॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ चतुर्पता अथर्वन् वेद उभा राहीन पोटी । निजरूप भुम्मा जागी करन सारी सृष्टी ॥



# चतुर्पता
# ॥ अथर्वन् वेद ॥

व

## ॥ श्रीकृष्णाजी महाराज श्रीक्षेत्र सावंगा-विठोबा ॥

यांचे संपुर्ण चरित्र ग्यान असलेले

# ॥ कृष्णांमृत ॥

सह

चतुर्पता अथर्वन् वेद च्या ४४४ पेक्षा जास्त संग्रहित केलेल्या
ओव्या, अष्टगण, अष्टशक्तीयॉ व
मुळावरच्या जुन्या ओव्या, अर्ज आरत्या ईत्यादी..

## शब्दार्थ, चरणार्थ निरसन स्पष्टीकरन सह





B: Blank Page2

## ।। चतुर्पता अथर्वन् वेद ।।

**या ग्रंथाची ही प्रत इंकजेट शाई ने प्रिंट केली असल्यामुळे, ग्रंथाचे पाने व त्या वरिल अक्षरांना पाणी न लागु देण्याची काळजी घ्यावी.**
**ही विनंती.**

या ग्रंथ/गाथा मधिल दोष निवारण करून,
हा ग्रंथ/गाथा अनमोल करण्यासंबधी,
आपले अनमोल सुचना/सुझाव.. ईत्यादी अवश्य कळवावे.
ही विनंती.
निरसनकार

F:

## ॥ पुर्णावतार श्री कृष्णाजी चे राउळ, श्रीक्षेत्र सावंगा-विठोबा ॥











| | | | |
|---|---|---|---|
| ॥ श्री कृष्ण महाराज धनी अवधुत ॥ देवस्थान, श्रीकृष्णाजी ची वाहोली श्रीक्षेत्र सावंगा-विठोबा ता.चांदुररेल्वे, जी. अमरावती, विदर्भ, महाराष्ट् | शक्ती पुंजन वहिनावाई देवस्थान जळगाव | कृष्णाजी-हेंगडुजी वाहोली वहिनावाई देवस्थान जळगाव | हेंगडुजी वाहोली हेंगडुजी देवस्थान जळगाव |

F:






माघ शुध्द पंचमी 01.02.2017

॥ संयुक्त प्रस्तुत पत्रिका ॥

श्री कृष्ण अवधुत देवस्थान, दांडेकर नगर, जांबरोड, वडगावरोड यवतमाळ
श्री कृष्ण अवधुत संस्थान, लोकमान्यनगर, कारंजालाड, जि. वाशीम.
श्री कृष्ण अवधुत संस्थान, लाडखेड, ता. दारव्हा, जि. यवतमाळ.
विदर्भ, महाराष्ट्र व्दारे संयुक्तिकरित्या प्रकाशीत

# ॥ चतुर्पता अथर्वन् वेद ॥

॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ ॥ च्या

चतुर्पती ओव्या भजने गायन...ईत्यादीला संयुक्तरित्या प्रस्तुत करून, स्फुर्ति देणारे

## ॥ चतुर्पती श्री कृष्ण अवधुत पंथ चे सहयोगी देवस्थाने, मंदिरे, राउळे, संस्थाने व प्रतिष्ठाणे ॥



।। श्री अवधुत मंदिर ।। चिरोडी, ता. चांदुररेल्वे, जि. अमरावती



।। श्री कृष्ण अवधुत संस्थान ।। श्रीक्षेत्र सावंगा–विठोबा ता. चांदुररेल्वे, जि. अमरावती



।। श्री ईश्वर–पुनाजी राउळ ।। श्रीक्षेत्र सावंगा–विठोबा जि. अमरावती



।। श्री अवधुत महाराज देवस्थान।। कारला, ता. चांदुररेल्वे, जि. अमरावती



।। श्री हेंगडुजी महाराज संस्थान।। जळगाव, ता. आर्वि, जि. वर्धा



।। श्री संत बहिनाबाई संस्थान।। जळगाव, ता. आर्वि. जि. वर्धा



।। श्री कृष्ण अवधुत देवस्थान।। जांबरोड, वडगावरोड ता. जि. यवतमाळ

पुढील पानावर..

..०२..

| | | | |
|---|---|---|---|
| ।। श्री अवधुत मंदिर ।। राजुरवाडी, ता. आर्वि, जि. वर्धा | ।। श्री कृष्ण अवधुत देवस्थान ।। माणीकवाडा ता. नेर, जि. यवतमाळ | ।। श्री कृष्ण अवधुत संस्थान।।, लोकमान्यनगर ता. कारंजालाड, जि. वाशीम | ।। श्री कृष्ण अवधुत मंदिर ।। दर्यापुर ता. दर्यापुर, जि. अकोला |
| ।। श्री कृष्ण अवधुत मंदिर ।। रहाट्गाव ता. अमरावती जि. अमरावती | ।। श्री कृष्ण अवधुत मंदिर ।। मंगरूळ दस्तगीर ता. धामणगावरेल्वे, जि. अमरावती | ।। श्री कृष्ण अवधुत संस्थान ।। लाडखेड ता. दारव्हा, जि. यवतमाळ | ।। श्री कृष्ण अवधुत राउळ ।। हरसुल ता. दिग्रस, जि. यवतमाळ |
| ।। श्री कृष्ण अवधुत मंदिर ।। सिंदखेड ता. नेर, जि. यवतमाळ | ।। श्री कृष्ण अवधुत मंदिर ।। मालखेड ता. अमरावती, जि. अमरावती | ।। श्री कृष्ण अवधुत मंदिर ।। पळसखेड ता. अमरावती, जि. अमरावती | ।। श्री कृष्ण अवधुत राउळ ।। (सावंगा ज्योत वाढल्याचे ठाणं ) नांदगाव शिवार ता. आर्वि जि. वर्धा |

व
विविध गावचे
।। श्री कृष्ण महाराज धनी अवधुत ।।
देवस्थाने, संस्थाने, प्रतिष्ठाणे, राउळे, मंदिरे व ठाणे..




॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

## ॥ चतुर्पता अथर्वन् वेद ॥

# ॥ अनुक्रमणिका ॥


| | | | | |
|---|---|---|---|---|
| ०१ | ०० | ०० | संयुक्तीक प्रस्तुत पत्रिका, | ०५ |
| ०२ | ०० | ०१ | कॉपिराईट व विवरण पत्रिका<br>अर्पण पत्रिका | ०८<br>११ |
| ० | ०० | ०२ | चतुर्पती चे पुर्णावतार दर्शन भाग ०१ | १५ |
| ०३ | ०० | ०३ | कृष्णांमृत : पुर्णावतार कृष्णाजी चे चरित्र दर्शन भाग ०२ | ३३ |
| ०४ | ०० | ०४ | चतुर्पता अथर्वन् वेद प्रस्तावना | ८३ |
| ०५ | ०० | ०५ | चतुर्पता अथर्वन् वेद प्रवेश | १०३ |
| ०६ | ०० | ०६ | चतुर्पता अथर्वन् वेद दशखंड अनुक्रमणिका | १११ |
| ०७ | ०० | ०७ | परिशिष्टे | १०८३ |
| ०८ | ०० | ०८ | ऋणनिर्देश व आभार, संदर्भ ग्रंथसुची व ईतर | ११२९ |




॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥




www.chaturpata-atharvan-ved.com

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

# ॥ चतुर्पता अथर्वन् वेद ॥

## ॥ विवरण पत्रिका ॥

| | |
|---|---|
| संयुक्तिक प्रकाशक/प्रस्तुत : | श्री कृष्ण अवधुत देवस्थान, जांबरोड, वडगावरोड, यवतमाळ.<br>श्री कृष्ण अवधुत संस्थान, लोकमान्यनगर, कारंजालाड, वाशिम.<br>श्री कृष्ण अवधुत संस्थान, लाडखेड, ता. दारव्हा, जि. यवतमाळ.<br>विदर्भ, महाराष्ट्र द्वारे संयुक्तिकरित्या प्रकाशीत<br>व<br>**॥ श्रीकृष्ण अवधुत देवस्थान ॥**<br>**सावंगा–विठोबा । जळगाव । कारला । यवतमाळ**<br>..ईत्यादी विदर्भ विभागातील श्री कृष्ण अवधुत देवस्थाने/संस्थाने/राउळे व मंदिरे यांच्या तर्फे संयुक्तिकरित्या प्रस्तुत |
| संकलक, संकलन मुद्रण, शब्दार्थ, चरणार्थ, निरसन–स्पष्टिकरन, मुख पृष्ठे चित्रांकन व संपादक | **निरसनकार** |
| प्रथम आवृत्ति प्रकाशन वर्ष : | माघ शुध्द पंचमी 01.02.2017 |
| प्रथम आवृत्तिचे प्रायोजक : | ..........................................................................<br>..........................................................................<br>यांनी वैयक्तिक/सयुंक्तपणे या ग्रंथाचे कलर प्रिंटिग च्या एकुन 100 प्रति प्रायोजीत करुन, या प्रतिंचे ग्रंथदान **श्री कृष्ण अवधुत देवस्थान,** ................ द्वारे संगठित **‘चतुर्पता अथर्वन् वेद वितरण व प्रसार समिती,** .............तर्फे खालील प्रमाणे वितरित करण्यात आले आहे. |

वितरण :

| श्री कृष्ण अवधुत देवस्थान, राउळे व संस्थाने | |
|---|---|
| • सावंगा–विठोबा देवस्थान | 10 प्रति |
| • कारला देवस्थान | 10 प्रति |
| • हेंगडुजी देवस्थान देवगाव | 05 प्रति |
| • बहिनाबाई देवस्थान जळगाव | 05 प्रति |
| • यवतमाळ देवस्थान | 10 प्रति |
| • ईतर ठिकाणचे देवस्थाने व संस्थाने व राउळे/मंदिरे | 15 प्रति |
| वाचनालये, व धार्मिक संस्था ईत्यादी | 15 प्रति |
| भजन मांडी व सत्संग मंडळे, स्वाध्याय केंद्र, अभ्यास केंद्रे, सत्संस्कार केंद्रे, श्रेष्ठ नागरीक संघ, प्रवचण व किर्तन शिक्षण केंद्रे.. ईत्यादी | 30 प्रती |
| एकुन वितरीत केलेल्या ग्रंथदानाच्या प्रति | 100 प्रति |

| | |
|---|---|
| ग्रंथ/गाथा उपलब्धता : | **॥ श्रीकृष्ण अवधुत देवस्थान ॥**<br>**।। सावंगा । कारला । जळगाव । यवतमाळ ।।**<br>ईत्यादी चतुर्पती अवधुत देवस्थान ने ग्रंथाकरीता निर्धारीत केलेली, त्या देवस्थान/संस्थान ची देणगी/दान पावती द्वारे, हा ग्रंथ गाथा त्या देवस्थानातुन उपलब्ध होवु शकतो. विकत मिळु शकतो. फक्त चतुर्पती श्री कृष्ण अवधुत देवस्थाने, संस्थाने, राउळे व त्यांच्या रजिष्टर समिती यांना हा गाथा विक्रि चा अधिकार आहे.<br>कृष्ण अवधुत देवस्थान/संस्थान/राउळ/मंदिर<br>................................... चे देणगी मुल्य : रु 751/– |
| कलर प्रिंटर | कृष्ण अवधुत पिओडी प्रिंटीग सर्व्हिस्<br>64, ओमनगर, आर्णिरोड, यवतमाळ. मो. 9527963564 |

ईतर माहीती : **Doc.** MS Office Word 2003 : Font Used :- Kruti Dev 140wide & 040 Wide; Paper : A4 size, Odd pg. num. printed on front side(F:) of paper, wheares Even pg.num. printed on back side(B:) of paper .

**Free Download : Print copy From :** http://www.chaturpata-atharvan-ved.com/pdf/00-00-00-00-CAV-PrintCopy

या ग्रंथाचा एक वेळा तरी श्री कृष्णाजी च्या बाहोली ला स्पर्श करावा. ही विनंति.

F:

# ॥ अर्पण पत्रिका ॥

॥ ज्या अनामीकाने आपणहुन आम्हा घरी येवुन,
हे अहीनाघरचे चतुर्पता निरंजन ग्यानांमृत पाजले,
त्या अनामीका च्या चरणी हा ग्रंथ/गाथा अर्पण ॥

।। आमचं काही नाही ईथे । सर्व काही आहे देवा तुझे/तुमचे ।।
।। तुमचेच फुल पुष्प देवा, तुम्हा वाहतो । निमित्या कारण आम्ही दर्शना येतो ।।
।। निमित्या कारण तुम्ही, धरला हात ।
तुमचीच ही वाणी देवा । तुम्ही सांगतली हद्यात/जगात ।।
।। वाणी जगात/हद्यात सांगतली । चतुर्पती नामाची ज्योत उजळली/प्रकाशली ।।
।। कृष्णराज महाराज । मालक होय गादीचे ।
गादीवरं येवुन, केलं याहीनं । चतुर्पता अथर्वन् वेदाचं रंचन ।।
।। अथर्वन् वेदाची मांडणी । सांगी सांगतली आकाशवाणी ।।
।। आकाशवाणी चा धनी आला । तोच सांगतो सर्व ग्यान अवघ्याला ।।
।। आकाशवाणीचा आला । शकुन/सांगी सांगन तो अवघ्या जनाला ।।
।। चतुर्पता अथर्वन् वेद, उभा राहीन पोटी । निजरुपी भुम्मा, जागी करन पृथ्वी ।।
।। अथर्वन् वेदाची गाही । दयाहो महाराजा, जागी करा पृथ्वी ।।
।। पृथ्वी तुमच्या अध्यान । याहो महाराजा करा यवगाचे काम ।।
।। यवग धरुन उभा राहयं । याहो महाराजा तुम्ही कराव संभाळ ।।
।। संभाळ संभाळ वचन । वचनी गोयले देवराया किसन ।।
।। वचन दिले मानवाले । मानवाची देवा कारुणा तुले ।।
।। कारुणेच्या सागरा, कारुणा कर । आम्ही अन्जान लेकरं, पदरी धर ।।
।। आम्ही अडाणी अडाणी । आम्हा हाती काही नाही ।।
।। अवघं तुमच्या हुकमात । हुकमा बिना पत्ता नाही हालत ।।
।। नाही हालत पत्ता । चवताळी आहे देवा तुमची सत्ता ।।
।। चौथ्या खुम्मी चवताळाचा मालक, उभा धनी । हे सर्व आहे याहीच्या अध्यानी ।।

।। बिर्द वाणी देवा तुमची होय । संभाळ करनं देवा, तुम्हा हाती आहयं ।।
।। नाही आम्हाशी गुरुग्यान । याहीच्या मोक्षाला हिरं ।
अजात या अहीनाला । डाग नाही जराभर ।।
।। गुरु चेला सिध्द साधक । येईना मनी ।
एकच जाणतो । माझा गुरुदेव आदीमुनी धनी ।।
।। तुच माझा गुरु । तुच माझा पिता ।
हे अवघं साहयं झालं । देवा तुमच्या हाता ।।
।। होत पुर्विचं संचित । म्हणुन घडली देवा, तुमची संगत ।।
।। कृष्ण संगतीचा लाभ । काहीतरी होता पुर्वजन्माचा भाग ।।
।। होता पुर्विचा दोरा । म्हणुन आलो देवराया च्या घरा ।।
।। आकाशवाणी दोरा हाती । चढुन गेले झेंडया वरती ।।
।। आदीमुनी महामुनी हाती । पाडल्या हो फरा-याच्या गाठी ।
राखन आहे आता देवराया श्रीपती ।।
।। सुटला शकुनाचा वारा । ऐसा बोले झेंडयाचा फरारा ।।
।। ऐसा बोले हो चौरंगी द्युत । हे होय लभेदाची किर्त ।।

।। आम्ही आहो पामर । घडले अपराध देवा माफ कर ।।
।। अपराध करा देवा माफ । तुच होय पुर्विचा बाप ।।

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥





F:

## ॥ प्रायोजकां करीता अर्पण केलेले पान ॥

॥ ज्याव्दारे कुणाचेही मन-आत्मा दुखविल्या जाणार नाही. अशी आपली सत् शव्द मांडणी, रंचना किंवा शुध्द सत् जाहीरात या एका पानाच्या को-या जागेवर करण्याची मान्यता **चतुर्पता अथर्वन् वेद** 'जसा आहे तसा' कलर प्रिंटिंग करणा-यां प्रायोजकां ला दिलेली आहे. या को-या पानाचा सद्उपयोग करावा. दुरूपयोग करू नये. ही विनंती. ॥

माघ शुध्द पंचमी २०१७
दिनांकः- ०१.०२.२०१७



# श्री कृष्ण अवधुत संस्थान

लोकमान्य नगर, ता. कारंजा–लाड, जि. वाशिम



## श्रीनाथ ईलेक्ट्रीकल्स ॲन्ड इंजीनिअरींग कॉन्ट्रक्टर
## ता. कारंजा लाड, जि. वाशिम

यांच्या सौजन्याने

## ॥ चतुर्पता अथर्वन् वेद ॥

या ग्रंथाच्या एकुन 41 प्रति
'जशी आहे तशी'
**श्री कृष्ण अवधुत पिओडी प्रिंटीग सर्व्हिस् यवतमाळ**
येथे कलर इंकजेट प्रिर्टीग करून,
या 41 प्रतिंचे ग्रंथदान
कृष्ण अवधुत देवस्थाने व संस्थाने, राउळे, मंदिरे, धार्मिक वाचनालये व धार्मिक संस्था, स्वाध्याय केंद्रे, सत्संस्कार केंद्रे, भजन मांडी व सत्संग मंडळे, आध्यात्मीक अभ्यास केद्रे, ..ईत्यादी ठिकाणी वितरित करण्यात आले आहेत.

या पैकी ही एक प्रत आपणास समर्पित करत आहोत.

**–: प्रायोजक :–**
**श्री कृष्णराव मारोतराव गाडगे**
**श्री रामदास मारोतराव गाडगे**
कारंजा (लाड), जि. वाशीम । मो. 75 88 5005 89 / 38

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ चतुर्पता अथर्वन् वेद ॥

चे संयुक्त प्रकाशक

व्दारे संगठित

# चतुर्पता अथर्वन् वेद वितरण व प्रसार संस्था

**यवतमाळ**

चे

**प्रमुख उद्देश**

**।। संस्थेचे प्रमुख उद्देश ।।**

- चतुर्पता अथर्वन् वेद चे वितरण व प्रसार करुन, चतुर्पता निरंजन ग्यान, आत्मोपदेश, आत्मग्यान, कायाग्यान, देहे-जीवांचे ग्यान विज्ञान, आत्मग्यान, योगग्यान, सत्कृत्य मार्गोपदेश, सत्संस्कार.. ईत्यादी चतुर्पती ग्यान चा जनलोकांत प्रचार करुन, या चतुर्पता ग्यानाव्दारे जनलोकांचे सत्याकडे लक्ष्य वेधुन, सत्य ज्ञान बीज दाखवुन, त्यांना सत्याकडे प्रेरित करुन, चतुर्पतीच्या सत् कृत्य मार्गि लावणे. सत्याची ज्योत चढवण्यास साहयं करुन, स्वतः व्दारे स्वतःची ओळख करुन देवुन, सत्य धर्म मार्गि लावण्यास प्रयत्न करत राहणे.

- चतुर्पता ग्यानाव्दारे देहं-जीवांच्या उन्नत्ती करिता भक्त जनलोकात मानव नितीमत्ता, मानव धर्म व वर्म, समसमानता, सिदाई व सत् शिष्टाई, सत् आचार विचार ..ईत्यादी सत् गुण उन्नत करुन, त्यां सत्गुणांच्या वाढीकरीता सत् जनांस एकास एक एकत्रित करुन, त्यांच्याव्दारे जनलोकांत सत्संस्कार व सत्य, ज्ञान भक्ती, औदार्य, दया, क्षमा, शांती, क्रिया व करुणा, नम्रता .. ईत्यादी सत्गुणांची संप्पन्नता आणण्याचे कार्यास साहयं करने. भक्त जनांत सत्य ज्ञानसंप्पन्नता, सत्य ध्यान ज्ञान भक्ती आणण्यास प्रयत्नरत् राहणे.

- याकरिता चतुर्पता अथर्वन वेद चे चतुर्पती ग्यान देणारे स्वाध्याय केंद्रे, अभ्यास केंद्रे, वाचनालये, प्रवचन व किर्तन चे शिक्षण केंद्रे, सत्संस्कार केंद्रे, भजन मांडी व सत्संग मंडळे,.. ईत्यादी स्थापित करुन, त्यांना निरंतर चालणा देण्याकरीता प्रोसाहनात्पर साहय व आर्थिक मदत करने. तसेच चतुर्पता अथर्वन् वेद चे ग्यान देणारे, सत्य ध्यान, ग्यान, भक्ती मार्ग दाखवणारे.. प्रवचणे व किर्तने, भजन मंडळे यांचे कार्यक्रम शहरे व खेडयापाडयात आयोजीत करने......ईत्यादी या संस्थेचे प्रमुख उद्देश आहेत.

॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ चतुर्पता अथर्वन् वेद उभा राहीन पोटी । निजरूप भुम्मा जागी करन सारी सृष्टी ॥

# चतुर्पता
# ॥ अथर्वन् वेद ॥

॥ चतुर्पता पुर्णावतार दर्शन भाग ०१ ॥

## ॥ चतुर्पती पुर्ण अवतार प्रारंभिक दर्शन ॥



## शब्दार्थ, चरणार्थ निरसन स्पष्टीकरन सह



॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ ॥



चतुर्पता
अथर्वन् वेद



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

www.chaturpata-atharvan-ved.com

॥ पुर्णावतार दर्शन भाग नं. ०१ ॥

॥ चतुर्पतीचे पुर्ण अवतार दर्शन ॥

# ॥ चतुर्पती पुर्ण अवतार प्रारंभिक ग्यान दर्शन ॥

मिर्त लोकी आकाराला विशेष महत्व दिल्या गेलेले आहे. कारण आकारालाच साधन मानल्या गेले आहे. परंतु आकार हा नाशीवंत असुन त्याला काही विषेश मर्यादा असल्यामुळे, आकाशमात मधील सुक्ष्म सृष्टीत आकाराला विशेष महत्व नाही. आकाशमात मध्ये निराकाराला जास्त महत्व आहे. आकाशमात मध्ये संचारीत असलेले आध्यात्मीक विश्व हे सुध्दा निराकार निर्गुण आहे. या निराकार निर्गुण विश्वाचा परमात्मा हासुध्दा निराकार निर्गुण आहे. हा अमर्याद परमात्मा निराकार-निराधार निशंःकलंकी निरंजन चैत्यन्य ज्योतीर्मय रूपात सोयंम् उभा आहे. या सत्य देवालाच आपरूप असेही म्हटल्या गेले आहेत. देहीत हेच आपरूप अंश रूपात आहे.

निराकार-निराधार निशंःकलंकी निरंजन चैत्यन्य ज्योतीर्मय सोहंम् ज्योतरूप परमात्मा यालाच संपुर्ण विश्वाचा आद्य पुरुष, आदीपुरुष, प्रथम पुरुष, पुराणपुरूष म्हणुन संबोधल्या गेले आहे. तसेच तो सर्व सृष्टीचा सर्वप्रथम आधीचा निराकार निशंःकलंकी निर्गुण परमात्मा आहे. *'अव'* म्हणजे आधीचा आणी *'द्युत'* म्हणजे माव/लिला रंचुन खेळ खेळणारा ! असे दोन शब्द मिळुन *अवद्युत* असा शब्द तयार झाला आहे. सर्वप्रथम मुळावरचा खेळ खेळणारा निराकार निराधार निर्गुण धनी ला अवद्युत या नामाने संबोधल्या गेले आहे. मुळावरचा खेळ खेळणा-याच्या अवद्युत या नामातील पुढे *द्य* चा *ध* असा उच्चार होवुन धुत उच्चार झाला. *'धुत'* म्हणजे धुणारा, निशंःकलंकी करणारा परमात्मा.. असे त्याचे वेगवेगळे अर्थ वेगवेगळ्या बुध्दिनुसार निघु लागलेत. याही पुढे काही जन ध चा द करून *'धुत'* चा *'दुत'* असा उच्चार करु लागलेत. *'दुत'* म्हणजे संदेशवाहक ! संदेश देणारा, शकुन देणारा, आकाशवाणी व्दारे संदेश देणारा, आकाशवाणी करणारा परमात्मा असा अर्थबोध होवु लागला. असो.

अश्याप्रकारे जरी नाम अनंत उच्चाराचे व वेगवेगळ्या अर्थाचे असले, तरी हाच पिंडी या ब्रम्हांडी चा सर्वात मोठा/महा देव होय. म्हणुनच या परमात्मा धनी ला शिव असे म्हटल्या गेले आहे. म्हणुनच अवधुत म्हणजे निर्गुण निराकार असेही म्हटल्या जाते. देहीचे कलंक धुवुन निश्कलंकी होवुन जो देहीच्या निर्गुण निरंजन अवतार जिवाचे या शिवाशी लग्न लावतो, तो आदीचा मुळावरचा खेळ जाणुन खेळ खेळणारा अवधुत योगी होतो. हा अवधुत योगी चैतन्य च्या चौकीवर विराजमान होतो. गगणी विहार करत आकाशावर चढुन सुध्दा आपले आसन सोडत नाही. अत्यंत पोहचलेला असुन सुध्दा लहानपण धरून राहतो. अहंकारी नसतो. कोणास ओळखु नाही येत. हा अवधुत योगी त्यांच्या देहरूपी वृक्षावर राहुटी केलेल्या लुंडमुंड असलेल्या निराकार हंस पक्षी म्हणजेच आत्म्यांचा बिना पायाच्या नाच, बिना हाताचा ताल, बिना जिभेचा नाद-गान ऐकत पहात तल्लीन राहतो. ब्रम्हाग्नी भडकवत त्यामध्ये कायेचे हवन करत जलजलाट करत राहतो. त्रिकुटी संगम मध्ये जागी राहुन हिशोब पाहत राहतो. म्हणुनच या अवधुत योगी ला कबिर आपला गुरू मानत म्हणतो की :

॥ अवधु जोगी जगमे न्यारा । मुद्रा निरति-सुरती करी सिंगीनादन् खडे धारा । बसे गगणमे वृत्तिन दैखे चेतनी चौकी वेढा । चढी आकाश पर आसन नही छोडे । पावे महारस मिठा । परगट कथा मौहै जोगी दिलमें दरपन जौयं । सहस्त्र एक्कीस छैसौ धागौ निहचलें नौके पाये । ब्रम्ह अग्नीमें काया जारे । त्रिकुटी सगंमे जागैं । कहे कबिर सोई जोगेश्वर सहज मुनील्यां लागैं ॥ अवधु सो योगी गुरू मेरा । जो या पढको करे निबेरा.. ॥ कं ग्रं पद ६०, १६७. असो.

हा अखंड मेघाप्रमाणे असलेला आदीरूप आदीपुरूष अनंत विश्वांचा परंम आत्मा आहे-०१-०१-०१. म्हणुनच याला परमात्मा असे संबोधतात. हा आदीरूप आदीपुरूष परमात्मा धनी :

- आकार नसलेला निराकार तसेच आधार नसलेला निराधार आहे.
- कलंक नसलेला निश्कंलकी तसेच डाग नसलेला बेडाग गव्हर आहे.
- गुणातीत असलेला निर्गुण असुन काजळी नसलेला निरंजन आहे.
- अयन नसलेला निराकार नारायण आहे.
- स्वतःहुन आपरूप उभा झालेला/असलेला सोयंम् परमात्मा आहे.
- हा स्थिर असुनही वेळ पडल्यास अति चंचल होणारा अनामत होय.
- हा *निराकार-निराधार निशंःकलंकी निरंजन चैत्यन्य ज्योतीर्मय आदीपुरूष परमात्मा* धनी या मिर्तलोकी विविध आकारी देहरुपाचे वस्त्र/वेष म्हणजेच हिंदीत भेष/पहेराव-वेषभुशाएँ धारण करत असल्यामुळे, या आदीरूप आदीपुरूष परमात्मा धनीलाच अनंत भेष धारण करणारा ‘भैष‘ या नामाने चतुर्पती पंथाच्या भुम्मेवर संबोधील्या गेलेले आहे.
- हा अनंत भेष धारण करणारा भैष धनी एकच देहरुपी वेष/भेष न घेता विविध रुपी-आकारी देहरूपी वस्त्राचे वेष/भेष परिधान करत असल्यामुळे, या धन्याला एकवचनी भेष या नावाने न संबोधता अनेकवचनी भैष/भैस या नामाने आकाशमात मध्ये तसेच चतुर्पती पंथाच्या भुम्मेवर सर्वत्र संबोधल्या जाते. या भैष धनी बध्दल चे अधिक ग्यान आता घेवु या !

**भैष चा अर्थ** :- ‘‘यवगाच्या एका ठरावीक कालावधीत, विविध ठिकाणी विविध देहरूपी वेष म्हणजेच हिंदीत भेष पहेराव, वेषभुशाएँ धारण करतो. आणी एकाच अथवा विविध समयात एकाच अथवा विविध ठिकाणी विविध देहरुपी वेष धारण केलेल्या अवतारांच्या समुदायात, निराकार-निराधार निशंःकलंकी निरंजन चैत्यन्य ज्योतीर्मय सोहंम् स्वरुपात अंतर्भुत होवुन, त्यांना भरून भरतो आणीक उरतो. चतुर्व्युह रूप रंचनेत अवतरुन विविध देही धरत खेळ खेळणारा परीपुर्णतमपुर्ण अवतार म्हणजे आदीरुप आदीपुरुष भैष धनी परमात्मा होय.

**परमात्मा भैष धनी चे संक्षिप्त व्याख्यार्थ** :-

परमात्मा भैष/भैस धनी म्हणजे :

- आदीरूप निराकार-निराधार निशंःकलंकी निरंजन ज्योतीर्मय आदीपुरुष नारायण चतुर्पती धनी होय.
- जो कोणत्याही प्रकारच्या एका देहित पुर्णतः सम्मावु शकत नाही.
- जो एका विशिष्ट कालावधीत विविध ठिकाणी विविध आकारी देहरुपाचे वस्त्रे परिधान करून विविध देहरूपी वेष म्हणजेच हिंदीत भेष पहेराव, वेषभुशाएँ धारण करत देही धरतो. अनंत भेष धारण करत विविध देहरूपी वेष धारण केलेल्या अवतारांच्या समुदायात निराकार-निराधार निशंःकलंकी निरंजन चैत्यन्य ज्योतीर्मय स्वरुपात अंर्तभुत होवुन आपला खेळ खेळत राहतो.
- हा भैस जेव्हा आपला परिपुर्णतमंपुर्ण अवतार घेतो, तेव्हा तो चतुर्व्युह रुपांची रंचना साधुन सर्व शक्तीयाँ, सिध्दगणसह अठरा खेंत्री द्युतगण व ईतर सर्व ला संग घेवुन आपला परिपुर्णतमपुर्ण अवतार घेत असतो.
- जेव्हा जेव्हा चतुर्पती आदीपुरुष भैस नारायण हा परीपुर्णतम पुर्ण अवतार घेतो, तेव्हा तेव्हा तो भैष धनी आपल्या परीपुर्णतम पुर्ण अवतार कार्यात विविध प्रकारच्या कार्यसिध्दि करण्यासाठी :एकाच देहिची रंचना न करता चार चार देहरुपांची व्युह रंचना करतो. म्हणजेच चतुर्व्युह रूपांची रंचना करतो. चतुर्व्युह रूपांच्या अवतारां पैकी एक अवतार हा पुर्ण अवतार असतो.

• जेव्हा भैष धनी हा चतुर्व्युह रूपांच्या अवतार रंचने सह अठरा खेत्री द्युत, भक्तगण, देवगण, ऋषी-मुनी, संत-महात्मे, जाणते-ज्ञानी.. ईत्यादी अवतारांच्या फौजे मध्ये ज्योर्तिमय स्वरूपात अंतर्भुत होवुन परिपुर्णतम्पुर्ण अवतार घेवुन अवतरतो, तेव्हा त्यां चतुर्पती धन्याचे अवतरण चतुर्व्युहरूपांच्या चौदेही सह पुढे-मागे अवतरलेल्या सर्व अवतारांच्या समुहात संचारीत होवुन, त्यां सर्वांना तो भरुन भरतो आणीक उरतो. म्हणुनच जेव्हा जेव्हा तो आदीरुप भैस परमात्मा परिपुर्णतमपुर्ण अवतार घेत असतो, तेव्हा तेव्हा त्यांच्या दिव्यसेवेसाठी तसेच त्यांचा माया-मोहनीचा खेळ पाहण्यासाठी किंवा भैसाच्या खेळात सामील होण्यासाठी व ईतर दिव्य कार्यासाठी देवगण, भक्तगण सह ईतर सिध्दगण व अवतारगण त्यांच्या संग किंवा पुढे-मागे अवतरत राहत असतात.

• भैसाच्यां ज्योती मध्ये सर्व अवतारांचे संपुर्ण तेज सम्मावुन, त्या अवतारांच्या ज्योती मध्ये या भैस अवताराची ज्योत खेळत राहते.

• चतुर्व्यह रूपांच्या रंचनेतील चार देहीचा पती, माया व तिन देवांचा पती सह सर्वत्राचा पती भैस धनी असल्यामुळे या आदीरूप आदीपुरूष भैस परमात्म्यालाच **चतुर्पती धनी** असे संबोधल्या गेले आहे.

.

अश्या प्रकारे तो भैष परमात्मा यवगान यवगात एकाच कालावधीत विविध आकारी देहरुपात, विविध ठिकाणी निराकार-निराधार निशंःकलंकी निरंजन चैत्यन्य ज्योतीर्मय स्वरुपात खेळतो. चतुर्व्युह रुपांची रंचना करतो. आपले अठरा खेत्री द्युत, भक्तगण, देवगण, ऋषी-मुनी, संत-महात्मे, जाणते-ज्ञानी.. ईत्यादी ची फौज घेवुन, या सर्व अवतारांच्या समुहात त्यांचे अवतरण संचारीत होवुन त्यांना भरुन भरतो आणीक उरतो.

या पुढे ईथे '*आदीरूप आदीपुरूष आदीगण निराकार निराधार निश्कलंकी निरंजन ज्योतीर्मय आदीपुरुष नारायण धनी*' यांना '*आदीपुरुष*' या '*आदीभैष*' *किंवा* '*भैष/भैस*' 'नारायण' 'परमात्मा' किंवा '*चतुर्पती*' '*धनी*' यापैकी एका अथवा अनेक नामाच्या शब्द समुहाने संबोधल्या गेलेले आहे.

असा जो तो भैष नारायण धनी परमात्मा जेव्हा फक्त एकाच देहित ज्योतीर्मय स्वरुपात अवतरतो, तेव्हा तो १. अंशाश अवतार २. अंश अवतार ३. आवेश अवतार ४. कला अवतार यापैकी एक अवतार घेत राहतो.
उदाहरणार्थ : मरीची ईत्यादी त्या आदीपुरुषाचे अंशांश अवतार होय. ब्रम्ह ईत्यादी त्या आदीपुरुषाचे अंश अवतार होय. कपील व कर्मप्रभुती ईत्यादी त्या आदीपुरुषाचे कला अवतार होय. परशुराम ईत्यादी त्या आदीपुरुषाचे आवेश अवतार होय. नृसिंह नर-नारायण ईत्यादी त्या आदीपुरुषाचे आवेशावतार होय.

परंतु तो परमात्मा जेव्हा परिपुर्णतम्पुर्ण अवतार घेतो, तेव्हा तो चतुर्व्युहरूपांच्या चौदेही पैकी एका देहीत पुर्ण अवतार घेतो. तो पुर्ण अवतार त्याचा पुर्णात्मा असतो. या पुर्ण अवतार संग भक्तांत्मा चा संच हा त्यांची भक्ती करण्यासाठी सदा संग अवतरत असतो. चतुर्व्युहरूपांच्या चौदेही सह पुढे-मागे अवतरलेल्या अवतारांच्या समुहात सह सर्वत्रात तो निरंजन धनी ज्योतिर्मय स्वरूपात अंर्तभुत होवुन त्यांना भरून भरतो आणीक उरतो. एकाच समयात विविध ठिकाणी आपले अनेक खेळ खेळत राहतो.

म्हणुनच असे म्हटल्या गेले आहे की : जेथे परमात्मा चा पुर्णावतार असतो, तेथे चतुर्व्युहरंचने सह नउ रसांची अभिव्यक्ती दृष्टीगोचर होते. तसेच तिथे युगपालट, युगसंग्राम, शौर्य, बल, पराक्रम ची परिकाष्ठा सुध्दा दृष्टीगोचर होत असते. संदर्भः-गर्ग/गोलोकखंड/अध्याय०१/श्लोक१६-२७

ज्याच्या स्वतःच्या तेजोर्मय ज्योतीत अन्य संपुर्ण ज्योतीचे तेज विलीन होते, त्या अवताराला परिपुर्णतमपुर्ण असे म्हटल्या गेलेले आहे. परिपुर्णतमपुर्ण अवतार म्हणजे या सर्व अवतारांच्या समुहात केवळ चैत्यन्यमय सोहंम् ज्योत स्वरूपी भरून भरलेला आणीक उरलेला असलेला कैवल्यनाथ आदीपुरूष भैस नारायण होय. मानव त्या अखंड परमात्माला खंडीत करून ज्याला जशी आवडी असेल, तश्या पृथक-पृथक भावाच्या अनुसार आपल्या परंमप्रिय रुपात पाहुन भजतो.

प्रतेक यवगात परिपुर्णतमपुर्ण अवतार हा एकला आदीपुरुष भैष नारायण आहेत. म्हणुनच असे म्हटल्या जाते की : ज्या अवतारात पुर्ण चे लक्षण दृष्टीगोचर होते. जो एका कार्याच्या उध्देशाने अवतरुन यवगा यवगाचे अन्यन्य अनेक करोडो कार्याचे संपादन करतो. तो पुर्ण अवतार सह अवतरलेल्या सर्व अवतारांच्या समुहात निरंजन ज्योतिर्मय स्वरूपात अंर्तभुत झालेला आदीपुरुष भैस धनी परमात्मा चा साक्षात परिपुर्णतमपुर्ण अवतार होय. उदाहरणार्थ : श्रीराम, श्रीकृष्ण, श्रीकृष्णाजी हे त्यांचे पुर्ण अवतार होय. श्रीकृष्णाजी च्या पुर्ण अवतार चे ग्यान पुर्णअवतार दर्शन भाग-०२ :- कृष्णांमृत मध्ये दिलेले आहे.

आदीपुरुष भैष नारायण हा आपल्या परिपुर्णतमपुर्ण अवतार कार्यात त्यांच्या संग व पुठे-मागे अवतरलेल्या सर्वात ज्योतीर्मय स्वरुपात भरुन भरलेला आणीक उरलेला असतो. तो धनी मुळयवगापासुन कृथा-त्रैता-व्दापर व कली या चौयवगाचा संधीकाळात उभा राहलेला आहे. आदीपुरुष भैस धनीदेवानें यवगान यवगात शुध्द बोलनं केलेले आहे. प्रतेक यवगातील परमात्मा धनी च्या परिपुर्णतम्पुर्ण अवतार कार्य सह त्यांचे चतुर्व्युहरंचनेचे ज्ञान घेवु या !

**१. कृथा यवग** :-

॥ आधी उभे नारायण । मग घडले सगुण-निर्गुण ।
तेथुन झाले देवांगण ॥ खंड०५/ओवी-०१
॥ कृथा यवगी राज देवाने, नेले किर्तित ।
त्रिगुणांच्या हवाला देल्ली याहीनं रहीत ॥ ..खंड०५/ओवी-२७

कृथायवगात जेव्हा तो आदीपुरुष भैष नारायण हा परीपुर्णतमपुर्ण अवतार घेवुन अवतिर्ण झाला, तेव्हा त्यांनी चतुर्व्युह रुपरुपांची रंचना करुन ईश्वरी काया, ईश्वरी मायासह सिध्द-शक्तीयॉ, मायाचैत्यन्या, आदीमाया, ब्रम्हा-विष्णु-महेष, ऋषी-मुनी, योगी-भक्त, देवगण व अठरा खेत्री द्युतगण ईत्यादी च्या रुपात सम्मावुन त्यांना भरुन भरला आणीक उरला आहे. कृथामध्ये त्याने चतुव्युहरूपाची रंचना अशी केली होती.

**१. आदीमुनी २. ब्रम्हा ३. विष्णु ४. महेश आणी शक्ती !**

प्रथम यवगात या सर्व अवतारांच्या समुहात विविध ठीकाणी त्या सर्व रुपांच्या आत निराकार-निराधार निशंःकलंकी निरंजन ज्योतीर्मय स्वरुपात संचरत खेळला. सर्व खेळ खेळणा-यां द्युतांचा पती म्हणजेच द्युतपती चा मान त्याने विष्णुला दिला. ज्याला अयन-आकार नाही अश्या नारायणाने म्हणजेच मुळयवगाचा आदीपुरुष भैष नारायण परमात्मा यांनी आपल्या स्वतःच्या मानाचा प्याला चे देणं विष्णुरुपाला दिले.

उदाहरणार्थ : जसा शनीदेवाने हनुमंताला स्वतःचा मानाचा प्याला दिला. आणी घोषीत करुन देणं दिले की : "जो कोणी हनुमंताची पुजा-अर्चना भक्ती

करेल, त्याच्या त्याच भक्तीने हा शनीदेव प्रसन्न होईल. हनुमंताची पुजा-अर्चना भक्ती केली की माझी पुजा-अर्चना भक्ती आपरुप होईल. त्याला शनीची वेगळी पुजा-अर्चना भक्ती करण्याची गरज राहणार नाही.'' असा शनी ने आपल्या मानाच्या प्यालाचे देणं हनुमंताला दिले. आणी स्वतः लहानपण घेतलेले आहे. लहानपण घेवुन या नरदेहीला वज्र प्रमाणे कणखर बनवण्याचे कार्य शनीदेव करत आहे.

याच प्रमाणे प्रथम यवगाच्या आरंभी व अनंत यवगाच्या अंती आदीरूप आदीपुरूष भैस परमात्मा हा आदीमुनी रुपात आकारी आला. या आदीमुनी ने सत्वगुणांचा राजा विष्णुला स्वतःचा मानाचा प्याला दिला. आणी घोषीत करुन देणं दिले की : ''जो कोणी सच्ची पुजा-अर्चना भक्ती करेल, त्याच्या त्याच सच्च्या भक्तीने हा धनीदेव प्रसन्न होईल. कुणीही कुणाचीही सच्ची पुजा-अर्चना भक्ती केली की माझी पुजा-अर्चना भक्ती आपरुप होईल. चतुर्व्युहरंचनेतील पुर्णावतार चा मान विष्णुला भेटेल.'' असा चतुर्पती धनीदेव आदीमुनी ने आपल्या मानाच्या प्यालाचे देणं विष्णुला दिले. सत्वगुणांचा राजा विष्णुला पुर्णात्माचा शिल्ला तिन यवगाकरीता दिलेला आहे. आणी स्वतः 'बरे गा माझे लहानपण' असे म्हणत लहानपण घेतलेले आहे.

तेव्हापासुन यवगान यवगात लहानपण घेत तो आकाशवाणीचा आदीपुरुष परमात्मा फक्त सच्या भक्तीभाव वर प्रसन्नं होवुन भक्तीकर्ताला त्याचे ईच्छीत देणं आपरुप देत राहीला आहे. जिथे सच्ची भक्ती भाव असेल, तिथे तो आपरुप स्वतःहुन उभा राहीला. भक्तीकर्ता ज्या देहरुपाची सच्ची भक्ती करत असेल, त्या देह-रुपांमार्फत त्या भक्ती-कर्ताला त्याचे ईच्छीत देणं आपरुप देत राहीला आहे.

परंतु आपल्याला कोण्या सत्य धनी देवानं देण दिले ? याचे ज्ञान त्या अन्जान भक्तीकर्ता ला नसल्यामुळे तो भक्तीकर्ता स्वतःला जे काही देणं मिळालेले आहे, ते देणं त्या आकारी देह-रूपाने दिले आहे; असे मानु लागला. तो अन्जान भक्तीकर्ता ज्या आकारी देहरूपाची भक्ती करत होता, त्या आकारी देह-रुपाला मान देत राहीला. ऐश्या रितीने आदीपुरूष आदीमुनी परमात्मा च्या मुळच्या वचनाव्दारे मानाचे प्याला चे देणं आकारी देह देवतांना मिळु लागलेत.

यवगान यवगातील सच्च्या भक्ताला कोणं देणं दिलेले आहे ? याचे ज्ञान तो भक्त ज्या आकारी देह-रुपाची भक्ती करत होता त्या देह-रुपालाच ठाव ! भक्ताला देणं देणा-या चौथ्या चतुर्पतीचे ज्ञान भक्तापर्यत पाहचवु न देण्याची तत्कालीन व्यवस्था तेथे मायादेवता सह तिन देवांनी केली होती. त्यामुळेच भक्त ज्या रुपांची भक्ती करत होते, त्या रुपानेच आपल्याला देणं दिले. असे मानुन त्या आकारी रुपांच्या देवतेची दृढतेने भक्ती करु लागलेत.

सच्च्या भक्ताने कल्पिलेल्या आकार हा साकार करून, त्या साकारी दृष्ययमान रुपांच्या आत उभा राहुन सच्च्या भक्तांना देणं देणारा चैत्यन्य ज्योतीर्मय स्वरुपात उभा असलेला आदीपुरुष भैष नारायण चतुर्पती धनी होय. परंतु यां देण देणा-या धनीदेवा पर्यंत त्या भक्तांची ज्ञान दृष्टी मायेच्या पडदयामुळे पोहचल्या गेली नाही. सर्वसामान्य भक्तजनांची दृष्टी त्या देह-रुपांच्या आकारावरच मायेव्दारे स्तंभित केल्या गेली होती. सत्तास्थापनेच्या कारणास्तव मायेसह तिनदेवांनी तिरगुणांची झापड त्यांच्या दृष्टीवर टाकुन सर्वसामान्यांची दृष्टी तिरगुणांवर खिळवल्या गेली होती.

जे चतुर्पतीज्ञानी तिरगुणी स्वतःची पुजा-अर्चना व भक्ती करण्याचे सांगत होते, त्यां सर्वांना चौथा चतुर्पति ज्योतीर्मय आदीपुरुष भैष नारायण चे परंमज्ञान होते. चतुर्पती ची शिष्टाईचे ग्यान होते. त्याचमुळे त्यांनी सर्वसामान्य जनास ज्योत लावुन कर्मकांड करण्याचा नेम घातला. निरंजन ज्योत लावुन कर्मकांड करण्याची प्रथा पाडली. सर्वसामान्य जनलोकापासुन चतुर्पतिचे ज्ञान लपवुन त्याच चतुर्पती आदीपुरूष धनी चे प्रतिक स्वरूपात निरंजन ज्योती समक्ष आपले पुंजन भक्तजनांकडुन करवुन घेवु लागलेत. ज्याला सच्ची भक्तीच प्रिय आहे, त्याच्या समोर सच्च्या भक्ती-भावाची ज्योत लावुन भक्तीचा सांड होवु लागल्याने तो चतुर्पती धनी परमात्मा आपरूप पावन होत होता. सच्च्या भक्ताला देणं देत होता.

तेथे कर्ता, धर्ता, करविता, देणं देणारा दाता तो चौथा निरंजन परमात्मा धनी होता. परंतु मायादेवतेसह तिनदेवांनी केलेल्या या व्यवस्थेमुळे भक्ताला देणं देण्यांचा मान या तिरगुणीं देवतेला आपोआप मिळत होता. भक्त मिळवुन सत्ता चालवण्यांकरीता त्या चतुर्पती ग्यानी तिरगुणींना काहीही करण्याची आवश्यकता नव्हती. फक्त एकच आवश्यकता होती ती म्हणजे चतुर्पती निरंजन धनी चे चतुर्पता ग्यान भक्तापासुन लपवुन ठेवणे.

सर्वजन त्या निरंजन चैत्यन्य ज्योतिर्मय आदीपुरुष भैष नारायण चे प्रतिक स्वरुपात निरंजन ज्योत लावुन त्याच्या समोर पुजा-अर्चना व भक्ती व कर्मकांड ईत्यादी सत्कर्म चा सांड करत होते. अप्रत्यक्षपणे चतुर्पतिचे पुंजन करत होते. परंतु या चतुर्पती धनी च्या प्रतिक स्वरूपात लावलेल्या निरंजन ज्योतीचे चतुर्पती ज्ञान मायेसह तिनदेवांनी सर्वसामान्य जनलोकास सहजासहजी दिलेले नाही ! हे दुःख सांगु तरी काय ?

ऐसे भक्तजन जे ईतर दैवतेची भक्ती व ईतर कर्मकांड नेमाने ज्योत लावुन करतात. ज्या ज्योतीची भक्ती व ईतर कर्मकांड व्दारे पुंजन करतात. ती निरंजन ज्योत कुणाची ? चतुर्पति धनीदेवाचीच ! परंतु चतुर्पति च्या निरंजन ज्योतीचे यथार्थ ज्ञान नसल्यामुळे त्यांची चौथी अवस्था प्रकाशीत झाली नाही. व त्याचमुळे त्यांची ही आराधना, भक्ती मायेच्या मायावी अज्ञानाने ग्रासली राहते.

परंतु हे सर्व अन्जान सच्चे भक्तगण प्रेमाने सतत भक्तीकार्यात निमग्न राहत आपल्या अंर्तगत सच्च्या भक्ती-भाव ची निरंतर ज्योत लावतो. ज्याला सच्ची भक्ती अत्यंत प्रिय आहे; असा जो तो फक्त सच्च्या भक्ती-भावाला पावणारा चतुर्पती आदीपुरुष भैष नारायण हा सच्च्या भक्तांने आपल्या अंर्तगत लावलेल्या सच्च्या भक्ती-भाव च्या निरंतर ज्योतीव्दारे नित प्रसंन्न होत असतो. त्या धन्याला सच्ची भक्ती अत्यंत प्रिय आहे. तो फक्त सच्च्या भक्ती-भावाला पावणारा ! मग ती भक्ती कोणीही कुणाचीही करो ! तिथे तो पावतो. आणी त्या भक्ताला देणं देण्यासाठी आपरुप स्वतः उभा राहुन देणं देत राहतो. हे देणं 'यादृष्शी भावना तस्यस सिध्दिर्भवति' (जशी ज्याची भावना, त्या भावनेनुरुप फलसिध्दी) या न्यायाने त्या भक्ताने भजलेल्या आकाराचे रूपा मार्फत तो धनी देणं देत राहतो. तो असा :

चतुर्पती आदीपुरुष निरंजन धनी परमात्मा हा आपला तेजोगुणी अशं अवतार घेवुन सर्वांच्या अंतरी हा आत्माराम बनुन उभा आहे. सर्वांच्या शेजारी तो उभा आहे. सर्वांच्या अंतःकरणात तो वसलेला आहे. त्याचमुळे कुण्याही भक्तजनास कुण्याही देवतेची भक्ती, उपासना, आराधना व ईतर सत्कर्म करण्याची ईच्छा होताच, तो त्या भक्ताच्या ईच्छापुर्ततेसाठी त्या भक्ताची श्रध्दा

त्याने कल्पिलेल्या आकारी देवतेच्या रूपावर स्थिर करतो. चतुर्पती निरंजन धनी परमात्मा च्या याच शिष्टाई मुळे तो भक्त त्याच्या ईच्छेनुरुप कोणत्याही विशिष्ट देवतेची भक्ती आराधना करण्यास स्वतःला समर्पित करु शकतो. असा श्रध्देने युक्त झालेला आपल्या विशिष्ट देवतेची कृपा संपादन करण्यासाठी प्रयत्न करतो. या प्रयत्नात तो सर्वप्रथम त्याच्या नकळत अजाणतेने आदीपुरुष भैष नारायण निरंजन धनी चे प्रतिक स्वरुपात सत्भाव-भक्ती ची ज्योत अंतरी लावतो. सद्भावाची ज्योत अंतरी लावुन मनी कल्पिलेल्या विशिष्ट देवतेची नेमाने भक्ती आराधना करतो.

देहरूपी दिवनालीत चैत्यनेचे तेल ओतुन त्यात एका भावाची वात लावुन, निरंतर अखंडीत समयबध्द निरंजन चैत्यन्य ज्योत लावुन, त्या ज्योतीसमोर तो भक्त भक्ती-भावाचा सांड करु लागतो. ज्याला भक्ती अत्यंत प्रिय आहे. जो फक्त सच्च्या भक्ती-भावाला पावणारा आहे. असा जो तो परमात्मा आदीपुरुष भैष नारायण त्या भक्ताच्या भक्ती-भावाच्या ज्योतीवर प्रसन्न होतो. आणी तिथे आपरुप-स्वतःहुन उभा होवुन, *'यादृष्शी भावना तस्यस सिध्दिर्भवति'* (जशी भक्ताची भावना, त्या भावनेनुरुप फलसिध्दी) या न्यायाने त्या भक्ताने भजलेल्या आकारी रूपांमार्फत देण देतो.

अश्या रितीने तो चौथा धनी त्या भक्ताच्या मनी ईच्छीत असलेल्या विशिष्ट देवतेच्या रूप साकार करून त्या रूपाच्या अंतर्गत उभा राहुन भक्तांना देणं देतो.

हे सर्व लाभ व देणं देणारा भक्ताचा विशिष्ट देवता नसुन वस्तुतः हे देणं व लाभ देणारा कर्तार धनी तर वेगळाच आहे. हे देणं देणारा कर्तार केवळ चौथा चतुर्पती परमात्मा आदीपुरुष भैष नारायण आहे.

याप्रकारे भक्ताने भजलेल्या विशिष्ट देवतेच्या सर्व भक्तगणांतुन निष्काम व सच्ची भक्ती करणारे सच्चे शुरवीर खेत्री सच्च्या भक्ताला निवडुन, तो चौथा भैस त्या सच्च्या भक्ताला शुध्द भक्तीयोग देतो. निरंजन चैत्यन्यमय ज्योतीचे चतुर्पति ज्ञान व भक्तीयोग देतो. जेणेकरुन तो भक्त त्याच्या कडे आकर्षित होवुन पोहचतील. अशी व्यवस्था करुन ठेवतो. सच्च्या भक्तावर अनुग्रह करण्यासाठी तसेच त्या सच्च्या भक्ताच्या अंतःकरणात स्थित असलेली चैत्यन्यमय सोहंम् ज्योत प्रकाशण्यासाठी प्रयत्नरत राहतो. सच्या भक्तांच्या आत्म ज्योतीवर आलेला कलंक-काजळी दुर करण्यासाठी व इतर अन्य बहु कारणासाठी सच्च्या भक्तांना चवथ्या अवस्थेत नेवुन चतुर्पति ग्यान देतो. चौथ्या आदीपुरूष भैसाने दिलेल्या चतुर्पति ग्यान व्दारे सच्च्या भक्ताला त्यांची ज्योत निश्कलंकी बनवुन प्रकाशमान करण्याचा बुध्दियोगही हा चतुर्पती आदीपुरूष भैस देतो. ऐवढेच नव्हे तर सच्च्या भक्ताच्या मनात अज्ञानापासुन उत्पन्न झालेल्या अंधःकाराचा नाश करतो. सच्च्याला आत्मज्ञानी बनवुन चतुर्पती निरंजन ग्यानी बनवतो.

भक्ताला अनंत लाभ प्राप्त करुन देणारा, देणं देणारा केवळ निराकार निर्गुण निरंजन परमात्मा आदीपुरुष भैष आहे. हा केवळ आपल्या ऐकाच अंशाने अनंत ब्रम्हांड सह सर्व चरांचर विश्वाला धारण करुन आहे. या सर्व विश्वाचा नायक बनुन, अध्यक्ष बनुन कार्यरत आहे. केंद्र स्थानी उभा राहुन या सर्व अनंत ब्रम्हांड सह सर्व चरांचर विश्वाला आपल्या ऐकाच अंशाने भरुन भरलेला आणीक उरलेला आहे.

या भरुन भरलेला आणीक उरलेल्या आदीरूप आदीपुरुष भैष नारायण व्दारे निघालेल्या तेजाच्या केवळ एकाच अंशापासुन अमर्याद दिव्य विभुती व वस्तु निर्माण झाल्या आहेत.

सौंदर्य, कांती, ऐश्वर्य, आकर्षण-शक्ति सह ईतर शक्ति-योनीयॉं, देवांगण, तिरलोक सह अनंत ब्रम्हाडे..ईत्यादी सर्व या ज्योर्तिमय आदीपुरुष भैष नारायण पासुन उत्पन्न झालेले आहेत. अधिक ग्यानाकरीता खं०१/०१/गण-०१ आदीपुरूष आदीगण चे निरसन वाचा.

सृष्टी उत्पत्तीस कारण असलेला, सृष्टी निर्माता सर्वत्राचा पिता असलेला हा आदीरूप आदीपुरूष भैस या सर्वापासुन निश्कलंकी राहतो. मुळयवगा पासुन यवगान यवगामध्ये स्वतः लहाणपण घेवुन या सर्वत्रां मध्ये तो भरुन भरत आणीक उरत संचारत आहे. तो असा :

मुळयवगापासुन मुळयवगाचा देव निरंजन ज्योर्तिमय आदीपुरुष भैष नारायण यांनी ईश्वरी माया, ईश्वरी काया रुपाशी आणुन त्या रुपांची किर्ति महिमा वाढवु लागला. या आकारी रुपांचे राज्य त्या निराकार-निराधार निशःकलंकी निरंजन ज्योर्तिमय आदीपुरुष भैष नारायण देवाने किर्तित आणुन त्यांच्यावर प्रेमाचा वर्षाव करु लागला. त्या त्या रुपांचे राज किर्तित आणुन त्यांच्यावर प्रित करु लागला.

या प्रितिपायी त्या निरंजन ज्योर्तिमय आदीपुरुष अवतार आदीमुनी ने तिरगुणांच्या देवांना व तिरगुणांचे तिन राजे याना तिन यवगाचे राज्य देणं दिले. हे राज्य चालवण्यासाठी चैत्यनेचा शिक्का त्यांच्या हाती दिला-०१-०२-०१.

जसे सत्वगुणांचा राजा विष्णुला बनविले. रजगुणांचा राजा ब्रम्हाला बनवले. तर तमगुणांचा राजा महेष ला बनविले. या तिरगुणांच्या त्रिदेवांच्या हाती चैत्यनेचा शिक्का देवुन, त्यांच्या हवाला भैष नारायण धनीदेवाने निर्माण केलेली सर्व रहित-वस्ती दिली.

परंतु परतफेडच्या बदल्यात या तिरगुणांचे त्रिदेव व या तिरगुणांचे तिरलोकी अवतार, दैवत यांनी एवढ एक चांगल काम केले की : ज्याची रहित-वस्ती आहे त्या निरंजन ज्योतिर्मय आदीपुरुष यांची प्रतिक स्वरूपी निरंजन ज्योत लावुन स्वतःच्या पुजा-अर्जा, स्तुति-महिमा वाढवण्याचा कार्यारंभ केला. तो असा :

स्वतःची पुजा-अर्चना, स्तुति-महिमास्त्रोत्र कर्मकांड ईत्यादी करणा-यास प्रथम ज्योत लावुन नंतरच पुजा-अर्चना ईत्यादी कर्मकांड करण्याचा नेम घालुन दिला. आपआपल्या भक्तांला निक्षुन सांगतले की : निरंजन ज्योत लावल्याशिवाय पुजा-अर्चना ईत्यादी कर्मकांड सिध्द होणार नाही.

परंतु त्यांनी हे नाही सांगतले की : ही निरंजन ज्योत का लावावी ? या निरंजन ज्योतीच ग्यान काय आहे ?. निरंजन ग्यान काय आहे ?. निरंजन ज्योत का लावावी ? याचे निरंजन ज्ञान जर भक्ताला मिळाले, तर भक्त आपल्याला न भजता या चतुर्पति ज्योर्तिमय आदीपुरुष ला भजु लागेल. आणी आपल्याला भक्त मिळणार नाही. आपण भक्तांवर राज्य करु शकणार नाही. हे त्यांना चांगल्या रितीने माहीत होते. याच भिती मुळे ज्योतीचे चतुर्पति ज्ञान भक्तांपर्यत पोहचवु न देण्याची व्यवस्था त्यांनी तत्कालीन करुन ठेवलेली होती-आहे.

भक्ताला ज्योर्तिमय आदीपुरुष व्दारे मिळालेले देण मिळाले. परंतु ते देणं देण्याचा मान हे सर्व चतुर्पतीचे ज्ञान असलेले तिरगुणांचे तिरलोकी अवतार स्वतः घेत राहीलेत. असे हे तिरगुणी दैवत आपआपल्या भक्तजनांला ज्योर्तिमय आदीपुरुष निरंजन ज्योतीचे चतुर्पति ज्ञानापासुन दुर ठेवुन, स्वतः देण दिल्याचा मान घेत भक्त मिळवत राहलेत. असेच भक्त मिळवत आपली सत्ता गाजवु लागलेत.

अंनत यवगाच्या अंती आणी प्रथम यवगाच्या सुरुवातीस तिरलोक्यातील तिनगुणी अवतार असलेल्या देवांनी ऐसे कृत्य केलेत म्हणुन तेथुन त्याला **कृतायुग** असे नाव पडले.

कृता-त्रैता-व्दापर काळी आकाशवाणी करणारा कोण ? त्रिदेवासह ऋषी-मुनी, योगी-जोगी, ८८ सहस्त्र ऋषिमुनी, सनद्मुनी-देवगण ईत्यादी स्वतः अंर्तगत कुणाचे ध्यान करत होते ?. भक्ती ! मग ती कोणाचीही कुणीही करो ! त्या सच्च्या भक्ती-भावाला पावुन त्यांना देणं देंणारा कोण ?.

कुणी भक्त जर त्याच्या ईच्छेनुसार, कुणाचीही सच्ची भक्ती करत असेल (उदाहरणार्थ गुरु-पति, माता-पिता, बंधु-भगिनी ईत्यादी सजिव-जसे सत्‌यवगातील जनलोक करत होते, तसेच सजीवासह दगड-धोंडे ईत्यादी निर्जीव-जसे कलयवगातील जनलोक करत आहेत) त्यांच्या या सच्च्या भक्तीभावाचे रक्षण करुन त्यांना देणं देणारा कोण ?.

सच्च्या भक्ताच्या भक्तीकार्यात आड येणा-यास दंड देणारा कोणं ?.

सच्च्या भक्ताला व देवतांना सिदाई वाचा देणारा कोण ?. सच्चे भक्त व देवता जे जे बोल बोलेल, त्या त्या बोलावर उभा राहुन त्यांच्या बोलाप्रमाणे कार्य करणारा, त्यांचे ते बोल सिध्द करणारा कोणं ?.

सच्चा भक्त मग तो सात्वीक असो; या राजसी असो; किंवा तामसी असो ! त्यांच्या सच्च्या भक्ती-भावाव्दारे त्यांना त्यांचे ईच्छीत देणं, वरदान देणारा कोण ? देवतांची ईच्छा असो वा नसो ! त्या देवतांना वरदान देण्यास भाग पाडुन, त्यां देवतांच्या बोलावर उभा राहणारा कोण ? ईत्यादी ईत्यादी प्रश्नाचे उत्तरे जरा विचार व मनन-चिंतन करुन शोधा.

चिंतन-मनन व शोधकार्यात चौथ्या चतुर्पति ज्ञानाचे व्दार उघडेल. मुळयवगाचा आदीपुरुष भैस व त्यांच्या चतुर्पति ज्ञानाची कळी तुमच्या अंतःरंगात उमजेल ! मनमोग-याचा परीमय-सुगंध दरवळु लागेल. एवढ मात्र निश्चित जाणा ! आता ही मनमोग-याची कळी उमलण्याचा प्रयत्न करण्यासाठी तसेच आदीपुरुष भैसाने घेतलेल्या परिपुर्णतम पुर्ण अवतार दर्शन ग्यान घेण्याकरीता चला जावु या त्रैतायवगात !

**त्रैता यवग** :-

॥ त्रैता यवगी राज ऐसे, रामचंद्र झाले !
९९-राम, गणीता नाही, याहीच्या रहितीले ॥...खंड०५/ओवी-२७
॥ राम नामी, पाप जळाले, पहा त्या वाल्मीकीचे !
टाई मारुन, बसले वरती, वारुळ चढले अंगालें ॥.खंड०६/ओ-०१
॥ उभा आहे माझा राम ! राम करे यवगाचे काम ॥

त्रैता यवगात जेव्हा आदीपुरुष भैष नारायण परीपुर्णतमपुर्ण अवतार घेवुन अवतरला, तेव्हाही त्यांनी चतुर्व्यहरुपांच्या रंचनेसह ईश्वरी काया, ईश्वरी मायासह सिध्द-शक्तीयाँ, ऋषी-मुनी, योगी-भक्त, देवगण व अठरा खेत्री द्युतगण ईत्यादीच्या रुपात सम्मावुन त्यांना भरुन भरला आणीक उरला.

.त्रेता यवगात त्या निरंजन चैत्यन्य ज्योर्तिमय आदीपुरुष भैष नारायण धनी ने आपल्या परिपुर्णतम्पुर्ण अवतार कार्यात चतुर्व्युह रुपांची रंचना केली होती. ती अशी :

**१. रामचंद्र २. लक्ष्मण ३. भरत ४. शत्रुघ्न**

या चतुर्व्युह रुपांच्या रंचणेत पुर्ण अवतार राम रुपात अवतरला. या चतुर्व्यह रुपांच्या रंचने सह शक्तिमाता सिता आणीक ईतर ईश्वरी काया, ईश्वरी मायासह सिध्द-शक्तीयाँ, ऋषी-मुनी, योगी-भक्त, देवगण व अठरा खेत्री द्युतगण,( उदाहरणार्थ भक्तात्मा हनुमान, जांबुवंत, अंगध... ईत्यादी) भक्तगण, सिध्दगण देवगण ईत्यादी आकारी रुप धारण करुन अवतरलेत. चतुर्व्युह रूपांच्या रंचने सह पुढे-मागे अवतरलेल्या सर्व अवतारांच्या समुदायात तो चतुर्पती आदीपुरूष धनी एकाच ठरावीक समयकालात, विविध ठिकाणच्या अवतारी देहीत अंतर्भुत होवुन अवतरत संचरत राहला. या अवतारांना दोन दोन च्या जोडीत ठेवुन या अवतांच्या समुहात तो धनी अनेक खेळ खेळला. या अवतार समुहात संचारीत राहत या कळसुत्राचा मालकाने अनेक कर्मे व खेळ खेळ्लेले आहेत. याचे वर्णन तरी काय करु ? रामायण वाचा ! या यवगात भक्तात्मा हनुमान व पुर्णात्मा राम ही देवा-भक्ताची ही जोडी झाली.

येथेही त्या धन्याने स्वतःचा मानाचा प्याला विष्णु ला दिला आहे. त्याचमुळे चतुर्पति व त्याच्या ज्ञानापासुन वंचित असलेले अज्ञानी जनलोक रामाला विष्णुचा अवतार मानु लागलेत. असो.

परंतु त्रैतायवगाचे राज हे आदीपुरुष भैष नारायण चा परिपुर्णतम पुर्ण अवतार मध्ये पुर्णात्मा रुपात अवतरलेल्या रामाने केलेले आहे. एवढच नव्हे तर त्या आदीपुरूष भैसाने पुर्ण अवतार रामचंद्रा मागोमाग राम निर्माण करत करत (उदाहरणार्थ श्रीराम, परशुराम, सदाराम, आत्माराम, मनीराम, तुलशीराम, सदाराम... ईत्यादी) ९९ रामापर्यत त्या आदीपुरूष धनीदेवाने रहित केलेली आहेत. गणीता नाही याहीच्या रहतीले/वस्तीले...! सांगु तरी काय ?

हा आदीपुरूष रहित करत करत व्दापर यवगाच्या अंताच्या संधिकाळा पर्यत आला. आणी तोच आदीपुरुष भैष नारायण धनी आपला परिपुर्णतम् पुर्ण अवतार घेवुन पुर्ण अवतार कृष्ण रुपात चतुर्व्युह रंचनेत अवतरला. तर मग चला व्दापर यवगात ! आदीपुरुष भैसाचे परिपुर्णतम् पुर्ण अवतार दर्शन ग्यान घेण्याकरीता व्दापरी जाउन पाहु या ! :

**व्दापर यवग** :-

॥ व्दापर यवगी राज ऐसै, श्रीकृष्ण झाले ।
वाजवलं पाउल, तिर तिर भवनं नाचवले ॥ खंड०७/ओवी-२७
॥ पांडवाचा सखा, वनात आपन ।
पुरविले अन्न, ऋषीश्वरा ॥ खंड०७/ओवी-१८
॥ यवगा यवगी, आले आपणं, माया वेष घेवुन
गीता परसली, विर अर्जुन, एक पंडुचां नंदन
आदीगण नेमला, गण हा उध्दारी जिवाला ॥ खंड०१/गण ०३

॥ पार्थ म्हणे, श्रीअनंता, सेरुप दाव, मज आता !
हरी म्हणे माझ, विशाल रुप, भेशील पाहता पाहता ॥ खंड०६/ओ.०९

व्दापर यवगात जेव्हा निराकार-निराधार निशं:कलंकी निरंजन चैत्यन्यमय आदीपुरुष भैष नारायण धनी हा परीपुर्णतमपुर्ण अवतार घेवुन अवतरला. तेव्हा त्यांनी चतुर्व्यहरुपांच्या रंचनेसह ईश्वरी काया, ईश्वरी मायासह सिध्द-शक्तीयॉ, ऋषी-मुनी, योगी-भक्त, देवगण व अठरा खेत्री द्युतगण ईत्यादीच्या रुपात सम्मावुन त्यांना भरुन भरला आणीक उरला.

व्दापर यवगात त्या निरंजन चैत्यन्य ज्योर्तिमय आदीपुरुष भैष नारायण धनी ने आपल्या परीपुर्णतमपुर्ण अवतार रंचनेत चतुव्यहरुपांची रंचना केली होती. ती अशी :

**१. श्रीकृष्ण २. बलराम ३. प्रद्युम्न ४. अनिरुध्द**

या यवगात आदीपुरुष भैष नारायण धनी चा परिपुर्णतम पुर्ण अवतार कार्यात चतुर्व्युहरूपांच्या रंचनेत पुर्णात्मा श्रीकृष्ण रुपात अवतरुन पुर्ण अवतार झाला होता. तर शेषात्मा हा बलराम. आणी कामदेवात्मा हा प्रद्युम्न. तर ब्रम्हात्मा हा अनिरुध्द रुपात अवतरले. या चौघाची चौकडी अवतरली.

या चतुर्व्यह रुपांच्या रंचनेसह परमं शक्ति रुक्मिणी व पराशक्ति राधा तसेच १६ सहत्रं गोपीगंणा रूपात असलेल्या शक्तियॉ..ईत्यादी ईश्वरी माया सह ईश्वरी काया अवतरलेत. जसे शेषाचा अवतार असलेला बलराम, कामदेवाचा अवतार असलेला प्रद्युम्न, ब्रम्हाचा अवतार असलेला अनिरूध्द, चंद्राचा अवतार असलेला अभिमन्यु, कश्यपचा अवतार असलेला वसुदेव, अदिती मातेचा अवतार असलेली देवकी, धरादेवीचा अवतार असलेली यशोदा, वसुद्रोणाचा अवतार असलेला नंद..ईत्यादी सह १८ खेत्री द्युतगण -जसे धर्मराज युगीष्ठीर, भक्तात्मा सखा अर्जुन, भिम, नकुल, सहदेव, सुदामा...ईत्यादी अवतरलेत. या सर्व अवतारांच्या समुदायामध्ये अंतर्भुत होवुन संचरला. सिध्द-शक्तीयॉ, ऋषी-मुनी, योगी-भक्त देवगण ईत्यादी अवतारांच्या समुदायात सम्मावुन त्यां सर्वाना भरुन भरला आणीक उरला.

व्दापर यवगात हे सर्व अवतार भैसाच्या चतुर्व्युह रूपांच्या रंचनेसह आकारी रुप धारण करुन अवतरलेत. त्या अवतरलेल्या आकारी देहरुपांच्या समुदायात तो निरंजन ज्योतिर्मय धनी परमात्मा एकाच समयकालात विविध ठिकाणी अंतर्भुत होवुन अवतरला. विविध ठिकाणी च्या देह ज्योती मध्ये अंतर्भुत होवुन भैसाची निरंजन ज्योत अनेक खेळ खेळली. या अवतारांना दोन दोन च्या जोडीत ठेवुन या समुहात तो अनेक खेळ खेळत राहला. या अवतार समुहात संचारीत राहत राहत त्यांनी अनेक कर्मे केलेली आहेत. याचे वर्णन तरी काय करु ? महाभारत वाचा !

व्दापर यवगातही निरंजन चैत्यन्यमय आदीपुरुष भैष नारायण यांनी स्वत:चा मानाचा प्याला विष्णु ला दिला. त्याचमुळे चतुर्पति व त्यांच्या ज्ञानापासुन वंचित असलेले अज्ञानी जनलोक श्रीकृष्णाला विष्णुचा अवतार मानु लागलेत. असो.

परंतु व्दापरयवगाचे राज हे आदीपुरुष भैष नारायण चा चतुर्व्युहरंचनेत अवतरलेल्या पुर्ण अवतार श्रीकृष्णाने तिरतिरभवन नाचवत केलेले आहे. व्दापर यवगात भक्तात्मा हा अर्जुन आणी पुर्णात्मा कृष्ण ही कृष्ण-अर्जुन ची देवा-भक्ताची जोडी झाली होती. या जोडी व्दारे यवगाचे कार्य करून ठेवल्या गेलेले आहे.

व्दापरी च्या भैसाच्या परिपुर्णतम्पुर्ण अवतार कार्यात चतुर्व्युह रंचनेतील पुर्ण अवतार श्रीकृष्णाने आपला सखा असलेला भक्त योगात्मा अर्जुनास रणांगणा मध्ये गितांमृत पाजले. या भगवंताच्या लेकीसमान असलेल्या भ. गीताने माव/लीला केली. अर्जुनाच्या रोमरोमांत ज्ञानरूपी भगवत गीता संचारली. भगवंताची लेक असलेल्या गितेने अर्जुनाने हातचा टाकलेला बाण पुनश्चः हाती देवुन अर्जुनास युध्दास उभे केले. या भगवंता ने परसलेल्या(वाढलेल्या) भ.गीता च्या रसपान कालावधीत हा पार्थ( अर्जुनाचे एक नाव ) म्हणे श्रीकृष्णाला : कृष्णदेवा ! सेरुप दाखव मजला ! उत्तरादाखल कृष्णहरी म्हणे की : माझं विशाल रुप पाहुन तु भेशील ! परंतु तु माझा अत्यंत प्रिय भक्तात्मा सखा असल्यामुळे हा परमात्मा बघण्यासाठी आवश्यक असलेली त्रिगुणातीत दिव्य दृष्टी मी तुला देतो.



चतुर्पती परमात्माने दिलेल्या दिव्य दृष्टीव्दारे अर्जुनाने आदीपुरूष चतुर्पती भैस परमात्माची विविध रुपे पाहीलेत. चतुर्पती भगवंताला जाणले. आणी युध्दास उभा झाला. या चौथ्या भगवंताने त्याला युध्द जिंकुन देण्यास वेळोवेळा साहयं केले. युध्द जिंकुन दिले. कृष्णाने पांडवास राज्यभोग दिला. ज्ञानभोजन दिले. आणी आपल्या अवतार कार्याच्या अंती गुप्त झालेत असे खंड-०६-१२ :- शुन्याकाराची ओवी चे चरणे सांगी करतात. ते असे :

॥ कृष्ण अवतारी, पांडव बादशाही, हेही गुप्त झाले ।
कली मध्ये, द्युत उतरले, अवघ्याशी खर्ची दिले ॥ खं.०६/ओवी-१२

व्दापरच्या पहाटेच्या संधिकाळी श्रीकृष्णा सह अवतारी पांडव बादशाही ईत्यादी तेथील सर्वजन गायपाचा खेळ करून गुप्त झालेत. आणी कली मध्ये तेच सर्व द्युत बनुन उतरलेले आहेत. :म्हणजेच कृष्ण अवतारी व पाडंव बादशाही सह कृष्णाचे सर्व सच्चे सवंगडी भक्तजन कृष्णासंग जे व्दापरी गुप्त झाले होते, ते सर्व या कृष्णासह कलीमध्ये चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाचे द्युत बनुन कृष्णासह चतुव्युहरंचनेसह अवतिर्ण झाले आहेत. आणी कलीपासुन पिडलेल्या अवघ्या सच्चे भक्तजनां चे पिडा रोग विघ्न दुर करून, त्याच्या मधुन कलीचे ठिकाणे उडवुन त्यांना कलीने दिलेल्या पिडा दुःखे च्या मोबल्यात सर्वकाही दिले आहेत. देत आहेत. तसेच त्यानी अवघ्या सच्च्या जनास देणं देवुन त्यांचा खर्च भरून दिला आहे. अधिक ग्यानाकरीता कृष्णांमृत वाचा.

कृष्णाने येथे उभे राहुन अवघ्यांचे उसने फेडलेत. या कृष्णापासुन कोणीही खाली हात वापस गेला नाही. या कृष्णाने या चतुर्पती ची दंवंडी प्रमाणे वाणी सांगीतली आहे. चतुर्पता अथर्वन् वेद सच्च्या भक्तांच्या हाती दिलेला आहे. देत आहे. तो नाही चुकला तिरलोक्याशी. अधिक ग्यानासाठी खंड०६/ओवी-१२/ चे निरसन वाचा. असो.

भ.श्रीकृष्ण गुप्त झाल्यावर त्यांच्या संग कृष्ण अवतारी म्हणजेच कृष्णासंग पुढे-मागे अवतरलेले सर्व अवतारी गण व पांडव बादशाही लोक हेही गुप्त झालेत. म्हणजेच अंती गायपाचाच खेळ झालेला आहे. गायपाच्या खेळाचे ग्यान कृष्णामृत मधुन घ्यावे.

कृष्णाचा पुर्णात्मा, सख्यांचे भक्तात्मे व ईतर अवतारात्मे गायप होवुन निरंजनी ज्योतिर्मय स्वरूपात गेलेत. पुढील येणा-या काळात निरंजन ग्यान सच्च्या भक्तांना देण्यासाठी ते निरंजन ऋषि बनलेत. सच्चा भक्तांची चौथी अवस्था प्रकट करून सच्च्या भक्तांना गाही दृष्टांत देवुन या चौथ्या चतुर्पती चे

ग्यान देण्यासाठी ते सर्व निरंजन ऋषि कार्यरत् झाले आहेत. चतुर्पती धनीदेवाचे सर्व कार्य करण्यासाठी त्यां गायप झालेल्या निरंजन ऋषिंजनांनी आकाशमात मध्ये चतुर्पती पंथाचा पाया रोवला. झेंडे फडकवलेत.

कल यवग :-

**॥ चतुर्पती पंथाचा पाया ॥**

॥ ईत्तेवार, होय विष्णुचा ! विशंक/विषय मोडुन ऋषी आला !
त्याच दिवशी, पाया गडे हो ! निरंजनाचा बसला ॥ खं.०६/ओवी-१२

इत्तेवार होय विष्णुचा :- कलीचा प्रारंभ रविवार या विष्णुच्या दिवसा पासुन झाला. ॥ कलीचा प्रारंभ जाण । भाद्रपद मास पक्ष कृष्ण । त्रयोदशी रविवार दिन । तै जाहला असे ॥ मुळस्तंभ अ-१७/०३. याच दिवशी गंगेतीरी गायपाचा खेळ उभारुन कृष्ण अवतारी पांडव बादशाही सह कृष्णसवंगडी भक्तगण गायप झालेत. याच दिवसा पासुन जो कृष्ण निरंजन निश्कलंकी ज्योत स्वरूपी ऋषि बनला. त्या निरंजन निश्कलंकी ज्योतीला भजण्याचा चंतुर्पती कृष्ण अवधुत पंथाचा पाया अकाशमात मध्ये निरंजन स्वरूपी असलेल्या कृष्ण योगीजन, सखेजन, व सच्चे भक्तजन सवंगडी.. ईत्यादी व्दारे स्थापल्या गेला. याच दिवशी या निरंजना पाया गडे हो स्थापल्या गेला. तेव्हापासुन अकाशमात मधील या चतुर्पती पंथाच्या ज्या ज्या योग्यांनी कलयवगात भुतलावर अवतिर्ण होवुन निराकार निश्कलंकी ज्योतिर्मय निरंजना चा प्रसार प्रचार केला, ते सर्व या अकाशमात मधील निरंजन चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाचे निरंजन ऋषि योगी होय. त्या सर्व ऋषि योगी च्या पुढे असलेला एक अनामीक योगी येथे विशंक/विषय मोडुन ऋषि बनुन पुढे आला.

**कल यवगाचा संधिकाळ** :-

विशंक मोडुन ऋषि आला :- अपवित्रता मोडुन, विषयांचे कलंक मोडुन निश्कलंकी बनुन तो कृष्ण ऋषी बनुन कलीच्या संधिकाळात प्रकट झालेला आहे. कृष्ण देहघरी तो उभा झाला. सावंग्यात उभा हा एक ऋषि । अवघे तिर्थ याहीच्या पायापाशी ! कलयवगाच्या संधिकाळात त्या गुप्त कृष्णाने इथे पुर्ण अवतार घेतला आहे. त्याच्या संग गुप्त झालेल्या सर्व निरंजन ऋषि ने या चतुर्पता कृष्ण अवधुत पंथाच्या भुम्मेवर त्यांचे द्युत बनुन अवतार घेतले आहे. घेत आहेत. घेणार आहेत.

या यवगात त्या निरंजन चैत्यन्य ज्योर्तिमय आदीपुरुष भैष नारायण धनी ने आपल्या परिपुर्णतम्पुर्ण अवतार कार्यात चतुर्व्युह रुपांची रंचना येथेही केलेली आहे. ती अशी :

**१. श्रीनाथ श्रीकृष्णाजी २. हेंगड्डुजी ३. देवमनजी ४. पुनाजी.**

या पुर्ण अवतार ग्यानाकरीता पुढील भाग **कृष्णांमृत** वाचावे.

या चतुर्व्युह रुपांच्या रंचणेत पुर्ण अवतार कृष्ण रुपात अवतरला. या चतुर्व्यह रुपांच्या रंचने सह ईश्वरी काया, ईश्वरी मायासह सिध्द-शक्तीयॉ, ऋषी-मुनी, योगी-भक्त, देवगण व अठरा खेत्री द्युतगण, भक्तगण, सिध्दगण देवगण ईत्यादी आकारी रुप धारण करुन यांच्या संग अवतरलेत. चतुर्व्युह रूपांच्या रंचने सह पुढे-मागे अवतरलेल्या सर्व अवतारांच्या समुदायात तो चतुर्पती आदीपुरुष भैष धनी एकाच ठरावीक समयकालात, विविध ठिकाणच्या अवतारी देहीत अंतर्भुत होवुन संचरत राहत आला आहे.

या अवतारांना दोन दोन च्या जोडीत ठेवुन या अवतांच्या समुहात तो धनी देव अनेक खेळ खेळला. या अवतार समुहात संचारीत राहत या कळसुत्राचा मालकाने अनेक कर्मे व खेळ खेळलेले आहेत. याचे वर्णन तरी काय करु ? कृष्णांमृत वाचा !

म्हणुनच चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ हा निर्गुण निरंजन कृष्ण अवधुत यांचे सच्चे भक्त, योगीजन, जाणत्या सिध्द योगी मुनी यांचा पंथ आहे. येथेच कलीच्या संधीकाळात चतुर्व्युह रुपांची रंचनेत पुर्ण अवतार श्रीनाथ कृष्णा गुप्त रुपात उभा झालेला आहे. असे जाणत्या गणांमध्ये मानल्या जाते. परंतु याची खोज कलीच्या गलीतपात्रामुळे कुणासही सहजासहजी लागली नाही.

॥ कली होता, तो गतकली झाला । गलीत पात्र झाले सारे ।
पत्रिकेची खोज गडेहो । नाही लागली कोणाले ॥ खं.०६/ओवी-१२

व्दापरच्या संधिकाळात कलंकीची कळ घेवुन जो कली उतरला, तो कली पुढे गतकली झाला. या कलीच्या प्रभावाने सर्व गलीत पात्र म्हणजेच ज्याप्रमाणे नदिचे पात्र दुषीत होते, त्याप्रमाणे या कलीव्दारे सर्व दुषित कलंकीत झालेत. त्याचमुळे कोणा स्वार्थि बहु तमरजगुणी तिरगुणी ब्रम्हयांला ३०० ते ४०० वर्षेपर्यत कलीसंधीत ज्या ठिकाणी पुर्ण अवतार उभा आहे, त्या चतुर्पता कृष्ण अवधुत पंथाच्या ठिकाणच्या सत्याच्या पत्रिकेची खोज लागला नाही.
सत्याची पत्रिका असलेली सत्यदेव चतुर्पती आदीपुरुषाचे निरंजन ग्यान सह सर्व ग्यान-भक्ती युक्त भजन, पुंजनं ध्यान सुमरन गिण्यान गायणा-या चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाचा शोध स्वार्थि बहु तमरजगुणी तिरगुणी जनाला लागला नाही. आणी पुढेही त्यांना या सत्याच्या पत्रिकेचा खोज लागणार नाही. अशी व्यवस्था येथे चतुर्पती च्या जाणत्यांव्दारे करुन ठेवलेली आहे.

कलीच्या संधिकाळात गुप्त कृष्णाने पुर्ण अवतार कुठे घेणार/घेतला ? कुठे अकाशमात चा चतुर्पता कृष्ण अवधुत पंथ उभा राहीला आहे ? कलीच्या संधिकाळामध्ये कुठे तो गुप्त रुपात पुर्ण अवतार कृष्णा उभा आहे ? कुठे तो गुप्त रुपात उभा राहुन सत्यवगाची मांडणी करत आहे ? कैशी यवगी मांडणा आहे या भैसाची ? याची खबर नाही कोणाशी ! ज्याने स्वतःला ओळखले असे स्वरुपी ओळखीचे जीव हे या आदीपुरुष भैस अवतार कृष्णाला ओळखतीन !

या कृष्णाला बहु मानवाचे वाटते भेव ! कारण की : या चतुर्पतीचे चारही वाणीतुन निघणारे हरीनाम हे स्वार्थि रजतम बहु गुणी तिरगुणी जन मायेच्या तिरगुणी प्याला हाती घेवुन घेतीन. मायेचे तिरगुणी मद्यपान करुन ईतर वेदांप्रमाणे या चतुर्पता अथर्वन् वेदाच्या ज्ञानात आपले पोटपाण्याचे सोयीसाठी कर्मकांड पुजापाठ... ईत्यादी तिरगुणी ग्यानाचा शिरकाव करेल. आणी या निश्कलंकी कृष्णा मुखच्या चतुर्पता अथर्वन् वेदाचा नाश करु पाहतील. म्हणुनच तो कोणा अश्या ऐ-या-गै-याला ही खबर देणार नाही बर ! अश्यांना सहसा या चतुर्पती जवळ येवु देणार नाही. या चतुर्पती अथर्वन् वेदाच्या निरंजन ज्ञानाकडे फिरकु सुध्दा देणार नाही.

कलीच्या संधिकाळात घेतलेल्या कृष्णाच्या या गुप्त पुर्ण अवताराचे ज्ञान सहजासहजी कोणा स्वार्थि, दोहीत संभाळणा-या तिरगुणींना मिळणार नाही. अश्या दोहीतांना या चतुर्पती पासुन दुर ठेवण्याची सोय या कृष्णाने आधीच करुन ठेवली आहे. हा कृष्ण आपणहुन सच्चे भक्तजनांच्या देहघरी जावुन त्यांची बुध्दि प्रचोद्यात करतो. आपणहुन या चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाची निमंत्रण पत्रिका सच्च्या भक्तांना देत आहे.

त्यां सच्चेजनांना आपणहुन आपल्या हाताशी हात लावत, आपला हात त्यांच्या हाती देत आहे. सच्च्यांना हाती घेवुन त्यांना या चतुर्पताचे गोत मिळवुन देत आहे. सच्चे जनांची धियो/मती/बुध्दि प्रचोद्यात म्हणजेच प्रेरीत करत त्यांना दवंडी प्रमाणे चतुर्पती अथर्वन् वेदाची वाणी सांगत सुटलेला आहे.

कृष्णाच्या या शिष्टाई मुळेच या चतुर्पता कृष्ण अवधुत पंथाच्या भुम्मेवर पुढे मग शुध्द सत्वात वावरलेले सच्चे तिरलोकी जन येवुन भिड घालतीन. भेटी आंगचे सिध्द या कृष्णाच्या संगतीनं उभे राहतीन. तेव्हा मग अवघे तिरलोक्य जनी गर्दि करतीन. स्वर्गिचे दैवत, पाताळाचे पालक हेही भिड घालतीन. तिन खुम्म आपल्या भक्तगणांसह शरण येतीन...ईत्यादी चतुर्पतीच्या खुणा असलेल्या या सत्या च्या पत्रिकेचा शोध कोणा स्वार्थि दोहीत करणारे रजतम बहुगुणी तिरगुणी जनांला सहजा सहजी लागणार नाही.

परंतु तुम्हा हाती हा चतुर्पता अथर्वन् वेद आला. याचाच अर्थ तुम्हाला कृष्णाची चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाची निमंत्रण पत्रिका मिळाली. सत्याची पत्रीका मिळाली. ॥ तुमचा होता काहीतरी पुर्विचा दोरा । म्हणुन आले कृष्णदेव राया तुमच्या देहघरा ॥ होता पुर्विचा भाग । म्हणुन झाला हा लाभ ॥ होत पुर्विच संचित । म्हणुन घडली या कृष्णाची संगत ॥ हा आदीपुरूष बोले अहीनाशी, ऐक हकिकत : तुमच आमच होत, पुर्विच नात ! म्हणुन ही सत्याची पत्रिका दिली तुमच्या हातातं ! हे तुम्ही जाणा आता निश्चित. या शकुनी पत्रिकेचा मान करा हो सदोनित ! आजपर्यत चतुपतीच्या सत्य पत्रिकेची खोज नाही लागली कोणाले ! भैषाच्या यवगी मांडणा ची खबर नाही कोणाशी ! कारण की : चतुर्पती चे हे सर्व ऋषि गायप राहुन, या सर्वांनी गायपाचा खेळाव्दारे कधी देही तर कधी विदेही होत सच्च्या भक्तांनाच चतुर्पति ज्ञान भक्तीने संपंन्न करत आले आहेत. निरंजन ज्योती चे चतुर्पती ज्ञान अमृत पाजत आले आहेत.

व्दापर यवगा पासुन कलयवगात आणी या कलयवगाच्या कालखंडात त्या अकाशमात मधील चतुर्पती पंथाच्या भक्त-योगात्मे; कृष्णसखे भक्तगण यांनी कायापालठ सिध्दी व्दारे कितीतरी नवे नवे देह नव्या नव्या को-या भुम्मेवर धारन केलेत. निराकार-निराधार निरंजन ज्योतीर्मय आदीपुरुष यांची भक्तीचे बीजे ठिकठिकाणी पेरलेत. चतुर्पती धनीदेवाची अखंडपणे भक्ती करत करत हे सर्व कलयवगाच्या संधीकाळात कृष्णा संग प्रकटले आहेत.

या सर्व यवगाच्या कार्यकाळात ते चतुर्पतीचे भक्त, योगात्मे, कृष्ण सखे भक्तगण यां सर्वांनी नजाणे कितीतरी पंथाची रंचना करुन पंथगुरु म्हणुन अवतीर्ण होवुन 'निराकार-निराधार निरंजन ज्योतीर्मय आदीपुरुष' यांची भक्तीचे बीजे पेरले असेल. न जाणे ते कधी कबीर बनले राहु शकते, तर कधी फकीर, तर कधी महाराज, बाबा, संत, योगी, महात्मे, भक्त, सखा, तर कधी शिवगण, वैष्वगण, शाक्तगण ईत्यादी बनुन अवतीर्ण झालेले राहु शकते.

चतुर्पतीच्याच सांगी व्दारे शब्दबध्द झालेल्या सर्व यवगाच्या 'खर म्हणा का लटक म्हणा', 'राम नामी पाप जळाले', 'अकाशवाणी शेला घेवुन आले श्यामकर्ण', 'हा ऋषी म्हणे, शुन्याकार होईल गा पृथ्वा', 'गोकुळी अवतार', 'पांडंवाचे काज', 'आदीगण नेमला', '.कलीचरण', 'हुआ गुरु का बच्चा'.....इत्यादी ओवीचे निरसनातुन ज्ञान घ्यावे. असो.

या व्दापर यवगाच्या अंती व कलयवगाच्या सुरूवातीच्या संधी काळात निरंजन ऋषिव्दारे स्थापन झालेल्या आकाशमात स्थीत चतुर्पती पंथात असाच एक गायपाचा खेळ करणारा, सर्व शक्तियॉं व सिध्दियॉं संप्पन सिध्द पुराण पुरूष असलेला अनामीक ऋषि भक्तयोगी होता.

**॥ अनामीक ऋषि भक्तयोगी कृष्णाजी चे कार्य ॥**

या सर्व मधील एक अनामीक ऋषि भक्तयोगी ! हा सखा अनामीक भक्त योगात्मा कलयवगात गायपाचा खेळ करत करत, बोध देणारा बोधाजी बनत बनत पुर्णात्मा संग कलयवगाच्या संधीकाळात एक झाला. या कलयवगाच्या संधीकाळात भक्तात्मा-पुर्णात्मा एक होवुन चतुर्व्युह रुपांच्या रंचणेत निराकार-निराधार निशं:कलंकी निरंजन चैत्यन्यमय आदीपुरुष भैष नारायण चा पुर्ण अवतार बनलेत आहेत. ते असे :

व्दापर यवगा पासुन कलयवगात आणी या कलयवगाच्या कालखंडात त्या अनामीक भक्तात्मा ने कायापालठ सिध्दी व्दारे कितीतरी नवे नवे देह नव्या नव्या को-या भुम्मेवर धारन केलेत. आणी निराकार-निराधार निरंजन ज्योतीर्मय आदीपुरुष यांची भक्तीचे बीजे पेरत पेरत, अखंडपणे यवगान यवगात भक्ती करत करत कलयवगाच्या संधीकाळात प्रकटले आहेत.

परंतु हे सर्व त्यांचे यवगान यवगीवे अवतार त्या भक्तात्मा अनामीका ला ठाव ! निजरुपात जे जे यवग गेले, त्या त्या यवगापरी त्यांनी जे जे अवतार धारण केलेत, त्या त्या अवताराचे ज्ञान त्या अनामीक भक्तयोगात्मा कृष्णाला ठाव ! आमचे तर निजरुपा मध्ये तिन यवग गेले असल्यामुळे आम्हास नाही ठाव !

॥ निजरुपा मध्ये, तिन यवग ! गेले हो सारे !
यवगा-परी, अवतार झाले ! ते ठावुक त्याहीले(कृष्णाले) ॥ ˙.०७-२६

तिन यवग निजरुपा मध्ये गेले सारे । परंतु या यवगात गायपाच्या खेळाव्दारे जेजे अवतार अनामीक भक्तात्मां ने धारण केले असेल, त्या त्या सर्व अवताराचे ज्ञान त्या अनामीक भक्त योगात्मा कृष्णाजीला ठाव ! आम्हा नाही ठाव ! कारण की : होती नव्हती नाही दिली ! त्यांनी आम्हा कोणाच्या हातात ! आम्हा मानवाला त्यांनी पुर्ण मेद्या बुध्दी दिली नाही. आम्हाला जी काही मर्यादित बुध्दी त्यांनी दिली; आमच्या ज्योती मध्ये ज्योत खेळवली; निरंजनी भेटी देत ज्या काही गाहया, साक्ष, पुरावे दिलेत; मुजरे घेतलेत; त्यांच्या ज्योतीच्या प्रकाशाव्दारे कर्म-इंद्रियां सह ज्ञानेंद्रिये व मन मती कड्डन जे काही काम करवुन घेतले; ज्योतीच्या प्रभावाखाली आम्हास जे काही प्राप्त झालेत; ...ईत्यादी वरच आम्ही समाधान मानुन पुन:पुनश्च:पुन: म्हणतो की :

॥ 'तुच कर्ता, तुच करवीता, तुच सत् बुध्दीचा दाता ।
तुमच्या परता जगात बापा । नाही कोणी आता ॥

असे विनवत विनवत अनामीक भक्तात्मा कृष्णाजीच्या मेद्या-बुध्दीच्या दुरवर पसरलेल्या दिव्य प्रकाशाने विस्मीत होवुन, त्याच दिव्य प्रकाशाव्दारे प्रचोद्यात झालेल्या आमच्या मर्यादित बुध्दीच्या बळावर एवढच म्हणु शकतो की : कृष्णाजीचे मुळ ! यवगाचे स्थळ...! त्याच्या आंगच खेळ, तोची जाणे !



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



**॥ चतुर्पता पुर्ण अवतार प्रारंभिक ग्यान दर्शन ॥**

**॥ भाग-०१ संपुर्ण ॥**



पुर्णावतार कृष्णांमृत दर्शन पुढील भाग-०२:-कृष्णांमत पुढील पानावर..

॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ चतुर्पता अथर्वन् वेद उभा राहीन पोटी । निजरूप भुम्मा जागी करन सारी सृष्टी ॥

# चतुर्पता
# ॥ अथर्वन् वेद ॥

॥ चतुर्पता पुर्णावतार दर्शन भाग ०२ ॥

॥ चतुर्पती पुर्ण अवतार कृष्णांमृत दर्शन ॥

॥ पुर्णावतार श्रीकृष्णाजी महाराज श्रीक्षेत्र सावंगा-विठोबा ॥

यांचे संपुर्ण चरित्र ग्यान असलेले

## ॥ कृष्णांमृत ॥



## शब्दार्थ, चरणार्थ निरसन स्पष्टीकरन सह






www.chaturpata-atharvan-ved.com

॥ श्री ॥

**॥ चतुर्पता पुर्ण अवतार दर्शन भाग ०२ ॥**

## सर्व शक्तियॉं व सिध्दियॉं संपन्न

## ॥ पुर्णावतार अनामिक भक्तयोगी कृष्णांजी चे संपुर्ण चरीत्र ग्यान ॥

# ॥ कृष्णांमृत ॥

॥ कृष्णाजीचे मुळ, यवगाचे स्थळ ।
त्याच्या आंगचा खेळ, तोची जाणे ॥ खंड.०५/ओवी.-७६
॥ गायपाचा खेळ, कोणा कळेना ।
आपल्या बळाने अवतार आला हा, पुर्विचा जुना ॥ खं.०५/ओ-३१
॥ यवगाचा खेळ, त्या यवग्याला ठाव, त्या कृष्णाला ठाव ।
तोची जाणे कळा, तो भक्तराज ॥ खंड.१०/०२/आ-२४

यवगान यवगात ॑अनामीक परात्पर भक्तयोगी भक्तात्मा कृष्णाजीने निराकार-निराधार निरंजन ज्योतीर्मय आदीपुरुष यांची भक्ती अखंड निरंतर केली. चर्तुपती निराकार-निराधार निरंजन ज्योतीर्मय आदीपुरुष यांच्या भक्तीचे बिजे विविध ठिकाणी स्थापलेत. चर्तुपती निराकार-निराधार निरंजन ज्योतीर्मय आदीपुरुषचे चतुर्पती ग्यान यांची सांगी केली. चर्तुपती आदीपुरुषाच्या भक्तीस जनलोकास लावुन गाहया दिल्यात. दवंडी दिली. गर्जना केल्यात. परंतु हे जग मानेना ! चतुर्पती ची गाही कोणी ऐकेना !

कृष्णा यवगान यवगापासुन जे चतुर्पतीचे ज्ञानासह चर्तुपती आदीपुरुषा ची गाही-साक्ष-पुरावा सांगत सुटला आहे, त्या चर्तुपती आदीपुरुषाच्या चतुर्पती ज्ञानाला तिरलोक्यातील जनलोकास तिरगुणात गुरफटवुन ठेवणारे तिरगुणी सत्ताधारी, तसेच तिरगुणाचे दांभीक तिरगुणी अवतार लबाड म्हणत असे ! त्यांना खोट संबोधुन चतुर्पतिच्या भक्ती-अस्तुकी-महिमाच्या कार्यात भंगा आणत होते.

हे तिरगुणी स्वतः कोपुन तिरगुणात गुरफटलेल्या जनलोकास त्यांच्यावर कोपवत होते. या कोपलेल्या सर्व तिरगुणींव्दारे चतुर्पतीच्या कार्यात भंगा आल्यावर, तो ॑अनामीक परात्पर भक्तयोगी **भक्तात्मा** कृष्णा गायपाचा खेळ उभा करुन आपला जुना देह तेथुन गायप करुन पुनःश्च नव्या को-या भुम्मेवर नवा कोरा देह धारण करुन प्रकट होवुन अवतीर्ण होत असे. तो असा..

**गायपाचा खेळ :-**

हा गायपाचा खेळ सर्वोच्च पदावर गेलेल्या सिध्दी व शक्तीयॉं संप्पन्न शिवतत्वी योगी पैकी लाखोंतुन एखादा परंम्सिध्द योगी सिध्द करतो. या गायपाच्या खेळाचे ग्यान अत्यंत गुप्त आहे. हे ग्यान योगसाधनेत जे योगी समोर गेले आहेत, त्यांच्याच थोडेबहुत ध्यानात येवु शकतो. सर्वसामान्यांच्या डोक्यावरुन जाते एकढं मात्र निश्चित ! त्यामुळे सर्वसामान्यांनी हा गायपाचा खेळाचा भाग सोडुन पुढे वाचावे. हा भाग फक्त योगी-ज्ञानीजनां करीता आहे हे जाणावे.

हा भाग कृष्णकृपेन दिलेल्या प्रकाशाने देहेवर्णनाची ओवीतील काही चरणे व श्री मुळस्तंभाचे श्लोक यावरुन मती प्रचोदयात् होवुन, त्या मर्यादित मती व्दारे अमर्याद गुप्त ग्यानपिंड समजावुन देण्याचा थोडाबहुत प्रयत्न कृष्णाला वंदन करुन आरंभ करीत आहो !

देहे वर्णणाची ओवी खंड०३/ओवी-०५तील काही चरणे :-

॥ निरंजन-निराकार' निर्गुण । निर्भय पद जाण एक ॥
॥ या षट्चकाच्या शेवटी । चंद्र-सुर्याच्या मेळी गोल्हाटी ।
नाद-बिंदुच्या पाडुन गाठी । पद-पिंडाच्या होईन भेटी ॥
भजनं :- ॥ आनंदाची ज्योत गडे हो आनंदात रहयीं ।
लेकराची बाणी पुरवे हा राया यवुनी ॥
॥ बिंदु स्थानी अष्टदळ कमळी । जीवहंस केवळ आहे ।
अगोचर स्थानी देव । निरंजन आहे ॥
॥ रजगुण स्वादीस्थानी । सत्वगुण नाभी भवनी ।
नाद बिंदुचे स्थान । मृग नयनी ॥ खंडं.०३/ओवी.२६

श्री मुळस्तंभ अध्याय ११ तील काही श्लोक :-

॥ सहस्त्रदळ भुवन । तेथे सर्वांचा मेळा जाण ।
येथे जन्म-मरण संचित कर्म । असे जाणं ।
येथे सोहंम् शब्द बिज । असे जाण ।
येथे अंग स्थळी प्रलय जाण ॥ मुळस्तंभ-अ-११-श्लोक.१२९-१३४
॥ त्या शट्चकांच्या शेवटी । पडे नाद-बिंदा गाठी ।
होये पद-पिंडास भेटी । मग देह नाहीसा होती ॥ अ-११-श्लो.१३७
॥ त्या आनंदपदाच्या तळी । आणी चंद्र-सुर्याच्या मेळी ।
असे सुखः गोल्हाट मंडळी । प्रेमयोगी तो शिवतत्वी ॥ श्लो.१३८
॥ ऐसा शिवतत्वी शिव झाला । आणी कामतत्वी गुंतला ।
गुंतोन पुनःश्च उगवला । तो शिव योगी झाला ॥ अ-११-श्लो.१४०

वरील चरणांचा सार थोडक्यात कृष्णकृपेने दिलेल्या प्रकाश ज्योतीच्या प्रभावा खाली असा प्रचोदयात् होतो की :
या गायपाच्या खेळाच्या वेळी :

१. शरीर वज्रासारखे केल्या जाते.
२. मनाचे मनपण सोडुन दिल्या जाते.
३. षट्चक भेदन करून वृत्ती सहस्त्रादळी प्रथम मिसळवल्या जाते. मुलाधारा वरची कुंडलीनी उठवुन सहस्त्रदळावर चढवल्या जाते. त्या सहस्त्रदळाच्या शेवटी वर चढुन आलेली ऋण कुंडलीनी व घनं् सोयंम् ज्योत यांचे जेव्हा ऐक्य होते, तेव्हा चकमक होवुन त्या चकमकीची स्फोटक परिस्थिती ही एकच अनाहद् चा नाद चा गुणगुणांत गोंधळ/गलबला म्हणजेच आरोही उत्पन्न करते.

॥ चौथ्या खुम्मी चतुर्पती । ज्योत प्रकाशन देही ।
एकच होईन आरोही । जागी करन चौताळी ॥ खंड०५/७७
॥ एकच देईन गाही/आरोही याचे । मानु नका भय ।
चतुर्पती चा कार दावन । डोळ्या समोरं ॥ खंड०५/७७
॥ तुम्ही डिकावं या नामाला । सुर्यप्रभा सम होईल उजाला ॥
॥ तुम्ही डिकावं या नामाला । चंद्रज्योती सम होईल उजाला ॥
॥ ज्योतीनं ज्योत प्रकाश । भरन देहीत ।
उजळनं रूप सुर्याच्या तेजात । जैसे रूप सुर्याचे तेज ॥
॥ उपमा देवु तरी काय ? आकारात हा देव आला नाही ।
नाही छाया नाही काया । कैसा पाहु हा देव राया ?
आपणास पाहता तो पाहवेना । बळ करीता आकळेना ॥
॥ परात्परं परात्परं । हा देव आहे अगोचर/हा देव आहे निराकार ।
या देवाच्या भक्तीनं सिध्द झाले ।
देवपण या सिध्दांच्या आंगी आले ॥ खंड०२/३६
॥ समईया लागल्या ठायी-ठाई । कर्ता-याची अमोल चतुराई ।
ब्रम्हांडाची दिवनाली चेती । तेल चैतन्य वात सत्रावी ॥
॥ ज्योत चमके जिवनकळा । जीव-मोक्षाचा हिरं जिव्हाळा ।
उजाळा उजळे दिपमाला, कर्ता-याच्या आंगी अघातकळा ।
जिवांची जिवनकळा । सेरूपी उभा कृष्ण सावळा ॥खंड०२/३६

तद्नंतर ही एकच अनाहद् शब्दारोळी व्दारे उत्पन्न झालेला गुणंगुणांत चा गलबला याचा लय होत अनाहत् नादाने प्रकाश होतो. हा प्रकाश व्यक्त स्वरूपात येवुन सहस्त्र कोटी सुर्य प्रभा सम उजाला होतो. कोटी सुर्यप्रभा सम प्रकाश उत्पन्न होतो. देहीची चौताळी जागृत होते. ज्योत देहीत प्रकाशते. ठाई ठाई समया लागते. मस्तक ब्रम्हावरची दिवनाली चेतुन तिचा प्रकाश पडते. या प्रकाशाच्या व्यक्त स्वरूपास प्रकाश बिंदु असे म्हणतात. अश्या रितीने बिंदुस्थानावर अनाहद् नाद व्दारे प्रकाश जेव्हा योगीत होतो तेव्हा त्यास नाद व बिंदु असे म्हणतात. तेथे मग या नाद-बिंदु एकमेकांत गुंतुन त्यांच्या गाठी पडण्यास सुरूवात होते.



४. तद्नंतर पद-पिंडाच्या भेटी करिता ब्रम्ही प्राण आकर्षुण ब्रम्ही टाळी लावल्या जाते.
५. अशी टाळी जेव्हा ब्रम्हानंद पदी बसवल्या जाते, तेव्हा त्या परमात्मा कृपेने कायेच्या तत्वांचा सहस्त्रदळी प्रवेश होवुन हे कायेचे तत्वे त्या कोटी सुर्यप्रभारूपाच्या तेजोमय प्रकाश निर्गुण स्वरूपी आकृतीत मिसळुन स्वरूपी ऐक्य ब्रम्हरंधभुवनी होते. हेच ते सहस्त्रदळ भितरी जेथे जीव-शिव एक होते ते ब्रम्हरंध भुवन होय.



६. जीव-शिवाच्या ऐक्यात सत्रावीचा हिरण्यगर्भ कायातत्वांत भिणुन कायातत्वे खेचरी होतात. व पदपिंडास ग्रासुन पंचकोषास ठाव उरत नाही. पद-पिंडाच्या भेटी होवुन देहे नाहीसा होतो । देहे गायप होतो ।
७. अश्या प्रकारे देहे गायप करून तो स्वयंः शिव होवुन त्या आनंदाच्या तळी, चंद्र-सुर्याच्या मेळी सतत क्रमाक्रमाने चालणा-या गोल्हाट मंडळी तो सिध्द शिवयोगी प्रेमयोगी बनुन, आनंदाची ज्योत बनुन आनंदीत परमय सुखाने राहतो. असा हा प्रेमसुखाचा गडी असलेला शिवयोगी आनंदाची ज्योत बनुन आनंदित परमय सुखात राहत असतो.

॥ आनंदाची ज्योत गडे हो । आनंदात राहयं ।
लेकरांची बाणी पुरवे । हा राया येवुनं ॥
॥ देही होतो विदेही होतो । येतो पुन्हा पुन्हा ।
अथर्वन् वेद चौथ्या खुम्मी । करतो गर्जना ॥

८. आणी त्या शिवयोगीला कार्य करण्याची ईच्छा झाल्यास त्या कार्याच्या कामांच्या तत्वी म्हणजेच कामतत्वी गुंतुन पुनःश्च उगवतो.
९. म्हणजेच .पुनःश्च कायापालट सिध्दी व्दारे काया धारण करून प्रकट होवुन अवतरतो. आपले ईच्छीत कार्य सिध्दी करतो. व पुनश्चः असाच गायपाचा खेळ करत गुप्त होवुन यवगान यवगी संचारीत राहातो.



थोडक्यात असे योगशात्राच्या अंतिम टप्प्यात पोहचलेले शिव योगी *गायपाचा खेळ उभारून देहीतील षट्चक्राच्या शेवटी सहस्त्रदळीच्या वर असलेल्या बिंदुस्थानावर नांद-बिंदुच्या गाठी पाडुन, कायातत्वांच्या सहस्त्रदळी प्रवेश करून कायेचे तत्वे निर्गुण स्वरूपी मिसळुन स्वरूपी ऐक्य करतात. आणी त्या निर्गुणाने आनंदपदाच्या तळी चंद्र-सुर्याचा जेथे मेळ होतो त्या गोल्हाट मंडळी असलेल्या सुखाठाई जीव-शिवाचे ऐक्य करून स्वयंः शिव होतो.*

*अश्या प्रकारे पद-पिंडाच्या भेटी करत निर्गुण निराकार केवळ देह धारण केला जातो. आनंदाची ज्योत बनुन आनंदात गुप्त रूपी राहत चतुर्पतीचे कार्य करण्यास गुंतते. असे आनंदाची ज्योत बनुन आनंदात राहत आपल्या लेकरांची बाणी पुरवतो. लेकरांनां देणं देतो. भैसाच्या यवगाची मांडणीचे कार्य करण्यास*

*गुंतुन रहतो. असे गुंतुनी* ''पुनश्चः देह धरून कार्य करण्याची ईच्छा उत्पन्न झाल्यावर ''कायापालट सिध्दी'' व्दारे असे योगी नवा कोरा देह नव्या को-या भुम्मेवर धारण करत प्रकट होवुन कार्य करण्यास उगवतो. आपले ईच्छित कार्य करतो.



आणी पुन गायपाचा खेळ करून आनंदाची ज्योत बनुन आनंदात राहत आपल्या कार्यात गुंतुन रहतो. प्रकट होतो. गायप होतो. असेच तो देही होतो. विदेही होतो. येतो पुन्हा पुन्हा । चौथ्या खुम्मी चतुर्पती अथर्वन् वेदाची करतो गर्जना पुनःपुन्हा... गायपाचा खेळ करतो. असो.

-: गायपाच्या खेळाचा भाग संपुर्ण :-

**गायपाचे खेळ करणारे योगी :-**

असे गायपाचे खेळ करणारे योगी ढवळागीरी आजही संचारत आहेत. असे जाणते जाणतात. त्यापैकी एक योगी म्हणजे हा कृष्णा ! जो या सर्व गायपाचा खेळ करणा-या शिव योगीच्याही पुढे गेला आहे. आदीपुरूषाचा पुर्ण अवतार झाला. अशी सांगी खंड०२/१६:-मोहरच्या ओवी चे पहीलेच चरण गर्जुन करत आहे.

तो 'अनामीक परात्पर भक्तयोगी भक्तात्मा कृष्णा वरील प्रकारे गायपाचा खेळ करत आपला जुना देह तेथुन गायप करुन पुनःश्च नव्या को-या भुम्मेवर नवा कोरा देह धारण करुन अवतीर्ण होत असे.

आणी पुनश्च चर्तुपती निराकार-निराधार निरंजन ज्योतीर्मय आदीपुरुष यांची भक्तीकार्य अखंड निरंतर सुरु ठेवत असे. चर्तुपती निराकार-निराधार निरंजन ज्योतीर्मय आदीपुरुष यांची भक्तीचे बिजे जीज्ञासु, जाणत्यात रोवण्याचे कार्य नित करीत असे. निरंतर चतुर्पती ग्यान भक्तीच्या गाहया-पुरावे साक्षी दृष्टांता सह त्यांना देत असे. सांगी करत असे. दवंडी देत असे. गर्जना करत असे.

अश्या प्रकारे 'ज्याच नाव-गाव माहीत नाही' असा जो तो **अनामीक भक्तात्मा कृष्णा'** चतुर्पतीचे कार्य करत करत, मुळयवगापासुन चर्तुपती निराकार-निराधार निरंजन ज्योतीर्मय आदीपुरुष यांची भक्ती अखंड निरंतर करत करत कलयवगाच्या संधीकाळापर्यंत आला.

**कलयवगाचा संधीकाळ :-**

हा अनामीक भक्तयोगी भक्तात्मा कृष्णाजी (सध्याचे प्रचलीत नाव) यांनी मुळस्तंभीचा देव निराकार-निराधार निरंजन ज्योतीर्मय आदीपुरुष यांची भक्ती मुळयवगापासुन यवगान यवगात करत कलयवगाच्या संधीकाळापर्यंत येवुन गुप्तपणे उभे आहेत.. **(**मुळयवगी होत काय ? मुळयवगी कोण ? ईत्यादी ज्ञानाकरीता 'खंड०१/०१/०१:-आदीपुरुष आदीगण' व 'खंड०१/०२/०१:-शक्तीची ओवी'....इत्यादी चे निरसन वाचावे**)**

अनामीक परात्पर भक्तयोगी भक्तात्मा कृष्णाजीने निराकार निराधार निरंजन ज्योतीर्मय आदीपुरुष यांची भक्ती यवगान यवग केलेली आहे. त्यांना आधीच प्राप्त असलेल्या अनेक शक्तीयॉ-सिध्दीयॉ पैकी गायपाचा खेळ व्दारे जूना देह गायप करून नवा कोरा देह धारण करुन नव्या को-या भुम्मेवर अवतीर्ण होत रहये. तेथे चतुर्पती चे ज्ञानबिजे रोवत चतुर्पती ची भक्ती करून पुन्हा तेथुन गायप होवुन नव्या को-या भुम्मेवर प्रकट होत होत त्यांनी यवगान यवगी चतुर्पती आदीपुरूष धन्याची भक्ती केलेली आहे. त्यांनी अशी अखंड भक्ती संपुर्ण चौयवगाच्या चौकडीत केलेली आहे.

त्रैतायवगापासुन या निराकार-निराधार निरंजन ज्योतीर्मय आदीपुरुष यांची भक्ती करत करत व्दापर यवगी आले. आणी आदीरुपाचा पुर्ण अवतार श्रीकृष्णा संग त्यांच आदीरुपाचा भक्तात्मा बनुन अवतीर्ण झाला. चतुर्पती आदीपुरुष भैसा चा पुर्ण अवतार श्रीकृष्ण याचा सखा-भक्तयोगी सवंगडी बनला. कृष्णज्ञान गीतांमृत प्राशन केले. आणी त्याच्याच संग गायप झाला. असे *‘खं.०६/ओ.१२:-हा ऋषी म्हणे, शुन्याकार होईल गा पृथ्वा’, ‘खं.७/ओ. १८:-गोकुळी अवतार’, ‘खं.०१/०१/०३:-आदीगण नेमला’* इत्यादी ओवी ंचे चरणे गर्जुन सांगी करतात. या ओवीच्या निरसनातुन ज्ञान घ्यावे.

कलयवगाच्या संधीकाळात भक्तात्मा कृष्णा पुनःश्च प्रकट होवुन अवतरला. या कृष्णाव्दारे मिर्तलोकी स्थापीत झालेल्या *“चतुर्पती कृष्ण अवद्युत”* पंथाच्या भुम्मेवर कृष्णाच्या अमर्यात मेद्याबुध्दीचा दिव्य प्रकाश पडलेला आहे.

कृष्णाच्या दिव्य प्रकाशाच्या किरणाने, दिव्य झलकेनेच आम्हाला आमच्या मर्यादित ईंद्रीये, मन, मतीच्या शक्तीनुसार जे काही प्राप्त झाले आहे, जे काही देणं मिळालेत त्याच्या बळावर त्यांच्या यवगान यवगीच्या कार्यकाळातील काही काही गुप्त अवताराचे ज्ञान कथन करण्याचा प्रयत्न करण्याचे धाडस कृष्ण कृपेनं करु शकतो.

तेही त्यांच्या कृपेने त्यांनीच आम्हापर्यत पोहचवलेल्या काही ओव्यांच्या चरणांच्या आधारा-आधारे लगंडत लगंडत ! त्या कृष्णज्योतीच्या प्रकाशात जे काही दृष्टांत गाही मिळाल्यात. त्याचा आधारावर कृष्णं प्रकाशाने प्रचोद्यात् झालेल्या धियोने निरसन करण्याचे थोडेबहुत आता धाडस करु शकतो.

हेकोडे-तेकोडे(वेडे-वाकडे) या कृष्ण-अवद्युत गाईचे सगर/मार्ग आहेत. म्हणुनच काही ओवीचे चरणे गर्जुन सांगी करतात की :

॥ हेकोडे-तेकोडे, गाईचे सगर ।
देव दिगांबर, महाराजा हो ॥ खं.०७/ओ.७२
॥ गाईचे वाणी, उभे दिगांबर धनी ।
अठरा हे ज्ञानी, हा देव आहे पुराणी ॥ खं.१०/०२/आ.१४
॥ देही होतो, विदेही होतो, येतो पुन्हा पुन्हा ।
अथर्व वेद, चवथ्या खुम्मी, करतो गर्जना ॥ खं.१०/०२/आ.२६

आदीरुपाचा हा भक्तात्मा देह धरुन देही होतो. गायपाच्या खेळ करुन विदेही होतो. पुनः देही होवुन अथर्वन् वेद, चवथ्या खुम्मी गर्जना करतो. पुनः पुनः गायपाच्या खेळ करुन विदेही होतो. हा दहाही दिशांचे पांघरुन घेत असल्यामुळे, हा महाराज देव दिगांबर होय. याहीस देव दिगांबर म्हणुन तुम्ही भजावं आता !

॥ या देवळात ही ज्योत नांदे । पुर्व, पश्चिम उत्तर दक्षिण, दहाही बाजुने ॥

गायपाच्या खेळ करत करत हा भक्तात्मा प्रथम यवगापासुन कृथात अवद्युत झाला. कृथातुन-त्रैताचा पुर्णात्मा राम संग हा भक्तात्मा अवतरला. आणी- व्दापरच्या पुर्णात्मा कृष्ण संग हा भक्तात्मा अवतरला. व पुढे ही अवतरत आलेला आहे

या कलीच्या संधीकाळात पुनश्चः हा भक्तात्मा आपल्या भक्ती भाव च्या बळावर पुर्णात्माशी ऐक्य करुन अवद्युत बनुन कृष्णाजी रुपात पुर्ण अवतार झालेले आहेत. ते ठाई ठाई अवतलेले आहेत. ते असे :

॥ बोध कलीचा, झालासे धुरा ।
भजा श्रीकृष्णाला, आणाव घरा ॥ खं.१०/०२/आ.२९
॥ कल यवगी राज ऐसे बोधोजी झाले ।
मिर्तलोकी तिरगुणाचें उडवन ठिकाण ।
या यवगाचे गुण, देव निचंत का बसले ॥ खं.०७/ओ.२७

कलयवगी हा भक्तात्मा चतुर्पती निरंजन ज्ञानाचा बोध देणारा बनला. बोध-ज्ञान देवुन जनलोकास चतुर्पती ज्ञानी बनवले. जनलोकास चतुर्पतिचे बोध देत देत कलयवगाच्या संधीकाळात हा पुनःपुनश्चः अवतरला आहे.

कलयवगाच्या संधीकाळातील भक्तात्मा कृष्णाजी चे गायपाच्या खेळाव्दारे घेतलेल्या गुप्त अवताराचे ज्ञान आम्हास यशवंतराव बुवा यांच्या ''खंड०७/ओवी-७०:-महाराजाचा शकुन आला सत्यवग पाहय !'' या ओवीच्या सांगीने बरेचसे केलेले आहेत.

कृष्णभक्त श्री यशवंतराव बुवा यांनी कृष्णाजी कडे अर्ज करुन या गुप्त ज्ञानासाठी कितीतरी सव्वा महिने केलेत. सरतेशेवटी त्यांना त्याच्या भक्तीला प्रसन्न होवुन सावंग्यातील एका निरंजनऋषि ने निश्कलंकी ज्योतीमर्य स्वरूपात गावाच्या येशीवर असलेल्या मुज-यावर त्यांना भेट दिली. निरंजनी भेटी झाल्यात.

निरंजन ज्योतिर्मय ऋषी ने त्या बुवाला सांगी केली की : सावंग्याच्या येशी च्या आतमध्ये पुर्णावतार कृष्णाजी चा मान आहे. ज्याचा मान त्याला दिलाच पाहिजे. सावंग्यात कृष्णाची अस्तुकी आहे. म्हणुनच सावंग्याच्या येशीच्या आत तुझी अस्तुकी व कार्यसिध्दि करण्याच्या कामास हा ऋषि साहय करु शकत नाही. परंतु येशीबाहेर तुझा संग करुन योग्य ती मदत-साहय करतो. असे वचन देतो. म्हणुनच आता कृष्णाजीचे गुप्त अवताराच्या शोध-कार्यासाठी तुम्ही सावंग्या बाहेर निघा ! आम्ही मार्ग दावतो. आम्ही साहय होतो.

आपल्या भक्ती-भावाच्या बळावर येशीवर देवऋषि गोयल्या च्या दुस-याच दिवशी, यशवंतराव बुवा यांनी सावंग्यात कृष्णाजी कडे आपल्या ईच्छीत कार्यसिध्दी साठी पुन्हा एक सव्वा महिन्याची अर्ज लावली. आणी त्याच दिवशी सावंगा गावाबाहेर निघुन, भक्तात्मा कृष्णाजी चे गायपाच्या खेळाव्दारे घेतलेल्या गुप्त अवताराचे ज्ञान मिळवण्यासाठी येशीवर मुज-यास आलेत.

येशीवरच्या मुज-यावर आल्यानंतर येशीवर उभा असलेला, निरंजन ज्योर्तिमय ऋषी हा त्यांच्या देहीच्या आत्म ज्योती मध्ये अतंर्भुत झाला. तो निरंजन ऋषी जो जो मार्ग दावत होता, त्या त्या मार्गाने वाटचाल करत करत ते गेलेत. यशवंतराव बुवाने भक्तात्मा कृष्णाजी चे कलयवगाच्या संधीकाळ मधील घेतलेल्या अवतारांच्या ठाण्यावर भेटी दिल्यात. आणी मुंगी पैठन नदीवर सव्वा महिना वाठवला.

भक्तात्मा कृष्णाजी चे कलयवगाच्या संधीकाळात कुठे कुठे अवतार झालेत, याची सांगी त्यांनी *''महाराजाचा शकुन आला सत्यवग पाहय ! खंड०७/ओवी-७०''* या ओवीत शब्दबध्द करुन ठेवलेली आहे.

यशवंतराव बुवाच्या ''महाराजाचा शकुन आला सत्यवग पाहय !'' या ओवीसह ''जग ओळखेना ! सांगतो गाही कोणी ऐकेना ! खंड०२/ओवी-१७''

या ओवींच्या काही चरणे व इतर चरणांच्या सांगीच्या आधाराने, आता आपण कलयवगाच्या संधीकाळात समोर जाउ या !

॥ सारजा राणीच्या, घरी कृष्णाने । धरला अवतार ।
कानडच्या, बळीराम राजाच । उध्दारलं कुळ सारं ॥ खं.०५/ओ.७०
॥ कानडचा, बळीराम राजा । होय तो गोदेचा ।
तिथ मचले, दोहित फितुर । पहा तिरगुणांचा ॥ खं.०५/ओ.७०
॥ तिरगुणं सत्ता, पाहे आता । गमावला रंग ।
याहीचा केला, संग शेवटी । आणला भगं ॥ खं.०५/ओ.७०
भजनः- ॥ अडीच दिवस/रोज मागते राजा । कानल ध्वजा ।
अनामत भजा, निश्कलंकी लागन ध्वजा ॥ खंड०४/१८

**स्थळ :- कानड**

दक्षिण भारतात भक्तात्मा कृष्णाजी ने सारजा राणी च्या घरी अवतार धरला. आणी कानड प्रदेशाच्या बळीराम राजाचे सारे कुळ उध्दारले गेले.

कानड चा बळीराम राजा चे मुळ तेथे वसलेल्या गोदेगावचे होते. तिथे भक्तात्मा कृष्णाजी ने सत्य देवाची म्हणजेच मुळयवगाचा निराकार निराधार निशंःकलंकी निरंजन चैत्यन्यमय आदीपुरुष भैष नारायणाचे चतुर्पती ज्ञान भक्ति चे बिजे रोवण्याचे कार्य करत होता. या सत्य देवाची ओळख, गाही-साक्ष-पुरावे यांच्या सह चतुर्पतिची ग्यान-भक्ति तेथील जनलोकास दिली.

जे जिज्ञासु व जाणते होते, त्यांनी कृष्णाच्या चतुर्पतीला ओळखले. परंतु तिरलोक्याचे तिरगुणी अवतार जन व तिरगुणांची पक्की झापड असलेले तसेच अध्यां हळकुंडात पिवळे झालेले इतर जनलोक व ईतर जग चतुर्पती धन्याला ओळखेना ! चतुर्पती धन्याच्या कितीही गाही त्यांना दिल्यात तरी ते मानेना !

कारण की : तिरलोक्याचे तिरगुणी अवतार सह तिरगुणी सत्ताधारीं नी जर चतुर्पतीला मानले, तर त्यांना भक्त मिळणे कठिण होवुन जाईल ! त्यांची सर्वसामान्यावर असलेली सत्ता जाईन. हे चांगल्या रितीने ते तिरगुणी अवतार जन सह तिरगुणी सत्ताधारी जाणत असल्यामुळे, चतुर्पति उमजत असुनही त्यांनी चतुर्पतीला पडित ठेवण्याचे कट कारस्थान रंचले होते. कृता यवगापासुन असेच घडत आले आहे. याच कारणास्तव तिथेसुध्दा चतुर्पति च्या ज्ञान भक्ती कार्यात या तिरगुणींनी दोहित मचवले. तेथील सत्ताधारी मानवांना कोपवले. फितुर केले. आणी तेथील आध्यात्मीक वलय व सत्ता या तिरगुणींनी ˙पुर्णपणे हाती घेतली.

तिथे आता तिरलोक्याचे तिरगुणी अवतारांचे हस्तक सत्ता पाहत असल्यामुळे, त्या तिरगुणी सत्ताधा-यांनी तिथे भक्तात्मा कृष्णाजी च्या कार्यात भंगा आणुन चतुर्पता गाई ला पडित टाकण्याचा उपक्रम हाती घेतला होता. भक्तात्मा या तिरगुणींच्या उपक्रम च्या उचापत्या मुळे दुःखी झाला होता. अशी सांगी 'जग ओळखेना !' या ओवींचे चरणे गर्जुन करतात की :

॥ दुःख मी सांगु काय माझे । विश्व चैत्यन्य चांगली पाहयें ।
जगाच्या देखताची होय । जग ओळखेनां ।
सांगतो गाही कोणी ऐकेना । ॥ खंडं.०२/ओ.१५
॥ अरण्यात होता एक जीव । संग होती एक सवं ।
सत्य ओळखला आत्मा-राम देव । जग ओळखेनां ।
सांगतो गाही कोणी ऐकेना । ॥ खं.०२/ओ.१५

हे तिरगंणी जनलोक सत्ता-लालचेपायी प्रतेक वेळी चतुर्पती ज्ञान भक्ती कार्यात भंगा आणुन या चतुर्पता गाईला लबाड म्हणत असे. दोहित मचवत चतुर्पता गाईवर सरळसाध्या व अज्ञानी जनलोकास कोपवत आलेले आहेत. या

चतुर्पती अथर्वन् वेदापासुन दुरच ठेवत आलेले आहे. मायेची तिरगुणी सत्ता टिकवुन सत्ता चालवण्याच्या लालचेपायी हे सर्व तिरगुणी अज्ञानी जनांस 'चतुर्पता अर्थवन् वेद गुप्त आहे' असे सांगुन या चतुर्पता गाईवे अमृतपान पिण्यापासुन जनलोकास वंचित ठेवत आलेले आहेत. हे दुःख मी काय सांगु माझे ?

परमात्माने चेतवलेल्या ज्या चैत्यन्य सोहंम् ज्योती स्वरूपी मुळस्तंभाच्या आधारावर हे तिरगुणीं जनांचे देहे उभे आहेत. म्हणजेच ज्या आत्म चैतन्य ज्योतीच्या आधारावर हे तिरगुणी सह सर्व देहे उभे आहेत, त्याच चैत्यन्य ज्योती चे भक्ती करणा-या चतुर्पति भक्तांच्या भक्ती-कार्यात हे तिरगुणीं जन सत्तालालचा व विषयवासनेत अडकुन चतुर्पती चे कार्य भंगा आणत होते. भंग करत आलेले आहेत. दोहित मचवत आहेत.

सत्तालालचा, स्वार्थीपणा व विषयवासनेत अडकलेली यां सर्व तिरगुणीं जनांची चैत्यन्य ज्योत उभी ठेवणारा तो परमात्मा वक्रदृष्टीनं आपल्या तेजोगुणी अंशअवतारामार्फत चांगला पाहत आहे. ही परमात्माच्या तेजोगुणी अंशाने उभी झालेली चैतन्य ज्योत तर त्यांच्या देहित उभी आहे.

या जगाच्या देखता ती उभी असुन हे जग तिला अनुभवत आहे. तिच तर या जगाच्या देखताची चतुर्पती परमात्म्याची ज्योत होय ! तिचाच तर अनुभव हे जग घेत आहे. तिच्या भरवश्यावरच तर सर्व देहीचे जग चालत आहे. तरीही तिला जग ओळखेनां ! चैतन्य ज्योतीचे मुळस्त्रोत् असलेल्या चतुर्पती धन्याला न भजता तिरगुणी देवतांना भजत आहे ?

या तिरगुणींनी चैत्यन्य ज्योतीवर काजळी आणलेली आहे. तिरगुणी तिचा प्रकाश बाहेर पडु न देता मायेच्या तिरगुणांने पाडलेल्या अंधकाराचे रक्षण करत आहे. त्यां तिरगुणीच्या अंधःकाराने अंधार पडलेल्या अंधारी अरण्यात एक दिव्य प्रकाश देणारा भक्तात्मा-जीव होता. त्याच्या संग त्याच्यांवर माया-ममतेचा वर्षाव करणारी एक स्त्री शक्तिमाता सारजा नामाची सव होती. शक्तिमाता सारजा राणी च्या घरी भक्तात्मा कृष्णाजी देवाने अवतार धरला होता. तिथे त्यांनी चतुर्पति आदीपुरुष देवाचे चतुर्पति ग्यान भक्ती बळीराम राजास देवुन, त्या कानड च्या बळीराम राजाचे सारे कुळ उध्दारले. सत्य देवाची ओळख, गाही, साक्ष, पुरावे यांच्या सह चतुर्पतिची ग्यान भक्ति चे बिजे तेथील जनलोकात रोवलीत.

तिथेसुध्दा चतुर्पति च्या ग्यान भक्ती कार्यात या तिरगुणींनी दोहित मचवले. तेथील सत्ताधारी मानवांना कोपवले. फितुर केले. आणी चतुर्पतिचे कार्य भंगा आणले.

तिरगुणींव्दारे चतुर्पतिचे इच्छीत कार्य भंगा आणल्या गेल्यामुळे, कृष्णाने तेथे गायपाचा खेळ उभा केला. आणी या खेळाव्दारे भक्तात्मा कृष्णाजी तेथुन गायप झाले. आणी नवा कोरा देह नव्या को-या भुम्मेवर धारण करुन ते आंधप्रदेशात अवतरलेत.

**स्थळ :-आंधप्रदेश**

॥ अमरावती नगर । होतो जयजयकार ।
पहा हर्ष अम्बरं । कोंडाशीला ॥ खं.०७/ओ.७१

भजने व गजरेः-

॥ अमरावती नगरी जयजयकार । कृष्ण, थडीच्या कोंडाशीला ।
कोडाशीला आनंद झाला, एकाच आरोहीला ॥खं०९/२४

॥ कापुर उजळा, ज्योत कृष्णानदीवर नागार्जुन सागर ।
कोंडाशीला जाउन पाहय, हरुर्ष अंबर ॥खं०९/२४
॥ कृष्णाजीचे घरं । अमरावती नगरं ..।
गुप्त झाली ज्योत, सापडला मोती सावंगपुरं ॥खं०९/२४ ॥
चिरोडीच्या शिखरावर, कृष्ण हरी अवतरले
भक्त झाले हैराण, भैसनाम मुखी आले. ॥खं०९/२४

भक्तात्मा कृष्णा दक्षिणेकडील कानड प्रदेशातुन गायपाचा खेळ करून तेथुन गायप झालेत. आणी आधंप्रदेशातील कृष्णा नदीच्या थडीवर-तिरावर वसलेले गाव कोंडाशी, तालुका अमरावती, आंधप्रदेश येथे कायापालट सिध्दी व्दारे अवतरुन प्रकट झालेत. या अमर-अंबर कृष्णात्मा वृक्षाने हर्ष-आनंद देत चतुर्पती आदीपुरुषाची ग्यान भक्ती चा परमय पसरवण्यासाठी नागार्जुन या स्थळी पक्की मांड बसवली. निराकार-निराधार निशं:कलंकी निरंजन चैत्यन्यमय आदीपुरुष भैष नारायण यांची ग्यान भक्ती चा परमय तेथील जनलोकात दरवळु लागला.

चतुर्पतिच्या ग्यान भक्ती व्दारे सत्य देवाचे चतुर्पती ज्ञान जनलोकांच्या मुखी पडुन त्यांना सुख प्राप्ती होवु लागली. कृष्णात्माने दिलेल्या चतुर्पति च्या या एकाच आरोळी व्दारे तेथे सुखः उभे होवुन कोंडाशीला जिकडे-तिकडे आनंदाव्दारे आनंदी आनंद झाला. चतुर्पतिच्या या एकाच आरोळी मुळे तेथील तिरगुणी सत्ताधारी जन खडबडुन जागी होवुन, चतुर्पतिच्या ग्यान भक्ती कार्यात भंग आणण्यासाठी कार्यरत् झालेत.

हे तिरगुणांचे हस्तक पुर्विप्रमानेच या चर्तुपतीच्या ग्यान भक्ती कार्यात भंग आणणार आहेत. याची पुर्ण जाणीव त्या जाणत्या भक्तात्मा कृष्णा ला होती. पुर्वी तिरगुणींच्या हस्तका व्दारे, त्या तिरगुणींनी कोपवलेले मानव त्यांना ठाव होते. म्हणुनच 'जग ओळखेना' ही ओवी आपल्या चरणां व्दारे अशी सांगी करते की :

॥ अरण्यात दिला एक ठाव । नागार्जुन त्याचे नाव ।
कोपले आहे मानव ठाव । जग ओळखेनां ।
सांगतो गाही कोणी ऐकेना ॥ खं.०२/ओ.१७

हे तिरगुणींच्या षडयंत्राव्दारे कोपलेले मानव कृष्णाल ठाव आहे ! हे कोपलेले मानव चतुर्पति कार्यात भंगा आणु शकते. अश्या बहु मानवाचे वाटते भेव ! कारण की : तिरगुणी-माया-देवतांनी त्यांचे तिरगुणी ज्ञान हे मधुपान प्रमाणे अज्ञानी जनलोकास पाजुन त्यांची शुध्द हरवुन ठेवलेली आहे. या मधुपानाप्रमाने प्राशन केलेल्या तिरगुणी ज्ञानाच्या संगतिन हे तिरगुणी ज्ञानीजन चतुर्पतिचे ग्यान भक्ती घेतीन. मौस म्हणजे चारही वाचेतुन निघालेले चतुर्पति नाम ग्यान भक्ती घेईलही.

परंतु या चतुर्पति ला बेईमान होवुन या मौसवाणी च्या साहयाने पुनश्चः स्वतःचेच भक्त बनवण्याच्या उपक्रमाला सुरुवात करतील !. कारण की : ''जैसे कर्म तैसे फळ'' या न्यायाने त्रिदेवांनी व या तिरगुणांचे तिरलोकी अवतारांनी जसे कर्म करुन स्वतःचेच भक्त बनवले, तसेच त्यांचे फळ म्हणुन त्रिदेवांचे भक्तही स्वतःचेच भक्त बनवत तेच करतील ! मधुपान घेतील या चतुर्पतिच्या मौसासव ! आणी या चतुर्पतिला बेईमान होवुन स्वतःचीच महीमा, अस्तुकी करेल. म्हणुनच या कोपलेल्या तिरगुणांच्या हस्तकां पासुन जरा दुरच चतुर्पता ठेवलेली बरी !

या कोपलेल्या तिरगुणांच्या हस्तकापासुन जरा दुरच नागार्जुन अरण्यात चतुर्पतिचा ठाव दिलेला आहे. चतुर्पती ची पक्की मांड बसवलेली आहे.

जेणेकरुन या तिरगुणांच्या हस्तकांचा चतुर्पता ग्यान भक्ती जे कार्य उभे केले आहेत, त्यात त्यां स्वार्थि तिरगुणींचा अडथळा नको ! हस्तक्षेप नको.

या अवतार कार्यात त्या जाणत्या भक्तात्मा कृष्णा ने जाणले की : आदीपुरुष जेव्हा जेव्हा परीपुर्णतमपुर्ण अवतार घेवुन चतुव्युह रुपांच्या रंचनेत येतो, तेव्हा तेव्हा त्या रंचनेत पुर्णात्मा हा पुर्णअवतार रुपात अवतरत असतो. आताही तोच आधीचा पुर्णात्मा तिकडे महाराष्ट्रात विठ्ठल रुप धारण करुन सच्च्या भक्ताला भेटी देत आहे. देणार आहे. त्याला गठवण्यासाठी ही नामी संधी चालुन आली आहे. महाराष्ट्रात प्रकट होवुन कार करण्याचा, लिला-माव करण्याचा समय आला आहे.

पुर्णात्मा ला गठवुन वचनी गोवुन त्या पुर्णात्मा संग ऐक्य साधुन, आदीरुप आदीपुरुषाला परीपुर्णतमपुर्ण अवतार घेण्याची विनवनी करण्याची ही नामी संधी चालुन आली आहे. ही संधी साधण्याकरीता पुर्णात्मा जिथे खेळ करणार आहे, तिथेच आता या भक्तात्मा कृष्णा ला अवतीर्ण व्हावे लागेल. आणी भक्तात्मा-पुर्णात्मा चे ऐक्य करुन निराकार-निराधार निशं:कलंकी निरंजन चैत्यन्यमय आदीपुरुष भैष नारायण ला परीपुर्णतमपुर्ण अवतार घेण्याची विनवनी-अर्जी करावे लागेल....इत्यादी कार्यासाठी त्या भक्तात्मा कृष्णाने कोंडाशीला गायपाचा खेळ करुन तेथुन गायप झाला. आणी पंढरपुर महाराष्ट् येथे प्रकट होवुन अवतरला.

**स्थळ :- महाराष्ट्**

**०१. पंढरपुर :-**

॥ पंढरीला, गेला कृष्णहरी । बोधपणी उरला ।
मायावतीच्या पोटी तो । उभा राहीला ॥ खं.०५/ओ.७०
॥ धानक ऋषी पोटी याहीनं । उध्दारली सुद ।
तिथ उभे धनी याहीनं । केला हरीबोध ॥ खं.०५/ओ.७०
॥ ज्याची होती सत्ता तो धनी । उभा अवद्युत ।
नामीच राहा गडेहो उभी । अकाशमात ज्योत ॥ खं-०५/ओ.७०

कोंडाशीला ज्ञानाचा बोध देत बोधपणी उरुन, त्या कोडांशीतुन तो कृष्णा गायपाचा खेळाव्दारे गायप झाला. आणी तो भक्तात्मा कृष्णहरी पंढरीला प्रकृतिमायेच्या पोटी देह धरुन प्रकट होवुन तिथे अवतरला. तेथील धानक ऋषी घरी त्याने कलयवगात चतुर्पतीची सुद उध्दारली. कलयवगात चतुर्पता अथर्वन् वेदाची सुद उध्दारल्या गेल्यामुळे, तिथे ज्याची सत्ता होती तो पुर्णात्मा त्यांच्या समोर विठ्ठल रुपात उभा राहीला. आणी तिथे या विठ्ठल-धनी ने आपला परंमप्रिय सखा भक्तात्मा कृष्णाजीला हरीबोध केला की :

॥ ज्याचा भाग देईल त्याला, मुळचे वचन ।
सत्रावीच्या दांडाने, पाझर चतुर्पतिचा येईन ॥ खं.०५/ओ.७०
॥ ज्याचा भाग देईन त्याले । काहीतरी कनवा येईन त्या धन्याले ।
जुने वचन फेडन सारे ॥ सांगतो गाही.. खं.०२/ओ.१५

विठ्ठलाने उदान केले की : कृष्णा ! तुम्ही याच चतुर्पति नामी राहा !. या चतुर्पतिची मिर्तलोकच्या आकाशमात मध्ये आता निरंजन ज्योत उभी होणार आहे. या चतुर्पतिला पुढे पाझर येणार आहे. या चतुर्पति धनी निराकार-निराधार निशं:कलंकी निरंजन चैत्यन्यमय आदीपुरुष भैष नारायण आपल्या मुळचे वचना व्दारेच, ज्याचा भाग त्याला देईल ! काहीतरी कनवा येईन त्या धन्याले ! जुने वचन फेडन सारे !

मुळच्या वचनाचे कथन पुर्णात्मा व्दारे झाल्यामुळे पंढरपुरात भक्तात्मा कृष्णा हा चतुर्पति निराकार-निराधार निशं:कलंकी निरंजन चैत्यन्यमय आदीपुरुष

भैष नारायण यांची भक्ती निरंजन ज्योत लावुन करु लागला. जाणते जन कृष्णाला निरंजन ज्योतीचा भक्त म्हणुन जाणु लागलेत. तर तेथील सर्वसामान्य जनलोक ज्योतीचा देव म्हणुन कृष्णाला ओळखु लागलेत. भजु लागलेत. मान देवु लागलेत. परंतु त्या जनलोकस कितीही सांगीतले तरीसुध्दा ते जनलोक निराकार-निराधार आदीपुरुषाची गाही मानेना !. जो तो पुर्णात्मा जे सगुन साकार रुप दाखवत होता, त्या सगुन साकार विठ्ठल रुपाची भक्ती करण्यात दंग होते.

आदीपुरुष रुपी नाण्याच्या एकाच बाजुची म्हणजेच जी बाजु सगुन साकार आकारात रूप दाखवत आहे, त्या एकाच बाजुची भक्ती महिमा वाढवण्यासाठी तेथील बहुतांशः जन कार्यरत होते. परंतु त्याच नाण्याची दुसरी बाजु ज्या बाजुने तो परमात्मा निराकार-निराधार निशंःकलंकी निरंजन चैत्यन्य ज्योतीर्मय स्वरुपात त्या सगुन साकार रुपाच्या आकारात भरुन भरला आणीक उरला आहे. ती दुसरी बाजु तेथील बहुतांशः भक्तजनांच्या विस्मरणात गेली होती. एकाच नाण्याच्या दोन्ही बाजुची भक्ती करण्यास कोणी एक पुढे येत नव्हता !.

तेथील बहुतांशः जनलोकांनी परमात्मा आदीपुरुषाच्या पुर्णात्मा विठ्ठल रुपी नाण्याच्या दोन बाजुपैकी निराकार-निराधार निशंःकलंकी निर्गुण बाजु पडीत टाकली होती. तेथील बहुतांशः भक्त जनलोकांच्या डोळयांवर आलेली ही झापड पाहुन तो आदीपुरुष-भक्त भक्तात्मा कृष्णा उदासला. तिथे काही त्या कृष्णाजीचे मन रमु लागले नाही. उदासल्या व व्याकुळ मनाने त्या भक्तात्मा कृष्णाजीने पुनश्चः पुर्णात्मा विठ्ठलाची कारुणा केल्यामुळे, पुर्णात्मा तेथे पुनश्चः विठ्ठल रूपात उभा राहीला. तेथे उभा राहुन भक्तात्मा कृष्णाजीला वचन दिले की :

॥ एकच दांडा, फोडन पाखंड, पहा या तिरगुणांचा ।
तेथुन आले हरी, पंढरी झाली वसान ॥ खं.०७/ओ.७०

पुर्णात्मा विठ्ठलाने तेथे उभा राहुन भक्तात्मा कृष्णाजीला वचन दिले की : पुढे भक्तात्मा-पुर्णात्मा च्या आत्मज्योतीचे ऐक्य होईल. तेव्हा मग चतुर्पति नामाचा एकच दांडा म्हणजे चतुर्पति नामाचा एकच पंथ या तिरगुणांच पाखंड फोडुन तिरगुणींचे पितळ उघडे पाडणार आहे.

इथचं दहीही दिशेला जाणारं पाणीव्दारे इथे ओलवुन, हा पुर्णात्मा विठ्ठल हे एवढ सर्व पाणी या एकाच चतुर्पति पंथा लावन हो !. तिथेही दहाही दांडाने दाही दिशेन चतुर्पतीचे पाणी ओलवुन एकाच चतुर्पती पंथा लावेल. असे वचन देत विठ्लाने उदान केले की :

हे भक्तात्मा कृष्णा ! आकाशमात मधील आदीपुरुष धन्याच्या चतुर्पति पंथाची ध्वजा आता तुम्ही मिर्तलोकी उभारावी. आता तुम्ही नव्या को-या भुम्मेवर, नवा कोरा देह धरुन, नव्या जोमाने चतुर्पतिची प्रेम ग्यान-भक्ती ध्वजा उभारुन कार्यास लागावे !. आकाशमात मधला चतुर्पती पंथ तुमच्या व्दारेच मिर्तलोकी उभा होईन. हा पुर्णात्मा विठ्ठल या भक्तात्मा कृष्णाजी नामाच्या ज्योती मध्ये ज्योत मिळवुन भक्तात्मा-पुर्णात्मा चे ज्योतीचे ऐक्य करेल.

आता या कलीच्या संधीत तुमच्या व्दारे उभा झालेल्या मिर्तलोकच्या चतुर्पती पंथाच्या भुम्मेवर भक्तात्मा-पुर्णात्मा चे ज्योतीचे ऐक्य होईल. या एक झालेल्या ज्योती व्दारे चतुर्पती आदीपुरूष भैस धन्याला परीपुर्णतमपुर्ण अवतार चतुर्व्युहरूप रंचनेत घेण्यास विणवणी करु !. ज्योती मध्ये या आदीपुरुष भैस धन्याची निरंजन ज्योत खेळवु !

हे भक्तात्मा कृष्णा ! तु आता पंढरीला गुप्तपणे गायपाचा खेळ उभारून गायप हावुन पंढरी सोडावी. आणी नव्या को-या भुम्मेवर नवा कोरा देह धारण करून प्रकट व्हावे. तुम्ही धारण केलेल्या नव्या को-या देहभुम्मेवर हा पुर्णात्मा विठ्ठल अवतरून ज्योती मध्ये ज्योत भैस अवताराची खेळणार आहे. तो नवा कोरा देहच चतुर्पती धन्याच्या परिपुर्णतम् पुर्ण अवताराच्या चतुर्व्युह रंचनेत पुर्ण अवतार होईल. असे वचन देतो. विठ्ठलाने दिलेल्या या वचनांमुळे भक्तात्मा कृष्णाचे मन उल्हासले.

॥ उल्हासले मन, सोडली पंढरी ।
आणीक कारण, भुम्मेवरी हो ॥ खं.०७/ओ.२६

विठ्ठलाने अनामीक भक्तयोगी भक्तात्मा कृष्णाजीला वचन दिल्यानंतर, उल्हासल्या मनाने भक्तात्मा कृष्णाजीने योग्य संधी साधुन गायपाचा खेळ उभा केला. आणी तेथुन गायप होवुन पंढरी बहु कारणासाठी सोडली.

नाण्याच्या दोन्ही बाजुची भक्ती, अस्तुकी-महिमा वाढवण्याच्या कारणा करिता भक्तात्मा कृष्णा ने पंढरी सोडली ! चतुर्पती चे ग्यान भक्तजनांना पाजण्याकरीता भक्तात्मा कृष्णा ने पंढरी सोडली. आणीक बहु कारणासाठी त्याने पंढरी सोडली. तो गायपाचा खेळाव्दारे जागोजागी चतुर्पती आदीपुरुष धन्याच्या भक्ती चे ठाण-पेणं स्थापत चालला. आणी पुर्वाश्रमिच्या माहुर मार्गे तो वायव द्युत भक्तात्मा कृष्णा हा रुक्मिणीच्या माहेर घरी विदर्भात आला. विदर्भातील अमरावती पासुन अंदाजे एक कोस म्हणजेच १३ कि.मी. दुर असलेल्या को-या भुम्मेवर त्याचे मन रमले ! आणी तिथेच आपले चतुर्पती बिर्दाचे कार्य उभारण्याचे ठरवले.

अमरावती जिल्हा मुख्यालया पासुन अंदाजे एक कोस म्हणजेच १३ कि. मी. दुर असलेल्या चिरोडी/तिरोडी या गावालगतच्या घनदाट जंगलातील को-या भुम्मेवर त्यां वायव द्युत भक्तात्मा कृष्णाचे मन रमले. आणी त्या को-या भुम्मेवर कायापालट सिध्दिव्दारे माद्य शुध्द पंचमी या दिवशी नवा कोरा बालदेह धरून तो भक्तात्मा प्रकट झालेत. रममान मनाने विठ्ठलाकडे प्रार्थना केली की :

॥ सावंग पुरचे राज्य विठोबा, करा हो बादशाही ।
मन माझ रमलं मायबाप, विठ्ठल रुक्माई ॥ खंडं०७/ओवी.३३
॥ माद्य शुध्द पंचमी ऐसा । माद्य उतरला ।
नवरत्नाचा शेला देवान । जडीत विणला ॥ खंडं०७/ओवी.३३

कृष्णा त्रिकाल ज्ञानी असल्यामुळे त्यांनी जाणले होते की : या को-या भुम्मेला पुढे सावंगा-विठोबा या नावाने ओळखले जाणार आहे. म्हणुनच तेव्हा सर्वप्रथम या को-या स्थळावर देहधरून उभे राहुन विठ्ठला कडे प्रार्थना केली की : को-या भुम्मेवर उभ्या असलेल्या या सावंगपुरचे राज्य कराहो बादशाही ! ज्या दिवशी त्यां वायव द्युत भक्तात्मा कृष्णाने त्या को-या भुम्मेवर बाल देह धरून प्रकट झाला, तो दिवस माघ शुध्द पंचमीचा होता. याच दिवशी तो त्या नव्या को-या भुम्मेवर कायापालट सिध्दिव्दारे नवा कोरा नवरत्नाचा देह उभारून को-या भुम्मेवर प्रकट होवुन उभा झाला.

पुर्वाश्रमि तो आंधप्रदेश मधील अमरावती तालुक्यात अवतरला होता. तर आता विदर्भात अमरावती जिल्हात चिरोडी लगतच्या जंगलात प्रकटला.
पुर्वाश्रमि त्रैतातील मातेचे नाव अनुसया होते, तर येथे सुध्दा त्यांनी अनुसया माता निवडली. अश्या रितीने भक्तात्मा कृष्णा ने आपल्या पुर्वाश्रमिच्या नामात समानता साधली.

या प्रकारे मुळयवगाचा अनामीक परात्पर भक्तयोगी भक्तात्मा कृष्णा यांनी मुळयवगापासुन निराकार-निराधार निशंःकलंकी निरंजन चैत्यन्यमय आदीपुरुष भैष नारायण ची भक्ती अखंडपणे करत आलेला आहे. कृथा-त्रैता-व्दापर-कली त अनेक अवतार घेत घेत, या कलयवगाच्या संधीकाळात कानड--कोडाशी--पंढरी--माहुरमार्गे चिरोडी या हेकोडे-तेकोडे वेडया वाकडया मार्गाने रुक्मिणीच्या माहेर घर असलेल्या विदर्भातील अमरावती जिल्हातील तिरोडी लगतच्या जंगलातील कोरी भुम्मा सावंगा येथे प्रकट होवुन अवतरला. गायपाचा खेळ कोणा न कळु देता, आपल्या भक्ती बळाने हा पुर्विचा जुना अवतार विदर्भात येवुन उभा झाला आहे. तो असा :

**स्थळ :- विदर्भ, महाराष्ट्**

**०२. सावंगा-विठोबा :-**

भक्तात्मा कृष्णा विदर्भातील अमरावती जिल्हा मघील चिरोडी-तिरोडी या गावालगतच्या घनदाट जंगलातील को-या भुम्मेवर अवतरुन प्रकट झाला. ज्या क्षणी तो भक्तात्मा कृष्णा को-या भुम्मेवर अवतरुन देह धरून प्रकट झाला, त्याच क्षणी जाणते चतुर्पतीचे भक्तगण सह योगी-जोगी, संत-महंत पुण्यात्मे-महात्मे तसेच निरंजनी ऋषी-मुनी, सखे-संगती ईत्यादी जाणत्यांनी जाणले की :

या कलयवगाच्या संधीकाळात प्रकट होवुन अवतरलेल्या या अनामीक परात्पर भक्तयोगी भक्तात्मा कृष्णाजीने धारण केलेल्या या नव्या को-या देहघरीच आता पुर्णात्मा अंतर्भुत होणार आहे. भक्तात्मा व पुर्णात्माच्या ज्योती एक होणार आहे. या एक झालेल्या ज्योती मध्ये परिपुर्णतम भैस अवतारांची ज्योत खेळणार आहे. भैसाचा परिपुर्णतम् पुर्ण अवतार चतुर्व्युहरंचनेत अवतरणार आहे.

भक्तात्मा व पुर्णात्मा चे ऐक्य व्दारे या को-या भुम्मेवरच आता आदीपुरूष भैसाचा परीपुर्णतमपुर्ण अवतार उभा होणार आहे. हा आदीपुरूष धनी आपल्या चतुर्व्यह रुपांच्या रंचनेसह, १८ खेत्रीगण व इतर सर्वगणांना घेवुन अवतरणार आहे. अनंत यवग ज्याचे भक्तीत कठले, असा जो तो अनामीक परात्पर भक्तयोगी भक्तात्मा कृष्णाने कलयवगाच्या संधीकाळात ज्या नव्या को-या देहीचा साजशृंगार करुन नटुन थटुन उभा आहे. त्या नव्या को-या नरदेहीलाच चौदा चौकडया यवग पुरलेली त्यांची आधीची भक्ती जडणार आहे.

आधीची भक्ती जडुन या त्यांच्या चौदा चौकडया यवगातील निरंतर अखंड प्रेम भक्ती-भाव व्दारेच भक्तात्मा-पुर्णात्मा चा मुळयवगाचा परमात्मा निराकार-निराधार निशंःकलंकी निरंजन चैत्यन्यमय आदीपुरुष भैष नारायण चा आता परीपुर्णतमपुर्ण अवतार अवतिर्ण होणार आहे. या भक्तात्मा कृष्णाची ही नवी कोरी देहीच पुर्ण अवतार होईल.

या जन्माच्या देहीचे पारणे फेडणार हा महाराजा !. म्हणुनच ते सर्व जाणते द्युतगण विणवणी पुर्वक म्हणु लागलेत की :

॥ संजिवनीचा, आहे उजाला, चव ताळात ।
स्वर्गीचे, लोक म्हणती, आम्हा पाठवा मिर्तलोकांत ॥ खंडं०५/ओ.२८

आता या अनामीकाच्या मुखची संजिवनी असलेले चतुर्पता अथर्वन् वेद, चतुर्पता नाम, ग्यान, भक्तीचा उजाला पिंडी या ब्रम्हांडीच्या चवही ताळात होणार आहे...ईत्यादी जाणत्यांनी जाणले. ज्या जाणत्या भक्त योग्यांनी, संत महात्मांनी, कृष्ण सवंगडयांनी तसेच तिन्ही ताळातील लोकांसह इंद्रसभा,

यमपुरी, निजधाम, वैकुंठी, कैलास ईत्यादी स्वर्गीच्या लोकांनी जाणले. त्या सर्व जाणत्यांनी निराकार-निराधार निशं:कलंकी निरंजन चैत्यन्यमय आदीपुरुष भैष नारायण यांच्याकडे प्रार्थना विनवनी अर्जा चा सांड करत म्हणु लागलेत की :

॥ मिर्तलोकचा, सुखःसोहळा, हा स्वर्गी नाही ।
चतुर्पतिचा झेडा, ईश्वर-पुना/आदीपुरुषाची गाही ॥ खंड०५/ओ.२८

मिर्तलोकचा सुखःसोहळा हा आता स्वर्गि नाही गा आदीपुरुषा ! स्वर्गि अमृत, पाताळी अमृत आहे पण मिर्तलोकचे नाम नाही रे !

चौथा चतुर्पती आदीपुरुष भैस आपल्या पोटी असलेला चतुर्पता अथर्वन् वेद आता कृष्णाच्या मुखा व्दारे प्रकट करुन या मिर्तलोक च्या सच्च्या भक्तजन लोकांत यांचे ज्ञानांमृत पाजणार आहे. त्यामुळे येथुन पुढे कृष्णाजीच्या मुखावाटे निघणा-या भैसा पोटच्या चतुर्पती अथर्वन् वेद चा चतुर्पति नाम संजिवनीचा उजाला चवताळात पडणार आहे. भैसा ने पुढेच कारणास्तव ठेवलेला आपल्या पोटचा अथर्वन वेद कृष्णा मुखातुन प्रकट होणार आहे.

चतुर्पति आदीपुरुष यांच्या आकाशमात मधील चतुर्पती पंथाचा ज्ञान भक्ती चा झेंडा आता मिर्तलोकी फडकणार आहे. चतुर्पति आदीपुरुष यांच्या गाही, साक्ष, पुरावासह चतुर्पति ज्ञान भक्ती चे निशाण आता फडकत राहणार आहे. पुढे या कलीच्या संधीत चतुर्पति आदीपुरुष चा मोहर-शिक्का येणार आहे. चतुर्पतीच्या चौरंगी बाज्याचा नाम घोष होणार आहे. म्हणुनच ते विनवनी करु लागलेत की :

हे चतुर्पती आदीपुरुष भैस धन्या ! आता आम्हा या चतुर्पति च्या गाही-साक्ष-पुरावासह चतुर्पती ची ग्यान भक्ती करण्यासाठी मिर्तलोकांत पाठवा हो राया ! चतुर्पति आदीपुरुष धनी यांची महिमा वाढवण्यासाठी, चतुर्पति आदीपुरुष यांची अस्तुकी करण्यासाठी, चतुर्पति चा चौरंगी बाज्या वाजवण्यासाठी, चतुर्पती भैसाच्या यवगाच्या मांडणीत सामील होण्यासाठी आणीक बहु कारणास्तव चतुर्पतिचे ईतर अनेक कार्य करण्यासाठी आता आम्हास मिर्तलोकी अवतार घेण्याची आज्ञा दयावी. परमात्मा आदीपुरुष भैसाच्या परिपुर्णतम्पुर्ण अवतार रंचनेतील आमचा भाग आम्हास दया हो भगवंता ! म्हणुनच आम्ही पुन:पुनश्चः विनवणीपुर्वक अर्ज करतो की : मिर्तलोकांत या भक्तात्मा कृष्णाजी चा संग करण्यासाठी आम्हा आता पाठवा !

या सर्व जाणत्यांच्या विनवनी अर्जा ला जशी जशी मंजुरी/आज्ञा आदीपुरुषा कडुन मिळत गेली, तसे तसे स्वर्गिचे लोक सह जाणत्यांचे अवतरणे या मिर्तलोकी या को-या भुम्मेच्या परिसरात सुरु झाले !. ते असे :

सर्वांच्या आधी सर्वप्रथम भक्तात्मा कृष्णा मुळ यवगापासुन निराकार निराधार निशं:कलंकी निरंजन चैत्यन्यमय आदीपुरुष भैष नारायण ची भक्ती चे झेंडे फडकवत फडकवत मिर्तलोकच्या सावंगा या को-या भुम्मेवर प्रकट होवुन अवतिर्ण झाला. आणी माद्य शुध्द पंचमी ला या को-या भुम्मेवर सुस्कार टाकला तो असा :

॥ माघ शुध्द पंचमी ऐसा माघ उतरला ।
नवरत्नाचा शेला देवानं जडीत विनवला ॥ खंड०५/ओवी-३३
॥ पाचव्या वेदाचा सुस्कार । ये अवतार, कार कर ।
बांधले बिन खांबाचे घर ॥ खंड०५/ओ.०१

अनामीक परात्पर भक्तयोगी कृष्णाजी यांच्या पाचव्या लभेद वेद भक्तात्मा यांनी सुस्कार टाकला पंढरपुरात ! आणी जंगलातील या को-या

भुम्मेवर तो निर्गुण वायव द्युत कृष्णा उभा राहला. आणी ''ये आदीपुरुष अवतारा ! कार कर !'' अशी प्रथम विनवनी त्यांनी केली. आणी कायापालट सिध्दी व्दारे या कृष्ण कारागीराने बिनखांबाचे देहघर बांधने सुरु केले. ऐसा या सुतार कारागीर वायव द्युत कृष्णाने वासला किकंर हाती न घेताच देहमाडी बांधण्यास सुरूवात केली.

॥ ऐसा सुतार कारागीर । नव्हत वासला-किंकर ।
आपरुप माडी केली तयार ॥ खंडं०७/ओवी-०१, खंड०३/०३

ऐसा या सुतार कारागीर कृष्णाने हाती वासला-किंकर न घेता मेळुवर मेळुचे मंडयान रंचुन आपरुप नवी कोरी देहरुपी माडी तयार केली. सावंगा नामाच्या या को-या भुम्मेवर भक्तात्मा कृष्णाची देहरुपी माडी उभी झाल्यानंतर निर्गुण पुरीचे चारही यवगातील गण येवुन आनंदाने कोलाहल करू लागलेत.

॥ निर्गुणपुरीचे आले कोल्हांटीं । सोह्ंम शक्ति ठोल पिटवती ।
चव यवगाची झाली दाटी ॥. खंडं०७/ओवी-०१

आदीपुरुषाला भजणारे निर्गुणपुरीचे सर्व जाणत्यांनी भक्तात्मा कृष्णाजीच्या नामाचा उदो उदो, जयजयकार करू लागलेत. त्यांच्या सोयंम् शक्तियाँ आनंदाने ठोल पिटवु लागलेत. अकाशमात मधील निर्गुणपुरीच्या सर्व गणांनी तेथे कोल्हांटीं प्रमाणे कोलाहट मचवला. निर्गुणपुरीचे योगी, संत, महंत, सखा, भक्त ईत्यादी तिन्ही ताळातील जाणतेगण त्यांच्या मागोमाग अवतिर्ण होवु लागलेत. अवतिर्ण होवुन तिथे देह धरुन या सोयं्म शक्तिचा ठोल पिटवत उभे झालेत.

चवयवगात कृष्णासंग अवतिर्ण झालेले निर्गुणपुरीचे जाणतेगण सखेभक्तगण पुनश्चः या को-या स्थळी अवतिर्ण होवुन दाटी करु लागलेत. तिथे चवयवगातील अवतारांची भिड होवुन चवयवगाची दाटी झाली. निळावंती बरसु लागली.

या निळावंतीच्या बरसातीत :

१. सर्वप्रथम अनामीक परात्पर योगी यांच्या पाचव्या लभेद वेद भक्तात्मा कृष्णा हे चार वर्षाच्या बालकाचे रुप धारण करून अवतिर्ण झाले होते.
२. या चार वर्षाच्या बालक रुपाची देखभाल करण्यांसाठी, त्याचे निर्गुण पाठीराखे खाकित्मा यांने ७ वर्षाचे बालक रुप धारण केले.
३. निर्गुण पाठीराखा मलकोजीत्मा यांनी ९ वर्षाचे बालक रुप धारण केले.
४. भक्तात्मा कृष्णाचा यवगायवगीचा सखा असलेला निर्गुण हेंगडुत्मा हा सुध्दा कृष्णाची संगत करण्यासाठी बालक रुप धारण करुन या मिर्तलोकी कृष्णा संग अवतरला.

प्रथम ही चौकडी एकाच समयात त्या को-या भुम्मेवर अवतरली. व चौ दिशेने गेली. आणी तद्नंतर त्यांच्या मागोमाग त्या परीसरात जसे जसे जाणत्यांचे अर्ज आदीपुरुषाकडुन मंजुर होवु लागले, तसे तसे तिरलोक्यातील जाणत्यांचे अवतरणे सुरु झाले.

आदीपुरुषाचा संग करण्यासाठी तेथे चौकोणी मेघनिळाची निळावंती बरसात सुरु झाली होती. कलयवगाच्या संधीकाळाची चौकोणी मेघनिळाची निळावंती बरसात मध्ये जंगलातील त्या को-या भुम्मेवर दोन-दोन च्या जोडीने अवतरलेले कृष्णाजी-हेंगडुजी, व खाकिजी-मलकोजी हे चौघे जन चार वेगवेगळया दिशेने धन्यांच्या ज्ञान भक्ती चे बिजे पेरण्याच्या कामी लागलेत.

आपआपल्या दिशेने आपआपले भक्तीकार्य करत असतांनाच, त्या चारही दिशेच्या कोणातुन ते सर्व आपल्या भक्ती सिध्दी बळाने आकाशमार्गाने या को-या भुम्मेवर येवुन एकमेकास भेटु लागलेत. एकत्रीत होवुन खेळ करु लागलेत.

कोण्या एका दिवशी कोण्या एका वेळी जंगलातील ही कोरी भुम्मा आपल्या बळाने साफ करुन त्या को-या भुम्मेवर आपल्या खाकि-मनकोजी, व हेंगडुजी या सवंगडयांची वाट पाहत भक्तात्मा कृष्णा चा हा बालदेह उभा होता. त्याच वेळी जंगलात गाई चरावयास घेवुन येणारा गाईकी उकंडा यास तो गोंडस बाळ देह तिथे उभा दिसला. तो असा :

चिरोडी नजीकच्या जंगलात नेहमी गाई चरावयास नेणारा गाईकी उकंडा आंधव हा आपल्या पुर्विस्ताच्या संचितावद्दारे आपले गाई ढोरे घेवुन चिरोडीहुन जंगलातील या को-या भुम्मेनजिक त्या दिवशी गेला. या को-या भुम्मेनजिक गाई चरावयास सोडुन तो एका झाडाखाली विश्रांती घेत डुलकला.

परंतु त्याचे गाई ढोरे हे को-या भुम्मेवर उभा असलेल्या बाळ कृष्णाच्या आकर्षण शक्तिने आकर्षीत झालेत. आणी जिथे बाळकृष्णा उभा होता त्या को-या भुम्मेवर गेलेत. तिथे सवंगडयांची वाट पाहत उभ्या असलेल्या बाळकृष्णा भोवती आजुबाजुने हे सर्व गाई ढोरे चरु लागलेत.

जेव्हा उकंडा जागी झाला, तेव्हा गाई ढोरे दृष्टी समोर दिसले नाही. तो गाई ढोरे च्या पावलांच्या खुणां व घुंगराच्या आवाजाचा कानोसा घेत घेत को-या भुम्मेजवळ आला. त्या को-या भुम्मेवर गाई ढोरांच्या गोळक्या मध्ये उभा असलेला बाळ कृष्णा त्याला दुरुनच दिसला. एवढया घनदाट जंगलात हे ४ वर्षाचे गोंडस बाळ, कोणी बरे मरायला आणुन टाकले ?. असेच आपुले बाळ असते तर ? ईत्यादी प्रश्न तो आपल्या मनी घेवुन उकंडा बाळकृष्णा समोर उभा झाला.

निपुत्रीक असलेल्या उकंडा आंधव यांनी गोडस बाळकृष्णाचे दर्शन लाभ झाला. बाळकृष्णा कडे पाहुन त्यांचा पुत्र प्रेम भाव जागृत झाला. हा जागृत प्रेम भाव बाळकृष्णा कडे ओसांडुन वाहु लागला. उकंडाचा हा प्रेम भाव जाणत्या भक्तात्मा बाळ कृष्णाने जाणला. उकंडयाचा जागृत व सच्च्या प्रेम भाव मुळे भक्तात्मा कृष्णा प्रसन्न झाला. उकंडाची मनीच असलेल्या पुत्र प्राप्ती ची ईच्छा पुर्ण करण्यासाठी तसेच उकंडाचा दत्त मानस पुत्र बनुन जनात जाहीर होवुन आदीपुरुषाच्या ग्यान भक्ती चा कार्यारंभ करण्यासाठी आणीक बहु कारणासाठी तो भक्तात्मा बाळ कृष्णा उकंडासह जाण्यास मनीच तयार झाला.

या कलीच्या संधीत यवगायवगी चा भक्तात्मा कृष्णाच्या बाळ देहाने या प्रकृति मायेसह इतर सुक्ष्म विश्वाला मनी मानवंदना दिली. जोहार ठोकुन तो अनामीक परात्पर भक्तयोगी भक्तात्मा बाळ कृष्णा हा उकंडया संग येण्यास तयार झाला. गायकी संग येवुन तो चिरोडीच्या महार पोडयात आला. कृष्ण चतुर झाला. महारा घरी येवुन महार झालेत. आंदवन होवुन जनात जाहीर होवु लागला. चतुर्पति नामी पावन होत होत कार्यारंभ केला. तो याप्रमाणे :

राजबींड रुपाचा गोंडस बाळकृष्णा उकंडयासह चिरोडीच्या महार पोडयात उकंडयाच्या दारी आला. उकंडाची पत्नी अनुसया ला बाळकृष्णाने दर्शन दिले. आणी तिची बुध्दि प्रचोदयात् करुन तिच्या मुखात कृष्ण नाम या भक्तात्मा बाळकृष्णाने दिले. मुखी आलेले कृष्ण नाम उच्चारुन तिने या गोंडस बाळाला

कृष्णा म्हणुन हाक मारली. उल्हासित, आनंदित झाली. उल्हासल्या मनाने अनुसयाने त्या राजबिंड गोंडस बाळाचे नाव कृष्णा ठेवले. अश्यारितीने यवगायवगीचा अनामीक भक्तयोगी भक्तात्मा ने कृष्णा हे नाम धारण केले.

महार पोडयात राजबिंड रुपाचा राजकुमारासारखा दिसणारा गोंडस बालक कोठुन आले ? अशी विचारणा गावातील उच्चवर्णिय सुवर्णजन करुन विनाकारण आपणास त्रास देतीन. आणी या बाळाला आपणापासुन दुर करतिल. कृष्णापासुन आपणास वंचित करेल. ..ईत्यादी भिती उकंडा-अनुसया च्या मनी निर्माण झाली होती.

या भितीपायी त्या माता-पिता ने या राजबिंड रुपाचा राजकुमारासारखा दिसणारा बाळकृष्णाला चार भिंतीच्या आड ठेवले. गावाच्या येशीच्या आत व बाहेर या राजबिंड बाळकृष्णाची माहिती नव्हती. फक्त गावाच्या येशीवर असलेल्या महार पोडातच या राजबिंड बाळकृष्णाची माहिती होती. तशी व्यवस्थाच त्या येशीवरच्या जनलोकांनी येशीवर तयार करुन ठेवली होती.

उकंडा-अनुसयेच्या मनात आलेली विनाकारण भिती त्या जाणत्या बाळ कृष्णाने जाणली. कारण तोच तर यवगायवगीचा अनामीक भक्तयोगी भक्तात्मा ! या भक्तात्मा ने जरी रुप लहान बाळाचे धरले असले, तरीसुध्दा त्या जातकाच्या आयुष्याचे अनुभव करोडो वर्षाचे होते.

यवगान यवगाच्या करोडो वर्षाच्या भक्ती संग यवगान यवगीची बुध्दी व अनेक सिध्दियॉं, शक्तियॉं ईत्यादी घेवुन, यवगान यवगात बारबंड पणे फिरत फिरत उकंडा-अनुसया जवळ आलेला तो वायव द्युत भेलुंड होय. या गर्भि सिध्दास जगात जाहीर होवुन चतुर्पति ज्ञान भक्तीचे बिजे जनलोकांत रोवण्याचे कार्य सिध्दिस न्यावयाचे होते. या कृष्ण देवाला जगात जाहीर होवुन चतुर्पती कार्यासह आणीक बहु कार्य करने होते.

परंतु त्यांच्या या कार्यात खंड पडण्याची स्थिती उकंडा व अनुसया च्या विनाकारण भिती मुळे तिथे निर्माण झाली होती. या स्थितीतुन बाहेर पडण्यासाठी तिथे त्या चतुर बाळ कृष्णाने चतुराई केली. माता-पित्याच्या मनातील भिती दुर करण्यासाठी बाळकृष्णा हा स्वतःचे राजबिंड राजकुमारा सारखे दिसणारे गोंडस रुपाचा त्याग करु लागला. राजबींड रुप तो सोडु लागला. आणी हळुहळु तो हाडकुळा-कृश बनत गेला. बाळकृष्णास कोणतातरी रोग जडला. अशी दर्शनीय मायावी स्थिती त्या बाळकृष्णाने तेथे निर्माण केली. जेणेकरुन माता-पिता ही स्थिती दुर करण्याच्या निमित्याने बाळ कृष्णास घेवुन घरा बाहेर पडतील. अशी माया त्या सोंगाडयाने रंचली.

रोग दुर करण्याच्या निमित्या कारणाने हे लोक आपहुन या बाळकृष्णाला घेवुन बाहेर पडतील. विविध ठिकाणी घेवुन जातील. या निमित्या कारणाने या बाळकृष्णास आपले इच्छीत कार्य साध्य करता येइल. तसेच आपल्या साठी विविध ठिकाणी अवतरलेले पाठीराखे योगी, संत, महंत, महात्मे, सखा भक्त ईत्यादी जाणत्यांच्या भेटी घेता येईल. चतुर्पतीचे कार्य सुरु करता येईन.

या कार्यारंभाची सुरुवात करण्याच्या उध्देशाने त्या बाळकृष्णाने रोग्याचे सोंग घेवुन सोंगाडी बनला. सोगांडया बनुन बाळपणापासुन जनास देव मानायला लावण्याच्या कार्यासह इतर कार्याचा शुभारंभ केला तो असा :

बाळकृष्णाने रोग्याचे सोंग घेतल्यामुळे माता-पिता चिंतीत झालेत. बाळकृष्णाला रोगमुक्त करण्याकरीता ते मायबाप धागे-दोरे, देव-धर्म, नवस-पुजा, वैद-हकीम ईत्यादी करु लागलेत. तरीसुध्दा बाळ बरे होइना !.
हे बघुन ते मातापिता दुःखी, कष्टी, मजबुर हतबल झालेत. परंतु हिम्मत न हारता, काहीना काही काहीतरी उपाय करत राहलेत.

रोग दुरस्त करण्याचा दावा करणारे त्या काळी काही सच्चे साधुसंत बाबा लोकही होते. तसेच त्याच काळी जंतर-मंतर, करणी-कवटाळा, नवग्रि-हे बारा राशी, काडीमुडीचे देव ईत्यादी करणारे काही जनलोक होते. तसेच काही जनलोक असेही दावा करणारे होते की : त्यांच्याच अंगात देव अथवा देवी येते. अश्या ठोंगी लोकासह ठोंगीबाबा व दांभिक जनलोकही होते.

कुणा एकाच्या अंगात देव येतो. असे कळताच उकंडा-अनुसया आपल्या बाळकृष्णाला बरे करण्याच्या उध्देशाने त्या अंगात येणा-या देवी अथवा देवताकडे घेवुन जात असे. परंतु तिथे काहीतरी वेगळच घडे !. तिथे त्या मानवाच्या आंगी येत असलेल्या देवासमोर बाळकृष्णाला नेताच तो ''आंगी देव येतो म्हणणारा मानव'' लटालटा थरथरा कापु लागे. त्याचे धाबे दणाणु लागे ! त्याच ठाणं डगमगु लागे !. आणी तो स्वतःच एखादया लष्टाणा-भुता प्रमाणे वागु लागे. घुमु लागे.

''आंगी देव येतो'' असे म्हणणा-या त्या तथाकथीत मानवाने काही मांत्रिक क्रियेव्दारे वचनात गुंतवुन प्राप्त करुन घेतलेले लष्टान, व्दैत-भुत, लाव-चुडैलीन ईत्यादी त्याच्या आंगच तिथच त्याच्या आंगी घुमु लागे. ज्या लष्टानाव्दारे तो दांभिक मानव आपले इच्छीत कार्य साध्य करत असे, त्या लष्टानाला तो मांत्रिक त्याच्या जवळ आलेला मानव कोण ? कुठुन आले ? कश्यासाठी आला ?.. ईत्यादी विचारपुस करत असे !.

आणी त्याच्या समोर गोळा झालेल्या जनांसमोर तो जाणता असण्याचे ठोंग रंचत असे. असे टोंगी देव ठोंग रंचुन ज्या जनास फसवत होता, त्याच जनासमोर त्याच्या आंगच लष्टान प्रकट होवुन घुमु लागे. लष्टान प्रकट होवुन घुमु लागल्याने त्या दांभिक बाबा-मानवाचे ठोगीपणाचे पितळ त्याच जनलोकां समोर उघडे पडत असे. त्या मानवाच्या आंगी देव नव्हे तर लष्टान आहे. हे तेथील जनलोकास माहीत पडत असे.

तथाकथीत दांभिक मानवाच्या आंगी असलेले लष्टान घुमुन फिरुन हातापाया पडुन, मनीच विनवण्या करत बाळकृष्णासमोर लोळण घेई. पुन्हा असे ठोंग रंचुन, देवाचे नाम समोर करून जनास फसवणार नाही. असे मनीच म्हणत म्हणत बाळकृष्णाच्या चरणावर लोटांगण घेई !.

बाळकृष्णाला मुक्षपणे क्षमा मागे. आणी स्वतःहुन नवस करत असे. कृष्णास वचन देत असे की : ''मी जिथे कुठे राहीन, तिथे कुणालाही त्रास न देता, कुणाचाही घात न करता, शांतपणे सरळ साध्या सिदाई च्या मार्गाने राहुन चतुर्पति कृष्ण अवद्युत नामी राहीन.'' अश्या रितीने बाळकृष्ण तिथे काही एक शब्द न बोलता मुकाटयाने त्या लष्टानास चतुर्पति कृष्ण अवद्युत नामी लावे. त्या लष्टाणच्या वासनामय व मनोमय कोषात चतुर्पति कृष्ण अवद्युत नामाचे बिज रोपन करुन त्या बिजाला खतपाणी घालत असे. आणी त्याला नामीच राहा गडेहो एकच भाव धरुन असे सांगुन, त्या ठोगी मानवाच्या हातुन त्या लष्टानाला मुक्त करून त्याच्या उत्तरोत्तर प्रगतीचा मार्ग मोकळा करत असे. तो असा :

कृष्णा काही एक न बोलता आपल्या कृति व्दारे मांत्रिक मानवाच्या हातुन त्याच्या ताब्यातील लष्टानाला मुक्त करुन, त्या कलंकित जिवात्माच्या मनोमय-वासनामय कोषात चतुर्पती नामाचे बीज रोपन करत असे. त्या बिजाला खतपाणी घालत असे. चतुर्पती नामाच्या उच्चतर गोडी व्दारे त्यांच्या मनोमय वासना मिटवत असे. मनोमय-वासनामय कोषतुन मुक्त करून त्यांना मुक्तिच्या मार्गावर लावत असे. त्यांना चतुर्पति नामगंगाने वेळोवेळा न्हावुन, त्याला धिराईने निशःकलंकी बनण्याच्या मार्गि लावुन साहयं करत असे. त्यांची उच्चत्तर उच्च प्रगती करण्यास साहयं करत त्याना त्यांचे मुळचे घर दाखवुन उध्दार करत असे. ''जिवात्मा ते आत्मा'' या प्रवासात नित साहय करत असे.

मांत्रिकदेवासमक्ष तेथिल जनलोकास काहीएक न बोलता सरळ सरळ अनुभवाची गाही, साक्ष-पुरावा बाळ कृष्णा देत असे. म्हणुनच आर्वीचे चरणे, दवंडी देवुन आम्हास सांगी करतात की :

॥ मानवाच्या आंगी, येत नाही देव । व्दैत-भुत घेते/घेईन, देवाचे नाव ।
प्रकट होईल लष्टान, देव नवस घेइन...।
थरथरा कापे धरणी हो तिरभवन ॥ खंडं०२/ओ.४६
॥ नवखंडा मध्ये एकच रुप, धरला अवतार ।
पाखंडी व्दैताच, चालु नाही देणार जराभर ॥ खंडं०२/ओ.१७
॥ आदीपुरुषाच्या मुखातुन निघाला, सत्य शकुन ।
नामीच राहा गडेहो एकच भाव धरुन ॥ खंडं०२/ओ.१७
॥ अलाड वस्तु थोर, हे होय माझ माहेर ।
हदयी लहान मोठे थोर, अवघे बराबर ॥ खंडं०२/ओ.१७

अश्या रितीने बाळकृष्णाने सोंगाडयाच्या कार्यकाळात सर्वप्रथम परमात्मा आदीपुरुषाचे तेजोगुणी अंश असलेले, असे जिवात्मे जे त्यांच्या देहीच्या जीवनकाळात षटविकार, विषयवासना, ईत्यादीचे कलंकीत संस्कार त्यांच्या सुक्ष्ममनमती वर कोरल्या जावुन ते षटविकारांनी कलंकीत झालेत. आणी त्या कलंकीत संस्कारा व्दारे आत्म्यावर वासनामय-मनोमय कोष चढुन तो कलंकीत जिवात्मा बनुन आकाशमात मध्ये आलेत. आणी त्या कलंकीत संस्कारानुरुप वागु लागलेत. किंवा असे जीवात्मे कोण्या एका मांत्रिकाच्या ताब्यात जावुन, त्या मांत्रिकाचे गुलाम बनुन, मांत्रिक जे सांगेल ते भले-बुरे कार्य करु लागलेत.

अश्या कलंकीत जिवात्मा ला शोधुन त्यांच्या वरचे कलंक धुण्यास सुरूवात केली. परमात्माचा मुळचा तेजोगुणी अंश असलेला निश्कलंकी आत्म स्वरूपी बनवुन त्यांच्या मुळघरी जाण्याचा मार्ग प्रशस्त करत गेलेत. जिवात्म्यावरचे कलंक धुण्याच्या कार्यास लागलेत.

कलंकीत जिवात्माला किंवा मांत्रिकाच्या ताब्यात असलेल्या जिवात्माला मांत्रिकगणांच्या ताब्यातुन सोडविले. आणी त्यांना बेवारस न सोडता मुळचा धनी च्या चतुर्पती मार्गाला लावुन, त्यां त्या कलंकीत जिवात्मांना उच्चत्तर अशी चतुर्पति नामाची गोडी लावली. धिराईने ही चतुर्पति नामाची गोडी त्याच्या मनोमय कोषात रुजवुन त्या कलंकीत जिवात्मा ला निशःकलंकी बनवण्याच्या मार्गि लावले. मुळचे घराच्या मार्गाने लावले. मुळचा धनी कडे इशारा करून त्यांच्यात धिराईने चतुर्पति नामाव्दारे सिदाई आणली. सिदाईच्या सेनेत भरती करण्याची प्रकिया सुरु केली. मुळचे घर दाखवुन त्या जीवात्मांची मोक्षाकडे-मुक्तिकडे वाटचाल सुरु केली.

अकाशमात मध्ये वरच्या वर उच्चत्तर अश्या चतुर्पति नामाच्या गोडी चे अमृतपान पाजुन त्यांना चतुर्पति नामी लावलेत. त्यांचे कलंक झाडलेत. त्यांना

निश्कलंकी बनवलेत. आणी त्या निश्कलंकी निर्गुण गादीवर चतुर्पता अथर्वन् वेदाचे ग्यान ठेवले. निर्गुण गादीवर चतुर्पता अथर्वन् वेद ज्ञानाचे रोपण केलेत. ते सैन्य चतुर्पता अथर्वन् वेद गादीवर बसवुन दिलेत. अश्या रितीने त्या चतुर्पता अथर्वन् वेदांच्या सैन्यांव्दारे सर्वप्रथम आकाशमात मध्ये चतुर्पति नामाचा झेंडा निर्गुण निराकार निश्कलंकी तेजोगुणी सैन्याव्दारे फडकवला.

या साठी त्या बाळकृष्णाने सोंगाडया बनले. आपले माता-पिता असलेले उकंडा-अनुसया ला घेवुन, विविध मांत्रिक तसेच आंगात देव येतो म्हणणारे देव, यांच्यासह ठोंगी बाबा संत महंत ईत्यादी ठिकाणी फिरलेत. आणी त्या ठोंग्यांना, दोहितांना न मुखचा आवाज म्हणजेच न बोलता कृति व्दारे संदेश दिला की :

॥ जंतर-मंतर, करणी-कवटाळ । नव ग्रि-हे, बारा राशी ।
हे पुंजन तु सोड गा । हरिभजनी राहाव बा ॥ खंडं०७/ओ.७०

तुम्ही हरिभजनी राहुन सत्य देव चतुर्पती आदीपुरुष धनीदेवाला पुंजावं ! असे कृतिव्दारे बाळकृष्णाने मात्रिक जनांला सांगुन, मांत्रिकांच्या बंधनात अडकलेल्या जिवात्माची सुटका करु लागलेत. आणी त्यां जिवात्मांना चतुर्पति पंथात दाखल करुन घेवुन, त्या जिवात्मात उच्चत्तर अशी चतुर्पति नामाची गोडी रुजवु लागलेत. त्यांना मुळचे घर दाखवुन त्यांची मोक्षाकडे-मुक्तिकडे वाटचाल सुरु करु लागलेत.

बाळकृष्ण च्या या कार्यामुळे तत्कालीन मांत्रिकगण हादरले. थरथरा कापु लागलेत. त्यांचे धाबे दणाणु लागले. भैसाच्या दणाना मुळे ते चतुर्पती नामी शरण येवु लागलेत.

तत्कालीन मांत्रिकगणां पैकी ज्या मांत्रिकगणांत सत्वगुणाचा लेश होता, असे सर्व मांत्रिकजन बाळकृष्णास शरण आलेत. आणी खुल्या दीलाने-शुध्द अंतःकरणाने बाळकृष्णाला उध्देशुन विनवणीपुर्वक म्हणु लागलेत की :

॥ जंतर-मंतर, करणी-कवटाळ । नव ग्रि-हे, बारा राशी ।
जादु-टोणा बहु केले राया । येवु दे दया...,
येवु दे दया द्युतराया, शरण आलो तुया पाया ॥ खंडं०७/ओ.७०

सत्वगुणांचा लेश असलेले सर्व मांत्रिकजन, खुल्या दीलाने-शुध्द अंतःकरणाने झालेल्या चुका मान्य करुन, बाळ कृष्णाला शरण आलेत. जे काही मांत्रिक कार्य केले त्याबद्दल ते विनवणीपुर्वक कृष्णाला उद्देशुन म्हणु लागलेत की : येवु दे दया ! कृष्ण द्युतराया ! शरण आलो तुया पाया !

परंतु काही रज-तम गुणांचा लेश असलेले लोभी मांत्रिक जन बाळकृष्णा पासुन दुर पळु लागलेत.

बाळकृष्णला त्याचे मायबाप आपणा जवळ घेवुन येत आहे. असे त्या लोभी मांत्रिकास त्याच्या बांधीक गुलाम असलेल्या जिवात्मा लष्टाण व्दारे कळताच, ते लोभी मांत्रिकजन एकतर आपले स्वतःचे ठाणं सोडुन पळुन जावु लागलेत. किंवा आपल्या ठीकाणावर त्या दिवशी हजरच नाही राहु लागलेत !.

माता-पित्याने बाळकृष्णाला त्या बाबा च्या ठिकाणावर नेल्यावर त्या ठिकाणावर एकतर तो मांत्रिक हजर राहत नव्हता. किंवा त्या ठिकाणाहुन पसार झालेला राहत होता. हे बघुन माता-पिता आपली मेहनत वाया गेली. असे समजुन कष्टी होत होते.

बाळकृष्णाची ही सर्व माव-लिला काही केल्या थोडीबहुतही माता-पिता उकंडा-अनुसया ला कळत नव्हती. त्यांच्या काही एक लक्षात येत नव्हते. ते मनीच असे प्रश्न करत चिंतन करत होते की : जनलोक तर म्हणतात 'हे एक दैवी दिव्य बालक आहे.' तर मग या दैवी दिव्य बालकालाच रोग कसा जडला ?. या प्रश्नाचे न उलगडणारे कोडं माता-पित्याला पडले होते. काय करावे हे त्यांना काही सुचेना !.

बाळकृष्णाला जर मांत्रिकाकडे नेले, तर तो मांत्रिक एकतर या बाळालाच शरण येतो. किंवा पसार होतो. बाळाला जर देवाकडे नेले, तर तो देवच घुमुं लागुन त्याच्या आंगी असलेले लष्टान प्रकट होवुन, या बाळापुढेच लोटांगण घालतो.

सच्चे संत महात्मे योगी जोगी जाणते यांच्या कडे जर बाळाला नेले, तर ते सच्चे जाणते गण म्हणतात की : आम्ही या बाळकृष्णाच्याच भेटीची-दर्शनाची आम्ही वाट पाहत होतो. या बाळकृष्णाला आम्ही काय बरे करणार ? हा कृष्णाच तर जगाचे बरे करणारा तारणहार आहे !...ईत्यादी म्हणत या बाळाचीच स्तुति करत होते.

परंतु कोणी काहीएक सांगेना ! हे बाळ कसे बरे होणार ? हा बाळ बरा होण्याचे काहीच लक्षण दिसत नाही ! आता या बाळाला न्यावे तरी कुठे ?. कोणी तरी काही तरी सांगाव आम्हास ! या विवंचनेत माता-पिता पडले होते. हतबल झाले होते.

बाळकृष्णाची ही सर्व माव-लिला रंचली होती ती या करीता की :

- या बाळकृष्णला त्याच्या संग व पुढे-मागे विविध ठिकाणी अवतिर्ण होवुन, चतुर्पतिच्या कार्यास लागलेल्या जाणत्या गडयांना भेटी दयावयाच्या होत्या.
- समाजातील दांभीकता माजवणारे, फसवेगीरी करणारे, दोहित पसरवणारे, भोंदु लोकांना निवडुन त्यांची पुस घ्यायची होती. आणी समाजातील अश्या भोंदु-लोकांचे त्याच समाजासमोर पितळ उघडे पाडुन, त्या समाजातील भ्रामक समजुती, अंधश्रध्दा, चाली-रीती, दांभिकता, फसवेगीरी ईत्यादी साफ करावयाच्या होत्या. तत्काळीन समाजातील भ्रामक समजुती, अंधश्रध्दा, चाली-रीती, दांभिकता, फसवेगीरी ईत्यादी दुर करावयाची होती.
- तसेच अज्ञानी जनांना न बोलता फक्त अनुभव व कृति व्दारे चतुर्पती चे ग्यान दयावयाचे होते.
- चतुर्पती चा कार्यारंभ करण्याकरीता सुरुवात करायची होती.
- आणीक बहु कारणास्तव त्यांनी ही सोंगाडयाची माव-लिला रंचली होती. याची खबर त्यावेळच्या सर्वसामान्य जनलोकास नव्हती.

या सोंगाडयाची माव-लिला च्या काळात सर्व जाणत्यांच्या भेटी घेवुन अंती खाकी-मनकोजी, व फकीरजी यांचीसुध्दा भेटी घ्यावे. असे मनीच ठरवले होते त्या बाळकृष्णाने !.

सर्व जाणत्यांच्या भेटी घेवुन इच्छीत कार्य संपन्न झाल्यानंतर, बाळकृष्णाने आपले कळसुत्रे हालवुन कोण्या एका मानवाव्दारे आपला पिता उकंडा यांना प्रातःकाळी निरोप कळविला की :

जिथे बाळकृष्ण उकंडयास भेटला, त्या जंगलातील को-या भुम्मेवर बाळकृष्णा सारखेच खाकी-मनकोजी नाम असलेले दोन दिव्य दैवी संपत्तीचे बालके खेळत आलेले आहेत. या बाळकृष्णाला त्यांच्या जवळ घेवुन जावे !. बाळकृष्ण बरा होवु शकण्याची शक्यता आहे.

त्या कोण्या एक मानवाच्या निरोपानुरुप माता-पिता उकंडा-अनूसया हे आपल्या बाळकृष्णाला घेवुन, जंगलातील त्या को-या भुम्मेकडे त्याच दिवशी रवाना झालेत.

आपल्या भेटीला निराकार-निराधार निशं:कलंकी निरंजन चैत्यन्यमय आदीपुरुष भैष नारायण यांचा यवगायवगीचा अनामीक परात्पर भक्तयोगी भक्तात्मा कृष्णा हा बाळकृष्ण रुपात माता-पिता ला संग घेवुन येत आहे. असे त्याच दिवशी त्या खाकी-मनकोजी नाम असलेले दोन दिव्य दैवि जाणत्या बालकांनी जाणले. मनीच उल्हासले. उल्हासल्या मनाने बाळकृष्णाची आतुरतेने वाट पाहु लागलेत.

उकंडा-अनुसया हे बाळकृष्णला घेवुन त्यां दैवीबालकांच्या जवळ पोहचले. त्या माता-पिता ने बाळकृष्णाला खाकी-मनकोजी समोर ठेवले. आणी माय-बाप विनवनी करु लागलेत की :

जन म्हणतात की : तुम्ही जसे दैवी बालक, तसेच हेही दैवी बालक आहे. तरीसुध्दा हे दैवी बालकास रोग कसचा जडला ? या बाळाला रोगमुक्त करुन तुम्हीच आता तुमच्या या बाल सवंगडयाला बरे करावे देवा !.

उत्तरादाखल खाकी-मनकोजी बालक म्हणु लागलेत की : आम्ही या बाळ-कृष्ण सवंगडयाचीच वाट पाहत होतो. बाळ-कृष्णाने खाकी मनकोजी कडे पाहले. तिघांची नजरानजर एक होवुन तिघांच्याही मुखावर स्मित हास्य झळकले. बहु दिवसाची भेट झाली आणी तिघेही उल्हासीत आनंदित झालेत.

उकंडा-अनुसया यांना या तिघाची माव-लीला काही उमजेना !. या तिघांच वागणे काही कळेना !. ते माता-पिता खाकी-मनकोजी नामाच्या दोनही बालकांना विनवनी करत म्हणु लागलेत की : आमच्या बाळकृष्णाही काहीही करुन बरे करा ! या बाळाला काहीतरी देणं दया ! जेणेकरुन हा बाळ बरा होईल ! अश्या विनवण्या याचना अर्जा ते माता-पिता खाकी-मनकोजी बालका कडे करु लागलेत.

उत्तरादाखल खाकी-मनकोजी म्हणाले की :
हाच तर जगाचा तारणहार !. तारणहार ला कोण तारणार ? हाच तर विश्वनायक !. सर्व विश्वाला देणं देणारा महामहा योगी याहीच्या पुढ होणारा ! आम्ही तर यांच्या मागचे पाठीराखे !. आम्ही काय याला देणं देवु शकतो ?. जगाला देणं देणा-याला देणं देण्याचे सामर्थ व बळ आम्हामध्ये नाही.
म्हणुनच हे मायबाप हो ! या कृष्णालाच देणं मागा !. या कृष्णालाच बरे होण्यास सांगा ! या कृष्णालाच विनवणी अर्ज करा की : आपले आपरुप बरे करा म्हणुन !. रांजबिंड व प्रकाशमान आपरुप करा ! ऐसे म्हणुन या कृष्णालाच विनवणी अर्जा करा !

अशी सांगी करुन ते दोघे दिव्य बालक माता-पितास म्हणाले की : जाता जाता तुमच्या जाण्याच्या वाटेवर बाळाच्या भेटीची आस ठेवुन ठाण मांडुन बसलेल्या फकिराच्या भेटीस बाळकृष्णास घेवुन जावे. कृष्ण बाळालाच विनवणी

केल्यानंतर बाळ बरे होइल ! असे सांगुन त्या त्या दोघा खाकी व मनकोजी बालकाने माता-पित्याची आदराने रवानगी केली.

माता-पित्याच्या परतीच्या वाटेवर उभ्या असलेल्या फकिराकडे माता-पिता निघालेत. बाळकृष्णा माता-पित्या संग येत आहे. हे त्या जाणत्या फकीराने जाणले. मनीच उल्हासुन म्हणु लागले की : आता आहे आपली भेट बाळकृष्णा संग ! आतुरतेने वाट पाहु लागलेत.

माता-पिता बाळकृष्णाला घेवुन फकीराच्या दारी आलेत. फकीराच्या दारी आलेला बाळकृष्णाला माता-पिताने फकीराच्या पुढयात नेला. फकीराने काहीएक विचार न करता सरळ-सरळ बाळकृष्णाला स्पर्श केला. पदस्पर्शाचा लाभ झाल्यामुळे धन्य होवुन मनीच उल्हासुन, तो मनीच म्हणु लागला की :

''बहु दिवसाची भेट देल्ली, आता या रायानं हो ! करतो प्रार्थना हात जोडुनी, धनी अवतार ! आता कराव कार मोहरचा-समोरचा !. झाले दर्शन झाला लाभ, उध्दारला हा देहजीव !'' असे मुक्षपणे बोलुन तो फकीर माता-पित्यास उध्द्येशुन म्हणाला की :

तारणहार ला तारण्याची हिम्मत कोण करणार ? विश्वाला देणं देण्या-यास देणं देण्याचे बळ कुणामध्ये असणार ? बरे करणा-यास बरे कोण करणार ? म्हणुनच हे मायबाप हो ! तुम्हीच या बाळकृष्णाला सांगा की :

आम्ही सर्व उपाय व प्रयत्न करत करत बारबंड फिरता फिरुन थकलो आहोत. आता आम्ही कुठेच फिरणार नाही. कुठच जाणार नाही. कुण्या देव-दैवतांना भजणार नाही. धागे-दोरे करणार नाही. हे बाळकृष्णा ! आपणच आपले आपरुप बरे करा हो !. असा भाव धरुन तुम्ही तुमच्या घरीच या कृष्णाला विनवणी करा ! आणी निश्चिंतपणे झोपा. बाळ बरे होईल ! हे निश्चितपणे सांगतो. अशी त्या फकीराने माता-पित्यास सांगी करुन, बाळ-कृष्णासह माता-पित्याची मान-सन्मानाने तेथुन रवानगी केली.

तेथुन माता-पिता बाळकृष्णाला घेवुन त्या रात्री चिरोडी या आपल्या गावी घरी पोहचले. जेवन वैगेरे करुन त्याच रात्री ते मायबाप फकीराच्या सांगीप्रमाणे बाळ-कृष्णाला उद्वेशुन म्हणाले की :

*हे कृष्णा ! आम्ही सर्व उपाय व प्रयत्न करत करत बारबंड फिरता फिरुन थकलो आहोत. आता आम्ही कुठेच फिरणार नाही. कुठच जाणार नाही. कुण्या देवी-दैवतांना भजणार नाही. धागे-दोरे करणार नाही. कृष्णा ! तु आपरुप या घरी आला ! आपणहुन आले या घरा आम्हा धरलं हाती । आता आपणहुन आपणच आपरुप बरे करावे !.*

अशी त्या फकीराने सांगतल्या प्रमाणे कृष्णाला विनवणी केली. बाळाला ही विनवणी घालत घालत निजरुपी केले. आणी स्वतःही झोपलेत. प्रातःकाळी उठुन पाहते तर काय ? बाळकृष्णा रस्त्यावर खेळत आहे ! असे दृष्य त्यांना दिसले. हे दृष्य बघुन ते दोघेही मायबाप आनंदित झालेत. त्या प्रातःकाळी आनंदित उल्हासीत होवुन त्या मायबापाने सुश्वास घेतला. आणी म्हणु लागलेत : ''बाळ आपरुप बरे झाले !.'' धन्य देवाची लिला ! कळेना कोणास !

त्या गावाच्या येशीवर असलेल्या महार पोडयात पुढे हे दिव्य दैवि बालक कृष्णा आपल्या राजबिंड मुळरुपात येवुन वाढु लागले. जंगंलातील को-या

भुम्मेवर गाय वासरे नेवुन तेथेच रमुन राहु लागलेत. या बाळ-कृष्णा संग अवतीर्ण झालेले त्यांचे पाठीराखे खाकी-मनकोजी यांच्यासह ईतर सर्व जाणतेगण त्यांच्या कडे येणा-या पिडीतांचे देहीवरील दुःख-दर्द, संकटे-आरीष्टे, रोग-विघ्ने उडवण्या साठी, त्या पिडीतांना जंगलातील को-या भुम्मेवर उभ्या असलेल्या कृष्णाकडे पाठवु लागलेत.

पिडीतांचे देहीवरील दुःख-दर्द, संकटे-आरीष्टे, रोग-विघ्ने कृष्णा उडवु लागला. कृष्णाच्या नुसत्या दर्शनाने, सांगीने पिडीतांचे भले होवु लागलेत. जे कृष्णापर्यंत पोहचले ते खाली हाताने कधीच परत गेले नाहीत.

कोण्या एका भक्ताच्या हाती कृष्णाने देणं दीलेत. तर कुणाच्या हाती सुखः दिले. कुणा एका च्या पुढे उभे राहुन, त्याच्या नशीबात असलेल्या भालीयाच्या घावाचा निर्वाळा काटयावर करुन त्याला होणा-या दुखःदर्द ची तिव्रता कमी केल्यात. संकटे-आरीष्टे दुर केलेत. तर कुणाची पुर्ण न होणारी इच्छांची इच्छापुर्तिही केल्यात. जे भाग्यात नव्हते ते भाग्यात आणुन दिले. जे भाग्यात होतं ते सहजतेने त्यांच्या हातात दिले या कृष्णाने..!

कृष्णापर्यंत पोहचलेले हे जनलोक कृष्णापासुन काही ना काहीतरी घेवुनच गेले. या कृष्णाने ज्याच्या भाग्यात जो भाग होता, तो भाग त्याला सहजच मिळवुन दिला. ज्या बाळाच्या भाग्यात जो भाग नव्हता, तोही भाग त्याच्या भाग्यात आणुन दिला. कितीतरी बुडाल्या वंशाचा वाढवला वेल या कृष्णाने ! आणीक कितीक वर्णु या कृष्णाचे गुण ?

''जो आपणाकडुन काहीही अपेक्षा न करता निस्वार्थ भावाने आपले भले करतो तोच आपला देव !'' या विचारसरणीचे जनलोक कृष्णालाच आपला देव मानु लागलेत. कृष्णालाच कुळदैवत मानु लागलेत. कृष्णाला देव म्हणुन भजु लागलेत. पुंजु लागलेत. अश्या एका विचारासरणीचे अनेक झालेत. अनेकाव्दारे किर्त महिमा दुरवर पसरु लागली.

कृष्णा रूपाने मोठे झालेत. चिरोडी वरुन लगतच्या जंगलात गाई-ढोरे चारायला नेता नेता त्या जंगलातील ज्या को-या भुम्मेवर अवतीर्ण झालेत, त्याच को-या भुम्मेवर वास्तव्य करु लागलेत. त्या को-या भुम्मेवर आदीपुरुष धन्याची भक्ती करत मन रमवु लागलेत. त्या को-या भुम्मेवर पक्की मांड बसवु लागलेत. त्या घनदाट अंधा-या वनात या कृष्णरायाने ४५ वर्षे चतुर्पती आदीपुरूषाची भक्ती केली.

भक्त व जनलोक सुध्दा कृष्णाला शोधत शोधत घनदाट जंगलातील त्या को-या भुम्मेवर वास्तव्यास असलेल्या कृष्णापर्यंत पोहचु लागलेत. कृष्णाजवळ पोहचलेल्या त्या भक्तजन लोकात कृष्णा चतुर्पतिचे बिज रोपन करु लागलेत. चतुर्पता अथर्वन् वेदाचे ग्यान देवु लागलेत. मुळयवगाचा देवाचे मुळयवगाचे ग्यान सांगु लागलेत. भक्तजनास चतुर्पती ग्यानी बनवु लागलेत.

निराकार-निराधार निशंःकलंकी निरंजन चैत्यन्यमय आदीपुरुष भैष नारायण यांची चतुर्पति ज्ञान-भक्ती ची सांगी करु लागलेत. चतुर्पति ज्ञान-भक्तीचे बिजे सच्च्या भक्तात रोवुन त्याची देखभाल, जपवणुक व रक्षण करू लागलेत. चतुर्पति ज्ञान-भक्तीचे अमृतपाणी पाजु लागलेत.

अमृत पान्हा पाजुन चतुर्पति ज्ञान-भक्तीचे पिक काढु लागलेत. भक्तजनास चतुर्पति आदीपुरुषाच्या ज्ञान-भक्ती मार्गि लावु लागलेत. त्याच

सोबत तेथे येणा-या पिडीतांचे सुध्दा दुःख-दर्द, संकटे-आरीष्टे, रोग-विघ्ने कृष्णा उडवु लागला.

जे भक्तजन

- कृष्णाच्या सांगीनुरुप सच्चेपणाने दया-क्षमा-शांती ला घेवुन, सारंगधर हदयी भरवु लागलेत.
- सत्मार्गी राहुन सिदाईने सरळसाध्या मार्गाने चतुर्पति आदीपुरुषाची भक्ती करु लागलेत.
- चतुर्पती नामी राहन चतुर्पतीची ज्ञान भक्ती करू लागलेत.

ते सर्व भक्त जनांची त्यांच्या जित्या जन्मी असलेल्या दुःख-दर्द, संकटे-आरीष्टे, रोग-विघ्ने असलेली चौ-यांशी ची तिव्रता चतुर्पतिच्या भक्तीने कमी होई ! या कृष्ण संगतिन त्या भक्ताच्या दैवात असलेले भालीयाचे घाव चा निर्वाळा काटयावर त्या भक्ताच्या नकळत होई !. कारण की :

कृष्णा हा त्रिकाल जाणता ! भुत-भविष्य आणी वर्तमान हे तिनही काळ जाणणारा त्रिकालदर्शि ! त्याचमुळे चतुर्पतिच्या सच्च्या भक्ताच्या भविष्यात कोण कोणते घाव आहेत ? हे त्या कृष्णाला आधीच माहीत होत होते. त्याच मुळे तो चतुर्पतिच्या त्या सच्च्या भक्तांना आधीच खुणमुद्रा देवुन-त्याला सावध करत असे. दृष्टांत देत असे. त्या घावाची तिव्रता कमी करण्याची आधीच तयारी करुन त्या घावाच्या समयी तो आधीच उभा राहत असे. सच्च्या भक्ताने हाका मारो या ना मारो ! भक्ताच्या संकटसमया पुढे तत्परतेने उभा तो कैवारी ! आधीच उभा राहुन आपल्या चतुर्पतिच्या सच्च्या भक्त गडयांच्या दैवात असलेले भालीयाचे-भाल्याचे घावाची तिव्रता कमी करत, भक्तांच्या दैवातील त्या घाव चा निर्रवाळा काटयावर करत असे ! सच्च्या भक्तांच्या जित्या जन्मीच्या चौ-याशीतील फेरीची तिव्रता कमी करण्यासाठी सदा भक्ताच्या मागे पुढे चालत असे ! त्या सच्च्या भक्ताचा चाकर बनुन चाकरी करण्यासाठी हा सत्य देव उभा राहत असे.

कृष्णाच्या याच शिष्टाई वर भाळुन सच्चे भक्तजनासह जाणते गण त्याच्यावर प्रेम भक्तीचा वर्षाव करु लागलेत. भेटी आंगचे सिध्दगण त्यांच्या संगतीन उभे राहु लागलेत. त्यांच्या व्दारे कृष्णाची किर्त महीमा, अस्तुकी चा परीमय दुरवर पसरू लागला होता.

जंगलातुन कृष्णाची किर्त महिमा दुरवर पुर्व, पश्चिम अश्या दहाही दिशेला पसरत गेली. किर्ति मुळे जंगलात गर्दि भिड वाढु लागली. दुरवरुन त्या जंगलातील को-या भुम्मेवर कृष्णाकडे चारही प्रकारचे सत्कृतित पुण्यवान भक्त जनलोक गर्दि करु लागलेत. ते असे :

**॥ कृष्णाकडे येणारे चार प्रकारचे भक्तगण ॥**

**प्रकार ०१ : आर्त पिडीत भक्तगण** :-

- सांसारीक अडचनी, दुःख-दर्द, रोग-विघ्न ईत्यादी पिडांव्दारे पिडीत झाल्यामुळे समाजाने त्यांच्या पिडामुक्तीचे प्रयत्न करण्याचे टाकुन दिलेले पिडीत जन
- आपत्ती, विपदा, कृत्या व्दारे संकटग्रस्त झालेले जन.
- दुखः निवारण्याकरीता सर्व प्रकारचे उपाय योजना, व्रत-वैकल्प देव-देवता करुन थकलेले जनलोक
- निराश होवुन हतबल झालेले ईत्यादी

ऐसे आर्त जनलोक जंगलातील कृष्णराया कडे धाव घेवु लागलेत. कृष्णाला शरण येवुन आपले पिडा संकटे दुर करुन घेवु लागलेत.

कृष्णाव्दारे आपले अडचनी, दुःख-दर्द, रोग-विघ्न ईत्यादी इडा-पिडा दुर होवुन आनंदित झालेले हे सर्व आर्त भक्तजन पुढेमग कृष्णाचे भक्त बनुन चतुर्पति पंथात दाखल होवु लागलेत. ऐसे हे आर्त प्रकारचे भक्तगण कृष्णाकडे गर्दि करु लागलेत.

**प्रकार ०२ :- जिज्ञासु भक्तगण :-**

- परमसत्य च्या शोधात असलेले.
- चतुर्पति ज्ञान प्राप्त करुन घेण्याची इच्छा बाळगणारे.
- तिरगुणाच्या पल्याड असलेल्या मायेविरहीत सच्या ज्ञानाचे अभिलाषी !.

ऐसे परंम ज्ञानाच्या शोधात, शोध घेत घेत, बारबंड फिरुन आलेले जिज्ञासु, पारखी भक्तगण कृष्ण संगतीचा लाभ घेण्याकरीता, चतुर्पती चे निरंजन ज्ञान घेण्याकरीता कृष्णाकडे येवु लागलेत. कृष्णाचे परंम् भक्त बनुन चतुर्पति पंथात दाखल झालेत. ऐसे हे जिज्ञासु-पारखी प्रकारचे भक्तगण कृष्णाकडे गर्दि करु लागलेत.

**प्रकार ०३ :- अथार्थि भक्तगण**(भौतिक लाभाची वासना बाळगणारे) :-

- भौतिक लाभच्या इच्छेने भक्त बनुन सकाम भक्ती करणारे !.

हे उच्चकोटीतील व्यापारी भक्तगण, संसाराच्या निरनिराळ्या अवस्थेत कृष्णाला शरण येवुन सकाम (म्हणजे काम असेल तेव्हा फळाची इच्छा बाळगुन भक्ती करणारे !) भक्तगण सकाम भक्ती करतात. आणी हे अथार्थि भक्तगण आपल्या भक्तीच्या मोबदल्यात, स्वतःच्या इच्छा-आकांक्षा कृष्णाव्दारे पुर्ण करण्याची आशा बाळगतात.

हे व्यापारी भक्तगण पुजा-अर्जा, सेवा, भक्ती ईत्यादी ची किंमत कृष्णाला मागत असतात. काही ना काहीतरी भगवंताला देवुन, त्याच्या मोबदल्यात काहीना काही प्राप्त करण्याची ईच्छा बाळगत असतात.

भगवंताकडुन स्वतःच्या इच्छा-आकांक्षा पुर्ण करण्याचे मागणी तसेच इच्छीत फल सदा न कदा हे अथार्थि भक्तगण मागत राहतात. सकाम भक्तीने ओवाळुन कृष्णा व्दारे फल मिळवत राहतात. तेही ठिकच आहे कारण की :

एकमेकाचे एकमेकांनी पोषन केल्यास सर्वाकरीता सर्वत्र समृध्दी येते. असो.. असेही भक्तगण कृष्णाचे भक्त बनुन चतुर्पति पंथात दाखल झालेत. हे अथार्थि प्रकारचे भक्तगण ला त्यांच्या सकाम भक्तीच्या मोबदल्यात कृष्णाकडुन काही ना काही भौतिक लाभ मिळत राहील्यामुळे हे अथार्थि भक्तगण ही त्या जंगलात येवुन कृष्णाभोवती गर्दि करु लागलेत. राहु लागलेत.

**प्रकार ०४ :- परंम्ज्ञानी भक्तगण**

(कृतार्थ झालेले शुध्द सच्चे ग्यानी भक्तगण):-

- कृष्णा व्दारे चतुर्पति चे निरंजन परंम् ज्ञान सह देणं प्राप्त होवुन कृतार्थ झालेले शुध्द सच्चे निरंजन ज्ञानी भक्तगण
- चतुर्पती च्या ज्ञान भक्ती व्दारे कृष्णाशी नेहमी युक्त राहुन, अंतरी सतत नामधुनी तेवत ठेवुन निष्काम भक्ती करत राहणारे भक्तगण

असे हे ज्ञानी भक्तगण जेव्हा जेव्हा संधी मिळेल, तेव्हा तेव्हा हे ज्ञानी भक्तगण कृष्णाची स्तुति-अस्तुकी-महिमा सेवा भजन, पुजन, ध्यान, सुमरन, ईत्यादी करत निरंतर कृष्ण भक्ती करत राहतात. हे भक्तगण निष्काम भक्ती करणारे असल्यामुळे, कशाचीही अभिलाषा न बाळगता काही ना काहीतरी देण्यासाठी सतत प्रयत्नरत् राहतात. कारण यांना चांगल्या रितीने माहित असते की :

इथ आमच काही नाही ! जे काही आहे ते सर्व कृष्णाने दिलेले आहे. सर्वकाही कृष्णाचेच आहे. म्हणुनच जो काही आमचा एकच मनभाव आहे, त्या एकच मनभावाचे फुल-पुष्प कृष्णा चरणी अर्पण करत हे निरंजन ज्ञानी भक्तगण विनवित राहतात की : हे कृष्णा ! आम्ही जडलो गा तुम्हा पायी ! आम्हा नित ठेवा आपल्या नामी ! असे म्हणत हयगय न करता स्वकर्तव्य करत राहतात. धिराईच्या देही बनवुन राहतात.

यां सच्च्या भक्तांचा धर्ता, कर्ता, करविता, तसेच सच्चे भक्तांच्या बुध्दीचा दाता हा कृष्णाच राहतो. आपन फक्त त्याच्या हातातील कळसुत्र बाहुली आहोत. कळसुत्र दोरी या कळसुत्राचा मालक कृष्णाच्या हाती आहे.

जो पर्यंत त्याची इच्छा असेल, तो पर्यंत तो दोरी हालवुन तो या आयुष्याचा पाळणा हालवणार आहे. त्याच्या या कामात कुणीही आड येणार नाही. कुणीही आडवे येवु शकत नाही. म्हणुनच मृत्यु चे भय बाळगुन काय उपयोग ? असे म्हणत हे ज्ञानी भक्त निर्भेव होवुन कृष्णास विनवतात की :

हे आदीपुरुष कृष्णा ! हे कळसुत्राच्या मालका कृष्णा ! तुम्हाव्दारे या आयुष्याचा पाळणा हालवतांना तुमचे मन रमण्यासाठी, तुमच्या मनाला आनंदीत करण्यासाठी आम्हाला जसे खेळवयाचे असेल तसे तु खेळव ! तुला जर आम्हा रडणा-यास गुपचुप ठेवावयाचे असेल, तर काहीतरी देवुन गुपचुप ठेव ! आम्हा जनास शांत ठेवावयाचे असेल, तर सुखःशांती देवुन आम्हास सुखी ठेव !

कर्मफलाची आसक्ती न ठेवता आमचे नियत कर्तव्य म्हणुन आम्ही जे काही कर्म करत आहोत, त्या कर्माच्या फलाने तुला जर आनंद होत असेल तरच ते कर्म आमच्याकडुन करवुन घे ! कारण त्या कर्माचे फळ आम्ही तुलाच अर्पण करत आहोत. आम्ही अर्पण केलेल्या कर्मफळाने तुला आनंद व्हायलाच पाहीजे. असेच कर्म आमच्या कडुन करवुन घे !

जिथे तुला आनंद होत असेल, तिथेच आमचा देह चंदनाप्रमाणे झीजवुन झिजव ! ज्या कार्याव्दारे तुला आनंद होईन, असेच कार्य आमच्या कडुन करवुन घे. जिथे तुला आमचा देह कष्टी करुन आनंद होत असेल, तिथे आमची देही कष्टी ठेव ! जिथे तुला आम्हास सुखः देवुन आनंद होत असेल, तिथेच आम्हास सुखः दे !

आनंदाने आमच्या गुणदोषासह आम्हाला स्विकारुन पदरी घेवुन आमच्यातील गुणदोष आमच्याच व्दारे काढुन आनंदीत हो ! आमच्यात शिरलेला अहंकाराचे नित झाडण कर. आणी आम्हाला सरळ साध्या रितीने सिदाईच्या मार्गाने ठेवुन या परमात्माची प्राप्ती करवुन दे ! कारण की : हे आम्ही चांगल्या रितीने जाणतो की तुच तर धर्ता, कर्ता, करविता तसेच सच्चे भक्तांच्या बुध्दीचा दाता आहेस. इतकेच नव्हे तर सर्वकाही तुच आहेस. तुमच्याच हाती सर्वकाही आहे. तुमच्या हुकमा बिन झाडाचा एक पत्ता सुध्दा हालत नाही. म्हणुनच आम्ही पुनःपुन्हा विनवणी अर्ज करीतो की :

हे कृष्णा ! ज्या गोष्टीपासुन-ज्या कर्मापासुन तुला आनंद होत असेल, असेच कर्मे-गोष्टी आमच्या कडुन करवुन घे !. तुला आनंद होण्यासाठी आम्हाला जसे ठेववायचे असेल तसे ठेव !. तुला जे योग्य वाटेल ते आम्हा संग कर !. कारण की : तु आम्हास अत्यंत प्रिय आहेस. भलेही तु आम्हा भक्तास अत्यंत प्रिय मानो या ना मानो ! भलेही तु आम्हा भक्तास साहय करो या ना करो ! आम्ही तुमचे होय म्हणतो. आम्ही चिरंजीव तुम्हा चरणी उभे आहोत. आता धरले हो तुमचे पाय ! नाही सोडत हो जगजेठ !

असे हे निरंजन ज्ञानी, धिर गंभिर, धिट, निर्भय परमं ज्ञानी भक्तगण जंगलातील को-या भुम्मेवर जावुन कृष्णाचे परंम भक्त बनलेत. चतुर्पति पंथात दाखल झालेत. असे हे कृतार्थ झालेले परंम ज्ञानी प्रकारचे भक्तगणही जंगलातील को-या भुम्मेवर उभा असलेल्या कृष्णाभोवती गर्दि करु लागलेत

अश्याप्रकारे **१. आर्त पिडीत भक्तगण २. जिज्ञासु भक्तगण ३. अथार्थि भक्तगण ४. परंम्ज्ञानी भक्तगण** असे चारही प्रकारचे भक्तगण जंगलातील को-याभुम्मेवर उभा असलेल्या कृष्णाभोवती गर्दि करु लागलेत.

यापैकी पहील्या आर्त प्रकारचे भक्तगण हे प्रथम नाना विविध ठिकाणाहुन फिरून आलेले होते. बहुत ठिकाणी अनेक नाना विविध तत्कालीन योगी संत महात्मे देवी-देवता बुवा-बाबा यांच्याकडे साकडे घालुन, त्यांनी सांगीतल्याप्रमाणे कर्मकांड पुजा-अर्जा ईत्यादी सर्व करूनही ज्यांचे रोग-विघ्ने, इडा-पिडा संकटे ईत्यादी दुर होवु शकल्या नाहीत. असे आर्त पिडीतजन कृष्णाकडे आलेत.

कृष्णाच्या सांगीप्रमाणे आदीपुरूषाकडे अर्ज लावुन, मनोभाव सच्ची भक्ती ने त्या अर्जाच्या पाळणुका सच्च्या दिलाने पाळुन तरू लागलेत. अर्ज सफल होवुन आंगी असलेंल्या पिडांपासुन मुक्त होवु लागलेत.

हे सर्व आर्त जनलोक चतुर्पति मार्गि लागुन आदीपुरूषाच्या भक्तीसह चतुप्रतिच्या अमृत वाणी ने न्हावुन निघाल्यामुळे त्यांच्या इडा-पिडा कृष्णकृपेने कायमच्या दुर झाल्यात.

ज्या रोग्याचे दुखःदर्द च्या पिडा पाहुन, न राहवुन त्या रोग्यांच्या घरच्या लोकांनी त्या रोग्यांची दुरस्त होण्याची आशा सोडुन दिली होती. असेही अत्यंत आर्त पिडीत रोगी बरे झाल्यावर कृष्णा चा संग करण्यासाठी तिथेच झोपडी बांधुन राहु लागलेत. बरे झालेल्या रोग्यांच्या मागोमाग त्यांच्या घरचे लोकही त्यांच्या सोबत तिथेच त्यांच्या झोपडीत वास्तव्यास येवु लागलेत. बरे झालेल्या आर्त जनांच्या झोपडया बघुन इतर प्रकारच्या भक्तजनाला तिथे येवुन वास्तव्यास राहण्याचे स्फुरण झाले.

चारही प्रकारचे भक्तगण कृष्णा चा संग नित प्राप्त करण्यासाठी तसेच कृष्णाहस्ते चतुर्पतिचे अमृतपान पिण्यासाठी त्या जंगलातील को-या भुम्मेवर वास्तव्यास आलेत. तिथेच प्रपंच करून परमार्थ साधु लागलेत. कृष्णा संगतीने बहु पुण्य झाले !. असे म्हणत म्हणत नित आनंदी व निरोगी राहु लागलेत. चतुर्पति आदीपुरूषाच्या नामी राहुन, चतुर्पती चे भजन पुजंन घ्यान करत आनंदी व निरोगी देहीने तिथे जंगलातील को-या भुम्मेवर झोपडया बांधुन राहु लागलेत.

या चारही प्रकारच्या भक्तगणांपैकी पहील्या प्रकारचे आर्त भक्तगण हे या सर्व भक्तगणांच्या संगतीने जिज्ञासु कृष्णभक्त बनलेत. जनलोकांत जिज्ञासा

जागृत झाल्याने ते सर्व जिज्ञासु भक्तजन जेव्हा संधी मिळेल तेव्हा कृष्णाकडे साकडे घालुन म्हणु लागलेत की : कृष्णा ! चतुपता होय गा तुमची ! हे चतुर्पति ज्ञान समजावुन सांग गा कृष्णा !. कृष्णा ला असे चतुर्पता ज्ञान ''सांग गा ! सांग गा !'' म्हणणा-या जनलोकांची संख्या तिथे दिवसे नं् दिवस वाढु लागलीत.

ज्ञानप्राप्ती करीता त्यांच्या सह इतर जनलोकही तिथे झोपडया करून राहु लागलेत. चतुर्पतिच्या सावांना ''सांग गा'' चतुर्पति ज्ञान असे म्हणणा-या लोकांच्या वस्त्या वाढु लागल्यात. अश्या अनेक वस्त्या वसुन घनदाट जंगलातील को-या भुम्मेवर वास्तव्यास असलेल्या कृष्णाच्या झोपडी भोवती गाव वसले.

या गावात आर्त, जिज्ञासु, अथार्थि व ज्ञानी असे चारही प्रकारचे भक्तगण चतुर्पतिच्या पुर्ण ज्ञान भक्ती करीता कृष्णा मागे ''सांग गा कृष्णा ! चतुर्पति ज्ञान'' असे म्हणत कृष्णा मागे फिरू लागलेत. कृष्णा मागोमाग फिरणारे भक्तगण ची गर्दि तेथे राहु लागल्याने या गावाचे नाव प्रथम ''सांव गा ! (कृष्णा) असे पडलेत. तद्नंतर उच्चारदोषाने ते ''सावंगा'' असे झाले.

आणी पुढे भक्तात्मा कृष्णाच्या आंगी निरंजन ज्योतस्वरूपी विठ्ठल अंर्तभुत होवुन या एक झालेल्या ज्योती मध्ये ज्योत भैसाची खेळु लागल्याने या गावाचे नाव जाणत्यां सिध्दगण, द्युतगणं ईत्यांदी ्व्दारे **सावंगा (विठोबा)** असे पडले. असो. पुढे पाहु :

सावंग्यात मुळस्तंभाचा भक्तात्मा कृष्णा ने रंग धरल्यानंतर कृष्णासंग व पुढे-मागे अवतरलेले जाणते योगी-जोगी, संत-महात्मे, बाबा-महाराज ईत्यादी कृष्णाला वेळोवेळा भेटी देवु लागलेत.

या जाणत्यांपैकी काशीचे वल्लभ ऋषी जे पुर्वाश्रमी अवलेह मुनी होते, त्यांनी काशी वरून कृष्णाला आवाज दिला की : 'हे कृष्णा ! तुझा संग करण्यास येतो मी खरा ! तुमच्या देहघरी अवतिर्ण होणा-या निराकार-निराधार निशं:कलंकी निरंजन चैत्यन्यमय आदीपुरुष भैष नारायण यांची भक्ती करण्यास ! तुझी भक्ती करण्यास !

काशीहुन आलेल्या या आवाजाच्या प्रति उत्तरादाखल कृष्णाने सावंग्यातुन त्या काशीच्या अवलेह मुनीस उर्फ बल्लभ मुनीला आवाज दिला की : ''ये बारा वर्षानी ! ये एका तपानंतर ! आजच तुमची कारला या गावी अवतार घेण्याची व्यवस्था करून ठेवतो.

कारला या गावी राघोबाजी हा पुर्वाश्रमी अवलेह मुनी चा भक्त होता. पुर्वाश्रमीच्या या वल्लभ ऋषीच्या कृपेने राघोबाजीला दोन अपत्य झाले होते. परंतु नजीकच असलेल्या कृष्णाच्या आकर्षन शक्तिने तो सावंग्यातील कृष्णा कडे आकर्षित होवुन चतुर्पतिचा भक्त झाला होता. घरावर तुळशीपत्र ठेवुन तो चतुर्पतिच्या कृष्ण-अवद्युत मार्गि लागला होता.

चिरोडी नजीकच्या जंगलात वसलेल्या सावंगा या गावात कृष्णाचा संग व चतुर्पतिची ज्ञान-भक्ती करण्यासाठी वास्तव्यास आला होता. राघोबाजी कृष्णाचे चरण पकडुन चतुर्पति आदीपुरूषाची भक्ती करत होता. कृष्णाच्या संगतीने त्याचे बहु पुण्य संचित झाले होते. सावंग्यातील जाणता राजा कृष्णा

सर्वकाही जाणुन होता. एके दिवशी राघोजीच्या नकळत राघोजीला देणं देण्यासाठी कृष्णा पुढे सरसावला !

कृष्णा राघोजीस म्हणाले की : राघोजी ! पहा त्या कारल्या गावाकडे जाणा-या पाय वाटेकडे !. जेव्हा राघांजीने कारला गावाकडे जाणा-या पायवाटेवर दुरवर राघोजीने पाहीले, तेव्हा त्यांना दिसले की :

त्या पायवाटेवर एक गाय उभी असुन, ती गाय आपल्या वासरासाठी हंबरडा फोडत आहे. हा दुष्टांत बघुन राघोजीने कृष्णास विनवनी करून म्हटले की : हे कृष्णदेवा ! हे काय होय ते सांगा हो मजला आता !.

राघोजीच्या विणवणीस पावन होवुन कृष्णाने त्याला सांगी केली की :

जी गाय आपल्या वासरासाठी हंबरडा फोडत आहे. ती गाय दुसरी तिसरी कोणी नसुन पुर्वाश्रमी ज्या अवलेह मुनीची भक्ती तु केली होती, तोच तुझा पुर्वाश्रमीचा वल्लभ ऋषी आहे. वल्लभ मुनी म्हणजेच पुर्वाश्रमीचा अवलेह ऋषी होय. तो अवलेह मुनी या कृष्णाकडे आकर्षित झालेल्या आपल्या वासराकरीता म्हणजेच या राघोबा वासराकरीता हंबरडा फोडत आहेत.

श्रीकृष्णाचा संग करण्यासाठी तो वल्लभ ऋषी पुढे बारा वर्षानंतर तुया घरी अवतार घेवुन अवतीर्ण होणार आहे.

श्रीकृष्णाचा संग करत चतुर्पति ज्ञान भक्तीचे बिजे जनलोकात रूजवुन चतुर्पती ज्ञान भक्ती सह चतुर्पती धन्याची किर्त महिमा वाढवण्या साठी तो अवलाई अवतार तुमच्या घरी एक तपानंतर येणार आहे. पुढे बारा वर्षांनी एका भल्या पहाटेच्या प्रहरास तो अवतार केळीच्या पानावर मासाचा गोलांकृत छोटया गोळयाच्या रूपात या राघोबास प्राप्त होणार आहे.

राघोबा ! एका तपानंतर तुला प्राप्त होणारा तो केळीच्या पानावरचा गोळा, त्या केळीच्या पानासह तुझया घरच्या भिंतीच्या एका कोणडयात ठेव. आणी आता जी सांगी सांगतो ती सांगी निट लक्ष देवुन एक तप ध्यानात ठेव.

या गुप्त सांगी प्रमाणे निरंतर समयबध्द ज्योत लावुन विद्यीयुक्त त्या तुम्हास केळीच्या पानावर प्राप्त झालेल्या गोळया समोर अखंड साधना कर !. तुमच्या या साधनेव्दारे दहा दिवसांनी त्या मासाच्या गोळाला आकार येण्यास प्रारंभ होईल. ४७ दिवसांनी तो पुर्णत्वात येईल. आणी त्या आकाराच्या आत निशःकलंकी निरंजन ज्योत अंर्तभुत होवुन, तो आकारच ज्योतीचा अवतार होइन ! त्या अवतारास देवमन नामाने जन ओळखतीन.

म्हणुनच आता तु याच पायवाटेने आपल्या कारला गावी जावुन प्रपंच करून नित राहय गा परमात्मा संग ! अशी कृष्णाने राघोजीस सांगी केली. आणी आदराने त्या पायवाटेने राघोजीची रवानगी कारला गावाकडे केली.

अश्या रितीने वल्लभ ऋषी ला त्या समयी ''ये बारा वर्षानी !'' असा जो आवाज दिला होता, त्या आवाजाचा शकुन साधण्याची तयारी बारा वर्ष अगोदरच या कृष्णाने करून ठेवली होती.

तर ईकडे जरी माय-बाप उकंडा-अनुसयाला पुर्वसंचिताने प्राप्त झालेला कृष्णा हा त्यांचा दिव्य दत्त मानस पुत्र असला, तरी सुध्दा कृष्णाच्या अनंत

लीला याच डोळा याच आपल्या दृष्टीदेखत पाहुन कृष्णाचे मायबाप उकंडा-अनुसया हेही आपले नाते विसरून कृष्णाला भजु लागले होते.

अनुसया तर एक विवाहीत स्त्री होती. आणी तिच्याही काही सर्वसामान्य इच्छा होत्या !. प्रतेक विवाहीत स्त्री ची इच्छा असते की : विवाहानंतर आपल्याला स्वतःच्या गर्भि वाढलेले अपत्ये व्हावेत. आपली सुध्दा ओटी भरावी. नाही नाही म्हणता स्त्रीयांना गर्भाच्या कळांची आवड असतेच ! भलेही गर्भाच्या कळा तिला दुखःदर्द देवोना ! ते दुखःदर्द ची ती सुप्तपणे आस धरते. ते दुःखदर्दच तिला सुखःद वाटत असतात. कोणी काहीही म्हणो परंतु गर्भाच्या कळांचे अनुभव घेण्याची सुप्त इच्छा तिच्यामध्ये असतेच. तसेच ती वात्सल्याची मुर्ती असल्यामुळे तिला तिच्या जवळच्या वात्सल्याच्या रसाने आपल्या पुत्रांना न्हावु घालावयाचे असते. याच इच्छापोटी तिला तिचे स्वतःचे गर्भि पुत्र ची आस असते. म्हणुनच त्यासाठी तिला स्वतःचे मुलं हवे असतेच.

मातेच्या मनाच्या कोनडयात दडुन असलेली ही मनाची सुप्त इच्छा जाणता राजा कृष्णाने जाणली. आणी आपल्या काही प्रिय जाणत्यांना मातेच्या गर्भातुन अवतिर्ण होण्यास कृष्णा मान्यता देवु लागलात. मान्यता दिलीत. तिच्या नकळत तिच्या इच्छेप्रमाणे तिला पुत्रलाभाचे देणं प्राप्त होवु लागलेत.

आकाशमात मधील चतुर्पतीचे अवतारी निर्गुण निरंजन ऋषिं यांना कृष्णाची मान्यता प्राप्त झाल्यानंतर, एकामागं एक मान्यताप्राप्त अवतारी जाणत्यांचे अवतरण मातेच्या गर्भामार्फत ठराविक अंतराने होवु लागलेत. उकंडा-अनुसया ला पुत्ररत्न लाभु लागलेत. तिच्या गर्भातुन मान्यताप्राप्त जाणत्यांचे अवतरणे कृष्णकृपेने झालेत.

उकंडा-अनुसया ला संतु-चिंतु, गोविंदा-हरी आणी पाचवा लभेदात्मा पुना लाभला. हे पाचही द्युतजन यवगान यवगी कृष्णा संग अवतिर्ण होवुन चतुर्पति आदीपुरूषाची भक्ती करणारे उच्च कोटीतील अवतारी व जाणते होते. मायेच्या पोटी अवतरल्या नंतर हे पाचही द्युत कृष्णा संग चतुर्पती क्ष्ण अवद्युत नामाची गर्जना करू लागलेत . या पाच द्युतांपैकी :

गोविदा-हरी हे दोघे गायपाचा खेळ उभा करून आपआपल्या दिशेला गेलेत. आणी वरच्या व खालच्या दिशेने चतुर्पति कृष्ण अवद्युत पंथाचा झेंडा फडकवला. आणी तिथे कृष्ण अवद्युताची गर्जना करत चतुर्पति पंथाची कमान सांभाळली.

संतु-चिंतु यांनी मिर्तलोकी चतुर्पति पंथाची कमान सांभाळली. तर पाचवा लभेदात्मा पुनाने मिर्तलोकच्या आठही दिशेने चतुर्पति कृष्ण अवद्युत पंथाचा झेंडा फडकवुन, गावागावात चतुर्पति कृष्ण अवद्युत भजनाची पक्की मांड बसवल्यात.

कृष्णाच्या मुखातुन निघालेल्या चतुर्पता अथर्वन् वेदाची सांगी ही हेंगडुजी व पुनाजी सह इतर जाणत्यांनी शब्दबध्द केली. त्या सांगीचे ओवी मध्ये रूपांतर करून कृष्ण अवधुती भजनात पंचतत्व गायन कलाव्दारे चतुर्पता अथर्वन् वेदाचे ते सर्व गायन करू लागलेत.

या भजन मांडी व्दारे चतुर्पति कृष्ण अवद्युत पंथाचा झेंडा विविध ठिकाणी गावोगावी फडकवु लागलेत. चतुर्पती चा प्रचार प्रसार करत चतुर्पती कृष्ण अवधुताची किर्त महीमा वाढवु लागलेत. चतुर्पति कृष्ण अवद्युत

भजनाव्दारे कृष्णाच्या मुखचे अनमोल रत्न असलेले आकाशमात मधील चतुर्पती निरंजन धन्याचे ज्ञान मिर्तलोकच्या जनलोकात वाटु लागलेत.

चतुर्पति कृष्ण अवद्युत भजनाव्दारे त्या भजनातच रोग-विघ्न, दुखःदर्द, इडा-पिडा ईत्यादी सांसारीक व बाहेरील पिडा दुर करू लागलेत. पिडीत व गरजु जनलोकांची निष्काम भावाने सेवा करत, जनलोकास सुखी करण्याच्या कार्याला लागलेत.

हे चतुर्पतीचे कार्य सच्च्या भक्ती भाव ने करत असतांना **पुनाजी** हे कृष्णाजीची पितृभावाने अगाध भक्ती करू लागलेत. कारण त्या काळी सर्वात मोठया भावाला वडीलाचा दर्जा देत असे. वडील म्हणुन संबोधत असे. ''मोठा भाउ हाच आपला पिता'' असा भाव मनी बिंबवत असे. मनी ठेवत असे. याच पितृ भावाने पुनाजीने कृष्णाला आपला पिता मानुन या पित्याची अपार भक्ती केली.

कृष्णाची सांगी शब्दबध्द करून त्या सांगीचे ओवी मध्ये रूपांतर करून, त्या त्या भजनात पंचतत्व गायन कलाव्दारे गायन करणे. ईत्यादी चतुर्पति ज्ञान भक्ती कार्याची प्रेरणा पुनाजीं ने हेंगडुजी राया कडुन घेतली होती.

**हेंगडुजी** हे कृष्णा संग, त्या को-या भुम्मेवर बालक रूपात अवतिर्ण झालेले कृष्णाचे यवगान यवगीचा सखा-मित्र होता. श्रीकृष्णाजीची सखाभावाने भक्ती करण्यास अवतरलेला तो एक जाणता अवतारी योगी होता. चतुर्पतीची ज्ञान भक्ती व प्रचार प्रसार महीमा वाढवण्यासाठी, जळगाव या गावात जावुन तेथे उभा होवुन तेथुन चतुर्पतिच्या कार्यास लागलेला तो एक गर्भि सिध्द होय.

हेंगडुजी दरवर्षि वैकुठ एकादशीला विठ्ठलाच्या दर्शनास वारक-यांसोबत जात असे. प्रतेक वारी च्या वेळी तो कृष्णाची आज्ञा घेत असे. परंतु कोण्या एका वर्षि कृष्णाने हेंगडुजीला 'ईथेच पंठरी दाखवतो. ईथुनच विठ्ठलाचे दर्शन घेजो.' असे म्हणुन पंठरीला वारक-यांसह जाण्याची आज्ञा हेगांडुजीला दिली नाही. हेंगडुजी कृष्णाजवळच थांबला. वैकुठ एकादशी चा दिवस आला. कृष्णा व हेंगडुजी स्नान करण्यासाठी नदीवर गेलेत. खोलाट नदी मध्ये डुबकी मारून शंक झाल्यानंतर कृष्णाने हेगांडुजीला नदिच्या पात्रात उभे केले. त्याच्या हातावर विटेचा तुकडा देवुन त्यावर कापुर ज्योत लावली. आणी कृष्णाने हेंगडुजीस 'एका स्थळावरून क्षणार्धात गायप होवुन दुस-या स्थळावर प्रकट होण्याची' सिध्दि प्रदान केली. प्राप्त सिध्दिची प्रचिती घेण्याकरिता हेंगडुजीस आज्ञा देत कृष्ण म्हणाले की : आजच तुला प्राप्त झालेल्या या सिध्दिबळाने क्षणार्धात या पाण्यातुन गायप होवुन पंठरीला जा ! तिथे विठ्ठलाचे दर्शन घे ! मनाप्रमाणे यात्रेत फिर ! आणी क्षणार्धात वापस ये !

कृष्ण आज्ञेप्रमाणे हेंगडुजी खोलाट नदिच्या पात्रात उभे राहीलेत. कापुर ज्योत लावली. आणी तेथुन क्षणार्धात पंठरीत गेले. पंठरीत जावुन विठ्ठलाचे मनोभावे दर्शन घेतले. यात्रेत फिरून आपल्या भागातील सवंगडयांना शोधुन त्यांच्या भेटी-गाठी घेतल्यात. त्यांच्या जवळचे जड सामान 'घरी पोहचवुन देतो' असे म्हणुन हाती घेतलेत. आणी त्या सर्व जड सामानासह तेथुन कृष्णकृपेने प्राप्त झालेल्या सिध्दिबळाने क्षणार्धात गायप होवुन पुनश्चः कृष्णासमोर प्रकट झालेत. कृष्णाचे दर्शन घेतलेत. गावाकडे जाण्याची आज्ञा घेतली. आणी तेथुन ते क्षणार्धात आपल्या संगच्या जड सामानासह आपल्या जळगावात पोहचले. ज्या सवंगडयाचे जे सामान होते, ते सामान त्यांच्या घरी त्याच वैकुठ एकादशी च्या दिवशी पोहचवले. हे सर्व पाहुन गावकरी अवाक् झालेत.

कृष्णकृपेने प्राप्त झालेल्या सिध्दी व्दारे हेंगडुजी हे क्षणार्धात कृष्णा जिथे कुठे असेल, तिथे प्रकट होवुन कृष्णाचा संग करत असे. सखाभाव ने कृष्णाला भजत असे. कृष्णाचा तो एक अत्यंत प्रिय सखा होय. हेंगडुजी रायानं सखा भावाने कृष्णाला भजले. कृष्णा कडुन चतुर्पती ग्यानपिंडा चा अमृत पान्हा पिला. कृष्णाच्या मुखची सांगी शब्दबध्द करून त्या सांगीचे ओवीत रूपातंर केले. तसेच पुनाजी, देवमनजी.. ईत्यादी तत्कालीन जाणत्यांना प्रेरणा देवुन, कृष्णांच्या मुखच्या सांगीचे त्यांच्या कडुन ओवीरूपात रूपांतर करण्यास साहयं केले. हेंगडुजीने नित कृष्णाचा संग केला. चतुर्पती पंथाचा झेंडा चौताळात फडकवला. आपल्या दिशेने चतुर्पतीच्या मांडा बसवल्या. भजन मांडी व्दारे चतुर्पती ग्यान प्रसार प्रचार करण्यास वेळोवेळी भजन मंडळीला साहयं केलेत. करत आहे. सानीध्य कितीक वर्णु याहीचे गुण ? या महामुनीने वर्णन केले. गुण याहीचे गाउ ! कर्ता-याने केली करणी, डोळयानं पाहु !

हे आदीपुरूष कृष्णा ! तुमच्या जाणत्या गणांचे ज्ञान जाणत्या पुरताच मर्यादित न ठेवता, ते गुप्त ज्ञान सर्वसामान्य जनलोकांसाठी हिम्मत करून लिहुन ठेवण्याचे धाडस या निर्बल अन्जान निरसनकाराने तुमच्याच कृपेने केल्याबध्दल क्षमस्व : क्षमस्व : क्षमस्व :

चतुर्पति ज्ञान व भक्ती चा चौकोणी मेंघ चारही कोनातुन निळावंती बरसु लागला होता. या निळावंतीच्या बरसातीत कृष्णाजीने सर्वसामान्य भक्तजन लोकांच्या नकळत गुप्तपणे नव्या यवगाच्या कार करण्याचा आरंभ करण्या करीता गुप्त साधना सुरू केली.

॥ राउळ नव्हत देउळ नव्हत, स्थापना केली ।
पक्की मांड बसवली देवा, याहो लवकरी ॥ खंडं०७/ओ.३७

त्या को-या भुम्मेवर उभारलेल्या कृष्णाच्या झोपडी जवळ उभ्या असलेल्या औदुंबर व सिंदी या दोन झाडांच्या एकत्रीत छायेखाली साधना करू लागलेत. तिथे तेव्हा राउळ नव्हत. देवुळ नव्हत. तिथे या देहीच्या हदय पेठेवर आदीपुरूष धन्याची स्थापना करून पक्की तपी मांड बसवली. मांडवशीला नव्या यवगाचा आरंभ करण्याच्या साधनेसाठी ही पक्की तपी मांड कृष्णाने गुप्तपणे बसवली होती. याव्दारे कृष्णाने आदीपुरूष विठ्ठलाकडे 'लवकर देहीत अंर्तभुत व्हा हो !' ही विनवणी अर्ज मांडली होती. याची खबर तेव्हा तिथल्या कुण्या सर्वसामान्य भक्तजनास नव्हती !

॥ यवगाची केली साधना, मांडवशीले ।
ही खबर ठाव श्रीकृष्ण देवांले ॥
॥ यवगं साधवले, यवगी द्युत जाना । रंचना रंचली, पक्की सारी ॥

ही नव्या यवगाच्या साधनेची खबर सर्वसामान्यासह इतर तिन प्रकारच्या भक्तगणांस ठाव नव्हती. परंतु चौथ्या प्रकारातील काही चतुर्पतीचे परंम् निरंजन ज्ञानी भक्तगणां सह देवलोकं व कृष्णासंग पुढे-मागे अवतिर्ण झालेले जाणते योगी संत-महात्मे, द्युतगण अवतारगण सह स्वर्गीचे लोक या सर्व जाणत्यांना ठाव झाली होती.

त्या सर्व जाणत्यांनी जाणले की : ''भक्तात्मा कृष्णाच्या या साधने व्दारे पंढरीत ज्या पुर्णात्मा विठ्ठल ने कृष्णास वचन दीले होते, आता तोच आपल्या दिलेल्या वचनांची वचनपुर्ति करेल. तो पुर्णात्मा विठ्ठल दिलेल्या वचनाची सोडवणुक करण्याकरीता आता या भक्तात्माच्या आंग उभा राहीन. आणी या भक्तात्मा व पुर्णात्मा च्या ज्योती एक होवुन, या एकत्रीत ज्योती मध्ये ज्योर्तिमय आदीपुरूष भैस नारायणाची ज्योत खेळन. कृष्णाच्या यवगानं

यवगाच्या भक्तीबळाचे आधीचे संचित जडुन आता आदीपुरूष भैसाचा परीपुर्णतम पुर्ण अवतार चतुर्व्युह रंचनेत देही धरून अवतरणार आहे.

आता निराकार-निराधार निशंःकलंकी निरंजन चैत्यन्यमय आदीपुरुष भैष नारायण हा भक्तात्मा कृष्णाच्या या नव्या को-या देहभुम्मेवर अवतरणार ! कृष्णच्या या नव्या को-या देहीला आपल्या चतुर्व्यह रूपांच्या रंचनेत पुर्ण अवतार बनवुन तो परिपुर्णतम्पुर्ण अवतार रंचनेत अवतरणार आता. !

आता या परिसरातील विविध ठिकाणी, विविध देहीमध्ये एकाच समयात विविध रितीने खेळ करण्यासाठी निराकार-निराधार निशंःकलंकी निरंजन चैत्यन्यमय आदीपुरुष भैष नारायण यांचा परीपुर्णतमपुर्ण अवतार या को-या भुम्मेवर अवतरणार !. तो अवतिर्ण झाल्यावर हा भक्तात्मा कृष्णा मग नव्या यवगाची रंचना करेल. सत्‌यवगाचा आरंभ करेल. निश्कलंकी नात जुळवुन मरण चुकवेल. ईत्यादी सर्व जाणतेगण यांनी जाणलेत. ते जाणते म्हणु लागलेत की :

॥ नव्या यवगाची रंचना करन, देव आपल्या हातान ।
निशःकलंकी नात दर्शनी, चुकतीन मरण ॥ खंडं०७/ओ.६७.
॥ याहीच्या मुखचे अनमोल रत्न, बाहेर पडतीन ।
सत्य भक्त अनामीकाचे बोल, पदरी झेलतीन ॥ खंडं०७/ओ.६७

या नव्या यवगाच्या रंचनेत या मिर्तलोकी चौथ्या निरंजन निश्कलंकी धन्याशी नात जुळल्या जावुन मरण चुकतीन !. आदीपुरूष कृष्णाच्या मुखाव्दारे भैसा पोटचा चतुर्पता अथर्वन् वेद बाहेर पडेल. या चतुर्पता अथर्वन् वेदाचे अनमोल रत्न कृष्णामुखा व्दारे बाहेर पडन पुढे !. भैसा पोटचे हे चतुर्पति निरंजन ज्ञान भक्तीचे सांगी करणारे अनमोल रत्न पदरी झेलण्याचा खरा समय आलेला आहे. या कलीच्या संधीत चतुर्पती भैसा पोटी असलेला चतुर्पता अथर्वन् वेद या कृष्णा मुखातुन आता प्रकट होणार !.. ईत्यादी सर्व त्या सर्व जाणत्यांनी जाणलेत. आणी हे सर्व जाणते त्या भक्तात्मा व्दारे होणा-या परिपुर्णतम्पुर्ण लभेद अवताराकरीता कृष्णात्मा विठ्ठल व मुळयवगीचा निराकार-निराधार निशंःकलंकी निरंजन चैत्यन्यमय आदीपुरुष भैष नारायण यांच्याकडे सामुहीक विनवणी अर्ज करू लागलेत की :

॥ कृष्ण म्हातारा योगी खरा, रंग धरला ।
आदी भैसा खुम्मी याहीन, झेंडा उभारला ॥ खंडं०७/ओ.३१

हे आदीपुरूष परमात्मा ! यवगान यवगी या अनामीक परात्पर भक्तयोगी भक्तात्मा कृष्णा यवगान यवगात चतुर्पती धन्याच्या ज्ञान भक्तीचा झेंडा फडकवत आलेला आहे. आणी आता या सावंगाच्या को-या भुम्मेवर अवतरला आहे. जनात जाहीर होवुन येथे उभा आहे.

इथेही या भक्तात्मा ने कृष्णदेह धारण करून तुमच्याच चतुर्पति ज्ञान भक्तीचा झेंडा फडकवुन चतुर्पतीचे बिजे तो भक्त जन लोकात रोवत रोवत साठी वर्षाचा म्हातारा झाला आहे.

हा योगी खरा तुमच्याच चतुर्पति नामाचे जाहीरण करत आहे. हा तुमच्या भक्तीचा झेंडा असलेला तुमचाच आंगचा तुमचाच सवंगडी भक्तात्मा ! तुमच्या या को-या भुम्मेवर या भक्तात्माने नवी कोरी धारण केलेली ही कृष्ण-देहीने उधळलेला चतुर्पति रंग आता कच्चा न ठेवता, या कृष्ण-देहीच्या भुम्मेवर पुर्णात्मा विठ्ठल यांना अंतर्भुत होवुन अवतिर्ण होण्याची आज्ञा करावी. तुम्ही परीपुर्णतमपुर्ण अवताराच्या रंचनेची मांडणा करून येथे उभे राहावे. तुमच्या

परिपुर्णतम् पुर्ण अवतार च्या चतुर्व्युह रूपांच्या रंचनेत कृष्णाला पुर्ण अवतार बनवुन पक्का कर !. तुझा शिक्का-मोहर वाजवा हो आता !.

या कृष्ण-नरदेहीला म्हणजेच या कृष्णाला मुळयवगाचा आदीपुरूष यांचा पुर्ण अवतार जाहीर कर ! यासाठी तु आता सत् देही धरून त्या सत्देहीत तुमची ज्योता अंर्तभुत करून परीपुर्णतमपुर्ण अवतार घ्यावे. तुमच्या परिपुर्णतम्पुर्ण अवतार रंचनेतील आमचा भाग आम्हास दयावा. हीच आम्हा सर्वांची तुम्हाकडे विनवणीपुर्वक अर्ज !.

हे आदीपुरूष भैस नारायणा ! मुळस्तंभीचा हा अनामीक परात्पर **भक्तात्मा** ची, ही कृष्णा नाम घेतलेली ही कृष्णदेहीच आदीपुरूषाचा पुर्ण अवतार बनणार आहे. हे गुप्त ज्ञान आम्ही तुमच्याच कृपेने जाणले.

भैषाच्या परीपुर्णतमपुर्ण अवताराची किर्त महीमा सह मिर्तलोकचा हा सुखःसोहळा याच देही याच डोळा बघण्याकरीता आम्ही सर्व स्वर्गिचे लोक, वैष्णवगण, शिवगण, शाक्तगण सह ईतर सिध्दगण तसेच जाणते संत-महात्मे, योगी-जोगी, भक्तगण...ईत्यादी अनेक ठिकाणचे जाणतेगण या सोहळात भाग घेण्याकरीता कृष्ण परिसरात देही धरून अवतिर्ण झालेले आहेत. म्हणुनच आम्ही गर्जतो की :

॥ मिर्तलोकचा सुखःसोहळा हा स्वर्गी नाही ।
चतुर्पतीचा झेंडा, ईश्वर-पुनाची/आदीपुरूषाची गाही ॥ खंडं०७/ओ.२८

चतुर्पतीचा झेंडा, आदीपुरूषाची गाही साठीच आम्ही या मिर्तलोकी या संधीकाळी अवतरून तुमच्या या प्रसादाची वाट पाहत आहोत. तुमच्या व आमच्या अवतरणास कारण हा कृष्णा आहे.

या कृष्णाच्या देहघरी आता अवतार घ्यावे. म्हणुनच आम्ही सर्व जाणतेगण पुनःपुनश्च सामुहीक विनवणी अर्ज करीतो की :

॥ भाग वचन पुर्विच देणं राखा इमान ।
राखा इमान, या देहघरी रहावं येवुन ॥ खंडं०७/ओ.१६

आम्ही इमानदारीने इथे आलोत. त्याचे इमान राखण्यासाठी या भक्तात्माने धारण केलेल्या या कृष्ण देहघरीच उभा राहुन आपल्या परिपुर्णतम् पुर्ण अवताराच्या चतुर्व्युहरूप रंचनेत या कृष्णाच्या देहीला आता तुझा पुर्ण अवतार बनव !. तुमच्या चतुव्युह रूपांच्या रंचनेने युक्त अश्या परीपुर्णतमपुर्ण अवतार रंचनेत आम्हाला सम्मावुन घे ! आमच्यात अंर्तभुत हो !

तुमची एकाच समयात विविध देही धरून विविध ठिकाणी खेळणारी ज्योत आमच्या या देहीतसुध्दा खेळवुन आमचा संग कर ! आमची ही इच्छा या कृष्णाच्या यवगाच्या साधनेव्दारे तुम्ही पुरवा हो भैसराया !

या मुळस्तभीचा क्ष्णाने येणा-या यवगाचा झेंडा उभारला आहे. आणी या झेंडयाखाली आम्ही उभे राहुन तुमची वाट पाहत आहोत धनीदेवा !

हे आदीपुरूष धनी ! मुळस्तंभिचा भक्तात्मा कृष्णा याहीने या मिर्तलोकी चतुर्पती पंथाचा झेंडा फडकवला आहे. तुम्ही आता परीपुर्णतमपुर्ण अवतार रंचना करून चतुर्पतिचा हा झेंडा जागोजागी फडकावत तुमचे यवगं आणण्यासाठी उभे राहावे ! हीच तुम्हा चरणी आम्हा सर्वाच्या सामुहीक विनवणी अर्जा ! अर्जा फलीत झाल्यात. आणी सर्वच ज्याला ठाव तो चतुर्पती धनीदेव आकाशमात मध्ये उभा राहीला.

॥ मुळस्तंभीचा भक्त याहीन, झेंडा उभारला ।
सर्वच ज्याला ठाव तो धनीदेव, उभा राहीला ॥ खंडं०२/ओ.०९

आता या मुळस्तभीचा अनामीक भक्तात्मा कृष्णाने यवगान यवगाच्या चौदा चैांकडयात मुळयवगाचा देव आदीपुरूष अनामत यांची भक्ती केली. या चौकडयात चतुर्पतीच्या ग्यान भक्तीचा झेंडा फडकवत फडकवत कलीच्या संधीकाळात आला.

आणी तोच पुर्विचा चतुर्पती धनीदेवा-भक्तीचा झेंडा उभारला. आणी पुढेही येणा-या भैसाच्या सत्यवगाचा झेंडा उभारला आहे. देवा-भक्ताचे नाते जनात सांगुन त्याच्या हद्य पेठेवर चतुर्पती ग्यान भक्तीचे झेंडे फडकवु लागला आहे.

भक्त जनांची दृष्टी तिरगुणांच्या पलीकडे नेवुन त्रिगुणातीत दृष्टी(तिन गुणांच्या पलीकडे पाहण्याची दृष्टी) कृष्णाने भक्तजनांस दिल्या आहेत. आणी या तिरगुणांच्या पलीकडे उभा असलेल्या आदीपुरूष धन्याचे चतुर्पती ग्यान भक्तीचे बीजे जनांच्या मनात रोवु लागला. मनात रोवलेल्या या ग्यान भक्ती बिजाला कृष्णा आपले यवगान यवगात अवतरून स्थापन केलेल्या, अनेक पंथाचे अनुभवजन्य त्रिगुणातीत अलक्ष्य असे चतुर्पतिच्या ग्यानोपदेशाची सांगी सांगुन, त्या सांगीच्या रसाव्दारे त्या बिजांना खतपाणी घालु लागला.

चतुर्पति ग्यान भक्तीचा चौकोणी भारी मेघ निळाचा बरसात करू लागला. कृष्णाच्या या सर्व कार्याने निरशुन्याहुन ज्याला सर्वच ठाव आहे, तो धनीदेव निराकार-निराधार निशं:कलंकी निरंजन चैत्यन्यमय आदीपुरुष भैष नारायण तिथे आकाशमात मध्ये निर्वान सोहम् ज्योत स्वरूपात आपरूप उभा झाला.

॥ निर्वाणा ची ज्योत । उभी सोहंम्
या ज्योतीनं मदत, केली पुर्ण ॥ खंड१०/०१/०२
॥ ज्योतीनं ज्योत उजेड । प्रकाश या देहीत ।
अवधुत आला देव सावंग्याचा राजा
उघडले रूप हे सुर्याचे दिप ॥ खंड१०/०१/०२
॥ मुळस्तंभीचा भक्त याहीन, धरला रंग ।
चत्रभुज उभे राहीले, याहीच्या आंग ॥ खंडं०२/ओ.०९
॥ विठोबा-हरी या भुम्मेवरी, देह धरला ।
देह धरला, कृष्ण नामी पावला ॥ खंडं०५/ओ.३५
॥ भरून पावले रूप दावले, विठ्ठल कुलशाही ।
विठ्ठल कुलशाही, देवाचा आवाज नरदेही ॥ खंडं०५/ओ.१६
॥ ज्योती मध्ये ज्योत खेळते । भैस अवतार ।
याहीच्या आंगी शुध्द सत्वगुण । करविता कर्तार ॥ खंडं०५/ओ.३१
॥ अनामीका घरी अवतार धरला । आदी पुरूषानं ।
चंद्र-सुर्य, तारांगण देवांगण । घालते लोटांगण ॥ खंड०५/२९
॥ पृथ्वीवर अवतार आला । तो पाहा आता ।
चवथ्या खुम्मी भुम्मा जागृत । करन समर्था ॥ खंड०५/३०
॥ ज्योती चा अवतार देवाचा । शकुन चांगला ।
पुर्विचं भाकलं देव देणं देतो अहीनाला/अवघ्याला ॥ खंड०५/२७

आपरूप उभ्या झालेल्या निर्वाणाच्या ज्योतीने कृष्णाला पुर्णपणे अवघी मदत केली. ज्योतीच्या मदतीने मुळस्तंभाचा भक्त असलेल्या कृष्णाच्या चतुर्पति ग्यान भक्तीने पुर्णपणे रंग धरला. या निर्वाणाच्या ज्योतीच्या पुर्ण मदतीने पुर्विच्या वचनपुर्ति करीता पुर्णात्मा चत्रभुज महाराज विठ्ठल हा निरशुन्याहुन ज्योत स्वरूपात कृष्णाच्या मिर्तलोकी म्हणजेच कृष्णाच्या हद्यपेठेवर अंर्तभुत होवुन प्रथम उभे राहले.

या कृष्णाच्या आंग अंतर्भुत होवुन चत्रभुज उभे राहीलेत. आणी तद्नंतर त्या कृष्णदेहीच्या तिनही ताळात व्याप्त होवुन भक्तात्माच्या ज्योती मध्ये पुर्णात्माची ज्योत खेळत खेळत सर्वीकडे भरून पावले. कृष्णाला रूप दावले. निराकार निरंजन विठ्ठल धनीदेवाचा आवाज, कृष्ण नरदेहीत आला. भक्तात्मा कृष्णाने धारण केलेल्या नव्या को-या देहभुम्मेवर भक्तात्मा व विठ्ठल रूप दाखवत फिरणारा पुर्णात्मा यांच्या ज्योती एक झाल्यात. भक्तात्मा-पुर्णात्मा या दोन ज्योती एकमेकात विलीन होवुन त्याचे ऐक्य कृष्ण देहभुम्मेवर झाले.

कृष्णाच्या देहरूपी पृथ्वीवर एकच ज्योत व नवलाख तारा चमकु लागल्यात. या देहरूपी नव्या दिव्यानं चतुर्पती धन्याची केली हो आरती !

या एक झालेल्या ज्योतीने तो कृष्ण-देह धरला. कृष्ण-देह मध्ये अंर्तभुत होवुन कृष्णदेह धरला या विठ्ठलाने ! तो कृष्ण-देहच विठ्ठल झाला ! ऐसा हा निराकार निरंजन ज्योर्तिमय विठोबा हरी ने कृष्ण देह धरून तो कृष्ण नामी कलीच्या संधित पावला.

भक्तात्मा व पुर्णात्मा या दोन ज्योती एकमेकात विलीन होवुन त्या दोनची एक ज्योत बनुन कृष्णाच्या देहीत उभी झाल्यानंतर आदीभैसाची परिपुर्णतम्पुर्ण अवतार घेण्याकरिता विनवणी अर्जा त्या ज्योतीने केली. विनवणी मान्य होवुन त्या ज्योती मध्ये चतुर्पती आदीपुरूष भैसाची ज्योत खेळु लागली. कृष्णाच्या आंगच्या नवखंडाच्या नव ज्योती उजाळुन त्या सर्व ज्योतीचा एक उजाला झाला. आंगी शुध्द सत्वगुण चा करवीता कर्तार कृष्णा हा आदीपुरूष बनुन शुध्दसत्वगुण प्रकाशीत करू लागला. शुध्दसत्वगुणी देही धरू लागला. आणी मग....

॥ पंचभुती उरला तोही, धरला रंग ।
सगुण-निर्गुण, उभा झाला आंग ॥ ०८/०१/०३
॥ स्वर्ग मिर्त पाताळ भरून, उरला तो जगजेठी ।
यवगावरत मोहीम देवाची, कलयवगी झाल्या भेटी ॥ खंडं०५/ओ.२४
॥ या नरदेहीचा त्याहीनं अवतार केला ।
तो ऋषिश्वर या स्वराले मिळाला ॥ खंड०२/१०
॥ पायी पद्म मुखी रत्न, कृष्ण म्हातारा जगात ।
तिन ताळात उजेड याहीची प्रकाशली ज्योत ॥ खंडं०५/ओ.३१
॥ कुठ होता कुठ नाही, कसा आला देही ।
धन्य देवाची किर्त महीमा, कारागीरी तुही ॥ खंडं०५/ओ.२८

निराकार-निराधार निशं:कलंकी निरंजन चैत्यन्यमय आदीपुरुष भैष नारायण ज्योत स्वरूपात या कृष्णा-आंगी एक झालेल्या ज्योती मध्ये उभा राहल्यानंतर तो पंचभुती भरून भरला आणीक उरला. सगुण-निर्गुण त्या कृष्ण-देह आंगी उभा राहला. तो जगजेठी कृष्ण देहीच्या आंग असलेल्या स्वर्ग-मिर्त-पाताळी, चौताळीत भरून भरला आणीक उरला.

यवगान यवगात जी चतुर्पतीची मोहीम कृष्णदेवाने उघडली होती, त्या मोहीमेच्या फलस्वरूप कलयवगाच्या संधीत भक्तात्मा कृष्णाजी व पुर्णात्मा विठ्ठल व आदीपुरूष अवद्युत धनी यांच्या निरंजन ज्योतीच्या भेटी कृष्ण देहीत होवुन या तिन ताळीच्या तिन ज्योती एक झाल्यात. चौताळाचा मालक असलेला चौथा मुळयवगाचा देव निराकार-निराधार निशं:कलंकी निरंजन चैत्यन्यमय आदीपुरुष भैष नारायण धनी परिपुर्णतम्पुर्ण अवताराची चतुर्व्युह रंचनेसह उभा झाला.

॥ भेटी आंगचे सिध्द उभे । राहावं आमच्या संगतीला ।
सदा विनवितो नित साहयं । करावं आम्हाला ॥ खंड०२/ओवी-३७

काही जनांना त्यांच्या बुध्दी व दृष्टी नुसार काही ओव्यांच्या निरसनामध्ये तिरगुणी ग्यान आहे. असे वाटु लागेल. परंतु हे तिरगुणी ज्ञान होय काय ? तिरगुणी ज्ञान म्हणजे काय ? तिरगुणी ज्ञान व चतुर्पती ग्यान कशाला म्हणावे ? तिरगुणी ग्यान व चतुर्पती ग्यान यात फरक काय आहे ? याची त्यांनी अवश्य पारख करून घ्यावी. आमच्या मते तर...

**तिरगुणी ज्ञानः-**

तिरगुणी ग्यान म्हणजे :

- तिरगुणी मायेच्या रज, सत्व, तम या तिरगुणांचे राजे असलेले अनुक्रमे ब्रम्हा विष्णु महेश आणी तिरलोक्याचे तिरगुणी अवतार देवी-देवता यांची स्तुति व महीमा पुजा-पाठ मुर्तिपुजा व्रत-वैकल्प वाढवणारे कर्मकांड असलेले सत्व रज तम गुण युक्त ज्ञान.
- तिरगुणी देवतांची किर्त महीमा वाढवण्यासाठी प्रेरीत केलेले स्तुतिगाण, कथासार, व्रत-वैकल्य, मुर्तिपुजा, कर्मफलांच्या आशेने युक्त असलेले कर्मकांड ईत्यादी स्वतःव्दारे स्वतःची महिमा पुजा-अर्चना आदर-सत्कार प्रेरीत करून स्वतःची सत्ता गाजवणारे ग्यान.
- मानसन्मान पुजा-अर्चना आदर-सत्कार ईत्यादी ची अभिलाषा बाळगुन असलेले तिरगुणी गुरू व्दारे दिलेले पोटपुजेसह मानसन्मान मिळवणारे तिरगुणी कर्मकांडाचे ज्ञान.
- कल्पना म्हणजेच माया ! या मायेचा संग करून मानसन्मान व पोटपुजेसाठी घुसवुन दिलेले काल्पनिक पर लावलेले ग्यान.

हे सर्व तिरगुणी ज्ञान होय.

**चतुर्पती ग्यान :-**

चतुर्पता ज्ञान म्हणजे :

- तिरगुणी मायेने रंचलेले कपट व असत्य दाखवुन, या तिरगुणी मायेच्या तिरगुणांच्या पलीकडचे सत्याकडे लक्ष्य वेधुन या तिरगुणांच्या पल्याड उभा असलेल्या चतुर्पती परमात्मा आणी त्याचा तेजोगुणी अंश असलेल्या आत्मा याबध्दलचे निश्कलंकी निरंजन ज्ञान म्हणजे चतुर्पता ज्ञान होय.
- म्हणजेच ज्या ग्यानाने तिन गुणांचे तिन राजे यांच्या पलिकडे उभा असलेल्या चौथ्या चतुर्पती परमात्माची ज्ञानसंप्पंन्न भेट होवुन मायेच्या भ्रांतीचा भेद उडतो. कल्पनेच्या म्हणजेच मायेच्या म्हणजेच कल्पनेच्या पालव्या तोडुन मायाविरहीत असलेले निरंजन ज्योतीचे निरंजन ग्यान प्रकट होते. सत्य ज्ञान भक्तीबीज दिसते. हद्यात सोहंम् बिजाचा प्रकाश पडतो. पिंडी-ब्रम्हांडी ऐक्य होवुन ब्रम्ह म्हणजेच निराकार निराधार ज्ञानदृष्टीत येतो. तिरगुणांच्या पल्याड उभा असलेला चौथा निराकार निराधार निशंःकलंकी सोहंम् निरंजन चैत्यन्य ज्योर्तिमय आदीपुरूष भैस दृष्टीक्षेपात येतो. त्याचा प्रकाश लाभुन देह-आत्मा जागृत होतो. यश, श्री, औदार्य, ज्ञान, विज्ञान, दया, क्षमा, शांती, माया-ममता, क्रिया, करूणा प्राप्त होते. पर व परमेश्वर दिसते. पंचम शुन्य दिसते. त्याचे सुमरन म्हणजे स्मरण येवुन आत्म स्मृति ची प्राप्ती होते. देणं मिळत राहते ! ते ग्यान म्हणजे चतुर्पती ग्यान होय.

- ज्या ग्यानाने आत बाहेर चैत्यन्य दिसुन निरंजनी बोधाने आत्मग्यान व निरंजन ग्यान पिंडे प्राप्त होते. तिरगुणी मायेच्या पलीकडचे त्रिगुंणांतीत असलेले चतुर्पती परमात्मा चे ग्यान देत देत चौथी अवस्था प्रकाशमान करते. सच्ची ज्ञान-भक्ती देते. ते चतुर्पता ग्यान होय.
- परमात्माच्या अंशाला पकडुन परमात्मापर्यत पोहचण्याचे ग्यान. म्हणजेच परमात्माच्या तेजोगुणी अंश असलेल्या निर्गुण निरंजन आत्माला जाणुन चौथ्या चतुर्पती निराकार निरंजन परमात्मा पर्यत पोहचण्याचे मार्गोपदेश, योगज्ञान, देह-जीवांचे ज्ञान, कायाज्ञान, आत्मज्ञान, चतुर्पती निरंजन ग्यान, मुळावरचे ज्ञान, मानव निती धर्म, सिदाईचे ग्यान, भाकल्या शकुनाचे ग्यान, सत्कृत्याचे ज्ञान ईत्यादी मुर्तिपुजा व कर्मकांड व्रत-वैकल्पे विरहीत ग्यान म्हणजे चतुर्पता ज्ञान होय. तसेच स्वतःव्दारे स्वतःची किर्त महीमा वाढवणारे ज्ञान विरहीत ग्यान म्हणजे चतुर्पता ग्यान होय.
- तिरगुणांचे ओझे टाकुन चौथ्या शुध्द सत्वाच्या अधिक्य वाढवण्याकरीता सत्कृत्याकडे लावुन, सत् च्या अधिक्याचे संचय करत त्यातुन शुध्द सत् काढत त्या शुध्द सत्व चे सार हंसरूपी आत्म्याला पाजणारे ग्यान म्हणजे चतुर्पता ग्यान होय. आत्म्यावरचे विषय-वासंनांचे वेस्टने धिराईने काढुन त्या आत्म्याला निश्कलंकी व प्रकाशीत करण्याचे देहीचे व जीवाचे ग्यान म्हणजेच निरंजन आत्मग्यान देणारे ज्ञान म्हणजे चतुर्पता ग्यान होय. तसेच देहे-जीवाच्या उन्नत्ती साठी आत्माला जागवण्यासाठी केलेले आत्मोपदेश, निरंजन ग्यान भक्ती ईत्यादी चे ग्यान म्हणजे चतुर्पता ज्ञान होय.

हेच सर्व ग्यानाच्या पल्याडचे चौथ्या तुर्या अवस्थेत प्राप्त होणारे निरंजन **चतुर्पता ग्यान** होय.

हे तुरीया म्हणजे चौथ्या अवस्थेतील चतुर्पती ग्यान ज्याला प्राप्त झाले, तो तिरगुणांचे देवी-देवता व त्यांची महीमा वाढवणारे कर्मकांडे, पुजा-पाठ, व्रत-वैकल्प जंतर-मंतर यांच्या मागे लागत नाही. तो चतुर्पता निरंजन ग्यानाने आत्मग्यानी होवुन परमात्याच्या अंशाला पकडुन सरळ सरळ एकला असलेल्या चतुर्पतीलाच मनभाव सद्भाव भक्ती करत भजतो. तो जाणतो त्या एकाला जाणताच सर्व काही जाणले जाते. सर्व वेद पुराण कुराण बायबल या एकाचेचे आहे. चार वेद सहा शास्त्रे अठरा पुराणात या एकाचेच स्तुतिगाण तिरगुणी कविकर्त्यानी आपआपल्या तिरगुणी देवतांचे नामे समोर करून केलेले आहेत. त्या एका पासुन दुर गेल्यास सर्व काही दुर जाते.

कारण की : त्या एकापासुनच तुम्ही सर्वत्र जुळल्या गेलेत आहात. त्या एका पासुनच सर्वत्राचा उगम आहे. सर्वत्र अंती त्या एका मध्येच विलीन होणार आहे. अश्या त्या एका कडे पाठ फिरवुन मायेच्या तिरगुणी संसाराकडे दृष्टी ठेवुन पाहील्याने काहीही प्राप्त होणार नाही. परंतु तिरगुणी माये कडे पाठ फिरवुन तिरगुणांच्या पल्याड उभ्या असलेल्या त्या एकाकडे दृष्टी वळवल्यास, तो एक आपणहुन तुम्हा घरा येवुन तुम्हा हाती धरून तुम्हास वेळोवेळा जे पाहीजे ते सर्व काही प्राप्त होण्यास नित साहय करत राहील. आकाशवाणीचा हा शिकविता धनी तुम्हा जवळी उभा राहील. या धन्या संग तुमची तार जुळेल.

या व्यतीरीक्त ईतर तिरगुणी ज्ञानी व जे आत्मज्ञान विसरले, ते आकाशवाणी चा धनी चतुर्पती ला विसरले. ते सर्व तिरगुणी जन तपे, व्रते,

तिर्थे, पुजा-पाठ, कर्म-कांडाच्या उपासना, मुर्तिपुजा, जप-तप व तिरगुणी अवतारांची व स्वतःच्या व्दारे स्वतःची अथवा स्वतःच्या आवडत्या तिरगुणी देवतांची किर्त-महीमा वाढवणे ईत्यादी मार्गाला लागले आहेत. त्याकरीता ते नवविध धर्म रंचत आहेत. या मुळेच हे लोक तिरगुणी माया-धर्मात बांधले गेलेत. असे तिरगुणीमय माया-धर्म चालवत असतांना ते आत्मग्यानासह चौथ्याला विसरले. चतुर्पतीचे निरंजन ग्यान विसरले. आणी मायेने टाकलेल्या तिरगुणी बंधनात पडलेत.

तिरगुणी मायेच्या मायावी मोहनी व्दारे त्यांच्यावर मायेची भ्रांती, भ्रम व भुलवन पडली. तिरगुणी मायेने त्यांना मधुपानाप्रमाणे पाजलेल्या आपल्या तिरगुणी ज्ञानाचा प्याला ची धुंद चढुन ते मायेच्या भुलवणीच्या धुनीत गोयल्या गेलेत. स्वतःच्या देहीच्या निरंजन धन्याला विसरून गेलेत. आणी तिरगुणी मायेच्या तिरगुणी ज्ञानाचा प्याला हाती घेवुन त्यांनी तिरगुणी मायेने खोदलेला अधोगतीचा मार्ग धरला. तिरगुणी मायेच्या अधोगतीच्या मार्गात पडल्यानंतर हे सर्व तिरगुणी लोक आपल्याच धर्माला थोर संबोधुन षटकर्मे चा आरंभ मोठया अभिमानाने करू लागलेत.

हे तिरगुणी सर्व ३३ कोटी देवांना भजुन मोक्ष मागतात. परंतु त्यांना हे माहीत नसते की : त्रिदेवांसह या ३३ कोटी तिरगुणी देवांनाच तर मोक्ष मिळाला नाही, तर ते तिरगुणी देव यांना मोक्ष कुठुन देणार ?

जे तिरगुणी देव व त्यांचे तिरलोकी अवतार जन हे या तिरगुणी भक्तांच्याच कडुनच भक्ष्य मागतात. नवस घेत त्याच्या भक्तांनाच काहीतरी मागतच राहतात. ते देव यांना काय देवु शकणार ? निष्काम भक्ती करण्यास कसे सांगु शकेल ?

देणारा वेगळा निराळाच केवळ एक ! आणी त्यां एकल्या एक चौथ्या परमात्मा च्या देण्याचा मान घेवुन सत्ता गाजवणारे हे तिरगुणी देव ! हेच सत्य या तिरगुणींना माहीत नाही !

हे सत्य जरी तिरगुणी मायेची झापड असलेले तिरगुणी जगाला कितीही सांगीतले, तरी हे तिरगुणी जग या चतुर्पतीला काही केल्या ओळखेना ! हाच चतुर्पती देव भरण देही ! हे कितीक सांगतले तरी काही केल्या कोणी ऐकत नाही. हे तिरगुणी जग ओळखेना ! सांगतो गाही कोणी ऐकेना !

म्हणुनच कबिर जसा या तिरगुणी दुनियेला सयाना/शहाणा ची पदवी देवुन स्वतःला पागल, दिवाना घोषीत करतो, तसेच आम्ही सुध्दा या तिरगुणी दुनियेला अती शहाणे ची पदवी देवुन स्वतःला उलटे पागलच घोंषीत करतो.

कारण की : या मायेव्दारे अंधंकारात पडलेल्या तिरगुणी जगतात सत्यज्ञान सांगणा-याला पागल मानले जाते. तर असत्य व मुढं ग्यान सांगणा-याला ज्ञानी मानल्या जाते. ज्यांना काहीच माहीत नाही. ज्यांनी फक्त शब्दांचा कचरा कुटार जमा केलत. आणी आपल्या खोपडी मध्ये शास्त्रे भरून ठेवलेत. कोरडे ग्यान भरून ठेवलेत. तेच या तिरगुणी जगतात ज्ञानी समजले जातात. ज्यांच्या जवळ शब्दांचे जाळे आहेत. वेद उपनिषद पुराण कंठस्थ आहेत. तेच या तिरगुणी जगतात पंडीत समजल्या जाते. तेच निष्णांत मानले जातात. तेच तर्क करण्यात तर्कि आहेत. असे या तिरगुणी दुनियेत मानतात. ऐसे या तिरगुणी जगातातील सर्व त-हेचे मुढं असलेले तिरगुणी जन हे सत्य

सांगणा-या खऱ्या ज्ञानीला पागल ठरवतात. आणी असत्य सांगणा-या ढोंग्यांना प्रतिष्ठीत ज्ञानी समजतात.

म्हणुनच शुकदेव या तिरगुणी मायेच्या बंधनात टाकणा-या या तिरगुणी जगतात प्रवेश करण्याच्या भयाने घाबरत घाबरत १६ वर्षे मातेच्या उदरातच राहीला. आणी बाहेर येवुन ही तिरगुणी दुनियाला त्यागुन सरळ जंगलात वास्तव्यास गेला. तिन सोडुन चौथ्या मार्गी लागला.

तर कबिर स्वतःला म्हणु लागला की : कहे कबिर दिवाना । ये दुनिया एक सयाना/शहाणा । मै ही एक पागल दिवाना.. । कारण की : या तिरगुणी दुनियाचे बहुमत आहे. तिरगुणी मायेच्या अंधकार कोठडीत राहणा-यांनी सत्य प्रकाश कधिही पाहीला नसल्यामुळे, त्यांना कितीही सत्य सांगीतले, प्रकाशाचा मार्ग दाखवला तरी ते मानत नाही. कारण की : त्यानां या मायेच्या अंधकारात राहण्याची सवय पडली आहे. मायेच्या अंधा-या कोठडीत अंधःकारात राहणा-या या तिरगुणी दुनियाने चौथ्या धनीदेवाचा प्रकाश कधीही न पाहील्यामुळे चौथा प्रकाश मार्ग दाखवणा-यालाच ते बहुसंख्यने असलेले तिरगुणी अंधकारी बहुमताने पागल ठरवतात.

अंधंकारी जनांला फक्त अंधाराची आदत पडल्यामुळे ते फक्त अंधार व अंधाराची छाया जाणतात. त्याचमुळे ते सर्व या 'चौथ्या धनीदेवाच्या निरंजन प्रकाश चे अस्तित्वच नाही आहे' असे म्हणतात. व एकमेकांना दुजोरा देतात.

कारण की : त्यापैकी काही जाणत्या तिरगुणींना याची जाण आहे की : या चौथ्याच्या निरंजन प्रकाशाचे अस्तीत्व मानल्याने तिरगुणी मायेव्दारे आपल्याला फसवुन बांधल्या गेले. असे सिध्द होते. आपली फसगत होवुन मायेच्या अंधकारात मायेला चोपडत राहीले. आपण मायेव्दारे फसवल्या गेलो. मायेत फसुन आपले जिवन व्यर्थ वाया घातले. ईत्यादी सिध्द होते. मायेत राहुन त्यांनी आजपर्यंत जे आयुष्य जगले ते व्यर्थ ठरल्या जाते. आपणच मुर्ख पागल ठरवल्या जाईल. या भितीने निरंजन कृष्ण प्रकाशाचे सत्य सांगणा-याला एकल्याचे ते जाणुनबुजुन ऐकत नाही. तिरगुणी मायेने आपल्या अंधा-या कोठडीच्या अंधकारात टाकलेले अंधकारी स्वार्थि तिरगुणी जन हे बहुमताने असल्यामुळे ते सर्व त्या प्रकाश मार्ग सांगणा-या एकल्यालाच हिनवत हिनवत पागल ठरवते.

म्हणुनच कबिर स्वतःला पागल म्हणवुन घेतो. म्हणुनच आम्हीपण स्वतःला उलटे पागल म्हणवुन घेतो. म्हणुनच शुकदेव या तिरगुणी मायेच्या अंधकारी जगतात येण्यास भितो. व बाहेर आल्यावर या अंधकारी तिरगुणींचा पदर न लागण्यासाठी यांच्यापासुन दुर जंगलात पळुन चौथ्या मार्गि अरण्यात लपुन राहतो. म्हणुनच चतुर्पतीचे ओवी चरणे गर्जतात की : हे तिरगुणी जग ओळखेना ! सांगतो गाही कोणी ऐकेना ।

त्याचमुळे अश्या तिरगुणी दोहीत ठेवणा-या बहु मानवाचे वाटते भेव ! कारण की : हे अंधकारी तिरगुणी जनलोक हे चतुर्पतीचं चारही वाणीतुन निघालेले मौंस वाणी चे रसपान हे तिरगुणी मायेने मधुपानाप्रमाणे पाजलेल्या तिरगुणी ज्ञानांच्या प्याल्यात टाकुन करतील. आणी या चतुर्पतीच्या मौसवाणीला बेईमान होवुन स्वतः चे हीत हे तिरगुणी स्वार्थिजन साध्य करुन घेतील.
म्हणुनच अश्या या अंधकारी तिरगुणी मानवांपासुन ही चतुर्पती दुरच असलेली बरी ! तिरगुणी राज सह तिरलोक्यातील तिरगुणी अवतार यांच्या पासुन ही चतुर्पती चौथ्याने आधीच आपल्या पोटी ठेवुन यांच्यापासुन दुरच ठेवत आलेला

आहे. स्वार्थि सत्तालालची तिरगुणी पासुन ही चतुर्पता दुरच गुप्त ठेवण्याचा प्रयत्न चतुर्पतीच्या जाणत्यांनी केलेला आहे. करत आहे. पुढेही करत राहणार !

ज्यांचे काहीतरी पुर्व जन्मांचे व या जन्माचे संत्कृत्याच संचीत जडले आहे. ज्यांनी पुर्वजन्माचे सत्कृतीचे संचित जागृत केले आहे. अश्यांच सच्च्या भक्त भाग्यवंताच्या हाती ही चतुर्पता लागेल. अशी व्यवस्था कृष्णा सह सर्व चतुर्पतीच्या जाणत्यांनी आधीपासुनच करून ठेवलेली आहे. असो.

कृष्णाजी महाराज यांच्या सांगीवर आधारीत असलेल्या चतुर्पता अथर्वन् वेदांच्या ओव्या अंदाजे ई.सन. १७०० साल च्या अगोदर पासुन आवाजी येत येत आजपर्यंत आल्या आहेत. कृष्णकाळातील व-हाडी बोलीभाषा व त्यांचे गायन, उच्चार ईत्यादीचे वैशिष्टे लक्षात यावीत. त्यांची मुळ अवस्थेतच शक्य तो जपवणुक व्हावी. म्हणुन नविन लेखन नियम व व्याकरणाप्रमाणे बोलीभाषेची दुरस्ती न करता ते जुने व्याकरण जसेच्या तसे ठेवण्याचा शक्यतो प्रयत्न केलेला आहे.

जीथे आवश्यकता वाटेल तिथे जुने शुध्द बोलनं असलेले शब्द जसेच्या तसे ठेवुन त्याचे पर्यायी नवे शब्द दिलेले आहेत. आवश्यकता वाटल्यास गुंढ शब्द, आजच्या पिढीने कानी न ऐकलेले शब्द, जुने लुप्त झालेले शब्द ईत्यादीचे स्पष्टीकरण सह अर्थ दिलेले आहेत.

तुम्ही तुमच्या भागातील बोली भाषा प्रमाणे तुमच्या म्हणणीत जुन्या उच्चारांचे नविन उच्चारां प्रमाणे उच्चारण करून गायन करू शकता. परंतु जुन्या उच्चाराच्या शब्दातुन जसे चौरंगी अर्थाचे बोध निघतात, तसे नविन उच्चाराने निघनेच याची काही खात्री नाही.

उदाहरणार्थ :-

१. जसे *''त्याहीचे''* या उच्चाराऐवजी *''त्याचे''* असा उच्चार तुम्ही तुमच्या बोली भाषेप्रमाणे करू शकता. परंतु हे उच्चार बदल करतांना याचे अवश्य ज्ञान तुम्हास असले पाहीजे की : *''त्याहीचे''* हा उच्चार दृढता दर्शवते तर *''त्याचे''* हा उच्चार शंकास्पद अर्थ दर्शवते. जसे 'नागाजुन *त्याचे* नाव !' असा उच्चार केल्यास नागार्जुण हे कोण्यातरी निर्जिव स्थळाचे नाव राहु शकते. किंवा सजिव प्राण्याचे नाव राहु शकते. असा सजिव या निर्जिव ? असा शंकास्पद अर्थबोध निघतो. तर 'नागार्जुन *त्याहीचे* नाव' असा हा उच्चार स्पष्टपणे दर्शवते की : नागार्जुन हे कोण्यातरी सजीव प्राण्याचे नाव आहे. ते कोणत्याही हालतीत ते निर्जिव वस्तु अथवा ठिकाणांचे नाव नव्हे. हे निश्चित आहे. यात कोणतीही प्रकारची शंका नाही.

२. जसे *''परवेशी''* या उच्चाराऐवजी *''प्रवेशी''* हा उच्चार तुम्ही तुमच्या बोली भाषेप्रमाणे करू शकता. परंतु *''प्रवेशी''* हा उच्चार एकच अर्थ दर्शवते ते म्हणजे प्रवेश करणारा ! परंतु *''परवेशी''* हा उच्चार दोन पेक्षा जास्त अर्थबोध देवुन चौरंगी होतो. *परवेशी* म्हणजे *पर+वेशी* !.*पर=दुस-या, मायेच्या* + *वेशी* = *येश,सिमा* म्हणजेच दुस-या वेशीवरून आत आलेला. मुळ घराची वेश ओलांडुन दुस-या वेशीवर प्रवेश घेणारा प्रवेशी. आत्मा आपल्या परमात्माच्या . मुळ घर ची वेश ओलांडुन, या प्रकृतिमायेच्या येशीच्या आत प्रवेश घेवुन होणारा प्रवेशी जीव ! ईत्यादी चौरंगी अर्थ *परवेशी* उच्चाराने निघु शकते. असो.

३. जसे *'राहो'* या शब्दाचा उच्चार ऐवजी *'राहावे'* असा उच्चार तुम्ही तुमच्या बोलीभाषेप्रमाणे करू शकता. परंतु *'राहावे'* हा उच्चार एकच अर्थ दर्शवते. तर *'राहो'* हा उच्चार एकपेक्षा जास्त अर्थ दर्शवत चौरंगी होतो. ***राहो*** म्हणजे येथे येवुन राहावे. व राहो म्हणजे देहीत राहुटी करून राहणारा निश्कलंकी राहु आत्मे येथे येवुन उभे राहो. उदाहरणार्थ :- *// 'तिन यवगं भ्रांत पडली, नाही झाले दर्शन । भैसराज महाराज उभे राहो येवुन' //* या चरणात दुस-या टुकीचा अर्थ चौरंगी होते. ते म्हणजे तिन यवग तिरगुणी मायेची भ्रांत पडल्यामुळे दर्शन झाले नाही. म्हणुनच आता 'भैसराज महाराज तुम्ही येथे उभे रहावं व आम्हास दर्शन दयावे' आणी दुसरा अर्थ 'भैसराज महाराज तुमच्या दर्शनाकरीताच हे राहु आत्मे देहीत परवेशी होवुन येथे तुमची दर्शनाची वाट पाहत हे राहु आत्मे म्हणजेच राहो उभे आहेत'. अश्या रितीने *राहो* हा शब्द चौरंगी होतो.

त्याचमुळे जुन्या उच्चाराचे शब्द जसे चौरंगी व मंत्राप्रमाणे काम करतात, तसे काम नविन उच्चाराने उच्चारलेले शब्द करेलच याची काही शाश्वती नाही. काही जमानत नाही. काही खात्री नाही.

कारण की : ही वाणीच मंत्रवत् रंचणेत रंचलेली असुन चौरंगी अर्थाची आहे. मंत्राप्रमाणे फल देण्यासाठी कुठे कुठे मंत्राप्रमाणे शब्दरंचना करून पंचतत्व गायन कला व्दारे गायन केलेली आहेत. पंचतत्व गायन कला ची माहीती परीशिष्टात दिलेली आहे. अधिक ज्ञानासाठी ते परिशिष्ट वाचावे.

काही काही ओवींचे काही काही चरणे हे मंत्राप्रमाणे कार्य करतात. ते चरणे काही चतुर्पतीचे जाणते कधी कधी मंत्राप्रमाणे कुठे कुठे वापरतात. म्हणुनच तुम्ही तुमच्या गायन म्हणनीत शब्दबदल, उच्चारबदल, ओळबदल, करतांना याची जाणीव ठेवावी की : मुळ शब्दाचा-चरणांचा-ओवीचा जो मुळ गाभार्थ आहे. जो मुळ अर्थ आहे, त्या मुळ अर्थाचा बेअर्थ होणार नाही. पंचतत्व गायन कला बिघडुन त्या चरणांचा प्रभाव कमी होणार नाही. याची अत्यंत काळजी घेण्यात यावी.

विनाकारण जवरदस्तीने, नविन चालीत बसवण्याकरीता नवीन शब्द टाकुन त्या शब्दाला लांबवणे. अति लांबवुन लयीत म्हणणे. किंवा नविन चालीत बसण्यासाठी एखादा शब्द गाळुन टाकणे. शब्द बदलवणे. असे करू नये. कारण तुम्ही गाळलेला किंवा बदलवलेला शब्दच जर पंचतत्व मंत्रवत उच्चारात मोलाचे कार्य करणारा असला, तर त्या चरणांची सर्व शक्तीच वाया जाईल.

म्हणुनच याची जाणीव ठेवावी की : तुम्ही गाळलेला शब्द हा पंचतत्व उच्चार रंचणेत मंत्रवत कार्य करणारा राहु शकतो. म्हणुनच "ठेका चुकला तरी चालेल परंतु शब्द गाळु नये !" हा जुना नेम बाळगावा. ही कळकळीची विनंती.

काल प्रवाहामुळे काही काही ओवीतील चरणे विखुरली गेली आहेत. तर काही ओवीचे चरणे कमी-जास्त किवां गहाळ झालेले आहेत. त्याचमुळे ज्या काही गायन म्हणणीमध्ये, चतुर्पतीच्या दांडा-दांडामध्ये काही काही ओवींचे चरणे जास्तीचे आहे. ते जास्तीचे चरणे जिथुन कुठुन मिळेल, तेथुन आणुन *"माझ्र मजला गोड रे बापा ! कस टाकु या चरणांना !"* असे म्हणत म्हणत या चतुर्पता अथर्वन् वेदात समावीष्ट केलेले आहेत.

चतुर्पता अथर्वन वेदात दिलेल्या ॥ मुळावरची ओवी ॥ या शिर्षकाखाली असलेली ओवी ही कृष्णकालीन असुन ती कृष्णकृपेने चतुर्पती च्या भैटी आंगच्या नामीक अनामीक जाणत्यांकडुनच निरसन काळच्या सतरा वर्षात शब्दार्थ चरणार्थ सह देणं स्वरूपात २०१७ च्या पुढंच्या काळात देण्याकरीता आम्हास प्राप्त झालेल्या आहेत.

तर ॥ सावंगा-जळगाव दांडाची मुळावरची ओवी ॥, तसेच ॥ जळगाव दांडची मुळावरची ओवी ॥ या शिर्षकाखाली असलेल्या ओव्या या नामदेव बुवा महाराज सावंगा यांनी मांडलेल्या ४५ दिवसाच्या मांडीतील जाणते बुवा महारांज ईत्यांदी जाणते गणांनी, नामदेव बुवा महाराज ंचे निकटचे अनुयायी व त्या मांडीचे भजनगडयांचे व्यवस्था सांभाळणारे भजनयोगी श्री गणपतराव सोनुले, वाढोडा-खुंटे ता. आर्वि, जी. वर्धा यांना मुळावरच्या ओव्यांचे देणं पुढच्या काळाकरीता चालवण्यासाठी दिलेल्या होत्या. तेच काही देणं त्यांनी जळगाव दांडचे भजनयोगी श्री गोवर्धन पाते, सोनुरं-देवीचे, ता. धामणगाव, जी. अमरावती यांना पुढंच्या काळाकरीता चालवण्यासाठी दिले. आणी ऐसे हे सावंगा-जळगाव दांडचे मुळावरचे देणं हे कृष्णाजी-हेंगडुजी ने आपले कुणालाही न कळणारे कळसुत्रे हालवुन बाहुल्या नाचवत, त्या कळसुत्राच्या मालकाने श्री गोवर्धन पाते यांची भेट घालुन, त्यांना आम्हा घरी आणुन ते सावंगा-जळगाव दांड चे देणं आम्हास २०१७ समोर च्या काळात चालवण्याकरीता शब्दार्थसह दिलेले आहे. तेच देणंप्राप्त ओव्या ॥ सावंगा-जळगाव दांडची मुळावरची ओवी ॥ या शिर्षकाखाली दिलेले आहेत.

तर ॥ 'कृष्णपुरी ची ओवी' ॥ या शिर्षकाखाली असलेल्या अरज, ओवी, आरत्या हया कृष्णपुरी दांडचे देणं कृष्णपुरीचे खेत्री संत श्री दशरथ तिजारे, भातकुली, ता. धामणगावरेल्वे, जी अमरावती यांनी त्यांचे सुपुत्र असलेले कृष्णपुरीचे लढवये श्री मनोहरराव तिजारे, ह. मु. यवतमाळ यांना दिले. आणी तेच कृष्णपुरीचे देणं श्री मनोहरराव तिजारे यांनी कृष्णपुरीचे शब्दार्थ व चरणार्थ सह आम्हास दिलेले आहे. त्यामुळे येथे दिलेल्या जवळपास ८० प्रतिशत कृष्णपुरी खंडाच्या ओव्या यांच्याकडुन प्राप्त झालेल्या आहेत.

जास्तीचे चरण जर तुमच्या म्हणणीत नसेल किंवा तुमच्या दांडाचे नसेल, तर ते चरण तुमच्या ईच्छेप्रमाणे तुमच्या म्हणणीत किंवा दांडात सामील करून चतुर्पती नाम ओलवुन वाढवु शकता. किवां विचार करून गाळु शकता. हे तुमचे तुम्हीच ठरवावे. तुम्हास कळेन तसे म्हणा ! आम्ही तर या देहीचा राहु आत्मा आमच्या सत् यवगावर येवुन गायन करत आहे. यातच समाधान मानत या राहु ला कधी ना कधी सत्य प्रकाश येण्याची वाट पहात आहोत.

काल प्रवाहा मुळे काही काही ओवीतील चरणे वर-खाली झालेले होते/आहेत. अश्या काही काही अस्ताव्यस्त ओवीतील चरणांचा कम जुळवण्याचा शक्यतो प्रयत्न कृष्णकृपेने केला आहे. तरी सुध्दा काळाच्या मा-यापुढे चरणे वर-खाली राहण्याची शक्यता राहु शकते. याच कारणामुळे या चतुर्पता अथर्वन् वेदात सर्वच चरणांना कम नंबर न देता, पहील्या व वाढत्या चरणाला व मध्ये चार चार चरणां नंतर कम नंबर दिलेले आहेत. बाकी मधल्या चरणांचे कम नंबर हे तुम्ही तुमच्या गायन म्हणनीप्रमाणे देवुन गायन करू शकता. अथवा या चतुर्पता अथर्वन् वेदात ज्या कमाणे चरणे दिलेले आहे, त्या कमाणे जसेच्या तसे गायन करू शकता. गायन करावे. ही विनंती.

## ॥ विनवणी अर्ज ॥

हरी हरी कृष्णा परमेश्वरा सच्चिंत्तानंदा !

तुच आम्हावर कृपा केली. हद्यात प्रेम ग्यान भक्ती जागृत करुन चतुर्पतीच्या भजन पुंजन ध्यान सुमरनी लावुन अंतरी घंटा वाजवला. आम्हाला हाती धरलेत. नामाचा घोक दिलात. आम्हाला तुमच्या चतुर्पती निरंजन ग्यानपिंडाचा प्रकाश वेळोवेळा दिलेत. वेळोवेळा जेव्हा आवश्यकता असेल किंवा जेव्हा आंतरीक ईच्छा झाली, तेव्हा या हद्यी अंतःकरणी स्फुरण दिलेतं.

तुमच्या या अंतःकरणातील स्फुरणामुळे धियो उत्तेजीत होवुन, त्या उच्चत्तर अश्या बुध्दीने मन इद्रिये ताब्यात घेवुन या मन बुध्दिला तुमच्या कृपेने पक्के बांधले. या कर्मेंद्रिया व्दारे तुमचे भजन ध्यान सुमरन करत, प्रपंच करुन परमार्थ साधवत साधवत नित चतुर्पता नामी ठेवलेत. आम्हाला तुम्ही हस्तक बनवुन सर्व निरसन आमच्याकडुन करुन करवुन घेतले. हे निरसन करण्यासाठी वेळावेळा मदत केली. निरसनाकरीता ज्या ज्या वेळी ज्या ज्या ग्यानाची आवश्यकता पडली, ते सर्व ग्यान आम्हास त्या त्या वेळी पुरविलेत. अनुभवांची गाही दिलीत. दृष्टांत दिलेत. दृष्टांत देत निरंतर १७ वर्षे ग्यानाचा वर्षाव करत राहीला. निरसनाची अखंड स्फुर्ति देत राहीला. अंतिम धैय च्या वाटेवर असलेले यश अपयश पचवण्याची ताकद देवुन, जिथे कुठे अडखळलो त्या अडखळलेल्या स्थितीतुन बाहेर काढत अंतिम धैय प्राप्त करण्यास साहयं झाला. असेच साहय सच्च्या भक्तांना नित करत राहावे. हीच नित अर्ज.

आम्हाला हस्तक बनवुन या माध्यमाचा तुच कर्ता तुच करविता व तुच सत् बुध्दिचा दाता होवुन तुच हे निरसन करुन घेतलेले आहेत. धन्य भाग्य आमचे थोर ! म्हणुनच आम्ही वेळोवेळा विनवणीपुर्वक अर्ज करुन म्हणतो की :

॥ धन्य देवाची किर्त महीमा, कारागीरी तुही ।
धन्य देवा तु कारागीर । उभा ठाई ठायी ।
करुन भक्ती नाम कंठी । ठेवला हद्यी ॥

हे नटेश्वरा कृष्णा ! अवताराचे सोंगे घेवुन मौजेने आमचे सर्व कामे व कर्मे करणारा आपणच इथं नटला आहे. तुच आमचा गुरु ! तुच आमचा पिता ! तुच आमचा सर्वकाही बनुन कोणत्या ना कोणत्या रुपाने साक्षात्कार, गाही पुरावे सच्च्या भक्तांना देत आहात. सच्च्या भक्तांना निरंजनी भेटी देत आहात. निरंजनी भेटी देता ! मुजरा आहे बा अवधुता ! तुमच्या चरणी आमचा माथा ।

आपणच आपल्या भक्ताच्या हद्यात शिरुन आपणच आपला ग्यानपिंड प्रेरीत करत राहतो. निरंजन प्रकाश देत राहतो. धियो प्रचोदयात् करुन देहा जागृत करत राहतो. खुण-मुद्रा देत राहतो. आपणच गुरु बनतो. आपणच शिष्य बनतो. आपणच आमचे माता पिता बनतो. आपणच मालक बनतो. आपणच चाकर बनतो. सर्वकाही बनतो. ही तुमची अमर्याद बुध्दीची अनंत माव काही केल्या आमची मर्यादित बुध्दी जाणु शकली नाही. इथं आम्ही गोंधळुन जातो. म्हणुनच थकुन आम्ही तुलाच पुनःपुनश्च विणवनी अर्ज करतो की :

*हरी हरी कृष्णा !* हे अनंता । तुम्ही अनंत असल्यामुळे आम्ही तुम्हा कडुन कितीही मिळवीले तरीही अजुन मिळवण्यासाठी काहीना काही शिल्लक च राहील. तुम्हा कडुन घेता घेता आम्ही थकुन जावु. परंतु तुम्ही देता देता थकणार नाही. आम्ही चुकुन जावु. परंतु तुम्ही या पिंडी या बम्हांडीच्या तिरलोक्याशी नाही चुकणार !. आमचे पात्र ज्ञानरुपी पाण्याने भरुन जावुन वरतुन वाहत राहील. परंतु या परमात्माच्या चौकोणी मेघांची वर्षा चालुच राहील. तो भरुन भरन आणी अंती पुरुन उरलेलाच राहीन. तुमच्या ज्ञानरुपी पावसाच्या वर्षावाव्दारे आम्ही नित ओलेचिंब होवुन राहील्यामुळे आमच्यावर एक वेळ अशी

येते की आम्हीच पुनःपुनश्चः विनवातो की : हे अनंता ! आता थांबव बापा हा तुझा चौकोणी मेघांचा पाउस ! आम्ही अति ओलेचिंब झाल्यामुळे थंडीने आम्हा हुडहुडी भरली आहे. शिण आला आहे. आमचे देहीचे तिरभवन थरथर कापत आहे. आता दयाहो थोडी उष्णता । पुरवा हो तुमचे तेज ! आणी तेही तुम्ही पुरवत राहता.

जेव्हा तुमच्या तेजाची जलजलाट सहन होत नाही. पुन्हा देहीचे तिरभवन थरथरा कापते तेव्हा आम्ही पुनंः शितलता मागतो. आणी तेही तु पुरवत पुरवत आम्हा भक्तांचे जीवनभर न संपणारे एका मागुन एक मागण्यांचे चक्र फिरवत ठेवत भक्तांच्या मागण्या पुरवत पुरवत पुरून उरतोच. हे अनंता ! अंती तुम्ही उरलाच. तुच भरून भरला आणी उरला. तुमचा अंत नाही कळाला ! हे कळसुत्राच्या मालका ! तुमची कळसुत्र कळा कळेना कोणाला । हे आता तुमच्याच कृपेने निश्चित जाणतो.

हे अनंता । तु अनंत. तुझे हरीनाम अनंत. तुझे ज्ञान-ग्यान गिण्यान अनंत. तुझी माव अनंत ! तुमची अनंत माव-लिला व किर्त-महीमा सह चतुर्पती निरंजन ज्ञान ईत्यादी बध्दल लिहता लिहता आमची ही देहरूपी धरतरी आटत आटत पुर्णपणे आटुन जाईल. तरीसुध्दा तुमची अनंत माव-लिला व किर्त-महीमा सह चतुर्पति ज्ञान महीमा अस्तुकीचे लिखाण पुर्ण होणार नाही. हे लिखान अपुर्णच राहील. तुमच्या बध्दल सांगावयाच्या काही गोष्टी अपुर्ण अपुरच राहील ! हे आम्ही आता चांगल्या रितीने तुमच्याच कृपेने जाणतो.

या अपु-या अपुर्ण मानवाकडुन, पुर्ण परमात्मा कृष्णा चे अनंत माव-लिला, किर्त-महिमा व संपुर्ण चतुर्पती ज्ञान व अस्तुकी महीमाचे लिखान पुर्ण होवुच शकत नाही.

तुमच्या अनंत माव व चतुर्पती ज्ञानाच्या न संपणा-या अपार गोष्टी आमच्याव्दारे शेवटी अपुर्ण अपु-या राहील. हेही आम्ही तुमच्याच कृपेने अत्यंत चांगल्या रितीने जाणल्यामुळे सरतेशेवटी तुमच्याच कृपेने तुम्हीच दिलेला तुमचाच चतुराईचा गुणाचे देणं वापरण्यास आज्ञा घेतो ! आणी याच चतुराईच्या गुणांचे देणं वापरून आता आम्हीसुध्दा चतुराई करून हे आमचे अपुर अपुर्ण लिखान स्तंभित करून तुम्हा समोर हात जोडुन उभे राहतो. आणी विनवणीपुर्वक अर्ज करत आम्ही तुमच्या या चतुर्पता अथर्वन वेदात प्रवेश घेण्यासाठी तुमची आज्ञा मागतो. कृष्ण महाराज धनी अवधुता ।

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ चतुर्पता अथर्वन् वेद उभा राहीन पोटी । निजरूप भुम्मा जागी करन सारी सृष्टी ॥

# चतुर्पता
# ॥ अथर्वन् वेद ॥

॥ ग्रंथ प्रवेशव्दार दर्शन भाग ०२ ॥

॥ चतुर्पता अथर्वन् वेद ॥

## ॥ ग्रंथ प्रवेश ॥



## शब्दार्थ, चरणार्थ निरसन स्पष्टीकरन सह



॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ ॥



चतुर्पता

॥ अथर्वन् वेद ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

www.chaturpata-atharvan-ved.com

B: Page104



॥ अकाशमात उभी आहे ज्योत । केली भुम्मेवर मात, होईन भुम्मेवर मात ।
साहयं कराले आले अवधुत । आपल्या बाळाचं हो प्राण्यां ॥
हरी भजो नित भजो । परमय सुखः तु पाहयं रे प्राण्या..



॥ चौकोणटयावर चार अवतार । उभे ठाई ठाई ।
सावंग्यामध्ये अवतार उभा । कृष्णराज भैस ॥
॥ उभा आहे पुर्ण अवतार । मोडन जंतराचा भार ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ ग्रंथ प्रवेश व्दार दर्शन भाग ०२ ॥

# ॥ चतुर्पता अथर्वन् वेद प्रवेश ॥

हे आदीपुरूष भैस परमात्मा श्रीकृष्णा अवधुता । इथे तुझेच सर्वकाही आहे. आमचं काहीही नाही. ईथे तुच सर्व काही आहेस. तुच सच्च्या भक्ताचा कर्ता, करविता, सत् बुध्दीचा दाता आहेस. तुच पिता. तुच माता. तुच गरू व तिरलोक्याचा दाता आहेस. आम्हास अवघ साहयं तुमच्या हाता झाले आहे. होत आहे. होत राहणार. तुमच्या हुकमाबीन इथल्या झाडाचा पत्ता सुध्दा हालत नाही. तुमच्या बीन आमच कोणी नाही. म्हणुनच आम्ही तुम्हालाच पुनःपुनश्च विनवणी अर्जा करीतो की :

चतुर्पता अथर्वन् वेदात संग्रहीत झालेल्या तुमच्याच चतुर्पती ज्ञानाच्या सर्व ओवीवर तुमच्या सत्तेची मोहर-शिक्का ठोकुन वाजवुन, या चतुर्पता अथर्वन् वेदा व्दारे तुमची सत्ता चालवावी. चतुर्पता अर्थवन् वेदाच्या सच्च्या भक्तजनास तुमच्या सत्तेचा सत् अनुभव व गाही व देणं ईत्यादी चांगल्या रितीने दयाहो.

॥ आसन ॥

हे आदीपुरूष धनी । आम्ही आपणास विनवणी अर्ज करतो की : या चतुर्पता अथर्वन् वेदात जिथे जिथे आकाशमात मधील तुमच्याच सर्व आध्यात्मीक विश्वातील सर्व द्युंतगण, खेत्रीं, दैवी सत्‌शक्तियॉं-सिध्दियॉं, देवी-देवता गण.. ईत्यादी सर्व लोकांचे नाम चे अक्षर आलेले असेल, तिथे तिथे त्या नावाच्या अक्षरालाच त्यांचे पवित्र व स्थिर तक्त-आसन बनवा हो राया । निश्कलंकी स्थिर अक्षरी आसन बनवत बनवत या चतुर्पता अथर्वन् वेदांच्या अक्षरांवर भरून भरा आणीक उरून नित राहावे हो राया ।

॥ आसन धारणा ॥

हे आदीपुरूषा । हे आदीपुरूष कृष्ण राया । आम्ही सर्व चतुर्पतीचे भक्तगण पुनःपुनश्चः तुम्हा विनंती अर्ज करतो की : चतुर्पता अथर्वन् वेदाच्या अक्षरांचे जे तक्ती आसन आहे, ते धारण करण्याची आज्ञा सर्व चतुर्पतीच्या आध्यात्मीक विश्वासह आकाशमात मधील सर्व द्युंतगण, खेत्रीं दैवी सत्‌शक्तीयॉं-सिध्दियॉं देवी-देवता गणदेवता यांना दयाहो राया. । सर्वत्रास चतुर्पता अथर्वन् वेदांचे अक्षरी तक्त धारण करण्याची आज्ञा दयाहो राया हो ।

ज्याप्रमाणे तुम्ही आपल्या शक्तयॉं-सिध्दियॉं व द्युतगणांसह चतुर्पतीची फौज फलटन घेवुन चतुर्पता अथर्वन् वेदांच्या अक्षरांवर उभे राहलेले आहेत, त्याचप्रमाणे या सर्व आध्यात्मीक विश्वांच्या देवी-देवता, चैत्यन्य, माया-चैतन्या, आदीमाया, देवी-देवता, परा-परमय शक्तियॉं, ब्रम्हा-विष्णु-महेष, इंद्र-चंद्र, गणी-गंधर्व, यम-इवान, हनुमान, अर्जुन पांडव सह सर्व द्युतगण, यादवगण, शेषगण, अष्टगण, अष्टभैरव, अष्टशक्तियॉं, भवान्या जोगण्या-भोवण्या, आसरा गोपीगणां, प-या, रिध्दी-सिध्दी लक्ष्मी, जाणते संत-महंत, योगी-जोगी, ऋषी-मुनी ईत्यादी तुमच्या भेटी आंगच्या सर्व सिध्दगण, शाक्तगण, सच्चे भक्तगण यांना चतुर्पता अथर्वन् वेदात आलेल्या त्याच्यां नामाच्या अक्षरावर उभे होण्यास आज्ञा दयावी हो राया ।. या सर्वांना चतुर्पता अथर्वन् वेदांचे अक्षरी आसन नित धारण करण्यास आज्ञा देत आम्हा भक्तजनांच्या साहयास नित उभे राहावे हो राया । हीच अखंड अर्ज करतो हो राया । याहो राया हो ।

॥ आवाहन ॥

हे आदीपुरूषा । आम्ही आपणास विनवणी पुर्वक आवाहन करतो की : तुमच्या आध्यात्मीक विश्वातील सर्वत्रासं चतुर्पता अथर्वन् वेदात आलेल्या त्यांच्या नामाच्या अक्षरावर अखंड उभे होण्याची नित आज्ञा दयावी. त्यां सर्वाना या चतुर्पता अथर्वन् वेदावर उभे करण्याची शिष्टाई करत तुम्ही आपल्या द्युतांची फलटन फौज, देवांगण, दैवी शक्तियॉं, सिध्दियॉं, देवी-देवता, सिदाई सेनेची फौज ईत्यादी आध्यात्मीक विश्वातील सर्वानां घेवुन या चतुर्पता अथर्वन् वेदाच्या अक्षरांवर उभे राहावे. आणी आम्हा भक्तजनांचे नित साहयं सर्वत्र करावे हो राया । असे आम्ही आपणास आवाहण करतो ।

आम्ही पुनःपुनश्च विनवनी पुर्वक आवाहन करतो की : तुमच्या व्दारे चतुर्पता अथर्वन् वेदांच्या अक्षरी आलेले सर्व द्युतगण, अक्षयगण, भेटी आंगाचे सिध्दगण..ईत्यादी यांनी आम्हा संग नित उभे करून आम्हास नित साहय करत राहावे. आम्हास संपुर्णपणे निरंजन निश्कलंकी चतुर्पती आदीपुरूषाच्या गिण्यानाने सदैव ज्ञान संपन्न ठेवावे. निरंजन चतुर्पती ग्यानाने न्हावुन शुध्द करावे. चतुर्पती निरंजन ज्ञान प्राप्ती व धारण करण्याचे सामर्थ दयावे. त्याकरीता मेधा बुध्दि तसेच आवश्यक साधन सामग्री आम्हास प्रदान करावे. नित चतुर्पती नामी ठेवुन नित आपण दिव्य प्रकाशीत चतुर्पता निरंजन ज्ञानाने युक्त होवुन वेळोवेळा उभे राहुन आपले सानीध्य/संग आम्हास लाभावे. चतर्पती निरंजन ज्ञान प्राप्त बुध्दि वैभव आमच्यात पुर्णपणे स्थीर करावे. चतुर्पती धन्याचे निरंजन ग्यान कधीही आम्हापासुन दुर न जावे. हीच तुम्हा चरणी अखंड विनवनी अर्ज आहे. तसेच आम्ही पुनःपुनश्च विनवनीपुर्वक अर्ज करतो की :

आपल्या सर्व रूपां-रूपांच्या ईश्वरी काया सह ईश्वरी माया व दैवी शक्तीयॉं सिध्दियॉं या सह सर्व अवतारांना नित आवाहन करून चतुर्पता अथर्वन वेदाचे अक्षरी आसन ग्रहण करण्यासाठी आवाहन पुनःपुनश्चः करतो हो राया । संगठित करणा-या देवी-देवता यांना या चतुर्पता अथर्वन् वेदाच्या ज्ञानयज्ञात येण्याचे आवाहन करतो. तुम्ही या चतुर्पता अथर्वन् वेदाच्या ज्ञानयज्ञात यावे. आणी या संगठन चे संवर्ध्दन नित करावे. आमच्या या प्रार्थना व अर्जाला आपण ग्रहन करत चतुर्पता अथर्वन् वेदाची ज्ञानसंप्प्ती ने भक्तजनास सदा संप्पन व वैभवशाली बनवावे. याहो राया ।

॥ विनियोग ॥

हे आदीपुरूषा । सर्व आध्यात्मीक विश्वांच्या देवी-देवता, माया चैतन्या आदीमाया देवता, ब्रम्हा-विष्णु-महेष, इंद्र-चंद्र, गणी-गंधर्व, यम-इवान, हनुमान अर्जुन पांडव यादव सह सर्व द्युतगण, भक्तगण, अष्टगण, अष्टभैरव, अष्टशक्तियॉं, सिध्दियॉं योगन्या-भवान्या जोगण्या-भोवण्या, आसरा गोपीगणां प-या, रिध्दी-सिध्दी लक्ष्मी सह जाणते सिध्द योगी-जोगी ऋषी-मुनी संत-महंत चतुर्पती ग्यानी ईत्यादी सर्व गणलोक हो ।

आम्ही आपण सर्वानां आवाहन करून चतुर्पती अथर्वन् वेदांचे अक्षरी आसन परिग्रह करण्यासाठी विनियोग करतो की : या चतुर्पता अथर्वन् वेदात जिथे कुठे तुमचे नाव आलेले असेल, तिथे तिथे त्या नावाच्या अक्षरालाच आपले तक्त-आसन या आदीपुरूष धन्याने बनवले आहे. या तुमच्या नामाच्या अक्षरावर म्हणजेच या अक्षरी आसन-तक्ती वर येवुन उभे राहावे हो राया । या तुमच्या नावाच्या तक्तावर उभे राहुन सच्च्या भक्तगण यांना सदा साहय करत राहावे. सच्च्या भक्तांना नित आपले सानीध्य संगत प्राप्त करून दयावी. चतुर्पता अथर्वन् वेद च्या ज्ञानयज्ञास ग्रहन करावे. याच विनवनी पुर्वक तुम्हा आवाहन करून पुनःपुनश्च विनवनी अर्जा करतो हो कृष्ण राया ।

॥ विनवनी अर्जा ॥

हे आध्यात्मीक विश्वातील सर्व । आम्ही आपण सर्वांनां पुनःपुनश्चः विणंवनी अर्ज करीतो की : या चतुर्पती अथर्वन् वेदाच्या अक्षरी उभे राहुन तुमच्या नावाच्या त्या अक्षरालाच मंत्रबिजं करा हो राया । तुमच्या नामाच्या बोलावर उभे राहुन भक्तजनांवर कराव दया । बहु यवग तारा । देणं देत नित साहय करत राहा हो राया ।

हे कृष्णा । तुम्ही आपण हुन सच्च्या भक्तघरा जावुन त्या सच्च्यांना आपल्या हाती धरलेत. तुम्हीच भक्तांना हाती धरून भक्तांच्या हातात हा चतुर्पता अथर्वन् वेद दिला. ज्यां भक्तांनी चतुर्पता अथर्वन् वेद हाती घेवुन चतुर्पता कृष्ण अवधुत पंथात प्रवेश घेतला. चतुर्पता अथर्वन् वेदाचे वाचन मनन चिंतन सह ज्ञानामृत प्राशन केले. चतुर्पता अथर्वन् वेदाला आपल्या हृदयपेठेवर आसनस्थ केले. चतुर्पतीच्या ज्ञान भक्ती सह भजन पुंजन ध्यान मार्गि लागले आहेत. अश्या त्या सर्व भक्तांना या चतुर्पता अथर्वन् वेदाच्या निरसनात अपुर राहीलेले चतुर्पती ग्यान पुर्ण करून पाजा हो राया । चतुर्पता अथर्वन् वेदाच्या निरसनातील अपु-या अपुर्ण गोष्टी पुर्ण करण्यासाठी आपणहुन या सच्च्या भक्ताच्या घरा पुनःपुनश्चः जावे हो राया । पुनःपुनश्चः घरा जावुन त्या भक्तांना निरंजनी भेटी देत दवंडीच्या प्रमाणे चतुर्पतीची वाणी सांगा हो राया । भक्तांच्या हद्‌यी चतुर्पती ज्ञान भक्तीची सांगी करण्यास सोहंम् उभे राहा हो राया । आपरूप स्वतःहुन मो-ह पुढे येवुन भक्तांच्या अंर्तमनात चतुर्पती ज्ञान भक्तीच्या पुर्ण गोष्टी सांगा हो राया । चतुर्पतीची ज्ञान संजीवणी चा पुरवा दयाहो राया । चतुर्पती नामाची ज्योत या भक्तांच्या मिर्तलोकी-हद्‌यी अहोरात्र प्रज्वलीत ठेवा हो राया । चतुर्पती भक्तांच्या हद्‌यी तुमचे ध्यान, कंठी तुमचे नाम सदोनीत जागृत ठेवत, या सर्व चतुर्पती भक्त जनाची प्रेम ग्यान भक्ती मजबुत करावी हो राया । परस्पर वैमनस्य उत्पन्न करण्याचे कृत्य चतुर्पतीच्या या भक्तांव्दारे न व्हावे. भक्तजनाच्या भावानुरूप योग्य ते फल सहजतेने दयाहो राया । त्यांना सर्वत्र साहयं करत अनुभव, गाही, साक्ष, भेटी व देणं देत राहावे हो राया । देणं देत याहो राया हो ।

हे आदीपुरूष कृष्ण धनी । तुच आकाश, तुच धरणी, तुच पिता, तुच माता, तुच सर्वकाही । हे आकाश माझा पिता । या पित्याच्या विविध पुरवां ने बरसणा-या पोषक व उत्पादक स्थुल, सुक्ष्म व मिश्र प्रवाह युक्त उपयुक्त पर्जन्य च्या धारा या धरतरी माता वर नित पडावे. पित्याचे पर्जन्य तर धरतरी ची धारण शक्ती यांच्या संयोगाने जिवनतत्व ला प्रेरीत करणारी रूमावळी व सृजनशिल प्रकृती नित उभी ठेवावी. प्रकृतिव्दारे उत्पन्न झालेले जिवनतत्व हे सृजीत प्रवाहरंस आणी सर्व प्रकारचे रोग-विघ्ने यांच्या मध्ये प्रतिष्ठीत/स्थापित असल्यामुळे आम्ही पुनःपुनश्चः विनंती अर्ज करून विनवितो की :

हे कृष्णा । आमची प्राणशक्ती घेवुन आमचाच घात करणा-या रोग-जंतु कृमि-किटक सह इतर वाईट शक्तियॉं यांना आमची प्राणशक्ति कदापि प्राप्त होवु देवु नकोस । तसेच देहीत प्रवेश करून देहीचा ताबा घेणा-या सर्व वाईट शक्तियॉं चे विघ्ने सह सर्व प्रकारचे रोग उत्पन्न करण्यास कारणीभुत असलेले देहीतील सर्व जिवाणु विषाणु किटाणु कृमी च्या आंगची प्राणशक्ती बल व बिजविर्य देहीबाहेर काढुन नष्ट करावे. आपल्या तेजोमय प्रकाश किरणांव्दारे देहीत त्यांची कधिही पुनःउत्पत्ती न होण्याकरीता संपुर्णपणे नायनाट करावा. प्राणवायु चंद्र-सुर्य चैतन्यज्योत या व्दारे आम्हाला विषेश पोषन प्राप्त होवुन सर्व विकार बाहेर काढुन नष्ट करावे. ऐसे रोग-विघ्ने संकष्टे आरीष्टे सह वाईट शक्तिंयॉं चा नायनाट करत देह रक्षण करून आम्हास निरोगी/निरामय करावे हो राया । देहजीव मजबुत बनवा हो राया । देहे वज्र अंबर करत याहो राया ।

हे कृष्णा । सर्वत्राला आकर्षित करून आपल्या कक्षेत ठेवणारी कृष शक्ती ही तुझीच उत्पत्ती आहे. तुच कृष शक्तीचा स्वामी आहे. म्हणुनच तुला कृष्णा म्हणतात. तुझे ईच्छेपासुनच सर्व शक्तीयॉं उत्पन्न झालेल्या आहेत. या सर्व शक्तीयॉंना तेज देणारा तुच आहेस. चैतन्य व प्राण, शक्ती व तेज चा अग्न तुच आहे. तुमच्या तेजावाचुन शक्तीयॉं काम करू शकत नाही. तुच सर्व शक्तीयॉंला तेज व बळाचा पुरवा करणारा धनी आहेस. चैतन्याचा पुरवा करणारा धनी आहेस. म्हणुनच आम्ही भक्तजन तुम्हास पुनःपुनश्चः अर्ज करतो की : हे शक्तीच्या मालका कृष्णा । आम्हा भक्तांचे वाईट करण्याच्या हेतुने प्रयत्न करणा-या सर्व वाईट शक्तियॉं यांचे तेज, बल संपुर्णपणे तुमच्या कृष् शक्तीव्दारे आकर्षित करून त्यांना आम्हासमोर निष्क्रीय तेजहीन बलहीन व लुंडमुंड बनवुन आम्हापासुन बहु दुर लोटावे हो राया ।

आम्हा भक्तांच्या अंतर्गत घुसुन आमचा ताबा घेवु पाहणा-या, अंर्तःबाहय आम्हा त्रास देणा-या, आमचे वाईट करू पाहणा-या, आमच्या सभोताल आमचे अहित करण्याच्या हेतुने वावरणा-या, आमचा घात अथवा नाश करण्याच्या हेतुने दबा धरून बसलेल्या, रोग-विघ्ने उत्पन्न करणा-या व संकष्टे-आरीष्टे च्या रूपात उभे राहणा-या.. ईत्यादी आम्हा समोर-मागे व भोवताल उभ्या असलेल्या सर्व वाईट व घातक कृत्या व शक्तीयॉं यांचे सर्व शक्तीतेज बल तुम्ही तुमच्या कृष शक्तीने संपुर्णपणे आकर्षित करून, त्यां सर्व वाईट शक्तीयॉं ला तेजोहीन बलहीन लुंडमुंड बनवुन देहीपासुन दुर करावे. आमचे नित रक्षण करत राहावे कृष्णदेवा । नरदेहीस सुखी नांदवत राहावे हो कृष्ण राया ।

जेव्हा जेव्हा कोणत्याही वाईट शक्तीयॉं कृत्या आमचे समक्ष आम्हा समोर उभ्या राहतील अथवा आमच्या सभोताल येवुन आमचे अहीत करण्याच्या हेतुने वावरेल, तेव्हा तेव्हा त्यांचे तेज तुमच्या कृष शक्तीने आकर्षित करून त्यांना बलहीन निष्क्रिय व निष्फल करून लुंडमुंड करून आम्हापासुन दुर करा हो कृष्ण राया ।

आमच्या सर्व कृत्यांचा नाश करू पाहणा-या कृत्यांचे ही संपुर्णपणे तेज बलशक्ती आकर्षित करून त्यां कृत्याचा संपुर्णपणे संहार करून त्यांचा पुर्णतः नायनाट करून आमचे सदोनित रक्षण करत राहा हो कृष्णराया । वाईट शक्तीयॉं नित उडवत आम्हास नित साहय करावे हो राया ।

आम्ही पुनःपुनश्चः विनंती अर्ज करतो की : मिर्तलोकच्या या चतुर्पती नाम ज्योती मध्ये तुमची भैस अवतारी ज्योत खेळवत उभे राहा हो राया । या चतुर्पती नाम ज्योती मध्ये भैस अवतारी ज्योत खेळवुन सच्च्या भक्तांना नित निरंजनी भेटी देत राहावे हो कृष्णराया । भक्तांचा मुजरा स्विकारून भक्तांच्या सत् भावनेची पुर्तता वेळोवेळी करावं राया । भक्तांना वेळोवेळा या ज्योतीचा अनुभव साक्ष-पुरावा-गाही दयाहो राया । तुमचा नित चैतन्याचा पुरवा दयाहो राया । सत् ची गाही देत देत याहो राया हो ।

हे आदीपुरूष कृष्णराया । तु फक्त अनुभव घेण्याचीच वस्तु होय. याचे अत्यंत चांगले अनुभवजन्य ज्ञान, सच्चा भक्तांच्या पदरी अनुभवाचे गाठोडे देवुन दयाहो राया । चांगले अनुभव देत देत याहो राया हो । तुमच्याच हस्ते तुम्हीच खतपाणी घालुन परिपक्व केलेल्या चतुर्पता अथर्वन् वेद च्या फळाचा परीमय अखंड ठेवा हो राया । मुळस्तंभाच्या शेडयावर असलेल्या या चतुर्पता अथर्वन् वेद च्या फळाच्या बिजांव्दारे नित कोर धान्य पिकवा हो राया ।

ज्यांना चतुर्पती ज्ञानाचा लवलेश नाही. असेही इतर सच्चे भक्त निवडुन त्यांच्या घरा आपणहुन जावुन, आपनहुन त्यांचा हात धरून या चतुर्पतीच्या भुम्मेवर नित आणत राहवे हो कृष्णराया । चतुर्पता कृष्ण अवधुत पंथाच्या भुम्मेवर आणुन या सच्च्या भक्तांवर चतुर्पतीच्या चौकोणी मेघनिळाचा वर्षाव करत, असे सच्चे नित कोरे धान्य या चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाच्या भुम्मेवर नित पिकवा हो राया । नित कोरे धान्य पिकवत पिकवत याहो राया हो । सच्च्या भक्तजनास साहय करत या बिर्दावर सदा अखंड उभे राहा हो राया । बिर्दावर उभे राहुन बिर्द वाणी संभाळा हो राया । ही बिर्द वाणी तुमचीच होय. त्याचमुळे या वाणी चा सांभाळ करने तुमच्याच हातात आहे हो कृष्णराया । संभाळ करा हो राया । भक्तांचा संभाळ करत याहो राया । कारण की : तुम्हीच सच्च्या भक्तजनांना हाती धरून त्याच्या हाती चतुर्पता अथर्वन् वेद दिल्यामुळे तुम्हा आता या चतुर्पता अथर्वन् वेदांच्या भक्तजनांला साहय करावेच लागते हो राया । हाती घेतलेला हा चतुर्पता अथर्वन् वेद धारण करण्याची मेघा बुध्दि व शक्तीसह चोखट निरंजन ग्यान दयाहो कृष्णराया । याच तुम्हा चरणी विनवणीपुर्वक आमच्या देहीच्या अर्जा सदोनित ठेवतो. कारण की : या सच्च्या भक्तांच्या देहघरात तुम्हीच आपणहुन आलेत. आणी या भक्तांच्या हाती चतुर्पता अथर्वन् वेद देवुन त्यांना पदरी धरले आहे । हाती धरले आहे हो राया ।

॥ पदरी धरलं; नका ठेवु/जावु दुरं । लोट मारतो तुमच्या चरणावरं ॥<br>
॥ तुझेच फुलपुष्प तुलाच वाहतो । निमित्याकारण दर्शना येतो ॥<br>
॥ निमित्याकारण तुम्ही धरला हातं ।<br>
तुमचीच वाणी तुम्ही सांगाव जगातं/ह्दयातं ॥<br>
॥ वाणी जगात सांगतली । चर्तुपति नामाची ज्योत उजळली ॥<br>
॥ जोडा या ज्योतीले हात । उभा आहे देव कृष्ण अवधुत ॥

निमित्याकारण तुम्ही धरला या भक्ताचा हात । म्हणुनच आता तुमचीच वाणी भक्तजनाच्या ह्दयात तुम्ही सांगाव । तुमचीच वाणी तुम्ही जगात सांगाव हो कृष्णराया ।. आम्ही तुम्हाबध्दलचे संपुर्ण ग्यान सांगण्यास अपुरे असल्यामुळे असमर्थ आहोत. म्हणुनच या अपु-या अपुर्ण मानव भक्तांची पुर्णा कडे हात जोडुनी पुनःपुनश्चः विनंती अर्जा आहे देवा अवद्युता । देवा द्युतराया हो । तुमचे संपुर्ण ग्यान तुम्हीच दयावे । तुमचे सेरूप दावावे हो कृष्णराया । तुमच्या वाचुन आमचे ईच्छा पुर्ण करणारा कोणी नाही हो ।

॥ ईच्छा पुर्ण करा पुर्ण अवतारा । तुमच्या बिन नाही आमचा दुसरा ॥<br>
॥ अगाध वाणी अगाध धनी, अगाध महीमा तुही ।<br>
तुमच्या वाचुन इच्छा पुर्ण, । कोण करण आमची ॥<br>
॥ इच्छा पुर्ण कर या देही, । देहीतुन जावुच नको कई ।<br>
असो तुमच्या रूपासुखाची गाही/दाई ॥<br>
॥ नामी जडल्या उपर नसावं । या देहीला मरण ।<br>
तुमचे नाम घेता चुकवा । चौ-यांशी यवनं ॥<br>
॥ अर्ज पुर्ण करा हो आमची । अगध आहे देवा तुमच्या पायाची ॥<br>
॥ अगध आहे प्रभुनायका । तिरलोक्याची दोरी सदा धरा आपल्या हाता॥<br>
॥ कलयवगी भक्तांची दाई । पाउल पुढं पडले नाही ॥<br>
॥ कलयवगी भक्तजन देवासमान । ऋषिकेशी आले याहीच्या संगं/आंग.<br>
॥ देव प्रेमानं बांधला । अंगी हरी राबविला ॥

हे कृष्ण अवधुता । तुमच्या वाचुन आमच्या या अर्जा व इच्छा कोणी पुर्ण करू शकत नाही. म्हणुनच हे अगाध वाणीचा अगाध धनी असलेला पुर्ण अवतार कृष्ण अवद्युता । तुम्हा चरणी माथा ठेवुन पुनःपुनश्च या विनवणी अर्जा व इच्छा पुर्ण करण्याची याचनापुर्वक निरंतर विनती पुनःपुनश्चः करत याचनापुर्वक तुया पायी दाई/अगध घालतो.

**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

# ॥ माफीनामा ॥

आम्ही माफीनामा लिहुन ठेवतो की :
**॥ चतुर्पता अथर्वन् वेद ॥**
च्या
निरसन मधिल काही वाक्यांमुळे, निरसनाचे लेखन स्पष्टिकरण मुळे कुणाच्या भावना दुखावल्या गेल्या असतील, किंवा कुणाच्या मनाला टोचुन खं:त वाटत असेल, दुःख होत असेल.., अश्या भावना दुःखावलेल्या, दुःखी झालेल्या भक्तजनांची आम्ही हात जोडुन नम्रपणे माफी मागतो.

**॥ चतुर्पता अथर्वन् वेद ॥**
च्या
चरणार्थ, शब्दार्थ निरसन स्पष्टिकरन चा हेतु, हा शुध्द चतुर्पता ज्ञानदान चा असुन, या निरसनाचा हेतु कुणाच्याही भावना दुःखण्याकरीता नाही.
हे जाणुन आम्हास माफ करावे.

अशी आम्ही शरणागत होवुन, वारंवार विनंती करतो.
आम्हास क्षमा करावी. क्षमस्वःक्षमस्वःक्षमस्वः ।

॥ आपला शरणागत ॥

**निरसनकार**
**॥ श्रीसुदन प्रभाकर शेंडे ॥**
**सकंलक, संकलन मुद्रण, मुख व आंतरिक पृष्ठ चिंत्रांकन, मांडणी**
**शब्दार्थ, चरणार्थ, निरसन व स्पष्टिकरण, चतुर्पता अथर्वन् वेद वेब कर्ता, व संपादक**
ॐ नगर, यवतमाळ.-४४५००१ विदर्भ, महाराष्ट्
मो. ९५२७९६३५६४, ०७२३२-२४६३२१



॥ चुकलो आहो पामर । उभा आहो तुमच्या समोर ॥
॥ उभा आहे तुमच्या समोर । एवढे अपराध माफ कर ॥
॥ अन्याय करा देवा माफ । तुच होय पुर्विचा बाप ॥
॥ अपराध कोटयानं कोटी । देवा तुम्ही घालाना पोटी ॥
॥ माझेया अपराधाच्या राशी । भेदुन गेल्या हो गगणाशी ॥
॥ मागे झाल्या पुढेही होतीन । जन्मो-जन्मीच्या चुका ।
जन्मो-जन्मीच्या चुका । माफ करा विठ्ठल सख्या ।
जन्मो जन्मीच्या चुका । माफ करा कृष्ण सख्या ।
जन्मो जन्मीच्या चुका । माफ करा माझे या सख्या ॥

Sp Shende.
Nirsankar

**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**








॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

# ॥ चतुर्पता अथर्वन् वेद ॥

# ॥ अनुक्रमणिका ॥


| | | | | |
|---|---|---|---|---|
| 01 | 00 | 01 | संयुक्तिक प्रस्तुत पत्रिका कॉपिराईट व विवरण | 05 |
| 02 | 00 | 02 | पत्रिका, अर्पण पत्रिका | 11 |
| 03 | 00 | 03 | चतुर्पती चे पुर्ण अवतार दर्शन भाग-01 | 15 |
| 04 | 00 | 04 | चतुर्पती चे पुर्ण अवतार दर्शन भाग-02<br>कृष्णांमृत : पुर्णअवतार कृष्णाजीचे चरित्रदर्शन | 33 |
| 05 | 00 | 05 | चतुर्पता अथर्वन् वेद : ग्रंथ प्रस्तावना | 83 |
| 06 | 00 | 06 | चतुर्पता अथर्वन् वेद : ग्रंथ प्रवेश | 103 |
| 07 | 00 | 07 | चतुर्पता अथर्वन् वेद : खंड अनुक्रमणिका | 111 |
| 08 | 00 | 08 | परिशिष्टे | 1083 |
| 09 | 00 | 09 | ऋणनिर्देश व आभार, संदर्भसुची ईत्यादी | 1129 |


॥ अनुक्रमणिका ॥

## ॥ खंड ०१ ॥

## ॥ सुमरन, अष्टगण व अष्टशक्तियाँ ॥


| ओवी कमांक. | खंड नं. भाग न. | खंड ०१ ओवी नं. | ओवीचे नाव | पान नं. |
|---|---|---|---|---|
| | | | ॥ खंड-०१ : भाग-०१ :- सुमरन, अष्ट-गण ॥ | |
| ०१ | ०१.०१ | ०१ | सुमरन | १३३ |
| ०१ | निरसनसह | ०१ | गण नं ०१ :- आदीपुरूष आदीगण | १३५ |
| ०२ | निरसनसह | ०२ | गण नं ०२ :- साहीत्रावर उभा | १५२ |
| ०३ | निरसनसह | ०३ | गण नं ०३ - आदीगण नेमला | १६१ |
| ०४ | निरसनसह | ०४ | गण नं ०४ :- तारू आले तारू आले | १७४ |
| ०५ | ०१.०१ | ०५ | गण नं ०५ :- भजो भजो गणपती | १७९ |
| ०६ | ०१.०१ | ०६ | गण नं ०६ :- प्रथम नमो गणराजा | १८० |
| ०७ | ०१.०१ | ०७ | गण नं ०७ :- भजन पुजंन ध्यान | १८१ |
| ०८ | ०१.०१ | ०८ | गण नं ०८ :- मुळस्तंभीचा गण | १८२ |
| | | | ॥ खंड-०१ : भाग-०२ :- अष्ट-शक्तियाँ ॥ | |
| ०९ | निरसनसह | ०१ | शक्ती ओवी ०१ :- मुळावरची शक्ती | १८५ |
| १० | निरसनसह | ०२ | शक्ती ओवी ०२ :- निराकार निरंजन | २०७ |
| ११ | निरसनसह | ०३ | शक्ती ओवी ०३:- माया-चैत्यन्या आदीमाया | २३३ |
| १२ | निरसनसह | ०४ | शक्ती ओवी ०४ :- रूत या गमन | २४५ |
| १३ | निरसनसह | ०५ | शक्ती ओवी ०५ :- मुळ यवगाची गाही | २४७ |
| १४ | निरसनसह | ०६ | शक्ती ओवी ०६ :- कात ग राणे कात | २५० |
| १५ | ०१.०२ | ०७ | शक्ती ओवी ०७ निराकार आदीमाया-फुगडी | २५७ |
| १६ | निरसनसह | ०८ | शक्ती ओवी ०८ रूक्मिणीची दाई -अरज | २५९ |

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ अनुक्रमणिका ॥

# ॥ खंड ०२ ॥

# ॥ चतुर्पती निरंजन ग्यान च्या ओव्या ॥


| ओवी क्रमांक. | खंड नं. ०२ | खंड ०२ ओवी नं. | ओवीचे नाव | पान नं. |
|---|---|---|---|---|
| १७ | निरसनसह | ०१ | सहा नर सचला साचा | २७१ |
| १८ | निरसनसह | ०२ | साहंकारी निराधारी | २९३ |
| १९ | निरसनसह | ०३ | निरंजना कर जागी अवघी भुम्मा | ३०४ |
| २० | निरसनसह | ०४ | जलीया खांबाशी उभे निरंजन | ३०७ |
| २१ | ०२ | ०५ | कैची माया? निर्मळ ढळमळ सप्तसागर | ३०८ |
| २२ | निरसनसह | ०६ | द्युतांचे हे मोती, जली हारपले | ३०९ |
| २३ | ०२ | ०७ | आकाश जाणुनिया पिता | ३१८ |
| २४ | ०२ | ०८ | शकुन निघाला | ३१९ |
| २५ | ०२ | ०९ | शकुनाच्या लागा ध्यानी | ३२० |
| २६ | ०२ | १० | मनोरथ पुरवनं माझं | ३२१ |
| २७ | निरसनसह | ११ | आदीपुरूषाचा खेळ नाही कोणा मालुम | ३२२ |
| २८ | ०२ | १२ | मुळयवगी देह धरली | ३२३ |
| २९ | निरसनसह | १३ | अजाताची ओवी :- अजाताची पुरवा.. | ३२४ |
| ३० | ०२ | १४ | आधी स्थिती वर्णन करतो | ३३८ |
| ३१ | निरसनसह | १५ | गाही ची ओवी :- जग ओळखेना.. | ३३९ |
| ३२ | निरसनसह | १६ | मोहरची ओवी :- सांगी केली त्वां मोहर | ३५१ |
| ३३ | ०२ | १७ | सावंग नगरी ज्योत भारी | ३६६ |
| ३४ | ०२ | १८ | जाहीरणाची ओवी :- बहुत यवग जाहीरण | ३६८ |
| ३५ | ०२ | १९ | जाहीरणाची ओवी :- म्हणनी ०२ | |
| ३६ | निरसनसह | २० | माझं घर मज नाही ठाव :- मोठी ओवी | ३७१ |
| ३७ | ०२ | २१ | माझे घराचं ठिकाण :- छोटी ओवी | ३९२ |
| ३८ | ०२ | २२ | लहानपण ची ओवी :- मुळावरची मोठी | ३९४ |
| ३९ | ०२ | २३ | बरे गा माझे लहानपण :- म्हणनीतील | ३९६ |
| ४० | निरसनसह | २४ | बावशी ची ओवी :- बावशीच्या साली.. | ३९७ |
| ४१ | निरसनसह | २५ | गगन कवटाळु ची ओवी | ३९९ |
| ४२ | निरसनसह | २६ | बत्तिशी ची ओवी :- पहिली बत्तिशी.. | ४०५ |
| ४३ | निरसनसह | २७ | जोहार ची ओवी :- आहो महार करतो.. | ४०७ |
| ४४ | निरसनसह | २८ | तारखेची ओवी :- तिरतिरभवनी सभा.. | ४०९ |
| ४५ | निरसनसह | २९ | कनवाळु ची ओवी :- भक्तीचा कनवाळु.. | ४१२ |
| ४६ | निरसनसह | ३० | आदीमुनी-महामुनी कैसं नातं दोघाचं.. | ४१५ |
| ४७ | निरसनसह | ३१ | चतुर्पता गाईची ओवी:- आदीमुनी अवतार | ४२१ |
| ४८ | ०२ | ३२ | संजिवनी व डहाक्याची गुप्तओवींचे ज्ञान | ४२६ |
| ४९ | ०२ | ३३ | गाईची ओवी :- आदीरूप आले धनीदेव.. | ४२९ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ५० | ०२ | ३४ | गाईची ओवी :- अठरा वर्णाची गाय.. | ४३० |
| ५१ | ०२ | ३५ | पडीत गाय ची ओवी :- अल्याड आम्ही.. | ४३२ |
| ५२ | निरसनसह | ३६ | धेनु गाय ची ओवी :- तिरोपतीचा जप.. | ४३३ |
| ५३ | ०२ | ३७/१<br>३७/२ | नाम गायची ओवी :- माझी नामगाय..<br>व सकाळच्या प्रहरी गाय सोडली ओवी | ४३९ |
| ५४ | ०२ | ३८ | गायची ओवी :- मिर्तलोकची राज महीमा | ४४० |
| ५५ | निरसनसह | ३९ | संतपुरीची ओवी :- संतपुरीचे संत मिळाले | ४४२ |
| ५६ | ०२ | ४० | वस्तु खासी या रायाची | ४४७ |
| ५७ | ०२ | ४१ | आकाशवाणी बोले धनी चवथ्या खुम्मी | |
| ५८ | ०२ | ४२ | जुन्याचा ऋषिश्वर | ४४८ |
| ५९ | ०२ | ४३ | हिशोब करून कजबा उजाळ | ४४९ |
| ६० | निरसनसह | ४४ | देह निर्गुणा ! पाचही तत्व दयाहो मजला | ४५० |
| ६१ | निरसनसह | ४५ | विटाळाची ओवी | ४५६ |
| ६२ | ०२ | ४६ | धनी आला मनमोहन | ४६१ |
| ६३ | ०२ | ४७ | देव देव म्हणता | ४६२ |
| ६४ | ०२ | ४८ | चत्रभुज महाराज तुमची वाणी | ४६३ |
| ६५ | ०२ | ४९ | उरलेल्या ओवी करीती रिकामी जागा | ४६३ |
| ६६ | ०२ | ५० | उरलेल्या ओवी करीती रिकामी जागा | ४६४ |




॥ अनुक्रमणिका ॥

## ॥ खंड ०३ ॥

# ॥ काया ग्यान च्या ओव्या ॥


| ओवी क्रमांक. | खंड नं. ०३ | खंड ०३ ओवी नं. | ओवीचे नाव | पान नं. |
|---|---|---|---|---|
| ६७ | निरसनसह | ०१ | मुळस्तंभिचा पाया । सांगतो कृष्ण राया | ४६७ |
| ६८ | निरसनसह | ०२ | दरवाज्याचे राखनदार | ४९२ |
| ६९ | निरसनसह | ०३ | मुळावरचा मोठा पाळणा :- जन्म मुळाचा | ४९९ |
| ७० | ०३ | ०४ | जागृत पाळणा :- छोटा | ५२२ |
| ७१ | निरसनसह | ०५ | देह वर्णनाची निबंध ओवी | ५२३ |
| ७२ | निरसनसह | ०६ | पंचभुतांचा पसारा | ५४२ |
| ७३ | निरसनसह | ०७ | पंच इंद्रियांचे पंच विषय | ५५३ |
| ७४ | ०३ | ०८ | शांती हे मिळवुन | ५५६ |
| ७५ | ०३ | ०९ | एक बाग लावला | ५५७ |
| ७६ | ०३ | १० | सावंग्या नगरात.., अकाशमात ज्योत | ५५८ |
| ७७ | ०३ | ११ | अनामत राया, कर बापा दया | |
| ७८ | ०३ | १२ | मनाजी पाटील देहगावचा | ५५९ |
| ७९ | ०३ | १३ | जिव अध्यानी.., कधी होशील आत्मज्ञानी | |
| ८० | ०३ | १४ | पिंजरा बनवला | ५६० |
| ८१ | ०३ | १५ | पक्ष्यामध्ये पक्षी राघो, राहतो कैसा ? | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ८२ | ०३ | १६ | देहगावचा राजा होय | ५६१ |
| ८३ | ०३ | १७ | कळेना आदीपुरूषाची माव | |
| ८४ | ०३ | १८ | मानवा, सुद धर गा बुध | ५६२ |
| ८५ | ०३ | १९ | काळीवर रंचली पांढरी | |
| ८६ | ०३ | २० | देहीमध्ये जन्मली नार | |
| ८७ | ०३ | २१ | सार्थक काही नाही झालं मानव जन्मा.. | ५६३ |
| ८८ | ०३ | २२ | षटग्गुण उर्मि हे षटवैरी | |
| ८९ | ०३ | २३ | आता तरी सुधर गडया ! | ५६४ |
| ९० | ०३ | २४ | प्रार्थना करा, देव सोहंम् नांदतो घरा | ५६५ |
| ९१ | ०३ | २५ | तिरग्गुण तिव्हा उभा केला | |
| ९२ | निरसनसह | २६ | सांगतो स्वरग्यान ची ओवी | ५६६ |
| ९३ | ०३ | २७ | स्वरग्यानाची ओवी-२ :- भविष्यज्ञान | ५७५ |
| ९४ | ०३ | २८ | योगी खरा, यानं यवगं आणलं घरा | ५७६ |
| ९५ | ०३ | २९ | पहा हो जन, जग भुलवलं याहीनं | ५७७ |
| ९६ | ०३ | ३० | लंबी लंबी हात पाय | ५७८ |
| ९७ | ०३ | ३१ | सांगतो हो जाये । गाय चतुर्पता गाये | ५७९ |
| ९८ | ०३ | ३२ | उरलेल्या ओवीकरीता रिकामी जागा | ५८० |




॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ अनुक्रमणिका ॥

## ॥ खंड ०४ ॥

## ॥ भविष्यग्यान भाकल्या शकुन ग्यान च्या ओव्या ॥


| ओवी कमांक. | खंड नं. ०४ | खंड ०४ ओवी नं. | ओवीचे नाव | पान नं. |
|---|---|---|---|---|
| ९९ | निरसनसह | ०१ | ढाकुल नामी शकुन सांगतो | ५८३ |
| १०० | ०४ | ०२ | कैकु कैकु शकुन ऐका | ५८८ |
| १०१ | ०४ | ०३ | अवधुत आहे जबर, कोणा नाही खबर | ५९१ |
| १०२ | ०४ | ०४ | स्वप्नि दिसता, दृष्टांत घडेनं | ५९२ |
| १०३ | ०४ | ०५ | आधी अधार मग कार | ५९३ |
| १०४ | ०४ | ०६ | भैसाचं राज होणार सागंतलं | |
| १०५ | ०४ | ०७ | जसाच यौग तसाच खेळ | ५९४ |
| १०६ | ०४ | ०८ | एक्यानवं सम्मेश्वरा | |
| १०७ | निरसनसह | ०९ | तिन मुके सहा वेडे, अठरा भावांवले | ५९५ |
| १०८ | ०४ | १० | शास्त्र मती बयकन तिथी | ५९७ |
| १०९ | ०४ | ११ | पाणी पवनाच्या नित धारा | ५९९ |
| ११० | ०४ | १२ | करन कार, निश्कलंकी अवतार | |
| १११<br>११३ | ०४ | १३<br>१३/२ | कलीचरण :- ऐक अर्जुना, तुला सांगतो<br>सुन सुन भाई रे | ६००<br>६०६ |
| ११४ | ०४ | १४ | यवगाची गणीता | ६०७ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ११५ | ०४ | १५ | मिर्तलोकी, धनी येईन नितरूप | |
| ११६ | ०४ | १६ | कलयवगा.., आला भंग सांगे जगा | ६०८ |
| ११७ | ०४ | १७ | कलयवगात.., सत्यवग होणार नित | |
| ११८ | ०४ | १८ | गिरी पर्वत मेरू शिखर उडुन जाईन | ६०९ |
| ११९ | ०४ | १९ | तिरगुण तिघांचा, दिवस उडवन सातांचा | ६१० |
| १२० | ०४ | २० | तिरगुणा जागी रहयं, सांगतो भविष्य | |
| १२१ | ०४ | २१ | तुम्ही तिकुन, आम्ही इकडुन | ६११ |
| १२२ | ०४ | २२ | नव्या यवगाचं राज्य योग्यानं सांगतल | |
| १२३ | ०४ | २३ | सांगतो भविष्याची वाणी | ६१२ |
| १२४ | ०४ | २४ | सांगतो खरं, पुढे होणार पृथ्वीवर | ६१३ |
| १२५ | ०४ | २५ | चुकलो देवा फारं, बहु आहे मी अन्जानं | ६१४ |
| १२६ | ०४ | २६ | भाकलं पुर्विच जरा.., येईन घरा | ६१५ |
| १२७ | ०४ | २७ | भाकलं जरा नाही चुकणार | |
| १२८ | ०४ | २८ | उरलेल्या ओवीकरीता रिकामी जागा | ६१६ |
| १२९ | ०४ | २९ | उरलेल्या ओवीकरीता रिकामी जागा | ६१७ |
| १३० | ०४ | ३० | उरलेल्या ओवीकरीता रिकामी जागा | ६१८ |




॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ अनुक्रमणिका ॥

## ॥ खंड ०५ ॥

# ॥ कृष्ण चरित्रग्यान, स्तुतीगाण व विनवणी च्या ओव्या ॥


| ओवी कमांक. | खंड नं. ०५ | खंड ०५ ओवी नं. | ओवीचे नाव | पान नं. |
|---|---|---|---|---|
| १३१ | ०५ | ०१ | माझा गुरूदेव आदीमुनी | ६२१ |
| १३२ | ०५ | ०२ | आगम उगम गुरूगणको | |
| १३३ | ०५ | ०३ | निर्मळ ढळमळ सप्त हे सागर | ६२२ |
| १३४ | ०५ | ०३.०१ | भक्ती हे दावुन, ढोंग फैलावती | |
| १३५ | ०५ | ०४ | मुळयवगाचा देव, आदीमुनी राव | ६२३ |
| १३६ | निरसनसह | ०५ | यवगाचा घेतला जुम्मा मन लावुन | ६२४ |
| १३७ | ०५ | ०६ | यवगं साधवले, यवगी द्युत जाणं | ६२६ |
| १३८ | ०५ | ०७ | यवगाचा गलपटा नाही कोणा मालुम | ६२७ |
| १३९ | ०५ | ०८ | निश्कलंकी अवतार खरा हो खरा | |
| १४० | निरसनसह | ०९ | भुललीसे वस्तु ? ऐसा यवगी बोलला | ६२८ |
| १४१ | ०५ | १० | नवरत्नाचा शेला देवानं जडीत विनवला | ६३१ |
| १४२ | ०५ | ११ | उभा राया कृष्णराजा, देव उभा माझा | |
| १४३ | ०५ | १२ | साचा हा सचवलां, ये माझे माहेरा | ६३२ |

## ॥ विणवनी ॥

हे सुक्ष्म जनहो । ज्या निराकार-निराधार आदीरुप आदीपुरुषाने तुम्हा सुक्ष्मांना दोन-दोन च्या जोडीनं उत्पन्न केलेत. तुमच्या आपरुपाचे दोन-दोन झेंडें फडकवुन सृष्टीरंचनेत तुमचा कार निभावला-निभावत आलेला आहे.

त्याच आदीपुरुष अवतार व्दारे तुमच्या त्याच रुपांचे प्रतिक स्वरुपात दोन झेंडें चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाच्या भुम्मेवर रोवले आहे. या चतुर्पती च्या भुम्मेवर सर्वत्राचा पिता असलेल्या आदीरूप आदीपुरुषाचे भजन-पुंजन, ध्यान-सुमरन, स्तुति व विनवणी असलेले ज्ञान-भक्ती युक्त गायन केले जात आहे. आदीपुरुषाच्या पायरीचे पुंजन करत अवघा मान दोन झेंडयाला चतुर्पतीचे भक्तगण देत आहेत.

म्हणुनच आम्ही सर्व चतुर्पतीचे भक्तगण तुम्हा सर्व सुक्ष्मांना विणवनी अर्ज करीतो की :

अकाशमात मधील तुमच्या या आदीपुरुषाच्या भजन-पुंजन, सुमरण-ध्यान गिण्यान ईत्यादी कार्यास निरंतर साहय करत चतुर्पती बिंदावर नितं उभे राहावे. चतुर्पती च्या भक्तांना नित साहयं करा. चतुर्पता अथर्वन् वेदाच्या अक्षरी उभे राहुन भक्तांना सदा साहय करत राहावे.

हिच आम्हा सर्व चतुर्पती भक्तांची ब्रम्हांडातील सर्व आध्यात्मीक विश्वे यातील सर्व दोन-दोन च्या जोडीत असलेल्या सुक्ष्मां सह शक्तीयॉ व सिध्दियॉ व सिध्दगण जाणतेगण.. ईत्यादी चरणीं निरंतर नित अरज आहे.

तिरलोकी खेळ मांडला :-

॥ देवाने धरणी बनवली । नजर वरच्यावर अंबर केली ॥ १२ ॥
॥ देवानं स्वर्ग बनवला । खेळ मंडयानी मांडला ॥ १३ ॥
॥ ऐसा होवुन गेला कारं । धनीदेव आले यवगावर ॥ १४ ॥
॥ आदीपुरूषाच्या हात । जागी होये मिर्तलोक ॥
भजने :--॥ आदीपुरुष आदीगण । उभं केलं मेरु मंडयान ॥
॥ आदीपुरुष आदीगण । उभं केल माया चैत्यन्य ॥
॥ थयथयकार अगुचर गण । माया विस्तारली याहीनं, उभ केलं तिरभवन ॥

निराकार निरंजन निर्गुण अवधुत धनी च्या सर्वप्रथम खेळात या देवानं धरणी बनवली. या धरणीवर मिर्त लोक उभा केला. आणी त्या धन्याची नजर धरणीवर वरच्या वर गेल्याने तिथे वरच त्याने अंबर स्वर्ग बनवला. वर अंबर स्वर्ग लोक उभा केला. तर खाली पाताळ लोक उभा केला. स्वर्ग मिर्त पाताळ चा कार निभवण्यासाठी त्यांनी त्यात पुनश्चः आपला खेळ मांडला. या खेळात त्याने स्वर्ग व पाताळ याच्या मध्ये मेरुच मैदान ठेवले. या मेरूमंडयानात इच्छा स्थापुन या ईच्छेलाच शक्ति रूपात प्रकट केलेत. या शक्तीने तिचे विविध रूपाचा बाजार फैलावत 'आदीमाया-चैत्यन्यशक्ति' या रुपात प्रकट झाली. पुढे झालेला कार शक्तीची ओवी खंड०१/०२/०१ च्या निरसनातुन जाणुन घ्यावे. असो. निराकाराने मुळ शक्तिला सृष्टी निर्मितीसाठी उपयुक्त असलेले देणं, त्या आदीरुपाव्दारे मिळवण्यास कसे साहय केले ? यांचे ज्ञान शक्ति ची ओवी खंड०१/०२/०१ निरसनातुन घ्यावे. ही विनंती

धनीदेव आले यवगावर :-

जो निराकार निर्गुण आहे. जो अणु रेणु पासुन बनलेला नाही. अश्या चतुर्पती आदीरूप आदीपुरूष धनी व्दारे अणु रेणु पासुन सर्व काही उत्पन्न झाले. त्या आदीरूप आदीपुरूष आदीगणाच्या कृष्णशक्ती व्दारे अणु-रेणु सह अनंत ब्रम्हांडे निर्माण झालेत. ऐसा हा आदीपुरूष आदीगणात सांगितल्याप्रमाने कार सर्वत्राचा पिता असलेला आदीपुरूष आदीगण परमात्मा व्दारे होवुन गेला

आहे. तोच एकला आदीपुरूष आदीगण वेळोवेळा आपला चतुर्व्युह रंचनेत परिपुर्णतम्पुर्ण अवतार घेवुन रूपा-रूपात यवगान यवगात अवतरला आहे. रूपा-रूपाच्या यवगावर आलेला आहे. या कलयवगाच्या संधित तोच एकला आदीरूप आदीपुरूष मिर्तलोकी चतुर्व्युहरूपांची रंचना करून कृष्णदेहधरणी वर अवतरून आपला परिपुर्णतम्पुर्ण अवतार घेवुन गुप्त रूपात उभा आहे.

या चतुर्पती आदीरूप आदीपुरूष कृष्ण धन्यालाच अनंत नावाने जाणतेगण ओळखतात. अनेक आध्यात्मीक विश्वातील जाणतेगण, सिध्दगण पंथगुरू धर्मगुरू ईत्यादी अनेक प्रकाराने त्यांच्या बध्दल सांगी करतात. अनेक संबोधने देतात. यवगान यवगात अनंत संबोधन देत त्याला संबोधल्या गेले आहेत. ते अश्याप्रकारे :

- **चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ** च्या भुम्मेवर या आदीपुरूष आदीगण धन्याला ''चौथा चतुर्पती, आदीरूप आदीपुरूष भैस नारायण, कृष्ण महाराज, धनी अवधुत'' या नामाने या परमात्मा ला संबोधतात.
- **शैवपंथीय शिवतत्वी** या चौथ्या धन्याला **शिव** या नावाने संबोधतात
- **कृष्णतत्वी** या चौथ्या आदीरूप परमात्मा धनी ला **कृष्ण** या नामाने संबोधतात.
- **वैष्णव पंथीय** या चौथ्या आदीरूप परमात्मा धनी ला **विष्णु नारायण** असे म्हणुन संबोधतात.
- चौथ्या आदीरूप परमात्मा धनी ला **म्लैच्छ** संबोधतात की : जो स्वतः आहे तोच खुद ! सर्वांचे मुळ ! जो खुद होकर खडा होता है वो **खुदा** । म्हणजेच आपरूप सोयंम् उभा होणारा आदीरूप परमात्मा ।
- **तथागत भ.बुध्द** या गणांबध्दल चे संबोधन सुत्तपिटक/खुदकनिकाय/ उदान/पाटलिगामिय वग्ग यात असे करतात की :

  **हे भिखुनो !**

  हे एक आयतन आहे. तिथे न पृथ्वी आहे. न पाणी आहे. न आकाशान्त्यायतन आहे. न विज्ञानान्त्यायतन आहे. न अकिंचन्त्यायतन आहे. न नैव संज्ञा आहे. न सज्ञायतन आहे. तेथे हे न लोक आहे. न परलोक आहे. न चंद्रमा आहे. व न सुर्य आहे. न मी त्याला अगती म्हणतो न गती ! आणी मी त्याला स्थिती अथवा उपस्थितीपण म्हणत नाही. मी त्यास उत्पत्तीपण मानत नाही. ते न कोठे थाबंते न प्रर्वतीत होते. न त्याला काही आधार आहे-ते निराधार आहे. हयातच सर्व दुःखाचा अंत आहे.

- **भं. गीता** मध्ये अध्याय १७ मध्ये या आदीपुरूष आदीगणां च्या आदीस्थान बध्दलची कृष्ण भगवान सांगी करतात की :

  ॥ तत् पदं तत्परिमार्गितव्यं । यस्मिन्गता न निवर्तति भुयः ।
  तमव चाद्यं पुरूष प्रपद्ये । यतः प्रवृत्तिः प्रसुता पुराणी ॥अ-१७/श्लोक.०४
  ॥ न तध्दासयते सुर्यो न शशांको न पावक : ।
  यन्ध्दत्वा न निवर्तते तध्दाम परमं ममं ॥ अ-१७/श्लोक-०६

  ज्यापासुन ही प्राचिन संसारप्रवृत्ति विस्तार पावली, त्या आदीपुरूषाला शरण जावे. एकवेळा शरणा गेल्यावर पुन्हा माघारे फिरावे लागत नाही. म्हणुन याच आदी स्थानाचा शोध करावा.

  ज्ञाते जन या आदी स्थानाला पोहचल्यावर पुनंः परत येत नाहीत. ते आदी स्थान माझे स्थान होय. ते स्थान स्वयंःप्रकाशीत आहे. सुर्य चंद्र किंवा अग्नी यास ते प्रकाशीत करता येत नाही. या आदीस्थानी उत्तम पुरूष-आदीपुरूष निराळामात्र आहे. क्षर-अक्षर पेक्षा वेगळाच आहे. त्यालाच परमात्मा म्हणतात. हा अव्यय आदीपुरूष तिनही लोकांत प्रवेश करून त्याचे धारण करतो. श्लोक. अ-१७

- **बम्हसंहितेमध्ये** याबध्दल असे कथन करण्यात आले आहे की :

  ॥ अव्दैतमच्युतमनादिमनन्तरूपमाद्यं पुराणपुरूष नवयौवन च ।
  वेदेषु दुर्ल्लभमदुर्ल्लभमात्मभक्तौ गोविन्दमादिपुरूषं तमहं भजामि ॥

  जो अव्दैत अच्युत अनादि आहे. ज्यांची अनंतरूपे असुनही, जो आदी आहे. तोच मुळ पुरूष आहे. तो मुळचा आदीपुरूष सर्वात प्राचिन पुराणपुरूष असुनही तो नित्य नवयौवनसंपन्न आहे. अश्या दुर्ल्लभाहुन दुर्ल्लभ आदीपुरूषाला गोविन्द आत्मभक्ती करून भजतो.

- **स्वयं भगवंत भं गीतेत** या आदीपुरूष आदीगणाच्या स्थानांबध्दल सांगी करत आहे की :

  ॥ त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् ।
  मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ॥ भ.गीता./अ.०७/श्लो१३
  ॥ परस्तस्मात्तु भावाअन्योव्यक्तोअव्यक्तात्सनातनः ।
  यः स सर्वेषु भुतेषु नश्यत्सु न विनश्यति ॥ भ.गीता/अ.०८/श्लो.२०
  ॥ अव्यक्तोअक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् ।
  यं प्राप्य न निवर्तन्ते तध्दाम परंम ममं ॥ भ.गीता/अ.०८/श्लो.२१
  ॥ बहिरन्तश्च भूतानामंचरं चरमेव च ।
  सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चान्तिकेच तत् ॥ भ.गीता/अ.१३/श्लो.१६
  ॥ ज्योतिषामापि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते ‸
  ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हद्‌यी सर्वस्य विष्ठितम् ॥ भ.गीता/अ.१३/श्लो.१८

  सत्व, रज, तम या तीन गुणांनी मोहीत झालेले सर्व तिरगुणी जग हे तिरगुणांच्या पल्याड उभ्या असलेल्या या अविनाशी असा मज म्हणजेच चतुर्पती धन्याला जाणत नाही.

  व्यक्त व अव्यक्त जड प्रकृतिच्या पलीकडे एक अन्य नित्य सनातन प्रकृति या धन्याची आहे. ती परा व अविनाशी आहे. सगळयाचा अंत झाला तरी हया प्रकृतिचा लय होत नाही.

  त्या अव्यक्त परमं धामाला ''अक्षर'' असे म्हणतात. अक्षर म्हणजे अविनाशी ! असे हे परमधाम आणी तेच परमं गति म्हणजे परमस्थानही आहे. मनुष्य जेव्हा या आदीपुरूष आदीगणांच्या स्थानाला जावुन पोहचतो, तेव्हा तो तेथुन कधीही परत येत नाही. तेच या चतुर्पतीचे परमं धाम होय. माझे चतुर्पता अवधुत धाम होय. चतुर्पती धनी चे परंम तत्व आत-बाहेर, चर-अचर या सर्वात आहे. ते सुक्ष्म असल्यामुळे या मर्यादित ईंद्रियांव्दारे जाणता येत नाही. त्याचमुळे ते जवळ असुनी न दिसे. जरी ते अतिशय दुर आहे असे वाटत असले, तरी ते सर्वांच्या अतिशय जवळही आहे.

  असे हे सर्व तेजस्वी पदार्थांचे प्रकाशक तेज आहे. व तिरगुणी मायेन पाडलेल्या तिरगुणांच्या अंधःकाराच्या पलीकडले आहे. असे म्हटले जाते की : ज्ञान तेच. जाणावयाचेही तेच. आणी ज्ञानाने मिळवावयाचेही तेच आहे.

  त्रिगुणांच्या पलीकडे गेलेले त्याचे भक्तच त्याला चतुर्पतीच्या ज्ञानाने तो केवळ जागवु शकतो. कारण तो सर्वांच्या हद्‌यी ठाण मांडुन बसलेला आहे. श्वासाची धुनी धडाधडा जाळत आहे. ईत्यादी.

- **श्रीमुळस्तंभ** या मध्ये या आदीरूपाबध्दल असे सांगीतले आहे की :

या आदीरूपाचे नाव सर्व जाणतात. परंतु रूप जाणत नाही. या आदीरूपाच्याच गर्भात उपजतात. पण तिरगुणांच्या फासा यांच्या गळात पडला असल्यामुळे या तिरगुणांच्या पल्याड उभा असलेल्या या धन्यालाच जाणत नाही. त्यामुळे हे सर्व तिरगुणी जग आंधळे आहे. हे तिरगुणी आंधळे त्या आदीरूपानेच उत्पन्न केलेल्या तिरगुणी मायेला तिरगुणांच्या पलीकडे उभा असलेला आदीरूप धनी दाखवा म्हणुन प्रार्थना करतात. ती बिचारी तिरगुणी मायातरी काय करणार ? आपणच टाकलेली आपल्याच तिरगुणी ज्ञानाची झापड कशी काढणार ? तिरगुणांच्या पलीकडे पाहणारी दिव्य ज्ञान नेत्राशिवाय या आदीरूपाला कसा दाखवावा ? म्हणुन विचारात पडते. आणी मग ती समजवण्यासाठी आपल्या तिरगुणी बाळाला मधुपाना प्रमाणे आपल्या तिरगुणी ज्ञानाचा प्याला पाजुन, त्यांच्या हाती कर्मकांडाची काठी देवुन ऐक-ऐकाचा हात धरते.

एकेकाला एक-एक असे १. ब्रम्हा, २. विष्णु, ३. रूद्र, ४. ईश्वर, ५. आदीनाथ ६. सदाशिव हे सहा लींग दर्शन चाचपडुन दाखवते. आणी मग माया म्हणते : माझे तिरगुणी बाळांनो ! पाहीला का आदीरूप परमात्मा ? ज्याच्या हातात जे लिंग लागले, त्यातच ते संतोष पावुन संतोषाने उत्तर देतात की : हो ! आम्ही पाहीला आदीरूप ! मग अश्या तिरगुणी बाळांना ही त्रिगुणी माया अंती हाती काही न देता मृत्युभवनी बसवते.

नंतर वेषधारी सहा दर्शने १. जंगम २. जोगी ३. सन्यांशी ४. वैष्णव ५. म्लैच्छ ६. क्षपणीक ही वेषधारी सहा दर्शने परस्परांत माझेच लिंग थोर म्हणुन आप आपल्या परीन/बुध्दिने झगडा करतात. त्यासाठी नाना प्रकारची शास्त्रे-पुराणे ग्रथ रंचना रंचतात.

आणी त्यांच्यापासुन तयार झालेले सहा उपदर्शने १. शैव २.वैष्णव ३. जोगी ४. ब्राम्हण ५. सन्याशी ६. जैन या उपदर्शना ची तर देवपुजा ऐका हो ! वैष्णवाने याला देवळात स्थापला. तर या आदीरूपाला संन्यांश्यांनी पर्वत आहे असे म्हटले. तर योग्यांनी याला सर्वठायी मानला !

अश्या पाखंडाने तो मुळयवगाचा अखंड आदीरूप देवाला खंडुन-खंडुन, आपआपल्या दैवताच्या भागा-भागात, खंडा-खंडात, अर्धा-अर्धा-पाव वाटुन घेतला.
संदर्भ :- श्रीमुळस्तंभ, भ.गीता.

- काही एक चरणे या आदीरूप आदीपुरूष आदीगण चतुर्पती धन्याबध्दल गर्जना करून असे सांगी करत आहे की :

॥ ईश्वरी काया ईश्वरी माया । देहा रूपाशी आणल्या ।
तुया रूमावळीला गणीता नाही । तु रूपी उतरला ।
तुया आंगची सत्ता ज्योता, याहीच्या आंगी खेळु लागल्या ।
अनंत देवाच्या आंगी भरून । भरला आणीक उरला ॥
॥ चक्रपाणी सुदर्शन धारी । तु ब्रम्हचारी ।
पंढरपुरी तु विटेवरी । तुच उभा सावंगपुरी ।
अल्ला परम् दिका मालीक । तुच श्री हरी ॥
॥ येशु पिता तुच गुणवंता । साक्ष करार केला ।
संत महंत ऋषि मुनी । योगी आंगी आला ।
श्री बुध्द महाविर धर्मगुरू । बनुनी तुच खेळला ॥
॥ अनामत उभा एका ठायी । सारी दुनिया फिरे भोवती ।
स्वर्ग मिर्त पाताळ सर्वलोक । भरून उरला तु अंती ॥
॥ भरून भरला आणीक उरला । अंत नाही कळला ।
तुमची कळसुत्र कळा । कळेना कोणाला ॥
॥ चतुर्पती कृष्ण अवधुता । अनंत कोटी ब्रम्हांड नायका ।
आदी भैसा कृष्ण नाथा । शरण आलो श्री अनंता ॥
॥ कृष्ण महाराजा धनी अवधुता । तुमच्या चरणी ठेवला माथा ॥

जरी हा परमात्मा सर्व भूतांत विभागला आहे असे दिसते, तरी तो वास्तविक कधिही विभागलेला नसतो. तो नित्य विभागरहीत एकरूपच आहे. तिरलोक्यासह सर्व चरांचरात तो एकच अखंड भरून भरला आणीक उरला आहे. अश्याप्रकारे जे या अखंडीत आदीरूप आदीपुरूषाला भजते, तेच निजभक्त होयं ! जे बाहेरील सर्व मुद्रा साधने सोडुन सच्च्या भक्तीने याचीच मुद्रा धारण करतो, तोच खरा शैव-वैष्णव सर्वधर्मि होय. अवधुत होय.

बाकी सर्व तिरगुणी जन हे तिरगुणी मायेच्या अंधःकारात बुडल्या असल्यामुळे, आपआपल्या प्रकृतिच्या योगाने बध्द झालेले काम्य वासनांनी मोह पावलेले आहेत. असे माया व्दारे मोहीत झालेले लोक स्वतंःला आवडणा-या उपासनेचा नियम पाळुन वेगवेगळ्या तिरगुणी देव व रूपांची भक्ती करत असतात.

अश्या वेळी जो भक्त ज्या ज्या उपास्य देवी-देवतेच्यां रूपांची भक्ती श्रध्देने करू इच्छीतो, त्या त्या देवी-देवतांच्या ठिकाणी त्याची भक्ती तो चौथा चतुर्पती आदीरूप आदीपुरूष दृढ करतो.

अश्या रितीने त्या चौथ्याव्दारे श्रध्दा दृढ झाल्यावर त्या इच्छीत देवतेची आराधना तो भक्त जास्त नेटाने करू लागतो. व मग त्या चौथ्या आदीरूपानीच निर्माण केलेली ती काम्य फळे, तो चौथा चतुर्पती आदीरूप आदीपुरूष धनी त्यास प्राप्त करून देतो.

कारण की : तो चौथा चतुर्पती आदीरूप आदीपुरूष फक्त भक्तीलाच पावणारा आहे. मग ती भक्ती, कुणीही कुणाचीही करेना !. **''यादृश्यी भावना तसश्य सिध्दिर्भवती''** म्हणजे ''जसा ज्याचा भाव असेल, तसा त्याला देण देतो''। असे त्या चौथ्या धन्याने या मानवाला जणुकाही वचन दिले आहे.

फक्त भाव, भक्ती सच्ची हवी. त्या भावानुरूप तो भक्त एखादया समयाला धरून समयबध्द होवुन, निरंतर एकठायी भक्तीच्या कामी अखंड कार्यरत् असायला पाहीजे. अश्या भक्ताला तो चौथा आपरूप येवुन देण देत राहतो. या चतुर्पती धनीदेवाच्या देणं देण्याच्या स्वभावाला/शिष्टाईला कधीही कोणताही देव आडवं येत नाही. कोणी या चतुर्पती आडव येणार नाही.

अश्या रितीने सर्वांना देणं देणारा तोच चौथा धनी !. अकाशमात मधील आकाशवाणीचा तो चौथा चतुर्पती आदीरूप आदीपुरूष धनी स्वतं मात्र लहानपण घेवुन आहे. या सर्वांपासुन तो वेगळा निराळाच अलीप्त राहीलेला आहे.

परंतु निर्बुध्द लोक त्या अकाशमातमधील आकाशवाणीचा धनी असलेल्या चौथ्या निराकार निराधार निश्कलंकी निर्गुण चतुर्पती धनीचे हे श्रेष्ठ व अत्युत्कृष्ट स्वरूप न ओळखता, तो चौथा सगुणरूपधारी आहे असे समजतात. तो चौथा धनी योगमायेन आच्छादिलेला असुन तिरगुणांच्या पल्याड असल्यामुळे भलत्या-सलत्याला कोणालाही त्या चौथ्याचे स्वरूप उघड उघडपणे दिसत नाही.

कारण की : तो तर निराकार निराधार निशंःकलंकी निर्गुण निरंजन चैतन्य ज्योतिर्मय स्वरूपी आहे. या अनादि अनंत अखंड अगोचर अनिवार असलेल्या चौथ्याला उघड रूपांची अभिलाषा बाळगणारे निर्बुध्द लोक ओळखत नाही. हे जग ओळखेना ! सांगता गाही कोणी मानेना !

चौथ्या आदीरूप आदीपुरूष धन्याला ओळखत नाही. भलेही तो चौथा त्याच्यांच देहीत तेजोगुणी अंश अवतार घेवुन उभा असतांनाही ! हाच विविध देहीत आपला तेजोगुणी अंश अवतार घेवुन उभा आहे.

तुम्हा जवळ तुम्हा अंतरी तसेच आजुबाजुला शेजारी तो चौथा धनी सर्वत्र भरून भरला आणीक उरला आहे. परंतु आत्मज्ञान नसल्यामुळे याचे ग्यान तुम्हास नाही. म्हणुनच ओवीचे चरणे गर्जना करतात की :

॥ देव-देव म्हणता, देव बा । आहे बहुता परी ।
ज्याच नाव, देव तो आहे । अवघ्याच्या अंतरी ॥
॥ देहीतला देव नाही ओळखला । हिंडे रानवन ।
ज्याच नाव देव ते आहे । अग्निचं घर ।
घरात अग्न असुन । काहो हिंडता बाहेर ? ।
॥ अंतरीचा देव नाही ओळखला । हिंडे बाहेर ।
बाहेर पाहता पाहता आयुष्य । वाया गेले जाण ॥
॥ देहीतला देव नाही ओळखला । ज्या प्राण्यानं ।
केले तिर्थ गेले वाया । झाला हीन ॥
॥ महा महा ऋषि बसले । विचार करून ।
आत्म ग्यान शोधल्या शिवाय । नाही तत्व ग्यानं ॥ खंड०२/४७

हे सर्व तिरलोक्यातील तिरगुणी अवतार सह तिरगुणी जन त्या चौथ्या व्दारे चेतवलेल्या चैतन्य च्या भरवश्यावर मेखी मारत बसले आहेत. जे देहीच चैतन्य आहे, ते या जगाला दिसत आहे. परंतु त्या चैतन्याचा पुरवा असलेल्या त्या चौथ्या चतुर्पती आदीरूप आदीपुरूष धन्याला ओळखत नाही. तिरगुणी मायेने त्यांच्या दृष्टीवर झापड टाकल्यामुळे त्यांच्या ज्ञानदृष्टीत तो चौथा येत नाही. किती हे अज्ञान ? चौथ्याला ओळखीचेच ओळखतीन जीव हो !

हा चौथा चतुर्पती आदीपुरूष धनी हा तिरगुणी मायेच्या पल्याड त्रिगुणातीत आहे. त्याचमुळे जो पर्यंत हे सर्व तिरगुणी जन आपले तिरगुणी ज्ञानाचे तिन शिक्के त्या चौथ्याला अर्पण करणार नाही, तोपर्यंत त्या तिरगुणींना हे चतुर्पती धन्याचे निरंजन चतुर्पती ज्ञान पुर्णपणे न होता ते भ्रांतीत पडुन अर्धवटच राहील. मायने हाती दिलेल्या तिरगुणी ज्ञानाचा प्याला घेवुन धुंद होवुन मायेच्या भ्रांतिच्या भुलवणीतच राहील. अंती तेही याला वेद-शास्त्राप्रमाणेच नेती-नेती म्हणत, न जाणता येणारा न जाणता येणारा असे ओरडत लबाड म्हणत राहील. कारण की : या तिरगुणांचं कुळच लबाड आहे. सत्ता अभिलाषा पोटी तिरलोक्याचे तिरगुणी अवतार सह तिरगुणी जन या आदीरूप आदीपुरूष धन्याच्या चतुर्पती ग्यानाला लबाड म्हणत राहतीन. लबाडी करत राहतीन.

त्याच्या या लबाडीमुळेच हे चतुर्पता गाय पडीत टाकल्या गेली होती. परंतु कृष्णाजीन आणलेल्या भैसाच्या यवगाच्या मांडणी मुळे तिरगुणींनी पडीत टाकलेली चतुर्पता गाय वेळोवेळा उभी राहली आहे/राहत आहे/राहणार आहे. तिरलोक्याला याची खबर नाही. आता शुध्द करा हे आपलं कुडं/कुळं !

वेदशास्त्रांच्या ज्ञानात तर सत्व रज व तम या तीन गुणांचेच विवरण केले आहे. या तिरगुणी ज्ञानाला हाती घेवुन हे वेद जेव्हा या आदीरूपाला शोधतात, तेव्हा हा चौथा आदीरूप या वेदांनाच गोंधळात टाकतो. म्हणुनच :

हे ज्ञानीजन हो ! भले पंडितजन हो !

ही सर्व काम्यकर्मे तिरगुणांनी व्याप्त असुन त्यापासुन संसाराची पुनरावृत्ती होवुन ८४-शी च्या फे-यात फेकल्या जाते. म्हणुनच या तिरगुणांचे ओझे टाकुन या तिरगुणांच्या पलीकडे जावे.

तिरगुणांच्या पलीकडे उभ्या असलेल्या आपल्या मुळच्या धन्याकडे पाहावे. त्याकरीता धन्याची आस धरून चतुर्पती ज्ञान-भक्ती च्या कामी लागावे. नेहमी चतुर्पती नामी राहुन सत्‌कृत्यात करत शुध्दसत्वगुणांत निमग्न व्हावे. म्हणजे या सत्‌कृत्याच्या सत्‌च्या अधिक्याने तुम्ही त्रिगुणातीत व्हालं. तिरगुणांच्या पलीकडे जालं. तिरगुणांच्या पलीकडे गेल्याशिवाय तो चौथा प्राप्त होवु शकत नाही. हे त्रिकालबाधीत सत्य आहे. याकरीता आदीपुरूष चतुर्पती कृष्ण अवधुत धनी चा हा चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ उभा असुन यातं चौथ्या चतुर्पती चे ज्ञान सह सर्वकाही दिले आहे.

चतुर्पती पंथाच्या चतुर्पती ग्यानाला तिनही गुणांचा बंध नसुन, ते आत्मतत्व व्दारे आत्मस्वरूपात रममाण करणारे आहे. या चतुर्पती ज्ञानात कुठेही तिरलोक्यातील तिरगुणांचे राजे ब्रम्हा विष्णु महेश तसेच तीरगुणांचे ईतर अवतार, देवी-देवता ईत्यादी तिरगुणींची किर्त महीमा, कथा व स्तुती, व्रत-वैकल्पे, कर्मकांड, साधन-पुजंन मुर्तिपुजा ईत्यादी नसुन यात फक्त त्या तिरगुणांच्या पल्याड उभा असलेल्या अव्यक्त निराकार निराधार निर्गुण परमात्माची चतुर्पती चे ज्ञान ध्यान भक्ती प्रेम सुमरन आहे. तसेच तिरगुणांच्या पलीकडे पाहुन तिरगुणांच्या पलीकडे उभ्या असलेल्या आदीरूप परमात्माला शरण जाण्याचा भजन पुजन ध्यान ज्ञान-भक्ती सुमरन चा सुलभ मार्ग आहे. या मार्गात त्या चौथ्याची प्रेम, ज्ञान, भक्ती, भाव, भजन, पुजन, ध्यान, सुमरण व आत्मतत्वे सह आत्मस्वरूपी आत्मज्ञानाव्दारे आत्मज्ञानी होवुन परमात्मा प्राप्ती करून घेण्याचा बोध आहे. या सुलभ मार्गात मुळयवगाचे ज्ञान, मुळयवगाच्या धनीदेव चे निरंजन ज्ञान, देह व जीवाचे ज्ञान, ध्यान योग ज्ञान, भाकल्या शकुनाचे भकीत ज्ञान, उपदेश बोध.. ईत्यादी सर्वकाही ज्ञान अंर्तभुत आहे. या चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाच्याच भुम्मेवर तो चौथा चतुर्पती आदीरूप आदीपुरूष भैस उभा आहे. तो भक्तजनांना अनुभवांचे गाठोडे भरून देत आहे.

आम्हाला या चौथ्याचा प्रकाश लाभला. तसाच तुम्हासही लाभावा. या इच्छेपोटीच या चतुर्पता कृष्ण अवधुत पंथाच्या भुम्मेवर येण्यासाठी आम्ही चतुर्पतीचे सर्व भक्तजन तुमची उत्सुकतेने वाट पाहत आहोत. या चतुर्पता कृष्ण अवधुत पंथाच्या भुम्मेवर तुमचे मान सन्मानासह स्वागतच करण्यासाठी उत्सुक आहोत. काही ना काही आदरसत्कार देण्यासाठी आतुर आहोत. आमच्या अनुभवांवरून सांगतो की : या चतुर्पती धन्याकडुन इथे सच्च्या भक्तीव्दारे तुम्हास तिरगुणी बंधाच्या बाहेर काढुन काही ना काही देणं ही मिळेल. एवढं मात्र निश्‍चित आहे हो !

हे कृष्णा ! हे तुमच्या चतुर्पती बागेत ओवीरुपात असलेले तुझेच प्रथम फुलपुष्प तुलाच अर्पण करतो.

॥ श्री ॥

॥ कृष्ण महाराजा धनी अवधुता । तुमच्या चरणी आहे माथा ॥
॥ तुझेच फुलपुष्प, तुलाच वाहतो । निमित्याकारण दर्शना येतो ॥
॥ निमित्याकारण तुम्ही धरला हात । तुमचीच वाणी, तुम्ही सांगाव हृदयात ॥
॥ वाणी हृद्‌यात/मिर्तलोकी सांगतली । चर्तुपति नामाची, ज्योत उजळली ॥
॥ सांगी झाली अंतराळी । महाराजा पुर्ण करून दयाहो सही ॥

**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०१ ॥

॥ गण नं. ०२ ॥

॥ निरसनसह मुळावरचा गण ॥

## ॥ साहित्रावर उभा । गण हा..॥

॥ साहित्रयावर उभा ऽ..। गण हा आला सागरचा
जीवन या भक्तीच्या करिता ॥ ०१ ॥
॥ प्रथम ऐकला ऽ..। तेव्हा तो, अगुचर झाला
देहे-जिवांचा संग केला ॥ ०२ ॥
॥ कुठच नव्हत काहि ऽ..। हे रुप आहे अगुचर
जिवन हे मोक्षाच घर ॥ ०३ ॥
॥ कुठच नव्हत काहि ऽ..। हे रुप, आहे अनिवार
लाल हि-याची गणिता कर ॥ ०४ ॥

॥ घनन घनघनकार ऽ..। कोठे होता धुम्मधुम्मकार
सोहंम् रुपाचा हा अवतार ॥ ०५ ॥
॥ बनवली मेदनी ऽ..। बनवले स्वर्ग-मृत्यु पाताळ
शकुनी झाला सारा विस्तार ॥ ०६ ॥
।। शकुनाचं साहयं । उभ केलं तिनताळ । हा होय धन्याचा खेळ ।।
॥ बनवले निर्गुण ऽ..। बनवलं माया-चैत्यन्य
खेळ मांडला मालकानं ॥ ०७ ॥
॥ बनवला सागर ऽ..। बनवलं पाणी पवन
अष्टगण करते सुमरणं ॥ ०८ ॥
॥ चारहि रंग वर्णुका ऽ..। गण हा चरंचारी आला
सिध्द करे भक्ताची वाचा ॥ ०९ ॥
॥ पुर्विस्ताचा दोरा ऽ..। साहृय केलं प्रभुनं
हेच होय घुताचं देणं ॥ १० ॥
॥ अमृताची वाणी । संचित जडलं या नामानं ।
जागी करा हो तिरभवनं ॥ ११ ॥
किंवा ।। अमृताची वाणी । विघ्ने जळतीन नामान । जागी करुन दाखवनं ।।
॥ जगाच्या माहेरा ऽ..। अर्ज करुन ओवाळीतो
जागी करुन दाखववजो ॥ १२ ॥

॥ मोडनं देहित्र । मोडन त्रिरित्र ऽ..। उभ करन साहित्र
गण हा चरंचारी आला । सिध्द करे भक्ताची वाचा ॥ १३ ॥

भजने :-
॥ गण हा आला सागरचा । साहृय भक्तीले भक्तीले झाला ॥
॥ साहृय करा साहृयवंता । पदरी धरा महाराजा अवद्युता ॥
॥ पदरी धरलं ऽ नका जाउ दूरं । लोट मारतो देवाच्या चरणावर हो ॥
॥ तुमचे चरण माझी डोही । हो हाच करार ।
भक्त जनांवर, करावं दया । बहु यवग तारं ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

## ॥ साहित्रावर उभा । गण हा..॥

### ॥ निरसन/स्पष्टिकरण ॥

॥ साहित्रयावर उभा । गण हा आला सागरचा
जीवन या भक्तीच्या करिता ॥ ०१ ॥
॥ प्रथम ऐकला । तेव्हा तो अगुचर झाला
देहजिवाचा संग केला ॥ ०२ ॥

जेव्हा कुठच नव्हत काही, तेव्हा त्या मुळयवगी आध्यात्मीक द्रव्यांचा/जलांचा १४ जुग पुरुन उरेल एवढा विराट जलाचर/सागर अनंत यवगी होता. आणी या जलाचराला भरुन भरलेला आणीक उरून असलेला तो आदीरुप निराकार निराधार आदीपुरुष महाराज चरांचर व्याप्त होते. आणीक त्याचे तेजोगुणी अंश असलेले आत्मगडी होते त्यांच्या बराबर संगतीन होते.

प्रथम एकला असलेल्या त्या आदीरुपाने त्यांच्या चरांचर व्याप्त असलेल्या मनात 'मो-ह सृष्टी रंचावी' असे इच्छिले होते. आणी सृष्टी रंचनेचे कार्यासाठी ते आदीरुप निराकार-निराधर-निश्कलंकी सोहंम् ज्योत रुपात उभा झाला. आदीरूपाच्या त्या निरंजन चैतन्य ज्योतीची छाया ही प्राण स्वरूप घेवुन उत्पन्न झाली. सृष्टी रंचनेचे कार्य सुरु झाले. या ज्योतीच्या दिव्य चैत्यन्य प्रकाशाव्दारे त्या जलाचरांतील सर्व तत्वात प्राण संचारला.

या जलाचरातील सृष्टिनिर्मितीस सक्षम अश्या तत्वांसह सुक्ष्म रुपात असलेल्या अन्न-अग्न, पाणी-पवन, आकाश-धरणी या सहा मुख्य निराकार नरांचा साचा सचल्या गेला. या सहाही नरांना साहयं करत तो या साहीत्रा वर उभा झाला. खंड०१/०१/०१:-आदीपुरुष आदीगण च्या निरसनातुन अधिक ज्ञान घ्या.

सृष्टी साकार करण्यासाठी अन्न-अग्न, पाणी-पवन, आकाश-धरणी या सहाही तरायावर तो साहंकारी निराधारी चैत्यन्यमय निश्कलंकी सोहंम् ज्योत रुपात दर्शनी उभा राहीला. तो गण सागरचा या सहांचा कार निभावत सृष्टीत यवगान यवगात जिवन या भक्तीचा निभाव करण्याकरीता आला आहे.

अन्न-अग्न, पाणी-पवन, आकाश-धरणी हे सहा तर मुळचे निराकार-निर्गुण आहे. या सहा नरांचा ज्याने साचा सचवला तोही निराकार-निराधार-र्निगुण आहे. आणी त्या सहानर साच्यात ओतलेले आत्मचैत्यन्य हेही निराकार-र्निगुण आहे. निराकार-निराधार-र्निगुण अश्या आदीपुरुषाचे विर्य म्हणजेच त्याचे तेजोगुणी अंश असलेले आत्मे या साच्यात प्रवेशी केले. या आत्मपुरुष च्या छायेने म्हणजेच या आत्म्याच्या चैत्यन्यमय ज्योतीच्या छायेने सहानर साच्यात प्राण उद्‌भवला.

जशी या देहिची प्रकाशात छाया पडते, तशीच छाया या आत्म्यपुरुषाची पडुन तेथे प्राण र्निमाण होत असते. या आत्मपुरुषाची छाया म्हणजे प्राण ! या आत्माच्या छाया म्हणजे प्राण याच्याव्दारे सहानर साच्यामध्ये देहिची रंचना होवु लागली. सृष्टी साकारु लागली.

॥ अन्न-अग्न, आकाश-धरणी । पाणी.पवन ।
या देहीला तारु आहे, हे सहा जन ॥

या सहाही नराला देहिचे तारु बनवुन सहानर साच्यातुन सगुण स्थुल रुप आकारले आहे. या सहाही नरांशी एकरुप होत त्या एकल्या नराने सृष्टीत जीवन जन्मा घातले आहे.

त्याने जन्मा घातलेले जीवन हे भक्तीच्या कामा करीता सच्चेपणाने झिजण्यासाठी आहे. सच्च्या भक्तीच्या कामाकरीताच सदा साह्य करत चैत्यन्यमय ज्योत रुपात तो निराकार-निराधार आदीपुरुष या सृष्टित उभा आहे.

॥ अन्न-अग्न, आकाश-धरणी । पाणी पवन ।
या देहीचा तारू उभा, तो निरंजन ॥

या देहीला तारणारा तारू असलेला निराकार निराधार आधीरूप आदीपुरूष धनी हा आपला अंश अवतार घेवुन या जगाच्या देखताच निरंजन चैत्यन्यज्योत स्वरुपात प्रतेक सजिवात चैतन्य उधळत आपल्या चैत्यन्य प्रकाशाची साक्ष-गाही देत या जगाच्या दृष्टिसमोर उभा आहे. परंतु ही त्याची गाही सांगता सांगुनीया हे जग त्याला ओळखेना ! हे दुःख काय सांगु आमचे ! सर्व विश्वातिल चैत्यन्य हे दुःखं चांगले पाहत आहे. कारण हेच चैत्यन्य जगाच्या देखता जगाच्या डोळयासमोर प्रतेक सजिवात उभे आहे. असो.

या सृष्टीर्निमितीत आधीस्थानाच्या जलाचरांतील सुक्ष्मतत्वांसह आपले तेजोगुणी आत्मगडी यांच्याशी एकरुप-अगुचर होवुन तोच प्रथम एकला असलेला नराने या देहे-जिवांशी संग यवगान यवगा केलेला आहे.

॥ कुठच नव्हत काहि ऽ हे रुप आहे अगुचर
जिवन हे मोक्षाच घर ॥ ०३ ॥
॥ कुठच नव्हत काहि ऽ हे रुप आहे अनिवार
लाल हि-याची गणिता कर ॥०४॥

जेव्हा कुठच नव्हत काही, तेव्हा तो यांच्याशी एकरुप-अगुचर झाला. जेव्हा तो अगुचर झाला, तेव्हा त्याचे रुप अनिवार म्हणजेच न आटोक्यात येणारे, न आकळता येणारे, न वर्णण करता येण्यासारखे होते. असा जो तो जेव्हा सहानर साच्या रंचुन या सृष्टित तेजोगुणी अंश रुपात अवतरला, तेव्हा सजीव आकार साकारला. हा तेजोगुणी अंश अवतार जेव्हा काही नरदेहीच्या शुध्दसत्व च्या अधिक्याने त्यांच्या देहीत प्रकाशला, तेव्हा काही काही नरदेह त्याच्या प्रकाशाने प्रकाशीत झालेत. जाणते झालेत. आणी त्या चौथ्या धन्याचे गुण वर्णण करण्याचा प्रयत्न करु लागलेत. चौथ्या धन्याला जाणण्याचा प्रयत्न करू लागलेत. चौथ्याला तिरगुणी ज्ञानाने आकळण्याचा प्रयत्न करु लागलेत. परंतु त्यानां बळ करीता तो आकळेना ! शेवटी थकुन तेही त्याला न जाणता येणारा ! न जाणता येणारा म्हणत चुप्पी मारुन घुमं घालुन बसले. आणी चुपचाप त्या आपरूप धन्याचे ध्यान करत बसलेत. तो चौथा आपरूप धनी ज्या आकारात ज्योतस्वरुपी प्रकाशमान झाला. ज्योतस्वरुपी खेळला. त्या आकारालाच सर्वसामान्य भक्तजनांनी मान सन्मान देवुन त्या नरदेहीच्या आकारालाच भजु लागलेत.

ज्या ज्या आकारात तो लाल निराकार-निराधार आदीपुरुष ज्योत स्वरूपात अंर्तभुत होवुन खेळला. असे सर्व आकारी देहे आपआपल्या क्षेत्रात लाल हि-याप्रमाणे प्रकाशमान झालेत. त्यां नरदेहीचे आत्मे लाल हि-याप्रमाणे प्रकाशीत झालेत. असे लाल हिरे त्याने देहे धरत यवगान यवगात अगणीत उत्पन्न केलेत. तेच लाल हिरे त्याच्या नामाची किर्त महीमा जगात वाढवत आहे. असेच यवगा यवगीचे आत्माराम ! याहीची किर्त महिमा जगात वाढवत आहेत.

॥ हिरा हिरा तो लाल हिरा, भक्ती परवेशी ।
तुया नामाची किर्त महीमा । जगात वाढवली ॥
॥ यवगा यवगीचा आत्माराम । याहीची किर्त महीमा जगात वाढवनं ॥

जसा नागाच्या मुखात असलेला लाल हिरा हा मागीतलेले ईच्छित फळ देतो. तसेच नरदेहीत लाल हि-याप्रमाणे प्रकाशीत झालेल्या आत्मांव्दारे ती नरदेही फळ देवु लागलेत. जेजे बोलन त्यांची नरदेही करन, तेते सिध्द करण्यासाठी तो आदीपुरूष त्यांच्या बोलावर उभा राहुन त्यांचे बोल सिध्द करु लागलात. त्यांची किर्त-महीमा जगात वाढवु लागला. त्यांचा संग करु लागला. असे लाल हिरे पुढे इश्वर-देव, साधु-संत-महंत, ऋषि-मुनी, योगी-जोगी, दिव्यात्मे-महात्मे, जाणते व इतर शक्तियॉ.. ईत्यादी नामाने ओळखले जाउ लागलेत. आदीपुरूषाच्याच आंगचे त्याचेच तेजोगुणी अंश असलेले ऐसे हे लाल आत्मे हे आदीरूप आदीपुरूषाची सच्ची भक्ती करण्याकरिता या सृष्टित प्रवेशी होवुन प्रकाशीत होवु लागलेत. आणी ईच्छित फळ देवु लागलेत. निराकार-निराधार आदीरूप आदीपुरूषाच्या नामाची किर्त-महीमा या जगात वाढवु लागलेत. असे अगणित लाल त्या आदीपुरूषाने या सृष्टित दिलेत. आणी पुंढेही देत राहणार. यवगान यवगात जन्म घेत घेत हरीच्या नामाची किर्त-महीमा जगात वाढवत ठेवणा-या या आत्म्यांची म्हणजेच या लाल हि-यांची गणिता कर । यवगा यवगीचे हे आत्माराम । याहीची किर्त महिमा जगात वाढवत आहेत.

असाच एक लाल हिरा कृष्ण महाराज आहेत. यवग गेले चरांचर, हा कृष्णा या लाल हि-यांच्याही पुढे गेलेला आहे. सर्व योगी याहीच्या पुढं गेलेला आहे. आदीपुरूष पुर्ण अवतार झाला आहे. कृष्णामृत तसेच खंड०२/ओवी-१६ :- जाहीरण केली, त्वा मोहर वाजवली. या ओवी मधुन अधीक ग्यान घ्यावे.

लाल हि-याप्रमाने नरदेही प्रकाशमान होण्यासाठी आत्मग्यानी होवुन सत्कृत्यात राहुन शुध्द सत् च्या सच्या भक्ती भावाने त्या धन्याच्या अवताराला स्वतःच्या देहित प्रकाशमान करण्याचा सतत प्रयत्न करीत रहावे लागते. सच्या भक्तीचे काम आपल्या आंग करावे. कुणाचीही लाज लज्जा भिति न बाळगता, सच्च्या भक्ती-भावाचे काम सतत निरंतर अखंडपणे करत राहावे. शुर विर खेत्री प्रमाणे प्रतेक अडचनीवर मात करत पुढे पुढे जात राहावे.

या करीता आपल्या देहित निश्कलंकी मांडणा करत रहावे. या देहितील षटविकारा सह इतर विकार व दोषांना दुर करण्याचा सतत प्रयत्न करीत राहावे. देहितील कलंकाला हळुहळु धिराईने दुर करत, या देहिला धिराईने निश्कलंकी बनवन्यास प्रयत्नरत् राहत, या देहित निश्कलंकी मांडणा करत जावे.

या कार्यात तो आदीपुरुष सदा साह्य करेलं. जेव्हा खरोखरच गरज तेव्हा उभा राहुन मदत करीत राहील. गाही देत उभा राहील. जेव्हा कधी निरंजनी भेट देईन, तेव्हा त्याला मुजरा करा. विनवनी करा की : नुसतीच काही क्षणाची भेट न घेता, आता ‘सांग लवकर ! कधी याल या देह भुम्मेवर’ ! असे विनवत राहा. त्याला आणाभाका घालुन विनवनीपुर्वक दाई म्हणजेच शपथ घालुन, मुजरा आहे बा अवद्युता ! असे विनवनीपुर्वक म्हणत त्याला अर्ज करा की :

॥ निरंजनी भेटी देता । मुजरा आहे बा अवधुता ।
मोडा चौ-यांशीच्या वाटा ॥ ०२/४१
॥ ईच्छा पुर्ण कर माझी । या देहीतुन जावुच नको कयी ।
असो तुया रूपा-सुखाची गाही ॥ ०५/७६

जेव्हा जेव्हा तु या देहित निरंजनी भेट देशील, तेव्हा तेव्हा या देहितुन जाउच नको कधी ! या देहिवर असो तुमच्या रुपा सुखाची गाही-साक्ष !

असे विणवणी पुर्वक म्हणत म्हणत त्याला या निश्कलंकी देहिच्या निर्गुण गादीवर बसुन ठाण मांडण्याची सदोनित विनंती करावी. आत्मज्योती मध्ये त्या निश्कलंकी भैसाची ज्योत अंर्तभुत करण्यासाठी प्रयत्नरत् रहावे. त्या धन्याच्या भजन पुजन सुमरन व्दारे भक्ती भाव उंचावुन आत्मज्योत प्रकाशीत होण्यासाठी सतत प्रयत्न करीत राहावे. असेच या देहिला त्या निराकार निराधार आदीपुरुषाकडुन प्रकाशमान करुन स्वतःही लाल हि-याप्रमाणे प्रकाशीत होण्याचा सतत प्रयत्न करीत राहावे.

आपले जिवन हे त्या आदीपुरुषाने दिलेले देणं समजुन या जिवनातच मोक्षाचे घर शोध ! आपले जिवन हे त्या आदीपुरुषाच्या घरापर्यत जाण्याचे साधन आहे असे समजुन राहा. या जिवनाला आपले नियत स्वकर्तव्य करत सतत भक्तीच्या कामी ठेवावे. भक्तीचे काम आपल्या आंग करावे. या जिवन-मरणाच्या चौ-यांशीच्या फे-यातुन मुक्त होण्यास पाण्याबाहेर आलेल्या मासोळी प्रमाणे तडफडत राहावे. सरतेशेवटी त्या आदीपुरुषाच्याच साह्याने या जीवनातुन मुक्त होवुन आपल्या त्या आदीपुरुष धन्याच्या घरी म्हणजेच आपल्या मुळ घरी आस-याला जावे लागते.

॥ घनन घनघनकार ऽ कोठे होता धुम्मधुम्मकार
सोहंम् रुपाचा हा अवतार ॥ ०५ ॥

आधीस्थानी पराप्रकृती मध्ये घनन घन कार व कोठे कोठे नादब्रम्हाचा धुम्मधुम्मकार होता. तेव्हा त्या आदीरुपाने सोयंम म्हणजे स्वतः उभा राहुन निरंजन सोहंम ज्योत रुपाचा अवतार घेतला. त्या मुळघरच्या सोहंम् ज्योत रुपी अवतारानेच या पृथ्वासह ही देहरुपी धरणी-मेदनी बनवली आहे.

॥ बनवली मेदनी ऽ बनवले स्वर्ग-मृत्यु पाताळ
शकुनी झाला सारा विस्तार ॥ ०६ ॥

'मो-ह सृष्टी रंचावी' असा त्या निश्कलंकी सोहंम् ज्योतीच्या सर्वव्याप्त मनात शकुन आला. आणी सृष्टिरंचनेचे कार्य सुरु झाले. अन्न-अग्न, पवन-पाणी, आकाश-धरणी ईत्यादी जे आधी सुक्ष्मताःसूक्ष्म रुपात होते, ते या सृष्टि रंचनेत स्थूल रुप घेवु लागलेत. सुक्ष्म अश्या सहा-नरांचा त्याने साचा बनवला. या साच्यात त्याचे तेजोगुणी अंश असलेले आत्मे आपल्या धन्याच्या सृष्टिनिर्मितीच्या इच्छाची पुर्ति करीता उडया घेवुन प्रवेशी होवु लागलेत. या सहानर साच्याव्दारे प्रकृतियोनी मध्ये प्रवेश करुन सृष्टिमध्ये प्रवेशी झाले. या तेजोगुणी आत्माच्या म्हणजेच या आत्मपुरुषाच्या चैतन्यप्रकाशात पडलेल्या छाया व्दारे सहानर साच्यात प्राण निर्माण होवुन तेथे जिवनकळा ज्योत उभी झाली. या जिवनकळा ज्योतीने देहिची रंचना करुन देहे आकारात आणलीत. ही देहधरणी म्हणजेच मेदनी बनवली.

एवढच नव्हे तर त्याने स्वर्ग-मिर्त-पाताळ हे तिनही ताळ ब्रम्हांडी या पिंडी बनवुन हे तिन्ही या देहरुपी मेदनी वर वसवलेत आहेत. नर-देहिचा कमरे खालचा भाग हा पाताळ होय. तर कंमर ते मान म्हणजेच धड हा भाग मिर्तलोक होय. आणी मस्तक हे उर्ध्व स्वर्गलोक होय. या स्वर्गात अमृतासह विविध सिध्दीयॉ, शक्तियॉ.. ईत्यादी त्याने वसविल्या आहे. हे सर्व त्याच्या मो-ह सृष्टि रंचावी या शकुना व्दारे झालेले आहेत.

अश्या रितीने त्याने त्याच्या ***मो-ह सृष्टी रंचावी*** या शकुनाच्या व्दारे ही अनेक ब्रम्हांड निर्माण होवुन त्या अनेक ब्रम्हांडात अनेक सृष्टियॉ निर्माण होवुन त्यापैकी एका सृष्टीवर ही देहरुपी मेदनी बनवली आहे. आणी त्या मेदनी वर स्वर्ग-मिर्त-पाताळ हे तिन ताळ बनवले. चौथा ताळ ठेवला आहे.

सृष्टीयॉं च्या विस्तारा आधी ऐसा हा शकुन निघाला होता. तो मुक्ष्य पणे आपल्या सर्वव्यापी मनी बोलला होता. ज्योत उभी राहली. या ज्योतीने मो-ह सृष्टी रंचावी ही ईच्छा बाहेर फेकली. या ईच्छेसंग त्याने आपल्या आंगचे तेजोगुणी अंश बाहेर फेकल्या गेलेत. या तेजोगुणी अंशाव्दारे बनले हो प्रथम निर्गुण उभा झाला. निर्गुण असा आत्मगण स्थापला गेला. या निर्गुणाचा संगम झाला. आदीगणाची ईच्छा ही त्याची शक्ती झाली. या शक्तीने पुढे सृष्टी निर्मितीस देण देवुन साहयं केलेत. याहीच्या साहयाने सृष्टी निर्माण झाली. गण ०१:- आदीपुरूष आदीगण व मुळवरच्या शक्तिची ओवी खंड०१/०२/०१ मधुन अधीक ग्यान घ्या.

॥ बनवले निर्गुण ऽ बनवलं माया-चैत्यन्य
खेळ मांडला मालकानं ॥ ०७ ॥

मुळयवगी असलेला धुम्मधुम्मकार नादब्रम्ह व ज्योत एकवटली. अगुचर झाली. जेव्हा ते अगुचर झाले, तेव्हा तेथे र्निगुण उभा झाला. या र्निगुणाच्या संगमाने माया-चैत्यन्या शक्ती प्रकटली. शक्तिच्या प्रकटीकरणाच्या अधिक ग्यानाकरीता खंड०१/०१/आदीपुरूष आदीगण व मुळवरच्या शक्तिची ओवी खंड०१/०२/०१ मधुन अधीक ग्यान घ्या.

आदीपुरुष भैस नारायणाने या मायाचैत्यनेला आपल्या अध्यक्षतेखाली घेतले. आणी तिच्या प्रकृतिरुपी योनीत आपले तेजोगुणी विर्य म्हणजेच त्याचे अंश असलेले आत्मारुपी गडयांना प्रवेशी बनवले. हे निर्गुण आत्मगडी आपल्या धन्याच्या इच्छापुर्ति करीता सृष्टित परवेशी-प्रवेशी झालेत. आणी यांच्या छायाव्दारे तेथे प्राण र्निमाण होवुन, हा प्राण या आत्म्याच्या चेत्यन्यप्रकाशत उजळुन जिवनकळा ज्योत उभी झाली. ही जिवनकळा ज्योत देहे आकारु लागली.

ऐसा प्रथम निगुण थापला. त्या र्निगुणाच्या संगमातुन सगुण-र्निगुण मायाचैत्यन्या उभी केली. आणी या मायाचैत्यन्याच्या प्रकृतियोनी व्दारे सृष्टीयॉं जन्मा घातली. आणी त्या मालकाने मुळयवगाच्या सुक्ष्म निराकार पाणी, पवन, सागर, ईत्यादीला स्थुल रुपात बनवुन या सृष्टित खेळ मांडला आहे.

॥ बनवला सागर ऽ बनवलं पाणी पवन
अष्टगण करते सुमरणं ॥ ०८ ॥
॥ चारहि रंग वर्णुका ऽ गण हा चरंचारी आला ।
सिध्द करे भक्ताची वाचा ॥ ०९ ॥

मुळयवगी निराकार सुक्ष्म तत्वें-द्रव्यें असलेला चौदा जुग पुरुन उरेल एवढा विराट जलाचर-सागर अनंत यवगी होता. त्याच सागरातील निराकार सुक्ष्मजलाला म्हणजेच त्या सुक्ष्म पाण्याला त्या मालकाने या सृष्टित स्थुल रुपात रुपांतरीत करुन त्यांचे अवतरन या सृष्टीत केले आहेत. इथेही सागर बनवला. आकाश-धरणी, पाणी-पवन, अन्न-अग्न, चारही खाणी, आणी या चार खाणीतील कित्येक रंगारंगाचे देहे, तिन ताळ, त्रिलोक, चौदा भुवन, अष्टगण, अष्टभैरव, अष्टशक्तियॉं व सिध्दियॉं सह सर्व देवगण, असुरगण, शाक्तगण.. ईत्यादी बनवले आहेत. आणी या सर्वासह जे आपल्याला माहित नाही ईत्यादी मध्ये तो भरुन भरला आणीक उरला आहे.

हे सर्व अष्टशक्तियॉं, अष्टगण, अष्टभैरव, व तिनदेवसह सर्व देवगण, सिध्दियॉं ईत्यादी या चौथ्या चतुर्पती निराकार निराधार निश्कलंकी आदीपुरुष धनी देवराया चे सुमरण, जप-ध्यान यवगान यवगात आपआपल्या ईष्टदेवतांचे नाव समोर ठेवुन करत आहेत. म्हणुनच चरणे गर्जुन सांगी करतात की :

॥ ब्रम्हा विष्णु तिरनयन । माये पासुन ।
त्यांना या रायाचं देणं । तेही करते याहीचे सुमरन ॥
॥ शेष शयनी, क्षिर सागरी । लक्ष्मी नारायण ।
लक्ष्मी-नारायण, त्याहीनं धरले याहीचे जपध्यान ॥
॥ शेष सयन्य, सहस्त्र मुख । करते सुमरन ।
करते सुमरन, जळी-स्थळी ऋषिकेशी, जपीतपी,
..अष्टगण अष्टभैरव अवघे जन ॥ खंड१०/०१/०६ कृष्ण सावळा

जरा मनीच प्रश्न विचारा की : 'शीव कुणाचे घ्यान करत कैलासी बसलेला आहे ? विष्णु कुणाचे घ्यान करत क्षिरसागरी बसलेला आहे ? ब्रम्हा कुणाचे घ्यान करतो ? सनातन काळी आकाशवाणी करणारा कोण ? सत्यवगी भक्ताच्या बोलावर उभा राहणारा कोण ?...

या त्रिदेवांसह, सर्व देवगण, देवी-देवता, अष्टगण व शेष सैन्य, ऋषि-मुनी, योगी-जोगी, भक्तगण सहस्त्र मुख या निराकार-निराधार आदीपुरुषाचे यवगान यवगात सुमरण करत आहेत. 'कैलाशी महेष या निराकार-निराधार आपरूप आदीपुरुषाचे नाम जपत त्याच्याच ध्यानी आहे. .

॥ चौथी खाण महाराज गुण । अस्सल हा वाण ।
अस्सल हा वाण । या रायाचं करते हो जाहीरण ॥ खंड१०/०१/०६

कृष्णा मुखच्या चतुर्पता अथर्वन् वेदात अष्टगण, अष्टशक्तियॉं, अष्टभैरव उभे राहुन या चौथ्या चतुर्पती धन्याचेचे जाहीरण करत आहेत. त्यांचीच ज्ञान भक्ती सह स्तुतिगाण व विनवनी करत आहेत. कृष्णाच्या चारही वाणीतुन निघालेल्या चारही रंगाचे अर्थाने ते चौथ्या धनी चे जाहीरन करत आहेत. कृष्ण धन्याच्या अस्सल वाण चे चारही खाणीतील चारही रंगाचे वर्णण तरी कसे करु ? याचे चारही रंग वर्णु तरी काय ?

या कृष्ण धन्याच्या समोर तर आमची मर्यादित बुध्दि सह सर्व इंद्रिये कमी पडत आहे. हा मुळयवगाचा आदीगण तर येथे चरंचारी आला आहे. इथे अष्टगण, अष्टशक्तियॉं, अष्टभैरव सह सर्व गण त्याचेच सुमरण करत आहेत. तो कृष्ण धनी फक्त भक्तीला पावनारा ! मग ती भक्ती कुणीही कुणाचीही करो ! त्या सच्या भक्ताच्या भक्तीला आपरुप आपनहुन त्या भक्ताच्या घरी जावुन देणं देणारा आहे. त्याला हाती धरणारा-पदरी धरणारा आहे. त्याची वाचा सिध्द करणारा आहे. याहीचे गुण वर्णु तरी काय ?

.असा जो तो निराकार-निराधार आदीपुरुष पुर्ण अवतार कृष्णा या चतुर्पता कृष्ण अवधुत बिर्दावर उभा आहे. भक्तांच्या संरक्षणार्थ भक्तांच्या पुढे-मागे दहाही दिशेने हा दिंगाबर धनी उभा आहे. आणी भक्तही म्हणत आहे की :

॥ आम्ही आहो मुढं मुढ । रस्ता दाखव देवा, होय गा पुढ ॥

आणी तो भक्ताच्यां पुढे-मागे होत आहे इथ । या भक्तांच्या, मार्गातील काटे दुर करत त्याच्या नशिबी असलेले भालीयाचे घाव काटयावर निर्वाळत आहे. कारण की : हे सर्व सच्चे भक्त त्याचेच पुर्विस्ताच्या मुळयवगाचे यवगान यवगातले प्रिय गडी होय.

हे सर्व त्याच्या त्या मुळ घरी येण्याच्या वाटेवर-मार्गावर आहेत. त्याचा काहीतरी पुर्विचा दोरा होता. म्हणुन कृष्ण धनीदेव त्यांच्या घरा आले. आणी त्यांना हाती धरलेत. येथं त्याने हाती धरलेल्या सर्वाला साह्य करत तो प्रभु आदीपुरुष धनी सोहंम् ज्योत रुपात आकाशमात मध्ये देणं देत उभा आहे.

॥ पुर्विस्ताचा दोरा ऽ साह्य केलं प्रभुनं
हेच होय द्युताचं देणं ॥ १० ॥

ज्यांना ज्यांना कृष्ण धन्याने आपणहुन घरी जावुन त्यांना हाती धरून, चर्तुपतिच्या अमृत वाणी चा प्याला पाजला. आणी या चर्तुपति कृष्णअवद्युत पंथात दाखल करुन घेतलेले आहेत. अश्या त्या सर्व भक्तगणांचा या कृष्णाशी काहितरी पुर्विचा दोरा बांधुन होता. म्हणुनच तर हे भौर चंदन त्यांच्या घरा आले आहे. नुसतेच त्यांच्या घरा न येता, त्या सच्या भक्तांना दवंडीच्या प्रमाणे चतुर्पती ग्यान अमृताची वाणी सांगतली आहे. तोच त्यां संच्च्यांचा कर्ता, करविता व बुध्दिचा दाता झाला आहे. आणी त्यांना सदा साह्य करीत अकाशमात मध्ये निश्कलंकी सोहंम् ज्योत रुपात उभा आहे.

मुळयवगाच्या आदीपुरुषाचा पुर्ण अवतार कृष्णाने आपनहुन सच्या भक्ताच्या घरा ज्योत स्वरुपात जाउन सच्या भक्तांना हाताशी धरले आहे. आणी त्यांना दवंडीच्या प्रमाणे चतुर्पतीची वाणी सांगतली आहे. चतुर्पता अथर्वन् वेदाची अकाशमातमधील आकाशवाणी वाणी सांगीतली आहे. म्हणुनच हे सर्व भक्तगण त्यांना अर्जि करत आहे की :

॥ अवद्युता ची संगत घडली । धनी आला आमचा ।
तुम्हा नामी जडलो प्रतिपाळ, करा आमचा ॥ खंड१०/०१/अर्ज-०१
॥ आपन होवुन आले घरा । आम्हा धरले हाती ।
दवंडी च्या प्रमाणे वाणी । सांगतली यवगाची/जगाशी ॥
॥ यवगी मांडणा । भैसाची..! खबर नाही कोणाशी ॥ यवगी मांडणा..

आमचा हा आत्मा त्याचाच तेजोगुणी अंश अवतार आहे. जे सर्व त्या परमात्मात आहे, ते सर्व अंश स्वरूपात या आमच्या आत्म्यात आहे. परंतु देहितील कलंकाच्या काजळीने त्याचा प्रकाश झाकळल्या जावुन तो प्रकाश आम्हास भेटत नाही. देहितील षटविकारासह इतर कलंक दुर करुन निशःकलंकी बनुन निरंजनाच्या प्रकाशाव्दारे देहिला कसे प्रकाशमान करावे ?. याची निश्कलंकी मांडणा कृष्णाने या कृष्णअवद्युत चर्तुपति पंथात करुन ठेवली आहे.

सर्वसाधारण जनलोकाशी आदीपुरूष भैसाच्या यवगाच्या यवगी मांडणा ची खबर नाही. ज्याचे पुर्विचे काही संचित असेल, अश्यांचाच दोरा इथ जुळलेला आहे. त्यांच्या आत्म्याचा आकाशी दोरा मुळयवगापासुन त्या निराकार-निराधार आदीपुरुषाशी जुळलेला आहे. आणी अजुनही या चतुर्पता कृष्ण अवधुत पंथाव्दारे जुळुन आहे. त्यांनाच चतुर्पता अथर्वन वेदाचे निरंजन ग्यान झालेले आहे.

कृष्णामुखच्या चतुर्पता अथर्वन् वेदाच्या निरंजन ग्यान सह सर्व ग्यान असलेले अमृत वाणी चें देण सच्च्या भक्तांना कृष्ण देवातर्फे येथे झाले आहे. हेच होय या द्युताचं देण ! कृष्णाव्दारे मिळालेल्या या चतुर्पती नामाच्या अमृत वाणीच्या देणं व्दारे पुर्विच पुण्य-सचित सह आताचे पुण्य-संचीत जडले आहे. या चतुर्पती नामानं पुढेही संचित जडत राहणार आहे.

॥ अमृताची वाणी ऽ संचित जडलं या नामानं
जागी करा हो तिरभवनं ॥ ११ ॥

कृष्णाने देणं दिलेल्या चर्तुपतिच्या अमृत वाणीने या जन्मी सुध्दा सत्कृताचे, पुण्याचे संचित कृष्णकृपेने जडलं आहे. म्हणुनच चर्तुपतिचे सर्व भक्तगण अर्ज करीत आहे की :

हे कृष्णाजी राया !

तुच दिलेल्या या चतुर्पती नामा च्या अमृताची वाणी व्दारे तुमच्याच कृपेने आम्हा सर्वानां याही जन्मात संचित जडलं आहे. म्हणुनच आम्ही तुम्हास पुनःश्च विनवनी पुर्वक अर्ज करीतो की : असेच संचित नित जडुन या संचिताने आमच्या देहिचे तिरभवन सह तिरलोक जागी करावं. देह जागी करून प्रकाशमान करावी. या देहीच्या आत्मारामाव्दारे तुमची यवगान यवगात किर्त महिमा वाढत जावे.

या देहिच्या पाताळ व मिर्तलोकच्या येशीवर साडेतिन वेटोळे कुंडल घालुन निपचीत पडुन असलेली कुंडलीनी शक्तिला चर्तुपति भजनाव्दारे जागी करुन हरीनामी धिराईने उभी करा.

तर या देहिच्या मिर्तलोकी असलेले, रविचक्र, अनाहृतचक्र व विशुध्द चक्रासह इतर मिर्तलोक च्या देवी-देवता व सिध्दियां यांना जागृत करावे.

तसेच देहिच्या उर्ध्व स्वर्ग लोकातील तालुमुलचक्र, आज्ञाचक्र, सहस्त्रगार चक्र सह इतर चक्रे यावरील विविध सिध्दिया-शक्तियॉं जागी करुन या देहीचं तिरभवन जागी करा हो । जागी करा चौताळी तुमच्या एकाच आरोळी व्दारे ! देह प्रकाशमान करा.

हे जगाच्या माहेरा ! याच कारणासाठी आम्ही अर्ज करून तुम्हा ओवाळीतो :

॥ जगाच्या माहेरा अर्ज करुन ओवाळीतो
जागी करुन दाखवजो ॥ १२ ॥
॥ मोडनं देहित्र । मोडन त्रिरित्र उभ करन साहित्र
गण हा चरंचारी आला । सिध्द करे भक्ताची वाचा ॥ १३ ॥

हे जगाच्या मालका ! आम्ही अर्ज करुन तुम्हास ओवाळीतो की : आता या जगास या देहितील तिरभवनासह सर्व जागी करुन दाखवजो.

तुमच्या कृपेने आम्ही सर्व जाणतो की : तुच या देहितलं त्रय म्हणजेच सत्व-रज-तम हे त्रिरीत्र मोडनारा आहेस. तुच या देहिचे सहाही तर म्हणजेच साहित्र उभ करणारा आहे. तुच अन्न-अग्न, पवन-पाणी, आकाश-धरणी या सहाही तरांचे देणं देवुन या नरदेहीस भक्तीच्या कारण लावणारा आहेस.

कारण की : तुच चरंचारीया भक्तीकारण भक्तगडयांसाठी इथे येवुन उभा झाला आहेस. चरंचारीया येवुन भक्ताची वाचा-वाक्य सिध्द करत, यवगान यवगात उभा आहे. म्हणुनच आम्ही सर्व भक्तगण भजनी विनवनीपुर्वक म्हणतो की :

॥ गण हा सागरचा आला । साहृय भक्तीले भक्तीले झाला ॥
॥ गण हा सागरचा आला । साहृय भक्तीले भक्तीले झाला ॥
॥ साहृय करा साहृयवंता । पदरी धरा महाराजा अवधूता ॥
॥ पदरी धरलं, नका जावु दूर । लोट मारतो देवाच्या चरणावर हो ॥

**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०१ ॥
॥ गण नं. ०३ ॥
॥ निरसनसह मुळावरचा गण ॥

## ॥ आदीगण नेमला । गण हा..॥

॥ आदी गण नेमला । गण हा, उध्दारी या जीवाला/देहेला ।
गण हा, उध्दारी या देहीला/जीवाला ॥ घृ ॥

॥ जेंव्हा, कुठच नव्हत काही । हे सर्वच निरसुन पाही
आधी, गण होता गोसाई/गोस्वामी । भागवंता ची गाही ।
मो-हें, शिरष्टी रंचावी..। ऐसे इच्छिले मनी ।
शिरष्टी, रंचना रंचली । खेळ मांडला माया-मोहनी ।
याहीचा, प्रताप आम्हा आठवला । आदीगण नेमला ॥ ०१ ॥

॥ गण हा, ऐका थोर महंती । येरवी काय जाणती ।
मुर्ख, मळीचा गण स्थापती..। त्याची होइन माती ।
जेव्हा, गिरजा-शंकर नव्हती । तो गण आणा चित्ती ।
तो गण उध्दारी या जीवाला । आदीगण नेमंला ॥

॥ आदी, गण मग मंडयान । मग रंचले तिरभवनं ।
आधी, माया केली उत्पन्न । मग केले देवांगण ।
यवगा, यवगी आले आपण । माया, वेष हा धरून ।
गीता, परसली विर अर्जुन । एक, पंडुचा नंदन ।
लेक, परसली या बापानं । माव केली लेकानं ।
धनुष्य, बाणं हाती घेतला । आदीगण नेमला ॥ ०३ ॥

॥ मोहनी, टाकली जीवा वरी । सर्वच आणलं आकारी ।
खेळ, खेळतो नाना परी । आपणं कळ सुत्रधारी ।
कौतुक, पाहतो श्री हरी । उभा अंबेच्या तिरी ।
याहीचा, प्रसाद आम्हा भेटला । आदीगण नेमला ॥ ०४ ॥

॥ बरी हो, कृपा झाली अहिनास । मालुम नाही कोणास ।
चतुर्पति, ज्ञान या देवाचं । याहीचा प्रकाश आहे त्यात ।
मायेच्या, विरहीत याहीची ज्योत । मिळाली या ज्योतीतं ।
पांग, जन्माचा/जीवाचा फिटला । आदी गण नेमला ॥ ०५ ॥

॥ ऐका, कवडीचे पान छप्पन्न । पाची पानी विडा बांधुन ।
उरल्या, सभेशी दया वाटुन । बोलनं खरं होइन ।
आंबा, अपाडी पिकला..। आदीगण नेमला ॥ ०६ ॥

भजने :- ॥ आदीगण भरला देही । धन्याचं बोलनं झालं चौताळी ॥
॥ आदीगण भरला आंगी । धन्याचं बोलनं आहे चौरंगी ॥
॥ आदी गणाचं सुमरनं । सिदाई वाचा या बाळाला देणं ॥
॥ आदीगणांच सुमरनं । कंठी बाळाच्या करा हो गायनं ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ मुळावरचा गण ॥

## ॥ निरसनसह आदीगण नेमला ॥

**-: निरसन/स्पष्टीकरण :-**

॥ आदीगण नेमला । गण हा उध्दारी देहेला ।
गण हा उध्दारी जीवाला ॥ घृ ॥
॥ जेंव्हा कुठच, नव्हत काही । हे सर्वच निरसुन पाही
आदी गण, होता गोस्वामी । भागवंता ची गाही ।
मो-हें सृष्टी, रंचावी..। ऐसे इच्छिले हे मनी ।
सृष्टी रंचना रंचली ॑। खेळ मांडला माया-मोहनी ।
याहीचा प्रताप, आम्हा आठवला..। आदीगण नेमला ॥ ०१ ॥

जेंव्हा कुठच, नव्हत काही..। सर्वच निरसुन पाही :-
खंड०१/०१/०१:-आदीपुरूष आदीगण व खंड०१/०१/०२:-साहीत्रावर उभा या गणांच्या निरसनातुन जेव्हा कुठच काही नव्हत, तेव्हांच सर्वच ज्ञान निरसुन पाहावे. आपणास ग्यान येईल की :

जेव्हा कुठच नव्हत काही, तेव्हा तो निराकार निराधार अखंडतेने चैत्यन्य स्वरूपात चरांचर व्याप्त होता. हेच त्याचे आदीरूप होय.

हे आदीरूप महाराज तेव्हा आणी आताही निराकार निराधार चैत्यन्य रूपात चरांचर व्याप्त आहेत. आणी त्यांचे तेजोगुणी अंशात्मे सह निराकार सुक्ष्म पंचतत्वे, सुक्ष्म ईद्रियसमुह सह ईतर सर्व सुक्ष्मगण जे आपल्या ईद्रियज्ञानाच्या पलीकडचे-इंद्रियातीत आहेत. असे सर्व त्या आदीरूपात होते.

या सर्व निराकार सुक्ष्म तत्व-गणांचा पती तोच आदीरूप होता. तो निराकार निराधार चैत्यन्यरूप आदीरूप या सर्व निराकार गणांचा गणपती होता.

आदीगण होता गोस्वामी..। भागवंता ची गाही :-
आध्यात्मीक विश्वात गाईला ‘गौ‘ या नामाने संबोधल्या जाते. तसेच मुळच्या सर्व निराकार सुक्ष्म तत्वे व सुक्ष्म इद्रियसमुह, तेजोगुणी अंशात्मे ईत्यादी सर्वांना सुध्दा **‘गौ’** या एकाच शब्दाने संबोधल्या जाते. सर्व मुळच्या गौ म्हणजेच गायीचा समुहाचा स्वामी तो आदीरूप असल्याकारणाने त्या आदीरूपाला ‘‘गोस्वामी’’ असे सुध्दा म्हणतात. आदीरूप धन्यालाच ‘‘गोसाई’’ असे सुध्दा म्हटल्या गेले आहे. गोसाई म्हणजे मुळच्या ‘‘गो’’ चा साई=परमेश्वर असा अर्थ होतो. तसेच तो आदीरूप या सर्व मुळच्या ‘गो‘ चा पालक असल्यामुळे त्यालाच गोपाल असेही म्हटल्या गेले आहे.

ज्याने त्रिभुवनसह सर्वच गोविले. आपल्या पायी जो रूपा रूपी मिळे. अकार-उकार-मकार सह अर्धि मात्रा ॐकार आणी सोयंम् हंकार गर्जे. असा जो तो आदीगण गोस्वामी आहे. हा गोसाई सोयंम् निराकार निराधार निश:कलंकी सोहंम् ज्योत रूपात सर्वप्रथम उभा झाला.

मो-हें सृष्टी, रंचावी..। ऐसे इच्छिले हे मनी :-
या निराकार निराधार चैत्यन्यमय निशं:कलंकी सोहंम् निरंजन ज्योतस्वरूपी आदीरूप आदीपुरूष नारायण ने त्यांच्या चरांचर व्याप्त असलेल्या मनात ‘‘ मो-ह सृष्टी रंचावी ’’ अशी ईच्छा धरली. या इच्छेसरशीच तिथे सृष्टीनिर्मितीचा खेळ उभा झाला. तो असा :

आदीरूपाची मो-ह सृष्टी रंचावी ही इच्छा त्यांच्याच चरांचर व्याप्त मनात साम्मावली. आणी ही ईच्छा त्या निरंजनाच्या मुळावरचा रंग पकडुन त्याची अद्भुत शक्ती बनुन उभी झाली. मुळावरच्या रंगाव्दारे मुळ शक्ती उभी झाली. या खेळात सर्वप्रथम अद्भुत अशी मुळावरची शक्ती प्रकटली.

प्रथम एक निराकार निराधार अव्यक्त सोहंम् निरशुन्य तत्व ! त्याचा निरंजन इश्वर तोच ! त्याच्याच ओहंम्-सोहंम् परंब्रम्ही ऐक्यातुन त्याची शक्ती उद्भवली. या शक्तीचा श्रीपतीही तोच ! तोच शक्तीचा कर्तार ! तोच ऐकलाच आपरूप आदीपुरूष शक्तिसमोर आदीमुनी रूपात आला. या चौथ्या आदीपुरूष आदीमुनीनें त्या मुळ-चैत्यन्या शक्तीला तिन देव जागी करून देणं दिलेत. शक्तीच्या ओवी-खंड०१/०२/ओवी.०१ च्या निरसनातुन घ्यावे. आपणास ज्ञान येंईन की :

॥ एक शेजुन तिन केल्या । एकीच्या तिन ।
चतुर्पता गाय उभी । होती आपन ॥ खंड१०/०२/आरती-०३ कोट-कोट

जेव्हा शक्तीच्या प्रार्थनेला पावुन आदीमुनी भैष नामी तिच्यासमोर तो गायप झालेला चौथा खुम्म हा आदीमुनी रूपात उभा झाला, तेव्हा शक्तीने जाळलेले तिन खुम्म ची राखे चे गोळे शक्तीने एक शेजुन एक असे एकीचे तिन करून आदीमुनी पुढे मांडली. त्यावर आपल्या मस्तकी आलेले तिन चैतन्याचे गोळे फुलपुष्पाप्रमाणे ठेवलेत. आणी तिच्या समोर उभ्या असलेल्या आदीमुनी ला प्रार्थना करून विनविले की : तुम्ही जसे निर्विकार निश्कलंकी चैतन्य स्वरूपी उभे आहात, तसे निर्विकार निश्कलंकी चैतन्य ओतुन हे तिन खुम्म उभे करून दयाहो. शक्तीच्या विनवणी ला पावन होवुन आदीमुनी ने शक्तीने एक शेंजुन एक मांडलेल्या तिनला म्हणजेच ब्रम्हा, विष्णु शंकर यांना रूप प्रदान करून प्रकट केलेत.

॥ ब्रम्ह राखीचा साचा । याहीनं जागी केला ।
ब्रम्हांड रूपाचा, ब्रम्ह देव । उभा राहीला ॥
॥ विष्णु राखीचा साचा । याहीनं जागी केला ।
विश्व रूपाचा, विष्णु देव । उभा राहीला ॥
॥ शंकर राखीचा साचा । याहीनं जागी केला ।
शंक रूपाचा महा देव । उभा राहीला ॥ खंड०१/०२/०१

हे तिन देव या शक्तीच्या हवाली करून शक्तीसह त्या तिन खुम्मा ला तिनयवगाच्या राजपदवी चे देणं सह सर्वकाही आदीमुनीने दिलेत. त्या चौथ्या आदीमुनीने तिघांपैकी ब्रम्हा च्या हाती रजोगुणांचा शिक्का देवुन त्याला रजोगुणांचा राजा बनवला. तर शंकराच्या हाती तमोगुणांचा शिक्का देवुन त्याला तमोगुणांचा राजा बनवला. आणी विष्णुच्या हाती सत्वगुणांचा शिक्का देवुन त्याला सत्वगुणांचा राजा बनवला. त्याचसोबत त्या विष्णुरूपाला आपला मानाचा प्याला दिला. व सृष्टीचक्रांच्या कार्यात यवगाच्या चौकडीतील तिन यवगाचे राज्य त्यांना देवु केले. ऐसे त्यां तिघांना या तिन यवगाची राजपदवी दिली. परंतु शक्तीचे रूप भ्रांतीत असल्यामुळे तिने त्या चौथ्याला त्यावेळी ओळखले नाही. ती चतुर्पता गाय आदीमुनी तिच्या समोर आपहुन आपरूप उभी होती. तिला त्या आपरूप चौथ्याचा बोध झाला नाही. तरीही तिच्या भक्तीवर पावन होवुन तो चौथा चैतन्यचा उभा शिक्का असलेला आदीमुनीने तिला तो चौथा चैतन्य शिक्का तिन यवगात वापरण्याकरीता दिला. आणी तीला सांगी केली की : या चौथा चा बोध तुला कलीत होईन. हा चौथाच कलीच ठिकाण उडवन ! म्हणुन तु आपला हिशोब पाहय ! असे म्हणुन तो चौथा खुम्म आदीमुनी भैस कैलाशी निघुन गेला. कैलाशी बसुन अवघे तो तिरभवन पाहये. त्याच चौथ्या कर्ता-याने कैलाशी निराकार निराधार निरंजनी बसुन यवगाच्या चौकडीत अवघा खेळ मांडला आहे.

सृष्टी रंचना रंचली । खेळ मांडला माया-मोहनी :-

यवगाच्या चौकडया मध्ये त्या चौथ्या कर्ताराने या सृष्टीत मायादेवते सह तिन गुणांचे राजपती म्हणजेच तिरोपती ब्रम्हा विष्णु महेश यांच्या व्दारे माया-मोहनीचा खेळ मांडला आहे.

या माया-मोहनीच्या खेळात माया ही भक्तांना मोहीनी घालुन त्याला तिरगुणांचा प्याला मधुपानाप्रमाणे पाजत आहे. या तिरगुणांची झापड व धुंदी त्यांच्या डोळयावर आणुन, या तिरगुणांच्या पल्याड उभा असलेल्या त्या चौथ्या चतुर्पती चे चतुर्पता ग्यान घेवुन आकाशवाणीच्यात्या चौथ्या चतुर्पती धनीदेव कडे जावु देण्यास रोकत आहे.

तर तो चौथा आकाशवाणीचा निराकार निराधार निरंजन आदीपुरूष धनी हा सच्चे भक्त यांना निवडुन त्या सच्च्या भक्तांच्यां बुध्दीचा दाता कर्ता, करविता बनुन त्यांच्या बुध्दीपटलावर उभा राहुन, त्यांचे तिरगुणांचे बंध तोडत आहे. त्यांना दृष्टांत देत आहे. सत्कृत्यात राहुन सत्वांच्या अधिक्याने असे यवगान यवगातील सच्चे भक्त या तिरगुणी बंधनाच्या बाहेर पडुन तिरगुणांतीत होवुन चतुर्पती कडे वळत आहे. वळले आहे. वळत राहणार. हे सर्व यवगान यवगापासुन चतुर्पतीचे ग्यान प्राप्त करत चतुर्पती मार्गि लागलेले आहेत.

अश्या रितीने या माया-मोहनीच्या खेळात माया भक्तांवर मोहनी घालत आहे. तर तो चौथा सच्या भक्तांला चौथ्या अवस्थेत नेवुन त्या भक्तांवर आलेली मायेची मोहनी तोडत आहे. या मायेला आपल्या अध्यक्षतेंखाली घेवुन तो चौथा आदीपुरूष धनी या सर्व सच्या भक्तांना देण देत यवगान यवगा उभा आहे. या सर्वाहुन वेगळा अलग निराळाच निशंःकलंकी राहुन तो हे सर्व खेळ करत आहे.

हा चौथा चतुर्पती धनी निराकार-निराधार सोहंम् चैत्यन्य ज्योत स्वरूपात सर्व देहीत आपल्या तेजोगुणी अंशाव्दारे अधिष्ठीत होवुन, या जगाच्या देखताच त्याची ही चैत्यन्यज्योत सच्या भक्तांची भक्ती पाहत उभी आहे. सच्या भक्तांच्या सच्या भक्तीला पावुन त्याला त्याचे इच्छीत देण देत तो चौथा मायेच्या तिरगुणांच्या पल्याड उभा आहे. मग तो भक्त कुणाचीही सच्ची भक्ती करेना ! उदाहरणार्थ देवी देवता माता पिता गुरू सखा पती.. इत्यादी ंची सच्ची भक्ती करेना ! तो त्यांनां देण देण्यासाठी तत्पर आहे. तो फक्त सच्या भक्तांच्या सच्च्या भक्तीस पावन होत आहे. सच्या भक्तीला पावन होवुन त्या सच्या भक्तांने ज्या कुण्या आकाराची अथवा कशाचीही सच्ची भक्ती मनात केली असेल, त्याच त्याने भजलेल्या आकाराला त्या भक्तांच्या मनांव्दारे प्रक्षेपीत करत आहे. ऐसा त्या भक्तासमोर त्या भक्तांनी कल्पीलेला तो आकार उभा करून त्या आकारामार्फत देण देत यवगान यवगात उभा आहे. भक्तांच्या मनाने कल्पीलेल्या त्या रूपांच्या आकाराला देण देण्याचा मान देवुन तो चौथा स्वतःमात्र लहाणपण घेतल आहे. आणी या सर्वापासुन वेगळाच, निराळा निशंःकलंकी राहुन यवगी उभा आहे.

याहीचा प्रताप, आम्हा आठवला..। आदीगण नेमला :-

फक्त सच्या भक्तीलाच पावणारे यांचे हे प्रताप सह मुळयवगाचे त्यांचे अनेक प्रताप व शिष्टाई आम्हाला कृष्णांजीने सुमरन/स्मरण करून दिले आहेत. आणी आम्ही चतुर्पतीचे भक्त कुण्याही देवी देवता गुरू यांना आपल्या भक्तीच्या कारणाकरीता न नेमता, या आदीगणालाच सच्च्या भक्तीच्या कारणाकरीता नेमले आहे. धन्य आमचे भाग्य थोर ! आदीगण नेमला ! गण हा उध्दारण देही या जीवाला !

या आदीगणाच्या भक्तीव्दारे आमच्या पदरात चतुर्पती ग्यानाचे थेबं-थेंब साचवुन जे काही चतुर्पती ग्यानमय गंगाजल आम्हा जवळ संचित झाले आहे, त्याच्या आधारावर आम्ही या आदीगणांची महंती गात आहोत. तर हा कृष्ण सांगी करत दवंडी देत गर्जना करून आम्हा भक्तजनास सांगत आहे की :

॥ गण हा ऐका हो ! थोर महंती । येरवी काय जाणशी ।
मुर्ख मळीचा गण स्थापती । त्याची होइन माती ।
जेव्हा गिरजा-शंकर, नव्हती । तो गण आणा चित्ती ।
तो गण उध्दारी या जीवाला/देहिला । आदीगण नेमला ॥ ०२ ॥

हा आदीगणाचे ग्यान ऐका हो ! या आदीरूप आदीगणाची महंती-महीमा ऐका हो ! या आदीगणांची महंती चौथ्या खुम्मावर उभ्या असलेल्या चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाच्या भुम्मेवर येवुनच जाणते ग्यानीजन जाणती ! आणी ही महीमा महंती अनुभवल्यानंतर या आदीगणाचीच महंती हे चतुर्पतीचे ग्यानीजन गात आहे. या आदीगण गणपतीच्या महंती व्यतिरीक्त इतरांची महंती तुम्हा का गात बसले आहात ? असे ते गर्जुन सांगत आहेत. इतर जन जे मायेच्या निराकार मातीच्या मळीपासुन मुर्त स्वरूपात मायेने आकारी आलेल्या मायेच्या गणपतीची स्थापना करत आहे. या साकारलेल्या मातीची शेवटी निराकारी मातीच होईन. हेही निश्चित जाणा ना तुम्ही !

त्याच मुळे जेव्हा गिरजा-शंकर नव्हते, तेव्हाचा तो निराकार आदीरूप आदीपुरूष आदीगण गणपती तुम्ही आपल्या चित्ती आणावा. त्याच आदीगण आदीरूप गणपतीची हद्‌यपेठेवर स्थापना करून, मन भावांचे फुल पुष्प त्याला सदोनित अर्पण करा. या चतुर्पती ची ग्यान-भक्ती सह भजन पुंजन ध्यान सुमरन करा हो !

तोच चतुर्पती आदीरूप आदीपुरूष आदीगण आपरूप गणपती आहे. हा आदीगण गणपती या देहे-जीवाला यवगान यवगात उध्दारत आहे. मोक्षपदाला नेत आहे. मागे-पुढे आणी आता तोच एकला आदीगण या देहे-जीवाचा उध्दार करत आहे. तो गण उध्दारण या देह-जीवाला ! याचीच दवंडी देवुन कृष्णा गर्जना करतो आहे. तोच आदीगण कृष्णा आपल्या मुखची सांगी करत आहे की :

॥ आदी गण, मग मंडयान । मग रंचले तिरभवन ।
आधी, माया केली उत्पन्न । मग केलं देवांगण ।
यवगा यवगी, आले आपन । माया, वेष हा धरून ।
गीता परसली, विर अर्जुन । एक पंडुचा नंदन ।
लेक परसली या बापानं । माव केली हो लेकानं ।
धनुष्य बाण, हाती घेतला । आदीगण नेमला ॥ ०३ ॥

आदी गण, मग मंडयान । मग रंचले तिरभवन
आधी, माया केली उत्पन्न । मग केले देवांगण । यवगा यवगी ..

अनंत यवगापासुन ते प्रथम यवगान यवगाच्या चौकटीत हाच चौथा आदीरूप आदीपुरूष आदीगण सर्व गणांचा पती म्हणजेच गणपती होता. या आदीरूप आदीगणांनेच ‘मो-ह सृष्टी रंचावी‘ अशी इच्छा त्यांच्या चरांचर व्याप्त मनात फेकुन दिली. ती फेकलेली इच्छाच त्याच्या कार्यसिध्दीसाठी उद्युक्त झाली. आणी त्या आदीगण आपरूपात सम्मावुन आधी शक्ती बनुन उभी झाली. सर्वप्रथम आधी उत्पन्न झालेल्या या आदी शक्तीला त्या आदीगणाने आपल्या अध्यक्षतेखाली यवगा यवगी घेवुन, यवगा यवगी माया वेष धरून आले आहेत.

आदीगणाच्या आदी खेळात त्या आदीरूप आदीगणानं सर्वप्रथम यवगाचे मंडयान रंचले. स्वर्ग व पाताळाची रंचना करून त्या दोहोमध्ये मेरूचे मैदान ठेवले. मेरूचे मंडयान रंचले. मिर्तलोकची स्थापना केली. पिंडी ते ब्रम्हांडी या नात्याने तेच सर्व या देहपिंडीत रंचले आहे. पिंडी या ब्रम्हांडी च्या तिरलोक्यात तिरभवनाची रंचना करून, इश्वरी काया इश्वरी माया सह इतर सर्व देही उभ्या उभारल्यात.



या देहीपैकी नरदेही ही एक देही आहे. पिडी ते ब्रम्हांडी या न्यायाने या नरदेहीत मेरूचे मंडयान म्हणजे पाठीच्या कण्याचे एकावर एक रंचलेल्या मनक्याचे मंडयान आहे.




या मेरूचे २१ कडे हे २१ विशाळ स्वर्ग आहेत. या मेरूच्या खाली सप्तपाताळाची रंचना केली तर वर ब्रम्हांडी उर्ध्व स्वर्ग रंचना केली.

या २१ विशाळ स्वर्गाचे तिन भाग करून तिन पु-या रंचल्या. यापैकी :

- ब्रम्हपुरीत ब्रम्हाची वस्ती असुन त्याच्या अधिपत्याखाली ७ स्वर्ग दिलेत.
- विष्णुपुरीत विष्णुची वस्ती असुन त्याच्या अधिपत्याखाली ७ स्वर्ग आहेत.
- शिवपुरीत शिवाची वस्ती असुन त्याच्या अधिपत्याखाली ७ स्वर्ग आहेत.
- मिर्तलोक व पाताळलोकच्या येशीवर कुंडलीनी शक्ती कुंडल घालुन बसलेली आहे.

अश्या रितीने त्या आदीरूपाने हे २१ स्वर्ग या तिघांना वाटुन दिलेत. हे विशाळ २१ स्वर्ग वैकुंठापर्यतच आहेत. २१ स्वर्गाच्या वर असलेल्या उर्ध्व स्वर्गि चौथ्या ताळी उभ्या असलेल्या निराकार-निराधार निरंजन धन्याला या २१ स्वर्गाची मांडणा जावुन मिळेना ! या २१ च्या पलीकडे असलेल्या उर्ध्व स्वर्गि निराकारी निराधारी निरंजन स्वरूपी उभ्या असलेल्या धन्याच्या चैतन्य प्रकाशात या २१ स्वर्गातील सर्व भुतजाती मेरूच्या आधाराने नांदत आहेत.

अश्या या भरून भरला आणीक उरलेल्या चौथ्या निरंजनाने या नरदेही च्या मस्तकी उर्ध्व स्वर्ग स्थापुन उर्ध्व स्वर्गाच्या चौताळा वर निरंजनाचे स्थान ठेवले आहे.




तेथे तो चैतन्यब्रम्ह रूपात उभा आहे. ते चैत्यन्य ब्रम्ह पुर्ण त्याचाच अंश असुन ते वेदशास्त्र पुराणे यासही कळत नाही. ते फक्त अनुभवानेच जाणता येते. परंतु सांगता येत नाही. कारण ते इंद्रियातीत म्हणजे इंदियाच्या पलीकडचे असल्यामुळे इंद्रियातीत अवस्थेतच अनुभवता येते. त्या इद्रियातीत अवस्थेत इंद्रिये निजरूपात असल्याकारणाने त्या इद्रियातीत अवस्थेबाहेर आल्यानंतर ते इंद्रिये बिचारे काय त्याची महती करणार ? म्हणुनच ते सांगता येत नाही. वर्णन करता येत नाही. त्याचमुळे त्याच्याबध्दल आम्हा अपुर्ण मानवास लिहता येत नाही. ते फक्त अनुभवानेच जाणता येते. अधिक ग्यान कायाज्ञान खंडातुन घ्यावे.

अश्या त्या वरीष्ठ व सांगण्यास फार कठीन स्थानापासुन तो भरून भरला आणीक उरला आहे. त्याचे ते उर्ध्व चैत्यन्य रूप कृष्णकृपा झाल्या शिवाय कोणालाच कळत नाही. असो..

॥ कजव्या मध्ये हिशोब केला । याहीला केलं हीनं ।
स्वर्ग पाताळी पेठा नांदते । अमृता गुणं ॥ खंड०१/०२/ओवी-०३

या उर्ध्व स्वर्गाच्या स्थानीच देहीला नियंत्रीत ठेवणा-या सर्व शक्तीयॉं सिध्दीयॉं ठेवुन त्याच्या खाली २१ स्वर्गावर सर्व देवतांचे गुणरूपात अधिष्ठान ठेवले आहेत. या कजब्याच्या हिशोबात देही देवी-देवतांना उर्ध्व स्वर्गाच्या खालच्या स्थानावर ठेवुन या देही-देवताला हीन/नित्कृष्ठ केलं हो !

या देहीच्या उर्ध्व स्वर्गलोक स्थानी मौत मरण नाही. उदाहरणार्थ या देहीच्या जीवनकाळात मस्तिकाच्या पेशी मरत नाही. आणी पुनश्च जन्मतही नाही. या देहीचे जीवनकाळ संपल्यानंतरही या मस्तीकातील बुध्दिसंस्काराच्या सुक्ष्म अव्यक्त पेशी चिरंजीव राहतात. या सुक्ष्मसंस्कार कोरून ठेवणा-या सुक्ष्म पेशी मनमती संस्काराला सोबत घेवुन निराकार अव्यक्त अवस्थेत जातात. परंतु मरत नाही ! अश्या रितीने या पेशी स्वर्गातील देवतांप्रमाणे व्यक्तातुन अव्यक्त अवस्थेत आणी अव्यक्त अवस्थेतुन व्यक्त अवस्थेत प्रकट होत राहतात. म्हणुनच आकाशमात मधील आध्यात्मीक विश्व सांगी करते की :

नरदेहीच्या मृत्युनंतर नरदेहीची उर्जा ही निराकार गोळयात रूपांतरीत होवुन, त्या उर्जेसह देहीचा निराकार चैत्यन्यमय आत्मा हा निराकार अव्यक्त सुक्ष्म मन मती संस्कार सह सुक्ष्म इंद्रियसमुहाला गोळा करून घेवुन जात असतो. अश्या रितीने तो देह गोल निराकार गोळा असलेला पोहन/पवन होतो.
॥ ईश्वर पुना पोहन/पवन झाला । येवुन बाळाला हो साहयं झाला ॥

या सर्व व्यक्त-अव्यक्त होणा-या सुक्ष्म सृष्टीच्या पलीकडे उभा असलेला तो चौथा आदीरूप आदीपुरूष नारायण व त्यांचे निराकार आत्म-सखे-भक्तगडी ची सिदाई सेना ईत्यादी उच्चत्तर पातळीतील पुण्यात्मे हे कायेच्या उर्जेचे आवरण असलेल्या मनमती संस्कार सह इद्रियांचा सुक्ष्म समुह असलेल्या या निराकार आत्मा-गोळाला आपल्या नियंत्रणाखाली घेतात. तो धनी स्वतः न्यायाधिश बनुन या निराकार गोळाच्या आत असलेल्या सुक्ष्म समुहाच्या संस्कारानुरूप, कलंकानुरूप या समुहाला न्याय देवुन पुनश्चः त्यां गोळांला देह धरण्याची संधी देवुन चौ-यांशि फिरवितो. अथवा त्याला निश्कलंकी बनवुन त्याच्या राहीलेल्या कलंकातुन मुक्त करण्यासाठी सिदाईच्या मार्गाने लावुन त्याची मोक्षाकडे वाटचाल करण्यास साहयं होतो. मोक्ष देवुन त्यांना मुक्ति आनंद देतो. असो..

मानेच्या खालच्या भागापासुन कमरेपर्यतचा भाग हा मिर्तलोक होय. येथे मृत्युचे प्राबल्य आहे. देहीच्या याच भागातील पेशी जास्तीत जास्त जन्मतात व मरतात. यांचे मौत मरण देहीच्या याच मिर्तलोकात आहे.

या आदीरूप आदीपुरूष नारायणाने नरदेहीच्या कमरेखालील भागात सप्तपाताळ वसवुन तिथे लिंगदेवाची स्थापना केली आहे. लिंगदेवतेचे गुण कार्याचे स्थान पाताळी ठेवले आहेत.

अश्या रितीने पिंडी ते ब्रम्हांडी या न्यायाने या नरदेहीत स्वर्ग-मिर्त आणी पाताळ या तिन्ही लोकांची स्थापनेसह तिरभवन व इतर जे इंद्रियांच्या दृष्टीगोचर नाही अश्या अगुचर ची स्थापना करून ही नरदेही उभी केली आहे.

आदीरूप निराकार निराधार धनी हा चैत्यन्य ज्योत स्वरूपात सर्व पिंडी या ब्रम्हांडी भरून भरला आणीक उरलेला आहे. ऐवढेच नव्हे तर या चौथ्या आदीरूपाच्या अर्ध्या भागानेच हे सर्व भरून भरले आहे. आणी अर्ध्या भागात तो उरलेलाच आहे. म्हणुनच असे म्हटल्या गेले आहे की : या आदीरूपाच्या अर्ध्या भागाचीच ही सर्व मांडणा आहे. असे खंड०२/ओवी-३६ धेनु गाय ची ओवी गर्जुन सांगी सांगत आहे की :

॥ तिर पतीचा जप केला । चौथा नाही ओळखला ॥
॥ चौथा आहे अर्धा भाग । गोड परिमय याहीच्या आंग, ब्रम्हगुंज याहीच्या आंग
अर्ध्या भागाची मांडना । अर्थ जाणे पुर्ण ज्ञानी । अर्थ नजाणे तो अज्ञानी ॥

ज्याने या चौथ्याच्या अर्ध्या भागाची मांडणेचेच ग्यान घेतले, ते सर्व अज्ञानी आहेत. कारण त्यांनी उरलेल्या अर्ध्या भागाचे ग्यान अजुनही घेतलेले नाहीत. त्या उरल्या चौथ्याच्या अर्ध्या भागाच्या आंगातच गोड परिमय आहे. ब्रम्हगुंज आहे. या ब्रम्हगुंज व गोड परिमय चा अनुभव अजुन त्यांनी घेतला नाही. म्हणुन चौथ्याला न जाणणारे सर्व अज्ञानी आहे. हा चौथाच तर यवगा यवगी माया वेष घेवुन त्यांच्या समोर आला आहे. पंरतु अज्ञानी असल्यामुळे या चौथ्याला त्यांनी ओळखले नाही.

यवगा यवगी आले आपन :-

हा चतुर्पती आदीपुरूष धनी आपल्या अर्ध्या भागानेच यवगान यवगाच्या सर्व देहीत चैत्यन्यमय ज्योत स्वरूपात या सृष्टीत उभ्या असलेल्या सर्वाच्या डोळा देखत यवगान यवगात उभा आहे. त्या उरलेल्या अर्ध्या भागानेच तो यवगा यवगी माया वेष धरून आला आहे. तो उरलेला अर्धा भाग कोणत्याही प्रकारच्या ऐका देहीत सम्मावु शकत नसल्यामुळे, तो भैष चतुर्व्युह रूपांची रंचना करून अनेक शक्तीयॉं व सिध्दीयॉं सह अनेक देहीच्या आकारात एका ठरावीक काळात संचारत यवगान यवगात परीपुर्णतम्पुर्ण अवतार घेवुन अवतरला आहे. यांचे वर्णन तरी काय करू ? अधिक ग्यानासाठी कृष्णांमृत वाचा ।

चतुर्व्यह रूपांची रंचनेसह अनेक रंचना करत परिपुर्णतम पुर्ण अवतार घेत घेत तो व्दापर मध्ये सुध्दा अवतरला आहे. या व्दापरात हा सर्व लक्षणांनी संपन्न स्वयं परिपृर्ण पुर्ण रूप घेवुन श्रीकृष्ण रूपात अवतरून याने अर्जुनासमोर भ.गीता परसली आहे.

माया वेष हा धरूनं । गीता परसली विर अर्जुन ।एक पंडुचा नंदन
लेक परसली या बापानं । माव केली लेकानं । धनुष्य बाण हाती घेतला



**परसने** = वाढणे, ग्यानाचे भोजन वाढने. । **माव** = लिला खेळ.

व्दापरच्या कृष्णकालावधीत आदीरूप आदीपुरूषाचा पुर्ण अवतार श्रीकृष्ण यांनी पंडुराजाच्या पाचही पुत्र म्हणजेच पांडवापैकी एक असलेला त्याचा परम प्रिय सखा विर अर्जुन यांना रणांगणात, गुढं व गुप्त ग्यानसंप्पन असलेली आपली पोटची भ.गीता रूपी लेक चे ग्यान भोजन परसले आहे. भगवंताच्या पोटची भगवंताच्या मुखाबाहेर पडलेल्या या भं. गीता लेकीचे अत्यंत गुढ असे ग्यान चे भोजन त्याने अर्जुनास रणांगणात परसण्याचे कारण की : जेव्हा सैन्य निरिक्षण करण्यासाठी प्रंथम अर्जुन युध्दारंभी रणांगणात गेला. आणी त्याने युध्दासाठी उभे असलेले त्याचेच गुरू बंधु व नातलगांवर त्यांनी दृष्टी टाकली, तेव्हा तो नाना विचारांच्या गोंधळात पडला. भ्रांतीत पडुन भ्रमित होवुन तो श्रीकृष्णा म्हणाला की :

या युध्दात समोर उभ्या असलेल्या गुरूजन पित्यासमान लोक व बंधु जन नातलगांना मारून मला काही कल्याण दिसत नाही. याचमुळे हे कृष्णा ! या युध्दात मज विजयाची, राज्याची व सुखाची सुध्दा मज आकांक्षा इच्छा नाही.

कारण की : ज्याच्या साठी आम्ही राज्याची, सुखाची व जीवीताची देखील इच्छा करावी तेच जर या रणांगणावर युध्दाकरीता उभे ठाकले, तर मग या राज्याच्या सुखाचा व जीवीताचा तरी काय उपयोग होणार आहे ?

हे मधुसुदना ! गुरू, वडील, पुत्र, आजे, मामे, सासरे, नातु, मेहुणे आणी सारे नातलग आपले प्राण व संप्पत्ती सोडुन देण्यास तयार असतांना, आणी माझ्यापुढे उभे असतांना मी जगलो तरी त्यांना ठार मारण्याची इच्छा मी मग का करावी ?

हे जीवांच्या रक्षणकर्त्या ! हे जनार्दना ! त्रैलोक्याच्या राज्यासाठीही मी त्यांच्याशी लढायला तयार नाही. मग या पृथ्वीची काय कथा ?

अश्या या आततायी आक्रमकांना आम्ही जर ठार मारले, तर आम्हाला पापच लागणार आहे. म्हणुन धृतराष्टांच्या पुत्रांना व आमच्या मित्रांना ठार मारणे योग्य नाही.

हे माधवा ! आमच्या स्वतःच्या नातलगांना मारल्याने आमचा काय लाभ होणार आहे ? आणी आम्ही सुखी कसे होवु शकु ?

हे जनार्दना ! जरी हया लोकांना लोभाने व्याप्त झाल्यामुळे आपल्या कुटूंबियांना मारण्यात आणी मित्रांशी भांडण्यात पाप दिसत नसले, तरी पण आम्ही हे पाप आहे असे जाणत असतांना अशी कृत्ये काय म्हणुन करावी ?

हे लोकरक्षक श्रीकृष्णा ! गुरूशिष्य परंपरेत मी असे ऐकले आहे की : जे कुलपरंपरा नष्ट करतात, ते नेहमी नरक यातनेत राहतात. अरेरे ! हे किती चमत्कारीक आहे की : राज्यसुख उपभोगण्याच्या इच्छेने लोभाने उद्युक्त झाल्यामुळे आम्ही मोठे पाप करण्यास तयार झालो आहेत. या धृतराष्टांच्या पुत्रांशी लढण्यापेक्षा त्यांनी शस्त्रधारी नसलेल्या व प्रतिकार न करणा-या मला जरी ठार मारले, तरी ते मी अधिक चांगले समजेन.



या प्रमाने अजुर्नाने बोलल्यानंतर आपले गांडीव धनुष्य बाण बाजुला टाकुन दिले. आणी अत्यंत शोकाकुल चित्ताने रथाच्या मध्यभागी खाली जावुन बसला.

अश्या रितीने अर्जुन मायेच्या भ्रांतीमध्ये येवुन रथाच्या खालच्या भागात मध्यभागी आला. आणी हाती घेतलेला धनुष्य बाण खाली टाकुन व्दिधा अवस्थेत बसला. तेव्हा कृष्ण त्याच्या समोर उभा राहुन, अजुर्नाची भ्रांती दुर करण्यासाठी त्याला धिराईने ज्ञानांमृत पाजत पाजत, आपली अत्यंत गुढ व रहस्यमय ज्ञानाचे अलंकार घालुन असलेली भगवत गीता लेकी व्दारे ग्यान भोजन त्याला परसले/वाढले. गीता चे ज्ञानाचे भोजन त्याच्या समोर हळुहळु त्याच्या चवीप्रमाणे वाढु लागला. परसु लागला.

भ. गीताच्या ज्ञानभोजन कालावधीत कृष्णाने अर्जुनाला नुसतेच ज्ञान भोजन न देता, त्याला त्याच्या इच्छेप्रमाणे जे पाहीजे ते ज्ञान दिले. कृष्णाने अर्जुनाचे मन समाधान करत त्याला दिव्य दृष्टी दिली. दिव्यदृष्टी देवुन त्याला आपले **मुळस्वरूप** दाखवले. आदीरूप आदीपुरूष भैसाचे चतुर्पती ज्ञान दिले. विराट असे भैस रूप दाखवले.

विर अर्जुनाला आपली मुळ भागवता असलेली भं गीता या श्रीकृष्ण बापाने परसली. भ. गीता चे अत्यंत गुप्त व रहस्यमय ज्ञान सह चतुर्पती ज्ञानाचा वर्षाव अर्जुनावर केला. अर्जुनाच्या मतीत आलेल्या युध्द न खेळण्याच्या विचांरावर मात केली. ऐशी अर्जुनाला नविन डोळयाची नविन दृष्टी देण्याची माव-लीला या परमात्म्या मुखच्या मुळ भागवता असलेली गीता लेकीने केली.



श्रीकृष्णाच्या भ.गीता च्या याच माव-लीला व्दारे पंडुच्या पांडवापैकी एक लेक असलेल्या अर्जुनाने आधी स्वतःच्या हाताने खाली टाकलेला धनुष्यबाण पुनश्च हाती घेतला. चतुर्पती श्री कृष्ण अवधुत आदीपुरूष आदीगण यांना आपला गणपती नेमला. या आदीपुरूष आदीगणाला सर्वप्रथम नमन करून, त्याला पुढं करून युध्दाकरीता शंखनाद केला. आणी तो सुत्रधारी कृष्णा कौतुक पाहु लागला. कळसुत्राचा मालक असलेला कृष्णा ने अजुर्नासह सर्व जीवांवर मोहीनी घालुन, आपली कळसुत्रे रणांगणात उभा राहुन हालवु लागला.

॥ मोहनी टाकली जीवावरी । सर्वच आणलं आकारी
खेळ खेळतो नानापरी । आपण कळ सुत्रधारी
कौतुक पाहतो हा श्रीहरी । उभा अंबेच्या तिरी
याहीचा प्रसाद आम्हा भेटला । आदीगण नेमला ॥ ०४ ॥

या निराकार निराधार आदीरूप आदीपुरूषाने सर्वत्रास आकारी आणुन त्रिगुणात्मक माया उत्पन्न केली. या मायेची मोहनी सर्व जीवांवर टाकली आहे. आणी या मायेला आपल्या अध्यक्षतेखाली घेवुन तिची मोहीनी सच्या भक्त जनां वरून हटवत, सर्वत्र तो नानापरी खेळ करत आहे. या सर्वत्रांचा सुत्रधारी बनुन यवगान यवगा कळसुत्रे हालवत उभा आहे.

हा आदीपुरूष कृष्णा या त्रिगुणात्मक मायेच्या पलीकडील तिरांवर उभा राहुन, या तिरगुणी अंबामायने मांडलेला तिरगुणांचा खेळ पाहत आहे. जर आपले राजहंस भक्त या त्रिगुणात्मक अंबामायेच्या फास्यात अडकत असेल, तर त्या राजहंसाचे फासे तोडत आहे. तिरगुणी अंबा मायेच्या पलीकडे जाण्यासाठी धडपडणा-यां कडे कौतुकाने पाहत, त्यां भक्तांना साहय करत या अंबारूपी मायेच्या तिरावर-काठावर उभा आहे.

हे सर्व कौतुक कृष्णाचे आहे. तो कृष्णा निमित्याकारण हात धरून आमच्यावर निमीत्य ठेवुन, अनेक प्रकारे अनेक प्रयत्नांने दृष्टांचा तसेच अधर्माच्या बाजुने असणा-याचा नाश करत आहे. सच्चे भक्त व सत्यांच्या बाजुला असणा-यांना तारत आहे. तो असत्याचा पाडाव करतो. सत्य विजयी करण्या करीत यवगान यवगात उभा राहत आहे.

कृष्ण हाच सर्व माव-लीला कौतुक दाखवत आहे. या चौथ्या आदीपुरूष कृष्णाचा हा खेळ यवगान यवगापासुन चालत आहे. आणी हाच खेळ त्या आदीपुरूषाने या विदर्भ भुम्मेवर साकारला आहे.

या विदर्भात अंबामाया अमरावती मध्ये उभी आहे. आणी या अंबामाया च्या येशीवर हा कृष्णा उभा आहे. अमरावती पासुन अंदाजे १२ की.मी. अतंरावर सावंगा येथे तो आदीपुरूष कृष्णा कृष्णाजी नाम धारण करून उभा आहे. या आदीपुरूष कृष्णाजीचा प्रसाद भाग्यशाली चतुर्पतीच्या भक्तांना या चतुर्पतीच्या भुम्मेवर भेटला आहे. भेटत आहे. भेटत राहणार.

आदीपुरूष कृष्णाजींचा हाच चतुर्पती ज्ञानाचा प्रसाद प्रासन केल्यानंतर सर्व चतुर्पती भक्तांनी, या आदीपुरूष कृष्णालाच आपला आदीपुरूष आदीगण नेमला आहे. या कृष्णांचीच बहु प्रमाणात आम्हा सर्वांवर कृपा झालेली आहे. कृष्णकृपेने या अहीन आत्म्यापर्यंत हे चतुर्पती ग्यान पोहचुन, या अहीन आत्म्यावर या चतुर्पती ग्यानाचे सुक्ष्म संस्कार कोरल्या जात आहे. सत्य भक्ती बीज मिळुन हद्यात सोहंम् बीजाचा प्रकाश लाभत आहे.

अहीन कृष्णानेच हे अहीना घरचे निरंजन ग्यान या देहीच्या तिरभवनात भरले आहे. अहीनाघरचे ग्यान प्राप्तीने आमचा अहीन आत्मा प्रकाशत आहे. आणी बरेच काही इथे आम्हास लाभत आहे. म्हणुनच आम्ही सर्व चतुर्पतीचे भक्तगण गर्जना करून गायन करत आहो की : या देहीच्या अहीन आत्म्यास कृष्णाची बरी हो कृपा झाली. कोणा जनलोकास मालुम नाही. यवगी मांडणा ! भैसाची ! खबर नाही कोणाशी !

॥ बरी हो कृपा झाली । या अहिनास । मालुम नाही कोणास
चतुर्पति ज्ञान या देवाचे । याहीचा प्रकाश पडला आहे त्यात ।
मायेच्या विरहीत याहीची ज्योत । मिळाली या ज्योतीत ।
पांग जीवाचा/जन्माचा फिटला । आदीगण नेमला ॥ ०५ ॥

-: **शब्दार्थ** :-

**अहिन** :- ''ज्याच्या शिवाय आपला राज्य कारभारच चालु शकत नाही, काहीच करू शकत नाही, असा जो तो अढळ अगोदरचा असलेला पिंडीतील आत्मा , तर ब्रम्हाडी आध्यात्मीक व इतर सर्व विश्वातील निराकार निराधार निशं:कलंकी परमात्मा ।.''

**अहिन शब्दाचे उदाहरण** :- पुरातन व अलीकडच्या जुन्या काळी प्रजेकडुन कर वसुल करण्याच्या काही वेगवेगळ्या पध्दती होत्या. परंतु प्रतेक कर वसुलीच्या पध्दतीमध्ये, सर्वात प्रथम अहीन सारा, अधीक त्यानंतर शेतसारा, घरसारा इत्यादी सारा-कर मिळवुन कर वसुली प्रजेकडुन राजा घेत असे. परंतु जर एखादया वर्षी भयंकर दुष्काळ पडला तर, त्या दुष्काळी परीस्थीतीत शेतसारा, घरसारा इत्यादी सारा-कर राजा माफ करत होता, परंतु अहिन सारा म्हणजे ज्या सारा वाचुन तो राजा राज्यकारभारच चालवु शकत नाही, असा **अहिन सारा** राजा वसुलच करत होता. हा अहिन सारा राजा करीता अत्यंत महत्वाचा सर्वप्रथम अगोदरचा होता. या अहिनावाचुन तो राज्यकारभारच चालवु शकत नव्हता. या वरून आपणा घ्यानात येईल की :
**''अहिन म्हणजे अगोदरचा सर्वप्रथम एकला ज्याच्या वाचुन काहीच करता येत नाही''** असा अर्थ समोर येतो.

अहीन म्हणजे ज्याच्याशिवाय राज्यकारभार चालु शकत नाही असा ! पिंडा मध्ये आत्मा हा अहीन आहे. कारण याच्याशिवाय देहीचा राज्यकारभार चालु शकत नाही, तर ब्रम्हांडी परमात्मा हा अहीन आहे. कारण याच्याशिवाय या सृष्टीचा राज्यकारभार चालु शकत नाही. म्हणुनच *अहीन हा शब्द आत्मा व कळसुत्राचा मालक परमात्मा यांनाच लागु होतो. यांच्याशिवाय पिंडी या ब्रम्हांडीचा राज्यकारभार ठप्प होतो. म्हणुन आत्मा व परमात्मा यांना अहिन या नामाने संबोधिले आहेत.*

कळसुत्राचा मालक असलेल्या कृष्णाने आपण होवुन सच्या भक्तांच्या घरा जावुन सच्या भक्तांना हाती धरले आहे. आणी दवंडीच्या प्रमाणे ही चतुर्पतीची वाणी सह अहिनाघरचे ग्यान सच्या भक्तांस दिलेले आहे. नुसतेच ग्यान न देता, त्या ग्यानाचे वेळोवेळी अनुभव देवुन त्या अनुभवाने भक्तांच्या गाठयोडया भरल्या आहेत. अनुभवजन्य अहिनाघरच्या ग्यानाने परमात्मा चा तेजोगुणी अंश असलेला अहिन आत्म्यावर आलेले देहीचे विकार व विषय-वासना यांचे कलंक धुतल्या जात आहे. धिराईने हा अहिन आत्मा प्रकाशमान होत आहे. या चतुर्पती ग्यानाचा प्रकाशात सत्य भक्तीबीज आम्हाला कृष्णाने दावले आहे. त्याचमुळे हद्यात सोहंम् बीजाचा प्रकाश लाभला आहे.

या चतुर्पती देवान दिलेल्या चतुर्पती ग्यानाच्या प्रकाशाने मनमतीवरील अंधःकार जावुन आमची धियो प्रचोद्यात होत आहे. आम्हास प्रत्यक्ष ज्ञान म्हणजेच प्रज्ञा प्राप्त होत आहे. बुध्दि उच्चत्तर होत आहे. या उच्चत्तर बुध्दि व प्रज्ञाव्दारे सत्वाचे अधिक्य होवुन त्रिगुणातीत म्हणजेव तिरगुणांच्या पल्याड पाहणारी दिव्य दृष्टी लाभत आहे. दिव्यदृष्टी लाभली आहे. सत्य भाव, सदाचार सद्गृण शुध्द सत्व च्या बोध ईत्यादी मुळे माया प्रपंच विरहीत देहेभाव मुक्त होवुन सर्व विकार विसर्जित होत आहेत. या तिरगुणी मायेच्या विरहीत असलेली चतुर्पती ज्ञानाची ज्योत या देहीच्या ज्योतीला येवुन मिळत आहे. संचारत आहे. संचारत राहणार आहे. त्याचमुळे कृष्णाची नित संगत लाभत आहे.

त्रिगुणातीत म्हणजे तिरगुणांच्या पल्याड असलेली व तिरगुणांचा लवलेशही नसलेली ही चतुर्पतीची ज्योत या देहीच्या चैत्यन्य ज्योतीला येवुन मिळत आहे. मिळाली आहे. नविन डोळयाची नविन त्रिगुणातीत दिव्य दृष्टी लाभुन या चतुर्पतीची संगत घडल्याने हा जन्म सार्थकी लागला आहे. या जगात जन्म घेवुन येण्याचा पांग आता फिटला आहे. म्हणुनच आम्ही चतुर्पतीचे भक्तगण या आदीपुरुष कृष्णाजीलाच आमचा आदीगण नेमला आहे. हाच आदीगण तारण या देहे-जीवाला ! हे आता निश्चित आहे. कारण कवडीमोल देहीचे पाचही पानाला या कृष्णानें आमच्याकडुन भक्ती-भावाचा विडा बांधुन घेतला आहे. देंहीच्या पाचही तत्वी आम्ही भावाचा विडा बांधला आहे.

॥ ऐका कवडीचे पान छप्पन्न । पाचही पानी विडा बांधुन
उरला सभेशी द्या वाटुन । बोलनं खरं होइन ।
आंबा अपाडी पिकला । आदीगण नेमला ॥ ०६ ॥

देहीला इथे कवडीची उपमा/संबोधन दिलेली आहे. या देहरुपी कवडीचे पान ५६ आहेत ते ऐका हो :

१० इंद्रिये व ११ वे मन X ५ तत्वांच्या ०५ पानाचा विडा असे ११ X ५ = ५५ पाने असलेली देही आहे. या पानाला पाचही तत्व चा विडा बांधुन, पाचही तत्वाच्या कामा प्रमाणे या देहीचे तिरभवन चतुर्पतीचे गायन करत आहे. आणी जो एक भावाचा विडा उरतो, तो एक प्रेम भक्ती-भावाचा उरला विडा त्या भरुन भरला आणीक उरल्याकरीता त्या भैसाच्या दरबार च्या सभेत जावुन आम्ही अर्पण केला आहे.

त्या एकल्या भरुन भरला आणीक उरलेल्याचा तो उरलेला एकमेव प्रेम भक्ती-भावाचा विडा अवघ्या सभेशी दयाहो वाटुन. अवघ्या सभेशी ज्ञान-भक्ती भाव प्रेम अर्पन करावे. मग पहा त्याची कमाल ! तुमचा बोल तुटका पुटका असेल किंवा लटका जरी असला, तरी त्या बोलावर तो उभा राहुन तुमचे ते बोल खरे करेल.

उदाहरणार्थ, जर तुम्ही कुणाची गंमत करण्यासाठी अंधारात पडलेल्या दोरी ला साप आहे ! असे लटके जरी म्हटले, तर खरोखरच तिथे सापच निघेन, कारण तिथेही तो तुमच्या बोलावर उभा राहीन. गंमतीने लटके बोललेले तुमचे बोलावर तो उभा राहुन ते बोलही तो खरं करेल.

याकरीता जेव्हा तुम्ही चतुर्पती नामी राहुन सच्ची भक्ती कराल, तेव्हा हे चतुर्पती नाम रस आंगी येवुन तुम्ही लदबदुन जाल. चतुर्पती निरंजन ग्यान सह अनुभवाचे गाढोडे पदरी बांधुन तुम्ही अल्पवेळातच तुम्ही वेळेच्या आधीच परिपक्व व्हाल. चतुर्पती निरंजन ज्ञानसंप्पन्न व्हाल. चतुर्पती निरंजन गुढं व रहस्यमय ज्ञानाने तुमचा देहरूपी आंबा अपाडीच पिकन ! अपाडी पिकलेल्या आंब्याचा गुण रसाने व परीमयाने अन्य जन तुम्हा कडे आपोआप आकर्षित होईल.

हा आदीगण तर अनुभवानेच जाणता येणारा ! याचे वर्णन आणीक कितीक वर्णु ? अनुभवाने जाणता येण्याकरीता हा आदीगण नेमला ! आणी या एकल्या आदीपुरूष कृष्णकृपेने अनुभवासह हे सर्व काही साहय झाले. सर्व काही सिध्द झालेत.



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥








पुढील गण पुढील पानावर...

॥ खंड ०१ ॥
॥ गण नं. ०४ ॥
॥ निरसनसह मुळावरचा गण ॥

# ॥ तारू आले तारू आले ॥

॥ तारू आले तारू आले । गणपती तुझया नामी ।
तारू आले तारू आले । विठ्ठलपती तुझया नामी ।
तारू आले तारू आले ॥ घृ ॥

॥ नव्हती आकाश धरणी । नव्हत पवन हे पाणी ।
तेव्हा होती गणवाणी ॥
॥ नव्हता आकार उकार । कोठे होता धुम्मधुम्मकार ।
राया उभा निराकार ॥
॥ आदीपुरूष आदीगण । निराकार अनामत ।
निश्कलंकी उभी ज्योत ॥
॥ माया, निर्गुण । उभ केल तिरभवन ।
देहे तारावयाचे काम । देहे तारा यवगायवगी ॥ ०५ ॥

॥ देहे जिवाचे साहय । आहे या गणरायाच्या हाती ।
देहे तारले यवगायवगी । महीमा अवताराची मोठी ॥
॥ गणरायाच सुमरण । अथरव्न वेदाचं बोलनं
जागी/जम्मा करण तिरभवन । जागी करन चारही खुम्म ॥
॥ आहो धुम्मधुम्मकार । राया याही भुम्मेवरी ।
मालुम नाही जगापरी । कृष्णा उभा पुर्ण अवतारी ॥०८॥
॥ हाती घेवुनीया काठी । गण हा विघ्नाच्या पाठी ।
अवघे विघ्ने उडवी ॥०९॥

॥ गणरायाच्या हाती । आहे अमृताची कुपी ।
जागी करन अवघी सृष्टी ॥
॥ सिष्टाई करून । शिरष्टी करन/केली जागी ।
महीमा अवताराची अवघी ॥
॥ आहो बारावी ही सिध्दी । तेरवी आहे सुध्दी ।
यवगी जागी करन धरणी/सृष्टी ॥ १२ ॥
॥ महा जरी मुनी । उभे गाईच्या ठिकाणी ।
वेदभेद गुरूमार्ग येथुनी ॥
॥ निशःकलंकी अवतार । निसपुस करून टाकन सार ।
शंकाचारी हा योगी । दृष्टी दाखवन कार ॥१४॥

॥ आहो शकुनी आधार । कृपेने यवग कठले फार ।
दाखवन डोळ्यासमोर । दृष्टी देखा कार ॥
॥ आकाशवाणीचा हंकार । कलयवगी केला कार, सत्यवगी करण कार
दाखवन दृष्टी समोर ॥ १६ ॥

**भजनेः-** ॥ गणराज महाराज देव आले । मिर्त लोकी याहीन झेंडे उभारले ॥
॥ तारू आला देहीचा । संभाळ करन देहे जिवाचा ॥
॥ तारू आला देहीचा । शिक्का बसन या आदीपुरूषाचा ॥
॥ तारू उभा भक्तगण हो । याहीच्या चरणी लोटांगण ॥

॥ गण नं. ०४ ॥

॥ मुळावरचा गण ॥

## ॥ तारू आले तारू आले ॥

### -: निरसन/स्पष्टीकरन :-

॥ तारू आले तारू आले । गणपती तुझया नामी गा ॥
तारू आले तारू आले । विठ्ठलपती तुझया नामी गा ॥
तारू आले तारू आले ॥ घृ ॥

हे आदीरूप आदीपुरूषा ! तु अन्न-अग्न, पाणी-पवन, आकाश-धरणी, या सहा नरांना या देहीचे तारू बनवलेत. या सहा नरांत तुझा हंकार ओतुन साहंकारी निराधारी निरंजन सोयंम् ज्योत स्वरूपात या देहीत तेजोगुणी अंश अवतार घेवुन उभा झाला आहे. निराधार निरंजन हा सर्व देहीचा तारू बनुन सर्व देहीला आधार दिलेला आहे.

॥ अन्न-अग्न आकाश धरणी । पाणी पवन ।
या देहीचे तारू उभे । हे सहा जन ॥
या देहीला तारू उभा । तो निरंजन ॥
॥ तारू आला देहीचा । शिक्का बसन या आदीपुरूषाचा ॥

यवगान यवगात या देहीला तारण्यासाठी उभा झाला. यवगान यवगीच्या भक्तगणांचे तारू बनवलेत. भक्तगणांना तु सिध्द बनवलेत. आम्ही ना कच्चे ना पक्के मडके असलेल्या भक्तगडयांच्या भक्तीला तारण्यासाठी तसेच सिध्दगणांना सिध्द करण्यासाठी, सच्च्या भक्तगणांच्या बोलावर उभे राहण्यासाठी.. ईत्यादी अनेक कार्यासाठी तु आपल्या चतुर्व्युह रूपांची रंचना करून परिपुर्णतम् पुर्ण अवतार घेवुन येथे कृष्णदेहीवर उभा झाला. आणी चतुर्व्युह रंचनेत तुझाच यवगान यवगीचा अवधुत भक्तयोगी कृष्णाजीला तुझा पुर्ण अवतार बनवुन गुप्त रूपाने आकाशमात मध्ये उभे आहात.

॥ अकाश मात उभीआहे ज्योत । केली भुम्मेवर मात,होईन भुम्मेवर मात
साहय कराया आले अवधुत । आपल्या बाळाचे हो प्राण्या । हरी भजो.
॥ अवधुत उभे भक्तीला तारू । मुखानं आवाज केला सुरू ॥

तुम्हाच या आकाशमात मध्ये निराकार निराधार सोहंम् निरंजन ज्योत स्वरूपात उभे आहात. आकाशमात वरून या कृष्णदेहेरूपी भुम्मेवर येवुन तुम्हीच कृष्णाजी बनलेत हो ! आणी या कृष्णाजींने या भुम्मेवर मात केली. हा अवधुत सच्या भक्तांच्या भक्तीला तारण्यासाठी वेळोवेळा धावुन आला. याचे वर्णन करू तरी काय ? अशीच मात पुढेही होणार ! याचा आम्हा भक्तांस भरोसा आहे. म्हणुन आम्ही भजनांव्दारे विनवनी करतो की :

॥ मागं तारले पुढं तारशीन । भरोसा आहयं ।
भरोसा आहे म्हणुन आम्ही धरले तुझे पाय ॥
॥ तारू उभे हो भक्तगण । या देवाच्या चरणी लोटांगण ॥

तुम्हीच तुमच्या सच्च्या भक्तांना मागे तारलेत पुढेही तारत राहणार ! याचा आम्हा चतुर्पतीच्या भक्तांना भरोसा आहे. म्हणुनच आम्ही तुम्हास शरण येवुन तुमचे पाय धरले आहे. तुम्हीच सच्च्या भक्तगणांच्या बोलावर उभे राहुन त्यांचे बोल सिध्द केलेत. भक्तांना सिध्द बनवुन भक्तगणांच्या देहीचा तारू बनत येथे गुप्तरूपाने उभे आहात. भक्तगण हो ! हा तारू उभा आहे ! याहीच्या चरणी आमचे लोटांगण आहे.

हे कृष्ण अवधुता ! येथे सर्वकाही तुम्हीच आहात. तुच येथे सर्वत्राचा तारू बनुन उभा आहे. भक्तांचा तारू बनुन तु उभा आहे. भक्तांच्या बोलावर उभा राहुन त्यांना तुम्ही सिध्द बनवलेत. धन्य ही तुमची अनंत माव कोणाला कळेना ! हे अगाध वाणीच्या अगाध धनी अवधुता ! अगाध महीमा आहे गा तुही ! कितीक वर्णु तुमचे गुण ?

तुच येथे सर्व गणांचा गणपती आहेस. सर्व ईश्वरी काया ईश्वरी माया सह सर्वत्राचा पती आहेस. सर्व देवरूप सिध्दगण, जाणतेगण भक्त-योगी गण ईत्यादी चा गणपती तुच असुन तुच या सर्वांचा तारू आहे. तुच विठ्ठल असुन तुच आमच्या सर्वांचा पती आहे. या सर्वांच्या सहा नर देहीचा भ्रतार असलेला तु या नरदेहीत निरंजन सोहंम ज्योत स्वरूपात उभा आहे.

हे आदीपुरूष विठ्ठल गणपती ! तुझ्या या चतुर्पती नामी या देहीचे सर्व सहाही तारू गण चतुर्पतीची ज्ञान-भक्ती करण्याकरीता आले हो ! तारू आले हो विठ्ठल पती तुझ्या या चतुर्पती नामी गा !

**-: प्रथम पाच चरणाचे निरसनाचे ग्यान**

खंड०१/०१/०१ आदीपुरूष आदीगण मधुन घ्यावे. :-

तेव्हा होती गण वाणी...:

तेव्हा कोठे कोठे धुम्मधुम्मकार असा जो नाद होत होता, तो धुम्म्धुम्म्कार नादब्रम्हच आदीगण आदीपुरूष ची वाणी होय.

-: चरण ०६ ते चरण १६ चे निरसन :-

॥ देहे जिवाचे साहय । आहे या गणरायाच्या हाती ।
देहे तारले यवगायवगी । महीमा अवताराची मोठी ॥

निराकार निरंजन ज्योर्तिमय आदीगण आदीपुरूष हा यवगान यवगी ईकडुन पेरत तिकडुन मोडत ज्योतीचा खेळ करत आहे. हा आपरूप आदीपुरूष यवगान यवगी देह जीवाला साहयं करत आपल्या हातानं उपजत देह तारण करत आहे. आदीरूप आदीपुरूषानेच यवगान यवगात परिपुर्णतम पुर्ण अवतार घेत चतुर्व्युह रूपांची रंचना करत प्रतेक यवगात देहीमध्ये अवतरला आहे. याच्या या परिपुर्णतम पुर्ण अवताराची महीमा फार मोठी आहे. या पुर्ण अवताराची महीमा वर्णु तरी काय ? याहीच्या परिपुर्णतम पुर्ण अवतार चे ग्यान कृष्णामृंत मधुन घ्यावे.

॥ या गणरायाच सुमरण । आथरून् वेदाच बोलनं ।
जम्मा करण तिरभवन । जागी करन चारही खुम्म ॥

या आदीपुरूष आदीगणाचे सुमरन करताच अथर्वन् वेद उभा होवुन या या आदीपुरूषावर बोलन करतो. हा चतुर्पता अथर्वन् वेद या आदीपुरूष आदीगणाचे ग्यान देत चवथी अवस्था प्रकट करत चौथ्या खुम्मावर घेवुन जातो. आणी देहीचे तिरभवनी ठाई भक्ती-भाव सह चतुर्पता ची नामज्योत प्रज्वलीत करून देह जागृत करतो. या आदीपुरूष आदीगणाने आपले परिपुर्णतम पुर्ण अवतार चतुर्व्युह रंचनेत रंचुन याही चतुर्पता कृष्ण अवधुत पंथाच्या भुम्मेवर सावंगा येथे कृष्ण देहधरणीवर आपला पुर्ण अवतार कलीयवगाच्या संधीकाळात घेतलेला आहे. चौथ्या आदीपुरूष भैसा पोटचा चतुर्पता अथर्वन् वेद हा पुर्ण अवतार कृष्णा च्या मुखातुन निघाला आहे.

॥ आहो धुम्मधुम्मकार । राया याही भुम्मेवर ।
मालुम नाही जगापरी । कृष्णा उभा पुर्ण अवतारी ॥

सावगा या को-या भुम्मेवर तो आदीपुरूष आदीगण कृष्णदेहीव्दारे उभा असल्यामुळे याही चतुर्पता कृष्ण अवधुत पंथाच्या भुम्मेवर तो आधीचा

मुळयवगाचा धुम्मधुम्मकार नादब्रम्ह गर्जत आहे. आदीपुरूष आदीगण चे भजन पुंजन नाम सुमरन सह चतुर्पती ची हा कृष्णा दवंडी देत आहे. आपल्या मुखाव्दारे नादब्रम्ह गर्जत आहे. आदीपुरूषाच्या चतुर्व्युह रूपांची रंचना मधील पुर्ण अवतार कृष्णा हा गुप्त रूपात या सावंग्यात उभा आहे. हंकार उठवत आहे. आपरूप आदीपुरूष आदीगणाच्या याही पुर्ण अवताराची महीमा फार मोठी आहे. परंतु आदीपुरूषाचा हा चतुर्व्युहरूपांच्या रंचनेतील पुर्ण अवतार सर्वसामान्या करीता गुप्त असल्यामुळे या जगापरी मालुम नाही.

॥ हाती घेवुनीया काठी । गण विघ्नाच्या पाठी । अवघे विघ्ने उडवी ॥
॥ या गणरायाच्या हाती, आहे अमृताची कुपी । जागी करन अवघी सृष्टी ॥
॥ सिष्टाई करून, शिरष्टी करन/केली जागी । महीमा अवताराची अवघी ॥

हा कृष्ण गणराया एका हाती काठी घेवुन सच्च्या भक्ताने धावा करो या न करो ! तो सच्च्या भक्तांच्या दैवात असलेले भालीयाचे घाव काटयावर निर्वाळत येथे उभा आहे. सच्च्या भक्तांचे विघ्ने आरीष्टे व अहंकार झाडत आहे. सच्च्यांच्या मागे-पुढे राहत त्यांचे संरक्षण करत आहे. त्यांचा कर्ता, करविता व सत् बुध्दिचा दाता बनत त्यांची बुध्दि प्रचोद्यात करत आहे. त्यांना मेधा बुध्दि देत आहे. देणं देत आहे. तर दुस-या हाती अमृताची कुपा घेवुन तो आपणहुन सच्च्या भक्ता घरी जात, त्या सच्च्यांना दृष्टांत खुणगाठा देत आपल्याकडे आकर्षुन घेत आहे. त्यांना दंवडी च्या प्रमाणे चतुर्पतीची वाणी सांगत आहे. चतुर्पतीचे ज्ञानांमृत पाजत आहे. ब्रम्हरस सच्च्या भक्तांना पाजत देह अंबर करत आहेत. अशी शिष्टाई करत तो येथे निजरूपी शिरष्टी जागी करत उभा आहे. या पुर्ण अवताराची महिमा फार मोठी आहे. याचे वर्णन तरी करू काय ?

॥ आहो बारावी ही सिध्दी । तेरवी आहे सुध्दी । धरणी जागी करन..

हाच कृष्णदेव अवघी निजरूप सृष्टी जागी करन. सच्च्या भक्त योग्याची चवथी अवस्था जागृत करून त्यांची निजरूपी देहधरणी जागी करत आहे. देहीतील सुर्याच्या बारा ज्ञान कला धिराईने जागृत करत हा सुर्याच्या तेरव्या कलेच्या सिध्दि च्या ठाई हा उभा होतो. आणी चौदाव्या सिध्दिठाई तो पुढे मग यवगाचे काम उभ करत आहे. चंद्राच्या सोळा कला जागृत करून सत्रावी जिवनकळाच्या ठाई हाच कृष्ण प्रभु उभा होतो. *चंद्र-सुर्याच्या बारा जरी सोळा कलांचे अधिक ज्ञान खंड०२/ओवी०६ चे निरसनातुन घ्यावे.* ऐसा हा कृष्ण देह जागृत करून जागृत देहीच्या बोलावर उभा राहत आहे. ऐसी शिष्टाई करून याहीन आधी सृष्टी उभी केली आहे. आणी येथेही शिष्टाई करत लहानपण घेवुन सच्च्या भक्तांचे देह तारायाच्या काम करत हा पुर्ण अवतार गुप्त रूपात उभा आहे. चतुर्पता चे निरंजन ग्यान अमृत चा प्याला पाजत आहे. कृष्णाच्या या अमृताचा ब्रम्हरस तुम्ही घ्याहो प्या । नाम या देवाचं घ्याहो घ्या । या कृष्ण देवाच्या चतुर्पती नाम रसाई चा अमृताचा प्याला जो पिवुन मग्गांम् झाला. तो या जगाला याची वाणी सांगत आहे. धन्याचे नवलं सांगत सुटला आहे की :

॥ महा जरी मुनी । उभे गाईच्या ठिकाणी । वेदभेद गुरूमार्ग येथुनी ॥

कृष्णकृपेने जागृत झालेले हे चतुर्पताचे निरंजन ग्यान प्राप्त सच्चे भक्त योगी मग म्हणत आहे की : यवगानं यवगीचे महा महा मुनी आधी आपली चवथी अवस्था प्रकाशमान करूनच, या चतुर्पता गाईच्या ठिकाणी आलेत. आणी या गाईचा अमृत पान्हा पिवुनच त्यांनी वेद भेद गुरूमार्ग येथुनी निर्माण केलेले आहे.

जिथुन हे वेदभेद गुरूमार्ग निघालेत. ते आपरूप आदीपुरूष आदीगण आता या कलयवगाच्या संधीत विदर्भातील सावंगा या को-या भुम्मेवर कृष्ण देह धरून गुप्त रूपात उभा आहे. हेच ते मुळ स्थान होय. येथेच तो कृष्णदेव

पुर्ण अवतार घेवुन उभा आहे. येथेच तो कृष्णदेव जागृत असुन सच्च्या भक्त गणांना अनुभव देत आहे. सच्च्या भक्तगणांवर शक्तीपात करत त्यांना जागृत करत आहे. सच्च्यां वर आपल्या चतुर्पती चौकोणी मेघनिळाचा वर्षाव करत त्यांना देणं देत आहे. सच्च्यांचा कर्ता करविता सत् बुध्दिचा दाता तो होत आहे. हा निश्कलंकी अवतार सर्वकाही निसपुस करत आहे. याहीच्या परता जगात आता कोणी आमच नाही !

॥ निशःकलंकी अवतार । निसपुस करून टाकन सार ।
शंकाचारी हा योगी । दृष्टी दाखवन कार ॥
॥ आहो शकुनी आधार । कृपेने यवग कठले फार ।
दाखवन डोळ्यासमोर । दृष्टी देखा कार ॥
॥ आकाशवाणीचा हंकार । कलयवगी केला कार, सत्यवगी करण कार
दाखवन दृष्टी समोर ॥

पुढे येणा-या भैसाच्या यवगाच्या कारणास्तव हा निश्कलंकी अवतार सर्वकाही निसपुस करणार आहे. आपल्या भैसाच्या यवगाच्या निश्कलंकी मांडणा व्दारे हा शंक आचार विचाराचा शंकाचारी कृष्णा हा शंक आचार विचाराचे भक्त योगी ईथे निर्माण करत आहे. शंक आचार विचारांच्या शंकाचारी देहा करत राहणार आहे.

कृष्णाने आपल्या दृष्टी देखता कलयवगाच्या संधित केलेला सत् यवगाचा कार सह अनेक कार आपल्या सच्च्या भक्तांच्या डोळ्यासमोर दाखवत त्यांना दृष्टात देणार आहे. आकाशवाणी चा हंकार उठणार आहे. या कृष्णाच्या यवगाच्या मांडणीमुळे चारन चार घडी ऐसा नरदेही चा कोट असलेल्या स्थुल सुक्ष्म कारण महाकारण या चारही देहा पुढे शंकाचारी म्हणजेच शंक आचार विचाराने राहत चतुर्पतीचा संग करून या पाचव्या केवळ कृष्णा ची गाही देणार आहेत. चतुर्पतीच्या या शंक गणांचा गणपती कृष्णा च्या चतुर्पती नामी सर्व गण राहणार आहे. या सर्व गणांचा गणपती कृष्णाच चतुर्पता नामी सारी देहधरणी ची सृष्टी जागी करन हो ! दृष्टी दाखवन हो चमत्कार । ऐसा हा कार तो सच्च्या भक्तांच्या दृष्टी समोर दाखवन.

कृष्णा हा आमचा देहीचा तारू आला हो ! आता हाच देह जीवाचा संभाळ करन.या देहीवर या आदीपुरूषाचा शिक्का बसन. चंदन शिक्का तुच मोहंर ! अवघी किल्ली देवा तुमच्या जवळ ! हा अवधुत आला या भक्तीला तारू ! मुखाने आवाज केला सुरू ! मुखाने आवाज करा सुरू ! अन्जान आहे हो लेकरू ! उभा आहे हा देव या देहीला तारू ! देह जीव तारायासाठी, उध्दारायासाठी हा गणपती तारू आला आहे. तारू उभा हो भक्तजन ! याहीच्या चरणी लोटांगण !



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०१ ॥
॥ गण नं. ०५ ॥
॥ मुळावरचा गण ॥

# ॥ भजो भजो गणपती ॥

या मुळ गणांच्या चरणांची पलट असलेला पलटगण खंड०७/०२ मध्ये दिलेला आहे.

॥ कळसुत्र तुम्हा हाती । भजु भजु गणपती
अवघा कार तुम्हा हाती । भजा भजा गणपती ॥ धृ ॥

॥ देहे या धरून । राया सोयंम् रूपी आले ।
सेरूप दावा जगाले ॥
॥ याहीच्या शिराया मुकुट । गळा माळ वैजावंती ।
टिळा शोभे लल्लाटी ॥
॥ पायी या पद्म । आंगी चंदनाच्या उटी ।
देहे वज्र अबंर याहीची । देहे भरून उरली याहीची ॥
॥ याहीच्या चरणी उध्दार । धरणी आहे कंचनाची ।
अवघा प्रेम भाव याहीशी । देहे जागृत करशी ॥

॥ आहो यवगाची गणीता । ठाउक आहे भैसाशी ।
अवघा कार याहीच्या हाती ॥

भजने :-
॥ भजा भजा गणपती । कळसुत्र कळा/दोरी या देवाच्या हाती ॥
॥ कळसुत्राचा मालक । कळसुत्र कळा/दोरी या देवाच्या हातात ॥
॥ उभा गणराजा गणपती । अवघा कार आहे या देवाच्या हाती ॥
॥ तुम्हा पासुन अवघे जन । कार करा, महाराजा येवुन ॥
॥ भजनी उभा राहय गणराजा । नाम तुझं.....।
चतुर्पती गिण्यान दयाहो मज । चतुर्पती बिरद कर गा उभं ॥
॥ गणराज महाराज । उभे राहा येवुन ।
अमृताची गंगा वाहे । याहीच्या मुखातुन ॥
॥ गणराज महाराज...व्हा प्रसन्न । आम्ही करतो सुमरण रात्रंदिनं ॥
॥ गणराज महाराज.. मोक्ष देणं । आम्ही करतो तुमचे सुमरन रात्रंदिन ॥
॥ गणराज महाराज व्हावे साहय । ही अरज आता लेकरांची आहयं ॥
गजर :-
॥ भजनी महाराज बोले । जैसा प्रभुराज डोले ।
देल्ली भेट बहु लाभ झाला आम्हाले ॥

-: शब्दार्थ :-

**सोयंम्** :- आपरूप, स्वतःहुन । **शिराया** :- डोक्यावर । **लल्लाटी** :- कपाळी
**कंचनाची धरणी** :- सोन्याप्रमाणे चकाकी असणारी देह/धरणी, तेजोमय आरावलयाची देही ।



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०१ ॥
॥ गण नं. ०६ ॥
॥ मुळावरचा गण ॥

## ॥ प्रथम भजु गणराजा ॥

॥ प्रथम नमो/भजु गणराजा । रंगणी, रंग राखा माझा ।
दोन्ही कर, जोडुन तुम्हा । विनवीतो चत्रभुजा ॥ घृ ॥
॥ चौघा जनाचा, अंगीकार संग । घेवुन चालवजा ।
तिरलोक्याचा, घेतला हवाला । त्वां आदीरूपा ॥
॥ संत महंत सभा पंडीत । तुम्ही देवा अवघे जन ।
चित्तमन लावुन, ऐकाव देवा । माझ, पोपटं/बोबडं बोलनं ॥
॥ काया मती, दया हो प्रिती । शकुन गुण गाया ।
तुमच्या चरणी, मस्तक माझी । उजळाना काया ॥ ०४ ॥
॥ सहा शास्त्र, चार वेद । हा ठवळागिर ।
ऐक रे, गुरूपुत्रा । गण हा, आहे निराकार ॥
॥ पांडवाच्या, बळान कोणी । एक, लावन ध्वजा ।
शकुन चालन, भैसाचा धनिदेव । यवगा वर उभा ॥ ०६ ॥
किंवा म्हणनी नं.०२ ॥ पांडवाच्या बळानं याहीच्या कोण मोडतीन, ध्वजा ।
हुकुम/शकुन चालन भैसाचा । धनिदेव यवगावर उभा ॥

**भजने :-**

॥ भजनी उभे आदीगण । चतुर्पती गिण्यान या बाळाला देणं ॥
॥ चतुर्पती गिण्यान दया देवा । हदयी लावा माझेया ग्यानाचा दिवा ॥
॥ गणराज महाराज व्हावे प्रसन्न । आम्ही करतो सुमरण रात्रंदीनं ॥
॥ गणराज महाराज तुमची वाणी । कराव कारण, हरी मुखाच्या वचनी ॥
॥ गणराज गणपती । कळसुत्र आहे या देवाच्या हाती ॥
॥ उभा गण पृथ्वीचा पती । अवघा कार आहे या गणाच्या हाती ॥
॥ गणराज महाराज व्हावे साहय । आहो साहयें..
ही अरज आता । या लेकरांची आहे ॥

### -: शब्दार्थ :-

**चौघा जनांचा अंगिकार...** :- स्थुल, सुक्ष्म, कारण, महाकारण या चारही देहातुन निघणा-या वैखरी, मध्यमा, परा, पश्चंती या चारही वाणीव्दारे निघणारी मौस वाणी चा अंगिकार संग घेवुन चालवजा. कारण की : जेव्हा माझा हा जीव चौ-यांशीत हिंडत हिडत कोणी एक देव हवाला घेईना, तेव्हा कृष्णदेवा ! तुया पेठीवर आल्यावर तुच उतरला या कायापुर च्या हद्‌य पेठेच्या मनच्या तक्ती वर । आणी या देहीला चतुर्पती नामज्योतीत ठेवुन या देहीच्या तिरलोक्याचा हवाला तुच घेतला आहे. । **पोपट बोलनं** :- ज्याप्रमाणे पोपटाचा धनी व्दारे पोपटाला जसे शिकविल्या जाते तसे तो पोपट बोलतो, त्याचप्रमाणे आमच्या जवळी असलेला शिकविता धनी कृष्णाने जे आम्हास चतुर्पती ग्यान शिकविले तेच आम्ही पोपटा प्रमाणे बोलत आहे. । **बोबडं बोलनं** :- आम्ही नेनंती बालक आहोत. आमच्या कृष्ण पित्याने जसे बोलनं शिकविले त्याप्रमाणे जरी बोलता आले नाही तरीसुध्दा आम्ही कसेतरी बोबडं बोलनं करत आमच्या कृष्ण पित्याने शिकविलेले चतुर्पती ग्यान सांगत आहो. । **काया** :- कंचन देह, अखंड देहजीव । **मती** :- मेघा बुध्दि । **प्रिति** :- प्रेम । **उजळाना काया** :- कापुराची ज्योत जशी उजळल्या जाते तशी या कायेची आत्मज्योत उजळुन देहीच्या ठाई ठाई समया लावुन ही देह जागृत करा. देह उजळुन देहीला प्रकाशमान करा. । **ढवळा** :- निश्कलंकी कापुराप्रमाणे शुभ्र पांढरा रंग । **गिर** :- पर्वत । **ढवळागिर** :- जसा हिमालय दुरून निश्कलंकी पांढराशुभ्र दिसतो तसा निश्कलंकी पांढराशुभ्र बेडाग, गुण नाही गव्हर असलेला बेडाग शंक आदीपुरूष आदीगण कृष्णा !

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०१ ॥
॥ गण नं. ०७ ॥
॥ मुळावरचा गण ॥

# ॥ भजन पुजन ध्यान तुमचे ॥

॥ या मुळगणांच्या चरणांची पलट असलेला पलटगण खंड०७/०१ मध्ये दिलेला आहे. ॥

॥ भजन पुंजन, ध्यान तुमचे । राया ध्यान तुमचं
आदी गणाला आळंगितो । गिण्यान, दया मजं ॥
॥ आदी गणाला, आळंगितो/विनवितो । या भजना मंध्यी ।
मौंसा मध्ये बसुन आपली । चालु दया वाणी ॥
॥ गायी पोटी, चार वेद । गिण्यान सागर ।
चवथ्या वेदाचं होय बोलनं । जागी करन सार ॥
॥ चातुर आहे, उभा याहीच्या । मौंसाला हिरं ।
तिर गुणांच ग्यान् शुन्य । उडवन सारं ॥ ४ ॥
॥ चत्रभुज महाराज देवा तुम्ही । दावा सेरूप ।
देवा या जीवाचं/शिवाचं सेरूप । हे आहे एक ॥
॥ आदी भैसा खुम्मी देवाची । मेहर छायासं/साहयास ।
याहीच्या हाती आहे । बाळ, गोपाळाचे काजं ॥

**भजने** :- ॥ अदिगणांच सुमरन । अर्थवन् वेदाचं/आदीपुरूषाचं होय बोलनं ॥
॥ आदीगणाचं सुमरन । चतुर्पती गिण्यानं या बाळाला देणं ॥
॥ आदीगणाला विनवीतो । चतुर्पती गिण्यान या देवाला मागतो ॥
॥ बसली भजनाची मांड । आम्हा दयाहो गिण्यानाचा सांड ॥
॥ चतुर्पती गिण्यान दया देवा । अंतरी लावा ग्यानाचा दिवा ॥
॥ चतुर्पती गिण्यान दया देवा । तुमच्या चरणाचा धरला धावा ॥
॥ चतुपती गिण्यान दया देवा । तुमच्या चरणावर ठेवला माथा ॥
॥ चतुर्पती गिण्यान दया हरी । माझा माथा तुमच्या चरणावरी ॥
॥ भजन करता मिळलं भोजन । हरीचे/ध्रुताचे/विठ्ठचे नित्य.... ।
नाम घेता चुकतीन चौ-यांशी बंधनं/यवनं । नामघेता देव होईन प्रसन्न ॥
॥ भजन करता मिळन भोजन । ऐसं सांगुन ठेवलं कृष्ण रायानं ॥
॥ आदीगण भरले हो पोटी । सांगता सत्कृताच्या गोष्टी ॥
॥ आदीगण भरले हो आंगी । हरीचे बोलनं झालं चौरंगी/बहुरंगी ॥
॥ आदीगण भरले या देही । हरीचे बोलनं झालं चौताळी ॥
॥ हदयी धरून उभा जवळ । लोट मारली देवाच्या चरणावर ॥

**शब्दार्थ** :- **आळंगीतो** :- भक्ती-भावाने हद्यात अर्तभुत करून, हद्यी मासांच्या पेशी-पेशीत, रोमा-रोमात आदीगणांबध्दलच्या भक्तीभावाला जागा देणे. निराकाराला निराकार भक्ती-भावाने हद्यी कवटाळणे, निराकार आदीगणाला भक्ती-भावाच्या मार्गाने आंगी भरून मिठी मारणे । **मौसा मध्ये बसुन** :- या देहीमध्ये बसुन, या देहीच्या वैखरी मध्यमा परा पश्चंति या चारही वाणीतुन निघालेल्या मौस वाणी व्दारे आपली वाणी चालु दया । **मौसाला हिर** :- हि-याप्रमाणे चकाकी असलेल्या चातुर कृष्णदेहीतुन निघालेल्या मौस वाणीला हि-याप्रमाणे तेजोपुंजः चकाकी आहे. । **देवा या जीवाच/शिवाचं सेरूप हे आहे एक** :- या आदीपुरूष कृष्ण देवाचे सेरुप आणी या देहीचा शिव म्हणजेच आत्मा/जीव चे सेरूप हे एक आहे. कारण की : कृष्ण धनीदेव हा निराकार आहे, तर या देहीचा आत्मा निराकार आहे. कृष्ण धनीदेव हा निर्गुण आहे, तर या देहीचा शिव म्हणजेच आत्मा हा सुध्दा निर्गुण आहे. कृष्ण धनीदेव हा चैतन्यमय आहे, तर या देहीचा आत्मा हासुध्दा चैतन्यमय आहे. जे तेजोगुण या कृष्ण धनीदेवात आहे तेच तेजोगुणं या आत्म्यामध्ये अंश रूपात असल्यामुळे, या कृष्ण धनी देवाचे आणी या शिवाचे म्हणजेच आत्मा/जीवाचे सेरूप एक आहे. । **मेहर** :- कृपा । **छाया**:- देहीवर आत्याची पडलेली छाया म्हणजेच प्राण । **मेहर छायेस**- धन्याच्या कृपाप्रसाद धन्याच्याच अंशअवतार आत्माराम ची छाया रूपी प्राण असलेल्या या देहीस आहे ।

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०१ ॥
॥ गण नं. ०८ ॥
॥ मुळावरचा गण ॥

## ॥ मुळस्तंभीचा गण ॥

॥ मुळ स्तंभीचा गण । धनी उभे आहे निर्वाणं ।
हा होय चवथा खुम्म । यान उभ केलं मंडयानं ॥
॥ चौताळाचा धनी । उभा आहे हा निर्वानं ।
हा होय चवथा खुम्म । गोपाळा साठी, ये बाप्पा धावुन ॥

॥ शकुनाचं साहय । उभे केले तिन ताळ ।
हा होय धन्याचा खेळ ॥
॥ स्वर्ग मिर्त पाताळ । ताळ तीनं ।
ही पाण्याची नरदेही । तार येवुन ॥
॥ भैसराज महाराज । करावं कारण ।
करावं कारणं । रूप दावा येवुनं ॥
॥ आदीपुरूष आदीगण । कराव मोहीम ।
तेरव्या सिध्दिला । उभे राहा येवुनं ॥०६॥

॥ पुर्विस्ताचा दोरा । साहय केलं प्रभुनं ।
हेच होय द्युताचं देणं ॥
॥ द्युत सांगे भुम्मेवरी । नाम गर्जे भुम्मेवरी ।
करा बा यवगाची । यवगाची तयारी ॥
॥ अंबर पदाची । करा बा तयारी ।
का करता घडामोडी । अवधुत राया ॥
॥ कळसुत्र कळा । आहे तुम्हा हाती ।
अवघे मानव लावा । या एका पंथी ॥१०॥

॥ उघडा कवाड । देहे या देवळाचे ।
आता राज्य आले । सम-शेरांचे ॥
॥ आदीपुरूष भरन देही । मानवाला भय नाही ॥
॥ आदीपुरूषाचा खेळ । कोणा नाही कळेना ।
ये गा अवधुत राया । यवगावर साहयं ॥
॥ येवुन कर बाप्पा दया । दिला आधार ।
दिला आधार नामाचा । महाराजाची मेहर ॥१४॥

भजने :-
॥ आदीपुरूष आदीगणं । इच्छा धरली हो या प्रभुनं ॥
॥ इच्छा धरली प्रभुनं । उभ केलं आदीमाया चैतन्यं ॥
॥ आदीमाया पासुन । ब्रम्हा विष्णु शंकर तिघे जन ॥
॥ उभा देव पृथ्वीचा पती । याहीन रंचली नवखंड शिरष्टी ॥
॥ याहीन रंचली शिरष्टी । अवघा कार आहे या देवाच्या हाती ॥
॥ आदीपुरूष आदीगण । कार करा महाराजा येवुन ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

खंड 01-भाग 02 : अष्टशक्तियाँ पुढील पानावर..

॥ खंड ०१/भाग-०२ ॥

## ॥ मुळावरची शक्ती ची ओवी नं. ०१ ॥

ओवी महात्म :- स्थापनेच्या व जागृतिच्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी

॥ मुळावरच्या शक्ती ची निरसनसह मुळावरची ओवी ॥

# ॥ शक्तीची ओवी ॥



वरचरण :-

॥ सांगीवर सांगत आहे खरं । निराकार निराधार ।
सांगी सांगुनीया शक्ती निघन, वर अग्नीच जाळ ॥

## ॥ ओवी ॥

॥ सांगीवर सांगी आहे खरं । शक्ती होय वर अग्नीच जाळ
ती नाही ठेवणार, कुणाची उर । कल यवगात..
जोकोणी करन भक्ती, त्याला देईन भेट ॥०१॥

॥ निराकार-निराधार । याशी गुण, नाही गव्हर ।
शक्ती म्हणे ''हा देव नाही खरा'' । निघुन गेली..
इच्या मुखात आलं जाळ । अग्न-धुनी उठली ॥



॥ शक्ती बोले, कर्ता-याशी । भला देवा, टाकुन गेला मजशी
जावे निराकारा च्या पाशी । येतो मी खरा..
आजवरी लौटले यवग । दिसेना डोळा ॥०३॥

॥ आंगी अग्न, परोपरी मदन । मस्तकी शिल्ला, दिले तिरनयन
शक्ती आप, आली पलटुन । रूत दे मजला..
हे आले, आवाजी बीज । खबर नाही तुजला ॥

॥ आवाजी उभे, स्थापले खुम्म । तिन पहा, जाळले शक्तीन ।
चवथा एक होता, गायप झाला...
आजवरी लौटले यवग, दिसेना डोळा ॥०५॥

॥ शक्ती बोले, पाचव्यानं । निराकारा ! रूत मजला देनं ।
काय केले, चारही खुम्म ? सांग तु मजला..
घडोघडी मागते रूत । बर नोव्हे तुजला ॥०६॥

॥ तीन जाळले, एक गायप झाला । कायतरी म्हणावं ? त्या गायपाला
''भैस'' म्हणुन विनव त्याला । असला येईन..
इन मांडली प्रार्थना, भाव धरून ॥०७॥

॥ पद्म रत्न, हिरे लेला । चवथा आदीमुनी अवतार आला ।
निराकारानं, गोयली वचनी । सांगन मागणं/मानं..
तुम्ही उभे, दयाहो चैत्यन्य । दयाहो चैत्यन्य ॥०८॥

भजने :-

॥ ब्रम्ह राखीचा साचा । याहीनं, जागी केला ।
ब्रम्हांड रूपाचा, ब्रम्ह देव । उभा राहीला ॥
॥ विष्णु राखीचा साचा । याहीनं, जागी केला ।
विश्व रूपाचा, विष्णु देव । उभा राहीला ॥

॥ शंकर राखीचा साचा । याहीनं, जागी केला ।
शंक रूपाचा, महा देव । उभा राहीला ॥
॥ तिनखुम्म जागी केले याहीनं । तिनखुम्म जागी केले याहीनं ।
आणीक चौथा दिला । तिर नयन ॥

॥ चौथा शिक्का तुला तिरनयन । कलीत होईन, बोधपण ।
उडवन कलीचं ठिकाण । हिशोब पहा आपुला..
तुम्ही निघुन गेले कैलासा । आहो ऐकला ॥०९॥

॥ कैलाशी निघुन, गेले तुम्ही । अवघी धरणी हो, पडली सुनी ।
गुण नाही गव्हर, याहीच्या मनी । पुसावं यवग्याला..
भुम्मेवर भुम्मा गोळक । होतीन गोळा ॥१०॥

॥ भुम्मेवर भुम्मा गोळक, होतीन गोळा । चवथ्या/चौ खुम्माचा, राहीन जिव्हाळा.
तीन खुम्म येतीन शरणा । आदीमुनी..
अवघ्याचा चुकवन मोहजबा, तेव्हा पासुनी ॥११॥

॥ यमपुरी, इंद्र सभा । निजधाम वैकुंठ, कैलास गडी ।
येतीन मोहजब्याच्या वेळी । होतीन गोळा..
भुम्मेवर भुम्मा गोळक । दिसन डोळा ॥१२॥

॥ जाळामुळा पासुन, येतीन गडी । अवघी धरणी, होईन रूमावळी ।
रोमीधुत येतीन भुम्मेवरी । पहा येथुन...
किंवा म्हणनी २- रूमद्युत उठन देहीवरी । पहा येथुन.....
देहीचा चुकन मोहजबा, तेव्हा पासुन ॥१३॥

॥ पहा शक्तीच जाळमुळ । शक्ती आहे, चरांचर ।
शक्ती काय, निघते भलत्याच घर । शक्ती बाजारी..
इन भरवला बाजार, भुम्मेवरी ॥१४॥

॥ भुम्मेवर भुम्मा गोळक, होतीन गोळा । शक्तीचा बाजार, मोडन सारा
जागानाही राहणार, शक्तीला । पडन विचारी..
मग राहीन म्हणन, तयाच्या चरणा वरी ॥१५॥

॥ तयाचे उध्दरतीन हे जीव । भुम्मा गोळक, आहे निर्भेव ।
शक्ती राहीन, याहीच्या सवं । सैवंरात किंवा सेरूपात..
सेरूपी भैस, उभा राहीन देहीत ॥१६॥

॥ देहीचे शकुन, भडकन अग्न । तेव्हामग जल-जलाट, होइन काम
थरथरा कापन, तिरभवन । धनी आला..
हा उरल्या देहीत भेट देईन अवघ्याला ॥१७॥

भजनं :-
॥ धनी आला हो आला । हा उरल्या देहीत भेट देईन अवघ्याला ॥१८॥
॥ धनी आला हो आला । उजाला नामाचा तिरभवनी झाला ॥

ओवी महात्मः- स्थापनेच्या/जागृतिच्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी...
॥ मुळावरची शक्ती ची ओवी ॥

# ॥ निरसनसह शक्तीची ओवी ॥

## -: निरसन/स्पष्टीकरन :-




### १. शक्ती :-

प्रथम एकला असलेल्या आदीरूप आदीपुरूष परंब्रम्ह नारायणाच्या चरांचर व्याप्त मनात ''मो-ह सृष्टी रंचावी'' अशी ईच्छा प्रकट झाली. आणी तो निराकार निराधार निश्कलंकी ज्योतिर्मय स्वरूपात उभा झाला. आदीरूप धन्याची ही ज्योत च सर्वात आधी ची अग्नी होय. हीच वर अग्नी होय. या आदीरूप ज्योतीलाच वर अग्नीच घर असे संबोधील्या आहे. या वर अग्नीचे घर असलेल्या आदीरूपाच्या ज्योतीत आदीरूपाची 'मो-हं सृष्टी रंचावी' ही ईच्छाच त्या उभ्या असलेल्या निराकार निराधार निरंजन ज्योतीच्या मुळावरचा रंग धरून अद्‌भुत अश्या शक्ती रूपात प्रकट झाली. *अधिक ग्यानाकरीता खंड०१/०१/गण-०१ :- आदीपुरूष आदीगण चे निरसन वाचा.* ती शक्ती वर अग्नीच्या घरातुन उत्पन्न झाल्यामुळे या शक्तीचे सुध्दा घर हे वर अग्नीच होय. शक्ती ही वर अग्नीच्या रंग घेवुन ती प्रकट झाल्याकारणाने वर अग्नी जाळ चे गुण शक्तित आहे. वर अग्नीच्या मुळावरची शक्ती ही सुध्दा वर-अग्नी च्या जाळाप्रमाणे पसरलेली फाकलेली आहे. शक्ती ही वर-अग्नीच्या म्हणजेच या आदीपुरूषाच्या निशंःकलंकी निरंजन ज्योतीच्या मुळावरील रंगाव्दारे निर्माण झाली असल्यामुळे, तिलासुध्दा अग्नीच जाळ म्हणुन आध्यात्मीक विश्वाने संबोधलेले आहे. तिला अग्नीच जाळ याच करीता म्हटले आहे की : ज्याप्रमाणे तुम्ही अग्नीचा उपयोग करून निर्मिती करू शकता, अथवा विध्वंस करून प्रलयास कारण होवु शकता. त्याचप्रमाणे या शक्तीव्दारे तुम्ही निर्मिती करू शकता, अथवा विध्वंस करून प्रलयास कारण होवु शकता.

उदाहरणच दयायचे म्हटले तर घरच्या अग्नीचेच घेवु या । जसे घरातील अग्नीपासुन तुम्ही त्या अग्नीला योग्य त्या बंधनात ठेवुन म्हणजेच तिला चुलबंधनात टाकुन, तिच्याशी जपुन वागुन तिच्या मदतीने पोषक अश्या स्वयंपाकाची निर्मिती करू शकता. परंतु त्याच अग्नीला तुम्ही जर जपुन न वागता तिला बंधनात न ठेवता स्वैर सोडले, तर तीच अग्नी तुमचे घर भस्मसात करून विध्वंस करू शकते. किंवा तुम्हालाच भाजुन काढु शकते. अश्याप्रकारे या एकाच अग्नशक्ती व्दारे विध्वंस अथवा निर्मिती होते. म्हणुनच जाणते जनांनी असे सांगुन ठेवले आहे की : ''शक्ती म्हणजे शक्ती ।'' तिच्याशी जपुन वागावे. तिला स्वैर न सोडता तिला सदा बंधनात ठेवावे. तिला आपल्या सपुर्णतः ताब्यात ठेवावे. आपल्या नियंत्रणाखाली ठेवावे. याच प्रित्यर्थ खंड०२/ओवी-३०:-आदीमुनी महामुन कसं नात या ओवीचे चरण गर्जुन सांगत आहे की : *जो माझा खेत्री, त्याची मी शक्ती । तोच माझा वर ।* ते अक्षरशः खरे आहे. कारण की : जो क्षत्रिय बनुन या शक्तीचा जींकुंन आपल्या ताब्यात व बंधनात ठेवतो, त्याचीच ती शक्ती बनुन राहते. तोच त्या शक्तीचा वर/पती बनुन राहतो. असो.

जो कोणी अश्या रितीने घरच्याही शक्तीला ठेवुन भक्ती करन । त्यालाच ही शक्ती भेट देवुन त्याची सव बनुन म्हणजेच त्याच्यावर माया-ममता करणारी

स्त्री बनुन, त्या निराकारी निराधारी आदीपुरूष धन्यांची भेट करून देण्यास अवश्य साहय होईल.

आता या शक्तीरूपी अस्तुरी व आदीपुरूष कर्ता म्हणजेच मुळयवगाचा एकला प्रथम पुरूष यांच्यात झालेल्या ख-या सांग्या व संवाद चित्त लावुन ऐका हो । आदीपुरूष आदीगणाच्या ईच्छा व्दारे प्रकट झालेल्या या शक्तीने काय काय केलेत ? याचे ज्ञान या शक्तीच्या ओवी मधुन घेवु या ।

वरचरण :- ॥ सांगीवर सांगत आहे खरं । निराकार निराधार ।
सांगी सांगुनीया शक्ती निघन, वर अग्नीच जाळ ॥

हा निराकार परमात्मा सांगीवर सांगी दृष्टांतासह सांगते. आणी हा निर्गुण आत्मा दृष्टांत पहात ही सांगी ऐकते. निर्गुणाने दृष्टांसह ऐकलेली निराकार निराधार धन्याची सांगीवर सांगतलेली ही सांगी खरी आहे. ही सांगी सांगुन ही शक्ती वर अग्नीच्या जाळाप्रमाणे धगधगेल. ही सांगीवर सांगी खंर आहे. याची प्रचिती ही शक्ती देईल. वर अग्नीची गाही साक्ष प्रचिती देईल.

॥ सांगीवर सांगी आहे खरं । शक्ती होय वर अग्नीच जाळ ।
ती नाही ठेवणार कुणाची उर । कलयवगात..
जोकोणी करन भक्ती, त्याला देईन भेट ॥ ०१ ॥

आदीरूप ज्योतीच्या मुळावरचा रंग धरून उत्पन्न झालेल्या शक्तीने विविध रूप घेवुन आपल्या रूपा-रूपांचा बाजार मांडला आहे. हा बाजार सुध्दा वर अग्नीच्या जाळाप्रमाणे तिने पसरवला आहे. या बाजारातील या शक्तीला उध्देशुन केलेल्या एकापेक्षा एक सरस असलेल्या ज्या काही सांग्या सांगीतल्या आहे, त्या संपुर्णतः ख-या आहेत. येथे या मिर्तलोकी एकापेक्षा एक सरस अश्या सांग्या तो निराकार निराधारी आदीपुरूष कर्ता सागंत आहे. त्या सर्व सांग्या ख-या आहेत.

सर्व सगुण-निर्गुणात, आकारा-निराकारात, व्यक्त-अव्यक्त यामध्ये तो आदीपुरूष धनी सर्वत्र व्याप्त होवुन भरून भरला आणीक उरला आहे. या उरलेल्या चौथ्या धन्याचीच आकाशमात मध्ये निराकारी निराधारी निशंःकलंकी निरंजन ज्योत उभी आहे. ही चौथ्याची निरंजन ज्योत वस्तुतः वर ची अग्नी होय. वर-अग्नी होय.

वर-अग्नी चे घर असलेल्या चौथ्या आदीपुरूष अहीन धनीदेवाचे अहीनाघरचे चतुर्पता ग्यान हे अहिनाघरच्या आदीपुरूष पुर्ण अवतार निराकार निर्गुण निरंजन ज्योतिर्मय कृष्णाजी यांनी आम्हास दिलेले आहेत. या आदीपुरूषाची ही निरंजन ज्योत पिंडी या ब्रम्हाडी सर्वव्याप्त आहे. या निरंजनानेच पिंडीच्या मिर्तलोकी च्या हद्यी उभा राहुन ज्या काही सांग्या येथे सांगीतल्या आहेत, त्या सांग्या सांगताच ही वर-अग्नी अग्नीज्वाला प्रमाणे या मिर्तलोकी सर्वत्र पसरत जाईन.

या सांग्या सांगताच चतुर्पती ची अनामत शक्ती या मिर्तलोकी धगधगेल. आणी या अग्नी-घरचे असलेले अनामत शक्तीने दिलेले अहीना घरचे चतुर्पती नाम हे मायेला खाली खाली दाबत नेईल. आणी या मायेला नमवुन तिला आपल्या अध्यक्ष्यतेखाली घेवुन मिर्तलोका वर अग्नीच्या जाळ प्रमाणे प्रसरेल. जो कोणी या चतुर्पतीची सच्ची भक्ती करेल, त्याला ही आदीपुरूष अनामत ची शक्ती प्रथम भेट देईन.

निरंजन आदीपुरूषाच्या ‘मो-ह सृष्टी रंचावी‘ या ईच्छाव्दारे प्रकट झालेली एकटीच शक्ती ही सृष्टी निर्मिती करू शकत नसल्यामुळे ती बहुत यवग आदीरूप आदीपुरूषाच्या आकारी रूपाची वाट पाहता पाहता थकली. आणी शेवटी त्रासुन उग्दीग्न होवुन बोलु लागली की :

॥ निराकार-निराधार । याशी गुण नाही गव्हर ।
शक्ती म्हणे ‘‘हा देव नाही खरा । निघुन गेली..
इच्या मुखात आले जाळ । अग्नी-धुनी उठली ॥ ०२ ॥

‘ज्याला आकार नाही असा निराकारी । ज्याला काहीच आधार नाही असा निराधारी । ज्याला कोणताही गुण नाही असा निर्गुण । ज्याला कशाचाही गंध/डाग नाही असा तो बेडाग/गव्हर । म्हणजेच ज्याला कलंक नाही असा तो निशंःकलंकी‘ असलेला धनी देव हा खरा देव नाही. हा काही सत्य देव नव्हे । निराकार निराधार याशी गुण नाही गव्हर । हा देव नाही खरा । असे अग्नीज्वालाप्रमाणे जळजळीत बोल शक्ति उध्दिग्नतेने बोलली.

शक्तीच्या मुखातुन तिच्याच कर्तार धनी असलेल्या निराकार निराधार निश्कलंकी आदीरूप धनीदेवा च्या नामाची अवहेलना करणारे, त्याला असत्य ठरवणारे अग्नीज्वाला प्रमाणे जळजळीत धगधगते बोल निघालेत. आणी *‘जैसे कर्म तैसे फळ’* या न्यायाने तिच्या अग्नीज्वालाप्रमाणे बोललेल्या बोलाचे फळ तिथे धगधगत्या अग्नी ज्वाला उत्पन्न होवुन उपजले. आणी तिथे त्या अग्न ची ची भुल पाडुन भ्रांतीत टाकणारी धुनी उठली. ही भुलवनीच्या धुनी ची भ्रांती शक्तीला चिकटुन शक्तीचे रूप भ्रांतीत पडले.

या अग्न-धुनी च्या धुळधानीमुळे शक्ती त्या आग्नेय दिशेला सोडुन तिच्या कर्तार असलेल्या धनीदेव ईश्वराला पुनश्चः विनवणी करण्यासाठी ती इशान्येला आली. त्या इश्यान्य दिशेला उत्तरमुखी होवुन, दोन्ही हात जोडुन आपल्या कर्तार असलेल्या त्या आदीरूप आदीपुरूषाला उध्द्देशुन नम्रपणे बोलुन विनवु लागली की : *भला देवा । मज टाकुन गेला ?*

॥ शक्ती बोले कर्ता-याशी । ‘‘भला देवा टाकुन गेला मजशी ।
जावे त्या निराकाराच्या पाशी । येतो मी खरा.....
आजवरी लौटले यवग । दिसेना डोळा ॥०३॥



उत्तरमुखी होवुन उत्तर कडे दृष्टी ठेवुन हात जोडुन ती शक्ती उभी राहली. आणी तिच्या कर्ता-याशी म्हणजेच तिला ज्याने उत्पन्न केले त्या निराकार निराधार निरंजन स्वरूपी आदीपुरूषाला विनवणी करू लागली की : तु मला धुम्मधुम्मकार ओहंम् व निराकार निरंजर ज्योत स्वरूपी सोहंम् च्या ऐक्यातुन निघालेला जो तुझा मुळावरचा रंग आहे, त्यापासुन उत्पन्न केले. आणी मलाच तु बेवारस टाकुन दिले ? मला एकटीलाच टाकुन देवुन, तु निशःकलंकी बनुन गायप आहे. मला एकटीलाच यवगान यवगात टाकुन गेला आहे । हे बरे भले आहे का ? भला देवा । टाकुन गेला मजशी ? शक्तीच्या मुखातुन लिनतेने व्याकुळतेने असे व्याकुळ बोल निघताच, तिथे आवाज उठुन आकाशवाणी झाली की :

तु आता त्या निराकारा पाशी जावे । मी मागुन आकार घेवुन खरोखरच येणार आहे. हा सत्यदेव निर्विकार बनुन खरोखरचं रूपारूपात येणार आहे. येतो मी खरा तुझ्या समोर । येतो मी खरा । तेव्हा शक्ती पुनश्चः विनवणी करून बोलली की : आजपर्यत बहुत यवग लौटले, तरी अजुनही निर्विकार आकारी रूप माझ्या डोळ्यांना दिसेना । येतो मी खरा । या उठलेल्या आवाज चे शकुन केव्हा साधल्या जाईल ?

याप्रकारे शक्तीने व्याकुळ होवुन कळकळीने विनवणी केल्यानंतर, त्या शक्तीला दिलासा देवुन थोडेबहुत शांत करण्याकरीता त्या कर्ता-याने तिथे आकाशवाणी चे आवाज उठवुन तिला देण दिले. त्या निराकार निराधार आदीरूप कर्तार धनीदेवाच्या आकाशवाणी व्दारे उठलेल्या आवाजाच्या प्रतेक शब्दाचे देणं तिला प्राप्त झाले. ते असे :

॥ आंगी अग्न, परोपरी मदन । मस्तकी शिल्ला, दिले तिरनयन ।
शक्ती आप आली पलटुन । रूत दे मजला....
तुला दिले आवाजी बीज । खबर नाही तुजला ॥०४॥

या चरणाच्या प्रतेक शब्दाच्या उठलेल्या आवाजा व्दारे प्रतेक शब्दाचे देणं, आदीपुरूष कर्ता कडुन शक्तीला प्राप्त झाले ते याप्रमाणे :

१. **आंगी अग्न** :- हा आवाज कर्ता-याच्या आकाशवाणी व्दारे उठताक्षणीच, शक्तीची अंगकांती ही अग्नीप्रमाणे तेजोमय झाली. शक्तिला **तेजोगुणी अंगकांतीचे देणं** मिळाले.

२. **परोपरी मदन** :- हा आवाज कर्ता-याच्या आकाशवाणी व्दारे उठताक्षणीच, शक्तीच्या रोमारोमात म्हणजेच त्वचेच्या प्रतेक छिद्रात मदन बीज येवुन, तिची अंगकांती ही मदनमस्त झाली. मदनमस्त अंगकांतीची शक्ती ही सृष्टी निर्मितीस सक्षम झाली. तिला **मदनमस्तता व सृष्टीनिर्मिती करण्याची क्षमतेचे देणं** मिळाले. या देणं व्दारे शक्तिला प्रकृतिचे रूप म्हणजेच महद्मायेचे रूप प्राप्त झाले.

३. **मस्तकी शिल्ला** :- हा आवाज कर्ता-याच्या आकाशवाणी व्दारे उठताक्षणीच शक्तीला तेजोमय चैत्यन्यमय प्रकाश चा चैतन्याचा शिक्का/शिल्ला तिच्या मस्तकी मिळाला. तिला **चैतन्याचा शिक्का चे देणं** होवुन चैतन्याचा शिक्का तिच्या हाती आला. या चैतन्य चा शिक्का तीच्या आंगी येवुन तीला चैत्यन्या चे रूप प्राप्त झाले.

४. **दिले तिरनयन** :- हा आवाज कर्ता-याच्या आकाशवाणी व्दारे उठताक्षणीच, तिथे सृष्टी चे काम करणारे तिन खुम्म व या तिन खुम्माच्या पाठीशी चवथा खुम्म अशी आवाजी उत्पत्ती होवुन या चौ-खुम्माचे देण झाले.

हे चारही देणं शक्तीला झाले. परंतु तीचे रूप भ्रांतीत असल्यामुळे ती फक्त १. आंगी अग्न २. परोपरी मदन आणी ३. मस्तकी चैत्यन्यचा शिक्का चा तेजोमय चैत्यन्याचा प्रकाश यातच दंग झाली. स्वस्वरूपी दंग झाल्यामुळे तेथील भुलवनीची धुनी च्या भ्रांतीत पडत गेली. त्यामुळे तिचे लक्ष्य या चौथ्या ४. दिले तिरनयन व्दारे प्रकट झालेल्या या चौखुम्माच्या देणं कडे गेले नाही.

हे चारही देणं “ मो-हं सृष्टी रंचावी ” या कारणास्तव शक्तीला आवाजी झालेत. या देणं व्दारे शक्ती आता प्रकृति व चैत्यन्या रूप घेण्यास सक्षम झाली. प्रकृती-चैत्यन्या रूप प्राप्त झालेली शक्ती दोन्ही हात जोडुन पुनश्चः कर्ता-याला विनवणी पुर्वक म्हणु लागली की :

शक्ती आप आली पलटुन । रूत दे मजला :-

हे कर्ता-या । मी निराकार निराधारला हा देव नाही खरा । असे असत्य संबोधुन त्या निराकार निराधार पासुन स्वतःहुन/आप तुमच्या कडे पलटुनी आली आहे. आणी तु माझे या विनवणी ला पावन होवुन माझे समोरील अकाशमात मध्ये तुच निराकार निराधार अवस्थेत उभा झाला आहे.
आणी तु जावे त्या निराकारा पाशी । येतो मी खरा । असे सांगी करत आहे.

हे कर्तारा । तुच तोच निराकार निराधार, गुण नाही गव्हर असा निश्कलंकी सत्य धनी देव होय. हे ग्यान तुम्ही माझे समोर उभे राहल्याकारणाने माझे वर चिकटलेली भ्रांती हटल्यामुळे आता मजला झाले आहे. तुमच्या कृपेने मजला ज्ञान झाले की : ‘तु कर्तार । आणी तो निराकार निराधार । हे एकच आहे ।‘ म्हणुनच आता तुजलाच विनविते की : मी एकटीच तुमच्या रूताशिवाय सगुण-निर्गुण सृष्टी निर्माण करण्यास अक्षम आहे. त्याचमुळे सृष्टी निर्मिती करण्याच्या कारणास्तव तुम्ही ‘रूत दयाहो मजला । रूत दे मजला ।‘ असे विनवत सृष्टी उत्पत्तीचे बीज/रूत त्या निराकार कर्ता-याला शक्ती मागु लागली. तेव्हा तिथे त्या कर्ता-यानं आकाशवाणी केली की :

तुला दिले/आले आवाजी बीज । खबर नाही तुजला :-

कर्तार धनीदेवाने आपल्या आकाशवाणी चा आवाज उठवुन त्या आवाजाव्दारे शक्तीला सुमरन केले की : *‘दिला तिरनयन‘* हा आवाज उठताक्षणीच चार बिज तुझ्या करीता आवाजी थापले गेलेले आहे. परंतु तुझे रूप भ्रांतीत असल्यामुळे तुजला त्याची खबर नाही झाली.

असे सुमरन करून त्या निराकार कर्तार धनी देवाने ज्या ईशान्येला चार खुम्म थापले गेले, त्या इशान्येला ‘‘झन्‌कार’’ असा आवाज उठवुन शक्तीचे लक्ष्य इशान्ये दिशेवर उभ्या असलेल्या त्या चौ-खुम्मा कडे वेधले. आवाजी थापल्या गेलेले चार खुम्म शक्तीला दावले.

॥ आवाजी उभे स्थापले खुम्म । तिन जाळले शक्तीनं ।
चवथा एक होता । गायप झाला.......
आजवरी लौटले यवग, दिसेना डोळा ॥.७ ॥

मुळयवगी आवाज उठले. त्या आवाजाचे शकुन साधल्या गेले. शक्तीसमोरही असेच *‘तुला दिले आवाजी बिज‘* या आवाजाचा शकुन साधुन सृष्टी उत्पन्नतेस साहय करणारे तसेच सृष्टीचे पालन पोषन रक्षण व संहार व पुनश्चः निर्माण...इत्यादी कामे करण्यास कारणीभुत होणारे चार बिज इशान्य दिशेला खुम्माप्रमाणे उभे राहीले होतो.



उदाहरणार्थ लाल बंजर खडकाचे निमुळते टोक असलेले त्रिकोणात्मक सुळके । जे एका शेजुन एक तिन पहील्या रांगेत होते. आणी त्या तिन खुम्म च्या पाठीशी त्यांना भरून उरलेला चौथा खुम्म होता. इशान्य दिशेला चौथ्या चरणात हे चार खुम्म प्रकट होवुन उभे झाले होते.

तिन जाळले त्या ‘शक्तीन :-

जेव्हा त्या इशान्येला कर्ता-यानें *‘झन्‌कार‘* आवाज उठवुन या चार खुम्माकडे शक्तीचे लक्ष्य वेधले, तेव्हा शक्तीची नेत्रदृष्टी त्या खुम्मावर पडली. शक्तीला एक शेजुन तिन खुम्म व त्या तिन च्या पाठीशी त्यां तिघांना भरून भरला आणीक उरला असलेला चौथा विराट खुम्म उभा आहे. असे दृश्य दिसलेत. परंतु तिथे शक्तीच्या कर्माव्दारे निर्माण झालेली भ्रांतीत पाडुन भुलवन टाकणारी धुनी तिच्या अवती-भोवती चिकटलेली होती. त्या धुनीमुळे शक्तीचं रूप तिथे भ्रांतीत पडत होते. या भ्रांतीमुळे शक्तीने हे जाणले नाही की : हेच कर्ता-याच्या उठलेल्या आवाजी शकुनाव्दारे आलेले चार बिज होय ।. तिला अशी भ्रांती पडली की : ‘जे काही उत्पन्न झालेले दिसते आहे ते काहीतरी वेगळेच उभे झालेले आहे ।. काहीतरी भलतच येथे उत्पन्न झाले आहे ।.’ हे भलतच अशुभ राहु शकते..ईत्यादी संदेहं/संशय तीला पडला.

भ्रातिंत पडलेल्या शक्ति मध्ये आलेल्या संदेह/संशयामुळे त्या शक्तिने क्षणार्धात आपली नेत्रदृष्टी अग्न-तेजोमयी केली. आणी त्या अग्नमय नेत्रातुन अग्नीचे तेज किरणे त्या खुम्मावर सोडुन त्यांव्दारे सुरूवातीच्या रांगेतील एक शेजुन एक असलेले तिन खुम्म एकापाठोपाठ एक या प्रमाणे क्षणार्धात जाळले. म्हणजेच ब्रम्हा विष्णु शंकर हे तिन खुम्म एका एका क्षणात जाळले. तद्नंतर चौथ्या क्षणी चौथ्याला जाळण्यासाठी तिची नेत्रज्योत वळवणार त्याच क्षणी जो चवथा एक होता, तो क्षणार्धात गायप झाला. एका खिणात गुप्त झाला. त्या चौथ्यावर शक्तीची दृष्टीच जावु शकली नाही.

जे तिन खुम्म शक्तीकडुन जाळल्या गेलेत, ते तिन खुम्म तिन चैतन्यमय ज्योत अवस्थेत गेले. आणी शक्तीच्या मस्तकी आले. तिन खुम्माचे तिन चैत्यन्यज्योती शक्तीच्या मस्तकी आले. याप्रमाणे चौथ्या चरणात जो *'मस्तकी शिल्ले दिलें'* हा जो आवाज उठला होता, त्या उठलेल्या आवाजाचा शकुन साधल्या जावुन शक्तीच्या मस्तकी **'तिरगुणांचे तिन शिक्के'** चे देणं आलेत.

जो चवथा एक होता । गायप झाला, त्या चौथ्या खुम्माची युक्ति ही शक्ति ला उमजली नाही. परंतु तिने हे मात्र निश्चित जाणले की : या तिघांसोबत या तिघांच्या पाठीशी असलेला या तिघांना भरून भरला आणीक उरला असलेला चौथा नाही. त्यामुळे हे सर्वकाही व्यर्थ आहे. हे सर्व काही भंगास येणारे आहे.

कारण की : या तिघांच्या पाठीशी उभा असलेला जो चौथा खुम्म तिघांना भरून भरला आणीक उरलेला होता, तोच चवथा गायप आहे. आणी बाकी तिनच चैत्यन्य ज्योत स्वरूपात माझे मस्तकी आले आहे.

तो चौथा । तिच्या दिव्यदृष्टीव्दारे सुध्दा तिला दिसेना । कसा दिसणार ? त्या चौथ्याच्या कृपेशिवाय तो चौथा दिसत नाही । तो चौथा तर निराकार निराधार निर्गुण निर्विकार निश्कलंकी । या तिरगुणांच्या पलीकडचा । सर्व जगाच्या दृष्टी पलीकडचा । सर्व ब्रम्हांडात भरून भरला आणीक उरून राहलेला असुनही तो ना दिसे सहजासहजी कोणास । तिथे त्याच्या काना-मात्राच फक्त शक्तीला अल्प वेळ दिसल्या होत्या.



गायप असलेल्या चौथ्याला दिव्यदृष्टीव्दारे पाहण्याकरीता शक्तीचे यवग न यवग लौटल्या नंतर सुध्दा जेव्हा शक्तीच्या दिव्य डोळ्यांना तो दिसेना, तेव्हा शक्ती पुनश्चः व्याकुळ झाली. व्याकुळतेने ती पहील्या चरणाच्या आग्नेय कडे गेली. आणी तिथे आकाशमात मध्ये दृष्टी लावुन, त्या निराकाराला व्याकुळतेने पुनश्चः पाचव्यांदा विनवनी करून बोलु लागली की :

॥ शक्ती बोले पाचव्यानं । निराकारा, रूत मज देनां ।
काय केले चारही खुम्म । सांग तु मजला...
घडोघडी मागते रूत । बर नोव्हे तुजला ॥ ०६ ॥

शक्ती बोले पाचव्यानं :-

दुस-या चरणांत शक्ती दोनदा बोलली ती अशी :

. १. ''निराकार निराधार । याशी गुण नाही गव्हर''
२. ''हा देव नाही खरा''
३. तिस-या चरणांत शक्ती तिस-यांदा बोलली ती अशी :
''भला देवा टाकुन गेला मजशी''

४. चौथ्या चरणात जेव्हा निराकार आप आले पलटुन तेव्ही ती
चौथ्यांदा बोलली ती अशी :
''रूत दे मजला''
५. या पाचव्या चरणात ती शक्ती पाचव्यांदा बोलली ती अशी :
''निराकारा । मला रूत देना ।

अश्या रितीने शक्ती व्याकुळ होवुन पहील्या चरणात आग्नेय दिशेवर उभा असलेल्या निराकारा ठिकाणी येवुन निराकारा ला उध्देशुन पांचव्यांदा जेव्हा 'निराकारा । मला रूत देना ।' अशी बोलली, तेव्हा निराकाराने आकाशवाणी व्दारे तिथे आवाज उठवुन सर्वकाही जाणत असुनही तिची पुस घेत तिला विचारणा केली की :

काय केले चारही खुम्म ? सांग तु मजला ।
घडोघडी मागते रूत । बर नोव्हे तुजला :-

तुला दिलेल्या चारही खुम्माचे तु काय केले ? हे सर्वप्रथम सांग तु मजला । तु जे वेळोवेळा-घडोघडी रूत मागते आहे । हे तुला शोभत आहे काय ? हे रित बरी नोव्हे तुजला । हे वागण *बरं नोव्हे तुजला* ।

तेव्हा शक्ती फजीत होवुन पश्चातापाने व्याकुळ झाली. आणी जे घडले ते सत्य त्या निराकारा समोर सांगु लागली की :

॥ तीन जाळले, एक गायप झाला । काय म्हणु ?, त्या गायपाला ।
''भैस'' म्हणुन विनव त्याला । असला येईन..
इन मांडली प्रार्थना, भाव धरून ॥ ०७ ॥

निराकाराने त्या शक्तीची पुस सहाव्या चरणात घेतल्यानंतर शक्ती फजीत झाली. तिला 'जे घडले ते सत्य सांगीतल्याशिवाय चैत्यन्याशक्ती पाशी उपाय राहीला नाही.'

शक्ती शरण येवुन शुध्द अंतकरणाने प्रामाणीकपणे इमान राखुन व्याकुळ होवुन निराकारास सत्य सांगु लागली की :

तिन जाळले एक गायप झाला :-

जे चार खुम्म आवाजी उभे झाले होते, त्या चार बिजांपैकी/खुम्मापैकी पहील्या तिन खुम्माला मी भ्रांतीत असल्यामुळे दिव्य अश्या तेजोगुणी अग्नी दृष्टीने जाळले. आणी ज्याक्षणी चौथ्याला जाळण्यासाठी अग्नीदृष्टी टाकणार, त्याच क्षणी तो विराट चौथा खुम्म गायप झाला. एका खिणात गुप्त झाला.

जो तो चौथा गायप असलेला आहे, तो माझ्या दिव्यदृष्टीला यवगान यवगापासुन दिसेना । तर मग मी त्या चौथ्याला कुठुन कसे व कोण्या नामाने बोलावु ? कोण्या नामाने त्याला आवाज देवु ? कोण्या नामाने त्याची प्रार्थना करू ? कोण्या नामाने त्याचा धावा करू ? जेणेकरून तो असलेला चौथा माझ्या पुढयात येईल । **काय म्हणु ? त्या गायपाला** ।

शक्तीच्या या विनम्र व्याकुळ व शुध्द अंतकरणाने बोललेल्या बोलावर प्रसन्न होवुन निराकार तिच्या सुमरनी आला । तिला सांगी करून त्या निराकाराने उपदेश केला की : ऐक चैत्यनी : भैस म्हणुन विनव त्याला ।

'भैस' म्हणुन विनव त्याला । असला येईन :-

निराकार धनीदेवाने शक्तीला उपदेश दिला की : ज्याच्यावर तुझी नेत्रदृष्टी जावु शकली नाही, तो चार पैकी एक असलेला चौथाला तु **''भैस''**

असे म्हणुन भाव धरून त्या भैसाची प्रार्थना मांडुन विनवत राहयं त्याला । कारण की : तोच चौथा पुढे येणा-या यवगान यवगात विविध आकाराचे देहेरूपी वेषात अंर्तभुत होवुन त्या देहरूपी वेष (हिंदीत भेष) घेवुन अवतरणार आहे. म्हणुनच तु त्याला अनेकवचनी भैष/भैस या नामानेच विनवनी कर ।

भरून भरलेल्या आणीक उरलेल्या चौथ्या खुम्माला भैष या नामाने विनवुन त्याची भाव धरून प्रार्थना मांडावी. भाव धरून त्या चौथ्या भैसाची नित प्रार्थना मांडल्यास, धावा केल्यानेच तो भरून भरला आणीक उरला असलेला चौथा आपरूप तुझ्या समोर येईन.

याप्रमाणे निराकार धनिदेवाने शक्तिला उपदेश देवुन शक्तीच्या मुखी भैस नाम दिल्यानंतर त्या शक्तीने भाव धरून भैसाची प्रार्थना मांडली ।

इन मांडली प्रार्थना, भाव धरून :-

शक्तीने भैसाची भाव धरून प्रार्थना मांडली. भैसाचा धावा ती निरंतर अखंडतेने करू लागली. चैत्यन्याच्या मुखात अखंड भैस नाम आले । मुखी भैस नाम अखंड निरंतर येवुन भैसाचाच ध्यास राहु लागल्यानंतर तिच्या प्रार्थनेला तो पावन झाला.

तिस-या चरणात उठलेल्या *'येतो मी खरा !'* या आवाजाचा शकुन साधण्याचा वेळ आली. तिस-या चरणात ''येतो मी खरा'' या उठलेल्या आवाजाचा शकुन सिध्द करण्याकरीता तो आधीचा आदीरूप आदीपुरूष भैस सर्वप्रथम सगुण/आकारी रूपाचा असा निर्विकार मुनी वेषाचा देहे आकारून म्हणजेच तो आदीमुनी बनुन शक्तिच्या पुढयात आला. तो असा :

॥ हिरे पद्‌म लालही लेला । चवथा आदीमुनी अवतार आला ।
निराकारानं गोयलं वचनी । सांगन मानं/मागणं
तुम्ही उभे, दयाहो चैत्यन्य । दयाहो चैत्यन्य ॥८॥

शक्तीने जेव्हा आदीरूप आदीपुरूष भैस यांची अंखंड प्रार्थना मांडली. तेव्हा हा आदीपुरूष भैस नावाने पावला. भैस नामी शक्तीच्या प्रार्थनेला पावुन, आपला 'येतो मी खरा' या उठलेल्या आवाजाचा शकुन साधण्याकरीता शक्तीच्या पुढयात तो निर्विकार आकारी रूप घेवुन आला. तो असा :

हा ज्याला कोणत्याही प्रकारांच्या कलंक व विकाराने जडलेले नाही असा निर्विकार निश्कलंकी आदीमुनी यांनी पायी पद्‌म धारण केले होते. मस्तकी नागाच्या मुखात जे स्वयं:प्रकाशीत कामनापुर्ति करणारे रत्न असते ते ''लाल रत्न'' आणी कपाळी चंद्रकोर व चंद्र-सुर्य लल्लाटी धारण करून होते. बेंबी हिरा, हद्‌यी अमृत कुपी ईत्यादी आभुषणे धारण करून तो मुनीच्या वेषभुषेत वायव्येकडुन आग्नेयकडे रूमझुमत शक्तिसमोर उभा झाला.

आपला ''येतो मी खरा'' आणी ''जाय त्या निर्विकाराच्या पाशी'' या आवाजाचा शकुन सिध्द करण्याकरीता/साधन्याकरीता तो शक्तीच्या मायेच्या ममता समोर आदीमुनी वेषात साकारून त्या आधीच्या निराकार निराधार आदीपुरूष कर्ता-याने सर्वप्रथम आपले आकारी रूप शक्तीला दाखवले.

आधीच्या आधीरूप आदीपुरूषाने सर्वप्रथम आकारी रूप मुनी वेषात घेतले असल्याकारणाने त्या आदीरूप आदीपुरूषालाच आदीमुनी असे संबोधल्या गेलेले आहे. आधीचा निराकार आदीपुरूषाचा मागुन आलेले आकारी आदीमुनी अवतार रूप होय. तो प्रथम एकला रूपी नर होय.

॥ प्रथम एकला । एकला रूपी राया नर ।
नर धरली स्थुल देहीस । तेजगुण आदीपुरूष ॥ खंड१०/०२/आरती-०१

प्रथम एकला असलेला निराकार आदीरूप आदीपुरूषाने अन्न-अग्न पवन-पाणी, आकाश-धरणी हे सहा नर साचा व्दारे स्थुल देही सचवुन त्यात तेजगुणी अवतार घेवुन उभा राहुन रूपी आला. हाच प्रथम एकला असलेला एकला रूपी आलेला राया नर होय. ही आकारी स्थुल नरदेही घेवुन, त्या नरदेहीत आदीपुरूषाचे तेजगुण घेवुन सर्वप्रथम प्रकट झालेला नर होय. चौथा आदीमुनी आदीपुरूष अवतार होय. सर्वकाही एकल्याचाच खेळ । प्रथम एकला आदीरूप आदीपुरूष । तोच शक्तिचा कर्तार । त्याचेच ते निराकार रूप । त्याचेच ते निर्विकार रूप । तोच निराकार निराधार, गुण नाही गव्हर असा । तोच शक्ती व निराकार यांच्यातील निर्विवाद म्हणजेच विनाकारण चाललेला वाद शांत करण्यासाठी शक्तीच्या सुमरनी आला. तोच आदीमुनी रूपात आला. त्याच निराकाराने शक्तीला उपदेश दिला की :

॥ निराकारान उपदेश केला । ऐक चैत्यन्या ।
दयावे तिर नयन । जागी करन आदीमुनी ॥ खंड०८-०१/ओवी-०२

ऐक चैत्यन्या शक्ती । तुझ रूप तुझ्या कर्मामुळे भ्रांतीत पडत असल्यामुळेच तु तिन खुम्म जाळलेत. हे तिनही चैत्यन्यरूपात तुझ्या मस्तकी आहे. हे तुझ्या मस्तकी तिरनयनाने दिले असलेले तिन गुणांचे तिन शिल्ले/शिक्के जागी करण्याकरीता या चौथ्या आदीमुनीला अर्पण करावे लागेल. याकरीता *एक शेजुन तिन* या प्रमाणे या तिरगुणांच्या तिन शिक्याची शेज/मांडणी करून, ते तिन गुणांचे तिन शिल्ले फुल-पुष्पाप्रमाणे या चौथ्या आदीमुनीला अर्पण करण्याचे वचन दे । आणी तिन ला भरून भरला सानीध्य उरलेल्या चौथ्या आदीमुनीस तुझया मस्तकी आलेले तिन निर्गुण शिक्के तिन रूपात जागी करण्यास विनव । या आदीमुनीला मागण सांग न मागण की : जसे तुम्ही रूपी उभे झाले आहेत, तसे एक शेजुन तिन केलेल्या खुम्मावर ठेवलेले तिन निर्गुण शिक्के तिन रूपी उभे करून तुम्ही ओतावे चैतन्य । त्यांना दयाहो चैतन्य । दयाहो चैतन्य । तुम्ही उभे । दयाहो चैतन्य । दयाहो चैतन्य । अशी पुन:पुनश्च मागणी मागत तुझी मागणी मानण्यास सांगं ।

तुम्ही हे उभे दयाहो चैत्यन्य । दयाहो चैत्यन्य :-



शक्ती खाली बसुन उभ्या असलेल्या आदीमुनी चरणी नतमस्तक झाली. त्यानंतर तिने आपल्या शक्तीव्दारे तिन खुम्माच्या राखीचे/राखडीचे/रक्षाचे एक शेजुन एक असे तिन खुम्म स्वत:च्या हाताने शेजलेत. आणी त्यावर आपल्या मस्तकी असलेले तिन चे गुणी शिक्के फुलपुष्पाप्रमाणे वाहुन ते आदीमुनीला अर्पण केलेत. तिने भाव धरून असा हा साचा आदीमुनीला अर्पण केला. आणी आदीमुनीला विनवनी करू लागली की : जसे तुम्ही रूपी उभे झाले आहेत, तसे एक शेजुन तिन रंचलेल्या साच्यावर ठेवलेले तिन निर्गुण शिक्के तुम्ही आपले चैतन्य ओतुन तिन रूपी उभे करून दयावे । या तिन साच्या ची रंचना जागी करा ना हरी । जसे तुम्ही उभे आहात, तसे आता त्यांना दयाहो चैतन्य । तुम्ही उभे । दयाहो चैतन्य । दयाहो चैतन्य ।

शक्तीने हे तिन खुम्माचे राखीचे एक शेजुन तिन रंचलेले तिन साचे व त्यावर तिच्या मस्तकी असलेले तिनखुम्माचे तिन गुणी शिक्के हे चौथा खुम्म आदीमुनी च्या चरणी अर्पण केल्यानंतर, त्या आदीमुनीने ते तिन साचे जागी केलेत ते असे :

॥ ब्रम्ह राखीचा साचा । याहीनं, जागी केला ।
ब्रम्हांड रुपाचा, ब्रम्ह देव । उभा राहीला ॥
॥ विष्णु राखीचा साचा । याहीनं, जागी केला ।
विश्व रुपाचा, विष्णु देव । उभा राहीला ॥
॥ शंकर राखीचा साचा । याहीनं, जागी केला ।
शंक रुपाचा, महा देव । उभा राहीला ॥ खंड०९/जळगाव भजन पाठा



ब्रम्हांडातील सृष्टीची उत्पत्ती करण्याची क्षमता असलेला ब्रम्ह-राखीचा साच्यावर शक्तीने ठेवलेला रज गुणी शिक्का हा ब्रम्ह रुपात आदीमुनीने जागी केला. म्हणजेच ब्रम्हदेवाला उत्पन्न केले.



उत्पन्न झालेल्या सृष्टीचे पालन पोषन रक्षण करणाची क्षमता असलेल्या विष्णु-राखीच्या साच्यावर शक्तिने ठेवलेला सत्व गुणी शिक्का हा विष्णु रुपात आदीमुनीने जागी केला. म्हणजेच विष्णु देवाला उत्पन्न केले.



सृष्टीचे संहार करण्याची क्षमता असलेल्या शंकर-राखीच्या साच्यावर शक्तिने ठेवलेला तम गुणी चैत्यन्याचा शिक्का हा शंकर रुपात आदीमुनीने जागी केला. महादेव शंकराला उत्पन्न केले. ऐसे

॥ ब्रम्हा विष्णु तयार केले । आणीक तिरनयन
आदीमाया शक्ती झाली । जाहीरणा पासुन ॥ खंड०२/ओवी-१८

आदीपुरुष आदीरुप च्या धुम्मधुम्मकार नादब्रंम्हव्दारे झालेल्या जाहीरणा पासुन उद्‌भवलेल्या मुळावरच्या शक्तीला तीच्या मस्तकी आलेल्या तिन शिल्ल्याचे तिन रुपे आदीपुरुष आदीमुनी ने जागी करुन/प्रकट करुन उभे केलेत. म्हणजेच ब्रम्हा विष्णु शंकर तयार करुन हे तिन शक्तिच्या स्वाधीन केले. तसेच आदीमुनीने या तिघांना पुढे येणा-या यवगाच्या चौकटीतील तिन यवगाची राजपदवी चे देणं सह विष्णुला आपल्या मानाचा प्याला दिला.

॥ तिन यवगाचा दिला जुम्मा । यवगा कारण ।
तिनयवगाचे राज्य तिघाला । देवु केलं देणं ॥ खंड०९/३-देव

यवगाच्या चौकडीतील तिन यवगाचा जुम्मा या तिघांना दिला गेला होता. तिन यवगाचे राज्य त्यांना दिले गेलेत. तिथे आपहुन उभी झालेली चतुर्पता गाय असलेली चौथ्या आदीमुनी ने विष्णुला आपल्या मानाचा प्याला चे देणं दिलेले आहे. ऐश्या रितीने एक शेजुन तिन मांडणीपुढे आपणहुन उभ्या असलेल्या चौथ्या खुम्म आदीमुनीने तिन जागी केलेत.

॥ एक शेजुन तिन केल्या । एकीच्या तीन ।
चतुर्पता गाय उभी होती । आपहुन ॥ खंड१०-०२/आरती-०३/कोटकोट

चैत्यन्यान एक शेजुन जी तिन ची रंचना मांडली होती, तिथेही चौथा खुम्म असलेली चतुर्पता गाय म्हणजेच आदीमुनी तिच्या रंचणा मांडणीची माव/लिला समोर उभा होता. या चौथा खुम्म आदीमुनी यांनीच एक शेजुन तिन असलेल्या तिन खुम्माला ब्रम्हा विष्णु शंकर या तिन रुपात जागी करुन उभे केलेत. तिन खुम्म यांच्या पाठीशी उभा असलेला तो चौथा खुम्म तिथेच आदीमुनी रुपात शक्तीच्या दृष्टीदेखत आपहुन उभा होता. परंतु शक्तीचे रुप भ्रांतीत पडत राहत असल्यामुळे तिच्या दृष्टीसमोर उभा असलेला आदीमुनीच तो गायप झालेला चौथा खुम्म होय. हा बोध तिला झाला नाही.

॥ चैत्यन्या रुप, भ्रांती तिथं । असे यान तुम्ही ?
तिला दिले तिरनयन । त्याहीला काय दयान तुम्ही ? ॥ खंड०५/ओवी-७३

चैत्यन्या रूप तिच्या आधीच्या कर्म फळा व्दारे केव्हाही भ्रांतीत पडत राहत असल्यामुळे जीथ चैत्यन्या तिथ तिला भ्राती चिकटुन असतेच. म्हणुनच तिच्यावर कृपा करून त्या आदीमुनीने तिला दिले तिरनयन । आता तुम्ही तुमचाच विचार करा की : जसे चैतन्यारूप भ्रांतीत पडत राहते तसे तुम्ही भ्रांतीत पडत आहात का ? या आदीमुनीला काय दयानं तुम्ही ? तुम्हालाही भ्रांती पडली काय ? म्हणुनच तुम्ही या चौथ्याला ओळखत नाही काय ?

या भ्रांतीमुळे शक्तीला तिच्या समोर उभा असलेल्या चौथा खुम्म आदीमुनीचा बोध/ज्ञान न झाल्यामुळे तिला तो ओळखु आला नाही. तरीसुध्दा कारूणेच्या सागर असलेल्या आदीमुनीने तिला स्वतःची खुणमुद्रा/खुणगाठ देण्यासाठी सांगी करून देणं दिले की : दिला चौथा शिक्का तुला तिरनयन ।. हा चौथा शिक्का उभा राहीन । कलीत या चौथ्याचे बोधपण तुला होईन. ऐस तिन खुम्म जागी केले आणी चौथा दिला हो तिरनयन ।

॥ तिनखुम्म जागी, केले त्याहीन । सानीध्य चौथा, दिला तिरनयन ॥

॥ चौथा शिक्का तुला तिरनयन । कलीत होइन बोधपण ।
उडवन कलीचं ठिकाण । हिशोब पहा आपला.....
तुम्ही निघुन गेले कैलासा । आहो ऐकला ॥९॥

शक्तीचे रूप भ्रांतीत असल्यामुळे त्या शक्तीसमोर उभा असलेला आदीमुनी रूपात आलेला चौथा शिक्का तीने ओळखला नाही. तेव्हा तिची भ्रांती काढण्यासाठी आदीमुनीने शक्तीला सांगी केली की : हा चैतन्याचा चौथा शिक्का उभा राहीन तुला तिरनयन । तुला या चौथ्याचे बोधपण कलीत होईन. बोध अवसरी राज्य कलीच भरून घेवुन, हाच चौथा कलीच ठिकाण उडवनं. म्हणुनच तु जरा विचारानं हिशोबानं राहयं । हिशोब पाहय आपला । मी तर आहो एकला । आहो एकला आपरूप येणारा ब्रम्हचारी । आपरूप भक्तीला पावणारा भक्तांचा कैवारी । असे म्हणुन ते आदीमुनी हरी कैलाशी निघुन गेले. आदीपुरूषाचा अवतार आदीमुनी हा हरी शक्तीसमोर उभा राहुन गुप्त झाला.

॥ आदीपुरूषाचा अवतार आला । आदीमुनी ।
तिन खुम्म जागी केले । पुन्हा गुप्त झाले हरी ॥ खडं ०८-०१/०२

अश्या रितीने प्रथम अव्यक्त आदीरूप आदीपुरूष । त्याचेचे आपरूप निरंजन । त्याचा निरंजन तोच । त्याच्याच निरंजना पासुन ईच्छा । ईच्छा पासुन शक्ती । शक्तीचा दैवत श्रीपती आदीमुनी । त्या आदीमुनीने त्रिदेव ला जागी करून पुनः उत्पन्न केलेत. त्या त्रिदेवांनी आदीमुनीच्या देणं चा वापर करून कृत्य केले. म्हणुन तिथुन कृतयवग असे नाम देवांनी दिले । त्याच्यापासुनच यवगाच्या चौकडी ची गणीता सुरू झाली. यवगाच्या चौकडीतील यवगान यवगात उभा असलेला सर्वाचा ईश्वर तोच प्रथम एकला केवळ आदीपुरूष हरी । या आदीपुरूषाचा अवतार आदीमुनी प्रथम नरदेह रूपात आला. तोच प्रथम एकला रूपी राया नर । आदीपुरूषाचा अवतार आदीमुनी तिथे आला. आदीमुनीने तिन खुम्म शक्तीस जागी करून दिलेत.तिच्या समोर उभा राहुन तो गुप्त होवुन कैलाशी निघुन गेला. शक्तीच्या दिव्य दृष्टी च्या कक्षेपासुन गुप्त होवुन आदीमुनी कैलाशी निघुन गेल्यानंतर ती शक्ती इद्रियांतीत अवस्थेच्या बाहेर आली. आदीमुनीच्या कृपेने तिची भ्रांती दुर झाली.जेव्हा तीची भ्रांती दुर झाली, तेव्हा तीने त्या चौथ्याला ओळखले. परंतु वेळ निघुन गेली होती. तो चौथा तर तिच्यापासुन दुर कैलाशी निघुन गेला होता. त्यामुळे ती दुःखी व व्याकुळ अतःकरणाने म्हणु लागली की :

॥ तिन यवगाचा राज्यकारभार । या तिघांच्या हाती ।
आदीमुनी वाचुन सुनी आहे । ही राजपदवी ॥ खडं ०८-०१/०२

तिन यवगाची राज्यकारभार या तिघांच्या हाती देवुन, तुम्ही निघुन गेलेत. या तिघांच्या पाठीशी असलेला तुच चौथा कैलाशी निघुन गेल्यामुळे तिघांची राजपदवी सुनी आहे. कैलाशी निघुन गेले हरी तुम्ही ।

॥ कैलाशी निघुन गेले तुम्ही । अवघी धरणी पडली सुनी ।
गुण नाही गव्हर याहीच्या मनी । पुसावं कोण्या यवग्याला.....
भुम्मेवर भुम्मा गोळक । होतीन गोळा ॥१०॥

शक्तीची भ्रांती आदीमुनी कृपेने निघाल्यानंतर शक्तीला प्राप्त झालेल्या दिव्यग्यान दृष्टीव्दारे जाणीव होवुन तिने जाणले की : आदीमुनी अवतार रूपात आलेला हाच तो गायप झालेला चौथा खुम्म होय. तिन खुम्माला भरून भरला आणीक उरलेल्या या चौथ्या खुम्माने च तिन खुम्म जागी करून दिले. या चौथ्यानेच या तिघांना तिन यवगाचे राज्यकारभार चे देणं दिले. या शक्तीला उपदेश ग्यान-बोध करून देणं दिले. आणी आम्हा पासुन दुर कैलाशी निघुन गेले. ऐसे आदीमुनी कैलाशी निघुन गेल्यामुळे ती व्याकुळ झाली. व्याकुळतेने शक्ति म्हणु लागली की : आम्हा केलं उपदेशी आणी कैलाशी निघुन गेले तुम्ही ? आम्हा केले देवा तुमच्या वस्तीपासुन दुर । आम्हा केलं देवा तुम्ही अपदेशी । आता राहवं कोण्या देशी ? कोणाच्या संगतिने ?

कैलाशी निघुन गेले तुम्ही । आम्हा केले देवा उपदेशी/अपदेशी ?

तिघांना तिन यवगाचा राज्यकारभार तर चौथ्याने दिला, परंतु तिघांच्या पाठीशी उभा असलेला तो चौथाच आता आम्हा संग नाही । आम्हा अपदेशी करून निघुन गेला. भरून भरला आणीक उरलेल्या चौथ्या खुम्म आदीमुनी वाचुन हे तिन राजपती सुने होतीन. या तिरकुटांच्या तिनही गादया सुन्या पडतीन ।. कारण की : या तिन च्या पलीकडे उभा असलेला तिरलोक्याचा मालक धनीदेव एकला कैलाशी राहुन तिरभवन न्याहरत आहे. त्यामुळे ही धरणी आम्हासाठी तर आताच सुनी पडली आहे. अवघी ही देह धरणी पडली हो सुनी ।. तुम्ही ही रंचना केली. परंतु तुमच्या वस्ती शिवाय नाम रूप नाही हो हरी । तुम्हा वाचुन सुनी आहे पृथ्वा ।

हे आदीमुनी । तुम्हा वाचुन नाही बा कोणी । लवकर याहो ।

हे आदीमुनी । तुम्ही तर कैलाशी निघुन गेलेत । तुम्ही निघुन गेल्या मुळे ही धरणी पडली हो सुनी । या सुन्या धरणीत आता पुसाव तरी आम्ही कोणाला ? पुसाव तरी कोण्या योग्याला ?

निर्गुण निराकाराच्या मनी गुण नाही गव्हर । तो तर निराकार, बेडाग, निशंःकलंकी असुन माझेया दृष्टीपल्याड आहे । आता पुसाव तरी कोणाला ? आदीमुनी वाचुन आता पुसाव तरी कोण्या योग्याला । अश्या संदेहात शक्ती पडली.

शक्तीचा संदेह निरसन करण्याकरीता कैलाशाहुन आदीमुनी ने आकाश वाणी केली की : तुला तुझे मुळ सांगणारे, मुळावरचे ग्यान सांगणारे माझे भुम्मा गोळक या भुम्मेवर गोळा होतीन । त्यांना चवथ्या खुम्माचा जिव्हाळा राहीन. चौ-खुम्माचा जिव्हाळा राहीन. तेच बोध अवसरी तुझा संदेह दुर करतीन. ईत्यादी सांगी करणारी चौथ्या आदीपुरूष धन्याची एकामाग एक सांगी करणारी **आकाशवाणी** शक्तीच्या पुढे **झाली**. ती अशी :

आकाशवाणी चे चरणे पुढील पानावर..

## ॥ आकाशवाणी चे चरणे ॥

॥ भुम्मेवर भुम्मा गोळक, होतीन गोळा । चवथ्या खुम्माचा, राहीन जिव्हाळा ।
तीन खुम्म येतीन शरण । आदीमुनी...
अवध्याचा चुकवन मोहजबा, तेव्हा पासुनी ॥११॥

-: **शब्दार्थ** :-

**भुम्मा गोळक** :- भुम्मेवर एका ठायी गोळा होवुन निर्भयतेने चतुर्पतीचे भजन पुजन ध्यान व नाम सुमरन भक्ती करणारे सच्चे भजनीगण, भक्तगण, जाणतेगण ग्यानीगण, योगीगण इत्यादी यानां या चतुर्पतीच्या भुम्मेवरील **भुम्मा गोयक** असे म्हटल्या गेले आहे. अश्या या भुम्मा गोयकास चतुर्पती ग्यान व्दारे चवथ्या खुम्माची ग्यान भक्ती, सुमरन, भजन पुंजन ध्यान ईत्यादी चा जिव्हाळा राहीन. चौ-खुम्माचा जिव्हाळा राहीन. ऐसे भुम्मा गोळक या भुम्मेवर गोळा होतीन.

कैलाशाहुन शक्तीसमोरील आकाशात आकाशवाणी झाली की :
भुम्मेवर भुम्मा गोयक होतीन गोळा :-
मिर्तलोकी तो चौथा उभा राहीन. सर्वत्राला आकर्षित करणा-या कृष् शक्तिचा मालक असलेला चौथा आदीपुरूष आदीमुनी कृष्णा हा तिनही लोकांतुन मिर्तलोकी हे भुम्मा गोयक लोक आपल्याकडे आकर्षित करेल. या ग्यानसंपन्न गोयक भक्तगणांपैकी काही गोयक हे वैकुठातील वैष्णवगण राहतील. काही कैलाशातील शिवगण राहतील. तसेच स्वर्गातील इंद्र आदी देवतांचे भक्तगण सह निजधामातील वहर-पितर गण सुध्दा राहतीन. तसेच यवगान यवगापासुन चतुर्पती नामी असलेल चतुर्पतीचे भक्तगण राहतील.

काही तिरगुणांचे संपुर्ण ज्ञानी होवुन उपरती होवुन या तिरगुणांच्या पार गेलेले राहतील. काही असेही सच्चे भक्त, ध्यानी, योगी राहतीन की : ज्यांना तिरगुणाचे संपुर्ण ज्ञान आहे. परंतु या सच्च्यांना चतुर्पती ज्ञानाचा गंध ही नाही. सपुर्णतः कोरे धान्य चे वाण आहेत. असे कोरे धान्य तो कृष्णा आपल्या कृष् शक्तिव्दारे आकर्षित करेल. आणी यांना चतुर्पती भुम्मेवर आणुन हे वाण पिकवणार आहे. या चतुर्पती भुम्मेवर हे कोरे धान्य कृष्णाने घातलेल्या खत-पाण्याव्दारे पिकणार आहे. हे आंबे अपाडी पिकणार आहेत. अंगांच्या नसानसात, केसाच्या छिद्रा छिद्रात म्हणजेच रोम-रोमात चतुर्पती नाम भिनवुन हे चतुर्पती चे रोमीद्युत पुढे होणार आहे. या सर्वांना चारही खुम्माचा जिव्हाळा राहीन.

चवथ्या खुम्माचा/चौ-खुम्माचा राहीन जिव्हाळा :-
चतुर्पतीने गोळा केलेले हे सर्व सच्चे भुम्मा गोळक हे चारही भवन, चौदा चौक्या, स्वर्ग मिर्त पाताळ हे तिन ताळ, तिनही तिरभवन, पंचेचाळीस ताळ इतक्या ठिकाणाहुन या मिर्तलोकी चतुर्पती नामी गोळा होतीन. ईतक्या ठिकाणाहुन हे भुम्मा गोयक चतुर्पती भुम्मेवर गोळा झालेले राहल्यामुळे, साहजीकच त्यांना आपल्या पुर्वाश्रमीच्या पुज्य असलेल्या देवांचा म्हणजेच ब्रम्हा विष्णु महेष या तीन खुम्माचा जिव्हाळा राहीन. आणी या सोबतच चतुर्पती च्या भजन पुंजन ध्यान सुमरन व्दारे चौथा खुम्मी उभा असलेल्या चतुर्पती भैस यांचा अत्यंत जिव्हाळा राहीन. चवथ्या खुम्माचा जीव्हाळा राहीन. चौ-खुम्माचा राहीन जिव्हाळा राहीन. चौ-खुम्माचा जिव्हाळा असलेले हे सर्व भक्तजन या कलयवगी पुढेमग देवा सम्मान राहतीन.

॥ कलयवगी भक्तगण । देवा सम्मान ।
महा महा ऋषिश्वर आले/येतीन । याहीला शरण ॥ खंड०९/२३

कलयवगी हे सर्व चतुर्पती नामी असलेले सच्चे भक्तगण देवासमान राहतीन. त्याचमुळे दुर दुरचे महा महा ऋषि-मुनी, योगी-जोगी ईत्यादी आध्यात्मीक विश्वाचे सच्चे गण, या चतुर्पतीच्या गरतीच्या मोहया कडे आकर्षित होईल. आणी चतुर्पतीला शरण येवुन चतुर्पती ग्यानाचा गर चुसुन चतुर्पती नामी महाभार भक्त होतीन.

॥ कली सरता पुढे भक्त । महा भार होतीन ।
क्षिरसागरचा महाविष्णु । शरणागत येईन ॥ खंड४/ओवी-२७

कली सरता सरता हेच चतुर्पतीचे सर्व सच्चे भक्तगण इतके महाभार होतीन की : क्षिरसागरचा महाविष्णु सुध्दा याच चतुर्पती मार्गि येवुन चतुर्पती धन्याला शरण येईल.

तीन खुम्म येतीन शरण :-

चौथ्या आदीपुरूष आदीमुनी कृष्णाला चतुर्पती चे भक्तगण, सिध्दगण, जाणते द्युत गण ईत्यादी चतुर्पती च्या गडी सह महाविष्णुच येथे शरणागत झाल्यामुळे त्यांच्या मागोमाग यमपुरी ईद्रसभा निजधाम वैकुठ व कैलास गडी हेही येतीन. पाताळाचा शेष, स्वर्गिचा इंद्र, यम आदी देवतागण सुध्दा या मिर्तलोकी चतुर्पती नामी येवुन चतुर्पती धन्याला शरण येतीन. आपले तिन यवगातील सच्चे भक्तगडी चौथ्याला शरण आल्यामुळे सच्चे भक्तगण लोकांच्या पुर्वाश्रमीच्या देवता असलेले ब्रम्हा विष्णु महेश हे तिन खुम्म आपले राज्य चौथ्या खुम्मी अर्पण करून शरण येतीन. चौथ्या खुम्मी शरणागत झालेल्या सर्व सच्चे भक्त गण सह सर्व देवी-देवता शक्तियॉ यांचा गणपती हा चौथा आदीपुरूष आदीगण राहील.

ऐसे आदीपुरूष कृष्णाच भाकलं आहे. असे ओवीचे चरणे गर्जुन सांगी करत आहे की :

॥ पाताळाचा शेष करन चाकरी । शुन्याचा दरबार ।
कृष्णाजीच आहे भाकलं । जरा नाही चुकणार ॥
॥ शेष पाताळी, ईंद्र स्वर्गि । येईन शरणागता... ॥ तरण उपाय आरती
॥ स्वर्गिचा इद्र येईन भुम्मेवरी ।
या मानवाच्या सभेत । यम करन हवालदारी ॥ खंड०४/ओवी-०६
॥ निजधाम वैकुंठ कैलासाहुन । ऋषि-मुनी योगी येतीन ।
न्याय पृथ्वीवर होईन । शेक सरन दुर्जनाचा ॥ खंड०८-०१/ओवी-७७

अश्या रितीने निजधाम वैकुंठ, कैलास इंद्रपुरी, यमपुरी शिवपुरी व इंद्र चंद्र, गणी गंधर्व ईत्यादी ठिकाणचे अवघे लोक तसेच ऋषी-मुनी, योगी-जोगी, सन्याशी-वैरागी या चतुर्पती नाम मार्गाने येथे येवुन चतुर्पती आदीपुरूष धन्याला शरणागत होतीन.

॥ यमपुरी, इंद्र सभा । निजधाम वैकुंठ, कैलासी गडी ।
येतीन मोहजब्याच्या वेळी । होतीन गोळा..
भुम्मेवर भुम्मा गोळक, दिसन डोळा ॥१२॥
॥ जाळामुळा पासुन, येतीन गडी । होईन मग सुनी धरणी रूमावळी ।
रूमद्युत उठन देहीवर (किंवा रोमीद्युत येईन भुम्मेवर । पहा येथुन..
अवघ्याचा चुकन मोहजबा , तेव्हा पासुन ॥१३॥

इंद्रसभा यमपुरी, निजधाम वैकुंठ व कैलासचे गडी सह तिन ताळ, चौदा भुवन, स्वर्ग-मिर्त पाताळ, पंचेचाळीस ताळ...इतक्या जागचे लोक या चतुर्पती नामी शरण आल्यामुळे इतक्या जागी या चतुर्पती लभेद अवतार धनी चा शिक्का चालन । भैसाच राज चालवण्यास घेण्यात येणा-या चतुर्पतीच्या जुम्माच्या वेळी/मोहजब्याच्या वेळी हे सर्व गोळा होवुन इतक्या जागी या

चतुर्पतीच्या ध्वजा अस्मानी राहीन. चवथ्या खुम्मी उभा राहुन इतक्या जागी या भैसाच राज चालन.

जाळामुळा पासुन येतीन हे गडी :-

चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाच्या भुम्मेवर येवुन हे सर्व ठिकाणाहुन आलेले भुम्मा गोळक गोळा होतीन. सर्वत्र ते भुम्मा गोयक दिसन डोळा । तेव्हा मग पुनश्चः अवघी धरणी रूमावळी करण्यासाठी या भुम्मेवरी चतुर्पती चे रोमीद्युत येतीन. चतुर्पती नाम रसाई च्या अमृत प्याला पिउन हे रोमीद्युत आपली अवघी देहरूपी धरणी रूमावळी करून, आपल्या संग असलेल्या भक्तांची ही अवघी धरणी रूमावळी करत करत अवघी धरणी रूमावळी करेल. ऐसे चतुर्पती चे रोमीद्युत या भुम्मेवरी येतीन.

रोमीद्युत येतीन भुम्मेवरी :-

-: **शब्दार्थ** :-

**रोमीद्युत** :- चतुर्पती नामी आलेल्या भुम्मेवरील भुम्मा गोयंकापैकी ज्यांनी

- चतुर्पती ची निरंतर सच्ची भक्ती ध्यान करत चतुर्पतीचे नाम आपल्या त्वचेच्या रोमारोमात/छीद्राछीद्रात, कणाकणात हे चतुर्पती अवधुत नाम भिनवले.
- रोमारोमात चतुर्पती नाम भिनवुन नित चतुर्पती नामी राहुन चतुर्पतीचे अनुभव व देणं चे गाठोडे पाठीशी घेवुन लहानाहुन लहानपण घेतले.
- लहानाहुन लहानपण घेवुन म्हणजेच ढाकुलता बाळगुन सर्व लहान्याहुन लहानपण घेतलेल्या ढाकुल कृष्णा च्या चतुर्पती नामी या चतुर्पती भुम्मेवर कृष्णाजीचे हस्तक बनुन जे हे स्वर्गिचे द्युत वावरत आहे-वावरत राहलेत, वावरत राहणार आहे, ते येथे अवतरलेले सर्व स्वर्गिचे द्युतगण, ग्यानीगण, जाणतेगण ।
  या सर्व सच्चे भक्त भजन, ध्यान, योगी, ग्यानी, भक्तगण, द्युतगण, हस्तकगण, जाणतेगण यांना रोमीद्युत असे म्हटल्या गेलेले आहे.

असे चतुर्पतीचे बहु अनुभवी रोमीद्युत जाळामुळापासुन या भुम्मेवर पुनश्चः अवतरून या चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाच्या भुम्मेवर येतीन । हे सर्व मुखी अवधुत नामी असलेले चतुर्पतीचे रोमीद्युत, सच्चे भक्तगण, इत्यादी चतुर्पतीचे गडी **'भजो अवधुत नाम'** अशी ठिकठिकाणी गर्जना करतील. जे लोक चतुर्पती अवधुत नामी नाहीत. तसेच जे चतुर्पती अवधुत नामी कच्चे आहेत. अश्या प्रतेक सच्च्या भक्तांच्या देहरूपी धरणीच्या नसानसात/रोमा-रोमात चतुर्पती नाम भिनवुन, त्या भक्तजनांची अवघी देहरूपी धरणी या चतुर्पती नामी उत्तेजीत/रूमावळी करून टाकेल.

जे सच्चे भक्तगण या चतुर्पती नामापासुन कोरे आहेत. असे कोरे धान्य या चतुर्पतीच्या भुम्मेवर आणुन त्यांना खतपाणी घालुन त्यांना पिकवेल. चतुर्पती नामी परिपक्व बनवेल. या परिपक्व भक्तजनांच्या व्दारे चतुर्पती अवधुत नामाची एकच ज्वारी इथ होईन । या सर्वांचे नामरूपी खादय एकच राहीन, ते म्हणजे अवधुत नामाची ज्वारी । या ज्वारीच्या भाकरीचे भोजन सच्चे भक्ती-भावाने आदीगण आदीपुरूष कृष्ण अवधुताचे भजन पुंजन ध्यान, सुमरन करता आपरूप मिळत राहीन. ऐसे चतुर्पती नाम ज्वारी च्या भाकरीचे भोजन प्राशन केंल्यानंतर मग सच्चे म्हणतीन की :

॥ आदीगण भरले हो पोटी । या देवाचे बोलन झाल चौताळी ॥
॥ आदीगण भरले हो आंगी । या देवाचे बोलनं आहे चौरंगी ॥

जेव्हा असे एकच चतुर्पती नामी राहुन देहीतील पाचही तत्वांच्या कामाला या निरंजनाच्या अर्पण करणारे असे रोमीद्युत या भुम्मेवर येवुन ही भुम्मा रूमावळी करतीन, तेव्हा पहा तेथुन अवघ्यांचा येण्या-जाण्याचा मोहजबा चुकन ।

चौ-यांशीचा मोहजबा चुकेल । याहीच्या हातानं ही चौ-यांशी मोडण । संच्च्यां पुढे चौ-यांशीची गणीता राहणार नाही.

कारण की : रोमीद्युतांसह त्यांच्या संगच्या सर्व भक्तांच्या देहीचे पाचही तत्वे हे निरंजनी शरण गेल्याकारणाने त्या सर्वांची सारी देहरूपी धरणी नविन होईन । देहीच्या पेशी ला चतुर्पती नामरसाई च्या प्याला व्दारे सतत नव चैत्यन्य मिळत राहल्यामुळे त्या कधी मरणार नाही. तेव्हा मग मरणार नाही बा कोणी । तेव्हा पासुनी अवघ्या भक्तजंनाचा येण्या-जाण्याच्या ८४शी चा मोहजबा/गणीता चुकनार आहे. म्हणुनच कृष्णा आकाशवाणीव्दारे सांगी करतो की : पहा या शक्तीच जाळमुळ । तुम्हा हाती चतुर्पता निरंजन ग्यान लागेल. तुम्हाला तो चौथा कळेल । चौथ्यापर्यत येण्याचा मार्ग कळेल । चौथ्याचा अनुभव सह देणं मिळेल.

॥ पहा शक्तीच जाळमुळ । शक्ती आहे चरांचर ।
शक्ती काय निघते भलत्याच घर । शक्ती बाजारी....
इन भरवला बाजार , भुम्मेवरी ॥१४॥

पहा शक्तीच जाळमुळ । शक्ती आहे चरांचर :-

या शक्तीचं जाळमुळ आता पहा । या शक्तीचे मुळ काय ? ही शक्ती कशी उत्पन्न झाली ? या शक्तीने कसा आपला मायाजाळ या भवसागरात टाकला आहे ? या चतुर्पता अथर्वन् वेदाला हाती घेवुन हे शोधुन पहाना जरा । शक्तिचे मुळ शोधता शोधता तुम्हा हाती चतुर्पता चा सार ग्यान येईल की :

निराकार निराधार आदीरूप आदीपुरूषाच्या निरंजन सोयंम् ज्योतीच्या मुळावरच्या रंगाव्दारे त्या आदीपुरूषाने या शक्तीला उत्पन्न केलेले आहे. सृष्टीनिर्मितीच्या खेळात निरंजनाच्या मुळावरचा रंग धरून शक्ति प्रकट झालेली आहे. शक्ति ही निरंजनाच्या मुळावरचा रंग धरून उत्पन्न झाली असल्यामुळे तिला आदीपुरूष धनी यांचा चरांचर व्याप्तता सह अनेक रंगाचे रंग-गुणांश मिळालेले आहेत. तिने भाव धरून भैस नामी मांडलेल्या प्रार्थनेमुळेच तो आदीपुरूष आदीमुनी रूपात तिच्यासमोर प्रकट झाला. आदीमुनीने तिला तिन देव प्रकट केलेत. आणी शक्तिच्या हवाली करून त्या तिघांना तिनयवगाच्या राजपदवी सह ईतर देणं दिलेत. तिरलोक्यातील तिन देव सह तिरगुणी अवतार हे तिच्या अधिपत्याखाली आहेत. यांना संग घेवुन तिने तिरगुणांचा बाजार मांडला आहे. त्याचमुळे ती शक्तीसुध्दा चरांचर व्याप्त होवुन रंगली आहे. ती अशी :

इन भरवला बाजार भुम्मेवरी :-

शक्तिने आपल्या तिन गुणांच्या तिन राजे यांच्या सत्तास्थापने करिता तिरगुणी महामाया देवता चे रूप घेवुन तिरगुणांचा या भुम्मेवर कवली बाजार मांडला आहे. या बाजारात ही मायाशक्ती रजगुणांना संग घेवुन *राजशी शक्ती* बनुन वावरत आहे. तर कधी सत्वगुणांना संग घेवुन *सात्वीक शक्ती* बनुन वावरत आहे. आणी तमगुणांना संग घेवुन *तामशी शक्ती* बनुन वावरत आहे. ऐसे शक्तिने अनेक रूपे घेत आपला बाजार मांडलेला आहेत. शक्तिच्या बाजारात येणा-या लोकांना मायाशक्तीला चिकटुन असलेल्या भुलवन पाडुन भ्रांतीत टाकणा-या धुनीने भुलवले आहे. तिरगुणांची माय असलेल्या मायाशक्तीने या भुललेल्यां लोकांना तिरगुणांचा प्याला मधुपानाप्रमाणे पाजुन त्यांची शुध्द हरवुन त्यांना धुंद करत आहे.

शुध्द हरवुन धुंद झालेल्यावर मायाशक्ती आपली मोहनी टाकुन तिन देवां सह तिरलोक्यातील तिरगुणी अवतार यांनी मांडलेल्या दुकानात आणत आहे.

तिरगुणी ग्यानाच्या दुकानामधला कवडीमोल किंमतीचा तिरगुणी माल त्यांच्या मस्तकी यवगान यवगापासुन मारत आहे. त्यांच्या डोक्यावर तो तिरगुणी माल लादला आहे.

तिरगुणी मायाशक्ती ने नरदेहीत सुध्दा आपला तिन गुणांचा बाजार मांडला आहे. या नरदेही मधील बाजारात ती विविध रूपे घेत या नरदेहीला नाचवत आहे. तिरगुणांच्या या तिन शक्तीयॉ एकमेकांचा पाडाव करत या नरदेहीं चा कब्जा घेवुन नरदेहीला आपआपल्या गुणांनुरूप नाचवत आहेत. नरदेहीला तिन शक्तियॉने आपले युध्दक्षेत्र बनवुन टाकले आहे. ते याप्रकारे :

- या देहीत कधी सत्व-रज या दोन गुणांचा पाडाव करून तमोगुणांचे वर्चस्व जेव्हा वर येते, तेव्हा ही माया त्या तमाला संग घेवुन तामशी शक्ती बनुन या देही चा कब्जा घेते. आणी ही *तामशी शक्ती* त्या नर-देहीला सैतानासारखे, व्दैतासारखे बनवुन नाचवत राहते. देहीकडुन कुकर्म करवुन घेत राहते. देहीला तापवत ठेवते. तामशी अहंकार आणत राहते.
- तर कधी या देहीत तम-रज या दोन गुणांचा पाडाव करून जेव्हा सत्वगुणांचे वर्चस्व वर येते, तेव्हा ही माया या सत्वगुणाला संग घेवुन ही माया सात्वीक शक्ती बनुन देहीचा कब्जा घेते. आणी मग ही *सात्वीक शक्ती* या देहीला म्हणजेच स्वतःलाच देव समजुन देवाप्रमाणे वागायला भाग पाडते. देवांप्रमाणे भक्ष्य घेत राहते. देहीची पुजा-अर्चना करवुन घेत राहते. मी खुप मोठा ज्ञानी, ध्यानी, योगी, जोगी ईत्यादी मोठेपणा आणत स्वतःव्दारे स्वतः चे व्यक्तिमहत्व वाढवण्यास कार्यरत् राहते. देहीला मान सन्मान दयावा. सत्कार करावा. अशी आशा आकांक्षा अभिलाषा धरूत राहते. या सर्व कर्माव्दारे ही सात्वीक गुण शक्ती सात्वीक अहंकार आणत राहते.
- तर कधी या देहीत सत्व-तम या दोन गुणांचा पाडाव करून जेव्हा रजोगुणांचे वर्चस्व वर येते, तेव्हा या रजोगुणांचा संग घेवुन ही माया *राजशी शक्ती* बनते. आणी मग ही राजशी शक्ती देहीला राजाप्रमाणे वर्तन करावयास भाग पाडते. राजपद, मानसन्मान मिळण्याची आशा धरते. राजाप्रमाणे अहंकाराने वागु लागते.

अश्या प्रकारे देहीतले सत्व-रज-तम हे तिनही गुण आपआपले वर्चस्व स्थापत या देहीत आपआपल्या गुणांचा खेळ करत या देहीला नाचवत राहते. मायेने आपल्या तिरगुणांचा कमाकमाने या देहीत बाजार मांडण्याचा पण/नेम केला आहे. जो मायेच्या या तिरगुणांचा पण/नेम नाशवेल, तोच देहीतील पण-नाशीला/पन्नाशीला पार करून चौथ्या कडे जाण्यास सक्षम होतो. त्यालाच तो चौथा भेट देईल. हेही निशित ।

ऐसा या मायाशक्तीने तिनही गुणाला संग घेत चरांचर व्याप्त बाजार भरवला आहे. या बाजारात आलेल्या जनलोकांना भुलवण टाकुन मायेने भुलवले आहे. मायेच्या बाजारात येणारे बाजारी लोक या मायाशक्ती ने टाकलेल्या भुलवणी पायी आपले स्वस्वरूप, पुर्व संचित, सद्गुण ईत्यादी पार विसरून गेलेले आहेत. मायेच्या बाजारात येवुन मायेने टाकलेल्या तिरगुणांच्या मोहीनी व्दारे मोहीत होवुन त्यांनी अपगुण विकत घेतलेले आहेत. त्यांच्या या अपगुणांच्या संग्रहामुळेच चौ-यांशीची फेरी त्यांच्या मागे लागली आहे. ८४शीचा बाजार उभा झाला आहे.

आदीमाया-शक्तीचा बाजार चालवण्याचा सौदा तिचे तिन सुतांनी घेतलेला आहे. या सौदयामुळेच या तिरगुणी बाजांरातील पाले-मुळे असलेल्या कवडीमोल ज्ञान घेतल्यामुळे तो आत्मज्ञान विसरून गेला आहे. स्वस्वरूप विसरून जीव हा भुलला भांबावला आहे. कोणते घेवु कोणते ठेवु ? हे काही त्याला सुचत नाही । तो विचारी पडला आहे ।

शक्ती काय निघते भलत्याच घर

परंतु या माया शक्तीच्या बाजारांव्दारे जरी यवग हिन नित्कृष्ट दर्जाचे होवुन त्याव्दारे मती सुध्दा हिन/नित्कृष्ट झाली असली, तरी सुध्दा त्या जश्या आहे तश्या मतीने या शक्तीचे घर असलेल्या चतुर्पती धन्याचे ग्यान घेवुन चतुर्पतीला सच्च्या दिलाने शरण जावे. चतुर्पती ला सच्च्या भक्ती-भावाने शरण गेल्यानेच डोळ्यावर असलेली तिरगुणांची झापड उघडल्या जावुन त्रिगुणातीत दृष्टीने तिरगुणांपलीकडचे पाहु शकतो. तिरगुणांच्या पलीकडे उभा असलेला तो चौथा आदीपुरूष धनी त्यांच्या ज्ञान दृष्टीक्षेपात येईन. जेव्हा तो चौथा ज्ञानदृष्टीस येईन, तेव्हा त्याला चतुर्पती निरंजन ग्यान प्राप्त होवुन त्या जीवाला शुध्द चतुर्पता कळन । आपरूप या चौथ्या खुम्मी उभ्या असलेल्या चतुर्पतीला म्हणजेच या निराकार निराधार निशंःकलंकी निरंजन आदीपुरूष चतुर्पतीचे भजन पुजंन ध्यान सुमरन भक्ती करावयास लागेलं.

या भजन पुजंन, ध्यान धारणा, सुमरन भक्ती व सत्‌कृत्याचे अधिकत्व ईत्यादी व्दारे या देहीत चौथा शुध्द सत्व जागी होवुन त्या निर्गुणांची चैतन्य ज्योत जागृत होईन. त्यांच्या या जागी झालेल्या ज्योतीमध्ये भैस अवताराची ज्योत खेळु लागेल. मग ही चैत्यन्या माया तिरगुणांचे तिन शिक्के हे फुलपुष्पाप्रमाणे चौथ्या शुध्द सत्व भैसा चरणी अर्पण करेल. शुध्द स्वरूपात आपल्या मुळ स्थानी प्राप्त होवुन भैसा चरणी लीन होईन. ती शक्ती याप्रकारे नरदेहीत भैसा चरणी लिन झाल्याने मग कश्याला जाईन हे देहघर सोडुन भलत्याच घरी । ही शक्ती देहीवर माया ममता करणारी देहीची सव बनुन राहीन. नरदेहीतील शक्तीच्या तिर गुणांचा बाजार आपरूप मोडन. अश्या रितीने चतुर्पती चे बहु भुम्मा गोळक गोळा होवुन या शक्तीचा सारा बाजार मोडन.

॥ भुम्मेवर गोळक होतीन गोळा । शक्तीचा बाजार मोडन सारा ।
जागानाही राहणार शक्तीला । पडन विचारी.....
मग राहीन म्हणन तयाच्या चरणावरी ॥१७॥

एका ठिकाणी गोळा होवुन आदीपुरूषाचे भजन पुजंन ध्यान सुमरन करणारे व मुखी सिदाईचे आगार/भंडार असलेले तिरगुणांच्या पलीकडे गेलेले, तिरगुणांच्या पलीकडे पाहणारे, शुरविर खेत्री असलेले निर्भेव भुम्मा गोळक या भुम्मेवर तो आदीपुरूष कृष्णा गोळा करेल.

चतुर्पती चे निर्भेव भुम्मा गोळक शक्तीने मांडलेला तिरगुणांचा बाजार सह चौ-यांशीचा बाजार मोडण्यास भक्तजनास साहय करेल. हे भुम्मा गोळक इतर भक्तजनांत जागृती आणुन नरदेहीत तिरगुणांचा बाजार मांडण्यास जागा देणार नाही.

आणी तेव्हा मग या शक्तीला सत्वगुणाला संग घेवुन नरदेहीत सात्वीक शक्ती चे रूप घेवुन 'मीच मोठा सात्वीक । मीच मोठा धार्मिक । मीच मोठा ब्रम्हज्ञानी । मीच मोठा ज्ञानी, सत्ववेत्ता, भजन, पुजंन करणारा ।.....ईत्यादी अहंभाव, अभिमान ईत्यादी.. ला संग घेवुन या जगात मिरवता येणार नाही.

तसेच या शक्तीला रजगुणाला संग घेवुन नरदेहीत राजशी शक्ती चे रूप धरून 'मीच मोठा सत्ताधारी । मीच मोठा । मीच मोठा ।....ईत्यादी राजशी अहंभाव, अभिमान ईत्यादीला संग घेवुन जगात या देहीला मिरवता येणार नाही. तसेच या शक्तीला तमगुणाला संग घेवुन नरदेहीत तामशी शक्ती चे रूप धारण करून तामशीवृत्ती, दृष्टप्रवृत्ती, दोहीत भाव ।.....ईत्यादी तामशी अहंभाव, अभिमान ईत्यादीला संग घेवुन, जगात या देहीला मिरवता येणार नाही.

अश्यारितीने तिरगुणांना संग घेवुन या शक्तीला नर देहींना नाचवता येणार नाही. मिरवता येणार नाही. शक्तीला नरदेही नाचवता मिरवता येवु न शकल्यामुळे शक्ती मांडत असलेला नरदेहीतील तिरगुणांचा बाजार मोडीत निघेल. या शक्तीला तिरगुणाला संग घेवुन नर देहीत अवतार घेवुन नटता येणार नाही ।

अश्या रितीने नर देहीत चतुर्पती च्या शुरविर खेत्री गोळक या शक्तीचा तिरगुणी बाजार मोडुन काढेल. चतुर्पती च्या भुम्मा गोयका व्दारे या शक्तीला तिरगुणांचा संग मिळवु न दिल्यामुळे तिला नर देहींत तीचा तिरगुणांचा बाजार मांडण्यास जागाच नाही राहणार । ती मग पडन विचारी । चतुर्पती चा विचार करतांच तिला तिचे मुळावरचे उत्पत्तिचे ग्यान प्राप्त होईन. चतुर्पती ग्यानाने ती शुध्द स्वरूपात येवुन तिची भ्रांती दुर होईल. तीला उमजुन येईन की : हाच तो माझा क्षत्रिय । मला जिंकणारा । माझा बाजार मोडणारा । असे तीला उमजुन येईल. आणी मग ती म्हणन :

॥ ..जो माझा खैत्री/क्षत्रिय । त्याची मी शक्ती । तो माझा वर.. ॥ खंड०२/३०

असे म्हणत या भुम्मा गोयकाच्या देहीवर माया ममता करणारी भुम्मा गोयकाची सव बनुन राहील. भैसाची वाट पाहत त्यांच्या चरणांच्या चारही बाजुने फिरत राहीन. तो चौथा भुम्मा गोयकाच्या देहधरणीवर उभा झाल्यावर मग राहीन म्हणन त्या चत्रभुज अवतार च्या चरणावर । राहीन म्हणन तयांच्या चरणावरी । तेव्हा मग त्यांचे/तयांचे उध्दरतीन हे जीव ।

॥ तयाचे उध्दरतीन, हे जीव । भुम्मा गोळक, आहे निर्भेव ।
शक्ती राहीन, याहीची सवं । सेरूपात/सैवंरात......
सेरूपी भैस, उभा राहीन । या देहीत ॥१६॥

**शब्दार्थ :-**

**तयाचे** = त्यांचे । **सवं** = माया-ममता करणारी स्त्री, शक्ती । **सैवरात**:- स्वयंवरात

निर्भयतेने ज्या शुर विर खैत्री गोळकांनी शक्तीला जिंकले, त्या सर्व शुर विर खैत्री/क्षत्रिंयाचे/तयांचे जीव हे उध्दरतीन. कारण की : हेच शुर विर खेत्री भुम्मा गोयक देहीमध्ये या शक्तीला जींकुन तीला आपल्या क्षत्रिय बळाने स्वयंवरास उभी करेल. ही शक्ती जेव्हा उभी होईल, तेव्हा तीच्या संग स्वयंवर/लग्न लावुन घेण्यासाठी, या देहीतील चत्रभुज अंश अवतार म्हणजेच या देहीतील शिव जागृत होवुन सेरूपात नरदेहीच्या भुम्मेवर उभा राहीन. तो निराकार आप येईन पलटुनी । तेव्हा मग या देह भुम्मेवर देहीच्या शिव-शक्तीच स्वयंवर होईन. नर देहीत तेव्हा शिव-शक्तीचे मिलन होईन. आणी मग ही शिव-शक्ती देहीचा समया पालटन. देही ही नविन डोळयाची नविन बाहुली होईल. या नविन दिव्यदृष्टीने अनामत शक्ती ने तिरलोक्याचा घेतलेला जुम्मा पाहील. अहिनाघरचे संपुर्ण ग्यान चे दृष्टांत दिव्यदृष्टी ने दिसेल. आणी त्याच सोबत बरच काही देणं ही प्राप्त होईल-होत राहील. परंतु हे सर्व या देहीत केव्हा घडन ? याचा शकुन ऐका हो ।

॥ देहीचे शकुन भडकन अग्न । तेव्हा जलजलाट होइन काम ।
थरथरा कापन तिरभवन । धनी आला....
हा उरल्या देहीत भेट देईन अवघ्याला ॥७७॥

चतुर्पती नाम जेव्हा देहीच्या रोमा-रोमात भिनेल, तेव्हा हे नामरूपी अग्न भडकन । नामज्योत देहीत प्रकट होईन. देहीच्या तिरलोक्यात तिरभवनात चतुर्पती नामाचा जलजलाट होईन. या नामाच्या जलजलाटामुळे देहीतील सर्व बाधक जळुन जाईल. देही तेजोगुणी होईल । तेजोमय कांती लाभेल ।

नर देहीवर तिरगुणांने जे राज स्थापन केले होते, ते तिरगुणी राजसुध्दा चतुर्पती च्या नाम जाळाने जळुन-भाजुन उडुन जाईल. चतुर्पतीच्या नाम अग्नीज्वालाने नर देहीतील तिरगुणांचे राजपदवी खाली करण्याची वेळ आली आहे. तिनगुणांची राजपदवी चौथ्या भैसाला अर्पण करण्याची वेळ आली आहे. अशी जाणीव त्रिगुणांचे तिन राजे यांना येईन.

देहभुम्मेवर धनी उभा राहण्याची आता वेळ आली आहे. अशी जाणीव तिरगुणी राजे व त्यांचे तिरलोकी अवतार देवता यांना आल्यामुळे त्यांचे ठाणे दनानुन जाईन. देहीचे तिरभवन थरथरा कापन. देहीतील हे सर्व तत्वे चतुर्पती धन्याला शरणागत होईल. देही देवता शरणागत होवुन त्या देवता आपआपले शिल्ले धन्या चरणी अर्पण करेल. तेव्हा मग तो धनी सोहंम् रूपात उभा राहीन.

जेव्हा धनी नर देहीत सेरूपी उभा राहीन, तेव्हाचा शकुन ऐका हो । हा त्रिकुटावर ज्योत स्वरूपी चमकुन, या देहीच्या आंगीन कपाटी ती ज्योत पाडुन संपुर्ण देही जागृत करेल. या देहीत त्याने ठेवलेले अवघ्या सुप्त शक्तीयॉं, सिध्दियॉं यांना भेट देवुन त्यांना जागृत करेलं. देह शक्ती जागृत होवुन या देहदेउळी स्वयंवराला उभी होईन । या स्वयंवराच्या वेळी भैसाने ज्याला भेट दिली आहे, असे भेटी आंगचे सिध्दगण देह-देउळी भेटीला येईन । या सर्वांच्या उपस्थितीत नर देहीत शिव-शक्तीचे स्वयंवर होईन. जीवा या शिवाचे सेरूप एक होईन ।

थोडक्यात नरदेहीत तो आदीपुरूष कृष्ण धनी सेरूपी उभा राहुन नर देहीतील अवघ्याला उरला देहीन भेट देवुन त्यांना ज्योता चढवन । अवघी देहधरणी जागृत करेल । सुपात्र असलेल्या नरदेहीला तो आपला अवतार बनवेल. आपले ईच्छित कार्य या नरदेही व्दारे करून घेईल. जसे कृष्णाजीची नरदेहीलाच या धन्यानं आपला पुर्ण अवतार बनवुन त्या कृष्ण नरदेही व्दारे येणा-या भैसाच्या यवगाची मांडणा करून ठेवली । अहीनाघरचे चतुर्पती ग्यान, भक्तीचा पुरवा, सिदाई सेना ची रंचना केली. आणीक बहु कारणा साठी अनेक कार्य करून ठेवलेत. कृष्णांमृत वाचुन ग्यान घ्यावे ।.

**भजने :-**

**॥ धनी आला हो आला । हा उरल्या देहीन, भेट देईन अवघ्याला ॥**
**॥ धनी आला हो आला । उजाला नामाचा, तिर लोकी झाला ॥**



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०१/भाग-०२ ॥
॥ शक्तीची ओवी नं. ०२ ॥
ओवी महात्म :- स्थापनेच्या व जागृतिच्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी
॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

## ॥ निराकार निरंजन ॥

॥ निराकार निरंजन । नव्हतं पाणी हे पवन ।
एवठं काम केले याहीन । उभी केली माया चैतन्यां ।
अवघ दिलं याहीच्या स्वाधीन ॥ ०१ ॥

॥ निराकार निरंजन । याहीला देव म्हणन कोण ?
अवघे आणले आकारात । तेथुन झालेसे प्रकट ।
पहा जगात । पहा या जगात ॥ ०२ ॥

॥ प्रकट झाले तिरभवनी । जन लोक लागले घ्यानी ।
भुल पाडली चैत्यन्यानं । अवघ टाकलं मोहुन ।
पहा मायेनं । पहा या मायेनं ॥ ०३ ॥

॥ अवघी माया याहीच्या पासुन । तिरलोक याहीला 'शरण ।
माया सोडुन भक्ती करन । त्याच्या हद्‌यी भरन ।
करन हैरान । करन हैरान ॥ ०४ ॥

॥ माया सोडुन जो भक्ती करन । त्याला होईन हा देव प्रसन्न ।
त्याला होईन या देवाच देणं । तिथ मायेचं काय चालन ।
पहा भक्तीनं । पहा या भक्तीनं ॥ ०५ ॥

॥ देवा भक्ताची जोडी होईनं । अंतर पलघडी नाही राहीनं ।
याहीची किर्त जो करन । त्याची महीमा जगात वाढनं ॥०६॥

भजने :-
॥ भक्ती करून निःसंग होजो । ऐक जन आता, ऐक प्राण्या आता ।
या भक्तीला, भंग नको आणु । वाया जाशीन अघोगता ॥
॥ भक्ती केली या रायान । घरामध्ये घातले चैतन्य ।
अशीच भक्ती करा देहजीव । तरतील नामानं ॥

॥ ग्यान या, भक्तीची निशानी । मनाशी लावजा ।
सत्य नाम, सुमरन करता । रोगविघ्न जातीन, भंगा ॥
॥ सावंग नगरी, ज्योत भारी । ठेवलं सांगुन ।
हरीनामाच्या, ध्वजा लावल्या । भक्ती कारण ॥

॥ हरी हरी कृष्णा । तु जगाचा कर्ता ।
तुवा भक्तीशी, लावले बा । सर्व आता ॥
॥ सर्वत्राच्या, आधी भक्ती । पुनानं केली ।
हरी नामी, झेंडा लावला । ध्वजा उभारली ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ शक्तीची ओवी नं. ०२ ॥

ओवी महात्मः- स्थापनेच्या व जागृतिच्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी

॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

## ॥ निराकार निरंजन ॥

### -: निरसन/स्पष्टीकरन :-

॥ निराकार निरंजन । नव्हतं पाणी हे पवन ।
एवठं काम केले याहीन । उभी केली माया चैतन्यं ।
अवघ दिलं याहीच्या स्वाधीन ॥ ०१ ॥

एवठं काम केले याहीन :-

आदीपुरुष आदीगणांच्या निरसनावरुन आपणास ग्यान आले आहे की : आदीरुपाच्या 'मो-ह सृष्टी रंचावी' या संकल्पमात्र शकुनाव्दारे प्रथम एकला असलेले आदीरुप सोयंम् निरंजन ज्योत रुपात स्वतः होवुन आपरुप उभा झाला. ही निराकार चैत्यन्यमय सोहंम् ज्योत म्हणजेच त्या आदीरुपाचा निरंजन अवतार होय. ही उभी झालेली सोयंम् निरंजन ज्योत तेथील धुम्मधुम्मकार नादब्रम्हात भरुन भरली आणीक उरली. धुम्मधुम्मकार नादब्रम्ह व सोयंम् ज्योती हे ऐक्य झाले. या ऐक्यातुन ओहंम्-सोहंम् धुनी उठली. जसे लाकडावर लाकुड घासुन अग्नी उत्पन्न होते, तसे आदीरुपाच्या ओहंम्-सोहंम् या दोन बोटाच्या चिमटीने त्या जलाचरात विर्जन पडले. आणी सृष्टीयॉं उत्पत्तीचा खेळ सुरु झाला. शक्ती उभी झाली.

उभी केली माया चैतन्यं :-

सृष्टी उत्पत्तीच्या कार्यात सर्वप्रथम त्या निरंजन ज्योतीने "**मो-ह सृष्टी रंचावी**" ही इच्छा बाहेर फेकली. ही इच्छा आदीरुपाच्या चरांचर व्याप्त मनात सम्मावली. आणी आपरुप सोयंम् ज्योतीच्या मुळावरचा रंग धरुन, ही ईच्छाच अद्‌भुत शक्ती बनुन उभी राहली-०१.०१.०१. या मुळ चैत्यन्या शक्तीला त्याने आकाशवाणी व्दारे सृष्टी उभारण्यास आवाज दिला-०१.०२.०१. अश्या रितीने प्रथम एकला आदीरुप आदीपुरुष आदीगण ! मग रंचले मंडयान ! मग रंचल तिरभवन ! आणी मग ते 'येतो मी खरा-०१.०२.०१' या आवाजाचा शकुन सिध्द करण्याकरीता आदीमुनी रुपात शक्तिसमोर आलेत. आणी मग यवगान यवगी माया वेष धरुन उभे राहीले आहेत.

अवघ दिलं याहीच्या स्वाधीन :-

मुळयवगाचे यवगान यवग लौटल्यानंतर सुध्दा शक्ती ही कर्तार धनी शिवाय सृष्टी निर्माण करण्यास असमर्थ ठरु लागली. तेव्हा ती उध्दीग्न होवुन म्हणु लागली की : निराकार निरंजन, याहीला गुण नाही गव्हर ! याहीला देव म्हणन कोण ? हा देव नाही खरा !..ईत्यादी खंड०१/०२/०१शक्ती ची ओवी मधुन अधिक ग्यान घ्यावे.

आपणास ग्यान येईल की : निराकार निराधार निरंजन, याहीला देव म्हणन कोण ? हा देव नाही खरा !..ईत्यादी शक्तीने जळजळीत बोल सत्य धनीदेवास बोलुन सुध्दा, त्या मुळयवगी सत्य देव आदीपुरुष सर्वप्रथम आकारी वेष घेवुन आदीमुनी रुपात शक्तिसमोर आला. शक्ती-मायेची मायावी सृष्टी उभारण्याकरीता या आदीपुरुष आदीमुनीने शक्तीला देणं देवुन अवघ शक्ति मायेच्या स्वाधीन करुन दिले.

॥ निराकार निरंजन । याहीला देव म्हणन कोण ?
अवघे आणले आकारात । तेथुन झालेसे प्रकट ।
पहा जगात । पहा या जगात ॥ ०२ ॥

निराकार निरंजन । याहीला देव म्हणन कोण ? :-

प्रथम चरणात मुळयवगी आपरूप आदीपुरूष आदीगण निरंजन धनी ने आदी माया चैत्यन्या शक्तीला उत्पन्न केले. यवगान यवग लौटले तरी त्या चैत्यन्या शक्तीला तो आदीरूप डोळा दिसेना ! तो काही आकारी रूपात दिसेना ! त्यामुळे निराशेने उग्धीग्न होवुन शक्ति म्हणु लागली की :

निराकार निरंजन आदीपुरूष ला देव म्हणन तरी कोण ? हा देव नाही खरा ! असे अविश्वासदर्शक निराकार निरंजन सत्य धनीदेवाला असत्य ठरवणारे अग्नीज्वालाप्रमाणे जळजळीत बोल बोलली. असे बोलल्यानंतर पुढे काय काय घडलं ? याचे ग्यान चैत्यन्याशक्तीच्या खंड०१/०२/०१:-शक्ती ओवी मधुन घ्यावे. तुम्हास ग्यान येईल की :

तेथुन झालेसे प्रकट :-

तो आधीचा आदीपुरूष आदीगण-खंड०१/०१/०१ आदीरूप निराकार कर्तार आदीपुरूष धनीदेव शक्तीसमोर सर्वप्रथम आकार धरून आदीमुनीच्या वेषात शक्तिची ओवी खंड०१/०२/०१ मध्ये प्रकट झाला. या सर्वप्रथम आकारी रूपात आलेल्या आदीमुनीने चैत्यन्या-शक्ती ला तिन शिक्के जागी/प्रकट करून दिलेत. या तिन शिक्क्या पैकी :

- सृष्टी निर्मिती करणारा चैत्यन्याचा शिक्का त्या आदीमुनीने ब्रम्हदेवाच्या रूपात प्रकट केला.
- सृष्टीचे पालन पोषण व रक्षणाचे काम करणारा चैत्यन्याचा शिक्का त्या आदीमुनीने विष्णु रूपात प्रकट करून शक्तीला दिला.
- सृष्टीचा संहार विनाश करण्याचे सामर्थ असलेला चैत्यन्याचा शिक्का त्या आदीमुनीने शंकर रूपात प्रकट केला. आणी
- स्वतः तो चौथा आदीपुरूष आदीमुनी अवतार कैलाशी निघुन गायप झाला.

अश्या प्रकारे आधी उभे होते ज्याला अयन नाही आकार नाही असा आदीरूप निराकारी निराधारी आदीपुरूष नारायण ! मग तोच आदीरूप नारायण हा आपरूप निराकार निश्कंलंकी निरंजन ज्योत स्वरूपात उभा झाला. आदीरूपाच्या निरंजन ज्योतीने ईच्छा धरली. ती इच्छाच शक्ती बनुन उभी राहली-०१-०१-०१. या शक्तीला देण देण्यासाठी तो आदीरूप नारायण हा निर्विकार आदीमुनी रूपात प्रकट होवुन शक्तिसमोर उभा झाला. या आदीमुनीने त्रिदेवाला घडवुन त्यांना चैत्यन्या-मायेच्या स्वाधीन केले. या त्रिदेवांपासुन कृतयवग चा प्रारंभ होवुन देवांगण घडले.

अवघे आणले आकारात :-

हे सर्वकाही त्या एकल्या असलेल्या आदीरूप आदीपुरूष नारायणा पासुनच घडलेत. त्याच्या पासुनच व्यक्त-अव्यक्त घडवल्या गेलेत. सगुण-निगुर्ण घडवल्या गेलेत. ईश्वरी माया ईश्वरी काया घडवल्या गेल्यात. काया रूपाशी आणल्या गेल्यात.

॥ ईश्वरी माया ईश्वरी काया । रूपाशी आणल्या ।
तुया आंगची सत्ता । ज्योती, नांदु लागल्या ॥ ०२/२९
॥ तुमच्या आंगचा जीव होय । तुमच्या हात देवा बनली देही ॥
॥ देह-जीव बनवला मजबुत । देह देवळात नांदते देवाची ज्योत ॥
॥ जोडा या ज्योतीला हात । उभे आहे हो कृष्ण अवधुत ॥

आदीरूप आदीपुरूष भैस नारायण धनीदेवाने इश्वरी माया इश्वरी काया रूपाशी आणल्या. आणी त्यांच्याच हातुन बनलेल्या या रूपा-रूपाच्या देहीमध्ये

त्यांच्याच आंगच्या तेजोगुणी सत्ता ज्योत म्हणजेच आत्मज्योती व्दारे सर्व देही नांदु लागल्या. प्रतेक देह-देउळात तो धनीदेव आपला तेजोगुणी अंश अवतार घेवुन निर्गुण चैतन्य ज्योतिर्मय सोहंम् स्वरूपात उभा झाला. लायक देह-देवळात या देवाची ज्योत नांदु लागली. ज्या देहीने आत्मज्ञानी होवुन या निरंजन ज्योत स्वरूपी उभ्या असलेल्या कृष्ण अवधुताला हात जोडुन सच्च्या भक्ती-भावाने भजलेत, त्यांना चौथ्या च्या चतुर्थ म्हणजेच तुर्या अवस्थेत प्राप्त होणारे चतुर्पता अथर्वन् वेदाचे ग्यान झालेत. निराकार निर्गुण अश्या आत्म गादीवर ठेवलेले चतुर्पती निरंजन ग्यान चा प्रकाश व्दारे त्या देहीच्या आत्म ज्योती प्रकाशु लागल्यात. त्या रूपांची निरंजन ज्योत धरणी रूमावळी करत सर्वत्र खेळु लागली. ऐसे त्याने बनवलेल्या रूपाच्या रूमावळीला गणीताच नाही.

॥ रूमावळीला गणीता नाही । तु रूपी उध्दरला ।
धन्य तुमची लिला । सर्व घटी भरून उरला ॥ ०२/२९

त्याच्या रूपावळीच्या रूमावळीला गणीताच नाही. तो रूपी उध्दरला. धन्य त्याची लीला तो सर्व घटी भरून भरला आणीक उरला. अश्या रितीने पिंडी या ब्रम्हांडीच्या तिर तिरभवनी तो तेजोगुणी अंशरूपात येवुन आत्म चैत्यन्यज्योत रूपात प्रकट झाला.

॥ प्रकट झाले तिरभवनी । जन लोक लागले ध्यानी ।
भुल पाडली चैत्यन्यानं । अवघ टाकलं मोहुन ।
पहा मायेनं । पहा या मायेनं ॥

प्रकट झाले तिरभवनी :-

सृष्टी निर्मितीत त्या आदीरूपाने सगुण-निर्गुण अश्या ईश्वरी माया ईश्वरी काया रूपाशी आणल्या. सगुण रूपी देही तर या सगुण रूपांच्या अंर्तगत निर्गुण असा धन्याचा तेजोगुणी अंश अवतार आत्माराम ! असा सगुण-निर्गुण साचा ठेवुन सगुण देहीच्या विविध रूपा-रूपात तो निर्गुण आत्माराम आला.

काया रूपाशी आणुन या कायारूपी दिवनालीत आपल्या तेजोगुणी अंशाव्दारे चैतन्य तेल टाकुन रूपा-रूपांच्या देहीत जिवनकळा ज्योती उभ्या केल्यात. या ज्योती त्याच्याच त्या तेजोगुणी अंशाव्दारे नांदु खेळु लागल्यात.

तो आदीरूप आदीपुरूष नारायण आपला तेजोगुणी अंश अवतार घेवुन, या देहीत चैत्यन्यमय ऋषि बनुन निर्वाणी बसुन धडाधडा सोहंम धुनी जाळत बसलेला आहे. चरांचरात व्याप्त होवुन सर्वत्राला भरून भरला आणीक उरलेला आहे. अश्या प्रकारे पिडी या ब्रम्हांडीच्या घटोघटी च्या तिरभवनी भरून तो चैत्यन्यज्योत रूपात घटोघटी प्रकटला. रूपाशी आला आहे.

जनलोक लागले ध्यानी :-

प्रथम यवगीच्या ग्यानी, भक्त, योगीजन ईत्यादी यांनी सर्वप्रथम आदीरूपाने हेच सोहंम रूप जाणले होते. आदीरूपाच्या देहीतील याच तेजोगुणी अंश अवतार या एकाच अंशालाच पकडुन, त्यांनी आदीरूप आदीपुरूषाचे ग्यान त्याच्याच अंशअवतार व्दारे मिळवत ते सर्व अहीनाघरचे ग्यानी झाले होते. अहीनग्यान असलेले या सर्वांना याचे ग्यान होते की :

देहघरी निर्वाणी बसलेल्या आदीरूपाचा तेजोगुणी अंश अवतार असलेला निराकार निर्गुण चैत्यन्यमय ऋषि आत्मा हा पिंडी या ब्रम्हांडी कोणती धुनी पेटवुन बसलेला आहे ? ब्रम्हांडी कोणता जप होत आहे ? ईत्यादी सर्व अहीन ग्यान प्रथम यवगीच्या ऋषि-मुनी योगी-जोगी भक्त ग्यानी-ध्यानी यांना होते.

सर्व अहिनाघर च्या ग्यानीं लोकांनी अहिनाघरचे ग्यान निष्काम भावाने कर्मफलांची आसक्ती न धरता सर्वसाधारण जनलोकात प्रेरीत केले होते. प्रथम यवगाच्या जनलोकास चतुर्पती अहिनाघरचे ग्यान व्यवस्थित समजावुन सांगतले होते. त्यांना सोसावर/श्वासावर ध्यान लावुन सोहंम् चा अजपा जप श्वासावर लक्ष्य केंद्रित करून करावयास शिकविले होते. शांत ठिकाणी शांत बसुन नैसर्गिक श्वासावर मन केन्द्रित करून सोहंम् ध्यानास लावले होते ते असे :

शांत ठिकाणी शांत बसुन नैसर्गिक श्वासावर लक्ष्य केंन्द्रित केल्यानंतर काही वेळातच तुमच्या लक्ष्यात येईल की : श्वास आत घेतांना *'सो्'* असा ध्वनी उत्पन्न होवुन ऐकावयास येतो. तर श्वास बाहेर टाकतांना *'हंम्'* असा ध्वनी उत्पन्न होवुन ऐकावयास येतो. श्वास आत घेतांना **सों** व बाहेर टाकतांना होणा-या **हंम्** या दोन ध्वनी वर लक्ष्य ठेवुन तो सोहंम् ध्वनी ऐकत राहल्याने आपोआपच निर्गुण सोहंम् चा अजपा जप होतो.

सोहंम च्या अजपा जपाव्दारे सर्वप्रथम मन केन्द्रित करून आदीरूपाचे कोणतीही ईच्छा व कल्पनामुक्त म्हणजेच निर्विकल्प ध्यान भृकृती मध्ये कसे करावे ? ईत्यादी ग्यान प्रथम यवगी अहिनाघरच्या ग्यानी योगी जनांनी जनलोकास दिले होते. म्हणुनच त्या काळी सर्व जनलोक याच आत्मतत्वात विलीन होवुन सोहंम् च्या ध्यानी होते. अश्यारितीने या सोसावर/श्वासावर लक्ष्य ठेवुन प्रथम यवगीचे ते सर्वजन सोहंम ध्यानी लागले होते.

सोहंम् ध्यानी लागल्यामुळे ते सर्व जनलोक आत्मतत्व जाणुन आत्मग्यानी झालेले होते. हे आत्मतत्व आत्मज्ञान तिरगुणांच्या पलीकडचे असल्यामुळे या आत्मतत्व आत्मग्याना व्दारे त्यांना तिरगुणांच्या पल्याड उभ्या असलेल्या चतुर्पती धन्याचे ग्यान झाले होते. मुळयवगी होत कोण कोण ? मुळयवगाचे ग्यान सह मुळयवगाचा देव 'निराकार निराधार आदीपुरूष नारायण' यांचे बहुतांशः ग्यान त्यांना झालेले होते. त्याचमुळे ते सर्वजन या चौथ्या आपरूप आदीपुरूष भैस नारायण धन्यालाच भजत होते. चौथ्या चतुर्पती आदीपुरूषाचे भजन पुजन ग्यान सुमरनां मुळेच त्यांना आपरूप चौथ्याचे आपरूप ग्यान सह विविध देणं धन्याकडुन प्राप्त होत होते.

प्रथम यवगाच्या सर्व भक्त जनांना धन्याच्या शिष्टाचार चे ग्यान झालेले होते की : तो निराकार निराधार आदीपुरूष नारायण धनी हा शुध्द अंतकरणाने सच्च्या भाव धरून केलेल्या सच्च्या भक्तीलाच पावणारा आहे. मग ती सच्ची भक्ती कोणीही कुणाचीही करो ! हा आपरूप चौथा धनी फक्त त्या भक्तांच्या शुध्द अंतकरणाने केलेल्या सच्या भक्तीला पावुन आपरूप देण देत राहतो. आणी हा देणं देणारा आपल्या अंत-करणात तेजोगुणी अंश अवतार घेवुन वसलेला आहे. चैत्यन्यज्योत अवतार रूपात देहीतच उभा आहे.

त्याचमुळे प्रथम यवगीचे सर्व जनलोक याच आत्मतत्वात रममान होवुन आत्मज्ञानी होते. तिरलोक्यातील तिरगुणी ग्यान व त्यांचे देवता यांची महीमा भक्ती करण्याकडे त्यांचा कल कमी होता. कारण की : त्यावेळी त्यांना ग्यान झालेले होते की : वेदांमध्ये सत्व, रज, तम या तिन गुणांचेच विवरण केलेले आहे. जेव्हा या वेदांच्या तिरगुणी ज्ञानापलीकडे पाहु तेव्हाच तो चौथा धनी दृष्टीक्षेपात येतो. तेव्हाच तो सत्य देव चौथा चतुर्पती प्राप्त होतो. त्याचमुळे जे सर्व जनलोक सुखःदुःख, शित-उष्ण, मान-अपमान.. ईत्यादी व्दंदापासुन दुर राहुन नेहमी सत्कृत्यात राहत होते. सत्कृत्याच्या अधिक्याने शुध्द सत्व मध्ये प्रवेश करत होते. चौथ्या अवस्थेत येवुन चौथ्याच्या नामी निमग्न राहत होते.

सत्कृत्याच्या अधिक्याने ते सर्व तिरगुणांच्या पलीकडे जावुन त्रिगुणातीत दृष्टीचे झालेले होते. या तिनही गुणांचा बंध तोडुन ते आत्मतत्वांव्दारे आत्मस्वरूपात रममाण झालेले होते. अश्याप्रकारे ते सर्व आत्मतत्वात रममाण होवुन आत्मज्ञानी झाले असल्यामुळे, त्या प्रथम यवगीच्या जनलोकास आत्म ग्यान झाले होते की :

प्रकृतिमाया पासुन उत्पन्न झालेले सत्व, रज व तम हे तिरगुण देहीत वास करणा-या आदीपुरूषाच्या तेजोगुणी अंश अवतार असलेल्या अविनाशी आत्म्याला खेचत राहतात.

या तिरगुणांपैकी रज व तम चा पाडाव करून सत्वगुण जेव्हा वर येतो, तेव्हा त्याला सुखः व ज्ञान प्राप्त होते. या प्राप्तीमुळे त्या देहीला मी सुखी ! मी ज्ञानी ! असा मी पणाचा अभिमान त्याच्यात शिरू लागतो. आणी याच्या साहयाने तो मनुष्य अहंकारी होवुन मीच मोठा सात्वीक, ज्ञानी ईत्यादी म्हणत देहीला मिरवत राहतो. अहंकारी सत्व ने तो बध्द होतो. बंधनात अडकतो.

तिरगुणांपैकी सत्व व तम चा पाडाव करून रजोगुण जेव्हा वर येतो, तेव्हा तो जिवात्म्यास रंगवणारा रजोगुण त्याच्यात तृष्णा व आसक्ती याचे उत्पादन करतो. आणी तृष्णा व आसक्तीयुक्त कर्माच्या लालचीने तो राजशी होवुन अंहंकारी होतो. तो अहंकारी रजोगुण आत्म्याला खेचत नेत बांधतो.

तिरगुणांपैकी सत्व व रज या गुणांचा पाडाव करून जेव्हा तमोगुण वरचढ होवुन वर येतो, तेव्हा तो सर्व प्राण्यांना मोहाच्या पाश्यात गुंतवतो. अज्ञान पसरवुन प्रमाद व आलस्य/आळस आणी निद्रा यांच्या योगाने जिवात्म्यास जखडुन टाकतो.

परंतु प्रकृती मायेच्या या तिन गुणांहुन तिचा कर्ता ''निराकार निराधार निरंजन सोहंम् ज्योत स्वरूपी आदीपुरूष भैस नारायण'' हा भिन्न/वेगळा/ निराळा/अलग आहे. प्रकृतिमाया च्या पलीकडचे त्याचे तेजोगुणी अंश असलेले आत्मरूप जेव्हा दृष्टीक्षेपात येते, तेव्हा तो त्या आदीपुरूषाच्या स्वरूपास प्राप्त होवु लागतो. त्याला चतुर्पतीचे ग्यान येवु लागते. या ग्यानाव्दारे त्याला याची जाणीव झालेली राहते की :

देह उत्पत्तीस बिजभुत असलेल्या सत्व-रज-तम या त्रिरीत्रांचे अतिक्रमण करून या अतिक्रमणानंतर देहधारी पुरूष जन्म मृत्यु जरा व्याधी यांच्या दुःखातुन मुक्त होवुन मोक्षास पावतो. त्याचमुळे ज्याच्यापासुन ही प्राचिन संसारवृत्ती विस्तार पावली, त्या चतुर्पती आदीपुरूष धनी च्या ध्यानी हे सर्व जनलोक लागुन त्या आदीरूप आदीपुरूषाला शरण गेले होते. चतुर्पतीला शरण राहल्यावर पुनः माघारे फिरावे लागत नाही. म्हणुन याच परमात्माच्या स्थानाच्या ठायी ते सर्व स्थित होते.

प्रतेकाच्या हद्यात याच परमात्माने अंशरूपी अवतार घेवुन अधिष्ठान असते. स्मृती, ज्ञान, विस्मरण ही याचपासुन उद्भवत राहतात. हा चतुर्पती प्रतेक प्राण्याच्या हद्याप्रदेशाच्या अंतःपुरात वास करतो. व मायेने सर्व प्राणीमात्रासा जणु काय यंत्रारूढ करून फिरवत असतो. हाच तो कळसुत्राचा मालक ! कळसुत्राची दोरी हाती ठेवुन कळसुत्रे बाहुल्या/काया खेळवत खेळ करत राहतो. म्हणुनच संपुर्णपणे संपुर्णभक्ती भावाने या कळसुत्राच्या मालकालाच

शरण जावुन त्याच्या प्रसादानेच उत्कृष्ट शांती व शाश्वत सुखः परमय सुखः प्राप्त करून घेता येते. ईतर कोणत्याही मार्गाने नव्हे !

म्हणुनच त्या प्रथम यवगीचे जनलोक आकाशवाणी उठवणा-या याच निराकार आदीपुरूष चतुर्पती धनी च्या ठिकाणी मन लावुन भक्ती करणारे त्याचे भक्त होते. त्याचेच भजन पुजन ध्यान सुमरन यजन करून त्यालाच नमस्कार करत त्यालाच जावुन मिळणारे होते. हे सर्व जनलोक त्याच्याच ध्यानी होते. कारण की :

तो फक्त सच्चा भाव धरून केलेल्या भक्तीलाच पावणारा होता. मग ती भक्ती कुणीही कुणाचीही करेना ! कुण्याही रूपाची करेना । त्याच्या त्या सच्या भक्तीला पावुन तो अदिरूप धनी देण देत राहत होता. ते आदीरूप सच्च्या भक्त जनांच्या बोलावर उभा राहुन त्यांचे बोल खरे करत होता. तथास्तु म्हणत राहत होता. आदीरूपाच्या या स्वभावामुळेच, त्यांच्या या शिष्टाई मुळे तेव्हा कुणीही कुणाचीही भक्ती करण्यास दंग होता. सच्या भक्तीला उधान आले होते. आणी तो आदीरूप आदीपुरूष त्या सच्च्या भक्ताची भक्ती दृढ करून त्यांना फळ देत, आपल्या स्वभावनुरूप शिष्टाई करत राहत होता तो असा :

सात्वीक राजस तामसी या तिन पैकी एका प्रकृतिच्या स्वभावास अनुसरून सर्व प्राण्यांची श्रध्दा उत्पन्न होत असते. अस्तुरी-पुरूष हे श्रध्दामयच प्राणी आहे. ज्याची जशी श्रध्दा असेल, तसा तो होत असतो. आपआपल्या प्रकृतीच्या योगाने बांधलेले, बंधनात अडकलेले, निरनिराळया काम्य वासनांनी मोह पावलेले लोक स्वतःला आवडणा-या उपासनेचा नियम नेम पाळुन वेगवेगळया आकारी देवी-देवतेची भक्ती करीत राहतात. राहत आहे.

अश्या वेळी जो भक्त ज्या उपास्य देवतेची भक्ती श्रध्देने करू इच्छितो, त्या भक्ताच्या ठायी तोच धनी चैत्यन्यज्योत रूपात उभा असतो. आणी भक्त ज्या देवतेची भक्ती करतो, त्या देवतेच्या ठिकाणीही तोच आदीपुरूष धनी चैत्यन्यरूपात असतो. अश्याप्रकारे भक्त व त्या भक्ताची देवता या दोन्ही ठिकाणी तो आपरूप धनी चैत्यन्य ज्योत स्वरूपात भरून भरला सानीध्य उरला असल्यामुळे तो उरलेला चौथा त्या भक्ताची श्रध्दा अधिक दृढ करतो.

अश्या रितीने अंर्तबाहयं भरून भरलेला आणीक उरलेल्या एकल्या धन्याकडुन श्रध्दा दृढ झाल्यानंतर भक्ताने आपल्या मनी कल्पिलेल्या ईच्छीत देवी-देवता चे तो भक्त जास्त नेटाने भक्ती करू लागतो. आणी मग त्या भक्ताच्या सच्या भक्तीला पावुन तो चौथा धनी भक्ताने भजलेले कल्पित देवी-देवतांचे रूप साकार करतो. या रूपा मार्फत आदीरूप आदीपुरूष धन्यानेच निर्माण केलेली ती काम्य फळे मग तोच आदीरूप त्या भक्ताला प्राप्त करून देतो. अश्या रितीने सच्च्या भक्ताच्या मनाने कल्पिलेल्या देवी-देवते चे रूप साकार करून त्या रूपाच्या बोलावर उभा राहुन त्या भक्तास तो देणं देतो.

तथापी त्या अल्पमती लोकांस मिळणारे फळ हे नाशीवंत असते. मोक्षाप्रमाणे टिकावु नसते. म्हणुनच त्या आदीपुरूष धन्याहुन अन्य देवतांची भक्ती करणारे जनलोक अन्य देवतांकडे आकर्षित होतात. व त्या चतुर्पती आदीपुरूष धन्याचे भक्त गण हे बोलावर उभ्या राहणा-या आदीपुरूष धन्याला प्राप्त करून घेतात.

म्हणुनच जे लोक त्या आदीपुरूष धन्यावाचुन इतर देवतेंचे श्रध्देने भजन करीतात, ते यथाविधी कर्म करणारे नसले तरी त्या आदीपुरूष धन्याचेच

अप्रत्यक्षयरित्या पुंजन करतात. असे समजावयाचे. ! कारण की : सर्व यज्ञाचा भोक्ता व प्रभु तोच आहे. या अल्पमती लोकांना हे तत्वतः कळत नाही. म्हणुन त्यांच्याकडुन अश्या चुका घडुन ते जन्म मरणाच्या ८४ फे-यात अडकतात.

अश्या रितीने ज्याचे देव त्याला लागतात. देवाची भक्ती करणारे देवांस जावुन मिळतात. पितरांची भक्ती करणारे लोक पितरांना प्राप्त करून घेतात. भुतांची भक्ती करणारे लोक भुतांस जावुन पोहचतात. व आकाशवाणीच्या चौथ्या निराकार आदीपुरूष चतुर्पती धन्याची भक्ती करणारे भक्त त्याच आदीपुरूष धन्याला येवुन मिळतात.

आदीरूप आदीपुरूष धन्याचे श्रेष्ठ व अत्युत्कृष्ट आणी अव्यय अखंड निराकारी निराधारी निरंजन निशंःकलंकी निरंजन सोहंम् स्वरूप अल्पमती लोक ओळखत नाही. त्याचे हे श्रेष्ठ स्वरूप न ओळखता तो निराकार निर्गुण आदीपुरूष धनी हा सगुणरूप धारी आहे असे समजतात. तो योगमायेने आच्छादिलेला असल्यामुळे कोण्याही अभक्तांना त्याचे स्वरूप उघड दिसत नाही. जरी तो धनी, त्यांच्याच हद्‌यी अंशरूपात अवतरून उभा असला, तरीही त्या *'आदीरूप अनादि अव्यय निराकार निराधार निर्गुण निशंःकलंकी निरंजन सोहंम् चैत्यन्यज्योत स्वरूपी आदीपुरूष भैस नारायण'* ला हे मुढं लोक ओळखत नाही. असे हे धन्याला न ओळखणारे अनोळखीचे भुते धन्याच्याच त्रिगुणात्मक प्रकृतिच्या ताब्यात गेलेले असतात. तिरगुणी प्रकृतीमाया चौथ्या धन्याच्याच अधिन असल्यामुळे, त्या प्रकृतीमाया मार्फत तो धनी पुनःपुनः त्या मुर्खास उत्पन्न करतो. चौ-यांशी योनीत फिरवत ठेवतो. जोपर्यत त्याची चौथी अवस्था प्रकट होवुन त्यास आदीरूप चौथ्या धन्याचे चतुर्पती ग्यान होत नाही, तोपर्यत तो चौ-यांशी ची फेरीत पुनःपुन उत्पन्न होत राहतो. चौ-यांशी फिरत राहतो.

परंतु जे लोक एकनिष्ठेने चिंतन भजन पुजन ध्यान सुमरन करून, त्या आदीपुरूष धन्याची उपासना व दिव्य सेवा करतात. शुध्द अंतकरणाने भक्ती भाव धरून जे काही असेल ते सच्या भक्तीभावाने आपरूप धन्याला समर्पण करतात. हद्‌यी प्रेम भक्ती भाव निरंतर वाहवत ठेवतात. अश्या त्या सर्व सच्च्या भक्तांची ती भाव भक्ती ची देणगी तो त्या सच्च्या भक्तांच्या अंर्तगत उभा राहुन प्रेमाने स्विकारतो. त्या सतत योगयुक्त असलेल्या सच्च्या पुरूषाच्या सांसारीक नित्याचा उदरनिर्वाह तो चालवतो. त्या सच्या भक्तांच्या संसाराची चिंता त्याच्या अध्यानी असते. इतकेच नव्हे तर तोच त्यां सच्च्या भक्तांच्या कर्ता करविता बुध्दिचा दाता होतो.

चतुर्पतीचे वरील सर्व ग्यान प्रथम यवगाच्या जनलोकास होते. या अहीनाघरच्या ग्यानावर तेव्हा तिरगुणी देवता व मायादेवतेंचा पडदा नव्हता. त्याचमुळे प्रथम यवगाचे सर्व भक्त जनलोक या चतुर्पती आदीपुरूष धन्याच्या ध्यानी लागले होते. म्हणुनच तेव्हा सनद्‌कुमार ईत्यादी ऋषिमुनी या चतुर्पतीच्या भक्तीव्दारे त्रिदेवांपेक्षाही बलवान झाले होते. नाथांनी प्रतिसृष्टी उत्पन्न केली होती....ईत्यादी

तर सती सावित्रीने या चतुर्पती ग्यानाच्या प्रकाशाने आपल्या पतीलाच परमेश्वर मानुन पतीची सच्ची भक्ती केली होती. तिच्या या पतीपरमेश्वरा वरील सच्या भक्तीला पावुन *'सच्च्या भक्तीलाच पावणा-या आपरूप चतुर्पती आदीपुरूष धनी'* यांनी तीला तपो-भक्तीबळ दिले होते. पतिव्रता बळ दिले होते.

या आपरूपाने दिलेल्या तपोबळाच्या प्राबल्याने ती त्रिदेवी पेक्षा श्रेष्ठ गणल्या गेली. आदीरूप आदीपुरूष यशकर धन्याने दिलेल्या तपोबळाच्या देणं व्दारेच ती स्वतःच्या पतीला यमव्दारातुन सोडवण्यास यशस्वी झाली होती.

आधी सच्च्या भक्ताला आकाशवाणी व्दारे शकुन सांगणारा हाच आपरूप निराकार आदीपुरूष धनी तेव्हा निराळा केवळ एकला उभा होता.

आपरूप आदीपुरूष धन्याच्या शिष्टाई मुळे तेव्हा फक्त भक्तीलाच उधान आले होते. कारण या धन्याला काहीच पाहीजे नव्हते. हा फक्त त्याच्या स्वभावानुरूप सच्चा भक्तांच्या सच्चा भाव-भक्तीलाच पावत होता. देण देत होता. सच्च्या भक्तांच्या सच्चा भक्तीला आपरूप पावन होण्याची शिष्टाई करत तो धनी यवगान यवगा साठी उभा होत होता. उभा झालेला आहे/राहणार.

म्हणुनच कुणी पतिव्रता आपल्या पतीला परमेश्वर मानुन पती-भक्तीत लिन होते. तर कुणी माता-पित्याला परमेश्वर मानुन माता-पिताच्या भक्तीत निमग्न राहत हाते. तर कुणी बंधु-भक्तीत लिन होता. तर कुणी सखा-भक्तीत ! तर कुणी गुरू-भक्तीत !......ईत्यादी सर्व जन सच्चा भक्ती-भावाने सच्चे भक्त बनुन सच्च्या भक्तीत लिन होते. प्रथम यवगी भक्तजनांची सच्या भक्तीला पावुन तो सच्या भक्तीला पावणारा *आकाशवाणीचा निराकार निराधार आदीपुरूष चतुर्पती धनी* त्यांच्या बोलावर उभा राहत होता. ज्याचा जसा भाव तसा हा अवधुतराव त्यांचा देव बनुन, उभा राहुन देण देत राहत होता.

प्रथम यवगी तेव्हा तिथे त्या चौथ्या गायप असलेल्या चतुर्पतीचीच महीमा वाढत चालली होती. त्या चौथ्या अजाताचीच संपुर्ण पृथ्वा होती. सर्व जनलोक आकाराच्या आत जी धन्याची चैत्यन्य ज्योत आहे, त्या चैत्यन्यज्योती कडे पाहणारे असल्यामुळे तेव्हा विषमता नव्हती ! जातीभेद नव्हता ! हिंसा नव्हती. समानता, अहींसा होती.

कारण त्यांना याचे ग्यान होते की : एखादया प्राण्यांची हिसां करणे म्हणजे आपण ज्या धन्याच्या चैत्यन्य ज्योतीला भजत आहो, त्या चैत्यन्य ज्योतीला विझवणे होय. प्राणहत्या करने म्हणजेच आपल्या त्या आकाशवाणीच्या आपरूप धनी देवाला बळजबरीने आपल्या स्वतःच्या स्वार्थाकरीता, स्वतःच्या आनंदाकरीता, स्वतःच्या हिताकरीता हाकलत आहो.

ते चैत्यन्य नैसर्गिक रित्या त्या आदीरूपाच्या ईच्छेने त्या प्राण्याच्या देहीच्या बाहेर जाणे निराळे ! आणी त्याच चैत्यन्य-ज्योतीला आपल्या आनंदाकरीता, शौकाकरीता त्या प्राण्याच्या देहीतुन हिसांव्दारे हाकलने म्हणजे अनिती पाप होय. हे कृत्य मानव नितीमत्ता च्या विरूध्द आहे. त्याचमुळे तेव्हा सर्व प्राणीमात्रांबध्दल प्रेम भाव दया कारूणा होती. याच विचारसरणीने दया, क्षमा शांती सुख नांदत होते. आणी विषमतेचे विसर्जन होवुन सर्व समानतेने राहुन, सर्वांना सत्रावीच्या जिवनकळा ज्योतीची गोडी होती.

त्याच मुळे तेव्हा विटाळ न धरणे, स्पृश्य-अस्पृश्यता न पाळणे, यांच्यासह व्रते उपोषणे ईत्यादी फालतु कर्मकांड, शिव-शिव ते जनलोक जाणत नव्हते. पाळत नव्हते !

प्रथम यवगात असलेल्या चतुर्पती ग्यानाव्दारे पृथ्वीत ही जी समानतेची विश्वरंचना चतुर्पती आदीरूप आदीपुरूष धन्याव्दारे झाली होती. त्या चतुर्पतीच्या विश्वरंचनेला आवर घालुन त्या समसमान रंचनेवर बंधने टाकण्यासाठी तसेच

या चतुर्पती ग्यानावर पडदा टाकुन आपले तिरगुणी राजे व त्यांचे महीमा, स्तुति ज्ञान व सत्ता हे राहीलेल्या तिन यवगात स्थापन करण्यासाठी..ईत्यादी कारणास्तव मायाचैत्यन्या आदीमायासह त्रिदेवांनी त्या विश्वरूप चौथ्या चतुर्पती आदीपुरूष कर्ता-याकडे आपले देणं चे स्मरणार्थ प्रार्थना केली.

समानतेच्या रंचनेला छेद देवुन आपली तिरगुणी सत्ता स्थापनेकरीता आदीमाया चेत्यन्या सह त्रिदेवांनी चतुर्पती कर्ता-याकडे प्रार्थना केली की :

## ॥ आदीमाया चैत्यन्या सह त्रिदेवांनी केलेली प्रार्थना ॥

हे आदीरूप आपरूप कर्तार आदीपुरूष आदीमुनी चतुर्पती धनीदेवा ! आम्ही त्रिदेवासह माया चैत्यन्या शक्ती तुम्हास पुनःपुनश्चः सुमरीतो की :

मुळयवगी शक्तीने मांडलेल्या भैस नामी मांडलेल्या प्रार्थनेला पावन होवुन तुम्ही आदीमुनी अवतार रूपात येवुन आम्हा तिघांना प्रकट केलेत. शक्तीसह आम्हास देणं दिलेत. तिन यवगाचे राज करण्याचे देणं आम्हा त्रिदेवांना दिलेले आहे. तुच आम्हा प्रकट करून तिनयवगाची राजपदवी दिली. ब्रम्हाला रजगुणांचा राजा, तर शंकराला तमोगुणांचा राजा, आणी विष्णुला सत्गुणांचा राजा असे तिघांना तिन राजपदवी देलेली आहे. विष्णुला आपल्या मानाचा प्याला दिला आहेस. *खंड-०१-०१-०१, ०१-०२-०१ यातुन अधिक ग्यान घ्यावे.*

परंतु चतुर्पती ची महीमा व चतुर्पती ग्यान-भक्तीमुळे तुमचीच महीमा येथे वाढत जात आहे. प्रथम यवगीच्या चतुर्पती च्या ग्यानी भक्त जनलोकांच्या समानतेच्या परिस्थितीत आता आमची महीमा वाढवुन सत्ता स्थापण्याची शक्यता खुंटली आहे. आता आम्ही कोणत्याही परिस्थितीत आमची तिरगुणी सत्ता स्थापन करू शकणार नाही. म्हणुनच आम्ही विनंती अर्ज करतो की :

तुम्ही तुमचे सच्या भक्तीला पावन होवुन, भक्तांना देणं देण्याची शिष्टाई चे कार्य असेच अखंडपणे चालु ठेवुन, आम्हाला ते देणं देण्याचा मान दया. आम्हास आमच्या मानाचा प्याला दया ! तुम्ही दिलेले मानाच्या प्याल्याचे देणं आम्हास आता लाभु दयाहो.

तुम्ही आम्हास दिलेली तिनयवगाची सत्ता आता आम्हा भोगण्यास दयाहो आदीपुरूषा ! तुम्ही आमच्या हाती दिलेला राजपदवीचा शिक्का आता आम्हास चालवु दयाहो ! ते तिन गुणी तिन शिक्के कसे चालवायचे ? या करिता ज्ञान दयाहो आम्हा । आता आमचं देणं आम्हास दयाहो आदीपुरूष धन्या !

हीच आम्हा तिरगुणांचे राजे सह चैत्यन्या मायादेवते ची या चौथ्या चतुर्पती आदीरूप आदीपुरूष आदीमुनी धन्याकडे विनवणी याचना अर्ज !

त्रिदेव सह मायादेवताने केलेल्या वरील प्रार्थणेला पावन होवुन आकाशवाणीच्या आदीरूप आदीपुरूष चतुर्पती धन्याने त्या प्रथम यवगी लहानपण घेतले. आदीपुरूष चतुर्पती धन्याने तेथे एक खेळ उभा केला. त्या खेळात चौवेद ग्यान सह सर्व ग्यान असलेला एक अखंड ग्यानपिंड बनवला. त्या ग्यानपिंडाला गाईचा आकार देवुन तिच्यात चैतन्य ओतुन ती गाय उर्ध्व स्वर्गामध्ये पाठवुन दिली. आणी तेथे त्या चौथ्या आदीपुरूष भैसाने चतुराई करून तिन वेद तिघा जनांच्या हाती दिलेत. (मायाचैत्यन्या गाईच्या ओवीतुन तो खेळ उभारून त्यांच्या हाती तिन वेद कसे दिलेत ? याचे अधिक ग्यान खंड०१/०२/ओवी-०३ मायाचैत्यन्या गायीच्या ओवी निरसनातुन घ्यावे.)

खंड०१-०२-०३ मायाचैतन्या च्या ओवीतुन आपणास ग्यान येईल की : मायाचैत्यन्या गाईच्या ओवीत आदीपुरूष भैस आदीमुनी रूपात येंवुन त्या निर्विकारी भैसाने त्रिदेवांना तिन वेद दिलेत. आणी पुढे येणा-या यवगाकारण चौथा अथर्वन् वेद पोटीच ठेवला. हे तिन वेद घेवुन ते तिघे मनात खुशाल झालेत. या तिन वेदातील जे ग्यान चैत्यन्यमायेपर्यंत जावुन पलटते, ते ग्यान निराळे काढुन त्या ग्यानाचा भैसा पोटी असलेला चौथा अथर्व वेद मानला गेला. तो अथवर्न् वेद गुप्त आहे. असे जनात पसरवले/रूजविले आहे. या तिन वेद चे चार भाग करून या वेदांचे ग्यान भक्त जनांत प्रेरीत केले. ते असे :

वेदांचे त्यांनी १. उपासना कांड २. कर्मकांड ३. ज्ञानकांड असे तिन कांड केलेत. या तिन कांडा पैकी :

- ज्ञानकांड हा श्रेष्ठ ठरवुन त्यावर सत्वगुणांचा शिक्का ठेवुन, सत्वगुणांचे राज विष्णुने स्थापले.
- उपासना कांड मध्यम ठरवुन त्यावर रजगुणांचा शिक्का मारून, रजगुणांचे राज ब्रम्हदेवाने स्थापले.
- कर्मकांड कनिष्ठ ठरवुन, त्यावर तमोगुणांचा शिक्का ठेवुन, तमोगुणांचे राज शंकराने स्थापले.

वेद व वेदांचे कांड या व्दारे त्या चौरूपाला म्हणजेच १. ब्रम्हा २. विष्णु ३. महेश ४. आदीमाया-शक्ती यांना आपल्याला चतुर्पती कर्तार धनी कडुन मिळालेले देणं चा वापर करावयाचा होता. ब्रम्हा विष्णु महेश या तिन शिल्लेदारांची महीमा वाढवायची होती. तिरगुणांचे तिन पदर सर्वसामान्य भक्त जनलोक च्या खांदयावर टाकावयाचे होते. चतुर्पती ग्यान वर पडदा टाकुन चतुर्पती ची महीमा व सम-समानतेची विश्व रंचना ला छेद देवुन, तिरगुणी राजे व त्यांचे महीमा वाढवणारे तिरगुणी ज्ञान जनलोकास मधुपानाप्रमाणे पाजुन लोकांवर भुल पाडावयाची होती. चतुर्पती ग्यान पडीत टाकुन तिरगुणांची सत्ता स्थापन करावयाची होती. तिरगुणी सत्ता स्थापणेसाठी आदीमायाशक्ती सह त्रिदेवांनी प्रथम यवगी असलेल्या मुळयवगाच्या चतुर्पती ग्यानावर पडदा टाकत राहीलेल्या तिन यवगात तिरगुणी ग्यान जनलोकांस मधुपानाप्रमाणे पाजत सुटलेत. भुलवन भ्रांतिची धुनी चिकटुन असलेल्या आदीमाया चैत्यन्या शक्तीला आपल्या ला चिकटुन असलेली भ्रांतीची भुल जनलोकांना चिकटवुन त्यांना भ्रांतीच्या भुलवनीत टाकुन भुलवायचे होते. म्हणुनच :

भुल पाडली चैत्यन्यानं । अवघ टाकलं मोहुन । पहा या मायेन :-

जनलोकांवर भुल पाडण्यासाठी चैत्यन्यानें त्रिगुणात्मक प्रकृतिमायेच तिरगुणी रूप घेतले. या त्रिगुणात्मक प्रकृतीमायेने आपल्या आंगच्या तिरगुणांना घेवुन ती विविध रूपात अवतरू लागली. विविध रूप घेत विविध रूपात आकारू लागली. तिने तिरगुणी रूपांचा बाजार मांडला.

तिरगुणी मायेच्या रूपांपैकी सत्वगुणांचा राजा विष्णु यांचा सत्व गुण घेवुन ती सात्वीक-शक्ती बनली. सत् च्या संगतीने तिने लक्ष्मीरूप घेतले. तर रजोगुणांचा राजा ब्रम्हा यांचा रजगुण घेवुन ती राजशी-शक्ती बनली. रज च्या संगतीने तिने सरस्वती चे रूप घेतले. तमगुणांचा राजा शंकर यांचा तम गुण घेवुन ती तामशी-शक्ती बनली. तम च्या संगतीने त्या आदीमायाने पार्वति रूप घेवुन या मायेची मोहन माळा या तिघांच्या गळा घातली. आणी ती ब्रम्हया आंगी येवुन तिने या तिघांचे तिन मठ या जगात स्थापले.

॥ गाई पोटी चार वेद । केलं चैत्यन्यानं कपट ।
ब्रम्ह्या आंगी येवुन । तिन स्थापले मठं ॥ खंड०२/ओवी-३३
॥ तिन वेद येता पोटी । केलं चैत्यन्यानं कपटं ।
याहीच्या उचिष्टांची याहीन । वाढवली किर्त ॥खंड०२/ओवी-३३

आदीपुरूष भैसा पोटी जे चार वेद होते, ते चार वेद मिळवण्यासाठी आदीमाया चैत्यन्याने कपट केले. या कपटाचे ग्यान मायाचैत्यन्याच्या खंड०१/०२/०३ओवीतुन घ्यावे. परंतु भैसा पोटचे चारही वेद ती घेवु शकली नाही. पुढील येणा-या यवगाकारण चौथा अथर्वन वेद चौथ्या भैसा पोटीच ठेवला. तो चौथा वेद चौथ्या पोटीच राहीला. फक्त तिन वेद मायादेवता सह त्रिदेवांच्या हाती आले. त्या तिन वेद सह तिरगुणांचे तिन राजे यांची सत्ता व महीमा वाढवण्यासाठी आदीमाया-चैत्यन्याने तिरगुणी राजे यांचे तिन मठ स्थापलेत. तिरगुणांच्या या तिन मठांव्दारे वेद वाक्यांचे आठ भाग केलेत. त्यापासुन आठ शास्त्रे निर्माण झाली. वेदांचा भेद कोणास कळत नाही म्हणुन त्याचे सहा दर्शने केलेत.

पुढे हेच सहा दर्शने हे सहा शास्त्र म्हणुन मान्य पावले ते असे :
१. मिमांसक शास्त्र २. नैयात्तीक शास्त्र ३. चार्वाक ४. वैशैषिक ५. बौध्द ६. सांख्यांक असे सहा दर्शनाचे सहाशास्त्रे झालीत.

जे या सहादर्शनाचे वेष मिरवु लागलेत, ती उपदर्शने झालीत ती अशी :
१. जंगम २. जोगी ३. सन्यांशी ४. वैष्णव ५. ग्लैच्छ ६. क्षपणीक असे वेष घेवुन हे दर्शने वेषधारी झालेत.

हे वेषधारी सहा दर्शने परस्परात माझेच लिंग थोर ! माझ माझे मोठं ! असे म्हणत आपआपल्या मतीने मोठेपणा घेण्यासाठी झगडु लागलेत. या झगडयाने अशांतीचा प्रवेश झाला. माझे माझे थोर करत म्हणत नाना प्रकारे शास्त्रे पुराणे रंचना करू लागलेत/होवु लागलीत.

आणी अश्याप्रकारे या मायेच्या विस्ताराने अज्ञानाचा अंधःकार पडुन, त्या अंधःकारात बुडाल्यामुळे हे मायेच्या अधिपत्याखाली गेलेले तिरगुणी लोक मुळच्या सत्य देवालाच ओळखु न लागलेत. मायेचे मुळ विसरले. मुळयवगाचे चतुर्पती ग्यान विसरले. आत्मज्ञान विसरले. चतुर्पती धनीदेवाच्या शिष्टाई ला विसरले. चतुर्पती धनी देवाला विसरले. आणी याहीनं या मायेच्या बाजारात विकण्यासाठी डोळयात पाणी आणणारे तिन गुणी कांदे हाती घेतलेत. आणी मोठयामोठयाने ओरडत ग्राहकांना भाळवत ते या मायेच्या बाजारात तिन गुणी कांदे विकु लागलेत. म्हणुनच खंड०२/ओवी०७:- आकाश जाणुणीया पिता या ओवीचे चरण गर्जुन सांगी करते की :

॥ माया मोहीत हे वेद-पुराण । हे वाचकाचे काम ।
हे अवघेच खोटं जाण । धनी देव करन हो तारण ॥ ०२-०७

जे आत्मग्यान विसरले, तेच वेद-पुराण प्रेरीत तपे व्रते तिर्थे त्रिदेव व त्यांचे तिरलोक्यातील तिरगुणी अवतांर यांची भक्ती पुजा महीमा उपासना कर्मकांड..ईत्यादी मार्गाने लागलेत. फालतु कर्मकांड चालवत असतांना ते चौथ्या आदीरूप आदीपुरूषाला विसरून मायेच्या भुलवणीने मोहुन गेलेत. आणी तिरगुणी मायेने मधुपानाप्रमाणे पाजलेल्या तिरगुणी ग्यानाच्या प्याला पिवुन दंग होवुन मायेत पडलेत. मालक भुललेत. मायेत पडल्यामुळे मायेला चिकटुन असलेली भ्रांती त्यांना चिकटली. आणी भ्रांतिमुळे भ्रमात पडुन मुळ मालकाला भुलुन जावुन, माझे माझे मोठं थोर म्हणत अनेक धर्मपंथ रंचत अधोगतीस जावु लागलेत.

नंतर त्याच आपल्या धर्माला थोर थोर संबोधत षटकर्मे चा आरंभ करु लागलेत. या षटकर्मा सह विविध आसक्त व लोभ युक्त कर्माव्दारे ते मोठे द्रव्ये मिळवु लागलेत. धन द्रव्य मिळाल्यावर द्रव्य संप्पत्तीत भुलुन नाना प्रकारच्या योनी हिंडत फिरत जन्म-मरणाचे अधिकारी झालेत. चौ-यांशी योनीत फिरु लागलेत. ८४शीचा बाजार भरला. या बाजाराचा सौदा या तिरगुणांन घेतला आहे. या मायेच्या तिरगुणी बाजारात येवुन जीव हा भुलला भांबावला आहे. कोणतं घेवु ? कोणतं ठेवु ? कोणते सोडु ? हे काही त्याला समजेना !

अश्या रितीने या तिरगुणी मायेने आपल्या तिरगुणी उचिष्टाची किर्त वाढवण्यासाठी विविध रुपात आली. तिरगुणांचा बाजार मांडुन खेळ उभा केला. या खेळात तिने कलारीन प्रमाणे आपल्या तिरगुणांचे ज्ञान या तिरगुणांच्या बाजारात रमणा-या जनलोकांच्या मुखी मधुपानाप्रमाणे पाजु लागली.

आणी ही तिरगुणाची माय आपल्या तिरगुणी राजे व त्यांचे पुजापाठ व्रते वैकल्पे उपासना कर्मकांड व्दारे त्यांचीच महीमा वाढवणारे ज्ञान मायेचा प्याला पिवुन धुंद झालेल्यांच्या मुखांव्दारे वदवत वदवत वाठवत नेत, तिरगुणी राजे व त्यांचे तिरलोक्यातील तिरगुणी अवतार यांची महीमा वाढवु लागली.

मायेच्या या भ्रांतीत टाकणा-या, भुलवन पाडणा-या मोहनीपायी या तिरगुण व तिरगुणी ज्ञानाच्या पलीकडे उभा असलेल्या, आत्मग्यान व आत्मतत्व, ध्यानयोग व्दारे जाणता येणा-या चवथ्या अवस्थेतील म्हणजेच तुर्या अवस्थेतील चौथ्या चतुर्पती आदीपुरुषाच्या चतुर्पती ग्याना वर पदडा पडु लागला. हे चतुर्पता ग्यानाची गाय पडीत पडुन या तिरगुणांची या जनलोकांवर भुलवन पडली.(मायेच्या भुलवणीच्या अधीक ग्यानासाठी खंड०२/ओवी-१६ मोहरची ओवी चे निरसन वाचा.)

अश्या रितीने येथे बाजार हा तिरगुणी मायेचा भरला आहे. या बाजाराचा सौदा या मायासह तिरगुणांचे तिन राजे यांनी घेतलेला आहे. आणी या तिरगुणी बाजारात येवुन जनलोक भुलले भांबावलेले आहेत. या तिरगुणी भुलवणीपायीच ते जनलोक आत्मतत्व आत्मग्यान सह चतुर्पती ग्यान भुलले. तिरगुणी मायेच्या भुलवणीपायी तिरगुणांच्या पलीकडे पाहण्याची दृष्टी जावुन चांगले चांगले भक्तजन आंधळे झालेत. ही त्यांची भुलवन दिवसान दिवसापरी वाढत वाढत जात तिन यवग लौटलेत. या तिन यवगीच्या तिरगुणी ज्ञानाव्दारे तिरगुणी चा महापुर आलेला आहे. या महापुरातुन पलीकडे जावयाचे आहे.

॥ भल्याभल्यांला पडली हो गिरकी । मुंळ मायेचा पसारा ।
हया गंगेमध्ये नाव चालली, थाप पाहयजो हुशारा ॥

दुस्तर अश्या त्रिगुणांत्मक मायेला अतिक्रमन करत, या तिरगुणांच्या पल्याड थडीवर उभ्या असलेल्या धन्या कडे पोहत जावयाचे आहे. याकरीता या तिरगुणी ज्ञानांनी जी घुंगी टाकुन तुमच्या डोळ्यावर झापड आणली आहे, ती तिरगुणी ज्ञानाची झापड काढुन फेकुन दयावी. या तिरगुणींची उघडा घुंगी फेका झापडी ! आणी पहा त्या तिरगुणांच्या पल्याड..!

तिरगुणांच्या पल्याड पाहणारी त्रिगुणातीत दृष्टी ठेवल्यावर तुमच्या दृष्टीपटलावर दिसुन येईल की :

या मायेनेच मच्छींदरास मिठी घातली होती. मायेची ही मिठी शेवटी गोरक्षनाथास सोडवावी लागली. या मायेनच रामराया गलपटला होता. या

मायेनच विश्वमित्र गलपटला होता. तसेच महान महान योगी-जोगी, ऋषि-मुनी ईत्यादी भक्तजन या मायेनच गलपटत आहे. गलपटत राहणार आहेत !

म्हणुनच या मायेला जपुन चाला. डोळे उघडे ठेवुन तिरगुणांच्या पल्याड उभ्या असलेल्या चतुर्पती धन्याकडे पाहा. आत्मतत्वांत रममान होवुन आत्मग्यानी सह चतुर्पती ग्यानी व्हावे. चतुर्पता ग्यानाचा संग सदा राहावे.

तिरगुणांचे तिन राजे व त्यांचे तिरलोक्यातिल अवतार यांची महीमा वाढवणारे पुजा पाठ व्रत वैकल्प असलेले, स्वतः व्दारे स्वतःचीच महीमा वाढवणारे, स्वतःव्दारे स्वतःचीच पुजा अर्चना, मान सन्मान सत्कार महीमा वाढवणारे तिरगुणी ज्ञान सोडुन दयावे.

तिरगुणांच्या या आसारातुन आत्मग्यानाचे, आत्मतत्वांचे, जिवनतत्वांचे सत्य सार निवडा. सत्कृत्य करीत सत्कृत्याच्या अधिक्याने या तिरगुणांच्या पल्याड असलेले आत्मतत्व, आत्मग्यान युक्त चतुर्पती ग्यान घ्यावे. आत्मग्यान, या आत्मतत्वांचे चिंतन मनन व्दारे या आत्म्याला या देहीचा सरदार बनवण्यासाठी सत्कृत्यात राहुन सत् च्या अधिक्याने या आत्म्यावर सत्संस्कार टाका. चतुर्पता ग्यानी राहा.

चतुर्पती ग्यानानेच या आत्म्यावर त्याचे मुळचे घरचे, अहीनाघरचे चतुर्पती ग्यान कोरल्या जावुन या देहीचे ग्यानासह दया क्षमा शांती समता बंधुता मानवता...ईत्यादी सत्कृत्यात जागरूतता येईल. या जागृततेव्दारे आत्मा तजोमय प्रकाशमान होवुन स्वतः व्दारे स्वतालाच जाणुन घेईल. तिरगुणांच्या बंधनातुन मुक्त होईल.

कारण की : या आत्मतत्वं आत्मग्यानाला तिरगुणांचा बंध नाही. हेच चतुर्पती ग्यान हे तिरगुणांच्या पलीकडचे ग्यान होय. या चतुर्पती च्या आत्मतत्व युक्त आत्मग्यान व्दारे त्या परमात्म्याच्या तेजोगुणी अंश असलेल्या आत्म्याला जाणता येते. आणी आत्म्यावर आलेली षटविकार, विषयवासना, आसक्ती, तृष्णा सह तिरगुणांची काजळी हटवुन त्याला प्रकाशीत करता येते. सत्याला जाणता येते. सत्कृत्याचे अधिक्य वाढवत ठेवता येते.

सत्कृत्याच्या अधिक्याने गुणातीत होवुन परमात्माला जाणता येते. ज्याप्रमाणे भाताची परिक्षा शितावरून होत असते, त्याप्रमाणे त्या धन्याला जाणण्याकरीता प्रथम त्या परमात्म्याच्या तेजोगुणी अंशाला सत्कृत्यात राहुन आत्मग्यानी बनुन जाणावे लागते. आणी तो अंश देहीच्या आत उभा असल्यामुळे देहीला जाणावे लागते. कायाज्ञानी व आत्मज्ञानी व्हावे लागते.

अश्या रितीने देह-जीवाला जाणुन या परमात्म्याच्या अंशाला पकडुन परमात्माकडे जावे लागते. असे केल्यानेच परमात्म्याला जाणुन घेण्याचा मार्ग सहज सुलभ होतो. आणी हे कार्य फक्त चतुर्पतीच्या आत्मतत्वांत निमग्न राहुन सत्कृत्य करत सरळ साध्या सिदाई च्या मार्गाने सतृकृत्यात राहत आत्मग्यान प्राप्त करूनच करता येते. इतर कोणत्याही तिरगुणी मार्गाने साधनाने नव्हे !

हे तिरगुणी ज्ञान तर मायेचा विस्तार होय. हे ग्यान मायेने मोहीत आहे.

॥ आहो मोहीत हे पुराण । हे होय वाचकाचे काम ।
हे सर्वच खोट जाण । कारण की :
तो चतुर्पती धनी देव करतो हो तारण या सर्वत्राचे ॥ ०२-०७

खरा तारण करणारा तो आपरूप चतुर्पती देव खरा. परंतु मायेच्या भुलवणीपायी तुम्हास असे वाटते की : तिरगुणांचे देव तारण करते. परंतु त्यां तिरगुणांचे तिन राजे सह तिरलोक्यातील तिरगुणी अवतार यांनाच तर मोक्ष नाही. ते तिरगुणी तिन तर त्यांना दिलेले उत्पत्ती, पालन, लय...ईत्यादी सृष्टीचे कामे करत आहे. चतुर्पतीने त्यांना दिलेल्या या कामासोबत सोबत ते आपली महीमा स्तुति वाढवत आहेत. सत्ता अभिलाषापायी तिरगुणी ज्ञान वाढवत आहे. हे तिरगुणी ज्ञान तर मायेची मोहनी होय.

या त्रिगुणात्मक प्रकृतिमायेने भुल टाकुन अवघ मोहुन टाकलं आहे. या मायेची हीच तिरगुणी मोहनी स्वतःवर पडु देवु नका. या तिरगुणांच्या पल्याड असलेल्या चतुर्पतीच्या ग्यानी राहुन, त्या चतुर्पती आदीपुरूष धन्याकडे पहावे. चतुर्पतीचेच भजन पुंजन ध्यान सुमरन करत त्याला शरण राहावे. कारण की : ही माया-शक्ती शेवटी या आदीरूप चतुर्पती धन्याचीच उत्पत्ती असुन, ही अवघी माया सह तिरलोक या धन्यालाच शरण आहे. धन्याच्या अध्यक्षतेखाली, अधिपत्याखाली आपआपली कामे आपआपले स्वार्थी अभिलाषा ठेवुन करत आहेत.

॥ अवघी माया याहीच्या पासुन । तिरलोक याहीला शरण ।
माया सोडुन भक्ती करन । त्याच्या हद्‌यी भरन ।
करन हैरान । करन हैरान ॥

अवघी माया याहीच्या पासुन :-

आधी उभा होता तो एकला निराकारी निराधारी अव्यक्त अखंड असा आदीरूप आदीपुरूष भैस नारायण ! आदीरूप एकला ! तेथुन तो सोयंम म्हणजे स्वतःहुन, आपरूप निराकार निराधार निशंःकलंकी निरंजन ज्योत स्वरूपात उभा झाला.

जेव्हा निरंजन उभा झाला, तेव्हा तेथे आथीच धुम्मधुम्मकार स्वरूपी असलेला नादब्रम्ह आणी या सोहंम् ज्योतीच ऐक्य झाले. या परंब्रम्ही ऐक्यातुन त्या निरंजन ज्योतीने *'मो-ह सृष्टी रंचावी'* अशी इच्छा त्यांच्या चरांचर व्याप्त मनात बाहेर फेकली. ती इच्छा त्याच्या सर्वव्याप्त मनातच सम्मावली. आणी निरंजन ज्योतीच्या मुळावरचा रंग धरून, सगुण-निर्गुण अशी अद्‌भुत शक्ती बनुन उभी झाली. या आदीमायाशक्तीला आवाज दिला त्याने सृष्टी उद्‌भवयास ! परंतु ती तेव्हा सक्षम नसल्यामुळे तिच्या कर्ता-याने तिला देणं दिले. शक्तीच्या ओवी खंड०१/०२/ओवी-०१ च्या निरसना मधुन ग्यान घ्यावे.

आणी तिचा तो कर्तार तीचा श्रीपती बनुन आदीमुनी अवतार घेवुन तिच्या समोर आला. आधीच्या निराकार आदीपुरूषाच्या मागाहुन आलेल्या त्याच्याच या सगुण-निर्गुण आदीमुनी अवतार यांनी शक्तीला तिन देव उत्पन्न करून दिलेत. तिला बोध करून देणं दिलेत. शक्तीच्या ओवी नं.०१ मध्ये मिळालेल्या देणं च्या भरवश्यावर, त्या एकल्या व्दारे उत्पन्न झालेली एकली चैत्यन्याशक्तीने सृष्टी रंचनेत प्रकृतिमाया, तिर गुणमयी माया, आदीमाया, मायादेवता.....ईत्यादी रूप घेत विविध अवतार रूपात तिचा अनेका अनेक रूपांचा बाजार मांडला. देवांगण उत्पन्न केलेत.

अश्या रितीने या मुळयवगाच्या प्रथम एकला असलेल्या आदीरूप आदीपुरूषापासुन अवघी माया उत्पन्न झालेली आहे. अजाणत्या ला मायेनं घातलेल्या तिरगुणांच्या भुलवणीपायी याची खबर नाही. ही आदीपुरूषाची माया हेच महद्‌ब्रम्ह होय. ती सर्वांची उत्पत्तीस्थान आहे. तिचे गर्भि तो आदीपुरूष आवाजी बिज रोपीत करतो. आणी त्याच मुळे सर्व प्राण्यांची उत्पत्ती होत राहते.

प्रतेक योनीत जी जी शरीरे निर्माण होतात, मायेची महत्ब्रम्ह ही योनी असुन तो आदीपुरूष तिला आवाजी बीज देणारा सर्वत्राचा पिता आहे.

एवढ सर्व करून सुध्दा या प्रकृतिमायेच्या गुणांहुन तिचा हा कर्तार आदीपुरूष भैस नारायण हा भिन्न आहे. तिच्या पासुन अलिप्त व निराळाच आहे. ब्रम्हचारी आहे. असे जेव्हा उदासीनपणे पाहणा-या पुरूषाला कळु लागते. आणी जेव्हा या तिरगुणांच्या पलीकडचे आत्मरूप सोहंम्रूप हे चतुर्पतीच्या ग्यानाव्दारे दृष्टीक्षेपात येते, तेव्हा तो त्याच्या त्या आपरूप स्वरूपास तो प्राप्त होतो. त्याची चौथी अवस्था प्रकाशमान होवुन त्याला चौथ्या चतुर्पती आदीपुरूषाचे चतुर्पती ग्यान आपरूप येवु लागते. आपणहुन तो चौथा त्याच्या देहघरी येतो. आणी त्याला हाती धरून दवंडीच्या प्रमाणे ही चतुर्पतीची वाणी सांगत राहतो. मुळयवगाच्या मुळावरच्या गोष्टी सांगत राहतो.

आणी मग तो आत्मतत्वी सच्चा भक्त ! देह उत्पत्तीस बिजभुत असलेल्या या सत्-रज-तमगुण त्रयाच्या त्रिरित्रांवरं अतिक्रमण करून हे देहीतील त्रिरीत्र मोडुन काढतो.

त्रिरित्र मोडुन काढल्यानंतर त्या सच्च्याला मान-अपमान, सुखःदुःख, प्रिय-अप्रिय, स्तुति-निंदा या दोन्ही त्यास सारखीच वाटतात. त्याचे विषम विसर्जित होवुन मुळावरची चतुर्पतीची समानतेची व्यवस्था त्यामध्ये येते.

जो कोणी निंदा करत असेल त्या निंदकाच्या कुडीला *‘निंदा करने‘* हा दोष चिकटुन आहे. असे मानतो. आणी निंदकाच्या *‘निंदा करणे‘* या कर्माकडे दुर्लक्ष्य करतो. असे हे चतुर्पती ग्यानी सच्चे भक्त, मान-अपमान, मित्र-शत्रु यांच्या ठिकाणी समानतेन नित पाहत राहल्याने त्याचे मनाचे विषम विसर्जित होत राहते.

ते सच्चे भक्त कोणत्याही कर्माची वासना धरून कार्य आरंभ करत नाही. कर्मफलांची आसक्ती न धरता, सत् कर्मच आपले नियत कर्तव्य कर्म आहे. असे समजुन कार्य करत राहतो. सत् कर्मफळे धन्याला अर्पन करतो. शुध्द मन-भावाचे फुलपुष्पे नित धन्याला वाहतो. जीवन चैतन्य हे फुल पुष्पाप्रमाणे धन्याला वाहत राहतो. धन्याला जीवनचैतन्य अर्पन करून सत् भक्ती भावाने नित पुजंन करत राहतो.

अश्या सच्च्या मानवालाच त्रिगुणांच्या पलीकडे गेलेला म्हणजेच गुणातीत असे म्हणावे. असे सच्चेच अव्यभिचारी भक्तीयोगाने त्या आदीपुरूषाचे चतुर्पती ग्यान भक्तीचे रसपान सेवन करत अंतरी सतत नामज्योत तेवत ठेवतात. तेच सच्चे या गुणत्रयाचे-त्रिरीत्राचे तिरगुणांचे अतिक्रमण करून तिरगुणांच्या पलीकडे उभ्या असलेल्या चौथ्या चतुर्पती आदीपुरूष धन्याकडे जावुन मिळतात. मोक्ष प्राप्तीस समर्थ होतात.

त्या सच्च्यानांच माहीत असते की : अविनाशी अविकारी निर्विकारी चतुर्पती आदीपुरूष भैस नारायण परंब्रम्ह हेच शाश्वत धर्माचे आणी आत्यंतीक परंम सुखाचे-परमय सुखाचे वसतिस्थान होय. तोच चौथा सर्वत्र भरून भरला आणीक उरलेला आहे.

अश्या रितीने ते या त्रिरीत्राच्या अतिक्रमणा नंतर ते देहधारी अस्तुरी या पुरूष या जन्मीच जन्म-मृत्यु जरा यांच्या दुःखातुन मुक्त होवुन मोक्षास पावतो. या देही या डोळी मोक्षपद चे सुखः अनुभवतो.

अहिनाघरचे चतुर्पती ग्यान त्या सच्च्या भक्तांच्या जवळ आकाशमात मधील चतुर्पतीच्या ग्यान-गंगेतुन येत असल्यामुळे तो सच्चा भक्त गुण म्हणजे इंद्रिये ! ही इंद्रिये तीच्या गुणांकडे म्हणजेच या विषयांकडे वळतात. असे समजुन त्यात आसक्त होत नाही. त्याला याचे ग्यान येते की :

हे जग सर्व त्रिगुणात्मक पदार्थाने मोहीत झालेले आहे. त्याच मुळे हे त्रिगुणात्मक लोक त्रिगुणांच्या पलीकडे असलेले चौथ्यास जाणत नाही. त्या अव्यय अखंड निराकारी निराधारी चतुर्पती आदीरूप आदीपुरूष भैस नारायणाचे स्वरूप जाणत नाही.

ही त्या चौथ्याचीच अवघी माया असुन ही त्याची त्रिगुणात्मक दिव्य माया अत्यंत दुस्तर आहे. जे या चतुर्पती भैस नारायणाला शरण येतात, तेच यातुन तरून जातात.

म्हणुनच जसे प्रथम यवगीचे अवघे जनलोक याहीला शरण होते, तसेच आजही तिरलोक्यातील जाणते, सच्चे भक्तजन,..चतुर्पतीचे सर्व गण या चतुर्पतीलाच शरण आहेत. शरण राहतात. पुढेही शरण राहील. त्या सच्च्यांच्या पिंडी च्या त्रिलोका सह या ब्रम्हांडातील त्रिलोक याहीचा दाता तो धनीच असल्यामुळे ते सर्व या चौथ्या धन्यालाच शरण राहुन *'संभाळ करा महाराजा अवधुता !'* असे विनवत आहे. राहणार आहे.

तिरलोक याहीला शरण :-

प्रथम यवगीचे अवघे जनलोक या चौथ्या चतुर्पती आदीपुरूषाला शरण होते. तेव्हा या चौथ्या अजाताचीच पृथ्वा होती. विश्वरंचनेत झालेल्या या अजाताच्या पृथ्वा मध्ये या आकाशवाणी च्या चौथ्या गायप धनीदेवाचीच महीमा भक्ती ला उधान होते.

या मुळयवगीच्या चौथ्या आदीपुरूष धन्याचीच भक्ती तिरलोक्यात सत्ता स्थापण्यासाठी आदीमाया सह तिन देवांनी आणी या त्रिदेवांचे तिरलोक्यातील तिरगुणी अवतार यांनी केलेली आहे. या चौथ्या आदीपुरूष भैस नारायण ची भक्ती, ध्यान, नाम जप करून या चैत्यन्या माया देवतेसह त्रिदेव व त्यांचे तिरलोक्यातील अवतार सिध्द होत गेलेत. सिध्द झालेत.

जरा विचार करून मनाला विचारून पाहा की : ब्रम्हा कोणाचे ध्यान करत बसला आहे ? विष्णु कुणाचे ध्यान करत आहे ? आणी कैलाशी महेष कैलाशी बसुन कुणाचे ध्यान करत आहे ? हे सर्व कुणाचे नाम जपत आहे ? चौथ्या सोहंम् आपरूप धन्याचेच ना ! आकाशवाणी करणारा कोण ? आकाशातील ग्यान-गंगेव्दारे न्हावुन टाकणारा कोण ? आकाशातुन ग्यानाचा वर्षाव करणारा कोण ? आपरूप ग्यान देणारा, सच्च्या भक्तांच्या बोलावर उभा राहुन त्यांचे बोल सिध्द करणारा कोण ? ईत्यादी प्रश्नाचे उत्तरे शोधा. शास्त्रे पडताळा म्हणजे हे शास्त्रेच तुम्हास सांगेल की :

मुळयवगाच्या या चतुर्पति देवानेच ब्रम्हयास *'ओहंम् सोहंम् ब्रम्हरूपाय ब्रम्हणे स्वाहा !'* असा आवाजी गायत्री मंत्र दिला. या गायत्रीचा आवाजी मंत्रोपदेश ब्रम्हयास केल्यानंतरच त्या ब्रम्हयाने दोन भुवयांमध्ये लक्ष्य लावुन ध्यान केले. त्या ध्यानाने आदीपुरूष आदीगणा चे आपरूप म्हणजेच ते चौथे परंब्रम्ह पाहीले. आदीरूप आदीपुरूषाचे ते निललोहीत ओहंम्-सोहंम् निश्कलंकी ज्योतिर्मय लीग स्वरूप विरंचीने/ब्रम्हयाने लल्लाटी धरून अखंडीत चिंतिले.

तेव्हा तो आदीरूप उभा होवुन निरंजन ज्योर्ति स्वरूपात ब्रम्हयाआंगी प्रगट होताच, त्या ब्रम्हयाने त्या आदीरूप चौथ्याचे ते निरंजन ज्योर्ती स्वरूप अखंडकारी पाहत त्या निरंजन निश्कलंकी ज्योतीचे ध्यान धारणा करत बसला.

ब्रम्हयाने नेत्र लावुन जेव्हा अश्यारितीने त्या निरंजन ज्योतीर्मय लींगाचे चिंतन करून उग्र तप ध्यान केले, तेव्हा तो चौथा आदीरूप आदीपुरूष भैस नारायण त्याचा दृष्टीसमोर निरंजन ज्योर्तीरूपात प्रकट झाला. तेव्हा त्या कर्ता-यास ब्रम्हा म्हणाला की :

हे कर्ता-या । हे आदीमुनी आदीपुरूष देवा । आपण आम्हा प्रसन्न झालात. ईथे सर्वत्र निराकार आहे. तरी या निराकार रूपी रात्रीचा अंधकार दुर करून सृष्टी उत्पत्ती रंचनेचा दिवा लावावा ! त्याकरीता मजला चतुर्पती धन्याच्या सिध्द नामाचे देणं दयावेत. आता माझी ही इच्छा पुर्ण करावी.

असे हे मागणे ब्रम्हयाने मागतल्यावर त्या ब्रम्हयास त्या चतुर्पती निरंजन कर्ता-याने सृष्टी उत्पत्ती कार्य करण्याचा सिध्द नामाचा महीमा दिला. पंचभुतात चैत्यन्य मिसळवण्याची ग्यान शक्ती दिली. तेव्हाच तो सृष्टी उत्पत्तीचे कार्य उत्पन्न करू शकला. आपल्याव्दारे उत्पन्न सृष्टीत धन्याच्या कृपेने चैतन्य ओतु शकला.

तर शिव सुध्दा त्याच चतुर्पती निरंजन ज्योत स्वरूपी कर्ता-याने जे निरंजन आभरणे पांघरली आहेत. त्याचे या देहीत ध्यान करत बसला आहे. त्याचेच आदीरूप या देहीत पाहत, त्या आदीरूपाच्याच ध्यानी कैलासी बसला आहे. त्या चौथ्या निरंजन कर्ता-याची भावी आवरणे मनाशी आणुन ध्यान, धारणा, समाधी सर्वस्वी धारण करून, तो निरंजन निशंःकलंकी चतुर्पतीचेच नाम जप ध्यान.. ईत्यादी करत कैलाशी बसला आहे.

तर विष्णु हा शिरसागरी त्या चौथ्या आदीरूपाच्याच ध्यानी राहुन, आपल्या मानाच्या प्यालाचे देण त्या चौथ्याकडुन घेत क्षिरसागरी पहुडलेला आहे.

आणी आदीमाया-चैत्यन्या, खंड०१/०२/शक्तीच्या ओवी नं. ०१ मध्ये त्याच चौथ्या निराकाराने त्याच चौथ्या गायपाचे भैस नाम तिला दिले. त्या चौथ्या चतुर्पती भैस नामीच अजुनही आहे.

अश्या रितीने आदीमाया चैत्यन्या सह त्रिदेव व त्यांचे तिरलोक्यातील तिरगुणी अवतार, देवांगण, सनद्मुनी, ८८ सहस्त्र ऋषि, योगी, जोगी ..ईत्यादी सह सर्व जाणते भक्त योगी जनलोक त्या मुळयवगाचा देव आदीरूप आदीपुरूष चतुर्पती धनी च्या ध्यानी आहेत. तिरलोक्यातील या सर्वांनी त्यांच्या तिरलोक्याचा मालक असलेल्या मुळयवगाचा देव म्हणजेच या चौथ्या आपरूप आदीपुरूष धन्याचीच भक्ती केलेली आहे. करत आहे. आदीमाया चैत्यन्यासह हे सर्व भक्त जनलोक, देवलोक त्या चौथ्या चतुर्पती आदीरूप आदीपुरूषाचेच भक्त होय.

चतुर्पतीला शरण असलेल्या तिरलोक्यातील या सर्व भक्त देवगण लोकांनी निराकार निराधार आदीपुरूष भैस नारायणाचेच ध्यान भक्ती सुमरन करत त्या भैसाकडुन देणं मिळवत गेलेत. चैत्यन्याच्या भैस नामजप व्दारे चौथ्या भैसाकडुन तिन देवांना तिन यवगाचे राज्य करण्याच देणं मिळाले. यासोबतच मानाचा प्याला चे देणं विष्णुला मिळाले आहेत.

भैसाच्या मानाच्या प्याला चे देणं म्हणजे तो चौथा आदीरूप आदीपुरूष धनी जेव्हा जेव्हा परीपुर्णतमपुर्ण अवतार रंचना करून चतुर्व्युह रूपाच्या रंचनेत पुर्ण अवतार घेईन. आणी विविध देहीत विविध ठिकाणी ज्योत स्वरूपात खेळेल. तेव्हा तेव्हा त्या अवतरणातिल पुर्ण अवतारचा मानाचा प्याला या विष्णुच्या गळयात पडेल. आदीरूपाचा तो पुर्ण अवतार विष्णुचे अवतार म्हणुन गणल्या जावुन, चतुर्भुज विष्णुलाच त्या पुर्ण अवताराचा काहीही न करता फुकटचा मान मिळेल. म्हणुनच या चौथ्या चतुर्पती आदीपुरूष भैस नारायण चे यवगान यवगात जेवढे जेवढे चतुव्युह रूपांच्या रंचनेत परिपुर्णतम पुर्ण अवतार झालेत, ते सर्व पुर्ण अवतार या मानाच्या प्याला च्या देणं व्दारे विष्णुचे अवतार म्हणुन सर्वसामान्य जनलोकात गणल्या जावु लागलेत. अश्यारितीने चौथ्या चतुर्पतीने आपल्या मानाचा प्याला विष्णुला देवुन या तिघांच्या हाती तिनयवगाची सत्ता दिली. राजपदवी दिली.

परंतु या तिघांना भेटलेली राजपदवी सुदी नाही केली. आदीमाया सह या तिघांनी आपल्या स्वतःच्या चौथ्या चतुर्पती धन्याच्याच चतुर्पती ग्यानावर पडदा टाकला. ज्यांच्यापासुन बनले त्यालाच सत्ता अभिलाषापायी बेईमान होवुन यांनी तिरगुणी ज्ञानाची भुलवन जनलोकावर घातली. धन्याचा तेजोगुणी अंश अवतार आत्म्याराम ला तिरगुणाच्या बंधनात अडकवुन चौ-यांशीच्या फेरीत टाकले. तिरगुणांने बध्द केलेत. तिरगुणांचे तीन राजे ब्रम्हा विष्णु महेष आणी त्याची माय असलेली चैत्यन्या मायादेवता या चौघांचे तिरलोक्यातील विविध तिरगुणी अवतार यांचीच महीमा स्तुतिगाण, भक्ती व्रत वैकल्प पुजापाठ याचेचे ग्यान असलेले तिरगुणी ज्ञान दिलेत. हेच तिरगुणी ग्यान या त्रिगुणात्मक आदीमायाने मधुपानाप्रमाणे सर्वसामान्य जनलोकास पाजुन या जनांवर तिरगुणी ज्ञानाची भुलवन पाडली. आणी आपल्या सुतांची सत्ता स्थापन केली.

या त्रिगुणात्मक मायेने एवढे एक काम चांगले केले की : ती स्वतः या आदीरूप भैस नामी राहली. ती आदीरूप धन्याची भैस नामी भक्त/चाकर/दासी झाली. आपल्या मालकाच्या अधिपत्या खालीच राहली. मालकाच्या अध्यक्ष्यतेखाली राहुन आपले तिरगुणी पुत्रांचे कार्य करीत आपल्या धन्याला/मालकाला बेईमान झाली नाही. आपल्या धन्याच्याच ध्यान भक्ती व भैस नाम जपात राहली. आणी आपल्या तिन सुत आणी त्यांचे तिरलोक्यातील अवतार यांची महीमा वाढवत राहली.

आदीमायाने आपल्या तिन पुत्रांची महीमा ध्यान भक्ती सत्ता वाढवण्याच्या कार्या सोबतच तिने त्रिदेव व तिरगुणी देवी देवता याच्या पुजापाठ, व्रत वैकल्प कथासार कर्मकांडे ..ईत्यादी सर्व तिरगुणी महीमा वाढवणा-या कर्मामध्ये एक नेम कुणालाही कळु न देता घातला आहे.

तिने कोणालाही न कळु देता गुप्तपणे आपल्या तिरगुणी कर्म कांड, पुंजन कार्य च्या कार्यात एक नेम घातला आहे. तो नेम म्हणजे *'जे काही कर्मकांड करावयाचे आहे, ते सर्व कर्मकांड निरंजन ज्योत लावुन करावे.'* या नेमाव्दारे तिने सर्वसामान्याला या नेमाचे ग्यान होवु न देता, सर्व तिरगुणी कर्मकांड, कार्यात आपल्या आदीपुरूष धन्याची निरंजन ज्योत लावुन कर्मकांड कार्य करण्याचा नेम घातला. आपल्या धन्याला/मालकाला बेईमान न होता त्या चौथ्या धन्याची प्रतिकात्मक निरंजन ज्योत लावुनच सर्व तिरगुणी कर्मकांड व तिरगुणी कर्मे अन्जानांकडुन करवुन घेत, तिने त्रिदेव व त्यांचे तिरलोक्यातील तिरगुणी अवतार यांची महीमा वाढण्याचा खेळ मांडला.

मायाचैत्यन्याने आपल्या धन्याची प्रतिकात्मक निरंजन ज्योत लावण्याचे कारण असे की : या आदीमाया चैत्यन्याला आपल्या चतुर्पती धन्याचे परंमग्यान असल्यामुळे तिला याचे ग्यान होते की : तिचा धनी/मालक आदीपुरूष निरंजन ज्योतस्वरूपी भैस नारायण ! हा फक्त भक्तीलाच पावणारा आहे. मग ती भक्ती कुणीही कुणाचीही करो ! आपल्या धन्याच्या या स्वभावा चा या शिष्टाईचा उपयोग करून सर्वसामान्यांना त्रिदेवांची सच्ची भक्ती करावयाची लावावयाची. म्हणजे तो धनी आपल्या नियत स्वभावानुसार शिष्टाई करून आपरूप त्या भक्ताला देणं देईल. आणी तो भक्त समजेल की : हे देणं त्याने भजलेल्या कल्पीत देवांनच दिले आहे.

अश्या रितीने तिरगुणी देवतांची महीमा त्या चौथ्या धन्याच्या भक्तीला पावणा-या स्वभाव व शिष्टाईव्दारे आपरूप वाढत जाईल. म्हणुनच मायेने सर्व तिरगुणी कर्मकांड भक्तीकर्मे ..ईत्यादी मध्ये निरंजन ज्योत लावुन ते तिरगुणी कर्म करण्याचा नेम घातला आहे. निरंजन ज्योत लावण्याचा नेम तिरगुणींच्या सर्व कर्म-कांडात ठेवुन भक्ताच्या नकळत ती माया आपल्या चौथ्या आदीपुरूष धन्याची भक्ती त्या तिरगुणी भक्तांकडुन करवुन घेवु लागली. माया त्या भक्तांना चतुर्पतीचे ग्यान होवु न देण्याची काळजी घेत अप्रत्यक्षयरूपाने भक्ताकडुन चौथ्या निरंजन समक्ष सच्ची भक्ती अन्जांनाकडुन करवुन घेवु लागली.

कारण की : या चतुर्पती धन्याचे प्रत्यक्ष्य चतुर्पती ग्यान जर सर्वसामान्य जनलोकांपर्यत गेले, तर हे सर्व सामान्य जनलोक तिरगुणी ज्ञानासह या तिरगुणी देवतांची पुंजन भक्ती न करता, सरळसरळ त्या चौथ्याचीच भक्ती करून चतुर्पती नामी राहीन. त्या चौथ्याचीच महीमा प्रथम यवगाप्रमाणे वाढेल.

परंतु मायेला आपल्या धन्याला बेईमान न होता, आपल्या पुत्रांची महीमा वाढवायची होती. त्यामुळे या तिरगुणात्मक आदीमायाशक्तीने आपल्या धन्याचे चतुर्पती ग्यान बहुसंख्य सर्वसामान्य जनांपर्यत जाणार नाही. याची सर्व प्रकारची काळजी घेत या अन्जान जनलोकास चतुर्पती कडे जाण्यापासुन रोकत राहली. भुलवत राहली. विचलीत करत राहली. फक्त आत्मग्यानी सच्या भक्त योगी यांनाच ती आपल्या धन्याकडे जाण्यास रोकत नव्हती. जे आत्मग्यान विसरले. चतुर्पती ज्यांना माहीत नाही. तिरगुणातच खितपत पडले. अश्या सर्वांना तर तीने तिन यवगापर्यत भ्रांतीच्या धुनीमध्ये भुलवतच ठेवले आहे.

परंतु आदीमाया चैत्यन्यासह त्रिदेव व त्यांचे तिरलोक्यातील तिरगुणी अवतार असलेल्या सर्व देवता, सर्व सुक्ष्मजगत, आकाशमात मधील आध्यात्मीक विश्वे व त्यासोबतच भुतलावरील सच्चे भक्त, जाणते, योगी जोगी संत महात्मे भजनी ध्यानी जन..ईत्यादी सर्व सच्चे त्रिगुणातीत भक्त जन हे या चौथ्या चतुर्पती आदीपुरूष धन्यालाचा शरण येवुन त्याचेच अजुनही ,भजन पुंजन ध्यान भक्ती सुमरन करत आहे. करत राहणार..

अश्या रितीने या मुळयवगाच्या प्रथम ऐकला असलेल्या आदीपुरूष धन्याचेच सर्व तिरगुणांच्या पलीकडे गेलेले त्रिगुणांतीत दृष्टीने पाहणारे भक्त जन ध्यानी आहेत. अवघे तिरलोक जाणता या अजाणता, प्रत्यक्ष्य वा अप्रत्यक्ष्यरित्या या आदीपुरूषालाच शरण आहे. अजाणत्याला मायेने घातलेले तिरगुणांच्या भुलवणीपायी याची खबर नाही. म्हणुनच या तिरगुणांवर अतिक्रमण करून या तिरगुणी मायेच्या या तिरगुणांच्या पल्याड जावुन जो कोणी त्या तिरगुणां पल्याड उभ्या असलेल्या चतुर्पती आदीपुरूष हरी चे ध्यान भजन पुजंन सुमरन भक्ती ..ईत्यादी आत्मतत्वा ंव्दारे आत्मग्यान सह चतुर्पती ग्यानात

रममान, निमग्न होवुन सच्ची भक्ती करन, त्याच्या तो नक्की हद्यी भरन ! आणी त्यांच्या देहीमध्ये अंशरूपी अवतार घेवुन उभा असलेल्या त्याच्या चैत्यन्य ज्योतीमध्ये या आदीपुरूष भैस नारायणाची ज्योत खेळन. त्या भक्ताला तो चतुर्पती आदीपुरूष भैस धनी आपल्या पुढे येणा-या यवगाच्या रमण्यात सामील करून घेईल.

आदीरूप भैसाच्या यवगाच्या रमणाकारणच तो धनी त्या सच्च्या भक्ताला निरंजनी भेटी देत राहील. त्यांचा मुजरा स्वीकारत राहील. त्यांच्या बोलावर उभा राहत जाईल. गाही साक्ष पुरावा देत राहील. तो आदीपुरूष धनी वारंवार निरंजनी भेटी देत राहील. आणी ते भक्त पुनःपुनश्चः धन्याच्या त्या निरंजन भेटी साठी आतुरतेने वाट पाहत राहील. पुनःपुनश्चः निरंजनी भेटीने, त्या भेटीच्या आतुरतेने व गाहीच्या अनुभवाने तो सच्चा भक्त हैराण होईल. त्याला पुनःपुनश्च, निरंजनी भेटी देत, गाही साक्ष पुरावे देत तो हैरान करन. पुनःपुनश्च भैटी देण्याच्या आशेने तो त्याच्यां हद्यी पक्की मांड बसवुन त्यांच्या हद्यी भरन. त्या सच्या भक्तांस भैटी, गाही साक्ष पुरावे, दृष्टांते देवुन करन हैरान । करन हो हैरान..

परंतु हे होण्यासाठी त्याला प्रथम माया सोडावी लागेल. माया सोड्डन भक्ती करावी लागेल. मायेच्याच पोटी राहुन मायेला धोका देत धन्याचा संग करावा लागेल. मायेला कुरवाळत मायेच्या कर्मशृंखला तोडाव्या लागेल. मायेला झिडकारून धन्याच्या भक्ती कर्माच्या शृखलेत गुंतुन राहावे लागेल. सत्कृत्यात राहुन सत् च्या अधिक्याने शुध्द सत् मध्ये जावे लागेल. तिरगुणांच्या पल्याड जावे लागेल. तेव्हाच होईन मग या देवाचं देणं !

॥ माया सोड्डन जो भक्ती करन । त्याला होईन हा देव प्रसन्न ।
त्याला होईन या देवाच देणं । तिथ मायेचं काय चालन ।
पहा या भक्तीनं । पहा या भक्तीनं ॥

तिरगुणी मायेचे तिरगुण हे आत्म्याला खेचत राहतात. बंधनात टाकत राहतात. या तिरगुणांपैकी :

- सत्वगुण हा सुखः आणी ज्ञान याच्या सहवासाने मनुष्याला बध्द करतो.
- रजोगुण हा लोभ उत्पन्न करून, तृष्णा व आसक्ती यांच्या व्दारे जीवाला रंगवुन त्या मनुष्यात लोभ व आसक्तीयुक्त कर्माच्या लालचीने तसेच हर्ष रोम ...ईत्यादी कडे त्याच्या प्रवृत्तीला नेवुन विषयवासना व इच्छा वाढवुन त्याच्या आत्म्याला बांधत असतो.
- तमोगुण हा अज्ञान पसरवुन निद्रा आलस्य, प्रमाद मोह यांच्याव्दारे आत्म्याला पाशात गुंतवुन, त्याच्या योगाने जिवात्माला जखडुन टाकत राहतो.

सत्वगुणाच्या अधिक्याने या तिरगुणी मायेला सोड्डन षटविकार दुर सारत आसक्ती भय, तृष्णा व काम-क्रोध-लोभ या त्रयीला दुर सारावे. शुध्द निर्मळ अंतकरणाने आत्मतत्वांत विलीन होवुन आत्मग्यान घ्यावे. आणी सत्कृत्यात राहत सत् च्या अधिक्याने शुध्द सत् प्राशन करत चतुर्पती नाम ग्यानी ध्यानी राहावे. अश्याप्रकारे जो कोणी या आदीपुरूषाची भक्ती करत शुध्द सत्वाकडे जाईल. या तिरगुणात्मक मायेच्या तिरगुणांच्या पल्याड जावुन प्रेम भाव भक्ती व नामज्योत हद्यी सतत तेवत ठेवुन सच्ची भक्ती करन, **त्याला** नक्कीच **होईन** हा चतुर्पती धनी **देव प्रसन्न** ! अश्याच त्रिगुणातीत भक्तांना **होईन या आदीपुरूषाचं देणं** । आदीपुरूष धन्याचं देण झाल्यावर तिथे मायेच काय चालन ? कारण देण मिळवणार भक्त तर त्या त्रिगुणात्मक मायेला अतिक्रमण करून, त्या तिरगुणांच्या पलीकडे, तिरगुणी ज्ञानाच्या पलीकडे गेला असल्यामुळे तिथं

मायेची पोहच चालणार नाही. या सच्च्या भक्तांची दृष्टी त्रिगुणातीत म्हणजेच तिरगुणांच्या पलीकडे पाहणारी झाल्यामुळे त्याला अहिनाघरचे चतुर्पती ग्यानाचे देणं त्या आदीपुरूष धन्याकडुन होत राहील.

आदीमाया शक्ती कुणाच्या अधिन आहे ? ती कुणाच्या अधिपत्याखाली काम करत राहते ? तिच्यावर कुणाची सत्ता आहे ? मुळयवगी कोण ?... ईत्यादी चतुर्पतीचे ग्यान त्याच्या पोटी येईन. त्याच्या पोटी धिराईने हा चतुर्पता अथर्वन् वेद उभा राहीन. त्याला या चतुर्पता अथर्वन वेद गाईचा अमृत पान्हा प्यायला मिळेल. त्याला अहीनाघरचे चतुर्पता ग्यान अनुभवासह येवुन त्याला त्या चतुर्पती आदीपुरूष धन्याचं देणं मिळत राहीन. तेव्हा मग या तिरलोक्याचा मालक असलेल्या तसेच या मायेचाच मालक असलेल्या आदीपुरूष धन्यासमोर या मायेचं काय चालन ? कारण की : ही मायाच त्या धन्याच्या अधिपत्याखाली राहुन आपले काम करत राहते. तो आदीपुरूष धनी या मायेला आपल्या अध्यक्ष्यतेखाली घेवुन आपली माव लिला करत राहतो. ही मायाच त्या कळसुत्र मालकाच्या हातातली एक कळसुत्र बाहुली आहे. मायारूपी बाहुलीचे सुत्रे तर कळसुत्रांच्या मालकात असल्यामुळे मग त्या चौथ्या कळसुत्राच्या मालकाच्या भक्तांसमोर या मायेच काय चालन ?

असाच कळसुत्रांवर कळा धरून हा धनीदेव यवगान यवग अनंत माव-लीला-खेळ करत उभा आहे. या मायेच्या हातात त्या धन्यानेच आपल्या सत्ते चा शिक्का दिलेला आहे. त्या धन्याच्या सत्ता शिक्या विना माया काहीच करू शकत नाही. आपल्या धन्याच्या हुकुमाबीना पानाचा पत्ता ही हालवु शकत नाही. अश्या या सर्वशक्तीमान स्वतःच्या धन्याच्या भक्ताला माया कशी रोखु शकेल ? जेव्हा जेव्हा आपल्या मालकाच्या भक्ताला ती रोकण्यासाठी समोर येईन, तेव्हा तेव्हा तिची भ्रांती दुर होवुन ती आपल्या मुळ स्वरूप ग्यानाला प्राप्त होईन. आणी या भक्तांचीच माया ममता करणारी सव बनुन त्याच्या चरण चारी राहीन म्हणन ! काहीही न करता निस्तेज होवुन पडुन राहीन. या तिरगुणी मायेचेच तिन सुताचे तिरलोक्यातील तिरगुणी अवतार सह इतरांचा मग काय गुजारा ?

मुळयवगी अनामत आदीपुरूष धनी आणी या धन्याचे भक्त या दोघांचाच साचा तयार झालेला आहे. या साच्या व्दारे देवा-भक्तांच्या जोडया तयार झालेल्या आहेत. तयार होत आहे. पुढेही होणार आहे. आता ही या देवा-भक्तां च्या साच्यातुन देवा भक्तांच्याच जोडी होईन.

॥ देवा भक्ताची जोडी होईनं । अंतर पलघडी नाही राहीनं ।
याहीची किर्त जो करन । त्याची महीमा जगात वाढनं ॥

देवा-भक्तांची जोडी होईन :-



**जोडी केव्हा होईल ? देवा-भक्ताची जोडी होण्याकरीता भक्त कसा असावा ?**

हे सर्व जग त्रिगुणात्मक पदार्थाने युक्त त्रिगुणी मायेव्दारे मोहीत झाले आहेत हे जाणुन जो ग्यानी भक्त तिरगुणांचे ओझे टाकुन सत्कृत्याचे अधिक्य करतात. आणी तिरगुणांच्या पलीकडे उभ्या असलेल्या चौथ्या आदीपुरूष धन्याला भजतात तेच चतुर्पती ग्यानी होतात. तेच आपली बुध्दि-मती व्दारे आपले चंचल मन जिकडे कुठे भले भलतीकडे धावत असेल, तेथुन ते खेचुन आणुन धन्याचरणी पक्के बांधतात. आणी मग धन्याच्या कृपेने मन-मती

शुध्द करून मन स्थिर करतात. स्वतःच्या देहरूपी धरणीतील षटविकार, षटउर्मि...ईत्यादी जे कलंक आहेत, ते कलंक या शुध्द मन-मती व्दारे धुत ते संपुर्ण साफ करण्यात सदा प्रयत्नरत् राहतो.

दया, क्षमा, शांती, स्थिरता, समानता, मानवता ..ईत्यादी व्दारे शुध्द सत्वगुणांच्या वाढीस पोषकता निर्माण करत राहतो. कोणत्याही प्राण्याचा व्देष करत नाही. सर्वांशी समानता मित्रभाव ठेवुन, समानतेचे वर्तन ठेवुन दयाळु अंतःकरणाने युक्त राहतो.

माझ माझ न करता हे सर्व जे काही आहे, ते सर्व त्या धन्याचे आहे. हा धनीच सर्वांचा उत्पादक आहे. धन्यांपासुनच सर्वकाही निर्माण झालेले आहे. असे समजुन जे काही धन्याच्या कृपेने सहजतेने इमानदारीने मिळेल त्यातच समाधानी संतुष्ट राहतात. एकनिष्ठेने एकच भाव धरून धन्याच्या एकाच नामी राहतात. धन्याच्या नामाची ज्योत हद्यी सदा तेवत ठेवत धन्याचे चिंतन मनन सुमरन गायन ..ईत्यादी भक्तीकर्मे करत धन्याची दिव्य सेवा उपासना करतात. विश्वाच्या पसा-यातील या यवगाच्या आयुष्यात आपल्या आयुष्याची गणीता ही अल्प आहे. असे समजुन उमजुन हरीच्या नामाचा आळस न धरता हरीकर्मे सह सत्कर्मे करत सत् च्या अधिक्याने शुध्द सत्व कडे वळतात.

आणी वेळ घटका न पाहता मिळालेली वेळ न गमावता निरंतर जिथे कुठे वेळ मिळेल तिथे धन्याला भजतात. जिथे कुठे निवांत, एकांत, शांती मिळेल, त्या वेळात हद्यी हरीनामाची ज्योत तेवुन त्या हरीनामाच्या ज्योतीत तल्लीन होतात. धन्याकडे चित्त लावुन धन्याकडेच आपले पाचही तत्वे, पंचप्राण, इद्रिये ..ईत्यादी सर्व लावुन प्रेम युक्त ज्ञान भक्ती भाव ठेवतात. असेच भक्त परस्परांना धन्याविषयी बोध करून धन्याचे गुण, गायन ईत्यादी करत संतुष्ट व सुखी पावत राहतात. याप्रमाणे प्रितिपुर्वक अंतःकरणाने धन्याला भजणा-या भक्तास तो आदीपुरूष धनी सत् बुध्दिरूप साधन देतो. या साधनांव्दारे तो भक्त समबुध्दि ठेवुन सत्कृतात राहतो. या सत्कृत्याचे अधिक्य करत आपली देहरूपी धरणी शुध्द करत जातो. या धरणीतील विकारांचे काटे व कलंक दुर सारत राहतो.

निष्कलंकी बनण्यास समर्थ होवुन ते धन्याचे भजन पुजंन ध्यान सुमरन चिंतन मनन पठन गायन ..ईत्यादी भाव-भक्तीकर्मे व्दारे धन्याला येवुन मिळतात. अश्याच भक्तजनां वर कृपा करण्यासाठी धनी त्यांच्या अंतकरणात प्रवेश करून आपल्या प्रदिप्त ग्यानदिपाने अज्ञानापासुन झालेला मोह व अंधःकार सह अहंकाराचा नाश करतो. त्याच्याशी जोडी करतो. देवा-भक्ताची जोडी तयार होते. आणी मग अंतर पलघडी राहत नाही.

अंतर पलघडी नाही राहीन :-

देवा-भक्ताची जोडी झाल्यावर धन्याचे जोडीदार असलेले सच्चे भक्तयोगी केवळ धन्याच्या ठिकाणी अंतःकरण ठेवतात. अंतर न ठेवता एकच भाव धरून एकनिष्ठेने भाव बळकट ठेवुन एकल्या धन्याला भजतात. अश्या योगयुक्त असलेल्या सच्च्या भक्तांच्या सांसारीक उदरनिर्वाहची चिंता धन्याच्या अखत्यारी राहते. त्या सच्च्या भक्ताला समोर ठेवुन, त्या सच्च्या भक्तांचा उदरनिर्वाह तो धनीच अप्रत्यक्षरित्या चालवतो. एवढच नव्हे तर तो धनीच अश्या सच्च्या भक्तांचा कर्ता, करविता बुध्दिचा दाता बनुन त्याची उच्चत्तर उच्च अशी प्रगती करत राहतो. कारण की : तो भक्त आता धन्यावाचुन माझ कोणी नाही ! असे समजुन वागत धन्याचरणी लीन असतो. आणी ज्याच नाही कोणी, त्याचा तो

चौथा आपरूप धनी ! तो आपरूप धनी त्यावे सर्व कामे सहजतेने आपरूप करत राहतो.

असा हा ज्ञानी सच्चा भक्त धनीकृपेने जाणता झाला असल्यामुळे तो हे जाणतो की : इथे जे काही आहे ते सर्व त्या धन्याच्या मालकीचे आहे. सर्व पदार्थाचे जेवढे काही मुळ म्हणुन आहे, ते मुळ या मुळयवगाच्या आदीरूप चतुर्पती धन्यापासुनच आहे. सर्वत्राचा दाता तोच धनी आहे. तो धनी भरून भरला नाही अशी एकही वस्तु या चरांचरामध्ये नाही. धन्याच्या दिव्य विभुतीस मुळीच अंत नाही. ज्या ज्या वस्तुत वैभव आहे, तेज आहे किंवा प्रभाव आहे, त्या त्या सर्व या धन्याच्या तेजाच्या एका अंशापासुन निर्माण झाली आहे धन्याच्या तेजोगुणी अंश अवतार असलेल्या या आत्म्यापासुन या सजीवात सजीवता आहे. सृष्टीत चैतन्य उभे आहे. धनी आपल्या या एकाच अंशाने हे सर्व चरांचर जगत भरून भरला आणीक उरलेला आहे.

अश्या या उरल्या धन्याची खरेपणांने ओळख झाली असल्यामुळे धन्याला धन्याच्याच मालकीचे न देता, स्वतः देहधरणीत सिंचन करून वाढवलेला एकला प्रेम भक्ती भाव त्या धन्याला अर्पण करत राहतात. प्रेमरस भक्ती भाव ग्यान युक्त चतुर्पती चा नामरसाई असलेला ब्रम्हरसाचा अमृत प्याला पिवुन तो मग्गम होतो. चतुर्पतीची ज्ञानगंगा भरवुन त्या ज्ञानगंगेत आंघोळ करतो. चतुर्पतीच्या ग्यानगंगेत खोलवर डुबकी मारून संपुर्ण निर्मळ होतो. संपुर्ण निर्मळतेने निर्मळ प्रेम भक्ती-भाव धन्याला सदा न कदा अर्पण करीत राहतात.

असे सच्चे भक्तजन शुध्द अंतःकरणा होवुन, त्याच्या इच्छेनुसार त्याच्या ऐपतीनुसार पत्र पुष्प किंवा तेही नसेल तर जल किंवा तेही नसेल तर हदयी नाम रसाई उत्पन्न करून, त्या नाम रसाईने न्हावुन शुध्दतेने धन्याला प्रेम भक्ती भाव अर्पण करतो. दोन्ही हस्तक व तिसरे मस्तक धन्याचरणी अर्पण करतो. कर्मफळ धन्याला अर्पण करतो. ऐसे तो धन्याचरणी समर्पण करत राहतो. आणी तो धनी त्याची ही प्रेम भक्तीभावाने दिलेली देणगी प्रेमाने स्विकारतो. हा सच्च्या ग्यानी भक्त योगी धन्याच्याच ठिकाणी मन लावुन धन्याचेच भजन पुंजन ध्यान सुमरन गायन ..ईत्यादी यजन करणारा होतो. प्रेम भक्ती भावाने धन्याला आलींगण देवुन, त्या एकल्या धन्यालाच मुजरा करतो. दंडवत घालतो.

सर्व धर्माचा परित्याग करून *माझ मजला शुध्द रे बापा / कस टाकु या धन्याला ! याहीन जगवला माझा पिंड'* असे म्हणत या एकल्या चतुर्पती धन्यालाच शरण येतो. धन्याच्या दिव्य सेवा करत धन्याचरणी लिन राहतो. आणी धनीही त्याला वज्राप्रमाणे बनवत राहतो. देहे अंम्बर करत राहतो.

अश्या त्या सच्या भक्तांवरील संकष्टे आरीष्टे,.....ईत्यादी त्रिकालदर्शि धनी देवाला आधीच माहीत असल्यामुळे त्या संकष्टाच्या आरीष्टांच्या समयाला त्या सच्या भक्तांने पुकारो या न पुकारो ! धावा करो या ना करो ! तरीही तो त्रिकालदर्शि धनी आधीच त्या भक्ताच्या पुढे-मागे, वर-खाली सभोताल वेढा टाकुन राहतो. संकष्टे आरीष्टे चे काटे दुर करतो. भक्तावर येणारे संकष्टे आरीष्टे यांची हवाच काढुन टाकतो. सच्या भक्तांच्या नशिबात असलेले भालीयाचे घाव याचा निर्वाळा काटयावर करतो. संकष्टाची तिव्रता कमी करतो. त्याच्या जित्या जन्मीच्या चौ-यांशीची तिव्रता कमी करतो. अश्या रितीने तो धनी त्या सच्यां भक्तावर कृपादृष्टी ठेवुन त्याला सर्व संकटे आरीष्टातुन तारतो. सच्च्या भक्ताला आपला प्रसाद देवुन, त्या प्रसादाने त्या सच्च्या भक्ताला उत्कृष्ट शांती शाश्वत स्थान, परमय सुखः, अहीनाघरचे चतुर्पती ग्यान

..ईत्यादी सह देणं प्राप्ती करून देत राहतो. त्याच्या पुढे-मागे/पाठीशी उभा राहुन जिकडे सच्च्या भक्त जाईन, तिकडे तो त्याच्या संग चालत राहतो. जैशी मनाची आवडी असेल तैशी त्याला गोडी देत राहतो. त्याच्या हद्यी वस्ती ठेवतो.

जसे समुद्र व तरंग याचे एकरूपता असते, तसे धनी देवाला जो या प्रकारे सर्वभावे भजुन त्याला अन्यन्य शरण राहतो. त्याला धनी देव क्षणभर विसरत नाही. सच्चा भक्त धनीदेवा ची भक्तीत वेडा पिसा होवुन आपले नियत कर्तव्य कर्मे करत राहतो. तर तो धनीदेव सच्च्या भक्ताच्या मागे-पुढे, घरी-दारी सभोताल त्याच्यावर दृष्टी ठेवुन असतो. सच्चा भक्तांचा चाकर बनुन त्या सच्च्यांचे कामे करण्यास साहय होतो. ऐसा हा धनीदेव आपल्या सच्च्या भक्ताच्या सेवेत राहुन त्याचा चाकर बनतो. तर सच्चे भक्त देवाच्या दिव्य सेवेत रममाण राहुन, धनी देवाचा चाकर बनुन त्या देवाचे जे काही कार्य असेल ते करत राहतो. ऐकमेकांचे चाकर बनुन देवा-भक्तांचा संगजोड राहतो.

या संगजोड व्दारे सच्च्या भक्ताला देवाकडुन गाही/साक्ष/पुरावे मिळतात. त्याला ग्यान येते की : आध्यात्म हे अनुभवाचे शास्त्र आहे. इथ कोणतेच कोरडे ग्यान चालत नाही. प्रतेक ओल्या ग्यानाचा अनुभव घेतल्या जावु शकतो. आणी या अनुभवांकरीता परमात्मा चरणी तो सदा लीन होवुन धन्याची भजन पुजन ध्यान सुमरन, उपासना, धारणा ...ईत्यादी मार्गाने पुनःपुनश्चः सुक्ष्मःअतिसुक्ष्म ग्यान प्राप्ती सह अनुभव घेत अंती धन्याला प्राप्त करून घेतो. या प्राप्ती कालावधीत धन्यांच्या आधी धन्याच्या शक्तीयॉ सच्च्यां भक्तांना कधीकधी भेटी देतात. शक्तिचे देणं ही देतात. परंतु त्या शक्तीयॉ च्या देण्यांतच तो सच्चा भक्त योगी भुलुन दंग होत नाही. शक्तीयॉ च्या देणं चे उपयोग न करता या देणं चा बाजार न मांडता शक्तीला आपल्या देहीच्या बांडीची लंगडी दासी बनवुन, तो सच्चा भक्त धन्याचा संग व प्राप्ती करिता नित धडपड करत राहतो.

सच्च्या भक्तयोगीला जे काही देणं होते. त्या देण्याचा बाजार तो सच्चा भक्त योगी मांडत नाही. सच्चा भक्त योगी निरंजन ज्ञानी असल्यामुळे त्याला याचे ग्यान असते की : देण्यांचा बाजार मांडल्याने त्या बाजाराव्दारे बाजारी माया शिरते. आणी अंगाला चिकटते. मग ही कपटी माया देवा-भक्तात अंतर आणते. धन्यापासुन दुर करू शकते.

म्हणुन तो सच्चा ग्यानी भक्त धन्याची प्राप्ती करण्याच्या मार्गात धन्यांच्या शक्तीयॉ कडुन जी काही देण्यांची प्राप्ती झाली असेल, त्या देणं-प्राप्तीचा बाजार न मांडता कोणालाही कळु न देता परमात्मा प्राप्ती करीता केवळ निष्काम बुध्दीने धन्याची भक्ती अशीच अखंड अविरतपणे करत राहतो.

शक्ती व धन्याच्या काही देणं प्राप्ती नंतरही निष्काम बुध्दिने भक्ती करणारा हा सच्चा ग्यानी भक्तयोगी योग्यतेने अती श्रेष्ठ असतो. अश्या ब्रम्हप्राप्ती झालेल्या सच्चा ग्यानी भक्तयोग्यास धनी अतिशय प्रिय असतो. व धन्यालाही असाच सच्चा ग्यानी भक्त योगी अतिशय प्रिय असतो. धनी व धन्याच्या शक्तियॉ व्दारे देणं प्राप्ती झालेला सच्चा ग्यानी भक्त योगी हा धन्याचा आत्माच असतो. धनी ही त्याला स्वतःचा आत्मरूप समजतो.

कारण की : तो सच्चा ग्यानी भक्त योगी हे सर्व गतीमध्ये उत्तम गती असलेला आदीरूप धनी च्या ठिकाणी चित्त ठेवुन त्या धन्याचाच आश्रय करतो. अनंत जन्म पावल्यानंतर हे सर्व जग या धन्याच आहे. अशी खात्री पटुन असा

सच्चा ग्यानी भक्त योगी धन्याला येवुन मिळतो. धन्याचा संग करतो. संगतीन हा नर होतो मग नारायण ! नराचा नारायण होतो. असे सच्चे महात्मे अत्यंत्य दुर्लभ होय.

अश्या रितीने ही देवा-भक्तांची जोडी एकमेकात अंतर पलघडी न ठेवता ऐकमेकांचे ऐकमेकांनी पोषण करत, दया क्षमा शांती व सुखंः... ईत्यादीं ची सर्वाकरीता सर्वत्र समृध्दी आणत राहते. भक्त हा धनी देवाची किर्त वाढवत राहते. तर धनी देव हा भक्तांची किर्त महीमा वाढवत राहतो. कोण कुणाचा चाकर ? कोण कुणाची किर्त वाढवत आहे ? कोणीतरी सांगा हो आम्हास ! म्हणुनच खंड०३/ओवी नं.१८ः-मानवा सुध धर या ओवी चे चरणे गर्जुन सांगी करतात की : अश्या सच्च्या भक्ताची...

॥ देही पिशाबीले बसन । समोर देव उभा राहीन ।
जरा नाही राहणार शरमुन ॥ मानवा सुध धर रे बुध ॥ खंडं-०३-१८
॥ देही म्हणन खातो जहर । हातचं जहर हाती राहीन ।
पोटचं जहर बाहेर पडन ॥ मानवा सुद धर गा बुध । खंडं-०३-१८
बुध धर आपल्या पोटी, देव येईनं घरां । अवघ्या सांगनं गोष्टी ॥

*सच्चा भक्त जिथे राहील. ज्या कोण्या अवस्थेत राहील. अथवा त्याची देही जरी पिशाबीले म्हणजे लग्वी करण्यास खाली बसली, तरी त्याचे रक्षण करत त्याचे संग तो धनीदेव जराही शरमुन न राहता त्याच्या समोर उभा राहीन. त्या सच्च्या भक्तांन जहर जर खातो म्हणुन हाती घेतले, तर ते हातचे जहर त्याच्या हातीच राहीन. उलट त्याच्या पोटी असलेले पोटचे जहर बाहेर पडन. दहाही अवतार त्याच्या भोवती जुम्मा घालनं. खंड०३/ओवी नं.१८*

मुळयवगी झालेल्या देवा-भक्तांच्या या साच्यातुन अश्याच देवा-भक्तांच्या दोन दोन च्या जोडी ची किर्त महीमा यवगान यवगात झाली आहे. होत आहेत. पुढेही होणार आहे. देवा-भक्तांची ही जोडी ऐकमेकांचे ऐकमेकांनी पोषण करत, देवा-भक्तांची किर्त महीमा जगात वाढवत आहेत. उदाहरणार्थ जसे कृतायवगापासुन *नारायण-नारद* ही देवा-भक्ताची जोडी झाली होती. त्रैतायवगात *राम-हनुमान* ही देवा-भक्तांची जोडी झाली होती. व्दापरात *श्रीकृष्ण-अर्जुन* ही देवा-भक्ताची जोडी झाली होती. तर आता या कलीच्या संधीत *कृष्ण महाराज-धनी अवधुत* ही देवा-भक्ताची जोडी एक झाली आहे.



॥ कृष्ण महाराज-धनी अवधुत ॥

॥ खंड ०१/०२ ॥

॥ माया-चैत्यन्या आदीमाया-शक्तीची ओवी नं. ०३ ॥

॥ निरसनसह सावंगा-जळगाव दांडची मुळावरची ओवी ॥

॥ गायत्री गायची ओवी ॥

## ॥ माया चैत्यन्या आदीमाया ॥

या ओवीची पलट ओवी खंड०७/ओवी-०९ मध्ये दिलेली आहे.

॥ माया चैत्यन्या, आदी माया । विनवितो इथं ।
हे होय माया । माहया मायची, सांगतो किर्त ॥ घृ ॥
॥ स्वर्गा वरं, होती गाय । तिचे होते चौघं ।
तिच्या अमृतानं देह । जगवला पिंडं ॥
॥ अमृत पान्हा, पाजुन चौघां । अशी बोले गायं ।
माझा अंगी कार आता । कोण करन साहयं/सोय ॥
॥ भाग वचनं, पुर्विच देणं । तुम्ही राखा ईमानं ।
भैस बोले, हद्‌यी मांसी । जागा देईनं ॥
किंवाः- ॥ भाग वचनं पुर्विचं देणं । तुम्ही राखा ईमानं ।
माझा अमृत पान्हा पेल्ले । तुम्ही चौघे जन ॥..जळगाव
॥ अमृत पान्हा पैल्ले त्या । चौघाशी बाले गाय ।
माहया पिंड मौसाची । कोण करन सोय ? ॥..जळगाव
॥ तेव्हा भैस राज बोलला । तु का भेते मायं ?
तुया पिंड-मौसाची जागा । माहया हद्‌यात आहयं ॥...जळगाव
॥ गाळा मध्ये गाय फसली । निरोप चौघाशी ।
वरवर केलं तिघांनं । चिंता, पडली भैसाशी ॥ ..जळगाव
॥ चिखला मध्ये गाय फसली, । निरोप चौघांशी ।
वरवर केलं, तिघानं । चिंता, पडली भैसाशी ॥
॥ आदी रूप भैस याहीनं । उपसली गायं ।
गंगे तिरी नेवुन तिचे । धुतले पाय ॥
किंवा :-॥ आधे भैसानं बांधली कंबर । उपसली गाय ।
ही वर थडी गंगा वाहे । तिथं झोकले/धुतले पाय ॥..जळगाव
॥ गाय बोलली, भैसा परी । मी जातो पाहयं, मी राहते साहयं ।
त्याच वेळी त्या गाईनं । ठेवला पिंड ॥
॥ गाय मेली/गेली, ताळी आली । ऐसा बोले भैसं ।
ब्रम्हा विष्णु, तिरनयनं । चला जावु तिथं ॥०८॥
॥ चौघं मिळुन, ताळी येवुन । उध्दारली/विधारली गायं ।
चार वाटण्या, चार भाग । सुदामत आहयं ॥
किंवा :-॥ सर्वणाचा सुरा घेवुन गाय, विधारली याहीनं ।
चौघा जनांच्या चार वाटण्या । ठेवल्या करून ॥ ..जळगाव
॥ वेद आले, पोटी आपला । भाग घेतला भक्षुन ।
त्या तिघानं गंगेत जावुन । केलं पिंडदान ॥ ...जळगाव
॥ आपला भाग पहा गिळला । राया भैसानं
तिघां जनांन, गंगेत जावुन । केलं पिंड दानं ॥
॥ आदी रूप भैस राया । गंगे थडी होता ।
सोडलेले तिन पिंड । गिळले आता ॥
॥ भाग वचन पुर्विचं देणं । राखलं ईमानं, राखला मान ।
हद्‌यी मांसी, जागा देल्ली । आदी भैसानं ॥ १२ ॥
॥ तिघां जनां, पुसे खुणां । माया देवतां ।
गाई पोटी, सर्वच होतं । गमावलं आतां ॥
किंवा :-॥ माया देवता पुसे तिघा । काय केली गाय ।
गाई पासुन अवघंच होतं । गमावली सोय ॥ ..जळगाव

॥ होवुन मावची, कलारीन । वसवली पेठं ।
गळा हात, घालुन भैसालां । आणावं/आणले इथं ॥
किंवा :- ॥ होवुन मावची कलारीन । वसवली पेठं ।
हे होय माया कौशल्य । याची सांगतो किर्त ॥
॥ होवुन मावची कलारीन । लावली भट्टी ।
गळ्यात घाला हात भैसाला घेवुन या येथी ॥
॥ पाजुन महा कारण कारं । कळपी केला धुंदं ।
उलाट होवुन, त्या भैसालां । अवघी होती/आहे शुध्दं ॥
किंवा :- ॥ मधुपानाचे प्याले पाजले । कैपी केला धुंद ।
खाल्या पाडला भैस याहीला । होती सुदबुध ॥ ..जळगाव
खाल्या पाडला :- डोके धरून खाली बसण्यास भाग पाडणे
॥ वेदा पाठी, वेद पढले । सुने वेद तीनं ।
अथर्वन वेद, पोटी राहीला । यवगा/पुढंच कारणं ॥१६॥
॥ वेद घेवुन तिन देवं । खुशाल मनाशी ।
ज्या वेदानं, व्हाव जागी तो । नाही तिघा पाशी ।
अमृत संजीवनी आहे । भैसा च्या पाशी ॥१७॥
॥ तिन वेद हाती घेतले । काही नाही त्याला ।
तिन ताळाचा हिशोब याहीनं । आकार केला ॥
॥ कजब्या मध्ये, हिशोब केलां । याहीला केले हिनं ।
स्वर्ग-पाताळ, पेठा नांदते । अमृता गुणं ॥ १८ ॥
॥ स्वर्गि अमृत पाताळी अमृत, नाम नाही धन्या ।
नाम नाही रे धन्या । दोन्ही, पेठां पडल्या सुन्या ॥
॥ यवगा परी, भ्रांत सारी । आज होतो नेणंता ।
वजाबाकी, भरून झाली, यवगाची कथा ॥१९॥
॥ अन्न-पाण्याचे, आहार त्याहीला । हे जातीनं सकस ।
साहंकारी पोहना अधारी । तो नादंन इथं ॥ २० ॥
॥ चतुर्पता गिण्यानं देवाचं । चालन परमाण/प्रमाणं ।
राज्य येईन भैसाचं । याहीचं उडवनं ठिकाणं ॥२१॥
किंवा :- मिर्त लोकी, तिर गुणांचं । उडवणं ठिकाणं ॥
॥ चतुर्पता, अथर्वन् वेद । उभा राहीन पोटी । देव उभा राहीन येथी..
निजरूप भुम्मा, जागी करनं । सारी शिरष्टी/सृष्टी ॥२२॥
किंवा:- ॥ चतुर्पता अथर्वन् वेद । हे भैसा पोटा ।
निजरूप भुम्मा देहे जागी । करन सर्वत्रा ॥ ..जळगाव

भजने:- ॥ आथर्वन वेदाची गाही । जागी करन, देव सारी सृष्टी ॥
॥ आथर्वन वेदाची मांडणी । सांगी सांगे हो आकाश वाणी ॥
॥ माया देवता माय तिघाची । गुणावंती रूपावंती माय माझी ॥
॥ माया देवता माय तिघाची । चतुर्पता गाय, माय माझी ॥
॥ हे होय गाय गाय । हे होय गाय गाय ।
गाय मिर्तलोकी/स्वर्गावरती/तिरभवनी राहयें इला पाहयं ॥
॥ हे होय गाय गाय । हे होय गाय गाय ।
गाय चौवेदाची/सर्वत्राची माय । चातुरा भला भेद तु पाहयं ॥

गजर :-
॥ चतुर्पता गाय जागृत । अहीनाच्या ईथं । चातुरा घरी आली...
पाजे अमृताचा पान्हा । धन्य माउली ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ निरसनसह माया चैत्यन्या आदीमाया ॥

-: निरसन/स्पष्टिकरण :-

॥ माया चैत्यन्या, आदी माया । विनवितो इथं ।
हे होय, माया । माहया मायची, सांगतो किर्त ॥

खंड ०१/०२/ओवी०२:-निराकार निरंजन/चरण०३ च्या निरसनावरून आपणास ग्यान आलेले आहे की : प्रथम यवगी चतुर्पति धन्याच्या चतुर्पती ग्यानाव्दारे पृथ्वीवरचे विषम विषर्जित होवुन पृथ्वीवर सम समानतेची रंचना झाली होती. त्यावेळी या चतुर्पती च्या ग्यान-भक्तीच्या नादामुळे तिथे सर्वांना सत्रावी जिवनकळा ज्योतीची गोडी लागली होती. सर्व आकाशवाणीचा चौथा निराकार निराधार निरंजन आदीपुरूष भैस नारायण नामी भक्तीरत् होते. या गोडीमुळेच विषमतेचे विर्सजन झालेले होते. सर्वत्र समसमान रंचना होती. ही समसमान रंचना कशी महामाया व्दारे मोडल्या गेली ? याची आता सांगतो गा किर्त !

हे होय, माया । माहया मायची सांगतो किर्त :-

प्रथम यवगी च्या समसमानेच्या विश्वरंवनेला छेद देण्याकरीता चौथ्याने दिलेले देणं अंमलात आणण्याचा संकल्प आदीमायासह तिघांनी केला. तिरगुणी राजे व त्यांची महीमा सह सत्ता स्थापन करण्यासाठी आदीमाया सह त्रिदेवांनी चतुर्पती कडे प्रार्थना मांडली. धन्याव्दारे आवाजी दिलेले देणं ची अमंलबजावणी करीता तसेच धन्याव्दारे मुळयवगी मिळालेल्या त्या देणं चा शकुन साधण्याकरीता, चौथ्या चतुर्पती धन्याकडे सुमरन प्रार्थना निरंतर केली. प्रार्थनेच्या अधीक ग्यानासाठी शक्ती खंड०१/०२/ओवी०२/चरण०३ चे निरसन वाचा. मायाचैतन्येसह त्रिदेवांनी केलेल्या प्रार्थनेला तो आपरूप चौथा चतुर्पती धनी पावन झाला. आणी त्या आकाशवाणी करणारा आपरूप चतुर्पती धन्यानं स्वतः लहानपण घेत एक खेळ उभा केला. या खेळात त्याने चतुर्पता गाय उभी केली ती अशी :

धन्याच्या या एका खेळात त्या आदीरूप चतुर्पती धन्याने त्याच्या आकाशमात मधील सृष्टीतील चौ-वेदांच्या ग्यानासह सर्व सुक्ष्मःत्तर सुक्ष्मः असे ग्यान एकत्र केलेत. या सर्वत्र ग्यानाचा एकच ग्यानपिंड बनवुन या ग्यानपिंडाला गाईचा आकार दिला. त्या गाईच्या आकारात आपले चैतन्यसह सर्व शक्तीयॉं सिध्दीयॉं ओतुन ती १८ वर्णाच्या सर्वग्यानसह चौ-वदाची गाय सजीव केली. अश्यारितीने या चतुर्पती धन्यानं १८ वर्णाची चौ-वेदाची गाय उभी करून, ती गाय २१ स्वर्गाच्या वर असलेल्या उर्ध्व स्वर्गावर पाठवुन दिली.

मायाचैतन्या आदीमाया ला ईथ विनवुन, माया देवतांने या चतुर्पता गाईचे ग्यान आपरूप चतुपती धनी अवतार भैसा कडुन कसे हस्तगत केले ? याचे ग्यान इथं देवुन या मायेची आता किर्त सांगतो.

सर्व ग्यानाचे एकत्रीकरण झालेला एकच ग्यानपिंड व्दारे उभी झालेली ही चतुर्पता गाय उर्ध्व स्वर्गावर राहत होती.

॥ स्वर्गा वरतं, होती गाय । तिचे होते चौघं ।
तिच्या अमृतानं देहें । जगवला पिंडं ॥
॥ अमृत पान्हा, पाजुन चौघां । अशी बोले गायं ।
माझा अंगी कार आता । कोण करन साहयं ॥
॥ भाग वचनं, पुर्वीच देणं । राखावं ईमानं ।
भैस बोले, हद्यी मांसी । जागा देईनं ॥

उर्ध्व स्वर्गावर सर्व ग्यानपिंडा व्दारे उत्पन्न झालेली धन्याची १८ वर्णासह चौ-वेदाची चतुर्पता गाय होती. आणी तिथे त्या स्वर्गात ब्रम्हा विष्णु शंकर हे तिघे आणी खंड०१-०१-०१:-शक्तीच्या ओवी मध्ये कैलाशी निघुन गेलेला चौथा आदीपुरूष आदीमुनी भैस अवतार होता. असे चौघे जन त्या स्वर्गावर होते.

ज्याप्रमाणे कृष्णाजी आपल्या चतुर्पतीच्या सच्च्या भक्तजनांना चतुर्पता ग्यानाचा पान्हा पाजत आहे. त्यांचा पिंड जगवण्यासाठी त्या सच्च्या भक्तांच्या अडी-अडचनी, संकष्टे-आरीष्टे, रोग-विघ्ने दुर करत त्यांचा पिंड जगवत आहे, त्याप्रमाणे तिथे स्वर्गावरही या ब्रम्हा-विष्णु शंकर भैस या चौघांचा देहपिंडाला चतुर्पता गाय आपला सर्वग्यानसंपन्न अमृत पान्हा पाजत होती. त्यांचा पिंड जगवत होती. या चतुर्पती गायीनेच आपला अमृतपान्हा पाजुन या चौघाचा देह-पिंड जगवला. या चतुर्पता गायीने आपला अमृतपान्हा पाजुन या चौघांचा पिड जगवल्यानंतर ही चतुर्पता गाय त्या चौघाशी अशी बोले की : जे तुमचे पुर्विचे देणं होत, ते देणं चे शकुन सिध्द करण्याकरीता आदीरूप धन्याने मज उत्पन्न केले होते. मुळ्यवगी शक्तीसमोर जे आवाज उठले होते, ते शकुन आता साधल्या गेलेले आहे. आता ते शकुन सिध्द होवुन तुमचं देणं तुम्हास लाभलेले आहे. या चतुर्पता गायी व्दारे तुम्हास सर्व ग्यान येवुन, तुम्ही सर्व ग्यानसंपन्न झालेले आहात.

या सर्व ग्यान पिंडात चौथ्या चतुर्पतीच्या ग्यानपिंडाचा जो भाग आहे, तो चौथा भाग चतुर्पतीला कोण देणार ? या चतुर्पता गाईचा जो भाग आहे, तो भाग या चतुर्पता गाईला कोण देणार ? आता तुम्हा चौघा पैकी या चतुर्पता गायीचा कोण अंगीकार करणार ? कोण या चतुर्पता गायीला साहयं करणार ? कोण माझा भाग मला देणार ? कोण या चतुर्पताचा भाग ईमान राखुन ईमानदारीने देणार ? ज्याचा भाग त्याला दिल्यानेच, काहीतरी कनवा येईन त्या चतुर्पती धन्याला । म्हणुनच या चतुर्पतीच्या भाग राखण्याकरीता कोण मजला हे वचनं देणार ? भाग वचन पुर्विच देणं झाले आहे. आता तुम्ही ईमान राखावं. अशी गाय बोलली.

उत्तरादाखल चौथा भैस बोले की : या चतुर्पता गाईला माझे मिर्तलोकच्या हदयी असलेल्या मासा-मासाच्या पेंशी-पेशीत, रोमा-रोमात केसाच्या प्रतेक छिद्रात चतुर्पतीच्या प्रती भक्ती भाव व तुझेच नाम भिनवुन चतुर्पती चा रोमीद्युत बनवुन तुजला जागा देईन. चतुर्पती चा रोमी द्युत बनुन तुझा अंगीकार करेल. या चौथ्या चतुर्पती धन्याला त्याचा चौथा भाग ईमानदारीने अर्पण करेल. असे वचने देतो.

ऐसे वचने चौथ्या भैसाने चतुर्पता गायीला देवुन तिचा अंगीकार केला. एकलाच चतुर्पता गाई चा संग सदा करू लागला. परंतु त्या त्रिगुणी मायासह त्या तिघांनी वेगळाच आपला तिरगुणी खेळ मांडला. या तिरगुणी खेळांमुळे तिरगुणींने केलेल्या तिनगुणी चिखलात चतुर्पता गाय फसली.

॥ चिखला मध्ये, फसली गाय । निरोप चौघांशी ।
वरवर केलं, तिघानं । चिंता, पडली भैसाशी ॥

चिखला मध्ये, फसली गाय :-

आदीमायासह त्रिदेवांनी आपल्याल्या मिळालेल्या देणं च्या भरोवश्यावर अन्जान जनसामान्यावर आपले तिरगुणांचे ग्यानाचे फासे टाकलेत. त्यांना तिरगुणी ग्यानाच्या बंधनात अडकवु लागलेत. आपल्या तिन पुत्रांची तिरगुणी सत्ता स्थापनेच्या हेतुने मायेने आपल्या चतुर्पती धन्याचे चतुर्पती ग्यान सर्वसामान्य भक्तजनास न देता, चतुर्पती गाईच्या चतुर्पता ग्यानावर पडदा

टाकत ती माया तिरगुणी ग्यानांचा प्याला मधुपानाप्रमाणे जनलोकांस पाजु लागली. जसे जसे मायेसह तिनदेवांनी पाजलेले तिरगुणी ज्ञान वाढु लागले, तसे तसे त्यांची स्वतःचीच महीमा वाढवत ते सत्ता स्थापन करू लागले. सत्ता स्थापनेकरीता तिरगुणांचे राजे व त्यांचे तिरलोक्यातील तिरगुणी अवतार यानी स्वतःचेच स्तुतीगाण, महीमा पुजा अर्चना, व्रत-वैकल्प चे तिरगुणी ज्ञान अन्जान लोकांना देण्याचा सपाटा सुरू केला. सत्यदेव चतुर्पती धन्याला पडीत टाकुन ते ज्याच्या पासुन बनले त्यालाच बेंईमान होवु लागलेत. तिरगुणी मायेच्या तिरगुणांव्दारे चतुर्पतीचे ग्यानावर गडद पडदा टाकल्या जावु लागला. चतुर्पतीचे कुणी भजन पुंजन सुमरन करे ना ! मायेच्या या तिरगुणी ग्यानांव्दारे ती चतुर्पता गाय पडीत पाडल्या गेली. या सैरवैर वाढलेल्या पुजा-पाठ, व्रत-वैकल्प जप. ईत्यादी स्वतःचीच स्तुतिगान करणा-या तिरगुणी ग्यानाचा तिथे चिखल झाला. या तिरगुणी ग्यानांच्या चिखलात ही चतुर्पता गाय फसली । फसल्या गेली.

निरोप चौद्याशी :-

चतुर्पता गाय ऐसी फसल्यामुळे त्या चतुर्पता गाईने चौघाशी निरोप धाडुन आपल्यापाशी बोलावले. आणी समजावुन सांगीतले की :

ज्याचा भाग त्याला दिलाच पाहीजे. या चतुर्पता गायीला बेईमान न होता आप-आपले ईमान राखावे. हे तुमच पुर्विच देणं असल्यामुळे या चतुर्पता गाईचा पान्हा पिवुन तुम्ही मोठे झालेत. आता चतुर्पती शी राखा हो ईमान ! भाग वचन पुर्विचे देणं राखाव ईमान !

वरवर केले तिघांनी :-

चतुर्पता गाईच्या उपदेशाने त्या तिघांनी आदीपुरूषाची निरंजन ज्योत लावुन आपले कर्म कांड करायचे असे ठरवले. आदीपुरूष धन्याची निरंजन ज्योत लावुन आपले पुजापाठ कर्मकांड चालवण्याचा नेम घालुन वरवर चतुर्पतीची चिंता आहे असे दाखवले. परंतु सत्तेच्या अभिलाषापायी चतुर्पता गाईला पडीत टाकुन आपले तिरगुणी ग्यान वाढवण्याचे कार्यच ते तिन करत गेलेत. या चतुर्पता गाईचे बावन्नकशी सोन्याप्रमाणे असलेले ग्यान काही सर्वसामान्यांच्या हाती जावु दिले नाही. हे चतुर्पता ग्यान स्वतःजवळ झाकुन ठेवुन, आपलेच तिरगुणी ग्यान ते जनसामान्यांना मधुपानाप्रमाणे पाजु लागलेत. व आपली तिरगुणी सत्ता वाढवु लागलेत. तिरगुणांची सत्ता गाजवु लागलेत.

चिंता पडली भैसाशी :-

माये सह तिघांच्या अश्या वागण्यामुळे त्या चौथ्या भैसास चिंता पडली. आता चौथ्या एकल्यालाच ही गाय या तिरगुणांच्या चिखलातुन उपसावी लागेल. या चतुर्पता गायीला आपण तसे वचन दिले आहे. दिलेले वचन व ईमान राखावं लागण्याकरीता त्या चौथ्याने कंम्बर/कटी बांधुन पडीत गायीला हात देवुन वेळोवेळा तिरगुणी चिखलातुन उपसत राहण्याचे कार्य करत गेला. चतुर्पती गाय चे चतुर्पता ज्ञान गंगेचे अमृत पाणी सच्च्या भक्तगणांना वाटण्याकरीता कंम्बर बांधुन सज्ज होवुन कार्यरत् राहु लागला.

॥ आदी भैसानं बांधली कंम्बरं । उपसली गायं ।
गंगे तिरी नेवुन तिचे । धुतले पाय ॥
॥ गाय बोलली, भैसा परी । मी जातो पाहयं, मी राहते साहयं ।
त्याच वेळी त्या गाईनं । ठेवला पिंड ॥

कंबर बाधुन सज्ज्य होवुन चौथ्याने जेव्हा ही चतुर्पता गाय तिरगुणांच्या चिखलातुन उपसुन चतुर्पती ज्ञानगंगेत नेवुन तिचे पाय धुतले, तेव्हा ती

चतुर्पता गाय बोलली की : मी जाते आता पाहयं ! ही चतुर्पता गाय सदैव चौथ्या चतुर्पतीच्या भक्तगणांना नित साहयं राहीन. जो कोणी चौथ्याचे भजन पुंजन सुमरन शुध्द अंतकरणाने करेल, त्याला मी नित साहय होईन. त्याना माझा चतुर्पता पान्हा सदैव पाजत ठेवत त्याचा देहपिंड जगवेल. त्यांना तिरगुणांच्या पल्याड नेवुन तिरगुणांच्या पल्याड उभ्या असलेल्या धन्याकडे जाण्यासाठी सदैव त्याची पाठराखन करेल. असे कोणत्याही परिस्थीतीत नित साहयं करत राहण्याचे वचने गाईने दिलेत. तर भैसाने पुर्विचे भाग वचन गाईला दिले.

भाग वचन पुर्विच देणं ! राखतो गाईशी ईमान ! असे भैसाने दिलेल्या वचनाव्दारे ती गाय संतुष्ट व समाधानी झाली. प्रसन्न होवुन त्याच वेळी त्या गाईने आपला आंगचा सर्वग्यानयुक्त ग्यान-पिंड चौथ्या भैसा सम्मोर ठेवुन गुप्त झाली. निराकार अव्यक्त अवस्थेत गेली. विदेह झाली. गाय जेव्हा आपल्या मुळ निर्गुण निराकार स्वरूपात गेली, तेव्हा तिथचा तिच्या आंगचा सर्व ग्यान असलेला एकच ग्यान-पिंड मिर्तलोकच्या ताळी गंगेतिरी पडला. तिच्या आंगचा सर्वत्राचे ग्यान असलेला एकाच ज्ञान-पिंड सह ती निराकार विदेह स्वरूपात मिर्तलोकच्या ताळी आली.

॥ गाय गेली/मेली ताळी आली । ऐसा बोले भैसं ।
ब्रम्हा विष्णु, तिरनयनं । चला जावु तिथं ॥
॥ चौघं मिळुन, ताळी येवुन । उध्दारली/विधारली गायं ।
चार वाटण्या, चार भाग । सुदामत आहयं ॥

चतुर्पता गाय ही निराकार अव्यक्त अवस्थेत गेली आहे. आणी तिच्या आंगचा सर्व ग्यांनाचा ग्यान-पिंड मिर्त लोकच्या ताळी पडुन ती ताळी आली आहे. असे भैस त्या तिघांसमोर बोलला. भैस तिघांस म्हणे की : ब्रम्हा विष्णु शंकर हो ! चला जावु तिथे !. आणी मग तेथुन ते ब्रम्हा विष्णु शंकर भैस हे चौघे चतुर्पता गाईच्या मागोमाग मिर्तलोकच्या ताळी आलेत. चतुर्पता गाईचा उध्दार करण्यासाठी त्यानी चतुर्पता गाईच्या आंगच्या एकाच ग्यान-पिंडाचे पुंजन करून एकाच ग्यान-पिंडांचे सुर्वणाचा सुरा घेवुन चार भाग केलेत. एका पिंडास चार भागात विधारली म्हणजेच एकाचे चार भागात विभागणी केली. चतुर्पता गाईच्या एकाच ग्यानपिंडाचे हे चार भाग म्हणजे १. ऋग्वेद २. यजुर्वेद ३. सामवेद आणी ४. अथर्व वेद हे चार ग्यान-पिंड होय. ब्रम्हा विष्णु शंकर आणी चौथा भैस या चार जनांनी हे चार ग्यान-पिंड वाटुन घेतलेत.

॥ आपला भाग पहा गिळला । राया भैसानं ।
तिघां जनांन, गंगे मध्ये । केलं पिंड दानं ॥
॥ आदी रूप भैस राया । गंगे थडी होता ।
सोडलेले पिंड तेही । गिळले आता ॥
॥ भाग वचन पुर्विच देणं । राखलं ईमान, राखला मान ।
हद्‌या मध्ये, जागा देल्ली । आदी भैसानं ॥

गाईच्या ज्ञानपिंडाचे जे चार भाग चौघाने समसमान वाटुन घेतले होते, त्या चार भागापैकी आपला जो चौथा भाग होता, तो राया भैसानं आपल्या पोटी गिळला. परंतु ब्रम्हा विष्णु शंकर या तिघा जनांनी त्यांच्या जवळ असलेले तिन ग्यान-पिंड उमजुन न आल्यामुळे त्यांच्या वाटणीस आलेल्या गाईच्या त्यां तिन ग्यान-पिंडाचे त्या तिघांनी गंगेतिरी पिंडदान केले. जेव्हा ते तिन ग्यान-पिंड गंगेत वाहु लागले, तेव्हा तिथे गंगेतिरी उपस्थीत असलेला चौथा भैस यांने ते तिनही ग्यान-पिंड उचलुन घेतले. आणी गंगेत सोडलेले तिन वेदाचे तिन ग्यान-पिंड आपल्या पोटी गिळले. अश्या रितीने भैसाच्या पोटी चारही ग्यान-पिंड आलेत. पोटी असलेल्या चौथा अथर्वन् वेदाचा ग्यान-पिंड सह

तिन ग्यान-पिंड असे गाईच्या चारही ग्यान-पिंडाला हद्याच्या रोमारोमात भिनवुन हद्यामध्ये भैसानं गाईला जागा दिली. संपुर्ण ग्यान-पिड स्वरूपी गाईला आपल्या हदयाशी कवटाले.

चौथ्या चरणात *भैस बोले, हद्यी मांसी । जागा देईनं* असे जे वचन भैसाने गाईला दिले होते, त्या वचनाची ईमान राखले. गाईच्या चारही पिंडाला आपल्या हद्यामध्ये जागा देवुन, गाय च्या ग्यानपिंड स्वरूपाचा मान राखला. सर्व चारही पिंड सच्च्या दिलाने भक्तीभावाने पठन व आत्मसाद केलेत. सपुर्णतः आत्मसाद करून त्या चारही ग्यानपिंडा च्या ग्यानाला रोमारोमात जागा दिली. हद्याच्या मासा मासात पेशि-पेशीच्या रोमारोमात चतुर्पता गाई प्रती भक्ती भाव भरवला. भक्ती-भावाने त्या गाईचे चतुर्पता नाम सर्वांगी रोमा रोमात भिनवुन रोमीद्युत बनला. चतुर्पता गाईचा रोमीद्युत बनुन त्या निराकार गाईचा सर्व वाणरूपी पिंडाचा अंगीकार हदयी मासी जागा देवुन केला. अश्या रितीने या आदीभैसाने *भाग वचनं, पुर्विच देणं । राखलें ईमानं ।* हदयी मासी चतुर्पता गाय धरली हो या आदीभैसानं ! आणी तिघे पिंडदान करून तसेच रिकाम्या पोटी रिकाम्या हाताने आपल्या मायेकडे गेलेत. तेव्हा मायेने त्या तिघांना विचारले की : काय घडले त्यांच्या सर्व खुणा सांगा मजला आता ?




॥ तिघां जनां, पुसे खुणां । माया देवतां ।
गाई पोटी, सर्वच होतं । गमावलं आतां ॥
॥ होवुन मावची, कलारीन । इनं, बसवली पेठं ।
गळा हात, घालुन भैसाला । आणावं/आणले इथं ॥
॥ पाजुनं महा कारण कार । कळपी केला धुंदं ।
उलाट होवुन, या भैसाला । अवघी होती/आहे शुध्दं ॥

तिन पिंडाचे गंगेत पिंडदान करून जेव्हा ब्रम्हा विष्णु शंकर हे तिघे रिकाम्या पोटी रिकाम्या हाताने माया देवते कडे गेलेत, तेव्हा मायादेवतां त्यांना म्हणाली की : काय घडले त्याच्या खुणा सांगा मजला आता ? गाई पोटचे वाण रूप तुम्ही आता मज दाखवा हो. तेव्हा त्यां तिघांनी घडलेली सर्व हकीकत माया देवतेस कथन केली.

तिघांच्या मुखातुन सर्व घडलेली घटना ऐकुन माया त्या तिघांना उद्देशुन बोलली की : जे तुम्ही तिन पिंड गंगेत पिंडदान करून गंगेला अर्पण केलेत, ते तिन पिंडच तर गाई पोटचे वाणं असलेले तिन वेद होय.

गाई पोटी, सर्वच होतं । गमावलं आतां :-

चतुर्पता गाईच्या पोटी चौवेद ग्यान सह सर्वच ग्यान होत. सर्वच वाणं रूपी देणं त्या गाईच्या पोटी होत. आणी तिच्या आंगचे हे सर्वत्राचे सर्व ग्यान चे वाणं तिच्या चारही ग्यान-पिंडात आलेले होते. परंतु तुमच्या अज्ञानीपणा मुळे ते चारही ग्यान-पिंडाचे ग्यान एकल्या भैसाच्या पोटी गेलेले आहेत. भैसा पोटी गाईचे सर्वच वाणंरूपी देणं गेलेले आहे. तुम्ही तिघांने तुमच्या वाटयास आलेले ते सर्वच ग्यानाचे वाणं रूपी देणं तुम्ही गमावले आहे.

होवुन मावची, कलारीन । इनं, बसवली पेठं :-

मायादेवताने एवढ सर्व त्या तिघांना कथन करून त्या तिघांची घडलेली चुक तिघांना दर्शविली. तिघांचा भाग तिघांना मिळवुन देण्यासाठी या तिरगुणी मायेच्या मनात तिरगुणां सह तिरगुणांच्या तिन देवांचा पसारा पसरवुन त्याचा विस्तार करण्यासाठी कल्पना आल्यात. माव-लिला ची कलारीन होवुन तिरगुणांचा बाजार मांडण्याकरीता ज्या कल्पना मायादेवतेच्या मनी आल्या, त्या कल्पनेचा रंग धरून ती मायादेवता महामाया रूपात प्रकटली. म्हणुनच कल्पना

म्हणजे माया ! असे जाणत्यांव्दारे म्हटल्या जाते. ईच्छा शक्ती झाली, तर कल्पना माया झाली ! व तिने सात प्रकारचे रूपे घेत घेत सप्तमाया झाल्यात. सप्तमायाचे ग्यान खंड ०३/०१ मुळस्तंभीचा पाया या ओवीतुन घ्यावी.

चौथ्याच्या पोटात असलेली वेंदांसह सपुर्ण ग्यानसंप्पत्ती प्राप्त करण्यासाठी माया ने ज्या कल्पना कल्पील्या होत्या, त्या कल्पना साकार करण्याकरीता तीने अनेक माव लिला खैळ मांडत मावची कलारीन बनुन महामाया चे रूप घेतले. आपल्या मोठया मोठया पेठा स्थापल्यात. आपला तिरगुणी बाजार मांडला. आणी ती कलारीन बनुन या बाजारात बसली. आपले मायावी तिरगुणी ग्यान ती मधुपानाप्रमाणे जनास पाजु लागली. ही कलारीन महामाया तिच्या तिरगुणी मायाज्ञानाच्या पेठेत येणा-या जनलोकांस मायायुक्त तिरगुणी ज्ञानाचे प्यालावर प्याले पाजुन त्यांना धुंद करू लागली. तिरगुणी मायाज्ञानाची नशा वर नशा चढवुन त्यांची मुळ शुध्द हरवु लागली. त्या जनांस त्याच्या शुध्द स्वरूपाचा विसर पाडुन आपल्या मागे लावु लागली. आपल्या मागे नाचावयाला भाग पाडु लागली.

तिन देवांना वेदज्ञानरूपी संप्पती कशी गमावली ? याच्या खुणा मायेने तिघांना विचारल्या नंतर या तिन देवांचे तिरगुणी राज्य वाढवण्यासाठी अत्यंत आवश्यक असलेली ज्ञानसंप्पत्ती कशी प्राप्त करावयाची ? याकरीता मायेने मनी कपट कल्पलेत. चौथ्या च्या पोटी असलेली वेदसंप्पती प्राप्त करण्यासाठी मनी कपट कल्पना करणारी होय ही कपटी माया देवता ।

॥ ही माया मोठी कपटी । लागली मोठया-मोठयाच्या पाठी ।
ईने घातली मच्छींदराला मिठी । ईने मथवले जगजेठी.... ॥
॥ या मायेला जपुन चाला । ईच्यामुळे रामराया गलपटला ।
पाहता पाहता धोका दिला......॥ खंड-०८/०१/ओवी-०५
॥ ईची सत्ता तिनही ताळात । महा महा केले ईने लंपट... ।
ईंद्र-चंद्र गणी-गंधर्व सह, तिनदेव या मायेच्या आज्ञेत ॥
॥ ईने गाजवली सत्ता । ईन वाढवली अहंता ।
भुल पाडली ईन सर्वत्रा । भलताच गवसवते ही रस्ता ॥
॥ भक्तजन भुलले सोसा । म्हणुन जन भंगले आचार-विचारा ।
नाही तत्वाची सुध-बुध । ईने मागे लावला चौ-यांशीचा फेरा ॥
.....ऐस अवघ टाकलं मोहुन । पहा मायेन या मायेन ॥

मृगजळाप्रमाणे दिसणारी ऐशी ही माया तिरगुणांचा पसारा घेवुनी व्यापली आहे. म्हणुनी तिरगुण करे धिंगाणे । परंतु तुम्ही शुध्द सत्वात राहुन, दया क्षमा शांती प्रसन्नता धरून, आशा मनशा ईच्छा पापी कल्पना जाळुन, शुध्द सत्वी चौथ्याचे मनी ध्यान ध्यास धरावे.

ही कपटी माया जन्मतः या देहीला जोडल्या गेली आहे. म्हणुनच ही देही मनी ईच्छा आशा मनशा कल्पना रंगवत कपट कल्पुन धोका देवुन काही ना काहीतरी मिळवण्यासाठी प्रयत्न करत राहतो. या मायेच्या अध्यानी ही अमृत वाणी घेत नाही कोणी । मायाशक्तीत पडत राहते देही नेहमी ।.

तिरलोक्यातील तिरगुणी अवतार यांच्याव्दारे तिघांचे राज्य वाढवण्यासाठी आपली मोहनमाळा तिन देवा सह त्यां तिरगुणी अवतारांच्या गळात घालुन, हे सर्व या मायेने आपल्या अध्यानी केले आहे. या मायेच्या अध्यानी राहुन तिनदेव व त्यांचे तिरलोक्यातील अवतार देवांगण यांचा विस्तार पावला आहे. या मायेमुळेच जीव मायेच्या अधीन होवुन भोग कल्पीतो.

परंतु *'कल्पना म्हणजे माया'* आणी *'ईच्छा म्हणजे शक्ती'* यांना त्या परंब्रम्ह निराकार निरंजनाचा स्पर्श नाही. म्हणुनच आता विनवा विनवा हो त्या निश्कलंकी निरंजन धनी परमात्म्याला की :

॥ तिरभवन घडलं तुम्हा हात । मोडा माया-शक्ति मारा लाथ ।
कर लवंडी-बवंडी दासी । घाल घरात, सुखी नांदव नरदेहीस ॥०१-०२-०५

धनी देवा ! पिंडी या ब्रम्हांडी चे तिरभवन तुम्हा हात घडल आहे. या तिरभवनात माया-शक्ती आपला धिंगाणा घालत आहे. तिचा त्रास तुमच्या भक्तजनांना होत आहे. म्हणुनच या माया-शक्ती चा नाच व्दारे झालेला धिंगाणा मोडा. त्याकरीता ईला लाथ मारा ! आणी या माया-शक्तीला सच्च्या भक्तजनांच्या देहीच्या बांडीची दासी म्हणजेच बनियनच्या आतल्या खिश्यात मावणारी लटकत लंगडत लंगडी चालणारी लवंडी-बवंडी माझी दासी करून घरात घाल. सुखी नांदव या नरदेहीस ! ०१-०२-०५. माझे अंतर तुमच्या ग्यान भक्तीच्या रंगात रंगवुन या कल्पना म्हणजेच माया च्या पालव्या तोडुन देहीत नांदा. ॥ देवा माझे अंतर रंगवा । यवगा यवगी संग वागवा ।
कल्पनेच्या तोडुन पालव्या देहीत नांद माहया ॥

गळा हात, घालुन भैसाला । आणावं/आणले इथं :-


०६ महामाया

अश्या रितीने माया ने महामाया देवतेचे रूप घेवुन त्यां तिघांना म्हणाली की : मी आता कवली पेठ/मोठी बाजारपेठ वसवुन मावची/लीलांची कलारीन होवुन महामाया चे रूप घेवुन बसली आहे. आता तुम्ही तिघे कसेही करून आणाभाका टाकुन, गळा हात घालुन चौथ्या भैसाला या महामायेच्या पेठेत घेवुन या !

तिघांना महामायादेवतेने सांगी केल्यानंतर ते तिघे भैसाकडे गेलेत. भैसाची मनधरणी करून गळा हात घालुन त्या भैसाला महामायेने वसवलेल्या पेठेत आणले.

पाजुनं कारण-महाकारण कार । कळपी केला धुंदं :-

मायादेवतेने मावची कलारीन होवुन रंचलेल्या पेठेत तिघांनी गळा हात घालुन भैसाला आणल्यानंतर त्या भैसाच्या पोटचे ग्यान काढण्यासाठी भैसास कारण महाकारण चे ग्यान मायादेवतेसह ते तिघे मधुपाना प्रमाणे पाजु लागलेत. ऐसे केल्याने तैसे होते. तैसे केल्याने हे असे होते. तैसे करण्याचे कारण हे आहे. त्या कारणासाठी हे कार्य करावे लागते. या कार्य-कारणाने ते कारण होते. त्या कारणाने हे महाकारण होते. ते कार्य-कारण आहे तुम्हा हाती. ते सर्व जगाच्या ग्यानाचे महाकारण होवु शकते. असे त्यां भैसाला कारण महाकारण सांगत सांगत त्या भैसाला कारण महाकारण च्या कार्य कारण-महाकारणं च्या कळपात धुंद केलेत. भैसाची देहमती उलाट केली.

उलाट होवुन, या भैसाला । अवघी होती/आहे शुध्दं :-

परंतु तिरगुणींनी एवढ सर्व उलट सुलट ग्यान सांगुनही त्या भैसाला अवघी सुद शुध्द होती. भैसाला सर्व काही कळत होते. माया सह हे तिघे कश्या करीता मज धुंद करत आहे ? याची सर्व जाण त्या भैसाला होती.

या महामायेच्या पेठेतच तिघांनी जेव्हा चौथ्याला आणले, तेव्हा तो चौथा भैसानं या पेठेत येताच 'जैसा देश वैसा वेष' घेतला खरा ! परंतु त्याला आपल्या स्वरूपाची शुध्द होती. म्हणुनच त्या पेठेत त्याच्या समोर मांडण्यात आलेल्या कारण-महाकारण ग्यान ची नशा उलटवुन पुर्णतः शुध्दित तो राहला.

'ज्याचा भाग देईन त्याला' या आपल्या मुळच्या वचना प्रमाणे कनवाळाने त्यांचे तिन भाग त्यांना देण्यासाठी तत्पर झाला.

॥ वेदा पाठी, वेद पढलें । सुने वेद तीनं ।
अथर्वन वेद, पोटी राहीला । पुढे यवगा कारणं ॥

पुर्णतः शुध्दित राहुन त्या चौथ्या भैसांने आपल्या मुळच्या वचनाप्रमाणे वागुन आपल्या पोटी जे तिघांचे तिन भाग होते, ते तिन भाग तिघांना देण्याकरीता त्यांच्या समोर तिन वेद पढले/वाचले. आणी ज्या वेदानं तो चौथा धनीदेव जागी होतो, तो आपला भाग असलेला चौथा अथर्वन् वेद हा पुढील येणा-या यवगाकारण आपल्या पोटीच ठेवला. अमृत संजीवनी असलेला तो चौथा भाग असलेला चतुर्पता अथर्वन् वेद काही तिघांच्या हाती दिला नाही. तिनदेवाने भैसामुखचे फक्त तिनवेद चे ग्यान-भोजन ग्रहन केलेत. तिन वेद प्राप्त झाल्याच्या आंनदाने मनात खुशाल झाले. परंतु ज्या चौथ्या वेदाने तो चौथा चतुर्पती धनीदेव जागा होतो, तो अमृत संजिवनी असलेला चौथा वेद चौथ्या पाशी आहे. असो..

अश्या प्रकारे ग्यान संप्पत्ती प्राप्त करून घेण्याकरीता, आपले स्वार्थ साधण्याकरीता....ईत्यादी काही ना काही घेवुन येण्या-जाण्याकरीता माया ही अनेक माव/लीला खेळ रंचत महामायाचे रूप घेते. आणी आमच्या हातच-पोटचं झुठं घेवुन जाते. ऐशी ही झुठी माया..

॥ झुठीं माया, झुठी काया । झुठे देव तिन ।
भैसा मुखचं झुठं घेतलं । झाले बेईमान ॥ ०६/०२
॥ उष्टेच उष्टे अवघेच उष्टे । कौतुक पहा या देवाचे ॥ ०६/१३
॥ जो नाही होणार बेईमान । त्याला हा चौथादेव नामी सांभाळन ।
जो होईन बेईमान । त्याची, तो चौथा पुस घेईन ॥ ०२/३७
॥ फितुर बम्हया । अवघे शरण । म्हणे तिर्थ तुया पायी ।
पाय धुवुन जग पितीन । तरी त्यात अमृत नाही ॥ ०६/०२
॥ चतुर्पता वेदांत गाय । हे माझ तिर्थ ।
ईची अमृत संजीवनी आहे । या चौथ्याच्या पोटात ॥

ही महामाया या देहीला जन्मतः जोडल्या गेली आहे. म्हणुनच ही देही कोणत्याही प्रकारची संप्पत्ती उदा. धनसंप्पत्ती ज्ञानसंप्पत्ती....ईत्यादी प्राप्त करण्यासाठी घेण्या-देण्यासाठी अनेक लहान-मोठया खेळांचा बाजार रंचत-मांडत-मोडत धडपडत राहते. अंती ही महामाया संग जीव घेवुन हातच-पोटचं झुंठ घेवुन जाते. ऐसे धडपड करत भैसा मुखचे झुटं/उष्टे तिन वेद तिघांने घेवुन मनात खुशाल झाल आहेत.

॥ वेद घेवुन तीन देवं । खुशालं मनाशी ।
ज्या वेदानं, व्हावं जागी तो, नाही तिघा पाशी ।
चौथावेद/अमृत संजीवनी आहे । भैसा पोटाशी ॥

ज्याचा भाग त्याला दिल्यावरच काहीतरी कनवा धन्याला येतो. या कारणास्तव त्या भैसाने पुर्ण शुध्द सुद ठेवुन तिन वेद त्यां तिघांच्या समोर पढलेत/वाचन केले. आणी चौथा चतुर्पता अथर्वन् वेद पुढे येणा-या यवगाकारण आपल्या पोटीच ठेवला.

भैसाच्या मुखचे तिन वेद तिघांने मनलावुन भक्तीभावाने श्रवण करून पुर्णतः आत्मसाद केल्यानंतर ते तिन वेद त्या तिघांच्या पोटी आले. तिन वेद तिंघांजवळ आल्यानंतर ते तिघे आपल्या मनाशी खुशाल आनंदी झालेत.

तिनवेद हाती आल्याची खुशी होवुन त्या आनंदाच्या भरात ते तिन हे विसरून गेलेत की : ज्या वेदानं तो धनी जागी होतो, तो चौथा चतुर्पता अथर्वन् वेद त्या तिघांपाशी नसुन तो चौथा वेद तर पुढेच यवगाकारण भैसानं आपल्यापुढं नं पढता/वाचता आपल्याच पोटी ठेवला आहे. ही चौथी अमृत संजीवनी तर भैसा पोटी पुढेच यवगा कारण आहे.

मायादेवते सह तिघांन तिन वेद हे कपटी कल्पनेची माव-लिला रंचुन नित्कृष्ट दर्जा च मायेचा बाजार मांडुन कपटाने घेतलेत. म्हणुनच *'जैसे कर्म तैसे फळ'* या न्यायाने त्यां माया सह तिघांचा हीशोब कजब्या मध्ये त्यांना हीन नित्कृष्ट दर्जाचे स्थान देवुन केला आहे.

॥ कजब्या मध्ये, हिशोब केलां । याहीला केले हिनं ।
स्वर्ग-पाताळ, पेठा नांदते । अमृता गुणं ॥

कजबा/देही मध्ये या तिघाचा हिशोब भैसानं केला तो असा : ब्रम्हाला पाताळी बेंबीखाली स्वाधीष्ठान चक्रावर जागा दिली. तर विष्णुला बेंबीस्थानी रविचक्रावर जागा दिली. आणी शंकराला हद्यावर अनाहत् चक्रावर जागा देवुन या तिघांच्या वर कंठस्थानी आपण चौथा जीवदेवता बनुन वसला आहे.

आणी उर्ध्व स्वर्गि त्रिकुटी तिन जागा या तिघांना देवुन, या त्रिकुटा वर चौथ्या ताळी तो धनी वसला आहे. अश्या रितीने पिंडीत हा चौथा जिवदेवता आत्माराम धनी बनुन सर्वांना नांदवत सर्वांना आपल्या अख्त्यारी घेत आहे. या तिघांचे स्थान या कजब्यामध्ये त्या चौथ्या पेक्षा नित्कृष्ट हिन दर्जाचे आहे. म्हणुनच तिन देवांच्या तिन गुणांना पायदळी तुडवल्याशिवाय चौथा शुध्द सत्व प्राप्त होत नाही आहे. आणी चौथ्या शुध्द सत्व अवस्थेत गेल्याशिवाय तिरगुणांच्या पलीकडे उभा असलेला धनी काही प्राप्त होत नाही आहे. कजब्या मध्ये कसे हे तिघे हिन आहेत ? याबद्यलचे अधिक ग्यान कायाग्यान खंड०३/०१च्या मुळस्तंभिचा पाया व देहवर्णणाची ओवी ०३/०२ यातुन घ्यावे

॥ स्वर्गी अमृत पाताळी अमृत, नाम नाही धन्या ।
नाम नाही रे धन्या । दोन्ही, पेठां पडल्या सुन्या ॥
॥ स्वर्गी अमृत पाताळी अमृत, मिर्त लोकी नाम ।
तुमच्या नामा वाचुन अवघ, दिसते हिनं ॥

पिंडी या ब्रम्हांडी च्या स्वर्गि अमृत आहे. पाताळी अमृत आहे. परंतु या दोनही ताळच्या लोकांच्या हाती धन्याचे चतुर्पता नाम नाही. धन्याचे नाम तर मिर्तलोकी आहे. या स्वर्ग-पाताळ दोनही ताळात धन्याचे नाम नसल्यामुळे, ते एकमेकांची स्तुती करण्यातच धन्य मानु लागले आहेत. या दोनही ताळी धन्याचे नाम नसल्यामुळे या दोनही पेठा सुन्या आहे. धन्याच्या नामाविना या दोनही पेठा हिन आहे. त्याच मुळे यवगानं यवगा भ्रांत पडुन अवघ हिन झालेले आहे.

॥ यवगा परी, भ्रांत सारी । आज होतो नेणंता ।
वजाबाकी, भरून झाली, यवगाची कथा ॥

**-: शब्दार्थ :-**

**नेनंता**= *एखादे काम करण्याचे कोरडे ज्ञान आहे परंतु अनुभव नाही, असे काम स्वेच्छेने केले आणी त्यात काही चुका झाल्या तर त्या चुकांना अनुभवीजन त्याला 'नेनंता' आहे असे समजुन माफ करतातं.*

***उदाहरणार्थ*** *:- एखादा लहान बाळ काम आपले वडील काम कसे करतात हे बघत बघत तोही ते काम करण्यास उत्सुक होवुन त्या कामाचा प्रत्यक्ष अनुभव नसतांनाही ते काम हाती घेवुन करू लागतो. आणी या कामात काही चुका झाल्यास वडील त्याच्यावर न रागवता तो नेणंता आहे असे समजुन ते काम त्याला व्यवस्थीत*

*समजवुन सांगत त्या कामात निष्णांत करतो. ।* **नेनंती** *:- असे अनेक कोरडे ज्ञानी जे आपल्या या ज्ञानाच्या भरवश्यावर अनुभव घेण्यास उत्सुक आहे । धडपडत आहे.*

या तिरगुणी माया महामायेने वसलेल्या तिन पंठे व्दारेच यवगान यवगापरी भ्रांत पडली आहे. या पेठेत नेणंता होवुन आदीपुरूष भैसाचा पुर्णअवतार कृष्णा त्याच्या पोटच्या **चतुर्पता अथर्वन् वेद** व्दारे चतुर्पतीचे काम पुढेचं येणा-या यवगाकारण यवगान यवगात करत करत आला आहे. आणी या कलीच्या संधीत तेरव्या सिध्दित उभा राहुन या समर्थाने तिरगुणींचा हिशोब घेण्याची तयारी सुरू केलेली आहे.

॥ अन्न-पाण्याचे, आहार त्याहीचे । जातीनं सकस ।
साहंकारी पोहन अधारी । तो नादंन इथं ॥
॥ चतुर्पता गिण्यानं देवाचं । चालन परं्माणं/प्रमाणं चालनं ।
मिर्त लोकी, तिर गुणांचं । उडवणं ठिकाणं ॥ प्रमाणं :- गाही, साक्ष
॥ चतुर्पता, अथर्वन वेद । उभा राहीन पोटी ।
निजरूप भुम्मा, जागी करनं । सारी शिरष्टी/सृष्टी ॥

आता या कृष्णाच्या यवगाच्या कामाव्दारे कलयवगात नित सत्यवग आणत पुढे सत्यवग होणार आहे. या तिरगुणी मायेच्या हिशोबाची वजाबाकी भरून झाल्यावर, या तिरगुणांच्या तिन यवगाची कथा संपुण चौथ्या चतुर्पती चे सतयवग् येणार आहे. कृष्णामुखच्या भैसाच्या पोटच्या चतुर्पता अथर्वन् वेदाच्या सांगी प्रमाणे सर्व काही होणार आहे. ज्यांनी अन्न पाणी चे आहार ओपार पुंजनमान दर्शन घेवुन देहा नाशवल्या आहेत, मुळ यवगं नाशवले आहेत. त्यांचा यवगापरीचा हिशोब भरून घेत, या तिरगुणी नाशीवंतांचे दर्शन मानसन्मान सह घेत असलेले त्याहीचे सर्व अन्न पाण्याचे आहार ओपार दर्शनमान पुंजनमान हे सर्वच/सकस उडुन जातीन. ऐसे या मिर्तलोकचे तिरगुणांचे सर्व ठाव-ठिकाणे ठाणे तो उडवुण टाकणार आहे. चतुर्पता अथर्वन् वेद सर्वजनास प्राप्त करून देणार आहे. हा चतुर्पता अथर्वन् वेद पुढे सर्वाच्या पोटा उभा राहुन, या चतुर्पतीचे गिण्यानं प्रमाणं/गाही देत या देहीची निजरूपी भुम्मा जागृत करत करत सारी सृष्टी जागृत करणार आहे. ऐसी या कृष्णरायाची सांगी आहे.

**भजने :-**

॥ माया चैतन्या माय तिघांची । गुणावंती/रूपावंती चतुर्पता गाय माझी ॥
॥ हे होय गाय गाय । गाय सर्वत्राची माय । चातुरा भला भेद पाहयं ॥
॥ हे होय गाय गाय । गाय चौवेदाची माय । चातुरा भला भेद पाहयं ॥
॥ हे होय गाय गाय । गाय माझी माय । चातुरा ईला तु पाहयं ॥
॥ हे होय गाय गाय । गाय तिरभवनी राहयं । चातुरा ईला तु पाहयं ॥
॥ हे होय गाय गाय । गाय सर्वत्र राहयें । चातुरा भला शोध तु पाहयं ॥

**गजर** :- ॥ चतुर्पता गाय जागृत, अहीनाच्या ईथ । चातुरा घरी आली...
पाजे अमृताचा पान्हा । धन्य माउली ॥





**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०१/०२ ॥

## ॥ अस्तुरी-शक्तीची ओवी नं. ०४ ॥

ओवी महात्मः- स्थापनेच्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी.....

॥ मुळावरची ओवी ॥

# ॥ रूत या गमन ॥

॥ रूत या गमन । करते दोघे जन ।
बंधना वाचुन । साचा होईना ॥
॥ देवकी अरजन । 'शक्ती या चैतन्यं ।
मायेचं पुंजन । देव घेईना ॥
॥ माया निवृत्ती बंधन । देवाशी मागे देणं ।
दिला चौथा दिन । निवृत्तीला ॥
॥ बिज आवाजी-नजरी । उरस्थळी-कमरी ।
ऐसे बीज झाले चारी । सत्य जाणा ॥

॥ बिज आवाजी कर्म-भोग । देईन नराशी ।
अस्तुरी देईन त्याशी । निवडुनी ॥
॥ करूनी निवडं । अस्तुरी वाटतीन दान ।
तिथे चारही बिज । मुळस्तंभी जाणं ॥
॥ मुळ स्तंभाचे बिज । ऐस आणन धनी ।
जागी करन सृष्टी । अवघे जाणा ॥

भजने :- ॥ सत् यवगाचे चारही बिज । ऐस आणन हो धनी देव ॥
॥ बिज आवाजी येईन शकुन । मायेचा वेल विस्तार वाढंन/चालनं ॥
॥ अर्थव वेदाची गाही । जागी करन देवराया सृष्टी ॥
॥ मुळस्तंभाचा देव, चवथ्या खुम्मी आला ।
ज्याला अवघ, मालुम तो देव । उभा राहीला ॥
॥ मुळस्तंभाचा देव, धनी उभा भैस ।
या यवगाचे कारण आहे । याहीच्या हात ॥

### -: शब्दार्थ :-

**रूत** :- विर्य, बिज । **गमन** :- ईकडुन तिकडे जाणे । **देवकी** :- ज्या ठिकाणी नित देवपुजा केल्या जातात, त्या ठिकाण/घरचे भक्तजन । **अरजन** :- विनवनी अर्ज करन. **निवृत्ती बंधन** :- मायेच्या विटाळाला निवृत्त करण्याचे बंधन देवानं चौथ्या दिवशी दिले. । **देणं** :- वर मागणे, वर देणें । **उर** :- छाती, वक्षस्थळाचा भाग । **अस्तुरी** :- स्त्री । **कर्मभोग** :- कर्माव्दारे मिळालेला भोग, जैसा कर्म वैसा फळ.

**बिज आवाजी नजरी उरस्थळी कमरी** :- चार प्रकाराने बिज देण्याचे प्रकार आधीच्या यवगी होते. ते असे :

१. **आवाजी बिज** :- आवाजा व्दारे बिज देणे.
   - मुळयवगी शक्तीच्या ओवी ०१/०२/०१ मध्ये शक्तीला आवाजा व्दारे तिच्या कर्ता-याकडुन आवाजी बिज मिळाले.
   - व्दापरच्या कुंतीला आवाजी बिजाच्या वराव्दारे तिने ईच्छीलेले देव उभे राहुन, त्या देवांनी तिला आवाजी बिज दिलेत. कुंतिला आवाजी बिजा व्दारे कर्ण व पंचपांडव हे पुत्र झालेत.

**०२. नजरी बिज** :- नजराला नजर भिडवुन नेत्रा व्दारे बिज देणे.

॥ दृष्टी देखता स्वभ्रताराची । गर्भ राहे स्त्रियांशी । त्रैतायवगी ॥

मुळस्तंभ अं.-१७.१७

- त्रैतायवगी स्वताच्या भ्रताराची दृष्टी देखताच स्त्रियांशी गर्भ राहत असे.
- ईछुक स्त्री-पुरूषाच्या दृष्टा-दृष्टातुन बिज राहण्याचे प्रकार या त्रैतायवगी घडत होते.
- अनावधानाने लक्ष्मीच्या नेत्रांतुन बिजयुक्त अ्श्रुबिंदु पडुन शंखासुर उत्पन्न झाला. आणी त्याने ब्रम्हदेवाचे वेद चोरले हे कथानक घडुन झाले.
- मोर आपल्या नेत्रबिंदु व्दारे लांडोरी ला बिज देतो असे मानल्या जाते.

**०३. उरस्थळी बिज** :- उरस्थळाला उर/छाती घासुन अथवा स्पर्शुन बिज देणे.

- अंजलीच्या उरस्थळाला पवन झोंबुन पवनसुत झाला. पवनाने अंजलीला दिलेले ते उरस्थळी बिज होय.
- सागरातील स्ट्रीप जातीचा नरमासा आपले उर म्हणजे बाहया व्दारे मादी च्या बाहया ला स्पर्श करून म्हणजेच मादीच्या उराला आपला उर घासुन मादीच्या उरस्थळी बिज देतो.
- खटमल आपल्या मादीच्या उरावर आपले उर घासुन मादीला उरस्थळी बिज देतो असे मानल्या जाते.

**०४. कमरी बिज** :- कमरेखालील पाताळी लिंगाव्दारे कमरेखालील पाताळी योनीत बिज सोडण्याची पध्दत.

- मानवासह ईतर सर्व अंडज व जाडज जातीच्या प्राण्यांमध्ये आढळुन येते.

ऐसे आधी बिज हे चारही झाले. हे तुम्ही सत्य जाणा ना ! असेच बिज आवाजी कर्म भोग येईन. अस्तुरी निवडुन देईन नराशी । करूनी निवड अस्तुरी वाटतीन दान.. हो पुढं येणा-या भैसाच्या यवगात । मुळस्तंभाचे ऐसे हे बिज आणन तो आदीपुरूष भैस धनी । आणी जागी करन सर्व सृष्टी अवघे जाणा ना तुम्ही । अथर्वन् वेदाची गाही । जागी करन महाराजा सृष्टी ।



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०१ ॥

॥ शक्तीची ओवी नं. ०५ ॥

ओवी महात्मः- गर्वाने माजलेल्यां अहंकारी तिरगुणी शक्ती समोर, हमखास म्हणण्यात येणारी.....

॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

## ॥ मुळयवगाची गाही ॥

॥ मुळ यवगाची गाही । नउ महीने.....
त्वां घडवली नर देही ॥ घृ ॥
॥ नवा दिवसाच, नवं करा । नवल वाटे, या जगाला ।
तोडा त्रीगुणी/त्रिकुटी बंधन । मोडा या, शक्तीचा पसारा ॥
॥ शक्ती पिंड, घडव न्यारा । या शक्तीच, राज्य मोडा ।
शक्ती गर्वाने मातली । ऐक देवा....
तिरभवनी जागा नाही दयावा ॥
॥ तिरभवन घडले, तुमच्या हात । मोडा शक्तीला, मारा लाथ ।
कर बांडीची लवंडी दासी । घाल घरात....
सुखी नांदव नरदेहीत ॥

किंवा म्हणनी नं.०२: शक्ती लवंडी-बवंडी होवुन बांडीची जात । घाल घरात सुखी नांदव नरदेहीत ॥

डहाकी :-
॥ चला जाउ-पाहु, शक्तीच जाळमुळ । शक्ती निघते, भलत्याचं घर
शक्ती काय निघते, भलत्याचं घर । शक्ती बाजारी....
इन भरवला बाजार, या भुम्मेवर ॥

**भजने :-**
॥ तिर गुणाच्या बाजाराची पर । झाली आजवर ।
याहीच शुन्य उडवन राहणार नाही जराभर ॥
॥ 'शुन्याची होईन रात्रं । निजरा जन ।
या मध्ये उभा राहीन । हा निरंजन ॥
॥ थकलं माया चैत्यन्या । या तिनही तिरलोक्याचे थकतीन गुणं ॥

**-: शब्दार्थ :-**

**नवल** :- आश्चर्य, विस्मय, अचंबा । **न्यारा** :- जगावेगळा, असामान्य
**मातली** :- अहंकाराचा माज येवुन माजलेली । **त्वां** :- तुवा, तुम्ही
**बांडी** :- बनीयन, शर्ट च्या आतमध्ये घालण्याकरीता, पातळ सुती कापडाने शिवलेली, खिसा असलेले पुरूषाचे अंर्तवस्त्र म्हणजेच आजची बनीयन
**लवंडी-बवंडी** :- लगंडी, लुळी-पाळी, निस्तेज काहीही न करता पडुन राहणारी..



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

निरसन पुढील पानावर...

## ॥ निरसनसह मुळयवगाची गाही ॥

-: निरसन/स्पष्टीकरन :-

आदीमायाशक्तीने इथे तिच्या रूपा-रूपाचा बाजार मांडला आहे. या तिरगुणी बाजारात ती सर्वप्रथम सात्वीक-शक्ती, राजस-शक्ती व तामस-शक्ती या तिन रूपात तीनगुणांना ला संग घेवुन अवतरली आहे. आणी या तिनाचे आकारी-निराकारी अनेक रूपे घेत, तिने तीच्या रूपारूपाचा बाजार मांडला आहे. उदाहरणार्थ :- धन-शक्ती, राज-शक्ती, व्दैत-शक्ती, स्त्रि-शक्ती, तामसी-शक्ती, तांत्रिक-शक्ती....ईत्यादी.

सगुण आकारात ही शक्ती देहीतील सत्वगुणाचा अंह घेवुन सात्वीकतेचा आव आणत सात्विक शक्ती बनुन नरदेहीला नाचवत आहे. तर रजगुणाला घेवुन राजशी शक्ती बनुन राजशीपणाचा आव आणते. आणी या नरदेहीला आपली राजशी सत्ता चालवण्यासाठी काहीही करण्यासाठी नाचवत आहे. तमगुणांना संग घेवुन तामशी शक्ती बनुन, नरदेहीस वाईट वर्तवणुकी व कर्मे यांच्या व्दारे नाचवत आहे.

नरदेहीतील तिन गुणांना संग घेवुन, तिने या नरदेहीला नाचवण्यासाठी पण केला आहे. मायाशक्तीच्या बाजारासह तिरगुणांनी केलेल्या या पण/नेम मुळे काही काही नरदेही गर्वात येवुन माजलेले आहे. या शक्ती व्दारे गर्वात येवुन अहंकाराने माजलेल्या नरदेही चा प्रत्यक्ष्य या अप्रत्यक्ष्य पणे भक्तजन लोकास त्रास होतो. त्या भक्तजन लोकांस त्रास देत राहतात.

अश्या गर्वाने माजलेल्या शक्तीचे त्या नरदेहीतील तिरलोक्या मधले राज्य मोडण्यासाठी तसेच या शक्तीला या नरदेहीत असे राज्य स्थापना करू देण्यास रोकण्यासाठी, पुढे राज्य करू न देण्यासाठी.....ईत्यादी कारणास्तव या शक्तीसह सर्वाचा धनी असलेल्या चतुर्पती आदीपुरूषाला या ओवी व्दारे विनवणी केलेली आहे. ती अशी :

हे आदीपुरूषा ! *'मो-ह सृष्टी रंचावी'* या तुमच्याच ईच्छेमुळे शक्ती झाली. सर्वकाही रंचना झाली. या रंचनेत तु मानव देहीची रंचना केली. नव महीने मायेच्या उदरी घालुन त्वा साहय करत नरदेही घडवली आहे. नव महीने नव दिवसानं ही तुमची नव नव रंचना या जगात येताच नवल वाटे ! तु कशी या देहीची रंचना केली ? याचे नवल वाटे या जगाला !

देहीच्या रंचना कालावधीत हा आत्मा मायेच्या गुणांच्या बंधनात पडुन मायेचे तिन गुणांनी बांधला गेला. चार न चार घडी ऐश्या चार देहीच्या कोट त्याच्यावर पडला. मायाशक्तीच्या पसा-यात हा जीवात्मा अडकला. मायेच्या तिरगुणी बंधनामुळे जीव हा भुलला भांबावला आहे.

हे आदीपुरूषा ! आता विनवनी अर्ज करतो की : तोडा तोडा हे तिरगुणांचे तिरकुटी बंधन ! त्रिकुटाच्या तिरगुणी बंधनाव्दारे हा आत्मा या देहीचा धनी असुन तो या शक्तीनं लोपुन चोर ठरला आहे. शक्तीच्या बेंडयात अडकला आहे. म्हणुनच गर्वाने मातलेल्या शक्तीचा या नरदेहीतील पसारा मोडा. आणी या आत्मपुरूषाला या शक्ती ने मांडलेल्या नरदेहीतील पसा-यातुन वर काढत प्रकाशमान करा. हीच विनंती.

येथे ही देही म्हणजे शक्ती आणी तिचा धनी म्हणजे हा आत्मपुरूष ! या आत्मारामाला या देहीचा/शक्तीचा सरदार/राजा बनवुन, या शक्तीचा देहपिंड

घडव न्यारा न्यारा ! या देहपिंडात तु ज्या ज्या शक्ती वसवलेल्या आहेत, त्या त्या शक्तीयॉला निश्कलंकी ज्योता चढवुन जगावेगळा असामान्य शक्तीने युक्त देहपिंड करून, देहीचा धनी आत्माराम ला प्रकाशीत करा. त्याचकरीता या देहपिंडात असलेले तिरगुणी शक्तीचे राज्य मोडा. कारण की : ही शक्ती गर्वानं माजुन या देहपिंडाला वारंवार नाचवु लागली आहे. ती अशी :

- कधी ही शक्ती आपल्या रज-तम गुणांचा पाडाव करून सत् गुणांच्या वर्चस्व वाढवुन मी मोठा सत्वगुणी ! मी मोठा ज्ञानी ! असा अहंकार आणुन या देहीला नाचवत आहे.
- तर कधी सत्व-तम चा पाडाव करून रज गुणांचे वर्चस्व या देहीवर आणुन मी सत्ताधारी ! मी सांगतो तेच करा ! असा राजाप्रमाणे अंहकार आणुन या देहीला नाचवत आहे.
- तर कधी सत्व-रज या गुणांचा पाडाव करून तम गुणांचे वर्चस्व या देहीवर आणुन तामसी प्रवृत्ती जागृत करून या देहीला नाचवत आहे.

म्हणुनच आमची विनंती अर्ज ऐक धनीदेवा ! आजवर या तिरगुणांच्या बाजारांची पर झाली. आतातरी या तिरगूणी शक्तीला या देहीच्या तिरभवनात असा नाच करण्यास, धिंगाना घालण्यास जागा नाही दयावी. ही विनंती अर्ज.

हे आदीपुरूषा ! ब्रम्हाडी या पिंडीचे तिरभवन हे तुमच्या हातानं घडलं आहे. तिरभवनाचा मालक तु आहेस. अठरा खुम्मावर उंच घर तुमचे आहे. तुमच्या मुळावरच्या रंग घेवुन ही शक्ती तुमच्या ईच्छेपासुन उत्पन्न झाली आहे. तरी ही शक्ती या देहीच्या तिरभवनात धिंगाणा घालत आहे ? तुम्ही नव महीने घडवलेल्या या देहीला नाचवत आहे ?

आदीपुरूष देवा ! ज्यानां तुमची लाथ लागते, तो देह पवित्र होत आहे. तुमच्या चरणस्पर्शासाठी सत् देही धडपडत आहे. म्हणुनच तुम्हा विनवित विनवत पुनःपुनः निरंतर अर्ज करतो की : या गर्वाने मातुन धिंगाणा घालणा-या कलंकीत शक्तीला तुमची लाथ मारून, शक्तीचे अहंकार झाडुन तिचे परीवर्तन करावे. तिला निश्कलंकी ज्योता चढवुन पवित्र करावे. ज्याप्रमाणे बनीयन/बांडीच्या आतल्या खिश्यात जसे अत्यंत महत्वाचे कामाच्या वस्तु पडुन राहतात, त्याच प्रमाणे या शक्तीला लगंडी, लुळी-पाळी, निस्तेज काहीही न करता पडुन राहणारी अशी या चौ-देहरूपी कोटाच्या अंर्तभागाच्या बांडीची लंगडी दासी बनवुन ठेवा. नरदेहीच्या मुळावरच्या शक्तीला निश्कलंकी ज्योता चढवुन मुळावरच्या मुलाधार घरी तसेच तिच्या स्वर्गिच्या त्रिकुटी अग्न घरी तिला ठेवावी. जेणेकरून जेव्हा अत्यंत आवश्यकता असेल, तेव्हाच तिचा उपयोग आम्हा घेता येईन. अशी व्यवस्था करून या निश्कलंकी शक्तीला देहघरात घालुन सुखानं नांदंव या नरदेहीत ! सुखी नांदव या नरदेहीस !

हे मुळावरची शक्ती ! ज्या घरी तु उत्पन्न झाली, त्या तुया माहेर घरचे आदीपुरूषाचे भक्त तुला विनवित आहेत की : तु आम्हावर निश्कलंकी माया-ममता प्रिति करणारी आमची निश्कलंकी सव बनुन, या चौ-देहरूपी कोटाच्या बांडीची लवंडी दासी व्हावे. या देहघरी आपल्या मुलाधार व अग्नघरी शांततेने पडुन राहात या नरदेहीस सुखी नांदवावे. वेळ पडल्यास आवाज दिल्यानंतर तातडीने उठुन उभी होवुन आम्हास साहय करावे. रक्षण करावे. असेच सदोनित आमचे रक्षण व साहय करावे. आमचा संग करत या नरदेहीस सुखी नांदवावे. हीच तुया चरणी तुया धन्याच्या भक्तांची निरंतर अखंड अर्ज !

**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०१/०२ ॥
॥ प्रपंचमाया-शक्तीची ओवी नं. ०६ ॥
॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

## ॥ कात ग राणे कात ग ॥

॥ कात ग राणे, कात ग । अवघ आटलं यात ग ।
चारही प्रहर, कातता मेली । नाही लागला हात ग ॥ ०१ ॥

॥ स्वर्ग पाताळ, थेट ग । यामध्ये, कापुस ओट ग ।
चारही प्रहर, ओटता मेली । नाही लागलं बोट ग ॥

॥ सगुण निगुण, पेळु ग । सुंदर काते साळु ग ।
चारही प्रहर, कातता मेली । नाही निघाली तात् ग ॥

॥ बाजारी न जाउ, हाटा ना जाउ । बसल्या मोल घेवु ग ।
आले देवाचे द्युत । तान्हा, नेला हातच्या, हात ग ॥ ०४ ॥

॥ तान्हा आला, निघुन गेला । उभा राहीला, भैस ग ।
आले देवाच्या मना । तान्हा, दिला हातच्या हात ग ॥ ०५ ॥

**भजने :-**
॥ नामी राहाव । देवाच्या...देव चुकवन मरण । नामी रहावं.. ॥
॥ नामी राहयं भजनी राहयं । चुकन चौ-यांशी, धन्याची सांगी आहयं ॥

**-: शब्दार्थ :-**

**राणे**:- पंचतत्वाचा प्रपंच मांडलेल्या, या देहीला राणी म्हणुन दिलेले संबोधन, एकेरी नाम देह राणे, तिरगुणी प्रपंचमायेने मांडलेल्या तिरगुणी प्रपंचाचा संग करत बसलेल्य देहीला दिलेले नाव. काही म्हणणीत हीलाच रांडे म्हणुन संबोधीले आहे. ।
**कात**:- कातने, टकळीव्दारे सुत कातण्याची किया.
**आट**:- आटने, दिव्याच्या वातीला पिळ-आट देत जसे ओटल्या जाते, त्या कियेला आट देणे असे म्हणतात. ।
**प्रहर**:- समय मोजण्याची पुरातन पध्दत. आजचा अडीच तास म्हणजे एक प्रहर. ।
**पेळु**:- कापुस ओटण्यासाठी खास तयार केलेल्या, पिंजलेल्या कापसाचा पिळलेला पेळु ।
**थेट** :- कापुस ओटण्याच्या हस्तचलीत यंत्राचा मधला दंडुका, ज्याला अर्धगोलाकार छीद्रे राहुन, त्यात कापसाचा पेळु अडकवुन, हळुहळु ओढत सुत काढल्या जाते. ।
**हाट** :- मोठी बाजारपेठ, । **मोल** :- किंमत, मुल्य, भाव
**साळु** :- जिभ । **तात्**:- सत् सार, । **तान्हा**:- जीवात्मा, जीव



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

निरसन पुढील पानावर....

॥ खंड ०१ ॥
॥ तिरगुणी प्रपंचमाया-शक्तीची ओवी नं. ०६ ॥
॥ मुळावरची ओवी ॥

# ॥ कात ग राणे कात ग ॥

**-: निरसन/स्पष्टीकरन :-**

॥ कात ग राणे, कात ग । अवघ आटलं यात ग ।
चारही प्रहर, कातता मेली । नाही लागला हात ग ॥

हे देह राणे ! तु पंचतत्वांचा प्रपंच माडुंन आत्मपुरूषा संग राहत आहे. आणी तिरगुणी प्रप्रच माया चा संग करून तिरगुणी प्रपंच कातत बसली आहे. आपल्या आत्माराम आत्मपुरूष धन्याचे ग्यान घेतले नाही. आपल्या धन्याचे ग्यान घेवुन आत्मग्यानी न बनता, या तिरगुणी प्रपंच मायेच्या भ्रांतीत भुलुन तिचा तिरगुणी प्रपंच कातत कातत ही अवघी तुझी देह-धरणी आटवत आहे.

हे देहराणे ! तुला हे माहीत नाही की : अश्या तुझे सारख्या तिरगुणी प्रंपंच मायेत भुलुन गेलेल्या देही या चारही प्रहर प्रपंच कातत कातत मेल्या आहेत, तरी त्या देहींचा हात तिच्या आत्मपुरूष धन्या पर्यत लागला नाही. तुझे सारख्या अश्या देही आत्मग्यानी नसल्यामुळे त्यांनी आपला हात स्वतःहुन आपल्या आत्माराम आत्मपुरूष धन्याकडे दिलेला नाही. या आत्माराम आत्मपुरूषाच्या हाताशी हात लावुन गोतं स्थापलं नाही आहे. या आत्मपुरूषाच्या हातात हात न देता त्याच्याशी स्वयंवर न करता, त्याच्या नावाचा टीका न लावता कुवां-या राहत आहेत. यवगान यवगात जन्म घेत अश्याच आत्मपुरूष धन्या संग राणे सारखे न राहता कुवा-यां राहुन तिरगुणी मायेचा प्रपंच जवळ करत आत्मारामा संग रांडे सारख्या राहत आल्या आहेत. आता या जन्मी तरी तिरगुणी मायेने मांडलेल्या तिरगुणी प्रपंचात भुलुन असे रांडे सारखे राहणे तुला शोभते काय ? आता हे वागन बरं नोव्हे बा देह राणे !

॥ स्वर्ग पाताळ, थेट ग । यामध्ये, कापुस ओट ग ।
चारही प्रहर, ओटता मेली । नाही लागलं बोट ग ॥

हे देह राणे । तुझे स्वर्ग म्हणजे हे तुझे मस्तक. आणी पाताळ म्हणजे हे तुया कमरे खालील भाग ! या स्वर्ग व पाताळी यामध्ये मिर्तिलोक तुझे घड आहे. तु तुझे मिर्तलोकी तुझे हदयी अंतःकरणात उभा असलेल्या तुया निरंजन धन्याचे नाम सुध्दा तु काढत नाही. आपल्या निरंजन धन्याचे नाम सुध्दा तु मिर्तलोकी घेत नाही.

तु फक्त तिरगुणी प्रपंचमायेच्या भ्रांतीत पडुन, निती या अनिती च्या मार्गाने आपले मस्तक चालवत या तिरगुणी प्रपंच मायेलाच कुरवाळत आहे. संसार सार तुया हाती ! धनी देवाशी काय काम ? असे अहंकाराने म्हणत या प्रपंचमायेने मांडलेल्या तिरगुणी प्रपंचा करीता, जे लागते ते साध्य करण्यासाठी आटत आहे. कधी या पाताळी लिगंपिसाट बनुन लिंगतृप्तीकारक कर्मे करत आहेत. असेच तृप्तीकारक आसक्तीयुक्त कर्मे करत राहत मिर्तलोकी उभ्या असलेल्या आपल्या निरंजन धन्यालाच विसरली. आपल्या निरंजन चतुर्पती अवतार धन्याला बेईमान होउन त्यांचे साधे नाव सुध्दा घेत नाही. आपल्या निरंजन धन्याला विसरून पिंडीच्या स्वर्ग व पाताळाला थेट बनवुन, एकात एक पिंजलेल्या कापसाचा चौदेहीचा पेळु या तिरगुणी प्रपंचमाये करीता ओटत बसली आहे. तिरगुणी प्रपंच मायेच्या भ्रांतीच्या भुलवनीत येवुन, आपल्या निरंजन धनी अवतार आत्म्याला विसरून हा पेळु तु ओटत ओटत कातत आहे ग !

हे देहराणे ! तु आपल्या धन्याला विसरून तुयावर तिरगुणी मायेने पाडलेल्या भुलवनीत पडुन तिरगुणी मायेने मांडलेल्या तिरगुणी प्रपंच करत तु आपला देहीचा कापुस ओटत आहे. हे देहराणे ! तु आपल्या चतुर्पती आदीपुरूष निरंजन धनी अवतार च्या नामाचा टिळा न लावता, त्या आत्मारामाशी लग्न न करता त्याच्या संग रांड बनुन राहत तिरगुणी प्रपंचमाये साठी तिरगुण व त्यांचे राजे यांचा महिमा वाढवण्यासाठी, तु देहरूपी पेळुचा चांगला कापुस ओटत आहे ग ! यापेक्षा आता काय म्हणाव तुला ? तु अन्जान असल्यामुळे तुला हे माहीत नाही की :

तुया सारख्या अश्या आपल्या निरंजन धन्याला विसरून त्या धन्याच्या नामाचा टिळा न लावता त्या धन्याला बेईमान झालेल्या देही या चारही प्रहर तिरगुणी प्रपंचमायेच्या तिरगुणी महती करीता या देहरूपी पेळुचा कापुस ओटत ओटत मेल्या आहेत. आपला देहीचा निरंजन धनी अवतार आपल्या जवळी देहीत उभा असतांना सुध्दा त्याचे ग्यान घेतले नाही. आत्मज्ञानी झाली नाही. आत्मज्ञानी होवुन आपल्या निरंजन धन्याच्या बोटाला साधा स्पर्श करण्याचाही या देहीने प्रयत्न केला नाही. आपल्या निरंजन धनी अवतार ला साधे बोट सुध्दा या देहीचे लागले नाही. आपल्या निरंजन धन्याच्या साध्या बोटाचा स्पर्श सुध्दा या देहींना लाभलेला नाही. या देहीने तिरगुणी प्रपंच मायेचा संग केल्यामुळे तिरगुणी प्रपंचमायाच्या भ्रांतीत पडुन, आपल्या धन्याच्या नामाचा टिळा न लावता त्याच्याशी स्वयंवर न करता त्याच्या संग कुवा-यां राहल्यात. प्रपंचमायेच्या भ्रांतीच्या भुलवनीत पडुन अश्याच कुवा-या राहत यवगान यवगात जन्म घेत आपल्या देहीच्या निरंजन धन्या संग रांडे सारखी राहल्यात आहेस. किती ही या प्रपंच मायेत भुललेल्या देहीची शोकांतिका आहे ? ऐसे वागणे शोभते का तुजला ? आता या जन्मी तरी हे वागणं बरं नोव्हे ग !

हे देहराणे ! आता या जन्मी तुझे हातात तुझे निरंजन धन्याचा चतुर्पता अथर्वन वेद आला आहे. आता या जन्मी तरी तु तिरगुणी प्रपंचमायेच्या भुलवनीने भ्रांतीत पडुन कुवांरी न राहता आपल्या धन्याच्या नामाचा टिका लावुन, हे तिरगुणी प्रपंचमायेच भंवर जाळ तोड तोड ग ! या तिरगुणी मायेच्या खेळाच्या जरा बाहेर निघुन पाहयं ! उघड या तिरगुणी मायेची धुंगी भुलवनीची झापड ! ज्ञान-दृष्टीचा डोळा उघडुन आत्मग्यानी बनुन तिरगुणाच्या पलीकडे उभा असलेल्या या आपल्या चतुर्पती धन्याच्या हातात हात दे ग !

देह राणे ! या चतर्पती धन्याच्या हातात हात देवुन आपल्या निरंजन धन्याच्या चतुर्पती ग्याना व्दारे तु आता आत्मग्यानी हो ग ! चतुपती निरंजन ग्यानी हो ग ! ग्यान-दृष्टी उघडुन आत्म ग्यानी होवुन तु आता चतुर्पती निरंजन धन्याचे चतुर्पती ग्यान घे ग !

॥ सगुण निगुण, पेळु ग । सुंदर काते साळु ग ।
चारही प्रहर, कातता मेली । नाही निघाली तात् ग ॥

हे देह राणे ! ज्याप्रमाणे कापुस जसा एकात एक विणुन त्याचा पेळु बनवल्या जाते, त्याप्रमाणे या स्थुल सुक्ष्म कारण महाकारण देही एकात एक गुंफुन या देहीचा पेळु बनवल्या गेला आहे. या चौदेहीच्या पेळुत आकारी तिन गुणात्मक सगुण देही आहेत, तर आत्मा मन चित्त चैतन्य प्राण..ईत्यादी निराकार निर्गुण असे आहेत. ऐसा हा चौदेहीचा सगुण-निर्गुण पेळु आहे. आता तु या सगुण देही चे ग्यान कायाज्ञान खंडातुन घेवुन निर्गुण आत्मा चे सेरूप पाहयं.

हे देह राणे ! तु तुझे आणी आपल्या आत्मराम आत्मपुरूष निरंजन धन्याचे सेरूप पाहयं. तु होय कोण ? कोण होय तो ? तिरगुणी प्रपंच मायेची झापड फेकुन तिची धुंगी हटवुन नवचैतन्याने ज्ञानदृष्टीचा डोळा उघडुन, तुया चतुर्पती धन्याचे ज्ञान दृष्टांत पाहयं तु आता !

हे देह राणे ! तुझे या आंग निराकार निराधार चैत्यन्यमय निश्कलंकी चतुर्पती निरंजन धनी परमात्मा त्याचा तेजोगुणी अंश अवतार घेवुन तुझा आत्माराम आत्मपुरूष निरंजन धनी बनुन तुया जवळी उभा आहे. ज्ञान-दृष्टी चा आतातरी उघड नविन डोळा ! आणी नवल पाहय की :

हे देह राणे !

- तुझा हा आत्माराम आत्मपुरूष धनी हा परमात्मा प्रमाणेच निर्गुण निराकार आहे, तर तु देह राणे सगुण आकारी आहे.

- तुझा हा आत्माराम धनी परमात्मा प्रमाणेच निराधार आहे, तर तु या धन्याच्या आधारावर उभी आहे. या आत्माराम आत्मपुरूष रूपी मुळ खांबाच्या आधारावर म्हणजेच या आत्माराम रूपी मुळस्तंभाच्या आधारावर तुझे हे देहदेउळ उभे आहे. हा मुळस्तंभ निघाला तर तुझे हे देहदउळाचे पडणे आहे. हे निश्चित जाण !. तरी तु आपल्या देहीचा मुळस्तंभ असलेल्या निरंजन धन्याला पडीत टाकले आहेस ? या निराकार निराधार निरंजन मुळस्तंभाच्या आधारावर तु उभी असुन, चालत बोलत तिरगुणी मायेंचा तिरगुणी प्रपंच कातत या तिरगुणी मायेचा संग करत आहे.

- तुझा हा आत्माराम आत्मपुरूष धनी परमात्मा प्रमाणेच निश्कलंकी निर्विकार आहे, तर तु षटविकार...ईत्यादी देहीतील विकाराने कलंकीत आहे. तुया विकारांचे वेस्टने तु आपल्या धन्यावर आणुन त्याव्दारे वासनामय, मनोमय कोषाचे प्राबल्य दिवसानं दिवस वाढवुन, तु त्या धन्याच्या प्रकाशापासुन वंचीत होत आहे. त्याचमुळे तुझा जवळी असलेला हा आत्माराम आत्मपुरूष धनी हा सर्वशक्ती व सर्वसिध्दि संप्पन्न असुनही त्याचा प्रकाश तुला लाभत नाही. धन्याचा लख्ख प्रकाश न लाभल्यामुळे त्याचा देणं पासुन तु वंचीत झाली. आणी तु प्रकाश जवळ असतांनी सुध्दा त्याचा उपयोग न घेता अंधारात राहत शक्तीहीन निस्तेज निपजीत होवुन निजरूप झालेली आहे.

- तुझा हा आत्माराम आत्मपुरूष धनी परमात्मा प्रमाणेच चैत्यन्यमय निरंजन ज्योत स्वरूपी आहे. ज्याप्रमाणे परमात्माच्या चैत्यन्यप्रकाशात पडलेल्या परमात्माची छाया म्हणजे प्राण आहे. ही सर्वव्यापी परमात्माची सर्वव्यापी प्राणमय छाया सर्व सृष्टीयॉ मध्ये विखुरून सर्वत्र व्यापलेली आहे. त्याचप्रमाणे या परमात्माचा अंश असलेला तुझा आत्माराम धनी याच्या चैत्यन्य प्रकाशात त्याची पडलेली छाया म्हणजे तुझा प्राण आहे. तोही तुझे या देहीत सर्वत्र विखरून सर्वत्र व्यापलेला आहे. तुया या आत्माराम धन्याच्या उपस्थीतीने तुझे या देहीत व्यापलेला हा प्राण तुझे मन जिकडे जाते तिकडे संचारत आहे. आणी तु या आपल्या निराकार निराधार निश्कलंकी चैत्यन्यमय धन्याच्या भरवश्यावर उभी राहुन आपल्याच धन्याच्या चतुर्पती निरंजन ग्यानाला पडीत टाकुन, तिरगुणी प्रपंचमायेच्या भुलवनीत पडुन तिरगुणीची स्तुती महीमा गात आहे.

चतुर्पती धनी परमात्माचा तेजागुणी अंश अवतार आपल्या जवळी उभा असुन त्याचे ज्ञान न घेता, आत्म ग्यानी न होता या चतुर्पती धन्याला विसरून तिरगुणीं मायेचाच प्रपंच कातत बसली आहे ?

- तुझा हा आत्माराम आत्मपुरूष धनी निराकार आहे, तर तु आकारी आकारली आहे. तुझा या आकारात असलेले तुया मुखातील तुझी जिभ म्हणजे तुझी साळु ! ही तुझी साळु व्दारे तु निराकार निरंजन परमात्माला विसरून आकाराचीच स्तुती करत बसली आहे ? ही तुझी साळु, तिरगुणी प्रपंच मायेन मांडलेल्या तिरगुणी प्रपंचाच्या बाजारात, तिरगुणी माल विकण्यासाठी सुंदर बोल बोलत आहे. या तिरगुणी साठी तुझी ही साळु आपल्या निर्गुण धनी ला पडीत टाकुन सुंदर बोल काते ग !

परंतु या तिरगुणी मायेच्या भुलवणी पायी तुझे या निराकार निरंजन धन्या च्या चतुर्पती ग्यानाबध्दल हीच तुझी साळु चुप्पी मारून बसली आहे. तुझे या चतर्पती धन्याच्या चतुर्पता ग्यानाच्या गाय बध्दल काहीएक न बोलता, या चतुर्पता गाईला पडीत टाकुन या चतुर्पता गाईचा मौसाचा म्हणजेच चारही वाचेतुन निघणा-या हरीनामाचा तु त्याग करत आहे. तीचा अमृत पान्हा असलेल्या या चतुर्पता ग्यानावर कोपत आहे. लबाड म्हणत आहे. हे देहराणे ! आता हे वागण बरं नोव्हे ग !

हे देह राणे ! तुझाच चतुर्पती धनी तुया आंगी त्याच्या तेजोगुणी अंश अवतार घेवुन तुझा आत्माराम आत्मपुरूष धनी बनुन उभा आहे. तुया घरी या चतुर्पती धन्याने तेजोगुणी अंश अवतार घेवुनही तु नटत आहे ? आपल्या धन्याचे ग्यान घेवुन आत्मज्ञानी बनुन धन्याचे चतुर्पती ग्यान-भक्ती करण्याच्या महत्वाच्या कार्यातुन नटत आहे. या महत्वाचे कार्याला बाजुला सारून हटत आहे ? धन्यापासुन वंचित होत आहे ? नटली ग देह राणे तु ! डोळे असुन आंधळी झाली आहे ? तोंड असुन उगी झाली आहे. आपल्या धन्याच्या प्रकाशापासुन वंचीत झाली ग !

नटली ग देह राणे तु ! कारण की : तु आपल्या धन्याला प्रकाशीत करण्यासाठी प्रयत्न न करता तु चंदनाप्रमाणे झिजलीच नाही. तु तर तिरगुणी प्रपंचमायेच्या संसाराकरीता राब राब झिजली आहेस !. आणी या तिरगुणी मायेच्या संसाराने तुझे या धन्यालाच पडीत टाकुन, तुझे निरंजन धन्यावरच षटविकारासह अन्य कलंकाचे वेस्टन टाकुन त्याचा प्रकाश तुजपासुन रोखला. कितीक वर्णु या तिरगुणीं मायेचे कपटी दुर्गुण ?

या तिरगुणी मायेने आपल्या स्वतःच्या धन्याला प्रकाशीत करण्याचे महत्वाच्या कार्यातुन तुला नटवुन, तुला तिरगुणी प्रपंच मायाच्या अध्यानी करून तिरगुणी प्रपंचात गुंतवुन ठेवलेत. आणी तु स्वतःच्या धन्यालाच पडीत टाकुन, या तिरगुणी प्रपंच माया शक्तीच्या अध्यानी पुर्णतः जावुन या तिरगुणींचाच प्रपंच कातत बसली आहे. आणी या तिरगुणी मायेच्या तिरगुणी ज्ञानातच गुरफटुन आपली देहधरणी आटवत आटवत बसली आहेस ?.

आणी आपल्या साळु व्दारे या तिरगुणींचे बोल सुंदर कातत या तिरलोक्यातील तिरगुणी देवता व त्यांचे अवतार यांचीच गुणगाण, स्तुती महिमा..ईत्यादी सह त्या तिरगुणींचे पुजा-पाठ, व्रत-वैकल्प, कर्मकांड..ईत्यादी कार्यात गुंतुन गेली आहेस. आपल्या निराकारा निरंजन धन्याला विसरून,

आकाराव्दारे आकाराचीच स्तुती करत बसली ग तु देहराणे ? स्वतःव्दारे स्वतःची महीमा वाढवणा-या तिरगुणी ज्ञानातच गुंतुन फसली ग देहराणे !

हे देह राणे ! या तिरगुणींच्या भुलवनी पायी या तिरगुणीं देवतांची पुजा-पाठ, व्रत-वैकल्प, स्तुती गुणगाण, महीमा.. ईत्यादी करणा-या कित्येक देहीच्या साळु, चारही प्रहर कातता कातता मेल्यात. परंतु त्या तिरगुणी देहीच्या साळुंना त्याच्या तिरगुणांच्या पलीकडे उभा असलेल्या धन्याचे शुध्द सत्व चे सार म्हणजेच तात् काही या देहींच्या हाती आले नाही. शुध्द सत्व चे सार न काढल्यामुळे आपल्या सत्य धनी देवाचे ग्यान काही यांच्या हाती लागले नाही. आपल्या धन्यापर्यत यांचा ज्ञान-दृष्टी गेली नाही.

आपल्या सत्य धन्यापर्यत ज्ञान-दृष्टी न गेल्यामुळे त्या तिरगुणी मायेच्या फास्यात अडकलेल्या देही काही आत्मग्यानी झाल्या नाही. त्याच मुळे नाही पाहीला त्यां तिरगुणी देहींनी त्यांचा निरंजन धनी. ! सुने आहे या देही निरंजना वाचुन !. म्हणुनच :

हे देह राणे ! तु नको सोडु तु आपले घरदार ! कर स्वतःचा सदैव प्रपंच व्यवहार ! आणी मनाचा निर्धार करून सत्याकडे नजर वळवुन, आपल्या अंतरी चौकशी करत अंतरी उभ्या असलेल्या धन्याला शरण जा. भ्रम झाल्याप्रमाणे कश्याला हिंडते तु दुरदेशी ? तिर्थ यात्रा अनुष्ठाण हे व्यर्थ आहे हे जाण ! कारण की : या सर्व तिर्थि पिंडी तुझा देहीचा तो निरंजन धनीच सर्वत्र भरून भरला आणीक उरला आहे. आपल्याच जवळ जगजेठी उभा असतांना कुठे निघाली तु देव पाहण्यास ? देव नको पाहु, वेडे नको होवु ! तिर्थयात्रेला नको जावु ! देव-देव म्हणता देव आहे बा बहुता परी ! ज्याचं नाव देव तो आहे बा अंतरी तुया जवळी ! ज्ञान-दृष्टीचा डोळा उघडुन पाहयं. ज्ञानदृष्टीच्या नविन डोळयाने किल्ली शोध. आपल्या चतुर्पती धन्याच्या हरीनामाची किल्ली घेवुन या देहदेवळाचे कवाड उघड । आत्मग्यानी होवुन ध्यान लावुन पहा तो कोटयान कोटी सुर्यप्रभेचा प्रकाशाचा जगजेठी ! आणी मग या तिरगुणी बाजारा या मोठया व्यापारपेठेत न जाताच, बसल्या बसल्या या धन्याचे मोल घेवु ग !

॥ बाजारी न जाउ, हाटा ना जाउ । बसल्या मोल घेवु ग ।
आले देवाचे द्युत । तान्हा, नेला हातच्या, हात ग ॥
॥ तान्हा आला, निघुन गेला । उभा राहीला, भैस ग ।
आले देवाच्या मना । तान्हा, दिला हातच्या हात ग ॥

हे देह राणे ! तु आपल्या चतुर्पती धन्याच्या चतुर्पती नामी राहुन पुर्णतः आत्मग्यानी व चतुर्पती निरंजन ज्ञानी झाल्यावर तुझे तुलाच कळेल की : तो निरंजन धनी सह सर्व देवी-देवता व शक्तीयाॅ तुयाच देहीत वसवल्या आहे. तिरलोक्यातील तिरगुणी अवतार यांचे सर्व तिर्थस्थाने तुयाच अंतरी बहु जवळी आहे. या तिरलोक्यातील तिरगुणी अवतार माया यांचा धनी सुध्दा तुयाच जवळ आहे. त्यामुळे तुला या तिरगुणींनी मांडलेल्या मायेच्या बाजारात असलेल्या या तिरगुणींच्या मोठया व्यापारपेठा असलेल्या तिर्थस्थानी जाण्याची आवश्यकता भासणार नाही. या तिरगुणी बाजारात या हाटात न जाताच तिरगुणी प्रपंचमायेच्या भुलवनीतुन बाहेर पडुन, आत्मग्यानात निमग्न होशीन तु ! आणी मग आपल्या चतुर्पती धन्याची सच्ची भक्ती करत राहत, स्वतःचा प्रपंच करत परमार्थ साधत सर्व तिर्थक्षेत्राच्या पुजा-पाठ कर्मकांड..ईत्यादी पुण्यांचे मोल या घरी बसल्या बसल्याच घेवु ग !

असेच आत्मग्यानी होवुन आपल्या या देहीच्या चतुर्पती धन्याच्या चतुर्पती नामी सच्ची ग्यान-भक्ती भजनी राहुन, घरी बसल्या बसल्याच मोल घेत जिवन जगत राहा.

असेच चतुर्पती नामी घरच्या घरी मोल घेत जीवन जगत असतांना जर कोण्या एका समयी या चतुर्पती धनीदेवा चा द्युत असलेला यमदेव जरी या चतुर्पती धन्याचा चिरंजीव तान्हा बाळ असलेला तुझा आत्माराम आत्मपुरूष धन्याला नेण्यास आला, तरी या देह राणेच्या तिरलोक्यावर या चतुर्पती धन्याचा झेंडा असल्याकारणाने तो यम तिथेच थांबेल. कारण की : हा आत्माराम धनी त्या चतुर्पती हुजुरचा झाला असल्यामुळे आणी यमही त्या चतुर्पती हुजुरचा चाकर असल्याकारणाने, तो यम तुझे आत्मपुरूष धन्याला हात लावणार नाही. आणी त्या समयी हा चतुर्पती भैस धनी हद्‌यी उभा झाल्या कारणाने, या चतुर्पती धन्याचा तान्हा बाळ असलेला देहीचा हा आत्मपुरूष चिरंजीव आत्माराम धनी तुला न कळताच तुला हातच्या हात देईल ग । तुला तुझे आयुष्य वाढवुन देईन ग देह राणे !

अथवा काही नैसर्गिक कारणास्तव, तुझा तो आत्मपुरूष धनी निघुन जाण्याच्या स्थितीत असेल अथवा हिंडायला गेला असेल, त्या समयी तो चतुर्पती भैस आपरूप उभा होईन. चतुर्पती धन्याच्या आंगाचा असलेला त्याचा तेजोगुणी अंश असलेला त्याचा चिरंजीव तान्हा बाळ म्हणजेच तुझा आत्मपुरूष धनी जिथे कुठे भरकटला असेल, तेथुन खिचुन आणुन तुला न कळता तुला तुझा तो आत्माराम धनी हातच्या हात तुला आणुन देईन ग ! तो धनी तुला तुझे आयुष्य वाढवुन देईन ग देह राणे ! अश्या आयुष्य वाढवुन देण्याच्या कित्येक घटना या चतुर्पती पंथा च्या भुम्मेवर घडल्या आहे. कित्येकांचे मरण चुकवले आहे. कित्येकांच्या जित्या जन्मीच्या चौ-यांशी चुकवल्या आहे...आणीक काय सांगु तुला तुझे चतुर्पती निरंजन धन्याचे वर्णन गुण । कितीक वर्णु या चतुर्पती निरंजन धन्याचे गुण ?

गाही :-

॥ ऐका राहुचे गुण । राहु उभा राहीन सोयंम् । चुकवन देहीचे मरण ॥
॥ ऐका तारखेचे गुण । शांत होईन तिरभवन ।
त्याला आयुष्य देईन येवुन । यवगायवगी धनी संग वागवन ॥

**भजने :-**

**॥ नामी राहाव । देवाच्या...देव चुकवन मरण । नामी रहावं.. ॥**
**॥ नामी राहयं भजनी राहयं । चुकन चौ-यांशी, धन्याची सांगी आहयं ॥**

महत्वाची टिप :- *या मुळावरच्या ओवीत 'रांडे' हा मुळ शब्द होता. परंतु अज्ञानींना रांडे हा शब्द कोण्या अर्थाने दिलेला आहे याचा अर्थबोध झाला नसल्यामुळे, रांडे हा शब्द त्यांना बोचत होता. त्यामुळे त्यांच्या म्हणणीतुन ही मुळावरची ओवी हळुहळु बाहेर पडत गेली. परंतु चतुर्पतीच्या ज्ञानी जाणत्यांना 'रांडे' हा शब्द कोण्या अर्थाने घेतला आहे ? याचा बोध ग्यान असल्यामुळे या जाणत्यांनी रांडे ऐवजी राणे हा शब्द वापरून ही ओवी आपल्या म्हणणीत निरंतर ठेवली. अंदाजे ३५० वर्ष ज्ञानी जाणत्यांच्या म्हणणीत ही ओवी राहील्या नंतर ही मुळावरची ओवी आज आपल्या हाती पडली आहे. हे सर्व शक्य झाले ते 'रांडे' ऐवजी 'राणे' हा शब्द वापरून !. त्याचमुळे राडे हा शब्द नविन ऐकणा-याला बोचत असल्यामुळे त्या 'रांडे' ऐवजी 'राणे' हा शब्द आपल्या म्हणणीत वापरावा. ही विनंती.*

**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०१/०२ ॥

॥ निराकार आदीमाया-शक्तीची ओवी नं. ०७ ॥

ओवी महात्मः- स्थापनेच्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी...

॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ निराकार आदीमाया ची फुगडी ॥

॥ आणा फणी, घाला वेणी । सखुबाई साजनी ।
चव यवगाच्या, फुगडया खेळाया । चला जाउ, गौळणी ॥
॥ उशीर नका, लावु माझया । संग, नाही कोणी ।
चव यवगाच्या, टिप-या खेळाया । चला, जावु गौळणी ॥घृ॥

॥ कैची वेणी, कैची फणी । कैचा, कुरन कार ।
कुठ जन्मली, ही नार । हिचं, सांगा माहेर ॥ ०१ ॥
उशीर नका, लावु माझया । संग नाही कोणी ।
चव यवगाच्या टिप-या खेळाया, ..... ॥ घृ ॥

॥ साठी खण, साडीची मजला । शिवाना चोळी ।
आणुन निरशुन्याचा दोर । भराना जाळी ॥ ०२ ॥
उशीर नका, लावु माझया । संग नाही कोणी ।
चव यवगाच्या, टिप-या खेळाया, ..... ॥ घृ ॥

॥ आणुन त्रिरथा, कुर्ता चोळीला । बंद, बसवा दोन्ही ।
आणुन असमानाची मजला । कराना ओढनी ॥ ०३ ॥
उशीर नका, लावु माझया । संग नाही कोणी ।
चव यवगाच्या, टिप-या खेळाया, ..... ॥ घृ ॥

॥ सव्वा खंडी, सोन्याची मजला । घडवाना नथ ।
नउ लक्ष, तारांगण फुल । गुंफाना वेणीत ।
तेहत्तीस कोटी, देव डोहीला । गुंफाना टोप ।
उघडा माझा, माथा फुगडी । खेळे कौतुक ॥ ०४ ॥
उशीर नका, लावु माझया । संग नाही कोणी ।
चव यवगाच्या, टिप-या खेळाया, .. ॥ घृ ॥

॥ अनवट बिचवे, पायी वाक्या । अठ्ठांशी सहस्त्र ऋषी ।
एकत्र कौरव, मिळुन ईरदया । गुंफाना बोटी ।
दहाही अवताराची मजला । वळाना गाठी ।
आणुन पाचही, पांडव पोथ । गरसुळी कंठी ॥ ०५ ॥
उशीर नका, लावु माझया । संग नाही कोणी ।
चव यवगाच्या टिप-या खेळाया,....॥ घृ ॥

॥ कृथा त्रैता, व्दापर कली । नव्हते, चार यवग ।
कोण घडवला, गैना-गाठा । कुठ, होता सोनार ।
तेहत्तीस कोटी, देव नव्हते । नव्हता, लंकेचा रावण ।
कुठ होते, राम-सिता । दया, तुम्ही सांगुन ॥ ०६ ॥
उशीर नका लावु माझया । संग नाही कोणी ।

॥ तांबे पितळ, कांस्ये नव्हते । नव्हता, रूपयाचा भांडार ।
आशा मनशा, दृष्ट कल्पना । नव्हता, याचा व्यवहार ।
छंद मुखवडयाचा, छंद गावतो । धन्य, त्याची करणी ।
खेळ खेळतो, सारंगधर । तो, साहेब धनी ॥ ०७ ॥
उशीर नका लावु माझ्या । संग नाही कोणी ।
चव यवगाच्या टिप-या..... ॥ धृ ॥

॥ बाबु खानाचा, दास पंथी । धन्याचे गावतो गिण्यान ।
दासनी पंथाचा, मुजरा घ्याहो । तुम्ही, अवघे जन ॥ ०८ ॥

**भजने :-**
॥ फुगडी खेळे हो श्रीहरी । आला अंबेच्या तिरी ॥ फुगडी खेळे हो.

**-: शब्दार्थ :-**

फणी :- वेणी घालण्यासाठी तयार केलेले केस विंचरण्याचे सांधन, कंगवा
कुरणकार :- केस कुरवाळुन वेणी विंचरणांचा कार । गावतो :- गायन करतो
टिप-या व फुगडी :- मुलींचा/स्त्रियांचा एक खेळ । चोळी :- झांपर, ब्लाउज ।
संग :- सोबती । डोही :- डोकं, मस्तक ।



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥




.

॥ खंड ०१/०२ ॥

**॥ रुक्मिणीची दाई : शक्तीची अरज-ओवी नं. ०८ ॥**

ओवी महात्मः- जागृतीच्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी.......

॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

# ॥ रुक्मिणीची दाई अरज-ओवी ॥

या ओवी ची पलट ओवी खंड०७/ओवी-०४ मध्ये दिलेली आहे.

॥ जैशी मनाची आवडी । त्याहीला असो सर्व गोडी ।
विठोबा उभे राउळाशी । भक्त आले मुज-याशी ॥ घृ ॥०१॥

भजने :-
॥ ऐसा भाव धरा मनी । तुम्हा जवळ आहे धनी ॥
॥ ज्याचं मन समाधान । त्याहीला देवाचे दर्शन ॥

॥ विठोबा बोले रुक्मीणी । आत्मा आलासे धावुन ।
रुक्मीणी बोले खडसुन । आत्मा चालला तेथुन/रुसुन ॥०२॥

॥ विठोबा बोले रुक्मीणी । आत्मा आणावा धुंडुनी ।

भजने :--
॥ अवघ्या वेदातला वेद । आत्मा पाचवा लभेद ॥
॥ अवघ्या गोडातलं गोड । आत्मा लावणीच झाड ॥
॥ अवघ्या गोडातलं गोड । देवा-भक्ताचा संगजोड ॥

भक्त जाईन तिकडे जाईन । मग म्हणाल सांगतलं नाही ॥०३॥

॥ भक्ता मागं देव गेला । संदेह पडला रुक्मीणीला ।
रुक्मीणी बोले नारदाशी । हरी गेले, घेवुनी या देवाशी ॥०४॥

॥ नारद बोले रुक्मीणी । दाई घालावी देवाशी ।
दाई घालावी देवाशी । आंग आणा ऋषीकेशी ॥०५॥

॥ कृथा यवगी भक्तराज । याहीची दाई, देवा फिर मागं ।
दाई मानेना देवाशी । पुढे चाले ऋषीकेशी ॥०६॥
॥ त्रैता यवगी भक्तराज । याहीची दाई, देवा फिर मागं ।
दाई मानेना देवाशी । पुढे चाले ऋषीकेशी ॥०७॥
॥ व्दापर यवगी भक्तराज । याहीची दाई, देवा फिर मागं ।
दाई मानेना देवाशी । पुढे चाले ऋषीकेशी ॥०८॥

॥ कल यवगी भक्तराज । याहीची दाई, देवा फिर मागं ।
दाई मानली देवाशी । आंग आले ऋषीकेशी ॥०९॥

**भजने :-**
॥ कलयवगी भक्तजन, देवा सम्मान । ऋषीकेशी आले याहीला शरण ।
ऋषीकेशी आले याहीच्या आंग/संग ॥

**-: शब्दार्थ :-**

**दाई घालने** = घरातुन रागारागाने अथवा काही कारणास्तव रुसुन गेलेल्याला आणा-भाका घालुन, विनवणी-याचना अर्ज अथवा हातापाया जोडुन अथवा त्याला स्वतःची अथवा त्याच्या अत्यंत प्रिय व्यक्तीची शपथ घालुन, ..ईत्यादी मार्गाने कसेही करुन समजावुन, मन वळवुन, मागे परत घरी आणणे म्हणजे दाई घालने. दाई म्हणजेच विनवणी याचना करुन घातलेली शपथ.

निरसनसह

॥ मुळावरची ओवी ॥

# ॥ दाईची अरज-ओवी ॥

## -: निरसन/स्पष्टीकरन :-

॥ जैशी मनाची आवडी । त्याहीला असो सर्व गोडी ।

हे आदीपुरूषा ! तुम्ही तर *'यादृश्यी भावना तसस्य सिध्दिर्भवती'* देणारे म्हणजेच जशी ज्याची भावना असेल, तसे त्या भावनानुरूप फल-सिध्दि देणारा आहे. जसा ज्याचा भाव असेल, तसा त्याचा देव बनुन तु देण देत राहतो. म्हणुनच आम्ही छोटीशी अरज करतो की : जशी ज्याची मनाची आवडी असेल, तशी त्याला गोडी असु दे ! ही गोडी निरंतर त्याला राहु दे !

कारण की : ही निरंतर सतत अखंड टिकलेली गोडीच त्याला त्याच्या आवडी प्रमाणे सिध्दी, देणं प्रदान करून देवु शकते. तुमच्या नामाच्या यथार्थ ग्यानातुन झालेली ही गोडी आणी त्या गोडीतुन मिळणा-या आनंदाची अनुभुती हे निष्ठावान भक्तच जाणतो. तुमच्या या भक्तीच्या गोडीव्दारेच तो भक्त सच्चा होतो. सच्च्या भक्ती व्दारे तुमच्या सख्य होणा-या भक्तीचा आत्मिक आनंद तो भक्त प्राप्त करतो. भक्ताच्या अंतरात्माला होणारा आत्मीक आनंद मग परमानंद, सत्चित्तानंद भक्ताला देतो. तुमच्या नामाच्या निरंतर गोडी ची पहीली पायरी चढल्यावर सर्व शक्य होते. त्यामुळे आम्ही पुनःपुनश्च अर्ज करतो की :

हे आदीपुरूष कृष्णा ! आम्ही विनंतीपुर्वक अर्ज करतो की : जैशी ज्याची मनाची आवडी असेल, तैशी त्याला असो बा सर्व गोडी !

हीच छोटीशी अर्ज घेवुन आम्ही भक्तजन तुम्हाला मुजरा करण्यासाठी राउळात आलो आहोत.

॥ विठोबा उभे राउळाशी । भक्त आले मुज-याशी ॥

भजने :-

॥ ऐसा भाव धरा मनी । तुम्हा जवळ आहे धनी ॥

॥ ज्याचं मन समाधान । त्याहीला देवाचे दर्शन ॥



हे विठोबा धनी ! या राउळी तुम्ही जैसा भक्तांचा भाव, तैशी त्या सत्य भक्ताला फल-सिध्दि चे देणं देत उभे आहात. पिंडी या ब्रम्हांडी या नात्याने तुम्ही या पिंडीत सुध्दा तु अंश अवतार घेवुन उभा आहेस.

म्हणुनच आम्ही भक्तजनांनी आमच्या हृद्यी *'आम्हा जवळच धनी उभा आहे'* ऐसा जो भाव धरला आहे, त्या भावाला पावुन आमच्या हृद्यरूपी विटेवर कायमचा उभा राहुन तुमच्या सुखा-रूपाची गाही दे ! याच करीता तुमच्या मुज-याला आलो आहोत. आमचा मुजरा स्विकारून आम्हास आमच देणं दयावे.

॥ ज्याचे मन समाधान । त्याला देवाच दर्शन/देणं ॥

हे विठोबा धनी । आम्ही भक्तजनांनी *'आम्हा जवळ उभा आहे आमचा धनी'* असा जो भाव आम्ही मनात धरला आहे. या भावा मुळेच तुझी कृपा होवुन या नामाचं देणं मिळाले आहे. आमचे चित्त संतोष पावुन आमचे मन समाधान झाले आहे. ज्याचे मन समाधान झाले आहे, त्याला मन समाधान चे देणं मिळालेले आहेत. त्याचमुळे आम्ही पुनःपुनश्च विनविनी करतो की :

जी तुमची आकाशवाणी आहे, त्या वाणीवर उभा राहुन आम्हास हर घडीघटका दर्शन दयावे. आम्हाला भेट दयाहो पलघडी ! आणी आमच्या लायकीनुसार आम्हास देणं दयाहो हरघडी !

शिपी किनारी या चतुर्पतीच्या गंगेथडीवर उभा राहुन हीच *'भेट दयाहो पलघडी'* अशी सच्या मनभावाने अरज लावण्यासाठी याच घटका याच वेळी, वेळ न गमावता आम्ही तुम्हाला मुजरा करण्यासाठी धावुनी येत आहो.

॥ विठोबा बोले रुक्मीणी । आत्मा आलासे धावुन ।
रुक्मीणी बोले खडसुन । आत्मा चालला तेथुन/रुसुन ॥

ज्या सच्या भक्तां च्या आत्मज्योती मध्ये त्या भैस अवताराची ज्योत खेळली, त्या देवा-भक्ताच्या संगजोड मधील भक्ताचा आत्मा विठोबासमोर मुज-यासाठी धावुन येत हजर झाला. ज्या क्षणी विठोबा रुक्मीणीशी बोलनं सुरु करणार, त्याच क्षणीच सच्या भक्ताचा आत्मा तेथे मुज-यासाठी धावुन हजर झाल्यामुळे, त्या क्षणी विठ्ठल-रुक्मिणीच्या बोलण्यांमध्ये आपोआप खंड पडला. रुक्मीणीचा एकांत भंग पावला.

आपल्या विठोबा धनी वर आपल्या एकटीचाच अधिकार आहे. अशी भ्रांती त्यावेळी रुक्मीणीवर पडली असल्यामुळे ती रागारागाने त्या मुज-याला आलेल्या भक्त आत्म्यास खडसावुन बोलली. अग्नी-ज्वाला प्रमाणे जळजळीत बोल बोलुन तिने त्या भक्त आत्म्यास खडसावले/दटावले/हेडासले. त्या सच्च्या आत्म्यास दुखावले.

रुक्मीणीने मुखी अग्न-ज्वालाप्रमाणे बोल येवुन, त्या जळजळीत बोलाव्दारे दुखावलेला तो सच्चा भक्ताचा आत्मा तेथुन रुसुन चालता झाला. तेथुन निघुन गेला.

विठोबा देवाच्या मुज-याकरीता आलेला देवा-भक्ताच्या संगजोड मधील सच्चा भक्ताचा आत्मा विठोबा देवा समोर दुखावल्या गेल्यामुळे विठोबा रुक्मीणी वर खिन्न झाले. उदासले. रुक्मीणीचे आंगन सोडुन, त्या भक्ताचा संग करण्यासाठी विठोबा हरी तत्पर झाले. तत्परतेने निघण्यापुर्वि रुक्मिणीला ज्ञानपुर्वक समजावनी देण्यासाठी रुक्मीणीला उद्देशुन विठोबा बोलले की :

॥ विठोबा बोले रुक्मीणी । आत्मा आणावा धुंडुनी ।
भजने :- ॥ अवघ्या वेदातला वेद । आत्मा पाचवा लभेद ॥
॥ अवघ्या गोडातलं गोड । आत्मा लावणीच झाड ॥
॥ अवघ्या गोडातलं गोड । देवा-भक्ताचा संगजोड ॥
भक्त जाईन तिकडे जाईन । मग म्हणाल सांगतलं नाही ॥
विठोबा बोले रुक्मीणी । आत्मा आणावा धुंडुनी :-

विठोबा बोले की : हे रुक्मिणी ! जो सच्चा भक्तात्मा तुझ्या खडसावुन बोलण्यामुळे येथुन रुसुनी चालता झाला आहे. निघुन गेला आहे, तो सच्चा भक्त-आत्म्याला आता तुच धुंडुनी आणावे. तुच शोधुनी आणावे. तुच समजावुन आणावे. कसेही करुन तु तुझ्या आंगणात भक्तांत्म्या ला परतुन आणावे. कारण की : अवघ्या वेदातला पाचवा लभेद होय.

॥ अवघ्या वेदातला वेद । आत्मा पाचवा लभेद भेद ॥

हे रुक्मिणी ! हा भक्तात्मा दुसरा-तिसरा कोणी नसुन माझाच तेजोगुणी अंश अवतार आहे. तो माझ्यात आहे आणी मी त्याच्यात आहे. ज्याप्रमाणे मी लभेद म्हणजे निर्मळ, निशंःकलंकी, भेद न जाणता येणारा निराकार निराधार निर्गुण आहे, त्याचप्रमाणे हा माझा तेजोगुणी अंश अवतार असलेला आत्मा

सुध्दा आहे. माझ्या याच तेजोगुणी अंश अवतारा व्दारे आत्मज्ञानी भक्तगण मला जाणु शकतात. माझा हा एकच तेजोगुणी अंश सर्व सजीवात भरून भरला आहे. हाच माझा अंश आत्मा अवघ्या वेदांतला वेद होय. कारण की : हा आत्मा जर देहीत नसेल तर देही काय वेद वाचणार ? लभेद धनीचा भेद जाणणारा पाचवा लभेद आत्मा होय. या आत्मा व्दारे लभेद धनीचा भेद जाणु शकते. वेदांव्दारे नाही ! कारण की : हे वेद माझा भेद जाणत नाही. माझे पुर्णग्यान हे सर्व वेद अवगत करू शकले नाही. या अवघ्या वेदांकरीता शेवटी मी लभेदच म्हणजे निर्मळ भेद न जाणता येणारा निशंःकलंकी राहल्यामुळे, हे वेदच शेवटी थकुन '*नेती-नेती*' म्हणजेच 'न जाणता येणारा ! न जाणता येणारा..!' असे म्हणत संभ्रमात पडुन राहलेत. वावचळले आहेत. बावचळुन वेडे होवुन मायेच्या भ्रांतित आपआपल्या तिरगुणी राजे व दैवतांना समोर करून माझे बध्दल चे तिरगुणी मायामिश्रीत ज्ञानच देवु लागले आहेत.

परंतु मला जर जाणावयाचे असेल, तर माझ्या या तेजोगुणी अंशापासुन जाणावे लागेल. माझे तेजोगुणी अंशाचे ग्यान घ्यावे लागेल. आत्मज्ञान शोधावे लागेल. आत्मग्यान शोधल्या शिवाय नाही तत्व ग्यान ! हे जाणावे लागेल. आत्मज्ञानी होवुन माझा तेजोगुणी अंश असलेला पाचवा लभेद आत्मा व्दारे मला जाणता येवु शकते. कारण की : माझा हा तेजोगुणी अंश माझे गुण अंशरूपात घेवुन माझ्या प्रमाणेच सर्वगुण संपन्न, ज्ञानसंप्पन्न, शक्तीसंपन्न सर्वसक्षम असल्याकारणाने, माझे ग्यानाकरीता याच माझ्या तेजोगुणी अंशाला पकडावे लागेल. त्याच्या वरची काजळी काढुन त्याला प्रकाशुन त्याच्या प्रकाश-किरणांव्दारे माझा भेद जाणु शकते. आत्म्याचे प्रकाशन पाचव्या लभेद जाणल्यानेच होते. चारही वेदाव्दारे नव्हे !

हाच ग्यानसंपन्न सर्वगुणसंपन्न आत्माच या चारही वेदातला पाचवा लभेद वेद होय. या पाचव्या लभेद वेदा व्दारेच या पाचव्या लभेद धनीचा भेद जाणु शकते. ईतर कोणत्याही मार्गाने नव्हे.

हे रूक्मिणी ! अवघ्या वेदातल्या या पाचव्या वेदालाच तु माझ्या देखत खडसावुन माझ्या पासुन दुर केलेत ? हे वागणं बर नोव्हे तुजला !

मजकरीता हा आत्माच अवघ्या गोडातलं गोड होय. हा आत्माच माझे लावणीचे झाड होय. या लावणीच्या झाडालाच तु उखडुन फेकले. हे वागणं बर नोव्हे तुजला !

॥ अवघ्या गोडातलं गोड । आत्मा लावणीच झाड ॥

हे रूक्मिणी ! या प्रकृतीसृष्टी मध्ये मी ईकडुन पेरतो आणी तिकडुन मोडत ज्योतीचा खेळ खेळत असतो. या खेळामध्ये बिज-आत्म्यांची लावणी करण्याकरीता मी प्रथम प्रकृतीमायाला वश करतो. तिला स्वतःच्या अध्यक्ष्यतेखाली घेतो. स्वतः अख्त्यारी राहुन तिच्यावर वर्चस्व प्रस्थापीत करतो. आणी मग प्रकृति मायेच्या महत्ब्रम्ह योनीत हे माझे विर्यरूपी आत्म-बिजे ला प्रवेशी करतो. प्रकृति माये मध्ये प्रवेशी झालेल्या बिजात्माचे रोपन प्रकृतिमध्ये मीच करतो. अश्याप्रकारे प्रकृति मायेला बिजात्मे म्हणजेच माझे तेजोगुणी अंश आत्मे प्रवेशी करून तिच्या गर्भधानास कारणीभुत असणारा मी सर्वत्राचा पिता होतो. ऐसा हा सर्वत्राचा पिता आपले तेजोगुणी अंश असलेले बिज-आत्मा व्दारे देहरूपी वृक्ष-वेलीची लावणी प्रकृतीमध्ये करत असतो.

हे माझे विर्यरूपी बिज म्हणजेच हा माझा तेजोगुणी अंश असलेला आत्माच माझे अक्षय अविनाशी नश्वर चिरंजीव असलेले लावणीचे झाड होय.

या लावणीच्या झाडा व्दारेच मी सर्व चरांचर देहे-जीवांची उत्पत्ती करतो. त्या उत्पन्न झालेल्या अंकुरांनां खतपाणी घालतो. त्यांचे भरनपोषन करतो. सोकारी होवुन त्यांचे रक्षण, पालन, झाडन ...ईत्यादी करत आपला पिताधर्म निभावत राहतो. या लावणीचे झाड रोपण व्दारे मीच बिजाधारी पिता होतो. मीच या आत्म बिजाचे रोपण करत आत्मज्योती इकडुन पेरतो व तिकडुन जिर्ण मोडक्यां नालायक देहींला मोडत त्यातुन आत्मजोत काढतो. ऐसा ईकडुन पेरत तिकडुन मोडत आपला शेती-शेती चा खेळ करत राहतो.

या लावणीच्या झाडाव्दारे म्हणजेच माझ्या तेजोगुणी अशं असलेल्या या आत्माव्दारे मी प्रकृतीत लावणी करत असल्यामुळे, मला हे लावणीचे झाडच अवघ्या गोडाहुन गोड आहे.

हे रुक्मिणी ! मजला अवघ्या गोडाहुन गोड असलेले माझे भक्तात्म्यांचे लावणीचे झाड माझ्या मुज-याला आल्यावर माझे दृष्टी देखत तु माझ्यापासुन तोडुन दुर केले. देवा-भक्तांचा संगजोड मधील सच्चा भक्ताला त्याच्या धनीदेवा पासुन दुर खेदडले. हे वागणं बरं नोव्हे बा तुजला !

देवा-भक्तांचा हा संगजोड हा मला अत्यंत प्रिय आहे. अवघ्या गोडाहुन गोड मजला देवा-भक्ताचा संगजोड आहे. हे सर्व जाणत असतांनाही हा देवा-भक्ताचा संगजोड तोडला ! हे वागणं बर नोव्हे बा तुजला !

॥ अवघ्या गोडाहुन गोड । देवा-भक्ताचा संगजोड ॥

हे रुक्मिणी ! देवा-भक्ताच्या संगजोड मधील सच्चा भक्तात्मा आपल्या जिवनकाळात सत्कर्माच्या अधिक्याने शुध्द सत्व कडे वळुन तिरगुणांच्या पलीकडे जावुन मला भजत राहतो. त्रिगुणातीत होवुन तिन गुणांच्या अनुभवाच्या पलीकडे जातो. ऐसा सच्च्या भक्त जेव्हा सच्च्या भक्ती-भाव व्दारे मजला भजत राहतो, तेव्हा मी त्याच्याशी सख्य मैत्री करत त्याच्याशी संगजोड करतो. त्याला निरंजन ग्यान पाजतो. चतुर्पती नामी लावतो. त्या सच्च्या च्या हद्‌यी नामज्योत स्वरूपात अंतरी उभा होतो. त्याचे भरण-पोषण व रक्षण करतो. त्याचे गुणदोष सुधारतो. त्याला देणं देतो.

सच्च्या भक्तांच्या सच्च्या भक्तीभाव व्दारे त्या सच्च्या भक्तांच्या आत्मज्योती मध्ये अंर्तभुत होतो. त्याच्या हद्‌यी कंठी दाटुन येतो. निरंजन ज्ञानस्वरूपात मी त्याला प्राप्त होतो. त्याच्या आत्मज्योत मध्ये माझी ज्योत खेळु लागते. ऐश्याच सच्च्या भक्तांच्या ज्योती मध्ये या भैस अवताराची ज्योत खेळतो हो ! मी त्यां सच्च्या भक्तांशी अनेक प्रकारचा खेळ खेळत त्याला शिकवितो. शिकविता शिकविता त्याला देणं देत राहतो. असा देवा-भक्ताच्या संगजोड मधील सच्चा भक्तात्मा माझ्या पर्यत येवुन पोहचतो.

हे रुक्मिणी ! असा माझ्या पर्यत पोहचलेला देवा-भक्ताच्या संगजोड मधील सच्च्या भक्तात्मालाच तु खडसावले. ! देवा-भक्ताच्या संगजोड ला तडा देण्याचे काम केलेत. हे वागण बर नोव्हे तुजला ! देवा-भक्तांचा संगजोड मला अवघ्या गोडाहुन गोड असतो. देवा-भक्ताच्या संगजोड मधील सच्चा भक्त जिकडे जातो, तिकडेच मी त्या सच्चा भक्तामागे जात त्याच्या पुढे-मागे चालत त्याचे सभोताल रक्षण करत असतो. त्याच्या संग राहत असतो. ऐसा देवा-भक्ताच्या संगजोड मधील सच्चा भक्त जाईन, तिकडे हा धनीदेव आता जाईन !

॥ भक्त जाईनं तिकडे जाईन । मग म्हणालं सांगतलं नाही ॥

हे रूक्मिणी ! असा देवा-भक्ताच्या संगजोड मधील भक्तात्मां जिकडे कुठे जाईन तिकडे मी जात असल्यामुळे मग म्हणु नको की : ''मजला सांगतले नाही''

ऐसे रूक्मिणीला समजावणीपुर्वक उपदेश ग्यान विठोबा धनीदेवाने दिले. आणी खरोखरच तो सत्यदेव आपल्या बोलावर उभा राहण्याकरीता रूक्मिणीच्या आंगणातुन गुप्त होवुन, त्या रूसुन गेलेल्या भक्तांत्माच्या संग मागे-पुढे चालण्याकरीता त्या सच्चा भक्ता मागे गेला.

॥ भक्ता मागं देव गेला । रूक्मीणीला संदेह पडला ।
रूक्मीणी बोले नारदाशी । हरी गेले, घेवुनी या देवाशी ॥
संदेह = शंका, संशय
॥ भक्ता मागे देव गेला । रूक्मिणीला संदेह पडला ॥

*'आत्मा जाईन तिकडे जाईन'* असे ऋषिकेषी धनीदेवाने रूक्मिणीला उपदेश देवुन सांगीतले. आणी रूक्मिणीच्या आंगणातुन गुप्त होवुन त्या भक्तदेवा मागे तो धनीदेव गेला. आपला कृष्ण धनीदेव आपल्या आंगणातुन गेल्यामुळे रूक्मिणीच्या मनात नाना विविध शंका-कुशंका उद्‌भवु लागल्यात. संदेह पडु लागले. तिचे मन संदेही झाले.

रूक्मिणीला संदेह असे पडले की : माझे खडसावनी व्दारे रूसुन गेलेल्या भक्तदेव आता माझ्या या आंगणात माझ्या घरी कधी परतुनी येणार नाही. त्याचमुळे त्या भक्तदेवाच्या संग पुढे-मागे असलेला माझा ऋषिकेशी धनीदेव सुध्दा माझ्या आंगणात माझ्या घरी कधी परतुन येणार नाही. धनी ऋषिकेशाला माझ्या आंगणात माझ्या घरी आता कसे परतुनी आणावे ? धनी देवांस माझे घरी आंगणी कसे परतुन आणावे ? याच्या शंका-कुशंकाने रूक्मिणीच्या मनाला ग्रासले.

धनी ऋषिकेशीला माझ्या आंग आणण्यासाठी तिने विचार केला की : आता प्रथम त्या रूसुन गेलेल्या भक्तदेवाला शरण जावे लागेल. त्या रूसुन गेलेल्या भक्तदेवाला विनवणी याचना करावी लागेल. भक्तदेवास आणा-भाका घालुन कसेही करून समजावुन त्याचे मन वळवुन माझ्या घराच्या आंगणात प्रथम परतुनी आणावे लागेल. सच्चा भक्तदेवाचा मान करावा लागेल. त्या रूसलेल्या भक्तदेवास आता मी कोण्या तोडांने समजावु ? त्याला आता समजावन कोण ? असे संदेह रूक्मिणीला पडले.

६-शास्त्रे ६-जोग व ६-दर्शन असे अठरा खुम्मी धान्य घरी असलेल्या विठोबाच्या नवरीने म्हणजेच रूक्मिणीने ऐसा विचार केला की : या रूसलेल्या भक्तदेवाला माझ्या आंगणात परतुनी आणण्याकरीता मजला मार्ग दाखवण्या साठी सर्व भक्तदेवांचा राजा असलेला नारद हाच सक्षम आहे.

ऐसा विचार रूक्मिणीने करता क्षणीच वरतुन गुप्ततेने सर्व काही पाहत असलेला भक्तराज नारद रूक्मिणी समोर प्रकट झाला. रूक्मिणीच्या आंगणात भक्तांचा राजा भक्तराज नारद प्रकट होवुन उभा झाला. भक्तराज नारदास रूक्मिणीने घडलेली घटना कथन करून आपले संदेह शंका नारद राजा समोर व्यक्त केलेत. आणी त्या भक्तराज नारदास तिने विनविले की : भक्तदेवा संग हरी गेले. तुम्ही घेवुन या तुमच्या भक्त-देवाशी !

रूक्मीणी बोले नारदाशी । हरी गेले घेवुनी या देवांशी :-

रुक्मिणी बोले की : हे भक्तराज नारदा ! भक्तदेवा संगं त्याच्या मागे-मागे हरी गेले आहेत. जोपर्यत रूसुन गेलेला भक्तदेव माझ्या घरच्या आंगणात परतुन येणार नाही, तोपर्यत त्या भक्तदेवाच्या संग त्याच्या पुढे-मागे चालत असलेला हरीसुध्दा आता माझ्या आंगणी कदापी परतुन येणार नाही. माझे हरीला माझ्या आंगणात आणण्या करीता तुम्ही त्या भक्त देवाशी घेवुन यावे. अथवा त्यां जोडीला घेवुन येण्याकरीता आता काय करावे ? हे सांगा हो मजला !

हे भक्तराज नारदा ! मला पडलेल्या संदेहाचे निरसन करण्याकरीता तुम्हीच सक्षम आहात. आता तुम्हीच निरसन करावे. अथवा तुम्हीच माझ्या या आंगणात त्या भक्त-देवाशी घेवुनी यावे.

उत्तरादाखल चतुराई करत नारद बोले की :

॥ नारद बोले रूक्मीणी । दाई घालावी देवाशी ।
दाई घालावी देवाशी । आंग आणा ऋषीकेशी ॥

भक्तराज नारद बोले की : हे रूक्मिणी माय ! तुम्ही फक्त रूसुन गेलेल्या सच्च्या भक्त-देवाला विनवणी याचना करून आणा भाका घालुन कसेही करून समजावुन मन वळवुन या भक्तराज नारदाची दाई/शपथ घालावी. त्याचे पाउल पुढे पडणार नाही. याकरीता माझी दाई/शपथ टाकावी. जर रूसुन गेलेला भक्त-देव त्याच्या भक्तराजाच्या दाईला/शपथेला मानुन परत तुम्हा आंगणात आला, तरच त्या भक्तदेवाच्या संग पुढे-मागे वेढा टाकुन चालत असलेला तुझा हरी त्या भक्त-देवाच्या संग त्याच्या मागोमाग तुझ्या आंगणात परत येईल. म्हणुनच आता तुम्हीच त्या रूसुन गेलेल्या सच्चा भक्तदेवास त्याच्या भक्तराजाची दाई घालावी. दाई घालावी भक्त-देवांशी । आणी त्या भक्त-देवाच्या संग असलेल्या ऋषिकेशीला त्या भक्तदेवासह तुमच्या आंगणात परतुन आणावे.

नारदा व्दारे रूक्मिणीला मार्ग सापडला. देवा-भक्ताचा संगजोड जिथे चालला होता, तिथे ती रूक्मिणी भक्तदेवाशी त्याच्या भक्तराजाची दाई घालण्यासाठी क्षणार्धात प्रकट झाली. आणी भक्तदेवाशी *'भक्तांचा राजा असलेल्या भक्तराज नारद'* ची वारंवार दाई घालु लागली. ती अशी :

॥ कृथा यवगी भक्तराज । याहीची दाई, देवा फिर मागं ।
दाई मानेना देवाशी । पुढे चाले ऋषीकेशी ॥



कृतायवगीच्या १७ लक्ष २८ हजार वर्षात झालेल्या सर्व भक्तगणांच्या ध्यान-भक्तीदिक कर्माने पुणीत होवुन बलवान झालेल्या कृतायवगीच्या भक्तराज नारद याहीची दाई घालत रूक्मिणी भक्तदेवाशी विनवणी याचना अरज करू लागली की : हे भक्तदेवा ! कृतायवगाच्या भक्तराज नारद याहीची दाई तुम्हा भक्तदेवा ! तुम्ही फिरा हो मागे ! जे झाले ते विसरा आणी मागे फिरा. तुम्ही फिरा हो भक्तदेवा मागें ! कृथायवगाच्या भक्तराज नारद याहीची दाई तुम्हा आहे. परंतु कृतायवगीच्या भक्तराजाच्या दाईला/शपथेला तो भक्तदेव मानेना. त्या भक्तदेवाच पाउल पुढे पुढेच पडु लागले. त्याचमुळे त्या भक्तदेवा संग असलेल्या ऋषिकेशीचे पाउल सुध्दा त्या भक्तदेवाच्या संग पुढे पुढे पडत पुढे चाले हो ऋषिकेशी !

भक्तदेव हा कृथायवगाच्या भक्तराज नारदाच्या दाईला मानत नाही आहे. हे दृष्य बघुन रुक्मिणी व्याकुळ होवुन पुनः त्रैतायवगाच्या भक्तराजाची दाई घालु लागली.

॥ त्रैता यवगी भक्तराज । याहीची दाई, देवा फिर मागं ।
दाई मानेना देवाशी । पुढे चाले ऋषीकेशी ॥

त्रैतायवगीच्या १२ लक्ष ९६ हजार वर्षात झालेल्या सर्व भक्तगणांच्या यज्ञादिक कर्माने पुणीत होवुन बलवान झालेल्या त्रैतायवगीच्या भक्तराज नारद याहीची दाई घालत रुक्मिणी भक्तदेवाशी विनवणी याचना अरज करु लागली की : हे भक्तदेवा ! तुम्ही फिरा हो मागे ! रुसले तुम्ही, समजावतो आम्ही ! भक्तराज नारद याहीची दाई तुम्हा भक्तदेवा ! फिर मागं !

परंतु त्रैतायवगीच्या भक्तराजाच्या दाईला तो भक्तदेव मानेना. त्या भक्तदेवाच पाउल पुढे पुढेच पडु लागले. त्याचमुळे त्या भक्तदेवा संग असलेल्या ऋषिकेशीचे पाउल सुध्दा त्या भक्तदेवा च्या संग पुढे पुढे पडत पुढे चाले हो ऋषिकेशी !

भक्तदेव हा त्रैतायवगाच्या भक्तराज नारदाच्या दाईला मानत नाही आहे. हे दृष्य बघुन रुक्मिणी व्याकुळ होवुन, पुनः व्दापर यवगाच्या भक्तराजाची दाई घालु लागली.

॥ व्दापर यवगी भक्तराज । याहीची दाई, देवा फिर मागं ।
दाई मानेना देवाशी । पुढे चाले ऋषीकेशी ॥

तद्नंतर व्दापर यवगीच्या ०८ लक्ष ६४ हजार वर्षात झालेल्या सर्व भक्तगणांच्या पुजा अर्चना कर्मफलादिक ईत्यादी कर्माने पुणीत होवुन बलवान झालेल्या व्दापर यवगीच्या भक्तराज नारद याहीची दाई घालत रुक्मिणी भक्तदेवाशी विनवणी, याचना, अरज, करत दाई घालु लागली की : हे भक्तदेवा ! आणा-भाका घालत थकले मी आता भक्तदेवा ! तुम्ही फिरा हो मागे ! व्दापर यवगाच्या भक्तराज नारद याहीची दाई तुम्हा भक्तदेवा ! फिर मागं !

परंतु व्दापरयवगीच्या भक्तराजाच्या दाईला तो भक्तदेव मानेना ! त्या भक्तदेवाच पाउल पुढे पुढेच पडु लागले. त्याचमुळे त्या भक्तदेवा संग असलेल्या ऋषिकेशीचे पाउल सुध्दा त्या भक्तदेवाच्या संग पुढे पुढे पडत पुढे चाले हो ऋषिकेशी !

व्दापर यवगाच्या पुण्याने पुणीत झालेल्या भक्तराज नारद याची दाईने सुध्दा भक्तदेव मानेना ! हे दृष्य बघुन रुक्मिणी व्याकुळ होवुन आता पुनः कल यवगाच्या भक्तराजाची दाई घालु लागली.

॥ कल यवगी भक्तराज । याहीची दाई, देवा फिर मागं ।
दाई मानली देवाशी । आंग आले ऋषीकेशी ॥

कृतायवगाच्या १० वर्षे ध्यानादिक कर्म केल्याने ज्या पुण्याचा भागीदार भक्त होतो, तेवढेच पुण्य त्रैतायवगात ०१ वर्ष यज्ञादिक कर्मे केल्यानं मिळते. तर व्दापरयवगात ०१ महीना पुजा अर्चना केल्याने भक्ताला मिळते. परंतु तेवढेच पुण्य कलयवगात फक्त ०१ दिवस सच्च्या भावाने नाम संकिर्तन भजनादि भक्तीकर्मे..ईत्यादी केल्याने त्या सच्च्या भक्ताला मिळते.

ऐवढे सर्व पुण्य ! कलयवगात एकाच दिवसात सच्च्या भक्तास सच्च्या भक्ती-भावाने भक्ती केल्याने मिळत असल्यामुळे, कलयवगातील नाम संकिर्तन भजनाच्या प्राबल्याने कलयवगाचे सच्चे भक्तगण या तिनही यवगाच्या सच्या भक्तगणांपेक्षा अधिक बलवान प्रबल व देवासमान होत आहे. त्याचमुळे या कलयवगाच्या भक्तीबळावर उभा असलेला सर्व भक्तांचा राजा भक्तराज नारद यांचे सुध्दा पुण्यं बळ व प्राबल्य या तिनही यवगापेक्षा कितीतरी पटीने वाढलेले आहे. तिनही यवगात पुणीत झालेल्या भक्तराज नारदपेक्षा या कलयवगाच्या सच्च्या भक्तांव्दारे तो भक्तराज नारद कितीतरी पटीने अधीक बलवान व प्रबळ पुणीत झालेला आहे. त्याचे पुण्य सामर्थ शक्ती तिन यवगा पेक्षा कलयवगात कितीतरी पटीने वाढलेली आहे.

रुक्मिणीने जेव्हा या कलयवगाच्या ०४ लक्ष्य ३२ हजार वर्षातील सच्च्या भक्तांगणांच्या नाम संकिर्तन भजन ईत्यादी कर्माव्दारे तिनही यवगाच्या भक्तांच्या भक्तबळापेक्षा अधीक बळ मिळुन अत्यंत प्रबळ बलवान पुणीत झालेल्या कलयवगीच्या भक्तराज नारद ची दाई भक्तदेवाशी रुक्मिणीने विनवणी याचना करत घातली, तेव्हा या कलयवगाच्या सच्च्या भक्तांव्दारे अत्यंत प्रबल पुनित झालेल्या भक्तराजाची दाई ने भक्तदेवाचे पाउल तिथल्या तिथेच थबकले. भक्तदेवाचे पाउल पुढे काही पडलं नाही. आणी तो भक्तदेव या कलयवगाच्या भक्तराजाच्या दाईला मानला । ही कलयवगी भक्तराज ची दाई मानली भक्ताशी !

भक्तदेवाने कलयवगांच्या सर्व सच्च्या भक्तांव्दारे पुणीत होवुन अत्यंत बलवान झालेल्या कलयवगाच्या भक्तराजाला मान दिला. भक्तदेवाच पाउल पुढे न पडता तो भक्तदेव रुक्मिणीने घातलेल्या या कलयवगाच्या भक्तराजाच्या दाई ला मानला. आणी मग..

आंग आले ऋषिकेशी :-

कलयवगाच्या भक्तराज यांची दाईला तो रुसलेला भक्तदेव मानुन रुक्मिणीच्या आंगणात परत गेला. त्याचबरोबर त्या भक्तदेवाच्या संग पुढे मागे असलेला ऋषिकेशी सुध्दा त्या भक्तदेवाच्या मागोमाग रुक्मिणीच्या आंगणात आले. ही देवा-भक्ताची जोडी रुक्मिणीच्या आंगणात आली.

अश्या रितीने रुक्मिणीच्या कलयवगाच्या भक्तराज च्या दाई व्दारे रुक्मिणीच्या आंग/आंगणी आले हो ऋषिकेशी !

भजने:-

॥ कलयवगी भक्तजन, देवा सम्मान । ऋषीकेशी आले याहीला शरण ।
ऋषीकेशी आले याहीच्या आंग/संग । ऋषिकेशी आहे याहीच्या संगतीनं ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ प्रथम खंड समाप्त ॥



॥ खंड ०२ ॥

॥ ओवी नं. ०१ ॥

ओवी महात्म :- मांड बसलेल्या पहील्या दिवशी, हमखास म्हणण्यात येणारी..
देवमनजी यांनी शब्दबध्द करून गायलेली

॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

## ॥ सहा नर सचला साचा ॥

॥ सहा नर, सचला साचा । या शनीचराच्या/सम्मेश्वराच्या पुंजनी ।
ज्योत होती, पाताळी-भुवनी । सोयम्/स्वयंम् रूपी ॥ घृ ॥
॥ पाताळाची ज्योत, श्री आकाशाला गेली । हे अल्लाद वस्तु झाली
दर्शना नाही आली । अकारातं ॥
॥ श्री आकाशाला मानं । कर/घ्या तयाचे दर्शनं ।
सुने आहे, अवघे देह । ज्योती बिनं ॥
॥ सुने आहे, अवघे देहे । साचात उरलं कायं ?
सहा जोग, करतीन पत्ता । सोस नोव्हयं ॥ ०४ ॥

॥ साचा सचवला, निर्गुण । त्यापासुन, अवघे जन ।
जन सांगत, असे ग्यान । अवघं हिनं ॥
॥ हिनं आहे, ग्यान ध्यान । जप तप अनुष्ठान ।
सुखःसोहळे, झाले हिनं । सोस भुलल्यानं ॥
॥ साधु हे सन्याशी । पाताळी पाहतीन अवघे जन ।
सुखः सोहळा झाला हीनं । सोस भुलल्यानं ॥ ..जळगाव दांड
॥ शत/पत सोहळे, करतीन जन । जन भुलले पाखंडात ।
जन भुलले, पाखंडातं । काही नाही उमजत ॥
॥ मुळ यवग, पहाव शोधुन । भले पंडीत, तुम्ही चातुर ।
कसे भुलले, सोसाचे घर । नाही खबर ॥ ०९ ॥

॥ आदी पुरुष, आदीरूप । याहीची उभी राहली ज्योत ।
साच्यात भरला सोस । झाले/आले कपट ॥
॥ भुल पाडुन/सोस लावुन, लावली धुनी । तिरलोकी, तिरभवनी ,
खाली पाणी, वर पाणी । यामध्ये पेटला अग्न,
झाली धुळधानी ॥
॥ अन्न-अग्न, पवन-पाणी । आकाश पाताळ धरणी ।
सहा नर, सचला साचा । उभा दर्शनी ॥ १२ ॥

**भजने :-**

॥ अन्न-अग्न, आकाश-धरणी, पाणी पोहन । देहीला, तारू आहे, हे सहा जन ॥
॥ अन्न-अग्न, आकाश-धरणी, पाणी पोहन । या देहीत, तारू उभा, निरंजन ॥
॥ साचा सचला तुम्हा हात । कृष्ण महाराज प्रकटले जगात ॥
॥ साचा सचला, तुम्हा हात । याहो महाराजा, सोयंम् दयाहो भेट ॥
॥ साचा सचला, तुम्हा हात । याहो महाराजा, दया बाळाला भेट ॥
॥ बाळ अडाणी अग्यान । शिकव महाराजा, या बाळाला ग्यान ॥
॥ बसली भजनाची मांड । याहो महाराजा, उभे राहा हो येथ ॥
॥ पक्की बसली, हो मांड । दयाहो महाराजा, आम्हा गिण्यानाचा सांड ॥
॥ चतुर्पती गिण्यान, दया देवा । अंतरी लावा हो देवा, ग्यानाचा दिवा ॥
॥ चतुर्पती गिण्यान, दया देवा । तुमच्या चरणा वर माझा माथा ॥
॥ चतुर्पती गिण्यान, दया हरी । आमचा माथा हो तुमच्या, चरणा वरी ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ निरसनसह सहा नर सचला साचा ॥

-: निरसन/स्पष्टीकरन :-

॥ सहा नर सचला साचा, या शनीचराच्या/सम्मेश्वराच्या पुंजनी ।
ज्योत होती पाताळी-भुवनी, सोयम् रूपी ॥ ०१ ॥

सहा नर सचला साचा...

जेव्हा दोन्ही बिंदुचा, म्हणजेच पुरूष-बिजरूपी शिव आणी स्त्री-बीजरूपी शक्ती हे दोन बिंदु एक झाले, तेव्हा त्या संगमाव्दारे तो आत्मपुरूष आत्मा सम्मावला. आणी मायेच्या जिवनकळा ज्योतीच्या साहयाने, मायेच्या उदरी या देहीची रंचना झाली.

या देह रंचनेत, त्या आत्मपुरूषाच्या म्हणजेच आत्म्याच्या चैतन्यमय प्रकाशात, आत्माची छाया पडुन त्याचा प्राण निर्माण झाला. जशी देहीची छाया या सर्वसाधारण प्रकाशात पडत असते, तशीच या आत्मपुरूषाची छाया त्याच्या चैतन्यप्रकाशात प्राण स्वरूपात पडत असते. आत्म्याची छाया म्हणजे हा प्राण होय. या प्राणापासुन पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश आणी अन्न या निराकार सुक्ष्म तत्वांत चेतन तत्व अवतरून/सम्मावुन, या सहा नरांचा सगुण-निगुर्ण साचा प्रथम बनला.

खंड०३/०५ देहेवर्णनाची ओवीतील चरणांचा आधार घेवुन, या देहीत सहा नरां ने काय काय उभे केले याचे ग्यान घेवु या ।

**१. पहीला नर पृथ्वीतत्व ।**

॥ नाडी-हस्ती, त्वचा-मांस । आणीक आहे केस
हे पंचगुण चांगले पाहयं । पृथ्वी तत्वाचे होय ॥खंड ०३-०६॥

पहीले पृथ्वीतत्व । या पांडवाने अन्नरूपी द्रौपदीचा संग करून या देहीत १. नाडी २. हस्ती ३. त्वचा ४. मौस ५. केस, या रूपात आपले पंचगुण व पंचविषय घेवुन हा नर या देहीत अवतरला.

**२. दुसरा नर आपतत्व/जलतत्व ।**

॥ लाळ-मुत्र, स्वेत-रेत । आणीक आहे रूधीर
हे पंचगुण चांगले पाहयं । आप तत्वाचे होय ॥खंड ०३-०६॥

दुसरे आपतत्व/जलतत्व । या पांडवाने अन्नरूपी द्रौपदीचा संग करून या देहीत, १. लाळ २. मुत्र ३. स्वेद /घाम ४. रेत/विर्य ५. रूधीर/रक्त, या रूपात आपले पंचगुण व पंचविषय घेवुन हा नर या देहीत अवतरला..

**३. तिसरा नर तेजतत्व/अग्नीतत्व ।**

॥ सुधा-तृष्णा, निद्रा-आळस कांती । हे आहे तेजाचे वंश ।
हे पंचगुण चांगले पाहयं । तेज तत्वाचे होय ॥खंड ०३-०६॥

तिसरे तेजतत्व/अग्नीतत्व । या पांडवाने अन्नरूपी द्रौपदीचा संग करून या देहीत १. सुधा/भुक २. तृष्णा/तहान ३. निद्रा/झोप ४. आळस ५. कांती/देहीचा तेजोमय आरा, या रूपात आपले पंचगुण व पंचविषय घेवुन हा नर या देहीत अवतरून साकारला.

**४. चौथा नर वायुतत्व ।**

॥ चलन-वलन, आकुंचन-प्रसरण । आणीक आहे निरोधन ।
हे पंचगुण चांगले पाहयं । वायु तत्वाचे होय ॥खंड ०३-०६॥

चौथे वायुतत्व । या पांडवाने अन्नरूपी द्रौपदीचा संग करून या देहीत १. चलन २. वलन ३. आकुंचन ४. प्रसरण ५. निरोधन, या रूपात आपले पंचगुण व पंचविषय घेवुन या देहीत अवतरून साकारले.

**५. पाचवा नर आकाशतत्व ।**

॥ क्रोध-लज्जा, व्देष-मोह भय, आहे आकाशाचा वंश ।
हे पंचगुण चांगले पाहयं । आकाश तत्वाचे होय ॥खंड ०३-०६॥

पाचवे आकाशतत्व । या पांडवाने अन्नरूपी द्रौपदीचा संग करून, या देहीत १. क्रोध २. लज्जा ३. व्देष ४. मोह ५. भय, या रूपात आपले पंचगुण व पंचविषय घेवुन या देहीत अवतरून साकारले.

या पंचभुतात्मक पाचही पांडवानी, अन्नतत्वरूपी द्रौपदिशी एका एका निश्चित समयाला साधुन जोडी केली. आणी त्यांच्या या मिलनातुन जडतत्वे उत्पन्न होवु लागलेत. ते असे...

जसे प्राणरूप अन्न-अग्नी या जोडीने आपल्या तत्वांच्या संगाने, अग्नी व्दारे या अन्नाचे पचन केलेत. या रती-क्रियेत या अन्नाने सुक्ष्म अती सुक्ष्म रूप घेत, या पंचतत्वीय देहीला पोषक असे अनेक रसतत्वे ला जन्मा घातले.

तसेच याच अग्नी-अन्न च्या जोडीव्दारे, अन्नाच्या रसाला सुक्ष्म अती सुक्ष्म अवस्थेत नेवुन, या देहीला पुढेच कारण असलेले १. विर्य, २. तप, ३. मंत्र बोली, ४. कर्म, ५. लोक, आणी या लोकांत ६. नाम ईत्यादी ची सोय लावुन ठेवलेली आहे.

अन्नाच्या अंशाने चंद्र तर तेजाच्या अंशाने सुर्य, या देहीत प्रकटले आहे. या प्रकटलेल्या जडतत्वे व्दारे देहीच्या पेशी आकारू लागल्या. पेशीपासुन अवयव आकारू लागलेत. वेगवेगळ्या अवयवांपासुन देही साकार झाली. अन्नाव्दारे निर्मित शुक्र/विर्य व शोनित यांच्या संगमाने योनी तयार झाली ती अशी :

॥ पुरूषाचा भाग अधिक । पुत्र असे दक्षिण कुशीत ।
स्त्री चा भाग अधिक । पुत्री असे वाम कुशीत ॥
॥ स्त्री-पुरूषाचा भाग अधिक । मध्य भागी आहे नपुंसक ।
हा रेत विस्तार महादेवाचा । मानव जन्म पहा कोण्या रितीचा ॥
...०३/०५:-देह वर्णणाची ओवीतील चरणे.

पुरूषलिंगः- पुरूष-बिजतत्वांचा भाग दक्षीण कुशीत अधिक झाल्यास, पुरूषलींग असलेला पुत्रा ची दक्षिण कुशीत रंचना झाली.

स्त्रीयोनीः- तर स्त्री-बिजतत्वांचा भाग वाम कुशीत अधिक झाल्यास, स्त्रीयोनी असलेली पुत्री ची वाम कुशीत रंचना केली गेली.

नपुसंकः- आणी याच्या व्यतीरीक्त, पुरूषबिजतत्व व स्त्री-बिजतत्वें यांचा समसमान भाग मध्यभागी अधिक संचीत झाल्याने, मध्यभागी नपुसंकाची रंचना केली गेली.

अन्नाव्दारे झालेले हे सर्व कार्य, या आत्मपुरूषाने आपल्या चैतन्यप्रकाशात प्रथम श्रध्दामय सिदाई निर्माण करून, स्वतः अक्त्यारी राहुन करवुन घेतलेले आहेत.

अश्या रितीने, या आत्मपुरूषाने आपल्या चैतन्यप्रकाशात पडलेल्या त्याच्या छायाव्दारे निर्मित झालेल्या प्राण व्दारे आधी .श्रध्दामय सिदाई प्रकटली. आणी मग या सिदाईच्या देवानं..

१. आकाश २. वायु ३. तेज ४. आप ५. पृथ्वी/धरणी ६. अन्न
या सहा नरात चेतनतत्व ओतुन, पुढेच कारण असलेले...
८. इद्रिये ९. मन १०. मती ११. विर्य १२ तप १३. मंत्रबोली १४. कर्म १५. लोक आणी या लोकात १६. नामरूप ..

असे एकुन सोळा कला आपल्या प्राणाच्या निर्माण केल्या.

या देहीत, तो सिदाईचा देव या कलाकलाने समावीष्ट होवुन, या देहीत निराकार निराधार निर्गुण चैतन्य ज्योतिर्मय रूपात उभा झाला.

ज्याच्या ठिकाणी या सोळा कलांचा प्रार्दुभाव आहे, असा तो निराकारी निराधारी निर्गुण चैत्यन्यज्योतीर्मय आत्मपुरूष हा दुसरा तिसरा कोणी नसुन, त्या निराकार निराधार आदीपुरूष धन्याचा तेजोगुणी अंश असलेला आत्मा होय.

निराकार निराधार चतुर्पती आदीपुरूष धनी आपल्या तेजोगुणी अंश असलेल्या आत्मा व्दारे, या देहीचा आत्मपुरूष बनुन या देहीत उभा झालेला आहे. हाच तो सोळा कला-कलात वसलेला षोडसकला आदीपुरूष होय असे अध्यात्म सांगी करते. याचमुळे हा धनी आपल्या विशिष्ट चैतन्याच्या अधिष्ठानाव्दारे, कला-कला रूपाने देहीत भासमान होत राहतो/उभा असतो.

कला-कलात, निराकार चैत्यन्य ज्यातिर्मय स्वरूपात या देहीचा मुळस्तंभ बनुन तो धनी उभा आहे. याच निराकार निराधार चैत्यन्यमय निर्गुण मुळस्तंभाच्या आधारावर हे देह-देउळ उभे झाले आहे.

तो धनी एकला । तो एकलाच एकाच चैत्यन्य तत्वाचा अखंड अनुभव देत, मुळस्तंभ बनुन या देहीला आधार देत निराधारी उभा आहे. या निराधारी च्या आधारा वर, राज ऐसे थोर देहीच देउळ त्यानेच तयार केले आहे. त्यानेच ही कारगीरी करून देहेदेउळ उभारले आहे. तोच या देहेदेवळाची महीमा वाढवत आहे.

धन्य तो कारागीर धनी । या धन्याच्या धन्य कारागीरीने तीन ताळ, २१ स्वर्ग, १४ भुवन तिरभवन ..ईत्यादी, अनेक रंचनासह अनेक शक्तीयॉ-सिध्दीयॉची येथे ठेवण ठेवले आहेत.

तसेच या देहे देउळावर चंद्र-सुर्य, हिरे माणीक लाल लावुन, आपल्या चैतन्यप्रकाशाने या देहेदउळाला चमकवत आहे. उजाळत आहे. या धन्यानं बहु हौशीसाठी रूपात आणुन हे देह देउळ तयार केले आहे. सहानर साचा व्दारे तयार केलेल्या देहेदेउळात, या देहीचा धनी स्वतः निराकार निराधार सोहंम्रूपी चैत्यन्यमय ज्योत स्वरूपात सोयंम नांदतो आहे.

या शनीचराच्या/सम्मेश्वरांच्या पुंजनी..

**शनीचर** :- शनी चा चर म्हणजे अनुशासक ची फिरस्ती, संचारन, फेरी, अनुशासक । **सम्मेश्वर** :- समशेर धारण करणा-या यवगाचा राजा. सम्मेश्वरा बध्दलचे अधिक ग्यान खंड०४/०८ ओवी ९१ सम्मेश्वरा च्या शब्दार्थातुन घ्यावे.

धनीदेवा । तु बनवलेल्या देह देवळात शनीदेव दर बारा वर्षानी फेरी मारत आहे. आणी या देहीला जित्या जन्माची चौ-यांशीचा अनुभव वाहत या देहदेवळास वज्राप्रमाणे मजबुत करत आहे. या शनीप्रमाणे धनीदेवा तुम्ही सुध्दा या देहीत शनीप्रमाणे संचरत देहदेवळाच्या जिर्ण झालेल्या पेशीरूपी विटा इकडुन मोडत, तिकडुन नवनव्या पेशीरूपी विटा लावणी-पेरणी करत शेती-शेती चा खेळ करत उभा आहे. देही जगवत आहेस. हे सम्मेश्वरा ! तुच या देहीच्या हाती नामाची समशेर देणारा या देहीचा ख-या अर्थाने सम्मेश्वर आहे. तुमच्या पुंजनीच हा देह ठेवा. तुला आम्ही पुनःपुनश्चः विनवितो की, या शनीचराच्या पुंजनीच या सहानर साचा देहीची उमर चौदावी कायम ठेवुन, सदोनित-अखंडीत -निरंतर करोडोच्या वरत आयुष्य देवुन ही देही मजबुत ठेवा हो । निरशुन्याच्या धन्या, सावंग्याच्या मालका । हा अखंड देहेजीव नांदव गा सारखा ।

तुमच्याच कृपेने या देहीत पाताळी उभी असलेली पाताळाची ज्योत, आता आकाशात उभी झाली आहे । या सप्तपाताळ सह १४ भवनी ही ज्योत सोहंम् रूपी उभी झाली आहे. ही ज्योत अशीच अखंडपणे तेवत ठेवावी ।

याच करीता ही आम्हा अन्जान लेकरांची अर्ज ।

ज्योत होती पाताळी-भुवनी, सोयम् रूपी...

ही नरदेही तीन लोकांत विभागली गेली आहे. ती अशी :

१. देहीची कम्बर आणी कमरेखालचा भाग यास पाताळ लोक म्हणतात.
२. तर कमरेवरचा भाग ते गळयापर्यतच्या भागाला म्हणजेच धडाला मिर्तलोक असे म्हणतात.
३. तर मानेच्या वरच्या भागावर विराजमान असलेले मस्तका ला ब्रम्हांड असे म्हणतात.
४. आणी चौथा चौताळ ।

जसे या ब्रम्हांडावर उर्ध्व स्वर्ग आहे. आणी इतर सुप्त शक्तीयॉं व सिध्दीयॉं या अगोचर स्थानी वसलेल्या आहेत. तसेच या देहीच्या उर्ध्व स्वर्गात सुप्त शक्तीयॉं व सिध्दीयॉं वसलेल्या आहेत.

आणी या उर्ध्व स्वगालोकावरील अगोचर स्थानी, तो निरंजन उभा आहे. या चौताळी या निश्कलंकी निरंजनाचे राज आहे... असो. काया खंड०३ मधुन देहीचे अधिक ग्यान घ्यावे.

मातेच्या देहीच्या पाताळ लोकी गर्भि विसावलेल्या नव्या देहीची जिवनकळा ज्योत ही नव्या देहीच्या मुल-आधार चक्रावर येवुन स्थिरावली. मायेच्या जीवनकळा ज्योतीने ही गर्भिदेहीत स्थिरावलेली ज्योत मायेच्या पाताळ लोकी उजेडु लागली.

मातेच्या उसनवार चैत्यन्यरूपी तेलाच्या साहयाने ही गर्भिदेहाची ज्योत तेवत राहली. मातेच्या उसनवार जीवनकळा ज्योतीला, गर्भि देहीची ज्योत मिळुन, गर्भि देहीची संपुर्ण रंचना झाली. नव्या गर्भि देहीच्या आधारचक्राच्या स्थळी असलेल्या, कुर्म-वराह शेषाच्या माथ्यावर असलेल्या सप्तपाताळाच्या वर, साडे तिन वेटोळे कुंडल घालुन त्या ठायी चैत्यन्याशक्ती बनुन या नव्या देहीत स्थिरावली.

सातव्या महीन्याच गणीत । उभी जीवनकळा ज्योत.... ०३/०३:-पाळणा

या रंचनेत सातव्या महीन्याच्या गणीतात, तो निरंजन निगुर्ण निराधार उभा झाला. या सातव्या महीन्याच्या गणीतातच, या मुलाधार स्थीत शक्तीला त्या निर्गुणाने धक्का देवुन जेव्हा जागृत केली, तेव्हा ती वरवर सरकत स्वर्गलोकांपर्यत तिन्ही लोकांत चैत्यन्य प्रकाश देत सळसळली. आणी निर्गुणाव्दारे आलेल्या चैत्यन्यप्रकाशाने, या निगुर्ण म्हणजे आत्मा च्या छाया व्दारे या नव्या देहीत प्राण निर्माण झाला. देही स्वय:पुर्ण प्राणमय झाली.

ज्याप्रमाणे ही स्वय:पुर्ण ज्योत प्रथम नव्या देहीच्या पाताळी सोहंम रूपात उभी झाली होती । तद्नंतर ती या देहीच्या आकाशाला गेली, त्याचप्रमाणे योगी सुध्दा देहीच्या पाताळ स्थीत मुलाधारावर स्थिरावुन पहुडलेली शक्तीची ज्योत प्रथम उभी करतो । तद्नंतर ती शक्तीज्योत सळसळत वर वर जात एक एक चक्रावर मार्गक्रमण करत, त्या त्या चक्रांना उजाळत षटचक्र भेदन करून देहीच्या उर्ध्वस्वर्गिच्या आकाशात जाते. तिथे अल्लाद वस्तु होते. दर्शना नाही येत आकारात ।

॥ पाताळाची ज्योत, श्री आकाशाला गेली । तिथं अल्लाद वस्तु झाली ।
दर्शना नाही आली, आकारातं ॥
पाताळाची ज्योत, श्री आकाशाला गेली ।..



The Seven Chakras

देहीच्या रंचनाकालावधीत, देहीच्या पाताळी आधार चक्रापर्यत येवुन स्थिरावलेली शक्तीची ज्योत, तेथुन वर उठुन वरवर सरकत सरकत देहीच्या सर्व लोकांना प्रकाशमान करत गेली होती. ही प्रथम १ .मुलाधार व आधारचक्री नंतर

२. नाभीस्थानचे रविचक्र /मणीपुर
३. हद्यस्थानचे अनाहत चक्र
४. कंठस्थानचे विशुध्दचक्र
५. तोंडाच्या आत वरच्या जबडया च्या भागातील पोकळी मध्ये असलेले तालुमुल चक्र
६. दोन्ही भुवयाच्या मध्ये भृकृटी स्थानी असलेले आज्ञा/अग्नचक्र



या सहा चक्रांना प्रकाशीत करत करत, या सहाचक्रस्थानी प्रचुन मात्रा मध्ये शक्ति उर्जा देत ही पाताळाची ज्योत उर्ध्व स्वर्गि गेली.

७. आणी मग या षटचक्रांच्या शेवटी, चंद्र-सुर्याच्या मेळी गोल्हाटीत टाळुस्थीत सातवे अगोचर चक्रस्थानावर प्रकाशली.

...आणी तेथुन पुढे, जिथे निरंजनज्योर्तिमय आदीपुरूष धनी उभा आहे, तिथपर्यत गेली होती. धन्याच्या चरणी लीन होवुन मग ती आंगीन कपाटी गिरली/पडली.

अश्यारितीने ही ज्योत देहीच्या मनक्यास्थीत २१ स्वर्ग ओलांडुन, षटचक्रपल्याड सातवे अगोचरचक्र स्थानी गेली होती.

हे अनंत प्रभा अपरंपार असलेले अगोचर स्थान देहीच्या मस्तकस्थान जे ब्रम्हांड म्हटल्या गेले आहे, त्या ब्रंम्हाडाच्या आकाशी आहे. ही पाताळी असलेली शक्तीची ज्योत ब्रम्हांडा च्या आकाशात-गगणात जावुन, गगणी उभ्या असलेल्या निरंजर आदीपुरूष धन्याला कवटाळली. त्या निरंजन धन्याच्या परमय सुखानंदाच्या चैत्यन्य शिक्का लाभाव्दारे अल्लाद म्हणजेच आनंददायी वस्तु बनुन चमकली. आनंदाची ज्योत बनली. आणी या देहीच्या अंगीन कपाटी ही परमयानंदी ज्योत उन्मुन्नी, खाली गिरत-पडत देहे देउळी च्या दस ज्योती, सहा षटचक्रे वर ही परमयानंदी ज्योत उर्जा शक्ती देत, देहकांती भेदुन जिवनकळा ज्योतरूपाने देहीत विसावली आहे.

या देहीची रंचना, या जीवनकळा ज्योतीनेच ज्योतीला ज्योत लावत केली आहे. म्हणजेच एका देहीच्या जीवनकळा ज्योतीने दुस-या देहीची जीवनकळा ज्योत ला प्रकाश देवुन ती ज्योत लावली, तर धन्याने त्या ज्योतीच्या दिवनालीत, चैत्यन्याचे तेल ओतत ही ज्योत प्रज्वलीत ठेवलेली आहे.

जसे मायेच्या जीवनकळा ज्योतीने तीच्या गर्भात दुस-या देहेरूपी दिवनालीची जीवनकळा ज्योत पेटवली. आणी गर्भातील त्या जीवनकळा ज्योत तेवत ठेवण्याकरीता धन्याने चैतन्याचे तेल ओतुन तिला आत-बाहेर प्रज्वलीत ठेवली.

एका जीवनकळा ज्योतीनेच दुसरी जीवनकळा ज्योत उभी कलेली आहे. या जीवनकळा ज्योतीने तयार केलेला देहीचा आकार या जगाच्या देखत आहे. जग या देही चा आकाराला पाहत त्या आकाराचे दर्शन घेत आहे. परंतु जी या देहीला मुळस्तंभाप्रमाणे आधार देत उभी आहे, ती निराकार निराधार सोहंम् चैत्यनज्योत ही तर चैतन्याची गाही देत या जगाच्या देखतच आहे. तरी जग ओळखेना !

या ज्योतीच्या चैत्यन्यव्दारे हे सर्व देहे हे सर्व जग पाहत आहे. सर्व जग या ज्योतीचे चैत्यन्य अनुभवत आहे. परंतु ही ज्योत निराकार असल्यामुळे जगाच्या *दर्शना नाही आली हो आकारात* ।

निराकार निराधार निरंजन आदीपुरूष धन्याने आपली निरंजन चैत्यन्य सोहंम् ज्योत आपल्याच तेजोगुणी अंश अवतारा व्दारे या देहीत उभी केली आहे. ही निरंजन धन्याची ज्योत आपल्या मुळयवगाच्या मुळ स्वरूपातच निराकार निराधार निर्गुण निरंजन चैत्यन्यमय सोहंम् रूपात देहीत उभी आहे. हीच आदीपुरूष धन्याच्या तेजोगुणी अंशाव्दारे उभी केलेली ज्योत या जगा देखतच आपल्या चैतन्य-शक्तीची गाही देत आहे. परंतु जगाच्या दर्शना नाही आली हो आकारात ! कारण त्यांची दृष्टी देहीवरच स्तंभित केल्या गेली. स्वार्थि तिरगुणीं ने ही दृष्टी आत वळवुन देहीच्या आत जावु दिली नाही हो.

हा मुळयवगाचा आदीपुरूष धनीच या देहीत तेजोगुणी अंश अवतार घेवुन, या देहीचा धनी बनुन देहीच्या ब्रम्हांडी निराकार निरंजन चैत्यन्य ज्योत रूपात उभा आहे. म्हणुनच देहीच्या या मस्तकस्थीत ब्रम्हांडातील आकाशाला मान आहे ।

ध्यानात आकाश दर्शन झाल्यावर त्या आकाशाला मान देवुन, ध्यान तसेच पुढे चालु ठेवा. आणी पुढे चाललेल्या त्या निरंतर ध्याना व्दारे त्या निरंजन ज्योतीचे दर्शन घ्या ।

ध्यान नसेल होत तर, प्रत्यक्ष सावंगा येथे येवुन याच ज्योतीचा दर्शन घ्या. अनुभव घ्या. याच चतुर्पती कृष्ण अवधुत ज्योती ला मन-भावाने ईमानदारीने सच्चेपणाने भजा. आणी मग ध्यान न करताच, अकस्मात कोण्या एका दिवशी डोळे मिटुन शांतपणे पडुन राहता राहताच प्रथम आकाश दर्शन होईल. त्या आकाश दर्शनाला मान दया. हे आकाशच सर्वत्राला उत्पन्न करणारा सर्वत्राचा पिता होय. या आकाश रूपी पिता चे पिंडी या ब्रम्हांडी दर्शन घेत राहा. ब्रम्हांडाच्या या आकाश दर्शन चा लाभ होत राहुन, कोण्या एका दिवशी त्या आकाशात ही निरंजन कृष्ण ज्योत दर्शन देईन. अनुभव देईल. एवढ मात्र निश्चित आहे सच्या भक्तांकरीता ।

॥ श्री आकाशाला मानं । कर तयाचे दर्शनं ।
सुने आहे अवघे देह । ज्योती बिनं ॥

श्री आकाशाला मान :-

या देहीचे मस्तकालाच ब्रम्हांड असे म्हटल्या गेले आहे. या ब्रम्हाडातील उर्ध्व स्वर्गलोकावर अगोचर स्थानी, धनी आपला तेजोगुणी अंश अवतार घेवुन उभा आहे. हा ऋषि तेथे निर्वाणी बसला आहे. तेथे तोच धडाधडा ओहंम्-सोहंम् ची धुनी जाळतो आहे. तोच या ब्रम्हांडी बसुन सोहंम् अजपा जप जपत आहे.

देहीच्या या ब्रम्हांडी असलेल्या, या श्री च्या आकाशाला मान दया. ब्रम्हाडीच्या या गगनाला शुध्द भावाने कवटाळा. या आकाशाचे दर्शन घेत घेत, कोण्या एका दिवशी या निर्वाणी बसलेल्या ऋषि चे काहीतरी उपाय करून दर्शन घ्याहो.

कर तयाचे दर्शन :-

हे आकाश दर्शन घेण्याकरीता, कृष्णाजीची वाणी गडे हो तुम्ही मनीच ऐकाव. नुसतेच ऐकल्याने काहीएक होत नाही म्हणुन काहीतरी उपाय करून, मन त्याच्या चंचल अस्थीर स्वभावामुळे, जिकडे कुठे भले भलतीकडे भटकत असेल तेथुन ते खेचुन आणावे.

देहीचा धनी देह-शक्तीने लोपवला आहे. हा शिव शक्तीने लोपला आहे. देह-शक्तीच्या ताब्यात जावुन त्याच्यावर देहीच्या विषयवासना ईत्यादी कंलकाचे वेष्टने चढवुन या देह-शक्तीने त्याला चोर ठरवला आहे. हा देह-शक्तीचा धनी असता चोर झाला आहे. स्वतः अक्त्यारी असता शक्तीचा मुक्त्यारी झाला आहे.

म्हणुनच सोहंम् आत्मा पुरूष रूपी धनी म्हणजेच या आत्मपुरूषावरचे देह-शक्तीचे कलंकाचे वेस्टने काढुन त्याला निश्कलंकी बनवत देह-शक्तीचा अक्त्यारी धनी करण्याकरीता, देह-शक्तीच्या ताब्यात असलेल्या सर्वांना सोडवुन धन्याच्या अक्त्यारी ठेवण्याकरीता, देह-शक्तीच्या ताब्यात असलेल्या मनाला खेचुन आणण्याकरीता,....ईत्यादी कारणास्तव स्वतःला इंद्रिये मन बुध्दी यापेक्षा श्रेष्ठ आत्मपुरूष माना. आणी मग उच्चतर अशी जी ती बुध्दि तिच्याव्दारे तिच्या खालच्या स्तरावर असलेल्या मनाला बांधुन आपल्या अक्त्यारी आणा. आपल्या अक्त्यारी आलेल्या मनात जागृत असलेल्या इद्रिय विषय वासनां, मोह आसक्ती, इच्छा,....ईत्यादी विकारी कलंका पासुन, या मनाला मुक्त करत मन शुध्द स्वच्छ व निर्मळ करत न्यावे.

या मनाला बांधुन निर्मळ करण्याकरीता, अनेक मार्गापैकी एक मार्ग हा आहे की : तुम्ही सजग जागृत राहुन, डोळे बंद करून फक्त तुमच्या श्वासावर लक्ष्य दया. श्वास उजव्या नाकपुडीतुन वाहत आहे की डाव्या नाकपुडीतुन की

दोन्ही नाकपुडीत हे ध्यानात आल्यावर, तो जसा वाहत आहे तसा काही एक प्रयत्न करता नैसर्गिक रित्या वाहु दया. फक्त त्यावर लक्ष्य/ध्यान ठेवा.

असे केल्यानं तुमच्या ध्यानात येईल की, श्वास आत येतांना ***सों*** असा आवाज उत्पन्न करत आहे. आणी श्वास बाहेर पडतांना, ***हंम्*** असा आवाज उत्तन्न करत आहे. या श्वासाच्या आत बाहेर येणा-या या ***सो*** आणी ***हंम्*** या दोन आवाजा वरच मन केंद्रित करा.

निरंतर मन केंद्रित करतांना, मन त्याच्या चंचल स्वभावामुळे इकडे तिकडे यदा कदाचित भटकले, तर त्याला तेथुन खेचुन आणुन पुनश्च या श्वासाच्या ध्वनीवर केंद्रित करावे. असे करत राहल्याने आपरूप ***सोहंम् चा अजपा*** जप होईल.

असे एक दोन घंटा मन केंद्रित करण्याची तयारी झाल्यानंतर, त्या मनाला त्रिकुटी न्या. म्हणजेच दोन भुवयाच्या मधली भृकूटी च्या थोडे वर स्थित करावे.

तिथे जे दिसते ते आदीपुरूष आदीगणाचें आपरूपाचे स्वरूप समजुन साक्षिदृष्टीने पाहा. आणी त्या आपरूपाला हे मन अर्पण करून, त्या आपरूपाला शुध्द अंतकरणाने विनवणी करा की : अल्प काळाकरीता का होईना या मनाला बांधुन तुमच्या चरणी फुलपुष्पांप्रमाणे अर्पण करत आहे. या मनाला आता तुच तुमच्या चरणी पक्के बांधावे. ही विनंती अर्ज करून तेथे आदीपुरूष आदीगण आपरूपाचे ध्यान सुरू करावे.

असे मनाला पक्के बांधुन, ज्या भजन भक्ती योग्याने आदीपुरूष आदीगणाचे ध्यान एकाठायी निरंतर समयबध्द करत राहील्याने, तो निरंजन आदीपुरूष महाराज नक्कीच त्या योग्याला भेट देईन. यात काही-एक शंका नाही. याचा अनुभव घ्यावयाचा असेल, तर सर्वप्रथम आदीपुरूष आदीगणाच्या ध्यानाला अश्या रितीने सहजच बसा. त्या नंतर नेमधारी बना म्हणजेच दिवसाचा कोणताही ऐका समयाला बांधा/ठरवा. आणी निरतर दररोज त्याच समयाला ध्यान करा ।

> उदाहरणार्थ पहाटेच्या एका प्रहरास ४ ते ६ या समयाला तुम्ही बांधले, तर त्याच समयी ध्यान करने म्हणजेच त्याला समयबध्द ध्यान म्हणतात. तर ते समयबध्द ध्यान दररोज खंड न पडत करने म्हणजेच त्याला निरंतर ध्यान म्हणतात. आणी ते निरंतर ध्यान एकाच स्थानी म्हणजेच या मस्तीकाच्या आकाशस्थानी करत राहणे म्हणजे एकठायी/एकास्थानी ध्यान होय.

असे समयबध्द, निरंतर, एकाठायी/एकास्थानावर, ध्यान करत राहल्याने, एक ना एक दिवस असा उजडेल की, तुम्हास तुमच्या मस्तकातच ब्रम्हांड दिसेल. जसे तुम्ही प्रत्यक्ष्य डोळ्यान पाहता तसेच आकाश/गगन कृष्णकृपेने दिसायला लागेल. या श्री च्या आकाशाला मान देवुन, या आकाशाचे दर्शन घेता राहल्याने, पुढे कोण्यातरी एका दिवशी कृष्णकृपेने झालेल्या शक्तिपात व्दारे ज्योतीचा प्रकाश लाभेल. ती ज्योत प्रकट होईल आपल्या कोटी सुर्याच्या प्रभांचा प्रखर लख्ख प्रकाश दिसेल.

॥ तुम्ही डीकावं या नामाला । कोटी सुर्य प्रभा सम होईल उजाला ॥
॥ तुम्ही डिकावं या नामाला । चंद्र ज्योती सम होईन उजाला ॥
॥ धनी आला हो आला । उजाला नामाचा झाला ॥

या प्रखर कोटी सुर्य प्रभा सम निर्माण झालेल्या लख्ख प्रकाशाला पाहुन भयभीत होवु नका. शुरविर खैत्रीप्रमाणे निर्भय बनुन, सपुर्णताः सजग जागृत राहा. जागृत राहुन हा प्रकाश साक्षीभाव दृष्टीने डोळे बंद अवस्थेत पाहत राहा. या लख्ख प्रकाशात तुम्ही न्हावुन निघाल. या प्रकाशाचा पुरवा जेथुन येत आहे, त्या उगमस्थानी असलेल्या निर्वाण निर्गुणाच्या ज्योतीच दर्शन होईल. दृढतेने निर्भयतेने व शांत अंतःकरणाने सजग जागृत राहुन, त्या ज्योतीच्या ठायी लीन होण्याचा प्रयत्न करत राहा. निरंजन ज्योती शी समरस होण्याचा प्रयत्न करत राहा.

ज्योत चमकली त्रिकुटावरी । अन अंगीन कपाट गिरी । ..खंड०२/३६
ज्योतीनं ज्योत प्रकाश । भरन देहीत । उजळन रूप हे सुर्याच्या तेजात ॥

असे केल्याने, मग ही ज्योत देहिच्या त्रिकुटावर चमकुन देहीच्या अंगीन कपाटी म्हणजेच या देहीच्या कानाकोप-यात, देहीच्या प्रतेक कपाटी गीरून पडेल. या देहीचा कप्पा न कप्पा प्रकाशीत करत, देहीच्या रोमारोमात म्हणजेच देहीच्या त्वचेच्या केसाच्या प्रतेक छिद्रात भरून भरन आणीक उरेल. या देहीला प्रकाशमान करून देहीला संपुर्ण जागृत करेल. या देहीचे साहय करण्यासाठी सदा न कदा या देहीत भरून भरेल आणीक उरेल. असो..

ही ज्योत खालील मार्गाने ही कृष्णकृपा होवुन कृष्णाच्या शक्तिपात व्दारे त्यांची ज्योत चमकुन उजळु शकते. देह जागृत होवु शकतो.

**१. रोमीघुत बनुन :-**

ज्या भजनी योगी, हे चतुर्पती नाम भजन पुजन/सेवा सुमरण व ग्यान, आपल्या देहीच्या रोमारोमात भिनवुन रोमीद्युत बनले आहे. आणी दुस-यानांही रोमीधुत बनण्यासाठी उत्तेजना देत सत्कृत्य करत सत्कृत्यात राहत आहे. देहीला निश्कलंकी बनवत आहे. या रोमीद्युतांवर कृष्णकृपा होवुन अश्या रोमीद्युता वर कृष्णकृपा होवुन कृष्णाच्या शक्तिपात व्दारे त्यांची ज्योत चमकुन उजळु शकते.

**२. सरळसाध्या सिदाईच्या मार्गाने निशंःकलंकी राहुन :-**

जे महान प्रयत्नाने आपल्या जीवनकाळात, मन बुध्दी, इंद्रिये, भोगलालसा विषय वासना सह षटविकार ..ईत्यादी, देहीच्या कलंकापासुन या जिवात्मास दुर ठेवत ठेवत जीवन जगत आहे. तसेच या देहीच्या कलंकापासुन धिराईने हळुहळु मुक्त होत, त्यावर नियंत्रण ठेवत त्याला हळुहळु निवृत्त करत आहे. केलेले आहे. आणी सिदाईने सरळ साध्या मार्गाने जिवन जगत आहे. अश्यांवर सुध्दा कृष्णकृपा होवुन कृष्णाच्या शक्तिपात व्दारे त्यांची ज्योत चमकुन उजळु शकते.

**३. सिदाईच्या मार्गाने :-**

या देहीत निर्भयता, दया, क्षमा, सत्य लिनता लहानपण, सिदाई चा सरळपणा, साधी राहणी उच्च आचार-विचार ठेवतो. सत्कृत्य करत सद्गुणांच्या वाढीकरीता सतत प्रयत्नरत् राहतो. सारंगधर हद्यी भरतो. आपल्या जिवात्मास चतुर्पती नाम ग्यानसह चतुर्पती धन्याच्या प्राप्तीची गोडी लावत आहे/लावली आहेत. आत्म्यावर सतसंस्कार कोरत आहे. सत्कृत्य करत करत भजन पुंजन नाम सुमरणी नित आहे. ऐसा जो या जगात सिदाईच्या मार्गाने जीवन जगत आहे, त्यावर सुध्दा कृष्णकृपा होवुन कृष्णाच्या शक्तिपात व्दारे त्यांची ज्योत चमकुन उजळु शकते.

**४. सत्संस्काराने :-**

जीवात्मात चतुर्पती नामाचे रोपन करून, त्याला चतुर्पतीच्या भजन पुजन ध्यान ग्यानसह सत्कृत्याचे खतपाणी घालतो. या चतुर्पतीच्या नामरसाई व्दारे, या देहीत सिंचन करून या जीवात्मावर सत्संस्कार टाकत आहेत. जीवात्म्यास सत् चे सार देत आहे.

तसेच चतुर्पती धन्याच्या सानीध्यात त्याच्या नाम संगतीत मनाला ठेवुन, त्याच्याच नाम गोडीत राहण्याचे सुक्ष्म संस्कार आपल्या जीवात्म्यावर कोरत आहे-कोरलेले आहे. धन्याच्या संगतीन, धन्याच्या नाम ज्योती व्दारे, सतत धन्याच्या नाम सानीध्यात राहुन धन्याचे भजन पुजन सुमरन ध्यान ग्यान ... सह, चतुर्पती नाम-अमृताची आपल्या जीवात्यास उच्चत्तर गोडी लावली आहे. अश्या सत्कृत्यात राहणा-यांवर कृष्णकृपा होवुन कृष्णाच्या शक्तिपात व्दारे त्यांची ज्योत चमकुन उजळु शकते.

या ४. मार्गाव्यतीरीक्त, या जीवात्यास इंद्रियेभोगापासुन जरी कोणी इतर मार्गाने निवृत्त केला, तरी त्या जीवात्माची इंद्रिये विषयाची गोडी सुप्त अवस्थेत राहते. ती गोडी संपुर्णतः सुटत नाही.

परंतु भजनी योग्यांच्या या ४ मार्गाने, हरीनाम रूपी गोडीचा म्हणजेच नामाच्या परमयाव्दारे धन्याच्या गोडीचा या जीवात्म्यास जर अनुभव आला, तर त्या जीवात्म्याची विषय-वासना बध्दलची सुप्त गोडीही सुटते.

काही सच्च्या सत्लोकांनी/ भजनी-योग्यांनी, आपल्या जीवनकाळात सिदाईच्या मार्गाने राहुन, त्याच्या जिवात्माची विषय वासनां बध्दलची सुप्त गोडी सोडुन दिली. आणी त्याच्या जीवात्मावर उच्चत्तर अशी, धन्याच्या नाम अमृतपानाची गोडी लावली. त्यांच्या आत्म्यास नाम रसाई चा अमृताचा प्याला पाजुन, नामांमृताची गोडी लावली आहे. आणी त्यामुळेच त्यांच्या देहीच्या जीवात्मा, चैत्यन्यमय आदीपुरूष धन्याच्या चैत्यन्यात स्थिर झालेला आहे. या स्थिरतेने तो काहीही तकार न करता, आळस न धरता, या धन्याच्या दिव्य सेवेत रूममान झाला. त्याला धनी सहजच काहीएक प्रयत्न न करता, त्याच्यावर शक्तीपात करून निरंजन ज्योतीचे दर्शन देतो. वर्षाव करत राहतो. देणं देत राहतो.

चैत्यन्यमय आदीपुरूष धन्याप्रमाणे, जीवही चेतनामय आहे. आणी त्या जीवांनाही सुखाची आनंदाची इच्छा राहते. कृष्ण धनी अवधुत नित्य परमय अल्लाद आनंदमय आहे. तो चैतन्याचा सागर आहे.

जर आत्म-जीवांनी :

- या कृष्ण धन्याची संगत चतुर्पती नामव्दारे पकडली.
- नामज्योतीत राहत धन्याच्या संगतीत राहीले.
- कृष्ण धन्याच्या सांगीव्दारे रचंलेल्या यवगाच्या कार्याशी सहकार्य केले.
- धन्याच्या सानीध्यात चतुर्पती नाम व्दारे राहुन आपले नियत कर्तव्यकर्मे करत राहत, धन्याची दिव्य परमय सेवा म्हणजेच पुंजन, भजन सुमरन ध्यान ग्यानाव्दारे सत्कृत्य करत राहलेत.

तर त्या आत्म-जीवांना सुध्दा, या धन्यापासुन परमय आनंदाची प्राप्ती होवुन ते सुखी होतात.

आणी मग असे प्रतेक आत्म सुखी झालेले जीव, दुस-या जीवाची सेवा करण्यास धडपडत राहतो. कर्मफलांची आसक्ती न ठेवता सेवा करण्यात नित मग्न राहतो.

हे सत्य चतुर्पतीच्या जाणत्या योगी जनांनी जाणुन, या चतुर्पतीच्या भजनी-योग्यांच्या जीवात्म्या ला, चतुर्पती धन्याच्या सानीध्यात धन्याचे संगतीन नित ठेवण्याचे महान कार्य, या चतुर्पती पंथाच्या भुम्मेवर करून ठेवलेले आहे.

त्याच मुळे, येथे उभ्या असलेल्या जीवात्म्यास त्याच्या स्वतःच्या स्वरूपाचा विसर पडत नाही. त्यांच्या भजन पुजन ध्यान सुमरन कार्याव्दारे, तो जिवात्मा सतत जागृतीत ठेवल्या जातो. या आत्म जागृती मुळे, भजनी-योग्यांचा जिवात्मा हा विस्मृतीत न जाता, धन्याकडुन आपरूप शिक्षण तसेच आकाशमातचे दिव्य चतुर्पती ग्यान वर्षाव व देणं...ईत्यादी, जेव्हा गरज भासेल, तेव्हा प्राप्त करत राहतो.

तो जीवात्मा चिन्मय आनंदमय सुखाने, शाश्वत असे सत्कृत्याचे अधिक्य ठेवुन, सिदाईने सरळसाध्या मार्गाने प्रपंच करून परमार्थ साधत साधत जीवन जगत या चतुर्पतीच्या भुम्मेवर राहतो.

अश्या रितीने : भजनी योगी जनांचा जिवात्मा हा आपल्या मुळ आत्मस्वरूपात येवुन, जेव्हा त्रिगुणात्मक प्रकृतीमायाला सोडुन आपल्या स्वरूपात स्थिर होत जातो, तेव्हा तो स्वतःव्दारे स्वतःला जाणतो. आणी मग त्याच्यातील सुप्त रूपात असलेले भगवंताचे सुक्ष्म तेजोगुण वाढीस लागते. जागृत होवु लागते.

हे केवळ ऐकल्याने व वाचल्याने होत नाही. तर वाचल्यानंतर चिंतन करून, त्याचे सार ग्यान आत्मसाद करावे लागते. नामी उडी घ्यावी लागते. अनुभव घ्यावे लागते. अनुभवासाठी कार्यरत् व्हावे लागते. जेव्हा स्वतःहुन धन्याच्या नामी उडी घेउन जोकोणी प्रयत्नांव्दारे त्यात स्थित होतो, तेव्हा त्याचा आत्मा स्वतःव्दारे स्वतःला ओळखुन, परमात्मा धन्याकडुन स्वतःची बुध्दि प्रकाशमान करून घेत राहतो. कृष्ण अवधुत धन्या ला विनवत राहतो की : तुच कर्ता तुच करविता, तुच बुध्दिचा दाता । तुमच्या वाचुन मज कोण नाही आता । असे विनवत, धन्याकडुन तोच देण मिळवत राहतो. तोच जीवात्मा-परमात्माचे सुक्ष्म अतीसुक्ष्म ग्यान मिळुवत, त्याचा अनुभव घेत राहतो.

हे जीवात्मा व परमात्माचे ग्यान फार गुप्त आहे. कारण ते ग्यान त्रिगुणात्मक मायेने आच्छादिलेले आहे. परंतु या त्रिगुणांचे आच्छादन काढुन या तिरगुणांच्या पलीकडे असलेले आत्मतत्व व आत्मग्यानयुक्त चतुर्पती ग्यान जर कळसुत्राच्या मालकाने आपल्या कळसुत्र बाहुल्यांचे कळसुत्रे हाती धरून, त्या हाती धरलेल्या कळसुत्र बाहुल्या व्दारे सांगीतले किंवा हद्यी अंर्तभुत असलेला त्याच्या अंश अवतारामार्फत सांगीतले तरच ते आपल्याला समजु शकते.

म्हणुनच काहीतरी उपाय करून या निश्कलंकी कृष्ण धन्याच्याच नामी राहा. निरंतर भजन पुजंन सुमरन ध्यान ग्यान नाम व्दारे, या कृष्ण धन्या च्या सानीध्यात राहा. या धन्याच्या कृपेने तुम्हाला आत्म्याचे वैभव कळेल एवढ मात्र निश्चित आहे.

कारण की : यवगान यवगीच्या, अनेका अनेक जन्मात अनेक इंद्रिये-तृप्तीकारक कर्मासह अनेक भक्त्या व सत्कृत्य करत करत, आता या

चतुर्पती पंथाच्या भुम्मेवर जीथे जिवात्म्यांचा धनी उभा आहे तिथे तुमचा जीवात्मा येवुन दाखल झाला आहे. या चतुर्पती भुम्मेवर तो सर्व आत्म्यांचा धनी परमात्मा कृष्ण अवधुत उभा आहे. आता या चतुर्पता कृष्ण अवधुताच्या चरणावर तुमचा महान जिवात्मा येवुन, चतुर्पती भैस धन्याला तो सपुर्णतः शरण येत/आला आहे. धन्याच्या कृपाप्रसादाची वाट पाहत तो जिवात्मा येथे धन्याच्या भेटीची आस धरून उभा आहे.

कृष्णधनी च्या कृपाप्रसादा करीता, त्याला तुमच्या देहीचे साहय हवे आहेत. ही देहीसुध्दा भजन पुंजनी राहुन, आपल्या जिवात्म्याला साहय करत आहे. त्याचमुळे ही देह-शक्ती धन्याच्या संगतीत राहुन, धन्याच्या संगतीन या जिवात्माचा अंतीम सत्याचा शोध पुर्णत्वास नेण्याकरीता, ही देह-शक्ती साळुमाय चे साहय घेत प्रयत्न करत आहे. या प्रयत्नात तो या देह-शक्तिला भजन पुजंन करीता स्फुरण व चालना देत आहे. अनंताकडुन अनंताकडे चालु असलेला या आत्मपुरूषाचा प्रवास, या चतुर्पती भुम्मेवर येवुन आता पुर्ण होणार आहे.

कारण की : आता कुठे तो तिरगुणांच्या पल्याड असलेल्या, या चतुर्पती ग्यानावर येवुन, या चतुर्पती धन्याच्या भुम्मेवर आता हा देह सार्थक होणार आहे. या धन्याच्या कृपेन त्यांचा प्रवास इथे परीपुर्ण होत आहे. या धन्याच्या कृपेनेच तो त्याचे वैभव जाणत आहे.

हा चतुर्पतीच आपला मुळचा देव मुळयवगाचा मालक धनी आहे. याचे ग्यान जीवात्म्यास होवुन, हा सर्वांचा धनीच आपण सर्वाचा उगमस्थान, आधीस्थान आदीरूप आहे. या आदीरूप आदीपुरूष आदीगणा च्या आधीस्थानीच आता विसावाचे आहे. हे तो जिवात्मा जाणत आहे.

हाच आदीरूप गणपती । या देहरूपी धरणीसह सर्वत्रांचा धनी होय. सर्व काही या धन्याचच आहे. हाच सद्‌गुरू होय. या सद्‌गुरू धन्याचे अलक्ष्य असे चतुर्पती ग्यान या चतुर्पती पंथाच्या भुम्मेवर त्या सद्‌गुरूने ठेवलेले आहे. अज्ञानी त्रिगुणीजनांकरीता गुप्त असलेला *'चतुर्पता अथर्वन् वेद'* याच चतुर्पता भुम्मेवर आहे. कृष्णा मुखच्या चतुर्पता अथर्वन् वेदाचे निर्गुण=आत्मा सैन्य इथल्या देहरूपी गादीवर बसुन आहे.

या चतुर्पता पंथाच्या भुम्मेवर, तो ब्रम्हरूप म्हणजेच निराकार निराधार आदीरूप आदीपुरूष धनी उभा असुन, या धन्याच्या चरणांचा धावा करत चतुर्पतीच्या सर्व भक्तगणांनी येथे जप मांडला आहे. इथचे सर्वकाही या धन्याचेच आहे. आमचा काही एक नाही. जो काही आमचा एकुलता एक भाव होता, तोही या धन्याला आम्ही अर्पण केला आहे. आता इथ आमच काहीच नाही हो । या धन्यावाचुन आता आमचा कोणीच नाही । अश्या विनवण्या करत करत या धन्याकडुन चतुर्पतीचे भक्तजन एक एक देण आप आपल्या पदरात पाडुन घेत आहे.

हा चतुर्पती धनी, या देहीमध्ये निराकार निराधार निरंजनी उभा राहुन या देहीला आधार देत आहे. देणं देत आहे. चैत्यन्याचा पुरवा-पुरवठा करत उभा आहे. या देहीच्या चवही ताळात, हा धनी निराकार निराधार निरंजन निशंःकलंकी सोहंम ज्योत स्वरूपात उभा आहे. याच निरंजन धन्याचे ध्यान करून, या देहीच्या आकाशमात मध्ये या निरंजन धन्याचे दर्शन घ्यावयाचे आहे.

ज्या नरदेहीने :

- या तिरगुणी मायेच्या पल्याड उभ्या असलेल्या, निरंजन आदीपुरुष धनी चे चतुर्पती ग्यान घेतले नाही.
- आपल्या देहीच्या आकाशमात मध्ये, या धन्याचे ध्यान करुन, त्या श्री च्या आकाशाला मान देवुन, दर्शन घेतले नाही. देहीच्या आकाशमात मध्ये उभ्या असलेल्या, निर्वाण धन्याची सोहंम् ज्योत पाहीली नाही.

त्या सर्व नरदेही, आध्यात्मीक विश्वाच्या दृष्टीकोणातुन अजुनही सुन्या आहे. कारण की : सर्व शक्तियॉं सिध्दियॉं त्यां नरदेहीच्या जवळ असुनही, धन्याच्या नामी ध्यानी राहुन त्यांना त्यापैकी एकही जागी केल्या नसल्याकारणाने, त्या नरदेहीतील त्या शक्तियॉं, सिध्दियॉं सुप्तपणे निपजीत पडुन सुन्या आहे. देही जवळ चैतन्याचा सागर असलेला चैतन्यज्योर्तिमय निरंजन धनी अवतार असुनही ती नरदेही अजुनही सुनी पडली आहे ?

तसेच भौतीक विश्वाच्या दृष्टीकोणातुन पाहीले असता असे ध्यानात येईन की : जर या देह-शक्तिचा चैतन्यज्योर्तिमय निरंजन धनी अवतार या देहीतुन निघुन गेला, तर त्याची ही निरंजन चैत्यन्य ज्योत या देहीतुन निघुन जावुन सुना पडेल हा नरदेह । या निरंजन ज्योती विना सुना आहे हा नरदेह ।

म्हणुनच आध्यात्मीक अथवा भौतीक विश्वातील अवघ्या जनांनी, जर या तिरगुणांच्या पल्याड असलेले हे आत्मतत्व आत्मग्यानयुक्त चतुर्पती ग्यान घेवुन, ही निरंजन ज्योत जागृत केली नाही. जागृत ठेवली नाही. अथवा देहेजीवांचा हिशोब पाहीला नाही. तर ती सर्व नरदेही या निरंजन ज्योती च्या प्रकाशा वाचुन सुनी आहे. निरंजना वाचुन अवघी देहरुपी धरणी सुनी आहे.

॥ सुने आहे अवघे देहे । साचात उरलं काय ?
सहा जोग करतीन पत्ता । सोस नोव्हे ॥ ०४ ॥

ज्याच्या नरदेहीने :

- या नरदेहीतच निराधार उभी असलेली निरंजन ज्योतीच, हे तिरगुणांच्या पलीकडे असलेले चतुर्पती ग्यान घेतले नाही.
- चतुर्पता ग्यानाव्दारे, तिरगुणांच्या पलीकडे उभ्या असलेल्या धन्याचे ग्यान व अनुभव हे आत्मतत्वांव्दारे आत्मज्ञानी बनुन घेतले नाही.
- तसेच या तीरगुणांच्या पलीकडचे हे चतुर्पती ग्यानातील आत्मग्यान घेवुन, या निरंजन धन्याच्या ग्यानी ध्यानी भजन सुमरनी लागले नाहीत.

त्यांच्या त्या सर्व नरदेही सुने आहे या ज्योतीवीन । या निरंजन ज्योतीच्या ग्यानाविना, ध्यानाविना, दर्शनाविना हे सर्व नरदेही सुने आहेत.

ज्याला या सोहंम् ज्योतीचे अहीनाघरचे ग्यान झाले. ज्यांनी हे अहिनाघरचे ग्यान, मन लावुन घेतले. त्यांना हे ग्यान झाले असते की : हा निरंजन ॠषिच या देहीच्या ब्रम्हांडी बसुन, ओहंम्-सोहंम् ची धुनी धडाधडा जाळत आहे. त्या निरंजन ॠषि आत्मा ची सोयंम् ज्योत देहरुपी धरणीत चैत्यन्य प्रकाश देत भरुन भरली आणीक उरलेली आहे. त्याच मुळे ते या सोहंम् ज्योतीचा शोध पत्ता सहाशास्त्र अठरापुराण ..ईत्यादी, इतरत्र ठिकाणी शोधत बसत नाही. त्यांच्या श्वासातुनच त्यांना या सोहंम् ज्योतीचा मार्ग मिळतो. आणी त्या मार्गाने जावुन ते दर्शनही घेतात.

परंतु हे तिरगुणी ज्ञानी जन, या सोहंम् ज्योतीचा पत्ता सहाशास्त्र, अठरापुराण, सहाजोग यांनी घातलेल्या कर्मकांडाच्या मार्गाव्दारे शोधन्याचा प्रयत्न करत आहे. परंतु अजुनही त्यांना हा देह कश्यामुळे सुना पडतो ? या सहानर साच्यातुन निर्माण झालेल्या देहेत काय भरून भरले आणीक उरलेले आहे ? याचा पत्ता ठावठीकाणा त्याच्या तिरगुणी ग्यानात सापडत नाही.

त्याचमुळे हे सर्व तिरगुणी आपल्या सोसाची/श्वासाची जन्मदात्री असलेली कृष्ण निरंजन ऋषि चा पत्ता काढत काढत, कुठे अवधुताची वस्ती ? असे पुसत पुसत या चतुर्पता भुम्मेवर पुढेमागे येतीन. हे सर्व तिरगुणी ज्ञानाच्या पलीकडे असलेले, अहीनाघरचे चतुर्पता निरंजन ग्यान शोधण्याकरीता, चतुर्पता अथर्वन् वेदा च्या चतुर्पती धन्याच्या अनुभवाकरीता वाट पुसत पुसत येतीन. असे भाकलेलेच आहे. हे होणे निश्चित आहे.

इथे या चतुर्पती पंथाच्या भुम्मेवर येवुन, मग म्हणेल हेच होय सत्य धनी देवाचे अहीनाघरचे ग्यान । आणी मग मान्य करेल की : आतापर्यंत इतर स्वयं:घोषीत ज्ञानीजन जे ज्ञान आपणास सांगत होते, ते सर्व ज्ञान या अहीनाघरच्या निरंजन ग्यानापेक्षा निच दर्जाचे हीन आहे. ते मग जाणतील ही की, आधी या देहीचा साचा सचवला गेला आहे निर्गुण...

॥ ०२ ॥

॥ साचा सचवला निर्गुण । त्यापासुन अवघे जन ।
जन सांगत असे ग्यान । अवघं हिनं ॥
॥ हिनं आहे ग्यान ध्यान, जप तप अनुष्ठान ।
सुख:सोहळे झाले हिनं । सोस भुलल्यानं ॥
॥ शत सोहळे करतीन जन । जन भुलले पाखंडानं ।
जन भुलले पाखंडानं । काही समजेना ॥
॥ मुळ यवग पहाव शोधुन । भले पंडीत तुम्ही चातुर ।
तुम्ही भुलले सोसाचे घर । नाही खबर ॥ ०८ ॥

सहानर हे निराकार निर्गुण आहे. या सहा नरांचा साचा बनवणारा धनीही निराकार निर्गुण आहे. या सहा नरांत ओतलेले चैत्यन्य हेसुध्दा निराकार निर्गुण आहे. याप्रमाणे ज्याच्यापासुन हा सहानर साचा बनला, ज्याने तो बनवला, आणी ज्यात तो वसला आहे, ते सर्वच तर निराकार निर्गुण आहे. तरी सुध्दा या कडे तुम्ही दुर्लक्ष्य करता ?

आधी हाच निर्गुण साचा सचवला त्या धन्याने । आणी त्या निराकार निर्गुण निशं:कलंकी धनी आपल्या तेजोगुणी अंशाव्दारे या साच्यात अवतरला. या तेजोगुणी अंश अवताराने म्हणजेच या आत्म्याने, या सहा नरांना या देहीचे तारू बनवुन, या निर्गुण सहानर साच्यापासुन देहीचे स्थुलरूप/सगुणरूप साकारले. त्या सगुण देहित उभा राहुन तो चैत्यन्याचा पुरवा देत आहे.

धन्याच्या तेजोगुणी निर्गुण अंश अवताराने निराकार सहानर साच्यातुनच सगुण देही आकारली आहे. निराकार निर्गुण पासुन हा सगुण आकार निर्माण केल्या गेलेला आहे. या आकारी आलेल्या सगुण स्थुलदेही दारेच हे अवघे जनलोक ज्ञानाच्या गोष्टी करत आहे.

..परंतु तिरगुणी ज्ञानाच्या गोष्टी कुठपर्यंत ? जेथपर्यंत तो निर्गुण निराकार धनी अवतार, या देहीत चैत्यन्यमय निरंजन ज्योतस्वरूपी विराजमान आहे तोपर्यंत !

परंतु ज्या निरंजन आत्मारामाच्या अस्तीत्वाने हे सर्व तिरगुणी जनलोक देहीची हालचाल करत आहे. नियत कर्तव्य कर्मे आणी फालतुचे ज्ञान सांगत बसले आहे. मोठयामोठया ज्ञानाच्या गोष्टी करत आहे. त्या निरंजन आत्म्याचे जर आत्मग्यान नसेल तर त्यांचे ते सर्व ग्यान व्यर्थ/हीन आहे. म्हणुनच एक चरण गर्जुन सांगी करत आहे की :

॥ महा महा योगी/अवतार बसले । विचार करून ।
आत्म ग्यान शोधल्या शिवाय । नाही तत्व ग्यान ॥

ज्या निरंजनाच्या भरवश्यावर महा महा योगी अवतार आपले तिरगुणी ज्ञान सांगत आहे, त्या निरंजनाचेच जर निरंजन ग्यान नसेल, तर त्या मोठया ज्ञानी जनांच्या सर्व तत्व ज्ञानाच्या गोष्टी निरर्थक आहे. महा महा तत्वज्ञानी च्या तिरगुणी ज्ञानाच्या गोष्टीत त्यांच्या देहीला आधार देणारा निराधारी सोहंम् ज्योत स्वरूपी चतुर्पती धन्याचेच निरंजन ग्यान नसेल, तर त्यांचे ते सर्व तिरगुणी ज्ञान व्दारे आलेले ध्यान जप तप अनुष्ठान कर्मकांडे... ईत्यादी सर्व ज्ञान निकृष्ट म्हणजे हिन दर्जाचे आहे असेच मानावे लागेल. सर्व ग्यानांपेक्षा श्रेष्ठ असलेले निरजंन ग्यान पेक्षा निच दर्जाचे इतर ज्ञान गोष्टी, ते सर्व तिरगुणी जनलोक सांगत सुटलेले आहे.

परंतु जिथे निरंजन ग्यान तेच सर्वश्रेष्ठ ग्यान होय. या ग्यानापेक्षा इतर सर्व ज्ञान निच नित्कृष्ट दर्जाचे हिन आहे. असे विचार करत महा महा योगी अंती घुमं घालुन बसलेले आहेत.

जे सहानर साच्याव्दारे सचलेल्या देहीवर लादलेल्या हीन ज्ञानाव्दारे, जे सुख सोहळे देही करत आहे, ते सर्व हिनच आहे असे समजावे लागेल. कारण ज्या निरंजन धन्याच्या भरवश्यावर सर्व ग्यान ध्यान जप तप अनुष्ठान सुखःसोहळे करत आहे, त्या चतुर्पती निरंजन धन्याची महीमा न वाढवता, तिरलोक्यातील तिरगुणी अवतार, देवी-देवता यांची महीमा वाढवण्या करीता व्रत वैकल्पे कथासार प्रवचन करून, यां तिरगुणांचीच महीमा वाढवत आहे. सर्वसामान्यांना सत्यापासुन दुर ठेवत आहे. हे शोभते का ज्ञानी जनांना ?

मायेच्या भुलवणीपायी महा महा तिरगुणी ज्ञानी जन त्यांच्याच देहीत उभा असलेल्या त्या निराकार निराधार चौथ्या निरंजन धन्याला पार विसरलेले आहेत. ज्या धनी अवतारापासुन त्यांचा श्वास सध्या चालत आहे. त्यांचा श्वास जन्मला आहे. ज्याच्या आधारावर त्यांची देही उभी आहे. अश्या त्या आपल्याच आदीपुरूष निरंजन धनी चे चतुर्पती निरंजन ग्यान सह आत्मग्यान, आत्मतत्वे व इतर अनुभवी ग्यान असलेल्या चतुर्पती ग्यानालाच हे सर्व मोठे मोठे तिरगुणी ज्ञानी आपल्या स्वतःच्या हिताकरीता पडीत टाकत आहे. केवढं हे त्यांचे दुर्भाग्य !

या चतुर्पती ग्यानाला, ते तिरगुणी अवतारसह सर्व तिरगुणी जन लबाड म्हणत आहे. आणी हे तिरगुणी स्वतः लबाडी करून तिरगुणी ज्ञानाची व देवतांची महीमा वाढवत आहे. पाखंड माजवत आहेत. हे सर्व तिरगुणी जन हे सर्व कार्य करत आहे कारण ते आपला सोस/श्वास भुललेले आहेत.

या सर्व भुललेल्या तिरगुणींना सद्‌बुध्दी दयावी हीच धन्याचरणी अर्ज ।

भुललेल्यांनी जरा लक्ष्य देवुन ध्यानात घ्या की : नउ महीने मायेच्या उदरी ही देही असतांना तिथे तर हा देह विटाळी पाण्यातच होता. तेव्हा नव्हता सोस/श्वास. ज्याक्षणी देही बाहय जगात प्रवेशली, त्याक्षणीच अनामत धन्याने

त्या देहीला आपल्या डाव्या पायाचा अंगुठा व्दारे धक्का देवुन या देहीचा श्वास चालु करून दिला. तुमच्या या देहीचा चैतन्याचा नित पुरवा देत त्यानेच हा श्वास चालु ठेवला आहे.

आणी नुसताच हा सोस/श्वास एक वेळ चालु न करता, जोपर्यंत तो या देहीत अंश अवतार रूपात तो उभा आहे, तोपर्यंत चालु ठेवण्याचा जुम्मा/ठेका त्याने घेतला आहे. देह-दिवनालीत चैत्यन्यरूपी तेल ओतुन, जिवनकळा ज्योत तेवत ठेवण्याची व्यवस्था देहीच्या धन्याने करून ठेवली आहे.

या चैत्यन्यमय आत्मज्योतीनेच/जीवनकळा ज्योतीनेच हा श्वास चालु ठेवलेला आहे. आयुष्य दिले आहे. आणी तुम्ही तुमच्या श्वासाच्या या जन्मदात्री निरंजन चैत्यन्य ज्योतीलाच भुललेत ? निरंजन ज्योतीचे निरंजन ग्यानाला दुर ठेवलेत ? आणी भुलले भांबावले हो तुम्ही या तिरगुणी मायेच्या तिरगुणी ज्ञानां च्या प्याल्या व्दारे ।

त्रिगुणात्मक मायेन ब्रम्हयां आंगी येवुन, तिरगुणांचे तिन मठ स्थापले आहेत. तिच्या तिन मठांव्दारे तिरगुणी ज्ञानाचा प्याला, तुम्हाला मधुपानाप्रमाणे पाजुन, या मायेने तिची भ्रांती व भुलवण तुम्हावर चिकटवली आहे. या तिरगुणी मायेने स्वःसत्ता गाजवण्याच्या कारणास्तव तिरगुणांच्या पलीकडे असलेले आम्ततत्व व आत्मग्याना ने युक्त असलेले चतुर्पतीचे निरंजन ग्यान पासुन तुम्हास दुर ठेवलेले आहेत. हे जाणा तुम्ही आता.

या त्रिगुणात्मक मायेने, तुम्हा संग पाखंड करून तुमच्या डोळयावर त्रिगुणात्मक ज्ञानाची झापडी टाकुन, या तिरगुणी ज्ञानाचा प्याला तुम्हाला एकामागुन एक पाजत, तुम्हाला गुंगीत टाकले आहे. त्याच मुळे, या तिरगुणी ज्ञानात सत्याचा काही अंश सापडेना !. सत्य देव काही दिसेना ! हे तिरगुणी ज्ञान, तिरगुण आणी या तिरगुणांचे राजे यांचे व्रत, वैकल्प, पुजा पाठ कथासार, जप तप अनुष्ठान व कर्मकांड यांच्या बाजारा पलीकडे काही एक जाईना ! याच तिरगुणी बाजाराची तिरगुणीं मायेनी तुम्हावर भुलवन टाकली आहे. या तिरगुणी बाजारात, तुम्ही आपली शुध्द मती गहाण ठेवत आहात आणी तिरगुणी ज्ञान घेत आहात.

या तिरगुणींच्या भयान वस्तीत, तुम्ही स्वतःचेच घर विसरून तुमचा जीव हा भुलला भावांवला आहे. त्याचमुळे तुम्हास या तिरगुणी ज्ञानाच्या बाजारा बाहेर निघुन तिरगुण व त्या तिरगुणांचे राजे ब्रम्हा विष्णु महेष व त्यांचे तिरगुणी अवतार यांच्या ग्यानां पलीकडे तुम्ही जात नाही आहेत. म्हणुनच या तिरगुणांच्या पल्याड उभा असलेल्या चौथा चतुर्पती धनी च्या आकाशवाणी व सांगी व्दारे उभे झालेले हे चतुर्पती ग्यान काही तुम्हा उमजेना । तिरगुणांमुळे काही एक समजेना ।

म्हणुनच आम्ही पुनश्चः आपणाकडे विनंती अर्ज करतो की, तुमच्या हाती या चतुर्पतीचा अथर्वन् वेद पडला असल्यामुळे आतातरी उघडा तुमच्या डोळयावर असलेली तिरगुणांची झापडी ! आणी या चतुर्पता अथर्वन् वेदाच्या साहयाने, तिरगुणांच्या झापडी व्दारे आलेली तिरगुणांची घुंगी हटवुन, या तिरगुणांच्या पलीकडे असलेले चतुर्पती ग्याना व्दारे मुळ यवग पहाव शोधुन ।

मुळयवगाचा चतुर्पती आदीपुरूष देव, मुळयवगी होत काय ? मुळयवगाची साधना सह आत्मतत्व व आत्मग्यान, शकुनग्यान सह इतर अनुभवी ग्यान असलेले, हे चतुर्पती ग्यान घ्याहो । या चतुर्पतीच्या भुम्मेवर तुमचे स्वागतच

होईल, मान होईन एकढ मात्र निश्चित आहे. म्हणुनच जर तुम्ही खरच सत्य पंडित, भले चातुर ग्यानी असाल, तर हा तुमचा सोस/श्वास आला कोठुन ? तुमचा सोस कोणामुळे अजुनही चालत आहे ? कोण या देहीत सोसाची/श्वासाची धुनी धडाधडा जाळत, ब्रम्हांडी सोहंम् मंत्र जपत आहे ? ईत्यादी मुळयवगाचे ग्यान पहाव शोधुन या चतुर्पता भुम्मेवर येवुन ।

तुम्हास अवश्य ग्यान होईल की : जो तुमचा श्वास आहे त्या श्वासाच्या आत ध्वनी कोणता ? तो जप न करता होणारा अजपा जप कोणता ? तो सोहंम् ध्वनी कोणाव्दारे व कोण्याठिकाणाहुन निघत आहे ? ...ईत्यादी तिरगुणां पलीकडील ग्यानसह, चौथ्या धन्याचे अनेक अनुभव येईल तुम्हास । जर तुम्ही सच्चेपणाने या पायरीवर आलेत तर ।

चतुर्पता अथर्वन् वेदाव्दारे या चतुर्पता भुम्मेवर येण्याची संधी मिळुनही जर तुम्ही चतुर्पता भुम्मेवर आले नाहीत, तर मुळयवगाचे ग्यान तरी कसे होईल तुम्हास ? चतुर्पतीचे निरंजन ग्यान कसे होईल ?

जिथे निरंजन ग्यान नाही, ते सर्व ज्ञान व्यर्थ आहे. असे हे व्यर्थ ज्ञान अहंकाराने चतुर्पती झिडकारत असाल, या चतुर्पता गाईला पडीत टाकत असाल, तर आम्हा चतुर्पतीच्या गडयांना म्हणावेच लागेल की : तुम्ही भुलेले मुळचे घर । तुम्ही भुलले तुमच्या सोसाचे घर । चौथ्या अहीना घरच्या चतुर्पती ग्यानाची खबर नाही तुम्हास । तुम्हा खबर नाही की : हाच चौथा चतुर्पती धनी शुध्द करन हो तुमचे कुडं/कुळ ।...

म्हणुनच कृष्णा सर्वत्रास लवुन मुजरा करत, सांगी सांगत दवंडी देत आहे की : आता हा चतुर्पता अथर्वन् वेद हाती घेवुन, तिरगुणांच्या पलीकडे उभा असलेल्या मुळ यवगाचे चतुर्पती आदीपुरुष धन्याचे घरचे म्हणजेच अहीनाघरचे ग्यान घ्याव बा । हा चतुर्पता अथर्वन् वेद नुसतेच हाती न घेता, काहीतरी उपाय करून हे चतुर्पता ग्यान हद्यी भरावं बा ।. या चतुर्पता भुम्मेवर येवुन तिरगुणांव्दारे पडीत टाकलेली ही पडीत गाय उभी करण्यास साहय व्हावे बा आता ।

॥ भेटी आंगचे सिध्द उभे करा/राहा आम्हा संगतीला ।
सदा विनविता नित साहयं । करावं आम्हाला ॥

असे केल्यानेच तुम्ही उजळुन निघाल. कारण की : आता या मिर्तलोकच्या या निर्गुण निराकार चतुर्पता भुम्मेवरच आदीपुरुष आदीरुपाची निशंःकलंकी ज्योत आकाशमात मध्ये उभी आहे.

॥ आदी पुरुष आदीरुप, याहीची निश्कलंकी उभी ज्योत ।
साच्यात भरला सोस । झाले कपट ॥

आधी कुठच नव्हत काही । तेव्हा तो आदीरुप आदीपुरुष निराकार निराधार होता. तोच आदीपुरुप निरंजन ज्योत स्वरुपात उभा झाला. कोटयान कोटी सुर्याची प्रभा एकत्र केल्याने, जेवढी प्रभा उत्पन्न होवु शकते, त्यापेक्षा बहुपट प्रभा या ज्योतीव्दारे तिथे फाकलेली होती. या प्रभेच्या शांत व सौम्य आनंददायक प्रकाश तेजाला आदीपुरुष धन्याची प्रभा अथवा प्रभाशक्ती अथवा पराशक्ती किंवा पराप्रकृती असे आध्यात्मीक विश्वात म्हटले गेले आहेत.

आदीपुरुष आदीगणात सांगीतलेल्या, या पराप्रकृतीला सुर्य-चंद्र प्रकाशीत नाही. ती स्वयंःप्रकाशीत असुन अनेकांना उजळत उभी आहे. याच पराप्रकृतीव्दारे, प्राकृत सृष्टी धारण केली जाते. या पराप्रकृतीतील ज्या

आण्वीकस्फुल्लींग रूपी अव्यक्त आत्मगडयांना, काही कालावधीनंतर अथवा त्यांचे संचीत कमी झाल्यावर, जेव्हा पुनश्चः व्यक्त होण्याची इच्छा निर्माण होते, तेव्हा त्यांची ती इच्छा पुर्ण करण्यासाठी तो धनी त्याच्यावर कृपा करतो.

कारण की : प्रतेक आत्मगडी हे त्या धन्याचेच अंश आहे. आणी तो धनी त्या प्रतेकांबध्दल फार कृपाळु आहे. त्याचमुळे या आदीपुरूष धन्याच्या कृपेने, ते या प्राकृत सृष्टी मध्ये उडी घेतो. उडी घेवुन या प्रकृतीमायेमध्ये प्रवेश करून प्रवेशी होतात.

ज्यावेळी तो प्रकृती मायेत प्रवेशी होतो, त्यावेळी ही कपटी माया सर्वप्रथम कपट करून, त्या निशंःकलंकी आत्म्याला आपल्या तिरगुणांच्या वर्चस्वाखाली घेवुन प्रकृती-मायेच्या वारेने वेस्टीते. तो या प्रकारे प्रकृतीमायेच्या वारेने वस्टील्या जावुन जिवात्मा बनतो.

अश्या रितीने, मायेच्या कपटाव्दारे परमात्माच्या तेजोगुणी अंश असलेला हा निशंःकलंकी आत्मा, प्रकृतीमायेच्या वर्चस्वाखाली येवुन तिच्या तिन गुणांने बांधल्या जातो. या तिरगुणी मायेच्या तिरगुणांच्या बंधनाने, तो वेस्टीला जावुनच मग तो गुणमयी मायेच्या व्दारे देहधारी बनतो.

तो जीवात्मा गर्भि आल्यानंतर, त्याने धारण केलेल्या त्याच्या को-या नविन देहाला तो प्रकृतीत प्रवेशी होण्यास साहय करतो. तो त्याच्या मुळघरचा धनी आदीपुरूष त्याच्यावर कृपावंत होवुन त्याच्या जन्माच्या दिवशीच, त्याला सर्व साहय करत, त्याच्या कानी ओंहंम्-सोहंम् मंत्र सांगुन/फुंकुन त्याला शुध्द रस्ता दाखवतो. योनीचे बंद असलेले कवाड, हाती किल्ल्या घेवुन उघडतो. आपल्या डाव्या पायाचा अंगुष्ठा लावुन, मातेला हेलावा आणतो. आणी नरकनगरीतुन त्याला मुक्त करून, बाहेर आणण्यास साहय होतो.

नुसतेच बाहेर आणण्याचे साहय न करता, तो परमात्मा आदीपुरूष धनी या जिवात्मा विषयी इतका कृपावंत होतो की : तो त्या जिवात्मात अंशरूपाने अंर्तभुत होवुन त्या जिवात्मासंग नित राहतो. अश्या रितीने या जीवात्माचे संक्रमण हे परमात्मा आदीपुरूष धन्याच्याच कृपेने शक्य होत असते.

परंतु माया मोठी कपटी । ती या जीवात्मास भुल पाडते. धन्याने सांगीतलेल्या ओहंम्-सोहंम् मंत्राचे त्याला विसर पाडते. त्याचमुळे तो या मायेच्या वर्चस्वाखाली अधिकेतर अधिक येत, मी कोण होय ? मी कोण होयं ? असे कोण व्हयं ? कोव्हं कोव्हं... ? असे जन्मापासुन ओरडत राहतो.

पहील्या दिवशी, जन्माशी आला । सोहंम् शब्द विसरला ।
तेथुन पडली हो, भुलवन । गेला दुसरा दिन......
......पाचव्या दिवशी, पाचवी । आले ब्रम्हा हे सटवी ।
सटवी घालते हो, अक्षर । ब्रम्हा पाहये वाचुन ।
जाती अक्षर, दिलं घालुन । यान मिळवलं हो पुंजन ।
शंकर नंदयाची, पिशाब । त्याची लावुन ज्योत ।
सहाव्या दिवसाच, पुंजन । सहा जोग सहा दर्शन..०३/०३:-पाळणा चरणे

पहील्याच दिवशी, या मायेच्या कपटा कारस्थानांमुळे, या तिरगुणात्मक मायेने पाडलेल्या तिरगुणी भुलवणीपायी तो जीवात्मा मुळचे घर भुलला. धन्याने दिलेला सोहंम् शब्द विसरला. आणी मग या तिरगुणी मायेच्या भुलवणीतच गेला दुसरा तिसरा चौथा व पाचवा दिवस !

आणी या पाचव्या दिवशी ब्रम्हयाने येवुन, आपले जाती अक्षर ˙घालुन दिले. आणी मिळवलं आपले पुंजन सहाव्या दिवशीच । सहा जोग सहा दर्शन . ..ईत्यादी, तिरगुणी ग्यानाचा प्याला पाजुन ।

अश्या रितीने, या तिरगुणी मायेसह या तिरगुणी देवतांनी मिळवले पुंजन कपट कारस्थान करून । या जिवात्मा संग तिथ झाले हो मोठे कपट । काय सांगु ? हे सांगता सांगवत नाही हो । या मायेने तिच्या संग असलेल्या भ्रांतीच्या धुनी ची भुलवन त्या नव्या जीवात्माला चिकटवुन आपले तिरगुणां सह तिरगुणी ज्ञानाची धुनी लावुन दिली सहाव्या दिवशी सहा जोग सहा दर्शनाव्दारे....

॥ भुल पाडुन लावली धुनी । तिरलोकी तिरभवनी,
खाली पाणी वर पाणी । यामध्ये पेटला अग्न, झाली धुळधानी ॥

या तिरगुणात्मक मायेने तीच्या संगच्या भ्रांतीची भुलवन पाडुन, तिच्या तिरगुणी ज्ञानाची धुनी तिरलोकी तिरभवनी लावली आहे. या तिच्या तिरगुणांच्या भुलवणीच्या धुनी पायी, मन मती भ्रातीत पडलेले आहेत.

जसे शक्तीचे रूप भ्रांतीत असते, तसे तुम्ही भ्रांतीत पडलेले आहात. या भ्रांतीमुळेच धन्यानं सांगीतलेला सोहंम् जपमंत्र तुम्ही विसरलात. आणी भलते-सलतेच्या मागे लागलात. आपल्या देहीच्या निरंजन धन्याला बेईमान होवुन त्रिगुणात्मक मायेने पाजलेल्या तिरगुणी ज्ञानात डुबी मारली. आणी या तिरगुणी ज्ञानांच्या पलीकडे असलेले धन्याच्या चतुर्पती ग्यानापासुन दुरावलेत !

तुम्ही तिरगुणी जन हो ! या तिरगुणाच्या धुळधाणीन भुलले भांबावले आहे. तिरगुणी मायेने तुमचा जीव आर्बुस-निर्बुस केला आहे. आणी तो तिरगुणी भंवर जाळात फसला. त्याच मुळे तुमचा हा जिवात्मा मुळचे घर विसरला. मुळच्या धन्याला विसरून, तिरगुणी राजे व त्यांचे तिरलोक्यातील तिरगुणी अवतारांच्या मागे लागलेत.

तोडा तोडा हे तिरगुणांचे भंबर जाळ । या मायाचैत्यन्याचा खेळ । या तिरगुणात्मक मायेच्या पलीकडे, जरा बाहेर निघुन डोळे उघडुन पहा ।
चतुर्पतीच्या नव्या दृष्टीने पाहय की :

खाली पाणी वर पाणी । यामध्ये पेटला अग्न, झाली धुळधानी

आध्यात्मीक विश्वात *१. पृथ्वी २. आप ३. तेज ४. वायु ५. आकाश आणी ६. मन ७. आत्मा ८. काल ९. दिशा* या नउ तत्वांना द्रव्य म्हणजेच पाणी/जल असे संबोधल्या गेलेले आहे. कारण की : जलाचे गुणधर्म जसे चंचलता, जिकडे जागा मिळेल तिकडे स्थित्यंतर करने म्हणजेच स्थित्यंतरता, विरलता, निराकारता, निर्गुणता/रंगहीनता ..ईत्यादी, जे गुणधर्म पाण्याचे आहे तेच गुणधर्म या नउ तत्वांचे आहे. म्हणुनच या नउही तत्वांना पाणी/जल अथवा द्रव्य असे म्हटल्या गेलेले आहे. जलाच्या अधीक ग्यानाकरीता खंड ०१/०१:-आदीपुरूष आदीगण चे जलाचर टुकीचे निरसन वाचावे

या ब्रम्हांडी या तिरलोकी, हे निराकार निर्गुण असलेले आध्यात्मीक विश्वाने संबोधलेले पाणी प्रचुर मात्रेत आहे. आणी वर स्वर्ग लोकी सुध्दा हेच पाणी निराकार निर्गुण तत्वं रूपात प्रचुर मात्रेमध्ये आहे. या मिर्तलोकी हेच निराकार पाणी, तेजोमय अग्न म्हणजेच या तेजोगुणी आत्माशी संयोग पावुन, जडतत्व रूपात येवुन आकारले आहे.

निर्गुण पाण्याच्या सहानर साच्याव्दारे हे पाणी जडतत्वांत येवुन, त्यावर या आत्मपुरूषरूपी तेजोगुणी अग्न व्दारे चैत्यन्य प्रकाश पडुन, हे पाणी चैत्यन्यमय झालेले आहेत. याच पाण्याची ही नरदेही आहे.

हेच आध्यात्मीक पाणी नरदेहीत सुध्दा स्वर्ग मिर्त पाताळी प्रचुर मात्रेत भरून भरलेले आहे. पाण्याच्या नरदेहीच्या स्वर्ग व पाताळ या दोहीच्या मध्ये असलेल्या मिर्तलोकी, त्या निगुर्ण निराकार आत्मपुरूषाने आपली चैत्यन्यप्रकाश देणारा अग्न पेटवलेला आहे.

या अग्न म्हणजेच तेजोगुणी आत्मा व्दारे, या देहीच्या तिरलोकी तिरभवनी चैत्यन्यमय धन्याची सोहंम् धुनी पेटत आहे. आणी बाहेर या त्रिगुणात्मक मायेन, आपली तिरगुणी धुनी पेटती ठेवलेले आहे. यामुळेच धुळधाणी झाली आहे. या तिरगुणी धुनी व्दारे झालेली ही धुळधाणी ओलांडुन, जो आतील सोहंम् धुनीत रममान होतो, त्यालाच त्याचे ग्यान होते की :

हा जन्म घ्यावयाच्या अगोदर, पुर्विपासुन तुम्ही सोहंम् रूपी आहात. या सोहंम् रूपी आत्मारामाने आता हा देह धरला आहे. आत्माराम निरंजन धन्याने धरलेल्या देहा व्दारेच तुम्ही पंचमुखी बोलत आहात. म्हणुनच प्रार्थना करा । आता या आपल्या देहीच्या सोहंम् ज्योतीर्मय निरंजन धन्याला विनवा हो । चौथा चतुर्पती धनी आपला तेजोगुणी अंश अवतार रूपात या देहीत उभा होवुन सोहंम् निराधार निराकार चैत्यन्य ज्योतिर्मय रूपात या देहीत नांदत आहे. या धन्यानेच तुम्हा जन्मा घालुन, ओहंम्-सोहंम् मत्र तुमच्या कानी फुकुन, तो तुमचा प्रथम गुरू झाला आहे.

या निर्गुण धनी गुरू ने, सांगीतलेल्या मंत्राव्दारे ओहंम्-सोहंम् ची धुनी कडे ध्यान दिल्यानंतरच, या तिरगुणी मायेची तिरगुणी भुलवणीची धुनी दुर होईल. आणी या चतुर्पती धन्याचे चतुर्पती ग्यान येईल. चतुर्पती अंगाच्या रोमारोमात भिनेल. या धन्याला आडवे येणार नाही कोणी । कारण हा धनीच तिरगुणी मायेचा, व तिच्या तिरगुणी राजे व त्यांचे तिरगुणी अवतांर या सर्वांचा धनी होय. देता होय. पिता होय. सर्वकाही शक्तीचे स्त्रोत होय. म्हणुनच याच चतुर्पती धन्याकडे अर्ज करा की :

हे आदीपुरूष धन्या । तुच या देहीची रंचनेस साह्य झाला. तुच अन्न-अग्न, पवन-पाणी, आकाश-धरणी या सहा नरांचा साचा सचवुन, ही देही सचण्यास साह्य झाला. देही जगवण्यास साह्य झाला. देही उभी करण्यास साह्य झाला. या देहीला असेचं अखंडीत उभे ठेवण्यासाठी या देहीतुन जावुच नको कधी । असो तुमच्या रूपा सुखाची गाही येथी ।

या दर्शनी उभ्या असलेल्या देहीत दर्शनी उभा राहुन, तुमच्या रूपा सुखाची गाही दयावे. हीच इच्छा पुर्ण कर गा माझी । तुला पुनःपुनश्च हीच अर्ज करत राहतो की : जोपर्यत तुमचे साह्य आहे तोपर्यत हा देह अखंडीत दर्शनी उभा ठेव ।

॥ अन्न-अग्न पवन-पाणी । हे आकाश धरणी ।
सहा नर सचला साचा । उभा दर्शनी ॥ ११ ॥

*१. अन्न २. अग्न ३. पवन ४. पाणी आणी हे ५. आकाश ६. धरणी* या सहा नरां पासुन या देहीचा साचा बनल्या गेला. आणी या निराकार सहानर साच्याच्या सहाही नरांत, निरंजन धन्याने निर्गुण निराकार चैत्यन्य ओतुन, ही देही आकारी आणुन, या जगाच्या दर्शना आली आहे.

या सहा नर साच्यामुळे, जी देही आकारली ती या जगाच्या दर्शना येत आहे. परंतु या दर्शनीय देहीच्या आत जे चैत्यन्यमय आदीपुरूष धन्याचा निर्गुण अंश अवतार च्या उपस्थितीव्दारे देहीत चैत्यन्याची ज्योत बनुन उभी आहे. ही चैत्यन्य ज्योत या जगाच्या समोर असुनही, या ज्योतीचे अस्तीत्व मान्य करूनही, या ज्योतीच्या मालकालाच दुर सारत आहे.

तो मालक तर तुमच्या देहीतच, तुम्हाला वेळोवेळा आपल्या अस्तीत्वाची जाणीवा देत तुमच्या दर्शनी उभा आहे. या जगाच्या देखताच आहे तरी हे जग ओळखेना । या जगाच्या देखता असलेल्या निराकार निर्गुण धन्याची गाही कृष्णा सांगतो आहे, तरी कोणी ऐकेना ! किती मोठी झापड या तिरगुणी जगावर या तिरगुणांची ? या तिरगुणी झापडी मुळेच हे जग भुलले भांबावले आहे.

या त्रिगुणात्मक मायेव्दारे आलेल्या तिरगुणी ज्ञानाच्या धुळधाणी पायी, तिरगुणांनी उठलेल्या तिरगुणी भुलवनीच्या धुनीपायी, दर्शनी उभा असलेला धनी त्यां बिचा-यांना तिरगुणींच्या त्रिगुणात्मक दृष्टीने दिसत नाही आहे. म्हणुनच या तिरगुणांच्या पलीकडे जावुन त्रिगुणातीत दृष्टी ठेवुन पहा ना जरा ।

त्रिगुणातीत दिव्य दृष्टीने या धन्याकडे पाहुन या धन्याचे भजन पुजन सुमरन करा हो । या धन्यालाच अर्ज करून आपले मागणे मागा हो । या धन्यालाच अर्ज करा की :

॥ साचा सचला तुम्हा हात । कृष्ण महाराजा प्रकटले मिर्त लोकात ॥
॥ साचा सचला तुम्हा हात । कृष्ण महाराजा प्रकटले हद्‌यात ॥
॥ साचा सचला तुम्हा हात । याहो महाराजा, संग/उभे राहावं नित ॥
॥ साचा सचला, तुम्हा हात । याहो महाराजा, सोयंम् दयाहो भेट ॥
॥ साचा सचला, तुम्हा हात । याहो महाराजा, दया बाळाला भेट ॥
॥ बाळ अडाणी अग्यान । शिकव महाराजा, या बाळाला ग्यान ॥
॥ बसली भजनाची मांड । याहो महाराजा, उभे राहा येथं ॥
॥ पक्की बसली, हो मांड । दयाहो महाराजा, आम्हा गिण्यानाचा सांड ॥
॥ चतुर्पती गिण्यान, दया देवा । अंतरी लावा देवा, ग्यानाचा दिवा ॥
॥ चतुर्पती गिण्यान, दया देवा । तुमच्या चरणा वर माझा माथा ॥
॥ चतुर्पती गिण्यान, दया हरी । आमचा माथा तुमच्या, चरणा वरी ॥
॥ तुमचे चरण माझी डोही । हाच करार, देवा हाच करार ।
भक्त जनांवर, कराव दया । बहु यवग तार ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०२ ॥

॥ ओवी नं. ०२ ॥

ओवी महात्म :- जेव्हा **सहा नर सचला साचा** ही ओवी कारल्यातुन देवमनजीं गात होते, तेव्हा त्या एकाच समयी त्या सहानर ओवीवर उत्तरोत्तर ग्यान देण्यासाठी कृष्णाजीने सावंग्यात सांगी केली. आणी कृष्णाजीच्या त्या शब्दसाचाचे त्याच वेळी जळगावचे हेंगडुजी यांनी ओवीत रूपांतर करून गायलेली...

स्थापनेच्या वेळी सहानर साचा नंतर हमखास म्हणण्यात येणारी..

॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

## ॥ सहा हंकारी निराधारी ॥

॥ साहंकारी, निराधारी । तो बसला आहयं ।
मुळ यवगाचा/स्तंभाचा, शकुन दादा । निरंजनी पाहयं ॥ घृ ॥
॥ निरंजना, भरून गुणा । भर सर्व्या देही ।
निरंजना, वाचुन सुनी । आहे हो पृथ्वी/नरदेही ॥ ०२ ॥
॥ निरंजना, भरून गुणा । भर सर्व्या ठायी ।
आदी भैसाच, राज्य होणार । तिरलोकी गाही ॥ ०३ ॥
॥ तिर लोकी, गाही तुझा/तुमचा । उठला हंकार ।
भक्त जनावर, कराव दया । बहु यवग तार ॥ ०४ ॥

॥ साहं कारी, निरां धारी । उभे निरंजन ।
बहु दिवसाच्या, नाही झाल्या भेटी । या प्रपंचानं ॥
॥ प्रपंचा ची, झापड आहे । माझेया डोळयांलां ।
पंचेचाळीस, चौक्या तोडुन । भेट दयाहो मजला ॥
॥ पंचेचाळीस, चौक्या आड । खेळ, खेळेतो निरंजनं ।
सब देवतांचे, पुंजन करता । नाही चुकले मरणं ॥
॥ सब देवतांचे, पुंजनमान नाही । झाले दर्शनं ।
किंवा म्हणणी २ :- सब द्युतांचे पुंजन मान । झाले दर्शन ।
आहार-उपहार, घेवुन देहा । नासवल्यां याहीनं ॥ ०८ ॥
॥ गाउ काय, नाशीकाची वाणी । नाश झाला, हो तिरभवनी ।
मुळ यवग, नासवले तिन्ही । सुर्दशना...
याहीनं बहुनाश केला जिवाजना ॥ ०९ ॥

किंवा जळगावं दांड चे चरणे :-

॥ नाशीक दिसणार नाही कोठी । निरंजनाच्या होतीन भेटी ।
कोण धरल्या जीवाच्या वाटी । मालुम नाही.., याहीनं नाशवली नरदेही ॥
॥ ओपार पुंजन मान । दर्शनं घेतलं त्याहीनं ।
त्याचं भरून घेईन उसनं ॥ सुदर्शना.., ॥ जळगाव दांड चे चरण
॥ ब्रम्हा विष्ण शिवशंकर । पुजंनमान झालं दर्शन ? ।
तथी हिशोब दया भरून । सुदर सैना...
याहीनं बहुनाश केला जीवा जना ॥ जळगाव दांड चे चरण
॥ कोणीतरी धरण जिवांच्या वाटी । त्याहीची चाकरी करा तुम्ही ।
निरंजनाच्या होतीन भेटी । राज्य भैसाचं चालन,., महीमा होईन तिरलोकी ॥

॥ कोणीतरी धरनं जिवाच्या वाटी । याहीच्या कधितरी होतीन भेटी
याहीच्या कधितरी होतीन भेटी । मालुम नाही., याहीनं नासवली नरदेही ॥
॥ निरंजन घडवत असें देही । जीव काय आले/गेले द्युताच्या पायी
अजुन याहीचा खोज नाही । द्युत सैना.., देहे जागी करा ही भुम्मा ॥

**भजने :-**

॥ सुदर सैनाच्या गणती । वेढा देहेच्या भोवती ।
याहीचे हत्यार बोलती । कृष्ण अवधुत कृष्ण अवधुत ॥
किंवा याहीचे हत्यार बोलती । अवधुत नाम विठ्ठल नाम ॥
॥ निरंजनाची, वस्ती । भुम्मा, नासली सारी ।
यादव जागी, करा हो याहीला । आणावं घरी ॥ ०१ ॥
॥ जागी करा, यादवाले हो । करा मानवाले ।
पुर्विच, भाकलं अहीना । घरी, देव आले ॥ ०२ ॥
॥ अहीना घरी, देवं आले । पुर्विच नांत ।
पुर्विच; नातं अकाशमात । उभी आहे ज्योत ॥...
॥ ज्योत भली हो ज्योत भली । उभी आहे ताळात ।
ज्योतीचा अवतार कृष्णदेव । उभे सावंग्यात ॥

॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

## ॥ सहा हंकारी निराधारी ॥

**-: निरसन/स्पष्टीकरन :-**

॥ साहंकारी, निराधारी । तु बसला आहयं ।
मुळ यवगाचा/स्तंभाचा, शकुन दादा । निरंजनी पाहयं ॥ धृ ॥

अन्न-अग्न, पाणी-पवन सानीध्य आकाश-धरणी, या सहानरांचा या देहीचा जो साचा बनला आहे. या सहा नरा सह सर्वत्राचा तारू असलेला तो निरंजन आहे. हे सहा नर या देहीचे तारू बनले आहे. या सहा नर तारू चा तारू तो निरंजन आहे. कारण या निरंजनानेच या सहा नरांमध्ये चैत्यन्य ओतले आहे. या सहा नरांना हंकार् देवुन तोच साहंकारी आहे. या निरंजनानेच या सहानरांचा कार निभावला आहे. तो साहंकारी निरंजन या सहा नर साच्यात निराधारी बसला आहे. मुळ यवगाच्या कोणत्या आवाजी शकुनाव्दारे हा निरंजन या देहीत आला आहे ?. मुळयवगाचे कोणत्या ग्यानपिंडा च्या शकुनाव्दारे या चतुर्पतीचे निरंजन ग्यान तो देत आहे ? ते तु आता सुक्ष्मःसुक्ष्मोत्तर अती सुक्ष्मः ज्ञान दृष्टीने निरंजनी पाहय.

मुळ यवगाचा, शकुन दादा । निरंजनी पाहयं ।

या साहंकारी निराधारी आपरूप निरंजनाचा मुळयवगाचे शकुन हो दादा आता पाहयं त्या खंड ०१/०१/गण०१ आदीपुरूष आदीगण व खंड०१/०२/०१ शक्ती ची ओवीत । जेव्हा तुम्ही निरंजनी सुक्ष्मः सुक्ष्मेत्तर सुक्ष्मः ज्ञानदृष्टीने बघाल, तेव्हा चतुर्पतीच्या निरंजन ग्यानाचे शकुन तुम्हापर्यत येवुन तुम्हा चतुर्पतीचे निरंजन ग्यान प्राप्त होईन. तुला चौथ्या अवस्थेचे ग्यानाचे सार येईल की :

या सृष्टीनिर्मितीच्या खेळाच्या आधी तो अयन नसलेला आधीरूप भैस नारायण उभा होता. त्याचा शकुन निघाला. तो मुक्ष्यपणे मो-ह सृष्टी रंचावी असे बोलुन उभा झाला. निर्गुण थापल्या गेला. निर्गुण निर्विकार परमात्मा थापल्या जावुन, सगुण-निर्गुण निरंजन स्वरूपी उभा झाला. निरंजनाची 'मो-ह सृष्टी रंचावी' ही ईच्छाच निरंजनाच्या मुळावरचा रंग धरून सगुण-निर्गुण शक्ती रूपात उभी झाली. सगुणःनिर्गुण घडले. शक्तीने मांडलेल्या प्रार्थनेला पावुन, 'येतो मी खरा' या आवाजाचा शकुन साधण्याकरीता सगुण-निर्गुण निर्विकार आदीपुरूष आदीमुनी उभा झाला. या आदीमुनीने शक्तीला सगुण-निर्गुण तिन देव जागी करून उभे करून दिलेत. शक्तीसह या तिन ला देणं दिलेत.

या तिनाने देवांगण घडवले. या देवांनी पुढे कृत्य केलेत म्हणुन तेथुन पुढच्या यवगाचे नाव **कृतयवग** पडले. या कृतयवगापासुन यवगाच्या चौकडीची गणणा होवु लागली. या यवगाच्या चौकडीवर सत्यवग उभे झाले. या चौकडीच्या येशीवर तो मुळयवगाचा **''येतो मी खरा''** हा शकुन साधण्याकरीता देही होतो. विदेही होतो. येतो पुन्हा पुन्हा. चौथ्या खुम्मी अथर्वन् वेद गर्जना करतो. या देहीच्या निरंजन रूपी मुळस्तंभाचे हे मुळयवगाचे शकुन निरंजनी पाहयं.

मुळयवगाचा **''येतो मी खरा''** हा शकुन साधण्याकरीता तो निरंजन या देही खरोखरच येतो. विदेही होतो. पुन्हा पुन्हा येतो. त्याची पहीली अवस्था अव्यक्त असते. तर मधल्या अवस्थेत तो व्यक्त होतो. आणी अंती तो पुन्हा अव्यक्त होवुन, या व्यक्त-अव्यक्तच्या पल्याड उभा राहतो. तेथुन तो निरंजन अवतार या देह-शक्तीला हाती धरून, अथर्वन् वेद चौथ्या खुम्मी गर्जना करतो.

निर्गुण निरंजन परमात्मां, पिंडीत आपला अंश अवतार घेवुन उभा आहे. तो अवतार दुसरा-तिसरा कोणी नसुन त्या आधीरूप आपरूप चैत्यन्यमय सोहंम् निरंजन निर्गुण परमात्माचा तेजोगुणी अंश असलेला, या देही-शक्तीचा आत्मा होय. म्हणुनच या आत्माला सुध्दा **निर्गुण, निरंजन** असे म्हटल्या गेले.

याच निराकार-निराधार, निर्गुण-निश्कलंकी आपरूप चैत्यन्यमय निरंजन सोहंम् ज्योत स्वरूपी आत्माराम धन्याने, सहानर सचलेल्या साच्याच्या सहा नरात आपले चैत्यन्य ओतुन, या सहा नराला आपला हंकार दिलेला आहे. आपल्या चैतन्याचा पुरवा/पुरवठा व्दारे या सहा नरांचा तारू बनुन उभा आहे.

पिंडीत तोच सहा ला हंकार देणारा साहंकारी निराधारी बसला आहे. आपली सोहंम् धुनी पेटवत हा निरंजन ऋषी निर्वाणी बसला आहे. ओहंम्-सोंहंम् धुनी धडाधडा जाळतो आहे. सोहंम् मंत्र पिंडी च्या ब्रम्हांडी जपतो आहे. याचा कसा कळेल सुम्मार ? या कडेच ध्यान दे । निरंजनी पाहयं गा दादा । हाच तो मुळयवगाच्या **'येतो मी खरा'** या आवाजी शकुनाव्दारे, या नरदेहीत आलेला तो निरंजन अवतार होय. हाच नरदेहीचा मुळस्तंभ होय. या मुळस्तंभाच्या आधारावरच देही उभी आहे. आता त्या निरंजनालाच विनव की :

॥ निरंजना । भरून गुणा । भर सर्व्या देही ।
निरंजना, वाचुन सुनी । आहे हो पृथ्वी ॥ ०२ ॥

हे निरंजना । हे देह निगुर्णा । हे देहीच्या आत्मारामा । तु या सर्व गुणांत भरून भरला आणीक उरला आहे. म्हणुनच तुलाच विनविते की : या देहीच्या पाचही तत्वांचे गुणांत तुझे चैतन्य भर. तु तुझे सर्वगुण सर्वशक्ती सह अखंडपणे तुझा चैतन्याचा पुरवा/पुरवठा या देहीला दयाहो. निरंजना तुच सर्व गुणांने भरून भरला आहे. म्हणुन सर्व्या देही तुच गुण रूपासह भर. तुमच्या वाचुन ही देहधरणी, ही पृथ्वी सुनी आहे.

हे निरंजन निर्गुणा । या पंचभुताचे ८२ तत्वगुणां व्दारे, ही चौ-देही बनली आहे. या चौ-देहीत स्थुलदेहीचे ३३ तत्वे तर सुक्ष्मदेहीचे ३३ तत्वे, आणी कारण देहीचे ८ तत्वे व महाकारण देहीचे ८ तत्वे गुण असे ८२ तत्वगुण या देहीचे कार्य करत आहे. अधीक ग्यानासाठी .खंड०३/ओवी-०६पंन्चीकरन ओवी यातुन ग्यान घ्यावे ।

हे निरंजना । तुच या पंचभुताच्यां सर्व तत्व गुणांत चैतन्य ओतुन या सर्वांना कार्यरत् केले आहे. ते कार्य करण्याचे कारण तु आहे. तु आहे म्हणुनच

ते सर्व कार्य करत कार्यरत् आहे. याचे कार्य असेच अखंडपणे राहण्यासाठी, आता मी तुलाच विनवितो की : या देहीतुन जावुच नको कधी । असो तुझे या रूपा-सुखाची व गुणांची गाही । या करीताच पुनःपुनः विनवितो की :

अन्न-अग्न, पाणी-पवन, आणी आकाश-धरणी या सहा नरांपैकी अन्न हे माझ मजलाच मिळवावे लागते. हे अन्न सहजतेने मिळवण्यासाठी साहय करत, उरलेल्या पाचही तत्वांचे गुण या देहीला भरभरून दयाहो. तु सर्व्या देही भर.

कारण की : तुझे चैतन्यसह ईतर गुणांचा पुरवा/पुरवठा जर या तत्व गुणांत कमी झाला, तर हे तत्व गुण कमजोर होवुन ही देही कमजोर होईन. या कमजोर देहीने तुझे ग्यान-भक्ती, नाम-सुमरन करण्याची ताकत कमजोर होईन. ही देही तुझे नाम सुमरन पुर्ण ताकतीने करू शकणार नाही. म्हणुनच पुनः विनवितो की : तुझा भरपुर चैतन्याचा पुरवा सह गुणं रूप शक्ती देवुन, हा देहपिंड मजबुत बनवा हो बनवा.

हे निरंजना । देहे निर्गुणा । आत्मारामा । हा देहपिंड मजबुत बनवुन, मजबुतीने तुझे या चतुर्पती नामाची टाळी वाजवुण्यासाठी, तसेच तुझेच ग्यान-भक्ती, नाम-सुमरन करण्यासाठी तुलाच विनवितो की : या चतुर्पतीच्याच भजन पुंजन ध्यान सुमरन ईत्यादी कारणां करीता, तुझे चैत्यन्यमय सर्वगुण व सर्वशक्तीने या देहीचे पाचही तत्वे भरून, तुझे देणं या देहीच्या पाचही तत्वांला दयाहो.

**आकाश तत्वाचे गुणं दयाहो मजला ।**

हे निरंजना । या आकाश तत्वांचे गुण असलेला जो कान/श्रोत आहे, त्यात तुम्ही त्यात अखंडपणे भरभरून चैतन्य ओतुन अखंडपणे परमात्मा प्राप्तीच्या अंतीम लक्ष्यापर्यत, चतुर्पती चे नाम व हरीभक्तीच्या गुंज-गोष्टी ऐकण्याची ताकत मजला दयाहो. निरंजना । आकाशाचे गुणं भर सर्व्या देही ।

निरंजना । या आकाशाचे जे अंतःकरण आहे, हे अंतंःकरण शुध्द व निर्मळ करण्याचे साहय कर. त्यात तुझा प्रित्यर्थ ग्यान भक्ती-भाव भरण्याचे साहयं करत, तुझे सर्व गुण शक्ती चैत्यन्य अखंडपणे भरपुर भरून तुझे प्रित्यर्थ ग्यान-भक्ती भाव अखंडपणे मजला वाहु दयाहो. निरंजना । याच करीता अखंडपणे चतुर्पती प्राप्तीच्या अंतीम लक्ष्यापर्यत, या आकाश तत्वांचे गुण मजला दयाहो. निरंजना ! तुलाच मी गुणाचे मागणं मागतो. कारण की, तु या सर्वांचे आदी कारण आहे. निरंजना ! भरून गुणां भर सर्व्या या देही ।

**वायु तत्व गुण दयाहो मजला ।**

निरंजना ! या वायु तत्वांचे गुण जे त्वचा, स्पर्श, मन संकल्प-विकल्प आहे, त्यात तु सर्व गुणांसह भरून चतुर्पती धनी प्राप्तीच्या अंतीम लक्ष्यापर्यत तुझे चैतन्याचा अखंडपणे पुरवा देत राहयं. निरंजना ! भरून गुणा भर सर्व्या देही ।

हे निरंजना ! या वायुतत्व गुणानी बनलेली जी त्वचा आहे, तिच्या रोम-रोमात/छिद्रा-छिद्रात तुझे ग्यान-भक्ती नाम सुमरन भिनवण्याकरीता, या त्वचेत भरूपुर चैतन्य सह तुझे सर्वगुण चा पुरवा ओतुन, ही त्वचा आता कांतीमय, तेजोमय बनवा.

हे निरंजना ! या वायुचे जे मन आहे, त्या मनातील सर्व षटविकार बाहेर काढण्यास साहयं करा. त्याला निश्कलंकी बनवण्याकरीता त्या मनात चतुर्पती प्राप्तीचा संकल्प, निर्धार, धैय व ध्यास राहण्यासाठी साहय करा. तसेच

या मनाला पक्के बांधुन तुया चरणी अर्पण करण्यासाठी, या मनात भरभरून चैतन्य ओतुन त्याला तुझाच ध्यास आता राहु दे !

निरंजना ! या वायुचा जो स्पर्श आहे, त्याला तुझे पायाची स्पर्शाची आवड व ध्यास आता राहु दे. चतुर्पती धन्याच्या पायाचा स्पर्श या देहधरणीस लागुन, ही संपुर्ण देहधरणी प्रकाशीत होण्याकरीता नित साहयं करावे. कृष्ण निरंजन नराची लाथ लागता हा देह पवित्र आहये. म्हणुनच आम्हास याहीचा चरण स्पर्श करून दयाहो. तुम्ही परीस आम्ही लोहा । संगत घडली याहो कृष्ण महाराजा, कृष्ण अवतारा निरंजना ।

निरंजना ! याच करीता या वायुतत्वांचे गुण अखंडपणे चतुर्पती प्राप्तीच्या अंतीम लक्ष्यापर्यत मजला दयाहो आता.

**तेज तत्व गुण दयाहो मजला ।**

निरंजना ! तेज तत्वागुणानी बनलेली जी बुध्दि आहे, तिच्यात तुझे चैतन्य सह सर्व गुण शक्ती भरभरून ओतुन तिला प्रकाशमान कर. तिला प्रकाशमान करून तिचे रूपांतर कुशाग्रबुध्दि, तेजबुध्दि, मेद्याबुध्दि यात करत, तिच्यात तुझे सर्व ग्यान भरभरून दे । सर्व ग्यान सह नित भक्ती-भाव ठेवा हो निरंजना ।

निरंजना ! तेजाचे जे डोळे आहेत, त्या डोळयां मध्ये तुझेच रूप पाहण्याची आस ठेवा. तुया भेटीची, तुया चाहत ची आस नित राहु दे. याच करीता या तेजतत्वांचे गुण अखंडपणे चतुर्पती प्राप्तीच्या अंतीम लक्ष्यापर्यत आता मजला दयाहो.

**आप तत्व गुण दयाहो मजला ।**

निरंजना ! आपतत्व गुणांनी बनलेली जी जिव्हा म्हणजेच साळु आहे, तीला या चतुर्पती च्या नामरसाई ची गोडी राहु दे. ही साळु तुझेच नामोच्चार व तुझेच ग्यानाचे बोल सुदंर कातण्यासाठी, या साळुला भरभरून चैतन्य दे. ऐसे बोल बोलु दे की : ज्या बोलाने तु डोलु लागेल. ऐसे गायन करू दे की : ज्या गायनाने तुला आनंद होवुन तु नाचु लागेल. तिच्याव्दारे तुझेच ग्यान व नाम भजन सुमरन अखंडपणे चतुर्पती प्राप्तीच्या अंतीम लक्ष्यापर्यत करत राहु दे.

निरंजना ! आपतत्व गुणांचे जे चित्त आहे, ते चित्त आत्मग्यान चतुर्पती ग्यान याच्या चिंतनात ठेव । हे निरंजना ! चित्त चलबिचल न करता चतुर्पती मध्ये स्थिर करून, हे स्थिर चित्त तुझेच चरणी राहु दे. याच करीता आप तत्वांचे गुण अखंडपणे चतुर्पती प्राप्तीच्या अंतीम लक्ष्यापर्यत दयाहो. निरंजना भरून गुणा । तु भर गा सर्व्या देही ।

**पृथ्वी तत्व दयाहो मजला ।**

निरंजना ! या पृथ्वी तत्व गुणांनी बनलेले, नाडी, हस्ती, मास,...इत्यादी सर्व पृथ्वीतत्व गुणांत तुझे नामाचा परमय ठेवा. तुझे चैतन्य सह सर्वगुण रूप शक्ती भरभरून भरून, हे चतुर्पती नाम अंगाच्या केसाच्या छिद्रासह रोमारोमात भरभरून भर. या सर्व्या देही च्या अंगच्या रोमारोमात छिद्राछिद्रात तुझेच चतुर्पता नाम भरवत, तुझे गुणरूप देवुन या देहीला रोमीद्युत बनवा हो.

निरंजना ! याच करीता या पाचही तत्वांचे गुण अखंडपणे चतुर्पती प्राप्तीच्या अंतीम लक्ष्यापर्यत आता दयाहो मजला. निरंजना ! भरुन गुणा । तु भर गा सर्व्या देही । तुमच्या वाचुन सुनी आहे ही देहधरणी ।

निरंजना वाचुन सुनी आहे पृथ्वी ।

या टुकीचे अधिक ग्यानाकरीता, खंड०२/ओवी०१ **सहानर सचला साचा** च्या निरसनातुन ग्यान घ्यावे.

हे निरंजना ! तु सर्व गुणांत भरुन भरला आणीक उरला आहे. तुच सर्व गुण रुप व शक्ती सिध्दियॉ संप्पन्न आहे. असा हा सर्वगुण रुप व शक्ती सिध्दियॉ संप्पन्न पिंडीतील निरंजन हा देहीच्या विकारांमुळे झाकाळला असेल, तर त्या निरंजनाच्या सर्वगुण शक्ती सिध्दियॉ वाचुन ही देहधरणी सुनी आहे. म्हणुनच याला प्रकाशीत करण्याचे साहय करत राहावे. हा निरंजन जर सर्व देहीत प्रकाशीत नसेल, तर सुनी आहे ही पृथ्वी । निरंजन ज्योती च्या प्रकाशा विना सुने आहे अवघे देह । साच्यात उरल काय ? सुने पंचतत्वे ।

आपल्या सत्य धन्यापर्यत ज्ञान-दृष्टी न गेल्यामुळे, त्या तिरगुणी मायेच्या फास्यात अडकलेल्या देही काही आत्मग्यानी झाल्या नाही. त्याच मुळे त्यां तिरगुणी देहींनी त्यांचा निरंजन धनी नाही पाहीला. सुने आहे या देही निरंजना वाचुन.

निरंजना । नको ठेवु ही सुनी धरणी । सुनी भुम्मा । तुच सर्वत्र भरुन भरला आणीक उरला असल्यामुळे, तुझें चैत्यन्य सह सर्व गुण रुपांने सर्व शक्तीने भरुन भर गा सर्व देही, सर्व्या भुम्मा. कारण तुझेच राज येणार हे तुच आम्हा सांगीतले आहे. तुझीच या पिंडाच्या तिरलोक्यासह ब्रम्हांडी गाही आहे. म्हणुनच आम्ही पुनःपुनः विनवितो की :

॥ निरंजना, भरुन भुम्मा । भर सर्व्या ठायी ।
आदी भैसाच, राज्य होणार । तिरलोकी गाही ॥ ०३ ॥
॥ तिर लोक्यात, तुमची गाही । उठला हंकार ।
भक्त जनावर, कराव दया । बहु यवग तार ॥ ०४ ॥

हे निरंजना ! निराकार निरंजन चैतन्यज्योतीर्मय रुपात या देहपिंडीत उभे राहलेत. या देहपिंडीच्या सहा नर साच्यात हंकार ओतला. या हंकारासह तुम्ही तुमच्या चैतन्य प्रकाशाची गाही या देहपिंडीला दिलेली आहेस. तुमच्या प्रकाशात आत्मपुरुषाची छाया पडुन, या देहपिंडीत प्राण निर्माण झाला आहे.

तुमच्या हंकारानेच सहा नर चैतन्यमय होवुन, देहपिंडी चेतनामय झालेल्या आहेत. तुम्हाव्दारेच देहपिंडी चेतनामय होवुन चालत बोलत उठत-बसत धावत आहे. तुमच्या हंकारानेच नर देहीचे तारण होत ही नरदेही जिवन जगत आहे. तुमच्या दयेनेच देहीचे भरण पोषन पालन रक्षण होत आहे. आणीक कितीक वर्णु तुमचे गुण ? असेच आम्हा भक्तजनांवर नित दया करुन आम्हास बहुयवग तार हो आता.

आदीभैसाचे राज्य होणार याची तिरलोक्यात गाही देण्यासाठी, माझे या देहरुपी भुम्मेवर उभा राहुन तु आता भर सर्व्या देहीत. या सहा हंकारी धरणीवर तुच उभा आहे. याची गाही या देहीच्या तिरलोक्यावर तुमचे गुणरुप देवुन करावी. अशी हात जोडुनी करतो विनंती देवा अवधुता । देवा निरंजना । कैवल्यनाथा । धाव पाव लवलाही भेट दयाहो आता ।

॥ सहा हंकारी धरणी वर । उभा तो निरंजन ।
बहु दिवसाच्या भेटीनाही झाल्या । या प्रपंचानं ॥
॥ प्रपंचाची झापड आहे । माझेया डोळ्याला ।
पंचेचाळीस चौक्या तोडुन । भेट दयाहो मजला ॥
॥ पंचेचाळीस चौक्या आड । खेळ खेळतो निरंजन ।
सब देवतांचे पुंजन करता । नाही चुकले मरणं ॥
॥ सब देवतांचे पुंजन मान । नाही झालं दर्शन ।
आहार उपहार घेवुन देहा । नाशवल्या याहीनं ॥ ०८ ॥

सहा नर साचाव्दारे बनलेली देहधरणी वर तो निरंजन आपला तेजोगुणी अंश अवतार घेवुन उभा आहे. ही देही पंचइंद्रियांच्या विषयाचा मायेचा प्रपंच माडुंन आत्मपुरुषा संग राहत आहे. तिरगुणी प्रप्रच माया चा संग करून तिरगुणी प्रपंच कातत बसली आहे. या तिरगुणी मायेने आपल्या स्वतःच्या धन्याला प्रकाशीत करण्याचे महत्वाच्या कार्यातुन देहीला नटवुन, या देहींला तिरगुणी प्रपंच मायाच्या अध्यानी करून तिरगुणी प्रपंचात गुंतवुन ठेवलेत.

हे देही ! स्वतःच्या धन्यालाच पडीत टाकुन, या तिरगुणी प्रपंच माया शक्तीच्या अध्यानी पुर्णतः जावुन या तिरगुणींचाच प्रपंच कातत बसली आहे. ऐसा प्रपंच कातत कातत प्रंपच्याच्या जाळ्यात गुंतल्याने, हा देहीचा धनी जवळी उभा असतांनाही या देहीला आपल्या धनीच्या बहु दिवसाच्या भेटी नाही झाल्या आहेत.

या तिरगूणी प्रंपंचाची गुंगी येवुन, जी या तिरगुणी प्रपंचाची झापड या देहीच्या डोळ्यावर आली आहे, ती प्रपंचाच्या झापडी सर्वप्रथम तुम्ही चतुर्पती ग्यानांमृताने दुर करा. तिरगुणी मायेच्या चौक्यांच्या पल्याड तो धनी आहे. या तिरगुणी प्रपंच मायेच्या ४५ चौक्या आहेत. त्या अश्या प्रकारे या देहीत वसलेल्या आहेत.

- या तिरगुणी मायेचे सत्व, रज तम हे ३ गुण,
- काम कोध लोभ मोह मद अहंकार हे ६ मनोविकार,
- कल्पना म्हणजेच माया. या मायेचे ईच्छा, व्देष सुखःदुखः हे पंचभुतात्मक विकार, इंद्रियांचे पंचविषय,..ईत्यादी ३२ पाखंड, हे आशा मनशा दुर्गुण वासना माया ममता...ईत्यादी व्दारे मायेच्या ३६ कल्पना चा बाजार देहीत भरून आहेत. या मायेच्या ३६ कल्पनेच्या पालव्या तोडुन भेट दयाहो मजला.

ऐसे ३, ६, ३६ मिळुन मायेच्या ४५ चौक्या या देहीत आहेत. मायेच्या या ४५ चौक्या तोडुन देवा भेट दयाहो मजला.

मायेच्या या ४५ चौक्या आड राहुन तो निरंजन खेळ खेळतो. मायेचे बंधन फेकुन मायेच्या या ४५ चौक्या तोडुन त्रिगुणातीत झाल्यावर त्या निरंजनाचा खेळ अनुभवास येतो. मरण चुकविता येते. आयुष्य वाढविता येते.

त्याच करीता या निरंजन धन्यास विनवा विनवा की : तुमच्या चतुर्पती नामी जडल्या वर भक्तजनांस या देहीला नसावे मरण । तुमचे नाम घेता चुकवा चौ-यांशी यवनं । ही ईच्छा पुर्ण कर माही, या देहीतुन जावुच नको कयी । असो तुया रूपा सुखाची गाही ।

हे निरंजन धन्या ! आजपर्यत तुमचे ग्यान या देहीला यवगान यवगात न मिळाल्यामुळे यवगान यवगात या देही निरंजन ग्यानी झाली नाही. त्याच

मुळे या देही तुला न विनंवता, तिरलोक्यातील तिरगुणी अवतार असलेल्या सर्व देवी-देवतांचे पुंजन मान करत करत मेल्यात. परंतु या सब देवतांचे पुंजन करून त्यांना मान देता देता, अंती या देहीचे मरण सबदेवतांनी चुकविले नाही. सब देवतांच्या पासुन मुक्ती न मिळल्यामुळे माझा जीव हा चौ-यांशी फे-यात हिंडतो हो. माझा मुळ यवगाचा देव नाही पाहीला हो. यवगा परी अवतार झालेत दोन दोन । या देहीचे मरण नाही चुकवले हो कोणं ?

कारण की : तिरलोक्यातिल तिरगुणी अवतार असलेल्या देवी-देवंता च्या नावावर, हे पोटपाणी व मानसन्मानाचे स्वार्थ बाळगुण असलेले तिरगुणी जन मायेच्या तिरगुणी ग्यानाच्या भरोवश्यावर सब देवतांचे पुंजन व मान दर्शन, या देहीव्दारे घेत आहेत. स्वार्थि तिरगुणीं जनांनी या देही कडुन, यवगान यवगात आहार उपहार घेत घेत, या देहीला व्रत वैकल्य, कर्मकांड पुजापाठ युक्त पाखंडी मायेच्या तिरगुणी ग्यानी लावुन, यवगान यवगातल्या देहीचा नाश केला आहेत. देही नाशवल्या आहेत.

॥ गाउ काय, नाशीकाची वाणी /किंवा- जाईन ही भक्तीकाची वाणी ।
नाश झाला, हो तिरभवनी ।
मुळ यवग, नासवले तिन्ही । सुदर्शना...
याहीनं बहुनाश केला जिवाजना ॥ ०९ ॥

या तिरगुणीने तिन यवग निरंजन चतुर्पती गाय पडीत टाकुन, तिच्या पर्यंत पोहचु न देण्याची काळजी घेतली. चतुर्पताचा अमृतपान्हा न पाजता, या स्वार्थि तिरगुणींनी स्वतःच्या स्वार्थ व सत्ता स्थापनेकरीता, मानसन्माना करीता, सत्काराकरीता, गुरू-शिष्य परंपरा चालवण्याकरीता, तिरगुणांचे तिन मठ चालवण्याकरीता ईत्यादी कार्यासाठी देहीला वेठीशी धरले आहेत. यवगान यवगात या तिघांच्या तिरगुणीं नी देहीच्या चौथ्या निरंजन धन्याचे ग्याना पर्यंत देहींला जावु दिले नाही. चतुर्पतीचा अमृतपान्हा प्राशन करू दिला नाही. तिन यवग या त्रिकुटांच्या तिनगुणी मायेचा झाला संग । या तिरगुणी मायेने मधुपानाप्रमाणे पाजलेल्या तिरगुणी ज्ञानाच्या प्याल्यातच, या देही झाल्या दंग । तिरगुणात दंग झाल्यामुळे या देहीला आपला निरंजन धनी हाती नाही आला. आणी गेला या देहीचा रंग । कुडीचा नक्षा उतरला. यवगान यवगात जन्म घेवुनही या तिरगुणींच्या संगतीन नाही झाल्या या देही आत्मज्ञानी । नाही झाल्या या देही चतुर्पती निरंजन ग्यानी । या तिरगुणींनें या देहीचा यवगान यवगात तिर तिरभवनी नाश केला हो । गाउ काय मी या नाशीवंताची वाणी ? या तिरगुणींनी नाश केला हो तिरभवनी । याहीनं मुळ नासवले. यवग नासवले तिन्ही ।

॥ ओपार पुंजन मान । दर्शन घेतले त्याहीनं ।
त्याचं भरून घेईन/दया उसनं । सुदर सैना,
याहीनं बहुनाश केला जीवा जना ॥
॥ ब्रम्हा विष्णु, शिवशंकर । पुंजनमान झाले दर्शन/यवगं चालविले कोण
तथी हिशोब दया भरून । निरंजना... देहे जागी कर गा भुम्मा ॥

हे ब्रम्हा विष्णु शिवशंकर । तुम्ही तुमच्या मायेच्या चतुर्पती धन्याला मान न देता त्याला पडीत टाकुन, पुजापाठ कर्मकांडव्दारे स्वतःचेच पुजन मान सन्मान दर्शन आहार उपहार घेत आपले तिरगुणी राज्य आपल्या आपरूप चौथ्या धन्याला पडीत टाकुन तिन यवग चालवलेत. तुमच्या या तिन यवगात सर्वसामान्य देहीला तिच्या चतुर्पती निरंजन धन्याचे ग्यान न देता, देहीला आत्मग्यानी न होवु देता मायेच्या तिरगुणी ग्यानाच्या प्याल्यातच डुबविले. तुमच्या मायेच्या तिरगुणी प्याल्याने जीवाजनांचा बहु नाश केला आहेत.

त्याचे आता या कलयवगी हिशोब दयाहो भरून । तुम्हा तिघांच्या देही उभ्या करणा-या चौथ्या चतुर्पती धन्याकडे आता याचा खडखडा हिशोब भरून दयावे.

हे त्रिदेव हो ! या कलयवगाच्या संधी पर्यत तुम्ही पुंजन मान दर्शन घेतलं. आता या कलीच्या संधीत तो चौथा गुप्तपणे उभा झाला असल्यामुळे, तुमच्या आहार ओपार पुंजन मान सन्मान दर्शन पुजापाठ कर्मकांड..ईत्यादी पाखंडाव्दारे, जी सर्व सामान्यांना भुलवन पाडुन त्यांचे मन मोहुन त्यांना दंग केलेत, त्यांची बुध्दिमती स्तंभित करून, ती अडलेली मती चौथ्या निरंजन ग्यानापर्यत जावु दिली नाही. त्यांना तिरगुणांचे फाश्यात खिचुन चौ-यांशी च्या फेरीत घुमवलेत. तिघा मिळुन तुम्ही तुमचे राज्य चालवण्यासाठी, तुम्हा पासुन सर्वसामान्यांना मुक्ती दिली नाही. तुम्हा पासुन त्या सर्वसामान्यांना मुक्ती न देण्यासाठी, तुम्ही चौथा धन्याच्या पोटी असलेला चतुर्पता अथर्वन् वेद गुप्त आहे. असे सांगण्याचे योजना केली. या योजनेव्दारे चौथ्या धन्याच्या निरंजन ग्यानास पडीत टाकत टाकत सर्वसामान्यांना आत्मग्यानी, निरंजन ग्यानी करण्याचे योजीले नाहीत. मोक्षाचा मार्ग दाखवण्याचे योजीले नाही.

आता या कलीच्या संधीत, या सर्व तुम्ही आपली सत्ता चालवण्याकरीता केलेल्या योजनांचे तो चौथा धनी उभा राहुन भरून घेईन उसनं । त्यामुळे सत्ता चालवण्याकरीता ज्या चुकीच्या योजना आखल्या गेल्यात, त्या सर्व योजना गुंडाळुन आपल्या चौथ्या धन्याच्या पोटी अर्पण करावे. आता या कलीच्या संधीत आपल्या आपरूप चौथ्या धन्याचा चतुर्पता अथर्वन् वेद सच्च्या भक्तजनांच्या हाती देवुन, आपला हिशोब भरून दयावा.

हे तिरगुणांचे तिन राजे ब्रम्हा विष्णु शिवशंकर च्या बोलावर उभा राहणारा कोण ? या तिन देवास जागी करून उभे करणारा कोण ? तिनयवगाची राजपदवी देणारा कोण ? स्वतः लहानपण घेवुन तिनदेवासं सत्ता देणारा तो चौथा कोण ? तिन यवग चालवण्यास साहय करणारा कोण ? यवगं चालवले कोण ? चवथ्या खुम्मी उभा कोण ? याची सांगी जरा तुम्ही तिरगुणींना करा. तिरगुणींना चतुर्पती ग्यान दया तरच आम्ही चतुर्पतीचे भक्तगण तुम्हास खरे म्हणु । तरच राहीन तिन खुम्माचा जिव्हाळा आम्हा चतुर्पती भक्तगणां जवळ । आता सर्वसामान्य भक्तजनांच्या हाती हा चतुर्पता अथर्वन् वेद आला असल्यामुळे. या स्वार्थि तिरगुणी नाशीवंतांचा जोर कमी कमी होत, हे देहीचे नाश करणारे तिरगुणी नाशीक दिसणार नाही बा कोठी । म्हणुनच धरा या निरंजन आत्म-जीवांचा वाटा असलेला, त्या चौथ्या निरंजन कृष्णामुखचा चतुर्पता अथर्वन् वेद ।

॥ कोणीतरी धरन/धरा जिवाच्या वाटी । याहीच्या कधीतरी होतीन भेटी ।
निरंजनाच्या होतीन भेटी । सुदर सैना/सुदर्शना...
देह जागी कर गा भुम्मा ॥
॥ किंवा :- कोण धरल्या जीवाच्या वाटी । याहीची चाकरी हो करा तुम्ही ।
राज्य भैसाचं चालन, त्याची तिरलोकी महीमा ॥ जळगाव दुक

कोणीतरी धरा या निरंजन आत्म-जीवाच्या आत्मग्यानी मार्गातील जवळच्या वाटा असलेला चतुर्पता अथर्वन् वेद हाती । हे करण्यासाठी तुमच्या वाटा कोण धरल्या आहेत ? हे आम्हास मालुम नाही ! परंतु तुमचे देही कोण नाशवल्या ? हे तुमचें तुम्हास मालुम असल्यामुळे, आता तुम्ही सच्या मन भाव भक्ती ठेवुन आपल्या देहीच्या चौथ्या निरंजन धन्याची चाकरी करा हो । कारण की : पुढे राज्य हे चौथ्या निरंजन भैसाचं येणार आहे. त्याचमुळे तो या कलीच्या संधीत सच्च्या भक्तांना भेटी देत आपले यवगाची मांडणी करत आहे.

त्यांना आपल्या यवगाच्या मांडणीत सामील करून घेत आहे. त्याचमुळे या निरंजनाच्या कधी ना कधी कधीतरी होतीन भेटी ।

म्हणुनच पुनश्च विनविते की : हे तिरगुणी जन हो । तुम्हा पैकी कोणीतरी धरा हो आत्म-जीवाच्या वाटी. आपल्या निरंजन धन्याचा चतुर्पता अथर्वन् वेद हाती घेवुन या निरंजनाचा मार्गाने लागा हो. आत्मज्ञान घ्याहो. चतुर्पती निरंजन धन्याच्या नादी लागा हो. या चतुर्पती धन्याची चाकरी सच्च्या मनोभावाने करा हो तुम्ही । तेव्हा मग होतीन या निरंजनाच्या भेटी ।

निरंजन ग्यानाव्दारे जेव्हा देही आपल्या चतुर्पती निरंजन धन्याला सत्य मनोभावाने भजतीन. तेव्हा मग या देहीच्या निरंजना संग नक्कीच भेटी होतीन. आपल्या धन्याच्या निरंजनी भेटी प्राप्त झाल्यानंतर पुनःपुनश्च निरंजनाच्या भेटी करीता विनवत राहतीन त्या देही की : हे निरंजना । तुम्ही निरंजनी भेटी देता । मुजरा आहे बा अवधुता । चुकवा यमपुरीचा रस्ता आता । ऐसे जेव्हा नित वारंवार सच्चा मनभावाने विनवत राहाल, तेव्हा मग निरंजन धनीच तुमच्या देहघरी आपणहुन येवुन तुम्हा हाती धरून, तुमच्या हाती चतुर्पता अथर्वन् वेद देईल. चौथ्या खुम्मी अथर्वन् वेदाची गर्जना करत, दंवडीच्या प्रमाणे चतुर्पती वाणीची सांगी करेल. तुमचा देह रूपी भुम्मा जागी करन. चुकवन देहीचं मरण. भैसाच्या यवगी मांडणीत सामील करून घेईन. हे तुम्ही निश्चित जाणा. कारण की : हा निरंजन च घडवत असे देही..

॥ निरंजन घडवत असें नरदेही । म्हणुन जीव आले द्युताच्या पायी ।
*किंवा जीव काय गेले द्युताच्या पायी ?*
अजुन याहीचा खोज नाही । मालुम नाही.. ॥

हा निरंजन धनी च घडवत असे नरदेही ! हा निरंजन धनीच आपले गुणरूप या देहीवर देवुन देहीचे गुणदोष काढतो. देहीला शक्तीसंपन्न करतो. चैतन्यमय करतो. देहीच्या उर्ध्वस्वर्गि पहुडुन असलेल्या सिध्दियॉं जागृत करतो. देहीतील तिन ताळाच्या सिध्दगणांना चैतन्याचा भरभरून पुरवा देवुन त्यांना उठवुन उभे करतो. देही देवता माया चैत्यन्या शक्ती यांना ज्योता चढवतो. संपुर्ण देही जागृत करतो. म्हणुनच या चतुर्पती निरंजन धन्याच्या पायी या चौथ्या धन्याची मनोभाव भक्ती व सेवा करण्यासाठी, चतुर्पती पंथाच्या भुम्मेवर देह-जीव आले आहेत. येथे हे जीव निरंजन धन्याची सच्च्या मनभावाने भजन पुंजन नाम सुमरन ध्यान करण्यासाठी आलेले आहे. त्यापैकी काही सच्चेजन मोक्ष प्राप्ती करून, धन्याच्या पायी गेले आहेत.

परंतु जे अजुनही तिरगुणी मायेच्या तिरगुणी ग्यानाच्या प्याल्यातच धुंद आहेत, ज्यांच्या हाती चतुर्पता अथर्वन् वेद पडला नाही, त्यांना कोण सांगन या निरंजन आत्म-जीवाच्या वाटी ? कोण सांगन आत्म्याव्दारे परमात्माकडे जाणा-या जवळच्या मार्गाच्या वाटी ? कोण देईन निरंजनाचे आत्मग्यान ? मालुम नाही.. कारण की : त्या तिरगुणींना अजुनपर्यत या निरंजन धन्याचा खोज/शोध काही लागला नाही. आत्मग्यान शोधल्या शिवाय नाही तत्वग्यान ! हे अजुन या तिरगुणी ग्यानीला मालुम नाही. म्हणुनच याहीनं आपल्या देही तिरगुणीच्या संगतीन नाशवल्या आहेत. या तिरगुणी मायेच्या प्याल्यात डुबुन, याहीन आपल्या मागे चौ-याशी लावली आहे.

हे सुदर्शना । हे चतुर्पतीच्या द्युत सैना गण हो । तुम्ही मार्गक्रमण करत अश्या नाशलेल्या देहीला येथे आणुन, त्यांना शुध्द करण्याकरीता त्यांच्यावर अतिक्रमण करा. दृष्टांताच्या तलवारीने त्यांची तिरगुणी मती मारा. सर्वत्र त्रिगुणातीत मती करा. त्याच्या मतीमध्ये चतुर्पती निरंजन धन्याचे ग्यान रोपन

करून, त्यां बिचा-यांना तिरगुणांच्या फाश्यातुन मुक्त करा. ऐसे सर्वत्रांना जागी करा. चतुर्पती नामी लावुन निरंजनाच्या भेटी करा. देहरूपी भुम्मा जागी करा हो. या चतुर्पती पंथाच्या भुम्मेवर नित कोर धान्य पिकवा हो ।

हे कृष्ण सुदर्शना । तुमच्या द्युतसैना गणांच्या अतिकमण व्दारे सुधर ही तिरगुणी सैना. या तिरगुणीं सेनाला नमवुन त्यांना सरळ साध्या सिदाईच्या मार्गाने लावण्याकरीता, त्यांच्या देहेभोवती आपल्या द्युतसेना चा वेढा घाला हो आता. द्युतसेना च्या कृष्ण अवधुत नामाच्या हत्याराने त्यांना जिंकुन, आपल्या चतुर्पती सेनेत सामील करून घ्याहो आता । तुमच्या मुखचा चतुर्पता अथर्वन् वेद या सर्वत्रांच्या हाती देवुन, देहे जागी कर गा अवघी भुम्मा । हीच अर्ज आहे हो आमची आता ।

॥ सुदरसेनाच्या/सुदर्शना च्या गिणती । वेढा, देहे च्या भोवती ।
याहीचे हत्यार..। हत्यार बोलती । अवधुत नाम ॥
॥ सुदरसेनाच्या/सुदर्शना च्या गिणती । वेढा, देहे च्या भोवती ।
याहीचे हत्यार..। हत्यार बोलती । विठ्ठल नाम ॥
॥ सुदरसेनाच्या/सुदर्शना च्या गिणती । वेढा, देहेच्या भोवती ।
याहीचे हत्यार बोलती । कृष्ण अवधुत कृष्ण अवधुत ॥
किंवा याहीचे हत्यार बोलती । अवधुत नाम अवधुत नाम ॥ ..*जळगाव दांडातील*

चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाच्या भुम्मेवर उभे असलेले चतुर्पती अवधुत भक्तांच्या भोवती, चत्रभुज महाराज यांचे सुदर्शन चक्र वेढा घालुन त्यांचे सर्वप्रकारे रक्षण करीत आहे. तिरगुणांच्या जाळ्या तोडत आहे. तर कृष्णा भालीयाचे घाव काटयावर निर्वाळत उभा आहे. वेळ घटका सांभाळत आहे. देणं देत आहे. देव ज्योता जीव ज्योता या देहीत भरत देहीला ज्योता चढवत आहे. देहे उजाळत आहे. यादव जागी करून त्यांना आपल्या घरी आणत आहे. भक्तांच्या घरी आपणहुन जावुन, त्यांना हाती धरून दवंडीच्या प्रमाणे चतुर्पतीची वाणी सांगत आहे. चतुर्पती भक्तांचे मुखी कृष्णाने दिलेले चतुर्पती नामाचे हत्यार कृष्ण अवधुत कृष्ण अवधुत बोलत रोग-विघ्ने संकटे-आरीष्टे व्दैत-दुर्जन इत्यादी ंचा संहार करत आहे.

॥ नामी तरण तरण भरोसा । ऐसा आहे हरीनामाचा ठसा ॥
॥ नामी तरण तरण भरोसा । उभा आहे श्रीकृष्ण सखा ॥
॥ उभा आहे माझा सखा । आता नाही देहीला धोका ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥






॥ खंड ०२ ॥

॥ ओवी नं. ०३ ॥

॥ मुळावरची ओवी ॥

# ॥ निरंजना..। कर जागी अवघी भुम्मा ॥

॥ निरंजना कर जागी अवघी भुम्मा ।
निरंजना देहे जागी कर गा भुम्मा ॥ घृ ॥

॥ निरंजन वस्तु, रयत/रहीत खासी । मालुम नाही कोणाशी
कौतुक केलं यवगावरी ॥ निरंजना..।

॥ निरंजन वस्तु, होय कोण ? आदी पुरूषाचं मंडयान ।
जागी करनं तिरभवन ॥

॥ तिन ताळ केले याहीनं । आणीक चंद्र, सुर्य दोन ।
नउ लक्ष, तारांगण । केल त्याहीनं ॥ निरंजना...

॥ एकवीस स्वर्ग, केले त्याहीन । आणीक चौदाही भुवन ।
केली सात दिपाची रंचना । देवांगणा...
तुम्ही येवुन भेट देना ॥




॥ ब्रम्हा विष्णु, राज्य करा ।
शंकर पाटील, होय तो खरा
मोडा यमाच्या येरझारा ॥ निरंजना..

॥ ब्रम्हा विष्णु, तसल्ली/तहसीली करा ।
आदी भैसाची, सोय धरा ।
जीव नेईल पहीली-पार/पैल-पार ॥ निरंजना..

॥ उत्तम देहीची घडमोड । विर उठतीन भुम्मेवर ।
सिध्द होईन घरोघर ॥ ०८ ॥
॥ तिरभवनाला पडला फास/फाम । देवराया, करन कार ।
नागार्जुन उभा राहीन ॥ ०९ ॥
॥ हरीचा भक्त, होय/आहे कोण ?
हरीला भजता आणा शिणं ।
किंवा म्ह. २:- हरीला भजत, नाही जन ।
गेलेल्या वस्त्या देईन आणुन ॥

भजने :-

॥ निरंजनाची वस्तु याची रहीत/वस्ती नासली सारी..
जागी करा, माधवा याहीला । आणावं घरी ।
जागी करा, यादवा याहीला । घेवुन या घरी ॥
॥ निराकार निर्गुण, निरंजन ज्योत । मज दावा अनंत ।
ब्रम्हांडाच्या, वरत सेरूप । ओळखाव अनंत ॥
॥ ब्रम्हांडाच्या, वरत सेरूप । श्री कृष्णाचं ।
पुढ सुख आहे । अनंत यवगाचं ॥

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. ०४ ॥
॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

## ॥ जलीया खांबाशी, उभे नारायण ॥

॥ जलीया खांबाशी, उभे नारायण । या देवानं तारले । तीर-तीरभवनं ॥
॥ जलीया खांबाशी, उभे नारायण । पाण्यानं तारले । तीर-तीरभवनं ॥
॥ जलीया खांबाशी, उभे नारायण । अग्नीनं तारले । तीर-तीरभवनं ॥
॥ जलीया खांबाशी, उभे नारायण । वा-यानं तारले । तीर-तीरभवनं ॥
॥ जलीया खांबाशी, उभे नारायण । आकाशानं तारले । तीर-तीरभवनं ॥
॥ जलीया खांबाशी, उभे नारायण । धरणीनं तारले । तीर-तीरभवनं ॥
॥ जलीया खांबाशी, उभे नारायण । अन्नानं तारले । तीर-तीरभवनं ॥

॥ आकाश-धरणी पाणी पवन । उभ केलं मेरु मंडयान ।
तीन ताळ चौदा भुवन । चंद्र सुर्य दोन ॥
॥ आकाश-धरणी पाणी-पवन । अन्न अग्नं ।
या देहीला तारु आहे । हे सहा जनं ॥
॥ आकाश-धरणी पाणी पवन । उभकेलं मेरु मंडयान ।
या देहीचा तारु उभा । तो निरंजन ॥

**भजनें :-**

**॥ तारु आला देहीचा । शिक्का बसन या आदीपुरुषाचा ॥**
**॥ मोहर शिक्का येईन सेरुप । उजाला पडनं चवही ताळातं ॥**

### -: निरसन :-

**सहा नर सचला साचा** या ओवीच्या निरसनातुन आपणास ग्यान झालेले आहे की : पंचमहाभुते आत्मा मन..ईत्यादी पाण्याचीच ही नरदेही बनली आहे. म्हणुनच येथे या नरदेहीलाच जलीया खांब असे संबोधीले आहे. पाण्याचा खांब म्हटले आहे. या जलीया खांबाशी, निराकार निराधार निर्गुण आदीपुरुष नारायण हा आपल्या तेजोगुणी अंश अवतार घेवुन उभा आहे. म्हणजेच तो आपोनारायण पिंडात आत्मा बनुन, या जलीया खांबाशी आधार देत मुळस्तंभ बनुन उभा आहे. तर ब्रम्हांडी सावंगा येथे तो आपोनारायण कृष्णा उभा आहे.

या धन्याच्या तेजोगुणी अंश असलेल्या आत्मारामाने या देहीचे तिरतीरभवन तारले आहे. या धनी नारायणाने आकाश-धरणी, पवन-पाणी, अन्न अग्न या सहा जनांना नरदेहीचे तारु बनवुन त्याचा सहानर साचा सचवला. आणी त्यात आपले चैत्यन्य ओतले आहे. या सहानर साच्या व्दारे ही नरदेही आकारुन, या नरदेहीत तिन ताळ, चौदा भुवन चंद्र सुर्य ..ईत्यादी, कित्येक उभे करुन, तो या देहदेउळात निरंजन चैत्यन्य ज्योतिर्मय स्वरुपात देहीचा तारु बनुन उभा झाला आहे.

अन्न-अग्न पाणी-पवन व आकाश-धरणी या सहा नरांव्दारेच, या देहीचे मेरु मंडयान उभे करुन, या देहीसह हे तिर तिर भवन त्या उभ्या असलेल्या निरंजन नारायणाने तारले आहे. हाच धनी आदीपुरुष नारायण या देहीसह सर्वत्राचा तारु बनुन उभा आहे. या आदीपुरुषाचीच सत्ता सर्वत्र असुन याच्या सत्तेचा मोहर/शिक्का पुढे सेरुपात येवुन, सर्व सच्च्या भक्तांच्या देहीच्या चवही ताळात उजाला पडणार आहे. हेही निश्चित जाणा ।

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥

**॥ ओवी नं. ०७ ॥**

॥ मुळावरची ओवी ॥

# ॥ निर्मळ ढळमळ ॥

या ओवीची पलट ओवी खंड०७/ओवी-०६ मध्ये दिलेली आहे.

वरचरण :- ॥ कैची हे माया । कैचा हा सागर ।
कैची देवता । कैचा हा विस्तार ॥

**॥ निर्मळ ढळमळ । सप्त हे सागर ।**
**विर्जले कैश्यानं । सांगा मुळ ? ॥ ०१ ॥**
**॥ अडिच या रत्तीची । बांधुन हे मुसं ।**
किंवा म्ह. २ :- रक्त या मासाची । बांधुन मुसं
**या मध्ये हंस । उंच आहे ॥**
**॥ उपजीता जन्मता । फुंकलेसे कान ।**
**आता झालो पाक । तुम्हा हातं हो ॥**
**॥ उपजीता जन्मता । फुंकलेसे कान ।**
**आता गुरूला मान । कोण्या परी हो ॥ ०४ ॥**

**॥ कईचा गुरू । कईचा पंथ ।**
**धनी अनामत । वेगळा/उभा असे ॥ ०५ ॥**
॥ याहीचा हे गुंज । ऐकले या कानी ।
आता धरली बाणी । द्युतराया हो ॥ -पलट चरण
॥ सावाची हे वाणी । चांगला हा पंथ ।
धनी अनामत । उभा इथं ॥ -पलट चरण

**॥ तुच माझा गुरू । तुच माझा बाप ।**
**तुच आदीरूप । सर्व ठाई ॥**
**॥ तुच माझा गुरू । तुच माझा पिता ।**
**अवघ साहय झालं । तुमच्या हाता ॥ ०९ ॥**
**भजने :- ॥ साहय झाले तुम्हा हात । देह जीव नांदवा हो इथं ॥**
**॥ साहय केले मायबापा । वेळोवेळा धन्याच्या चरणावर माथा ॥**
**॥ साहय केले प्रभुनं । धनी उभे, उभे आम्ही लेकरं अन्जान ॥**
**॥ अंन्जानाचा होय दाता । संभाळ करा, महाराजा अवद्युता ।**
**भेट दयाहो महाराजा अवद्युता/समर्था ॥**

## -: शब्दार्थ :-

**मुंस** :- रक्त-मासाचा गोळा पासुन बनलेली देही । **कैचा** :- कैसा ? । **विर्जले** :- विरजले, विर्जन टाकुन विरजने. जसे दुधात दहयाचे विर्जन टाकुन, दुध विर्जले जावुन त्याचे दही बनते त्याप्रमाणे. । **रत्ती** :- अस्तुरी-पुरूषाचे बिज बिंदु । **हंसं** :- आत्म्याला दिलेले संबोधन, हंसपक्षी ज्याप्रमाणे दुधातले पाणी वेगळे करत, फक्त दुधच ग्रहन करून पितो, त्याचप्रमाणे हा आत्मा सुध्दा आसारातुन सार वेंगळे करत, असत्यातुन सत्य वेगळे करत, फक्त सत्य सार च ग्रहन करतो. म्हणुन या आत्म्याला **हंस** या नावाने संबोधल्या जाते. । **पाक** :- निर्मळ, बेडाग, निश्कलंकी, पवित्र, शंक ।

**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. ०६ ॥
॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

## ॥ द्युताचे हे मोती ॥

॥ द्युताचे हे मोती । जली हारपलं ।
शकुनी सापडलं । कल यवगी ॥घृ॥
॥ शकुना पासुन । झाला जयजयकार ।
सगुणी आधार । निर्गुणाचा ॥
॥ निर्गुणा पासुन झाली । माया उत्पन्न ।
झाले बम्हा-विष्णु । तिर नयन ॥
॥ माया हे चैतन्या । चैतन्यं फाकले ।
येथुन क्षिर-सिंधु । आला असे ॥ जळगाव दांडातील चरण...
॥ निर्गुणा पासुन । झालेसे गुण/तिरगुण ।
वाढवले ज्ञान । तिरं पतीचं ॥ ०५ ॥

॥ तिर्गुणी हे माया । सगुणी हे काया ।
नवमासी जन्मले । अवघे राया ॥
॥ तिरगुणांच्या जाळ्या । तोडन अवद्युत राया ।
अंबर करन नरदेहया । महाराजा हो ॥
॥ जीवज्योता, देव ज्योता । भरनं देही ।
सांगी करन सही । महाराजा हो ॥ जळगाव पाठातील चरण...
॥ पाच जरी सात । दहा पासुन भुलले ।
येथुन उत्पत्ती । झाली असे ॥०९॥

॥ बारा जरी सोळा । आल्या एका दांडा ।
सत्रावीला ठाव । यवगी झेंडा ॥
डहाकी :- ॥ ४, ६, १० जनी । १२, १६, २ आहे गुणी ।
झाली ५०शीची गणना । २ सांगे कृष्ण राया ॥
॥ जीवा चे गुण । सांगा याहीच्या खुण ।
जीव केला कैश्यानं । दयाहो सांगुन ॥
॥ आटनं हे पाणी । सापडनं मोती ।
हिशोब घेईन । यवगा परी ॥ १३ ॥

भजने :-
॥ द्युताचा डंका.। तुम्ही तिरलोकी सांगजा । मो-ह होणार, हे पाहीजा खरं
॥ द्युताची वाणी.. । ध्यान देवुन, ऐका कानी ।
तुम्ही नका धरू अंदेशा । आला धनी ॥
॥ चार वाणी, चार खाणी । हा दंडवत ।
घरी उभा, आहे अखंड । अवद्युत ॥
॥ चार वेद, चार भेद । हा दंडवत । लावा चतुर्पतीची सुद । महाराजा ॥
॥ तुम्ही उभे देव । हे मोती चांगले दाव/दाखवं ॥
॥ तुया घरी मोत्याची खाणं । या मोत्याची पारख । नाही केली कोण ॥
॥ मोती लोळे गाग-यात । उचलुन घ्याहो, महाराजा पदरात ॥
॥ ऐसा एक दिवस यंईन । अवघे मोती, एका हाते ओवीनं ॥
॥ अवघे आहे एकाचे । काम नाही अनेकाचे ॥
॥ जल सागर आटनं पाणी । अनामत, उभा राहीन धनी ।
तो तारण जीवाजनी । हे सर्व याहीच्या अध्यानी ॥

## ॥ ओवी नं. ०६ ॥

॥ मुळावरची ओवी ॥

# ॥ निरसनसह द्युताचे हे मोती ॥

### ॥ शब्दार्थ/चरणार्थ, स्पष्टिकरण/निरसन ॥

**द्युत** :- निराकार निराधार निशं:कलंकी आदीपुरूष अवधुत । व त्यां आदीरूप आदीपुरूष परमात्माचे पुर्ण अवतार गडी यांना कुठे कुठे द्युत या शब्दाने वर्णिलेले आहे.

**मोती** :- परमात्माचा अंश अवतार आत्मा. ज्याने स्वतःच्या आत्म्याला जाणले ते ओळखीचे रोमीद्युत म्हणतात : माझा मजला गवसला मोती । बहु यवगाचा तो संगती । नित सांगे हो मानव निती । प्रार्थना करा.. हा आत्माराम देव सोयंम नांदतो या देहघरा । हाच देव नेईन त्या परमात्मा कडे...

**जलीया हारपलं** :- या पाण्याच्या/जलाच्या देहरूपी समुहात हरवले. देहीच्या विकाराने बाधीत होवुन स्वस्वरूप विसरून मोती हरवले. जला बद्दल अधिक ग्यानासाठी जलीया खांबाशी व आदीपुरूष आदीगण यांच्या निरसनातुन ग्यान घ्यावे.
**शकुनी** :- निशःकलंकी परमात्माचा शकुन/शुभ संकल्प आल्यावर..
**सापडलं** :- गवसले, जे आधीच माझ होतं ते मिळाले, भेटले, प्राप्त झाले..

शकुनापासुन झाला जयजयकार :- आदीरूप परमात्माचा मो-ह सृष्टी रंचावी या शकुन निघाला, मुक्ष्य बोलला, आणी निगुर्ण थापला गेला. या निर्गुणापासुन पुठे धुम्मकार उठुन, हा धुम्मकार चा ओहंम् व ज्योतीचा सोहंम् असे ओहंम्-सोहंम् एक होवुन सृष्टी रंचनेचा खेळ सुरू झाला. ओहंम् व सोहंम् च्या टाळी व जयजयकाराने हे घडले म्हणुन शकुना पासुन झाला जयजयकार असे म्हटले गेले आहे. अधिक ग्यानासाठी आदीपुरूष आदीगणांचे निरसन वाचा.

निर्गुणी आधार शकुनाचा :- परमात्मा चा शकुन निघाला मुक्ष्यपणे/मनातल्या मनात बोलला आणी निर्गुण स्थापला गेला. निगुर्ण असा परमात्मा व त्यांचे अंशअवतार आत्मगडी ज्योत स्वरूपात उभे राहीलेत. म्हणुन या निर्गुण आत्माला म्हणजेच निर्गुणाला आधार हा आदीरूपाच्या शकुनाचा आहे. अधिक ग्यान खंड०१/०१/गण०१ आदीपुरूष आदीगणातुन घ्यावे.

॥ निर्गुनापासुन झाली माया उत्पन्न । झाले ब्रम्हा विष्णु तिरनयन ।
निर्गुणा पासुन झाले हे तिरगुण । वाढवले ग्यान तिर पतीचे ॥ :-
प्रथम आदीरूपाचा शकुन निघाला, मुक्ष्य बोलला, आणी निर्गुण स्थापला. या निर्गुणापासुन खेळ उभा राहीला तो असा : ओहंम्:सोहंम ज्योत ऐक्यली । या ज्योतीच्या मुळावरचा रंग धरून शक्ती उद्‌भवली । या शक्तीने अनेक रूप धारण करत ब्रम्हा विष्ण शंकर हे चौथ्या आदीमुनी कडुन जागी करून घेतलेत...खंड०१/०२/०१ शक्तीच्या ओवीतुन अधिक ग्यान घ्यावे.

अश्या रितीने शकुनापासुन शक्ती आदीमाया उत्पन्न होवुन या मायेने हे तिरगुणांचे तिन राजे ब्रम्हा विष्ण शंकर जागी करून घेवुन, या तिघांचे तिरगुणी ज्ञान वाढवले. तिरगुणी मोहजालाच्या जाळयात सर्वसामान्य अन्जानांना अडकवुन तिरगुणी राजांची महती वाढवली... अधीक ग्यान खंड ०२/१६ मोहरची ओवी च्या निरसनातुन घ्यावे.

माया हे चैत्यन्या । चैतन्य फाकंलं । तेथुन क्षिरसिंधु आला असे ।
तिर्गुणी हे माया । सगुणी हे काया । नवमाशी जन्मले अवघे राया :-

शक्तीची खंड०१/०२/ओवी ०१ मधुन आपणास ज्ञान आलेले आहे की : शक्तीनेच विविध रूप घेत ती माया चैत्यन्या रूपात येत येत तीने भैसाची भाव धरून प्रार्थना मांडली. आणी तिच्या या प्रार्थनेला पावुन चैतन्य फाकवुन क्षिरसिंधु आदीमुनी अवतार तिच्या पुढे आलेत आणी तिन खुम्म तिला जागी करून ते तिन तिच्या हवाला केलेत...

हाच घडणाक्रम देहीत सुध्दा घडत असतो. आई/माये चा नव मासाचा गरोदर काळ पुर्ण झाल्यावर जेव्हा तिचे देहीतील चैतन्य फाकुवुन, आदीपुरूषाचा अंश अवतार असलेला निर्गुण आत्माराम हा त्याने धारण केलेल्या सगुण देहीला बाहेर काठण्यास धडपडतो, देवास वचने देतो, विनविनी काकुळती करतो, तेव्हा शिर-सिंधुतुन म्हणजेच शिराच्या/डोक्यातिल सुषम्ना-सिंधु नाडी वहनातुन तो आदीमुनी अवतार त्याच्या साहयास येते. डाव्या पायाचा अंगुठाचा स्पर्श करतो तोच हेलकावा मातेला येतो. गर्भि बाळ मायेची नरकनगरी सोडुन बाहेर येते.खंड०३/०५-देहवर्णणाची ओवी व ०३/०३-मोठा पाळणा यातुन अधिक ग्यान घ्यावे. म्हणुनच असे म्हटले गेले आहे की :

माया चैत्यन्याचे चैतन्य फाकवल्यावरच तो क्षिरसिंधु येत असतो.

तिरगुणांच्या जाळ्या, तोडन अवद्युत राया । अंबर करन नरदेहया, महाराजा ॥ जीवज्योता, देव ज्योता, भरन देही । सांगी करन सही, महाराजा ।

या चतुर्पता अथर्वन् वेदाव्दारे तो कृष्णराया मायेसह तिरोपतीने जनलोकांवर टाकलेले हे तिरगुणी फासे, तिरगुणांच्या जाळा तोडन हा अवधुत राया । अंबर करन नरदेह हा कृष्णमहाराजा । देंहातील सर्व ज्योतीला देव ज्योत लावुन जीवाला प्रकाशमान करेलं. भेलुंडा सहीत तो देहीत सम्मावुन आपली सांगी खरी करेल. असे भाकलं आहे....

पाच जरी सात, दहापासुन भुलले । येथुन उत्पत्ती झाली असे ।
येथुनी ठाच/ठाव या जगताशी....

सांख्य दर्शनानुसार २४ तत्वांनी प्राकृत विश्वाची अनित्य अभिव्यक्ती झाली असुन, या २४ पासुनच उत्पत्ती झाली आहे. यापैकी वरील ५७१२=२२ या बाविस तत्वांनी अभिव्यक्ती होवुन, या २२ तत्वात उरलेले दोन तत्वे म्हणजे आत्मा व परमात्मा मिळुन २४ तत्वापासुन उत्पत्ती होत असते. ते २४ तत्वे असे आहेत :

**पाच** म्हणजे पंचमहाभुतेः- १. पृथ्वी २. वायु ३. जल ४. वायु ५. आकाश
**सात** म्हणजे .पंचप्राण अंह व मन :-
१. प्राण, २. अपान, ३. समान, ४. उदान, ५. व्यान, हे पंचप्राण व ६. मन, ७. अहंकार
**दहा** म्हणजे दशइद्रिये

असे एकुन २२ तत्वाने अभिव्यक्ती साकारल्या जाते. तर या २२ तत्वांच्या अभिव्यक्तीमध्ये परमात्मा व त्याचा तेजोगुणी अंशअवतार आत्मा हे दोन तत्वे मिळुन उत्पत्ती होत असते. येथुनच सर्व जगताचा ठाव ठिकाणा होत असतो.

बारा जरी सोळा आल्या एका दांडा । सत्रावीला ठाव यवगी झेंडा ।

**-: बारा जरी सोळा :-**



**चंद्र :-**

चंद्र सुर्य हे नयन । डावा डोळा हा चंद्राचे प्रतिक । हीच चंद्रदृष्टी । या चंद्रा च्या आहेत हो सोळा कला । याचे नाव गुण मन लावुन ऐका । संदर्भ-खंड०३/०७-देहवर्णनाच्या ओवी, ०३/०१-मुळस्तंभिचा पाया, हस्तलीखीत पुर्णब्रम्हविचारयोग,... ईत्यादीतुन...

**चंद्राच्या सोळा कला :-**

०१ : **शांकीनी** :- शांख्ये पाहे ही नयनी । शंक निशःकलंकी दृष्टीने पाहण्याची कला म्हणजे शांकीनी कला ।

०२ : **पद्मिनी** :- दृष्टी निरलक्ष्यी आणुन मच्छदृष्टीने पद्मराज विष्णु च्या सत्वगुणांकडे पाहण्याची कला म्हणजे पद्मिनी कला ।

०३ : **लक्ष्मी** :- दृष्टी अलक्ष्याशी आणुन परा मुळ माया पाहुन, ज्ञानसंप्पत्ती हाती घेण्याची कला म्हणजे लक्ष्मीकला ।

०४ : **कामिनी** :- कामना काम वासना दृष्टीच्या दुर करुन, कामनिक न होता कर्म पुर्ण करणारी कला म्हणजे कामीनी कला ।

०५ : **पोषनी पुरविनी** :- हरीनामाचे पोषन करणा-या दृष्टीने पाहुन हरीनामाने मायेची बेडी तोडुन, हरीनामानेच सर्वत्र पोषन व पुरवा/पुरवठा करणारी कला म्हणजे पोषनी पुरविनी कला ।

०६ : **पुष्टवर्धिनी कसोदीनी** :- दृष्टा-दृष्टीने स्वरुप पाहुन, दृष्टीने पुष्ट वर्धन करणारी तसेच जीव जावो अथवा राहो । लवलाही चे पुंजन करत सत्सार घेण्याची दृष्टी कसणारी कला म्हणजे पृष्टवर्धिनी कसोदीनी कला

०७ : **आल्हादिनी** :- दृष्टी अलक्ष्य ध्यानी लावुन, आनंदाची ज्योत आनंदी राहुन, चैत्यन्यप्रभुच्या दिव्य प्रभा ची उकळी आणणारी, चैतन्य प्रकाशात उजाळुन आल्हादुन आनंद प्रभु कडे घेवुन जाणारी कला म्हणजे आल्हादिनी कला ।

०८ : **अश्वपद्मिनी** :- अश्वदृष्टीने चैतन्य चेतवुन, आश्वासुन मुखी रत्न, पद्म हिरे लालही लेला आदीमुनी नयनी पाहुन, दिनप्रतीदिन दृष्टी त्या पद्मराजा आदीमुनी च्या वंदनी ठेवणारी कला म्हणजे अश्वपद्मिनी कला

०९ **व्यापिनी** :- सर्व ठायी वास्तव्य करुन व्यापुन असलेल्या परमात्म्याला पाहण्याची कला. प्रंपंच/संसार करोनी परमार्थ साधत साधत, जनी वनी मनी ध्यानी सर्वत्रा ग्यानी सर्व ठायी भरुन भरला आणीक सर्वत्र व्यापुन भरुन उरलेल्या त्या परलोकी परमात्माला सर्वत्र दृष्टी ने व्यापुन पाहणारी नयन कला म्हणजे व्यापिनी कला ।

१० : **प्रेमोदिनी** :- प्रेम आनंदाच्या भरात, हरीभजन सुमरन करत, प्रेमदृष्टीने प्रेमोदित होउन, प्रसन्नतेने मोह दुर करणारी, प्रेमदृष्टीने पाहणारी नयन कला म्हणजे प्रेमोदिनी कला ।

११ : **मोहीनी** :- सर्व जीवांचा मोह जाळुन, आनंदाची ज्योत आनंदात राहत असलेल्या श्रीप्रभु कृष्ण अवधुत च्या भजन पुंजन ध्यान सुमरन ग्यान यात मोहीत होवुन, कृष्ण अवधुतालाच भक्तीभावाने मोहीत करुन टाकणारी कला म्हणजे मोहीनी कला.

१२ : **प्रभा** :- मनचंद्राची दृष्टा-दृष्टीने ज्ञान प्रभा फाकुन, त्या प्रभेव्दारे शुध्द अंतःकरणी प्रभा प्रकाशुन, ज्ञान प्रभा फाकवत जाणारी कला, म्हणजेच प्रभा फाकवणारी प्रभा कला.

**१३ : क्षिरवर्धिनी** :- दृष्टा-दृष्टीने क्षर व अक्षर यात समानता आणुन, क्षर अक्षरी वर्तन करत क्षर अक्षराचे वर्धन करणारी कला.
**१४. विकासनी** :- मनचंद्राचा विकासाव्दारे ज्ञानाचा विकास होवुन ज्ञानकळा विकासल्या जावुन, अक्षयी आनंदाचा विकास साधण्याची कला म्हणजे विकास करणारी विकासनी कला.
**१५ : वेदवर्धिनी** :- नामोच्चार, सदाचार, सत्‌कृत्य करत सद्‌गुणी सिधाई मार्गाने राहत राहत, जीव हा नित हरीनामी ठेवुन वेदज्ञानाचे वर्धन करणारी कला ।
**१६. : शोभिनी** :- परंम्सुक्ष्म दृष्टीने परंम् ज्ञानास शोभा आणुन, त्या परंम चतुर्पती निरंजन ज्ञान हाती घेवुन त्याव्दारे परमात्माचा संग करत, कृष्ण अवधुत चरणी लीन राहण्याची कला म्हणजे शोभिनी । या १६ कला पुर्ण होवुन येथे मन चंद्र पुर्ण शोभला । पोर्णिमेस उगवला । सत्रावीत प्रभु आला.

**१७. : सत्रावी जीवनकळा/चैतन्यकला** :-

॥ मन चंद्र सोळा कलाने पुर्ण शोभिला/झाला ।
सत्राव्या जीवनकळेत प्रभु आला ॥
॥ सत्रावी जीवनकला/जीवनकळा । सेरुपी उभा कृष्ण सावळा ॥

या डाव्या मार्गाने डाव्या डोळयाच्या/नयनाच्या सोळा कला पोर्णिमेच पुर्ण साध्य झाल्यावर, सत्रावी जीवनकलेत अमृतपान्हा पाजण्याकरीता कृष्ण सावळा उभा होतो.
ही सत्रावी जीवनकळा जाण. या सत्रावीचे पाणी भरले आहे उलटया दांडाने । जीव शिवाच्या होतीन भेटी पहा याही डाव्या मार्गाने । येथे कृष्ण सखा बासरी वाजवे । सत्रावीचा उजाला होये । सत्रावी हिरण्यगर्भगाय नामा अमृत पान्हा सोडे । योग्याच्या मुखी ते अमृत टपटप टपके । प्रसाद नामाचा भेटे । शुध्द स्वरुपी जीव होये । योगी झेंडा फडके । दशईद्रिये, पंचप्राण, आणी मन व बुध्दि या सतरा समयात चैतन्य-तेल ओतुन सत्रावी वात व्दारे समयाच्या ज्योती लागल्या हो आता ठाई ठाई । आता आहे या कर्ता-याची चतुराई । ब्रम्हांडावरची ज्योत पाही । चैतन्य ची वात सत्रावी । ..असो. _सत्रावीचे सचित्र ग्यान ०३/०१मुळस्तंभिचा पाया, ०३/०३पाळणा व ०३/०५देहवर्णनाच्या ओवीतुन घ्यावे ।_



**सुर्य** :-
चंद्र सुर्य हे नयन । डाव्या डोळयास्थीत चंद्र तर उजवा डोळा हा रवी चे प्रतिक । हीच रवीदृष्टी । या रवि च्या आहेत हो बारा राशी बारा कला । याचे नाव गुण मन लावुन ऐका । संदर्भ-देहवर्णनाच्या ओवी, मुळस्तंभिचा पाया, हस्तलीखीत पुर्णब्रम्हविचारयोग,... ईत्यादीतुन.

**सुर्याच्या बारा कला सिध्दि** :-
**०१. : किरणी** :- ज्ञानाचा किरण प्राप्ती होताच ज्ञानाचा उजाला होये । अंधःकार नाहीशा होये । ज्ञान माया नाचुनी जाये ।
**अनुभवात्मक उदाहरण/गाही/दृष्टांत** :- पुर्वसंचिताने कोणत्यातरी एक मार्गाने चतुर्पता अथर्वन् वेद वाचकाच्या हाती येतो. वाचक हा अथर्वन् वेद हाती घेवून वाचतो. वाचता वाचता त्याची स्वः ज्ञानमाया नाचु लागते. तो वाचक आपल्या स्वःज्ञानाप्रमाणे हे बरोबर, ते चुक, हे असे पाहीजे, ते तसे पाहीजे, ते येथे नको...असे अनेक चिंतनःविचार वाचता वाचता करत, त्या वाचकाची ज्ञानमाया अथर्वन् वेदाच्या ज्ञान किरण प्राप्तीने त्याच्या डोक्यात नाचु लागते. कुठे कुठे अंधःकार नाहीशा होवुन ज्ञान उजाला होतो, तर कुठे कुठे अहंःकार वरचढ होवुन ज्ञानमाया नाचुनी जाते. रविच्या या किरणी कले व्दारे चतुर्पता ज्ञान किरण प्राप्त होवुन, प्रथम असा खेळ सुरु होतो. या किरणी कला व्दारे...

०२. : **दाहीनी** :- दाहकत्व सर्व जगी पसरन पावे । उष्णतामान सर्वत्र भासे । ज्ञान अग्नी प्रकटे ।

**अनुभवात्मक उदाहरण/गाही/दृष्टांत** :- हा चतुर्पता अथर्वन् वेद संपुर्ण पठन केल्यानंतर या चौथ्या अथर्वन वेदज्ञानात थोडेबहुत तथ्य आहे याची जाणीव होते. या चतुर्पता अथर्वन् वेदाचे तेज वाचकास भासते/जाणवते. या वेदाची दाहकता भासत राहुन, या वेदाचे उष्णतामानाचा त्यास स्पर्श होवुन, त्याचा ज्ञान अग्नी कधी कधी प्रकटत राहे या दाहीनी कला व्दारे ।

०३. : **ज्वालीनी** :- ज्ञानसुर्यापासुन ज्वाला निघे । ज्ञानअग्नी धडधडा भडके । प्रकाश ज्ञानसुर्याचा पडे ।

**अनुभवात्मक उदाहरण/गाही/दृष्टांत** :- दाहीनी कला प्राप्त झाल्यावर तो पारखी वाचक हा वेद पुनःपुनः हाती घेवुन पुनःपुनः सुक्ष्म अभ्यासु दृष्टीने धिराईने वेद वाचन पठन करत स्मरण करतो. या वाचन कालावधीत दाहणी कला व्दारे प्रकटलेला ज्ञानअग्नी भडकु लागतो. ज्ञानसुर्यापासुन ज्ञान ज्वाला निघते. ज्ञान अग्नी धडाधडा भडकु लागे । त्याच्या डोक्यात प्रकाश ज्ञानसुर्याचा पडे । या ज्वालीनी कला सिध्दि व्दारे आता...

०४. : **दिपीनी** :- अंतरी ज्ञानाचा दिपक लागे । दिप दिपांतरी प्रकाश लागे । दिपाने दिप उजळे । प्रकाश सर्वत्र मिळे ।

**अनुभवात्मक उदाहरण/गाही/दृष्टांत** :- ज्वालीनी व्दारे डोक्यात ज्ञानसुर्याचा प्रकाश पडल्यानंतर, त्या डोक्यात चतुर्पती अथर्वन् वेद ज्ञानाने चतुर्पती ज्ञानाचा दिप लागतो. या ज्ञानदिप प्रकाशाने शब्दांची उमज येते. शब्द योग्य रितीने समजुन उमजुन सुक्ष्म अर्थ प्राप्त होतो त्याला या दिपिनी कला सिध्दि व्दारे...

०५. **स्फुर्तिनी** :- स्फुर्ति नामाची होये । ध्यानी-मनी स्फुर्ति डुले । देहे हा विदेही करे । आनंद स्वरूप पाहे । त्याशी काही न उमजे । नयना नयनी एक ज्योत होये । ज्योतीनं ज्योत मिळे ।

**अनुभवात्मक उदाहरण/गाही/दृष्टांत** :- दिपिनी कला सिध्दि व्दारे दिपक/समया लागल्यानंतर त्याला चतुर्पती नामाची स्फुर्ति होते. ही स्फुर्ति त्याच्या ध्यानी-मनी डुलायला लागते. ही ध्यानी मनी डोलावयास लावणारी स्फुर्ति त्याला पुनःपुनः चतुर्पता अथर्वन् वेदात डोकावुन वेद वाक्यांचा सुक्ष्म अर्थ स्फुर्तिने आत्मसाद करावयास लावे । आणीक बहुत काही घडे । या स्फुर्तिनी कला सिध्दी व्दारे...

०६. : **मोहीनी** :- जीव नामाशी मोहीत होये । जगाचा माया मोह दुर करे । आनंद मोह एकरूप होये ।

**अनुभवात्मक उदाहरण/गाही/दृष्टांत** :- स्फुर्तिनी प्राप्त झाल्यावर चतुर्पती नामाच्या स्फुर्तिने तो ध्यानी मनी डुलत चतुर्पती नामी मोहीत होये । या मोहीनी कला सिध्दि व्दारे...

०७. : **जीतीनी** :- इद्रिये संयमन करे । दशइंद्रिये ला जिंकुन टाके । नामस्मरणी तल्लीन राहुन, जीतींद्रिये होवुन ज्ञानसुर्याला कवटाळे ।

**अनुभवात्मक उदाहरण/गाही/दृष्टांत** :- पारखी हा इंद्रिये मन बुध्दिला जिंकुन, चतुर्पती नामी उडी घेतो । तुझे या नामी उडया घातल्या आम्ही म्हणे । नामस्मरणी तल्लीनता येई । या जीतीनी कला सिध्दि व्दारे...

०८. : **तेजीनी** :- तेजपुंजः प्रकाश लाभे । तेजी तेज सम्मावत जाये । नामरूपी गहन तेज ग्रहन करण्याचे सामर्थ्य येई ।

**अनुभवात्मक उदाहरण/गाही/दृष्टांत** :- जितीनी व्दारे नामस्मरणी तल्लीनता आल्यानंतर चतुर्पती ज्ञानाच्या तेजाने तेज मिळे । तेजाने तेज सम्मावत जाये । चतुर्पती नामरूपाचे गहन तेज प्राप्त होये । चतुर्पती चा तेजःपुंज प्रकाश लाभे । या तेजीनी सिध्दि व्दारे...

**०९. : विद्युत तेजा/विद्युतेजा** :- जैशी विद्युल्लता चमके । तैशी चमकत पाहे अविनाशाशी । साक्ष/गाही घेई निराकार निर्गुण अलक्ष्य चतुर्पतीची ।

**अनुभवात्मक उदाहरण/गाही/दृष्टांत** :- देव दरबारी बिजली चमके । ज्योत हरी नामाची प्रकटे । चतुर्पतीची गाही घेई । चमकत चमकत चतुर्पतीची चमक पाहे ।

**१०. : शंखीनी** :- नाद गर्जे शंकाचा । निश्कलंकी/शंक ध्यानी मनी येई । जीव-शिव मिश्रीत ज्ञान प्रकटे ।

**अनुभवात्मक उदाहरण/गाही/दृष्टांत** :- निशंःकलंकी/शंक चतुर्पती ध्यानी मनी येई । जीव-शिव मिश्रीत चतुर्पतीचे निरंजन ज्ञान प्रकटे । या शंखीनी कलेव्दारे ।

**११. : शशिप्रभा** :- सोयंम् ज्योतीचा प्रकाश लाभे । कोटी सुर्याची प्रभा अपरंपार लाभे । कोटी सुर्याच्या प्रभाने विस्मीत मनी होये । हा प्रकाश अनंत सुर्याचा भारी दिसे । अनंत गगना न सम्मावे । चौताळावरती सहस्त्र सुर्याचे तेज प्रकटे । या शशीप्रभा कला सिध्दि व्दारे...

**अनुभवात्मक उदाहरण/गाही/दृष्टांत** :- ज्याचा अनुभव त्याला भासन थोर । उभा आहे आता पुर्ण अवतार ।

**१२. दिपकला** :- दिपी दिपकला भारी दिसे । नानापरी दिप उजळे । अंतरी अनंत दिप लागे । प्रकाश अनंत सुर्याचा होये । सहस्त्र सुर्याचा प्रकाशाचे तेज चौताळावर प्रकटे । या ज्योतीनं ज्योत उजेड लाभे । प्रकाश या देहीत पडे । या सुर्याच्या दिपाने रूप उजळले जाते ।

**अनुभवात्मक उदाहरण/गाही/दृष्टांत** :- समया लागल्या ठाई ठाई । कर्ता-याची अमोघ चतुराई । काय गुण वर्णु । याचे वर्णन न करता येई ।

ऐसा हा ज्ञानसुर्य १२ कला सिध्दि सह प्रकटे । या १२ वी च्या ठायी ३२शी उभी होये । १६ आणी १६ होय ३२शीचा मुद्दा । या ३२ शीच्या ठाई तेरावी सिध्दि सिदाई उभी होते । मरण चुकते.

**१३. : तेरावी** :- ज्ञानसुर्य १२ कला सिध्दिसह प्रकटल्यानंतर, या तेराव्या सिध्दि ठाई धनी उभा होवुन सिदाई वाचा ची सिध्दि देतो. या सुर्याच्या १२ सिध्दि पुर्ण । १३ व्या सिध्दि ठाई धनी उभा समर्थ । ही तेरवी सिध्दि अवरत । धनी उभा आहे हो येथे आता समर्थ । म्हणुनच या तेराव्या सिध्दिला मान आहे. । या तेराव्या सिध्दिला मान । चौदावी लागता पुढे होईन यवगाचे काम ।

**चौदावी** :- आता हरीदर्शनाची चव दाखवणारी चौदावी लागता होईन सत् यवगाचे काम । या चौदाव्या सिध्दित उभा आहे माझा राम । हा राम करे यवगाचे काम । या चौदाव्या ठाई आनंदाची ज्योत आनंदात राही । या लेकराची बाणी पुरवे हा कृष्णराया येवुन । जे जे बोले ते ते होई या पृथ्वीवर ।

१२ जरी १६ आल्या एका दांडा :-

आपणास ज्ञान आलेले आहे की : मन चंद्राच्या १६ चंद्रकला मार्गाने सत्रावी जिवनकळा ठाई धनी उभा होतो. तर बुध्दि सुर्याच्या १२ सुर्यकला मार्गाने १३ व्या सिध्दि ठाई धनी उभा होतो. या चंद्र-सुर्य दोन्ही मार्गाने धनी उभा होतो. या १२ व १६ चे लोंढे एकाच हरीदांडावर येवुन हरीचरणी लीन होतात. सुर्य मार्गात तेरावी चौदावी साधल्या जाते, तर चंद्र मार्गात १२ अन ४

मिळुन सोळावी हाती धरून चंद्राच्या सोळा कला साधल्या जात असल्यामुळे, या चंद्रमार्गात १६ आणी १६ बत्तीशी चा मुद्या साधल्या जातो. म्हणुनच या सत्रावीला ठाव योगी झेंडा असे म्हटल्या गेले आहे.

चंद्र बत्तीशी चा मुद्दा :-

दशइंद्रिये, मन व बुध्दि याच्या दिवटया लागुन सुर्याच्या बारा कला या बारा ज्ञानसुर्य ज्योती रूपात उभ्या झाल्यात. आणी या सुर्याच्या/मेद्याबुध्दिच्या बारा ज्योतीचा प्रकाश स्थुल सुक्ष्म कारण महाकारण या चौ-देहात पडुन या १२ ज्योती आणी ४ देह मिळुन १६वी हाती धरल्या जाते. १२ आणी ४ मिळुन १६ वी चे गठण होते. आणी १७वी ची या देहधरणीवर एकच जीवनकळा ज्योत उभी राहते. ऐशी १२ अन ४ मिळुन सवळी गठन । सत्रावीची जीवनकळा देहीत नांदन.

अश्या रितीने या बाराज्योती अन चारदेह मिळुन १६/सोळावी आणी चंद्राच्या १६ चंद्रकला ऐशी १६ अन १६ बत्तीशी झाली हद्द । ही उभी राहली जिवनकळी सुद । या सोळा न सोळा बत्तीशीला चुकतीन मरण । नाही चौ-यांशी यवन ।

ऐसा चंद्र झाला ३२शीचा मुद्या । आता साधवा सिदाई । देवा, १४वीची मोहीम कर गा उभी । खेळ कर गा उभा ।

॥ चद्र बत्तिशीचा मुद्या । साधवा, तेरवी सिध्दि भैसा मोहीम कर गा उभी ॥

जीवा चे गुण, सांगा याहीची खुण । जीव झाला हो कैश्यानं ?...

आत्मा हे परमात्माचे तेजोगुणी अंश अवतार असल्यामुळे, परमात्मा मध्ये जे गुण आहे तेच तेजगुण अंश रूपात या आत्म्यात अस्तीत्वात असतात. पुर्विपासुन सोहंम् स्वरूप या आत्माचे । आत्मा हा निराकार निराधार अव्यक्त निर्वाण निरंजन निशंःकलंकी निर्गुण चैतन्यमय सनातन शुध्दसत्व गुणी असतो.

आदीरूपाच्या मो-ह सृष्टी रंचावी या ईच्छेखातर परमात्मा च्या आंगच्या या तेजोगुणी अंश असलेल्या आत्म्याने प्रकृतिमायेच्या योनीमध्ये उडया घातल्या. प्रकृतीमायेमध्ये प्रवेश घेवुन प्रकृतीचे प्रवेशी/परवेशी झाले. देहे धरलीत. देहधारी झालेत. जेव्हा हे आत्मे परवेशी झालेत, तेव्हा ते प्रकृती-मायेच्या तिन गुणांच्या विकारांच्या वर्चस्वा खाली आलेत.

या तिरगुणांसह ईतर विकारांच्या वर्चस्वाखाली येवुन, ते शंक/ निशःकलंकी पवित्र आत्मे, देहधारी झालेत. या प्रकृति मध्ये देहधारी बनुन, देहीच्या मन, बुध्दि, अंहं, सह तिरगुणांनी बध्द होवुन, आत्मा हा जिवात्मा झाला या मायेमुळे ।

अश्या रितीने हा शंक आत्मा । प्रकृतिच्या गुणांनी बध्द होवुन, बांधल्या जावुन जिवात्मा बनला. जिवात्मा बनुन मायेच्या तिरगुणांनी बांधला गेला. देहीचे ईद्रिंये, विषय वासना विकार..ईत्यादी मध्ये अडकवुन यांच्या विषया डोही मध्ये डुबकी मारली. आणी या आत्माचा या मायेनं इथंच घात केला.

ज्ञान, अबध्दता, एकशत्वता, व्यापकता, नित्यानंद, अतृप्त, चैतन्यमयता... असे गुण जीवास लागले आहे. परंतु जिवात्म्याला चेतनेचा विस्मरणशिल असण्याकडे कल असल्यामुळे त्याला आपल्या ख-या स्वरूपाचा विसर पडतो. आणी मायेत गुफतो.

मायेत पडुन मालक भुलुन तो मायेचे गुण कठीनता, लैलुप्यता, दुर्धरता, आर्जवता, मौन्यवता, दुर्जनता. तिरगुणता...ईत्यादी मायेचे गुणांचे त्याचावर भ्रम चढुन, तो मायेच्या फास्यात गुरफटतो तो असा :

१. **आवरक** :- या फास्याव्दारे जिवात्मा आवरून बांधल्या जातो.

२. **आच्छादक** :- या फास्याव्दारे तिरगुणांचे जिवात्म्यावर आच्छादन तिरगुणी माया टाकते. ही तिरगुणी माया त्याला त्याच्या मुळघरच्या चौथ्या परमात्मा कडे जावु देत नाही. तिरगुणांनी बांधुन ही माया जिवात्म्यास चौ-यांशीत फिरवे हो गरगरा । जावु न देई परमेश्वराकडे ही आता ।

३. **मोहक** :- या फास्याव्दारे मायेने जीवाशी तिरगुणी राजे व त्यांचे तिरगुणी ग्यान, हे कलारीन प्रमाणे पाजते. मायेने पाजलेल्या या तिरगुणी ज्ञानाच्या प्यालाने त्याला धुंद करून या तिरगुणी महती ग्यानाची मोहनी घालते. त्याची शुध्द हरवते. मायेची बेडी त्याच्या पायात टाकल्या जाते. अश्या प्रकारे या मायेच्या मोहक फाश्याव्दारे माया ही जिवात्माला अविद्या चे नादी लावुन प्रपंचमायेची मोहनी मायेने जीवावर पाडुन मोहुन ठेवलेले आहे.

४. **भ्रमकता** :- या फास्याव्दारे प्रपंचमायेचा भ्रम बुध्दिशी चढुन भ्रमणा पाडली आहे जीवाशी । म्हणुनच तो विसरला आहे ख-या सत्यदेवाशी । चतूर्पतीशी विसरून, न पाहे तो मुळ आपले । न पाहे तो आपले मुळघर । दगडधोंडे पुजे तो आता । दगडधोंडे पुंजता मोक्षय नाही मिळे हो याहीच्या हाता । देहेगावचा मनाजी पाटील आपल्या आशा मनशा कल्पना वासना भ्रांती भुली या सहा बायका सह भोग भोगे हो विकाराचा सदान्कदा । या मनाजी पाटलाने ८४शीच्या फे-यात मोतीला पाडले आहे हो आता । हा मोती/हिरा लोळे हो तिरगुण भोगी गाग-यात । उचलुन घ्याना महाराजा याला पदरात ।

॥ हिरा गाग-यात लोळे । याची पारख कोणी नाही करे ॥
॥ हिरा लोळे गाग-यात । उचलुन घ्याना महाराजा पदरात ॥
॥ हिरे हिरे झाले बहु । ऐसा लाल कुठे पाहु ॥
॥ लाल हि-याचे गणित । तुम्ही सांगा हो सांगा पंडीत ॥

आटलं हे पाणी, सापडनं मोती । हिशोब घेईन, यवगा परी :-

जीव जावो अथवा राहो पुंजन करा हो लवलाही । तो देव काही चुकला नाही तिरलोक्याशी । म्हणुनच चंदनाच्या परी झीजवा या देहीला । या तिरगुणांचे ओझे टाकुन पलीकडे पाहण्याची दृष्टी आल्यावर आटनं या तिरगुणांचे पाणी । या देहीत तिरगुणांने मुरवलेले पाणी हे चतुर्पतीच्या निरंजन आत्मग्यानाच्या तेजाने आटल्यानंतर सापडन हा आत्मा । सापडन हा मोती । सापडन हो हिरा.

**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. ०७ ॥
॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ आकाश जाणुनीया पिता ॥

या ओवीच्या काही चरणांची पलट चरणे खंड०७/ओवी-१४ मध्ये दिलेले आहेत.

॥ आकाश जाणुनीया पिता । धरतरी जाणुनीया माता ।
तुम्ही सेवा कोणाची करता ? तुम्ही सेवा देवाची करा ॥
॥ आकाश जाणुनीया पाणी । धरणी माय माझी मेदनी ।
तुम्ही लागले कोणाच्या घ्यानी ? तुम्ही लागा, देवाच्या ध्यानी ॥
॥ नाही हात पाय । आहे लुंडमुंड ।
पाय पाहु कोण्या तोंड ? काय पाहु कोण्या तोंड ? ॥
॥ लदबद ज्योतीचा प्रकाश । याहीचा उजेड चवताळत ।
आता ओळखा हेच घर । राया, घर अनामताचं ॥०४॥
॥ चित्ती चिन्तुंनीया चित्तां । तेव्हाच होईन जित्तां ।
याहीनं सवात्यात दसरा । सांगतला होता ॥
॥ माया मोहीत वेद-पुराणं । हे वाचकाचे कामं ।
हे अवघच खोट जाणं । धनीदेव करन/करतो तारणं ॥
॥ अन्न-अग्न पाणी-पवन । होईन भुभुंत्कार ।
अवघा कार जाणं । धनीदेव करन तारनं ॥
॥ धरतरी-अस्मान कडाडनं । होईनं वर्षाव पडन पर्जन्य ।
चतुर्पतीचा कार जाण । धनीदेव करन हो तारण ॥
॥ धन्या चा वर्षाव । पाडनं पर्जन्य ।
अन्नाचा कार जाणं । होईन धनी देवाचं देणं ॥
॥ यवगी याचा कार । तो उडवन भयभयकार ।
तिर तिरलोक्याचा कार । धनीदेव आणन एका जाग्यावर ॥

**भजने** :- ॥ कृष्णा आहे चातुर । आता आहे, या तिरलोकी अधार ॥
॥ तिरलोक्याचा होय दाता । संभाळ करा, महाराजा अवद्युता ॥

**शब्दार्थ** :- **मेदनी** :- देह धरणी । **पाणी** :- आकाशाचे आध्यात्मीक जलाचर चे जल/पाणी. *जलाचर चे पाणी यांचे अधिक ग्यान खंड०१-०१-०१:-आदीपुरुष आदीगण मधुन घ्यावे.* । **लुंडमुंड** :- निराकार निराधार धनी देवाला आकार च नसल्यामुळे त्याला कुठचे हात पाय ? तो धनीदेव तर लदबद ज्योतीचा कोटी सुर्य प्रभा सम प्रकाश आहे. हेच या अनामत धन्याचे घर आहे. या चैतन्यमय प्रकाशाचा सर्वत्र उजेड पडला आहे. म्हणुनच ॥ तुम्ही डिकावं या नामाला । सुर्यप्रभा सम होईन उजाला, चंद्रज्योती सम होईन उजाला ।

**माया मोहीत हे वेद-पुराण** :- या टुकीचे ग्यान खंड०१-०२-०२:-निराकार निरंजन या ओवीच्या 'भुल पाडली चैतन्याने' या टुकीच्या निरसनातुन घ्यावे. ।

**चित्ती चिंन्तुनिया चित्ता** :- नामी डिकुन चित्तात सदोनित धन्याचे चिंतन करुनीया चित्तात चितन करत राहावे । **जित्ता** :- चैतन्यमय होईन, जिवंत होईन ।

**धन्याचां वर्षाव पडन पर्जन्य** :- आध्यात्मीक जलाचरातील पाण्याचे वर्षाव व्दारे पडलेले पर्जन ! आकाश माझा पिता ! या मुळयवगाच्या पित्या च्या जलाचरांतील विभिन्न स्त्रोत् ने बरसणा-या पोषक व उत्पादक स्थुल, सुक्ष्म व मिश्र प्रवाह युक्त उपयुक्त पर्जन्य च्या धारा सह चतुर्पती ग्यान रुपी अन्न या धरतरी माता मेदनी वर नित पडावे. पित्याचे पर्जन्य तर धरतरी ची धारण शक्ती यांच्या संयोगाने जिवनतत्व ला प्रेरीत करणारी सृजनशिल प्रकृती नित उभी ठेवावी. या पर्जन्याव्दारे चतुर्पतीची ग्यानरुपी एकच ज्वारी चे अन्न पिकवावे. चतुर्पती निरंजन ग्यानरुपी अन्नाचा कार जाणावे. नित्य भजन करता मिळेलं या अन्नाचे भोजन ! नाम घेता चुकतीन चौ-यांशी यवनं. अधिक ग्यान ०२/३१ ओवी च्या शब्दार्थामधुन घ्यावे. ।

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥

॥ ओवी नं. ०८ ॥

॥ निरसनसह जुनी ओवी ॥

## ॥ शकुन निघाला ॥

॥ शकुन निघाला, मुक्ष्य बोलला । निर्गुण स्थापला ।
तिर्गुणाच्या, पोटी खेळ । पाखंडाचा झाला ॥
॥ शकुन आला, खरा याहीचा । नाही केला मान ।
तिर गुणांच्या, ज्ञाना मध्ये । झाल चिन्ह भिन्न/भुलले जन ।
निर गुणांच्या, ज्ञाना मध्ये । हर्रप सुदबुध ॥
॥ शकुन आला, खरा गडेहो । मान्य नाही केला ।
तिर गुणांच्या, ज्ञाना मध्ये । बोंबाटा झाला ॥
॥ निर्गुण गादी, लावुन समाधी । भुलले समाधीत ।
तिरगुणांच्या, ज्ञाना मध्ये । नाही कळला अंत ॥ ०४ ॥
॥ मुळयवगाचा, शकुन आला । चौथ्या खुम्मी ।
सत्य वचनी, दवंडी देल्ली । धन्याची वाणी ॥ ०५ ॥

**भजने :-**

**॥ शकुनाचा मान करा, तारण देही । कृष्ण महाराज, थोर महीमा तुही ॥**
**॥ शकुनाचा होईन जलजलाट पृथ्वीवरी ।**
**या हरीला आडवं येणार नाही कोणी ॥**

**-: निरसन/स्पष्टिकरण :-**

निरंजनाने ''मो-ह सृष्टी रंचावी'' असे ईच्छीले मनी । आणी ही ईच्छा त्या निरंजनात सम्मावुन, ''मो-ह सृष्टी रंचावी'' चा शकुन/शुभसंकल्प, आदीरूपाच्या सर्वव्याप्त मनातुन निघाला. हा शकुन निघाला आणी आदीरूपाच्या सर्वव्याप्त मनातल्या मनात बोलला. या शकुनाच्या या मुक्ष्य बोलल्याने, तेथे निर्गुण परमात्मा थापल्या गेला. हा निर्गुण परमात्मा आपला तेजोगुणी अंश अवतार घेत, सहानर साच्याव्दारे बनलेल्या रूपा रूपाच्या देहीत आला. म्हणजेच हा आत्मा देहीत आला. हा निगुर्ण देहीत येवुन उभा झाला आहे.

या देहीचा मुख्य आधार असलेला मुळस्तंभ म्हणजेच हा निर्गुण आत्मा । हा निर्गुण या देहीच्या पोटी आल्यावर, या सगुण देहींनी या निरंजन निर्गुण आत्माला विसरून तिरगुणांचा बाजार मांडला. मायेनं या तिरगुणी बाजारात पाखंडाचा खेळ केला. मुख्य मालकाला विसरून स्वतःचीच किर्त-महीमा वाढवु लागलेत. स्वतःच्या देहीचीच पुजा-पाठ अन्जाना कडुन करवुन घेवु लागलेत हे स्वार्थि तिरगुणी । अश्या रितीने सत्य शकुनाचा मान न करता त्या शकुनाला पडीत टाकुन, तिरगुणांच्या ग्यानामध्ये अन्जानांची सुदबुध हरवु लागलेत. सत्य ग्यानाचे चिन्हच भिन्न करून, आपले तिरगुणी ग्यान जनांस सांगु लागलेत. यांच्यामुळे आता तिरगुणी ग्यानाचा बोंबाटा झाला आहे. परंतु हे सर्व तिरगुणी ज्ञानी जन आपल्या मायेच्या तिरगुणी ग्यानातच समाधी लावुन बसल्यानंतरही, या तिरगुणांच्या ग्यानाव्दारे त्याना खऱ्या देवाची मुळची किल्ली असलेले तुर्या म्हणजे चौथ्या अवस्थेचे चतुर्पती ग्यान प्राप्त करू शकले नाही. तिरगुणांत डुबुन असल्यामुळे, या तिरगुणींना चतुर्पती ग्यानाचा अंत कळला नाही.

या मुळस्तंभाचा शकुन आता चौथ्या खुम्मी आला आहे. म्हणुनच सत्य वचनी राहुन, या चतुर्पती धन्याची वाणी सांगुन या कृष्णानं चतुर्पती ची दंवडी देल्ली आहे. या शकुनाचा मान कर । तो कृष्ण धनी तुमची देही तारण । कारण ही त्या कृष्णाचीच महीमा आहे.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. ०९ ॥
॥ जुनी ओवी ॥

## ॥ शकुनाच्या लागा ध्यानी ॥

॥ शकुनाच्या, लागा ध्यानी । सोय धरा काही ।
पुन्हा पुन्हा, नरदेही ऐसा । जन्म नाही ॥
॥ शकुनाची, लावा धुनी । धराव ध्यानं ।
कृष्ण योगी, आला बापा । मिर्त लोकी वाणं ॥
॥ मुळ यवगाचा, भक्त याहीनं । झेंडा उभारला ।
सर्वच ज्याला, ठाव तो धनीदेव । उभा राहीला ॥
॥ मुळ यवगाचा भक्त याहीन, धरला रंग ।
चौथ्या खुम्मी, आला धनी, याहीच्या आंग/संग ॥०४॥

॥ चौथ्या खुम्मी, उभा धनी देवहं । भुम्मेवर आला ।
मिर्त लोकी, आनंदाचा । कंद उगवला ॥
*किंवा :- ॥ मुळ यवगाचा, धनी देव । कल यवगी आला ।*
*हरी नामाला विसरू नका । तारण अनेकाला ॥ ..म्हणनी.२*
॥ मुळ यवगाचा, धनी देव । होयें भैसं ।
याहीच सुमरण, करता पडला । वै-याला धाक ॥
॥ महा महा, योगी येतीन । याहीला शरण ।
शरण राहता, चुकतीन मरण । नाही, चौ-यांशी यवनं ॥
॥ ब्रम्हा विष्णु, शंकर याहीच्या हाती । यवगाचे काम ।
भरला याहीचा मुद्या धनिदेव हिशोब घेईन ॥
*किंवा :- तिन यवगाच्या, कामाचा धनीदेव । हिशोब घेईन ॥ ..म्हणनी.२*
॥ अवधुत जबर, सांगे खबर । सांगे तिर लोकी ।
आदी रूप, भैसाचं राज्य । होणार बा इथी ॥ ०९ ॥

**भजनेः-**
॥ आदीपुरूष, बोले अहीनाशी, आलो तुया घरी । जेजे बोलान, तेते होईन, पृथ्वीवरी ॥
॥ आदीपुरूष, बोले अहिनाशी, दिलं वचन । नित नांदन, तुया घरी, आनंदानं ॥
॥ आदीपुरूष, बोले अहिनाशी, सांगतो खरं । नित नांदन, हरी ईथं, वंश परांपर ॥
॥ आदीपुरूष, बोले अहिनास । सांगतो हकीकत । तुमचं आमचं, होत, पुर्विच नातं ॥
॥ आदीपुरूषाच, गिण्यान, झालं अहिनास । कलयवग, लागता देणं, झालं कहीकास
॥ या आदीपुरूषाची गाही, तारण देही । किती सांगु जगा कोणी ऐकत नाही ॥

**शब्दार्थ :-** **शकुन :-** परमात्मा नामी राहुन, स्वस्वरूपी आत्माराम जागृत झाल्यावर शुभ-अशुभ काय घडणार ?...ईत्यादी निराकार परमात्मा ची सांगी तो निगुर्ण आत्मा ऐकतो. *॥ सांगते निराकार । आयकते निगुर्ण ॥ खंड०५/३२* देह हा सगुण तर आत्मा हा निर्गुण ! देह हा आकारी तर परमात्माचा तेजोगुणी अंश असलेला परमात्माचा अंश अवतार आत्मा हा निराकारी ! त्याचाच तो निराकार परमात्मा ! निराकारी परमात्मा मुक्ष्य सांगनं त्यांचाच तो तेजोगुणी अंश अवतार निगुर्ण आत्माराम ऐकतों. निराकार कृष्णाव्दारे सांगी सांगणारे आउक यवग त्यांच्या देहघरी उभे होते. *अधिक ग्यानासाठी खंड०५/६५:-सत्य जाणा या ओवीचे शब्दार्थ वाचावे.* ऐसे परमात्मा मुखचे निघालेले अंर्तआत्माने ऐकुन, अंर्तआत्म्याच्या आवाजाव्दारे देहीला संदेश देणारे हे शकुन दोन प्रकारचे असतात. १. चर शकुन २. अचर शकुन. यापैकी चर शकुन हे तत्काळ फळ देणारे असतात तर अचर शकुन हे समोरील येणा-या काळाचे दर्शन घडवणारे, भविष्यकाळी फळ देणारे असतात. या अचर शकुनालाच भाकलं म्हणजे भविष्य असे म्हटले आहे. **अहीन** :- आत्मा/परमात्मा । **घरी** :- देहघरी । **वाण** :- मुळावरचे देणं । **झेंडा** :- चतुर्पती ग्यान भक्ती असलेल्या हरीनामाचा झेंडा

**निरसन** :- या ओवीच्या निरसनाकरीता कृष्णांमृत वाचा.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. १० ॥
॥ जुनी ओवी ॥

# ॥ मनोरथ पुरवन माझं हीत ॥

॥ मनोरथ देवं । पुरवन माझं हीत ।
लागलो घ्यानी..। हा देह तुमच्या अघ्यानी ॥ घृ ॥

॥ कळ विळ्यांची । झाली नीळावंती ।
तेही तरी माझेयां । बसत नाही चित्ती ॥ लागलो..

॥ सजीवळ्या चीं । ही झाली शकुनावंती ।
तेही तरी माझेंयां । बसत नाही चित्ती ॥ लागलो..

॥ कथल त्याचं । हे झालं पुराणं ।
त्याच्या वर, माझेंयां । बसत नाही मनं ॥

॥ सहा नर नामी राहीनं । तो, करन गादीचा मान ।
मजला होईन पुढं । याहीचं दर्शनं ॥ ०४ ॥
किंवा म्हणनी नं २ चे चरण
॥ सालभी राहीन । तो करन गादीचा मान ।
याहीचं मजला गा । होईन दर्शन ॥

॥ नर देही चां । याहीनं अवतार केला ।
तो ऋषीश्वरं । स्वरां ले भेटला ॥

॥ जप तप ऋषीचं । पडत नाही कामी ।
देहे धरूनं आला । माझा धनी ॥

॥ निर्भेव गावतो । निशःकलंकी वाणी ।
मिर्त लोकी देव राया । उभा माझा धनी ॥

॥ निशःकलंकी । नित्य आदी रूप ।
उभा आहे/राहीन धनी देव । एक लभेद ॥ ०८ ॥

भजने :-
॥ मनोरथ देवा । माझं पुरवं हितं ।
लागलो घ्यानी । देवा हे, सर्व तुमच्या अघ्यानी ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. ११ ॥
॥ मुळावरची ओवी ॥

# ॥ आदीपुरूषाचा खेळ ॥

या ओवीची पलट ओवी खंड०७/ओवी-०५ मध्ये दिलेली आहे.

॥ आदीपुरूषाचा, खेळ नाही । कोणा मालुमं ।
तिर गुणांच्या, ज्ञाना मध्ये । बहु भुलले लोकं ॥
॥ सर्वत्राच्या, आधी । आदी पुरूष याहीच नाव ।
तिरलोक्या मध्ये, वेळं याहीच । न्यातं ओळखांवं ॥
॥ तिर्गुण म्हणता, सगुणं देहीमध्ये । वस्तु आहे कोणं ?
ज्याचा शकुन, तोच ओळखन । कळतीन लक्षणं ॥
॥ तिरगुणी माया, उभी राहली । केले अवगुण ।
ज्याच्या संग महाराज । त्यांहीनं ओळखला गुण/खुण ॥

॥ आश्वीना मध्ये धोंडा येईन/आला । पुष जाईन/गेला उडुन ।
खेळ राहीला, उभा नाही । कोणास मालुम ॥
॥ चैत्र मासी, प्रतीपदेला । धोंडा येईन ।
गुढा जाईन उडुन याहीच । उडवन ठिकाण ॥
॥ किजबीज किजबीज, झाली याहीची । दोहीची सदवी ।
सदवी होवुन पदवी उडाली । ठाव नाही त्याहीशी ॥
किंवा म्हणनी नं.२ :- सदवी राहुन, पदवी उडाली । ठाउक भैसाशी ॥
॥ निर्गुणाचे, राज आहे । तिरगुणी आंगी ।
शुन्य गा उडवन याहीची । नाही राहणार पदवी ॥०८॥

**भजने :- ॥ आदी पुरूष, बोले अहीनाशी । आलो तुया घरी ।**
**जे जे बोलान, ते ते होईन । पृथ्वी वरी ॥** अहीन:- आत्मा

-: सार :-

तिरगुणी जे तिरगुणी ग्यान सांगत सुटले आहे, ते तिरगुणी ग्यान सांगण्यासाठी कोण वस्तु या तिरगुणी देही जवळ आहे ? हे सर्व तिरगुणी देही निगुर्ण अश्या आत्म्याच्या भरवश्यावर उभी असलेल्या देहीव्दारेच तर हे सर्व तिरगुणी ग्यान सांगत सुटले आहे. परंतु या भल्या भल्या तिरगुणी ज्ञानींना आपल्या जवळ असलेली वस्तु म्हणजेच आपल्या देहीच्या आत्म्याच आत्मज्ञान झालेले नाही । तिरगुणी मायेनं उभ्या केलेल्या अवगुणां मुळे, हे सर्व तिरगुणी त्या निर्गुण निरंजनाचे निरंजन ज्ञान न घेता, सगुण देहींचे तिरगुणी ग्यान सांगत सुटले आहे.

परंतु ज्याच्या संग तो कृष्ण महाराज उभा राहीला, त्यांनी ही निर्गुण निरंजन वस्तु ओळखुन, आत्मग्यानी बनुन, त्या निरंजनाला भजत चतुर्पतीचे जाणते झालेत. त्यांना याचे ग्यान झाले की : या सर्व तिरगूणी सगुण देहीच्या आंगी राज आहे या निर्गुणाचे । या निगुर्ण निरंजन आत्माचे । सुनी आहे हे सर्व देही या निरंजना वाचुन । या निरंजनाच्या भरवश्यावर या सगुण तिरगुणी देही राज करत आहे. तो निर्गुण याच्यातुन निघुन गेला तर, या तिरगुणी सगुण देहींची राज करण्याची काय मजल ? जेव्हा तो निर्गुण निरंजन उभा होईन, तेव्हा या तिरगुणांच शुन्य तो उडवन । या तिरगुणांचे राजे व त्यांचे तिरगुणी अवतार यांहीची राज पदवी नाही राहणार मो-ह ।

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. १२ ॥
॥ जुनी ओवी ॥

# ॥ मुळ यवगी देहे धरली ॥

॥ मुळ यवगी, देहे धरली । निराकारानं ।
चव यवगात, खेळ खेळतो । आकार धरूनं ॥
॥ निराकाराशी, आकार-आधार । आला कैसा ?
मुळ यवगी, भक्त-अनामत । साचा दोघाचा ॥
॥ निराकाराशी, आकार-आधार । आला कोठुन ?
भुलले जन लोक । नाही, कोणा मालुम ॥
॥ निराकार म्हणती, जन लोक । बहु देतीन गाही ।
देहे जीवाचा, हिशोब नाही । सुनी नर देही ॥

॥ निराकार आदी रूपाची । उभी सोयंम् ज्योत ।
सोहंम् ज्योतीच्या, ठायी होतें । मुळ यवगी नाद ॥
॥ मुळ यवगी, नाद होतें । धुम्मधुम्मकार-सोयंम् ज्योत ।
या नादाचा प्रकाश उभी । माया अद्‌भुत ॥
॥ अद्‌भुत माया, उभी झाली । केलं तिरगुण ।
ब्रम्हा विष्णु शिव-शंकर । माया पासुन ॥
॥ ब्रम्हा विष्णु, शंकर झाले । माये च्या उदरी ।
याहीच्या हवाला/हाती, रहित । रायानं, देल्ली सारी ॥

॥ ब्रम्हा विष्णु, शंकर झाले । मायेच्या पोटा ।
केला यवगाचा चुन्ना । याहीची, तिरलोकी सत्ता ॥
॥ ब्रम्हा विष्णु, शंकर याहीची । तिरलोकी सत्ता ।
रज सत्व, तम गुणांची । मिटेना अहंता ॥
॥ ब्रम्हा विष्णु शिव-शंकर । आणीक माया देवता ।
चवरूपांवर, शिक्का आहे । आदी पुरूषाचा ।
शिक्का असुन, नाही का म्हणता ? कसेहो तुम्ही पंडीता ?
॥ चव खुम्मावर, उभी राहीन । अवद्युत बादशाही ।
हात कोणाचा, पुरत नाही । तारू केली नरदेही ॥

भजने :-
॥ होती नव्हती नाही दिली । कोणाच्या हाती ।
म्हणुन शरण आलो देवा । तुमच्या चरणी ॥
॥ तुमचे चरण माझी डोही । हाच करार..
भक्त जनांवर करावं दया । बहु यवगं तार ॥
॥ अनंत यवगावर । तारले महा महा विर ।
हरी भजनी हो देवा । तार बा आता ॥
॥ अनंत यवगा साठी । उभा आहे जगजेठी ।
हरी भजनी दयाहो भेटी । महाराजा ॥
॥ अनंत यवग तारा । महाराजा कृष्ण अवतारा ।
तुमच्या बिन हो मजला । कोण बा दुसरा ? ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. १३ ॥
॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

## ॥ अजाताची ओवी ॥

॥ नाहीं मज, गुरू ग्यान । याहीच्यां मौंसाला हिरं ।
अजात या अहिनाला । डाग, नाही जरा भर ॥ घृ ॥०१॥

॥ अजांताची, पुरवा पृथ्वा । अहिनाची खाणं ।
आधी माया शक्ति झाली । या, अहिना पासुनं
ब्रम्हा विष्णु शंकर झाले । या, अहिना पासुनं ॥
॥ अजांताची, पुर्वा पृथ्वा । अहिनाची खाण ं।
आकाश-धरणी, दोन्ही कार । निभवले याहीनं ।
चंद्र-सुर्य दोन्ही कार । निभावले याहीनं ॥
॥ अजांताची, पुरवा पृथ्वा । अहिनाची खाणं ।
पाणी-पोहन, दोन्ही कार । निभवले याहीनं ।
अन्न-अग्न, दोन्ही कार । निभवले याहीनं ॥
॥ अजांताची, पुरवा पृथ्वा । अहिनाची खाणं ।
छत्तीस कार, खाणे कार । निभवले याहीनं ॥ ०५ ॥
॥ अजांताची, पुरवा पृथ्वा । अहिनाची खाणं ।
नउ खंडाचे, नउही कार । निभवले याहीनं ॥

॥ नउं खंडाचे, नउही कार । निभवत आला ।
चौ-यांशीची बिगार नाही । चुकली कोणाला/जोग्याला ॥
॥ आलेसं जोगी, बसले रोगी । संसार खोयला/गमावला ।
पृथ्वीचा, कार याहीच्या । हाती नाही आला ।
चतुर्पतीचा, कार याहीच्या । हाती नाही आला ॥
॥ अहिनां मागुन, आले जोगी । त्याला यवगी म्हणविता ।
मौसं कार, या अहिनाशी । जरा नाही बट्टा ।
मौक्षं कार, या अहिनाला । तुम्हास का बट्टा ? ॥ ०९ ॥
॥ ०२ ॥
॥ ऋषिं-मुनी, योगी-जोगी । मुळ यवगाचे कोण ?
सिदाई वाचा, गर्जे शकुन । याहीचं/अहिनाचं तिरभवनं ॥१०॥
॥ तिरं भवनाचा, मालक अहिन । आहे अजात ।
जाती-जातीला, दुसरे नेमाल तर । बहु होईन घात ॥
॥ अवघ्यां जातीत, एकच आहे । अहिन अजात ।
अठरा जाती, फुकट सोवळे । काहो चोखतं ? ॥
॥ चोखं-चोख, अमृत पान । मौंसाची मुसं ।
या अहीनाला, काहो विटले । कशी तुमची रीतं ॥ १३ ॥

॥ चोखं-चोख, अमृत पान । मौंसाची मुसं ।
अहीन नामाचा, हरीं जिव्हाळा । तो आहे कोठं ?
॥ कोटं-कोट, रक्त-मासाची । अहीनं आहे एक ।
येण्या-जाण्याची, एकच वाट । कुठ नाही खोटं ॥

॥ अजांताचा, अहिन जुम्मा । हा आहे थोर ।
ऋषी-मुनी, गुरू-पुत्र । बहु राहले दुरं ॥ १६ ॥
॥ दुर दुर रे, दुरं मुद्दला । अहिन नाही तुया जुम्यात
अहिन नाही तुया हुकमात ।
सहा दर्शन, जोग मोडन । मगतुम्ही, राहान कोणात? ॥१७॥

॥ ०३ ॥

॥ अजाताला, पर लावता । पर जाती झाले ।
परात योगी, पलटुन/परतुन आले । पहा हिशोबाले ॥
॥ ब्रम्हा विष्णु, शंकर चैत्यन्यानं । बाजार भरवला ।
अवतार निर्गुण, निर्विकारानं । बहु गोळा गिळला ॥
॥ अवतारांनं, गोळा गिळला । पहा याही हिशोबात ।
अहिन नामाचा, हिरं जिव्हाळा । ठेवला जागरूंत ॥
॥ अहीन राजा, चवथ्या खुम्मी । करन निसपुस ।
तिरकुटाचा/चैत्यन्याचा, बाजार भरला । बहु झाला नाश ॥२१॥

॥ तिरकुटाचा/चैत्यन्याचा, हिशोब/बाजार नाही । झाला अजुनं ।
चौथ्या खुम्मी, भैस राजा । हिशोब घेईनं ॥ २२ ॥

भजने :-
॥ अहिन अनामत खरा/खासा । निसपुस करन, तीन यवगाचा झाडा ॥
॥ धनी येईन यवगाचा । हिशोब घेईन, लहान्या-मोठयाचा ॥
॥ अशी तुया हिशोबाची गाही । महाराजा महीमा आहे गा तुही ॥
॥ महीमा आहे गा तुयी । आता आहे या तिरलोकी गाही ॥
॥ तिरलोक्याचा होय दाता । संभाळ करा महाराजा अवधुता ॥

गजरे :-
॥ एक निष्ठ होता प्रल्हाद । कळेना अग्नी । कळेना पाणी...।
जहराचं केलं अमृत । नामाची लावली धुनी ॥
॥ काम धेनु गाय जागृत । अहीनाच्या इथं । भावीकाघरी आली... ।
पाजे अमृत पान्हा । धन्य माय माउली ॥

:- निरसनसह शब्दार्थ -:

**अहिन** :- ‘‘ज्याच्या शिवाय आपला राज्य कारभारच चालु शकत नाही, काहीच करू शकत नाही, असा जो तो अढळ अगोदरचा असलेला पिंडीतील आत्मा । तर ब्रम्हाडी आध्यात्मीक व इतर सर्व विश्वातील निराकार निराधार निशं:कलंकी परमात्मा’’

**अहिन शब्दाचे उदाहरण** :- पुरातन व अलीकडच्या जुन्या काळी प्रजेकडुन कर वसुल करण्याच्या काही वेगवेगळया पध्दती होत्या. परंतु प्रतेक कर वसुलीच्या पध्दती मध्ये सर्वात प्रथम अहीन-सारा, अधीक त्यानंतर शेत-सारा, घर-सारा इत्यादी सारा-कर मिळवुन, राजा प्रजेकडुन कर वसुली करत असे. परंतु एखादया वर्षी भयंकर दुष्काळ पडला तर, त्या दुष्काळी परीस्थीतीत शेतसारा, घरसारा इत्यादी सारा-कर राजा माफ करत होता, परंतु अहिन-सारा म्हणजे -‘ज्या सारा वाचुन तो राजा राज्यकारभारच चालु शकत नाही’ असा अहिन-सारा वसुलच करत होता. हा अहिन सारा त्याच्यांकरीता अत्यंत महत्वाचा सर्वप्रथम अगोदरचा होता. या अहिनावाचुन तो राजा राज्यकारभारच चालवु शकत नव्हता.

या वरून आपणा ध्यानात येईल की : *अहिन म्हणजे अगोदरचा सर्वप्रथम एकला, ज्याच्या सत्तेवाचुन काहीच करता येत नाही असा अत्यंत महत्वाचा... ।* असा अर्थ समोर येतो.

या विश्वाचा राज्यकारभार एकल्या परमात्मा शिवाय चालुच शकत नाही तसेच देहीचा राज्यकारभार आत्मा शिवाय चालुच शकत नाही. परमात्मा व त्याचा तेजोगुणी अंश आत्मा यांच्या सत्तेशिवाय पिंडी या ब्रम्हांडीचा राज्यकारभार चालु शकत नाही. त्यांच्या सत्तेवाचुन काहीच करता येत नाही. म्हणुनच इथे **परमात्मा** व त्याचा तेजोगुणी अंश असलेल्या **आत्मा** यां दोघांनाही **अहीन** असे म्हटल्या गेलेले आहे ।

**अजात** :- ज्याला जन्मच नाही त्याला जात कुठुन चिकटणार ? परमात्मा हा अजन्मा असल्यामुळे त्याला कोणती जात चिकटणार ? म्हणुनच परमात्मा व त्याचा तेजोगुणी अंश आत्मा । हा कोणत्याही जातीचा नसुन तो जात नसलेला अजात आहे. म्हणुनच इथे निराकार निराधार निशःकलंकी **परमात्मा** व त्याचा तेजोगुणी अंश असलेल्या **आत्मा** या दोघाला **अजात** असेही म्हटल्या गेले आहे.

**पुरवा/पुर्वा** :- संपुर्ण पुरवठा, रसद पुरवणे स्त्रोत,, झरा. । **पुर्ण** :- संपुर्ण अवघच
भजन उदाहरण. :- ॥ अंबर पदाची वासना । पुरवा पुरवा श्रीकृष्ण देवा ॥

**मौसं कार** :- चारही देहाच्या चारही वाचेतुन निघालेला मोक्ष देणा-या हरीनामाचा कार.

**मौसाची मुसंः**- ज्या रक्त-मासाच्या देहरूपी गोळयातुन फक्त हरीनाम-अमृताचा निरंतर पाझर चारही वाचेतुन होत रहते ती मौसाची मुसं. ।

**हिरं** :- हि-याप्रमाणे चकाकी, कांती असलेला, अंधारातही प्रकाश देणारा कृष्ण आत्मा ।

**हरीनामाचा हिरं जिव्हाळा** :- हि-याप्रमाणे सतत, निरंतर लखलखणारा जिव्हाळा

**मुद्दला** :- ना पाप - ना पुण्य । ना नफा - ना तोटा । ना संसार - ना बाईचे सुखः - ना लेकरू । ईत्यादीत वावरणा-याला 'मुद्दला' असे संबोधल्या गेलेले आहे ।.

**खोयला** :- गमावला - हिंदीत खोणे तर मराठीत गमावणे, मिळवले नाही.

**चोखत** :- ग्रंथ-पुराणातुन वाचुन, अनुभवाविना चोखुन चोखुन कोरडे बोलत राहने..

**बट्टा** :- डाग, कलंक । **जुम्मा** :- ठेका,

**जाती-पाती** :- अठरा पगड जाती ।
**जाती-न्याती** :- अठरा पगड जातीतले अनेक नाते सबंध ।

**पर** :- मायेच्या कल्पनेचे वेगवेगळे बहु पंख लावुन अनेक झालेले पंख

**तसनस** :- नासधुस, विखरून नाश पावणे, अंत होणे,

निरसन पुढील पानावर...

## ॥ निरसनसह अजाताची ओवी ॥

॥ नार्ही मज, गुरु ग्यान । याहीच्यां मौसाला हिरं ।
अजात या अहिनाला डाग । नाही जरा भर ॥ घृ ॥ ०१ ॥

नार्ही मज गुरुग्यान :-

आम्हा जवळ कोण्या हाडा-मासाच्या प्राण्याचे गुरुग्यान नाही. कारण आम्ही कोणत्याही हाडा-मासांच्या प्राण्याला गुरु केला नाही. तसेच गुरु दक्षिणा घेवुन कान फुकणा-या गुरु जवळचे ज्ञान आम्हा जवळ नाही. गुरु दक्षिणा घेवुन कान फुकणा-याला आम्ही गूरु केलेला नाही याचे कारण की, जो गुरु आपल्या शिष्याकडुन गुरु दक्षिणा घेवुन मान सन्मान सेवा ची अभिलाषा बाळगत, त्याच्या कडुन भिक्षा घेत राहतो, तो आम्हास काय देणार ? ज्याचा स्वभावातच घेणे आहे, त्याच्याकडुन देणं मिळण्याची अपेक्षा कशी बाळगावी ? जे स्वतःच मान सन्मान गुरु दक्षिणा... ईत्यादी चे भक्ष्य/भिक्षा मागतात ते दुस-यास काय देणार ?

असा मानसन्मान दक्षिणा सेवा घेण्याची अभिलाषा बाळगणारा गुरु शेवटी त्याच्या शिष्याला सुध्दा मान सन्मान दक्षिणा सेवा घेण्याची अभिलाषाच देणार हे निश्चित आहे. जैसा गुरु वैसा शिष्य या दोघांची ही अभिलाषा अंती अहंकारात परावर्तित होवुन, त्यांच्या पतनास कारणीभुत होणार हेही निश्चित आहे. कारण की, अहंकार हा परमात्म्याचा हाडवैरी आहे. जिथे अहंकार तिथे तो परमात्मा राहत नाही. त्यामुळे हे अहंकारी त्या परमात्मा पासुन बहु राहले आहेत दुर ।

असे परमात्मापासुन बहु दुर गेलेले, अहंकारी निंदकर्मे करत असलेले, सारासार विचारांची जाणीव नष्ट झालेले, व्यक्तीगत वैयक्तीक महत्वाकांक्षा बाळगणारे, धन कामीना कडे पाहणारे गुरु आम्हास त्याज्य आहे. उदाहरणार्थ जसे आर्थिक मदत व स्वतःच्या वैयक्तीक वचनपुर्ति साठी अनुक्रमे द्रोणाचार्य व भिष्म या दोघांनी दुर्योधनाची बाजु घेवुन अधर्माचा साथ केला. आणी आपली आदरनियता या आधात्मीक विश्वात गमावली आहे । ते या आध्यात्मीक विश्वात त्याज्यच राहीलेले आहेत. कारण की, अश्याप्रकारे स्वतःच्या प्रतिष्ठेकरीता, स्वतःच्या नामकिर्तिकरीता अथवा स्वतःच्या वैयक्तीक प्रतिष्ठा महत्वांकांक्षा व व्यक्तीमहत्व वाढवण्याकरीता, स्वधर्म सोडुन परधर्म अथवा अधर्माचा संगत करणारे गुरु भयावह आहे. असे आधात्मीक विश्वाचे जाणते जाणतात म्हणुनच अश्याची संगत नको रे बाप्पा ।

आम्हाला संगत हवी आहे परमात्म्याची । सत्पुरुषाची । कृष्ण धन्याची.. म्हणुनच आम्ही या चतुर्पती कृष्ण अवधुत धन्यालाचा आपला गुरु केलेला असुन, गायन करत आहो की :

॥ सद्गुरुचा अलक्ष्य पंथ । तो ब्रम्हरुप/तो आदीरुप ।
तुया चरणाचा धरला धावा । मांडला जप ॥
॥ तुच माझा गुरु । तुच माझा पिता ।
अवघ साहयं झालं । तुम्हा हाता ॥
॥ तुच माझा गुरु । तुच माझी माता ।
तुच माझा कर्ता-करविता । बुध्दिचा दाता ॥..

..असे म्हणत आम्ही या धन्यालाचा आमचा गुरु व सर्वकाही मानतो. आणी ज्याचे कोणी नाही गुरु त्याचा तो धनी गुरु बनुन त्याला अनुभवजन्य ग्यान देत त्याला सदा कोण्या ना कोण्याप्रकारे कोणाही व्दारे आपले कळसुत्रे हालवुन साहयं करत राहतो. ऐसा आमचा हा चौथा धनी गुरु ।

॥ गुरू पदी तिरर्था तिरर्था । हा चौथा आहे लभेद भेदा ॥

म्हणुनच कोणी एक, गुरू-चेला सिध्द-साधक । येईना आम्हा मनी । आम्ही एकच जाणतो राया । आदीमुनी धनी । कारण की, आमच्या जन्माच्या वेळी या आदीमुनी धन्यानेच, या देहीचे काम सिध्द केले. दैव प्राप्त अरजंलं ।.. .असे पाळण्याचे चरणे सांगी करते की :

.....पाचही अक्षर कारण । सिध्द केले काम ।
तेव्हा सिध्दाचा । जीव झाला । तारू केलं जीवाला ।
तेव्हाच सिदाई । प्रकटली । तोच गुरू केला ।
माझा गुरू तो । आदीमुनी । पुरवे अमृत वाणी ।
अंम्बर केलीशी । नरदेही । यानं बसवलं एका ठायी ।
आता लागलो तुया चरणा....
ओळखा तुम्ही । माझा गुरूदेव हा आदीमुनी... ।

जेव्हा हा सर्वगुण सर्वसिध्दियॉं संप्पन्न सिध्द आत्मा म्हणजेच सिध्द प्रकृतिमायेच्या योनीमध्ये प्रवेश करून प्रवेशी/परवेशी झाला, तेव्हा तो प्रकृतिमायेच्या तिरगुणांच्या बंधनात अडकुन, त्याच्यावर मायेचा फास पडुन, त्याच्यावर एकावर एक असे चार न चार घडी ऐसा चार देही चे कोट चढुन तो सिध्द जिवात्मा झाला. ऐसा जेव्हा सिध्दाचा जीव झाला, तेव्हा तारू केलं या जीवाला त्या परमात्मा आदीमुनी आदीपुरूषाने । आदीपुरूष अवतार आदीमुनी हा सिदाईचा देव तेथे प्रकटला । आणी तेव्हाच त्याची सिदाई या देहीत प्रकटली । आणी या सिदाईच्या देवालाच आम्ही गुरू केला ।

या देवाने शुध्द रस्ता दाखवुन, सिदाईने सरळ साध्या मार्गाने सोस न भुलता सच्चेपणाने जीवन जगण्याची सांगी करून, या निर्गुण धनी गुरू ने ओहंम्-सोहंम् मंत्र कानी फुंकला । ऐश्या रितीने या निर्गुण निर्विकार आदीपुरूष अवतार आदीमुनी धन्याने उपजीता जन्मताच हो फुंकले हो कान । म्हणुनच आता दुस-या कोण्या ऐ-या-गै-या गुरूला मान कोण्या परी देवु ? या ऐ-या-गै-या गुरूची महीमा वाढवु कैशी ?

॥ उपजीता जन्मीता । फुंकलेसे कान ।
आता गुरूला मान । कोण्या परी ?
आता हाडामासाच्या गुरू या चेल्याची महीमा वाढवु कैशी ?...
॥ गुरू या चेल्याची । महिमा वाढवता कैशी ?
मन ठिकाणी नाही बसवलं । कोण्या या गुरूने ॥
॥ मन ठिकाणी आता बसवलं । पहा या धन्यानं, पहा या आदीमुनीनं..
बहुत नफा घडला । आता याहीच्या संगतीनं ॥

माझा गुरूदेव आदीमुनी धन्याचा पुर्ण अवतार असलेला कृष्णा । हा पुनः पुनः आपणहुन या देहघरा येवुन, याने आम्हा हाती धरून ठेवले आहे. यानेच या देही येवुन, दवंडीच्या प्रमाणे या चतुर्पतीची वाणी ची सांगी सांगुन, आम्हास चतुर्पती ग्यानसंपन्न केलेले आहे. हा कृष्णाच चतुराई करत, सदा सर्वकाही साहयं करत.. उभा आहे आम्हा जवळी ।

॥ हा चतुर आहे उभा । **याहीच्या मौसांला हिरं** ।
तिरगुणांच ज्ञानासह त्याहीचे शुन्य, तो उडवन सारं ॥
याहीच्या मौसाला हीरं :-

हि-याचा प्रकाश जसा निश्कलंकी असतो, तसाच निश्कलंकी प्रकाश देणारी ही वाणी कृष्णाच्या चारही वाचेतुन निघालेली आहे. रोम-रोम निश्कलंकी असलेल्या या कृष्णाने आपल्या चारही वाचेतुन ही निष्कलंकी मौस वाणी ची सांगी केलेली आहे. याहीच्या या मौसाला/चतुर्पती हरीनामाला हीरं आहे.

हि-याप्रमाणे निश्कलंकी चकाकी असलेली ही मौसं वाणी निष्कलंकी प्रकाश देत आम्हा सर्वांची बुध्दि प्रकाशमान करत आहे. करत राहणार आहे. या चारही वाणीतुन निघुन चारही खाणीत गुंजलेल्या, या चौरंगी चतुर्पती मौस वाणी च्या प्रकाशाव्दारेच, या तिरगुणांच्या पलीकडे असलेले नाम व ग्यान आम्हा जनांस आलेले आहे. येत राहणार आहे. म्हणुनच आम्ही सर्व जन गजर करून म्हणतो की :

॥ या तिरगुणांच्या पलीकडे । ठावुक नव्हतं नाम/नाव ।
त्वा पढवले गोपाळ । अवधुत राव ॥

या कृष्ण महाराज धनी अवधुताने चौरंगी बोलनं करत या तिरगुणांच्या पलीकडे पाहण्याची दृष्टी आम्हास देत, या तिरगुणांच्या पल्याड उभा असलेल्या चतुर्पतीचे ग्यान व नाम आम्हास देवुन, या चतुर्पती पंथाच्या भुम्मेवर हे गोपाळ शिकविले आहेत. हा शिकविता धनी आम्हास अनुभव देत, अनुभवजन्य ग्यानाच्या गाठोडया भरून देत उभा आहे. अनुभवसंप्पन्न प्रत्यक्ष ग्यान आम्हास देत आम्हाला शिकवत आम्हा जवळ उभा आहे. सर्वकाही साहयं करत आहे. जे ग्यान आम्हास पाहीजे त्याचे चितंन सात दिवस केल्यावर, ते ग्यान आपरूप आम्हास प्राप्त करून देत आहे. त्याच मुळे ग्यानाकरीता आम्ही नाही केला हो गुरू कोण्या ऐै-या-गै-याला । नाही मज गुरू ग्यान या हाडामासाच्या दक्षिणा घेणा-या ऐै-या-गै-या गुरू जवळचे । हे काही आमचे ग्यान बोलत आहे ते सर्व ग्यान या माझा गुरूदेव आदीमुनी कृष्ण धन्याचे आहे. याचीच गाही ओवी चरणे देत उभे आहे.

॥ साळु जरी बोले । बोले मंजुळ वाणी ।
शिकविता धनी । जवळी उभा ॥ हो राया । कृष्णराजा हो राया....
॥ हंकाराची ही वाचा । हा अहीनं भला ।
बट्टा नाही याला । रत्ती भर हो ॥

जोकोणी या पड्जिभेव्दारे म्हणजेच साळुव्दारे या चतुर्पतीच्या मंजुळ वाणीचे बोलने करत आहे, त्याच्या त्या मंजुळ वाणीचा शिकविता धनी हा कृष्णाच आहे हे निश्चित जाण । तोच त्याच्या जवळी उभा राहुन ही रत्तीभर/राई ईतका बट्टा नसलेली ही निश्कलंकी हंकाराची वाचा वदवुन घेत आहे. अजात अश्या कृष्णाच्या या अहीनाला/आत्म्याला डाग नाही आहे जराभर म्हणुनच रत्तीभर बट्टा नसलेली ही चतुर्पतीची चारही वाचेतुन निघालेली मौसवाणी त्यांच्या मुखातुन निघालेली आहे ।

अजात या अहीनाला, डाग नाही जराभर ।

ज्याला जन्मच नाही त्याला जात कुठुन चिकटणार ? असा जन्म-मरण नसलेला एकच परमात्मा आणी त्याच्या तेजोगुणी अंश असलेला आत्मा आहे. परमात्मा आत्मा हे अजात आहे म्हणुनच यानां जात कुठुन चिकटणार ? कोण्या जातीचा त्याला तुम्ही म्हणणार आता ? आणी त्या परमात्म्याचा पुर्ण अवतार असलेला हा कृष्णा सुध्दा अजात आहे. त्याला सुध्दा जन्म-मरण नाही तो तर तुम्हा आम्हाकरीता यवगान यवगात प्रकटच झाला आहे. त्याने कोण्या गर्भातुन जन्म घेतलेला नाही आहे. तो यवगान यवगात मायेच्या योनीतुन जन्मला नसुन यवगान यवगात गायपाचा खेळ करत प्रकट-गुप्त प्रकट-गुप्त होत पुनंःपुनः प्रकट-गुप्त होत या कलीच्या संधिपर्यत येवुन इथे प्रकट झाला आहे. मग त्याला जात कुठुन चिकटणार ? तो अजन्मा जाती धर्मापासुन निश्कलंकी असुन कित्येक जाती-धर्मात यवगान यवगात प्रकट झालेला राहु शकतो. त्याच्या यवगान यवगातल्या जाती धर्म पंथ तुम्ही सांगु शकता काय ? तो या सर्वांपासुन निश्कलंकी असुन अजात आहे हे जाणा हो तुम्ही ।

हा अजाता वाचुन पिंडी या ब्रम्हांडीचा राज्यकारभार चालु शकत नसल्यामुळे तोच अहीन आहे. हा अहीनच तर त्रिदेवांच्या आत्म्यासह सर्वत्राचा आत्मा आहे. तोच तर परमात्मा आहे. या पिंडी या ब्रम्हांडाचा तोच आत्मा असुन त्याचा चालक मालक आहे. कळसुत्रांचा मालक आहे. तोच तर मायेचा श्रीपती आहे.. आमचा धनी गुरू सह सर्वकाही आहे.. अधिक ग्यानासाठी कृष्णांमृत वाचा.

या अजातानेच आम्हास सर्व पुरवले आहे. आमच्या मनमती बुध्दित चतुर्पती ग्यानाचा प्रकाश पाडुन आम्हा जनास या अहीनाघरचे ग्यान पुरवलेले आहे. पुरवत आहे. हा अजात अहीनच सर्वत्र साहयं करत सर्व बाजुने सर्वत्र चतुर्पती अहीन अजाताचा पुरवा म्हणजेच पुरवठा पुर्ण करत आहे. आधी या अजाताने पुर्ण पुरवा करत दोन-दोन चे कार निभावले आहे. आता तो या चतुर्पती चा पुर्ण साहयं पुरवठा करत आहे. पुढे तो असाच पुर्ण पुरवा करत राहत अवतार घेणार आहे. अशी सांगी आम्हास लाभलेली आहे.

या अजाताचा पुर्ण पुरवा/पुरवठा च आम्हास अहीनाघरचे ग्यानांची सांगी करत आहे की :

॥ अजांताची, पुरवा पृथ्वा । अहिनाची खाणं ।
ब्रम्हा विष्णु शंकर चैत्यन्या । अहिना पासुनं ॥
॥ अजांताची, पुर्वा पृथ्वा । अहिनाची खाण ।
आकाश-धरणी, दोन्ही कार । निभवले याहीनं ।
चंद्र-सुर्य दोन्ही कार । निभावले याहीनं ॥
॥ अजांताची, पुर्वा पृथ्वा । अहिनाची खाणं ।
पाणी-पोहन, दोन्ही कार । निभवले याहीनं ।
अन्न-अग्न, दोन्ही कार । निभवले याहीनं ॥
॥ अजांताची, पुर्वा पृथ्वा । अहिनाची खाणं ।
छत्तीस कार, खाणे कार । निभवले याहीनं ॥ ०५ ॥
॥ अजांताची, पुर्वा पृथ्वा । अहिनाची खाणं ।
नउ खंडाचे, नउही कार । निभवले याहीनं ॥

अजांताची, पुरवा पृथ्वा । अहिनाची खाणं :-
अजात परमात्म्याच्या 'मो-ह सृष्टी रंचावी' या ईच्छापुर्ति करीता त्याच्या आंगचे तेजोगुणी अहीन आत्मे यांनी, प्रकृतिमायेच्या योनीमध्ये उडी घेवुन ते प्रकृतित प्रवेशी झालेत. अजात परमात्मा हा अहीन असल्यामुळे त्याच्या अंगंचे आत्मगडी हे सुध्दा प्रकृतिमध्ये अहीन झालेत. या अहिना व्दारे प्रकृतिचा राज्यकारभार चालु लागलात. प्रकृतिमध्ये अजात अहिन परमात्म्या आंगचे अजात अहिनाच्या चैतन्याचा पुरवा व्दारे चौखाणी निर्माण होवु लागल्यात. या चौखाणीला अजात अहिनाचा चैतन्य प्रकाशाचा पुरवा होत या वाढु लागल्यात. अहिना च्या चैतन्य प्रकाशाने निर्माण झालेल्या प्राण व्दारेच सर्वत्र सजिव उत्पन्न होवुन वाढु लागलेत. सर्व सजिवांना या अहिन खाणीचा पुरवा आहे.

- ब्रम्हा विष्णु शंकर चैत्यन्या । अहिना पासुनं ॥

या निराकार निराधार अजात आदीपुरूष धन्याच्या आंगचे तेजोगुणां पासुन आत्मगडी प्रकृति योनीत आलेत. तर अजाताच्या ईच्छापासुन शक्ती उभी झाली. खंड०१/०१/गण०१ यामधुन अधीक ग्यान घ्यावे. शक्तीला अजात आदीमुनीने दिलेल्या चैतन्य पुरवा व्दारे तिन देव तिच्या पुढयात उभे करून दिलेत. खंड०१/०२/ओवी०१ शक्तिची ओवी यातुन अधिक ग्यान घ्यावे. या आदीमाया सह

तिन देवांने देवांगण निर्माण केलेत. या देवांनी कृत्ये केलेत म्हणुन कृतायवग निर्माण झाले. कृता यवगापासुन यवगाची चौकडी तयार झालीत...असो.ः

अजात धनी चा चैतन्य पुरवठा/पुरवा व ईच्छाशक्ती व्दारे सर्व काही निर्माण झालेले आहेत. या अजात धनी च्या पुरवा व्दारेच :

- आकाश-धरणी, दोन्ही कार । निभवले याहीनं ।

अजात धनीच्या पुरवठा व्दारे आकाश-धरणी ही जोडी निर्माण झाली. देवान धरणी बनवली. नजर वधर वरच्या वर उर्ध्व नेली. आणी उर्ध्व नजरे वर अम्बर उर्ध्व स्वर्ग बनवला. ऐशी अजाताने आकाश-धरणी जोडी उत्पन्न केली. यांना आपला पुरवा दिला. या अजाता च्या पुरवा मुळेच धरणी ही सुक्ष्मजीव, स्थुलजडांना आधार होवुन कारण महाकारण होवु लागली. प्रकृतिमायेस आधार झाली. धरणीवर देही जन्मा घेवु लागल्यात. पृथ्वी मुळे सृष्टिरंचनेचा खेळ होवु लागला. पंचतत्वे हे स्थुल देहीस कारण होवुन स्थुल देही तयार झाली. या स्थुल देहीस उभे करण्यास प्राण हा कारण होवुन ही स्थुल देही उभी झाली. आणी या प्राणाच्या उत्पत्तीचे कारण हा आत्मा आणी या आत्म्याचे महाकारण परमात्मा झाला. आत्मा परमात्मा याच्या पासुन प्राण उत्पन्न झाला. परमात्माच्या छायेव्दारे या सृष्टीत प्राण संचरला तर आत्म्याच्या छायेव्दारे या देहीत प्राण खेळु लागला. आत्म्यापासुन निर्मित मनाव्दारे प्राण हा शरीरात संचारला. जिकडे मन धावु लागले तिकडे प्राण धावु लागला. त्यामुळे मनाची वासना विकार प्राणात शिरून प्राण मग वासनामय होतो. मनातील ईच्छा चे वासनेत रूपांतर होवुन कारण देहास अधिष्ठान तयार होते. अश्याप्रकारे या अजात परमात्याच्या महाकारणानेच हे सर्व आकाशातुन या धरणीवर अवतरलेत. या सर्वांना पृथ्वीचा आश्रय/आधार असुन ते सर्व या पृथ्वीवरच नांदतात.खेळतात.

तर आकाश हा धरणीतील पोकळी मध्ये शिरला. आणी धरणीच्या पोकळी सह सर्वत्र धरणीला कवटाळुन सर्वव्यापक होवुन सर्वत्राचा पिता बनला आहे. कारण सर्वप्रथम निरशुन्य गगणा व्याले । हे गगण व्याले वायव । वायव व्याले तेजाले । तेज व्याले आप्पाले । आप्पा व्याला पृथ्वीले । ऐसे पंचतत्वे निर्मिले । मग चरांचर झाले. अश्या प्रकारे आकाश हा सर्वत्राचा पिता झाला. देहवर्णनाची ओवी चे चरणे यातुन अधिक ग्यान घ्यावे.

- चंद्र-सुर्य दोन्ही कार । निभावले याहीनं ।

या अजाताच्या पुरवा व्दारे चंद्र-सुर्य ची जोडी निर्माण झाली. या चंद्र-सुर्याने रात्रं-दिन जन्मा घातले. हे चंद्र-सुर्य अप्रत्यक्षरित्या अन्न निर्मितीस साहयं होवु लागलेत. सुर्य प्राणस्वरूप शक्ती म्हणजेच प्राण जागी करणा-या चेतना-प्रकाश ला आपल्या १२ कला व्दारे साहय करू लागला तर चंद रयीरूप जडअन्न निर्मितीस आपल्या १६ कलाव्दारे देहीस साहय होवु लागला. अश्या रितीने सुर्य हा प्राणस्वरूप झाला तर चंद्र हा अन्नस्वरूपी होवुन आपआपले कार अजाताच्या पुरवा व्दारे निभावत आहेत. या चंद्र-सुर्याच्या कार मध्ये सुर्य हा प्राण धारण करून देही प्रकाशीत ठेवतो. तो वैश्वावर अग्नी रूपात देहीत उगवतो. आपल्या बारा कला व्दारे देहीत प्रकाशतो. अन्नासंग समागम करून अन्नाला पचवत पचवत विर्य-बिज उत्पत्तीस कारण होतो. असो.

- अन्न-अग्न, दोन्ही कार । निभवले याहीनं ॥

अन्न-अग्न ची मिथुन जोडी निर्माण झाली. अन्ना मुळे प्राण जीवाच्या ठाई राहु लागला. अग्न हा अन्नसह समागम करत अन्न चा पचवु लागला. अग्न व्दारे अन्नाला पचवत पचवत नेत अन्नाचे सुक्ष्मःत्तर सुक्ष्म कणांच्या सुक्ष्म रसाने विर्य बिज निर्माण झालेत. विर्य-बिज च्या समागमाने चौ-यांशी

लक्ष्य योनी निर्माण झाल्यात. चौखाणी निर्माण झाल्यात. ऐसा हा अन्न-अग्न चा कार तो अजात धनी यवगान यवग निभावत आहेत. या जन्मी या देही सुध्दा त्या अजाताच्या चैतन्य पुरवा सह अनेक पुरवठा व्दारेच अन्न-अग्न चा कार निभावत निभावत निभावला गेला आहे. निभावत आहे. म्हणुनच तुम्ही हे ज्ञान घेत आहेत. या अजाताच्या पुरवा व्दारे.तुमच्या सर्व क्रिया कर्म इत्यादी सर्व घडले आहे.

अश्याप्रकारे आकाश-धरणी, पाणी-पोवन, अन्न-अग्न, या सहा नरांचा कार निभावत या सहानर साच्यात चैतन्य चा पुरवा/पुरवठा ओतुन त्यांने सृष्टि रंचना केली. सहानरांच्या निगुर्ण साच्याव्दारे देही साकार केल्यात. देही निर्माण करून या देहीचे ३६ प्रकारचे कार सह चौखाणीतील देहीच्या खाण्या-पिण्याची व्यवस्था करण्यासाठी अन्न आहार ची शृंखला रंचुन खाणे कार निभावला. पृथ्वीचे नवखंडाचे नवही कार या अजाताने आपला पुरवा देवुन तो नवखंड देहीत आपला तेजोगुणी अंश अवतार घेवुन आत्माराम बनुन या देहीला चैतन्य प्राण सह ईतर सर्व चा पुरवा/पुरवठा करत आहे. त्या अजात अहिन च्या पुरवा मुळेच तुम्ही हे अहिनाघरचे ग्यान घेत आहे. देहीचे सर्वे कार निभावले आहेत. निभावत आहे. असो.

॥ नउं खंडाचे, नउही कार । निभवत आला ।
चौ-यांशीची बिगार नाही । चुकली कोणाला/जोग्याला
॥ आलेसं जोगी, बसले रोगी । संसार खोयला/संसार गमावला ।
पृथ्वीचा, कार याहीच्या । हाती नाही आला ।
चतुर्पतीचा, कार याहीच्या । हाती नाही आला ॥

• नवखंडाचे नवही कार यवगान यवगापासुन अहिन निभावत आलेला आहे. परंतु या तिरगुणी देहीने आपल्या अहिनास त्याच्या अहिनाघरचे ग्यान प्राप्त करून देण्यास धडपड केलेली नाही. आत्मज्ञान घेवुन मोक्षपदप्राप्तीकरीता प्रयत्न केलेत नाही. मोक्षपदास नेले नाही. तिरगुणी मायेच्या तिरगुणी चिखलात फसले आणी आपल्या अहिनाला चौ-यांशीत फिरवत ठेवलेत. या चौ-यांशीची बिगार नाही चुकली कोण्या तिरगुणी जनाला ! नाही चुकली कोण्या तिरगुणी जोग्याला !

• हे जोगी तर दुनियेस त्रासुन दुनियाचा त्याग करून संसार गमावुन अंगावर भस्म लावुन जोग घेतात. रानोवनात भटकतात. तनाचा लाकुड करतात. ग्यान कमावतात. परंतु आत्मज्ञाना वाचुन सर्व तत्वज्ञान सर्वत्र सुने राहते. आत्मग्यान शोधल्या शिवाय नाही तत्व ग्यान ! याची जाण त्यांना नसते. त्याचमुळे ते आपल्या अर्धवट ज्ञानाव्दारे भेद-भेद निर्माण करत पंथा पथाचे गट पाडतात. माझे माझे मोठे म्हणतात. आत्माज्ञानी जाणते ची गाही मानत नाही. आणी आपलेच तिरगुणी तत्व ग्यान वाढवण्याकरीता भगवे कपडे अंगावर चढवुन साधुची वेशभुषा धारण करतात. षटविकार, षटउर्मि, आशा मनशा कल्पना, ईच्छा तृप्ति वासना इत्यादी सहा धुतले नाही, तरी अपन बन गये साधु ?

संधी साधु बनुन जिकडे तिरगुणांचे पाणी वाहत आहे तिकडे वाहत जातो. षटविकारांना संग घेवुन तिर्थयात्रा करत करत जेथे धन व कामिना नजर येते, तेथे त्याची नजर खिळते. जोग मागत पेव भरतो. जोग कमाईने धन-कामिनी ला लुभावत धन-कामिना वर डल्ला मारत मारत सर्व आयुष्य गमावतो. परंतु निरंजन आत्मज्ञानावाचुन त्यांच्या हाती या देहधरणीचा कार काही येत नाही. निरंजन आत्मग्यानावाचुन त्याचे सर्व तत्वज्ञान सुने पडते. सुनी झाली देह धरणी त्याची निरंजनावाचुन !

त्यागी सर्वत्राचा त्याग करतात परंतु मठ बांधुन राहतात. संधी साधु जोगी ची वेशभुषा धारण करून मानसन्मानाची ईच्छा बाळगतात. गुरूपदाची ईच्छा बाळगतात. गुरूदक्षिणेची लालच बाळगतात. शिष्याचा मोह ठेवतात. शिष्य मिळवण्यासाठी वनवन भटकतात. कर्मफलाची आसक्ती राखतात.

ज्यांच्या मनात या ईच्छा वासना मोह लालच आहेत त्यांनी संसाराचा त्याग केला, जोग घेतला, सन्याशी झाला असे कसे म्हणावे ? षडविकाराने भरलेल्या स्वार्थि देहीत दया शांती क्षमा विवेक भक्ती ग्यान इत्यादी चा प्रवेश कैसा होईन ? हरीहर यांनासुध्दा प्रपंच व काम कोधाने सोडले नाही, तेथे संधी साधु सन्याशी जोगी मानवाचा पाडाव काय ? संसार व अस्तुरी सोडुन जोग घेतल्याने जोगी उध्दारले असते, तर नपुसंक जन्मता का उध्दारले नसते ? अस्तुरी व संसाराचा त्याग करून वेडेपिसे होवुन रानावनात भटकंती करणा-यांच्या कपाळी अन्न कोठचे ? अन्नासाठी त्यांना शेवटी अस्तुरीकडेच जोगवा ची भिक्षा मागावी लागते. एकांताने मुक्ती जर मिळाली असती तर बिळात राहणा-या सर्व सर्प उंदिर यानां काहीही न करता मुक्ती मिळाली असती ? भस्म लावल्याने मुक्ती मिळाली असती तर गाढवाला सुध्दा मुक्ती मिळाली असती ? ज्याचा स्वभावातच घेणे आहे, तो देणं देणार कैसे ? असे जे वर्तन करतात ते नर कच्चे आहेत. वो नर कच्चा रे कच्चा । हुवा गुरूका बच्चा ।

अंति तो नर कच्चा रे कच्चा राहतो. निरंजन आत्मज्ञान अभावी तो नर मोक्षपदास न जाता, तो कच्चा नर माया दृष्ट वासना धरून ईच्छेच्या संग अंती वासनेच्या मागे जातो. कपटी माया कपट करून त्याला खोल खड्डयात लोटते. जशी त्याची वासना तैशी त्याची होते गती । यमाचे द्युत येवुन त्याला म्हणतात की : खुप झाले हे तुमचे थोंतांड पसरवुन भोग भोगणे या जगात ! आता चला यमपुरीला भोग भोगण्याकरीता !

यमपुरीतुन बाहेर निघाल्यानंतर परमात्याचे द्युत त्यांना विचारतात की : बहु खाणे-पिणे व मानसन्मानाची तुमची वासना आहे, तर एखादया करोडपतीच्या घरी कुत्रा/मांजराचा जन्म देवु काय ? कुत्रा/मांजर/बकरी च्या योनीत तुम्हास प्रवेश करवुन देवु काय ? तिथे बहु मान सन्मान खायला प्यायला मिळत तुमची खाण्या-पिण्याची मानसन्मानाची ईच्छा व्दारे तुमची वासनापुर्ति होवु शकते. ऐसे फिरून चौ-यांशी फेरे । नरक प्राप्ती याहीच्या नशिबी ! या जीवांची होईन दशा, गुंडाळन मन । मग याहीला कोण सोडवणार ? देव पदावर जावुन । नाही उध्दारले हे लोभी स्वार्थि संधी साधु जोगी मुनी योगी सन्याशी ! अश्या संधी साधु जोगी मुनी योगी सन्याशी च्या आंगी षटविकार उर्मि.. ईत्यादी चा रोग आहे. हे विकारांचे रोग घेवुन बसलेल्या या सर्व विकारी रोगींना तुम्ही खरा योगी म्हणता ? देवा ! सर्वत्रास सद्‌बुध्दि दयाहो देवा आता !

॥ अहिनां मागुन, आले जोगी । यवगी म्हणता ।
मौसं कार, या अहिनाशी । जरा नाही बट्टा ।
मौक्षं कार, या अहिनाला । तुम्हास का बट्टा ? ॥ ०९ ॥

जपी तपी सन्याशी योगी मुनी जोगी अनेक बसले नेमी । परंतु ते सर्व अंतःर्मुख न झाल्यामुळे, त्यांनी देहीच्या आत न पाहील्यामुळे चौथ्या तुर्या अवस्थेत असलेले चौथ्या चतुर्पतीचे निरंजन आत्मज्ञान झाले नाही. या निरंजन आत्मग्यानावाचुन त्यांना नाही सापडला निरंजन धनी । काही साध्य झाले नाही. सार्थक काही नाही झाले. सर्व केले ते वाया गेले. कारण की : अहिन आत्म्यास जागवुन त्याला मोक्ष प्राप्त करून देणारा मोक्ष कार त्यांच्या हाती नाही आला. अहिन आत्म्यास मोक्ष प्राप्त करून देणा-या चारही वाचेतुन

निघणा-या मौस वाणी चा चतुर्पती हरी नामाचा कार, हा अहिन परमात्मा कृष्ण अवधुताचा आहे. निश्कलंकी कृष्णा मुखचा आहे. निश्कलंकीच्या या मौस कार ला जरा सुध्दा कोठेही कलंक/बट्टा नाही. निश्कलंकी लभेद परमात्मा प्रमाणेच हा चतुर्पती हरी नामाचा मौस कार निश्कलंकी लभेद प्रकाशमान आहे.

॥ ऋषिं-मुनी, योगी-जोगी । मुळ यवगी कोण ?
सिदाई वाचा, गर्जे शकुन । याहीचं तिरभवनं ॥ १० ॥
॥ तिरं भवनाचा, मालक धनी । तो अहिन अजात ।
जाती-जातीला, दुसरे नेमाल तर । बहु होईन घात ॥

ऋषि मुनी योगी जोगी जन हो ! जेव्हा कुठच नव्हत काही तेव्हा त्या मुळयवगी आधी कोण होते ? मुळ्यवगाचा देव कोण ? याकरीता खंड०१/०१/गण०१-आदीपुरूष आदीगण याचे ग्यान घ्यावे. तुम्हास ग्यान येईन की : पुर्विपासुन तुम्ही सोहंम् रूपी होते. त्या मुळयवगाच्या परमात्म्याच्या आंगचे गडी बनुन धनी महाराजा संग होते. तुम्ही प्रथम अव्यक्त सोहंम् असे परमात्म्याचे तेजोगुणी अंश होते. परमात्म्याच्या मो-ह सृष्टी रंचावी या ईच्छेकारण तुम्ही सृष्टीत उडी घेवुन देह धरून व्यक्त झालेत. आणी आता या देहीव्दारे पंचमुखी बोलत आपल्या धन्यालाच विसरलेत ? आपल्या धन्याला बेईमान होवुन सत्तेसाठी तिरगुणांचे राजे यांच्या चाकरीला लागलेत ?

आपल्या मुळ यवगाच्या मुळघरच्या धन्याला जे नाही झाले बेईमान त्या ईमानदार सरळसाध्या सिदाईच्या मार्गाने चालणा-या सच्च्या जनांला धन्याने हाती धरून त्यांचे देहीच्या तिरभवनाचा मालक अहिन अजात धनी त्या सच्च्या देहीव्दारे शकुन गर्जत आहेत. त्या सच्च्या देहीला सिदाई वाचा देवुन जेजे ते बोले तेते त्यांच्या बोलावर उभे राहुन साध्य करत आहे.

पिंडी या ब्रम्हांडीचा तिरभवनाचा मालक हा अजात अहिन आहे. ज्याला जन्म-मरण नाही त्याला जात कशी चिकटवणार ? तुमच्या देहीचा अहिन अजात आत्मा व ब्रम्हांडाचा अहिन अजात परमात्मा यानां जन्म-मृत्यु नसल्यामुळे जात चिकटुन नाही. ते कोण्याही जातीचे नाहीत. ते अहिन अजात आहेत. त्यां अहीन अजात ला तुम्ही आता कोणती जात चिकटवणार ? प्रतेक जातीत तो एकच अहीन अजात उभा आहे. ज्याप्रमाणे नारीचा भ्रतार ज्या जातीचा असेल ती जात त्या नारी ला चिकटते, त्याप्रमाणे देहीचा भ्रतार हा अहिन अजात जातीचा आत्मपुरूष असल्यामुळे देहीला सुध्दा तिच्या भ्रताराची जात अहिन अजात चिकटुन या देही अहिन अजात जातीच्या झाल्या आहेत. म्हणुनच सर्व देही एकाच जातीचे म्हणजे अहिन अजात आहेत. या रक्तमासाच्या देहीमध्ये तो एकच हंस आत्मा उंच आहे बाकी सर्व देही समसमान आहे. कोणीही उच्च नाही. कोणीही निच नाही. तरी तुम्ही उच्च निच करत जाती जाती नेमता ? शिव-शिव करत अहिनाला दुर दुर नेमाता ? माझी जात उच्च तुमची जात कनिष्ठ म्हणुन हिनवतात ?

ऐसे जाती जाती नेमत असाल तर तो अहिन अजात धनी तुम्हा पाशी येणार नाही. अहिनाचा मोक्ष कार तुम्हास प्राप्त होणार नाही. तुम्ही अंती जाती जाती करत, जाती जाती मध्ये फिरत चौ-यांशी च्या फे-यात फिरणार आहात. ऐसे तुम्ही जर शिव-शिव करत अहिनाला दुर दुर म्हणत जाती-जाती ला दुसरे दुसरे नेमाल, तर तुमच्या अहिन आत्म्याचा मोक्ष कार तुमच्या हाती न आल्यामुळे तुमचा बहु होईन घात ! हे निश्चित जाणा ! कारण की :

॥ अवघ्यां जाती, एकच आहे । अहिन अजात ।
अठरा जाती, फुकट सोवळे । काहो चोखतं ? ॥

अवघ्या जाती च्या देही मध्ये तो अहिन अजात धनी आपला तेजोगुणी अंश अवतार घेवुन उभा आहे. अवघ्या देहीचा धनी अवतार अहिन अजात असल्यामुळे अवघ्या देही या अहिन अजात जातीच्या आहेत. तरी सुध्दा तुम्ही तुमच्या स्वार्थाकरीता देही-देही च्या अठरा जाती ठरवुन फुकट ओवळे सोवळे शिव-शिव करत देही-देही मध्ये भेद निर्माण करत आहात ? आपआपल्या जातीचे गुण चोखत बसले आहात ? हे शोभते का ज्ञानीजन पंडितांला ? कोणीतरी सांगा हो आम्हाला ! काहो तुमची दृष्टी देहीवर खिळल्या गेली ? कोण तुमची दृष्टी देहीच्या आत नेण्यास रोकत आहे ? कोणीतरी विचार करा हो आता ! विचाराअंती तुमच्या ध्यानात येईन की :

॥ आधी नव्हत्या जाती पाती । पहा त्या मुळात ।
तेव्हा एकच वर्ण होता । अहिन अजात ॥ खंड०२/१४

या अहिन अजाताची सर्वत्र समसमान व्यवस्था होती । जनलोक अहिन अजाताच्या ध्यानी लागले होते. खंड०१/०२/ओवी-०२ निराकार निरंजन चे **'जनलोक लागले ध्यानी..'** या टुक च्या निरसनातुन अधिक ग्यान घ्यावे.

प्रथम यवगी तेव्हा तिथे त्या चौथ्या गायप असलेल्या चतुर्पतीचीच महीमा वाढत चालली होती. त्या चौथ्या अजाताचीच संपुर्ण पृथ्वा होती. सर्व जनलोक आकाराच्या आत जी धन्याची चैत्यन्य ज्योत आहे, त्या चैत्यन्यज्योती कडे पाहणारे असल्यामुळे तेव्हा विषमता नव्हती. जातीभेद नव्हता. चार वर्ण नव्हते. हिंसा नव्हती. अहींसा होती.

या समसमान व्यवस्थेला छेद देवुन आपली तिरगुणी सत्ता स्थापनेकरीता माया ने खेळ मांडला. तिरगुणी मायेच्या भ्रांतित येवुन तिरगुणीं मानवांनी जातियवाद चा जन्मा घातलेत. आपल्या स्वार्थाकरीता अन्जानाला अन्जान ठेवुन त्यांना मायेच्या फाश्यात अडकवुन, मायेच्या बंधनाच्या बेडया टाकुन पायदळी तुडवत मायेची तिरगुणी सत्ता स्थापन केली आहे. सर्व काही तिरगुणी माया व तिचे सुतांचा हा मायावी खेळ आहे. या मायेच्या खेळामुळेच तुम्ही मायेत पडलेत. तुमचे मालक भुलले आणी चौ-यांशीत पडले आहात. तुम्ही कोणी या चौ-यांशीची बिगार नाही चुकवली. म्हणुनच खंड०२/ओवी-२७ जोहरची ओवी चे चरणे गर्जुन पुस घेत आहे की :

अठरा जाती अठरा न्याती, अठरा लिंग वर्णिता ? अठरा वर्ण ज्याच्या आंग, तो होय कोणता ? मायेत पडले, मालक भुलले, चौ-यांशी यवनं ! चौ-याशिची बिगार नाही, चुकवली कोण ? सर्वत्राच्या आधी आदीपुरूष याहीचं नावं । तिरलोक्या मध्ये वेल, याहीचं न्यात ओळखावं ।

॥ चोखं-चोख, अमृत पान । मौंसाची मुसं ।
या अहीनाला, काहो विटले । कशी तुमची रीतं ॥ १३ ॥
॥ चोखं-चोख, अमृत पान । मौंसाची मुसं ।
अहीन नामाचा, हरीं जिव्हाळा । तो आहे कोठं ?
॥ कोटं-कोट, रक्त-मासाची । अहीनं आहे एक ।
येण्या-जाण्याची, एकच वाट । कुठ नाही खोटं ॥
॥ अजांताचा, अहिन जुम्मा । हा आहे थोर ।
ऋषी-मुनी, गुरू-पुत्र । तुम्ही बहु राहले दुरं ॥ १६ ॥

तिरगुणी मायेचे रक्त मासाचे मुंस रूपी गुरू व्दारे दिलेले मायेच्या तिरगुणी ग्यानाचे दुग्धपान हे अमृतपानाप्रमाणे तुम्ही चोखत आहे. जसे जसे तुमची ईच्छा होत आहे तसे तसे तुम्ही तिरगुणी मायेचे मायावी दुग्धपानालाच अमृतपान समजुन चोख चोख चोखत आहात. आणी दुस-यासही मायेचे

दुग्धपान करण्यास उत्तेजन देत आहात ? ग्रंथ-पुराणातुन वाचुन, अनुभवाविना चोखुन चोखुन कोरडे बोलत त्याना तिरगुणी मायेचे दुग्धपान करण्यास उत्तेजना देत आहात. परंतु तुमच्या देहीच्या आत जो अहिन अजात निरंजन धनी आहे त्याला काहो पडीत टाकत आहात ?

ज्या धन्याच्या भरवश्यावर तुमची देही उभी आहे त्या हंसाला चौथ्या शुध्द सत्व चे भोजन कधी देणार ? तुमच्या तिरगुणी मायेच्या आसारातुन चौथ्या शुध्द सत्वचे सार कधी त्यास प्राशन करू देणार ? या अहिनाला काहो विटले ? अहिन अजाताचा पुर्ण अवतार कृष्णा च्या मुखच्या चारही वाणीतुन निघणा-या हि-याप्रमाणे चकाकी असलेल्या चतुर्पता अथर्वन् वेदाचा कोठे गेला आहे तुमचा जिव्हाळा ? त्याला काहो दुर करता ? अहिनाघरचा अहिन नामाचा हिरं जिव्हाळा तो आहे कोठं ?

चार न चार देहीचा या आत्म्यावर कोट असलेल्या या रक्त मासाच्या सर्व नरदेहीत तो अहिन अजात परमात्मा चा तेजोगुणी अंश एकच आहे. हे त्रिकाल सत्य आहे की या अहिन अजात आत्म्याव्दारेच अहिन अजात परमात्म्याकडे जाण्याचा एकच मार्ग आहे. यात यत्किंचितही कोठेही खोट नाही आहे. या एकच मार्गावरून मार्गक्रमण करण्यासाठी निरंजन आत्मज्ञानी होणे अत्यंत आवश्यक आहे. अनुभवी होणे अत्यंत आवश्यक आहे. त्याचकरीता चतुर्पता अथर्वन् वेद कृष्णाने तुम्हा मानवांच्या हाती दिला आहे. आणी तुम्ही या अहिनाचा अनुभव देणारा चतुर्पती मार्ग सोडुन मायेच्या विविध रंगी तिरगुणी मार्गावर वाटचाल करत आहेत ? त्रिकुटात रमत आहात ?

अहिन अजात परमात्म्याने तिरलोक्यात उभा राहुन तिरलोक्यात चैतन्य प्राण ओतण्याचा, देणं देण्याचा जुम्मा घेतला आहे. सहा नरांचा कार सह चारही वाचेतुन निघणा-या चतुर्पती हरीनामाचा कार, मोक्षाचा कार, प्रकृतिचा कार ईत्यादी क्षेत्रांचा ३६ कार सह या क्षेत्राला लागणा-या भोजन चा खाणे कार निभावण्याचा या अहिन अजाताने जुम्मा घेतला आहे. या जुम्माखातर

- अजात अहीन परमात्मा हा आपला तेजोगुणी अंश अवतार घेवुन देहीत आत्माराम बनुन उभा झाला आहे.
- अहिन अजातानेच आपल्या पुरवाव्दारे ही देही उभी करून ठेवण्यावा जुम्मा घेतला आहे.
- या जुम्माखातर या अहिन अजाताच्या पुर्ण अवतार ने चतुर्पता अथर्वन् वेद तुम्हा हाती दिला आहे. त्याचमुळे हा आत्मा तिरगुणाच्या पलीकडचे शुध्द सत्वच प्राशन करत आहे. सत्य स्विकारत आहे. आपल्या मुळच्या घरी म्हणजेच परमात्म्याकडे जाण्यासाठी याची धडपड चालली आहे.
- तुम्हास निश्कलंकी बनवण्यास साहय करत निश्कलंकी बनवुन चौथ्या भैसाच्या यवगाच्या मांडणीत सामील करून घेण्याचा जुम्मा घेतला आहे.याचा हा जुम्मा बहु आहे थोर !

परंतु तुम्ही तिरगुणांत लोळत असल्यामुळे या निरंजन अहिन अजाताच्या चतुर्पता हरीनामाचा जिव्हाळा बाळगत नाही आहे. तिरगुणी मायेच्या बंधनात तुम्ही झिडकारले नसल्यामुळे, तुमची देही त्याला त्याचे शुध्द सत्व चे भोजन देत नाही आहे. तुमच्या आत्म्याला प्रकाशीत करण्यासाठी जे साहय लागते ते साहयं त्या आत्म्याला देत नाही आहे. त्याच्यावर आलेल्या देहीच्या विकारांची काजळी दुर करत नाही आहेत. त्याला निश्कलंकी बनवण्यास काहीही तुमचा जिव्हाळा नाही. त्याचमुळे तिरगुणात लोळणारे ऋषि मुनी गुरू पुत्र हे अहिन अजाताच्या थोर जुम्म्यापासुन बहु राहीले आहेत दुर ! कशी तुमची रित ?

॥ दुरदुर रे, दुरं मुद्दला । अहिन नाही तुया जुम्यात/हुकमात ।
सहा दर्शन, जोग मोडन । मग तुम्ही, राहान कोणात? ॥१७॥

हे तिरगुणी मायेत भुललेले जनलोक तिरगुणी मायेचे मायावी ज्ञानाव्दारे तिरलोक्यातील तिरगुणी अवतारांचे पुंजन, कर्मकांड, व्रत-वैकल्प हे या निरंजनाला विसरून त्याला दुर ठेवुन करत आहे. ऐश्या या तिरगुणी कर्म कांडाच्या ज्ञानात डुबल्यामुळे त्यांना तिरगुणांच्या पल्याड उभा असलेला निरंजन अहिन अजात प्राप्त न होता, त्यांच्या कडुन ना पाप घडत आहे. ना पुण्य घडत आहे ! ना नफा घडत आहे. ना तोटा घडत आहे ! अंती ते मुद्दलातच राहत आहेत. या मुद्दलामुळेच मिर्तलोकी चौ-यांशीची बिगार उभी झाली आहे. चौ-यांशी भोग नशिबी आलेले आहेत.

या मुद्दलात राहणा-या तिरगुणी मायेच्या तिरगुणी कर्मकांडाच्या ग्यानाच्या प्याला पाजण्याच्या जुम्मा मध्ये तो अहिन अजात नाही आहे. या तिरगुणी मायेने पाजलेले तिरगुणी ग्यान हाती घेवुन तिरगुणांच्या पल्याड उभा असलेला तो अहिन अजात धनी या तिरगुणींच्या हाती कदापी लागणार नाही. हे त्रिकाल सत्य निश्चित जाणा. या तिरगुणांच्या जुम्म्यात तो धनी कदापी उभा राहत नाही. म्हणुनच चरण गर्जते की : दुर दुर रे तिरगुणी मुद्दला ! हा अहिन अजात नाही तुया तिरगुणी मायेच्या जुम्म्यात ! जेव्हा तुझे हे तिरगुणी सहा दर्शन, सहा जोग मोडन म्हणजेच जेव्हा हा अहिन अजात आत्मा देहीबाहेर निघुन देहीचे सहा दर्शन सहा जोग चे तिरगुणी ग्यान मोडन, तेव्हा तुम्ही तिरगुणी राहान कोणात ? तुम्हा तिरगुणीनी त्या अहिनाच्या हातात तुमच्या देही चा हात न दिल्यामुळे, तुमच्या हातात तो अहिन आला नाही.

तुम्ही चौथ्या अवस्थेत पोहचुन चौथ्या चतुर्पती निरंजन आत्मज्ञानी चतुर्पती ग्यानी झालेत नाही. आपल्या आत्म्यावर आलेले देहीचे विकार हटवले नाहीत. तुमच्या आत्म गोळयात विकार वासना शिरून वासना धरून तुमचा आत्मा या तिरगुणी मायेच्या ज्ञानामुळे चौ-यांशीच्या फे-यात फिरणार आता ! कर्मकांड, साधन-पुंजन, व्रत-वैकल्प, दोहित कथा, स्वःस्तुतिगाण, स्वतःचेच पोटपुंजन, मानसन्मान सत्कार, स्वःसत्ता गाजवणा-या तिरगुणी माया व तिच्या सुतांच्या मायावी ग्यानाव्दारे ! केवढी ही अधोगति ? आत्मा अज्ञानी अज्ञानी ! कधी होईन हा आत्मज्ञानी ?

॥ अजाताला, पर लावता । पर जाती झाले ।
परात योगी, पलटुन/परतुन आले । पहा हिशोबाले ॥
॥ ब्रम्हा विष्णु, शंकर चैत्यन्यानं । बाजार भरवला ।
अवतार निर्गुण, निर्विकारानं । बहु गोळा गिळला ॥
॥ अवतारांनं, गोळा गिळला । पहा याही हिशोबात ।
अहिन नामाचा, हिरं जिव्हाळा । ठेवला जागरूंत ॥
॥ अहीन राजा, चवथ्या खुम्मी । करन निसपुस ।
तिरकुटाचा/चैत्यन्याचा, बाजार भरला । बहु झाला नाश ॥२१॥
॥ तिरकुटाचा/चैत्यन्याचा, हिशोब/बाजार नाही । झाला अजुनं ।
चौथ्या खुम्मी, भैस राजा । हिशोब घेईनं ॥ २२ ॥

अजात अहिन हा पुर्विपासुन एकच आहे. परंतु तुम्ही तिरगुणीनी तुमच्या मायेच्या कल्पनेचे पंख पसरवुन तुमच्या स्वार्थि मताप्रमाणे त्या अजात अहिनाला वेगवेगळया जाती चिकटवुन वेगवेगळया जाती पाडल्यात. उच्च-निच भेद पाडला. जाती जातीचा तिरगुणी देव तयार केलेत. तिन गुण आणी त्या तिनगुणांचे तिन राजे यांचे तिरगुणी अवतार यांच्या तिरगुणी ग्यानाचा बाजार भरला. तिरगुणांचे प्याले जनसामान्याला पाजुन त्यांची फसवणुक केलीत. शुध्द सत्व अजात अहिनाला पडीत पाडुन तिरलोक्यातील तिरगुणी अवतार

यांच्या मागे लावुन चौ-यांशीत पाडलेत. आणी त्यांच्या पासुन परात्पर योगी यांना परतुन गेला. परंतु या अजात अहिन निर्विकार कृष्ण अवताराने शुध्द निर्गुण गोळे गिळंकृत करत त्यांना आपल्या पायी जागा देवुन मोक्षपद दिले आहे. देत आहे. देत राहणार आहे. या सिदाईच्या मार्गाने चालणा-या शुध्द निर्गुण आत्म्यांला चतुर्पती अथर्वन् वेदाच्या गादीवर बसवुन चतुर्पती अथर्वन् वेदाची सिदाई फौज तयार केली आहे. करत आहे. करत राहणार आहे. यांची ही सिदाईची फौज यवग काबिज करून सत्यवग आणण्यासाठी आगेकुच करत आहे. ऐशी यवगी मांडणा या भैसाची । याची खबर नाही कोणाशी ।

कलयवगाच्या संधिकाळात अवतरलेल्या पुर्णावतार कृष्णाने अहिन नामाचा हि-याप्रमाणे चकाकी असलेला जिव्हाळा चतुर्पती कृष्ण अवधुत भक्तजनांमध्ये जागृत ठेवला आहे. चैतन्या मायेने जो तिरगुणांचा बाजार अजुनही भरला आहे, तो बाजार हळुहळु मोडण्याचा प्रारंभ पुर्णावतार कृष्णाजीने या अहीन नाम च्या हिरं जिव्हाळाव्दारे केला असुन तो बाजार चौथ्या खुम्मी तोच भैसराजा कल्की अवतार रूपात मो-हं येवुन आपल्या कृष्ण अवधुत सिदाईच्या सेनेला संग घेवुन संपुर्णतः मोडणार आहे. सर्वत्र निसपुस करत कलीचं ठिकाण उडवुन सत्यवग स्थापणार आहे. म्हणुनच खंड०१/०२/शक्ती ओवी०१ मध्ये या चैतन्या शक्तीला त्याने सांगी केली आहे की : ‘‘जेव्हा चौथा शिक्का चा कलीमध्ये होईन, तेव्हा तुला त्याचे बोधपण येईन ! हा चौथ्या खुम्मीचा चौथा भैसराजा उडवन या कलीचं ठिकाण ! तोपर्यत तु आपला हिशोब पहा !‘‘ या सांगीप्रमाणे तो चौथा भैसराजा या स्वार्थि तिरगुणींचा हिशोब घेत तिरगुणी चैतन्याचा तिरगुणी बाजार मोडणार आहे.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ ओवी नं. १४ ॥

॥ जळगाव दांडची जुनी ओवी ॥

## ॥ आदीस्थिती वर्णन करतो ॥

॥ आधी स्थिती, वर्णन करतो । घ्या तुम्ही ऐकुन ।
आधी नव्हत्या, जाती-पाती । नव्हते चारही वर्ण ॥
॥ आधी नव्हत्या, जाती-न्याती । पहा हो मुळातं ।
तेव्हा एकच, वर्ण होता । अहिन अजातं ॥
॥ अहीन माता अहीन पिता । अहीनाची खाणं ।
जोगा मध्ये जावुन पुर्वि । काय केले त्याहीनं ॥
॥ अजाताला, पर लावता । पर जाती झाल्या ।
परात योगी, पलटुन गेला । भंग, आला पृथ्वीला ॥
॥ एका पासुन, अनेक झाले । पडली भुलवनं ।
तिरभवनाचा, खेळ राया । नाही पाहीला कोणं ॥
॥ एका पासुन, अनेक झाले । तिर तिरगुणी, झाला खेळ ।
तिरगुणीच्या खेळाची, तसनस होईन । पाहजा पुढं/मो-हं ॥
॥ अजाता पासुन अवघे झाले । तिरगुणी झाला खेळं ।
तीर गुणी खेळांनं बहु । झाला नाशं ॥
॥ नासले यवग, नासले योगी । नासले यवगाचे राज ।
दहाही कार, पृथ्वी मध्ये । उभे, अहिनं महाराज ॥
॥ धुम्म धम्मकार, वाजन टाळी । आदी पुरूषाची ।
उभा राहुन, हिशोब घेईन । पहा या यवगी ॥
भजनेः- ॥ धनी येईन, यवगाचा । हिशोब घेईन, देव लहान्या-मोठयांचा ॥
॥ हिशोब देता, होईन घाण । तेव्हा याहीला, होईन हो मालुम ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. १७ ॥
॥ निरसनसह मुळावरची गाहीची ओवी ॥

## ॥ आला जग हे तारण्या ॥

॥ आला जग हे तारण्या । जग ओळखेना...
सांगतो गाही कोणी ऐकेना ॥ घृ ॥

॥ दुःख काय, सांगु माहये । विश्व चैतन्या, चांगली पाहये ।
जगाच्या देखताची होयें ॥ जग ओळखेना...
॥ अरण्यात होता एक जीव । संग होती एक सवं ।
सत्य ओळखला आत्माराम देव ॥ जग ओळखेना...
॥ अरण्यात दिला एक ठावं । नागार्जुन त्याचं नाव ।
कोपले आहे मानव ठावं ॥ जग ओळखेना...
॥ गाही चतुर्पता गाय । जगवलां अनामीकाचा देहं ।
मौंस भक्षता लाभ/लाज काय ? जग ओळखेना..॥ ०४ ॥

॥ गाय चतुर्पता घरी । आज म्या नाही, टाकली खरी ।
मुळ भागवता घातली ॥ जग ओळखेना...
॥ मुळ यवगी, केला एक बोलं । भाग नाहीदेणार, होईन कल्पांत
जम्मा होईन, ब्रम्हादिक ॥ जग ओळखेना...
॥ ज्याचा भाग, देईन त्याले । काहीतरी कनवा, येईन धन्याले ।
जुने वचनं, फेडन सारे ॥ जग ओळखेना...
॥ वचना मुळे होईन अपघात । मोजब्या साठीनं होईन रात/रात्र ।
रात नाही होणार, भेटन ज्योत ॥ जग.. ॥ ०८ ॥

॥ हे होय सत्कृताची ज्योत । यवगा यवगी देईन आउक ।
तिरलोक भुलले/गेले अभिमानात ॥ जग ओळखेना...
॥ अभिमानाशी दिला मान । त्याचे नोव्हे बा चैतन्य ।
किंवा अभिमानाचा होईन अपमान । त्याचे नोव्हे हे चैतन्य ।
निराकार आप आले पलटुन ॥ जग ओळखेना...
॥ निराकार-निराधार । शिव-शक्तीचं होईन स्वयंवर ।
अनामीक म्हणे, देवा मी तुझ बाळ ॥ जग ..॥
॥ ओळखीचे ओळखतीन जीव । बहु मानवाचे वाटते भेव ।
मधुपान घेतीन मौंसासवं ॥ जग ओळखेना..॥ १२॥
॥ मौंस होय अनामीकाचे घर । कोणाला देणार नाही बरं ।
तिरलोक येवुन घालतीन भिडं ॥ १३ ॥ जग..

भजने :- ॥ अनामीका घरी आला । भाव पाहुन, देव राया उतरला ॥
॥ भाव धरा भक्ती करा । भावीका साठी देव, भावीक झाला ॥
॥ भाव या अनामीकानं केला । देव वचनात, अखंड गोयला ॥
॥ ज्याचा भाव त्याची भक्ती । विठोबा उभा, देव त्याहीच्या संगती
॥ ज्याचा भाव त्याचा देव । उभा आहे देव, अवधुत रावं ॥
॥ उभा आहे माझा देव । आता नाही, कोणाचं भेव ॥
॥ उभा आहे माझा सखा । आता नाही, या देहीला धोका ॥

गजर :-
॥ तुम्ही या भजनी बसा । उभा आहे सखा । होणार नाही धोका..
या चतुर्पती नामाला । येवुन भजा.. ॥

॥ निरसनसह मुळावरची गाहीची ओवी ॥

## ॥ आला जग हे तारण्या ॥

### -: निरसन/स्पष्टिकरण :-

॥ आला जग हे तारण्या । जग ओळखेना...
सांगतो गाही कोणी ऐकेना ॥ घृ ॥
॥ दुःख काय, सांगु माहये । विश्व चैतन्या, चांगली पाहये ।
जगाच्या देखताची होयें ॥ जग ओळखेना...

आपल्या **"येतो मी खरा"** या वचनाव्दारे हा चतुर्पती आदीपुरूष भैस हे जग तारण्या साठी या जगात आला आहे. हे सर्व जग तारण्यासाठी तो चैतन्या माया व त्रिदेव सह या जगातील सर्व सजीवात चैतन्यमय सोहंम् ज्योत स्वरूपात उभा राहीला. आपल्या चैतन्य ची गाही देत तो या सर्व चरांचरात उभा आहे. या देहीच्या मिर्तलोकी हदयी च्या अंतरंगात निराकार निराधार सोहंम् स्वरूपात हा भगवंत निरशुन्याहुन आला आहे. या देहीत निराकार निराधार चतुर्पती आदीपुरूष धनी आपला तेजोगुणी अंश अवतार घेवुन देहीचा आत्माराम धनी बनुन उभा आहे. आपली चैतन्य ची गाही देत हा धनी देहीच्या मिर्तलोकी हद्यी सांगी करत सुटला आहे. या सांगीची अनुभवासह गाही देत आहे. या गाहीचा साक्षात अनुभव वेळोवेळा देत उभा आहे.

जेव्हा या जगाला ही अनुभव युक्त चतुर्पतीची गाहीचा सांगी सांगतो तेव्हा हे जग मानेना ! चतुर्पती धन्याची ही गाही यांना सांगता सांगवत नाही ! कितीतरी सांगु रे बाप्पा ! हे जग मानत नाही ! कारण की : या जगात तर तिरगुणी मायेसह तिरलोक्याचे तिरगुणी अवतार व त्याच्या तिरगुणी ज्ञानी पंडित जनांनी, आपआपले गुणांचे मठ स्थापुन आपआपले तिरगुणी पंथ-पंथ पाडले आहेत. हे पुढेही असेच पंथ-पंथ पाडुन आपआपले गट गट पाडतील हो । या तिरगुणी गटां-गटाचे लोक माझे-माझे मोठ मोठ म्हणत दोहित मचवत आहेत. या तिरगुणी मायेच्या भुलवणीपायी हे तिरगुणी ज्ञानीजन पुढेही माझ माझ मोठच म्हणतील. पंथ-पंथ पाडतिन गट । यांना कितीही सांगता सांगवत नाही. हे मानणार नाही या आदीपुरूष कृष्णा ची गाही ! म्हणुनच आता यांना दुर-दुर करण्याची वेळ आली आहे.

हे त्या तिरगुणींचे ६शास्त्रे, ६जोग, ६दर्शने, १८पुराण... ईत्यादी परस्परात माझे माझे मोठं मोठे म्हणत, आपआपल्या बुध्दिच्या परीने झगडा करत आहेत. त्या तंटयाच्या समर्थनार्थ नाना प्रकारच्या कथा व पुराणे या तिरगुणींनी रंचले आहेत. असे हे तिरगुणी अज्ञान अंधःकारत बुडाले असल्यामुळे या तिरगुणींच्या ६शास्त्रे-६जोग-६दर्शने अश्या या १८ खुम्मावर उभा राहुन, यांच्या सच्च्या भाव चे अन्न भकसुन देणं देणा-या आपल्या आदीपुरूष धन्याचे स्वरूप हे तिरगुणी जाणत नाही. ज्यांनी स्वतःलाच नाही ओळखले असे तिरगुणी तिन च्या पल्याड उभा असलेल्या चौथ्या आदीपुरूष धन्याला ओळखत नाही. यांच्या देहीत ठाणं मांडुन बसलेल्या त्या आदीपुरूष धनी अवताराला ओळखत नाही. जाणत नाही. यांच्याच हदयी ठाण मांडुन असलेल्या त्या आदीपुरूष अंतरात्मा व्दारे दिलेले चैतन्याची गाही, अंतरात्माचे आवाजी ग्यान व सांगी हे मायेचे तिरगुणी जग मानेना ! आदीपुरूषाचे चैतन्य या जगाच्या देखताच आहे ना । तरी सुध्दा या चैतन्य स्वरूपी आदीपुरूषाला हे जग मानेना । या विश्वातील चैत्यन्य कोठुन आले आहे ? या देहीला चैतन्य चा पुरवा कोठुन येत आहे ? या विश्वातील हे चैतन्य यांच्या दृष्टी देखत असतांना याच्या कडे ते जराही लक्ष्य देत नाही. किती या मायेने यांना करकचुन बांधुन ठेवलेत ? मायेपोटी आपल्या स्वतःच्या देहीच्या धन्यालाच ते विसरलेत. याचेच दुःख काय मी सांगु माझे ।

हे विश्वव्यापक चैतन्यपुरूष आदीपुरूषा । तु तर या सर्व सजीवात चैतन्यमय सोहंम् स्वरूपात राहुन, माझे हे दुःख चांगले पाहत आहे. अनुभवत आहे. तुच तर या जगाच्या देखता असुन, या जगाच्या दृष्टी समोर उभा आहे. परंतु या जगाच्या दृष्टीवर तिरगुणी मायेने टाकलेली तिरगुणी ज्ञानाची झापडी असल्यामुळे, तु त्यांना दिसत नाही. तुझे चैतन्य त्यांना दिसत नाही. तुझे सोहंम् चैत्यन्यमय निराकार निराधार रूप ते जाणत नाही.

आदीपुरूष देवा । यां तिरगुणींच्या दृष्टीवर टाकलेली, तिरगुणी मायेची उघड घुंगी हे झापडी । यां अन्जानांना या तिरगुणांचे ओझे टाकुन दयायला सांगुन, या तिरगुणांच्या पलीकडचे पाहु दे । तिरगुणांच्या पलीकडे पाहण्याची सद्बुध्दि दे । हीच अर्ज आहे गा आता माझी । या तिरगुणीं सृष्टीच्या घनदाट अरण्यात उभ्या असलेल्या आत्मज्ञानी जीवाची ।

॥ अरण्यात होता एक जीव । संग होती एक सवं ।
सत्य ओळखला आत्माराम देव ॥ जग ओळखेना...
॥ अरण्यात दिला एक ठावं । नागार्जुन त्याचं नाव ।
कोपले आहे मानव ठावं ॥ जग ओळखेना...

-: शब्दार्थ :-

ठाव :- ठिकाणा, माहीत असने । संग :- सोबत । गाही :- साक्ष, पुरावा
कोपले :- रागावले, कोधीष्ट झाले । **सव** :- माया-ममता करणारी स्त्री शक्ती

या जगाच्या एका अरण्यात, असा एक ठाव त्याने दिला होता की : ज्याचे नाव नागार्जुन असे होते. या ठीकाणी आम्हावर माया ममता चा वर्षाव करणारी, आदीशक्ती माया चैत्यन्यारूपी सव सारजा राणी आम्हा संग होती.

या चैतन्याचा संग करून, या ८४ लक्ष्य योनी व्दारे निर्मित देहरूपी वृक्ष्यांच्या या विराण अरण्यात या एका जीवानं हा सत्य देव आदीपुरूष ओळखला आहे. या सत्यदेवाच्याच कृपेने चतुर्पती निरंजन ग्यान प्राप्त करून घेतले. निराकार निराधार निरंजन चतुर्पतीचीच भक्ती करत, या निरंजन चतुर्पतीची ज्योत देहात संचारून खेळवली. या चतुर्पती ग्यान-ध्यान-भक्तीव्दारे, याची आकाशवाणी व्दारे आलेले, चतुर्पतीचे मुळावरचे आकाशमात मधले निरंजन ग्यान घेतले. आणी जेव्हा या तिरगुणी जगाला या निराकारी निराधारी निरंजन आदीपुरूषाने दिलेल्या सर्व गाही ची सांगी सांगतली, तेव्हा हे तिरगुणी जग मानेना ! कोणी ऐकेना या चतुर्पतीचं ग्यान ! कारण की : चतुर्पती ग्यान हे तिरगुणी जगाच्या पल्याड जावुन, तिरगुणांच्या पलीकडे उभ्या असलेल्या आदीपुरूषाची गाही देत होतं.

तिरगुणांचे ओझे टाकुन देण्यास भाग पाडुन तिरगुणांच्या पलीकडे पाहणारे हे चतुर्पती ग्यान आहे. म्हणुनच हे चौथ्या अवस्थेचे चतुर्पतीचे ग्यान जर सर्वसामान्यांच्या हाती गेले तर तिरगुणींना भिती वाटत होती की : हे चतुर्पती ग्यानः

- या तिरगुणांचे ठाणे उडवन.
- तिरगुणी राजे उडवन.
- तिरगुणी सत्ता उडवुन टाकन.
- त्रिदेवाचे तिरगुणी ग्यान मोडन आता !

असे तिरगुणी ज्ञानीजनांनी जाणल्या मुळे तिरगुणी ग्यानी जाणते जिकडे तिकडे चिंता करू लागले की : हे उर्ध्व स्वर्गिच्या आकाशमात मधले चतुर्पती ग्यान, उर्ध्व स्वर्गिचे ग्यान-ध्यान-सुमरन करत देहा अंबर करन. म्हणुनच तिरगुणी ग्यान सोडुन सर्व देवांगण सह मानवगण हेच चतुर्पती ग्यान सुमरन करतील.

या भिती पायी हे तिरगुणी ज्ञानी जाणुन बुजुन चतुर्पती चा विरोध करू लागले आहे. अन्जान मानवाची दिशाभुल करून त्यांना चतुर्पतीच्या विरोधात भडकवत आहेत. असे हे मी-मी म्हणणारे अहंकारी तिरगुणी ग्यानी जिकडे तिकडे चिंता करत, अन्जान सर्वसामान्य जनलोकांस या चतुर्पतीवर कोपवत आहे. यां तिरगुणीं च्या व्दैत कर्मामुळेच हे अन्जान लोक चतुर्पती वर कोपलेले आहेत. चतुर्पती ला पडीत पाडत आहेत.

हे कोपले मानव मज ठाव आहे. तरी सुध्दा या कोपलेल्या लोकांत ही चतुर्पता गाय चतुर्पतीची गाही देत निर्भिड पणे उभी राहत आहे. म्हणुनच आता या चतुर्पतीचीच गाही देतो की :

॥ गाही चतुर्पता गाय । जगवलां अनामीकाचा देहं ।
मौंस भक्षीचा लाभ काय ? जग ओळखेना..॥ ०४ ॥
॥ गाय चतुर्पता घरी । आज म्या नाही, टाकली खरी ।
मुळ भागवती घातली ॥ जग ओळखेना...

-: शब्दार्थ :-

**अनामीक** :- ज्याला नाव नाही असा । **म्या** :- मी । **गाही** :- साक्ष, पुरावा
**मौंस** :- चारही वाचेतुन निघणारे चतुर्पतीचे हरीनाम ।
**मुळ भागवता** :- मुळ यवगाचा देव आदीपुरूष राव । यां चतुर्पतीचे मुळावरचे ग्यान व चतुर्पती चे निरंजन ग्यानपिंडे असलेला चतुर्पता अर्थवन् वेद । ज्याव्दारे चौथी अवस्था प्रकाशमान होते, असा हा चौथा वेद पाचवा सुक्ष्मवेद असलेली भागवता होय ।..

या कोपलेल्या मानवाच्या समुहात चतुर्पता गाईने या अनामीकाचा देह आपल्या ग्यानाचा अमृत पान्हा पाजत जगवला आहे. जगवत आहे. हीच तर या चतुर्पता गाईची गाही होय की : या चतुर्पता गाईने या अनामीकाला तिरगुणांच्या पलीकडे नेवुन, तिरगुणांच्या पल्याड उभ्या असलेला चतुर्पती आदीपुरूषाचे चतुर्पती निरंजन ग्यान चा पान्हा पाजला आहे. या चतुर्पता वेदांत गाईच्या निरंतर पान्हा व्दारे अनामीकाला चतुर्पती निरंजन ग्यानाने लदबद केले आहेत. अनामीकाचा देह वज्र अम्बंर केला आहे. या चतुर्पतीचे दर्शन करवुन दिलेत. या परा-पश्यंती, वैखरी-मध्यमा या चारही वाणीतुन निघणारी ही चतुर्पतीची मौसवाणी देवुन, ती गाय अनामीक देहघरी उभी झालेली आहे.

या मौसंवाणी व्दारे निघणारे चतुर्पती चे हरीनाम हे अलक्ष्य ग्यानसंपन्नता देणारे आहे. मुक्ती पदाला, निर्वाण पदाला नेणारे आहे. हे चतुर्पता हरीनाम मोक्षपद प्राप्त करून देणारे असुन, या चतुर्पता चे सेवन करण्यास लाभ काय काय आहे ? हे या जगाला सांगतो आहे. पण हे स्वार्थि तिरगुणी जग मानेना ! हे तिरगुणी जनलोक या मौसवाणीच्या सेवनाची लाज का बाळगत आहेत ? या मौसवाणी ला पडीत का टाकुन देत आहे ? या मौसाला गिळुन का ठेवत आहे ? या चतुर्पतीचे स्वतः भक्ष्यण करून ईतर सर्वसामान्य जनांपासुन चतुर्पती ला लपवुन का ठेवत आहेत ? या गायीच्या या मौसवाणीचा का मांडलासे त्याग ? हे चांगल्या रितीने आम्ही जाणतो की : हे चतुर्पतीचे हरीनाम त्रिकुटाचा चुराडा करून तिरगुणींचे तिरगुणी ग्यान मोडीत काढुन, तिरगुणींची तिरगुणी सत्ता उडवुन टाकेल. म्हणुन तुम्ही तिरगुणी सर्वकाही जाणले असतांनाही हे चतुर्पती ग्यान तुमच्या जवळच गिळुन ठेवत आहात. ते कोणाला देत नाही आहे. या चतुर्पता गायीचा तुम्ही त्याग मांडला आहे. त्रिदेव सह महा महा ऋषि मुनी मुग गिळुन बसले आहेत. घोंम घालुन बसले आहात. हे चतुर्पता ग्यान पडीत टाकुन, दुस-यांच्या पासुन लपवुन ठेवत आहात. अश्या प्रकारे या मौसवाणी च्या भक्षणाने तुम्हा तिरगुणींना काय लाभ होणार ? तुम्ही तिरगुणींनी पडीत टाकलेली चतुर्पता गाय यवगान यवगात उभी राहली आहे.

॥ पडीत गाय उभी राहयं । यवगा च्या मुळं ।
तिरगुणींला खबर नाही । शुध्द करा आपलं कुळ/कुडं ॥खंड०२/३७

ऐका जनलोक हो । जरी या तिरगुणींनी ही चतुर्पता गाय पडीत टाकली असली, तरी पुढे येणा-या भैसाच्या यवगा कारण ही पडीत गाय वेळोवेळा उभी राहत आहे. याची या तिरलोक्यांतील तिरगुणींना खबर नाही. म्हणुनच तुम्ही जनलोक हो ! या चतुर्पता गाय ला आत्मसाद करून, आपलं कुडीचे कुळ शुध्द कराव.

या चतुर्पता गायीला आजही आम्ही नाही टाकली आहे खरी । ईचा चतुर्पता पान्हा या देहीच्या रोमा-रोमात भिनवुन, या चतुर्पता गायीचं ठाणं या देहघरी आता आम्ही वसवलं आहे. या चतुर्पती चा रोमीद्युत बनुन, ईचीच जोपासना आजवरी करत आहोत. चतुर्पती धन्याचे भजन पुजन ध्यान सुमरन करत, या आदीपुरूषाला भजतो आहो. याचीच गाही/साक्ष म्हणजे ही चतुर्पता गाय ! ही चतुर्पता गाय स्वर्गातील कामधेनु गाई प्रमाणे आमच्या कामना पुर्ण करत, या मिर्तलोकी चतुर्पती पंथाच्या को-या भुम्मेवर उभी आहे. या चतुर्पता गायीनेच आपला अमृत पान्हा पाजुन, मुळयवगाचे मुळावरील निरंजन ग्यान सह मुळ भागवता असलेला चतुर्पता अथर्वन् वेद भक्तांच्या हाती दिलेला आहे. या मुळ भागवता असलेल्या चतुर्पती अथर्वन् वेदाचे बोल, भक्त आपल्या मुखातुन काढत आहे. या गाईचे हे बोलच आपल्या समोर या गाईची गाही देत नित उभे होत आहे.

या आवाजी निघालेल्या मुळ भागवता असलेल्या चतुर्पता अथर्वन् वेदातील बोला-बोलावर, शब्द-शब्दावर, चरणा-चरणावर तो चतुर्पता आदीपुरूष धनी उभा राहुन सच्च्या भक्तांना गाही देत आहेत. साक्ष देत आहे. अनुभव देत आहे. ग्यान देत आहे. अश्याप्रकारे अनेक कार्य आपल्या सच्च्या भक्तांकरीता करत आहे.

हा आदीपुरूष या मिर्तलोकी चे आकाशमात मध्ये निराकार निराधार निरंजन सोहंम् ज्योत स्वरूपात उभा आहे. गाही देत आहे. यांची हीच गाही, या तिरगुणी जगास सांगता हे जग मानेना ! सांगता गाही कोणी ओळखेना ! हे स्वार्थि जग चौथ्याचा भाग चौथ्याला देत नाही आहे हो । या मुळभागवता असा एक बोल केला आहे की :

॥ मुळभागवता, केला एक बोलं । भाग नाहीदेणार, होईन कल्पांत
जम्मा होईन, ब्रम्हादिक ॥ जग ओळखेना...
॥ ज्याचा भाग, देईन त्याले । काहीतरी कनवा, येईन धन्याले ।
जुने वचनं, फेडन सारे ॥ जग ओळखेना...
॥ वचना मुळे होईन अपघात । मोजब्या साठी होईन रात ।
रात नाही होणार भेटन ज्योत ॥ जग.. ॥ ०८ ॥

-: **शब्दार्थ** :-

**कणवा** :- कनवळा, दया, कारूणा । **बोल** :- गोष्ट, बोलनं, वाणी ।
**कल्पांत** :- कल्प-अंत, कल्पाचा अंत, विश्वाचा शेवट ।
**मोजबा** :- येण्या-जाण्याची गिणती, चौ-यांशीची गिणती, । **रात** :- रात्र

मुळयवगाचे मुळावरचे ग्यान असलेल्या या चतुर्पता भागवता मध्ये असा एक बोल केला आहे की : ज्याच्या नशिबी जो भाग असेल, तो भाग त्याला वेळ आल्यावर मिळणारच आहे. ज्याचा भाग त्याला दयावाच लागतो.

**उदाहरणार्थ** :- पाडावर आलेल्या आंब्याच्या झाडाचा पुर्ण पाड काहीही विचार न करता पाडला, तर या सृष्टीत असलेल्या पक्ष्यांचा त्या आंब्यावर जो भाग होता तो भाग त्यां पक्ष्यांना मिळणार नाही.

सृष्टीतुन जे काही तुम्ही घेता त्यापैकी काही भाग त्या सृष्टीलाच परत करावा लागतो. कारण तो भाग दुस-या कोणाच्या नशिबाचा भाग राहु शकतो. हा भाग जर त्या नशिबाला मिळला नाही, तर आकांत मचुन कल्पांताची स्थीती उद्भवु शकते. देह-कल्पांचा अंत होवु शकतो. हा कल्पांत होवु नये म्हणुन आमच्या नशिबात आमचा भाग आम्हास सहजतेने मिळावा. या कारणास्तव चतुर्पती कडे महा महा ब्रम्हांदिक येवुन जमा होतीन. या आदीपुरूष चतुर्पती कडे ज्याचा भाग त्याला मिळावा याकरीता अर्ज करतीन. तेव्हा मग ता निरशुन्याहुन येईन भगवंत मिर्तलोकात आणी मग...

॥ ज्याचा भाग, देईन त्याले । मुळचे वचन ।
सत्रावीच्या दांडानं पाझर । चतुर्पतीचा येईन ॥ खंड५/७०

**'ज्याचा भाग देईन त्याला'** हे आपले मुळचे वचन निभावत-फेडत, तो आदीपुरूष अवतार आदीमुनी कृष्ण उभा राहीन. कृष्णाच्या शिष्टाई व्दारे या अन्जान अहंकारी स्वार्थि ब्रम्हादिक ईत्यादी ंचा निराकार निराधार आदीपुरूष धन्याला काहीतरी कनवा येईन.

आपले मुळचे वचन फेडावया करीता तो कारूणेचा सागर असलेला मुळयवगाचा देव चतुर्पती आदीपुरूष या मिर्तलोकी सत्रावीच्या दांडाने पाझर आणुन, अमृत गंगा झरझर वाहवत उभा राहीन. दिलेले जुने वचनं तो फेडन सारं ! म्हणुनच तुम्ही या अवताराच्या शरण राहव. दिलेले वचन तो आणन सोडवुन. भाग वचन पुर्विचं देणं, तो ईमान राखन. तो सच्च्यास आपल्या हदयी मासी/मध्ये जागा देईन. ज्याचा जो मान/भाग असेल, तो मान/भाग सहजतेने त्याला मिळवुन देईन हो. हे निश्चित जाणा.

॥ पल्याड धनी त्याची महीमा वाणी सांगु जगाला ।
तिरलोक्यातील तिरगुणी अवतार । लबाड म्हणे मजला ॥ खंड०२/३५

परंतु या तिरलोक्यातील जे तिरगुणी अवतार, या चतुर्पती मौंस वाणीला खोटी वाणी आहे. लबाड वाणी आहे..असे जाणुन बुजुन लबाडतेने म्हणत आहेत. लबाडी करत या चतुर्पताला पडीत टाकत आहे. ही पडीत गाय उभी राहणार नाही. ही गाय मरणावस्थेतच राहील. परंतु तसे न होता चतुर्पती आदीपुरूष हा शंक देहघरी उभा राहुन देहीचा राजा अहिन आत्मा याच्या मुखी चतुर्पती गिण्यान देवुन देहीला आत्मज्ञानी बनवेल.

॥ आदीपुरूष चतुर्पती । गिण्यान देईन अहिनामुखी ।
उडवन तिर-पतीची टोपी । हो-हो म्हणता होईन जित्ती ॥ ०२/३१
॥ नाही-नाही म्हणता उसन झालं । उभा राहुन फेडन सारं ।
उभा राहुन फेडन सार । त्याहीला चौ-यांशी नाही चुकणार ॥०२/३१
॥ नाही नाही म्हणतीन त्याहीला चौ-यांशी बिगार ।
येण जाणं त्याहीला लागन । कदा नाही चुकणार ॥ ०४/०३

आदीपुरूष हा अहिनाच्या मुखी आपले चतुर्पती गिण्यान जेव्हा देईन तेव्हा या तिरगुणांचे तिन राजे यांची पदवी उडवुन ही चतुर्पता गाय हो-हो म्हणता या देहीत जित्ती होवुन उभी राहीन. देहीला चतुर्पता अथर्वन् वेदाचे निरंजन चतुर्पता ग्यान सह आदीपुरूष धन्याचे देणं प्राप्त करून देईन. परंतु हे लबाड तिरगुणी म्हणतात की : ही चतुर्पता गाय कधी जीत्ती होवुन उभी होणार नाही. तिरोपतीची टोपी उडवणार नाही. असे जे उसन अवसान आणुन चतुर्पता गाय जित्ती होणार नाही. उभी होणार नाही नाही । असे म्हणत तिरगुणी जे वचने देत सुटले आहेत, त्यांच्या त्या लबाड वचनामुळे एक ना एक दिवस त्याचीच फजीती होईन. हे लबाड चतुर्पता गाय ही हो-हो म्हणता जित्ती होवुन उभी होणार नाही. धनी उभा राहणार नाही. तिर पतीची टोपी पदवी उडणार नाही.

ऐसे नाही नाही म्हणत सच्च्या चतुर्पती भक्तांना हिनवतीन, तेव्हा तो धनी शंक व सच्च्यांच्या देहघरी उभा राहुन सर्व नाही-नाही म्हणण्याचे उसनं फेडनं. नाही-नाही म्हणणा-यांच्या मागे मग चौ-यांशी ची बिगार लागेल. येणं-जाणे त्याहीच्या मागे लागेल. ते कदा नाही चुकणार. ऐसा हे तिरगुणी त्यांचा स्वतःचा अपघात करुन घेणार आहे. मागे चौ-यांशी ची तिव्रता लावुन घेणार आहे.

तसेच जे अभक्त लोक वचने देत आपले वचने पाळत नाही आहेत, आपल्या स्वतःच्याच बोलावर उभे राहत नाही आहेत, अश्या अभक्त लोकांनी बोललेल्या बोलावर, अभक्तांनी दिलेल्या वचनावर तो काही उभा राहणार नाही. जे स्वतःच्याच बोलावर उभे राहत नाही, ते कोण्या तोंडाने देवाला त्यांच्या बोलावर उभे राहण्यास विनवतीन ? जे स्वतःच्याच बोलावर उभे राहत नाही, त्यांच्या बोलावर देव कसा उभा राहील ? त्यांच्या त्या बोलावर तो उभा न राहल्यामुळे, अश्यां लबाडांनी दिलेल्या लबाड वचना व्दारे लबाडांचा अपघात होईन.

॥ लबाडीच्या मुळं । ८४शी यवनं ।
म्हणुन येणं-जाण. येरझार । ८४शी यवनं ॥ ०२/२४

या लबाड तिरगुणी सह अभक्तांनी केलेल्या लबाडी मुळे झालेल्या अपघाताने, त्या सर्व लबाड तिरगुणी अभक्तांच्या मागे चौ-यांशी लागेल.
जित्या जन्मी जी चौ-यांशी भोगत आहे, ती चौ-यांशी सौम्य करणारा कोणी एक धनी नाही-नाही म्हणणा-यांच्या जवळ न राहल्यामुळे त्यांच्या जित्या जन्माची ८४शी ची तिव्रता वाढेल. ८४शी चे तेज वाढेल. ८४शी च्या येरझारा वाढेल. ही त्यांची जित्या जन्मीची ८४शी कधी व कशी संपणार ? याची गिणती करता करताच त्यांच्या जिवनाची रात होईन.

जित्या जन्मीच ही चौ-यांशी त्यांच्या मागे लागुन राहीन, तर मग मेल्या मागं ती ८४शी काय चुकणार ? मेल्या माग तो फक्त काळच चुकवेल हो । ही ८४शी चुकनार नाही.

॥ जित्या जन्मी ८४शी आहे । मेल्या मागं चुकवण काय ?
नामी रहयं भजनी रहयं । चुकन ८४शी,
धन्याची सांगी आहे ॥ ०२/३१
॥ सत्य सांडन भुम्मा । मोडण हा कली, सोडुन दया लबाडी ।
बसा नेमधारी । या भैसाच्या ॥ ०२/२४

म्हणुनच ऐक लबाडा ! लबाडाने असत्य लबाड वचने अथवा असत्य व लबाड बोल न बोलता, सत्कृत्यात राहुन या सत्य देवाच्या नामी राहावं. भजनी राहवं या चतुर्पतीच्या । शरण राहवं या आदीपुरुषाला । तुम्ही लबाडी सोडुन दिल्यानंतर हा कली मोडन. म्हणुनच लबाडी सोडुन सच्च्या भक्ती भावाचा नेम घेवुन सत्याचा नेमधारी बनुन, या भैसाच्या भजन पुंजन ध्यान सुमरनी बसा. तेव्हा मग या देहभुम्मेवर सत्य सांडन ! तो धनी उभा राहुन तुमची ८४शी चुकवन. अशी या धन्याची सांगीच आहे. हा धनीदेव उभा राहुन ८४शी चा सारा फेरा फेडन/चुकवन. आणी तेव्हा मग या जीवनाची रात न होता, चतुर्पती आदीपुरुष ची ज्योत भेटन. देहज्योता प्रकाशन.

हेच होय सत्कृत्यात राहुन, या सत्कृत्याच्या अधीक्याने तिरगुणांच्या पलीकडे नेणारी, त्रिगुणातीत दृष्टीस आलेली सत्य सांडवत असलेली चतुर्पती ची सत्कृत्याची ज्योत होय. ही ज्योत यवगान यवगी सांगी करत आहे.

॥ हे होय सत्कृताची ज्योत । यवगा यवगी देईन आउक ।
तिरलोक भुलले अभिमानात ॥ जग ओळखेना...

**-: शब्दार्थ :-**

**यवगा यवगी** :- युगान युगां पासुन । **आउक** :- सांगी करने ।

सत्कृत्याच्या अधिक्याने तिरगुणाचे पलीकडे जावुन, या तिरगुणांच्या पल्याड उभ्या असलेल्या त्या निराकार निराधार निष्कलंकी चतुर्पती आदीपुरूषाची ही ज्योत होय. सत्कृत्याने लाभलेली ही ज्योत असल्यामुळेच या ज्योतीलाच सत्कृत्याची ज्योत असे म्हटल्या गेले आहे. या सत्कृत्यात राहणा-या सत्पुरूषाच्या देहीमध्ये, ही निरंजन ज्योत चैत्यन्यमय सोहंम् स्वरूपात उभी राहुन, देहीच्या त्रिकुटावरी चमकन. ही ज्योतच यवगा न यवगापासुन चालत आलेलें चतुर्पती ग्यान आउक/आउट म्हणजे आपरूप सांगी करेल. जाहीरण करन.

या सत्कृताचा अधिक्याने या तिरगुणांच्या पल्याड जावुन, निरंजन धनी कडे जाणा-या सत्पुरूषाला ही सत्कृत्याची ज्योत नित साहय होईल. सत्कृत्य करत चतुर्पती नामी असलेल्यां च्या देहीतील कलंक धुवुन, देहीत निश्कलंकी मांडणा करण्यास ही सत्कृत्याची ज्योत सदा साहयं करेल.

या सत्कृत्या व्दारे तो सत्पुरूष काम, क्रोध, मोह, मद, मत्सर, अंह,.. ईत्यादी इंद्रियांदि अवयवांचे विषय विकार..इत्यादी धुवुन देही सुदर साफ करेल. देही निर्विकार स्वच्छ करून शंक आचार विचार ठेवुन, या देहीत निश्कलंकी मांडणा करेल. सत् यवगाची मांडणा या देहीत होईन. भैसाची यवगी मांडणा या शंक देहीव्दारे होईन. परंतु त्याची खबर कोणा बाहय जगताला राहणार नाही. ही चतुर्पता ज्योत शंकाकडे नेण्यास साहय होत राहील. तो ध्रुत बनुन राहीन. अवधुत पदास जाईन.

या ध्रुतांच्या देहघरी सतृकृताच्या ज्योती व्दारे आदी भैसाचे सांगी, जाहीरण आउट करणारे आवुक यवग येईन. *'सांगते निराकार परमात्मा । ऐकते निर्गुण आत्मा'* या अवस्थेची प्राप्ती झाल्यानंतर चतुर्पती चे सांगी करणारे आउक यवग ज्याच्या देहघरी येईन, तो मग नाही पडणार बा विचारी ! त्याला विचारचक्रांत पडण्याची आवश्यकताच राहणार नाही. कारण की : त्याच्या प्रतेक विचारावर तो निरंजन धनी सांगी करेल. ग्यान देत राहील. त्याला ग्यानप्राप्ती करीता, इकडे तिकडे कुठेही भटकावं लागणार नाही. विचार चक्रांत पडुन, तो नाही पडणार बा विचारी !

परंतु या विचार चक्रांत पडून, विचार करन तिनही लोक सारे की : हे एवढ मुळ ग्यान त्याच्या जवळ कुठुन आले ? आमच्या सारखा हाडामासांचा गुरू न करता, कुठे गेला होता तो निरंजन ग्यानप्राप्ती साठी ?.....त्याच्या या मुळग्यान संप्पन्नतेचे अनेक विचार करतीन तिरलोक्याचे तिरगुणी अवतार सह तिरगुणी जन सारे ! आणी मग म्हणन हाही चतुर्पती देव खरा ।

परंतु काही स्वार्थि तिरगुणी जनांला सगळ समजुन उमजुन सुध्दा हे सर्व चतुर्पती ग्यान मानण्यास तयार होणार नाही. कारण की : या तिरगुणींनी मायेन पाडलेल्या भुलवणीपायी सर्व तिरगुणी स्वार्थि जन हे स्वहीत व स्वार्थापायी आलेल्या अभीमानात गेले आहेत. ऐश्या या अभिमानीं चा अपमान होईन. हे निश्चित जाणा.

॥ अभिमानाशी दिला मान । अभिमानाचा होईन अपमान ।
त्याचे नोव्हे हे चैतन्य । निराकार आप आले पलटुन ॥

जेव्हा चैत्यन्याचा शिक्का हा चतुर्पती आदी भैसाच्या हाती घेईन, तेव्हा या तिरगुणांची माय असलेली माया चैत्यन्या ही स्वतःहुन म्हणन की : तो माझा खेत्री । त्याची मी शक्ती । तो माझा वर । तोच होय या चतुर्पती पंथाच्या भुम्मेवर उभा असलेला माझा चत्रभुज पुर्ण अवतार कृष्ण ।

अश्या रितीने माया चैत्यन्याच या चतुर्पती आदीभैसाला शरण आल्यावर, मग मान दिलेल्या या स्वहीती स्वार्थि तिरगुणींच्या अभिमानाचा अपमान होईन. त्यांच्या जवळ निश्कलंकी चैतन्य राहणार नाही. त्यांचे नोव्हे बा आता ते चैतन्य । ते चैतन्य तर आता या आदीभैसाचे होय.

जेव्हा स्वहीती स्वार्थिजन आपला अभिमान सोडुन, या आदीपुरूष आदीभैसाला सच्चेपणाने भजतीन, तेव्हाच त्या सच्चे जनांपाशी तो निराकार निराधार आदीपुरूष भैस आप/स्वतःहुन पलटुनी येईन. मग ते सच्चे म्हणतीन की : निराकार आप आला पलटुनी । आता होईन या देहीच्या निराकार निराधार शिवाचे या देहीच्या शक्तीसोबत स्वयंवर..

॥ निराकार-निराधार । शिव-शक्तीचं होईन स्वयंवर ।
अनामीक म्हणे देवा मी तुझं बाळ ॥ जग..

**-: शब्दार्थ :-**

**स्वयंवर** :- वर निवडुन हार टाकणे, अटी पुर्ण करून लग्न करने, मिलन ।
**भिड घालने** :- गर्दि करने, जमाव तयार होणे ।

येथे या चतुर्पती पंथाच्या भुम्मेवर, कितीतरी वेळा या चतुर्पती ग्यानाचा संग करून निराकार आप आले आहे पलटुनी । आपहुन सच्च्या देहघरा पलटुन येवुन सच्च्या देहीला हाती घेवुन दवंडीच्या प्रमाणे या भैसाच्या यवगाची चतुर्पतीची वाणी जगातील सच्च्या देहीला सांगतली आहे. सच्च्या देही प्रकाशीत केलेल्या आहेत. म्हणुनच या चतुर्पतीच्या ग्यानाचा संग करून जेव्हा या चतुर्पती आदीपुरूषाचे भजन-पुजंन, ध्यान-सुमरन कराल, तेव्हा ही चतुर्पती ज्योत हृदयात प्रज्वलीत होईन. या मिर्तलोकी या हृदयी तेवत असलेली चतुर्पती निरंजन ज्योती चा जेव्हा अखंड संग कराल, तेव्हा तो निराकार निराधार आदीपुरूष चतुर्पती देहीच्या अहीना मुखी अहीनाघरचे निरंजन चतुर्पता गिण्यान देईन.

या निरंजनात्मा अहीना मुखच्या निरंजन चतुर्पती ग्यानामुळे, या देहीत चतुर्पती निराकार निराधार चैतन्य आदीपुरूष यांची निरंजन ज्योत जागृत होईन. या जागी झालेली ज्योतीला भेट देण्यासाठी, या देहीच्या सप्तपाताळा वर साडे तिन कुंडल घालुन बसुन असलेली शक्ती चतुर्पतीच्या भजन-पुंजन, ध्यान-सुमरन व्दारे वर वर सरकत, देहीच्या मनक्या स्थित २१ स्वर्गाच्या वर जावुन देह पुरा उजळुन टाकेल.

मस्तकस्थीत देह ज्योता उजळुन, ही शक्ती सहस्त्रागार वर स्थित असलेल्या उर्ध्व स्वर्गिच्या आकाशमात मधील निराकार निराधार उभ्या असलेल्या निरंजना समोर उभी राहील. जेव्हा ती तेथुन खाली येईन, तेव्हा मग या शिवाचं या देहीच्या शक्ती सोबत स्वयंवर होईन. शिव-शक्तीच मिलन होईन. या मिलनातुन ही ज्योत या त्रिकुटी चमकुन, या देहीच्या तिरभवनी होईन गा आरोही. ।

आणी मग ही ज्योत, या देहीच्या संपुर्ण अंगा-अंगाच्या कप्प्या-कप्प्यात, कपाटा-कपाटात ती गिरन/पडन. तेव्हा मग ती ज्योत या देहदेउळीच्या दस/दहा ज्योतीसह, षटचक्रेसह अनेक चक्रे उजाळुन टाकेल. या चक्रांचा प्रकाश या देहीच्या कांतीला भेदुन बाहेर निघेल. यामुळेच या देहीला तेजोमय अंगकांती प्राप्त होवुन ही देही कंचन बनेल. या देहीला मेघा स्मृति सह अनेक विविध सिध्दियॉ शक्तीयॉ प्राप्त होवुन काया व मती उजाळुन निघेल.

ही ज्योत, त्या देहीचा समया पालटुन, त्या देहीची दृष्टी नवी करेल. नव्या दृष्टीने या देहीला सर्वकाही न पाहीलेले नविनच दिसन सार. । या नविन डोळयाच्या दिव्यदृष्टी मुळे, ही नविन डोळयाची ही कळसुत्र बाहुली येथुनच तिरलौक्यात चैतन्य आदीपुरूषाने घेतलेला जुम्मा पाहील. अकाशमात मध्ये उभी असलेली निश्कलंकी अनामत ज्योत या मिर्तलोकातुनच त्याच्या विव्यदृष्टीत पडेल. त्याला मग त्या जीवनकळीच्या सत्रावी ज्योतीची गोडी लागेल.

त्याला सत्रावीची गोडी लागुन, त्याचे विषम विसर्जन होईन. तो सर्व चरांचरात एकच तत्व पाहील. तो समबुध्दिचा होवुन एकच चैतन्य ज्योत सर्वात पाहील. ते एकच तत्व म्हणजे या निराकार निराधारी चतुर्पती आदीपुरूष भैसाची चैतन्य चा पुरवा देणारी जिवनकळा ज्योत !

या नविन डोळयांच्या दृष्टी मुळे, ज्याला आधीचे नाव गाव माहीत नाही असा हा अनामीक म्हणन की : आता मला या चतुर्पतीच्या कृपेने, माझे घराचं ठिकाण जाणतो. मी माझे निजस्वरूप आत्मस्वरूप आता जाणतो. कृष्णदेवा । तुमच्या कृपेने या देहीच्या शिवाचे या देहीच्या शक्ती सोबत स्वयंवर झाले आहे. हे सर्व या चतुर्पती ने मला तिरगुणांच्या पलीकडे पाहणारी त्रिगुणांतीत अशी दिव्यदृष्टी दिल्यामुळे संभव झाले आहे. या स्वयंवरात या नविन डोळाने तुझे तेजोगुणी अंश दिसु लागलेत. तुझे तेजोगुणी अंश मजमध्ये प्रकाशमान झालेत. आता ख-या अर्थाने देवा मी तुझे बाळ झालो आहे. मी ख-या अर्थाने आज मी या जगात या सत्य देवाचं बाळ झालो आहे.

आतापर्यत मी देवाला देवा मी तुझ बाळ । तुझ बाळ । असेच म्हणत होतो. परंतु आता या अनामीका घरी तो मुळयवगाचा चतुर्पती देव भाव पाहुन उतरला. या देवानं आपला बाळ पोटाशी घेतला. आणी 'हे माझ बाळ । हे माझ बाळ ।' असे देव म्हणु लागले आहेत. आपल्या बाळाच्या बोलावर उभा राहुन बाळाचे काम तो करू लागला आहे. तो या अनामीका देहघरी येवुन या अनामीक बाळाचा झाल्यामुळे, आता ख-या अर्थाने हा अनामीक म्हणतो की : **देवा हे तुझ बाळ । आता करा तुम्ही संभाळ । हे तुझं बाळ जग ओळखेना !**

ज्यांनी असेच स्वताला ओळखुन तुजपर्यत पोहचले आहेत, ते सर्व ओळखीचे ओळखतीन हो जीव । त्यांनी हा जीव ओळखला असल्यामुळे असे ओळखीचे तिरलोक्यी गडी येवुन घालतीन गा भिड ।

॥ ओळखीचे ओळखतीन जीव । बहु मानवाचे वाटते भेव ।
मधुपान घेतीन मौंसासवं ॥ जग ओळखेना... ॥ १२ ॥

हे आदीपुरूषा । आता मी तुमच्या कृपेने ख-या अर्थाने स्वतःचे स्वरूप ओळखणारा झालो आहे. माझे सारखेच स्वतःचे स्वरूप ओळखणारे जीव मज ओळखतील. तसेच तु ज्याला ज्याला भेटला आहे, ज्याच्या हृदयी भेट दिली आहेत, असे तुया भेटी आंगचे शुरविर सिध्द तुमच्या कृपेने या स्वयंवराच्या दिवसाले माझे संगतीन उभे राहले आहेत. हे सर्व ओळखीचे झाले आहेत.

तसेच ज्यांनी आत्मज्ञानी बनुन, तिरगुणांच्या पलीकडे जावुन आपले आत्मस्वरूप, स्वस्वरूप, निजरूप जाणले आहेत किंवा जाणण्याच्या मार्गावर आहेत. तुमच्या भेटीच्या मार्गावर आहेत. तुमच्या भेटीसाठी उत्सुक होवुन प्रयत्नरत् आहेत. असे जाणकार सिदाईने चालणारे जीव मज ओळखतीन गा आता. असे हे ओळखीचे ओळखतीन हा जीव !

परंतु या जगात तिरगुणांनी बादशाही केली आहे. तिरलोक्य जन या तिरगुणांच्या सब देवतांचे, पुंजन मान दर्शन घेत आहे. या अन्जान जनांकडुन यां तिरगुणींनी आहार-उपहार घेत अन्जानांच्या सह स्वतःच्याही देहा नाशवल्या आहेत. अश्या या तिरगुणांचे देव व त्यांचे नायक यांना पुंजता भेव वाटते. चौ-यांशीचा फेरात तिरगुणांच्या बंधनात टाकवुन अडकवुन ८४शी चुकवु न देता ८४शी ची तिव्रत वाढवणारे फसवे स्वार्थि स्वहीती मायावी तिरगुणी बहु मानवांचे वाटते गा आता भेव । कारण की : जो तिरगुणांचा प्याला माया चैत्यन्यानं मधुपानाप्रमाणे पाजुन तिरगुणी जनांच्या हाती दिला आहे, तो प्याला ते स्वहीता पायी सोडायला तयार नाहीत.

तिरगुणांच्या पलीकडे पाहण्याची इच्छा स्वस्वार्थापायी यांनी सोडुन दिलेली आहे. तिच पिंडदान केलेले आहे. तिरगुणांच्या पलीकडे पाहायला हे फसवे तिरगुणीजन तयार नाही.

या तिरगुणांच्या पलीकडे उभ्या असलेल्या मौंसराजाची म्हणजेच या चतुर्पती आदीपुरूषाची ही परा-पश्यंती, मध्यमा-वैखरी या चारही वाचेतुन निघणारी मौंस वाणी आहे. ही चतुर्पतीची मौसं वाणी या तिरगुणांचे पलीकडची आहे. परंतु मायेचा तिरगुणी प्याला मुखी लावुन, हे फसवे मायावी तिरगुणी जन मौंसवाणी चा संग करू पाहत आहे. म्हणुनच ही चतुर्पतीची मौस वाणी कोण्या फसव्या मायावी तिरगुणीला नाही देणार बर । अश्या स्वार्थि स्वहीती मायावी तिरगुणी बहु मानवाचे भेव वाटते. कारण हे स्वार्थि स्वहीती तिरगुणी तिरगुणी मायेच्या प्यालाने मद्यपान घेतीन मौसा सव !

ज्यांनी स्वतःला ओळखुन स्वतःचे सेरूप पाहीले ते ओळखीचे ओळखतीन हा जीव. अश्या ओळखीच्या जीवांना तो आदीपुरूष देईन या जीवाची ओळखी करून ! त्या ओळखीच्या जीवांच्या हातीच देईन तो आपली मौसवाणी ! कारण या मौसवाणीतच तो अनामीक कृष्ण गुप्तरूपात राहतो. हे मौस वाणीच त्याचे घर होय. या घरात येणाःया अनोळखी बहु मानवाचे त्याला वाटते हो भेव कारण हे अनोळखी तिरगुणी मायेच्या तिरगुणी ग्यानाचा प्याला पिउन ही चतुर्पती ची चारही वाणीतुन निघालेली मौंसवाणी लुटु पाहतील. अश्या अनोळखी तिरगुणींला ही मौसवाणी तो देणार नाही बरं !

॥ मौंस होय अनामीकाचे घर । कोणाला देणार नाही बरं ।
तिरलोक येवुन घालतीन भिड ॥ जग ..॥ १३ ॥

या चारही वाचेतुन निघणा-या मौसवाणी च्या चतुर्पती हरीनामात हा अनामत आदीपुरूष उभा राहतो. या अनामीकाचे घर या चतुर्पतीच्या वाणी मध्ये आहे. या चतुर्पती वाणी च्या अक्षरांना आदीपुरूषाने आपले तक्त बनुवुन या वाणी च्या शब्दावर उभा राहतो. चतुर्पता अथर्वन् वेदांच्या अक्षरी तक्तीवर उभा राहुन तो धनी सच्च्या भक्तांना साहय करत आपले यवगाचे कार्य करत आहे.

जर तिरगुणांना संग घेवुन, तिरगुणी प्याल्याने तिरगुणी मायेचे मृधुपान करत ही चतुर्पती वाणी घेत असाल, तर ही चतुर्पतीची मौसंवाणी त्यां मायचे मधुपान करणा-यांच्या हाती कोण्यत्याही हालतीत देणार नाही बरं ! कारण की :

या चतुर्पतीच्या मौसवाणी करीता, आम्हा तिरगुणांच्या पलीकडे पाहणारा सच्चा पाहीजे. त्रिगुणातीत दृष्टी ठेवुन बघणारा सच्चा पाहीजे. त्या सच्च्यांच्या घरी आपणहुन जावुन त्यांना हाती धरून ही वाणी त्यांच्या हातात दिल्या जाईन. परंतु कोणत्याही तिरगुणी प्याला घेवुन मद्यपान करणा-यांच्या हाती ही वाणी लागु देणार नाही. हे निश्चित जाणा.

त्रिगुणातीत दृष्टी ठेवुन, सच्च्या दिलाने पारख करणारा सच्चा पारखी भक्त पाहीजे. अश्या सच्च्या भक्त पारखीलाच या चतुर्पती वाणीचं तो कृष्णधनी देणं देईन.

ही चतुर्पता कोणा ऐ-या-गै-याच्या हाती नाही दिली आहे. कारण की : या चतुर्पती वाणीत चतुर्पतीचा मौसराज धनी तिरलोक्याची किल्ली हाती घेवुन उभा आहे. ज्यांनी तिन यवगाची राजपदवी दिली आहे, अश्यांच्या हाती ही वाणी सहजा सहजी दिलेली नाही तर ईतरांचं काय ? यां देवांच्या हाती तर तिन वेदच दिले आहेत. हे तिन वेद घेवुन तिन देव आपल्या मनात खुशाल आहे. परंतु ज्या चतुर्पता अथर्वन वेदाने तो धनी जागा होतो, तो चौथा चतुर्पता अथर्वन् वेद चौथ्या धनी ने या तिन देवांच्या हाती नाही दिला आहे. तो अमृत संजीवनी असलेला चौथा चतुर्पता अथर्वन वेद या चौथ्या भैसाच्या हाती आहे.

ही चतुर्पता अथर्वन् वेदाची वाणी तर भैसाच्या यवगाच्या मांडणी करीता कार्यरत् असुन, येथे या चतुर्पती पंथाच्या भुम्मेवर पुढे येणा-या भैसाच्या यवगाकारण आवाजी उभी आहे. या आवाजी आलेल्या चतुर्पतीच्या अनमोल वाणी व्दारेच तुम्ही निरशुन्याहुन येवुन, या मिर्तलोकी या हदयी ठाणं मांडलेत. या मिर्तलोकी या हदयी तुम्ही तुमची पेठ बसवली. आणी ही चतुर्पतीची वाणी ऐकुन सर्व त्रिलोक्य जनी, या धरणी उतरले. अवघे दैवत उतरलेत. पाताळाचे पालक, स्वर्गिचे दैवत या मिर्तलोकी भेटी साठी आलेत. हे चतुर्पती देवा । जे तुमच्या भेटीच्या मार्गावर आहेत, जे तुम्हास भेटले आहेत, असे तुया भेटी आंगचे सिध्द आता देवा तुया या बाळाच्या संगतीन उभे राहले आहे. या स्वयंवरामुळे आता निजधाम, वैकुंठ, कैलाशी व इंद्रपुरी चे गडी.. इत्यादी अवघ्याची या चतुर्पती भैसाच्या वाणीचे अमृतपान करीता भिड पडणार आहे. आता करसं नाही म्हणावं त्याहीले. ? हे तिरलोकी घालतीन हो भिड ।

॥ भिड मुर्खती उभ्या ज्योती । करा यवगाले ।
एकच भाव राहु दया देवा । अस्तुरी पुरूषाले ॥

**भजने :-**

**॥ अनामीका घरी आला । भाव पाहुन देवराया उतरला ॥**
**॥ ज्याचा भाव त्याची भक्ती । विठोबा राया देव त्याहीच्या संगती ॥**
**॥ ज्याचा भाव त्याचा देव । उभा आहे माझा अवधुत राव ॥**
**॥ भाव धरा भक्ती करा । भावीका साठी हो देव भावीक झाला ॥**
**॥ भाव या अनामीकानं केला । देव वचनात अखंड गोयला ॥**
**॥ वचन दिले मानवाले । मानवाची हो देवा कारूणा तुले ॥**
**॥ कारूणेच्या सागरा, कारूणा कर । आम्ही अन्जान लेकरं, पदरी धर ॥**
**॥ पदरी धरल्या । नको जावु दुर । लोट मारतो देवाच्या चरणावर ॥**
**॥ धरले चरण उभा जवळ । हेच मागतो महाराजा मागणं ॥**
**॥ तुमचे चरण माझी डोही । हो हाच करार ।**
**भक्त जनांवर करावं दया । बहु यवगं तारं ॥**

**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. १६ ॥
॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

# ॥ मोहरची ओवी ॥

॥ सांगी केली...त्वा मोहर वाजवली ।
जाहीरण केली.. त्वां मोहर वाजवली ॥ घृ ॥

॥ यवग गेले चरांचर । तुम्ही यवगी याहीच्या पुढं ।
तुम्ही यवगी याहीच्या पुढं ॥ जाहीरण केली..
त्वां मोहर वाजवली ॥ सांगी केली...
॥ ब्रम्हा विष्णु तिरनयन । यवग चालवले कोण ?
चौथ्या खुम्मी उभा कोण ? ॥ सांगी केली...,
॥ स्वर्ग पाताळ ताळ दोन । मिर्त लोक होय ठिकाण ।
मिर्त लोक झालं कोठुन ? सांगी केली... ॥
॥ स्वर्ग म्हणे उंच आहे । मिर्त लोक ताळ होये ।
शिराई वाटे शरण जीवं येतो । मालक कोण ?...
त्वां मोहर वाजवली ॥ सांगी केली... ॥ ०४ ॥

॥ स्वर्गी कामधेनु गाय । चौरंगाचा बळी पाताळी ।
कोण्याएका दिवशी येईन द्युतं । उडवण पदवी...
त्वां मोहर वाजवली ॥ सांगी केली..
॥ तिरगुणांचे तिन पदर । ते काय राहतीन खांदयावर ?
गर्तिचा मोडा/मोळ्या कार । होय बाजारीं.....,
त्वां मोहर वाजवली ॥ सांगी केली...
॥ चैत्यन्या होवुन बाजारीनं । यवग नासवले तीनं ।
यवग हीनं केलं इनं । कैशी चांगली ?...
त्वां मोहर वाजवली ॥ सांगी केली...
॥ काया हीनं मती हीनं । हीनं केलं देहभान ।
शुध्द चतुर्पता कळली । जाहीरण केली...
त्वा मोहर वाजवली ॥ सांगी केली... ॥ ०८ ॥

॥ चैत्यन्या होउन कलारीनं । हद्‌यी पाजलं मधुपान ।
हद्‌यी पाजलं मधुपान । भुलवन पडली...
त्वां मोहर वाजवली ॥ सांगी केली...
॥ भुलवनं पडली यवगापरी । ऐसे यवग कठले भारी ।
उडवा घुंगी ही झापडी । विठोबा येईन...
विनवा हो रात्रंदिन ॥ सांगी केली...
॥ उडवन घुंगी, पळन झापडी । खेळ करन खळाखळी ।
खेळ होईन खळा खळी । धैसकं पडली...
त्वां मोहर वाजवली ॥ ..जळगाव सांगी केली...
॥ उडवन तिरगुणाचं शुन्यं । जागी कर्ते होय कोण ?
त्याहीचं नाव दयाहो सांगुनं । जाहीरण केली...
त्वां मोहर वाजवली ॥ सांगी केली... ॥ १२ ॥

॥ अस्तुकी केली, श्री रायानं । ताळा परस दोन दोन ।
मो-हरं यवगाचे कारण । अस्तुकी केली...
त्वां मोहर वाजवली ॥ जाहीरण केली...
॥ यवग भाकल्याचे गुणं । सुने वेद पडले तीन ।
अर्थवन् वेद कोण्या घरूनं ? । सांगी केली...
त्वां मोहर वाजवली ॥ जाहीरण केली...
॥ अनंत बाजीयाचा घोष । त्यामध्ये बाज्या कोण सरस ?
मो-हं होणार सांगें द्युत । बाज्या चौरंगी....,
त्वां मोहर वाजवली ॥ जाहीरण केली...
॥ द्युतराज सांगे खरं । मोडन गंधर्वाचा कार ।
मोडन तिरगुणी बाजार । मोडन चौ-यांशी...,
त्वां मोहर वाजवली ॥ जाहीरण केली...॥ १६ ॥

॥ अठराखेत्री उभा द्युतपती । याहीच्या सत्रावीच्या किर्ती ।
अभिमान ज्याहीच्या पोटी । ढळन किल्ली...
त्वां मोहर वाजवली ॥ जाहीरण केली...
॥ ऐका गोळकाची खुणा । रमणा यवगाच्या कारणा ।
जागी करन तिरभवनां ॥ सांगी केली...
त्वां मोहर वाजवली । जाहीरण केली...
॥ ऐका गोळकाचं खरं । भैस उभा यवगा वर ।
मोडुन व्दैताचा कारं । तक्ती येईन परमेश्वर ॥
सांगी केली... त्वां मोहर वाजवली । जाहीरण केली...
॥ याहीच्या यवगाचा कार । सत्य चालन कारभार ।
सुखः होईन कुडीवर । सांगी केली....,
त्वां मोहर वाजवली । जाहीरण केली... ॥ २० ॥

॥ कुडीपासुन अवघा व्यवहार । हा होय जीवनकळीचा कार ।
याहीच्या हाती आहे कार । कुडीवर आयुष्य चढवन थोर ॥
सांगी केली...., त्वां मोहर वाजवली । जाहीरण केली...
॥ ऐका गोयकाची वाणी । निरसुन टाकन तिरभवनी ।
सुखः होईन जीवाजनी ॥ सांगी केली....,
त्वां मोहर वाजवली । जाहीरण केली..॥ २२ ॥
॥ ओळखा जाहीरणाची खुणं । पुर्विपासुन केली जतन ।
शिक्का सेरूपी चढनं ॥ २३ ॥ सांगी केली...
त्वां मोहर वाजवली । जाहीरण केली...

भजने :-
॥ चंदन शिक्का तुच मोहर । अवघी किल्ली देवा तुमच्या हातात ॥
॥ शिक्का मोहर आले सेरूप । याहीचा उजाला आहे चवताळात ॥
॥ शिक्का मोहर आले सेरूप । याहीचा उजाला पडला चवताळात ॥
॥ शिक्का मो-हरं येईन सेरूप । याहीची कमान चढन यवगा वर ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

निरसन पुढील पानावर...

॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

# ॥ मोहरची ओवी ॥

## -: निरसन/स्पष्टीकरन :-

॥ सांगी केली...त्वा मोहर वाजवली ।
जाहीरण केली.. त्वां मोहर वाजवली ॥ घृ ॥

**-: शब्दार्थ :-**

**त्वां** :- संस्कृत शब्द त्वं म्हणजे तु ! संस्कृत मधल्या **त्वं** पासुन व-हाडी मराठीत **त्वां** शब्द आलेला आहे. **त्वां म्हणजे तुवां, तुम्ही** हा अर्थ येथे होतो.

**मोहर** :- सत्तेचा शिक्का, दस्तऐवजावर सत्तेचा जो राजमुद्रा/शिक्का ठोकुन त्या दस्तऐवजाला जी राजमान्यता दिली जाते ती सत्तेची मोहर/शिक्का

**जाहीरण केली** :- सर्व जनात जाहीर करून सांगीतली. दवंडी देवुन सांगतली.

आदीपुरूष भैस अवतारा ! मिर्तलोकी च्या हद्यी जी काही सांगी त्वां केली आहे, त्या सांगीवर रंचलेल्या ओव्यांच्या गायनावर तुम्ही तुमच्या सत्तेचा मोहर/शिक्का मारून/ठोकुन/वाजवुन, त्या सांगीला राजमान्यता देत त्याचा तुच अनुभव व गाही देत इथ उभा आहेस.

मिर्तलोकी या देहीच्या हद्यी सांगतलेली तुमची सांगी, आम्ही जनात जाहीर करून सांगीतली. आणी त्यावर त्वा मोहर वाजवली. त्वा सांगतलेली सांगी रूपी किल्ली आम्ही या जनात जाहीरण करून सांगतली -जाहीरण केली. तुमच्या या सांगीच्या जाहीरणावर तुम्ही तुमच्या सत्तेची राजमुद्रा म्हणजेच मोहर रूपी शिक्का त्यावर ठोकुन/वाजवुन, या तुमच्या सांगीला राज मान्यता दिली आहे. देत उभा आहे. देत उभा राहणार... हेच आम्ही प्रथम जाहीरण करून सांगतो.

॥ यवग गेले चरण ऀचार । तुम्ही यवगी याहीच्या पुढं ।
तुम्ही यवगी याहीच्या पुढं ॥ जाहीरण केली..

हे आदीपुरूषा । आतापर्यंत यवगाच्या चौकडया कितीक गेल्यात. या चारही यवगात कितीक सांग्या झाल्या असतील याची गणती नाही. परंतु आम्ही असे जाणतो की : या चारही यवगातील योगी-जोगी, ऋषि-मुनी यांच्या सर्व सांगी पेक्षाही, या आदीपुरूष कृष्णा ची सांगी सर्व श्रेष्ठ आहे. कारण हाच कृष्ण योगी, सर्व गायपाचा खेळ साधणा-या चारही यवगातील उच्च कोटी च्या योग्यांच्या ही पुढे गेलेला आहे. जे कोण्या उच्च कोटीच्या योग्यास साधले नाही, ते या कृष्णाने करून दाखवले आहे.

या कृष्णाने आपल्या भक्ती बळावर आदीपुरूषाला स्वतःच्या देहधरणी वरच पुर्ण अवतार घेण्यास लावले आहे. अधिक ग्यानाकरीता कृष्णामृत वाचा. हा कृष्णाच आदीपुरूष झाला आहे. पुर्ण अवतार झाला आहे. म्हणुनच आम्ही सर्वप्रथम जाहीरण करून सांगतो की : हाच चारही यवगातील योगी याहीच्या पुढंच हा कृष्णा योगी आहे. हा कलयवगाच्या संधीत उभा झालेला आदीपुरूष पुर्ण अवतार आहे. हे जाहीरण करताच त्यावर या आदीपुरूष कृष्णा ने आपल्या आध्यात्मीक सत्तेचा मोहर ठोकुन आमच्या सांगी व जाहीरणाला राजमान्यता दिली आहे. आम्ही तुमच्या सांगीवर सांगी केली. आणी जाहीर करून जनात जाहीरण केली. तुमची सांगी जाहीर करून जाहीरण करताच, त्यावर त्वा तुमच्या आध्यात्मीक शक्तीची राजमुद्रा म्हणजेच मोहर ठोकुन वाजवली. राजमान्यता दिली. धन्य आमचे भाग्य थोर !

-: पुसत ? चरण :-

॥ ब्रम्हा विष्णु तिरनयन । यवग चालवले कोण ?
चौथ्या खुम्मी उभा कोण ? ॥ सांगी केली...,

ब्रम्हा विष्णु तिरनयन हे तिन गुणाचे तिन खुम्म आहे. आणी चौथ्या शुध्द सत्व खुम्मी उभा कोण आहे ? याची सांगी या कृष्णाने आम्हा केली आहे. अशीच सांगी सर्व जनलोकांच्या हद्यी करुन या सांगीवर मोहर ठोकावी. चौथ्या खुम्मी उभा कोण ? याची सर्व जनास किल्ली सांगा हो ! हीच आता तुम्हा पायी आमची अरज आहे.

-: सांगत चरण :-

॥ स्वर्ग पाताळ ताळ दोन । मिर्त लोक होय ठिकाण ।
मिर्त लोक झालं कोठुन ? सांगी केली...

स्वर्ग पाताळ या दोन ताळावर तोच चौथा उभा आहे. परंतु त्या चौथ्याचे मुख्य ठिकाण तर मिर्त लोकच होय. हे मिर्त लोक झाल कोठुन ? याचीही सांगी येथे या कृष्णाने केली आणी त्या सांगीवर आधारलेल्या ओव्यांवर त्या अदिपुरुषाने मोहर वाजवली.

-: पुसत ? चरण :-

॥ स्वर्ग म्हणे उंच आहे । मिर्त लोक ताळ होये ।
शिदाई वाटे शरण जीवं येतो । मालक कोण ?...
त्वां मोहर वाजवली ॥ सांगी केली... ॥ ०४ ॥

हे चौताळाच्या मालका । तिताळावर तुच उभा आहे. या तिन ताळापैकी स्वर्ग तर उंच आहे. मिर्त लोक हे तुमचे ठिकाण होय. हेच तुमचे ताळ होय. अशी त्वा सांगी आम्हा केली. म्हणुनच आम्ही इथे या मिर्तलोकी येवुन, जन्माच्या अगोदर गर्भि असतांना जसा शिदाई च्या वाटे शरण आलो तसेच आता शिदाई वाटे डोके ठेवुन नतमस्तक होवुन तुम्हा शरण येत आहे. या मिर्त लोकचा खरा मालक कोण ? याची सर्व जनास किल्ली सांगा हो । हीच आता आमची तुम्हा चरणी अरज आहे.

-: सांगते चरणे :-

॥ स्वर्गी कामधेनु गाय । चौरंगाचा बळी पाताळी ।
कोण्याएका दिवशी येईन द्युतं ॥ उडवण पदवी...
त्वां मोहर वाजवली । सांगी केली..

स्वर्गात स्वर्गिच्या दैवतांची कामना पुर्ण करणारी कामधेनु गाय त्वां ठेवली आहे. तर पाताळात चौ-चारही रंग आत्मसाद असलेला चौरंगी बळीराजा ला पालक करुन ठेवलेले आहे. आणी इथे या मिर्तलोकी कोण्यातरी एका दिवशी एक चतुर्पतीचा द्युत येवुन, तो या चतुर्पती ग्यानाच्या सांगीवर सांगी करुन जनात जाहीरण करन. तेव्हा मग हे चतुर्पती ग्यान त्या शंकाला म्हणजेच निश्कलंकी अवधुत ला घेवुन येईन. निश्कलंकी कृष्ण अवधुत तिरगुणांची पदवी उडवन.

विष्णु जवळ असलेली सत्वगुणांची पदवी, तर ब्रम्हाजवळ असलेली रजगुणांची पदवी, तसेच शंकरा जवळ असलेली तमगुणांची पदवी, तो चौथा चतुर्पती आदीपुरुष भैस नारायण उडवन. या निरंजन निर्गुण निराकार आदीपुरुषाचे राज या तिन खुम्मावर आहे. या निर्गुण निराकाराचे राज हे तिरगुणांच्या अंगी आहे. या तिरगुणांचे शुन्य उडवुन, त्यांची पदवी हा चौथ्या खुम्मावर उभा असलेला चौथा ठेवणार नाही. असा या चौथ्याचा खेळच पुढे होणार आहे. अशी त्वा सांगी केली, आणी आम्ही जाहीरण केली आणी त्यावर त्वा मोहर वाजवली. धन्य तुमची महीमा थोर !

चतुर्पती व्दारे या सत्व-रज-तम या तिरगुणांचे तीन शिक्के उडवल्यानंतर, या तिरगुणांचे तिन पदरं या देहीच्या खांदयावर खरच राहतीन काय ?

॥ तिरगुणांचे तिन पदर । ते काय राहतीन खांदयावर ?
गर्तिचा मोडा/मोळ्या कार । होय बाजारी....,
त्वां मोहर वाजवली ॥ सांगी केली...

जेव्हा कोण्या एका दिवशी चौथ्या खुम्मी उभा असलेला रोमीद्युत येवुन या तिरगुणांची पदवी उडवन, तेव्हा या देहीवर असलेले तिरगुणांचे राज राहतीन काय ? या तिरगुणाचे राज राहणार नाही ! जेव्हा या तिरगुणांचे या देहीवरचे राज जाईल, तेव्हा या देहीवर चौथा शुध्द सत् उभा राहीन. या शुध्द सत् व्दारे, या आत्म्याच्या चार कोटावर म्हणजेच स्थुल, सुक्ष्म, कारण आणी महाकारण या चौदेही वर, म्हणजेच आत्माच्या या चारही येशीवर, तो येशीचा यशकर असलेला चौथा चतुर्पती मालक आपरूप येवुन उभा राहीन. हा चौथा देहीच्या चारही येशीवर भरून भरन आणीक उरेल. या देहीवरील तिरगुणांनी टाकलेले आठही गर्तिचे कार चे ओझे, तो या देहीला खाली टाकण्यास बाध्य करेल.

चौथ्या शुध्द सत् व्दारे उभा झालेला, चौथा चतुर्पती मालका मुळे या देहीच्या खांदयाचर असलेले सत्व रज तम या तिन गुणांच्या गर्तिचे कार चे तिन पदर उडुन जाईल.

या तीरगुणाने आठ प्रकारची गरती च्या कार चे ओझे या देहीच्या डोक्यावर/खांदयांवर लादलेले आहे. देहीच्या खांदयावर तिरगुणांनी आठ प्रकारच्या गरतीच्या मौळ्या बांधुन, या गरतीच्या कार असलेल्या मोळयाचे ओझे चा भार जिवनभर वाहण्यासाठी टाकलेला आहे.

अश्या या तिरगुणां नी दिलेल्या १. अभिमानाची गर्ति २. कर्माभिमानाची गर्ति ३. धनसंपदाची गर्ति ४. विद्याभिमानाची गर्ति ५. मुर्खपणाची गर्ति ६. अंगबळाची गर्ति ७. मद्यप्राशनाची व मायेच्या मधुपानाची गर्ति ८. अहंपणाची गर्ति अश्या आठ गर्तिच्या कार च्या मोळ्या बांधुन त्याचे ओझे घेवुन वाहणा-यां कोरडया तिरगुणी हमालांची थोरवी गाणा-यां तिरगुणीं जवळ, ईतरांचा उपदेश कसा चढेल ?

अभिमानाची गर्ति
कर्म-अभिमानाची गरती
धन संपदाची ची गर्ति
विद्या-अभिमानाची गर्ति
मुर्खपणाची गर्ति
अंगबळाची गर्ति
मद्यप्राशना ची गर्ति
मी-मी अहंपणाची गर्ति



असे हे तिरगुणी ज्ञानी गर्तिच्या कार च्या मोळ्या चे ओझे डोक्यावर घेवुन, आपले तिरगुणी गर्तिचे ज्ञान मायेच्या तिरगुणी बाजारात विकण्यासाठी फिरत आहे. हे तिरगुणीच तर मायावी बाजारात फिरणारे बाजारी होय. तिरगुणांची माय असलेल्या मायाचैतन्यानेच तर हा तिरगुणी बाजार मांडुन, या तिरगुणींना हाती घेवुन या मायावी बाजाराचा ठेका घेतलेला आहे. ही माया चैतन्याच तर बाजारीन झाली आहे. मग बिचा-या त्या इतर सर्वसामान्यांच काय ? गर्तिच्या कार च्या मोळयाचे ओझे डोक्यावर घेवुन वाहणारे हे तिरगुणी ज्ञानी नुसते बाजारी आहे. बगळयाप्रमाणे ध्यानाचे ठोंग करत मासोळी दिसताक्षणीच आपल्या चोचेने उचलुन गळयात/पोटात टाकणारे ढोंगी आहेत. ऐसा याहीनं आहार उपहार खावुन देह याहीनं नाशवल्या आहेत.

देहेचे जिवना चा नाश करणारे हे तिरगुणी आहेत. मानसन्मान देण्याइतपत सुध्दा ते योग्य नाही आहेत. कारण की : या तिरगुणींची माय असलेली चैत्यन्या-माया हीच तर बाजारीन आहे. तिरगुणी मायेनेच तर यवगं नासवले आहे, तर मग तिचे तिरगुणी लेकरं कसे वागतिल ? हे तिरगुणी नाशीवंत आहेत. याहीनं नाश केला आहे तिरभवनी ! मुळ यवग नाशवले तिनही ! याहीनं बहु नाश केला जिवाजना ! म्हणुनच या तिरगुणां च्या गर्तिच्या कार व्दारे झालेल्या किर्तिचा गड मोडा ! ती किर्ति बाजारी होय. सांगी केली..

॥ चैत्यन्या होवुन बाजारीनं । यवग नासवले तीनं ।
यवग हीनं केलं इनं । कैशी चांगली ?...
त्वां मोहर वाजवली ॥ सांगी केली...
॥ काया हीनं मती हीनं । हीनं केलं देहभान ।
शुध्द चतुर्पता कळली । जाहीरण केली...
त्वा मोहर वाजवली ॥सांगी केली... ॥ ०८ ॥

माया चैत्यन्याशक्तीने भाव धरून प्रार्थना मांडुन, आदीमुनी कडुन सत्व, रज, तम या गुणांच्या देवतांना जागी करून आपल्या पदरी घेतले--शक्तीचे ओवी-०१/०२/०३ चे निरसन वाचा.

सत्व गुणांचा राजा असलेला विष्णुराज, रज गुणांचा राजा असलेला ब्रम्हा तर तम गुणांचा राजा असलेला शंकर, या तिन त्रिकुटांचा झेंडा या चैत्यनेने फडकला. हा झेंडा फडकवुन या तिरगुणींचा कवली बाजार म्हणजेच कवडी मोल किंमत असलेल्या ज्ञानाचा नकटा-नकली वस्तु प्रमाणे चकाकणारा बाजार मांडला आहे.

तिरगुणी बाजारात बाजारीन होवुन ही कलारीन चैत्यन्या बसली आहे. ज्यात फक्त या तिरगुणी अवतांराची स्तुतीगाण व्रत वैकल्पे पुजा-पाठ स्त्रोत्र कथासार.. ईत्यादीच आहे. अश्या कवडी मोल किंमत असलेले तिरगुणी ज्ञानाचा प्याला ही कलारीन माया मधुपानाप्रमाणे अज्ञानी जनांना पाजत आहे. असे कवडीमोल किमंतीचे तिरगुणी ग्यान पाजत पाजत, सत्य लपवत लपवत तिने यवग तिने नाशवले आहे. हे यवग नित्कृष्ठ हीन दर्जाचे केले आहे. जी माय यवगान यवग हीन करत सुटली आहे, ती कैशी चांगली ? ऐसे कृष्णाने सांगी करून सांगतले आहे. तर त्याचे कृष्णगडयांनी जाहीरण केली. आणी त्यावर आदीपुरूषाने आपल्या सत्तेची राजमुद्रा म्हणजेच मोहर ठोकुन वाजवुन राजमान्यता दिलेली आहे. आपल्या सत्तेची ही मोहर वाजवुन आदीपुरूष कृष्णा ने हेही सांगी केली की :

जरी या नाशलेल्या नित्कृष्ट हीन झालेल्या यवगामुळे, मानवाची मती म्हणजेच बुध्दि हीन होवुन ते देहभान विसरून हिनतेकडे वळले असले, तरी सुध्दा या आसारातुन सार देत, चतुर्पती नामी असलेल्या भक्तांच्या भोवती असलेल्या तिरगुणांच्या जाळया आदीपुरूष भैस अवतार कृष्ण महाराजा तोडन.

॥ तिरगुणांच्या जाळया । मोडन हा राया ।
अंबर करन देहा । महाराजा हो ॥ खंड०२/०६:-द्युताचे हे मोती

या तिरगुणीनी आपल्या जाळया टाकुन, जनलोकांचे देहभान जरी हिन केलेले असले, तरी सुध्दा या चतुर्पती नामी असलेल्या भक्त जनांच्या भोवतालच्या तिरगुणांनी टाकलेल्या तिरगुणी मायेच्या जाळया तोडन तो अवधुत राया । या तिरगुणी जाळया तोडुन, तो अवधुत राया आपल्या चतुर्पती भक्ताला तिरगुणाच्या पल्याड असलेल्या चौथ्या शुध्द सत् कडे घेवुनच जाईल.

चौथ्या खुम्माच्या शुध्द सत् गुणांमुळेच तिरगुणांचे शुन्य उडुन या तिरगुणांची जरासुध्दा सत्ता या देहीवर राहणार नाही. आणी मग त्याला शुध्द चतुर्पता कळेल. ही शुध्द चतुर्पता कळाल्यानंतर त्यांच्या देहीवर भैसाचं राज यायला वेळ लागणार नाही. या भैसाच राज येईनचं । हीच कळालेली चतुर्पता कृष्णाने सांगी करून सांगतली आणी त्यांचे सच्च्या भक्तगडयांनी त्या सांगीचे जाहीरण करून जनात सांगीवर सांगी केली. आदीपुरूषाने या जाहीरणावर मोहर वाजवली...

॥ चैत्यन्या होउन कलारीनं । हद्यी पाजलं मधुपान ।
हद्यी पाजलं मधुपान । भुलवन पडली...
त्वां मोहर वाजवली ॥ सांगी केली...
॥ भुलवनं पडली यवगापरी । ऐसे यवग कठले भारी ।
उडवा घुंगी ही झापडी । विठोबा येईन...
विनवा हो रात्रंदिन ॥ सांगी केली...

जुन्या काळी कलार या जातीचा मुख्य व्यवसाय मद्य विकण्याचा होता. पतीच्या व्यवसायाला हातभार लावणा-या या जातीच्या अस्तुरीला **कलारीन** असे संबोधल्या जात असे.

तिरगुणांची माय-माता असलेली मायाचैत्यन्या ही सर्वप्रथम कलारीन झाली. ही कलारीन होवुन या तिरगुणांची महीमा वाढवणारे तिरगुणी ज्ञान, जनलोकांच्या हद्यी यवगान यवगापासुन मधुपानाप्रमाणे पाजत आलेली आहे. तिने मधुपानांप्रमाणे पाजलेल्या या तिरगुणांची महीमा वाठवणारे व्रत वैकल्पे कथासार पुजा-पाठ आत्म स्तुतीगाण स्तोत्र..ईत्यादी मध्येच हे तिरगुणी जन धुंद झालेले आहेत.

यवगान यवगा पासुन हे तिरगुणी ज्ञानीजन, देहीच्या चौथ्या धन्याला विसरून, आत्मज्ञानी न होता कवडीमोल अश्या कर्मकांडी तिरगुणी ज्ञानांच्या धुंदीत वावरत आहेत. माया चैत्यनेने मधुपानाप्रमाणे पाजलेल्या तिरगुणी ज्ञानाची धुंगी-गुंगी यांच्या डोळ्यांवर चढली आहे. म्हणुनच या तिरगुणांच्या पल्याड उभा असलेला तो चौथा त्यांच्या दृष्टीक्षेपात येत नाही आहे. तिरगुणांच्या गुंगी व्दारे, या तिरगुणी ज्ञानाची मोहनी त्या सर्व तिरगुणीं जनसामान्यावर या मायाचैत्यन्याने पाडुन त्यानां भुलवनीत टाकले आहे. तिने या तीरगुणी शुन्याची भुलवन, दिवसेंन दिवस वाढवत वाढवत नेत यवगान यवग लौटले आहे.

मुळयवगी होत काय ? मुळयवगीचा देव कोण ? मुळयवगीची साधना कोणती ? आकाशवाणी करणारा कोण ? त्रिदेवांच्या बोलावर उभा राहणारा कोण ? चौथा चतुर्पता अथर्वन् वेद कोण्या घरी ? चौथा मुळपुरूष आदीपुरूष धन्याचे चतुर्पती ग्यान,...इत्यादी अहीनाघरचे ग्यान, या तिरगुणी मायेच्या भुलवणी पायी तिरगुण ज्ञानी योगी पंडीतांना ठाव झाले नाही.

ज्यांना मुळयवगीच्या चौथ्या खुम्मी उभा असलेल्या चौथ्या चतुर्पतीचे ग्यान नाही, त्यांना मुळची किल्ली कशी गवसणार ? ज्याने मायाचैत्यनेने पाजलेले तिरगुणी ज्ञानाच्या दुधाचे हांडे जरी तिनही भरले असले, तरी या तिन च्या पल्याड उभा असलेला चौथा धनीच त्याने नाही जाणला, तर मग कैसे होईल त्याला आपल्या सत्य देवांचे देण ? सर्व काही व्यर्थ जाईल हो ! कशी गवसन त्या बिचा-याला मुळची किल्ली ? कुणीतरी सांगा हो ! मुळची किल्ली गवसावयाचीच असेल तर या तिरगूणी ग्यानाची गुंगी झटकुन डोळ्यावर जी या तिरगुणी ज्ञानाची झापडी आली आहे, ती झापडी सर्वप्रथम दुर करून खं-या अर्थानं डोळे उघडुन पहावे. या तिरगुणांच्या पल्याड पहावे लागेल.

त्रिगुणातीत दृष्टी म्हणजेच तिरगुणांच्या पलीकडे पाहणारी दृष्टी आल्यावर, तुम्ही स्वतःहुन तुमचे तिरगुणी ज्ञानाचे तिन शिक्के, या तिरगुणांच्या पल्याड उभा असलेल्या चौथ्या धन्याला अर्पण कराल. आणी मग तुम्हास चवथ्या खुम्मी उभा असलेल्या आदीपुरूष चतुर्पती धनीचे ग्यान आपरूप येईल. आदीपुरूष चतुर्पती गीण्यान या देहीच्या अहीनामुखी देईन. अहिनाघरचे ग्यान अहिनामुखी आल्यामुळे देहीचा हा अहिन म्हणजे आत्मा हा स्वतःला जाणुन आत्मज्ञानी होईन. चतुर्पती ग्यानी होईन. निरंजन ग्यानी होईन. निरंजन आदीपुरूष चतुर्पती धनी हा नुसतेच कोरडे ग्यान न देता, त्या ग्यानाचे अनुभवही देत राहील. बहु अनुभवां नंतर तुम्हाला हा निर्गुण निराकार विठोबा धनी कळेन. आकारी नाण्याची दुसरी बाजु तुमच्या दृष्टीदेखत येईल. तेव्हा तुम्हीच म्हणाल हाच तो सत्य देव ! हाच चौथा धनीदेव खरा ।

म्हणुनच त्या मुळयवगी उभ्या असलेल्या, चौथ्या निगुर्ण निराकार निराधार चौथ्या चतुर्पती विठोबालाच रांत्र-दिन सच्च्या दिलाने विनवा हो ! तो नक्की येईन. ऐसे जाहीर करून कृष्णा सांगी सांगतो. या कृष्णाच्या संगतिच्या जाणत्या भक्तगडयांनी येथे या चतुर्पता भुम्मेवर उभे राहुन तेच कृष्णा मुखची सांगीचे जाहीरण केले. आणी त्या आदीपुरूष कृष्णानें त्यावर मोहर ठोकुन आपली राजमान्यता दिलेली आहे.

॥ तो उडवन घुंगी, पळन झापडी । खेळ करन खळाखळी ।
खेळ होईन खळा खळी । धैसकं पडली...
त्वां मोहर वाजवली ॥ सांगी केली...
॥ उडवन तिरगुणाचं शुन्यं । जागी कर्ते होय कोण ?
त्याहीचं नाव दयाहो सांगुनं । जाहीरण केली...
त्वां मोहर वाजवली ॥ सांगी केली... ॥१२॥
॥ उडन राजे राज्यापरी । एक राजा एक खेंत्री ।
शिक्का भैसाचा चालनं । अवधुत सांगे किल्ली ॥ जाहीरण केली...
.....जळगाव पाठातील चरणे

त्या निराकार निराधार विठोबा धन्याला रात्रंदिन विनवल्या नंतर तो येईल. हा धनी देहधरणीवर उभा झाल्यानंतर या देहीवरील त्रिकुटाचे अंमल ठाणे तो उडवन. हे त्रिकुटाचे अंमंल ठाणे उडाल्यामुळे तिरगुणांच्या व्दारे पडलेल्या सा-या भ्रमाने जी घुंगी आणुन भुलवण पडली होती, ती दुर होवुन डोळ्यावर आलेली त्रिगुणांची झापडी पळन. नव्या दृष्टीचा डोळा होईल. नवी त्रिगुणातीत दिव्य दृष्टी मिळेल. नवी दृष्टी धन्याचा तिरलोक जुम्मा, ज्योत अनामत येथुनच पाहील.

ही त्रिगुणातीत दृष्टी प्राप्त झाल्यामुळे, या देहीवर जे सत्व-रज-तम या तिनगुणांचे जे राज आहे, ते राज उडुन जाईल. त्रिगुणांचे राज उडुन या त्रिगुणांचे तिन राजे आपले देहीवरचे राज्य खाली करनं. कारण की : चौथ्या खुम्मी उभा असलेला शुध्द सत् भैस हा एकच राजा एकाच खेत्री येवुन, या तिनही राजाशी प्रज्ञामती व्दारे बोलने करेल. आणी मग या तिघांच्या हाती असलेला चैत्यन्याचा शिक्का तो चौथा धनी आपल्या हाती घेईन.

देहीवरचे तिन बादशाहाचे राज्य जावुन, चैत्यन्याया शिक्का शुध्द सत् च्या हाती आल्यानंतर शुध्द सत् चा खासा बादशाहा भैसराज हा चौथ्या खुम्मी उभा राहीन. आणी चैत्यन्यस्वरूपी कळपाने राहणा-या, ६४ लाख जोगीनी, ३६० हजार भोवण्या, १६ सहस्त्र गोपीगणा, ७ हजार आसरा, ७ स्वर्गिच्या प-या, रिध्दी-सिध्दी लक्ष्मी धरतरी माता....ईत्यादी ला ज्योता चढवुन त्यानां हा भैसराजा सच्च्या व शंक देह घरा आणेल.

देहघरा ज्योता चढल्यानंतर तो देह निर्मळ निशं:कलंकी प्रकाशीत होउन लभेद नर होईन. या पवित्र लभेद नराचे नव्या दृष्टीमुळे सर्वत्र सत्रावीची गोडी लागुन विषमतेचे विसर्जन होईल. चार खुम्मी चारही नामी एकच मन राहील. त्यांना चवही खुम्मांचा जिव्हाळा राहीन. ते निर्भेव राहतीन.

असे पवित्र लभेद निर्मळ गोळक तो चौथा धनी या भुम्मेवर गोळा करन. असे गोळा झालेले गोयक गडी हे कैलास, वैकुंठ, इंद्रसभा, यमपुरी...ईत्यादी ठिकाणाहुन जाळामुळापासुन येईन. आणी अवघी धरणी ते रूमावळी टवटवित करून टाकेल.

रूमावळी झालेल्या धरणीवर धनी आल्यावर अश्याच प्रकारचा खेळ तो धनी खळाखळी म्हणजेच प्रतेक सत् देहधरणीत-देहघरी करून नव्या यवगाचा कार करन. या नव्या यवगाच्या कार मूळे कली उडुन जाईल.

धनीच्या नव्या कार च्या याच खेळाची आता आम्हाला ध्यास लागला आहे. रूखरूख लागली आहे. घैसक पडली आहे. कारण की : या खेळात एकाच खेत्री एकच भैस राजा येवुन, चैत्यन्येचा शिक्का आपल्या हाती घेवुन नवा कार करणार आहे. अशी किल्ली अवधुत योगी कृष्णा सांगत आहे. हाच श्रीराया कृष्णा या चतुर्पतीची महीमा वाणी सांगी यवगान यवगा पासुन सांगत सुटला आहे. दंवडी देत आहे. या कृष्णानेच या चतुर्पतीची अस्तुकी म्हणजे महीमा वाढवली आहे. कृष्णाने जागोजागी पेणं स्थापत या चतुर्पतीची यवगान यवगात अस्तुकी केली आहे. हे आम्ही जाहीरण करून सांगतो.

॥ अस्तुकी केली या श्रीरायानं । ताळा परस दोन दोन ।
मो-हरं यवगाचे कारण । अस्तुकी केली...
त्वां मोहर वाजवली ॥ जाहीरण केली...
॥ यवग भाकल्याचे गुणं । सुने वेद पडले तीन ।
अर्थवन् वेद कोण्या घरूनं । सांगी केली...
त्वां मोहर वाजवली ॥ जाहीरण केली...
॥ अनंत बाजीयाचा घोष । त्यामध्ये बाज्या कोण सरस ?
मो-हं होणार सांगें द्युत । बाज्या चौरंगी....,
त्वां मोहर वाजवली ॥ जाहीरण केली...

-: **शब्दार्थ** :-

**अस्तुकी करने** :- महीमा, किर्त वाढवणे, किर्तित आणुन प्रित करने.

प्रतेक ताळापरस दोन-दोन च्या जोडीने येवुन या श्रीराया कृष्ण धनीदेव ने चतुर्पतीचीच अस्तुकी केली आहे. या चतुर्पतीची महीमा वाणी वाढवत नेलेली आहे. यवगान यवगापासुन तो कृष्णधनी सच्च्या भक्तांच्या देहघरा आपनहुन जावुन, त्यांना हाती घेवुन चतुर्पती ग्यानाचे त्यांना अनुभवासह देणं देत आहे. देत आलेला आहे. देत राहणार आहे. कारण की : पुढे याच भैसाचं यौग येणार आहे. पुढे येणा-या याच भैसाच्या यवगाकारण तो कृष्णा अस्तुकी करत सुटला आहे. त्यानेच सर्वप्रथम जाहीरण केलेले आहे की, पुढे याच भैसाच राज्य चतुर्पतीच यवग येणार आहे. हे त्यानेच भाकलेले आहे. त्याच भविष्य त्यानेच सांगुन ठेवलेले आहे.

'शुध्द सत्व चतुर्पती धन्याचे सत् यवग येणार' असे जे कृष्णाने भाकले आहे, त्याची ग्वाही-साक्ष पुरावा म्हणजे हळुहळु तिनही वेद पाठ-पठनाचे कार्य सुने पडले आहे. कारण की : या नाशवलेल्या तिनही वेदात आता या चौथ्याला जागी करण्याची क्षमताच राहलेली नाही.

चौथ्याला जागी करण्याची क्षमता असलेले वेद कोण्या घरी आथरून आहे ? या चौथ्याचा चौथा चतुर्पता अथर्वन् वेद कोणता बाजा वाजवत आहे ? हा बाज्या कोणता घोष करत आहे.? हे सर्वसामान्यांना माहीत नाही. कारण की :

इथे या मिर्तलोकी काही स्वार्थि तिरगुणी सत्ताधारी ज्ञानी पंडित जनांनी आप आपल्या पोट-पाण्याच्या व्यवस्थेसाठी, त्यांच्या हाती आलेल्या वेदात आपल्या मानसन्मानसह पोटपाण्याचे व्यवस्था करणारे श्लोक घुसवुन वेदांचा नाश केलेला आहे. आणी या तिरगुणींनी आपल्या तिरगुणी ज्ञानमती च्या आधारावर पंथ-पंथ तयार करून जनलोकांची गटा-गटात विभागणी केलेले आहेत. आता पंथा पंथा चे गट पडुन, प्रतेक पंथाचे जन माझ-माझच मोठे असे म्हणत आपआपल्या पंथाचे घोष वाक्य घेवुन, स्वतःच्याच महती करीता स्वतःच्याच पंथांचा बाज्या वाजुवन, आपल्या स्वतःच्या ताब्यातील पंथाला रंग चढवत आहेत. हे सर्व स्वार्थि तिरगुणी काही या आदीपुरूषाची ग्वाही मानण्यास तयार नाही. किती सांगु रे बाप्पा हे तिरगुणी जग मानत नाही. म्हणुनच कृष्णा म्हणतो की :

॥ सांगता सांगवत नाही । किती सांगु रे बाप्पा । हे जग मानत नाही ।
पंथ पंथ प्रडतील गट । माझ माझ म्हणतील मोठ ।
मानत नाही... या आदीपुरूषाची गाही ॥

असे हे तिरगुणी आपआपल्या पंथाचे गट पाडुन, आपआपले बाजे वाजवत आहेत. असे प्रतेक पंथ पंथांचे मिळुन अनंत बाजीयाचा घोषाचा इथे कल्लोळ होत आहे. त्यामध्ये देवा ! कोणता बाज्या सरस ? सांगा किल्ली..

या अनंत बाजीयाच्या घोषामध्ये सरस असा एकच बाजा आहे. तो म्हणजे चारही रंग असलेला चारही वाणीतुन वाजणारा चतुर्पतीची चौरंगी बाज्या ! हाच चौरंगी बाज्या व्दारे चतुर्पती पुढे सर्वामुखी येणार आहे. पुढे होणार असे हा द्युत सांगत आहे. कारण की : याच चतुर्पती पंथातील भुम्मा गोयकाला चारही खुम्माचा जिव्हाळा राहीन. त्यांच्या या जिव्हाळा मुळेच कैलाशी, वैकुंठी, इंद्रपुरी, यमपुरी निजधाम.. ईत्यादी जाळामुळा च्या ठिकाणा पासुन हे सर्व गडी चतुर्पतीच्या मोहजब्या च्या वेळी येईल. तेव्हा ख-या अर्थाने हा चौथ्या खुम्माचा चतुर्पतीचा बाजाच चौरंगी होवुन या चौरंगी बाज्याव्दारे चौरंगाचे बोलने या चतुर्पती पंथाच्या भुम्मेवर होईल. आणी मग या चौरंगी बाज्या व्दारेच तिरगुणी देवतांचे मनोरंजना साठी गायन करत असलेल्यां गंधर्वांचा कार मोडल्या जाईन. अशी या द्युत राजाने सांगी केली... आणी त्याने त्यावर मोहर वाजवली

॥ द्युतराज सांगे खरं । हा मोडन गंधर्वाचा कार ।
हा मोडन तिरगुणी बाजार । मोडन चौ-यांशी...,
त्वां मोहर वाजवली । जाहीरण केली...॥ १६ ॥

पुढे होणा-या भैसाच्या सत्‌युवगाची दवंडी देणारा चतुर्पतीचा चौरंगी बाज्या वाजवुन तो धनीदेव नवा कार करणार आहे. ज्याप्रमाणे इंद्रसभेत इंद्रासह देव देवतेच्या मनोरंजनासाठी गंधर्व गण गायन करतात, त्याचप्रमाणे स्वतःच्या व इतर देवतांच्या मनोरंजनासाठी गायन करणा-या लोकांचा गायनाचा कार तो धनी निभावणार नाही. त्रिलोक्यातील गंधर्वाचा कार धनी मोडणार आहे. कारण की : या गंधर्वाच्या गायनात भक्ती भाव अत्यंत कमी असुन, राग-रागीन्या बहु प्रमाणात आहे. या गंधर्व गायनात भक्ती-भाव अर्पण करण्यावर ध्यान न ठेवता, राग-रागीनीवरच जास्त ध्यान ठेवले जाते. भक्ती-भाव व रागरागीनी यांचे वजन केल्यास रागरागीनीचे वजन जास्त भरते. तर भक्ती-भाव कमी भरतो. राग-रागीने मुळे भक्ती-भाव अर्पण करण्यास अडथळा येतो. भक्तीभाव अर्पण करण्यात खंड पडतो.

अहंकार सह असलेला भक्ती-भाव धनी कदापी स्विकारत नाही. धन्याला सच्च्या भक्ती-भाव जास्त तर ईतर कमी पाहीजे असते. या गंधर्व गायनात ''मी उत्तम गायन करतो'' असा मी-पणाचा अहंकारच आहे. अहंकार हा हरीचा हाडवैरी असल्यामुळे, तो चौथा या तिरगुणींचा तिरलोकी असलेला सच्च्या भक्ती-भावाविना राग-रागीन्या यावरच जास्त लक्ष्य/ध्यान केंद्रित करत असलेल्या गायनाचा बाजार मोडन. या देहीतील तिरगुणांचा बाजार मोडुन, या गंधर्वांचा तो भैस राया कार मोडन. अशी या धन्याची सांगी आहे.

या देहीमध्ये तिरगुणांनी बाजार मांडण्याचा जो पण म्हणजेच नेम घेतला होता, तो या चौथ्या व्दारे मोडीत निघाल्यानंतर तेव्हा मग ॥ चार सहा दहा जनी, । बारा सोळा दोन आहे गुणी ॥ खंड०२/३६ अश्या पन्नास मातृकाचा मेळा या देहीतील षटचक्रांवर वसलेला आहे. हा कृष्णधनी आपल्या लभेद चैतन्याचा पुरवा षटचक्रांवर देवुन या षटचक्रासह षटचक्रांवर असलेल्या या पन्नास मातृका जागी करेल. आणी या देहीला तिरगुणांव्दारे नाचवणारा पण चा नाश करून/मोडुन, या पन्नास जागृत मातृकाच्या पन्नाशीला दोन केवळ मात्रा भेटुन देहे-जीव यांचे स्वयंवर होईल. अशी सांगी केली..

॥ पणनाशीला होईन स्वयंवर । अठरा खुम्म न्यात जेवनं ।
तेव्हा ही गाय जागी होईन ॥ ..जळगाव पाठातील चरण

या देहीत तिन गुण ठाण मांडुन बसलेले आहेत. हे तिनगुण या देहीत आपआपल्या सत्तेचे नित वर्चस्व गाजवण्या साठी लढत/धडपडत राहते. ते असे :

- या देहीत कधी सत्व-रज या गुणांचा पाडाव करून, तमोगुण वर येवुन या देहीवर तम चे वर्चस्व करून तमगुणां ची सत्ता गाजवतो. जेव्हा तमोगुण वरचढ होवुन आपले वर्चस्व गाजवतो, तेव्हा तो तमोगुण या देहीला सैतानासारखे-राक्षसारारखे नाचवतो. देहीव्दारे दुष्कर्म करतो. तामशी कृत्य करत तामशी बनतो.
- कधी तम-रज या गुणांचा पाडाव करून, सत्गुण वर येतो व तो देहीवर सत्गुणांचे वर्चस्व गाजवतो. सत्वगुणांचे वर्चस्व झाल्यास, हा सत्वगुण या देहीला 'मी मोठा सात्विक', 'मी ब्रम्ह ज्ञानी', मी ज्ञानपंडीत, मी गुरू' असा अंह आणते. देहीची पुंजनमान ची अंपेक्षा बाळगुन या देहीची देवांप्रमाणे पुजा करवुन घेण्याकरीता प्रयत्नरत् होतो. एवढच नव्हे तर स्वतःलाच देव समजुन, देवाप्रमाणे आहार उपहार पुंजन मान घेत देहीला वागावयास भाग पाडते.
- तर कधी तम-सत् या गुणांचा पाडाव करून, रजोगुण वर येवुन हा रजोगुण या देहीवर रज चे वर्चस्व गाजवतो. देहीत जेव्हा रजगुण वरचढ होवुन आपले वर्चस्व गाजवते, तेव्हा त्या देहीला हा रजगुण जणुकाही राजा सारखी वर्तन करावयास लागते. देहीत राजशी पणाचा अहंकार आणते.

अश्या प्रकारे, या देहीत हे तिरगुण ऐकमेकांचा पाडाव करून, एकमेकांवर वरचढ होत आपआपल्या गुणांचे वर्चस्व स्थापवत आपआपल्या गुणांचा खेळ करत या देहीला नाचवत राहते.

या देहीला जीवनभर अश्याचप्रकारे नाचवण्याचा पण म्हणजे नेम, या तिरगुणांनी घेतलेला आहे. हे तिरगुण अश्या प्रकारे या देहीत आपआपल्या गुणांचा बाजार मांडत राहण्याचा यांचा नेम-पण आहे.

परंतु ॥ चार सहा दहा जनी । व बारा सोळा दोन आहे गुणी ॥ ०२/३६ या पन्नास मातृका जागी करून या देहीत तो चौथा शुध्दसत्व चा धनी भैस जेव्हा अंर्तभुत होतो, तेव्हा तो सर्वप्रथम या देहीत तिरगुणांनी मांडलेला बाजार मोडीत काढतो. देहीतला त्रिकुटांचा तिरगुणी बाजार मोडल्या गेल्यानंतर, त्या देहीला मग या तिरगुणांच्या पलीकडे पाहण्याची म्हणजेच त्रिगुणातीत दृष्टी येते. या नव्या त्रिगुणातीत दिव्य दृष्टीमूळे, तिरगुणांच्या पल्याड उभा असलेला तो चौथा शुध्द सत् धनी चे निरंजन चतुर्पता ग्यान त्याला प्राप्त होवु लागते. या चतुर्पता ग्यानप्राप्ती मुळे जेव्हा तो तिरगुणांच्या पलीकडे पाहतो, तेव्हा या देहीतला तिरगुणांनी केलेला पण नाश पावत जातो. तिरगुणी पणांचा विनाश होतो. जेव्हा तिरगुणांचा पण नाशतो, तेव्हा या पण नाशीला जागी झालेल्या पन्नास मातृका व देही-देवतांच्या साक्षीने देह-जीवाचे स्वयंवर होते. आतापर्यत तिन यवग देही-जीवाचे स्वयंवर नाही झाले । ते स्वयंवर या पण नाशीला होते.

या पण नाशीच्या स्वयंवरात, ६ शास्त्रे, ६ दर्शने, ६ जोग या अठरा सह, अटरा पुराणात, कोणतं एक समान नात आहे ? या अठरांचा विषय हा एकच तत्व आहे ते म्हणजे हरी आहे. या अठरा खुम्मावर उंच घर कोणाचे आहे ? हरीचेच आहे. या अठरा खुम्माचे कोणते अन्न तो भकसतो ? भाव-भक्तीचे !.... ईत्यादी चतुर्पता ग्यान त्याला येईन.

या चतुर्पती ग्यानाव्दारे त्याला सत्रावीची अत्यंत गोडी लागन. ही गोडी या न्यात्यातील विषमता दुर करून, ही सत्रावीची गोडीच त्याची विषमता विसर्जन करेल. तो सर्वत्र समानतेने पाहु लागेल. त्याचा एकच न्यात-नात दिसेल ते म्हणजे सर्वत्र व्यापलेली चैतन्य ज्योत. अठरा खुम्मात कोणते न्यात आहे याचे ग्यान त्याच्या पोटी गेल्यामुळे, ते हे अठरा खुम्माचे न्यातच जेवन. आणी तेव्हा ही त्याची देहरूपी गाय सह चतुर्पता गाय जागी होईन. त्याला चतुर्पता ग्यान येईल की : या अठरा खेत्री सह सर्वत्र त्या चौथ्या द्युत राजाचीच सत्ता आहे. अठरा खेत्री तोच चौथा द्युतराजा आदीपुरूष उभा आहे. तोच या अठरा खेत्रीच्या अठरा खुम्मावरीत शुध्द सत्भावाचे अन्न भकसत आहे. तोच कळसुत्राचा मालक होय. या चौथ्या आदीपुरूषाच्याच हाती सर्व कळसुत्र बाहुल्यांची दोरी आहे. तोच सर्वांना नाचवत आहे. त्याने लावलेल्या या जीवनकळा ज्योत व्दारेच देहीची किर्ति देहे करत आहे. या अठरा खेत्री सह सर्वत्र तोच चौथा द्युतपती भरून भरला आणीक उरलेला आहे. अशी सांगी केली..

॥ अठराखेत्री उभा द्युतपती । याहीच्या सत्रावीच्या किर्ति ।
अभिमान ज्याहीच्या पोटी । ढळन किल्ली...

ही चतुर्पता गाय जागी झाल्यावर त्या देहीला कळन की : सहाशास्त्रे, सहादर्शन, सहाजोग, या अठरा सह चार वेद अठरा पुराण,..ईत्यादी सर्व ठिकाणी या एकल्या धन्याचा विषय आहे. या सर्व ठिकाणी या एकाच चौथ्या निराकार निराधार आधीरूप आदीपुरूष आपरूप निरंजन धन्याचीच गुणगाण आपआपल्या दैवतेच्या आकाराला समोर ठेवुन केल्या गेलेली आहे. आप आपल्या दैवताचे नाव समोर घालुन या चौथ्या धन्याची महिमा वर्णिलेली आहे. *अठरा खेत्री उभा द्युतपती या टुकीचे अधीक ग्यान खंड०७/२६:-तारखेची ओवी निरसनातुन घ्यावे.* या अठरा खेत्री/ठिकाणी उभा असलेला हाच द्युतांचा पती असलेला चौथा चतुर्पती द्युतपती अवधुताच्या सत्रावीच्या जीवनकळा ज्योती व्दारेच त्या सर्व देही लिहण्यास, वाचन करण्यास, चर्चा करण्यास सक्षम झालेले आहेत. या चतुर्पतीने लावलेल्या जीवनकळा ज्योतीव्दारेच या आल्या-गेल्या देहींची किर्ति होत आहे.

या सत्रावी जिवनकळा ज्योती विना ते किर्ति तरी कसे करणार ? या जीवनकळा ज्योतीच्या प्रज्वलीत प्रकाशामुळेच प्रतेक जन आपआपल्या क्षेत्रात समोर गेलेले आहेत. प्रकाशीत झालेले आहेत. परंतु प्रकाशीत होवुन समोर आलेल्या पैकी ज्याहीच्या पोटी अभिमान येवुन राहील, त्याहीची ढळन गा किल्ली । कारण की : या अभिमानींचा होईन अपमान ।..

॥ अभिमानाचा होईन अपमान । त्याचे नोव्हे बा चैतन्य ।
निराकार आप आले पलटुन ॥ ०२/१७ जग ओळखेना...

ज्याच्या पोटी अभिमान राहील, त्याच्या आंगी या अभिमानाच्या व्दारातुन अहंकार शिरेल. ज्याच्या जवळ अहंकार राहीन, त्यांचे नोव्ह बा हे चैत्यन्य. कारण की : अहंकार हा हरीचा हाडवैरी असल्यामुळे एकतर हरी लाठी घेवुन आपल्या भक्तांचा हा अहंकार झाडेल, नाहीतर तो हरी त्या अभक्ताला खड्डयात लोटुन त्या अभक्तापासुन बहु दुर जाईल. त्या अभक्तांच्या जवळ हरीचे चैत्यन्य राहणार नाही. कारण की : हा हरी ज्याच्याजवळ सत् चा ठेवा आहे, तेथेच तो निराकार हरी आपरूप पलटुन येत असतो. इतरांजवळ नोव्हे । म्हणुनच सांगी करतो की :

ज्याच्या जवळ अभिमान नाही आहे असेच भुम्मा गोयक हरी गोळा करन. त्यां भुम्मा गोयकांना धन्याचे भजन पुजंन ध्यान सुमरन करण्याचा हक्क देईन. असेच धन्याने हाती धरलेले अभिमान नसलेले गोयक भजन पुंजन ध्यान सुमरन सिदाई.. ईत्यादी मार्गाने त्या चौथ्या चतुर्पती हरीला आलींगण देतीन. हा चतुर्पतीचा रमणा यवगा कारण त्यांच्या जवळ चालत येईल. अश्याच सच्च्या गोयकाच्या खुणा ऐका हो..

॥ ऐका गोळकाची खुणा । रमणा यवगाच्या कारणा ।
जागी करन तिरभवनां । सांगी केली...
त्वां मोहर वाजवली ॥ जाहीरण केली...

आता गोयकांच्या खुणा ऐका हो ! चौथ्या खुम्माचा जिव्हाळा ज्यांच्यात आहे, असे एका ठिकाणी गोळा होवुन सच्चेपणाने चतुर्पती आदीपुरूषाचे भजन पुजन ध्यान सुमरण..ईत्यादी करणारे, निर्भेव शुरविर खेत्री असलेल्या सच्च्या ग्यान व भक्त योगीं जनांना गोयक/गोळख असे म्हटल्या गेलेले आहे.

चतुर्पती आदीपुरूष आपल्या यवगाच्या कारणास्तव या गोयकाच्या देहीतील अकाशमात मध्ये उभा झालेला आहे. या चतुर्पतीचाच त्यांना पुरवा आहे. हा चतुर्पती धनी तिरलोक्यातील गोयकाला आपल्या संग घेत, या गोयकांना आपल्या यवगाच्या रमणा कारण आपल्या रमण्यात सामील करत निघाला आहे. हा चतुर्पतीचा रमणा या गोयकांच्या ज्योती जागृत करत करत, त्यां गोयकांच्या हद्यी देहीच्या मिर्तलोकी निरशुन्य निरंजन सोहंम् ज्योत स्वरूपी आलेला आहे. आउक यवग त्यांच्या देहघरी आणुन, त्या त्या गोयकाची ज्योत त्रिकुटावर चमकवुन अंगा अंगाच्या कपाटात गिरवत आहे. पाताळाची ज्योत आकाशी नेवुन तेथुन ती ज्योत बिजली प्रमाणे पाडुन अंगीन कपाटी च्या ज्योती उजळवत आहे.

या ज्योतीच्या प्रकाशा मुळेच त्या त्या गोयकांचे तिर तिरभवन जागी झालेले आहे. हे तिरभवन म्हणजेच त्या गोयकाची निजरूपी असलेली देहधरणी जागी करून, त्या गोयकाला तो चतुर्पती आदीपुरूष त्याच्या पुढे येणा-या यवगाच्या कारणा निघालेल्या रमण्यात सामील करून घेत आहे. या कृष्ण गोयकाचच सर्वकाही खर होत आहे. म्हणुनच याहीचच ऐका हो ! हे जाहीरण करून सांगतो...

॥ ऐका गोळकाचं खरं । भैस उभा यवगा वर ।
मोडुन व्दैताचा कारं । तक्ती येईन हा परमेश्वर ।
सांगी केली... त्वां मोहर वाजवली । जाहीरण केली...
॥ याहीच्या यवगाचा कार । सत्य चालन कारभार ।
सुखः होईन कुडीवर । सांगी केली....,
त्वां मोहर वाजवली । जाहीरण केली... ॥ २० ॥

गोयकाचे खर सांगन ऐका हो । हा भैस यवगान यवगात माया वेष म्हणजेच हिंदी भाषेत भेष घेवुन, विविध देहीच्या आकारात येत असल्यामुळे याला भैष/भैस असे म्हटल्या गेले आहे. हा भैष यवगान यवगात चतुर्पती ग्यान आपल्या सच्च्या भक्तांना परसत/वाढत आलेला आहे. कारण की : पुढे हाच भैस आपले मुळ सत् यवग आणुन आपल्या यवगावर चौथ्या खुम्मी उभा राहीन. आणी जे लोक दोन दोन हित जपत आलेले आहेत, दुजाभाव जपत आहे, म्हणजेच स्वतःच्या स्वार्थि हीतासाठी एकी कडे एक भजण्याचे सोंग/ढोंग करत आहे, तर दुसरीकडे दुसरा जपण्याचे ढोंग करत आहे. एकीकडे दाभिकता तर दुसरीकडे सात्वीकता दाखवत फिरत आहे. एकीकडे भोगपिपासुपणा, तर दुसरीकडे ढोंगी आध्यात्मीक सात्वीकता दाखवत आपले हीत जपत आहे. असे दोन दोन हीत जपणा-या दोहीतांचा कार तो एकला चौथा मोडुन काढणार आहे. याहीन मचवले ढोंग । या कृष्ण रायान ओळखला याहीचा रंग । म्हणुनच या भैसाच्या यवगाव्दारे त्या दोहीतांचे असत्य तो मोडुन काढणार आहे. असत्यच मोडीत निघाल्यामुळे, सत्याचा कार होण्यास वेळ लागणार नाही.

या भैसाच्या यवगात सत्याचा कार होणार असल्यामुळे, याहीच्या यवगात सत्य कारभार चालन. याहीच्या यवगाचा बहु कार मध्ये एक कार सत्याच्या होईल. हा कार कुडीच्या व्यवहारावर वर्चस्व गाजवेल. आणी या कार व्दारेच, सर्व देहीवर सुखः होईन. सांगी केली..

॥ कुडीपासुन अवघा व्यवहार । हा होय जीवनकळीचा कार ।
याहीच्या हाती आहे कार । कुडीवर आयुष्य चढवन थोर ।
सांगी केली...., त्वां मोहर वाजवली ॥ जाहीरण केली...
॥ ऐका निशःकलंकी वाणी । निरसुन टाकन तिरभवनी ।
सुखः होईन जीवाजनी । सांगी केली....,
त्वां मोहर वाजवली ॥ जाहीरण केली...॥ २२ ॥
॥ ओळखा जाहीरणाची खुणं । पुर्विपासुन केली जतन ।
शिक्का सेरूपी चढनं । सांगी केली...
त्वां मोहर वाजवली ॥ जाहीरण केली...

कुडीच्या सत् व्यवहार व्दारे समोर येणा-या भैसाच्या सत् यवगाचा कार येणार आहे. सत् यवगाचा सत्य कारभार आणण्यासाठी, आता या कुडीच्या व्यवहारात सत्य कारभार आणावा लागेल. भैसाच्या या सत्य कार ला हातभार लावण्यासाठी, तुम्ही आतापासुनच आपल्या कुडीच्या व्यवहारात सत्य कारभार करावा लागेल. तेव्हा कुठे तुम्ही भैसाच्या यवग आणण्याकरीता ख-या अर्थाने योगदान केले आहे, असे आध्यात्मीक विश्वात मानल्या जाईल. तुम्हाला या तुमच्या कुडीपासुनच हा सत्य व्यवहार करत जावे लागेल. कुडी ही शंक आचार विचाराची म्हणजेच शंकाचारी ठेवावी लागेल. कारण की ही कुडीच सत्रावीच्या जीवनकळा ज्योतीच घर होय. हे घर तुम्हास निश्कलंकी व शुध्द सत्व शंकाचारी ठेवावी लागेल. या कुडीतच तो चौथा मालक तेजोगुणी अंश रूपात आहे. या मालकानेच ही जीवनकळा ज्योत प्रज्वलीत ठेवलेली आहे. तोच या कुडीत षोडस्कला कलाने वावरत आहे. हा मालकच सत्रावीचा पाझर फोडुन अमृत गंगा झरझरा वाहवन.

या देहीमध्ये जो तिरगुणांनी कल्लोळ माजवला आहे, तो कल्लोळ मोडुन काढेल. या कार व्दारेच देहीतील सर्व चैतन्य या एकल्या धनी चरणी एकवटेल. देहीच्या चौथ्या धनी चरणी जेव्हा या देहीतील सर्व चैतन्याचा शिक्का अर्पण होईल, तेव्हा तो धनी या कुडीत सेरुपी उभा राहुन चैत्यन्याचा शिक्का आपल्या हाती घेईन. देहीच्या चैतन्याचा शिक्का भैसा हाती आल्याने या देहीवर भैसाचे राज्य येईल.

असे बहु सच्चे भक्तजन लोकांच्या कुडी वर राज्य आल्यानंतर, मग चतुर्पती चा चारही बाजुनी असलेला चौकोणी मेद्य या चतुर्पती भैसामुखच्या चतुर्पता अथर्वन् वेदाचे निरंजन ग्यान सह देणं चे छोले यांचा वर्षाव बरसन. या चौकोणी मेद्याच्या निळावंती वर्षावाने एकच चतुर्पती ग्यानाचे पिक येईन. एकच वर्णाची एकच ज्वारी येईन. चतुर्पती नाम ग्यान भक्ती भजन पुजन ध्यान सुमरन चे सर्व बाजुने एकच पिक येईन. एकल्या एक चतुर्पतीचे पिक सर्वत्र दृष्टीस येईन.

या चतुर्पतीच्या पिकाकडे आकर्षित होवुन वैकुंठ, कैलास, इंद्रपुरी, यमपुरी....ईत्यादी ठिकाणचे जाळामुळापासुन गडी या चतुर्पती पंथात दाखल होवुन येतीन. ते येथे धन्याच्या प्रकाशाने न्हावुन निघेल. हे सर्व जाळामुळापासुन आलेले गडी प्रकाशीत होईन. प्रकाशीत गडयांच्या मागे मागे ज्यांना चतुर्पती अवधुत नाम माहीत नाही, चतुर्पती ग्यानाचा गंधही नाही, असे सच्चे भक्त जन या चतुर्पती पंथात दाखल होईल.

असे हे दाखल झालेले कोरे धान्यं ला खतपाणी घालुन तो चौथा चतुर्पती पिकवन. देहरुपी आंबा अपाडी पिकन ! येथे देही कमी वेळात परीपक्व होवुन, चतुर्पतीच्या रसाने लदबदुन जाईल. या नव्या को-या धान्या मुळे आलेल्या को-या पिकांमुळे चारही बाजुने चारही कोणातुन सर्व गडी आकर्षित होवुन गोळा होतीन. चौकोणातुन चौकोणी गडी गोळा झाल्यावर चारही बाजुने चतुर्पतीचा निळावंती ढग बरसु लागेल. चतुर्पतीच्या भक्ती ग्यान रसाची गंगा वाहेल.

म्हणुनच कृष्णा सांगी करतो की : या निशंःकलंकी देवाची वाणी तुम्ही ऐका हो ! हा निशंःकलंकी धनी आल्यावर या कुडीवर सुख येईल. सुख नाही मावणार या कुडीच्या तिर तिरभवनी । दुःख नाही दिसणार बा स्वप्नी ।..

अश्या या यवगान यवगीच्या पुर्विपासुन जतन केलेल्या खुणा तुम्ही मन लावुन शोधा हो ! मन लावुन ओंळखा हो ! हाच धनी सेरुपी येवुन आपला चौथा चैतन्य शिक्का या देहीवर या तिरलोकी चढवन. चतुर्पतीचा चंदनाप्रमाणे परमय/सुगंध सर्वत्र पसरेल. कारण चंदन शिक्काची मोहर त्या धन्याचीच आहे. त्या धन्याच्याच हाती अवघी किल्ली आहे. होती नव्हती नाही दिली किल्ली धन्याने कुणाच्याही हातात ! धन्याचा तो मोहर शिक्का सेरुपात या देहीवर वाजवुन देहीच्या चवही ताळात उजाला पाडन. हे जाहीरण करुन सांगतो कारण की : त्यांनी तशीच सांगी करुन त्या सांगीवर आपला सत्तेची राजमुद्रा असलेला चंदनाचा शिक्का म्हणजेच मोहर ठोकुन/वाजवुन मान्यता दिली आहे.

॥ सांगी झाली अंतराळी । महाराजा पुर्ण करुन दया सही ॥



**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०२ ॥

॥ ओवी नं. १७ ॥

ओवी महात्मः- भजनात जर लष्टान आले असेल, तर हमखास म्हणण्यात येणारी...

॥ मुळावरची ओवी ॥

# ॥ सावंग नगरी ज्योत भारी ॥

या ओवीची पलट ओवी खंड०७/ओवी-०७ मध्ये दिलेली आहे.

॥ सावंग नगरी, ज्योत भारी । दिसते केवळ ।
कलयवगा मध्ये, नाम निघालं । अग्नीचं घरं ॥धृ॥
किंवा म्हणनी २ चे धृपद :- ॥ सांगी खरी ज्योत भारी । दिसते केवळ ।
कलयवगामध्ये नाम निघालं । अग्नीचं जाळं ॥
॥ कोण्या ठायी, वसे नाही । कोणाला मालुमं ।
पृथ्वी मध्ये, ठोंग मचवलं । पहा घुमा-यानं ॥
॥ हुकुम केला देवरायानं । हुकुम बंद केलं काम ।
घुमा-याचे, देव्हरे मोडले । पहा या शक्तीनं ॥
॥ सहा शास्त्र, ग्रंथ लिखीत । काय होते यानं ।
योगी या जोगी याहीचं । मोडले अनुष्ठानं ॥
॥ अगाध पोथी, पुराण गीता । वाचतां कुराणं ।
बम्हा विष्णु, शाहीर थकले । आणीक तिरनयनं ॥०५॥

॥ नउ खंडामध्ये, एकच रूप । तुम्ही धरला अवतार ।
व्दैत पाखंडाचं, चालु नाही । देणार जरा भर ॥
॥ हाती घेवुन, खंजीर करे । व्दैताचं निरसन ।
नउखंड पृथ्वा, जागी/जम्मा कराले । नाही लागणार खिनं ॥
भजने :- ॥ नव खंड पृथ्वी, दहावा खंड काशी ।
याहीचा हिशोब घेईन, खिनात/क्षणात एका दिवशी ॥
॥ नवखंडा मध्ये एकच देवा । तुमची गर्जनां ।
इंद्र चंद्र गणी गंधर्व । येतीन तुम्हा शरणा ॥
॥ कोण ठिकाण, कोण मकाण । कोण तुमचं नावं ?
पृथ्वी वरत, राहो देवा । तुमचेचं नावं ॥०९॥

॥ अल्लाद वस्तु, थोर गडेहो । हेचं होय, माझं माहेरं ।
लहान, मोठे थोर हद्यी । अवघे बराबरं ॥
॥ आदीपुरूषाच्या, मुखचा होय हा । सत्य शकुनं ।
नामीच राहा, गडे हो । एकच, भावं धरूनं ॥११॥

डहाकी :-
॥ नामी जडल्या, उपर नसावं । देही ला मरणं ।
चरण चारीया अवतार यवगावर करते तारणं ॥

भजने :- ॥ नामी/भजनी राहयं करन संभाळ । धर या कृष्णदेवाचे पाय ।
करनं या भक्तीचा संभाळ । भजनी राहयं करनं संभाळ ॥
॥ शुर विरा, बांध कंबर । निघ बाहेरं ।
तुला पाहता । धरणी, कापे थरथर ॥
॥ खेत्री बाहेर निघाला । रमणा यवगाचा, हाती धरला ॥
॥ खेत्री ढाल पटाईत । उभा राहीला हो, या भजनात ॥
॥ खेत्री शुरविर भगवान । या गोपाळा साठी, आला धावुन ॥
॥ खेत्री शुरविर भगवान । या गोपाळाला, ने बाप्पा तारून ॥
॥ भाल्या वरत, भाले रंचले । खेत्रीयांची शाळा ।
खेत्रीयांची शाळा, यामध्ये खेळे । कृष्ण राया ॥
॥ दरबार या देवाचा होयं । वर पंजा, आदीपुरूषाचा आहयं ॥

॥ दरबार द्युतांचा होयं । निळवंतीचा इथ न्याय आहे ॥
॥ दरबार द्युतांचा होय । ख-या खोटयाचा, इथं न्याय आहे ॥
॥ हे होय देवाचे लाल । आपल्या मुखांन, चांगला बोल ॥

## -: निरसनसह शब्दार्थ :-

**घुमा-या** :- या घरून त्या घरी फिरणारा, एका ठायी न बसता अनेक ठायी वसुन अनेक ठिकाणे घुमणारा, कोणास न सापडणारा, कोणास याचा पत्ता ठाव ठिकाणा सांगता न येणारा, गाव नाही शिव नाही, आहे परवेशी... असा जो तो घुमा-या.
**अग्नीचे घर** :- तेज गुण आदीपुरूषाचे तेजगुणी नाम/घर, आदीपुरूषाच्या तेजोगुणी अंशअवतार असलेल्या केवळ अहिन आत्म्याचे अंतिम मुक्कामाचे अक्षय ठिकाण । **खिन** :- घडाळाचा एक क्षण । **शाहीर** :- महिमा चे गायन करणारे ग्यानी. । **दोहीत** :- दोन दोन हित जपणारे, आकाराला भजणारे । **खंजीर** :- नाम हे तलवार ईची कोणी ना धरे धार ! हेच नाम खंजीर होय. या अमृताची कुपा असलेले नामरूपी खंजीराने व्दैताचे निरसन करावे. । **अल्लाद** :- आल्हाददायक आनंदयुक्त । **नव खंड** :- ब्रम्हांडातील पृथ्वीचे नव खंड तसेच पिंडीतील देहरूपी धरणीचे नव खंड. पिंडीतील नवखंड :- सांधे जुळणी पासुन देहीचे भाग वेगवेगळे केल्यास पायाचे ४खंड, हाताचे चार खंड व धड असे नउ खंड देहीचे होतात. आणी शेवटी उरतो तो दहावा खंड म्हणजे मस्तक ! नवखंड चे अधिक ज्ञान देहवर्णनाच्या ओवीतील घ्यावे.



**केवळ** :- फक्त एकटाच शिल्लक राहीलेला, चारही देही सोडुन फक्त पाचव्या कैवल्य/केवळाचा आनंदाची ज्योत बनुन राहीलेला निश्कलंकी कृष्ण आत्माराम.

### नवखंडा मध्ये एकच रूप :-




ब्रम्हाडी नवखंडामध्ये प्रतेक सजीवात तो धनी निराकार निराधार चैतन्य ज्योत रूपात एकच सेरूप घेवुन उभा आहे. तसेच पिंडीतील नवखंडामध्ये त्या धन्याचे सेरूप एकच आहे. तो एकच धनी चैतन्य ज्योतरूपी आपला तेजागुणी अंश अवतार घेवुन निराकार निराधार निर्गुण चैतन्य-ज्योर्तिमय आत्माराम बनुन अनेक नवखंड देहीत उभा आहे. अश्या प्रकारे पिंडी या ब्रम्हांडी त्या धन्याचे एकच निराकार निराधार निश्कलंकी चैतन्य-ज्योर्विमय रूप घेवुन सर्व ठायी उभा आहे. हाच या जगाच्या देखता चैतन्य ज्योतिमर्य रूपात सर्व जगात सर्व देहीत वसलेला आहे. आदीपुरूष भैसाची हीच चैतन्य ज्योत या देहीच्या आत्म ज्योतीमध्ये खेळवा. आदीपुरूष भैसाचे हे विश्वातील चैतन्य जग चांगले पाहत आहे तरीसुध्दा हे जग याला ओळखेना, सांगतो ग्वाही कोणी ऐकेना ।

**गर्जना** :- एकच होईन आरोही जागी करन पिंडी या ब्रम्हाडी ची चौताळी ! राहो देवाच्या या एकच गर्जना मुळे पिंडी या ब्रम्हांडाचे नवखंड जागी होण्यास नाही लागणार खिन/वेळ. नवखंड पृथ्वा व दहावा खंड काशी वर पसरलेले तिरगुणांचे तिन पदर, तिरगुणांचे शुन्य उडवण्यास नाही लागणार खिन...

॥ काशी सारखा तिर्थ हे ब्रम्हया ! आहे तुझ्या पाशी ।
पाय धुवुन तिर्थ पितिल । तरी त्यास अमृत नाही ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥

॥ ओवी नं. १८ ॥

॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ जाहीरणाची ओवी ॥

॥ बहुत यवग, जाहीरण करतो । मानेना कोणी ।
या जाहरणा पासुन, रंचना झाली । तिर भवनी ॥
॥ बम्हा विष्णु, शंकर केले । माया पासुन ।
आधी माया, शक्ती झाली । जाहीरणा पासुन ॥
॥ जोहार माझा, जाहार चातुरा । भला भेद पाहयं ।
दो चव रूपां मध्ये आदीरूप । कोणाचं आहे ?
॥ हाती काठी, घेवुन उभा । दरवाज्या पाशी ।
सर्वत्राला, मुजरा बाप हो । भाकर दया माझी ॥०४॥
किंवा जळगाव :- दुरच आहो उभा दादा हो । भाकर दया माझी ॥

॥ हाती काठी, घेवुन हिंडतो । शहरात/पेठीत जावुनं ।
सर्वत्राला, मुजरा बाप हो । करतो लवुनं ॥
॥ अवघ घेतल, हिरून । नित/नगीन, नागोळा केला ।
कुठ नेता, कुडीला ? कुडीचा, नक्षा उतरला ॥
॥ शिर खांदयाशी, घेवुन उभ्या । गल्ली मिरवला ।
भरल्या वस्तीत याहीचा न्याय । कोण नाही केला ॥
॥ नाही गवसल; पेणं/केनं । रूपया, अस्सल/हशील घेतला ।
ईशव/विश्व घाटावर, त्या नरानं । ठेका बसवला ॥०८॥

॥ अठरा खुम्मावर, उंच घर । कोणाचं आहे ?
त्या नराची, लाथ लागता । तो देह पवित्र आहे ॥ ॥
॥ साडे तिन हात जागा । देल्ली त्याला ।
मुखा मध्ये पाणी टाकुन । मातीत/अग्नीत घातला ॥..जळगाव
॥ अखेर/आणीक चौक्या, मुस्सुंडी मध्ये । तो नर बम्हया शुर झाला
देहे उरीची, जागा साहय । देव कराले आला ॥ ११ ॥

भजने :-

॥ उरली जागा साहयं केली । अनामत रायानं उजळल्या ज्योती ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ ओवी नं. १९ ॥

॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ जाहीरणा पासुन पक्की रंचना ॥

॥ बहुत यवग, जाहीरण करतो । मानेना कोणी ।
या जाहीरणा पासुन, पक्की रंचना । झाली तिर भवनी ॥
॥ ऐसा महार, करतो जोहार । यवगाच्या वर ।
यवगाच्या वर, कैसे हे ? जीवन कळीचे घर ॥
॥ येशीचा, येशकर कैसा । बोलता झाला ।
या भुम्मेच्या, ठायी येवुन । तो उतरला ॥
॥ हाती काठी, डोहीवर पाही । उभा दरवाज्याशी ।
पंच भुती, नांदती यमाच्या । दाढया सोडती ॥

॥ हाती काठी, घेवुन हिंडतो । शहराच्या काठी ।
होती पुर्विची, भाकर देवा । दया हो आपली ॥
॥ येशी वर, जावुन याहीनं हो । जागा मोजली ।
सर्वच घेतलं, हिसकुन चोरांचा । नक्शा उतरला ॥
॥ खांदी घेता, गल्ली मिरवता । उभ्याच गल्लीनं ।
भरल्या नगरा, मध्ये सोय । नाही, लावली कोणं ॥
॥ ईश्ववं/विश्व घाटावर, या नरानं । ठेका बसवला ।
कुठं उचलता, चोरा रूपया । हशील दे मजला ॥

॥ साडे तिन हात जागा । देल्ली हो त्याला ।
मुखा मध्ये पाणी टाकुन । मातीत/अग्नीत घातला/लोटला ॥
॥ अखेर मुस्सुडी मध्ये तो नर । बम्हयासुर झाला ।
देह उरलीसे जागा साहयं देव कराले आला ॥
॥ अठरा खुम्मावर, उंच घर । कोणाचं आहे ?
त्या नराची लाथ, लागता । तो देह/नर, पवित्रं आहे ॥
॥ प्रातःकाळी, उठुन म्हणे । रस्त्यावर घर ।
रस्त्या वर, घर म्हणुन मी । करतो जोहारं ॥

॥ ऐसा महार, करतो जोहार । यवगाच्या वर ।
या महारा विना, काम चालेना । सुना दरबार ॥

**भजने :-**

॥ अवतार साहयांचा नंदन । याहो महाराजा, करा देहीचं राखन/जतन ॥

## ॥ निरसनसह शब्दार्थ ॥

**जाहीरण** :- यवगान यवगात आकारी रूपाचा आकार घरून, आकाशवाणी व्दारे जाहीर करून सांगणारा- आदीपुरूष परमात्मा आणी त्याचा तेजोगुणी अंश असलेला आत्मा ।

**जोहार** :- लवुन मानाचा मुजरा करने । **दोचव** :- दोन अस्तुरी पुरूष हे चार खाणीचे, चौखाणीपैकी प्रतेक खाणीत हे अस्तुरी-पुरूष म्हणजे नर-मादी हे दोघे असते. आणी त्यात आदीरूप कोणाचे आहे ? याचा भेद पाहयं । **चौरूप** :- आदीमायाशक्ती, बम्हा विष्णु शंकर ।

**१८ खुम्म** :- ०६-शास्त्रे, ०६-जोग, ०६-दर्शन चे ग्यान सांगणारे १८ पुराण ।

**लाथ**:- चरणस्पर्श, पाय । ॥ अल्लाद आहे त्याचे पाय, नाही लागले या देहधरणीला । त्याचीच करतो आवड धनीदेवा ! कधी यालं भेटीला ? ॥

**भाकर** :- आधी केली धरणी शुध्द । करता पुंजन । हेच माझी भाकर ! म्हणजे ही देहधरणी अंर्त-बाहय शुध्द करून, शुध्द आचार विचाराने सरळ साध्या सिदाईच्या मार्गाने राहुन शुध्द सच्चे भावाने चंतुर्पतीचे भजन पुंजन करणे, अश्या पध्दतिने नामाचे भोजन घेण्याची माझी भाकर करून, त्याचे भोजन नाही देल्ली कोणं हो देवा ।.

**लवुन** :- लव लावुन म्हणजे प्रेम लावुन, गोडी लावुन आणी लवुन म्हणजे प्रेमाने नम्रपणे वाकुन नमस्कार करत मुजरा ।

**शिर खांदयाशी** :- शवयात्रेत जसे समोरच्या दोन खांदेकरुच्या खांदयाशी शवाचे शिर/मस्तक असते तसे शिर खांदयाशी. । **उभ्या गल्ली** :- सरळ अरुंद बोळ/रस्ता ।

**हिरुन** :- हिसकावुन । **नगीन-नागोळा** :- अंगांवर एकही कपडा न ठेवता उघडाबंब । **कुडी** :- देही । **नक्षा उतरणे** :- अहं, माज, चैतन्य....ईत्यादी सगळे काही जाणे । **रुपया** :- खणखणीत वाजणारा चतुर्पती नामाचा रुपया-ज्याव्दारे सर्वकाही मिळु शकते.

**अशिल/हशिल** :- वापस देण्याच्या बोलीवर उसना दिलेला, तात्पुरता हाशील केलेला म्हणजे हशील ।

**पेणं** :- विसाव्याचे ठिकाण, परमात्मा चे ठायी विसावा देणारा मुक्काम, नामाचे भोजन मिळण्याचे ठिकाण अधिक ग्यान खंड०७/२६ च्या शब्दार्थ मधुन घ्यावे ।
**केनं** हा शब्द कनोपनिषद् या उपनिषदात सांगीतलेल्या परमात्माप्राप्ती करण्याच्या मार्गाकरीता वापरलेला राहु शकतो ।

**ईसवं/विश्व घाट** :- ईश्वर प्राप्त करण्यासाठी लागणारे नागमोडी हेकोडे तेकोडे वळणाचे रस्ता असलेला मार्ग जसे पिंडीतील १ ला घाटः- त्रिकुट संगमी, । २ रा घाटः- त्रिकुटशिखरावरी वेष्णवी-श्रीहाट, । ३ रा घाटः- शैवी-गोल्हाट, । ४ था घाटः- सत्यलोकी -औटपीट । ५ वा घाट ब्रम्हरंध्र जिथे जिव-शिवाचे ठाणे आहे त्या टाळुस्थानी श्रोत्रस्थानापासुन येणारी ब्रम्हगुफा /भ्रमरगुंफा । असे घाट या पिंडीत आहेत. या घाटांवर चौकी बसुवुन एक एक चौकीदार तेथे नेमुन तो परमात्म्या ठेका वसवतो. परमात्माला त्याच्याच अस्सल नामाच्या रुपया देवुन, काही जाणते योगी पुनःपुनः देहीच्या अंर्तबाहय येणं-जाणं करु शकतात. ईतर सर्वसामान्य येवु शकत नाही. तसेच ब्रम्हांडाच्या इश्वर प्राप्तीच्या घाटावर सुध्दा या इश्वराने ठेका बसवला असुन तेथे सुध्दा नामाच्या रुपया घेतला जातो तेव्हाच तेथे प्रवेश मिळुन तेथिल सर्वकाही मिळु शकते.

**मुसुड्डी/मसुंडी** :- स्मशान भुमी. ।

**देह उरीची जागा** :- जिथे देह ठेवला/सोडला/जीव जावुन देह उरला ती जागा । त्या जागेवर तो नर-ब्रम्हया शुर बनुन उभा राहुन, तो पुना पुनः आपले भक्त सखे-सोय-यांच्या साहयास आला.



**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. २० ॥
॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥
॥ देही-आत्मपुरुष-शिव चे बोल/संवाद ॥

## ॥ माझ घर मला नाही ठाव ॥

॥ माझ घर/ठिकाणं, मला रे बापा । हे नाही ठाव ॥ घृ ॥
कोण्या वंशी, जीव माझा । नाही पाहीला देवं ॥
॥ देहे जीवाचे, मुळ यवगाचे । कोणी एक सांगा हो ।
पिंडा मध्ये, जीव-शिव । दोन्ही नांदवा हो ॥
॥ आलो बंन्शी/वंशी, झालो पंथी । उभा पायरीशी ।
आहे माझ्या मागं निमित्य । गुंतलो/लागलो चाकरीशी ॥
॥ परोपरीच्या, केल्या/आहे पाय-या । परी उभा आहे ।
तिर गुणांचे, ओझे टाकुन । पलीकडे पाहावें ॥ ०४ ॥
किंवा :- तिरभवनाचे/तिरलोक्याचे एवढे ओझे । न टाकुन जावे ॥

॥ परोपरीचे, पिंड राया । विटाळी घडले ।
त्या पिंडाचे, तिर्थ रे बम्हया । कोणाचे झाले ? ॥
॥ माया आंगी, विटाळ आला । त्याचा, पिंड घडलां ।
त्या पिंडातुन, हंस आला । कोणाचा झाला ? ॥
॥ माया आंगी, विटाळ । पिंडीं, दुरच बसवलां ।
माझ मजला, शुध्द/गोड रे बाप्पा । कस टाकु त्याला ? ॥
॥ त्याचं पिंडा धरणी जागा । ठेवलं वजीनं/वज करूनं ।
हेच माझ्या, कामा येईन । पुढं पांघरून ॥ ०८ ॥

॥ धरणीत/घरात वसनां, बाहेर मसनां । बरी, केली सोय ।
काय उपाय कराव म्हणता । आमचा देव आहयं ॥
किंवा:- त्याचं काय करावं म्हणता । आमचा देव आहयं ॥ ..जळगाव
॥ तुम्हीच देव, तुमचा जीव । तोही, घेउन जाता ? ।
चतुर्पता, वेदांत गाय । इच्यावर, राहो सत्ता ॥
॥ चतुर्पता, वेदांत गाय । ही आहे पोटा ।
कोण्या नामानं, शुध्द अनामीक । दुरच होय म्हणता ?
॥ दुरच असतो, उगाच बसतो । का देता हाका ? ।
तिन ताळाची, करतो चाकरी । चाकर आहो तुमचा ? ॥१२॥
किंवा जळगाव :- ॥ दुरच असतो उगाच बसतो । नाही माझी सत्ता ।
तिताळा ला हाका मारता । चाकर आहो तुमचा ॥

॥ तिर ताळाची, करतो चाकरी । उचलतो गाय ।
आधी केली, धरणी शुध्द । तुम्ही करता काय ? ॥
किंवा जळगाव :- आधी केली, धरणी शुध्द । तुम्ही त्याचं करता कायं ?
॥ आधी केली, धरणी शुध्द । करूत्याच/कर्त्याचं/करताचं पुजनं ।
किंवा जळगाव :- आधी केली, धरणी शुध्द । जग करतीन पुजनं ।
हेच माझी, भाकर बापा । नाही देल्ली कोणं ॥ १४ ॥
॥ शुध्द असता, धरणी हो राया । करावं पुंजन ।
आता उगीच राहुन करां । अनामताचं पुंजन ॥
किंवा :- आता नका लाजु गडेहो । करा, अनामताचं पुंजन ॥

॥ बारा अवसा, बारा पुनवा । पुंजता धरणीशी ।
चोवीस आ-हे-गि-हे लावले । चंद्र-सुर्याशी ॥१६॥
॥ चंद्र-सुर्याने, आ-हे/आले गि-हे । कोठवरं भोगावं ? ।
कधी मिटन, चौ-यांशी ? ब्रम्हया ! याचं, पंचांग पाहयं ॥
॥ आकाशी चंद्र-सुर्य काशी । धरणी वर आहे ।
कोणं दिले ? कोणं आणले ? । कोणाचें होये ? ॥
॥ आकाशी चंद्र-सुर्य काशी । धरणी वर येणारं ।
कोणं देखीले ? कोणं पाहले ? । पुढेच होणारं ॥ १९ ॥
॥ काशी सारखे, तिर्थ ब्रम्हया । देल्ले तुया पाशी ।
पाय धुवुन पेतीन जग । त्यामध्यें अमृत नाही ॥२०॥

॥ चतुर्पता, वेदांत गाय । हे माझ तिर्थ ।
कसं मी टाकु इला । इनं, जगवला पिंड ॥
॥ तिर्थ पिंडीं, वस्ती याहीची । दुरच होय म्हणता ? ।
तिर्थ-पिंडाच्या, दुरच असते । का देता हाका ? ॥
॥ पिंडा मध्ये, पोहन-पाणी । नांदे, इच्छा कर्तार ।
कल यवगी, वस्ती ठेवनं । हे माझं घरं ॥
॥ ज्यांच घर, त्यांच मुळ । तो गायप झाला ।
किंवा :- तुमचे हे घर, यवगाचे मुळं । तु गायप झाला ?
कल यवगात आला भैस । यवगाचा दोरा ।
सत यवगात, येईन भैस । यवगाचा राजा ॥ २४ ॥

॥ महा महा, योगी उभे । राहतीन यवगाले ।
शक्ती मागनं, रूतं लज्जा । येईन/पडनं अवघ्याले/योग्याले ॥२५॥
॥ चारबीजं हाती घेवुन भैस । रूतं, देईन शक्तीले ।
शक्ती आंगचा, विटाळ । शुध्द करन, भैस अवघ्याले ॥
॥ आधी शुध्द, मंध्यी शुध्द । झाले भैसानं ।
आता नका, लाजु करा हो । अनामीकाचं पुंजनं ॥
॥ तिर लोक्याचे, पुंजन अनामीक । करन एक भावं ।
पुंजना वेगळे, राहतीन । वाया, जातीन ते जीवं ॥ २८ ॥

॥ अनामीकाला, पुंजारपण । देल्लं देवानं ।
तिन यवगाचं उसनं । गादीवर, घेईन भरूनं ॥ २९ ॥
किंवाः- तिन यवगाची, गादी स्थापना । घेईन उकलुन ॥..जळगाव
किंवा :- ॥ अनामीकानं, तिन यवग । केले पुंजन ।
उभा राहीन, गादी वर । उसनं घेईन भरून ॥

भजने :-
॥ भाव धरा भक्ती करा । भावीका साठी देव भावीक झाला ॥
॥ भाव या अनामीकानं केला । देव वचनात अखंड गोयला ॥
॥ अनामीका घरी आला । भाव पाहुन देवराया उतरला ॥
॥ ज्याचा भाव त्याची भक्ती । विठोबा राया, देव त्याहीच्या संगती ॥
॥ ज्याचा भाव त्याची भक्ती । देव राया, आहे त्याहीच्या संगती ॥
॥ देव भावाचा भुकेला । चाकर आहे, तो सच्च्या भक्तांचा ॥
॥ देव भावाचा भुकेला । देव नाही, कोणाच्या बापाचा ॥

निरसन पुढील पानावर....

॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ निरसनसह माझे घरं । मला नाही ठावं ॥

- : निरसन/स्पष्टिकरण : -

॥ माझं घर/ठिकाण मला रे बाप्पा । हे नाही ठावं ।
कोण्या वंशी, जीव माझा । नाही पाहीला देवं ॥

हे आदीपुरूष शिवा ! जेव्हा या आत्मानं देह धारण केला नव्हता, तेव्हा पुर्विपासुन सोहंम् रूप या आत्माचं होतें. ते आधी रूप निराकार होतें. तेव्हा कुठच नव्हत काही, हे आधी रूप अगोचर होते. आदीपुरूष महाराज तेव्हा चरांचर होते. आणी त्या आदीपुरूष धन्याच्या आंगचा निराकारी तेजोगुणी अंश असलेला आत्मा हा त्याचां गडी बनुन आदीपुरूष महाराजा संग होता.

हे आदीपुरूषा ! तुम्ही चरांचर व्याप्त असे निरंजन ज्योत स्वरूप घेवुन उभे झालेत. या तुमच्या निरंजन रूपाने 'मो-ह सृष्टी रंचावी' अशी ईच्छा तुमच्याच चरांचर व्याप्त मनात धरली. त्या इच्छेमुळे बहु कार घडलेत. शक्ती उद्‌भवली. सृष्टी रंचनेचा खेळ उभा झाला. त्रिदेव उभे केले.. ईत्यादी अनेक कार करत त्यांचा कार तु निभावत आला. आदीपुरूष आदीगण-खंड०१/०१/०१, शक्ती-०१/०२/०१ व अजात ओवी-खंड०२/१३ चे निरसन वाचा ।

तुम्ही केलेल्या अनेक कार पैकी, एक कार म्हणजे तुमच्या मो-हं सृष्टी रंचावी या ईच्छेपुर्ति करीता तुमच्याच हुकमाने तुमचेच आंगचे तेजोगुणी अशं असलेल्या आत्मा-गडयांनी सृष्टीत रहित नांदवण्यासाठी प्रकृतिच्या योनी मध्ये उडया घेतल्या. या आत्म्यांनी प्रकृती मध्ये प्रवेश घेवुन, या प्रकृतिचे प्रवेशी/परवेशी बनुन देहे धरलीत. हे तुझेच आंगचे तेजोगुणी अंश देहधारी झालेत.

जेव्हा हे आत्मे परवेशी झालेत, तेव्हा ते प्रकृती-मायेच्या तिन गुणांच्या विकारांच्या वर्चस्वा खाली आलेत. मायेच्या तिरगुणांसह ईतर विकारांच्या वर्चस्वाखाली येवुन ते शंक आंत्मे देहधारी झालेत. प्रकृति मध्ये देहधारी बनुन देहीच्या मन, बुध्दि, अंहं, सह मायेच्या तिरगुणांनी बध्द होवुन, ते शंक/निशःकलंकी पवित्र आत्मे हे जिवात्मे झालेत.

अश्या रितीने हा शंक आत्मा प्रकृतिच्या गुणांनी बध्द होवुन जिवात्मा झाला. जिवात्मा बनुन मायेच्या तिरगुणांनी बांधला गेला. तो जिवात्मा आपल्या देहीचे ईद्रिंये, विषय वासना विकार..ईत्यादी मध्ये मायेव्दारे अडकवल्या गेला. जिवात्म्याने विषय वासनाच्या विषया डोही डुबकी मारली. आणी या आत्माचा मायेनं इथंच घात केला. मायेने जिवात्म्यांच्या मागे चौ-यांशी चा फेरा लावला. आता या मायेच्या पोटी राहुन, या मायेला धोका देत मज नाईलाजास्तव केव्हा न केव्हा तरी या मायेचा घात करावा लागेल. तेव्हाच माझी सुटका होईल, हे मी जाणतो. याच करीता मज सत्‌सार चे भोजन देणा-या देहीची साथ हवी आहे. अश्याच देहीच्या शोधात मी फिरत राहतो.

मायेने माझा घात केला. मी म्हणजेच हा आत्मा/जिवात्मा या चौ-यांशीच्या फे-यात अडकलो. आणी माझे मुळचे घर विसरलो. या चौ-यांशीत या देहीचे बालपण-तारूण्य-वार्धक्य पाहत न पाहत, कितीतरी नवे नविन देहे टाकत नवे नवे देहे धारण करत फिरलो. या कितीतरी देहीत आला-गेला हा जीव ! याची गिणती मज नाही हो ठाव ! यवगान यवगात या आत्माचे कितीतरी अवतार झाले असतील. कितीतरी वंशात जन्म घेतला असेल. परंतु कोण्याही वंशी या आत्माचे जे मुळचे ठिकाण आहे, जे माझे मुळचे घर आहे,

ते ठाव/माहीत झाले नाही. या अहिन आत्म्याच्या मुळचे अहिनाघरचे निरंजन ग्यानाचे भोजन या निरंजन आत्म्याला मिळाले नाही. त्याचमुळे माझा मुळयवगाचा मुळचा सत्यदेव आदीपुरूष भैस नारायण गवसला नाही.

स्वतः इश्वरी अंश असुनही मायावी तिरगुणी मायेच्या तिरगुणांच्या संगतीने मी मायावी बनलो आहो. इश्वरी अंश विसरून गेलो आहो. त्याचमुळे आता मुळयवगाचे मुळावरचे अहिनाघरचे चतुर्पती ग्यान घेवुन शंकाचारी होवुन मुळस्वरूपात जावे लागेल. आपल्या मुळावरच्या मुळघरी जावुन या मुळघरचा मालक असलेला अजात अहिन चतुर्पती आदीपुरूष धनी यांचा संगतिचे गडी बनुन राहावे लागेल. किंवा या अदिपुरूष धन्याच्या ज्योतीमध्ये सपुर्णतः विलीन व्हावे लागेल. आता या जन्मीचं हे देहघर या आत्मगडयांची या इच्छा पुर्ण करेल काय? हे मज नाही ठाव !

या जन्मीचा देहीचा रथ मज आत्मास आता कोण्या मुक्कामा पर्यत नेवुन पोहचवेल ? हा देह-रथ कोण्या ठीकाणी थांबेल ? कोण्या मार्गाने जाईल ? हा देह-रथ मला सारथ्थ देवुन चतुर्पती मार्गाने मज नेईल ? कीवा ही देही कोण्या तिरगुणींचे ऐकुन स्वार्थि तिरगुणी गुरूच्या हाती या देहीचे सारथ्य देवुन भलत्याच मार्गाने मज नेईल ? या देहीने निवडलेल्या मार्गाने मला माझ्या मुळठिकाण चे अहिनाघरचे निरंजन चतुर्पता ग्यान मिळेल काय ? या देहीने पकडलेल्या मार्गाने माझे मजला स्वःस्वरूप दाखवुन, या चौ-यांशीच्या फे-यांतुन मजला मोक्ष देवु शकेल ? कीवा पुन्हा याच ८४शी मार्गाने फरफटत ठेवेल ? याचा ठाव-ठिकाणा मज नाही गा ठाव. ! म्हणुनच, आता या चतुर्पती धन्या कडे अर्ज करतो की : या देहीला आपल्या जीवात्माचे मुळावरचे मुळयवगाचे ग्यान कोणी तरी प्रकाशीत आत्म गडयांनीं या देहीला सांगा हो !

॥ देहे जीवाचे, मुळ यवगाचे । कोणीतरी सांगा हो ।
पिंडा मध्ये, जीव-शिव । दोन्ही नांदवा हो ॥

हे चतुर्पती आदीपुरूषा ! हा जीव कितीतरी देह धारण करत, कितीतरी देहांची अदला-बदल करत मजल-दरमजल मारत या मानव जन्मा पर्यत आला आहे. या मानव जन्मात मज आत्माचे मुळ यवगाचे कोण ठिकाण ? कोण मकाण ? कोण्या ठायी राहत होतो ? कोण्या रूपी होतो ? कोण माझा मालक ? त्या मुळयवगी उभ्या असलेल्या अनामत ज्योतीचं जळ-मुंळ काय ? ... ईत्यादी मुळयवगाच्या मुळावरचे चतुर्पती देवाचे अहीनाघरचे चतुर्पती ग्यान या देहीला कोणीतरी चतुर्पतीच्या आत्मगडयांनी कोणत्याही मार्गाने चांगल्या रितीने समजावुन उमजावुन सांगा हो ! आणी या चतुर्पती निरंजन ग्यानाच्या बळावर या पिंडामध्ये हा जीव आणी तो चतुर्पती शीव असे हे जीव-शिव दोन्ही नांदवा हो ! हीच अरज मज आत्माची या चतुर्पती धन्या चरणी आहे.

हे मुळयवगाच्या चतुर्पती देवा ! हीच अर्ज पुनंःपुनश्चः लावण्यासाठी या मानव वंशी आलो आहे. परंतु देहीवर या तिरगुणी मायेनं तिरगुणांचा फासा टाकुन, मज आत्मास फशी पाडलं आहे. या फाश्यात तुझा हा राजहंस अडकला आहे. या तिरगुणांचे हे फासे, हा कृष्ण महाराज धनी अवधुत तोडन. तिरगुणांचे हे अम्मल ठाणे तो उडवन. तो या देहीत निशंःकलंकी मांडणा करून माझे मुळचे घर मज दाखवन. याच आशेवर आता तुमच्या या चौथ्या चतुर्पती ग्यानाच्या पायरीवर येवुन चतुर्पती पंथी बनलो आहे गा बन्सी !

॥ आलो बंन्शी/वंशी, झालो पंथी । उभा पायरीशी ।
काय निमित्य माझ्या मागं । गुंतलो चाकरीशी ॥

**शब्दार्थ** :- **बन्शी** :- कृष्णाचे एक नाव । **चाकरी** :- सेवा, नोकरी

हा आत्माराम आपले मुळचे ठिकाण प्राप्त करण्यासाठी, येथपर्यंत देह धारण करत करत आलेला आहे. कृष्णा ! तुमच्याच कृपेने या चतुर्पतीचा अथर्वन वेद या देहीच्या हाती आला आहे. तुमच्याच कृपेने या चतुर्पती पंथात तुम्ही प्रवेशी करून घेतले आहे गा बन्शी !

या यवनी मानव वंशी होवुन चतुर्पती पंथी लागुन, या चतुर्पतीच्या पहील्या पायरी वर उभा झालो आहे. कृष्णा ! आता ही चवथ्या तुर्या अवस्थेची पहीली पायरी पार करण्यास साहय करण्यासाठी तुमच्याच आंगच्या या चिरंजीव बाळाला तुमचे पाय दाखवा हो. या नरदेहीच्या जन्माचं आता काय निमित्य आहे ? कोणत्या निमित्या कारण तुम्ही माझा हात धरून मज हाती हा चतुर्पता वेद दिला आहे.? कोणत्या निमित्या कारण तुम्ही या देहीला या चतुर्पती पंथात दाखल करून घेतले आहे. ? कोणत्या निमित्या कारण आपणहुन या देहघरी येवुन, आपल्या काना-मात्रा दाखवुन मज धरलं हाती ? कोण्या निमित्याकारण नुसतेच हाती न धरता या मिर्तलोकी च्या हदयी तुमच्या यवगाची दवंडीच्या प्रमाणे वाणी सांगतली आहे. नुसतीच वाणी न सांगता हाताशी हात लावुन, चतुर्पतीशी गोत/नातं जुळवुन चतुर्पती पंथाच्या चाकरीशी लावल आहे. चतुर्पती चे निरंजन चतुर्पता ग्यान वेळोवेळा देवुन, त्या ग्यान वाणीचे अनुभवही दिलेत आहेत...ईत्यादी हे सर्व कोण्या निमित्य कश्या करीता आम्हा दिले आहेत ?

आता हे सर्व तुमचे चतुर्पता निरंजन ग्यान या मिर्तलोकी देहीच्या हदयी तुम्ही उभे राहुन तुमच्याच चतुर्पता मौसं वाणी व्दारे सांगाव आम्हास ! कारण की : इथे तुच यवगा परी पर लावत उभा झाला आहे. तुमच्याच मुळे मायेची ममता उभी झालेली आहे. ही ममता तुमच्या कडे, तसेच या संसार रूपी मायेकडे सुध्दा नेत आहे. आरंभी ही देही या मायेच्या भुलवणीत पडुन या देहीचा मालक भुलली होती. परंतु तु स्वतः आपणहुन या देहघरा आले. आणी मज धरलं गा हाती ! धन्य माझ भाग्य थोर !

परंतु अजुनही ही माया म्हणते ईकडे ये ! हा चतुर्पती देव म्हणते ईकडे ये ! तिकडे जावु नको ! आता जावु कुणी कडे देवा ? कारण की : जोवरी ही काया आहे, तोवरी हीला माया चिकटुन राहणारच आहे. त्याचमुळे कैसा पाहु हो माझा देव राया ? याच संभ्रमात पडलो आहे. हा संदेह मिटव बा आता ।

कारण की : आता मी तुमच्या कडे घेवुन जाणा-या या तुमच्याच चतुर्पती पंथाच्या पायरी वर उभा राहुन, या चतुर्पतीच्या चाकरीशी लागलो आहे. इथे एक से बढकर एक चढण्यास कठीन अश्या परोपरीच्या पाय-या असुन, या पायरीच्या पल्याड घाटाच्या पलीकडे तु उभा आहे. तुम्ही परोपरीच्या पाय-या केल्या आहेत. आणी तिरगुणांचे ओझे टाकुन पलीकडे पाहयं असे म्हणत या तिरगुणांच्या पल्याड उभा आहे. तुच सच्च्या भक्तांना तिरगुणांच्या पलीकडचे ग्यान देत आहे. तिरगुणांच्या पलीकडे जाण्याच्या खुणा देत आहे. तिरगुणांच्या पलीकडे गेलेल्यांच्या हाताशी हात मिळवत त्यांना देणं देत आहे. पुढे येणा-या भैसाच्या यवगाची मांडणी मध्ये सच्च्या त्रिगुणातीत भक्तसवंगडयाना सामील करत आहेत.. धन्य गा तुमची माव ! कळेना कोणास !.

॥ परोपरीच्या, केल्या/आहे पाय-या । परी उभा आहे ।
तिरगुणांचे, ओझे टाकुन । पलीकडे पाहावें ॥ ०४ ॥

हे चतुर्पती देवा । तुमच्या कडे घेवुन जाणा-या चतुर्पती मार्गाच्या पहील्या पायरीवर उभा राहुन आता तुमच्या चाकरीशी लागलो आहे. परंतु हा चतुर्पतीचा घाट चढतांना बहु लागत आहे हो नेट ! या घाटाच्या वर असलेल्या परोपरीच्या पाय-या चढतांना दमछाक होत आहे. पुढे पुढे तर हा रस्ता घोपट होत आहे.

या घोपट रस्तावर आलेले आम्ही तर आहो मुढं मुढं । आता देवा तुच रस्ता दाखव । होय गा पुढं । या घोपट रस्त्यावर नाही छाया, नाही माया । कैसा पाहु हा देवराया ? कैसा ओळखु हा देव राया ? आम्हास पाहता तो पाहवेना, बळ करीता आकळेना ! उपमा देवु तरी काय ? हा देव आकारात नाय ! हा माझा परात परं तत्व आदीपुरूष देव तिरगुणांच्या पलीकडे या मायेच्या पल्याड उभा आहे. म्हणुनच आता तुच ये बाप्पा धावुन आमच्या साहयास ही विनंती आहे.

हे सचित्तानंद सिध्द ब्रम्हवेत्ता कृष्णा ! हे चतुर्पती पंथाच्या मालका ! देह ज्योतीच्या मालका ! तुम्ही तर हे परात परं परंतत्व देखीले आहे. हे परंम आपल्या आंगी आणले आहे. या धनीदेवा च्या चरणी तुच या नवलाख पाहय-या अर्पण आहे. आता तुर्या अवस्था प्रकाशीत करणा-या या चौथ्या पायरीवर तुच साहय हो कृष्ण अवधुता ! साहय कर बा साहयंवंता ! आता आम्ही अल्याड आहो. पल्याड तो धनी आहे. आणी मध्ये पडली आहे ही पड ! याच पडीची तु दवंडी देत सांगी करत आहे की : या चतुर्पती धन्याकडे जाण्यासाठी सत्कृत्यात राहुन, सत्कत्याच्या अधिक्याने या देहीच्या तिरलोक्याच्या डोक्यावर असलेले तिरगुणांचे ओझे टाकावे. हे तिरगुणांचे ओझे टाकुन पलीकडे पहावे. पल्याड उभ्या असलेल्या धन्याकडचे निरंजन चतुर्पता ग्यान हे तुझे मुखच्या चतुर्पता अथर्वन् वेद व्दारेच मजपर्यंत आले आहे. तुमच्याच कृपेने तुमच्याच सांगी व्दारे तु आम्हास ग्यान दिले आहे की :

तिरगुणांचे ओझे टाकुन । पलीकडे पाहावें :-

प्रकृतिपासुन उत्पन्न झालेले सत्व-रज-तम हे तिन गुण हे देहीत वास करणा-या निरंजन आत्म्याला खेचुन बांधुन टाकत असतात. या निरंजन आत्म्याला तिरगुणाच्या बंधनात अडकवत असतात. ते अश्याप्रकारे :

- सत्वगुण हा सुखः आणी ज्ञान याच्या साहयाने मानवास बध्द करतो. सत् बंधनात अडकवतो. सुखाच्या ठिकाणी आसक्ती उत्पन्न करतो. मीच मोठा ज्ञानी पंडित ! मीच मोठा सात्विक ! असा सात्वीक अहंकार आणतो. सत्वगुणांचे अंहं चे वर्चस्व झाल्याने हा सत्गुण या देहीला नाचवतो. हा सत्वगुण या देहीची देवांप्रमाणे पुजा करवुन घेतो. एवढच नव्हे तर स्वतःलाच देव समजुन, देवाप्रमाणे वागावयास या देहीला भाग पाडते. देणं देण्याचे आव आणते. सत्कार करवुन घेतो. या देहीला मान सन्मान मिळण्याची अभिलाषा बाळगतो.

- रजोगुण या जिवात्म्यास रजवतो/रंगवतो ! रजोगुणां व्दारे तृष्णा व आसक्ती युक्त कर्म उत्पन्न करतो. या तृष्णा व आसक्तीयुक्त कर्म करण्याच्या लालचीने या लोभाने तो या मनुष्य प्राण्यास बध्द करतो. हा रजोगुण हर्ष, राग, विषय ईच्छा, लोभात्मक बुध्दि ईत्यादीका कडे या प्राण्यांची प्रवृत्ती वाढवत नेत प्राण्यास बध्द करून बंधनात अडकवतो. जेव्हा रजगुण वरचढ होवुन आपले वर्चस्व गाजवते, तेव्हा हा रजगुण या देहीला जणुकाही राजा सारखी वर्तन करावयास लागते. देहीला राजाप्रमाणे वागावयास भाग पाडतो. देही राजसत्ता गाजवण्याची अभिलाषा बाळगत राहते.

- तर तमगुण हा प्राण्याच्या ज्ञानावर आच्छादन/पांघरून टाकुन, त्या प्राण्यास मायावी व अज्ञानी करतो. आणी आपल्या मोहपाशात

अडकवुन घोर अश्या अंधःकारात पाडतो. तम मुळे प्रमाद/माज, मोह, अज्ञान, आळशीपणा, निद्रा, कर्तव्याचा विसर..ईत्यादी तमोगुणी बुध्दिचे लक्षणे वाढत वाढवत नेत नेत, याच्या योगाने तो या जिवात्म्यास जखडुन टाकतो. तम गुण हा प्रमाद, माज उत्पन्न करून प्राण्यास अविचारी वर्तन मुर्खपणा करण्यास प्रवृत्त करतो. सत् कृत्य, सत् कार्या विषयी निरूत्साह दाखवतो. तमोगुण अती वरचढ होवुन जेव्हा आपले वर्चस्व गाजवतो, तेव्हा तो तमोगुण या देहीला सैतानासारखे-राक्षसारारखे नाचवतो. या तम बुध्दिच्या मुर्खपणाने हा जिवात्मा चांगलाच अडकल्या/जखडल्या जावुन तो चांगलाच बध्द होतो. बंधनात अडकतो. मायेच्या बेडया देहीच्या पायात पडतात.

अश्या रितीने हा जिवात्मा प्रकृति मायेच्या तिन गुणांनी जखडल्या जावुन बंधनात पडतो. ८४ शी च्या फेरीत फिरतो. परंतु प्रकृतिच्या या तिन गुणांच्या पलिकडे उभा असलेला प्रकृतिमायेचा कर्ता हा भिन्न असुन, तो कर्तार आदीपुरूष तिरगुणांच्या पल्याड उभा आहे. असे जेव्हा समदृष्टीने व उदासीनपणे पाहणा-या मनुष्य प्राण्यास कळु लागते, तेव्हाच त्याला या तिरगुणांच्या पल्याड असलेले आत्मरूप/सेरूप त्याच्या दृष्टीत येते. ज्ञान दृष्टीत आलेल्या सेरूपी अंशाला पकडुन, तो त्या आदीपुरूष चतुर्पती परमात्मास प्राप्त करण्यास पात्र होतो. आणी मग तो देह उत्पत्तीस कारणीभुत असलेल्या तिरगुणी गुणत्रयांच्या/देहीत्राच्या/त्रिरीत्रां च्या अतिक्रमणा नंतर, तो देहधारी पुरूष जन्म मृत्यु, जरा व्याधि, यांचे दुःख यातुन मुक्त होवुन या जन्मी च मोक्षास पावतो. भ. गिता. १३-३०

### तिरगुणांच्या पलीकडे पाहणारा कोण ?

- ज्याला जरी तिरगुणांच्या कार्याची प्राप्ती झाली, तरी तो त्या कार्याचा व्देष करत नाही. आणी प्राप्त न झाली, तरी त्या तिरगुणी कार्याची ईच्छा धरत नाही. असा जो उदासीनपणे वर्तन करतो.
- या तिरगुणांनी ज्याचे चित्त चंचल होत नाही. हे तिन गुणच परस्परांच्या ठिकाणी व्यापार करत आहेत, असे समजुन तो स्थिरता प्राप्त करतो. या स्थिरते मुळे तो सुखः आले तरी हर्षभरीत होत नाही, तर दुःख आले तरी तो विषद होत नाही, या दुःखाने वाईट वाटुन घेत नाही.
- जो कोणत्याही अवस्थेत कोणत्याही परीस्थितीत स्थिर असतो. त्याची सर्वत्र समबुध्दि होवुन, त्याच्यातले सर्व विषम विसर्जित झाले आहे. त्याचमुळे त्याला सर्व समान वाटतात. तो सुखः अथवा दुःख, जय अथवा पराजय, मान अथवा अपमान, स्तुति अथवा निंदा, प्रिय अथवा अप्रिय, शत्रु अथवा मित्र ईत्यादी ठिकाणी समबुध्दि ठेवुन समभावाने पाहतो.
- तो धैर्यवान कोणत्याही आसक्तीयुक्त कर्माची आसक्ती न करता, कर्माची वासना न धरता आपले नियत कर्तव्य म्हणुन कर्मे करतो.

अश्या प्राण्यांस त्री गुणातीत म्हणजे तिरगुणाच्या पलिकडे पाहणारा असे समजावे/म्हणावे. या शिवाय तो खेत्री अव्यभिचारी सत् कर्मात दृढ होवुन, सच्च्या भक्ती योगाने हरी नामाचे अमृतपान सेवन करतो. तोच या तिरित्रि म्हणजे सत्व, रज, तम या तिनगुणांचे पलीकडे जावुन मोक्षप्राप्तिस समर्थ होतो. भ.गिता. १४-२७

म्हणुनच हे भक्त अर्जुना ! वेदांमध्ये सत्व-रज-तम हे तिन गुण व या तिन गुणांचे तिन राजे यांचेच विवरण केलेले आहे. वेदांच्या तिन गुणांच्या विवरणांच्या पलिकडे तु पाहयं. या तिरगुणांच्या पलीकडे जावे. आत्मज्ञान शोधल्या शिवाय नाही तत्वज्ञान ! हे जाणुन आत्मज्ञान घेवुन आत्मज्ञानी व्हावे. कारण तसे केल्यावाचुन तुला मोक्षप्राप्ती होणार नाही. सर्व कामनायुक्त काम्य कर्मे तिरगुणांनी व्याप्त असतात. या काम्य कर्मा मुळेच या संसारात पुनःरूपी येवुन या संसाराची पुनरावृत्ती होत असते.

म्हणुनच तु सुखः-दुःख, शितःउष्ण ईत्यादी व्दंदापासुन दुर राहयं. आणी नेहमी सत्कृत्यात राहुन सत्य ज्योतीत निमग्न हो ! सत् कृत्यात राह ! सत्यदेवाचे सत्य ज्ञान प्राप्त कर ! असे केल्यानेच या सत्कृतिच्या अधिक्याने तु त्रिगुणातीत म्हणजेच तिरगुणांच्या पलिकडे पाहणारा होशील. तिरगुणांच्या पलीकडे असलेल्या आत्मतत्वात निमग्न हो ! या आत्मतत्वात रममान हो ! हे आत्मतत्वच तुला तिरगुणाचे पलीकडचे चतुर्पता निरंजन ग्यान सह निरंजनाची प्राप्ती करून देवु शकते. भ.गिता.अ.२/४५

जेव्हा तु तिरगुणांच्या पलिकडे असलेले निरंजन चतुर्पतीचे आत्मग्यान सह सर्व ग्यान असलेले हे चतुर्पता ग्यान ची पारख करशीन, तेव्हा तुला ग्यान येईन की : जरी परोपरीचे पिंड हे विटाळी घडले असले, तरी त्या विटाळी पिंडात एकच आत्मतत्व आहे. एकच निरंजन आहे. या एकाच निरंजना ठिकाणी रममान हो ! या त्रिगुंणातीत नविन डोळ्याने या तिरगुणांच्या पलीकडे पाहये ! तेव्हाच तुला सत्य ग्यान येईन की :

॥ परोपरीचे पिंड राया । विटाळी घडवले ।
त्या पिंडाचे तिर्थ गडे हो । कोणाचे झाले ॥
॥ माया आंगी, विटाळ आला । त्याचा, पिंड घडलां ।
त्या पिंडातुन, हंस आला । कोणाचा झाला ? ॥

माया आंगी विटाळ आला. आणी त्या विटाळापासुनच हा देह पिंड हळुहळु आकार घेत घडला. या विटाळी जलात खेळत खेळत वाढला. जेव्हा या पिंडात परमात्म्याने मायेवर कृपा करून त्याचा तेजोगुणी अंश असलेला आत्मा पाठवला, तेव्हाच या पाचव्या लभेद आत्मा च्या सुस्कारानं या पिंडात सत्रावीची जिवनकळा ज्योत उभी होवुन नांदु लागली. ज्याप्रमाणे राजहंस हा पाणीमिश्रीत दुधातुन पाणी वेगळे काढत फक्त दुधच पितो, कंकरमिश्रीत मोतीतुन फक्त मोतीच वेचतो त्याचप्रमाणे या पिंडाचा राजहंस आत्मा हा देहीच्या षटविकारांच्या विषय वासना व्दारे, कलंकीत झालेले सर्व संस्कार बाजुला काढुन, देहीच्या सत्संस्काराचेच प्राशन हा हंस करू लागतो. तो हंस आत्मा देहीच्या कलंक काटे कंकरा व्दारे कलंकीत न होता, या देहीत राहुटी करून निश्कलंकीच राहु लागला. तो कोण्या कलंकाला प्राशन न करता, कलंकाशी बाधीत न होता, निशकलंकी बनुन देहीत राहु लागला. आत्म तत्वांत रममान होवु लागला. हरी नामाची रसाई प्राशन करू लागला. चतुर्पती ग्यान भक्ती व्दारे स्वतःला जाणु लागला. स्वतःला जाणल्याने स्वतः प्रकाशीत होवु लागला. स्वतः ची आकाश वाणी या देहीला ऐकवु लागला.

अश्या रितीने, हा परमात्म्याचा अंश अवतार हंस आत्मा या देहघरी राहुन परमात्माच्या अंश गुणांलाच चिकटुन परमात्माचाच झाला. या परमात्माच्या आंगचा अंश परमात्मा पासुन वेगळा कसा राहील ? हा परमात्माचा तेजोगुणी अंश असलेला हंस आत्मा अंती परमात्माचाच झाला. ज्याचा जो अंश होता त्याचा तो अंश झाला. ज्याची त्याला गोडी होती, त्या ग्यान भक्ती रसात

हरीनामाच्या गोडीत राहीला. सत् संस्कार प्राशत करत सत्यात राहीला. निश्कलंकी राहुन तो कोणाचा झाला नाही. अंती तो हंस परमात्माचाच झाला.

**उदाहरणार्थ** :- दशरथ राजाने चुकुन अजाणतेने श्रावण बाळाला बाण मारला. या दशरथ बाणामुळे श्रावण बाळाच्या पिंडातुन त्या पिंडाचा हंस आत्मा गेला. जो हंस गेला तो कोणाचा झाला ? तो हंस तर परमात्माकडुन आला. माय-बापात आपल्या परमात्म्याला पाहुन, त्या माय-बापलाच परमात्मा समजुन सच्ची सेवा भक्ती केली. आणी अंती तो परमात्मा कडेच गेला ना ? की दुसरी कडे गेला ? सांग पंडीता आता ! तो या देहीच्या विटाळातच आला, तर मग या विटाळालाच का दुर नेमता ?

परोपरीचे वेगवेगळे पिंड या विटाळानेच घडवले आहेत. त्या परोपरीच्या रक्त या मासाच्या पिंडात तो हंस निरंजन आत्मा उंच आहे. या निरंजनाचे ग्यान न घेता हे जनलोक ज्या परोपरीच्या पिंडाचे पाय धुवुन तिर्थ पितात, ते तिर्थ तर या विटाळी घडलेल्या पिंडाचेच आहे. आणी हा पिंड विटाळाचा म्हणजेच विटाळाचेच ते तिर्थ आहे. या गुरू पिंडाच्या पाय धुवुन घेतलेल्या तिर्थामागे न लागता, आता या चतुर्पता वेदांत गाईचे अमृतरूपी ग्यान घेवुन आत्मग्यानी होवुन आपल्या पिंडाच्या हंसापर्यंत पोहचा. या हंसावर स्वार होवुन परमात्म्याकडे वाटचाल करा. या पिंडाला विटाळी न संबोधता, त्याला दुर न करता, माझ पिंड मजला शुध्द रे बापा म्हणत आधी पिंडधरणी शुध्द करून स्वतःच्या पिंडातील हंस याला त्याचे सत्सार चे भोजन देवुन त्याच्या लळा लावा. त्याला त्याच्या प्रकाशापासुन दुरच नका ठेवु हो !

॥ माया आंगी, विटाळ पिंडी । दुरच बसवलां ?।
माझ मजला, शुध्द/गोड रे बाप्पा । कस टाकु त्याला ? ॥
॥ त्याच पिंडाची धरणी जागा । ठेवलं वज करूनं
हेच माझ्या, कामा येईन । पुढंच पांघरून ॥ ०८ ॥

या माया आंगी विटाळ येवुन, या विटाळा पासुनच या परमात्माच्या तेजोगुणी अंश अवतार असलेल्या आत्माला देहघर बनवुन दिल्या जाते. अश्या त्या माये आंगच्या विटाळी देहाला तुम्ही दुरच बसविता ? दुरच होय म्हणता ? अस्पृश्य ठरवता ? हे शोभते का तुमच्या ज्ञानाला ज्ञानी पंडीता ?

त्या विटाळी देहाला तुम्ही अस्पृश्य समजता ? परंतु तुमचा हा देह ? तो तर याच मायेच्या विटाळा पासुन बनला आहे ना ? तुमचा देह हा विटाळा पासुनच बनला असल्यामुळे, या मायेच्या विटाळा विना प्रकट झालेले दैवत व योगी ईत्यादी इश्वरी काया असलेल्या या देवतांनी तुमचा हा देह अस्पृश्य मानायला पाहीजे होता. परंतु ते दैवत तर स्पृश्य-अस्पृश्यता न मानता, आपले भक्त पृश्य की अपृश्य ? उच्च-निच न बघता त्यांना देणं देत सर्विकडे सर्वांना समान दृष्टीने बघतात. विषमता विसर्जित करून समान दृष्टीने या सर्व देहीचे एकच निरंजन आत्मतत्व बघतात. परंतु तुम्ही ज्ञानी पंडीत ? शिव-शिव म्हणत स्पृश्य-अस्पृश्यता बाळगता ? उच्च-निच ठरवता ? तुमच्या देवांपेक्षाही तुम्ही मोठे झाले आहात काय ? हे तुम्हा शोभा देते काय ?

विटाळ हा फक्त आकारालाच चिकटलेला असतो. ज्याला आकारच नाही अश्या त्या निराकार निरंजन हंस आत्म्याला हा विटाळ कुठुन चिकटणार ? विटाळ हा निराकार निरंजनाला कधीही चिकटत नाही. तो निराकार निरंजन तर विटाळा विनाच शुध्द पवित्र निश्कलंकी आहे. म्हणुनच या आत्म हंसाला या हंसराज कृष्णदेवान दिलेला, या हंस आत्म्यास प्राप्त झालेला जसा काही नरदेह असेल, ज्या काही जातीत तो उपजला असेल, ज्या काही अवस्थेत तो पडला असेल त्या सर्व स्थितीत या नरदेहीला मी शुध्द मानतो रे बाप्पा ! त्या नरदेहीला पडीत टाकुन न देता त्या विटाळी देहाचाच संग करून, त्या विटाळी

देहालाच जागी ठेवुन माझे स्वभाव गुणांनुरूप शुध्द व निश्कलंकी करण्यासाठी प्रयत्नरत् राहतो. त्या पिंडाची धरणी जागी ठेवुन तिचे वज करून माझा मुळचा मालक असलेला निरंजन निश्कलंकी आदीपुरूषाची भक्ती करत त्याला चतुर्पती नामाची गोडी लावत, निश्कलंकी मांडणा करत राहतो.

ही विटाळी देहीच या निश्कलंकी आदीपुरूषाकडे जाण्याचा या हंसाचा रथ होय. देह-रथाचे सारथ्य या हंसाने हाती घेवुन, कृष्णराजाने मजवर कृपा करून दिलेल्या या चतुर्पती ग्यान भक्ती मार्गाने रथ हाकत आहो. कृष्णकृपेच्या आधाराने उच्चत्तर अशी बुध्दि ठेवुन, त्या उच्चत्तर बुध्दि व्दारे या बुध्दिच्या खालच्या स्तरावर असलेल्या मनाला ताब्यात घेवुन संयीमत करतो आहे. या संयीमत मनाव्दारे इंद्रियांचे संयमन करून कृष्णाने दावलेल्या चतुर्पती मार्गाने वाटचाल करत आहे. भाव-भक्ती ने हरिनामाच्या गोडीत न्हावुन ही वाटचाल सुरू आहे. पुढेही अशीच वाटचाल जोवर कृष्णकृपा राहणार तोवर करणार आहे.

म्हणुनच माया आंगी विटाळा व्दारे निर्मित या देह-रथाला मी अंर्तःबाहय शुध्द करतो. आम्ही करतो ही देह धरणी शुध्द ! देहीला निश्कलंकी बनवण्यासाठी, त्याची वज/जपवणुक करून ठेवत आहे. आधी हा देह-रथाची धरणी शुध्द करत, मग करतो आहे माझे मालकाचे पुजंन. अश्या रितीने या निश्कलंकी कडे जाण्यासाठी, या विटाळाचा पांघरून असलेला त्याच पिंडाची देहीची जपवणुकच पुढे माझे कामा येईल. ईच्या साठी ही धरणी जागा वज करून ठेवलं. यवगान यवगात या मायेच्या विटाळी पांघरून असलेला, हा देही रथ हाकलत आहे. या विटाळाचा पांघरून असलेला हा देही-रथ व्दारेच आध्यात्मीक प्रगती करत ग्यानसप्पंन्न होत होत येथ पर्यत आलो आहे. आणी आता हे चतुर्पता निरंजन ग्याना व्दारे, स्वस्वरूप जाणुन आत्मग्यानी बनलो आहे.

आता या एकल्या चतुर्पती मार्गाने पुढे पुढे जात निश्कलंकी आदीपुरूषा कडे या हंसाला पोहचायचे आहे. हेच या हंसाचे अंतीम धैय/लक्ष्य होय. आत्मग्यानाने या मानवी देहीच्या आत दृष्टी अंर्तभुत करून, अंर्तगत तेजगुण जागृत करावयाचे आहे. त्या अंशात्मक अवतार असलेल्या परमात्माला पुर्ण रूपारूपात देहीच्या आत अंर्तभुत करून स्वयंः प्रकाशीत व्हावयाचे आहे.

हेच अंतिम लक्ष्य गाठण्यासाठी, आता या हंसाला कितीही जन्म घ्यावे लागले तरी चालेल ! कितीतरी देहीत वस्ती करत या देहीत वसत वसना करावा लागेल. तर कधी या देहधरणीला मसना/श्मशान देवुन, माझे या धैय कडे अंतिम प्रवास करावा लागेल. हे मज नाही ठाव ! परंतु या धन्यान या देहीत वसना-मसना ची बरी केली सोय मज करीता !

॥ धरणीत वसनां, बाहेर मसनां । बरी, केली सोय ।
त्याचा काय उपाय, कराव म्हणता । आमचा देव होयं ॥

आदीपुरूष परमात्मा चा तेजोगुणी अंश अवतार असलेला हा चिरंजीव हंस आत्मा आपल्या धनीदेवाला शिराळ वाटे शरण येतो. आणी धन्याच्या कृपेने या प्रकृती मायेच्या योनी मध्ये प्रवेश करून प्रवेशी होतो. पिंडात प्रवेश करून या देहपिंडात राहुटी करतो. देहपिंड म्हणजेच कजब्यात वसना/वस्ती करतो. धन्याच्या नाम रसाईच्या गोडीत राहतो. सत् संस्काराचे प्राशन करतो. आपल्या धन्याकडे जाण्याचा मार्ग शोधतो. धन्याकडे जाण्याच्या मार्गाने वाटचाल करण्यास देहीला साहयं करत राहतो. धन्याकडे जाण्याच्या मार्गावर वाटचाल करता करता, जेव्हा ही देहधरणी जुनी, जिर्ण, मोडक्या अवस्थेत येते, तेव्हा तो हा मोडका कजबा सोडुन उडुन जातो. उदाहरणार्थ जसे मनुष्य आपले जुने

जिर्ण झालेले वस्त्रे टाकुन नवे कपडे धारण करतो, त्याचप्रमाणे हा हंस जुना जिर्ण व राहण्यास नालायक झालेला देह धरणी बाहेर निघुन तो देह मसनात नेण्याकरीता टाकुन देतो. तो निरंजन आत्मा या देहीला टाकुन देत, या देहीला मसना/श्मशान भुमी देतो.

आणी तो सोयम् जिवात्मा पुर्वाश्रमीच्या देहीचे सुक्ष्म असे इंद्रिये, मन, बुध्दि व तीच्यावरचे संस्कार यांना घेवुन, त्या त्या संस्काराप्रमाने वागत वागत पुनश्च परमात्मा कृपेने नविन देह धारण करतो. आणी या नव्या देहीत पुनश्चः वसना म्हणजे वस्ती करून राहतो.

निश्कलंकी धन्याने आपण धनीदेव होवुन, या हंसाला निश्कलंकी कडे जाण्यासाठी चिरंजीव बनवुन पुनःपुनश्च आपल्या धन्याच्या कडे येण्याची संधी देत राहतो. जोपर्यत हा हंस निश्कलंकी कडे पोहचणार नाही, तोपर्यत तो धनी या हंसाला अश्या संध्या देत फिरवत ठेवण्याची या धन्यानं बरी सोय केली हो !

बरी केली सोय हो आमच्या या धन्यानं की : या हंसांला प्रकृती मायामध्ये प्रवेशी करून, त्याला चिरंजीवत्व देवुन अंबर बनवुन राहण्यास विटाळी देहघर दिले. देहीच्या षटविकारा सह अन्य विकार विषय वासना..ईत्यादी कलंकाच्या सानीध्यात ठेवुन, या हंसाला आपले निश्कलंकीत्व जपवणुक करण्यास कार्यरत् ठेवुन, आपल्या निश्कलंकी धन्याकडे जाण्याचा मार्ग या धनी देवानं दाखवला. बरी केली हो सोय या धन्यानं । परंतु ही देही काही त्या हंसाला साथ देत नाही. म्हणुनच तो हंस ‘धनी काय दिसत नाही येथ‘ असे म्हणुन, मोडक्या कजब्यातुन निघुन जातो. पुनः नव्या देहीत त्या देहीला मसना देण्याकरीता वसना करतो.

काय उपाय करावं आता ? तुम्हीच आमचे देव ! तुमचा आंगचाच हा जीव ! तरी या जीवाला आपल्या निश्कलंकी धन्याकडे येण्यासाठी एवठा मोठा खटाटोप करावा लागतो ? तु असतांना बाप ! या देहीच्या हातातुन काहो घडले हे पाप ? का देतो ८४शी चे दुःख परोपरी ? वेळोवेळा ८४शी भोगण्यास का भाग पाडता ? या देहीतुन हा जीव निघुन जाण्यास का भाग पाडता ? का या जीवाला घेवुन जाता ?

॥ तुम्हीच देव, तुमचाच जीव । तोही, घेवुन जाता ? ।
चतुर्पता, वेदांत गाय । इच्यावर, राहो सत्ता ॥

हे आदीपुरूष धन्या ! हे शंक आत्म गडी तुझेच तर तेजोगुणी अंश आहे. तुमच्या ईच्छेसरशीस आम्ही प्रकृतीच्या योनीमध्ये उडया घेवुन या प्रकृतीचे प्रवेशी झाले आहे. इथे प्रवेशी होवुन प्रकृती मायेच्या तिन गुणांसह, चार चार कोट या आत्म्या वर चढल्या जावुन मायेच्या बंधनात हा आत्मा अडकल्या गेलो. सप्त कोषाने हा आत्मा वेस्टीला गेला आहे. आणी जिवात्मा बनला आहे. आत्म्यावर आलेले हे तिरगुणांचे बंधने सह देहकोषातुन मुक्त होण्यासाठी, मजवर कृपा करून तुम्ही या देहीच्या हाती हा चतुर्पता अथर्वन् वेद दिलेला आहे. आता या देहीच्या आंगी ही चतुर्पता आली असल्यामुळे या तिरगुणांचे जाळे हा कृष्ण महाराजा तोडन ! याच आशेवर आम्ही इथे ठाणं मांडुन बसलो आहोत. या कृष्ण संगतीन लागुन, बंधन तोड गा देवा । तुमच्या चरणावर ठेवला माथा । अशी विनवणी करत मला माझे मुळ घराकडे नेण्याची या कृष्णा चरणी विनवणीपुर्वक याचना करत आहो.

कृष्णा ! तुच तर आमचा धनी देव आहे. तुमच्या आंगचाच तर हा जीव आहे. तुमच्या हात ही देही बनली आहे. इथ हा देह-जीव खासा बनवला आहे. आता या देह-जीवावर कोणा तिरगुणींचा व्दैताचा वर्षाव चालणार नाही. या चतुर्पती पंथातच हा देह-जीव मजबुत बनवुन या देह देवळात माझे धनी देवाची ज्योत नांदते आहे. आता मजला या ज्योतीचा उजेड सदोनित आहे. आता हा तुमचाच हा जीव असतांना तोही का घेवुन जाता ? धनीदेवा ! त्याला घेवुन जाण्याचे प्रयोजन काय ? फक्त तुमचीच सत्ता आहे म्हणुन ?

देवा । तुमच्या हुकमा बिना झाडाचा पत्ता/पान सुध्दा हालत नाही. तुमची चौताळी सत्ता आहे. परंतु आता ज्यात तुझेच चतुर्पती ग्यान भक्ती आहे, त्या चतुर्पता गाई वर मज आत्माची सत्ता राहु दे ! हीच तुम्हा चरणी अर्ज !

कारण की : हीच चतुर्पता गाय चतुर्पता ग्यानाचा अमृत पान्हा पाजत मज परमानंद देत उभी आहे. या चतुर्पता गायी मुळेच या देहघरी ही आंनदाची ज्योत आनंदात राहयत आहे. हीच चतुर्पता गाय या देह-जीवाला निरंजन ग्यानाने लदबदुन, मजला ८४ शी च्या फे-यातुन मुक्त करण्यास समर्थ आहे. तिरगुणी माये सह तिरगुणांच्या बंधनातुन मुक्त करून, मोक्ष प्राप्त करून देण्यास ही चतुर्पता गाय समर्थ आहे. ही चतुर्पता गाय माझे या धन्याकडे येण्याच्या मार्गात वेळोवेळा साहयं करत आहे. वेळोवेळा या देहीला सत्कृत्यात ठेवत, सत् संस्कार टाकत चतुर्पती हरीनामाचा पान्हा पाजण्यासाठी उभी होत आहे.

या चतुर्पता गायीच्या अमृत पान्हा या देह-जीवाने प्राशन केल्यामुळेच या जिवात्माच्या मनोमय कोषातुन मनाचे कलंकीत विकार निघुन जाण्यास साहयं होत आहे. या मनोमय कोषामध्ये चतुर्पती हरी बध्दलचे प्रेम, भाव, ग्यान, भक्ती कोरल्या जात आहे. कोरल्या गेले आहेत. या चतुर्पतीच्या ग्यान, भक्ती प्रेम भावाने च हा मनोमय कोष हरीनामाच्या ज्योतीमध्ये लीन होत आहे.
तर या चतुर्पता गायीने पाजलेल्या अमृत पान्हाने, या जिवात्माच्या विज्ञानमय कोषात चतुर्पतीचे विशेष ग्यान सह निरंजन ग्यान कोरल्या गेले आहे. या चतुर्पता गायीचे सत्य ग्यान व चतुर्पताचे ग्यान संस्कार कोरल्या जात आहे. हा विज्ञानमय कोष त्या चतुर्पता ग्यानाच्या संस्कारानुरूपच वागुन या जिवात्माच्या आनंदमय कोषात परमानंद, परमय सुखाचे भंडार भरत आहे. त्याच मुळे ही आनंदाची ज्योत इथ आनंदात राहत आहे. म्हणुनच आता माझी अर्ज आहे की : या चतुर्पता गाई वर या देहीत राहुटी करून राहीलेल्या राहु/आत्मा ची सत्ता राहो. कारण हीच चतुर्पता गाय या जिवात्माला देहीच्या आत या बाहेर योग्य ते मार्गदर्शन करणार आहे. आपला चतुर्पता अमृत पान्हा पाजत राहणार आहे. हे मी आता जाणले असल्यामुळे मी पुनःपुनश्चः विनवणी अर्ज करतो की :

या चतुर्पता गाईवर या निरंजनाची सत्ता राहु दे ! या निरंजन आत्माची सत्ता सदा ठेव ! या चतुर्पता गाईपासुन क्षणभर ही मज दुर ठेवु नको. या चतुर्पता चा संग मज यवगान यवग राहु दे ! मी माझ्या मुळ स्वरूपात येवुन, माझ्या मुळ घराच ठिकाण येईपर्यत, माझा धनी मला प्राप्त होईपर्यत आणी सर्वकाही प्राप्त झाल्यावर सुध्दा या चतुर्पता गायीचा सदा संग ठेवुन या चतुर्पता गायीवर या राहु ची सदा सत्ता राहु दे !

मज आत्माची सुरूवातीची अवस्था अव्यक्त सोहंम् होती. मधली अवस्था व्यक्त झालेली असते तर पुनः अंती मी अव्यक्त होतो. माझ्या अव्यक्त-व्यक्त-अव्यक्त या अवस्थेतुन मी या देही व्दारे माझ्या मधल्या व्यक्त

अवस्थेत आलो आहे. या देहीच्या कालखंडात माझे कडे आलेली ही चतुर्पता गाय या देहीच्या वस्ती काळात तसेच या देहीबाहेरच्या अकाशमात मधील अव्यक्त अवस्थेतील काळात सदा मज आत्मास शुध्द करत सदा मज संग राहो. या सर्व देही ला सदा चतुर्पता चे साहय राहो. कृष्णराया ज्या मार्गाने गेला, त्याच मार्गाने ही चतुर्पता गाय आम्हास नेवो. आदीपुरूष कृष्णाजी च्या पोटी असलेली ही चतुर्पता गाय आम्हा जिवात्मांच्या ही पोटी राहो. या चतुर्पता वर या आत्म्याची सत्ता, परमात्म्याची सत्ता राहु दे आता । सत्ता माझी सत्ता तुझी, राहु दे देवा । सदा विनविते देवा भक्तात, ठेवा हो समानता । हीच माझ्या मुळ चतुर्पता धनी चरणी या जिवात्माची अर्ज !

॥ चतुर्पता, वेदांत गाय । ही आहे पोटा ।
कोण्या नामानं, शुध्द हो अनामीक ? दुरच, होय म्हणता ?

पुर्व जन्मो-जन्मीच्या देहीचे नाव माहीत नसलेल्या या अनामीकाला या जन्मीच्या नरदेहीच्या कालखंडात कृष्ण रायाने आपण हुन या देह घरा येवुन आपल्या हाती आता धरले आहे. हाती धरून या देहीला तो निरंजन कृष्ण आपल्या संग वागवत आहे. आपल्या चतुर्पता गाईचा पान्हा पाजत आहे. या कृष्णकृपेनेच या चतुर्पता गाईचा चतुर्पता ग्यान भक्ती हरीनामाचा पान्हा आता माझ्या पोटा गेलेला आहे. त्याचमुळे याच चतुर्पता ग्यान-भक्ती हरीनामाच्या ज्योतीत या देहीचा जिवनकाळ घालवण्यातच आम्ही धन्य मानत आहो.

चतुर्पता गाईने पाजलेल्या चतुर्पती ग्यान ने आता आमच्याच्यानं होईन तोवर आम्ही शुध्द होत होत निश्कलंकी धन्या कडे जाण्याच्या मार्गात चालत आहोत. शुध्दतेने चांगल्या आचार-विचाराने, सरळ साध्या सिदाईच्या मार्गाने ,देहीचे सर्व विकार दुर करत, सत्कृत्यात राहुन आपले जिवन निर्भयतेने जगण्याचा प्रयत्न करत आहोत. प्रयत्न करत राहणार. याच सिदाईच्या मार्गाने जगलो, जगणार, जगत राहणार हे आता निश्चित झाले आहे. आता या चतुर्पता नामाच्या पलीकडे दुसरे कोणतेही नाम नाही. हे चांगल्या रितीने जाणतो. याच चतुर्पता मार्गाने शुध्द होवुन माझे अंतीम लक्ष्य गाठणार आहे हे जाणतो. म्हणुनच तुम्ही ब्रम्हया ! आता आम्हास कोणते नाम देवुन, आम्हास शुध्द बनवण्याचा आव आणुन या कृष्ण अनामीका पासुन दुरच होय म्हणता ? या अनामीकाला दुरच होय म्हणता ? हा अनामीक कृष्णाजीच तर निरंजन आदीपुरूष बनला आहे. -कृष्णांमृत वाचा

निरंजन आदीपुरूषाचीच वस्ती तिर्थि पिंडी आहे. हाच आदीपुरूष कृष्णा दवंडी देवुन यवगान यवगात सांगी करत आहे की :

॥ दुरच असते, उगाच बसते । का देता हाका ? ।
तिर लोक्याची, करते चाकरी । चाकर आहो तुमचा ? ॥
॥ तिर लोक्याची, करतो चाकरी । उचलतो गाय ।
आधी करतो, धरणी शुध्द । तुम्ही करता काय ? ॥
दुरच असतो । उगाच बसतो । का देता हाका ?

या निरंजन कृष्णाचे स्वरूप अव्यक्त आहे. त्यानेच हे सर्व जग त्याच्या अव्यक्त स्वरूपाने व्यापलेले आहे. त्याच्या ठायीच सर्व भुते आहे, परंतु तो मात्र त्यांच्या ठिकाणी नाही. त्यांच्या ठिकाणापासुन दुरच असतो. कारण तो या तिरगुणी भुतांसह असलेल्या या तिरगुणी मायेच्या पल्याड उभा आहे. तो तिरगुणी मायेच्या तिरगुणांच्या पलीकडे असल्यामुळे या तिरगुणी मायेच्या बंधनात तो धनी नाही. परंतु हे सर्व तिरगुणी प्राणी तिरगुणी मायेच्या तिरगुणी बंधनात अडकुन तिरगुणी मायेच्या ठिकाणी अडकलेले आहे. अजुनही या धन्याच्या ठिकाणी हे सर्व तिरगुणी प्राणीं नाही आले आहे.

हा धनीच या प्राण्यांचा उत्पन्नकर्ता, धारणकर्ता, असुनही या प्राण्यांमध्ये कायमचा स्थिरावलेला राहत नाही. यांच्यापासुन दुरच होत राहतो. ज्याप्रमाणे सर्वगामी वायु नेहमी आकाशाच्या ठिकाणी असुनही आकाश त्याच्या ठिकाणी स्थीरावत नसते, त्याचप्रमाणे हे सर्व प्राणी धन्याच्या ठिकाणी असुनही हा धनी त्यांच्या ठिकाणी स्थारावत नाही. तो धनी या तिरगुणी प्राण्याच्या ठिकाणा पासुन जरा दुरच उभा असतो. तो तिरगुणीं पासुन दुरच होत राहतो.

तो आदीपुरूष या त्रिगुणात्मक मायेच्या संसाराच्या दुरच असतो. आणी मौन व्रत धारण करून उगाच बसुन या तिरगुणी मायेच्या तिरगुणां व्दारे उभारलेला तिरगुणी खेळ पाहतो. या मायाजाळाचा खेळात संसार सार तुम्हा हात ! या निरंजन निराकार निराधार निगुर्ण धनी देवाशी काय काम ? असा विचार ठेवुन तिरगुणांचा संग करून सगुण व्देत भजत तिरगुणी जिवन जगत राहत आहेत.

असे तिरगुणांच्या अधिपत्या खाली जीवन जगत असतांना, या तिरगुणी मायेचा संग करून तिरगुणी मायेच्या ठिकाणी नित राहुन, तो चौथा निरंजन धनी दिसला काहो तुम्हाले ? मायावी मायेच्या तिरगुणी ठिकाणावर राहुन त्या धन्याचे ठाव ठिकाण माहीत झाले काहो तुम्हाले ?

तिरगुणांच्या पलीकडे पाहत पाहत, तिरगुणांच्या पल्याड जावुन या मायेच्या तिरगुणी ठिकाणाहुन जो प्राणी दुर हटतो, त्यालाच हा धनी आपला हात त्याच्या हातात देवुन या तिरगुणी मायेच्या ठिकाणाहुन खिचुन चौथ्या धन्याच्या ठाव ठिकाणी आणतो. अश्या रितीने तिरगुणांच्या पलीकडे गेलेल्या त्या प्राण्यास या धन्याचे ठिकाण प्राप्त होते. त्या चौथ्या निरंजन आदीपुरूष कृष्ण धन्याच्या ठिकाणी येवुन तो प्राणी मोक्ष पदा जातो. इतरत्र कोणत्याही तिरगुणी मार्गाने तो मोक्षपदास जात नाही.

कारण की : तो धनी तर या तिरगुणींपासुन दुरच असतो. उगाच बसतो. तर मग तिरगुणी मार्गाने जावुन या उगाच बसलेल्या चौथ्या धनी ला 'मोक्ष दयाहो देवा !' असे म्हणुन का देता हाका ? तिरगुणी मार्गाने आजपर्यत कुणासही मोक्ष प्राप्त झालेला नाही आहे. हे सर्व जाणते तिरगुणी जाणतात तरी सुध्दा मायेच्या आहारी जावुन तुम्हास फसवतात ? आणी तुम्ही फसतात ? धनीदेवा ! आता सर्वत्रास सद्‌बुध्दि दयाहो.

तिरलोक्याची करतो चाकरी । चाकर आहो तुमचा ?

तो निरंजन आदीपुरूष धनी तर निराकार निराधार निर्गुण अव्यक्त आहे. हा चौथा शुध्द सत्व चा धनी तिरगुणीं पासुन जरा दुरच राहुन पिंडी या ब्रम्हांडातील तिरलोक्यात म्हणजेच या देहीतील स्वर्ग मिर्त पाताळ या तिनही लोकात निराकार निराधार चैतन्य सोहंम् स्वरूपात भरून भरला आणीक उरला आहे. तो चैतन्यमय निरंजन आदीपुरूष धनी हा चैतन्याचा मुळस्तंभ बनुन या देहीत निराधार उभा आहे. अश्या रितीने देहीत हा धनी उभा राहुन आपल्या चैतन्यमय निराकार निराधार निरंजन मुळस्तंभाच्या आधारावर ही देही चालत-बोलत उभी ठेवण्याची चाकरी करत आहे. बरे गा माझे लहानपण असे म्हणत हा निर्गुण निरंजन धनी तुमच्या देहीची चाकरी करत आहे. त्याच मुळे तुम्ही चालत -बोलत धावत आहे. हा धनी आपली शिष्टाई करत, लहानपण घेत आपल्या मानाचा प्याला विष्णुला देत आहे. तिरलोक्याची चाकरी करण्याचा तिरलोक जुम्मा घेत आपले कार्य करत उभा आहे. या कृष्ण धन्यानेच वेळोवेळा यवगान यवगात अवतार घेत, या देह धरणी सह ही धरणी शुध्द केलेली आहे. म्हणुन हा कृष्ण धनी चाकर होय का तुम्हा तिरगुणींचा ?

॥ तिर लोक्याची, करतो चाकरी । उचलतो गाय ।
आधी केली धरणी शुध्द । तुम्ही करता काय ?

हा आदीपुरूष कृष्णा ! या देहीच्या तिरलोक्याची चाकरी करत ही देहरूपी गाय वेळोवेळा उचलत आहे. यानेच सर्वप्रथम सर्वात आधी ही धरणी शुध्द केलेली आहे. तशीच देहधरणी आता तुम्ही शुध्द करता आहेत का ?

॥ आधी करतो, धरणी शुध्द । करत्याचं पुजनं ।
हेच माझी, भाकर देवा । नाही देल्ली कोणं ॥
॥ शुध्द असता, धरणी हो राया । करावं पुंजन ।
आता उगीच राहुन करां । अनामताचं पुंजन ॥

आधी करतो, धरणी शुध्द । करत्याचं पुजनं ?

ही देही या आत्म्याची धरणी आहे. या देह धरणी वर परमात्म्याने आपला तेजोगुणी अंश अवतार घेवुन, ही धरणी आपल्या चैतन्य प्रकाशात जागृत करून आतापर्यत ठेवलेली आहे. परमात्माचा अंश अवतार असलेला आत्माराम या देहधरणीवर उभा आहे. परंतु या देहधरणीवर आलेल्या विकारी काटे, विषय वासन ईत्यादी काढत ही देहधरणी आम्ही आधी शुध्द करतो. आत्म्यावरचे मनोमय वासनमय कोषाचे खोड तोडुन टाकतो. देहीची उत्तरोत्तर प्रगती करत देहीच्या आत्मारामा पर्यत पोहचवुन या निरंजन आत्मारामा च्या ग्यान प्रकाशात देहीला न्हावुन काढत आहोत. देही प्रकाशीत करत आहोत. हेच आमचे धन्याला वाहलेले फुल पुष्पाचे पुंजन होय.

अश्या प्रकारच्या धरणी शुध्दता करत, या आत्मारामा पर्यत पोहचुन या निरंजन आत्मारामा च्या ग्यान प्रकाशात न्हावुन निघण्यास हे मानव कमी पडत आहे. कारण की : हे मानव निरंजन आत्मग्यानी नसल्यामुळे या देहधरणीचेच पुंजनात गुंतलेले आहेत. या देहधरणीचे पाय धुवुन तिर्थ पित त्या देहधरणीच्या विटाळी तिर्थालाच अमृत मानत आहेत. आत्मज्ञानी होवुन धन्याच्या तेजोगुणी अशंअवतार असलेल्या आत्म्याव्दारे आलेले निरंजन ग्यानाला ते जाणत नाहीत.

हेच माझी, भाकर देवा । नाही देल्ली कोणं ।

हा आत्माच परमात्माचा तेजोगुण अंश आहे. आदीपुरूष परमात्माला जाणण्याकरीता हाच एक दुवा आहे. हाच एक मार्ग आहे की : प्रथम परमात्माच्या या अंशाला पकडुन या अंशाच्या ग्यान प्रकाशानेच परमात्माकडे जाता येते. परमात्म्याच्या या एका अंशाला जाणले, या अंशाच्या प्रकाशात न्हावुन निघाले म्हणजे मग तोच अंश परमात्मा पर्यत पोहचवुन देतो. त्याच मुळे प्रथम आत्मग्यानी होवुन परमात्म्याच्या या अंशाला जाणुन या अंशापर्यत पोहचा । या अंशाच्या हातात आपल्या देहीचा हात दया. मग तो अंशच पोहचवुन देईल आपल्या निरंजन धन्याकडे !

परमात्माच्या या तेजगुण अंशापर्यत पोहचण्यासाठी मार्गक्रमण करतांना, या मार्गात आलेले काम-क्रोध, लोभ-मोह, मद-मत्सर, डंब-अंहकार, भय त्रिगुण.. ईत्यादी देहीच्या विकारांचे काटे दुर करत करत जावे. हाती ग्यानाची कु-हाड घेवुन या काम,क्रोध..ईत्यादीचे खोलवर रूजलेले खोडे काढत काढत जावे. त्या मार्गावर आलेल्या आशा-मनशा, आकांक्षा-कल्पना यांच्या पालव्या तोडत तोडत धिराईने चालत चालत मार्गक्रमण करावे लागते. या मार्गाने एकदा देहीतल्या निरंजना कडे पोहचले, तर तोच निरंजन तुम्हास परमात्माकडे आपरूप पोहचवुन देईल.

हे सर्व चतुर्पता ग्यान कृष्णाकडे असल्यामुळे या कृष्णाने आधी ही देहधरणी शुध्द करून निरंजनाला प्रकाशीत केले. ही देहधरणी आधी शुध्द

करून, त्या कर्तार निरंजन आदीपुरूषाचे ग्यान-भक्ती-भाव ने पुंजन केले. तिनगुणांचे तिन शिक्के त्याहीच्या चरणी अर्पण केलेत. मन-भावाचे फुल-पुष्प त्या धनी देवाच्या चरणावर वाहले. त्या धनीदेव आदीपुरूषाला आपल्या देही अंर्तगत आणले. धनीदेव आदीपुरूषाचा पुर्ण अवतार बनलेत. आणी तोच त्यांच्या अनुभवाचा चतुर्पता मार्गाने जाण्यास आम्हा सांगी केली. अश्याच प्रकारचे पुजंन तुम्ही करता काय ? अश्याच प्रकारच्या पुजंनाची माझी भाकर होय. हीच भाकर नाही दिली बा कोणी तिरगुणींनी मजला ! यां तिरगुणींनी स्वतःचे दिले तरी काय ? स्वार्थि तिरगुणी ब्रम्हयांने स्वतः चे पोट भरण्याकरीता जगास कर्मकांड देवुन पुंजन करावयास शिकविले ? जगास भुलविले. मायेनं भुललेले जग करतीन पुंजन ?

इथ सर्वकाही परमात्म्याचे आहे. सर्वांचा तो एकला धनी आहे. त्याच मुळे ईथे तुमचे काहीही नसुन, तुमच्या मालकीचा फक्त एकच भक्ती-भाव तुम्हास दिलेला आहे. तोच भाव या चतुर्पता ग्यानाला संग घेवुन अर्पण करने. आधी देहधरणी शुध्द करून ग्यान-भक्ती-भाव चे भोजन त्या परमात्म्याला अर्पण करत राहणे. हिच त्या परमात्म्याची भाकर होय. ही भाकर अर्पण करने हेच कर्त्याच सत्य पुंजन होय. ही त्याची भाकर त्याला न देता ज्यावर तुमचा अधिकारच नाही, ते भलत-सलत त्याला देत सुटल्याने तो निरंजन परमात्मा तुम्हा देह घरी उपाशीच राहील. उपाशी पोटी अध्यात्म होत नसते. अध्यात्मच जर नाही झाले, तर देणं कोणं देणार ? त्याच मुळे आता तुम्ही उगीच राहा ! आणी ऐका गडे हो या अनामीक कृष्णांचे आता !

काहीही त्रिगुणात्मक व्यर्थ बडबड न करता, या त्रिगुणींबध्दल मौन व्रत धारण करून उगीच राहुन आधी मन धरा हाती. दया-क्षमा, शांती, चित्ती हदयी ठेवुन सत् संगत सत्कृत्ये करत, मनभाव प्रेमभाव, सद्‌भावाने, ग्यान-भक्ती, वैराग्य-सद्‌गुण या चौघांचे चौघडे वाजवत राहा. आशा-मनशा, दुंर्गुण वासना-कल्पनेचे ठिकाणे उडवत, तिन-सहा-छत्तीस असे पचेचाळीस चौक्या तोडुन भेट देण्यास या आदीपुरूषा परमात्मा कडे प्रार्थना करत राहावे.

अश्याच रितीने आपली देहधरणी आधी शुध्द करत ही देह धरणी जेव्हा जेव्हा शुध्द झालेली असते, तेव्हा तेव्हा त्याची भाकर त्या कर्ता-याला दयावी. जरी कितीही विघ्ने दुखः समोर आले, तरी त्या दुखांचे आरे-गिरे भोगुन त्यांना पार करत करत हा अनामीक करतो गा अनामताचे पुंजन ! तुम्ही करा गडे हो असेच उगिच राहुन सुखःदुःखाचे आरे-गिरे भोगत त्यांना पार करत अनामत धन्याचे पुंजन करावे. !

॥ बारा अवसा, बारा पुनवा । पुंजा हो धरणीशी ।
चोवीस आ-हे-गि-हे लावले । या चंद्र-सुर्याशी ॥
॥ चंद्र-सुर्याने, आ-हे गि-हे । कोठवर भोगावें ? ।
कधी मिटन, चौ-यांशी ब्रम्हया । पंचांग पाहावे ॥ २० ॥

एका वर्षाला १२ अमावश्या व १२ पोर्णिमा असे एकुन २४ अवसा-पुनवा होतात. या पैकी एका वर्षाला सरासरी एका अवसाला सुर्यग्रहन, तर एका पुनवा ला चंद्रग्रहन असे २ ग्रहने होतात. ग्रहणा अगोदरचे १२ आरे व ग्रहणा नंतरचे १२ गि-हे असे हे एकुन २४ आरे-गि-हे एका ग्रहणाला लागतात. पिंडी या ब्रम्हांडी या नात्याने, ब्रंम्हांडात जे चंद्र-सुर्य आहे तेच चंद्र-सुर्य प्रतिक रूपात या देहीत आलेले आहेत. या देहीच्या डाव्या भागात इडा नाडी समुह असुन या इडा समुहात चंद्र असतो. आणी या चंद्राचे प्रतिक म्हणुन या देहीचा डावा डोळा ओळखल्या जातो. तर या देहीच्या उजव्या पिंगळा नाडी समुहात सुर्य असतो आणी या सुर्याचे प्रतिक म्हणुन या देहीचा उजवा डोळा ओळखल्या जातो. असे

हे चंद्रःसुर्य नयन हो । यालाही १२ अवसा १२ पुनवा लागतात. २४ आरे-गि-हे भोगावे लागतात. १२ अवसा व १२ पुनवा यांचे पुंजन ही देहधरणी करत आहे. परंतु आताही १२ अवसा १२ पुनवा पुंजता पुंजता, आपल्या चंद्र-सुर्याला सुखःदुःखाचे आरे-गि-हे लागलेलेच आहेत. याचे कारण म्हणजे तुम्ही स्वतःला त्या सत्कर्माचे फळाचे भोक्ते समजत आहात. तुम्ही स्वतः तिरगुणांच्या पल्याड जात नाही आहेत. त्याच मुळे असेच सुखःदुःखाचे आरे-गि-हे भोगत भोगत या देहीने यवगान यवगात कित्येक जन्म घेत घेत, कित्येक सुखःदुःखाचे डोंगर पार करत करत फिरत आहेत. याची गणीता आहे का ठाव ? तुम्हा हाती या यवगान यवगात मुळचा चतुर्पती देवाचे निरंजन चतुर्पती ग्यान न लागल्यामुळे, असे तुम्ही सुखःदुःखाचे आरे-गि-हे भोगत फिरत आहात. परंतु आता हा चतुर्पतीचा अथर्वन् वेद तुम्हा हाती आल्यामुळे आता त्या ब्रम्ह जाणतो असे म्हणणा-या ब्रम्हयाला विचारा की :

हे ब्रम्हया । तु तर म्हणतोस की : मी ब्रम्ह जाणतोस ? मग तु सांगीतलेल्या कर्मकांडा च्या मार्गाव्दारे या यवगान यवगात जन्म घेत मज ब्रम्ह प्राप्त का नाही झाला ? तु सांगीतल्याप्रमाणे मी यवगान यवगात जप-तप, व्रत-वैकल्प, कर्मकांड करत राहुनही का मज नाही भेटला या देहीचा धनी ? मी चौ-यांशी फिरत-फिरत का इथपर्यंत आलो ? आता कुठवर मज पाषाणाचे देव पुजांयला लावुन, त्यांचे जप-तप. व्रत-वैकल्प सांगुन या चौ-यांशीच्या फे-यात फिरवत ठेवणार ? माझे या फिरण्याला जबाबदार कोण ? तु तर म्हणतो : मी धर्म जाणतो. मी ज्ञान जाणतो. मी पंचाग पाहतो. तर मग आता या देहीच्या चंद्र सुर्याने हे सुखःदुःखाचे आरे-गि-हे आता कुठवर भोगावे ? आता हे मज सांगण्यासाठी आपल्या ज्ञानचक्षुने जरा आपले पंचाग उघडुन पहा हो । आणी तुमच्या सांगण्याप्रमाणे या तिरगुणात राहुन या तिरलोक्याचे तिरगुणी अवतार यांचे व्रत वैकल्पे स्तुतीगाण व पुंजन पाठ करत करत कधी मिटतीन हे आरे-गि-हे ? हे पंचागी पाहुन सांगा हो । आपले पंचांग पाहुन सांगा मज की : चतुर्पतीचे निरंजन आत्मज्ञान न घेता कधी मिळेल मुक्ति यातुन ?

हे ब्रम्हया । तु ज्या तिरलोक्यातील तिरगुणी राजे व त्यांचे अवतार यांचे पुंजन पाठ व्रत वैकल्पे अज्ञानी जनांना सांगुन त्यां तिन कडुन जी मोक्षाची मागणी करत आहे, तो मोक्ष तर या तिन देवतांना सुध्दा मिळालेला नाही. हे तिन तर आप-आपले कार्य करत, आपआपले गुंणांचे राज्य संभाळत राज्य करत आहे. या तिन ला मोक्ष नाही. ज्यांना मोक्ष नाही, त्यांना तु कसा मोक्ष मागणार ? हे मज सांगा हो ! या तिन ला सोडल्याशिवाय मोक्ष नाही हो ! म्हणुनच हे ब्रम्हया ! या तिन च्या पल्याड उभा असलेला तो चौथा निरंजन तुझे देहीच्या काशी तिर्थक्षेत्री उभा असतांना त्या निरंजनाचे पाय न धरता, का बसला या तिरगुणांचे तिन राजे ची स्तुतिगान करत ? आकाशी चंद्र सुर्याचे ठिकाण पंचागी पाहुन काय साध्य होणार तुज आता ? ते तर तुज जवळच्या काशी ठिकाणी आहे. तिथेच तु आता पाहावे.

॥ आकाशी चंद्र-सुर्य काशी । धरणी वर आहे ।
कोणं दिले ? कोणं आणले ? । कोणाचें होये ? ॥
॥ आकाशी चंद्र-सुर्य काशी । धरणी वर येणारं ।
कोणं देखीले ? कोणं पाहले ? । पुढेच होणारं ॥

आकाशात जे चंद्र सुर्य आहेत, तेच चंद्र सुर्य या पिंडीच्या नवखंड देहधरणीच्या मस्तकस्थीत दहावा खंड काशी धरणीवर आहे. तर ब्रम्हांडी च्या काशी सारख्या पवित्र स्थान असलेल्या सावंगा येथे सुर्य तर जळगाव येथे चंद्र उतरला आहे. पिंडीच्या मस्तकी चंद्र सुर्य हे नयन दोन आहेत. हे चंद्र-सुर्य कोण

पाठवले ? कोण दिले ? कोणाचे होय ? पिंडीचे हे चंद्र-सुर्य तर या परमात्माच्या तेजोगुणी अंश असलेल्या आत्म्या संग, त्या परमात्म्यानेच तर दिलेले आहेत. जेव्हा हा आत्मा जुनी जिर्ण झालेली देह धरणी टाकुन जातो, तेव्हा आपल्या सुक्ष्म पंचइंद्रियासह, मन व बुध्दी चे सुक्ष्म संस्कार घेवुन तो जात असतो. आणी तो जेव्हा दुस-या देहधरणीवर येतो, तेव्हा या आत्म्यासह तेही चंद्र-सुर्य पुढेच येणार ! ते येणारे चंद्र-सुर्य कोण देखीले ? कोण पाहीले ?

परंतु आता या आत्म्यासह आलेले या देहधरणीवरचे चंद्र-सुर्य ला आरे-गि-हे भोगावेच लागणार आहे. कारण की : या आत्माला मागील जन्मी त्याला त्याचे मुळ घराचे ठिकाण माहीत झाले नसल्यामुळे, या जन्मी ते त्याच्या मुळ परमात्म्याचे ठिकाण चे ग्यान घेण्याकरीता इथे आला आहे. आता या जन्मी त्याने धारण केलेल्या देहीच्या जवळ, त्याचा मुळ यवगाचा देव चतुर्पती आदीपुरूष परमात्मा चा चतुर्पता अथर्वन् वेद हा त्याच्या मागील जन्मीच्या संचिताव्दारे कृष्णकृपा होवुन या देहीच्या हाती पडला आहे. या चतुर्पता अथर्वन् वेद मुळे त्या आरे-गि-हे ची फक्त तिव्रता कृष्णकृपेने कमी झालेली आहे. भाल्यावरचे घाव काटयावर निर्वाळत आहेत. परंतु जे भोग आहे, ते भोग भोगुनच हिशोब पुर्ण करून समोर मार्गक्रमण करावे लागते. ही समोरची प्रगती करण्यासाठी हे सुखःदुःखे भोगत आपल्या कर्तव्याची बाब म्हणुन नियत कर्तव्य कर्मे करावेच लागते. परंतु तुम्ही जन्म घेतला असल्यामुळे याही जन्मी त्याला मागच्या जन्मीच्या बरे-वाईट संचिताव्दारे आलेले सुखःदुःखाचे अश्रु चे २४ आरे-गि-हे या देहीच्या भोगावे लागतात. कृष्ण कृपेने तुमच्या नशिबात असलेले भालीयाचे घाव चे काटयावर निवारन होत, या चंद्र-सुर्याला आता थोडयाबहुत कमी प्रमाणात कमी तिव्रतेचे आरे-गि-हे भोगावेच लागणार ते असे.

कोणतेच कर्मे निष्फळ नसतात. प्रतेक कर्माला बरे, वाईट व बरे-वाईट असे मिश्र फळ येतात. वाईट कर्मे चे परिनाम चे ग्रहन या चंद्र-सुर्याला लागुन दुःखाचे आरे-गि-हे भोगावयास लावतात. तर चांगले कर्मे चंद्र-सुर्याला सुखाचे आरे-गि-हे लावतात. तर बरे-वाईट असे मिश्र कर्मे मिश्र सुखःदुःखाचे आरे-गि-हे या देहीच्या चंद्र-सुर्याला लावतात. कधी कधी चांगल्या कर्मात सुध्दा हयगय, निश्काळजीपणा, दुर्लक्ष्य केल्यामुळे त्याचे सुध्दा बरे -वाईट असे मिश्र फळ येते. त्याच मुळे सुखःदुःःख हे भोगावेच लागते.

म्हणुनच कृष्णाने भगवत गीता मध्ये असे सांगुन ठेवले आहे की : तु तुझे कर्तव्याची बाब म्हणुन हयगय न करता आपले स्व कर्मे करत जा ! त्या कर्माच्या फळाची आसक्ती, अभिलाषा न बाळगता, त्या प्रतेक कर्माचे फळ या कृष्णास अर्पण करत जा ! असे सत्कर्माचे फळ कृष्णालाच अर्पण केल्यानेच त्या सर्व कर्माचे फळाचे बरे-वाईट परिनाम या कृष्णास प्राप्त होवुन ते परिनाम तुला भोगावे लागणार नाही. तुझे केव्हाही अहीत होणार नाही. तुमच्या चंद्र-सुर्याला कर्माच्या परीनामाचे ग्रहन लागुन, तुला आरे-गि-हे भोगावे लागणार नाही. अथवा तुमचे नशिबात असलेले भालीयाचे घाव यांची तिव्रता कमी होवुन हे सौम्य तिव्रतेचे सुखःदुःखे थोडयाबहुत प्रमाणातच भोगावे लागेल. म्हणुनच सरळ साध्या सिदाईच्या मार्गाने राहत असेच निष्काम आसक्तीरहीत सत्कर्मे करत करत जेव्हा तु या सत्कर्माच्या अधिक्याने या तिरगुणांच्या पलिकडे जाशिन, तेव्हा या तिरगुणांच्या पल्याड उभा असलेला हा चतुर्पती कृष्णा तुम्हास आपरूप प्राप्त होईनं.

परंतु ब्रम्हया । हे सर्व साध्य होण्यासाठी प्रथम तुम्हा नवखंड देहधरणीच्या दहाव्या खंड असलेल्या काशी तिर्थास जावे लागेल. शुध्द आचारा विचाराचा झाडु घेवुन ही काशी धरणी शुध्द करत तिथे चतुर्पती नामअमृताचा पाझर

फोडत फोडत, चतुर्पती ज्ञानगंगेत न्हावुन निघाव लागेल. असे हे काशी सारखे तिर्थ आहे तुम्हा पाशी । या काशी तिर्थक्षेत्रीच देह जीवाच बरं आहे.

॥ काशी सारखे, तिर्थ रे ब्रम्हया । आहे, तुया पाशी ।
पाय धुवुन, जग पितीन । त्यातं, अमृत नाही ॥
॥ चतुर्पता, वेदांत गाय । हे माझ तिर्थ ।
कसं मी, टाकु इला । इनं, जगवला हा पिंड ॥

या नवखंड नरदेहीवर दहावा काशी खंड म्हणजेच मस्तक ठेवुन, धन्याने इथे आपले सर्व गुण सह शक्तियॉ व सिध्दियॉ ठेवल्यात. म्हणुन या मस्तकाला गुणात काशी असे म्हटलेले आहे. हे खंड जागृत झाल्यावर इच्याच पोटी या सत्‌यवगाचा जन्म आहे. नव खंड पृथ्वा दहावा खंड काशी । या तिरगुणांची क्षणात उडवण हो पदवी ॥

॥ तिर्थी पिंडी, वस्ती याहीची, दुरच होय म्हणता ? ।
तिर्थ-पिंडाच्या, दुरच असते, का देता हाका ? ॥
॥ पिंडा मध्ये, पोहन-पाणी । नांदे इच्छा कर्तार ।
कल यवगी, वस्ती ठेवनं । हे माझं घरं ॥
॥ तुमचं हे घर, यवगाचं मुळ । तु गायप झाला ।
कल/सत यवगी, आला/येईन भैस । यवगाचा दोरा/राजा ॥ २४ ॥

-: **शब्दार्थ** :-

**वेदांत गाय** :- वेद जिथुन *'नेती नेती'* म्हणत पलटुन आले, त्या वेदांच्या अंतापार/अंतापलीकडे असलेले परमं ज्ञान जिथे मिळते, ती वेदांत गाय म्हणजेच निराकार निरंजन परमं ग्यान-शक्ती पिंड, वेदातील चौथा पिंड समजावुन देणारे ज्ञान ।

**ब्रम्हया** :- 'ब्रम्ह जाणतो !' असे फुशारकीने म्हणणारा ।, अनुभवाविना शास्त्र-पुस्तकातुन वाचुन/पाठ करून, पोपटपंची करणारा मानव, ज्याला हेही मालुम नसते की : ब्रम्ह हे वाचुन जाणावयाचे नसते, ते तर अनुभवाचे असते ।

**हंस** :- आत्मा, देहधरणीवर अवतरून देहीत वसना/वस्ती करतो, तर देहीबाहेर पडुन त्याच देहीला मसना/स्मशानभुमी देवुन, सुक्ष्म असे पंचईद्रिये मन व मतीसंस्कार घेवुन बाहेर पडतो । **वस्ती** :- निरंजनाची वस्तु असलेल्या या आत्म्याची वस्ती/रहीत ही पिंडी या ब्रम्हांडात आहे.

हे बम्हया । ज्या अनामीकाला तुम्ही दुरच होय म्हणता ? तो अनामीक कृष्णाच तर तो निरंजन आदीपुरूष होय. याच निरंजन आदीपुरूषाचीच तर सर्व तिर्थि पिंडी निरंजन वस्तु आहे. या निरंजन वस्तु ची वस्ती/रहीत या पिंडी या ब्रम्हांडी आहे. सर्व सजीवांच्या अंतःकरणात राहुटी करून राहणारा निरंजन आत्मा हा या निरंजन आदीपुरूषाचाच तर अंश आहे. सर्व प्राणी मात्रांच्या ठिकाणी असलेले चेतना/चैतन्य तर त्याचेच आहे. त्यानेच तर तिर्थि पिंडी या ब्रम्हांडी ही चेतना देणारी निरंजन वस्तु ठेवलेली आहे. सर्व तिर्थि पिंडी या ब्रम्हांडी त्याचीच निरंजन वस्तु ची वस्ती असुनही, शिव-शिव करत स्पृश्य-अपृश्यता मानत त्यालाच दुर होय म्हणता ?

सर्व पदार्थांचे जे काही मुळ म्हणुन आहे, ते मुळ तोच निरंजन आदीपुरूष कृष्ण धनी आहे. तो धनी व्यापलेला नाही, अशी एकही वस्तु या चरांचरात नाही. तेज वैभव प्रभुत्व..ईत्यादी सह सर्व काही त्याच्याच तेजाच्या फक्त एका अंशापासुन निर्माण झालेले आहे. तो एकला धनी त्याच्या एकाच अंशाने, हे सर्व चरांचर विश्वे व्यापुन यात वस्ती करत भरून भरला आणीक उरलेला आहे.

परंतु हे निर्बुध्द ब्रम्हया ! तुम्ही लोक त्याचे हे श्रेष्ठ व अती उत्कृष्ठ आणी अव्यय असे निराकार निराधार निरंजन स्वरूप न ओळखता, तो

सगुणरूपी आहे असे समजुन त्या अनामीकाला दुरच होय म्हणता ? तो तर योगमायेने आच्छादिला असल्यामुळे भल्या-भलत्याला त्याचे स्वरूप उघड दिसत नाही. म्हणुनच हे निर्बुध्द मुर्ख लोक अनादि अव्यय निराकार निराधार निश्कलंकी निरंजन आदीपुरूषाच्या स्वरूपाला ओळखत नाही. ज्यांनी स्वतःची ओळखी करून घेतलेली आहे, असे ओळखीचे जीव त्या आदीपुरूषाला ओळखतील !

तिर्थि पिंडी या ब्रम्हांडी तर या आदीपुरूषाचीच निरंजन वस्तु म्हणजे त्या आदीपुरूषाचाच अंश अवतार आत्मारामची वस्ती आहे. तरी सुध्दा तुम्ही स्पृश्य-अस्पृश्यता मानत, ज्या देहीच्या आत तो निरंजन वस्ती करून उभा आहे त्या अनामीक देहीलाच त्या अनामीकालाच दुरच होय म्हणता ? स्पृश्य-अस्पृश्यता भेद करता ? पिंडा-पिंडात भेद करून, स्पृश्य -अस्पृश्यता ठरवुन शिव शिव करणारे तुम्ही खरंच ज्ञानी आहात काय ? जरा आपल्या अंर्तमनाला विचारून पहा. अंर्तमन काय सांगते त्यावर अंमल करा....मगच उमजेल की :

तो निरंजन राया तर या तिर्थि या पिंडी या ब्रम्हाडी सर्वत्र भरून भरलेला सानीध्य उरलेला आहे. तो भरून-उरून अंती तो वेगळाच राहीला आहे. या तिरगुणी मायेच्या विश्वात त्याच्या एकाच अंश रूपाने राहुटी करत, तो दुरच या तुमच्या तिरगुणी विश्वाच्या येशीवर उभा राहुन, या तिरगुणी मायेचा तमाशा तो वक्रदृष्टीने निमुटपणे पाहत आहे. आणी जे या तिरगुणी मायेच्या येशीबाहेर निघालेत, त्यांचा हात हातात घेवुन त्यांना साहयं करत उभा आहे. तो तर तुमच्या या तिरगुणी मायेच्या विश्वाच्या तिर्थ पिंडाच्या दुरच आहे. तरीही तो निराळा आपल्या एकाच अंशाने तुम्हा जवळ तुम्हा देहीअंर्तगत तो कर्तार या पिंडा मध्ये पोहन पाणी ईच्छा शक्ती सह नांदत आहे. तो धनी तुम्हा अंतरी आहे. तुम्हा जवळी आहे. तुम्हा शेजारी आहे. तुम्हा पुठे-मागे दाही दिशेचे पांघरून घेवुन तुमचा तो दिंगाबर धनी उभा आहे. तोच कर्तार पिंडामध्ये पवन-पाणी, ईच्छा शक्तीला नांदवत आहे.

जेव्हा हा आत्मा या कृष्ण परमात्माच्या घरी येथे या चतुर्पता कृष्ण अवधुत पंथाच्या पायरीवर येवुन उभा झाला. आणी येथुन वर वर असलेल्या परोपरीच्या पाय-या चढत या कृष्ण परमात्मानेच उभं केलेल्या सत् यवगाच्या मुळावर येवुन पोहचला, तेव्हा तो पाहते ते काय ? येथे तो कृष्ण परमात्मा स्वतः गुप्त होवुन आपल्या मौस वाणी च्या घरात राहुन आपणच लावणी केलेल्या आपल्या सत् यवगाच्या मुळाला खतपाणी घालतो आहे, गुप्त रूपात उभा राहुन सत् यवगाची मांडणी करत आहे..., तेव्हा तो आत्मा म्हणतो की : हे परमात्मा ! तुम्हीच तर आपणहुन या देहघरा येवुन मज या तुमच्या या घरी आणलें, तुमच्याच मौस वाणी च्या घरात राहुन मज अहीनाघरचे ग्यान दिले. सत् यवगाचे मुळ दाखवले आणी तुच येथे गायप आहे ? येथे तर तुज नाही हात पाय ! तु तर लुंडमुंड आहे. आता काय पाहु कोण्या तोंड ? हा अनामत या घरी तर लदबद ज्योतीचा प्रकाश चे तेजांकृत रूप घेवुन आपला उजेड चवताळात पाडत आहे. अल्लाद आहे तुमचे पाय नाही लागले हो या देह धरणीला ! असा जेव्हा तो आत्मा रडगाडे पिटत आक्रोश करू लागला, तेव्हा तो उरला धनी त्याच्या सुमरणी आला. आणी त्याची समजावणी करण्याकरीता येणा-या सत् यवगात मी येवुन काय काय करणार याचे शकुन देवु लागला. तेच शकुनाचे चरणे तो सत् यवगी पुढे काय काय करणार ? याचे ग्यान देत आहे की :

॥ महा महा, योगी उभे । राहतीन सत् यवगाले ।
शक्ती मागनं, रूतं लज्जा । येईन/पडनं अवघ्या योग्याले ॥

॥ चारबीज हाती, घेवुन भैस । रूतं, देईन शक्तीले ।
शक्ती आंगचा, विटाळ । शुध्द भैस करन अवघ्याले ॥
॥ आधी शुध्द, मध्ये शुध्द । झालो, भैस नामानं ।
आता नका, लाजु कराहो । अनामीकाचं पुंजनं ॥
॥ तिरलोक्याचे, पुंजन अनामीक । करन एक भावं ।
पुंजना वेगळे, राहतीन वाया । जातीन, ते जीवं ॥ २८ ॥
॥ अनामीकाशी, पुजा-अर्पण/पुजारपण । देल्लं देवानं ।
तिन यवगाच, उसनं । गादीवर, घेईन भरूनं ॥ २९ ॥

**शब्दार्थ :- वस्तु** :- निरंजन आत्मा ही अविनाशी वस्तु देहघरामध्ये चैतन्यप्राण चा प्रकाश देण्याकरीता परमात्म्याने ठेवली आहे. हा निरंजन देहीमध्ये राहुटी करून देहीत वस्ती करतो. परंतु या निरंजनाची वस्ती या देहभुम्मेवर असतांनी सुध्दा तिरगुणांमुळे ही देहभुम्मा नासली सारी । **वस्ती** :- निरंजनाची देहीमधील वस्ती । **रूत** :- विर्य बिज

**चार बिज** :- बिज आवाजी नजरी उरस्थळी कमरी-०१/०२/०४ ऐसे चार प्रकाराने बिज देण्याचे प्रकार आधीच्या यवगी होते. ते असे :

**०१. आवाजी बिज** :- आवाजा व्दारे बिज देणे.

- मुळयवगी शक्तीच्या ओवी ०१/०२/०१ मध्ये शक्तीला आवाजा व्दारे तिच्या कर्ता-याकडुन आवाजी बिज मिळाले.
- व्दापरच्या कुंतीला आवाजी बिजाच्या वराव्दारे तिने ईच्छीलेले देव उभे राहुन, त्या देवांनी तिला आवाजी बिज दिलेत. कुंतिला आवाजी बिजा व्दारे कर्ण व पंचपांडव हे पुत्र झालेत.

**०२. नजरी बिज** :- नजराला नजर भिडवुन नेत्रा व्दारे बिज देणे.

॥ दृष्टी देखता स्वभ्रताराची । गर्भ राहे स्त्रियांशी । त्रैतायवगी ॥

- त्रैतायवगी स्वताच्या भ्रताराची दृष्टी देखताच स्त्रियांशी गर्भ राहत असे.
- ईछुक स्त्री-पुरूषाच्या दृष्टा-दृष्टातुन बिज राहण्याचे प्रकार या त्रैता यवगी घडत होते.
- अनावधानाने लक्ष्मीच्या नेत्रांतुन बिजयुक्त अ्श्रुबिंदु पडुन शंखासुर उत्पन्न झाला. आणी त्याने ब्रम्हदेवाचे वेद चोरले हे कथानक झाले..
- मोर आपल्या नेत्रबिंदु व्दारे लांडोरी ला बिज देतो असे मानल्या जाते.

**०३. उरस्थळी बिज** :- उरस्थळाला उर/छाती घासुन अथवा स्पर्शुन बिज देणे.

- अंजलीच्या उरस्थळाला पवन झोंबुन पवनसुत झाला. पवनाने अंजलीला दिलेले ते उरस्थळी बिज होय.
- सागरातील स्ट्रीप जातीचा नरमासा आपले उर म्हणजे बाहया व्दारे मादी च्या बाहया ला स्पर्श करून म्हणजेच मादीच्या उराला आपला उर घासुन मादीच्या उरस्थळी बिज देतो.
- खटमल आपल्या मादीच्या उरावर आपले उर घासुन मादीला उरस्थळी बिज देतो असे मानल्या जाते.

**०४. कमरी बिज** :- कमरेखालील पाताळी लिंगाव्दारे कमरेखालील पाताळी योनीत बिज सोडण्याची पध्दत.

- मानवासह ईतर सर्व अंडज व जाडज जातीच्या प्राण्यांमध्ये आढळुन येते.

ऐसे आधी बिज झाले हे चारही । सत्य जाणा ना तुम्ही । बिज आवाजी नजरी उरस्थळी कमरी असे बिज देण्याचे चार प्रकार आहेत. चारही प्रकाराने देण्यात येणारे चार बिज चे देणं देण्याचा अधिकार परमात्म्याचा आहे. ऐसे हे चार बिज भैसधनी हाती घेवुन शक्ती जे रूत मागेल, ते मागीतलेले रूत तो भैस धनी शक्तीला देईन.

**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. २१ ॥
॥ जुनी ओवी ॥

# ॥ माझ्या घराचं ठिकाण -छोटी ओवी ॥

॥ माझ्या घराचं, ठिकाण बाप्पा । मज नाही ठाउकं ।
मज कोणाचा, आकार कळेना । कशी सांगु रित ? ॥
॥ ब्रम्ह काळ, मुळ यवगात । पहा अक्षरातं ।
मुळ पुरूषाचं, ठिकाणं बापा । कशी आहे रीतं ॥
किंवा म्हणनी नं. २
॥ मुळ यवगाचा, आकार ब्रम्हा । आहे एका शहरातं ।
मुळ पुरूषाचं ठिकाण कळेना । कशी आहे रीतं ॥
॥ देवरूप छाया, आणीक माया । उभ केलं ज्योतीनं ।
तिला आवाजी गर्भ राहला । त्यात नाही आपनं ॥
॥ देवरूप/हरूष् छाया, लावली माया । ब्रम्हया वाढवलां ।
नरदेही/पृथ्वीचा, भंग केला । पुसावं कोणाला ? ॥

॥ राक्षस गण, विस्तार कोण ? पुसावं ब्रम्हयाला ।
मानवाचं मासं तोडुन । खाये कडाकडा ॥
॥ राक्षस भवन, करून । भक्ती, आकारली आहे ।
आकाश वाणी उरला धनी । याहीचे धरावे पाय ॥
॥ जागी राहुन, पाहये ब्रम्हया । याहीनं पसरले तोंडं ।
याहीच्या आंगची चैत्यन्या माया । ईन मचवल ढोंग ।
देवरूप छाया, योग माया । गिळलं धोंडं ॥
॥ ब्रम्हया अंगी, धर्म । तो काय, भक्तीत निवळला ।
पांडवाचा परीवार । श्री कृष्णानं वाठवला/उध्दारला ॥

॥ गेले यवग, आले यवग । कोणास मालुमं ।
काहो भरवला, बाजार । खोटा व्यवहार करूनं ।
काहो भरवला, बाजार । एवढा आकार करूनं ॥
॥ गेला जीव, आला जीव । कोणास मालुमं ।
तिरलोक्याचा/पृथ्वीचा, आकार केला । ब्रम्ह देवानं ॥
॥ काय सांगु, तुम्हा गडे हो । खरचं हे आहे ।
येईन चांगोना माय माझी । करन देहीसं साहयं ॥
॥ चतुरपता वेदांत गाय । हे माझ्या पोटातं ।
ईंच्याच पोटी जन्म गडे हो । यवगाचा आहयं ॥

॥ आल्या येशी, गुणात/रूपात काशी । गुणावंती माय ।
इच्याच पोटी, जन्म गडे हो । अवघ्याचा आहे ॥
भजने :-
॥ माया चैत्यन्या माय तिघांची । माया चैत्यन्या माय तिघांची ।
माय सत्वधिर । चांगोणा माय माझी ।
माय रूपावंती । चांगोणा माय माझी ।
॥ माया चैत्यन्या माय तिघांची । माया चैत्यन्या माय तिघांची ।
माय चतुर्पता । वेदांत गाय माझी ॥
॥ चतुर्पता वेदांत गाय । हिच्याच पोटी जन्म यवगाचा आहे ॥

-: निरसनसह शब्दार्थ :-

देवरूप छाया आणीक माया । उभ केले ज्योतीने.. :- ज्योर्तिमय निरंजन परमात्माची जी छाया पडली ती छाया च प्राण बनली. आणी निरंजन ज्योतीच्या मुळावरच्या रंगाने माया उभी केली. तिला आवाजी खुम्म दिले. परंतु त्यात तो चौथा निरंजन निराकार निराधार परमात्मा उभा न राहता, गायप राहुन निराळाच राहीला. आदीपुरूष आदीगण व शक्ती ओवी नं.१ च्या निरसनातुन ग्यान घ्या.

देवरूप छाया, लावली माया । ब्रम्हया वाढवलां.... :- परमात्माचा अंश अवतार असलेल्या आत्म्याच्या छायेला माया चिकटली. प्रकृतिमायेने त्यावर वेस्टने घालुन त्या जीवात्म्याला बंधनात अडकवले. तिरगुणी मायेन आपले तिन गुण त्यास लावुन त्याच्या देहीला तिरगुणी बनवले. आणी मग या तिन गुणांपैकी रज गुणांनी आपली राजशी सत्ता वाठवण्याकरीता रजगुणांचा राजा ब्रम्हा याची त्या देहीव्दारे किर्त महीमा वाढवत या ब्रम्हयाला वाढवला. देहीला मुळपुरूषाच्या चतुर्पती ग्यानाकडे जाण्यास रोकत रोकत या तिरगुणी राजे यांनी तिरगुणी देहीवर आपलीच सत्ता गाजवण्यासाठी त्याना दिलेल्या तिनही यवगात कार्य केलेत. चतुर्पती पासुन देहीला दुर नेवुन तिरगुणी राजे यांची किर्त महीमा वाढवत, या देहीवर या तिरगुणी राजे यांचीच सत्ता आहे असे भासवत या देहीत या पृथ्वीत भंग आणला. परंतु या देहीला भंग न येवु देण्यासाठी सतयवगाचे सत्य हेच आहे की : परमात्म्या हा या देहीच्या आंग आपला अंश अवतार घेवुन आत्माराम बनुन उभा आहे. आणी या देहीवर त्या चतुर्पती धन्याचीच सत्ता आहे.

॥ देहीवर सत्ता आहे धन्याची/चतुर्पतीची । यवग भरले ।
अवतार घेवुन सारंगधर । सत्य बोलले ॥
॥ आपण उभे हो आंग । अवतारा संग ।
अनामत आले हो आले । दिवस आला हो आला ॥....

आल्या येशी, गुणात काशी :- आल्या ईश्वरी काया, चौ येशिच एकच घर असलेल्या देही । या देहीवर एक काशी खंड म्हणजेच मस्तक ठेवुन, इथे आपले सर्व गुण सह शक्तियॉं व सिध्दियॉं ठेवल्यात. म्हणुन या मस्तकाला गुणात काशी असे म्हटलेले आहे. हे खंड जागृत झाल्यावर इच्याच पोटी या सत्‌यवगाचा जन्म आहे.

॥ गेला जीव, आला जीव । कोणास मालुमं ।
तिरलोक्याचा/पृथ्वीचा, आकार केला । ब्रम्ह देवानं ॥

पिंडी या ब्रम्हांडीतील तिरलोक्याचा आकार केला आहे ब्रम्हदेवानं । हा ब्रम्हा उत्पत्ती करीत असे. परंतु पुढची किल्ली म्हणजेच त्या आकारात चैतन्य कसे ओतावे ? हे त्याला मालुम नाही. त्या ब्रम्याला त्यान बनवलेल्या आकारात चैतन्य ज्योत उभी तेवत ठेवता येत नाही. चैतन्याचा पुरवा करता येत नाही. आपला अंश अवतार घेता येत नाही. म्हणुनच धनी आपला तेजोगुणी अंश अवतार घेवुन प्रतेक देहीत आत्माराम रूपात उभा राहुन चैतन्याचा पुरवा देहीला देत राहतो. या देहीत जीव धन्याच्या कृपेने परवेशी/प्रवेशी होतो. तरमग प्रतेक जन्मीच्या देंहीतुन जीव गेला आहे आणी प्रतेक जन्मीच्या देहीत तो आला आहे. असे कितीतरी वेळा गेला जीव आला जीव हे कोणास मालुम ? हे तर त्या धन्यालाच ठाव आहे.

काय सांगु, तुम्हा गडे हो । खरचं हे आहे....

हा धनीच आम्हा चतुर्पतीची चांगोणा माय होय. ही चांगोणा माय येईन. देहीच मरण चुकवन. या देहीस साहयं होईन. हा धनीच आमची चतुर्पता वेदांत गाय होय. या गाईच्या पोटीच सत यवगाचा जन्म आहे. या धन्याव्दारे ज्याच्या काशी क्षेत्री सद् सत्‌गुण भरून आहेत, अश्या देहरूपी वेशी येथे आलेल्या आहेत. या येशी/देही पोटी जन्म अवध्या सत्‌यवगाचा आहे. काय सांगु तुम्हा गडे हो ! खरचं हे आहे !

**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. २२ ॥
॥ जळगाव दांडातील मुळावरची ओवी ॥ .

## ॥ बरे गा माझे लहानपण ॥

॥ मुळावरची मोठी ओवी ॥

॥ आदी पुरूष, करन-कर्तार । आले बावशीचे साल ।
बावशी करून, दाव लवकर ॥
बरे गा, माझे लहानपणं..॥ घृ ॥
॥ साल बावशीच्या साली । नागार्जुन, येईन घरी ।
होईन त्या, शंकाची आरोळी ॥
॥ बावशीचे बावसर जन । बहात्तराचे बैतलंपण ।
देतीन गाहीचे वचनं ॥
॥ निरशुन्य निरंजन । साचा सचवला निर्गुण ।
ज्याची किल्ली धन्याला मालुमं ॥ ०४ ॥

॥ ब्रम्हा करतसे उत्पन्न । तिरलोकी आकार केला त्यानं ।
आलं-गेलं त्याला मालुम । पुढची किल्ली नाही मालुम ॥
॥ विष्णु शिलेदार बहाद्दुर । शेजली तिरलोक्याची कुड ।
नाही केली चौ-यांशीची मोड ॥
॥ शंकरानं संगळा केला । पैदा चौ-यांशीचा वेढा ।
राखन नाही केली लेकरा ॥
॥ अवतार झालेत यवगावर । नाही त्या किल्लीची खबर ।
यवग पाडलं सुनं ॥ ०८ ॥

॥ अमर पद ऋषीजना । मुनी होवुन बसली भुम्मा ।
नाही त्या किल्लीचा ठिकाणा ॥
॥ मानव आदी भक्तजन । द्युतम् गाय गाही गुणं ।
वरकट चौ-यांशी मोडनं ॥
॥ चौ-यांशीची उकलन वाणी । मौसराज पडन गगंनी ।
गाही देईन तिरभवनी । जाउ देणार नाही कोणी ॥
॥ सव्वा प्रहर उभी प्रिथवी । विस घंटा कापन धरणी ।
शंक सम्मावनं तेथुनी । ज्योता खेळतीन दोन्ही ॥१२॥

॥ शंक सम्मावला त्याहीनं । मौसं रक्षते त्याहीचे गुण ।
येईन तो शंकाला घेवुन ॥
॥ शंकाचारी राहतीन देहा । पाचव्या गाही साठी गाहया ।
मोडन चौ-यांशीच्या देहया ॥
॥ चैत्यन्याचे तुटतील ताल । मोठया-मोठयाचे होतीन हाल ।
शरण राहल्यानं तरतीलं ॥
॥ निर्गुणाचा भक्तीभार । बसुन निरसन केलं फार ।
येईन यवगावर शंक अवतार ॥ १६ ॥
॥ निरसुन निरंशुन्यं । शुन्य टाकन उडवुन ।
तो वरकट चौ-यांशी मोडनं ॥
॥॥ ऐका लहानपण गुणं । बसुन निरसन केलं त्याहीन ।
लहानपण नाही धरलं कोण ? लहानपण धरलं देवानं ॥१८॥

॥ शकुन उठला यवगावर । मो-हं होणार सांगतले खरं ।
येईन शंकाचारी अवतार ॥

भजने :-

॥ शंक सम्मावला त्याहीनं । मौस रक्षिते त्याहीचे गुणं ॥
॥ उठला बावसीचा रंग । चत्रभुज उभा, राहीला आंग ॥
॥ उठला बावसीचा रंग । आदीपुरूष उभा, राहीला आंग ॥
॥ बावशी उठली । बहुरंग , खेळे महाराजा/अवताराच्या संग ॥

लहानपण चे भजने :-

॥ ऐरावत रत्न, आहे थोर । त्याला आहे, अंकुशाचा मार ॥
॥ जिथ आहे मोठेपणं । तिथे आहे, याचना कठीन ॥
॥ जिथ आहे लहानपण । तिथं आहे या देवाचं दर्शन ॥
॥ लहानपण ठेवु । विठु/देव रायाचं दर्शन घेवु ॥
॥ लहान पण धरावे । मुंगी होवुन साखर खावे ॥
॥ लहानपण देगा देवा । मुखी लागो साखरेचा खवा ॥
॥ लहानाचं मोठो झालो । देवा, तुया कृपेनं ।
एवढं मागतो देवा । नको देवु अभिमान/मोठेपण ॥

-: निरसनसह शब्दार्थ :--

**शंक** :-निशःकलंकी, शुध्द, पवित्र, पाक, उदां :- जसे म्हशीच्या दुधात काळपटपणाचा लवलेशही नसते, ते दुध पुर्णतः पांढरे शुभ्र असते, तसे पाक शुध्द निर्मळ निश्कंलकी **शंक अवतार** :- निश्कलंकी अवतार । **शंकाची आरोळी** :- निश्कलंकी ची आरोळी **शंकाचारी** :- शंक-आचारी, निशंःकलंकी पवित्र शुध्द/शंक आचार-विचार करणा-या देही, शुध्द आचार विचार ठेवुन, सरळ साध्या सिदाईच्या मार्गाने चालणा-या शंकाचारी देहा, शंक आचार विचारी देहा प्रेरीत करणारा निश्कलंकी अवतार । **गाहया** :- शंकाचे साक्ष-पुरावे जवळ असलेल्या देहा । **गाहीचे वचन** :- साक्ष पुरावे ठेवुन दिलेले वचन । **पाचवी गाही** :- स्थुल-सुक्ष्म, कारण-महाकारण, आणीक पाचवी कैवल्य/केवळ देही । या पाचव्या आत्माच्या केवळ देही करीता देण्यात येणारी गाही साक्ष -पुरावा ई. । **शेजली** :- फुलांची जशी शेज करते त्याप्रमाणे शेज करून ठेवणे. । **७२ चे बैतलपण** :- १८ जाती, १८ न्याती, १८ लिंग. १८ वर्ण असे एकुन ७२ याचे बेतालपणे बरळणे. । **शिल्लेदार** :- सत्वगुणी सत्तेचा शिल्ला/शिक्का मोहर असलेला शिल्लेदार विष्णु । **संगडा/संगळा** :- व्याप, संग्रह जमाव । **पैदा** :- जन्मा घालने, निर्माण करून देणे. । **मौसं** :- नाभीकमळातुन परा, हदयातुन पश्चंती, कंठातुन मध्यमा, व मुखातुन वैखरी या चारही वाचेतुन निघालेले हरीनाम । **मौस रक्षते त्याहीचे गुण**:- अध्यात्मीक विश्वानुसार आपला आध्यात्मीक प्रवास चारही वाणीतुन होत गेला पाहीजे. म्हणजेच वैखरीतुन मध्यमात, तद्नंतर मध्यमातुन पश्यंति मध्ये, आणी पश्यंती तुन परा मध्ये गेला पाहीजे. असे गेल्यानेच या चारही वाचेतुन निघणारी मौसंवाणी त्या भक्तांचे सर्व गुण रक्षते. आणी सर्व काही सिध्द होत जाते. । **मौसराज** :- चारही देहाच्या चारही वाणीतुन निघणा-या वाणी चा, निराकार निराधार राजा आदीपुरूष आदीरूप धनी **मुनी** :- मौन व्रत धारण करून चुपचाप बसलेली देहधरणी/पृथ्वा/धरणी । **ताल** :- ठेका, लय. भान । **मानव आदी** :- मानव इत्यादी । **मो-हं**:- समोर, पुढे, भविष्यात. । **द्युतम् गाय** :- द्युतांची गाय असलेली चतुर्पता गाय । **ऐरावत** :- समुद्र मंथनातुन निघालेला जो एक रत्न होता, त्याचे नाव ऐरावत हत्ती ! तो ऐरावत इंद्राला देण्यात आला. त्याला इंद्राच्या अंकुशाचा मार सहन करावा लागतो.



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. २३ ॥
॥ म्हणनीतील छोटी ओवी ॥

# ॥ बरे गा माझे लहानपण ॥

॥ आदीपुरूष, करन कर्तार । आलं बावशीचे साल ।
बावशी करून, दाव लवकर ॥
बरे गा माझे लहानपण ॥ घृ ॥
॥ साल बावशीच्या साली । नागार्जुन येईन घरी ।
होईन त्या, शंकाची आरोळी ॥
॥ बावशी चे, बावसर गुण । चौ-यांशी चे, बैतलं गुण ।
देतीन गाही चे वचनं ॥ ०३ ॥

॥ बम्हा करतसे उत्पन्न । साचा सचवला, निर्गुण ।
पुढची किल्ली, नाही मालुम ॥
॥ विष्णु शिलेदार बहाद्दुर । शेजली तिर लोक्याची पर ।
नाही मोडला, चौ-यांशीचा बाजार ॥
॥ शंकरानं, संगळा केला । पैदा चौ-यांशीचा फेरा ।
राखन नाही, केली लेकरा ॥ ०६ ॥
॥ मौंसराज, हिंडतसे गगंणी । नाहीकेली मौंसाची, पारख कोणी
मौस होय, जीवनकळीचें घरं । गाही देईन, तिर भवनी ॥

॥ शंकाचारी राहतीन देहया । पाचव्या गाही, साठी गाहया ।
मोडन चौ-यांशीच्या देहया ॥
॥ चैत्यन्या आंगचे, तुटतील ताल । मोठया-मोठयाचे, होतीन हाल
शरण राहता, चुकतील मरणं ॥ ०९ ॥
॥ काय सांगु, लहानपण गुणं । बसुन निरसन, केलं त्याहीन ।
लहानपण नाही धरलं कोण ? लहानपण धरलं, भगवंतानं ॥

भजने :-
॥ उठला बावसीचा रंग । चत्रभुज उभे, राहीले आंग ॥
॥ उठला बावसीचा रंग । आदीपुरूष उभा, राहीला आंग ॥
॥ बावशी उठली । बहुरंग, खेळे अवताराच्या संग ॥
॥ बावशी उठली । बहुरंग, खेळे महाराजा संग ॥
॥ ज्याच्या अंगी लहानपण । तोच खरा अनामीक जाणं ॥
॥ जिथ आहे लहानपण । तिथं आहे या देवाचं दर्शन ॥
॥ लहान पण ठेवु । विठु रायाचं दर्शन घेवु ॥
॥ लहान पण धरावे । मुंगी होवुन साखर खावे ॥
॥ लहानपण देगा देवा । मुखी लागो साखरेचा रवा ॥
॥ लहानाचं मोठो झालो । देवा, तुया कृपेनं ।
एवढं मागतो देवा । नको देवु अभिमान/मोठेपण ॥

-: शब्दार्थ :-
खंड-०२/मुळओवी-२२ :-'बरे गा माझे लहानपण-जळगाव पाठा' मध्ये शब्दार्थ दिलेले आहेत.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. २४ ॥
ओवी महात्मः- स्थापनेच्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी...
॥ मुळावरची ओवी ॥

# ॥ बावशी ची ओवी ॥

॥ बावशीच्या साली । उठन बावशी ।
येईन भैस । पहा राया ॥ किंवाः- मचन भविष्य । पहा राया ॥
॥ धरतरी आदीमाया शक्ती । रूत मागणं दयानं किती ?
भैसाच्या ज्योती । प्रकाशती ॥
॥ भैसा च्या खाणी । भैसा च्या वाणी ।
लक्ष जीवा जनी । पैदा होती ॥
॥ भैसा ची खाणं । भैसाचं हे वाणं ।
सत्यवंत गुणी कोण ? निवडती हो राया ॥ ०४ ॥

॥ सत्य सांडन भुम्मा । मोडन कली । सोड्डुन दया लबाडी
बसा नेमधारी । या भैसाच्या/महाराजाच्या ॥
॥ लबाडीच्या मुळं । चौ-यांशी यवनं । चौ-यांशी बिगार ।
म्हणुन/लागलं येणं-जाणं । येरझार हो ॥
॥ स्वर्गा वरून येणं । स्वर्गा वरती जाणं ।
धनी अनामत । बाहेर वसे ॥
॥ बाहेर वसे म्हणुन । धरली हो तुमची बाही ।
वस्ती करा माझ्या । नरदेही हो राया ॥ ०८ ॥

॥ हिंडता-फिरतां । होयें बा ओलांडा ।
घात नसो पिंडा । यवगा यवगी । हो राया ॥
॥ भेलुंड सिध्दाच्या । बसतीन परवरी ।
सिध्द पैदा होईन । भुम्मेवरी ॥
॥ भेलुंड सिध्द । भरन तिनही ताळी ।
भेलुंडाचा सिध्द । दावन डोळा ॥
॥ भेलुंड सिध्दाचें । तप आहे भारी ।
बसन गादीवरी । भेलुंडाच्या/याहीच्या हो राया ॥ १२ ॥

॥ भेलुंड सिध्द/सहीत/सम्मेत । सम्मावनं देही ।
आता म्हणनं माझी । यात्रा आली हो राया ॥ १३ ॥
भजने :-
॥ उठला बावशीचा रंग । चत्रभुज उभे। राहीले आंग ॥
॥ उठला बावशीचा रंग । विठोबा उभे। राहीले आंग ॥
॥ उठला बावशीचा रंग । आदीपुरूष उभे। राहीले आंग ॥
॥ बावशी उठली । बहुरंग.. खेळे महाराजाच्या संग ॥
॥ बावशी उठली । बहुरंग.. खेळे कर्ता-याच्या संग ॥
॥ बावशी उठली । बहुरंग.. खेळे अवताराच्या संग ॥
॥ आहो या कुडदेहीला । भेलुंडाचा सिध्द । दाखवें डोळा ॥
गजर :- ॥ या । तरा हो येथी । उभा जगजेठी.. ।
महाराजा । उघडा कवाड घ्या हाती किल्ली ॥

...शब्दार्थ पुढील पानावर......

-: निरसनसह शब्दार्थ, चरणार्थ :--

**भेलुंड** :- भार, ओझे वाहणारा, जम्माव, पहाड, डोंगर

**भेलुंड असता सिध्द झाला** :- दुःखाचे भार, ओझे पहाड डोंगर डोक्यावर असतांनाही त्या दुःखाच्या जम्मावाने तो खचुन न जाता, आपले सद्‌गुण त्या डोंगराच्या भारा खाली दबु न देता, शनिचर भोगत भोगत शांतपणे ईमानदारीने आध्यात्मीक साधना निरंतर करत सिध्द झालेला, अडी अडचणी चे काटे दुर करत आपले व्रत भंग न होवु देता, या कठिण समयात आड आलेले दुःखाचे पर्वत/डोंगर चढुन जात जात सिध्द होणारा खासा राजा.

ऐसी एकच आमची कृष्ण माय माउली होवुन गेली. ईचे कितीक आठवु गुण ? कितीक शनिचर भोगला ईन ? या कृष्णाच्या डोक्यावर अनेक प्रकारचे दुःखाचे डोंगर होते. तिरगुणींनी वेळोवेळा कृष्णाने मांडलेला चतुर्पती चा खेळ मोडल्याचे दुःखे, अडी-अडचणी... ईत्यादी अनेक दुःखाच्या डोंगरा चे भार कृष्णाच्या डोक्यावर होते. परंतु ऐवढे सर्व तिरगुणांनी टाकलेले भेलुंड असतानाही तो कृष्णा शांतपणे धिराईच्या मार्गाने चतुर्पती ची महीमा वाणी यवगान यवगा सांगत सांगत, पुढे जात जात आपल्या चतुर्पती धन्याची साधना करत करत चतुर्पती चे पेणं स्थापत स्थापत सिध्द झाला. आणी सिध्द असता बसला तप धरून ! याहीच्याच या तपानं ही अनामत ज्योत खेळु लागली हो ! आणी याहीच्या या तपामुळेच आदीपुरूष धनी याहीच्या देहधरणीवर उभा होवुन कृष्णच आदीपुरूष धनी झाला हो ! याहीच्याच या तपामुळे आम्हा हाती हा चतुर्पता अथर्वन् वेद पडला हो ! आणीक कितिक वर्णु याहीचे गुण ?

**भेलुंड शब्दप्रयोग उदाहरणे :-**

१. एखादयावर खुप कर्जाचा भार/डोंगर उभा झाला, किंवा एकापाठोपाठ ऐक अश्या अनेक अडी-अडचणी चा भार आला, तर तो मनुष्य चिडचिडा बनुन बावचळल्या सारखा बेताल वागावयाला लागतो. त्यामुळे त्याचे सद्‌गुण त्या भाराखाली दबल्या जाते. अश्या वेळी जाणते जन असे म्हणतात की : त्याच्या डोक्यावर खुप भेलुंड/भार असल्यामुळे, तो सद्‌गुणी ऐसा बेताल बावचळल्यासारखा वागत आहे. त्याला जरा समजुन उमजुन घ्यावे. साहय करावे.

२. देहीवर भगवे कपडे, गळ्यात माळ, दाढी व इतर अलंकाराचा भार घेवुन भेलुंडाचे सोंग करणारा । स्वंयंःसिध्द आहे असे घोषीत करून अनुभवाविना कोरडे ज्ञान सांगत फिरणारा । असे भगवे सोंग घेवुन भेलुडाप्रमाणे मिरवुन, या सोंगाडया भेलुंड सिध्दाच्या मेळयातुन कोरडे ज्ञानच सांगणारा स्वयंःघोषीत सिध्द होतीन. कारण साधु होणं दुर्लभ जाणं । ख-या अनुभवसंप्पन्न भेलुंडाचे तप आहे हो भारी । सच्चे नेमधारी तप करणारे खरे भेलुंड निवडुन, त्यांच्याच देहरूपी गादीवर येवुन बसतीन हरी । तो सच्या भक्तच भेलुंड असता सिध्द होईन..

**परवरी** :- मायेचा मेळ, जम्माव, पंगती, कल्पना मायेच्या वर ।

**भरन तिनताळी** :- देहीच्या आत अंर्तभुत होवुन देहीच्या तिन ही ताळात तो धनी भरून भरन आणीक उरून राहील. । **ओलांडा** :- ओलांडणे, येश/सिमा ओलांडणे. उदा. दस-याला स्वतःच्या गावाची सिमा ओलांडुन सोनं आणल्या जाते तो ओलांडा । कामानिमित्य स्वतःच्या घराची/गावाची सिमा ओलांडुन होणारा ओलांडा, येण्या-जाण्याचा रस्ता पार करतांना होणारा ओलांडा, वरून-खाली-वर येता-जाता होणारा ओलांडा ... ईत्यादी, ओलांडे घात न होता सुलभ व्हावे. जर ओलांडे न जाणता झालेच तर असे ओलांडे ओलांडतांना घात नसो या देहपिंडा हो राया, कृष्ण राजा हो राया ।. **गादी** :- देही । ही गादी होय निरंजन मालकाची । ईच्यावर सत्ता आहे या निरंजन आत्माराम देवरायाची । या देहगादीवर तो आत्माराम धनी उभा आहे. । **यात्रा आली** :- या तरा ।, तरण्याची वेळ आली आहे या कलीच्या संधीत ! कारण तो आदीपुरूष धनीदेव या देहीवर भेलुंड असतानांही ती शंक देह सिध्द करण्याकरीता, आता त्या त्या शंकाचारी भेलुंडाच्या देहीत येवुन या देहीच्या तिनही ताळी सम्मावन । आणी बसन या भेलुंडाच्या देहरूपी गादीवर । करून दाखवन असेच भेलुंडाचे सिध्द !

**सहीत/सम्मेत** :- ..च्या संग, ..च्या सह । **सम्मावन** :- अतंर्भुत होईन.

**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०२ ॥

॥ ओवी नं. २७ ॥

ओवी महात्मः- ग्रहणकाळाच्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी...

॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

## ॥ गगन कवटाळुची ओवी ॥

या ओवीची पलट ओवी खंड०७/ओवी-०८ मध्ये दिलेली आहे.

॥ गगन कवटाई.. राहु दिवस येईन खरा ॥ घृ ॥
॥ धुम्मधुम्मकार होईन मेदनी/धरणी । चंद्र-सुर्य लपतीन गंगनी ।
गाही देईन तिरभवनी ॥ गगन कवटाई..
॥ अंधःकार पडन भारी । भुम्मा निजरूप होईन सारी ।
भुम्मा निजरूप राहीन सारी ॥ गगन कवटाई..
॥ राहु उगवनं/उगवले परवेशी । साडेतीन दिवसाच्या गणती ।
अवसा-पुनवा मोडनं तिथी ॥
॥ सव्वा प्रहर उभी प्रिथवी । विस घंटा कापन धरणी ।
शंक सम्मावन तेथुनी । तेव्हा ज्योता हिंडतीन दोन्ही ॥०४॥
जळगाव पाठातील चरण
॥ हे होय आदीपुरूषाची ज्योत । भैस राजा उभा येथं ।
एकच होईन आरोही । जागी करन चौताळी ॥
किंवा ॥ चौघे उभे चौहुकडे । मध्ये भैस उभा राहीन ।
एकच देईन आरोही । जागी करन तिनही ताळ ॥..जळगाव चरण
॥ ऐका शाहुनंदाची वाणी । शाहु/पदर पसरला गगनी ।
जाउ देणार नाही कोणी ॥
॥ उडवण नाशीकांची वाणी । नाशीक वस्त्या देईन काढुनी ।
याहीचं मुख नाही पाहणार कोणी ॥
॥ छत्तीस पवनाचे गुणं । देह बाधक आहे त्यानं ।
सत्य येईन शकुन । बाधक टाकणं काढुन/जाळुनं ॥ ०८ ॥

॥ ओळखा राहुची खुणं । सात देईन काढुन ।
उडवन दहाचं ठिकाणं ॥
॥ ओळखा राहुची खुणं । राहु उभे राहीले सोयम् ।
चुकवनं देहीचं मरणं ॥ गगनं कवटाळु..,
राहु दिवस आला खरा ॥
॥ हे पद पलटुनिया/परतुनिया भारी । राहु उभा यवगावरी ।
पृथ्वा गिण्यानवंत करन/होईनं सारी ॥
॥ ऐका राहुची वाणी । दुःख दिसणार नाही स्वप्नी ।
सुखः नाही मावणार तिरभवनी ॥ १२ ॥
॥ हा कर्तार करन कारं । या सख्याचं वय आहे थोर ।
वाणं येईन देहीवर ॥
॥ राहु माझा प्राण सखा । जागी करनं अवघ्या लोका ।
जन्म मरण मिटवनं धोका ॥ १४ ॥
भजने :- ॥ राहु उभा राहीला । भारी संभाळ या देवानं केला ॥
॥ राहु राहु राहु दे । अनंत यवगं सुखः कुडीला होवु दे ॥
॥ राहु राहु राहीनं । करोडो वर्षे आयुष्य कुडीला होईनं ।
॥ उमर बारा तेरा वर सात । बत्तिशीला अम्बंर करा देहपिंड ॥
॥ करोडो वर्षे आयुष्य देई । महाराजा महीमा आहे तुई ॥

## ॥ गगन कवटाळु निरसनसह शब्दार्थ/चरणार्थ निरसन ॥

**गगन कवटाळी** :- हा चौरंगी शब्द असल्यामुळे याचे चार रंगाचे अर्थ निघतात ते असे :

**पहील्या रंगाचा अर्थ** :- गगणाला गवसने, अशक्यप्राय:, गगनाप्रमाणे विशाल महान असे प्रचंड काम करने. कृष्णाने जे गगनाप्रमाणे विशाल महान असे प्रचड कार्य करुन, या अकाशमात मधल्या चतुर्पती धन्याला आपल्या आंग आणुन हा चतुर्पता अथर्वन् वेद आम्हा हाती दिला. अश्या या कृष्णाच्या चतुर्पताच्या महान कार्यासह चतुर्पता अथर्वन् वेदाचे संपुर्ण ग्यान घेवुन, या चतुर्पता ग्यानाला कवटाळुन सच्चेपणाने या चतुर्पतीच्या ग्यान भक्ती मार्गि राहणे, यालाच गगन कवटाळीत राहणे असे चतुर्पतीचे काही जाणकार म्हणतात. असेच गगन कवटाळी राहल्याने एक ना एक वेळा राहु दिवस येईल खरा ।

**दुस-या रंगाचा अर्थ** :- गगन म्हणजे आकाश । चतुर्पती मध्ये आत्म्याला सुध्दा आकाश म्हणुन कुठे कुठे संबोधीले आहे. कारण या परमात्माच्या अंश असलेल्या आत्मा नावाची सर्वशक्तीयॉ व सिध्दियॉ संप्पन्न वस्तुला अत्यंत सुक्ष्म तसेच अत्यंत प्रचड विशाल असे गगणा एवढे सुध्दा होता येते. म्हणुनच कुठे याला गगन तर कुठे वस्तु असे संबोधल्या गेले आहे. उदाहरणार्थ भुललीसे वस्तु ? ऐसा योगी बोलला । निरंजन वस्तु रयत खासी । वस्तु खासी या रयाची भंगणार काहीनाही जराभर । गगनाएवढी निरंजन वस्तु जीथे राहते ती वस्ती मोडता कैसे ? गोलाकाराची खुण ही वस्तु राहतो गगणात । मिर्तलोकचे लोक आहे माया जाळात ।

त्याचमुळे गगन म्हणजे आत्मा असा एक अर्थ समोर येतो. आत्मग्यानी बनुन या आत्मावर आलेले विषय वासना विकारांचे कलंक धुत, या आत्म्यावर चतुर्पती ग्यान-भक्ती सह सत्कृत्याचे शुध्दसत् चे सत्संस्कार कोरत या देहीत कृष्णाने सांगी केलेली निश्कलंकी मांडणा करत करत या आत्माला शुध्द सत् ने कवटाळणे म्हणजे गगन कवटाळु ।

चतुर्पती मार्गी राहुन जसे जसे तुम्ही निष्कलंकी मांडणा देहीत करत जाल, तसे तसे हा आत्म्या म्हणजेच गगण प्रकाशीत होते. या निरंजनाचे ग्यान तुम्हास प्राप्त होवु लागते. या निरंजनाची आकाशवाणी तुम्हास ऐकु येते. यालाच अंतरात्माचा आवाज असे म्हणतात. एकदा का जर तुम्ही तुमच्या अंर्तआत्माचा आवाज ऐकुन या निरंजनाला देहीचा सरदार बनवुन या देहीचा हात या निरंजनाच्या हाती दिला, तर मग तो सरदार निरजनं आत्माच तिरगुणांशी युध्द खेळुन तिरगुणांचे देहीवर असलेले अम्मल ठाणे उडवुन तुम्हास तो आपल्या परमात्मा धनीकडे घेवुन जातो. अश्या रितीने या गगन/आत्माला कवटाळुन परमात्माकडे जाता येते. हेच गगन कवटाळल्याने राहु दिवस येईन खरा ।

**तिस-या रंगाचा अर्थ**:- ध्यानमार्गातील एक पायरी म्हणजे आकाशदर्शन । योगी या पायरीवर आल्यावर त्याला ध्यानात आकाश दिसु लागते. यालाच काही जाणकार चिदाकाश असे म्हणतात. ध्यान योग मार्गात दिसणा-या मस्तकाच्या उर्ध्व स्वर्गीच्या या आकाशाला मान दया । कारण की : या आकाशातच तो निरंजन धनी पुढे उभा होणार आहे, म्हणुनच या आकाशाला मान देत त्या आकाशाचे दर्शन घेत, सुना आहे हा नरदेह । निरंजन ज्योतीच्या दर्शना शिवाय । असे भाव ठेवुन प्रेमरस ध्यान भक्ती भावाने या आदीगणाला आलिगण देत राहा. या आकाशमात त्या निरंजनाच्या भेटीची चाहत/आस ठेवुन, या आकाशाच्या ध्यानी, जोपर्यत निरंजनाचे कोटी सुर्यप्रभेसम लख्ख प्रकाशाची ज्योत दिसत नाही अथवा चंद्रज्योतीसम उजाला दिसत नाही, तोपर्यत असेच ध्यानमार्गात प्रयत्नरत् राहावे लागते. या आकाशालाच कवटाळुन, या आकाशाला मान देवुन त्या आकाशाचे दर्शन घेत त्या आकाशाच्या ध्यानी राहत या आकाशमात मध्ये त्या निरंजन ला उभे करुन देहीवर राहु दिवस आणण्याकरीता, तसेच ध्यान पुढे चालु ठेवत प्रयत्नरत् राहने. हेच गगण कवटाळु । राहु दिवस येईन खरा ।

**चौथ्या रंगाचा अर्थ** :- या कलयवगात सत्यवग येणार नित । ते सत् यवग केव्हा येणार ? जेव्हा तुम्ही सत् कृत्ये करत चतुर्पतीच्या सत्कृत्याच्या ज्योतीमध्ये राहुन, आपल्या आत्माराम-आदीगणला चतुर्पती भजन पुजन ध्यान मार्गि राहत ग्यान

भक्ती भावाने आलींगण देत राहाल म्हणजेच या गगणाला कवटाळीत राहाल, तेव्हा तुम्ही आत्मग्यानी बनाल. जेव्हा आत्मज्ञानी होवुन या चतुर्पतीचे निरंजन ग्यान आचरणात आणाल, तेव्हाच या देहीत राहुटी करून राहीलेला राहु म्हणजेच आत्मा वर सत्संस्कार कोरल्या जाईन. जेव्हा असेच सत्संस्कार या गगणात टाकत राहाल, तेव्हा तो राहु स्वयंःप्रकाशीत होवुन त्या राहुचा दिवस तुमच्या देहीवर येईन । मग तुम्ही म्हणाल : गगन कवटाळी राहु दिवस आला खरा । म्हणुनच बाळाजी राजे पाटील म्हणतात की : **या रवी दिवसाने माझे बहु बर केले !** हे सत्य होईन. या देहीवर या राहु रवी दिवसा पासुनच, या कलयवगात सत्यवग होणार बा नित । या देहीवर हे सत् यवग आल्यावर, तुम्ही जेजे बोलान तेते होईन बा खर । या सत् यवगावर येवुन हेच चरणचारी बोलनं या कृष्णानं केल आहे. जे जे सांगतलं ते होईन बा खर । सिदाई होईन मानव खुम्मी । पृथ्वा म्हणजे देही जागी करन सारी । तो योगी सांगनं सारं. । **राहु** :- भरून भरला आणीक उरून राहुटी करून राहीलेला राहु । ब्रम्हांडात भरून भरला आणीक उरून राहीलेला परमात्मा, तर पिंडीतही भरून भरला आणीक उरून राहीलेला त्याचाच तेजोग्गुणी अंश अवतार आत्मा या दोघानाही राहु असे संबोधतात ! जो राहुटी करून या प्रकृतीमायेच्या देही च्या काटेरी झोपडीत राहतो तो निरंजन आत्मा पिंडीचा राहु होय. आणी जो अनंत ब्रम्हांडात भरून भरला आणीक उरून राहिलेली आदीपुरूषाची निराकार निराधार निरंजन ज्योत ही अनंत ब्रम्हाडाचा राहु होय. या पिंडीतील राहु/आत्मज्योती मध्ये ज्योत खेळते अनंत ब्रम्हांडाचा राहु असलेल्या भैस अवताराची । तो भैस राजा उभा येथ । **राहु दिवस येईन** :- जर निरंजन आत्म्याला चतुर्पतीच्या सिदाईच्या मार्गाने प्रकाशीत केलेत, तर याच्या प्रकाशाने त्या अनंत ब्रम्हांडाच्या राहु धन्याकडे जावु शकता. ज्या दिवशी तुमचा निरंजन आत्मा प्रकाशीत होईन, त्या दिवशी निरंजन धन्याचा लख्ख प्रकाश तुम्हास प्राप्त होईन, त्याच दिवसापासुन येईन हा राहु दिवस खरा । तोच राहु दिवस आठवा । या राहु दिवसाच्या ध्यान,स्मरण करा. आणी चतुर्पतीच्या ध्यान सुमरनी भजनी मार्गि राहत हा राहु दिवस आपल्या देहीवर आणण्यासाठी, या देहीचे षटविकार सह अन्य विषय वासना काढुन टाकत, या देहीत निश्कलंकी मांडना करण्यास प्रयत्नरत् व्हावे.अथक प्रयत्न करून देहीत निश्कलंकी मांडणा करा. निश्कलंकी मांडणा झाल्यावर हा राहु दिवस येईन खरा । या राहु दिवसा पासुन या देहीवर भैसाची यवगाची मांडणा होईन. या अनंत कोटी रवी च्या प्रभेप्रमाणे असणा-या प्रकाशाच्या राहु दिवशी राहु धनी येईन हो । आणी तुम्ही जे जे बोलान ते ते या भुम्मेवर होईन. या देहीवर सिदाई वाचा येईन । भैसाच राज होईन या भुम्मेवर । सर्व काही प्राप्त होईन या राहु च्या दिवसा व्दारे ।

**परवेशी** :- प्रवेशी, आपल्या येशीवरून/सिमेवरून निघुन दुस-या येशीवर प्रवेश करणारा, उदाहरणार्थ. आपल्या मुळघरच्या वेशीवरून येवुन प्रकृतिमायेच्या येशीच्या आत प्रवेश घेवुन पिंडी चा प्रवेशी आत्मा तर दया,क्षमा सुखःशांती ईत्यादी सद्‌गुणांचा वर्षाव करत देहीच्या आत प्रवेश करून निरंजनी भेटी देणारा ब्रम्हांडाचा प्रवेशी निराकार परमात्मा आदीपुरूष । म्हणुनच परवेशी हा शब्द पिंडीचा आत्मा तसेच ब्रम्हांडाचा परमात्मा यां दोघांनाही लागु पडतो. या आदीपुरूष परवेशाची संगत घडल्याने हृद्य नामाने भरून कंठ दाटुन येते. चंद्र-सुर्य नयनातुन गंगा-यमुना नदयांचे चे भावाश्रु वाहु लागते.

**अवसा-पुनवा** :- ज्या तिथींला चंद्र-सुर्य एकाच सरळ रेषेत राहतात ती तिथी - अमावस्या व पौर्णिमा. । **मेदनी** :- देह धरणी । **शंक** :- निश्कलंकी, बेडाग, पवित्र

**अवसा-पुनवा मोडन तिथी** :- देहीतील चंद्र हा डाव्या नाकपुडीतुन वाहणा-या चंद्रस्वराने ग्रासतो, तर सुर्य हा उजव्या नाकपुडीतुन वाहणा-या सुर्य स्वराने ग्रासतो. म्हणुनच जाणते योगीजन देहीतील हे चंद्र सुर्य ग्रासु नये म्हणुन दोन्ही नाकपुडीतुन निघणारा सुषम्ना स्वर वाहवत वाहवत, ध्यानात लिन होवुन सुषम्नेच्या हातात हात देवुन सुषम्ने संग परमात्मा चरणी लीन होतो. अश्याच प्रकारे लिन होण्याकरीता तो जाणता योगी चंद्र-सुर्याच्या अवसा-पुनवा मोडुन काढत आपल्या देहीवर राहु दिवस आणण्यास प्रयत्नरत् रहतो. परंतु जेव्हा तो राहु दिवस येतो, तेव्हा या अवसा-पुनवा तिथी मोडण्यास त्या योग्यास प्रयत्न करावा लागत नाही. कारण की : त्या राहु दिवशी या योग्यांच्या देहरूपी गादीवर तो राहु उभा राहुन देहीच्या अवसा-पुनवा तिथी मोडुन काढतो. सिदाई वाचा देतो. भैसाचे यवग आणतो. जे जे बोलान तेते होते ।

**॥ सव्वा प्रहर उभी धरणी । विस घंटा कापन धरणी । तेव्हा ज्योता हिंडतीन दोन्ही ॥**

**आध्यात्मीक अर्थ** :- राहु धनी जेव्हा देहधरणीवर प्रवेशी होतो, तेव्हा ही देहधरणी ज्या अवस्थेत आहे त्याच अवस्थेत अंदाजे साडे तिन तास थरथरते. त्यावेळीचे देहीचे शकुन असे आहे की : देहीत अग्न भडकते आणी जलजलाट काम होते. कमी-जास्त

प्रमाणात अंदाजे २० तास पर्यत ही देहधरणीचे तिरभवन थरथरा कापत राहते. जेव्हा ही धरणीत अग्न भडकुन अशी जलजलाट काम होवुन थरथरत राहते, तेव्हा देहीचा निरंजन आत्मा आणी त्या निरंजन आत्म्याचा धनी निश्कलंकी/शंक निरंजन परमात्मा ची निरंजन ज्योत या दोन ज्योती एकमेकांमध्ये मिसळत खेळत बागडत देहधरणीवर हिंडत राहते. शंक म्हणजेच निश्कलंकी तेथे सम्मावत जाईन. भरन हा देहीच्या तिनही ताळी ! ज्योतीमध्ये ज्योत खेळते हो या भैस अवताराची ! देहीच्या ज्योता प्रकाशीत करत राहते. देहीच्या शक्तीयॉं व सिध्दियॉं जागृत करत राहते. ऐसा हा धनी उरल्या ज्योतीन देहीला भेट देतो. देहीतील अवघ्या देहीदेवतांना आणी तिरगुणांचे तिन अम्मल ठाणे रिकामे करून तिथे आपली सत्ता स्थापन करून हा आदीपुरूष अवतार देहीचा राजा होतो. चतुर्पतीचा झेंडा फडकवतो ! असो. ऐसा हा अनामत आदीपुरूष जाण ! **ऐका शाहुनंदाची वाणी । शाहु पसरला गगनी** :- मस्तकाच्या गगणी कोटी सुर्य प्रभा सम प्रकाश पसरवुन या रविप्रकाशाच्या राहु दिवशी कोटी सुर्य प्रभा सम शाहु नंद कृष्णा आपली वाणी गर्जत मस्तक गगणी प्रकाशीत होवुन पसरला. तोच शाहुनंद कृष्णा आपल्या हाती काठी घेवुन रोग विघ्ने उडवत देहीच्या दरवाज्या पाशी उभा राहुन, सर्वत्राला लवुन मुजरा करून मुखाने गर्जना करत वाणी काढत आहे की : 'हे देही ! दे या तिरगुणांचे दान । सुटन या देहीच्या चंद्र-सुर्याचे गि-हाण । मुक्त होशीन या ८४शी गि-हाणातुन, या ८४शी फे-यातुन । चुकन या देहीचं मरण ।' अशी या मस्तकाच्या गगणी हा शाहु आपला प्रकाशमय पदर पसरवुन मागणी मागत मागत फिरणारा शाहु नंद कृष्ण ची हे वाणी तुम्ही ऐका हो ! ऐकल्याने होत नाही काहीतरी उपाय करा हो । **आरोही** :- एकच नाद चा गलबला । **नाशीवंताच मुख नाही पाहणार कोणी** :- स्वतःच्या स्वार्थासाठी स्वतःच्या पोटपाण्यासाठी, स्वतःच्या अन्ना सहीत मानासाठी....ईत्यादी कारणास्तव या वेदांचा नाश करणा-या स्वार्थि तिरगुणींचे मुख नाही पाहणार कोणी ! कारण की : हा तिरगुणी ब्रम्हया आहे शापीत ! या नाशीवंत शापीता घरी नाश । म्हणुन याहीच मुख नाही पाहणार कोणी । या नाशीवंताना तो पुढे जावु देणार नाही. जम्मा होतीन हे ब्रम्हादिक परंतु याहीच्या कोणा हाती तो ही चतुर्पताची मौस वाणी देणार नाही बरं । कारण चतुपताचे हरीनाम असलेले मौस/वाणी होय या अनामीकाचे घर । **३६ पवनाचे गुण** :- पवनाच्या शक्तीने काम करणारे या देहीत तिरगुणी मायेचे काम-क्रोध, लोभ-दम मद-मत्सर हे षटविकार षटवैरी आहेत. आणीक क्षुधा-तृष्णा, मोह-शोक, जरा-मरण हे षटउर्मि आहेत. तसेच आशा-मनशा, कल्पना- ईच्छा, तृप्ती-वासना, अभिमान-अहं, भ्रम-भ्रांती, डंब-व्दैत, तिरगुण.....ईत्यादी ३६ प्रकारचे गुण देहीत वसलेले आहेत. पवनाच्या आधारे चालणा-या मायेच्या या ३६ कल्पनांने देहे बाधक होतो. म्हणुनच सत् कृत्ये करत सत्कृत्याच्या ज्योती राहुन शुध्द सत् गुणांनं देहीचे ३६ गुणांवर आक्रमण करून पवन शुध्द करा हो । **सात** :- देहीवरचे तिरगुणांचे राजे १.ब्रम्हा २.विष्णु ३.शंकर यांचे सह ४.मायाचैतन्या, ५.देही-देवता, ६.गणी-गंधर्व, ७.आरे-गि-हे युक्त चंद्र-सुर्य अश्या या सात ज्योती या तिरगुणांचे देवता/दैवत आहे. याहीचे मानाचे पद पलटुन, यांचे ठाणे उडवुन या देहीमध्ये तो आदीपुरूष भैस उभा राहीन. तिरगुणी एकच गलबला म्हणजे आरोही करेल. । **दहा** :- दशइद्रिये चे विषय वासना कलंक, प्रकृति मायेचे दहा गुण :- १.आशा २.तृष्णा ३. लालसा ४.आकांक्षा ५.असत्यपणा ६.मद ७.मत्सर ८.अहं ९.किर्ति १०.असत्य भावाची प्राप्ती अश्या या दहाचे उडवण तो ठिकाण. । **पद पलटुनी/परतुनी भारी । राहु उभा राहीन यवगावरी** :- तिरगुणांचे राजे ब्रम्हा विष्णु शंकर यांनी आपले राजसत्तेचे राजपद या देहीवर आणुन देहीवर आपल्या तिरगुणांव्दारे अमंल/सत्ता गाजवत आहे. म्हणुनच देही या तिर गुणांचा संग करत या तिरगुणां संग नाचत आहे. परंतु या चतुर्पता ग्यानाने जेव्हा ती देही तिरगुणांच्या पलीकडे पाहुन या तिरगुणांचे देहीवरचे तिन शिक्के हे चतुर्पती भैसा चरणी अर्पण करन, तेव्हा हे देहीवरचे तिर गुण सह या तिरगुणांचे राजे यांचे ठाणे तो चौथा धनी उडवुन टाकेल. देहीवर तो राहु सोयंम् उभा राहीन आणी या देहीवर असलेले तिरगुणांचे हे भारी राज पद पलटुन टाकेल. देहीवर तो निरंजन उभा राहील्यावर या चतुर्पतीच्या निरंजन ग्यानानं पृथ्वा/देही मग गिण्यानवंत होईन सारी । **वाण येईन देहीवर** :- तिळसंक्रांतीला ज्याप्रमाणे स्त्रिया एकमेकांच्या घरोघरी जावुन, एकमेकांना ऐपतीप्रमाणे वाण म्हणजेच फळ-भाजी-धान्यासह भेटी देतात, त्याच प्रमाणे तो निरंजनी धनी सच्च्यांना भेटी देत, आपल्या सच्च्या भक्तांचा मुजरा घेत, सच्च्या भक्तांना त्याच्या ऐपतीप्रमाणे वाण म्हणजेच त्याच्या देहीवर जैशी ज्याची चाकरी तैसा देण देत राहील. जसा ज्याचा भाव राहील तशी त्याला

सिध्दि देत राहीन. हा राहु दिवस आल्यावरया निरंजन आदीपुरूषाचे असेच वाण या देहीवर वर्षोनवर्षी येईन.

या ओवीचे चौरंगी निरसन होत असल्यामुळे तिन रंगाचे निरसन हे वरील शब्दार्था चे साहयं घेवुन आपण स्वतः करून घ्यावे. या ओवीचे भौतीक सृष्टीचे निरसन सोपे आहे. म्हणुनच येथे फक्त चौथ्या रंगाचे चतुर्पती योगासृष्टीत योग्यांना वेगवेगळे आलेल्या अनुभवचे योगसृष्टीतील निरसन जागेच्या कमतरतेमुळे थोडक्यात सार देवुन करत आहो.

## ॥ योगसृष्टीतील निरसनसह गगन कवटाळु ॥

जेव्हा योगी ध्यानास बसतो तेव्हा तो त्याचे चंद्र-सुर्य रूपी नयन तो भुमध्यवरील गगणात लपवितो म्हणजेच उर्ध्वदृष्टी करून ध्यानास बसतो. त्यामुळे सर्वप्रथम दृष्टीसमोर तात्पुरता अंधःकार येतो. या अंधकारातुन श्वास येतांना 'सो' आणी श्वास सोडतांना 'हंम' असा श्वासोश्वासाचा ध्वनी ऐकत तो जेव्हा ध्यानावस्थेत जातो. आणी या ध्यानाची जेव्हा त्याच्याकडुन धारणा होते, तेव्हा त्याची देहरूपी भुम्मा योगनिद्रेत निजरूप होते. देहधरणीवर म्हणजेच मेदनीवर कधीकधी धुम्मधुम्मकार नाद उठणे सुरू होते. तद्नंतर काही तासानंतर त्यास आकाश दिसने सुरू होते.

॥ श्री आकाशाला मान, कर तयाचे दर्शन । सुने आहे अवघे देह ज्योती विनं ॥०२/०१

ध्यानात असतांना मस्तकाच्या उर्ध्व स्वर्गावरील गगणी दिसणा-या श्री च्या आकाशाला मान देत तो योगी 'सुना आहे हा नरदेह निरंजन दर्शनावाचुन' असे निरंजन धन्याला विनवुन, त्या निरंजन ज्योत दर्शनाची आस ठेवुन चिद्‌आकाशाकडे पाहत पाहत तो योगी आपल्या मेदनीला निजरूपात नेवुन मेदनीवर अधुन-मधुन उठणारा तो धुम्मधुम्मकार नाद ऐकत सोहंम् ध्यानी राहतो. योगी जनांत कुठे कुठे ऐसे म्हटल्या गेले आहे की : ॥ राहु उगवनं परवेशी । साडेतीन दिवसाच्या गणती । अवसा-पुनवा मोडनं तिथी ॥ साडे तिन दिवस अशीच जर देहधरणी म्हणजे मेदनी निज अवस्थेत ध्यानी राहली, तर त्याचा आत्मा जागृत होतो. सुषुम्नेच्या जागृतीत हा देहीचा राहु उगवतो. सोहंम् ध्यानामुळे त्याची देहीच्या अवसा-पुनवा तिथी सुषुम्नेच्या जागृतीव्दारे मोडल्या जाते. तेव्हा मग त्याच्या मेदधरणीवर राहुचा प्रवेश होवुन सव्वा प्रहर जलजलाट होउन त्याची मेदनीवर उठणारा धुम्मधुम्मकार अनाहत् नादाचे कंपने त्याला साडे तिन तास थोडे बहुत झटके देत हालवत राहते. त्यामुळे त्याची देहधरणी थरथर कापत राहते. या कालावधीत धनी येण्याच्या अगोदर धन्याच्या शक्तीयाँ भेट राहतात. तद्नंतर राहु धनी प्रवेशी होतो. ते याप्रमाणे : ॥ सव्वा प्रहर उभी धरणी । विस घंटा कापन धरणी, शंक सम्मावन तेथुनी । तेव्हा ज्योता हिंडतीन दोन्ही ॥

निश्कलंकी म्हणजेच शंक असा राहु धनी जेव्हा देहधरणीवर प्रवेशी घेवुन देहेत सम्मावतो, तेव्हा ही देहधरणी ज्या अवस्थेत आहे त्याच अवस्थेत अंदाजे साडे तिन तास देहीवर धुम्मधुम्मकार अनाहत् नाद उठत त्या अनाहत् नाद कंपनाने थोडेबहुत थरथरत राहते. त्यावेळीचे देहीच शकुन खंड०१/०२/०१ मध्ये असे सांगीतले आहे की :

॥ देहीच शकुन भडकन अग्न । तेव्हा मग जलजलाट होईन काम ।
थरथरा कापनं तिरभवन, धनी आला..॥ ०१/०२/०१:-शक्तीची ओवी ०१

देहीत अग्न भडकते आणी जलजलाट काम होते. कमी-जास्त प्रमाणात अंदाजे २० तास पर्यत ही देहधरणीचे तिरभवन अनाहत् नाद कंपनाव्दारे थरथरा कापत राहते. जेव्हा ही धरणीत अग्न भडकुन अशी जलजलाट काम होवुन थरथरत राहते, तेव्हा देहीचा निरंजन आत्मा ची ज्योत आणी त्या निरंजन आत्म्याचा धनी निरंजन परमात्मा यांची शंक म्हणजेच निश्कलंकी निरंजन ज्योत, या दोन ज्योती मस्तक गगणी कोटी सुर्य प्रभा सम प्रकाशीत होवुन, एकमेकांमध्ये मिसळत खेळत बागडत देहधरणीवर हिंडत राहते. ज्योतीमध्ये ज्योत खेळते हो भैस अवताराची ! देहीच्या ज्योता प्रकाशीत करत राहते. देहीच्या शक्तीयाँ व सिध्दियाँ जागृत करत राहते. म्हणुनच : ॥ तुम्ही डिकावं या नामाला । कोटी सुर्यप्रभा सम होईन उजाला ॥

जेव्हा या निरंजन धनी व त्याच्या अंशअवतार आत्मा या दोन्ही ज्योता एकमेकात मिसळत या देहधरणीवर हिंडतीन, तेव्हा त्या राहु दिवशी त्याला कोटी सुर्यप्रभा सम उजाला मस्तक ब्रम्हांडी बिंदुस्थानावर दिसतो. तोच होय राहु दिवस ! त्यालाच रवी दिवस असेही म्हणतात. रवी दिवशी उगवलेल्या राहु धनी चा कोटी सुर्य प्रभा सम प्रकाशच होय आदीपुरूषाची ज्योत ! तो भैस उभा येथ ज्योतस्वरूपात !

॥ हे होय आदीपुरूषाची ज्योत । भैस राजा उभा येथं ।
एकच होईन आरोही । जागी करन चौताळी ॥

बिंदु वर सहस्त्र कोटी सुर्य प्रभा सम उजाला होतो. राहु उगवुन कोटी सुर्यप्रभा सम प्रकाश उत्पन्न होतो. बिंदु स्थानावरच कोटी सुर्यप्रभासम लख्ख उजाला असलेल्या प्रकाशाच्या व्यक्त स्वरूपास प्रकाश बिंदु असे म्हणतात. यालाच बिंदु असे म्हटल्या गेले आहे. आणी हा बिंदु व ध्यानाव्दारे देहीवर उठणारा धुम्मधुम्मकार अनाहत् नाद यांच्यामध्ये गाठी पडत जाते. नाद-बिंदु एकमेकांत गुंतुन त्यांच्या गाठी पडण्याची शृंखला सुरू होते. या नाद-बिंदु च्या गाठी व्दारे चौताळी जागृत होवुन बरेच काही घडायला लागते. ज्योत देहीत प्रकाशते. ठाई ठाई समया लागते. मस्तक ब्रम्हावरची दिवनाली चेतुन तिचा प्रकाश पडते. अश्या रितीने ध्यानाव्दारे झालेल्या धुम्मधुम्मकार मेदनी च्या बिंदुस्थानावर अनाहद् नाद व्दारे प्रकाश जेव्हा होतो, तेव्हा त्यास नाद बिंदु असे म्हणतात. याचे अधिक ग्यान कृष्णांमृत मधुन गायपाच्या खेळाच्या ग्यानातुन व शब्दार्थामधुन घ्यावे. नाद बिंदु च्या गाठी पाडुन योगी जेव्हा टाळी लावतो, तेव्हा मग प्रकाश बिंदु व धुम्मधुम्मकार नाद याची एकच नाद आरोही म्हणजे गलबला होतो.

॥ तिरतिरभवनी होईन आरोही । याचे मानु नका भेव ।
चतुर्पती कार दावन । डोळ्या समोर ॥

आणी मग राहु धनी देहीत प्रवेश करून कोटी सुर्यप्रभा सम उजाला करत एकच धुम्मधुम्मकार नादांची नाद आरोही/गलबला देहीत उठवुन तो उगवतो. हेच होय आदीपुरूषाची ज्योत । भैस धनी उभा येथं । याच्या एकाच नाद आरोहीने हे सर्व घडल्या जाते. राहु धनी उगवण्याच्या या रवि दिवसापासुन देहीला सुक्ष्म व गुढं असे त्रिगुणातीत ग्यान मिळत जाते. 'सांगते निराकार धनी, ऐकते निर्गुण आत्मा' अशी अवस्था त्यास प्राप्त होवुन आउक यवग त्याच्या देहघरी उभे राहते. अवसा-पुनवा तिथी मोडण्यास त्या योग्यास प्रयत्न करावा लागत नाही. कारण की : त्या राहु दिवशी या योग्यांच्या देहरूपी गादीवर तो राहु उभा राहुन देहीच्या अवसा-पुनवा तिथी मोडुन काढतो. भैसाचे यवगाच्या निश्कलंकी मांडणीचे ग्यान येते. चतुर्पती धन्याच्या गुंजावरणाव्दारे नाशीकांची वाणी सह तिरगुणी ग्यान उडुन ही देहरूपी पृथ्वा सपुर्णतः तिरगुणांच्या पल्याड असलेले तुर्याअवस्थेतील चतुर्पती निरंजन सुक्ष्म व गुढं ग्यानाने गिण्यानवंत होते. या चतुर्पती च्या राहु धनी च्या वाणी ऐकत राहील्याने :

॥ ३६ पवनाचे गुण, देह बाधक त्यानं । सत्य येईन शकुन, बाधक टाकण काढुन ॥
॥ ओळखा राहुची खुण, सात देईन काढुन । उडवन दहाचे ठिकाणं ॥

देहीवरचे तिरगुणांचे राजे १.ब्रम्हा २.विष्णु ३.शंकर यांचे सह ४.मायाचैतन्या, ५. देही-देवता, ६.गणी-गंधर्व, ७.आरे-गि-हे युक्त चंद्र-सुर्य अश्या या सात ज्योती या तिरगुणांचे देवता/दैवत आहे. याहीचे मानाचे पद पलटुन, यांचे ठाणे उडवुन या देहीमध्ये तो आदीपुरूष भैस उभा राहीन. तो उभा राहल्यानंतर दशइंद्रिये चे विषय वासना कलंक तसेच प्रकृति मायेचे दहा गुण :- १.आशा २.तृष्णा ३.लालसा ४.आकांक्षा ५.असत्यपणा ६.मद ७.मत्सर ८.अहं ९.किर्ति १०.असत्य भावाची प्राप्ती अश्या या दहाचे तो प्रथम उडवण ठिकाण ! त्यानंतर तिरगुण व तिरगुणी मायेच्या पवनाआधारी चालणा-या देहे बाधक करणा-या ३६ कल्पनांच्या पालव्या तोडुन देहीत नांदनं ! सत्य शकुन देईन. देहीजवळ आलेला धन्याचा सत्य शकुनाव्दारे योगी देहीचे बाधक काढुन टाकेल. तेव्हा मग मायेच्या ३ गुण, ६ विकार आणी ३६ कल्पना अश्या मायेच्या एकुन ४५ चौक्या आड खेळ खेळणारा तो धनी उभा होवुन ॥ देवज्योत जीवज्योता भरन या देही । सांगी करन सही । तो कृष्ण महाराजा हो राया ॥ याच्या ज्योतीनं ज्योत प्रकाश भरन देही । उजळन या देहीचे रूप हे या कृष्ण सुर्याच्या प्रकाशात ! जैसे देहीचे रूप हे या सुर्याचे तेज होईन । ऐसे या देहीचे पद पलटवुनी भारी । राहु उभा राहीनं देहीच्या सत् यवगावरी । ही देहधरणी पृथ्वा संपुर्ण गिण्यानवंत करून सोडेल. देहीवर चतुर्पती धन्याचा वाण येईल. अधीक ग्यान शब्दार्थ मधुन घ्यावे.

म्हणुनच या निश्कलंकी ज्योर्तिमय चतुर्पती आदीपुरूष धनीदेवाला जाणा हो !

॥ अनामत आदीपुरूष जाण । धरनदेही त्याला भेटन । तिरलोक धरली देही त्याला देणं संपन्न ॥
॥ हा चतुर्पती देव, धरन देही । निजरूप भुम्मा जागी करन चौ-ताळी ॥
॥ कजवा वस्ती देव करनं आदीपुरूष । होईन अचंवा प्रकाशन ज्योत ।
॥ डिकाव या नामाला । कोटी सुर्यप्रभा सम होईन उजाला । चंद्रज्योती सम होईन उजाला ॥
॥ लदबद ज्योतीचा प्रकाश, याहीचा उजेड चौ-ताळात । ओळखा याहीचे घर, राया घर अनामताचं
॥ ज्योतीनं ज्योत प्रकाश उजेड देहीत ।
उजळनं/उजळले रूप सुर्या च्या तेजात । जैशे रूप हे सुर्याचे तेज ।
॥ निर्वाणाची ज्योत, उभी सोयंम् । या ज्योतीनं मदत, केली पुर्ण ॥

**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. २६ ॥
ओवी महात्म :- रोग्याच्या अंगात लष्टान आहे की नाही ? याची शहानिशा करण्यासाठी, हमखास म्हणण्यात येणारी..
॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

# ॥ बत्तीशीची ओवी ॥

॥ यवगा परी, दुनुन खेळ । आहे होणार ।
नव्या यवगाचं, राज्य भाकलं । कुल जाईन सारं ॥

॥ पहीली बत्तीशी, भरून राया । बोध पणी उरला ।
देवव्दारी, चमत्कार गुणी । दिसन खरा ॥
॥ दुसरी बत्तीशी, भरून राया । देवाचा खेळ ।
यात्रेकरू, आपल्या पायी । पडतीन पुढं पुढं ॥
॥ तिसरी बत्तीशी, भरून राया । देवाचा खेळ ।
पुढे बोलता, मानव विर । कापतीन थर थरा ॥
॥ चवथी बत्तीशी, भरून राया । देवाचा खेळ ।
शुरविर खेत्री, उभे राहतीन । या भुम्मेवर/ याहीच्या संगतीन ॥

॥ पाचवी बत्तीशी, भरून राया । देवाचा खेळ ।
पाषाणाला, फुट म्हणता । फुटतीन तडातडं ॥
॥ सहावी बत्तीशी, भरून राया । देवाचा खेळ ।
तिताळा मध्ये, नाही ठेवणार । कोणाची उरं ॥

भजने :-
॥ सोळा न सोळा । बत्तीशी पुरली हद्द ।
ही उभी राहली जिवनकळीची सुद ॥
॥ सत्रावी उभी जिवनकळा । सेरूप चढवा महाराजा गोपाळा ॥
॥ सोळा न सोळा । बत्तिशी पुरला मुद्या ।
याग-होम कराल, तरी भैसाचं । यवग, टळणार नाही कदा ॥
॥ सोळा न सोळा । बत्तिशी मुद्या ।
साधवा सिदाई देवा । मोहीम कर गा उभी ॥
॥ चंद्र बत्तिशीचा मुद्या । साधवा सिदाई देवा । मोहीम कर गा उभी ॥
॥ चंद्र बत्तिशीचा मुद्या । साधवा तेरवी सिध्दी, भैसा मोहीम कर उभी ॥
॥ तेरव्या सिध्दिला मान । चौदावी लागता, पुढे होईन, यवगाचे काम ॥
॥ तेरवी सिध्दि अवरत । धनी उभे आहे हो समर्थ ॥
॥ चंद्र बत्तिशीचा उगवला पुरा । चत्रभुज देव । आले या घरा ॥
॥ चंद्र बत्तिशीचा उगवला पुरा । आदीपुरूष देव आले हो घरा ॥

गाहया :-
॥ पिंडा मध्ये चक सात । नउ नाडया मोठया बळकट ।
पुढे भोर गुंफिंची वाट । वर सत्रावीचा देठ ॥
॥ बारा न चार, मिळुन सोवळी । धरली हाती ।
सत्रावीची जिवनकळा ज्योत, उभी राहली ॥
॥ बारा रवी, १६ कळा । सत्रावीचा आहे उजाला ।
यान साधली सत्रावी जिवनकळा ॥ हा कृष्ण योगी खरा ।

निरसन पुढील पानावर...

## ॥ बत्तीशीची ओवी निरसनसह शब्दार्थ/चरणार्थ ॥

### बम्हांडातील बत्तिशी :-

आघाताने अथवा अन्य कारणाने पृथ्वीच्या फिरण्याची गती वाढुन जेव्हा राहु दिवस येंईन आठवा, तेव्हा ८ दिवसाचा एक आठवडा होईल. असे ४ आठवडे एका महीन्यात येवुन ३२ दिवसाचा एक महीना होईन. हा बत्तिस दिवसाचा जेव्हा महीना होईन. तेव्हा सर्वांची पिंडीतील ३२शी पुर्ण करण्यासाठी ओढं राहील. जनलोक पिंडीतील ३२शी पुर्ण करून महा महा योगी होतीन. जीवनकळीची सुद उभी राहुन निळवंती बरसन. कोरे धान्य पिकन. भैस येईन. सत्युवग येईन....

| | | |
|---|---|---|
| **पिंडीतील बत्तिशी :-** बत्तीशीचे अधिक ग्यान कायाग्यान खंड ०३ मधुन घ्यावे. | | |
| ०१ | दशइद्रिये, मन व बुध्दि च्या दिवटया लावुन या रवीच्या ज्योती प्रकाशल्या बारा म्हणजेच सुर्याच्या १२ कला याचे अधिक ज्ञान खंड०२/०६ मध्ये दिलेल्या आहेत.... | १२ |
| ०२ | चार न चार घडी ऐसा या देहीचा कोट असलेल्या स्थुल सुक्ष्म कारण व महाकारण असे चार देहा.... | ०४ |
| ०३ | चंद्राच्या सोळा कला याचे अधिक ग्यान खंड०२/०६ च्या निरसनातुन घ्यावे.. | १६ |
| | एकुन मुद्दे | ३२ |

असे एकुन ३२ मुद्दे योग्याला साधावे लागते. जेव्हा तो हे बत्तीस मद्दे आपल्या जीवन काळात सिध्द करतो, तेव्हा कुठे त्या योग्याची बत्तीशी पुर्ण होवुन तो खरा योगी होतो. कृष्णा योगी ने आपल्या विविध अवतार कार्यात प्रतेक जिवनात अश्या बत्तीश्या पुर्ण करून सहावी बत्तीशी सावंगा च्या अवतार कार्यात पुर्ण करून, पुर्ण अवतार झालेत.

०१. **पहील्या** अवतार कार्यात त्या कृष्ण योग्याने पहीली बत्तीशी पुर्ण करून तिथे तो बोध देत देत बोधपणी उरला. त्या बत्तीशीला त्याचे चमत्कारी गुण तो दाखवु लागला.

०२. **दुस-या** अवतार कार्यात जेव्हा त्यांनी दुसरी बत्तीशी पुर्ण केली, तेव्हा तरण्यासाठी फिरणारे यात्रेकरू भक्त यांचे पाय त्यांच्या कडे आपोआप आकर्षित होवु लागलेत. कृष्णा जवळ येवुन ते भक्त यात्रेकरू कृष्णापायी पडुन तरू लागलेत.

०३. **तिस-या** अवतार कार्यात जेव्हा त्यांनी तिसरी बत्तीशी पुर्ण केली, तेव्हा त्यांच्या कडे करारी आली. सत्वशुध्दचा कडकडीतपणा आला. मी मी म्हणणारे तिरगुणी मानव विर शुर विर खेत्री त्यांनी योजीलेल्या कार्या कडे पाहुन, त्यांच्या पुढे बोलता थरथरा कापु लागलेत.

०४. **चौथ्या** अवतार कार्यात जेव्हा त्यांनी चौथी बत्तीशी पुर्ण केली, तेव्हा जाणते शुर विर खेत्री भक्त त्याहीची संगत करू लागलेत. भेटी आंगचे सिध्दगण व सत्-शक्तियॉं व पुण्यात्मे त्यांच्या संगतीला आलेत. त्यांना साथ सहकार्य करू लागलेत. कृष्णा जेजे बोलन त्या त्या बोलावर उभे राहुन, कृष्णाचे तेते बोल सिध्दगण सिध्द करू लागलेत.

०५. **पाचव्या** अवतार कार्यात जेव्हा त्यांनी पाचवी बत्तीशी पुर्ण केली तेव्हा त्यांच्या कडे सिदाई वाचा आली. ते जे जे बोले ते ते होत असे ।
पाषानाला फुट म्हणता पाषाण फुटु लागे । पाषाण हद्यी लोकांचे हद्य गदगदुन मउ मृदृ होत असे त्यांच्या या सिदाईच्या वाचे व्दारे !

०६. **सहाव्या** अवतार कार्यात जेव्हा त्यांनी सांवंगी सहावी बत्तीशी पुर्ण केली, तेव्हा जाणत्यांनी जाणले की : आता भैस येणार या कृष्णाच्या देहगादीवर । हा कृष्णाच आदीपुरूष भैसाचा चतुर्व्युह रूप रंचनेतील पुर्ण अवतार होणार. भैसाचा पुर्ण अवतार होवुन तिन ताळात हा नाही ठेवणार आता कोण्या तिरगुणींची उर !.. .. असो. अधीक ग्यानासाठी कृष्णामृत वाचा.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥

॥ ओवी नं. २७ ॥

ओवी महात्मः- अरजीच्या अगोदर किंवा अखजी-अक्षयतृतीया सणाच्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी...

॥ मुळावरची ओवी ॥

# ॥ जोहार ची ओवी ॥

वरभजनं :-

॥ तिन खुम्मी तीन राजे । चौथा खुम्म पडला सुना ।
चारही खुम्मी राज्यं चालवन । त्याहीची सांगतो महिमा ॥

॥ आहो महार, करतो जोहार । अवघ्याला शरणं ।
अठरा खुम्मावर, वस्ती याहीचं । भकसतो अन्नं ॥ ०१ ॥

॥ अठरा जाती, अठरा न्याती । अठरा लींगं वर्णिता ?
अठरा वर्ण, ज्याच्या आंगी । तो होय कोणता ? ॥

॥ सर्वत्राचा, आधी आदी पुरूष । याहीचं नावं ।
तिरलोक्या मध्ये, वेल याहीचं । न्यात सांगावं ॥

॥ चार वाणी, चार खाणी । चौरंगी जाणां ।
चव-रंगाचं, केल बोलनं । न्यातं ओळखानां ॥ ०४ ॥

॥ आदी मुनी, महा मुनी । महा व्दार झाले ।
किंवा :- ॥ महाव्दार महामुनी । महाऋषी झाले । जळगाव टुक..
कोण मुळचे, होय महार । महाराज म्हणावं कोणाले ? ॥

॥ मायेत पडलो, मालकं भुललो । चौ-यांशी यवनं ।
चव-यांशीची, बिगार नाही । चुकवली कोण ? ॥

॥ चौ-यांशीची बिगार केली । मिर्त लोकानं ।
कैलासाहुन लोक येतीन । जोहार जी शरणं ॥

॥ कैलासाहुन, लोकं येतीनं । जायरण अखजीं ।
किंवा :- कैलासा चे लोक मोहरं । होणार अखजी ॥ जळगाव टुक..
वहर-पितर, लोकं याहीची । मचन/होईन फजीती ॥

॥ ओहर-पितर, लोकं याहीची । पाहेरी/पाहेणी केली ।
यशव्दारचा नाईक, गणिता पुसं । घेईन सारी ॥
किंवा:- ॥ ओहरं-पितरं, या लोकांची । केली पाहेरी ।
यशव्दाराचा, नाही गणितां । पुस घेईन सारी ॥ जळगाव चरण..

भजने :- ॥ नोव्हे महार होय महाराज ।
याहीचा अंत कळेना, जायरण सगळं काजं ॥
॥ मुजरा कृष्णाले भैसाले । अंबर करा देहीले ॥ मुजरा..

-: निरसनसह शब्दार्थ/चरणार्थ :-

**वर्णिता** :- वर्णन करता । **जोहार** :- लवुन तिनवेळा राजाला मुजरा करने

**१८ खुम्मावर वस्ती...** :- १८ पुराण जसे ब्रम्हपुराण, पद्मपुराण, शिवपुराण, विष्णुपुराण, भागवत, नारदपुराण, मार्कंडेयपुराण, अग्निपुराण, भविष्योत्तरपुराण, ब्रम्हवैवर्तपुराण, वामणपुराण, वराहपुराण, मत्स्यपुराण, ब्रम्हांडपुराण, कर्मपुराण, गरूडपुराण, स्कंदपुराण, लिंगपुराण. या १८ पुराणापैकी जरी १० पुराणी शिव वर्णिला, ४ पुराणी विष्णु स्तविला. २ पुराणव्दयी ब्रम्हा गायला आणी दोहेत अग्नीसुर्य स्तविला असला, तरी या १८ पुराणावर त्या निराकार निराधार निरंजन आदीपुरूषाचीच वस्ती आहे. या अठरानेही निरंजनाने घेतलेल्या विविध रूपाच्या आकाराची विविध शब्दाचें खेळ करत, आपआपल्या दैवताचे नाव समोर ठेवुन, त्या निरंजनाचीच स्तुती केलेली आहे. तो निरंजन आदीपुरूष या पुरांणांतील देवतांचे सच्चे भक्त यांना निवडुन, यांच्या सच्च्या भक्ती भावाचे अन्न भकसुन त्यांना देण देत राहतो.

**१८ जाती** :- कृश ऋषीची कासार जात, जनार्दन ऋषीची जात तांबोळी, वाल्मीकी ऋषीची जात कोळी, कुलज ऋषीची जात कान्होज, मळी ऋषीची जात माळी, व्यास ऋषीची जात धिवर, वशिष्ट ऋषीची जात धवड, कश्यप ऋषीची जात खाती, नारदमहामुनी ऋषीची जात धोबिन, भार्गव ऋषीची जात तांबटी, कौंच ऋषीची जात न्हावी, शंतनुमामा महाऋषीची जात साळीन, कौडिण्य ऋषीची जात कोष्टी, चंपकनामा ऋषीची जात चर्मकार, दर्दुर ऋषीची जात डोहारिण, मार्कडेय ऋषीची जात मांतग, मर्गज ऋषीची जात शिंपी, बृहस्पती ऋषीची जात बुरूड, कुंभक ऋषीची जात कोल्हाटी, धनिर्ग ऋषीची जात धनगर, खटऋषीची जात खाटिक, विष्णुशर्मा ऋषीची जात पुष्करी, ग्रेधाक्ष ऋषीची जात गोसावी....ईत्यादी बद्रिकाश्रमी ८८ सहस्त्र ऋषीचे कुळापासुन १८ पगड जाती निर्माण झाल्यात. संदर्भ :-मुळस्तंभ अध्याय १३/श्लो.६३ ते ७४

**न्यात** :- नातेसंबध, । **१८ न्याती** :- १८ प्रकारचे नाते सबंध. जसे माता-पिता, पुत्र-पुत्री, बहीन-भाउ, सासु-सासरे. ईहीन-ईव्हाई, काका-भासरा, जावाई-मेव्हुना, भारजा-चुलता,...ईत्यादी १८ न्याती

**१८ लिंग** :- १. शिवलिंग निराकार निराधार परमात्मा परंब्रम्हाचे यालाच गुरूलिंग असे सुध्दा काही जन म्हणतात. २. ब्रम्हयाशी शिळामय लिंग ३.विष्णुशी इद्रनिळ लिंग ४. रूदाशी प्रभाकरलिंग ५. पार्वतीशी घृष्णेश्वरलिंग ६. सर्वगणांशी इश्वरलिंग ७. मिर्तलोकाशी महालिंग ८. आकाशाशी शुन्यलिंग ९. वरूणाशी वायुतत्वाचेजंगम/स्फटिकलिंग १०. अग्नीशी हेमलिंग ११. उदकाशी/पाण्याशी तोयेश्वरलिंग १२. भुमिकेशी पृथ्वीतत्वाचे आचारलिंग/रामेश्वरलिंग १३. आदीत्य/सुर्याशी तुरयलिंग १४. चंद्राशी मठन्नलिंग, १५.मनुष्याशी हाटकेश्वर लिंग १६. वाणीशी बाणेश्वरलिंग, १७. विघाधरीशी केदारलिंग १८. मेरूशी श्रीकांचनेश्वर लिंग......ईत्यादी लिंगपुजा सांगतली गेली आहे. संदर्भ :- मुळस्तंभ

**चार वाणी** :- १. मुखातुन उठणारी वैखरी, २. कंठात असलेली मध्यमा,
३. हदयातुन उठलेली पश्यंति, आणी ४. नाभिकमळातुन वर आलेली परा,
असे या चार देहीच्या चार वाणी । या चारही वाणीतुन निघणारी मौस वाणी.

**चार खाणी** :- ०१. बियांपासुन उत्पन्न होणारी बिजखाण. जसे झाडे, ०२. अंडयातुन उत्पन्न होणारी अंडज खाण. जसे पक्षिकुळ, ०३. अचानक उत्पन्न होवुन अचानक नाहीशी होणारी उद्‌बिज खाण. जसे उंबरातील किडे, ०४. विर्य-बिज पासुन उत्पन्न होणारी जाडज खाण. जसे व्दीपाद प्राणी मानव, चतुर्पाद प्राणी गायी गोत्र... ईत्यादी.

**चवरंगाच बोलनं** :- चार रंगाचे चौरंगी बोलने म्हणजेच एका एका शब्दाचे अथवा वाक्याचे चार चार अर्थ असलेले, चार वाणीतुन निघालेल्या मौसंवाणी चे बोलने.

**८४शीची बिगार** :- जित्या जन्मीच्या ८४शी चा अडी-अडचणीचा दुःख-दर्द चा फेरा, तर मेल्या मागे ८४शी योनीत जन्म-मृत्यु सह ईतर दुःखे सोसत फिरण्याचा फेंरा !

**अखजी** :- वहर-पितर पुंजनाचा अखजी सण । या सणाच्या दिवशी वहर-पितंरा करीता भोजन तयार करून, त्यांच्या पुंजनासह त्यांच्या नावाने ते भोजन समर्पित केल्या जाते.
**जायरण अखजी** :- जायरण म्हणजे निरंजन आत्मा । या आत्म्याची अखजी कशी करणार ? कारण की : या आत्म्याला जन्म नाही मृत्यु नाही. तो अजात आहे. या अहीन अजात निरंजन आदीपुरूष आत्म्याची अखजी करणा-याची मचन फजीती हो ।
**वोहर/ओहर** :- ज्या कुटुंबात आधी माता मृत्युमुखी झाली असेल, ते कुटुंब वोहर पुंजतात. मुख्यः मृत स्त्रीयांचे मातृ-पुंजन अखजीला करतात.
**पितर** :- ज्या कुटुंबात आधी पिता मृत्युमुखी झाला असेल, त्या कुटुंबात पितर चे पुजन केल्या जाते. मुख्यः मृत पुरूषांचे पितृ-पुंजन अखजीला करतात.

**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०२ ॥

॥ ओवी नं. २८ ॥

ओवी महात्मः- चतुर्पती नाम घेण्याच्या महीन्या च्या पहील्या तारखेला म्हणजेच उरली अवसा, प्रतिपदा, बिजेला, किंवा मांडीच्या स्थापनेच्या पहील्या दिवशी, अरजीच्या अगोदर किंवा अखजी, अक्षयतृतीया सणांच्यावेळी, हमखास म्हणण्यात येणारी..

॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ निरसनसह तारखेची ओवी ॥

॥ तिर तिरभवनी, सभा एक केली । वरकटं करतिन चाकरी ।
वरकटं करतीन चाकरी । त्याच्या साठीं, हे तारीख सांगतली ॥
॥ तारीख करा, तारण खरा । तिथं तरण-उपाय, होईन सारा ।
तारीख चुकणार, नाही कोणाला । तारिख, करनं पडनं अवघ्याला ॥
॥ तारीक करनं पडन अवघ्याले । नाही करतीन ते फजीत झाले ।
तारीख चुकणार नाही कोणाले । करनं, पडनं हो अवघ्याले ॥ ..जळगाव
॥ ऐका तारखेचे गुणं । शांत होईन, तिर तिरभवनं ।
त्याहीला आयुष्य, देईनं येवुन/द्नुनं । यवगा यवगीं...
धनी संग, नांदवनं/वागवनं ॥०४॥

॥ धन्याचे मोठं/वज्जरं, निब्बरं मन । करा भक्ती, जिरवा मनं ।
त्याहीचं नशीब उघडनं । त्याहीला, अगाध/अव्हाडं होईन देणं ।
॥ धन्याचे हाउस, धरा ध्यानं । करा भक्ती, ईरवा मनं ।
त्याहीच्या संग आउक यवग । नांदवनं हो नारायणं ॥
॥ धन्याचे आउक, धरा ध्यानं । सगंतीनं शंक नर होईन नारायणं
त्याहीच्या संग, स्वर्गीचे द्युतं । बोलनं, करतीन येवुनं ॥
॥ अठरा खेत्री, द्युतपती । परवेशाचं गिण्यानं, होईन मिर्त लोकी ।
धन्याचा, खेळ होईन, मिर्तलोकी । या खेळानं..
खोटं, जरा नाही लपणारं ॥०८॥

॥ माया चैत्यन्या आधी शक्ति । या ईचा खेळ अडनं ईथी/येथीं ।
या ईचं ठिकाण उडवन येथी/ईथी । कल यवगातं..,
सत् यवगं होईन नितं ॥
॥ ब्रम्ह आकारं, पुसे शिरष्टी । आकार न्यारा आहे कुठी ? ।
धन्याचा खेळ आला/उभा येथी । सांगतो खरं..,
खेळ पाहता थकतीन जनं ॥
॥ यवगी उभा सत्वधीरं । जाण तो नव्या यवगाचां कारं/खेळ ।
याहीच्या हाती कळसुत्रं । संग तार कं उठनं नितं ।
नाम भजा हो नित्य रूपं ॥ ११ ॥
॥ ऐका तारकेचे गुणं । रमणा येईन तिर तिरभवनं ।
उभा राहीन चौथा खुम्मं । तो चौ-यांशी मोडनारं ॥ १२ ॥
॥ ऐसं होणार नाही, म्हणता हो । उसनं झालं ।
उभा राहुन फेडन सारं । त्याहीला चौ-यांशी, नाही चुकणारं ॥१३

**भजने** :- ॥ नामी राहयं भजनी राहयं । चुकन चौ-यांशी सांगी आहे ॥
॥ नाम भजा नित्य रूप । तारीक नाम तारकं ।
तारकं नाम घ्याना गडेहो । करा देहीचं सार्थक ॥
॥ तारीकं नाम परवेशी । येईन महाराज हो, देहे ताराशी ॥
॥ अवसर प्रतिपदा बिजं । अवसा प्रतिपदा बिजं ।
हे तारीख भज, येईन महाराज/चत्रभुज । हे तारीख भज, तो लावनं ध्वज ॥
॥ तारीख भजा..। देव येईन चत्रभुजा/महाराजा । तो लावन हो ध्वजा ॥ तारीकं भजा..

## -: तारकेच्या ओवी चे निरसनसह शब्दार्थ/चरणार्थ :-

**वरकटं** :- वर-वर चे लोक, अर्ध्या हळकुंडात पिवळे झालेले वर वरचे जन लोक । **दुनुन** :- दुगुणे, दुप्पट । **वज्जरं निब्बरं मन** :- वज्राप्रमाणे टणक/कठिण तसेच मोठे निब्बर मन । **ईरवा मन** :- वीट ज्याप्रमाणे पाण्यात विरवल्या जाते, त्याप्रमाने धिराईने मुरवत-जिरवत ईरवा/जिरवा मन । **हाउस** :- हौस, खुष करण्याकरीता करीता, खुशी । **अव्हाड देणं** :- देही अंतर्गत चे अगाध देणं । **अडन** :- अडल्या/रोकल्या जाईल, थांबवल्या जाईन. । **उडवन** :- ठाणे वरची सत्ता उडवल्या जाईन. उडवणे

त्याहीच्या संग आउक यवग :-

आउक :- सांगी, आत्माराम धन्याने दिलेला आवाज, अतर्रात्म्याचा आवाज, आकाशवाणी, आपरूप सांगी करणारे भैसाचे यवग. ऐसे सांगी करणारे आउक यवग ज्याच्या घरी, तो नाही पडणार बा विचारी, विचार करतीन तिनही ताळचे तिरगुणी. खंड०७/ओवी-६७/सत्य जाना भंग सुटला देवांगण ।

चतुर्पती नामज्योती च्या अखंड परमय व्दारे मन उन्मळुन पंच प्राणाने देही उल्हासुन ज्याच्या देहघरी हे आउक यवग प्रकटले, त्याला ***सांगते निराकार*** परमात्मा, ***ऐकते निर्गुण*** आत्मा-०७/३२ ही अवस्था प्राप्त होते. आउक यवगाच्या या अवस्था प्राप्तीमुळे तो नाही विचारणास कोणास ग्यान. कारण की : तो निराकार भैस त्याला पाहीजे असलेले ग्यानाची सांगी त्या देहघरी आपल्या अंश अवतार आत्माराम मार्फत आपरूप करत असतो. अंर्तआत्माचा आवाज प्रकट होत तो आवाज शांतपणे बसुन ध्यान लावुन देही ऐकत राहते. बाकी तिरगुणी जग मग विचार करेल की : या देहीला कुठेही न जाता, कोणत्याही गुरूजवळ न जाता घरबसल्या आपरूप ग्यान कुठुन प्राप्त झाले ? त्या आउक यवग प्रकटलेल्या देहीला विचारणा केल्यास ती देही म्हणेल की : ओळखा तुम्ही.. माझा गरूदेव आदीमुनी...!

**शंक** :- निश्कलंकी, पाक, अती-पवित्र जसे म्हशीच्या दुधात काळपटपणाचा लवलेशही नसतो ते पाक शंक असते तसेच कलंकाचा लवलेशही नसलेला निश्कलंकी अतिपवित्र म्हणजे शंक वर्ण । **शंका नर** :- शंक पवित्र आचार विचाराचा परंम् ग्यानी नर ।

स्वर्गिचे द्युत बोलन करतीन येवुन । परवेशाचे गिण्यान होईन मिर्तलोकी :-

विषय-वासना मनो-विकारासह मृत्यु पावुन पवनरूपी गोल गोळा झालेले काहीजन देहीशी बोलनं न करताच चोराप्रमाणे देहीत घुसुन बळजबरीने देहीचा ताबा घेवु पाहतात. उदाहरणार्थ लष्टाण ईत्यादी. परंतु उच्च श्रेणीतील स्वर्गिचे पुण्यात्मे, शंक आचार विचाराचे कृष्णांचे शंकाचारी द्युतगण, सिध्द शक्तियॉं हे देहीत चोरासारखे घुसत नाही. ते सर्व शिष्टाचार बाळगतात. अंगीभुत शिष्टाचाराव्दारे प्रथम ते स्वर्गिचे द्युत अथवा शक्तियॉं त्या देहीशी एकतर बोलन करतात, किंवा 'येत आहे' याचे शकुन देतात. देहीची मान्यता घेतात. आणी मग ज्या देहीने त्यांच्या शकुनाचा मान ठेवुन त्यांना आवतन दिले, त्या देहीत ते पुण्यात्मे अंर्तभुत होवुन देहीत प्रवेश करून/प्रवेशी होवुन हद्‌य नामाने भरून देत देहीला संदेश अथवा गुप्त गुढंग्यान देतात. देहीला निरंजनी भेट देवुन निघुन जातात. ऐसे कृष्णाचे संगचे स्वर्गिचे द्युत, शुध्द सत् शक्तियॉं देहीत प्रवेशी होवुन निरंजनी भेटी देत राहतात. या परवेशांची संगत घडुन हद्‌य चतुर्पती नामाने भरून जाते. चतुर्पतीचे निरंजन ग्यान सह जेजे ग्यानाची आवश्यकता पडेल तेते सर्व ग्यान त्या सच्च्या देहीला मिळत जाते. ऐसे परवेशी ज्ञान सह बहुकाही या कृष्णाशी *// मंगळवा-या दिवशी शक्तीनं बोलन करून । संगत परवेशाची/प्रवेशाची घडवुन, त्यांच हद्‌य दिले नामानं भरून //* खंड०७/ओवी-२७ चे चरणे पहा. ऐश्या या चतुर्पती कृष्ण अवद्युत चे **परवेशाचे चतुर्पती गिण्यान होईन मिर्त लोकी**.

**अठरा खेत्री द्युतपती** :- १८ खुम्मावर वस्ती. असलेल्या १८ पुराण जसे ब्रम्हपुराण, पद्‌मपुराण, शिवपुराण, विष्णुपुराण, भागवत, नारदपुराण, मार्कंडेयपुराण, अग्निपुराण, भविष्योत्तरपुराण, ब्रम्हवैवर्तपुराण, वामणपुराण, वराहपुराण, मत्स्यपुराण, ब्रम्हांडपुराण, कर्मपुराण, गरूडपुराण, स्कंदपुराण, लिंगपुराण. या १८ पुराणापैकी जरी १० पुराणी शिव वर्णिला, ४ पुराणी विष्णु स्तविला. २ पुराणव्दयी ब्रम्हा गायला आणी दोहेत अग्नीसुर्य असला, तरी या १८ पुराणावर त्या निराकार निराधार निरंजन आदीपुरूषाचीच वस्ती आहे. या अठरानेही

निरंजनाने घेतलेल्या विविध रूपाच्या आकाराची विविध शब्दाचें खेळ करत, आप आपल्या दैवताचे नाव समोर ठेवुन त्या निरंजनाचीच स्तुती केलेली आहे. ०६ शास्त्रे, ०६ दर्शन, ०६ जोग असे १८ तसेच ०४ वेद १८ पुराणात या एकाचीच गाही आपआपल्या आवडीच्या दैवताचे नामे समोर करून दिलेली आहे.

तिथे तो निरंजन आदीपुरूष या पुरांणांतील देवतांचे सच्चे भक्त यांना निवडुन, यांच्या सच्च्या भक्ती भावाचे अन्न भकसुन त्यांना देण देत राहतो. ऐसे हा १८ खुम्मावर उंच घर असलेला १८ खैत्री/ठिकाणचा द्युतपती असलेला चतुर्पती धनी होय. अठरा खुम्मावर उंच घर असलेल्या चतुर्पती धनी या अठरा खेत्री चे द्युत यांचा पती असल्यामुळे या चतुर्पती धन्याला अठरा खेत्रीचा द्युतपती असे म्हटल्या गेलेले आहे, या अठरा खेत्री/ठिकाणी हा द्युतपती उभा आहे. म्हणुनच या चतुर्पती धन्याला अठरा खेत्री चा द्युतपती असे संबोधले आहे. हा धनी अथवा त्यांचे संगचे त्याचेच द्युत हे परवेशी/प्रवेशी होवुन चौथे शुध्द सत्व चे चतुर्पता ग्यान सच्च्यांच्या हद्यी प्रेरीत करत राहतात. *अठरा खेत्री उभा द्युतपती या टुकीचे अधीक ग्यान खंड०७/१६:-मोहरची ओवी निरसना तुन घ्यावे.*

बम्ह आकार पुसे शिरष्टी ? :-
चतुर्पती ने या ब्रम्हयाची उत्पत्ती करून मुळची किल्ली मालुम नसलेल्या या ब्रम्हया च्या हाती निर्गुण साचा देवुन, त्या साचातुन उत्पत्ती करण्याचे काम दिले. ऐसे आकारी उत्पत्तीचे काम करत ज्याने निर्गुण साचातुन आकार साकारले, त्या ब्रम्हयास सृष्टी पुसे की : तुला उप्पन्न करणा-या मुळ ब्रम्ह चा आकार कैसा आहे ? तुमच्या पासुन उत्पन्न न झालेला वेगळा निराळा आकार कुठे आहे ? । **पुसे** :- विचारणे । **शिरष्टी** :- सृष्टी, प्रकृति । **न्यारा** :- वेगळा, निराळा । **कुठी ?** :- कोठे ?, कुठे ?

अवसर/अवसा प्रतिप्रदा बिज :- सुर्यवंशाच्या लोकांचा महीना अमावस्ये पासुन चालु होतो. कारण की : अमावश्येच्या दिवशी सुर्याच्या प्रकाशात चंद्रप्रकाशाचा लवलेशही नसतो. या संपुर्ण दिवशी सुर्याचा शुध्द प्रखर तेजपुंजः व निश्कलंकी प्रकाश असतो. या दिवसानंतर पोर्णिमपर्यत प्रतेक दिवशी सुर्यप्रकाशात चंद्रप्रकाशाचा लवलेश कलाकलाने येत असतो. आणी पोर्णिमे पासुन अवसा पर्यत सुर्यप्रकाशातील चंद्रप्रकाशाचा लवलेश कलाकलाने कमी होत अमावश्येला सुर्यप्रकाशात चंद्रप्रकाशाचा लवलेश अजीबात नसतो. त्यामुळेच या निश्कलंकी सुर्यप्रकाशाच्या दिवसाच्या पहील्या दिवसापासुन म्हणजे प्रतिपदा पासुन सुर्यवंशी चा महीना चालु होतो. म्हणुनच अमावश्या च्या प्रतिपदा या तिथीला सुर्यवंशीय लोक प्राधान्य देतात. चतुर्पतीचे सुर्यवंशीय भजनी भक्त सुध्दा महिन्याचा नाम घेण्याचा पहीला दिवस उरली अमावश्येनंतर येणा-या प्रतिपदा मानतात. प्रतेक महीन्याच्या उरल्या अमावश्येला उटी करण्याचे पुंजन सावंगा दांडात आहे. तर अमावश्येच्या प्रतिप्रदेला अवसर पुंजन करण्याची प्रथा जळगाव दांडात आहे. आणी या अवसर पुंजन नंतर प्रथम बिज नाम ज्योत लागत असल्याने, या नाम ज्योत बिज च्या दिवशी म्हणजेच अवसर पुजेच्या दुस-या दिवशी तारकेचे पुंजन करतात. या तारखेच्या दिवसापासुन १३ दिवसांने पोर्णिमा येत असल्यामुळे ही १३ चरणांची तारखेची ओवी हमखास म्हणुन *॥ अवसा/अवसर प्रतिप्रदा बिज । हे तारीख भज येईन महाराज । तो लावनं ध्वज ॥* हे भजन म्हटल्या जाते. बिज तारखेलाच नाम घेण्याचा प्रवेश होतो. म्हणुन या तारखेलाच तारीख नाम परवेशी/प्रवेशी म्हणत, महाराजाला देहे तारावयाशी विनविनी सुरू होते. या तारखेंच्या दिवशी तारखेची ओवी व कापुरज्योत ही या तारखेची आरती हमखास म्हणण्याची प्रथा कृष्णकाळापासुन पडलेली आहे. नाम घेण्याच्या पहील्या दिवशी हमखास म्हणण्याची ओवी म्हणजे तारखेची ओवी होय. म्हणुनच मांड बसल्याच्या पहील्या दिवशी तारखेची ओवी व तारखेची आरती हमखास म्हटल्या जाते. तसेच स्थापना केल्याच्या पहील्या दिवशी सुध्दा हीच तारखेची ओवी व आरती म्हटल्या जाते. तर अमावश्यानंतर येणा-या मराठी महीन्याच्या पहील्या दिवशी म्हणजेच प्रतिप्रदाला ही तारखेची ओवी व आरती जाणते हमखास म्हणतात. या प्रतिपदेलाच हो येईन चत्रभुज महाराज । लावन तो ध्वज । म्हणुनच ही तारीख भज । हे तारीख नाम तारक तारीख आहे, म्हणुन आता या दिवसापासुन नाम घेण्याची सुरूवात करून या देहीचे सार्थक करा हो । थोडक्यात नाम कार्यास, शुभ कार्यास सुरूवात केल्याच्या पहील्या दिवशी तारखेची ओवी व कापुर ज्योती ची तारकेची आरती चतुर्पतीच्या जाणत्यांकडुन हमखास म्हटल्या जाते. ।

**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. २९ ॥
परमात्माकडे देह-जिवाने केलेली विनवणी ची...
॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

# ॥ कनवाळु ची ओवी ॥

॥ भक्ती चा, कनवाळु साहय । करावं बाळासं ।
अनामत, महाराज देहीला । तारा बहु यवगं ॥
॥ देह जीवाच्या करावं/होतीनं भेटी । थोर महीमा तुही ।
कृष्णराज महाराज तुम्हाला । बहु यवगं विनवी ॥ ०२ ॥

॥ तिस लक्ष, तुरूंग देही । हिंडलो पानो-पानं ।
भोगली चौ-यांशी । माझं, कंटाळले मन ॥
॥ विस लक्ष, गाय-गोत्री । हिंडलो रानोवनीं ।
बालक तुझा, तान्हा कृष्णा । धर मज पोटाशी ॥०४॥
॥ अकरा लक्ष, जलचर । हिंडलो/होतो पाण्यातं ।
भोगली, चौ-यांशी दया । करा कृष्ण नाथं ॥
॥ दहा लक्ष, किडा-किटुक । हिंडलो चौ-यांशी ।
नाही राहली, उरवती । जागा, दयाहो पायाशी ॥
॥ नउ लक्ष, पक्षी कुळी । उडलो/हिंडलो गगणातं ।
आता माझी दया येवु द्या । मानव जन्मातं ॥
॥ चार लक्ष, मानव देही । उत्तम आहे ।
थोर माझं, भाग्य धरले । देवाचे पायं ॥०८॥

॥ चार न् चार, घडी ऐसा । कोट बनवलां ।
जीवन-पोहन, राजा यामध्ये । नांदु लागलां ॥
॥ कोट-कोट, येरझार कोट । म्हणावं कैश्याशीं ।
कोट हे, नरदेही । सोयंम्/जीव, नांदवा ईथी ॥ १० ॥
॥ चार न् बारा, मिळुन सवळी । हाती धरलीं ।
सत्रावीला, जिवनकळा । ज्योत, उभी राहली ॥
॥ चार न् बारा, मिळुन राया । सवळी गठनं ।
सत्रावीला, जिवनकळा । ज्योत, देहीत नांदनं ॥१२॥

॥ रूमा-वळीला, गणिता नाही । तु, रूपी उतरला/उध्दारला ।
धन्य तुमची, लीला सर्व । घटी भरून उरलां ॥ १३ ॥
॥ इश्वरी माया, इश्वरी काया । रूपाशी/रूपात आल्या/येतीनं ।
धन्याच्या आंगच्या सत्/सत्ता ज्योता । रूपी नांदु लागल्या/लागनं ॥
॥ देही मध्ये, देही हो राया । स्थुल-सुक्ष्म देही ।
स्थुल देहीला, आयुष्य राया । लाखाचं देई ॥
॥ देही मध्ये, देही । फजीत, नाही चे काम ।
सुक्ष्म देहीवर, सिदाई वाचा । दयाहो शकुनं ॥
॥ देही मध्ये, देही राया । सुक्ष्म देहीं ।
सुख राहीलं उभ । आयुष्य, कुडीवरं देई ॥ १७ ॥

भजने :- ॥ राहु राहु येईनं । करोडोवर्ष देहीला सुखः होईनं ॥
॥ राहु राहु राहु दे । अनंत यवगं देहीला सुखः राहु दे ॥

**डहाक्या :-**

॥ अरज माझी, अरज देवां । तुम्हा पायी आहें ।
सदा विनवतो, माझ्या मुखी । उभा राहयं ॥
॥ तुमच्याच आंगचा, जीव हा राया । तुमचाच सवंगडी ।
तुमच्या नामानं, तरल्या राहो । बहु यवगावरी ॥
॥ अगाध वाणी, अगाध धनी । अगाध महीमा तुही ।
तुमच्या वाचुन, ईच्छा पुर्ण । कोण करनं माही ॥
॥ ईच्छा पुर्ण, कर या देही । जावुच नको कही ।
देहीतुन जावुच-नको कधी । असोतुया, रुपा-सुखाची गाही ॥

**भजने :-**

**॥ परमय सुखाची वाणी । याहो महाराजा, सुखंः दयाहो येवुनी ॥**
**॥ सुखा साठी, म्या भजलासे हरी । आहो हरी..**
**सुखंः दयाहो । महाराजा देहीवरी/येवुनी हो ॥**
**॥ उमर बारा तेरा वर सात । बत्तिशीला अंबर, करा देह पिंड ॥**
**॥ उमर चौदाशी चौदाशी । अंबर करा देहीशी ॥**
**॥ आयुष्य करोडावरत देई । कृष्ण महाराजा महीमा आहे तुही ॥**
**॥ महीमा आहे गा तुही । आता चालव या तिरलोकी गाही ॥**
**॥ तिरलोक्याचा होय दाता । संभाळ करा महाराजा अवधुता ॥**

## ॥ कनवाळुची ओवी निरसनसह शब्दार्थ/चरणार्थ ॥

चौ-यांशी :- चौ-यांशी म्हणजे ८४ लक्ष योनी । जसे वृक्ष-वेलींच्या पानावर राहणा-या ३० लक्ष तुरंग देही च्या योनी, जंगलात विचरण करणारे २० लक्ष गाय-गोत्री च्या योनी, पाण्यात राहणारे ११ लक्ष जलचरांच्या योनी, गगणात उडणारे १० लक्ष पक्षी कुळे यांच्या योनी आणी ईतर ९ लक्ष किडा-किटुके यांच्या योनी असे एकुन ८० लक्ष योनी होतात. यासह विविध प्रकारच्या ४ लक्ष मानव देही असे एकुन ८४ लक्ष योनी होतात. या सर्व योनी फिरणे म्हणजेच ८४ शी चा फेरा फिरणे, यालाच चौ-यांशी असे म्हटले आहे.

जिवन-पोवन राजा :-
या आत्म्याला जिवन-पोवन राजा असे म्हटल्या गेले आहे. कारण या आत्म्यामुळेच या देहीला जिवन भोगावयास मिळते. या देहीचे श्वास/पवन चालु राहते. हा देहीचा जिवन-पोवन राजा असलेला आत्माराम या देहीत नांदु लागल्यावरच, ही देही कार्यरत् होवुन कार्य करण्यास सक्षम होते. अन्यथा या देहीला मसनात जावे लागते.

चार न चार घडी ऐसा कोट :-
सुप्त ईच्छा असलेले आत्म्याची सुप्त ईच्छा जेव्हा उफाळुन बाहेर येते, तेव्हा त्यांच्या ईच्छापुर्तिकरीता परमात्मा आदीपुरुष त्यांच्यावर कृपा करतो. आणी त्यांच्या ईच्छापुर्तिकरीता, त्यांना प्रकृतिमायेच्या योनीमध्ये प्रेरीत करतो.

प्रकृतिमायेच्या योनीत जेव्हा हा निश्कलंकी शंक आत्मा प्रवेशी/परवेशी होतो, तेव्हा प्रकृतिमायेच्या तिन गुणांनी ते बध्द होतात. आणी त्या शंक आत्म्यावर एकावर एक घडी केलेल्या कोटाप्रमाणे १.स्थुलदेही २. सुक्ष्मदेही ३. कारणदेही ४. महाकारण देही असे चार देहीचे आवरण येते. शंक आत्म्यावर आलेल्या या चार देहांच्या आवरणालाच '**चार न चार घडी ऐसा कोट**' असे संबोधलेले आहे. या चार देहीच्या मिळुन बनलेल्या कोटालाच नरदेही असे म्हणतात.

**येरझार कोट** :- आत्म्यावर चार न चार घडी ऐसा कोट आल्यानंतर, तो शंक आत्मा, या देही या मायेव्दारे आलेल्या तिरगुण सह देहीचे मनोविकार, विषय वासना याव्दारे उत्तरोत्तर या चार च्या सप्तकोषाने वेस्टीला जावुन तो जिवात्मा बनतो.

परंतु जेव्हा या देहींव्दारे आलेले तिरगुणांचे बध्द, विकार विषय वासना सह सप्तकोषाचे वेस्टन सत्कृत्य करत, चतुर्पती ग्यान-भक्ती मार्गाने तोडल्या जाते, तेव्हाच तो जिवात्मा पुनः शंक आत्मा बनतो. मुक्त होतो. परमात्मा आंग लीन होतो. जे जिवात्मे अश्याप्रकारे या चार देहीपासुन सुटले, तेच केवळ निरंजनी ग्यानी आत्मे च परमात्माजवळ लीन होवुन मोक्षपदी पावतात.

परंतु जोपर्यंत या जिवन-पोवन राजा असलेल्या आत्म्यावरचे हे कोट उतरवल्या जात नाही, तोपर्यंत तो आपल्या केवळ मुळ शंक स्वरूपात येत नाही. स्वयंःप्रकाशीत निरंजन होत नाही. जर त्या निश्कलंकी आत्म्यावर आलेले हे वेस्टने, बंधने तोडल्या न जाता, देहीव्दारे वाढवल्या गेले, तर तो जिवात्मा असेच जुने झालेले अथवा नालायक कोट टाकुन देत, नवे नवे कोट धारण करत, चौ-यांशी यवनी फिरत राहतो. या कोटाव्दारे तो जिवात्मा येणं-जाणं करत ८४शी फिरतो, म्हणुन याला ***'येरझार कोट'*** असे म्हटल्या गेले आहे.

**बारा न चार** :- १२ आणी ४,

दशईद्रिये आणी मन व बुध्दीच्या दिवटया लावुन, या सुर्याच्या ***बारा*** ज्योती प्रकाशीत झाल्या. या बारा सुर्याच्या कला आहेत. आणी स्थुल-सुक्ष्म, कारण-महाकारण या ***चार*** देहाचा कोट असे ऐकुन १२ आणी ४ मिळुन १६ म्हणजेच जुन्या बोलीभाषेत ***सवळी*** म्हणजेच सोळावी गठन केली जात आहे. आणी चंद्राच्या सोळाकला प्रकाशना नंतर येणारी सत्रावी आहे जिवनकळा ज्योत निरंजनाची । ही सत्रावी उभी राहील्याशिवाय काया उभ्या होत नाही. १२ रवी कळा आणी १६ चंद्रकळा चे ग्यान खंड०२/ओवी-०६ द्युताचे मोती च्या निरसनातुन घ्यावे.

**धन्याच्या आंगच्या सत्ता ज्योता । रूपी नांदु लागल्या....** :-

ही जीवनकळा ज्योत त्या परमात्म्याचा अंश अवतार असेलेला त्याच्याच तेजोगुणी अंशअवतार आत्माराम व्दारे उभी होते. म्हणजेच परमात्म्याच्या तेजोगुणी अंश आत्म्या व्दारेच देहपिंडाच्या सत्ता ज्योती खेळु लागते. परमात्मा आंगच्या या आत्माव्दारेच, ही जिवनकळा ज्योत उभी राहुन, या सर्व देहीच्या आंगी नांदु लागल्या आहेत. पिंडी या ब्रम्हांडी भरून भरला आणीक उरला असलेल्या धन्याच्या सत्ताज्योता व्दारेच या पिंडी या ब्रम्हांडीच्या सर्व देहीच्या आंगच्या ज्योती खेळतात.

**रूमावळी** :- टवटवितपणा, तेज बहरणे, उदाहरणार्थ पावसाळयाच्या सुरूवातीला प्रथम दोन-तिन जोरदार पाउस पडल्यानंतर, धरणी हिरवीगार टवटवित होते, जोपर्यंत ती टवटळीत होत नाही, तोपर्यंत धरणी रूमावळी झाली नाही । असेच शेतकरी म्हणत राहतात.

**सिदाई वाचा** :- कुणाचाही आत्मा तडपल्या जाणार नाही अश्या प्रकारच्या प्रेमळ बोलीसह, 'जेजे बोलान तेते होईन' अशी शकुनी वाचा/वाक्य ।

**सर्वघटी भरला** :- सर्व देही सह सर्वत्र अणु-रेणुत सुध्दा भरून भरला । आणीक उरला असलेला चौथा परमात्मा आदीपुरूष भैस नारायण ।

**देही मध्ये देही फजीत नाही ज्याचे काम** :-

स्थुल, सुक्ष्म, कारण, महाकारण असे चार देहाचे सात कोष याने हा आत्मा वेष्टीला आहे. या चार देह कापसाच्या वेळु प्रमाणे एकमेकात गुंफलेल्या असुनही चारही वेगवेगळया रितीने एकमेकांची फजीती न करता कामे करतात. याहीचे कामाची आपआपसात फजीती नाही होत. चार देहाचे अधिक ग्यान खंड०३/ओवी-०६ पंचभुताचा पसारा या ओवीच्या निरसनातुन घ्यावे.

**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. ३० ॥
॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

## ॥ आदीमुनी महामुनीच न्यात ॥

॥ आदीमुनी-महामुनी । कसं नातं दोघाचं ।
कर पारख, यवग्यांची । पारखी सैंवर शक्तीचं ॥घृ॥

॥ चौदा चौकडया, यवग पुरले/भरले । जडावं आधीचं ।
किंवा :- चौदा चौक चौक्या पुरले । जडावं आधीचं ।. ..जळगाव दांड
अनामत-शक्ती, कैशी ? । या दोघांची रीतं ॥
॥ भेलुंड असता सिध्द झाला । बसला तप धरुनं ।
अनामत ज्योत खेळते । याहीच्या तपानं ॥
॥ अनामत ज्योतीनं, भेव नाही । याहीच्या तपालां ।
ऐसा कोण सिध्द राजा । बहु रंगी जाणा ॥
॥ इकडुन पेरते, तिकडुन मोडते । ज्योती चा खेळं ।
तिरलोक जुम्मा, ज्योत अनामत । होईन प्रलयं ॥०५॥

॥ तिरलोक जुम्मा, अनामत ज्योतीनं । गिळलं जीवन ।
शक्ती म्हणे, जो माझा खेत्री । त्यालाच ओळखनं ॥
किंवा जळगावः- शक्ती म्हणे, तो माझा छत्र पती । त्यालाच ओळखीनं ।
॥ तो खेत्री भ्रतार, त्याची मी शक्ती । तो माझा वर ।
किंवा :- तो छत्र पती/भ्रतार, मी त्याची शक्ती । तो माझा वरं । जळगाव
चत्र भुज, अवतार सिध्द । उभे/होईन भुम्मे वर/भुम्माभर ॥
॥ भुम्मा सिध्द, कंचन धरणी । समयाच्या/यवगाच्या मुळं ।
तेव्हा शिव-शक्ती, समया पालटन । नवीन दिसनं सारं ॥०८॥
॥ नवीन होईन डोळयाची बाहुली । बहु नाही अवघडं ।
तिरलोक जुम्मा, ज्योत अनामत । तिथुन/रूपं दिसन सारं ॥

॥ स्वर्गि पुतळी, पाताळी पुतळी । मिर्त लोकी डोळा ।
तिरलोक जुम्मा, ज्योत अनामत । करतीन येरझारा ॥
॥ तिर लोक्या मध्ये, बहु सिध्द । होतीन अंबर ।
कोणा पासुन, अवघ झालं ? कोणतं म्हणावं मुळं ? ॥
॥ मुळ यवगी, आवाज उठले, शकुन साधले । हे सिध्द जाणा ।
तिरलोक जुम्मा, ज्योत अनामत । केली साधना ॥
किंवा जळगाव म्हणनी :-
॥ मुळ यवगाचे आवाज उठतीन । शकुन साधतीन । सिध्द झाले जाणा ।
तिरलोक जुम्मा ज्योत अनामत । त्यानं येवुन केली साधना ॥
॥ मुळ यवगाची, केली साधना । मज नाही ठावं ।
भुम्मेवर सिध्द उठतीन/निघाले । जगाचे/मुलखाचे देवं ॥१३॥

॥ भुम्मे वर, सिध्द उठतील । हरी नाम सुमराल, शक्ती वरणाले
ज्याच्या आंगी, इमानं त्याहीला । देव येईन भेटीलें ॥
किंवा जळगाव :- ज्याच्या पोटी भाव त्याच्या देव येतीन भेटीले ॥
॥ भेटी आंगचे, मानव सिध्द । उभे राहतीनं यवगाले/संगतीले ।
पडन अवघ्याची भिडं । कैसं नाही, म्हणावं त्याहीले ? ॥
किंवा जळगाव :- येवुन घालतीन भिड । कसं नाही, म्हणावं त्याहीले ॥

**॥ भिडं मुर्वत्ी, सोयंम् ज्योती । उभ्या, राहतीन सैवराले/स्वरूपाले**
**यवगा वरी, भाव राहीन । अस्तुरी-पुरूषाले ॥**
**॥ एक अस्तुरी, एक पुरूष । दोघांचा एकच भावं ।**
**यवगा वर, उभा/जागी राहुन । मोडनं गंधर्व ॥१७॥**

**भजने :-**
॥ अस्तुरी पुरूषाचा भाव । त्याहीच्या घरी हा नांदतो देव ॥
॥ तिन खुम्मी, केली बादशाही । चौथा खुम्म पडला सुना ।
चारही खुम्मी, राज्य चालवन । त्याची होय महीमा ॥

**-: निरसनसह शब्दार्थ/चरणार्थ निरसन :-**

**अनामत** :- जी वस्तु स्पर्श न करता, न धरता जशीच्या तशी स्थिर राहते, परंतु जेव्हा आवश्यक्यता पडेल, तेव्हाच ती वस्तु सरकवुन हस्तगत करता येते, अस्थीर करून सिध्द करता येते, त्यास अनामत असे म्हणतात. परमात्मा हा स्थीर आहे. परंतु आवश्यकता पडल्यास त्यास पाण्याप्रमाणे वाहत चंचल होता येते. म्हणुन त्यास अनामत असे म्हटलेले आहे. मुळयवगी आदीपुरूष आदीगण हा अनंत यवग प्रथम स्थिर होता. परंतु अनंत यवगा अंती जेव्हा त्याला सृष्टी निर्मितीची आवश्यकता वाटली, तेव्हा तो चंचल होत गेला. सृष्टी निर्माण केली. आणी पुनश्चं स्थिर झाला. म्हणुन त्याला अनामत असेही म्हणतात. धरले चरण उभा जवळ । ही मागणी सिध्द करणारा नामरहीत इश्वर म्हणजेच अनामत ज्योत । **सैवरं** :- स्वयंवर, शिव-शक्तीचे स्वयंवर

**भेलुंड असता सिध्द झाला :-**
दुःखाचे भार, ओझे पहाड डोंगर डोक्यावर असतांनाही त्या दुःखाच्या जम्मावाने तो खचुन न जाता, आपले सद्‌गुण त्या डोंगराच्या भारा खाली दबु न देता, शनिचर भोगत भोगत शांतपणे ईमानदारीने आध्यात्मीक साधना निरंतर करत सिध्द झालेला,. अडी अडचणी चे काटे दुर करत आपले व्रत भंग न होवु देता, या कठिण समयात आड आलेले दुःखाचे पर्वत/डोंगर चढुन जात जात सिध्द होणारा खासा राजा.

ऐसी एकच आमची कृष्ण माय माउली होवुन गेली. ईचे कितीक आठवु गुण ? कितीक शनिचर भोगला ईन ? या कृष्णाच्या डोक्यावर अनेक प्रकारचे दृःखाचे डोंगर होते. तिरगुणींनी वेळोवेळा कृष्णाने मांडलेला चतुर्पती चा खेळ मोडल्याचे दुःखे, अडी-अडचणी... ईत्यादी अनेक दुःखाच्या डोंगरा चे भार कृष्णाच्या डोक्यावर होते. परंतु ऐवढे सर्व तिरगुणांनी टाकलेले भेलुंड असतानाही तो कृष्णा शांतपणे धिराईच्या मार्गाने चतुर्पती ची महीमा वाणी यवगान यवगा सांगत सांगत, पुढे जात जात आपल्या चतुर्पती धन्याची साधना करत करत चतुर्पती चे पेणं स्थापत स्थापत सिध्द झाला. आणी सिध्द असता बसला तप धरून ! याहीच्याच या तपानं ही अनामत ज्योत खेळु लागली हो ! आणी याहीच्या या तपामुळेच आदीपुरूष धनी याहीच्या देहधरणीवर उभा होवुन कृष्णच आदीपुरूष धनी झाला हो ! याहीच्याच या तपामुळे आम्हा हाती हा चतुर्पता अथर्वन् वेद पडला हो ! आणीक कितिक वर्णु याहीचे गुण ?
**भेलुंड** शव्दाच्या शव्दप्रयोग उदाहरणाचे अधिक ग्यान खंड०२/२४:-वावशीची ओवी मधुन घ्यावे.

**तिरलोक जुम्मा ज्योत अनामत :-**
तिरलोक्याचा ज्याने जुम्मा घेतला आहे असा अनामत ज्योत रूपी चैतन्यज्योतिर्मय अनामत आदीपुरूष कृष्ण.

**अनामत-शक्ती, कशी आहे दोघांची रित ? :-**
मुळ यवगाचा आदीरूप आदीपुरूष अनामत ज्योत हा मुळचा परमात्मा । या परमात्याच्या मो-ह सृष्टी रंचावी ही ईच्छाच त्या परमात्म्याच्या मुळावरचा रंग धरून शक्ती रूपात उद्‌भवली. तो परमात्माच तिचा कर्तार. तोच तिचा उत्पन्नकर्ता.. तोच तिला देणं देणारा .....। अनामत ज्योत आणी शक्ती च्या रितीचे अधीक ग्यान आदीपुरूष आदीगण व शक्ती नं १ च्या ओवीतुन घ्यावे. मुळावरचा खेळ खेळणारा तोच

अनामत धनी हा अनामीक कृष्णा आंगी अंर्तभुत झाल्यामुळे येथे कृष्णाजीला अनामत असे संबोधीले आहे. तर तिच मुळावरची शक्ती हेंगडुजी आंगी अंर्तभुत झाल्यामुळे येथे हेंगडुजीला शक्ती ची उपमा दिलेली आहे.

**प्रलय** :- ११ इंद्रिये व पंचमहाभुते अश्या १६ विकृतियॉं या रज-तम-सत्व या तिन गुणांचे विकार आहेत. रजोगुणांवर तमगुणांचा प्रभाव आल्याने वर्तमान स्थुल रूपाला सोडुन, अंहकार व पांच तन्मात्रा ला क्रमाक्रमाणे लिन करण्याला प्रलय असे म्हटलेले आहे. या प्रलयात देहीच्या सात प्रकृतियॉं सुष्मम्ना नाडीत अर्न्तमुख होत असल्यामुळे केवळ वृत्ती रूपाने म्हणजेच देहीच्या मनाच्या वृत्तीचा लय होतो. मन-पवन ग्रासल्या जाते. हे योग प्रलय पाच प्रकारचे असतात. या पंचप्रलयापैकी योगनिद्रेतील निद्राप्रलय चे उदाहरण घेवु या । या निद्राप्रलय मध्ये मनासह सर्व ईद्रिये आनंदज्योतीस्वरूप आत्म्यामध्ये लिन होतात. ज्या प्राणाच्या शक्तीमुळे विषये जाणुन घेवुन उपभोगला जाते, ती प्राणशक्ती सुध्दा या निद्रे मध्ये हळुहळु लिन होते. ऐकण्याची क्रिया हळुहळु लिन होत कानाने ऐकणे बंद होते, डोळ्याने पाहणे बंद होते...ईत्यादी पंचभुतांच्या पंचविषयांचे गुण जसे गंध रस.. ईत्यादी विषयगुण, हे त्या त्या गुणांना ग्रहण करणारे ईद्रिये यांच्यात लिन होतात. जसे गंध नाकात, ध्वनी कानात..ईत्यादी इंद्रियाचे व्यापार, हे सर्वच निद्रमध्ये लिन होवुन प्रलय पावतात. तसेच मन चिंतन बुध्दि निश्चय, अहंकार व जाणीव विरल्या जावुन निद्रेत लिन होवुन प्रलय पावतात. तसेच वृत्ति ही निद्राकाळी इद्रियांसह आत वळुन कारण शरीरात लीन होवुन नष्टप्राय होते. अश्या रितीने पंचभुते सुक्ष्म पंचईद्रिये मन बुध्दि चे सुक्ष्म संस्कार ईत्यादी या आत्म्यामध्ये लिन होतात. प्रलय पावतात. आणी जे सर्व एकात लिन होवुन प्रलय पावतात, ते सर्व त्या एकापासुनच पुनश्चः उत्पन्न होतात.

**ईकडुन पेरते तिकडुन मोडते ज्योतीचा खेळ** :-

ज्या एका ठिकाणी जेजे लिन होते, तेते त्याच एका ठिकाणापासुन प्रकट होत असते. या सुक्ष्मनियमाला अनुसरून या पिंडात या आत्म्यामध्ये प्रलय पावलेले सर्व पुन्हा त्याच आत्म्यापासुन प्रकट होते. तर ब्रम्हाडात सृष्टी प्रलयामुळे, जेजे त्या एकाच परमात्मात लिन होतात, तेते त्या एकाच परमात्मापासुनच उत्पन्न होतात. व्यक्तातुन प्रलयकाळी अव्यक्तात जातात आणी अव्यक्तातुन व्यक्त होत राहतात त्या परमात्मा कृपेने । अश्या रितीने हा करून पुतळा घडवुनी पुतळा उपजीतो हातान म्हणजेच ईकडुन पेरतो व तिकडुन मोडत ज्योतीचा खेळ खेळत राहतो. । देहीचा पुतळा उभा करून, त्यात आपला तेजोगुणी अंश अवतार उभा करतो. त्या देहीला जगवत त्या देहीला घडवतो. जुन्या जिर्ण झालेल्या देहीतील ज्योत अव्यक्त करून अथवा काढुन नव्या व्यक्त देहीत त्या ज्योतीचे बिजारोपन करून खेळवत राहतो.

**खे़त्री** :- परशुरामाला पुरून उरलेले क्षत्रिये, आपल्या स्वतःचा शक्तीला स्वतःचा शत्रु मानुन या शक्तीला जिंकुन उरंणारा क्षत्रिय, शक्तीचे भरणपोषण करत तिच्यावर राज्य करणारा..

**खेत्री शब्द उत्पत्तीचे मुळ** :-परशुरामाने जेव्हा जेव्हा क्षत्रियांचे निर्मुलन करून, पृथ्वा निःक्षत्रिय केली, तेव्हा तेव्हा क्षत्रिंयाच्या गर्भधारक स्त्रिंयांनी पलायन करून, हिंगळजा मातेला शरण गेल्या. या गर्भि स्त्रियांच्या आपल्या गर्भरक्षणाकरीता केलेल्या प्रार्थनेला पावुन हिंगळाजी मातेने त्यांना त्यांच्या गर्भाचे रक्षण करण्याचे वचन दिलेत. आणी त्यांना सांगी केली की : ‘तुम्ही आता या वेळी आपले क्षत्रियपण टाकुन देवुन तंतुपटांवर उपजीवीका करा.’ असे बोलुन त्यांच्या कडुन कुंचितांबट आणी पट विणवुन त्यांना खेत्री असे नाव दिलेत. अश्यारितीने हिगंळजा मातेच्या कृपेने त्या गर्भि चे मागील क्षत्रियपण राहुन, ते नवजात क्षत्रिये बालक खेत्री या नावाने ओळखल्या जावु लागलेत. संदर्भ मुळस्तंभ अ.१७ असे २१ वेळा परशुरामाने पृथ्वा निःक्षत्रिय करून सुध्दा क्षत्रिय हे खे़त्री या नावाने उरलेच । त्याचमुळे इथे क्षत्रिय हा शब्द न वापरता, खे़त्री हा शब्द या उरलेल्या क्षत्रिंयां करीता वापरला आहे. ।

**छत्र** :- संरक्षरण, छाया । **छत्र पती** :- संरक्षक, छाया देणारा. उदाहरणार्थ :- छत्री जशी पावसाळ्यात पावसापासुन तर उन्हाळयात उन्हापासुन संरक्षण देवुन शिरावर छाया देते, त्याप्रमाणे शक्तीला संरक्षण देवुन तिला छाया देणारा तिचा छत्रपती

**तो खेत्री भ्रतार, त्याची मी शक्ती । तो माझा वर :-**

या तिरगुणांनी या देहीला आपआपल्या गुणांव्दारे नाचवण्याचा पण मांडला आहे. तम गुण हा या देहीला व्दैता सारखा नाचवतो. तर रज गुण हा या देहीला राजाप्रमाणे वागण्याची अभिलाषा व्यक्त करून नाचवत राहतो. तर सत्व गुण हा या देहीला देवतांप्रमाणे नाचवत, या देहीची मान-सन्मान, सत्कार, पुजा-अर्चनाची,..ईत्यादी सत्व अभिलाषा वाढवत नाचवत राहतो. या तिन गुणांव्दारे या देहीला नाचवण्याचा जो पण या तिनगुणांनी केला आहे, तो पण मोडुन काढणारा, त्या पणाचा नाश करणाराच या शक्तीला जींकणारा माझा खेत्री होय. कारण शक्तीने मांडलेला या देहीतील हा तिरगुणांचा बाजाराचा पण मोडणारा च्या देहीत मग शक्तीला आपल्या तिरगुणी लेकरांचा बाजार मांडण्याकरीता जागा राहणार नाही. शक्तीला आपला बाजार मांडण्यास जागा न राहील्यामुळे, मग ती शक्ती म्हणन आता राहीन त्या खेत्रीच्या चरणावर ! अश्या रितीने या शक्तीला जिंकणारा तो खेत्री भ्रतार कृष्ण आहे, त्याची मी शक्ती होईन. आणी तोच चत्रभुज माझा वर या देहीत उभा राहीन. ही देह भुम्मा सिध्द होईन. असा जो तो खेत्री भ्रतार कृष्ण ची मी शक्ती होय. शक्ती-१ व मोहरची ओवी च्या निरसनातुन अधीक ग्यान घ्या ।

**कांचन/कंचन धरणी** :- सोन्याप्रमाणे चकचकीत, तेजपुंज, तेजपुंज आरा असलेली काया । **बाहुली** :- देही, देही च्या डोळ्याची बाहुली, । **पुतळी** :- डोळ्याची पापणी, मुर्ति,

**परताळाले** :- पडताळुन पाहण्यासाठी । **अस्तुरी** :- स्त्री,

**वरणाले** :- वरण करण्याकरीता, वर्णन करण्याकरीता, स्वयंवरासाठी शक्तीने टाकलेली 'तिरगुणांचा पण नाशीची अट' पुर्ण करून, तिला जिंकुन धन्याला अर्पण करून तिच्याशी आपल्या धन्याचे स्वयंवर घडवुन आणण्यासाठी केलेला एक प्रयत्न ।

**भेटी आंगचे सिध्द :-**

ज्या ओळखीच्या सिध्दांना धन्याने वेळोवेळी निरंजनी भेटी दिल्या. वेळोवेळा त्यांच्या बोलावर उभा राहीला, त्यांचे कामे उत्साहाने केलीत असे धन्याच्या भैटी आंगचे सिध्द उभे राहतीन सच्च्या भक्ताच्या संगतीले ! यवगाच्या सच्या भक्ताच्या स्वरूपाले या सिध्दांच्या ज्योती येवुन भेटतीन. त्या ज्योती सम्मावुन घेण्याचे सामर्थ्य धन्याकडुन त्या सिध्द असता भेलुंड झालेल्या सिध्दास प्राप्त होईल. म्हणजेच विलीन करणा-या धन्याच्या आपरूप सोयंम् उभ्या राहणा-या ज्योती त्या सिध्दाच्या देहीत अंर्तभुत होवुन या सिंध्दांच्या ज्योती स्वरूपात विलीन करण्याचे सामर्थ्य देत या सिध्दांच्या ज्योतींची भिड मुर्वन. ।

**भिड** :- गर्दि, जमाव, । **मुर्वती** :- मुरवणा-या, जिरवणा-या उदा. *// धन्याचे मोठं निब्बर मन । करा भक्ती धरा ध्यान, जीरवा मन //* विट ज्याप्रमाणे पाण्यात मुरवुन तिच्यातला पाणी पिण्याचा गुण जिरवल्या जाते त्याप्रमाणे धन्याचे वज्जर निब्बर मन वळवण्यासाठी करा सच्ची भक्ती, धरा ध्यान तेव्हा मग धन्या हैसेखातर भेटी आंगच्या सिध्दांच्या ज्योती या स्वरूपाले मिळण्यास भिड करतील. ।

**भिड मुर्वती** म्हणजेच भिड मुरवणा-या सोयंम् *ज्योती उभ्या* राहतीन शक्तीच्या स्वयंवरात या स्वरूपाले/सेरूपाले । **उठतीन** :- उभे राहतीन.

**गंधर्व** :- राग-रागीनी वर ध्यान केंद्रीत करून, देवांच्या मनोरंजनासाठी केलेले गायन, देवांकडे ध्यान न लावता राग-रागीनी संगीतावर जास्त ध्यान लावुन, भक्तीचा लटका आव आणुन देवां सह स्वतःचे मनोरंजन करण्यासाठी गायन करणारे गायक ।

**गंधर्व विवाह** :- परित्याज्य म्हणजेच टाकुन दिलेल्या स्त्रियांशी लग्न करणारे । एकीला टाकुन दुसरीशी हार टाकुन गुपचुप विवाह करणारे गंधर्व । अश्या या गंर्धवांच्या कार चे ग्यान, मोहरची ओवी चरण-१६ च्या निरसनातुन अधीक ग्यान घ्या.

॥ मुळ यवगी, आवाज उठले, शकुन साधले । हे सिध्द जाणा ।
तिरलोक जुम्मा, ज्योत अनामत । केली साधना ॥

॥ मुळ यवगी, केली साधना । हे मज नाही ठावं ।
भुम्मा वर, सिध्द निघाले । मुलखाचे देवं ॥

मुळयवगी प्रथम आवाज :- *'मो-ह सृष्टी रंचावी'* या आवाजाचा शकुन साधण्यासाठी आदीरूपाची निरंजन ज्योत उभी राहली. आणी या ज्योतीने ही ईच्छा तिथल्या सर्वव्याप्त मनात धरली. आणी ही ईच्छाच त्या निरंजन ज्योतीचा मुळावरचा रंग धरून शक्ती बनुन उभी राहली. त्यानंतर शक्तीची ओवी-१ मध्ये बहुत यवग अशीच शक्ती एकटीच राहल्याने ती उन्मन्त झाली. *'हा देव नाही खरा'* असा तिने जळजळीत आवाज उठवला.

अग्नीप्रमाणे जळजळीत बोल असलेल्या या आवाजाचा शकुन साधण्यासाठी तिथे अग्न धुनी उठली. पुन्हा शक्तीने व्याकुळ होवुन जेव्हा *'भला देवा ! टाकुन गेला मजला'* असा आवाज उठवला, तेव्हा या आवाजाचा शकुन साधण्याकरीता *'येतो मी खरा'* असा कर्ता-याचा आवाज उठल्या गेला. आवाजी खुम्म थापल्या गेले. कर्ता-याकडुन उठलेल्या *'येतो मी खरा'* या आवाजाचा शकुन साधण्याकरीता, निराकार शक्तीच्या सुमरणी येवुन त्या निराकाराने शक्तीला वचनी गोयले. आणी भैस हे नाम देवुन *'भैस म्हणुन विनव त्या चौथ्याला'* अशी सांगी केली. शक्तीने 'भैस' या नामाची भाव धरून प्रार्थना मांडली. आणी या प्रार्थनेला पावन होवुन तो चौथा आदीपुरूष भैस कर्तार धनी ने आधी उठवलेला *'येतो मी खरा'* या आवाजाचा शकुन साधण्याकरीता, तो निराकार निश्कलंकी धनी आदीमुनी रूपात शक्ती समोर आला. आणी *'येतो मी खरा'* या आवाजाचा शकुन साधल्या गेला. तिच्या मुळयवगाच्या साधनेमुळे सृष्टीरंचनेकरीता तिन खुम्म जागी करून देत या शक्तीला आदीमुनी कडुन देणं झाले आहे

अश्या रितीने मुळ यवगी आवाज उठले. त्या आवाजाचे शकुन साधले. हे आवाज सिध्द झालेत हे जाणा । हे सिध्द करण्यासाठी शक्तीला तिरलोक्याचा ज्याने जुम्मा घेतला आहे असा अनामत ज्योत रूपी आदीपुरूष भैसाची साधना करावी लागली. तिने भैस म्हणुन धावा मांडुन साधना केली तेव्हा कुठे तो चौथा भैस आदीमुनी तिच्यासमोर उभा ठाकला. ती सृष्टी रंचनेस सिध्द झाली. या मुलखाच्या सिध्द देवांना शक्तीने अशी इमानदारीने सच्च्या दिलाने प्रथम आदीपुरूष भैसाची साधना केली हे ठाव नाही. प्रथम शक्तीने केलेल्या साधनेचे फलीत म्हणुन या भुम्मेवर ठिक ठिकाणच्या मुलखी देव मुळयवगाचे आवाज उठवतीन, शकुन साधतीन व सिध्द होवुन उभे होतीन.

॥ भुम्मे वर, सिध्द उठतीन । हरी नाम सुमराले/शक्ती वरणाले
ज्याच्या आंगी, इमानं त्याहीला । देव येईन भेटीलें ॥
॥ भेटी आंगचे, सिध्द उठतीनं । शक्ती परताळाले ।
पडन अवध्याची भिडं कैस ।, नाही म्हणावं त्याहीले ? ॥
॥ भिडं मुर्वती, सोहंम् ज्योती । उभ्या राहतीन यवगाले/स्वरूपाले
यवगा परती, भाव राहीन । अस्तुरी-पुरूषाले ॥ १६ ॥

या भुम्मेवर अनेक सिध्द हरी नाम सुमरन करण्यासाठी किंवा शक्तीला वरण्यास उठलेले आहेत. परंतु कर्मफलांची इच्छा आकांक्षा मान सन्मान ईत्यादी ला वगळुन जो सिध्द आंगी ईमान राखुन, बेईमान न होता या आदीपुरूषाला सच्च्या भक्ती भावाने भजेल, त्याला तो धनी देव भेटीला येईन ! तो धनी उरल्या देहीनं त्याहीला भेट देईन. तेव्हा शक्ती राहीन याहीच्यावर माया ममता करणारी याहीची सव/अस्तुरी/स्त्री । आणी तो धनी त्यांच्या देहभुम्मेवर सेरूपी उभा राहीन. शक्तीला पडताळण्या साठी असेच भेटी आंगच्या सिध्द उठतीन. जेव्हा ते शक्ती पडताळाले उभे राहतीन, तेव्हा तेथे अवध्या भेटी आंगच्या सिध्दांची भिड-गर्दि होईन.

या भेटी आंगच्या सिध्दांच्या देहघरी त्या आदीपुरूष भैसाने निरंजनी भेटी दिल्या असल्यामुळे, त्यां सिध्दांना कैसे नाही म्हणाव आता या देह घरी येण्यास ? तेही या देही भेटी देतीन. देहीच्या स्वरूपाले त्याच्या ज्योती येवुन भेटतीन. त्यांची सुध्दा भिड होईन. ही भिड मुरवण्यासाठी धनीदेवाची आपरूप सोहंम् ज्योत त्या सिध्द असता भेलुंड झालेल्या सिध्दांत सम्मावुन जाईल. तेव्हा मग त्या सिध्दास भेटी आंगच्या ज्योती सम्मावुन घेण्याचे सामर्थ्य देईल. शक्तीच्या स्वयंवरात या सिध्दांच्या सोहंम्

ज्योती एकमेकांत विलीन करेल. भिड मुरवणा-या सोहंम् ज्योती उभ्या राहतीन त्यांच्या स्वरूपात । ते सर्व विनवत राहीन की :

॥ सेरूपी नित उभी राहयं, चांगोणा माय । देह जीवाच करावं, नित साहयं ॥
॥ सेरूपी उभी राहयं, चांगोणा माय । या अनंत यवगाचे सुखं आहयं ॥
॥ सुखा साठी भजलासे हरी, आहो हरी । सुखंः दयाहो, महाराजा देहीवरी हो ॥
॥ आम्ही सुखाचे हरी तुया गा रूपाचे । ग्यान भजतो मायवाप दयाळाचे हो ॥

असे सच्या भक्तीभावाने विनवत स्वःस्वरूपात सोहंम् ज्योती उभ्या राहीलेल्या ओळखीच्या सिंध्दांची संख्यां जेव्हा वाढेल, तेव्हा ते सिध्द या चौथ्या प्रति भक्ती-भाव अर्पण करण्यास अस्तुरी पुरूषांना ते सर्व भेटी आंगचे ओळखीचे सिध्द उत्साहीत करतीन. चौथ्या मार्गी लावतीन. त्याचमुळे स्त्री/अस्तुरी व पुरूष यांना या यवगापरी चौथ्या आदीपुरूष भैस नारायण प्रति सच्चा मनभाव भक्ती-भाव राहीन.

॥ एक अस्तुरी, एक पुरूष । दोघांचा एक भावं ।
यवगा वरत, उभा राहुन । मोडनं गंधर्व ॥

जेव्हा या यवगात एक अस्तुरी म्हणजेच स्त्री व एक पुरूष या दोघांचा या एकल्या असलेल्या एक आदीपुरूष भैस नारायण प्रती एकच भाव भक्ती सुमरन राहीन, तेव्हा तेव्हा तो त्या यवगावर उभा राहुन गंधर्वाचा कार मोडेल. देवांकडे ध्यान न लावता राग-रागीनी यावर जास्त ध्यान केंद्रीत करून भक्तीचा लटका आव आणुन देवांच्या मनोरंजना सह स्वतःच्या मनोरंजन करण्यासाठी गायन करणारे गंधर्व गायक... ईत्यादी भक्ती भाव न ठेवता स्वतःच्या मनाच्या मनोरंजनासाठी गायन करणा-यां गंधर्व गायकाचा कार मोडेल. एक देवाला टाकुन दुस-या भलत्या सलत्या तिरगुणी देवाला आपला मनभावाचा हार टाकत टाकत ३३ कोटी देवांना आपला भ्रतार बनवुन, त्यांना भजण करणारे गंधर्व भक्त व गंधर्व गायक यांचा कार तो धनी मोडन. अश्या या गंधर्वांच्या कार चे अधीक ग्यान खंड०२/ओवी-१६ : मोहरची ओवी चरण १६ च्या निरसनातुन घ्यावे.

॥ अस्तुरी पुरूषाचा एक भाव । त्याच्या घरी सदा नांदन देव ॥
॥ ज्याचा भाव त्याचा देव । उभा आहे माझा अवधुत राव ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. ३१/०१ ॥
॥ चतुर्पता गाईची ओवी ॥
॥ सावंगा-जळगाव दांडची मुळावरची ओवी ॥

# ॥ आदीमुनी अवतार मागुन आला ॥

।। ब्रम्ह राखीचा साशा/साचा जागी केला । ब्रम्हाड रूपाचा ब्रम्ह देव उभा झाला ।।
।। विष्णु राखीचा साचा जागी केला । ईशवं रूपाचा विष्णु देव उभा झाला ।।
।। शंकर राखीचा साशा/साचा जागी केला । शंक रूपाचा महा देव उभा झाला ।।
॥ आदीमुनी अवतार मागुन आला ।
आदी पुरूष भैस आधीला खरा ॥ घृ ॥
॥ आधे पुरूष चतुर्पती । गिण्यान होईन अहीना मुखी ।
उडवन तिर पतीची टोपी । हो हो म्हणता राहीन जित्ती ॥
॥ माव केली चैत्यन्यानं । एक शेजुन केल्या तिन ।
चतुर्पता गाय आपण । गाय राहली, ईला उभी करन धनी ॥
॥ त्या राखीचा वंश हीन । हीन यवुग मोडनं जुनं ।
आलं रूपा रूपात । राज यवग भैसाचं ॥
॥ बम्हा विष्णु शंकर । चौथा आदीमुनी अवतार ।
चार शिक्के याहीच्या देहीवर । पुरला चव यवगाचा खेळ ।
मोडनं देहे तिरकुट सारं ॥
॥ मोडन शिक्का धनी कोण ? त्याहीचे दुत हिंडतीन वनवन ।
त्याहीची शांती करन कोण ? द्युत नाचवतीन..,
हे मानव अवघे जन ॥
॥ राजा विना फौजा सुन्या । त्याहीचे दुत हिंडतीन वनवन ।
जुन पुंजता, बहु फजीत होईन प्रिरथम ॥
॥ जुन्या पुंजल्यानं काय होतं ? पिशाळ ज्योत मुलकी येतं ।
पिशाळ ज्योत मुलकी येतं । हे आहे खरं..,
हे नात सुटन सारं ॥
॥ येईन नाथ, बसवनं नातं । शुध्द होतो हरी भजनात ।
शुध्द होतो हरी भजनात । गडया रे..,
जो करन भक्ती, त्याला देव देईन भेटं ॥
॥ पिशाळ ज्योत, शांत मुळ । मुलकी नाही सांगतो खरं ।
स्वर्गावरून आले दोन केवळ । ध्वजा असमानी, विडा मोहर
॥ गादीवर विडा ध्वजा असमानी । तिथ जमा होईन प्रिथवी ।
जेवतीन विडा, पाहतीन ध्वजा । तेव्हामग, मरणार नाही कोणी.
॥ ऐसे होणार नाही-नाही म्हणता ? उसनं झालं ।
होईन उभा फेडन सारं । त्याला चौ-यांशी कदा नाही चुकणार ॥
॥ जित्या जन्मी चौ-यांशी आहे । मेल्या माग चुकन काय ? ।
नामी राहयं भजनी राहयं । चुकन चौ-यांशी, अशी सांगी आहे ।
॥ यवगी आला सत्वधीर । जाणते नव्या यवगाचा खेळ ।
याहीच्या हाती कळसुत्र । संग तारक उठला नित ।
नाम भजा नित्य रूप ॥
भजन :- ॥ नाम घ्याहो जगजेठी । तारण शिकवनं महीमा मोठी ॥
॥ नाम घ्याहो जगजेठी । तुमचीं महीमा होईन मोठी ॥
गजर :- ॥ बम्ह थकला, विष्णु थकला । थकला शंकर...
कृष्णाजीन अवतार धरला । तु रंग धर ॥

मुळावरची सावंगा दांड ची ओवी पुढील पानावर...

॥ ओवी नं. ३१/०२ ॥
॥ चतुर्पता गाईची ओवी ॥
॥ निरसनसह मुळावरची सावंगा दांड ची ओवी ॥

## ॥ आदीमुनी अवतार मागुन आला ॥

॥ आदीमुनी अवतार, मागुन आला.....।
आदीपुरूष भैस । आधीला खरां ॥ घृ ॥
॥ माव केली, चैत्यन्यानं । एक शेजुन, केल्या तीनं ।
चतुर्पता, गाय आपणं । गाय मेली....
हिला जागी, करा हो हरी ॥
॥ चतुर्पता अथर्वन् वेद । गिण्यान होईन, अहिना मुखी ।
किंवा :- ॥ आदीपुरूष चतुर्पती । गिण्यान होईन अयना मुखी ॥
उडवणं तिरंपती ची टोपी । हो हो म्हणता, होईन जित्ती ॥
॥ होणार नाही-नाही म्हणता, उसनं झालं । उभा राहुन, फेडनं सारं
उभा राहुन, फेडनं सारं । त्याहीला चौ-यांशी...
चव-यांशी नाही चुकणार ॥
॥ जित्या जन्मी, चौ-यांशी आहे । मेल्या मागं, चुकवणं काय ?
नामी राहये, भजनी राहयें । चुकन चौ-यांशी...
अशी, धन्याची सांगी आहे ॥ ०४ ॥

॥ जुनं यवग, मोडन हिनं । जुनं पुंजल्यानं, काय होतं ?
पिशाळ ज्योत, मुलकी येतें । पाहीजा पुढं....
हें/दोहीत नातं, तुटन सारं ॥
॥ येईन नाथ, बसवन नातं । सुखः होईन, हरी भजनातं ।
शुध्द करन, हरी भजनातं । जोकोणी करन भक्ती...
त्याहीला देईन भेटं ॥
॥ पिशाळ ज्योत, शांती मुळं । मुलकी नाही, सांगतो खरं ।
याहीच्या हाती, कळसुत्रं । पुरवनं, चवयवगाचा खेळं ।
मोडन, देहीतलं तिरकुट सारं ॥ ०८ ॥
किंवा :- उडवन देहीतलं तिरकुट सारं ॥
॥ मोडनं शिक्का, धनी कोण ? तीघांचे दुत हिडंतीन वनवन ।
त्याहीची शांती, करन कोण ? द्युत नाचवतीन....
हे मानव/यवगी अवघे जनं ॥ ०८ ॥

॥ ब्रम्हा विष्णु, शिवशंकर । चौथा आदीमुनी अवतार ।
चार शिक्के, याहीच्या देहीवर । रूप रूपांचे...
पुढे राज्य, होईन भैसाचे ॥
॥ पिशाळ ज्योत, शांती मुळं । स्वर्गीचे येतीन, दोन केवळं ।
स्वर्गीचे येतीन, दोन केवळं । ध्वजा अस्मानी, विडा मोहरं
॥ गादीवर विडा, ध्वजा अस्मानी । अवघी जम्मा, होईन पृथ्वी ।
जेवतीन विडा, पाहतीन ध्वजा । तेव्हा मग,
मरणार नाही बा कोणी ॥ ११ ॥
डहाकी :- ॥ पिसाळ ज्योत शांती रूप । संग तारक उठन एक ।
त्याहीच्या संगतीनं....नाम भजो नित्य रूप ॥
**भजने :-**
॥ विडा भावाचा होयं । या विडयानं, देव करतो संभाळं ॥
॥ विडा घ्याहो भाव धरून । तेव्हाच होईन देव रायाचं देणं ॥

॥ अस्तुरी-पुरूषाचा भाव । त्याच्या घरी सदा, नांदतो देवं ॥
॥ भाव धरा, भक्ती करा । भावीका साठी देव, भावीक झालां ॥
॥ भाव या, अनामीकानं धरला । देव वचनांत, अखंड गोयला ॥
॥ अनामीका, घरी आला । भाव पाहुन, देवराया उतरला ॥
॥ ज्याचा भाव, त्याची भक्ती । विठोबा राया, देव त्याहीच्या संगती ॥
॥ ज्याचा भाव, त्याची भक्ती । देव राया, त्या भावीकाच्या संगती ॥
॥ ज्याचा भाव, त्याचा देव । उभा आहे, माझा अवधुत राव ॥
॥ उभा आहे, माझा सखा । आता नाही, या देहीला धोका ॥
॥ उभा आहे, माझा देव । आता नाही, कोणाचं भेवं ॥
॥ उभा आहे, माझा हरी । तुया बिन मजला, कोण तारी ॥
॥ उभा आहे, माझा राम । राम करे, यवगाचे काम ॥

## ॥ निरसनसह आदीमुनी अवतार मागुन आला ॥

### -: शब्दार्थ/चरणार्थ निरसन :-

आदीमुनी अवतार मागुन आला :-

आदीपुरूष आदीगण व शक्तीच्या ओवीच्या निरसनातुन आपणास ज्ञान आले आहे की : सर्वप्रथम एकला आपरूप आदीपुरूष निराकार निर्गुण निशकलंकी स्वरूपात होता. मग हा एकला आदीपुरूष ज्योत स्वरूपात उभा झाला. या निशकलंकी ज्योतीनं 'मो-हं सृष्टी रंचावी' ही इच्छा सर्वव्याप्त मनात सोडली/फेकली. ही इच्छाच मग मुळावरचा रंग धरून अद्‌भुत अश्या शक्ती स्वरूपात उभी झाली. शक्तीच्या ओवीत या शक्तीचा कर्तार असलेल्या निराकार निराधार आदीपुरूषा कडुन शक्तीला देणं मिळाले. या देणं मध्ये 'येतो मी खरा' असे आवाजी देणं शक्तीला मिळाले. मुळ यवगी उठलेल्या 'येतो मी खरा' या आवाजाचा शकुन साधण्यासाठी तो कर्तार आदीपुरूष धनी शक्तीने भाव धरून मांडलेल्या प्रार्थनेला पावन झाला. आणी तो आदीपुरूष शक्तीसमोर आदीमुनी अवतार रूपात आला. शक्तीने आपले तिरगुणांचे तिन शील्ले एक शेजुन तिन ठेवुन त्या आदीमुनीला अर्पण करून विनवले. चतुर्पती आदीमुनीने शक्तीला देणं दिलेत. यावरून आपणास ग्यान येते की : आधीला तो कर्तार धनी आदीपुरूष भैस खरा । प्रथम एकला असलेला तो आदीपुरूष भैस धनी हा आदीमुनी अवतार रूपात मागुन आला. शक्तीच्या ओवीच्या निरसनातुन अधिक ग्यान घ्यावे.

**भाव** :- लिला, खेळ । **शेजुन** :- जवळ जवळ, ऐक शेजुन ऐक ।

**ज्ञान** :- नुसतेच ऐकुन वाचुन घेतलेले कोरडे ज्ञान ।
**ग्यान** :- ऐकलेल्या वाचलेल्या कोरडया ज्ञानाचा अनुभवातुन घेवुन आलेले सार यांना ग्यान म्हटले आहे ।
**गिण्यान** :- ग्यानाच्या अनेक अनुभवातुन त्या अनुभवांचे सार काढुन सांगीतलेले-गायलेले अनुभवजन्य ग्यान याला गिण्यान असे म्हटलेले आहे.

**अहीना मुखी** :- आदीपुरूष चतुर्पती या देहीला त्रिगुणांच्या पलीकडे पाहण्याची दृष्टी देवुन, देहीच्या निरंजन आत्मा वर चतुर्पतीचे ग्यान-भक्तीने सुक्ष्म सत् संस्कार टाकत राहीन. त्या त्या देहीच्या निरंजनाला प्रकाशीत करत देहीच्या अहीन आत्मारामाच्या मुखी आदीपुरूष चतुर्पती चे निरंजन गिण्यान सह सर्व गिण्यान देईन/होईन. **अहीन** या शब्दाचे अधिक ग्यान खंड०२/१३:-अजाताची ओवी मधुन घ्यावे.

उडवन तिर पतीची टोपी :-

जेव्हा चतुर्पती आदीपुरूष हा अहीन आत्मा मुखी चतुर्पती गिण्यान देईन, तेव्हा देहीवर असलेले तिन गुणांचे राज उडुन जाईन. तिन गुणांचे राजे हे आपआपल्या गुणांचे ठाणे रिकामे करतीन. या तिन गुणांच्या तिन राजे यांचे मुकुटे खाली पडतीन. ऐसे या तिन गुणांच्या पतीची म्हणजेच तिरं पतीची टोपी/मुकट तो धनी उडवन.

**जित्ती** :- चैतन्यमय, जिवंत, सजिव । **हिन** :- नित्कृष्ट दर्जाचे । **राख** :- राखड, भस्म/रक्षा

होणार नाही नाही म्हणता ! उसनं झाले । उभा राहुन फेडन सार.. :-
"ही चतुर्पता गाय कदापी जित्ती होवुन उभी होणार नाही." 'ऐसे होणार नाही नाही' असे जे तिरगुणी म्हणत आहेत, त्यांना विनवनी आहे की : तुमचे "ऐसे होणार नाही नाही" हे तुमचे म्हणणे आम्हास उसने दया ! आणी 'ही गाय जित्ती होणार नाही नाही' असे आमच्यासमोर म्हणु नका. ऐसे नाही-नाही म्हणणा-यांचे जे आमच्यावर उसने झाले आहे, ते सर्व उसने एक ना एक दिवस तो धनी फेडणार आहे. आम्ही जित्ती हो असे 'हो-हो म्हणता' जेव्हा ही चतुर्पता गाय जित्ती होवुन उभी होईन, तेव्हा तो चतुर्पती धनी उभा राहुन सर्व नाही-नाही म्हणणा-यांचे आमच्यावर झालेले उसने फेडन. आणी नाही-नाही म्हणणा-यांच्या मागे चौ-यांशी लागेल. ती ८४शी त्यां नाही-नाही म्हणणा-यांना कदा नाही चुकणार ! कारण की : आदीपुरूष भैसअवतार कृष्णा ची सांगी आह की :.

॥ नाही नाही म्हणन ! त्याहीला चौ-यांशी बिगार ।
येण-जाणं त्याहीला लागन, कदा नाही चुकणार ॥ ०४/०३ ॥

म्हणुनच तुम्हा तिरगुणींना हात जोडुन विनंती आहे की : "ही पडीत गाय कदापी जित्ती होणार नाही ! याहीचा चौथा धनी उभा राहणार नाही ! ऐसे चतुर्पती च्या सांगीप्रमाणे होणार नाही ! ऐसे चतुर्पती ग्यानाप्रमाणे होणार नाही." असे नाही-नाही म्हणत आमच्यावर उसनं करू नका. कारण आमच्यावर झालेले उसने फेडण्याकरीता आमचा धनी उभा राहणार. ही चतुर्पता गाय यवगाच्या मुळे 'हो.हो म्हणता' जित्ती होवुन उभी राहीन. हे निश्चित जाणा. धनी उभा राहुन हिशोब घेवुन मग नाही-नाही म्हणणा-यांच्या मागे चौ-यांशी लागेल हेही निश्चित जाण. म्हणुनच आमच्या समोर ही चतुर्पता गाय जित्ती होवुन उभी होणार नाही-नाही. ऐसे म्हणु नका. ही विनंती.

जुन पुंजन :- सत् यवगी जी कोणतेही कर्मकांड न करता, तिन देवांना न पुंजता फक्त सच्च्या भक्ती-भावाने चौथ्याच्या पुंजनाची पध्दत होती ते जुनं पुंजन ! जुन पुंजन बध्दलचे अधिक ग्यान खंड०१/०२/ओवी०३ निराकार निरंजन या ओवीच्या जनलोक लागले घ्यानी या टुकांच्या निरसनातुन घ्यावे.

पिसाळ ज्योत, शांती मुळ, स्वर्गिचे येतीन दोन केवळ :- भाव हा व्याकुळ असतो तर भक्ती ही वेडी पिसी असते. 'पिसे झालो भैस नामी । आमच काय करन कोणी ?' अश्या या वेडया पिसे भक्तीची ज्योत म्हणजे पिसाळ भक्तीची ज्योत असलेले पिसाई । अशी पिसाळ ज्योत देहीत खेळवलेला पिसाळी भक्तीचा देवमनजी महाराज होवुन गेले. म्हणुनच त्यांच्याबध्दल भजन म्हटल्या जाते की : ॥ पिसे भयान । भैसाचे द्युत । वाणी सांगे जगाला ॥ असा हा भैस नामी पिसा झालेला वेडा पिसा, पिसाळ ज्योतीचा पिशाळी द्युत देवमनजी होवुन गेला. असे हे पिशाळी ज्योत व शांती चे मुळ असलेले कैवल्य देही केवळ असलेले स्वर्गिचे कृष्णाजी व हेंगडुजी !



स्वर्गिचे येतीन दोन केवळ :- केवळ म्हणजे फक्त एकटाच शिल्लक राहीलेला, चारही देही सोडुन फक्त पाचव्या कैवल्य/केवळ देह धारण करून आनंदाची ज्योत बनुन राहीलेला केवळ शंक निश्कलंकी कृष्ण आत्माराम ! असे स्वर्गिचे दोन केवळ येतीन. ते म्हणजे सुर्य ज्योतीचा अवतार आदीपुरूष कृष्ण व चंद्र ज्योतीचा अवतार हेंगडुजी. हे दोन केवळ देह धारन करणारे स्वर्गिचे द्युतगण यांना संग घेवुन येतीन !

**दोहीत** :- एकाच वेळी दोन दोन हित सबंध ठेवणारे । **नाथ** :- कृष्णनाथ । **बसवन** :- सबंध जुळवनं, जोडन । **नांत** :- नाते संबंध, हरीनामाचं न्यातं । **मुलकी** :- या ठिकाणीः, स्थानी । **पुरवन** :- अजाताचा पुरवा करनं, पुरवठा करन

मोडण देहीतलं तिरकुट सार :- देहीच्या नयनाच्या मध्यभागी थोडे वर रजगुण, सतगुण व तमोगुण यांचे राजे ब्रम्हा विष्णु महेष यांचे ठाणे आहे. खंड०३/०१:- मुळस्तंभीचा पाया या ओवीतुन या तिरकुटाचे ग्यान घ्यावे. जेव्हा आदीपुरूष राजा होईन आणी या चौथ्या राजाचा दरबार भरन, तेव्हा हे तिरकुटाचे तिन ठाणे मोडन आणी हे

तिन चाकर होतीन. शेष पाताळी इंद्र स्वर्गी या आदीपुरूष राजास शरणागता येईन. तरण उपाय करून आम्हाला तारण हा समर्था आदीरूपा आदीपुरूषा !

**मोडन शिक्का धनी कोण ? त्याहीचे/तिघांचे दुत हिंडतीन वनवन :-**

आदीपुरूष हा देहीचा राजा जेव्हा होईन, तेव्हा देहीतलं तिरकुट मोडल्या जावुन देहीतील तिन गुण व तिनगुणांचे राजे यांचे तिन शिक्के चालणार नाही. ते तिन शिक्के मोडन. जेव्हा चौथ्या सत्वगुणी राजा व्दारे तिनगुणांचे तिन शिक्के मोडल्या जाईन, तेव्हा तिर पती शरण येतीन. एकला चौथा धनी राहीन. तेव्हा तिनगुणी यांचा धनी कोणीही राहणार नाही. आता त्यांचा धनी कोण ?

तिनगुणी राजे यांचे तिनगुणी दुत यांच्या पाठीशी धनी नसल्यामुळे ते अशांत होवुन वनवन भटकतीन. आता या अशांत तिरगुणी जनांची शांती करन कोण ? देहीवर चारही शिक्के असलेले पुढे होणारे मानव द्युतगण, यवगीगण यां तिरगुणी अशात जनांना नाचवुन नाचवुन थकवुन शांत करेल. रजोगुणी ब्रम्हा, सत्वगुणी विष्णु, तमोगुणी शिवशंकर आणी चोथा शुध्द सत्वगुणी आदीमुनी अवतार हे चार शिक्के देहीवर असणारे रूपरूपाचे द्युतगण हे रूपरूपाचे भैसाचे राज्य आणण्याकरीता कामी लागेल. यांच्या याच कार्यामुळे पुढे राज होईन या भैसाचे !

**ध्वजा** :- झेंडा । **असमानी** :- विशाल, अति उंच, आकाशाला टेकलेला, असमान ।

**विडा** :- पण, नेम, अनमोल किमंतीचा जो तुमचा भाव आहे, त्या भावाला चतुर्पती नामी अर्पन करण्याचा विडा, शकुनाचा विडा, भैसाचे यवग आणण्याचे पण केलेला विडा । भैसाची सत्ता असलेला शिक्का आणण्याचा विडा । जिथे राहीन तिथे सत्कृत्य करत, चतुर्पती नामी राहण्याचा भक्ती भावाचा विडा ।

**मोहर** :- चौथ्या आदीपुरूष भैस नारायण च्या सत्तेचा शिक्का ! सत्तेची मोहरं । खंड०२/१६:-सांगी केली त्वा मोहरं वाजवली या ओवीच्या निरसनातुन मोहर बद्दल चे अधिक ग्यान घ्यावे.

**गादीवर विडा** :- या देहीवर या भैसाच्या सत्तेचा झेंडा फडकवुन, चौथ्या प्रती सच्च्या भक्ती भाव अर्पण करण्याचा एकच धर्म एकच नेम । चतुर्पती नामाची महीमा वाढवण्याचा विडा/नेम चतुर्पती च्या सच्च्या भक्तांनी घेतलेला आहे.

**जेवतीन विडा** :- ॥ भजन करता मिळेल ज्ञान-भक्ती भावाच्या विडयांचे भोजन । ऐस सांगुन ठेवल आहे कृष्णानं : धन्याचा वर्षाव पडन चौकोणी मेघांचे निरंजन ज्ञान धारांचे या देहधरणीवर पर्जन्य । ऐसे पर्जन्य पाडुन नित कोर धान्य पिकवन तो या भुम्मेवर । या मेघनिळ चे अवल्ल पिक येणार । अन्नाचा हा कार जाणं । होईन देवरायाचं देणं । अधिक ग्यान खंड०४/०७:-आकाश जाणुनी पिता ओवीच्या शब्दार्थामधुन घ्यावे

॥ भजन करता मिळन भोजन, हरीचं नित्य ।
नाम घेता चुकतीन/तुटतील चौ-यांशी यवन/बंधन ॥
॥ भजन करता मिळन भोजन । विठ्ठचं नित्य, नाम घेता होईन देवाचं देणं ॥

तेव्हामग भजन करता करता भक्ती भाव अर्पण करत परमय सुख व अंबर पद देणारा सच्या ज्ञान-भक्ती-भावाचा विडा सच्चे भावीकभक्त भजनी जेवतीन.



**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०२ ॥

॥ ओवी नं. ३२ ॥

॥ गुप्त ठेवलेल्या मुळावरच्या जुन्या ओव्या ॥

# ॥ संजीवनी व डहाक्या ची ओवी ॥

## ॥ ओवी महात्म ॥

कुठे कुठे चतुर्पती च्या जाणत्यांव्दारे अशी कल्पना केलेली आहे की : ओवी म्हणजे एक वृक्ष आणी या ओवीरुपी वृक्षाच्या फांदया म्हणजेच डहाक्या त्या ओवींचे चरणे होय. ओवी हा वृक्ष होय, तर ओवीचे चरणे हे डहाक्या होय.

चतुर्पती पंथात संजीवनीचे ओवीरुपी वृक्ष आणी डहाक्याची ओवीरुपी वृक्ष या दोन वृक्षांचे संपुर्ण फांदया/चरणे हे नित मंत्रबिज शक्ती तेजाने प्रकाशीत राहुन, कल्पनेपलीकडचे चतुर्पतीचे विषेश व गुढ कार्य करत असल्यामुळे, ते चरणे गुप्तपणे ठेवण्यांचा कल चतुर्पतीच्या जाणत्यांचा होता.

कारण की : हे सजीवनी डहाक्याचे चरणे घेण्यासाठी भक्तयोगी हा मनाचा षटविकारी नसावा. त्याच्या देहीत संपुर्णतः निश्कलंकी मांडणा झालेली असावी. तसेच तो हाती अगन्या बाण घेवुन आंगी लहानपण बाळ्गुण लिनतेचा सागर असावा लागतो. असा ज्ञान भक्ती वैराग्य सद्गुण साधुन देहीत निश्कलंकी मांडणा करणारा लाखातुन एकच पहेलवान निपजत असल्यामुळे, हे चरणे जाणत्यांनी कुणाच्याही हाती सहजा सहजी दिले नाही.

ते जाणते जाणत होते की : हे चरणे जर सर्व सामान्याच्या हाती दिलेत, तर तो सर्वसामान्य भक्तगण अहंकारी बनुन, या चरणांचा दुरोपयोग करु शकतो...ईत्यादी कारणास्तव ज्यां कृष्णकालीन निश्कलंकी भजनी भक्तजनांच्या जवळ या सजीवनी व डहाक्या च्या ओवीरुपी वृक्षाचे चरणे होते, त्या त्या जाणते भजनी भक्तांनी ते चरणे काही काही ओव्यात जीथे लागत/भिडत असेल, तिथे तिथे कुणालाही न सांगता ते चरणे म्हणत गेले. आणी असेच चालत चालत येत, या डहाकयाच्या ओवीचे चरणे ईतर चतुर्पतीच्या मुळावरच्या जुन्या ओव्यात गुप्तपणे सर्वसामान्य भजनी गणांना न कळता मिसळल्या गेले.

संजीवनी डहाक्याचे चरणे असे गुप्तपणे ओवीत मिसळवल्या गेल्यामुळे, मुळावरच्या काही काही तिन चार चरणांच्या छोटया ओव्या सहा ते आठ चरणां पेक्षा मोठया झाल्यात. कुठे कुठे मोठया ओव्यांत सुध्दा जिथे कुठे या गुप्तवृक्षाच्या फांदया जुळत असेल, तिथे त्या जुळवुन मोठया ओव्या आणखी मोठया झालेल्या आहेत. परंतु या सर्व मुळावरच्या जुन्या ओव्यात 'कोणते डहाक्या अथवा संजीवनीच्या चरणे आहेत ?' हे आता शक्यतो कोणी ओळखु शकत नसल्यामुळे, काही काही चतुर्पतीचे जाणते असेही म्हणतात की : जेव्हा कृष्णकालच्या चतुर्पतीच्या मुळावरच्या जुन्या ओव्या तुमच्या जवळच्या संपुर्ण गाथ्यामध्ये येईल, तेव्हा त्या गाथा मध्ये या दोन गुप्त वृक्षाच्या संपुर्ण फांदया येवुन, त्या गाथात चतुर्पतीचे हे दोन गुप्त वृक्ष गुप्तपणे उभे होतील. जेव्हा गाथा मध्ये हे दोन वृक्षे गुप्तपणे उभे होतील, तेव्हा तो गाथा आपोआप प्रकाशीत होईल. निरंजन ग्यान प्रकाश देत राहील. तो गाथा मंत्राप्रमाणे काम करु लागेल. देणं देत राहील. रक्षण करत राहील. चतुर्पती चे निरंजन व गुढ ग्यान निरंतर प्रकाशीत करत राहील. नित प्रकाश देत राहील....ईत्यादी.

संजीवनी व डहाक्या च्या ओवीरुपी दोन वृक्षाच्या फांदया गुप्तपणे मुळावरच्या ओवीरुपी वृक्षाच्या फांदयात मिसळलेल्या आहेत. त्यामुळे काही एक ओवीचे काहीएक चरणे हे डहाक्याच्या ओवी चे काहीएक चरणे राहु शकते.

अथवा संजीवनीच्या ओवी चे काहीएक चरणे राहु शकते. ज्याप्रमाणे बॅटरी चा सेल बॅटरीच्या दिव्याला उर्जा देवुन प्रकाशीत करते, त्याप्रमाणे संजीवनी व डहाक्या चे चरणे आपल्या स्वभावनुरूप संपुर्ण ओवीला उर्जा देवुन प्रकाशीत करत प्रकाश देत राहतात. चतुर्पतीच्या या दोन ओवीरूपी वृक्षाचे चरणे/फांदया गुप्त असल्यामुळे, त्या गुप्त चरणांना आवाहन देवुन येथे गुप्तपणे उभे राहण्याकरीता, हे कोरे आसन दिलेली आहे. आणी आम्ही चतुर्पतीच्या द्युतगण व जाणत्यांना विनंतीपुर्वक आवाहन करतो की :

॥ कोरी भुम्मा कोरी जागा । कोरा कागद ।
या को-या भुम्मेवर उभा करा । सिदाईचा वेद ॥

या को-या कागदाच्या को-या भुम्मेच्या आसनावर त्यांच्याजवळ असलेल्या या दोन वृक्षांच्या फांदया लावुन, गुप्तपणे येथे संजीवनी व डहाक्या चे दोन वृक्ष उभे करून, या को-या भुम्मेवर सिदाईचा वेद उभा करावा. या वृक्षाचा प्रकाश या चतुर्पता अथर्वन् वेद च्या गाथ्याला संपुर्णपणे नित लाभत राहावे. सच्च्या भक्तांना ईच्छीत देणं मिळत राहावे. सच्चे भजनी भक्तजन प्रकाशीत होत राहावे. अशीच योजना सदोनित ठेवावी. ही सदोनित विनंती अर्ज.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुता ॥
॥ नरदेहीचा त्वां अवतार केला । हा ऋषिश्वर स्वरांले भेटला ॥
॥ भेटी चा हा लाभ । वृक्षाला फळ । दिसते केवळ राजहंस ॥
॥ भेटी आंगाचे सिध्द उभे । करावं आमच्या संगतिला ।
सदा विनविते नित साहयं । करावं आम्हाला ॥
॥ तुमच्या आंगाचा जीव होये । तुमच्या हात देवा बनली देहे ॥
॥ देह-जीव तुमचा होये । देह-जीवाच्या देवा करावं भेटी ॥
॥ देह या शिवाच्या करावी भेटी । अगाध महीमा आहे धनीदेवा तुही ॥
॥ अगाध वाणी अगाध धनी । अगाध महीमा तुही ।
तुम्हा वाचुन ईच्छा पुर्ण । कोण करन माही ॥
॥ ईच्छा पुर्ण कर या देही । या देहीतुन जाउच नको कयी ।
असो तुया रूपा सुखाची गाही ॥
॥ तुमच्याच आंगचा जीव हा राया । तुमचा सवंगडी ।
तुमच्या नामानं तरल्या जावो । बहु यवगावरी ॥
॥ नामी जडल्या उपर नसावं । या देहीला मरण ।
तुमचं नाम घेता चुकवा । चौ-यांशी यवनं ॥
॥ फाटक्याचे धड । करावं बा अवधुता ।
भाकल्याचे गुण बोला पंडीता ॥
॥ कृष्ण महाराजा धनी अवधुता । धरले चरण, चरणी ठेवला माथा ॥
॥ धरले चरण उभा जवळ । हे मागतो महाराजा मागणं ॥
॥ कोरी भुम्मा कोरी जागा । कोरा हा कागद ।
या को-या भुम्मेवर उभा करा । आता सिदाईचा वेद ॥

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. ३३ ॥
॥ आदीरूप गाईची ओवी ॥
॥ सावंगा-जळगाव दांडची मुळावरची ओवी ॥

## ॥ आदीरूप आले धनीदेव ॥

॥ आदी रूप, आले धनीदेव । आप रूप आले ।
आकाश वाणी, गिण्यानं देव । सांगे अहिनाले ॥
॥ आकाश वाणी, तिर भवनी । याहीची गर्जना ।
चतुर्पती, गिण्यान देव/ज्योत । सांगे/देतो अहिनाला ॥
॥ मागं यवगं मो-हं यवगं । मध्ये अहिन खासा ।
सर्वत्राची खबर ठाव । सांग मालका ॥
॥ सर्व अकारात अहीन खासा । अनामत न्यारा ।
याहीच्या शकुनाचा हा होय । सुटला वारा ॥
॥ अहीन न्यांत होय कोण ? याची करा हो पारखं ।
याहीच्या शकुनानं उभा । आहे तिर लोक ॥
॥ वर स्वर्ग, खाली पाताळ । मध्ये मिर्त लोक ।
शिदाई वाटे शरण आलो । उभे मालक ॥
॥ मिर्त लोकी हवाला अहीन । अनामताचा आहे ।
याहीच्या चरणी शरण राहता । बहु, होईन प्रतिपाळ ॥
॥ प्रथम यवगी करोडो वर्ष । आयुष्य होतं ।
त्याहीच्या देह पिंडाला तेव्हा । नव्हता घात ॥
॥ कृथा यवुग जाता । जाईन, संसाराची गणीता ।
होती नव्हती होवुन गेली । यवगाची कथा ॥
॥ शेष सुमरनी हजार वर्षे । आयुष्य होतं ।
कली लागता गतकली पासुन । बहु झाला घात/नाश ॥
॥ गाई आंगी शिरष्टी । शिष्याईन केलं कपट ।
ब्रम्हया आंगी येउन तीनं । थापले मठ ॥
किंवा प्रचलीत म्हणनी :- ।। गाई पोटी, चार वेद । केले चैत्यन्यानं कपटं ।
ब्रम्हया आंगी, येवुन तीन । स्थापले मठं ।।
॥ चौ वेदाची गाय । चैतन्यानं, केलं कपटं ।
तिच्या वशिष्ठाची/वर्चस्वाची याहीनं । वाढवली किर्त ॥
किंवा प्रचलीत म्हणनी :- ।। तिन वेदं, येता पोटी । केलं चैतन्यांनं कपटं ।
याहीच्या उर्चिष्टांची याहीनं हो । वाढवलीं किर्त ।।
॥ गाई आंगी सत्ता । तिर, तिर भवनी आहयं ।
याहीच्या चरणी शरणी राहता । बहु होईन संभाळ ॥
॥ चरणी राहता मरण नाही । चौ-यांशी यवनं ।
सोळा न् सोळा बत्तिशीला । चुकतीन मरण ॥

डहाक्या :- ।। सोळा न् सोळा बत्तिशीचा पुरला मुद्या ।
हे करन याग व्योम । यवग टळणार नाही कदा ।।
।। सोळा न् सोळा बत्तिशीची पुरली हद्द । हे उभी राहली चतुर्पतीची सुद
।। पिंडी या ब्रंम्हांडी राया, भरुन उरलां । शुन्य उडवुन देवराया, उभा राहीला ।।
।। सर्वत्राची खबर ठाव आहे । तुम्हा मालका ।
आगम निगम की खबर ठाव । सांग मालका ।।
।। तुया/गाई पासुन, आकार राया । तिर भवनी आहें ।
करोडों वर्षे, आयुष्य राया । कुडी वरत देई ।।

**भजने :-**
।। उमर बारा तेरा वर सात । बत्तिशीला, अम्बंर करा देह पिंड ।। उंबर..
।। करोडो वर्षे, आयुष्य देई । महाराजा, महीमा आहे गा तुयी ।।
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. ३४ ॥
॥ सावंगा-जळगाव दांडची मुळावरची ओवी ॥

# ॥ अठरा वर्णाची गाई ची ओवी ॥

या ओवीची पलट ओवी खंड०७/ओवी-१० मध्ये दिलेली आहे.

वरचरणे :- ॥ गाईचे वर्णन । करतो सुमरनं ।
धरलेसे ध्यानं । विठ्ठलाचें/देवा तुझें ॥
॥ अठरा वर्ण । कृष्णाचं सुमरन ।
आणीक कैसे वर्णन । गाही हेच आहे ॥

॥ अठरा वर्णाची गाय । सर्वत्रांची माय ।
ईचा सुःख पाहयं, अनंत यवगं ॥
॥ गायी च्या पोटी । वेदांची घोंकणीं ।
तेथुन सारा कार । गिण्यानाचा ॥
॥ ग्यान हे गिण्यानं । वेद जाणा भेद ।
अथरवन् वेदाचं । सांगाना सुद/घर ॥
॥ अथर्वन् वेद । आहे कोण्या घरी । मजला सांगाना हरी ।
जागी होईन कैश्यानीं ? सांगाना भाव/हरी ॥०४॥

॥ गायी च्या पोटी । सत्-कृत्याच्या गोष्टी ।
ईथुन पोथी । पुराणं झालं ॥
॥ गायी च्या पोटी । आहे जरी सावं ।
येथुन निरसेवं । सहाही शास्त्रं ॥
किंवा म्हणनी नं २ :- येथुन घ्यावं निरसुन । सहाही शास्त्रं ॥
॥ गायी च्या पोटी । आहे जरी वसुं । ते महाराजाची खाण ।
वसुदेव झाला येथुन । द्युत राया ॥
॥ तिर पतीचे ज्ञानं । तिघाचे तीन गुणं ।
पुढे कैसे होईन ? शुन्य निरसुन ॥ ०८ ॥

॥ गाईचा अंगीकारी । कोण आहे हरी ? मजला सांगाना हरी ।
गाय उभी कोण्या घरी ? सांगाना तुम्ही ॥
॥ गाय मेली आहे का जित्ती ? ईची पुजां कैशी केली ?
सांगा ईची किल्ली । गुणी जना ॥
॥ चौ वेदांची गाय । केलं पिंड दान ।
गाय केली पवित्र ? का ठेवली दुर ? ॥
॥ गाईच्या मौंसाचा । मांडलासे त्यागं ।
केलं मधुपान । गुरू या नामीशी ॥ १२ ॥

॥ कैश्याचं वर्ण ? कैश्याची धरणी ? कैस झालं अन्न-पाणी ?
सांगा याहीच्या खाणीं । गुणी जना ॥
॥ मौसांची खाणी । मौसांच्याच वाणी ।
उभे जीवा जनी । भावं धरा देवाशी ॥
॥ मौसांच्या खाणी । जाणं तिर लोका ।
सांगा याहीच्या खुणा । गुणी जना ॥
॥ मौसाच्या खाणी । जाणे दिगांबर ।
उभे अनामत । यवगा वर ॥ १६ ॥

॥ गाई चा अंगीकारी । उभा इथ हरी ।
गाय उभी घरी । अठरा खुम्मावरी ॥
॥ अठरा वर्णाची गाय । महाराजांची खाणं ।
आणीक कैचे वर्णन ? गाही हेच आहे ॥ १८ ॥

भजने :-

॥ गायीचे वर्णन । हे वंदिले । हे वर्णिलें ।
कृष्ण महाराजा । हे शकुन बहु चांगले ।
आदीरूप राया तुये, शकुन बहु चांगले ।
॥ तु गाय मी वासरू । सावळ्या नको गा आता पान्हा चोरू ॥
॥ तु हरीणी मी पाडस । सावळ्या नको गा आता तोडु आसं ॥ ०४ ॥
॥ आशाची बेआशा करू नको । करू नको ।
पदरी धरलं, महाराजा सोडु नको हो ॥
॥ पदरी धरलं, तु नको जावु दुरं । लोट मारली, देवाच्या चरणां वर ॥
॥ हे होय गाय गाय, गाय सर्वत्राची माय । चातुरा भला भेद पाहयं ॥
॥ गायीचे तीन पाय तीनखुम्मी, उभे आहें ।
गायीचा चवथा पाय यवगा, वर सावधं आहे ॥

-: निरसनसह शब्दार्थ :-

**अठरा वर्णाची गाय** :- ६-शास्त्रे, ६-जोग, ६-दर्शन मिळुन १८ सह चार वेद व अठरा पुराणाचे ग्यानाचे वर्णन यांचा सार एकाच चतुर्पता गाई आंगी असल्यामुळे, या चतुर्पता गाईलाच १८ वर्णाची गाय असे संबोधलेले आहेत. या चतुर्पता गाईच्या चौथ्या आदीपुरूष धन्याची याच १८ खुम्मावर वस्ती असुन या १८खुम्मावर येणा-या सच्च्या भक्ताच्या मनभाव भक्तीचे अन्न तो भकसतो. आणी सच्च्या भक्तांना आपरूप देणं देत राहतो. । **माय** :- माता, जननी

**घोकणी** :- वारंवार पाठांतर करून, घोकुन-घोकुन, घुसळुन-मुसळुन आलेले ज्ञान ।

**निरसेवं** :- निर्शेव, निरसुन आलेले, निर्माण झालेले, उत्पत्ती, निरसन होणारे ।

**वसु** :- वस्ती करून राहणारा, राहु आत्मा देहीत वस्ती करून राहतो. ।

**वसुदेव** :- वस्ती करून राहणा-याचा पिता, देहीत वस्ती करून राहणारा राहु आत्मा चा पिता हा परमात्मा आहे. तो परमात्माच पिंडी या ब्रम्हाडी च्या वसुचा देव वसुदेव आहे.

**ज्ञान** :- नुसतेच ऐकुन घेतलेले कोरडे ज्ञान । **ग्यान** :- ऐकलेल्या कोरडया ज्ञानाचा अनुभवातुन घेवुन आलेले सार यांना ग्यान म्हटले आहे ।

**गिण्यान** :- ग्यानाच्या अनेक अनुभवातुन सार काढुन, सांगी सांगीतलेले-गायलेले याला गिण्यान असे म्हटलेले आहे. । **भेद** :- ग्यानाचा भेद करून सांगणे ।

**मौसवाणी** :- चारही वाणीतुन साळुमाय व्दारे निघालेली हरीनामाची वाणी.

**खाण** :- हिरे रत्न मोल मिळवण्यासाठी, खोल खोदलेली भु खदान,

**चार खाणी** :- १. बियांपासुन उत्पन्न होणारी बिजखाण, जसे झाडे, २. अंडयातुन उत्पन्न होणारी अंडज खाण, जसे पक्षिकुळ, ३. अचानक उत्पन्न होवुन अचानक नाहीशी होणारी उद्‌बिज खाण, जसे उंबरातील किडे, ४. विर्यापासुन उत्पन्न होणारी जाडज खाण, जसे व्दीपाद प्राणी मानव, चतुर्पाद प्राणी गायी गोत्र... ईत्यादी

**तिघाचे तिन गुण** :- ब्रम्हा, विष्णु महेश या तिन बंधुचे रज सत् तम हे तिन गुण

**डिग** :- हरीनामी चिकटुन राहा, झोंबुन राहा. । **सारा सार कार** :- संपुर्ण घोकुन घोकुन काढलेल्या ग्यानाचा सार काढुन केलेला कार ।

हे **महाराजाची खाण । ..गाही हेच आहे** :- या चतुर्पता गाई पासुनच चतुर्पती पंथात बहु महाराज तयार झालेले आहेत. उदाहरणार्थ हेंगडुजी महाराज, देवमनजी महाराज, पुनाजी महाराज, खाकी महाराज, मनकोजी महाराज, फकिरजी महाराज, कोणजाणे महाराज, श्रावण महाराज, लहाणुजी महाराज... ईत्यादी महाराज ची खाण या चतुर्पता गाई पासुनच तयार झाले आहेत. हे महाराजच गाही साक्ष देत आहे की : या अठरा वर्णाच्या चतुर्पता गायचे आणीक काय वर्णन करू ? ही चतुर्पता गाय हे महाराज तयार करण्याची खाण आहे. याची गाही/साक्ष पुरावा करीता आम्ही उभे झालेलो आहोत.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥

॥ ओवी नं. ३७ ॥

॥ पडीत गाईची ओवी :- जळगाव दांडातील... ॥

॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ अल्याड आम्ही पल्याड धनी ॥

॥ अल्याड आम्ही, पल्याड धनी । मध्ये राहली पडं ।
याच पडीची, दवंडी देतो । मानत नाही जनं/बरं॥
॥ पल्याड धनी, त्याहीची वाणी/महीमा । सांगु जगालां ।
तिर लोक्याचे, तिरगुणी अवतारं । लबाड म्हणे मजलां ॥
॥ लबाड कुळं, लबाडा मुळं । कैशी पडली गायं ।
पडीत गाय, उभी राहयं । ये माझे मायं ॥
॥ पडीत गाय, उभी राहयं । यवगा च्या मुळं ।
तिरगुणीला/तिरकुटाला, खबर नाही । शुध्द, करा आपलं कुळं ॥०४

॥ आपलं कुळं आपलं मुळं । नाही विटलो कुळीलां ।
आकाशवाणी कुळं, माझी धरणी । उभं करनं मजलां ॥
॥ आकाशवाणी कुळं, माझी धरणी । धरणी वर खाणं ।
अवघ्या खाणीचे, जीव का खाता ? अल्लाद आणुनं ॥
॥ अल्लाद आहे, त्याहीचे पाय । नाही लागत धरणीलां ।
त्याचीच करतो, आवड हो देवा । कधी याल भेटीलां ? ॥
॥ भेटी आंगचे सिध्द उभे । करा माझेया संगतीलां ।
सदा विनवितो नित साहय । करा हो मजलां/आम्हालां ॥

॥ गायी आंगी, पुस आहे । जगवा चे जीवनं ।
या पुसीचे, बसतीन झटके । होतीन हैराणं ॥ ०८ ॥

भजने :-

।। हे होय गाईची पुस । या पुसीचे झटके खातीन कईक/बहुत ।।
।। हे होय गायीची पुस । ऐसे झटके, बसतीन कहीक ।।
।। कृष्णा याहो लवकर । महाराजा देवा तु आपले वासरं संभाळ ।।
।। देवा तु गाय, मी वासरु । नको देवा मजला/आम्हाला विसरु ।।
।। नको देवा आम्हाला विसरु । संभाळ करा, महाराजा हे लेकरु ।।
।। हुंबरीतो गाईच्या वाणी । राखन करा हो तारण करा ।
महाराजा देवा तुम्ही येवुन देहे तारा । महाराजा देवा तुम्ही ।।

-: शब्दार्थ :-

**अल्याड** :- अलिकडे, ईकडे, तिरगुणी मायेत । **पल्याड** :- पलिकडे, तिकडे, तिरगुणी मायेच्या पलीकडे । **पड** :- पडझड, ईकडुन तिकडे न जाता येणारी दुभंगलेली जागा/वेश, पडलेली दरी, भेग, **उदाहरणार्थ** :– आम्ही तिरगुणी मायेच्या मायावी जगतात वावरत आहो, तर तो धनी या तिरगुणी मायेच्या जगताच्या पलीकडे तिरगुणांच्या पल्याड उभा आहे. सर्वत्राचा चौथा धनी आणी तिरगुणात्मक मायावी जग या मध्ये तिरगुणी मायेनें पड म्हणजेच खोल दरी खोदलेली आहे. जणेकरुन आम्ही तिरगुणांच्या पलीकडे सहजासहजी जाणार नाही अशी व्यवस्था या पड व्दारे तिरगुणी मायेसह तिरलोक्यातील तिरगुणी अवतार यांनी करुन ठेवलेली आहे. **पडीत** :- जाणुन-बुजुन टाकुन दिलेले, । **धरणी** :- देहधरणी । **कुड** :- देही, । **आपलं कुळ** :- चतुर्पती नाम वंशावळी चे मुळ, चतुर्पती चे कुळ, आकाश वाणीचे कुळ । **खाणी** :- १. बिजखाणं ०२. उद्बिज खाणं ०३. अंडज खाण ०४. जाडज खाण या चौखाणीचे अधिक ग्यान खंड०२/२७ ओवीच्या शब्दार्थ मधुन घ्यावे. । **अल्लाद** :- आनंद, आनंददायक, सुखदायक, आल्हाददायक । **पुस** :- विचार पुस करुन हिशोब घेणे, शेपुट, शेपटीचा झटका मारणे. । **जगवाचे** :- जगवायचे जगाचे जीवन. ।

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. ३६ ॥
॥ धेनु गायची ओवी ॥
॥ निरसनसह मुळावरची निबंध ओवी ॥

## ॥ तिरोपतीचा जप केला ॥

॥ तिर-पतीचा जप केलां । चौथा नाही ओळखलां ।
गुरू पदी तिर्था-तिर्था । चौथा आहे लभेद भेदा ॥
॥ चौथा आहे अर्धा भाग । गोडं परमय याहीच्या आंग ।
ब्रम्हगुंज याहीच्या आंग ।
अर्ध्या भागाची मांडणी ।
अर्थ न जाणे तो अज्ञानी । अर्थ जाणें पुर्ण ग्यानी ॥
॥ अर्थ शोधुनिया पाहयं । ऐसी धेनु कोणं आहयं ?
ऐसी धेनु समर्थाची । तिरलोकी सत्ता इची ॥
॥ ऐसी धेनु अवघ्याचं माहेरं । इचा स्वामी परात्परं ।
इच्या कुशीत शिव-लिंग । इची पुजा करा अखंड ॥ ०४ ॥
...वरील ०४ चरणांचे निरसन खंड०१/०१/गण-०३ मध्ये दिलेले आहे.

॥ ऐसी धेनु साकारलीं । सोहंम् रूपी प्रकाशली/विस्तारली ।
सोहंम् ज्योतीचा प्रकाशं । ब्रम्ह आणले रूपात ॥
...या चरणांचे निरसन खंड०१/०१/गण-०१ मध्ये दिलेले आहे.
॥ पृथ्वा परस्थंम्मा भारी । अवघ उत्पन्न इच्या वरी ।
चांगले काय शोधुनं पाहयं । इथं कोणतं पुर्ण आहयं ? ॥
॥ पुर्ण शोधुनीया पाहयं । इथं कोणते पदार्थ आहयं ।
पुर्ण नाही आणले घ्यानां । काय पढोनीया पोथी-पुराणां ॥
॥ पुर्ण नाही आणले घ्यानीं । त्याचा जिव्हाळा तृणवाणी ।
पुर्णत्वाचे प्रकार नेनें । काय जाणु मी देवा अडचनें ॥ ०८ ॥

॥ भाग : ०२ ॥
॥ अर्धि मातृका बोले जग । कोण्या अक्षराचा होय भाग ?
अक्षर आणां हो ध्यानां । ऐसा बोले योगी राणा ॥
॥ चौसष्ट अक्षरांच्या पोटी । मंत्र झाले कोटयानं कोटी ।
जितके मंत्र तितके देवं । अक्षरी आहे त्याहीचे नावं ।
अक्षरांची रंचना सारी । तत्व पदार्थ पुरूषार्थ चारही ॥
॥ नाही शोधले विद्याक्षर । कैशी चुकणं येरझारं ?
अष्टवर्ण आचरले । फळ भोगाया जन्मा आले ।
॥ नवनिधा भक्ती केली । वस्तु न कळता, वाया गेली ॥
परीक्षा करणारा सापडे ना कोठे । आकाराचें देव केले मोठे

॥ भाग : ०३ ॥
॥ उपमा देवु तरी काय ? आकारात माझा देव आला नाही ।
नाही छाया नाही काया । कैसा पाहु माझा देव राया ?
आपणास पाहता तो पाहवेना । बळ करीता आकळेना ॥
॥ परात्परं परात्परं । तो देव आहे अगोचर/निराकार ।
या देवाच्या भक्तीनं सिध्द झाले । देवपण सिध्दांच्या आंगी आले ॥

॥ चालवाया धर्म-कर्म नित्य । भाव करते नेम सत्य ॥
कुणी पार्थिव करती । कुणी स्थावर पुंजती ।
तिर्थ यात्रा अनुष्ठानं । व्यर्थ आहे मनी जाणं ॥ १६ ॥

॥ भाग : ०४ ॥

॥ जो बावन्नीत पाही । त्याला साधन नलगे काही ।
वेद-सिध्दांत प्राप्त त्याशी । दुसरे पदार्थ तृणवाणी ॥ तृण :- गवत
॥ क्रिडा करे तो क्षिरसागरी । स्नान करे तो तिर्थि-सागरी ।
परंम् अमृत नित्य सेवी । कांजी/गुरू कशाला तो आठवी ?॥
॥ गोडी लागली सत्रावीची । विषय/विषम विसर्जन झाले त्याशी ।
पुर्ण बावन्नीत तो पाही । वरत उरलं काही नाही ॥
॥ बावन्न पाहता दिसे अवघड । पाहीन त्याला आहे सुबळ ।
आधी व्हावे हरीचा दास । भावे धरावी धरून कास ।
बरे शोधावे पन्नास । भाव धरून करावी आस ॥२०॥

॥ चार सहा दहा जनी । बारा सोळा दोन आहे गुणी ।
झाली पन्नाशीची गणना । दोन सांगे कृष्ण राणा ।
उरले ते दोन बिज । ओहंम्-सोहंम् बिज मंतरा ॥
॥ सचित्तानंद ब्रम्हवेत्ता । परमं तत्व परं देख ।
सत्य वाणी चित्ती आनंद । मुख्य मालकाचं होईन देणं ।

॥ भाग : ०५ ॥

॥ प्रभुची ईच्छाशक्ती मुळमाया । पल्याड देख मुळं माया ।
मुळं मायाचे लक्षणं । शुध्द सत्व आत्म ज्ञान ॥
॥ माया तिरभवनी व्याली । सर्व भुता प्रसवली ।
मुख्य वाचा खाणी चारी । वेद पुराण माया सारी ॥
॥ माया त्यागु म्हणते एक । हे वाटते कौतुक ।
जोवरी काया तोवरी माया । कैशी त्यागानं माया ?
जोकोणी तोडण माया । जडनं या शरीरी तो राया ॥
॥ ज्योत चमंचमीं त्रिकुटावरी । उन्मुनी अंगी कपाटी गीरी ।
देह देउळी दस ज्योती । षटचक्र भेदी कांती ॥ २६ ॥

॥ समईया लागल्या ठायी-ठाई । कर्ता-याची अमोल चतुराई ।
ब्रम्हांडाची दिवनाली चेती । तेल चैतन्य वात सत्रावी ॥
॥ ज्योत चमके जिवनकळा । जीव-मोक्षाचा हिरं जिव्हाळा ।
उजाळा उजळे दिपमाला, कर्ता-याच्या आंगी अघातकळा ।
जिवांची जिवनकळा । सेरूपी उभा कृष्ण सावळा ॥

**भजने :-**

॥ सावळा उभा । उभे अनामत....
सोयंम् उभी हो ज्योतं ॥ सावळा उभा....
॥ ज्योत भली हो ज्योत भली । उभी आहे ताळातं ।
ज्योतीचा अवतार कृष्णदेव । उभे सावंग्यातं ॥
॥ आहो या ज्योतीचा । उजेड आहे मजला सदोनितं ॥

## -: धेनुची ओवी चे निरसनसह शब्दार्थ/चरणार्थ :-

**तिरोपती** :- रज, सत् व तम या तिन गुणांचे पती ब्रम्हा विष्णु महेश । गुरूचे पद घेणारे गरूजन हे या तिघांचेच तिरगुणी ज्ञान देत सुटले आहेत. जो चौथा निर्मळ निश्कलंकी लभेद आहे, त्याचा काहि त्यांना भेद घेता आला नाही. या तिरगुणांच्या तिन अवस्थेतच ते राहील्यामुळे त्यांची चवथी अवस्था प्रकट न झाल्यामुळे त्यांना चवथी अवस्थेचे चतुर्पता ज्ञान या तिरगुणी गुरूजना जवळ आले नाही.

**चौथा ब्रम्ह** :- निराकार निराधार निश्कलंकी अहीन अजात परात्पर असा चौथा आदीपुरूष भैस नारायण । ज्याचे ज्ञान प्राप्त करता करता वेद कुंठीत होवुन, नेती-नेती म्हणजेच न जाणता येणारा, न जाणता येणारा असे म्हणुन मौन झालेत. ही जी ब्रम्हांड विश्वाची मांडणी झालेली आहे, ती ब्रम्हांड मांडणी या चौथ्याच्या अर्ध्या भागानेच झाली आहे. हा चवथा आपल्या अर्ध्या भागानेच सर्वत्र भरून भरला आहे आणीक आपल्या अर्ध्या भागाने उरलाच आहे. या चौथ्याचीच या देहीच्या तिरलोक्यासह या ब्रम्हांडाच्या तिरलोक्यात सत्ता आहे. हा आपल्या एका अंशाव्दारेच या पिंडी या ब्रम्हांडी सत्ता गाजवत आहे. त्याचा तो एक तेजोगुणी अंश या देहीच्या तिरलोक्यात आत्मा या नावाने वसला आहे. याच्या या सोहंम् ज्योतीच्या प्रकाशानेच म्हणजेच या चेतन्यप्रकाशानेच या देही उभ्या आहेत. देही च्या आकारात याचा हा सोहंम् चैतन्यमय प्रकाश असल्यामुळेच या देही आकारल्या आहेत-आकारत आहेत. सर्व सजीव आकाराच्या आत तो आपल्या एकाच अंशाने उभा आहे., तर ब्रम्हांडी तो परमात्मा या नावाने भरून भरला आणीक उरून वसलेला आहे. आणी त्याची छाया प्राणस्वरूपात सर्व ब्रम्हांडी पडलेली आहे.

हा चौथा पुर्ण ब्रम्ह काही त्या तिरगुणींनी ध्याना आणुन, या पुर्ण चा शोध काही त्यांनी घेतला नाही. तिरगुणांच्या पल्याड न जाता तिरगुणात राहुन बहुजनांनी जप-तप अनुष्ठान व नवनिधा भक्ती केली असेल, परंतु ते भक्तजन तिररगुणांच्या पल्याड न गेल्यामुळे त्या तिरगुणांच्या पल्याड असलेली ही चौथी अनामत वस्तु म्हणजेच मोक्ष देणारा हा चौथा ब्रम्ह त्यांना काही प्राप्त झाला नाही. हा चौथा न कळल्यामुळे ते तिरगुणांतच गुरफटत राहुन गुंफु गुंफु मरत, हे सर्व त्याची मेहनत वाया घालवत गेलेत. ८४शी फिरत राहीलेत. परंतु त्यांना काही या तिरगुणी देवतांनी मोक्ष दिला नाही. या तिरगुणी मायेनं त्या तिरगुणींच्या डोळयावर आणलेल्या झापडी मुळे ८४शी तुन मोक्ष देणारा हा चौथा ब्रम्ह काही त्यांनी ओळखला नाही. कळला नाही. त्या रजोपती ब्रम्हयाला जर हा ब्रम्ह कळला असता, तर त्या ब्रम्हयाने कृष्णाच्या गाई चोरून नेल्या असत्या का ? त्या ब्रम्हयाला हा चौथा ब्रम्ह कळला नाही, म्हणुन तर त्या ब्रम्हयानं कृष्णाच्या गायी चोरल्यात.

॥ अर्धि मातृका बोले जग । कोण्या अक्षराचा होय भाग ?
अक्षर आणां हो घ्यानां । ऐसा बोले योगी राणा ॥

त्या आदीरूप आदीपुरूष पासुन अ-कार, उ-कार, म-कार, आणी या तिन अक्षरांना पुर्णत्व देणारा ँ-अर्धा कार असे चार पासुन धुम्मधुम्मकार ॐ कार बनला. हा ॐ कार नादब्रम्हचा धुम्मधुम्मकार नाद हा सोहंम् ज्योतीशी ऐक्य पावुन, हे ब्रम्हांडे विश्वे उत्पत्ती झालीत. अ-उ-म या तिन मातृकापासुन ५० अक्षरे झालीत. ती ५० चार वर्णाशी खेळतात. चौथ्या अर्ध्या मातृकाचे दोन निराळेच राहीलेत. निराळे असलेलेच विद्याक्षर असुन हेच चौथ अक्षर आणा हो मनाशी । या चौथ्या अक्षराच्या आधारावर हे तिन उभे आहेत. हे चौथ सोयंम् ज्योत आणा हो ध्याना । ऐसा बोले हा योगी राणा ।

जसे त्रिशुलाचे तिन वरचे टोके आणी ज्यावर त्रिशुलाचे तिन टोके वसले आहेत तो त्या तीन ला आधार देणारा चौथा दांडा ! असे हे चौघा पासुन त्रिशुल बनले आहेत. परंतु तिरगुणी आकाराला भजणारे पाहणारे लोक हे वर वरचे तिन टोकेच पाहत आहेत, तर चौथ्या निराकाराला भजणारे पाहणारे जन त्यां तीन टोकाला आधार देणारा मुळावरचा दांडा पाहत आहे. कारण त्याला हे ग्यान झालेले असते की : या त्रिशुलाचा आधार हा चौथा मुळावरचा दांडा आहे. म्हणुनच ते त्या तिन ला सोडुन चौथ्या कडे पाहतात. तिन ला सोडुन तिरगुणांच्या पल्याड उभ्या असलेल्या चौथ्याला पाहत आहेत. या चौथ्या निराकार ओहंम्-सोहंम् अक्षरालाच ध्यानात आणत आहे. चौथ्या चतुर्पतीचे निरंजन आत्मग्यान घेवुन जो बावन्नीत पाहे त्याला ईतर साधन न लगे काही !

॥ बरे शोधावे पन्नास । भाव धरूनी करावी आस ।



The Seven Chakras

| | | |
|---|---|---|
| १. मुलाधार चक्रावरील ४ बिज मातृका | २.स्वाधीस्थान चक्रावरील ६ बिज मातृका | ३. मनिपुर चक्रावरील १० बिज मातृका |
|  वं, शं, स, ष |  ब, भ, म, य, र, ल |  ड, ढ, न, त, थ, द, ध, न, |
| ४. अनुहत् चक्रावरील १२ बिज मातृका | ५. विशुध्द चक्रावरील १६ बिज मातृका | ६. अग्नि चक्रावरील २ बिज मातृका |
|  क, ख, ग, घ, ङ, च, छ, ज, झ, ञ, ट, ठ |  अ, आ, इ, ई, उ, ऊं, ऋ, ॠ, लृ ॡ, ए, ऐ, ओ, औं, अं, अः |  हं, क्ष |

॥ ४, ६, १० जनी । १२, १६, २, आहे गुणी ।
झाली पन्नाशीची गणना । २ सांगे कृष्ण राणा । ॥
॥ उरले ते दोन बिज । ओहंम् सोहंम् बिज मंत्रा ॥ लावली धुनी...

या षटचक्रांच्या शेवटी । पडे नाद-बिंदुच्या गाठी । होय पदपिंडाच्या भेटी । मग देह नाही । त्या आनंदपदाच्या तळी । चंद्र-सुर्याच्या मेळी । असे सुख गोल्हाट मंडळी । प्रेमयोगी तो । शिवतत्वी शिव झाला । आणी बिर्दाच्या कामतत्वी गुंतला । गुंतुनी पुनः उगवला । तोची शिवयोगी श्री कृष्णा जाणा ।

| | | |
|---|---|---|
| ७. सहस्त्रागार चक्र | जिव-शिव सोहंम् स्थान | निरंजन |
| सहस्त्र पाकोळीकांचे हे सहस्त्रागार चक्र आहे. येथे आहेत : उर्ध्वस्वर्ग, आकाश वाणी, परा-पश्यंति वाचा । सोंहंम् शब्दबिज । म कार मातृका । प्रलय अवस्था अंगक्षेत्री । परिपुर्ण सत्रावी । हिरण्यगर्भ देह । सहस्त्रागार व ब्रम्हरंध्र याचे येशिवर उभा आहे तो सोहंम् । |   प्रभुची ईच्छाशक्ती माया । दिसते तिकडे मुळमाया । जो कोणी तोडन माया । जडल शरीरी तो राया । |  परात्परता परात्पर । येथे देव आहे तो अगूचर । आपणास पाहता तो पाहवेना । बळ करीता आकळेना । उपमा देवु तरी काय ? हा देव आकारात नाही । याहीच्या भक्तीनं सिध्द झालेत । देवपण सिध्दांच्या आंगी आले । |

॥ ज्योत चमकली त्रिकुटावरी । उन्मुनी अंगीन कपाटी गीरी ।
देह दउळी दस ज्योती । षटचक्रे भेदी कांती ॥

**दस ज्योती** :- दश इद्रिये । **षटचक्रे** :- सहा चक्रे खालील चित्रात दर्शवलेले आहेत । **कांती** :- देही चा प्रकाश । **देहकांती** :- देहीचा प्रकाश, देहीचे आरावलय । **उन्मुनी** :- सळसळत वर जावुन खाली पडने.




कपाळाचा दोन भुवयामधील मध्यभाग म्हणजे या तिरगुणांचा त्रिकुट ! तिरगुणी या त्रिकुटा पर्यतच पोहचतात. या त्रिकुटा च्या खयालात मन मोहुन दंग राहतात. परंतु ज्यांनी या तिरगुणांचे तिन शिल्ले धन्याच्या चरणी अर्पण केलेत आणी या तिरगुणांच्या पलीकडे या त्रिकुटा वर गेलेत, त्यांना पुढे सत्रावीचे अमृतपानाचा लाभ होतो. सहस्त्रदल कमळातुन अमृतस्त्राव योग्याच्या मुखात टपटप टपकत येतो. षोडसकला आदीपुरूषा ची ही सत्रावी कळा होय. याव्दारे देही चैतन्यमय होत राहते. या सत्रावी च्या अमृतपानाने त्यांची काया खेचरी होते. या खेचरी कायेने ते उर्ध्व स्वर्गि असलेल्या चतुर्पती च्या हिरण्यगर्भि गायत्री गाय चे चतुर्पती ग्यानाचा पान्हा प्राशन करतो. या चतुर्पता गायत्री गायचे ग्यान खंड०१/०२/ओवी-०३ : मायाचैतन्य आदीमाया या ओवी व्दारे कृष्णाने सांगीतलेले आहे. या चतुर्पता गायत्री गायचा पान्हा प्राशन केल्यानंतर, त्याला पुढे धेनु गाय भेटते. या धेनु गाय चे ग्यान या ओवीत आहे. चतुर्पतीच्या या कामधेनु गाय चे ग्यानाचा पान्हा प्राशन करून पुढे गेल्यावर, त्यां योग्याला भाकल्या शकुनाचे ग्यान देणारा काग भेटतो. या कागाचे ग्यान खंड-४ मधिल भाकल्या शकुनाच्या ओव्यात कृष्णाने दिलेले आहेत. या काग कडुन भाकल्या शकुनाचे ग्यान प्राप्त करून, तो योगी मग संपुर्ण चतुर्पती ग्यानसंपन्न होवुन सहस्त्रागार मध्ये घुसतो. सहस्त्रगार मध्ये पहुडलेल्या एक एक शक्तीचे अनुभव घेतो. निरंजनाची आकाशवाणी ऐकतो. आकाशवाणी करणारे आउक यवग म्हणजे टाळुस्थित आकाशवाणी व्दारे सांगी करणारे यवग त्याच्या देहघरी येते. आपरूप सांगी करणारे आउक यवग त्याच्या देहघरी आल्यामुळे, मग तो नाही पडत विचारी ! कारण की : त्याच्या प्रतेक विचारावर त्याच्या टाळुस्थित आकाशवाणी व्दारे सांगी होत राहते. त्याच मुळे तो कुठेही न जाता, बसल्या बसल्या धन्याच्या आकाशवाणी व्दारे येणारे ग्यान घेत राहतो. अश्या योग्याला एवढ अगाध ग्यान कोठुन प्राप्त झाले ? याचा विचार मग या तिन ताळातील लोक करत बसतात. डोक खाजवत बसतात. अश्यारितीने त्या कृष्ण योग्याला अगाध धन्याचे अगाध ग्यान प्राप्ती झाली. त्या कृष्ण योग्याला ज्योर्तिमय निरंजन आदीपुरूष धन्याची प्राप्ती होवुन त्याचे देह-जिवाचे लग्न होते.

ही निरंजन ज्योत त्यावेळी या त्रिकुटावर असलेल्या ब्रम्हांडातील अकाशमात मध्ये कोटी सुर्य प्रभासम चमकते हो । आणी तेथुन सळसळत खाली येत शरीराच्या प्रतेक अंगाअंगात अग-कपाटी घुसुन काया च्या सर्व समया तेजोमय करते. देह देउळीच्या दशज्योती सह षटचक्रावरील ज्योती तेजपुंजः होतात. त्याच मुळे त्यांचा प्रकाश हा देहीला भेदुन बाहेर येवुन अंगकांती तेजोमय बनवते. आरावलय वाढवते.. असो.

## ॥ समईया लागल्या ठायी-ठाई । कर्ता-याची अमोल चतुराई ।

देवासमोर एकापेक्षा जास्त ज्योती लावुन प्रकाश देणारी वस्तु म्हणजे समयी ।



जसे मन बुध्दीच्या दिवट्या लावुन दशइद्रियांवर चैतन्य ज्योती लावुन या ज्योती झाल्या आहेत बारा । या बारा ज्योतीच्या या देहीतील समया आहेत, तर सप्तचक्रे वरील विशेष चैत्यन्य ज्योती लावल्या असल्यामुळे, सप्तचक्र हे सुध्दा या देहीतील समया आहेत. नवखंडाच्या नउ ज्योती असल्यामुळे नवखंड हेसुध्दा देहीच्या समया आहे. टाळुस्थानावर ब्रम्हाडात निरंजन ज्योत उभी असल्यामुळे या देहीचे ब्रम्हांड हे सुध्दा एक समयी होते... अश्या अनेक समया या देहीत ठाई ठाई त्या कर्ता-यान अमोल चतुराई करून लावल्या आहेत. देहीच्या समया आणी त्याचां प्रकाश याचे ग्यान बाजुचा फोटो पाहुन घ्यावा.

## ॥ ब्रम्हांडाची दिवनाली चेती । तेल चैतन्य वात सत्रावी ॥

॥ प्रभुच्या शक्तियाँ दोन रूपात ब्रम्हांडी उभ्या ।
इच्छाशक्ती मुक्तमाया आणीक माया ॥
॥ पहिली ईच्छाशक्ती मुक्तमाया । आत्मग्यान देई ।
निरंजन प्रभुकडे नेई । मोक्ष मिळवुन देई ॥
॥ दुसरी ईच्छामाया मायादेवता । सर्व सिध्दि देई ।
मोहित करे सर्व । मोक्षपदापासुन दुर नेई ॥
॥ या मायेनं नाडले ब्रम्हा विष्णु शंकर मोठे मोटे ऋषिमुनी समर्थ ।
या बलवान मायेनं । सिध्दियाँ देवुन मोक्षपदापासुन दुर ठेवले ॥
॥ जोकोणी तोडनं ही माया । शरीरी जडन तो निरंजन राया ॥




॥ ज्योत चमके त्रिकुटावरी ।
उन्मुनी अंगीकपाटी गिरी ।
देहदेउळी दस ज्योती ।
षट्चक्र भेदी कांती ॥

॥ ब्रम्हांडाची दिवनाली चेती ।
तेल चैतन्य वात सत्रावी ॥

॥ प्रभुची ईच्छाशक्ती मुक्तमाया ।
मुक्तमायेचे लक्षण ।
शुध्दसत्य आत्मग्यान ॥

॥ माया तिरभुवनी व्याली ।
सर्वभुती प्रसवली ॥
॥ मुख्य वाचा वाणी चारही ।
वेद पुराण माया सारी ॥

या समयां पैकी ज्यावर निरंजन ज्योत उभी आहे ती ब्रम्हांडाची म्हणजेच या मस्तकाची समयी । हीच एक समयी अशी आहे की : या समईत/दिवनालीत या निरंजन ज्योती मुळे सोयंम्/आपोआप चैतन्य रूपी तेल त्यात वरून पडत राहत असुन, या दिव्याची वात ही सत्रावी जिवनकळा आहे. ही दिवनाली जोपर्यत देहीत आत्माराम ची राहुटी आहे म्हणजेच जो पर्यत हा राहु आत्मा या देहीत वस्ती करून आहे, तोपर्यत ही ज्योत तेवत राहत राहत देहीच्या इतर समयात चैतन्य तेलाचा पुंरवठा करत राहते. असो. अधिक ग्यान काया ग्यान खंड ०३ च्या ओव्यां मधुन घ्यावे.

॥ कृष्ण महाराज
धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. ३७ ॥
॥ चतुर्पता नाम गाईची ओवी ॥
॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ माझी नामगाय बरी हो ॥

या ओवीची पलट ओवी खंड०७/ओवी-११ मध्ये दिलेली आहे.

॥ माझी नाम गाय बरी हो । पृथ्वा घाले हद्‌यी ।
माझी नाम गाय बरी हो । हे होय पुर्विस्ताची दोरी ।
माझी नाम गाय बरी हो । सोयंम्, नांदे या घरी ॥

॥ गायीचे तीन पाय । तिनखुम्मी उभे आहे ।
या गायीचा, चवथा पाय । यवगावर सावथ आहे ॥
॥ सावध आहे, यवगा वरी । कार केला, या भुम्मेवरी ।
कार केला, भुम्मेवरी । या गाई ची, गाही खरी ॥
॥ गायीच्या, पोटी आहे केवळं । पृथ्वीत वसवलं गोकुळं ।
महाराज राखे हो गाई । याहीनं तारली नरदेही ॥
॥ गायीचा, शकुन खासा । वेल वाढवलां मानवाचा ।
दिवस आला, यवगाचा हो । करोडो वर्षे आयुष्याचा ॥
करोडो वर्षे आयुष्याचा । सत्य शकुन आहे गाईचा ॥

॥ आमच्या हाती काही नाही । आम्ही, जडलो तुम्हा पायी ।
देवा श्रीकृष्णा, राखे हो गाई । बहु दयाहो गाही ।
देवा श्रीकृष्णा, दयाहो गाही । त्वां तारली नरदेही ॥

भजने :-
॥ ऐसे कैक झाले बेईमान । याहीची पुस घेईन ।
जे नाही होणार बेईमान । त्याहीला नामी सांभाळनं ॥

॥ ओवी नं ३७/२ ॥

## ॥ सकाळच्या प्रहरी -गाईची ओवी ॥

॥ सकाळच्या प्रहरी, गाय सोडली । पहा त्या प्राण्यानं ।
होत शेतं, जवळ गाय । गेली धावुनं ॥
॥ कुणब्याची/शेतक-याची, नजर पडली । गाय आणली कलावुनं ।
बिना चा-या, वाचुन गाय । ठेवली बांधुनं ॥
॥ गाय होती, गर्भार माय । कंठी दाटला प्राणं ।
एका जीवा, माग दोन । जीव गेले मरूनं ॥
॥ घरची नार, गर्भार सारं । सुर पोटी उठले ।
एका जीवा, बध्दल जीव । चौघाचे गेलें ॥ ०४ ॥
॥ कुणब्याला/शेतक-याला, विटाळ पडला । गेला घर सोडुनं ।
गंगे तिरी, येवुन त्याहीनं । केलं पिंडदानं ॥ ०५ ॥

भजने :-
॥ देव आला, हो धावुन । या बाळाचा, आकांत पाहुनं ॥
॥ ज्ञान/अमृत गंगा भरली । यामध्ये आंघोळ, या बाळाची झाली ॥
॥ ज्ञान गंगेची उकळी । निर्मळ झाली, या बाळाची देही ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥

॥ ओवी नं. ३८ ॥

ओवी महात्म :- कारला दांडात या मुळावरच्या ओवीला, अरजीचा मान असुन कारला अरज चे घृपद हे ॥ या स्थळाची राज महीमा, देवा तुम्हाले । आता विनवितो, हाती धरावं बाळाले ॥घृ॥ असे म्हटल्या जाते. बाकी सर्व चरणे सारखेच !

॥ मुळावरची अरज/ओवी ॥

## ॥ मिर्त लोकची राज महीमा ॥

या ओवीची पलट ओवी खंड०७/ओवी-१२ मध्ये दिलेली आहे.

॥ मिर्त लोकची, राज महीमा । येईना कोणाले ।
सर्वच गेलं, लुटीत देवा । आठवु कोणाले ॥ घृ ॥
॥ घेरला शंकर, सुद-बुध भुलला । पहा या राजाशी ।
फार झालं, भय जावुन । बसले कैलाशी ॥
॥ जप-तप केलं, त्या व्दैतानं । घेतलं मागुनं ।
व्दैताची, खाण शेवटी । झाली बेईमानं ॥
॥ व्दैत खाणं, उडवनं मानं । खोटी त्याहीची वस्ती ।
भगोडयाची, वजाबाकी । भरुन, झाली त्याहीची ॥ ०४ ॥

॥ माय हे माउली । बाजारी, बसली जावुनं ।
भुलली तम्माम जावुन । घेतलं बैगनं/अवगुण ॥
॥ समुद्राची, खेप बेलं । केले भाडयानं ।
नाही गवसलं, केनं । बैलं, भरले दंभानं/डंभानं ॥
॥ माय हे माउली, ऐसी एक । गेली होवुनं ।
किती आठवु गुणं ? शनीचर भोगलां इनं ॥
॥ समुद्राची, खेप लागली । मोत्याची खाणं ।
आता गवसलं, केनं/पेणं । हद्य, भरलं नामानं ॥ ०८ ॥

॥ राज ऐसा, थोर देउळ । केलं तयार ।
या देवळाची, महीमा धनीदेव । उभे कारागीरं ॥
॥ तिन ताळाची, केली रंचना । देहे देउळावरं ।
चंद्र-सुर्य, हिरें लावले । प्रकाश उजेड फारं ॥
॥ रुपाशी आणुन, देउळ केलं । बहु हौसी साठी ।
नका जावु, रुसुन सोहंम् । नांद बा येथी ॥
॥ बहु दिवसाची, वस्तु असा मी । आहे एका शहरातं ।
धन्याच्या, कृपेने रयत । नाही, जाणार कुठं ॥ १२ ॥
किंवाः- धन्याच्या सुखानं रहीत, नांदन बा इथ । --कारला अरज टुक

॥ या देवळाची, उम्ररं बारा । तेरा वर सात /वर्षातं ।
करोडो वर्ष, आयुष्य देई । या कुडी वरतं ॥ १३ ॥

भजने :-

॥ उमर बारा तेरा वर सात । बत्तिशीला अंबर करा देहपिंड ॥
॥ उमर चौदाशी चौदाशी । अंम्बर करा देहीशी । उमर चौदाशी...॥
॥ करोडो वर्षे आयुष्य देई । महाराजा हे महीमा तुई ॥
॥ महीमा आहे गा तुई । आता चालव या तिरलोकी गाही ॥
॥ तिरलोक्याचा होय दाता । संभाळ करा महाराजा अवधुता ॥

## ॥ मिर्त लोकची राज महीमा चे निरसनसह शब्दार्थ/चरणार्थ ॥

**व्दैत** :- दोहीत, दोन दोन हित जपणारे दानव, आध्यात्मात दोन भक्तीमार्ग आहेत. १. व्दैत मार्ग म्हणजे आकाराला पुंजनारे यांचा भक्तीमार्ग तर २.अव्दैत मार्ग म्हणजे निराकार निराधार धन्याला पुंजनारे यांचा भक्तीमार्ग । आकार म्हणजेच व्दैत पुंजन सोडल्यानंतरच ख-या अर्थाने तो आध्यात्मीक विश्वाच्या पहील्या पायरीवर येतो. तोपर्यत तो व्दैत मार्गि राहुन तिरगुणी मायेच्या मायावी देवतांच्या खयालातच राहतो.
**भुलली** :- विसरली । **तम्माम** :- सर्वच । **बाजारी** :- तिरगुणांच्या बाजार मांडलेली तिरगुणी माय । **घेतलं बैगन** :- वांग, वांग्याप्रमाणे वेशभुषा असणारे चेहरे. उदाहरणार्थ डोक्यावर गोल बुची बांधुन लांब दाढी वाढवलेले साधुप्रमाणे दिसणारे अवगुणी बैगनी/ढोंगी चेहरे जवळ घेणे/करणे । **भगोडा** :- पळुन जाणारा, भगोडयाची वस्ती म्हणजे पळुन जाणा-यांची वस्ती ! उठुन पळते, त्याला का धरता ? बाहेर धनी उरला भरून ! उरली देहे उरली जागा, देहेत या त्या धन्याला घेवुन । तो साहय करन नरदेहीचे । अथर्वन् वेद चवथा खुम्मी, आसन उडवन हो यमाचं ॥ ०२/३९ । **वस्तु** :- निरंजन वस्तु आहे हो खासी ! **पैंणं** :- विसाव्याचे ठिकाण, अंतिम लक्ष्य असलेले ठाणं, मोक्षाचे ठिकाण । **डंब** :- दंभ, अहं, माज । **शनिचर भोगला ईन** :- तिरगुणी व्दारे आलेल्या दुःखाच्या फे-या भोगणारा कृष्ण देह । **रयत** :- प्रजा, जनता । **मोत्याची खाण** :- मोत्या सारखे निश्कलंकी शंक पाक शुभ्र सुर्य-चंद्र प्रभा असलेले हरीनाम ! कृष्णदेवाचा सुर्य प्रभा व हेंगडुजी चा चंद्र ज्योतीचा प्रकाश लाभलेले हरीनाम जिथे आहे ती चतुर्पती नामाची खाण । **चंद्र-सुर्य** :- चंद्र सुर्य हे नयन दोन

### ॥ तिन ताळाची केली रंचना । या देह देवळावर ।
### चंद्र-सुर्य हिरे लावले, प्रकाश उजेड फार ॥

०१. कमरेपासुन खालचा भाग हा पाताळ. ०२. कमर ते मान हा मिर्तलोक आणी ०३. मानेवरचे मस्तक हे उर्ध्व स्वर्ग असे तिन ताळाची रंचना या देहदेवळावर केली आहे.




या देवळाच्या डाव्या भागात ईडा नाडीसमुह ठेवुन या समुहात चंद्र प्रकाशतो. या चंद्र चे प्रतिक डावा डोळा होय.

या देवळाच्या उजव्या पिंगळा नाडी समुहात सुर्य वसतो. या सुर्य चे प्रतिक उजव्या डोळा होय. असे रितीने या देहदवळावरचे चंद्र-सुर्य हे डावा व उजवा असे दोन नयन होय.

या देहदेवळावर सप्तचक्र सह ब्रम्हांडात अनेक शक्तीयॉ या देही हिरे प्रमाणे लावलेले आहेत. आणी या देहदउळात तो परमात्मा आपला तेजोगुणी अंश अवतार घेवुन या देवळातला धनीदेव बनुन उभा आहे. या निरंजन धन्यामुळेच या देहदेवळात प्रकाश उजेड फार आहे. देहदेवळाचा कारागीर तो धनीदेव आहे.



### ॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. ३९ ॥
॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

## ॥ संतपुरीची ओवी ॥

॥ संत पुरीचे, संत मिळाले । कायतरी केलं याहीनं ।
अवघच निरसुन, उभा राहीला । धनी अवतार निरंजन ॥
॥ अगाध पोथी, पुराण गीता । भागवती झालं काय ?
मुळ स्तभांवर, गाही वाटली । तिथतरी जावुन पाहयं ॥
॥ सहा शास्त्र, ग्रंथ लीखीत । पंचम पुराण ते आहे ।
तिर पतीच, करता बोलनं । आम्हातरी ते सांगे काय ?
॥ तिरगुणांचे, तिन पदर । शुन्य उडवन तो चैत्यन्यं ।
चवशुन्यावर, करता/होईन बोलनं । उभा राहीन चौथा खुम्म ।

॥ उडवन दर्शन, उडवनं जोगी । उडवनं माया, ते चैतन्यं ।
किंवा- चव शुन्यामध्ये शकुन निर्गुण । शुन्य मोडन चैतन्यं...जळगाव
अवघच निरसुन, उभा राहीनं । धनी अवतार निरंजनं ॥
॥ झालेसे अवतार, झाले योगी । मुळनाश केला याहीनं ।
नर देहीला, भंग आणला । शेवटी पळाले उठुनं ॥
॥ उठुन पळते, त्याला का धरता ? बाहेर उरला भरूनं ।
उरली देहे, उरली जागा । देहेत या त्याला घेवुनं ॥
॥ उरली देहे, उरली जागा । साहयं करन/होईन नरदेहीचं ।
आथर्वन वेद, चौथा खुम्मी । आसन उडवनं यमाचं ॥
किवा :- आथर्वन वेद इंद्र सभेत । शासन मोडन यमाच ॥ ˙...जळगाव
॥ यम खडीचं घेते, पडीचं घेते । पड-पाताळ, होय त्या यमाचें..
तिन ताळावर, झेंडा देवाचा । चाकर है वो हुजुरके ॥
॥ हुजुरका चाकर बेटा । अक्षयी चिरंजीव होय याहीचा/हुजुरचा ।
अवघच तिरलोक, शरण येतें । आथर्वन् वेद कोणाचा ?
॥ आथर्वन् वेद, इंद्र पुरी, । इंद्रसभा होय कोणाची ? ।
ऋषी-मुनी, जपी-तपी । शरण आले याहीशी ॥
॥ आथर्वन् वेद, चौथ्या खुम्मी । निद्रा नसावी तिरलोकी ।
रात्रं न् दिवसा, लभेद भजो । तो चुकवण चौ-यांशी ॥

॥ अगीन/अगंध जाळ, लभेद खेळ । पवन-पाणी अंदरं ।
नर देहीतुन, जीव का जाते ? कुड पडनं धरणीवरं ॥
किंवा :- जीव घराच्या बाहेर का जाते । धरणीवर पडनं कुडं ॥ जळगाव
॥ खडीचही उठवां, पडीचही उठवां । मोक्ष सिदाई उठनं ।
नरदेहीतुन, जीव नाही जाणार । सत्य चालनं शकुनं ॥
जळगाव म्हणनी:-॥ चौथ्या खुम्मी उभा राहीन । मोक्ष सिदाई उठन ।
जीव घराच्या बाहेर नाही जाये । सत्य चालवन बोलनं ॥
॥ सत्य येईन, अहिन खुम्मी । अवघचं करन निर्मळ/निर्गमं ।
अवघच निरसुन उभा राहीन । निशःकलंकी अवतार ॥१५॥
भजने :- ॥ भुलले संत महंत । आथर्वन वेदाची पडली भ्रांत ॥
॥ संत महंत झाले । भिक्षा मागुन याहीनं पेव भरले ॥
॥ भिक्षा मागुन भरले पेव । याहीला कशाचा घडन देव ॥
॥ संत महंत मिळाले । ध्यानी आणले या अथर्वन् वेदाले ॥
॥ अथर्वन् वेदाची गाही । जागी करन महाराजा पृथवी ॥

॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ निरसनसह संत पुरीचे संत मिळाले ॥

**-: शब्दार्थ/चरणार्थ निरसन/स्पष्टीकरन :-**

काय तरी केलं याहीनं :-

जे सर्वसामान्यांना समजले नाही असे काहीतरीच करून ठेवले. भक्तांना पाया पडायचे शिकविले परंतु कुणाच्या ? भक्तांना देणं दिले परंतु कुणांच्याव्दारे ? स्वतःच्याच देहीची पुजा करून घेणे, मानसन्मान सत्कार घेणे ईत्यादी घेणा-यांच्या पाठीशी उभा कोण होता ?

देण देणारा, पाठीशी उभा राहणारा । त्यांच्या बोलावर उभा राहणारा, तो चौथा ! या चौथ्याच्या देणं व्दारे स्वतःचेच भक्त बनवत जात स्वतः ची मानसन्मान पुजाअर्चना महीमा करून घेतली. परंतु ज्याच्या भरवश्यावर बनले त्या चौथ्याचे ग्यान सर्वसामान्यांना दिले नाही. भलतेसलतेच घेत भिक्षा मागुण पेव भरले. असेच भलतेसलतेच देणं-घेणं करत काय केले याहीन ? मायेचे लांछन लावुन शेवटी उठुन पळाले. १३ दिवस जयजयकार झाला व १४ व्या दिवशी दुसरा आला ! असेच आजवरी होत होत गेले. अगाध पोथी, पुराण गीता, भागवती वाचत पढत आजवरी असेच होत आले आहे.

मुळ स्तभांवर, गाही वाटली । तिथतरी जावुन पाहयं :-

हे अवघच निरसुन आता उभा राहीन तो धनी निरंजन । या चौथ्याची गाही तिरगुणांवर बोलन करत करत, त्या कार्तिकेय लिहुन ठेवलेल्या सहा शास्त्र ग्रंथ लिखीत असलेल्या पंचम पुराण मुळस्तंभात दिलेली आहे. ते मुळस्तंभ तिन देवांचे म्हणजेच तिर पतीचं बोलन करता करता, अंती आम्हा ते सांगे की : तिरगुणांचे, तिन पदर । शुन्य उडवन चैत्यन्यं... । चवशुन्यावर करून बोलनं । उभा राहीन तो चौथा खुम्म ।

आमचेच आम्हा तरी ते मुळस्तंभ अध्याय१७/श्लोक ३५ ते ५६ व्दारे सांगे तरी काय की :

या कलयवगाच्या अंती । धर्म स्थापावया श्रीपती । धरील कलंकी अवतार । अठरा हात लांबी खडंग धरील ।.... ते सित खडंग घेवुनी । **राउळा पुठां** ऐसा कलयवगी घोडा उभा करेल तो नारायण । मग तो सुलग्ने खांडे प्रक्षळतील । तै सर्व जनांशी आकांत होईल । मग पल्लवछत्रे निघतील । ते समयी । .....ऐसा प्रलय होईन । मग **राउळा चालतीन** ।..तेथे **अवधुत विर** मार/बहुसंख्येने होतील । आणी व्दादश **सुर्य** तपतील । सर्व बिज घालील । अवतारी जाण ।......तो चौथा खुम्म ।..सर्व बिज एकवटेल । आपण सर्वेश्वर । कलंकीरूपी अवतार । तोच एकला ईश्वर । उरेल जाण । मग तो श्रीपरमेश्वरू । एकलाच निराकारू । ज्याशी नाम सर्वेश्वरू । तो ऐकला एक । सर्व त्या माजी उपजणे । जाण देवी । जैसे भुमीस पेरीजे बीज । सर्वांशी तो शेंडा दावी निज । मग ते एकवटिजे सहज । पिकले म्हणुनी । तैसे सर्व त्या पासुनी जाहले । अनंतयुगे विस्तारले । मग तेच उरले एकले एक अनंतयुगी ॥

....मुळस्तंभ/अध्याय१७/श्लोक ३५ ते ५६
मधील संदर्भासाठी घेतलेला काही भाग

चवशुन्यावर, करता बोलनं । उभाराहीन चौथा खुम्म :-

**चवशुन्य**:- अधीक ज्ञानासाठी कायाज्ञान खंडात दिलेला मुळस्तंभिचा पाया ओवीत दिलेल्या चकडिटेल-००१ फोटो वर दिलेले ग्यान घ्या ।

१. **अधःशुन्य** :- पिंडीत गुद्स्थानी गणेशदेवता व लिंगस्थानी ब्रम्हा सह कमरेखालचा पाताळाचा प्रदेशावर

२. **मध्यशुन्य** :- पिंडीत नाभीस्थानी विष्णुदेवता व भवसागर प्रदेशावर

३. **उर्ध्वशुन्य** :- भृकुटीमध्यावर त्रिकुट शिखरी ।

४. **चतुर्थशुन्य म्हणजेच शुध्दशुन्य** :- टाळुस्थानी

॥ या चौशुन्यावर करता बोलने । पहावं चौशुन्याच्या पलीकडे ।
या चौशुन्याच्या पलीकडे । निर्गुण स्वरूप आहे वेगळे ॥

**५. या चौशुन्यावर उभे पाचवे शुन्य निर्रशुन्य ।**
**कदा नाश नाही येथं । हे अविनाशी जाण ॥**




॥ पाचवे शुन्य ॥
॥ बिंदुस्थानी जीवहंस केवळ ॥




टाळुस्थित बिंदुस्थानावर निरशुन्य आहे. या निरशुन्यावर उभा तो निरंजन । या निरशुन्यावर या चतुर्पतीचे झळके निशाण । तेथे नाही काया नाही माया । नाही चंद्र नाही सुर्य । नाही रात्रा नाही दिनमान । कोटी सुर्याची शितल लख्ख प्रभा अपरंपार । सोयंम ज्योतीचा हा प्रकाश । ब्रम्ह आणले रुपास । अर्ध्या भागाची ही मांडणी । हे ब्रम्ह आणले रुपाशी । या सर्वात भरून भरले आणीक उरलेले हे उरले अर्ध जाण ज्ञानी ।

॥ झालेसे अवतार, झाले योगी । मुळनाश केला याहीनं....।
नर देहीला, भंग आणला/केला । शेवटी पळाले उठुनं ॥
॥ उठुन पळते, त्याला का धरता ? बाहेर उरला भरुनं...।
उरली देहे, उरली जागा । देहेत या त्याला घेवुनं ॥
॥ उरली देहे, उरली जागा । साहयं करन/होईन नरदेहीचं...।
आथर्वन वेद, चौथा खुम्म । आसन/शासन उडवनं यमाचं ॥ ०८ ॥

आतापर्यतच्या यवगान यवगात कितीतरी तिरगुणी अवतार झाले असेल. कितीतरी योगी झाले असतील. परंतु यांनी केले तरी काय ? मुळयवगाचा देव कोण ? मुळयवगी होत काय ? यांचे ग्यान भक्ती जनास न देता स्वतःचीच महती महीमा वाढवण्याचे काम याहीने केले.

मुळयवगाचे जे चतुर्पता ग्यान होते त्या ग्यानाला पडीत टाकुन, तिरगुणी ग्यानाचा प्याला जनास पाजुन मुळयवगाच्या चतुर्पता ग्यानाचा नाश करत मुळनाश केला हो याहीनं ! आणी नरदेहीचा भंग करून शेवटी या जगातुन उठुन पळाले. असे जे उठुन पळतात त्याला काहो धरून तुम्ही भजतात ?

भजाचे असेल तर जो अंर्तःबाहयं भरून भरला आणीक उरलेला आहे त्या निरंजन धन्याला भजा हो । जिथे निरंजन आत्मा जावुन फक्त देहच उरला त्या देह पडलेल्या त्या देहाची उरली जागा च्या ठायी जावे. जो भरून भरला आणीक उरला निरंजन परमात्मा आहे त्याला आपल्या देहेत सच्च्या भक्ती भाव च्या चतुर्पती मार्गाने घेवुन या । तो निरंजन च या नरदेहीचे साहय करन. तो चौथ्या खुम्मी उभा असलेला पिंडी या ब्रम्हांडाचा निराकार निरंजन धनी हा चौथ्या खुम्मी उभ्या असलेल्या चतुर्पती अथर्वन् वेद चे ग्यान देवुन आसन उडवन हो यमाचं ।

यम खडीचं घेते, पडीचं घेते । पड-पाताळ, होय त्या यमाचं..



यम आपला फास खडीच्या देहीवर म्हणजेच ठणठणीत उभा/खडा असलेल्या देहीवर टाकतो. किंवा पडीच्या देहीवर म्हणजेच क्षतीग्रस्त झालेल्या देहीवर टाकतो. अश्या रितीने यमाचा फास हा खडीच्याही देहीवर पडतो व पडीच्याही देहीवर पडतो. यम आपला फासा टाकण्यास देहनिवड करण्यासाठी खडीचही देह घेतो व पडीचही देह घेतो. परंतु त्या देहीच्या तिरलोक्यावर त्या निरंजन धनी अवतार चा झेंडा आहे. आणी तो चौथा निरंजन धनी त्या यमाचाच मालक असल्यामुळे तो यम त्याच्या हुजुरचा/मालकाचा झेडा स्वतःहुन खाली पाडत नाही. म्हणुनच जेव्हा त्या देहीचे पाताळ जमीनीवर संमातर होवुन पडते, तेव्हाच त्या देहीचा जीव नेण्याचा अधिकार त्याला प्राप्त होतो. देहीचे पाताळ खाली जमीनीवर समांतर टाकल्यावर यमास जीव नेण्यास अधिकार प्राप्त होते. असे जुने जाणकार मानतात. म्हणुनच पडलेले पाताळ म्हणजेच पड पाताळ होय त्या यमाचे असे म्हटले आहे.

नर देहीच्या तिनही ताळावर त्या निरंजन मालकाचाच झेंडा आहे. हा झेंडा उखडण्याचे सामर्थ यमामध्ये नाही. कारण की : तो यमच त्या पिंडी या ब्रम्हाडाच्या निंरंजन मालकाचा/हुजुरचा चाकर होय. हुजुरच्या आज्ञेशिवाय तो काहीही करू शकत नाही.

हुजुरका तो, चाकर बेटा । अक्षय चिरंजीव हुजुरचा...।

बेटा । यम हा त्या चौथ्या निश्कलंकी निरंजन मालकाचा/हुजुरचा चाकर असल्यामुळे, जरी त्या यमाचे काम आत्माला नेणे असले तरी तो यम आपल्या मालकाच्या हुकुमाबाहेर जात नाही. कारण आत्मा हा त्या यमाच्या मालकाचा म्हणजेच निरंजन आदीपुरूषाचा तेजोगुणी अंश अवतार असल्यामुळे, तो आत्मा त्या निरंजनाचा अविनाशी, अमर, क्षय न पावणारा अक्षयी चिरंजीव आहे. अवघ्या गोडाहुन गोड असे हे आत्मे त्या मालकाचे लावणीचे झाडे आहेत. मालकाच्या चिरंजीवालाच न्यावयाचे असल्यामुळे मालकाची परवानगी त्या यमाला घ्यावीच लागते । कारण हुजुरचा होय तो यम चाकर । बेटा । तुझा आत्मा अक्षयी चिरंजीव होय त्या हुजुरचा । म्हणुनच या पिडीच्या तिरलौक्यासह ब्रम्हाडांचे अवघच तिरलोक याहीला शरण येते.

इंद्रपुरी, । इंद्रसभा होय कोणाची ?...

देहपीडाच्या सर्व शक्तीयॉ व देवतां सह सर्वावर राज्य करणारा पिंडीचा राजा हा आत्मा असल्यामुळे, या देह पिंडीचे इंद्रपद आत्म्याजवळ आहे. म्हणुनच देहपिंडीचा इंद्रराजा म्हणजे त्या पिंडीचा आत्मा । तर ब्रम्हांडाच्या सर्व शक्तीयॉ व देवतां सह सर्वावर राज्य करणारा राजा हा परमात्मा असल्यामुळे ब्रम्हांडात

परमात्म्या जवळ इंद्रपद आहे. अनंत ब्रम्हांडाचा आत्मा म्हणजे परमात्मा । म्हणुनच अनंत ब्रम्हांडाचे इंद्रराजा म्हणजेच परमात्मा । हा जगाचा इद्र म्हणजेच चौथा परमात्मा कलंकी अवतार घेवुन स्वधर्माची स्थापना करेल. त्याच्या या स्थापनेत सहभागी होण्यासाठी जो या कलीत इद्रिये जिंकुन आपल्या इंद्राच्या म्हणजेच आत्म्याच्या स्वाधीन करून आपल्या आत्म्याला या देहीचा सरदार बनवेल, तोच त्या भैसाच्या मांडणीत सहभागी होईल । भवबंधनातुन तरून जाईल. परमयपदा, मोक्षपदा जाईल.

हे सर्व आत्मे त्या एकल्या आदीपुरूषाचेच अंश अवतार असल्यामुळे प्रतेक पिंडी या ब्रम्हांडातील इंद्रपुरी त्या चौथ्या निरंजन परम्याचीच होय.
चतुर्पता अथर्वन् वेद सुध्दा त्या चतुर्पती धन्याचा होय. त्या सर्वत्राचेच हे सर्वकाही होय । हे जाण ज्ञानी । जाणते ऋषि मुनी जपी तपी याला जाणुन सर्वपरी शरण आले आहे. म्हणुनच आता या देहीच्या तिरलोक्याला निद्रा न देता रात्रं न दिवस भजा हा लभेद म्हणजेच निर्मळ निश्कलंकी राजा ! हा राजाच चुकवन तुमची जित्या जन्मासह मेल्या मागची चौ-यांशी । म्हणुनच ओवीचे हे चरण दवंडी देवुन सांगते की : ॥ आथर्वन् वेद, इंद्र पुरी । निद्रा नसे हो तिरलोकी...। रात्रं न दिवस, लभेद भजो । तो चुकवण चौ-यांशी ॥ १२ ॥

खडीचही उठवां, पडीचही उठवां । मोक्ष सिदाई उठनं...
बेटा । तुझा आत्मा त्या हुजुरचा अक्षयी चिरंजीव होय । या आत्म्याला जन्म नाही मरण नाही. तो अक्षय चिरंजीव आहे. म्हणुनच स्वतःला श्रेष्ठ जाणुन उच्चत्तर अशी बुध्दि ठेवुन, त्या बुध्दिच्या हाताखालील मनाला संयमित करून या संयमीत मनाव्दारे आपले ईद्रिये यांना ताब्यात घेवुन राहत जावे. जो कोणी समाजात पडलेले जनलोक आहेत त्यां पडीता जनांना सदैव हात देवुन उभे करत जावे. तर जे उभे होते परंतु काही भाग्यातील संकटे आरीष्टे रोग विघ्ने ईत्यादी मुळे पिडुन खाली बसलेले आहेत, त्यांना सुध्दा तुमच्या मदतीचा हात देवुन उठवा ! तसेच जे उभे आहेत परंतु त्यांचे उडण्याची ताकत कमी झालेली आहे, त्यांना सुध्दा उडण्याची ताकत देण्यासाठी प्रयत्नरत होवुन त्यांना उडण्यासाठी साहयं करा. पडीतांना आपला हात देवुन सतत उभे करण्याचा प्रयत्न करत जगा । जे अंधकारात आहे त्यांना प्रकाश लाभण्यासाठी प्रयत्नरत् व्हावे. ज्यांनी खुप काही पाहीलेले आहे परंतु जे पाहीले आहे ते बाहेरची रूपरेखाच पाहीली आहे, अश्यांना अंदरचे अंतर्गत सत्य दाखवण्यास, त्यांची चौथी तुर्याअवस्था प्रकाशीत करण्यासाठी चौथ्या चतुर्पता मार्गि आणण्यास प्रयत्नरत् व्हावे । पहा मग चौथा खुम्म उभा राहुन मोक्ष सिदाई कशी नाही उठणार ? तुम्ही अश्या रितीने निष्काम परोपकारी भावनेने खडीचही उठवा व पडीचही उठवा । मग मोक्ष सिदाई उठनच । तिला उठणे भाग आहे. ही मोक्ष सिदाई उठल्यानंतर या नरदेहीतुन जीव नाही जाणार । सत्य चालन शकुन । जे जे बोलान ते ते होईन या भुम्मेवर । सत्य येईन अहीन खुम्मी......हे निश्चित जाणा असे हे चरण गर्जुन सांगी करते की : सत्य येईन तुमच्या अहीन आत्म्या आंगी ! आणी मग तो निरंजन निश्कलंकी अहीन आत्माराम हा अवघच ग्यान ध्यान निरसुन टाकत चतुर्पती चे निरंजन ग्यानाने देह प्रकाशुन टाकनं. आणी तो निरंजन आत्मा चतुर्पतीच्या परोपरीच्या पाय-या चढत जात परी उभ्या असलेल्या आपल्या मुळघरी परमात्म्या धन्या चरणी लीन होईन.

॥ सत्य येईन, अहिन खुम्मी । अवघचं करन निर्मळ/निर्गमं ...।
अवघच शुन्य, निरसुन टाकन । निशंःकलंकी अवतार ।।१७।।

**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०२ ॥

॥ ओवी नं. ४० ॥

॥ मुळावरची जुनी ओवी ॥

## ॥ वस्तु खासी होय या रायाची ॥

॥ वस्तु खासी होय रायाची । काहीनाही भंगणार जराभर ॥ घृ ॥
॥ ऐका गोळकाचं खरं । नाशीक वस्ती देहीवर ।
नजरी नाही दिसणार जराभर । गुणं रूप येईन देहीवरं ।
॥ चौ येशीचं एकच घरं । येशीवर उभाआहे येशकर
मायच्या पोटी जीव येतो । नाही खबरं...॥
॥ बम्हा विष्णु तिरनयनं । करतीन मोजब्याचे काम ।
मोजब्यात नाही आपनं ॥
॥ तुम्ही पुंजता पाषाणाचे देव । त्यात नाही आहे जीवं ।
भेटनं या कुडीत, कुडीतला शिवं ॥ ०४ ॥
॥ पिसे झालो भैस नामी । आमच काय करन कोणी ?
भैस होय सबदेहेचा धनी ॥
॥ जे जायचे ते गेले । जावुन भाजुन आणन सारे ।
अंबर करन देह पिंडाले ॥ ०६ ॥

**भजने** :- ॥ अंबर करा नरदेही । महाराजा महीमा आहे गा तुही ॥
॥ अमर पदाची वासना/वाणी । पुरवा पुरवा महाराजा निर्वाणा/चक्रपाणी ॥

**शब्दार्थ** :- **वस्तु** :- अविनाशी केवळ आत्मा, निरंजन आत्मा या निरंजन धन्याची/रायाची वस्तु ही खासी आहे. ही वस्तु भगंणार नाही जराभर कारण की : या वस्तुस जन्म-मृत्यु नसुन ही अविनाशी वस्तु अहीन अजात आहे. । **नाशीक वस्ती** :- सत रज तम गुण व त्यांचे राजे यांची या देहीचा राजा निरंजनाची वस्तु असलेल्या राहुटी करून राहणा-या राहुच्या वस्तीत राहुन बम्हा विष्णु शंकर मोजब्याचे काम करत राहतात. ही तिन देवांच्या तिरकुटांची वस्ती नाशीवंत आहे । **चौयेशीच एकच घर** :- स्थुल सुक्ष्म कारण व महाकारण ऐसे चार देहाच्या वेशीच हे एकच देहघर ।
**पिसे**:- वेडा भक्तीभाव



॥ ओवी नं. ४१ ॥

॥ मुळावरची जुनी ओवी ॥

## ॥ आकाश वाणी बोले धनी ॥

॥ आकाशवाणी... बोले धनी हो, चवथा खुम्म निर्वाण ॥ घृ ॥
॥ दोहीत मोडा बा लवकरी । येवुन नांदा भुम्मेवरी ।
चुकवा चौ-यांशीची फेरी ॥
॥ यवग गेले मोघमं । नाही पाहीला चौथा खुम्म ।
सावळ्या नंद ये धावुनं ॥
॥ गिरजा देह, जीव अंबर । लवकर ये बा सारंगधरं ।
अवध्या देहा करा अंबर ॥
॥ निरंजनी, भेटी देता । मुजरा आहे हो, अवद्युता ।
चुकवा यमपुरीच्या वाटा ॥ ०४ ॥

**भजने** :- ॥ हा होय चवथा खुम्म । धनीदेव उभा आहे निर्वाणं ॥
॥ चवथा खुम्म आहे जागृत । आकाशवाणी गर्जला हा द्युत ॥
॥ आकाश वाणी गरजला । बिर्दासाठी देव धावुन आला ।
॥ आकाश वाणी गरजला । आपल्या बिर्दावर निर्वाण/देव उभा राहीला ।
॥ निर्वाणाची ज्योत उभी राहली सोहंम् । या ज्योतीन अवघी मदत, केली पुर्ण ।
॥ ज्योत भली हो, ज्योत भली, उभी आहे ताळातं । ज्योतीचा अवतार कृष्णदेव, उभे सावंग्यातं ॥ ॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. ४२ ॥
॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ मोडनं जुन ॥

॥ मोडणं जुनं । जुन्याचा ऋषिश्वरा ।
गेल्या वस्तु/वस्त्या देव । आणुन, देईन घरां ॥ घृ ॥
॥ पहीला ऋषि । होय गा निर्गुण ।
त्यापासुन दुसरा । झाला सगुणं ॥
॥ तिसरा ऋषि होय । पंच मुखी ब्रम्हा ।
कलयवगी तो जाईन । पाताळ भुवनां ॥
॥ चवथा ऋषि । दशअवतारी विष्णु ।
कलयवगी त्यावरी । शिक्का हाणु ॥ ०४ ॥

॥ पाचवा ऋषि । जटाधारी शंकर ।
कलयवगी तोही, वा-यानं डोलन ।
॥ सहावा ऋषि । होय बा दत्तात्रयं ।
कलयवगी तोही, याहीला शरण येईनं ॥
॥ सहा ऋषि पासुन । हे झाले सहा दर्शनं ।
कल/सत् यवगी याहीला । देव म्हणनं कोण ? ॥
॥ सहा ऋषि पासुन । अडुसष्ट ऋषि झाले ।
तेही शरण गेले । या ऋषिश्वराले ॥ ०८ ॥

॥ अडुसष्ट ऋषि पासुन । अठ्ठयांशी सहस्त्र झाले ।
कल यवगी तेही । गिरी कपाटी लपले ॥
॥ अठ्ठयांशी सहस्त्र ऋषि । विनवीते या ऋषिश्वराले ।
मोडा कली देवा । बाहेर काढा आम्हालें ॥ १० ॥

डहाकी :- ॥ सहा दर्शन जोग मोडन । मांडण निर्वाळ ।
पंथाच्या पाळणुका पाळनं, येईन अवघ्याला ॥

भजने :-- ॥ कल यवगी तुझे नाम । सांगतलं आहे ।
ऋषि-मुनी योगी-जोगी । तुयी, वाट पाहे ॥
॥ हरी हरी कृष्णा । तुयी वाट कुठवर पाहु ?
या पाषाणाला देवपुजां । कुठवर देवु ? ॥
॥ जप तप अनुष्ठान । अवघे गेले वाया ।
शरण आलो आम्ही देवा तुमच्या पाया । लज्जाराखा अवधुत राया
॥ खेत्री बाहेर निघालां । यवगाचा रमणा हो, हाती घेतलां ॥
॥ खेत्री शुर विर भगवानं । या गोपाळ साठी ये बाप्पा धावुन ॥

-: शब्दार्थ :-

**जुन्याचा ऋषिश्वर** :- सर्वत्र आकार करून आकारलेला, जीव शिव शक्तीचा निर्माण कर्ता एकला एक आपरूप आदीपुरूष आहे. तोच एकला सर्वात आधीचा सर्वात जुनाट पुरूष असुन सर्व जुन्यां ऋषिंजनांचा धनीदेव ऋषिश्वर आहे !

**अठ्ठयांशी सहस्त्र ऋषि** :- गोत्रऋषी पासुन झाले ८८ सहस्त्र । ते १८ पगड जातीस व्याले । मग ते जाहले पर्वत....श्रीमुळस्तंभ अध्याय १३ मधुन ८८ सहस्त्र ऋषीचे नावे व त्यांचे गोत्र जाती व वशांवळ यांचे ग्यान घ्यावे.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. ४३ ॥
॥ मुळावरची ओवी ॥

# ॥ हिशोब करून कजबा उजाड ॥

या ओवीची पलट ओवी खंड०७/ओवी-३७ मध्ये दिलेली आहे.

वरचरणे :-

॥ यवगाची केली गाडी । ब्रम्हा विष्णु बैल दोन ।
सानीध्य तिसरा तिरनयन । गाडीचा धुरकरी, तुम्ही दयाहो सांगुन ॥
॥ आकाशी चंद्र सुर्य काशी । धरणी वर येतीन ।
खांबाशी बांधल्या जातीन । मार त्याला बासाचा देतीनं ॥
॥ हिशोब/कसब करून, कजबा उजाडं । हे रीत, बरी नाही ।
हे रीत बरी, नाही येवुन । नांद माझ्या देही ॥
॥ भरभर भरभर, वायु भरले । तीन ही ताळं ।
स्वर्ग मिर्त, पाताळ हा होय । धन्याचा खेळं ॥
॥ धरतरीची, केली आरती । चंद्र-सुर्याच्या ज्योती ।
पती ओवाळ, गेली । उभी, कैश्यावर होती ? ॥
॥ पाताळी पाहु का आकाशी ? सुर्त लिंग ओळखा ।
उभी कैश्यावर राहु । या कैलास नायका ॥ ०४ ॥
॥ भरून भरला आणीक उरला । जग व्यापक झाला ।
तुमची कळसुत्र कळा । कळेना कोणाला ॥
॥ भरून भरला आणीक उरला । अंत नाही कळला ।
देहे उरलीची जागा साहयं । कराले आला ॥
॥ मेळुवर मेळु, रंचले मंडयान । ओवाळ गेली पती ।
ओवाळ गेली पती उभी । तारू धरून होती ॥
॥ आकाश धरणी पवन पाणी । उभ केलं मंडयानं ।
या देहीचा तारू उभा । तो निरंजनं ॥ ०७ ॥

**भजने** :- ॥ तारू उभा देहीचा । संभाळ करन, तो अवध्या जनांचा/देहे-जीवांचा
॥ अवद्युत उभा भक्तीला तारू । मुखानं आवाज केला/करा सुरू ॥
॥ अवधुत आले भुम्माकारणं । घरोघरी होईन नाम सुमरन । होईन नाम सुमरन
॥ कजबा वस्ती करन आदीपुरूष । होईन अचंबा, प्रकाशन ज्योत ॥
॥ कजबा वस्ती करन आदीपुरूष । होईन अचंबा, जगा होईन कौतुक ॥
॥ उभा राहयं कजब्याच्या मालका । कजबा वस्ती कर बापा ।
देहजीव नांदव बा आता ॥

-: निरसनसह शब्दार्थ :-

**धरतरीची केली आरती** :- देहीच्या *// नव खंडाच्या नव उजाळल्या ज्योती । या नव्या दिव्यानं केली हो आरती //०२/४८,०५/७२* । **चंद्र-सुर्याच्या ज्योती** :- चंद-सुर्य हे नयन । कोण दिले कोणं आणले कोणाचे होय ? या चंद्राच्या सोळा कलाच्या सोळा ज्योती आणी सुर्याच्या बारा कळा च्या बारा ज्योती या बारा जरी सोळा एका दांडावर आणुन या ज्योती उजळल्या हो कृष्णानं ०२/०६ ! आणी हा कृष्णा मुळयवगाच्या उठलेल्या *'चौथा शिक्का दिला तिरनयन'०१/०२/०१* या आवाजाचा शकुन साधण्याकरीता आपल्या गिरजा देहीला शक्तीच्या हवाला करून, देहीचा तारू असलेला देहीचा पती निराकार निराधार निरंजन धनी ला ओवाळ निराकार निराधार निरंजन केवळ बनुन गेला ! आता याहीला पाताळी पाहु का आकाशी ? याहीचे सुर्त लिंग कसे ओळखु ? हा तर भरून भरला आणीक उरला, जगव्यापक झाला, याहीचा अंत नाही कळला । याची कळसुत्र कळा कळेना कोणाला ! ज्या जागेवर त्याचा गिरजा देह उरला त्या देह उरीच्या जागेवर तो कृष्णधनी नित साहय कराले आला/उभा राहीला.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. ४४ ॥
॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

## ॥ पाचही तत्वे दयाहो मजला ॥

॥ देह निर्गुणा ! या देहीला । पाचही, तत्वं दयाहो मजला ॥ धृ ॥

॥ पाचही तत्वांचे काम । गायन करतो तिरभवनं ।
पाचही तत्वं देहीला देणं । होईन या,
नरदेही कारण ॥
॥ पाचही तत्वं निरंजनी । जम्मा होईन अवघी पृथ्वी ।
सारी नविन होईन धरणी । तेव्हा मग,
मरणार नाही बा कोणी ॥
॥ मौतं मरण देहीवर । येणं-जाणं एकच घरं ।
उरला देहीच्या बाहेर । याहीच्या,
अखत्यारी संसार ॥
॥ अखत्यारी राहुन/आकार करून आकारला । उरल्या कधी येशील भेटीला
अनामत यवगी भरून उरला । याहीचा,
अंत नाही कळला ॥ ०४ ॥

॥ आदीपुरूष आदीरूप । निशंःकलंकी उभी ही ज्योत ।
निगुर्ण पुरी पुंजन खासा । या धन्याला,
स्वर्गी जोडु हातं ॥ ०५ ॥

**भजने :-**
॥ हात मी स्वर्गाला जोडीतो । मिर्त लोकी धनी अवद्युत भजतो ॥
॥ हात मी स्वर्गाला जोडीतो । मिर्त लोकी कृष्ण अवद्युत पुंजतो ॥

## ॥ निरसनसह पाचही तत्व दयाहो मजला ॥

-: निरसन/स्पष्टीकरन :-

॥ देह निर्गुणा । या देहीला । पाचही तत्व दयाहो मजला ॥ धृ ॥

हे निरंजना ! देहे निर्गुणा ! आत्मारामा ! हे निर्गुण निराकार आदीपुरूष परमात्मा । तुमच्या आंगचाच तुमचाच तेजोगुणी अंश असलेला या देहीचा निर्गुण निराकार आत्मपुरूष असलेला आत्मा आहे. हा तुझाच अंश असल्यामुळे तुमच्या प्रमाणेच हा सुध्दा शक्तीसंप्पन्न व देण देण्यास समर्थ आहे. म्हणुनच या देहीच्या या निर्गुण आत्म्यास म्हणजेच या देह निर्गुणास आता विनंती अर्ज करतो की :

हे देह निर्गुणा । ही देहधरणी तुझीच आहे. तुच या देहधरणी चा राजा आहे. तुच या देह भुम्मेचा इंद्र आहेस. तु या देहधरणीचा राजा असुनही या देहधरणीवरचे पाचही तत्वे पुर्णपणे प्रकाशीत नाही. देहीत चौदा चौक्या तुच आणुन का पाडली अंधारी ? तुमच्या राज्यात का अंधार आहे ? म्हणुनच तुला विनंतीपुर्वक अर्ज करतो की : आता या देहीला दिलेले पाचही तत्वे पुर्ण प्रकाशीत करून देह संपुर्ण प्रकाशीत व शक्तीसंपंन्न आणी मजबुत करून दयावे. हा देहपिंड मजबुत बनवुन मजबुतीने धन्याच्या या चतुर्पती नामाची टाळी वाजवण्यासाठी, तसेच धन्याचेच ग्यान-भक्ती, नाम-सुमरन करण्यासाठी या धन्याचा तेजोगुणी अवतार असलेल्या तुलाच विनवितो की :

या चतुर्पतीच्याच कारणां करीता तुझे चैत्यन्यमय सर्वगुण व सर्वशक्तीने देहीचे पाचही तत्वे तुमच्या चैतन्याच्या पुरवा भर भरून देत आता तुझे देणं दया हो !

**आकाश तत्व दयाहो मजला ।**
देह निगुर्णा निरंजना !

- ○ या आकाश तत्वांचे गुण असलेला जो कान/श्रोत आहे, तुम्ही त्यात अखंडपणे भरभरून चैतन्य ओतुन, अखंडपणे परमात्मा प्राप्तीच्या अंतीम लक्ष्यापर्यत चतुर्पती चे नाम व हरीभक्तीच्या गुंज-गोष्टी व सर्व तत्वांचे मुळ असलेला अनाहत् नाद ऐकण्याची ताकत या देहीला दयाहो.
- या आकाशाचे जे अंतःकरण आहे, ते अंतंःकरण शुध्द व निर्मळ करण्याचे साहय करत त्यात निरंजन धन्या प्रित्यर्थ ग्यान भक्ती-भाव भरण्याचे साहयं करत, तुझे सर्व गुण शक्ती भरून तुझे चैत्यन्य अखंडपणे भरपुर भरून या देहीला ग्यान-भक्ती भाव अखंडपणे वाहु दयाहो.
- जसे आकाशात अनेक ढग येवुनही आकाश अचल व निर्विकार राहते तसेच या जीवनात अनेक विकारी ढग आल्यावर त्या विकारापांसुन निर्विकार राहण्याचा गुण दयाहो आता !
- आकाश जसे सर्वव्यापक, सर्वगुणांतीत, सर्वसाक्षीभुत, शाश्वत, चिरंतर असुन विविध देह-घटी अंतरी राहुनही सर्वत्र एकच आहे, तसेच सर्व व्यापक तिगुणाच्या पलीकडे नेवुन त्रिगुणांतीत होण्याचे देणं तसेच सर्वत्र समानता पुर्वक व्यापुन दृष्टी राहण्याचे देणं । शाश्वत चिरंतर राहण्याचे आकाश तत्वाच्या गुणांचे देण दयावे.. हीच अर्ज
- आकाश तत्वांचे गुण
- काया ची तृष्णाव क्षुधा कमी असने.
- आकाशाप्रमाणे हलकी-फुलकी, स्फुर्तिदायक काया राहणे.
- गोड व प्रेमळ वाणी होणे.
- सर्वान्तर्यामी, दयाळु असने. इत्यादी सर्व गुण या देहीला दयाहो.

तसेच नित नाम सुमरण व्दारे उत्पन्न झालेला अनाहत् नाद अखंडपणे ऐकण्याची शक्ती, दुरश्रवण, दुरदर्शन, दुरगमन करण्याची शक्ती ईत्यादी आकाश तत्वांचे शुध्दसत्व गुणी शक्तींयाॅ चतुर्पती प्राप्तीच्या अंतीम लक्ष्यापर्यत दयाहो. कारण की : तु या सर्वांचे कारण आहे. निरंजना ! तुच सर्व गुणांने भरून भरला आहे. आता तुझे ते सर्व गुण भर सव्र्या देही !

**वायु तत्व दयाहो मजला ।**
हे देह निर्गुणा, निरंजना !

- या वायु तत्वांचे गुण जे त्वचा, स्पर्श, मन संकल्प-विकल्प आहे, त्यात तु सर्व गुणांसह भरून, तुझे चैतन्याचा अखंडपणे पुरवा चतुर्पती धनी प्राप्तीच्या अंतीम लक्ष्यापर्यत देत राहयं ।
- या वायुतत्व गुणानी बनलेली जी त्वचा आहे, तिच्या रोम-रोमात छिद्रा-छिद्रात धन्याचे ग्यान-भक्ती नाम सुमरन भिनवण्याकरीता, या त्वचेत भरूपुर चैतन्य सह तुझे सर्वगुण चा पुरवा ओतुन ही त्वचा कांतीमय, तेजोमय आराची बनव गा आता ।
- या वायुचे जे मन आहे, त्या मनातील सर्व विकार बाहेर काढण्यास साहयं करा. मनाला निश्कलंकी बनवण्यास साहयं करत त्या मनात चतुर्पती प्राप्तीचा संकल्प, निर्धार, धैय व ध्यास राहण्यासाठी, तसेच

या मनाला पक्के बांधुन धन्या चरणी अर्पण करण्यासाठी या मनात भरभरून चैतन्य ओतुन त्यात धन्याची प्राप्ती करने हा एकच ध्यास राहु दे आता

- या वायुचा जो स्पर्श आहे, त्याला धन्याच्या पायाची धन्याच्या स्पर्शाची आवड व ध्यास नित राहु दे. चतुर्पतीच्या पायाचा स्पर्श या देहधरणीस लागुन ही संपुर्ण देहधरणी प्रकाशीत होवो. याकरीता नित साहय करावे आता ।

- हे देह निर्गुणा आत्म निरंजना । तुझा व वायुचा जो
  - अलिप्त राहण्याचा गुण.
  - कुणाशीही आसक्त न होता, गुण दोष न घेता निर्दोष राहण्याचा गुण
  - गंध आश्रय घेवुनही त्या गंधापासुन वेगळा/निराळा राहण्याचा गुण
  - न थांबता वेग घेण्याचा गुण
  - उसाच्या चिपाडात जावुनही चिपाडाची खाज अंगाला लागु न देण्याचा गुण...ईत्यादी सह तुझे सर्व वायु तत्वांचे गुण या देहीला दया हो । हीच अखंड अर्ज

याच करीता या वायुतत्वांचे गुण अखंडपणे चतुर्पती प्राप्तीच्या अंतीम लक्ष्यापर्यत दयाहो मजला आता देह निर्गुणा निरंजना ! देहीच्या मालका..

**तेज तत्व दयाहो मजला ।**

देह निर्गुणा निरंजना !

- तेज तत्वागुणानी बनलेली जी बुध्दि आहे, तिच्यात तुझे चैतन्य सह सर्व गुण शक्ती भरभरून ओतुन तिला प्रकाशमान करा. तिला प्रकाशमान करून तिचे रूपांतर कुशाग्रबुध्दि, तेजबुध्दि, मेद्याबुध्दि यात करत, तिच्यात धन्याचे सर्वग्यान व भक्ती भाव भरभरून दे ! यात सर्व ग्यान सह भक्ती-भाव निरंतर ठेवा.
- या तेजाचे जे डोळे आहेत, त्या डोळयां मध्ये धन्याचे रूप पाहण्याची आस ठेव । धन्याच्या भेटीची, धन्याच्या चाहत ची आस नित राहु दे ।

देह निर्गुणा ! आत्म निरंजना !

- तुमच्यात आणी अग्नी यामध्ये सर्वच स्वाहाः केल्यावर सुध्दा तो त्याचा संग्रह न करता पवित्रच राहण्याचा गुण आहे.
- स्वःतेजाने आणी आपल्या प्रकाशाने अंधकार दुर सारण्याचा गुण आहे.
- स्वतः निर्विकार निराकार असुनही काष्ठाच्या संगतीन बाहय डोळयांनी आकारी दिसण्याचा गुण तुम्हात आहे.
- या तेज/अग्नी तत्वांचे गुणाव्दारे ज्योतीदर्शन, स्वरूपदर्शन, ओजसतत्वांचे अवतरण आणी या ओजसतत्वांव्दारे दिव्य वाङःमयीन शक्ती, गायन, वाणी, विद्वत्ता, धृता बुध्दिमत्ता, ज्ञानमय अनुभुती सह ज्ञानतत्वांचे अवतरण...ईत्यादी अग्न तत्वांचे सर्व गुण शक्तियॉं या देहीला जागृत करून देवुन या देहीव्दारे अज्ञानाचा अंधकार दुर होवु दे. या देहीला देहाभिमान व मानसन्मानाची ईच्छा न ठेवता, ही देही निर्मळ निर्विकार निशःकलंकी नित राहु दे. धन्याचे नाम सुमरन भाव भक्ती यामध्ये अखंडतेने वाहु दे. याच करीता ही अर्ज विनविनी.

हे अग्न चे घर असलेल्या देह निर्गुणा ! निरंजना ! याच करीता या तेज/अग्नी तत्वांचे सर्व गुण अखंडपणे चतुर्पती प्राप्तीच्या अंतीम लक्ष्यापर्यत दयाहो.

**आप तत्व दयाहो मजला ।**
हे देह निर्गुणा निरंजना !

- या आपतत्व गुणांनी बनलेली जी जिव्हा म्हणजेच साळु आहे, तीला आपतत्वांचा रस गुण चिकटला आहे. या रस गुणांला जागृत करून या साळुला या चतुर्पती च्या नामरसाई ची जननी बनवुन या देहीला या नामरसाईची नित गोडी राहु दे. या साळु ला धन्याचेच नामोच्चार व धन्याचेच ग्यानाचे बोल सुदंर कातण्यासाठी या साळुला भरभरून चैतन्य दे. ज्या बोलाने धनी डोलु लागेल, ऐसे बोल बोलण्याची शक्ती या देहीच्या साळुला दे. तिच्याव्दारे धन्याचेच ग्यान व नाम भजन सुमरन अखंडपणे करत राहु दे.
- या आपतत्व गुणांचे जे चित्त आहे, ते चित्त चतुर्पती ग्यान सुमरन याच्या चिंतनात ठेव. ते चित्त या चतुर्पती मध्ये स्थिर करून, चतुर्पती धन्याच्या चरणी राहु दे.
- देह निर्गुणा ! आत्म निरंजना !
  - तुमच्यात आणी जलात जसे स्वच्छता निर्मळता गुण आहे तोच गुण या देहीला देवुन या देहीचा स्वभाव आचार विचार निर्मळ करा.
  - तुझे अमृतसमान माधुर्यता चे गुण या देहीला देवुन या देहीच्या मुखातुन माधुर्ययुक्त, कुणालाही दुःख न देणारे, कुणाचाही आत्मा तडपणार नाही असे बोल दे.
  - तुझे सर्वव्यापक पवित्रतेचा गुण या देहीला देवुन या देहीचे चरित्र व पवित्र राखण्याचे बळं दे ।
  - तु जसे ब्रम्हांडातील सर्व सिध्दियॉं चे उत्पत्ती कर्ता आहे. तसेच आध्यात्मीक जलाचराचे जलतत्वें सुध्दा देहीतील सर्व सिध्दियॉं चे जननी आहे. जलतत्वांच्या या सिध्दियॉला तुमची चैतन्यज्योतीची ज्योत मिळवुन या सिध्दियॉं जागृत करून दयावे. याच करिता ही विनवणी अर्ज ।

देह निर्गुणा निरंजना ! याच करीता या आप/जल तत्वांचे सर्व गुण अखंडपणे चतुर्पती प्राप्तीच्या अंतीम लक्ष्यापर्यत दयाहो. देह निर्गुणा निरंजना । भरून गुणा । तु भर गा सर्व्या देही ।

**पृथ्वी तत्व दयाहो मजला ।**
देह निर्गुणा । निरंजना ।

- या पृथ्वी तत्व गुणांनी बनलेले, नाडी, हस्ती, मास,...ईत्यादी सर्व पृथ्वीतत्व गुणांत, या चतुर्पती धन्याच्या नामाचा परमय ठेवुन, तुझे चैतन्य सह सर्वगुण रूप शक्ती भरभरून भरून, भर सर्व्या देही ।
- धरतरी ही माझी माता । या मातेचा सर्वत्र क्षमाशीलता, सहनशीलता, ..ईत्यादी गुण या देहीला देवुन या देहीत सदैव क्षमा व सहनशीलता जागृत राहु दे ।
- ज्याप्रमाने या धरणीमातावर कोणीही कसाही कचरा घाण करतो परंतु ही माता या सर्व कचरा, घाण करणा-यास क्षमा करते त्याप्रमाणे या देहीच्या आंगी क्षमा गुण दे । कारण की : या क्षमेमुळेच शांती येते. आणी शांती आल्यावर आध्यात्मीक प्रगती वेगाने होते. या गरीब धरतरी माताचे दया क्षमा शांती हे गुण या देहीला देवुन या देहीच्या

नजरेत कोणी शत्रु राहणार नाही । अशी व्यवस्था करून ही देही बालकाप्रमाणे निष्पाप, मान-अपमानापासुन दुर, किर्ति-अपकिर्ति च्या पल्याड ठेवा. राग व्देष रहीत ठेवुन, भुक तहान शमवुन एकटाच आनंदाची ज्योत बनुन आनंदात खेळत राहत या देहीच्या हद्यी सारंगधर भर । हीच विनवनी अर्ज ।

देह निर्गुणा ! निरंजना ! हे पाचही तत्वे या स्थुल देहीला कारण आहे. देहीचा आधार आहे. या पाचही तत्वांमुळे देह हा जगाची प्रचिती घेत आपआपले व्यापार करत आहे. पंचमहाभुते व त्यांचे गंध आणी गुणांचे ग्रहण करणारे ईंद्रिये आपआपले व्यापार करत आहेत. या सर्वाचा प्रमुख प्राण आहे. आणी या प्राणांचा उत्पत्तीकर्ता तु आहेस. तु तुझे चैतन्याचा पुरवा या पाचही तत्वांचे सर्व गुण यांना अखंडपणे चतुर्पती प्राप्तीच्या अंतीम लक्ष्यापर्यत दे. सर्व नामरूप गुणांच्या पाढीमागे जे एक तुझे तत्व आहे, ते परातत्व जाणण्याकरीता जीवात्मा व परमात्मा यांची दैवी परातत्वी प्रकृती चे पुर्ण ज्ञान जागृत करून चिन्मय आनंदमय सत्चित्तानंद रूपात नांदत तु या देहीत भरून सर्व गुणा । तु भर सर्व्या देही । या देहीतुन जावुच नये कधी ! असो तुया रूपासुखा ची गाही । ही सदोनित अखंड अरज आहे आता.

॥ पाचही तत्वांचे काम । गायन करतो तिरभवनं ।
पाचही तत्वं देहीला देणं । होईन या, नरदेही कारण ॥

हे देह निगुणा ! हे पाचही तत्वे या देहीत तुमच्या चैतन्यप्रकाशाव्दारेच काम करत आहेत. यांच्या कामाप्रमाणे या देहीच्या तिरभवना व्दारे धन्याचे चतुर्पती गायन ही देही आता करत आहे. या पंचतत्वांच्या काही गुणांच्या कामाप्रमाणे गायन असलेल्या, या चतुर्पतीच्या पंचतत्व गायन कलामुळेच तुमचे भजन पुंजन सुमरन ध्यान व्दारे पाचही तत्वें यांचे देणं या नरदेहीस प्रकाशीत करण्याचे कारण होईन । हे आम्ही तुमच्याच कृपेने जाणतो. अधिक ग्यानासाठी पंचतत्व गायन कला चे परिशिष्ट यातुन ग्यान घ्यावे.

॥ पाचही तत्वं निरंजनी । जम्मा होईन अवघी पृथ्वी ।
सारी नविन होईन धरणी । तेव्हा मग, मरणार नाही बा कोणी ॥

देहीचे पाचही तत्वें या निरंजन धन्याच्या भजन पुजंन नाम सुमरन ध्यानी राहुन, हे पाचतत्वे निरंजन धन्याला अर्पण करत राहील्याने यां निरंजन धन्याच्या कृपेने पंचतत्वांचे गुण प्रकाशीत होवुन ही देहधरणी समोर प्रकाशीत होणार आहे. हे पाचही तत्वे निरंजनी येवुन अवघी देह धरणी निरंजना चरणी जम्मा होणार आहे. त्याचमुळे येथे या चतुर्पतीच्या पंचतत्व गायन प्रणाली व्दारे पाचही तत्वें त्या निरंजनात अर्पण करण्याच्या कियेसाठी ही अवघी देहधरणी चे पाचही तत्वे निरंजनी जम्मा करण्यासाठी गोळा होत आहे. ध्यान लागुन संपुर्ण देहीचे पंचतत्वे मस्तक ब्रम्हाडावरील आकाशमात मध्ये उभ्या असलेल्या निरंजनात एकवटल्या गेल्यामुळे, नामरसाई चा अमृतपान्हा पिवुन ही देहधरणीच नव चैतन्यमय, स्फुर्तिदायक व उल्हासीत होवुन नविन डोळयाची बाहुली होणार आहे. होत आहे. म्हणुनच आम्ही गजर करतो की :

॥ माझया मनात भासते मला । जसा पुणवेचा चद्रंमा ।
माझ दर्शन घडलं मला । धन्य तु नारायणा ॥

असे स्वरूप दर्शन घडलेले ओळखीचे जीव या कृष्ण धन्याला ओळखुन त्यां धन्याच्या ग्यान भक्ती मार्गी लागुन, त्या भजन पुजन ध्यान ग्यान भक्ती मार्गाने त्यांची सारी ही देहधरणी नविन होईन. तेव्हा मग देहीचा निरंजन धनी आत्माराम या देहीतुन जाणार नाही. आपल्या रूपासुखाची गाही देत राहील. तेव्हा मग मरणार नाही त्यांच्या देहधरणीवरील कोणी पेशी ।

कारण की : या देहधरणी वरच्या पेशी सतत मरतात व जन्मत राहतात. मौत मरण होत राहते या पंर्शीचे या देह धरणीवर । मस्तकी उर्ध्व स्वर्गावरून या धरणी वर येणं । या धरणीवरून उर्ध्व स्वर्गावरत जाणं । असे येण-जाण या एकच देहघरी करत राहतात.

॥ मौतं मरण देहीवर । येणं-जाणं एकच घरं ।
उरला देहीच्या बाहेर । तरी याहीच्या, अखत्यारी संसार ॥
॥ अखत्यारी राहुन आकारला । उरल्या कधी येशील भेटीला
अनामत यवगी भरून उरला । तरी याहीचा, अंत नाही कळला॥४॥

मरण हे फक्त चार देहीलाच ग्रासते. परंतु या चार देहीचा धनी असलेला तो चौदेहीच्या बाहेरचा केवळ निरंजन आत्मपुरूष हा चिरंजीव असतो. तो मरतही नाही आणी जन्मतही नाही. या अहीन अजात अमर अश्या निरंजना च्या ठिकाणी जो देह स्थित होतो, अंर्तभुत होतो, तो देह चिरंजीव होतो. अंबर होतो. त्यास या आत्मारामाच्या १६ कला प्राप्त होवुन, त्याचे नामरूप नाहीशे होवुन तोही पुरूष होतो. परंतु जो आत्मज्ञानी होवुन आत्मारामात अंर्तभुत होत नाही, त्याच्या देहीला मौत मरण चिकटुन राहते. त्या देहीला मौत मरण दिलेले आहे. या देहीच्या पेशी जन्मतात आणी मरतात. अश्यारितीने जन्म मरण हे या देहीला आहे. हरएक तपानंतर देहीने नवरूप धारण केलेले असते. परंतु आत्म्याला नाही. आत्मा हा या देहीत येतो आणी देही जिर्ण झाल्यावर अथवा राहण्यायोग्य नसल्यावर या देहीतुन जातो. मुळघरच्या आत्म्याला येण-जाण करण्यासाठी मिर्तलोकी देहीचे एकच घर दिलेले आहे. तो आत्मजीव या देहघरा येतो. राहुटी करून राहतो. आणी अंती वेळ आल्यावर निघुन जातो. हे देहघर त्या आत्मजीवाचे येण-जाण करण्याचे अस्थायी घर होय. या देहीधरी तो येण-जाण करतो. परंतु तो धनी तर या देहीच्या बाहेर वसे. तो धनी या देहीत व देहीच्या बाहेर भरून भरला आणीक उरला आहे. त्या धन्याच्याच तर अखत्यारी हा सर्व संसार आकारलेला आहे. तोच अखत्यारी राहुन सर्वत्र आकारलेला आहे. तो अखत्यारी धनी आकाराच्या बाहेर निघाला तर आकार हा नाश पावतो. तो अनामत योगीच तर सर्व आकाराला भरून भरला आणीक उरला आहे. महा महा योगी, व वेद पुराण यांना त्यांचा अंत कळला नाही आहे. तो उरली देहे उरली जागी उरलेलाच असुन तोच या नरदेहीचे साहय करन ! अथर्वन् वेद इंद्रपुरी यमाचे आसन उडवन ! म्हणुनच त्याला विनवत राहा की : निरंजना ! कधी येशील भेटीला ? या देहीतुन जावुच नको कधी ! असो तुया रूपा सुखाची गाही ! अंबर करा ही नरदेही ! तुम्हा वाचुन माझ नाही कोणी !

॥ आदीपुरूष आदीरूप । निशंःकलंकी उभी ही ज्योत ।
निगुर्ण पुरी पुंजन खासा । या धन्याला, स्वर्गी जोडु हातं ॥०५॥

मुळयवगाचा धनी आदीपुरूष आदीरूप हाच आपला तेजोगुणी अंश अवतार घेवुन प्रतेक देहीत निराकार निराधार निरंजन निश्कलंकी ज्योत स्वरूपात निगुर्ण आत्माराम बनुन उभा आहे. पिंडी या ब्रम्हांडी मध्ये तो एकच धनी निराकार निराधार निश्कलंकी निरंजन निगुर्ण ज्योत स्वरूपात आकाशमात मध्ये उभा आहे. या निंगुर्ण धन्याच्या निगुर्ण आत्माराम चे शुध्द सत्व मनोभाव व्दारे केलेले पुंजन हेच मोक्षपदास नेण्यास समर्थ आहे. म्हणुनच सर्व पुंजनापेक्षा या निगुर्ण आत्मारामाची पुरी असलेल्या चौथ्या निरंजन आदीपुरूष धन्याचे पुंजनच खास आहे. आता या उर्ध्व स्वर्गिच्या आकाशमात मध्ये उभ्या असलेल्या उर्ध्व स्वर्गिच्या निरंजन धन्यालाच हात जोडुन, मिर्तलोकी चतुर्पती कृष्ण अवधुत धन्याचे पुंजन करून तिरलोक पुजा साहीत करू या !

**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. ४७ ॥
॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

## ॥ विटाळाची ओवी ॥

॥ विटाळ चंडाळ । घालुन मुळखंड ।
पायाची अगद । महाराजा ॥
॥ विटाळी हे मुळ । वसवला वाणं ।
विटाळ अवघ्याचं । कुळ गोत्र हो ॥
॥ रक्त या मासाची । बांधुनी हे मुंस ।
यामध्ये हंस । उंच आहे ॥
॥ विटाळी हा मान । विटाळी हा खाण ।
विटाळी हा प्राणं । जन्मलासे ॥
॥ विटाळी हे मुळ । विटाळी हे कुळ ।
विटाळी देहज्योत । प्रकाशली ॥
॥ विटाळी हे ओवळे । विटाळी हे सोवळे ।
विटाळ अवघ्याचे । कुळ स्वामी ॥

भजने :-

॥ आम्ही विटाळाचे हो । तुम्ही विटाळाचे ।
तुम्ही विटाळाचे । दुर दुर नेमता कैसे ? ॥
॥ तुम्ही विटाळाचे हो, आम्ही विटाळाचे । दुर दुर नेमता कैसे ?
विटाळाचा कार । वस्ती भुम्मेवर आहे ॥
॥ तुम्ही विटाळाचे हो, आम्ही विटाळाचे । दुर दुर नेमता कैसे ?
निर्गुणाची वस्तु । रायाचा परीवार आहे ॥
॥ विटाळा पासुन आहे उगम । तुम्ही आम्ही अवघे जन ॥
॥ विटाळा पासुन तुम्ही आम्ही । अवघे जन ।
अनामत आहे हो राया । विटाळा विनं ॥

## ॥ निरसनसह विटाळाची ओवी ॥

-: निरसन/स्पष्टीकरन :-

॥ विटाळ चंडाळ । घालुन मुळखंड । पायाची अगद । महाराजा ॥

आध्यात्मीक विश्वात नरदेहीला उलटे मुळ असलेला वृक्ष मानतात. कारण या नरदेहीरूपी वृक्षाचे मुळ हे वर आहे. हे मुळ निरंजन ज्योतस्वरूपी आदीपुरूष परमात्मा कडुन चैत्यन्याचा पुरवा घेत राहते. चैत्यन्य रूपी रस शोषुन, या देहधरणीला सतत जिवनरस पुरवठा करत राहते.

ज्याप्रमाणे धरणीत पेरलेल्या बियां/बिजांमधुन सर्वप्रथम मुळ बाहेर येते, त्याच प्रमाणे प्रकृतीमायेमध्ये पुरूषाव्दारे पेरलेले पिंड-बिजांचे मुळ हे प्रकृती मायेच्या योनीवाटे सर्वप्रथम बाहेर येते. याच नियमाला अनुसरून देहपिंडाचा सर्वप्रथम योनीबाहेर येणारा भाग म्हणजे या देहीचं डोक/मस्तक ! म्हणुनच या मस्तकाला देहरूपी वृक्षाचे मुळ म्हणुन आध्यात्मीक विश्वात संबोधतात. म्हणुनच याच मस्तकाला ***मुळखंड*** असे म्हटल्या गेले आहे. कारण की : देहपींड हा खंडा-खंडाने बनलेला आहे. आणी हा मस्तकाचा काशी खंड सर्वप्रथम योनीबाहेर आला असल्याकारणाने याला मुळखंड असे म्हटल्या जाते.

काशी मुळखंडावर देहीचे ब्रम्हांड असुन, येथे अगोचरी उर्ध्व स्वर्ग आहे. येथे कामधेनु सह सर्व शक्तीयॉं व सिध्दीयॉं सुप्त रूपाने वास करत आहे. जे नाही ते इथे सर्वकाही आहे. जसे या देहपिडाच्या मेरूमैदानात अधांतरी खेळत

असलेली सुषम्ना नाडी याच मुळखंडाच्या दसव्या व्दारातुन म्हणजेच टाळुमार्गातुन त्या आदीपुरूष परमात्माशी तार जुळवुन असते ती अशी :

अधांतरी सुक्ष्म अश्या सुषम्ना नाडीच्या आत, तिच्यापेक्षाही सुक्ष्म अशी वज्रनाडी असते. या वज्रनाडीच्या आत, तिच्यापेक्षाही सुक्ष्म अशी चित्रिणी नाडी असते. आणी या चित्रिणी नाडीच्या आत, तिच्याही पेक्षा अती सुक्ष्म अशी ब्रम्हनाडी असते. ही ब्रम्हनाडी या मुळखंडाच्या दसव्या व्दारातुन म्हणजेच टाळु मार्गातुन वर वाट काढत परमात्माशी तार जुळवुन असते. तिच्या या भोर गुफीच्या वाटे व्दारे त्या अजात परमात्माचा पुरवा देहीला पुरवत राहते/घेत राहते.

या अतिसुक्ष्म ब्रम्हनाडीरूपी तारेतुनच, हा देहरूपी वृक्ष त्या चैत्यन्यमय निराकार निराधार आदीपुरूष परमात्मा कडुन चैत्यन्य रसांचे शोषन करत राहतो. या चैत्यन्य तेलाच्या पुरवठा व्दारे सत्रावी जिवनकळा ज्योत प्रज्वलीत ठेवल्या जाते. परमात्माशी जुळवुन असलेली ही तार तुटली/ म्हणजे देहीचे देठ तुटुन सर्वकाही संपले ! म्हणुनच या आदीपुरूषाच्या सोहंम ज्योतीलाच वर सत्रावीचा देठ म्हटल्या गेले आहे.

हे सर्व या मुळखंडा व्दारेच म्हणजे या मस्तकाव्दारेच होत असते. असे मुख्यस्थानी असलेले मुळखंड हे विटाळानेच बनुन विटाळी पाण्यातुनच तर योनीबाहेर आलेले आहे. विटाळानेच याला बनवुन हा चांडाळ विटाळ याला चिकटुन बाहेर आलेला आहे. एवढच नव्हे तर या संपुर्ण देहपिंडाचा जन्मच विटाळ पासुन होवुन या विटाळालाच बाहेर घेवुन आलेला आहे. त्याचमुळे प्रतेक देहपिड हा विटाळी, अस्पृश्यच आहे. असे असतांना दुस-यांना अस्पृश्य, विटाळी कोणत्या तोडांने म्हणता ? स्पृश्य-अस्पृश्य करसे मानता ? विटाळी संबोधुन दुरच काहो नेमता ?

विटाळाला दुरच नेमायचे असेल तर सर्वप्रथम या मुळखंडाला चिकटुन आलेला विटाळ दुर करावा लागेल. आणी त्याकरीता या मुळखंडालाच धडापासुन दुर करावे लागेल. या विटाळाला दुर करण्याकरीता करू शकता का हा मुळखंड धडावेगळा ? नाही ना ! मग इतरांना विटाळी अस्पृश्य म्हणत दुर दुर नेमता कैसे ?

मुळखंडाला चिकटुन आलेल्या हा चांडाळ विटाळ तुम्हाला दुर करता येत नसल्यामुळे या विटाळाचाच मुखवटा असलेल्या मुळखंड आदीपुरूष महाराजाच्या चरणी ठेवा. या परमात्माची अगद/शपथ की : ‘‘आजपासुन आम्ही कुणाचाही विटाळ माननार नाही. कुणालाही विटाळी चांडाळी म्हणुन, अस्पृश्य मानुन दुर दुर नेमणार नाही’’ कारण या विटाळी मुळानेच हा वाण वसवला आहे.. अशी सांगी हा कृष्णा गर्जना करून दवंडी देवुन सांगत आहे की :

॥ विटाळी हे मुळ । वसवला वाणं । विटाळ अवघ्याचं कुळ, गोत्र होय ॥

या देहपिंडाचे मुळ हे विटाळी आहे. या मुळाव्दारेच हा देहरूपी वृक्ष वाढला आहे. या विटाळापासुनच हा देहपिंड बनला आहे. प्रथम अस्तुरीला विटाळ आला. त्या विटाळानेच तिला बिजारोपनासाठी सक्षम केले.

आणी चौथ्या दिवशी निवृत्त होवुन पुरूषाचे बिजारोपन यशस्वी केले. आणी विटाळी बंधन घालुन, विटाळी पाण्यात पिडं घडला. अश्याप्रकारे या देहपिंडाची उत्पत्ती हीच मुळ विटाळापासुन झाली आहे. या विटाळानेच हा देहरूपी वाण अस्तुरीला दिलेला आहे. या नात्यानं विटाळचं अवघ्याचं कुळगोत्र

होय. हा विटाळाच सर्व देहीचे कुळगोत्र असल्यामुळे आमचे गोत्र श्रेष्ठ, तुमचे गोत्र कनिष्ठ, आम्ही उंचे तुम्ही निच हे कैसे म्हणता ?

सर्व जन्मलेले देहच विटाळापासुन बनुन, सर्व देहांच कुळगोत्र हे विटाळ असल्यामुळे कुणीही उंच नाही, कुणीही निच नाही. सर्व देह समान आहे. आणी या सर्व समान देहांमध्ये तो फक्त आत्मा उंच आहे. उच्च श्रेणीतला आहे. तोच अजन्मा आहे. ज्याला जन्मच नाही त्याला विटाळ कोठुन चिकटणार ? त्याला जात कोठुन चिकटणार ? तो चिरंजीव निश्कलंकी अहीन अजात आहे.

रक्त या मासाची । बांधुनी हे मुंस । यामध्ये हंस । उंच आहे.

जेव्हा दोन्ही बिंदुचा एक झाले म्हणजेच अस्तुरी बिज व पुरूष बिज एक झाले, तेव्हा मायेच्या विटाळाला बंधन प्राप्त होवुन त्या विटाळी रक्त-मासाची मुस बांधल्या गेली. ही मुस पंचमहाभुते आणी या पाचाचे पंचविस तत्वे, रक्त मास व इतर तत्वे मिळुन मायेच्या पोटी विटाळी सम्मावली. या मायेच्या विटाळी पाण्यात ही मुस वाढत वाढत जात तिचा पिंड बनला. या पिंडात तो हंस म्हणजेच चारही वेदातला पाचवा लभेद आत्मा आला. या पाचव्या च्या सुस्काराव्दारे पिंडात जीवनकळा ज्योत उभी झाली. तिरगुणी मायेच्या तिरगुणांनी ठासुन भरून असलेल्या देहरूपी दिवनालीत, या हंसाने चैत्यन्य रूपी तेलाचा पुरवा करून सत्रावीची जिवनकळा ज्योत प्रज्वलीत ठेवली.

हा विटाळ जन्मलेल्या आकारालाच चिकटुन येतो. परंतु हा हंस अजन्मा निराकार असल्यामुळे त्याला तो कसा चिकटणार ? तो तर निशंःकलंकी आहे. या सर्वांपेक्षा उच्च श्रेणीत उंच आहे. अहीन अजात आहे.

देहपिंड हे उचं-निच नसुन समान आहे. परंतु या देहपिंडाला ज्याने प्रकाशीत ठेवले, ज्याने देहीला अस्तीत्वात ठेवुन देहीचा राज्यकारभार सांभाळला तो या पिंडीचा राजा हंस आत्मा हाच अवघ्या देहपिंडात उंच आहे. हा आदीपुरूष परमात्माचा तेजोगुणी अंश असलेला हंस आत्मा हा सर्व हयात देहीत असल्यामुळे, सर्व देहा याच्या चैत्यन्यज्योतीनेच प्रकाशत आहे. सर्व देहपिंडात एकच चैत्यन्यज्योत असल्यामुळे सर्व देह एकसमान उंचीचे आहे. कोणताही नरदेह हा उंच नाही. कोणताही नरदेह हा निच नाही. सर्व नरदेह हे एक चैत्यन्याची ज्योत आहे. त्याच मुळे समान उंचीचे आहे.

म्हणुनच या हसांव्दारे उभी झालेल्या जिवनकळा ज्योतीची गोडी लावा. कारण की : ज्याला या सत्रावी जिवनकळा ज्योतीची गोडी लागली आहे, त्यांचे विषम आपोआप विर्सजीत होत आहे. झालेले आहे. या विषम विसर्जनामुळे तो सर्वाकडे समान दृष्टीकोनातुन बघत आहे. त्याला या चतुर्पतीच्या नव्या दृष्टीने सर्व काही समान दिसत आहे. आकाराच्या आत वसलेली जगाच्या देखताची चैतन्य ज्योत दिसत आहे. म्हणुन चरणे सांगी करते की :

॥ गोडी लागली सत्रावीची । विषम विसर्जन झाले त्याशी ॥

मग तुम्ही का विषमता जपता ? ही विषमता जपुन मी सर्वांपेक्षा श्रेष्ठ असा अभिमान का बाळगता ? स्वतःला इतरापेक्षा श्रेष्ठ उंच आहे, असे मानुन देहीला मान सन्मान सत्कार ची अभिलाषा का बाळगत आहात ? का दुस-यांकडुन स्वतःच्या देहीला सर्वप्रथम मान मागत आहात ? हा मान तर सर्वप्रथम विटाळालाच जातो. कारण हा विटाळ नसता तर हा तुमचा देहपिंड तयार झाला असता का ? नाही ना ! तर मग विटाळीच हा मान आहे. मग

या विटाळी देहीच्या मानसन्मानाची अपेक्षा का बाळगता ? मानसन्मानाचा अभिमान का बाळगता ? कुणीतरी सांगा हो आम्हाला...

॥ विटाळी हा मान, विटाळी हा खाण । विटाळी हा प्राणं, जन्मलासे ॥
॥ विटाळी हे मुळ, विटाळी हे कुळ । विटाळी देहज्योत, प्रकाशली ॥

विटाळी हा खाण... :-

जिव-जातीच्या चार खाणी आहेत. त्या अश्या

१. बिज-खाण :- बिजांपासुन/बियांपासुन उत्पन्न होणारी जिवजात. उदा. झाडे
२. अंडज-खाण :- अंडयातुन उत्पन्न होणा-या जिवजाती. उदा. पक्षी ईत्यादी
३. उजबिज-खाण :- अचानक पैदा होवुन खत्म होणा-या जिवजाती. उदा. उंबरातील किडे ईत्यादी
४. जाडज खाण :- विर्य-बिज पासुन उत्पन्न होवुन योनीमार्गातुन जन्म घेणारी जिवजात. उदा मानव, चतुष्पाद प्राणी ईत्यादी

या चारही खाणीच्या जिवजाती ची उत्पत्ती विटाळा पासुनच आहे. फरक एवढाच की, प्रतेक खाणीतील विटाळाचे स्वरूप वेगवेगळे आहे. या चारही खाणीतील जिव-जातीला उत्पन्न करण्याचा सर्वप्रथम मान हा विटाळालाच जातो. या चारही खाणीतील जिवजाती चे आकार विटाळा पासुन झाला. या विटाळी अवस्थेतच त्यांचा प्राणमय देह बनला. या विटाळी अवस्थेतच सर्व देहीत प्राण जन्मला/संचारला.

सर्व खाणीचे देहांचे मुळ उत्पत्ती हे विटाळातुनच उत्पन्न झाल्यामुळे या सर्व खाणीचे मुळ हे विटाळच आहे. ज्याच मुळच विटाळी त्याच कुळ मग कसे ? कुळही विटाळी । याच विटाळी कुळात सर्व देहज्योता या कलाकलाने वसलेल्या आत्माराम हंसाव्दारे प्रकाशल्या आहेत. मग ओवळे-सोवळे पाळत, सोवळे आहे म्हणत ओवळे-सोवळे करत दुस-याला 'दुर हो ! दुर हो !' असे म्हणता, ते कोणत्या तोंडाने ? विटाळानेच बनलेल्या तोंडाने ना ! विटाळीच ना.

विटाळी हे ओवळे, विटाळी हे सोवळे । विटाळ अवघ्याचे, कुळ स्वामी

कुळस्वामी म्हणजे तुमचे नातेसंबधाचा वेल ज्या मुळ स्वामीपासुन उत्पन्न झाला त्याला कृलस्वामी असे म्हणतात. तुमच्या कुळाचे नातेसंबध मागे मागे जोडत नेत जात जिथे थांबुन कुळाच्या ज्या पहील्या मुळ व्यक्ती पर्यत जाते, तो कुळाचा पहीला व्यक्ती तुमचा कुळस्वामी । याच कुळस्वामी पासुन तुमच्या कुळाचा वेल वाढत वाढत, त्याला फांदया फुटुन एक फांदी तुमच्या कुळापर्यत पोहचलेली आहे.

परंतु जरा विचार करा की : अवघ्या खाणीचा उगम तर विटाळापासुनच झाला आहे. ज्याने या मिर्तलोकी मायेच्या योनीमार्गातुन जन्म घेतला अश्या सर्व स्वामीचें देह हे विटाळानेच बनले असल्यामुळे त्यांचे देहकुळ हे विटाळी आहे. कुळस्वामीचे कुळही तोच विटाळ आहे. या विटाळाच्याच खतपाण्याने तुमच्या कुळाचा वेल विस्तार झाला आहे. या विटाळी मुळा पासुनच अवघ्या खाणीच्या कुळाची उत्पत्ती होत आहे. मग हा विटाळच तर अवघ्या खाणीचा कुळस्वामी होतो. हा विटाळ तर ख-या अर्थाने सर्व खाणीचा एकटा कुळस्वामी आहे. सर्व कुळांचा कुळस्वामी हा विटाळ आहे. तर मग आमच कुळ श्रेष्ठ तुमच कुळ निच हे कैसे म्हणता हो ?

तुम्ही आम्ही तर एकाच कुळाचे ! ते म्हणजे या विटाळी कुळाचे । तुम्ही आम्ही या विटाळी कुळाचे एकच कुळ असलेले आहे. तुमचा देह हा विटाळी

पाण्यातुनच उत्पन्न झाला. आणी आमचाही देह हा विटाळी पाण्यातुनच उत्पन्न झाला. तुम्ही आम्ही तर या विटाळी देहकुळांचे असल्यामुळे अस्पृश्यच आहेत. सर्वच जिवजाती विटाळी व अस्पृश्य असतांना, स्पृश्य-अस्पृश्य विटाळी मानुन इतरांना 'अस्पृश्य, विटाळी' असे म्हणुन दुर दुर नेमता कैसे हो ?

या विटाळाने केलेल्या कार व्दारेच या भुम्मेवर देहजीवानं वस्ती केली आहे. मिर्तलोकची संपुर्ण देहजीवांची वस्तीच तर विटाळी आहे ना ! मग विटाळी म्हणुन दुर बसवणे, विटाळी म्हणुन एखादयाला वंचित ठेवने, अस्पृश्य लेखने.. ईत्यादी बाबी तुमच्या ज्ञानाला शोभते काय ? ऐसे तुमच अज्ञानासारखे वागणे बरे नोव्हे ! तुम्ही जर खरोखरच ज्ञानी असाल, तर तुमच्या डोळ्यावरील आलेली तिरगुणांची झापडी उडवा. अन मग तिरगुणांतीत दृष्टीने शोधुन पहा 'कोण आहे विटाळा बीना ?', कोण सर्व विटाळी जाती पासुन निराळा ? तुम्हाला नक्कीच त्या निशंःकलंकी कडे जाण्याचा मार्ग सापडेल.

विटाळ हा फक्त आकारालाच चिकटुन आहे. ज्याला आकारच नाही त्याला विटाळ कुठुन चिकटणार ? म्हणुनच त्या निगुर्ण निराकार निशंःकलंकी आदीपुरूष ला भजा हो । तो एकटाच या विटाळा विना असुन निराळा आहे. तोच अजन्मा आहे. ज्याला जन्मच नाही, त्याला जन्मा सोबत येणारी विटाळ व जात कुठुन चिकटणार ? म्हणुनच तोच विटाळाविना अजात अहीन आहे. त्याला जराभर कलंक नाही. तो एकटा गव्हर बेडाग निशंःकलंकी आहे. तोच शंक म्हणजे अति पवित्र आहे. अश्या या सोहंम् निशंःकलंकी ज्योत स्वरूपी आदीपुरूषाला भजा हो !

कारण की : तो एकलाच अनामत विटाळा विना आहे. निशंःकलंकी आहे. तो इतका पवित्र-शंक आहे. त्याला कोणताही मोठयातला मोठा कलंक अपवित्र म्हणजे विशंक बनवु शकत नाही. त्याच्या पवित्रा मध्ये इतके तेज आहे की : एखादी मोठयातली मोठी विशंक-अपवित्र वस्तु त्या निश्कलंकीच्या थोडयाबहुत जरी जवळ आली, तर ती वस्तुच त्या निरंजन निश्कलंकीच्या पवित्रतेच्या तेजाने सर्वप्रथम पवित्र बनन्यास सुरूवात होते. आणी जेव्हा ती विशंक वस्तु त्या निशंःकलंकीच्या कक्षेत पोहचते, तेव्हा ती सपुर्णतः पवित्र बनलेली राहते. म्हणुनच त्या निशंःकलंकी निरंजन चैतन्य ज्योतिर्मय आदीपुरूषाला भजा हो !

भाव भक्ती मार्गानं, भजन पुजंन ध्यान सुमरन करत, या निशंःकलंकी आदीपुरूषाच्या जवळ जसे जसे निकट पोहचाल, तसे तसे आपरूप पवित्र होत जाईल. याच भजन पुजंन ध्यान सुमरन मार्गाने वाटचाल करत जेव्हा त्याच्या कक्षेत प्रवेश कराल, तेव्हा त्याच्या पवित्र लख्ख तेजाचे दर्शन होवुन त्या पवित्र तेजाव्दारे तुमचे सर्व कलंक धुतल्या जाईल.

आणी याच मार्गाने पुढेही वाटचाल करत राहील्याने, एक ना एक दिवस तुम्ही शंक व्हाल ! त्या निश्कलंकीचे शुध्द सत्व गुण शक्ती....ईत्यादी, तुम्हाला प्राप्त होत राहत/होवुन, तुमचे आचार विचार हे शंक म्हणजेच अति पवित्र होईल. या शंक आचार विचाराने शंक शुध्दसत् संस्कार चारही देहीवर येवुन, या चारही देही शंक/अतिपवित्र आचार-विचाराच्या म्हणजेच शंकाचारी बनेल. चौथ्या शुध्द सत्वगुणांने या चारही देही युक्त होवुन त्यावर सिदाई येईन. सिदाई वाचा व अहीनाघरचे चतुर्पती निरंजन ग्यान सह सर्वकाही येईल. आणी मग, तुम्ही शंकाचारी अवतार केव्हा बनले ? हेच तुमचे तूम्हाला समजणार नाही. शंकाचारी होवुन पाचव्या ची गाही मग तुम्हीच दयाल एवढ मात्र निश्चित आहे. तर मग भाव धरा प्रयत्न करा हो । देर किस बात की ?

। कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥

॥ ओवी नं. ४६ ॥

ओवी महात्मः- भजनात जर लष्टान आले असेल, तर हमखास म्हणण्यात येणारी...

॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ धनी आला मनमोहन ॥

॥ थरथरा कापे, धरणी हो ! तिर भवनं ॥ घृ ॥
॥ धनी आला, मनमोहन । रंचना रंचली, तिर भवन ।
तीनताळ चौदाभुवन, मेरुमंडयान । वसवलं त्यानं..॥
थरथरा कापे, धरणी हो, तिर भवनं ॥ घृ ॥
॥ निराकार- निरंजन । उभी केली, माया-चैतन्य ।
तेहत्तीस कोटी, देवांगण । वसवलं त्यानं....
॥ कलह मचवला कलीनं । कलीत भुलले, अवघे जन ।
उडवण कलीचं ठिकाण । उभा जगजीवनं.. ॥ थरथरा कापे...
॥ मानवाच्या आंगी येतनाही देव । व्दैत-भुत सांगतीन, देवाचे नाव
प्रकट होतीन/झाले लष्टान देव । नवस मागतीन/घेईन.. ।
थर थरा कापे धरणी हो तिर भवन ॥०४॥
॥ आदीपुरुषाचा, कुबन मारा । भौरं चक, फिरे गरगरा ।
आणुन बांधतीन, देव दरबारा । देव हिशोब घेईन..॥
॥ हा होय आदीपुरुषाचा बाण । बाण चालले जैसे मुंग्याचे सैन्य ।
गजबजलं, देवांगण । बाण पाहुन...॥०६॥ थरथरा कापे..
॥ हे होय शकुनाचे बाण । गगनी पंथी, गेले उडुन/निघुन ।
उडवणं व्दैत-भुताच ठाणं । जळतीन लष्टानं/सैतान...
थरथरा कापे धरणी हो तिर भवनं ॥०७॥

भजने :-

।। हे होय अगण्या बाण । उडन वै–याचं ठिकाणं ।।
।। दरबार द्युतांचा होय । वर पंजा, आदीपुरुषाचा आहयं ।।
।। दरबार देवाचा होयं । ख–यां खोटयांचा, इथं न्याय आहयें ।।
।। देवाच्या नामाची तलवार । याची कोणी ना धरे धारं ।।
।। कोण ठिकाण, कोण मकाण । कोण तुमच गावं ?
कोण्या ठायी, राहता तुम्ही ? काय तुमचे नावं ? ।।
।। दादा होय का बाई होय । आपलं नावं तु सांगत का नायं ।।
।। नको करु नामाची चोरी । बांधल्या जाशीन देव दरबारी ।।
।। भिक्या–भिक्या म्हणुन हाका मारशी । भिक्या बांधला देवानं खांबाशी ।।
।। भिक्या बांधला अग्नी–खांबाशी । त्याची घेतली कृष्णानं दाढी–मिशी ।।
।। मुजोरी केली हो भिक्यानं । त्याची फजीती, केली या कृष्णानं ।।
।। आमचा देव लाल लालं । व्दैत–भुतांची तो काढतो सालं ।।
।। हे होय देवाचे लालं । आपल्या मुखानं चांगला बोलं ।।
।। देव दरबारी, मुका बसला । का आहे इथं ? ।
मुखी नाम, घेता अवद्युत । घेईन पदरातं ।।
।। गाव नाही, शिव नाही । आला कोठुन ?
अवद्युताचा, झटका बसताच । पळशीन उठुन ।।
।। तुवा मचवले ढोंग । माझे रायानं ओळखला रंग ।।
।। हरी भजनी । प्रेम सुखाची वाणी । आत्मा सावध होय, तु सावध होय
।। आत्मा सावध होय तु आता । हरी परमय पदा । उभारल्या ध्वजा ।।
।। आत्मा चाल, भजनी राहयं । बहु यवग सुखः पाहयं ।।
।। हरीचे सुखः आहे थोर । हरी उभे कृष्ण अवतार । धनी कृपेचे सागर ।
केली दया बाळावर । माझा माथा चरणा वर ।।

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. ४७ ॥
॥ जुनी ओवी ॥

## ॥ देव देव म्हणता ॥

॥ देव-देव म्हणता, देव आहे । कोण्या ठाई ? ।
शंका नाही जन्माला, देव म्या । पाहीला नाही ॥
॥ देव-देव म्हणता, देव आहे । मायेचा बाजार ।
ज्याचं नाव देव, ते आहे । अग्नीचं घरं ॥
॥ देव-देव म्हणता, देव आहे । बहुता परी ।
ज्याच नाव देव, तो आहे । अवघ्याच्या अंतरी/शेजारी ॥
॥ अंतरीचा देव नाही ओळखला । हिंडतो रानोवन ।
घरात अग्न असुन हो राया । काहो तपता/हिंडता बाहेर ? ॥

॥ अंतरीचा देव नाही ओळखला । हिंडतो बाहेर ।
बाहेर पाहता पाहता आयुष्य । वाया गेले जाण ॥
॥ देहीतला देव नाही ओळखला । ज्या प्राण्यानं ।
केले तिर्थ, गेले वाया । झाला हीन ॥
॥ महा महा, ऋषि बसले । विचार करून ।
आत्म ग्यान, शोधल्या शिवाय । नाही तत्व ग्यानं ॥

भजने :-

॥ आत्म ग्यान साधले गडे हो । तो साधु खरा ।
अवघे महा महा वाया गेले । चौ-यांशीच्या फेरा ॥
॥ ज्ञान भक्ती वैराग्य सद्‌गुण । साधले ज्यानं ।
तो लाखा मध्ये एक पहेलवान जाणं ॥
॥ दया क्षमा शांती कारुणा । प्रेम धरा हद्‌यी ।
त्याशी साधन नाही लागे । ज्योतीचा देव देईन भेटी ॥
॥ ना दिया ना पाती । यह आत्मज्योत नजर नही आती ॥
॥ तेरे घरमे भरा भंडार । यार क्यो घुमता बाहर-बाहर ।
खोल दरवाजा कवाड । है कोई कुंजीवाला लाल ॥
॥ देहीतला शिव नाही ओळखला ।
तिर्थयात्रा करता वाया गेला ॥
॥ ऐक्यांशी कोटी सव्वा लक्ष्य दहावर । दहा देवता ।
त्याच्या मध्ये कोणी नाही बापा । मोक्षाचा दाता ॥
॥ मोक्षा विना तत्वता ? कैच्या गिता भागवता ?
सहा शास्त्रे ग्रंथ लिखित । भागवत गिता ।
घरात विस्तु असुन, बाहेर का तपाला जाता ? ॥
॥ निरशुन्यामध्ये तो भगवंत । निराकार होता ।
तुमच्या विना कोणी नाही बापा । मोक्षाचा दाता ॥

॥ हरी भजनी । प्रेम सुखाची वाणी । आत्मा सावध होय, तु सावध होय
॥ आत्मा सावध होय तु आता । हरी परमय पदा । उभारल्या ध्वजा ॥
॥ आत्मा चाल, भजनी रहयं । बहु यवग सुखः पाहयं ॥
॥ हरीचे सुखः आहे थोर । हरी उभे कृष्ण अवतार ॥
॥ धनी उभे कृष्ण अवतार । धनी कृपेचे सागर । केली दया बाळावर ॥
॥ केली दया बाळावर । माझा माथा चरणा वर ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. ४८ ॥
॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ चत्रभुज महाराज तुमची वाणी ॥

या ओवीची पलट ओवी खंड०७/ओवी-३६ मध्ये दिलेली आहे.

॥ चत्रभुज महाराज तुमची वाणी । देवाची वाणी ।
केले कारण सिध्द उभे, मानव खुम्मी ॥
॥ निज भ्ररांत राहु नका । यवग भरले ।
सुक्ष्म देही वर तो तारण मानवाले ॥
॥ ब्रम्हयां आहे राक्षस मुखी । याहीचे वर्णन ।
याहीच्या यवगाची गणिता । झाली भरून ॥
॥ सहा जन श्रेष्ठ । याहीचा, परिमय आहयं ।
बहु सिध्दांच्या हाती राया । करनं संभाळ ॥ ०४ ॥

॥ लाखा लाखो चा तरणं उपाय । या एका कडे ।
बहु सिध्दांच्या उभ्या करन । परं मेळे ॥
॥ तिरनयन खेत्री उभे राहीले । अवघं जितं ।
ज्योत आकाशवाणी उडवनं । अवघा कलंक ॥ ०६ ॥

भजने :
॥ ज्योतीनं ज्योत चढनं । दिवस अधिक ।
उभा राहये कृष्णा । जगात होईन कौतुक ॥
॥ ज्योतीनं ज्योत प्रकाश । उजळनं देहीस ।
उजळन रूप या सुर्याच्या तेजात । जैसे रूप हे सुर्याचे तेज ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०२ ॥
॥ ओवी नं. ... ॥

## ॥ उरलेल्या ओवीकरिता रिकामी जागा ॥

॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ चतुर्पता अथर्वन् वेद उभा राहीन पोटी । निजरूप भुम्मा जागी करन सारी सृष्टी ॥

# चतुर्पता
# ॥ अथर्वन् वेद ॥






## शब्दार्थ, चरणार्थ निरसन स्पष्टीकरन सह






www.chaturpata-atharvan-ved.com

॥ खंड ०३ ॥
॥ ओवी नं. ०१ ॥
॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

## ॥ मुळस्तंभाचा पाया ॥

॥ हा होय मुळस्तंभाचा पाया । सांगतो बा कृष्ण राया ।
त्याहीनं बनवलीसे काया । याहीनं सप्त/शब्द जोडली माया ॥
॥ परात्पर परमेश्वर । वेद घेवुन बोले शास्त्रंर ।
परमेश्वर पदार्थ थोर । ठाई-ठाई भरला सागर ॥ घृ ॥

॥ कर्ता-यानं केली करणी । आदी भैसाची उठली धुनी ।
पाप-पुण्यांची घेवुन लेखनी । नित्य करतो कारकुनी ॥
॥ पिंडामध्ये नदया चारं । त्या कोण्या कोण्या मार्गावरं ?
गंगा यमुना भागीरथी । अर्ध्या आंगी सरस्वती ।
कोण्या कोण्या ठिकाणी वाहती, याचा शोध करा अंतरी ॥
॥ पिंडा/देहा मध्ये चक्रं सातं । नउ नाडया मोठया बळकट ।
पुढे भ्रमर गुंफीची वाट । वर सत्रावीचा देठं ॥
॥ नउ व्दाराची करून गिणती । एक-एक बाजु चौक्या किती ?
चारही बाजु बराबरं । घडो-घडीचा एक-एक सुरं ।
कोतवाल उभा चावडीवर । गस्त देतो चौफेर/घरोघरं ॥
॥ एक ऋषी बसला निर्वाणी । धडाधडा जाळतो धुनी ।
बंम्हांडी जपतो मंत्ररं । याहीचा कैसा कळेल सुम्मारं ? ॥
॥ ज्याच्या कानी जपला मंत्रर् । त्याला काही कळेना सुम्मार ।
तुम्ही वाचता सहाही शास्त्ररं । याचा सांगुन दया सुम्मारं ॥
॥ परात्पर परमेश्वर । वेद घेवुन बोले शास्त्ररं ।
परंम् चिंत्ता परमेश्वर । ठाई ठाई भरला सागर ॥ घृ ॥
॥ तुम्ही बहात्तर कोठुडया गाता । याचें नाव काहो विसरता ?
शड्/सप्त चक्रं विषय धरता । सत्रावीचं सुमरण करता ॥
॥ परात्पर परमेश्वर । वेद घेवुन बोले शास्त्ररं ।
परंचित्ती परमेश्वर । ठाई ठाई भरला सागर ॥ घृ ॥

भजने :-

॥ तिन डोळयाचा पुरूष । सागर भरला तिरनयन च्यां पोटात ॥
॥ तिन डोही चवथा देहें । पंचमुखी हो ब्रम्हया बोलत आहे ॥
॥ शडपंखी/वरपंखी लावली माया । भंवर जाळ त्वा टाकलं गळा ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥




निरसन पुढील पानावर......

## ॥ निरसनसह मुळस्तंभाचा पाया । सांगतो बा कृष्ण राया ॥

### -: शब्दार्थ/चरणार्थ निरसन सह चित्रमय स्पष्टीकरन :-




देहघराच्या आत त्या निराकार निरंजन निगुर्णा व्दारे उभा असलेल्या निराकार निराधारी चैत्यन्य प्रकाश स्तंभाला म्हणजेच खांबाला मुळस्तंभ असे म्हटल्या गेले आहे. या मुळस्तंभाच्या पाया वर हे देहघर उभे आहे. या निराधारी मुळस्तंभाला लटकलेल्या या देहीतील सप्तचक्रे सह विविध चक्र-तारे यांना तो निरंजन आत्माराम चैतन्य प्रकाश देत असतो. या देहीचा तो निराधार मुळस्तंभ बनुन या देहीला आधार देतो. निरंजनाच्या मुळस्तंभाचा चैतन्य प्रकाश देहीच्या चक्रांवरुन संचारीत होत, संपुर्ण शरीर चैतन्यमय ठेवत शरीराची आरा बनवत राहते. निरंजन धन्याच्या चैतन्यप्रकाशाव्दारे सप्तचक्रे आपआपल्या रंगात प्रकाशीत होवुन आपआपल्या स्थानावरुन कमी-जास्त प्रमाणात आपआपले रंग देहीबाहेर फेकत राहते. देहीची विविध रंगी आरा निर्माण करत राहते. वरील फोटो वरुन ग्यान घ्या.

### त्यानं उपजतचं केली काया, त्यानं सप्त जोडली माया :-




निराकार निराधार निरंजनाने जेव्हा दोन्ही बिंदु एक झाला तेव्हाच सम्मावुन गर्भात उपजताच ही काया निर्मिती सुरु केली आहे. आणी या कायेला त्याने सप्त माया जन्मतः जोडली आहे. या सप्तमायाचे आता ग्यान घेवु या ।

त्यानं सप्त जोडली माया :-

**सप्तमाया :-**

**१. शक्ती :-**


०१ शक्ती

प्रथम एकला असलेल्या आदीरूप आदीपुरूष परंब्रम्ह नारायणाच्या चरांचर व्याप्त मनात ''मो-ह सृष्टी रंचावी'' अशी ईच्छा प्रकट झाली. ही ईच्छाच त्या उभ्या असलेल्या निराकार निराधार निरंजन ज्योतीच्या मुळावरचा रंग धरून अद्‌भुत अश्या शक्ती रूपात प्रकट झाली. आता या शक्तीची ओवी खंड०१/२/ओवी-०१ यातुन ग्यान घेवु या ।

हे प्रथम रूप ईच्छा शक्ती । या शक्तीचं रूप भ्रांतित पडणारे आहे. म्हणुनच शक्तीच्या ओवीत या भ्रांतीमुळेच ती सत्यदेवाला विसरून जळजळीत बोल बोलुन, तिच्या स्वकर्माने भुलवनी ची धुनी उठवली. आणी तिन खुम्म जाळले...ईत्यादी

ही इच्छा शक्ती व तिला पडणारी भ्रांती....ईत्यादी तिचे गुण या देहीला जन्मतः जोडल्या गेले आहे. म्हणुनच देही जेव्हा कोणत्याही प्रकारच्या शक्ती स्वरूपात येते म्हणजेच या देहीला जेव्हा कोणत्याही प्रकारची शक्ती उदा. धनशक्ती, ज्ञानशक्ती राजशक्ती....ईत्यादी प्राप्त होते, तेव्हा ती देही भ्रांतीत पडुन अहंकारी अविचारी कर्मे करते. या भ्रातीत या देहीला देव समजेना ! सत्यदेवाला भले-बुरे खोटे ठरवणारे बोल बोलत, मीच कर्ता धर्ता सर्वकाही समजत वर्तन करते.

म्हणुनच ही भ्रांती दुर करावी. या भ्रांतीमुळे मोठे मोठे दुराचारी डुबले आहेत. या भ्रांतीचा प्रकार बहु भारी आहेत. या भ्रांतीन जीव भ्रमले आणी चौ-यांशीच्या फेरीत पडले आहेत. असे हे शक्तीच रूप राहते भ्रांतीत ! तसे नका होवु तुम्ही जनात ।

ही शक्ती मुळ धरून स्वरूपावरी आहे. परंतु तिला तिचे स्वरूप उमजत नाही. स्वरूप न उमजल्यामुळे ही आनंद विरहीत राहत असे. या शक्तीलाच मुळमाया, आदीमाया आदीशक्ती...असे म्हटल्या गेले आहेत.

**२. प्रकृति :-**


०२ प्रकृती

शक्तीच्या ओवी ०१/०२/०२ मध्ये कर्ता-याकडुन शक्तीला जेव्हा ''*आंगीअग्न, परोपरी मदन*'' चे देणं झाले, तेव्हा त्या देणंव्दारे शक्तीरूपाच्या रोमारोमात तेज सह मदन आले. तिला तेजोमय व मदनसंपन्न कांती प्राप्त होवुन, तिला प्रकृतीमायेचे रूप प्राप्त झाले. कर्ता-याला 'रूत दे मजला' म्हणत सृष्टी निर्मितीचे बिज मागणारी ही प्रकृतिमाया म्हणजेच महद्‌माया !

या प्रकृतीमाया म्हणजेच महद्‌मायेला तिचा कर्तार आपल्या स्वतःच्या अध्यक्ष्यतेखाली घेवुन, तिला वश करतो. स्वतः अख्त्यारी राहुन प्रकृति वर वर्चस्व गाजवत, स्वतःचे तेजोगुणी अंशरूपी बिज म्हणजेच त्या कर्ता-याचा तेजोगुणी अंशअवतार असलेले आत्मे याचे रोपन प्रकृति मायेच्या योनीत करत असतो. या प्रकृतिमायेच्या ठिकाणी तोच हे त्याचे अंशअवतार आत्मबिजे यांचे रोपन करतो. प्रकृतिमायेस गर्भधानास कारणीभुत असणारा, प्रकृतीमायेला बीज देणारा तो सुत्रधारी ब्रम्हचारी सर्वत्राचा पिता बनुन सर्वत्रांचे पालन पोषण करत निराळाच राहतो.

ही प्रकृतीमाया व तिचे गुण या देहीला जन्मतः जोडल्या गेलेले आहे. म्हणुनच प्रतेक देह आपआपल्या प्रकृतीप्रमाणे वागतो. या देहीला प्रकृति मायेचे *"आंगी अग्न व परोपरी मदन"* चे देणं पौंगंडावस्थेपासुन मिळने सुरु होवुन, ते वाढत वाढत युवावस्थेत पुर्णतः प्राप्त होवुन या देहीला जोडल्या जाते.

### ३. चैत्यन्या :-




शक्तीला आंगीअग्न व परोपरी मदन च्या देणंप्राप्तीनंतर प्रकृतिच्या मस्तकी कर्ता-याने चैतन्याचा शिक्का दिला. जेव्हा कर्ता-याकडुन प्रकृतिला चौथा चैतन्य चा शिक्का प्राप्त झाला, तेव्हा तो चौथा चैतन्य चा शिक्का हा प्रकृतिला झोंबुन तिला झंझावत तिच्या अंगी सळसळत संचारला. आणी प्रकृतिला सपुर्ण व्यापुन तिच्यात भरुन भरला आणीक उरला. ऐसे कर्ता-याने दिलेल्या चौथ्या चैतन्य शिक्या व्दारे प्रकृतिला चैत्यन्या मायेचे रुप प्राप्त झाले. तिलाच चैत्यन्या असे नाव पडले. या चैत्यन्यापासुन पुढे देवा जीवां सह ईश्वरी काया ईश्वरी माया चा विस्तार झाला.

या देहीला ही चैत्यन्या जन्मतः जोडल्या गेली आहे. आणी ईचे गुणांचे देण या देहीला पौंगडावस्थेपासुन युवावस्थेपर्यत प्रकृतीचे आंगी अग्न व परोपरी मदन चे देणं प्राप्ती झाल्यानंतर, युवावस्थेत चैत्यन्या चे देणं संपुर्णतः प्राप्त होते. चैत्यन्याचे चैतन्य या देहीच्या युवासस्थेत सळसळत सर्व देही चैत्यन्याने व्यापुन टाकते. या चैत्यन्या चा झपाटा मोठा । भ्रांती भ्रम मोठा । म्हणुनच ईच्यामुळे जनांच्या चुकल्या वाटा ।

### ४. तिरगुणी :-




शक्तीच्या ओवीत ही चैत्यन्या रुत मागत फिरल्यानंतर, जेव्हा तिच्या सुमरणी निराकार निराधार येवुन तिला त्याने उपदेश केला, तेव्हा तीने भैस म्हणुन भाव धरुन त्या चौथ्याची प्रार्थना मांडली. चैत्यन्याच्या या प्रार्थनेला पावुन तो गायप असलेला चौथा तिच्या समोर आदीमुनी अवतार रुपात आला. त्या चौथ्या आदीमुनीने चैतन्याने एक शेजुन तिन मांडलेल्या तिच्या तिन खुम्माला जागी करुन त्यांचे प्रकट रुप तिला दिले. त्यांच्या हाती तिन यवगाचा कारभारी राज्य दिले. ते एक शेजुन तिन खुम्म म्हणजे ब्रम्हा विष्णु महेष !

तिन रंगाचे तिन गुणांचे तिन पुत्र तिला प्राप्त झाल्यानंतर ती आपल्या त्या तिन पुत्रांचे गुणवर्धन, लालन, पोषन, संगोपन करण्यासाठी प्रयत्नरत् राहु लागली. जसे दोन-तिन रंग एकमेकात मिसळवल्या नंतर तिसरा रंग उत्पन्न होते, तसे तिन पुत्रांचे तिन गुणांचे रंग त्या तिन च्या मातेने धरले. तिघांचे तिन रंग एकमेकांत मिसळवुनी ती चैत्यन्या आता तिरगुणी माया रुपात प्रकट झाली.

तिरगुणी माया प्रकट झाली. सावधान ! या देहीला ही तिरगुणी माया चे तिन पुत्रांचे गुण रंग जन्मतः जोडल्या गेलेले आहे. म्हणुनच ही तिरगुणी माया या देहीत आपल्या तीनपुत्रांच्या तिरगुणांचे लालन पोषन संवर्धन करण्यासाठी नेहमी प्रयत्नरत् राहते.

या तिरगुणी माये मुळेच या देहीत :

- कधी ब्रम्हाच्या रजगुणांचे वर्चस्व येत, ही देही राजासारखी वर्तनाची आव आणते. लोभ व आशेची हाव ठेवते. मनात सत्ता गाजवण्याचे विषय वासना ठेवुन खेळ उभारते व पापांकडे घेवुन जाते. आणी मग सोस भोगत नाचते.
- कधी विष्णुच्या सत् गुणांचे वर्चस्व येत ही देही सात्वीकतेचा वृत्तीचा आव दाखवु लागते. कर्मफलाची आशा धरून सात्विक कर्मे करतो फलाशाने इश्वर भजनी येतो. व पुण्याकडे जात सुखाने नाचते.
- तर कधी रूद्राच्या तम गुणांचे वर्चस्व येत ही देही तामसी वृत्ती. आळस निद्रा सुस्ती उन्मत्तपणा..ईत्यादी तामशी गुण ने नाचु लागते. ऐसे ना धड प्रपंच ना धड परमार्थ करत मधल्या मध्येच लटकत देही नाचते व स्वतःच निरर्थक बडबड करत दुःखाचे डोंगर भोगते.

अश्या रितीने ही तिरगुणी माया या देहीला नाचवत राहते.

तिरगुणी मायेचे या देहीला अश्यारितीने नाचवणे थांबवुन या तिरगुणांच्या पलीकडे पहावे. तेव्हा कुठे या तिरगुणांच्या पल्याड उभा असलेला तो चौथा सत्यदेव बुध्दिच्या दृष्टीक्षेपात येईलं. तो चौथा बुध्दिच्या दृष्टीक्षेपात आल्यानंतर शुध्द सत् गुणांत राहत शुध्द सत्कर्मे करत त्या चौथ्याकडे जाता येते. चौथ्याला प्राप्त करून मोक्ष प्राप्ती करता येते.

अन्यथा या तिरगुणांतच राहुन ८४शीच्या फे-यात पडुन, या तिरगुणांच्या वर्चस्वाखालीच फिरावे लागणार ! या तिरगुणी व तिरगुणांचे तिरलोक्यातील अवतार यांचे मागे फिरून कदाही मोक्ष प्राप्ती होणार नाही. कारण त्यानांच मोक्ष नसुन त्याच्या हाती त्या कर्ता-याने कारभार दिलेला आहे. ते कारभारी राज्य करणारे आहेत, मोक्ष देणारे नाहीत. हे निश्चित जाण ! म्हणुनच या तिरगुणांचा भ्रम सोडा । भजा चतुर्पती आता ।

**०७ माया :-**




आता मायाचैत्यन्या आदीमाया गाईच्या ओवी-३२/खंडं ०२ कडे वळुन त्या ओवीतुन ग्यान घेत माया जाणुन घेवु या ।

तिरगुणी मायेच्या मनात तिरगुणां सह तिरगुणांच्या तिन देवांचा पसारा पसरवुन त्याचा विस्तार करण्यासाठी ज्या कल्पना आल्या त्या कल्पना चा रंग धरून ती माया रूपात प्रकटली. म्हणुनच कल्पना म्हणजे माया ! हे निश्चित जाण.

ईच्छा ही शक्ती झाली, तर कल्पना ही माया झाली. या कल्पना व इच्छा ला त्या परंब्रम्ह निराकार निरंजनाचा स्पर्श नाही म्हणुनच विनवा विनवा हो त्या निरंजनाला आता

॥ देवा माझे अंतर रंगवा । यवगा यवगी संग वागवा ।
...कल्पनेच्या तोडुन पालव्या देहीत नांद माहया ॥

तिघांचे राज्य वाढवण्यासाठी मायादेवताने आपली मोहनमाळ तिन देवा सह तिरलोक्यातील तिरगुणी अवतार यांच्या गळात घालुन, हे सर्व या मायेने आपल्या अध्यानी केले आहे. या मायेच्या अध्यानी राहुन तिनदेव व त्यांचे तिरलोक्यातील अवतार देवांगण यांचा विस्तार पावला आहे. या मायेमुळेच जीव मायेच्या अधीन होवुन भोग कल्पीतो.

तिन देव मायेच्या अधीन असल्यामुळे या तिन देवांना वेदज्ञानरूपी संप्पती कशी गमावली ? याच्या खुणा विचारून तिरगुणांचे राज्य वाठवण्यासाठी, अत्यंत आवश्यक असलेली ग्यान संप्पत्ती प्राप्त करण्यासाठी तिने कवडीमोल किंमतीची तिरगुणी पेठ वसवली. चौथ्या च्या पोटी असलेली ती वेद-ज्ञान संप्पती प्राप्त करण्यासाठी, मनी कपट कल्पुन कल्पनेची पेठ उभी करणारी ही कपटी माया देवता होय.

॥ ही माया मोठी कपटी । लागली मोठया-मोठयाच्या पाठी ।
ईने घातली मच्छींदराला मिठी । ईने मथवले जगजेठी.... ॥
॥ या मायेला जपुन चाला । ईच्यामुळे रामराया गलपटला ।
पाहता पाहता धोका दिला......॥
॥ ईची सत्ता तिनही ताळात । महा महा केले ईने लंपट... ।
ईद्र-चंद्र गणी-गंधर्व सह, तिनदेव या मायेच्या आज्ञेत ॥
॥ ईने गाजवली सत्ता । ईन वाठवली अहंता ।
भुल पाडली ईन सर्वत्र । भलताच गवसवते ही रस्ता ॥
॥ भक्तजन भुलले सोसा । म्हणुन जन भंगले आचार-विचारा ।
नाही तत्वाची सुध-बुध । ईने मागे लावला चौ-यांशीचा फेरा ॥
*.....ऐस अवघ टाकलं मोहुन । पहा या मायेन मायेन ॥*

म्हणुनच विनवा देवाला की : हे तिरभवन घडले, देवा तुम्हा हात । मोडा ही तिरगुणी मायाशक्ती, मारा लाथ । कर या मायेला बांडीची दासी म्हणजेच माझे बनियनच्या आतल्या खिश्यात मावणारी, लटकत लंगडत लंगडी चालणारी लवंडी-बवंडी दासी । घाल घरात । सुखी नांदव या नरदेहीस ।

ऐशी ही माया तिरगुणांचा पसारा घेवुनी मृगजळाप्रमाणे व्यापली आहे. म्हणुनी तिरगुण धिंगाणे करे ! पंरतु तुम्ही शुध्द सत्वात राहा., दया क्षमा शांती प्रसन्नता धरा. आणी आशा मनशा ईच्छा पापी कल्पना जाळुन, शुध्द सत्वी चौथ्याचे मनी ध्यान ध्यास धरून नित राहावे.

ही कपटी माया जन्मतः या देहीला जोडल्या गेली आहे. म्हणुनच ही देही मनी ईच्छा आशा मनशा कल्पना रंगवत कपट कल्पुन धोका देवुन काही ना काहीतरी मिळवण्यासाठी प्रयत्न करत या मायेच्या अध्यानी राहते. ही देही मायाशक्तीच्या आहारी नेहमी पडत राहते. मायेने पाजलेल्या तिरगुणी प्याल्यामुळे, मायेच्या अध्यानी असलेला कोणी एक तिरगुणी मायेला सोडुन भक्ती करत नाही. तिरगुणांचे ओझे टाकुन देण्यास सांगुन तिरगुणी मायेच्या पलीकडे घेवुन जाणारी शुध्द सत्व ची गोडी लावणारी चतुर्पतीची अमृत वाणी कोणी तिरगुणी घेत नाही.

**०६ महामाया :-**




खंड०१/०२/०३ मायाचैत्यन्या गाईच्या ओवीत चौथ्याच्या पोटात असलेली वेंदांसह सपुर्ण ग्यानसंप्पत्ती प्राप्त करण्यासाठी माया ने ज्या कल्पना कल्पील्या होत्या, त्या कल्पना साकार करण्याकरीता तीने अनेक माव लिला खैळ मांडत मावची कलारीन बनुन महामाया चे रूप घेतले. आपल्या मोठया मोठया पेठा स्थापल्यात. आपला बाजार मांडला. आणी या बाजारात ती कलारीन बनुन बसली. या तिरगुणी पेठेत येणा-या जनलोकास ती मधुपानाप्रमाणे आपले मायाज्ञान पाजु लागली. ही महामाया तिच्या तिरगुणी मायाज्ञानाच्या पेठेत येणा-या जनलोकांस मायायुक्त तिरगुणी ज्ञानाचे प्यालावर प्याले पाजुन त्यांना धुंद करू लागली.

तिरगुणी मायाज्ञानाची नशा वर नशा चठवुन त्यांची मुळ शुध्द हरवु लागली. त्या जनांस त्याच्या शुध्द स्वरूपाचा विसर पाडुन आपल्या मागे लावु लागली. आणी आपल्या मागे नाचावयाला भाग पाडु लागली.

या महामायेच्या पेठेतच तिघांनी गळा हात घालुन जेव्हा चौथ्याला आणले, तेव्हा तो चौथा भैसानं या पेठेत येताच 'जैसा देश वैसा वेष' घेतला खरा ! परंतु कारण महाकारण चे मधुपानाप्रमाणे प्याल्यावर प्याले पाजुनही त्या चौथ्याला आपल्या स्वरूपाची शुध्द होती. म्हणुनच त्या पेठेतील कारण-महाकारण ची तिरगुणी नशा उलटवुन पुर्णतः शुध्दित राहुन, त्या चौथ्या भैसांने त्या तिघांचा जो भाग होता तो भाग त्यांना देण्याकरीता त्यां तिघांच्या समोर तिन च वेद पढले/वाचले. आणी ज्या वेदानं तो चौथा जागी होतो, तो आपला भाग असलेला चौथा अथर्वन् वेद पुढील येणा-या यवगाकारण आपल्या पोटीच ठेवला. अमृत संजीवनी असलेला तो चौथा चतुर्पता अथर्वन् वेद काही त्या तिघांच्या हाती लागला नाही. ते तिनदेव तिन वेद घेवुनच खुशाल मनात आहे..

अश्या प्रकारे ग्यान संप्पत्ती प्राप्त करून घेण्याकरीता, आपले स्वार्थ साधण्याकरीता, आपले स्वहीत जपण्याकरीता, काही ना काही घेवुन जाण्याकरीता माया ही अनेक माव/लीला खेळ रंचत महामायाचे रूप घेते. आणी आमच्या हातच-पोटचं झुठं घेवुन जाते.

॥ झुठीं माया, झुठी काया । झुठे देव तिन ।
भैसा मुखचं झुठं घेतलं । झाले बेईमान ॥
॥ उष्टेच उष्टे अवघेच उष्टे । कौतुक पहा या देवाचे ॥
॥ जो नाही होणार बेईमान । त्याला हा चौथादेव नामी सांभाळन ।
जो होईन बेईमान । त्याची, तो चौथा पुस घेईन ॥
॥ फितुर बम्हया । अवघे शरण । म्हणे तिर्थ तुया पायी ।
पाय धुवुन जग पितीन । तरी त्यात अमृत नाही ॥
॥ चतुर्पता वेदांत गाय । हे माझ तिर्थ ।
ईची अमृत संजीवनी आहे । या चौथ्याच्या पोटात ॥

ही महामाया या देहीला जन्मतः जोडल्या गेली आहे. म्हणुनच ही देही कोणत्याही प्रकारची संप्पत्ती उदा. धनसंप्पत्ती ज्ञानसंप्पत्ती ....ईत्यादी प्राप्त करण्यासाठी, घेण्या-देण्यासाठी अनेक लहान-मोठया खेळांचा बाजार रंचत-मांडत-मोडत धडपडत राहते. अंती ही महामाया संग जीव घेवुन हातच-पोटचं झुंठ घेवुन जाते.

**०७ प्रपंच माया :-**




तिन वेदांची ग्यानसंप्पत्ती प्राप्ती झाल्यानंतर या महामायेला आपला तिरगुणी प्रपंच थाटुन त्याचा विस्तार करावयाचा असल्यामुळे पुठे मग ती प्रपंच माया झाली.

तिरगुणी तिन वेदांचा प्रपंच विस्तारासाठी या तिन वेदांचे मुले म्हणजे ६ शास्त्रे जन्मा घातले. आणी या ६ शास्त्रांचे मुले १८ पुराणे जन्मा घालुन या १८ चे अनेक मुले जन्मा घालुन वेदांचा प्रपंच विस्तार केला. या आपल्या ३ वेदांचे ६ पोरे व १८ नातु सह अनेक पणतु चे संवर्धन पालन पोषन संभाळ करण्यासाठी या आजीबाईने विविध रूप घेतले. त्यापैकी तिन रूपांची मोहनमाळा तिघांच्या गळयात घालुन ईतर विविध रूपांची मोहनमाळा तिरलोक्यातील तिरगुणी अवतारा सह देवांगण तारांगण, भक्तांगण, मानवगण....ईत्यादी च्या गळया मध्ये घालुन या प्रपंच मायेन विस्तार मांडला.

ही प्रपंचमाया या देहीला जन्मतः जोडल्या गेली आहे. कोणत्याही प्रकारची संप्पत्ती प्राप्ती नंतर उदाहरणार्थ धनसंप्पत्ती ज्ञानसंपत्ती...ईत्यादी प्राप्ती नंतर ही देही प्रपंच थाटुन त्याच्या विस्ताराच्या प्रयत्नात राहते. सर्वसामान्यजन प्रपंच थाटण्याईतपत धनसंप्पत्ती प्राप्ती झाल्यानंतर अस्तुरी संग विवाह करून प्रपंच थाटतो. व या आजीबाईचे रडगाणे ऐकत प्रपंचाचे पालन पोषन संभाळ विस्तार करतो. तर स्वतःला ज्ञानी घोषीत करणारे ज्ञानीजन थोडीबहुत ज्ञानसंप्पती प्राप्त झाल्यानंतर स्वयःघोषीत गुरू बनुन आपले शिष्य बनवत आपला आध्यात्मीक प्रपंच थाटुन त्याच्या विस्तारासाठी प्रयत्नरत् होतो. माझ माझ मोठं म्हणत कुणाचीही गाही न मानत, दिखावुपणा, झगझगीतपणा दाखवत मिरवतो.

या सप्तमायेचे आवरण काढुन जेव्हा चेतना मुक्त होते, तेव्हाच आध्यात्मीक दिव्य विश्वाचे ज्ञान त्याच्यापर्यत येते. त्याला दिव्य ग्यानप्राप्ती होवुन त्याचा दिव्य आध्यामिक विश्वाशी संपर्क येतो. आध्यात्मीक सुक्ष्मेतर सुक्ष विश्वांचे अनुभव येते. आणी या अनुभवसंपन्न संपर्कानंतरच त्याला आकाशमात मधील चतुर्पती निरंजन ग्यानासह सर्व दिव्यग्यान प्राप्ती होत आउक यवग त्याच्या देहघरी येते. आकाशऋषी चतुर्पता अथर्वन् वेदाचे निरंजन ग्यान सह सुक्ष्म वेदग्यानाचे गुजांरण करतो. आणी हे गुंजारण ऐकत अनुभवत तो परिपक्व होत होत तो चौथ्याकडे जातो...अन्यथा नाही !

म्हणुनच या सप्तमायेने दुषित झालेली चेतना शुध्द सत्वात राहुन शुध्द सत्कर्म करत शुध्द केली पाहीजे. या करीता कधी कधी या सप्त माये ला कुरवाळत तिला धोका देवुन तिला दुर सारण्याचे अत्यंत किल्ष्ट काम चतुरपणाने करावे लागते. तर कधी तिला लाथ मारावी लागते. तेव्हा कुठे तो चौथा बुध्दिच्या दृष्टीक्षेपात येवुन त्या चौथ्या सत्यदेवाचे दिव्य असे चतुर्पतीचे निरंजन ग्यान सह अन्य ग्यान तुमच्या बुध्दिपटलावर येवुन ते पढता येवु शकते. आणी त्या दिव्य ग्यानानेच तुम्ही त्या चौथ्यापर्यत पाहचु शकता.

या सप्त मायेने दुषित झालेल्या जीवाला बध्द जीव म्हणजेच मायेच्या बंधनात असलेले जीव असे म्हणतात. बंधन प्रत्यक्ष्यपणे तेव्हाच अनिवार्य असते जेव्हा त्याचा सुपरिणाम होत असतो. परंतु या सप्तमायेचे बंधनाचा परिणाम अनिष्ट चौ-यांशीत फिरवत ठेवणारा आहे. या सप्त मायेचे बंधने मानवाला जन्मतः जोडल्या गेले असल्यामुळे तिचे सर्व बंधने तोडण्यास त्याची दमझाक होत होत ते बंधने तोडण्यास तो असमर्थ ठरतो.

म्हणुनच अत्यंत अनिष्ट परिणाम देणारे मायेचे बहुतांश बंधने जिथे गरज असेल तिथे कधी कधी चतुराईने झुगारून देण्यातच चतुरपणा आहे. म्हणुनच चतुराई करून त्या सत्य देवालाच हे बंधने तोडण्याची विनवणी करा. मायेचे बध्द जीव म्हणुन तुम्ही न राहण्यासाठी, विनवा विनवा हो त्या चौथ्या सत्यदेवाले !

॥ बंधन तोड गा देवा । तुमच्या चरणाचा धरला धावा ॥
॥ प्रपंचाची झापड आहे माझेया डोळ्याला ।
पंचेचाळीस चौक्या तोडुन । भेट दयाहो मजला ॥ -०२/०२

॥ कर्ता-यानं केली करणी । आदी भैसाची उठली धुनी ।
पाप-पुण्यांची घेवुन लेखनी । तो नित्य करे कारकुनी ॥

जेव्हा कर्ता-यानं करणी केली, तेव्हा शक्तीमाया उभी झाली. ती प्रकृती माया विटाळी बंधन मागे आपल्या कर्ता-याला । तिच्या विनवनीला पावन होवुन कर्ता-यानं तिच्या विटाळ निवृत्तीला चौथा दिन देवुन, या आदीशक्तीला विटाळी बंधन दिले.

जेव्हा प्रकृतीला विटाळी बंधन मिळाले, तेव्हा दोन्ही बिंदु एक झाला. आणी तेव्हाच पित्याच्या तिन महीने मस्तकी असलेला तो निराकार पुतळा सम्मावला. त्याने मग निर्गुण सहानर साचा सचवला. या निर्गुण साचा पासुन सगुण रक्त-मासाची मुस बनवली. आणी या सगुण झालेल्या साच्यात तो मुळचा निरंजन धनी आपला तेजोगुणी अंश अवतार घेवुन निश्कलंकी सोहंम् ज्योत स्वरूपात या सहानर साच्याला चैतन्य देण्याकरीता आत्माराम बनुन उभा झाला.

निरंजन धन्याच्या या अवताराने जेव्हा या सगुण साच्यात म्हणजेच या देहीत सोस म्हणजेच श्वास भरला, तेव्हाच या देहीच्या तिरलोक्यी तिरभवनी त्या आदीभैसाची ओहंम्-सोहंम् धुनी उठली. या धुनीनं गेल्या वस्त्या आणुन देण्यासाठी, राया भैसानं या देहीच्या तिरकुटावर चढाई करून संपुर्ण देहीचे राज्य हस्तगत केलेत. आणी या देहीच्या दप्तरी आपले अंश अवतार आत्मा ला कारकुन बनवुन उंच ठिकाणी बसवले आहेत. धन्याचे तेजोगुणी अंश असलेला, त्याचा हंस अवतार असलेला कारकुन आत्माराम हा पाप-पुण्याची लेखनी घेवुन आपल्या धन्याची नित्य कारकुनी करत या देहीत उभा आहे.

हा कारकुन आत्मा या देहीने केलेले कोणतेही चांगले-वाईट कर्माच्या संस्काराची शाई पाप-पुण्याच्या लेखनीत भरतो. आपल्या सुक्ष्म बुध्दिपटलावर चित्रगुप्ताप्रमाणे पाप-पुण्याचे लिखान करतो. देहीच्या पाप-पुण्य कर्मांचा साक्षीदार तो आत्मपुरूष बनतो. तो आत्मा या देहीत देहीचे कर्मे बघत त्याची नोंदं घेत बसला आहे. म्हणुनच तुम्ही चांगले सत्कृत्य करा. चांगले कर्मे करा. सर्वाशी चांगले वागा. चांगले रहा. चांगले भले करते.

देहीव्दारे चांगले सत्कर्मे करत चांगल्या सत्संस्काराची शाई त्या आत्म्याला पुरवावी. तेव्हा कुठे तो त्याच्या पाप-पुण्याच्या लेखणीत ती चांगल्या सत्संस्काराची शाई टाकुन चांगले लिखान करन. त्याच्या चांगल्या लिखानाने चांगलेच होईन. वाईट लिखानाने वाईट होईल. हेही निश्चित आहे.

एखादयाने वरवर जगाला दाखवण्यासाठी चांगले कर्म मनात दुषित हेतु व वासना ठेवुन आरंभले, तर त्याच्या मनातील दुषित वासना-आसक्तीयुक्त हेतु जगाला कळणार नाही. परंतु त्या वरवर दिसणा-या चांगल्या कर्माच्या आड असलेल्या दुषित वासना-आसक्तीयुक्त हेतु त्याच्या आत्मा पासुन कदापी लपणार नाही. कर्माचे आड लपलेले दुषित वासना-आसक्तीयुक्त कर्माचे लिखान त्या देहीचा तो आत्मपुरूष करेलच. म्हणुनच आपल्या देहीचे वाईट कर्मे जगापासुन कितीही लपवले तरी देहीच्या आत्म्यपुरूषा पासुन ते कदापी लपणार नाही. तो आत्मपुरूष सत्याचेंच लिखाण करेल.

म्हणुनच एखादयाला जर असे वाटत असेल की : त्याने वरवर चांगल्या कर्माचा पांघरून घालुन, त्या पांघरूना आड त्याचा मुख्य दुषीत हेतु लपवुन जगाला मुर्ख बनवले. तर तसे ते त्याचे वाटने अत्यंत चुकीचे असुन, ते त्याच्या स्वतःचेच अत्यंत मुर्खपणाचे लक्षण आहे. कारण की :

त्याचा तो दुषीत आसक्तीयुक्त कर्म हेतु चे लिखान, धन्याचे कारकुनाचे काम करणारा त्याचाच देहीच्या दप्तरी बसलेला त्याच्या आत्मा नक्की करेल. त्याच्या कर्माच्या मागे दडलेले वाईट कर्माचे वाईट लिखान तो करेलच. आणी आपल्या धन्याला त्याच्या त्या वाईट कर्माचे लिखान दाखवेलच. जसे कर्म तसे फळ या न्यात्याने त्या कर्माचे फळ हे त्यास भोगावेच लागेल. म्हणुनच पुनः पुनश्च कृष्णा सांगी करतो की :

तुम्हा मानव बनवुन पाठवले. मानवा सारखे राहा. पशु सारखे वागु नका. मोठेपणाचे पांघरून घेवु नका. बरे गा माझे लहानपण म्हणत लहानपण धरून राहा. भष्टाचारी न होता, चांगल्या आचार-विचाराने चांगले वागा. भष्टाचारी कृत्य न करता, चांगल्या रितीने आपले नियत कर्तव्य कर्मे, सतकृत्य करत राहा. चांगल्या रितीने दया क्षमा शांती धरून हद्यी सारंगधर भरून, भाव भक्तीने सरळ साध्या सिदाईच्या मार्गाने चांगले चाला. चांग भल ! सर्वकाही चांगलेच होईल. अन्यथा असे जर नाही वागले तर जित्या जन्मीच चौ-यांशी भोगावी लागेल. आणी राहलेली चौ-यांशी मेल्या माग तरी चुकेल काय ?

म्हणुनच कर्मफलाची आशा न धरता सत्कर्माचे फळ धन्याला अर्पण करत राहा. सत्कृत्ये करत सत्कृत्याच्या अधीक्याने तिरगुणांच्या पल्याड पाहत, नामी राहय भजनी राहयं. चुकन चौ-यांशी.. अशी धन्याची सांगी आहे.

॥ परात्पर परमेश्वर । वेद घेवुन बोले शास्त्रंर ।
परमेश्वर पदार्थ थोर । ठाई-ठाई भरला सागर ॥ धृ ॥

प्रथम पदार्थ एकला आदीरूप परमेश्वर ! त्या एकल्याचाच आंगचा त्याचाच तेजोगुणी अंश म्हणजेच आत्मा हा दुसरा पदार्थ ! तर त्या एकल्याचीच ''मो-हं सृष्टी रंचावी'' ही ईच्छा त्याच्याच मुळावरचा रंग धरून अद्‌भुत अश्या शक्ती स्वरूपात उभी झाली तो तिसरा पदार्थ ! या शक्तीला जागे करून दिलेले देवता म्हणजे चौथा पदार्थ आणी यां देवतांना देणं देवुन सृष्टी प्रपंच दिला तो पाचवा पदार्थ !

अश्या रितीने प्रथम एकला परमात्मा, दुसरा आत्मा, तिसरी शक्ती, चौथे देवता आणीक पाचवा प्रपंच ! हे पाचही पदार्थ त्या एकुलत्या एक परमेश्वर नावाच्या पदार्थाने स्वतःपासुन अलग-अलग करत निर्माण केले असल्यामुळे, तो मुळावरचा एकच निराळा परमेश्वर पदार्थ थोर आहे.

तोच एकला सागर ! त्या एकल्या धन्याच्या अंशाने या पाचही पदार्थासह सर्व पंचक षट् सप्तक अष्टक नव... ईत्यादी सर्वत्र चरांचरां मध्ये तो परमेश्वर पदार्थ भरून ठाई-ठाई भरून भरला आणीक उरला आहे. या परमेश्वराबध्दलच वेद घेवुन शास्त्रे बोलत आहे. हा परमेश्वर पदार्थ थोर ! ठाई-ठाई भरला हा सागर ।

पुढील पानावर....

पिंडामध्ये नदया चारं । त्या कोण्या मार्गावरं ? :-







॥ नवनाडयाची ओवी ॥

॥ शक्तीस्वरूपी गंगा नदी होय । डावी ईडा नाडी ।
कैलासाहुन आली ही गंगा । मुलाधारात गेली ॥

॥ शंभुस्वरूपी यमुना नदी होय । उजवी पिंगळा नाडी ।
वैकुंठाहुन आली ही यमुना । कमरेत गेली ॥

॥ निराधारी सरस्वती नदी । होय मध्य सुषम्ना नाडी ।
सत्यलोकाहुन आली ही सरस्वती । अधांतरी राहली ॥

॥ चौथी भागीरथी नदी । होय सत्रावी हिरण्यगर्भि ।
भागीरथ प्रयत्न करून योग्यांनं । आणली आपल्या मुखी
त्या योग्याला अगध नाही । अन्न या पाण्याची ॥ ०४ ॥

॥ या नदयांची मिळवणी आहे । त्रिकुटा वरी ।
या त्रिवेणीसंगमी आंघोळ करून । चढुन जावे घाटावरी ॥

॥ मुखा मध्ये अलंबुषा । लिंगस्थानी कुहु नाडी ।
गुदस्थानी शंखिनी । ऐश्या या प्राणवाहक दश नाडी ॥

॥ या नदया वाहत आल्या । आधारा वर ।
मुल आधाराला धक्का देवुनी । घ्यावे पीडीतील सहाही दर्शन ॥०७॥

खंड०३/ओवी२६ सांगतो स्वरग्यान च्या ओवी च्या
निरसनातुन नाडी ग्यानचे अधिक ग्यान घ्यावे.
पुढील पानावर...

पिंडा मध्ये चक्रं सातं :-

॥ पिंडचक्रावरील सहा दर्शन ची ओवी ॥

॥ चार पांकोळीका गुद् स्थानी । मुल आधार चक्रं ।
गणेश शारदा कुंडलीनी शक्तीचे । झाले पहिले दर्शन ॥
॥ सहा पांकोळीका लींग स्थानी । स्वाधीष्ठान चक्रं ।
ब्रम्ह देवता सावित्री शक्तीचे । झाले दुसरे दर्शन ॥
॥ दहा पांकोळीका नाभी स्थानी । मणीपुर चक्रं ।
विष्णु देवता कमळा शक्तीचे । झाले तिसरे दर्शन ॥

॥ बारा पांकोळीका हृद्य स्थानावर । अनाहत् चक्रं ।
शिव देवता उमा शक्तीचे । झाले चौथे दर्शन ॥
॥ सोळा पांकोळीका कंठ स्थानी । विशुध्द चक्रं ।
जीव देवता अ विद्या शक्तीचे । झाले पाचवे दर्शन ॥
॥ दोन पांकोळीका भुमध्य स्थानी । अग्नं/आज्ञा चक्रं ।
परमहंस देवता माया शक्तीचे । झाले सहावे दर्शन ॥

॥ चार सहा दहा बारा । सोळा दोन आहे गुणी ।
झाली पन्नाशीची गणणी । उरले दोन सांगे कृष्णधनी ॥
॥ उरले ते दोन बिज । ओहंम् सोहंम् बिज मंत्रा ।
याहीच्या वाचुन सत्यपुंजन । घडणार नाही जरा ॥
॥ सातव्या अगोचर चक्रावर । आहे माझ सत्य पुंजन ।
या को-या भुम्मेवर निरंजन निर्गुणाचे । झाले लख्ख दर्शन ॥
॥ हा निर्गुण धनी, माझा गुरू । मालुम होईन सर्वत्रा ।
या पिंडीचे सहादर्शन जोग । मांडण, तो निर्वाळा ॥

पिंडीतील चक्रे ०७ :-






०१. **प्रथम मुलाधार चक्र** :- गुद्स्थानी असलेले हे चक्र रक्तवर्ण असुन येथे कुंडलीनी शक्ती हीच गणेश देवता संग शारदा शक्ती येथे वसते. या चक्राला चार पांकोळीका असुन, या चार पांकोळीकावर **वं शं षं सं** या चार मातृका वसते. रिध्दी सिध्दी कर्मकळा उत्पत्ती व ईश्वर ऋषी व अपान वायुचे हे स्थान होय.






०२. **दुसरे स्वाधीष्ठान चक्रं** :- लिंगस्थानी असलेले हे चक्र पितवर्ण असुन येथे ब्रम्हदेवता सह सावित्री शक्ती वसते. या चक्राला सहा पांकोळीका असुन या सहा पांकोळीकावर **बं भं मं यं रं लं** असे सहा मातृका आहे. येथे व्यानवायु स्थुलदेह, जागृतिअवस्था, वैखरी वाचा, पृथ्वीतत्व, आचारलींग, सलोकतामुक्ती, सुर्यऋषी, ऋग्वेद, -हस्व अकारमात्रा अर्धशुन्य ईत्यादी असते.






०३. **तिसरे मनिपुर/रविचक्र** :- नाभिस्थानी असलेले हे चक्र निलवर्ण असुन येथे विष्णुदेवता सह कमळाशक्ती वसते. या चक्राला दहा पांकोळीका असुन, या दहा पांकोळीकावर **डं ढं णं तं थं दं घं नं पं फं** असे दहा मातृका आहे. येथे समानवायु सुक्ष्मदेह, स्वप्नअवस्था, मध्यमा वाचा, आपतत्व, गुरूलींग, समीपतामुक्ती, पवनऋषी, यर्जुवेद, दिर्घ उकारमात्रा मध्यशुन्य ईत्यादी असते.






०४. **चौथे अनाहत् चक्र** :- हृद्‌यस्थाना वर असलेले हे चक्र लालवर्ण असुन, येथे रूद्रदेवता उमाशक्ती वसते. या चक्राला बारा पांकोळीका असुन, या बारा पांकोळीकावर **कं खं गं घं ङं चं छं जं झं ञं टं ठं** असे बारा मातृका आहेत. येथे प्राणवायु कारणदेह, सुषुप्तीअवस्था, पश्चंती वाचा, तेजतत्व, शिवलींग, स्वरूपतामुक्ती, इद्रऋषी, सामवेद, प्लुता मकारमात्रा ईत्यादी असते.






०५. **पाचवे विशुध्द चक्र** :- कंठस्थानी असलेले हे चक्र सफेदवर्ण असुन येथे जीवदेवता अ विद्या शक्ती वसते. या चक्राला सोळा पांकोळीका असुन या सोळा पांकोळीकावर **अं आं इं ईं उं ऊं ऋं ॠं लं लॄं एं ऐं ओ औं अं अः** असे सोळा मातृका आहेत. येथे उदानवायु महाकारणदेह, तुर्याअवस्था, परा वाचा, वायुतत्व, जंगमलींग, सायुज्यतामुक्ती, ब्रम्हाग्नीऋषी, अथर्ववेद, अर्धिमात्रा ईत्यादी असते.

०६. **सहावे अग्न/आज्ञा चक्र** :-







त्रिकुटी पाहवे ! तिन देवतांची वस्ती आहे




॥ त्रिकुट ख्याल भरला आहे ।
तिरकुटाच्या संगतीन फळ येतीन भोगनं ॥

भृकटी मध्यस्थानी म्हणजेच दोन डोळयांच्या भुवया च्या मध्य स्थानी असलेले हे चक्र ज्योतीवर्ण असुन येथे परमहंसदेवता सुमना मायाशक्ती वसते. या चक्राला दोन पांकोळीका असुन या दोन पांकोळीकावर **हं क्षं** असे दोन मातृका आहेत. यापैकी एका पांकोळीवर परमहंस देवता तर दुस-या पांकोळीवर मायाशक्ती वसते. या सहाही चक्रावरील ४, ६, १० जनी । १२, १६, २ आहे गुणी । झाली पन्नाशीची गणीता । या सहा चक्रावरील एकुन पन्नास मातृका पुर्ण होतात. दोन सांगे कृष्ण राया । उरते ते दोन ओहंम्-सोहंम बीज मंत्र जाणा ।




येथे त्रिवेणी संगम असुन, ज्ञानदेह, उन्मन्नीअवस्था, परा वाचा, आकाशतत्व, गुणमुक्ती, हंसऋषी, सुक्ष्मवेद, उर्ध्वशुन्य, चंद्राच्या सोळा कला, सुर्याच्या बारा कळा ईत्यादी आहेत. येथुन वर ब्रम्हांडी तिरकुटांचे तिन शिखरे सुरू होतात. म्हणुन याला तिरकुट असेही म्हणतात. ते तिरकुट तिघांचे वरील फोटोत दाखवल्याप्रमाणे...

## ॥ मस्तक बम्हांडाचे चके ॥

### तिरकुटा वरील बम्हांडाचे घाट व चौक्या :-

तिरकुटी तिन शिखरे तिघांचे..

उत्तरेचे शिखर

पुर्वेचे शिखर






गोल्हाटी शंकर

सत्यलोक बम्हा

पश्चिमेचे शिखर



कंठस्थानी

जीवदेवता

रसनेहटी श्रीहाटी

विष्णु देवता

**१. प्रथम पुर्वेचे शिखरी सत्यलोक बम्हाचे ।**

हा बम्हा सावित्री/देहीचे स्वरूप पाहतो. जातकर्मे करतो. सर्वप्रकार पाहुन तिन गुण सर्वत्र मिळवत राहतो. उत्पत्ती करतो. येथे स्थुल भोग सर्वत्र दिसते. पंचतत्वांची आटणी येथे होते. या सत्यलोकच्या घाटावरी सर्वत्र अष्टधा प्रकृतिची निर्मिती असुन येथे स्थुल देह, जागृती अवस्था, वैखरीवाचा, अकारमात्रा, ऋग्वेद, सलोकतामुक्ती ईत्यादी त्रिवेणी संगमी असते.

**२. दुसरे पश्चिमेचे शिखरी वैकुंठ विष्णुचे ।**



रसनेहटी/जीभेच्या वर श्रीहाट स्थान आहे. येथे पश्चिमेचे शिखरी वैकुंठ असुन येथे निळवर्ण विष्णुदेवता वसते. रसना स्थळ चे लिंगदेह हटल्यावर हिरण्यगर्भ देह तेथे असतो. हेच न्यनता नसलेली परिपुर्ण सत्रावी जीवनकला होय. चंद्राच्या १६ कला पुर्ण झाल्यावर या १७ व्या जीवनकलेत कृष्णधनी उभा होत असतो. सत्रावीत कृष्ण उभा होवुन बासरी वाजवतो. त्याची बासरी ऐकुन सत्रावी हिरण्यगर्भ गाय पान्हा सोडत राहते. तो पान्हा योग्याच्या मुखी टप टप टपकत राहतो. सत्रावीच्या पान्हा मधुन योग्याच्या मुखी अमृताचा प्रसाद चा लाभ होतो. या प्रसादामुळे त्या योग्याला अन्न-पाण्याची अगध राहत नाही. चैतन्यमय शुध्दस्वरूपी जीव मिळे ! जीवा-शिवाच्या भेटी निरंजनी होये. आणी मग आनंदाची ज्योत आनंदात राहे. आनंद सोहळा अनुभवे ! तिरभवनी सुख न मावे । अनुहत् स्वर चाले ! या श्रीहाट घाटावरी उंकारमात्रा, विलयस्थीती अवस्था, गुरूलींग, मध्यशुन्य, मध्यमावाचा, यजुर्वेद, समीपतामुक्ती, ईत्यादी भेटते.

**३. तिसरे गोल्हाट चकावरी उत्तरेचे शिखरी कैलास शंकराचे ।**



पृथ्वी गोल गोल गोल्हाटी ! चक्षु गोल्हाट चककमळी गोलाकार गोल्हाट चक फिरत राहते. या गोल्हाटचक घाटावरी उत्तरेचे शिखरी कैलासी शंकर वसते. सुर्याच्या १२ रवी-सिध्दी पुर्ण झाल्यावर तेराव्या सिध्दीच्या ठाई येथे समर्थ निरंजन धनी उभा होतो..



आणी मग उजव्या रवी व डावा चंद्र डोळयांच्या अनुकमे बारा व सोळा नेत्रकमळी या स्वरूपा-स्वरूपी मिळते. या चक्षु गोल्हाट चककमळी तेज ऋषी झळाळी करतो. शिवलींग सामवेद केवळ भेटतो. सुषुप्ति अवस्था मकारलय प्राप्ती होते. येथे समस्त लालवर्ण सुरंगे शोभती !

येथे लालवर्ण तमोगुणी रूद्रदेवता, शिवलींग, प्लुत मकारमात्रा, उर्ध्वशुन्य, प्रलय अवस्था, पश्चंतीवाचा माया, कारणदेह, स्वरूपतामुक्ती, रेचक पवन,

पिनाकपाणी देवता,... हे समस्त राहत असते. येथे नामधुनी, शंखाचा नाद सारे गर्जत असते. आता या त्रिकुटाच्या वर पुढे जाण्याकरीता हरीला विनवा की :

॥ आम्ही आहो मुढे मुढं । रस्ता दाखव देवा होय गा पुढं ॥
॥ रस्ता आहे बिकट । चढतांना बहु लागते नेट ॥
॥ रस्ता आहे कठीन । हा होय करवती घाट ॥
॥ करवटी घाट येंगला/चढला । त्रिकुट पर्वतावर चढुन गेला ॥
॥ त्रिकुटी तिन पर्वत । चढले कठीन याहीनं ।
ज्योतीचं ठिकाण पाहीलं । शिखरा वर ॥
॥ शिखरा वर गेला । प्रकाश लाभला त्याला ।
प्रकाश पडला ज्योतीचा । ब्रम्हा विष्णु शंकर भुलला ॥
॥ ब्रम्हा भुलला, विष्णु भुलला । भुलला शंकराचे घर ।
सावंगपुरी उभा राहीला/झाला । तो सारंग धर ॥
॥ ज्योतीनं ज्योत प्रकाश । भरन/उजेड देहीत ।
उजळले रूप सुर्याच्या तेजात । जैसे रूप सुर्याचे तेज ॥
॥ चतुर्पती निरंजन गिण्यान । देणं झाले त्याहीला ।
ब्रम्हा विष्णु शंकर । उडुन गेले अंतराळा ॥
॥ निरशुन्यामध्ये तो भगवंत । निराकार होता ।
याहीच्या बिना कोणी नाही बापा ! मोक्षाचा दाता ॥

**४. चौथे ब्रम्हांडी औटपिट नगरी निराकार नारायणाची ।**




तिरकुटाच्या वरील तिन शिखरांच्या अग्रावर ब्रम्हांडाची औटपिट नगरी आहे. तिरगुण त्यागल्यावरच येथे प्रवेश मिळतो. म्हणुन आता तिघांचे त्रिगुण त्यागावे. आणी चौथा शुध्द सत्व गुणांशी पकडुनी राहावे. तेव्हा कुठे येथे शुध्द सत्वगुणी निळवर्ण निराकार भैस नारायण देवताचे दर्शन होते. या दर्शना करीता सदोनित चतुर्थ गुणांची महीमा ऐकावे. परंज्ञान शुध्द सत्व जाणावे. ज्या देही शुध्द सत्व गुण संचारे । तो त्रिगुणांचा सहजच त्याग करे । एकच धर्म एकच नेम धरा की : नित शुध्द सत्व ग्यान आचरण ठेवुन चतुर्पतीचे भजन पुजंन ध्यान सुमरण सदोनित करावे.

येथे वायुऋषी नानापरी बोले । या घाटावरी जंगमलींग देव अथर्वन् वेद उच्चार करीत राहतो. ओंकार-अर्धमात्रा, चतुर्थशुन्य, चौथी तुर्यावस्था. तुर्याची उन्मन्नी अवस्था शोधुन शोधुनी । जीवाचा भ्रम दुर करी । परावाचा, मुळप्रकृतीदेह सायुज्यतामुक्ती, नादबिंदु, ओंकार इश्वराचे ज्ञान भक्ती या पुण्याग्नि स्थानी नित असे.

ऐसे हे मस्तकी ब्रम्हाडीचे चार स्थाने जाणा. हे चार स्थाने मस्तकाच्या चौकोणटयावर असुन या चौकोणटयावर निरंजनाने आपले चार अवतार आपआपल्या स्थानी उभे आहेत. ते चार म्हणजे ब्रम्हा विष्णु शंकर हे त्रिदेव आणीक चौथा बसुन चौक्या चार आदीमुनी अवतार चैतन्य निराकार आत्मपुरूष आहे.

॥ चौकोनटया वर चार अवतार । उभे ठाई ठाई ।
सावंग्या मध्ये अवतार उभा । कृष्णराज भैष ॥

या चार स्थानाच्या वरील स्थानावर धन्याचा निरंजन अवतार आदीपुरूष कृष्णराज भैष उभा आहे. येथे जाणे-येण्यासाठी भ्रमरगुंफा पाचवी वाट ठेवली आहे. ही भ्रमर गुंफा कानसुळी पासुन ब्रम्हरंध्र भुवना पर्यत जाते. या भ्रमरगुंफा

वाटेने या पिंडातल्या सहस्त्रागार स्थित सावंग्याच्या अकाशमात मध्ये जावुन आता पुढे त्या ठाई जीव रूप पाहय. या वाटेने ते भ्रमणा करे ठाई ठाई !

पुढे भ्रमर गुंफीची वाट । वर सत्रावीचा देठं :-

**७. भ्रमर गुंफा :- नजीकचा मार्ग/शॉट्कट**



**७. भ्रमर चकरं** :- ही भ्रमर गुफा श्रौतस्थानी आहे. श्रौतस्थान वरचा हा भ्रमरगुफेचा घाट रस्ता त्रिकुटाचे तिन घाट व चौथा औटपीटचा घाटावरून सत्रावीचा देठावर येवुन ब्रम्हरंधभुवना पर्यत जाते. या भ्रमरगुंफेच्या मार्गाने चार घाट लागत नाही. हा मार्ग सरळ सत्रावीचा जिथे देढ आहे त्या ब्रम्हरंध स्थानी योग्याला पोहचवुन देते. या भ्रमरगुफेच्या घाटावर आहे आकाशऋषी हा सुक्ष्म वेदोच्चार करीत निर्मळ गंगा, सुक्ष्मवेद व अगोचर स्थानाचा पत्ता योग्याला सांगतो. ओत-प्रोत भरून तो योग्याला बिजमंत्र देतो. योग्यात उन्मन्नी अवस्था आणतो. चवथी तुर्या अवस्था तो या उन्मोनीने दाखवतो. जीवाशी उन्मत्त निजरूप दाखवुन सर्वत्र आनंद पसरवत जातो.

कानसुळीत/भ्रमरगुंफेत भ्रमरचक्र भ्रमणा करते. या भ्रमरगुंफाच्या माझारी योगबळाने जावे ! पहा याही नजीकच्या रस्त्याने अमृतवल्ली भेटे ! जीव-शिवाच्या भेटी होये !

कानसुळीच्या याच शॉट्कट/नजीकच्या मार्गाने चतुर्पतीचा गडी आकाशऋषीचे गुंजारण व प्रसादलिंगी होणारा सुक्ष्मवेदाचा उच्चार ऐकतो. *तिरकुट ख्याल भरला आहे । या तिरकुटांचे करता तरी काय ?* असे म्हणत तिरकुटी मार्गाला सोडुन या वरच्या भोर गुंफीच्या चौथ्या मार्गाने, निराकार आदीपुरूष नारायणाचे पाय धरण्याची आस धरून जीव-शिवाच्या स्थानावर सरळ जातो. त्या ठाई तो जीवरूप पाहतो. लहान/धाकटी उन्मन्नी अवस्था शोधुन जीवाचा भ्रम दुर करतो. कैवल्यमुक्ती स्थानी जावुन पोहचतो. आणी मग मायेची विस्मृती होवुन केवळ निरंजन चतुर्पती धनीदेवाचे ज्ञान प्रकटते.

या भ्रमरगुंफाच्या भ्रमरचकाठाई कृष्णवर्ण झळाळी असलेला सदाशिव देवता आहे. येथे सगुणज्ञानदेह, परात्परवाचा, कैवल्यमुक्ती, धाकटी उन्मन्नीअवस्था, अर्धमात्रा, प्रसादलींग आहेत.

वर सत्रावीचा देठ :-

## ॥ सत्रावी ॥

जसे चार घाट चढुन सत्रावी च्या देढावर जाता येते, तसेच भ्रमर गुंफा मार्गाने हे चारही घाट सोडुन/वगळुन सरळ सरळ सत्रावी च्या देढावर जाता येते. या भ्रमरगुंफा वाटेवर सत्राविचा देठ आहे. चंद्राच्या सोळा कला सिध्द होवुन सत्रावी कला मध्ये सत्रावीच्या हिरण्यगर्भ देहभुम्मेवर सेरूपी सावळा उभा

होतो. या हिरण्यगर्भ देही च्या सत्रावी चा पान्हा पिवुन ब्रम्हरंध ठिकाणी जीवा-शिवाची भेट होते.

॥ सत्रावी जिवनकळा जाण । सत्रावीचे पाणी भरले उलटे दांडान ।
येथे उभा साळुचा भ्रतार । लावले यानं सत्रावीचे नहर ।
जीवा-शिवाच्या होते भेटी । पहा याही रस्त्याने ॥
॥ सत्रावी हिरण्यगर्भ देह होय । हेच होय जीवनकळा ज्योत जाण ॥
॥ दश इंद्रिये मन बुध्दि आणीक पंचप्राण ज्योती ।
सत्रावी हिरण्य गर्भ देहाची । झाली गणती ॥
॥ सत्रावीचे लक्षण । चंद-सुर्य या नयनांच्या कला जाण ॥
॥ रविच्या बारा सिध्दी पुर्ण । तेराव्या सिध्दिठाई धनी उभा होतो समर्थ ॥
॥ तुम्ही डिकावं या नामाला । सुर्यप्रभा सम होईल उजाला ॥
॥ तुम्ही डिकावं या नामाला । चंद्रज्योती सम होईल उजाला ॥
॥ चंद्राच्या सोळा कळा पुर्ण । कृष्णधनी उभा होतो या सत्रावी ठाई ॥
॥ कृष्णधनी वाजवे बासरी । सत्रावी, हिरण्यगर्भगाय पान्हा सोडी ।
मुखी सत्रावीच्या धारा येई । अगध नाही राहे अन्न या पाण्याची ॥
॥ शुध्दरूप जीव स्वरूपी । जीवा-शिवाच्या होते भेटी याही रस्त्यांनी ॥
॥ सत्रावी ज्योत जीवनकळा । सेरूपी उभा येथ कृष्ण सावळा ॥
॥ दशइद्रिये पंचप्राण मन व बुध्दि । या सतरा समया लावल्या ठाईठाई ।
कर्ता-याची अमोल चतुराई । ब्रम्हाडावरची ज्योत पाही ।
चैत्यन्याची वात सत्रावी ॥
॥ सत्रावी उभी जीवनकळा । जीव मोक्षाचा हिरं जीव्हाळा ॥
॥ गोडी लागली सत्रावीची । विषम विसर्जन झाले आम्हाशी ॥

या सत्रावी हिरण्यगर्भदेह ठाई उकारमात्रा विलयस्थीती अवस्था आहेत. येथे मध्यमा वाचा, विष्णु देवता व पंचभुताचा एकवटा असे. येथे सात्वीक अहंकार विकार । अंतःकरण, मनबुध्दि, चित्त, अहंकार काळघर । ब्राम्हीमाया पुरूषाक्षर आहे. या सत्रावी जीवनकलेच्या देढाच्या वर कैवल्यभुवन आहे.

## ६. ब्रम्हरंधभुवन/कैवल्यभुवन/परमहंसभुवन :-

।। प्रमुख्या शक्तियाँ दोन रुपात ब्रम्हांडी असण्या ।
इच्छाशक्ती मुक्तमाया आणीक माया ।।
।। पहिली ईच्छाशक्ती मुक्तमाया । आत्मग्यान देई ।
निरंजन प्रभुकडे नेई । मोक्ष मिळवुन देई ।।
।। दुसरी ईच्छामाया मायादेवता । सर्व सिध्दि देई ।
नोंहित करी सर्व । मोक्षपदापासुन दुर नेई ।।
।। या मायेनं नाडले ब्रम्हा विष्णु शंकर मोठे मोठे ऋषिमुनी समर्थ ।
या जगात मायेनं । सिध्दिनीं देवुन मोक्षापदापासुन दुर ठेवले ।।
।। जोकोणी तोडनं ही माया शरीरी जडन तो निरंजन राय ।




।। ज्योत चमके त्रिकुटावरी ।
उन्मुनी अंगीकपाटी गिरी ।
देहदेउळी दरु ज्योती ।
षटचक्रं भेदी कांती ।।

। ब्रम्हांडाची दिवाळी येती ।
तेल नेतला गात सत्रावी ।।

।। प्रभुची ईच्छाशक्ती मुक्तमाया ।
मुक्तमायेचे लक्षण ।
शुध्दसत्य आत्मग्यान ।।

। माया त्रिभुवनी व्याली ।
सर्वभुती प्रसवली ।।
।। मुख्य याची याणी चारही ।
वेद पुराण माया सारी ।।

सहस्त्रदळी ब्रम्हरंध भुवन आहे. येथे जाण्याचे दोन मार्ग आहेत.

१. तिकुटी त्रिदेवांच्या ब्रम्हाडीच्या तिन चौक्या वरचा घाट आणी चौथा औटपीट चौकीचा घाट पार करून या चार चौकीच्या वर असलेल्या सत्रावी देढाला पकडुन ब्रम्हरंध भुवना जावे लागते.

किंवा

२. पाचव्या भ्रमरगुंफीच्या भोर गुंफीच्या वाटेने चौथ्या हिरण्यगर्भगाय असलेल्या सत्रावीच्या देढ पकडुन, अमृतझरा प्राशन करत ब्रम्हरंध भुवनापर्यत जाता येते.

जो चौदेहावरी गेला, त्याने या पदी कैवल्य देह प्राप्त केला. केवळ प्राप्त करून तो अमरपदी अमर झाला. परंसृष्टीशी मिळाला. रत्नानर्व पदी न्हावुन निघाला. तो जीव शिवास मिळाला. जीव-शिव एकमेकात मिळुन केवळ स्वरूपी झाला. निरंजनाची कृपा त्यावरी झाली.

निरंजनरूपी ऐक्य करण्यास सर्वत्र आनंदाशी तल्लीन झाला. मन-पवनाचा ग्रास केला. माया-मोह जिरवला. सर्व तिर गुणचक्रे व इंद्रिये विषय चा लय करून प्रलय अवस्थेशी मिळाला. निर्मळ गंगेत न्हाला. लभेद झाला. ज्योतीरूपी प्रकाश प्राप्त केला. आनंदाची ज्योत बनुन आनंदी राहला. ऐसा कृष्ण शिवयोगी आपल्या बिर्दाच्या कामतत्वी गुंतला, गुंतुनी पुनःपुनः उगवला. ही आनंदाची ज्योत गडे हो आनंदात राहये । या लेकराची बाणी पुरवे हा कृष्णराया येवुनी ।




या ब्रम्हरंध्रभुवनी निर्गुण सर्ववर्ण आदीपुरूष परमात्मा शिवस्वरूप घेवुनी इच्छाशक्ती, ब्रम्हीमाया सह वसलेला असतो. प्रभुची इच्छा ही शक्ती रूप घेवुन येथे प्रभुसंग उभी आहे. तर कल्पना ही मायारूप घेवुन प्रभुसंग उभी असते.

जो प्रभुच्या इच्छाशक्तीकडे वळतो त्याला ती प्रभुची इच्छाशक्ती मुळमाया शुध्दसत्व आत्मज्ञान परंम चतुर्पतीग्यान देवुन केवळ बनवते. आणी ‘जो माझा खेत्री त्याची मी शक्ती तो माझा वर‘ असे म्हणत सिदे निरंजन धन्याकडे नेवुन मोक्ष पद मिळवुन देते.

तर जो कल्पना म्हणजेच ब्रम्हीमाया कडे वळतो त्याला ब्रम्हीमाया ही सिध्दियॉं देते. ब्रम्हीमायेच्या सिध्दीयॉं व्दारे तो योगी मोहीत होवुन सिध्दियॉंच्या मोहजालाला भाळुन तो निरंजन धनी विसरतो. आणी सिध्दियॉंत रमतो. ऐसा सिध्दियॉंतच रमुन राहील्यामुळे तो मोक्षपदापासुन दुर जातो. आणी मग ही माया त्या जीवाजवळच्या कर्म-धर्माची शिदोरी पाहुन, जैशी शिदोरी तैशी त्या जीवाशी जन्माशी पाठवते. ‘जैसे कर्म वैसे फळ‘ या न्यायाने ही माया जीवांशी कर्मभुमीवर उतरवते. चौ-यांशीचा फे-यात अडकवते. या मायेपासुन त्रिगुण पसारा ची उत्पत्ती होत असते. जीवाशी माया त्रिगुणात नित बुडवत राहते. ज्याला चौथे शुध्दसत्व प्राप्त झाले नाही, ते मोठे मोठे या मायेच्या संगतीनं बुडाले आहेत. माया संगतीने त्रिगुणात बुडाले म्हणुन ते कर्मभुमीमध्ये फसले. ही माया त्रिभुवनी व्याली । सर्व भुती प्रसवली । मुख्यवाचा खाणी चारही । वेद पुराण माया सारी । म्हणुनच भजनी योगी विनविती की :
‘निरंजना ! कल्पनेच्या/मायेच्या पालव्या तोडुन देहीत नांद माझे या ।‘

या ब्रम्हरंध/कैवल्य/परमहंसभुवनी कोटी सुर्याची प्रभा ही चंद्रप्रकाशाप्रमाणे शितल असते. ही प्रभा येथे निरंतर फाकलेली दिसते. नाना भास, नाना अनुहत् ध्वनी, सर्वसाक्षी अवस्था, अनुभव वाचा, ब्रम्हमात्रा, आत्मवेद, परंमपुरूषऋषी, पुर्णतःमुक्ती, आनंदाची ज्योत, कैवल्यदेह, पुर्ण वाण सह पुर्णस्थब्रम्ह शिव व महालींग चे दर्शन/भेट होते. येथे जीव-शिवाचे ऐक्य होवुन केवळ हंस उरतो. म्हणुनच याला कैवल्यभुवन अथवा परमहंसभुवन असेही म्हटल्या जाते.

पंधरावा कळस जीव या रायास ! हा केवळ जीवहंसास पंधराव्या कळस स्थानी उभा असतो. हा पंधरावा कळस ब्रम्हरंधच्या वरच्या अंतीम टोकावर असलेल्या बिंदुस्थानी असतो. टाळुवरच्या बिंदुस्थानच्या दहाव्या खिडकीतुन बाहेर पडुन तो हंस अष्टदळकमळी उभा राहुन, पुढे मस्तक ब्रम्हांड स्थित शिखास्थानच्या सातव्या अगोचरचक्री उड्डाण घेवुन निरंजन धन्याकडे जातो.

**बिंदुस्थान :- ब्रम्हरंधभुवनावरचे कळस शिखास्थानी :-**

बम्हरंधभुवनाचे कळसावर बिंदुस्थान आहे । हे स्थान टाळुस्थानच्या वरच्या बाजुला शिखास्थानी आहे. येथे अष्टदळ कमळ आहे. या अष्टदळ कमळाच्या मध्य असलेल्या या बिंदु स्थळी जीव हंस केवळ उभा आहे. जेजे वस्तु हा जीवात्मा पाहे, तैशी तैशी त्या वस्तुबध्दलची वासना त्याच्यात अंर्तभुत होण्यास प्रयत्नरत् होत असे. त्या परमात्म्यानं बिंदुस्थानचा पंधरावा कळस स्थान हे जीव-शिव मिश्रीत होवुन फक्त एकलाचा आंनदाची ज्योत बनुन राहीलेला केवळ हंस जीव या राया करीता ठेवला आहे.

॥ येथे आहे सुक्ष्मवेद पाचवा । यावर पाहयं आता निरंजनाचा देखावा
॥ या बिंदु स्थानी पाहयं । अष्टदळ कमळ आहे ॥
॥ आता ऐका । अष्टदळांची नावे । हरसुले, विशाद, भय ।
शांती, उत्साह, उन्मन्नी । आणीक चिन्ता प्रचिती ।
आहे या अष्ट पांकोळी ॥ खंड०३/ओवी-०७: देहवर्णणाची ओवी

या बिन्दुस्थानाच्या वर सातवे अगोचर चक्र आहे. .

**७. सातवे चक्र अगोचर । मस्तक ब्रम्हांडी । येथे आहे तो निरंजन ।**

सातवे चक्र अगुचर ! या वर आहे निरंजन ज्योतीचे स्थान ! या को-या भुम्मेवर तो अगुचर देव निरंजन उभा आहे.

अगोचर चक्राचे स्थान हे खांदयांपासुन दोन्ही हात उंचावुन आकाशाला हात जोडल्या नंतर जे अंतर होते ते एक हात अंतर ! असे सव्वाहात अंतर चा मधल्या मध्य भागी अगोचर चक्राचे स्थान आहे. । बाजुच्या फोटो मध्ये पहा.

ऐसे हे अगोचर चक्राचे स्थान सव्वा हात मध्य पाहयजो । येथे अगोचर चक्राचे स्थान ओळखजो । या स्थानाच्या वर असलेल्या स्थानाशी मस्तक ब्रम्हांड म्हणती । येथे अनंत प्रभा अपरंपार । कोटयान कोटी चंद्र-सुर्य जडीत । ऐशी प्रभा फाकली इथ । सोयंम् निरंजन ज्योतीचा प्रकाश येथं । हे होय

निरंजन ज्योतीचे स्थान । आता अंतरी तो सिध्द ओळखजो । तो ओळखावा ईथं निट । तोच होय अगोचर । मुख्य ओळखावे आता त्याचे घर । पहा तो निरंजन निराकार-निर्गुण । हेच होय या सिध्दाचे दर्शन । हाच श्री सद्‌गुरु मुख्य ओळखावा । नेत्री-श्रोती हाच पाहावा ।

अगोचरचक्र ज्योतीचे स्थान । येथे उभा होतो माझा देव निरंजन । आकाशवाणी बोले हा धनी । चौथ्या खुम्मी निर्वाण निराकारी । या निराकार निर्गुणाला नाही काया नाही माया । उपमा देवु तरी काय ? हा देव आकारात नाय/नाही । या देवाच्या भक्तीनं सर्व सिध्द झाले । याहीचे गुणरुप यश, श्री, औदार्य, ज्ञान-विज्ञान, दया, क्षमा, शांती, कारुणा, मायाममता, क्रिया, अविनाश. .ईत्यादी गुणरुप सिध्दांच्या आंगी उतरले । देवपण सिध्दांना मिळाले । हेच होय या सर्व सिध्दांचे सत्यपुंजन । हे सिध्द जडले या देवाला प्रेमलावुन । या देहीचे तो नित्य करतो आता पालन । या तिर्थस्थळी आल्यावर बाकी सर्व तिर्थयात्रा अनुष्ठान व्यर्थ आहे हे जाण । आधी याहीला नमन कर । या देह-निगुर्णाचे या नरदेहीला देणं होईन । आता या को-या भुम्मेठाई आकाशवाणी तिरभवनी गर्जना होईन हे जाण ! अनुहत् शब्द ऐका इथे आता । येथेच अलक्ष्यबोध, अलक्ष्य अपरंपार परंम्ग्यानी निर्वेद । येथे वेदाशी पडे मौन । वेद न जाणे सर्वकाही इथच । येथची महीमा सांगता सांगता तिनदेव मौन धरुन मुके झाले । सहाशास्त्रे बरळत वेडे झाले । १८ पुराणे भांबावले । तो वेदं कैचा बोले ? नेती, नेती.....न जाणता येणारा, नजाणता येणारा..

येथेच निरशुन्य । या निरशुन्यामध्ये चतुर्पतीचे झळके निशाण । कोटी सुर्याची लख्ख प्रकाशाची शितल प्रभा फाकली आहे अपरंपार । सोहंम् ज्योतीचा हा प्रकाश । ब्रम्ह आणले याहीन रुपास । अर्ध्या भागाची ही मांडणी । अर्थ न जाणे अज्ञानी । अर्थ जाण आता ज्ञानी । सहा चक्रावरील मातृका ४,६,१० जनी । आणीक १२, १६, २ आहे गुणी । झाली पन्नाशीची गणीता । सहा चंक्रावरील एकुन पन्नास मातृका ची गणीता पुर्ण झाली । उरल्या दोन सांगे कृष्ण धनी । उरले ते दोन ऐका तुम्ही । ओहंम्-सोहंम् बिज मंत्रं । ओहंम् आहे धुम्मधुम्मकार नादब्रम्ह तर निरंजन ज्योतीचा आहे सोयंम् । ओहंम्-सोहंम् ची लावली धुनी । ऐवढी अर्ज ऐक आता आमची । करा हरी दया । तुम्ही घडवा सदोनित पुंजन । जडवा आपल्या पाया । हेच माझ देवांगण । हेच माझ नित्य पुंजन । याहीच्या पुंजनी लागले चतुर्पतीचे भक्तजन । याहीला आता जडलो आम्ही, प्रेम लावुन । या देहीचे नित्य करतो, हा निरंजन पालन ॥ खंड०३/ओवी-०५: देहवर्णणाची ओवी यामधुन अधिक ग्यान घ्यावे.




नवनाडया मोठया बळकट :-

मनुष्याच्या नाभी/बेंबीस्थानी एक कंद आहे. हा कंद मुलाधार पासुन नाभीपर्यत तिरपा गेलेला आहे. या कंदातुन एक अंकुर फुटलेला आहे. आणी या अंकुरातुन ७२ हजार नाडया निघुन सर्व शरीरभर पसरलेल्या आहे. मनुष्यदेह गर्भाअंर्तगत असतांना मातेच्या नाळीव्दारेचे या अंकुराठिकाणी प्रथम अन्नपाण्याचा रसपुरवठा होवुन, येथुन तो रसपुरवठा या ठिकाणच्या ७२ हजार नाडयांव्दारे सर्व शरीरभर संचारुन या बाळकायेची वाढ मातेच्या गर्भात झालेली आहे. गर्भाबाहेर बाळदेही आल्यानंतर मातेची ही नाळ कापल्या जाते व काही कालांतरानंतर या ७२ हजार नाडया सुप्त अवस्थेत जावुन या देहीत सुप्तावस्थेत पहुडलेल्या राहतात. या नाडया योगी आपल्या योगसाधनेव्दारे जागी

करतात. योगसाधनेने या नाडया जागी कराव्या लागतात. तसेच या सुप्त नाडयांच्या कंदाठाई जिथे मेरूचा दांड सुरू होतो त्या मुलाधार ठिकाणी भुजंगाप्रमाणे साडेतिन वेटोळे घालुन कुंडलीनी शक्ती सुप्तावस्थेत पहुडलेली असते. कोणत्यातरी एका मार्गाने तिलाही जागी करावे लागते. असो.



याच तिरप्या कंदा च्या वरील बाजुस दहा व खालील बाजुस दहा अश्या एकुन विस महत्वाच्या नाडया या शरीरात पसरलेल्या आहेत. हया शिवाय दोन्ही बाजुने दोन-दोन अश्या चार नाडया तिरप्या वाकडया गेलेल्या आहेत.

या एकुन चोवीस/२४ नाडया पैकी फक्त दहा नाडया या वायु वाहुन नेणा-या मुख्य नाडया म्हणुन जन ओळखतात. तिरप्या व खाली पसरलेल्या या सर्व दशनाडया प्राणवाहक शक्तीचे वहन करणा-या असुन सर्व शरीरभर वायु खेळवतात. या दहा नाडया चे नावे व स्थाने खालील चित्राप्रमाणे आहे.

**१. ईडा २. पिंगळा ३.सुषम्ना ४.गांधारी ५.हस्तजीव्हा ६.पुषा ७.यशस्वीनी ८.अवलुंबा ९.कुहु १०.शंखीनी** या दहा नाडया खालील चित्रात दाखवल्या आहेत.




या दश नाडयां पैकी सुषम्ना ही अंधातरी असल्यामुळे काही तत्वयोगी तिला वायुवाहक न धरता चैतन्याचा पुरवा वाहक मानत असल्यामुळे ते तत्वयोगी या सुषम्नाला वायुवाहक नाडयातुन वगळुन वायुवाहक नवनाडया हया मोठया बळकट आहेत असे मानतात. या दशनाडी चे नाव स्थान व कार्यसंबधी माहीती पुढील पानावरच्या तक्त्यात दिलेली आहे.

खंड०३/ओवी-२६: सांगतो स्वरग्यान व देहवर्णनाच्या ओवी
च्या निरसनातुन अधिक ग्यान घ्यावे.

| -: दशनाडी चा तक्ता :- | | | |
|---|---|---|---|
| कं. | नाडी च नाव | नाडीचे स्थान | ईतर ग्यान |
| ०१ | ईडानाडी उर्फ गंगानाडी/नदी उर्फ चंद्रनाडी | शरीरस्थ डावा/वाम भागात ईडानाडी चा समुह असतो. कैलासाहुन मुलाधारात वाहत जाते. | ईडा च्या वामनाडी समुहात चंद्र स्थीत असतो.. ईडा ला गौरवर्ण शक्ती ची उपमा दिलेली आहे. |
| ०२ | पिंगळानाडी उर्फ यमुनानाडी/नदी उर्फ सुर्यनाडी | शरीरस्थ उजव्या/दक्षिण भागात पिंगळानाडी चा समुह असतो. वैकुठाहुन कमरीत वाहत जाते | पिंगळा च्या उजव्यानाडी समुहात सुर्य स्थीत असतो.. पिंगळा ला निलवर्ण शिव ची उपमा दिलेली आहे. |
| ०३ | सुषम्ना नाडी उर्फ सरस्वती नाडी/नदी | शरीराच्या मध्यभागी अधांतरी निराधार निराकुल उभी असते. ईची अतिसुक्ष्म अशी ब्रम्हनाडी मेरूमंडयानात अधांतरी खेळत टाळुमार्गातुन बाहेर पडुन परमात्मापर्यत तार जुळवुन असते. | सुषम्ने च्या मध्य अधांतरी नाही समुहात हंर्स स्थीत असतो.. सुषम्नेला कालरूपी अग्नी ची उपमा दिलेली आहे. कारण ही सर्व कर्मे परमात्म्यामध्ये लीन करते. |
| ०४ | गांधारी नाडी | डाव्या डोळयातुन तिरप्या कंदापर्यत | |
| ०५ | हस्तिजिव्हा नाडी | उजव्या डोळयातुन तिरप्या कंदापर्यत | |
| ०६. | पुषा नाडी | उजव्या कानातुन तिरप्या कंदापर्यत | |
| ०७. | यशस्विनी नाडी | डाव्या कानातुन तिरप्या कंदापर्यत | |
| ०८. | अलुंबुषा नाडी | मुखातुन तिरप्या कंदापर्यत | |
| ०९ | कुहु नाडी | लिंगातुन तिरप्या कंदापर्यत | |
| १०. | शंखिनी नाडी | गुद्स्थानातुन तिरप्या कंदापर्यत | |

पुढील पानावर...

॥ नउ व्दाराची करता गिणती, एक-एक बाजु चौक्या किती ?
चारही बाजु बराबरं । घडो-घडीचा एक-एक सुरं ॥



नवव्दाराची करता गिणती :- कायामहाल ला एकुन नउ व्दारे/दरवाजे असुन दहावी खिडकी ठेवलेली आहे. ते असे १. उजवा नयन २. डावा नयन ३. उजवा कान. ४.



डावा कान. ५. उजवी नाकपुडी. ६. डावी नाकपुडी ७. मुख ८. लिंग/योनीव्दार ९. गुद्व्दार आणीक दहावी १०. टाळु स्थित एक खिडकी त्या धनी कारागिराने ठेवली आहे. वरील फोटोवरून ग्यान घ्यावे.

एक एक बाजु चौक्या किती ? चारही बाजु बराबर :-
॥ ब्रम्हा विष्णु शंकर । बसुन चौक्या चार ।
चौथा आदीमुनी अवतार । चैतन्य निराकार ॥ ०३/०३

मस्तक स्थित चारही बाजुने बराबर संख्या ने एक एक चौकी कर्तार धन्याने ठेवलेली आहे. अश्या चार बाजुच्या एकुन चार चौक्या त्रिकुटा वर ठेवलेल्या आहेत. ते असे.

१. पुर्वबाजुने सत्यलोकी ब्रम्हा ची चौकी.
२. पश्चिम बाजुने वैकुठ लोकी विष्णु ची चौकी.
३. उत्तर बाजुने कैलाशी शंकराची चौकी.
४. या तिन चौक्याच्या वर दक्षिण बाजुने औटपिट नगरी निराकार चैतन्यपुरूष भैस नारायण ची चौकी

अश्याप्रकारे प्रतेक बाजुने एक एक असे चार चौक्या बराबर बसवल्या आहेत. वरिल चित्रमय फोटोवरून ग्यान घ्या.

घडोघडीचा एक एक सुर :- खंड०३/ओवी-२६: सांगतो स्वरग्यान मधुन या टुकीचे ग्यान घ्यावे.

॥ कोतवाल उभा चावडीवर । गस्त देतो घरोघरं ॥<br>
॥ एक ऋषी बसला निर्वाणी । धडाधडा जाळतो धुनी ।<br>
ब्रंम्हांडी जपतो मंत्रं । याहीचा कैसा कळेल सुम्मारं ? ॥

या चरणाचे ग्यान खालील फोटोवरून घ्यावे.

सप्तचक्रांवर जागोजागी चौक्या स्थापुन त्या चौक्यांचे चौकीदार म्हणुन जे देव-देवता नेमले त्यांचे भरण पोंषन व रक्षण करण्यासाठी यांच्या घरोघरी हा देहीचा निरंजन ऋषि कोतवाला प्रमाणे ग्रस्त घालत भेट देत राहतो. देहीचा हा निरंजन ऋषी मस्तक ब्रम्हांडी निर्वानी बसुन धडाधडा धुनी जाळत ओहंम्-सोहंम् चा मंत्र जपत राहतो. याच्या या सोहंम् धुनीमुळेच देहीचा श्वास चालु राहतो. श्वास घेतांना सों् असा या ऋषीचा उच्चार असतो तर श्वास सोडतांना हम् असा याचा उच्चार असतो. याचा हा उच्चार शांतपणे श्वासावर लक्ष्य ठेवुन ऐकत बसल्याने जप न करताच सोहंम् अजपा जप होतो.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०३ ॥

॥ ओवी नं. ०२ ॥

॥ निरसनसह मुळावरची जुनी ओवी ॥

# ॥ दरवाज्याचे राखनदार ॥

वरचरणं :-

॥ मागं यवगं मो-हं यवग । मध्ये अहिन खासा ।
सर्वत्रांचा जन्मं राया । सांगनं आता ॥




॥ दरवाज्याचे राखनदार । तुम्ही चौकीदार ।
दरवाज्याच्या बाहेर निघाले ।
कसे जुम्मेदार ? ॥

॥ गेल्या रयतीचा, जुम्मा घेतला ।
रयत पळाली ।
खचली किल्याची, माती । जतन,
येशीवर केली ॥

॥ ज्याचा वेष त्याचा भेद । त्यालाच ठावुक
यवगी उभा राहीन ।
देहा, करन जागृत ॥

॥ एकच लक्ष्य, चौ-यांशी वेशीवर ।
जीव आहे जागृत ।
तिकडुन येता जीव पाहीला ।
सुंदर बागेत ॥ ०४ ॥




॥ साथ योगी सात देहा ।
एका एका जागेत ।
उठुन भुम्मा जागृत करन ।
अवघ्याला सुखः ॥

॥ जागी राहा हिशोब पाहा ।
गेल्या यवगाचा ।
कुठं कुठं झाला जन्म,
तडाखा होईन हिशोबाचा
॥०६॥

डहाकी :--

॥ ईश्वरी काया ईश्वरी माया ।
रूपाशी आल्या ।
धन्याच्या आंगची सत्ता ।
रूपी ज्योती, नांदु लागल्या ॥

पुढील पानावर.....

भजने :-

॥ जागी राहा हो राहा । यवगाचा, आला रमणा ।
यवगाचा आला रमणा पुढे, पाहा हो पाहा ॥
॥ जागी करा यादेवाले हो । करा मानवाले ।
पुर्विचं भाकलं अहिना घरी देव आले ॥
॥ अहिना घरी आले देव । पुर्विचं नातं ।
पुर्विचं नातं अकाशमात, उभी राहली ज्योतं ॥
॥ ज्योत भली हो ज्योत भली, उभी आहे ताळातं ।
ज्योतीचा अवतार कृष्णदेव, उभे सावंग्यातं ॥

॥ आला यवगाच्या सुत्रानं धावुन, भैस करे शिष्टाई ।
निजरूप भुम्मा जागी करन । चवही ताळी ॥
॥ जागी करू केलं या, साडेतीन दिवसाच्या रात्री/रातीं ।
नाही ठेवणार देहीवर , तिळभर माती ॥
॥ धर धर तु या, देहीचा रंग ।
याहो महाराजा... । तुम्ही राहावं आम्हा संग हो ॥

डहाकी :-

॥ संगतीचे गडी । पंगतीन राहु ।
साथचा सवंगडा संगतीन खेळु ॥

## ॥ निरसनसह शब्दार्थ/चरणार्थ ॥

**जुम्मा** :- ठेका । **जुम्मेदार** :- ठेकेदार । देहीचा ठेकेदार हा निरंजन आत्मा आहे तोच या देहीत आपली राहुटी वस्ती करून, ही देही जगवत ठेवण्याचा ठेका घेतो. देहीचा ठेकेदार गेला की ठेका संपला हे निश्चित जाण.

**रयत** :- प्रजेची वस्ती । निरंजन वस्तु असलेल्या हा आत्म्या देही मध्ये राहुटी/वस्ती करत या देहीच्या वस्तीमध्ये चैतन्य फिरवत राहतो. या निरंजन वस्तुची वस्ती देहीत असते.

**किल्ला** :- देही, येथे देहीला किल्ला असे म्हणुन संबोधीले आहे कारण ही देहीसुध्दा एक ना एक दिवस किल्याप्रमाणे खचुन खाली पडणार आहे.

**येश** :- देहीच्या सिमा, चौदेहीच्या चार सिमा । हे सिमोल्धंन करून आत्मा हा आपल्या मुळघरी जातो. आत्म्यावर चार न चार घडी ऐसा कोट असलेल्या स्थुल, सुक्ष्म, कारण, महाकारण या देहीच्या सिमा/येशा पार करत करत, जिवात्मा हा आपल्या मुळआत्मास्वरूपी येवुन आपल्या मुळघरी जातो.

**वेष/वेश** :- रूप धारण करणे, छद्‌मी पहेराव वेषभुषा/वेशभुषा म्हणजेच हिंदीत भेष ।

**ज्याची वेष** :- ज्याचा देह रूप धारण करण्याचा वेष, ज्याचा देहरूपी पहेरावी वेश ।

**त्याचा भेद** :- देहरूप धारण केलेल्या पहेराव मधील आत्मरूपाचा व देहरूपाचा सुक्ष्म फरक/अंतर जाणणे म्हणजेच त्याचा भेद जाणणे.

**त्यालाच ठावुक** :- ज्याचा जो देह असेल त्या देहीतील आत्मरूपाच भेद ती देहीच घेवु शकतो. अन्य कोणीही/कोणतीही त्याच्या आत्मरूपाचा भेद ठावुक करून घेवु शकत नाही. उदाहरणार्थ परमात्म्याने जी देही धारण केली त्या देहीतील आत्मज्योतीचा भेद त्या परमात्म्यालाच ठावुक ! त्या कृष्ण योग्यालाच ठावुक !

**एकच लक्ष्य** :- एकच धैयाकडे लक्ष्य व मन एकवटुन/केंद्रित करून ठेवणे, एकच ध्यास कडे लक्ष्य लागुन जागृती अवस्था ठेवणे । उदा. लक्ष्मण :- लक्ष व मन रामावर एकाग्र ठेवणारा रामाचा भाउ लक्ष्मण.

**चौ-यांशी वेशीवर** :- विविध अश्या चौ-यांशी लाख यवनी च्या देहीवर तो जीवात्माच आपले मुळघर धुंडण्यासाठी एकच लक्ष्य म्हणजे मुळघरी जाण्याचा एकच ध्यास ठेवुन जागृत असतो.

पुढील पानावर...

तिकडुन येता जीव पाहीला । सुंदर बागेत :-

-: सुंदर बाग :-

**सुंदर बाग चा पिंडीतील अर्थ :-**

या नरदेहीला सुदंर बाग असे म्हटले आहे. कारण की : या देहरूपी बागेत काय काय सुंदर आहे ? हे पाहता पाहता नवल वाटते. निराळा चे निराळे नाम प्राप्त होवुन निरनिराळे दर्शन होत होत डोळयाचे पारणे फिटते. या देहरूपी बागेतच अनेक तिर्थस्थाने सह सर्व असल्यामुळे ब्रम्हांडी असलेले तिर्थस्थाने व इतर सर्व पाहण्याची ईच्छा होत नाही.

जरा या देहीच्या बागेत आत डोकावुन पहा ! येथे नव लाख तारे चमचमत आहे. सप्तसागर, नवखंड आणी दहावा काशी खंड येथेच आहे. येथील तिर्थस्थाने हिंडता हिंडता मुलाधारी गणेशदेवता सह साडेतीन वेटोळे घालुन बसलेली शेषरूपात शक्तीचे दर्शन होते. तर स्वाधीष्ठान स्थानच्या तिर्थस्थानी जावुन ब्रम्हदेवा सह सावित्रीचे दर्शन होते. आणी नाभी स्थानच्या रवीचक्री तिर्थ स्थानी जावुन विष्णुदेवता सह कमळाशक्तीचे दर्शन होते. हृद्य स्थानावर अनाहतचक्री तिर्थस्थानी जावुन शंकरदेवता सह उमाशक्तीचे दर्शन होते. कंठस्थानच्या विशुध्दचक्री तिर्थस्थानी जावुन जिवदेवता सह विद्याशक्तीचे दर्शन होवुन शुध्द सत्व गुणाच्या प्रसादाचा लाभ होते.

पुढे मग भृकुटीमध्य स्थानी चंद्र-सुर्य नयना मध्ये असलेल्या अग्नी चकाचे तिर्थस्थानी जावुन हंसऋषी मायाशक्ती सह परमहंसदेवता चे दर्शन होते. तर तेथुन थोडे वर गेल्यावर त्रिकुट लागुन तिन नदयाच्या संगमी आंघोळ करून, पुर्वे दिशेचे ब्रम्हाचे सत्यलोक, पश्चिमेचे विष्णुचे वैकुंठलोक तर उत्तर दिशेला महेष चे कैलास लोकचे दर्शन होते. आणी या तिकुटाच्या तिन अग्राच्या वर जावुन औटपिट नगरीमध्ये नारायणाचे दर्शन होते.




या चौकोणटयावर चार उभे असलेल्या अवतार चे दर्शन घेतल्यावर याहीच्या पुढे मार्गक्रमण केल्यावर, या चौकोणटयावर चार उभे असलेल्या अवतार यांच्या अकाशमात मध्ये उभी असलेल्या धन्याची निरंजन ज्योती चे दर्शन होते. चंद्राच्या सोळा कला पुर्ण होत होत चौताळावरच्या विहीरीचे दर्शन होते. या विहीरेचे उलटे पाझर आहे. या उलटया पाझराचे पाणी दशनाडीदाडांने सर्व देहीत वाहत चैतन्य पसरवत जाते. सत्रावी जीवनकळाचा पान्हा प्यावयास मिळतो. शुध्दस्वरूपी जीव येवुन धनी समर्थाचे दर्शनाचा लाभ होतो.

श्रौत स्थानीच्या भ्रमरगुफाच्या वाटेने आकाशऋषीचा सुक्ष्मवेदोच्चार चा गुंजारव ऐकत ऐकत ब्रम्हरंध्र भुवनापर्यत पोहचुन तिथे जीवा शिवाच्या भेटी होते. आदीदेव परमात्मासह आदीशक्ती चे पुर्णस्थ दर्शन होवुन केवळ कैवल्य वाणं मिळते.




केवळ वाण प्राप्त करून बिंदुस्थानच्या वर उभा राहुन अगोचर चक्रस्थान च्या परात्पर परात्पर देव अगोचर धनी चे अलक्ष्य दर्शन लाभ होतो. लख्ख प्रकाशाचा प्रसाद प्राप्त होतो. या लख्ख प्रकाशात या अगोचर निर्गुण निराकार निरंजन निश्कलंकी चतुर्पती धन्याच्या भक्तीने सर्व सिध्द झाले आहेत.




या देहरूपी बागेत हिंडतांना या चौथ्या अगोचर निरंजन देवाच्या आंगी असलेले यश, श्री, औदार्य, ग्यान, विज्ञान, दया, करूणा, मायाममता, क्रिया अविनाश हे त्या चे गुणरूप ज्या सिध्दांच्या आंगी आलेत, त्या सिंध्दांचे दर्शन सह चतुर्पता अथर्वन् वेदाचा लाभ होवुन अनेक लाभ झालेत. आणीक काय वर्णु या पिंडीतील सुदर बागेचे वर्णन ?

**सुंदर बाग चा ब्रम्हाडातील अर्थ :-**

या विश्वात सावंगा-विठोबा या ठिकाणी यवगा साठी कृष्ण देवानं पुर्ण अवतार धरला हो ! चरंचारीया अवतार कृष्णदेव यानं भक्तजनांचे तारणं करण्यासाठी एक बाग लावला. त्यासाठी त्याने भक्तांचे औट हात देहीच वावरं/शेत घेतले. त्यात नागर भक्तीचे धरून काम क्रोध मद-मत्सर आणीक डंब अहंकार हे सहा बैल जुंतुन हे शेत नांगरले. आणी आशा-मनशा काडी-आकांक्षा व कल्पनेच्या पालव्यां हया भक्तांच्या हाती चतुर्पती ज्ञानाची कु-हाड देवुन/घेवुन त्याने तोडल्या. काम-क्रोध चे खोड या शेतातुन काढले. विवेकाची वाही केली व तिफन भावाचे जुंतले ! सत्व चाढं हे कसले. आणी या शेतात जोधळ्याप्रमाणे सोहंम् बीज उनारले/पेरले. यात शेतात एक विहीत खोदली. सुंदर बाग तयार केली.

पिंडीमध्ये जसे चौकोणटयावर ब्रम्हा विष्ण महेष भैसनारायण हे चार अवतार उभे असुन अकासमात मध्ये धन्याची ज्योत उभी आहे, तसेच या ब्रम्हाडी सांवगा या बागेच्या चौकोणटयावर चार अवतार कृष्णान उभे करून, या अगोचर सावंगाबागेच्या अकाशमात मध्ये अगोचर धनी निराकार निराधार निरंजन ज्योत स्वरूपी उभा आहे. ही ज्योत भली हो ज्योत भली ! उभी आहे या मिर्तलोकच्या ताळात । ज्योतीचा अवतार कृष्णदेवया सावंगा बागेत उभे आहे. या सावंगा बागेच्या चौकोणटयावर उभे असलेले चार अवतार म्हणजे १. कृष्णाजी, २.हेंगडुजी, ३.देवमनजी, ४.पुनाजी या चार अवतार ज्योतीमध्ये तो धनी आपली निराकार निराधार निश्कलंकी निरंजन ज्योत मध्यी सावंग्यात खेळवत आहे. येथे अकाशमातमध्ये निरंजन ज्योत स्वरूपात तो पुर्ण अवतार कृष्णराज भैस धनी उभा आहे. ऐसे रितीने पिंडी च्या आकाशमात मध्ये निराकार निराधार निरंजन धन्याची ज्योत उभी आहे आणी तीच धन्याची ज्योत या ब्रम्हांडी असलेल्या सावंगा तिर्थक्षेत्रीच्या अकाशमात मध्ये निराकार निराधार निश्कलंकी निरंजन ज्योत स्वरूपात उभी आहे. ही ज्योत सच्च्या भक्तांच्या ज्योती मध्ये संचारत आहे. या भैस अवताराची ज्योत सच्च्या भक्तांच्या ज्योतीमध्ये आनंदाने खेळत भक्तांना खेळवत वाढवत आहे.

जसे पिंडीच्या चौताळावर एक विहीर असुन या विहीरेचे उलटे पाझर आहे. या उलटया पाझराचे पाणी दशनाडीदाडांने सर्व देहीत वाहत चैतन्य पसरवत चैतन्य ज्योत तेवत ठेवते. या विहीरीवरचा सत्रावी जीवनकळाचा पान्हा प्यावयास मिळतो. शुध्दस्वरूपी जीव येवुन धनी समर्थाचे दर्शनाचा लाभ होतो, तसेच या ब्रम्हाडी या सुंदर बाग क्षेत्री पिंडी ते ब्रम्हांडी या न्यात्याने, त्या कृष्णाने सावंगा येथी चतुर्पती नामाचा पाझर सोडणारी विहीर तयार केली: सांवगा नामाची विहीर म्हणजे सावंगा तिर्थक्षेत्र असुन याही विहीरीचे उलटे पाझर आहे. या उलटया पाझराचे पाणी दहादांडासह सर्व बाजुने पाझरून सर्व ठिकाणी चतुर्पती नाम अमृताचा पुरवा करत, चैतन्याचे तेल ओतत चतुर्पती नाम ज्योत तेवत ठेवत आहे.

हा एकच कृष्ण माळी निर्विकार शंक/निश्कलंकी गोरा-गोमटा हो । या एकल्यानेचं या चतुर्पतीच्या या एका सावंगा नामच्या विहीरी पाचं मोटा लावल्या आहेत. या पाचही मोटाचे पाणी हे याने काढलेल्या सर्व दहाही दांडा ने जात आहे.। याच्या या सावंगा विहीरीपासुन दहा दांड त्याने काठले ते म्हणजे १.जळगाव दांड तेथुनच २.बहीनाबाईचा दांड, ३.देवमनचा कारला दांड, ४.इश्वर-पुनाचा दांड, ५.गोविंदा-हरीचा दांड, ६.बाळाजीचा पलटदांड, ७.हससुलचा कोणजाणेदांड, ८.विठोबा-धनसींग चा दांड, ९.चणकाजीचा दांड, १० कृष्णपुरीचा दांड.....ईत्यादी दहा दांडासह अनेक लहान-मोठे दांड कृष्णाने काढले आहेत. या दांडाचे अनेक दांड झालेत.

या सर्व दांडानं कृष्णाने एका सावंगा विहीरीवर लावलेल्या १.हेंगडुजी, २.देवमनजी, ३.पुनाजी, ४.बाळाजी, ५.राव-साव या पाचही मोटाचे पाणी हे या दहाही दांडा सह सर्व दांडा जाते.

पिंडीतील चौताळाच्या विहीरीचे जसे उलटे पाझर आहे. या उलटया पाझराने वर पाणी झरझर वाहे. तसेच पिंडी या ब्रम्हांडी या न्यात्याने या चतुर्पता विहीरीचे उलटे पाझर फोडुन, हे चतुर्पती ग्यानाचे वर पाणी झरझर वाहवत ठेवले आहेत. सर्व दांडाचं चतुर्पती नामाचे एवढं सर्व पाणी त्या त्या दांडाच्या भागात ओलुन, एवठं सर्व पाणी उलटया दांडान या एका चतुर्पती पंथी आणले आहेत. त्या कृष्णाने हे चतुर्पती नामाचे वर पाणी एकाच चतुर्पती कृष्ण अवधुत पंथा लावले आहेत. म्हणुनच या चतुर्पता कृष्ण अवधुत पंथात सर्व प्रकारचे ग्यान विज्ञान आहे. भक्तजनास इथे ग्यानाची कमतरता भासणार नाही. अशी व्यवस्था करून ठेवली आहे. ठेवत आहे. ठेवणार आहे. त्याचमुळे हा बाग पंचरंगी फुलला आहे. धनीदेव हा बाग पाहुन मनी खुशाल झाला. आणी या बागेवर सोकारी म्हणुन देवराज कृष्ण विठु सावळा उभा राहीला. विठु या बागेचे राखन करत उभा आहे.

जे पिंडीत आहे तेच सर्व या कृष्णाने वसवलेल्या सुंदर बागेत वसवलेले आहे. पिंडी या ब्रम्हांडी या कृष्णानं आपल्या हातानं ऐसा हा बाग लावुन, तयार केलां आहे. अमृत टाकुन, सजिव करून ठेवला आहे. ठेवत आहे. ठेवणार आहे. या बागेत येणारे राजहंसावर आलेले तिरगुणी मायेचे फासे तोडुन या महाराजाने भैसाच्या मांडणीचे काम या सुंदर बागेव्दारे उभं केलें आहे.

या बागेत येणा-या भक्तांच्या नशिबी असलेले भाल्याचे घाव काटयावर त्याने निरवाळले. आकाशाची आयुष्याची दोरी हाती घेवुन भक्तांच्या आयुष्यांचा पाळणा लांबवला. भक्तांना वेळो वेळी वेळ पडेल तेव्हा साहयं करण्यास भक्तांच्या पुढे उभा राहुन साहयं केलेत. साहयं करत आहे. करणार आहे...म्हणुन येथे टाळ वाजे, नौबत वाजे हो घनाना । श्रीकृष्णाचा पुर्ण अवतार हा कृष्णाजी येथे आला आहे. आता कृष्ण अवधुत कृष्ण अवधुत तुम्ही म्हणाना याहीला ! हिरा हिरा तो कृष्णा, लाल हिरा ! या कृष्णहि-याने भक्तांत भक्ती परवेशी/प्रवेशी करून चतुर्पता नामाची किर्त महीमा जगात वाढवली आहे. भक्तांच्या घरी आपणहुन जावुन भक्तांना हाती घेवुन दवंडीच्या प्रमाणे चतुर्पती नाम वाणी सांगत चतुर्पतीची किर्त महीमा जगात वाढवत आहे.

येथे हा कृष्ण अवधुत भक्तीला तारू बनुन उभा आहे. यान चतुर्पती नाम भक्तांच्या मुखात देवुन भक्ता मुखातुन सुरू केले आहे. आणी आम्हा भक्ताच्या घरी आपणहुन येवुन आम्हा भक्ता हाती धरून दवंडीच्या प्रमाणे हे चतुर्पती नाम सांगुन, या सुंदर बागेत या कृष्णानेच आम्हास आणले आहेत. म्हणुनच चरण सांगी करते की : हा जीव चौ-यांशी यवनीच्या देहा फिरत असतांना आम्हा जीवांवर या कृष्णाने कृपा करून आम्हा या उत्तम मानव यवनीच्या देहरूपी सुदर बागेत आणले आहे. आणी या पिंडीच्या सुंदर बागेत आणुन आम्हा त्वा ब्रम्हांडीच्या या कृष्ण अवधुत पंथाच्या सुंदर बागेत ठेवलेत. धन्य आमचे भाग्य थोर ! तुमच्याच कृपेने या मानव जन्मात आलो. तुमच्याच कृपेने या चतुर्पती कृष्ण अवधुत पंथात आलो.

॥ आलो बन्शी, झालो आम्ही पंथी । उभा आहे चतुर्पती पंथाच्या पायरीवर !
आहें आमच्या माग निमित्य ? लागलो आम्ही तुया चाकरीशी !!

आणी तुमच्या चाकरी करत असतांना पिंडी या ब्रम्हांडी आम्हा तु साहयं झालात. भालीयाचे घाव काटयावर निरवाळलेत. चतुर्पता अथर्वन्वेद आम्हा हाती दिला...आणीक कितीक वर्णु तुमचे गुण ?
॥ आला यवगाच्या सुत्रानं कृष्णा धावुन । आदीपुरूष भैस अवतार करे हो शिष्टाई ॥

॥ साथ योगी सात देहा । एका एका जागेत ।
उठुन भुम्मा जागृत करन । अवघ्याला सुखः ॥
॥ उठुन हा निजरूप भुम्मा जागी करन ।
या चवही ताळी । अवघ्याला सुखः ॥
॥ जागी राहा हिशोब पाहा । गेल्या यवगाचा ।
कुठं कुठं झाला जन्म, तडाखा होईन हिशोबाचा ॥

हा कृष्णा यवगा यवगात बारबंड फिरत चतुर्पतीचे पेणं करत यवगाच्या सुत्राने चतुर्पती ग्यानाचे रोपन करत येथपर्यत आलेला आहे. आणी येथे येवुन तो आपली शिष्टाई करत आहे. हा योगी आता आम्हा योगीयांच्या साथीला आहे. संगतीचे गडी पंगतीन राहत आहेत. साथचा सवंगडा संगतीनं खेळत आहे. यवगान यवगात आमच्या साथ असलेला हा कृष्णा आपल्या सातही देहीने एका एका जागेत उभा होत आहे. आपली शिष्टाई करत आहे. याच्या या शिष्टाईने अवघी नवव्दार आणी दशवी खिडकी असलेल्या देहमाडी/किल्याचे राखन/रक्षण करत आहे. अनामत ज्योतस्वरूपी या कर्ता-याने पालन पोषन रक्षण करत पिंडी या ब्रम्हांडीची भुम्मा जागी करण्याचा तिरलोकी जुम्मा घेतला आहे. यांच्या या जुम्म्यामुळेच आमची निजरूप भुम्मा तो जागी करत सुखः चा वर्षाव करत आहेत. यांनी दिलेले सुखः हे पाहुन यवगान यवगाचे दुःख आम्ही विसरून यांच्या पायी जडलो आहेत.

तुम्ही सुध्दा आतापर्यत यवगान यवगं तुम्ही कितीतरी जन्म घेत आले आहेत. जन्म-मरणाचे दुःख सह इतर दुःखे भोगले आहात. आता पहा कुठं कुठं कोण कोणत्या देहीत तुमचा यवगान यवगात जन्म घेतला ? या यवगान यवगाच्या जन्म घेतलेल्या कोण्या यवनी सुखः ना मिळे । कोण्या यवनी तुम्हास मोक्ष मिळाला नाही. म्हणुनच यवगान यवगी जन्म-मरत भटकत होते. परंतु आता ही मानव यवनी प्राप्त झाली आहे. आणी या मानव यवनीत तुमचे यवगान यवगात तुम्ही केलेल्या रहिवासात जे पुण्यकार्य संचित केलेत, त्याचे फल देण्याचा जुम्मा या कृष्णाने घेतला आहे. काहीतरी पुर्वजन्मीच्या संचिताने कृष्णा तुम्हा देहघरी येवुन तुमची धियो प्रचोद्‌यात करून तुमच्या हाती चतुर्पता अथर्वन् वेद दिला आहे. दवंडीच्या प्रमाणे तो ही चतुर्पतीची वाणी सांगत आहे. या कृष्णाने वसवलेल्या सुदर बागेत आणुन येथुन मोक्षाची पहीली पायरी दाखवली आहे. तिरगुणांचे ओझे टाकुन या तिरगुणांच्या पलीकडे उभ्या असलेल्या चौथ्या धनी कडे तुम्हास जावयाची मोक्षाची पायरी जागली/लागली आहे. आता येथुनी जागी राहुन हिशोब पाहत कृष्णाच्या सांगीप्रमाणे वागत मोक्षाकडे वाटचाल करा. हा शिकविता धनी कृष्णा सदा तुम्हा जवळी उभा आहे. तुम्हास तत्परतेने साहय करण्यास कटिबध्द आहे. कारण याहीनं भैसाच्या यवगाचा रमणा सुरू केलेला असुन, या रमण्यात तुमच्या हाती चतुर्पता अथर्वन् वेद देवुन सामील केलेले आहेत. आता तुम्ही

॥ जागी राहा हो राहा । यवगाचा, आला रमणा ।
यवगाचा आला रमणा पुढे, पाहा हो पाहा ॥



**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०३ ॥

॥ ओवी नं. ०३ ॥

॥ निरसनसह मुळावरचा पाळणा ॥

ओवी महात्मः- कृष्णाष्टमी, रामनवमी.. ईत्यादी जन्मदिन च्या वेळी हमखास म्हणण्यात येणारा पाळणा..

## ॥ मुळावरचा मोठा पाळणा ॥

॥ आता लागलो, तुया चरणां..। जागी ठेव पाळणां ॥ धृ ॥

॥ जन्म मुळाचा, संगती । घाल, पाळण्याशी ।
आता लागलो, तुया चरणां । जागी, ठेव पाळणां ॥ धृ ॥

॥ माया विटाळी, बंधनं..। केल आदी शक्तीनं ।
दोन्ही बिंदुचा, एक झाला..। तेव्हाच, सम्मावला ।
पाचही यमदुत, उभे झाले..। नेवु लागलें जीवालें ।
तेथुन तारलं, देवानं..। धरले याहीचे चरणं ।
आता लागलो, तुया चरणां..। जागी ठेव पाळणां ॥ ०१ ॥

॥ चंद्र-सुर्य, नयन..। नाक, सुत्र दोनं ।
यामध्ये वापरतो जीवन..। करतो,येणं-जाणं ।
नव्या ज्योतीचा, प्रकाश..। त्याची सांगतो रीतं ।
ब्रम्हा विष्णु, शंकरं..। बसुन चौक्या चारं ।
आदी मुनी, अवतारं..। चैतन्य, निराकार ।
आत्म पुरूष, चारही यम..। चौदा चौक्या गुणं ।
तेथुन तारलं, देवानं..। धरले, याहीचे चरणं ।
आता लागलो, तुया चरणां..। जागी ठेव पाळणां ॥ ०२ ॥

॥ पाचव्या वेदाचा, सुस्कारं..। जीव धुजी वरं ।
२१ स्वर्गाची, मांडणा..। जावुन धन्याशी भेटेना ।
२४ आ-हे, हे गि-हाणं..। यानं पाडली भुलवनं ।
३२ पाखंड, हे भरूनं..। ३६ कल्पनानं ।
७२ कोठुडया, हया कोरूनं..। भरल्या अवजारानं ।
केलं नेताचं/नेत्राचं, झाडनं..। झाड-झुडी कारणं ।
देहे-पिंड, हा झाडुनं...। अजुन का होईनां ? ।
देहे झाडं, देहमाई..। बसवं एका ठाई ।
आता लागलो, तुया चरणां..। जागी, ठेव पाळणां ॥ ०३ ॥

॥ चारही उभारून, हे खांब..। वर कमडीचा बंध ।
कमडी लावलं, बंधनं..। एकशे अठ्ठावीस बंधनं ।
केली देहीची, रंचना..। खांब उभारणीस येईना ।
ठेवल्या देहीला, खिडक्या..। चौदा या चौक्या ।
आणीक पंधरावा, कळसं..। जीव या रायास ।
यामध्ये वापरतो, हा सुभानं..। होय गा मोतीदानं ।
आता लागलो, तुया चरणां..। जागी ठेव पाळणां ॥ ०४ ॥

॥ ऐसा सुतारं, कारागीरं..। नव्हतं वासला-किकरं ।
आप रूप, देह माडी..। केली हो तयारं ।
केलं देहीला, कंगुर..। राया भलाच कारागीरं ।
तिनशे साठ, हे कमंडी..। करून जोडा-जोडी ।
तिनशे साठ, नवनाडी..। लावुन हाडो-हाडी ।
तिनशे साठ, शनीचरं..। बसवुन देहीवरं ।
तिनशे साठ, दिनमानं..। नाही संचिता मालुमं ।
दैवं प्राप्त, अरजलं..। नशिब पाचही नावं ।
पाचही अक्षरं, लल्लाटी..। पुढं आयुष्याची गिणती ।
पाचही अक्षरं, कारणं..। सिध्द केले कामं ।
तेव्हा सिध्दाचा, जीव झाला..। तारू केलं जीवाला ।
तेव्हा सिदाई, प्रकटली..। तोच गुरू केला ।
माझा गुरू हो, आदीमुनी..। पुरवे अमृत वाणी ।
अंबर केलीसे, नरदेहीं..। यान बसवलं एका ठायी ।
तेथुन तारलं, या देवानं..। धरले याहीचे चरणं ।
आता लागलो, तुया चरणां..। जागी ठेव पाळणां ॥ ०५ ॥

॥ माया जन्माची, कपटी..। तिन सम्मावलं पोटी ।
केली उदरात, रंचणुक..। जीवन कळा ज्योतीनं ।
जीवं जांळी, जीव होता..। ऐका याची गणीता ।
पहील्या महीन्याचं, गणीत..। ढळमळ पाणी होतं ।
दुस-या महीन्याचं, गणीतं..। रक्त-मासांची मुसं ।
तिस-या महीन्याचं, गणीतं..। अंकुर फुटले त्यातं ।
चौथ्या महीन्याचं, गणीतं..। हद्‌य पाठ-पोटं ।
पाचव्या महीन्याचं, गणीतं..। हाडी या मस्तकं ।
सहाव्या महीन्याचं, गणीतं..। जावळं नखं-बोटं ।
सातव्या महीन्याचं, गणीतं..। उभी जीवनकळा ज्योतं ।
आठव्या महीन्याचं, गणीतं..। सुर्य झाला निटं ।
नवव्या महीन्याचं, गणीतं..। देव झाले कृपावंत ।
येवु लागलो, तेथुनं..। होतं कवाड लावुन ।
हाका मारल्या, देवालें..। देव किल्या घेवुन आले ।
दिले कवाड, उघडुनं..। आदी शक्तीनं ।
तेथुन तारलं, या देवानं..। धरले याहीचे चरणं ।
आता लागलो, तुया चरणां..। जागी ठेव पाळणां ॥ ०६ ॥

॥ बाहेर पाहलं, येवुनं..। बहु दिसते सयन्य/सैन्य ।
निर्गुण विभुतीं, सत्तेची..। राखं आदी शक्तीची ।
त्यावर बाळाला, टाकुनं..। नाळ खांडे हो सुईनं ।
लो-लो लोहा-या, वाढीयां..। यानं खांदला दरीया/दर्या ।
चारही यम, दर्यावरीं..। आल्या आसरा धावुनी ।
या बाळाला, न्हावुनं..। फुकंले नाक-कान ।
म्हणे गुरू हो ! काहुन आली..। माय ची सुईनं ।
पाय लावले, नयनीं..। केली पायवणी ।
सव्वा हात, बावतं फाडुनं..। दिलं बाळाला पांघरून ।
पदर विटाळी, लागलां..। दोहीत विटाळ झाला ।

चोखं चुक-चुक, अमृत करूनी..। दया धान्य फेकुनी ।
धान्य वेचायां, हरकोणीं..। प-यां आल्या सात जनी ।
सुप भरूनं, हे मोती..। भरत असे ओटी ।
या मायेची, भरली ओटी..। धन्याची महीमा मोठी ।
आता लागलो, तुया चरणां..। जागी, ठेव पाळणां ॥ ०७ ॥

॥ पहील्या दिवशी, जन्मलां..। सोहंम् शब्द विसरला ।
तेथुन पडली, भुलवनं..। गेला दुसरा दिनं ।
तिस-या दिवशी, दळतां..। केला आटा-घाटा ।
उरफाटे बाहुलं, करूनं..। केलं पाटयाचं पुंजनं ।
काजळ-कुंकु, लावुनं..। दिला पिंज-याला मानं ।
चौथ्या दिवशी, चौ-यांशीं..। गणा या गोताशी ।
पाचव्या दिवशी, पाचवीं..। आले बम्हा हे सटवी ।
सटवी घालतें हो ! अक्षरं..। बम्हा पाहे वाचुनं ।
जाती अक्षरं, दिलं घालुनं..। यानं मिळवलं पुंजनं ।
शंकर नंदयाची, पिशाबं..। त्याची लावुन ज्योतं ।
सहाव्या दिवसाचं, पुंजनं..। सहाजोग सहा दर्शनं ।
सातव्या दिवसाचं, पुंजनं..। आला मेसकाईला मानं ।
सातही आसरा, या सवासीनी..। निट पुंजनं करा ।
दयावे द्रव्यें, झाकुनं..। नाही यमाशी हुकुमं ।
आठव्या दिवशी, आठवां..। करतो देवा-देवां ।
नवव्या दिवशी, नवज्योतां..। देहीत प्रकाश होतां ।
दहाव्या दिवशी, दशवतां..। उभे धनी अनामतां ।
त्याशी लागली हो ! हे चिंतां..। हे स्वर्गीच्या द्युतां ।
अकरा दिवस, जन्माशी झालें..। कुळ सारे मिळाले ।
बारा राशी, हया मोकळयां..। तार या देहीला ।
तेथुन तारलं, या देवानं..। धरले याहीचे चरणं ।
आता लागलो, तुया चरणां..। जागी ठेव पाळणां ॥ ०८ ॥

॥ बाराव्या दिवशी, बारसं..। हा नेमण्याचा दिवस ।
वनस्पतीचा, करून पाटं..। टाकला चौकातं ।
त्यावर मायेला, बसवुनं..। वाटते खोबरं-पानं ।
डोळा काजळ, घालुनं..। केले दाती-दातवणं ।
गजबज सवासीनी, या माउल्यां..। माया चैत्यन्या पावल्यां ।
बारा राशी, हया मोकळया..। केल्या मोत्याच्या घुग-यां ।
याहो सिदाई, हा जलदिनं..। घ्याहो आपला मानं ।
पाळण्यात घाला हो ! या बाळाला..। नावं ठेवायलं ।
नावं ठेवलं, वेल्हाळं..। निद्रा नसे डोळं ।
पाळणा उभारला, चौकोणां..। तार निरंजना ।
तेथुन तारलं, या देवानं..। धरले याहीचे चरणं ।
आता लागलो, तुया चरणां..। जागी ठेव पाळणां ॥ ०९ ॥

-: डहाकी :-
॥ आकाशाची दोरी । लांबवला पाळणा ।
कळसुत्र जाणा, महाराजा हो राया ॥

भजने :-
॥ पाळणा उभारला खासा । झोका दयाहो, महाराजा आयुष्याचा ॥
॥ हाती पाळण्याची दोरी । राखन आहे, देवराया श्रीहरी ॥
गजर :- ॥ हाती पाळण्याची दोरी । झोका गेला लांब दुरी.... ।
झरझरा उतरले हरी हो, अंबेतिरी/सावंगपुरी/मुज-याशी ॥

॥ ओवी नं. ०३ ॥

## ॥ निरसनसह मुळावरचा मोठा पाळणा ॥

### -: निरसन/स्पष्टीकरन :-

॥ पाळणा चरण ०१ चे निरसन ॥
॥ माया विटाळी, बंधनं..। केल, आदी शक्तीनं ।
दोन्ही बिंदुचा, एक झाला..। तेव्हाच, सम्मावला ।
पाचही यमदुत, उभे झाले..। नेवु, लागलें जीवालें ।




॥ माया विटाळी बंधन । देवाशी मागे देणं ।
तेव्हा दिला चौथा दिन । निवृत्तीला ॥०१/०२/०४

जेव्हा मायेने तिच्या विटाळाला बंधन मागीतले, तेव्हा देवाने तिच्या विटाळाच्या निवृत्ती करीता चौथा दिवसाचे देणं दिले. ऐश्या रितीने विटाळाला बाहेर निघण्यास बंधन प्राप्त होवुन, मायेचा विटाळ अंर्तगत स्थिरावला. आणी या अंतर्गत स्थीरावलेल्या विटाळातच माता-पित्याचे उसनवार प्राणशक्ती घेवुन आलेले स्त्री-बीजबिंदु व पुरुष-विर्यबिंदु असे दोनही बिंदुचे एकत्रीकरन होवुन ते विर्य-बिज फलीत झाले. जेव्हा हे दोन्ही बिंदु एक झाले, तेव्हा बिजाचारी बापाच्या मस्तकी असलेले ते आत्मबिज मणकेस्थीत २१ स्वर्ग ओलांडुन त्या गर्भि सम्मावले. आणी मग दोन्ही बिंदुव्दारे फलीत झालेले विर्य-बीज वृध्दिंगत होत, त्या विटाळी जलात दुपट्टीकरण किया करत करत वाढु लागले.

जेव्हा ते वाढु लागले, तेव्हा या नव्यादेहीला मारण्यासाठी मातेच्या देहीवर उभे असलेले पाचही यमदुत उभे झाले म्हणजेच मातेच्या देहीत उभ्या असलेल्या देहीला मारणा-या पाच प्रकारच्या किलर पेशी उभ्या झाल्यात !. आणी जेव्हा त्या नव्या देहीत अंर्तगत घुसुन अंर्तःबाहय मारत मारत त्या नव्याला बाहेर काढण्याचा प्रयत्न करत नेवु लागले, तेव्हाच त्या अंर्तःबाहय पाच प्रकारच्या किलर पेशीरुपात असलेल्या यमदुतापासुन या धनीदेवानें तारले. आणी तेथेच त्याला आपले तेजबळ देवुन त्याचे तेज स्थिरावुन त्याच्या जिवनज्योती मध्ये चैतन्य तेल ओतले.

अश्या प्रकारे अंर्तःबाहय असलेल्या या पाचही यमदुताव्दारे ज्योत विझण्यापासुन वाचवत वाचवत तेथुन तारलं या देवानं । आता धरले याहीचे चरण. देवा । आता लागलो तुया चरणा.. जागी ठेव या देहीच्या आयुष्याचा पाळणा ।

पुढील पानावर...

॥ पाळणा चरण ०२ चे निरसन.. ॥




॥ चंद्र-सुर्य, नयन..। नाक, सुत्र दोनं । यामध्ये वापरतो, जीवन..। करतो , येणं-जाणं । नव्या ज्योतीचा, प्रकाश.। त्याची, सांगतो रीतं । ब्रम्हा विष्णु, शंकरं. ..। बसुन, चौक्या चारं । आदी मुनी, अवतारं...। चैतन्य, निराकार । आत्म पुरुष, पाचही यम...। चौदा, चौक्या गुणं । तेथुन तारलं, देवानं..। आता लागलो..

चंद्र-सुर्य, नयन..। नाक, सुत्र दोनं । यामध्ये वापरतो जिवन..
नव्या ज्योतीचा प्रकाश त्याची सांगतो रित :-

गर्भ जेव्हा सम्मावते तेव्हा निराकार पुतळा म्हणजेच आत्मा हा बिजाचारी बापाच्या मस्तकी उभा होतो. हा आत्मा मस्तक ते मनक्याचे २१ स्वर्ग मार्गाने प्रतेक मनक्याचे चार छीद्रे या प्रमाणे २१ मनक्याचे ८४ भोगत त्या गर्भात परमात्मा कृपेने येणे-जाणें करतो.

॥ शिव-शिव सदाशिव । तो शंकर भोळा ।
तीन महीने बापाच्या मस्तकी । होता तो पुतळा ॥ खंड०६/२१

तिन महीने बापाच्या मस्तकी असलेला तो निराकार पुतळा म्हणजेच आत्मा हा गर्भात येणे जाणे करतो. जेव्हा जेव्हा तो गर्भात पाहणी करण्यासाठी येतो, तेव्हा त्याच्या चेतनेचा प्राणउर्जाशक्तीयुक्त दिव्य प्रकाश किरणांचा स्तंभ गर्भाच्या मस्तीकातील टाळुवाटे गर्भाच्या कायेत सम्माहीत होते. हा प्रकाशस्तंभ कायेच्या उत्तर व दक्षिण सहद्य स्नायुतंत्र सह पराहद्य व केंद्रिय स्नायुतंत्र असे चार स्नायुतंत्रात विभाजीत होत होत, अन्य सहा केंद्रात ही उर्जा स्थिरावत जाते.

हे सहा केंद्र म्हणजे या कायेचे सहा चक्रे होय. प्रथम साठवण सहस्त्रागारात होते. या सहस्त्रागारात अतीरिक्त संचयीत उर्जा मग आज्ञा/अग्नचक्रावर संचयीत होवुन मग ती क्रमाक्रमाने त्याखालील एक एक चक्रांवर संचयीत होत जाते. अश्याप्रकारे ही त्याची चैत्यन्य उर्जा या षट्चक्रा सह सर्व सुक्ष्म चंक्र-ता-यांचे भेदन करत करत रिढ च्या त्रिकोणीय हड्डी स्थीत मुलाधार चक्राच्या ठिकाणी येते. तिथे तिला मार्ग न मिळाल्यामुळे तिथे अतिरिक्त सिध्द चैतन्यउर्जा संचयीत होवुन सुप्तपणे प्रडुन राहते. या भरून भरल्या आणीक राहीलेल्या उर्जेला कुंडलीनी शक्ती असे म्हणतात. अश्या रितीने ही मुळ शक्ती वसवली या देहीत ! ही शक्ती कुडलीनी ऋण भारयुक्त असते, तर मस्तीकाचे सहस्त्रागार हे घन भार युक्त राहते. जसे जसे गर्भकायेची ऋण व घण शक्ती वाढत जाते, तसे तसे या मस्तकस्थित-सहस्त्रागार व कमरस्थित-मुलाधार या दोहीच्या मध्ये अधांतरी आकर्षन सिध्दचैतन्य उर्जेचे एक क्षेत्र निर्माण होते.

या अधांतरी चैतन्य उर्जा शक्तीव्दारे सुषुम्ना नाडी कायेत स्थापीत होवुन ही सुषुम्ना नाडी कायेमध्ये अधांतरी उभी राहते. ही अधांतरी चैत्यन्य उर्जायुक्त सुषुम्ना त्या निराकार निराधार चैतन्याच्या दिव्य स्तंभाला पकडुन परमात्मापर्यत आपली तार जुळवते. या तारेतुन त्या अजाताचा पुर्ण पुरवा घेत ही सुषुम्ना सर्व शरीरभर जिवनशक्ती निर्माण करत, कायेच्या अन्य दोन इडा व पिंगळा नाडी समुह चालु करते.

आणी मग आत्मा हा चंद्र-सुर्य, नयन..। नाक, सुत्र दोनं । यामध्ये तो वापरतो । त्याच्या वापरामुळे जीवन करतो, येणं-जाणं त्या आत्मा व्दारे ...।

अश्या रितीने बापाच्या मस्तकी तिन महीने असलेल्या निराकार आत्मपुरूषरूपी पुतळा हा मातेच्या गर्भात येणे-जाणे करत, इडा पिंगळा सुषुम्ना या तिन नाडी चालु करतो. तिस-या ते पाचव्या महीन्या दरम्याने तिन नाडी समुह चालु झाल्यावर, मातेच्या नाळे तुन संपुर्ण गर्भकायेचे पोषण व वाढ गर्भाच्या नाभीस्थात रवीचक्रांतुन निघालेल्या अंदाजे ७२ हजार नाडयाव्दारे पाचव्या महीन्यापर्यंत होत राहते. पाचव्या महीन्यात कायावाढ पर्याप्त रितीने झाल्यानंतर, या पाचव्या महीन्यात तो आत्मा गर्भ कायेत प्रवेश करून प्रवेशी होतो.

चैतन्याचा पुतळा असलेल्या आत्मारामाच्या प्रवेशा व्दारे नविन जिवन चैतन्य बळ मिळुन, त्याच्या स्वयं पुनरूत्थान व्दारे कायेचे रोगनिवारण, नविनीकरण, संतुलन, पुनःचक्र निर्मिती ईत्यादीचे कार्य जोमाने होते. मस्तीक व कायेची सामुहीक चेतना जागृत होते. आत्म चैतन्य मुळे हद्य व मस्तीक केंद्रे यांना चैतन्य उर्जा मिळते. हे दोनही केंद्रे ही चैतन्यउर्जा सर्व शरीरभर संचारीत करते. चैतन्य संचारन मुळे जीवन कळा ज्योत उभी करते. या जीवनकळा ज्योतीची उर्जा सर्व जीव कोषीकात समान रूपात प्रवाहीत होवुन, कायेच्या चक्रस्थानी भरपुर मात्रेमध्ये जमा होत राहते.

“जिथे उर्जेची धारा निर्माण होत असते, तिथे चुंबकक्षेत्र हे निर्माण होतच असते.”
या सुक्ष्मनियमाप्रमाणे त्या गर्भाच्या कायेचे एक स्वतःचे चुंबकीय आरा अथवा तेजोवलय कमी अधीक प्रमाणात निर्माण होत राहते. आत्म्याच्या चैतन्यप्रकाशात पडलेल्या आत्माच्या छायेव्दारे स्थापीत या तेजोवलयामुळे त्या कायेचा प्राणमय कोष निर्माण होतो. प्राणमय कोष निर्मिती व्दारे सहस्त्रागार व मुलाधार हे दोन ध्रुव स्वयंःसंचालीत होते. सुषम्ना नाडी सुध्दा स्वयं संचालीत होते. सर्व कायेत ही प्राणशक्ती प्रवाहीत होत राहते. कायेत चैतन्यउर्जा युक्त जीवनकळा चे जिवनदायी प्राणशक्तीचे एक एक चक्रे गतीमान होवुन कायेची वाढ जोमाने होवु लागते. या आत्माच्या प्रवेशाव्दारे आता सांगतो त्याच्या नव्या ज्योतीच्या प्रकाशाची रित..

ब्रम्हा विष्णु शंकर ।
बसुन चौक्या चार
आदीमुनी अवतार..............

...चौदा चौक्या गुण....
तेथुन तारलं.. देवानं...

**चौदा चौक्या :-**

आध्यात्मीक विश्वात कायेच्या मस्तकीच्या वरच्या भागाला ब्रंम्हांड म्हणतात तर उरलेल्या देहाला पिंड असे सुध्दा संबोधतात.



चतुर्पता अथर्वन् वेद पाळना चरण ०५ फोटो

या पिंडी मध्ये गुद्स्थानच्या त्रिकोणीय हड्डी मध्ये कुंडलीनी शक्ती तीच गणेशदेवता राहते. तर लिंगस्थानी असलेल्या स्वाधीष्ठान चक्राच्या चौकी वर रजोगुण चा राजा ब्रम्हा येवुन वसतो. बेंबीस्थानच्या रवी चक्राच्या चौकीवर सत्वगुणांचा राजा विष्णु उभा होतो. आणी हद्‌यस्थानच्या अनाहत चक्राच्या चौकी वर तमगुणांचा राजा शंकर येवुन बसतो.

या पिंडीत शक्तीरूपी गणेशदेवता च्या चौकी सह तिन गुणांच्या तिन देवांच्या तिन चौक्या स्थापीत होतात. या तिनही चौक्यावर तिन देव वस्ती करतात. तर कंठस्थानच्या विशुध्द चक्रावर शुध्द सत्वगुणी आत्मारामची चौथी चौकी स्थापीत राहते. तो येथे जीवदेवता बनुन उभा राहतो. ऐश्या या कायेच्या धडात पाच चौक्या स्थापन होतात.

पिंडी ते ब्रम्हांडी या न्यात्याने या चारही चौक्या सह ईतर चौक्या ब्रम्हांडी मस्तक स्थानी सुध्दा स्थापीत होतात.

पुढील पानावर...

## -: मस्तकी ब्रम्हांड :-

ब्रम्हा विष्णु शंकर । बसुन चौक्या चार आदीमुनी अवतार




मस्तीकातील चौ-बाजुच्या चार चौक्यापैकी, ब्रम्हांडाची ब्रम्हा ची चौकी ही अग्नचक स्थीत त्रिकुट स्थानाच्या वर पुर्वच्या शिखरी असुन याला ब्रम्हलोक अथवा सत्यलोक असे म्हणतात.

विष्णुची चौकी ही पश्चिमेच्या शिखरी श्रीहाट चक स्थानाच्या वर राहुन याला वैकुंठ लोक असे म्हणतात.

आणी शंकराची चौकी ही गोल्हाट चक स्थानाच्या वर उत्तरेच्या शिखरी राहुन याला कैलास लोक असे म्हणतात.

या तिनही चौक्याच्या वरच्या बाजुला औटपिट स्थानी निराकार भैस नारायणाची चौथी चौकी स्थापीत असते.

पिंडी या ब्रम्हाडीच्या या चारही चौक्यावर त्या त्या चौकीचे देवता उभ्या राहतात. अश्या रितीने या देहगावी चार धामावर चार खुम्म आणी या पिंडी या ब्रम्हांडीच्या चारही चौक्यावर पाचवा माझा घनश्याम चैत्यन्य निराकार आदीमुनी अवतार हा आत्मपुरुषाच्या सेरुपात उभा होत असतो.

### चौदा चौक्या गुण :-

वरील पिडी या ब्रम्हांडी च्या मुख्य १४ चौक्या आपआपल्या गुणांसह या संपुर्ण देहीवर धन्याव्दारे स्थापीत होतात.

जसे या **पिंडातील पाच चौक्या**

१. गुद्स्थानी मुधाधार चकस्थीत रक्तवर्ण गणेशदेवता-शारदाशक्ती ची चौकी याचे कर्मकळाउत्पत्ती गुण
२. लिंगस्थानी स्वाधीष्ठान चकस्थीत पितवर्ण ब्रम्हदेवता-सावित्री ची चौकी चे रजोगुण
३. नाभिस्थानी मनीपुर/रवीचक स्थीत निलवर्ण विष्णुदेवता-कमळाशक्ती च्या चौकीचे सत्वगुण
४. हद्यस्थानावर अनाहृत चक स्थीत रुद्रदेवता-उमाशक्तीच्या चौकीचे तमगुण
५. कंठस्थानी विशुध्द चकस्थित सफेदवर्ण जीवदेवता-विद्याशक्ती च्या चौकीचे शुध्दसत्वगुण या देहीत आपआपले चौक्याचे गुणांची सत्ता स्थापन्या करीता प्रयत्नरत् राहतात. तर मस्तक स्थित **ब्रम्हांडी ०९ चौक्या** आहे. वरील फोटोप्रमाणे त्या अश्या
६. भुमध्यस्थानी अग्नचकाच्या पहील्या पत्रावर परमहंसदेवता यांची चौकी तर दुस-या पानावर

७. मायाशक्तीची चौकी
८. भुमध्यावर त्रिकुटस्थानी पुर्वेच्या शिखरी सत्यलोकी ब्रम्हदेवतेची चौकी
९. पश्चिमेच्या शिखरी रसनेहटी श्रीहाटी वैकुठस्थानी विष्णुची चौकी
१०. चक्षुचककमळ स्थानी गोल्हाटी उत्तरेच्या शिखरी कैलाशी महादेवाची चौकी
११. या त्रिकुटी तिन देवांच्या शिखरांच्या त्रिअग्रावर असलेल्या ब्रम्हांडाच्या औटपिट नगरी चैत्यन्य निराकार नारायणाची चौकी असते
१२. टाळुस्थानी ब्रम्हरंधस्थित इच्छाशक्तीची चौकी सह आणीक
१३. दुसरी टाळुस्थानी ब्रम्हरंधस्थित ब्रम्हीमायाची चौकी. आणीक
१४. एक टाळुस्थानी ब्रम्हरंधस्थित केवळ शिवाची चौकी.

अश्या या चौदा चौक्या नव्या ज्योतीव्दारे कार्यरत् होवुन या चौदा चौक्या आप आपल्या गुणांची सत्ता स्थापण्यासाठी कार्यरत होतात.

काया हे या चौक्यांच्या गुणांचे वर्चस्व गाजवण्याचे युध्दक्षेत्र बनल्यामुळे देहीवर उभे असलेले पाचही यम कार्यरत होतात. या सर्वापासुन वाचवुन या देहीची तारण करण्यासाठी तो निराकार निराधार धनीदेव या देहीवर बिंदुस्थानी अगोचर चकाच्या वर उभा होतो. या अगोचर चका वरील ब्रम्हांडात तो धनी निरंजन निराकार निर्गुण निशकलंकी ज्योत स्वरूपात उभा होतो आणी येथुन तारलं या देवानं....धरले याहीचे चरण....आता लागलो तुया चरणा..




॥ पाळणा चरण ०३ चे निरसन ॥

॥ पाचव्या वेदाचा, सुस्कारं..। जीव, धुजी वरं ।
२१ स्वर्गाची, मांडणा..। जावुन, धन्याशी भेटेना ।
२४ आ-हे, हे गि-हाणं...। यानं, पाडली भुलवनं ।
३२ पारवंड, हे भरूनं...। आहे, ३६ कल्पनानं ।
७२ कोठुडया, हया कोरूनं...। भरल्या, अवजारानं ..आता
लागलो, तुया चरणां..। जागी, ठेव पाळणां ॥०३॥

पाचव्या वेदाचा सुस्कारं..। जीव, धुजी वरं :-

अवघ्या वेदातला वेद । आत्मा पाचवा लभेद होय. या आत्मा म्हणजेच पाचवा लभेद वेदाने प्रथम सुस्कार घेत, हा जीव या आदीशक्तीच्या घुजीवर उभा केला आहे.

२१ स्वर्गाची मांडणा ! जावुन, धन्याशी भेटेना :-

गर्भ देहीत पाठीच्या २१ मणकेस्थीत २१ स्वर्ग ची मांडणा होवुन प्रतेकी ७ स्वर्ग याप्रमाणे तिन देवतां मध्ये त्यां २१ स्वर्गाची वाटणी केली गेली.

परंतु हे २१ स्वर्गाची मांडणा त्या धन्यापर्यत पोहचु शकत नाही. कारण तो धनी या २१ स्वर्गाच्या वर मस्तकी उर्ध्व स्वर्गाच्या वर ब्रम्हांडी उभा आहे. बाजुच्या फोटोमधुन ग्यान घ्यावे.

२४ आ-हे हे गि-हाणं । यानं पाडली भुलवनं :-

कोणत्याही ग्रहणाच्या आधी आरे लागतात व ग्रहणकाळ व ग्रहणकाळ नंतर गि-हे लागतात. सरासरी प्रतेक वर्षाला १ चंद्रग्रहण व १ सुर्यग्रहन लागत असते. जुन्या काळी अशी कल्पना केली गेली होती की : या ग्रहणकाळात चंद्र-सुर्याला आरे-गि-हे व्दारे दुःखे भोगावे लागते. असो.

परंतु इथे या देहीत हे सत्य आहे की : गर्भाच्या देहीत चंद्र-सुर्य हे नयन रूपात आले असल्यामुळे या चंद्र-सुर्य रूपी नयनाला गर्भातील नरक यातना भोगावे लागुन दुःख भोगावे लागतात. असे पुर्वजन्माच्या ब-या-वाईट कर्माचे संचीता व्दारे आलेले हे २४ आरे-गि-हे गर्भा असतानांच सुरू होवुन ते जन्मकाळपासुन पुढील वर्षात या गर्भि च्या नशिबी येतात. हे आरे-गि-हे त्याला भुलवन पाडत राहतात. या भुलवनीच्या व्दाराने कल्पना म्हणजेच माया त्याच्यामध्ये विस्तारीत होत ३२ पाखंड ३६ कल्पनाच्या रूपाने विस्तारते.

३२ पाखंड हे भरूनं आहे, ३६ कल्पनानं :-

सत्व रज तम हे ३ गुण, काम कोध लोभ मोह मद मत्सर अहं हे षटविकार, ईच्छा,व्देष सुखःदुखः हे पंचभुतात्मक विकार, इंद्रियांचे पंचविषय,.. ईत्यादी ३२ पाखंड, हे आशा मनशा दुर्गुण वासना माया ममता...ईत्यादीमायेच्या ३६ कल्पनेने ही गर्भि देहीत भरून जाते..

७२ कोठुडया कोरूनं भरल्या, अवजारानं :-

आधार चकी ४ कोठे, स्वाधीष्ठान स्थानी ६ कोठे, मनीपुरचक स्थानी १० कोठे, अनुहातचक स्थानी १२ कोठे, विशुध्दचकस्थानी १६ कोठे असे पिंडीचे षटचकावरील मातृकाचे ५० कोठे आणी ब्रम्हांडीचे मस्तक स्थानचे २१ कोठे व एक दुर्घट कोठा असे एकुन ७२ कोठे या देहीत त्या कारागिराने कोरले आहेत. गुण-शक्तीयॉ चे अवजारे त्या धनी कारागीराने हया ७२ कोठडयात भरून ठेवलेले आहेत.

केलं नेताचं/नेत्राचं, झाडनं...। झाड-झुडी, कारणं ।
देहे-पिंड, हा झाडुनं...। अजुन, का होईनां ।
देहे झाडं, देहमाई...। आता, बसवं एका ठाई ।
तेथुन तारलं, देवानं..। धरले, याहीचे चरणं ।
आता लागलो, तुया चरणां..। जागी, ठेव पाळणां ॥ ०३ ॥

हे देह-निर्गुणा ! धनी कारागीरा ! या देहीचे रोग-विघ्नापासुन सरंक्षण करण्याच्या कारणास्तव तुच या देहीची झाड झुड करून दुःखाश्रु पुसुन नेत्राचे झाडन केलेले आहे. वेळोवेळा दुःखाश्रु मिटवुन सुखःअश्रु वाहवत आहे. तरी सुध्दा हे रोग-विघ्ने, षटविकार अंतर्गत प्रवेश करण्यासाठी सदैव तत्पर राहत असल्यामुळे देहपिंड हा या विकारांपासुन अजुन झाडुन होईना ! या रोग-विघ्ने षटविकार व्दारे देह अशांत अस्थिर होत आहे. देहीतील काडीकचरा साफ न होत असल्यामुळे देहे शंक बनु शकत नाही आहे. तुला या देहगादीवर बसवण्यासाठी आम्हास ही देहगादी सुंदर व सफा करण्यास साहय होत नित हा देह नित झाड ग देहमाई निरंजना देह निर्गुणा ! आता बसव एका ठाई ! आता लागलो तुया चरणा ! जागी ठेव या देहीच्या आयुष्याचा पाळणा ! हीच नित अखंड अर्ज आहे.

पुढील पानावर..

॥ पाळणा चरण ०४ चे निरसन ॥

चारही उभारून हे खांब । वर कमडीचा बंध :-




दोन हात दोन पाय असे चारही खांब उभारून त्यावर हाडाच्या कमडी १२८ ठिकाणी बांधुन पिंजरा जोडला. देहीची रंचना केली. तरीसुध्दा देहीचा खांब हा उभारणीस येईना । तेव्हा मग

ठेवल्या देहीला खिडक्या :-




या देहीला दश दरवाजे/खिडक्या बाजुच्या फोटोत दाखवल्याप्रमाणे ठेवल्या आहेत. दोन डोळे, दोन कान, दोन नाकपुडया, एक मुख आणी योनीलींग व गुद्द्वार असे नवद्दार आणी दशवी टाळुस्थानची खिडकी ! असे देहीला दरवाजे/खिडक्या ठेवल्या आहेत.

चौदा या चौक्या :-




या पिंडीच्या मुख्य पाच चक्रे व मस्तकी ब्रम्हांडीच्या मुख्य नउ चक्रे अश्या एकुन १४ ठिकाणी चौक्या उभारून त्या चौक्याच्या जागोजागेवर अन्य देवास चौकीदार ठेवलेत. बाजुच्या फोटो प्रमाणे.

आणीक पंधरावा कळस :- या चौदा चौक्याच्या वर बिंदुस्थानी जीव या




रायास पंधरावा कळस ठेवला. या कळसा वरून जीव या रायाव्दारे उत्पन्न झालेले जीवन या सर्व चौक्या व दरवाजे-खिडक्या यामध्ये वापरू लागले. या सर्व ठीकाणी जीव या रायाच्या वापराने चैत्यन्यप्रकाशासह प्राणशक्तीचा पुरवा या सर्व ठिकाणी होवुन, या सर्व चकस्थानावरून सर्व देहीत चैत्यन्यमय प्राणउर्जाशक्ती संचारू लागली. जीव या रायाची जीवनकळा ज्योत देहीत उभी होवुन खेळु लागली. जीव चांगल्या रितीने भानावर येवुन सुभान झाला. **सुभान** :- चांगल्या रितीने भानावर आलेल्या जीवास दिलेली उपमा । या जीवास या चौदा चौक्यावर असलेला पंधरावा कळस राहण्यास दिलेला आहे. हेच होय धन्यार्नें दिलेले मोतीदान या देहीस ।

॥ पाळणा चरण ०५ चे निरसन ॥

॥ ऐसा सुतारं, कारागीरं...। नव्हतं, वासला-किकरं ।
आप रूप, देह माडी...। केली, हो तयारं ।
केलं देहीला, कंगुर...। राया, भलाच कारागीरं ।

लाकडी काम करणा-यास सुतार असे म्हणतात. कोणताही सुतार हा वासला व किकंर ईत्यादी सुतारी अवजारावाचुन सुतारी काम करू शकत नाही. परंतु हा धनीदेव एकच ऐसा सुतार आहे की : ज्याने वासला किकंर ईत्यादी सुतारी अवजारे हाती न धरताच ही आपल्या रूपाची स्वयं:पुर्ण, स्वयंनिर्मित, स्वयंचलीत प्रतिकृती असलेली ही देहरूपी माडी बनवली. या भलाच धनीदेव कारागीराने या देहीरूपी माडीला कंगुरे-छिद्रे खिडक्या दरवाजे ईत्यादी माडी उभारण्यास आवश्यक असलेले सर्व तयार केलीत. ते असे.

तिनशे साठ, हे कमंडी..। करून जोडा-जोडी ।
तिनशे साठ, नवनाडी..। लावुन हाडो-हाडी ।
तिनशे साठ, शनीचरं...। बसवुन, देहीवरं ।
तिनशे साठ, दिनमानं...। नाही, संचिता मालुमं ।
दैवं प्राप्त, अरजलं...। नशिब, पाचही नावं ।
पाचही अक्षरं, लल्लाटी...। पुढं, आयुष्याची गिणती ।

तिनशे साठ हे कमंडी । करून जोडा-जोडी :-

२५ उभे चरणीचे, २१ सुक्ष्म मार्गाचे, ७२ सांध्याचे, २२ पासोळीचे, २८ उरी-पृष्ठी पासोळीचे, ४२ आडकाटे, ४ खुंटे, २१ मनकेचे...ईत्यादी एकुन ३६० अस्थी/हाडांच्या कमडया ची जोडाजोडी करून मेरूमंडयान चा साचा उभारला.

तिनशे साठ नवनाडी । लावुन हाडो-हाडी :-

३६० नव नव्या नवनाडीयॉ या ३६० कमडीच्या हाडोहाडी लावल्या आहेत. देहीला रत्न जडीत जडविले. सुर्य झळकवला. देहीत शक्ती बसवली. या देहीच्या पिंज-यात जीव राघो बसवला. माया वसवले एक नगर ! ३६० शनीचर जागोजागी बसवले. ३६० दिनमान ची रंचना केली. या सह अनेक प्रकारचे देवदेवता सह तिरलोक्यांची रंचना या देहरूपी माडीत रंचुन चौथा ताळ ठेवला. असो... ऐसी स्वयंपुर्ण बिन खांबाची देह माडी बांधली. धन्य तो धनीदेव कारागीर । या धन्याची महीमा वर्णु तरी किती ?.

आमच्या दैवात होत म्हणुन ही देहमाडी धन्यानं आम्हास प्राप्त करून दिली. पाचही अक्षर कपाळी/लल्लाटी कोरून पुढे आयुष्याची गणीता दिली. या देहरूपी जलीया खांबाशी निराकार भैसनारायण उभे आहेत. या धनीदेवानेच पिंडी या ब्रम्हांडाचे तिर तिर भवनं तारले आहे. या हरीच्या नामाला घेण्यास कोणतीही वेळ-घटका पाहावी लागत नाही. म्हणुनच सदोनित हरीचे नाम घ्याहो. नाम घेण्याकरीता या देहीला आयुष्य गणीता नाही. या हरीच्या नामाचा न करावा आळस ! आहो कैलाशी महेष या हरीचे सदोनित नाम जपतो. कारण या पाचही अक्षरांच्या कारणाने या हरीने या भक्तराजांचे काम सिध्द केलेत आहेत.

पाचही अक्षर कारण । सिध्द केले काम ।
तेव्हा सिध्दाचा । जीव झाला । तारू केलं जीवाला ।
तेव्हाच सिदाई । प्रकटली । तोच गुरू केला ।
माझा गुरू तो । आदीमुनी । पुरवे अमृत वाणी ।
अंम्बर केलीशी । नरदेही । यानं बसवलं एका ठायी ।
आता लागलो तुया चरणा....॥ ०५ ॥

आत्मा हा सर्वगुण सर्वसिध्दियॉ संप्पन्न आहे. म्हणुन यालाच सिध्द असे येथे संबोधिले आहे. जेव्हा हा सिध्द प्रकृतिमायेच्या योनीमध्ये प्रवेश करून प्रवेशी/परवेशी झाला, तेव्हा ते प्रकृती-मायेच्या तिन गुणांच्या विकारांच्या वर्चस्वा खाली आला. या तिरगुणांसह ईतर विकारांच्या वर्चस्वाखाली येवुन प्रकृतिमायेच्या तिरगुणांच्या बंधनात अडकुन, त्याच्यावर एकावर एक असे चार न चार घडी चा चार देही चे चार कोट चढुन तो देहधारी जिवात्मा झाला.

मुळचे शंक/निशःकलंकी पवित्र आत्मे हे या प्रकृति मध्ये देहधारी बनलेत. देहधारी बनुन देहीच्या मन, बुध्दि, अंहं, सह मायेच्या तिरगुणांनी बध्द झालेत. ऐसे या मायेमुळे या मुळचा सिध्द असलेल्या आत्मा चे रूपांतर देहधारी जिवात्मा बनुन झाले.

अश्या रितीने हा मुळातच शंक सिध्द असलेला आत्मा । प्रकृतिच्या गुणांनी बध्द होवुन, बांधल्या जावुन जिवात्मा बनला. जिवात्मा बनुन मायेच्या तिरगुणांनी बांधला गेला. देहीचे ईद्रिंये, विषय वासना विकार..ईत्यादी चे फासे त्याच्यावर पडलेत.

ऐसा मुळातच सिध्द असलेला शंक निशंकलंकी आत्मा म्हणजेच सिध्दाचा रूपांतर होवुन जेव्हा तो देहधारी जीव झाला, तेव्हा या जीवाला त्या परमात्मा आदीपुरूष अवतार आदीमुनीने तारू केलें. आदीपुरूष अवतार आदीमुनी हा सिदाईचा देव तेथे प्रकटला. या धनीदेवानं आपल्या डाव्या पायाचा अंगुठा लावुन या जीवास सिदाई दिली. त्या धन्याची हीच सिदाई या देहीत सर्वप्रथम प्रकटली. तेव्हा मग या सिदाईच्या धनी देवालाच आम्ही गुरू केला. या निर्गुण धनीगुरूने आम्हा शुध्द रस्ता दाखवला. सिदाईने सरळ साध्या मार्गाने सोस न भुलता, सच्चेपणाने सत् जीवन जगण्याची सांगी केली. या निर्गुण धनी गुरू ने ओहंम्-सोहंम् मंत्र कानी फुंकला.

ऐश्या रितीने या निर्गुण निर्विकार आदीपुरूष अवतार आदीमुनी धन्याने उपजीता जन्मताच आम्हा सर्वांचे कान फुंकले हो !

॥ उपजीता जन्मीता । फुंकलेसे कान ।
आता गुरूला मान । कोण्या परी ॥
आता हाडामासाच्या गुरू या चेल्याची महीमा वाठवु कैशी ?...

॥ गुरू या चेल्याची । महिमा वाढवता कैशी ?
मन ठिकाणी नाही बसवलं । कोण्या गुरूने ॥

॥ मन ठिकाणी आता बसवलं । पहा या धन्यानं, पहा या आदीमुनीनं..
बहुत नफा घडला । आता याहीच्या संगतीनं ॥

॥ गुरू नाही चेला नाही । नाही फुंकले कान कोणी ।
त्याचा गुरू देव उभा हो । आदीमुनी ॥

॥ सिध्द साधक गुरू चेला । येईना मनी ।
देह तारू एक जान । आदीमुनी धनी/अनामत धनी ॥

॥ माझा गुरू तो । आदीमुनी । पुरवे अमृत वाणी ।
अंम्बर केलीशी । नरदेही । यानं बसवलं एका ठायी ॥
आता लागलो तुया चरणा....

पुढील पानावर...

## ॥ पाळणा चरण ०६ चे निरसन ॥

### पहील्या महीन्याचे गणीत । ढळमळ पाणी होतं :-




पहील्या महीन्यात स्त्री-बिज व पुरुष-विर्य हे दोन्ही बिंदु एक होवुन विर्य-बिज फलीत झाले. नव दिवसात या एक गोलाकार फलीत विर्यबिज चे दोन, दोनाचे चार, चार चे आठ... असे दुपट्टीकरन व्दारे वृध्दिगत होत होत त्या विटाळी जलात अव्यक्त स्वरुपात या पहील्या महीन्याच्या गणीतात वाढु लागले. हे पहील्या महीन्याचे गणीत ! पहील्या महीन्यात येथं ढळमळ पाणी होतं ! परंतु त्या ढळमळ पाण्यात नव्या पिंडाचे अंगप्रत्यय हे अव्यक्त स्वरुपातुन व्यक्त स्वरुपात येण्यास प्रयत्नरत् झाले. २१ दिवसाच्या प्रयत्नाअंती ते ढळमळ पाणी हे गोलाकार गोळा घन स्वरुपात स्थिरावुन, तेथुन ते पुढील ९ दिवस त्या घन गोळाची वृध्दी होत होत या पहील्या महीन्याअंती या जलमय पिडी चा आकार १ सेंटीमिटर ईतका झाला.

प्रथम महीन्याच्या गणित सिध्दि करीता आयुर्वेदामध्ये खालील काढा प्रथम महीन्यात आयुर्वेदिक वैद्य कडुन घेण्याचे सांगीतलेले आहे तो असा :
एक कप दुध व एक कप पाणी टाकुन त्यामध्ये ज्येष्ठमध, सागाचे बी, देवदार, एक चमचा क्षीरकाकोळीचा चुर्ण टाकावे. व ते उकळुन आटुन आटुन एक कप करने व तो काढा प्रथम महीन्यात घेणे.

### दुस-या महीन्याचे गणीत । रक्त-मासाची मुसं :-




पहील्या महीन्याअंती आणी दुस-या महीन्याच्या आरंभिच्या दिवसात ते ढळमळ पाणी घन स्वरुपात येत येत त्याचा रक्त-मासाचा एक गोळा होतो. तद्नंतर या मुसीचा म्हणजेच या रक्त-मासाच्या गोळाचा एक भाग जाड असुन दुसरा भाग शेपटाप्रमाणे बारिक व टोकदार होतो. तरीही ते गोलाकारच भासते. कारण जाड व बारीक शेपटासारखे टोक एकमेकात मिळलेल्या सारखे दिसत असतात.

जाड भागात शिर डोळे कान नाक मुख ईत्यादी अवयव तर मध्यभागी हृदय यकृत ईत्यादी चा सुत्रपात होत राहतो. तर शेपटाकडच्या भागात पाय.. ईत्यादी अवयवांच सुत्रपात होतो. ऐसा या गणीतात सुप्त अवयवांचा सुत्रपात होत राहत, ते अवयवे अव्यक्त सुप्त स्वरुपात कार्यरत् असतात. ४२ व्या दिवसात हृदयस्थानी धडकन करणा-या पेशी कार्यरत् होवुन त्यांची धडकन ७५ वेळा प्रति मिनीट असते. आणी ती पुढे १२५ वेळा प्रति मिनीट पर्यत वाढत वाढत जाते. दुस-या महीन्याच्या अंती म्हणजेच अंदाजे ५० व्या दिवसाला ही मुसीची लांबी जवळपास ४ सेंटीमिटर ईतकी वाढुन ती अंकुर फुटण्याच्या स्थितीत येते.

याकरीता दुस-या महीन्याच्या गणितात **आपटा, काळेतिळ, मंजीष्ठा, व शतावरी** याचा काठा आयुर्वेदामध्ये वैद्याकडुन घेण्याचे सांगीतलेले आहे.

तिस-या महीन्याचे गणीत । अंकुर फुटले त्यास :-

पहील्या महीन्याच्या गणीतात स्त्री-बीजबिंदु व पुरूष-वीर्यबिंदु हे दोन बिंदु म्हणजे दोन रती आणी या दोन रतीमध्ये अर्धि रत जोडुन अडीच रतीची दुस-या महीन्यात रक्त-मासाची मुस जन्मली. या मुसीचे गणीत खंड०३/ओवी-०५: देहवर्णनाच्या निबंध-ओवीच्या चरणाप्रमाणे असे आहे.

॥ पुरूषाचा भाग अधिक । पुत्र असे दक्षिण कुशीत ।
स्त्री चा भाग अधिक । कन्या असे वाम कुशीत ।
स्त्री - पुरूषाचा भाग समान । मध्यभागी वसे नपुंसक ।
ऐसा रेत विस्तार महादेवाचा । मानव जन्म पहा कोण्या रितीचा.॥

या मुसी चा जन्म हा अडीच रती पासुन होतो. या मुसी चा जन्म जर एक रत स्त्री-बीजबिंदु व दिड रत पुरूष-विर्यबिंदु असे अडीच रतीने झाला असेल, तर या गणीतात पुरूष-रेताचा भाग अधीक असल्याने या मुसीच्या पेशी आकाराने पिंडासमान होते. ती महादेवाच्या पिंडाप्रमाणे दिसणारी मुस पुरूषलींगाची असते. तो पुत्र दक्षिण कुशीत स्थीरावतो.

या मुसी चा जन्म जर एक रत पुरूष-विर्यबिंदु व दिड रत स्त्री-बीजबिंदु असे अडीच रतीने झाला असेल, तर या गणीतात स्त्री-रेताचा चा भाग अधीक असल्याने या मुसीच्या पेशी आकाराने चापट चतुष्कोण होते. ती चापट चतुष्कोण आकाराची मुस स्त्रीयोनी ची असते. ती कन्या वाम कुशीत स्थीरावतो.

या मुसी चा जन्म जर सव्वा रत पुरूष-विर्यबिंदु व सव्वा रत स्त्री-बीजबिंदु असे अडीच रतीने झाला असेल, तर या गणीतात स्त्री-पुरूषाच्या रेताचा चा भाग समसमान असल्याने या मुसीच्या पेशी आकाराने अर्धगोलाकार होते. ती अर्धगोलाकार आकाराची मुस नपुंसक ची असुन, तो किंकर मध्यभागी स्थीरावतो.

ऐश्या रितीने दुस-या महीन्याच्या गणीतात अंदाजे ४ सेंटिमिटर ईतकी वाढलेली मुस रूपी गर्भपिंड हा तिस-या महीन्याच्या आरंभी गर्भात दक्षिण वा वाम अथवा मध्य या तिन पैकी एकाभागी मातेच्या गर्भात स्थीरावते.

या स्थिरावलेल्या मुसीची तेथुन पुढे वाढ होवु लागते. या तिस-या महीन्याच्या गणीतात मुसीला इंद्रियेस्थानी अंकुर फुटते. मुसीला हात-पाय च्या ठीकाणी अंकुर फुटुन त्या मुसीचे स्वरूप सामान्य मानव प्राण्याप्रमाणे आकार घेवु लागते. ७० व्या दिवसापासुन हाता-पायाची रंचना सह इतर ग्रंथि चा विकास पुढे होवु लागतो.

तिन महीन्याअंती आकार मानव शरीराप्रमाणे दिसु लागतो. तिन महीने बापाच्या मस्तकी उभा असलेला आत्मारामाचा पुतळा साठी आता गर्भपिंड तयार झाला असल्यामुळे तो येथे येणे-जाणे करत आपला प्रकाशकिरणाच्या स्तंभाव्दारे त्यात चैतन्य ओतत राहतो. चैतन्य व्दारे त्याचा प्राणमय कोष निर्मितीस सुरूवात होवु लागते. त्यामुळे आता या तिन महीन्यानंतर गर्भपात ची जोखीम कमी होते.

याकरीता तिस-या महीन्यात **बांडगुळ, क्षीरकाकोळी, अनंता** याचा काठा आयुर्वेदामध्ये जाणत्या वैद्याकडुन घेण्याचे सांगीतलेले आहे.

चौथ्या महीन्याचं गणीत । हद्‌य पाठ-पोट :-

चौथ्या महीन्यात गर्भाचे पाठ-पोट ईत्यादीसर्व अंग प्रत्यंग अधिक स्पष्ट होतात. आत्माराम धन्याचा चैतन्यचा मुळस्तंभ गर्भि येत असल्याकारणाने हद्‌य पेशी आपल्या संस्कारानुरूप कियाशील होवुन स्पंदन करू लागते. आता त्या गर्भिनीच्या शरीरात एक तिचे स्वतःचे व दुसरे त्या गर्भाचे असे दोन हद्‌य एकाच वेळी कार्यरत् असतात. हद्‌यी चैतन्य आल्याने तिनमहीने २२ दिवसानंतर तो गर्भि जागृत होतो. त्याचे इंद्रिये आपआपल्या विषय ग्रहन करतात. आणी तो आसपासच्या परीस्थीतीचा आढावा घेतो. प्रतिकीयात्मक हालचाल करतो. कन्या असेल तर तिला प्रथम स्पर्शज्ञान येवुन ती प्रथम हातपाय हालवते. पुत्र हलने-डोलने करत हालचाल करते. या गर्भि कन्या-पुत्र च्या हालचालीची गती अत्यंत कमी असल्यामुळे मातेला त्याची जाणीव होत नाही. परंतु तिला त्याचे डोहाळे लागतात. या डोहाळयाच्या वेळी माता जी ईच्छा व्यक्त करते ती ईच्छा त्या मातेची नसुन त्या गर्भाने मातेव्दारे व्यक्त केलेली असते.

या चौथ्या महीन्याच्या गणीतात त्या गर्भाची लांबी अंदाजे १७ सेंटीमिटर ईतकी होते. लींगस्थान अधिक स्पष्ट होतात. चेहरा अधीक स्पष्टतेकडे जावुन डोक्यावर केस निघण्याच्या अवस्थेकडे तो वाटचाल करू लागतो.

याकरीता चौथ्या महीन्यात **धमासा, अनंता, रास्ना, मंजीष्ठा, देवदार** याचा काठा आयुर्वेदामध्ये वैद्यांकडुन घेण्याचे सांगीतलेले आहे.

पाचव्या महीन्याचं गणीतं । हाडी या मस्तकं :-

पाचव्या महीन्यात आत्मारामाचा प्रवेश होतो. शिराचा भाग अन्य शरीराच्या भागापेक्षा मोठा होतो. तसेच या पाचव्या महीन्यात अस्थी मास रक्त व धातुची उत्पत्ती अन्य चार महीन्यापेक्षा जास्त होते. त्यामुळे गर्भाच्या संपुर्ण शरीरावर एक तेलकट चोपडा असा विषेश पदार्थ तयार होवुन, त्याचे विषेश आवरण शरीरावर येते. त्यामुळे गर्भाच्या त्वचेची गर्भ जलतत्वां पासुन रक्षा होत होत त्वचेअंर्तगत असलेल्या हाड व मस्तक याची वाढ जलद होते. जलद वाढीमुळे हाडी या मस्तकाला बळकटी येवु लागते. मस्तक बळकट झाल्याने चेतना मन व बुध्दि वळवळाले लागते. या मन-बुध्दिच्या चलनामुळे ज्ञान ग्रहन करण्याची प्रकीया तो प्रवेशी आत्मा चालु करतो. मन बुध्दि कडे अग्रेसर होते. मातेने घेतलेल्या आहाराचा स्वाद तो घेवु लागतो. त्याची पाचन प्रणाली सुरू होते..... ईत्यादी प्रणाली त्याच्या विकासीत होतात.

या पाचव्या महीन्यात आत्मा हा गर्भिकायेत प्रवेशी झाला असल्यामुळे, या पाचव्या महीन्यापासुन या आत्माच्या आश्चर्यकारक रित्या श्रवण ग्रहण करण्याचा स्वतःचा संस्कार गर्भिकायेत जागृत होत राहतो. या जागृता अवस्थेत जर मातेची एकाग्रता झाली किंवा एखादया भाव मध्ये जर ती तल्लीन झाली, तर तिच्या या तल्लीनता व एकाग्रतामुळे तो आत्मा मातेच्या इंद्रियांनी केलेले श्रवण व अनुभव स्वतः ग्रहन करून त्याचे संस्कार स्वतःसह गर्भिकायेवर टाकत राहतो. या पाचव्या महीन्यापासुन ते जन्मापर्यत तो आत्मा आपल्या कायेच्या विकास प्रकीयेत गर्भाच्या मातेचा पर्यावरणाशी येणारा संबंध आणी सभोतालची परिस्थीती संस्कृति..इत्यादीच्या प्रभावाचे सुक्ष्मसंस्कार गर्भ कायेवर टाकत राहतो.

अश्यारितीने तो आत्मा गर्भ मेंदु मधील पर्यावरणाला अतिशय संवेदनशील असलेल्या पेशीत स्वतःच्या अनुसार बदल अथवा परिवर्तन घडवुन आणण्याची आदत/संस्कार टाकत जातो. या पाचव्या महीन्याच्या नंतर येणारे

पुढील ४ महीने तो आत्मा संस्कारक्षम राहुन स्मृति, चेतना अनुभव, प्रेम, संबध..ईत्यादी चे संस्कार एकवटत राहते. आत्मारामाव्दारे एकवटलेले सुक्ष्मसंस्कार तो आत्मा स्वतःसह गर्भकायेवर टाकत राहतो. उदाहरणार्थ सुभद्रा ने आपल्या जागृतावस्तेत कृष्णा व्दारे जेव्हा चक्रव्युह भेदाचे जे ज्ञान श्रवण केले होते, ते सर्व ज्ञान तिच्या गर्भाने श्रवण केल होते. म्हणुनच अभिमन्युला जन्मताच चक्रव्युहभेदाचे गर्भिज्ञान प्राप्त होते. असो..

या पाचव्या महीन्याच्या अंती तो गर्भ जावळे निघण्याच्या सुरूवातीच्या स्थितीत येतो. सहाव्या महीन्यात प्रवेश करतांना त्या गर्भाची लांबी अंदाजे २५ सेंटीमिटर ईतकी होते.

याकरीता पाचव्या महीन्यात **रिंगणी,डोरली, शिवण,अनंता व एक चमचा गाईचे तुप** याचा काठा आयुर्वेदामध्ये वैद्यांकडुन घेण्याचे सांगीतलेले आहे

सहाव्या महीन्याचं गणीतं...। जावळं, नखं-बोटं :-

सहाव्या महीन्याच्या गणीतात शरीरावर केस व डोक्यावर जावळं निघुन त्याची वाढ होते. पाचव्या महीन्याच्या गणीतात मन बुध्दि मस्तक चालु होते. तर या सहाव्या महीन्यात बुध्दि अधिकोतर अधिक विकास पावत जाते. त्या गर्भाच्या शरीरात ताकत, भार याची जाणीव, यासह वेगवेगळे भाव व वर्ण याची वृध्दि करत जाते. गर्भाच्या शरीराचे नखे-बोटे सह स्नायु शिरा नसा अस्थी....ईत्यादी ची रंचना अधीक बळकट होत होत त्या स्पष्टपणे प्रकट होतात. या सहाव्या महीन्याच्या गणीतात गर्भाच्या शरीराचे वेगवेगळे अंग अवयव ची रंचना स्पष्टपणे प्रकट होते. या सहाव्या महीन्याअंती आणी सातव्या महीन्यात प्रवेश करतांना गर्भाची लांबी अंदाजे ३० सेटीमिटर म्हणजेच १ फुट ईतकी होवुन त्याचे वजन अंदाजे ९०० ग्रॅम पर्यत वाढते.

याकरीता सहाव्या महीन्यात **पिठवण, चिकणा, शेवगा, गोक्षुर, ज्येष्ठमध** याचा काठा आयुर्वेदामध्ये वैद्यांकडुन घेण्याचे सांगीतलेले आहे

सातव्या महीन्याचं गणीतं । उभी जीवनकळा ज्योतं :-

सहाव्या महीन्याच्या गणीतात गर्भाचे शरीर संपुर्ण परीपुर्ण होवुन सातव्या महीन्यात त्या गर्भाची स्वयंपुर्ण जिवनकळा ज्योत उभी होते. पाचव्या महीन्याच्या गणीतापर्यत गर्भ मातेच्या उसनवार जिवनकळा ज्योतीच्या साहयाने वाढला. परंतु या सातव्या महीन्याच्या गणीतात तो गर्भ स्वतःच्या स्वयःपुर्ण उभ्या झालेल्या जिवनकळा ज्योतीच्या साहयाने वाढु लागतो. स्वतःच्या जीवनासाठी सर्व अंग-प्रत्यंग अवयवांची अत्यंत आवश्यक असलेली वाढ या महीन्यात त्याची जिवनकळा ज्योत करते. त्याचमुळे काही अपरीहार्य कारणास्तव जर या सातव्या महीन्यात गर्भ जन्माला आला व त्याचे योग्य ते काळजीपुर्वक पालन पोषन केल्या गेले, तर तो गर्भ स्वतःच्या जिवनकळा ज्योतीच्या भरोवश्यावर जिवंत राहु शकतो...असो.

मातेच्या गर्भात आठव्या महीन्यात प्रवेश करतांना त्या गर्भाची लांबी अंदाजे ३५ सेंटीमिटर होवुन त्याचे वजन जवळपास १३०० ग्रॅम ईतके होते.

याकरीता सातव्या महीन्यात **शिंगाडेचुर्ण, कमलदेठचुर्ण, द्राक्षा, कचोरा, ज्येष्ठमध, खडीसाखर** याचा काठा आयुर्वेदामध्ये आयुवैदिक वैद्याकडुन घेण्याचे सांगीतलेले आहे.

आठव्या महीन्याचं गणीतं । सुर्य झाला निटं :-

आठव्या महीन्यात त्या गर्भाचे नाभीचक्र म्हणजेच नाभीस्थानी असलेले रविचक्रावरील सुर्याचा सुर्योदय होतो. त्याचा स्वतःचा सुर्य बळकट व निट होत प्रकाशु लागतो. त्यामुळे त्याच्या कायेवर ओज येते. आता एक एक समस्या उभी राहत जाते. ते म्हणजे आतापर्यंत त्या गर्भाला मातेच्या शरीराचा ओज प्राप्त होत असल्यामुळे, त्या गर्भिकायेला मातेचा ओज घेण्याची जी सवय असते ती काही अचानक सुटत नाही. त्यामुळे तो गर्भ कधी मातेचा ओज घेतो तर कधी स्वतःचा ओज घेत राहल्याने, त्या गर्भाचा ओज स्वतःकडुन मातेकडे जाते व मातेकडुन स्वतःकडे येत स्थानांतरण करत राहतो.

ओज स्थानांतरामुळे त्याचा स्वतःचा ओज अस्थीर होत असतो. काही कारणास्तव जर या आठव्या महीन्यात बालक जन्मा आले तर या ओज अस्थीरतेमुळे ते बालक जिवंत राहण्याची शाश्वति कमी असते. त्याच मुळे या आठव्या महीन्याच्या गणीतात गर्भाच्या सुर्याला निट होण्याकरीता हा आठवा महीना संपुर्णपणे अर्पण केला आहे. म्हणुनच या आठवा महीन्यात गर्भिनीकरीता जपुन चालण्याचा आहे. या आठव्या महीना गर्भाच्या सुर्याला अर्पण करून गर्भाच्या सुर्याच्या वाढीकरीता खास ठेवला आहे.

आठव्या महीन्याच्या अंती त्या गर्भाचा सुर्य स्वयंपुर्ण प्रकाशीत होवुन निट होतो. या आठव्या महीन्याअंती त्याचा स्वःत चा सुर्य निट प्रकाशु लागते. या सुर्याच्या प्रकाशाने शरीरातील षटचक्रे, तारे व ईतर सुक्ष्मचक्रे सुदृढ, शक्तीसंपन्न व स्वयंःप्रकाशीत होवु लागते. त्या गर्भिकायेला ओजस शक्ती प्राप्त होत राहते. या ओजस शक्तीमुळे त्या गर्भाला अष्टांग हद्य सप्तधातु यातील अत्यकृष्ट शुध्द सत्व असा जीवनास आधारभुत भाग आठव्या महीन्याच्या अंतापर्यंत प्राप्त होते. नवव्या महीन्याच्या आरंभापासुन ते अंतापर्यंत या ओज मुळे देहस्थीती अत्युकृष्ट सुद्ढ व शक्तीसंपन्न अवस्थेपर्यंत जात राहते.

याकरीता आठव्या महीन्यात **कमठा,बेल, रिंगणी,पडवळ, उस डोरली** याचा काठा आयुर्वेदामध्ये वैद्याकडुन घेण्याचे सांगीतलेले आहे

नवव्या महीन्याचं गणीतं । देव झाले, कृपावंत :-



नवव्या महीने ची अवधी पुर्ण झाल्यानंतर जेव्हा देहे पुर्णपणे ओज-शक्ती पुर्ण होवुन बाहेर निघण्यास सक्षम होतो, तेव्हा तेथुन तो प्रसव कालात समोर येवु लागतों. परंतु जेव्हा समोर सरकुन बाहेर पडण्याकरीता घडपडतो तेव्हा त्या योनीचं कवाड लावुन असते. हे कवाड उघडण्यास साहयं करण्याकरीता तो मग तेव्हा आपल्या धनीदेवाला विनवण्या अर्जा करतो. हा निर्गुण आपल्या निराकार निरंजन धनी देवालें जोराने हाका मारतो. असे खंड०३/०५ः देहवर्णनाची ओवी चे चरणे सांगी करतात की :

॥ नववा महीना लागला । अर्जा करे हो धनी देवाले ॥०३/०५<br>
॥ देवा तुझे कोणते चोरले । कोण्या निमित्य त्वा कोठडीत कोंडले ? ॥<br>
॥ ऐसे पाप कोणते घडले । कुडी पाप त्वा लावले भोगाले ? ॥<br>
॥ जटा अग्नी जाळ लावला । काहो जाचना देवा करता या देहीला ? ॥<br>
॥ दुर्गंधीने कासावीस झाला । शुध्द रस्ता देवा दाखव चांगला ॥<br>
॥ ऐसे अर्जा करे देवाला । देव म्हणे बेईमान होशीन मजला ॥<br>
॥ काकुळती करू लागला । वचनी गोयले त्याला ॥<br>
॥ धनीदेव किल्या, घेवुन आला ।<br>
ओहंम्-सोहंम् कानी मंत्र सांगीतला । शुध्द रस्ता दाखवला ।<br>
डाव्या पायाचा अंगुठा लावला । तोच हेलकावा मातेला आला. ॥

या हेलकाव्यां च्या जोरामुळे मातारूपी आदीशक्तीने योनीचे उघडण्यास जोर लावुन कवाड उघडुन दिले. नरक नगरी सोडुन तेथुन ते बाहेर निघाले.

॥ हा प्रथम सन्याशी झाला । सर्व्या आंगी राख लेला ।
वारा मायेचा लागला । सोहंम् शब्द विसरला ।
कोम शब्द उच्चारू लागला । देवाशी बेईमान झाला ॥०३/०५

या सर्व्या आंगी आदीशक्तीची राख लावुन योनीगुफेंच्या बाहेर आलेल्या या प्रथम सन्याशी ला या धनीदेवानं तारलें. बाहेर निघताच मायेचा वारा लागला. आणी तो आपल्या धनीदेवांन कानी फुंकलेला सोहंम् शब्द विसरला. आणी कोम्-कोम् शब्द उच्चारला. धनीदेवाशी बेईमान झाला. तरी धन्यानं त्याला पदरी घेतले. पदरी धरलं म्हणुन आता म्हणे धरले याहीचे चरणं । आता लागलो तुया चरणां..। जागी ठेव पाळणां ॥ ०६ ॥

याकरीता नवव्या महीन्यात **पांढरी उपळसरी, धमासा, क्षीरकाकोळी, ज्येष्ठमध** याचा काठा आयुर्वेदामध्ये वैद्याकडुन घेण्याचे सांगीतलेले आहे.

अश्या रितीने नव महीन्यात वेगवेगळे काढे आयुर्वेद ग्रंथात सांगितले आहेत. वरील काढे ने सुखप्रसव होण्यास मदत होते. याच बरोबर सितोपलादि चुर्ण ५० ग्रम, प्रवाळ भस्म ५ ग्रम, सुवर्णामाक्षीक भस्म ५ ग्रम, अभ्रक भस्म ५ ग्रम, असे मिश्रण गर्भिणीने पाव-पाव चमचा काढयासह घेतल्यास गर्भ बलवान, स्मृतिवान वा दिर्घायु होतो. यात कोणतीच शंका नाही. असे आयुर्वेदिक शास्त्र सांगते. परंतु वरील सर्व चिकीत्सा दिर्घ अनुभवी आयुर्वेदीय चिकित्सक कडुनच होणे आवश्यक आहे. स्वतःहुन नव्हे !

.

॥ पाळणा चरण ०७ चे निरसन ॥

॥ बाहेर पाहलं, येवुनं...। बहु, दिसते सयन्य/सैन्य... ।
...आता लागलो, तुया चरणां..। जागी, ठेव पाळणां ॥ ०७ ॥

कृपेचा सागर असलेल्या धन्याच्या कृपेने जेव्हा बाहेर येवुन पाहीले, तेव्हा असामान्य शक्तीने शिध्द असलेले निर्गुण आत्मपुरूषाने धारण केलेले बहु सैन्य दिसले. धन्याच्या सत्तेने युक्त असलेले हे सर्व निर्गुण निराकारा आत्मा सैन्यांनीच हे देहे काबिज करून धारण केलेले आहे. येथे उभे असलेल्या सर्व देही या आदीशक्तीची राख लावुनच आलेले आहेत. याची जाण झाली. या आदीशक्तीच्या राखेवर लोळण्याची आता माझी पाळी आहे. हे जाणले. तेव्हाच त्या आदीशक्तीच्या राखेवर या बाळाला टाकल्या गेले. आणी खांडली माझी नाळ त्या सुईनीने ! आणी रडगाणे फुंकले लो-लो लोहा-या वाढीया.. म्हणत !

लो-लो लोहारा प्रमाणे हत्यार घेवुन या बाळंतपण करणा-या नर्स/सुईनीने वाढीया प्रमाणे नाळ खांडली. नाळ खांडल्यामुळे तिथे दर्या/खोल गड्डा पडुन दर्याप्रमाणे तिथली जागा झाली. देहीला पहीला घाव होताक्षणीच देहीवरचे चारही यमदुत जीव नेण्याकरीता त्या दर्यावर येवुन बसले. तेव्हा या देहीच्या रक्षणार्थ या देहीला पडलेला खड्डा/दर्या बुजवण्याच्या कामा करीता या देहीच्या आसरा धावुनी आल्या. आसराचे साहयं झाले. कालांतराने खड्ा भरून तिथे बेंबी तयार झाली.

त्या सुईनीने या बाळाला न्हावुन कान फुंकले । ज्या क्षणी सुईनीने कान फुंकले त्याचक्षणीच गुरू गुरू म्हणणारे दुःखावले. कारण कान फुंकण्याचा प्रथम मान गुरूला होता. परंतु तो मान सुईनीला मिळाला असल्यामुळे,. ते गुरू मनीच म्हणे की : काहुन आली ही मायची सुईन ?

तद्नंतर त्या सुईनीने या बाळाचे पाय डोक्याकडे नेवुन नयनास लावुन पायवणी केली. सव्वा हात बावत म्हणजे स्वच्छ धोत-याचा पदर फाडुन या पदराचे पांघरून या बाळाला दिले. विटाळी असतानांच हा पदर लागुन विटाळी झाला. आणी वरून मातेचा विटाळी पदर लागल्यामुळे दोन दोन हीत संभाळणारा दोहीत विटाळ झाला. आता या पदराखाली चोख चुक चुक करून अमृतपान !

दोहीत विटाळी पदराखाली घेवुन मायेने दिलेल्या त्या दुग्धजन्य अमृतानं बाळदेहीला जगण्यासाठी जे धान्य-खाद्य लागते, ते धान्य आपल्या बाळाला दिले. आणी ज्याक्षणी बाळदेहीला ते अमृतमय दुग्धजन्य धान्य मिळाले, त्याच क्षणी या बाळदेहीतील चक्रस्थानावरील सातही प-या ते धान्य वेचाया आल्या. त्या सातही जनीने आप आपल्या चक्रस्थानावर सुप भरून हे अमृतमय धान्य-मोती नेवुन आपआपले चक्रस्थाने यावर धन्य-मोतीची सुक्ष्मःत्तर सुक्ष्म अन्नरस चा पुरवा करू लागल्यात. आपआपल्या चक्रांचे स्थान शक्तीसंपन्न व तेजोमय करू लागल्यात.

देहीच्या चंके तारे यांना प्रथम धान्य या देहीच्या प-या मुळे प्राप्त झाल्यामुळे, देहीचे चक्रे तारे चमकु लागुन प्रकाशु लागलेत. देहीचा आरावलय वाढुन देही टवटवीत चैत्यन्यमय व तरतरीत झाली. आणी कळसुत्राच्या मालकाने ही टवटवीत चैत्यन्यमय केलेली बाळ देही या मायेच्या ओटीत टाकुन या मायेची ओटी धनी देवानं भरली हो ! या धनी देवाची महीमा आहे मोठी ! तेथुन तारलं या धनीदेवानं ! आता लागलो याहीच्या चरणा.. जागी ठेव हा देहरूपी चौकोणी पाळणा ।

॥ पाळणा चरण ०८ चे निरसन ॥

**पहील्या दिवशी जन्मलां** । सोहंम् शब्द विसरला !
तेथुन पडली, भुलवनं । **गेला, दुसरा दिनं** :-

नवव्या महीन्याच्या प्रसवकालातील विनविन्या अर्जा ला पावुन धनीदेव किल्ल्या घेवुन आले. धनीदेवाला जेव्हा त्याने ‘शुध्द सिदाईच्या मार्गाने जाईन/राहीन‘ असे वचन दिले, तेव्हा त्या धनिदेवाने कानी ओहंम्-सोहंम् मंत्र दिला. आणी त्या नरक नगरीतुन बाहेर काढुन तारले. परंतु जन्म घेवुन बाहेर येताच मायेच्या भुलवनीने तो सोहंम् शब्द विसरला. आणी कोव्हं-कोव्ह असा उच्चार करू लागला. पहील्याच दिवशी धन्याने दिलेला सोहंम् शब्द न उच्चारता कोव्हं कोव्ह शब्द उच्चारून धन्याला बेईमान झाल्यामुळे, तेथुन मायेची भुलवनीत टाकणारी भुली/भ्रांतीची लागन झाली. आणी तेथुन भुलवन पडली. या भुलवनीतच दुसरा दिन गेला.

**तिस-या दिवशी** दळतां । केला आटा-घाटा !
उरफाटे बाहुलं करूनं । केलं पाटयाचं पुंजनं ।
काजळ-कुंकु लावुनं । दिला पिंज-याला मानं ।
**चौथ्या दिवशी** चौ-यांशीं । गणा या गोताशीं ।

तिसरा दिनं येताच जात्यावर/चक्कीवर नवे दळण दळुन आटा आणला. आणी त्यात पाणी टाकुन त्याचा घाटा केला. व त्याचे उरफाटे बाहुलं करून पाटयाचं पुंजन केलं. गणागोतासमक्ष या बाळदेहीला म्हणजेच या देहरूपी पिंज-याला काजळ-कुंकु लावुन मान दिला. अश्या रितीने तिसरा दिन गणागोतात गेला. आणी चौथ्या दिनापासुन त्या गणागोतांना या बाळदेहीच्या जित्या जन्मीची चौ-याशीची सुखःदुःखाची लागन होवु लागली. जर या बाळदेहीला चौ-यांशीचे दुःख झाले, तर यां बाळदेहीच्या गणागोतांना त्यांची

लागन होवु लागली. चौथ्या दिवसापासुन या बाळदेहीच्या चौ-यांशी सोबत ते गणगोतही ती बाळाच्या चौ-यांशी चे भोग पाहुन दुःखी होवु लागलेत.

**पाचव्या दिवशी** पाचवीं...। आले ब्रम्हा हे सटवी ।
सटवी घालतें अक्षरं, ब्रम्हा पाहे वाचुनं । जाती अक्षरं दिलं यानं घालुनं ।
यानं मिळवलं पुंजनं । शंकर नंदयाची, पिशाबं । त्याची लावुन ज्योतं ।
**सहाव्या दिवशाचं** पुंजनं । सहाजोग सहा दर्शनं ।

पाचव्या दिवशी पाचही अक्षर लल्लाटी कोरण्यासाठी ब्रम्हा आणी यमाची माता सटवी हे दोघे जन आलेत. जेव्हा सटवीने या बाळाच्या लल्लाटी नशिब चे पाचही नाव-अक्षरे घातले, तेव्हा ते ब्रम्हा वाचुन पाहु लागला. आणी त्या अक्षरात आपल्या जाती अक्षरांची मिसळन करुन, या ब्रम्हयांन आपलं स्वतःचेच पुंजन मिळवण्याची सोय केली. लिंगदेवताची पिशाब रुपी विर्याव्दारे ही देह-ज्योत धन्याच्या कृपेने उभी झाली. आणी या देह-ज्योतीचं पुंजन करण्याचा मान ब्रम्हयानं मिळवला. त्या ब्रम्हानं सहाव्या दिवशी आपले सहा जोग सहा शास्त्रे सहा दर्शने चे कोरडे ज्ञान या देहीच्या समोर वाचुन जे मिळवायचे ते मिळवलें. तेथुन गेला सहावा दिन !

**सातव्या दिवसाचं** पुंजनं । आला मेसकाईला मानं ।
सातही आसरा या सवासीनी । निट पुंजनं करा ।
दयावे द्रव्यें झाकुनं । नाही यमाशी हुकुमं ।

**-: शब्दार्थ :-**

**मेसकाई** :- मेसका आई जी कोलाम ईत्यादी आदीवासी समाजाची आसरा शक्तीयॉ संपन्न दैवी शक्ती असलेली देवी आहे. या मेस्कामाय ला सातव्या दिवशी बांगडया ओटीचे सामान, हळदकुंकु, अगरबत्ती ईत्यादी अर्पण करुन, ज्योत लावुन तिला बाळजन्माच्या सातव्या दिवसाचा मान दिल्या जातो. सातव्या दिवशी तिच्या जवळचा अंगारा आणुन बाळाच्या कपाळी तो अंगारा लावल्या जातो. तसेच गौर देवी रोग झाल्यास दही-भाताचं बोंड तिला अर्पण करुन तिची पुंजन केल्या जात असे. तसेच कोलाम ईत्यादी आदीवासी समाजात पहीली हळद मेस्कामाय ला अर्पण केली जात असे. अश्या या जुन्या प्रथा आहे. । **आसरा** :- तृष्णेने व्याकुळ झालेल्यांची तृप्ती करुन त्याला समाधान देणा-या दैवीशक्ती, तृष्णा भागवणारी जागा, शक्ती, देवी-देवता ईत्यादी ।

पहील्या दिवशी सुईनी व्दारे नाळ खांडल्यामुळे, तिथे दर्या/खोल गड्डा पडुन दर्याप्रमाणे तिथली जागा झाली. देहीला हा पहीला घाव होताक्षणीच देहीवरचे चारही यमदुत जेव्हा जीव नेण्याकरीता त्या दर्यावर येवुन बसले, तेव्हा या देहीच्या रक्षणार्थ या देहीला पडलेला खड्डा/दर्या बुजवण्याच्या कामा करीता या देही अंर्तगतच्या आसरा धावुनी आल्या होत्या. या आसरांचे उपकार फेडण्यासाठी या आसरांची माता असलेल्या मेसकाईला सातवा दिनी पुंजनाचा मान दिला आहे.

या सातव्या दिवशी मेसका आई च्या ठिकाणी मेसकाईचे पुंजन केल्या जाते. आणी पुनः त्या सातही आसरांना सवासीनी बनुन येण्याचे आवाहन करुन देहीच्या त्या जागेचे निट पुंजन करण्याची विनवनी केल्या जाते. बेंबीच्या दर्यावरील जे काही द्रव्ये उघडे असेल, ते संपुर्णपणे झाकण्याचे आवाहन करण्यात येते. यां आवाहनाव्दारे हे सुक्ष्म द्रव्ये आसरांव्दारे झाकल्या गेल्यामुळे आता त्या जागेवर राहण्याचा यमाच्या यमदुतांशी हुकुम राहत नाही.

या आवाहन विनंती मुळेच या सातव्या दिनापासुन बेंबीच्या ठीकाणचा पडलेला घाव भरल्या जावुन, तो दर्या पुर्णपणे भरुन तेथे बेंबी/नाभी तयार होण्याचे काम होवु लागते.

**आठव्या** दिवशी आठवां । करतो देवा-देवां ।
**नवव्या** दिवशी नवज्योतां । देहीत प्रकाश होतां ।

आठव्या दिवशी जेव्हा आठवा चे संस्कार केल्या जातो, तेव्हा तो देवा देवा करतो. आणी ऐसे देवा ! देवा ! करतच हा आठवा दिन गेला. आणी पाहतो तर काय ? नव्या दिवशी चक्रस्थानावरील सर्व नवज्योता प्रकाशुन देहीत प्रकाश झाला होता.

**दहाव्या दिवशी** दशवतां । उभे धनी अनामतां ।
त्याशी लागली हो, हे चिंतां..। हे स्वर्गीच्या द्युतां ।
**अकरा दिवस**, जन्माशी झालें...। कुळ, सारे मिळाले ।
बारा राशी, हया मोकळयां, तार, या देहीला । तेथुन तारलं, या देवानं...।

दहावा दिन दशवता करण्याचा दिन आला. या दहाव्या दशवता दिनी धनी अनामत उभे झाले. त्या धनीदेवाशी या दशवताच्या दुस-या दिना पासुन चितां लागली की : अकरा दिवस या बाळाच्या जन्माशी झाले. त्याला गणगोत कुळ.. ईत्यादी सारे मिळाले.

परंतु अजुनही या बाळाच्या देहीवरच्या बारा राशी हया मोकळया आहेत. ज्या मोकळया बारा राशीने शंकरालाच पळविले आहे, त्या बारा राशी या बाळाला भरकटुन त्यालाही बारसे होण्याच्या अगोदरच पळवु शकते. याची चिंता धनीदेवाला लागली.

या बारा राशी पासुन रक्षण करण्यासाठी तेथे धनीदेव सोयंम् उभा झाला. या मोकळया बारा राशी पासुन बाळाचे रक्षण करत करत तेथुन या धनीदेवानं तारलें. आता लागलो तुया चरणा... जागी ठेव हा पाळणा..

॥ पाळणा चरण ०९ चे निरसन ॥

॥ **बाराव्या दिवशी, बारसं...।** हा, नेमण्याचा दिवस ।
वनस्पतीचा, करून पाटं...। टाकला चौकातं ।
त्यावर मायेला, बसवुनं...। वाटते, खोबरं-पानं ।
डोळा काजळ, घालुनं...। केले, दाती-दातवणं ।
गजबज सवासीनी, या माउल्यां..। माया, चैत्यन्या पावल्यां ।
बारा राशी, हया मोकळया...। केल्या, मोत्याच्या घुग-यां ।
याहो सिदाई, हा जलदिनं...। घ्याहो, आपला मानं ।
पाळण्यात घाला हो, या बाळाला...। नावं, ठेवायलं ।
नावं ठेवलं, वेल्हाळां...। निद्रा, नसे डोळां ।
पाळणा उभारला, चौकोणां...। तार निरंजना ।
तेथुन तारलं, या देवानं..। धरले याहीचे चरणं ।
आता लागलो, तुया चरणां..। जागी ठेव पाळणां ॥ ०९ ॥

जन्मापासुन येणारा बारावा दिवशी बारस केली जाते. हा बारस दिन बाळाच्या देहीला नाव नेमण्याचा असतो. या दिवशी बाळाचे नाव ठेवल्या जाते. म्हणुनच या दिनाला जलदिन म्हणजेच पाण्याने तयार झालेल्या देहीचे नाव ठेवण्याचा दिन असे म्हणतात. या जलदिनी ही स्वर्ग मिर्त पाताळ असे तिन ताळ असलेली ही पाण्याची नरदेही तार येवुन ! अशी विनविनी धनीदेवास केल्या जाते.

जुन्या काळच बारस करण्याची रीत या नवव्या चरणात सांगीतलेली आहे. या बारशी च्या रितीप्रमाणे प्रथम वनस्पतीचा नवा पाट बनवुन तो चौकात टाकला जातो. त्या पाटावर मातेला बसवुन खोबर-पान वाटल्या जाते. तद्नंतर

मातेच्या डोळ्याला काजळ व कपाळी कुंकु लावुन, जुन्या काळी दात धासण्याचे एक प्रकारचे मंजन असलेले दातवण या व्दारे मातेचे दात घासल्या जातात.

त्यानंतर माउल्या असलेल्या गजबज सवासीनी मातेचे ओक्षवण करतात. या माया चैतन्यारूपी माता ओक्षवण करून मन संतोष पावुन बाळा सह बाळाच्या मातेला आशिर्वाद देतात. त्यानंतर बाळाच्या बारा राशी या मोकळ्या असल्यामुळे, त्या बारा राशी ची शांती करण्यासाठी मोतीधान्य उकडुन घुग-या करतात. आणी सिदाईचा धनीदेव याला अर्जा आवाहन करून, या बारश्याच्या जलदिनी या धनीदेवाने आपला मान घेण्याची विनवनी करतात.

कारण की : आतापर्यत या धनीदेवानंच या बाळाला तारलं आहे. आणी आता पुढे ही धनीदेवानं तारण करावं. यासाठी धनीदेवालाच या पाळण्यात घालावया नाव ठेवावयास आवाहण करतात.

विनवनी अर्ज करतात की :

॥ कळसुत्राचा मालक । कळसुत्र दोरी देवा तुम्हा हातात ॥
॥ अवघ तुमच्या हुकमात । हुकमाबिना पत्ता नाही हालत ॥
॥ नाही हालत पत्ता । चवताळी आहे देवा तुमची सत्ता ॥

हे कळसुत्राच्या मालका ! तुच या देहीच्या कळसुत्र बाहुल्याला नाचवत आहे. जसा तु नाचवत आहे तसे आम्ही या मिर्तलोकच्या व्यासपिठावर नाचत आहो. तुमच्या हुकमाबिना येथे झाडाचा पत्ता सुध्दा हालत नाही. पिंडी या ब्रम्हाडीच्या चवताळी तुमचीच सत्ता आहे. हे कळसुत्राच्या मालका ! मिर्तलोकच्या व्यासपिठावर त्वां उतरवलेल्या या कळसुत्र बाहुलीची दोरी तुम्हा हातात आहे. मिर्तलोकच्या व्यासपिठावरील उपद्रवी बाहुल्या आम्हास भिडुन आमचे नुकसान न करो ! याकरीता आता तुच या देहीची कळसुत्र बाहुली नाचवत असतांना नित काळजी घेवुन ही बाहुली तुमच्या छायेत ठेवुन सुखाने नाचव. आमचा संभाळ कर ! श्रीहरी आता तुच आमचे सर्वप्रकारे सर्वबाजुने सर्वत्र नित राखन करावे. नित भरन-पोषन व वेळोवेळा साहयं करत राहावे. तारण करावे. कारण की : तुच हा देहरूपी चौकोणी पाळणा उभारला आहे खासा । तुमच्याच हाती या देहरूपी चौकोणी पाळण्याची आयुष्याची दोरी आहे. आता झोका दयाहो महाराजा आयुष्याचा । पाळणा उभारला चौकोणा । तार बा निरंजना । आता लागलो आम्ही तुया चरणा । जागी ठेव हा पाळणा ।

या बारश्याच्या दिवशी अर्जा विनवनी आवाहन ओक्षवण.. ईत्यादी पुंजनकर्मे झाल्यानंतर या बाळदेहींचं जगाकरीता नाव ठेवलं गेलं वेल्हाळा । आता निद्रा नसे बा डोळा । नित जागी ठेव हा उभारलेला देहरूपी चौकोणी पाळणा । तार निरंजना । आता लागलो तुया चरणा. ।



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०३ ॥

## ॥ ओवी नं. ०४ ॥

ओवी महात्म :- कृष्णाष्टमी/जन्मदिवशीच्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी....

## ॥ जागृत पाळणा ं-छोटा पाळणा ॥

॥ जागृत पाळणा, नित जागी राहयंना.. ॥ जागृत पाळणा ॥ घृ ॥

॥ देहे धरली, या घरी.. । केली झाड-झुडी ।
कळसुत्र, हे दोरी.. । आहे रायाच्या हाती ॥ जागृत पाळणा..
॥ आहो पिंडी, या ब्रम्हांडी.. । भरून नवखंड
हिरा आहे, जडीत.. । ज्योतीचा प्रकाश ॥ जागृत पाळणा...
॥ आहो दहाही, दशकुळ.. । मुखी अमृत फळ ।
कृष्ण रूपाचा, हा खेळ.. । वाढविला बाळ ॥ जागृत पाळणा..
॥ चारही उभारले, हे खांब.. । कैवल्याचा बंध ।
पाळणा बनवला, मजबुत.. । त्यामध्ये नांदते ज्योत ॥ ०४ ॥

॥ पाचही सवासनी, हया ब-या.. । केल्या मोतीयाच्या घुग-या ।
नाव ठेवले, वेल्हाळा.. । निंद्रा नसे डोळा ॥ जागृत पाळणा..
॥ पायी पद्‌म, बेंबी हिरां.. । मुखी याहीच्या रत्न ।
चंद्र-सुर्य, लल्लाटी...। ज्योतीचा प्रकाश ॥ जागृत पाळणा..
॥ पाळणा अनंत, यवगाचा...। कृष्ण या नामाचा ।
धनी उभा हो, यवगाचा...। सिदाई याहीची वाचा ॥ जागृत..
॥ पाळणा अनंत, यवगाचा...। उच्ची या मोलाचा ।
निश्चय धरला, हा खासा...। शकुन याहीची वाचा ॥ ०८ ॥

॥ देहे पाहा हो, चौरंगी..। तुम्ही चौरंगी ओळखाना ।
तुम्ही उभे हो, आहा देव...। मोती चांगला दयाहो ॥ जागृत...
॥ देहीचे वर्ण, तयार केले काम । याहीचा कारागीर कोण आहे ।
याहीच नाव, दयाहो सांगुन...। जागरूत पाळणा ॥ १० ॥

भजने :-
॥ हाती पाळण्याची दोरी । राखन आहे देवराया श्रीहरी ॥
॥ देवरायाची महीमा मोठी । या बाईची देवानं भरली ओटी ॥
॥ पाळणा बनवला खासा । झोका दयाहो अनंत यवगाचा ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥






॥ खंड ०३ ॥

## ॥ ओवी नं. ०५ ॥

ओवी महात्म :- पुनाजी व्दारे बाळाजी पाटील यांना देणं झालेली..

॥ मुळावरची निबंध ओवी ॥

# ॥ देहे वर्णन ची ओवी ॥

वरभजन :-॥ साळु मायेचा, हंकार आहे चांगला । चतुर्पती अवतार, देव आला आता ॥

॥ ०१ ॥

॥ प्रथम एकला ॥

॥ नव्हता आकार उकार । तेव्हा नव्हता घुमघुमकार ।
नव्हती आकाश धरणी । तेव्हा नव्हत पवन पाणी ॥
॥ नव्हतं रात्रं दिनमान । तेव्हा नव्हत मेरूमंडयान ।
तेव्हा नव्हता विस्तार । इंद्र-चंद्र हरी-हर ॥
॥ नव्हते बम्हा विष्णु खाणी चार । तेव्हा नव्हता परिवार ।
अष्टगण भैरवदिका । क्षिरसागर नव्हते देखा ॥
॥ नव्हती शेष पृथ्वी । तेव्हा नव्हता गगन शिखी ।
पंचतत्वे नव्हते देखा । सृष्टीची कोण रेखा ? ॥
॥ जीव देवता कोणत्या ठायी । कोठे होते त्या समयी ।
एका प्रभु वाचुन । तेव्हा नव्हते कोणाचे ठिकाण ॥
॥ घनन घनन घनकार । आधीच होता हंकार वोंकार ।
यवग झाले चरांचर । प्रथम होता जीव वोंकार ॥
॥ कृपा प्रभुची झाली । त्यान माया निर्माण केली ।
तेणे पृथ्वा स्थापली । ईची रंचना आता ऐका चांगली ॥

॥ ०२ ॥

॥ पंचतत्वे निर्मिती ॥

॥ ऐका पंचतत्वे निर्मिती । चित्त देवुनी ॥
॥ शुन्य ते गगना व्याले । गगन व्याले वायव ।
वायव व्याले आप्पाले । आप व्याले पृथ्वीले ॥
॥ ऐसे पंचतत्वे निर्मिले । मग चरांचर झाले ।
प्रथम हेच विस्तारले । मग जन्म कैकाचे झाले ॥
॥ पृथ्वी आप तेज । वायु आकाश ।
ऐसे पंचतत्वाचे भेद । एकमेका मध्ये आहे सबंध ॥

॥ ०३ ॥

॥ स्थुल देहीचे २५ तत्वे ॥

-: स्थुल देहाचे पंचविस तत्वे :-

| | १ | २ | ३ | ४ | ५ |
|---|---|---|---|---|---|
| १ | पृथ्वी | आप | तेज | वायु | आकाश |
| २ | नाडी | लाळ | क्षुधा | चलन | क्रोध |
| ३ | हस्ती | मुत्र | तृष्णा | वलन | लज्जा |
| ४ | त्वचा | स्वेद | निद्रा | आकुंचन | व्देष |
| ५ | मास | रेत | आळस | प्रसरण | मोह |
| | केस | रुधिर | कांती | निरोधन | भय |

॥ पहा त्याहीचे संतान ।
पाचाचे पंचविस गुण ।
आले या स्थुल देहीले ।
ऐसा तिरनयन बोले ॥

॥ एक एकाचे पाच गुण ।
निरनिराळे सांगेन ॥

॥ नाडी हस्ती त्वचा मौसं । आणीक आहे केस ।
हे पंचगुण चांगले पाहय । पृथ्वी तत्वाचे होय ॥
॥ लाळ मुत्र । स्वेद रेत रुधिर ।
हे पंचगुण चांगले पाहयं । आप तत्वाचे होय ॥
॥ क्षुधा तृष्णा निद्रा आळस । कांती आहे तेजाचा अंश ।
हे पंचगुण चांगले पाहयं । तेज तत्वाचे होय ॥
॥ चलन वलन धावन । आकुंचन आणीक आहे प्रसरण ।
हे पंचगुण चांगले पाहयं । वायु तत्वाचे होय ॥
॥ कोध लज्जा व्देष । मोह भय । आहे आकाशाचा वंश ।
हे पंचगुण चांगले पाहयं । आकाश तत्वाचे होय ॥

॥ ०४ ॥
॥ सुक्ष्म/लींग देहाचे २५ तत्वे ॥

-: पंचभुते वे सुक्ष्म देहाचे २५ तत्वे :-

| पंच भुते | पंच विषय | पंच ज्ञानेंद्रिये | पंच कर्मेंद्रिये | पंच वायु | पंच अंतःकरण |
|---|---|---|---|---|---|
| १. पृथ्वी | गंध | घ्राण | गुद् | अपान | अहंकार |
| २. आप | रस | जिव्हा | शिश्न | प्राण | चित्त |
| ३. तेज | रूप | चक्षु | पाय | उदान | बुध्दि |
| ४. वायु | स्पर्श | त्वचा | हात | समान | मन |
| ५. आकाश | शब्द | श्रौत | वाचा | व्यान | अंतःकरण |

॥ या पाचाचे पंचविस गुण । आले आहे हो सुक्ष्म देहीले ॥

॥ राजस तामस सात्वीक । या तिनचा अहंकार विस्तार देख.

॥ सात्विक अहंकारा पासुन । अंतःकरण पंच ज्ञान इंद्रिये जाण ।
अंतःकरण मन बुध्दि । चित्त आणीक आहे अहंकार ।
श्रौत त्वचा नयन । जिव्हा आणीक ध्राण ॥
॥ संकल्प-विकल्प बुध्दि अहंकार । हे आहे अंतकरणाचे गुण चार ।
हे चार गुण मिळवुन । अंतःकरण करे बोलनं ॥

॥ राजस अहंकारा पासुन । कर्मे इंद्रिये, पंच प्राण विस्तार ।
हात वाचा चरण । लींग आणीक गुद्स्थान ।
प्राण अपान समान । उदान आणीक आहे व्यान ॥

॥ तामस अहंकारा पासुन । पंच विषय विस्तार जाण ।
शब्द स्पर्श । रूप रस गंध । हे आहे विषय पंचक ॥
॥ शब्द विषय आकाशाचा । स्पर्श विषय आहे वायुचा ।
रूप विषय तेजाचा । रस विषय आहे आपाचा ।
गंध विषय पृथ्वीचा । ऐसे गुण विषय आहे याहीचा ॥

॥ प्राण अपान समान । उदान आणीक व्यान ।
हे वायुचे पाच गुण । आहे या धरणी ।
अंतकरणाचे चार गुण । आहे या जीवनी ॥

॥ राजस तामस सात्विक । हे जीवनाचे तिन गुण देख ।
आकाश-वायु आहे एक ॥

॥ ऐसे पाच गुण । आहे या धरणी ।
चार गुण आहे या जीवनी । तिन गुण आहे हो वन्ही ॥

॥ ०५ ॥
॥ पंचतत्वांचा गुण विस्तार ॥
॥ ऐसे गुण पाचही तत्वाचे । बहु विस्तार आहे याहीचे ॥

| पंचतत्वे | विषय | वर्ण | आकार | शस्त्र |
|---|---|---|---|---|
| आकाश | शब्द | निळ | चौकोणी | धनुष्य |
| वायु | स्पर्श | हिरवा | गोल | खड्ंग |
| तेज | रूप | तांबस | त्रिकोणी | भाला |
| आप | रस | शुभ्र | अर्धगोल | सुरी |
| पृथ्वी | गंध | पिवळा | बिंदु | अंकुश |
| **कृति** | **मुख** | **आहार** | **स्वाद** | **स्थान** |
| आकाश-डोले | कर्ण | नाद | कडवट | लल्लाट |
| वायु-चाले | नसीका | परिमय | आंबट | कंठ |
| तेज-देखे | नयन | देखणे | तिखट | हृदय |
| आप-निजे | इंद्रिये | विर्य | गोड | नाभी |
| पृथ्वी-बोले | जिव्हाळा | अमृत | मधुर | स्वाधिष्ठान |

॥ या पाचही तत्वाचे । वर्ण-रूप पहा हो चांगले ॥




॥ पृथ्वीचे वर्ण पाहयं । हे पिवळा वर्ण आहे ।
पृथ्वीचा आकार रूप पाहयं । हे चौकोणी आहे ॥
॥ आपाचे वर्ण पाहयं । हे श्वेत वर्ण आहे ।
आपाचा आकार रूप पाहयं । हे गोल आहे ॥

॥ तेजाचे वर्ण पाहयं । हे तांबस-लाल वर्ण आहे ।
तेजाचा आकार रूप पाहयं । हे त्रीकोणी आहे ॥
॥ वायुचे वर्ण पाहयं । हिरवा-निळा झळाळी वर्ण आहे ।
वायुचा आकार रूप पाहयं । हे अर्धगोल आहे ॥
॥ आकाशाचे वर्ण पाहयं । हे काळा-निळा वर्ण आहे ।
आकाशाचा आकाररूप पाहयं । हे निराकार-बिंदु आहे ॥

॥ ऐसे वर्ण रूप पाचही तत्वांचे । आता शस्त्र पाहा याहीचे
॥ पृथ्वीचे शस्त्र पाहयं । अंकुश-फरश होय ।
आपाचा शस्त्र पाहयं । हे सुरी होय ।
तेजाचे शस्त्र पाहयं । हे भाला होय ।
वायुचे शस्त्र पाहयं । हे खडंग होय ।
आकाशाचे शस्त्र पाहयं । हा धनुष्यबाण होय ॥

॥ ऐसे शस्त्र पाचही तत्वांचे । आता मुख-आहार पाहा याहीचे ॥
॥ पृथ्वीचे मुख पाहयं । रसना जिव्हाळा होय ।
पृथ्वीचा आहार पाहयं । हे अमृत भोजन होय ॥
॥ आपाचे मुख पाहयं । हे लींग इंद्रिय होय ।
आपाचे आहार पाहयं । हे विर्यबिंदु होय ॥
॥ तेजाचे मुख पाहयं । हा नयन लोचन होय ।
तेजाचे आहार पाहयं । हा देखने होय ॥
॥ वायुचे मुख पाहयं । हे नसिका होय ।
वायुचे आहार पाहयं । हे परिमय होय ॥

॥ आकाशाचे मुख पाहयं । हे कर्ण होय ॥
आकाशाचे आहार पाहयं । हे शब्दनाद होय ॥

॥ ऐसे मुखी-आहार पाचही तत्वांचे । आता स्वाद ऐका याहीचे ॥
॥ पृथ्वीचे रूचा पाहयं । हे मधुर आहंय ।
आपाचे रूचा पाहयं । हे गोड आहे ।
तेजाचे रूचा पाहयं । हा तिखट आहे ।
वायुचे रूचा पाहयं । हे आंबट आहे ।
आकाशाचे रूचा पाहयं । हे कडवट होय ॥

॥ ऐसे रूचा पाचही तत्वांचे । आता स्थान पाहयं याहीचे ॥
॥ पृथ्वीचे स्थान पाहयं । हे स्वाधीष्टान होय ।
आपाचे स्थान पाहयं । हे नाभी भवन होय ।
तेजाचे स्थान पाहयं । हे हद्‌यस्थान होय ।
वायुचे स्थान पाहयं । हे कंठस्थान होय ।
आकाशाचे स्थान पाहयं । हे लल्लाट प्रदेश होय ॥

॥ ऐसे पाचही तत्वे । आणीक सत-रज-तम तिनगुण मिळुनी ।
ही होय अष्टधा प्रकृती । ऐसे जन बोलन करी ॥

॥ या देहीत दशप्राण आहे । याहीचा व्यवहार सांगतो पाहयं ॥
॥ दश प्राणांचे नाम । आता ऐक चित्त देवुन ॥
प्राण अपान । समान उदान आणीक व्यान ।
नाग कुर्म कुकळ । देवदत्त आणीक धनंजय ॥
॥ प्राण श्वासोश्वास करी । अन्न उदक आहार जिरवी ॥
॥ आपाने मलमुत्र सारणे । समाने सर्व संधी बसने ।
हात-पाय लवतात त्यानें । उदान अंतकाळी प्रकट होणे
व्यानाने रसधातु शरीरी नेणे । पुष्टता दिसे शरीर तेणे ।
॥ नाग असे टाळुकमळी । कुर्म दृष्टीने न्याहाळी ।
कुकुळ कर्ण मंडळी । लुब्ध झाला श्रवण मेळी ।
देवदत्त मुखा मधी असे । धनंजय नासीकी असे ।
हे पाचही पवन । या ब्रम्हांडी असे ॥
॥ जांभळी देवदत्ताची । शिंक आहे धनंजयाची ।
कुकुळ हास्य रूदनाची । स्थीती चालली असे याहीची ॥
॥ नाग पाचांगी असे । कुर्म उन्मळी नेत्रासे ।
ऐशी दश पवनाची । करणी आहे हो याहीची ॥
॥ कुकुळ आकाशाचा । नाग आहे वायुवाचा ।
कुर्म तेजाचा । देवदत्त आहे आपाचा ।
धनंजय पृथ्वीचा । ऐसा मेळा या दशप्राणांचा ॥

॥ नाग कुर्म कुकळ । देवदत्त आणीक धनंजय ।
श्रौत त्वचा नयन । जिव्हा आणीक ध्राण ।
शब्द स्पर्श । रूप रस गंध । हे आहे पंधरा तत्वे सुंदर ।
ऐसे हे पंधरा सुंदर । याहीला आहे चंद्राचा आधार ॥

॥ ओहंम्-सोहंम् हे आदी बीजे । उभे अग्नी वायु मध्ये ।
वायु मध्ये पाणी । या पाण्याची ही बनली धरणी ।
या धरणीचा मेरू । झाला हो त्याच वेळी ॥
॥ या आदी बीजाने । या चंद्राचे चित्त चेतवले ।
आणीक सुर्याला । साकार करून दाखवले ॥
॥ धाण तत्वाच्या मेळाणे । सुर्य वर्तते ज्या बळाने ।
तेथे व्यान उदान अपान । समान प्राण मिळे ॥
॥ मृग नयनी जाण । नाद-बिंदुचे स्थान ॥
॥ हद्‌यी असे मन । नाभी असे पवन ॥
॥ मन हे चंचल । हा आहे पवनाचा खेळ ।
बिंदु-पाण्याचा । प्रकाश आहे या दोघाचा ॥

॥ ऐसे मेळे पाचही तत्वांचे । आता कृति ऐका याहीचे ॥
॥ पृथ्वी बोले, आप निपजे । तेज देखे, वायु चाले ।
आकाश ऐकुनी डोले । तो डोले आपल्या ठायी ॥

॥ शुन्य बम्हांडाच्या पोटी । आहे आकाशाची कोठी ।
आकाशाच्या पोटी । अवघी झाली आहे सृष्टी ॥

॥ आकाशाच्या पोटी । आहे वायुची कोठी ।
वायुच्या पोटी । आहे तेजाची कोठी ॥
॥ तेजाच्या पोटी । हे आहे आपाची कोठी ।
आपाच्या पोटी । हे आहे पृथ्वीची कोठी ॥

॥ ०६ ॥

॥ सुख रूप भाव घरी । ईश्वर रूप आहे या शरीरी ॥
॥ एक परमात्मा । त्याचा अंश दुसरा आत्मा ।
तिसरा देह लींग । चवथा आहे धर्मात्मा ।
पाचवी आहे न्यातीभुम्मा । हया वस्तु चांगल्या चित्ती ठेवा ॥

॥ मक्षिकाचे ठाणे । आहे हो घरोघरी ।
मेरू बारावा । मिर्तलोकी आहे त्याचा ठेवा ।
सोळा लक्ष । आहे तो खरा ।
याहीचा आहे विस्तार । सोळा सहस्त्राचा आहे परिवार ॥

॥ ही अमरावती बरवी । सहस्त्र रूपाची देवी खरी ।
नवरत्नाची प्रभावती । कामधेनु आहे ईच्या संगती ।
चितांमणी शोभवत । नव रत्नाचा उजेड आहे भारी ॥

॥ कल्पतरू आहे घरोघरी । ऐसी ही वस्तु होय श्रीहरी ।
हे होय पुण्याची नगरी । हा राया नांदते या शरीरी ॥

॥ आता चारखाणी जाणा । या रायानं तयार केल्या एका क्षणा ॥
याहीच्या ईच्छामाया पासुन । बम्हा विष्णु शंकर देव तिन ।
अकार उकार मकार जाणा । या तिघांचे तिन गुणमात्रा ॥

॥ याहीनं सकल सृष्टी आकारली । ईश्वर रूपी प्रसवली ।
प्रथम निजवस्तु परंब्रम्हा । मग आला मेघशामा ।
सगुण रूपी अवतरला । आता पहा सगुण लीला ॥

॥ प्रथम कृथा यवंग । राया आला हंस रूप धरून ।
त्रैता यवगी अवधुत । अनुसयाचा झाला तो सुत ।
व्दापर माझारी । अवतार धरला याहीनं श्रीनंदाच्या घरी ॥

॥ हा श्रीकृष्ण परंब्रम्ह होय । पुर्ण अवतार याहीचा आहे ।
या श्रीकृष्णाने व्दारका रंचली । रूक्मिणीदेवी हरून आणली ।
राज्य करे व्दारका नगरी । उध्दारल्या याहीनं नर-नारी ॥

॥ या कृष्णाच्या मुखा आगारी । वेद उभे झाले आहे चारी ।
आगम-उगम या देवानं । अवघ ठेवलं सांगुन ।
या मानव देहीत । पृथ्वा रंचना दाखवली ईथं ॥

॥ याहीनं थापले ताळ । आता ऐका सप्त पाताळ ।
अतळ वितळ सुतळ । आणीक आहे भुतळ ।
रसाळ जाणुनी तळ । तळातळ आणीक आहे महातळ ॥
॥ पहीले पाताळ भितरी । पुष्पावती नामाची आहे नगरी ।
रक्त-करस्त गज घेवुनी । शेष आहे त्या तळी ॥
॥ दुसरे पाताळ भितरी । शैलपुरी नामाची आहे नगरी ।
सहस्त्र मुख घेवुनी । शेष आहे या स्थळी ।
तो आहे सहस्त्र फणी । तिर भवन त्याच्या माथ्यावरी ।
त्याच्या माथ्यावर महामणी । प्रभा उजेड त्याचा भारी ॥
॥ तिसरे पाताळ भितरी । श्रीधर पट्टमपुर नामाची आहे नगरी ।
रंकस्थमय घेवुनी । शेष आहे या स्थळी ॥
॥ चौथे पाताळ भितरी । चातकपुर नामाची आहे नगरी ।
गंध नयन घेवुनी । शेष आहे या स्थळी ॥
॥ पाचवे पाताळ भितरी । रूद्रावती नामाची आहे नगरी ।
भारी ईशान्य घेवुनी । शेष आहे या स्थळी ॥
॥ सहावे पाताळ भितरी । कांचनपुर नामाची आहे नगरी ।
नाम परम आचारू घेवुनी । शेष आहे या स्थळी ॥
॥ सातवे पाताळ भितरी । उमावती नामाची आहे नगरी ।
नयन सुत्र घेवुनी । शेष आहे या स्थळी ।
कुटुंब भार्या सहीत । तो आहे येथी ॥
॥ ऐसे शेषापासुन सप्त पाताळ । वर एकविस स्वर्ग विशाळ ।
मध्ये मेरू मंडयान । ऐका हो त्याचा विस्तार ॥

॥ मेरू मंडयान चांगले पाहयं । हे मध्य भागी आहयं ।
मेरूचा विस्तार गहन । ऐक आता चित्त देवुन ॥
॥ महा मेरू उभा आहे । हा मुख्य नायक होय ।
याच्या आधारी पाहयं । हे देवलोक आहे ।
हे चांगले पाहयं । या स्थळावर उभे आहये ॥

॥ पहा हा मेरू साचा । हाच कुमार होय भुम्मा देवीचा ।
पंच प्रकाशी उगवला । मेरू पाहा चांगला ॥
॥ या मेरूची ब्रम्हांडी संख्या पाहयं । सोळा लक्ष उंची आहयं ।
भुमी मध्ये नव सहस्त्र । रूंदी आहे बत्तीस सहस्त्र ॥

॥ या मेरूच्या अष्ट दिशा-देव पाहयं । पुर्व पश्चिम उत्तर दक्षिण ।
आग्नेय नैऋत्य वायव्य ईशान्य ॥

॥ सुत्र सहित पाहये । पुर्वेस ईद्राचे दालन आहये ।
पाच सहस्त्र कर गणीत । चार सहस्त्र इद्रलोक बोलत ।
पाच अन चार नवसहस्त्र गणीत ।
या ब्रम्हांडी इंद्राची सत्ता आहे इथ ॥
॥ अलग अग्नीकोण । वसत असे अग्नीला लागुन ।
सात सहस्त्र योजन । ब्रम्हांडी राज्य करतो आपन ॥
॥ दक्षिण दिशेत । यमराज उभा प्रचंड ।
याचा दंडभार । ब्रम्हांडी चौदा लक्ष आहयं ॥
॥ नैऋत्य दिशेत । राजा आहे नैऋत्य ।
चार सहस्त्र योजन । ब्रम्हाडी राज्य करतो आपण ।
नव सहस्त्र उची दळ । हे आहे प्रबळ ॥
॥ पश्चिम दिशेनं । राजा आहे वरूण ।
नव सहस्त्र योजन । ब्रम्हांडी राज्य करतो वरूण ॥
॥ आता वायव्य कोणी देख । राजा आहे शिव भवानीक ।
सात सहस्त्र योजन । ब्रम्हांडी राज्य करतो आपण ॥
॥ उत्तर दिशेन । राजा कुबेर । चंद्रलोकी याचा आहे अधिकार ।
दहा सहस्त्र योजन । ब्रम्हांडी राज्य करतो आपण ॥
॥ ईशान्य कोणी । राजा आहे ईशान्यी ।
सात सहस्त्र योजन । ब्रम्हांडी राज्य करतो आपण ॥

॥ ऐश्या अष्टदिशा देही । राजे नांदतात या अष्टदिशेच्या नगरी ।
अष्ट नगराहुनी उंची । ब्रम्हांडी तेरासहस्त्र योजन मोहीमेची
तिघाच्या शिखरी । बराबरी आहे याहीची ॥

॥ ऐश्या अष्टदिशा आहे । ईच्यावर वजन आहे पर्वत ।
मेरू पर्वता भोवती पाहयं । सप्त पर्वत वेस्टुन आहयं ॥
॥ आता ऐका चांगले । या सप्त पर्वतांचे नावे ।
द्रोणागीरी चित्रकोट । ब्रम्हगीरी गोवर्धन हिमाचल ।
मुक्तागीरी प्रयागतुल्य । उदाचल आणीक विद्याचल ॥

॥ या मानव देहीत । ही रंचना दाखवली ईथं ॥
॥ इद्रापासुन वदन । अग्नी पासुन दोन्ही नयनं ।
यमा पासुन । आहे या शरीरी केस ।
विष्णु पासुन । नाडी अस्ती आणीक मौस ।
विरंचीपासुन घाण । कुबेरा पासुन दोन्ही कर्ण ।
वरूणा पासुन । नासिक आहे जाण ।
महाशक्ती पासुन । आहे दोन्ही हस्त ।

वायुवा पासुन । आहे दोन्ही चरण ॥
॥ चरण असता झाली धरणी । शिराय मुकुट लागला गगणी ॥
॥ ऐसे अष्टक या देही । राजे नांदतात या देहनगरी ॥

॥ <u>हे भुम्मा आहे श्रेष्ठ । ईच्यावर आहे नव खंड</u> ॥




॥ नवखंड ऐका चांगले लक्ष्य देवुनी ।
खंडा खंडाची गणीता आहे याहीची
एक एक खंड पाहयं ।
दहा लक्ष योजन आहयं ॥

॥ पुर्वेस भरत खंड ।
आग्नेयेस आहे उत्तम खंड ॥
॥ दक्षिणेस रम्य खंड ।
नैऋत्येस आहे द्रव्य खंड ॥
॥ पश्चिमेस केतुमाळा खंड ।
वायव्येस आहे हरी खंड ॥
॥ उत्तरेस विधीखंड ।
ईशान्येस आहे मालखंड ॥
॥ मध्ये स्वर्ग खंड ।
ऐसे झाले नव खंड ॥

॥ दोन पायाचे ४-खंड दोन हाताचे ४-खंड आणीक धड असे ९-खंड पृथ्वी/देही । १० खंड मस्तकी काशी ॥
॥ काशी सारखा तिर्थ रे वम्ह्या ! आहे तुझ्या पाशी । पाय धुवुन तिर्थ पिलीन । तरी त्याचा अमृत नाही ॥

॥ दहावा खंड काशी ।
येथे गणीता आहे लींगाची ॥

॥ <u>या मेरुच्या आधारी । एकविस विशाळ स्वर्ग आहे यावरी</u> ॥




॥ पंचक पंथीच्या मनी । आहे २१-स्वर्गाची निशाणी ॥
॥ आता ऐका । या २१ स्वर्गाची नावे चित्तलावुनी ।
॥ ज्योती स्वर्ग । सितस्वर्ग आणीक विमळस्वर्ग ॥
॥ अभियागतस्वर्ग । प्रकाश आणीक विख्यातस्वर्ग ।
॥ सदोनित रम्यस्वर्ग । सहज आणीक सिध्दस्वर्ग ॥
॥ नाद स्वर्ग । दिव्यस्वर्ग आणीक एकांतस्वर्ग ॥
॥ अनुपम्य स्थिरस्वर्ग । नामतृप्ती आणीक निर्मळस्वर्ग ।
॥ प्रेमळ स्वर्ग । निजस्वर्ग आणीक लयस्वर्ग ।
॥ अनंत स्वर्ग । नित्यस्वर्ग सानीध्य अतितस्वर्ग ।
॥ सच्चिदानंदनाम स्वर्ग । झाले गणीत २१ स्वर्ग ॥
॥ २२-वा महा उर्ध्वस्वर्ग ।
येथ उभा माझा धनी निराकार ॥
॥ विशाळ २१ स्वर्गाची मांडणा ।
उर्ध्व-स्वर्गावरच्या धन्याशी जावुन मिळेना ॥
॥ स्वर्ग पाताळाच्या स्थळी । आहे अमृत ।
तिर्थ चरणी ची शुध्द । ब्रम्हादिका ते दुर्लभ जाण ।
॥ ऐसे २१-स्वर्गाचे प्रमाण । <u>चौदा मंडळाचे नावे जाण</u>
भुमंडळ वायुमंडळ । मेह चंद्र सुर्य मंडळ ।
गर्ग तारांगण । रूप ध्रुव ईंद्रमंडळ ।
ब्रम्ह विष्णु शीव । निरंजन मंडळ ॥

॥ ऐसे झाले सप्त पाताळ । त्यावरी २१ विशाळ स्वर्गे
यामध्ये अंतराळी चौदा भुवने । त्याची नावे ऐका चांगले ॥
॥ शिवभवन पारखु । अमृतभवन सुख टिपु ।
अभ्यास सुमन भवन । प्रेम आनंद सुलोचन भवन ।
शालव नाभीभवन । आणीक आहे रम्य देव भवन ॥
॥ भवना-भवनाची । गणीता आहे याहीची ।
एक एक भवन पाहयं । ब्रम्हांडी सहा लक्ष योजन आहयं ॥

॥ ऐसे चौदा भवन झाले । छप्पन देश ऐका चांगले ।
देशा देशाची । गणीता आहे हो याहीची ॥

॥ एक एक देश पाहयं । दिड लक्ष योजन आहयं ।
दिप विदा सिंगल । कलींग कामल आणीक सिव्हल ।
द्रविड पिंगळा तेलंग । कानडा काश्मिर आणीक बंगाल ।
कमळा कन्या पोरांग । जामठा मलका भवठा आहेर ।
गुजरात कर्नाटक । कामठा रायदेश सोरट काम ।
जाफर दिलवन । कनोज मौती ग्रावीड बंगाल ।
अधनी मानव । चिनापट्टम हेडंबा आणीक मालव ।
गौंड मराठा पोरांग । कोळंबा मालवा चौपट काविल ।
मुलतान हापशी । खुरासन वेदांतर आणीक वेदमही ।
व्यानाळ आळण पंजाळ । बालक भोजन पालक पितळा दवान

॥ ऐसे १४ भवन आहयं । ही पृथ्वी मध्यात पाहयं ।
ही पृथ्वी चांगली पाहयं ।
ब्रम्हांडी सात लक्ष बारा योजन आहयं ॥

॥ आता ऐका चांगले । मेरू भोवतीच्या सप्त नदयांचे नावे ॥
॥ भिमा तापी । आणीक आहे चंद्रभागा ।
वेदावती वैतरणी । गंगा यमुना सरस्वती ।
या गंगा श्रेष्ठ आहे । याहीच्यावर सप्त व्दिपे आहे ॥

॥ आता ऐका चांगले । यावरील सप्त व्दीपा ंचे नावे ।
जंबुव्दीप हस्तीचे ठायी । श्वेत व्दीप आहे रोमाच्या ठायी ।
कुशव्दीप मज्जेच्या ठायी । कौंचव्दीप आहे मस्तकाच्या ठायी
शालव व्दीप । आहे त्वचेच्या ठायी ।
गोमेदशंख व्दीप । आहे मेदाच्या ठायी ।
पुष्कर व्दीप । आहे नाभीच्या ठायी ॥

॥ ऐसे सप्तव्दिप झाले । सप्तव्दीपाला वेस्टुन सप्तसागर आहे ॥
॥ आता ऐका चांगले । या श्रेष्ठ सप्त सागराची नावे ॥
मध्य सागर । हे आहे विष्ठेच्या ठिकाणी ।
क्षार सागर । हे आहे मुत्राच्या ठिकाणी ।
दधी सागर । हा आहे नासिका ठिकाणी ।
मधु सागर । हा आहे या मस्तक ठिकाणी ।

रस सागर । आहे या नाभिच्या ठिकाणी ।
निर सागर । आहे या नेत्रांच्या ठिकाणी ॥

॥ सातवे क्षिरसागर । आहे या सत्रावीच्या ठिकाणी ।
हे सागर आहे खोल । यामध्ये रत्न निघाले अनमोल ।
हिरे रत्न मोती । ऐसे लालाची पैदास आहे येथी ।
नाम अमृत तुले । कोणी तुलत नाही याले ॥

॥ चौदा रत्नांची पैदास इंथं । या चौदा रत्नांचे नावे ऐक ।
॥ लक्ष्मी कौस्तुभ परिजातक ।
सुरा धन्वंतरी चंद्रमा कामधेनु आणीक ऐरावत ।
रंभा विष धनुष्य । अमृत श्यामकर्ण शंकर ॥

॥ ऐसे झाले चौदा रत्न । हेची पाहयं निट ।
या मानव देहीत । ही पृथ्वा रंचना दाखवली येथ ।
ही भुम्मा आहे मोठी । आता लागलो ईच्या सेवेशी ॥

॥ ईच्यावर शक्ती कुंडलीनी । उभ्या आहे नव जनी ।
कुडलीनीशक्ती हंसरूपेनी । प्राणवाहेनी आणीक पश्चंती ।
हस्तीनी चित्रीनी । शंकेनी डंकेनी पद्मिनी ॥
॥ ऐश्या या नव नारी । ऐका पाच नारी चे गुण आहे भारी ॥
॥ नारी हस्तीनी आधारसृष्टी । लज्जत मनी काम धीरी ।
ही आहे सत्वगुणी । कृपावंत आहे बहु मनी ॥
॥ नारी चित्रीनी । चंचळ आहे या शरीरी ।
भ्रमित असे नयनी । हास्य वंदन रजो गुणी ॥
॥ नारी शंकेनी । कोधत असे तमो गुणी ।
काम करी निर्लज्ज । बहु सृष्टी पाहे एकरूप ॥
॥ नारी डंकेनी । उग्र रूपी बहु तमगुणी ।
ही अवलक्षणी कर्कश बोलत । वच वच लाव बोलत ॥
॥ नारी पद्मिनी । त्रिगुणी वसत असे लक्ष्मी ।
ऐसे आहे याहीचे गुण । या रीतीचे आहे हे लक्षण ॥

॥ ०७ ॥
॥ चौ-यांशीची गणीता ॥

॥ पहा पहा हो आता चौ-यांशीचे मुळ ।
कोण्या यवनीत नाही सुख । येथे आहे भारी दुःख ॥
॥ पाप-पुण्याचे फळ । भोगावयास आले सकळ ।
सुखःदुःखाचे मुळ । पहावयास आले सकळ ॥

॥ यवनी यवनी हिंडता । याहीची केली हो गणीता ॥
॥ तिस लक्ष तुरूंग देही । राया हिंडला पान पत्ती ।
त्यामध्ये उत्तम नाही हो गती ॥
॥ विस लक्ष । चौ-चरणी आहे समस्त ।
मोठे कष्ट आहे हो ईथं ॥

॥ <u>अकरा लक्ष</u> । जलचर हिंडलो पाण्यात ।
काही ठिक नाही ईथं ॥
॥ <u>दहा लक्ष</u> । पक्षिकुळी उडलो गगणात ।
उडता-उडता झालो हो फजीत ॥
॥ <u>नव लक्ष</u> । किडा किटुक हिंडलो सर्वत्री ।
जरा सुखः नाही तेथी ॥
॥ <u>चार लक्ष</u> मानव देही हिंडलो चौ-यांशी ।
भारी दुःख आहे पहा येथी ॥
॥ <u>ऐसे लक्ष चौ-यांशी</u> फेरे । तेने आहे येरझारे ॥

॥ ०८ ॥
॥ मानव जन्म ॥

॥ एका मासाचे सोळा रूतु । त्यामध्ये चुके अवचित्तु ।
ऐसी रूतुची हत्या घडे । तयाशी लक्ष चौ-यांशी फेरे ।

॥ <u>पुरूषाचा भाग अधिक । पुत्र असे दक्षिण कुशित</u> ।
<u>स्त्री चा भाग अधिक । कन्या असे वाम कुशित</u> ।
<u>स्त्रि-पुरूषाचा भाग अधिक । मध्य भागी उपजे नपुसंक</u> ॥

॥ ऐसा रेत विस्तार महादेवाचा ।
मानव जन्म पहा कोण्या रितीचा ॥

॥ पाळणा ॥

॥ पहील्या मासी ढळमळ । अडीत रत्ती यामध्ये पडल्या निर्मळ ।
दुस-या मासी मुस जन्मली । रक्त-बिंदुची खोळ झाली ।
तिस-या मास लागला । अंकुर फुटले त्या मौसेला ।
चौथा मास लागला । हाडी अस्थी जडली त्याला ।
पाचवा मास लागला । नाडी बंदी केले त्याला ।
सहावा मास लागला । रोम आंगी जडले त्याला ।
सातवा मास लागला । चैतन्य आले त्याला ।
आठवा मास लागला । सुर्य निट होवु लागला ।
नववा मास लागला । वेदना होते हो मातेला ॥

॥ नववा महीना झाला । अर्जि करे हो देवाला ।
देवा तुये कोणते चोरले । कोण्यानिमित्य या कोठडीत कोंडले ।
तुये भांडार कोणते फोडले । कोण्या निमित्य उलटे टांगले ।
ऐसे दोष कोणते घडले । मल-मुत्राचा लेप देहीला चढले ।
ऐसे पाप कोणते घडले । कुडी पाप लागलं हो भोगाले ।
तुये मत कळु आले । जिव-जंतु लावले हो तोडांले ।
जटा अग्नीजाळ लावला । काहो जाचना देता या देहीला ।
दुर्गंधिनं कासाविस झाले । शुध्द रस्ता देवा दाखव चांगले ॥

॥ ऐसी अर्जि करे देवाला । देव म्हणे, बेईमान होशील मजला ।
काकुळती करू लागला । वचनी गोयले त्याला ।
ओहंम्-सोहंम् मंत्र । कानी सांगतला देवानं ।
शुध्द रस्ता । देवानं दाखवला हो त्याला आता ॥

॥ डाव्या पायाचा अंगुठा लावला । तोच हेलवा मातेला आला ।
नव मास नवं पुर्ण झाले । नरकनगरी सोडुन बाहेर आले ॥

॥ प्रथम सन्याशी बनला । सर्व्या आंगी राख लेला ।
वारा मायेचा लागला । कोम् शब्द उच्चारला ।
ओहंम्-सोहंम् मंत्र भुलला । देवाशी बेईमान झाला ॥

॥ ०९ ॥
॥ पिंड रंचना ॥

॥ ऐसा मुळस्तंभी झाला । बहु विस्तार आहे त्याला ।
ऐका अवधुताचे मत । मनुष्य उदरी त्याहीनं घातले तवरुत ।

॥ या मानव देहीत । ही पृथ्वा रंचना दाखवली इथं ।
तया प्रमाण केले हात । आकार आहे एकविस ॥
॥ हात यम । अंगुले आहे बारा ।
कापसे अंगुले तेरा । जिवलग हद्‌यी गाभारा ॥

॥ एक अंगुल आहे शरीरी । अंगुले सातशे नवनवी ।
औष्ट अंगुल । आहे पित्याची पोळी ।
॥ विजयी बोले जे जवळी । रुंदी आहे दोन अंगुली ।
नव अंगुल मुत्र कोठ । मळ कोठ आहे दहा बोटं ॥
हे सांगतले बिकट । रुद्र प्रसार झाले प्रकट ।
॥ मुख आंगोळा चारी । जिव्हा अंगुळा आत भितरी ।
एक अंगुळे अंतरी । हे होय जिव्हेची मुळ पत्री ॥

॥ सांदो सांदी जोड दिसे । बहात्तर नाडी असे ।
बाविस पासोळ्या असे । आणीक बहात्तर कोठडे ।
तेरु दस आहे । या देहीला दारोटे ।
दोन्ही रंध गुप्त असे । महा दुग्ध घटे ॥

॥ नेत्र स्त्रोत्र गुद् घाण । लिंगस्थान नाभी भवन ।
ब्रम्हांडी आणीक वदन । अष्ट पंचक जाण ।
सव्वा घट आहे रुधिर ॥

॥ तिनशे साठ आहे अस्थी । विस नखे उभे मिळी ।
औट कोठी । आहे रोमा वळी ।
एकविस सहस्त्रा । गणीता आहे मारोता ।
एक आहे शरीरी । त्याला आधार चौपरी ।

॥ ऐसे आहे एक मत । आणीकं सांगे बहुत ।
बेंबी आंगोळा सहीत । पन्नासाच्या वरत चौरेचाळीस ।
पंचविस उभे चरणीचे । एकविस सुक्ष्म मार्गाचे ॥
॥ बहात्तर सांधे असे । बाविस पासोळ्या असे ।
उरी पुष्टी पासोळी । अठ्ठाविस कंठापर्यंत असे ॥

॥ बेचाळीस आरकाटे । याला आधार आहे चार खुटें ।
॥ हद्यी मुख । हनुवटी दात आहे बत्तीस ॥
॥ पिंडी आहे मन-पवन । हद्यी असे मन ।
नाभी असे पवन । शरीर चाले या दोहींनं ॥
॥ पंचक पंथीच्या मनी । हे होय एकविस स्वर्गाची निशाणी ॥
॥ आता पंचमुद्रा पाहयं । हेही या शरीरी आहयं ।
॥ खेचरी मुद्रां चे स्थान । हे मुख मंडळ जाण ।
बत्तीसा माझारी । सुर्य वस्ती असे त्यावरी ॥
॥ भुचरी मुद्रा मनोहर । नासिक आहे ईचे घर ।
इथे वसे निरंतर । तुम्ही पहा सत्वर ॥
॥ च्याचरी मुद्रा नेत्र कमळी । हे सर्व जग न्याहरती ।
चक्षुमंडळी वसत असे । ईचेपासुन सर्व बम्हांड दिसे ॥
॥ अगोचर मुद्रा श्रवणी असे । नाम सुमरन ऐकत असे ॥
॥ अलक्ष्य मुद्रा अपरंपार । गगन चक्री आहे तिचे घर ।
उन्मनी निरंतर । तिथ नांदत असे सत्वर ॥

॥ ऐसी झाली पंचमुद्रांची ओळखी । शंकर बोलले आपल्या मुखी ॥

॥ शंकर बोले । श्रीगुरू भेटे । तेव्हाच भ्रांतीचे फळ मिटे ॥
॥ ज्याने आत्मतत्व देखीले । आपण आपणा ते ओळखले ॥
॥ ऐसा सद्गुरू ओळखावा । तेने सर्व कर्माचा नाश व्हावा ॥
॥ दृष्टीच्या अभ्यांतरी । षट चक्रे ते प्रकाश करी ॥




॥ आधार चक्री चार कोठे ।
स्वादीष्ठान चक्री सहा कोठे ॥
॥ मनिपुर चक्री दहा कोठे ।
अनुहात चक्री बारा कोठे ॥
॥ विशुध्द चक्री सोळा कोठे ।
अग्नीचक्री आहे दोन कोठे ॥

॥ ऐसे कोठे झाले पन्नास ।
पश्चिमेचे कोठे आहे एकविस ।
दुर्घट कोठा असे एक ।
ऐसे या देहीत बहात्तर कोठे ॥

॥ हे सांगतो निटनेटके ।
ऐका चित्त लावुन चांगले ।
सांगतो तेथील अवस्था ।
ऐक प्रथम तु षटचक्रे आता ॥

॥ १० ॥

॥ षटचक्रे ॥

॥०१॥ प्रथम आधार चक्र रक्तवर्ण । येथे गणेश देवता जाण ॥




॥ सिध्दि, बुध्दिशक्ती ।
ईश्वरऋषी कर्मकळा आहेत मात्रा चार ॥
॥ येथे जप सहाशत आहे ।
हे आधारचक्र गुद्स्थानी आहे ॥
॥ याच्या तळी अपान । कुर्म वराह शेष आहे ॥
॥ त्याच्या माथी । सप्त पाताळ आहे ।
॥ आधारचक्र चतुष्टकोण ।
चारही पांकोळीका शोभायमान ॥
॥ चार बिज जाण । वशषस हा जप उच्चारण ।
॥ येथे असे शारदाशक्ती । चारही गुण वर्तती ।
चारही अंगुळा उर्ध्वगती । चारही पांकोळीका शोभती ॥

॥०२॥ याच्यावर सहा अंगुळे पहा । दुसरे स्वाधीष्ठान चकरं आहे ।




॥ स्थुलदेही वैखरी वाचा ।
-हस्व मात्रा ऋग्वेद साचा ॥
॥ पितवर्ण रजोगुणी ब्रम्हदेव ।
संग शक्ती सावित्री जाण ॥
॥ सुर्यऋषी व्यानपवन ।
आचारलींग हे पृथ्वीतत्व होय ॥
॥ तत्वदळे सहा ऐका । सहा हजार जप देखा
अव्यक्ती वारुणी सराहिणी ।
रोहिणी अमुर्ती परिपुर्णी ॥
॥ याचे षटदळ गुण देखा । हे चांगले ऐका ।
प्राणशक्ती कीर्ति गर्विती । कुबुध्दि अविश्वासी मुर्छिती
॥ हे षट्दळ पितवर्ण ।
पंचमुखी ब्रम्हया, अर्ध्या आंग सायत्रीचे ठीकाण ।
॥ ऐसे स्वाधीष्ठाण चकाची खुण । हे होय लींगस्थान ॥

॥०३॥ याच्यावर दहा अंगुळे पाहयं । तिसरे मणिपुर चकरं आहयं ।




॥ याला दहा दळे आहेत ।
निळवर्ण स्वर्णमय शोभतात ॥
॥ लिंगदेह स्वप्न अवस्था ।
मध्यमा वाचा विष्णुदेवता ।
॥ मुक्ती समीपता । सानीध्य शक्ती कमळा ॥
॥ राजाभिमानी यजुर्वेद । आणीक मात्रा दिर्घ ॥
॥ आपतत्व प्राणसमान । सानीध्य पवै ऋषी जाण ॥
॥ दशदळा पांकोळीका । याचे नावे ऐका ।
सर्वांगी शोषिणी जया । भद्रा शांती आणीक कसया ।
तोषिणी रोचना व्दिशीर्षी । आणीक आहे दक्षिणी ॥
॥ याचे गुण देखा । हे चांगले हो ऐका ।
तृषा लज्जा पिशुन । सानीध्य आशा अनादी ग्रहण ।
काष्ठा विषदा । सानीध्य आहे ईच्छा, निद्रा ॥

॥ येथे जपसंख्या । सहा हजार आहे ।
हे मनीपुर चकरं नाभीस्थानी । तेजतत्व आहे त्रिकोणी ।
॥ येथे मेघश्याम विष्णु राहत । संग शक्ती लक्ष्मी सहीत ।

॥०४॥ याच्यावर बारा अंगुळे पाहये । व्दादशदळ अनुहात्चक आहये



अनाहत्

॥ येथे कारणदेह सुषुप्ती अवस्था ।
तेजतत्व रूद्रदेवता ॥
॥ लालवर्ण ज्योतीकळा । सामवेद मात्रा प्लुप्ता ॥
॥ इंद्रऋषी इंद्राग्नी । प्राणव्यान स्वरूपता मुक्ती ॥
॥ शिवलींग उमाशक्ती । ही सुंदरी बारा गुण वर्तती
बारा अंगुळे उर्ध्वगती । बारा पांकोळीका शोभती
॥ व्दादश पांकोळीका । याचे नावे आता ऐका ।
सर्वरेखा संभार रतिप्रीया । विलया पद्मीनी त्रिमाया
तारा शोभना सारोहिणी । सुवासी वधोकी सारंगिणी ।
॥ अनुहात् चकरं हद्यी पाहे । तेथे सहा हजार जप आहे ।

॥ ०५ ॥ याच्यावर सोळा अंगुळे पाहे । विशुध्द चकरं आहे ॥



विशुध्द

॥ जीव देवता अ विद्या शक्ती ।
प्रत्यक्ष्य चैतन्य सायुज्यता मुक्ती ॥
॥ महाकारण देह । आत्मा ब्रम्हाग्नि उदानप्राण ॥
॥ तुरीया अवस्था परा वाचा ।
अर्धमात्रा अथर्वन् वेद साचा ॥
॥ जंगमलींग वायुतत्व आहयं ।
सानीध्य येथे अग्नीऋषी पाहयं ॥
॥ षोडदश पांकोळीका । याचे नावे हो नावे ऐका ।
प्राणधारी प्रतिघातीनी । भद्रता संकटारी ब्राम्हणी ।
लोहिता सभागी निःसंगी । मदलसा नम्रता उन्मनी ।
नम्रवर्णता भानमती । प्रभा निःशंका आणीक नास्ती ॥
॥ सोळा पांकोळीका सोबत । एक सहस्त्र जप आहे इथ ॥
॥ सोळा अंगुळे गणीत । याचा वर्ण आहे सफेद ।
सोळा गुण गात । शक्ती वरत असे आपरूप ॥
॥ ऐशी विशुध्द चकाची खुण । हे होय कंठस्थान ॥

॥ ०६ ॥ याच्यावर दोन अंगुळे पाहयं ।
ज्योतीवर्ण अग्नी चकरं आहयं ॥



२. आज्ञा / अग्न

॥ या व्दिदळ चकाची खुण ।
चंद्र-सुर्य नयन दोन ॥



॥ वाम नयनी ।
चंद्राच्या आहे सोळा कळा ॥
॥ उजव्या नयनी ।
सुर्याच्या आहे बारा रवि सिध्दि ॥



॥ चंद्राच्या सोळा कळा । याचे नावे मन लावुन ऐका ।
सुभद्रा अल्हादिनी । पुरविणी अश्वदिनी शंखिनी ।
कमोदिनी चिदा । कसुदिनी लक्ष्मी मोहीनी ।
कामिणी साम्यउदकी । व्यापिनी मथुनी विकासीनी पद्मीनी ॥
॥ चंद्राच्या सोळा कळा झाल्या पुर्ण ।
सत्रावी जिवनकळेत उभा धनी समर्थ ॥



॥ सुर्याच्या बारा कळा । याचे नावे मन लावुन ऐका ।
किरणी दाहणी । ज्वालीनी दिपिनी स्फुर्तिनी ।
मोहीनी जीतीनी । तेजीनी विद्युतेजा शंखीनी ।
शशीप्रभा दिपकला । सुर्याच्या आहे या बारा कळा ॥
॥ या बारा रवि सिध्दि झाल्या पुर्ण ।
तेराव्या सिदाई सिध्दी ठाई । धनी उभा आहे समर्थ ॥
॥ व्दीदळ अग्नीचक्र पाहयं । जपसंख्या एकसहस्त्र आहयं ॥
॥ चंद्र-सुर्य मन-पवन । रज-तम नाद बिंदु दोन ।
डाव्या नयनी असे चंद्र । उजव्या नयनी असे सुर्य ।
हदयी असे मन । नाभी असे पवन ।
सत्वगुण नाभी भवनी । रजगुण स्वाधीष्ठानस्थानी ।
तम गुण अनुहात । या मृग नयनी आहे नाद-बिंदुचे स्थान ॥

॥ या व्दीदळ अग्नीचक्र मध्ये । ज्योती वर्ण भुस्थानी आहे. ॥
॥ हे ज्योतीवर्ण अग्नीचक्र । भ्रवांतरी हंसऋषी पवित्र ।
परमहंस आणीक मायाशक्ती । दोन उभे दोन पानावरी ॥
॥ अग्नीचक्र हे त्रिकुट । म्हणुन परमहंसदेव आहे आपण ।
इडा पिंगळा नाडी । सुषम्नाबाई आहे येथी ।
इच्छा शक्ती धरून । दोन्ही दळ आहे शोभायमान ।
दोन्ही पांकोळीका सोबती । दो मध्ये आहे ही सरस्वती ।
दोन्ही दळी वस्ती । दोन अंगुळे गणती ॥
॥ विराटदेह उत्पत्ती अवस्था । अकारमात्रा वैखरी वाचा ।
राजस अहंकार । विकार प्राणपंचक पांच ज्ञानेंद्रिय ॥
॥ ज्ञानदेह उन्मनी अवस्था । शिव देवता परा वाचा ।
॥ ऐशी सर्वांची । आहे येथे वस्ती ॥
॥ मन बोलीजे सावधान । अग्नीचक्रावरतं त्रिकुट जाण ॥

॥ ११ ॥
॥ पश्चिमेचा मार्ग ॥

॥ पहा पश्चिमेचे स्थान । ब्रम्ह चंडीकेचे मकाण ।
त्रिकुटा पासुन वरता । पश्चिम मार्ग सांगता ॥

॥ सांगतो तेथील अवस्था । ऐक देही तु आता ।

॥ तिरकुटाच्या तिन-वाटा । दोन्ही वाटा आनंदी, बोले निळकंठा ॥




॥ या त्रिकुटा वर, लोक आहे तिन । बम्हा विष्णु त्रंबक जाण । ऐसे देव आहे हे तिन ॥

॥ जे जाणती तिन देवाशी । ते वेगळे न होती ॥

॥ ०१ ॥ प्रथम स्थान ते त्रिकुट । पृथ्वीतत्व ऋषी आहे ऋग्वेद ।
हा आहे परवेशी जाण । या पित्याचे करावे वर्णन ॥
॥ हे होय पुर्वेचे शिखर । चौ देशी मंत्र आहे चार ।
येथे बम्हदेव आहे । बोलती हा सत्यलोक होय ॥

॥ ०२ ॥ दुसरे पश्चिमेचे शिखर । हे आहे महा थोर ।
बरवे माझे मन । गुतंले तयाचे गुण पाहुन ।
तयाशी वैकुंठ बोलीजे । तेथे आहे विष्णु महाराजे ।
या विष्णुला । हा आहे अवघा मान ।
हेच होय । श्रीगुरूचे मुख्य स्थान ।
यजुर्वेद । मन-विकासी सृष्टीचा आहे ।
या विष्णुचे गुरूलींग । लींगदेह रसनास्थळ जाण ।
रसनेहटी श्रीहाटस्थान । तेथे आप ऋषी नांदे आपण ।
आपरूप उकार जाण । गुरूलींग यजुर्वेद कारण ।
भक्ती दर्शन हे ग्यान । रसाळ आहे याहीचा गुण ।
येथे नांदती भक्ती जन । ११ सहस्त्र योजन वैकुंठ जाण ॥
॥ ऐसा बोले ज्ञानीजन । वैकुंठी उभा आहे श्रीअनंत ।
ऐसा हा प्राणी बोले । हा प्रेम साधु मनी धरला आहे ।
बम्हांड कर्ता हाच होय । हे ठिकाण अमृततुल्य आहे ।
तेणे धरीला गोविंद । आता जडला इथ गोत्र संबध ॥

॥०३॥ तिसरे कोटयान कोटी योजने । उत्तरेचे कैलाश शिखर आहे
अकरा सहस्त्र । आहे त्याचा विस्तार ।
येथे आहे महादेव । अष्टगणां सोबत तो नांदतो इथं ।
नामधुनी शंखाचा नाद । गर्जती सारे शिव गण ।
अधिकारी शिवलींग । कारणदेह गोल्हाटस्थळ येथे जाण
चक्षु गोल्हाट चककमळ । तेथे तेजऋषी करी झळाळ ।
तिसरा सामवेद केवळ । तेजरूप मकार जाण ।
बुध्दियुक्त सुर्य तमोगुण । तेज आहे याहीचा गुण ॥

॥ हे भक्ती जन मोहीते । पाहुन तिघांचे तिन शिखरे ।
सुर्याचे ग्यान प्रकटुने । चढुन जावे तिन घाट शिखरे ।
॥ त्रिकुटी तिन वाटा । आहे तेथे आटा घाटा ।
मो-हंच्या दोन वाटा । आनंद जाण बोले निळकंठा ॥

॥ ०४ ॥ या तिन शिखर अग्रावरी ।
आता जाण चौथी औटपिठ नगरी ।




॥ चौथे बम्हांडीचे औटपिठ ।
येथे आहे महाकारणी निराकार नारायण ॥
॥ चौथा अथर्ववेद वायु ऋषी ।
येथे बोलनं करी नाना परी ॥
॥ चौथे जंगमलींग उच्चारी ।
येथे अथर्वन् आहे हो सिध्दांती ॥
॥ चौथी तुर्या अवस्था ।
येथे परा वाचा आणीक अर्ध मात्रा ॥
॥ या षटचकांच्या शेवटी ।
नादबिंदु/स्वरलहरीच्या पडन गाठी ।
पद-पिंडाच्या होतीन भेटी ।
मग देह नाही त्या आंनंदपदा तळी ।
चंद्र सुर्याच्या मेळी ।
प्रेम योगीला असे सुखः गोल्हाटी मंडळी ॥

॥ ०५ ॥ ब्रम्हरंध भुवन । जीव-शिव-शक्तीचे ठीकाण ॥




॥ हे क्षेत्र महालींग जाण ।
सत्रावीचे लक्ष्य जीवन ॥
॥ सत्रावी ब्रम्हरंधपुर्ण ।
येथे देह हिरण्यगर्भ ॥
॥ सत्रावी जीवनकळा
ज्योतीचे लक्षण ।
चंद्र-सुर्य अवश्य जाण ॥
॥ सत्रावी उभी जिवनकळा
सेरुपी उभा कृष्णसावळा ॥
॥ सहस्त्र पांकोळीका हेमवर्ण । ऐसे आहे मस्तक स्थान संपुर्ण ॥

॥ ०६ ॥ आता बिंदु स्थानी पाहयं । अष्टदळ कमळ आहे ।




॥ आता ऐका । अष्टदळांची नावे ।
हरसुले, विशाद, भय ।
शांती, उत्साह, उन्मन्नी ।
आणीक चिन्ता प्रचिती ।
आहे या अष्ट पांकोळी ॥
॥ या बिंदु स्थळी । जीव हंस आहे ।
॥ जेजे वस्तु पाहे जीवात्मा ।
तैशी तैशी होत असे वासना ॥

॥ आत्मा सुक्ष्मवेद पाचवा । यावर पाहयं आता तो देखावा ॥

॥ ०७ ॥ सातवे चक अगोचर । येथे आहे तो निरंजन ।
॥ तोच होय अगोचर । मुख्य ओळखावे आता त्याचे घर ॥




॥ सव्वाहाता मध्यं पाहीजो । अंतरी तो सिध्द ओळखजो ॥

॥ सातवे चक अगुचर । येथे अनंत प्रभा अपरंपार ॥

॥ तयाशी मस्तक ब्रंम्हांड म्हणती । सोयंम् निरंजन ज्योतीचा प्रकाश येथी ॥

॥ कोटयान कोटी चंद्र-सुर्य जडीत । ऐशी प्रभा फाकली इथ । तो ओळखावा ईथं निट ।

॥ पहा तो निरंजन निराकार-निर्गुण । हेच होय या सिध्दाचे दर्शन ।
हाच श्रीसद्गुरू मुख्य ओळखावा । नेत्री-श्रोती हाच पाहावा ॥
॥ हा साकार पिंड बोलीते । निर्भयतेने हे एकपद जाण इथे ।
औळखा तो इथे निट । तो प्रसिध्द निरंजन नित्य ज्योतीत ॥
॥ आधारचक ज्योतीत पाहयं । तो कुंडलीनी नेम शक्ती आहे ।
हे होय रूद्रायणी माता । हेच होय गणेश देवता ॥
॥ स्वाधीचक ज्योतीत पाहयं । तो चतुरानयन शक्तीसावित्री आहे ॥
॥ मनीपुरचक ज्योतीत पाहयं । तो लक्ष्मी नारायण आहे ॥
॥ अनुहातचक ज्योतीत पाहयं । तो रूद्रदेवता आहे ॥
॥ विशुध्दचक ज्योतीत पाहयं । तो सोहंम् देवता आहे ॥
॥ पहा अग्नीचक ज्योता चे स्थान । तो येथे आहे तिर तिर नयन
तो शशिप्रभा सोळाकळा सहीत । उर्ध्वमुख पोर्णिमेस सुर्यनाथ
तो तपत असे मनमत । हया पवनाच्या पोटात ॥

॥ अगोचरचक ज्योतीचे स्थान । येथे उभा तो अगुचर देव निरंजन
॥ हेच माझ देवांगण । हेच माझ नित्य पुंजन ॥
॥ याहीला आता जडलो आम्ही, प्रेम लावुन ।
या देहीचे नित्य करतो, हा निरंजन पालन ॥

भजने :-
॥ ईश्वर मुखी । मन पवन पुन्हा बोलला ॥
॥ या विठ्ठलाने । बाळ गोपाळांचा सांभाळ केला/वेल वाठवला ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०३ ॥

॥ ओवी नं. ०६ ॥

॥ निरसनसह पंन्चीकरणाची रहाटगाव दांडातील ओवी ॥

## ॥ पंचभुतांचा पसारा ॥

॥ हे नरा, लक्ष्य दे जरा । पंचभुतांचा पसारा ।
सांगतो तुला, या देहीचा उभारा ॥ घृ ॥

॥ पृथ्वी-आप तेज वायु-आकाश । हे होय पंचभुत जाण ।
याला जाणतो मानवं । नाही दुसरा..॥ सांगतो तुला..
॥ काम-क्रोध शोक, मोह-भय । हे गुण आकाशाचे होय ।
हे देहीत शोधुन पाहयं । पाहयं चातुरा...॥ सांगतो तुला..
॥ चलन-वलन धावणं, । प्रसरण आकुंचन ।
हे वायुचे पाचं गुणं । देहीत जाणं...॥
॥ क्षुधा-तृष्णा आलस्यं । निद्रा आणीक कांती ।
तेज तत्वाच्या या प्रती । जाण सर्वभुत.. ॥ ०४ ॥
॥ शुक्र शोनीत, लाळ मुत्र स्वेद । आपतत्वाचे होय हे भेद ।
याचा साक्षी आहे तु खुद । नाही दुसरा ॥
॥ अस्थी-मांस रोम त्वचा-नाडी । पृथ्वी तत्वाची होय जोडी ।
पंचवीस तत्वांन भरली स्थुलदेही । पाहयं चातुरां..॥ ०६ ॥

॥ जागृत अवस्था नेत्रस्थानं । वैखरीवाचा स्थुलभोग जाणं ।
क्रियाशक्ती रजगुणं । अकारमात्रां....,
विश्व अभिमान निट पाहयं नरा ॥ या देहीचा उभारा..
॥ जन्मते राहते वाढते । तरूण होवुन वृध्द मरते पाहयं ॥०८॥
॥ हे षट्विकारं स्थुलदेही जाणं । ज्ञान हस्ते कर निरसनं ।
हिनं विपरीत बुध्दी संव्हारण । मार धक्के याशी..,
मानव तु कैसा होशी ॥ ०९ ॥ हे नरा..

॥ स्थुल-सुक्ष्म कारण । चवथा देह महाकारणं ।
पाचवां कैवल्य जाणतो कोण ? बोल दुसरा...॥१०॥
॥ मनोमय प्राण विज्ञान । होय सुक्ष्म देहीचे ।
याशी कोण जाणते ? बोल दुसरा...॥ हे नरा..
॥ स्वप्नअवस्था कंठस्थान । मध्यमा वाचा प्रविक्ता भोग जाण ।
ज्ञानशक्ती सत्वगुण मान । उकार मात्रा...
तेजस अभिमान सुक्ष्मी आहे नरा ॥ लक्ष्य दे जरा...
॥ सुषुप्तीअवस्था अनुहत् स्थान । पश्चंतीवाचा आनंदभोग जाण ।
द्रव्यशक्ती तमगुण । मकारमात्रा..
प्राज्ञ अभिमान कारणी आहे नरा ॥ लक्ष्य दे जरा...
॥ तुर्याअवस्था उर्ध्वस्थान । परावाचा आनंदवास भोग जाण ।
ईच्छाशक्ती शुध्दसत्वगुणी मान । अर्धि मात्रा...
प्रत्यगामी अभिमान महाकारणी आहे नरा ॥ १४ ॥

॥ ऐसे ८२ तत्वें आहे एका ठायी । हे जडले मानवाच्या देही ।
जोकोणी शोध करून पाहयी । तो कथन करन सारा सार ॥

डहाकी :-
॥ दश इंद्रिये पंचप्राण पंचभुत । मनमती अहंकार ।
या २३ तत्वांत, आहे । या आदीपुरूषाचा संचार ॥
**भजने :- ॥ वर पंखी लावली माया । भंवर जाळ टाकलं गळा ।**
**येवुन तारा या गोपाळा । तुमची महीमा आहे हो राया ॥**
**॥ नरा रे । कर नर नारायण गडी । तेव्हाच होईन सार्थक या कुडी ॥**
**॥ मानवा । भुलु नको रे संसारा ।**
**घे देवाचा आसरा । कर हरीनाम सोयरा ॥ मानवा..**
**॥ मानवा । सुध धर । बुध धर । आपल्या पोटी ।**
**देव येईन घरा । सांगन अवघ्या गोष्टी ॥**
**॥ कजबा वस्ती करन आदीपुरूष ।**
**होईन अचंबा । प्रकाशन ज्योत ॥**
**॥ ज्योतीन ज्योत प्रकाश । उजेड देहीत ।**
**उजळनं रूप या सुर्याच्या तेजात । जैसे रूप हे सुर्याचे तेज ॥**

## ॥ निरसनसह पंचभुतांचा पसारा ॥

### ॥ निरसन/स्पष्टीकरन ॥

॥ हे नरा, लक्ष्य दे जरा । पंचभुतांचा पसारा ।
सांगतो तुला, स्थुल देहीचा उभारा ॥ धृ ॥

हे नरा, लक्ष्य देवुन पाहय जरा ! हा देहे पंचभुताचा पसारा आहे. तो पंचभुतांपासुन बनलेला आहे. हा स्थुल देहे पंचभुतांपासुन कसा उभारला ? हे सांगतो तुला !

॥ पृथ्वी-आप तेज वायु-आकाश । हे होय पंचभुत जाण ।
याला जाणतो मानवं । नाही दुसरा..॥

१. पृथ्वी २. आप ३. तेज=अग्न ४. वायु ५. आकाश हे पंचभुते होय.

हे पंचभुते या स्थुल देहीत असुन मानव देहच याला चांगल्या रितीने जाणतो. दुसरा कोणी नाही !

१. पृथ्वीतत्व :- देहेत जितका कठीन भाग आहे तो पृथ्वी तत्वांचा !
२. आपतत्व :- देहेत जितका द्रव्यमय भाग आहे तो आप तत्वांचा !
३. तेजतत्व :- देहेत जितका उष्ण भाग आहे तो तेज तत्वांचा !
४. वायुतत्व :- देहेत जितका चलन-वलन करणारा भाग आहे तो वायुतत्वांचा !
५. आकाशतत्व :- देहेत जवढा पोकळ भाग आहे तो आकाश तत्वांचा !

आता या वरील पाचाचे पाच चे संक्षिप्त वर्णण खालीलप्रमाणे आहेत.

॥ काम-क्रोध शोक, मोह-भय । हे गुण आकाशाचे होय ।
हे देहीत शोधुन पाहयं । पाहयं चातुरा..॥

**१. आकाशतत्वाचे ५ भाग :-**

देहेतील १.काम २. क्रोध ३. लोभ ४.मोह आणी ५. भय हे पाच आकाश तत्वांचे होय. ही सर्व हदयातील आकाशात उत्पन्न होत असल्यामुळे आकाश तत्वांची होय. ही तत्वे बंधन व्दारा अत्यंत दुःख देणारे, होणारे काम बिघडवणारे, मानवाचा लय/लोप करणारी आहेत. यापैकी हा काम कधीही तृप्त न होणारा असुन तो ज्ञानीजनांचा वैरी आहे. इंद्रिये, मन आणी बुध्दी हे याचे वसतीस्थान होय. याच्या योगाने ज्ञानीजन बंधनात अडकुन हा काम त्यांचे ज्ञान झाकुन टाकतो. मोह उत्पन्न करत राहतो.

पदार्थाचे ज्ञान करून देणारे इंद्रिये हे सुक्ष्म आहेत. या इंद्रियांपेक्षाही सुक्ष्म मन आहे. आणी या मनापेक्षा निर्णय घेणारी व कार्याकार्य ठरवणारी बुध्दी ही सुक्ष्म आहे. आणी या बुध्दीच्याही पलीकडे असलेला परमात्मा या तेजोगुणी अंश असलेला आत्मा हा अत्यंत सुक्ष्म आहे. आणी याच्याही पलीकडे परमात्मा आहे.

या परमात्माला नमन करून स्वतःला इंद्रिये, मन, व बुध्दी यांच्यापेक्षा श्रेष्ठ असा परमात्माचा अंश असलेला आत्माराम समजावे. स्वलःला आत्माराम समजुन स्वतः या देहीचा राजा/धनी आहे असे समजावे. देहीच्या अखत्यारी आत्माराम नसुन या आत्माराम धन्याच्या अखत्यारी देही आहे. अशीच आपली नित उच्चत्तर बुध्दी ठेवावी. या उच्चत्तर बुध्दी व्दारे या बुध्दीच्या हाताखाली असलेल्या मनाला नियंत्रणात/ताब्यात घेवुन त्याला आपले मित्र बनवावे. आणी या मनाव्दारे इंद्रियांचे सयंमन करून या आकाशतत्वांच्या काम, क्रोध, लोभ, मोह, भय या पाच शत्रुला ठार मारावे. काम क्रोध व लोभ हे तीन प्रकारचे आपला नाश करणारे नरकाचे व्दार आहेत. म्हणुन मनुष्याने निदान या त्रयीचा त्याग करावा. अथवा ठार मारावे !

अश्या रितीने ज्ञान व ग्यान म्हणजेच अनुभवाचे ज्ञान यांचा नाश करणा-या या पापी शत्रुला ठार करावे....भ.गीता०३/४३.

त्याच प्रमाणे शोक मोह आणी भय यापासुनही दुःख होते याचा अनुभव तुम्हा-आम्हा सर्वांना आहे. म्हणुन उच्चत्तर बुध्दी टेवुन त्याचाही त्याग करावा. किंवा निदान त्याच्या ठिकाणी ममता तरी ठेवु नये.

॥ चलन-वलन धावणं, । प्रसरण आकुंचन ।
हे वायुचे पाचं गुणं । देहीत जाणं..॥

**२. वायुतत्वांचे ५ भाग** :-

वायुचे पाच भाग देहीत असे आहेत.

१. चलन=चालने, २.वलन=वळणे उभे राहणे. ३. धावन=धावणे ४.प्रसरण म्हणजे पसरणे किंवा ताणणे. ५. आकुंचन=आखडणे

हे पाच तत्वे वायुचे होय. या पाच तत्वांना तु ओळखतोस ! हेही जाणतो की : वायुवाचुन चलनःवलन ईत्यादी क्रिया घडु शकत नाही. तु फक्त याचा या जीवनात साक्षी आहेस. हे तुझे नव्हे ! तु फक्त याचा दृष्टा/पाहणारा आहेस. पाहणे हे तुझे काम असल्यामुळे याला तु तुझे या देहीतच पाहयं !

॥ क्षुधा-तृष्णा आलस्यं । निद्रा आणीक कांती ।
तेज तत्वाच्या या प्रती । जाण सर्वभुत.. ॥

**३. तेजतत्वांचे ५ भाग** :- तेजाचे पाच भाग देहीत असे आहेत.

१. क्षुधा=भुक लागणे २. तृष्णा=तहान लागणे. ३. आलस्य=आळस येणे. ४. निद्रा=झोप येणे, निजणे. ५. कांती=अंग कांती, अंगाचे तेज

हे तेजाचे भाग असल्यामुळे ते तेज तत्वांचे होय. ते तेजाचे कसे ते पाहु या !

**१. क्षुधा** :- पोटात जेव्हा जठारअग्नी प्रज्वलीत होतो, तेव्हाच भुक लागते म्हणुन भुक लागणे हे तेजाचे तत्वभाग होय.

**२. तृष्णा** :- मेहनती कार्यामुळे देहीच्या अंर्तगत अग्नी प्रज्वलीत होवुन जलाचा -हास होतो. तो -हास रोकण्यासाठी तहान लागते. तहान ही तेज कार्याव्दारे तेज उत्पन्न होवुन जलाचा -हास झाल्याने लागत असल्यामुळे, तहान लागणे हे अग्नीतत्वाचा भाग होय.

**३. झोप व ४. आळस** :- तेजाचा -हास भरून काढण्यासाठी थकवा/आळस अथवा झोप येते. आराम अथवा झोपेने शरीरात अग्नी संचय होवुन शरीर तरतरीत होते. म्हणुन हेही अग्नीतत्वांचे भाग होय.

**५. कांती** :- देहाची कांती हा तेजाचा भाग होय. शरीराचे तेज हे अग्नीतत्वांचे सुचक होय.

शरीरातील अग्नीचा कार जाणुन या अग्नीच्या पाच भागावर नियंत्रण आणता येते. तेज तत्वांच्या या पाच प्रती सर्व प्राण्यांमध्ये आहेत. हे जाण मानवा !

॥ शुक्र शोनीत, लाळ मुत्र स्वेद । आपतत्वाचे होय हे भेद ।
याचा साक्षी आहे तु खुद । नाही दुसरा ॥

**४. आपतत्वाचे ५ भागं** :-

१. शुक्र= विर्य-बिज, रेत. २. शोनीत= रक्त. ३. लाळ= तोंडातील लाळ.
४. मुत्र= पिशाब,लग्वी ५. स्वेद= अंगातुन निघणारा घाम

देहीचे हे पाचही भाग जलस्वरूप असल्यामुळे हे जलतत्वाचे भाग होय. याचा साक्षी तर तुच खुद आहे. याचा अनुभव घेणारा तुमच्या वाचुन दुसरा कोणी नाही रे नरा !

॥ अस्थी-मांस रोम त्वचा-नाडी । पृथ्वी तत्वाची होय जोडी ।
पंचवीस तत्वांन भरली कुडी । पाहयं चातुरां...॥ ०५ ॥

**५. पृथ्वीतत्वांचे ५ भाग** :-

१. अस्थी=हाड. २. मांस ३. त्वचा=कातडी/चामडी. ४.नाडी=शिरा. धमन्या नाडया. ५. रोम= अंगावरील केस

देहीचे हे पाचही भाग जडस्वरूप असल्यामुळे हे पृथ्वीतत्वाचे भाग होय.

शरीरातुन प्राण निघुन गेल्यावर आकाश वायु तेज आप हे चार तत्वांचे भाग आपआपल्या तत्वांत जावुन लगेचच मिसळुन जातात. परंतु पृत्वीतत्वांचे भाग हे निघत नसल्यामुळे त्यांना कालग्रास करण्यासाठी नष्ट करावे लागते.

उदाहरणार्थ :- शवामध्ये/मयतामध्ये काम क्रोध लोभ मोह भय हे आकाशाचे गुण राहत नाही ते आकाश तत्वात मिसळुन जातात.
तर वायुतत्वाचे चलन वलन प्रसरण भाग वायुतत्वात लगेचच मिसळते. फक्त एकटा धनंजय वायु सोडुन बाकी सर्व वायुतत्वात मिसळुन जातात. हा धनंजय कधी कधी शवामध्ये सुक्ष्मरुपात आकुचन/ प्रसरण करत राहतो. आणी जलतत्वांचे शुक्र शोनीत भंग पावतात.

–परंतु पृथ्वी तत्वांचे अस्थी, मास, त्वचा, नाडी, रोम हे पाचही भाग राहतात. ते राहीलेले भाग काल ग्रस करतो. अथवा त्या भागांना पृथ्वीतत्वांत मिसळण्यासाठी शवाला अग्नी दयावा लागतो अथव दफन करावे लागते. अग्नीव्दारे राख पृथ्वीत मिसळते तर दफनाव्दारे माती पृथ्वीत मिसळते. अश्या रितीने फक्त पृथ्वाचे पाचही भाग मानवाच्या व्दारे अथवा प्राण्यांव्दारे पृथ्वीत मिसळल्या जाते.

हे पाच भाग पृथ्वीचे आहेत. आणी हे पाचही शेवटी पृथ्वीलाच अर्पण केल्या जावुन पृथ्वीत मिसळल्या जाते. हे पाचही पृथ्वीचेच असुन पृथ्वीलाच दिल्या जात असल्यामुळे ते तुझे नाही ! तु फक्त त्याचा साक्षी आहेस.

| -: स्थुल देहाचे पंचविस तत्वे :- | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | पृथ्वी | आप | तेज | वायु | आकाश |
| २ | नाडी | लाळ | क्षुधा | चलन | क्रोध |
| ३ | हस्ती | मुत्र | तृष्णा | वलन | लज्जा |
| ४ | त्वचा | स्वेद | निद्रा | आकुंचन | व्देष |
| ५ | मास | रेत | आळस | प्रसरण | मोह |
| | केस | रुधिर | कांती | निरोधन | भय |

अश्या रितीने या देहीत पंचभुताचे प्रतेकी पाच भाग असे पाच गुणीला पाच असे पंचविस भाग स्थुल देहीचे आतापर्यत झालेत. या स्थुल देहीचे आणखी आठ तत्वे आहेत ते आता पाहु या !

॥ जागृत अवस्था, नेत्रस्थानं । वैखरी वाचा, स्थुलभोग जाणं ।
क्रियाशक्ती, रजोगुणं । अकारमात्रां....,
विश्व अभिमान, मिटव नरा ॥

स्थुल देहिचे ३३ तत्वे आहेत. आतापर्यत स्थुल देहीचे २५ तत्वे झाले आहे. या चरणात स्थुल देहीचे आणखी ८ तत्वे जाणु या ।.

१. **जागृत अवस्था** :-
जीवाच्या जागेपणी त्याला त्याच्या इंद्रियांकडुन होणा-या जाणीवा तसेच शब्द-स्पर्श, रूप रस गंध याचे ग्यान ज्या अवस्थेत स्पष्टपणे होते त्याला जागृत अवस्था असे म्हणतात. या जागृत अवस्थेचा व्यवहार एकंदर ४२ तत्वापासुन होतो. ते पुढे पाहु..

२. **नेत्रस्थान** :- या नेत्राच्या योगाने जागृता अवस्थेत व्यवहार होतात.

३. **वैखरी वाचा** :- ही जागृतावस्थेची वाचा होय.
१. कंठ २. ताळु ३. जीव्हामुल ४. दात ५. ओठ ६. नाक ७. छाती ८. डोके या आठ स्थानाच्या योगाने जे बोलने होते ते वैखरी बोलने होय. तिच वैखरी वाचा होय.

४. **स्थुलभोग** :- जागृतावस्थेत सुखःदुःखाचे जे भोग स्पष्टपणे होतात त्या भोगांना स्थुलभोग म्हणतात.

५. **क्रियाशक्ती** :- क्रियारूप व्यवहार जागृतावस्थेत ज्या शक्तीव्दारे होतात तिला क्रियाशक्ती म्हणतात. ही क्रिया करण्याची शक्ती जागृतावस्थेत असते.

६. **रजोगुण** :- राजसीपणा, अभिमान योगाने राग, व्देष ईत्यादी जे जागृतावस्थेत घडतात ते रजोगुण.

७. **अकार मात्रा** :- ॐकार च्या साडेतीन मात्रापैकी अ या अक्षराची मात्रा

८. **विश्व अभिमान** :- आपन कर्ता आहो. आपण भोक्ता आहो. ईत्यादी प्रकारचा जीवाने केलेला अभिमान ! हा अभिमान मिटव रे नरा !

अश्या प्रकारे **२५ व ८ मिळुन ३३ तत्वे** फक्त स्थुल देहीचे झालेत. या देहीचे षटविकार जाण आता ।

॥ जन्मते राहते वाढते । तरूण होवुन वृध्द मरते पाहयं ॥
॥ हे षट्विकारं जाणं । ज्ञान हस्ते कर निरसनं ।
हिनं विपरीत बुध्दी संव्हारण । मार धक्के याशी..,
मानव तु कैसा होशी ॥ ०९ ॥

जसे मनाचे काम-क्रोध-लोभ, मद-मत्सर-अहं हे सहा मनोविकार आहेत, तसेच या देहीचे सहा विकार आहेत. हे सर्व जाण आणी तुमच्याच जवळच्या अनुभवी ज्ञानाने निरसन कर ! तेव्हा कुठे तुमची जी विपरीत बुध्दी झालेली आहे, ती जागेवर येईल. या देहीचे षटविकार जाण आता !

**देहीचे षटविकार :-**

१. **जन्मते**:- ही देही प्रथम जन्मते. ही देही योनीतुन जन्मलेली आहे.
२. **राहतो**:- जन्मसमयी राहुने राहुटी केल्यामुळे तो जीवंत राहतो.
३. **वाढतो**:- तो जीवंत राहल्याकारणाने तो देह वाढतो.
४. **तारूण्य**:- देही तरूण होवुन रसभरीत होते.
५. **वृध्द होतो** :- तरूणपणाकडुन वृध्दअवस्थेत जावुन वृध्दापकाळाचे जिवन जगतो.
६. **मरतो**:- आत्मराहु निघुन गेल्यावर देही मरते.

मनोविकाररसह सर्व विकारांना धक्के मारून हे सर्व विकार काढ ! मग मानवा तु कैसा होशील ? निश्कलंकी ! याचा विचार तुच कर !

स्थुल देहीचे ३३ तत्वांचे ग्यान आपण जाणले. परंतु एवढयावरच समाधान मानु नको ! आणखी ३ देहा व त्यांचे तत्वे सह पाचवा कैवल्य उरला आहे हे जाण आता !

॥ स्थुल-सुक्ष्म कारण । चवथा देह महाकारणं ।
पाचवां कैवल्य जाणतो कोण ? बोल दुसरा...॥

कोटाची घडीवर घडी चार घडी करून जसा तो कोट ठेवला जातो, तशी ही चार देहीची नरदेही बनलेली आहे. आणी या कोटाच्या चार घडीच्या आत पाचवा जीवन पोहन आत्माराजा नांदत आहे. जीवन पोहन आत्माराजाचे हे चार कोट/चार देहे आहेत. मानवी कायाचे चार देह असे आहेत.

**१. स्थुल देह २. सुक्ष्म देह ३. कारण देह ४. महाकारण देह**
आणी **५.** परमात्माचा तेजोगुणी अंश अवतार आत्मा यावरचे हे चार देह हटुन केवळ शिल्लक राहीलेला जो **पाचवा कैवल्य केवळ** ! तो या चारही देहींना चालवत आहे.

**१. स्थुल देही :-**
या चार देही पैकी स्थुल देहीचे ३३ तत्वांचे आपण ग्यान घेतले आहे. आता इतर तिन देहीचे ग्यान घेवु या ।

**२. सुक्ष्म देही :-**
॥ मनोमय प्राण विज्ञान । होय सुक्ष्म देहीचे ।
याशी कोण जाणते ? बोल दुसरा...॥ हे नरा..

सुक्ष्म देहात १. प्रणमय कोष २. मनोमय कोष व ३. विज्ञानमय कोष असे ३ कोष असुन या तीन कोषाने तो बनलेला असतो.

सुक्ष्म देहीचे हे तीन कोष कोणकोणते तत्वांपासुन बनलेले आहेत. ते आता पाहु या ।

**१. प्राणमय कोष :-**
१. व्यान २. समान ३. उदान ४. प्राण ५. अपान
६ नाग ७. कुकुल ८. कुर्म ९. देवदत्त आणी १०. धनंजय



हा प्राणमय कोष हा या दशवायु तत्वां पासुन उत्पन्न होतो. तो असा :

आत्मपुरुषाची चैत्यन्यप्रकाशात पडलेली छाया म्हणजे प्राण ! ही छाया देहीच्या षटचक्रांचा रंग घेवुन दशवायुच्या पडते. आणी हे दशवायु चक्रांच्या रंगी रंगुन प्राणमय होतात.

शरीराच्या वेगवेगळया ठिकाणी राहणारे हे प्राणमय दशवायु चे वेस्टन आत्मावर येवुन त्या वेस्टनावर आत्माची छाया निरंतर पडत राहल्याने, ते वेस्टनच आत्माचे प्राणमय कोष बनते. हे दशवायु प्राणरूप बनतात. हे प्राणरूप वायु आत्माला झाकुन टाकतात म्हणुन त्याला प्राणमय कोष असे म्हणतात.

**२. मनोमय कोष :-**

प्राणमय कोषाच्या आत हा मनोमय कोष वस्ती करतो. हा मनोमय कोष हा मुख्यतः ८ तत्वांचा बनलेला असतो. ते आठ तत्वे असे आहेत.

**पंचज्ञानेंद्रियांचे पंचविषय :-**

१. शब्द २. स्पर्श ३. रूप ४. रस ५. गंध यासह ६. चित्त ७. मन ८. अंतःकरन या **आठ तत्वांनी मनोमय कोष** बनलेला असतो

**३. विज्ञानमय कोष :-**

मनोमय कोषाच्या आत विज्ञानमय कोष असतो. हा **विज्ञानमय कोष सात तत्वांचा** बनलेला असतो तो असा :

**विज्ञानमय कोषाचे सुक्ष्म पंचज्ञानेंद्रिये** :- १. सुक्ष्म श्रौत २. सुक्ष्म त्वचा ३ सुक्ष्म चक्षु ४. सुक्ष्म जीव्हा ५. सुक्ष्म घाण यासह ६. बुध्दिचे विषय व ७. अहंकार । ऐश्या या सात तत्वांनी विज्ञानमय कोष बनलेला असतो.

| -: पंचभुते चे सुक्ष्म देहाचे २५ तत्वे :- | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| पंच भुते | पंच विषय | पंच ज्ञानेंद्रिये | पंच कर्मेंद्रिये | पंच वायु | पंच अंतःकरण |
| १. पृथ्वी | गंध | घाण | गुद | अपान | अहंकार |
| २. आप | रस | जिव्हा | शिश्न | प्राण | चित्त |
| ३. तेज | रूप | चक्षु | पाय | उदान | बुध्दि |
| ४. वायु | स्पर्श | त्वचा | हात | समान | मन |
| ५. आकाश | शब्द | श्रौत | वाचा | व्यान | अंतःकरण |

अश्या रितीने सुक्ष्म देहाच्या प्राणमय कोषाचे १० तत्वे, तर मनोमय कोषाचे ८ तत्वे, आणी विज्ञानमय कोषाचे **सात/७** तत्वे असे एकुन २५ तत्वे सुक्ष्म देहाचे आतापर्यत झालेत. या २५ तत्वांसह आणखी ८ **तत्वे** या सुक्ष्मदेहाचे आहेत ते असे :

॥ स्वप्नअवस्था कंठस्थान । मध्यमा वाचा प्रविक्ता भोग जाण ।
ज्ञानशक्ती सत्वगुण मान । उकार मात्रा...
तेजस अभिमान सुक्ष्मी आहे नरा ॥ लक्ष्य दे जरा...

१. **स्वप्न अवस्था** :- सुक्ष्म देहाची स्वप्नावस्था आहे.

जे खरे नसुन खरे वाटतात, जे अनुभवुन न अनुभवलेले राहतात , त्यास स्वप्नावस्था असे म्हणतात.

२. **कंठस्थान ची हीता** :-

स्वप्नअवस्थेचे स्थान हे मनीपुर ते विशुध्द कंठस्थानी गेलेल्या हिता या नावाची सुक्ष्म नाडीत आहे. हितात स्वप्नावस्था होते.

३. **मध्यमा वाचा** :- मनीपुरची मध्यमा वाणी सुक्ष्मी असते.
४. **प्रविविक्त भोग** :- सुक्ष्म वासनामय भोग स्वप्नावस्थेत असतो.
ज्याप्रमाणे कापुराच्या डब्यातला कापुर संपला तरी त्या डब्याला चिकटुन असलेला कापुराचा वास जात नाही. त्या सुगंधाचे संस्कार सुक्ष्म रूपात तेथे असतोच, त्याचप्रमाणे स्वप्नावस्थेत सर्व स्थुल भोग निवृत्त जरी झाले असले तरी त्या जागृतीतल्या स्थुल भोगाचे सुक्ष्म संस्कार रूपी सुक्ष्म भोग स्वप्नात अनुभवाने समजुन येतात.

*उदाहरणार्थ स्वप्नात अन्नभक्षण केल्याने जसे शरीर तर पुष्ट होत नाही परंतु अन्नभक्षणाचे सुखाचेःसुक्ष्म भोग स्वप्नावस्थेत मिळतो तसेच स्वप्नात हत्यार लागले तर अंगातुन रक्त येत नाही परंतु त्याचे दूःखाचे सुक्ष्म भोग स्वप्नावस्थेत मिळतो. या सुक्ष्म भोगास* ***प्रविविक्त भोग*** *असे म्हणतात. हे भोग सुक्ष्म देहाव्दारे होतात.*

५ **ज्ञानशक्ती** :- पदार्थाला जाणण्याची जी शक्ती असते ती शक्ती सुक्ष्मी असते.
६. **सत्वगुण** :- सुक्ष्मी सत्वगुण असतो. म्हणुनच स्वप्नावस्थेत विषयाचे ज्ञान परंतु प्रत्यक्ष्य किया घडत नाही.
७. **उँकार मात्रा** :- ओहंम् ची दुसरी उ कार मात्रा मनीपुरी सुक्ष्मी असते.
८. **तेजस अभिमान** :- सुखःदुःखे भोगणारा तेजस नावाचा अभिमान सुक्ष्मी असतो. म्हणुनच तो जागृतीसह स्वप्नातही सुखःदुःखे अनुभवतो.

अश्या रितीने **२५** अधिक ८ असे एकुन **३३ तत्वे सुक्ष्मदेहाचे** सुध्दा आहेत. या ३३ तत्वे ला तुच पाहणारा साक्षी आहेस. या ३३ तत्वांचा दृष्टा तु आत्मा आहेस. तु या सर्व तत्वांपासुन निराळे ज्ञानरूप आहे. ही तत्वे जडरूप दृश्य आहे.

३. **कारण देही** :- या तिस-या कारण देहीत **आनंदमय कोष** असतो. आनंदमयकोष हा तिन आनंदी वृत्तियॉ व्दारे बनलेला असतो. तो असा :

- प्रिय म्हणजे आपल्या आवडत्या पदार्थाला पाहिल्यावर जो आनंद होतो तो प्रिय !
- मोद म्हणजे आपल्या आवडत्या पदार्थाचा लाभ झाल्यावर जो आनंद होतो तो मोद ! व
- प्रमोद म्हणजे आपला आवडता पदार्थाचा जो भोग मिळतो, आवडता पदार्थ भोगल्याने जो आनंद मिळतो तो प्रमोद !

या तिन प्रकारच्या वृत्तीयॉ व्दारे जो आनंद होतो, त्या आनंदाव्दारे बनलेला आनंदमय कोष होय.

या कारण देहीचे आठ तत्वे आहेत. ती अशी :

॥ सुषुप्तीअवस्था अनुहत् स्थान । पश्चंतीवाचा आनंदभोग जाण ।
द्रव्यशक्ती तमगुण । मकारमात्रा..
प्राज्ञ अभिमान कारणी आहे नरा ॥ लक्ष्य दे जरा...

१. **सुषुप्तावस्था** :- कारण देहीची सुषुप्तावस्था आहे.
जागृती व स्वप्नातले भिन्न-भिन्न व्यवहार ज्या गाढ झोपेच्या अवस्थेत लवमात्रही अनुभवास येत नाही. त्या गाढ निद्रेला सुषुप्तावस्था असे म्हणतात. या अवस्थेत जीव विषयाची कामनाही करत नाही व स्वप्नही पाहत नाही.

या अवस्थेत सुखः आहे. कारण अश्या झोपेतुन उठल्यानंतर तुम्ही सहजच म्हणता : ''काय सुखानं झोप आली ! '' तुमची देही झोपली असतांना हे सुखः कोणी अनुभवले ? अर्थातच त्या सुषुप्तावस्थेत तुमच्या आत्मारामने ! या सुखाचा अनुभव घेणारा तु आत्मा आहे. तु देही नव्हे !

या सुषुप्तावस्थेला जाणणारा तुमचा आत्मा आहे. देही नव्हे ! कारण की : या अवस्थेत देहीचे सर्व इंद्रिये, मन, बुध्दि, अंतःकरण चतुष्टय..ईत्यादी अज्ञानात प्रलय पावलेली असतात. त्याचमुळे मन व वाणीचे साधने प्रलय पावल्यामुळे त्यावेळी होणारा अनुभव बोलुन दाखवणे हे शक्य होत नाही. तरी सुखः उपभोगणारा आत्मा जागृत असतोच. जेव्हा देही जागी होते तेव्हा त्यावेळी जागी झालेल्या आपल्या मन व वाणीच्या साहयाने '' मी सुखाने निजलो होतो !'', ''आज सुखाने शांत व गाढ झोपलो होतो !'' असे वाक्ये उच्चारते. परंतु दृष्टा तु स्वयं आत्मा आहे. तो आत्मा त्या अवस्थेपासुन निराळा आहे. म्हणुनच तो आत्मा ती प्रलय अवस्था उपभोगु शकला.

२. **हदयस्थान** :- सुषुप्तीअवस्था हद्‌यस्थानी अनुहात् चक्र कारणी आहे.
३. **पश्च्यंती वाचा** :- अनाहत् चक्रावरील पश्चंतीवाचा कारणी आहे.
४. **आनंद भोग** :- हा सुषुप्तीअवस्थेतला कारणी आनंदभोग होय.
५ **द्रव्य शक्ती** :- ही द्रव्य शक्ती कारणी असते.
६. **तमोगुण** :- अनाहत् वरील रूद्राचा तमोगुण कारणी असतो.
७. **मकार मात्रा** :- अनाहत् वरील ॐ कार ची म् कार मात्रा कारणी असते.
८ **प्राज्ञाभीमानी** :- सुषुप्तावस्थेचा अभिमान बाळगणारे चैत्यन्य कारणी प्राज्ञअभिमानी होते ।

ही सुषुप्तीची **आठ** तत्वे तु जाणतोस. ही अष्टतत्वे कारण देहीची असल्यामुळे तुझी नाहीत. तु फक्त त्याचा साक्षी आहेस.

**४. महाकारण देही :-**

''आपण देह नसुन स्वयं आत्मा आहो. आपण स्वतः दृष्टा, साक्षी आहो !'' असे जे विषेशग्यान मनाच्या वृत्तीत उत्पन्न होते, त्यालाच चवथा महाकारण देह म्हणतात.

अज्ञान व तत्कार्यरूप जो देहादिक प्रपंचाच्या पुर्ण निवृत्तीचे हा महाकारण देह मोठे कारण आहे. आपण स्वतः दृष्टा/साक्षी आहो असे जे विषेशज्ञान मनाच्या वृत्तीत उत्पन्न होते त्यालाच चवथा महाकारण देह असे म्हणतात.
या महाकारण देहाचे रूप हे ज्ञान आहे आणी प्रकाशक आत्मा आहे.

या महाकारणी देह चे सुध्दा आठ तत्वे आहेत.
॥ तुर्याअवस्था उर्ध्वस्थान । परावाचा आनंदवास भोग जाण ।
ईच्छाशक्ती शुध्दसत्वगुणी मान । अर्धि मात्रा...
प्रत्यगामी अभिमान महाकारणी आहे नरा ॥ लक्ष्य दे जरा...

१. **तुरीया अवस्था** :-
ही चवथी अवस्था होय. १. जागृत २. स्वप्न ३. सुषुप्ति या तिन च्या पलीकडे असलेली ही चौथी अवस्था तुर्या होय.

तुरीय म्हणजे चवथा परमात्मा ! आणी तुरीया म्हणजे त्या परमात्माचा तेजोगुणी अंश असलेला आत्मा ! आणी तुरीयातीत म्हणजे

तीन अवस्थेच्या पलीकडची अवस्था मध्ये घेवुन जाणारा तो तुरीय-चवथा-परमात्मा ! हा चवथा या तुर्या अवस्थेचा प्रकाशक आहे.

**२. मुर्धनिस्थान :-**

सर्व स्थानातले श्रेष्ठ स्थानाला मुर्धनिस्थान असे म्हणतात. हे श्रेष्ठ व सर्वोत्तम स्थान, श्रेष्ठ व सर्वोत्तम असलेल्या परमात्माच्या तेजागुणी अंशात्मा - आत्म्याला विशुध्दी योजीलेले/कल्पिलेले आहे.

**३. परा वाचा :-**

शब्द उच्चाराची पहिल्या अवस्थेला परा वाचा असे म्हणतात.

**४ आनंदावभास भोग :-**

आत्माचे यथार्थ ज्ञान दर्शन झाल्याने कृतार्थ धन्य व निवृत्त होवुन विषेश आनंदाचा अनुभव जेव्हा येतो, तेव्हाच्या त्या अनुभवाला आनंदावभास भोग असे म्हणतात. हा आनंदाचा वास असणारा भोग महाकारणी आहे.

**५. इच्छा शक्ती :-**

ज्ञान झाल्यावर निर्विकल्प सुखाचा अनुभव घेण्याची जी इच्छा होते तिचे नाव इच्छा शक्ती ! ही महाकारण देहाची निविकल्प सुखाचा अनुभव घेण्याची ईच्छाशक्ती होय.

**६. शुध्दसत्वगुण :-**

महाकारणाचा हा शुध्द सत्वगुण होय. या तिरगुणाच्या पलीकडे असलेल्या शुध्द सत्व ला तिरगुणांचा कलंक बिलकुल नाही. हा शुध्द सत्वगुण महाकारण देहाचा होय.

**७. मात्रा** :- उँकार ची अर्धि मात्रा ˘ महाकारण देहाची होय.

**८. प्रत्यगात्माभिमान :-**

आपण दृष्टा आहो असा जो अभिमान, त्याला प्रत्यगात्माभिमान म्हणतात. या आठही तत्वांचा प्रकाशक तु सामान्य पुर्ण ज्ञानस्वरूप आत्मा आहेस.

अश्या रितीने स्थुल, सुक्ष्म, कारण व महाकारण या चौ-देहाचे ८२ तत्वे झाले आहेत. ते असे..

| | | | |
|---|---|---|---|
| १. | **स्थुल देहीचे** २५ तत्वे **अधीक** ८ तत्वे | = | ३३ तत्वे. |
| २. | **सुक्ष्म देहीचे** २५ तत्वे **अधीक** ८ तत्वे | = | ३३ तत्वे. |
| ३. | **कारण देहीचे** ...................... | = | ०८ तत्वे |
| ४. | **महाकारण देहीचे** ................ | = | ०८ तत्वे |
| | **चौ-देहीचे एकुन** | = | **८२ तत्वे झाले !** |

॥ ८२ तत्वें आहे एका ठायी । हे जडले मानवाच्या देही ।
जोकोणी शोध करून पाहयी । तो कथन सारा सार ॥

चौ-देहीचे ८२ तत्वे आतापर्यत आपण पाहीलेत. हे ८२ तत्वे या मानवाच्या एकाच देहीच्या ठायी स्थीत आहे. मानवाच्या या देहीला जडले आहेत

देहीच्या या ८२ तत्वांना जाणणारा तु प्रत्यगात्मा स्वयंप्रकाश आहे. तु उपाधीरहीत स्वयं परमात्माचा तेजोगुणी अंश अवतार आहे. असा जेव्हा दृढनिश्चय होतो, तेव्हा त्याला साक्षात्कार झाला म्हणजे अपरोक्ष ज्ञान झाले असे म्हणतात. याच न्यायाने शास्त्राच्या फक्त उपदेशाने परमात्मा सच्चिंदानंद आहे, असे जे जाणणे त्याला परोक्ष ज्ञान असे म्हणतात. असो..

तु या स्थुल सुक्ष्म कारण महाकारण या चार देहाहुन वेगळा/निराळा आहे. तुच या चार देहाचा प्रकाशक असा शुध्द चैत्यन्यमय असा पाचवा केवळ आत्मा आहेस. हा आत्माच तुझे स्वरूप होय. हेच स्वरूप चिरंजीवी आहे. तु आत्मा असुन चिरंजीव आहे. तु स्वयंः आत्मा असुन निर्विकार आहे. परंतु हे देहे विकारी आहेत. हे देहे आकारी आहे. परंतु तु आत्मा असुन स्वयं मात्र निराकार आहेस. हे देहे पंचभुताचे कार्य आहे. परंतु तु आत्मा असुन त्याचे कारण आहे. कारण तु आत्मा आहेस हे जाण ! या आत्माचाच शोध करून पाहयं ! आत्मज्ञान शोधल्या शिवाय ईतर तत्वज्ञान ला काही अर्थ नाही !

**पाचवा केवळ आत्मा :-**

देहीच्या आत या निराकार आत्माचा अनुभव सत् + चित् + आनंद = सत्चित्दानंद या तीन निराकार रूपाने केवळ होतो.

**सत्** :- सत् या शब्दाने अस्तीत्वाचा सत्तेचा बोध होतो. घटात या आत्माचे अस्तीत्व व सत्ता आहे याचा बोध देत राहते. ती होय ब्रम्हीमाया !. जसे घट आहे असे म्हटल्याने घटाच्या अस्तीत्वाचा/सत्तेचा बोध होतो. तसाच आत्मा आहे असे म्हटल्याने आत्माच्या सत्तेचा बोध होतो.

**चिद्** :- या घटी तो आत्मा आहे ! याचा भास चित्ताव्दारे भासत राहते. ती होय माया !

**आनंद** :- या घटाच्या ठिकाणी आंनद देत राहतो. तो होय आनंदाची ज्योत स्वरूपी परमात्मा ।

ऐसे या घटात सत्-चिद्-आनंद या तिन निराकार रूपांनी आत्मा हा पाचव्या केवळ देही चा अनुभव देत राहतो.

तुम्ही अंतरी शोध करून पाहील्यामुळे आता तुम्हास स्वस्वरूपाचे ग्यान आले असल्यामुळे तुम्ही हेच सर्व कथन आता सारासार विचार करून जनासमोर मांडावें.



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

| -: संदर्भासाठी घेण्यात आलेले ग्रंथ :- | | | |
|---|---|---|---|
|  | ०१. भगवत गीता |  | ०२. श्रीरामगुरू गुजरात यांचा पंन्चीकरण ग्रंथ. |



॥ खंड ०३ ॥

॥ निरसनसह मुळ जुनी ओवी नं. ०७ ॥

## ॥ पंच इंद्रियांचे पंच विषय ॥

॥ शब्द विषयाने । कुरंग फसले ।
प्राणाशी मुकले । क्षणमात्री ॥
॥ स्पर्श विषयाने । हत्ती गवसला ।
अधोगती गेला । प्राण त्याचां ॥
॥ रूप विषयाने । पतंग भुलला ।
दिव्यानं घेतलां । प्राणं त्याचां ॥
॥ रस विषयानें । मीन अडकला ।
गळा लागला । फास त्याच्या ॥
॥ गंध विषयाने । भ्रमरं अडकले ।
प्राणाशी मुकले । हे पाचही जनं ॥ ०५ ॥

**भजने :-**

॥ पंच इंद्रियांच्या पाचही विषयाचा, समुदाय मानवाशी ।
का ना आठवशी, नाम अहर्निशीं ॥
॥ वेळो वेळा नाम कंठी, ज्याच्या राहयी ।
तो काळ नाही पाहयी, कदा काळी ॥

## ॥ निरसनसह पंच इंद्रियांचे पंच विषय ॥

### -: निरसन/स्पष्टीकरन :-

॥ शब्द विषयाने । हरंन फसले ।
प्राणाशी मुकले । क्षणमात्री ॥

पचंज्ञानेद्रिय पैकी एक असलेल्या कान/श्रौव या ईद्रियाचा विषय हा शब्द आहे. या शब्द विषयाने आकर्षित होवुन हरीण फसते ते अश्याप्रकारे :

शिकार करणारा पारधी मंजुळ अश्या सुस्वरात गाणे म्हणत राहतो. या सुस्वराच्या नाद ची भुरळ हरीणाला पडते. आणी ते हरीण त्या गितावर भाळुन आपले भान विसरून पारध्याच्या समोर स्तंब्दपणे उभे राहते. त्याचक्षणी पारधी आपला फास त्याच्यावर टाकुन त्याला फाश्यात/बंधनात अडकवते. नादाचा मोह हरणाला बांधुन टाकतो. मधुर गितांच्या शब्द विषयाच्या साहयानं पारधी त्या मृगाला बंधनात अडकवतो. पारध्याच्या या नादफाश्यात अडकुन चपळ हरीण आपल्या प्राणाशी एका क्षणात मुकते.

**चरण सार :–** संगीतावर भाळुन लुब्ध होवुन आपले स्वतःचे भान विसरून, नाद ऐकण्याचा अती मोह करणा–यांचा नाश होतो.

॥ स्पर्श विषयाने । हत्ती गवसला ।
अधोगती गेला । प्राण त्याचां ॥

पचंज्ञानेद्रिय पैकी एक असलेल्या त्वचा या ईद्रियाचा विषय हा स्पर्श आहे. या स्पर्श विषयाने आकर्षित होवुन हत्ती फसते ते अश्याप्रकारे :

हस्तीदंत मिळवण्यासाठी हत्तीची शिकार करणारे शिकारी एक मोठा खड्डा खोदतात. व त्या खड्डयावर बांबु वैगरे टाकुन तो खड्डा गवत पाला-पाचोळाने झाकतात.

आणी मग ज्या दिशेकडुन हत्तीची टोळी येत असेल, त्याच्या विरुध्द दिशेने त्या खड्डयाच्या बाजुला एक हुबेहुब दिसणारी लाकडी हत्तीन ठेवतात. त्या खड्डाच्या दिशेने येणा-या हत्तीच्या टोळीतील एखादया मदमस्त हत्तीचे लक्ष्य जर त्या लाकडी हत्तीनी कडे गेले, तर तो हत्ती त्या मायावी हत्तिनीचा स्पर्श करण्याच्या विषयाने आपले भान विसरतो. आणी त्या लाकडी हत्तीनीकडे आसक्त होवुन, तिच्या आंगाला आंग लावुन स्पर्श करण्यासाठी धावत येतो. अंती त्या मायावी हत्तीनी समोर असलेल्या शिकारीने खोदलेल्या खड्डयात तो हत्ती पडतो. शिका-यांव्दारे त्याच्या पायात बेडी पडुन तो गुलाम बनतो. अथवा मारल्या जातो. अश्या रितीने स्पर्श विषयाने शिकारी लोक हत्ती ला गवसुन त्याचा प्राण अधोगतीस नेतात.

**चरण सार :–** स्त्री मोह हा वाईटच ! सुंदरी स्पर्शाची ईच्छा बाळगुन सुंदरी पाहता जो तिच्यामागे धाव घेतो, तो बंधनात अडकुन नाश पावतो. कामातुर होणे हे अमंगलं असते. परनारी च्या सौंदर्यावर भाळुन तिच्या मागे जाणे नकोच. तिच्या पासुन दुर राहणेच श्रेष्ठ होय.

॥ रूप विषयाने । पतंग भुलला ।
दिव्यानं घेतलं । प्राणं त्याचं ॥

पचंज्ञानेद्रियापैकी एक असलेल्या नयन/नेत्र या ईद्रियाचा विषय हा रूप आहे. या रूप विषयाने आकर्षित होवुन पतंग जीवाची पर्वा न करता फसते.

फुलपाखरू कुटुंबातील पंतंग नावाची जात दिव्याच्या ज्योतीचा प्रकाश पाहुन त्या तेजसंपन्न ज्योत रूपाकडे आकर्षित होतात. आपले भान विसरून त्या दिव्याच्या ज्योतीवर उडया घेतात. आणी आपले प्राण गमावतात. अश्या रितीने प्रकाश देणारा दिवा त्या पतंगाचा प्राण घेतो.

दिप पाहुन पंतग त्यावर झेप घेवुन मरतो. अशीच स्थीती रमणी सौंदर्यावर भुलुन जाणा-या पुरूषाची होते. विषयामध्ये रमणारा नर नाश पावतो.

**चरण सार :–** ज्ञान प्रकाश देणारा दिवा आपल्याला कोणते ज्ञान देणार ? त्या दिव्याच्या ज्ञानप्रकाशाने आपले तारण होणार अथवा घात होणार ? याचा सखोल विचार करावा. जर आपले तारण होत असेल तर त्या ज्ञाना करीता उडी मारावी. परंतु ज्या ज्ञानाने आपला घात अथवा अधोगती होत असेल असे ज्ञान घेण्यासाठी उडया घालु नये.

॥ रस विषयानें । मीन अडकला ।
गळा लागला । फास त्याच्या ॥

पचंज्ञानेद्रिये पैकी एक असलेल्या जिव्हा/जिभ या ईद्रियाचा विषय हा रस आहे. या रस विषयाने आकर्षित होवुन मिन गळात अडकते ते याप्रमाणे :

मासे पकडणारे कोळी लोक आपल्या गळाच्या आकडयांना मासे यांचे खादयंपदार्थ बांधतात. आणी तो गळ पाण्यात टाकतात. त्या खादयपदार्थाच्या आमिषाने/रसाने पाण्यातील मासे त्या गळ फासा कडे आकर्षित होतात. गळफास मध्ये तोंड घालुन त्या गळाच्या आकडयात अडकतात. आणी तडफडुन मरतात. अश्या रितीने रस विषयाच्या बंधनात अडकुन त्यांच्या गळा फास लागुन ते त्यांच्या मरणयातना दुःखास स्वतःच कारणीभुत होतात.

**चरण सार :–** काट्याला लावलेले आमिष खाण्याकरीता मासा तोंड उघडतो आणी फसतो ! जर अशी फसवणुक व्हायची नसेल, तर रसनेवर विजय मिळवावा लागतो. रसनेची आमिष माणसाला देशोदेशी फिरवते. देशोघडीस लावते. रसना आवरलीच पाहीजे.

॥ गंध विषयाने । भ्रमरं अडकले ।
प्राणाशी मुकले । हे पाचही जनं ॥

पचंज्ञानेद्रिये पैकी एक असलेल्या नाक या ईद्रियाचा विषय हा गंध आहे. या गंध विषयाने आकर्षित होवुन, भ्रमर बंधनात अडकुन प्राण गमावत असे :

सुर्योदयानंतर उगवलेल्या कमळ या फुलाच्या गंधाने भ्रमर आकर्षित होवुन त्या कमळावर बसतो. कमळाचा गंध विषयाचा आस्वाद दिवसभर घेत देहभान विसरतो.

आणी जेव्हा सुर्यास्त होते, तेव्हा ते कमळ फुल मिटल्या जावुन तो देहभान विसरलेला भ्रमर त्या कमळात अडकतो. काही वेळानंतर मोठा शाकाहारी प्राणी हत्ती त्या कमळाला खातो. आणी त्या कमळासोबत तो भ्रमरही हत्तीच्या पोटात जावुन आपल्या प्राणास मुकतो. गंध विषयाचे भान विसरून सेवन करत राहील्याने अंती घात होतो. अश्यारितीने फुलांफुलांवर भ्रमण करून मधुसार ग्रहण करणारा भ्रमर अडकुन प्राणाशी मुकते.

**चरण सार :-** हिंडुन फिरून जिकडुन मिळेल तिकडुन सर्विकडुन सारं रस ग्रहन करतांना, आपले भान विसरून आपले मुळघर विसरून त्या साराच्या विषयाच्या अती बंधनात अडकु नये. भानावर राहुन रस ग्रहण करावा.

अश्या रितीने पंचज्ञानेंद्रियांच्या इंद्रियतृप्ती करीता पंचविषयात स्वतःचे भान विसरून अती डुबुन राहल्याने जसे पाचही जन बंधनात अडकुन आपल्या प्राणाशी मुकले, तसे तुम्ही इंद्रियतृप्तीकारक कर्मे करत पंचविषयात स्वतःचे भान विसरून अती डुबुन राहील्याने तुम्हीसुध्दा या पंचप्राण्यांप्रमाणे बंधनात अडकुन अधोगतीस जावु शकता. म्हणुनच या पाचही विषयाच्या ठिकाणी दोषदृष्टी ठेवुन त्यांचा त्याग करावा.

मायेने भारल्यामुळे मनुष्य विविध रूपी विषयाचे सेवन करण्यासाठी इंद्रियेतृप्तीकारक कर्मे भान विसरुन करत राहतो. या इंद्रियेतृप्तीकारक विषयी कर्माव्दारे तो मायेच्या बंधनात अडकुन मायेला जवळ जावुन भगवंतास विसरून स्वतःचा नाश ओढवुन घेतो. सुखःदुःखे भोगत चौ-यांशीत लोटल्या जातो.

ईद्रिये व त्यांची विषये यांच्यावर इंद्रियेसयंमनाव्दारे नियंत्रण केल्याखेरीज ज्ञानाच्या उच्च स्तरावर आरुढ होण्याचा काहीही संभव नसतो. जिथे उच्च असे दिव्यज्ञान नाही तिथे भगवंताकडे जाण्याचा सहज मार्ग कसा सापडेल ? इंद्रिये विषयांचा कसा व कुठे उपयोग करणे फायदेशिर आहे हे कसे समजेल ?

म्हणुनच ईद्रिये संयमन करत या विषयात न अडकता पुर्ण ज्ञानी व्हावे. तेव्हा मग तो पुर्ण ज्ञानाआधारे त्याला इंद्रिये विषयांचा कसा ? केव्हा ? व कुठे ? उपयोग करून घेता येते याचे ज्ञान येते. आणी मग तो ज्ञानी या इंद्रिये विषयासक्ती ला योग्य रितीने वापरतो. कर्तव्यपालन करत उच्चप्रतीच्या उच्चत्तर अवस्थेपर्यत उन्नती करतो. पल्याडची उंच उडी घेण्यासाठी बांबुप्रमाणे या विषया चा आधार घेतो आणी सोडतो. आणी पल्याड उडी घेवुन परमात्माच्या दृष्टी देखत उभा राहतो.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०३ ॥

॥ ओवी नं. ०८ ॥

## ॥ शांती हे मिळवुनं ॥

॥ शांती हे मिळवुनं । घातलं सारवणं ।
शुध्द झाले मनं । आता राया हो ॥
॥ काम-कोध मिळवुनीं । घातलासे सडा ।
शुध्द झाला घडा । आता राया हो ॥
॥ आशा-मनशा तृष्णेचं । केलसे झाडणं ।
निर्मळ झाले जीवनं । आता राया हो ॥
॥ दया या क्षमांची । भरली रांगोळ ।
उध्दारले कुळ । सात पिढयांचे ॥ ०४ ॥

॥ दया क्षमा शांती । आहे या चित्ती ।
झाल्या दासी मुक्ती । चारही जनी ॥
॥ दया क्षमा शांती । आहे ज्या घरी ।
धावुनीया हरी । येतो लवकरी ॥ ०६ ॥

भजनं :-

॥ दया क्षमा शांती होय, हरी भक्तीचा झरां ।
याच्याविना होणार नाही भक्ती, प्रार्थना करा ॥
॥ दया क्षमा शांती होय, हरी भक्तीचा झरां ।
यानं वाढवलां पागुरा, सहाही शास्त्रां ॥

-: शब्दार्थ :-

सारवन :- माती पाणी व शेण यांचे मिश्रण करून घर सारवणे म्हणजे सारवण होय. शांती व्दारे देहघर सारवणे । सडा :- माती पाणी व शेण यांचे मिश्रण करून आंगणात शिपंडणे म्हणजे सडा घालणे होय. । घडा :- देह । झाडण :- झाडझुड करणे, झाडणी/केरणीने साफसफाई करणे. देह पिंड हा झाडुन अजुन का होईना ? देह झाड देहमाई ! बसव एका ठाई, आता लागलो तुया चरणा । रांगोळ :- अंगणात पाणी शिपंडल्यानंतर अंगण सुशोभित करण्यासाठी विविध रंगांच्या रांगोळीने आकृति भरून जी रांगोळ काढल्या जाते ती रांगोळ । देहीमध्ये सद्गुणांची रांगोळ



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०३ ॥
॥ ओवी नं. ०९ ॥
॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ एक बाग लावला ॥

या ओवी ची पलट ओवी खंड०७/ओवी-१३ मध्ये दिलेली आहे.

॥ एक बाग लावला त्यानं । निर्गुणं माईनं माइनं ॥ घृ ॥
॥ औटं हाताचं, वावरं केलं । नागर भक्तीचं धरलं ।
नागर भक्ती चं धरलं । निर्गुणं, माईनं माईनं ॥
॥ काम-कोध, मद-मत्सरं । आणीक डंब, अहंकार ।
हे बैल जुंतले सहाजनं । निर्गुणं माईनं माईनं ॥
॥ आशा-मनशा, काडी-आकांक्षा । कल्पनेच्या, पालव्यां काढी ।
ज्ञानाची कु-हाड घेवुन हाती । काम-कोध खोड तोडीं ॥
॥ विवेकाची, वाही केली । तिफन भावा चे जुंतले ।
सत्व चाढं हे कसले । सोहंम् बीज उनारले/पेरले ॥ ०४ ॥

॥ चवताळावर, एक विहीरं । या विहीरीचे उलटे पाझरं ।
वर पाणी, वाहे झरझरं । निर्गुणं माईनं माईनं ॥
॥ सत्रावी माळीनं, बहु सुंदर । वाफे वल्हवले बहात्तरं ।
वाफे वल्हवले, बहात्तर । निर्गुणं माइनं माईनं ॥
॥ गुलाब कन्नेर । फुले, उगवले चौफेरं ।
एकविस भरले अंबरं । चौदा मंडळ बराबरं ॥
॥ बाग पंच-रंगी फुलला । विठु-सावळा राखन राहीला ।
धनीदेव पाहुन, खुशाल झालां ॥ ०८ ॥

**भजने :-**

॥ पंच रंगीचे, फुलं उमलले । कोण्या एका समयी ।
तोडु जाता, न ये हाता । बम्हादिक शिणले ॥
॥ पंच रंगीचे, फुलं उमलले । कोण्या एका समयी ।
तोडु जाता, न ये हाता । बहु यवग शिणले ॥
॥ बागे मध्ये, झाड लावलं । वर चंपा जाळी ।
बिना आधारी, मळा घातलां । वर बसला माळी ॥
॥ चौताळावर, केली विहीर । मोट चाले पाताळी ।
बिना पाण्यानं दांड चाले । वर वाफे जायी ॥
॥ चौताळावर, केली विहीर । मोट चाले पाताळी ।
कोणं वल्हवले, चारही भाग ? बहु पिकाया केळी ॥
॥ ओळखा ओळखा बीजाकारं ।
सावंग्यात नांदे पुर्ण अवतारं ॥

### -: शब्दार्थ :-

**औट हात** :- साडे तिन हात चा देहं । **नागर** :- खेत वखरण्याचे अवजार **कल्पना** :- माया । **कु-हाड** :- झाडे तोडण्यावे अवजार । **तिफन** :- तिन फनाचे पेरणी करण्याकरीता वापरण्यात येणारे साधन

### -: निरसन/स्पष्टीकरन :-

**दरवाज्याचे राखनदार** खंड.०३/ओवी.०२ च्या सुदंर बागेच्या निरसनातुन या ओवीच्या निरसनाचे ग्यान घ्यावे.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०३ ॥

॥ ओवी नं. १० ॥

॥ जुनी ओवी ॥

## ॥ सावंग्या नगरात नगरातं ॥

॥ सावंग्या नगरात, नगरात । आकाशमात ज्योतं ॥ घृ ॥

॥ साडे तीन हाताचे सावंगपुर । वस्ती खुलली गुलजारं ।
यामध्ये बत्त्या लावल्या चार ॥ सावंगा नगरात..
॥ चौ-बाजुला, चौक्या चारं । आणीक तिनशेसाठं सगर ।
जागो जागी चौकीदारं ॥
॥ बत्तीस घरांचा, करून आकारं । किल्ला बांधला चौफेरं ।
लावले सत्रावीचे नहरं ॥
॥ या किल्याला, नउ व्दारं । बंदोबस्ती केली फारं ।
वर खिडकी मनोहरं ॥
॥ सावंग्याचा, मनाजी पाटीलं । जाणतो नव्या, यवगाचा कारं ।
लावले निरशुन्याचे तारं ॥
॥ आउट हाताचं, सावंगपुरं । या गावात सचवलं सारं ।
बाज्या वाजतो मोहरं ॥



॥ ओवी नं. ११ ॥

॥ जुनी ओवी ॥

## ॥ अनामत राया ॥

॥ अनामत राया । तु येवुन कर बापा दया ॥ घृ ॥

॥ साडेतीन हाताची, अगीन बोट । नित खेळते पाण्यातं ।
अंदर बसली जीवनकळा ज्योतं ॥
॥ अगीन बोटची, रंचणुक । नव व्दारे, चार वल्हे/चाके ।
साहय करते देवादिकं ॥
॥ अगीनबोटचे, नवलं काय ? । आत बसली, चैत्यन्या माय ।
ओळखा चौ-यांशीचा मेळं ॥
॥ अगीन बोट, अगीन बोटं । अगीन बोटची, भरती झाली ।
येण-जाणं येरझार करी ॥
॥ अगीन बोट, सागरात । संपली ईच्या आयुष्याची मुदतं ।
निघुन गेली, जीवनकळा ज्योतं ॥

डहाकी :-
॥ ईच्छा पुर्ण कर माझी । या देहीतुन जाउच नको कधी ।
देहीतुन जाउच नको कधी । असो तुया रूपा-सुखाची गाही ॥

**भजने :-**
॥ सावंग आहे अगुचर । नित्य नामाचा होतो बा गजर ॥
॥ सावंग सोयंम् शब्दाचं । माहेर होय भावीक भक्त जनाचं ॥
॥ पहा या सावग्याचे सुखः । जन्म मरणाचे देहीचे हरतील दुःख ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०३ ॥

॥ ओवी नं. १२ ॥

## ॥ मनाजी पाटील ची ओवी ॥

॥ मनाजी पाटील, ऐकाना..। आमची करू नका दैना ॥ घृ ॥
॥ मनाजी पाटील, देहेगावचां । बुध्दाजी पंत, सुभेदार याहीचा ।
कळवा तुमची, सत्य वाचा । ऐकानां.., आमची करू नका दैना ॥
॥ चिंताजी पंत, सरचिटनीस । अहंकार पंत, सबनीस ।
सुधारा तुमचे न्यायालय/हायकोर्ट । ध्यानं दयानां, आमची येवुं दया कारूणां
॥ कामाजी पंत, कोतवालं । क्रोधाजीला, तो भडकवनं ।
दुःखाचे डोंगर तो रंचन । या देहगावातं.., नका नेवु मशानातं ॥
॥ व्देषाजी, बनले जुम्मेदारं । लोभाजी, झाले खातेदारं ।
अभिमानानं, डुबवलं घर । देहगावाचें, लोक पळविले या नगरीचे ॥
॥ मत्सरजीने, मेहतरकी केली । कु-बुध्दी, कु-कर्मि झाली ।
याहीनं केली बरबादी । नाश केला, सत्यदेव नाही ओळखलां ॥
॥ मुसद्दी देहीचे, चार लोक । याहीचे पहा, कसे हस्तकं ।
काम-क्रोध, मोह छत्तीस । याहीनं नाश केला, सत्य देव नाही ओळखलां
॥ भावनाताई, हिंडली वनवन । ईला सांभाळन कोण ?
भ्रमाजी शिपाई, झाले बेईमानं । यानं नाश केला, सत्यदेवनाही ओळखलां ॥
भजने :- ॥ हाक ऐक देवराया । आमची येवु दयाहो दया ॥



॥ ओवी नं. १३ ॥

॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ जीव अध्यानी ॥

या ओवीच्या काही चरणांचे पलट चरणे खंड०७/ओवी-१५ मध्ये दिलेले आहेत.

॥ जीव अध्यानी ! कधी होशीन आत्मज्ञानी ॥ घृ ॥
॥ देही म्हणे जीवाला, कुडस्वामी ! स्वर्गी निघुन, जाता तुम्ही
ही देह-धरणी पडन सुनी ? ॥ जीव अध्यानी..
॥ देही म्हणे जीवाला, रघुपती ! माझा संसार तुम्हा हाती ।
तुम्ही गेल्यावर माझी माती ? ॥
॥ पुर्व जन्माचं संचित । म्हणुन धरला, तुमचा हातं ।
माझा काहो करता अपघात ? ॥
॥ जीव कितीतरी, अडाणी फारं । अख्त्यार असुन, झाला मुख्त्यार ।
आता व्हावे, देहीचे सरदार ॥ ०४ ॥
॥ तोडा-तोडा, भंवर/भौरं जाळ । माया चैत्यन्याचा खेळं ।
जरा बाहेर, निघुन पाहयं ॥ कधी होशीन आत्मज्ञानी...
॥ आधी मन, धरा हाती । अवगुणांची, नको उत्पत्ती ।
प्रेम भाव, नांदव भक्ती ॥
॥ स्वरूप चढवां, आत्मज्योती । चढुन जावे, घाट-करवटी ।
संग घेवुन निवृत्ती ॥
॥ लया जातीनं, असमानी जीवं । होईन महाराज आदीमुनी/महामुनी देवं
संग शक्ती, महाराणी सवं ॥ ०८ ॥
भजने :- ।। केला मायेचा पसारा । उत्तम केली नरदेही ।
जीवाला घेवुन जाता ? आमचं कोणी नाही हो ।।
।। लुटा लुटा हो अमृतवाणी । उत्तम नरदेही ।
उत्तम नरदेही । भरोसा घडीचा नाही ।।
।। देह–जीवान संग केला । नाही झाले लग्नं । तिन ताळात ज्योत राहे । संगतीनं ।।
।। जीव हा देहीच्या अध्यानी । याला बनबा बनवा आत्मज्ञानी ।।
।। जीव हा मायेच्या अध्यानी । याला सोडवा देवा या मायेपासुनी ।।

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०३ ॥
॥ ओवी नं. १४ ॥
॥ जुनी मुळ ओवी ॥

## ॥ पिंजरा ॥

॥ पिंजरा बनवला, गुलशाहीचा । राघोजी पर लंकेचा ।
जीव रंजीया, मोत्यांचा । राघोजी पर लंकेचा ॥ धृ ॥

॥ माया वसवलं, एक नगरं । कुठुन झाला हो संसारं ।
सोयरा सुखाचा, राव दुखाचा ॥ राघोजी पर लंकेचा..
॥ शक्ती बसवलीं, या देहीतं । आले मिर्त लोकातं ।
राघो बसवला, या पिंज-यातं । धन्य त्याची हिकमतं ॥
॥ या पिंज-याची, काडी । तिनशे साठ कमडीं ।
जडीत जडवले त्यालां । सुर्यजी झळकवला ॥
॥ माडी बांधली, धन्य कारागीरं । नउ महीन्यातं तयारं ।
ऐसा कोण ? चातुरं । वर मारे भंवर/भौरं ॥ ०४॥

डहाकी:-
॥ ऐसा सुतारं, कारागीरं । नव्हतं वासला-किकरं ।
आपरूप, हे माडी । याहीनं केली हो तयारं ॥

**शब्दार्थ:-** पिंजरा:- देही, कजबा । राघोजी :- आत्मा । पर:- माया, पल्याड

**भजने :-** ॥ पिंजरा काटयाचा केला । यामध्ये राघो हो राघो बसवलां ॥
॥ पिंजरा आकाशी डोले । यामध्ये राघो हो बोली बोले ॥
॥ ऐसा राघो ग्यानी-ध्यानी । बोली बोलतो हो मंजुळ वाणी ॥
॥ राघो स्वर्गी उडाला । अमृत घेवुन देव भुम्मेवर आलां ॥
॥ अशीच भुम्मा करन जागी । धन्याची महीमा आहे चवताळी ॥
॥ अवघी भुम्मा करन जागी । धन्याचं नाव आहे यवगा-यवगी ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०३ ॥
॥ ओवी नं. १५ ॥

## ॥ पक्षामध्ये पक्षी राघो ॥

॥ पक्ष्या मध्ये, पक्षी राघो । राहतो कैसा ?
रंगा रंगाचा, रंग राघोचा । चारा चरतो मोत्याचां ॥
॥ त्या राघोच्या परीवर एक पाण्याचं तळं ।
तेहत्तीस कोटी, देव येवुन । करते आंघोळं ॥
॥ त्या राघोच्या, परीवर । एक, चंदनाचे झाडं ।
त्या झाडाची, बत्तीस पाने । उगवले तीनं ॥
॥ पहील्या पानावर, देव राया । बसले येवुनं ।
दुस-या पानावर, देव राया । करते भोजनं ।
तिस-या पानावर, देव रायानं । सिदाई देल्ली दाखवुनं ॥
॥ हया झाडाच्या, बुंध्यात खोपा । केला घारीनं ।
खोपा केला घारीनं । अंडे, दिले दोन-दोनं ॥ ०५ ॥

**शब्दार्थ :-** राघो :- आत्मा । बत्तीस :- ३२ पाखंड भरून ३६ कल्पनेनं ।

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०३ ॥

॥ ओवी नं. १६ ॥

॥ मुळावरची जुनी ओवी ॥

## ॥ देहेगावचा राजा ची ओवी ॥

॥ देहेगावचा/देवगावचा, राजा होय । जमा पुंजी, जवळ आहे ।
आत्म सेरूप पाहयं । तु कोणं होय ? कोण होय ? ॥
॥ हातात कंकण, फिरतो गगंन । गुलामगीरीचे, तुटेना बंधनं ।
आधी देहगाव, तुझं रंगव । धनी नांदेल गा नांदेलं ॥
॥ काखेत लेकरू, गावात कल्ला । असा कसा, झाला गलबला
राहु हद्यी बुडाला । भ्रम झाला बा भ्रमं झालां ॥
॥ कस्तुरी असता, नाभी स्थानी । मृग हिंडतो, भ्रम झाल्यावाणी
तुया मुखी, संजीवनी । गोड वाणी बा गोड वाणी ॥ ०४ ॥
॥ तिर्थ यात्रा, अनुष्ठानं । व्यर्थ आहे, तुझे जाणं ।
आधी स्थिरं, कर मनं । मग होईन, देवरायाचं देणं ॥
॥ तुच कर्ता, तुच करविता । कर्म-धर्म, तुमच्याच करता ।
होय तु अवघ्याचा साहयतां । होय आता बा आतां ॥ ०६ ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ ओवी नं. १७ ॥

## ॥ कळेना आदीपुरूषाची मावं ॥

॥ कळेना आदीपुरूषाची माव । त्याचा खेळं त्यालाच ठावं ।
पुढे भक्त मागं देवं । धरली वाट... भाव भक्तीचा बळकट ॥
॥ रोम-रोम भरला देही । सत्य भक्ताच्या हद्यी ।
या जम्बुंव्दिपाच्या ठाई । देल्ली आरोळी..,जागी झाले पांडव तेही
॥ पंचप्राण पांडव होयं । ध्यान-ग्यानं द्रौपदा माय ।
धर्माचा आहे सत्य न्याय । यवगावरी.., या हस्तीनापुर नगरी ॥
॥ हस्तीनापुर तिर्थ काशि । देहे गाव वस्तीवाशी ।
सोहंम् रूपाचा ऋषिकेशी । भेटनं त्याला...
या सोहंम् सावंग्याला ॥ ०४ ॥
॥ या देहेगावी चार धाम । चवधामावर चार खुम्मं ।
पाचवा आहे घनश्याम । न्याहारून पाहे.., उभा चौ-खुम्मावर आहे
॥ या देहेगावी नदया चारं । सत्रावी वाहे झरझरं ।
दर्या खोल पचवनं सारं । हा होय साळुचा भ्रतारं ॥
॥ या देहेगावी षटविकारं । त्यांना बैल केलं यवगावरं ।
मारू मारू केलं बेजारं । लावलं तासी...
कोर धान्य पिकन दर मासी ॥
॥ देहेगावी सहा देवं । याहीनं चांगला धरला भाव ।
याहीनं सत्य धरला भाव । याहीनं उध्दारलं...आपलं देहगावं ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०३ ॥

॥ ओवी नं. १८ ॥

॥ जळगाव दांडातील मुळावरची ओवी ॥

## ॥ मानवा सुद धर ॥

॥ मानवा सुद धर गा बुध । बुध धर आपल्या पोटी ।
देव येईनं घरां । अवघ्या सांगनं गोष्टी ॥ घृ ॥
॥ देही घर सोडुन । निघनं मैदानां ।
दहाही अवतार घालन जुम्मा ॥ मानवा सुद धर गा बुध..
॥ देहीदिक जाईन घुमाले । जातो म्हणुन जीव आले ।
न्यारी बुध येईन देहघराले ॥ मानवा सुद धर गा बुध..
॥ देही पिशाबीले बसनं । समोर देव उभा राहीनं ।
जरानाही राहणार शरमुनं ॥ मानवा सुद धर गा बुध..
॥ देही म्हणनं खातो जहरं । हातचं जहरं हाती राहीनं ।
पोटचं जहरं बाहेर पडनं ॥ ०४ ॥ मानवा सुद धर गा बुध..

**भजने** :- ॥ मानवा भुलु नको रे संसारा । घे देवाचा आसरा ।
कर हरीनाम सोयरा ॥ मानवा भुलु नको रे संसारा ॥

टिप :- या ओवीच्या चरणांच्या निरसनाचे ग्यान खंड०१/०२/०२ च्या 'अंतर पलघडी नाही राहणार' या टुकीच्या निरसनात दिलेले आहे..



॥ ओवी नं. १९ ॥

## ॥ काळीवर पांढरी ॥

॥ काळीवर रंचली पांढरी । सात समुद्र ईच्या वरी ॥
॥ एका तळ्याच्या परी । निंबोण्या लावल्या हारो-हारी ॥
॥ आला निंबोण्याला बार । दोघी मिळुन एकच भ्रतारं ॥
॥ एक जन्माची वांझोटी । एक गर्भ दोघीच्या पोटी ॥ ०४ ॥
॥ एक गर्भ दोघीच्या पोटी । त्यातुन जन्मला ना-डर मोती ॥०५॥

**भजने** :-॥ मोती लोळे गाग-यातं । उचलुन घ्याहो महाराजा पदरातं ॥
॥ तुया घरी मोत्यांची खाणं । या मोत्याची पारखं, नाही केली कोणं ॥



॥ ओवी नं. २० ॥

## ॥ पंचीदर-नार ॥

॥ देही मध्ये, जन्मली हो । एक नार ।
मुखा मध्ये, नाही दात । भरला अंबरं ॥
॥ सात खणांची, चोळी शिवली । उघडा आहे दंड ।
या नाजुक, नारीची कंबर । आहे बंद नाडं ॥
॥ सव्वा मनाची, घागर घेवुन । नार गेली सागरी ।
या नारीनं, सर्व सागर । भरला घागरी ॥
॥ कुणी कडुन, आली एक, पंचीदर घारं ।
या घारीन; घागरा सहीत । उचलली नारं ॥०४॥
॥ या घारीच्या, मस्तका वर । सुवर्णाचा पहाड ।
त्या पहाडा वर, ऋषी होते । चौसष्ट हजारं ॥
॥ एका एका, ऋषीला मुले । आहेत चार-चारं ।
असन सद्‌गुरू मुर्ति । अर्थ, सांगा हो चातुरं ॥ ०६ ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०३ ॥

॥ जुनी मुळओवी नं. २१ ॥

## ॥ गडया रे सार्थक.. ॥

॥ गडया रे, सार्थक काहीनाही झालं ।
या मानव जन्मा, येवुन काहीतरी केलं ॥ घृ-१ ॥
॥ महा मायेला, पुर आला । सिंधु सागर, भरला ।
जीव हा, आर्बुस-निर्बुस झाला ॥ गडया रे...
॥ माया वसवले, एक नगरं । पुर्ण जडीतं, केले फारं ।
भयान वस्ती, भुलला घरं ॥ गडया रे...
॥ मायेचा, बाजार भरला । सौदा तिर गुणांन घेतला ।
जीव हा, भुलला भांबावला ॥ गडया रे...
॥ प्रपंचाचे, कबाड ओझें । कुठवर करशीन, माझे माझे ?
अवघचं विसरून, गेला तुझे ॥ ०४ ॥ गडया रे...

॥ गडया रे, पाहयं दुरवर पाहये ।
या मानव जन्मा, सार्थक होणार आहे ॥ घृ-२ ॥
॥ माझं-माझं, अवघं त्याग । जेजे लागन, तेते माग ।
शिदोरी येईन, तुझ्या संग । गडयारे पाहयं दुरवर पाहये ।
या मानव जन्मा सार्थक होणार आहे ॥
॥ कृष्ण उभे, जगजेठी । तिरगुणी माया, उडवण्या साठी ।
भाग्य दैवानं, झाल्या भेटी । गडया रे, पाहयं दुरवर पाहये ।
या मानव जन्मा, सार्थक होणार आहे ॥
॥ संधी लाभली, कल यवगाची । पुडी सोडुन, पहा भ्रमांची ।
निती चालनं, मानवाची । गडया रे, पाहयं दुरवर पाहये ।
या मानव जन्मा सार्थक होणार आहे ॥ ०७ ॥
भजन :- ॥ नाम घ्याहो नित्य रूप । नाम हे तारक ।
नाम घ्याना गडे हो । करा देहीचे सार्थक ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ ओवी नं. २२ ॥

## ॥ षटगुण उर्मि हे षटवैरी ॥

॥ काम क्रोध, लोभ दम । मद मत्सरं ।
षट वैरी, हे तत्पर । हेची जाणं ॥
॥ क्षुधा तृष्णा, मोहं शोक । जरा मरणं ।
षट उर्मि, हे पुर्ण । याच देही हो ॥
॥ आशा मनशा, कल्पना इच्छा । तृप्ती वासना ।
षट गुणं जाणा राया । या देहे मध्ये ॥
॥ बोले आदीमुनी राया । सोडावे हे अठरा ।
तोची या संसारा धन्य । होयं जाणा ॥ ०४ ॥
भजने :-
॥ देहेत भरलं सारं । बाहेर काढा हे कडबा-कुटारं ॥
॥ कडबा कुटाराचं काय काम ? अवघं बीजनाम घ्याहो पारखुनं ॥
॥ ओळखा ओळखा बिजाकार । सावंग्यात नांदे पुर्ण अवतार ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०३ ॥
॥ जुनी मुळ ओवी नं. २३ ॥

# ॥ आता तरी सुधर गडया ॥

॥ आता तरी सुधर गडया । घमेंडी घालु नको उडया ॥ घृ ॥

॥ जेव्हा होता निराकारी । इच्छा केली/धरली अवतारी ।
उडी घातलीं, मायेच्या उदरी ॥
॥ मायेच्या उदरी आला । हाडा-मासाचा, विस्तारं केला ।
त्या मध्ये, हंस आला ॥
॥ नउ महीने, मायेच्या उदरी । म्हणे लवकर, काढा बाहेरी ।
करीन म्हणे, धन्याची चाकरी ॥
॥ धन्यानं जन्माशी घातलां । त्याशीच, बेईमान झाला ।
सोहंम् शब्द विसरला ॥ ०४ ॥

॥ काय करतो, माझं-माझं । इथं काय आहे तुझं ?
धर चतुर्पतीची सुदं ॥
॥ काही सोहीतांच घर । संत सभा गर्भी घरं ।
चुकवा चौ-यांशी बिगारं ॥
॥ आता वेळ, राहली थोडी । यमरायाची, पडनं बेडीं ।
त्यामध्ये कोणं, घालनं उडीं ॥ ०७ ॥

भजने :-

॥ महाल-माडया, लाल कवडयां । संप्पत्तीचा हा तोरा ।
संप्पतीचा तोरा, टाकुन शेवटी । जाशीन उघडा ॥
॥ नगीन येणं, नगीनं जाणं । अगडदुत जैसा ।
कमरेचा कडदोरा तोही । नाही राहणार संगतीला ॥
॥ भरली पायली, कणा-कणानं । हरीला घेतीन उबडुनं ।
आयुष्याची, तुटन दोरी । तेव्हाच येईल मरणं ॥
॥ पाल-पडदे, नेवुन टाकले । गावा बाहेरं ।
मसंती मध्ये, महाल बांधला । जन्माचं घरं ॥
॥ गावा बाहेर, दिला जाणोसा । साडे तीन हाताचां ।
आत्माराम, सरदार पाहयें । वरूनं, तमाशा कुडीचा ॥

॥ पंचरंगीचे, फुल उगवले । कोण्या एका समयी ।
तोडु जाता, न ये हाता । ब्रम्हादिक शिणलें ॥
॥ पंच रंगीचे, फुलं उमलले । कोण्या एका समयी ।
तोडु जाता, न ये हाता । बहु यवग शिणले ॥

॥ बागे मध्ये, झाड लावलं । वर चंपा जाळी ।
बिना आधारी, मळा घातलां । वर बसला माळी ॥
॥ चौताळावर, केली विहीर । मोट चाले पाताळी ।
बिना पाण्यानं दांड चाले । वर वाफे जायी ॥
॥ चौताळावर, केली विहीर । मोट चाले पाताळी ।
कोणं वल्हवले, चारही भाग ? बहु पिकाया केळी ॥
॥ ओळखा ओळखा बीजाकारं । सावंग्यात नांदे पुर्ण अवतारं ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०३ ॥

॥ ओवी नं. २४ ॥

॥ रहाटगाव दांडातील ओवी ॥

## ॥ प्रार्थना करा... ॥

॥ मानव होय तु, सदा सोहंम् राहयं । प्रार्थना करा..
देव सोहंम् नांदतो घरा ॥ घृ ॥
॥ पुर्वि पासुन, सोहंम् आहे । धरला मानवाचा देहे ।
पंच मुखी, बोलत आहे ॥ प्रार्थना करा..
॥ माझा मजला, गवसलां हिरां । ओहंम्-सोहंम्, नांदतो घरा ।
डोळे उघडुन, पाहयं जरा ॥
॥ माझा मजला, गवसला मोती । बहु यवगाचा, तो संगती ।
नितं सांगतो, मानव निती ॥
॥ मागतो मानवाला दानं । घरोघरी, उभा मनमोहनं ।
ठाव आहे, मानव होणं ॥ ०४ ॥
॥ मानव होण; आहे कठिणं । साधु होणं, दुर्लभ जाणं ।
देव पाहण्याचे, लटके साधनं ॥
॥ देव नका पाहु, वेडे नका होवु । तिर्थयात्रेला, नका जावु ।
मानवाचे काम, आहे बहु ॥
॥ नका सोडु, घरदार । करा प्रपंच, व्यवहार ।
करून मनाचा, निर्धारं । सत्या कडे वळवा नजरं ॥
॥ उघडा ज्ञानाचे, हे कवाडं । बाहेर काढा, हो दयाळ ।
धर्म-पंथाची, नका ठेवु भिडं ॥ ०८ ॥
॥ धर्म-पंथाचा, भरला बाजारं । याहीचे कांदे, कोण घेणारं ?
पुढें मानव, अवघे होणारं ॥ ०९ ॥ प्रार्थना करा...

भजने :- ॥ नरा रे कर नर-नारायण गडी । तेव्हाच होईनं सार्थक या कुडी ॥



॥ ओवी नं. २५ ॥

॥ जुनी ओवी ॥

## ॥ तिरगुण तिव्हा उभा केला ॥

॥ तिरगुण तिव्हा, उभा केला । राज्य होईन नितरूपांच ।
वारं सुटलं, उपणुन घ्या ।
अशी घडी नाहीयेणारं ॥




॥ सत्य शकुनी, मेठ रोवली ।
हालेना जराभरी ।
मन-पवन, बैल दोन्ही । जुंतले पात्यावरी ॥
॥ हरीनामाचा, वेढा फिरला । मदन केले तयार ।
सत्वधिरांच्या, पाटया भरन्या । देता झाला बीजनामं ॥
॥ भरून पायली, उचलुन घ्याना । रिती होईना जराभर ।
रा रा रास, भरून घ्याना । महाराजाच्या कृपेनं ॥
॥ आशा भुस, गेला उडुन । बाहेर पडला जावुनं ।
करटं-कोंडा, उडुन जाईन । अवद्युताच्या कृपेनं ॥ ०५ ॥

भजने :- ॥ देहेत भरलं सारं । बाहेर काढा हे कडबा-कुटारं ॥
॥ कडबा कुटाराचं काय काम ? अवघं बीजनाम घ्याहो पारखुनं ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०३ ॥

॥ ओवी नं. २६ ॥

॥ निरसनसह स्वरग्यानाची ओवी ॥

## ॥ सांगतो स्वर ग्यानं ॥

॥ सांगतो स्वर ग्यानं । चातुरा भला, भेद पाहयं ।
किल्ली स्वरांची धरूनं । हरी चरणी...
जोकोणी लावनं ध्यान, होईन सिध्द योगी ॥
॥ डाव्या थडीनं गंगेचे घर । उजव्या थडीनं यमुनेचे घरं ।
मध्ये राहये सुषम्नेचे घर । निराधारी....
तार जुळवुन राहये, हरी च्या चरणी ॥
॥ गंगे घरी चंद्र राहयें । यमुने घरी सुर्य राहयें ।
सोहंम् निराधारी आपरूप राहयें । सुषम्ने घरी...
जोकोणी लावनं ध्यानं, होईन सिध्द योगी ॥
॥ श्वास घेताच उठतो सों्-कार । श्वास टाकताच उठतो हंम्-कारं ।
श्वास घेता-टाकता । सोहंम् ध्यान...
जोकोणी करन तोच, होईन सिध्द जाणं ॥ ०४ ॥

॥ चंद्र-सुर्याच्या संधीकाळी । सुषम्नाबाई जागी होई ।
हरी संग तार जुळवुनी । हरी चरणी...
सर्वच अर्पन/विलीन करी ॥
॥ चंद्राला कलंक गंगा लावते । सुर्याला कलंक यमुना लावते ।
चंद्र-सुर्याचे आरे-गि-हे । या नरदेही...
जोकोणी मिटवनं तोच, सिध्द योगी ॥
॥ दिवसा संगत ठेवा गंगेची । रात्री संगत ठेवा यमुनेची ।
चंद्र-सुर्य होईन निशःकलंकी । या देह घरी ...
जोकोणी लावन ध्यान, होईन सिध्द योगी ॥
॥ चंद्र बळानं करा शितकर्मे । सुर्य बळाने करा तेजकर्मे ।
सुषम्ने च्या संगतीने । करा हरीकर्मे....
भजन पुजंन ध्यान, सुमरण चिंतन सर्वत्र ॥०८॥

**भजने :-**

॥ चौयवगाचा योगी खरा । उभा सावंग्यात ।
पुढे होणार सांगे द्युत । ऐकाव मात ॥
॥ यवगी मांडणा । भैसाची । खबर नाही कोणाशी ॥ यवगी...



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

निरसन पुढील पानावर....

॥ ओवी २६ ॥

## ॥ निरसनसह सांगतो स्वर ग्यान ॥

### -: निरसन/स्पष्टीकरन :-

पिंडामध्ये नदया चार । त्या कोण्या मार्गावर ?




**सांगतो स्वर ग्यानं. :-**

स्वर म्हणजे नाकपुडीतुन निघणारा श्वास ! स्वरांचे चे ग्यान हे नाडीवर आधारलेले आहेत. म्हणुन प्रथम शरीरातील नाडीचे ग्यान घेत स्वरग्यानाचे ग्यान घेवु या.

मनुष्याच्या नाभी/बेंबीस्थानी एक कंद आहे. हा कंद मुलाधार पासुन नाभीपर्यंत तिरपा गेलेला आहे. या कंदातुन एक अंकुर फुटलेला आहे. आणी या अंकुरातुन ७२ हजार नाडया निघुन सर्व शरीरभर पसरलेल्या आहे. मनुष्यदेह गर्भाअंतर्गत असतांना मातेच्या नाळीव्दारेचे या अंकुराच्या ठिकाणी प्रथम अन्न पाण्याचा रसपुरवठा होत होता. या अंकुरापासुन तो रसपुरवठा अंकुराला जुळलेल्या ७२ हजार नाडयांव्दारे सर्व कायेत संचारत होता. बाळाच्या या अंकुरस्थानापासुनच सर्व कायेत रसपुरवठा होवुन बाळकायेची वाढ गर्भात झालेली आहे. गर्भाबाहेर बाळदेही आल्यानंतर मातेची ही नाड कापल्या जाते. अंकुरस्थानाला रसपुरवठा होणे बंद होते. त्यामुळे काही कालांतरानंतर या बेंबिस्थानच्या अंकुरातुन निघालेल्या ७२ हजार नाडया सुप्त अवस्थेत जावुन, या देहीत सुप्तावस्थेत पहुडलेल्या राहतात.

या नाडया योगी आपल्या योगसाधनेव्दारे जागी करतात. योगसाधनेने या नाडया जागी कराव्या लागतात. तसेच या सुप्त नाडयांच्या कंदाठाई जिथे मेरुचा दांड सुरु होतो, तिथे त्या मुलाधार ठिकाणी भुजंगाप्रमाणे साडेतिन वेटोळे घालुन कुंडलीनी शक्ती सुप्तावस्थेत पहुडलेली असते. कोणत्यातरी एका मार्गाने तिलाही जागी करावे लागते. असो.

याच तिरप्या कंदा च्या वरील बाजुस दहा व खालील बाजुस दहा अश्या एकुन विस महत्वाच्या नाडया या शरीरात पसरलेल्या आहेत. हया शिवाय दोन्ही बाजुने दोन-दोन अश्या चार नाडया तिरप्या वाकडया गेलेल्या आहेत.

या एकुन चोवीस/२४ नाडया पैकी फक्त दहा नाडया या वायु वाहुन नेणा-या मुख्य नाडया म्हणुन ओळखल्या जातात. तिरप्या व खाली पसरलेल्या या सर्व दशनाडया प्राणवाहक शक्तीचे वहन करणा-या असुन, त्या सर्व शरीरभर वायु खेळवतात. या दहा नाडया चे नावे असे आहेत :

**१. ईडा २. पिंगळा ३. सुषम्ना ४. गांधारी ५. हस्तजीव्हा ६. पुषा ७ यशस्वीनी ८. अवलुंबा ९. कुहु १०. शंखीनी** या वायुवाहक दहा नाडया आहेत. देहवर्णनाच्या ओवीतुन या दशनाडयाचे अधिक ग्यान घ्यावे. या दशनाडयांपैकी फक्त तिनच नाडया या अतिश्रेष्ठ व अतिमहत्वाच्या आहे त्या म्हणजे **१. ईडा २. पिंगळा ३. सुषम्ना**

डाव्या नाकपुडीतुन स्वर/श्वास चालु असता ईडानाडी/गंगा चा प्रवाह चालु राहतो. उजव्या नाकपुडीचा स्वर चालु असता पिंगळानाडी/यमुना चा प्रवाह चालु राहते. तर एक स्वर बंद होवुन दुसरा स्वर चालु होण्याच्या मधल्या काळात सुषम्नानाडी/सरस्वती चा प्रवाह वाहत असतो. म्हणजेच ईडा व पिंगळा च्या संधीकाळात सुषम्ना जागी होते. गंगा यमुना सरस्वती या तिन नाडया शरीराच्या कोणकोणत्या बाजुला राहतात याचे आता ग्यान घेवु या !.

॥ डाव्या बाजुनं गंगेचे घर । उजव्या बाजुनं यमुनेचे घरं ।
मध्यभागी सुषम्नेचे घर । निराधारी,
तार जुळवुनी लीन राहये, हरीच्याठाई ॥

डाव्या बाजुनं गंगेचे घर :-गंगा नदी ची उपमा ईडा नाडी ला दिलेली आहे. **ईडानाडी/गंगा** ही शरीराच्या डाव्या भागाकडुन वाहते. ही नाडी डावी असल्यामुळे तिच्याशी संबधीत सर्व डाव्या बाजुच्या नांडयांच्या समुहाला ईडा समुह अथवा ईडा अथवा गंगा असे म्हणतात.

उजव्या बाजुनं पिंगळा/यमुनेचे घरं :- यमुना नदी ची उपमा शरीरातील उजव्या भागस्थीत पिंगळा नाडी ला दिली आहे. **पिंगळानाडी/सरस्वती** ही शरीराच्या उजव्या भागाकडुन वाहते. ही नाडी उजवी असल्यामुळे तिच्याशी संबधीत सर्व उजव्या बाजुच्या नांडयांच्या समुहाला पिंगळा समुह अथवा पिंगळा अथवा यमुना असे म्हणतात.

मध्यभागी सुषम्ना/सरस्वतीचे घर :- सरस्वती नदी ची उपमा शरीरातील सुषम्ना नाडी ला दिलेली आहे. सुषम्ना नाडी **सुषम्नानाडी/सरस्वती** ही शरीराच्या मध्य भागी वाहते. ही नाडी मेरूमंडयानात अधांतरी निराधारी निराकुल असुन ठाळुमार्गे परमात्म्याशी तार/संधान जुळवुन असते. ती अशी :




सुषम्नेच्या आत **वज्रनाडी,** वज्रनाडीच्या आत **चित्रिणी** नाडी आणी या चित्रिनीच्या आत **ब्रम्हनाडी** !

सुषम्नाच्या या सुक्ष्मातिसुक्ष्म नाडयांपैकी एक मध्य **ब्रम्हनाडी** ही मुलाधार पासुन सुषम्नाच्या मध्यभागातुन

वाहत सहस्त्रागार च्या वर निघुन ब्रम्हांडी अकाशमात मधील परमात्म्याशी संधान/तार जुळवुन असते. या ब्रम्ह नाडीतुनच आत्म्याला परमात्म्याकडुन चैतन्य सह सर्वत्राचा पुरवा/पुरवठा होत राहतो.

निराधारी....तार जुळवुनी लीन राहये, हरीच्या ठाई :-

सुषमानाडीच्या आतमधल्या या सुक्ष्मातिसुक्ष्म मध्य ब्रम्हनाडी व्दारे योगी परमात्म्याशी तार जुळवुन घेतो. सुषम्नाबाई ही सुध्दा आपल्या या ब्रम्हनाडी रूपी तारेव्दारेच परमात्म्याला सर्व अर्पण करत असते. सुषम्नाबाई लिन होवुन तिच्या प्रवाहात जे काही आले ते सर्व ती परमात्म्याचरणी विलीन करत राहते. तिच्या या विलीनता व लिनतेचा फायदा चतुर योगी घेतो. आणी स्वतः याच सुषम्नाबाईच्या या ब्रम्हवाटेन परमात्म्यापर्यंत तार जुळवुन परमात्म्याचरणी लिन होतो. त्याच्या जवळचे सर्व परमात्म्यात विलीन करतो. असो.

ईडा नाडीला गंगा नदिची उपमा दिली आहे. तर पिंगळा नाडीला यमुना नदी ची उपमा दिली आहे. आणी सुषम्ना नाडी ला सरस्वती नदीची उपमा दिली आहे. योगी आपल्या भागीरथ प्रयत्नाव्दारे सुषम्नेला जागी ठेवुन सुषुम्नेच्या आत असलेली ब्रम्हनाडी चा प्रवाह वाहवत परमात्म्यामध्ये लिन होत असल्यामुळे या सुक्ष्मतासुक्ष्म मध्य ब्रम्हनाडीस भागीरथी नदी असे संबोधलेले आहे. असो. आता या ईडा पिंगळा व सुषम्ना या तिन नाडयांच्या घरी कोण कोण राहतो. याचे ग्यान घेवु या.

॥ गंगे घरी चंद्र राहयें । यमुनेच्या घरी सुर्य राहयें ।
सोहंम् निराधारी आपरूप राहयें । सुषमना घरी...
जोकोणी लावनं ध्यानं तो, सिध्द जाणं ॥
॥ श्वास घेताच सों-कार । श्वास टाकताच हंम्-कारं ।
श्वास घेता-टाकता । सोहंम् ध्यान...
जोकोणी करन तोच, होईन सिध्द जाणं ॥

ईडा/गंगे घरी चंद्र राहयें :-

डावीकडील ईडा नाडीसमुहाला प्रकाशीत करणारा शरीरस्थ चंद्र हा शक्तीस्वरूप आहे. हा चंद्र डाव्या नयन स्थीत असतो. चंद्रामुळे अमृतप्रवाहाचा स्त्रोत्र शरीराला प्राप्त होत कायेला पृष्ठता आणत राहतो. गंगेघरी राहुन गंगा नदीचे वहन करणारा हा चंद्र देहीत शक्तीस्वरूप असतो.

पिंगळा/यमुनेच्या घरी सुर्य राहयें :-

उजवी कडे पिंगळा नाडी समुहात शरीरस्थ सुर्य असतो. हा सुर्य शिवस्वरूप आहे. हा सुर्य उजव्या नयन स्थित असतो. उजवीकडील पिंगळा समुह असलेला शरीरस्थ सुर्यामुळे शरीरस्थ चरांचराची निर्मिती करण्यास साहय होते. यमुने घरी राहुन यमुना नदीचे वहन करणारा हा सुर्य देहीत शिवस्वरूप असतो.

सोहंम् निराधारी आपरूप राहयें । सुषमना/सरस्वती घरी :-

मध्यभागी सुषम्ना/सरस्वती ही निराधार अधांतरी परमात्म्याला आपल्या सुक्ष्मातिसुक्ष्म ब्रम्हनाडी तारेव्दारे बांधुन लटकत असते. या सुषम्ना नाडीत हंसः व सोहंम् लीन राहतो. 'सोहंम्' असा जप देहीच्या ब्रम्हांडी निर्वाणी बसलेला ऋषि करत राहतो. तो जप नाकाव्दारे श्वास घेतांना **'सों'** आणी श्वास सोडतांना 'हम्' अश्या नादलहरी उत्पन्न करत राहते. या उत्पन्न झालेल्या सोहंम् नादलहरी सुषम्ना खेळवत राहते. श्वास घेता सों आणी श्वास टाकता **हंम्** अश्या उत्पन्न झालेल्या नादलहरी ऐकत राहल्याने श्वास घेता-टाकता **'सोहंम्'** जप होतो. फक्त श्वासावर लक्ष्य केंद्रित करून सोहंम् ऐकल्यानेच **'न**

**जप करता आपोआप जप'** म्हणजेच अजपा जप-ध्यान होते. या सोहंम् मधील 'सो्' हे शक्तीचे बिज आहे. तर 'हम्' हे शिवाचे बिज आहे. असे योगीजनात मानल्या जाते.

मध्यभागी संधीकाळात जागी होणारी विषम संधी असलेली सुषम्नानाडी ही

- आदी व अंत नसलेली अनादि
- आकार नसलेली निराकारी
- बिन आधारी अधांतरी उभी असलेली निराधारी
- काहीही ग्रहण न करणारी निराहारी
- सर्वच लिन करणारी असुन, तिच्या ठाई परमतत्वें लिन होते.

ती परमात्म्यात सर्व विलीन करणारी असल्यामुळे तिच्या घरी जे टाकाल, ते सर्व परमात्मास प्राप्त होतात. सुषम्नाबाई परमात्म्यात लिन होवुन राहणारी असल्यामुळे, सुषम्नेच्या या लिनतेलाच साधु ग्यानी योगीजन संध्या असे म्हणतात.

देहीचा चंद्रास्त हा इडास्वरांचा अस्त करून केल्या जातो. तर देहीचा सुर्योदय हा पिंगळानाडीचा स्वर सुरु करून केल्या जातो. तसेच देहीतला सुर्यास्त हा पिंगळानाडीचा स्वर अस्त करून केल्या जातो. तर चंद्रोदय हा ईडास्वर चालु करून केल्या जातो. जाणीवपुर्वक देहीच्या आत चंद्रास्त ते सुर्यास्त अथवा सुर्यास्त ते चंद्रोदय किंवा चंद्रास्त ते सुर्योदय यामधील मधल्या काळ देहीत जागृत ठेवुन, म्हणजेच ईडा नाडीचा स्वर थांबवुन पिंगळा नाडीचा स्वर चालु होण्याचा मधला काळ म्हणजेच संधी वाढवुन देहीत संधीकाळ केल्याने सुषम्नाबाई जागी होते. आणी या संधिकाळात जो कोणी परमात्म्याचे भजन पुंजन ध्यान सुमरन, चिंतन करेल ते सर्व त्या परमात्म्यापर्यंत ही सुषम्नाबाई पोहचवण्याचे कार्य करत राहते. अशी ही परमात्म्याशी संधान जुळवुन देणारी ही सुषम्ना नाडी आहे. असे स्वरग्यानी योगी मानतात.

ईतर लोक जे प्रातःकाळी व सायंकाळी जी संध्याकाळ मानत असते ती खरी संध्या नसुन, देहीअंर्तगत नाडीव्दारे जी संध्या होते तिच खरी संध्या होय. योगीजन ही संध्या जाणीवपुर्वक एक नाडी बंद करून दुसरी नाडी चालु होण्याचा कार्यकाल वाढवुन, दोन्ही नाकपुडीने श्वास घेत सुषम्ना नाडी जागी करून ही संध्या करतात. आणी या देहीअंर्तगत संधीत परमात्म्याचे परमंतत्वे चिंतन, भजन पुंजन ध्यान सुमरन ईत्यादी भक्ती-मुक्तीचे हरीकर्मे करतात. याच संध्येत सुषम्नाघरी सोहंम् ध्यान जो कोणी करन तोच खरा स्वरग्यानी होय. कारण की याच चंद्र-सुर्याच्या संधिकाळी सुषम्नाबाई जागी होवुन आपले कार्य करत राहते.

॥ चंद्र-सुर्याच्या संधीकाळी । सुषमनाबाई जागी होई ।
हरी संग तार जुळवुनी । हरी चरणी..,
ती सर्वच अर्पन/विलीन करी ॥

चंद्र-सुर्याच्या संधीकाळी । सुषमना/सरस्वतीबाई जागी होई :-

ज्यावेळी देहीअंर्तगत ईडा नाडी जागी नसते तसेच पिंगळानाडी सुध्दा जागी नसते, त्यावेळी सुषम्नानाडी जागी होते. म्हणजेच जेव्हा सुर्यस्वराचा अस्त होवुन चंद्रस्वर चालु होण्याच्या अगोदरच्या दरम्यान चा जो काळ असतो, त्या संधिकाळी ही सुषम्ना जागी होते. संधिकाळी जागी झालेली ही सुषम्नाबाई कालरुपी अग्नीकुंड पेटवुन तिच्या प्रवाहात जे काही आले/येईन, त्या सर्वाची आहुती या होमकुंडात टाकुन हरीसाठी यज्ञ करते. हरीशी संधान जुळवुन हरीठाई लिन होवुन राहते. हरीचरणी ईच्या प्रवाहातले सर्वच विलिन करत राहते.

हरी संग तार जुळवुनी । हरी चरणी...ती सर्वच अर्पन/विलीन करी :-

म्हणुनच या देहीतल्या चंद्र-सुर्याच्या संधिकाळी जाणीवपुर्वक सुषम्नाला जागी ठेवतात. तिच्या संगतीन हरीनाम भजन ध्यान सुमरन ईत्यादीचिंतनादिक कर्मे केल्याने, हे सर्व कर्मे सुषम्ना हरीला अर्पण करत जाते. ही सुषम्ना त्या कर्त्याची तार हरीशी जुळवते. अश्यारितीने हरीपर्यत हरीकर्मे पोहचवुन, हरीचरणी सर्व लीन करून हरीशी संधान जुळवण्याचे साहयं या सुषम्ना जागृतीमुळे योग्यांना मिळते. म्हणुनच हे जाण स्वरयोगी की : या सुषम्ना नाडीवरच फक्त मोक्षप्राप्तीच्या साधना व चिंतनादिक हरीकर्मेच फलप्रद ठरते. ईतर कोणतेही भौतिक कर्मे विषयवासना भोगलालसेने आरंभलेले कर्मे या सुषम्नाच्या होमकुडात जळुन राख होते.

असे विषयासक्त सर्व कर्मे ही सुषम्ना आपल्या होमकुंडात टाकुन निष्फळ करते. ते विफल होतात. म्हणुनच या सुषम्नाबाईच्या जागी अवस्थेत ईच्या प्रवाहात फक्त कर्मफलांची आसक्ती न करता केलेले हरीकर्मे व भजन ध्यान धारणा सुमरन चिंतन ईत्यादी चिंतनादिक आध्यामिक कर्मेच करावी. तीच हरीकर्मे सफल होवुन अंबर करन ही सुषम्नाबाई । असो.

कोणत्या स्वराने कोण ग्रासते/झाकाळते ?, कोण्या वेळी कोणता स्वर चालवावा ?, कोणत्या नाडीत कोणते कर्मे करावे ?....याचे ग्यान आता या ओवीचे पुढचे चरणे सांगत आहेत.

॥ चंद्राला कलंक गंगा लावते । सुर्याला कलंक यमुना लावते ।
चंद्र-सुर्याचे आरे-गि-हे । या नरदेही...
जोकोणी मिटवनं तोच, होईन सिध्द योगी ॥ कलंक लावणे :- ग्रासने
॥ दिवसा ठेवा ईडा/गंगेला । रात्रीची संगत ठेवा पिंगळे/यमुनेची ।
चंद्र-सुर्याचा प्रकाश निशःकलंकी । या देहघरी...
जोकोणी ठेवन तोच, होईन सिध्द योगी ॥

ईडा/गंगा चंद्राला कलंकीते/ग्रासते :-

चंद्रस्वराने चंद्र ग्रासल्या/झाकाळला जातो. म्हणुनच रात्री देहिस्थ चंद्र झाकला न जाता रात्रभर पुर्णपणे निश्कलंकी प्रकाशमान ठेवण्यासाठी रात्री चंद्रस्वर न चालवता सुर्यस्वर चालवावा. सुर्यस्वर रात्री चालवल्याने देहीस्थ चंद्र झाकळल्या न जाता पुर्णपणे प्रकाशमान राहुन, देहीच्या आरावलयाला प्रबलता भेटत राहते.

पिंगळा/यमुना सुर्याला कलंकीते/ग्रासते :-

सुर्यस्वराने सुर्य ग्रासल्या/झाकाळला जातो. म्हणुनच दिवसा देहिस्थ सुर्य झाकला न जाता दिवसभर पुर्णपणे निश्कलंकी प्रकाशमान ठेवण्यासाठी दिवसा सुर्यस्वर न चालवता चंद्रस्वर चालवावा. चंद्रस्वर दिवसा चालवल्याने देहीस्थ सुर्य झाकळल्या न जाता पुर्णपणे प्रकाशमान राहुन देहीच्या आरावलयाला प्रबलता भेटत राहते.

दिवसा ठेवा ईडा/गंगेला । रात्रीची संगत ठेवा पिंगळे/यमुनेची :-

अश्या रितीने ब्रम्हांडातील सुर्य उगवताच पिंडीतील सुर्याचा प्रकाश निश्कलंकी प्रबल व बलवान ठेवण्यासाठी योग्याने दिवसा चंद्रस्वर चालवावा. व ब्रम्हांडातील चंद्र उगवताच पिंडीतील चंद्राचा प्रकाश निश्कलंकी प्रबल व बलवान ठेवण्यासाठी योग्याने रात्री सुर्यस्वर चालवावा. दिवसा चंद्र तर रात्री सुर्य उगवुन काळाला फसवणारी हीच कालक्षय साधना होय. या साधनेव्दारे देहीचे आयुष्यमान सह तेजोवलय वाढते.

अश्या रितीने प्रयत्नाव्दारे कालक्षय करत प्राप्त करून घेतलेले स्वरयोग्याच्या देहीचे प्रबळ बलबान तेजमय आरावलय, हे दुस-या कमजोर आरावलयाच्या सर्वसामान्य देहीला आकर्षित करते. या प्रबळ तेजोवलयाव्दारे योग्यात जन आकर्षण करण्याची शक्ती आपोआप येत राहते. कामे सहजच सिध्द होत राहतात....ईत्यादी गुण त्या स्वरयोग्यात येत राहते.

चंद्र-सुर्याचे आरे-गि-हे । या नरदेही...जोकोणी मिटवनं तोच, होईन सिध्द योगी :- योग्याने रात्री चंद्रस्वर चालवुन रात्री चंद्र उगवु नये. तसेच दिवसा सुर्यस्वर चालवुन दिवसा सुर्य उगवु नये. म्हणजेच जर दिवसा चंद्र उगवुन चंद्रस्वर व रात्री सुर्य उगवुन सुर्यस्वर योग्याने चालवला, तर स्वरांव्दारे चंद्र-सुर्याला येणारे आरे-गि-हे मिटल्या जाते. या देहीमध्ये जो कोणी असे स्वरांव्दारे येणारे देहीस्थ चंद्र-सुर्याचे आरे-गि-हें अश्या प्रकारे मिटवन, तोच खरा स्वरयोगी होय. अश्या प्रकारे जो कोणी दिवसा चंद्रनाडी व रात्री सुर्यनाडी ठेवण त्याच्या देहीस्थ चंद्र-सुर्याचा प्रकाश निश्कलंकी तेजपुंज राहीन. असाच निश्कलंकी प्रकाश जो कोणी ठेवण तोच खरा स्वर योगी होय.

चंद्रस्वर चालु असतांना उगवलेला दिवस, तसेच संपुर्ण दिवसभर चंद्रस्वर ! आणी सुर्यस्वराने मावळलेला दिवस व संपुर्ण रात्रभर सुर्यस्वर ! असे चक्र अनेक शुभ शुध्द गुण तेज उत्पन्न करत राहते. सुर्योदयी चंद्रस्वर व चंद्रोदयी सुर्यस्वर ठेवल्याने त्या दिवस-रात्रीचे सर्वच कामे सिध्द होतात. असे जाणकार योगी मानतात. म्हणुनच प्रातःकाळी चंद्रनाडी आणी सायंकाळी सुर्यनाडी असा योग असावा लागतो. अश्याप्रकारे चंद्रस्वरांचे निवारण रात्री करून रात्री सुर्यस्वर चालवावा. आणी सुर्यस्वरांचे निवारण दिवसा करून दिवसा चंद्रस्वर चालवण्याचा नित्य नेम जो करन तो निश्चितच योगी जाण.

जन योग्याने कोणत्या नाडीवर कोणकोणते ईतर कर्मे करावेत याचे ग्यान आता ओवीचे पुढील चरण देत आहे.

॥ चंद्र बळानं करा शितकर्मे । सुर्य बळाने करा तेजकर्मे ।
सुषमना बाईच्या संगतीन । करा हरीकर्मे....
भजन पुजंन ध्यान, सुमरण चिंतन सर्वत्र ॥

चंद्रबळाने करा शितकर्मे :-

**ईडा नाडीवर करावयाचे कार्ये :-**

चंद्रनाडी म्हणजे ईडानाडी ईलाच गंगा असेही म्हणतात. ही ईडा डाव्या नाकपुडीचा स्वर चालु राहल्याने जागी होते. इडा/गंगा वाहत राहील्याने देहीला चंद्रबळ भेटत राहते. ही ईडा स्त्रीरूप असुन गौरवर्ण आहे. म्हणुनच ईला स्त्रीशक्ती ची संज्ञा दिलेली आहे. चंद्रबळाच्या स्त्री व्दारे सौम्य शित कर्मेच करून घेणे उचित ठरत असते.. देहीला जेव्हा केव्हा शितलतेची आवश्यकता असेल, तेव्हा चंद्रनाडी/गंगेला जागी करून, तिच्याव्दारे देहीला चंद्राची शितलता मिळवुन देता येते.

उदाहरणार्थ :- उन्हाळात तेज उन्हानं देही उष्ण झाल्यावर जाणुनबजुन ईडा नाडी चालु करून देहीला थोडीबहुत शितलता आणता येते.

तसेच गंगेची संगत असतांना खालील शित सौम्य वर्गिय कर्मे करावेत ते असे आहेत :

**स्थिरकार्ये** :- या ईडा नाडी/गंगा प्रवाहात स्थीर फल देणारे कर्मे करावेत, जसे शेत घेणे, क्षेत्राधिकार जमवणे, देवस्थापना ईत्यादी.

**निर्माणकार्ये** :- या ईडा नाडी प्रवाहात निर्माण कार्य अथवा कर्मे करावेत, जसे गृहनिर्माण, धर्मप्रासाद मंदिर निर्माणकार्य, विहीर, कुप, तलाव बांधने, दिव्य औषधी रसायनादाची निर्मिती ...ईत्यादी निर्मितीकार्य ईडेवर प्रशस्त ठरतात.

**आरंभिक कार्य** :- कृषि बिज रोपन, व्यापारउदिम, गृहप्रवेश, विदयारंभ, मंत्रदिक्षा, मंत्रसाधन, गितवाद्य नृत्याचे पाठ घेणे, शास्त्राभ्यास आरंभ करणे, मुहुर्तमेढ घालने, दुरदेशगमन यात्रेला प्रारंभ करणे, विवाह वस्त्रे अलंकार आभुषणे धारण करणे. वरिष्ठांची गाठ-भेट घेणे, येशीवरून प्रवेश घेणे, येश ओलांडणे, ईत्यादी आरंभिक कार्ये इडा नाडीवर प्रशस्त ठरतात.

**नियंत्रण कर्मे** :- काम क्रोध लोभ यावर नियंत्रण, पिडा शोक खेद ताप मुर्च्छा यावर नियंत्रण करणे, काल व व्याधि चिकित्सा व त्यावर नियंत्रण, युध्दाचे नियंत्रण करून तह करने,...ईत्यादी नियंत्रण कार्ये ईडा नाडीवर प्रशस्त ठरतात.

**संग्रहात्मक कर्मे** :- वस्तुसंग्रह करने, मित्रसंग्रहं करने, धन-धान्य संग्रह करने, पुरवणे, जमा करून ठेवणे, गाडणे, स्वजनांशी संवाद संबंध स्थापणे... ईत्यादी संग्रहात्मक कर्मे चंद्रबळाने करावेत.

**योगाभ्यासादिक कर्मे** :- देवस्थापना, दानकर्मे, शांतीकर्मे व शांती लाभण्यासाठी कृत्ये करने, सेवा, दर्शन, ज्ञानसाधना, परोपकार, श्रेष्ठांचे पुंजन, पुष्टीदायक कर्मे करने,...ईत्यादीयोगाभ्यासादिक कर्मे ईडा नाडीवर करावेत.

**ईतर कर्मे** :- धन्याचे घरी पाचारण, गाई-ठोरांना घरी आणणे, येशी ओलांडणे,.. ईत्यादीकृत्ये ईडानाडीवर म्हणजेच चंद्रस्वर चालु करून/असतांना करावेत.

वर कथन केलेले ईडानाडीवरचे सर्व कर्मे कृत्ये दिवसा किंवा रात्री केव्हाही केले तरी चालेल. परंतु ती सर्व कर्मेकृत्ये गंगेतिरी/ईडानाडीवरच करावेत. फलदायक होण्यास लवकर साहयं होते असे जाणकार मानतात. यापैकी सर्व शुभकर्मेकृत्यांसाठी चंद्रनाडी ही प्रशस्त ठरते एवढे मात्र निश्चित जाणावे. आता सुर्यनाडीवर करणारे कर्मे पाहु या !

### सुर्य बळाने करा तेजकर्मे :-

**पिंगडानाडीवर/यमुनेवर करावयाचे कार्ये :-**

सुर्यनाडी म्हणजे पिंगळानाडी ईलाच यमुना असेही म्हणतात. ही यमुना उजव्या नाकपुडीचा स्वर चालु राहल्याने जागी होते. यमुनेव्दारे सुर्यबळ भेटते. ही पिंगळा/यमुना शिव पुरूष स्वरूप असुन निलवर्ण आहे. म्हणुनच ईला पुरूषशक्ती ची संज्ञा दिलेली आहे. सुर्यबळाच्या पुरूषा व्दारे तेज उष्ण दाहक उग्र कर्मेच करून घेणे उचित ठरते. देहीला जेव्हा केव्हा उष्णतेची आवश्यकता असेल, तेव्हा पिंगळा म्हणजेच सुर्यनाडी जागी करून देहीला सुर्याची उष्णता मिळवुन देता येते.

*उदाहरणार्थ :- हिवाळ्यात अति थंडीने देही थंड झाल्यावर जाणुनबजुन पिंगळा नाडी चालु करून रविचक्र/सुर्यचक्रावर तो सुर्यस्वराचा श्वास आणुन सुर्यचक्रावर ध्यान लावल्याने देहीला उष्णता प्राप्त करून देता येते. हिमालयातील योगीजन असेच रात्री सुर्यस्वर चालु ठेवुन सुर्यस्वराचा श्वास नाभिस्थीत रविचक्रावर रोकुन, तिथेच ध्यान लावुन देहीस्थ सुर्य जागृत करते. या सुर्याची उर्जा-उष्णता देहीला प्राप्त करून देत देत अति थंडीपासुन देहीचा बचाव हे योगीजन करतात.*

तसेच यमुनेच्या संगतीने खालील उष्ण तेज वर्गिय कर्मे करावेत. ते असे :

- भोजन करून अन्न पचवणे, व्यायाम, दुर्ग पर्वत यावर चढने, प्राण्यावर बसने, पशु विकणे, नदिच्या पात्राच्या पाण्यातुन नदि पार करणे, तिव्र उष्ण औषधी सेवन करने, शत्रुशी लढण्याकरीता शस्त्र हातात घेणे,

शिकार, उग्र व्यवहार, स्वस्त्रीला वश करून रतीसुखः घेणे. विटा पाषाण काष्ठ रत्न हिरे खडे यांचे घर्षन... ईत्यादी

- षटकर्मसाधन, द्युतकिडा, सुरापान, परापडन बिरमंत्राची उपासना, यंत्र तंत्र मारण उच्चाटन आणी यक्ष यक्षिणी वेताळ सैतान लष्टाण पिशाच्च विष यांचे निवारण करने. मारण मोहन, स्तंभन विव्देषन वशीकरण उच्चाटन, प्रेरण आकर्षण क्षोभन कय-विकय दान तसेच प्रेताचे हरन विव्देषन आणी शत्रुनिग्रह...ईत्यादी कुर घातक दारूण दाहक उष्ण तेज कर्मे सुर्यनाडीवर अर्थात पिंगळा नाडीवर केल्यास ते फलप्रद होण्यास साहय होते. निश्चित यशस्वीसुध्दा होते. यात संशय नाही असे जाणकार मानतात.

परंतु सुषम्नाच्या संगतीने फक्त चिंतनादिक मानसिक हरीकर्मेच करा हेही जाणकार सांगतात.

सुषमनाबाई/सरस्वती च्या संगतीन । करा हरीकर्मे....
भजन पुजंन ध्यान, सुमरण चिंतन सर्वत्र :-

**सुषम्ना नाडीवर करावयाचे कार्य :-**

एक नाडी अस्त होवुन दुसरी नाडी चालु होण्याच्या मधल्या संधिकाळात सुषम्ना नाडी जागी होते. सुषम्ना च्या प्रवाहात फक्त मानसिक भजन ध्यान सुमरन ईत्यादी चिंतनात्मक मानसिक हरीकर्मै फलदायक ठरतात.

ईतर कोणतेही कर्मे सुषम्नाच्या प्रवाहात फलप्रद नसल्यामुळे ते ईतर कर्मेकृत्ये सुषम्नाच्या प्रवाहात करू नये कारण की : सुषम्ना नाडी हरीशी आपल्या ब्रम्हनाडीव्दारे तार/संधान जुळवुन असते. ती हरी चरणी सर्वच लीन करत राहते. संधिकाळची ही सुषम्नाबाई जागी होवुन कालरूपी होम/अग्नीकुंड पेंटवुन, त्या होमाग्नीत तिच्या प्रवाहात आलेले सर्वच कर्मेकृत्ये ची आहुती टाकते. तिच्या जवळ आलेले सर्वत्राची आहुती आपल्या होमकुंडात टाकत ती सर्व कर्मे-कृत्ये हरीठाई विलीन करत राहते.

म्हणुनच एखादया भौतिक कार्यारंभाप्रसंगी सुषम्ना स्वर विषप्रद व वर्ज मानल्या जातो. कारण की : ती सुषम्ना आपल्या होमाग्नीमध्ये त्या कर्माचीसुध्दा आहुती टाकुन ते कर्मे विलीन करत त्या कर्माचे कार्य निष्फळ करते. म्हणुनच ही सुषम्ना सर्व भौतिक कार्यास मारक ठरते. त्या सर्व भौतिक कार्यकृत्यांचा ती नाश घडवुन आणते. म्हणुनच सुषम्नाच्या प्रवाहात ईडा-पिंगळा नाडी चे शित अथवा तेज कर्मे अथवा कोणतेही अन्य कर्मे करू नयेत.

ईच्या प्रवाहात फक्त भजन ध्यान सुमरन चिंतन ईत्यादी मानसिक हरीकर्मेच करावीत. कारण की : हे सर्व हरी कर्मे परमात्माचरणी लीन होण्यासाठीच केल्या जातात. आणी सुषम्ना ते कर्मे परमात्माचरणी लीन करण्यास तिच्या होमकुंडाव्दारे साहय करत, ते कर्म फलप्रद होण्यास मदत करत राहते.

म्हणुनच सरस्वतीच्या प्रवाहात मनात ईतर कोणतेही विचार न आणता शांत व स्तब्ध बसुन, हरीभजन पुंजन ध्यान धारणा सुमरन चिंतन ईत्यादी चिंतनादिक मानसिक हरीकर्मे च करावित. अन्य काही न करता फक्त योगादीक परमार्थिक परलौकीक मोक्षदायक हरीकर्मे कृत्ये तेवढी करावीत. मनाने देखील एखादया भौतिक कर्माचा विचार किंवा विषयवासना भोगलालसा युक्त असलेले भौतिक कृत्य ईत्यादीचे चिंतन करू नये.

विषम संधि म्हणजे सुषम्नानाडी ही अनादि निराहारी निराधारी असुन तिच्याच ठाई जावुन परंब्रम्हात लीन होता येते. म्हणुनच ईचा हात धरून परंब्रम्ह प्राप्तीकडे, मोक्षप्राप्तीकडे वाटचाल करावी लागते. ईच्या बळाने असे चिंतनादिक मानसिक हरीकर्मे जो कोणी करन तोच सिध्द स्वरयोगी जाण.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०३ ॥

॥ ओवी नं. २७ ॥

॥ स्वरग्यानाची ओवी ॥

## ॥ मरणाचे भविष्यज्ञान ॥

॥ एकच चंद्र स्वरं । अहोरात्र वाहे ।
त्याच मरण आहे । तिन वर्षानं ॥
॥ एकच सुर्य स्वरं । अहोरात्र वाहे ।
एकच वर्ष तो । सुखः पाहये ॥
॥ सारी रात्र चंद्रस्वरं । वाहे सुर्यस्वरं दिवसा ।
उरली काळ दशा । सहा महीना ॥
॥ चंद्रस्वर वाहे सदा । सुर्यस्वर वाहे ना कदा ।
एक महीना राहली । काळ दशा ॥ ०४ ॥

॥ अनुहात शब्द । ऐकु येत नाही ।
सात दिवस पाही । संसार सुखः ॥
॥ डोळ्याच्या बाहुलीस । दिसेना वर्ण ।
उरला पंचप्राण । दहा दिवस ॥
॥ मल-मुत्र वायु । एकावेळी धावे ।
तिन दिवस राहीले । त्या जिवनाचे ॥
॥ नासीकाचे शिखर । दिसेना नयनी ।
म्हणा आजच्या दिनी । राम राम ॥ ०८ ॥

भजनें :-
॥ राम राम राम । राम करे यवगाचं कामं ॥
॥ उभा आहे माझा राम । राम करे यवगाचे काम ॥
॥ उभा आहे माझा हरी । तुम्हा बिन मजला कोण नाही ॥
॥ उभा आहे माझा देव । आता नाही कोणाचं भेव ॥
॥ उभा आहे माझा सखा । आता नाही देहीला धोका ॥

गजर :-
॥ तुम्ही या भजनी बसा । उभा आहे सखा, होणार नाही धोका...।
या चतुर्पती नामाला येवुन भजा ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०३ ॥

॥ ओवी नं. २८ ॥

॥ योगसाधनेची मुळावरची ओवी ॥

## ॥ योगी खरा ॥

वरभजन चरणे :-

॥ देवा माझं मंदिर पडलं सुन । तुमच्या परता दिवा लावनं कोण ? ॥

॥ ज्ञान भक्ती वैराग्य सद्गुण । साधवले ज्यानं ।
ऐसा लाखात उरला एकच पहेलवानं ।
त्यानं मिटवली चौ-यांशी यवनं ॥

॥ योगी खरा..। यानं यवग आणलं घरा ॥ घृ ॥

॥ तिन यवगाचा यवगी जन । उभ केलं तिर भवनं ।
साधवलं मेरू मंडयान । साधकी पुरा...॥ यानं यवग आणलं

॥ केले येशीचं पुंजन । चारही येश्या साधवल्या त्यानं ।
चारही येश्या पुंजल्या त्यानं । पुंजनी खरा..॥ यानं यवग..

॥ दहा इंद्रिये अकरावं मनं । बारा राशी बावसर गुणं ।
तेरवी सिध्दि साधली त्यानं । चौदावी पुरा..॥ यानं यवग..

॥ बारा रवी सोळा कला । सत्रावीचा आहे उजाला ।
यानं साधली जीवनकळा । सत्रावी पुरा...॥०४॥ यानं यवगं..

॥ सहा छत्तीस बत्तीस गुण । तेही साधवले यवग्यानं ।
यानं साधली सिदाई । बत्तीशी पुरा..॥ यानं यवग आणलं

॥ रज-तम सत्व तिनगुणं । चवथा शुध्द सत्व गुण ।
याहीनं साधवला चवथा खुम्म । साधकी खरा..॥०६॥ यानं..

॥ चव यवगाचा योगी खरा । चौथ्या खुम्माचा आहे जिव्हाळा ।
याहीनं बावशी आणली घरा । मोडनं हा, चौ-यांशी चा धुरा ॥०७

भजनं :- ॥ यवगी आला यवगाचा । हिशोब घेईन लहान्या-मोठयांचा ॥

गजर :- ॥ ओहंम् स्वयंम् झाला । माये संग खेळु लागला ।
अवतार सावंग्यात धरला । आंदवना घरी...
याहीचं सुमरन करता । वेद थकले चारही ॥



॥ ओवी नं. २९ ॥

॥ योग साधनेची ओवी ॥

## ॥ पहा हो जन..! जग भुलवलं याहीनं ॥

॥ पहा हो जन..। जग भुलवलं यानं ॥ घृ ॥

॥ आसन मुद्रा स्थापला मठ । सहा चक्राची पायवाट ।
तुर्या आणीक गोलाट । नवं हे ग्यानं..॥ .

॥ आधार चक्री दिला दाटा । पवन फिरवला उरफाटा ।
बंद केल्या इंद्रियांच्या वाटा ॥ पहा हो जनं...

॥ बावन्न मात्रुकांचा मेळा । जप लावला ईडा-पिंगळा ।
कळा साधल्या बारा सोळा ॥ पहा हो जन..

॥ केली यवगाची साधना । रज-तम सत्व गुणांची मांडणा ।
जंतर मंतर केला जप ॥०४॥ पहा हो जन..

॥ सा-या देवाची केली पुजा । साध्य केली भवानी शारजा ।
साध्य केला भुमंडळीचा राजा ॥ पहा हो जन..

॥ पारायण केले चारही वेद । सहा शास्त्रांचा केला निर्विवाद ।
सिध्दि आणली धरून ं ॥०६॥ पहा हो जन..
॥ भविष्याची केली गणना । जावुन बसले महावना ।
उपाय केले नाना साधना ॥ पहा हो जन..
॥ जप-तप अनुष्ठानं । विद्यामंत्र केले अनुष्ठाण ।
आकाश पंथी केले गमन ॥०८॥ पहा हो जन..

॥ सिध्दी साधली प्रवेश काया । गुप्त/गायप केली देहीची छाया ।
निरंजन अवतार झाला ॥ ०९ ॥ पहा हो जन..
॥ चौथ्या खुम्मी निरंजन । आदीभैस चतुर्पती नाम ।
अनामत ओळखा येथं, ओळखा खुणं..। चुकवन तो देहीचं मरण ॥१०॥

**भजने :- ॥ अनामत अवतार धनी । उभा सावंग्यातं ।**
**उभा सावंग्यात । अकाशमात याहीची उभी राहली ज्योत ॥**

## -: निरसनसह शब्दार्थ :-

**चार येश्या** : १. स्थुल २. सुक्ष्म ३. कारण ४. महाकारण या चार देही ने आत्मा वेष्टीला आहे. चार न चार घडी ऐसा हा चौ-देहीचा कोट जिवनपोवन राजा असलेल्या आत्माला दिला आहे. या आत्म्याला चार देहीच्या चार येशा ओलांडुन आपल्या केवळ स्वरूपात जायचे असते. या आत्म्याचे हे चौ-येशिचे एकच देहघर आहे. ज्याने चौ-देहीच्या येशि साधुन जो या येशीवरी गेला, त्यालाच कैवल्य देह प्राप्त झाला. तोच कैवल्याचा पुतळा रत्नार्नव झाला अमर पदी अमर झाला... अधिक ग्यान कायाखंड०३ मधुन घ्यावे. ।

**सहा** : षटविकार १. काम २. कोध ३. लोभ ४. मोह ५. मत्सर ६. अहं हे मनाचे षटविकार होयं. ।
**छत्तीस** : ३६ पवनाचे गुण । देह बाधक आहे याहीनं । ३६ कल्पना म्हणजेच माया ।
**बत्तीस** : ३२ पाखंड भरून आहे ३६ कल्पनानं. या कल्पना म्हणजेच मायेच्या पालव्या तोडाव्या लागते व चंद्र बत्तिशीचा मुद्या म्हणजेच दशईद्रिये मन बुध्दि आणी चार देह मिळुन सोळा व चंद्राच्या सोळा कला असे मिळुन चंद्र व्दारे हा ३२शी चा मुद्या पुर्ण झाल्यावर तेरवी सिदाई सिध्दी प्राप्त होते. ।

**दहा इंद्रिये** : १.नाक २.कान ३. डोळे ४. जिभ ५. त्वचा हे पाच ज्ञानंद्रिये आणीक ६. वाणी ७. हात ८. पाय ९.उपस्थ १०.गुदा हे पाच कर्मेद्रिये असे एकुन दशइद्रिये होतातं.
**बारा राशी** : सुर्याच्या बारा राशी या मोकळया । तार या देहीला । आता लागलो तुया चरणा सुर्याच्या बारा कला चे ग्यान कायाखंडातील ०३/०१:-मुळस्तंभिचा पाया व ०३/०५:-देहवर्णनाच्या ओवी किंवा ०२/०६:-द्युताचे मोती या ओवीतुन घ्यावे.

**तेरवी** : १३वी सिदाई ची सिध्दि । ज्ञानसुर्य १२ कलासिध्दिसह देहीत प्रकटल्या नंतर धनी उभा होवुन सिदाईची ही सिध्दि देतो. खरा योगी सुर्याच्या बारा कला सिध्दि पुर्ण । १३व्या सिध्दिठाई धनी उभा राहतो समर्थ । हा तेरावा सुर्य प्रकटला । पुर्णात पुर्ण आनंद मिळाला । ही तेरवी सिध्दि अवरत । धनी उभे आहे येथे समर्थ । जेजे बोलान तेते होईन बा इथं । या तेरव्या सिध्दिला मान । पुढे मग परमात्मा प्राप्तीचा परमानंदाची चव दाखवणारी चौदावी सिध्दि लागल्यावर होईन यवगाचे काम । **सोळा कला** :- चंद्राच्या कळा आहेत सोळा । याचे ग्यान ०३/०५:-देहवर्णनाची ओवी व ०३/०१:-मुळस्तंभिचा पाया किंवा खंड०२/०६:-द्युताचे मोती या ओवीतुन घ्यावे. चंद्राच्या आहेत या सोळा कळा । या सोळा कला प्राप्त झाल्यानंतर सत्राव्या जिवनकळेत उभा होतो धनी समर्थ । सोळा कलाचा मन चंद्र झाला । सत्राव्या जिवनकळेत धनी आला । १२ जरी १६ आल्या एका दांडा । सत्रावीला ठाव योगी झेंडा ।

सहा चक्रे, तुर्या, गोल्हाट स्थान, सहा चक्रावरील बावन्न मातृका, इडा पिंगळा सुषम्ना नाडीयॉ, १२ रवी, १६ कला..:- याचे अधिक ग्यान कायाखंड ०३/०१:- मुळस्तंभिचा पाया व ०३/०५:-देहवर्णनाची ओवी यातुन घ्यावे.

॥ सिध्दि साधली प्रवेश काया । गुप्त केली देहीची छाया ॥

या चरणाचे ग्यान कृष्णामृत मध्ये दिलेल्या गायपाच्या खेळाच्या ग्यानामध्ये दिलेले आहे. तेथुन ते घ्यावे.



॥ ओवी नं. ३० ॥

॥ योग साधनेची ओवी ॥

## ॥ लंबी लंबी हात पाय ॥

॥ लंबी लंबी हात पायं । नार ती कैशी आहयं ॥ घृ ॥

॥ मुखी दरवाजे किती आहे । मुखात दाटलं अभाळं आहे ।
नाका वाटे जत्रा वाहे । बेंबी वाटे हत्ती जायें ।
नार ती कैशी आहे ? तुम्ही जाणुन नयनाशी घ्यावे ।
कितीक लहानशी आहे । सांगतो तिला पाहयें ॥
॥ नारीचा कणगी एवढा गळा । नारीचा चाका एवढां डोळा ।
मणभर काजळलेली एकवेळा । गोणीभर कुंकुलेली कपाळा ॥
॥ नारीची नांदी एवढी आरती । नारीचा चंद्राएवढा भिंग ।
नारीच्या कोण होता संग । नारीच्या जीवाचा जिवलग ॥
॥ एकविस स्वर्ग नारीची वेणी । नारीची भाल्या एवढी फणी ।
नारीचा कोणं होता धनी ? नार ती कैशी आहयं ? ॥

॥ अठरा बिंडयाचं लुगडं । नारीचं अर्ध आंग उघडं ।
उपरीत लावलं घरदार । नार ती कैशी आहयं ? ॥
॥ बिन पुरूषाहुन नार गर्भार । नारीला झाले अठरा लेकरं ।
अठरा/तिनं लेकरांची राणी । नारीचा कोणं होता धनी ? ॥
॥ माय बाप देखता जन्मला । सासु सासरा पैदा केला ।
पैदा केला आजा । पण आजा कामी लावला ॥

भजनें :-

॥ आधी जन्मलं बाळ । मग जन्मली बाळाची माता ।
तिच्याच पोटी भ्राता जन्मला । तोच तिचा पिता झाला ॥
॥ साळुमाय आली सदा रंगणी । साळुमाय आली सदा अंगणी ।
साळुमाय आली सदा अंगणी । साव पसरला गगनी ॥

॥ साळु माय आली सावंग्यावरी । हे होय कृष्णाची नगरी ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ ओवी नं. ३१ ॥

॥ योग साधनेची ओवी ॥

## ॥ सांगता हो जायें..! गाय चतुर्पता गायें ॥

॥ गाईच्या गळयात होती सरी । फास्यामध्ये फासे चारी ।
एका फास्यात पृथ्वा सारी । सांगतो जायें.. ॥ घृ ॥
॥ गाईचा भेद पुसतो तुला । किती रंग या गाईला ?
किती शिंग ईच्या अंगाला ? गाईचा जन्मं कोठे झाला ?
ईचं बाळ दाव आम्हाला । सांगतो जाये..
॥ ऐशी गाय दयाहो दावुन । पाच पाय बारा थानं ।
ईच्या ओव्याशी बारा थानं । चारा चरे दोहीकडुन ।
पाणी पिये शेपटाकडुन । गाय दोहली त्या ब्रम्हयांन ॥
॥ गाय म्या पाहली जोरा वारं । गायीनं गिळला सप्तसागरं ।
गिळला इंद्र चंद्र परमेश्वरं । सागतो जायं आहो जायें..॥०४॥

भजने :-

॥ बिन पायाची गाय । गाय यवगावर उभी आहयं ॥
॥ तिन पायाची गाय । अठरा खुम्मी उभी आहयं ॥





॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥






॥ काया खंड ०३ स्तंभित ॥



॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ चतुर्पता अथर्वन् वेद उभा राहीन पोटी । निजरूप भुम्मा जागी करन सारी सृष्टी ॥

# चतुर्पता
# ॥ अथर्वन् वेद ॥






## शब्दार्थ, चरणार्थ निरसन स्पष्टीकरन सह






www.chaturpata-atharvan-ved.com

॥ खंड ०४ ॥

॥ ओवी नं. ०१ ॥

ओवी महात्मः- जागृती/स्थापनेच्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी..

॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

## ॥ ढाकुल नामी शकुन सांगतो ॥

या ओवीच्या काही चरणांचे पलट चरणे खंड०७/ओवी-१६ मध्ये दिलेले आहेत.

॥ ढाकुल नामी, शकुन सांगतो । विठ्ठल नामी राहावं/जागारें बा ।
आकाश वाणी, गर्भी द्युत । पृथ्वी वरत होणार बा ॥घृ॥
॥ धन्य सद्गुरू, योगी मुर्ति । भजनी पंथी राहाव/लागा रे बा ।
अलक्ष्य ग्यान, या अहिनाशी । अक्षय/मोक्ष पद मागावं बा ॥
॥ गर्भि सिध्द, बोलुन आहे । बहुत नाश होणार बा ।
असत्याच्या, राशी सत्य । राई इतके नसणार बा ॥
॥ विपरीत बुध्दि, विनाश काळ । संत छळण्या होतीन बा ।
मिथ्था वाद, दर्शन सहा । कठिन कर्म करतीन बा ॥

॥ जप-तप, क्रिया-कर्म । स्नान-संध्या भुलतीन बा ।
अस्तुरी-पुरूष, लंपट भारी । विषया डोही डुबन बा ॥
॥ जैन मती, क्रिया-भ्रष्ट । जीव हत्या करतीन बा ।
लिंग देही, शिव भक्त । कडया कंदो-या करतीन बा ॥
॥ दील दार हिंदु मुसलमान । हेही एक उदिम करतींनं बा ।
दुरले पापी, चांडाळ रूपी । त्याहीचा शेक सरन बा ॥
॥ अभक्त हिंदु, तुर्क मुसलमान । उदो-उदो करतीन बा ।
शड्/छेड कर्म, वैश्य ब्राम्हण । दावन मुलखा जातींनं ॥०८॥

॥ ब्राम्हण क्षत्रिय वैश्य शुद्र । एकच वर्ण होतीन बा ।
म्हणुन दुरले/दुर्वे, मिर्त लोकी । याच मार्गि येतीन बा ॥०९॥
॥ धर्म हारतीन, कर्म मुर्रतीन । खंडो-खंडीचे राजे बुडतीन बा ।
धर्म तारकी सिध्द राजा । एक खेत्री तारणं बा ॥१०॥
किंवाः- धर्म हारतींनं तेव्हा सिध्द राजा । एक खेंत्री तारण बा ॥

-: ओवीमधील भजने :--.

कृता यवगाचे धर्म न्याती-गती :-
॥ धर्म करता कर्म हर्ले/झाले । बळी पाताळी घातले ॥
॥ धर्म बळीने केले । त्याला विष्णुने पाताळी घातले ॥
॥ धर्म शंकराने केले । त्याला कैलाशी पिटलें । ते कैलाशी गेले..
॥ धर्म हरीश्चंद्राने केले । डोम्या घरी पाणी भरले ॥
त्रैता यवगाचे धर्म न्याती-गती :-
॥ धर्म परशुरामानं केलें । त्याला कोकणी पिटलें ॥
॥ धर्म रामानं केले । ते वनवाशी गेले ॥
॥ धर्म जाणकीने केलें । तिला रावणाने नेले ॥
व्दापर यवगांचे धर्म न्याती-गती :-
॥ धर्म पाचही पांडवानं केले । ते वनात लपुन बसले ॥
॥ धर्म कर्णाने केलें । त्याचे रणी/रणात घात झाले ॥
॥ धर्म चांगुणाने केले । बाळ भोजनाशी दिले ॥
॥ ऐश्या धर्माच्या न्याती । ऐश्या कैश्या झाल्या धर्माच्या गती ॥
॥ ऐश्या धर्माच्या गती । भंग आला पृथ्वीशी ॥
॥ ऐश्या धर्माच्या खुणा । ऐका हो गुणीजना ॥
॥ ऐसा धर्म जाईन उडुन । राज भैसाचं येईन/होईन ॥

॥ आज आज म्हणता उदया । एक, वायु सुटनं बा ।
पहाड-पर्वत, मेरू शिखर । अंम्मल पद उडण बा ॥
॥ जेजे दिसे, तेते नाशे । चंद्र-सुर्य बुडतीन बा ।
तिन ताळ, चौदा भुवन । अंधःकार पडन बा ॥
॥ पुर्व-पश्चिम उत्तर-दक्षिण । दहाही दिशा हालतीन बा ।
सत् लक्ष्य, योजन बारा । एकच महाराज तारण बा ॥
॥ गंगा यमुना, काशी तिर्थ । सप्तही सागर आटन बा ।
हरीहरी ब्रम्हया ! सद्गुरू मुर्ति योगी महाराज तारण बा ॥१४॥

**भजनें** :- ॥ ऐका ढाकुलशाची वाणी । चित्त लावुनी, मन लावुनी ।
नवल होईन हो । नवल होईन तिर भवनी ॥
॥ ऐका ढाकुलशाची वाणी । चित्त लावुनी, मन लावुनी ।
गर्जना होईन हो । गर्जना होईन तिर भवनी ॥

## -: निरसनसह शब्दार्थ चरणार्थ निरसन/स्पष्टीकरन :-

**ढाकुल** :- सर्वात लहान असलेला, लहाणाहुन लहाणपण घेवुन राहीलेल्या सर्व जनातुन सर्वात लहानपण घेतलेला कृष्णा. उदा. लहानपण नाही धरलं कोणं । लहानपण धरलं भगवंतानं । जसे ऋषिश्वरांच्या बसविल्या पंगती । भोजन वाढती कृष्णराया । पंगतीचे पान उचलले देवानं । धरलेसे लहानपण कृष्णदेव रायानं । दामाजी साठी हे विठु झाले महार । पोत घेवुन गेले डोहीवर । जावुन उभे राहीले सव्वा प्रहर... ऐशी ढाकुलता /लहानपणता धरली या देवानं । **शकुन** :- परमात्मा नामी राहुन, स्वस्वरूपी आत्माराम जागृत झाल्यावर शुभ-अशुभ काय घडणार ?...ईत्यादी निराकार परमात्मा ची सांगी तो निगुर्ण आत्मा ऐकतो. *॥ सांगते निराकार । आयकते निगुर्ण ॥ खंड०५/३२* देह हा सगुण तर आत्मा हा निर्गुण ! देह हा आकारी तर परमात्माचा तेजोगुणी अंश असलेला परमात्माचा अंश अवतार आत्मा हा निराकारी ! त्याचाच तो निराकार परमात्मा ! निराकारी परमात्मा मुक्ष्य सांगनं त्यांचाच तो तेजोगुणी अंश अवतार निगुर्ण आत्माराम ऐकतों. निराकार कृष्णाव्दारे सांगी सांगणारे आउक यवग त्यांच्या देहघरी उभे होते. *अधिक ग्यानासाठी खंड०५/६५:-सत्य जाणा या ओवीचे शब्दार्थ वाचावे.* ऐसे परमात्मा मुखचे निघालेले अंर्तआत्माने ऐकुन, अंर्तआत्म्याच्या आवाजाव्दारे देहीला संदेश देणारे हे शकुन दोन प्रकारचे असतात. १. चर शकुन २. अचर शकुन. यापैकी चर शकुन हे तत्काळ फळ देणारे असतात तर अचर शकुन हे समोरील येणा-या काळाचे दर्शन घडवणारे, भविष्यकाळी फळ देणारे असतात. या अचर शकुनालाच भाकलं म्हणजे भविष्य असे म्हटले आहे. । **गर्भि** :- मध्य भागी असलेला, गर्भावस्थेतच परमात्माकडुन ग्यान प्राप्त केलेला उदा. अभिमन्यु याने गर्भावस्थेतच चक्रव्युह भेदाचे ग्यान श्रीकृष्ण परमात्म्याकडुन प्राप्त केलेले होते. पुर्वजन्माच्या संचिताव्दारे गर्भातच पुर्विच ग्यान सिध्दि ईत्यादी भगवंताकडुन प्राप्त झालेले गर्भि सिध्द द्युत । **अलक्ष्य ग्यान** :- मानवाच्या बुध्दिपल्याड असल्यामुळे मानव ज्याचं लक्ष्यच साधु शकत नाही, असे अनुभव संपन्न अहिनाघरचे ग्यान । **अक्षय पद** :- ज्याचा क्षय अथवा नाश किंवा -हास होत नाही असे पद ।

## ॥ निरसनसह ढाकुल नामी ॥

-: चरण १,२,३ चे निरसन :-

आध्यात्मीक विश्वात लहानाहुन लहानपण घेवुन राहीलेले/असलेले जे गर्भि सिध्द भक्तगण आहेत, त्या सर्वांचा बादशाहा हा विठ्ठल आहे. कारण की : जे लहानपण घेवुन राहीलेले सिध्द भक्तगण आहेत/झालेत, त्यांच्या पेक्षाही ढाकुलता म्हणजे लहानपणता या श्रीकृष्ण विठ्ठलाने वेळोवेळी भक्तांचा चाकर बनुन घेतलेली आहे. त्या कृष्णरायाने पंगतीचे पान उचलले. कुठे पोते डोहीवर नेले...ईत्यादी कर्मे व्दारे भक्तांसाठी लहानाहुन लहानपण घेतलेले आहे. म्हणुनच या श्रीकृष्णराया विठ्ठलाला ढाकुलशाहीचा म्हणजेच लहानाहुन लहानपण घेवुन राहीलेले भक्तगण, आध्यात्मीक राजे, महाराजे, ईत्यादीं चा

बादशहा असे म्हटलेले आहे. हा बादशाहाच खरा ढाकुल होय. म्हणुनच ईथे विठ्ठलास ढाकुल असे संबोधले आहे. या ढाकुल च्या नामी म्हणजेच विठ्ठल नामी राहुन, त्याच पुर्ण अवतार कृष्णा च्या मुखातुन निघालेला शकुन सांगतो की : तुम्ही आता या विठठ्ल नामी राहावं बा ।

कारण की : ज्यांना गर्भावस्थेतच पुर्विच्या संचिताव्दारे ग्यान सिध्दि ईत्यादी भगवंताकडुन प्राप्त झालेले आहेत. या प्राप्त ग्यानाच्या भरोवश्यावर आध्यात्मीक विश्वात पुढे पुढे चालत जावुन, या आध्यात्मीक विश्वाच्या गर्भात म्हणजेच मध्यभागी आलेले आहेत. असे आकाशवाणी विशाल अलिप्त अनंत ग्यान सिध्दि प्राप्त झालेले योगीजन पुढे गर्भि द्युत बनुन, या चतुर्पती विठ्ठल नामी पृथ्वीवर होणार आहे बा ! म्हणुनच कृष्णा सांगी करतो की : हे सद्‌गुरू मुर्ति ! योगीपंथी सच्चे भक्तगण हो ! तुम्ही या चतुर्पती कृष्ण अवधुत पंथी म्हणजेच चतुर्पती विठ्ठल पंथी आता राहावं बा ! असे सांगण्याचे कारण की : ज्याचें लक्ष्यच तुम्ही साधु शकले/शकत नाहीत. जे मानवाच्या मर्यादित बुध्दिच्या पलीकडे आहे. त्रिगुणातीत म्हणजे तिरगुणांच्या पलीकडचे आहे. असे अहिनाघरचे अहीन अजात परमात्म्याचे अलक्ष्य ग्यान या पंथी अहीन कृष्णरायाने सांगी करून ठेवलेले आहे. तो निरंजन स्वरूपी अहीन हे त्याचे मुळ ग्यान आपल्या सच्च्या भक्तांना भेटी देत वाटत आहे. म्हणुनच सांगी आहे की : सच्च्या भक्तांचा, गर्भिद्युतांचा...ईत्यादी सच्च्याजनांचा तो अहिन परमात्मा हाच कर्ता, करविता आणी बुध्दिचा दाता होय. हे मुळावरचे अक्षय चतुर्पती ग्यान सह सर्व काही प्राप्त करण्यासाठी, तुम्हीसुध्दा ज्याचा क्षय होत नाही अश्या अक्षयी परमात्माला नित विनवत, ज्याचा क्षय होत नाही असे अक्षय पद मागावं बा ! असेच अक्षय पद मागत या चतुर्पती कृष्ण अवधुत पंथी म्हणजेच चतुर्पती विठ्ठल पंथी राहावं बा !

या चतुर्पती विठ्ठलाच्या ठाकुलशाहीतील एक कृष्ण गर्भि सिध्द बोली बोलुन बोलला आहे कीः समोर कलीमुळे बहोत नाश होणार बा ! या कलीत सत्याच्या पत्रिकेचा खोज कोणास राहणार नाही. त्याचमुळे या कलीत खोटे बोलनं, खोट चालनं, इमान शुध्द न राखने, दुजा भाव, दोहीत म्हणजेच दोन दोन स्वहीत ठेवणे....ईत्यादी असत्यांच्या राशी चा ढीग चे ढीग राहणार बा ! या कलीत कोणी नाही कोणाचं ! अवघा हा लटका/असत्यांचा संसार राहणार बा ! या असत्याच्या राशी मध्ये सत्य हे राई ईतक नशिबानच सापडेल बा ! ज्या ठाई सत्य असेल त्या ठाईच तो परमात्मासुध्दा राहत असल्यामुळे, तो सुध्दा राई इतक्या नशिबबान भक्तांनाच भेटेन बा ! कारण की : ज्या ठाई सत्य भाव नाही, त्या ठाई परमात्मा उभा राहत नाही. जिथे परमात्मा उभा नाही, तिथे सद्‌बुध्दि नाही. तर मग प्रज्ञा बुध्दि कुठुन येणार ? जिथे सच्चा भाव भक्ती व सद्‌बुध्दि नाही, तिथे परमात्मा उभा राहत नाही. तर मग त्या विपरित बुध्दिचे काठी विनाश काळ असतो.

॥ विपरीत बुध्दि, विनाश काळ । संत छळणा होतीन बा ।
मिथ्था वाद, दर्शन सहा । कठिन कर्म करतीन बा ॥

जिथे असत्य भष्टाचार, अधर्म असते, तिथे तो परमात्मा उभा राहत नाही. त्याचमुळे भष्टाचारी जवळ तो परमात्मा कदापि राहणार नाही. तसेच असत्याला भजणारे मिथ्थे, खोटारडे दर्शनीय वेष घेतलेले मिथ्थेभक्त, मिथ्थेसंत, मिथ्थेसाधु..ईत्यादी यांच्या जवळ सुध्दा तो परमात्मा कदापि उभा राहणार नाही. सत्‌बुध्दिचा दाताच त्यांच्याजवळ नसल्यामुळे त्यांची विपरीत बुध्दि होईल. विपरीत बुध्दि ही विनाशकाळ ला जवळ ओढवुन घेतीन. या विनाशकाळी विपरित बुध्दिने सहाशास्त्र, अठरापुराण, सहादर्शन शास्त्रे ईत्यादीचा विपरीत अर्थ काढुन जनात कलह निर्माण करतीन बा !

या कलहामुळेच सामान्य जनलोक कोणतं घेवु ? कोणतं ठेवु ? या व्दिधा मनस्थीतीत जावुन विचारात पडतीन बा ! या सामान्य जनलोकांच्या व्दिधा मनस्थीतीचा फायदा घेवुन, हे मिथ्थेजन सहाशास्त्र अठरापुराण गिता भागवता सहादर्शन शास्त्रे.....ईत्यादी वर मिथ्था वाद करून, सच्च्या संत जनांच्या छळण्या करतीन बा ! सच्या भक्त व संतांची विनाकारण छेड काढुन त्यांच्या छळण्या करतीन बा ! जप तप सत् कियाकर्मे स्नान संध्या हरीपाठ ईत्यादी भुलुन कठिन महाकठीन पापकर्मे करतीन बा !

॥ जप-तप, किया-कर्म । स्नान-संध्या भुलतीन बा ।
अस्तुरी-पुरूष, लंपट भारी । विषया डोही डुबन बा ॥०४॥

या कलीत जप-तप, वैदिक, आध्यात्मीक कियाकर्मे, सकाळचे स्नान, संध्याकाळची संध्यापाठ, मानव प्राण्यांचे शिष्टाचार....ईत्यादी सत्संस्कार जन भुलतीन बा ! सत्संस्कार, सुसंस्कारांचे पतन व -हास यामुळे बहु लोक कुसंस्कारी होतीन बा ! विषयाचे चिंतन करू लागतीन. विषय वासना च्या ठिकाणी आसक्ती ठेवतीन. आसक्तीतुन अनेक वाईट ईच्छा त्यांच्यात उत्पन्न होवु लागतील. आणी त्या ईच्छा पुर्तता न झाल्याने त्या अपुर्ण ईच्छा त्यांच्यात कोध उत्पन्न करेल. या कोधापासुन अविचारी प्रवृत्ती त्यांच्यात निर्माण होईल. या अविचारातुन स्मृतिभ्रम होईल. स्मृतिभ्रमातुन बुध्दिनाश ! आणी बुध्दिनाशातुन स्वतःचाच विनाश करणा-या विषयभोगी इंद्रियांच्या विषयात स्वैर संचार करत हे कुसंस्कारी जन विषयभोगी होतीन. अश्याच प्रकारे कुसंस्कारी अस्तुरी सुध्दा घडेल. आणी आपले शिल सोडुन देतील बा. ! ऐसे कुसंस्कारी स्त्री-पुरूष विषय भोगी होवुन भारी लंपट होतीन. हे स्त्री-पुरूष भ्रष्ट चरित्रांचे असल्यामुळे, यांच्या भ्रष्ट वर्तवणुकी व्दारे ते बाकीच्यांनाही भ्रष्ट करतील. भ्रष्ट वर्तवणुकीने केलेली कितीही चांगली किया कर्मे शेवटी भ्रष्टच होतात. या सुक्ष्म नियमाला अनुसरून त्यां भ्रष्टाचा-यांचे सर्व कार्य भ्रष्ट होवुन त्यांच्यात नैराश्य, अशांती येवुन त्यांची बुध्दिभ्रष्ट होईल. भ्रष्ट विचार भ्रष्टाचार याने त्यानां अशुभ फलप्राप्ती होवुन ते कियाभ्रष्ट होतीन.

नदिच्या पात्रातील डोह ज्याप्रमाणे आपल्या मध्ये येणा-या प्रतेक वस्तुस घुमवत घुमवत आतमध्ये नेवुन डुबवतो, त्याप्रमाणे या भवसागरात विषयरूपी डोह या कलीत निर्माण होईन. हा विषयरूपी डोह त्याच्या जवळ आलेल्या भ्रष्टाचारी विषयभोगी भारी लंपट स्त्री-पुरूषांना त्याच त्याच विषयात घुमवत घुमवत आतमध्ये नेवुन डुववत राहीन. ते सर्व अस्तुरी पुरूष लंपट भारी या विषयाडोही डुबुन राहतीन बा ! जिवहत्या करतीन बा !

॥ जैन मती, किया-भ्रष्ट । जीव हत्या करतीन बा ।
लिंग देही, शिवचे भक्त । हेही कंदो-या करतीन बा ॥
॥ दील दार हिंदु मुसलमान । हेही एक उदिम करतीनं बा ।
दुरले पापी, चांडाळ रूपी । त्याहीचा शेक सरन बा ॥ ०८ ॥
॥ अभक्त हिंदु, तुर्क मुसलमान । उदो-उदो करतीन बा ।
शद्/छेड कर्म, वैश्य ब्राम्हण । दावन मुलखा जातीनं बा ॥

ज्यांची मती म्हणजे बुध्दि ही अहिंसा तत्ववादी आहे, अश्या लोकांची मती भ्रष्टाचारी मासांहारी लोकांच्या मिथ्था वादामुळे डळमळीत होईन. त्यांच्या बुध्दिला अनेक फाटे फुटुन तेही कियाभ्रष्ट होतील. काही अहिंसावादी जैन व शिवभक्त तसेच गळ्यात लिंग धारण करून कपाळावर रेखा ओढणारे लिंगदेही यांची मती ही मिथ्था वाद करणा-या भ्रष्टाचारी जनांच्या मागे लागुन भ्रष्ट होईल. आपली मुळची अहिंसावादी, शिव-लींग वादी मती भ्रष्ट झाल्यामुळे, असे मतीभ्रष्ट लोक मांस भक्षणाकरीता जिवहत्येचा आधात्मीक पर्याय व कारणे

शोधु लागतील. त्यानां हा पर्याय अन्य धर्माच्या कंदोरी या पुंजनपध्दतीमध्ये सापडेल.

'कंदोरी' या पुजंनपध्दतीमध्ये प्राण्यांची झेंडयासमोर पुजा वैगरे करतात. त्या प्राण्याला सोबत घेवुन झेंडयाला प्रदर्क्षणा घालतात. आणी त्या प्राण्यांचा बळी झेंडयासमोर देतात. बळी दिलेल्या प्राण्यांचे मासं शिजवतात. हे मास त्यांच्या देवासमोर नैवद्य ठेवुन, आपला नवस ते कंदोरी करणारे फेडतात. व राहीलेले मांस प्रसाद म्हणुन भक्षण करतात.

अहिंसावादी जैन मती असलेले काही भ्रष्टाचारी जैन, शिवांचे भक्त असलेले काही भ्रष्टाचारी शिवभक्त, लिंग धारण करणारे काही भ्रष्टाचारी लिंगदेही ..ईत्यादी भष्टाचारी कियाभ्रष्ट मतीभ्रष्ट झालेले जनलोक हे मासं खाण्याच्या कारणास्तव कंदोरी या पुंजनपध्दतीकडे वळतीन बा ! नवस करून नवस फेडण्याकरीता कंदो-या करून, आपली मासं भक्षण करण्याची ईच्छा तृप्ती करतीन बा ! भष्टाचारींच्या अश्या कंदो-या करणा-या कर्मामुळे गरीबातील गरीब मुसलमान तसेच दानातील दान देणारे दानशुर मुसलमान यांच्या या कर्माला प्रेरणा देतीन बा ! नित प्रोत्साहन देतीन बा ! त्यांच्या कर्माचा उदो उदो करतीन बा ! कंदोरीचा प्रचार करतीन बा ! त्यांच्या प्रसार प्रचाराच्या उदो-उदो मुळे छेड काढुन षटकर्म करणारे, वरच्या वर्गातील वैश्य ब्राम्हण हे सुध्दा बळी पडतीन बा ! हे सर्व भष्टाचारी पोटाचे लालची जन जिथे कंदो-या मोठया प्रमाणात होतात, अश्या पुढे होणा-या दावण मुलखा जातीन बा !

अभक्त असलेले काही हिंदु व तुर्कस्थानचे काही तुर्क मुसलमान एकत्र येवुन एक मोठा उदिम म्हणजे मोठे व्यापारी प्रायोजीतीकरण करून, या विनाकारण छेड काढुन छेड कर्मे करत छळण्या करणारे सह काम कोध मद मोह मत्सर व अंहकार या षटविकारीकर्मे करणारे, तामसी,... ईत्यादी विषयाडोही यात डुबलेले दानव प्रवृत्तीच्या भष्टाचारी लोकांना दावन मुलखा नेतीन. हे सर्व दानव प्रवृत्तीचे दानव मुलखा गेल्यामुळे, पुढे मग त्यां दुर्जन पापी चांडाळरूपी लोकांचा ताप कमी होईल. त्यांचा शेक सरन बा ।

॥ धर्म हारतीन, कर्म मुर्रतीन । खंडो-खंडीचे राजे बुडतीन बा ।
धर्म तारका सिध्द राजा । एक खेत्री तारणं बा ॥०९॥
किंवाः- धर्म हारतीनं तेव्हा सिध्द राजा । एक खेंत्री तारण बा ॥

जे जनलोक स्वतःचा मोठेपणा दाखवण्यासाठी स्वार्थ, दोहीत सत्ताधिकार, लालच, अंहकार, मी-मी पणा ईत्यादी ठेवुन धर्मकर्मे व धर्मपालन करतीन, त्यांचे ते कर्मे हारतील बा. विफल होतील बा । कर्मे अपयशी होतीन बा ! कारण की : धर्माचे पालन व धर्मकर्मे.. ईत्यादी हरीकर्मे हे फलाची आसक्ती न ठेवता, स्वतःच्या कर्तव्याची बाब म्हणुन करावे लागतात. आणी त्याचे फळ हे भगवंताला अर्पण करावे लागते. तेव्हाच त्या कर्माचे चांगले-वाईट दोष लागत नाही. परंतु असे न करता अंह व स्वार्थिपणा करून जर कोणतेही कर्म केलेत, तर ते कर्माचे बरे वाईट परिणाम येवुन ते कर्मे हारतीन बा ! ते कर्म विफल होतील बा ! ते कर्मे अपयशी होतीन बा ! अश्याच स्वार्थि व अंहकारी कर्मामुळेच देशो-देशीचे राजे यांची राजपदवी जावुन, ते स्वार्थि अंहकारी राजे महाराजे डुबतीन बा !

आणी मग कली अंती पृथ्वीवर एक खेत्री/ठिकाणी एकच महाराज येवुन, तो महाराज मग सर्वत्रास तारण बा ! परंतु तो तारणहार येण्या अगोदर त्याच तारणहाराने येथे सांगी केलेल्या चरण ०९ ते १४ च्या घटना घडणार आहेत.

**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०४ ॥

॥ ओवी नं. ०२ ॥

ओवी महात्मः- जागृती, स्थापना च्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी..

॥ मुळावरची ओवी ॥

# ॥ कैकु-कैकु शकुन ॥

॥ कैकु-कैकु, शकुन राया । सांगे तुम्हाला ।
उरल्या देहीचा, शकुन माझा । मान्य करा ॥
दुरल्या देशीचा, शकुन माझा । मान्य करा ॥ घृ ॥ ०१ ॥
॥ बत्तीस लक्ष, गम केली । यवगाचे गुणं ।
कल यवगी, महा भारी । सत्य सांगे शकुन ।
या शकुनाचा, प्रकाश पुढे । घ्या तुम्ही ओळखुनं ॥
॥ हाच बरा, हाच बरा । एक वाईक बोलतो ।
मिर्त लोकी, तिर लोक्याचा । शकुन सांगतो ।
निर्गुणाचा, तार धरा । सारा भ्रम सांगतो ॥
॥ बत्तीस लक्षाचे, गुणं मी । सांगतो दादा ।
नासलं तिरभवनं, नाचला हो । यवगाचा राजा ।
महा महा योगी लपुन । राहीले दादा ॥०४॥

॥ झुटे सिध्दं, झुटे साधक । झुटं यवग ।
राजा तैशी प्रजा । सत्य, नाही जराभरं ।
असत्याच्या, राशी एक । धनी राहु मोडणं ॥ ०५ ॥
॥ यवगा परी, भ्रांत सारी । निजरूपी झालो ।
काया-माया, लुटीत गेली । अवघं विसरलो ।
आलं-गेलं, ठाव आहे । धनी येशकराले ॥
॥ नव्हतं आकाश, नव्हतं धरणी । नव्हतं पाणी-पोहनं ।
कैची/कहीची माया, कैची छाया/काया । कहीचा निरंजन ।
क्षिर सागरचा, शेष राया । नव्हता दिगांबर ॥
॥ नव्हती रात्रा, नव्हता दिन । नव्हतं देह-भान ।
तिन ताळ, नव्हतं देखा । मेरू मंडयानं ।
घनन घन, घनकार होता । आदीरूप-शकुनं ॥०८॥

॥ शकुन निघाला, मुक्ष्य बोलला । निर्गुण स्थापला ।
तिरगुणांच्या, पोटी खेळ हा । पाखंडाचा झाला ।
नाश झाला/केला तिरभवनी । देव नाही ओळखला ॥
॥ विर्जन टाकुन, भुम्मा स्थापली । आधार शकुनाचा ।
किर्तित आणुन, प्रित केली । का भुलला सोसा ?
नाही ठेवला, ठिकाणा । देह-जीव, पडला सुना/जाणा ॥
॥ बत्तीस लक्षाची गणीता । यवगाची केली ।
होती-नव्हती, नाही दिली । कोणाच्या ही हाती ।
तिन ताळाची किल्ली घेवुन । धनी उभा येथी ॥
॥ बत्तीस लक्ष, भक्ती दादा । गेली सुन्यात ।
महा महा, भक्त्या झाल्यात । माझ्या देखतं ।
भक्ती झाली निष्फळ । हे व्हय, यवगाची गतं/गणित ।

॥ दुरल्या देशी, माझं ठाणं । सत्य वचनं ।
या ठाण्याची, कैकु शकुन । घ्या मज ओळखुनं/ऐकुनं ।
मिर्त लोकी, बाजार भरला । चौ-यांशी गुणं ॥१३॥
॥ रूपावंती, माता माझी । आहे सत्वधिरं ।
ईचीच कन्या, मी चिरंजीव । मोक्ष्याचं घरं ।
प्रभु माझा, बाप होय । हेच, माझं माहेरं ॥
॥ यवग गेले, यवगं आले । उभी मी यवगाले ।
नव्यांनउ, राम माझ्या । देखतां झाले ।
उरला राम, तो धनी माझा । तारण देहीले/अवघ्याले ॥
॥ असंख्यात, ब्रम्ह ऐसे । होवुन गेले ।
कोटयानं कोटी, विष्णु दादाहो । कईक पाहीले ।
गंगे मध्ये, कंकंर थोडे । इतके शंकर पाहीले ॥१६॥

॥ अष्ट गण, अष्ट भैरवं । माझ्या देखतां झाले ।
ऐसे चंद्र-सुर्य दादा । कहीक पाहीले ।
छप्पन्न कोटी, यादव उभे । राहतीन यवगाले ॥१७॥
॥ शकुन खरा, शकुन दादा हो । आली कैकुं ।
निर्गुणाच, राज आहे । तरी जीव चौ-यांशीत ?
पुर्विच आयुष्य कुडीला । होत, लाखा-लाखातं ॥
॥ पुर्विच आयुष्य कुडीला । होत लाखा-लाखात ।
त्याहीच्या, देह पिंडाला । तेव्हा नव्हता घातं ।
कली लागता, गतकली पासुन । बहु झाला घातं ॥
॥ अडीच या रेताची कन्या । पाळण्यातं बोलनं ।
पाचं या वर्षाची कन्या । भ्रतार न्याहारनं ।
सात या वर्षाची नार । गर्भार येईनं ॥२०॥

॥ शंक वर्ण, शंकाचारीयॉ । अवतार येईनं ।
मुळस्तंभाचे, फळ राया । शेंडयां वर येइनं ।
सव्वा सहा महीने त्याचा । परिमयं चालनं ॥
॥ अठरा या, वर्षाचा नंद । अवतार येईनं ।
सव्वा सहा, महीने याहीचा । विनवाद चालनं ।
तोच करण, प्रतिपाळ । तोडन, चौ-यांशी बंधनं ॥
॥ सतरा या, वर्षाची साळु । बाहेर निघनं ।
चवही दिशा, न्याहारून पाहीन । भ्रतार न्याहारनं ।
या दोघाचं, बोलनं । योगा, सृष्टीवर होईनं ॥
॥ महा महा, ऋषि याहीला । भजुन राहतीनं ।
सानीध्य नेमधा-या गर्वा । खाल्या होतीनं ।
नाही तत्वांची, सुद । प्राण्या, याल कोठुन ? ॥२४॥

॥ थोर थोर, दादा एक । नवलं होणारं ।
एक मेदनी, पाणी बरसन । मुसळाची धारं ।
चौ-कोणी, मेघ बरसन । निळावंती रंग ॥
॥ फार फार, दादा एक । वायु सुटनं ।
पहाड पर्वत, उडुन जातीन । मेरू शिखरं ।
मोठे मौठे, वृक्ष दादा । गगणी फिरणारं ॥

॥ सहाही दर्शनाची राया । सत्ता उडवनं ।
अकाश मात, द्युत राया । याहीच्या वर गाजनं ।
उभा राहीन, अवधुत । त्याहीची पुस घेईनं ॥
॥ सहाही दर्शन, मिळतीन हो । पवनां आधारं ।
वर अग्नीचा, डोह होईन । लाही फुटणारं ।
पहाड-पर्वत, जळुन दादा । चुना होणारं ॥२८॥
॥ या मध्ये, तरण उपाय । कैसा होईन ?
लाखो लाखे, सिध्द राया । उभे करनं ।
लाखो जीवांचा, तरण उपाय । याहीच्या हाती होईन ॥
॥ शुन्य उडवन, धनी । सारं, निरसुन टाकणं ।
साडेतीन दिवसाची, होईन गणीता । रात्रं होईनं ।
रात्रीचे गुण, भुम्मा निजरूप होईनं ॥
॥ या मध्ये, वापर करतीन । हे मानव विर ।
जागी राहुन, पाहतीन त्याहीचं । धन्य नशिब थोरं ।
त्याचं दिवशी, देहे-जीवांचे । बहु होतीन बरं ॥
॥ मुळस्तंभाचा, शकुन आला । चवथ्या खुम्मी ।
सत्य वचनी, दवंडी दिली । धन्याची वाणी ।
मा-हें होणार, तेच कथलं । लटकं नका मानु कोणी ॥
॥ चरणचारीया, होय बोलनं । ऐकुन घ्या वाणी ।
उभा राहीनं, अनामत धनी । तारनं मानवाच्या खाणी ।
सिदाई वाचा, होईन हो । मानव खुम्मी ।
करोडावर, आयुष्य होईन । मानव खुम्मी ॥३३॥

भजने :- ॥ शकुन आला कैकुंचा । जागी करन । हा देहपिंड खासा ॥
॥ शकुन आला कैकुंचा । अंबर करन । हा देहपिंड साचा ॥

-: निरसनसह शब्दार्थ :-

**शकुन** :- परमात्मा मुखचे अंर्तआत्माने ऐकुन तसे तसे देहीला संदेश देणारे हे शकुन दोन प्रकारचे असतात. १. चर शकुन २. अचर शकुन. यापैकी चर शकुन हे तत्काळ फळ देणारे असतात तर अचर शकुन हे समोरील येणा-या काळाचे दर्शन घडवणारे, भविष्यकाळी फळ देणारे असतात. या अचर शकुनालाच भाकलं म्हणजे भविष्य असे म्हटले आहे. अधिक ग्यानासाठी ०२/०९, ०४/०१, ०५/३२ चे शब्दार्थ पहा. । **बरा** :- चांगला भला । **वाईक** :- लहानात लहानपण घेवुन असलेला **लक्ष** :- लाख, उदा. बत्तीस लक्ष ३२,००००० । **नासलं** :- नाश झालेले । **झुटं** :- खोटं, असत्य, लटकं, उष्टं । **कैची** :- कश्याची, कायची कहीची । **साळु** :- वाणी, जिभ । **निजरूपी झालो** :- झोपी गेलो, स्वस्वरूपी निजरूपात गेलो । **कईक** :- बहुत, खुप । **कंकंर** :- दगडाचे बारीक खडे, रेतीचे बारीक खडे । **वृक्ष** :- मोठे झाडं **लाही फुटण** :- तव्यावर गरम केल्यावर मक्याच्या किंवा ज्वारीच्या जश्या लाहया फुटतात तश्या लाही फुटनं । **रेत** :- एक वित म्हणजेच करंगळी ते अंगुठा लांबवल्यावर जेवठे अंतर होते ते अंतर म्हणजे एक रेत/वित । साधारणताः कन्याबाळ जन्मल्यानंतर ते मातेचे १.५/दिड बिजरत्ती व पित्याचे ०१/एक विर्यरत्ती एकमेकात मिळुन एकुन २.५/अडीच रत्तीचे मुसं होवुन ते जन्मावेळेपर्यत २.५/अडीच रेताचे लांबीचे होवुन जन्मत असते. । **गर्भार** :- गरोदर । **शंक** :- निश्कलंकी, पाक, जसे म्हशीच्या दुधात काळपटपणाचा लवलेशही नसतो ते पाक शंक असते तसेच कलंकाचा लवलेशही नसलेला निश्कलंकी अतिपवित्र म्हणजे शंक वर्ण । **शंकाचारीया** :- शंक आचार विचाराचा शंक ग्यानी योगी च्या शंक आत्म्याचा शंक अवतार । **परिमयं चालन** :- दुरवर पसरणा-या चतुर्पता ग्यानाचा सुगंध चालन । दुरवर चतुर्पता अथर्वन् वेद ग्यानाची किर्ति चालन, चतुर्पता ग्यान चा परमय दुरवर दरवळत राहीन.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०४ ॥

## ॥ ओवी नं. ०३ ॥

ओवी महात्मः- जागृतिच्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी..

॥ मुळावरची ओवी ॥

# ॥ अवधुत उभे आहे जबर ॥

या ओवीची पलट ओवी खंड०७/ओवी-१७ मध्ये दिलेली आहे.

॥ अवधुत उभे/आहे जबरं । कोणा नाही खबरं ।
महाराजा च्या, हंकारा ने । भक्त जनांचे बहु बरं ॥ घृ ॥
॥ माया मेदनी, आटुन जाईन । अन्न जाईन हे सारं ।
साडेतीन दिवसाची, होईन रात्रां । पडनं मोठा अंधःकार ॥
॥ सारीच भुम्मा, निजरूप होईन । उभे राहतीन त्यात विरं/नरं ।
जागी राहुन, पाहतीन त्याहीचं । धन्य भाग्य आहे थोरं ॥
॥ भांडळीचं, अन्न जाईन । पाणीच नाही राहणारं ।
श्रीकृष्णाच्या, मुखचं होय भाकलं । कदा नाही चुकणारं ॥०४॥

॥ एक मेघनी, पाउस पडन । मुसळा एवढी हे धारं ।
वर अग्नीचा, पाउस पडन । कराल कोणता विचारं ? ॥
॥ नवल पर, पाणी होईन । पृथ्वीच्या वरं ॥
वर पाण्यानं, खालचं पाणी । आटुन जाईन हे सारं ॥
॥ ज्या स्थळावर, पाणी राहीनं । मुलुखं अवघा मिळणारं ।
धन-लक्ष्मी वतन-वाडे । लिहुन देतीनं कुलं सारं ॥
॥ नाही नाही, म्हणतीन त्याहीलां । आहे चौ-यांशी बिगार ।
येणं-जाणं, त्याहीला लागनं । कदा नाही चुकणार ॥ ०८ ॥

॥ जे नेमतीन, सत्य भाव । त्याहीचं होईन बहु बरं ।
येण्या-जाण्याची अगद नाही । चुकवन त्याहीची बिगारं ॥
॥ शंक वर्ण, होईन सारा । विचार पडन योगेश्वरा ।
कृष्ण राया, दिगांबरा । उठुन अवघे जागी करा ॥ १० ॥

**भजने** :-

॥ अवद्युत उभे जबर । तिरलोकी घेईन खबरं ।
आदीरूप महाराज । राज, भैसाचं होणारं ॥
॥ अवद्युत उभे भुम्मा कारणं । घरो-घरी होईन, नाम सुमरण ॥
॥ अवद्युत उभे भक्तीला तारू ।
मुखानं आवाज केला सुरू, आवाज करा सुरू ॥

## -: शब्दार्थ :-

**मेदनी** :- देह, धरणी । **मेघनी** :- नभ, मेघ आकाश । **आटने** :- पाणी कमी कमी होत, पाण्याचा एकही थेंब न राहणे. उदा विहीर संपुर्ण आटली म्हणजे विहीरीचे पाणी कमी कमी होत विहीरीत पाण्याचा एकही थेंब राहीला नाही.
**भांडळीचं अन्न जाईन** :- भरपुर उत्पन्न देणारे पांढ-या मातीचे शेत/वावर हे नापिक होईल. याही शेतात पिक येणार नाही. । **भाकलं** :- जे जे पुढे होणार, घडणार ते ते कथलेले भविष्य । **मुसळ** :- धान धान्य कांडण्यासाठी पुर्विच्या काळी वापरण्यात येणारी लाकडी मुसळ । **नवल पर** :- आश्चर्यकारक । **शंक** :- निश्कलंकी, कापराप्रमाणे पाक अतिशुध्द

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०४ ॥

॥ ओवी नं. ०४ ॥

ओवी महात्मः- स्थापनेच्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी..

॥ सावंगा-जळगाव दांडची मुळावरची ओवी ॥

## ॥ स्वप्नी दिसे, दृष्टांत घडे ॥

वरचरण :- ॥ असचं यवुग येईन दाद हो । असाच हा खेळ होणार ।
याची याद ठेवजा गडे हो । मो-हे/पुढे आहे असचं होणारं ॥

॥ स्वप्नी दिसेतां, दृष्टांत घडेनं । सारेच/अवघेच करतीन बडबडं ।
मो-हं होणार, सारं सांगतलं । हेही पाहजा नवलं खरं ॥१॥
॥ ज्याहीचे देवं, त्याहीला लागतीन । रोग-विघ्न उठणारं ।
सुखः असता, दुःख होईन । हेही पाहजा घरोघरं ॥
॥ व्दैत-भुत, लाव-चुडैला । याहीचही उडवनं ठिकाणं ।
मानवा मध्ये, विरं उठतीन । सिध्दक-साधक अवतारं ॥
॥ माती धरल्या, सोनं करते । सिध्दक साधक अवतारं ॥
जागी-जागी, यात्रा भरन । याहीची याहीच्या जवळ/समोरं ॥०४॥
॥ होईन झाडाचां राहुटं । झाडो-झाडी पाळणे लागतीनं ।
गल्ली कुच्चीनं शिर लोळते । पहा देवाचे कौतुक ।
किंवाः-गल्लो गल्ली सिद पडनं । पहा देवाचे कौतुक ॥
॥ उदिम धंदे, सोडुनया कायर/ताईप । लोकं, जाणार फारं/सारं ।
धन-संपदा, खाउन बसतीन । सारेच होतीन कंगाल ॥
॥ सुरूंग राज्यीका मध्ये पडन । तुट पैश्यांची नुपरं ।
अथी-रथी, शाहु-सावकारं । हे लुटल्या जातीन फारं ॥
॥ छत्तीस कार खाने हे बसतीनं । बसतीन उदीम व्यवहारं ।
अथी रथी शाहु सावकार । हे लुटल्या जातीन अंतापार ॥०८॥
॥ तेव्हा राजकी, शेले धरतीनं । बाविस उमरा उठणारं ।
जिकडे-तिकडे, भांडणं लागन । हे भांडन तिन ताळं ॥
॥ अडुसष्ट तिर्थ व-हाड देशा । देशा मध्ये होणारं ।
साधु-संत, भट-ब्राम्हणं । याहीलाही मान येईन फारं ॥ ०८ ॥
॥ तिरकुट मोडुन, चव यवगाचा । एकच होईन मारोडा ।
साधु-संत भट-ब्राम्हण । हाही लबाड, होईन खरा ॥
॥ सहा दर्शन, जोग मोडुन । गाई गोठाणं होणारं ।
पन्नाशीला स्वयंवर होईन । हे पाहजा तुम्ही मो-हं/डोळ्यानं॥१२॥
॥ दवंडी देतो, सांगुन ठेवतो । जन म्हणतीन होईन कयी ? ।
अथिर/अढुर आहे, मानव देही । जरा याहीला थिर नाही ॥
॥ दवंडी देतो, सांगुन ठेवतो । जन म्हणतीन करन कोण ? ।
सुरूंगाच्या/तुरूंगाच्या बाहेर निघन । तोच दाखवन करूनं ॥१४॥

भजनेः-॥ दवंडी देतो, सांगुन ठेवतो । तुम्ही उठा उठा हो, आला तुमचा दिवस.
. ॥ दवंडी देतो हो दवंडी देतो । तुम्ही उठा उठा हो । आलं सत् यवग ॥
॥ दवंडी देल्ली कृष्णानं । अजुन नाही कोणाले मालुम ॥
॥ दवंडी कृष्णाची होयं । दवंडी वाल्याचे धरावं पाय ॥

**शब्दार्थ** :- अढुर, अठोरः- अधिर, धिर नसलेला । सुरूंग :- विहीर खोदतांना जसे काळा दगडात सुरूंग लावुन विहीर फोडत खोदल्या जाते, त्याप्रमाणे तिरगुणी मायेचा तिन गुण रंगाचा प्रपंचाला सुरूंग लावुन/मोडुन चौथ्या स्वरंगाचे पाण्यात न्हावुन आलेला, तिन ला सोडुन तिच्या वरून चौथ्या पर्यत जाणारा, भ्रमरगुंफा मार्ग । तुरूंग :- मायेचा तुरुंग, जग हे मायेची बंदिशाळा । कुच्ची :- अरूंद बोळ, अरूंद गल्ली

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०४ ॥
॥ ओवी नं. ०५ ॥
॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ आधी आधार मग कार ॥

॥ आधी आधार, मग कार । सांगतला याहीनं/देवानं ।
पृथ्वी वरत, होणार नवलं । ठेवलं सांगुनं ॥ घृ ॥
॥ हाती टाळ, विणा । बायका, होतीन संतनी ।
मानव ऋषिश्वर होईन । अवघी पृथ्वी ॥
॥ ऋषि आंगचे, बिज । मदन, जातीन रूसुनं ।
संतनीची, वाजन टाळी । रूत मागतीनं ॥
॥ रूता आंगी, पुत । अगाध, याहीचा गुण/आवाज उठनं ।
या आवाजी, होतीन पुतळे । ठेवलं सांगुन ॥ ०४ ॥

॥ सांगुन सकस, जातीन वाया । विनवाल संगतीनं ।
याहीच किर्तन, ऐकता । बहु, त्रासतीन जनं ॥
॥ पाटिल पांडे, जुम्मेदार । कितीक ऐकतीन ?
याहीच्या किल्या मध्ये मेळ । संतनीचे बसतीनं ॥
॥ हाकम-हुकुम, कारकुन । राजा पासुन ।
राजे-प्रजे, हेही तरासतीन/त्रासतीन । कौल देतीनं ॥
॥ राजा पासुन, कौली भुम्मा । रहीत नांदे संगतीन ।
याहीच किर्तन, मोडा । कोणीएक, उपाय करूनं ॥ ०८ ॥
भजने :- ॥ संतनीची वाजन टाळी । किर्तन होईन घरोघरी ।
उभा राहीन अवतार । निरंजन., । मोडनं याहीचं किर्तनं ॥



॥ खंड ०४ ॥
॥ ओवी नं. ०६ ॥
ओवी महात्मः- स्थापनेच्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी
॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ भैसाचं राज होणार ॥

॥ भैसाचं राज, होणार सांगतलं....।
हे करून दावजो । महीमा, होईन थोरं ॥
॥ भैसाच्या राजी उठतीनं । मेघ-नीळ ।
या चौ-मेघांची, अगद । नाही राहणारं ॥
॥ या मेघ निळाचे । अव्वलं, पिक येणारं..।
नित कोरं धान्य पिकन । या भुम्मेवरं ॥
॥ नरदेही जिव्हाळा, आहे/राहीन । अनामतं ।
यम येवुन बसतीन । मानवाच्या सभेतं ॥०४॥
॥ यम-ईवान द्युतं । करतीन, हवालदारी ।
स्वर्गिचा इंद्र, येईन भुम्मेवरी ॥ ०५ ॥
भजने :- ॥ भैसाच्या राजी । सुखःनाही मावणार तिरभवनी ।
घरोघरी नाम, सुमरनी होईन प्राणी ॥
॥ अवद्युत आले भुम्मा कारण । घरोघरी होईन नाम-सुमरन ॥
॥ अवद्युत उभे भक्तीला तारू । मुखानं, आवाज केला/करा सुरू ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०४ ॥

॥ ओवी नं. ०७ ॥

॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ जसाच यवग तसाच खेळं ॥

॥ जसाच यवग, तसाच खेळं । तसाच खेळ होणारं ।
याची याद, ठेवजा गडेहो । असचं पुढं आहे होणारं ॥
॥ पुंजन शक्ती, भयान वस्ती । देह गांजला तिरभवनं ।
अनामीकाचा, वाडा गांजला । मोडा शक्तीचं पुंजनं ॥
॥ झाडो-झाडी, पाळणे लागतीनं । केला/होईन झाडाच राहुढ ।
गल्लो-गल्ली, सिध्द उठतीन । पहा देवाचं कौतुक ॥
॥ जोगी बंदा, सुधार झेंडा । सुधार आपल्या चेल्याला/बिरदाला ।
शकुनाचं, राज्य भाकलं । चुकणार नाही ते कोणाला ॥०४॥
॥ खंडो-खंडीचे, राजे भांडतीन । आप आपल्या राज्याला ।
ग्रंथासारखे, जप-तप ढळन । पुसाव तरी कोणाला ? ॥

भजने :- ॥ नाही चुकलो नेमा । यवग भरले हो घनश्यामा ॥
॥ हंकार कल यवगात । विठुची/ध्रुतांची, वाणी सांगे जगात... ।
नवल सांगे जगात ॥



॥ ओवी नं. ०८ ॥

॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ एक्यानउ सम्मेश्वरां ॥

॥ एक्यानउ सम्मेश्वरा । आषाढ या मासी । ॥
पांडव येतीन । जम्बुं व्दिपावरी ॥
॥ ब्यानउ सम्मेश्वरा । श्रावण या मासी ।
नउखंड पृथ्वा होईन । भया भंकार ॥
॥ ति-यांनउ सम्मेश्वरा । तिन्ही तिरलोक सारा ।
अल्लम दुनिया म्हणे । होईन सुखः संसारा ॥
॥ चौ-यानउ सम्मेश्वरा । आणीक चौ-यांशी चौक ।
जीव वधतीन । वधती म्हणे, सानीध्य चौक ॥ ०४॥
॥ पंच्च्यांनउ सम्मेश्वरा । वरजा बोले सुरजा राणी ।
सुनो सुनो पुराणी कथा ।
नर येईन स्वामी राजा । तो जाईन पश्चिम दिशा ॥

भजने :- ॥ पाचही पांडव कुंतीचे/देहीचे । राजे होय, या जम्बुं व्दिपाचे ॥
॥ पाचही पांडव कुंतीचे/देहीचे । मालक होय, देव या गादीचे ॥

### -: शब्दार्थ :-

**समेश्वरा** :- जसे कलयवगात इग्रजी कालगणणेनुसार 'ईस विसन', मराठी महीन्याप्रमाणे शके ईत्यादी नावाने कालाची गणणा केली जाते, तसे कालगणणा त्रैता-व्दापर काळात 'सम्मेश्वर' या नावाने केल्या जात होती. कारण की : त्यावेळी समशेर म्हणजेच तलवारीचे राज्य होते. या समशेर नावावरून सम्मेश्वरा या नावाने तेव्हा कालगणणा करत होते. । **अल्लम दुनिया** :- सारी, संपुर्ण विश्व
**सोमेश्वर** :- शंकराचे एक नाव । **शनेश्वर** :- शनिचे एक नाव ।
**शनीचर** :- शनीचा साडेसातीचा भोग

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०४ ॥
॥ ओवी नं. ०९ ॥
॥ निरसनसह जळगाव दांडातील मुळावरची ओवी ॥

## ॥ तीन मुके सहा वेडे ॥

॥ तीन मुके, सहा वेडे । अठरा भांबावले ।
अठरा भांबावले, तो कैचा वेद बोले ? ॥
॥ बम्हा विष्णु, शंकर तिघाचं । राज्यं पलटनं ।
चौथ्या खुम्मी, उभाराहीन धनी । अग्नीचं घरं ॥
॥ माया चैत्यन्या, शक्ती निघाली । या भुम्मेच्या वरं ।
या शक्तीनं, गणगोत केले । पहा या तिरगुणांचे ॥
॥ हुकुम बंद, मोडन फंद । चवही मुलखाचां ।
चौ-यांशीचा, मुद्‌दा चुकवण । हा बादशाहा खासा ॥ ०४ ॥

**भजने** :-
॥ उभा राहीन बादशाहा खासा । चुकवन तो चौ-यांशीचा मुद्‌दा ॥

-: **शब्दार्थ** :-

**तिन** :- बम्हा विष्णु व शंकर हे तिन देव. । **सहा** :- सहा शास्त्रे ।
**अठरा** :- अठरा पुराणे । **गणगोत** :- नाते सबंध । **फंद** :- फास, फासा

## ॥ निरसनसह तिन मुके सहा वेडे ॥

-: **निरसन/स्पष्टीकरन** :-

॥ तीन मुके, सहा वेडे । अठरा भांबावले ।
अठरा भांबावले, तो कैचा वेद बोले ? ॥

निराकार निराधार अखंड आदीरूपाला जाणता जाणता तीन गुणांचे अधिपती बम्हा विष्णु महेष हे तिघे थकले. आणी सरतेशेवटी घुंम घालुन/मौन व्रत धारण करून मुके होवुन, त्या आदीरूपाचे तेजाचे घ्यान भ्रुकुटिमध्ये आपआपल्या स्थानी चुप्पी मारून करत बसलेत.

आणी पुर्व-उत्तर मीमांसा, ज्योतिर्निबंध-चिंतामणी, व तर्कशास्त्र-वेदांत असे हे सहा शास्त्रें । हे सहाही या निराकार निराधार आदीरूपाचे वर्णन करता करता, त्याचे गुण गाता गाता वेडे झालेत. आणी तिरगुणांचा त्रिरंगी बाज्या वाजवु लागलेत. त्यांच्या मागोमाग येणारे अठरा पुराणे ! ब्रम्हपुराण-पद्‌मपुराण, शिवपुराण-विष्णुपुराण, भागवत-नारदपुराण, मार्कंडेयपुराण-अग्निपुराण, भविष्योत्तरपुराण-ब्रम्हवैवर्तपुराण, वामणपुराण-वराहपुराण, मत्स्यपुराण-ब्रम्हांडपुराण, कर्मपुराण-गरूडपुराण, स्कंदपुराण-लिंगपुराण हे अठरा पुराण सुध्दा त्या चौथ्या आदीरूपाचे ज्ञान देता देता भांबावुन गेलेत. अंती शिणलेत आणी मग... ? यांनी तिरगुणी मायेन तयार केलेले मद्यप्रासन केले. आणी तिरगुणांचा त्रिरंगी बाज्या वाजवु लागलेत. या अठरा पुरांणापैकी दहा पुराणांनी तमगुणांचा राजा शिव वर्णिला. तर चार पुराणांनी सत्वगुणांचा राजा विष्णु स्तविला. तर पुराणव्दयीं रजगुणांचा राजा ब्रम्हा गाईला. आणी दोघां पुराणांनी अग्नि-सुर्य !

या १८ पुराणांनी असा त्रिरंगाचा बाज्या वाजवला आहेत. वेदांचीही तीच गत झाली. ते तरी कैसे त्या आदीरूपांची महीमा ज्ञान वर्णन करू शकणार ? या आदीरूप आदीपुरूषाची महंती महीमा ज्ञान वर्णन गाता गाता, ते वेदही सरतेशेवटी थकुन ''नेती-नेती'' म्हणजेच ''हे नव्हे ते नव्हे'' ! तर होय काय ? आदी-अंती अखंड असा हा चौथा आदीरूप आदीपुरूष भैष हा ''न जाणता येणारा, न वर्णता येणारा..'' ऐसे कसेतरी काहीएक बोलु लागलेत... ॥०१॥

॥ ब्रम्हा विष्णु, शंकर या तिघाचं । राज्यं पलटनं ।
चौथ्या खुम्मी, उभाराहीन धनी । अग्नीचं घरं ॥

मुळयवगी चा धनी हा निराकार निराधार निशःकलंकी आदीरूप आदीपुरूष सोहंम् निरंजन ज्योत स्वरूपात उभा राहीला. आपल्या मुळावरच्या रंगाव्दारे शक्तीला प्रकट केले. मुळयवगी शक्तीच्या ओवीत शक्ती भ्रांतीत पडली. शक्तीने तिला भेटलेले खुम्म जाळलेत. तिचे तीन खुम्म ब्रम्हा-विष्णु-शंकर हे त्या गायप असलेल्या चौथ्या आदीरूप कर्ता-याने आदीमुनी रूपात येवुन जागी करून दिलेत. आणी तीन गुणांच तीन शिक्के या तिघांच्या हाती देवुन, त्यांना तिरगुणांचे राजे बनवले. सिध्दियॉ-शक्तियॉ चे सैन्य देवुन तीन यवगाचे राज्य या तिघांच्या हाती दिले. आणी हा भैस अव्यक्ताव्यक्त च्या पल्याड निराकार निराधार निशःकलंकी निरंजन चैत्यन्यमय सोहंम् आदीरूपात अखंडतेने आपल्या मुळस्वरूपात-आपरूपात एकला वेगळा राहीला ! सच्चा भावांच्या सच्चा भक्तांचा सारथी बनत त्या सच्च्यां च्या बोलावर उभा राहु लागला.

ब्रम्हा-विष्णु-शंकर या तीघांना दिलेल्या राज्याची मुदत आता संपली असुन, हे त्यांना दिलेले राज्य आता पलटनं ! कारण की : चौथ्या यवगात चौथ्या खुम्मी चौथा आदीरूप आदीपुरूष धनी हा वर अग्नीच घर असुन, या मिर्तलोकच्या अग्नी घरी म्हणजेच या चतुर्पति कृष्ण अवद्युत पंथाच्या भुम्मेवरील चतुर्पती नामाच्या अक्षरी आता तो उभा राहीला आहे. या चतुर्पता पंथाच्या माध्यमां व्दारे, कृष्ण हस्तकांव्दारे या तिघांचे तिरगुणी राज्य पलटवण्याची सुरूवात त्या भैसाने केलेली आहे. हे जाण ! तो आता उभा आहे. पुढेही तो उभा राहीन...अशी त्या आदीपुरूष भैसाचा पुर्ण अवतार कृष्णाजीने सांगी केलेली आहे. दवंडी दिलेली आहे की : तिन यवगाचे तिन शिक्के या तिघांचे भरले गा ! चैतन्यचा चौथा शिक्का उभा राहीन तिरनयन कृष्ण धनी अवद्युत ! ॥०२॥

॥ माया चैत्यन्या, शक्ती निघाली । या भुम्मेच्या वरं ।
या शक्तीनं, गणगोत केले । पहा या तिरगुणांचे ॥

आता पर्यत या तीन यवगात माया-चैत्यन्याने बाहेर निघुन या भुम्मेवर आपली तिरगुणी मायेची मोहनी घालुन, या तिघां राजांचे तिरगुणी गणगोत तयार केलेले आहेतं. आणी या तिरगुणी गणगोतांवर या तीन राजांचे हुकुम लागु केलेले आहेत. असे हुकुम लागु करत करत तीने तिरगुणी रांजांचे हुकुमं, व तिरगुणी फंदा हा अज्ञानी जनां सह मोठया-मोठया महान लोकांवर चौ-मुलखी टाकलेला आहे. ॥०३॥

॥ हुकुम बंद, मोडन फंद । चवही मुलखाचां ।
चौ-यांशीचा, मुद्दा चुकवण । हा बादशाहा खासा ॥०४॥

तो चौथा आदीरूप आदीपुरूष उभा राहीन. तिरगुणी मायेसह तिरगुणी राजां ने जो तिरगुणी ज्ञानाचा फंदा सर्वसामान्यावर टाकला आहे, तो तिरगुणी मायेचा फंदा मोडुन या तिरगुणी राजांचा हुकुम बंद करन. अज्ञानी जनांसह जे राजहंस यां तिरगुणांच्या फाश्यात पडलेले आहेत, त्याहीचे फासे हा महाराजा धनी देव तोडन हो ! या चतुर्पती चें टाळ वाजन. घोळ वाजन. नौबत वाजन झनाना. चतुर्पतीची अवद्युत नाम गर्जना होईन की : श्रीकृष्णाचा जो पुर्ण अवतार आला, त्याला आता कृष्ण अवधुत अवधुत म्हणाना ! हाच कृष्ण अवधुत चवही मुलखाचा तिरगुणी फंद मोडुन, जीत्या जन्मीच्या चौ-यांशीसह येण्या-जाण्याच्या चौ-यांशीचा मुद्दा चुकवण तो बादशाहा खासा कृष्ण महाराज धनी अवद्युत ॥०४॥

॥ कृष्ण महाराज धनी अवद्युत ॥

॥ खंड ०४ ॥
॥ ओवी नं. १०/०१ ॥
॥ जळगाव पाठातील मुळावरची ओवी ॥

## ॥ शास्त्र मती बयकन तीथी ॥

॥ शास्त्र मती, बयकन तिथी । भाकणुक आहे ।
कल यवगी, माघा-या राज्य । भैसाचं आहे ॥
॥ बम्हादिक हो, पृथ्वीत पुंजन । खाता सत् ढळले ।
राजे-प्रजे, बादशाही तक्त । गादीहुन उठले ॥
॥ येईन भैस, बादशाहा खासा । होईन गादी तक्तं ।
तीन ताळाचे, लोक राहतीन । याहीच्या हुकमातं ॥
॥ या बादशाहाचे, हुकुम राया । चौ-मुलखी सुटणारं ।
साता जनांवर, ताकीद राया । याहीची बसणारं ॥०४॥

॥ साता जनांवर, ताकीद मुलखी । सोय धरन कोणी ।
बाद शाही, तक्तं याहीचा । हा होय धनी ॥
॥ हुकुम बंद, मोडन फंद । चवही मुलखांचा ।
चौ-यांशीचा, मुद्दा चुकवण । हा बादशाहा खासा ॥
॥ झेडां पट्टा, घोडा धन्याचा । येईन भुम्मेवरं ।
कल यवगाचे, कुळ दादा । हे जाईन सारं ॥
॥ श्यामकर्ण, वायव द्युत दोन । येईन भुम्मेवरं ।
सव्वा गज, लिद पडनं । या भुम्मेवरं ॥०८॥

**भजने :-**

॥ सत् यवगाच परमान/प्रमाणं ।
कृष्ण महाराजा । जागी करून दाखवनं ॥
॥ यवग काबीज करन सारं । या भैसाचं, राज्य होईन भुम्मेवरं ॥
॥ राज्य होईन भैसाचं । याहीच्या सुखानं, रहीत नाही जाणार कुठं ॥
॥ आहो भैसाच्या राजी । सुखः नाही मावणार तिरभवनी ।
घरोघरी नाम सुमरनी । होतीनं प्राणी ॥



॥ ओवी नं. १०/०२ ॥
॥ म्हणनीतील सावंगा पाठा ची ओवी ॥

## ॥ शास्त्र मती बयकट कुंठी ॥

॥ शास्त्र मती बळकट कुंठी । भाकणुक आहे ।
कल यवगाच्या, ठाई राज्य । कोणाचं आहे ॥
॥ या बादशाहाचे हुकुम दादा । चौ-मुलखी सुटणारं ।
साता जनांवर, ताकीद गडे हो । याहीची बसणारं ॥
॥ या बादशाहाचे, हुकुम दादा । चहु मुलखात ।
तीन ताळाचे, लोक राहतीन । याहीच्या हुकमातं ॥
॥ हुकुम बंद, मोडन फंद । चवही मुलखांचा ।
चौ-यांशीचा, मुद्दा चुकवण । तो बादशाहा खासा ॥ ०४॥

॥ मिर्त लोकी, धुनी लावली । भुल पाडुन ।
या धुनित गेल्या वस्तु । देव देईन आणुन ॥

॥ गर्भि फौजा उठतीन देवाच्या । या पृथ्वीच्या वरं ।
सव्वा गज, लिद पडनं । या भुम्मेवरं ॥
॥ या फौजेच; ठिकाणं मकाण । कोणी नाही सांगणारं ।
तिन ताळ, चौदा भुवनांत । अकांत होणारं ॥
॥ तरण उपाय, होईन गडे हो । डिकावं नामाले ।
निशःकलंकी, अवतार उभा । राहीन दिवसाले ॥०८॥



॥ पांडवाशी कपट केलं । पहा त्या कौरवांनं ।
छयान्नव कुळीचा, राजा दिला । गादीहुन उठवुनं ॥
॥ राजा उभा, राहीन आपल्या । बिरदा च्या वरं ।
श्यामकर्ण, वारु येईन । या भुम्मेवर ॥
॥ झेडां पट्टा, घोडा धन्याचा । येईन भुम्मेवरं ।
कल यवगाचे, राज बापा । कुल जाईन हे सारं ॥११॥

भजने :- ॥ हत्ती घोडे दलभार । किसनजी आले हो आले अवतार ॥

-: निरसनसह शब्दार्थ :-

**बयकने** :- गोंधळणे, बिघडणे । **तिथी** :- तेथी, पंचागातील तिथी ।
**बयकट** :- मजबुत बळकट । **वारु** :- घोडा । **कुंठी** :- खुटी, **मती**:- बुध्दि

**शास्त्रमती बयकन तेथी** :- चतुर्पती परमात्माचे ग्यान जे चारही वेदास कळु शकले नाही, ज्याच्याबद्यल चारही वेद नेती नेती ! न जाणता येणारा न जाणता येणारा ! असे म्हणु लागलेत. आणी तिन देवांन चतुर्पती ग्यानावर मौन व्रत धरून मुके बसले. परमात्म्याचे ग्यान शोधता शोधता सहा शास्त्रे वेडे झालेत. आणी अठरा पुराणे भांबावले. अश्या या आपरूप आदीपुरूष परमात्मा चे ग्यान शास्त्र पुराणातुन काय मिळणार ? या चतुर्पतीच्या ग्यानासाठी शास्त्रपुराणी ज्ञानपंडीत यांची सहा शास्त्र व अठरा पुराणे यांवर आधारीत असलेली बुध्दिमत्ता/मती व्दारे केलेली व्यर्थ बडबड कोण ऐकणार ? कारण की : ज्यावर त्यांचे ग्यान आधारीत आहे, त्या शास्त्राची खुंटी येथे हलावयास लागल्याने शास्त्राचेच तिन मुके, सहा वेडे झाल्याने १८ भांबावुन बयकलेली आहे. तिथे या शास्त्रपंडीतांची खुंटी कशी बळकट राहणार ? त्यांची ती शास्त्रमती त्या चतुर्पती परमात्माच्या ग्यानप्राप्ती कार्यात बयकन तेथी ! अधिक ग्यान खंड-०४/०९:-तिन मुक सहा वेडे या ओवीच्या निरसनातुन घ्यावे.

**बयकन तिथी** :- राहु दिवस येईन आठवा तेव्हा ४ आठवडयाचा एक महीना होवुन सर्व तिथीच्या तारखा अस्ताव्यस्त होवुन ईकडे तिकडे बयकन ।

**बयकट कुंठी** :- पक्का आधार मेढींचा । भरोसा आहे या देवरायाचा । कारण या चतुर्पती देवरायाची जी चतुर्पती ग्यान-भक्तीची जी खुंटी आम्ही पकडली आहे ती बळकट/मजबुत आहे. ही बळकट मजबुत खुंटी ही बुध्दीला डळमळीत होवु देणार नाही. शांततेने व सुखःसमाधानाने जीवन जगण्यास साहय होईल.

**श्यामकर्ण वारु** :- अश्वमेघ यज्ञाच्या वेळी हा श्यामकर्ण नावाचा घोडा/वारु हा सोडला होता. या वारुच्या रक्षणासाठी महा महा योध्दे यांचे सह बहु सैन्य होते. ।
**बिरद** :- बिर्द, पंथ, देही । **कुल** :- कुळ



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०४ ॥

॥ ओवी नं. ११ ॥

॥ भाकल्या शकुनाची जुनी मुळओवी ॥

## ॥ पाणी-पवनाच्या नित धारा ॥

॥ पाणी-पवनाच्या नित धारा । आधी भजा...
निशःकलंकी अवतारं ॥ घृ ॥
॥ मोडन बाम्हणांच्या खाणी । बम्हदेव येईन शरणी ।
बम्हदेव येईन शरणी । पुढे होणारं....
निशःकलंकी अवतार ॥ आधी भजा...
॥ मोडन महानुभावाच्या खाणी । विष्णुदेव येईन शरणी ।
विष्णुदेव येईन शरणी । पुढे होणारं....,
निशःकलंकी अवतार ॥ आधी भजा...
॥ मोडन गोसाव्याच्या खाणी । शंकरदेव येईन शरणी ।
शंकरदेव येईन शरणी । पुढे होणारं....,
निशःकलंकी अवतार ॥ आधी भजा...
॥ मोडन या तीनही खाणी । आदीभैसाची उठन धुनी ।
आदीमुनीची उठन धुनी । पुढे होणारं....,
निशःकलंकी अवतार ॥०४॥ आधी भजा...



॥ ओवी नं. १२ ॥

॥ भाकल्या शकुनाची ओवी ॥

## ॥ करन कार...! निशःकलंकी अवतार ॥

॥ शिवरात्री पाडव्याचा नेम । शिमग्याला याग-होम ।
जिथे असनं देवकी । तिथे लभेद नर भेटनं ॥ करन कार..
॥ मांडवस सभा भावळीत । अवतार गादी स्थापनं ।
जेजे बोलानं तेते होईन । होईन या, भैसाच्या यवगातं ॥
करन कार..., निशंःकलंकी अवतार ॥ घृ ॥
॥ पिशाळी पाहतीनं गगणी । मिर्तलोकी ध्वजा असमानी ।
नाचत येईन अवघ्या जनी ॥ करन कार...,
॥ स्वर्ग मिर्त पाताळ । ऐसे नाचन तीनही ताळ ।
नाचनं मेरू मंडयान सारं ॥ करन कार...,
॥ उठनं कापुर आरती । आरत्या घेवुन येतीन हाती ।
तंद्री लागन मिर्त लोकी ॥ ०४ ॥ करन कार...,
॥ उठन या, देवव्दाराचे ध्यानं । ध्यानी लागतीन अवघे जनं ।
अशी या अवताराची खुणं । ऐकुन घ्याहो तुम्ही मानवं ॥
करन कार..., निशंःकलंकी अवतार ॥घृ॥

**भजनं** :- ॥ निशंःकलंकी अवताराची । पाहतो वाट ।
तुम्ही या महाराजा । सोयंम् दयाहो भेटं ॥

**शब्दार्थ व निरसन** :- खंड०५/७१:-महापुरूषा कळुन असता या मुळावरच्या ओवीचे काही चरणेच काही काही जनांच्या हाती लागल्यामुळे जेवढे चरणे हाती आले तेवढेच समोर म्हटल्या गेलेले आहे. किंवा ती ओवी चरणे लक्ष्यात ठेवण्याकरीता भागा भागात छोटी करून समोर म्हटल्या गेली आहे. असे ओवी निरक्षणावरून दिसते. तरी ***खंड०५/ओवी ७१:- महापुरूषा कळुन असता*** च्या निरसनातुन या ओवीचे शब्दार्थ व निरसनाचे ग्यान घ्यावे.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०४ ॥

## ॥ ओवी नं. १३ ॥

ओवी महात्मः- स्थापनेच्या/जागृतिच्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी..

॥ भाकल्या शकुनाची मुळावरची गर्जना/ओवी ॥

# ॥ कलीचरण ॥

॥ ०१ ॥

॥ ऐसा कोई भक्तराज । मनमे धिर धरे...।
एक लक्ष, अस्सी हजार के भितरं मे । एक जुग पडे ।
॥ उत्तर क्या फौजा । दख्खंन पर चढें.... ।
शाहुराज अपने बिरदपर खडे । साळुबाई अपने बिरदमे फिरें ।
॥ दोनो तरफसे एक शस्त्र चले.... ।
नासिक डौला मोंहु/मुहं मारक । आपस मे आप कटकटा मरे
॥ रावण का बेटा इंद्रजित । हर बल पवार घरी, अवतार धरे ॥

भजने :- ॥ लभेदजी । अरज सुनो कोई जम्माव की ।
आगे उम्मेद है, बहु मानकी ॥

॥ ०२ ॥

॥ पुढे बारा वर्ष राहता । आधीच होईन एक विपरीतं ।
दृष्टांचा/दोहीताचा होईन संहार, करन आकांत ॥
॥ या आकांताच्या समयी । देव तारन भक्त-जनासं ।
अकासमात येईन अवद्युत । डंका वाजन तिर भवनातं ॥

भजने :-
॥ डंका वाजे हो वाजे । आले सावंगपुरचे राजे ,
आले पंढरपुरचे राजे, आले व्दारकेचे राजे । डंका वाजे...
॥ डंका वाजे हो वाजे । अवद्युत नाम गर्जे । डंका वाजे हो वाजे ॥
॥ डंका वाजे हो वाजे । नाम कृष्ण देवाचे गर्जे । डंका वाजे हो वाजे ।

॥ ०३ ॥

॥ ऐक अर्जुना । तुला सांगतो, मो-हंची/पुढंची गर्जना ॥
॥ या कलयवगाच्या लोकांस । देव ठाउक नाही गा अर्जुना ।
॥ या नगरचे लोक, दगड धोंडे पुंजुन, कियाभ्रष्ट होतीन गा अर्जुना ॥
॥ या नगरचे लोक, व्दैत्यास देव, म्हणतीन गा अर्जुना ॥

भजनें :-
॥ हरी हरी म्हणतीन गा पांडव । या श्रीकृष्णा सारखा भजावा देवं ॥
॥ हरी हरी बोले गा पांडव । या अवद्युता सारखा भजावा देवं ॥
॥ पाचही पांडव देतीन गाही । या महाराजा सारखा देवं नाही ॥
॥ पाचही पांडव देतीन गाही । सत्या ठायी राहीन, देव उभा येवुनी ॥

॥ ०४ ॥

॥ सत्य जाण । सत्य धर्म बुडाला जाणं पईं/पैं ।
॥ जनार्दन म्हणे, ऋषिकेशि । आम्ही राहाव कोण्या ठाई ?
ज्या घरी सत्य राहीन । त्याच घरी/ठाई, राहीनं बा अर्जुना ॥

भजनें :-
॥ सत्य जाणा हों तुम्ही । मालक उभां, देव यवगाचा धनी ॥
॥ सत्य जाणा हों तुम्ही । मालक उभां, देव पृथ्वीचा धनी ॥

॥ ०५ ॥

**॥ धर्माचा खिळं । भक्त पाहे भुमंडळ । त्याशी ना मिले रसाळं ॥**
**॥ कृष्णा दावे खुणा । अवद्युत चरणी, लीन होवुन राहानां ॥**

भजनें :-
॥ हरी हरी कृष्णा । तुही संगत घडली/आहे बरी ।
या कलयवगामध्ये भक्त तार हरी । आमचा माथा तुमच्या चरणांवरी ॥
॥ हरी हरी कृष्णा । तु जगाचा जीवनं । भक्तीला लावले, त्वां अवघे जनं ॥
॥ हरी हरी कृष्णा । तुही वाट कुठंवर पाहु । पाषाणाच्या मुर्ति कुठंवर पुंजु ? ।
या पाषाणाच्या मुर्तिला पुंजा कुठंवर देवु ? ॥
॥ हरी हरी कृष्णा । कुठंवर पाहु तुझी वाट । कुठंवर पुंजु पाषाणाचे दैवत ? ॥
॥ हरी हरी कृष्णा । तु परम सुखाचा गडी । आमचा माथा तुया चरणा वरी ॥

॥ ०६ ॥

**॥ व्दैत भार झाला पृथ्वीशी । अवघड पडलं तिरलोक्यांशी ।**
**आदीपुरूषाचं भजन करनं । त्याची चुकन हो चौ-यांशी ॥**

भजनें :-
॥ आदीपुरूष बोले अहिनाशी । आलो तुया घरी ।
जेजे बोलांन, तेते होईन । पृथ्वी वरी ॥
॥ आदी पुरूष, बोले अहिनाशी । सांगतो हकिकतं ।
हे तुमच आमच होतं । पुर्विचं नातं ॥
॥ आदी पुरूष, बोले अहिनास । सांगतो खरं ।
इथे नांदे कृष्ण अवतार । वंश परांपर ॥
॥ नाम घ्याहो कृष्णाचे /विठोबाचे । सार्थक होईन देहे-जीवांचे ॥
॥ नाम घ्या हो फुकटं । याला नाही लागतं धन-दौलतं ॥
॥ अमृतरस । तुम्ही प्या हो प्या । नाम देवाचं घ्या हो घ्या ॥

॥ ०७ ॥

**॥ सस्ता दाणा-पाणी । निर्मळ गंगा, जल है गहरां ।**
**बाग-बगिचा अवरंग । उच्चा रूपया मोहरां ॥**
**॥ राम कहो, यह रसायन पिओ ।**
**अनंत घटका, सेरूपी शिक्का चढावों ॥**

भजनें :-
॥ ज्याच्या अंतरी शिक्कां । धाक पडे हो ब्रम्हादिका / इंद्र-यमादिका ॥
॥ विष्णु चरणावर लोळे । इतरांचा इथं, गुजारा काय ? ॥
॥ शंकर कापे थरथरा । इतरांचाचा इथं, काय गुजारा ? ॥
॥ तेरे घटमें/घरमे बाग-बगिचां । यही पे सिंचन, कर भाई थोडां ॥
॥ तेरे घरमे बाग बगिचा । यार तु, बाहर बाहरं । क्युं घुमता ? ॥
॥ खोल दरवाजे कवाड । है कोई कुंजीवाला लाल ॥

॥ ०८ ॥

**॥ बिंदी परस मंजिलं देखो । बिंदी परस है उजाला ।**
**इस शरीर मे अमृतरस भरो । भरो मधुरस धारां ॥**

भजनें :-
॥ नाम रसाई । अमृताचा प्याला । जो पिउन मग्गंम झाला ।
तो वाणी सांगे जगाला । नवलं सांगे जगाला ॥
॥ अमृत प्या हो प्या । या देवासारखे मानव तुम्ही व्हा हो व्हा ॥

॥ ०९ ॥

**॥ ऋषि ओळखा हो । परमेश्वरानी निद्रा केली, शेषशयनी ॥**
**॥ बारवीच्या ठाई बत्तीशी । तेरावी सिध्दिच्या ठाई, येईन कुंभनीवरी ।**

॥ तेरव्या सिध्दित करन बोलनं ।
चौदावी लागता, होईन यवगाचं कामं ॥
भजनें :-
॥ झाला बत्तीशीचा मुद्दा । साधवा, तेरवी सिध्दी ।
कृष्णा/भैषा मोहीम कर गा उभी ॥
॥ तेरव्या सिध्दीला मानं । चौदावी लागता होईन यवगाचे कामं ॥
॥ तेरवी सिध्दी अवरतं । इच्यावर उभा, धनीदेव समर्थ ॥
॥ ना दिया ना पाती । यह ज्योत नजर नही आती ।
आपरूप मे खडें । उजाला तिरलोक मे पडें ॥

॥ १० ॥

॥ चार लाख बत्तीस हजार । सांगतो कलीचे निर्माणं ।
स्त्री-हत्या, बाळ-हत्या । गो-हत्या, परद्रव्यं चोरी ।
यात दोन लक्ष जुग । सहजचं उडालें ॥
॥ दोन लक्ष बत्तीस हजार । कलीचे निर्माण पुढे राहीले ।
एक लक्ष दिले राजगृहाशी । राजकन्येशी पाप होवु लागता ।
एक लक्ष जुग । सहजचं उडालें ॥
॥ तिन लक्ष जुग सहजच उडाले ।
एक लक्ष बत्तीस हजार । कलीचे निर्माण पुढे राहीले ।
एक लक्ष दिले चंद्र-सुर्याले । चंद्र-सुर्याले ग्रहन लागता ।
एक लक्ष जुग सहजच उडाले ॥
॥ गि-हाण/ग्रहन पडे तो, कलीका लेखा लिखो भाई ।
कलीमे जीवोंको पिडा न देवें ।
गि-हाण पडे एकविससो बारा । वहां से कली लिखो भाई निर्धारा

॥ चार लक्ष कली सहजच उडाले ।
बत्तीस हजार । कलीचे निर्माण, पुढे राहीले ।
तेही ब्राम्हणास दान दिले । ब्राम्हण दान पाहुन, जप ध्यान विसरले
यात बत्तीस हजार जुग । सहजच उडाले ॥
भजनें :-
॥ साडे एकोन्नीस हिस्से पापं । अर्धा हिस्सा राहीलं पुण्यं ।
कलीला जागा नाही चातुरा । भला तु बेरीज पाहयं ॥
॥ रामराम रामराम । कलीत मोठं झालं पापं । लवकर येणं ॥
गजर :- ॥ माझं लक्ष्य तुया चरणी । संकष्टी धाव चक्रपाणी ।
राख या बिर्दाची वाणी ॥

-: निरसनसह शब्दार्थ व चरणार्थ निरसन :-

**जुग** :- युग, यवगं । **पडे/पढे** :- वाचावे । **दख्खंन** :- दक्षिण दिशा ।
**नासिक डौला मोंहु/मुहं मारक** :- गाउ काय नाशीकाची वाणी । नाश झाला हो तिरभवनी । तिरगुणांची नाश करणारी डौलदार नाशीक वाणी हे तोड मारणारी आहे.
**हर बल** :- प्रतेक वेळी । **गहरां** :- खोलवर । **जम्माव** :- भक्तजनांचा जमाव ।
**उम्मेद** :- आशा । **बहु** :- पुष्कळ, खुप । **मान** :- मानसन्मान
**धर्माचा खिळं** :- धर्माला पडलेला आळ, खिळ.

***उदाहरणार्थ*** *:- धर्म करता कर्म हर्रले/झाले । बळी पाताळी घातले ॥ धर्म बळीने केले । त्याला पाताळी घातले ॥ धर्म हरीश्चंद्राने केले । डोम्या घरी पाणी भरले ॥ धर्म कर्णाने केलें । त्याचे रणी/रणात घात झाले ॥ धर्म शंकराने केले । त्याला कैलाशी पिटलें ॥ धर्म परशुरामानं केलें । त्याला कोकणी पिटलें ॥ धर्म जाणकीने केलें । तिला रावणाने नेले ॥ धर्म चांगुणाने केले । बाळ भोजनाशी दिले ॥ ऐश्या धर्माच्या गती । भंग आला पृथ्वीशी ॥ ऐश्या या धर्माच्या खिळा/खुणा । जाणा हो तुम्ही गुणीजना ॥*

**सस्ता दाणा-पाणी** :- सहज मिळणारे नामजल जे सहजच तुमच्या जीवनाचे रक्षण करत तुम्हास आवश्यक असलेल्या दाना-पाणी चे सोय करते ।
**निर्मळ गंगा जल है गहरा** :- निश्कलंकी निर्मळ असे हे चतुर्पती नाम जल, हे इतके खोलवर गेलेले आहे की : या चौरंगी चतुर्पती नामाचं ग्यान घेता घेता आयुष्य कमी पडते. ही देहधरतरी आटते. ।
**बाग-बगिचा अवरंग** :- कृष्णाने लावलेला बहुरंगी बाग. अधिक ग्यानासाठी खंड ०३ ओवी ०२ दरवाज्याचे रखनदार मधील सुंदर बागेचे निरसन वाचा. ।
**उच्चा रूपया मोहरां** :- खणखणीत वाजणा-या निर्मळ निश्कलंकी नामाचा शिक्का । **रसायन** :- मिश्रण, सस्ता दाणा-पाणी, निर्मळ गंगा जल नामाचा उच्चा रूपया याचे मिश्रण/रसायण कृष्णबागेत येवुन प्याहो । व अनंत घटका सेरूपी शिक्का चढावो ।

बिंदी परस मंजिलं देखो । बिंदी परस है उजाला :-




**मंजील** :- धैय, लक्ष्य । **बिंदी परस** :- मस्तकस्थित बिंदुस्थानाच्या पलीकडे सातवे चक्र अगुचर । या वर आहे निरंजन ज्योतीचे स्थान । या को-या भुम्मेवर उभा तो अगुचर देव निरंजन । हेच लक्ष्य असावे. हेच धैय असावे. ईथेच तो लख्ख उजाला आहे. यासाठी या शरीरात चतुर्पती नाम अमृत भरा. अधिक ग्यानासाठी खंड ०३/०१ मुळस्तंभिचा पाया चे निरसन व देहवर्णनाची ओवी **वाचावे.**

**ऋषि ओळखा हो** :- एक ऋषी बसला निर्वाणी । धडाधडा जाळतो धुनी । बंम्हांडी जपतो मंत्रं । याहीचा कैसा कळेल सुम्मारं ? हा ऋषि ओळखा हो । ०३/०१

बारावीच्या साली बत्तीशी :-



**सुर्य** :-
चंद्र सुर्य हे नयन । डाव्या डोळयास्थीत चंद्र तर उजवा डोळा स्थित हा रवी । हीच रवीदृष्टी । या रवि च्या आहेत हो बारा राशी बारा कला । याचे नाव गुण मन लावुन ऐका । संदर्भ-देहवर्णनाच्या ओवी, मुळस्तंभिचा पाया, पुर्णब्रम्ह विचार योग,..इत्यादीतुन.
०१. : **किरणी सिध्दि** :- ज्ञानाचा किरण प्राप्ती होताच ज्ञानाचा उजाला होये. अंधःकार नाहीशा होये. ज्ञान माया नाचुनी जाये.
**अनुभवात्मक उदाहरण/गाही/दृष्टांत** :- पुर्वसंचिताने कोणत्यातरी एक मार्गाने चतुर्पता अथर्वन् वेद वाचकाच्या हाती येतो. वाचक हा अथर्वन् वेद हाती घेवून वाचतो. वाचता वाचता त्याची स्वः ज्ञानमाया नाचु लागते. तो वाचक आपल्या स्वःज्ञानाप्रमाणे हे बरोबर, ते चुक ! हे असे पाहीजे, ते तसे पाहीजे ! ते येथे नको...असे अनेक चिंतनःविचार वाचता वाचता करत, त्या वाचकाची

ज्ञानमाया अथर्वनृ वेदाच्या ज्ञान किरणप्राप्तीने त्याच्या डोक्यात नाचु लागते. कुठे कुठे अंधःकार नाहीशा होवुन ज्ञान उजाला होतो. तर कुठे कुठे अहंःकार वरचढ होवुन ज्ञानमाया नाचुनी जाते. रविच्या या किरणी कले व्दारे चतुर्पता ज्ञान किरण प्राप्त होवुन, प्रथम असा खेळ सुरू होतो. या किरणी कला व्दारे...

**०२. : दाहीनी** :- दाहकत्व सर्व जगी पसरन पावे । उष्णतामान सर्वत्र भासे । ज्ञान अग्नी प्रकटे ।

**अनुभवात्मक उदाहरण/गाही/दृष्टांत** :- हा चतुर्पता अथर्वन् वेद संपुर्ण पठन केल्यानंतर, या चौथ्या अथर्वन वेदज्ञानात ज्ञानांमृत आहे. याची जाणीव होते. या वेदाचे तेज हे वाचकास जाणवते. या वेदाची दाहकता भासत राहुन, या वेदाचे उष्णतामानाचा त्यास स्पर्श होवुन, त्याचा ज्ञान अग्नी कधी कधी प्रकटत राहे या दाहीनी कला व्दारे ।

**०३. : ज्वालीनी** :- ज्ञानसुर्यापासुन ज्वाला निघे । ज्ञानअग्नी धडधडा भडके । प्रकाश ज्ञानसुर्याचा पडे ।

**अनुभवात्मक उदाहरण/गाही/दृष्टांत** :- दाहीनी कला प्राप्त झाल्यावर तो पारखी वाचक हा वेद पुनःपुनः हाती घेवुन पुनःपुनः सुक्ष्म अभ्यासु दृष्टीने धिराईने वेद वाचन पठन स्मरण करतो । या वाचन कालावधीत दाहणी कला व्दारे प्रकटलेला ज्ञानअग्नी भडकु लागतो. ज्ञानसुर्यापासुन ज्ञान ज्वाला निघते । ज्ञान अग्नी धडाधडा भडकु लागे । त्याच्या डोक्यात प्रकाश ज्ञानसुर्याचा पडे । या ज्वालीनी कला सिध्दि व्दारे आता...

**०४. : दिपीनी** :- अंतरी ज्ञानाचा दिपक लागे । दिप दिपांतरी प्रकाश लागे । दिपाने दिप उजळे । प्रकाश सर्वत्र मिळे ।

**अनुभवात्मक उदाहरण/गाही/दृष्टांत** :- ज्वालीनी व्दारे डोक्यात ज्ञानसुर्याचा प्रकाश पडल्यानंतर त्या डोक्यात चतुर्पती अथर्वन् वेद ज्ञानान चतुर्पती ज्ञानाचा दिप लागतो. त्या ज्ञानदिपप्रकाशाने शब्दांची उमज येते. शब्द योग्य रितीने समजुन उमजुन येते त्याला या दिपिनी कला सिध्दि व्दारे...

**०५. स्फुर्तिनी** :- स्फुर्ति नामाची होये । ध्यानी-मनी स्फुर्ति डुले । देहे हा विदेही करे । आनंद स्वरूप पाहे । त्याशी काही न उमजे । नयना नयनी एक ज्योत होये । ज्योतीनं ज्योत मिळे ।

**अनुभवात्मक उदाहरण/गाही** :- दिपिनी कला सिध्दि व्दारे दिपक/समया लागल्यानंतर त्याला चतुर्पती नामाची स्फुर्ति होते. ही स्फुर्ति त्याच्या ध्यानी-मनी डुलायला लागते. ही ध्यानी मनी डोलावयास लावणारी स्फुर्ति त्याला पुनःपुनः चतुर्पता अथर्वन् वेदात डोकावुन वेद वाक्यांचा अर्थ स्फुर्तिने आत्मसाद करावयास लावे । आणीक बहुत काही घडे । या स्फुर्तिनी कला सिध्दी व्दारे...

**०६. : मोहीनी** :- जीव नामाशी मोहीत होये । जगाचा माया मोह दुर करे । आनंद मोह एकरूप होये ।

**अनुभवात्मक उदाहरण/गाही/दृष्टांत** :- स्फुर्तिनी प्राप्त झाल्यावर चतुर्पती नामाच्या स्फुर्तिने तो ध्यानी मनी डुलत चतुर्पती नामी मोहीत होये । या मोहीनी कला सिध्दि व्दारे...

**०७. : जीतीनी** :- इद्रिये संयमन करे । दशइंद्रिये ला जिंकुन टाके । नामस्मरणी तल्लीन राहुन, जीतींद्रिये होवुन ज्ञानसुर्याला कवटाळे ।

**अनुभवात्मक उदाहरण/गाही/दृष्टांत** :- पारखी हा इंद्रिये मन बुध्दिला जिंकुन, चतुर्पती नामी उडी घेतो । तुझया नामी उडया घातल्या आम्ही म्हणे । नामस्मरणी तल्लीनता येई । या जीतीनी कला सिध्दि व्दारे...

**०८. : तेजीनी** :- तेजपुंजः प्रकाश लाभे । तेजी तेज सम्मावत जाये । नामरूपी गहन तेज ग्रहन करण्याचे सामर्थ्य येई ।

**अनुभवात्मक उदाहरण/गाही/दृष्टांत** :- जितीनी व्दारे नामस्मरणी तल्लीनता आल्यानंतर चतुर्पती ज्ञानाच्या तेजाने तेज मिळे । तेजाने तेज सम्मावत जाये । चतुर्पती नामरूपाचे गहन तेज प्राप्त होये । चतुर्पती चा तेजःपुंज प्रकाश लाभे । या तेजीनी सिध्दि व्दारे...

**०९. : विद्युत तेजा/विद्युतेजा** :- जैशी विद्युल्लता चमके । तैशी चमकत पाहे अविनाशाशी । साक्ष/गाही घेई निराकार निर्गुण अलक्ष्य चतुर्पतीची ।

**अनुभवात्मक उदाहरण/गाही/दृष्टांत** :- देव दरबारी बिजली चमके । ज्योत हरीनामाची प्रकटे । चतुर्पतीची गाही घेई । चमकत चमकत चतुर्पतीची चमक पाहे ।

**१०. : शंखीनी** :- नाद गर्जे शंकाचा । निश्कलंकी/शंक ध्यानी मनी येई । जीव-शिव मिश्रीत ज्ञान प्रकटे ।

**अनुभवात्मक उदाहरण/गाही/दृष्टांत** :- या शंखीनी कला सिध्दि व्दारे निशं:कलंकी/शंक चतुर्पती ध्यानी मनी येई । जीव-शिव मिश्रीत चतुर्पतीचे निरंजन ज्ञान प्रकटे ।

**११. : शशिप्रभा** :- सोयंम् ज्योतीचा प्रकाश लाभे । कोटी सुर्याची शशी/चंद्राप्रमाणे शितल प्रभा अपरंपार लाभे । कोटी सुर्याच्या प्रभाने विस्मीत मनी होये । हा प्रकाश अनंत सुर्याचा भारी दिसे । अनंत गगना न सम्मावे । चौताळावरती सहस्त्र सुर्याचे तेज प्रकटे । या शशीप्रभा कला सिध्दि व्दारे...

**१२. दिपकला** :- दिपी दिपकला भारी दिसे । नानापरी दिप उजळे । अंतरी अनंत दिप लागे । प्रकाश अनंत सुर्याचा होये । सहस्त्र सुर्याचा प्रकाशाचे तेज चौताळावर प्रकटे । या ज्योतीनं ज्योत उजेड लाभे । प्रकाश या देहीत पडे । या सुर्याच्या दिपाने रूप उजळले जाते ।

ऐसा हा ज्ञानसुर्य १२ कला सिध्दि सह प्रकटे । या १२ वी च्या ठायी ३२शी उभी होये । १६ आणीं १६ होय ३२शीचा मुद्दा । या ३२ शीच्या ठाई जीवनकळा उभी होवुन तेरावी सिध्दि सिदाई उभी होते. चंद्राच्या सोळा कला चे अधिक ग्यान खंड०२/ओवी.०६: घृताचे मोती या ओवीच्या निरसनातुन घ्यावे.

| | | |
|---|---|---|
| **पिंडीतील बत्तिशी** :- बत्तीशीचे अधिक ग्यान खंड ०२ ओवी ०६ घ्रुताचे हे मोती व कायाग्यान खंड ०३ च्या ओव्यां मधुन घ्यावे. | | |
| ०१ | दशइंद्रिये, मन व बुध्दि च्या दिवटया लावुन बारा रविच्या ज्योती झाल्या बारा.... | १२ |
| ०२ | चार न चार घडी ऐसा या देहीचा कोट असलेल्या स्थुल सुक्ष्म कारण व महाकारण असे चार देहा.... | ०४ |
| ०३ | चंद्राच्या सोळा कला.... | १६ |
| | **एकुन मुद्दे** | ३२ |

तेरवी सिध्दि ठाई, येईन कुंभनीवरी :-

**१३. : तेरावी** :- ज्ञानसुर्य १२ कला सिध्दिसह प्रकटल्यानंतर या तेराव्या सिध्दि ठाई धनी उभा होवुन सिदाई वाचा सिध्दि देतो. या सुर्याच्या १२ सिध्दि पुर्ण । १३ व्या सिध्दि ठाई धनी उभा समर्थ । ही तेरवी सिध्दि अवरत । धनी उभा आहे हो आता समर्थ । म्हणुनच या तेराव्या सिध्दिला मान आहे. । या तेराव्या सिध्दिला मान । या तेराव्या सिध्दि ठाई उभा राहीन तो रविचकावरी आणी सर्व चक्रे रविप्रकाशाने न्हावुन प्रकाशीत होईन हो कुंभनी वर येवुनी.

चौदावी ला, होईन यवगाचं कामं :-

**१४. चौदावी** :- आता हरीदर्शनाची चव दाखवणारी चौदावी लागता होईन यवगाचे काम । या चौदाव्या सिध्दित उभा आहे माझा राम । हा राम करे यवगाचे काम । या चौदाव्या ठाई आनंदाची ज्योत आनंदात राही । या लेकराची बाणी पुरवे हा कृष्णराया येवुन । जे जे बोले ते ते होई या पृथ्वीवर ।

चंद्र बत्तीशी चा मुद्दा :-

दशइंद्रिये, मन व बुध्दि याच्या दिवटया लागुन या ज्योती झाल्या १२ आणी या बारा ज्योतीचा प्रकाश चौ-देहात पाडुन, हे १२ ज्योती आणी ४ देह मिळुन १६वी हाती धरल्या जाते. आणी १७वी ची या देहधरणीवर एकच जीवनकळा ज्योत उभी राहते. ऐशी १२ अन ४ मिळुन सवळी गठन । सत्रावीची जीवनकळा देहीत नांदन । अश्या रितीने या बाराज्योती अन चारदेह मिळुन १६/सोळावी आणी चंद्राच्या १६ चंद्रकला ऐशी १६ अन १६ बत्तीशी झाली हद्द । ही उभी राहली जिवनकळी सुद । या सोळा न सोळा बत्तीशीला चुकतीन मरण । नाही चौ-यांशी यवन ।

ऐसा १२ अन ४ मध्ये चंद्राच्या १६ कला मिळवुन चंद्र झाला ३२शी चा मुद्दा । आता साधवा सिदाई । देवा, १४वीची मोहीम कर गा उभी । खेळ कर गा उभा ।

साडे-एकोणविस हिस्से पाप । अर्धा हिस्सा पुण्य :- कलीत पुण्य दिडविश्व निपुण । पाप साडे अठराविश्वे गहन । एक गुण देता दान । शत गुण पुण्य प्राप्त होत असल्यामुळे अर्धा हिस्सा पुण्याच्या बळावर विश्व चालत आहे. । निर्धारा :- निर्धार करणारा ।

कली लिखो भाई निर्धारा... :-

कलीचरणाच्या दहाव्या भागात आलेल्या ग्रहणाच्या चरणाची गाही कबिराने दिलेली आहे म्हणुन ही आगम बात कबिर कहलाई ही कबिराची ओवी जळगाव दांडात जशी च्या तशी गायल्या जाते ती अशी...

॥ ओवी १३/१ ॥

जळगाव दांडातील गायनात असलेली..

॥ कबिराची मुळ ओवी ॥

**॥ सुन सुन भाई । आगम बात कबिर कहलायी ॥ घृ ॥**

**॥ प्रथम चरणों तो करो निहारा । जबलग बांधु हर मैदाना ॥**
**॥ गि-हाण पडे तो लिखा लेवो । कली लोगोको पिर ना देवो ॥**
**॥ हौसन वेद को मार/हैपक डाला । आगम सहे, नाम पुकारा ॥**
**॥ धर्मराज की लाहुर बाजी । जबलग बांधु पंडीत काजी ॥**
**॥ मिटव चिंता चित्त ध्यानी । मिटव बम्हया, भेद/वेद निशाणी ॥**
**॥ निरंजन बात रसाळी लावे । बाकी सब रसातल जावे ॥**
**॥ चौदा यम तो बांध मचावु । मुर्गा अंडा मकबर लावु ॥**
**॥ साधु संत भई घरघर जावे । अनंत रूपक्या बाता फैलावे ॥**
**॥ घरघर जाके सत्य नाम फैलावे । उसे मे सत्य कबिर कहलाये ॥**

**भजने :- ॥ कबिर परमाना सुन लेना । साहेब नाम तुम लेना ॥**
**॥ कबिर परमाना सुन लेना । हरीका भजन कर लेना ॥**
**॥ साहब बैठे झरोकेमे । सबका मुजरा ले ।**
**जैसी जिनकी चाकरी । वैसा देना दे ॥**
**॥ नबिबजी । अरज सुनो भई कोई जम्माव की । उम्मेद है बहु मानकी**

-: निरसनसह शब्दार्थ :-

**लिखा लेवे** :- लिहुन ठेवा । **पिर** :- पिडा, दुःख ।
**हौसन वेद हैपक/मार डाला** :- सत्याकडे मार्ग दाखवणारा चौथा वेद, हा वेद गुप्त आहे. असे स्वार्थि पोटपाण्याचे पुंजन करणारे तिरगुणी ब्रम्हयाने फैलवुन सर्वसामान्यापासुन सत्यदेवाचे सत्य लपवुन ठेवत, स्वार्थि तिरगुणींनी आपल्याच पुंजनी लोकांना लावुन या चौथ्या वेदाच्या सत्य मनभाव असलेल्या पुंजनाला मारले. ।
**ब्रम्हया** :- ब्रम्ह जाणतो असे कोरडया फुशारक्या मारणारा ।
**चौदा यम** :- चौदा अनुशासक, अनुशासन सांभाळणारे चौदा जन ।
**भेद** :- पंथा पंथात गट पाडुन त्यांच्यात फुट पाडुन आपले राज्य चालवणे. ।
**अनंत रूपक्या** :- तिरलोक्यातील तिरगुणी अवतार असलेल्या ३६ कोटी देवांच्या अनंत रूपाच्या कथा, कथानक, व्रत-वैकल्प, मानसन्मान वाढवणा-या कथा, स्तुतीगाण, पोट भरण्यासाठी उभे केलेले कर्मकांड.., ईत्यादी असलेल्या गोष्टी फैलावने. ज्याव्दारे काहीही साध्य होत नाही. अश्या कथा प्रसारीत प्रचारीत करने. ।
**फैलावे** :- प्रचारीत करने ।
**भई** :- भय बाळगुन, चौथ्या वेदाच्या सत्यज्ञान प्रचारीत झाल्याने चौथा सत्य धनी येईन. आणी मग तो चौथा धनी या साधुंच्या आतापर्यंत यवगान यवगात केलेल्या चुका च्या खोडा काढन. आपल्या यगगान यवगात केलेल्या चुका, खोडा 'ची पुस आता चौथ्याकडुन घेतली जाईन. याचे भय बाळगुन हे साधु घरोघरी जावुन लपुन राहतीन.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०४ ॥

॥ ओवी नं. १४ ॥

## ॥ यवगाची गणीता ॥

॥ बेचाळीस लक्ष, विस हजार । यवगा ची गणीता ।
एका एका, यवगाचं गिण्यान । भाकलं आता ॥
॥ सतरा लक्ष, अठ्ठाविस हजार । कृता यवगाची मांडणी ।
जपी-तपी, सन्यांशी-योगी । बसले अनुष्ठानी ॥
॥ बारा लक्ष, छान्नव हजार । त्रैता यवगाले दिले ।
गिरी कपाटी, योगी-जोगी । जावुन लपले ॥
॥ आठ लक्ष, चौसष्ट हजार । व्दापर यवगी पुर्ण ।
जपी-तपी, सन्यांशी-जोगी । करते याग-होमं ॥ ०४ ॥
॥ चार लक्ष, बत्तीस हजार । कल यवगाले दिले ।
नाम-सुमरन, ग्यान-ध्यानं । सर्व विसरले ॥
॥ कलयवगा मध्ये, नाम श्रेष्ठ । सांगतले आहे ।
योगी-जोगी, ऋषि-मुनी । तुयी वाट पाहये ॥ ०६ ॥

भजने :- ॥ अठ्ठांशी सहस्त्र, ऋषि लपले । गिरी कपाटी ।
तुया नामा, वाचुन नाही । चुकत चौ-यांशी ॥
॥ अठ्ठांशी सहस्त्र, ऋषि विनंत्या । करते या देवाले ।
मोडा हा कली देवा । बाहेर काठा आम्हाले ॥



॥ ओवी नं. १५ ॥

॥ भाकल्या शकुनाची जळगाव पाठातील जुनी ओवी ॥

## ॥ धनी येईन नितरूप ॥

या मिर्तलोकी.. । धनी येईन नितरूप ॥ घृ ॥
॥ कल यवगी, येईन अवतार । खेळ करन भुम्मेवरं ।
मचल सृष्टीमध्ये ख्याल । या मिर्तलोकी, धनी येईन नितरूप ॥
॥ कल यवगी, येईन अवतार । खेळ करन भुम्मेवरं ।
पैश्याचा तोट पडनं आपोआपं । या मिर्तलोकी...धनी येईन
॥ कल यवगी, होईन अवतार । खेळ करन भुम्मेवरं ।
मेदनीचे पाणी मेदनी पियल आपोआपं । या मिर्तलोकी..धनी..
॥ कल यवगी, होईन अवतार । खेळ करन भुम्मेवरं ।
अन्नाचा तोट पडनं आपोआपं । या मिर्तलोकी..धनी येईन..॥०४॥
पेवाचे जोंधळे पेव खातीन आपोआपं । या मिर्तलोकी..॥०५॥
कास्तकारं शेती सोडनं आपोआपं । या मिर्तलोकी..धनी..॥०६॥
उदिम धंदे सोडतीन आपोआप । या मिर्तलोकी..धनी ॥०७॥
ढोलातुन घुबडा निघतीन आपोआप । या मिर्तलोकी..धनी..॥०८॥
गरतीचा येशवा येईन आपोआप । या मिर्तलोकी..धनी ॥०९॥
पाण्यात भोपळा डुबन आपोआप । या मिर्तलोकी..
धनी येईन नित्य रूप ॥ १० ॥

डहाकी :- ॥ अडिच दिवस मागतो राजा । कानड ध्वजा ।
अनामत भजा । निशं:कलंकी लागन ध्वजा ॥

भजने :- ॥ निशं:कलंकी अवतार । खरा हो खरा ।
तुम्ही या देवाचं भजन । करा हो करा ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०४ ॥
॥ ओवी नं. १६ ॥
॥ जुनी मुळओवी ॥

## ॥ या कलयवगा.. आला भंग ॥

॥ या कलयवगाला....। आला भंग सागे जगा ॥ घृ ॥

॥ कलीचे दिवस, राहीले थोडे । आता तरी, उघडा डोळे ।
नका होवु, आंधळे-बहीरे । बसन दगा....
या कलयवगा आला भंग सागे जगा ॥ घृ ॥
॥ नका सोडु, घरदार । करा प्रपंच, व्यवहार ।
खोटयाला भजु नका जराभर । सत्याला भजा...
आला भंग सागे जगा ॥ या कलयवगा....
॥ सत्या ठाई, देव असे । त्या नलागे, भक्तीचे पिसे ।
ठाई-ठाई, रूप दिसे । यवगा यवगी.....
आला भंग सागतो जगा ॥ या कलयवगा....
॥ दया-क्षमा, शांती धरा । सारंगधर, हद्यी भरा ।
आदीरूप येईन घरा । करन जागा...
या कलयवगा....आला भंग सांगे जगा ॥ ०४ ॥

भजने :-
॥ या कलयवगा मध्ये, सत्यवग होणारं ।
खरं-खोटं जरा नाही लपणार ॥
॥ या कलयवगा मध्ये, सत्यवग येणारं ।
कृष्ण रायाच भाकलं, कदा नाही चुकणार ॥



॥ ओवी नं. १७ ॥
॥ जुनी मुळओवी ॥

## ॥ कलयवगात सत् यवग होणार ॥

॥ या कलयवगातं...। सत्यवगं होणार नितं ॥ घृ ॥

॥ हाकमत-हुकुमत, जवरदस्ती । यान बहुलोक झाले कष्टी ।
सत्य भाव, नांदव चित्ती ॥ या कलयवगातं...
॥ धन-दौलत, माया कपटी । देवादिकाशी अंतर ठेवे ।
ईला जागा देवु नये ॥ या कलयवगातं...
॥ अठरा भार, वनस्पती । हे होय, काडी-मुडी ।
मुखात नाही येणार, कोण्या वेळी ॥ या कलयवगातं...
॥ मानव ऋषिश्वर होतीनं । जटा भार वाढवतीनं ।
पाताळी मेंद-या लागनं ॥ ०४ ॥ या कलयवगातं...

भजने :-
॥ या कल यवगात, सत् यवगं होणारं ।
कृष्ण रायाचं भाकलं, कदा नाही चुकणार ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०४ ॥
॥ ओवी नं. १८ ॥
॥ सावंगा-जळगाव दांडातील मुळावरची ओवी ॥

## ॥ गिरी पर्वत मेरू शिखर ॥

॥ गिरी पर्वत मेरू शिखर । उडुन जातीनं ।
उडुन जाईन तेव्हा मग । कोण राहीन ? ॥
॥ बहु यवगाचं राज यवग्यानं । सागंतलं एक ।
अवघ्या खाणीच्या देहे जीवाला । बहु होईन दुःख ॥
॥ पाषाणाची लाही फुटन । अग्न डोह होईन ।
अग्न डोह होतीन तेव्हामग । कोण राहतीन ? ॥
॥ ब्रम्हा विष्णु शंकर हेही । हर्रप हारतीन ।
हर्रप हारतीन तेही मग । शरणागत येतीनं ॥
॥ समुद्रा मध्ये महा सागर । आहे अंतापार ।
केल्या भक्तीचे होतीन सांड । डुबतीन जन ॥
॥ समुद्राचा पोहन कार । कोण आहे ? ।
कोण आहे हो देवा । आम्हा सांगावे ॥०६॥

॥ समुद्राचा पोहन कार । तो माझा जगजीवनं ।
रत्ती रत्ती गोळा करनं । देव आपल्या हातानं/अवघे जन ॥०७॥
॥ अडीच रोज/दिवस मागतों/मागनं राजा । कानलं ध्वजा ।
कानलं ध्वजा, तुम्ही अनामत भजा हो भजा ।
तुम्ही अनामत भजा । निश्कलंकी च्या, लागतीन ध्वजा ॥
॥ अनामताला अरज करतो/करनं । राया अनामीक ।
अवघंच आणनं घरी घेवुन । काही नाही ठेवणार ॥
॥ सत्य बोला सत्य चाला । सत् यवगं येणारं ।
सत्यधारी राजा अहीन खुम्म । तो ही येणार ॥
॥ बहु यवगाचं राज यवग्यानं । सांगतलं एक ।
अवघ्या खाणीच्या देह-जीवाला । बहु होईन सुख ॥११॥
॥ अलक्ष्य पद या अहीनाला । तो देणारं/येणार ।
निजरूप आहे भुम्मा । तो, जागी करणार ॥
॥ बादशाही तक्तं अनामत ज्योत । हद्यी खेळनं ।
नवं यवुग राज भैसाचं । भैसाचं होईन ॥ १३ ॥

डहाकी :- ॥ तिरगुण तिरगुण तिघांचा । दिवस उडवन साताचा ।
आठवा हो ! दिवस येईन राहुचा । तेव्हा शिक्का चालनं भैसाचा ॥

**भजने** :- ॥ शुन्य उडवनं तिरगुणांच । राज होईन हो होईन भैसाचं ॥
॥ सत् यवगाच परमान/प्रमाणं । कृष्ण महाराजा । जागी करून दाखवनं
॥ यवग काबीज करन सारं । या भैसाचं। राज्य होईन भुम्मेवरं ॥
॥ राज्य होईन भैसाचं । याहीच्या सुखानं, रहीत नाही जाणार कुठं ॥
॥ आहो याहीच्या राज्यात । सत्ता नाही नाही कोणाची चालत ॥
॥ आहो भैसाच्या राजी । सुखः नाही मावणार तिरभवनी ।
घरोघरी नाम सुमरनी । होतीनं प्राणी ॥

**शब्दार्थ** :- यवग्यानं :- योग्यानं । हर्रप :- शुध्द हरपुन जाणे, सुद-बुध हरपने । सांड :- सडा, सांडणे । समुद्राचा पोहन कार :- खवळलेल्या समुद्रात उडी टाकुन समुद्रात डुबणा-याला तारणारा । रत्ती रत्ती गोळा करनं :- राई ईतक्या लहान आकाराचे सांडलेले तेही जमा करून गोळा करन. । तक्तं :-राज सिंहासनं । रोज :-दिवस, दिन

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०४ ॥

॥ ओवी नं. १९ ॥

॥ भाकल्या शकुनाची मुळावरची ओवी ॥

## ॥ तिरगुण तिरगुणं तिघांचा ॥

या ओवीची पलट ओवी खंड०७/ओवी-२६ मध्ये दिलेली आहे.

॥ तिरगुण तिरगुण तिघांचा । दिवस उडवण सातांचा ।
राहु दिवस येईन । शिक्का चालन आदी भैसाचा ॥
॥ दिवस सातं, केला नाश । नाश केला मुळयवगाचा ।
याहीच्या वरत, शिक्का येईन । पहा या अवद्युत रायाचा ॥
॥ राज पदी, नाही केली सुदी । ब्रम्हा-विष्णु शंकरानं ।
तिन यवगाची, तसनस केली । कळु येतीन याहीचे गुण ॥
॥ भैसा आंगचा, महेष झाला । पिटला कैलासा मध्ये ।
व्दैताचे, देव झाले । पृथ्वी च्या मध्ये ॥ ०४ ॥
॥ धोंडया वरत, धोंडा येईनं । पळ/भय सुटन त्या विघ्नाशी ।
व्दैताचे, देव झाले । भंग येईन त्याहीशी ॥
॥ उजबीज-किजबीज, झाली याहीची । ही झाली संधी/सदवी ।
संधी/सदवी होवुन, पदवी उडाली । ठाव नाही दोहीताशी ॥६॥
भजने :- ॥ या तिरगुणांची पर । झाली अजवर ।
शुन्य उडवनं । नाही राहणार जराभर ॥



॥ ओवी नं. २० ॥

॥ भाकल्या शकुनाची सावंगा-जळगाव दांडची मुळावरची ओवी ॥

## ॥ तिरगुणा जागी राहयं ॥

॥ तिरगुणा जागी राहय । सांगते भविष्य पाहयं ॥ घृ ॥
॥ भविष्य सांगाया, भैस आला । तिर गुणांचा, दिवस उडाला ।
उभा राहयं/राहिला, चौथ्या खुम्माला ॥ तिरगुणा..
॥ प्रकाश पडनं धरणी वरी । लाही फुटनं बा पाषाणी ।
तेव्हा डगमगनं धरणी ॥ सांगे भविष्य पाहयं..
॥ प्रभा फाकनं, धरणीवर । खालचे वर्ग, वर येणारं ।
जागी करन आपल्या हातानं ॥
किंवा प्रचलीत म्हणनी :- याहीचा हिशोब, कोण घेणार ? ॥
॥ गेला मुनी, ठावं नाही । जन लोक, देतीनं गाही ।
सांगी सांगतल्यानं सांगवत नाही ॥०४॥ जागी राहयं..
॥ गेला मुनी, तो येईन । आठा दिवसाची मांडणं ।
राहु दिवस, नाव टिपनं ॥ सांगे भविष्य पाहयं..
॥ भैसाचा खेळ होईन नवा । नवा राजा नविन पृथवा ।
लावनं तिरलोक्या मध्ये दिवा ॥ जागी राहयं..
॥ लागनं सत्याची ज्योत । नाही राहणार पापाचे पर्वत ।
पापी जातीनं पापानं जळुन । येवुन महाराजा...
जागी करनं/करा तिर भवनं ॥
॥ शिक्का येईन, भैसरायाचां । दिवस उडवनं, तिरगुणांचा ।
नाही ठेवणार, याहीची सत्ता ॥
॥ बादशाही तक्ती अनामत ज्योत । देईन/होईन देहेजीवाला बहु सुख ।
याहीच्या सुखानं रहीत । नाही जाणार कुठं । राज भैसाचं उभ ईथं ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०४ ॥

॥ ओवी नं. २१ ॥

॥ दर्यापुर दांडातीन चणकाजीच्या पाठातील १६ ओव्या पैकी एक ओवी ॥

## ॥ तुम्ही तिकडुन ॥

॥ तुम्ही तिकुन, आम्ही इकडुन । मध्ये वाहे भागीरथी ।
नित रूपाचा, हा खेळ । चुकणार नाही कधी ॥
॥ पृथ्वी वरतं, दुनुन खेळं । कोणा चा होयं ? ।
अंतरी शिक्का, मोहर गडे हो । भैसाचा आहे ॥
॥ विडा मोहरं, ध्वजा असमानी । निशाण भक्तीचं ।
गर्भि फौजा, उभ्या होतीन । हरी नाम भैसाचं ॥
॥ पुर्वेच्या फौजा, पश्चिमेला । करन चढाई ।
महा युध्द, होईन भारी । हरी नामाची लढाई ॥ ०४ ॥
॥ हरी नामाच्या, फौजा सुटनं । आवाज दनादणं ।
शिपी व-हाडा, मध्ये गर्भि । फौजा चालन ॥
॥ मेरू मैदानी, गर्दि फार । एकच होईन दाटी ।
वर अग्नीचा, डोह होईन । तारण जगजेठी ॥
॥ सप्तही सागर, आटुन जाईन । वर अग्नी मुळं ।
गंगा-यमुना, सिंधु सागरी । उडन धुळं ॥
॥ राई रूक्माई, येईन गडेहो । होईन प्रकटं ।
सत्रावी च्या, पाझरानं भरनं । अमृताचे माठं ॥ ०८ ॥

**भजनेः-** ॥ सत्रावीचा पाझरं । अमृत गंगा । वाहे झरझरं ॥

-: शब्दार्थ :-

**दुनुन** : दुहेरी, डबल । **तिकुन** : तिकडुन, समोरच्या बाजुने । **इकुन** : इकडुन, या बाजुने । **भागीरथी** : भागीरथाने अथक प्रयत्नाव्दारे आणलेली स्वर्गावरची गंगा म्हणजे भागीरथी नदी । ॥ अंतरी **शिक्का** नामाचा । चाकर आहे देव भक्ताचा ॥ **विडा** भावाचा होय । या विडयानं देव करतो संभाळ ॥
**असमानी** : आकाशी, आकाश, असमान, अंतरी : अंतःकरनात, अर्तभागात
**गर्भि** : गर्भातील, देवळातील/राउळातील मध्य भागातील गर्भा मधल्या,

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ ओवी नं. २२ ॥

॥ गिरीपर्वत या मुळावरची ओवी-खंड०४/१४ ची
भाकल्या शकुनाची प्रचलीत म्हणनीत आलेली छोटी ओवी ॥

## ॥ नव्या यवगाचं राज्य ॥

॥ नव्या यवगाचं, राज्य योग्यानं । सांगतले एक ॥
अवघ्या खाणीच्या, देह जीवाला । बहु ठेवन सुखंः ॥
॥ पहाड पर्वत, मेरू शिखर । उडुन जाईन ।
उडुन जाईन । तेव्हा कोण राहीनं ? ॥
॥ अग्नी चा, होईन डोहं । पाषाणाची, लाही फुटनं ।
लाही फुटनं । तेव्हा कोण राहीनं ? ॥
॥ समुद्रा चा, पोहन कार । कोण आहे ।
कोणं आहे देवा । आम्हाला सांगावे ? ॥ ०४ ॥
॥ समुद्रा मध्ये पोहन-पाणी । आहे अंतापार ।
बम्हा विष्णु, शंकर उडुन । जाईन अंतराळ ॥
॥ समुद्राचा, पोहनकार तो । माझा जग जीवनं ।
केल्या भक्तीचा होईन सांड । बुडतीन जनं ॥ ०६ ॥

भजने :-
॥ भक्ती करून, निःसंग होजो । तु प्राण्या आता ।
या भक्तीला, भंग नकोआणु वाया । जाशीन अघोगता ॥
॥ भक्ती करा, देहजीव झीजवा । नका आणु तोटां ।
केली कमाई, वाया जाईन । पाण्याच्या लोटां ॥
॥ भल्या भल्याला, पडली गिलटी । मुळ मायेचा पसारा ।
या गंगेमध्ये, नाव चालली । थाप पाहयजो हुशारा ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ ओवी नं. २३ ॥
॥ भाकल्या शकुनाची ओवी ? ॥

## ॥ सांगतो भविष्याची वाणी ॥

॥ सांगतो भविष्याची वाणी । ध्यान देवुन, ऐका कानी ।
उभा आहो, देवाच्या सुमरणी । सांगतो खरं....
तुम्ही पाहजा यवगा वरं ॥
॥ एकोन्नीसे बेएंशी/१९८२ सालातं । दोन संकाती, एका महीन्यात
उडवन हो माघं मास । या सालात....
काळ पडनं या धरणीतं ॥
॥ पहीला धोंडा, आश्वीनात । दुसरा धोंडा, फाल्गुनात ।
त्या बेएंशी सालात । धोडयावर धोंडे दोनं...
मो-हं काळ बहु कठिनं ॥
॥ दोन हजार/२००० साली । भविष्य होईन महाभारी ।
अष्ट दिशा हालन धरणी । वीस तास..
कोणा नाही कोणाची खबरं ॥ ०४ ॥
॥ दोन हजार सालात । सात ग्रह, राशीत येणारं ।
पाहजा डोळ्या समोर । पाहयजा मो-हं..
सांगतो देवमन अवतार ॥
॥ धरणी कंप, कितीक होतीनं । पहाड-पर्वत, जाईन फाकुन ।
यवगा वर, भैस उभा राहीन । सांगतो खुणं ...
राहुवार, दिवस येईनं ॥
॥ राहुवार, दिवस येईन । भुम्मेवर कोरं, धान्य पिकनं ।
पृथ्वा होईन, अजाताची खाणं । अहिन निती....
राहीन हो मानवाची ॥ ०७ ॥

भजने :-
॥ नित घ्यास सोहंम् ध्यानं । नित्य नेमानं घ्याहो अवद्युत नाम ॥
॥ नित घ्यास सोहंम् ध्यानं । नित्य नेमानं कराहो अवद्युत भजनं ॥

टिप :- या ओवी बद्दल दोन विचार प्रवाह पंथात वाहत आहेत. पहीला विचारप्रवाहाचे भक्त जन म्हणतात की : ही ओवी जुनी असुन काळाच्या कसोटीत 'जशीच्या तशी खरी' ठरली असल्यामुळेच जन मानत नाही. तर दुसरा विचारप्रवाहाचे भक्त जन म्हणतात की : ही ओवी जुनी नसुन नवी आहे. ती कुणीतरी नव्या काळाच्या भक्तानं लिहुन गायनात आणलेली आहे. म्हणुनच वरील ओवीचा अभ्यास करून अभ्यासाअंती जो तुमचा निष्कर्ष येईल, त्या निष्कर्षाप्रमाणे तुम्हास कळल तसे म्हणावे. जुनी अथवा नवी ? हे तुमचे तुम्हीच ठरवा.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०४ ॥

॥ ओवी नं. २४ ॥

॥ दर्यापुर दांडातील चणकाजीच्या पाठातील १६ ओव्या पैकी एक ओवी ॥

## ॥ सांगतो खरं पुढे होणारं ॥

॥ सांगतो खरं, पुढे होणार । पृथ्वी वरं ।
लटकं मानु, नये जरा । नाही चुकणारं ॥ घृ ॥
॥ सांगतो श्रम, दया धर्म । डुबतीन सारे ।
पृथ्वी चे, दान शुर । लुटल्या जातीन सारे ॥
॥ सोडतीन धर्म, कठीन कर्म । करतीन लोक ।
गाई-गोठान, होईन हो । हरी भक्तीचे ओघ ॥
॥ अभक्त जन, करतीन येणं । भक्ता घरी ।
सावंग जळगाव । शिणन कृष्णपुरी ॥ ०४ ॥
॥ वेळो वेळा, करतीन मोडा, भजन सोडा । म्हणतीन सोडा ।
हे बेजार करतीन । हरी भक्तीचा जिव्हाळा ॥
॥ करतीन घाई, वाजन टाळी, देव नाही । म्हणतीन नाही ।
सहाही दर्शनाची सत्ता । उडवन तेही ॥
॥ सहा जोग, वैभोग । डुबतीन सारे ।
ऐसे सुटतीन या । कल यवगाचे वारे ॥
॥ करतीन बडबड, सदा खडखड । होईन घरोघरी ।
आपसात लढाया होतीन भारी । आहो भारी ॥ ०८ ॥
॥ बसतीन लोक, करतीन घोक । त्या बुध्दिचा ।
किरकोट बाजार । भरन पाखंडाचा ॥
॥ करतीन जोर, पुसतीन घर । साधु संताचे ।
हरी भजन सोडुन देतीन/पळतीन दयाळाचे ॥
॥ करतीन जोर, पुसतीन घर । अनामीकाचे ।
थर थरा कापतीन बडवे सांवंग्याचे ॥
॥ मारतीन भडभडा, मोडतीन खोडा । दारू मासांच्या ।
मग म्हणन सत्य आहे । कृष्णाची वाचा ॥ १२ ॥
॥ सोडतीन रित, होतीन भयाभित । मग कळनं ।
लोकसत्ता, गडे हो । त्याहीच्या वर गाजनं ॥
॥ समया कठीन, आड येतीन । दुःखाचे पर्वत ।
तरी भंगणार नाही । कहीकाचे व्रत ॥
॥ साल शंभर, राहीन जोर । कल यवगाचा ।
मग एक, विपरीत होईन । खेळ महाराजाचा ॥
॥ लहान पण, तिथं जिवन । राहीन पाण्याचे ।
सप्त सागर, आटुन जाईन । पृथ्वी वरचे ॥ १६ ॥
॥ एक मेघनी, बरसन पाणी । पहा अग्नीचा ।
क्षिर सागर, आटुन जाईन । पहा विष्णुचा ॥
॥ चहु कोणी, लागनं अग्नी । जळनं सारं ।
ब्रम्हा विष्णु शंकर । चैत्यन्याचे घरं ॥ १८ ॥
॥ अकांत फार, पृथ्वी वर । होईन कलकोट ।
कुठे अवधुताची वस्ती । पुसतीन वाटं ॥
॥ धरतीन नाक, मारतीन हाकं । देव रायाले ।
देव येईन गडे हो । मांडवस भावळीले ॥ २० ॥
॥ सावंग पुर, जळगाव नगर । कृष्ण पुरी ।
इथ जम्मा होईन । अल्लम दुनिया सारी ॥
॥ मागतीन पाणी, आकाश वाणी । घेतीन ब्रम्ह रस ।
याच दिवशी, राहु उगवन । परवेश हो ॥

॥ सांहं कारी, निरा धारी, पवना आधारी । नांदनं धनी ।
देव राज होईन हो । मरणार नाही कोणी ॥ २४ ॥
**भजने** :- ॥ सांगतो खरं । धुत गाजन भुम्मेवरं ॥
॥ सांगतो खरं । धुत गाजन ब्रम्हाविष्णु शंकरावरं/माया-चैतन्यावर ॥

**-: शब्दार्थ :-**

**लटक** :- खोटं, असत्य । **रित** :- प्रथा । **मांडवस भावळी** :- गुडीपाडवा
**चहु कोणी** :- चारही कोणातुन, चारही बाजुने । **अल्लम दुनिया** :- संपुर्ण जग । सारं, सगळं विश्व, । **परवेश** :- प्रवेश, सृष्टीमध्ये प्रवेश घेवुन प्रवेशी होणे, सृष्टीमध्ये अवतरणे ।



**॥ ओवी नं. २५ ॥**

॥ दर्यापुर दांडातील चणकाजीच्या पाठातील १६ ओव्या पैकी एक ओवी ॥

## ॥ चुकलो देवा फार ॥

॥ चुकलो देवा फार । बहु आहे मी अन्जानं ।
समजावुन सांगा, मला चतुर्पती ग्यानं । आहो ग्यानं ॥
॥ चतुर्पता । देवा, होय तुमची ।
अगाध आहे । देवाच्या नामाची, आहो पायाची ॥
॥ अमृताचे झाड । देव उभे राउळात ।
भक्त तारू केले, या चतुर्पती नामातं ॥
॥ ऐस देवा तुये । चतुर्पती नामं ।
आत्मा ठेवला, त्वां कुडीमध्ये झाकुन ॥ ०४ ॥
॥ जीव धुजीवर, । उभी परमेश्वराची ज्योत ।
ज्योत उभी केली त्वा । शक्तीच्या महालात ॥
॥ उभे देव, केलं शक्तीचं आसनं । आहो आसंन ।
कोटीवर आयुष्य, दिलं मानवाला नेमुन ॥
॥ कोटी राहु केली । आली सव्वाशे चालुन ।
साठी वर्षाचा । तुम्ही केला ओगमानं/आयुष्यमान ॥
॥ आम्ही साठीत, तुम्ही गुप्त देवा । असं काहो नेमंलं ? ।
गर्भि घात झाला । काही, सार्थक नाही झालं ॥ ०८ ॥
॥ आम्हा साठी, तुम्ही गुप्त देवा । असं काहो नेमंल ? ।
कलीचा मानं । मला गुप्त होणं आलं । आहो आलें ॥
॥ कली तुमचा, जग तुमचे । देवा तुम्ही आहा चवताळी ।
माकडाला भेता ? कसे तुम्ही शिपाई ? ॥
॥ सातोडीत कली । देवा तुम्ही आहा चवताळी ।
आपलं सैन्य/सेना, देवा । पदरी धरावी ॥
॥ कली सरता, पुढे भक्त । महा भार होतीनं ।
क्षिर सागरचा, महा विष्णु । शरणागत येईन ॥ १२ ॥
॥ आकाश कराडनं, ही धरतरी हालंन । आहो हालंनं ।
चंद्रसुर्य तारांगण देवांगण । हेही वाटा भुलतीनं ॥
॥ श्री कृष्ण, बळीराम दादा । हे गुप्त राहीन/होईन ।
सहादर्शन, सहाजोग, दत्तमुर्ति । होईन गाईगोठानं ॥
॥ पुढे अवतार, निशःकलंकी येईनं । आहो येईनं ।
तेव्हा ब्रम्हा, विष्णु शंकर । हे पळ काढनं ॥
॥ तिरकुटाचे, अम्मल ठाणे । देव उडवनं । आहो मोडंन ।
याहीचे ठाणे, देव रिकामे पाडतीनं । आहो पाडतीनं ॥ १६ ॥
॥ पाचही पांडव, सहावी द्रौपदा । आहो येईनं ।
पृथ्वीचे कारभारी, हे होतीन । सहा जनं ॥
॥ पुढं राज्य । या भैसाचं होईनं ।
नित्य रूपी राज्य चालनं । भैसाच्या परमाणं ॥

॥ स्वभाग गुण, दया सोडुन । चंचंल पण ।
अगण्या बाण, हाती घेवुन । लिनता ठेवा धरून ॥ १८ ॥
भजने :- ॥ तिरभवनी लहानपण धरलं देवानं ।
तुम्ही नका राहु गडे हो । अभिमानानं ॥
॥ अभिमानाचा होईन अपमान । योगी आला ।
तिरभवनी धाक पडला । बम्हादिकाला ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ ओवी नं. २६ ॥
॥ भाकल्या शकुनाची मुळ जुनी ओवी ॥

## ॥ भाकलं पुर्विचं जरा ॥

॥ भाकलं पुर्विच जरा.. । नाही-नाही म्हणता येईन घरा ॥ घृ ॥
॥ तिन यवगाचे दर्शन । भरून घेईन राया निर्गुण ।
भरून घेईन आदीपुरूष ॥ भाकल पुर्विचं जरा...
॥ तिन यवगाचा मुजरा । भरून घेईन आदीपुरूष ।
भरून घेईन भैसराज ॥ भाकल पुर्विचं जरा...
॥ तिन यवगाचा मोजबा । भरून घेईन भैसराज ।
भरून घेईन भैसराज ॥ भाकल पुर्विचं जरा...
॥ जिव कंढीचा उपार । भरून घेईन भैसराज ।
भरून घेईन आदीपुरूष ॥ ०४ ॥ भाकल पुर्विचं जरा...
॥ ताटी कंटी उपार नित । जेवतीन दोघे जन ।
भुक लागली म्हणतीन जन ॥ भाकलं पुर्विचं जरा...
॥ झाडलें भैसाचं आंगन । याला यवगं झाले तिन ।
भरून घेईन तिन यवगाचं उसण ॥ भाकलं पुर्विच जरा...
॥ अखेर साल झाडा झुडा । भगवा झेंडा सारा ।
खेळ अस्मानीचा आला ॥०७॥ भाकलं पुर्विच जरा...
भजने :-
॥ अस्मानी ध्वजा । मन लावुन भजा । राजा येईन हो यवगाचा/देहीचा ॥
॥ नित घ्यास सोहंम् ध्यानं । नित्य नेमानं कराहो अवद्युत भजनं ॥



॥ ओवी नं. २७ ॥
॥ भाकल्या शकुनाची मुळ जुनी ओवी ॥

## ॥ भाकलं जरा नाही चुकणार ॥

॥ मोडन दुर्जनाचे गावं । चालन पांडवाचे नावं ।
चालन पांडवाचे नाव । हे भाकलं जरा नाही चुकणार ॥
॥ उडवन तिरोपतीची टोपी । चतुर्पती आहे सुदी ।
चतुर्पती आहे सुदी । हे भाकलं जरा नाही चुकणार ॥
॥ उडवन जंतराचे भार । किसनजी आले अवतार ।
किसनजी उभे पुर्ण अवतार । भाकलं जरा नाही चुकणार ॥
॥ लदबद ज्योतीचा प्रकाश । याहीचा उजेड चवताळात ।
याहीचा उजेड चवताळात । हे भाकलं जरा नाही चुकणार ॥०४॥
भजने :- ॥ हत्ती घोडे दरबार । किसनजी देव आले सरदार ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



-: भाकल्या शकुनाचा खंड ०४ स्तंभित :-



॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. ०१ ॥

॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ गुरूदेव आदीमुनी ॥

॥ ओळखा तुम्ही.. माझा गुरूदेव आदीमुनी ।
सांगा तुम्ही..माझा गुरूदेव आदीमुनी ॥ घृ ॥
॥ शक्ती माता माय धरणी । विर्जन नव्हतं पिंड पोहनी ।
तेव्हा कोण होता गुरू ? ॥ सांगा तुम्ही....
॥ या पिंडाशी पवन मिळाला । जली पिंड सम्मावलां ।
कर्ता-यानं कार केला ॥ ओळखा तुम्ही...
॥ पाचव्या वेदाचा सुस्कारं । ये अवतारा कार करं ।
बांधले बिन खांबाचे घरं ॥ ओळखा तुम्ही....
॥ आधी उभे नारायण । मग घडले सगुण-निर्गुण ।
तेथुन झाले देवांगण ॥ ०४ ॥ सांगा तुम्ही....

डहाक्या :-
॥ ऐसा सुतार कारागीर । नव्हत वासलं किंकर ।
आपरूप माडी केली तयार ॥
॥ निर्गुणपुरीचे, आले कोल्हाटी । सोहंम्-शक्ती, ढोल पिटवती ।
चौयवगाची झाली दाटी ॥
॥ पृथ्वीवर एकच डोळा । गुरूपुत्र आहे वेगळा ।
जाण महाराजाच्या कळा ॥ सांगा तुम्ही..

भजने :-
॥ गुरू नाही चेला नाही । नाहीफुंकले कान कोणी ।
त्याचा गुरू देव उभा । आदी मुनी धनी ॥
॥ गुरू-चेला, सिध्द-साधक । येईना मनी ।
एकच जाणतो राया । आदी मुनी धनी ॥
॥ शंक कळवते ग्यान । खोटया-नाटयाचे यानं मोडले अनुष्ठान ॥
॥ आदीमुनी । तुया वाचुन नाही कोणी । लवकर याहो..॥
॥ आदीमुनी । आमचा माथा तुया चरणी । लवकर याहो..॥



॥ ओवी नं. ०२ ॥

॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ आगम-उगम गुरू-गणको ॥

॥ आगम-उगम गुरू गणको । शोध आता निजपद ।
आत्म परात्पर सोहंम् । ज्योत निरंजन ॥
॥ आर्बुस-निर्बुस घुम्म घुम्मकार । आकार केला पृथ्वीचा ।
उभी केली चैत्यन्या । शोध करा निर्गुणाचा ॥
॥ निराकार निर्गुण-निरंजन । ज्योत मला दाखवं ।
अनंत ब्रम्हांडा च्या वरतं । सेरूप ओळखावं ॥
॥ अनंत ब्रम्हांडा च्या वरतं । सेरूप कृष्णाचे ।
सेरूप कृष्णाच पुढे सुखं । अनंत यवगाचे ॥ ०४॥

भजनं :-
॥ तुया रूपा-सुखाची गाही । आम्हा दयाहो हरी या देहीवरी ॥
॥ रूप दावा देहीवर । माझा माथा तुमच्या चरणावर ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. ०३/०१ ॥

॥ मुळावरची जुनी ओवी ॥

## ॥ निर्मळ ढळमळ ॥

वरचरण :- ॥ कैची हे माया, कैची हे काया । कैचा सागरं ।
कैची देवता । कैचा हा विस्तारं ॥

॥ ढळमळ निर्मळ । सप्त हे सागरं ।
कैश्यानं विरजलं ? सांगा मुळं ॥
॥ अडीच या रती/रक्ता या मासाची । बांधुनीया मुसं ।
त्यामध्ये हा हंस/आत्मा । उंच आहे ॥
॥ उपजीता जन्मता । लावलीसे राखं ।
आता झालो पाक । तुम्हा हातं ॥
॥ उपजीता जन्मता । फुंकलेसे कान ।
आता गुरूला मान । कैश्या/कोण्या परी ? ॥०४॥
॥ कईचा हा गुरू । कईचा हा पंथ ।
धनी अनामत । वेगळा/उभा आहे ॥
॥ धनी ! तुच माझा गुरू । तुच माझा पिता ।
अवघं साहय झालं । तुम्हा हाता ॥
॥ अवघं साहयं झालं । देवा तुम्हा हात ।
सुखः नांदव इथं । महाराजा ॥
॥ तुच दिले हातं । तुच दिले पाय ।
तु आमचा होय । मायबाप ॥
॥ तुच माझी माय । तुच माझा बाप ।
तुच आदीरूप । गुरू जनात/सर्व जनात ॥०८॥
॥ गुरू या चेल्याचा । दंडवत दोघांचा ।
अनामत ठसा । आदी पुरूषाचां ॥
॥ याहीची ही आकाशवाणी । ऐकली या कानी ।
आता धरली बाणी । महाराजा हो राया ॥ ..पलटदांड चे चरण

भजने :- ॥ गुरू-चेला, सिध्द-साधक । येईना मनी ।
एकच जाणतो आदीमुनी राया । आमचा धनी ॥



॥ ओवी नं. ०३/०२ ॥

॥ जुनी मुळ ओवी ॥

## ॥ भक्ती हे दावुन, ढोंग फैलावती ॥

॥ भक्ती हे दावुनी, ढोंग फैलावती । सोंग हे दावती, जगामध्यी ॥
॥ कान हे फुंकुन, मुंडा जरी केला । वाच्या नाही त्याला, देवव्दारी ॥
॥ गुरूचा मंतर्, चेल्याच्या कानी । लागलासे ध्यानी, गुरूमार्गाच्या ॥
॥ चेला जरी म्हणे, गुरूनं कैसे केले ? । तन मन धन, लुटी नेले ॥
॥ गुरू आंगचे पाप, चेल्या आंगी लागे । दोघेही बुडाले, ठाव नाही ॥
॥ गुरू या चेल्याचा, विनवाद दोघांचा । अनामत ठसा, अवधुताचा ॥
॥ हंकाराची वाचा, अहीन हा भला । बट्टा नाही त्याला । रत्तीभर ॥

भजने :-

॥ गुरू गुरू म्हणता थोर । धनी आल्यावर मोडनं गुरूची खोडं ॥
॥ तुच कर्ता, तु करविता । तु बुध्दिचा दाता ।
तुमच्या वाचुन आणीक दुसरा । कोणी नाही आता ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०५ ॥

॥ ओवी नं. ०४ ॥

॥ कृष्ण चरित्र ज्ञानाची मुळावरची ओवी ॥

## ॥ मुळ यवगाचा देव ॥

॥ मुळ यवगाचा देव, आदीमुनी राव ।
वचनी गोयलं नाव । सर्व ठायी ॥
॥ ज्याने दिले वचनं, तो आणनं सोडुन ।
राहावे बा शरणं । अवताराच्या/महाराजाच्या ॥
॥ निशंःकलंकी हा अवतार । कलयवगी आला/सत्यवगी येणार ।
सोडन वचनं । सर्व ठाई ॥
॥ तिरकुटाची माय । माया-चैत्यन्या होयं ।
ईचा मोडनं ठावं । उभा, राहीनं भैस रावं ॥०४॥
॥ उभा राहुन यानं । सेरूप धरल्या/धरनं देही ।
चैत्यन्या भेली भाई । भैस राया आला ॥
॥ उभा या राहुनं । हा मोडनं कुःसंग । खसम पुसन ।
चैतन्याच्या मुखी आलं/झालं । भैस नामं ॥
॥ उभा या राहुन, भैस गर्भि मुळं । परमयपदा दिवस, याहीचा होयं ॥
॥ प्रतिपदा/परमयपदा दिवस, भजत नाही जनं ।
तिरलोकी पुंजन, सदोनित आहे ॥
॥ तिरलोकी पुंजन, करतीनं खाता-घेता । येईन भैस, पुस घेईन आता ॥
॥ थोर हे मानवां । कष्टी करसं बा देही । कष्टी कचवा/झिजवा देही ।
पुंजन करा भाई । लव लावी ॥
॥ जीव जावो अथवा राहो । पुंजन करा भाई, लव लावी ।
देव काही चुकला नाही । तिरलोक्याशी ॥ ११॥

**भजने**:-॥ भाव ठेवा देवावरी । देव काही चुकला नाही तिरलोक्याशी ॥

-: निरसनसह शब्दार्थ :-

**परमय पदा दिवस** :- परमय म्हणजे निरंतर वाहणारा सुगंध, दरवळ. ईथे नाम धुनी ची दरवळ या अर्थाने परमय हा शब्द घेतलेला आहे. आणी परमय पद म्हणजे देहीच्या रोमारोमात केसाच्या प्रतेक छिद्रात नामरस भिनवुन रोमीद्युत बनने. आणी हा रोमीद्युत जिथे कुठे जाईल, तिथे आपल्या देहीव्दारे नामाचा दरवळ सोडत राहतो. त्या रोमीद्युतांच्या अंतरी नामधुनी धगधगत असल्यामुळे त्याच्या आंगातुन नामाचा दरवळ निरंतर वाहत असतो. त्याला नाम घेण्यास वेळ घटका लागत नाही. कुणाची आज्ञा लागत नाही. त्याच्यावर नाम घेण्याचे कुठलेही बंधन नाही. म्हणुनच तो जरी कुठेही कोणत्याही वेळेस गेला, तरी त्याच्या अंतरी अथवा मुखातुन नाम धुनी उठत राहते. अशी अतंरी निरंतर नाम धुनी परमात्मा कृपेने ज्या दिवसापासुन उठणे चालु होते तो **परमय पदा दिवस** होय. त्या दिवसापासुन त्याला नाम घेण्यास वेळ घटका आज्ञा बंधन लागत नाही. त्याला अन्न या पाण्याची अगध राहत नाही. **उदाहरणार्थ** :- *संत तुकाराम हे मलमुत्र त्याग करत असतांना सुध्दा त्यांच्या अंतरी निरंतर नाम धुनी धगधगत राहत असल्यामुळे, तो मुखाने 'विठ्ठल विठ्ठल' म्हणत होता. कारण की : त्यांच्या देहीवर परमय पदा दिवस उगवला होता. म्हणुनच तो आपले नित्य शरीरधर्म करत असतांना सुध्दा त्याच्या अंतरी निरंतर नामधुनी धगधगत असल्यामुळे कोणत्याही बंधनात न अडकता नाम घेण्याच्या वेळेची घडीघटका न पाहता निरंतर नाम घेत होता. असो.* हा परमय पदा दिवस देहीवर आणण्यासाठी प्रथम सत्य भाव धरून निरंतर प्रयत्न करत परमात्म्याला निरंतर भजावे लागते. आणी असा हा परमय पदा दिवस देहीवर आणण्यासाठी सत्य भाव धरून निरंतर प्रयत्नरत् होत परमात्म्याला जन भजत नाही. तिरलोकी पुंजन करते पण परमय पदा दिवस देहीवर आणण्याकरीता भजत नाही जन ! साधे दोन–तिन तास भजनात बसल्यावर तिथेही ते ईमानदारीने आपले मन लिन करून एकाग्रता आणुन मनलावुन भजन करत देहीत नाम भिनवुन त्याच्या आंगा/मुखातुन नामाचा दरवळ काढण्यास प्रयत्न करत नाही. ।

**लव** :- गोडी, प्रेम ओढं । **लवलावी** :- प्रेम/ओढं/गोडी लावुन. । **कुःसंग** :- वाईटांची संगत । **खसम** :- शुन्य, हिंदीत खतम, अरबी मध्ये खसम म्हणजे पती, तर योगशास्त्रात सुषुम्नावाहीनी असे चौरंगी अर्थ होतात. । **पुसनं** :- पुसुन टाकणे, मिटवणे. । **'खसम पुसन'** म्हणजे तिरगुणी शुन्याच्या गोलाकार रेषा/मर्यादा/वेषा पुसुन टाकुन, त्या शुन्याच्या आतमध्ये जे उरते ते उरलेले निरशुन्य दाखवणे.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. ०७ ॥

ओवी महात्मः- स्थापनेच्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी

॥ कृष्ण चरीत्र-ज्ञान ॥

॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

## ॥ यवगाचा घेतला जुम्मा ॥

॥ यवगाचा घेतला जुम्मा । मन लावुनं/आदीपुरूषांन ।
येशीवर देव गोयला । या दयाळानं ॥
॥ येशीवर साधन-पुंजन । केलं देवरायानं ।
हा वाण निघालं । भक्ताच्या येथुन/मुखातुनं ॥
॥ आदी पुरूष होय तो । जाण भक्तजनं ।
हा साधत-साधत आला । अवघ तिर भवनं ॥
॥ तिर भवनी/यवगाची केली साधना । राया आदी पुरूषानं ।
याहीनं अवघच/यौग आणले घरा । मेरू मंडयानं ॥०४॥

॥ या अनामीकाचं घर । पाहील रूपात जनं ।
याहीन येवुन केलं । या गादीचं रंचनं ॥

**भजने :-**

॥ गादी होय मालकाची । इच्यावर सत्ता आहे, या आदीपुरूषाची ॥
॥ गादी होय मालकाची । इच्यावर सत्ता आहे, या देव रायाची ॥



## ॥ निरसनसह यवगाचा घेतला जुम्मा ॥

-: निरसन/स्पष्टीकरन :-

॥ यवगाचा घेतला जुम्मा । मन लावुनं ।
येशीवर देव गोयला । या दयाळानं ॥

मुळचं सत् यवग आणायचचं असा ठेका या कृष्ण रायान घेतला होता. याकारणास्तव त्या योग्यानं यवगान यवगात देहीतील षटचकाच्या शेवटी असलेल्या नाद बिंदुच्या गाठी पाडुन, पद-पिंडाच्या भेटी करून देह गायप केला. व त्या आनंद पदाच्या तळी चंद्र-सुर्याच्या मेळी गोल्हाट मंडळी इच्छीत काळ सुखाने राहुन पुनश्चः तो प्रेमयोगी कायापालट सिध्दी व्दारे यवगान यवगात उत्पन्न होवुन देह धारण करत करत मुळयवगाच्या देवाचे कार्य करत आलेला आहे. या कार्याकरीता यवगान यवगात सत्यवग जागृत ठेवायचे असा ठेका/जुम्मा त्याने मन लावुन घेतला होता. आणी सरतेशेवटी या कलयवगात त्याच्या कार्यास संपुर्ण यश येवुन, या दयाळु कृष्णानं साक्षात मुळचा आदीपुरूष देवचं वचनात गोयला हो या दयाळान ! अधिक ज्ञानासाठी कृष्णांमृत वाचा.

॥ येशीवर साधन-पुंजन । केलं रायानं ।
हा वाण निघालं । या, भक्ताच्या मुखातुनं ॥

या देवाला वचनात गोयनासाठी, या कृष्णाजी देवान या पिंडाच्या चारही स्थुल-सुक्ष्म, कारण-महाकारण देहाच्या येशीवर तसेच ब्रम्हांडाच्या चारही येशीवर/सिमेवर साधन पुंजन केलं. तेव्हाच कुठं हे वाणं/देणं त्याला भेटलं आहे की : साक्षात मुळयवगाचा देव आदीमुनी याच्या देहीत ज्योत स्वरूपात

अंतर्भुत होवुन, त्याच्या या कृष्णाजी नामाच्या भक्ताच्या मुखातुन बोल बोलु लागलां. चौथ्या भैसा पोटचा चौथा चतुर्पता अथर्वन् वेद जनात प्रेरीत करु लागला. तो आदीपुरूषाचा भक्त कृष्णाच आदीपुरूषाचा पुर्ण अवतार झाला.

॥ आदी पुरूष होय तो । जाण भक्तजनं ।
हा साधत-साधत आला । तिर भवनं ॥
॥ तिर भवनी केली साधना । या आदी पुरूषानं ।
यानं अवघच आणले घरा । मेरू मंडयानं ॥०४॥

तो कृष्णाजीच आदीपुरूष होय. हे जाणा हो तुम्ही आदीपुरूषाचे भक्तजन हो ! कृष्णांमृतची गाही घ्याहो भक्तजन ! पिंडी या ब्रम्हाडी चे तिरभवनं तोच साधत साधत येथे आला आहे.

या कृष्ण आदीपुरूषानं तिरभवनी ध्यान लावुन या तिरभवनी व्यापक असलेला आदीरूपाची साधना केली. आणी यानं जे सर्वच आहे असे ते आदीरूप या देहघराच्या मेरू मैदानी आणुन, तेच मेरू मैदान या सावंग भुम्मेला गर्भि /मध्यभागी ठेवुन साकारले आहेत. यानं जसे आपल्या देहपिंडाला आदीपुरूषाची गादी बनवुन त्या गादीवर आदीपुरूषाला महत्प्रयत्नाने बसवले आहें, तशीच गादी या ब्रम्हाडी सावंगा या को-या भुम्मेवर सुंदर बाग-०३/०२ साकारून तिथेही या आदीपुरूष मालकालाच बसविले आहेत. आणी रूपारूपाच्या सच्च्या भक्ताच्या देह गादीवर सुध्दा बसत रूपारूपांना उध्दारत आहे.

॥ या अनामीकाचं घर । पाहील रूपात जनं ।
यान येवुन केलं या गादीचं रंचनं ॥

या अनामीक कृष्णाचं हे साकारलेले देहघर पाहील रूपात हे जनलोक ! या आदीपुरूषाच्या गादीचे रंचनं यानेच इथं येवुन केलं आहे. हा आदीपुरूष कृष्णा त्याच्या सच्च्या भक्ताच्या या देहरूपी गादीवर उठ-बसत, येत-जात त्याला निरंजनी भेटी देत राहतो. याचे अनुभव सच्या भक्तांनी वेळोवेळा घेतलेले आहेत. म्हणुनच एक सच्चा जाणता योगी भक्त चरण रंचना करून त्याला उध्देशुन म्हणतो की :

॥ निरंजनी भेटी देता । मुजरा आहे गा अवद्युता ।
चुकवा यमपुरीच्या वाटा ॥ आकाश वाणी बोले हा धनी....
॥ आकाश वाणी गर्जला । आपल्या बिर्दासाठी देव धावत आला ॥
॥ आकाश वाणी गर्जला । आपल्या बिर्दावर हा उभा राहीला ॥
॥ आकाशवाणी गर्जला । या बिर्दासाठी देव साहयं झाला ॥
॥ बिर्द वाणी तुही होय । संभाळ करनं देवा ! तुम्हा हाती आहे ॥
॥ बिर्द वाणी तुही होय । संभाळ करा लागते आम्हाले ॥

**गजर :-**

॥ माझेया मनात भासते मला । जसा पुनवेचा चंद्रमा ।
माझ दर्शन घडलं मला । धन्य तु नारायणा ।
माझं स्वरूप दावंलं मला । धन्य तु नारायणा ॥



**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. ०६ ॥
॥ कृष्ण चरीत्र-ज्ञानाची मुळावरची ओवी ॥

# ॥ यवग साध्य केले ॥

वरभजन :- ॥ यवगाची केली साधना । मांडवशीले ।
ही खबर ठाव, नाही कोणाले । ही खबर ठाव, श्रीकृष्णाले/देवरायाले

॥ यवग साधवले/साध्य केले । अवघे/योगी द्युत जाणा ।
रंचना रंचली । पक्की सारी ॥ घृ ॥
॥ पक्की/शिकवित असता नर । उभी केली/झाली परं ।
लोपीले अवतार । तीन यवगाचे ॥
॥ तीन यवगाचे अवतार/देव । कलीनं लोपले ।
भया भंग झाले । देवांगण ॥
॥ भया भंग झाला । भुम्मा गोळक आला ।
जागी करन सा-या । तिरभवनांला/तिरलोक्याला ॥०४॥
।। भुम्मा गोयक । निश्कलंकी अवतार । करनं निसपुस
हिशोब घेईन । तिन यवगाचा/अवघा सारा ।। ..जळगाव दांडातील
॥ बम्हा विष्णु शंकर । यवगाचे राजे तिन ।
याहीची होईन घाणं । हिशोब देता ॥
।। निर्गुण चैतन्य । अवतार आदीमुनी ।
घेईन भरुनी । तिन ताळ ।। जळगाव दांड चे चरणं
।। देह/देव ज्योता, जीव ज्योता । भरन हो देही ।
सांगी करन/करा सही । महाराजा ।। ..जळगाव दांडातील चरण
॥ सांगी सांगतली । दवंडी देल्ली/देतो खरी ।
राखावं लज्जा । या बिर्दाची ॥ हो राया.. कृष्णराजा
असावं लज्जा तुला । या बिर्दाची ॥ ..जळगाव दांडाची टुक
॥ बिर्दाची बाणी/वाणी । संभाळ कृष्ण धनी ।
तारा हो येवुनी । या गोपाळाला/जीवाजनी ॥ हो राया..
॥ ब्रम्हांडाची वस्ती । भैसाची मांडणा ।
काहो गुप्त झाला । जीवन माहया ॥१२॥ हो राया..कृष्णराजा
॥ धन्याचा करीना । आम्हा काय मालुम ? ।
चवथ्या खुम्मी राज्य । करु केलं ॥१३॥
।। धन्याचा करीना । आम्हा काय मालुम ? ।
चवथ्या खुम्मी देणं । करु केलं ।। जळगाव दांडातील चरण
।। धन्याचा करीना । आम्हा काय मालुम ? ।
चवथ्या खुम्मी देवराज । करु केलं ।। जळगाव दांडातील..

भजने :-
॥ चौथ्या खुम्मी उभा धनी । तो तारण जीवाजनी ..।
हे सर्व याहीच्या अध्यानी ॥

-: शब्दार्थ :-

**तिन यवगाचे अवतार/देव** :- अवलेहाई, ऋषि मुनी, कृष्ण योगी, संत महंत, च्या निश्कलंकी आत्मारामाने तिन यवगात जेजे अवतार घेतले ते तिन यवगाचे अवतार, किंवा तिरलोक्यातील तिनगुणी देवांनी जेजे अवतार घेतले ते तिन यवगाचे अवतार । **कलीनं लोपले** :- कलीच्या वर्चस्वाखाली दबल्या गेले, कलीत गुप्त झाले, कलीच्या दुषीत पाण्याने लोपल्या/सारवल्या गेले. ऐसे हे : अठ्ठयांशी सहस्त्र ऋषि, विनवीते धनीदेव ऋषिश्वराले । मोडा कली देवा, बाहेर काढा आम्हालें ॥ ०२/४२:-मोडन जुन जुन्याचा ऋषिश्वर ओवी चे चरण । **परं** :- माया

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०५ ॥

॥ ओवी नं. ०७ ॥

॥ कृष्ण चरीत्र-ज्ञान जुनी ओवी ॥

## ॥ यवगाचा गलपटा ॥

॥ यवगाचा गलपटा । नाही कोणाले मालुम ।
महा महा ऋषि बसले । घुंम घालुनं ॥
॥ महा महा ऋषि बसले । विचार करून ।
सहाही शास्त्रं जरा चालेना । हरी वाचुनं ॥
॥ कल यवगात, सांगे मात । तो आदीरूप ।
आदी रूपाची, माव कळेना । थकले ब्रम्हादिक ॥
॥ बारा अवसा, बारा पुनवा । यवगाच्या तिथी ।
त्याही अवघ्या, चळवळ झाल्या । उभा गणपती ॥०४॥

॥ आदीरूप/आदीपुरूष गणपती जागता । तो यादव पती ।
याहीच्या संग उभा आहे । देव, पृथ्वीचा पती ॥
॥ सद् गुरूचा, अलक्ष्य पंथ । तो ब्रम्ह रूप ।
तुया चरणाचा, धरला धावा । मांडला/लावला जप ॥०६॥

भजने :-

॥ जप मांडला तुया पायी । रोगा विघ्नाचे आता भय नाही ॥
॥ जप मांडला तुया पायी । आनंदानं नांदव, या बाळाची देही ॥
॥ तुया पायाचा धरला धावा । महाराजा, लक्ष्य अंतरी लावा ॥
॥ तुया पायी धरला धावा । महाराजा, येवुन तारा बाळ गोपाळा ॥



॥ ओवी नं. ०८ ॥

॥ कृष्ण चरीत्र-ज्ञान जुनी ओवी ॥

## ॥ निशंकलंकी अवतार खरा हो खरा ॥

॥ निःष्कलंकी अवतार खरा हो खरा । तुम्ही भजन देवाचं करा ॥
॥ जलावरी केला कार । निरंतर अवधुत खरा हो खरा ॥ तुम्ही
॥ मुक्ष्य वंदना अंबर कार । स्थुल देहीवर आला खरा हो खरा ॥
॥ तिर्थ्या मुखी भुम्मासुर । डांगेश्वर खरा हो खरा ॥ तुम्ही भजन.
॥ परिमान सांगे कर्तार । धनी आले घरा हो घरा ॥ तुम्ही भजन..
॥ यवगीराज आले घरा । तुम्ही महाराजा कृपा करा हो करा ॥
तुम्ही भजन देवाचं करा...
॥ भंवर चंदन आले घरा । तुम्ही महाराजा आयुष्य चढवा ॥
तुम्ही भजन देवाचं करा...

भजने :-

॥ होता पुर्विचा दोरा । म्हणुन आलो..। देव रायाच्या घरा ॥
॥ होत पुर्विचं संचित । म्हणुन घडली हो देवा ! तुमची संगत ॥
॥ होत पुर्विचं संचित । भंवर चंदन नांदे या हद्‌यात ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. ०९ ॥

॥ कृष्ण चरीत्र-ज्ञान ॥

॥ निरसनसह जुनी ओवी ॥

## ॥ भुललीसे वस्तु ॥

॥ भुललीसे वस्तु ऐसा । योगी बोलला ।
ऐरणाच्या संग उघडा प्रपंच डोळा ॥
॥ करून प्रपंच राहयं गा । परमात्मा संग ।
डोळ्याची बाहुली कैसा पाहते रंग ॥
॥ ज्यानं पाहीला रंग तो काय । रंगात मिळाला ।
अढळ पद कैसे मिळाले । ध्रुव बाळाला ॥
॥ करून गणाची पुजा ब्रम्हा विष्णु शंकर ।
सत्रावी तलावावर कैसे उगवले फुल ॥ ०४ ॥
॥ करून गणाची पुजा सातव्या मुक्कामी गेला ।
तिरलोक्याचा मालक धनीदेव पाहीला ॥
॥ तिरलोक्याचा मालक धनीदेव पाहीला त्यानं ।
निरशुन्यावर बसुन अवघे न्याहरे तिरभवनं ॥

**भजने** :- ॥ निरशुन्या मध्ये तो भगवंत । निराकार होता ।
तुमच्या बिना कोणी नाही बापा मोक्षाचा दाता ॥
॥ निरशुन्याहुन आले भगवंत । मिर्त लोकात ।
सावंग पुरी अवतार धरला । अहीनाच्या ईथं ।
सावंग पुरी दुकान लावलं । हरी नामाची पेठं ॥
॥ निरशुन्यावर विहीर खोदली । कोण होता वनमाळी ।
सावंग नगरी बाग लावला । पिकल्या सत्वाच्या केळी ॥

### -: निरसनसह शब्दार्थ/चरणार्थ निरसन :

**वस्तु** :- आत्मा । **ऐरण** :- देही, काया, कजबा, कुडी । **संग** :- सोबत ।
**प्रपंच** :- आत्मा व देही चा संसार । **राहयं** :- राहने
**भुललेशी वस्तु** :- तिरगुणी मायेनं आपल्या गुणांचा प्रापंचिक बाजार या देहीत भरवला आहे. या बाजाराचा सौदा तिरगुणांनी घेतला आहे. या बाजारामुळे ईथे हा जीव/वस्तु आर्बुस-निर्बुस होवुन भुलला भांबावलेला आहे. स्वतः अखत्यार असुन तो या देहीचा मुक्यार झाला आहे. आता कधी होईन हा आत्मा/वस्तु या देहीचा सरदार ? हे देही ! प्रंपच कातत कातत का भुललीसे ही आदीपुरूषाची अत्यंत प्रिय वस्तु ? ज्या वस्तु पासुन देहीत चैतन्य ज्योत उभी आहे ती वस्तु का भुललासे ? ऐसा हा कृष्ण अवधुत योगी बोलला.

ऐरणाच्या संग उघडा प्रपंच डोळा :-
भजने :- ॥ खाली ऐरणं वर घणं । यामध्ये हिरा ठेवला कंचन ॥
॥ वरतुन घणांचा टपोरा हाणला । यामध्ये हिरा मोलाशी आला ॥
॥ ऐसे हिरे झाले बहु । ऐसा लाल देवा कुठे पाहु ? ॥
॥ देवा तुयाघरी हि-यांची खाणं । या हि-यांची पारख, नाही केली कोण ॥
॥ तुम्ही उभे देव । हे हिरें आम्हा चांगले दाव/दाखवं ॥

ज्या प्रमाणे लोहार हा खाली ऐरण ठेवुन त्या ऐरणावर तप्त लोखंड ठेवुन त्या लोखंडावर घनाचे टपोरे मारत मारत लोखंडाला ईच्छित आकार देतो, त्याच प्रमाणे ईथे या देहीला ऐरण संबोधुन, या ऐरणाच्या संग सत्संस्कार चा घन घेवुन, या घनाच्या टपो-याने ऐरण व घण मध्ये ठेवलेल्या आत्मरूपी हि-यावरील विकारांची काजळी दुर करत जावे. सत्संस्काराच्या घनाने सतत टपोरे देत देहीच्या आत्मावर आलेले विकारी गुणांचे कलंक काढत हा आत्मरूपी हिरा मोलाशी आणावा. या हि-याला देहीच्या विकारापासुन निश्कलंकी

ठेवा. त्याला निश्कलंकी ठेवण्यासाठी देहीतील एक एक कलंकी विकार हे सत्संस्काराच्या घनाचे टपोरे मारून दुर करावे. देहीत निश्कलंकी मांडणा करत जावे. मग पहा धिराईने या हि-याची महीमा !

देहीत निश्कलंकी मांडणा करण्यासाठी सर्वप्रथम तुम्ही असे मानावयास पाहीजे की : मी देही नसुन आत्मा आहे. या देहीवर आत्म्याचे राज्य आहे. असे जाणुन शुध्द सत्व गुणांनी युक्त असलेली उच्चत्तर अशी बुध्दि ठेवावी. उच्चत्तर अश्या बुध्दि व्दारे या बुध्दिच्या खालच्या स्तरावर असलेल्या मनाला प्रथम ताब्यात घ्यावे. त्या ताब्यात आलेल्या मनाव्दारे इंद्रियावर संयम ठेवावा. आणी काम क्रोध लोभ मोह मत्सर अंह ईत्यादी मन व देहीच्या षटविकार व तिरगुणांना दुर करत करत, या देहीवर आत्म्याचे राज्य चालु दयावे लागेल. या आत्म्याला या देहीचा सरदार बनवुन देही व आत्म्याचा संसार करावा लागेल. आत्मपुरूषाचे गिरजा देहीवर वर्चस्व ठेवुन, देह जीवाचा प्रपंच चालवावा लागेल.

देह जीवाचा प्रपंच चालवण्यासाठी नका सोडु हो तुम्ही घरदार ! आपला प्रपंच करून परमार्थ साधत देह जीवाचा प्रपंच सुध्दा चांगले डोळे उघडुन करा. भौतिक व आध्यात्मीक देह-जीव असे दोन्ही प्रपंच साधत तुमचे व्यवहार करत सत्याला भजत सिदाईने चालावयाचे आहे. आत्मपुरूषाची प्रकृति ही राजहंसाप्रमाणे असल्यामुळे त्याला शुध्द सत्व सार चे भोजन लागते. ते भोजन या देहीवर शुध्दसत्वचे संस्कार करत त्याला दयावे.

याकरीता मनाचा निर्धार करा पक्का ! आणी सत्याकडे ज्ञान दृष्टी ची नजर वळवा. ज्ञान दृष्टीचा डोळा उघडुन पहा भक्तीचा जिव्हाळा ! सत्य आंगी येवुन देव कळेल. तुम्हास कळुन येईन की : स्वदेहीतच तो परमात्मा आपला तेजोगुणी अंश अवतार घेवुन उभा आहे. या जवळ उभा असलेल्या जगजेठी योगेश्वर ला आधी नमन करावे. ठाई ठाई त्याचे रूप दिसेल. त्याच्या व्दारे तिरगुणी मायेचा पडदा खोलल्यानंतर, या देहीच्या तिरभवनामध्ये हरीचा उजाला दिसेल. मग या उजालात नविन त्रिगुणातीत डोळ्याची बाहुली कैसा गुणातीत रंग पाहत आहे. हे तुमचे तूम्हालाच कळुन येईन. या चौथ्या शुध्दसत्व रंगा मध्ये ज्योत रंग आता मिसळुन घ्याहो ! पुढ सुखः नाही मावणार तिरभवनी ! ऐसे कृष्णाने सांगुन ठेवल आहे की : काहीतरी सार्थक करा या जन्माचं ! या रंगामध्ये ज्योत घ्याहो आपली मिसळुन ! कारण की : परमात्मा प्राप्तीचा ऐकच ध्यास मनी ठेवुन ज्याने असा रंग पाहीला आहे, त्याने अढळ पद मिळवलेले आहे. ध्रुव बाळास अढळ पद कैसे मिळाले ? हे जाणा. तो या रंगात कैसा मिळाला हेही जाणा.

### अढळ पद कैसे मिळाले ध्रुव बाळास ? :-

परमात्मा नारायण च्या मांडीवर बसने. असा एकच ध्यास ध्रुव बाळाने ठेवला होता. आपल्या धैय ध्यास प्राप्तीकरीता तो कोणत्याही गुरू अथवा कर्मकांडाच्या मागे न लागता सरळ जगंलात गेला. तेथे एका ठिकाणी पक्की मांड बसवुन नारायणाचा ध्यास धरून ध्यान करू लागला. त्याचे जपध्यान ईतके भारी झाले की : काही क्षणासाठी सृष्टी प्रलयसदृश स्थितीत आली. त्यामुळे नारायणाला त्याच्यासमोर चतुर्भुज रूपात उभे राहावे लागले. चत्रभुज नारायणाने त्याला स्वतःच्या मांडीवर बसवले. आणी अढळ पद दिले. ज्याप्रमाणे ध्रुव बाळ ईतर कोणत्याही मार्गि न लागता सरळ हरीनामाच्या रंगी रंगला, त्याप्रमाणे तुम्हीसुध्दा ईतर कोणत्याही गुरू, कर्मकांड व्रत कथासार ईत्यादी मार्गि न जाता एकल्या हरीनामी रंगावे. त्याचाच ध्यास व ध्यान करावे. ऐसे सर्व प्रापंचिक मोहमाया सोडुन हरीनामाची किल्ली हाती घेवुन, या आदीपुरूष धन्याच्या प्राप्तीचा ध्यास धरून ध्यान करा. आदीपुरूषाला शरण

राहुन त्याच्या हरीनामात रंगुन जावे. त्यालाच आपला आदीगण गणपती मानुन त्याचीच शुध्द मनोभावाने भजन पुंजन ध्यान सुमरन करा.

तिरलोक्याचा मालक धनीदेव पाहीला याहीनं :-

जसे ब्रम्हा विष्णु शंकर यांनी आपआपल्या स्थानी ठाणं मांडुन याच निराकारी आदीपुरूष गणाची मानसिक ध्यान व्दारे पुजा करून आत्मज्ञानी झाले व तिरलोक्याचा मालक पाहुन सत्रावी-०३/०१ तलावावर आपले देहरूपी फुल गवसुन अंम्बर झालेत, तसे तुम्ही सुध्दा या आदीपुरूष आदीगण ची ध्यान धरून आत्मज्ञानी होवुन आपले देहरूपी फुल खिलवुन अंम्बर व्हावे.

ज्या मार्गाने आदीपुरूष आदी गणा ची ध्यान धारणा व्दारे मानसिक पुजा करून कृष्णा हा सातव्या अगोचकावर-०३/०१,०५ जावुन आदीरूपाच्या मुक्कामी गेला, त्याच मार्गाने तुम्ही सुध्दा जावे. आपणही या आदीपुरूष आदी गणांचे भजन पुंजन ध्यान सुमरन करत आत्मज्ञानी होवुन सत्रावी जिवनकळा ज्योत उजळण्याकरीता प्रयत्नरत् व्हावे. निरंजन ज्ञानाचे फुल उगवावे. याच मार्गाने तिन देवांने तिरलोक्याचा मालक धनीदेव पाहीला आहे. याच मार्गाने कृष्णाने तिरलोक्याचा मालक धनीदेव पाहुन त्याला आपल्या देहभुम्मेवर अवतरले आहेत. याच चौथ्या शुध्द सत्व च्या चतुर्पती मार्गाने तुम्हीसुध्दा जावे.

तिरलोक्याचा मालक धनी देव ज्याने पिंडीत पाहीला त्याने ब्रम्हांडाचा परमात्मा जाणला. ज्याने परमात्मा जाणला तो काय तिरगुणांच्या शुन्याकडे पाहणार ? तो शुन्याकडे न पाहता निरशुन्याकडे पाहत निरशुन्य होवुन निरशुन्याच्या धन्या जवळ बसुन अवघ तिरभवन तिरलोक न्याहाळन. अवधुत होईन. अश्याप्रकारे कृष्णाजी अवधुत झाले. आणी जगाला सिध्द करून दाखवले की : तुम्ही सुध्दा अवधुत म्हणजे निर्गुण निरशुन्य होवु शकता. याकरीता फक्त चतुर्पती हरीनामी राहुन निश्कलंकी मांडणा या देहीत करावी लागेल. चतुर्पती हरीनामाची किल्ली हाती घेवुन ज्ञान दृष्टीने तुरिया/चौथ्या अवस्थेतील निरंजन ज्ञानाचे व्दार खोला. आणी चतुर्पती निरंजन ज्ञानाचा साठा घेवुन त्याच्या बळावर देह-जीवाचे लग्न लावण्यासाठी निर्भयतेने शुरविर खेत्री प्रमाणे विकारांशी लढा. कृष्णाची सिदाईची सेना तुमच्या साहयास येईन. साक्षीने आत्म्याला फक्त जाणायचे ! त्याला चतुर्पती हरीनामाची उच्चत्तर गोडी लावायची आणी हरीनामी राहुन '॥ आम्ही सुखाचे हरी तुया गा रूपाचे । गिण्यान भजतो मायबापा तुमचे ॥ सुखासाठी भजलासे हरी । सुख दयाहो महाराजा देहीवरी ॥' असे विनवत नित भजन पुंजन ध्यान सुमरनी राहत सुखःशांती व समाधान मिळवत त्याला गवसायचे ! आणी याच कृष्ण मार्गि राहुन चतुर्पती हरीनामाच्या बळावर देही शक्तीला त्याच्यापर्यंत नेवुन शिव-शक्तीचे स्वयंवर लावायचे. मग पहा याच डोळयासमोर त्या मालकाचा खेळ ! एवढे जर या जन्मात जमले तर मग चुकन चौ-यांशी ! तेव्हा मग मरणार नाही बा कोणी ! नाहीतर या चिरंजीवास देह धरणीत वसना आणी बाहेर जावुन देहीला मसना देत, पुढचा जन्म प्रयत्न करण्यासाठी ठेवलेला आहेच. भ्रष्ट न होता प्रयत्न करण्याची नित संधी देण्यासाठी बरी केली सोय या देवरायानं !

कृष्णाजीने या चतुर्पती वाणी व्दारे देह-जीवाचे लग्न लावण्यासाठी काय करावे ? लग्न कसे लावावे ? देह-जीवाचे प्रेमसबंध हरीनामाव्दारे कसे जुळवायचे ? जीवन कसे जगायचे ? कसे कर्म करायचे ? देहीत निश्कलंकी मांडणा कशी करायची ? त्यासाठी साहय ठरणारे आचार विचार, सत्बुध्दि, बोध ईत्यादी ज्ञान या वाणीत गुप्तपणे सांगुन ठेवलेली आहे. ते पहावे शोधुन !

**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०५ ॥

॥ ओवी नं. १० ॥

॥ कृष्ण विनवणीची मुळावरची ओवी ॥

## ॥ नवरत्नाचा शेला ॥

वरभजन :-

।। नामाची लाव बा गोडी । रसाची लाव बा गोडी । पायाची लागली गोडी ।
गोपाळ न्याहो देवा । पहील्या थडी ।।

।। भंवरं चंदन, ये माझे माहेरा । पृथ्वी चा कार, तुम्हा हाता ।।

॥ नव रत्नाचा शेलां । देवानं, जडीत विनवला ।
तिर गुणाच्या संगं । हा, नाशीवंत झाला ॥

॥ तिरगुणांचे मुळं । आहे, नाशीवंत कुळ ।
निघुन गेली वेळं । हे, मोघमात ॥

॥ विश्वास हा पक्कां । विश्व हे व्यापका । तुमचे नाम सांगा ।
नामाचा आधार । सदोनित दयाहो/राहो ॥

॥ निरशुन्याची ज्योत । ही, आकारात असे ।
कजबा वस्ती कैशी । हे, मोडता आता ॥ ०४ ॥

।। कजबा वस्ती देवं । करन आदीपुरुष ।
होईन अचंबा । प्रकाशन ज्योत ।। ..जळगाव दांड चे चरणं

**भजने :-**

॥ उभा राहयं कजब्याच्या मालका । कजबा वस्ती कर बापा ।
देह-जीव नांदवजो आता ॥

॥ ज्योतीनं ज्योत प्रकाश । भरनं देहीत ।
उजळन रूप सुर्याच्या तेजात । जैसे रूप सुर्याचे तेज ॥

॥ होता पुर्विचा लेश । हदयी नांदे भंवर चंदन ॥

॥ होता पुर्विचा दोरा । म्हणुन आलो देवरायाच्या घरा ॥

॥ होतं पुर्विचं संचित । म्हणुन घडली देवा तुमची संगत ॥

गजर :- ॥ कृष्णा ! तुझी संगत । मज घडो बा सदोनित ।
तुमची कळसुत्र कळा हो । कोणा नाही कळतं ॥



॥ ओवी नं. ११ ॥

॥ जुनी ओवी ॥

## ॥ उभा राया कृष्ण राजा ॥

॥ उभा राया कृष्ण राजा । देव उभा आहे माझा ॥ घृ ॥

॥ हे होय आदीपुरुषा ची वाणी । नवल होईन तिर भवनी ॥

॥ ग्यान म्हणजे हे उकळी । भडका उठला अंतराळी ॥

॥ चतुरपती याहीचं घर । आकाश वाणी तिरलोक्यावर ॥०४॥

॥ यवग भरले झाला मुद्या । शुन्य उडवन तो आता ॥

॥ हा होय आदीपुरुषाचा खेळं । रमण्यात आले तिनही ताळं ॥

॥ या आदी पुरुषाच्या हात । जागी होईन/करन मिर्त लोक ॥

॥ आदी पुरुष भरनं देही । मानवाला भय नाही ॥०७॥

॥ समजुन/उमजुन आदीपुरुषाची वाणी । स्थुल देहीवर उभे प्राणी

**भजने :-**

॥ धरधर स्थुल देहीचा रंग । याहो महाराजा तुम्ही, रहावं आम्हा संग ॥

॥ देहीचे वर्ण हे वर्णिले । कृष्ण महाराजा तुम्ही, शकुन दयाहो चांगले ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. १२ ॥
॥ विनवणी ची जुनी ओवी ॥

## ॥ साचा हा सचवला ॥

॥ साचा हा सचविला । ये माझे माहेरा ।
तुज विन आसरा । हा कोणाचा ? ॥
॥ दादा हा दादुल्या । बाई हे बायको ।
दोघाचा निर्वाळा । सांग पंडीता ॥
॥ बाई/भावनी/भादुली हे बायको । हे होय बा कजबा ।
हेचं होय बायको । सत्य जाणा ॥
॥ माय हे माउली । का नाही सावली ? ।
काया हिन केली । पहा द्युतराया ॥०४॥

॥ माय हे मावशी । मय्या/दया नाही तीशी ।
जीव झाला/केला अपदेशी । महाराजा ॥
॥ तु असतांना बाप । का घडविले पाप ? ।
चौ-यांशीचे दुःख । परोपरी ॥
॥ यवगाची पर । चौ-यांशीचं घर । झाली आजवर ।
तिरलोकी बाजार भरला । या भुम्मेवर ॥
॥ बाजाराची पर । झाली आजवर ।
किंवाः- बाजाराच्या पार । योग्याचं घरं । जळगाव दांडातील चरणटुक...
न्यारा करा कार । द्युतराया/महाराजा/मायबापा ॥०८॥
॥ यवगाच्या वर । उभा केला/करा खेळ ।
रूप दाखवा देहीवर । महाराजा/मायबापा ॥
॥ चौ-यांशीचा मुद्दा । फिटलासे वायदा ।
तुमच्या बिना नाही दुजा । सोयंम् नांदा ।
आता नाही दुजा । सोयंम् नांदा ॥०८॥

**भजने :-**

॥ सोयंम् नांद माझे राया । येवुन तारा बाळ गोपाळ ॥
॥ सोयंम् नांद माझे राया । आम्ही जडलो देवा तुमच्या पाया ॥
॥ सोयंम् नांद माझे राया । अन्जानाची माळ, तुमच्या गळा ॥

-: निरसनसह शब्दार्थ :-

**साचा** :- देहीचा साचा ज्यात आत्मा वसवला । **सचवला** :- रंचना केली, सजवला । **ये माझे माहेरा** :- आत्माचे माहेर हे परमात्मा चे घर असल्यामुळे परमात्माला उद्देशुन 'ये माझे माहेरा' म्हटलेले आहे. । **आसरा** :- विसावा, आधार । **दादा** :- आत्मा, जीव **दादुल्या** :- पती, नवरा, देहीचा पती असलेला आत्मा । **बायको** :- पत्नी, नवरी, आत्म्याची पत्नी असलेली देही । **माय, बाई, किजबा/कजबा** :- देही, । **सावली** :- छाया । **पर** :- मायेचे/कल्पनेचे पंख । **मय्या** :- मायाममता, दया कारूणा । **अपदेशी केला** :- देशोधडीस लावला, एका देशातुन/ठिकाणातुन दुस-या देशात/ठीकाणी पाठवला. उदाहरणार्थ आत्मा हा परमात्मा ठिकाणचा ! परतुं त्याला या मायेच्या ठिकाणी/देशी पाठवुन अपदेशी केला । **बाजार** :- तिरगुणी मायेचा बाजार, प्रपंचमायेचा बाजार, तिरगुणांचा बाजार । **वायदा** :- वादा, ठेका, जुम्मा । **दुजा** :- दुसरा ।

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. १३ ॥
॥ विनवणी ची निरसनसह मुळावरची ओवी ॥

## ॥ ये गा माझ्या विठु ॥

या ओवीची पलट ओवी खंड०७/ओवी-१८ मध्ये दिलेली आहे.

॥ ये गा माझ्या विठु । तुला आम्ही भेटु ।
मायबापा विठु । तुला आम्ही भेटु ॥घृ॥ ०१ ॥
॥ बारा सोळा भरून गेलं । भैसा खुम्मी, जागी झालं ॥
॥ गलीत पात्र झालं सत्रं । अथर्वन् वेदानं जागी केलं ॥
॥ गत-मत उडुन गेलं । सत्य स्वरूप/सेरूप देही दावलं ॥
॥ यौग भरणी झाली धरणी । देहे धरून उठव/उठलं प्राणी ॥
॥ भैसा खुम्मी अगाध वाणी । भेट देई अवघ्या जनी ॥
॥ आउक पाउस कल यवगी । सत्य शकुन नांदव देही ॥
॥ फुंक मारू येईन धोडां । साधवा सिदाई, कर जागा ॥
भजनं :- ॥ उभे आहे अवधुत । अमृत संजीवनी आहे याहीच्या मुखांत ॥

॥ ओवी नं. १३/२ ॥
॥ प्रचलीत म्हणनीतील ओवी ॥

## ॥ याहो माझे विठु ॥

।। याहो माझे विठु । तुम्ही आम्ही भेटु ।। घृ ।।
।। बारा कळा, शुन्य गेलं । भैसा चरणी जागी करनं ।।
।। गलीत पात्रं होईन सारं । आथरून वेदी जागी करनं ।।
।। गत मत उडुन जाईन । सत्य शकुन भरन देही ।।
।। हाउस माउस कल यवगी । सत्य सेरूप भरनं देही ।।
।। यवगं भरणी झाली धरणी । देहया धरुन उठ्तीलं प्राणी ।।
।। भैसा खुम्मी अगाध वाणी । भेट देईन अवघ्या जनी ।।
।। बारा सोळा भरुन झाले । ग्रहना अंगी यवग गेले ।।
।। यवगं गेले लुंडमुंड । फकमारू धोंडा, साधली सिदाई ।।
।। साधली सिदाई सांगे जगा । सिध्द पुरूष करन जागा ।।
भजने :- ॥ चंद्र बत्तीशीचा मुद्दा । साधवा सिदाई...देवा खेळ कर गा उभा ॥
॥ चंद्र बत्तीशीचा मुद्दा । साधवा तेरवी सिध्दि । देवा मोहीम कर गा उभी ॥
॥ तेरवी सिध्दि अवरस । ईच्यावर धनी देव उभे समर्थ ॥

### -: शब्दार्थ/चरणार्थ :-

**सत्रं** :- ठरलेल्या ठराविक कालावधीचा समय म्हणजे सत्रं, मालीका *उदाहरणार्थ : सत्रं न्यायालय, प्रथमसत्रं, व्दितीय सत्रं परिक्षा,.. ईत्यादी* । **गलीत पात्र, झालं सत्रं** :- जीवाची दशा दुर्दशा करणारे कलयवगाच्या कालनदीचे गलीत पात्र वाहण्याचा ठराविक कालावधीचा समय झाले. गलीत म्हणजेच वाईट समयाचे मालीकांचे कलयवगाचे सत्रं संपले. । **गत मत** :- दशा, दुर्दशा करणारे अगोदरचे/गतकाळचे जुने मतप्रदर्शन । **हाउस** :- हौस, खुशी । **आउक** :- सांगी करणारे आउक यवग ज्याच्या घरी, तो नाही पडणार बा विचारी, विचार करतीन तिनही ताळचे तिरगुणी. आउक शब्दाचे अधिक ग्यान खंड०५/ ओवी-६५:-सत्य जाना भंग सुटला देवांगण या ओवीच्या शब्दार्थ मधुन घ्यावे. । **भरणी** :- बहर, भरणे, ओसांडुन वाहणे, *उदाहरणार्थ : रिकामी झालेले भांडे जलाने गच्च भरणे, चिनीमातीची भरणी ज्यात लोणचे ईत्यादी वर्षभर जतन करणारे खादयं ठासुन भरलेली असते तीही एक भरणी, समुद्राची भरती ईत्यादी.* । **यवग भरणी** :- सत्याची भर ठासुन ठासुन भर घालणारी सत्य यवगाची भरणी, सत्याचा सागराची भरती. सत्य मुखाच्या आगारी असलेल्या सिदाई सैन्यांची भरती.
**यवग भरणी झाली धरणी** :- भैसाच्या सत्यवगाच्या चतुर्पती ज्ञानजलाच्या पाउसाने देहधरणी संपुर्ण भरून या पाउसाच्या अनुभवाव्दारे धरणी ओली झालेली आहे.
**यवग गेले लुडमुंड** :- परमात्मा प्राप्तीकरीता काहीच कर्म न करता यवगान यवग असेच मोघमात गेले. । **फुक मारून येईन धोंडा** :- फक मारून म्हणजे एकामागुन एक । धोडा म्हणजे मराठीतला धोंडा महीना ! खंड०२/ओवी-११:-आदीपुरूषाचा खेळ

नाही कोणा मालुम चे चरणे सांगुन ठेवत आहे की : पुढे भविष्यात आश्विना महीन्यामध्ये धोडा येईन. पुस महीना उडुन जाईन. आणी चैत्र मासी प्रतिपदेला दुसरा धोंडा येईन. गुढा उडुन जाईन. अश्या रितीने एका धोंडया ला फुक मारून, दुसरा धोंडा महीना एकाच वर्षात एकामागुन एक येणार ! असे या ओवीच्या काही चरणांने कथन केलेले आहे. आणी हे कथन सत्य झालेले आहे ते असे : पहिला धोडा आश्विन महीन्यात तर दुसरा धोंडा फाल्गुन महीन्यात १९८२ साली फक मारून आले. म्हणजेच एका धोंडयाला फुक मारून त्याला उडवुन दुसरा धोडा एकाच १९८२ वर्षात एकामागुन एक आला. आणी या १९८२ सालचा पुस महीना उडुन गेलला आहे. अश्या रितीने फक मारून येईन हो धोंडा ! हेही कथन सत्य झालेले आहे.

**साधली सिधाई सांगे जगा** :- सरळ साध्या सिदाईच्या मार्गाने लहानपण घेवुन नित चतुर्पतीचे ग्यान ध्यान भजन पुंजन सुमरन करत राहत चतुर्पतीच्या ग्यान अनुभवाने सुर्याच्या १२ कलासिध्दि व चंद्राच्या १६ कलासिध्दी आपल्या रूपात उभ्या करून एका दांडावर आणुन या या सुर्याच्या/मेद्याबुध्दिच्या बारा ज्योतीचा प्रकाश स्थुल सुक्ष्म कारण महाकारण या चौ-देहात पडुन या १२ ज्योती आणी ४ देह मिळुन १६वी हाती धरली. ऐसे १२ अन ४ मिळुन सवळीचे गठनं केली आणी त्या सवळीव्दारे सत्रावी ची एकच जीवनकळा ज्योत उभी देहधरणीवर केली. या सत्रावी जीवनकळा ज्योतीत सेरूपी उभा राहीला कृष्ण सावळा ! आणी या सावळयास चंद्राच्या १६ चंद्रकलासिध्दी अर्पन करून १६ अन १६ बत्तीशी चे गणीत साधले. ही झाली हद्द । ऐसा या कृष्णाने चंद्रबत्तीशीचा मुद्या साधवुन सिदाई आपल्या देहीवर उभी केली. सावळ्या विठ्ठलास आपल्या देहभुम्मेवर उभे करून चतुर्पती भैसास परिपुर्णतम पुर्ण अवतार घेण्यास लावले. चतुर्व्युह रंचनेत पुर्ण अवतार बनलेत. अधिक ग्यानाकरीता कृष्णांमृत वाचा. या कृष्णाने ही भैसापोटचा तुरीया म्हणजे चौथ्या अवस्थेत प्राप्त होणारा चतुर्पता अथर्वन् वेद जगास सांगीतला आहे. चतुर्पतीच्या सच्च्या भक्तजनास तिरगुणांच्या पल्याड नेवुन ग्यान-भक्ती मार्गे निरंजन ग्यान सह अनुभव देत त्यांचे रक्षण पालन पोषन.. ईत्यादी शिष्टाई करत गायपाच्या खेळाव्दारे गायप होवुन गुप्तपणे तो त्यांचे नित साहय करत उभा आहे.

**॥ निरसनसह ये गा माझ्या विठु ॥**

॥ बारा सोळा भरून गेलं । भैसा खुम्मी, जागी झालं ॥

*खंड०२/०६:-द्युताचे मोती । खंड०३/०५-देहवर्णनाच्या ओवी । ०३/०१-मुळस्तंभिचा पाया, ०३/०३पाळणा या ओवीतुन सुर्याच्या १२ कलासिध्दि व चंद्राच्या सोळा कळा व सत्रावी व बत्तीशीचे अधीक ग्यान घ्यावे ।*

॥ सोळा कळी पोर्णिमेला, चंद्र पुर्ण झाला ।
बारा कळी रवी दिवस, सुर्य उगवला ॥ खंड०७/ओवी-१८

डाव्या नयनाच्या डाव्या मार्गाने म्हणजेच १६ चंद्रकला मार्गाने सत्रावी जिवनकळा ठाई धनी उभा होतो. तर उजव्या नयनाच्या उजव्या मार्गाने म्हणजेच १२ सुर्यकला मार्गाने १३ व्या सिध्दि ठाई धनी उभा होतो या चंद्र-सुर्य दोन्ही मार्गाने १२ व १६ चे लोंढे एकाच हरीदांडावर येवुन हरीचरणी लीन होतात. सुर्य मार्गात तेरावी चौदावी साधल्या जाते तर चंद्र मार्गात १२ अन ४ मिळुन सोळावी हाती धरून चंद्राच्या सोळा कला साधल्या जात असल्यामुळे या चंद्र-सुर्य मार्गाने १६ आणी १६ बत्तीशी चा मुद्या साधल्या जातो. सोळा कळा च्या सिध्दी व्दारे तिरगुणी शुन्य उडुन जाते. तिरगुणांच्या पलीकडचा दृष्टिक्षेपात येतो. त्रिगुणातीत दृष्टी प्राप्त होते.

ऐसे सुर्याच्या बारा कळा व चंद्राच्या सोळा कळा कळा ने देह भरून गेलं ऐसे बारा सोळा देहीत भरून गेल्यावर देहीतील त्रिकुटाचे शुन्य जावुन चवथ्या तुर्या अवस्थेत चौथ्या भैसा खुम्मी देही जागी/जागृत झालं. तुमच्या कृपेने या जागृत झालेल्या देहीवर आतातरी या देहभुम्मेवर तु ये गा माझे विठु ! या देहीची ज्योत तुला भेटुन या देहीच्या ज्योतीमध्ये ज्योत खेळवा भैस अवतार ! आता ऐसेच ज्योतीमध्ये ज्योत मिळवत मायबापा विठु, तुला आम्ही भेटु ।

॥ गलीत पात्र झालं सत्रं । अथर्वन् वेदानं जागी केलं ॥
॥ गत-मत उडुन गेलं । सत्य स्वरूप/सेरूप देही दावलं ॥

विठ्ठला ! तुमच्या कृपेने या जागृत झालेल्या देहीवर जीवाची दशा दुर्दशा करणारे कलयवगाच्या कालनदीचे गलीत पात्र वाहण्याचा ठराविक कालावधीचे सत्र झाले. गलीत म्हणजेच वाईट समयाचे मालीकांचे कली कलह च्या चौ-यांशीच्या

समयाचे कलयवगाचे गलीत पात्र चे सत्रं झालं. कलीच्या गलीत पात्र चे सत्रं पुर्ण होवुन या देहीला तुमच्या कृपेने चौथा अथर्वन् वेद प्राप्त होवुन, या अथर्वन् वेदानं देही मती जागृत/जागी केलं. शुध्द मतीने शुध्द चतुर्पता कळाली. आणी तिरगुणी मायेच्या रंचनेव्दारे आधी जे तिरगुणी मत झाले होते, ते गतकालीन जीवाची दशा, दुर्दशा करणारे अगोदरचे/ गत काळचे जुने तिरगुणी मायचे स्वःमतप्रदर्शन व्दारे जीवावर लादलेले तिरगुणी मतं उडुन गेलं. हे विठ्ठला ! ऐसे तिरगूणांचे मत चे ठाणे उडवुन त्वा तिरगुणांचे पलीकडचे सत्य दावलं. मज माझे सत्य स्वरूप या देही या डोळा दावलं. स्वस्वरूपी जागी केलं. परंतु विठ्ठला ! निरंजना एवढंच करनं होतं का तुला ? एवढयांसाठीच तु मज हाती धरलं होत का ? निराळा ! तु का बसला दुर ? तु का नाही येत या देहभुम्मेवर ? निरंजन ! तुया वाचुन ही देह धरणी आहे हो सुनी ! आतातरी या देहभुम्मेवर तु ये गा माझे विठु ! या देहीची ज्योत तुला भेटुन या देहीच्या ज्योतीमध्ये ज्योत खेळवा भैस अवतार ! मायबापा विठु, ! आता ऐसेच ज्योतीनं ज्योत मिळवत तुला आम्ही भेटु ।

॥ यौग भरणी झाली धरणी । देहे धरून उठवं प्राणी ॥

भैसाच्या चौकोणी मेघ-निळाने बरसणारी निळावंती च्या चतुर्पती ग्यान जल वर्षावाचा पाउस नित सततधार पडुन या सत्यवगाच्या चतुर्पती ज्ञानजलाच्या पाउसाने देहधरणी संपुर्ण भरली. या चतुर्पतीच्या निळावंती पाउसाच्या अनुभवाव्दारे धरणी ओली झालेली आहे. चतुर्पता अथर्वन् वेदाच्या चतुर्पता निरंजन ग्यानाने सत्याची भर ठासुन ठासुन देहभुम्मेवर भरली. देहभुम्मेवर सत्य यवगाची बहर व्दारे देहधरणी भरून सत्य ओसांडुन वाहु लागलेत. या देहभुम्मेवर सत् यवगाची भरणी झाली. आणी देहीवर सत्य यवगं उभ राहीले. ऐसे तुमच्या कृपेने शुध्द सत्य ची भरणी होवुन सत् यवगं उभ झालेल्या या देहभुम्मेवर आतातरी तु ये गा माझे विठु ! हा देह धरून या नरदेहीचा अवतार करून हा निजरूप प्राणी आता प्रकाशमान करून उठवं विठ्ठला ! या देहीची ज्योत तुला भेटुन या देहीच्या ज्योतीमध्ये ज्योत खेळवा भैस अवतार ! आता ऐसेच ज्योतीमध्ये ज्योत मिळवत मायबापा विठु, तुला आम्ही भेटु.

॥ भैसा खुम्मी अगाध वाणी । भेट देई अवघ्या जनी ॥
॥ आउक पाउस कल यवगी । सत्य शकुन नांदते देही ॥
॥ फुक मारू येईन धोडां । साधवा सिदाई, कर जागा ॥

तुर्या अवस्थेत प्राप्त झालेल्या चौथ्या अगाध धनी भैसा खुम्मी चा मुखचा चौथा अथर्वन् वेद ची वाणी अगाध आहे. ही चतुर्पतीची वाणी ऐकुन पाताळाचे पालक, स्वर्गिचे दैवत.. ईत्यादी सर्व जनी भेटीसाठी मिर्तलोकच्या हद्यी उतरतील ! अवघे तुयी गाही देण्याकरीता या देहभुम्मेवरी येतीन ! अवघ्या जनी हौसीने भेट देई हो ! चार वेद सहा शास्त्रे, सहा दर्शन सहा जोग एका ठाई मिळुन आप आपले ग्यान सांगे हो ! ऐसे हे तुयं आपरूप सांगी करणारे तुझे आउक यवगं त्वा हौसेनं प्रकटवले. "*सांगते निराकार* परमात्मा, *ऐकते निर्गुण* आत्मा" ही अवस्था प्राप्त झाली. आउक यवगाच्या शकुन सांगीचा पाउस पडु लागला. अर्तरात्माच्या आवाजाव्दारे सत्य शकुन देहीत नांदु लागला. या सत्य शकुनाव्दारे बहु एक भाकलं कळलं की : पुढं आशिन मासी धोंडा येवुन पुस जाईन उडुन. आणी चैत्र शुध्द प्रतिपदेला पुनः धोंडा येवुन गुढा जाईन उडुन । ऐसा ऐका मागुन ऐक महीन्याला फुंक मारणारा धोंडा एका वर्षि येईन आणी मग पुढं तुझा नवाच खेळ उभा राहील. परंतु आताचं काय ? मज अजुन पुर्ण प्राप्त झालं नाही. म्हणुनच आज मी अर्ज करतो की : आता मनी हौस आणुन साधवा सिदाई देवा ! या देहभुम्मेवर पुर्ण अवतार रंचनेची मोहीम कर गा उभी ! तुया सत्य यवग आणण्याची मोहीम कर गा उभी ! कर बा यवगाची तयारी विठ्ठला ! कोरी भुम्मा कोरा कागद कोरा हा देहं । या को-या भुम्मेवर उभा कर सिदाईचा वेद । समर्था ! तेरव्या सिध्दि ठाई या देहभुम्मेवर नित उभा राहुन देहें कर संपुर्ण जागा ! धर या देहभुम्मेवर पुर्ण अवतार ! कर जागा आपल्या चतुर्पती बिरदाची । बिर्द वाणी संभाळ धनी । आता तु ये गा माझे विठु ! हा देह धरून या नरदेहीचा अवतार करून या देहीच्या स्वराला तुझा स्वर मिळवं विठ्ठला ! या देहीची ज्योत तुला भेटुन या देहीच्या ज्योतीमध्ये ज्योत खेळवा भैस अवतार !

**॥ चद्र बत्तिशीचा मुद्या । साधवा, तेरवी सिध्दि, भैसा मोहीम कर गा उभी ॥**

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०५ ॥

॥ ओवी नं. १४ ॥

॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ आपलीया बळे । नाही बोलवत ॥

॥ आपलीया बळे । नाही बोलवत ।
सख्या भगवंत । वाच्या तुही ॥
॥ साळु जरी बोले । बोले मंजुळ वाणी ।
शिकविता धनी । उभा आहे ॥
॥ भालीयाचे घाव । काटयावर निवारी ।
देव माझा कैवारी । उभा आहे हो राया ॥ कृष्ण राजा हो...
॥ कल्पने ची बाधा । न लागो राजसा ।
हरीच्या या दासा । भावीकाशी ॥
॥ हंकाराची वाचा । अहीन हा भला ।
बट्टा नाही त्याला । रत्तीभर हो राया ॥ कृष्ण राजा हो...

भजने :- ॥ हंकार कल यवगात । घ्रुताची/विठ्ठची वाणी सांगे जगात..
नवल/महिमा सांगे जगात ॥



॥ ओवी नं. १५ ॥

॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ देहीचा हा कार । उभा आहे सम्मोर ॥

वरभजन :- ॥ देहीवर सत्ता आहे धन्याची । यवग भरले ।
अवतार घवुन सारंगधर । सत्य बोलले ॥

॥ देहीचा हा कार । उभा आहे सम्मोर ।
नवनिधीचा कार । घेतो सारंगधर ॥
॥ करुणेचा सागर । उभा ठाई ठाई ।
गोपाळाच्या पाठी । अधार तु देशी ॥
॥ हंकार हे वाणी । विनविते तुम्हा ।
गोपाळ लावा नामी । अशी आहे वासना ॥
॥ पुर्विचा हा लेख/लेश । चुकवेना कोणा ।
उभी साळु माय । पाजे, अमृताचा पान्हा ॥
॥ फाटक्याचे धड । करावं बा अवधुता ।
भाकल्याचे गुण तुम्ही, बोलले पंडीता ॥

भजने :- ॥ शाहु नंदन गर्जुन बोले ।
या कर्ता-याचे/महाराजाचे दिवस जवळ आले



॥ ओवी नं. १५/१ ॥

॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ दिवस आला हो आला ॥

।। आपन उभे आंग । अवतार संग । अनामत आले हो आले ।। दिवस आला..
।। ज्याच्या मनात आहे खुशी । घडवन तशी । आपरूप आले हो आले ।।
।। वेळोवेळा करे सुमरन । अगाध गुण । देई त्याला हो त्याला ।। दिवस आला..
।। प्रेम भक्त नित ध्यान । लावुन मन । तोची खरा हो खरा ।। 04।। दिवस..

भजने :-
।। दिवस आला यवगाचा । सत्य शकुन या महाराजाचा/ईश्वर-पुनाचा ।।

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. १६ ॥
॥ कृष्ण ज्ञान सह विनवणीची मुळावरची ओवी ॥

## ॥ भरून पावले रूप दावले ॥

या ओवीची पलट ओवी खंड०७/ओवी-१९ मध्ये दिलेली आहे.

॥ भरून पावले, रूप दावले । विठ्ठल कुल शाही ।
महाराजा चा हंकार आला । आवाज नरदेही ॥घृ॥
॥ बहुत यवग, आहो मुढं । करावं तैयारी ।
कराव तैयारी भेट दयाना । श्री हरी ॥
॥ तुया चरणी, घातली मिठी । कराव मजबुती ।
कराव मजबुती येवुन तारा । आपल्या हाती ॥
॥ जीव जात, बहु अन्जान । अगाध आहे यवगाचे गुणं ।
यवगा चे गुण येवुन । अवघ्यास नांदव नं ॥०४॥

॥ परात पर, केला/कराव कार । यवगा चे परमाणं ।
यवगा चे परमाणं देवा । राहाव येवुनं ॥
॥ भाग वचन, पुर्विच देणं । राखाव ईमानं ।
राखावं ईमानं या घरी । राहावं येवुनं ॥
॥ दया सागरी, शकुन वाणी । तुम्हा पासुनं ।
तुम्हा पासुन ईश्वरी रूप । धरलं या देवानं ॥
॥ उभे श्रीहरी, जाहीरण करी । यवगाच्या वरं ।
यवगाच्या वर उभा हा । कृष्ण अवतारं ॥०८॥

॥ म्हणे महार, करे जोहार । यवगाचे वर ।
यवगाच्या वर हाच बाप्पा । करन कार ॥
॥ याहीलाच म्हणतो महाराज । हे माझं घरं ।
माझ्या घराचा येवुन तुम्ही । करावं अंगीकारं ॥
॥ भक्ती सुमरण, अगाध ज्ञान । जाहीरणा ची खुणं ।
जाहीरणा ची खुणं राया । घ्याना ओळखुनं ॥
॥ पहा जळ, आहे मुळं । पुर्विची खुणं ।
पुर्विची खुण हो राया । घ्याना ओळखुनं ॥१२॥

॥ किल्ली कुलुप, हाच महाल । संधीचे काम ।
संधीचे काम तुम्ही । घ्याना ओळखुनं ॥
॥ परात पर, परमेश्वर उभा । आहे अगोचर ।
आहे अगोचर जिवन हे । मोक्षाचं घरं ॥
॥ शिराळ भुवनी मुळ आहे । यवगाच्या वरं ।
यवगाच्या वर याची कोणा । नाही खबरं ॥१७॥

**भजने :-**

॥ महार नोव्हे होय महाराज ।
याहीचा अंत कळेना, जायरन काजं ॥
॥ महार नोव्हे, होय महाराज । हा जायरन करतो तिर तिरलोक्यात ॥
॥ यवगी मांडणा । भैसाची...। खबर नाही कोणाशी/जगाशी ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. १७ ॥
॥ कृष्ण ज्ञानाची व विनवणीची ओवी ॥

## ॥ भक्तीचा काज करे विठुराज ॥

॥ भक्तीचा काज । करे विठुराज ।
सांगीतला भेद । या चातुरानं ॥घृ॥
॥ जागी या राहीला । लभेद पाहीला ।
धुम्मधुम्मकार झाला । या भुम्मेवरी ॥
॥ झाला धुम्मधुम्मकार । उभा परमेश्वर ।
गिण्यानाचा सांड । सांगे जगा ॥
॥ ग्यान हे गिण्यान । सोडा अभिमान ।
मारला रावण । राम रायानं ॥०४॥
॥ प्रजेचं ठिकाण । उडवण निशाणं ।
असो लहाणपण । सर्व ठाई ॥०५॥

**भजने :-**

॥ लहानपण नाही धरलं कोणं । लहानपण धरलं या भगवंतानं ॥
॥ जिथे आहे लहाणपणं । तिथ आहे या देवाचं दर्शनं ॥
॥ लहानपण देगा देवा । मुखी लागो साखरेचा गोडवा ॥
॥ लहानपण देगा देवा । तुमच्या चरणाचा धरला धावा ॥

॥ ऐरावत रत्न थोर । त्याला आहे अंकुशाचा मार ॥
॥ जिथे आहे मोठेपण । त्याला आहे यातना कठीनं ॥
॥ जिथे आहे अभिमान । त्याचं नाही होईल हो चैतन्य ॥
॥ अभिमानाचा होईन अपमान । योगी आला ।
तिरभवनी धाक पडला । ब्रम्हादिकाला ॥
॥ लिनतेच्या सागरा । लिनतापण ।
आम्ही अन्जानं लेकरं । पदरी धर ॥

**गजर :-** ॥ लहानाचं मोठो झालो । देवा तुया कृपेनं ।
एवढं मागणं मागतो देवा । नको देवु अभिमान ॥

-: निरसनसह शब्दार्थ :-

**अभेद** = भेद न जाणता येणारा, ज्याचा भेद करु शकत नाही असा अखंड ।
**लभेद** = निर्मळ, निशंःकलंकी, कोणत्याही कलंकाव्दारे जो कलंकीत होत नाही, तर त्या कलंकालाच दूर करणारा/पवित्र करणारा सर्वत्राचा पिता परमात्मा भैस ।
**धुम्मधुम्मकार** :- नादब्रम्ह, अनाहत् नादब्रम्हाची नादारोळी, धुम्धुम्कार चा कल्लोळ, गुणगुणाटी गोंधळ

**ज्ञान** = तोडी सांगतलेले ऐकलेले वाचलेले ते ज्ञान ।
**ग्यान** = त्या ज्ञानाचा अनुभवाने आलेले ते अनुभवसिध्द ग्यान
**गिण्यानं** = अनुभवसिध्द ग्यानाच्या साठयांचा साठा करुन त्याचा हद्यी घोक करुन त्यातुन निघालेला कार/मार्ग/सार.. इत्यादी. उदा. हे चतुर्पतीच गायनातील गिण्यान ।

**सांड** :- सांडवणे, गिण्यारुपी पाणी धो-धो सांडवणे,

**ऐरावत** = पांढरा हत्ती जो समुद्रमंथनातुन निघाला त्याचे नाव ऐरावत असुन हे रत्न इंद्राला त्याचे वाहन म्हणुन देण्यात आले. ऐसे हे समुद्रमंथनातुन निघालेले एक रत्न । त्या थोर रत्नाला सुध्दा इंद्राच्या अंकुशाचा मार आहे.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. १८ ॥

॥ कृष्ण ज्ञानाची व अस्तुकीची ओवी ॥

## ॥ गोकुळी अवतार ॥

॥ गोकुळी अवतार । उभा कृष्णराज ।
आंग करे काज । पांडवाचे ॥ घृ ॥
॥ पांडवाचा सखा । वनात आपणं ।
पुरविले अन्न । ऋषि जनास ॥
॥ ऋषिश्वरांच्या । बसविल्या पंगती ।
भोजन वाढतीं । कृष्ण राया ॥
॥ पंगतीचे पान । उचलले कृष्ण देवानं ।
धरलीसे लहानपण । कृष्ण रायानं ॥ ०४ ॥
डहाकी :- ॥ पंगतीचे गडी । संगतीन खेळु !
साथचा सवंगडा । संगतीन राहु ॥
॥ द्रौपदी साठी । कृष्णदेव झाले साथी ।
पाडल्या राशी । नाना वस्त्रांच्या ॥
॥ द्रौपदी साठी । कृष्णदेव झाले कैवारी ।
वस्त्र रंगवीले । नाना परी ॥
भजने :- ॥ देव रंगाचा रंगारी । अवघे रंग या देवाच्या घरी ॥
॥ वस्त्रें रंगविले बहुपरी । आमचा माथा तुमंच्या चरणावरी ॥
॥ माझे अंतर रंगवा । यवगा यवगी मजला संग वागवा ॥



॥ ओवी नं. १९ ॥

॥ उपदेशाची जळगाव दांडातील जुनी ओवी ॥

## ॥ इथतरी कोणी एक असन सखा ॥

॥ इथतरी कोणी एक असन सखा । हरीला विसरू नका ।
हरी होय आत्मजीवाचा सखा ॥ घृ ॥
॥ पुर्व पुंजी काय केलं । सकृत होत भारी ।
सकृत होत भारी । म्हणुन आलो संसारी ॥
॥ माय बाप हे भाउबंद । उदंड आहे गोतं ।
उदंड आहे गोतं । शेवटी कोणाची नाही संगतं ॥
॥ दया धर्म तु कर काही । होईन पुण्याची जोड ।
होईन पुण्याची जोड । शिदोरी येईन हो संगत ॥
॥ यमरायाचे येतिन धुत । समोर नेईन तिथ ।
समोर नेईन तिथ । जिवाला जाचण्या बहुत ॥
॥ धन सपंदा दोन दिवसाची । छाया दुपारची ।
छाया दुपारची धरल्या घडीभर । नाही राहायची ॥
॥ सत्य संस्कृति मानव निती । भक्ती ही प्रेमाची ।
भक्ती ही प्रेमाची । अखंड संगत अवधुताची ॥
॥ काही तरी करा हो करा । तुम्ही भजन देवाचं करा ।
तुम्ही भजन देवाच करा । आदीपुरूष येतीन घरा ॥
॥ जलावरी केला कार । अवधुत निरंजन खरा ।
अवधुत निरंजन खरा । तुम्ही भजन देवाचं करा ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. २० ॥

॥ कृष्ण ज्ञानाची व विनवणीची निरसनसह मुळावरची ओवी ॥

## ॥ ब्रम्हांडीया वसे ॥

या ओवीची पलट ओवी खंड०७/ओवी-२० मध्ये दिलेली आहे.

॥ ब्रम्हांडीया वसे । काना मात्रा असे ।
असुनी ना दिसे । पहा राया ॥ धृ ॥
॥ फुकंलेसे कान । शुन्य हे निरसुन ।
शुन्या घरी वाणं । का दिलासे ? ॥
॥ शुन्या घरी वाणं । दोहीताचे काम ।
कळतीन लक्षण । भुम्मेवरी ॥
॥ देहीचा हा कार । जीव केला अंबर ।
फुकट शिणगार/शृंगार । का केलासे ? ॥ ०४ ॥
॥ शिराया घुमुजं । लागुनी भिंतीशी ।
धरूनीया गम । हद्याशी ॥
॥ हात या धरून । न्यावे कोठयातं ।
घ्यावे ओटयात । नर देही ॥
॥ ओटयातं घेवुन । करा प्रतिपाळ ।
चुकवावं वेळ । कहीक काळाची ॥
॥ चुकवुनी वेळं । उभा करा खेळ ।
मिळवावां मेळ । तिर लोक्याचां ॥ ०८ ॥

॥ आकाशी आकोडा । पाताळी कुदळी ।
आले/येतीन मिर्तलोकी । किर्तमोठी/किर्तिसाठी ।
॥ पाताळाचे पालकं । स्वर्गिचे दैवतें ।
मिर्तलोकी आले/येतीन । भेटी साठी ॥
॥ निधानी हा धर्म । पाताळी हा बळी ।
हिंशोबाच्या वेळी । देतीन गाही ॥
॥ ऐकुनी हे वाणी । तिरलोक्य जनी ।
उतरले/उतरतीन या धरणी । अवघे हे दैवतं ॥ १२ ॥

॥ लेकराची रेंग । भातक्याचा छंद ।
चित्त-मन लावुनं । कर आंग ॥ महाराजा..
॥ म्हाता-याचा रंग । अवतार उभे संग ।
आकाशाची वाणी । सांगे जगासं ॥
॥ लेकराची आळ । पुरवावं/समजावं मायबापा ।
आले देव साहयाला । महाराजा । किंवा
अवघं साहयं करा । तुमच्या हात ॥ हो राया कृष्णराजा हो राया..
॥ रंग या धरूनं । आहो तुम्हा मनीं ।
लागलोसे घ्यानी । देवा तुझ्या ॥ १६ ॥
॥ तरायाचे काम । आहे तुम्हा हाती ।
मुखाच्या वचनी । करावं कारं ॥
॥ आगम उगम । या सावाचा हुकुम ।
सुटतीन/चालनं शकुन । या नरा/राया मुखचे ॥ १८ ॥

म्हणनी ०२ :- उठन आवाज । या नराचे । किंवा चालन शकुन । भुम्मेवरी ॥

**भजने :-**

**॥ शकुनाचा होईन जलजलाट । भुम्मेवरी ।**
**या देवाला आडवं येणार, नाही कोणी ॥**
**॥ शकुनाचा होईन जलजलाट । पृथ्वी वरी ।**
**या देवाच्या आडं येणार नाही कोणी ॥**

**-: निरसनसह शब्दार्थ/चरणार्थ :-**

**शुन्या घरी वाण** :- तिरगुणांचे शुन्य यांच्या घरी वाण/देणं । **शिराय घुमुज** :- धडाचे घुमुज असलेले डोके, शिर, मस्तक । **गम** :- दुःख । **कोठा** :- प्राणी ठेवण्यांची/ राहण्याची जागा । **रेंग** :- लहान मुलांचे काहीतरी भेट मागण्यासाठी कुरकुर करत लटकं रडणे । **भातकं** :- कामावरून घरी येतांना लेकरांसाठी आणलेले खादयपदार्थ, भेटवस्तु ईत्यादी । **छंद** :- सवय, लत । **लेकराची आळ** :- आपली मागणी मागण्यासाठी लेकराने रेटुन धरलेला हट्ट ! **शृंगार** :- साज सजावट करून नटने.

ब्रम्हांडीया वसे । काना मात्रा असे । असुनी ना दिसे । पहा राया :-




कोटी कोटी सुर्याच्या समान तेजाचं महान दिव्य तेजोमंडल ज्याची आकृति आहे. जो निराकार सर्वव्यापी स्वेच्छामयी आपरूप धारी आहे. त्याचे स्वरूप त्याच्या ईच्छानुरूप तो धारण करतो. असा जो तो निराकार निराधार निश्कलंकी ज्योर्तिमय आदीपुरूष परमात्मा पिंडी या ब्रम्हाडी भरून भरला आणीक उरला आहे. पिंडीत तो आपल्या अंश अवतारात देहीच्या मस्तकावरील ब्रम्हांडी अगोचर चक्री निराकार तेजोमय ज्योत स्वरूपात उभा आहें. या ज्योतीनच तारु केले आहे या पिंडीला । जश्या अक्षराला काना मात्रा दिल्याने अक्षर अर्थपुर्ण होते, तसेच याच्याही काना मात्रा व्दारे तो या देहीला निरंजनी भेटी देत राहतो. या देहीचे कार्य संपन्न करत राहतो. याच्या या कानामात्रा चा अनुभव येतो. परतुं हा परमात्मा निराकार निराधार निश्कलंकी ज्योर्तिमय असल्यामुळे हा येथे असुनही तो सर्वसामान्यांना ना दिसे हो राया ! सच्चे योगीजनच आपल्या योगसाधने व्दारे या सत्चित्तानंदचे ध्यान लावुन बसतात. एखादया वेळेस आश्चर्यजनक रित्या अचानक ध्यानी मनी नसतांना, कोटी सुर्याव्दारे जी प्रभा फाकली जाते तशी अनंत प्रभा फाकलेली असलेले तेजपुंजः मंडलाकार तेजोमंडलचे प्रकाश दर्शन सच्या योगीजनांना मिळते.

देहीचा कार, जीव केला अंबर । फुकट शृंगार, का केला असे ?

परमात्म्याने या नरदेही चा कार केला आहे. या देहीत जे जे वसवले आहे, ते ते त्याने ब्रम्हांडातही वसवले आहे. कजब्या मध्ये हिशोब करून, या कजब्यात तिन ताळ वसवले. पिंडी-ब्रम्हाडी सप्तचक्रे तारे चा उजाळा केला. देवता च्या चौदा चौक्या ठेवल्यात. चंद्र-सुर्य नयन केले. चौदा भुवन, एकविस स्वर्ग, तिरकुट, औटपिट, ब्रम्हांड ईत्यादी सर्वकाही येथे वसवले. या देहीतील सर्वकाही परमात्माने ब्रम्हांडी सुध्दा वसवलेले आहे. ऐसा या परमात्माने देहीचा कार तर केला. परंतु या देहीला अंमर पद नाही दिले. देहीला मरण देवुन नश्वर ठेवले. व जिवाला अंबर केले. देहीला मरण देवुन नश्वर ठेवले, तर या जीवाला चिरंजीव ठेवुन अमर अंबर केले. ही असमानता काहो ठेवली राया ? या देहीला का नाही अंबर करत आता ? ही देही नश्वरच ठेवायची होती तर या देहीवर ईतकी सजावट करून फुकट शृंगार का केलासे हरी ?




॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. २१ ॥

ओवी महात्मः- या ओवीच्या काही चरणे सिध्द होवुन बाळाजी राजे यांच्या बुडाल्या वंशाचा वेल वाढला. अधिक ग्यानाकरीता पलट खंडाचे प्रारंभिक ज्ञान वाचावे. त्याचमुळे संततीच्या अर्जिच्या वेळी ही ओवी हमखास म्हटल्या जाते.

॥ कृष्ण ज्ञानाची व विनवणीची निरसनसह मुळावरची ओवी ॥

## ॥ जागा या पाग्याची ॥

या ओवीची पलट ओवी खंड०७/ओवी-२१ मध्ये दिलेली आहे.

॥ जागा या पाग्यांची । नाही हो गणीत ।
आता आहे हितं । देवा घरी ॥ घृ ॥
॥ घोडी या पिल्लाची । धाव बराबरी ।
काना-मात्रा हरी । जवळी असे ॥
॥ मुखाचा हंकार । उठली गर्जना ।
कळसुत्र जाणा । महाराजा हो ॥
॥ मन हे मोहीले । करीतो प्रार्थना ।
चुकवा हो जाचणा/यातना । चौ-यांशीच्या/यमपुरीच्या ॥०४॥

॥ भाव माझी भक्ती । राहो या आंगी ।
सदा खबर सांगी । घडी घटका ॥
॥ साखरेची गोणी । लादा बैलावरी ।
आठवितो हरी । सदोनित ॥
॥ बुडाल्या वंशाचा । वाढवां हो वेलं ।
साच्या करा बोलं । महाराजा हो ॥
॥ पानाची हे पत्ती । धरलीसे हाती ।
आता आहे लाभ । बहुता परी ॥
॥ भेटीचा हा लाभ । वृक्षाला फळं ।
दिसते केवळं । राजहंस ॥

॥ मेघांचा वर्षाव । पडनं पर्जन्यं ।
ओघंळ-नाघंळ । हे जातीन भरूनं ॥ ११ ॥
॥ ओगंळ-नागंळ । म्हणतील गंगा ।
तिथं तिर्थ शोभा । कैसी आता ? ॥
॥ सागराचं पाणी । अथांग हे आहे । अथा-तळा दिसे ।
हिरे रत्न मोती लाल । त्यात आहे ॥
।। काशीसे गमन । कार ल्याशी आला । कार त्याहीचा सांगा ।
उभा ऋषिश्वर । सत्य जाणा ।।. .कारला दांड चे चरणं
॥ कासाशी जडलो । कार याहीचा सांगा
उभे, पुर्ण अवतार । सत्य जाणा ॥१४॥ ..प्रचलीत म्हणणीचे चरणं

भजने :- ॥ कशी भुलवन पडली जना । काही समजेना ।
या महाराजाचा खेळ कोणा उमजेना ॥
॥ ज्याला भासनं त्याला थोर । उभा आहे पुर्ण अवतार ॥
॥ सत्य जाणाणा तुम्ही । मालक उभा देव पृथ्वीचा पती ॥
॥ मालक उभा योगेश्वर । याहीच्या चरणी माझा नमस्कार ।
आमचा माथा याहीच्या चरणावर ॥

-: निरसनसह शब्दार्थ/चरणार्थ :-

**जाग्या** = जागा, ठिकाण, स्थळ. । **पाग्या** = घोडे ठेवण्याचे पाग, गोठां, ठिकाण, स्थळ. । **नाही गणीता** :- संख्या नाही, अगणीत

**घोडी या पिल्लाची धाव बराबरी** :- जशी घोडी ही वेगवान धावण्यास स्वतः समर्थ असतांना सुध्दा ती आपली धाव चा वेग आपल्या पिल्लाच्या धावाच्या वेगा पेक्षा जास्त न ठेवता पिल्ल्याच्या वेगाएवढाच ठेवते, त्याचप्रमाणे हा हरी आपल्या काना-मात्रा दाखवत सच्च्या भक्ताच्या प्रगती करण्याच्या वेगाईतकाच आपला वेग ठेवुन त्याचा संग करत त्याला साहय करत राहतो. हरीच्या नामाच्या धिराईच्या देही ठेवत त्याची वेळ घटका सांभाळत राहतो.

**काना-मात्रा हरी** :- हरी हा निराकार मुळ अक्षर असल्यामुळे या मुळ अक्षराच्या काना-मात्रा चा अनुभव येतो. हा निरंजनी भेटी देतो, भक्तांचा मुजरा घेतो आपल्या काना-मात्रा दाखवतो, अनुभव देतो परंतु दिसत नाही. म्हणुन येथे काना मात्रा हरी असे संबोधिले आहे. । **राहो या आंगी** :- भक्तीने या देहीत सदोनित रहावे, किंवा या देह आंगी राहो म्हणजेच परमात्म्याचा अंशअवतार आत्माराम ने राहुटी करुन सदोनित भक्ती संग राहावे. निराकाराची सांगी तो निर्गुण आत्मा घडीघडका अंर्तआत्म्याच्या आवाजाव्दारे सदा खबर सांगे. तो या देहीतुन जाउच नये कधी । असो तुया रुपा सुखाची गाही. **घडी घटका** :- वेळोवेळा, प्रतेक वेळी ।

**गोणी** :- पोते । **लादा बैलावरी** :- या मानवरुपी बैलाच्या खांदयावर साखरेची गोणी लादुन/ठेवुन यांना हरी नामाच्या साखरेचा भार वाहु दया. साखरेचे गोणे प्रमाणे पुत्रं लाभुन त्यांचा सुखाने वेल-विस्तार वाढु दयावा. ।

**बुडाल्या वंशाचा वाढंवा वेलं** = ज्याचा जवळ आपली वंशावळ वाढंवणारा समोर कोणीही नाही तो बुडाल्या वंशाचा, निपुत्रिक. अधिक ग्यानासाठी खंड०७:-पलट दांड चे प्रारंभिक ग्यान वाचावे । **साच्या** = सत्याचा साचा ज्यात सत्यच आकारते, सत्य देही, सच्चा ।

**पानाची पत्ती धरलीसे हाती** :- जसे झाडाच्या पानाची पत्ती पिकल्यानंतर ती गळुन पडते, तसेच ही देही जिर्ण झाल्यानंतर गळुन पडते. ही नश्वर देही या कृष्णदेवानं हाती धरली असल्यामुळे आता आहे लाभ, हित बहुता परी । **वृक्ष** = झाडं, देहरुपी झाड, देहीला झाडाचे दिलेले संबोधन. । **राजहंस** = आत्मा, जसा राजहंस दुधात मिसळलेले पाणी ईत्यादी भेसळ बाजुला सारुन फक्त पाक-शुध्द दुधच पितो, तसा हा आत्मासुध्दा असत्य, आसाराची भेसळ बाजुला सारुन फक्त सत्यच सारं घेतो. म्हणुन या आत्म्याला राजहंस ची उपमा दिलेली आहे. तसेच सृष्टी-ब्रम्हांडाचा राजा हा परमात्मा आहे आणी त्याचा तेजोगुणी अंश असलेला हा चिरंजीव आत्मा आहे. आत्मा या परंम् राजाचा हंस आहे म्हणुन सुध्दा या आत्म्याला राजहंस असे म्हटल्या गेले आहे.

**मेघ** :- चतुर्पतीचा चौकोणी ढग । **पर्जन्य** :- चतुर्पतीच्या आकाशातील चौकोणी मेद्यनिळाच्या ढगातुन पडणारा ज्ञानरुपी पाण्याचा पाउस. अहीनाचा पुरवा ।

**ओघळ-नाघळ** :- पाण्याचे ओढे, नाले, खोरे

ओघळ-नाघळ म्हणतीन गंगा । तिथ तिर्थशोभा कैसी आता ?

ज्याप्रमाणे ओघ व नाला हे उथळ असते व त्यात पाण्याची खोली कमी असल्यामुळे खळखळाट जास्त असतो, त्याप्रमाणे ज्या मानवात ज्ञानाची कमतरता असुन फक्त खळखळाट फार असतो ते ओघळ-नागळ मानव या चतुर्पतीच्या चौकोणी मेघाच्या पाण्याव्दारे भरुन जातीन. या चतुर्पतीच्या ज्ञानरुपी पाण्याने ओले होवुन त्यांना अनुभवाचे देण प्राप्ती झाल्यावर ते शंक बनुन त्यांना गंगे सारखे पवित्र स्वरुप येईन. मग ते म्हणतीन : त्या गंगा नदी काठी असलेल्या तिर्थस्थानी शोभा कसली आता ? त्या गंगेकाठचे सर्वकाही तिर्थस्थाने तर या देहीतच आहेत. पवित्र करणारी गंगा तर या देहीतच आहे. मग कशाला जावु गंगेत स्नान करुन पवित्र होण्यासाठी ईकडे तिकडे ? काशी तर येथेच आहे. । **अथांग**=अनंत । **अथा-तळा** = जिकडे-तिकडे चहुकडे. । **गमन** :- येणे-जाणे ।

**काशीसे गमन** :- कृष्णआज्ञेने अवलेहावतार वल्लभ ऋषि हे ज्योतीस्वरुपात काशीहुन गमन करत, त्यांचे केळीच्या पानावर कारला येथे आगमन होवुन, त्या केळीच्या पानावर त्यांनी देवमन नामाचा अवतार घेतला. पुर्णावतार कृष्णांची कास धरुन भक्ती केली. अधिक ग्यानाकरीता कृष्णांमृत वाचावे. । **कास** = काखं, बगल. संगत ।

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०५ ॥

॥ ओवी नं. २२ ॥

॥ विनवणी व अस्तुकीची निरसनसह जुनी ओवी ॥

## ॥ हाती या धरला ॥

॥ हाती या धरीला । भक्तीचा लेश ।
चाल सुदामत । दाखवली ॥ घृ ॥
॥ कंठीं या ओवली । नाम चिंता मनी/पेटी ।
जतन होण्यासाठी । नरदेही ॥
॥ नेनंती गोपाळ । धरा हो पदरी ।
ग्यान दयाहो हद्यी । महाराजा/मायबापा । या गोपाळाला ॥

॥ याही भुम्मेवरी । तुमचं नावं गावं ।
जगा नाही ठावं । मायबापा/महाराजा हो ॥०४॥
॥ याही भुम्मेवरी । आहे माझा बाप ।
मिटवते दुःख । चौ-यांशिचे हो राया ॥
॥ याही भुम्मेवरी । आहे माझी माय ।
ईचे सुखः आहे । अनंत यवगं हो राया ॥
॥ सुखः हे पाहुन । दुःख विसरलो ।
पायी/नामी या जडलो । अवधुताच्या/महाराजाच्या/अवताराच्या ॥
भजनं :- ॥ नामी जडता चौ-यांशी नाही ।
अशी आहे या द्युताची/कृष्णाची/विठुची गाही ॥

॥ यवगाच्या साठी । विठोबा उभा आंगी/येथी ।
अवघी हे सांगी । सांगतली हो ॥०८॥
॥ यवगाच्या वर । उभा केला कार ।
रूप दावा देहीवर । महाराजा हो राया.. ॥
॥ देहे या धरून । उभा कृष्ण हरी ।
आहे या शिरी । याहीचा प्रताप ॥
॥ कृष्णाच्या सांगीनं । दिवस कठले ।
भेटी दयाहो बाळांले । महाराजा हो ॥ ११ ॥

भजने :-
॥ सोयंम भेट माझे राया । आम्ही लागो देवा तुमच्या पाया ॥
॥ रूप दावा देहीवरं । माझा माथा तुमच्या चरणांवर ॥

॥ निराकार निर्गुण निरंजन । रूप मला दाव ।
अनंत ब्रम्हांडा च्या वरत । सेरूप ओळखावं ॥
॥ अनंत ब्रम्हांडा च्या वरत । सेरूप कृष्णाचे ।
सेरूप कृष्णाचे पुढे सुख । अनंत यवगाचे ॥

॥ कृष्ण सुखाचा राजा । उभा राहयजो या गोपाळाच्या काजा ॥
॥ हरी हरी कृष्णा । तु सुखाचा गडी । देवा तु सुखाचा गडी ।
माझा हो माथा । तुमच्या चरणावरीं ॥

पुढील पानावर...

-: निरसनसह शब्दार्थ/चरणार्थ :-

**चाल** : कोणत्या मार्गाने कसे चालायचे ? मार्गानुरूप कशी चाल ठेवायची ? जिवनाचा मार्ग कसा चांगला ठेवायचा ? कोणत्या चांगल्या मार्गाने आपले अंतिम धैय प्राप्त करावयाचे ?..ईत्यादी चे चतुर्पता ग्यान । **सुदामत** : चांगली, सुदी ।

**नाम चिंता पेटी** : जुन्या काळी देह रक्षणार्थ किंवा काही अनुचित गोष्टीची चिंता मिटवण्यासाठी.. ईत्यादी कारणास्तव गळ्यात अथवा हाताच्या दंडाला एक छोटीशी पेटी बांधण्याची प्रथा होती. ही पेटी तथाकथीत देव अथवा मांत्रिक भारावुन देवुन, त्यात आपल्या मंत्रशक्ती ने भारावलेले साहीत्य भरून देत होते. व ती पेटी अंगाला बांधावयास सांगत होते. काही दिवसानंतर या पेटीचा देहीच्या कलंकाव्दारे नाश होत असे. पेटीतील साहीत्य नाश पावुन ती पेटी नासत असे. परंतु आम्ही त्या निराकार चतुर्पतीच्या नामी आहेत. आम्ही अशी भौतीक नाशीवंत पेटी न बांधता निराकार चतुर्पती नामाची निराकार पेटी ही या कंठात चतुर्पती नाम गाउन ओवली आहे. कंठी असलेली ही चतुर्पती नामाची पेटी आमच्या सर्व चिंता मिटवत आहे. आमच्या कंठी असलेली चतुर्पती नामाची चिता मिटवणारी पेटी आमचे रक्षण करत आहे. या चतुर्पती नामाच्या पेटी मुळे कृष्णा उभा होवुन आमच्या या देही चे पालन पोषन रक्षण व जतन करत आहे. वेळोवेळा या देहीचे रक्षण होत आहे. वेळ घटका सांभाळल्या जावुन, भालीयाचे घाव काटयावर निर्वाळत आहे ही पेटी !

**नेनंती** : एखादे काम करण्याचे कोरडे ज्ञान आहे. परंतु अनुभव नाही. असे काम स्वेच्छेने केले. आणी जर त्यात काही चुका झाल्या, तर त्या चुकांना अनुभवीजन ते काम करणारा 'नेनंता' आहे. असे समजुन त्या चुका माफ करत करत त्याला घडवतातं.

**उदाहरणार्थ** :- जेव्हा लहान मुलगा आपल्या पित्याच्या कामाकडे पाहुन पाहुन त्याच कामाप्रमाणे काम करण्यास उत्सुक होतो. आणी त्या आपल्या पित्याच्या कामाचा प्रत्यक्ष्य अनुभव नसतांनाही ते काम करण्यास सुरूवात करतो, तेव्हा पिता त्याच्या त्या कामा कडे दुरूनच लक्ष्य ठेवतो. आणी त्याच्या त्या कामात काही चुका झाल्यास त्याला नेनंता अनुभव नसणारा नवखा असे समजुन माफ करत करत ते काम जोमाने करण्यास तयास उत्साहन देत त्याला निष्णांत करत राहतो. त्या कामात निष्णांत पटाईत होत पर्यत त्याच्या कडुन त्या कामात झालेल्या सर्व चुका माफ करत त्याला मार्गदर्शन देत राहतो.

**नेनंती गोपाळ धरलीसे हाती** :- असे अनेक नेनंती ज्ञानी जे आपल्या या ज्ञानाच्या भरवश्यावर अनुभव घेण्यास उत्सुक आहेत. धडपडत आहेत. असेही भैसाच्या सत्यवगाच्या रमण्यात आलेले नेंनंती गोपाळ कृष्णाने *'तुम्हास कळनं तसे म्हणा !' भैसाच्या यवगाच्या रमण्यात तुम्ही नेनंती आले यातच आम्ही समाधानी आहे.'* असे म्हणत त्यांच्या हाती पाटी पुस्तक न देता तिरगुणाच्या पलीकडचे चतुर्पतीचे ग्यान-भक्ती शिकवुन ते अमंलात आणण्यासाठी या नेनंती ला कृष्णा हाती धरले आहे. या नेंनंती गोपाळा कडुन काही चुका झाल्यास त्याही चुका तो कृष्णा माफ करत आहे. नेनंती च्या अनुभव घेण्याच्या उत्साहात्मक कार्याव्दारे त्या नेंनंतीच्या हद्यी त्यांच्याच अनुभवातुन ग्यान प्रकट करत आहे. असे ग्यान नेनंतीला मिळत असल्यामुळे ते नेणंती गोपाळ कृष्णास पुन्हा पुन्हा विनती करत आहे की : कृष्णा ! ग्यान दयाहो हद्यी ।

**लवलावी** :- लव म्हणजे गोडी, आवड. आणी लावी म्हणजे लावणारा. म्हणून लवलावी म्हणजे नामाची गोडी, आवड लावणारा कृष्णा ! म्हणुनच भक्त कृष्णास विनवत आहे की : *॥ नामाचा लाव बा गोडी । रसाची लाव बा गोडी । हे गोपाळ न्याहो पहील्या थडी ॥ लव मज लागली । देवा तुमच्या गा पायाची ॥ अवतार उभे लवलावी । याहीच्या चरणावर माझी डोही ॥*

**शिरी** :- डोक्यावर । **दिवस कठले** :- नाम घेता दिवस न दिवस गेले.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. २३ ॥
॥ विनवणी व मनाला उपदेशाची जुनी ओवी ॥

## ॥ कशी ही माया ॥

॥ कशी ही माया, कशी ही काया, कसा जग व्यवहार ? ।
कोणी नाही कोणाचं । अवघा, लटका संसार ॥घृ॥
॥ चैत्यन्याचा खेळ विठोबा, मन झालं वेडं ।
बहु केला उपाय । मनाची, मिटेना तळमळं ॥
॥ ऐक मना रे, मन-मोहना । का झाला वेडा ? ।
तिर गुणांच्या संगतीन । कधी, मिटेना अवघडा ॥
॥ ऐक मना रे, गुणीजना । का भुलला सोसा ? ।
व्दैत-दुर्जनाची संगत । नको, धरू आता ॥०४॥

॥ व्दैत-दुर्जनाची संगत । बहु, परी केली ।
पतंगा च्या परी दिव्यावर, उडी घातली ॥
॥ दुर्जना ची संगत करता । बहु, चढला जंग ।
विठु राया वाचुन देहीला, चढेना रंग ॥
॥ या देहीची ईच्छा विठोबा । पुर्ण करनं ।
तिर गुणांचा भ्रम सारा । देईन उडवुनं ॥०७॥

**भजने** :- ॥ जिकडे पहावं तिकडे तीर गुणांची बादशाही ।
कल यवगाचा मान । कोणास, कळला नाही ॥
॥ कल यवगाचा मान । ख-या, देवाला ओळखेना जन ।
सत्य देवता सोडुन खोटयांना, पुजते प्रेमानं ।
सत्य देवता सोडुन खोटयांना, भजते जनं ॥
॥ झाला भ्रम डुबला धर्म । सारं जातीनं लया ।
चौथ्या खुम्मी उभा राहीनं । कृष्ण वेल्हाळा ॥
॥ उभा कृष्ण वेल्हाळा । आम्ही लागु या देवाच्या पाया ॥

### -: निरसनसह शब्दार्थ :-

**लटका** : खोटा, असत्य प्रेमाचा खोटा आव दाखवणे. ।

**लटका संसार** :- संसार सागरात कोणी कोणाचा सोबती नाही. प्रतेक जन काम असले म्हणजे लटके प्रेम दाखवुन काम करवुन घेत राहते. एकवेळा त्याचे काम झाले की त्याचे ते लटके प्रेम आटुन जाते. या संसारात कोणी कितीही जवळचा असला तरी तो केव्हानं केव्हा तुम्हास लटके प्रेम दाखवत तुमचा संग करत तुम्हास वेळोवेळा दुःख देतोच. ही गणागोत मित्राची जित्या जन्माची चौ-यांशी तुम्हा मागे याही जन्मी लागलेली आहेच. तुमचे दुःख जाणणारा, तुमची साथ न सोडणारा, तुमची मदत करणारा, तुमच्या अश्रुफुलांचा स्विकार करणारा, दुःखाने व्याकुळ झालेल्यांच्या मस्तकावर हात ठेवुन त्याला त्या दुःखातुन बाहेर काढणारा असा जो तो एकमेव तारणहार परमेश्वर या संसाराच्या पल्याड उभा आहे. तोच तुमच्या देहीत अंशरूपात अवतरला असुन तोच तुम्हास साहयं करत आहे. ईतर कोणी नाही येथे कोणाच ! अवघा हा लटका संसार आहे. या मायेच्या संसारात तुम्ही एकटे आलात, एकटेच आहात आणी एकटेच जाणार. हे अंतिम सत्य आहे !

जसे वाटसरू वाटेने चालता चालता थकल्यानंतर एखादया वृक्षाच्या छायेखाली थोडा वेळ थाबुंन विसावतात. आणी नंतर पुन्हा जो तो आप आपल्या मार्गाने चालता होतो, तसा हा क्षणभंगुर संसार आहे. मायेचा संबध प्रस्थापीत झाल्यामुळे येथे एकालाच अनेक नावाने ओळखल्या जाते. त्या एकालाचा कुणी पिता, पती, काका, मामा, पुत्र, भाउ, दादा असे नाव या मायेच्या सबंधामूळे मिळालेले असते. चाहत आस, कल्पनाच्या

अपुता ही तुमच्या दुःखास कारण होते. दुःख देणारी सुखद कल्पना ही माया आहे. ही संसाराची कल्पना खोटी असल्यामुळे तिला दुर सारून, परमात्माप्राप्तीच्या ईच्छालाच आपली शक्ती बनवुन, त्या परमात्म्याच्या साहयाने तिरगुणांचे ओझे टाकुन पलीकडे पाहत हा लटका मोहमय संसार सागर तुम्हास तरून जावयाचा आहे. हेच अंतिम सत्य आहे. म्हणुनच..

ऐक मना रे, मन-मोहना ! का झाला वेडा ? या संसार सागरात । या संसारी असलेल्या तिर गुणांच्या संगतीन कधी, मिटेना तुमचा अवघडा ! ज्याप्रमाणे कमळाचे फुल चिखल पाण्यातुन बाहेर वर येवुन पवित्रता ठेवुन आपले सौंदर्य दाखवते, त्याचप्रमाणे तुही या मायेच्या मोहमय संसाररूपी पाण्यातुन बाहेर पडुन या संसाराच्या वर येवुन पवित्रता ठेवुन आपले शुध्द सत् गुण सौंदर्य दाखवावे. म्हणजे तो परमेश्वर सदैव साहयास येईल.

**पतंग**= एक किडा जो दिव्याच्या प्रकाशाकडे आकर्षित होवुन त्या दिव्यावर उडी घेवुन स्वतःचाच घात करतो. । **परी**= प्रमाणे

**जंग**= ज्याप्रमाणे लोखंड हवेच्या संपर्कात बहु काळ राहल्याने त्यावर जंग चढुन हळुहळु ते कमजोर होत आपले मुळचे अस्तीत्व गमावत जातो. त्याचे असित्व टिकुन ठेवण्यासाठी लोखंडावर वेळोवेळा रंग दयावा लागतो, त्याचप्रमाणे ही देही व्दैत-दुर्जन व तिरगुणांच्या संपर्कात बहु काळ राहल्याने त्यावर यांचा जंग चढुन या जंगा व्दारे आपले मुळचे अस्तीत्व गमावत जाते. म्हणुनच या देहीवर सुध्दा या तिरगुणांच्या पल्याडची चतुर्पती भक्ती व भावाच्या रंग दयावा लागंतो. त्या साठी या पल्याड च्या चतुर्पती विठु राया वाचुन या देहीला चढेना रंग ।



॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. २४ ॥

॥ कृष्ण ज्ञानाची व विनवणीची जुनी ओवी ॥

## ॥ निजरूप असता जागी झालो ॥

॥ निजरूप असता जागी झालो । ध्यान लागलं विठुचं ।
हरी नामाचा छंद लागला । सार्थक होईन देहीचं ॥ घृ ॥
॥ तीन ताळ चौदा भुवन । गर्जे विठुचा शकुन ।
आल्या जन्माचं सार्थक होईन । येरझार जाईन चुकुनं ॥
॥ स्वर्ग मिर्त पाताळी भरून । उरला जगजेठी ।
यवगा वरत मोहीम देवाच्या । कलयवगी होईन भेटी ॥
॥ जीवा-शिवाच्या होईन भेटी । देहीत प्रकाशन ज्योत ।
अज्ञान मती उडुन जाईन । ऐकुन घ्याहो हकीकत ॥ ०४॥

॥ सत्य यवग सत्य कारभार । सत्य चालनं तिनताळी ।
आदी पुरूष भरन देही । एकच होईन आरोळी ॥
॥ आदीपुरूष आदीरूप अवद्युत । अनामत ज्योत ।
महीमा परं पार जगात । होईन कौतुक ॥०६॥

भजने :-

॥ महिमा आहे गा तुही । आता चालवं तिरलोकी गाही ॥
॥ तिर लोक्याचा होय दाता । संभाळ करा। महाराजा अवद्युता ॥
॥ संभाळ करा अवद्युता । तुमच्या चरणा वर ठेवला माथा ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ ओवी नं. २७/०१ ॥

॥ विनवणीची ओवी ॥

## ॥ विठोबा का धरलीसे आडी ॥

॥ विठोबा का धरलीसे आडी ? माझी पुरवाना आवडी ॥ घृ ॥
॥ बाग बगीचा सुंदर माडी । ऐसे तुझे भावीक गडी ।
माझी तनाची झोपडी । माझी पुरवाना आवडी ॥
॥ पाहुन तनाची झोपडी । रूसुन काहो जाता वनमाळी ।
कधी भेटनं ही मुर्त सावळी । माझी पुरवाना आवडी ॥
॥ वाट पाहतो घडोघडी । नाही टाकली प्रेमाची घडी ।
भेट दयाहो वनमाळी । माझी पुरवाना आवडी ॥
॥ शिपी व-हाडी गंगेथडी । ईथं अरज लावली थोडी ।
भेट दयाहो हरघडी/पलघडी । माझी पुरवाना आवडी ॥०४॥

॥ हरीचे दुकान भुमंडळी । सौदा घेते भावीक गडी ।
बांधा कापुराची वडी । माझी पुरवाना आवडी ॥
॥ ऐसे तुझे भावीक गडी । याहीला सौदयाची गडी ।
बांधा प्रेमाची पुडी । माझी पुरवाना आवडी ॥०६॥
भजने :- ॥ नाम घ्याहो विठोबाचे । सार्थक होईन देहे जीवाचे ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ ओवी नं. २७/०२ ॥

॥ कृष्ण ज्ञानाची व विनवणीची ओवी ॥

## ॥ आदीपुरूषानं अवतार घेतला ॥

॥ आदीपुरूषानं अवतार घेतला, झाला अनामीक ।
आगम-उगम सारं सांगुन, ठेवलं इंथं ॥घृ॥
॥ अनामीक घरी अवतार धरला । आदी रूपानं ।
चंद्र-सुर्य तारांगण देवांगण । घालते लोटांगण ॥
॥ आदीरूपानं भविष्य बापा । सांगतल्या मुळं ।
याहीला पाहता तिनही ताळ । कापतीन थरथरं ॥
॥ महा महा ऋषि-मुनी । आसन सोडतीनं ।
याहीच्या पुढं राज्य राया, अनामीकाचं होईनं ॥ ०४ ॥

॥ अनामीकाची जात गडे हो । आहे अजात/अधर्मि ।
लाजु नका गडे हो तुम्ही आपल्या मनातं/मनी ॥
॥ तुम्ही पुंजा हे कुळदैवत । सत्य धरा शुध्द भाव ।
अनामीकाला शरण राहता । उभा राहीन हा धनीदेवं ॥
॥ अनामताला चारही वेद । शरण आहे त्याहीला ।
याहीच्या आधारानं गायन । सांगतलं आदी रूपानं ॥
॥ आदीरूप मुळ यवगाचा । या, अनामीकाचा कर्ता ।
तोच उडवन मो-हं सारा । तिर गुणांचा शिक्का ॥०८॥
किंवा : अनामीक उडवन बाप्पा । तिरगुणांचा शिक्का ॥
भजने :- ॥ शुन्य उडवन तिरगुणांच । राज्य होईन हो होईन भैसाचं ॥
॥ राज्य होईन भैसाचं । याहीच्या सुखांनं रहित, नाही जाणार कुठं ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. २६ ॥

॥ कृष्ण ज्ञानाची व विनवणीची मुळावरची ओवी ॥

## ॥ उल्हासले मन ॥

॥ उल्हासले मन । सोडली पंढरी ।
आणीक कारणं । भुम्मेवरी ॥ घृ ॥
॥ सोडली पंढरी । जागो-जागी पेणं ।
तेव्हा केले येणं । सावंग्याशी ॥
॥ सावंग्याशी आले । झेंडे उभारले ।
राउळ थापले । विठ्ठलाचे/कर्ताराने ॥
॥ सावंग नगर । भोवताल सगर ।
मध्ये राउळ/देवघर । विठ्ठलाचे ॥ ०४ ॥
॥ सावंगा नगरात/राउळाच्या पुढं । भजनाची मांड ।
आलासे दांड । गिण्यानाचा ॥
॥ काळीवर पांढरी । तिचं नाव पंढरी ।
सावंग्याहुन भारी । कैसी आता ? ॥
॥ पंढरीची महीमा । सावंग्याशी आली ।
बोली सही केली । महा राजानं ॥
॥ सावंग्या नगरात । उभी जीवनकळा ।
गोपाळांच्या माळा । याहीच्या गळा ॥



**भजने :-**

॥ पंढरपुर पुजेचं महेमानं ।
सावंग्यात वाटते, साखरं पानं ॥
॥ सावंग माझं पंढरपुर । नित्य नामाचा होतो गजरं
॥ सावंग होय व्दारका ।
इथं नांदतो श्री कृष्ण सखा ॥
॥ उभा आहे माझा सखां ।
आता नाही या देहीला धोका ॥

**गजर :-**

॥ तुम्ही या भजनी रहा । उभा आहे सखा ।
होणार नाही धोका.....
या चतुर्पती नामाला, येवुन भजा ॥

-: शब्दार्थ :-

**पेणं** :- अंतिम धेयाकडे जाण्यासाठी विसावा घेण्याकरीता मार्गाच्या अध्ये-मध्ये करण्यात येणारा मुक्काम, विसाव्याचे ठिकाण, परमात्मा चे ठायी विसावा देणारा मुक्काम, नामाचे भोजन मिळण्याचे ठिकाण ।

**शब्दप्रयोगाचे उदाहरण** :- जुन्याकाळी भावीक यात्रेकरु चा जथ्था किंवा वारकरी भक्तजन देवदर्शनाकरीता/काशीदर्शनाकरीता पायीच निघत देवदर्शनाची आस ठेवुन मार्गक्रमण करत वाटचाल करत असता जेव्हा रात्र होते, तेव्हा ते एखादया गावात त्या रात्रीपुरता मुक्काम करुन भोजन वैगेरे करुन विसावा घेतात. आणी दुस-या दिवशी पुनश्चः आपल्या देवदर्शनाच्या धेयं प्राप्तीकरीता सुर्याच्या साक्षीने मार्गक्रमण करत रात्र पडेपर्यत पायी चालतात आणी पुढच्या मुक्काम करतात. असे परमात्म्याच्या देवदर्शनाची आस ठेवुन हरीच्या नामी धिराईने चालत जागोजागी मुक्काम म्हणजे पेणं करत अंतीम धेयापर्यत येवुन देवदर्शन घेतात. असेच जीवनात पेणं स्थापत परमात्माप्राप्ती च्या अंतीम धेय कडे प्रपंच करुन परमार्थ साधत परमात्माप्राप्ती करता येते. म्हणुन संतांच्या मुखी 'पेणं केलं' असा शब्दप्रयोग असतो. । **पुढं** :- समोर । **सही** :- खरी, सच्ची । **सगर** :- हेकोडे-तेकोडे/वेडेवाकडे मार्ग/रस्ते ।

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. २७ ॥

॥ कृष्ण ज्ञानाची व विनवणीची मुळावरची ओवी ॥

## ॥ ज्योतीचा अवतार देवाचा शकुन ॥

या ओवीची पलट ओवी खंड०७/ओवी-२२ मध्ये दिलेली आहे.

॥ ज्योती चा अवतार देवाचा । शकुन चांगला ।
पुर्विचं भाकलं कदा ना चुकवे कोणाला ॥
किंवा :- पुर्विचं भाकलं देणं । देव देतो अहिनाला ॥ घृ ॥
॥ मंगळवा-या, दिवशी बोलनं । शक्तीन केलं ।
परवेशाची, संगत हद्‌य । नामानं भरलं ॥
॥ डबडब डबडब डबोल वाजे । उठली शंक धुनी ।
उठली शंक धुनी । ऐका, सिदाईची वाणी ॥
॥ विठु/भैस रायाची वाणी सांगतो । श्री कृष्ण राज ।
मिर्त लोकी दवंडी देल्ली । आपले आंग ॥०४॥
॥ मिर्त लोका मध्ये सावंग । अगोचर वस्ती ।
अवतरले महाराज वाणी । सांगतली यवगाची/जगाशी ॥
॥ मिर्त लोका मध्ये सावंग । वसवलं गोकुळ ।
चौताळाचा मालक याहीच्या । हाती सर्व खेळं ॥ ०६ ॥
।। कृता यवगी राज देवानं/धन्यानं । आणलं किर्तिंत ।
तिर गुणांच्या हवालामध्ये । याहीनं, देल्ली रहितं ।। ..कारला दांड
।। त्रैता यवगी राज ऐसे । रामचंद्र झाले ।
नव्यानंव राम गणीता नाही । याहीच्या रहतीले ।। ..कारला दांड
।। द्वापर यवगी राज ऐसे । श्री कृष्ण झाले ।
वाजवले पाउलं तिर तिर । भवन नाचवले ।। ..कारला दांडचे चरणे
।। कल यवगी राज ऐसे । बोधोजी/किसनजी झाले ।
तीन यवगाचे हिशोब देव काय । निचंत बसले ।। ..कारला दांडचे चरणे
॥ नाटी बुध नाठी साठी । वर्षाचा म्हातारा ।
बरी गा, सोय धरा । तुटनं, तिरगुणांचा दोरा ॥ ११ ॥

**भजने :-**

॥ या तिरगुणांची पर । झाली आजवरं ।
शुन्य उडवनं । नाही राहणार जराभर ॥
॥ तिरगुणांच्या पलीकडे, ठावुक नव्हते नावं । त्वां पढवले गोपाळ, अवद्युत राव

-: निरसनसह शब्दार्थ/चरणार्थ :-

**अहीनाला** :- अहीन आत्म्याला । **बोलनं शक्तीनं केलं** :- सृष्टीत पवनरूपी गोल गोळा असलेले काही निराकारी-निर्गुण जन देहीशी बोलनं न करताच चोराप्रमाणे देहीच्या आतमध्ये घुसुन बळजवरीने देहीचा तावा घेवु पाहतात. उदाहरणार्थ लष्टाण ईत्यादी. परंतु उच्च श्रेणीतील स्वर्गिचे पुण्यात्मे, शंक आचार विचाराचे कृष्णांचे शंकाचारी द्युतगण व सिध्द शक्तियॉं ईत्यादी हे देहीत चोरासारखे घुसत नाही. देहीची ईच्छा असेल तर ते स्वर्गिचे द्युत शक्तियॉं ईत्यादी सर्व शिष्टाचार बाळगत प्रथम त्या ईच्छीत देहीस आपल्या येण्याच्या सत् खुणगाठा देतात. अथवा त्या देहीशी बोलन करतात. देहीची मान्यता घेतात. आणी मग त्या मान्यताप्राप्त देहीत अंर्तभुत होवुन देहीत प्रवेश करून/प्रवेशी होवुन देहीला संदेश अथवा गुढं ग्यान देतात. आणी निघुन जातात. ऐसे कृष्णाचे संगचे स्वर्गिचे द्युत व शक्तियॉं देहीत प्रवेशी होवुन या परवेशांची संगत घडुन हद्‌य चतुर्पती नामाने भरून जाते. चतुर्पतीचे निरंजन गुढंग्यान सह जेजे ग्यानाची आवश्यकता पडेल तेते सर्व ग्यान त्या सच्च्या देहीला मिळत जाते. ऐसे या कृष्णाशी **मंगळवा-या दिवशी शक्तीनं बोलन केल । संगत परवेशाची/प्रवेशाची, हद्‌य नामानं भरलं ।** **शंक** :- निश्कलंकी, पाक, अती-पवित्र जसे म्हशीच्या दुधात काळपटपणाचा लवलेशही नसतो ते पाक शंक असते तसेच कलंकाचा लवलेशही नसलेला निश्कलंकी अतिपवित्र म्हणजे शंक वर्ण । **शंक धुनी** :- निश्कलंकी निर्गुण चतुर्पती विठु ची निरंजन ग्यान प्रकट करणारी शंक धुनी । **रहीत** :- वस्ती

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०५ ॥

॥ ओवी नं. २८ ॥

॥ कृष्ण ज्ञान, विणवनी व संजीवनी चे चरणे असलेली.. ॥

॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ कुठं होता कुठं नाही ॥

॥ कुठं होता कुठं नाही । कसा आला देही ? ॥
धन्य देवाची किर्त महीमा । कारागीरी तुही ॥ ०१ ॥ घृ ॥
॥ धन्य देवा तु कारागीर । उभा ठाई ठायी ।
करून भक्ती नाम कंठी । ठेवला हद्यी ॥
॥ चार वेद सहा शास्त्र । पृथ्वा ही ऋणी ।
अनामीका च्या, मुखची होय । अमृत संजीवनी ॥
॥ संजीवनी चा, होतो/आहे उजाला । चव ताळातं ।
स्वर्गिचे लोक म्हणे, आम्हा पाठवां । मिर्त लोकातं ॥ ०४ ॥

॥ मिर्त लोकचा, सुखःसोहळा । हा स्वर्गि नाही ।
चतुर्पती चा, झेंडा । ईश्वर-पुना ची गाही ॥
॥ चतुर्पतीचं गिण्यान झालं । मौंसाच्या/मोक्ष्याच्या ठायी ।
धन्य देवाची किर्त महीमा । तारण पृथ्वी ॥
॥ चतुर्पतीचं, गिण्यान झालं । लेकरा ला देणं ।
निशं:कलंकी अवतार खरं । दाखवन करून ॥
॥ खरं असता खोटं म्हणतीन । जन तुम्हास येवुन ।
पहा मुळस्तंभ शोधुन । होय, कोणाचं निशाण ? ॥ ०८ ॥

॥ शास्त्रराच, ज्ञान झालं । तिर गुणां पासुन ।
संधीवर उभा राहीन । शास्त्रमती, पळन उठुनं ॥
॥ अनंत कवी अनंत ऋषि । याहीचं नोव्हे परिमाणं/प्रमाणं ।
महा-महा योगीं याहीलाइथं । नाही, लागतं/लागलं ठिकाणं ॥
॥ महा महा योगी बसले । विचार करून, घुंम घालुन ।
आत्म ग्यान शोधल्या शिवाय । नाही तत्व ग्यानं ॥ ..जळगाव दांड
॥ आकारा मध्ये, भागवत कथलं । कवी कर्त्यानं ।
शरण राहता चुकतिन मरण । नाही, चौ-यांशी यवनं ॥ ११ ॥

**भजनें :-**

॥ शरणी रहा हो । देवांच्या.., देव पुरवन तुमची आशा । शरणी रहा हो ।
विठुच्या.., विठु पुरवन तुमची आशा । नामी राहा हो ॥
॥ शरण आलो तुया पाया । येवुन तारा या बाळ गोपाळा ॥
॥ शरण आलो तुया पायी । आनंदाने नांदवा बाळाची देही ॥

-: शब्दार्थ :-

**अमृत संजीवनी** :- अनामीक कृष्णा मुखातुन भैसा पोटचा अमृत संजीवनी असलेला तुरीया अवस्थेत म्हणजेच चौथ्या अवस्थेत चौथ्या ताळी प्राप्त होणारा चतुर्पता अथर्वन् वेद, ज्याव्दारे मिर्त लोकी हद्यी हरीनामाचा उजाला होवुन हरीभजनात सुख प्राप्त करत हे भुम्मेवरचे भुम्मा गोयक एका ठायी गोळा होवुन हरीभजनाचा सुख सोहळा संप्पन्न करत आहेत. । **मौंसांच्या ठाई** :- अनामीक कृष्णा मुखच्या चारही वाणीतुन निघालेल्या चतुर्पती हरीनामाच्या ठाई । **नोव्हे** :- नव्हे, नाही होय. । **परिमाण** :- प्रमाण, गाही, पुरावा

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. २९ ॥

॥ कृष्ण ज्ञानाची व विनवणीची जुनी ओवी ॥

## ॥ गायप रूप प्रकट झाले ॥

॥ गायप रूप प्रकट झाले । मिर्त लोकात ।
असत्याच्या राशी मोडन देव । पापाचे पर्वत ॥
॥ अहिना घरी देणं झालं । अनामत थोर ।
असत्याच्या राशी मोड्न । उभा, करन सत्याचा कार ॥
॥ ऐका कोणी सत्य जनी । सत्य घ्याहो वाणी ।
सत्य बोलनं सत्य चालनं । त्याची होय संजीवनी ॥
॥ सत्य बोलनं सत्य चालनं । सत्य राहीनं ।
सत्या घरी देव विठोबा । आला धावुन ॥

॥ सत्या घरी आले विठोबा । सत्य पाहुन ।
मिर्त लोकी जाहीरण केलं । देह धरून ॥
॥ मिर्त लोकी जाहीरणं केलं । घ्या सत्याची गाही ।
निजरूप भुम्मा जागी करन । एकच वाजवुन टाळी ॥
॥ सत्य यवग सत्य कारभार । सत्य चालन तिताळी ।
आदीपुरुष भरन देही । एकच होईन आरोही ॥

भजने :-
॥ भैसा खुम्मी अगाध वाणी । उठली गर्जना ।
एक होईन आरोळी । जागी करन सारी सेना ॥
॥ भैसा खुम्मी अगाध वाणी । ज्योत प्रकाशनं देही ।
एक होईन आरोळी । जागी करन चौताळी ॥
॥ अथर्वन् वेदाची गाही । जागी करन महाराजा सारी सृष्टी ॥
॥ सत्या घरी आला भगवान । याहीनं मुखी दिले चतुर्पती नाम ॥
॥ सत्य आणनं जगा । पुर्ण अवतार आहे या बिर्दावर उभा ॥
॥ सत्य आणनं जगा । उभा आहे येथं कृष्ण सावळा ॥
॥ सत्य भावाचा मालक । अमृत/सागर भरले देवाच्या पोटात ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. ३० ॥
॥ कृष्ण ज्ञानाची व विनवणीची मुळावरची ओवी ॥

## ॥ सृष्टीवरी/पृथ्वीवरी अवतार उभा ॥

॥ पृथ्वीवरी/सृष्टीवरी, अवतार उभा । तो पहा आता ।
चवथ्या खुम्मी, भुम्मा जागृत । करन सर्वथा ॥ घृ ॥
॥ तीन यवगा, निजरूपा मध्ये । गेले हो सारे ।
यवगा परी, अवतार झाले । हे कळेना त्याहीले ॥
॥ यवगा परी, अवतार राया । झाले दोन-दोनं ।
या देहीचं, मरण नाही । चुकवले कोण ? ॥
॥ जीव चौ-यांशीत, नाही चुकवले । देहीचं मरणं ।
या अवतारांची, राज महीमा । वर्णु कोण्या गुणं ? ॥

॥ यवगा परी, अवतार घेतला । कृष्णं देवानं ।
या देहीच, मरण चुकतीन । याहीच्या हातानं ॥ ०७ ॥
॥ सहा शास्त्र, अठरा पुराण । हे भांडते नितं ।
याहीचा न्याय कोणी करेना । कसे अवतार दिक ॥
॥ सहा शास्त्र, अठरा पुराणं । ऐका ची गाही ।
जिवन कळीची, शुध्द बाप्पा । यामध्ये नाही ॥
॥ सहा शास्त्र, अठरा पुराण । हे ऋषि-मुनीचे मतं ।
जिवन कळीची, शुध्द आम्हास । दाखव येथं ॥

॥ ऋषि-मुनी जपतप, लावुन धुनी । देव दिसला काहो ?
ऋषि-मुनीनं, बहुकेलं अनुष्ठान । देव भेटला काहो ? ॥०८॥
॥ भैसा उदरी, लहान पण । लपली हो कथा ?
तिरगुणांच्या, ज्ञाना मध्ये । जन भुलले गाथा ॥
॥ भैसा खुम्मी, अगाध वाणी । ज्योत प्रकटन देही ।
एकच होईन, आरोळी । जागी करन चवताळी ॥

डहाक्या :-
॥ कल यवगी, होईन आरोही । मानु नका भेव ।
चतुर्पतीचा, कार आपल्या । मनीच ओळखावं ॥
॥ भक्तानं, ओळखावां आपला । शकुन अवतार ।
पृथ्वीचा, कार दावनं । डोळ्या समोर ॥

भजनें :-
॥ नाही आम्हास ग्यान । तुम्ही, पुसावं अहिनाले ।
आकाश वाणीचा येईन शकुन । सांगन अवघ्याले ॥
॥ सुटला शकुनाचा वारा । ऐसा बोले झेंडयाचा फरारा ॥
॥ नाद-बिंदुच्या पाडुन गाठी । गुप्त उभा आहे, कृष्ण जगजेठी ॥
॥ सृष्टीवर अवतार उभा हा । धरून शिष्टाई ।
हे निजरूप भुम्मा जागी करन । अवघी चौताळी/सृष्टी ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०५ ॥
॥ ओवी नं. ३१ ॥
॥ कृष्ण ज्ञानाची व विनवणीची जुनी ओवी ॥

## ॥ कुठच नव्हतं काही हे रूप ॥

॥ कुठंच नव्हतं काही हे रूप । आहे निराधार ।
कल यवगात, जोहार ठोकला । झाला महार ॥ घृ ॥
॥ कृष्ण म्हातारा, योगी खरा । रंग धरला ।
आदी भैसा खुम्मी याहीन । झेंडा उभारला ॥
॥ पायी पद्मं, मुखी रत्न । कृष्ण म्हातारा जगात ।
चौ ताळात, उजेड याहीचं । प्रकाशली ज्योतं ॥
॥ ज्योती मध्ये, ज्योत खेळे । भैस अवतार ।
याहीच्या आंगी, शुध्द सत्वगुणं । करवीता कर्तार ॥ ०४ ॥

॥ तुच कर्ता, तु करवीता । तुम्ही आहा चवताळी ।
तुमच्या बिना, जगात बापा । उरला कोणी नाही ॥
॥ यवगा परी, उभा राहीला । पर लावली सारी ।
या मायेची, माया-ममता । उभी राहली ॥
॥ माये ची, ममता ईला ं। दाखवलं रूपं ।
आम्हा केलं अपदेशी । आपण झाले गायपं ॥
॥ गायपांचा, खेळ कृष्णाचा । कळेना कोणा ।
आपल्या बळानं, अवतार आला । पुर्वि चा जुना ॥०८॥

॥ उभा राहुन, सांगे खुणां । तुम्हास जन लोका ।
चतुर्पती नामाच्या मार्गानं आला । महामुनी सखा ॥
॥ महा मुनीनं, वर्णन केले । गुण याहीचे गावु ।
कर्ता-यान, केली करणी । डोळ्यानं पाहु ॥

भजने :-
॥ मुखी गाउ डोळ्यांनी पाहु । विठ्ठलं माय हो ।
बहु दिवसाची अरज आहे । दाखव आपले पाय हो ॥
॥ मुखी गाउ डोळ्यांनी पाहु । विठ्ठलं बाप हो ।
बहु दिवसाची अरज आहे । दाखव आपले रूप हो ॥
॥ रूप दावा देहीवर । माझा माथा तुमच्या चरणावर ॥

॥ निराकार निर्गुण निरंजन । रूप मला दाखवं ।
अनंत ब्रम्हाडा च्या वरत । सेरूप ओळखावं ॥
॥ अनंत ब्रम्हांडा च्या वरत । सेरूप कृष्णाचे ।
सेरूप कृष्णाचे पुढे सुखः । अनंत यवगाचे ॥
॥ कृष्ण सुखाचा राजा । याहो महाराजा, या गोपाळाच्या काजा
॥ चौथ्या खुम्माचा राजा । उभा राहयजो, या गोपाळाच्या काजा ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०५ ॥

॥ ओवी नं. ३२ ॥

॥ कृष्ण ज्ञानाची व विनवणीची जुनी ओवी ॥

## ॥ पंच या प्राणांनं ॥

॥ पंच या प्राणांनं । उल्हासली देहें ।
आता राज्य होईनं । शकुनाचें ॥ धृ ॥
॥ तार या जगवाची । मदत आहे मोठी । पायी घातलेसी मिठी ।
आमचा संभाळ करा । जगजेठी ॥
॥ तार या जगवाची । मदत आहे फारं । देहे देउळ तार
तारून दाखवा कारं । महाराजा/मायबापा ॥
॥ कल या यवगात । सत् यवग होणारं ।
दिलासे आधारं । हरी नामी ॥ ०४ ॥
किंवा म्हणनी नं. २. देहेला आधार । कलयवगी होणारं ॥
॥ सांगतो निराकार । ऐकतो निर्गुणं/अहीनं ।
अनंत यवगाचे । चुकवा मरणं ॥
॥ हंकाराची वाचा । अहीनं हा भला ।
बट्टा नाही याला । रत्ती भर ॥ ०६ ॥

**भजने** :- ॥ हंकार कल यवगातं । विठ्ठुची वाणी, कृष्णा सांगे जगात ॥
॥ हंकार कल यवगातं । ह्युतांचे नवलं, कृष्णा सांगे जगात ॥
॥ हंकार कल यवगात । ह्युताची वाणी सांगे जगात । नवल सांगे जगात ॥
॥ नवल सांगतो । पुढं पाहयं, कृष्णा अक्षर पाहये । नवल.. ॥

### -: निरसनसह शब्दार्थ :-

**पंच प्राण** :- १. प्राण २. अपान ३. व्यान ४. उदान ५. समान हे पंचप्राण होय
**बट्टाः-** डाग, कलंक । **रत्तीभर :** तिळभर, राई ईतका । **मदत** :- साहयं ।
**तार या जगवाची** :- हरीनामाचा तार, तारणारा । हरीच्या आध्यात्मीक जगाची येथेचे जीवन जगवणारी तार । **फार** :- पुष्कळ, खुप, बहुत
**तारून दाखवा कार** :- हे जिवन तारून आम्हास चतुर्पतीचा कार दाखवा ।
**कल या यवगात सत् यवग होणार** :- या कलयवगात चतुर्पती नामी राहुन चतुर्पती कृष्ण अवधुत पंथात सांगीतलेल्या कृष्णाच्या सांगी प्रमाणे वागुन सिदाईने राहत देहीत निश्कलंकी मांडणा केल्यावर या कलयवगात सुध्दा या देहीवर सत् यवग उभे होते. आणी सत् यवगात जसे तो भक्ताच्या बोलावर उभा राहत होता, तसाच याही कलयवगात या भक्ताच्या बोलावर उभा राहुन त्यांचे बोल खरे होईल. ऐसे या कलयवगी महाभार भक्त देवासमान होवुन ऋषिकेशी या भक्तांच्या आंग येवुन कलयवगी सच्चा भक्तांच्या देहीवर सत् यवग होणार. ।
**सांगते निराकार । ऐकते निर्गुण.. । हंकाराची वाचा.. :**
देह हा सगुण तर आत्मा हा निर्गुण ! देह हा आकारी तर परमात्माचा तेजोगुणी अंश असलेला परमात्माचा अंश अवतार आत्मा हा निराकारी ! तो निराकारी परमात्मा सांगतो आणी त्याचा हा तेजोगुणी अंश अवतार असलेला देह निगुर्ण आत्मा ऐकतो. निराकार कृष्णाव्दारे सांगी सांगणारे आउक यवग त्यांच्या देहघरी उभे होते. *अधिक ग्यानासाठी खंड०५/६५:-सत्य जाणा या ओवीचे शब्दार्थ वाचावे.* अशी अवस्था सच्चा भक्त योग्याला प्राप्त होते. आउक यवगाव्दारे आलेल्या परमात्म्याच्या हंकाराची वाचा भक्त योग्याचा निर्गुण अहीनं आत्मा हा भला भावाने ऐकतो. निराकार परमात्म्याचा हंकार ऐकत सार घेत, शुध्द सत्व धारण करतो. अशी अवस्था प्राप्त झालेल्या त्या सच्च्या भक्त योग्याच्या अहीन आत्म्यावर रतीभर बट्टा राहत नाही. अशी अवस्था सर्व योगीजनांच्या पुढे गेलेल्या कृष्ण योग्याने स्वतः प्रथम प्राप्त केली. आणी आता तो कृष्णा तीच अवस्था सच्च्या भक्त योग्यांला प्राप्त करून देत, येथे चतुर्पती पंथाच्या भुम्मेवर आनंदाची ज्योत गडेहो आनंदात ठेवुन उभा आहे.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०५ ॥

॥ ओवी नं. ३३ ॥

॥ कृष्ण चरित्रज्ञानाची व विनवणीची मुळावरची ओवी ॥

## ॥ सावंगपुरचे राज विठोबा ॥

॥ सावंग पुरचे राज विठोबा । करा हो बादशाही ।
मन माझं मोहीलं मायबाप । विठ्ठल रूक्माई ॥ घृ ॥
॥ कुठच नव्हतं काही देवानं । देहे धरली ।
मुळा वरचा रंग देवानं । शक्ती बनवली ॥
॥ कुठंच नव्हतं काही उभ । केलं तिर भवनं ।
मिर्त लोकी झेंडे लावले । कृष्ण देवानं ॥
॥ तिर भवनाचा केला रहाट । होती कोण घडी ? ।
मन पवनाचं चातं देवानं । कांडी भरली ॥०४॥
॥ माघ शुध्द पंचमी । ऐसा, माघं उतरला ।
नउ रत्नांचा शेला देवानं । जडीत विणला ॥
॥ शेला झाला विणवुनी । केली तुर्याची तयारी ।
नउ लाख पाहयरी देवानं । चरणी लावली ॥
॥ सेना नाही गणीता । किती सांगु या सिध्दांशी ? ।
श्री कृष्णाच्या पायाची आज्ञा । आधार भक्तीशी ॥
॥ कुठंच नव्हतं काही भुम्मा । आहे अगुचरं ।
या को-या भुम्मेवर देवाचं । मोहीलं मनं ॥ ०८ ॥
॥ चौ-कोणटयांवर चार अवतार । उभे ठाई ठायी ।
सावंग्यात पुर्ण अवतांर । उभा कृष्णराज भईस/भैस ॥ ०९ ॥

**भजनेः- ॥ उभा आहे पुर्ण अवतार । याहीच्या चरणी आमचा नमःस्कारं ॥**

**निरसनसह शब्दार्थ :-** **तुर्या** :- १. जागृत, २. स्वप्न, ३. सुसुप्ती आणी ४. तुर्या. नामस्मरणी जागी राहुन हिशोब पाहयं ! *जागृति मे भजन करना । स्वप्न सुषुप्ती को कभी न भुलना, देखो तुर्या का करीना, गडबड मत करना !* तुर्या ही ध्यानातील चवथी अवस्था होय. उन्मनिने जीव-भाव वर नेवुन ही तुर्या उन्मनिने पहावे. तिनअवस्थेच्या पलीकडे चौथ्या परमात्म्यापद ला नेणारी ही ध्यानाची चवथीअवस्था तुर्या होय. केवळ आत्मा म्हणजे तुरिया/तुर्या. ही तिनच्या पलीकडे असलेली चवथी तुर्या अवस्था ही तिनच्या पलीकडे असलेल्या तुर्यातीत चौथ्या परमात्मा कडे घेवुन जाते. तीनच्या पलीकडे असलेले चौथे चतुर्पता निरंजन ग्यान देते. अधिक ज्ञानाकरीता कृष्णांमृत व कायाज्ञान खंडातील ओव्याचे निरसन वाचा. । **शेला**:- देह । **नवलाख पाय-या/पाहयं-या**:- पहील्या रंगाच्या अर्थाने या देहधरणीवर एकच ज्योत नवलाख तारा । याच होय नवलाख पाय-या ! या देवाच्या चरणी लावणे म्हणजे देहीच्या रोमारोमात नाम भिनवुन देहीचे रोम-रोम परमात्म्या चरणी अर्पण करने होय. चतुर्पती हरीनामाची एकच ज्योत देहधरणीवर उभी करून तिचा प्रकाशाने या नवलाख तारे/पाय-या उजळुन या कृष्णानं देवाच्या चरणी लावल्या तसेच दुस-या रंगाच्या अर्थाने दुस-यांच्या गुलामीत असलेल्या नव लाख जनांची सोडवणुक करून त्यांच्या वासनामय मनोमय कोषावर चतुर्पती हरीनामाचे रोपन करून त्यांना चतुर्पती नामाची उच्चत्तर गोडी लावली. त्यांना सिदाई दाखवुन त्याच्या निर्गुण गादीवर चतुर्पता अथर्वन् वेद ठेवुन त्यांना चतुर्पता अथर्वन् वेदाचे सैन्य बनवले. चतुर्पतीचे पहारेकरी बनवले. सिदाईचे सैन्य बनवले. कृष्णाच्या सिदाई सेनाची नाही हो गणीता ! किती मी सांगु सिध्दाशी ? कृष्णाच्या पायाची आज्ञा घेवुन भक्तीच्या आधाराने अधिकग्यान घेण्याकरीता कृष्णांमृत वाचा. । **चातं**:- दळणाच्या चक्कीचे चाके । **माघ**:- मराठी माघ महीना । **माघ उतरला**:- वर्षातील माघ महीना आला । **माघ शुध्द पंचमी** :- मराठी माघ महीन्यातील शुध्द-पंचमी ही तिथी. याच दिवशी कृष्णाजी तिरोडीच्या जंगलात असलेल्या को-या भुम्मेवर प्रकट झालेत । **चौकोणटयावर चार अवतार** :- चार बाजुने चार अवतार असलेले चतुर्व्युह रूपांची रंचना. ***या ओवीच्या निरसन च्या अधिक ग्यानासाठी कृष्णांमृत वाचावे.***

॥ खंड ०५ ॥

॥ ओवी नं. ३४ ॥

॥ कृष्ण चरित्र ज्ञानाची व विनवणीची ओवी ॥

## ॥ सावंग नगरी राज विठ्ठचं ॥

॥ सावंग नगरी, राज विठ्ठचं । बहु आनंदानं ।
निरशुन्याहुन, देव आले । पुर्ण, अवतार घेवुनं ॥ घृ ॥
॥ सावंग भुम्मा, अगुचर वस्ती । आदी मुनीचे गावं ।
अहिना घरी, उभा राहीला । श्री कृष्ण देवं ॥
॥ सावंग्या मध्ये, अवतार धरलां । आदी पुरूषानं ।
कोरी हे भुम्मा । देवानं, वसवलं ठाणं ॥
॥ आदीमुनी आधीला खरां । मागुन, महामुनी आला ।
आधी भैस नामाचा याहीनं । डंका वाजवला ॥ ०४ ॥

॥ आदीमुनींचा डंका ऐकुन । शिणभाग हर्रला, बहु आनंद झाला ।
सत्या घरी कार करून । धनी, सांगुन गेला ॥
॥ सांगुन गेला तोच आला । कार करायला ।
भरली यवगाची मुदत । धनीदेव, उभा राहीला ॥
॥ भरला यवगाचा समया । धनीदेव, कार करनं ।
मोडनं हा कली । दिवस, सत्याचा येईनं ॥
॥ सत् यवगी, नित्य रूपाचं । चालनं परमाणं/प्रमाणं ।
जिकडे-तिकडे मानव होईन । देवा सम्मान ॥ ०८ ॥

॥ सत् यवगी नित्य रूपांची । चालनं गाही ।
तुटन पापांचे बंधन । वाजन, सत्याची टाळी ॥ ०९ ॥

भजने :-
॥ अवघी भुम्मा एक होईन । तेव्हाच वाजन टाळी ।
तेव्हाच वाजन टाळी हरी नामाची ॥
॥ दोन्ही हातानं वाजवा टाळी । अवद्युत विनवा हो विनवां ।
हा रक्त मासाच देहपिंड मजबुत बनवा हो बनवा ॥
॥ टाळी वाजवा हो वाजवा । काहीतरी देहीला झीजवा हो झीजवा ॥
॥ टाळी वाजवा हो वाजवा । काहीतरी मनाला जीरवा हो जीरवा ॥
॥ टाळी वाजवा.. । टाळी वाजवा हरी नामाची । सदभाव परमा याहीची ।
नित करा हो प्रार्थना महाराजाची/अवधुताची ॥
॥ अवधुत उभे भक्तीला तारू । मुखानं आवाज केला सुरू ।
आवाज करा सुरू ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. ३५ ॥

॥ कृष्ण ज्ञानाची ओवी ॥

## ॥ सावंग नगरी देव नांदतो ॥

॥ सावंग नगरी देव नांदतो । पहा सारंगधर ।
पहा सारंगधर, उत्तम बांधलं घरं ॥ घृ ॥
॥ विठोबा हरी या भुम्मेवरी । देह धरला ।
देह धरला, कृष्ण नामी तो पावला ॥
॥ आदीपुरूष अवतार । अनामीक झाला ।
अनामीक झाला, कार नामाचा केला ॥
॥ अनामीक देहघरी आला हरी । देहे धरली ।
देहे धरली, जन काही मानतं नाही ॥०४॥
॥ चतुर्पती आहे सुदी । जन मानतं नाही ।
जन मानत नाही, कैकाची होईन फजीती ॥
॥ कठीन काळ येणार गडे हो । कितीक समजाउ ? ।
कितीक समजाउ, तुम्ही गाफल नका राहु ॥०६॥

भजनें :-
॥ गाफल मत रहना । नही तो शिरपर बैढेगा बादशाहा ॥



॥ ओवी नं. ३६ ॥

॥ कृष्ण ज्ञानाची व विनवणीची ओवी ॥

## ॥ सावंगपुरचे कृष्ण राया ॥

॥ सावंग पुरचे कृष्ण राया । भेट दयाना भावीकाला ॥ घृ ॥
॥ भावीक आम्ही भावीक तुम्ही । देव-देव करते जन लोक हेही ॥
॥ देव पाहीला काहो कोणी । देव दिसते आपल्या मनी ॥
॥ मानत नाही देवाचे नाम । का करता कोरडे सोंग ? ।
देव घेईन हो ओळखुनं ॥ ०४ ॥
॥ ओळखतो आमचा देव । त्याचं नाव आहे अवधुत ॥
॥ कृष्णाजीचे हे बोलनं । कदा नाही चुकणार ।
बोलला ते सत्य होणारं ॥
॥ बोलनं करता बोलुन गेला । कृष्णाजी हो सावळा ।
सावळा नंदन येवुन गेला ॥
॥ सावंग पुरचा कृष्णाजी राया । पुर्ण अवतारी सत्य जाणा ॥ ०८॥
॥ आदीपुरूषाचा हा पुर्ण अवतार । उभा आहे या बिर्दावर ॥ ०९ ॥
भजने :-
॥ सत्य जानाना तुम्ही । मालक उभा यवगाचा धनी ॥
॥ सत्य जानाना तुम्ही । मालक उभा श्री कृष्ण धनी ॥
॥ सत्य आणन जगा । कृष्णाजी आहे बिरदावर उभा ॥
॥ सत्य आणन जगी । सिदाई सेना आहे बिरदावर उभी ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०५ ॥
॥ ओवी नं. ३७ ॥
॥ कृष्ण विनवणी व अस्तुकी ॥
॥ सावंगा-जळगाव दांडची मुळावरची ओवी ॥
॥ म्हातारपणची बुधनामाची ओवी-०५/४७ ची जोडओवी ॥

## ॥ तिनयवग निजरूपा मध्ये गेले ॥

॥ तिन यवग निजरूपा मध्ये । हे गेले सारे ।
अवतारा ची राज महीमा । ठाउक, नाही त्याहीले ॥
॥ यवगा परी अवतार दादा । झाले दोन दोन ।
या देहीचं, मरणं । नाही चुकवलं कोणं ॥
॥ जीव चौ-यांशी नाही चुकवलं । या देहीचं मरणं ।
अवतारा ची महीमा दादा हो । वर्णु कोण्या गुण ? ॥
॥ सहाही शास्त्र अठरा पुराण । हे भांडतीन नित ।
देहे-जीवाचा न्याय करे ना ! कसे अवतार दिक ? ।
देहे-जीवाचां न्याय करे ना ! कशी तुमची रित ? ॥

॥ सहाही शास्त्र अठरा पुराण । हे ऋषिचे मत ।
जीवन कळीची सुद । ज्योत, दाखव आम्हास ॥०४॥
॥ सहाही शास्त्र अठरा पुराण । खरी नोव्हे गाही ।
जीवन कळीची सुद बापा । या मध्ये नाही ॥
॥ सहाही शास्त्र अठरा पुराण । ऐका ची कथा ।
तिरगुणांच्या ग्याना मध्ये । बहु भुलले सोसा ॥
॥ सहाही शास्त्र अठरा पुराण । ऐकते जन ।
तिरगुणां चे शुन्यं बसले । उडनं कैश्यानं ? ॥०८॥
॥ चंचला/माया सागरी मोठेपण । कशी लोपली कथा ?
निजरूप भुम्मा जागी कश्यानं ? होईन समर्था ॥
॥ जला सागरी लहान पण । जपली कथा ।
निजरूप भुम्मा जागी करन । धनी समर्था ॥
॥ भैसा खुम्मी अगाध वाणी । ज्योत प्रकाशन देहीत ।
एक होईन आरोही । जागी, करन चौताळी/तिनताळी ॥११॥

वाढते चरणे :-

॥ सृष्टी वर अवतार उभा । धरन सृष्टाई । करन शिष्टाई ।
एक होईन आरोही । जागी करन टाळी/चौताळी ॥१२॥
॥ ज्योतीनं ज्योत प्रकाश । भरनं देहीत ।
उजळन रूप सुर्याच्या तेजात । जैसे रूप हे सुर्याचे तेज ॥

**भजने :-**

॥ तेरवी सिध्दी अवरत । धनी उभे आहे समर्थ ॥
॥ तुम्ही डिकावं या नामाला । सुर्यप्रभा सम होईल उजाला ॥
॥ तुम्ही डिकावं या नामाला । चंद्रज्योती सम होईन उजाला ॥
॥ सत्रावी उभी जीवनकळा । सेरूपी उभा कृष्ण सावळा ॥
॥ चौथ्या खुम्मी उभाराहीन धनी । तो तारण जीवा जनी ।
तो तारण जीवाजनी । हे सर्व त्याहीच्या अध्यानी ॥

गजर :- ॥ माझे मनात भासते मला । जसा पुनवेचा चंद्रमा ।
माझं दर्शन घडलं मला । धन्य तु नारायणा ।
माझ मुळ स्वरूप दावलं मला । धन्य तु नारायणा ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. ३८ ॥

॥ कृष्ण ज्ञानाची व विनवणीची मुळावरची ओवी ॥

## ॥ सावंग महाराजाचं नगर ॥

या ओवीची पलट ओवी खंड०७/ओवी-२३ मध्ये दिलेली आहे.

॥ सावंग महाराजाचं नगर । चरण चारीया बोलनं खरं ॥ घृ ॥
॥ बोलनं केलं यवगावर । जेजे सांगतलं होईन खरं ।
दुर्जन बहु होतीन बेजार । चरण चारीया बोलनं खरं ॥
॥ गावतो सावाची ही वाणी । सिदाई होईन मानव खुम्मी ।
गर्जना होईन तिरभवनी । चरण चारीया बोलनं खरं ॥
॥ उभे शुर विर खेत्री । सिदाई मुखाच्या आगारी ।
यवग काबीज करन सारं । पृथ्वा जागी करन सारी ॥
॥ ऐका या महाराजाचं/तिरनयनाचं खरं । भैसराज उभे यवगावरं ।
चरणी जागी करन सारं । चरण चारीया बोलनं खरं ॥०४॥

**भजने :-**

॥ चरण चारीया अवतारा । लवकर याहो, जगाच्या/भक्तांच्या माहेरा ॥
॥ चरण चारीया अवतारा । लवकर याहो, गरूडावर बसणा-या ॥
॥ गरूडावर केली सवारी । धावुन आले देव राया श्रीहरी ॥
॥ गरूडावर केली सवारी । धावुन आले भक्तांचे कैवारी ॥
॥ पिंतांबरा चा काठ । शेला, गगणी झळकला ।
गरूडा वर बसुन देवमाझा कैवारी आला ॥
॥ नाचता-खेळता देवाचा । ढळला पितांबर ।
साधु संत गर्जती नित नामाचा गजर ॥



॥ ओवी नं. ३९ ॥

॥ कृष्ण अस्तुकी व उपदेशाची मुळावरची ओवी ॥

## ॥ अपनी अपनी सब कोई कहे ॥

या ओवीची पलट ओवी खंड०७/ओवी-२५ मध्ये दिलेली आहे.

॥ अपनी अपनी । सब कोई कहे ।
महाराजाची बोली । सही होये ॥ घृ ॥
॥ वेडया भक्तीचा । निभाव तुम्हा हाती ।
उडवा भ्रांती । या बाळाची ॥
॥ भक्ती पाहुन । का गा झाला वेडा ? ।
तुम्हा अवघडा । आहे कोणाचा ? ॥
॥ माया रूपी काम । राहीले होवुनी ।
तुम्हा जरी भिती । आहे कोणाची ॥
॥ भक्तीचं काज । धरावं आपल्या आंग ।
नका धरू लाज । तुम्ही कोणाची ॥
॥ तरायाचे काज । राया तुमच्या हाती ।
मुखाच्या वचनी । कराव कार ॥ ०६ ॥ हो राया..

**भजने :-**

॥ मोहीले मन लागलो ध्यानी । हरी तारण करा, मुखाच्या वचनी ॥
॥ वचन दिले मानवाले । मानवाची देवा कारूणा तुले ।
मानवाची देवा कारूणा तुले । देह तारले देव आले ॥
॥ कारूणेच्या सागरा, करूणा कर । आम्ही अन्जान लेकरं, पदरी धरं ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०५ ॥

॥ ओवी नं. ४० ॥

॥ कृष्ण ज्ञानाची व विनवणीची ओवी ॥

## ॥ जाउ पाहु सावंगपुर ॥

॥ जाउ पाहु सावंगपुर । हे होय भक्तांच माहेर ॥ घृ ॥
॥ सावंग्याच्या चवही फेर । गर्दि झाली आहे फारं ॥ ०२॥
॥ सावंग नगर पेठं भारी । देवगावचे आले व्यापारी ॥ ०३ ॥
॥ किल्ल्या लावल्या कोठीले । देणं दिले भावीकाले ॥ ०४ ॥
॥ पहा या भावीकांचा भाव । खजीना भरे कृष्णदेव ॥ ०५ ॥

भजने :-
॥ पंढरपुर पुजेच महेमानं । सावंग्यात वाटते कृष्णदेव साखरपान ॥
॥ सावंग होय व्दारका । येथे उभा आहे श्रीकृष्णा सखा ॥
॥ उभा आहे माझा सखा । आता नाही या देहीला धोका ॥
॥ उभा आहे माझा देव । आता नाही कोणाचं भेवं ॥



॥ ओवी नं. ४१ ॥

॥ कृष्ण ज्ञानाची व विनवणीची ओवी ॥

## ॥ एक वेळा पाहु सावंगपुर ॥

॥ नरदेही जन्म थोर । एक वेळा पाहु सावंगपुर ॥घृ॥
॥ घनन घन कार । ओहंम्-सोहंम् निर्विकारं ।
निराकारानं केला आकारं ॥ एक वेळा पाहु सावंगपुर...
॥ आदी स्थान सावंगपुर । मग अवघं रूपांतर ।
देह धरला या भुम्मेवरं ॥ एक वेळा पाहु सावंगपुर...
॥ योगी आले यवगेश्वर । कृष्ण नामाचा अवतार ।
उभा राहुन करे जोहार ॥ एक वेळा पाहु सावंगपुर...
॥ अनंत नामाचा परमेश्वर । ग्यान-भक्ती सिदाईचे घरं ।
केला चव यवगाचा कारं ॥ ०४ ॥ एक वेळा पाहु सावंगपुर

॥ सावंग ग्यानाचं सागर । नित नामाचा होतो गजरं ।
धुम्मधुम्मकार याही भुम्मेवरं । एक वेळा पाहु सावंगपुर..
॥ राउळात दरवाजे चारं । दोनही झेंडें बराबरं ।
करे पुनाजी कारभारं ॥ ०६ ॥ एक वेळा पाहु सावंगपुर...

भजने :-
॥ सावंग आहे अगुचर । नित्य नामाचा होतो बा गजर ॥
॥ सावंग सोहंम् शब्दाचं । माहेर होय या भावीक भक्त जनांच ॥
॥ पहा या सावंग्याचे सुखः । जन्म मरणाचे देहीचे हर्ले दुःख ॥
॥ अनामत यवगी परात्पर । याहीच्या चरणी माझा नमस्कार ॥
॥ उभे आहे अवधुत । याहीच्या चरणी माझा दंडवत ॥
॥ उभा आहे भैसराजा । याहीला मुजरा आहे माझा ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०५ ॥

॥ ओवी नं. ४२ ॥

॥ कृष्ण चरित्र ज्ञानाची व विनवणीची ओवी ॥

## ॥ सावंगपुरची राज महीमा ॥

॥ सावंग पुरची राज महीमा । सत्याची ज्योतं ।
महाराजानं अवतार धरला । अहिनाच्या ईथं ॥ घृ ॥
॥ अहिन माता अहिन पिता । अहिनाचं सर्व ।
अहिना पासुन सर्वच झालं । का करता गर्व ? ॥
॥ मोत्या सारखं नाम याची । का करता माती ? ।
महाराजांन अवतार धरला । भावीका साठी ॥
॥ भावीका साठी होवुन कष्टी । हिंडतो रानो-वनी ।
आता या रायाच ध्यान । धरावं मनी ॥ ०४ ॥

॥ महाराजाचा सत्य शकुन । उभा चौथ्या खुम्मी ।
मिर्त लोकी दवंडी देल्ली । धन्याची वाणी ॥

भजने :-
॥ दवंडी देल्ली कृष्णानं । दवंडी वाल्या पाय दाखव येवुनं ॥



॥ ओवी नं. ४३ ॥

॥ कृष्ण चरित्र ज्ञानाची व विनवणीची ओवी ॥

## ॥ हे होय पुर्विचं देणं ॥

॥ हे होय पुर्विचं देणं । मावं केली देवानं ।
सावंग नगरी अखंड वाणी । होईन दर्शनं ॥घृ॥
॥ सावंग नगरी उभा देव । देहेचा धनी ।
याहीच्या नामी राहा गडेहो । तारण पृथ्वी ॥
॥ भावीकानं भक्ती केली । प्रेम लावुनं ।
त्याच्या घरी विठोबा नांदे । बहु आनंदानं ॥
॥ भावीकाचे गुणं पाहुन । रमले देवाचं मनं ।
याहीच्या हद्‌यी देव विठोबा । करे गायनं ॥०४॥

॥ भावीका साठी देव विठोबा । झाला कैवारी ।
पुर्विस्ताचा दिला कारं । सत्या घरी ॥०५॥

भजने :-
॥ होता पुर्विचं संचित । म्हणुन घडली देवाची संगत ॥
॥ होता पुर्विचा दोरा । म्हणुन आले देवराया घरा ॥
॥ सत्या घरी आला भगवान । याहीच्या मुखी दिले चतुर्पती नाम ॥
॥ सत्य आणनं जगा । पुर्ण अवतार या बिरदावर उभा ॥
॥ सत्य आणनं जगी । सिदाई सेना आहे बिरदावर उभी ॥
॥ अवधुत आले भक्तीला तारू । मुखानं आवाज केला/करा सुरू ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. ४४ ॥
॥ म्हणनी नं ०१ ॥

## ॥ कृष्णाजीचा ढोल वाजे ढम्‌ढम् ॥

॥ मानव होय तु मानव होय । सदाच सोहंम् राहयं ॥ धृ ॥
॥ कृष्णाजी चा ढोलं, वाजे ढम् ढम् ।
याहीन स्थापला, मानव जातीचा धर्म ॥
॥ कसले धर्म, हे कठीन कर्म ।
मानव जातीचे, जाणावे वर्म ॥
॥ कसल्या जाती, या कैश्याच्या न्याती ।
कठीन आहे, या मानव निती ॥
॥ श्रेष्ठं आहे, या मानवाच्या खाणी ।
कोण्या पंथाचे, गुलाम नाही आम्ही ॥०४॥
॥ आम्ही अजात, का करता जबरदस्ती ? ।
भगोडयाशी, आम्ही नाही, करणार दोस्ती ॥
॥ आम्ही सोयंम्, का करता जबराई ? ।
कोण्या देवाचे, गुलाम होणार, नाही हो आम्ही ॥
॥ कैचे देव ? हा कैचा भगवान ? ।
आमच तरी बा काय केलं कोणं ? ॥
॥ कैचे जोग ? हा कैचा धर्म-पंथ ? ।
अवघचं मोडन, एकच होईन, मानव जात ॥ ०८ ॥
॥ यवगा यवगाचा आत्माराम एक ।
सर्व घटी भरून उरला प्रभु नायक ॥ ०९ ॥
भजने :-
॥ यवगा यवगीचा आत्माराम । याहीची किर्त महिमा जगात वाढवनं ॥



ओवी ४४/२:- ॥ कृष्णाजीचा ढोल ॥ ..म्हणनी नं ०२
॥ मानव होय तु मानव होय । सदाच सोहंम् राहयं ॥ धृ ॥
॥ कृष्णाजीचा ढोलं वाजे ढम् ढम् ।
याहीन स्थापले हे मानव खुम्मीचे धर्म ॥
॥ कश्याचे धर्म, हे कश्याचे कर्म ।
हे कठीन आहे मानव खुम्मीचे वर्म ॥
॥ कसल्या जाती, कैश्याच्या या न्याती ।
हे कठीन आहे या मानव खुम्मीची निती ॥
॥ कश्याचे हे देव ? कश्याचे हे भगवान ? ।
आमच्या साठी कायतरी केलं याहीनं ॥०४॥
॥ तुम्ही सोयंम् आम्ही सोयंम् । का करता जबराई ? ।
कोण्या पंथाचे गुलाम होणार नाही कई ॥
॥ तुम्ही सोयंम् आम्ही सोयंम् । का करता जबरदस्ती ? ।
भगोडयाशी आम्ही नाही करणार दोस्ती ॥
॥ यवगा यवगाचा आत्माराम एक । भरला ठाई ठाई
भरला ठाई ठाई एकच प्रभु नायक ॥०७॥
भजनं :-
॥ ठाई ठाई भरला प्रभु नायक । साहय कराले आले अवद्युत ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०५ ॥

॥ ओवी नं. ४५ ॥

॥ कृष्ण अस्तुकी ची मुळओवी ॥

## ॥ कृष्णाजीची वाणी गडे हो ॥

॥ कृष्णाजीची, वाणी गडे हो । मनीच ओळखावं ।
ऐकल्यानं, होत नाही रे । काहीतरी उपाय करावं ॥ धृ ॥
॥ मन माझ, चंचल भलं । भलतीकडे धावे ।
आदीपुरूष महाराज । मनाला, पक्के बांधावे ॥
॥ मन बुध्दीला, पक्के बांधले । पहा योग्यानं ।
आदीपुरूष महाराज त्याहीला । भेट देईनं ॥
॥ मन बुध्दीच्या, दिवटया लावल्या । ज्योती झाल्या बारा ।
पृथ्वी वरत, एकच ज्योत । नउ लाख तारा ॥



ओहंम्-सोहंम् दोन्ही ताजवे केले बराबर

॥ ओहंम्-सोहंम् दोन्ही ताजवे ।
केले संगतीनं/बराबर ।
नउखंड पृथ्वी, नाही भरली ।
हि-याच्या वजनानं ॥ ०५ ॥

भजने :- ॥ तुया घरी हि-याची खाण ।
या हि-याची पारख नाही केली कोण ॥
॥ मोती लोळे गाग-यात ।
महाराजा उचलुन घ्याना पदरात ॥
॥ ऐसा एक दिवस येईन । अवघे मोती एका हाते/हारे ओवीनं ॥
॥ अवघे आहे एकाचे । काम नाही अनेकाचे ॥
॥ भक्ती एकानं केली । लहान्या-मोठयांच्या कामा आली ॥

-: शब्दार्थ :-

**दिवटया** :- दिवनाल्या, समया । **नवखंड पृथ्वा** :- नवखंडाची देही अधिक ग्याना खंड०३/०५:-देहवर्णनाची ओवी तुन घ्यावे. । **हिरा** :- आत्मा ।
**बारा ज्योती** :- ज्ञानसुर्याच्या बारा ज्योती प्रकाशुन उजळल्या. सुर्याच्या बारा ज्योती चे अधिक ग्यान खंड०२/०६:-द्युताचे मोती या ओवीतुन घ्यावे.



॥ ओवी नं. ४६ ॥

॥ कृष्ण अस्तुकीची ओवी ॥

## ॥ आकाशवाणी तिरभवनी सांगे ॥

॥ आकाश वाणी, तिर भवनी । सांगे अहिनाला ।
महाराजाचा, हंकार आला । आवाज नरदेहीला ॥ धृ ॥
॥ कृष्ण राया, धराव छाया । या बाळावर ।
देहे धरून, उभा राहीला । पुर्ण अवतार ॥
॥ कृष्ण पुर्ण अवतार । भक्तांसाठी झाला महार ।
भक्तांचा महार, उठुन उभा । या फळी वर ॥
॥ तुम्ही तिकडुन, आम्ही ईकडुन । होवु दया कारं ।
होवु दया कार । धर यवगाचा सुम्मार ॥ ०४ ॥

भजने :-
॥ धर यवगाचा सुम्मार । वाट पाहतो आम्ही अन्जान लेकरं ॥
॥ अन्जानाचा होय दाता । संभाळ करा महाराजा अवद्युता ॥
॥ संभाळ करा अवद्युता । तुमच्या चरणावर ठेवला माथा ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. ४७ ॥
॥ कृष्ण अस्तुकीची जुनी मुळओवी ॥

## ॥ वाईकाची वाणी ॥

॥ वाईका ची वाणी, उठली अस्मानी/स्वर्गावरी ।
चंद्र-सुर्य दोनही । जय जय बोले ॥ धृ ॥
॥ वाईका ची वाणी, चाले स्वर्गावरी । थरथरा कापे, बम्हपुरी ।
बम्हादिकास कळले । आता कैस होईन ?
भैस राज येईन । पुस घेईनं ॥
॥ वाईका ची वाणी, चाले स्वर्गावरी । थरथरा कापे, विष्णुपुरी ।
विष्णुदिकास कळले । आता कैस होईन ?
भैस राज येईनं । पुस घेईनं ॥
॥ वाईका ची वाणी, चाले स्वर्गावरी । थरथरा कापे, शिवपुरी ।
शिवादिकास कळले । आता कैस होईन ?
भैस राज येईनं । पुस घेईनं ॥ ०४ ॥
॥ वाईका ची वाणी, चाले स्वर्गावरी । थरथरा कापे, इंद्रपुरी ।
इंद्रादिकास कळले । आता कैस होईन ?
भैस राज येईन । पुस घेईनं ॥
॥ वाईका ची वाणी, चाले स्वर्गावरी । थरथरा कापे, यमपुरी ।
यमादिकास कळले, आता कैस होईन ?
भैस राज येईन । पुस घेईनं ॥ ०६ ॥
॥ भैसाच राज्य, सांगे वर्तमान ।
उडवन मान देवतांचा । उडवलासे मान दोहीताचा ॥
॥ भैसाचं राज । उठनं/उठलसे फार ।
नकळे आकार । बम्हदिका/इंद्रादिका/शिवदिका ॥
॥ पुस हे परवेशी । होईन मोठी भारी ।
महा-महा धेंडं । उठतीन भुम्मेवरी ॥
॥ महा-महा धेंडं । येतीनं भुम्मेवरी ।
यवगासाठी उभा । विठ्ठल हरी ॥ १० ॥

**भजने :-**

॥ धनी येईन यवगाचा ।
हिशोब घेईन लहान्या-मोठयांचा/ख-या-खोटयाचा ॥
॥ खळखळ खळ होईन खळखळा । यमादिकास बसन धक्का ।
सिध्दांच्या मुखी आहे, अग्नीचा भडका ॥

-: निरसनसह शब्दार्थ :-

**वाईक** = लहानाहुन लहानपण घेवुन असलेला वाईक ! यवगान यवगापासुन जो लहानपण घेवुन राहीलेला आहे. असा जो तो आदीपुरूष भैस ! लहानपण नाही घेतलं कोण ? लहानपण घेतलं या देवानं ! म्हणुन या सांहंकारी पवनाधारी वायव देवाला वाईक असे संबोधल्या गेलेले आहे. या आदीपुरूषाचा पुर्ण अवतार कृष्णाजी यांनासुध्दा हे संबोधन लागु होते. या साहंकारी पवनाधारी च्या अंतरीची नामाची धुनी असलेली वाणी म्हणजे वाईक वाणी । **पुस** = असं का केलं ? म्हणुन विचारपुस करने. ।
**धेंड** :- महान-महान, महाभारी योगी, मुनी, संत *॥ महामहा धेंड आत्माराम देव, सदाराम आहे । नउ खंडात याहीचा झेंडा, उभा आहे ॥* खंड०७/ओवी-५१/चरणं-२७ पहा.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. ४८ ॥

॥ कृष्ण विनवणी व अस्तुकी ॥

॥ सावंगा-जळगाव दांडची मुळावरची ओवी ॥

## ॥ म्हातारपणची बुधनामाची कृष्णा वाणी ॥

या ओवीची पलट ओवी खंड०७/ओवी-२४ मध्ये दिलेली आहे.

॥ म्हातार पणाची बुध नामाची । कृष्ण, सांगे जगाशी ।
नामीच राहा, गडे हो तुमची । चुकवन/मिटन चौ-यांशी ॥घृ॥
॥ बालपणा पासुन, देव मनाया/म्हणाया । लावलं नामाशी/अवघ्याशी ।
चित्त भावा पासुन मन । ठीकाणा, लावा/ओळखा देवाशी ॥
॥ बालपणा पासुन बरा गुणं । शिकवले अवघ्याशी ।
कळसुत्र कळा आहे या । देवा च्या हाती ॥
॥ उभे यवगी घरी याहीनं । धरला रंग ।
किंवा प्रचलीत म्हणनी :- ॥ यवगी उभा राहुन याहीनं । धरला रंग ।
ओळखा हो नरदेही राया । उभे आपले आंग ॥

॥ जोगी या राणी वैरागी । याहीन, घेतला जोग ।
नर देही पोहन ताकत । लागली मागं ॥
किंवा प्रचलीत म्हणनी :- पावन ही नरदेही ताकीद । लागला मागं ॥
किंवा प्रचलीत म्हणनी नं.२:- पावन हे नरदेही । गर्वानं आणला भंग ॥
॥ गुरू या चेल्याची, किर्त । महीमा, वाढवता कैशी ?
चंचल माझं मन ठिकाणी । नाही बसवलं कोणी ॥
किंवा प्रचलीत म्हणनी :- मन ठिकाणी नाही बसवलं । कोण्या गुरूंनी ॥
॥ मन ठिकाणी नाही बसवलं । पहा कोण्या गुरूनं ।
काहीच नफा घडला नाही । कान फुंकल्यानं ॥
॥ मन ठिकाणी आता बसवले । पहा या देवानं/कृष्णानं ।
बहुत नफा घडला हो देवा । तुमच्या सांगीनं/संगतीनं ॥

॥ म्हातारपणची उमंर/उंबर देही । हे करा नवी ।
साधवा सिदाई देवा ईची । वाढवां पदवी ॥
किंवा जळगाव :- साधवा सिदाई याहीची, वाढवा पदवी ॥
किंवा प्रचलीत म्हणनी :- साधवा तेरवी सिध्दी । देहीची, वाढवा पदवी ॥

भजने :-
॥ चंद्र बत्तिशीचा मुद्दा । साधवा तेरवी सिध्दी ।
कृष्णा मोहीम कर गा उभी ॥
॥ तेरवी सिध्दि अवरत । ईच्यावर उभे आहे धनी समरत्/समर्थ ॥
डहाकी :- ॥ खरा कार यवगाचा विडा । मांडला सभेत ।
तेरवी भरल्या वर बहु आहे हित ॥
॥ तेरव्या सिध्दीला मान । चौदावी लागता होईन यवगाचे काम ॥
॥ भैसानं अवतार धरला । चौदावीच्या ठाई तारू केले अवघ्याला ॥
॥ उभा आहे माझा राम । राम करे आता यवगाचे काम ॥

-: शब्दार्थ :-

**उमर, उंबर** :- वय । **देव मना या** :- देवमना या, देवमन महाराज यास, देव म्हणा या । तेरावी सिध्दि, चंद्रबत्तीशी, चौदावी, सिदाई चे ज्ञान खंड०२/०६:-'द्युताचे हे मोती' किंवा खंड०३ च्या ओवी निरसनातुन घ्यावे.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. ४९ ॥

॥ कृष्ण ज्ञानाची व विनवणीची मुळओवी ॥

## ॥ कृष्णाच्या संगतीनं/सांगीनं महापुण्य झाले ॥

वरभजने :-
॥ होता पुर्विचा दोरा । म्हणुन आले देवराया घरा ॥
॥ होत पुर्विचं संचित । म्हणून घडली हो देवा तुमची संगत ॥
॥ तुम्ही परेश आम्ही लोहा । संगत घडली याहो किसनजी देवा ॥
॥ लोहा घासे परेशाले/परिसाले । कंचन करा महाराजा देहीले ॥

॥ कृष्णाच्या संगतीन/सांगीनं । महापुण्य झाले ।
नाम सापडले । तरायाचे ॥ घृ ॥
॥ अनामीका घरी । धरीला अवतार ।
मिळविले गोपाळ । भुम्मेवरी ॥
॥ कृष्णा तुझा अंत । जगाशी नाही कळे ।
साथचा सौगडा । संगतीन खेळे ॥
॥ संगतीचे गडी । पंगतीन राहु ।
साथचा सवंगडा । संगतीन खेळु ॥०४॥

॥ कृष्णाची संगत । पुर्विच भाकलं ।
धन्य भाग्य थोर । आहे माझं ॥
भजन :- ॥ धन्य भाग्य थोर । कृष्णा पायी ।
हाती काठी सावळा । वळतो/राखे गाई ॥
॥ हेकोडे-तेकोडे । गाईचे सगर ।
नाही चौक्या मेटं । चौ-यांशीच्या ॥ मेटं :- मेळ मिळवणारा ठेकेदार
मिटवावे अंतर । महाराजा .॥ ...जळगाव टुक ।
॥ गाईच्या सगरी । तरण उपाय ।
मिळवा हो मेळ । तिरलोक्याचा ॥
॥ पाताळाचे पालक । स्वर्गिचे दैवत ।
येतीन/याहो मिर्त लोकात । भेटी साठी ॥०८॥

॥ फुल हे पुष्प । जाणुनी फुलोरा ।
परमय घरोघरा । देवा/आहे तुझा ॥
॥ पक्वान्न भोजनं । नाही रांधले हातानं । नाही पाहीले डोळ्यांनी ।
मन समाधान देवा तुझे । मन समाधान, यवगी याचे ॥

भजने :-
॥ ऐसा यवगी समाधान । न जेवता तृप्त झाले याहीचे मन ॥
॥ ज्याचे मन समाधान । त्याला होईन/झाले देवराया प्रसन्न ।
॥ ज्याचं मन समाधान । त्याहीला होईन/आहे देवरायाचं देणं ॥
॥ पक्वान्न करून ताट वाढलं । काय करन अन्न ? ।
बिना जेवल्या वाचुन कैस होईन समाधान ॥
॥ जेवणार वाला जेवुन गेला । घ्याहो तुम्ही ओळखुनं ।
पाचही पानांचा विडा जेवला । मन समाधानं ॥
॥ भजन करता मिळन भोजन । ऐसे सांगुन ठेवलं याहीनं ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०५ ॥
॥ ओवी नं. ५० ॥
॥ कृष्ण उपदेशाची मुळावरची ओवी ॥

## ॥ सब दोहीत सोड बा ॥

॥ सब दोहित/व्दैत सोड बा । हरी भजनी राहयं बा ॥ घृ ॥

॥ जंतर-मंतर । हे नाही बरं । जंतर-मंतर । हे नाही बरं...
हे पुंजन तु सोड/छोड बा । हरी भजनी राहयं बा ॥
॥ करणी-कवटाळा । हा नाही बरा ।
हे पुंजन सोडा बा । हरी भजनी राहयं बा ॥
॥ जादु-टोणा हा नाही बरा ।
हे तु पुंजन छोड बा । हरीभजनी राहय बा ॥
॥ नउ ग्रि-हे बारा राशी । हे मागं लावनं हो चौ-यांशी ।
हे पुंजन सोड बा । हरी भजनी राहयं बा ॥ ०४ ॥

॥ येईन व-हाडी । खांदे कु-हाडी ।
काडी-मुडीचे देव तु सोड बा । हरी भजनी राहयं बा ॥
॥ पाषाणाचे देव तु सोड बा । सब दोहीत सोड बा ।
हे पुजंन तु सोड बा । हरी भजनी राहयं बा ॥

भजने :-
॥ भुल पडली ख-या देवा । करे पाषाणाची पुजां ॥
॥ ज्याच्या हातानं बनले । त्यालाच बेईमान झाले ? ॥
॥ सबदोहीत सोडा हो सोडा । अवधुत येईन घरा । मोडन खोडा ॥
॥ हरीहरी कृष्णा, तुझी वाट कोठवर पाहु ? पाषानाला कोठवर पुंजु ?

॥ येवु दे दया भजनपाठां ॥

॥ येवु दे दया । दया द्युत राया ।
शरण आलो तुया पाया ॥ येवु दे दया, दया द्युत राया ॥ घृ ॥
॥ जादु-टोणा । बहु केला राया ।
एवढं करून गेलो वाया ॥ येवु दे दया, दया द्युत राया..
॥ करणी-कवटाळा । बहु केला राया ।
जप-तप करून गेलं वाया ॥ येवु दे दया, दया द्युत राया..
॥ पाप-पुण्य । बहु केले राया ।
सगळं करून गेलं वाया ॥ येवु दे दया, दया द्युत राया..
॥ धर्म-कर्म । बहु केले राया ।
तुमच्या वाचुन नाही माया ॥०४॥ येवु दे दया, दया द्युत राया..
॥ खोटं-नाटं । बहु केलं राया ।
हे सारा जावु दे लया ॥ येवु दे दया, दया द्युत राया..
॥ निंदा-स्तुती । बहु केली राया ।
हे चरणी वाहली तुया ॥०६॥ येवु दे दया, दया द्युत राया..

गजरं :-
॥ आम्ही व-हाडी व-हाडी । रूक्मीणीच्या माहेरचे गडी ।
आम्ही आलो तुया व्दारी । भेटी दयाहों जगजेठी ॥०१॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. ७१ ॥

॥ कृष्ण ग्यान, अस्तुकी व उपदेशाची ओवी ॥

## ॥ अमरावती नगर ॥

॥ अमरावती नगर । होतो जयजयकार ।
पहा हरूष/हर्ष अंबर । कोंडाशीला ॥ घृ ॥
किंवा म्हणनी नं. २:- हा वृक्ष अंबर । कोंडाशीला ॥
॥ घेवुनी अनमोलं । राहावं कासाशी ।
न दयावे चोरांशी । चंद्रबळ ॥
॥ घेवुनी या लोणी । न घालावे शेणातं । घालावेसे नातं ।
उपग्याशी मात । सांगु नये ॥
॥ घडविता पुण्यं । अर्ध पुण्यं लाभे ।
मोडविता दोघे । भंगा जाये ॥०४॥

॥ हरीच्या नामाचा । न करावा आळसं ।
कैलाशी महेष । जपतो नाम ॥
॥ सदोनीत नाम । आयुष्य गणीता नाही ।
हरीच्या नामाला । वेळ-घटका नाही । आज्ञा लागत नाही ॥
॥ तुम्हा पाया विना । दुजा नाही ठावं ।
घेतो तुमचे नामं । लव लावी हो राया ॥
॥ कल यवगी साधनं । नामा विना नाही ।
म्हणुन या नामी । रहावे लव लाही ॥

भजने :-
॥ उजळा कापुर ज्योतं । कृष्णा नदिवर नागार्जुन सागर ॥
॥ उजळा कापुर ज्योत । उभे आहे देव कृष्ण अवधुत ॥

गजरें :-
॥ अमरावती नगर । कोंडाशीला हरूष अंबर ।
तेथुन गुप्त झाली ज्योत । मोती सापडला सावंगपुर ॥०१॥
॥ अनुसयाचे झाले पुत । उकंडाचे सुतं ।
प्रकट झाली अखंड ज्योत । पहा सावंग्यात ॥०२॥
॥ चिरोडीच्या शिखरांवरी । देव अवतरले कृष्णहरी ।
भक्त झाले हैराण भैसनाम, दिले याहीन मुखी ॥०३॥
॥ सांज-सकाळी कृष्णाजीला । पुष्पे-सुमने वाहतो लमुन । या देवाला.. ॥
॥ चैतन्येच अक्षता वाहतो । त्रिकुटाचं बेल वाहतो ।
अर्पण करतो मन-भाव । देहपिंड, अखंड नांदवजो ॥०५॥

-: निरसनसह शब्दार्थ :-

हरूष अंबर :- हर्ष, आनंद, आनंदाची ज्योत गडे हो आनंदात अंबर बनुन राहयें.
कोंडाशिला :- तालुका अमरावती, गाव कोंडाशी, राज्य आंधप्रदेश. कृष्णा नदिच्या थडीवर वसलेले कोंडाशी या गावाजवळच्या नागार्जुन अरण्यात, या कृष्णाजी चा वृक्ष म्हणजे देह अंबर होवुन, आनंदाची ज्योत बनुन आनंदात राहीला. अधिक ग्यानासाठी कृष्णांमृत वाचा.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. ७२ ॥

ओवी महात्मः- भक्तांवर अचानक आलेले संकट दुर करण्यासाठी हमखास म्हणण्यात येणारी..

॥ निरसनसह विनवनी ची मुळ जुनी ओवी ॥

## ॥ हरीच्या नामाचा नसावा आळस ॥

॥ हरीच्या नामाचा । नसावा आळस ।
कैलासी महेष । जपतो नाम हो ॥ घृ ॥
॥ हरीच्या नामाचं । पिटलं ढेंढुंळ/ढिंढोर ।
डंका भुम्मेवर । देवा तुझा ॥
॥ हरीच्या नामाच्या । धिराई च्या देही ।
वेळ-घटका सांभाळी । महाराजा हो ॥
॥ भाल्याचे घाव । काटयांवर निवारी/निर्वाळी ।
देव माझा कैवारी । उभा आहे ॥ ०४ ॥
॥ आकाशाची दोरी । लांबविला पाळणा ।
कळसुत्र जाणा । महाराजा हो ॥
॥ हेकोडे-तेकोडे । गाई चे सगर ।
देव दिगांबर । महाराजा हो ॥
॥ गाई च्या सगरी । तरण उपाय ।
मिटवा हो भयं । या बाळाचे ॥
॥ साखरेची आळं । लाभावं आम्हाशी ।
लक्ष्य पाया पाशी । सदोनित ॥ ०८ ॥
॥ साळु जरी बोले । बोले मंजुळ वाणी ।
शिकविता धनी । उभा/जवळी आहे ॥ ०९ ॥

**भजनेः-** ॥ उभा आहे माझा देव । आता नाही या देहीला भेवं ॥
॥ उभा आहे माझा सखां । आता नाही या देहीला धोका ॥

**गजरः-** ॥ तुम्ही या भजनी बसा । उभा आहे सखा । होणार नाही धोका
या चतुर्पती नामाला येवुन भजा ॥

### -: निरसनसह शब्दार्थ/चरणार्थ निरसन :-

**धिराई** :- अंतिम धैयाकडे वाटचाल करतांना कधी यश तर कधी अपयश येत राहते. परंतु जेव्हा यश येते, तेव्हा हर्षुन न जाता किंवा जेव्हा अपयश येते, तेव्हा त्या अपयशाने खचुन न जाता, हरी नामी असलेल्या देही आपले अंतिम धैय प्राप्त करण्यासाठी सावधतेने संयमाने हळुहळु सावकाश म्हणजेच धिराईने चालत परमात्माप्राप्तीच्या अंतीम धैयाकडे मार्गक्रमन करत राहते.

**ढिंढोरा पिटनें** :- नामाचा उदो उदो करने. गजर करने. गर्जना करने. ढिंडोर/ढोल पिटवुन दंवंडी देणे. ॥ निर्गुणपुरीचे आले कोल्हाटी । सोहंम-शक्ती ढोल पिटवती । चवयवगाची झाली दाटी ॥ ओळखा तुम्ही माझा गुरूदेव आदीमुनी.. ।

**भालीयाचे घाव काटयावर निवारी** :- सच्च्या भक्ताच्या दैवात जर भाल्याचे घाव लिहुन असेल, तर ते घाव त्रिकालदर्शि कृष्णाला आधीच माहीत होते. आणी तो कृष्णा त्या सच्च्या भक्ताच्या त्या भालीयाच्या घावाच्या समयास त्या भक्ताने हाका मारो अथवा न मारो ! तो कृष्णा त्या संकट समयी तत्परतेने उभा होतो. त्या भक्ताच्या दैवात असलेले भाल्याचे घाव म्हणजेच मोठया संकट/आरीष्टे/विघ्ने याची तिव्रता कमी करतो. त्या संकटे/आरीष्टे/ विघ्न चा निवारा हा काटयावर म्हणजेच त्या संकट/अरिष्टे/विघ्न ची तिव्रता कमी करून, त्याचा निवारा करतो. निपटारा करतो. अश्या रितीने हा देव आमचा कैवारी कृष्णा ! सच्च्या भक्तांची जित्या जन्मीच्या चौ-यांशीची तिव्रता कमी करून, त्याचे निवारण करत राहतो. कृष्णाच्या या शिष्टाईवर भाळुन सच्चे भक्त आपले सर्व काही या श्रीकृष्णास अर्पण करतो. ।

**आकाशाची दोरी** :- आकाशामध्ये उभा असलेल्या कळसुत्राच्या मालकाच्या हाती या देहीची म्हणजेच या कळसुत्र बाहुलीची आयुष्याची दोरी असल्यामुळे, येथे कळसुत्र मालका च्या हाती असलेल्या या देहीच्या आयुष्याची दोरीला आकाशाची दोरी असे म्हटले आहे. । **लांबविला पाळणा** : पाळणा म्हणजे चौकोणी देहीचा पाळणा. या देहीचा ॥ पाळणा उभारला खासा । झोका दयाहो महाराजा आयुष्याचा ॥ कारण की : हे महाराजा तुच कळसुत्राचा मालक ! कळसुत्र तुम्हा हाती आहे. आता तार ही नरदेही ! तुमच्याच हाती या पाळण्याची दोरी । राखन आहे तुच देवराया श्रीहरी ! आम्ही अर्ज करतो की : आता तुमच्या हाती असलेल्या या आकाशाची आयुष्याच्या दोरी व्दारे या देहीचा पाळणाला झोका देवुन, या देहीचे आयुष्य वाढवा हो राया कृष्णराजा हो राया
॥ पाळणा उभारला हा चौकोणा । देवा तु तार आता निरंजना ॥
**हेकोडे-तेकोडे गाईचे सगर** : **हेकोडे-तेकोडे** :- वेडे वाकडे । **सगर** :- मार्ग
हा देव दिगांबर कृष्ण महाराजा कोण कोणत्या हेकोडया-तेकोडया मार्गाने सांवग्यापर्यत आला याचे ग्यान कृष्णांमृत मधुन घ्यावे.
**साखरेची आळ लाभावं आम्हाशी** : नामाचा गोडवा, मुखी मंजुळ गोड वाणी, साखरेकडे जश्या मुंग्या आकर्षित होतात, तश्या या हरीच्या नामाच्या धिराईच्या देहीकडे आकर्षन बळ/शक्ती यावे. साखरेचा गोडवा असलेली आकर्षण शक्ती हरीच्या नामाच्या धिराईच्या देहीस लाभाव. या करीताच सदोनित या हरीच्या नामाच्या देही तुमच्या पायापाशी लक्ष्य लावुन बसलेल्या आहेत. । **साळु** : मुखातील जिभ जिच्याव्दारे वाणी/बोल निघतात. । **शिकविता धनी जवळी उभा** : सर्व काही शिकवणारा निराकार निश्कलंकी ज्योर्तिमय परमात्मा कृष्णा हा आपला अंश अवतार घेवुन, आत्माराम बनुन या देहीत उभा आहे. तो तुम्हा जवळी उभा आहे. त्याला जाणुन त्याच्या प्रकाशा मार्फत सर्व काही शिकुन घ्या.



॥ ओवी नं. ७३ ॥
॥ विनवणीची ओवी ॥

## ॥ चालता बोलता ॥

॥ चालता बोलतां । असावं तुझे नावं ।
नामी माझा प्राणं । उध्दारजो ॥
॥ चालता बोलता । मुखी, ठेवा नामधुनी ।
आदीमुनी धनी । संग राहयं ॥
॥ मायेच्या उदरी । हिंडलो चारही खाणी ।
मायारूपी जननी । संग असे ॥
॥ माहेरची याद, येते वेळोवळा । मागे आहे गाडा, प्रपंचाचा ॥

**भजने** :- ॥ प्रपंच लावली माया । भंवर जाळ घातलं गळा ।
भंवर जाळ तोडुन देवा, दाखव आपले पाय, ठेवा आपल्या पाया ॥



॥ ओवी नं. ७४ ॥

## ॥ अज्ञानपणाच्या मौजा ॥

॥ अज्ञानपणाच्या मौजा । कौतुक पाहे भैस राजा ।
भरला तिरगुणांचा मुद्दा । उभ्या देवाच्या फौजा ॥ घृ ॥
॥ अज्ञानपणी अन्याय झाले । आदी भैसानं माफ केले ।
तेव्हा त्याहीन सांगुन ठेवले । राज्य समशेराचे आले ॥
॥ अज्ञानपणी कळत नव्हती मती । उपदेश केला तुम्ही संगती ।
उभा देवाच्या समोरी । आता समशेर घ्यावा हाती ॥
॥ दोहीत वधा पाखंड वधा । मुखी वंदन कार सदा ।
योगी उभा कृष्णराजा । सत्यभाव याहीची पुजा ॥

**भजनें** :- ॥ सत्य भावाचा मालक । सागर भरला देवाच्या पोटात ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०५ ॥

॥ ओवी नं. ५५ ॥

॥ कृष्ण अस्तुकी व विनवणीची ओवी ॥

## ॥ राउळाच्या पुढं ॥

॥ राउळाच्या पुढं । अमृताच झाडं, तरायाचं झाडं ।
सापडले पेठं । महाराजाचं हो ॥
॥ राउळाच्या पुढं । कंचन मकाण ।
लावलं दुकान । महाराजानं ॥
॥ कापुरांचा वास । येतो आसपास ।
केला रहिवास । विठ्ठलानं ॥
॥ उकंडयाच्या परी । फुले अंगावरी ।
इथं नांदे हरी । सदोनित हो ॥०४॥

॥ मोहयाची ही मांशी । उडाली गगणाशी ।
येवुन झोंबली । प्रेम रसाशी ॥
॥ मोहयाची ही मांशी । लुब्धली रसाशी ।
रस आला आंगी । देव राया ॥
॥ चौ-यांशीचा मुद्दा । मिटवावा वायदा ।
आता नाही दुजा । सोयंम् नांदा ॥०७॥

भजने :-

॥ सोयंम् नांद माझे राया । येवुन तारा बाळ गोपाळा ॥
॥ येवुन तारा बाळ गोपाळा । आम्ही लागु हो लागु तुम्हा पाया ॥



॥ ओवी नं. ५६ ॥

॥ कृष्ण अस्तुकी व विनवणीची मुळावरची ओवी ॥

## ॥ माझा भाव असो या नसो ॥

या ओवीच्या काही चरणांचे पलट चरणे खंड०७/ओवी-१४ मध्ये दिलेले आहेत.

॥ माझा भाव असो या नसो । तरी मी तुझा होय म्हणतो ॥०१॥
॥ अंतरी ओळखा हा पिता । अनुसया माझी माता ॥ ०२ ॥
॥ बम्हा विष्णु शंकर बाळ । अवतार निरंजन होय ॥ ३ ॥
॥ निरंजनाचे धरावे पाय । सांगी या अवताराची आहयं ॥ ०४ ॥

भजने :-

॥ बम्हा विष्णु शंकर याहीनं । या देवाची भक्ती केली ।
ते भक्त होय गडे हो । काही नाही याहीच्या हाती ॥
॥ या तिघांना आहे या, निरंजनाचा आधार ।
या लदबद ज्योतीच्या प्रकाशानं । उजाळ्लं याहीचं घरं ॥
॥ सेरूपी शिक्का या समर्थाचा । तारू आला लहान्या-मोठयाचा ॥
॥ कृष्ण देवा । सेरूप दावा डोळा । लवकर याहो ॥
॥ कृष्ण देवा । चैन पडेना जीवा । लवकर याहो ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०५ ॥
॥ ओवी नं. ५७ ॥
॥ विणवणी ची पहुर दांडातील ओवी ॥

## ॥ कळसुत्र तुम्हा हाती ॥

॥ कळसुत्र तुम्हा हाती । तार नरदेही ।
हे अनंत यवग सुखः । तुम्हा पायी ॥ घृ ॥
॥ स्वर्ग मिर्त पाताळ । ताळ तिन ।
पाण्याची नरदेही, तार येवून । मिर्तलोकी सुखः, दयाहो येवुन ॥
॥ धरतरी ही माता । आकाश हा पिता ।
तार बा अनंता । यवगा यवगा ॥
॥ नाम हे तारक । तार या भक्तीचा ।
आधार रूपाचा । चरांचर हो राया ॥

॥ मिर्त लोकी आहे । तरायाचे झाडं ।
नामं हे अवघड । अवद्युताचं ॥
॥ चंदनां च्या परी । झीजवां हा देहं ।
नामी ठेवावं । सदोदित हो राया ॥
॥ निजरूप भुम्मा आहे । हे अनंत यवग, सुखः मजला दयावे ॥
॥ कृष्ण सुखाचा राजा । उभा राहयजो, या गोपाळाच्या काजा ॥

॥ भक्ता आधार निर्वाण । करा दोहीतांच/व्दैताचं निरसन ॥
॥ कार होईन भुम्मेवरी । दोहीताचा संहार करी ॥
॥ द्युता/तुया चरणी वाहे गंगा । दोष पातक जातीन भंगा ॥
॥ तुया चरणां ची धुळं । आहे हा गोपाळ ।
नामी ठेवावं । गोपाळस हो राया ॥

॥ धुनी तुया नामाची । यवगा यवगी सदा, राहो आमच्या मुखी ॥
॥ आदीपुरूषाचं ग्यान । दयाहो, मुखी संजीवनी ।
तारा हो येवुनी । यवगा यवगी ॥
॥ आदीपुरूषाच नवाचं खेळ । दाखव बाळाशी ।
यवगा यवगी राज भैसाच/बळीचं । दाखव डोळयाशी ॥
॥ पृथ्वीचा मालक । राया जगजेठी ।
एकाच नामी, ठेवावं/ठेवन राया । अवघी सृष्टी ॥

॥ करतो विनवणी, चक्रपाणी । भक्ता आधार ।
मोघंम यवग, गेले राया । घ्या तुम्ही अवतार ॥
॥ असच करन होत तुला । का धरलं हाती ? ।
का धरलं हाती । सांगा, यवगाच्या गोष्टी ॥
॥ कोण ठिकाण ? कोण मकाण ? कोण तुमचं गाव ? ।
कोण्या ठायी राहता देवा । सांगा आपलं नावं ॥
॥ मौसाला लावुन हिरं । याहीचं शुन्य उडवावं ।
सदा विनवितो देवा । गोपाळ, नामी ठेवावं ॥

भजने :- ॥ तुया नामा हो तुया नामा । तुही तारशीन आम्हा ।
लवकर याहो जगजीवना । कलयवगी तुयी महीमा ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०५ ॥

॥ ओवी नं. ५८ ॥

॥ कृष्ण ज्ञान व उपदेशाची मुळावरची ओवी ॥

## ॥ तिरगुण ज्ञानी समजा मनी ॥

या ओवी ची पलट ओवी खंड०७/ओवी-२७ मध्ये दिलेली आहे.

॥ तिरगुण ज्ञानी, समजा मनी । धराव तर्क ।
महाराजाचा, हंकार आला । करावं पारखं ॥ घृ ॥
॥ पंचेचाळीस, वर्षे भक्ती । आंधी वनात/आंधीवनां केली ।
आला भैसा खुम्मी । व-हाडी, लावली ध्वजा ॥
॥ पंचेचाळीस, वर्षे सांगी । सांगतली जगा/जना ।
भाव नाही पोटी । दोहीत, मानना कदा ॥
॥ दोहीता मुळे, शरीराशी भंग । सांगतला जगा ।
आपन झाले देव । जनलोक, लागले पाया ॥ ०४ ॥
॥ दोहीता मुळें, देव राया । गेले कैलासा ।
आपन झाले देव । सेवा कोणाची करता ? ॥
॥ व्दैताचे अम्मंल ठाणे । आहे, या नरदेही ।
निशंःकलंकी अवतार । ठाणे उडवनं हेही ॥
॥ व्दैतांचे अम्मंल ठाणे हो । उडतीन सारे ।
इडा-पिडा रोग-विघ्न । जाईन/जळतीन सारे ॥ ०७ ॥

**भजने** :- ॥ या तिरगुणांची पर । झाली आजवर
याहीच शुन्य उडवनं । नाही राहणार जराभर ॥

-: निरसनसह शब्दार्थ/चरणार्थ :-

**तर्क** :- अंदाज, कयास । **आंधी वनात** :- अगोदर जंगलात, आधी राना-वनातील को-या भुम्मेवर, कृष्णाने नागार्जुन च्या घनदाट जंगलात भक्ती केली. त्या नंतर भक्ती करण्यासाठी व-हाडी चिरोडीच्या घनदाट जंगलातील को-या भुम्मेवर अवतरला. । **आंदवन** :- ही महार जातीतील साडेबारा जात पैकी एक जात आहे । **आला भैसा खुम्मी व-हाडी । लावली ध्वजा** :- कृष्णा हा चतुर्पती पंथाचा झेंडा/पाया रोवण्या करीता, चौथ्या खुम्मी अथर्वन् वेद ची गर्जना करण्यासाठी, सानीध्य बहु कारणासाठी.. व-हाडी आला. कसा व कोणत्या मार्गाने कृष्णाने या व-हाडात येवुन चतुर्पती नामाच्या ध्वजा उभारल्या याचे ग्यान कृष्णामृत मधुन घ्यावे. । **दोहीत** :- राक्षसा समान दोन दोन हित जपणारे व्दैत. । **अम्मल ठाणे** :- सत्ता गाजवणारे ठाणे, अमलबजावणी करणारे ठिकाणें.



॥ ओवी नं. ५९ ॥

॥ कृष्ण अस्तुकी मुळावरची ओवी ॥

## ॥ याहीच्या गळा माळ ॥

॥ याहीच्या गळा माळ । राया घाले विठामाय ॥ घृ ॥
॥ आगेकी आघाडी । पिछेकी पिछाडी ।
पिछाडीके आगे । याहीच्या गळा माळ ॥
॥ माटी मृत्तकीके । बनवले साचे ।
ज्याहीच्या हात बनले । त्याहीच्या गळा माळ ॥
॥ घेवुनी धनुष्य । जोडुनीया तिर ।
शेजलीसे परं । याहीच्या गळा माळ ॥
॥ खुब किया तारा । जोडुन पाचही तत्वां ।
घोडा पडु केला । याहीच्या गळा माळ ॥ ०४॥

॥ पिंडी या ब्रम्हांडी । उठला हंकार
चतुर्पता मोक्ष । याहीच्या गळा माळ ॥०५॥

**भजने** :- ॥ वैजावंती घातली माळ । देहे-जीवाचा कराहो संभाळ ॥
॥ पांडव कुंता देवीचे । मालक होय या गादीचे/जम्बुं द्विपाचे ॥
॥ सुवर्णाचा घोडा । जीन का काटयाचा केला ।
मन-पवनाचे चाबुक मारून । घोडा उडवला ॥ मन-पवनान घोडा उडाला ।
धरा धरा म्हणती । जोकोणी घोडा धरण त्याची चुकन चौ-यांशी ॥

-: निरसनसह शब्दार्थ :-

**याहीच्या गळा माळ** :- त्रिगुणांचे ओझे टाकुन पलीकडे पहात शुध्दसत्व धारण करणारे त्रिगुणातीत दृष्टीचे भक्त योगीजन यांची नरदेही जतन होण्यासाठी यांच्या कंठी या कृष्णाने चतुर्पती नाम चितांपेटी ओवली आहे. आणी हा निरंजन कृष्ण ऋषि मस्तक ब्रम्हांडी निर्वाणी बसला आहे. तेथे तोच धडाधडा सोहंम् धुनी जाळतो आहे. तोच या पिंडी या ब्रम्हांडी बसुन सोहंम् अजपा जप जपत आहे.

काहीही न करता फक्त नाक सुत्र दोन वर लक्ष्य/ध्यान केंद्रित करून या ब्रम्हांडी बसलेल्या या एक ऋषि चा फक्त जप ऐकल्यानेच कृष्ण अवधुती योग्यांचा अजपा जप होत आहे. शांत व पवित्र ठिकाणी शांतपणे नाक सुत्राच्या श्वासावर लक्ष्य केंद्रित केल्यावर तुम्हास शास घेतांना 'सों' असा ध्वनी ऐकावयास येवु लागतो तर श्वास सोडतांना 'हंम्' असा ध्वनी ऐकावयास येतो. या ध्वनीवर लक्ष्य केंद्रित केल्यानेच आपोआप 'सोहंम्' चा जप होतो. यालाच अजपा जप म्हणजे जप न करता केलेला जप असे म्हणतात. अश्या अजपा जप करत सत्गुणांच्या अधिक्याने शुध्दसत्व धारण करून त्रिगुणातीत झालेल्या भक्त योगी जन यांहीच्या गळात विठुमाय वैजावंती माळ घालत आहे. याहीच्या गळा माळ, घाले विठुमाय । अधिक ग्यान कायाग्यान खंड ०३ व खंड ०२/ओवी-०१ व ओवी-०२ मधुन घ्यावे.

**माटी मृत्तकी चे बनवले साचे** :- मुर्तिकार किंवा कुंभार जसा माती ला चांगले चाळुन तिला चांगले मुरू घालतो. आणी माती मुरल्यानंतर तिला ठोकुन ठोकुन मुलायम मउ मृत्तिका करतो आणी तिचा ईच्छीत आकाराचा साचा बनवतो, तसा परमात्मा आकारी साचा बनवत राहतो. । **परं** :- पर म्हणजे माया म्हणजेच कल्पना ! म्हणुनच भजन ओवीत म्हटले जाते की : या *मायेच्या/कल्पनेच्या तोडुन पालव्या देहीत नांद माझेया । या कल्पनेची बाधा न लागो राजसा । हरीच्या या दासा, भावीकाशी ।*

**खुब** :- बहुत, पुष्कळ । **तारा** :- देही, जीन, धनुष्यं. या देहीवर म्हणजेच पृथ्वीवर एकच ज्योत नव लाख तारा आहे. या नव लाख पहारेकरी तारा असलेल्या देहीच्या रोमारोमात नाम भिनवुन रोमीद्युत बनुन संपुर्ण देह देवांच्या चरणी वाहील्या हो या कृष्णानं ! **पाच तत्व** :- पृथ्वी आप तेज वायु आकाश या पाच तत्वांना/पांडवांना एकमेकात जोडुन बनवलेली ही पाचतत्वाची देही. । **घोडा** :- आत्मा, तिर

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ ओवी नं. ६० ॥

॥ कृष्ण अस्तुकी ओवी ॥

## ॥ निरशुन्यामध्ये उभा हरी ॥

॥ निरशुन्या मध्ये उभा हरी । तो अवधुत माझा ।
मेरू च्या मंडयानी । अखंड, उभारल्या ध्वजा ॥
॥ मायेत पडलो, प्रपंची गुंतलो । अध्यानी मायेच्या ।
निष्काम भक्ती कदा घडेना । मागतो सिदाई वाचा ॥
॥ शिदाई वाचा, गर्जे शकुन । धुम-धुम्मकारात ।
जपी तपी सन्यांशी थकले । नाही कळला अंत ॥
॥ कैचा वेद कैची माया । कैचा हे तिरगुण ।
निर्गुणाचे ग्यान । उभं केलं मंडयान ॥

॥ निराकार निर्गुण निरंजन । तो आदीगण ।
ग्यान भक्ती वैराग्य सद्‌गुण । हे होय मोक्षाची खुण ॥
॥ जलाधारी धुमधुम्मकारी । गर्जे शकुन ।
ईच्छेपासुन हंस अवतार । शक्ती-मायेचा जाण ॥
॥ जलाधारी अवधुत हंकार । गर्जे शकुन ।
याहीच्या पासुन माया । तिचे पासुन अवघे जन ॥
भजने :- ॥ जलाधारी धुमधुम्मकारी । ज्योत चमकली ।
अहीना घरी उभी राहुन । अवधुत नाम गर्जली ॥



॥ ओवी नं. ६१ ॥

॥ उपदेश-ज्ञानाची जुनी ओवी ॥

## ॥ सब दुनिया से न्यारा ॥

॥ सब दुनीयासे न्यारा । वो नर है बा रे, है बा रे ।
आपरूप मे खडे । वो नर है बा रे, है बा रे । ॥घृ॥
॥ निर्गुणने बनाया त्रिगुण । त्रिगुणसे बहुत, निकले अवगुण ।
आकर सत्‌कृत्यंमे खडे । वो नर है बा रे, बा रे ॥ ०१ ॥
॥ गिता-भागवत पोथी-पुराण । पुराण-कुराण सब कहे सारे ।
आकर चतुर्पती मे खडे ॥ वो नर है बा रे.....
॥ निगुर्ण वाणी सब कही सारी । ज्ञान बताया है भारी ।
आकर आपरूप मे खडे ॥ वो नर है बा रे.....
॥ ओ ओंकार, उसमे हंकार । सहस्त्र मुख पढे ।
आकर अहिन रूप मे खडे ॥०४॥ वो नर है बा रे...
भजने :- ॥ सहस्त्र पढे सहा गेल्यावर । अहिनरूप राहतीन खडे ॥
॥ सहस्त्र पढे दहा गेल्यावर । सोयंम रूप राहतीन खडे ॥



॥ ओवी नं. ६२ ॥

॥ उपदेश-ज्ञानाची जळगाव दांडची जुनी ओवी ॥

## ॥ सुन सुन भाई रे ॥

॥ सुन सुन भाई रे । उनकी कौण बढाई रे ? ॥ घृ ॥
॥ योगी-जोगी सन्यांशी हुये । धर्म निगलकर दुनिया लुभाये ।
आखीर आपही निकल गये । उनकी कौण बढाई रे ? ॥
॥ गुरू होकर शिष्य बनाया । तन-मन-धन अर्पण किया ।
उसके पास कुछ नही रहा । उनकी कौण बढाई रे ? ॥
॥ स्नान तिर्थमे किया । प्यास लगी तो, वही तिर्थ पिया ।
उसका पाप उसके पेटमे गया ॥ उनकी कौण बढाई रे ? ॥
॥ हात-पांव से थक गया । उनकी जीव्हा फलक्या/भडक्या हुयां ।
सहस्त्र दुःख गले लगाया ॥ ०४ ॥ उनकी कौण..
॥ ओही अहंकार उसे दिया । सहस्त्र मुखं बल गया ।
सहस्त्र दुःखं गले लगाया ॥ ०५ ॥ उनकी कौण बढाई रे ?
डहाकी :-
॥ सांगता सांगवत नाही । कितीक सांगु रे बापा । हे जग मानत नाही
पंथ-पंथ पडतील गटं । माझं-माझं म्हणतीन मोठं । मानत नाही..
या आदीपुरूषाची गाही ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. ६३ ॥
॥ नाथांचा उपदेश-ज्ञानाचा मुळावरचा फटका ॥

## ॥ हुऑ गुरूका बच्चा ॥

॥ हुआ गुरूका बच्चा । वो नर कच्चा रे कच्चा ॥ घृ-०१ ॥

॥ दुनिया त्यागकर/तजकर खाक लगाये । जाकर बैठे है बनमें ।
खेतरी मुद्रा दिया आसनको । ध्यान धरते है मनमे ॥
वो नर कच्चा रे कच्चा ॥ घृ ॥
॥ खाक लगाकर जोग लिया । तनका लकडा किया ।
बहते पाणी उपर सोया । वही करके पाया ? ॥ वो कच्चा..
॥ कुंडल तो खुप चढाये । बम्हरंध मे चढे जावे ।
चढता पाणी उपर चढावे । धनकामिना नजरनं आवे ॥
॥ तिर्थ करके उम्र खोयी । जोग कमाया है भारी
जाग जुतें मे सारी ॥ वो नर कच्चा रे कच्या...

॥ शास्त्र मे तो कुछ नही रखा । पुरा ग्यान कमाया ।
भेद-भेद का मार्ग करके । तनका लकडा किया ॥ कच्चा
॥ भगवे कपडे आंगपर चढाये । अपन/खुद बन गये साधु ।
जिस पेटसे पैदा हुआं । उसको कहता है बाबु ॥ वो कच्चा..
॥ गुपित होकर प्रकट हुआं । गोकुल मथुरा काशी ।
प्राणं निकलर सिद् भ्रमे । ओ परलोक के रहीवाशी ॥ कच्चा

॥ वो नर सच्चा रे सच्चा ! है गुरूका बच्चा ॥ घृ-०२॥
॥ कथना कथनी सब छोड दिया । दया शांती है चित्त्मे सच्ची/खरी
आपरूप मे खडा । शकुन बोले वो साचा ॥ सच्चा रे सच्चा,
है गुरूका बच्चा । वो नर सच्चा रे सच्चा

डहाकी :-
॥ कोई मान करे । कोई मुंहपर मारे । सब है उसको प्यारे ।
सब दुनीयासे वो न्यारे ॥ वो नर सच्चा रे सच्चा...

भजने :-
॥ सब दुनियासे न्यारा । वो है हमारा तारणवाला ॥
॥ चतुर्पती मे खडा । वो है हमारा पालनवाला ॥
॥ अलख रूप मे खडा । वो है हमारा पालनवाला ॥
॥ सिध्द साधक गुरू चेला । येईना मनी ।
देही तारू एकच जाण । अनामत धनी ॥

गजर :-
॥ माझे या मनात भासते मला । जसा पुनवेचा चंद्रमा ।
माझ दर्शन घडले मला । धन्य तु नारायणा ।
स्वरूप दर्शन घडले मला । धन्य तु नारायणा ॥

-: शब्दार्थ :-

तजकर :- त्रासुन, दुंनियाच्या जाचाला त्रासुन दुनियाचा त्याग करने, ।
त्यागकर :- दुनियेला त्रासुन दुनिया सोडुन जाणे. प्रापंचिक दुनियेचा त्याग करने. ।
सिद् :- ताठर योगी, हटयोगी । सिध्द :- मुळजात सिध्द असलेला आत्माराम ।
भ्रमे :- भ्रमण करने, फे-यात फिरणे । जुतें :- पायातील जोडे

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. ६४ ॥
॥ कृष्ण ज्ञानाची ओवी ॥

## ॥ यवगाचं साहय कराले । आले भैसराज ॥

॥ यवगाचं साहय कराले । आले भैस राज ।
तिरकुटांवर, कचुन कमान । साहयं करन बिर्दाचं ॥ घृ ॥
॥ प्रकाश किरण, प्रभा दिसे । पहा भैसाचं निशाणं ।
बिरदावर, साहय कराले । नाही लागणार खिणं ॥
॥ बत्तीस लक्ष, गम केली । पहा या रायानं ।
अगाध आहे, कृष्ण-धनी । बिरदावर येईन धावुनं ॥
॥ अजात आदीभैस, येईन येथ । कोणा नाही कळनं ।
जन भुलले, अभिमानात । काहीनां उमजनं ॥ ०४ ॥

॥ सत् यवगी, येईन भैस । धनी आप रूप ।
चरण चारीया, होय बोलन । नाम, चतुर्पतीच खरं ॥
॥ खरं या नामाला झाका । म्हणतीन दोहीत धर्मि ।
या दोहीतां ची, भरती मोठी । माया कपटी ॥
॥ मायेची कपटी, छाया आहे । भावीक भक्त भुलवतं ।
सच्चे भक्त, राहीले मजबुत । हद्‌यी, साठवला अवधुत ॥
॥ मानवा च्या, देही वर । भैसाचा, आहे शिक्का ।
भैसाचा शिक्का असुनही । नाही काहो म्हणता ?
शिक्का असुनही, नाही म्हणता । कसे तुम्ही पंडीता ? ॥०८॥
॥ सहा शास्त्रं, अठरा पुराण । खिणात, उडवनं या ठिकाणी ।
एकच होईन, ज्वारी तेव्हा । करन सावंगपुरी वारी ॥ ०९ ॥

**भजने** :-
॥ सावंग पुरी वारी तुम्ही । अवघें जन करानां ।
यवगाच्या सांगे खुणा । ईश्वर-पुनां ॥

-: निरसनसह शब्दार्थ :-

एकच ज्वारी :- चौकोणी मेघनिळ च्या वर्षावाव्दारे चतुर्पती नामाचे एकच पिक, हा एकच चतुर्पती पंथाचा दांड फोडन पाखंड या तिरगुणींचा । असे विठ्ठलाने पंढरपुरात कृष्णास सांगी केल्यानंतर कृष्णा सावंग्यात अवतिर्ण होवुन, चतुर्पती पंथाचा कृष्णाने येथे पुनःश्य नव्याने पाया रोवला. अधिक ग्यानासाठी कृष्णांमृत वाचा.

मानवा च्या देही वर । भैसाचा, आहे शिक्का । भैसाचा शिक्का असुनही । नाही काहो म्हणता ? कसे तुम्ही पंडीता ?

ब्रम्हाचा रजगुणांचा शिक्का, विष्णुचा सत्वगुणांचा शिक्का तर शंकराचा तमगुणांचा शिक्का हे तिन राजा चे तिन शिक्के या देहीवर असुन, चौथ्या भैसाचा शुध्द सत्व गुणांचा शिक्का या देहीवर आहे. ब्रम्हा विष्ण शिवशंकर आणी चौथा आदीमुनी अवतार ! यांचे रज सत् तम आणी चौथा शुध्द सत्व हे चार शिक्के या देहीवर आहे. या चार शिक्के ज्याने ताब्यात घेवुन आपल्या अक्त्यारीत ठेवलेले आहे, त्या भैसाचे रूपरूपाचे पुढे राज्य होईन. या भैसाचे पुढे राज्य आणण्याकरीता प्रथम या देहीवरचे तिरगुणांचे तिन शिक्के हटवावे लागेल. ही देही तिरगुणी न ठेवता, या तिरगुणांचे ओझे टाकुन पलीकडे पाहत, सत् च्या अधिक्याने या शुध्द सत्व भैसाची भक्ती करत राहावे लागेल. तेव्हा कुठे तिरकुटांचे तिन ठाणे तो उडवुन तो आदीपुरूष भैस होईन राजा या देहीचा ।

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. ६७ ॥
॥ कृष्ण ज्ञानाची मुळ ओवी -जळगाव दांड ॥

## ॥ सत्य जाणा भंग सुटन देवांगणा ॥

॥ सत्य जाणा । भंग सुटन/सुटला देवांगणा ॥ घृ ॥
॥ तिरकुटांच्या गादया तीन । जागी आहे चौथा खुम्म ।
उभा राहीन चौथा खुम्म ॥ सत्य जाणा...
॥ तीन यवग तिरकुटा संग । मोहिले मन झाले दंग ।
हाती नाही आला हो रंग ॥ सत्य जाणा...
॥ तिरकुटांच करता काय ? आदीपुरूषाचे धरावं पाय ।
तिरकुट ख्याल भरला आहे ॥ सत्य जाणा...
॥ पंचेचाळीसी चा चाळ । त्याहीला गिण्यानं/गुण अतांपार ।
खाल्या करतीन पाहजा पुढं ॥ सत्य जाणा...

॥ आउक यवग ज्याच्या घरी । तो नाही पडनं विचारी ।
विचार करतीन तीनही ताळी ॥०४॥ सत्य जाणा...
॥ आदीपुरूष करन कार । तिरकुट पाताळी घालनं ।
चवही नामी एकच मनं ॥ सत्य जाणा...
॥ आदीपुरूष भैस अवतार । नित्य रूप नामाचार ।
हा नाही ठेवणार कुणाची उरं ॥ ०७ ॥ सत्य जाणा...

भजने :- ॥ सत्य सगुणा च्या ठायी । देव उभे लवलाही ॥
॥ सत्य जाणाना तुम्ही । मालक उभा देव यवगाचा धनी ॥
॥ सत्य जाणाना तुम्ही । मालक उभा कृष्ण अवद्युत धनी ॥

-: निरसनसह शब्दार्थ :-




तिरकुटाच्या तिन गादया :- त्रिकुटी असलेल्या ब्रम्हा विष्णु महेष या तिन देवाच्या तिन गुणांची बिछायत / गादया असलेले ठाणे । ख्याल :- स्वप्नाप्रमाणे मायावी. स्वप्न ज्याप्रमाणे झोपेत निजरूपी खरे वाटते. पण जागी झाल्यावर कळते की : ते खरे नसुन स्वप्न आहे, त्याप्रमाणे हे तिरकुटी देवतांचे तिनगुणी ग्यान या देही निजरूपात असल्यामुळे या देहीला खरे वाटत आहे. परंतु ही देही चौथ्या च्या चतुर्पती ग्यानाव्दारे जागी झाल्यानंतर त्याला कळते की : वेद पुराण तिरगुणी ज्ञान हे माया सारी ! चौथ्या खुम्मी चतुर्पती आपरूप मे खडी. । खाल्या :- रिकाम्या, रिक्त । आउक यवग.. :- आपरूप सांगी करणारे भैसाचे यवग. ज्याच्या देहघरी हे आउक यवग प्रकटले, त्याला ॥ *सांगते निराकार* परमात्मा, *ऐकते निर्गुण* आत्मा ॥ ही अवस्था प्राप्त होते. आउक यवगाच्या या अवस्था प्राप्तीमुळे, तो नाही विचारणास कोणास ग्यान !. कारण की : तो निराकार भैस त्या आउक यवग प्रकट झालेल्या देहीला पाहीजे असलेले ग्यान ची सांगी/आवुक, त्या देहघरी आपरूप करत असतो. बाकी जग मग विचार करेल की : या देहीला कुठेही न जाता, कोणत्याही गुरूजवळ न जाता घरबसल्या आपरूप ग्यान कुठुन प्राप्त झाले ? त्या आउक यवग प्रकटलेल्या देहीला विचारणा केल्यास ती देही म्हणेल की : *ओळखा तुम्ही..! माझा गरूदेव आदीमुनी...!*

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. ६६ ॥
॥ कृष्ण ज्ञानाची जुनी ओवी ॥

# ॥ तिरकुटांवर करून चढाई ॥

॥ तिरकुटांवर करून चढाई । राया भैसानं ।
राज्य हस्तगत करून । दप्तरी, बसले कारकुन ॥ धृ ॥
॥ यवगाची हिशोब गणीता । केली कृष्णाजीनं ।
पाप-पुण्यांची केली गणीता । हाती कलम घेवुनं ॥
॥ पुण्यं थोडे पाप मोठे । पाहतीन तोलुन ।
राई ईतके पुण्यं भरले । पापाशी नाही वाणं ॥
॥ तोल करून शिणले कारकुन । ढिग पर्वता समान ।
काही नाही लागत हिशोब । जास्त पाप शिल्लक ॥०४॥
॥ दोहीत कपटांचे खडे भुम्मे वरून । काढा निवडुनं ।
चौफेर छाया भुम्मेवर । करा हो परिपुर्ण ॥
॥ धरणी मोडली माया थरारली । मेरूच मंडयानं ।
इथं भुम्मेवर फार । पहा, बम्हांड उघडुनं ॥
॥ जिकडे तिकडे चिंता । स्वर्गिचं अंबर करन ध्यानं ।
इश्वर नामाची सत्ता । सुमरन, करते देवांगण ॥
॥ धाव म्हणुन आदी भैसाले । हाका मारतीनं ।
नव्या यवगाचा कार करा । सत् यवग स्थापुनं ॥०८॥
॥ नव्या यवगाचा कार करा । कळसुत्र तुमच्या स्वाधीनं ।
तिथ नाही चालत सत्ता । भुम्मेचा काळ कठीनं ॥
॥ ब्रम्हा विष्णु शंकर आदी । अवतार दहा जनं ।
ऋषि-मुनी तेही तरले । आदीपुरूषाच्या नामानं ॥
॥ अनामताची, अगाध भक्ती । केली कृष्णाजीनं ।
या वंशी निशंःकलंकी । कृष्णाला, दिले वचनं ॥
॥ अनामताची अपार भक्ती । केली अनामीकानं/कृष्णाजीनं ।
अनामीकाला/कृष्णाला सोळा सहस्त्र । दिले वचनं ॥ १२ ॥
॥ सहा शास्त्र चारवेद अठरा । पुराणं गाही देतीन ।
सावंग्याचं राज्य याहीनं । केले कथनं ॥
॥ भुत भविष्य वर्तमान याहीचं, केलं वर्णनं ।
आदीपुरूषाचं गिण्यानं नाहीकळलं । थकले देवांगण ॥
॥ उभे स्वर्गिचे द्युत । आदी, भैसाची फलटनं ।
पण च्या नउ/९७च्या ला होईन । देहे-जीवाचे लग्नं ॥
॥ देहे-जीवाचं लग्न राया । आनंद तिरभवनं ।
पुष्प वर्षाव, घोष नामाचा । करते देवांगण ॥१६॥
॥ सव्वा महीने सुमरण केलं । ध्यानस्थ बसुनं ।
सावंग नगरी झेंडे लावले । मागे-पुढे भगवानं ॥
॥ सव्वा महीने सुमरन केलं । मिळाला संगम ।
घोर अरण्य, रात्र अंधारी । प्रकाशला किरणं ॥
॥ सप्त कोषाचे गमन मागे । चाले भक्त गणं ।
आडवा आला डोंगर । देव, पुढे गेला चढुनं ॥
॥ ज्ञान चक्षुने, शोधुन पाहयं । जरा डोळा उघडुनं ।
चवखुम्मा वर कृष्णाजीचं आहे । भंडार भरूनं ॥२०॥

॥ दया सागरी बोले कृष्णाजी । या भावीक जना ।
कनवाळानं करा भक्ती । टळनं धोका ॥
॥ कनवाळानं करा विनवणी । नामी सांगतला आधार ।
आकाश वाणी तारण बापा । तो सारंगधर ॥
॥ एकी करा भक्त जन । काहीतरी, धरा हो ध्यानं ।
यवगावर सावध होवुन । मोडन, चौ-यांशी बंधनं ॥२३॥

भजने :- ॥ निरशुन्याहुन विहीर खोदली । सावध होवुन, सावध पाहयीं ।
सावंग पुरी पाय लावले । सावध ज्योत रायाची ॥
॥ निरशुन्याहुन आले अवद्युत । मिर्त लोकातं ।
सावंग पुरी दुकान लावलं । नामाची पेढं ॥
॥ तुझे नामी हो तुझे नामी । उडया घातल्या आम्ही । तुझे नामी हो..॥

-: निरसनसह शब्दार्थ :-

**दप्तरी** :- कार्यालयात । **कलम** :- लेखनी, पेन । **वाणं** :- काहीच कमी नसने, कमतरता नसने, देणं, भेटी । **खडे** :- दगडाचे अत्यंत लहान लहान तुकडे. उदा. धान्यातील खडे । **गाही** : साक्ष पुरावा । **फलटन** :- सैन्यांच्या तुकडया, फलटनी । **सप्तकोष** :- देहीच्या आत्म्यावर पांघरलेले सप्तकोष जसे

१. अन्नमयकोष-जडदेह :- पंचभुते, पंचविषय यांचा संपर्क जडदेहाव्दारे होतो.

२. प्राणमयकोष-प्राणदेह :- प्रांणमयदेह व अन्नमय देह हे जिवंतपणी एक झालेले असतात. जोपर्यत जडदेहात आत्मा आहे, तोपर्यत त्याची छाया या देहीवर पडुन ही छायाच प्राण बनुन राहते. जडदेहाचा चलन-वलन करणारा कोष म्हणजे हा प्राणमयकोष ! हा प्राणमय कोषच प्राण अपान समान उदान आणी व्यान या पंचप्राणात विभागल्या जावुन, हे पंचप्राण या प्राणांचा प्रवाह वाहत ठेवतात. या प्राणमय कोषाचे गाठोडे जसे जसे विरल होते, तसे तसे ईतर कोष कार्यरत होतात.

३. वासनामयकोष :- वासनादेह : या कोषात सुप्तपणे वासना दडलेल्या असतात. जेव्हा या सुप्त वासना बाहेर येतात, तेव्हा त्या उत्पात घडवतात.

४. मनोमयकोष :- मनोदेह : हे मनाच्या उर्मिच्या उगम स्थान होय. या कोषात उर्मि उत्पन्न होताच वासना तिव्र व बलवान होतात. आणी वासनामय कोषाला बळ मिळते. सद्वासना सुप्तस्थितीत मनोमय देहात राहतात. पंचज्ञानेंद्रिये व मन मिळुन हा मनोमय कोष बनलेला असतो.

५. ज्ञानमयकोष :- ज्ञानदेह, कारणदेह : जेव्हा वासना व उर्मि याचा नाश होवुन वासनामय व मनोमय देह झडतो, तेव्हा कुठे उरतो तो ज्ञानमय देह ! बुध्दि, अंह, सद्विचार व उक्रांतीच्या ईच्छा या ज्ञानमयदेहात उरलेल्या असतात. सुक्ष्मज्ञान व जाणीव याचा उगम या कोषापर्यत पोहचलेला असतो. या व्दारे सिध्दांना दिव्यज्ञान व दिव्य दृष्टि प्राप्त होते. या ज्ञानमयकोषातील सत्बुध्दि व अहंव्दारे आत्म्यावर परमात्माबध्दलचे संस्कारी ज्ञान कोरले जाते. आणी त्या ज्ञानानुरूप बुध्दि चे विचारचक्र फिरू लागतात. ही विचारचक्रे मग तो विचार आपल्या संस्कारानुरूप सुखानंदप्राप्ती व सत्विचार बुध्दित दृढ करतात. ही दृढता त्यांच्यात सत्विचारानुरूप कार्य करण्याची जाणीव उत्पन्न करून त्याला प्रेरित करते. ही जाणीव पुढे त्याला दिव्यदृष्टी प्राप्त करून देते. आणी या दिव्यदृष्टी व्दारे पुढे मग तो दिव्यज्ञान प्राप्त करतो.

६. विज्ञानमयकोष :- विज्ञानदेह : विशेष ग्यान असलेला देह. या देहीचे हे विषेश ग्यान म्हणजे आत्मप्रकाशन करणारे निरंजन निश्कलंकी आत्मज्ञान होय.हे निरंजन ग्यान म्हणजे मोक्षाची पहाट समजावी. परमात्माबद्दलचे विषेश ग्यान गुणरूप सह अहं आणी बुध्दि आपरूप प्राप्त करत विज्ञानमय कोष बनत जात असते. जीव-शिवाचे ऐक्य होण्याचा संधिकाळाची वेळ म्हणजे विज्ञानमय देह समजावी.

७. आनंदमयकोष :- विज्ञानमय कोषातील मी-पणा आणी अहं बुध्दि चा नाश/नष्ट होवुन अहं संपुन केवळ आनंद या कोषात शिल्लक असतो. म्हणुन याला आत्म्याचा आनंदमय कोष असे म्हणतात.

सप्तकोषाबध्दलचे अधिक ग्यानाकरीता कायाखंड०३/ओवी-०६:-पंचभुताचा पसारा यातील चरणे *// स्थुल-सुक्ष्म कारण । चवथा देह महाकारणं । पाचवां कैवल्य जाणतो कोण ? बोल दुसरा...//०३/०६ // मनोमय प्राण विज्ञान । होय सुक्ष्म देहीचे । याशी कोण जाणते ? बोल दुसरा...//* हे नरा या चरणाचे निरसन वाचावे.




डोंगर :- कोपलेल्या मानवांव्दारे उभे झालेले भौतिक व मानसिक दुःखाचे डोंगर. पर्वत, देहीतील त्रिकुटी तिरगुणी राजांचे तिन पर्वत चढुन या पर्वताच्या पल्याड वर असलेल्या चौथ्या निराकार भैसराजा पर्यत जाणे, हा ॥ रस्ता आहे कठिन ।
कठा कठा रे बापा हरीच्या नामानं ॥

॥ करवटी घाट येंगला । त्रिकुटी पर्वतावरत चढुन गेला ॥
॥ त्रिकुटी तिन पर्वत कठीन । चढले हो रायानं ।
ज्योतीचं ठिकाण पाहील । शिखरा वर जावुन ॥
॥ शिखरा वर गेला । सुर्यप्रभासम/चंद्रज्योतीसम प्रकाश लाभला त्याला ॥
॥ ज्योतीनं ज्योत उजेड । पडला/भरला देहीत ।
उजळले रूप हे सुर्याच्या तेजात । जैशे रूप हे सुर्याचे तेज ॥
॥ महाराजाचे/साहेबाचे चतुर्पती निरंजन गिण्यान झाले । तिन्ही ताळ वर ।
ब्रम्हा विष्णु शंकर उडुन गेले अंतराळ ॥
॥ ब्रम्हा भुलला, विष्णु भुलला । भुलला शंकराचे घर ।
सावंग पुरी उभा राहीला । पहा सारंग धर ॥
॥ निरशुन्याहुन आले भगवंत । मिर्त लोकात ।
सावंगपुरी अवतार धरला । अहिनाच्या इथ ॥
॥ तिरगुणाच्या पलीकडे । ठाउक नव्हतं नाव-गावं ।
त्वां पढवले हे गोपाळ । अवधुत राव ॥
वरिल चरणांचे अधिक ग्यान कायाखंड-०३ च्या ओवींमधुन घ्यावे.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ ओवी नं. ६७ ॥

॥ कृष्ण ज्ञानाची जुनी ओवी ॥

## ॥ नव्या यवगाची रंचना करन ॥

॥ नव्या यवगाची रंचना करन । देव आपल्या हातानं ।
निशंःकलंकी नातं दर्शनी । चुकतीन मरणं ॥ घृ ॥
॥ अगाध लिला भैस रायाची । अहिनाघरी आली चालुनं ।
कृष्णाजीच्या मुखी देल्ली । रत्नाची खाणं ॥
॥ कृष्णा मुखचे अनमोल रत्न । बाहेर निघतीनं ।
सच्चे भक्त, अनामीकाचे/कृष्णाचे बोल । पदरी झेलतीनं ॥
॥ या रत्नांची पारख नाही । झाली कोणाले ।
चार वेद सहा शास्त्रं । अठरा पुराणं थकले ॥ ०४ ॥
॥ चतुर्पतीचं गुंज नाही । कळलं कोणाले ।
चार यवग ब्रम्हा विष्णु, शंकर थकले ॥
॥ सहस्त्र मुखी शेष थकला । थकलं देवांगण ।
ऋषि-मुनी जपी-तपीं थकले । गुंज नाही कळलं ॥
॥ जो कोणी, सत्य मिळवण । त्याचा वंश परांपर ।
अजरा अमर होईन किर्ति । देवा भक्ताच रूपांतर ।
॥ कर्ता-करविता काही नाही । तो साक्षी जाणा ।
माझे भक्तजन माझ्या नामी । मी त्याहीच्या अध्याना ॥०८॥
॥ माझे भक्तजन, माझ्या नामी । मी त्याहीचा चाकरं ।
त्याहीच्या चौ-यांशीची चिंता । माझ्या अखत्यारं ॥
॥ सत्य भक्तांचा, झाडीन दरबार । होईन त्याहीचा पांडेवार ।
करन-धरनं माझ्या अखत्यारी । करतो सर्व कारभार ॥

॥ सत्य भक्तजन भाव भक्ती । करन अर्पणं ।
त्याहीच्या संसाराची चिंता । माझ्या स्वाधीनं ॥
॥ सारेच म्हणते भक्ती देवाची । करतो परंपार ।
शुध्द भाव नाही अंतरी । आड घालता संसार ॥ १२ ॥
॥ संसार सारा तुम्हा हाती । मग माझ्याशी काय काम ?
संकट समयी, का देता हाका ? धावा देवा म्हणुनं ॥
॥ तुम्हीच करता तुम्हीच भरता । जन्मता-मरता तुम्ही ।
उगीच मला हाका मारता । सांगा कोण्या कामी ? ॥
॥ माया दृष्ट वासना धरून । आहे इच्छेच्या संग ।
अंतरी काहो इच्छा धरून । जाता वासनेच्या मागं ? ॥
॥ वासने पोटी पुर्नःजन्म होणार । ठेवलं सांगुनं ।
जशी ज्याची वासना तैसं । करन भैस नारायण ॥ १६ ॥
॥ जशी ज्याची वासना । तशी, होईन गती ।
फिरून चौ-यांशी वेढें । होईन, नरकाची प्राप्ती ॥
॥ जशी ज्याची करणी । तैसं, फळं मिळणारं ।
दुत काळाचे ओढुन नेतीन । यम राया समोर ॥
॥ अग्नी खांबाशी बांधुन ओढंन । तलवारीची धारं ।
पळुन जाता रिघ नाही । अग्नी स्थळावरं ॥
॥ ओहंम् सोहंम् कळेना त्याला, कसा परमार्थ ? ।
जेजे दिसे त्याच्या दृष्टीनं । सर्व जाणार व्यर्थ ॥ २० ॥
॥ जशी ज्याची करणी तैसं । फळ मिळणारं ।
सत् कृतीचा ठेवा उजाला । चतुर्पती येणारं ॥
॥ जशी ज्याची करणी तैसं । फळ मिळणारं ।
मिर्त लोकी अजन्म त्याशी । नाही चौ-यांशी बिगारं ॥
॥ ओहंम् स्वरूपी मर्द तनुचे । करे हरन ।
अविनाशी कृष्ण अवद्युताचे । गर्जे निशाणं ॥
॥ आदीपुरुष प्रकाशमय । तो आहे जंगमं ।
पंचभुतांचा सर्व खेळ । याहीच्या पासुनं ॥ २४ ॥
॥ प्रथम नसे जीव । शिव, येईन कोठुनं ?
प्रथम नसे जन्म । त्याला, मरण कोठुन ? ॥
॥ जल-तत्वांचे कणा-कणानं । वाळु नेतीन उचलुनं ।
एका पुढे एक धावते । होते वर्जनं ॥
॥ काष्ठं जाळुन होतो उजाला । अग्नी जैसा ।
कोळसा होवुन परिस उरतो । आपण होतो नाहीसा ॥
॥ नाम गर्जना चमके बिजली । अग्नी प्रमाणं ।
आहे म्हणता का नाही ? ऐसे माझं लक्षणं ॥ २८ ॥
॥ माया ब्रम्ह एकच रूप । भैस नारायणं ।
शुध्द भाव धरून । चरणी, घाला लोटांगण ॥ २९ ॥

**भजने :-**

॥ भाव धरा भक्ती करा । भावीकासाठी हो देव भावीक झाला ॥
॥ भाव अनामीकानं धरला । देव वचनात अखंड गोयला ॥

**-: शब्दार्थ :-**

वर्जन :- घर्षण । काष्ठे :- लाकडे । परिस :- आत्मा । जंगम :- स्थिर
तन :- देह ।

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०५ ॥
॥ ओवी नं. ६८ ॥
॥ कृष्ण ज्ञानाची जुनी ओवी ॥

## ॥ निरशुन्यामध्ये चतुर्पतीचे झळके निशाण ॥

॥ निरशुन्या मध्ये, चतुर्पतिचे । झळके निशाण ।
पंचम शुन्य, अवद्युत मुर्ति । समर्थ श्रीकृष्ण ॥
॥ श्याम कर्ण लभेद राजा । उभ भगवं निशाणं ।
सोहंम् ज्योतीचा प्रकाश दिसे । सर्वत्र, सुर्य नारायण ॥
॥ सोहंम् ज्योतीचा प्रकाशं तोडन । चौ-यांशी बंधन ।
तिर्थ पदावर उभे निरंजन । निराकार निर्वाण ॥
॥ अवधुत अनामत, उभें पदावर । निशंःकलंकी कृष्ण ।
आदी भैसाची छाया भक्ताला । देईन आलींगण ॥०४॥

॥ लभेद छाया लभेदं माया । लभेद तारांगण ।
लभेद ईश्वर लभेदं भक्त । लभेद मेरू मैदान ॥
॥ लभेद राजा, लभेदं प्रजा । लभेद श्यामकर्ण ।
लभेद राजा भैसंराज । मुळ, यवगाचे गुण ॥
॥ आदीपुरूष, लभेदं राजा । उभा, पुर्ण अवतार ।
भेद दोहीतांचे, जाळें जगाचे । तोडन सर्व बंधन ॥
॥ तिरगुणांचे, कपटीं फासे । जगात आहे मांडुनं ।
भयंकर पाप झालं भुम्मेवर । नाचे भुतांगण ॥ ०८ ॥

॥ या जीवांची होईनं दशा । गुंडाळन मन ।
मग याहीला कोणं सोडवणार ? देव पदावर जावुन ॥
॥ अनंत यवगी अवद्युत धनी । उभा, समर्थ श्रीकृष्ण ।
अनाडी कवी राजां इश्वर । गुरूलींग जाणं ॥
॥ सत्रावीचा देह असन त्याचा । करा मान ।
चौथा शिक्का उभा देहीवर । या भैसाचं देणं ॥ ११ ॥

भजने :-
॥ चौथा शिक्का उभा देहीवर । होय या भैसाचा ।
शिक्का असुन, नाही काहो म्हणता? कसे तुम्ही पंडीता? ॥
॥ आथर्वन वेद चतुर्पता गाय । उभी केली समर्थांनं ।
सावंग पुरी झेंडे उभे । सर्वत्र, भगवं निशाणं ॥
॥ अनामत-भक्ताची गाही उभी । आहे हो इथं ।
याहीच्या नामानं तरले भेलुंड । बहु यवगातं ॥
॥ नाम संजीवनी चे आहे बीज । ओहंम्-सोहंम् ।
ओहंम्-सोहंम् कृष्ण-अवद्युत । उजळानां नामं ॥

गजर :-
॥ ओहंम्-सोहंम् कृष्ण अवद्युत । ओहंम्-सोहंम् कृष्ण अवद्युत ।
कृष्ण अवद्युत कृष्ण अवद्युत । कृष्ण अवद्युत कृष्ण अवद्युत ॥
ओहंम्-सोहंम् कृष्ण अवद्युत.....॥

-: शब्दार्थ :-

**लभेद** :- निर्मळ, निश्कलंकी, शंक । **अभेष** :- ज्याला भेष/वेष नाही असा जो तो निराकार । **गाही** :- साक्ष पुरावा ।

पुढील पानावर..

-: भजन चरणे :-

॥ भजनात जर लष्टाण खेळत असेल तर हमखास म्हणण्यात येणारा भजनांचा चरणपाठां... ॥

॥ दणाना भैसाचा उठला । अग्नी खांब कराडला ॥
॥ देव व्दारी उभा झाला । हिरण्य कश्य नखी फाडला ॥
॥ हिरण्यकश्य नखी फाडला । आपला बाळ देवानं पदरी घेतला ॥
॥ उतर देवा प्रल्हादा सारखा । तसाच धावत ये बापा कृष्ण अवधुता ॥
॥ इंद्राने केला पणं । कृष्णा वर ।
यान गोवर्धन तारला । नखा वरं ॥
॥ गोवर्धन नखी धरला । या इंद्राचा पणं यानं खाल्या केला ॥
॥ सांगा भैसाहुन जगात मोठं । आहे तरी कोण ?
इंद्रा सारखे देव करते । आधी भैसाला नमनं ॥
॥ आदी भैस अभेष माया । मिटवनं व्दैत भुतांचा ।
सावंग नगरी अखंड जयघोष । होईन नामाचां ॥
॥ हाल-हाल करून भुताचा । वंश मिटवनं ।
प्रथम उभा राहुन भैस । मारणं सैतानं ॥
॥ कोण देव कोण दानव । ठाउक या भैसाले ।
व्दैता सारखे वागता गडेहो । नावं घेता देवाचें ॥१६॥
॥ व्दैत भाव विपरीत मती । नाश हो तत्वालां ।
सत्य बोला सत्य चाला । धनी, तारण अवघ्याला ॥
॥ कोण ठिकाण ? कोण मकाण ? कोण तुमचं गावं ?
कोण्या ठायी राहता तुम्ही ? काय तुमचं नावं ? ॥
॥ देव दरबारी मुका बसला । आहे का इथं ?।
मुखीं नाम घेतां अवद्युत । घेईन पदरातं ॥
॥ अवधुत नाम, आहे गा दादा । गोड साखंर ।
साखर असुन गुळ भक्षिता । केवढा हा अंधःकारं ॥

॥ दरबार देवाचां होय । निळावंतीचा येथे न्याय आहे ॥
॥ दरबार देवाचा होय । ख-या खोटयाचा येथे न्याय आहे ॥
॥ दरबार द्युतांचा होय । वर पंजा आदीपुरूषाचा/कृष्णाचा आहे ॥

॥ देवाच्या नामाची गोडी । देवाच्या गलपाला दोरी बांधली ॥
॥ आकाशवाणीचा दोरा हाती । राखन आहे देवराया श्रीहरी ॥
॥ देवाच्या नामाची तलवार । ईचा कोणी ना धरे हात ॥
॥ भाल्या वरत भाले रंचले । हे होय खेत्रीयाची शाळा ।
हे होय खेत्रीयाची शाळा । येथे खेळे कृष्ण राया ॥
॥ दादा होय का बाई होय ? आपलं नाव सांगत का नाही ॥
॥ नको करू नामाची चोरी । बांधल्या जाशीन देव दरबारी ॥
॥ भिक्या-भिक्या म्हणून हाका मारशी ।
भिक्या बांधला कृष्णानं खांबाशी ॥
॥ भिक्या बांधला खांबाशी । त्याची घेतली, कृष्णानं दाढी-मिशी ॥
॥ मुजोरी केली हो भिक्यानं । त्याची फजीती, केली कृष्णरायानं ॥
॥ किसनजी रखे/रखो बिरदकी बाणी ।
करे/करो रोग विघ्नोका पाणी ॥
॥ आमचा देव लाल लाल । व्दैत-भुतांची तो काढतो साल ॥
॥ हे होय देवाचे लाल । आपल्या मुखांन चांगला बोल ॥
॥ उभा आहे माझा हा देव । आता नाही कोणाचं भेव ॥
॥ उभा आहे माझा सखा । आता नाही या देहीला धोका ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. ६९ ॥
॥ कृष्ण चरित्र ज्ञानाची मुळ ओवी ॥

## ॥ पाहता पाहता नवलं झाले ॥

॥ पाहता पाहता नवलं झाल । अस एक भारी ।
भक्ता घरी शकुनं आला । बिजली च्या परी ॥ धृ ॥
॥ पुरवा अवद्युताचा । हार, गुंफला शकुनाचा ।
तिरलोक्या मध्ये, वेल वाढवला । अवधुत नामाचा ॥
॥ जगात अडानी, आत्म ज्ञानी । मुखी अमृत वाणी ।
तारक नाम, सांगे जगा । कनवळा मनी ॥
॥ ग्यान भक्ती वैराग्य । प्राप्त, अखंड समाधी ।
प्रेम रस ग्यान भक्ती । साधली नव निधी ॥०४॥
॥ कुठवर वाहु, पान फुलं ? कुठवरं वाहु कापुरं ?
कुठवर वाहु, काय ? अवघच, पडते अपुरं ॥
॥ मन मोग-याच्या, कळ्या उगवल्या । सुगंध फारं ।
सोहंम् ज्योत प्रकाशली । अवघा दुबळा संसारं ॥
॥ नाही सोडलं, घरदारं । आणीक, प्रपंच व्यवहारं ।
कोण ठिकाणं ? कोण मकाण ? एकांती कारं ॥
॥ आधी एकांती, मग लोकांती । सांगे विचारं ।
कोणी निंदती, कोणी वंदती । योगी बेजारं ॥ ०८ ॥
॥ कोण निंदती, कोण वंदती । हे नाही ठावं ।
आधी केली भक्ती । मग, झाले देवं ॥ ०९ ॥

**भजने**:-॥ भक्ती एकानं/कृष्णानं केली । लहान्या-मोठयांच्या कामी आली ।
॥ भक्ती केली रायानं । घरामध्ये, घातलं चैतन्यं ।
अशीच भक्ती करा देहजीव । तरतीलं नामानं ॥
॥ देव भक्ती-भावानं बांधला । आंगी हरी हो राबविला ॥

-: निरसनसह शब्दार्थ :-

**पुरवा** :- पुरवठा, स्त्रोत, झरा । **बिजली** :- अकस्मात पडणारा प्रकाश, आकाशातील चमकणारी विज, ।
**नवनिधा भक्ती** :- भक्ती करण्याचे ९ प्रकार आहेत. ते असे :
०१. श्रवण भक्ती :- भजन किर्तन सत्संग प्रवचन ईत्यादि कानाने ऐकुन उत्पन्न होणा-या भक्तीभाव व्दारे केलेली भक्ती
०२. किर्तन भक्ती :- नाम संकिर्तन व्दारे भक्ती करने.
*उदाहरणार्थ :- नारद, हनुमंता यांनी किर्तन करत भक्ती केली.*
०३. स्मरण भक्ती:- प्रल्हाद, गजेंन्द्र यांनी परमात्म्याची स्मरण करत भक्ती केली.
०४. पादसेवन भक्ती :- चरणाची सेवा करत भक्ती करने.
*उदाहरणार्थ :- लक्ष्मी ही विष्णुचे चरण सेवा करत विष्णुभक्ती करते म्हणजेच पादसेवन भक्ती करते.*
०५. अर्चन भक्ती :- पुजा अर्चनाव्दारे करण्यात येणारी भक्ती
०६. वंदन भक्ती :- सत्भावाने मनोमन वंदन करत करण्यात येणारी भक्ती
०७. दास्य :- चाकर, दास्य भाव ठेवुन करण्यात येणारी भक्ती.
०८. सख्य भक्ती :- परमात्माबध्दल सखा भाव ठेवुन करण्यात येणारी भक्ती.
*उदाहरणार्थ :- अर्जुनाने श्रीकृष्णाची सख्य भावाने म्हणजेच मित्रत्वाच्या भावाने भक्ती केली. आणी त्याला श्रीकृष्णाचे सारर्थ्य सह सर्वकाही मिळाले.*
०९. आत्मनिवेदन भक्ती :- आत्म निवेदन, सुमरन व्दारे भक्तीभाव निर्माण करत करण्यात येणारी भक्ती. *उदाहरणार्थ :- तुकाराम महाराज.*

**बेजार** :- त्रासुन त्रासुन जाणे. । **एकांती** :- एकटयात खुप विचार करून निर्णय करने

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०५ ॥
॥ ओवी नं. ७० ॥
॥ कृष्ण चरित्र ज्ञानाची शोध ओवी ॥
॥ यशवंतराव बुवा यांच्या पाठातील शोध निबंध ओवी ॥

## ॥ महाराजाचा शकुन आला ॥

॥ महाराजाचा शकुन आला । सत् यवग पाहावं ।
असन भावीक प्राणी । लक्ष्य, चरणावर लावावं ॥ घृ ॥

॥ जुन्या ओव्या, नव्या गाहया । उभ्या राहील्या ।
महाराजाच्या शकुनानं । दिवटयां लावल्या ॥
॥ जुनी गेली, नवी आली । थापली भुम्मा ।
तिरगुणांचा, सोडा भ्रमं । सुटनं जुम्मां ॥
॥ तिरगुणांचा, सोडा भ्रमं । भजा चतुर्पती ।
तिन यवग, गेले मोघमांत । काहीनाही आलं हाती ॥०४॥
॥ सत्तावनेला, भुम्मा नेमली । सत्य प्रमाण ।
सत् यवगावर, उभा धनी । दाखवतें खुणं ॥
॥ अठ्ठावनेला, भुम्मा स्थापली । आधार शकुनाचा ।
किर्तित आणुन, प्रित केली । का भुलला सोसा ? ॥
॥ ज्याची आहे, सत्ता तो धनी । उभा अवद्युत ।
नामीच रहा, गडे हो । धन्याची, आकाशमात ज्योतं ॥०७॥

कानड :
॥ सारजा राणीच्या, घरी देवानं । धरला अवतार ।
कानडच्या, बळीराम राजाचं । उध्दारलं कुळं ॥
॥ कानडचा, बळीराम राजा । होय गोदे गावंचा ।
तिथं मचलं, दोहीत पहा । फितुर तिर गुणांचा ॥
॥ तिरगुण सत्ता, पाहे आता । गमावलां रंग ।
याहीन केला, संग शेवटी । आणला भंग ॥१०॥
डहाकी :-
॥ अडिच दिवस/रोज मागते राजा । कानड ध्वजा ।
अनामत भजा । निशं:कलंकी लागन ध्वजा ॥ खंड०४/१८

आंधप्रदेश :
॥ अमरावतीतालुक्या मध्ये जयजयकार । कृष्ण, थडीच्या कोंडाशीला
कोंडाशीला आनंद झाला । एकच आरोहीला ॥
॥ तेथुन गेला पंढरीला देव । बोध पणी उरला ।
परकुती माया व तीच्या पोटी । कृष्णा, उभा राहीला ॥

महाराष्ट् : पंढरपुर
॥ धानक ऋषि, पोटी रायानं । उध्दारली सुद ।
उभा झाला, विठोबा धनी । केला, हरीनं बोध ॥
॥ ज्याचा भाग, देईन त्याले । हे मुळचं वचनं ।
सत्रावीच्या दांडानं पाझर । चतुर्पतीचा येईनं ॥
॥ चतुर्पतीचा एकच दांड । फोडन, तिरगुणांचा पाखंड ।
तिथुन गायप कृष्ण-धनी । पंढरी झाली वोसांड/ओसांड ॥१५॥

विदर्भ : सावंगा

॥ एकच सुद, एकच बुध । बोधाची ही मुर्त ।
चित्त-मन लावुन, ऐका गडेहो । देव रायाची किर्त ॥
॥ तोच महीमा, तोच दिवस । पावले अवधुतं ।
परकुरती/प्रकृति माया व तीच्या पोटी उभा । बाळ कृष्ण नाथं ॥
भजनं :॥ अवतार घेतला देवानं । चतुरा घरी आला देव नेम/भाव पाहुन ॥

॥ उकंडयाचा नेम/भाव पाहुन । देव, आलें चतुरा घरी ।
पंचेचाळीस वर्षे, भक्ती देवानं । केली आंधी वनी/आंधवनी ॥
॥ पंचेचाळीस वर्षे, वाणी देवानं । सांगतली जगा ।
आधी भैसा खुम्मी । व-हाडी, उभारली ध्वजा ॥
॥ सावंग नगरी, अगुचर वस्ती । धनी देव कृष्णराजा ।
बरीच भक्ती केली आता, पावन होय महाराजा ॥२०॥

॥ एकच धर्म, एकच नेम । नाम किर्त महीमा ।
मुंगी पैठनं, नदिवर वाढवलां । सव्वा महिना ॥२१॥
डहाकी :- ॥ हिरा हिरा तो लाल हिरा । भक्ती परवेशी ।
तुया नामाची किर्त महीमा । जगात वाढवशी ॥

**भजने :-**

॥ यवगा यवगीचा आत्माराम । याहीची किर्त महीमा जगात वाढवनं ॥
॥ यशवंता । गिण्यान झाले आता । तुया चरणी आमचा माथा ॥
॥ कृष्णनाथा । तुये गिण्यान झाले आता । तुया चरणी आमचा माथा ॥

**-: निरसन/स्पष्टीकरण :-**

या ओवी च्या चरणांचे निरसन चे ग्यान कृष्णांमृत मधुन घ्यावे.



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥




**॥ कृष्णांमृत चा उत्तरार्ध ॥**

पुढील पानावर..

॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ चतुर्पता अथर्वन् वेद उभा राहीन पोटी । निजरूप भुम्मा जागी करन सारी सृष्टी ॥

# चतुर्पता
# ॥ अथर्वन् वेद ॥

## ॥ खंड ०५ : भाग ०२ ॥

॥ चतुर्पता पुर्णावतार दर्शन भाग ०२ ॥

॥ श्रीकृष्णाजी महाराज श्रीक्षेत्र सावंगा-विठोबा ॥

यांचे संपुर्ण चरित्र ग्यान असलेले

## ॥ कृष्णांमृत : उत्तरार्ध ॥



**शब्दार्थ, चरणार्थ निरसन स्पष्टीकरन सह**



॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ ॥

चतुर्पता

॥ अथर्वन् वेद ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

www.chaturpata-atharvan-ved.com

॥ खंड ०७/भाग०२ ॥
॥ ओवी नं. ७१ ॥

## ॥ कृष्णांमृत चा उत्तरार्ध ॥

॥ कृष्णाजीने हेंगडुजीला केलेली सांगी/उपदेश ॥
॥ निरसनसह मुळावरची ओवी -जळगाव पाठातील ॥

## ॥ महापुरूषा कळुन असता ॥

॥ महा पुरूषा, कळुन असता । का बोलता हिनावुनं ?
कलयवगाची, संधी लाभली । नाही कोणा मालुमं ॥ घृ-०१ ॥
वरचरणे :- ।। चौसष्ट लक्ष, जोगण्या याहीला । ज्योता चढतीनं ।
कल यवगाची, संधी लाभली । नाही कोणा मालुमं ।।
।। तीनशेसाठ सहस्त्र, भोवण्यांला । ज्योता चढतीनं ।
कल यवगाची, संधी लागली । नाही कोणा मालुमं ।।
।। सोळा सहस्त्र, गोर्पी गणाला । ज्योता चढतीनं ।
कल यवगाची, संधी लाभली । नाही कोणा मालुमं ।।
।। नउ लक्ष, भवान्यां याहीला । ज्योता चढतीनं ।
कल यवगाची, संधी लाभली । नाही कोणा मालुमं ।।
।। सात लक्ष, आसरा याहीला । ज्योता चढतीनं ।
कल यवगाची, संधी लाभली । नाही कोणा मालुमं ।।
।। सात स्वर्गिच्या, प–या याहीला । ज्योता चढतीनं ।
कल यवगाची, संधी लाभली । नाही कोणा मालुमं ।।
।। रिध्दी–सिध्दी, लक्ष्मी याहीला । ज्योता चढतीनं ।
कल यवगाची संधी लाभली । नाही कोणा मालुमं ।।
।। आदी शक्ती, धरतरीला । ज्योता चढतीनं ।
कलयवगाची, संधी लाभली । नाही कोणा मालुमं ।।
॥ कल यवगा, साठी कितीक । करतीन याग-होम ?
सहस्त्र गाई, होमाला देतीन तरी । खेळ नाही चुकणारं ॥
॥ कल यवगा, साठी कितीक । करतीन याग-होम ?
सहस्त्र मानव, होमाला देतीन तरी । खेळ नाही चुकणारं ॥ ११ ॥
॥ कल यवगा साठी कितीक । करतीन याग-होम ?
यवगान यवगी, जप-तप कराल तरी हा । खेळ नाही चुकणारं ॥
॥ जपी तपी लाजवन । ऋषिमुनी संत शरण येतीन ।
मिर्तलोकी धनी येवुन । करन कार.., निष्कलंकी अवतार ॥
-: उडानच्या चालीतील घृ-०२ ची ओवी चरणे :-
॥ करन कार....। निश्कलंकी अवतार ॥ घृ-०२ ॥
॥ शिव-रात्री, पाडव्याचा नेम । शिमग्याचा याग-होम ।
जिथं असन देवकी । तिथं लभेद धनी भेटनं ॥ करन कार.
॥ मांडवस सभा भावळीत । धनी गादी स्थापनं ।
मुखसे बोलानं तेचं होईन । सत्य चालनं शकुन ॥
॥ पिसाई पाहतीनं, गगणी । मिर्त लोकी, ध्वजा असमानी ।
नाचत येईन, अवघ्या जनी ॥ करन कार..
॥ स्वर्ग मिर्त, पाताळ । ऐसे नाचन, तीन ताळ ।
नाचनं मेरू मंडयान सारं ॥ ०४ ॥ करन कार...,
॥ उभा राहीन, कुडीचा मालकं । या कुडीला देईन भेट
अवघी कुड करन जागृत ॥ करन कार....
॥ उठनं कापुर आरती । आरत्या घेवुन येतीन हाती ।
तंद्री लागन मिर्त लोकी ॥ ०६ ॥ करन कार...
॥ ऐसे उठन, या देवाचे ध्यानं । ध्यानी लागतीन, अवघे जनं ।
अशी या अवताराची खुणं । ऐकुन घ्याहो मानवं जनं ।

## करन खेळ...। निशंःकलंकी अवतार ॥०७॥

॥ करन खेळ... निश्कलंकी अवतार...॥ घृ-०३ ॥

॥ चौसष्ट लक्ष जोगणीला । चढवन ज्योता, आणनं घरा ।
येईन या अवतारा जवळ । करन खेळं...निशंःकलंकी अवतार ॥
॥ तीनशेसाठ सहस्त्र, भोवण्यांला । सोळा सहस्त्र, गोपीं-गणाला
चढवन ज्योता, आणनं घरा । येईन या, अवतारा जवळ ॥ करन...
॥ नउ लक्ष भवान्यांला । सात लक्ष आसराला ।
चढवन ज्योता, आणनं घरा । येईन या, अवतारा जवळ ॥ करन...
॥ सात स्वर्गि च्या प-यांला । रिध्दी-सिध्दी लक्ष्मीला ।
चढवन ज्योता, आणनं घरा । येईन या, अवतारा जवळ ॥ करन...
॥ आदी शक्ती, धरतरीला । चढवन ज्योता, आणनं घरा ।
येईन या अवतारा जवळ । करन खेळं...निशंःकलंकी अवतार ॥
भजने :-॥ सोळा न सोळा, बत्तीशी चा मुद्दा । जन करतीन याग-होम ।
जन करतीन याग-होम । यवग टळणार नाही कदा ॥
॥ चंद्र बत्तीशीचा मुद्दा । साधवा सिदाई देवा । मोहीम कर गा उभी ॥
॥ निश्कलंकी अवताराची, पाहतो वाट । तुम्ही या महाराजा, सोयंम् दयाहो भेट

-: शब्दार्थ :-

**पिसाळी** :- भाव हा व्याकुळ असतो तर भक्ती ही वेडी पिसी असते.
पिसे झालो भैस नामी । आमच काय करन कोणी ? अश्या या वेडया पिसे भक्तीची ज्योत म्हणजे पिसाळ ज्योत असलेले पिसाई । अशी पिसाळ ज्योत देहीत खेळवलेला, पिसाळी भक्तीचे देवमनजी महाराज होवुन गेले. म्हणुनच त्यांच्याबध्दल भजन म्हटल्या जाते की : ॥ पिसे भयान । भैसाचे द्युत । वाणी सांगे जगाला ॥ असा हा भैस नामी पिसा झालेला वेडा पिसा, पिसाळ ज्योतीचा पिशाळी द्युत देवमनजी होवुन गेला. असे हे पिशाळी ज्योत, शांती मुळ असलेले स्वर्गिचे येतीन दोन केवळ । **कुड** :- देह, काया । **असमानी** :- विशाल, अति उंच, आकाशाला टेकलेला, । **शिवरात्री पाडवा** :- महाशिवरात्री नंतरचा येणारा उपवास सोडण्याचा दिवस. । **शिमगा** :- होळी च्या रात्री नंतर येणारा, रंग खेळण्याचे, धुळवळीचे पाच दिवस असुन पाचव्या दिवशी रंगपंचमी दिवस येतो । **मांडवस सभा, भावळीला** :- चैत्र/भावळी महीन्यात येणा-या गुढी पाडव्याच्या सभेत भैसाची यवगाची मांडणा होईन. । **देवकी** :- ज्या घरात देवी-देवतांचे पुंजन भक्ती भावाने, नित्य नेमाने होते, असे ते देव देवता करणारे घर । म्हणजे देवकीचे घर असे म्हटल्या जाते. । **सहस्त्र** :- हजार । **उठन** :- उभे राहीन. । **तंद्री** :- ध्यास, ध्यान । **लभेद** :- निश्कलंकी, निर्मळ..

## ॥ निरसनसह महापुरूषा कळुन असता ॥

-: निरसन/स्पष्टीकरनं :-

ज्या दिवशी नउ दिवसाचा नवा कार होवुन, या कार व्दारे देवराज येईन हेही पाहयंजा पुढं । अशी सांगी कृष्णाने आश्विन च्या दस-याला हेंगडुजी महाराजाला केली होती, त्या दिवशी ती सांगी ऐकुन हेंगडुजी ने कृष्णास विनविले होते की : कलीच्या संधीकाळाचा मान आहे. ज्याचा मान त्याला दिलाच पाहीजे. ही संधीकाळ एकदम तुम्हास उडवुन टाकुन सत्यवगं आणता येणार नाही. कलीच्या संधिकाळाला मान देत त्याला त्याचे आयुष्य देत कलयवगात सत्यवग आणण्या करीता तुम्हास गायपाचा खेळ करून, गुप्त होवुन कार्य करावे लागेल. सध्या आम्हा तुमची संगत पाहीजे आहे. हा नव्या यवगाचा कार तुम्हा सध्या तरी करू नका...असे म्हणुन कृष्णास हिनावले होते. तेव्हा कृष्णाने आश्विन च्या दस-याला हेंगडुजीला या *'महापुरूषा कळुन असता का बोलता हिनावुन'* ओवीची सांगी करून या नव्या कार व्दारेच कलीच्या संधीला मान देत भैसाची मांडणा होणं आहे. ज्योता चढणं आहे. कलयवगात सत्यवग येणं आहे. जेजे सांगीतले तेते अवघ खर होणं आहे. अवघी सांगी खरी होणं आहे. भाकल्या शकुनाला मान देणं आहे. पुढे येणा-या यवगासाठी लागणारी सर्व तयारी करने आहे. मला कलीच्या संधीचा लाभ घेवुन नवा कार करून, कलीच्या संधीला मान देवुन गायपाच्या खेळाव्दारे गुप्त होणं आहे. आनंदाची ज्योत बनुन आनंदात राहत या भैसाच्या यवगाच्या मांडणीचे कार्य करने आहे. जसा नवरदेव आपला प्रपंच

थाटण्यासाठी लग्नास बाहोलीवर उभा राहतो, तसे येथे माझे घरी उभा राहुन चतुर्पतीचे कार्य करने आहे. बाहोलीवर उभे राहुन, चतुर्पती बिर्दावर सर्वत्राला उभे करने आहे..... अशी कृष्णाने हेंगडुजीला पुस महीन्याच्या तिन महीने अगोदर आश्विन च्या दस-याला सांगी केली होती. आश्विन नव्या दिवसाच्या कार ची ही सांगी च्या आश्विन दस-याच्या दिवसापासुन तिन महिने होते पुसाला ! या पुस महिन्यात सांगीप्रमाणे प्रत्यक्ष्य घटना घडणार होत्या. हेंगडुजीला तिन महीनेअगोदर कृष्णाव्दारे सांगीतलेले होईक होणार होते. तिथुन तिन महीन्यानंतर येणा-या पुसाच्या मांडीत ध्यानस्थ बसुन महापुरूषा कळुन असता या ओवीतील सांगीप्रमाणे घटना घडुन, नव्या यवगाचा नवा कार चा दिवस सुरू होणार होता.

पुस महिन्यातील या नव्या कार च्या दिवसापासुनच ध्यानी बसुन, त्रिपतीच्यां तिन गुणांची पदवी उडवुन, तिरगुणांचे राजे यांनी राज्य केलेल्या तिन यवगाची झाडझुड करत, पुस घेतल्या जाईन. तिन गुणांचे राजे यांना उडवुन अंतराळी पाढवुन तिन गुणांपलीकडचे चौथ्या शुध्द सत् चे राज आणणे आहे.

त्या दिवसापासुन देहीचे हाड-नाडात घुसलेले तिरगुणांव्दारे आलेले कंलंक यांची झाडझुड केल्या जाईन. या तिरगुणांनी उभारलेल्या ३६० शनिचरांचे पुंजनही मोडल्या जाईन. चौथ्या शुध्द सत् आदीरूप अनामताच्या जागृत ज्योता चढविल्या जाईन. शक्तीयॉं व सिध्दियॉं यांना चौथ्या शुध्द सत् च्या ज्योता चढवल्या जाईन. सत्यवगातील जुन्या पुजंनाची म्हणजेच या चतुर्पतीच्या पुंजनाची निघुन गेलेली ज्योत, आता या कलयवगी च्या संधित वळवली आहे. आता या वळलेल्या ज्योती च्या हंकाराने कलीच्या संधित पुस महीन्याच्या मांडीत हा निश्कलंकी अवतार नवा कार करन याची सांगी तुम्हा केलेली आहे. कृष्णा काय काय करणार ? याची कृष्णाने सांगीतलेली सांगी हेगंडुजी यांनी महापुरूषा कळुन असता या ओवीत सरळ साध्या भाषेत शब्दबध्द करून ठेवलेली आहे. तिचे निरसन करण्याचे काही एक आवश्यकता नाही. कारण ही ओवी चे शब्दार्थ वाचुन बुध्दिवंताला समजुन येईन अशीच तिची रंचना आहे.



॥ ओवी नं. ७२ ॥

## ॥ कृष्णांमृत चा उत्तरार्ध ॥

ओवी महात्मः- कृष्णाअष्टमी, कोजागीरी पोर्णिमा, माडी, शिमगा, चैत्र, आषाढी, व दिवाळीला हमखास म्हणण्यात येणारी ओवी...

॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

## ॥ अष्टमी जागृत पाळणा ॥

॥ अष्टमी जागृत पाळणा । नउ महीने झाले ।
गडयात आला कृष्ण ॥ घृ ॥
॥ नव दिवस, झाली कळ । कळलं खरं ।
देव राज, उभे होईन । पाहजा पुढं ॥
॥ तिथुन तिन, महीने । होते हो पुसाला ।
पुस रूस घेईन । तीन यवगाचा झाडा ॥
॥ हाडं-नाडं । देही चा झाडा ।
तिनशे साठ, शनीचरांचे । पुंजन मोडा ॥ ०४ ॥

॥ सालचे दिवस हो । तिनशे साठ ।
ही निघुन गेली । जुन्यां पुंजनाची ज्योतं ॥
॥ गेली ज्योत, वळली आहे । सांगतो खरं ।
या देवव्दाराचे । पुंजन अवघे करं ॥
॥ आधी भजा, कुळ दैवतं । सत्य भावं ।
त्याच्या घरी लक्ष्मी । सदा, नांदनं देवं ॥

।। हा देव भरते उरते । याची, कोण जाणे कळा ।
हा खेळ खेळतो अवघा । नित्य रुपाचा सारा ।। ०४ ।। जळगावदांड चरणं
।। प्रतिपदा दिवस । अवसर आहे नितं ।
आदीरुप अनामताची, आहे जागृत ज्योतं ।। जळगाव दांड चे चरणं
॥ शिमग्याची पंचमी । पाचही यमदुत भेदं ।
सालचे कोरं भोजन । सांगतलं एकं ॥
॥ शिमगा चैत्र, आषाढी, । दिवाळीला खरां ।
माडीच्या चौदा दिवस । आरत्या करां ॥
॥ नउ खंडाच्या, नउ उजाळल्या/वोयल्या ज्योती ।
या नव्या दिव्याची । केली हो आरती ॥ १२ ॥
भजने :- ॥ नउ महिने नव दिवस । गर्भा वरी । हो उभा राउळाशी... ।
हरी बा कृष्णा । जगात होईन आरोळी ॥
॥ नव महीने नव दिवस । उभा राहयं कृष्णा । जगात दाव कौतुक ॥

## ॥ निरसनसह अष्टमी जागृत पाळणा ॥

### -: निरसन :-

हेंगडुजी महाराजाला कृष्णाने, ज्या दिवशी नउ दिवसाचा नवा कार होवुन, देवराज येईन हेही पाहयंजा पुढं । असे म्हणुन सांगी केली होती, त्या दिवशी ती सांगी ऐकुन हेंगडुजी ने कृष्णास विनविले होते की : ज्याचा मान त्याला दिलाच पाहीजे. कलीच्या संधीचा मान आहे. कलीला मान देवुन सत्यवग आणण्याकरीता तुम्हा गुप्त व्हावे लागेल. आम्हा तुमची संगत पाहीजे आहे....असे म्हणुन कृष्णास हिनावले होते. पुस महिन्याच्या तिन महीने अगोदर कृष्णाने आश्विन च्या दस-याला हेंगडुजीला 'महापुरुषा कळुन असता का बोलता हिनावुन' या ओवीची सांगी केली होती. पुस महीन्याच्या मांडीतील नव्या दिवसाच्या कार ची ही सांगी होती. त्या आश्विन च्या दस-याला सांगीच्या दिवसापासुन तिन महीने होते पुस महीन्याच्या त्या नव्या कार च्या दिवसाला ! अधिक ग्यानाकरीता महापुरुषा कळुन असता-०७/७१ चे निरसन वाचावे.

नव महिने झाले गडयात आला कृष्ण !

पुस महीन्याच्या गायपाच्या खेळाच्या दिवसापासुन श्रावण महिन्याच्या कृष्णाष्टमी पर्यत नउ महीने झाले. भाकलेल्या या नउ महीन्यानंतर कृष्णा पुनश्चः आपल्या सवंगडयात येवुन आपल्या निराकार निर्गुण निरंजन तेजोमय केवळ देहाची गाही दिली. जाणत्यास हा निराकार निर्गुण निरंजन तेजोमय केवळ चैतन्यमय देहीचा पाळणा जागृत आहे. याची केवळ कृष्णाने गाही दिली. आणी या जाणत्यांनी या गाहीवर ही अष्टमी जागृत पाळणा ही ओवी रंचुन गायली.

तिथुन तिन, महीने । होते हो पुसाला :-

ज्या दिवशी हेंगडुजीला नव्या दिवसाचा नवा कार ची कृष्णाव्दारे सांगी झाली होती, त्या आश्विन च्या दस-याच्या दिवसा पासुन अंदाजे तिन महीने होते पुस/पौष महीन्याच्या भजन मांडीला ! त्या मांडीत *'महापुरुषा कळुन असता'* या ओवीतील सांगीप्रमाणे घटना घडुन, नव्या यवगाचा नवा कार चा दिवस सुरु होणार होता.

त्या पुस महीन्याच्या मांडीत ध्यानस्थ बसुन, त्रिपतीच्यां तिन गुणांची पदवी उडवुन, तिरगुणांचे राजे यांनी राज्य केलेल्या तिन यवगाची झाडझुड करत पुस घेतल्या जाईन. असे कृष्णाने हेंगडुजीला भाकले होते.

त्या दिवसापासुन देहीचे हाड-नाडात घुसलेले तिरगुणांव्दारे आलेले कंलंक यांची झाडझुड केल्या जाईन. या तिरगुणांनी उभारलेल्या ३६० शनिचरांचे पुंजनही मोडल्या जाईन. या दिवसापासुन आदीरुप अनामताच्या जागृत ज्योता चढविल्या जाईन. शक्तीयॉं व सिध्दियॉं यांना ज्योता चढवल्या जाईन. सत्यवगातील जुन्या पुजंनाची म्हणजेच या चतुर्पतीच्या पुंजनाची निघुन गेलेली ज्योत, आता या कलयवगी वळली असल्यामुळे आता हा निश्कलंकी अवतार करन कार ! अशी सांगी कृष्णाने हेंगडुजीस केली होती की :

॥ गेली ज्योत, वळली आहे । सांगतो खरं ।
या देवव्दाराचे । पुंजन अवघे करं ॥

जी चतुर्पती ची जी कृष्ण ज्योत गेली होती, ती वळलेली आहे. याची गाही जाणत्यांना केवळ कृष्णानं दिली आहे. म्हणुनच या चतुर्पती धनीदेव चे पुंजन आता अवघे जन करा. या चरणाच्या सांगीप्रमाणे सावंग्यात प्रतेक महीन्याच्या उरल्या अमावश्येला उटी चा कार्यक्रम असतो. तर जळगाव दांडात प्रतेक महिन्याच्या अमावस्येच्या प्रतिपदेला, तसेच पोळाच्या तोरणाखाली बैल जातेवेळी पोळाला व कृष्णजन्माच्या वेळी कृष्णाष्टमीला अवसर पुजनं केल्या जाते. या अवसर पुंजन नंतर येणा-या प्रथम दिवसाच्या प्रतिपदेला ज्योत लावल्या जाते. अवसर पुंजनाच्या दुस-या दिवशी म्हणजेच नाम घेण्याच्या प्रथम दिवशी म्हणजेच बिज तारकेचे पुंजन तारखेच्या ओवीच्या सांगी प्रमाणे केल्या जाते...असो अश्याच प्रकारे या चतुर्पती देव व्दाराचे पुंजन तुम्ही अवघे करा. म्हणुनच आधी भजा, कुळ दैवतं । सत्य भावं धरुन । या चतुर्पती देव हेच आपले कुलदैवत समजुन, सत्य भावाने या चतुर्पती देवव्दाराचे अवघे पुंजन करा. आता तुम्हा जवळ हे पुंजन करण्यासाठी प्रतिपदा अवसर/संधी आहे गा नित्य नेमाने ! हा दिवस भज !

॥ प्रतिपदा अवसर बिज । येईन चत्रभुज/महाराज । लावन हो ध्वज ॥
॥ हे तारीख भजा । येईन हो महाराजा । चढवन तो ध्वजा ॥
॥ हे तारीख नाम परवेशी । येईन महाराज देहेजीव तारावयाशी ॥

मांडवस प्रतिपदा भावळी याच दिवशी भैस राजा येणार ! चत्रभुज येणार ! महाराज येणार ! ते लावन मग ध्वजा ! तेव्हामग या आदीपुरुषाची ज्योत देही-देहीत जागृत होणार ! याच दिवशी *'महापुरुषा कळुन असता'* या ओवीच्या सांगीप्रमाणे ६४ लक्ष जोगण्या, ३६० सहस्त्र भोवण्या, १६ सहस्त्र गोपींगणा, ९ लक्ष भवान्या, ७ लक्ष आसरा, ७ स्वर्गिच्या प-या, रिध्दी-सिध्दी लक्ष्मी आदीमाया शक्ती, अष्टगण अष्टभैरव सह या देह धरणीला ज्योता चढुन, या शक्तीयॉं व सिध्दियॉं निश्कलंकी अवतारा जवळ येतीन. तेव्हा मग हा निश्कलंकी अवतार करन कार ! याच दिवशी तो निश्कलंकी येणार ! या दिवसापासुनच सत्यवगाची सुरुवात होवुन, भैसाचे राज्य स्थापल्या जाईन. म्हणुनच हा दिवस भजा हो नित्य रुप !

पाचही यमदुत भेदं :-

पाळण्यात सांगीतलेले आहे की : जेव्हा मायेला विटाळी बंधन केले, तेव्हा दोन्ही बिंदु एक होवुन या देहीची उभारणी सुरु झाली. या उभारणीच्या वेळी या देहीला मारणा-या पेशी रुपात या देहीवर पाचही यमदुत उभे झाले. आणी नेवु लागले होते या जीवाले ! परंतु तेथुन तारलं या चतुर्पतीच्या देवानं ! आणी जन्माच्या वेळी हा जीव जन्मा घालण्यास साहयं केले होते.

परंतु देही उभारणीच्या काळात या देहीवर जे पाचही यमदुत उभे झाले होते, ते अजुनही हा जीव नेण्याची वाट पाहत या देहीवर उभे आहेत. या मारणा-या किलर पेशी अजुनही या देहीत उभ्या आहेत. या देहीवर उभे असलेले पाचही यमदुत ला भेद देण्यासाठी, त्यांना कमजोर करुन या देहीला आयुष्य देण्यासाठी, शिवरात्री पाडव्याला नेम धर ! आणी शिमग्याचा योग साध ! ऐसे या चरणाव्दारे सांगुन ठेवलेले आहे.

शिमग्याची पंचमी :-

शिमग्याच्या पंचमीला सालचे एक कोर भोजन कर ! पाच कुळातील पाच सच्चे भावीक भक्तजनांना या चतुर्पती नामाचे भोजन परसुन त्यांना नामरसाई पाज ! चतुर्पतीच्या ग्यान अमृताचा पान्हा पाजुन, या चतुर्पतीच्या भजन पुंजन ध्यान सुमरनी लावा हो कोण्या एका भक्त जनास । दया क्षमा शांती सद्‌गुण याचे चौघडे वाजवं. प्रेम भक्ती नित्य नेम । लावुन मन । नित भजन पुंजन ध्यान सुमरन कराव. अश्याच प्रकारे :

॥ शिव-रात्री, पाडव्याचा नेम । कर शिमग्याचा याग-होम ।
जिथं असन देवकी । तिथं लभेद धनी भेटनं ॥

शिवरात्री नंतर येणा-या पाडव्याच्या दिवशी नेम धरून नामज्योत लाव. *सध्या सावंग्यात शिवरात्री नंतर येणा-या पाडव्याच्या दिवसापासुन रामनवमी पर्यत, या चरणाच्या सांगीप्रमाणे भजनाची मांड बसवुन अखंड नामज्योत लावल्या जाते.* अश्याच प्रकारचे जिथ देव-देवकी करणारे घर असेल, तिथ तो लभेद नर मांडवस सभा भावळीला धनी येईन हो ! याच दिवशी तो अवतार चौथ्या खुम्मी गादी स्थापन. या दिवसापासुन जेजे बोलान तेते होईन. सिदाई वाचा येईल. भैसाचे यवग सुरू होईल.

॥ शिमगा, चैत्र, आषाढी, हो माडीला । दिवाळीला खरां ।
माडीच्या चौदा दिवस । आरत्या करां

नित्य नेमाने भजन करत, शिमगा पंचमी, चैत्र, आषाढी, दिवाळी ला नित नाम भजा. आणी माडीचे चौदा दिवस या चतुर्पतीच्याच आरत्या करा । *सध्या विविध ठिकाणच्या काही काही राउळात शिमग्याला, चैत्र, आषाढी, आखाडी, ला भजन मांडी बसतात. दिवाळीला व माडीचे चौदा दिवस आरत्या या चरणाच्या सांगीप्रमाणे केल्या जातात.* या देहीच्या नव खंडाच्या नव ज्योती सच्च्या मनभाव-भक्तीने उजाळुन, या नव्या मन भाव भक्ती युक्त देहरूपी दिव्यानं, या आरत्या करा । या पंथाच्या पाळणुकाचे पालन कर । जे पंथाच्या पाळणुका पाळतीन त्यानांच देईन भेटा हा आदीपुरूष । अशी सांगी हेंगडुजीला करून, कृष्णा तेथुन निघुन गेले होते.

या ओवीच्या सांगीप्रमाणे मराठी महीन्यात खालीलप्रमाणे वर्षभर राउळात तसेच विविध ठिकाणच्या विविध चतुर्पती भजन मांडीत कार्यक्रम होतात. ते असे :

॥ दरवर्षि चे राउळातील कार्यक्रम ॥

01. **चैत्र/भावळी** :- गुढीपाडव्याला राउळात झेंडे चढवण्यांचा कार्यक्रम होतो. विविध ठिकाणच्या विविध चतुर्पती भजन मांडी रात्रभर जागरण भजने करतात. यात्रा असते.

02. **वैशाख** :- अक्षय तृतियेला विविध ठिकाणच्या विविध चतुर्पती भजन मांडी भजने करतात.

03. **जेष्ठ** :- राउळात चतुर्पती भजन मांडी भजन करत असतात.

04. **आषाढ** :- गुरूपोर्णिमा/आखडी ला राउळात व विविध ठिकाणच्या विविध चतुर्पती भजन मांडीत रात्रभर जागरण भजन चा कार्यक्रम असतो.

05. **श्रावण** :- गोकुळाष्टमी ला राउळात व विविध चतुर्पती भजन मांडीत रात्रभर जागरण भजन चा कार्यक्रम असतो. तसेच पोळ्याला विविध चतुर्पती भजन मांडी भजने करतात.

06. **भाद्रपद** :- राउळात भजन मांडी भजन करत असतात.

07. **आश्विन** :- दसरा ला राउळात झेंडे चढवण्यांचा कार्यक्रम होतो. सभामंडपात रात्रभर जागरण भजन असते. विविध ठिकाणचे राउळात माडीचे चौदा दिवस सकाळ संध्याकाळ आरत्या चतुर्पती भजनी करतात.

08. **कार्तिक** :- दिवाळीला विविध ठिकाणच्या चतुर्पती भजन मांडी आपआपल्या ठिकाणी भजने करतात. बलीप्रदिपदेला गायपुंजन व भजने करतात.

09. **मार्गशिर्ष** :- राउळात चतुर्पती भजन मांडी भजन करत असतात.

10. **षौष/पुस** :- राउळात पुसाची भजन मांड बसलेली असते.

11. **माद्य** :- माद्य शुध्द पंचमी ला विविध ठिकाणच्या राउळात चतुर्पती जागरण भजन कार्यक्रम असतात.

12. **फाल्गुन** :- होळी पोर्णिमेला व रंगपंचमीला विविध ठिकाणच्या चतुर्पती भजन मांडी आपआपल्या ठिकाणी भजने करतात.

॥ ओवी नं. ७३ ॥

## ॥ कृष्णांमृत चा उत्तरार्ध ॥

॥ सावंगा-जळगाव दांडची निरसनसह मुळावरची ओवी - ॥
ओवी महात्म :- गायपाचा खेळाव्दारे कृष्णा गुप्त झाल्यानंतर,
हेंगडुजी महाराजाने सावंग्याच्या जन लोकास करून ठेवलेला उपदेश ॥

## ॥ आदीपुरूषाचं भजन करता ॥

॥ आदीपुरूषाचे भजन करता । तुम्ही सावंग्याच्या/जन लोका ।
करून विनंति, लागुन चित्ती । ते देह नाही आता ॥
॥ जुना देह गेला, नवा धरला । तो आहे आता ।
आदीपुरूषाला राज्य भाकल । त्याची आहे सत्ता ॥
॥ जुना गेला, नवा आहे । तो होय म्हणता ?
रूप धरते, भेटी देते । त्याचं काय करता ? ॥
॥ लागुन ध्यानी, बसले नेमी/नामी । जागी होईन म्हणता ।
अवताराचं, मानत नाही । कैसे जागी करता ? ॥ ०४ ॥
॥ चैत्यन्या रूप भ्रांत तिथ । असे आहा/याल तुम्ही ।
आता तिला दिले तिरनयन । त्याहीला काय दयाल तुम्ही ?॥
॥ केली चैत्यन्या हिन, आली शरण । असे व्हालं तुम्ही ।
निश्कलंकी अवतार । जागी, करन आदीमुनी ॥
॥ आदीपुरूष आधीला । मागुन आले आदीमुनी ।
निघुन चैत्यन्याने पतीला गोयले । होते वचनी ॥
॥ ब्रम्हा विष्णु शंकर झाले । फजीत चैत्यन्या ।
आदीमुनी वाचुन जागी नाही । झाले चैतन्य ॥०८॥
॥ ब्रम्हा विष्णु शंकर दिले । चैत्यन्या उदरी ।
केला यवगाचा चुना । बहु, पाप याहीच्या पदरी ॥
॥ आदीपुरूष तो आधीचा खरा । मागुन आला आदीमुनी ।
निर्गुण चैतन्य, चतुर्पतीच्या । गुंतला आहे वचनी ॥
॥ देह देल्ली, जीव घरी । आदीपुरूष वसे ।
परमय वेद, तो परमेश्वर । बादशाहा असे ॥
॥ आदीपुरूषानं देण दिलं । पहा त्या बादशाहाला ।
जीव हत्या जरा नाही । घडणार त्याहीला ॥१२॥
किंवा :- प्राण वधता हत्या जरा नाही घडणार त्याहीले ॥१२॥
॥ आदीपुरूषा वाचुन दुसरा कोण । वंदन जीवाला/प्राणाला ।
ब्रम्हांडाची हत्या घडणार नाही । जरा त्याहीला ॥
किंवा :- ब्रम्हाडांची हत्या घडन नाही । चुकणार त्याहीले ॥
॥ हाती शिल्ला, प्राण वधले । याहीचे ओपार/उपार ।
आधीपुरूषाला आधीच अर्पण । त्याहीची भाकर/भाकलं ॥
॥ नव्हते वेद, नव्हते भेद । तईचा आदीपुरूष ।
निर्जिव हेडा, याहीच्या मुखी । गाईचे वेद ॥१५॥
॥ तिर भवनी चारही खुम्म । शक्ती आदी पुरूष ।
याहीच्या हंकारानं उभे । आहे तिरलोक ।
अनामत देव द्युत आहे गादीप ॥१६॥
॥ गादी केली भरून देहे । याहीच्या हुकुमात ।
अनामत नित रूप आहे । जागृत ज्योत ।
उरल्या गादीनं/देहीनं येईन चित्ती । खेळ केला नितरूप ॥

**॥ चारच खेळ चौघानं मांडले । एकच हाईन संगजोड ।**
**चौ-यवगाचा, उभा होईन खेळ । एकच उठन भंम्कार ॥१८॥**
**॥ चौ-यवगाचा, होईन मारोडा । शक्तीला सुटन चळ ।**
**दुनुन आयुष्य, होईन कुडीला । देवराज करन यवगाचां खेळ॥१९**

**भजने :-** ॥ धनी देव आला माझा । उजेड पडन त्याहीच्या रूपाचा ॥
॥ तारू आला अवघ्याचा । जागी करन देहे पिंड खासा ॥
॥ खेळ खेळ बा सारंगधर । त्वा नवा खेळ मांडला यवगावर/भुम्मेवर ॥
॥ खेळ खेळ बा सारंगपाणी/चक्रपाणी । मानवात राज्य करा येवुनी ॥

**-: शब्दार्थ :-**

**भाकलं** :- पुढे होणारे भविष्य । **हिन** :- निकृष्ट, निच दर्जाचे । **उदर** :- पोट । **चुन्ना** :- नाश करने । **शिला** :- हत्यार, मोठा दगड । **दुनुंन** :- डबल, दुसरे दोन पटीने जुनं । **भम्कार** :- उग्र/अग्न काळ निर्माण करणारा भुभुत्कार ।
**मारोडा** :- मारामारी, गलबला, गोंधळ, आरोही

## ॥ निरसनसह आदीपुरूषाचे भजन करता ॥

### ॥ निरसन ॥

पुस महीन्याच्या तिन महीने अगोदर कृष्णाजीने हेंगडुजी महाराजाला आश्विन च्या दस-याला सांगी केली होती की : येणा-या पुस महीन्याच्या भजनमांडीत नउ दिवसात नव्या यवगाचा नवा कार करणार आहे. देवराज येईन हेही पाहयंजा पुढं ! या नव्या कार व्दारेच भैसाची मांडणा होणं आहे. ज्योता चढणं आहे. कलयवगात सत्यवग येणं आहे. जेजे सांगीतले तेते अवघ खर होणं आहे. अवघी सांगी खरी होणं आहे. भाकल्या शकुनाला मान देणं आहे. पुढे येणा-या यवगासाठी लागणारी सर्व तयारी करून, मला कलीच्या संधीचा लाभ घेवुन, कलीच्या संधीला मान देवुन गुप्त होणं आहे.... ईत्यादी सांगी सांगुन हेंगडुजीला त्या पुस महीन्याच्या मांडीतील नव्या दिवसाच्या कार ची सांगी *'महापुरूषा कळुन असता का बोलता हिनावुन ०७/७१'* या ओवी व्दारे केली होती.

त्या आश्विन च्या दस-याला झालेल्या सांगीच्या दिवसापासुन तिन महीन्यानंतर आलेल्या पुस महीन्याच्या नव दिवसाच्या मांडीत कृष्णा नव्या यवगाचा नवा कार करण्यास ध्यानस्थ बसले. आणी *'महापुरूषा कळुन असता* या ओवीत सांगीतल्याप्रमाणे त्यांनी ६४ लक्ष जोगण्या, ३६० सहस्त्र भोवण्या, १६ सहस्त्र गोपींगणा, ९ लक्ष भवान्या, ७ लक्ष आसरा, ७ स्वर्गिच्या प-या, रिध्दी-सिध्दी लक्ष्मी, आदीमाया शक्ती, अष्टगण अष्टभैरव सह या देह धरणीला ज्योता चढुन, या शक्तीयॉ व सिध्दियॉ चतुर्पता बिर्दावर आणण्याची तयारी करून ठेवली. निश्कलंकी आल्यावर तो या सर्वास आणनं तो सर्व घरा । ऐशी भैसाच्या यवगाची गुप्त मांडणा केली. परंतु याची खबर तेव्हा कोणाशी नव्हती. निश्कलंकी मांडणा करत भैसाचे यवग आणण्याची सोय करून आपले चतुर्पतीचे कार्य गुप्त रूपात राहुन करण्याचे ठरवले.

आणी त्या योगीराज कृष्णाने पुर्विप्रमाणे पुनश्चः गायपाचा खेळ उभारून देहीतील षट्चक्राच्या शेवटी सहस्त्रदळीच्या वर नांद-बिंदुच्या गाठी पाडुन, कायातत्वांच्या सहस्त्रदळी प्रवेश करून, कायेचे तत्वे निर्गुण स्वरूपी मिसळुन स्वरूपी ऐक्य केले. अश्या प्रकारे पद-पिंडाच्या भेटी करत निर्गुण निराकार केवळ देह धारण केला. आणी त्या निर्गुणाने आनंदपदाच्या तळी चंद्र-सुर्याचा जेथे मेळ होतो त्या गोल्हाट मंडळी असलेल्या सुखाठाई जीव-शिवाचे ऐक्य करून शिव झाला. आनंदाची ज्योत बनुन आनंदात गुप्त रूपी राहत चतुर्पतीचे कार्य करण्यास गुंतला. भैसाच्या यवगाची मांडणीचे कार्य करू लागला. या गायपाच्या खेळाचे अधिक ग्यान कृष्णांमृत मधुन घ्यावे.

कृष्णाने भाकलेल्या गायपाचा खेळ च्या दिवसापासुन नव महीन्यानंतर येणा-या श्रावण च्या कृष्णाअष्टमी या दिवशी कृष्णाने गाही दिली. असे *अष्टमी जागृत पाळणा-०७/७२* या ओवी चे घृपद सांगी करते. त्या गायपाच्या दिवसापासुन कृष्णाचा निराकार निर्गुण केवळ देहीचा पाळणा हालत आहे. असे ही ओवी सांगते.

कृष्णा गायपाच्या खेळाव्दारे गायप होणार ! हे हेंगडुजीला कृष्णाने तिन महीने अगोदर आधीच सांगी करून सांगतले असल्यामुळे, कृष्णा गायप झाला याची चाहुल सर्वप्रथम हेंगडुजीला लागली. हेगडुजीने महारोगी वागदे यास ही *'आदीपुरूषाचे भजन करता'* ही ओवी देवुन त्यास सांगीतले की : कृष्णा ध्यानस्थ बसलेल्या झोपडी समोर जी नव दिवसाची भजनाची मांड बसली आहे, त्यात गायन करून ताबोडतोब निघुन ये !. या चतुर्पती गायनाव्दारे तुझा महारोग दुर होईल. असे त्यास सांगी करून, तेथुन त्यास सावंग्यात आपल्या योगबळाने पाठवले.

हेंगडुजीच्या सांगीप्रमाने कृष्ठरोगी वागदे यांनी अष्टमीच्या मध्यरात्री अंदाजे बारा वाजता 'आदीपुरूषाचे भजन करता सावंग्याच्या लोका' ही ओवी म्हटली. आणी रोगमुक्त होवुन तेथुन ताबोडतोब निघुन गेला. भजन मंडळीतील भक्त भजनी ही ओवी ऐकुन विचारी पडले. परंतु जाणत्यांनी ही ओवी ऐकुन जे जाणायचे ते जाणले. आणी भजन सकाळच्या चौघडा होईपर्यत चालु ठेवले.

तिकडे जळगावी जाणता कृष्णसखा हेंगडुजीने कृष्णा गायप झाला हे जाणले. हेगडुजीने गुप्त कृष्णास उद्देशुन म्हटले की : मायेची ममता ईला दाखवलं तुम्ही रूप ! आम्हा केलं अपदेशी, आपण झाले गायप ? मुळ यवगी शक्तीसमोर उठलेल्या 'चौथा शिक्का दिला तुला तिरनयन' या आवाजी देणं चा शकुन साधन्याकरीता शक्तिला चौथा शिक्का दिला. गिरजा शक्तीला देह दिला. आणी जीव अंम्बर करून सारंगधर बनुन कैलाशी निघुन गेले तुम्ही ! आता आहो मी एकला ! अवघी धरणी हो पडली सुनी ! आता गुण नाही गव्हर या योग्याच्या मनी ! हा कृष्णा झाला निर्गुण निश्कलंकी निराकार ! आता पुसाव कोण्या योग्याला ? अशी जेव्हा हेंगडुजी काकुळती करू लागला, तेव्हा निगुर्ण निश्कलंकी आंनदाची ज्योत स्वरूपी कृष्णाने आकाशवाणी व्दारे हेगडुजीला शक्तीच्या ओवी ०१/०२/०१ च्या पुढील चरणांची सांगी केली की : भुम्मेवर भुम्मा गोयक होतीन गोळा ! चौ-खुम्माचा राहीन त्यांना जिव्हाळा । तिन खुम्म येतीन शरण । हा आदीमुनी अवघ्याचा चुकवन चौ-यांशीचा मोहजबा तई पासुन.शक्तीची ओवी खंड०१/०२/ओवी०१ चे निरसन वाचा.

हेंगडुजी हा कृष्णाचा परमसखा असल्यामुळे सावंग्याची चौघडयाची ज्योत वाढल्यानंतर, कृष्णाचा संग करण्यासाठी त्यानेही पहाटे पहाटे गायपाचा खेळ करून तोही तेथुन गायप झाला.

तिकडे कारलास्थीत देवमननेही कृष्णा, हेंगडुजी गायपाचा खेळ करून गुप्त झाले आहेत. असे जाणल्यावर त्या भल्या पहाटे सावंग्यात प्रकट झाला. सकाळी देवमन, पुणाजी सह जाणत्यांना घेवुन झोपडीचा दरवाजा उघडुन पाहते तर काय ? ज्याठाई कृष्णाजी ध्यानस्थ बसले होते, त्याठाई ची जागा कृष्णदेहीच्या जलतत्वांच्या कणाकणाव्दारे ओलसर झालेली होती. ओहंम् स्वरूपी मर्द कृष्णाने आपल्या तनाचे/देहीचे हरन करून, त्या अविनाशी कृष्णद्युताने तिथे आपल्या जलाचे निशाण ठेवुन तेथुन तो गायपाचा खेळ उभारून गायप झाला होता. हे दृश्य पाहुन तेथील सर्वसामान्य भक्तजनांनी भावनेच्या भरात आक्रोश मांडला. तर जाणत्यांनी जी कृष्ण जल तत्वांची ओली जागा होती, त्या ओल्या जागेवरच्या ओल्या मातीचा गोळा तेथे उभारून, तेथेच कृष्ण नामाची ज्योत पेटवुन, त्या ज्योर्तिमय कृष्णास या सगुण-निर्गुण ज्योतीत राहण्याची विनंती अर्ज करून त्या जाणत्यांनी कृष्ण ज्योतीची त्या ओल्या मातीच्या गोळयात स्थापना केली.

ही कृष्णाची बाहोली होय. नवरदेव जसा आपला प्रपंच थाटण्यासाठी बाहोलीवर उभा होवुन लग्न लावतो, त्याच प्रमाणे कृष्णा गुप्तरूपात येथे या बाहोलीवर निराकार निर्गुण निरंजन ज्योत स्वरूपी उभा असुन, तो भैसाच्या यवगाची मांडणी करत उभा आहे. भक्तजनांचे तारण करत/करणार आहे. सत्यवगाचा प्रपंच थाटत नव्या यवगाचा नवा कार करणार आहे...ईत्यादी ग्यान तेथील आक्रोश करत कोपलेल्या मानव भक्तजनास जाणत्यांनी देवुन त्यांचा क्रोध शांत करून त्यांना समजावले. आणी अष्टमीच्या मध्यरात्री म्हटल्या गेलेल्या आदीपुरूषाचे भजन करता सावंग्याच्या लोका या ओवीच्या चरणांची सांगी समजावुन सांगतली ती अशी :

॥ आदीपुरूषाचे भजन करता । तुम्ही जन लोका/सावंग्याच्या लोका ।
करून विनंति, लागुन चित्ती । तो देह नाही आता ॥
॥ जुना देह गेला, नवा धरला । तो आहे आता ।
आदीपुरूषाचं राज्य भाकल । आता त्याची आहे सत्ता ॥
॥ जुना गेला, नवा आहे । तो होय म्हणता ?
रूप धरते, भेटी देते । त्याचं काय करता ? ॥
॥ लागुन ध्यानी, बसले नेमी/नामी । जागी होईन म्हणता ।
अवताराचं मानत नाही । कैसे जागी करता ? ॥



तुम्ही सावंग्याच्या जन लोका त्या आदीपुरूषाचे भजन करता आहे. त्या आदीपुरूष कृष्णास चित्त मन लावुन विनंती अर्जा करता आहे. ध्यानी लागुन नेम करून त्यास जागी होय म्हणत आहे. रूप धर म्हणत आहे. परंतुकृष्णा चा तो देह आता निराकार निर्गुण निश्कलंकी ज्योत बनला असुन, आता त्याचा तो सगुण देह नाही आहे. तो त्याचा जुना सगुण देह त्या कृष्णाने गायपाचा खेळ उभारून गायप केलेला आहे. आता त्याने निर्गुण निराकार निश्कलंकी ज्योर्तिस्वरूप तेजांकृत आकृति धरली आहे. कोटी कोटी सुर्याच्या प्रभा फाकल्या समान त्याची निराकार मंडलाकार तेजाची आकृति हा त्याचा नवा कोरा देह होय. आता येथ अकाशमात मध्ये ही निराकार निर्गुण निश्कलंकी ज्योर्तिसमान लभेद आकृति उभी आहे. या आदी भैसाची छाया सच्च्या भक्ताशी आता आलीगण देईन. हीच आता रूप घेणार ! भेटी देणार ! देही होणार, विदेही होणार ! अथर्वन् वेद चौथ्या खुम्मी गर्जना करणार आहे. या निराकार निश्कलंकी ज्योर्तिस्वरूपी आदीपुरूष कृष्णाचं सर्व भाकल खर होणार आहे.

ज्याची होती सत्ता तो धनी अवधुत आता उभा आहे. आता या आदीपुरूषाचीच सत्ता आहे. आता या तिर्थ पदावर निरंजन निराकार निर्वाण अवधुत अनामत निश्कलंकी कृष्ण उभा आहे. हा आदीपुरूष लभेद राजा कोटी सुर्याच्या प्रभा समान प्रकाशमय ज्योर्तिस्वरूप घेवुन आकाशमात मध्ये उभा झाला आहे. सर्वत्रा याहीचे प्रकाश किरणाची प्रभा दिसनं. येथे सारं देवांच भगव निशाण दिसनं ! म्हणुनच भक्तजन हो ! नामीच राहा गडे हो ! एकी करा. कनवाळानं भजन पुंजन ध्यान सुमरन भक्ती करा. या कृष्ण रायानं यवगावर सावध होवुन सावध ज्योत उभी केली आहे. याहीची अकाशमात मध्ये ज्योत उभी आहे . ही ज्योत आता निरंजनी भेटी देत राहीन. या अवधुतास तुम्ही मुजरा करा. हा तुमच्या चौ-यांशीच्या वाटा चुकवन. या सोहंम् ज्योतीचा प्रकाश तोडन चौ-यांशी बंधन ! बिर्दाचं साहयं कराले आता नाही लागणार खीण/क्षण ! आदीपुरूषाचा नवाच खेळ तो या देही या डोळा दाखवन. यवगा यवगीचे राज भैसाचं दाखवन. हा बापा अवघी सृष्टी/धरणी एकाच नामी ठेवन.

आता याहीच्या स्वाधीन कळसुत्र आहे. आता याहीनं चतुर्पती नामाची सत्ता उभी केली आहे. आता सर्व देवांगण चतुर्पती चे सुमरन करन. अवघे देवांगण पुष्प वर्षाव करत चतुर्पती नामाचा घोष करन. कारण देहीची निर्गुण गादी या कृष्ण मालकाची आहे. इच्यावर सत्ता आहे या देवराया कृष्णाची । याहीच्या संग स्वर्गिचे द्युत, आदी भैसाची फलटन सिदाई सेना उभी आहे. सेना नाही गणीता किती सांगु सिध्दाशी ? कृष्णाच्या पायाची आज्ञा, अधार भक्तीशी ! या चतुर्पती च्या चौ-खुम्मावर कृष्णाजीचे भंडार भरून आहे. सत्‌यवगी हा भैस आपरूप येईन. चौदावीला नविन ध्वज लावन. ऐसे हे चरणचारीया बोलन आहे 'की : चतुर्पती नाम खरं आहे. याहीनं पुर्विस्ताचा कार केला आहे. आता सत्या घरी, सच्च्या भक्ता घरी याहीची चतुर्पता आपरूप उभी राहणार.

हे सर्व या कृष्ण अवताराने आधीच भाकले आहे. तरी या अवताराचं मानत नाही ? मग कैसे जागी करता ? भ्रांतीमुळे या अवताराचं खरं मानलं नाही म्हणुन आधी चैतन्या शक्ती हीन झाली होती ! ती कैशी हीन झाली याचे अधिक ग्यान खंड०१/०२/०१ शक्तीची ओवीतुन घ्यावे.

॥ चैत्यन्या रूप भ्रांतीत । असे आहा/यानं तुम्ही ।
आता तिला दिले तिरनयन । त्याहीला काय दयाल तुम्ही ? ॥
॥ हिन झाली चैत्यन्या, आली शरण । असे व्हाल तुम्ही ।
निश्कलंकी अवतार जागी करन आदीमुनी ॥
॥ आदीपुरूष आधीला । मागुन आले आदीमुनी ।
निघुन चैत्यन्याने । पतीला गोयले होते वचनी ॥
॥ ब्रम्हा विष्णु शंकर झाले । फजीत चैत्यन्या ।
आदीमुनी वाचुन जागी नाही । झाले चैतन्य ॥
॥ ब्रम्हा विष्णु शंकर दिले । चैत्यन्या उदरी ।
केला यवगाचा चुना । बहु पाप याहीच्या उदरी ॥

शक्तीच्या ओवीः-०१/०२/०१ चे निरसन वाचा ! शक्तीच्या ओवीमध्ये शक्तीने 'हा देव नाही खरा' असे जळजळीत बोल बोलुन, जेव्हा या निराकार देवाला शक्तीने मानले नव्हते, तेव्हा जसे कर्म तसे फळ या न्यायाने तिथे अग्न धुनी उठुन भ्रातीत टाकणारी धुनी उठली होती. या भ्रांतीत टाकण्या-या धुनी मुळे शक्तीचे रूप भ्रांतीत पडले होते. शक्ती ने या धुनीच्या भ्रातित येवुन जेव्हा तिला दिलेले तिन खुम्म जाळले, तेव्हा ती हिन होवुन निराकार आदीपुरूष कर्ता-याला शरण आली. आणी तिने भैसाची भाव धरून प्राथना मांडली होती. तिच्या प्रार्थनेला पावन होवुन जेव्हा तो निराकार आदीपुरूष भैस आदीमुनी रूपाचा आकार घेवुन तिच्यासमोर येवुन उभा झाला, तेव्हा शक्तीने त्यालाच आपला पती मानुन वचनी गोयले होते. वचनानुसार तिला तिचे ब्रम्हा विष्णु शंकर हे तिन खुम्म आदीमुनीने जागी करून दिलेत. आणी आवाजी चौथा खुम्म तिरनयन दिला होता. परंतु शक्तीच रूप भ्रांतीत पडलेले असल्यामुळे, तिच्या समोर आदीमुनी रूपात उभा असलेल्या त्या चौथ्या खुम्माचा बोध तिला तेव्हा झाला नव्हता. तेव्हा कलयवगात या चौथ्या खुम्माचा बोध होईन. तो चौथा कलीचं ठिकाण उडवन. तोपर्यंत तु आता आपला हिशोब पहा. अशी आदीमुनीने तिला सांगी केली होती. कलयवगी चौथ्या खुम्माचा बोध झाल्यावर तुला 'चौथा शिक्का दिला तिरनयन' या आवाजी वचनाची पुर्तता चौथ्या आदीमुनी कडुन होईन. अशी आदीमुनीने शक्तिला सांगी केली होती. शक्तीच्या ओवीत । चौथा शिक्का तुला दिले तिरनयन । कलीत होईन बोध पण । उडवन कलीच ठिकाण । या उठलेल्या आवाजी देणं चा शकुन साधण्याकरीता, या देण्याची पुर्तता करण्याकरीता हा चौथा शिक्का असलेला आदीपुरूष आदीमुनी कृष्णाने कृष्णदेह चैतन्याशक्तीला दिला. या गिरजा शक्तीला देह दिला. आणी केवळ जीव अंबर करून निराकार निर्गुण निरंजन आनंदाची ज्योत स्वरूपी सारंगधर बनला. अश्या रितीने या कलीमध्ये या नव्या दिवसाच्या कार व्दारे शक्तीला दिलेल्या आपले मुळयवगाच्या वचनाची पुर्तता आदीपुरूष आदीमुनी कृष्णाने केली. शक्तीला तर दिले हो तिरनयन ! हे तर त्याचं आधीचेच भाकलं होतं. पहा त्या शक्तीच्या ओवीत. चैत्यन्या रूप जसे भ्रांतीत पडते, तसे भ्रांतीत पडले आहाता का तुम्ही ? आता काय दयाल तुम्ही या तिरनयनाला ?

॥ आदीपुरूष तो आधीचा खरा । मागुन आला आदीमुनी ।
निर्गुण चैतन्य, चतुर्पतीच्या । गुंतला आहे वचनी ॥
॥ देह देल्ली, जीव घरी । आदीपुरूष वसे ।
परमय वेद, तो परमेश्वर । बादशाहा असे ॥
॥ आदीपुरूषानं देण दिलं । पहा त्या बादशाहाला ।
जीव हत्या जरा नाही । घडणार त्याहीला ॥
॥ आदीपुरूषा वाचुन दुसरा कोण । वंदन जीवाला ।
ब्रम्हांडाची हत्या जरा नाही । घडणार त्याहीला ॥

शक्तीच्या ओवीतच तुम्हास ग्यान येईल की : तो निराकार कर्तार् आदीपुरूष प्रथम शक्ती समोर आपल्या ख-या स्वरूपात उभा होता. परंतु शक्तीने त्याला 'हा देव नाही खरा' असे हिनवल्यानंतर, तोच आधीचा निराकार आदीपुरूष कर्ता आदीमुनी रूप घेवुन मागुन आला. आणी तेच आदीमुनी या कृष्णदेहीत अवतरला ! हे निर्गुण चैतन्य चतुर्पती च्या वचनी या कृष्णाव्दारे गोयल्या गेले आहे. या देहधरी आदीमुनीने आपला जीव दिला. आणी आपल्या मुळस्वरूपी आदीपुरूष रूपात येवुन वसला. तोच अवघ्या वेदातला परमय वेद असलेला लभेद केवळ होय. त्या लभेदाचा चतुर्पता अथर्वन् वेद

कृष्णाच्या मुखातुन बाहेर पडला आहे. या चतुर्पता अथर्वन् वेदात कथलेल्या सत्यवगाचा तो कृष्णाच बादशाहा होय. या बादशाहाला आदीपुरूषाचं देणं झालं आहे. त्याहीला जीव हत्या, ब्रम्हाड हत्या जरा नाही घडणार !

॥ हाती शिल्ला, प्राण वधला । याहीचे ओपार/उपार ।
आधीपुरूषाला आधीच अर्पण । त्याहीची भाकर ॥
॥ नव्हते वेद, नव्हते भेद । तईचा आदीपुरूष ।
निर्जिव हेडा, याहीच्या मुखी । गाईचे वेद ॥

परंतु तुम्ही भक्तजन हो ! हातात शिला घेवुन हेल्याचे जिव वधुन, त्याचे मासं या आदीपुरूषाला ओपार/उपहार म्हणुन अर्पण करता. अश्या ओपार अर्पण करण्याच्या प्रथेव्दारे तुम्हास जिवहत्याचे पाप लागणार. या कृत्याने तो आदीपुरूष कधीही जागा होणार नाही. तो काही तुम्हास प्रसन्न होणार नाही. कारण की : हा आदीपुरूष कृष्णा ! या कृष्णा ने 'आधी केली हो धरणी शुध्द करता पुंजन । आणी यवगा यवगी गायपाच्या खेळाव्दारे कृष्णानं आपला स्वतः चा प्राणमय देह वधत येत येथ आला आहे. त्याला ब्रम्हाडाची हत्या जरा घडणार नाही. अश्याच प्रकारचे अंर्तबाहयं देह शुध्द ठेवुन भक्तीभावने मनोमय पुजन करने. हेच त्याची भाकर होय. आणी ती भाकर नाही देल्ली तुम्ही कोण ? । म्हणुनच माझे घरचे ठिकाण, व बहोत यवग जाहीरण करतो या ओवीचे चरण गर्जुन तुम्हास सांगी करतात की :

॥ आधी केली धरणी शुध्द करता पुंजन ।
हेच माझी भाकर देवा नाही देल्ली कोण ? ॥
॥ हाती काठी घेवुन उभा मी दरवाज्यापाशी ।
सर्वत्राला मुजरा दादा हो । भाकर दया माझी ॥

या कृष्णाला जर त्याची ही शुध्द सत् भाव ची भाकर नाही देल्ली, तर तो 'माझी भाकर मजला नाही देल्ली हो कोण ? असाच म्हणत फिरत राहील. तुमच्या या जिवहत्या करून ओपार देण्याच्या प्रथेव्दारे/कृत्याव्दारे दिलेली ओपार/भाकर चा तो कदापि स्विकार करणार नाही. या आदीपुरूषाला कृष्णाने आधी ही देहधरणी शुध्द करून त्या चतुर्पती आदीपुरूषाची जन्मोजन्मी भक्तीभावाने मनोभावपुंजा केली. नव्हता वेद नव्हता भेद तईच्या आदीपुरूषाला हीच सच्च्या भक्ती-भावाची भाकर या कृष्णाने यवगान यवगं अर्पण केलेली आहे. आणी तुम्ही भक्तजन हो काय करत आहात ? निर्जिव हेडा म्हणजेच हाती शिला घेवुन हेल्याची हत्या करून/त्याची लाश पाडुन, त्याचे ओपार कृष्णास अर्पण करता ? त्या लाशीचे मासं, मद्यपान आपल्या मुखाने प्राशन करून, त्याच मुखाने या चतुर्पता गाईचे अथर्वन् वेदाच्या ओव्या गाता ?

तुमच्या अश्या वागण्याने तो कृष्णा तुम्हास ही चारही वाणीतुन निघणारी मौसं वाणी नाही देणार ! कारण की : ही मौस वाणी या अनामीक कृष्णाचं घर होय. या मौस वाणीतच तो राहतो. या मौसवाणी च्या शब्दावर उभा राहुन त्या शब्दाप्रमाणे काम करतो. या चतुर्पता अथर्वन् वेदांच्या ओव्याच्या अक्षरी या मौस वाणी व्दारेच द्युतगण सह देवांगण आले आहेत. येत आहेत. द्युतासह देवांगण, येणार आहे. या मौंस वाणी व्दारातुनच तो कृष्णा देहघरी प्रवेश घेवुन प्रवेशी होत आहे. भेटी देत आहे. मुजरा घेत आहे. पुढे ऐसेच होणार आहे. आणी तुम्ही मासाहार मद्यपान करून पोटात मद्य-मांस ठेवुन ही चतुर्पता अथर्वन् वेदाची चारही वाणीतुन निघणारी मौस वाणी गायता ? तुम्ही असे गायन करता म्हणुनच जग ओळखेना या ओवीचे चरण गर्जुन सांगते की : ही मौस वाणी या अनामीक कृष्णाचे घर होय. तुम्ही असे मद्यपान मासाहार करत जर ही मौस वाणी मुखी घेत असाल, तर ही मौस वाणी तो कोण्या मद्यपान, मौसभक्षण करणा-या मानवास कदापि देणार नाही. तो ही मौस वाणी त्यांना देणार नाही बर ! अश्या तिरगुणी मासाहांर मद्यपान करणा-या बहु मानवाचे त्याहीला भेव वाटते. कारण की : असे तामसी मानव मद्यपान मासांहार करत आपल्या पोट-पाण्यासाठी, आपल्या स्वार्थासाठी या मौसवाणी चा उपयोग करून या चतुर्पताचा नाश करेल. अश्या स्वार्थि तिरगुणी मानवांना ही चतुर्पता न दिलेलीच बरी ! हे चतुर्पता ग्यान सहसा अश्या स्वार्थि तिरगुणी तमोगुणी बहु मानवांच्या जवळ येवु देणार नाही. अश्या मानवांना या चतुर्पताच्या जवळपास ही तो फिरकु देणार नाही. हे सत्य जाणा.

परंतु ज्या सच्च्या भक्ताने स्वतः च स्वताला ओळखुन स्वःस्वरूप पाहीले, आत्मरूप पाहीले, असे स्वः स्वरूपी ओळखीचे आत्मग्यानी भक्त-जीवचया कृष्ण जीवाला ओळखतीन. या चतुर्पताला ओळखतीन. त्यां सच्च्या आत्मग्यानी भक्तांच्या जवळ हे चतुर्पता ग्यान आपरूप येईल. तो कृष्णा आपणहुन त्यांच्या देहघरा उभे राहुन त्यांना हाती धरेल. दवंडीच्या प्रमाणे त्याला ही चतुर्पता वाणी सांगेल. मो-ह येवुन यवगाच्या गोष्टी सांगेल. निरंजनी भेटी देईल. त्यांचा मुजरा घेईल. त्यांच्या चौ-याशीच्या वाटा मोडन... । असे भेटी आंगचे सच्चे भक्तच ही चतुर्पता गाय जागृत ठेवतीन. तेच जागी करन या कृष्णाला ! आणी स्वतः ची ज्योत उजळुन या कृष्णाकडुन घेतीन. तेच जाणतील की :

॥ तिरभवनी चारही खुम्म । शक्ती आदीपुरूष ।
याहीच्या हंकारानं उभे, आहे तिरलोक । अनामत देव द्युत आहे गादीप ॥
॥ गादी केली भरून देहे । याहीच्या हुकुमात ।
अनामत नित रूप आहे, जागृत ज्योत । उरल्या गादीनं येईन चित्ती ॥
॥ देहे भरून, गाही दिली । याहीच्या हुकुमानं ।
उरल्या देहीनं येईन धनी । खेळ केला/करन नितरूप ॥

चौथी आदीशक्ती आदीपुरूष कृष्ण हा चौथ्या खुम्मी पिंडी या ब्रम्हाडी च्या तिरभवनी उभा आहे. हाच चारही खुम्मात तसेच देहे शक्ती संग या आदीपुरूषाच एकच तेज अशं असलेला आत्माराम या पिंडी या ब्रम्हांडी भरून भरला आणीक उरला आहे. याहीच्या हंकाराने पिंडी या ब्रम्हाडाचे तिरभवन तिरलोकी उभे आहेत. देहरूपी गादी केली आहे. देही याची गादी याने केलेली आहे. या गादीवर तो अंश अवतार घेवुन आत्माराम बनुन ही गादी चैतन्य ने भरून देत उभा आहे. या आदीपुरूष अनामत चा आत्माराम देवद्युत ची सत्ता या देह गादीवर आहे. चतुर्पतीच्या सच्च्या भक्तांच्या देहीत याचीच ही अनामत नित्य रूपाची ज्योत जागृत आहे. या धन्यानेच सच्च्या चतुर्पती भक्तजनांच्या देहीत येवुन, त्यांना निरंजनी भेटी देत गाही साक्ष पुरावे दिलेले आहेत. या कृष्णधन्याच्याच हुकुमात सर्व काही आहे. अवघ याहीच्या हुकुमात ! याहीच्या हुकुमाबिना झाडांचा पत्ता/पान सुध्दा नाही हालत ! तोच धनी उरल्या देहीन पुढे येईन. कारण की :

॥ चार खेळ चौघानें मांडले । एकच होईन संगजोड ।
चौ यवगाचा, उभा होईन खेळ । एकच उठन भमंकार ॥
॥ चौ यवगाचा, होईन मारोडा । शक्तीला सुटन चळ ।
दुनुन/जुनं आयुष्य, होईन कुडीला । देवराज करन यवगाचां खेळ ॥

चारही यवगात या चतुर्पता पंथाच्या भुम्मेवर चतुव्युहरूप रंचणेत अवतरलेल्या चौघानेंच खेळ मांडला आहे. या चौघाच्या खेळाचा एकच संगजोड झालेला आहे. अधिक ग्यानाकरीता कृष्णामृत वाचा. चर्तुव्युह रूप रंचनेत आलेल्या या पुर्ण अवतार कृष्णाचा हा चवयवगाचा खेळ आता उभा राहीन. या पुर्ण अवतारी कृष्णाच्या खेळाव्दारे या चतुर्पतीचा एकच भमंकार उठन. अग्नघरच्या अग्न काळ व्दारे या चतुर्पती पंथाचा एकच दांड या तिरगुणांचा पाखंड फोडन. तिरगुणी शक्ती सैरवेर होईन.. सुटन या शक्तीला चळ.., चवयवगात लागलेले अनेक नामी हे एकमेकात मारोडा करून अंती ब्राम्हण क्षत्रिय, वैश्य, शुद्र एक होवुन चतुर्पती च्या एकाच नामी लागतीन. एकला हा चतुर्पतीच्या एकाच नामी ही अवघी सृष्टी लावन बापा ! आणी जुन लाखो करोडोवर्षाचे आयुष्य या कुडीला येईन... असा खेळ तो देवराज कृष्णा सत्युवगाचा करणार आहे.



**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०५/भाग ०२ ॥
॥ ओवी नं. ७४ ॥

## ॥ कृष्णांमृत चा उत्तरार्ध ॥

## ॥ आकाशाची वाणी ॥

॥ आकाशाची वाणी । सांगे जिवा जनीं ।
सत्य जाणा तुम्हीं । आले/येईन धनीं ॥
॥ कल या यवगात । सत् यवगाची वाणी । सांगे कृष्ण धनीं ।
तारण जिवा जनीं । चौदावीला ॥
॥ मुळ यवगाच्या गोष्टी । सांगे कृष्ण अवधुतं ।
होईन हकिकतं । चौदाविला ॥
॥ कृष्णाजीचा बोल । उठला अपारं ।
जागी करनं सारं । चौदाविला ॥०४॥

॥ चौदावीच्या ठायी । तो, धरनं अवतार ।
करू केला कारं । नव दिवसाचा ॥
॥ नव्या या दिवसाचा । नवा कार होतां ।
खेळ कसा केला समर्था ? ठाव तुले ॥
॥ ग्यानाचा सागर । भडका, उठला अस्मानी/अंतराळीं ।
ठळमळ पाणीं । या राउळात ॥
॥ नवा या दिवसाच्या । नव्या खुणा चित्तां ।
पुर्विस्ता च्या संचितां । गेले रायां ॥०८॥

॥ देहे या धरून । अवतार आदीमुनी ।
पुर्विच्या संचिता । येईन धनी ॥
॥ मुळ यवगी वचन । कल यवगी दर्शनं/पुंजन ।
करा हो चिंतनं/पुंजन । सदोनितं ॥१०॥
भजनेः- ॥ पुंजन करतो धरणीले । हात जोडीतो जोडीतो आकाशाले ॥
॥ अवसर/अवसा प्रतिपद बिज । हे तारिख भज, येईन महाराज/चत्रभुत ।
॥ तारीख भजा । देव येईन चत्रभुजा/महाराजा । तो लावनं ध्वजा ॥



॥ खंड ०५/भाग ०२ ॥
॥ ओवी नं. ७५ ॥

## ॥ कृष्णांमृत चा उत्तरार्ध ॥

॥ कृष्ण ज्ञानाची व विनवणीची मुळावरची ओवी ॥
॥ आदीपुरूषाचे भजन करता ०५/७३ ची जोडओवी ॥

## ॥ सावंगपुरी सांगी झाली ॥

॥ सावंग नगरी, सांगी झाली । हे आहे थोरं ।
आदीपुरूषाच्या, ग्याना मध्ये । होईन सुदबुधं ॥घृ॥
॥ नवी सांगी अपोर/अप्रुप वाणं । तुही, जुनी सांगी थोरं ।
तिरकुटानं, उडया घातल्या । केलें राउळं ॥
॥ राउळ नव्हतं, देउळ नव्हतं । स्थापना केलीं ।
पक्की मांड बसली देवा । याहो लवकरीं ॥
॥ सावंग नाथा, धावुन आता । याहो लवकरं ।
सत् कृतीचा झाला/आहे उजाला । धन्य भाग्य थोरं ॥०४॥

॥ चव यवगाचा धनि देव । तो, होय गा अवतारं ।
चार शिक्के देहीवर याहीनं । केलं राउळं ॥०७॥
॥ सावळं सुत्र तिरकुट चित्र । होती ते देहीं ।
देहे पालटुन, गेला रे बापा । ज्योती च्या ठायीं ॥
॥ ज्योत कळा, जन्म निराळा । याहीचा होईनं ।
तो नर जन्मा येईन । त्याला, तुम्ही कैसे ओळखानं ? ॥
॥ आदीपुरूषा च्या हात ओळख । घ्याहो करूनं ।
आधी ओळखा आप-रूपाला/आदीपुरूषाला । तोमग देईन ओळखुनं.

॥ आदी पुरूषाला अरज करन/करतो । अवतार आदी मुनीं ।
निर्गुण ठायी अवतार धरन । बालक होवुनीं ॥०९॥
॥ होतीन बाळ भेतीन ताळ । तीन ही थरथरां ।
शुरविर खेत्री उभे राहतीन । याहीच्या संगतीलां ॥
गर्भि फौजा उभ्या राहतीन । याहीच्या राजपतिलां ॥
॥ तिर-तिर भवन ओळखुनया । एक नाही दिसणारं ।
याहीच्या संगतीचे/आंगचे आत्मं गडी । निघतीन बाहेरं ॥
॥ नवा राजा नवा करीना । भैसाचा खेळं ।
तिरकुटाचं करनं गुढं । हे पाहयजा पुढं ॥१२॥
किंवा :- तिरकुटांच मोडण ठाणं । हेही पाहजा पुढं ॥
॥ तिरकुट राउळ तिरकुट देउळ । तिरकुट मकाणं ।
तिरकुटाच्या संगतीन फळ । येतीनं भोगणं ॥

**भजने :-**

॥ खेत्री ढाल पटाईतं । बाहेर निघा, दया बाळाला भेटं ॥
॥ शुर विरा बांध कंबरं । निघं बाहेरं..
टाक पाउल, तुला पाहयंता तिरभवनं कापे थरथरं ॥
॥ देवा तु सांगुन गेलां । काहो यवगाला उशीर लावलां ॥
॥ देवा का करतो उशीरं । वाट पाहतो आम्ही अन्जान लेकरं ॥
॥ कृष्णा निघ निघ बाहेरं । वाट पाहतो आम्ही अन्जान लेकरं ॥

## -: निरसनसह शब्दार्थ/चरणार्थ :-

**अप्रुप, अपोर** :- अपार, अनंत, अफाट, नवल वाटणारे, पोर/मुलंबाळ नसलेले वांछोटे । **वाण** :- देणं, भेटी । **गर्भि फौजा** : देवाच्या/राउळाच्या गर्भस्थळातिल फौजा, मध्यभागी असलेल्या गर्भगृहातील गर्भि सिध्दांच्या फौजा । **गुढं** :- मोकळ्या जागेवर असलेल्या कडबा कोठारातील एक एक कडब्याचा ढिगं. तिरगुणी कडब्याचा ढिग. आज आज म्हणता उदया एक चतुर्पती शकुनाचा वारा येवुन हा तिरगुणी कडब्याचा ढिगं उडनं ।

**गर्भि सिध्द** :- मध्य भागी येवुन उभा असलेला, गर्भावस्थेतच परमात्माकडुन ग्यान प्राप्त केलेला सिध्द. देवासमोर देवालयातील गर्भात येवुन उभा असलेला.

**उदाहरणार्थ** :- अभिमन्यु याने गर्भावस्थेतच चक्रव्युह भेदाचे ग्यान श्रीकृष्ण परमात्म्याकडुन प्राप्त केलेले होते. पुर्वजन्माच्या संचिताव्दारे गर्भातच पुर्विच ग्यान सिध्दि ईत्यादी भगवंताकडुन प्राप्त झालेले गर्भि सिध्द द्युत !

ज्यांना गर्भावस्थेतच पुर्विच्या संचिताव्दारे ग्यान सिध्दि ईत्यादी भगवंताकडुन प्राप्त झालेले आहेत. आणी या ग्यानाच्या भरोवश्यावर आध्यात्मीक विश्वात पुढे पुढे चालत येवुन, या आध्यात्मीक विश्वाच्या गर्भात म्हणजेच मध्यभागी जे आलेले आहेत. असे आकाशवाणी विशाल अलिप्त अनंत ग्यान सिध्दि प्राप्त झालेले हे योगीजन पुढे गर्भि द्युत बनुन, या चतुर्पती विठ्ठल नामी पृथ्वीवर होणार आहे बा ! आणी अश्या

गर्भि सिध्दांच्या गर्भि फौजा या कृष्णाच्या राजपदिला उभ्या राहतीन. गर्भिच्या अधिक ग्यानासाठी खंड०४/०१ ठाकुलनामीचे निरसन वाचावे.

**त्रिकुट चित्र..** : त्रिकुटावर तिन देवाची वस्ती आहे. रज सत्व तम या तिनगुणांचे तिन राजे ब्रम्हा विष्णु शंकर हे तेथी राज करीत आहे. तिन राजे आपले तिरगुणी चित्रे चालवत आहेत. आपआपल्या गुणांचे डमरू या देहीत वाजवुन देहीला अहंकार आणुन याहीचे तिरगुण ही देही नाचवे. म्हणुनच कधी देहीतील रजगुणाचे डमरू वाजवल्या नंतर देही ही राजाप्रमाणे सत्ता गाजवण्यासाठी हपापते. माझेच ऐका, मीच मोठा ! असा अंहकार आणत राहते. तर सत्वगुणाचं डमरू वाजल्यानंतर या देहीला सत्वगुणांचा अहंकार होवुन ही देही मीच मोठा सत्वगुणी ! मीच मोठा ज्ञानी ! माझी पुजा अर्चना करा. मला मान सन्मान दयावे. अशी आशा/अपेक्षा बाळगत देहीत अहंकार आणुन राहते. आणी तम गुणांचे डमरू वाजल्या नंतर तर ही तामशी बनते. कुणाचही ऐकत नाही. अत्याचार करते. असेच चित्र नाचना-या देहीकडे बघितल्यावर दिसते. अश्या रितीने या त्रिकुटी चित्र व्दारे हे तिन गुण देहीत अहंकार आणत या देहीला नाचवत राहते. या तिरगुणांनी देहीला नाचवण्याचा पण/ठेका/नेम तिरगुणांने घेतला आहे. या तिनगुणांचे या देहीला नाचवण्याचा पण जो नाश करेल त्याच्या देह जिवाच या तिरगुणाच्या पण नाशीला स्वय्रवर होईन. जो या तिरगुणाचे ओझे टाकुन देईन, तोच पाहील या तिरगुणांच्या पलीकडे उभा असलेला चौथा शुध्द सत्व् धन्याला । अन्यथा या तिरकृटी तिरगुणांच्या संगतीन राहल्याने चौ-यांशीचे फळ येतीन भोगण्यासाठी !

**सावंग/सावळं सुत्र..** : त्रिकुटी चित्र च्या वर चौथ्या स्थानी अनंत ब्रम्हांडाची चित्रे तो चौथा शुध्द सत्वी चतुर्पती निरंजन परमात्मा चालवी । सोयंम् सिध्द खेळ दाखवी । तो कळसुत्राचा मालक देहीच्या कळसुत्र बाहुल्या नाचवी । तोच निराकारी निराधारी सांवग्याचा सावळा सुत्रधारी । जिव-शिवाचे सुत्र आहे याहीच्या हाती । सुत्रधारी तु उभा येथ । आता जिवा-शिवाचे सुत्र करावे एक । देह-जीवाचे लग्न लावुन आम्हा दयाहो आता अम्बंर पद । सावंग्याच्या कृष्णराज सुत्रधारी तुच एक । येथ येवुन आनंदाची ज्योत आम्हा दाखव.

**देहे पालटुन..** : काया पालटुन म्हणजेच कायापालट करण्याकरीता गायपाचा खेळ करून, देह गायप करून गोल्हाटी आनंदाची ज्योत गडेहो आनंदात राहत, कृष्णा आपले चतुर्पतीचे कार्य करत आहे. या आनंदाच्या ज्योतीच्या ठाई पासुन हा पुनःश्च उगवत कधी देह धरून देही होतो, कधी विदेही होतो. आणी चौथ्या खुम्मी चतुर्पता अथर्वन् वेद चतुर्पती नामाची गर्जना करतो. गायपाच्या खेळाची अधिक ज्ञान कृष्णामृंत मधुन घ्यावे.

**चार शिक्के याहीच्या देहीवर..** : ब्रम्हा विष्णु शिवशंकर सानीध्य चौथा आदीमुनी अवतार यांचे रज सत् तम हे तिन आणी चौथा शुध्द सत्व असे हे चार शिक्के याहीच्या देहीवर रूपरूपाचे आहे. म्हणुनच पुढे राज्य होईन या भैसाचे.

**आधी ओळखा आपरूपाला..** :- स्वतःव्दारे स्वतःचे सेरूप ओळखावे. असे ज्यांनी स्वतःला ओळखुन स्वतःचे सेरूप पाहीले ते ओळखीचे ओळखतीन हा जीव. अश्या ओळखीच्या जीवांना तो आदीपुरूष देईन या जीवाची ओळखी करून ! त्या ओळखीच्या जीवांच्या हातीच देईन तो आपली मौसवाणी ! कारण या मौसवाणीतच तो अनामीक कृष्ण गुप्तरूपात राहतो. हे मौस वाणीच त्याचे घर होय. या घरात येणाःया अनोळखी बहु मानवाचे त्याला वाटते हो भेव कारण हे अनोळखी तिरगुणी मायेच्या तिरगुणी ग्यानाचा प्याला पिउन ही चतुर्पती ची चारही वाणीतुन निघालेली मौंसवाणी लुटु पाहतील. अश्या अनोळखी तिरगुणींला ही मौसवाणी तो देणार नाही बरं !अधीक ग्यानाकरीता खंड०२/१५ः-गाहीची ओवी चे निरसन वाचावे.



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०५/भाग ०२ ॥

॥ ओवी नं. ७६/०१ ॥

## ॥ कृष्णांमृत चा उत्तरार्ध ॥

ओवी महात्मः- स्थापनेच्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी..

॥ भाकल्या शकुन व विणवनी ची सावंगा-जळगाव दांडची मुळावरची ओवी ॥

## ॥ म्याउ्र म्याउ्र हाका मारतो ॥

।। म्यांउ्र म्यांउ्र, हाका मारतो । पहा या साहेबालें ।
त्याचा प्राणी तोच तारण । पहा या दिवसालें ।।
।। प्रथम यवगी सत्य धारी । गिण्यान साहेबाचं ।
अवले/अल्लम् ऋषि जपी तपी । झाले सत् यवगातं ।।
।। गर्भि फौजा येतीन राया । या पृथ्वी वरं ।
सव्वा गज लीद पडनं । या भुम्मेवरं ।।
।। या फौजेचं ठिकाण मकाण । कोणी नाही सांगणारं ।
पुर्व पश्चिम उत्तर दख्खन/दक्षिण । अंकात होणारं ।।
।। तरण उपाय होईन दादा हो । डिकावं नामालें ।
निश्कलंकी, अवतार उभे । राहतीन यवगालें ।।
।। महाराजा च्या नामी/गिण्यानी कोणी एक । आत्मा लावनं ।
तोच यवगी सत्य धारी । राजा होईनं ।।
।। महाराजाचं नाम/गिण्यानं होईन । चौताळावरं/तिताळावर ।
ब्रम्हा विष्णु शंकर उडुन । जातीनं अंतराळं ।।
।। महाराजाचं नाम/गिण्यानं हो राया । या प्राण्या आलं ।
तिरगुणाचं राज शुन्य । होईन जल स्थलं ।।
।। जला स्थलावर ज्योत उभी । उठनं हंकारं ।
या ज्योतीनं तरले राहु । बहु यवगा वरं ।।
।। ज्योत भली हो ज्योत भली । ज्योत उभी आहे ताळातं ।
तिताळावर/तिरभवनात ज्योत उभी । नांदन देहीतं ।।
।। ज्योतीनं ज्योत प्रकाश/उजेड । भरन देहीतं ।
उजळनं रुप हे, सुर्याच्या तेजातं । जैसे रुप हे सुर्याचे तेजं ।।



॥ ओवी नं. ७६/०२ ॥

## ॥ कृष्णांमृत चा उत्तरार्ध ॥

॥ निरसनसह सावंगा दांड ची निरसनाकरीता घेतलेली मुळावरची ओवी ॥

## ॥ म्यांउ्र म्यांउ्र, हाका मारतो ॥

॥ म्यांउ्र म्यांउ्र, हाका मारतो । पहा त्या साहेबालें ।
ज्याचा प्राणी तोच तारण । पहा या दिवसालें ॥
॥ प्रथम यवगी सत्य धारी । गिण्यान या साहेबाचें ।
अवलेहाई ऋषि गुप्त झाले । सत् यवगाचें ॥
॥ साहेबाचं भाकलं दादा हा । एक प्राणी आहयं ।
तिरगुणांच उडवण ठिकाणं । होईन जल स्थळं ॥
॥ साहेबाचं, भाकलं दादा हा । एक प्राणी आहयें ।
पृथ्वी वरत, जलस्थळ झाले/होईन । अवघं ढळमळें ॥ ०४ ॥
॥ जलां स्थळावर, ज्योत उभी । उठला हंकारं ।
या ज्योतीनं, तरले राहु । बहु यवगा वरं ॥
॥ ज्योती भली हो ज्योत भली । उभी आहे ताळातं ।
बहुत यवगं ज्योत भली । नांदवं देहीतं ॥
॥ देही या, जीवाची गडे हो । अरज सुमरा हों ।
महाराजाच्या, गिण्यानानं । चौ-यांशी चुकवा हों ॥

॥ महाराजाच्या, गिण्यानी कोणी एक । आत्मा लावनं/लागनं/राहीनं
तोच यवगी सत्य धारी । राजा होईनं ॥०८॥
किंवा :- तोच प्राणी सत् यवगी । राजा होईनं ॥०८॥
॥ महाराजाचं गिण्यान/नाम होईन । चवही ताळा वरं ।
ब्रम्हा विष्णु शंकर उडुन । जातीन अंतराळं ॥
।। गर्भि फौजा येतीन राया । या पृथ्वी वरं ।
सव्वा गज लीद पडनं । या भुम्मेवरं ।। ..जळगावं दांड चे चरणं
।। या फौजेचं ठिकाण मकाण । कोणी नाही सांगणारं ।
पुर्व पश्चिम उत्तर दख्खन/दक्षिण । अंकात होणारं ।। ..जळगाव दांड चे चरणं
॥ तरण उपाय, आहे/होईन गडेहो । डिकावं नामालें ।
निशंःकलंकी, अवतार उभा । राहीन हो यवगालें/दिवसालें ॥

**भजने :- ॥ निश्कलंकी अवतारा । लवकर याहो, भक्ताच्या/भक्तीच्या माहेरा ॥**

**शब्दार्थ** :- **म्यांउ्र म्यांउ्र** :- मांजराचे पिल्ले ज्याप्रमाणे एकाठाई राहुन आपल्या माते ला निरंतर अखंडीत हाका मारते, त्याप्रमाणे एकाठाई एका हरी नामी राहुन हरीला निरंतर अखंडीत हाका मारणे. । **कलयवगी माघा-या** :- कलयवगाचा संधिकाळ गेल्यानंतर कलयवगामागे येणा-या सत्‌यवगाच्या आरंभ काळात. । **डिकाव**:- चिकटुन/ चिकाटीने एकाच ठाई ठिया मांडुन नामी राहावे. । **पृथ्वी** :- देहधरणी । **जलस्थळ** :- पाण्याची नरदेही असेलेला जलीया खांब-०२/०४:-जलीया खांबाशी उभे नारायण किंवा जिथे आध्यात्मीक जलाचा साठा राहते ते जलाचर चे अधिक ग्यान खंड०१/०१/०१:-आदीपुरूष आदीगण मधुन घ्यावे., । **प्राणी** :- मानव प्राणी

## ॥ निरसनसह म्यांउ्र म्यांउ्र, हाका मारतो ॥

### -: निरसन :-

॥ म्यांउ्र म्यांउ्र, हाका मारतो । पहा त्या साहेबालें ।
ज्याचा प्राणी तोच तारण । पहा या दिवसालें ॥

हे चतुर्पती धनी साहेबा ! आम्ही चतुर्पतीचे भक्तजन मांजरीच्या पिल्याप्रमाणे एका ठाई बसुन तुम्हास निरंतर अखंडपणे हाका मारतो की : आम्ही तुमचेच प्राणी असल्यामुळे तुम्हीच आम्हाला येथे येवुन तारा हो दिवसा दिवसाले यवगात ! सदोनित तरण उपाय करून आम्हा तारा हो समर्था !

॥ प्रथम यवगी सत्य धारी । गिण्यान त्या साहेबाचें ।
अवले हाई ऋषि गुप्त । झाले सत् यवगाचें ॥

हे चतुर्पती धन्या ! प्रथम यवगी तुमचेच सत्याच्या धारा वाहवणारे सत्यधारी चतुर्पती गिण्यान होते, त्याच सत्याधारी चतुर्पती गिण्यानांच्या धारा आता वाहु दयाहो. प्रथम सत् यवगी तुमच्याच चतुर्पती ग्यानाव्दारे सर्वत्र समसमानतेची व्यवस्था होती. अवघे जन तुमच्या ध्यानी होते. अधिक ग्यानाकरीता खंड०१/०२/०२:-निराकार निरंजन ओवीचे निरसन वाचावे. परंतु मायासह तिनदेव च्या देणं खातर चतुर्पती देवानं लहानपण घेवुन मायेसह या तिघांना तिन यवगाचे राज्य दिले. आणी या तिन यवगाच्या तिनगुणी राज च्या मायेत फसु नये म्हणुन तुमच्या सत्‌यवगातील अल्लम अवले हाई कृष्ण ऋषि, मुनी जपी तपी जसे गुप्त होवुन गुप्तपणे चतुर्पतीचे कार्य करत आहे. तसेच आता हा कृष्णा सुध्दा गुप्त होवुन चतुर्पतीच्या कार्य करत आहे.

॥ साहेबाचं भाकलं दादा हो । हा प्राणी आहयं ।
तिरगुणांच उडवण ठिकाणं । होईन जल स्थळं ॥

हे चतुर्पती धनी साहेबा ! तुमच्याच भाकल्याप्रमाणे हा कृष्ण यवगी प्राणी येथे उभा राहला आहे. तु त्यांच्या देहघरी आला आहे. तुम्हीच प्रथम सत् यवगाचे सत्याच्या धारा असलेले सत्यधारी चतुर्पती ग्यान असलेला चतुर्पता अथर्वन् वेद कृष्णमुखातुन बाहेर पाडुन आम्हा भक्तजनांच्या हाती दिला आहे. चतुर्पता बिर्द या मिर्त लोकी उभे केले आहे. तुमचाच हा एकच चतुर्पतीचा दांड या तिरगुणांचे पारखंड फोडुन, तिरगुणांचे ठिकाण उडवुन आदीपुरूष आदीगणांचे आध्यात्मीक जलांचे स्थळ म्हणजेच आदीपुरूष आदीगणाचे जलाचरात विवरत असलेले आदीगण आदीपुरूषा बरोबर असलेले गडी येथे उभे करणार/राहणार आहे. या जलीया खांबाशी उभे हे कृष्ण नारायण आता या

जलाचरात निरंजन ज्योत उभी करणार आहे. जलाचराच्या ग्यानाकरीता खंड०१/०१/०१:-आदीपुरूष आदीगण मधील चौदाजुग जलाचर, सोयंम् उभी ज्योत या टुकांचे निरसनातुन ग्यान घ्यावे.

॥ साहेबाचं, भाकलं दादा हो । हा प्राणी आहयें ।
पृथ्वी वरत, जलस्थळ झाले । अवघं ढळमळें ॥ ०४ ॥

हे चतुर्पती धनी साहेबा ! हे तुमचेच चतुर्पतीचे जलस्थळ उभे करण्याकरीता तुमच्या भाकल्याप्रमाणेच आमच्या कृष्णाने आपल्या देहधरणीचे सर्वप्रथम जलस्थळ करून सुरूवात केलेली आहे. तुमच्या पुर्विच्या भाकल्याप्रमाणेच मिर्त लोकी या कलीच्या संधीत हा कृष्ण प्राणी उभा झाला आहे. आणी तुमच्या भाकल्याप्रमाणेच येथे कृष्णाने आपल्या देहीचं आध्यात्मीक जलांत रूपांतर करून या जलामध्ये ज्योत स्वरूपात उभे राहुन हंकार उठवत आहे. हंकाराची वाचा, अहीन हा भला, बट्टा नाही बा याला रत्तीभर हो ! हंकार या कलयवगात । द्युतांची वाणी सांगे जगात ! जलीया खांबाशी, उभा हा नारायण । आहो धुम्मधुम्मकार राया याही भुम्मेवर ! जगा नाही मालुम । कळसुत्र तुम्हा हाती । भजो भजो हा गणपती । ।

॥ जलां स्थलावर, ज्योत उभी । उठला हंकारं ।
या ज्योतीनं, तरले राहु । बहु यवगा वरं ॥
॥ ज्योती भली हो ज्योत भली । उभी आहे ताळातं ।
बहुत यवगं ज्योत भली । नांदवन देहींतं ॥

या अनामत निरंजन ज्योतीनं कित्येक राहुटी करून असलेले राहु आत्मे बहुयवगावर तरले आहेत. आम्ही सुध्दा या अनामत निरंजन ज्योतीनं बहुयवग तरले राहु असा पक्का विश्वास आहे. ही ज्योत भली हो ज्योत भली उभी आहे आता ताळात । या ज्योतीचा अवतार कृष्णदेव आता गुप्तरूपात सावंग्यात उभा आहे. बहुत यवग ही निरंजन ज्योत भली आता नांदन या देहीत । आता उभा आहे आमचा कृष्ण सखा गुप्तरूपात । या गुप्त कृष्ण सख्याचा तिरलोकी उठलेला हंकार आम्हास सर्वोतपरी गाही देत आहेत. हा हंकार अवघ्या निर्मळ ठळमळ सप्त सागर असलेल्या आध्यात्मीक जलाला ठवळत आहे. अवघं जल आता ठळमळ करत आहे.

॥ देही या, जीवाची गडे हो । अरज सुमरा हो ।
महाराजाच्या, गिण्यानानं आपली । चौ-यांशी चुकवा हो ॥

आम्ही भक्तजन आपल्या देही या जीवाची अरज सुमरत आहो की : महाराजाच्या गिण्यानांन चुकवा हो आमचे मरणं ! चुकवा हो आमची चौ-यांशी ! आता नामी जडल्या उपर नसावं बा आता या देहीला मरण । तुमचे नाम घेता चुकवा चौ-यांशी यवनं । विश्व हे व्यापका ! आता तुमचे चतुर्पती नाम आम्हास काहीतरी उपाय करून व्यवस्थित समजावुन सांगा ! हे महाराजाचं गिण्यान समजवुन देण्याकरीता महाराजाच्या गिण्यानी कोणी एक आत्मा लावुन दयावा. हीच अर्ज.

॥ महाराजाच्या, गिण्यानी कोणी एक । आत्मा लावनं/लागनं/राहीनं ।
तोच यवगी सत्य धारी । राजा होईनं ॥
॥ महाराजाचं नाम/गिण्यान हाईनं । तिनही ताळा वरं ।
ब्रम्हा विष्णु शंकर उड्डुन । जातीन अंतराळं ॥.....

ऐसा एक शकुन या चरणांव्दारे दिला आहे की : पुढे येणा-या काळात महाराज कोणी एक सत्यधारी आत्मा च्या घरा आपरूप जावुन महाराजाच्या गिण्यानी लावनं ! अहीनाघरचे ग्यानांमृत त्या सत्यधारी योग्यास पाजेल. आत्मबोध देईल. महाराजाव्दारे अहीनाघरचे ग्यानांमृत चा प्याला पिलेला तो योगात्मा प्राणी महाराजाचे मुखचे महाराजाने दिलेले चतुर्पता अथर्वन् वेद चे संपुर्ण सविस्तर गिण्यान जगात प्रचारीत करेल. ऐसे चतुर्पतीचा मुळस्तंभ असलेल्या चतुर्पता अथर्वन् वेदाचे फळ हे दादा शेंडयावर येवुन तेथुन हा चतुर्पता अथर्वन् वेद जगात प्रसारीत होवुन जगास निरंतर परमय देत राहीन ! तो महाराजाच्या हस्ते सत्याच्या धारा पिणारा चतुर्पती यवगी सत्यधारी चतुर्पती गिण्यानाचा राजा होईल.

हा चतुर्पता अथर्वन् वेद हाती घेवुन जो चतुर्पती ग्यान घेवुन महाराजाचं संपुर्ण ग्यान रोमरोमात भरन, त्या सच्चा भक्त योग्याच्या देहीवरचे तिरगुणांचे राज जाईन. तो त्रिगुणातीत होवुन चतुर्पती च्या ध्यानी राहील्यामुळे त्याच्या देहीवरचे तिरगुणांचे तिन देवांचे गुणांचे ठाणे दुरवर अंतराळात उडुन जाईन. तिरगुणी ठाणे रिकामे झाल्यामुळे विविध तिरगुणी ठाण्यावरचे तिरगुणीं मोठा अंकांत माजवेल. तेव्हा मग त्या सत् देहीचे तिन ताळात देव ज्योता, जीव ज्योता हा महाराज भरून/चढवुन त्याचा देह प्रकाशीत करून आपली सांगी सही करेल. देवाच्या आंगचे/संगचे देहे आत्मे बाहेर निघुन त्या प्रकाशलेल्या सत् देही च्या संग उभे राहतीन. देवाच्या भेटी आंगचे सिध्द उभे राहतीन. त्यां सत् देहीच्या संग देवाच्या गर्भातील मध्यभागच्या गर्भि फौजा, चतुर्पता अथर्वन् वेद सैना..ईत्यादी उभ्या राहुन देहीचा तरणोउपाय करत राहील. ऐसे चरण गर्जुन सांगी करते की : ॥ तरण उपाय, होईन/आहे गडेहो । डिकावं या नामाले ।
निशं:कलंकी, अवतार उभा । राहीन हो यवगाले/दिवसाले ॥

**भजने** :- ॥ तुम्ही डिकावं या नामाला । कोटी सुर्यप्रभा सम होईन उजाला ॥
॥ तुम्ही डिकावं या नामाला । चंद्र ज्योती सम होईन उजाला ॥



॥ ओवी नं. ७७ ॥

## ॥ कृष्णांमृत चा उत्तरार्ध ॥

॥ सावंगा-जळगाव दांड ची मुळावरची विनवनी अर्जची ओवी ॥

## ॥ कर जोडुनी करतो प्रार्थना ॥

वरचरणे :-
।। कर जोडुनी करतो प्रार्थना । धनी अनामता ।
बदनामी च्या जवळे नको । राहु गुणी वंता ।।
।। हात जोडुनी करतो विनंती । देवा अवधुता ।
धाव पाव, लवलावी भेट दे । कैवल्य दासा ।।
।। झेंडा पट्टा घोडा देवाचां । येईन भुम्मेवर ।
तिन ताळाचा शकुन । हिरुन, नेईन कुल सारं ।।
।। जीव पाण्याचा बुडबुडा । संसार शेनाचा सडा ।
देह गा तारण, तोही । अवतार खरा ।। 04 ।।
॥ अल्लाद आहे याचे पाय । नाही लागत धरणीला ।
बहुत यवगं पाहयतो वाट । कधी यालं भेटीला ॥
॥ तिन यवगं गेले सुन्यात/शुन्यात । नाही झाले दर्शनं ।
कृष्ण राज महाराजा तु । दाखव आपले चरणं ॥
॥ तिन यवगं भ्रांत पडली । नाही दिसले डोळ्यानं ।
भैस राज महाराजा । उभे, राहो येवुन ॥
॥ ओळखा हो भक्तानं आपला शकुन अवतार ।
काय पाहता देहीचं निराळ । निघालं नामं ॥ ०८ ॥
॥ सत्य शकुन दवंडी देतो । या धन्याची वाणी ।
चतुर्पतीचा कार समजा । आपल्या मनी ॥
॥ समजा आपल्या मनी । ऐका, चतुर्पती नाम ।
चतुर्पतीचा कार दाखव । दृष्टी समोरं ॥
॥ ख-या कार यवगाचा विडा । मांडला सभेतं ।
तेरवी सिध्दी भरल्या वर । होईन गणीतं ॥
॥ अं् कार करा यवगाचा विडा । मांडला सभेत ।
चौदवी भरल्या वर पुढं । पाहयं बहु हित ॥१२॥
॥ ख-या कार यवगाचा देव । उभा राहीनं ।
देव काळ/काय उभा राहीन । थिर, धरा हो जनं ॥१३॥

**भजने** :- ॥ थिर नाही कोणाच्या मना । बाहेर काढा हो काढा सारी सैना ॥
॥ खेत्री ढाल पटाईत । बाहेर निघा दया बाळाला भेट ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. ७८ ॥

## ॥ कृष्णांमृत चा उत्तरार्ध ॥

कृष्ण स्तुतिगाण व भाकलं ग्यान असलेली..

॥ मुळावरची ओवी ॥

## ॥ कृष्णाजीचे मुळं ॥

**वरभजनं :**

॥ कशी भुलवन पडली जना । कशी भुलवन पडली जना ॥
या महाराजाचा खेळ कोणा समजेना/उमजेना ॥

॥ कृष्णाजीचे मुळं । यवगाचे स्थळ ।
त्याच्या आंगचा खेळं । तोची जाणे ॥
॥ त्याचा जो असनं । त्याला तो ओळखनं ।
ईतरांचे बोलनं । व्यर्थ आहे ॥
॥ धुमकेतुच्या वाणी । उभे आहे/माझे धनी ।
नवल होईन भारी । पाहयंजा पुढं ॥
॥ ढाल हे तलवारं । आकाशी टेकन । सुर्यही झाकनं ।
तेव्हा गि-हाणं होईन । महा भारी ॥

॥ ढाल हे तलवारं । आकाशी टेकनं, सुर्य हा झाकनं ।
तेव्हा रात्र होईन । साडे तिन दिवसाची ॥
॥ चौ-यांशी तासाची । ही रात्रा होईन ।
याच रात्री राजा । जन्म घेईन ॥
॥ राजा चा जन्म । दामा या नगरी ।
रूमझुम येइनं । पृथ्वीवरी ॥
॥ हत्यावर अंबारी । संग सेना भारी ।
मुज-याला येईन । सावंग पुरी ॥

**भजने :-**

॥ याहो सावंग्याच्या राजा । कार करा देवा आपल्या हाता ॥
॥ याहो सावग्याचा राजा । तुम्हा आहे नमस्कार माझा ॥
॥ याहो सावंग्याच्या राजा । तुमच्या चरणी आहे मुजरा माझा ॥
॥ चौथ्या खुम्माचा राजा । याहो महाराजा या गोपाळाच्या काजा ॥
॥ चौथ्या खुम्माचा राजा । उभा राहयजो या गोपाळाच्या काजा ॥

**टिप :-** या ओवीच्या निरसनाचे ग्यान कृष्णांमृत मधुन घ्यावे.



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०५ ॥
॥ ओवी नं. ७९ ॥
॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

# ॥ सांग लवकर । कधी यान भुम्मेवर ॥

॥ सांग लवकर...। कधी यान भुम्मेवर ॥ घृ ॥
॥ प्रथम शकुन निघाला होता । सोहंम् गुरू शक्ती माता ।
तेव्हा आलं कर्ता-याच्या चित्ता । करन कर्तार..
कधी यान भुम्मेवर ॥ सांग लवकर....

॥ शिर कंमड बराबर । मनचे/मधले ताळ तक्त खरं ।
वस्ती करता का पेठेवर ॥ सांग लवकर..
॥ शिदाई वाटे शरण जीव येते । धनी दिसत नाही कोठे ।
मोडला कजबा उठुन/उडुन जाते ॥
॥ यम-ईवान तुमचे द्युत । बोलावुन नेले सारे लोक ।
सारी नेली कजब्याची राशेद ॥
॥ यम-ईवान तुमचे द्युत । बोलावुन नेली सारी रहीत ।
कशी/बरी केली इंद्रानं हुकमत ॥
।। यम-ईवान तुमचे द्युत । बोलावनं केलं सर्वत्रास ।
तहशिली झाल्या कोणाच्या हात ? ।। ..जळगाव दांड
।। पेठीहुन गादी केली तहशिल । मिर्त लोकच तक्त खंर ।
तक्ती आले राजइंद्र/राजहंस ।। ...जळगाव दांडातील चरणे

॥ हिरे मोती लालही लेले । देणं तिरलोक्यास दिले ।
मोहब्बत करता यवगं गेले ॥
॥ हिरे मोती लाल कंकर । ऐसे जडीत केले फार ।
सारं नेलं पदार्थाचे जोहरं ॥
॥ चौ-यांशित हिंडतो माझा जीव । हवाला घेईना कोणी एक देव ।
पेठीवर जाता आलासं देव/संदेव ॥
॥ पेठीहुन उतरला कायापुर । भुम्मा गोयकाचं तक्त खरं ।
तक्ती येतीन परमेश्वर ॥

॥ शिव हा शक्तीनं लोपला । धनी असता चोर झाला/ठरला ।
राजा यवगा साठी आला ॥
॥ निश्कलंकी आल्यावर । निसपुस करन सारं ।
साधु लपतीन घरोघरं ॥ सांग लवकर..
डहाकी :-
॥ ईच्छा पुर्ण कर या देही । या देहीतुन जाउच नको कधी ।
अशी तुया रूपा-सुखाची गाही ॥
किंवा:- देवा तुला तुमच्या रूपासुखाची दाई ।..जळगाव दांडची टुक
भजने :-
॥ मागनं लय नाही लय नाही । ईच्छा पुर्ण कर या देही ॥ मागनं लय..
॥ निशंःकलंकी अवतारा ।
लवकर याहो । भक्ताच्यां माहेरा/बाळाच्या माहेरा ॥
॥ निशंःकलंकी अवतारा । तुम्हा विनवितो, आम्हा हदयी धरा ॥
॥ निशंःकलंकी अवताराची । पाहतो वाटं ।
तुम्ही या महाराजा । सोयंम् दयाहो भेटं ॥

॥ सोयंम् भेट माझे राया । आम्ही लागु हो लागु तुम्हा पाया ॥
॥ सोयंम् भेट माझे हरी । आम्ही जडलो देवा, आपल्या पायी/चरणी ॥
॥ उभा राहयं कजब्याच्या मालका । कजबा वस्ती कर बापा ।
देह जीव नांदवजो आता । देहजीव अंबर कर बा आता ॥
॥ कजबा वस्ती करन । आदी पुरूष ।
होईन अचंबा । प्रकाशनं ही ज्योत । जगात होईन कौतुक ॥
डहाकी :- ॥ ज्योतीनं ज्योत उजेड । प्रकाश या देहीत ।
उघडलं/उजळलं रूप हे सुर्याचे दिप । जैसे रूप हे सुर्याचे तेज ॥

## ॥ निरसनसह सांग लवकर ! कधी यान भुम्मेवर ॥

### -: शब्दार्थ/चरणार्थ निरसन :-

**शिर** :- मस्तक जे देहीचे उर्ध्व स्वर्गलोकी आहे. । देहीच्या स्वर्ग मिर्त पाताळाचे अधिक ग्यान कायाग्यान खंड०३ मधुन घ्यावे. । **भुम्मेवर** :- देह भुम्मेवर, पृथ्वीवर
**कंमड** :- कंबर जेथुन देहीचे पाताळ आहे ते स्थान. । **वस्ती** :- रहिवाश 'चे ठाणे

**मधले ताळ/मनचं ताळ** :- शिर व कंबर यांचे मधले या देहीचे धड. यालाच देहीचे मिर्तलोक म्हणतात. या मधल्या ताळ मध्ये हद्‌य स्थित मन आहे. म्हणुन याला येथे मनचे ताळ असे सुध्दा म्हटले आहे. या हद्‌य पेठेच्या निरामार मनच्या भाव-भक्तीच्या तक्तावर/बैठकीवर/गादीवर तो निराकार परमेश्वर येत असतो.

**शिर वाटे/सिदाई वाटे शरण जीव येत..** :- डोक्या वाटे, नतमस्तक होवुन, परमात्म्याला शरण जावुन योनीबाहेर प्रथम डोक काढुन या डोक्याच्या मार्गाने काया बाहेर येते. ज्याला सिदाई वाटे गर्भि जीव शरण जातो त्या निराकार देवाने कानी फुंकलेला सोहंम् मंत्र विसरून, बाहेर येताच कोहं शब्द उच्चारत त्या सत्य देवाला बेईमान होतो. सोहंम् शब्द विसरल्यामुळे त्याला मुळचा धनी चे चतुर्पता निरंजन ग्यान न प्राप्त झाल्यामुळे तो निरंजन धनी काय दिसत नाही त्याला या मिर्तलोकात येथे ? कसा दिसणार ? तो तर निराकार निराधार निर्गुण निश्कलंकी ! तो निराळा काही पाहण्याची वस्तु नसुन फक्त साक्षीभावाने अनुभव घेण्यची वस्तु होय. तो बेईमानांच्या कलंकीत देहीपासुन दुरच असतो उगाच बसतो ! अधिक ग्यानासाठी खंड ०३/ओवी-०३/मोठा पाळणा/चरण०५-०६ चे निरसन वाचा. ।

**राशेद** :- रेशन, दाणा-पाणी, खाण-पाण, अन्न-पाणी ।
**ईवान** :- ईश्वराचे दुत/द्युत हस्तक, माध्यम । जेव्हा पवनरूपी गोळा असलेल्या ईवान/ईशान नावाच्या रूद्रद्युतासं परमात्म्याने आपल्या परिपुर्णतम पुर्ण अवतार च्या चतुर्व्युह रूप रंचनेतील पुर्णावतार रामाचे साहय करण्याकरीता अवतार घेण्याची या द्युताला आज्ञा दिली, तेव्हा कळसुत्राच्या मालकाने आपले कळसुत्रे हालवुन अंजलीला पवनाकडुन आवाजी बिज मागण्याची प्रेरणा दिली. अंजलीने आवाज देताच तिच्या उरस्थळी पवन झोंबुन त्या पवनाने अंजलीला उरस्थळी बिज दिले. आणी मग तेथुन पवनरूपी गोळा असलेला परमात्म्याचा ईवान/ईशान रूद्रद्युत हा अंजलीच्या गर्भि अंर्तभुत होवुन सम्मावला. आणी या ईवान रूद्रद्युताने पवनसुत बनुन अवतार घेतला. हा पवनसुत म्हणजेच हनुमान हा ईवान रूद्रद्युत असुन तो परमात्म्याचा एक रूद्र द्युत होय. **इंद्र** :- विश्वाचा/जगाचा राजा ! पिंडीचा राजा हा आत्मा आहे तर बंम्हांडी ची राजा हा परमात्मा आहे. म्हणुनच पिंडीचा इंद्र हा आत्मा तर ब्रम्हांडाचा ईद्र हा परमात्मा होय ।
**रहीत** :- मिर्तलोकी वस्ती करून राहणारे सर्व प्राणी, देहीतील आत्मा वस्ती ।
**जडीत** :- दागीने । **कजबा**:- देह ।
**मोडला कजबा**:- जिर्ण विस्कळीत तोडफोड झालेला देह. ।

**सारं नेलं पदार्थाचे जोहर** :- अंगावरचे असलेले सर्व दागदागीने चे देणं काढुन घेणे. उदाहरणार्थ जसे सौभाग्यवती स्त्री चा पती वारल्यावर पत्नीच्या अंगावरचे सर्व सौंदर्याचे

लेणं असलेले दागःदागीने.. ईत्यादी काढल्या जावुन ती विधवा बनते. ती विधवा अवस्थेत येवुन तीच्या पाचही तत्वरूपी पदार्थापासुन एकत्र बनलेल्या देहरूपी पदार्थाचे जोहर म्हणजेच देहीवर असलेले लेणं ईत्यादी सार काही नक्षा उतरवुन तिच्या पतीसोबत सार काही नेल्या जाते. तो तिला सोडुन गेल्यामुळे....सार नेल या देहरूपी पदार्थाचे जोहर । **हवाला** :- चौ-यांशितुन मुक्त करण्याची जमानत, जुम्मा, ठेका.

पेठेवर जाता आलासे देव/संदेव :- पेठेवरचा हा कृष्णदेव मला चौ-यांशीच्या फे-यातुन मुक्त करून मोक्ष देवु शकेले का ?, मजला या भवसागरातुन तारेल काय ? माझ मजला ठिकाण हो बापा दाखवेल काय ? आतापर्यंत वंशां न वंशात जन्म घेतलेल्या कोण्याही वंशी न पाहीलेला देव मला प्राप्त करून देईल का ? माझा जन्म कोण्या निमित्य ..ईत्यादी शंका-कुशंका, संशय उत्पन्न होणे ।

पेठीहुन उतरला कायापुर :- पेठीहुन तो या कायापुर म्हणजेच या देही उतरला आणी या देहीच्या मधले मिर्तलोकच्या हद्यी असलेल्या या भुम्मा गोयकाच्या मनाच्या ख-या तक्तावर बसुन मनी भरला. या भुम्मा गोयकाच्या देहीरूपी भुम्मेवरील या मनभाव च्या तक्तीवर आता येतीन परमेश्वर असा भरोसा आला. आणी माझया मागे या सत्य देवानं काय निमित्य दिले आहे ? याचा शोध घेत घेत लागलो या देवाच्या चाकरी ! या चतुर्पता नामीच तरल तरन ऐसा भरोसा आहे. असे म्हणता म्हणता भाव-भक्तीच्या तक्तीवर उभा झाला हा सखा ! मागे तारले पुढे तारशीन भरोशा आहयं । म्हणुन म्या धरले तुमचे पाय । पाय धरले हो मजबुत । नाही सोडत आता जगजेठं । तुमचे चरण माझी डोही, हाच करार । भक्त जनांवर करावं दया, बहु यवग तार ।

शिव शक्तीनं लोपला :- ***लोपला*** *:- लपविला, झाकुन ठेवला, रंगाने/मातीने/विकाराने लेपुन सारवुन झाकला.* या देहीचा आत्मा हा परमात्म्याचा अंश अवतार असल्यामुळे तो या देहीचा सर्वात मोठा देव म्हणजेच महादेव होय. म्हणुनच या आत्म्यालाच शिवतत्वी जन कुठेकुठे शिव असे संबोधतात आणी या देही ला या शिवाची शक्ती असे संबोधतात । शिवतत्वी जनानुसार हा शिव असलेला आत्मा हा देहरूपी शक्तीच्या तिरगुण व षटविकार ईत्यादी व्दारे त्या शिवावर वेस्टने आणलेत. या देहरूपी शक्तीच्या कलंकाव्दारे त्या शिवाला लोपुन त्याचा प्रकाश ही तिरगुणासह षटविकार यांचा कलंक असलेली कलंकी देहीरूपी शक्ती बाहेर पडु देत नाही. या देहीरूपी शक्तीने हा आत्मारूपी शिव लोपला जावुन, तो शिव या देहीचा म्हणजेच शक्तीचा धनी असता त्या शक्तीच्या ताब्यात जावुन त्या शक्ती त्याच्यावर जोर करत त्याच्यावर शक्तीचे कलंक लावुन त्याला चोर बनवुन ठेवलो, शिव या शक्तीनें लोपुन तो शिव धनी असता शक्तीचा चोर झाला.

राजा हा यवगासाठी आला :- देहीचा शिव हा देहीचा धनी असता शक्तीच्या विकारांने लोपुन चोर ठरल्या गेल्यामुळे, त्या शिवाचा राजा कृष्णराजा आपल्या सत् यवगासाठी, त्या देहीच्या मिर्तलोकच्या हद्य पेठेवर असलेल्या मनाच्या तक्तावर उतरला. आणी चतुर्पता निरंजन ग्यान देवुन आपल्या शिवाला आपले स्वरूप दाखवले. त्याला त्याचा लख्ख प्रकाश दाखवत, शिवा/आत्मा कधी होशीन तु या शक्तीचा/देहीचा सरदार ? असा सवाल करत त्याला सरदार बनवण्यासाठी त्या शिवाला चतुर्पता अथर्वन वेदाचे निरंजन आत्मज्ञान दिले.

साधु लपतीन घरोघर :- हा निश्कलंकी कृष्णा या मनच्या तक्तीवर आल्यानंतर, तो चतुर्पतीचे निरंजन ग्यान आत्मज्ञान ईत्यादी व्दारे ही देही ज्ञानसंपन्न बनवेल. अश्यारितीने चतुर्पतीच्या निरंजन ग्यानाने अनुभवसंपन्न आत्मज्ञानी होईल. तेव्हा मग

॥ साधु संत भई घरघर जावे । अनंत रूपक्या बाता फैलावे ॥ -०४/१३/२

ऐसे संधी साधनारे तिरगुणी बहु तम स्वार्थि साधु संत घरोघरी जावुन जे तिरलोक्यातील तिरगुणी अवतार च्या अनंत रूपाच्या महीमा, स्तुतिगाण, पुजापाठ, व्रतवैकल्प सह स्वतःकरीता मानसन्मानसह पोटापाण्याच्या सोयी ची योजना असलेले कर्मकांड चे मिश्रीत ज्ञान. च्या बाता/कथा यवगात सांगत सुटलेले आहेत, ते ज्ञान या आत्मग्यानी देहीजवळ चालणार नाही. हे तिरगुणांच्या पल्याड जावुन चौथ्या चतुर्पतीचे निरंजन ग्यान प्राप्त ख-या आत्मज्ञानी च्या देह घरापासुन थोडे दुरच राहुन त्यांच्या

समोर न येता लपुन राहतीन. ते संधी साधु फक्त ज्याला खरे आत्मज्ञान नाही, जो तिरगुणांच्या कर्मकांडातच गुफुन गुंफुन मरत आहेत अश्याच देह घरी संधी साधुन जावुन तेथे लपुन आपले पोट भरतीन. चौथ्या वेदाच्या सत्यज्ञान प्रचारीत झाल्याने चौथा सत्य धनी येईन. आणी मग तो चौथा धनी या संधी साधुंच्या आतापर्यत यवगान यवगात केलेल्या चुका च्या खोडा काढन. आपल्या यगगान यवगात केलेल्या चुका, खोडा ची पुस आता चौथ्याकडुन घेतली जाईन. याचे भय बाळगुन हे संधी साधु संधी साधुन रजतम बहुत तिरगुणीच्या/अज्ञानींच्या घरोघरी जावुन लपुन राहतीन. अश्या रितीने आत्मज्ञानापासुन वंचीत असलेल्या च्या घरोघरी जावुन ते संधी साधु लपतीन. । **कयी** :- कधी । **लय** :- खुप, जास्त, पुष्कळ, बहुत ।
**गाही** :- साक्ष, पुरावा । **दाई** :- विनवणीपुर्वक घातलेली शपथ. अधीक ग्यानासाठी खंड०१/भाग-०२/ ओवी-०८/दाईची अरज-ओवी चे निरसन वाचावे.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. ७९/०२ ॥

## ॥ जगाच्या माहेरा । ये बापा अवतारा ॥

॥ जगाच्या माहेरा । तु ये बापा अवतारा ॥ धृ ॥
॥ कोण केली रंचना ? । कोण नांदतो तिरभवना ? ।
भैस माझा दिसेनां ॥ तु ये बापा अवतारा..
॥ कोण टाकली भुलवनं ? । कोणं भुलवले जनं ? ।
तु दिसेना डोळयानं ॥ तु ये बापा अवतारा..
॥ भ्रांती/भुलवन पडली चैतन्यी । तिन खुम्म टाकले जाळुनी ।
भैस गेला गायप होवुनी ॥ तु ये बापा अवतारा..
॥ भुलवन पडली स्वर्ग पाताळी । आणीक पडली तिनही ताळी ।
देव कोणा कळत नाही ॥ तु ये बापा अवतारा..

॥ भुलवनं पडली कलयुग । सहा दर्शन सहा जोगं ।
मागे लागला कर्मभोगं/वैभोग ॥ तु ये बापा अवतारा..
॥ स्वर्ग पाताळ मिर्तलोक । आणीक भुलले तिरलोक ।
अवघा मचला कलकोट ॥ ये बापा अवतारा..
॥ भुलवन पडली यवगापरी । जागी राहली एक माउली ।
भुली वाचुन दुरचं राहली ॥ ये बापा अवतारा..
॥ भुलवन पडली जगावरी । निमग्न झाले सर्व संसारी ।
अनामत उभे दरबारी ॥ तु ये बापा अवतारा..

**भजने** :-
॥ मानवा भुलु नको रे संसारा । कर हरीनाम सोयरा ॥
॥ मानवा भुलु नका रे भुलु नका । कैलाशी नांदतो माझा सखा ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ ओवी नं. ८० ॥

॥ कृष्ण ज्ञानाची जळगाव पाठातील ओवी ॥

## ॥ आदीपुरूषाची सांगी झाली अंतराळी ॥

॥ आदी पुरूषाची, सांगी गडे हो । झाली अंतराळी ।
या नामाला विसरू नका । जन्म-मरण नाही ॥
॥ आदी पुरूषाचं, देणं झालं । अहिना मुखी ।
पंचे चाळीस, वर्षे उपदेश । वाणी, सांगतली जगाशी ॥
॥ उपदेश पंथ, कळेना अंत । या जनं लोका ।
या पंथाचा चालक उभा/झाला । महामुनी सखा ॥
॥ जळगावचे, महा मुनी । महा विर झाले ।
आदीमुनीची, दिक्षा घेतली । भंग/भय नाही त्याहीले ॥०४॥

॥ आदीमुनी आदीपुरूष तो । साहयांशी आला ।
महा मुनीला वचनी गोयलं । देवु केलं त्याला ॥
॥ आदी मुनी भैस सांगे । मुळ यवगाच्या गोष्टी ।
हरी नामी कार केला । महा मुनीच्या हाती ॥
॥ पक्वान भोजन तयार केलं । महामुनी च्या हाता ।
वाढवला महामुनी । तिळभर, नाही अहंता ॥०७॥

**भजने** :- ॥ भोजनं वाढती आदीमुनी । तिळभर याहीला अहंता नाही ॥
॥ भजन करता मिळलं भोजनं । ऐस ठेवलं याहीनं/कृष्णानं सांगुन ॥
॥ भजन करता मिळलं भोजन, देवाचं नित ।
नित नाम घेता चुकतीन, चौ-यांशी यवनं ॥
॥ महाविर मारोती झाला, विघ्ने निवारी । कृष्ण नामाची टाळी, भक्त तारती ॥



॥ ओवी नं. ८१ ॥

ओवी महात्म :- नविन ठिकाणी हमखास म्हणण्यात येणारी विनवणीची ओवी..

## ॥ देवा-भक्ताचं कौतुक ॥

॥ देवा-भक्ताच कौतुक । ऐकुन घ्याहो जनलोक ।
पाहता थकले ब्रम्हादिक । कळेना त्याशी, आला जगात जगजेठी ।
॥ काहो कठोर केलं मनं । विनविती रात्रं-दिन ।
भावीकाच्या प्रार्थनेला येणं । राया जगजेठी, झाले अन्याय घाला पोटी
॥ कुठं गुंतले चक्रपाणी । वाट पाहतो वासरावाणी ।
तुमच्या वाचुन नाही कोणी । करमत नाही, देवा नांदव एका ठायी ॥
॥ लवकर याहो गरूडध्वजा । कितीतरी अंत पाहतो माझा ।
वेळोवेळा भरतो रागा । कितीक समजाउ..., देवा रूसुन नका जाउ ॥

॥ भावीक भक्त असन तुझा । वेळोवेळा घालतो येरझारा ।
मजला मानु नये दुजा । गुंतलो पाया..,लज्जा राखा विठोबा राया ॥
॥ गुंतलो तुया सेवेला । अन्जानाचा शिण का आला ? ।
तरी तु वचनी गुंतला । उपाय नाही...., ईच्छा पुर्ण कर या देही ॥
॥ देवा-भक्ताच गुजं । ऐकुन/पाहुन घ्याहो सर्वलोक ।
कुणीतरी करा देवाशी वाद । नामी राहा.., खेळ भक्तीचा पाहा ॥०७॥

**भजने** :- ॥ नामी रहयं भजनी रहयं । चुकन चौ-यांशी, अशी सांगी आहे ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०५ ॥
॥ ओवी नं. ८२ ॥
॥ कृष्ण अस्तुकी व पंथ ज्ञान ची ओवी ॥

## ॥ चिखलात पैदा होते । फुल कमळाचे ॥

॥ चिखला मध्ये पैदा होते । फुल कमळाचे ।
सोयंम् रूपी प्रकाशती । नामा च्या किर्ति ॥
॥ हाती काठी उभा जगजेठी । कृष्ण राया गायकी ।
होता गुराखी झाला गोविंद । तोही मोठा साधकी ॥
॥ पायी पद्‌म मुखी रत्न । बेंबी हिरा या योग्याचा ।
तिरभवना मध्ये उजेड याहीचा । राहु उगवला परवेशी ॥
॥ सावंग्यात प्रकाशला रवी । जळगावी उगवला चंद्रमा
गोड झाले हरीनाम गडे हो ! दुमदुमली पृथ्वा ॥ ०४ ॥
॥ चंद्र-सुर्य धरणी उतरले । कोणास नाही मालुम ।
कोटी सुर्याची प्रभा फाकली । उजळले अवधुत नाम ॥
॥ महाराज होते आदीमुनी-महामुनी । ध्वज लावली अस्मानी ।
तरले अवधुत नामी पुना । पुंर्विचं नाम गर्जे तिरभवनी ॥
॥ वल्लभ राया देव मन झाला । पद लाभलं रायाचं ।
येण्या-जाण्याची अगध नायं । नाम भजले भैसाचं ॥
॥ येण्या-जाण्याची अगध नाही । म्हणुन वाजवली टाळी ।
त्या जळगावी उभी झाली । महासती बहिना बाई ॥ ०८ ॥
॥ अलट पलट करे बाळाजी । तोही मोठा खटपटी ।
अवधुत नामी पक्की मांड । घातली देवास मिठी ॥
॥ इसना होता ईश्वर झाला । तरला अवधुत नामानं ।
बसला पायरी धरून गडे हो ! मार्ग दावला पुनानं ॥
॥ संतु-चिंतु, गोविंदा-हरी । राव-साव, याहीला नामाचा छंद ।
तरले अवधुत नामी गडे हो ! प्रसन्न झाले गोवींद ॥
॥ विठोबा धनसिंग महामहा भक्त । संग होता वाल्या माळी ।
हरसुलचे कोणजाणे महाराज । तो सांगत असे गाही ॥
॥ संत महिमा गावता गडे हो ! विघ्न हर्रतीन थोर थोर ।
संत महिमा ऐकता गडे हो ! पुण्याई होईन अपार ॥ १३ ॥
भजने :- ॥ हे होय कृष्णाची गाही । भेट देईन महाराजा येवुनी ॥
॥ कृष्ण महाराजा धनी अवधुत ॥



॥ ओवी नं. ८३ ॥
॥ विनवणीची ओवी ॥

## ॥ दिवस आला हो आला ॥

॥ आपण उभे आंग । अवतारा संग ।
अनामत, आले हो आले । दिवस आला हो आला ॥
॥ ज्याच्या मनात असन/आहे खुशी । घडवन तशी ।
आपरूप, आले हो आले । दिवस आला हो आला ॥
॥ वेळो वेळा करे सुमरन । अगाध गुण ।
देई, त्याला हो त्याला । दिवस आला हो आला ॥
॥ प्रेम भक्ती । नित ध्यानी । लावुन मनी ।
तोच, खरा हो खरा । दिवस आला हो आला ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ ओवी नं. ८४ ॥

॥ उपदेशग्यान व विनवणीची ओवी ॥

## ॥ सांगतो नवनिधा भक्तीचा पाया ॥

भजने :- दिवस आला यवगाचा । सत्य शकुन या महाराजाचा ॥
॥ दिवस आला यवगाचा । सत्य शकुन या ईश्वरं पुनाचा ॥

॥ नव निधा भक्ती केली । सांगतो, भक्तीचा पाया ।
ज्या भक्तीमध्ये चित्त-मन बसे । तेथे उभा देवराया ॥
॥ भक्ती करून उक्ती । नाही, मागतली भक्तानं ।
प्रपंचाच्या, फाश्या मध्ये । तो पडला जावुन ॥
॥ भक्ती करून निसंग होजो । ऐक प्राण्या आता ।
या भक्तीचा, संग नको सोडु । वाया, जाशीन अधोगता ॥
॥ भक्ती केली अनामीकानं । आदीरूप झाले त्याहीला प्रसन्न ।
आदीरूप झाले प्रसन्न । घरात घेतलं/आणलं चैत्यनं ।
अशीच भक्ती करजा तुम्ही । सत्य चालनं शकुन ॥०४॥

॥ भक्ती केली आदीपुरूषानं । या भक्तीनं याहीन दाखवली खुणं ।
भक्ती करजा तुम्ही । देह-जीव तरतील या भक्तीनं ॥
॥ भक्ती करजा मन लावुन/लउन । देवाचा जीव नाम सागर ।
देव नाही दिसला । तिरथा वर ॥
॥ भक्ती करा भावानं । शोधा मुळ पुरूषाचं ठिकाण ।
धनी उभा राहुन दावन । आपलं घरं ॥
॥ चित्त मन लावुन हाती धरा । ऐका भक्तीले ।
उभा राहीन धनी । तो तारण अवघ्याले ॥ ०८ ॥

॥ माग तारले पुढे तारशिन । भरोसा आहे ।
चित्त मन लावुन धरा । देवाचे पाय ॥
॥ तुच तारशीन तुच मारशीन । नको देवु चोरांच्या हाती ।
तुमच्या नामा वाचुन जगात । नाही सांगतल्या किर्ति ॥
॥ कल यवगी भक्ता साठी । देव आले धावुन ।
या महाराजानं तारले । भक्त अंन्जान ॥ ११ ॥
॥ भक्ती केली या अनामीकानं । तारले भक्त अहिन रूप धरूनं ॥

भजने :- ॥ नवनिधा भक्ती केली । वस्तु न कळता वाया गेली ॥
॥ नाम घ्याहो विठोबाचे । सार्थक होईन या देहे-जीवाचे ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. ८७ ॥
॥ उपदेश ग्यान ची ओवी ॥

## ॥ या तरा येथी ॥

॥ या ! तरा येथी, हे आकाशवाणी सांगी आहे कर्ता-याची ॥ घृ ॥

॥ त्रैचाळीस लक्ष विस हजार । चौयवगाची गणती ।
एका-एका यवगाचं, धन्यानं भाकलं । ऐका गिणती ? ॥
॥ सतरा लक्ष अठ्ठाविस हजार । कृता यवगाची मांडणी ।
जपी-तपी संन्याशी योगी । कईक बसले नेमी ॥
॥ बारा लक्ष छान्नव हजार । त्रैता यवगाची मांडणी ।
जपी-तपी सन्याशी योगी । कईक बसले ध्यानी ॥
॥ आठ लक्ष चौसष्ट हजार । कली निर्माण ।
यात-हेत/यात्रेत येवुन मिळाले अवघे जन । करा पुंजन ।
परमय वासी ॥ ०४ ॥ हे आकाशवाणी सांगी आहे..

॥ गळयात त्रिकुटाची माळ । या त-हेत येवुन करता काय ? ।
तिरकुटावर होम लावला । त्या योग्याकडे पाहयं ॥ यात्रा..
॥ ऐसा योगी समाधान । तिरकुटावर लावला होम ।
सदोनीत पाझर वाहे । चतुर्पती दांडान ॥ या तरा येथी..
॥ कर्ता-याचा शकुन । पहा हो अनुभवी ।
कलयवगी उतरला । भावीकाच्या देही/दैवी...
जो पेईन त्याला, मिळन चवी ॥ या तरा येथी...
॥ तेरव्या सिध्दी पासुन । दिला हेलकारा ।
नामी राहा गडे हो । पकडा नामाचा दोरा..
तेव्हा चुकन चौ-यांशीचा फेरा ॥ ०८ ॥ या तरा येथी..

॥ सांगीत आहे एक तरायाचे झाडं । आहो झाडं ।
याचा पाताळी शेडां, आकाशी गेली आहे जडं ।
याला आहे संजीवनीचे फळ ॥ ०९ ॥ या तरा येथी...

डहाक्या :-
॥ या झाडाचं हे वाण । अनमोल आहे ।
ज्याला रूचा लागली तो वाण घेत आहे ॥
॥ या फळाची रूचा । ज्याला, लागली आहे ।
अक्षय अंबर चिरंजीव तो, झाला आहे ॥

भजने :-
॥ उभा देव कृष्ण अवद्युत । अमृत संजीवनी आहे याहीच्या मुखातं ॥
॥ अमृताचा सागर भरला । देवा तुम्हा पाशी ।
म्हणुन शरण आलो । अमृता साठी ॥
गजर :-
॥ तुम्ही या ! तरा येथी । उभा जगजेठी ।
उघडा कवाड । घ्या किल्ली हाती ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. ८६ ॥
॥ विनवणीची ओवी ॥

## ॥ तुझ्या वाचुन कर्तार ॥

॥ तुझ्या वाचुन कर्तार । जगात नाही हरी कोणी ॥ धृ ॥
॥ अनामत आदीपुरूषाचा खेळ । संगम शिव-शक्तीच्या वर ।
ओहंम्-सोहंम् बिज मंत्रर । लावली धुनी.. ॥ तुझे वाचुन..
॥ बिन खांबाच बांधलं घरं । या वस्तीचा जुम्मेदार कोण ?
महा महा योगी मुसाफिर । आदीमुनी.....॥
॥ तुम्ही तिरभवनाचे धनी । तुमच्या आंगचे जीव आम्ही ।
तिरगुणांन केली बादशाही । बहु झाली हानी....॥
॥ तिरगुणांनी केली बादशाही । अवघी गजबजली पृथ्वी ।
ऐवढी अरज ऐका हो आमची । चवथ्या खुम्मी....॥ ०४ ॥
॥ आतातरी तिरगुणांच पुंजन मोडा । आपला वारू मैदानी सोडा ।
गाउ दयाहो मंजुळ रसाळ वाणी । शिव हरहरा...
तुमच्या वाचुन पुंजन । घडणार, नाही जरा ॥
॥ आपल्या पुंजनी लावा आम्हा । भोगले दुःख घनश्यामा ।
ऐवढी अरज ऐक आता । करा हरी दया...
तुमच्या हात घडवा पुंजन । जडवा आपल्या पाया ॥ ०६ ॥
भजने :- ॥ पुजन घडवा आपल्या हाता । तुमच्या चरणी आमचा आहे माथा ॥



॥ ओवी नं. ८७ ॥
॥ विनवणीची ओवी ॥

## ॥ पुना आला पुण्यांवरी ॥

॥ पुना आला पुण्यं घेवुनी । इश्वर होता बरोबरी ।
करे सत्याचा कारभार । सावंगपुरी.., आदीभैसाच्या दरबारी ॥
॥ पुण्यं पुनांच होय । इश्वर बराबर आहे ।
अंतर जरा नाही ठेवे । पलघडी.., दोघे बसुनी या राउळी ॥
॥ ऐकुन इश्वर ची मात । पुणानं दिला पुर्ण साथ ।
याहीनं उडवला भास । अंतरचा.., सवंगडी तो इश्वराचा ॥
॥ कृपा झाली योगी-मुनींची । इच्छा पुरवली भावीकाची ।
धावुन आला भक्तासाठी । तो जगजेठी.,सागरचा रहीवाशी ॥
॥ मोहीनी घातली प्रेमाची । कृपा झाली या श्रीप्रभुची ।
याहीनं उडवली भ्रांत । अन्जानाची..,सदा भावीकाच्या मुखी ॥
॥ सावळा याहो सारंगधर । आम्हाला काहो ठेवता दुरं ।
आम्हावर ठेवाहो नजर । सर्वठाई., तुम्हावाचुन नाही कोणी ॥६
भजने :-
॥ ध्यान धरले तुया चरणा । इश्वर-पुना आमची येवु दया कारूणा ॥
॥ सर्वत्राच्या आधी भक्ती । इश्वर-पुनांनं केली ।
चतुर्पती भक्तीचे लावले झेंडे । ध्वजा उभारली ॥
॥ हयाच कंकणी अवतार उभे । रूप पाहीले डोळयानं ।
या देहीची/घराची मजबुती केली । इश्वर पुनानं ॥
॥ इश्वर पुना सांगे खुणा । भावीक जना ।
एकी करा भक्तजनं हो । येईन मनमोहना ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. ८८ ॥

॥ कृष्ण विनवणी ची ओवी ॥

## ॥ पहीले वर्णन करतो सुमरन ॥

॥ पहीले वर्णन/नमन करतो सुमरन । धरीलेसे ध्यान विठ्ठलाचे ॥
धरलेसे ध्यान श्रीकृष्णाचे । चुकवावे मरण या देहव्दारी चे ॥
॥ दुसरे वर्णन सखल सुखाचे । अनंत रुपाचे जन्म महाराजा तुमचे ॥
॥ तिसरे वर्णन तुमच्या हाताचे । त्रिलोकी पालन आहे तुमचे
माझा तिरभवन देह तुम्हा चरणी आहे ॥
॥ चौथे वर्णन तुमच्या पायाचे । तुमचे चरणी मुजरे माझे ॥
॥ पाचवे वर्णन पाचही तत्वाचें ।
प्रकटतीन/प्रकाशल्या ज्योती नरदेही मध्ये ॥
॥ सहावे वर्णन सहादर्शनाले । पृथ्वीचा कार तुमच्या हाती आहे ॥
॥ सातवे वर्णन माया चैत्यन्याशी । झालासे अवगुण पृथ्वीशी ॥
॥ आठवे वर्णन अष्ट या गणाशी । चुकतीन मरन मिटन चौ-यांशी
किंवा :- ॥ आठवे वर्णन माया चांगोणाशी । होईल हे सुखः नर देहीशी ॥
॥ शकुनी हे माया, शकुनी हे राया । नवमासी जन्मले अवघे राया
॥ नववे वर्णन नव खंडाशी । मानाचा मुजरा महाराजाशी ॥
॥ दहावे वर्णन दहावा खंड काशी । नवखंडाचा हिशोब तिच्या पाशी
॥ दहावे शुन्य, उडतीन अवगुण । चालतीन शकुन पृथ्वीवरी ॥
॥ अवरावे वर्णन शुध्द मनाशी । चुकवा हो यातना या बाळाची ॥
॥ अकरा चे अकरत, उडतीन अकरा मासी । स्वरूपी दिसे, जगापरी ॥
॥ बारावे वर्णन उडतीन बारा राशी । स्वयंः प्रकटतीन ज्योती नरदेहीत ॥
॥ बाराचे बालट, उडतीन बारा राशी । नाही होणार अपघात पृथ्वीशी ॥
॥ तेराचे तिरगुण, उडतीन अवगुण ।
होईन नाम चतुर्पतीचं । होईन चतुर्पती ग्यान ॥
॥ चौदावे वर्णन रत्न जडीत आहे ।
तिरभवनाचा उध्दार त्यांच्या हाती आहे ॥
॥ पंधरावे वर्णन पंधरावी तिथी । अठराही न्याती त्यांच्याजवळ आहे ॥
॥ बारा जरी राशी, पंधरा या तिथी । सोळावीच्या उठतील गती ॥
॥ सोळावीच्या गती उठतीन । हिशोब घेईन पहा तिरगुणांचा ॥
॥ सत्रावीच्या किर्ति, अठरा या न्याती ।
स्वरूपी/सेरूपी चठतील या ज्योती ॥
॥ सतरावे वर्णन जिवनकळा ज्योतीले । अनंतसुखः देईन मानव देहीले ।
॥ सतरावीची किर्ति देणं नरदेहीस । सोहंम् ज्योत होतीन सांगीमुळ ॥
॥ अठरावे वर्णन सोहंम आबाशी हे आहे ।
स्वयंः अवघा विस्तार त्याहीचा आहे ॥

**भजने :-**

॥ सेरूपी उभी राहयं चांगोणा माय । या देहजीवाचं करावं साहयं ॥
॥ सेरूपी उभी राहयं चांगोणा माय । या अनंत यवगाचे सुखः पाहयं ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०५ ॥
॥ ओवी नं. ८९ ॥
॥ विनवणी ची ओवी ॥

# ॥ पहीली माझी ओवी ॥

॥ पहीली माझी ओवी, आदीपुरूषाशी । तुमच्या नामाला ओवी माझी ॥
॥ दुसरी माझी ओवी, दुजेपण नाही । विठोबा उभे गाही, ओवी माझी ॥
॥ तिसरी माझी ओवी, तिनही ताळाला । अन्जान बाळाला, ओवी माझी।
॥ चौथी माझी ओवी, चारही वेदाशी ।
पाचव्या लभेदाला, ओवी माझी ॥
॥ सहावी माझी ओवी, सहा दर्शनाशी । पृथ्वीचा कार याहीच्या हाती ॥
॥ ७वी माझी ओवी, सात ही वाराशी । ८व्या गणपतीला ओवी माझी ॥
॥ ९वी माझी ओवी, नवल यादव कुळी । दहाही अवताराला ओवी माझी
॥ ११वी माझी ओवी, ११ या रूद्राशी । बारा या राशीला ओवी माझी ॥
॥ तेरावी माझी ओवी, तिर या नयनाला । चतुरपतीला ओवी माझी ॥

॥ १४वी माझी ओवी, १४या यमाला । खाश्या यमराज्याला ओवी माझी
॥ १५वी माझी ओवी, १५या तिथीला । १६व्या अवशीला ओवी माझी ॥
॥ सोळावी माझी ओवी, सोळा या सिध्दिशी ।
यादव जागी करा ओवी माझी ॥
॥ सत्रावी माझी ओवी, जीवन कळीला । जिवन राजाला ओवी माझी ॥
॥ अठरावी माझी ओवी, अष्ट या गणाला । अष्टभैरवाला ओवी माझी ॥
॥ १९वी माझी ओवी, एका या रूपाला । इश्वरी रूपाला ओवी माझी ॥
॥ एकविसावी ओवी । एका या नामाशी । साडेबावशीला ओवी माझी ॥
भजने :- ॥ बावशी उठली । बहुरंग..। खेळु महाराजाच्या/अवताराच्या संग ॥

॥ २४वी माझी ओवी, आणीक चोविशी । लावावं सेवेशी ओवी माझी ॥
॥ पंचविसावी माझी ओवी, पंच तत्वांशी । पंच प्राणाला ओवी माझी ॥
॥ २६वी माझी ओवी, २६वीशी । आले देव साहयांशी, ओवी माझी
॥ २७वी माझी ओवी, २७ नक्षत्राशी । राजा इंद्रादिकाला ओवी माझी ॥
॥ २८वी माझी ओवी, आठवा श्रीकृष्ण । धरावे चरणं ओवी माझी ॥
॥ २९वी माझी ओवी, एका या नामाला । चंद्र-सुर्याला ओवी माझी ॥
॥ ३१वी माझी ओवी, एका या जिव्हेला । ३२सा मोक्षाला ओवी माझी ॥

भजने :-
॥ मोक्ष विना तत्वता । कैशी गिता भागवता ॥
॥ हरी विना तत्वता । कैशी गिता भागवता ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. ९० ॥

॥ कृष्ण ज्ञानोपदेशाची मुळावरची ओवी ॥

## ॥ पडदा खोल या मायेंचा ॥

॥ पडदा खोल या मायेचा ।
तिरभवनी उजाला, होईन हरी नामाचा ॥
॥ चातुरा शोधत शोधत जाय ।
देव भरला हो, भरून उरला आहे ॥
॥ देव भरला अखंड ज्योत ।
ज्योत खेळे हो, या मेरूच्या मंडयानात ॥
॥ कोण्या एका समयानं । ज्योत वळली हो, वळली भावीकानं ॥
॥ गेली ज्योत, वळली आहे । या चौदाविला, मुदत करार केला ॥
॥ देव येईन चत्रभुज । या चौदाविला, लावन नविन ध्वज ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ ओवी नं. ९१ ॥

॥ कृष्ण सावळा हरी जिव्हाळा खंड-१०/०१/मुळावरची ओवी-०६ ची जोड-ओवी ॥

## ॥ कृष्ण सावळा उभा राउळी ॥

॥ कृष्ण सावळा, उभा राउळा । समजावं आपल्या मनी ॥
समजावं आपल्या मनी । चातुरा, घ्या तुम्ही ओळखुनी ॥घृ॥
॥ सावंगपुरचा, होता महार । नाही, ओळखला कोणी ।
चित्त भावापासुन, देव ओळखा । आपल्या मनीं ॥
॥ सावंगपुरची, किती सांगु महिमा ? कृष्ण हरी मात ।
कृष्ण हरी मात । कोणी ना, समजे मनातं ॥
॥ माझी बुध, माझेया हाती । नाही कृष्ण नाथा ।
माझी बुध, माझेया हाती । दयाहो समर्था ॥ ०४ ॥

॥ यवगापरी, अवतार राया । हे झाले फारं ।
जिवनराजा, नाही दाखवला । कैसे अवतार ? ॥
॥ या देहीचा, जीवन राजा । नाही, दाखवला कोणी ।
जिवन राजा, आम्हा दाखवनं । तो चालक धनी ॥
॥ कृष्ण राजा, या महाराजा । सेरूप दावं आम्हा ।
सेरूप दाव, आम्हा । तुम्ही व्हा, जगाचे जिवना ॥
॥ परात परं, केला कार । यवगा च्या वरं ।
यवगा च्या, वरं । चातुरा, घ्या तुम्ही ओळखुनं ॥ ०८ ॥
॥ या देहीचा, मालंक राया । जीवन राजा होयं ।
पुढं याहीच्या, संगतीनं देही । अमर होईन पाहयं ॥ ०९ ॥

**भजने :-**

॥ अमर पदाची वासनां । पुरवा पुरवा, महाराजा निर्वाणा ॥
॥ अमर पदाची वासनां । पुरवा पुरवा, महाराजा चक्रपाणी ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. ९२ ॥
॥ उपदेश ज्ञानाची ओवी ॥

## ॥ मनाचा हा भाव ॥

॥ मनाचा हा भाव । दोघाचा संसार ।
मजला कधी घडनं । देवाचं दर्शनं ॥

॥ हरीच्या भजनी । शुध्द होते मनं ।
सदा दर्शन । देईन/देतो देवं ॥
॥ कोणाशी आपुले । नसावं व्दैत/दोहीत ।
तेव्हा घडे हितं । संचिताचे ॥
॥ अनुभवा विनं । अवघं आहे हिनं ।
पहावं शोधुन । ग्यान हे गिण्यानं ॥
॥ ग्यानं हे गिण्यानं । करावं मननं ।
करा निजध्यास चिंतन । कळनं ग्यानं ॥०७॥

॥ चौ-यांशी भोगुन । आला मानव देहं ।
सदा अभिमानात । जातो जीवं ॥
॥ जीव हा अग्यानी । शीव हा ब्रम्हग्यानी ।
दोघाची मिळवनं । होईन केव्हा ? ॥
॥ जीवा या शीवाच्या । जेव्हा होईन भेटी ।
तेव्हा आत्मदृष्टी/आत्मग्यान । प्रकटते ॥
॥ मनाचा भाव । तोची त्याचा देवं ।
शरणं राहावं । अवधुताच्या/अवताराच्या ॥०९॥

**भजने :-**

॥ शरणी राहवं । देवाच्या, देव पुरवनं तुमची आशा । नामी राहावं ॥



॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. ९३ ॥
॥ कृष्ण ज्ञानाची मुळावरची ओवी ॥

## ॥ बहुत यवग अर्ज करतो ॥

या ओवीची पलट ओवी खंड०७/ओवी-२९ मध्ये दिलेली आहे.

॥ बहुत यवग अरज करतो । कृष्ण अवतारा ।
सत् यवगाचा कार करून । दावा कर्तारा ॥
॥ स्वयंम रूपी महाराज आले । अहीनाच्या इथी ।
अहीनाच्या इथी सांगितल्या, योगा सृष्टीच्या गोष्टी ॥
॥ आले देव महारा घरी । महाल उध्दाराया ।
नाही ठेवला मानं आता । किती सांगु राया ॥
॥ आले देव महारा घरी । पाहीला रंग ।
धरला याहीचा संग । शेवटी आणला भंग ॥
॥ पिउन झाले उन्मन्त । याहीनं, गमावली वस्तु ।
वस्तु नाही ठेवली जवळ । ईचा अंदेशा बहु ॥
॥ ज्याच्या घरी विठ्ठल राया । तो महार खरा ।
वरकट महार जातीन वाया । चौ-यांशीच्या फेरा ॥

॥ चौ-यांशी च्या मोडन धुरा । तोच महार खरा ।
वरकट महार जातीन । माया, चैत्यन्याच्या घरा ॥
॥ भांडत भांडत दोघेही गेले । राया च्या पाशी ।
याहीचा न्याय कोणी करेना । कसे परवेशी ? ॥
॥ सिध्दक थकले, साधक थकले । थकले ब्रम्हादिक/इंद्रदिक ।
याहीचा न्याय कोणी करेना । कसे हे अवतारदिक ? ॥
॥ महार थकले, ब्राम्हण थकले । थकला मांगोडा/मारोडा ।
चौ यवगावर डंका वाजवला । त्वां कृष्ण अवतारा ॥

भजने :-
॥ डंका वाजे हो वाजे । आले सावंगपुरचे राजे ।
आले पंढरपुरचे राजे । डंका वाजे हो वाजे ॥
॥ डंका वाजे हो वाजे । अवधुत नाम गर्जे । डंका वाजे हो वाजे ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥








-: खंड ०५ स्तंभित :-

॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ चतुर्पता अथर्वन् वेद उभा राहीन पोटी । निजरूप भुम्मा जागी करन सारी सृष्टी ॥

# चतुर्पता
# ॥ अथर्वन् वेद ॥

॥ खंड ०६ ॥

॥ चतुर्पती कथांमृत च्या ओव्या ॥

## ॥ चतुर्पती चे कथांमृत ॥



**शब्दार्थ, चरणार्थ निरसन स्पष्टीकरन सह**



॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ ॥
चतुर्पता
॥ अथर्वन् वेद ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

www.chaturpata-atharvan-ved.com

॥ खंड ०६ ॥
॥ ओवी नं. ०१ ॥
॥ निरसनसह वाल्मीकीची मुळ जुनी ओवी ॥

## ॥ राम नामी पाप जळाले ॥

॥ राम नामी पाप जळाले । पहा त्या वाल्मीकाचे ।
ठाई मारून बसले । वरती, वारूळ चढले अंगाले ॥
॥ रंक होता राव झाला । पद लाभले रायाचे ।
टोलप्याला कोयमोय पाला । मुळ ओळखा सत्कृतीचे ॥

॥ गजेद्रांला संकट पडले । सुमरण केले रघुरायाचे ।
दाई सरशी उडी घातली । वैर तोडले दोघांचे ॥
॥ माती होती कस्तुरी झाली । नाव राहीले मातीचे ।
दासी होती राणी झाली । जगात भय वाटे तिचे ॥०४॥
॥ चतुर्पती नामी गायन करतो । चरीत्र होय रघुरायाचे ।
संता मध्ये निशाण गर्जे । पहा या अवद्युत रायाचे ॥०५॥

भजने :-
॥ नाम घेता तरले । चरित्र पहा वाल्मिकाचे ॥
॥ ऐसी तुया नामाची गाही । नामी तरला हो वाल्या कोळी ॥
॥ ऐसी तुया नामाची महीमा । अगणीत तारल्या मुंग्याच्या सेना ॥
॥ महीमा आहे गा तुयी । आता चालव तिर लोकी गाही ॥

-: निरसन/स्पष्टीकरन :-

॥ राम नामी पाप जळाले । पहा त्या वाल्मीकाचे ।
ठाई मारून बसले । वरती, वारूळ चढले अंगाले ॥
॥ रंक होता राव झाला । पद लाभले राजाचे ।
टोलप्याला कोयमोय पाला । मुळ ओळखा सत्कृतीचे ॥

## ॥ वाल्मिकी कथा सार ॥

वाल्मीकी पुर्वाश्रमी डाकु होता. जंगलात राहुन वाटसरूंना लुटने, त्यांची हत्या करने ईत्यादी निंद्य कर्मे, दुष्कृत्ये करत होता. एके दिवशी जेव्हा नारद मुनी वनात आले, तेव्हा वाल्मीकीने त्यालाही पकडले. नारद त्यास उद्‌देशुन म्हणाले की : जे पाप तु करत आहेस त्या पापात तुमचे घरचे भागीदार होणार का ? हे सर्वप्रथम तु घरच्यांना विचारून ये ! तोपर्यत मी येथे थांबतो. असे वचन देतो.

नारदाने सांगीतल्याप्रमाणे वाल्मीकी घरी गेला. आणी त्यांना प्रश्न विचारला की : जे मी तुमच्यासाठी पाप करत आहे, त्या माझे या पापात तुम्ही हिस्सा घ्याल का ? घरच्यांनी त्यास त्यांच्या पापाचा हिस्सा घेण्यास नकार दिला. तेव्हा त्यास उपरती येवुन, तो नारदासमोर निराश अवस्थेत उभा झाला. नारदाने त्यास उपदेश दिला. त्याचे पाप ईतके होते की : तो हरीनाम घेण्यास सक्षम नव्हता. म्हणुन नारदाने त्यास उलटे राम नाम दिले. दुष्कृत्य सोडुन सत्कृत्याला पकडुन वाल्मीकी तेथेच ठाई मारून पक्की मांडी घालुन नामी बसले. नाम जपु लागला. मन लावुन शुध्द अंतःकरणाने नाम जप करत राहील्याने, नामध्यास लागुन त्यास अन्न पाण्याची अगध नाही राहली. देहध्यास नाही राहीला. त्यांच्या शरीराच्या चारही बाजुने दिमक/मुंग्या ने वारूळ उभारले.

दिमकाच्या वारूळाला संस्कृत मध्ये वल्मीक म्हणतात. वारूळाने म्हणजेच वल्मीकने सपुर्ण देह आच्छादल्या गेल्याकारणाने त्याचे नाव वाल्मीक पडले. त्याच्या नाम तपश्चर्येव्दारे त्यास ऋषिपद प्राप्त झाले. राम नामाने त्याचे पाप जळुन त्यास कवित्व प्राप्त झाले. श्रीराम रघुरायाचे दर्शन झाले. भाकल्या शकुनाचे ज्ञान झाले.

अश्या रितीने तो पुर्वाश्रमी सत्बुध्दिने रंक म्हणजेच भिकारी असलेला निर्बुध्द डाकु ला ऋषित्व प्राप्त होवुन, तो भाकल्या शकुन ज्ञानाचा राजा बनला. त्याच्या टोलप्याला म्हणजेच मस्तकाच्या अंतरंगाला भाकल्या शकुन ज्ञानाचे कोयमोय कोमल-कोमल सुक्ष्मतिसुक्ष्म ज्ञानाच्या पालव्या फुटल्या. टोलप्याला फुटलेल्या या भाकल्या शकुन ग्यानाच्या पालव्या च्या आधारावर रामायण घडण्याच्या अगोदरच वाल्मीकीने संपुर्ण रामायण आधीच लिहुन ठेवले. आधीच लीहुन ठेवलेल्या वाल्मिकी च्या संपुर्ण रामायण प्रमाणेच भविष्यात रामायण घडले. तो भाकल्या शकुन ज्ञानाचा राजा बनला. पुर्वाश्रमीचा त्या डाकु ने आपली दुष्कृत्ये सोडुन सत्कृत्याच्या मार्गाने लागल्याकारणाने, सत्कृत्याची मुळ धरून नाम घेत राहील्याकारणाने त्यास ऋषिपद, भाकल्या शकुन ग्यानाचे राजपद..ईत्यादी प्राप्त झाले. पुढे मग त्याच्या आश्रमाला परमात्म्याचा पुर्णावतार श्रीरामरघुराया, सितामाय, लव-कुश..ईत्यादीचे पद/पाय लाभले आहे. म्हणुनच हो मुळ ओळखा या सत्कृतिचे...

*सार :- अज्ञानपणामुळे भुतकाळात झालेल्या चुका सुधारण्यासाठी, सत्कृत्य करत, नामी राहुन सच्च्या भक्ती भावाची हरीनामी पक्की मांड बसवावी. भुतकाळ च्या चुका विसरून वर्तमान काळात जी चतुर्पती हरीनाम घेण्याची संधी चालुन आली आहे, त्या संधीचा वर्तमान काळी फायदा घेतल्याने, भविष्यकाळी आपरुप सुधारल्या जावुन तारण होईल.*

॥ गजेद्रांला संकट पडले । सुमरण केले रघुरायाचे ।
दाई सरशी उडी घातली । वैर तोडले दोघांचे ॥

## ॥ जय विजय ची कथा सार ॥

जय-विजय हे विष्णुचे व्दारपाल आहेत. पुर्वाश्रमी त्यांनी कोणते सत् कृत्यकर्मे केलेत, ज्याव्दारे त्यांना व्दारपाल पद लाभले ? यांची ही कथा आहे.

तृणबिंदुची कन्या असलेली देवहुतीला महर्षि कर्दम ने नजरी बीज दिले. म्हणजेच कर्दम ऋषिच्या दृष्टीक्षेपाने देवहुतीला गर्भ राहीले. प्रसुतिकाळ पुर्ण केल्यानंतर देवहुतीने दोन जुळे पुत्रांना जन्म दिला. मोठया पुत्राचे नाव जय ठेवण्यात आले तर छोटया पुत्राचे नाव विजय ठेवण्यात आले. दोघेही बंधु पुढे मग विष्णु चे परम् भक्त झालेत. त्यांच्या मुखी नित 'ओम् नमो नारायणाय' या मंत्राचा अजपा जप सदोनित राहु लागला. नारायणाच्या भक्तीकार्याकरीता त्यांनी आपले जिवन समर्पित केले होते. ते सदैव 'ओम् नमो नारायणाय' या नामज्योतीत राहुन, आपआपले नियत कर्तव्यकर्मे करत जिवन जगत होते.

एके दिवशी राजा मरुत्त ने त्या दोघा बंधुला आपल्या यज्ञकार्यात भाग घेण्याकरीता आमंत्रित केले. तिथे यज्ञकार्यात जय ला ब्रम्हा बनविले गेले तर विजय ला आचार्य बनवण्यात आले. दोघा बंधुने आपआपले भाग यज्ञकार्यात व्यवस्थितपणे पार पाडले. यज्ञपश्चात दोघा बंधुना राजाने यज्ञ दक्षिणेत बहुत धन दिलेत. तेथुन दोघे बंधु संतुष्ट होवुन, आप-आपल्या यज्ञदक्षिणाचे धन घेवुन आपल्या आश्रमात आले.

आपल्या आश्रमात आल्यानंतर यज्ञदक्षिणेत आलेल्या धनाच्या वाटणीवरुन त्यांच्यात वाद-विवाद निर्माण झाला.

जय चे म्हणणे होते की : यज्ञदक्षिणेत आलेल्या सर्व धनाला एकत्रीत करून त्यांची समसमान वाटणी करून दोघात समसमान वाटुन घ्यावे. तर विजय चे म्हणणे होते की : ज्याच्या भाग्याने ज्याला जितके धन मिळाले, तितकेच धन त्यांच्या त्यांच्या वाटणीला आलेले आहे. त्यामुळे वाटणी करण्याचा प्रश्नच उद्भवत नाही.

विजय चे म्हणने ऐकुन जय क्रोधित झाला. क्रोध अनावर होवुन जय ने विजय ला शाप दिला की : विजय ! तु फक्त मगरीप्रमाणे ग्रहण करतो. घेतो परंतु देत नाही. त्याचमुळे तुला ग्राहयं म्हणजेच मगर ची योनी प्राप्त होवो.

जय ने दिलेला शाप ऐकुन विजय सुध्दा क्रोधीत झाला. आणी त्याने जय ला शाप दिला की : जय ! तु कुणाचही न ऐकणा-या मदमस्त हत्ती प्रमाणे मदाने, दंभाने

भ्रांत होवुन मजला शाप दिल्याकारणाने, तुला सुध्दा मदमस्त हत्ती म्हणजेच गजराज ची योनी प्राप्त होवो.

दोघां बंधुनी एकमेकांना कोधाच्या भरात शाप दिल्यानंतर त्यांची चुक त्यांच्या ध्यानात आली. दोघेही नारायणाचे परंम् भक्त असल्याकारणाने त्यांनी आप-आपल्या शापनिवृत्ती करीता, नारायणाची मनोमय प्रार्थना करून मनी धावा करू लागलेत. आपल्या परंम भक्तांचा धावा ऐकुन चत्रभुज नारायण तेथे प्रकट झाले. तेथे नारायणाने त्यांना उपदेश देवुन अभिवचन दीले. तो भगवंत म्हणाला की : तुम्ही माझे सच्चे व परंम् भक्त असल्यामुळे तुमच्या बोलावर आम्हा उभे राहावेच लागते. सच्च्या भक्तांचा बोल वचन कधिही असत्य ठरणार नाही. याची काळजी आम्ही घेत असतो. त्याचमुळे तुम्ही दोघे ऐकमेकांना दिलेल्या शापाचे भोग भोगल्यानंतर, तुम्हास परंम् देणं भेटुन तुम्ही परंमधामाला प्राप्त व्हाल. तुम्हा बंधुस परमपद प्राप्ती होईल. असे अभिवचन देवुन भगवान अन्तर्धान झाले.

तद्नंतर गण्डंकी नदी किनारी त्या दोघा बंधु ला मगर व गजराज ची योनी प्राप्त झाली. विजय मगर नदिच्या तिरावर पाण्यात राहु लागली. तर जय गजराज नदी किनारी च्या अरण्यात राहु लागला. या मगर-गज योनीत सुध्दा त्या बंधुंना त्यांच्या पुर्वसत्कृत्य व सचिताव्दारे पुर्विच्या जन्माचे स्मरण राहीले. जातक स्मरणामुळे ते या योनीत सुध्दा नारायणाची परंम भक्ती करत 'ओम् नमो नारायणा' या मंत्र-नामज्योत मध्ये राहुन तो जिवनकाळ व्यथित करू लागलेत. जातक स्मरणामुळे या योनीत दोघा परंम् हरीभक्तांमध्ये वैरभाव होता. ऐकमेकांना दिलेल्या शापव्दारे ही योनी मिळाली याचे स्मरण त्यां दोघां बंधुला असल्यामुळे, त्यां दोघांमध्ये ऐकमेकाबध्दल वैरभाव शत्रुभाव होता.

कोण्या एका समयीच्या कार्तिक मास चे स्नान करण्यासाठी, गजराज गण्डकी नदि मध्ये उतरला. गजराज व मगर यांच्यात वैरभाव असल्यामुळे, त्यासमयी मगर ने संधी साधुन गजराज चा पाय पकडला. मगरीच्या मुखात आपला पाय गेल्याकारणाने **गजेंद्राला संकट पडले.** गजराज ने साहयं करीता **सुमरन केले रघुरायाचे** ।. रघुराया नारायणाची विनवणी पुर्वक याचना विनंती अर्ज करत त्यांना शपथ/दाई घातली. साहयास लवकर येण्याकरीता धावा मांडला.

आपल्या परंम भक्ताची दाई ऐकता सरसी/क्षणीच म्हणजेच **दाई सरशी** 'दाई शब्दाचे ग्यान दाईची ओवीतुन घ्यावे.' नारायण त्या स्थळी **उडी घातली.** तेथे चत्रभुज रूपात प्रकट झालेत. आणी सुदर्शन चक्र चालवुन गजराज ची सोडवणुक केली. उपदेश करून त्या **दोघांचे वैर तोडले.** त्या दोघांना त्या शापीत योनीतुन मुक्त केले. आणी त्या दोघा बंधुला आपल्यासारखेच रूप दिलेत. विष्णुचे व्दारपाल पद देवुन वैकुठी पाठवले. हेच ते दोघे बंधु जय-विजय विष्णुचे विश्वविख्यात व्दारपाल होय.



याच व्दारपालांनी सनकादिकाला हरीदर्शन करीता वैकुठाच्या व्दारावर रोकुन त्यांना खाली ढकलले. 'हरीदर्शन घेणे' पासुन रोकण्याच्या कारणास्तव सनकादिकाने तिन असुरयोनी भोगण्याचा शाप जय-विजय यांना दिला. आपल्या परम भक्त असलेल्या जय-विजय च्या शापमुक्ती करीता, हरीने त्यांना यवगान यवगी च्या प्रतेक असुर योनीत त्यांचा उध्दार करण्यासाठी अवतार घेवुन यवगान यवगीच्या असुर योनीतुन जय-विजय ची सुटका करून उध्दार करण्याचे अभिवचन दिले.

तद्पश्चात् हेच जय-विजय सनकादिकाच्या शापाव्दारे कृतायवगी प्रथम असुर योनीत हिरण्यकश्यिपु व हिरणाक्ष झाले. कृताच्या या असुर योनीतुन जय-विजय ची सुटका करून उध्दार करण्यासाठी, हरीने नृसिंह अवतार घेतला.

तर त्रैतायवगी दुस-या असुर योनीत हे जय-विजय कुंभकर्ण व रावण झालेत. त्रैताच्या या असुर योनीतुन जय-विजय ची सुटका करण्याकरीता हरीने रामावतार घेतला.

आणी व्दापरयवगी तिस-या असुर योनीत ते व्दारपाल दन्तवक्र व शिशुपाल झाले. व्दापरच्या या असुरी योनीतुन जय-विजय ची सुटका करून उध्दार करण्याकरीता हरीने कृष्णावतार घेतला. अश्या रितीने आपल्या परंम् भक्तांच्या उध्दारासाठी हरीने यवगान यवगी अवतार धारण केलेत.

*सार :-*

।। काम क्रोध, लोभ दम । मद मत्सरं ।
षट वैरी, हे तत्पर । हेची जाणं ।। खंड03/ओवी-22
।। देहेत भरलं हे सारं । बाहेर काढा हे कडबा-कुटारं ।।

*तुम्ही सुध्दा काम क्रोध लोभ दम व मद मत्सर चा त्याग करून नित हरीनामी राहवे. विचार करून बोलावे. काम क्रोध लोभ दम्भ मद मत्सर..ईत्यादीचा कडबा कुटार आपल्या देहीच्या बाहेर काढुन फेकावा. आणी हरीभक्तीत स्थित व्हावे. समदर्शि बनुन विषमतेचे विसर्जन करावे.*

*जर जय विजय ने हे काम क्रोध लोभ मद दंभ मत्सर चा कचरा आपल्या देहीच्या बाहेर काढुन फेकला असता, तर त्यांनी क्रोधावर विजय मिळवुन शांत राहुन हिस्से वाटणीचा निर्णय घेतला असता. ऐकमेकांना शाप देण्याची त्यांच्यावर पाळी आली नसती. शापाव्दारे त्यांच्यावर मगर व गजराज ची योनी भोगण्याचा प्रसंग आला नसता.*

*जर जय-विजय ने देहीच्या बाहेर कडबा कुटार काढुन फेकला असता, तर त्यांना भोग न भोगता त्यांच्या परमं भक्तीमुळे विष्णुव्दारे सहजतेने परमंपद प्राप्त झालेच असते.*

*म्हणुनच देह सुंदर साफ करा । आदीपुरूष येईन देह धरा । तो सांगन अवघ्या गोष्टी । प्रार्थना करा । हरीची परंम् भक्ती करा । तो यवगान यवगी भक्ताचे तारण करेल. भक्तांचा उध्दार करेल.....असो.*

चतुर्पती नामी गायन करून हे हरीचरित्र सांगीतले आहे. प्रतेक हरी चरित्रात भक्तांनी, सर्वप्रथम निराकार निर्गुण स्वरूपात हरीची शुध्द मनोभावाने परमं् भक्ती केलेली आहे. त्या प्रतेक परंम् भक्तांनी कुठेही मुर्तिपुजा, तिरगुणी कर्मकांड ..ईत्यादी च्या मागे न लागता, शुध्द मनोभाव ठेवुन ज्ञान भक्ती केलेली आहे. सर्व परंम् भक्तांनी निराकार निर्गुण सत्यदेवाची म्हणजेच निगुर्ण अवधुत रायाची शुध्द मनोभावने परंम्भक्ती केलेली आहे. म्हणुनच त्यां भक्तांचा यवगान यवगात तारण होवुन उध्दार झालेला आहे. त्यां भक्तांच्या मातीच्या देहाची कस्तुरी होवुन, त्यांचा मातीच्या देहाचे नावाचा सुगंध यवगान यवगात दरळत आहे. म्हणुनच संतामध्ये या अवधुत रायाचेच निशाण गर्जत आहे.



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०६ ॥
॥ ओवी नं. ०२ ॥
॥ निरसनसह मुळावरची मोठी ओवी ॥

# ॥ आकाश वाणी शेला ॥

जळगाव दांड चे वरचरणं :–
।। गोष्ट खरी की लटकी । तुम्ही ओळखा दादा हो ।
तुम्हा कळन तसं म्हणा । आला यवगावर राहो ।।घृ।। ..जळगाव
।। झुटी माया झुटी काया । झुटे देव तिन ।
भैसाच्या मुखचं झुट घेतलं । झाले बेईमानं ।। ..जळगाव दांड

॥ आकाशवाणी शेला घेवुन । आले श्यामकर्ण ।
२१ स्वर्ग उडुन/उरून गेला । पढंवला कोण ? ॥ घृ ॥
॥ श्यामकर्णाचे परंम् मुदतचे । घर अनामीक ।
अनामीकानं सर्वच केलं । पहा या दुनियेत ॥
॥ आपला मान मधुपान । लव, दिला कपटानं ।
प्याला दिला विष्णुला । शेला, आटोपला याहीनं ॥

डहाक्या
।। अवघ्या जीवाहुन जीव अनामीक । आंगी लहानपणं ।
अवघ्या जीवाला शरण जातो । आंगी नाही मोठेपण ।।
।। अवघ्या जीवाहुन जीव आहे । अनामीक खासा ।
यवगासाठी धावुन आला । तो माझा सखा/पिता ।।
।। चातुराई केली चातुरा । कृष्ण अवतारा ।
धरल्यां सत्य धारां । अवघे, आणले घरा ।।
।। राहु धनी राहु मुनी । तो अहिन खासा ।
सर्वत्राची खबर ठाव । तो, सांगन आता ।।
।। सर्वत्राच्या आधी आदी पुरुष, याहीचं नावं ।
तिरलोक्या मध्ये वेल त्याहीचं । न्यात ओळखावं ।।

॥ साथ छाया सात माया । उभ केलं ज्योतीनं
अमृताचे वाणं जागी केलं। सहा जनं ॥ ०४ ॥
किंवा:– ।। साथ छाया आईका गाहयां । देवं कोटीनं ।
अमृताचं वाणं जागी करा साधन ।।
॥ घडवीला पुतळा देवानं । आपल्या हातानं ।
त्या आवाजी गर्भ राहीला । त्यात नाही आपणं ॥
॥ गाई या गो-हाचं जुग/गुंज । काही कोणा समजेनां ।
निर्गुणधनी/आकाशवाणी दत्त निरंजन । केला अध्यानां ॥
॥ गाही झालीसं मात । देल्ली, भैसाच्या उदरात ।
जली मच्छींदर होवुन मासोळी । आहे जागृत ॥
॥ जलींदराच्या पोटी मच्छींदर । गेला होवुनं ।
तिच्याच पोटी आवाज दिला । डोम्या गि-हाणं ॥०८॥

॥ डोम्या आंगी पिडं पडला । अर्जुन होईना ।
याहीच्या संगती हात जोडुन । उभी राज सेना ॥
॥ आकाश वाणी, ज्योत नामाचां । साहयं, अर्जुनाशी झाला ।
चौथ्या खुम्मी अथर्वन् वेद । सैना, उभ्या राहील्या ॥
॥ या सैनाशी अमृत पान्हा । दिला देवानं ।
तो देव नाही टळला मागं । फितुरी, केली ब्रम्हयानं ॥
॥ कर्त्या-याची राज सेना माग । फिरली पलटुन ।
चौथ्या खुम्मी अथर्वन् वेद । दिला, गादीवर बसवुन ॥ १२ ॥

डहाक्या :–

॥ चतुर्पता अथर्वन् वेद सैन्य । दिले गादीवर बसुनं ।
झुटे देव सिदे गेले । राज सैन्याला शरण ॥ ०६/०२

।। चतुर्पता अथर्वन् वेद, उभा । चौथ्या खुम्मी ।
ईच्या अमृत संजीवनीचा उजाला । आहे चौताळी ।।

**भजने :-**

॥ अथर्वन् वेदाची मांडणी । सांगी सांगतली आकाशवाणी ॥
॥ अथर्वन् वेदाचं बोलनं । या मकाणी ठेवलं आहे सांगुन ॥
॥ अथर्वन् वेदाची गाही । जागी करन महाराजा सारी सृष्टी ॥
॥ अथर्वन् वेदाचं बोलनं । उभा राहीनं चवथा खुम्म तो चौ-यांशी मोडन ॥
॥ चौथ्या खुम्मी येईन धनी । तो तारणं जीवाजनी । हे सर्व त्याहीच्या अध्यानी.

-: निरसनसह शब्दार्थ/चरणार्थ निरसन :-

**राहु** :- भरुन भरला आणीक उरुन, राहुटी करुन राहीलेला राहु । बम्हांडातील परमात्मा तर पिंडीतील त्याचाच तेजोगुणी अंश अवतार घेवुन उभा असलेला आत्मा । जो राहुटी करुन या प्रकृतीमायेच्या देही च्या काटेरी झोपडीत राहतो तो निरंजन आत्मा । तोच होय आदीपुरुषाची ज्योत । या आत्मज्योती मध्ये, ज्योत खेळते या भैसाची । तो भैस राजा उभा येथ । **शेंला** :- काया, देह । **झुटं** :- उष्टे । **झुटी** :- उष्टी, खोटी

।। झुटी माया झुटी काया । झुटे देव तिन ।
भैसाच्या मुखचं झुट घेतलं । झाले बेईमानं ।। जळगाव दांड चे चरणं

तो चौवेद पोटी असलेला चौथा सर्व तिरगुणी राजें यांच्या आवाक्या पासुन या तिरगुणांच्या पल्याड दुरच उभा राहुन देण देत असल्यामुळे, हे तिरगुणी राजे या चौथ्या भैसाला शरण गेलेत. आणी मायेला संग घेवुन या तिरगुणांच्या तिन राजे सह त्यांच्या मायेनं मावची कलारीन चे बाजारी रुप घेवुन पेठां मध्ये आपले विविध रुप घेवुन तिरगुणांच्या पेठां स्थापल्या. आणी तिनदेवाने कपट करुन गळा हात घालुन या आदीरुप भैसाला या पेठेत आणले. आणी कारण महाकारण ग्यानाच्या प्याल्याने धुंद करुन या कारण महाकारण ग्यानाची भैसाला उब आणुन त्याच्या मुखचे तिन वेद त्यांनी घेतलेत. अश्या रितीने भैसाच्या पोटामधील वेद भैसाच्या मुखातुन बाहेर काढुन ते भैसा मुखचे उष्टे/झुटे या तिन ने आपल्या पोटी घेतले असल्यामुळे उष्टेच उष्टे अवघेच उष्टे झालेत. उष्टी माया उष्टी काया उष्टे देव तिन झालेत. अधिक ग्यानाकरीता खंड01/भाग02/ओवी03 माया चैत्यन्या चे निरसन वाचावे.

ज्याने दिले त्यालाच हे तिरगुणी उष्टे देव बेईमान झालेत. ज्याच्या कडुन घेतलेत त्याच्या नावाच्या ठिकाणी आपले नाव घुसडुन टाकले. ज्याने तिन वेद दिले त्यालाच बेईमान होवुन, या तिन वेदाचा पसारा 18 पुराण, 06 शास्त्रे, स्तुती पोथी पुराण कथा गाण.. ईत्यादि मध्ये तिरगुणांचे विवरण पसरवले. आणी चौथा वेद त्या चौथ्याच्या पोटीच राहील्याकारणाने, त्या चौथ्या वेदाची फक्त प्रवेश पत्रिका देवुन उरला चौथा वेद गुप्त आहे. असे सांगत सुटलेत. सर्वसामान्य जनांला फसवुन त्यांना तिरगुणी ग्यान मधुपानाप्रमाणे पाजत त्यांच्या सहा सर्व मोठ्या मोठ्या मी–मी म्हणणा–यांनां भ्रांतीत टाकलेत. तिरगुणी ग्यानाला हाती घेवुन हे तिन वेद जेव्हा या चौथ्या आदीरुपाला शोधतात, तेव्हा ते गोंधळात पडुन नेती नेती म्हणत मागे परततात. तिन वेदांना तो चौथा काही जाणल्या गेला नाही. म्हणुनच या तिरगुणी ग्यानात असलेले तिरगुणांचे ओझे टाकुन, त्या तिरगुणांच्या पलीकडे पाहीणा–यांनाच तो चौथा शुध्द सत्व आदीपुरुष आपरुप प्राप्त होता.

अश्या रितीने या तिरगुणी माया ने या त्रिदेवांने तिनगुणांचे फासे सर्वसामान्य भक्तजनां वर टाकलेले आहेत. तिरगुणी फासे टाकुन त्यांना आपल्या तिरगुणी फास्यात अडकवुन, मधुपानाप्रमाणे ती तिरगुणी ग्यान सर्वसामान्य जनांना पाजत आहे. म्हणुनच खंड02/ओवी–7 आकाश जाणुणीया पिता व खंड02/ओवी–36 धेनुगायची ओवी या ओवीचे चरण गर्जुन सांगी करत आहे की :

।। आहो मोहीत हे पुराण । हे आहे वाचकाचे काम । 02/07
हे अवघच खोटं जाण । हा चौथा सत्यदेवच करतो तारण या सृष्टीचे ।

।। माया तिरभवनी व्याली । सर्व भुता प्रसवली ।
मुख्य वाचा खाणी चारी । वेद पुराण माया सारी ।। 02/36

ज्याच्या पासुन घेतले त्यालाच मायेसह तिनदेव बेईमान झाल्याकारणाने खोटी माया खोटी काया खोटे देव तिन ठरलेत. नका लागु तुम्ही या खोटयांच्या मागे. या झुटया तिरगुणी फासे चे खोटया मायाजाळ मुळे ते चौथ्या पर्यत पोहचु शकत नाही आहे.

॥ आकाशवाणी शेला घेवुन । आले श्यामकर्ण ।
एकविस स्वर्ग उडुन/उरुन गेला । पढंवला/पाठवला कोण ? ॥

॥ श्यामकर्णाचे परंम् मुदतचे । घर अनामीक ।
अनामीकानं सर्वच केलं । पहा या दुनियेत ॥

तो आकाश वाणी चा श्यामकर्ण अनामत धनीच आता आकाशवाणी शेला घेवुन, या सत्यधारी अनामीक कृष्णाच्या देहघरच्या २१ स्वर्गावरी भरून भरला आणीक उरून उभा झालेला आहे. तो श्यामकर्ण कृष्ण देहघरी आला असल्यामुळे, आता अवघंच या अनामीक कृष्णाच्या देह घरा आले आहेत. परमं मुदतचे घर असलेला श्यामकर्ण अनामत धनी ने कृष्णा व्दारे चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ मिर्तलोकी उभा करून, या पंथाच्या, या मिर्तलोकच्या भुम्मेवर नित उभा झालेला आहे. चतुर्पता कृष्ण अवधुत पंथाची पताका पुनश्चः उभारली आहे. ज्याने चतुर्पता कृष्ण अवधुत पंथ उभा केला त्यानेच या दुनियेत सर्वच केलं आहे. असे हे चरणे गर्जुन सांगी करत आहे की :

॥ आपला मान मधुपान । लव दिला कपटानं ।
प्याला दिला विष्णुला । शेला/शिल्ला आटपला याहीनं ॥

प्याला दिला विष्णुला..:-

खंड01/02/01:-शक्तीची ओवीत या चौथ्यानेच शक्तीच्या प्रार्थनेला पावुन, या तिघास जागी करुन यांना तिन यवगाची राजपदवी दिली आहे. एवढच न करता जसा शनीने हनुमंतास आपल्या मानाचा प्याला दिला, तसा आपला जो मान आहे त्या मानाचा प्याला त्या चौथ्याने विष्णुला दिला आहे. आणी ज्याचा मान त्याला तर दिला नाही. परंतु आपला मान मधुपानाप्रमाणे घेवुन कपटाने प्रेम दाखवुन म्हणजेच कपटाने लव/प्रेम देवुन, कपटी माया सह या त्रिदेवांने भैसा मुखचे भैसाने पढलेले तिन वेद हाती घेतलले आहेत. हे तिन वेद त्यांनी कसे कपट करुन घेतले याचे अधिक ज्ञान खंड01/भाग02/ओवी-03 माया चैत्यन्या आदीमाया ओवी मधुन घ्यावे.

या मायेसह तिन देवानें मनी कपट ठेवुन वरवर लव/प्रेम व्यक्त करत आपल्या राज्यस्थापनेसाठी चौथ्याकडे प्रार्थना मांडली. खंड०१/०२/०२ निराकार निरंजन या ओवीतुन त्यांच्या प्रार्थनेचे ग्यान घ्यावे. या प्रार्थनेला पावन होवुन त्या चौथ्याने समानता व्यवस्थेचा मानवजनावंर पसरवलेला आपला शेला आटोपता घेतला. प्रार्थनाव्दारे प्राप्त झालेल्या चौथ्याच्या देणं व्दारे त्या त्रिदेवांनी चौथ्याचा चैतन्यशिक्का असलेला त्या चौथ्याचा मानाचा शेला चा मानसन्मान कमी करत करत आटपुन सर्वसामान्यापासुन लपवुन ठेतला. अधिक ज्ञानासाठी खंड०१/०२/०२ निराकार निरंजन ओवी चे निरसन वाचावे.

सच्च्या भक्तजनांस आपणहुन येवुन देण देण्याच्या या चौथ्याच्या शिष्टाईच्या भरवश्यावर या तिघानं तिन यवगाचे राज चालवले आहे. भक्त मिळविले आहेत. ज्याच्या मुखचे घेतले त्यालाच बेईमान होवुन तिरगुणी माया सह तिरगुणांच्या तिन राजे यांनी तिन यवगात चवथ्या चतुर्पती चे ग्यानाला सर्वसामान्य भक्तजनां पासुन दुर ठेवत हे तिरगुणी राज्य स्थापले आहे. चौथ्याच्या शिष्टाईच्या भरवश्यावर भक्त मिळवुन त्या भक्तास तिरगुणी ग्यानाचा प्याला मधुपानाप्रमाणे पाजुन, या तिन यवगात त्यांनी राज केले आहेत. परंतु हे यवग चालवले कोण ? हे त्या भक्तास न कळल्यामुळे त्या भक्तांनी मुळच्या देणा-यास मान न देता भलत्यांनाच मान दिलेला आहे.

परंतु सर्वसामान्य जनांच्या दृष्टीवर टाकलेली तिरगुणी ज्ञानाची झापडी काढुन टाकण्यासाठी तो चौथा आदीपुरूष आकाशवाणी चा शेला घेवुन सत्यधारी अनामीक कृष्ण देहीवर अवतरला आहे. येथेही याहीनं येथेही लहानपण घेवुन आपला आकाशवाणी शेला आटपला आहे. असे चरणं गर्जुन सांगते की :

डहाक्या :-

।। अवघ्या जीवाहुन जीव अनामीक । आंगी आहे लहानपण ॱ ।
अवघ्या जीवाला शरण जातो । आंगी नाही मोठेपण ।।
।। अवघ्या जीवाहुन जीव आहे । अनामीक खासा ।
यवगासाठी धावुन आला । तो माझा सखा/पिता ।।
।। चातुराई केली त्वां चतुरा । कृष्ण अवतारा ।
धरल्यां सत्य धारां । अवघ, आणले घरा ।।
।। राहु धनी राहु मुनी । तो अहिन खासा ।
सर्वत्राची खबर ठाव । तो, सांगन आता ।।

या श्यामकर्ण अनामीक कृष्णाने आंगी लहानपण घेवुन चतुराई करत, सत्य धारा धरणा-या अनामीक कृष्णाने सत्य धारा वाहवत ईथे चतुर्पता पंथाच्या भुम्मेवर सर्वच काही करुन ठेवले आहे. सर्व काही करत आहे. सर्वकाही करुन ठेवणार आहे... हाच आदीपुरूषाचा चतुर्व्युह रंचनेत आलेला पुर्ण अवतार होय. हाच देहीच्या अर्तगत राहुटी करुन वसलेला सर्व राहु चा धनी होय. याची नाही

कोणा खबर. म्हणुनच याचा तेजोगुणी अंशअवतार असलेला हा देही अंर्तगतचा राहुच आपल्या राहु धन्याच्या चतुर्पती ग्यानासह सर्वत्राची खबर ठाव सांगन हो आता ! खालील चरणे गर्जुन गाही देत, सांगी करत चतुर्पती ग्यान देत आहेत की :

।। सर्वत्राच्या आधी । आदीपुरूष, याहीचं नावं ।
तिरलोक्या मध्ये वेल याहीचा । न्यात ओळखावं ।।

सर्वत्राच्या आधी सर्वप्रथम हा एकला आदीपुरूष होता. खंड 02/11 :– ‘आदीपुरूषाचा खेळ नाही कोणा मालुम‘ च्या निरसनातुन या चरणाचे ग्यान घ्यावे.

॥ साथ छाया सानीध्य/सात माया । उभ केलं ज्योतीनं
किंवाः- साथ छाया आईका गाहयां । देवं कोटीनं ।
अमृताचे वाणं जागी केले । सहा जनं/साधन ॥०४॥

**साथ छाया** :- सर्वत्राच्या आधी असलेल्या आदीरूप आदीपुरूष परमात्मा च्या निराकार निर्गुण निरंजन ज्योर्तिमय रूपाची छाया हीच प्राण शक्ती बनुन या ब्रम्हांडात त्याच्या साथ/संग ब्रम्हांडात संचारत आहे. । **आणीक माया** :- या ज्योर्तिमय परमात्माच्या मुळावरचा रंग धरून त्या ज्योतीची इच्छाच ही अद्‌भुत माया शक्तीस्वरूपात उभी झाली. या शक्तीला आवाजी तिन खुम्म दिलेत त्या चौथा तेथुन गायप झाला. त्यात नाही आपण..ईत्यादी ग्यान खंड०१/ओवी-०१ शक्तीची ओवी यातुन घ्यावे. । **सात माया** :- खंड०३/ओवी०१:-मुळस्तंभिचा पाया या ओवीतुन मायेच्या सात रूपांचे ग्यान घ्यावे. । **वाणं** :- भेट, देणं, । **सहा जन** :- सहा नर हे सहा नर जागी करून कायेचा सहानर साचा बनवला आहे. खंड०२/ओवी-०१ सहानर सचला साचा या ओवीतुन अधिक ग्यान घ्यावे.

॥ करूनी घडवलां पुतळा । देवानं आपल्या हातानं ।
त्या आवाजी गर्भ राहीला । त्यात नाही आपणं ॥

करूनी घडवला पुतळा देवानं.. :-

एकडुन पेरते तिकडुन मोडते :-

ज्या एका ठिकाणी जेजे लिन होते, तेते त्याच एका ठिकाणापासुन प्रकट होत असते. या सुक्ष्मनियमाला अनुसरून या पिंडात या आत्म्यामध्ये प्रलय पावलेले सर्व पुन्हा त्याच आत्म्यापासुन प्रकट होते. तर ब्रम्हाडात सृष्टी प्रलयामुळे, जेजे त्या एकाच परमात्मात लिन होतात, तेते त्या एकाच परमात्मापासुनच उत्पन्न होतात. व्यक्तातुन प्रलयकाळी अव्यक्तात जातात. आणी अव्यक्तातुन व्यक्त होत राहतात त्या परमात्मा कृपेने ।

अश्या रितीने हा देव आपल्या हातानं पुतळा उभा करून त्याला घडवितो. आपल्या हातानं ईकडुन पेरतो व तिकडुन मोडत ज्योतीचा खेळ खेळत राहतो. तो असा : प्रथम देहीचा पुतळा उभा करून, त्यात त्याचे अवघ्या गोडातील गोड असलेले लावणीचे झाड म्हणजेच तेजोगुणी अंश अवतार उभा करतो. लावणीचे झाड चे ग्यान खंड०१/०२/०८ च्या निरसनातुन घ्यावे. त्या देहीला जगवत त्या देहीला घडवतो. तद्‌नंतर त्या जुन्या जिर्ण झालेल्या देहीतील ज्योत अव्यक्त करून अथवा काढुन, नव्या व्यक्त देहीत त्या ज्योतीचे बिजारोपन करून खेळवत राहतो. आदीमुनी महामुनी कस नात दोघाच खंड ०२/ओवी-३० या ओवीच्या निरसन मधुन अधीक ग्यान घ्यावे.

अश्याप्रकारे हा ज्योतीचा मालक असलेला आदीपुरूप परमात्मा हाच देहीचे पुतळे करतो. देहीच्या संकष्टी त्याला बाहेर काढतो. अनुभावातुन नमुखचा उपदेश देत त्याला घडवितो. ऐसे याहीनं अनंत यवगाच्या अंती व सत् यवगाच्या आरंभिच्या संधिकाळात शक्तीला उपजुन उपदेश दिला. आवाजी बिज दिलेत. परंतु त्या आवाजी बिजा मधुन चौ-खुम्म तर उभे झाले. परंतु शक्तीच्या भ्रातीमुळे तिन खुम्म तिने जाळले आणी हा चौथा स्वतः मात्र गायप होवुन शक्तीच्या प्रार्थनेला पावुन शक्तीसमोर हा चौथा आदीमुनी रूपात उभा राहुन, शक्तीने एक शेजुन तिन ची मांडणा केलेले तिन खुम जागी करून दिलेत. शक्तीमाया चे संग ते एक शेजुन तिन खुम्म असुन हा त्यात तो चौथा नाही आहे. अधिक ग्यानाकरीता खंड०१/०१/०१:-शक्तीच्या ओवीचे निरसन वाचावे.

॥ गाई या गो-हाचे/गर्भाचे जुग । काही कोणाला समजेना ।
निर्गुणधनी/आकाशवाणी दत्त निरंजन । केला अध्याना ॥

**जुग** :- यवग । **निर्गुण धनी** :- अवधुत म्हणजेच निराकार निर्गुण धनी. तोच दत्त निरंजन स्वरूपात उभा राहीला होता. तोच चौथा चतुर्पती परमात्मा चतुर्पती गायरूपात उभा झाला होता. खंड०१/भाग०२/ओवी-३ मायाचैतन्या गाईच्या ओवीतुन याचे ग्यान घ्यावे.

गाय म्हणजेच तो चौथा चतुर्पती परमात्मा. आणी त्या चौथ्याने आदीमुनी रूपात येवुन शक्तीला आवाजी दिलेले गर्भ म्हणजेच तिन खुम्म दिले. खंड०१/ओवी०१ शक्तिची ओवी मधुन अधिक ग्यान घ्यावे. त्या तिघांना तिन यवगाची राजपदवी दिली.

परंतु ही परमात्मा रूपी गाय व शक्तीचे गर्भाने म्हणजेच मायासह त्रिदेवांने चालवलेल्या या तिन जुगांत/यवगात, चौथ्या चतुर्पती निरंजन परमात्माचे ग्यान सर्वसामान्य भक्तां पासुन याहीनं दुर ठेवले. यामुळे त्याच गाईचा चौथा गर्भ असलेला चौथा भैस हा दुःखी झाला. कारण की : चौथ्याची समसमानतेची रंचना मोडण्यासाठी तसेच या तिरगुणी मायेने तिच्या त्रिपुत्रा चा राज्यकारभार चालवण्यासाठी, सर्वसामान्य भक्तजनांना तिरगुणी ज्ञान मधुपानाप्रमाणे पाजलेत. मायेने पाजलेल्या तिरगुणी ग्यानाच्या प्यालाने, सर्वसामान्य भक्त या तिनही यवगात धुंद झालेत. आणी या तिनही यवगात त्रिदेवांची माता असलेल्या या तिरगुणी मायाशक्तीने तिरगुणी ग्यानाचा फासा सर्वसामान्य भक्त जनलोकांवर टाकुन, त्यांना तिरगूणांत अडकवुन ठेवलेले असल्यामुळे, हे चतुर्पतीचे निरंजन ग्यान काही कोणा सर्वसामान्य भक्तजनांस समजेना.

या सच्च्या भक्ताने ईच्छिलेल्या विविध रूपात सच्च्या भक्ताला या चौथ्याने भेटी दिल्यात. परंतु सच्चा भक्त हा ज्या आकाराचा रूप घेवुन भैसाने भेटी दिल्या, त्या आकारी रूपालाच भजु लागलेत. परंतु त्या आकाराच्या अंर्तगत असलेला, त्या निराकार निरंजन निश्कलंकी चौथा आदीपुरूष परमात्म्याला कोणी भजत नव्हते. तिरगुणी ग्यानामुळे भक्तजनां ची दृष्टी ही आकारावरच थिजल्या गेली. त्या आकाराच्या आतमध्ये पाहण्याची अंर्तगत आत्मदृष्टी त्यांना तिरगुणी ज्ञानीजनांनी दिली नाही. या चतुर्पता गाय व मायेचे तिन गर्भ असलेले तिनदेव व चौथा गर्भ यांचे क्लिष्ट-किल्ष्ट जुगाड काही केल्या सर्वसामान्य भक्तजनां च्या ध्यानी आले नाही.

तिरगुणी मायेच्या प्याल्यामुळे या चौथ्या चतुर्पती निरंजन आदीपुरूषाचे भक्तांना विस्मरण पडुन ते भक्त फक्त आकारालाच महत्व देवु लागलेत. तिन देव व त्यांचे तिरगुणी अवतार यांच्या देहीच्या आत असलेल्या चौथ्याकडे दुर्लक्ष्य करून, त्या देहीच्या आकारालाच भजु लागल्याकारणाने ही चतुर्पता गाय खिन्न झाली. कारण की : या चतुर्पता गाईने स्वर्गावरत या चौघांना चतुर्पता ज्ञानाचा अमृत पान्हा पाजुन जगवले होते. माया चैत्यन्या आदीमाया खंड ०१/०२ ओवी ०३ मधुन ग्यान घ्यावे. या ओवीत चौथ्या भैसाने दिलेल्या वचनाप्रमाणे या चौथ्या आदीरूप भैसानेच आपल्या ईमान राखुन या चौथ्या गाईला आपल्या हदृयाच्या मासंपेशी च्या रोमारोमात चतुर्पता नाम भरून या चतुर्पता ला जागा दिली होती. आणी आजही तो देत आहे. देत राहणार. याच कारणास्तव त्याने या तिघांचे राज्य चालवत चतुर्पता गाईला सच्च्या भक्तजनांच्या हदृयी जागा देत राहीला.

हे तिन यवग चालवले कोण ? सच्च्या भक्तीला देणं देणारा कोण ? चौथ्याच्या देणं देण्याच्या शिष्टाई व्दारे या त्रिदेवांनी कसे भक्त गणांचा संचय केला ?..ईत्यादी चे ग्यान तसेच त्रिदेंव व त्याचा बोलावर उभा राहणारा चौथा चतुर्पती राया यांचे जुगाड, न्यात, व चतुर्पतीचे निरंजन ग्यान काही केल्या कोणा समजेना.

निर्गुण धनी दत्त निरंजन । केला अध्याना :-

परंतु या कलयवगाच्या संधीकाळात हे चतुर्पती चे निंरंजन ग्यान सच्च्या भक्तांना देण्यासाठी कृष्णा उभा राहीला. त्याने देह धरला. आणी या देहात निर्गुण धनी दत्त निरंजनाला अंर्तभुत करून घेतले. त्या चौथ्या चतुर्पती निर्गुण निरंजन दत्त धन्याला आपल्या संपुर्ण अध्यानी केला. आपल्या देहीच्या आत त्याला अंर्तभुत करून घेतले. म्हणजेच त्या चतुर्पती परमात्मा आदीपुरूषाची पुर्ण निश्कलंकी ज्योत आपल्या

देहीच्या ज्योतीमध्ये अंर्तभुत करून, त्या ज्योतीमध्ये ज्योत खेळवत तोच आदीपुरूषाचा पुर्ण अवतार बनला.

॥ गाही झालीसे मात । देल्ली, भैसाच्या उदरात ।
जली मच्छींदर होवुन मासोळी । आहे जागृत ॥

गाही झालीसे मात :-

कलयवगात झाली मात, श्रीकृष्ण नाथ वचनी गोयला । कर्तार धनीदेव महाराजा आंगी उभा राहीला. हा सर्वेश्वर सर्व ऋषी चा ईश्वर ऋषिश्वर धनी या कृष्ण महाराजाच्या स्वराला/श्वासाला येवुन मिळाला. आणी कृष्ण नरदेहीचा याहीनं आपला पुर्ण अवतार केला. ही कृष्ण गाय झाली संपन्न । या आदीपुरूषाने दिलेल्या अनेक साक्ष पुरावे गाही व्दारे अनेक माव वर मात होवुन चौयवगाच्या सर्व गाहीवर या कलयवगाच्या संधीकाळात सावंगा येथे मात झाली आहे. भैसापोटचा अथर्वन् वेद कृष्णा मुखातुन बाहेर पडुन येथे उभा राहीला. भैसाच्या सत् यवगाची मांडणी झाली. सानीध्य बहुत काही झालेले आहे. याची खबर नाही कोणाशी !

देल्ली, भैसाच्या उदरात :-

जे मायेसह तिन यवगाचे राजे तिन ने आपल्या तिन यवगात जे चतुर्पती ग्यान झाकले होते, ते झाकण उघडुन तिरगुणाची झापड सर्वसामान्यांच्या दृष्टिवरून काढण्याकरीता, सर्वसामान्यांचे तारण करण्याकरीता, नव्या जोमाने चौथ्या चतुर्पती धन्याचे चतुर्पती ग्यान व चतुर्पती भक्तीचे बिजे जनसामान्यासह जाणत्यात रोवण्याकरीता, त्यांच्या देहीवर ज्योता चढवण्याकरीता, भैसाच्या सत्यवगाच्या मांडणा मजबुत करण्याकरीता, सिध्द शक्तीयॉं वर ज्योता चढवण्यासाठी, कलीचा मान राखण्याकरीता...सानीध्य बहुकारणाकरीता त्या कृष्णाने गायपाचा खेळ उभारून आध्यात्मीक जलाचरात म्हणजेच पंचतत्व काल दिशा आत्मा मन या नउ द्रव्यात/जलात उडी घेवुन कृष्ण देह भैसा उदरात घातला. आणी हा निर्गुण निराकार निश्कलंकी श्रीकृष्णा या आध्यात्मीक जलातुन गुप्तपणे सावंग्यात उभा राहुन ठाई ठाई आपला अवतार खेळु लागला आहे. प्रतेक वेळी याच्या संग होती शक्ती । हा जली मच्छींदर होवुन ही अंबर चतुर्पती मासोळी आहे जागृत !

जली मच्छींदर होवुन मासोळी । आहे जागृत :-

या कृष्णरूपी जागृत मासोळीच कधी देही होतो. कधी विदेही होतो. येतो पुन्हा ! चतुर्पता अथर्वन् वेद ची चौथ्या खुम्मी करतो गर्जना । आपल्या पोटी असलेला चौथा चतुर्पता अथर्वन् वेदाची आपणहुन भक्तांच्या देहघरा येवुन सच्च्या भक्तांना हाती घेवुन दवंडी च्या प्रमाणे वाणी गर्जुन सांगीतली आहे. हा चतुर्पता अथर्वन् वेद त्या कृष्णाने सच्च्या भक्त जनांच्या हाती दिला आहे. अश्या रितीने चतुर्पता गाय उभी ठेवण्यासाठी आध्यात्मीक जलाचरातील ही मासोळी जागृत असुन याच मासोळीने कित्येक ठिकाणी ठाई ठाई अवतार धरला. हे कोणा नाही मालुम. कृष्णामृत मधुन अधिक ग्यान घ्यावे. असे त्या ठाई ठाई अवतार खेळलेल्या कृष्णा च्या पुर्णात्माने या कलयवगात जे आधीच ठरवुन ठेवले आहे, ते घडवुन उभे करण्याकरीता उदाहरणार्थः- चतुर्पता अथर्वन् वेद, भैसाच्या सत् यवगाची मांडणी...ईत्यादी, तसेच आधीच्या ही यवगात बहु कारणाकरीता आधीच आपले चतुर्पतीचे कार्य योजुन ठेवलेले आहे. याचे ग्यान व गाही खालील चरणे गर्जुन देत आहेत की :

॥ जलींदराच्या पोटी मच्छींदर । गेला होवुनं ।
ईला/तिच्या नमुखचा/पोटी आवाज दिला । डोम्या गि-हाणं ॥
॥ डोम्या आंगी पिडं पडला, अर्जुन होईना ।
याहीच्या संगती हात जोडुन । उभी राजसेना, ॥
किंवा ॥ डोम्या आंगी पिंड पडला । अर्जुन होईना ।
याहीच्या संगती राज सैना । उभ्या राहील्या ॥
॥ आकाशवाणी/देहजगवाची, ज्योत नामाचां । साहयं अर्जुनाशी झाला ।
चौथ्या खुम्मी अथर्वन् वेद । सैना उभ्या राहील्या ॥
॥ या सैनाशी अमृत पान्हा । दिला देवानं ।
तो नाही टळला मागं । फितुरी, केली ब्रम्हयानं ॥

धर्म हरीश्चंद्राने केले. त्याने डोम्या घरी पाणी भरले. नित सत्या ठाई उभा राहणारा हा चतुर्पती सत्यदेव हरीश्चंद्राच्या पाठीशी नित उभा राहीला. आपल्या बोलावर उभा राहणा-या चतुर्पती ग्यानी हरीश्चंद्राच्या बोलावर उभा राहुन, या सत्यदेवानं हरिश्चंद्राच्या गेल्या वस्त्या दिल्या पुनः हरीश्चद्राच्या हाती आणुन ! या सत्यदेव चतुर्पती चौथ्यां परमात्म्याने हरीश्चंद्राची परिक्षा पाहणा-या विश्वमित्राची मान वाकडी केली हो ।

रोमरोमात सत्य धारण करून सत्य बाळगणा-या हरिश्चंद्राला पोषणारा मसानगीर डोम्या गि-हानं हरीश्चंद्राजवळचे सत्यज्ञान ग्यान घेवुन जेव्हा ठाई ठाई अवतार घेवुन खेळत असलेल्या सत्यदेवाला नमुखचा आपल्या पोटचा आवाज दिला, तेव्हा त्याच्या त्या आवाजाने सत्यदेव चतुर्पती धन्याचे वर्णन काही होईना ! डोम्या ने हरीश्चंद्राकडुन सत्यज्ञान घेतलेल्या त्याच्या आंगचा ग्यानपिंड काही पडेना.! अर्जुन वर्जुन होईना !.

परंतु त्या डोम्याने सत्याला धारण करणा-या राजाचे पोषन केलेले असल्यामुळे, त्या सत्य पोषणाच्या पुण्याच्या लाभ देण्यासाठी त्या डोम्या साठी सत्याला भजणा-या चतुर्पती सैना आपल्या सत्यदेव चतुर्पती धन्याला शरणा जावुन सत्यधारण करणा-याला पोषणा-या डोम्या च्या आंगचा हरीश्चंद्राच्या संगतीन हरीश्चंद्राने दिलेल्या सत्य ग्यानाचा ग्यानपिंड पाडुन, विर अर्जुन होवु दया ! अशी विनवणी अर्जा करू लागल्यात. या चतुर्पतीच्या चौथ्या निराकार निर्गुण सत्यदेवाच्या सत्याला धरून असलेल्या सर्व चतुर्पता अथर्वन् वेदाच्या सैन्याची विनंतीपुर्वक अर्जा धन्यानें मान्य करून डोम्या आंगचा सत्याचे पोषण करणारा ग्यानपिंड पाडला. आणी तो सत्याला पोषण करणारा ग्यानपिंड आत्मसाद करून कोणी एक कृष्णपरमात्माच्या सखात्मा विर अर्जुन झाला.

जेव्हा कृष्ण सखात्मा विर अर्जुन झाला, तेव्हा तो कृष्णाची संगत करू लागला. कृष्णाच्या संगतीने बहु लाभ होवुन सत्यदेव चतुर्पती कृष्णराज च्या सत्यधारी चतुर्पती सैना त्या अर्जुनाच्या संगतीस उभ्या राहील्यात. कर्तार धनीदेव कृष्णराज च्या सेना जिथे कुठे गुंतल्या असेल तेथुन पलटुनी येवुन अर्जुनाच्या मागे त्याच्या पाठीशी उभ्या राहील्यात. अर्जुन सह राज सैना ला अमृत पान्हा कृष्ण देवरायानं पाजला.

कृष्णाने अर्जुनास गितां अमृत पान्हा पाजुन बोध केला. कोटी कोटी चंद्र सुर्याची प्रभा फाकवुन आपले सेरूप दाखवले. कृष्णाचे सेरूप पाहुन अर्जुन मनात विस्मित झाला. अर्जुनास देह जगवाची आकाशवाणी व कृष्ण नामाची ज्योती चे अनेक साहयं झालेत. त्याच्या पोटी कृष्णा मुखचा चतुर्पता अथर्वन् वेद उभा राहीला. आणी या चौथ्या खुम्मीच्या चतुर्पता अथर्वन् वेद ग्यान ने माव करून अर्जुनाने आपल्या हातुन टाकलेला धनुष्यबाण त्याच्या हाती पुनश्चः उचलुन घेण्यास साहयं केलेत. आणी अर्जुनाने हाती घेतलेल्या त्या धनुष्यावर बाणावर बाण खेचुन कौरव आणी कौरवा सह असलेले छान्नव कुळीचे राजे उडवुन दिलेत. कौरवासह छान्नव कुळीचे राजे मारून यानं निर्गुण अश्या आत्मगादीवर आपल्या चतुर्पता अथर्वन् वेद सैन्य बसवुन दिले. हे चतुर्पता अथर्वन् सैन्य निर्गुण आत्म गादीवर बसवण्यासाठी तो कृष्णदेव त्यास साहय करण्यास कुठेही मागे राहीला नाही. तो देव नाही टळला मागे ! सत्याठाई हा देव राया उभा असे. या चतुर्पतीच्या चौथ्या निराकार निर्गुण सत्यदेवानंच सत्याला धरून असलेल्या सर्व सैन्याला चतुर्पती चे निरंजन ग्यान असलेले अमृत फल या देवाने वेळोवेळा देल्ले. यवगान यवगात तो देव नाही चुकला तिरलोक्याशी ! वेळोवेळा त्याने आपणहुन उभा राहुन हे चतुर्पतीचे निरंजन ज्ञानरस असलेले अमृत फल सच्च्या सत्य भक्तांना दिलेले आहेत.

परंतु ब्रम्हानं फितुरी करून हे अमृत फळ सर्वसामान्य लोकांपासुन दुरं ठेवले. या चतुर्पता अथर्वन् वेद चे सत्य ग्यान देण्यास मात्र ब्रम्हयांचा व्यास फितुर झाला. त्या व्यासास जेव्हा एका सच्च्या कृष्णभक्ताने विचारले की : गिता तुमची होय काय ? तुम्ही लिहीलेली गिता कुणाची होय ? असे विचारले. मग गीता कोणी केली ? असे उत्तरादाखल व्यासाने म्हणताच त्याचीच मान वाकडी झाली. मान वाकडी करून त्याने जाणले की : हे वर्म जाणणारा या सच्च्या कृष्णभक्तांचा कृष्ण धनी आल्यावर काढनं माझी खोड ! संदर्भ : सिध्दांतबोध अध्याय-३०

या व्यासाने आपल्या कडे आद्य गुरूपद घेवुन सर्वसामान्यास गुरूचे पाय धुवुन अमृत पिण्यास सांगीतले आहेत. या ब्रम्हयाचे पाय धुवुन सर्व जग पितीन तरी त्यात अमृत नाही हो. हे गुणी मानवा ! तुझे मस्तकी काशी सारखे तिर्थ असतांना त्या तिर्थावर जावुन तेथील तिर्थ न पीता, काय या ब्रम्हयाचे पाय धुवुन तु तिर्थ पित बसला आहे ? जरा या मस्तक ब्रम्हांडीच्या काशी तिर्थावर जा ! आणी आपल्या बुध्दिला चालना देवुन लक्ष्यात घे की : हा ब्रम्हया तर तुला आत्मज्ञानी होवु न देता तुझेया जवळच्या काशी सारख्या तिर्थस्थानावर जाण्यास तुला रोकत आहे. कारण एकदा की तु तुझया मस्तक स्थित काशी सारख्या तिर्थ स्थानी जावुन तेथील तिर्थ पिल्यावर, तु यां ब्रम्हाचे पाय धुवुन तिर्थ पिणार नाही. त्याहीला मानसन्मान देणार नाही. त्याहीच्या देहीची पुजा करणार नाही. त्यामुळे त्यां ब्रम्हया च्या देहीला मानसन्मान व पोटापाण्याची त्यां ब्रम्हयां नी केलेली व्यवस्था मोडकळीस येईल. त्यांचे पोटपाण्याची पुंजी जाईल...इत्यादी हा ब्रम्हया चांगल्या रितीने जाणतो. म्हणुनच तो स्वार्थि ब्रम्हया तुला या तिरगुणांतच घुमवत या चतुर्पतीचे निरंजन ग्यान घेवुन आत्मज्ञानी होवु देत नाही आहे. हे कितीक सांगु ? कोणी ऐकत नाही. काय उपाय करावं आता ? त्रिगुणी माया व तिचे सुत तिरगुणाचे तिन राजे यांनी फितुरी करून सर्वसामान्य भक्तजनांच्या डोळयावर तिरगुणांची झापड टाकली असल्यामुळे, यांना तिरगुणांच्या पल्याडचे दिसत नाही आहे. या सर्वसामान्य भक्त जनांनी तिरगुणांचे ओझे टाकुन, या तिरगुणांच्या पलीकडे उभा असलेल्या चौथ्या शुध्दसत्व भैस राजास बघावे. या तिनगुणांच्या पल्याड उभा असलेल्या चौथ्याची सांगतो गाही, चौथ्याची गाही अनुभवावी..ईत्यादी कितीक जरी सांगीतले तरी, ते तिरगुणी जगात डुबलेले भक्तगण कोणी ऐकेना. या फितुरांना सांगता सांगवत नाही. किती सांगु रे बापा ! हे फितुर तिरगुणी जग मानत नाही.

॥ कर्त्या-याची राज सेना । फिरली पलटुन
चौथ्या खुम्मी अथर्वन् वेद । दिला गादीवर बसवुन ॥

तिरगुणींने केलेल्या फितुरी मुळे कर्ता-याच्या मुखचे चतुर्पता अर्थवन् वेदाचे राज सैन्य या तिरगुणींपासुन मागे फिरवुन, ते चतुर्पता अथर्वन् वेद चे ग्यानसंपन्न सैन्य हे कर्तार भैसाने सच्च्या भक्तजनांच्या निर्गुण गादीवर बसवुन दिले आहे. म्हणजेच त्या चौथ्या भैसाने अथर्वन् वेदाचे सैन्य, या सगुण देहीच्या आत उभा असलेला चतुर्पती परमात्माचा तेजोगुणी अंशअवतार निर्गुण आत्मा यालाच गादी बनवुन, या गादीवर तो चौथा चतुर्पता अथर्वन् वेद बसवुन दिला आहे. आणी निर्गुण गादीवर बसवलेल्या या चतुर्पता अथर्वन् वेदावर तो शुध्द सत्व चौथा आदीपुरूष भैस उभा असुन तो, या तिरगुणांच्या पल्याड सच्च्या भक्तजनांस देणं देत आहे. यां धन्याच्या अमृत संजीवनी चा उजाला चौताळावर पडत आहे. चौ ताळ उजाळत आहे. या चतुर्पता अथर्वन् वेदाव्दारे या चौताळी प्राप्त झालेला चंद्रसुर्यप्रभेचा लख्ख प्रकाश हेच माझ तिर्थ होय.

॥ चतुर्पता गाय अथर्वन् वेद । हे माझ तिर्थ ।
ईच्या अमृत संजीवनीचा उजाला । आहे चौ ताळातं ॥

## ॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०६ ॥

॥ ओवी नं. ०३ ॥

॥ म्हणनीतील छोटी ओवी ॥

## ॥ खरं नेमा का लटंक नेमा ॥

या ओवीची पलट ओवी खंड०७/ओवी-२८ मध्ये दिलेली आहे.

॥ खरं नेमा का लटकं नेमा । ऐका रे दादा हो ।
तुम्हा कळन तसं म्हणा । आला यवगावर राहो ॥घृ॥०१॥
॥ राहो धनी राहो मनी । राहो अहिन खासा ।
सर्वत्रांचा जन्म दादा हो । तो देव सांगन आता ॥
॥ झुटी माया झुटी काया । झुटे देव तीनं ।
याहीच्या मुखचं झुटं/मुखी घेतलं । झाले बेईमानं ॥
॥ आपला मान मधुपान । बहु/लव दिला कपटांन ।
प्याला दिला विष्णुला । शेला अटपलां याहीनं ॥०४॥
॥ श्यामकर्णाचे परंम् मुदतचे । घर अनामीक ।
या अनामीकानं अवघचं केलं । पहा या दुनियेतं ॥०५॥

भजने :-

॥ अहीन अनामत खरा । हा हिशोब घेईन चवयवगाचा/लहान-मोठयाचा ।
॥ अनामीका घरी आला । भाव पाहुन देवराया उतरला ॥
॥ भाव धरा भक्ती करा । भावीका साठी देव भावीक झाला ॥



॥ ओवी नं. ०४ ॥

॥ सर्वात छोटी जुनी मुळओवी ॥

## ॥ माता म्हणे श्रीरायाला ॥

॥ माता म्हणे श्री रामाला । समाजाउ किती ? ।
श्री रामानं आळं घेतली । चंद्र मागतला हाती ॥०१॥
॥ अगासाची चांदनी हो राया । प्रकाशला दोरा ।
देवकीच्या पोटी अवतरला । श्रीकृष्ण हिरा ॥०२॥
॥ देवकीच्या पोटी कृष्ण । प्रकटला बाळ ।
हाती घेवुन खंजीर उभा । करे कंसाले काळं ॥०३॥

भजने :-

॥ कृष्णा निघ निघ बाहेर । हाती घ्याहो समशेर, उडवा वै-यांच शिरं ॥
॥ कृष्णा निघ निघ बाहेर । हाती घ्याहो धनुष्य, उडवा वै-यांच शिरं ॥
॥ धनुष्य घ्याहो हाती । फोडा या वैराची छाती ॥
॥ खैत्री बाहेर निघाला । खैत्री बाहेर निघाला ।
भारी संभाळ या बाळांचा केला/संभाळ या भक्तांचा केला ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०६ ॥
॥ ओवी नं. ०७ ॥
॥ कृष्ण कथामृंताची जळगाव दांडातील जुनी मुळ ओवी ॥

## ॥ चेंडु फळी ॥

॥ चेडु खेळत होता वनमाळी । रत्न जडीताचा ।
वाटुन घेतला मेळ गोपाळाचा । हो श्री रामा ॥ घृ ॥
॥ बळी राम डाव घ्यावे । हेतु होता अवघ्याचा ।
बळी रामानं चेडु मारला । नागोरी उडल्या सा-या ॥
॥ चौदा भवन एकविस स्वर्ग । चेडु उडुन गेला ।
येवुन कदम्ब डहाक्याला गुंफला । हो श्री रामा ॥
॥ कालीया चा डोह मोठा । पाणी होत जहराचं ।
बारा योजन त्या पाण्याची । वाफ उडे गगणातं ॥ ०४ ॥
॥ या वाफेचा लागता वारा । पक्षी होये मृत/मिर्त ।
कदम्बाची डहाकी पाण्यावर । होती त्या डोहात ॥
॥ कदम्बा वर चढला कान्हा/हरी । काही कोणाचं ऐकेना ।
जाउ नको देव राया । सवंगडी, लागले पाया ॥
॥ डहाक्या हालवुन पाडला चेंडु । पाण्यात देखीला नयनी ।
नयनी देखता चेडु मागे । टाकली पाण्यात उडी ॥
॥ गोकुळा मध्ये गेली खबर । झाला हो कहरं ।
रडती नगरच्या नर नारी । आकांत फार ॥ ०८ ॥
॥ यशोदा माता झोटे सोडी । नंद, आपलं कपाळ फोडी ।
गेली माझी जन्माची जोडी । हो श्री रामा ॥
॥ देवकी माता बंदी शाळी/गृही । झाली घाबरी ।
आशा कशी तोडली माझी । परात्पर श्री हरी ॥
॥ श्री कृष्ण गेले पाताळी । देखीला महाल सोन्याचा ।
महालात जावुन उभा राहीला । नंद गवळयाचा ।
तिथं पलंगावर निजला होता । पती पद्मिनीचा ॥
॥ रूप सावळा अंगी कळा । दहा अवतारी श्री रंग ।
रूप पाहुन नागीनी पद्मिनी । झाल्या दंग ॥ १२ ॥
॥ तुम्ही दिसता पुरूष अवतारी । जावे येथुन श्रीरंग ।
जागी होउन खाईन तुम्हाशी । कालीया भुजंग ॥
॥ हातानं चेंडु मागे कृष्णा । तो दयावे आम्हाशी ।
कृष्ण राया दाखवी कौतुक । वाजवे मुरली ।
मुरलीच्या नादानं तो भुजंग । झापा घाली ॥
॥ दोघांची चकमक झाली । अंग फुलवुन दिला ताठा ।
हात घालता होय टेका । भुजंग पाडला उलटा ॥
॥ नाचवु नाचवु केला जर्जर । नागीनी पद्मिनी पसरते पदर ।
चुडी दान दयाहो आम्हाशी । पदरते पदर ॥ १६ ॥
॥ येसन टोचलेसे नाका । शेषाचा केला घोडा ।
त्यावर स्वार झाला । श्री कृष्ण देवराया ॥
॥ यशोदा माता करे आकांत । अंग टाकले धरणी ।
डोही बुडाले मन मोहन । माझे चक्रपाणी ॥
॥ बळी राम म्हणे श्रीकृष्ण । आले हो जिंकुनी ।
हरीच्या चरणी डोही तरले । मनमोहन चक्रपाणी ॥१९॥

**भजने :-** ॥ पाण्याचं अमृत केलं । कृष्ण रायानं ।
रोग विघ्न उडवता । नाही लागला/लागणार खिण ॥
॥ सब पाणी है । सब पाणी । पाण्याची नरदेही तार येवुनी/जीवाजनी ॥
॥ सब पाणी है पाणी । पाण्यावाचुन निर्मळ नाही कोणी ॥

**-: शब्दार्थ :-**

**कदम्ब** :- कदम्ब नावाचे झाड । **डहाकी** :- झाडाची फांदी । **डहाक्या** :- झाडाच्या फांदया । **नागो-या** :- नागोरी खेळातील एकावर एक रचलेल्या गोल चकत्या असलेल्या एकापेक्षा एक लहान नागो-या ज्या विशिष्ट अंतरावरून चेंडु मारून पाडल्या जातात..। **मेळ** :- मेळावा, मिलाप, । **वादुन घेतला गोपाळाचा मेळ** :- जमा झालेले गोपाळाचा मेळावा हा नागो-या खेळ खेळण्याकरीता अर्धा अर्धा वादुन घेतला. ।
**डाव** :- नागोरी खेळातील एक डाव/बारी । **गुंफला** :- झाडाच्या फांदीत अडकला । **डोह** :- जेथे पाणी चक्राकार फिरत चक्कर काटत राहते. ती पाण्याची जागा म्हणजेच त्या पाण्यातील डोह, भवरा, भौरा । **मृत** :- मरून जाणे, मरने । **जहर** :- विष
**झोटे सोडणे** :- अतिशय दुःख झाल्याने भान न राहुन डोक्याचे बांधलेले केस सोडुन/सुटुन आक्रोश करत राहणे. । **शेष** :- नाग । **कहंर** :- कोलाहल, गोंधळ
**बंदि शाळी/गृही** :- कारागृहात, बंदिवासात, बंदिगृहात बंद करून ठेवलेल्या अवस्थेत. *जग हे मायेची बंदिशाळा ! या तिरगुणी मायेच्या शाळेत आत्मा बंदी झाला !* **झाप्या घाली** :- डोलत डोलत अंगावर झाप मारून चाल करने. । **जर्जर** :- खेळु खेळु खिळखिळा करने, नाचु नाचु नाचवत थकवने. । **चुडी दान** :- आपल्या पतीला मृत्यपासुन वाचवण्यासाठी पत्नीने मागीतलेले पतीदान, सौभाग्याचे लेण असलेल्या हातातील बांगडया फोडण्यापासुन वाचवण्यासाठी मागीतलेले चुडीदान म्हणजेच पती दान । **खिण** :- क्षण



॥ खंड ०६ ॥
**॥ ओवी नं. ०६ ॥**
ओवी महात्म :- लग्नप्रसंगाच्या भजनात हमखास म्हणण्यात येणारी...
॥ जुनी मुळ ओवी ॥

## ॥ कंसाचा चुडा ॥

॥ देवकी वसुदेव कंसाच्या । बंदी गृहातं ।
एक एक करता पुत्र । मारले सात ॥धृ॥०१॥
॥ श्रावण मासी अष्टमीला । आला आठवा पुत्रं ।
आठवा पुत्र प्रकट झाला । श्री कृष्ण अवतारं ॥
॥ कृष्ण आला आनंद झाला । वसुदेव कुळी ।
वसुदेव कुळी आनंद झाला । या गोकुळी ॥
॥ गोकुळा मध्ये कृष्ण नांदतो । बहु आनंदानं ।
मातेच्या उसन्या साठी देवानं । घेतलं लहानपणं ॥०४॥
॥ मातेच्या उसन्या साठी देव । झाले हो वैराळं ।
कंसाच्या नगरात देवरायानं । मांडली शाळं ॥
॥ घ्याहो घ्या, या बायांनो । चुडा जडीताचा लालं ।
चुडा जडीताचा लाल । त्याला, सुवर्णाचा साजं ॥
॥ रूप उजळा, या बायांनो । निवडा सोन्याचा साजं ।
उघडले पेटारे झळकले । सुर्याचे तेजं ॥
॥ उघडला पेटारा उजाला । आकाशी पडला ।
उजाला आकाशी पडला । चंद्र, सुर्य झाकला ॥०८॥

॥ मिळुन नगरच्या नारी करती । चुडयाचे मोलं ।
एका एका चुडयाचं मोलं । सांगा तुम्ही वैराळं ॥
॥ चुडयांचे लिखा आहे । सव्वा, लाख सोनटक्का ।
सव्वालाख सोनटक्का गणीता । नाही मोलाला ॥
॥ झाप झाप पेटारा तुझा । चुडा महागाचा फारं ।
आम्ही सासरच्या नारी । आमचा, दुबळा संसारं ।
तुझा चुडा घेईन । कमळजा, कंसाची नारं ॥
॥ कमळजा बाईच्या महालात खबर । कळली राणीला ।
कोण्या मुलखाचा वैराळ आला । आपल्या नगरीला ॥१२॥
॥ जा हो जा, सहेलीयांनो जा । घेवुन या वैराळाला ।
घेवुन या वैराळाला । चुडा, भरन आपल्या हाताला ॥
॥ मिळुन नगरच्या नारी आल्या । वैराळया जवळं ।
चला हो चला, वैराळयां तुमचा । राणीनं केला हेतं ॥
॥ पुढे सहेल्यां मागं वैराळी । राज वाडयात आला ।
कमळजा राणीनं बसायला पाट । याहीला दिलां ॥
॥ कोण गाव ? कोण शिव ? कुठले तुम्ही रहीवाशी ? ।
तुम्हा सारखा भाचा माझा । नांदतो गोकुळाशी ॥१६॥
॥ धन्य तुमचे माता पिता । सोन्याचं पान अंगणी ।
पान अंगणी कुरळे केस, घालते वेणी ॥
॥ कोण गाव ? कोण शिव ? तुम्ही कोण्या देशाचे ? ।
आम्हा जात नाही कुळ । फिरस्ती, आहो जगाचे ॥
॥ आम्हा गाव नाही शिव नाही । मुलुख परदेशी ।
चुडा विकण्या साठी माउली । हिंडतो दहाही दिशी ॥
॥ कमळजा राणीनं वैराळा हाती । दिला आपला हातं ।
सैल-सैल निवडुन याहीनं । कशी केली गतं ॥२०॥
॥ चुडा दाटला मनगटी । कळ, सोसेना जरा भरी ।
कळा लागल्या वैराळया । माझ्या, सर्व्या आंगी ॥
॥ आणा विळा, आणा खिळा । आणा हो सुरी ।
सुवर्णाचं खडंग माझे । राहीले हो घरी ॥
॥ जाय कमळजा आणाव माय । विळा सुरी ।
आणाव माय विळासुरी खंडंग । यातलं काहीतरी ॥
॥ कमळजा राणी उठुन शोधत । शोधत पाहते महालातं ।
विळा सुरी काहीनाही दिसतं । माझ्या महालातं ॥२४॥
॥ तेथुन कमळजा राणी पतीच्या । महाली गेली ।
उश्या खालचे खंडंग पतीचे । घेवुनी आली ॥
॥ घ्याहो वैराळया खंडंग घेवुन । कर माझा चुडा सैलं ।
कर चुडासैलं आता माझा । पती जागा होईलं ॥
॥ जा-जा मामीजी, खबर सांग । माझ्या मामाजीला ।
उश्या खालचा खंडंग तुमच्या । भाच्यानं नेलां ॥
॥ गुंडाळुन पेटारे कृष्ण राया । वाट मार्गि लागला ।
कृष्ण वाटमार्गि लागताचं । विचार, पडला मामीला ॥२८॥
॥ तेथुन कमळजा नार पतीच्या । महाली गेली ।
उठा-उठा स्वामी ! तुम्हास कशी, काळ झोप लागली ? ॥
॥ तुमच्या आमच्या बेसनी मजला । स्वप्न भारी पडलें ।
उश्या खालचे खडंग तुमच्या । भाच्यानं नेले ॥

॥ कंस उठला दचकुन महाला । माडीवर गेलां ।
चारही रस्ते पाहुन चोर । वाटेवर पाहीला ।
चोर वाटेवर पाहीला । डावं, कैसा चोरानं साधला ? ॥
॥ कंस उठला चालुन गेला । आपल्या नगरातं ।
एकच आरोळी देल्ली । जमा, केली रहीत ॥३२॥
॥ जमा केली तिनशे साठ । छप्पन कोटी मंडळी ।
मंडळी घेवुन उभा राहीला । युध्द करण्याशी ॥
॥ झाले युध्द दोघा दोघाचे । मामा-भाच्याचं भांडण ।
मामा-भाच्याचं भांडन । धरणी, वाजे दणादण ॥
॥ टाकुन कंसावर घाव त्याचे । केले दोन खांड ।
केले दोन खांड । कमळजा, हर्ली शुध्द/झाली बेशुध्द ॥
॥ कंस मामाचे शिर उडवाया । नाही लागला खिनं ।
शिर गुंडाळुन देवकीच्या पुढयांत । गेले घेवुन ॥३६॥
॥ देवकी आली कृष्ण ओवाळा । बहु आनंदात ।
बहु आनंदातं कृष्णांन । शिर, टाकलं आरतीत ॥
॥ शिर बंधुच पाहुन । आरतीचे, पडले ताटं ।
पडले ताट माझी मोडली । माहेरची वाटं ॥
॥ एकुलता एक बंधु माझा । तोही मारलां ।
तोही मारला कनवा कसा, नाही आला तुला ? ॥
॥ कृष्ण म्हणे देवकी मातेशी । का घेते लोळणं ? ।
सात बाळ तुझे मारले । कनवा नाही, आला कंसास ॥४०॥
॥ सात बाळ तुझे मारले । कनवा नाही, आला त्याला ।
एक बंधु तुझा मारला । कशी कनवा आली तुला ? ॥
॥ कोण मारले कोण तारले ? सांगाव मजला ।
रणांगणात विर पडला । दोष नाही कोणाला ॥
॥ तेथुन कृष्ण पलटुन गेले । मावशीच्या गावाला ।
कृष्णा-कृष्णा म्हणुन मावशीने । कडेवर घेतला ।
कडेवर घेतला डाव्या चरणी । गुप्त झाला ॥४३॥

**भजनेः- ॥ कृष्णा निघ निघ बाहेर । वाट पाहतो आम्ही अन्जान लेकरं ॥**

**-: शब्दार्थ :-**

**बंदिगृह** :- कारागृह । **शाळ** :- अंगावरची शाल जमीनीवर टाकुन त्यावर पेटारी ठेवुन त्या पेटारीतील काही वस्तु त्या शाली वर विक्री करीता ठेवुन दुकान मांडणे. ।
**चुडा** :- स्त्रीयांच्या हातातील बांगडयाचा संच । **मोल** :- भाव, किंमत विचारणे, ठरवणे, मागणे । **सोनटक्का** :- सोन्याचे नाणे । **झाप** :- झाकुन ठेव । **सहेली** :- सखी, मैत्रिण । **हेत** :- चुडा विकत घेण्याचा विचार, हेतु व्यक्त करने
**सोन्याच पान अंगनी** :- भाग्यवान माताःपिता च्या घरी सोन्या प्रमाणे आंगी चकाकी असलेला पुत्र त्यांच्या आंगणात खेळत आहे. त्यांच्या घरी जन्मला आहे. । **जात नाही कुळ** :- अजात । **फिरस्ती जगाचे** :- जगात घुमा-या प्रमाणे फिरणारे । **गाव नाही शिव नाही मुलुख परलोकी** :- या लोकच्या पलीकडे असलेल्या अकाशमात च्या निराकार निर्गुण जगताचे, जसे आकाशाला शिव/येश/सिमा नाही तेथे गाव नाही आणी शिव/येश ही नाही त्या निराकार निर्गुणपुरीचे । **सैल** :- ढिला, मोकळा ।
**गत** :- दुःखत स्थिती । **कळ** :- दुःखाची कळ, वेदना । **वाट मार्गि** :- आपल्या रस्त्याने मार्गक्रमण करत चालणे । **रहीत** :- राहणारे सर्व । **खांड** :- तुकडे, भाग । **शिर** :- मस्तक । **खिण** :- क्षण । **पुढयात** :- व्दारा समोर हजर होवुन ताटात दान टाकणे । **कनवा** :- कारूणा, दया ।

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०६ ॥

॥ ओवी नं. ०७ ॥

ओवी महात्मः- लग्न प्रसंगाच्या भजनात हमखास म्हणण्यात येणारी

॥ निरसनसह मुळज़ुनी ओवी ॥

## ॥ रूक्मीणी स्वयंवर ॥

॥ हरी वाचुनी बोले रूक्मीणी । मुकलीसे राया ।
हा मजवरत शत्रु आला । बंधु रूक्माया ॥ घृ ॥
॥ भिम्मकाच्या घरी बाई । रूक्मिणी उपवर ।
चिंता वर्णु बाळ, पिता म्हणे । पहाना वर ॥
॥ गोकुळ नगरी देवं जन्मले । ते सारंगधर ।
देवु देवु म्हणुनं केला । होता विचार ॥
॥ बोले रूक्माया, हे गत कैशी ? गवळयाचं पोरं ।
धुरी सारखी धुर पाहली । शिशुपाळ सुंदर ॥०४॥

॥ लिहुन पत्रिका तुम्ही पाठवा । पाठवां हो राया ।
हा मजवरती शत्रु आला । बंधु रूक्माया ॥
॥ पाहुन पत्रीका शेषं रूपाच । उल्हासलं मनं ।
नौबदलेला हुकुम दिला । गाव दिलं निशाणं ॥
॥ हत्या वर अंबारी वारू । सकळ एक साधन ।
भर बाणाचे हुट याहीच्या । संग तोफखाणं ॥
॥ कौडंण्यापुर रस्त्यांन शेषं, रूपाच चालनं ।
दोन्ही हाती हत्यार शिपाई । दावते खुणं ॥०८॥

॥ कौडंण्यापुर रस्त्यानं जैसं, मुंग्याचे सैन्य ।
चिंता वर्णु बाळ रूक्मिणी । झाली दिलगीर ॥
॥ महाला वरत उभी रूक्मिणी । न्याहरते दळ ।
छप्पन कोटी राजे येवुन । उतरले चौफेर ॥
॥ भाव तुझा भाव माझा । पाषाणाच्या लाहया ।
पाषाणाच्या लाहया । लवकर, याहो कृष्णराया ॥
॥ व्दारकेचे श्री कृष्णाजी । आले वनमाळी ।
आले वनमाळी । उतरले, अंबीकेच्या देवळी ॥१२॥

॥ अंबीकेच्या पुंजना गेली । बाई रूक्मिणी ।
नयनी देखली मुर्ती सुंदर । रूप सावळी ॥
॥ गळा हार घालुनी हरीच्या । चरणावर लोळे ।
सेना झाली आरोळी नेली । भिम्मकाची बाई ॥
॥ तेथुन देव निघुन गेले । सरहद्दीच्या बाहेर ।
दोन दुत देवानं पाठवले । भिम्मक या लवकर ॥
॥ धुम्म धुम्म कार झाला । अस कळलं भिक्याशी ।
भिक्या दादा रे, निघुन गेला । पोहचला व्दाराशी ॥१६॥

॥ बोले रूक्माया बंधु । खैत्री, आला गर्वाशी ।
काय जाणता सहाही शास्त्र ? बोले भगवंताशी ॥
॥ भिक्या भिक्या हाका मारताशी । भिक्या बांधला खांबाशी ।
भिक्या बांधला खांबाशी । त्याची, घेतली दाढी-मिशी ॥

किंवा
भजनात जर लष्टान आले असेल तर म्हणण्यात येणारे भजने :-
॥ भिक्या-भिक्या म्हणुन हाका मारताशी ।
भिक्या बांधला कृष्ण देवानं खांबाशी ॥
॥ भिक्या बांधला खांबाशी । त्याची घेतली कृष्णानं दाढी-मिशी ॥
॥ मुजोरी केली हो भिक्यानं । त्याची फजीती केली कृष्ण रायानं ॥
॥ आमचा देव लाल लाल । व्दैत-दुर्जनाची तो काढतो साल ॥
॥ हे होय देवाचे लाल । आपल्या मुखानं चांगला बोल ॥

॥ पदर पसरूनी बोले रूक्मिणी । बंधु माझा सोडा, ऋषिकेशी ।
सोडा हो ऋषिकेशी । शिक्षा, लागली त्याशी ॥
॥ भिम्मक राजा संग फौजा । घेवुन आला परीवार ।
धुम-धडाक्यात भगवंताचे । झाले स्वयंवर ॥२०॥

भजने :-
॥ रूक्मिणी स्वयंवर ऐकता । विघ्न, हर्तीन थोर थोर ।
रूक्मिणी स्वयंवर गाता । होईन, पुण्यांची श्यामगीर ॥
॥ रूक्मिणी आल्या सत्वधीर । नवा खेळ कर उभा ।
कृष्ण महाराजा । सेरूप दाखवा, अवघ्या जगा ॥

-: शब्दार्थ :--

मुखलेशी/मुकलेशी = एखादी गोष्ट मिळण्या पासुन वंचीत होने/मुकने, मुख पाहण्यापासुन वंचित होणे । गत = दुःखद स्थिती. । वारू = घोडा. ।
मोबदला = --च्या बदली भेट. । भिक्या = रूक्मिणीचा बंधु असलेला रूक्माया ला दिलेले संबोधन. । सोडा = मोकळे करा ।

## ॥ निरसनसह रूक्मिणी स्वयंवर ॥

-: निरसन :-

॥ भिम्मकाच्या घरी बाई । रूक्मिणी उपवर ।
चिंता वर्णु बाळ, पिता म्हणे । पहाना वर ॥
॥ गोकुळ नगरी देवं जन्मले । ते सारंगधर ।
देवु देवु म्हणुनं केला । होता विचार ॥

विदर्भात भिम्मक/भिष्मक नामाचा एक प्रसिध्द प्रतापी राजा राज्य करत होता. जो कौडण्यापुरचा स्वामी श्रीसपंन्न व सपुर्ण धर्मवेत्तामध्ये सर्वश्रेष्ठ होता. लक्ष्मी देवी चा अंश असलेली रूक्मिणी त्याची पुत्री होती. तर रूक्मी नावाचा त्याचा एक पुत्र होता. रूक्मिणी उपवर झाल्यानंतर तीच्या लग्नांची चिंता पित्याला पडली. गोकुळ नगरी चे देव सारंगधर कृष्णा याला रूक्मिणी देवु करण्याचा त्यांनी मनीच विचार केला होता. कृष्णाचा होता पुर्विचा भाग । म्हणुन त्याला होणार होता या रूक्मिणीचा लाभ । या पुर्विस्ताच्या संचिताने कृष्ण व रूक्मिणीने एकमेकांशी विवाह करण्याचा मनीच संकल्प केला होता. भिम्मक राजानेही रूक्मिणीला कृष्णाच्याच हाती देण्याचा विचार केला होता. तो विचार जेव्हा त्या पित्याने आपल्या पुत्र रूक्मिला सांगीतला. तेव्हा रूक्मि बोले :

॥ बोले रूक्माया हे गत कैशी ? गवळयाचं पोरं ।
धुरी सारखी धुर पाहली । शिशुपाळ सुंदर ॥०४॥

तेव्हा रूक्मिणीचा बंधु युवराज रूक्मि ने प्रयत्नपुर्वक आपल्या पित्याला मनवत, म्हणाला की : एका गवळाच्या पोराला रूक्मिणी देवुन, आपल्या राजकन्या रूक्मिणीची निच गत करता कैशी ? राजकन्येला कोण्या गवळयाच्या पोराला देवुन तिचे आयुष्य दुःखत स्थितीत न टाकता, राजकन्येला बरोबरीच्या राजाच्या घरीच दयावे. त्या करीता मी रूक्मिणी साठी योग्य वर पाहुन निवडला आहे. राजबिंड सुदर महाविर शिशुपाल ला रूक्मिणी दयावी. तिथे मग पिता-पुत्र व्दारे श्रीकृष्णाचा शत्रु असलेला महाविर शिशुपाल ला रूक्मिणी देण्याचा निर्णय घेतल्या गेला.

॥ लिहुन पत्रिका तुम्ही पाठवा । पाठवां हो राया ।
हा मजवरती शत्रु आला । बंधु रुक्माया ॥

आपल्या पिता-बंधु च्या निर्णयामुळे रुक्मिणी ला मनी दुःख झालेत. तिच्या चित्तात खेद उत्पन्न झाला. कृष्ण हरी वाचुन ही काया वंचित होईन. आपला जन्म घेण्याचे सार्थक होणार नाही... असे चिंतन करत करत तिचे चित्त चलबिचल होवुन ती कासाविस झाली होती. तिने कोण्या एका आपला ईमानी द्युताच्या बोलावुन त्याच्या हाताने कृष्णाला पाठवण्यासाठी संदेश पत्रिका लिहीली. आणी ती संदेश पत्रीका त्या ईमानी द्युताच्या हाती देवुन, त्यावर सर्व घडलेली हकीकत व होणारे होईक ईत्यादी लीहलेत. हा मजवर शत्रु झाला माझाच बंधु रुक्माया,...असे अधोरेखीत करून त्या ईमानी द्युताला श्रीकृष्णाकडे पाठवले. द्युत कृष्णासमोर हजर झाला. आणी त्या द्युताने ती पत्रिका कृष्णास वाचुन दाखवली. ही संदेश पत्रिका कृष्णा च्या हाती त्या द्युताने दिलीः....

## -: संदेश पत्रिका :-

।। श्री कृष्णा अवधुता । अनामत राया तुमच्या चरणावर माझा माथा ।।
कृष्ण राया । रुक्मिणीचा कोटी कोटी प्रणाम तुमच्या चरणा ।

भक्तराज नारद व्दारे मजला ज्ञान झाले आहे की :
।। तुम्हीच माझे पुंर्विस्ताचे संगती । आहो मी तुमची पुर्विची अर्धांगीनी ।।
।। तु या देहरूपी पृथ्वीचा पती । म्हणुन हाती धरली तुया नामाची काठी ।।
।। तुच या पृथ्वीचा पती । हे सर्व आहे तुमच्या अध्यानी ।।
।। ही पृथ्वी तुमच्या अध्यान । याहो कृष्ण महाराजा करा यवगाचे काम ।।
।। तुमचं आमचं देवा होतं । पुर्विचं नातं ।
हा बंधु आला शत्रु मजवरी । तोडाया तुमची संगतं ।।
।। कोरी भुम्मा कोरा देह । कोरा कागद ।
जो कोणी नाश करन, त्याच्या कुडीला लागनं पाप दोष ।।

जर चेदिराज शिशुपाल ने माझा हात पकडला, तर समजाव की :
या कृष्णरुपी सिंहांचा भाग कृष्णसिंह च्या डोळयादेखत कुत्राने उचलुन नेला.
।। आहो मी सिंहीन तुमची । काडी कचरा ची संगत न करे कदापि ।।
।। माझ मजला लेणं/देणं दयाहो देवा । म्हणुन आले मी तुमच्या शरणा ।।
।। माझ मजला देणं/लेणं दयाहो कृष्ण देवा । तुमच्या चरणाचा करतो धावा.।।
।। आरोळी देती गुहांतुन । पोट लाळ बसली कंबर । बांध कंबर निघ बाहेर ।।
।। शुर विरा बांध कंबर । निघ बाहेर । तुला पाहयता धरणी कापे थरथर ।।
।। कृष्ण देवा । चैन पडेना जीवा । लवकर याहो.. ।।

इथे कुलदैवत चे पुंजन करण्याची अशी प्रथा आहे की : विवाह च्या एक दिवस पुर्वि उपवधु राजकुमारी विदर्भातील कौडण्यपुर च्या येशीवर असलेल्या कुलदैवत अंबादेवी च्या मंदिरात पुजनासाठी जात असते. कौडण्यापुर ते मंदिर ही यात्रा मोठ्या धुम-धडाक्याने केली जाते. अतः जिथे कुलदैवत चे मंदिर आहे. तिथे मी दर्शना येईनच. तिथेच मजला माझं लेणं/देणं दयाहो देवा । हीच तुमच्या चरणी अर्ज..

ही पत्रिका वाचुन :
॥ कृष्ण खेत्री बाहेर निघाला । रमणा यवगाचा हाती घेतला ॥
॥ द्युतास रथात बसवले । रथावर आरूढ होवुन देव निघाले ॥

॥ पाहुन पत्रीका शेषं रुपाच । उल्हासलं मनं ।
नौबदलेला हुकुम दिला । गाव दिलं निशाणं ॥
॥ हत्या वर अंबारी वारु । सकळ एक साधन ।
भर बाणाचे हुट याहीच्या । संग तोफखाणं ॥

॥ कौडंण्यापुर रस्त्यांन शेषं, रूपाच चालनं ।
दोन्ही हाती हत्यार शिपाई । दावते खुणं ॥०८॥

कृष्णा हाती पत्रिका घेवुन एकटाच गेला आहे. हे पाहुन शेषअवतार बळीरामास संदेह आला की : कृष्णा एकटाच समस्त राजमंडल च्या मध्ये राजकन्याचे हरण करण्यासाठी निघाला असल्यामुळे तेथे युध्द होवु शकते. या आशंकाने शेषरूपी बळीरामाला ग्रासले. आणी त्या शेषराया ने कृष्णाला छत्रछाया देण्यासाठी युध्द करण्याच्या उल्हासल्या मनाने आपल्या नौबतीला हुकम दिला. भरा बाणानें बाणाचे हुट !. बांधा हुट पाठीवर ! संग घ्या बाण ! असे हुकुम देत ज्या गावाला युध्दाकरीता जायचे आहे, त्या कौडण्यापुर गावाचे निशाण असलेल्या खुणा सैन्यास दिल्या. आपल्या यादव शेष सैन्याला त्या गावाता युध्द करण्यास जाण्याकरिता तत्परतेने तयार केले.

हत्यावर अंबारी बांधुन युध्दाकरीता हत्तीसेना घेतली. युध्दात तरबेज असलेल्या वारू/घोडे हे साधन असलेली घोडसेना संग तोफखाण सुध्दा युध्दाकरीता घेतलेत. शेषराज बळीराम ने दोन्ही हाती कटयार घेवुन शिपायांना खुण दाखवत चालनं करण्याचा आदेश दिला. शेषाची ही यादव सेना कृष्णाचा माग घेत त्याच्या मागोमाग कौडण्यापुर रस्त्याने निघाली.

॥ कौडंण्यापुर रस्त्यानं जैसं, मुंग्याचे सैन्य ।
चिंता वर्णु बाळ रूक्मिणी । झाली दिलगीर ॥
॥ महाला वरत उभी रूक्मिणी । न्याहरते दळ ।
छान्नव कुळीचे राजे येवुन । उतरले चौफेर ॥
॥ भाव तुझा भाव माझा । पाषाणाच्या लाहया ।
पाषाणाच्या लाहया । लवकर, याहो कृष्णराया ॥
॥ व्दारकेचे श्री कृष्णाजी । आले वनमाळी ।
आले वनमाळी । उतरले, अंबीकेच्या देवळी ॥१२॥

ईकडे कौडण्यापुर नगरी कडे येणा-या सर्व रस्त्याने लग्नप्रसंगा करीता आलेल्या छान्नव कुळींचे राजे यांचें मुंग्याप्रमाणे सैन्य चौफेर उतरले होते.
प्रातःकाळी महावर उभी राहुन जेव्हा रूक्मिणीने हे दळ न्याहारले, तेव्हा ती पुन्हा आशंक होवुन कृष्णा येईल की येणार नाही ? ही माझी काया कृष्णावाचुन वंचित राहील का ? कृष्णावाचुन ही काया मुकन का ? ...ईत्यादी शंकाकुशंकाने चिंताग्रस्त झाली. ईथे सर्व छान्नव कुळीचे खेत्री राजे हे सर्वत्र पाषाणाप्रमाणे दिसु लागले आहेत. या पाषाणाच्या आता तडतड फुटन हो लाहया ! लवकर याहो कृष्ण राया ! असे मनन करत कृष्णाच्या चरणविन्दाचे चिंतन करू लागली. महालाच्या सर्वात उंच शिखरावर उभी राहुन कृष्णाची वाट पाहु लागली. वाट पाहता पाहता तिचे डावे अंग फडफडले.

अठरा खुम्मी चे ज्ञान असलेली रूक्मिणीने कालज्ञानाच्या आधारावर हे जाणले की : आपल्या शंकाकुशंकाचे समाधान पुर्वक उत्तर मिळाले. कृष्ण येवुन पोहचला असेच ही खुण सांगत असल्यामुळे तिच्या डाव्या अंगस्फुरणानें ती प्रसन्न झाली. प्रसन्न अवस्थेत आपल्या ईमानी द्युतची वाट पाहु लागली. त्याच वेळी श्रीकृष्णा संग आलेला रूक्मिणीचा ईमानी द्युत तेथे तत्काळ हजर झाला.

या ईमानी द्युताने रूक्मिणीला सांगी केली की : प्रातःकाळी कुण्डिनपुर च्या वनात असलेल्या अंबिकेच्या देवळाकाठी वनमाळी कृष्णासह आम्ही उतरलो. तिथे एका चिंचेच्या झाडाखाली घोडयाची झुलाची बिछायत करून, त्यावर कृष्णा तुझी वाट पाहत बसलेले आहे. आतापर्यत तु कृष्णाची वाट पाहत होती. आता तुझे उसने फेडण्याकरीता कृष्णा तुझी वाट पाहत आहे..

अश्या रितीने द्युताने रूक्मिणीला एकांतात श्रीकृष्ण आगमन संबधी सर्व वृत्तांत सांगीतला. द्युता मुखचा हा वृत्तांत ऐकुन रूक्मिणीला हर्ष झाला. हर्षउल्हासात रूक्मिणीने त्या ईमानी द्युतांचे चरणाला प्रणाम करून, त्या द्युताला वचन दिले की : ॥ द्युतांच्या वंशापासुन मी जाणार नाही कधीही दुर । द्युतांचे घर हेच माझे माहेर. ॥ हे माझे प्रतिज्ञापुर्वक वचन यवगान यवगी असेच राहणार ! हे तुम्ही निश्चित जाणा.

रुक्मिणीने हर्षउल्हासात अंबिकेच्या पुजंनासाठी जाण्याची संपुर्ण तयारी केली. कुलदैवतेच्या मंदिरात जाण्यासाठी रुक्मिणी आपल्या सखीयॉ ला संग घेवुन अन्तःपुरातुन लगबग बाहेर निघाली. रुक्मिणी बाहेर निघताच द्युतांनी भेरी, ढोलक, मृदंग, दुदंभी, ईत्यादी चा वाद्यनाद केला. वा्द्य नाम गजरात आपल्या ईमानी द्युतांसह रुक्मिणीचा रमणा हा आपल्या रक्षक-सेना सह अंबिकेच्या पुजनां करीता निघाला. रुक्मिणीचा तो रमणा वाटचाल करत अंबिकेच्या मंदिरी पोहचला.

॥ अंबीकेच्या पुंजना गेली । बाई रुक्मिणी ।
नयनी देखली मुर्ती सुंदरसे । रुप सावळी ॥
॥ गळा हार घालुनी हरीच्या । चरणावर लोळे ।
सेना झाली आरोळी नेली । भिम्मकाची बाई ॥
॥ तेथुन देव निघुन गेले । सरहद्दीच्या बाहेर ।
दोन द्युत देवानं पाठवले । भिम्मक या लवकर ॥

अंबिकेच्या पुजनाकरीता रुक्मिणीने आपले हात पाय धुवुन मंदिराच्या पाय-या मौनभावाने चढली. अंबिकेच्या समोर शुध्द मनभाव ने दोन्ही हात जोडुन उभी राहली. आणी अंबिकेचे पुंजन करुन तिला प्रार्थना केली की : श्री कृष्णच माझे यवगान यवगीचे पती होवो. हेच देणं दे माय आता ! असे देणं अंबिकेला मागीतले. अंबिकेचे पुंजन रुक्मिणी कडुन झाल्यानंतर तिथे द्युतांनी आरती टाळ ढोलक वाद्यांसह म्हटली. अंबिकेच्या आरती नंतर द्युतांनी आरतीवरील भजने म्हणत म्हणत रुक्मिणी चा रमणा जेव्हा व्दारावर आला, तेव्हा द्युतांव्दारे भजने म्हटल्या गेले की :

॥ करा या आरतीचा मान । कृष्ण अवतारा, लवकर येणं ॥
॥ नेवु केले । गोपाळ, कृष्णा अक्षर पाहयं ॥ नेवु केले...
॥ रुक्मिणी आल्या सत्वधिरा । खेळ कर गा उभा ।
कृष्ण महाराजा । रुप दावा अवघ्या जगा ॥
॥ कृष्णा निघ निघ बाहेर । रुक्मिणी माय आमची उभी सत्वधिर ॥
॥ कृष्णा याहो जगजीवना । तुम्हा विनवितो महाराजा मनमोहना ॥

हे द्युतांचे भजन कृष्णाच्या कानी जाताच, त्या चतुर कृष्णाने जे काही जाणायचे ते जाणले. आणी आपला रथ सुसाट वेगाने हाकत रक्षक सेना मध्ये दरार पाडत तो कृष्णा मंदिराच्या व्दाराशी पोहचवला. बाहय व्दारावर येवुन उभी असलेल्या रुक्मिणी ने व्दारासमोर आलेल्या रथात असलेली रुप सावळा सुंदर कृष्ण मुर्ति आपल्या नयनी देखली. रथात उभ्या असलेल्या कृष्णा ने खुणावताच, ती रुक्मिणी कृष्णनाथ च्या रथावर चढली. कृष्णाच्या गळा हार घालुन कृष्ण हरीच्या चरणावर लोळली. तेव्हा चातुराई करत रुक्मिणीला उभे करुन, कृष्णाने तिच्या हाती आपल्या रथाचा लगाम दिला. आणी सर्व विद्येत पटाईत असलेल्या रुक्मिणीने तो रथ सुसाट वेगाने हाकत तो रथ सरहद्दी च्या वाटेने पळविला.

हे दृष्य बघुन सेना बुचकळयात पडली. हे काय घडुन राहीले ? याचे विचार करत काही क्षण स्तंभित झाली. काही क्षणानंतर सेना जेव्हा स्तंभित अवस्थेतुन बाहेर आली, तेव्हा सेनेत गोंधळ उठला. गोंधळा अंती रक्षक सेनेच्या च्या लक्ष्यात आले की : रुक्मिणीचे अपहरण झाले. सेनात आरोळी झाली. ''नेली भिम्मकाची बाई रुक्मिणी कृष्ण राजाने !'' धावा-धावा कृष्णाच्या मागे !

सेनाच्या या आरोळया होईपर्यंत भिम्मक राजाच्या सरहद्दी बाहेर तो रथ येवुन पोहचला होता. येशिवर उभ्या असलेल्या यादव सेनामध्ये रथ उभा झाला होता. येशीवर उभा असलेल्या कृष्णदेवाने आपले दोन ईमानी द्युत भिम्मका कडे लग्नप्रसंग निमित्याकारण व्दारकेला लवकर येण्याचे निमंत्रन देण्यासाठी पाठवले. आणी त्या येशीहुन सिंह जसा आपला भाग घेवुन सियांरें यांच्या मधुन धिराईने चालत जातो, त्याप्रमाणे तो कृष्णसिंह रुक्मिणीला घेवुन धिराईने रथ हाकत, शेषराज बलराम च्या शेष सेनाला घेवुन व्दारकेच्या रस्त्याने निघाला.

॥ धुम्म धुम्म कार झाला । अस कळलं भिक्याशी ।
भिक्या दादा रे, निघुन गेला । पोहचला व्दाराशी ॥

ईकडे तोपर्यत रक्षक सेनाने भिम्मकाचा पुत्र भिक्या उर्फ रुक्मि ला संदेश पोहचवला की : रक्षकसेना ला दरार पाडुन रक्षकसेना मध्ये गोंधळा चा धुम्मधुम्मकार उठवुन श्री कृष्णा चा रथ अंबिकेच्या व्दारावर उभा झाला. व्दारावर उभा राहुन कृष्णाने रुक्मिणीचे हरण केले. हा संदेश कळताच भिक्या स्वयंवरासाठी जमा झालेल्या आपल्या मित्रांच्या व्दाराशी उभा झाला. स्वयंवराले आलेले आपले मित्र राजे व त्यांची मित्रसेना सह शिशुपाल यांना भडकवले. भडकलेले मित्र राजे व त्यांची मित्रसेना सह शिशुपाल तसाच व्दारकेच्या मार्गावर मार्गक्रमण करत सर्वप्रथम शेष सेना समोर येवुन थबकली. मित्रसेना व यादवाची शेष सेना एकमेकांसमोर उभ्या झाल्या. तेव्हा मग तेथे बलरामची शेषसेना व रुक्मि ची मित्रसेना यांच्यात घनघोर लढाई झाली. रुक्मिची मित्र सेना परास्त होवुन तेथुन पळाली.

आपली मित्रसेना यादवाची शेषसेना व्दारे परास्त होवुन पळाली. हे वृत्त रुक्मि ला कळल्यानंतर, तो रुक्मि नव्या ताकदीने संपुर्ण शक्ति ने युक्त होवुन आपली सेना घेतली. आणी व्दारका मार्गावर धीराईने चाललेल्या शेषसेनचा पिच्छा करत तो शेषसेनेच्या आडवा आला. तेथे पुनःश्च रुक्मि सेना व यादवाची शेष सेना यांच्यात घनघोर युध्द सुरु झाले. बलराम आपले हल चालवत सारी रुक्मि सेना चा पाडाव करु लागला. तर कृष्ण हा रुक्मि च्या एक एक अस्त्रांचा पाडाव करत, त्या कृष्णाने जसे ज्ञानाव्दारे त्रिगुणात्मक संसारी बधंन टाकणारी माया काटल्या जाते, तसे एक बाण मारुन रुक्मि च्या धनुष्याची प्रत्यंच्या/दोरी तोडुन टाकली.

तेव्हा रुक्मिने हाताने कृष्णावर आपली चमचमी महाशक्ती चा प्रयोग केला. कृष्णाने त्या महाशक्तीवर प्रतिप्रहार केला. कृष्णाच्या प्रतिप्रहाराने त्या महाशक्ती चे दोन तुकडे होवुन ती महाशक्तीला खंडीत झाली. ती दोन भागात खंडीत झालेली महाशक्ती जेथुन आली तेथेच कृष्णाने वळती करुन परत पाठवली. ती दोन भागात खंडीत झालेली महाशक्ती रुक्मीच्या रथाकडे चाल करण्याकरीता परत निघाली. रुक्मी ने पाहीले की : आपलीच महाशक्ती आपण जेथुन सोडली, तेथेच चाल करत येत आहे. आपलाच वार आपल्यावर पलटला आहे. हे पाहुन रुक्मिने स्वरक्षणार्थ रथाखाली उडी घेतली. तेव्हा त्या खंडीत महाशक्तीच्या एका भागाने रुक्मिच्या रथाचा सारथी चा बळी घेतला. आणी दुस-या खंडीत भागाने रुक्मिचा रथच संपुर्णपणे चकनाचुर केला.

॥ बोले रुक्माया बंधु । खेत्री, आला गर्वाशी ।
काय जाणता सहाही शास्त्र ? बोले भगवंताशी ॥

आपली शक्ती आपल्यावर परत आलेली पाहुन, आपल्याच शक्तीने आपल्याच सारथी चा बळी घेतला. आपला रथ चकनाचुर केलेला आहे. हे सर्व बघुन तो रुक्मि चिडुन जावुन कृष्णाला भलेबुरे शिव्या देवु लागला. जेव्हा रुक्मि चिडुन भलेबुरे शिव्या देत हाती तलवार घेवुन कृष्णावर चाल करुन गेला, तेव्हा कृष्णाने आपल्या अस्त्राचा प्रहार करुन त्याची ढाल तलवार काटुन टाकली. तेव्हा मग रुक्मि च्या हातात तलवारीची मुठ च राहीली. याही दशेत मुजोर रुक्मि मुजोरी करत, कृष्णाला भलेबुरे म्हणत, तु काय जाणतो सहाही शास्त्र ? हा कृष्णा खेत्री आला गर्वाशी... असे कृष्ण भगवंताला उद्देशुन बोलला. ऐसे बोलत तो रुक्मि चाल करुन येत आहे. हे बघुन कृष्णाने रुक्मिला आपल्या बाहुदंडाने पकडुन धरणीवर आपटले. तरीही मुजोर भिक्या ऐकत नसल्यामुळे, भिक्या आता तरी थांब ! भिक्या आतातरी युध्द थांबव ! भिक्या थांब ! असे कृष्णाने भिक्या भिक्या म्हणुन हाका मारता मारताच, त्या भिक्याला तसाच धरुन कृष्णाने त्या रथाच्या खांबाशी बांधला.

॥ भिक्या भिक्या म्हणुन हाका मारता । भिक्या बांधला खांबाशी ।
भिक्या बांधला खांबाशी । त्याची, घेतली दाढी-मिशी ॥

किंवा भजनात जर लष्टान आले असेल तर म्हणण्यात येणारे भजनेः-

॥ भिक्या-भिक्या म्हणुन हाका मारताशी ।
भिक्या बांधला कृष्ण देवानं खांबाशी ॥
॥ भिक्या बांधला खांबाशी । त्याची घेतली कृष्णानं दाढी-मिशी ॥
॥ मुजोरी केली हो भिक्यानं । त्याची फजीती केली कृष्ण रायानं ॥
॥ आमचा देव लाल लाल । व्दैत-दुर्जनाची तो काढतो साल ॥
॥ हे होय देवाचे लाल । आपल्या मुखानं चांगला बोल ॥

॥ पदर पसरुनी बोले रुक्मिणी । बंधु माझा सोडा, ऋषिकेशी ।
सोडा हो ऋषिकेशी । शिक्षा, लागली त्याशी ॥

आपला बंधु कृष्णरायानं रथाच्या खांबाशी बांधुन, कृष्णाने त्याचा वध करण्यासाठी आपल्या हाती धारदार खंडंग घेतलेला आहे. हे पाहुन रुक्मिणी भयाने व्याकुल झाली. तिचे बंधुप्रेम जागृत झाले. आणी आपल्या कृष्णाच्या चरणी तिने लोळण घेत, पदर पसरवुन कृष्णास विनवणी केली की :

॥ कृष्णराया ! सोडा सोडा हो याला ।. हा बंधु होय माझा रुक्माया ॥
॥ आहो ऋषिकेशी । शिक्षा लागली हो या बंधुरायाशी ॥
॥ कारुणेच्या सागरा, कारुणा कर । या अन्जान बंधुला माफ कर ॥

नववधुच्या विनंतीला मान देवुन कृष्णाने रुक्मिचा वध करण्याचा निर्णय सोडुन दिला. आणी जे शस्त्र वध करण्याच्या उद्देशाने उगारले होते, त्या उगारलेल्या शस्त्राचा मान राखण्याकरीता त्याच उगारलेल्या शस्त्राने त्या मुजोर भिक्याची दाढी-मिशी काढुन, त्याचे मुंडन करुन त्या मुजोर बंधुची फजीती केली.

अश्या रितीने बंधु रुक्मिला कृष्णाने फजीत केलेत. रुक्मिणीच्या विनवणीपुर्वक याचनेला मान देत रुक्मिणीच्या त्या बंधुरायाला बंधनातुन मुक्त करुन कृष्णाने त्याला जिवन-दान दिले. कृष्णाव्दारे बंधनमुक्त होवुन बंधुरायास जिवनदान प्राप्त झाल्यानंतर, शेषराज बलरामने बधुराज रुक्मायाला समजावले. रुक्मिणीला उपदेश केला की : जे घडले ते सर्व नियती चा खेळ आहे. मी आणी माझे हा भाव च जगाकरीता बंन्धनकारक होते. मी आणी माझे ची अहंता व ममता रहीत मनाचा भावच मोक्षास कारणीभुत होते. मनाचे भाव च परिस्थिती नुसार सुखःदुःख देणारे ठरतात... ईत्यादी ज्ञान सांगुन रुक्मिणीला उपदेश केला. आणी तो शेषराज बलराम हा कृष्ण-रुक्मिणी सह द्युतसेना, यादवांची शेषसेना, सुदर्शनसेना ईत्यादीला घेवुन व्दारकेकडे रवाना झाला.

॥ भिम्मक राजा संग फौजा । घेवुन आला परीवार ।
धुम्म धुम्म कार भगवंताचे । झाले स्वयंवर ॥२०॥

भजने :-

॥ रुक्मिणी स्वयंवर ऐकता । विघ्न, हर्रतीन थोर थोर ।
रुक्मिणी स्वयंवर गाता । होईन, पुण्यांची श्यामगीर ॥

यादव शेषसेना, सुदर्शन सेना सह बलराम-कृष्ण नें रुक्मिणीला संग घेवुन विजय दुन्दुभि वाजवत व्दारकेत प्रवेश घेतला. व्दारकेत भारी विजयोत्सव झाला. मार्गशिष महीन्यात वैदिक विवाह करण्याचे ठरले. प्रियंजन मित्र नातेवाईक ..इत्यादी ला लग्नपत्रिका पाठवण्यात आल्यात. भिम्मक राजाकडे ईमानी द्युत पाठवुन त्याच्या हस्ते पत्रिका देवुन मानपुर्वक बोलावण्यात आले.

भिम्मक राजा आपल्या फौजा व परिवार घेवुन लग्नसभारंभा प्रसंगी व्दारकेशी उतरला. देवराज इंद्राच्या अमरावती नगराप्रमाणे सुशोभित झालेल्या व्दारकेत, कृष्णाचे सवगंडी, द्युतगण व मित्रराजे यांच्या उपस्थितीत कौडण्यापुरच्या भिम्मक राजा-राणी हस्ते कन्यादान झाले. कृष्ण व रुक्मिणीचे हा विवाह मार्गशिष महीन्यात वैदिक विवाह पध्दतीने मोठया धुमधडाक्यात संपन्न झाला.

भिम्मक पुत्री रुक्मिणी च्या स्वयंवराची ही कथा भक्तीभावाने जो प्राणी ऐकतो, त्या प्राणाचे सर्व थोर थोर विघ्ने संकटे आरीष्टे हर्रल्या जाते. राईच्या लाहया जसे अग्नी तेजाने फुटुन कढईबाहेर तडातड बाहेर उडतात, तसे सर्व मोठे मोठे थोर थोर विघ्ने संकष्टे आरीष्टे, वाईट शक्तियॉं ..ईत्यादी या रुक्मिणी स्वयंवरा च्या तेजाने लाहयाप्रमाणे तडातड फुटुन दुर पळुन जाते. तो भक्त आरोग्य संपन्न, सुखःसंपत्तीने संपन्न होतो. हे रुक्मिणी स्वयंवर गाता ऐकता त्या भक्ताला शांती लाभुन तो हरीनामी पुण्यांचा संचय करतो. मोक्षाचा भागीदार होतो.

**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**



॥ खंड ०६ ॥
॥ ओवी नं. ०८ ॥
॥ जळगाव दांडातील जुनी मुळ ओवी ॥

## ॥ चंद्रावळी ची ओवी ॥

॥ मथुरा वृंदावन रहीवाशी । नटनटला सुत्रधारी ।
रूप राईचे धरून भोगली नार । चंद्रावळी व्दापरी ॥घृ॥०१॥
॥०१॥
॥ ब्रम्हादिकांवर संकट पडले । धावुन आला जवळी ।
व्दैत मर्दुनी गर्भ रक्षीले । मुळघरचा हा वनमाळी ॥घृ॥०२॥



॥ कृत यवगा चा । मच्छ अवतार पहीला ॥
॥ ब्रम्हदेवाचे वेद नेले । पडला तो विचारी ।
मच्छ अवतार धरून देवानं । शंखासुराला धरलं जली ॥
॥ शंखासुराला मर्दुनी वेद । घेतले आपल्या करकमळी ।
व्दैत मर्दुनी गर्भ रक्षीले । मुळघरचा हा वनमाळी ॥०४॥

॥ कृत यवगा चा । कच्छ अवतार दुसरा ॥
॥ कच्छ अवतार धरून देवानं । पाठीवर पृथ्वा घेतली ।
रसातळाला जात होती । कशी, तारली त्यावेळी ॥
॥ मधुकैट-भ्आसुराला मर्दुनी स्थापली । पृथ्वा त्यावेळी ।
व्दैत मर्दुनी गर्भ रक्षीले । मुळघरचा हा वनमाळी ॥०६॥



॥ कृत यवगा चा । वराह अवतार तिसरा ॥
॥ वराह अवतारी मुर्कासुर दैत्य । वधला त्यावेळी ।
दैत्य मर्दुनी उतरवला भार । मुळघरचा हा वनमाळी ॥०७॥



॥ कृत यवगा चा । अवतार नरसिंह चवथा ॥
॥ नरसिंह अवतारी मुळस्तंभी आला ।
दणाना झाला तिनताळी ।
व्दैत मर्दुनी बाळ रक्षीले । मुळघरचा हा वनमाळी ॥०८॥

॥ त्रैता यवगा चा । अवतार वामण पाचवा ॥
॥ वामन अवतार धरून देवानं । बळी घातला पाताळी ।
दान मागुनी गर्भ रक्षीले । मुळघरचा हा वनमाळी ॥०९॥



॥ त्रैता यवगा चा । अवतार परशुराम सहावा ॥
॥ परशुराम अवतार धरूनं दुनीया । निःशस्त्र केली सारी ।
क्षत्रीय मर्दुनी गर्भ रक्षीले । मुळघरचा हा वनमाळी ॥१०॥



॥ त्रैता यवगा चा । अवतार सातवा श्रीरामाचा ॥
॥ श्रीराम अवतारी रावण वधला । झाली लंकेची होळी ।
दैत्य मर्दुनी देव रक्षीले । मुळघरचा हा वनमाळी ॥११॥

||०२||



॥ व्दापर यवगाचा । अवतार आठवा आदीपुरूषाचा ॥
॥ कृष्ण अवतारी कंस वधला ।
आनंद झाला गोकुळी ।
व्दैत मर्दुनी धर्म रक्षीला ।
मुळघरचा हा वनमाळी ॥घृ॥



॥ गवळयांच्या गाई चारता । नित खेळे चेंडु-फळी ।
वैद-वाकडया पेंदया-सुदामा । खेळे यमुना तिरी ॥
॥ सगुण लगो-या मध्ये मांडल्या ।
सप्त धोंडयाच्या पायी ।
निर्गुण गुळणी धरून कृष्णानं ।
चेडु मारला तिताळी ॥
॥ कुठचा चेंडु कुणीकडे गेला । ब्रम्हसुत्राची कळा न्यारी ।
कैलासा वरून चेंडु उडाला । झाली कैलाशी आरोळी ॥
॥ तिरलोक्या वरून चेंडु उडाला । झाली स्वर्गि आरोळी ।
ब्रम्हा विष्णु पाहता थकले । झाली हो धुम्माळी ॥
॥ काहो विसरता ? ब्रम्हया माझ्या, गाई घेवुन गेला ।
कोणा पासुन कोण सोडवल्या ? पुसाव त्या ब्रम्हयाला ॥
॥ कोण कोणाच्या कामी पडले ? ठाउक मार्क्डेय ऋषिला ।
अश्या परंतु कथा वेद । आहे पुराणी सांगायला ॥

||०३||



॥ चंद्र गवयाच्या वंशी जन्मली । बाई चंद्रावळी
थोर भाग्य, चंद्रावळीचे ।
लाभला गोकुळचा वनमाळी ॥घृ॥
॥ कान्हाशी दिली चंद्रावळी । दौलतीचा भार जुना
गाडे-घोडे रथ-पालख्या ।
संग हत्तीचा पिलखाना ।
दासी-गुजारीनीं मेळयासंग पुढे । चाले कुळ सेना ।
॥ पतिव्रता होती चंद्रावळी । पुसा हो नारदाला ।
पतिव्रता ती काय नाचत । आली हो वाडयालां ।
नाचता नाचता सृष्टी नाचली । सदाशिव साहय तिला ॥
॥ सदाशिवाचे नित व्रत करी । ती, पतीव्रता धर्मी जाणा ।
महाला वरती तुळशी वृंदावनाला । नित घाले प्रर्दक्षीणा ।
नित सुर्याला अर्ध्य देई । ती, चंद्रावळी कामीना ॥
॥ गोपाळांनी त्याच वेळी । पाहीली ही मैना ।
चंद्रावळी च्या रूपा सारखे । रूप नाही तिरभवना ।
चंद्रावळीच्या पायी सोळा, सहस्त्र गोपीगणां ॥
॥ चंद्रावळीच्या शिरची वेणी । नवलक्ष तारांगणा ।
अंगामध्ये चोळी मोत्याची । गळयात जळीताच्या माळा/गहना ।
चंद्रावळीच्या रूपा सारखे । रूप नाही तिरभवना ॥
॥ महाला भोवती चौक्या चार । रिघ मुंग्याची जाईना ।
चंद्रावळी पतीवतां भारी । महाला बाहेर निघेना ।
ताळावरत सप्त ताळी । कोण सिडी लावन गगनां? ॥

॥ चंद्रावळीची पारख सांगा । गोपाळाशी पुसे हरी ।
ताळा वरत सप्त ताळी । चंद्रावळी उभी भारी ।
त्या ताळाच्या खाल्या कृष्णा । चंद्रावळी धेंडं भारी ।
चंद्रावळी उभी भारी । कोणनाही पाहली हो मुरारी ॥
॥ कृष्ण देवानं सोंग घेतलं । भानामती होवुन गेला ।
भानामती होवुन गेला राया । चंद्रावळी दाखवायला ।
गोपाळास चंद्रावळी दाखवाया देवानं । खेळ हो मांडला ॥
॥ चंद्रावळीच्या वाडया पुढं । खेळ देवानं मांडला ।
सुईच्या छिद्रातुन हत्ती । बाहेर ओढुन दाखवला ।
तरी चंद्रावळी, नाही आली बाहेर । खेळ बघायला ॥
॥ गोवींदाला गोष्ट झोंबली । हात फिरवे मिशावरी ।
पुण्य खेतरी पुण्य पवित्री । चंद्रगवळी जाण मजशी ।
चंद्रावळीची बिशाद किती ? हात पुरवन शिखराशी ॥
॥ आणीक तुम्हास एक सांगतो । हात लावीन सुर्याच्या रथाला ।
बसुन सुर्याच्या रथी पाताळी । गळ टाकन चंद्रावळीला ।
गळ टाकन चंद्रावळीला । लावन गवसनी गगनाला ॥

॥०४॥

॥ नट नाटयी पटाधीकारी । सन्मानाची रुक्मिणी ।
रुक्मिणीचा विचार येताच । उभे झाले/होते कृष्णधनी ॥धृ॥
॥ रुक्मिणीचा विचार येताच । गेले तिच्याकडे जगजीवना ।
रुक्मिणीला तिचा श्रृंगार मागताच । कवटाळले रघुनंदना ॥
॥ रुक्मिणी पुसे साज कश्याला ? सांगा हो खुणं ।
रुक्मिणी पुसे, कृष्णा सांगे । पण केला चंद्रावळीनं ॥
॥ कुल साजच्या सनगडयांच्या डब्या । उघडल्या श्रीरंगानं ।
जळी-जडीतांची वेणी घातली । भांग-टिळा केला कृष्णानं ॥
॥ मुद्रा खळी बिंदी बिजौरी । भांग मोत्याचा करुनं ।
हार पाताळी पोथ गरसुळी । दोरा निर्गुणं ॥
॥ बाही बुगडया काथ्या लेली । फुल चंदनाचं चांदनं ।
अनुग्रट बिचवे डुलक्या जोडवे । पायी टाकल्या लेपुनं ॥
॥ बाक्या मुंदी बोटा मध्यी । बायदानी अंगोळदानी ।
कमरेला पट्टा कुलपी नेसुन । पिवळी सिल्लारी ॥
॥ अवघ्या लेण्यांच्या लायक लेणं । कुंकु कपाळी लावुनं ।
नयना वरती लाल चमकी । सुर्य गेला झाकुनं ॥
॥ या सोंगाची कशी संपादनी । चोळीत उर नाही दोन्ही ।
चोळीत उर नाही दोन्ही । रुक्मिणीच सोंग घेतलं कृष्णानी ॥
॥ चौदा विद्या चौसष्ट कला । संग घेतल्या कृष्णबाईनं ।
चौसष्ट कला चौसष्ट दासी । संग घेतल्या या कामीणीनं ॥
॥ जडी-जडताच्या झाल्लरा रथाला । त्यावर बसले सारंगपाणी ।
गोकुळातुन रथ निघाला । रुक्मिणीच्या रुपात कृष्णधनी ॥
॥ गोकुळातुन रथ चालताच । फुंकार पडली तिरभवनी ।
रथ वारुचा उभा ठाकला । दरवाज्या पुढं जावुनी ॥
॥ चंद्रावळीला खबर कळताच । धावुन आली ती दरवाजी ।
रथा खाली राई उतरली । भेटल्या दोघी बहीनी ॥

॥ चंद्रावळीचा पती बोलला । नमस्कार वहीनी ।
अशी चंद्रावळीला भारवतांना । आली ती जवळी ॥
॥ नाचत नाचत कृष्णराई तेथुन । महाली गेली लाजुनी ।
म्हणे चंद्रावळी कृष्णराईला । शरमते का पुरूषावाणी ।
याच गोष्टी पायी या घरी । आली मी धावुनी/पाहुणी ॥
॥ सदाशिवांचे व्रत तुजला । आली ही राई धावुनी ।
ऐकुन महादेव कैलाशी हसले । कृष्णराई ब्रम्हग्यानी ॥
॥ म्हणे चंद्रावळी कृष्णराईला । पाणी सारलं गंगाळी ।
तुया घरी कुठचं न्हानं । आता नाही माझ्या कपाळी ॥

॥ यमुने तिर्थि न्हावयास गेली । तेथुन झाली मी एकांगी ।
व्रत पाच वारांच न्हावु नये । कशी काढु आंगची चोळी ? ॥
॥ कशी पतीची आज्ञा मोडु । श्री माधव याहीच्या पायी ।
गाठ वेणीला गाठ चोळीलां । खुण मुद्रा देल्ली सारी ॥
॥ मीच तुजला न्हावु घालते । सोड वेणी कर मोकळी ।
चंद्रावळी न्हावयास बसली । केस झरपते वनमाळी ।
उटनं चंदन पाणी सारून । आपस्थळी उरं चोळी ॥
॥ अशी चंद्रावळी न्हावुन उठली । महाला भरल्या रांगोळी ।
सुर्वणाचे पात्री बसुन । भोजन, केलं एकवेळी ॥

॥ अशी चंद्रावळी भारवतांना निजली । कृष्णराई जवळी ।
हात पुरूषाचा निब्बर लागता । दचकली चंद्रावळी ॥
॥ अरे अरे वै-या, कसा चावडीवर । छापा घातला दिवसाढवळी ।
अग्नी काष्ठ घेवुन हाती । करते या प्राणाची होळी ॥
॥ कृष्ण राईन स्वरूप दाखवलं । अवतार मुर्ति सावळी ।
पुष्पक विमान उतरवुन तिला । नेलं दुर मंडळी ॥
॥ सहा महिन्याची करून रात्रं । भ्रांत पाडली त्यावेळी ।
नउखंड पृथ्वा व्दिप व्दारका । शेष दाखवला पाताळी ॥
॥ देव व्दारांच कवाड उघडुनी । दाखवली रंभा पुतळी ।
दाखवली रंभा, पुतळी होय ही । देवांगणा राई चंद्रावळी ॥

**भजने :-**

॥ सप्त कुळांचा उध्दार झाला । कृष्णराई रूक्मीणी बाई ।
आठवे बाळ तुझे देवके । त्याची खुणं आहे न्यारी ॥
॥ महा विर मारोती झाला । अवघे विघ्न निवारी ।
कृष्ण नामाची टाळी राया । भक्ताला तारी ॥

## -: निरसनसह शब्दार्थ :-

**व्दापरी** :- व्दापर यवगी, दुपारी । **मर्दुनी**:- युध्दात मारूनी, युध्द करून शत्रुला मारणे, शत्रुंचे मर्दन करून शत्रुला जिंकणे । **रक्षिले** :- रक्षण केले. । **सोच** :- विचार । **रिघ** :- रांग, ओळ । **सीडी** :- वर चढण्याकरीता पाय-याची तात्पुरती बनवलेली शिडी, निशाणी । **बिशाद** :- पहुंच, पोच, ताकद । **गळ** :- मासोळी पकडण्यासाठी जसा गळ टाकल्या जाते तसा मोठा अनेक काटयांचा गळ, विनवणी चे फासे । **पण** :- नेम, व्रत **न्हानं** :- आंघोळ करने । **न्हावुन** :- सर्वांग आंघोळ करून ।

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०६ ॥
॥ ओवी नं. ०९ ॥

॥ कृष्ण कथामृंताची निरसनसह मुळावरची ओवी ॥

## ॥ पार्थ म्हणे श्रीअनंता ॥

॥ पार्थ म्हणे श्रीअनंता । सेरूप दाव मज आता ।
हरीम्हणे माझं, विशाल रूप । भेशीन पाहता पाहता ॥घृ॥०१॥

॥ कृष्ण मुर्ति झाली अर्पित । मुकुट लागले गगणातं ।
कोटी सुर्याची प्रभां फाकली । अर्जुन विस्मीत मनातं ॥
॥ नेत्र शिणले पाहतांना । सुर कोडंले गावतांना ।
तुझ्या आंगची चैतन्यं माया । भेलो सेरूप पाहतांनां ॥
॥ सागर भरला शाही हो । नवल वर्णु काय हो ? ।
सहा चार अठरा भांडती । कोणीचं नव्हत गाही हो ॥०४॥
किंवा म्हणनी २ : सहा शास्त्रे अठरा पुराण । कोणीच नव्हतं गाही हो ।

॥ अठरा भार वनस्पती । त्याची करून/मोडली लेखनी ।
लिहता-लिहता धरतरी आटली । धन्याची महिमा वर्णु किती ?
॥ श्रीगणेश नाथ बोले अपार । गोष्ट याहीची अपुरं/संपुर्ण/सफलं ।
गोष्ट दावली नयनी पाहली । कृष्ण पाहीला चातुरं ॥
॥ टाळ वाजे ढोंलं वाजे । नौबत वाजे झनानां ।
श्रीकृष्णाचा अवतार आला । अवद्युत अवधुत म्हणानां ॥०७॥

भजनें :-
॥ अर्जुनाशी दाखवले से रूप । आमची चुकवा हो चौ-यांशिची खेप ॥
॥ अर्जुनाशी दावले सेरूप । आमची चुकवा हो यमपुरीची खेप ॥
॥ अर्जुनाशी दावले सेरूप । आमची मिटवा हो चौ-यांशीचे दुःख ॥

## ॥ निरसनसह पार्थ म्हणे श्री अनंता ॥

-: निरसन/स्पष्टीकरन :-

॥ पार्थ म्हणे श्रीअनंता । सेरूप दाव मज आता ।
हरीम्हणे माझं विशाल रूप । भेशीन पाहता पाहता ॥घृ॥०१॥
॥ कृष्ण मुर्ति झाली अर्पित । मुकुट लागले गगणातं ।
कोटी सुर्याची प्रभां फाकली । अर्जुन विस्मीत मनातं ॥

पृथापुत्र अर्थात कुंतीपुत्र पार्थ उर्फ अर्जुन विनंतीपुर्वक याचना करून कृष्णास म्हणाला की : हे अनंत रूपी कृष्णा ! हे अनंता ! तु जसा आहे तसाच होवुन तुमचे ईश्वरी स्वरूप आता मजला दाखव. तुमच्या मुळ स्वरूपाची ज्योती प्रत्यक्ष्य पहावी. पिंडी ते ब्रम्हांडी ही ज्योत कशी भरून भरली आणीक उरली ? तुमचे ते पिंडी ते ब्रम्हांडी सेरूप पाहण्याची आता माझी ईच्छा झाली आहे. तुमचे ते सेरूप पाहणे शक्य आहे. असे जर तुम्हा वाटत असेल तर हे अनंता ! तुमचे ते सेरूप दाव मज आता ! ही ईच्छा पुर्ण कर माझी या देही ! असो तुमच्या रूपा-सुखाची गाही.

अर्जुनाची विनंतीपुर्वक याचना व्दारे प्रकट केलेली ईच्छा ऐकुन श्रीकृष्ण म्हणाले की : तु स्वतःच्या तिरगुणी दृष्टीने मला पाहण्यास समर्थ होणार नाहीस. म्हणुन मी सर्वप्रथम तुला त्रिगुणाच्या पल्याड असलेली त्रिगुणातीत दिव्य दृष्टी देतो. या दिव्य दृष्टीच्या योगाने तु माझे पिंडी ते ब्रम्हांडी ईश्वरी स्वरूप पाह आता !

असे म्हणुन श्रीकृष्णाने अर्जुना च्या नेत्रात दिव्यांजन घालुन आपले अनंत कोटी पिंडी ते ब्रम्हाडी रूपी रूपात उभा झाला. व्दीभुजधारी कृष्ण रूप अर्पित होवुन, त्या

रूपाच्या ठाई अनंताचे रूप उभे झाले. त्या अनंत रूपाचे मुकुट गगणाला भिडलेले होते. आकाश सुर्य ला लोपुन ते विश्वरूप दिसु लागले होते.

त्या अनंत रूपा व्दारे आकाशात कोटी सुर्य उगवल्या नंतर त्या सुर्यांची जी





एकत्रीत प्रभा तेज निर्माण होईल अश्या त्या कोटी सुर्याच्या प्रभेप्रमाणे तिथे प्रभा फाकली होती. त्या कोटी सुर्याच्या प्रभेमध्ये देवाधिदेव आदीपुरूष भैसराज कृष्णाच्या शरीरात नाना प्रकारांनी विभक्त झालेले सर्व विश्व एकत्र झालेले पाहीलेत. जेथुन हे विश्वे निर्माण झालीत तिथेच ते विश्वे पुन्हा अंर्तभुत होतांना पाहुन अर्जुन आश्चर्याने चकित झाला. मनात अर्जुन विस्मीत झाला. अंगावर रोमांच उभे राहुन विस्मित अवस्थेत तो आपल्या दिव्य नेत्राव्दारे त्या अनंता चे विविध रूपे पाहु *लागला.*



॥ नेत्र शिणले पाहतांना । सुर कोडंले गावतांना ।
तुझ्या आंगची चैतन्यं माया ।
भेलो सेरूप पाहतांनं ॥
॥ सागर भरला शाही हो । नवल वर्णु काय हो ?
सहा चार अठरा भांडती ।
कोणीचं नव्हत गाही हो ॥०४॥
किंवा म्हणनी २ : सहा शास्त्रे अठरा पुराण ।
कोणीच नव्हतं गाही हो ।

कोटी कोटी प्रभातेजाचे ते रूप अनेक हात, अनेक उदर, अनेक मुखांनी युक्त चंद्र व सुर्य डोळे असलेले होते. अनेक प्रकारचे अद्‌भुत देखावे त्यामध्ये दिसत होते. ते रूप सर्वच प्रकारांनी परम उज्वल, सर्वव्यापक, अनंत व सर्व आश्चर्याने भरलेले होते. तेव्हा त्यांच्या शरीरात नाना प्रकारांनी विभक्त झालेले सर्व विश्वातील अमर्याद रूपे त्याच्यात अंर्तभुत होवुन एकत्र झालेले पाहीलेत. त्या सेरूपाचा आदी अंन्त व मध्यही काही त्यास कळत नव्हता. रूपे पाहत पाहत जेव्हा त्याचे नेत्र शिणले/थकले, तेव्हा अर्जुन म्हणाला की : हे आदीपुरूषा ! येथे केवळ तेजांच्या राशी आहेत. तेजाची राश असलेली ही आकृती अग्नी सुर्याप्रमाणे देदीप्यमान, सर्व बाजुने प्रभा फाकल्यामुळे डोळयास पाहण्यासही कठीन, व अपरिमीत अशी मी अवलोकन करत आहे. तुमच्या या स्वरूपाला उपमा नाही. या तेजांच्या राशीमध्ये मी सर्वकाही आरपार अपरंमपार पाहत आहे. कृष्ण सेरूपाची लिला पाहण्यासाठी अनेक देवतागण, सिध्दगण, उच्च श्रेणीतील पुण्यवान जाणते योगी भक्तगण आकाशात प्रकट होवुन, ते सेरूप निरक्षण करतांना चलचित्राप्रमाणे अर्जुनाचे त्या सेरूपात पाहीलेत. ते सर्व कृष्णाचे नाम संकिर्तन करत हर्ष भावाने कृष्णाच्या सेरूपाला पाहत होते. कुतुहलाने निरक्षण करत होते आणी हात जोडुन नमस्कार करत होते.

तर हेच सेरूप पाहुन व्दैत दानव राक्षसगण, भुत प्रेत पिशाच्य लाव लावडीन, लष्टानं...ईत्यादी भयभित होवुन सैरावैरा पळत सुटले आहेत. ॥ ऐसे कैक आले, कैक गेले, कैक पळाले. । कैक या तेजाने जाळुन भाजुन गेले. । कैक मोठे मोठे मारल्या गेले. । याची गणीता नाही येथे.. ॥ असे दृष्य चलचित्राप्रमाणे त्या सेरूपात पाहील्यावर अर्जुन भयभित झाला.

सुर कोडले गावतांना :-

अर्जुनाने भगवंताचे हे एकाच वेळी एकत्र झालेले आश्चर्यकारक व विकाळ भयानक असलेले सेरूप पाहीले. त्या सेरूपाच्या अंगची चैतन्य माया पाहुन भयभित झाला. भयाने थरथर कांपत दोन्ही हात जोडुन पुनःनमस्कार करून, नम्र होवुन कंठ दाटुन सुर कोंडलेल्या सद्गत कंठाने भयभित घाब-या घाब-या ने तो सर्वव्यापक अनंता ची स्तुती करू लागला की :

हे अनंता ! तु सर्व कारणांचे कारण आहेस. तुच जगाच्या पल्याड असलेले परम तत्व, सत् आणी असत् आणी त्याच्याही पलीकडचे परंम अक्षर आहेस. तुच त्रिगुणातीत असुन या तिरगुणांच्या पल्याड उभा असलेला तुच आदीकर्ता आदीदेव आदीपुरूष पुराणपुरूष आहे. तुच चैतन्याचा स्वामी आहे. तुमच्या ईच्छे पासुनच मुळ शक्तीचा उगम आहे. तुज मुळेच सर्व शक्तीयॉंचा पसारा वाढला आहे. सर्व शक्तीचा पुरवा तु आहेस. तुमच्या अध्यक्षते खाली या शक्तीयॉं वावरतात आहेत. सर्व शक्तीचा स्वामी तु आहेस. तुज पासुनच या सर्व शक्तीयॉंला शक्ती तेज मिळते. तुमच्या तेजाने या सर्व शक्ती फिरत फिरत अंती तुज मध्येच विलीन होतात. तुमच्या तेजावाचुन या सर्व शक्तीयॉं बलहीन निस्तेज पडुन राहतात. तुच विश्वाचा परममात्र आश्रय आहेस. विश्रांती स्थळ आहेस. तुच सर्व सृष्टीयॉं चा उत्पादक आहेस. तुच सर्वत्राचा पिता आहेस. तुच सर्वत्राचा गुरू आहेस. ज्ञान तु आहे. ज्ञाता तुच आहे. जे जाणायचे ते तुच आहे. परंम्पद, परमयपद, मोक्षपद तुच आहेस. तुच आपल्या एका अंशाच्या तेजाने ही धरणी प्रकाशमान करत आहे. या सर्व विश्वातही तुच भरून भरला आणीक उरला आहे.

हे सर्वव्यापका ! हे अनंता ! कोण्या नामाने हाक मारू तुले ? तुला माझा पुढुन नमस्कार. पाठी मागुन नमस्कार. आणी सर्वच दाही बाजुने सहस्त्रो नमस्कार असो. आणी पुनःपुनश्च शरीर वाकवुन म्हणतो की : तुला अनंत नमस्कार असोत. तु एवढा मोठा असतांनाही लहाणपण घेवुन माझे संग राहला.परंतु तु माझे लक्ष्यात व ध्यानात न आल्यामुळे मी तुला अनावधानाने, अनादराने, मान न देता, अविचाराने जे काही बोललो असेल, थट्टेने जो काही अपमान केला असेल, त्या सर्व कोटयान कोटी अपराधाची मजला क्षमा करावी.

॥ अपराध माझे कोटयानं कोटी । देवा तुम्ही घालाना पोटी ॥
॥ माझे या अपराधाच्या राशी । भेदुन गेल्या हो गगणाशी ॥

हे अनंता । तुच या सर्व अखील विश्वाचा पिता आहेस. पिता ज्याप्रमाणे आपल्या पुत्राचे, सखा ज्याप्रमाणे आपल्या सख्याचे, किंवा प्रिय ज्याप्रमाणे आपल्या प्रियतमाचे अपराध सहन करून त्याला माफ करतो, त्याप्रमाणे माझे सर्व अपराध सहन करून मजला माफ करा.

॥ तुच माझा पिता । तुच माझा गुरू । संभाळ करा महाराजा हे लेकरू ॥

सागर भरला शाही हो । नवल वर्णु काय हो :-

तुझे पुर्वि कधीही न पाहीलेले, आकाशी आहये. पाताळी आहे. भरून भरले आणीक उरले आहे सर्व्यास ! असे शाही चैतन्य सागराने भरलेले या सेरूपाचे नवल तरी वर्णु काय हो ? हे सागराप्रमाणे भरती आलेले सेरूप पाहील्यानंतर तुमच्या वाचुन आणीक दुसरा नाही कोणी ! याची गाही/साक्ष/पुरावा प्राप्त झाला. सच्च्या जनांचा तुच कर्ता. तुच करविता. तुच सत् बुध्दिचा दाता आहेस. तुमच्या वाचुन आणीक दुसरा कोणी नाही. हे जाणुन मी हर्ष आनंदित झालो आहे. परंतु त्याच वेळी माझे मन तुझे हे विकाळ रूप पाहुन भयाने व्याकुळ झाले आहे. म्हणुन हे अनंता ! मजवर कृपा करून प्रसन्न व्हावे. देवा आता हा पसारा आटपुन मजला आपले कृष्ण रूप दावावे.अर्जुनावर प्रसन्न होवुन जेव्हा अनंता कृष्णरूपात आला, तेव्हा त्या कृष्ण पाहुन अर्जुन त्याला म्हणाला की : तुमचे हे सुंदर मानव देहधारी सावळे रूप पाहुन माझे चित्त आता शांत झाले आहे. भयमुक्त झालो आहे. उभा आहे माझा कृष्णदेव । आता नाही हो कोणाचे भेव ! आता मी आपल्या पुर्ववृत्तीवर आलो आहे. माझे मन समाधान करून आता कृष्ण देव प्रंसन्न झाले. या देवाचे दर्शन झाले. याच देही या डोळयानं सेरूप पाहीले.

सहा चार अठरा भांडती । कोणीच नव्हत गाही हो..
॥ अटरा भार वनस्पती । त्याची करून/मोडली लेखनी ।
लिहता-लिहता धरतरी आटली । धन्याची महिमा वर्णु किती ?

॥ श्री गणेशनाथ बोल अपार । गोष्ट याहीची अपुरं
गोष्ट दावली नयनी पाहली । कृष्ण पाहीला चातुर ॥

तद्नंतर आदीगण श्री गणेशनाथ कृष्णा बोले की : हे अर्जुना ! मी तुजवर प्रसन्न होवुन माझे हे सेरूप तुला दावले. तुज वाचुन आणीक कोणी आधी हे सेरूप केव्हाही पाहीले नाही. हे सहा शास्त्रे चार वेद अठरा पुराणे नुसतेच कल्पनेच्या पालव्या फोडत, माझे सेरूप कसे आहे ? याबध्दल भांडत आहे. परंतु या सहा चार अठरापेकी कोणीही माझी गाही घेतलेली नाही. कारण की : तुजला ही गोष्ट मी सर्वप्रथम दावली. तुच सर्वप्रथम नयनी पाहली. चतुर कृष्णा चे सेरूप तुच प्रथम पाहीले आहे. तुज वाचुन पुर्वि कोणालाही माझे हे सेरूप दाखवले नाही आहे. या चार सहा अठरा ने माझे हे सेरूप पुर्वि कधीही पाहीलेले नाही. हे सहा चार अठरा नुसतेच कोरडे भांडत असुन, यापैकी आधी कोणीच नव्हते गाही हो या सेरूपाची ।

हे अर्जुना ! तुच या सेरूपाची प्रथम गाही होय. म्हणुनचे हे सहा चार अठरा यांच्या पैकी कोणी एक गाही नसल्यामुळे, यां सहाचारअठरा च्या अध्ययनाने मी त्यास सापडत नाही. कारण की : यां सहा अठराचे आधार असलेले जे वेद आहेत, ते वेद च मजला नेती नेती म्हणत म्हणजेच न जाणता येणारा ! न जाणता येणारा ! असे म्हणत मागे परतुन यां वेदांनी सहा अठरा पुराण पोथी कर्मकांडे प्रसवलेत आहेत. या कर्मकांडाने यज्ञाने, पुराण पोथी च्या स्वाध्यायाने, कर्मकांडाने दानाने किंवा उग्र तपाने माझे हे विश्वरूप पाहणे शक्य नाही. दर्शन मिळण्यास अत्यंत कठीन असे माझे सेरूप वेदाने, तपाने, दानाने किंवा कोणत्याही प्रकारच्या यज्ञाने दिसणे शक्य नाही. परंतु अनन्य सच्चा भक्ती भाव चा योग ठेवुन, आत्मज्ञानी होवुन नित नामी राहुन, नित भजत असतांना योग साधल्या जावुन ध्यानी मनी नसतांना अचानक हे सेरूप मज कृपेने दिसणे शक्य आहे.

या अठरा भार वनस्पती असलेल्या अठरा पुराणांनी तिरगुणांचे राजे यांना संग घेवुन, तिरगुणी ग्यान घोकुन घोकुन त्याचा काढा काढुन जी ही अठरा पुरांणांच्या लेखनीत ही तिरगुणी शाई भरली आहे. त्या लेखणीव्दारे माझे नाम खोडुन माझे नामाच्या ठिकाणी आपआपल्या त्रिदेवांचे नाम समोर करून मजबद्दलचे जे ग्यान सांगत सुटलेले आहेत, ते ग्यान सांगता सांगता यांची ती लेखनी च मोडल्या गेली आहे. आणी असेच मजला लपवुन तिरगुणांचे राजे यांना समोर करून लेखनी करणा-या कितीतरी कवीकर्ते लेखक यांचे देहरूपी धरणी झिजु झिजु आटल्या असेल. कितीतरी लेखण्या मोडल्या असेल. परंतु मी काही त्यांना सापडलो नाही. दिसलो नाही. मी त्यांच्या पासुन दुरच असतो. निराळाच राहतो. मी फक्त तिरगुणांच्या पल्याड पाहणा-या सच्च्या भक्त योगी सखा ध्यानी यांनाच सापडतो. सख्या अर्जुना ! तु मजला ओळखलेत. असेच ओळखीचे जीव ओळखतीन मजला. असेच स्वस्वरूपी ओळखीचे आत्मज्ञानी जीव ओळखतीन की : एका सच्च्या भावाने एकाच नामी राहुन एकाच्याच निरंतर नित अन्यन्य भक्ती-भाव वाचुन कोटी प्रयत्न केले तरी मी कोणास सापडत नाही. माझे निरंजन ज्ञान होण्यास, मी दिसण्यास, मजला प्राप्त करण्यास आणी मजमध्ये प्रवेश करण्याला निरंजन आत्मज्ञान युक्त सच्चा भक्ती-भाव चा भजन पुंजन ध्यान सुमरन करत संधी साधलेला योग मार्गच योग्य आहे... असे श्रीकृष्णाने अर्जुनास सांगीतले.



॥ टाळ वाजे ढोलं वाजे । नौबत वाजे झनानां ।
श्रीकृष्णाचा अवतार आला । अवधुत अवधुत म्हणानां ॥०७॥

हे अर्जुना ! कलयवगाच्या संधिकाळात या श्रीकृष्णाचा पुर्ण अवतार गुप्तरूपात होणार आहे. जिथे हा गुप्त अवतार उभा राहील, तेथे जाणते सिध्द भक्त योगीं ईत्यादी व्दारे टाळ घोळ नौबत झनाना वाजत गाजत, गर्जना करत या कृष्णाने गाही देवुन सांगी केलेले सर्व गायन करत असेल की : या व्दापरच्याच श्रीकृष्णाचा पुर्ण अवतार कलयवगी कृष्ण देहीत आला आहे. त्या कृष्णदेहीलाच तुम्ही कृष्ण अवधुत अवधुत आता म्हणाना. कलयवगात सावंगा येथे उभा झालेल्या पुर्ण अवतार श्रीकृष्णाला विनवाना ! श्रीकृष्णाचा अवतार आला । अवधुत अवधुत म्हणाना..! पुर्ण अवताराच्या अधिक ग्यानाकरीता **कृष्णांमृत** वाचा.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०६ ॥

॥ ओवी नं. १० ॥

ओवी महात्मः- ओपार, भोजन नैवद्य देवासमोर ठेवल्यानंतर अथवा पाळणानंतर हमखास म्हणण्यात येणारी म्हणनीतील कृष्ण विनवनी ची जुनी ओवी

## ॥ शिदोरी छोटी ओवी ॥

॥ माता सुंदरी, देव श्रीहरी । बांधुन शिदोरी, गाई सोडं ।
हरी हरी कृष्णा, हट करता गा । झाला रोडं ॥घृ॥ ०१ ॥
॥ टाकुन चंदनपाट, वर सुवर्णाचे ताटं । धुम्मधुम कढी, पिवळा भातं ।
वाढलं जेवु, तुज काय देवु ? सांग बा तेवढं ॥
॥ एकला गहु, प्रकार बहु । वाढलं जेवु, तुज काय देवु ?
जेव हरी कृष्णा । का गा रूसला ? कर गा भोजन तु ॥
॥ पोळी दुपोळी, साधी रोटी । कांचन वाटी, दही ठेवलं ।
पुरण-पोळी आणीक पाचही । पक्वान्न वाढलं ।
जेव हरी कृष्णा, वर लोणीयाचं । माखलं ताटं ।
हरी हरी कृष्णा, हट करता गा । झाला रोडं ॥ ०४ ॥
॥ वरण तुरीचं, रांधलं निट । पुरण हरब-याचं, वाढलं ताटं ।
चक्के भरले दहयांचे घट । डोणे भरले श्रीखंड ।
जेव हरी कृष्णा, दही भाताचं । वाढलं ताटं ।
हरी हरी कृष्णा, हट करीता गा । झाला रोडं ॥
॥ भाजीत भाजी, भाजी अंबाडीची । लोण-मिरचे, खुडंले चारं ।
खुडले चारकणी हळकुंड । टाकलं, जिरं भाजीत ।
जेव हरी कृष्णा या, भाजीचे सत् किती, तरले दुष्काळातं ।
हरी हरी कृष्णा, हट करीता गा । झाला रोडं ॥
॥ चटण्या-चटण्या, दोन-चार चटण्या । आहे हारो हारं ।
हारो-हारं, लसन-जि-यांचा । करून क्षारं ।
करून क्षारं, बोर-आवळयांचा । जिरा-साळीचा, मोकळा भातं
जेव हरी कृष्णा, का धरली आळ ? झाली का दिटं ।
जेव हरी कृष्णा, किती ओवाळु ? मोह-या मिठं ।
हरी हरी कृष्णा, हट करीता गा । झाला रोडं ॥
॥ वनस्पतीची करून पत्रावळी । बोले भिम्मा, देतो आरोळी ।
देतो आरोळी ब्रम्हया राया । केला जवळी ।
जेव हरी कृष्णा, जेवु बोलाव । आपले सवंगडी ।
हरी हरी कृष्णा, हट करीता गा । झाला रोडं ॥ ०८ ॥

॥ नव गंगाळी, पाणी सारून, । माया-प्रितीचं, त्याहीला सिंहासनं ।
त्याहीला सिंहासन, हरी आल्या । सोळा सहस्त्रं नारं ।
जेव बापा, यादव भक्त । आले हो पांडवं ।
आले यादव कुळीचे राजे । आणीक देवांगण
तुमच्या मावची, आवड याहीलां । हरी हरी कृष्णा ।
हरी हरी कृष्णा, हट करीता गा । झाला रोडं ॥ ९ ॥

**भजने :-**

॥ पक्वान्न करून ताट वाढलं । काय करन अन्न ?
बिना जेवल्या वाचुन कैस, होईन समाधानं ॥
॥ जेवणार वाला जेवुन गेला । घ्या तुम्ही ओळखुनं ।
पाचही पानाचा विडा जेवला, मन समाधानं ॥
॥ ऐसा योगी समाधान । न जेवता तृप्त झाले मन ॥

॥ ज्याचं मन समाधान । त्याहीना झालें/होईन कृष्ण रायाचं देणं ॥
॥ भजन करता मिळल भोजन । ऐसं सांगुन ठेवलं कृष्ण रायानं ॥
॥ भजन करता मिळल भोजन । देवाच नित्य ।
नाम घेता चुकतीन । चौ-यांशी यवन ॥

-: शब्दार्थ :--

**रांधने** = हातात रवी इत्यादी घेवुन चांगले घुसळणे, । **कांचन** = सोनं प्रमाणे चकचकीत । **लोणीयाचे माखलं ताट** :- चपचपीत लोणी वाढलेले ताट ।
**चक्के भरले दहयाचे घट** :- स्वच्छ व पातळ सुती कपडयात दही बांधुन ठेवुन त्या दहयातुन पाणी झिरपुन काढलेले, पाणी नसलेले घट्ट दही याचे घट, यालाच दहयाचा चक्का म्हणतात । **डोणे** :- कढी ज्यात वाढली जाते ते मोहा वनस्पतीच्या पानापासुन तयार केलेल्या वाटया । **हट** :- जिद्द् । **रोडं** = हाडकुळा/बारीक अंगकाठीचा, कृश । **सत्** :- सत्व, चांगले गुण । **खुडले** :- देठापासुन तोडले । **हारो हार** :- हारातील फुलाप्रमाणे एका मागे एक वाढलेल्या, तिखट । **दिट** :- नजरेव्दारे वासनेव्दारे दृष्ट लागणे, भोजनाची ईच्छा न होणे । **गंगाळ** :- आंघोळीसाठी पाणी घेण्याचे तांब्याचे पात्र/भांडे । **सारून** :- सारवुन, टाकुन । **नारं** :- स्त्रिया । **माव** = हरी ची लिला, खेळ.



॥ ओवी नं. ११ ॥

॥ पाककला चे ग्यान असलेली विनवणीची ॥

॥ मुळावरची निबंध ओवी ॥

## ॥ कृष्ण अवधुताची शिदोरी -मोठी मुळ निबंध-ओवी ॥

॥ माता सुंदरी, देव श्रीहरी, बांधुन शिदोरी । गाई सोड ।
जेव हरी कृष्णा हट करीता । झाला रोड ॥
॥ एकला गहु प्रकार बहु वाढलं जेवु । सांग काय देवु तुला ।
जेव हरी कृष्णा, का गा रूसला ? तुझा अन्याय कोणता केला ॥
॥ पोळी दुपोळी, साधी रोटी, कांचन वाटी । दही ठेवलं ।
जेव हरी कृष्णा, वर लोणीयाचं । ताटं माखलं ॥
॥ अगर मांडयाची आवडी, आणीक पिठ पोळी
दुपोळी पोळी पुरण पोळी पक्वान म्या केला ।
जेव हरी कृष्णा, जेवु बोलाव । आपल्या सवंगडयाला ॥०४॥
॥ पक्वान्न करूनी, चौकुडी तुपातली । खिचडी खारवडी ।
सानीध्य पाठोडी पाचही पक्वान्न केली ।
जेव हरी कृष्णा, का बा । तु रूसला । ....... ...... ...... ॥
॥ उडदाचे करूनी वडे, काजु बत्ताशे । दुध पेढे ।
वा-या पु-या आणीक शिंगाडे । फराळ तु कर ।
जेव हरी कृष्णा, हट करीता । झाला तु रोड ॥
॥ कैलाशी पाक, बहु गोड । चपाचप तुप गुळ ।
तिळ तिराळु शांक कांदाची । केळ रत्नाळु ।
शाक म्या करंज्याची वाढली बहु ।
जेव हरीकृष्णा भाजी कंचनाची निसली ॥
॥ चिल्या धापोडया, करून पाक वडया । मुंगाच वरण ।
रांधल्या वडया, सकोडे राया । म्या केले ।
जेव हरी कृष्णा, तु गुळातले । हे कान्होले ॥ ०८ ॥
॥ ठोबंरा, आंबिल जोंधळयाची । खिर गव्हा-तांदळाची ।
नाग दिवे, हुरडया उबळीचे । वटाणे फुटाणे हरब-याचे ।
वटाणे आहे प्रगट, जेव हरीकृष्णा । तुला का आला विट ॥

॥ वरण मसुरीचे, राधुन कुथली । ठेवली बधारून ।
भरीत वांग्याचं, करून पाणगे । बाज-याचे माजले ।
जेव हरी कृष्णा दही । भाता वरी वाढले ॥
॥ तुरीच वरण, रांधल निट । पुरण हरब-याचे वाढले ताट ।
चक्के भरले दहयाचे, घट-डोणे भरले श्रीखंड ।
जेव हरी कृष्णा, तु कर गा भोजन निट ॥
॥ तेल जवसाचं, करडीचं तेल । भुईमुंगा च्या शेंगाच तेल ।
बिया कास मुरडयांच, तेल कामुनीचे । बहु आहे गुण ।
जेव हरी कृष्णा, तेल सर्व आहे । रायत्यात टाकुन ॥ १२ ॥
॥ करून बोराचं बोरकुट, मुंगण्या चिंचित आंबट ।
लोण मिरची लावुन तिखट । हे झालं गोड ।
पोट गेलं खोल, जेव हरीकृष्णा । हट करीता झाला रोड ॥
॥ सरूळे बोटुले, नखुले गहुले । सरगुंडयाची गुंडाळी ।
जेव हरी कृष्णा, वाढलं दुधाच्या सायीच दही ॥
॥ ताक वाढल, ताकाची कढी । सांडळी पापडी कुरडी ।
बोलाव आपल्या संगचे गडी । हाका मार ।
जेव हरी कृष्णा, होतो धंदयाला उशिर ॥
॥ वांग्याची भाजी, मुळाच्या शेंगा । मिरचीची भाजी ।
हळु हळु सांगा कवळा गुलाब तुमच्या साठी ।
जेव हरी कृष्णा, पान-वडया । वाढल्या ताटी ॥ १६ ॥
॥ कढी ताकाची, कढी कवटाची । कढी हरब-याच्या खाराची ।
शाक चिकण्या सुपारीची । खार-वडयाची
जेव हरी कृष्णा, तुला याची आवड मोठी ॥
॥ शेंगा रांधुनी, वाल वाल वाज्यांचा । नरम शेंगा चवळीच्या ।
वातट शेंगा खडक बिबीच्या । हेटा शेंगा सावरीच्या ।
वाघाट कटुल आणलं । जेव हरी कृष्णा तु कडुच कारलं ॥
॥ बेबरच्या शेंगा, डालो-डाल । उकडले फळ ।
जेव गोपाळ, तापल्या दुधाची । वाढली साय ।
कृष्णा का तु धरली आळ । झाली का दिट ।
जेव हरी कृष्णा, किती ओवाळु । मोह-या मिठ ॥
॥ जांब जांभुळी, आणीक अनेर खिरण्या । नारींदी उंबर ।
गोड तेढोळे, मांडयावर । नागर मोती भुम्मेवर ।
जेव हरी कृष्णा, खाय टरबुज डांगर ॥ २० ॥

॥ भाजी माठ चवीची, भाजी घोळाची । चिवन चाकन,
भाजी शेपुची, चांदु-या जोट, भाजी मेथीची । पालक चाकोत
जेव हरी कृष्णा, वनमाळी तुझे या बागेत ॥
॥ कळ मोड, भाजी हरण वेलाची, चिकण भाजी आहे फांदीची ।
लाल बिंदी भाजी चीलीची । तरोटा केना भाजी ।
भाजी कुंजराची आघाडा आहे कुपात ।
जेव हरी कृष्णा, अश्या भाज्या पाहील्या रानात ॥
॥ भाजी अंबाडीची, लोण मिरचे । खुडले चार ।
चारकणी हळकुंड, टाकलं जिर । या भाजीचे सल ।
जेव हरी कृष्णा, या भाजीचे सत् किती तरले दुष्काळात ॥

॥ दोडका दोडका, हजार दोडका । वावर दोडका ।
झुमक्या दोडका पारशी दोडक्याचे, गुण तुम्ही ऐका ।
काकडी वाळुक, आंबट चुका । भाजी वांग्याची केली ।
जेव हरी कृष्णा, तु पडुळयाची कथली ॥ २४ ॥
॥ शेंगा शेंगा, वाल भाज्याच्या । नरम शेंगा, आहे चवळीच्या गुल
शेंगा सौदंडीच्या, मुलमुंल शेंगा मुळाच्या ।
लांबलांब शेंगा मुगव्याच्या, वातळ शेंगा खडक बीबीच्या ।
वाघट कटुलं आणल जेव हरी कृष्णा । हेटयाचे केले फुल ॥
॥ माठ बरबटीची करून भाकरी । असा जेवतो गरीब न्याचार ।
तुझी धरतो हनुवटी । जेवहरी कृष्णा चुनवडया वाढल्या ताटी
॥ टाकुन चंदनपाट, वर सुवर्णाचे ताट । धुमधुम कढी पिवळा भात
वाढलं जेवु आणीक काय देवु । सांग बा मजला तेवढं
जेव हरी कृष्णा तु एवढा का रूसला ॥
॥ दाळ ज्वारी काढुन शाही । भाजुन लाही राजगि-याची ।
कंच मोकळी केले सत्तु लाहयांच पिठ ।
जेव हरी कृष्णा, तु फराळ कर निट ॥ २८ ॥
॥ मालती मुद्यी खा गळी । मालपुरी मेवाखीर, दुधावरची साय ।
हरी हरी कृष्णा, तुला सर्गुंडयाची आवड फार ॥
॥ गोडंबी दुध पोहे खाकस । शेवलाडु आहे, सरस पाक
वाढला आंब्यांचा रस । गुळ तुप मलींदा गोड ।
जेव हरी कृष्णा, हट करीता झाला रोड ॥
॥ नखले बोटुळे, चाळणी वरील पोहे । शेवळ्या अरण्या चारोळ्या ।
अन्न बा वाढले । हरीहरी कृष्णा वर लोणीयाचे माखले ॥
॥ साधेकेळं सोनकेळं राळकेळं । आव्या दुधावरची वाढली साय ।
का गा कृष्णा, धरली आळ । बैस पंगतीला ।
हरी हरी कृष्णा, तु बोलाव आपल्या गोपाळाला ॥ ३२ ॥
॥ एरंड पोपळी पिकली गोड । तु बसुन फराळ कर ।
उकडुनी आणले रत्नाळ । वर साखर वाढली ।
जेव हरी कृष्णा, तु आळ का बा धरली ॥
॥ गोंधळा सालफळी, आणीक भाकर । भुईडोडी आंबा बराबर ।
ईड लींबु निंबुचा क्षार । आवळा बोराची आवड फार ।
केलं मिरचीचं तिखुन । जेव हरीकृष्णा क्षाराच क्षार पाणी ॥
॥ चटण्या-चटण्या, दोन-चार चटण्या । आहे हारो हारं ।
लसन-जि-यांचा करून क्षारं । जिरा सायीचा मोकळा भात ।
जेव हरी कृष्णा, तु का बा नाही जेवत ॥
॥ अनरसे तुण्या, गुद गुंज वाण्या । सोजी कण्या, उंचीउंची खोबर
जेव हरी कृष्णा, तु मोठी खडीसाखर ॥ ३६ ॥
॥ बदमा बदाम गोडंबी, अंजीर मनुकाची, बी गोड आहे खुमानीले
जेव हरी कृष्णा, किती समजावु शिकवु तुले ॥
॥ तिळाचे लाडु तिळ भाजले पिठीचे लाडु तुपातले,
बुंदीचे लाडु जवात केले, भगर साबुदाना फराळाले ।
जेव हरी कृष्णा, पोहे दुधाने भिजवले ॥
॥ वनस्पतीची करून पत्राळी, बोल भिम्मा देतो आरोळी ।
ब्राम्हण राया केला जवळ ।
जेव हरी कृष्णा हट करीता झाला रोड ॥

॥ नव गंगाळी, पाणी सारून, । माया-प्रितीचं, त्याहीला सिंहासनं ।
त्याहीला सिंहासन, उठ हरी । सोळा सहस्त्रं आल्या नार ॥
उठ बापा, यादव भक्त । आले हो पांडवं ।
आले च्छान्नव कुळीचे राजे । तुमच्या मामाची, आवडं ।
हरी हरी कृष्णा, हट करीता गा । झाला रोडं ॥ ४० ॥

## -: निरसन :-

या शिदोरीचे निरसन पुरूषापेक्षा स्त्रिया चांगले रितीने करू शकते. कारण की : त्यांना पाककलेचे बरेच ज्ञान असते. म्हणुनच आम्ही चतुर्पती पंथाच्या गृहिनींना आवाहन करतो की : वैदभिय पुरातन पाककलेंच्या ईतिहासाची जपवणुक करण्यासाठी वैदर्भियन स्त्रियांनी पुढे यावे. आणी या ओवीत सांगीतलेल्या वैदर्भियन भाज्या व पालेभाज्या, रानभाज्या चे प्रकार, शेंगाचे प्रकार, वरण व भाताचे प्रकार, तेलाचे प्रकार, पाणगे मांडया भाकरी पोळी चे प्रकार, पु-यांचे प्रकार, खिरांचे प्रकार, वडयाचे प्रकार, कढी व क्षाराचे प्रकार, लाहयांचे प्रकार, लोणच्याचे प्रकार, पापड सरगुंडे ..ईत्यादी विविध प्रकारचे पुरातण वैदर्भियन पदार्थ कसे बनवायचे ? याची सचित्र कृति, सचित्र फळांचे व फराळाचे प्रकार, पक्वान्न चे प्रकार व कृति, ...ईत्यादी या ओवीत दिलेल्या सर्व पुरातन विदर्भियन पाककला कश्या बनवायच्या ? ईत्यादी चे संचित्र निरसन जर या ओवीत दिलेल्या संपुर्ण पदार्थांचे केले, तर कदाचित 'चतुर्पती कृष्ण अवधुत शिदोरी ची पाककलांचे संपुर्ण ज्ञान' या नावाचे अंदाजे १५० ते २५० पानाचे एक संपुर्ण मोठी गाथा/ग्रंथ तयार होवु शकते. हे काम कोण्या एका स्त्रीकडुन शक्य होत नसेल, तर हे काम करण्यास ईच्छुक असलेल्या स्त्रीयांनी एकत्र येवुन, आप आपल्या भागाचे गट पाडुन हे काम गटागटाने हाती घेवुन पुर्ण करावे. चतुर्पतीचे खेत्री तुम्हास जे वेळोवेळा साहय लागेल. ते साहय करण्यास नित उभे राहील. हे निश्चित जाणा.

**उदाहरणार्थ :-**

॥ चतुर्पता अथर्वन् वेद ॥
**॥ खंड ०६/११ चरण कमांक-०५ ॥**

## ॥ कृष्ण अवधुताची शिदोरी ॥

॥ पक्वान्न/पदार्थाचे नाव ॥
॥ ज्वारीच्या **खारवडया** ॥

भाजी अथवा फळाचे किंवा पक्वान्न पदार्थाचे, कृतिचे चित्र/फोटो

**साहीत्य** :- ज्वारीचे रवाळ पिठ, जिरे, तिळ, तिखट, मिठ आणी चिमटभर खायचा सोडा-ऐच्छीक

**कृति** :- ज्वारीचे रवाळ पिठ रात्री भिजु घालावे. काहीजन ताकात भिजु घालतात. सकाळी ते भज्याच्या पिठाईतके पातळ करावे. आणी चुलीवर गरम करण्यास ठेवुन त्यात तिळ तिखट, मिठ, जिरे खायचा सोडा टाकावे. वटया टाकता येईन तितके मिश्रण घट्ट होईपर्यत शिजु दयावे. मिश्रण कोमट असता छोटया छोटया वडया टाकावे. व उन्हात वाळु घालावे.

**खायचे कसे ?** :- तेल मिठ लावुन कच्च्या अथवा तेलात तळुन खाता येतात..



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥





॥ खंड ०६ ॥

॥ ओवी नं. १२ ॥

ओवी महात्म :- पोळा सणांच्या दिवशी, दिवस पलटण्याच्या समयास, संधिकाळात, नव्या कार्यआरंभाच्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी...

॥ निरसनसह मुळावरची ओवी ॥

## ॥ शुन्याकाराची ओवी ॥

वरभजनं :- ॥ परमेश्वरी पोळा गावतो । तोरणा खाली नवरा पाहयजो ॥

॥ ऋषि म्हणे शुन्याकार । होईन गा पृथ्वा ॥ घृ-०१ ॥
॥ परमेश्वरी पुंजन पोळा । तोरणा खाली उभा नवरा ।
कृष्ण म्हणे मी, परमय शक्ती । तेव्हाच पलटंन गुढां ॥०१॥
॥ काडी-मुडीचे व-हाडी देवता । त्यामध्ये श्रीकृष्ण होता ।
रुक्मिणी म्हणे, परमय शक्ती । त्याची कोणती सत्ता ? ॥
॥ ज्याची होती सत्ता । तो तेव्हाच उभा झाला ।
रुक्मिणीला दृष्टांत पडले । म्हणे विचार नाही बरा ॥
॥ रुक्मिणी पुसे, श्री कृष्णाला । हे काय होय ? सांगा मजला ।
कृष्ण म्हणे ऐक रुक्मिणा । सकाळी सांगीन तुला ॥ ०४ ॥

॥ सकाळी सांगु केलं कृष्णा । ते आता सांगा मजला ।
आजच होईक होणार आहे । गंगेत दावीन तुला ॥
॥ कृष्ण म्हणे, मानव बेटा । त्यानं तेव्हाच विचार केला ।
किंवा जळगाव :- ॥ मारू म्हणे कृष्ण बेटा । तेव्हाच विचार केला ॥
प्रातःकाळी गडी बोलावले । चला म्हणे/जावु आंघोळीला ॥०६॥
भजनें :-
॥ कृष्ण आंघोळीला निघाले । संग बाळ गोपाळ घेतले ॥
॥ कृष्ण आंघोळीला निघाले । संग रुक्मिणीला घेतले ॥
॥ कृष्ण आंघोळीशी जाता । संध्या कलंकीची आली ।
रुक्मिणीला दृष्टांत पडले । कळचं उभी झाली ॥
॥ कृष्ण म्हणे, ऐक रुक्मिणी । मीच उभा आहो तिरभवना ।
माझ्या वाचुन आणीक दुसरा । नाही कोणी जाणा ॥०८॥

॥ आकाशी/स्वर्गी आहयं पाताळी आहयं । भरून आहे सुर्या ।
कृष्णा ! याच वेळी, ऐसाच होय । सेरुप दाव मजला ॥
भजनें :- ॥ कलंकी होता, तो अवघा झाला शंक ।
निशंःकलंकी उभा राहुन । दावे/दावन कौतुक ॥
॥ निशंःकलंकी उभा राहीन । तो दाखवन कौतुक ॥
निष्कंलकी उभा राहुन । मोडन कलंक ॥ १० ॥
॥ एवढाच उपाय होत नाही । कृष्ण तेव्हाच चकित झाला ।
कलंकीची कळ लागता । कृष्णचं गुप्त झाला ॥
॥ कृष्ण अवतार राज पांडव बादशाही । तेही गुप्त झाले ।
कली मध्ये द्युत उतरले/अवतरले । अवघ्याशी खर्चि दिले॥१२॥

॥ ऋषि मुनी शुन्याकार । होईन अवघी पृथ्वा ॥घृ-०२॥
॥ आधी ऋषि मग मुनी । होईन अवघी पृथ्वा
संसाराची सोय गडेहो । नाही राहणार कोणा ॥

॥ सकस संसारी, अन्न आहारी । हेही जातीनं सारे ।
साहंकारी पोहना अधारी । धनी उभा यवगाले ॥
किंवाः– ।। अन्न पाण्याचे आधार त्याहीला । ते जातीन सकस
साहंकारी पोहना अधारी । ते नांदन ईथ ।। ..जळगाव
॥ इत्तेवार होय विष्णुचा । विशंक/विषय मोडुन, ऋषि आला ।
त्याच दिवशी पाया गडे हो । निरंजना चा बसला ॥१६॥
॥ कली होता, तो गतकली झाला । गलीत पात्र झाले सारे ।
या पत्रिकेची खोज गडेहो । नाही लागलां कोणाले ॥
किंवा :– या पत्रकीचा शोध नाही । लागला जना/कोणा ।।..जळगाव

**भजने :-**

॥ परमेश्वरी पोळा गावला । ऐक निरंजनी ।
तोरणा खाली बैल गेला । कोण त्याची नवरी ? ॥
॥ देवाचां शकुन सांगते खरी । कोण होय बैलाची नवरी ? ।
अठरा खुम्मी धान्य घरी । ती होय बैलाची नवरी ॥

## ॥ निरसनसह शुन्याकाराची ओवी ॥

### ॥ शब्दार्थ/चरणार्थ व निरसन ॥

**शुन्याकार :-** काहीच शिल्लक राहणार नाही. सर्वकाही शुन्य होईल.

**गुढा :-** गुढीपाडव्यात उभारण्यात येणारी गुढी. जुनी सत्तापलट होवुन नवी सत्ता स्थापन करण्याची खुण म्हणजे ही गुंढी आहे. ईथे व्दापर यवगाची सत्ता पलट/बदल होवुन कलीची नवी सत्ता स्थापण्याची, यवगाची पालटाची /बदलण्याची खुण ला गुढी या शब्दाने संबोधिले आहे.

**परं/परम्ं :-** सर्वोत्कृष्ठ, । **परंपार :-** सर्वोत्कृष्ठ च्याही पलीकडे...

**परमय शक्ती.. :-** परं परम् सत्व रज तम सह सर्व शक्तीला जागृत करून त्या शक्तींना तेज देणारी परंपार असलेली व परमळ/सुगंध/सुवासाप्रमाणे दरवळणारी/पसरणारी परमात्माची ही परमय शक्ती जीच्यात सदैव परमात्मा चा वास राहते.

ही निराकार निश्कलंकी आदीपुरूष परमात्माची परमय ज्योर्तिमय शक्ती कधीच एका देहीत सम्मावु शकत नाही. म्हणुन ती पुण्यात्म्यात अंश, अंशात.. अवतार घेवुन एक एका देहीत वास करत त्या देहीस परमय पदा पर्यंत घेवुन जाते. उदाहरणार्थ :- पुण्यात्मा संत तुकाराम महाराज यांच्या देहीत ही परमय शक्ती वास करत असल्यामुळे ते मल-मुत्र विसर्जन..ईत्यादी देहकर्म करत असतांनी सुध्दा परमात्म्याच्या नाम ज्योती च्या परमयात राहत त्यांच्या मुखातुन नाम निघत राहत होते. अंती ते परमय पदा गेले.

जेव्हा जेव्हा परमात्म्याचे चर्तुव्युह रूप रंचनेत अवतरण होते, तेव्हा तेव्हा ही परमय शक्ती संचारत असते. आणी आदीपुरूष परमात्माच्या चतुव्युहरूपासह या चतुर्व्युहरूप रंचने च्या अवतरण कालावधीत विविध ठिकाणी स्थित असलेल्या सत् देहींच्या ज्योती उजाळत राहते. त्या त्या सत्देहीच्या ज्योतीमध्ये ही परमय शक्ती खेळत, त्या एका देहीला संपुर्ण उजाळुन त्या उजळलेल्या देहीपासुन दुस-या सत् देहीच्या ज्योतीला ज्योत मिळवत त्या दुस-या सत् देहीलाही उजाळते. दुस-या देहीतुन तिस-या देहीला, तिस-या देहीतुन चौथ्या देहीला... असे अनेक सत् भक्त योगी गणांच्या देहाला त्या ठरावीक समयकालात झपाटत राहते. देहीला झपाटत त्या त्या देहीच्या ज्योतीला ज्योत मिळवत देहज्योती उजाळत सुगंधाप्रमाणे पसरत हरी नामाचा परमय सोडत खेळत राहते. परमात्मा अवतरण कालावधीत व या अवतरण कालावधीच्या पुढे मागे जन्मा आलेल्या सत् भक्त योगीच्या देहीला ही परमात्माची परमय शक्ती उजाळत अनेक देहा उजाळत राहते. या परमय शक्तीव्दारे उजळलेल्या देहीची सुगंधाप्रमाणे पसरणारी परमय/ परिमल, ती देही असो या नसो, तरी त्या उजळलेल्या देहीचा किर्तिरूपी अक्षय सुगंध परमात्म्या ची ही अक्षय परमय शक्ती युगान युगा दरवळत ठेवते. .

जेव्हा जेव्हा ही आदीपुरूषाची परमय शक्ती अवतरत असते, तेव्हा तेव्हा या शक्तीव्दारे आत्मज्योत उजळण्याकरीता, या परमय शक्तीचा संग लाभ होण्यासाठी आणीक बहु कारणासाठी अनेक दिव्य विभुतिया, जाणते, महात्मे, भक्त, योगी, सिध्दगण, सह देवतागण अवतारदिक व ईतर परमात्म्याच्या शक्तीयॉं, सिध्दियॉं..ईत्यादी परमात्मा संग अवतरत असतात. आदीपुरूष परमात्माच्या चतुव्युहरूप रंचनेचे अधिक ग्यान कृष्णामृत मधुन घ्यावे.

**दृष्टांत** :- प्रत्यक्षात घडणारी घटनांच्या आधीच प्राप्त झालेल्या खुणा अथवा संपुर्ण घटनाक्रम त्या होणा-या घटना घडण्याच्या अगोदरच दृष्टिपटलावर दिसने. ।
**सकस** :- समस्त, सर्व । **होळीक/होईक** :- होणार आहे, होणारी घटना होणार आहे, पुढे घडणारी घटना घडणार आहे. । **दावीन** :- दाखविन, दृष्टीस दिसेल. । **संध्या** :- संधिकाळ । **मुनी** = मौनी, मौन व्रत धारण करून चुप्पी मारून बसलेला ।

**कलंकी होता, तो अवघा झाला शंक...** :- जिवन जगतांनी व युध्दाव्दारे जे दोष-पातकाचे कलंक लागलेत ते सर्व कलंक धुवुन, तो सपुर्णपणे शंक म्हणजेच निश्कलंकी झाला. । **शंक** = पवित्र, पाक, अतीशुध्द, निशं:कलंकी. ।
**विशंक** = अपवित्र, कलंकी. शुध्द नसलेला. कलंक असलेला.
**गलीत** :- दुषित । **गलीत पात्र** :- नदिचे पात्र जसे दुषीत होते त्या प्रमाणे या कलीव्दारे सर्व दुषित कलंकीत होणे.

## -: निरसन :-

॥ परमेश्वरी पुंजन पोळा । तोरणा खाली उभा नवरा ।
कृष्ण म्हणे मी, परमय शक्ती । तेव्हाच पलटंन गुढां ॥०१॥

कृष्ण परमेश्वराने चतुव्युहरूपांची रंचना करून पुर्ण अवतार घेतला. आणी या पुर्ण अवताराचे पुंजन करण्यासाठी त्याचे पुर्विचे संवंगडी, सखे, जाणते योगी भक्त जन, देणं व वर मिळवणारे सह देवगण, शक्तीगण या पृथ्वीतलावर अवतार घेवुन अवतिर्ण झालेत. यांच्या अश्या एका मागुन एक अवतीर्ण होवुन परिपुर्णतम पुर्ण अवताराच्या दोरीत स्वत:ला बांधुन, तोरणाप्रमाणे हे सर्व अवतार या कृष्ण परमेश्वरी पोळयाची शोभा वाढवु लागलेत. जसा बैलाला पोळयाच्या सणां च्या दिवशी तोरणा खाली बैल उभा करून त्याचे पुंजन केल्या जाते, तसे या परमेश्वरी पुजन पोळयाच्या तोरणा खाली तो कृष्ण अवतार उभा होता. त्या परमेश्वरी पोळयात कृष्णाचेच पुंजन सर्व जन करत होते. अश्या रितीने कृष्णा भोवती भिड/गर्दि करत या परमेश्वराचे पुजन करण्याचा चतुर्व्युह अवतार रंचनेचा पोळा भरला होता.

जिच्या घरी अठरा खुम्मावर अठरा पुराणात उभा असलेल्या आपल्या नव-याच्या चारवेद, सहाशास्त्रे, अठरापुराण.. ईत्यादीं ची ज्ञान संपत्ती आहे, अशी ती कृष्णाची नवरी रूक्मिणी सुध्दा त्या पोळयात पतीपुंजन करत उभी होती. तिला उद्देशुन कृष्ण म्हणे की : जेव्हा ही परमय शक्ती म्हणन, तेव्हाच या व्दापर यवगाचे पलट होईन. यवगाची गुढी पलटुनी नव्या यवगाची गुढी उभारल्या जाईल.

॥ काडी-मुडीचे व-हाडी देवता । त्यामध्ये श्रीकृष्ण होता ।
रूक्मिणी म्हणे, परमय शक्ती । त्याची कोणती सत्ता ? ॥

काडी मुडीचे ग्रामदेवता चे पुंजन जे व-हाडी करत होते, त्यामध्ये सुध्दा तोच श्रीकृष्ण उभा होता. त्या व-हाडची अठरा खुम्मी धान्य घरी असलेली म्हणजेच अठरा पुराणाचे ग्यान संपत्ती घरी असलेली रूक्मिणी आपल्या अठरा खुम्माच्या वर उभ्या असलेल्या पतीदेव कृष्ण रायास म्हणे की : तुम्ही जी परमय शक्ती म्हणता, तिची अशी कोणती सत्ता आहे ?

॥ ज्याची होती सत्ता । तो तेव्हाच उभा झाला ।
रुक्मिणीला दृष्टांत पडले । म्हणे विचार नाही बरा ॥

रुक्मिणीने कृष्णास असे पुसता क्षणीच, ज्याची ती परमय शक्ती होती तो कृष्ण तेव्हाच उभा झाला. आणी रुक्मिणीला होणा-या घटनांचे दृष्टांत दाखवले. या दृष्टांतातील खुणा बघुन रुक्मिणीला चाहुल लागली की, आपण जो विचार केला होता : या कृष्णाची परमयशक्ती ची कोणती सत्ता आहे ? हा विचार नाही बरा !. हा कृष्णच दहाही अवतारी खेळ खेळणारा माझा धनी आहे. आता हा नवाच खेळ हा उभा करणार आहे. म्हणुन रुक्मिणी कृष्णास आतुरतेने पुसे की : हा काय खेळ होणार ? सांगा हो मजला !

॥ रुक्मिणी पुसे श्रीकृष्णाला । हे काय होय ? सांगा मजला ।
कृष्ण म्हणे : ऐक रुक्मिणा । सकाळी सांगीन तुला ॥ ०४ ॥

कृष्ण आता कोणता खेळ करणार ? याचे ज्ञान घेण्याच्या उत्सुकते पोटी रुक्मिणी पुसे त्या कृष्णाला की : जे काय तुम्ही दृष्टांत दाखवुन खुणा दाखवल्यात, ते काय होय ? ते सांगा मजला हो आता !. तेव्हा कृष्ण उत्तरादाखल म्हणाले की : उदयाच तुला दिसलेले दृष्टाताची घटणा घडणार आहे. दृष्टांताप्रमाणे होणारी घटना उदया सकाळी होणार आहे. म्हणुन उदयाच होईक होणार असल्यामुळे, उदया सकाळी तुला या खुणांचे सर्वज्ञान सांगेल.

॥ सकाळी सांगु केलं कृष्णा । ते आता सांगावं मजला ।
आजच होईक होणार आहे ! गंगेत दावीन तुला ॥

दुस-या दिवशी सकाळी सकाळी पुन्हा रुक्मिणीने कृष्णाकडे गळ घातली की : हे कृष्णनाथ ! आज सकाळी तुम्ही काल रात्री मला दिसलेल्या दृष्टांताच्या खुणगाठी चे अर्थज्ञान सांगु केले होते. आता ते सांगाव मजला ! तेव्हा कृष्ण रुक्मिणीला म्हणाले की : हो आजच सकाळी सकाळी होणारी घटना म्हणजे होईक होणार आहे. आता मी तुजला ते आजचं होईक नुसतेचं कोरडे न सागंता ते गंगेत प्रत्यक्ष्य दाखविणार !. चला गंगेत आंघोळीला !

॥ कृष्ण म्हणे, मानव बेटा । त्यानं तेव्हाच विचार केला ।
प्रातःकाळी गडी बोलावले । चला म्हणे/जावु आंघोळीला ॥ ०६ ॥
भजनें:- ॥ कृष्ण आंघोळीला निघाले । संग बाळ गोपाळ घेतले ॥
॥ कृष्ण आंघोळीला निघाले । संग रुक्मिणीला घेतले ॥

कृष्णाने होणारे होईक गंगेत दावन तुजला असे रुक्मिणीला म्हणता क्षणीच त्यांनी विचार केला की : आपल्या सवंगडयांना सुध्दा रुक्मिणी संग हे होईक दाखवण्यास घेवुन जावे. आणी त्यांनी त्यांच्या संग अवतिर्ण झालेल्या मानव रुपी सवंगडी व कृष्णसंग अवतार घेतलेल्या पाचही पांडव बादशाह ला त्या प्रातःकाळी निरोप पाठवुन ताबोडतोब आंघोळीकरीता बोलावून घेतले. आणी रुक्मिणी सह आपल्या बाळ गोपाळ सवंगडी सखे व पांडव बादशाही यांना संग घेवुन, कृष्णाचा तो रमणा गंगेवर आंघोळीस निघाला. कृष्णासह ते सर्व जन गंगेवर आलेत.

॥ कृष्ण आंघोळीशी जाता । संध्या कलंकीची आली ।
रुक्मिणीला दृष्टांत पडले । कळचं उभी झाली ॥

कृष्ण आपल्या रमण्यासह आंधोळीस गंगेवर जाता, कलंकीची संध्या आली म्हणजेच पहाटेच्या संधिकाळ ची वेळ झाली. जसा संधिकाळ लागला तसाच रुक्मिणीला पुन्हा दृष्टांत दिसले की : या संधिकाळची कलंकी कळच उभी राहीली आहे.

॥ कृष्ण म्हणे, ऐक रुक्मिणी । मीच उभा आहो तिरभवना ।
माझ्या वाचुन आणीक दुसरा । नाही कोणी जाणा ॥०८॥

कृष्णाने जाणले की : रुक्मिणीला कलंकी संध्या ची दृष्टांत दिसुन त्याव्दारे होईक ची चाहुल लागुन ती कासाविस झालेली आहे. तीचे मन चलबिचल होवुन ती दुःखी झालेली आहे. असे जाणत्या कृष्णाने जाणल्या नंतर कृष्ण रुक्मिणीला म्हणाले की : ऐक रुक्मिणी ! जे काही आहे ते मीच आहे. माझे वाचुन आणीक दुसरा कोणी नाही जाण !. मीच सर्वत्राचा सर्व खेळ खेळणारा, सर्वत्रांचे सुत्र नाचवणारा कळसुत्रधारी आहे. मीच सर्वत्र भरून भरला आणीक उरलेला आहे...ईत्यादी ग्यान कृष्णाने रुक्मिणीस दिले.

॥ आकाशी आहयं पाताळी आहयं । भरून आहे सर्व सुर्या ।
कृष्णा ! याच वेळी, ऐसाच होय । सेरुप दावा मजला ॥

तेव्हा रुक्मिणी कृष्णास उद्देशुन म्हणाली की : तुच आकाशी आहये, पाताळी आहे. सानीध्य भरून भरला आणीक उरला आहे सर्व्या सुर्याला ! सर्व्या जनाला कळसुत्रांच्या बाहुल्याप्रमाणे खेळवणारा तुच कळसुत्राचा मालक आहे. तर मग याच वेळी तुम्ही ऐसेच बोलल्या प्रमाणे होवुन, आता याच वेळी ऐसेच होवुन तुमचे सेरुप दाखवा हो मजला !

भजनें :-

।। कलंकी होता, तो अवघा झाला शंक । निशंःकलंकी उभा राहुन, दावे/दावन कौतुक ।।
।। कलंकी होता, तो अवघा झाला शंक । निशंःकलंकी उभा राहीन, तो उडवन कलंक ।।
।। कलंकी होता, तो अवघा झाला शंक । अवतार उभा राहीन, मोडन अवघा कलंक ।।

जिवन जगतांनी व युध्दाव्दारे जे दोष-पातकाचे कलंक लागलेत, ते सर्व कलंक धुवुन सपुर्णपणे शंक म्हणजेच निश्कलंकी होण्यासाठी कृष्ण गंगेच्या पात्रात उतरला. आणी रुक्मिणीचे मन रमण्याकरीता व पुढे होणा-या होईकाच्या खुणगाठा दाखवण्याकरीता, कलंकीची संध्या चा कलंक मोडुन त्याने गंगेत डुबकी मारली. सर्व कलंक धुण्याकरीता गंगेत डुबकी मारून सर्व कलंक धुवुन तो पुर्णत शंक म्हणजेच निश्कलंकी बनुन कृष्णा गंगेच्या पात्रात उभा राहीला. आणी रुक्मिणीला उद्देशुन म्हणाला की : जसा मी या गंगेच्या पात्रात निश्कलंकी होवुन उभा राहुन तुजला कौतुक दाखवत आहे, तसाच हा निश्कलंकी कृष्णा पुढे येणा-या यवगात उभा राहुन तुला कौतुक दाखवन. पुढे हा निश्कलंकी अवतार कलीसंधीत गुप्तपणे उभा राहीन. आणी या कलीचा अवघा कलंक मोडण /उडवन. या कलीचे ठिकाण उडवन..ईत्यादी रुक्मिणी समोर कृष्ण वदला !

॥ एवढाच उपाय होत नाही । कृष्ण तेव्हाच चकित झाला ।
कलंकीची कळ लागता । कृष्णचं गुप्त झाला ॥ ११ ॥

रुक्मिणीने जे सेरुप दावा मजला म्हणुन मागणी मागीतली होते. त्या मागणी ची पुर्तता करण्यासाठी, या कृष्णाने तर मला गंगेत डुबकी मारून ऐसा हा निश्कलंकी यवगा यवगा उभा आहे. उभा राहणार आहे. असे म्हणत मजला फक्त त्यांचे निश्कलंकी रुप दाखवले आहे. रुक्मिणीने विचार केली की : या कृष्णाने अर्जुनाला दाखवल्या प्रमाणे आकाशी आहे. पाताळी आहे. भरून भरला आणीक उरला आहे सर्व्या सुर्या ! असे सेरुप मजला नाही दाखवले. म्हणुन रुक्मिणी कृष्णास पुनश्चः विनवणीपुर्वक म्हणाली की : ऐवढेच एक निश्कलंकी रुप दाखवुन उपाय होत नाही कृष्णा ! मजला तुमचे सेरुप दावा हो कृष्णा ! तेव्हा तिची ज्ञानमय विनवणी पुर्वक हट्ट ऐकुन, चार वेद, सहा शास्त्रे अठरा पुराणाचे/खुम्माचें ग्यान असलेल्या तिच्या बुध्दिचातुर्या कडे पाहत कृष्ण चकीत झाला. कृष्ण चकीत अवस्थेत असतांना कलंकीने आपली संधी साधली. कलीच्या त्या कलंकी संधी ची कळ लागताच, निश्कलंकी कृष्ण

तिथेच गायपाचा खेळ करून निराकार निर्गुण निरंजन ज्योर्तिमय अवस्थेत जावुन, त्यां सर्वाच्या दृष्टी देखत गुप्त झाला.

॥ कृष्ण अवतारी राज पांडव बादशाही । तेही गुप्त झाले ।
कली मध्ये द्युत उतरले । अवघ्याशी खर्चि दिले ॥१२॥

कृष्ण आपल्या दृष्टी देखत गुप्त झालेला पाहुन, रूक्मिणी सह त्यांचे बाळ गोपाळ सवगडी, कृष्णाचा संग घेण्यासाठी अवतिर्ण झालेले अवतारी जन व पाचही पांडव बादशाही या सर्व्याजनांनी कृष्णाचा संग करण्यासाठी, त्यांनीही तिथे गायपाचा खेळ उभारला. आणी या गायपाच्या खेळाव्दारे ते सर्वजन निरंजन ज्योर्तिमय अवस्थेत जावुन, गंगेतिरी गुप्त झालेत.

अश्या रितीने त्या व्दापरच्या पहाटेच्या संधिकाळी कृष्ण अवतारी पांडव बादशाही सह सर्व कृष्ण सवंगडी व सखे हे गायपाचा खेळ करून गुप्त झालेत. आणी कली मध्ये ते गुप्त झालेले सर्व जन द्युत बनुन उतरले अवतरलेत ! म्हणजेच कृष्ण अवतारी व पाडंव बादशाही सह कृष्णाचे सर्व सच्चे सवंगडी भक्तजन कृष्णासंग जे गुप्त झाले होते, ते सर्व या कृष्णासह कलीमध्ये मिर्तलोकच्या चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाचे भुम्मेवर द्युत बनुन अवतिर्ण झालेत. आणी कलीपासुन पिडलेल्या अवघ्या सच्चे भक्तजनां चे पिडा रोग विघ्न दुर करून, त्याच्या मधुन कलीचे ठिकाणे उडवुन, त्यांना कलीने दिलेल्या पिडा दुःखे च्या मोबल्यात सर्वकाही श्रीकृष्णा सह या द्युतांनी कलीत खर्चि भरून दिलेत. अवघ्या सच्च्या जनास त्यांचे देणं सहजच मिळवुन दिला. कलीपासुन पिडुन येथे येणा-यां सर्व जनाचे रोग-विघ्न, संकष्टे-आरीष्टे, दुखःदर्द उडवुन त्यांचा खर्च भरून दिलात. श्रीकृष्णा ने येथे उभे राहुन त्याच्या समोर उभे राहणा-या अवघ्यांचे उसने फेडलेत. या श्री कृष्णाजी पासुन कोणीही खाली हात वापस गेला नाही. या श्री कृष्णाजी नेच या चतुर्पती ची दंवंडी प्रमाणे वाणी सांगीतली...चतुर्पता अथर्वन् वेद सच्च्या भक्तांच्या हाती दिला. तो नाही चुकला तिरलोक्याशी !

॥ आधी ऋषि मग मुनी । होईन अवघी पृथ्वा
संसाराची सोय गडेहो । नाही राहणार कोणा ॥ १३ ॥
॥ अन्न पाण्याचे आहार त्याहीले । जातीनं सकस सारे ।
साहंकारी पोहना अधारी । धनी उभा यवगाले ॥ १४ ॥

कृष्णा मुखच्या या चतुर्पता अथर्वन् वेदात, त्या कृष्णाने सांगी करून ठेवलेली आहे की : या कलीच्या अंताच्या आधी ऋषि मग मुनी होईन अवघी पृथ्वा ! संसाराची सोय गडेहो । नाही राहणार कोणा जनलोकास. कारण की : सर्व संसाराचे आधार जातीन. त्यामुळे सकस संसारी व अन्नाच्या आधारावर जगणारे अन्न आहारी, हेही त्यांचा अन्नाचा आधार गेल्याने निराकार निर्गुण निरंजन ज्योर्तिमय अवस्थेत विलीन होण्याकरीता कृष्णा कडे येतीनं सारे !. तेव्हा मग तो साहंकारी पवनाधारी धनीयाही यवगाले उभा राहीन. ..ईत्यादी प्रकारचे कित्येक भक्ती त्यांनी येथे सांगुन ठेवलेले आहेत.

॥ इत्तेवार होय विष्णुचा । विशंक/विषय मोडुन ऋषि आला ।
त्याच दिवशी पाया ग्रडेहो । निरंजनाचा बसला ॥ १५ ॥

इत्तेवार होय विष्णुचा :-

॥ कलीचा प्रारंभ जाण । भाद्रपद मास पक्ष कृष्ण ।
त्रयोदशी रविवार दिन । तै जाहला असे ॥ मुळस्तंभ अ-१७/०३.

कलीचा प्रारंभ रविवार या विष्णुच्या दिवसा पासुन झाला. याच दिवसा पासुन जो कृष्ण निरंजन निश्कलंकी ज्योत स्वरूपी ऋषि बनला. त्या निरंजन निश्कलंकी ज्योतीला भजण्याचा चंतुर्पती कृष्ण अवधुत पंथाचा पाया अकाशमात मध्ये निरंजन स्वरूपी असलेल्या कृष्ण योगीजन, सखेजन, व सच्चे भक्तजन

सवंगडी.. ईत्यादी व्दारे स्थापल्या गेला. याच दिवशी पाया गडे हो ! या निरंजना चा बसला ! तेव्हापासुन अकाशमात मधील या पंथाच्या ज्या ज्या योग्यांनी या भुतलावर अवतिर्ण होवुन, निराकार निश्कलंकी ज्योतिर्मय निरंजना चा प्रसार प्रचार केला, ते सर्व या अकाशमात मधील निरंजन चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाचे योगी होय. त्या सर्व योगी च्या पुढे असलेला एक अनामीक योगी येथे कलीचा विशंक मोडुन ऋषि बनुन आला.

विशंक मोडुन ऋषि आला :-

कलीमधली अपवित्रता मोडुन, विषय वासनाचे कलंक मोडुन निश्कलंकी बनुन, तो कृष्ण ऋषी बनुन कलीच्या संधिकाळात आला आहे. कृष्ण देहघरी तो उभा झाला आहे. सावंग्यात उभा हा एक ऋषि ! अवघे तिर्थ आता याहीच्या पायापाशी ! या कलयवगाच्या संधिकाळात त्या गुप्त श्री कृष्णाने पुर्ण अवतार घेतला आहे इथे. त्याच्या संग गुप्त झालेल्या सर्व निरंजन ऋषि ने या चतुर्पता कृष्ण अवधुत पंथाच्या भुम्मेवर द्युत बनुन अवतार घेतले आहे. घेत आहेत. घेणार आहेत. म्हणुनच चतुर्पती कृष्ण अवधुताचा पंथ हा निर्गुण निरंजन श्री कृष्ण अवधुत ला भजणारे सच्चे भक्त, योगीजन, जाणत्या सिध्द योगी सिध्द शक्तीयॉ द्युतगण ईत्यादी चा चौथ्या पंथ आहे. असे मानल्या गेले आहे.

॥ कली होता, तो गतकली झाला । गलीत पात्र झाले सारे ।
पत्रिकेची खोज गडेहो । नाही राहली कोणाले ॥ १६ ॥

व्दापरच्या संधिकाळात कलंकीची कळ घेवुन जो कली उतरला, तो कली पुढे गतकली झाला. या कलीच्या प्रभावाने सर्व गलीत पात्र म्हणजेच नदिचे पात्र जसे दुषीत होते त्या प्रमाणे या कलीव्दारे सर्व दुषित कलंकीत झालेत. त्याचमुळे या पत्रिकेची खोज म्हणजेच या सत्याच्या पत्रिकेची खोज, सत्यदेवाचे भजन पुंजनं ध्यान सुमरन गिण्यान गायणा-या चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाचा शोध कोण्या स्वार्थि बहु तमरजगुणी तिरगुणी जनाला ३०० ते ४०० वर्षेपर्यत नाही लागला. आणी पुढेही त्यांना या सत्याच्या पत्रिकेचा खोज नाही लागणार.

कलीच्या संधिकाळात गुप्त कृष्णाने पुर्ण अवतार कुठे घेणार/घेतला ? कुठे चतुर्पता कृष्ण अवधुत पंथ उभा राहीला आहे ? कलीच्या संधिकाळामध्ये कुठे तो श्रीकृष्ण गुप्त रूपात उभा आहे ? कुठे तो श्री कृष्ण गुप्त रूपात उभा राहुन सत्यवगाची मांडणी करत आहे ? कैशी यवगी मांडणा आहे या भैसाची ? याची खबर नाही कोणाशी ! या आदीपुरूष भैसाला ओळखीचे ओळखतीन हो जीव ! याला बहु मानवाचे वाटते भेव ! कारण की : हे स्वार्थि रजतम बहु गुणी तिरगुणी बहु मानव जन हे या चतुर्पतीचे चारही वाणीतुन निघणारे हरीनाम मद्यपान करत घेतीन. ईतर वेदांप्रमाणे या चतुर्पता अथर्वन् वेदाच्या ज्ञानात आपले पोटपाण्याचे सोयीसाठी कर्मकांड पुजापाठ... ईत्यादी तिरगुणी ग्यानाचा शिरकाव करून, या निश्कलंकी कृष्णा मुखच्या चतुर्पता अथर्वन् वेदाचा नाश करू पाहतील. म्हणुनच तो कोणा अश्या ऐ-या-गै-याला ही खबर देणार नाही बर ! अश्यांना सहसा या चतुर्पती जवळ येवु देणार नाही. या चतुर्पती अथर्वन् वेदाच्या निरंजन ज्ञानाकडे फिरकु सुध्दा देणार नाही.

कलीच्या संधिकाळात अवतरलेल्या कृष्णाच्या या गुप्त पुर्ण अवताराचे ज्ञान सहजासहजी कोणा स्वार्थि, दोहीत संभाळणा-या तिरगुणींना मिळणार नाही. अश्या दोहीतांना या चतुर्पती पासुन दुर ठेवण्याची सोय, आधीच या श्री कृष्णाने करून ठेवली आहे. हा श्री कृष्ण आपणहुन सच्चे भक्तजनांच्या देहघरी जावुन, त्यांची बुध्दि प्रचोद्यात करतो. आणी या चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाची निमंत्रण पत्रिका त्यांना देत आहे. त्यां सच्चेजनांना आपणहुन आपल्या हाताशी हात लावत, आपला हात त्यांच्या हाती देत आहे. त्यांना हाती घवुन, या चतुर्पताचे गोत मिळवुन देत आहे.

सर्व सच्चे जनांची धियो/मती/बुध्दि प्रचोद्यात म्हणजेच प्रेरीत करत, त्यांना दवंडी प्रमाणे चतुर्पती अथर्वन् वेदाची वाणी सांगत सुटलेला आहे. म्हणुनच या चतुर्पता कृष्ण अवधुत पंथाच्या भुम्मेवर पुढे मग शुध्द सत्वात वावरलेले सच्चे तिरलोकी जन येवुन भिड घालतीन. या कृष्णाच्या संगतीला भेटी आंगचे सिध्दगण उभे राहतीन. तेव्हा मग अवघे तिरलोक्य जनी येथे गर्दि करतीन. भिड घालतीन. या मिर्तलोकी येथे स्वर्गिचे दैवत, पाताळाचे पालक येतीन. या श्री कृष्णाच्या भेटीसाठी अवघ्याची भिड पडन. कस नाही म्हणावे त्या ओळखीच्या जीवाले ?

चतुर्पतीच्या या सत्याचा शोध कोणा स्वार्थि दोहीत करणारे रजतम बहुगुणी तिरगुणी दोहीत जनांला सहजासहजी लागणार नाही. परंतु तुम्हा हाती हा चतुर्पता अथर्वन् वेद आला. म्हणजेच तुम्हाला कृष्णाची चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाची निमंत्रण पत्रिका मिळाली. सत्याची पत्रीका मिळाली. कारण की :

।। तुमचा होता काहीतरी पुर्विचा दोरा । म्हणुन आले देव राया तुमच्या देहघरा ।।
।। होता पुर्विचा भाग । म्हणुन झाला हा लाभ ।
।। होत पुर्विच संचित । म्हणुन घडली या कृष्णाची संगत ।।
।। आदीपुरुष बोले अहीनाशी, ऐक हकिकत । तुमच आमच होत, पुर्विच नात ।।

म्हणुन ही सत्याची पत्रिका आपणहुन तुम्हा देहघरा येवुन दिली तुमच्या हातातं । ही चतुर्पती ची मौसवाणी दिली तुम्हा हात । मिळवलं हो गोतं । हे तुम्ही जाणा आता निश्चित. ! या शकुनी पत्रिकेचा मान करा हो सदोनित ! तारण तो देही । या कृष्ण महाराजाची महीमा आहे हो मोठी ।



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥






॥ खंड ०६ ॥
॥ ओवी नं. १३ ॥
॥ कृष्ण कथांमृताची निरसनसह जुनी ओवी ॥

## ॥ उष्टेच उष्टे ची ओवी ॥

॥ उष्टेच उष्टे अवघेच उष्टे । हरीनामी शुध्द झाले ।
हरी नामी शुध्द झाले । कौतुक पहा देवाचे ॥घृ॥०१॥
॥ सोनाराने सोन शुध्दिले/चोरले । डाग, पातकी लावले ।
मुळीच नव्हतं उष्ट रे बाप्पा । उष्ट झालं संगतीनं ॥
॥ उष्टा होता वाल्या कोळी । त्याच, दोषावर मनं ।
जिवंत माणसे मारून । सात, राजन भरले पापानं ॥
॥ मारा-मारा म्हणुन वाल्मिकी । तरला उलटया नामानं ।
मुळीच नव्हतं उष्ट रे बाप्पा । उष्ट झालं संगतीनं ॥०४॥

॥ ढिवरीन पोटी व्यास जन्मले । भागवत त्याहीनं कथले ।
उकंडया वरच उष्ट अन्न । शुक देवानं भक्षिले ॥
॥ उष्टे पात्रं दिले घोडीशी । अश्वथामा झाला तीशी ।
गाढविन पोटी गर्गाचारी । जन्मला तपेश्वरी ॥
॥ मृगा पोटी भृग जन्मला । एकशिंग त्याच्या माथ्यावरी ।
गाई पोटी गौतमऋषि । तोही जन्मला तपेश्वरी ॥
॥ अजामेळ होता पुण्यवान । ऐकावे त्याचे पुण्यं ।
उष्टी मातंगीन घरात घातली । पापाशी नाही वाणं ॥०८॥

॥ अजामेळाचे पुर्वज होते । कैलासा, पापाचे पुण्य झालें ।
तेच पुण्यं पाहुन कैलासा । अजामेळाला उध्दारले ।
॥ वाल्मिक-वशिष्ट म्हणे ऋषिचे । शोधु नये कुळं ।
नाले-खोरे गंगेत मिळाले । तेही झाले गंगाजलं ॥१०॥

**भजने** :- ॥ उष्टया पासुन उष्ट जन्मलं । ऐकुन घ्या हकिकतं ।
उष्टया बिना कोणी गडेहो । असेना समर्थ ॥
॥ उष्टया पासुन उष्ट जन्मलं । ऐकुन घ्या वाणी ।
इंद्र-चंद्र गणी-गंधर्व । जन्मले, महा महा मुनी ॥

### ॥ शुकदेव ॥

शुकदेव यांच्या जन्माची कथा अशी आहे की : जेव्हा शंकर एका वृक्षाखाली पार्वतीला अंम्बर बनण्याचे तत्वज्ञान असलेले अमर कथा सांगत होते, तेव्हा ती पार्वती कथा ऐकत हो ! हो ! म्हणता म्हणता झोपी गेली. हे पाहुन त्या वृक्षाच्या डहाक्यावर बसुन ती कथा ऐकत असलेला शुक पक्षि कथा संपुर्ण ऐकुन घेण्याच्या उद्देशाने, पार्वती झोपी गेल्यानंतर हो ! हो ! असे म्हणत शंकराची अमर बनन्याचे तत्वज्ञान असलेली कथा संपुर्ण ऐकुन घेतली. अमर कथा पुर्ण झाल्यावर जेव्हा शंकराला पार्वती झोपलेली दिसली, तेव्हा त्या शंकराने जाणले की : ही संपुर्ण कथा या शुकपक्षाने ऐकुन हाच पार्वती झोपल्यावर हो ! हो ! म्हणत होता. या शुकपक्षानीच अमर तत्वज्ञानाची संपुर्ण कथा ऐकलेली आहे. तेव्हा शंकराने विचार केला की : हे अमर तत्वज्ञान पक्ष्यांकरीता उपयुक्त नाही. त्याचमुळे शंकर हाती त्रिशुल घेवुन त्या शुकाला मारण्यासाठी सरसावले. शुकपक्षी जीवाच्या भितीने तेथुन सरळ पळत पळत व्यासाच्या आश्रमात प्रवेशी झाला.

तेथे त्या पक्ष्याने अत्यंत लहान रूप घेवुन व्यासजीच्या पत्नीच्या मुखाच्या आत प्रवेश केला. शंकराने जेव्हा हे पाहीले, तेव्हा त्यांनी जाणले की : हा शुकपक्षी व्यासपत्नीच्या उदरात गेल्यामुळे तो आता व्यासजीचा पुत्र बनणार. मानव रूप घेवुन तो बाहेर येईन. मानवांकरीता या अमर कथा चे तत्वज्ञान उपयुक्त असल्यामुळे, आता शुकाला मारण्याचे प्रायोजन राहीले नाही. ऐसा विचार करून शंकराने शुकपक्ष्याला जीवदान दिलेत. आणी तेथुन निघुन गेलेत.

पुढेमग शुकदेव सोळा वर्षेपर्यत मातेच्या उदरात राहीलेत. व्यासजीने बाहेर येण्यास विचारल्यास, ते तेथुनच शंकराव्दारे ऐकलेल्या अमर तत्वज्ञानाच्या आधारावर म्हणत होते की : बाहेर आल्याने तिरगुणी मायेचा प्रभाव पडतो. शुकाला उदराबाहेर येण्याकरीता सोळा वर्षे व्यासाने वारंवार विनवल्यानंतर सतराव्या वर्षि शुकदेव मायेच्या उदराबाहेर आलेत. आणी सरळ जंगलाकडे प्रस्थान केलेत. उकंडयावरचे उष्टे अन्न भक्षण करत तो विरक्त शुकदेव परमात्माची परंम भक्ती करू लागलात. चौथ्याची परंम भक्ती करत आहे. असे हे महापुरूष श्रीशुकदेवजी शंकराच्या अमर कथा च्या अमर तत्वज्ञाना व्दारे अमर बनुन अवधुत वेषात हिंडत आहे. निराकार निर्गुण निरंजन अवधुत ज्ञानाचे साक्षात स्वरूप बनुन आजही त्यांच्याजवळचे शंकरमुखचे अमर बनन्याचे तत्वज्ञान त्रिगुणातीत सच्च्या भक्ताला देत आहे. ते अंम्बर तत्वज्ञान असलेले त्रिगुणाच्या पलीकडचे ज्ञान सच्च्या भक्त योगी जनांला पाजत पाजत हा अवधुत सर्वत्र घुमत आहे. असे हे शुकदेव अवधुत ज्ञान देतात की :

॥ जितने साधन और ज्ञान हे । भक्ती सभीका फल महान है ।
स्वप्न समान जगत सब जानो । 'जगमे सुख है' यह भ्रम मानो ॥
॥ जब जग भोग विराग जागता । जब जग-सुखसे चित्त भागता ।
तब यथार्थ ज्ञान है होता । खुलता तभी शांन्तिका स्त्रोता ।
ज्ञान उदार प्रेम बन जाता । तब प्रिय नंदनॅदन मिल जाता ॥

जेव्हा जग भोग विराग पासुन जागते. जगात सुख आहे. हा भ्रम मानुन जग सुखाच्या आसक्ती पासुन आपले चित्त दुर करते, तेव्हा यथार्थ ज्ञान होते. तेव्हाच खुलते शक्तीचे स्त्रोत् आणी ज्ञान उदार प्रेम बनते व प्रिय नंदनॅदन कृष्ण ची भेट होते.

## ॥ व्यास ॥

महर्षि पाराशर व सत्यवती चे पुत्र असलेले व्यास हे व्दापरयुगाच्या अंतिम भागात ढिवरीन पोटी प्रकट झाला. या जाणत्या परंम् ज्ञानी पुराणपुरूषाने आपल्या सर्वज्ञ दुरदृष्टीने जाणले की : पुढे येणा-या कलयवगात मानवांची शारीरीक शक्ती, बुध्दिमती सह वेद धारण करण्याची शक्ती घटत घटत जावुन कमजोर होणार आहे. त्याचमुळे आवाजी अध्ययन करने त्यांना संभव नाही. या कारणास्तव त्यांनी तिन वेदांचे चार विभाग करून ठेवलेत. चौथ्या विभागात चौथ्या वेदाच्या भागाची फक्त वेद प्रेवेशीकाच त्यांच्याजवळ असल्यामुळे, तीचेही त्यांनी लिखाण करून चौथा वेद गुप्त आहे असे प्रसारीत केलेत. तिन वेदांवर आधारीत १८ पुराणे यांची रंचना केलीत. वेंदान्तदर्शन ची रंचना केली. या व्यतीरिक्त त्यांनी कृष्णच्या मुखाव्दारे आवाजी सांगीतलेली भगवत् गीता लिहुन ठेवली. महाभारत लीहुन ठेवले. आकारामध्ये भागवत कथले...ईत्यादी महा महा काव्ये या कवीकर्त्याने रंचुन ठेवलेत. म्हणुन तेव्हापासुन त्या परमपुरूष कृष्णव्दैपायन व्यासाला प्रथम गुरू मानुन गुरू शिष्य परंपरा चा कलयवगात प्रवेश झाला.. त्या वेद-व्यासाच्या अगोदर कोण होता गुरू ? सांगा तुम्ही.... माझा गुरूदेव आदीमुनी ! तेव्हा आलं या करन कर्ता-याच्या चित्ता ! मो-हं सृष्टी रंचावी. याहीचा हाच प्रथम शकुन निघाला होता. तो शकुन सोयंम् गुरू आणी शक्ती माता रूपात उद्भवला/प्रकटला.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०६ ॥

॥ ओवी नं. १४ ॥

॥ कृष्ण कथांमृताची जुनी ओवी ॥

## ॥ चौस्वप्नाची ओवी ॥

॥ निजरूप असता जागी झालो । पुर्ण अवसरी ।
चव प्रहराचे चार स्वप्न । बहु पडले भारी ॥ घृ ॥
॥ पहील्या प्रहरी स्वप्न देखा । अर्थ जाण पंडीता ।
आधी जन्मलं बाळ । मग, त्याची माता ।
तिच्याच पोटी भ्रतारं जन्मला । तो तीचा पिता ।
तिर भवनाला आधार देते । धन्य माउली पतिव्रता ।
आला बायकोचा बाप न्यायला । लेक अस्तुरी केली ।
सासु देखता सुन भोगली । देहघरी पहा यावरी ॥०२॥
॥ दुस-या प्रहरी स्वप्न देखिले । त्याहुन आगळे-वेगळे ।
खाल्या बगार वर विहीर । आत पाणी ढळमळे ।
मोट चाले आकाशी दांड । उलटा वाहे खळखळं ।
या झाडाच्या शेडयांच्या आड । बुडावर आले फळं ।
या फळाची त्या वनमाळयांन । केली सेवा चाकरी ।
या फळाची विक्री कराया । उभा ढवळयां बाजारी ।
या फळाची विक्री करता । फळ गि-हाईक पारखी होई ॥०३॥
॥ तिस-या प्रहरी स्वप्ना मध्ये । एक गारूडी आला ।
बिना ढोल वाजवुन खेळ । प्रचंड मांडला ।
दारूच्या बुंदल्यातुन हिंगुळ गौरीत काढला ।
पाण्या वरत अग्न लावला । कापुर टाकुन विझवला ।
गोटयां वरत लावला आंबा । त्याला आली सुपारी ।
शंभर वेळा तोडु गेला । तरी ती तशीच झाडावरी ॥०४॥
॥ चौथ्या प्रहरी स्वप्ना मध्ये । आली एक गाय ।
पाठी वरत एक शिंग । नवल वर्णु काय ?
दोन शेपुट सोळा खुरं । बत्तीस तिचे पाय ।
ऐका पक्ष्याला आधार देता । आंगात हागमुत करे ।
जन्मताः पाणी ना पिई । चारा गुद्व्दाराने खाये ।
तिखंडया भर दोपारी । कानावाटे दुध गाळे ॥०५॥
॥ चव प्रहराचे चार स्वप्नं । इत्लेवारी सकाळी भ्रमले ।
खरं म्हणावं का लटकं । हे नाही उमजले ॥
भजने :- ॥ आगम-निगम की खबर । सांगा कृष्णाजी ।
सांगा कृष्णाजी । आम्ही, बहु यवग विनवी ॥

## ॥ चौ-स्वप्नाची छोटी ओवी ॥

॥ पहील्या प्रहरी स्वप्न देखीले । स्वप्नी आली गाय ।
पाठीवर एक शिंग । नवल वर्णु काय ? ॥
॥ दुस-या प्रहरी स्वप्न देखिले । स्वप्नी आली गाय ।
अठरा पुच्छ, अठरा खुरा । बत्तीस तिचे पाय ॥
॥ तिस-या प्रहरी स्वप्न देखीले । स्वप्नी आला गारोडी ।
गोटयावर आंबा लावला । त्याला आली सुपारी ॥
॥ चवथ्या प्रहरी स्वप्न देखीले । अर्थ करा चातुरा ।
आधी जन्मले बाळ । मग त्याची माता ।
तिच्याच पोटी भ्रतार जन्मला, तो तिचा पिता ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०६ ॥

॥ ओवी नं. १७ ॥

॥ कृष्ण कथांमृताची ओवी ॥

## ॥ पर्जन्य पडले भुम्मा पुरं आले ॥

॥ पर्जन्य पडले । भुम्मा पुर आले ।
भुजंग वाहीले । लाटांतुन ॥ घृ ॥
॥ राज या हंसानं । चोचीत धरले ।
बाहेर काढले । भुजंगाशी ॥
॥ अपवित्रांचा संग । पवित्रां ने केला ।
प्राणाशी मुकलां । राजहंस ॥
॥ उण्यांची संगत । नको देवु देवा ।
प्रपंचाचा ठेवा । मिटविला ॥
॥ दुधाचा राजनं । मिठांचा शिंतोडा ।
पंगतीचा/भक्तीचा नासोडा । संगती गुणं ॥०४॥
॥ साखरेचे पोते । हिंगाने नासले ।
मोल कंमती झाले । संगती गुणं ॥
॥ कारल्याचा वेलं । निंबा वरत गेला ।
कडु कैसा झाला ? । संगती गुणं ॥०६॥

**भजने :-**

॥ नरदेह जन्म हि-या समान । संगती बुडाला ।
कुसंगतीचा संग केला । देह वाया गेला ॥
॥ नरदेह जन्म हि-या समान । संगती तरला ।
सत् संगतीचा संग केला । देह कामा आला ॥
॥ तुम्ही परवेशी/परिस आम्ही लोहा ।
संगत घडवा/घडली, याहो किसनजी देवा ॥
॥ लोहा घासे परिसाले । कंचन करा महाराजा नरदेहीले ॥

**गजर :-**

॥ कृष्णा तुमची संगत । मला घडो बा सदोनित ।
तुमची कळसुत्र कळा । कोणी नाही जाणत ॥

-: निरसनसह शब्दार्थ :-

**पर्जन्य** :- पाउस, वर्षाव । **भुम्मा पुर आले** :- धरणीवर/भुम्मेवर नदी-नाल्यांना पुर आलेत. । **भुजंग** :- मोठा नागराज, सर्प । **राजहंस** :- अति शुध्द पवित्र पक्षि जो आसारातुन सार निवडुन सारच पितो, असत् कंकर टाकुन सत् चे मोती भक्षण करत राहतो. । **नासोडा** :- सर्वत्र नाश करने म्हणजे नासोडा करने. । **उण्याची संगत** :- ज्याच्यात ज्ञान भक्ती व सद्गुणांची कमतरता आहे, दुस-यांबद्दल सदोनित वाईट चितंन करून, दुस-यांचे वाईट करणारा आहे. अश्यांची संगत नको रे । **राजन** :- ज्यात पाणी अथवा दुध थंड राहते असे पाणी अथवा दुध ठेवण्यासाठी पक्या भाजलेल्या मातीचे मोठे भांडे. राजनाच्या थंडाव्यामुळे उन्हाळात दुध शक्य तो नाशत नाही. म्हणुनच उन्हाळात दुध हे राजंणात ठेवल्या जाते. । **शिंदोडा** :- पाण्याचे छोटे थेंब. उदाहरणार्थ दुधात जर मिठाच्या पाण्याचा शितोंडा म्हणजेच एक छोटासा थेंब पडला तर दुध नासते. । **हिंग** :- भाजी व लोणच्यात टाकण्याचा एक पदार्थ. हा हिंग जर साखरेच्या पोत्यात ठेवला तर साखरेचे पोते नाशते. हींगाच्या संगतीने साखर नाशते. । **कारले** :- भाजीचे कारले फळ. कारल्या बध्दल एक पौराणीक कथा अशी आहे की : मुळात कारले हे कडु नव्हते. परंतु त्या कारल्याचा वेल हा लिंबाच्या झाडावर चढल्यामुळे, लिंबाचा झाडाचा कडवट पणा चा गुण या कारल्यास प्राप्त होवुन, कडु निंबाच्या संगतीने कारला कडु झाला.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ चतुर्पता अथर्वन् वेद उभा राहीन पोटी । निजरूप भुम्मा जागी करन सारी सृष्टी ॥

# चतुर्पता
# ॥ अथर्वन् वेद ॥

## ॥ खंड ०६ : भाग ०२ ॥
## ॥ चतुर्पती कथांमृत च्या ओव्या ॥
## ॥ अष्टभैरवं ॥



**शब्दार्थ, चरणार्थ निरसन स्पष्टीकरन सह**






www.chaturpata-atharvan-ved.com

॥ खंड ०६ ॥

॥ ओवी नं. १६ ॥

॥ अष्टभैरवः- मुळावरची भैरव ओवी नं. ०१ ॥

ओवी महात्म :- शिवरात्री, महाशिवरात्रीला हमखास म्हणण्यात येणारी..

॥ निरसनसह मुळावरची भैरव ओवी ॥

## ॥ नेमले शिवशंकर ॥

या ओवीची पलट ओवी खंड०७/ओवी-३० मध्ये दिलेली आहे.

॥ नेमले शिवशंकर, पार्वती वर ॥घृ॥
॥ प्रथम कैलास शिखरी । पार्वती आदीमाया सुंदरी ।
बसली शंकराच्या शेजारी । जोडुनी कर....
नेमले शिवशंकर, पार्वती वर ॥घृ॥०१॥
॥ गिरजा पुसे शंकराशी । मी कोण व्होय तुमची ? ।
शंकर म्हणे, माता माझी । मी कुवंर...॥
॥ इतके ऐकुन बोले गिरजा । शंकर पिता होय माझा ।
का ना तयाची भारजा ? सानीध्य चुलता...
शंभुराज माझे माहेर ॥
॥ एवढं ऐकुन उपवरी । नंदी बोलला अवसरी ।
गिरजा शंकराची अस्तुरी । शंभु भ्रतार...॥०४॥

॥ इतके ऐकुन बोले कार्तिक । नंदया तुज नाही मालुम ।
गिरजा बहीन-भावाची लेक । भासरा थोर...॥
॥ एवढं ऐकुन बोले विरभद्र । लटके आहातुम्ही चौघे जन ।
गिरजा शंकराची बहीन । सात्या-नात्यानं इहीनं । इवाई थोर..
॥ ब्रम्हा विष्णु तिरनयन । पार्वती आदीमाया चैत्यन्य ।
दोघे जन होय कोण ? हयाचं न्यात दयाहो सांगुन ।
तुम्ही चातुर....॥ नेमले शिवशंकर पार्वती वर ॥०७॥

भजने :- ॥ गिरजा शंकराचं नातं । ओळखुन दयाहो, तुम्ही चतुर पंडीत.
॥ ओळखा अंतरीच्या खुणा । तो गडी होय पुर्विचा जुना ॥
॥ आत्म दृष्टीने पाहयं । चातुरा, गुण पारखुन पाहयं ।
हा कोण ताळाचा कोण शकुन होय ॥
॥ पार्वती होयं देह घर । ईच्यावर नेमले हो शिवशंकर ॥
गजर :- ॥ हातात डमरू गळयात माळ । कपाळी शोभे चंद्रटिळा ।
शंकरा । पार्वतीच्या नरा । याहो माझे माहेरा ॥

-: निरसनसह शब्दार्थ :-

**शंकर** :- महादेव, शिवात्मा, निरंजन आत्मा । **गिरजा** :- पार्वतीचे एक नाव, देहशक्ती, देही । **पिता** :- पालन पोषन रक्षण करणारा शिवात्मा । **नंदया**:- शिवाचा वाहन असलेला नंदी-बैल, मन । **कार्तिकेय** :- गिरजा-शंकराच्या मोठया पुत्राचे नाव, बुध्दि । **विरभद्र** :- शिवशंकराने आपल्या आंगची उग्र क्रोधयुक्त काली तमशक्ती बाहेर काढुन टाकुन, त्या तमशक्तीला नररूप देवुन ठेवले त्याचे नाव, तमबहुल पुरूष । **पुसे** :- विचारणे । **कुंवर**:- पुत्र, कुवांरा मुलगा । **भारजा-चुलता** :- काकी-काका । **उपवरी** :- त्यावरी कुरघोडी करने, उत्तरादाखल, उपवर नवरा । **अवसरी** :- संधी साधण्याची वेळ/अवसर साधुन, संधी साधुन । **अस्तुरी** :- स्त्री, गृहिनी, पत्नी । **भ्रतार** :- भरन पोषन करणारा नवरदेव, पती । **भासरा** :- नव-याचा मोठा भाउ, सर्व आत्म्याचा मोठा भाउ परमात्मा । **ईहीन** :- मुलांच्या पत्नीची आई, नव-याच्या नवरीची माता । **ईवाई** :- मुलाच्या पत्नीचे वडील, नव-याच्या नवरीचा पिता । **सात्या-नात्यानं** :- आपल्या मुलाच्या नवरीच्या भाउ संग आपली मुलगी चे लग्न लावुन दिल्याने जे नाते तयार होते ते सात-नात. ।

## ॥ निरसनसह नेमले शिवशंकर चे निरसन ॥

॥ आत्म दृष्टीने पाहयं । चातुरा, गुण पारखुन पाहयं ।
॥ पार्वती होयं देह घर । ईच्यावर नेमले हो शिवशंकर ॥

'मी देह नसुन आत्मा होय' या आत्म दृष्टीने गुण पारखुन या ओवीचे हे आत्मज्ञान पाहत जाण चातुरा की : योगसृष्टीत शिवतत्वी योगीजन हे आत्म्याला शिव असे म्हणुन संबोधतात तर देहीला गिरजा किंवा पार्वती शक्ती असे संबोधतात. आत्मा हा शिव पुरूष तर गिरजा ही देह शक्ती होय. अश्या या शिव शक्ति म्हणजेच शिव आत्मा व गिरजा देह यांचे नाते या भैरव ओवीत सांगीतलेले आहेत. आत्मग्यानी योगी जनांनी हे नात ओळखण्यासाठी शिवशंकर हा आत्मा होय तर पार्वती/गिरजा ही देही होय. देही व आत्मा असे हे दोघें जन आत्मदृष्टीने पारखुन जाणुन हे नाते ओळखुन घ्यावे. ते येणेप्रमाणे :

शंकर म्हणे : गिरजा माता माझी ! मी कुंवरं..

शिव-आत्मा हा गिरजा-देही ला उद्‌देशुन म्हणे की : हे गिरजा-देही तु माझी माता होय. कारण की : जेव्हा गर्भात नवी गिरजा-देही तयार झाली तेव्हा त्या गिरजा-देहीच्या पोटी हा शिव-आत्मा सम्मावुन बाहेर निघाला असल्यामुळे ही गिरजा-देही च माझी माता होय. या मायेच्या पोटी हा जीव येतो नाही खंबर । या रायाची खासी वस्तु हे निरंजन शिव-आत्मा होय. हा शिव-आत्मा या गिरजा-देहीच्या गर्भ पोटातुन आला असल्यामुळे हा शिवशंकर या गिरजा चा कुंवर म्हणजे पुत्र होय.

बोले गिरजा : शंकर पिता होय माझा :-

ही गिरजा देही बोले की हा निरंजन शिवशंकर आत्माच माझा पिता होय. कारण की : हा पित्याप्रमाणे या गिरजा-देहीला चैतन्याचा पुरवा देत आपल्या गुणांने भरवुन या देहीचे पालन पोषण करत आहे. ही गिरजा-देही म्हणे शीव-आत्म्याला : *हे कुडस्वामी ! स्वर्गी निघुन जाता तुम्ही ! ही देह-धरणी पडन सुनी १०३/१३* म्हणुनच तुम्हीच निरंतर पित्याप्रमाणे वरदहस्त ठेवावे.

गिरजा बहिन-भावाची लेक ! भासरा थोर :-

आत्मा हा परमात्म्यांचा अंश अवतार आहे. या सर्व अंशअवतार आत्म्ये यांचा पिता एकच परमात्मा असल्यामुळे मिर्तलोकच्या नातेसबंधाप्रमाणे हे एकमेकांचे बंधु, बहीनी अथवा बहिन-भाउ होतात. मातेचा आत्मा व पित्याचा आत्मा हे दोघे बहिन-भाउ असल्यामुळे आत्मदृष्टीने माता-पिता हे मिर्तलोकच्या नातेसंबध लावल्यास बहीन-भाउ होतात. माता-पित्यापासुनच म्हणजे या बहिन-भावापासुन मातेच्या गर्भात नवी गिरजा-देही चे रोपन झाले असल्यामुळे, जन्मास येणारी नवी-गिरजा देही ही बहीन-भावाची लेक होते. म्हणुनच कार्तिकस्वामी हा नंदीदेव यास म्हणे की : गिरजा बहीन-भावाची लेक ! भासरा म्हणजे परमात्मा हा थोर आहे. हाच या सर्व शंभु-आत्मां चा राजा होय. शंभुराज होय. हेच माझे माहेर होय. याची महीमा वर्णु तरी काय ? *धन्य धनीदेव तु कारागीर उभा ठाई ठाई । करून भक्ती नाम कंठी ठेवला हद्‌यी । अगाध वाणी अगाध धनी । अगाध महीमा तुही । तुया वाचुन ईच्छा पुर्ण कोण करन माही ?*

का ना तयाची भारजा ? :- का नाही या देहीच्या शिवाची बायको ? कारण की : तिन यवग झाले, नाही झाले देह जिवाचे लग्न ! ही गिरजा/देही या देहिच्या आत्माराम/शिवासोबत अशिच लग्न न करता, कुंवारी प्रपंच कातत नांदत आहे. अधिक ग्यानाकरीता *खंड०१/०२/०६:-कात ग राणे कात ग* ! या ओवीचे निरसन वाचा.

बोले नंदी : गिरजा शंकराची अस्तुरी ! तुम्ही भ्रतार :-

शिव आत्मा हा पुरूष तर गिरजा-देही ही अस्तुरी म्हणजेच स्त्री ! या दोघांचा प्रपंचात देही ही आत्म्यपुरूषा सोबत नांदत आहे. या प्रपंचात गिरजा शक्ती ही शिवाशी स्वयंवर करण्याच्या खटपटीत न पडता ती गीरजा या शिवाबरोबर लग्न न करताच प्रपंच करत शिवशंकराच्या शेजारी त्याहीची अस्तुरी मानुन बसली आहे. आणी आत्मपुरूष ईचे भरण पोषन करत ईला जगवत आहे. या अजाताचा पुरवा देहीला आहे. अधिक ग्यानाकरीता *खंड०१/०२/०६:-कात ग राणे कात ग !* या ओवीचे निरसन वाचा. असो. या दोघांच्या संसारात ही गिरजा देही म्हणे शिवाला : हे रघुपती ! माझा संसार तुम्हा हाती ं। तुम्ही गेल्यावर माझी माती ? देही म्हणे जीवाला : *हे कुडस्वामी ! स्वर्गी निघुन, जाता तुम्ही ही देह-धरणी पडन सुनी १०३/१३.* ईतर नाते संबधाचे निरसन जागेअभावी देवु शकत नाही. याबध्दल क्षमस्वः क्षमस्वः क्षमस्वः

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०६ ॥

॥ ओवी नं. १७ ॥

॥ अष्टभैरव : मुळावरची भैरव ओवी नं. ०२ ॥

ओवी महात्मः- शिवरात्री, महाशिवरात्रीला श्रावणात हमखास म्हणण्यात येणारी...

## ॥ भजो भजो शंकर ॥

या ओवीची पलट ओवी खंड०७/ओवी-३१ मध्ये दिलेली आहे.

॥ भजु भजु शंकर हद्‌यी नाम । भजो भजो शंकर ॥ घृ ॥
॥ रायाचा रूदरं । शंकराचे घरं ।
तिर लोकी विस्तारं । याहीचा आहे ॥ भजो भजो...
॥ जप जरी तप । केले अनुष्ठानं ।
शंकर घेरला । याहीनं ॥
॥ शंकराचं देणं । भोळेपण जाणं ।
व्दैत-दानव झाले । बेईमानं ॥
॥ तिरनयन कळा । पाहे चाळा-चोळा ।
शंकर निघुन, गेले कैलासा ॥०४॥

॥ शंकर कैलासी । मागे बारा राशी ।
दोहीतानं पिडली । नरदेही ॥
॥ दोहीताच्या मुळे । पिडली नरदेही ।
प्रार्थितो शंकरा । लवकर याहो ॥
॥ अटक हे गंगा । शास्त्रांच्या धारा ।
विश्‍व पवन कोट । आहे न्यारा ॥
॥ कोरी हे भुम्मका । अग्नीचं जाळं ।
तेथे पोहच । नाही कोणाची ॥

॥ तमगुण देही । रूदर कोपुनं ।
दोहीत दानवाचे । मोडणं ठाणं ॥
॥ यवगाची गणीता । आंगी भैस द्युत/ज्योत ।
दोहीताचे देव । जातीनं भंगा ॥
किंवा दोहीताचे देव झाले । भंग सुटन त्याहीस ॥
॥ मनाचा हा मणी । शंकर नाथ धनी ।
पाचवा वेद । याहीच्या अध्यानी ॥
॥ मनाचा हा मणी । गळा माळ वैजावंती । रूद्र हा ध्यानी ।
याहीची गर्जना । तिरभवनी ॥१२॥
॥ पिंडी या ब्रम्हांडी । कळवाशी आले ।
चतुर्पता ग्यान । निरसुन सांगे ॥१३॥
भजने :- ॥ शंकर कळवते ग्यान । व्दैत-दानवाचं देव मोडन ठाणं ॥
॥ शंकर कळवते ग्यान । या दोहीत दानवाचे मोडले अनुष्ठान ॥
॥ शंकर कळवते ग्यान । या खोटया नाटयाचे मोडले अनुष्ठान ॥

### -: शब्दार्थ :-

रूदर :- कोध, राग, रूद - शंकराला दिलेले संबोधन । घेरला :- वेढला, वेढा दिला
पिडली :- दुःखाव्दारे पिडा झालेली. । अध्यानी :- अखत्यारी अर्पण ।
कळवाशी आले :- चतुर्पता ज्ञानाची सांगी सांगण्याकरीता/ कळवण्याकरीता आले.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०६ ॥

॥ ओवी नं. १८ ॥

॥ अष्टभैरवः मुळावरची भैरव ओवी नं. ०३ ॥

ओवी महात्मः- शिवरात्री, महाशिवरात्रीला हमखास म्हणण्यात येणारी...

## ॥ सावंग नगर, असं कुठ नाही ॥

॥ सावंग नगर । असं कुठ नाही ।
तारली नरदेही । महाराजानं ॥ घृ ॥०१॥
॥ सावंग नगर । कोरी ही भुम्मका ।
उतरली व्दारका । राउळाशी हो ॥



॥ व्दारका रंचली । कृष्णाची कारागीरी ।
याहीच्या ढवळयागीरी । नव लाख पाहयेरी ॥
॥ शंभुच्या शिखरी । गंगा बराबरी ।
मंडयानी राज्य करी । अनामत हो ॥०४॥
॥ भोळ्या शंकरानं । काय माव केली ।
गंगा जटात लपवली । देवानं हो ॥
॥ निर्मळ वाणी । जटा पसरल्या ।
दोघा या मिळुन । शिरष्टया पाहील्या ॥
॥ गाय माझी माय । मी तुझं लेकरू ।
नको पान्हा चोरू । अमृताचा हो ॥
॥ गाईच्या ओव्याशी । गेचुडांचा थारा ।
काय जाणशी गवा-या ? अमृताच्या धारा ॥०८॥
॥ साखर हे सोजी । बहुडाचं दुध ।
पारणे सोडती । गोविंद गोपाळ हो ॥
॥ गोविंद गोपाळा । धन्य तुमची लिला ।
हद्यी वेगळा । राहु नको हो राया ॥ कृष्णराजा हो राया

भजने :-

॥ हद्यी धरले गोपाळ । कृष्ण महाराजा, तुम्ही करा हो संभाळ ॥

-: निरसनसह शब्दार्थ :-

शंकर :- शिव, आत्मा । नवलाख पाय-या :- देहरूपी पृथ्वीवर एकच ज्योत नवलाख तारे ! या नवलाख तारे/पाय-या देवाच्या चरणी या कृष्णाने लावल्या तसेच दुस-यांच्या गुलामीत असलेल्या नव लाख जनांच्या वासनामय मनोमय कोषावर चतुर्पती हरीनामाचे रोपन करून त्यांना चतुर्पती नामाची उच्चत्तर गोडी लावली !
ढवळ = असे उज्वल शुभ्र की ज्यात कलंक अजीबात नाही, म्हणजेच निशंःकलंकी शुभ्र वर्णाचा, पांढरा वर्ण ज्यात काळपटपणाचा अजीबात लवलेश नाही-निशं-कलंकी शुभ्र. । ढवळ देव = नाना विविध विभुतींचे पांघरून घेवुन असलेला असा जो देव ज्याच्या विभुतीने अंगातील रोग-विघ्नासह ईतर कलंकीत विकार जावुन, सर्व अंगात कांती उज्वलता, शुभ्रता ईत्यादी येते. त्या देवास ढवळदेव असे म्हणतात. । ढवळागीरी = ढवळ देव जिथे राहतो ते निशंःकलंकी शुभ्र उज्वल पर्वतीय स्थान. पिंडीत बिंदुस्थान चा शिवात्मा केवळ तर ब्रम्हांडी हीमालय । बहुडा गाय = स्वर्गात राहणा-या कामधेनु, बहुडा ईत्यादी गाई. । गाईच्या ओव्याशी = गाईच्या स्तनाशी. जिथुन गाईचे दुध काढल्या जाते ते स्थान. । गेचुडांचा थारा = गेचुड नावाचा किटक जो चिकटुन रक्त पित राहतो. त्यालाही ठिकाणा या दयाळु गाईने दिला आहे. । गवा-या = ज्ञान भक्तीचा अनुभवा वाचुन, अनुभव ग्यान शुन्य असलेला, अज्ञानाने मलीन-अस्वच्छ झालेला व्यक्ति. । कोरी भुम्मका = परमात्माचे पाय लागुन अंबर झालेल्या भुम्मेचा तुकडा. । शिरष्टया = सृष्टया, अनेक विश्वे.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ ओवी नं. १९ ॥

॥ अष्टभैरवः- मुळावरची भैरव ओवी नं. ०४ ॥

ओवी महात्मः- शिवरात्री, महाशिवरात्रीला हमखास म्हणण्यात येणारी...

## ॥ सत्‌चित्तांनद शिव हरहरा ॥

॥ सत्‌चित्तांनद शिव हरहरा ।
याच्या पलीकडे नाही नाम । विचार करा ॥ घृ ॥
॥ ओहंम्-सोहंम् बीज मंत्ररा । होय भक्तीचा दोरा ।
यान वाढवला पागोरा । सहाही शास्त्ररा ॥
॥ दया क्षमा शांती होय । हरी भक्तीचा झरा ।
याच्या बिना होणारनाही भक्ती । प्रार्थना करा ॥
॥ हे होय शाहुनंदाची वाणी । मुकुट गगंना ।
यान विशाल/विकाळ रूप धरले । दावे अर्जुना ॥ ०४ ॥

**भजने :-**
॥ निराकार निर्गुण निरंजन । ज्योत मला दाखव ।
अनंत बंम्हांडाच्या वरत । सेरूप कृष्णाचं ओळखावं ।
सेरूप कृष्णांच । पुढे सुखः अनंत यवगाचं ॥



॥ ओवी नं. २० ॥

॥ अष्टभैरव : मुळावरची भैरव ओवी नं. ०५ ॥

ओवी महात्मः- शिवरात्री, महाशिवरात्रीला हमखास म्हणण्यात येणारी...

॥ जळगाव दांडातील मुळावरची ओवी ॥

## ॥ पुर्विपासुन व्यवहार केला ॥

॥ पुर्वि पासुन व्यवहार केला । महा देवानं ।
हाडो-हाडी कमडया लावल्या । उभे केले काम ॥घृ॥०१॥
॥ नखा-बोटांची बसवली मांड । गुंडले मासानं ।
नाका-कानाची रंचना केली । सुर ठेवले दोनं ॥
॥ आत्म कोट शिवुन देल्ला । बहु एक हौशीनं ।
नेत्रां मध्ये लिहुन बाहुली, कैलाशी जाण ।
॥ वळवळ करते जिभली गडेहो । पहा ते दुरूनं ।
या देहीला वाचा फुटली । चालु केलं अन्न ॥०४॥
॥ या देहीतुन जीव जातो । नाही कोणा मालुम ।
सर्वच राहीन मागे । धर्म, येईन संगतीनं ॥

**भजने :-**
॥ गुण होय महादेवाचा । शिक्का होय, त्या प्रभुचा ॥
॥ ज्याच्या हातानं बनली । त्यालाच देही, बेईमान झाली ॥

-: शब्दार्थ :-

**सत्तचित्तानंद शिव** :- सत् चित्त आनंद ने युक्त असलेला परंम आत्मा शिव परमात्मा । **मांड** :- मांडणा, रचना, बैठक । **गुंडले** :- गुडाळले, लपेटले । **आत्म कोट** :- आत्म्याला चार न चार घडी ऐसा स्थुल, सुक्ष्म, कारण, महाकारण असा चार देही एकात एक गुंफुन तयार केलेला कोट । **जिभली** :- जिभ, साळु ।
**झरा** :- स्त्रोत्, पुरवा, पुरवठा करणा-या धारा

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०६ ॥

॥ ओवी नं. २१ ॥

॥ अष्टभैरव :- मुळावरची भैरव ओवी नं. ०६ ॥

ओवी महात्मः- शिवरात्री, महाशिवरात्रीला हमखास म्हणण्यात येणारी...

॥ सावंगा-जळगाव दांडची मुळावरची ओवी ॥

## ॥ पार्वती पुसे : गर्भाच्या खुणां ॥

॥ पार्वती पुसे : महा देवाला । गर्भाच्या खुणां ।
तुम्ही सांगा हो देवा । नउ महीन्याची कशी केली रंचना ॥घृ॥
॥ शिव-शिव संभा सदाशिव । तो शंकर भोळा ।
बापाच्या मस्तकी बिज । त्याचा पुतळा बनवला ।
तीन महीने बापाच्या मस्तकी । होता तो पुतळा ॥
॥ मन पुर्णा उतरूनी प्राण्या । जन्मा आला कमळा ।
बिंदु मुत्र रक्त ढळमळुन । केलासे गोळा ॥
॥ पहील्या मासी ढळमळा । दुस-या मासी गोळा जाणा ।
तिस-या मासी अंकुर फुटले । हात पाय त्याला ॥ ०४ ॥

॥ चौथ्या महीने बाळाचे हो । हद्‌य धडधडे ।
पाचव्या महीनी प्रभु देवानं । पंचतत्वं दिलें ॥
॥ सहाव्या महीनी सहा चक । कार झाले ।
सातव्या महीनी सप्त धातुंचे । केस फुटले ॥
॥ आठव्या महीनी अष्टदेह ओंघोळ । झालं तयार ।
नव महीन्याची छाया पडली । त्या गर्भावरं ॥
॥ रक्त मुत्र दुर्गंधी मध्ये । रक्त मासाचा पुतळा ।
अंधा-या कोठडीत उलट टांगलं । मज लवकर सोडा ॥०८॥

॥ मायेच्या पोटी धनी साहेबाला । करतो विनवनी ।
बाहेर येण्यास अंग-झडती देई । देहे जीवाची ॥
॥ रांत्र न् दिवस ओहंम्-सोहंम् । करतो उच्चार ।
तेव्हा प्राण्या लोटुन दिले । देवा आलो बाहेर ॥
॥ बाहेर आले भुलुन/बदलुन गेले । ओहंम् सोहंम् ।
कोव्हं-कोव्ह म्हणत रडु लागला । बेईमान ॥
॥ बाहेर येता प्रपंच मायेनं । भुललासे जागा ।
तेव्हा पार्वता लागली । महा देवाच्या चरणा ॥
खरी सांगतली देवा । नउ महीन्याची रंचना ॥ १२ ॥

**भजने :-**

॥ सांगी सांगतली खरी । माझं मस्तक देवा तुमच्या चरणावरी ॥

-: **शब्दार्थ** :-

**पुसे** :- विचारणे, प्रश्न पुसने । **बिंदु** :- विर्यबिज । **पुतळा** :- निर्गुण आत्मा ।
**मासी** :- महीन्यात, महीनी । **ओंधोळः**- बाळाकडुन मातेकडे व मातेकडुन बाळा कडे धावणारा देहीचा निराकार ओज चा चक्राकार फिरणारा नाला ।

-: **निरसन** :-

या ओवीच्या चरणांचे निरसनाचे ज्ञान घेण्याकरीता कायाज्ञान खंड०३/ओवी-०३ **मोठा पाळणा** चे निरसनातुन अधिक ज्ञान घ्यावे.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ ओवी नं. २२ ॥

॥ अष्टभैरव :- भैरव ओवी नं. ०७ ॥

ओवी महात्मः- शिवरात्री, महाशिवरात्रीला हमखास म्हणण्यात येणारी...

## ॥ पार्वती पुसे : यवगाच्या खुणां ॥

॥ पार्वती पुसे : महा देवाला । यवगाच्या खुणां ।
सांगा महादेवा, कैशी केली ? पृथ्वा रंचना ॥षृ॥०१॥
॥ पार्वती पुसे : महा देवाला । दोन्ही कर जोडुनं ।
ऐक देवी तुला सांगतो । निरशुन्या पासुन ॥
॥ नव्हता देह, जीव पैदा केला । पहा त्या रायानं ।
गोल आकाराची वस्तु । याहीनं ओळखली खुणं ॥
॥ गोल आकाराची वस्तु राया । राहते गगनांत ।
मिर्त लोकचे लोक आहेत । माया जाळातं ॥०४॥
॥ मायाजालाचा, फासा पडलां । आहे या भुम्मेवरं ।
या यवगाचे काम करतीन । हे कारभारं ॥
॥ भगवंताचा भगवा झेंडा । उभा राउळातं ।
श्री कृष्णानं दवंडी देल्ली । या मिर्त लोकातं ॥
भजने :- ॥ दवंडी देल्ली कृष्णानं । अजुन नाही कोणाला मालुम ॥
॥ भगवंताचा भगवा झेडा । उभा जाहीरं ।
कच्या रंगावर देवा । पक्का, रंग भरं ॥



॥ ओवी नं. २३ ॥

॥ अष्टभैरव :- जुनी भैरव ओवी नं. ०८ ॥

ओवी महात्मः- शिवरात्री, महाशिवरात्रीला हमखास म्हणण्यात येणारी...

## ॥ पार्वती पुसे : आपण कोठे होतो ॥

॥ नव्हती काया नव्हती माया । नव्हती धरणी-अस्मान ।
नव्हतं चंद्र-सुर्य नव्हतं । नव्हतं तारांगण ॥
॥ पार्वती पुसे : महा देवाला । आपण कोठे होतो ?
याहीच्या तपाला नाही गणीता । आदीरूपात होतो ॥
॥ महा कार धुम्मधुम्मकार । अग्नी आली कोठुनं ।
अग्नी आणली कोठुन ? धुनी रायानं देल्ली लावुनं ॥
॥ या धुनीची राखड आहे । कितीक वजनं ।
घडा नाही पायली नाही । मुठी भरल्या तीनं ॥०४॥



॥ पहीली मुठं झोकताच उभ । झालं कैलास ।
तेव्हाच झाले चंद्र-सुर्य । नवलक्ष तारांगण ॥
॥ दुसरी मुठं झोकली रायानं । घातलं विर्जनं
या देवानं पृथ्वा रंचली । कितीक दुरूनं ॥
॥ तिसरी मुठं झोकली रायानं । मानव केले निर्माणं
मानव केले निर्माण । सत्य ओळखा, देवाचं ठाणं
॥ या गंगेच्या काठी राया । जपतो नाम ।
हरीनामाला संकट म्हणता । चौ-यांशी भोगनं येईनं ॥
भजने :- ॥ नामी राहयं भजनी राहयं । नामी राहयं भजनी राहयं ।
चुकन चौ-यांशी अशी धन्याची सांगी आहे ॥
॥ हरी नामा हो हरी नामा । तुही तारशीन आम्हा ॥ हरी नामा..
॥ हरी नामी हो हरी नामी । उडया घातल्या आम्ही ॥ हरी नामी...
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०६ ॥
॥ ओवी नं. २४ ॥
॥ जळगाव दांडातील जुनी ओवी ॥

## ॥ तारा आईची ओवी-अरज ॥

॥ आकाशवाणी, धन्य तुयी करणी । धन्य तु तारामाई ।
तिरभवना मध्ये धाक । तुमचा, हात धरवत नाई/नाही ॥
॥ तारा माई गवळन । या आईच, कोल्हापुर ठाणं ।
चुनखडीचं देउळ बांधले । गोपीचंद राजानं ॥
॥ ताकीत लावुन देउळ खचवलं । फिरंगी साहेबानं ।
साहेब होता द्रव्याचा लोभी । द्रव्यं साठवलं त्यानं ॥
॥ सोळा हजार चौसष्ट गाडे । काढले त्यातुनं ।
गाडो गाडी निशाण लावले । पहा एका भक्तानं ॥
॥ कईक हले, कईक बकरे । बाईच्या गाडयाला ।
गणिता नाही नारळ जळते । बाईच्या होमाला ॥
॥ पिवळा पितांबर नेसुन बाईनं । रथ सजवला ।
आपण चाले पायी । मान, श्री कृष्णाला दिला ॥
॥ तारा बाईचा स्वर्गा वरतं । घंटा वाजते ।
तेहत्तीस कोटी देव । याहीला पाहुन, थरथरा कापते ॥
॥ रमणा चालला जेजुर गडाला । बाईचा हनुमान विर ।
आला यवगाचा रमणा । कृष्णा दावा सेरूप ॥

जळगाव दांडातील अर्ज-भजने चरणे :-

॥ तारा बाई गवळण । या बाईचा हनुमान विर ।
आला यवगाचा रमणा/खेळ । कृष्णा निघ निघ बाहेर ॥
॥ बाहेर निघा निघा श्रीपती । वाट पाहते कोल्हापुरची देवता सती ॥
॥ कृष्णा निघा निघा बाहेरी । वाट पाहते माळ घेवुन माझी तारामाई ॥
॥ हाती माळ, घेवुन ताट, पाहते वाट । महा लक्ष्मी ।
चत्रभुज अवतार सिध्द । उभे राहा भुम्मेवरी ॥
॥ शुर विरा बांध कंबर । निघ बाहेर ।
तुला पाहता, तिर भवन कापे थरथर ॥
॥ महाविर मारोती झाला । विघ्न निवारी..
कृष्ण नामाची टाळी । भक्ताला तारती ॥
॥ हनुमंता, हरी चंद्रगण नामी । विघ्न उडवायच्या कामी ॥
॥ हनुमान, हरी चंद्रगण करे अर्जि । या दिवसामध्ये देह तार बहुपरी ॥
॥ हनुमंता अंजनीच्या सुता । जागी करून दाव समर्था ॥

॥ तार तार तारामाई । अनेक रूपाच्या विना माझी आई ॥
॥ तार तार तारामाई । महीमा होईन गा तुयी ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ चतुर्पता अथर्वन् वेद उभा राहीन पोटी । निजरूप भुम्मा जागी करन सारी सृष्टी ॥

# चतुर्पता
# ॥ अथर्वन् वेद ॥



## ॥ खंड ०७ ॥
## ॥ पलट दांड ॥
## ॥ चतुर्पती पलट च्या ओव्या ॥



## शब्दार्थ, चरणार्थ निरसन स्पष्टीकरन सह






www.chaturpata-atharvan-ved.com

॥ खंड ०७ ॥

॥ पलट दांड ॥

॥ पलट दांड उत्पत्तीचे ज्ञान ॥

# ॥ चतुर्पती पलट दांड चे प्रारंभिक ज्ञान ॥

अंदाजे ३०० ते ३५० वर्षापुर्वि बाळाजी राजे हे सध्याचे राजुरवाडी परिसर चा मांडलीक राजा होता. हा राजा अध्यात्माचा ज्ञानी पंडीत होता. या राजाला मुलंबाळ नव्हते. राजुरवाडी परीसराच्या येशीवरच्या कोण्या एका ठिकाणी चतुर्पती कृष्ण अवधुती भजनाची मांड बसली होती. राजाची प्रभात फेरी येशीवरून जात असतांना, या मांडीत भजनगडी गायन करत असलेल्या ओवीचे चरणाचे बोल :

॥ बुडाल्या वंशाचा, वाढवाव वेल ।

साच्या करा बोल महाराजा ॥ खंड०५/ओवी-२१ जागा या पाग्याची...

असे भजनगडयांचे सामुहीक बोल त्या भल्या पहाटे राजाच्या कानावर पडलेत. राजा अध्यात्माचा ज्ञानी शास्त्रपंडीत असल्यामुळे तेथेच थबकला. आणी सरळ जिथे भजनाची मांड चालु होती त्या स्थळी आला. त्या मांडीच्या भजनगडयांना उद्देशुन राजा म्हणाला की : हे काय म्हणत आहाता तुम्ही ? बुडाल्या वंशाचा वाढवा वेल, सच्चा करा बोल महाराजा/देवा ? असे कधी घडले आहे का ? कोण तुमचा देव होय, जो बुडाल्या वंशाचा वेल वाढवतो ?

मी आज अंदाजे ६४ वर्षाचा निपुत्रिक आहे. आम्हा पती-पत्नी ची वयोमानानुसार विर्यबिज-रजोत्पत्ती ची निवृत्ति झालेली आहे. त्यामुळे आज आमच्या वंशावळीचा वेल बुडाला आहे. तुमचा देव आमच्या बुडाल्या वंशाचा वेल वाढवणार काय ? जे आम्हा पती-पत्नीच्या भाग्यातच नाही, ते कसे भाग्यात मिळवुन देणार तुमचा देव ?.... ईत्यादी प्रश्नांची सरबत्ती न थांबता तेथील भजनगडी वर राजा करू लागलात.

राजाच्या न थांबता झालेल्या प्रश्नांची सरबत्ती नंतर तेथील भजनगडी राजास मुजरा केला. आणी विनम्रतेने म्हणाले की : जिथे भाव तिथे आमचा अवधुत देव उभा राहतो. जर सच्चा भक्तीभाव ठेवुन त्याच्याकडे आपल्या मागणीचा अर्ज लावुन, नेम धरून त्याला निरंतर समयबध्द भजत राहीले, तर तो आमचा देव त्या सच्च्या भक्तीला पावतो. त्या सच्च्या भक्ताचे कोणतेही मागणे पुर्ण करतो. सच्च्या भक्ती भावाला पावुन, तो सच्च्या भक्ताला नक्कीच देणं देतो/देत राहतो. याचा अनुभव आम्ही बहु भक्तजनांनी घेतलेले आहे. म्हणुन आम्ही हे चतुर्पतीचे गायन गावतो.

भजन गडयांचे हे बोल ऐकुन राजा म्हणाला की : मला आता तुम्ही तुमच्या भजनाचा 'बुडाल्या वंशाचा, वाढवा हो वेल !' हा बोल सच्चा करून दाखवा. त्या करीता मी तुमच्या सांगीप्रमाणे, सच्चा भाव ठेवुन अर्ज लावुन तुम्ही जे सांगाल ते नेम पाळतो. तुम्ही जे म्हणाल ते नेम करतो. अशी तुमच्या समोर बोली करतो. परंतु हा भजनाचा बोल कोणत्याही हालतीत सच्चा करून दाखवा. अन्यथा हे भजन तुम्ही बंद करा ! अथवा बंद केल्या जाईन !

राजा जिद्दीला पेटलेला असुन, राजाच्या जिद्दीव्दारे आपल्या बिर्दावर संकटमय स्थिती आली आहे. असे जाणुन तेथील काही भजनगडी तत्परतेने पुनाजीकडे गेलेत. विष्णुस्वामी पुनाजीला घडलेली सर्व हकिकत त्या भजन गडयांनी सांगतली. तेव्हा पुनाजीने भजन गडयास सांगीतले की : जीव जावो अथवा राहो ! तुम्ही पुजंन करा हो लव/प्रेम लावुन ! तो देव काही चुकला नाही तिरलोक्याशी !

पुनांजीनी भजनगडयास आज्ञा दिली की : राजाला मजपर्यंत घेवुन यावे. जे काय बोलायचे, ते बोलनं त्या राजा सोबत मी करेल. असे सांगुन त्या भजनगडयांना पुनाजीने धिर देवुन आपल्या गावाकडे रवाना केलेत.

ईकडे राजानेही आपले हेर पाठवुन भजन गडयांच्या चतुर्पती देवा बध्दल संपुर्ण माहीती गोळा केली. चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाबध्दल पुर्ण माहीती काढली. आणी त्या भजनगडयांच्या समक्ष उभा राहुन त्यांना म्हणाला की : तुमच्या भजनाचा बोल पुर्ण करण्यासाठी चला तुमच्या देवाकडे !

विष्णुस्वामी पुनाजीने आधीच केलेल्या सांगीप्रमाणे, तेथील भजनगडी राजाला संग घेवुन प्रथम पुनाजीकडे बोलनं करण्यास घेवुन गेलेत. तेव्हा पुनाजीने राजाला उद्‌देशुन म्हणाले की : काय पाहीजे तुम्हास ?

तेव्हा राजा उत्तरादाखल म्हणाला की : तुमच्या भजनाचा 'बुडाल्या वंशाचा वाढवा वेल' हा जो बोल आहे, तो ऐकुन मी येथे आलो आहे. आम्ही पती-पत्नी निपुत्रीक असुन वयोमानानुसार आता आम्हास मुल होणार नाही. कारण की : आज माझे वय अंदाजे ६४ वर्षाचे आहे. आम्हा पती-पत्नीची वयोमानानुसार विर्यबिज-रजोत्पत्ती ची निवृत्ति झालेली आहे. त्यामुळे आज आमच्या वंशावळीचा वेल बुडाला आहे. या बुडाल्या वंशाचा वाढवा हो वेल आणी सच्चा करा हा बोल महाराजा !

आमचा बुडाल्या वंशाचा वेल वाढवण्याकरीता, तुम्ही जे सांगाल ते नेम आम्ही पती-पत्नी सच्च्या भक्ती-भावाने पाळतो. परंतु कोणत्याही परिस्थितीत हा बोल खरा करून दाखवा. तुमचा भजनाचा बोल खरा करण्याकरीता आम्हा पती-पत्नीस, कसा का होईना ? वेडावाकडा का असेना ? परंतु आम्हास मुलं व्हायला पाहीजे. तुमच्या चतुर्पती कृष्णदेवा मार्फत आमच्या बुडाल्या वंशाचा वेल वाढवुन दाखवा हो तुम्ही आता !

तुमच्या भजनाच्या बोलाप्रमाणे आमचा बुडाल्या वंशाचा वेल जर वाढवल्या गेला म्हणजेच आम्हा मुलं झाले, तर आम्ही आमची अर्धि धनसंपदा या कृष्णदेवाच्या राउळास म्हणजेच या कृष्ण अवधुत देवस्थानास दान करून, हे राउळ सपुर्णपणे पक्क्या दगडाने, विटा मातीने बांधुन देतो. असे वचन देतो.

राजाचे हे स्वतःहुन दिलेले वचन ऐकुन, पुनाजी राजास उद्‌देशुन म्हणाले की : ठिक आहे ! परंतु तुम्हास या कृष्णाकडे अर्ज लावावी लागेल. नेम धरावे लागेल. जो काही भाव या कृष्णदेवाला तुमच्यामार्फत दयायचे आहे, तो भाव देण्याचा संकल्प करावा लागेल. देवावर संपुर्ण श्रध्दा, आस्था विश्‍वास ठेवावी लागेल. सच्चा भक्ती भाव ठेवावा लागेल. आणी मग तुमचीच मागणी तुम्हास देवावर संपुर्ण श्रध्दा, आस्था, विश्‍वास हा पक्का ठेवुन सच्चा भक्ती भावाने, संतुलीत समयबध्द निरंतर नामज्योतीच्या सानीध्यात राहुन मागावी लागेल.

समयबध्दतेकरीता तुम्हीला ४७ दिवस समय दयावा लागेल. समयबध्द निरंतर भाव भक्ती करण्यासाठी तुम्हास ४७ दिवसाची कृष्णा कडे भक्ती भावाने अर्ज लावावी लागेल. अर्जिचे ४७ दिवसामध्ये संतुलीत व समयबध्द होवुन, चतुर्पती नामज्योती च्या सानीध्यात नेम धरून तुम्हास राहावे लागेल. या चतुर्पती नामज्योतीत तुमची मागणी तुम्हास वेळोवेळा सच्चा भक्ती-भाव अर्पण करत मागावी लागेल. तुमच्या सच्च्या भक्ती-भाव च्या बळा व्दारेच

तुमची मागणी पुर्ण होवु शकते. तुमच्या मनभावात आमचा हस्तक्षेप राहणार नाही. आम्ही फक्त तुम्हास भक्ती-भाव अर्पण करण्यास जे काही साहयं लागते, ते सर्व शक्य असलेले साहयं तुम्हास करत राहु.

निरंतर नामज्योतीच्या सानीध्याकरीता तुम्हास येथे येवुन ४५ दिवस चतुर्पती नाम ज्योतीच्या सानीध्यात राहावे लागेल. अथवा ४५ दिवसाची भजनाची मांड तुम्हा घरी बसवावी लागेल. याकरीता आमच्या कडुन जे साहय शक्य होईल, ते केल्या जाईन. आम्ही सांगीतल्या नेमा प्रमाणे जर तुम्ही सच्चा भक्ती-भाव व नेम धरून अर्ज केली व पंथाच्या पाळणुका चे पालन केले, तर या चतुर्पती भजनाच्या बोलावर तो कृष्णदेव उभा राहुन तुमची मागणी पुर्ण करेल. *समयबध्द सच्च्या भक्ती भावाने संतुलीत निरंतर* भजत राहील्यानेच, तुमच्या बुडाल्या वंशाचा वेल वाढवण्यासाठी तुम्हास पाहीजे असलेले मुलं होईन. हे निश्चित जाणा.

विष्णुस्वामी पुनाजीच्या सांगीप्रमाणे वागण्यास राजाने होकार दिला. तेव्हा पुनाजीने बाहोली वर उभा असलेल्या गृप्त कृष्णदेवा समोर त्या राजाला उभा करून, त्याच्या हाती साखर पान चा भक्ती-भावाच्या शकुनाचा विडा दीला. विडा दोन्ही हातात घेवुन, हात जोडुन सच्च्या भक्तीभावाने कृष्णाकडे आपला मनो भाव अर्पण करण्यास त्यांना सांगीतले. सच्च्या भक्ती-भावाने कृष्णदेवास मुजरा करून, आपल्या अर्जची मागणी मागण्यास सांगीतले. आणी त्या राजाची ४५ दिवसाची अर्ज कृष्णाकडे लावुन, विडयाचे भजने म्हणने चालु केलेत :

॥ विडा भावाचा/शकुनाचा होय । या विडयानं देव करतो हो संभाळ ॥
॥ विडा घ्याहो भाव धरून । तेव्हाच होईन, देवराया प्रसन्न/कृष्णाचं देणं ॥
॥ भाव धरा प्रयत्न करा । भावीकासाठी हो देव भावीक झाला ॥
॥ भाव या अनामीकानं केला । देव वचनात अखंड गोयला ॥
॥ ज्याचा भाव त्याची भक्ती । कृष्ण/विठोबाराया देव त्याहीच्या संगती ॥
॥ ज्याचा भाव त्याचा देव । उभा आहे हो माझा अवधुत राव ॥
॥ राख या अर्जिची लज्जा । बिर्द संभाळ तु कृष्णाजी राया ॥
॥ राख या अर्जिचा मान । गोपाळ उभे दोन्ही हात जोडुन ॥
॥ दोन्ही हात जोडुन । अर्ज करतो हो देव रायाले ॥...
....ईत्यादी विडयाचे भजने म्हणत अर्जिचे भजने म्हटलेत.

आणी तेथुन राजा संग जावुन, त्या राजाला निरंतर नामज्योतीच्या सानीध्यात ठेवण्यासाठी ४५ दिवसाची भजनाची मांड त्या राजाच्या राजवाडयात बसवली. राजा पंथाच्या पाळणुका पाळत पुनाजीच्या सांगीप्रमाणे सच्च्या भक्ती-भावाने अर्जाच्या नेमाचे तंतोतंत पालन करू लागला.

४५ दिवसाच्या अर्ज नंतर राजाच्या पत्नीस दिवस राहुन अर्ज सफल झाला. कृष्ण कृपेने गर्भ रक्षिला गेला. नउ महीन्याच्या कालावधीनंतर राजाच्या पत्नीला मुलं झाले. मुलं होवुन अर्ज संपुर्ण सफल झाला. 'बुडाल्या वंशाचा वाठवा वेल' हे भजनाचे बोल सच्चे ठरले. जे आपण बोल बोलली, जो आपण आपला भाव अर्पण केला, त्याची पुर्तता करण्याचे राजा ने ठरवले. आपल्या बोलावर उभा राहणारा तो ज्ञानी राजा सह पत्नी आपल्या वंशाच्या दिवां ला आर्शिवाद मिळवण्यासाठी पुनाजी समोर हजर झाला.

पुनाजी समोर विनम्रतेने उभा राहुन त्या अध्यात्म च्या ज्ञानी राजाने मान्य केले की : हा चतुर्पती देव खरा ! या देवाची वाणी खरी ! 'बुडाल्या वंशाचा वाठवा वेल' या चरणाचे बोलावर कृष्णदेव उभा राहुन, त्यानी हा बोल खरा करून दाखवला आहे.

आमच्या ॥ बुडाल्या वंशाचा, वाढवला वेल । सच्चा केला बोल या कृष्ण महाराजानं ॥. आमच्या भाग्यात नसलेले आमच्या भाग्यात आणुन दिलेत या चतुर्पती कृष्ण देवानं !. हा चतुर्पती चा देव खरा ! हा चतुर्पती देव काही चुकला नाही तिरलोक्याशी !

आता या चतुर्पतीच्या देवाप्रमाणे आम्हास ही आपल्या बोलावर उभे राहुन, जे काही आम्ही बोललो; जे काही मनोभाव आम्ही या देवास अर्पण केला, तो मनो-भाव ची पुर्तता करण्याची आता आमची वेळ आली आहे. असे राजा पुनाजी समोर बोलुन पुनाजीच्या चरणी आपल्या सुतं ला ठेवुन म्हणाले की : तुमच्या साहयामुळेच हे अवघ साहयं झालेत. असेच साहय नित व्हावे. असे विनवत पुनाजीचा चरणी वंशाचा दिवा म्हणजेच आपले पुत्रं ठेवले. आणी राजा सद्गत होवुन विनम्रतेने पुनाजीला म्हणाला की : तुमचे आमच्यावर बहु उपकार झालेत. हे उपकार फेडण्याकरीता आमच्या वंशाच्या सात पिढया तुम्हास व तुमच्या वंशावळीस देव मानुन पुंजन करेल. आम्हासह आमच्या वंशावळीवर असेच उपकार करत नित साहय राहावे. आम्हा पाठीशी नित चतुर्पतीचे बिर्द उभे करावेत. हीच आता निरंतर अर्ज. असे म्हणुन पुनाजींचा आर्शिवाद मिळविला. आणी जे बोली बोलला, जे भाव केलेत, ते सर्व अर्पण करण्याची तयारी पुनाजी समोर दर्शविली.

पुढेमग राजाने आपल्या हिशोबनिस ला पुनाजी समोर बोलावुन पुनाजीच्या साक्षी ने आपल्या संपत्ती ची अर्धि अर्धि वाटणी केली. आणी आपली संप्पत्ती देवस्थानास दान करण्यासाठी पुनाजीला आज्ञा मागतली. तेव्हा पुनाजींनीं त्या अर्ध्या संप्पत्तीपैकी देवस्थानास जी उपयुक्त आहे अशी संप्पत्ती राजास दान करण्याची आज्ञा दिली. पुनाजींची आज्ञा घेवुन बाळाजी राजे यांनी आपली संपत्ती आपल्या बोलाप्रमाणे चतुर्पती कृष्ण अवधुत देवस्थानाला दान केली. चतुर्पती कृष्ण अवधुत देवस्थान पक्या दगडाने विटा मातीने बांधुन दिलेत. आजही जी संपत्ती देवस्थानाला दान केली, त्याचा संपुर्ण हिशोब आणी देवस्थान बांधकामास त्याकाळी किती खर्च लागलात ? किती विटा लागल्यात ? किती दगडे लागलेत ? किती ढाल, शस्त्रास्त्रे, पालखी रथ, शिपाई सह सुर्य, चंद्र, सुर्यपान, अब्दागिरी....ईत्यादी संपुर्ण राजचिन्हे देवस्थानाला अर्पन केलीत ? याच्या हिशोबाची वही बाळाजी राजे च्या वंशावळीतील श्री दिनकरराव आनंदराव मानकर पाटील, राजुरवाडी या घराण्याजवळ आहेत. असो.

बाळाजी राजे हे चतुर्पती चे परम भक्त झालेत. त्यांनी पुनाजीला गुरू मानले. आणी कृष्णाजीला सद्गुरू मानुन चतुर्पतींची भक्ती भावाने सेवा करू लागलेत.

बाळाजी राजे कृष्णाजीला सद्गुरू मानु लागले. आणी त्यांची भक्ती करू लागलेत असे पलट चरणे गर्जुन सांगी करतात की :

॥ माझे सद्गुरूचा हंकार आहे चांगला । ज्योतीचा अवतार कृष्णदेव ।
मन-पवन/आत्माराम/सदाराम देव मजला साहयं झाला ॥ ०७/३१,४७,४९,

॥ तिरनयन कळा । या कृष्णरायानं भरून उघडला डोळा ।
ईथे नांदतो हा माझा श्रीकृष्ण देव सावळा ॥

॥ कृष्णराया आंगी ज्योत । भैष्य सांगुन राया नांदते ईथ ।
या ज्योतीचा उजेड आहे । मजला सदोनित ॥

॥ कर्ता-यानं केल खरं । या सख्यांच वय थोर । ०७/०८
अवघं वाणं रायाच्या देहीवर । उभा आहे कृष्णदेव पुर्ण अवतार ॥

॥ पुर्ण अवतार या माझेया देवानं धरला ।
याहीनं आपल्या नामाचा उपदेश मज देल्ला ।
याहीच्या नाम-ओवीचा हद्यी घंटा वाजतो आता चांगला ॥ ०७/५०

॥ ज्याला भासन थोर । उभा आहे पुर्ण अवतार ॥ ०७/३०
॥ ईश्वर मुखी मन पवन । पुन्हा बोलला ।
या विठ्ठलाने बाळ गोपाळाचा वेल वाढवला ॥

तसेच बाळाजी राजे यांनी विष्णुस्वामी पुनाजीला आपला गुरू मानुन त्यांचीही भक्ती करू लागलेत. असे पलट चरणे गर्जुन सांगी करतात की :

॥ माझे या गुरू रायानें । आपणहुन माझा धरला हात ।
अवघं दाखवलं या ग्यान मार्गात ।
या मकाणी मजला दिसली सोयंम् ज्योतं ॥
॥ विष्णु आले महारा घरी । पाहीला याहीनं रायाचा रंग.. ॥ ०७/२९
॥ हा रत्न पारखी । या ठिकाणी उभा आहे ।
या विष्णुने हे रत्न पुर्वि/पुर्ण पारखले आहे ॥ ०७/५१
॥ भाव धरून उभा आहे । माझे देव ।
या विष्णुने पुर्वि/पुर्ण सांगतले । या श्रीकृष्णाचे नाम/नाव ॥०७/२४
पुन्हा बोलला हा माझा देव । मनशुध्द चांगले ठेवावं/बोलावं ॥
॥ या गुरू राजाने । आता माझे बरे केले ।
माझे धन मजला दिले । अंबार कोठे माझे या घरी भरले ॥
॥ बहुत दिवस अर्जि केली । या गुरू/पुनाजी राजाशी ।
माझे सद्गुरुनं/श्रीकृष्णांनं धरलं मजला हृद्याशी ॥ ०७/५०
॥ प्रथम श्रीकृष्ण मुखी शकुन बोलले ।
ईश्वर पुना पायी माझे तरणो उपाय झाले ॥

बाळाजी राजे च्या सच्च्या भक्ती भाव, सेवा-भाव, आपल्या बोलावर उभे राहण्याच्या प्रवृत्ती.... ईत्यादी वर प्रसन्न होवुन, पुनाजी तर्फे त्यांना देहवर्णनाची ओवी प्राप्त झाली. ही ओवी नुसतीच प्राप्त न होता या ओवीची अनुभव सह गाही व साक्षात्कार पुनाजीने बाळाजीराजे यांस करून दिला. चतुर्पतीचे गुढं गुप्त निरंजन ज्ञानांमृत त्यांना पाजलेत. चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाच्या चतुर्पती ज्ञानाने बाळाजी आत्मज्ञानी बनलेत. पुनाजी व कृष्ण कृपेव्दारे राजाजवळचे कोरडे अधात्मज्ञान ओले होवुन, त्यांची आत्मज्योत प्रकाशली. चौताळावरची चतुर्पती नामाची ज्योत त्याच्या देहीत प्रकटली. चतुर्पती निरंजन ज्ञानाची त्यांना प्राप्ती झाली. निरंजन ज्ञानामुळे त्यांच्यावर कृष्णकृपा झाली. कृष्णकृपेने त्यांना कोटी सुर्यप्रभा सम कृष्णप्रकाश लाभला. त्यांच्या देहीवर रविदिवस उगवला.

या कोटी सुर्यप्रभा सम रवि दिवसापासुन त्यांना अहिनाघरचे गुढं व गुप्त निरंजन चतुर्पती ज्ञानासह अहीनाघरचे देणं मिळत गेलेत. ज्याप्रमाणे आपल्या स्वतःच्या बोलावर उभे राहणा-या सच्च्या मानवाच्या बोलावर देव उभा राहतो, त्याप्रमाणे कृष्णदेव बाळाजींच्या बोलावर उभे राहु लागलेत. ते जेजे बोलन करतीन, तेते बोलनं खरे करू लागलेत. बाळाजीला शिदाई चे देणं सह ईतर देणं प्राप्त झाले.

कोटी सुर्यप्रभा सम कृष्ण प्रकाशाने शक्तिपात करून दिलेल्या देणंव्दारे त्यांच्या देहघरची आत्मज्योत जागृत झाली. देहीच्या शक्तियॉं जागृत होवुन लेखन व रंचना सिध्दि, ..ईत्यादी सिध्दियॉं त्यांना प्राप्त झालीत. ओवीरंचना, लिखाण करण्याची शक्ती सह ईतर सर्वकाही देहीच्या शक्तियॉं व सिध्दियॉं प्रकाशमान होवुन, त्यांचा देह प्रकाशीत झाला. पलट दांडाचा उगम झाला.
असे ओवीचे चरणे गर्जुन सांगी करतात की :

॥ ईश्वर पुना च्या बळे । उभा राया श्रीकृष्ण खेळे ।
चौताळाचा या रायानं मिळवला हो मेळं ॥
॥ या कृष्णरायानं मारली हाकं । माझे आत्मा सदाराम आला धावत ।
या लालाईने हा देह केला जागृत ॥

॥ सोळा कला पोर्णिमेला चंद्र पुर्ण झाला ।
बारा कली रवि दिवस, सुर्य उगवला ०७/१८॥
॥ या रवी दिवसाने/म्हणजेच या कृष्णप्रकाशाच्या दिवसाने ।
आता माझे बरे केले । श्रीकृष्णाचे बोल, ईश्वर पुनाने खरे केले ।
माझे आत्मा सदाराम नें साव-साव देव प्रकट केले ॥ ०७/४७
॥ पंच अवताराची वाणी । सांगतली अंतरीच्या जगा ।
अथर्वन् वेद उभा राहीला । विनवितो सदा ॥

अश्या रितीने कृष्णाने निरशुन्याहुन येवुन चौताळात खोदलेल्या विहीरीवर पुनाजी नामाची मोट लावुन, या पुना मोटी चे पाणी पलट दांडाने वाहु लागलेत. या पलट दांडाचे पाणी हे कृष्णप्रकाशाने जागृत झालेल्या जाणत्या बाळाजी राजाच्या परीसरातील सर्व गावात ओलवल्या गेलेत.

पुढेमग बाळाजी राजे यांनी पुनाजी कडुन लिखानास परवानगी/आज्ञा घेतली. आणी पुनाजी कडुन जेवढया जमेल तेवढया काही मुळ ओव्या घेवुन, ताम्रपत्रांवर मोडी लिपीत लिहल्यात. ते ताम्रपत्रे सात पिढयापर्यंत कुणाच्या हाती लागणार नाही. अशी व्यवस्था करून ठेवलेत. या कृष्णकालीन ताम्रपत्रावर लिहुन ठेवलेल्या ओव्या हया सात पिढयानंतर येणा-या काळा करीता आहे. जपवणुक करण्यासाठी आहे. सध्याच्या तत्कालीन प्रचलीत काळाकरीता नव्हे ! अशी जाण त्यांनी चतुर्पतीच्या सच्च्या भक्तजन सह आपल्या घराण्याला दिली.

लिखाणातील मुळ ओव्या स्वार्थि पोटभरू च्या हाती लागल्यास त्यांच्या तर्फे या लिखानात पोटपुंजेचे तिरगुणी ज्ञान घुसडल्या जावु शकते. याची जाण जाणत्या बाळाजी राजे यांना असल्यामुळे, त्यावर उपाय म्हणुन त्यानी तत्काळात गायनात आणण्या करीता काही काही मुळ ओव्याचे पलट करून गायन करने सुरू केले. जेवढया काही त्यांच्या जवळ मुळ ओव्या आल्यात, त्या मुळ ओव्यांची त्यांनी पलट केली. ओव्यांचे पलट करून, गायन करू लागलेत. कृष्णप्रकाशाच्या उजेडात ओवी रंचना करून चतुर्पतीची स्तुती करू लागलेत. मुळ ओवीचे पलट असलेली ओव्या तसेच स्तुतीगाण कायाज्ञान, आत्मज्ञान असलेल्या ओव्या रंचना बाळाजी व्दारे झाली. पलट गायन अस्तित्वात आले. चतुर्पतीचे पलट गायन चा एक खंड तयार झाला. तोच पलट खंड या चतुर्पता अथर्वन् वेदात समावीष्ट झालेला आहे. या चतुर्पतीच्या नराची ढाल उभी आहे ! येथे अवघ निशाण या ढाली बरोबर आहे । या ढालीचे तेज मोठं भारी आहे.



बाळाजी राजाच्या सच्च्या भाव भक्ती सेवा व पलट गायन ईत्यादी कार्यावर प्रसन्न होवुन, पुनाजीने कृष्ण राजाच्या सन्मानार्थ बाळाजी राजे यांनी दान दिलेल्या भाले, ढाल, सुर्य चंद्र सुर्यपान अब्दागिरीसह शस्त्रास्त्रे, शिपाई रथ पालखी ईत्यादी राजचिन्हे घेवुन सावंगा येथे रमणा काढण्याची पध्दत गुडीपाडवा व दसरा या दिवशी सुरू केली. पुढे मग या रमणाला बाळाजी राजे यांनी यात्रेचे स्वरूप दिलेत.

दसरा व गुढीपाडवा या दिवशी यात्रा भरू लागलीत. आज या गुढीपाडवा यात्रेला भव्य स्वरूप आले असुन या यात्रेत अंदाजे ३ ते ४ लाख भावीक भक्त आणी भजनगडी आप आपल्या भजन मांड सह दरवर्षी येतात. येथे रात्रभर डेरा टाकुन, आपले ईच्छीत मनोगत भाव कृष्णाकडे अर्पन करून, कृष्णाकडुन काहीना काही देणं घेवुन जातात.

तर दसरा ला सच्चे भजन भक्त गडी व चतुर्पतीचे जाणते आपल्या घरचा महत्वाचा दसरा सण सोडुन येथे येतात. ‘आपला भक्ती-भाव म्हणजेच सोनं‘ असा मनोभाव ठेवुन, सावंगा येथे येवुन ते दस-याचे भावरूपी सोनं कृष्णाला अर्पण करतात. काही भजनगडी तेथेच थांबुन रात्रभर जागृती भजन करत कृष्णाला आपले भजन भावरूपी भक्ती चे सोनं अर्पन करतात. तेथुन काहीना काही देणं घेवुन आपल्या घरी जातात/राहतात... असो.

बाळाजीराजे च्या जन्म-मृत्यु तारखेवरून

## ॥ कृष्ण प्रकट काळ चा अंदाज ॥

पुनाजी ९० वर्षे राहीलेत. त्यांच्या जीवनकालात बाळाजीने कृष्णाजीच्या राउळाचे बांधकाम करून, आपली धनसंपदा कृष्ण अवधुत देवस्थान सावंग्यास दान अर्पण केली. पुनांजीचे स्वर्गगमन १८५० झाले. पुनाजी हे १८२५ ते १८५० पर्यत गादीपती होते. पुनाजीच्या स्वर्गागमनानंतर रावजी हे गादीपती बनुन त्यांच्या काळात बाळाजीचे ३५ वर्षे राहीलेत. रावजी गादीपती असतांना १८५५ मध्ये पुनाजीच्या राउळाचे बांधकाम बाळाजीच्या देखरेखीत झालेत. बाळाजी राजे चे स्वर्गगमन १८८५ चे आहे. बाळाजी अंदाजे १०५ वर्ष राहलेत. बाळाजीराजे चा जन्म अंदाजे १७८० चा असावा. पाचवे द्युत विष्णुस्वामी पुनाजी हे बाळाजीपेक्षा अंदाजे २५ ते ३० वर्षे वयाने मोठे असल्यामुळे, पुनांजीचा जन्म (1780-30=1750) अंदाजे १७५० चा राहु शकतो. आणी पुनाजीचे जेष्ठ चार बंधु पैकी प्रथम दोन सतुं-चिंतु हे पुनाजीपेक्षा अंदाजे ७ ते ९ वर्ष वयाने मोठे असल्यामुळे, संतु व चिंतु चा जन्म (1750-9=1741) अंदांजे १७४१ व १७४३ चा राहु शकतो. आणी अनुसया पोटच्या संतु-चिंतु, गोविंदा-हरी व पाचवा पुना या पंचद्युतांच्या जन्माच्या ही अगोदर अंदाजे ४५ ते ८५ वर्षे आंधी वनात कृष्णाजीने आनंदाने भक्ती केली असल्यामुळे, कृष्णाजीचा प्रकट काळ हा (1741-85=1656) अंदाजे ई. स. १६५६ अथवा त्याअगोदरचा असु शकतो. सर्वसामान्य १७०० चे अगोदर असा अंदाज निघतो. असो.

| चतुर गादीपती चा अंदाजे कालावधी | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| कं | गादीपती चे नाव | कालावधी | कं | गादीपती चे नाव | कालावधी |
| 1. | श्री. पुनाजी | 1825 ते 1850 | 5. | श्री. आनंदराव | 1930 ते 1935 |
| 2. | श्री. रावजी | 1850 ते 1885 | 6. | श्री. नामदेवराव | 1935 ते 1961 |
| 3. | श्री. परसरामजी | 1885 ते 1920 | 7. | श्री. यशवंतराव | 1961 ते 1995 |
| 4. | श्रीरामजी | 1920 ते 1930 | 8. | पंचकमेटी द्वारे | 1995 पासुन पुढे |

येथे दिलेल्या पलट दांडाचे प्रर्वतक बाळाजी राजे आहेत. या पलट च्या ओव्यासह काही काही मुळ ओव्या बाळाजी राजे यांनी लिहुन ठेवुन, त्यांच्या काळापासुन सात पिढयानंतर अंदाजे ३०० ते ३५० वर्षानंतर येणा-या काळात आम्हा हाती मिळेल. याची व्यवस्था करून ठेवलेली होती. चतुर्पतीच्या जाणत्यां च्या व्यवस्थेनुसार आता सात पिढयानंतर म्हणजेच अंदाजे ३०० ते ३५० वर्षानंतर आम्हास मुळ ओव्या सह पलट च्या ओव्या प्राप्त झालेल्या आहेत. चतुर्पती च्या जाणत्यांनी ठेवलेल्या दुरदृष्टीप्रमाणे या ओव्या आता आम्हास प्राप्त झालेल्या आहेत. कृष्णकालीन जाणते हे जाणत होते की : सात पिढयानंतर येणा-या काळ चे चतुर्पती चे गडी थोडेबहुत शिक्षित राहणार असल्यामुळे, या कृष्णामुखच्या चतुर्पता अथर्वन् वेदांच्या ओव्यांत अथवा चतुर्पता कृष्ण अवधुत पंथात जर कोणी पोटभरू तिरगुणी कर्मकांड ईत्यादी तिरगुणी ग्यान घुसडण्याचा किंवा पोटभरू चाली-रिती, प्रथा घुसडण्याचा प्रयत्न केला, तर चतुर्पतीचे शुर विर खेत्री, भजनी, ग्यानी, अभ्यासु....ईत्यादी त्याचा विरोध या सात पिढयानंतर येणा-या काळी करू शकते.

सप्तपिढयानंतर च्या काळी ते चतुर्पतीचे सर्व खेत्री हे मानसन्मान, पोटभरू कर्मकांड, पोटभरू चाली-रिती, प्रथा..ईत्यादी तिरगुणी ग्यानाचा अजीबात शिरकाव या चतुर्पतीच्या ग्यानात करू न देण्यास कटिबध्द राहील. समर्थ राहणार आहे.

म्हणुनच या सात पिढयानंतर येणा-या काळी हा चतुर्पता अथर्वन् वेद त्यांच्या हाती देण्यास काहीही हरकत नाही. असे आधीच्या जाणत्यांनी जाणुन, हा चतुर्पता अथर्वन् वेद त्यांच्या सप्तपिढयानंतर आता शकुनांव्दारे आपल्या हाती दिला आहे. शकुनाव्दारे आलेला हा चतुर्पता अथर्वन् वेद आपणहुन सत् भक्तांच्या घरी येवुन हाती दिलेला आहे.

॥ शकुनाच्या लागा ध्यानी । सोय धरा काही ।
पुन्हा पुन्हा नरदेही ऐसा जन्म नाही ॥ ०२/०९ ॥
॥ शकुनाची लावा धुनी । धरावं ध्यानं ।
कृष्ण योगी आला बापा । मिर्त लोकी वाणं ॥ ०२/०९ ॥
॥ शकुनाचा मान करा । तारण देही ।
कृष्ण महाराज, थोर महीमा तुही ॥
॥ श्री कृष्णांचा वर्षाव, विष्णुचे/विष्णुस्वामी पुनाजीचे पालनं ।
दोघाच्या मुखंचे, होय हे गायन ॥ ०७/२१ ॥
॥ एका विहीरी, याहीनं लावल्या पाच मोटा हो ।
याहीचं पाणी, हे जाते दहाही दांडा हो ।
एवढं ओलुन, लावलं या एका पंथा हो ॥ टाळ वाजे..

चतुर्पतीचे हे पाणी चतुर्पतीच्या मुळ दहा दांड पैकी श्री बाळाजीराजे च्या पलट दांडात येवुन, येथेही हे चतुर्पतीचे पाणी ओलवुन या पलट दांडातही तो उभा असल्यामुळे येथेही,
॥ टाळ वाजे ढोंलकं वाजे । नौबत वाजे झणानां ।
श्री कृष्णाचा पुर्ण अवतार आला । अवधुत अवधुत म्हणानां ॥



**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**



**॥ सद्‌गुरू श्री कृष्ण महाराज की जय ॥**
**॥ गुरूदेव श्री विष्णुस्वामी पुनाजी की जय ॥**



॥ खंड ०७ ॥

॥ पलट गण नं. ०१ ॥

॥ भजन पुंजन खंड-०१/गण०७ या मुळ गण चा पलट गण ॥

## ॥ भजन पुजंन पलट गण ॥

॥ भजन पुजन ध्यान विठ्ठलाचे ।
राया चरणी जडलो सांभाळ, देव करते माझे ॥घृ॥०१॥
॥ आधी गणाला विनवितो राया । हरी भजना मंध्यी ।
हद्यी बसुन देव आपली सांगते वाणी ॥
॥ गायी पोटी चार वेद । ज्ञान सागर ।
चहु वेदाचं ऐका बोलनं, उभ केलं सारं ॥
॥ चतुर आहे उभे याहीच्या, मोक्षाला हिरं ।
तिरनयनाचं ओळखाव ज्ञान । जागी केलं सारं ॥०४॥

॥ चत्रभुज महाराज देवानं । दाखवलं स्वरूप ।
देवा या दिवसाचं रूप, दिसलं एकं ॥
॥ यादव कुळी उभा पुना । देव विनवावं सावासं ।
याहीच्या हातात आहे या, गोपाळाचे काजं ॥
॥ निशंःकलंकीचे आता राया । धरले पाय ।
देहे जीवाला, हा देव माझा । नांदवते आहयं ॥

भजने :-
॥ प्रथम नमो गणराजा । सर्व ठायी रंग, धरून देव माझा ॥
॥ गणराज गणपती । कळसुत्र आहे या देवाच्या हाती ॥
॥ उभा गण पृथ्वीचा पती । अवघा कार आहे या देवाच्या हाती ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥






॥ पलट गण नं. ०२ ॥

॥ कळसुत्र तुम्हा हाती भजोभजो गणपती -खंड०१/०१/०५ या मुळ गणांचे पलट चरणे असलेला पलट गण ॥

## ॥ विठ्ठल राया गणपती ॥

॥ उभा आहे अवद्युत । आता आहे या अवताराची भेट ॥
॥ जोडा ज्योतीले हात । चत्रभुज देव नांदतो इथं ॥
॥ विठ्ठल राया देव माझा गणपती ।
चत्रभुज राव-साव देव माझ्या इथी ॥
॥ शाम वेद मनपवन आत्मा । सदाराम संगती ।
याहीच्या आनंदान सदोनित । नांदतो इथी ॥

खंड०१/०१/०५:-कळसुत्र तुम्हा हाती भजो भजो गणपती या गणांचे पलट चरणे
॥ याहीच्या चरणी उध्दार । धरणी, आहे रत्न जडीताची ।
या देहीची मजबुती आहे या । देवाच्या हाती ॥
॥ देहे धरून चतुर उभे । माझे नांदते देव ।
या देहीचे देवरूप मजला । दाखवले इथं ॥
॥ विठ्ठलराया गणपती । कळसुत्र याहीच्या हाती ।
या देवाच्या पायी मजला । घडली संमती ॥
॥ श्रेष्ठ राया उभा आहे । वैजावंती माळ गळयात आहयं ।
कपाळी चंद्राची कोरं । उभा आहे देव पुर्ण अवतारं ॥

॥ पुनाचा हा जीव । पुनाची ही देही ।
चिरंजीव धर्मराया । नांदतो हाही ॥
॥ अवध्याचे गुण मालुम आहे । इश्वर-पुनाले ।
अंगीकार याहीच्या हाती । आत्मा सदाराम, नांदते संगती ॥
॥ या निशं:कलंकीचे आता । धरले पाय ।
माझ्या देहीचा अवघा कलंक । उडवला याहीनं ॥
॥ राया मालक माझा होये । ठाई-ठाई माझा देव उभा आहे ॥

॥ या मनीरामानं याहीचं ध्यानं । धरलं आहे ।
या सुरतरामानं अवघी राशद । जमा, केली आहे ॥
॥ सर्वच याहीला ठावं चतुर । उभे माझे देवं ।
अवघी केली चतुराई रायानं । आता, धरले तुमचे चरण ।
अवघी केली चतुराई राया । आता, जडलो तुमच्या पाया ॥

भजने :-
॥ देवा तुमच्या पोटात, आहे दया । आपल्या बाळावर तुम्ही धरली छाया
॥ मालक माझा देव नांदतो । अवद्युत राया ।
अवद्युत राया तुम्ही केली । मज वरती दया ॥
॥ याहीच्या चरणावर माथा । हद्यी धरलं देवा मजला आता ॥
॥ हद्यी धरून उभा जवळ । लोट मारली या देवाच्या चरणावर ॥१८॥

॥ आता विनवितो देवा । तुमच्या चरणाचा धरला धावा ॥
॥ कृष्णा याहो मनमोहना । तुम्हा विनवितो महाराजा मनमोहना ॥

॥ तुमचे नाम सागर । म्हणुन म्या धरला देवा तुमचा पदर ॥
॥ पदरी धरून उभा जवळ । लोट मारली देवाच्या चरणावर ॥
॥ चरणी आलो विठुराया । महाराजानं केली, बाळावर दया ॥
॥ दया केली प्रभुनं । अनामत धनी , उभेआम्ही लेकरं अन्जानं ॥

॥ अन्जानाचा होय दाता । भेट दयाहो महाराजा समर्था ॥
॥ अन्जान तुझं लेकरू । उभा देव या देहीला तारू ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०७ ॥
॥ पलट गण ओवी नं. ०३ ॥
## ॥ ....... गण/ओवी ॥

Blank Space for Additions :807-808

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. ०४ ॥
॥ दाईची अरज-ओवी शक्तिची ओवी-०८ खंड-०१/०२ ची पलट ॥

## ॥ हरी हो आत्मराजा ॥

॥ हरी हो आत्मराजा । श्री कृष्ण देव माझा ॥ घृ ॥

॥ विठोबा उभे राउळाशी । भक्त आले भेटी साठी ॥

॥ रुक्मीणी धावे खडसुन । आत्मा चालला पलटुन ।
विठोबा बोले रुक्मीणीशी । पलटुनी आणावे भक्ताशी ॥

॥ भक्त जाईन तिकडे जाईन । मग म्हणशील सांगतलें नाही ॥
भक्ता मागं गेले देव । रुक्मीणीला आला संदेह ॥

॥ रुक्मीणी बोले नारदाशी । दाई घालावी देवाशी ॥

॥ कृथा यवगी भक्तराज । दाई तुम्हा, फिरा मागं ।
दाई मानेना भक्ताशी । पुढे चाले ऋषीकेशी ॥

॥ त्रैता यवगी भक्तराज । दाई तुम्हा, फिरा मागं ।
दाई मानेना भक्ताशी । पुढे चाले ऋषीकेशी ॥

॥ व्दापर यवगी भक्तराज । दाई तुम्हा, फिरा मागं ।
दाई मानेना भक्ताशी । पुढे चाले ऋषीकेशी ॥

॥ कल यवगी भक्तराज । दाई तुम्हा, फिरा मागं ।
दाई मानेना भक्ताशी । पुढे चाले ऋषीकेशी ॥

॥ सत् यवगी भक्तराज । दाही तुम्ही फिरा मागं ।
दाही मानली भक्ताशी । पलटुन आले ऋषिकेशी ॥

भजने :-
॥ अवघ्या गोडातलं गोड । आत्मा लावणीचं झाडं ॥
॥ चहु वेदातला वेद । आत्मा पाचवा लभेद ॥
॥ भक्त जीवाचा जीवन । त्याला तु हद्‌यी धरनं ॥
॥ सत् यवगी भक्तीजन । हे आहे देवासमान ।
ऋषिकेशी आले याहीला शरणं ॥

-: निरसन/स्पष्टीकरन :-

दाईची ओवी खंड०१/भाग०२/०८ चे निरसन वाचावे.



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. ०५ ॥

॥ आदीपुरुषाचा खेळ खंड-०२/ओवी-११ ची पलट ओवी ॥

## ॥ या देवाचा मान्यव चांगला करावं ॥

वरचरण :- ॥ या देवाचा हा मान्यव । चांगला करावं ।
या देवाला ओवाळीतो । रावसाव होयमाझे देवं ॥०१॥

॥ सर्वत्राच्या आधी श्रेष्ठं आहे । ईश्वर पुनाचे नावं ।
याहीचा वेल विस्तार उभेआहे । माझे हेच देवं ॥
॥ शकुन म्हणता शकुन शकुन । वस्तु होय कोण ? ।
राव साव देव उभे । माझे दोनं ॥
॥ चित्तमन लावुन चारही वेद । उभे केले याहीनं ।
आथर्वन वेदाचं खर आहे । हे बोलनं ॥ ०४ ॥
॥ शकुन पुतळे रुप दिसले । या डोळ्यानं ।
संगत महाराजाची अगाध आहे । धर्म रायाचा गुणं ॥
॥ आशा धरून आत्मा राम । देव आले माझे ।
माझ्या हद्यी, बसुन या लालानं । उजीडले चांगले ॥
॥ या मार्गात सदा राम । देव माझे आले ।
या स्वरांवर बसुन, या लालांनी । उजीड चांगले केले ॥
॥ शकुनाचं राज्य तिरनयन । देवराया आंगी ।
या सावंग्यात खरी झाली । ईश्वर-पुनाची सांगी ॥ ०८ ॥



॥ ओवी नं. ०६ ॥

॥ निर्मळ ढळमळ खंड-०२/ओवी-०५ ची पलट ओवी ॥

## ॥ रायाचे हात, देहदेउळ झाले मजबुत ॥

वरचरण :- ॥ रायाचें हात । देहदेवुळ झाले मजबुतं ।
या देहदेवळात । नांदते देवाची ज्योतं ॥

॥ विनवितो हे माया । उभा देव सागर ।
ओळखावा तिरनयन । या रायाचा विस्तारं ॥
॥ उभे हे गोपाळ । सप्त हे सागर ।
ओळखावं हे कुळ । निर्मळ देवघरं ॥
॥ याहीच्या हे रत्ती । पक्की धरली मुसं ।
यामध्ये हा उंच । आहे हंसं ॥ ०४ ॥
॥ उमजुनी या मनी । राखन आहे ईथीं ।
हेच देव आहे । माझे संगती ॥
॥ याहीची ही वाणी । ऐकली या कानी ।
लागलोसे ध्यानी । आता महाराजा ॥
॥ याहीचा हा गुणं । ऐकला श्रवणी ।
आता धरली बाणी । या देवांनं ॥
॥ सावाची ही वाणी । चांगला हा पंथ ।
धनी अनामत । उभा इथं ॥ ०८ ॥
॥ तुच माझा गुरु । तुच माझा पिता ।
अवघं साहयं झालं । तुमच्या हाता ॥ ०९ ॥

भजने :- ॥ ईश्वर मुखी मन पवन । पुन्हा बोलला ।
या विठ्ठलानं बाळ गोपाळाचा । वेल वाढवला ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. ०७ ॥
॥ सांवंग नगरी ज्योत भारी खंड-०२/ओवी-१७ ची पलट ओवी ॥

## ॥ सावंग नगरी ज्योत भारी ॥

॥ सावंग नगरी ज्योत भारी । राया होय आमचा धनी ।
देव-ब्राम्हण, राया मुखी । आहे अमृत संजीवनी ॥ घृ ॥
॥ हुकुम या सावाचा । हुकुम, बंदी केलं कामं ।
पुर्वि पासुन सांगुन ठेवलं । देव रायाचं नामं ॥
॥ नवा खंडामध्ये आगळं आहे । देवरायाचं रूपं ।
गिरजा होय देही/देवी । राया, होय माझा बाप ॥
॥ अमृताची कुप्पा देव राया । हाती घेवुनं ।
नवखंड पृथ्वी जागी केली । दोघा मिळुनं ॥०४॥

॥ नवखंडामध्ये एकच आहे । या दोघांचा मानं ।
चंद्र-सुर्य जडले याहीच्या । आंगुष्ठी येवुनं ॥
॥ हेच ठिकाण हेच मकाणं । हेहोय आईचे गावं ।
गिरजा होय देही/देवी राया । आत्माराम होय महादेव ॥
॥ विठ्ठला च्या, मुळे हे होय । या आईचे मकान ।
पृथ्वी मध्ये गमन केलं । या आई-बापानं ॥
॥ छाया धरून सत्य आहे । रायाचा शकुनं ।
बम्हा-विष्णु शंकर झाले । माये पासुनं ॥०८॥

॥ ग्रंथ सावा पासुन महाभारत । इथं ठेवलं सांगुनं ।
पुर्वि पासुन नाम जपले । एका महा देवानं ॥
॥ हे होय चतुराच घर । हे होय, या आईचे माहेरं ।
आईला भजुन लवुन राहयं । आई वागवते बराबर ॥
॥ हे होय द्रौपदा आई । श्रीकृष्णा ची होय बाई ।
दोहीत दुर्जनाचं हाड फोडुन । खाते हेच आई ।
आता लागा ईच्या पायी । संभाळ, केला त्वां मायबाई ॥
॥ आदीपुरूषाच्या, मुखचा होय । सत्य शकुनं ।
राव-साव चरणी जडलो आता । नाही कोणाचं भेव ।
आत्माराम हद्यी शिरावर सदाराम । नांदते हे देवं ॥१२॥

भजने :-
॥ ईश्वर मुखी मन पवन । पुन्हा बोलला ।
या विठ्ठलानं बाळ गोपाळाचा । वेल वाढवला ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०७ ॥
॥ पलट दांड ॥
॥ ओवी नं. ०८ ॥
॥ गगन कवटाळु खंड-०२/ओवी-२७ ची पलट ओवी ॥

## ॥ रवी दिवस भरुन । मजला साहयं झाल ॥

॥ रवि दिवस भरुन मजला । साहयं झाला ।
चंद्र दिवसानं माझ्या घरी । चांगला आनंद केला ॥
॥ आकाश धरणी इथ आहे । पवन पाणी ।
या ठिकाणी चंद्र सुर्य । मिळाले दोन्ही ॥
॥ रवि दिवसाचा इथं उजाला । झाला भारी ।
अवघ देवांगण पलटुन आलं । देवरायाच्या घरी ॥
॥ रावा सावानं इथं वाणी । सांगतली भारी ।
हाच देह धरुन, देव नांदते । माझ्या शरीरी ॥०४॥

॥ राया आंगी ज्योत भैष्य सांगुन । राया नांदते इथं ।
या ज्योतीचा उजीड आहे । मजला सदोनित ॥
॥ अगाध आहे रायाचा गुणं । रायासंग अवघ देवांगण ।
याहीन दाखवलं रुप । हे होय, माझे मायबाप ॥
॥ उभा राहीला देव माझा । पुना परवेशी ।
भक्तीचा लेश पुरा आहे । या देवा पाशी ॥
॥ हे पत परतलं भारी । गिण्यानवंत मिळाले, एका ठीकाणी ।
याहीच्या मुखची हे होय । शकुन वाणी ॥०८॥

॥ करतारान केलं खरं । या सख्याचं वय थोर ।
वाण रायाच्या देहीवर । उभा आहे, पुर्ण अवतार ॥
॥ ऐका यादेवाची वाणी । चतुर, उभा आहे मकाणी ।
याहीच्या मुखची होय हे । अमृत वाणी ॥
॥ खरी याहीची वाणी । या सावानं, धरली बिर्दाची बाणी ।
पाचही वेद अवघ देवांगण । नांदते एका ठिकाणी ॥
॥ अवघे राया घरी येवुन । सत्वशिल, दाखवला डोळ्यानं ।
माझा अंगीकार करुन । हद्यी धरलं, या देवानं ॥१२॥
॥ श्रीकृष्ण सावळा सत्वशिल होय । या देवानं केलं बरं ।
या देहीचे रुप अंतापार ॥ १३ ॥

**भजने :-**

॥ ईश्वर मुखी मन पवन । पुन्हा बोलला ।
या विठ्ठलानं बाळ गोपाळाचा । वेल वाढवला ॥

-: शब्दार्थ :-

**रवि दिवस** :- ज्या दिवशी सुर्यज्योतीच्या कृष्णाचा कोटी सुर्यप्रभा सम कृष्णप्रकाश लाभतो तो दिवस ! तोच राहु दिवस होय. या रवि/राहु दिवशी *॥ कोटी सुर्यप्रभा सम होईन उजाला । डिकावं तुम्ही नामाला ॥ उजळन रुप या सुर्याच्या तेजात । जैसे रुप हे सुर्याचे तेज ॥*

**चंद्र दिवस** :- ज्या दिवशी चंद्रज्योतीच्या हेंगडुजीचा लख्ख चंद्रप्रकाश लाभतो तो दिवस ! या दिवशी *॥ चंद्रज्योती सम होईन उजाला । डिकाव नामाला ॥*

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ पलट दांड ॥
॥ ओवी नं. ०९ ॥
॥ माया चैत्यन्या आदीमाया खंड-०१/०२/शक्ती-ओवी-०३ ची पलट ओवी ॥

## ॥ प्रथम होती गायत्री ॥

**वरचरण** :- ॥ गिरजा माझी माता । साहंकारी राया उभा आता ।
या माय बापान, हद्यी बाळ । धरले आता ॥

॥ प्रथम होती, गायत्री । चौघे, झाले इच्या उदरी ।
इच्या अमृतान, देह पिंड । जगवला इन ॥
॥ अमृत पान्हा, पाजुन चौघाशी । बोलली गाय ।
माझा अंगीकार, या पुनानं । केला साहयं ॥
॥ भाग वचन, या पुनाशी । झालं देणं ।
याहीन राखलं, ईमान हद्यी । गाय धरली आदीरूपानं ॥०४॥
॥ अवघी याद, या गाईशी । निरोप आहे चौघाशी ।
वरवर केलं, तिघानं । चतुराई, आहे पुना पाशी ॥
॥ आधे रूप, भैस याहीनं । धरली गाय ।
गाय बोलली, संग उभी । सदोनित आहयं ॥
॥ गाय आली, ताई आली । भैस बोलतं ।
ब्रम्हा विष्णु, तिरनयन । उभे राहले इथं ॥
॥ चौघा मिळुन, ताई आली । याहीनं, बोलावली हीच गाय ।
गाय बोलली, अवघं आता । पुनाचं आहयं ॥ ०८ ॥

॥ तिघे जन, या गंगेशी । आहे प्रेमानं ।
हद्यी गाय, धरली राया । आदी रूपानं ॥
॥ तिघा जना, पुसे खुणा । माया देवता ।
गाई पोटचं, वाण-रूप तुम्ही । दाखवावं आता ॥
॥ अवघं वाण, आहे या । गाईच्या पोटातं ।
हेच माळ, घातली आहे । रायाच्या गळ्यातं ।
॥ कारण राया, हाती वेद । उभे केले याहीनं ।
आथर्वन् वेदाचं, खर आहे । हे बोलनं ॥ १२ ॥
॥ वेद आले, पोटी खुशाल । देव आपल्या मनाशी ।
अमृत संजीवनी आहे । राया च्या पाशी ॥
॥ कजब्या मध्ये, हिशोब केला । अगाध, आहे पुनाचा गुणं ।
अवघं नांदवते, देव राया । आपल्या हातानं ॥
॥ पवन पाण्याशी, आधार । या, सावानं धरलं ।
सत्य पुना, आधारी साहंकारी । राया उभा इथं ॥
॥ योगी भारी, अवतार घरी । मेघश्याम, आहे जाणता ।
या रायानं, आजवरी ऐकली । अवघ्याची कथां ॥ १६ ॥

॥ सत् यवगी, राज भैसा । परवाना, देवरायाचा आला ।
या देवरायानं इथ येवुन । उजीड चांगला केला ॥
॥ चतुर पती, आथुर्वनं वेद । आत्माराम देव आले पोटी ।
सदारामानं जागी केली । अवघी सृष्टी ॥ १८ ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ पलट दांड ॥
॥ ओवी नं. १० ॥
॥ अठरा वर्णाची गाय खंड-०२/ओवी-३४ ची पलट ओवी ॥

## ॥ गाईचे वर्णन । पुनाचे सुमरन ॥

पलट घृपदचरण :- ॥ गाईचे वर्णन । पुनाचे सुमरण ।
धरले हे ध्यान । राया विठ्ठलाचे ॥ घृ ॥

॥ अठरा वर्णाची गाय । वेदाची होय माय ।
इचे सुखः आहे । अनंत दिवस ॥
॥ गाईच्या या पोटी । वेदाचा विस्तार ।
तयांचा परिवार । ज्ञानाचा सागर ॥
॥ गाईच्या पोटी । आहे सत्कृती ।
दिलीसे पोथी । पुराणी आहे इथी ॥ ०४ ॥
॥ गाईच्या नाव । उभा आहे सावं ।
पुराणी आहेत । याहीचे नावं ॥
॥ गाईचा वंश । पुनाचा लेश ।
आता या रायानं । पाहीलासे वास/रहिवास ॥
॥ अठरा वर्णाची गाय । महारांजाची खाण ।
या गाईच्या मुखचं । होय हे वर्णन ॥
॥ गाईचे गायन । वेदाची हे याद ।
अथर्वनं वेदानं । सांगतली शुध्द ॥०८॥

॥ अथर्वनं वेद । राया मजबुत ।
पुनाचे हात । झाला जागृतं ॥
॥ तिघा या भावाचा । एक भाव ।
रूप धरून । उभे देव ॥
॥ चौ-वेदाची । हे होय गाय ।
देहपिंड धरून । संग उभी आहे ॥
॥ गाईचा हा मौसं । उल्हास याहीस ।
याहीचे गुण नाम । हे आहे बेस ॥ १२ ॥
॥ गाईचा जिवन । पुनाचा पवन ।
राया नांदवन । आपल्या हातानं ॥
॥ गाईचे हे वाणी । जन्मल्या खाणी ।
राया उभा आहे । प्रेम लावुनी ॥
॥ गाईचा अंगीकारी । राया उभा घरी ।
गाय उभी आहे । पुनाच्या घरी ॥
॥ गाईचे गायन । मौसाची धरणी ।
गाई पासुन झालं । अन्न पाणी ॥ १६ ॥

॥ गाईच्या या गुणा । मुखी अमृंत मौस माना ।
राया उभा खरा । विनवितो गुणीजना ॥
॥ गाईच्या खुणा । दिगांबर मना ।
राया योगी आला । अलामत पुना ॥ १८ ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ पलट दांड ॥
॥ पलट ओवी नं. ११ ॥
॥ माझी नाम गाई बरी हो खंड-०२/ओवी-३७ ची पलट ओवी ॥

## ॥ भजराम गाय माझी खरी ॥

॥ भजराम गाय माझी खरी । पृथ्वी, झाली इच्या उदरी ।
हे होय पुर्विची दोरी । सोहंम्, नांदते माझ्या घरी ॥ घृ ॥
॥ कार केला भुम्मेवरी । सावध, आहे यवगावरी ।
या मायेची ही गाही । झाली खरी ॥
॥ गाईचे तीन पाय । तीन, खुम्मी उभे आहे ।
गाईचा चवथा पाय । यवगावर सावध आहे ॥
॥ ऐसे कितीक झाले बेईमान । याहीची, पुस देव घेईन ।
जे नाही झाले बेईमान । त्याहीला, नामी सांभाळन ॥ ०४ ॥
॥ आहो बाळ तुझा तान्हा । पाजला, अमृंताचा पान्हा ।
हे होय चतुर्पता गाय । ईचा, भेद कोण पाहयं ॥
॥ हे होय अनंत रूपाची गाय । देहे, धरून उभी आहयं ।
यवगा वरत सावध आहयं । बाळाचं केलं साहयं ॥
॥ गाईच्या पोटी आले केवळ । पृथ्वी, वसवलं गोकुळ ।
महाराज राखे गाई । याहीनं, तारली नरदेही ॥
॥ यवगी आली विठामाई । तुज विन कोणी नाही ।
हे होय अनाथाची आई । संभाळ, करते मायबाई ॥०८॥
॥ गाईचा शकुन आला खासा । वेल, वाढवला मानवाचा ।
दिवस आला यवगाचा । करोडो, वर्षे आयुष्याचा ॥
भजने :-
॥ गाय गाय गाय । गाय सर्वत्राची/अवघ्याची माय ।
तिरभवना मध्ये राहे । पंडीता भेद तु पाहे ॥ गाय गाय गाय..



॥ पलट खंड ०७ ॥
॥ ओवी नं. १२ ॥
॥ मिर्तलोकची राज महीमा खंड-०२/ओवी-३८ ची पलट ओवी ॥

## ॥ या स्थळाची राज महीमा ॥

॥ या स्थळाची राज महिमा । देवा तुम्हाले ।
आता विनविती हद्यी । धरलं बाळाले ॥ घृ ॥०१॥
॥ मदत या सावाची, या रायानं । शुध्द, धरली राजाची ।
याहीच्या पाशी शिक्का मोहर । आहे इश्वर-पुनाची ॥
॥ राया आहे दैवान । अवघं, आहे रायाच धन ।
याहीच्या घरी आहे हो । रत्नाची खाण ॥
॥ माया लावुन या रत्नाची । राया करते जतनं ।
आत्मा सदारामाले उजीड झाला । याहीच्या नामानं ॥०४॥
॥ माय हे माउली, गिरजा रूपी । रूपात येवुनं ।
अमृताचा प्याला पाजला इनं । प्रेम लावुनं ॥
॥ भरले अमृतान घट निर्मळ आहे । रावा-सावाचा पंथ ।
हेच देव उभे याहीला । विनविती सदोनितं ॥

॥ समुद्राची खेप बळ दीले । या देवानं ।
आता गवसलं केणं परवेश । दिसले डोळ्यानं ॥
॥ राज ऐस थोर देउळ । केलं तयार ।
या देवळाची महिमा धनीदेव । उभे कारागीरं ॥०८॥
॥ चौ-ताळाची केली रंचना । या देह देवळावर ।
चंद्र सुर्य जडीत केलं । या देवळात उजेड ॥
॥ देउळ आले रूपात चांगले । ओळखाना येथी ।
या धन्याच्या कृपेन रयत । नांदते इथी ॥
॥ बहु दिवसाची वस्ती चांगली । ओळखाना इथी ।
याच देवळा मध्ये आहे या । देवाची वस्ती ॥
॥ या देवळाची उमर आता । आली भारास ।
अमर पद दिलं या रायानं । या देहीसं ॥ १२ ॥

भजने :-

॥ ईश्वर मुखी मन पवन । पुन्हा बोलला ।
या विठ्ठलानं बाळ गोपाळाचा । वेल वाढवला ॥
॥ ईश्वर मुखी मन पवन । पुन्हा बोलला ।
या विठ्ठलानं बाळ गोपाळाचा । वेल वाढवला ॥



॥ पलट खंड ०७ ॥
॥ ओवी नं. १३ ॥
॥ एक बाग लावला खंड-०३/ओवी-०९ ची पलट ओवी ॥

## ॥ हा बाग विठ्ठलाचा होय ॥

॥ हा बाग विठ्ठलाचा होय । सावळा, देव राखन आहयं ।
या बागाचा धर्म रायानं । केला संभाळं ॥ ०१ ॥
॥ औट हाताचे हे वावर केले । सत्वधीर यामध्ये नागर धरले ।
काम-कोध मद-मत्सर । डंब-अहंकार, हे बैल सहा जुतले
सत्वगुण मुखी सिध्दांत वेद बोलले ॥
॥ चौ-ताळावर एक विहीर । या विहीरीचे हेच होय नहर ।
चतुराई माळीन ही आहे । बहु चातुर ॥
॥ इने वाफे वल्हवले बहात्तर । गुलाव कन्नेर फुल आहे चौफेर ।
एकविस भरले अंबार । चौदा मंडळ आहे बराबर ॥ ०४ ॥
॥ बम्हया हाती हे बाग लावले ।
या विष्णुनं या बागाचे । पाळणं चांगले केले ।
या महादेवानं कृपा दृष्टीनं । बाग चांगले पाहले ॥
॥ हा बाग पंचरंगी खुलला ।
बाग पाहुन विठ्ठल देव मनी दंग झाला ।
आत्मा सदारामाने बागात येवुन । उजीड चांगला केला॥०६॥

भजने :-

॥ ईश्वर मुखी मन पवन । पुन्हा बोलला ।
या विठ्ठलानं बाळ गोपाळाचा । वेल वाढवला ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. १४ ॥

॥ आकाश जाणुनिया पिता खंड०२/ओवी-०७ व माझा भाव असो नसो खंड-०५/ओवी-५६ या दोन ओवींचे पलटचरणे असलेली पलट ओवी ॥

## ॥ उभा राया कृष्ण राया ॥

खंड०२/ओवी-०७ आकाश जाणुणीया पिता चे पलट चरण :-

॥ उभा राया कृष्णराजा ।
धरणी माय माझी धरणी । आता लागलो इच्या चरणी ॥

खंड ०५/ओवी-५६ माझा भाव असो नसो चे पलटचरणे :-

॥ अत्री ओळखावं हा पिता । उभी आहे अनुसया माता ॥
॥ ब्रम्हा विष्णु शंकर बाळ केले । अवतार उभे एका मिळे ॥
॥ श्री कृष्णानं दाखवले पायं । अवतार निरंजन होय ॥ ०४ ॥

खंड०२/ओवी-०७ आकाश जाणुणीया पिता चे पलट चरणे :-

॥ आहे या देवाचा आधार । दिसले चतुराचे घर ॥
॥ लदबद ज्योतीचा प्रकाश । इचा उजेड चवताळात ॥ ०६ ॥



॥ ओवी नं. १५ ॥

॥ जीव अज्ञानी ओवी खंड-०३/ओवी-१३ चे पलटचरणे असलेली पलटओवी ॥

## ॥ माता भेटली माय माझी ॥

॥ माता भेटली माय माझी । गिरजा जननी ।
हरूष्य आला शंभु देव । रायाच्या मनी ॥
॥ चतुराई गमन केलं । या, गिरजा आईनं ।
इथं भेटला मजला पंच्यानयन । हाच होय, माझा तिरनयनं ॥
॥ ईचे नयन उपराती । मोहनमाळा, इच्या गळा कंठी ।
कपाळी चंद्राची कोर । हे आहे, इच्या लल्लाटी.. ।
इच्या नाकी आहे, बेसर-मोती ॥
॥ बुचडा बांधुन बालांचा । भांग, भरला मोतीयाचा ।
वर तुरा लावला केवळ्याचा । इनं झपाटा मारला..,
दोन्ही नयनाचा ॥
॥ गिरजा आईनं सुंदररूप धरले । सर्वे आंगीवर इच्यारंचन दिसले
गिरजा तुजकडे पाहुनं । मन शंभुचे संतुष्ट झाले ॥०४॥

खंड०३/ओवी-२३ जिव अध्यानी चे पलट चरणे :-

॥ गिरजा म्हणे शंभुले । तांबोश्या माझा भ्रतार ।
मोठया-मोठयाचा हा देवं । होय सरदार....
अवघी रासेद घेवुन देवमाझा, आला लवकर ॥
॥ शंभु म्हणे गिरजाले । कधी सोडुन नाही जाणार तुले ।
हे सत्य वचन गिरजा माझे । तु घे चांगले...
सत्य-सत्य शंभु आपल्या, मुखी बोलले ॥
॥ शंभु अर्जवाशी आले । गिरजा म्हणे, राया सांगतो तुम्हाले ।
जितके सांगीतले तितके । ऐका लागन तुम्हाले ।
सत्य-सत्य शंभु आपल्या मुखी बोलले ॥
॥ गिरजा म्हणे शंभुले । परनारीवर तुमचे मन ।
तुम्ही वसंवलं तिरभवनं । साठी वर्षाचे खरं,
आहे तुमचे अनुष्ठानं ॥०८॥
॥ शंभु म्हणे गिरजाले । त्वां ठगवले मोठया-मोठयांले ।

मन माझे मोहीले । आपल्या अध्यानी, गिरजा केलं मले ।
साठी वर्षाचे अनुष्ठान । गिरजा तेही सोडले ॥
॥ गिरजा म्हणे शंभुले । तुम्ही राया होय कोण ?
मी होय गिरजा-तिरनयन । तिरभवनाचे राज्य...
आपण करू या दोघा मिळुनं ॥
॥ गिरजा म्हणे शंभुले । तुम्ही व्हावं राया निळकंठ ।
बहु दिवसा तुमची मजशी झाली भेट ।
आता झाली मिळवणी । देवराज्य करू एका ठिकाणी ॥११॥



॥ ओवी नं. १६ ॥
॥ ढाकुल नामी खंड-०४/ओवी-०१ चे पलटचरणे असलेली पलट ओवी ॥

## ॥ धन्य सद्‌गुरू सुर्तावंत ॥

॥ माझ्या सद्‌गुरूचा हंकार । आहे चांगला ।
अवतार ज्योतीचा श्यामवेद मजला । साहयं झाला ॥
खंड०४/ओवी-०१ ढाकुल नामी चे काही चरणांची पलट चरणे :-
॥ धन्य सद्‌गुरू सुरतीवंत । महाराजानं रूप धरले ।
चिरंजीव याहीनं केलं । आपल्या बाळाले ॥
॥ गायन कला राया आंगी । याहीन; शिकवलं आपल्या बाळाले ।
अवघ सत्य धरून सावळादेव । उभा राहीला ॥
॥ जप नाही तप । अवघ, करन आहे याहीला ।
अस्तुरी पुरूषाचे रूप अंगी । महादेव, राया उभा राहीला ॥
॥ अवघी याहीची विनवणी । या साधुचा, समागम झाला ।
आता दर्शनी महादेव । राया आला ॥
॥ आदी पासुन या नामाचा । उदिम चांगला केला ।
उदिम चांगला केला । देवरूप, आहे या रायाला ॥
॥ राया आहे दैवानं अवघा । आहे रायाचा मानं ।
अथुर्वनं वेदी राया होय । देव ब्राम्हण ॥
॥ भारत याहीच्या मनात । अमृत, संजीवनी याहीच्या मुखातं ।
देहपिंड धरला स्थुल देहीवर । उभा राहीला ॥ ०८ ॥
॥ हे होय धर्माची मुर्ति । ईश्वर-पुना, विठ्ठलदेव नांदतो इथी ।
राया राज्य कर्ते हा देव । होय पृथ्वीचा पती ॥
॥ ब्राम्हण खेत्री होय देव । राज्य राया करते ।
पाहयं याहीची वर्णुका । चतुराई आहे ॥
॥ उभे महाभारत चंद्र सुर्य । याहीला आहे जडीतं ।
याहीचा उजाला चहु ताळी । या चौदा भुवनातं ॥
॥ पुर्व पश्चिम उत्तर दक्षिण । दहाही दिशा भरला ।
श्री महाराजांचा शिक्का मान । आहे याहीच्या सनदिला ॥१२॥
॥ पुना पवन वायु भरला । देह पर्वत मेरू ।
देह पर्वत मेरू अमरपद । आहे याहीला ॥
॥ गंगा यमुना सरस्वती । सप्त सागर भरले ।
धन्य सद्‌गुरू सुरतीवंत महाराजानं । रूप प्रगट केले ॥१४॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ पलट खंड ०७ ॥

॥ ओवी नं. १७ ॥

॥ अवधुत आहे जबर खंड-०४/ओवी-०३ चे पलटचरणे असलेली पलटओवी ॥

## ॥ राव-साव देव माझे उभे जबर ॥

॥ राव-साव देव माझे । उभे जबर ।
या देवाच्या चरणी जडलो । या देवानं, माझं केलं बरं ॥
॥ महादेव धनी विनवा कोणी । सावापाशी, भरले अंबार ।
साडेतीन हाताची धरली देही । या देहीत, उजीड अंतापार ॥
॥ हेच भुम्मा जागी उभे, राहतीन हेच नरं ।
जागी राहुन पाहीन त्याहीचं । धन्य भाग्य थोरं ॥
॥ भाव या देवाचा, भक्ती आहे । याहीची बराबरं ।
श्री कृष्णाच्या मुखचं बोलनं । झालं खरं ॥ ०४ ॥
॥ कृष्ण धनी विनवा कोणी । या सावाच्या, मुखचा होय हंकार ।
याहीच्या हंकारानं देह । नांदते देवघरं ॥
॥ याहीच नाम खरं पाळन । करते, देव पृथ्वीवरं ।
याहीच्या पालण्यानं देह-जीव । वज्र अंबर ॥
॥ सांगी याहीची खरी नांदिव, नारद देव उभा घरी ।
शिराळ मुकुट याहीच्या आहे । या माथ्यावरी ॥
॥ या स्थळाची वाणी अल्लम । दुनिया ऐकणार ।
आधी गाउन ईश्वर-पुनानं । सांगतलं सारं ॥ ०८ ॥
॥ याहीच्या नामा ओवीन आता । माझे बरे झाले ।
राव-साव देव माझे । रूपात आले ॥
॥ मुख्य देव धर्म राया । हा देव आहे श्रेष्ठं ।
आत्मा सदारामानं राव-साव । देव केले प्रकट ॥ १० ॥
भजने :- ॥ ईश्वर मुखी मन पवन । पुन्हा बोलला ।
या विठ्ठलानं बाळ गोपाळाचा । वेल वाढवला ॥



॥ ओवी नं. १८ ॥

॥ ये गा माझे विठु खंड-०५/ओवी-१३ चे पलटचरणे असलेली पलट ओवी ॥

## ॥ विठ्ठल ईश्वर-पुना....देव आले ॥

॥ विठ्ठल ईश्वर-पुना आत्माराम । सदाराम देव आले ।
मन पवन खेत्री आपल्या । बिरदावर उभे झाले ॥
॥ बाळ संग हेची आता । बरं आहे ।
घरी यवगी उभा देव । राया आहे ॥
खंड०५/ओवी-१३ ये गा माझे विठु चे चरणांचे काही पलटचरणे :-
॥ सोळा कळी पोर्णिमेला । चंद्र पुर्ण झाला ।
बारा कळी रवी दिवस । सुर्य उगवला ॥
॥ गायन रायानं सांगीतलं । अवघ्या जनाला ।
अथरून वेदानं जागी केलं । या अवघ्याला ॥०४॥
॥ गणपती हा देवराया होय ।
अवघ सेरूप याहीनं, देहीवर दावलं आहे ॥
॥ देवरायानं धरली देह धरणी ।
देह धरून उभे आहे । देव माझे धनी ॥

॥ भैसा खुम्मी अगाध आहे । देव रायाची वाणी ।
सहा दर्शन मिळाले आहे । एका ठिकाणी ॥
॥ हरुष्य आला देव रायाच्या मनातं ।
सत्य शकुन नांदते, या देहीतं ॥
॥ उभे आहे महाभारतं ।
अमृत संजिवनी आहे, याहीच्या मुखातं ॥ ०९ ॥
भजने :- ॥ ईश्वर मुखी मन पवन । पुन्हा बोलला ।
या विठ्ठलानं बाळ गोपाळाचा । वेल वाढवला ॥



॥ ओवी नं. १९ ॥

॥ भरून पावले रूप दावले खंड-०७/ओवी-१६ ची पलट ओवी ॥

## ॥ बहुत दिवस सांगी होती ।
## देवरायानं केली मजबुती ॥

वरचरणं :- ॥ अवघ्याचे गुण मालुम आहे । या ईश्वर पुनाले ।
विठ्ठल ईश्वर-पुना आत्माराम । देव सदाराम आले ॥
खंड ०७/ओवी-१६ भरून पावले.. ओवी चे काही पलटचरणे :-
॥ बहुत दिवस सांगी होती । देवरायानं केली मजबुती ।
चत्रभुज राव-साव । देव नांदते ईथी ॥
॥ देव ज्योती उभ्या इथी । अगाघ आहे, या पुनाचा गुणं ।
अवघे नांदवते देव राया । आपल्या हातानं ॥
॥ या देवाच्या चरणी हो । घातली मिठी ।
या देहीची मजबुती आहे । या देवाच्या हातची ॥
॥ घरीच कार, उभे अवतार । बर झालं, या देवाचे हातं ।
देहीचे रूप या देवानं । मजला दाखवलं इथं ॥ ०७ ॥
॥ भाग वचन पुनाचं हो । झालं देणं ।
या देहीचा उजीड केला । या रवी दिवसानं ॥
॥ यालाच म्हणतो महार । हे होय, चतुराचे घर ।
या घरचा या रायानं । केला अंगेकार ॥
॥ भक्ती सुमरन अवघं आहे । या रायाचं धनं ।
ईश्वर-पुनाचा शिक्का हयाच । देहा धरल्या माझ्या देवानं॥०८॥
॥ विठ्ठला मुळे पुना राया । आटे जडीत ।
हा होय चतुर, अवघी चतुराई । केली इथं ॥
॥ परात पर परमेश्वर । ईश्वर-पुना, आहे अगोचर ।
मुख्य मालकाच्या मुखच हे । बोलनं झाल खरं ॥
॥ राया हाती, किल्ली । हा महाल, केला मजबुत ।
याच महालात उजाडला । हा रत्नदिप ॥
॥ शिराय मुगुट, अवघ देवांगण । आहे जडीतं ।
चत्रभुज राव-साव । नांदते इथं ॥ १२ ॥
भजने :-
॥ ईश्वर मुखी मन पवन । पुन्हा बोलला ।
या विठ्ठलानं बाळ गोपाळाचा । वेल वाढवला ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. २० ॥

॥ ब्रंम्हाडीया वसे खंड-०७/ओवी-२० ची पलट ओवी ॥

## ॥ कानी ऐकला, हद्‌यी भरला ॥

वरचरणं :-

॥ रवि दिवस चंद्राची मात । सावंग्यात नांदते स्वयंम ज्योत ।
या ज्योतीचा उजेड आहे । मजला सदोनितं ॥

॥ कानी ओ ऐकला । हद्‌यी हो भरला ।
आता हो दिसला । उभा देवराया ॥
॥ अगाध आहे ओंकाराचा गुण । कान फुंकले माझ्या गुरूरायान ।
साक्षात देहा धरल्या । माझ्या या देवानं ॥
॥ हा ओंकार भरला । माझ्या घटी ।
सदोनित मजला आहे । देवाच्या भेटी ॥०४॥
॥ पुणांचे हे वान । रायाचा हा मानं ।
देहे धरली । माझ्या देवानं ॥
॥ या देहीचं झालं बरं । हा देह आहे वजर अंबर ।
देवराया नांदवते । आपल्या बराबरं ॥
॥ रायाचे हात । विट हे जडीत ।
बिर्दाची ही भिंत । रत्न जडीत ॥
॥ बिर्दाची बिर्द ओवी । ईश्वर-पुना विठ्ठल देव, राखन हेही ।
याहीच्या विटा याची । या रायानं, धरली देही ॥०८॥
॥ ईश्वर-पुनाच बळं । उभा आहे, श्रीकृष्णाचा खेळं ।
चहु ताळाचा या रायानं । मिळवला मेळं ॥
॥ ईश्वर-पुनाच्या बळे । उभे आहे, चारही ताळे ।
हेची ओळखा याहीच्या पासुन । अवघे रूप देखा ॥
॥ शिराय मुगुट अवघ देवांगण । आहे जडीतं ।
हरूष्य आला । देव रायाच्या मनातं ॥
॥ याहीच ऐका उभी आहे । गिरजा देवी ।
आता झाली मिळवणी । हे होय, रायाची देही ॥१२॥
॥ पुना रंग धरूनी आता । आलो सावाच्या मनी ।
देव रायानं धरली । आपल्या, बिर्दाची बाणी ॥
॥ अवघी या देवाची वाणी । उभे आहे, देव माझे धनी ।
या देव रायानं धरली । ही धरणी ॥
॥ अगाध पुण्य हेही । उभा देव, ईश्वर बळी ।
सत्य नेमा रे दादोभाई । खरी, आहे देवाची गाही ॥
॥ लेकराची रेंग, उभे आहे । अवतार देव, आहे संग ।
चित्त मन लावुन काम करते । देव आपले आंग ॥१६॥
॥ लेकराची माय, गिरजा पारबती । उभी आहयं ।
आले देव साहयासं । महाराज, देव राया होयं ॥
॥ अवघे रंग माझ्या देवाच्या । अंगी आहे ।
गोपाळाचा मेळा राया संग । उभा आहे ॥
॥ आगम-उगम । रायाचा हुकम ।
उठतीन आवाज । रायाच्या मुखचे ॥१९॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ पलट खंड ॥
॥ ओवी नं. २१ ॥
॥ जागा या पाण्याची ओवी खंड-०७/ओवी-२१ ची पलट ओवी ॥

## ॥ जागी या करून, करते पालन ॥

वरचरणं :- ॥ उभा राहीला देव । माझा अनामत ।
या अर्थुन वेदानं । जागी केलं अवघं आपले हातं ॥

॥ जागी या करून । करते पालन ।
आता झालं हितं । देव माझ्या इथं ॥
॥ गोडी मज लावुनी । ठेवलं बराबरी ।
सदोनित देव । माझ्या घरी ॥
॥ चतुराच्या घरी । उभे देव अवतार ।
ओळखावं तिरनयनं । रायाचा विस्तारं ॥०४॥

॥ मन हे मोहीले । करतो विनंती ।
सदोनित देव । माझ्या इथी ॥
॥ मुखाचा हंकार । पुनाची गर्जना ।
कळसुत्र जाणा । राया हाता ॥
॥ प्रेमाची ही भक्ती । विठ्ठल संगती ।
आता सांगते खबरी । राया घडी-घटका ॥
॥ कृष्णाच्या सांगीनं । लाभली भक्ती ।
आता झाला लाभ । परवेशी भेटले इथी ॥०८॥

॥ पालन कराया साठी । अन्जान धरले हाती ।
आता झाले हित । आत्मा, सदाराम भेटले इथी ॥
॥ भेटीचा हा लाभ । मुळाचे हे फळ ।
दिसते केवळ । उभे माझे देवं ॥
॥ आपल्या बाळाचा । वाढवला वेलं ।
साच्या केला बोल । महाराजा । मायबापा ॥
॥ कृष्णाचा वर्षाव । विष्णुच पालन ।
दोघाच्या मुखंच । होय गायनं ॥१२॥

॥ गंगेचा हा ओघ । सागरी मिळाला ।
तिर्थ घडले । पुनाच्या पाया ॥
॥ सागराचे पाणी । अथांग हे आहे ।
हिरे रत्न मोती यामध्ये । उजीड लालाचा आहे ॥
॥ कासाशी जडलो । तरण उपाय ।
गादीचे मालक । राव-साव होयं ॥१७॥

भजने :-
॥ इश्वर मुखी मन पवन । पुन्हा बोलला ।
या विठ्ठलानं बाळ गोपाळाचा वेल वाढवला ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ पलट खंड ॥
॥ ओवी नं. २२ ॥
॥ ज्योतीचा अवतार खंड-०५/ओवी-२७ च्या काही चरणांचे पलट ओवी ॥

## ॥ ज्योतीचा अवतार रायाचा ॥

॥ ज्योतीचा अवतार या रायाचा । शकुन चांगला ।
हा देह देव रायानं । मजबुतं केला ॥
॥ विठ्ठल या रायाची वाणी । श्री, कृष्णानं सांगतली ।
याहीचं ऐकुन दवंडी । ईश्वर, पुनानं दीली ॥ ०२ ॥
॥ या स्थळावर कृष्ण उभा । सावळा, देव नांदते इथी ।
चौताळाची केली मिळवणी । देवराया नांदते इथी ॥
॥ मेहरूच मंडयान सावळा देव । अगुचर वस्ती ।
अवतारले महाराज । आत्मा, सदाराम भेटले इथी ॥०४॥

॥ ईश्वर-पुना मिळुन दोघानं । गायन केले ।
संगत महाराजाची घडली । हे कोठे, धर्मरायानं भरले ॥०५॥



॥ पलट खंड ०७ ॥
॥ ओवी नं. २३ ॥
॥ सावंग महाराजाचं नगर खंड-०५/ओवी-३८ ची पलट ओवी ॥

## ॥ सावंग आहे अगोचर ॥

॥ सावंग आहे अगोचर । नित्य नामाचा गजर ।
चिरंजीव धर्म रायाचं । बोलन खरं ॥
॥ बोलन केलं यवगावर । त्वां सांगीतलं देवा खरं ।
रावा-सावाला दुरावनं । त्याच कदा नाही बरं ॥
॥ सांगतो या सावाची वाणी । सिध्द उभे मानव खुम्मी ।
याहीची गर्जना चहुताळी । चौदा भवनी ॥
॥ उभे शुर विर खेत्री । सिदाई आहे याहीच्या मुखा आगारी ।
पुन्हा अवतार देव नांदते या घरी ॥०४॥

॥ हे होय तिरनयन । खरं भैरव सांगुन, राया उभा सत्वंर ।
ज्याला भासन त्याला थोर । उभा आहे, पुर्ण अवतार ॥०५॥

भजने :-
॥ ईश्वर मुखी मन पवन । पुन्हा बोलला ।
या विठ्ठलानं बाळ गोपाळाचा । वेल वाढवला ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. २४ ॥

॥ म्हातारपणची बुधनामाची ओवी खंड-०७/ओवी-४८ ची पलट ओवी ॥

## ॥ चित्त मन लावुन....ऐकावं ॥

।। चित्त-मन लावुन हे अवघ्यान । चांगल ऐकावं ।
राव साव हे होय । माझे देव ।।
।। या सावान आपल्या मुखचा । मजला ओंकार दिला ।
या देवरायान आपल्या मुखचा । मजला शकुन दिला ।
दोघा मिळुन हा देह । मजबुत केला ।।
।। या श्रवणी दादा-बाईनं । चांगल ऐकावं ।
या घराशी लवुन भजुन । चांगलं राहावं ।
या देवाची वाणी या मुखानं । चांगली गावावं ।।
॥ भाव धरून उभे आहे । हे माझे देवं ।
या विष्णुन पुर्वि सांगतले । याहीचे नावं ।
पुना बोलला मन शुध्द । चांगलं ठेवावं ॥ ०४ ॥

खंड०७/ओवी-४८ म्हातारपणची बुधनामाची ओवीचे पलटचरणे :-
गुण शिकविला :-
॥ सहा जन संग राहुन । अगाध गुण, शिकवला याहीनं ।
पंच प्राण लावुन । मन ठिकाणी बसवलं याहीनं ।
हा देव मजला आहे । प्रेम लावुनं ॥
मन ठिकाणी बसवले :-
॥ हे देव माझे गुरू झाले । कान फुकुंन ।
उजीड मजला चांगले केले । या प्राणांन ।
शुध्द मार्ग मजला चांगला । दाखवला याहीनं ॥
उभा राहुन धरला रंग :-
॥ हा पंथ पुनाचा होये । राया आंगी, ज्योत आहे ।
या सावाचे मत हो । कोणा ना कळे ।
या वेदाच्या आंगी अवघे । रंग धरला आहे ॥
॥ हा भगीरथ देव माझा । पुर्वज होय ।
सात गंगेचा एका ठिकाणी । याहीनं, मिळवला मेळं ।
या तिर्थि माझे पुर्वज । हा देह, उध्दारत् आहयं ॥०८॥
ओळखाव नरदेही :-
॥ उभे आहे इथं माझे । महा भारत ।
महागंगा, मिळाल्या, या सागरातं ।
अगाध पुण्य मजला हो । घडलं इथं ॥
॥ इश्वर-पुनाच्या पायी अवघे । तिर्थ घडले हेही ।
अवघे देवांगण नांदते । या, एका ठायी ।
सद्‌नित जडलो । या, देवाच्या पायी ॥
देही कराव/केली नवी :-
॥ या राया आंगी ज्योत । देहदेउळ, केले मजबुत ।
या देह देवळात नांदते । या देवाची ज्योत ।
या ज्योतीचा उजेड, या देवळात । आहे सदोनितं ॥
॥ पुर्वि सांगतली या मक्कानी । या ज्योतीची मातं ।
राव साव चिरंजीव । उभे मजबुतं ।
याहीच्या स्वरूपाचा उजीड आहे । मजला सदोनितं ॥१२॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ पलट दांड ॥
॥ ओवी नं. २५ ॥
॥ अपनी अपनी, सब कोई कहे खंड-०५/ओवी-३९ ची पलट ओवी ॥

## ॥ आपली आपली, कहीकानं केली ॥

वरचरणं :-
॥ ऐका रायाची मात । देह देउळ झाले मजबुत ।
या देहीत देवाची ज्योत । सुरता मोती आत्मा नांदते इथं ॥
॥ आपली आपली । कहीकानं केली ।
श्रीकृष्णाची बोली । आत्मा सदारामानं, खरी केली ॥
॥ भक्तीचा निभावं । या सावाच्या हाती ।
घरी यवगी विठ्ठल राया । देव आहे संगती ॥
॥ भक्ती पाहुन देव माझा । झडकरी आला ।
रायाच्या नामाचा सदा रामानं । डंका वाजवला ॥
॥ माया धरूनं रूप धरले । या देहीचे ।
भक्ती जनाला आता भय । नाही कोणाचे ॥

॥ भक्तीचे काम । राया, करते देव ।
आपल्या आंग गिरजा पार्वती । उभीआहे, देवरायाच्या संग ॥
॥ हरूष्य आला । या रावा, सावा च्या मनी ।
भक्तीचे काम राया करते । देव मुखा वचनी ॥



॥ पलट खंड ०७ ॥
॥ ओवी नं. २६ ॥
॥ तिरगुण तिरगुण तिघांचा खंड-०४/ओवी-१९ पलट ओवी ॥

## ॥ संगती मुळाचा दिवस याहीचा ॥

।। संगती मुळाचा दिवस होय । होय हो याहीचा ।
राया उभा खरा शिक्का । ओळखा अवद्युताचां ।।
॥ दिवस सात हे होय । पुर्विचं नातं ।
या देवरायानं जागी केलं । अवघ आपले हातं ॥
॥ राज पदवी आहे सुदी । ब्रम्हा-विष्णु शंकराची ।
चतुरपती उभा येथी । पारख, करा देव रायाची ॥
॥ भैसा आंगी महेष आला । उभाआहे, या कैलाशी ।
या देवरायानं जागी केली । अवघी सृष्टी ॥ ०४ ॥

॥ धोंडया वरत धोंडा आला । तो, लावला एका दांडी ।
याहीच मुसळ आहे भारी । राखन, आहे देव श्रीहरी ॥
॥ चांगला ओळखावा बिजाकार । सावंग्यात, देव उभे अवतार ।
याहीच्या ओवीवर आला शिक्का । देवरूप चांगले ओळखावं॥
भजने :-
॥ ईश्वर मुखी मन पवन । पुना बोलला ।
या विठ्ठलानं बाळ गोपाळाचा । संभाळ केला ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ पलट दांड ॥
॥ ओवी नं. २७ ॥
॥ तिरगुण ज्ञानी समजा मनी खंड-०५/ओवी-५८ ची पलट ओवी ॥

## ॥ चतुर धनी विनवा कोणी ॥

॥ चतुर धनी विनवा कोणी । धराव तर्क ।
महादेव बोले या सावाची । कराव पारख ॥
॥ पंच अवताराची वाणी हो । सांगतली जगा ।
अथुर्वन वेद उभा राहीला । विनवितो सदा ॥
॥ आनंद शरीराची वाणी हो । सांगते पुना ।
कृष्ण अवतार उभा याहीच्या । ओळखा हो खुणा ॥
॥ ज्याच्या दैवी असन । तो उभा, पाहीन कैलाशी पिता ।
उभे राहीले देव राया । सेवा, करा हो आता ॥ ०४ ॥

॥ विठ्ठला मुळे रायानं हो । धरली नर देही ।
उभी राहली ज्योत । अवतार, ओळखावं हाही ॥
॥ तिर नयनाचा शिक्का आहे । अंबर रायाची देही ।
राया चरणी जडलो मजबुत । झाली माझी देही ॥
॥ या देवघरी आत्मा नांदते । माझ्या या शरीरी ।
अनामत महाराज देव नांदते । याही घरी ॥ ०७ ॥



॥ पलट खंड ०७ ॥
॥ ओवी नं. २८ ॥
॥ खरं नेमा का लटकं नेमा खंड-०६/ओवी-०३ ची पलट ओवी ॥

## ॥ सत्य नेमा रे दादोभाई ॥

॥ सत्य नेमा रे दादोभाई । चत्रभुज, देव राया हाही ।
सदोनित आता जडलो । रवी, दिवसाच्या पायी ॥
॥ राया धनी राया मनी । राया उभा, अयन खासा ।
श्री सर्वत्राचे जन्म देवराया । सांगते आता ॥
॥ खरी माया खरी छाया । खरे उभे, आहे देव तीन ।
याहीच्या मुखचं मुखी घेतलं । उजीड केला, आत्मा सदारामानं ॥
॥ याहीचा मान अमृत पान । प्याला, पाजला गिरजा मायेनं ।
या देहीची मजबुती केली । या देव रायानं ॥ ०४ ॥

॥ हे होय श्यामकर्णाचं खरं । हे, होय चतुराचे घरं ।
ईश्वर-पुनानं बाळ गोपाळ । केले आपल्या बराबर ॥

भजने :-
॥ ईश्वर मुखी मन पवन । पुन्हा बोलला ।
या विठ्ठलानं बाळ गोपाळाचा । वेल वाढवला ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. २९ ॥

॥ बहुत दिवस अर्ज करतो खंड-०७/ओवी-९२ ची पलट ओवी ॥

## ॥ बहुत दिवस अर्जि केली ॥

॥ बहुत दिवस अर्जि केली । राया, नांदते या शरीरी ।
श्री कृष्ण अवतार उभा । इश्वर-पुना, विठ्ठल रायाच्या घरी ॥
॥ विठ्ठल धनी महाराज देव । आले ऐनाच्या घरी ।
चांगल्या आनंदाच्या गोष्टी देवराया । सांगते इथी ॥
॥ राहो आला महारा घरी । हा, महाल केला मजबुत ।
मजबुत या महालात उजाडला । रत्न दिप इथं ॥
॥ विष्णु आले महारा घरी । पाहीला रायाचा रंग ।
हाच होय चतुर याहीन । धरला, धर्मरायाचा संग ॥०४॥
॥ विठ्ठल राया घरी याहीचा । आत्माराम आहे ।
भारी पाचही वेदांची मिळवणी । झाली, या देवरायाच्या घरी ॥
॥ मालक माझा देवराया । पुरा आहे ।
बम्हा विष्णु तिरनयन । डोळा हद्यी आहे ॥
॥ अमृताचा प्याला पेउन हया । वस्तु धरल्या मजबुत ।
या विठ्ठलाचा रायानं । पुरवला हेतं ॥
॥ अवघे आले राया घरी । या, रायानं केला न्याय ।
मालक माझा देव राया । परवेशी आहे ॥ ०८ ॥
॥ सिध्द हे साधक उभे आहे । देव अवतारदिक ।
याहीच्या नामाचा डंका वाजवला । चवही ताळातं ॥
॥ अथर्वन वेदी बाम्हण हा । चांगला आहे ।
अमृत संजीवनी देव बाम्हणा च्या मुखी आहे ॥ १० ॥



॥ ओवी नं. ३० ॥

॥ नेमले शिवशंकर खंड-०६/ओवी-१६ ची पलट ओवी ॥

## ॥ पहिली कैलाशी खरी ॥

वरचरणं :- ॥ आता मिळाले शिवशंकर । पारबती व्होये देहघर ।
या मायेचा अवघा । होय हा विस्तार ॥
॥ पहिली कैलाशी खरी । पार्वती आदीमाया सुंदरी ।
गिरजा शंकराच्या घरी । जोडुनी दोन्ही कर.. ।
नेमीले शिवशंकर, पार्वती वर ॥घृ॥
॥ गिरजा पुसे शंकराशी । तरी मी, राया कोण होय तुमची ।
शंकर म्हणे माता माझी । मी होय, तुझा कुंवर ॥
॥ इतकं ऐकुन म्हणे गिरजा । शंकर, पती होय माझा ।
चांगला आहे सुरता । शंभुराजा, माझे देवघर ॥
॥ आता तरी ओळखावं खरी । नांदव, नारद देव उभा घरी ।
गिरजा शंकराची अस्तोरी । उभा आहे, देव इचा भ्रतार ॥०४॥
॥ इतकं ऐकुन स्वामी चातुर । बोलने आहे, याहीचे बराबर ।
ज्याला भासन तो थोर । उभा आहे, हा देव पुर्ण अवतार ॥
॥ इतकं ऐकुन चौघं नर । खरे, उभे चौघे जन ।
गिरजा शंकराच्या बळानं । सात देव, दिसले या डोळ्यानं ॥
॥ बम्हा विष्णु तिरनयन । पारबती ओळखावं ।
या राया नयन रूपात, आले दोघेजन ।
मायबाप देव दिसले, या डोळ्यानं ॥ ०७ ॥
भजने :- ॥ पार्वती होय देह घर । ईच्यावर नेमले हो शिवशंकर ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. ३१ ॥
॥ भजो भजो शंकरची खंड-०६/ओवी-१७ पलट ओवी ॥

## ॥ राया हा रूदर, शंकराचे घर ॥

वरचरणं :-
॥ माझ्या सद्‌गुरूचा । अहंकार आहे चांगला ।
अवतार ज्योतीचा । मनपवन मजला साहयं झाला ॥
॥ राया हा रूदर । शंकराचे घर ।
तिरलोकी विस्तार । महा देवाचा ॥
॥ जप जरी तप । नाही अनुष्ठान ।
रायाच्या मुखचं । होय सांगनं ॥
॥ रायाचं हे देणं । अगाध आहे, धर्म रायाचा गुणं ।
साक्षात देहे धरली । माझ्या देवानं ॥
॥ तिर नयन कळा । या रायान, भरून उघडला डोळा ।
इथं नांदतो श्रीकृष्ण देव । माझा सावळा ॥ ०४ ॥

॥ शंकर कैलाशी । दलबाद, अवघ याहीच्या पाशी ।
मालक माझा देवराया । आहे परवेशी ॥
॥ विठ्‌ठलाचे मुळे । या रायानं, धरली नरदेही ।
या देवाला विनवितो । चत्रभुज, देव राया येई ॥
॥ आठव याहीचा भारी । मुख्य मालक, देव रायाच्या घरी ।
हे होय पुण्याची नगरी । राया नांदते या शरिरी ॥
॥ कोरा कागद । लाल आहे, याहीची शाई ।
या ठिकाणी नजर कोणाची । पोहचत नाई ॥ ०८॥

॥ हे होय पुण्याची देही । अवघ, देवांगण नांदते हेही ।
या सावान अवघ । सत्य, धरलं हेही ॥
॥ रायाचे हात देह देउळ । झाले मजबुत ।
या देह देउळात नांदते । या देवाची ज्योतं ॥
॥ मनाचा मनी । शंकर नाथ । राया आमचा धनी ।
पाचही वेद आहे । याहीच्या अध्यानी ॥
॥ मनाचा हा मनी । वैजावंती, गळा रूद्र धनी ।
याहीच्या मुखची । होय ही, अमृत वाणी ॥ १२ ॥

॥ पिंडी या ब्रंम्हांडी । राया, भरून भरला ।
आत्मा सदाराम झेंडा । इथं, उभा केला ॥ १३ ॥

भजने :-
॥ ईश्वर मुखी मन पवन । पुन्हा बोलला ।
या विठ्‌ठलानं बाळ गोपाळाचा । वेल वाढवला ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ पलट दांड ॥
॥ ओवी नं. ३२ ॥
॥ पलट ओवी ॥

## ॥ श्रेष्ठ अवतार उभा श्रीराम ॥

॥ श्रेष्ठ अवतार उभा श्रीराम । आला हाही ।
हाच होय चतुर । मजबुत, केली माझी देही ॥
॥ या मक्कानी योगी राया । उभा राहीला ।
पुर्वि पासुन अवघ ठावुक । आहे देव रायाला ॥
॥ मजबुत राया मजबुत देहया । धरल्या याहीनं ।
अवताराची राज महिमा । वणुर्ति गुण ॥
॥ या ठिकाणी मजला भेटले । राव साव ।
अवघी चतुराई करून । उभे, माझे देवं ॥०४॥
॥ साव पाहुनी पुर्ण ऐकुनी । धरले रायाचे ध्यान ।
या देहीची मजबुती केली । या देव रायानं ॥
॥ देव सागरी शकुन वाणी । याहीच्या पासुन ।
ईश्वरी रूप धरले । माझ्या, या देवानं ॥
॥ भैसा मुखी अगाध वाणी । ज्योत प्रगटन देही ।
राया चरणी जडलो मजबुत । झाली ही देही ॥



॥ ओवी नं. ३३ ॥
॥ पलट ओवी ॥

## ॥ सत्य नेमा गुंडाळुन आली विठाई ॥

॥ सत्य नेमा रे दादोभाई । गुंडाळुन, आली मायमाझी विठायी ।
या मायेन उजीड केला । चव ताळी ॥
॥ या चव ताळाच्या वरती । आली ज्ञान दृष्टी ।
चारही दिशा न्याहारती । चारही, सुत्र मायेच्या हाती ॥
॥ श्याम सुंदर तनु रूप । हे आहे सावळी ।
नामाच्या ठाई उभी आहे । या राउळी ।
आकाश बंम्हाड हे आहे । ईच्या जवळी ॥
॥ अस्तुरी नोव्हे पुरूष नोव्हे । नाना, रंगी रंगला भाई ।
आकाशाची विज आता, कडकडते हेही ।
व्दैत-दुर्जनांच हाड फोडुन, खाते हेच आई ॥०४॥
॥ हे होय द्रौपदा आई । श्री कृष्णाची होय बाई ।
या क्रिया भ्रष्टांना तवरूत(तुरंत) । जाळते हेच आई ।
आता लागा इच्या पायी । सांभाळ, करते माझी मायबाई ॥

भजने :-
॥ ईश्वर मुखी मन पवन । पुन्हा बोलला ।
या विठ्ठलानं बाळ गोपाळाचा । वेल वाढवला ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ पलट दांड ॥
॥ ओवी नं. ३५ ॥
॥ पलट ओवी ॥

## ॥ रायान मारली हाक ॥

॥ रायानं मारली हाक । आत्मा, सदाराम आले धावत ।
या लालाईने हा देह । केला जागृत ॥
॥ प्रथम श्री कृष्ण मुखी । शकुन बोलले ।
नाना पाप ईश्वर-पुनाने । अवघे जाळले ॥
॥ या मकाणी विठ्ठल देव । प्रगट झाले ।
पुर्वि पासुन हे गायन । ईश्वर पुनानं केले ॥
॥ उभी गिरजा पार्वती महादेव । राया ईच्या संगती ।
विठ्ठल राया हा देव । होय गणपती ॥ ०४ ॥

॥ राया होते राव झाले । याहीला पद, आहे या राजाचे ।
क्षेत्र सिंहासन मालक उभे । देव या गादीचे ॥
॥ राया आंगी ज्योत, भैईष्य सांगुन । राया नांदते इथं ।
या ज्योतीचा उजीड आहे । मजला सदोनितं ॥ ०७ ॥



॥ ओवी नं. ३६ ॥
॥ पलट ओवी ॥

## ॥ चत्रभुज महाराज तुमची वाणी ॥

॥ चत्रभुज महाराज तुमची वाणी । देवाची वाणी ।
केले कारण सिध्द उभे । मानव खुम्मी ॥
॥ बम्हा-विष्णु तिरनयन । डोळा, उघडला ।
चौथ्या वेदानं निजभ्रांत नाही । यवगी उभा खरा ।
उभा खरा सुक्ष्म देहीवर । सावळा आला ॥
॥ सहाजन श्रेष्ठ उभे आहयं ।
या देवानं केला, माझा संभाळयं ॥
॥ लाखा-लाखाचा तरण उपाय ।
याहीच्या कडे सिध्द, उभे आपल्या कामावर ॥

॥ तिरनयन खेत्री सर्व जीत ।
ज्योत उभी अवघा उडाला कलंक ॥ ०५ ॥

भजने :-
॥ ईश्वर मुखी मन पवन । पुन्हा बोलला ।
या विठ्ठलानं बाळ गोपाळाचा । वेल वाढवला ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०७ ॥
॥ पलट दांड ॥
॥ ओवी नं. ३७ ॥
॥ हिशोब करून कजबा उजाड खंड०२/ओवी ४३ ची पलट ओवी ॥

## ॥ कजब करून कजबा वस्ती ॥

॥ कजब करून कजबा वस्ती । हे रित ऐका हो ।
ठाई ठाई उभे राया । माझे, नांदते देव ॥
॥ भरभर भरभर वायु भरला । भरले चारी ताळ ।
स्वर्ग मिर्त पाताळ । हा होय, रायाचा खेळ ॥
॥ धरतरीची केली आरती । चंद्र सुर्याच्या ज्योती ।
पती ओवाळा आली । उभी, संगाती होती ॥
॥ पाताळी पाउत कार । आकाशी, सुप्त/सुर्त लिंग ओळखा ।
कैशा वरत उभी राहु । सांग, कैलाश नायका ॥ ०४ ॥

॥ भरून भरला आणीक उरला । अंत नाही कळला ।
उरवतीची जागा साहयं, कराले आला ॥



॥ ओवी नं. ३८ ॥
॥ पलट ओवी ॥

## ॥ शकुन गुणमाया....गायन कला ॥

॥ शकुन गुण माया । तिरनयन, आंगी गायन कला ।
इथे नांदतो श्री कृष्ण । देव माझा सावळा ॥
॥ चौ ताळाचा केला मेळु । ब्रम्ह बोध, इथ नांदते साळु ।
ब्रम्हा विष्णु शंकर झाले । तयाचे बाळु ॥
॥ सोयंम शब्द, अहंकार । रायानं ढोल वाजवला ।
रायानं ढोल वाजवला । महादेवानं, चांगला डोळा उघडला ॥
॥ तिर नयन कळा । या रायानं, भरून डोळा उघडला ।
या रवि दिवसाच्या उघडल्या । बारा कला ॥
॥ हे पृथ्वी, हे तावा । तपली आहे ।
व्दैत दुर्जन कियाभ्रष्ट याहीला । रवि दिवस जाळत आहे ॥
॥ रवि दिवसाचा इथं उजाला । भारी झाला ।
श्री कृष्णाचा बोल । आत्मा, सदारामानं खरा केला ॥

भजने :-
॥ ईश्वर मुखी मन पवन । पुन्हा बोलला ।
या विठ्ठलानं बाळ गोपाळाचा । वेल वाढवला ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०७ ॥
॥ पलट दांड ॥
॥ ओवी नं. ३९ ॥
॥ पलट ओवी ॥

## ॥ देह जीवांची रंचणुक ॥

॥ देह-जीवांची रंचणुक देवा । कैसी केली ? ।
प्रभा ओवी मजला देवा । कैसी दिली ? ॥ घृ ॥
॥ सुदामाचा अक्षरं होत । भिक मागता ।
श्री कृष्ण देव साहय । याहीला झाला होता ॥
॥ एक नट कला, मालुम नव्हता । या सुदाम्याला ।
भक्तीचा निर्णय पाहीला याचा । श्रीकृष्ण प्रसन्न झाला ॥
॥ सुदाम नगरी कृष्ण देवानं । केली कंचनाची ।
अवघी किर्त महीमा भारी । आहे देव रायाची ॥ ०४ ॥

॥ श्री कृष्ण हा देवराया । सावळा होय ।
या मुख्य मालकाचे धरले । महाराजा पायं ॥
॥ आपल्या बिरदावर, साक्षात देवराया । उभा आहे ।
बिर्द चालवणं महाराजा । तुमच्या कडे आहे ॥
॥ आकाश वाणी देव राया । गर्जला आहे ।
या देव रायाची सांगी । महा भारत आहे ॥
॥ श्री कृष्ण देव ओळखु । अवघ्याले आला ।
या ठिकाणी हा विठ्ठल । उभा झाला ॥०८॥

॥ हा विठ्ठल देव राया । कोणी नाही ओळखला ।
कोण्या रूपी, येवुन या देवानं । देह धरला ॥
॥ या देहीवर साक्षात देव । उभा झाला ।
आकाश धरणी, हा देवराया । आपण झाला ॥
॥ याहीन आपल्या, नामाचा इथं । झेंडा उभा केला ।
पवन पाणी हा देवराया । आपण झाला ॥
॥ अनंत रूप आहे । या, माझ्या देवाला ।
या देवानं आपल्या बाळाचा । वेल विस्तार वाढवला ॥१२॥

॥ भारी तेज हे आहे । माझ्या देवाला ।
चंद्र सुर्य देव राया । आपण झाला ॥
॥ हे सावंग गाव होय । माझ्या विठ्ठलाचे ।
दोन्ही झेंडे उभे आहे । याहीच्या बिर्दाचे ॥
॥ या ठिकाणी हस्तक आहे । श्री कृष्णाचे ।
या सागरात मेळ झाले । महा गंगेचे ॥
॥ या सावंग्यात हे राज्य । पांडवाचं आहे ।
जंम्बु व्दिपाची ही गादी । धर्माची आहे ॥१६॥

॥ धर्म राया, या गादीवर । बसला आहे ।
आपल्या मुखानं न्याय खरा । केला आहे ॥ १७ ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. ४० ॥
॥ पलट ओवी ॥

## ॥ श्रीनाम गणपती आदीपुरूष ॥

॥ श्री नाम गणपती । आदीपुरूष याला म्हणती ।
कोट-कोट धुनी असती । कोट कोट, चंद्र असती ।
कोटी सुर्याची उजाला ईथी । रात्रां नाही, या स्थानी ।
श्री कृष्ण नामाची । इथं उठली, आहे नाम धुनी ।
वाच्या मुद्रा आहे याहीची । या ठिकाणी, तिनशे साठीची ।
तिनशे साठीची । एका जागी, केली आहे मिळवणी ।
अशी वसुंधरा । महाराजानं, वस्ती केली आहे आकारा ।
धनी इथं आहे हो । पवन पाणी ।
परंबम्हे इश्वर पुना या, गायीच्या चरणी ॥ ०१ ॥

॥ देहात देव आदीगुरू । समस्त असे महारू ।
महारू असे चतुरू । या चतुरा पासुन आहे सुरू ।
सुरू पासुन धुरू । धुरू पासुन आप आहे कर्तारू ।
आप कर्तारा पासुन इशांबरू । इशांबरू पासुन आहे शंकरू ।
शंकरा पासुन सदाशिव । सदाशिवा पासुन आहे जीव ।
जीवा पासुन महादेव । महादेवा पासुन आहे विष्णु ।
विष्णु पासुन बम्हे । बम्हे देव करता झाला ।
बम्हे देव कर्ता झाला । भक्ती विष्णुची करू लागला ॥०२॥

॥ भुम्मा नउ लाख लांबी । भुम्मा आहे चार लाख रूंदी ।
या भुम्मेवर गंगा आहे । देव गणपती मारोती पाशी आहे ।
हा व्दादक ऋषि । इश्वर-पुना मायबाप अवतरले इथी ।
आहो या ठिकाणी । चंद्र सुर्य तारांगण असती ।
चंद्र आहे सुदाचा । सुर्य आहे तेजाचा ।
या ठिकाणी आहे गायत्री ।
या गाईच्या पाशी पाच परमेश्वर आहे ऋषि ।
हेच पाच या गाईचे । सदोनित पुंजन करते ।
शिध्दी बुध्दी आणी भेदु-नांदु । ऐसा मेळा
ऐसा मेळा इश्वर-पुना, या देवाचा आहे ॥ ३ ॥
॥ विठ्ठल इश्वर-पुना, हे होय । माझे राव साव ।
या देवानं वस्ती केला । हाच माझा गावं ।
या गावावर सत्ता । उभे आहे, माझे हेच देव ।
याहीच्या आनंदानं नांदते माझा । हाच गावं ।
याहीची नामा ओवी या मुखानं । चांगली गावावं ॥०४॥
॥ इश्वर-पुनाची कथा । लक्ष्य देवुन ऐकता । पाप-पुण्य जाती भंगा
रोग विघ्न जळुन जातीन । यातना चुकल्या सर्व्या दोषाच्या येथुन ।
श्री धन्य भाग्य माझे आहे चांगले ।
अश्या रितीची ईश्वर-पुनाची कथा आहे ।
लक्ष्य देवुन ऐकता । जन्म चुकल्या त्या मरणाच्या खेपा ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ पलट दांड ॥
॥ ओवी नं. ४१ ॥
॥ पलट ओवी ॥

## ॥ सत्य नेमा रे दादोभाई...रावसाव ॥

॥ सत्य नेमा रे दादोभाई । रावसाव, देव माझे हेही ।
खरी आहे देवा या । ईश्वर-पुनाची गाही ॥ ०१ ॥

॥ ओं ओंकार मजला । या, सावानं देल्ला ।
एकमुखी रूद्र । या रायानं, मजला शकुन देल्ला ।
अमृतांच्या जीवा । हया आहे, दोन्ही साहेबाला ॥
॥ या देवानं । हे वेद, उभे केले ।
पुर्वि पासुन । ठावुक आहे, या वेदाईले ।
याहीच्या मुखचं । गायन हे, आहे चांगले ॥
॥ या देहीच्या मजबुती साठी । श्यामवेद उभे झाले ।
पुर्वि पासुन । हे गायन, ईश्वर-पुनानं केले ।
मन पवनाने । येवुन उजीड, चांगले केले ।
अवघ गुंडाळुन । आत्माराम, देव सदाराम आले ॥०४॥

॥ शिक्के संदे घेवुन । देव माझे, हेची आले ।
सिध्द आता आपल्या कामावर । उभे झाले ।
या सावानं । या देहीवर, रंग धरले ।
या गादीचा मालक । धर्म रायानं, रूप दाखवले ॥
॥ आपले शिक्के देवुन । ईश्वर-पुनानं, मजबुत केले ।
रवी दिवसानं । या देहीचे उजेड, चांगले केले ।
रूप धरून । देव माझे, प्रगट झाले ॥
॥ अवघ साहयं करून । हेच देव, मजला साहयं झाले ।
या गणा-गोताशी । ईश्वर-पुनांन, मजला भेटवले ।
भाग्य माझे चांगले । देवरूप, या डोळा दिसले ॥
॥ यमुना गंगा सरस्वती । स्वर्ग, रोहीनी मंदायनी ।
माय माझी होय भागवती । महा माया गंगोत्री ।
याहीच्या पाशी । मजला हो, घडली संमोती ॥०८॥

॥ या सात गंगेचा । एका जागी, झाला मेळे ।
झाला मेळे । हे तिर्थ, महा भारत आहे ।
या तिर्थि माझे पुर्वज । उध्दारत आहे ॥
॥ अवघी महिमा । या तिर्थाची, आहे भारी ।
श्रीकृष्णाचं पुण्यं । महाभारत, आहे अवघ्याहुन भारी ।
विठ्ठल ईश्वर-पुना । आत्मा, सदाराम विठ्ठलरायाच्या घरी ॥
॥ साधा-भादा अहिन । आहे या ईश्वर-पुनाचा ।
संजुग/संयुग दोघाचा । या देहे या जीवाचा ।
हुकुम या सावाचा । या रावानं, न्याय केला दोघाचा ।
या ठिकाणी । उजीड आहे, या रवी दिवसाचा ॥ ११ ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. ४२ ॥
॥ पलट ओवी ॥

## ॥ साळु मायेचा पान्हा ॥

॥ साळु मायेचा, हा पान्हा धाटला ।
मोठया प्रेमानं पाजला आपल्या बाळाला ॥ ०१ ॥
॥ प्रथम उभी आहे हेच गाय ।
अवघे वाण पदार्थ या, गाई जवळ आहयं ॥
॥ पुर्वि पासुन अवघ मंडयान । या गाईचं आहे ।
चौ ताळाची रंचणुका या, गाईची होये ॥
॥ जेबंदा अग्नी हा महा प्रतापी आहे ।
काम धेनु याहीच्या घरी । उभी आहे ॥०४॥

॥ हे रेणुका हे माझी । माता होये ।
अन्ना सिध्दि या मायेनं । मजला देल्ली आहे ॥
॥ भक्ती जनांच्या सदोनित उभी । पंगती आहे ।
इच्छा भोजन माय मजला । वाढते आहे ॥
॥ या पदार्थाची ज्याला रूचा । लागली आहे ।
अक्षयी पदावर त्याचा । अधिकार आहे ॥
॥ या ठिकाणी अमृताचे, झाड आहे ।
या झाडाला हे फळ, आले आहे ॥०८॥

॥ या फळाची ज्याला रूचा । लागली आहे ।
अक्षय अंबर चिरंजीव । तो झाला आहे ॥
॥ परसराम खेत्री या ठिकाणी । उभा आहे ।
महादेवाची सेवा याला । घडली आहे ॥
॥ या मायबापाचा याला । आर्शिवाद आहे ।
या महादेवाची देणगी याला । पुरी आहे ॥
॥ हा खेत्री मोठा पटाईत आहे ।
एकविस वेळा यानं । पृथ्वी जिंकली आहे ॥१२॥

॥ कोरी भुम्मा हे याला । मालुम आहे ।
या किल्या मध्ये रेणुका । माता आहे ॥
॥ हे मुख्य अग्नीच घर होये ।
व्दैत दुर्जनाले हे रेणुका । जाळते आहयं ॥
॥ या पृथ्वीवर कैक उन्मत्त । झाले आहे ।
याहीचा निंर्पातं रेणुका करते आहे ॥
॥ या मायेच्या जो कोणी । अर्जवत आहे ।
त्याहीचा अंगीकार रेणुका । करते आहे ॥१६॥

॥ या मायेची भरून कृपा । माझ्या वर आहे ।
अन्न सिध्दी या मायेनं । मजला दिली आहे ॥
॥ अन्ना सिध्दिचे सदोनित । मजला भोजन आहे ।
अंबार कोठे माझ्या घरी । भरले आहे ॥

॥ या कोठयात हे वाण । अनमोल आहे ।
या वाणांचे गुण, अंतापार आहे ॥
॥ या मायेची भरून कृपा । मजवर आहे ।
अमृत संजीवनी या मायेनं । मजला दिली आहे ॥२०॥

॥ या मायेची देणगी मजला, पुरी आहे ।
अवघा पुरवा माय मजला । पुरवत आहे ॥
॥ या मायेन रत्ती मजला । देल्ली आहे ।
रत्ती बळे अवघ देवांगण । संग नांदते आहे ॥
॥ या परसरामाचा शकुन, आहे चांगला ।
सोयंम् ज्योतीचा अवतार देव । उभा राहीला ॥
॥ या ज्योतीचा उजेड मजला । सदोनित आहे ।
आत्माराम हद्‌यी शिरावर सदाराम । नांदते आहे ॥२४॥



॥ ओवी नं. ४३ ॥

॥ पलट ओवी ॥

## ॥ बिरदाची भिंस्त ॥

॥ हे होय बिरदाची भिस्तं । या देहीला रत्न जडीत ।
या रत्नाचा उजेड आहे । मजला सदोनित ॥
॥ देव माझा हा आहे । लेकुरवाळा ।
याहीच्या संग आहे । गोपाळाचा मेळा ॥
॥ मेघश्याम देव आहे । रायाच्या घरी ।
यान धरली पुण्यांची । ही पायरी ॥
॥ या परवेशाचं तेज आगड/आगळं । आहे भारी ।
अवघे रंग याहीच्या देहा वरी ॥०४॥

॥ विठ्ठल राया घरी याहीचा । आत्माराम आहे भारी ।
पाचा वेदाची मिळणी झाली । देव रायाच्या घरी ॥
॥ सदाराम देव अवघ्याहुन । आहे भारी ।
शिराय मुगुंट याहीच्या आहे । माथ्या वरी ॥
॥ या दौंडयांन/दवंडयान चहु कडे । धुंडव्या घेतला ।
याहीच्या दवंडीन उजीड मजला । सदोनीत झाला ॥
॥ माता भेटली माय माझी । गिरजा जननी ।
देव राया मिळाले आहे । एका ठिकाणी ॥०८॥

॥ भाव या देवाचा, खरी आहे । याहीची भक्ती ।
याहीच्या पायी मजला । घडली सं मोती ॥
॥ हे होय वैदर्भ नवमी/नगरी । हे आता झाली खरी ।
या देवरायान वय माझं । बांधली पुरी ॥
॥ चंद्र बत्तीशीचा हा आता । उगवला पुरा ।
या देवरायाच्या मुखचा सत्य । शकुन आहे खरा ॥
॥ याहीच्या शकुनानं आता माझे । बरे झाले ।
राव साव देव माझे । रूपात आले ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. ४४ ॥
॥ पलट ओवी ॥

## ॥ धर्मरायान आनंद देंल्ला ॥

॥ या धर्म रायानं मजला, आनंद देल्ला ।
अवतार ज्योतीचा, आत्माराम, मजला साहयं झाला ॥
॥ प्रथम श्री कृष्ण मुखी । शकुन बोलले ।
ईश्वर पुनाच्या पायी माझे । तरण उपाय झाले ॥
॥ ईश्वर-पुना मिळुन या दोघांन । गायन केले ।
गायनाच्या मार्गानं अवघ्याला । सांगुन ठेवले ॥
॥ बहुत दिवस इथं वाट । पाहत बसले ।
गायनाच्या मार्गानं येता । कोणी नाही दिसले ॥०४॥
॥ रवि दिवसानं आता माझे । बरे केले ।
ईश्वर-पुनांन माझ्या कपाळी । कुंकु लावले ॥
॥ ईश्वर-पुना आपल्या बिरदावर । उभे झाले ।
चिरंजीव याहीनं केले आपल्या । या बाळाले ॥
॥ हेच देव या देहीचे । मालक झाले ।
चारही रस्ते शुध्द मार्ग । दाखवला बाळाले ॥
॥ देव रायानं माझे अंगीकार । चांगले केले ।
या सावानं आपन होवुन । मजला हद्‌यी धरले ॥०८॥
॥ पाचही वेद एका जागी मिळाले ।
सत्व गुण मुखी सिध्दांत । वेद बोलले ॥
॥ अवघ साहयं करून हे देव । मजला साहयं झाले ।
माझ्या देहीचे कवाड याहीनं । अवघे उघडले ॥
॥ सहा जनांची सांगी मजला । वाटली गोड ।
मन पवनानं माझ्या हाती । देल्ली कु-हाड ॥११॥
॥ आत्मा रामानं घेतली कुदळी । खाणुन टाकली अवघी जडपेडी ॥
॥ सदा रामानं घेतली कु-हाड । झाडुन तोडले ते अवघे खोड ॥
॥ मोठया पिक्तीचे उलथीन । यामध्ये, नागंर धरले ।
कुंदा पडाळ दर्भ हराई । हे अवघे मुरले ॥ १४ ॥
॥ त्याच्या जडा वेचुन, नाव कुलते । गंजी फुंकले ।
केर-कचरा वेचुन यामध्ये । अवघे खोड जाळले ॥
॥ निर्मळ झाली धाणा ओवी । इच्यामध्ये धाण चांगला आला हाही ॥
॥ मालीक साहेबान कृपा दृष्टीनं । धाण चांगला झाला ।
धाण चांगला पाहुन संतुष्ट । झाले देवाचे मनं ॥
॥ इश्वर-पुनाचे हातचे अक्षर । रायानं चांगले पाहुन ।
या धाणावर आत्मा सदारामाला । ठेवलं राखनं ॥
॥ मालीक साहेबाची भरून कृपा । माझ्या वर झाली ।
आपन होवुन मजला याहीनं । जहांगीरी दिली ॥
॥ जहांगीरी दिली मजला माझ्या, या गावाची ।
माझ्या या गावावर सत्ता । चालत नाही कोणाची ॥२०॥
॥ राव साहेबाची मेहर मजवर । पुरी झाली ।
पुरी सनद आपल्या शिक्याची । मजला दिली ॥
॥ या देवाची सत्ता आता । माझ्या वर आहे ।
या सावानं अंबार कोठे । भरले आहे ॥

॥ अंबार भरले आहे माझे । हेच कोठे ।
इचे रखवाली करणारे सरदार । आहे देव मोठे-मोठे ॥
॥ मेघश्याम मनपवन आत्मा सदाराम । खेत्री पटाईत ।
या मकाणी रिघ कोणाची । नाही पोहचतं ॥२४॥
॥ अवघी राशद हे होय । या विठ्ठलाची ।
या मालावर ध्वज उभी । आत्मा सदारामाची ॥
॥ अवघी जमा पुंजी हे । होय या सावाची ।
किर्त महीमा भारी आहे । या देव रायाची ॥२६॥



॥ ओवी नं. ४७ ॥

॥ पलट ओवी ॥

## ॥ ईश्वर पुनाची सांगी ॥

॥ ईश्वर पुनाची हे सांगी । झाली खरी ।
या देव रायानं हे देह । मजबुत केली ॥
॥ विठ्ठल देव राया माझा । हा आहे दयाळु ।
या आपल्या बाळाचा, या देवानं । केला संभाळु ॥
॥ विठ्ठल देव राया माझा । हा आहे भावीक ।
आपल्या दासाचा देव राया । झाला सेवक ॥
॥ पुर्वि सांगतली या मकाणी । ज्योतीची मात ।
आपल्या बिर्द साठी देव । आला धावत ॥०४॥
॥ या विठ्ठल रायाले माझी । आहे भिडं ।
या देहीचे देवानं उघडले । अवघे कवाडं ॥
॥ या विठ्ठल रायानं धरला हो । स्थुल देहीचा रंग ।
सद्‌वनित देव नांदते । माझ्या संग ॥
॥ आता जडलो आहे । या, विठ्ठला च्या पायी ।
या देवानं राशद अवघी । देल्ली हेही ॥
॥ आता जडलो देव रायाच्या पायी ।
या देवान या देहीची । मजबुती केली हेही ॥०८॥
॥ आता जडलो श्रीकृष्णा च्या पायी ।
या देवान मजला आनंद, दिला हाही ॥
॥ आता जडलो मेघश्याम च्या पायी ।
या देवान मजला जहांगीरी । देल्ली हेही ॥
॥ आता जडलो मनपवना च्या पायी ।
या देवान अगाध गुण । मजला शिकवला हाही ॥
॥ आता जडलो परसरामा च्या पायी ।
या देवान माझ्या देहीची । परवेशी केली हेही ॥१२॥
॥ आता जडलो प्रतापसुखा च्या पायी ।
याहीच्या सुखानं नांदत । ही माझी देही ॥
॥ आता जडलो आत्मारामा च्या पायी ।
माझ्या हद्‌यात आत्माराम, बोलतो हाही ॥
॥ आता जडलो सदारामा च्या पायी ।
माझ्या शिरावर सदाराम देव । नांदते हाही ॥
॥ आता जडलो श्रीरामा च्या पायी ।
या देहिला या देवानं । रंग चढवला हाही ॥१६॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. ४६ ॥

॥ पलट ओवी ॥

## ॥ ऐकाजी गुरूकिल्ली ॥

॥ ऐकाजी गुरूकिल्ली । प्याला पिवुन, मजला धुंद लागली ।
आत्मा सदारामाची मदत, मजला पुरी झाली ॥
॥ गुरू माझा देव राया । आहे मज पाशी ।
प्रयाग गंगा इथ मजला । घडली काशी ।
अवघे तिर्थ आहे माझ्या, गरू च्या पाशी ॥
॥ माझ्या गुरूच्या पाशी आहे । अगाध गुण ।
चौ ताळी आहे माझ्या । गुरूला मान ।
याहीच्या भेटीसी अवघं । आले देवांगण ॥
॥ अवघे रंग माझ्या गुरूच्या । आंगी आहे ।
माझ्या देहीची मजबुती याहीन । केली आहे ।
कृपा करून हद्यी मजला । धरलं आहे ॥०४॥

॥ माझ्या गुरूराजानं आपन होवुन । माझा धरला हात ।
अवघ दाखवलं मजला । या, ग्यान मार्गात ।
या मकाणी मजला दिसली । सोयंम् ज्योत ॥
॥ याहीच्या पाशी शिक्का आहे । याहीला आहे हो देवरूप ।
हेच होय माझे पुर्विचे । माय बाप ।
या देवानं दाखवले मजला । आपले रूप ॥
॥ या देवाच्या नामा ओवीची । मजला धुंद लागली ।
अवतार ज्योतीचा या रायानं । मजवर छाया धरली ।
कृपा करून खुण मुद्रा । माझ्या डोळा दाखवली ॥
॥ गुरू माझा भारत ध्वज । उभे आहे ।
हेच पुर्विच माझ । गणगोत होय ।
याहीच्या स्वरूपाचा उजीड मजला । सद्वनित आहे ॥०८॥



॥ ओवी नं. ४७ ॥

॥ गुरूची ओवी ॥

## ॥ सद्गुरूचा हंकार..सदाराम साहयं झाला ॥

॥ माझ्या सदगुरूचा हंकार । आहे चांगला ।
अवतार ज्योतीचा सदाराम मजला । साहयं झाला ॥०१॥
॥ अवघी जमापुंजी या सावाच्या । पाशी आहे ।
हाच पंथ ईश्वर-पुना । देवाचा होय ।
याहीच्या घरी उजीड रवी, दिवसाचा आहे ॥
॥ या मकाणी विठ्ठल देव । प्रकट झाले ।
अवघे तिर्थ या रायाला । शरण आले ।
अवघ देवांगण या रायाच्या । भेटीशी आले ॥
॥ किर्त महिमा राव सावाची । आहे भारी ।
गिरजा देवी हे होय माझी । माय खरी ।
इची नजर या बाळावरी । अवघ, देवांगण ईच्या घरी ॥०४॥

॥ अनंत रूप हे आहे । माझ्या देवाचे ।
या सावानं रंग धरले । या देहीचे ।
या मकाणी आसन आहे । रूद्र देवाचे ।
महादेवानं ध्यान धरले । आत्मा सदा रामाचे ॥
॥ शक्ति कुंडलीनी हे होय । गणेश देवता ।
दोघा मिळुन देह मजबुत । केला आता ।
या देवाच्या चरणावर । ठेवला माथा ॥
॥ रवी दिवसानं आता माझे । बरे केले ।
श्रीकृष्णाचे बोल ईश्वर-पुनानं । खरे केले ।
आत्मा सदारामानं रावसाव देव । प्रकट केले ॥०७॥



॥ ओवी नं. ४८ ॥
॥ पलट ओवी ॥

## ॥ पृथ्वीला हात जोडुन ॥

॥ या पृथ्वीला हात जोडुन । अर्ज कोण केला ।
या मायेशी लवुन भजुन । कोण राहिला ॥
॥ या मायेन हा जन्म । जगाले देल्ला ।
या मायेनं हा सांभाळ । अवघ्याचा केला ॥
॥ हे पृथ्वी हे होय । जगाची आई ।
आता लागाव ईच्या पायी । संभाळ, केला त्वा मायबाई ॥
॥ हे पृथ्वी लहान कैशी म्हणावं ।
यवगा यवगी इच्यावर, अवतरले देव ॥०४॥

॥ हे पृथ्वी कांचन आहे । ईच्या पोटी खाण रत्नाची आहे ॥
॥ हे पृथ्वी जड आहे भारी । सात समुद्र आहे ईच्यावरी ॥
॥ हे पृथ्वी परस्थान आहे मोठी ।
अवघी उत्पत्ती हे आहे । माय भुमीच्या पोटी ॥
॥ हे पृथ्वी हेच होय गाय ।
नित्य अमृत माय मजला, पाजत आहयं ॥

॥ कामधेनु होय ही गाय । अवघे वाणं पदार्थ, गायीचे आहयं ॥
॥ कितीक गुण वर्णु । ईश्वर, रूपी माय ।
पृथ्वीची वाणी । ईच्या हुन, उत्तम नाही कोणी ॥
॥ कितीक वर्णु भुम्मा आता । उभी आहे अनुसया माता ॥
॥ साळु मायेची कोठी । हे, आहे मोठी ।
अवघे तिर्थ हे आहे । माय, भुम्मेच्या पोटी ॥१२॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०७ ॥
॥ पलट दांड ॥
॥ ओवी नं. ४९ ॥
॥ गुरूची मुळ पलट ओवी ॥

## ॥ सद्‌गुरूचा हंकार..आत्माराम साहयं झाला ॥

॥ माझ्या सद्‌गुरूचा हंकार, आहे चांगला ।
अवतार ज्योतीचा आत्माराम, मजला साहयं झाला ॥

॥ प्रथम श्री कृष्ण मुखी । शकुन बोलले ।
पुर्वि पासुन सांगुन ठेवले । या रायाले ।
या पुनाने या देहीवर । रंग धरले ।
देव रूप या माझ्या । डोळा दिसले ।
या देवाच्या चरणा वर । मस्तक ठेवले ।
या बिरदाची बाणी आहे । गुरू राजाले ॥

॥ माझ्या गुरूराजानं । आपण होवुन, माझे फुंकले कान ।
ओंहंम्-सोहंम् मंत्र सांगतला । चांगला उजळुन ।
चौ ताळी माझ्या आहे । गुरूचा मान ।
याहीच्या भेटीशी अवघ आलं । आहे देवांगण ॥

॥ या गुरूरायानं आता माझे । बरे केले ।
माझे धन याहीन आता । मजला दिले ।
अंबार कोठे माझ्या घरी । या सावानं भरले ।
गणिता नाही आता याहीच्या । रशिदीले ॥

॥ गुरू माझा देव राया । आहे बळकट ।
पुर्वि पासुन ईश्वर-पुनानं । दाखवली वाट ।
या देवाशी मजशी आहे । सदोनित भेट ।
या देवाचे चरण हद्‌यी । धरले बळकट ।
गुरू माझा देव राया । आहे भावीक ।
देवराया नगरचा व्होय । नगर नायक ।
माझ्या गुरूचं पुण्यं आहे । अथांक ।
याहीच्या पुण्यांन आनंदात । नांदतो इथं ॥०४॥

॥ या सावाचा हा हंकार । आहे चांगला ।
सोयंम् ज्योतीचा अवतार देव । उभा राहीला ।
या ज्योतीचा उजीड । सद्‌वनित आहे ।
आत्माराम हद्‌यी शिरावर सदाराम, नांदते आहे ॥०५॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. ५० ॥
॥ गुरूची मुळ पलट ओवी ॥

## ॥ बहुत दिवस अर्जि गुरूची ॥

॥ बहुत दिवस अर्जि केली । या गुरू राजाशी ।
माझ्या सद्‌गुरूनं धरलं आहे । आपल्या हद्याशी ॥
॥ माझ्या गुरूरायान आपन होवुन । मजला लावलं सेवेशी ।
माझ्या सद्‌गुरून देणगी दिली । आपल्या बाळाशी ।
आता नांदवते गुरू राजा । या देह जीवाशी ॥
॥ गुरू राजा आता जडलो । याहीच्या पायाशी ।
प्रयाग गंगा इथ मजला । घडली काशी ।
अवघे तिर्थ माझ्या गुरूच्या । पाया पाशी ॥
॥ गुरू राजाच्या आता जडलो । याच पायी ।
महा गंगा मिळाल्या इथं । एका ठायी ।
अगाध पुण्य आता मजला । घडलं हेही ॥०४॥
॥ ईश्चर पुनाच्या पायी । अवघे तिर्थ, मजला घडले हेही ।
अवघ देवांगण नांदते हो । एका ठायी ।
सद्‌वनित आता जडलो । या देवाच्या पायी ॥
॥ गुरू माझा देव राया । हा होय सागर ।
या देवरायाचा अवघा होय, हा विस्तार ।
ईथं भेटला मजला देव । दिगांबर ॥
॥ हंस अवतार माझ्या या । देवानं धरला ।
महारा घरी देव माझा । नांदतो चांगला ।
अवद्युत नाव पावला । सत्य, शकुन आहे चांगला ॥
॥ हा देव सारंगधर झाला । अवघ्या, रंगी खेळु लागला ।
हा देव मनीश्वर झाला । याहीचा, हंकार आहे चांगला ।
हादेव श्रीप्रभु नायक झाला । आत्मा, सदाराम नाव पावला ॥०८॥
॥ पुर्ण अवतार या माझ्या । देवानं धरला ।
याहीन आपल्या नामाचा मज । उपदेश दिला ।
याहीच्या नामा ओवीचा हद्यी । घंटा वाजतो चांगला ॥
॥ चार अन् पाच, असे झाले नउ । इथं नांदते देव माझा, अवधुत राव ।
याहीची नामाओवी या मुखानं । चांगली गावावं ॥
॥ अवघ्याहुन श्रेष्ठ आहे माझे । हेच देवं ।
याहीच्या आनंदानं नांदतो माझा । हाच देहगावं ।
या गावावर सत्ता उभेआहे । माझे हेच देवं ॥
॥ भाव या देवाचा, खरी आहे । याहीची भक्ती ।
या देवाच्या पायी मजला । घडली संमोती ।
या देवानं जागी केली । अवघी सृष्टी ॥१२॥
॥ मालक माझा देवराया होय । हा पृथ्वीचा पती ।
श्री कृष्ण सावळा देव । आहे, याहीच्या संगती ।
चांग देवानं रूप मजला । दाखवलं ईथी ॥
॥ चांगदेव नर नवरा, झाला आहे । या नराचं रूप, अंतापार आहे ।
आपल्या हातान कहिकाचे बासींगं । उतरवले आहे ॥
॥ नर नवरा या ठिकाणी, उभा आहे । या नराचं तेज, मोठं भारी आहे ।
याहीच्या तेजानं कहीक दादा । ईरावले आहे ॥
॥ या मकाणी देवमाझा, अवतरला आहे । ईश्वररूप माझ्या देवाचं आहे
अवघ देवांगण हे याहीच्या । अध्यानी आहे ॥१६॥
॥ अवघ्या देवांगणाचा, इथं जम्माव । झाला आहे ।
या नराची ढालं उभी आहे । या ढाली संग याहीचं निशाण आहे ॥

॥ हे ढाल मोठी मजबुत आहे । अवघ वळ या ढालीनं, वळले आहे
॥ परसरामाचा बाण, अग्नी आहे । मेघ-डंबर याहीच्या पाशी आहे ।
या मेघ डंबराची भरून छाया । मजवर आहे ॥
॥ ईश्वराची देणगी मजला पुरी आहे । सुर्य-पान हे याहीच्या, हाती आहे ।
सुर्य पान मुख्य अग्नीचं । घर होये ॥ २० ॥
॥ कहिक उन्मत्त आले । ते जळुन भस्म झाले ॥
॥ पुर्वि पासुन अशी गाही । या नराची आहे ।
अवघी राशद या नरानं । जमा केली आहे ।
हे पृथ्वी या नरानं । सर केली आहे ॥
॥ खेत्री मोठा पटाईत आहे । एकविस वेळा यानं पृथ्वी जिंकली आहे ।
हे पृथ्वी या नरानं । सर केली आहे ॥
॥ आत्माराम देव अवघ्याहुन । श्रेष्ठ आहे ।
अवघ जोतीष्य हे याहीच्या । पाशी आहे ।
नेम वाल्याचे नेम याहीनं । खाली केले आहे ॥२४॥
॥ मेघश्यामाचा अमृताचा । वर्षाव आहे ।
याहीच्या वर्षावानं हे धरनी । गीली आहे ।
महा गंगा या वर्षावानं । भरली आहे ॥
॥ महा गंगेला हा पुर । आला आहे ।
दोन्ही थडी हे गंगा । भरून वाहत आहे ।
या गंगेच पाणी मोठं । अथांग आहे ॥२६॥
॥ या गंगेच पाणी मोठं निर्मळ आहे । हे तिर्थ महामहा भारी आहे
या तिर्थि माझे पुर्वज हा देह उध्दारत आहे ॥
॥ साळु बाई सावंग्यात । उभी आहे ।
हंकाराची वाचा या गाईच्या । मुखी आहे ।
हेच गाय आपल्या मुखानं । बोलते आहे ॥२८॥
॥ चतुर्पता उभी आहे । हेच गाय ।
अवघे रंग या गायीच्या । अगी आहयं ।
जो या रंगात राहिन तो चिरंजीव झाला आहे ॥
॥ कामधेनु उभी आहे । हेच गाय ।
अवघे वानोवान हे पदार्थ । या गाईचे होय ।
अवघा पुरवा माय मजला । पुरवत आहयं ॥
॥ पंचमुखी महादेव इथं । उभा आहे ।
याहीच्या संग गिरजा पार्वती । उभी आहे ।
अमृतांचे घट या दोघांनी । भरले आहे ॥
॥ हे सावंगा हस्तीनापुर होय । या ठिकाणी हा मेरू उभा आहयं ।
इथं आता द्रौपदा आली आहे ॥३२॥
॥ या मेरूवर हा धृव आहे । अक्षयी अंबर चिरंजीव, हा धृव आहे
या धृवानं आपला गाव । उध्दारला आहे ॥
॥ या सावंग्यात हे राज्य । पांडवाचे आहे ।
या जम्बुव्दिपात हे गादी । धर्माची आहे ।
या धर्मरायानं न्याय खरा । केला आहे ॥
॥ या कर्णाची मदत या । धर्माले आहे ।
रूक्मिणी सहीत श्रीकृष्ण याहीला । साहयं आहे ।
हा मारूती आत्मा सदारामाच्या । स्थावर आहे ॥
॥ ईश्वर-पुनाचा हा पंथ । चांगला आहे ।
अहिन वार्ता मजला याहीन । शिकवली आहे ।
रावा सावाचा बिजमंत्र । पुरा आहे ॥३६॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥
॥ ओवी नं. ५१ ॥
॥ मुळ पलट ओवी ॥

## ॥ मेरूची ओवी ॥

॥ ईश्वर पुनाचा शकुन । आहे चांगला ।
अवतार ज्योतीचा रवि दिवस । चंद्र साहयं झाला ॥
॥ ईश्वर पुना हे माझे । मायबाप होय ।
या देवाचा आशिर्वाद मजला । पुरा आहे ॥
॥ पुर्वि पासुन अवघ मंडयान । ईश्वर-पुनाचं आहे ।
या ठिकाणी हा मेरू । उभा आहे ॥
॥ या मेरूची हेच छाया । चहुकडे आहे ।
ईश्वरी रूप या माझ्या । देवाच आहे ॥ ०४ ॥
॥ ईश्वरी रूप धरून पुना । विठ्ठल देव ।
गणपती मिळुन या देवानं । उभकेल अवघ मंडयानं ॥
॥ सप्त पाताळाच्या तळी ईश्वर । रूपाचे आहे चरण ।
तिर्थ चरणीची शुध्द बम्हादिकाले । दुर्लभ जाण ॥
॥ ऐसा मेरू या ठिकाणी । उभा आहे ।
या मेरूच्या आधारी अवघं । देवांगण आहे ॥
॥ आकाश धरणी हे याहीच्या । पाशी आहे ।
पवन पाणी हे याहीच्या । पोटी आहे ॥०८॥
॥ चंद्र सुर्य याहीला, जडीत आहे । याचा उजाला अंतापार आहे ॥
॥ सहाही जनांची इथं मिळवणी । झाली आहे ।
सद्वनित याहीच मजला । दर्शन आहे ॥
॥ या देहीचे तारू देव । उभे आहे ।
पुरा आधार या देवाचा मजला । चांगला आहे ॥
॥ अवघ साहयं करून साचे । मजबुत केले आहे ।
या नर देहीचे रूप । अनंत आहे ॥ १२ ॥
॥ हेच देह या विठ्ठलाची होय । चत्रभुजदेव माझे नांदते आहयं ॥
॥ या सावाची हे सत्ता । मजवर आहे ।
या दिवसाचा आठव माझ्या । हद्यी आहे ॥
॥ या दिवसाची भरून कृपा । माझ्या वर आहे ।
अन्ना सिध्दी या दिवसानं । मजला दिली आहे ॥
॥ अन्न सिध्दीच सदोनित भोजन । मजला आहे ।
अंबार कोठे माझ्या घरी । भरले आहे ॥ १६ ॥
॥ या कोठयात वाण हे । अनमोल आहे ।
या वाणाचे गुण दादाहो । अंतापार आहे ॥
॥ या दिवसाची मेहर मजवर । पुरी आहे ।
अमृत संजिवनी या दिवसानं । मजला देल्ली आहे ॥
॥ या दिवसाची देणगी मजला । पुरी आहे ।
अवघा पुरवा दिवस मजला । पुरवत आहे ॥
॥ या दिवसाचे आता बळकट । धरले पाय ।
नवनित या दिवसानं मजला । देल्ला आहयं ॥ २० ॥
॥ देविदास देवराया होयं । रत्नदिप यान मजला देल्ला आहयं ॥
॥ या रत्नदिपाची उजेड मजला । सदोनित आहे ।
या डोळयान अनमोल वस्तु । मजला दिसल्या आहे ॥

॥ महा प्रचंड मेघश्याम देव । उभा आहे ।
हा खेत्री मोठा हो । अनिवार आहे ॥
॥ याहीच्या पाशी हा गुण । अगाध आहे ।
सहा जोग हा मोठा । बलाढय आहे ॥ २४ ॥
॥ महातेजस्वी हा पवन आहे ।
ईश्वरी रूप हया माझ्या देवाचं आहे ॥
॥ याहीच्या पाशी गुण चांगला । रसाळ आहे ।
अवघ ज्योतीष्य याहीच्या । पाशी आहे ॥
॥ महामहा धेंड आत्माराम देव । सदाराम आहे ।
नउ खंडात याहीचा झेंडा । उभा आहे ॥
॥ हा खेत्री मोठा हो । पटाईत आहे ।
एकविस वेळा याहीनं पृथ्वी । जिकंली आहे ॥ २८ ॥
॥ यमुना गंगा अथांग आहे । हे तिर्थ महाभारत आहे ॥
॥ तुळसा गंगा तुळाधार आहे । या तिर्थि देह हा उध्दारला आहे ॥
॥ मुळसा गंगा हे तिर्थ । महा भारी आहे ।
या तिर्थि माझे पुर्वज । उध्दारले आहे ॥
॥ नामांकीत गंगा ईची पदवी । मोठी भारी आहे ।
या तिर्थि जग उध्दार । कहिकाचा आहे ॥ ३२ ॥
॥ हयाच गंगा अवघ्याहुन श्रेष्ठ आहे ।
या सागरी या मिळाल्या आहे ॥
॥ हा सागर महाभारत आहे । या सागरात खाण रत्नाची आहे ॥
॥ हे रत्न महा भारी आहे । या रत्नाचा हा उजेड आहे ॥
॥ हे रत्न अनमोल आहे । या रत्नाची पारख कोणाले आहे ॥३६॥



॥ रत्न पारखी या ठिकाणी । उभा आहे ।
या विष्णुनं पुर्वि/पुर्ण रत्न ।
पारखले आहे ॥ ३७ ॥
॥ या ठिकाणी करवती । घाट आहे ।
तिरनयन ओंम् नाम एका ।
जागी मिळाले आहे ॥
॥ हा सागर महाभारत आहे । या सागरात राशद अंतापार आहे ॥
॥ या मालावर या ध्वजा । उभ्या आहे ।
या ध्वजांची भरून छाया । मजवर आहे ॥ ४० ॥
॥ या सावाचे मत ठाउक । पाच जनाले आहे ।
या वेदाच्या अंगी अवघे । रंग आहे ॥
॥ हाच सावळा जगा मध्यी । उभा आहे ।
हंकाराची वाचा हे याहीच्या । मुखी आहे ॥ ४२ ॥
॥ हा हंकार या देही । भरला आहे ।
वेद सिध्दांत सर्व सत्य । या मुखी बोलते आहे ॥
॥ अवघ धादांत या डोळयान । दिसले आहे ।
ज्योतीचा अवतार माझ्या संग । देव सदोनित आहे ॥ ४४ ॥
॥ या ज्योतीचा उजेड मजला । सदोनित आहे ।
आमचा राम हदृयी, शिरावर सदाराम । नांदते आहे ॥ ४७ ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०७ ॥

॥ ओवी नं. ५२ ॥

॥ मुळ पलट ओवी ॥

## ॥ मुद्राची ओवी ॥

॥ या साळु मायेचा हा । हंकार आहे चांगला ।
अवतार ज्योतीचा निरंजन अवतार । मजला साहयं झाला ॥
॥ पुर्वि पासुन या मकाणी । उठली नाम धुनी ।
श्री कृष्णाच्या मुखची होय । शकुन वाणी ॥
॥ या श्री कृष्णानं अवघ भविष्य । ठेवलं सांगुनी ।
या लहान मोठयां अवघ्यांनो । ऐकाव हे श्रवणी ॥
॥ रवि दिवसाच नाव येथं । ठेवलं सांगुनी ।
या दिवसाले अजुन भजुन । नाही राहीले कोणी ॥०४॥
॥ साठ वर्षे देव बसले । गम खावुनी ।
सुर्य वंशाचे अवघे लोक । रवि दिवसाच्या ध्यानी ॥
॥ मुख्य मालक महादेव मिळाले । या एका ठायी ।
याहीच्या मुखची होय ही । शकुण वाणी ॥
॥ पाचही वेद मिळाले आहे । या एका ठिकाणी ।
याहीच्या मुखची होय ही । अमृत वाणी ॥
॥ ईश्वर-पुना हे माझे । मायबाप होये ।
या देवांचा आर्शिवाद मजला । पुरा आहे ॥०८॥
॥ या दोघांच्या मुखच हे । गायन होय ।
या गायनाच्या मार्गाने गुरूराज । मजला भेटले आहे ॥
॥ या गुरू राजाचे बळकट धरले । हेच पाय ।
या देहीची मजबुती या । देवाच्या हातची आहयं ॥
॥ सद्‌गुरू देव माझा । चांगला आहे ।
या देवानं हद्‌यी धरले । आपले बाळ गोपाळ ॥
॥ अगाध गुण माझ्या गुरूच्या । पाशी आहे ।
चिरंजीव याहीन केलं आहे । आपल्या बाळाले ॥१२॥
॥ या अवधुताची भरून कृपा । मजवर आहे ।
मनमुद्रा खास याहीन मजला दिल्या आहे ॥
॥ सहाही मुद्राचे नित्य पारायण ¦ करतो आहे ।
सहाही मुद्रा मजला प्रसन्न । झाल्या आहे ॥
॥ सहाही मुद्राची नित्य विनवणी । करतो हेही ।
मन मुद्रा माझ्या हद्‌यी । बसली हेही ।
खेचरी मुद्रा या मुखी । बसली हेही ।
भुचरी मुद्रा हेही या दर्शनी । बसली हेही ।
च्याचरी मुद्रा हेही या नेत्री । बसली हेही ।
अगोचर मुद्रा हेही या श्रवणी । बसली हेही ।
अलक्ष्य मुद्रा हेही अलंमपार । आहे हेही ।
माझ्या शिरावर हे मुद्रा । नांदते हेही ॥
॥ सहाहीमुद्रा अनमोल आहे हेही । सहाहीमुद्राचे रूप अनमोल हेही ।
॥ माझ्या सद्‌गुरून सहाही मुद्रा । चढवल्या हयाही ।
सहाही मुद्राचे गुण अंतापार, आहे हेही ।
आत्मचित्ती परचित्ती शब्दरस । आणीक आहे हेची ॥१६॥
॥ रूप व्यानु-उदानु परमाणु समानु । सानीध्य पाचवा आहे अपानु हेही ॥

॥ अंतकरण मन बुध्दि चित्त । सानीध्य आहे अहंकार ।
पृथ्वी आप तेज वायु । आणीक आहे आकाश ॥




॥ आधाराच्या ठायी गणपतीचे । आहे मकाण ।
चतुरा दळी आहे हो । आरक्त वर्ण ॥
॥ या मकाणी ईश्वेश्वराचे । आहे आसन ।
या ठिकाणी हे आहे । गायत्री बसुन ॥२०॥
॥ या गायीच्या पाशी । पाच परमेश्वर आहे ऋषि ।
हेच पाच या गायीचे । सदोनित पुंजन करती ॥
॥ सिध्दु बध्द आणीक भेदु-नांदु आहे ।
ऐसा मेळा या ईश्वर-पुना । देवाचा आहे ॥
॥ चहु बोटाची गणती । सात जन गुण गाती ।
शक्ती कुंडलीनी ही होय गणेश देवता ॥२३॥

॥ स्वाध स्थानी चतुरा नयनी । या ठिकाणी आहे सायत्रा देवी ।
रज गुण । आहे या स्वाद स्थानी ॥
॥ मनीपुरी दिनकर स्वयंम । देवता लक्ष्मी संग आहे नारायण ।
सत्व गुण । आहे या नाभी भवनी ॥
॥ अनुहात् । हद्‌यी मनपवन पुना हा होय । सत्य शकुन ।
हद्‌याच्या ठायी चुद्र-सुर्य । आहे तारांगण ।
या भुवनेशी देवदत्त आहे । अवधुत ।
तम गुण । आहे या अनुहात स्थानी ॥ २६ ॥
॥ कंठ स्थानी । देव आहे हो वरुणु ।
याच मुखी । बम्ह आहे अमृत संजीवनी ।
याचा ध्यानी विष्णु जाण ग्यानी ॥ २७ ॥
॥ अग्नी स्थळी । देव आहे, तिरनयन ।
या श्रवणी कुबेर जाण । मस्तकी आहे प्रभा ओवी ॥ २८॥
॥ बिंदु स्थानी । जीव हंस, आहे केवळ ॥




॥ निरंजन स्थानी ।
देव आहे निरंजन ॥
॥ अवघ देवांगण ।
हेच होय । माझ पुंजन ।
॥ हेच देव या देहीचे ।
नित्य करते पालन ॥
॥ नाद-बिंदु चे स्थान ।
हे आहे मृग नयनी ।
॥ पिंडी असे मन-पवन ।
कोठे असे मन ?
॥ हद्‌यी असे मन । नाभी असे पवन । शरीर चाले या दोहीनं ॥
॥ तेहत्तीस कोटी आहे देवांगण । नउ लक्ष आहे तारांगण ॥
॥ पंचभुते नांदते हेही । यामध्ये आत्मा श्रेष्ठ, ओळखावं हेही ॥
॥ एक आत्मा । दुसरा आहे परमात्मा ।
तिसरा देहलींग जाणा । चौथा आहे धर्मात्मा ॥३७॥
॥ आणीक पाचवा आहे शुध्दमती ।
हेच देवांगण नांदते, सर्वाच्या संगती ॥
॥ पृथ्वी एवढी आहे साळुंका । या पिंडीवर सुर्त-लींग ओळखा ॥
॥ याच सुर्त-लींगाची महापुजा । करतो याची ।
पुरी देणगी । मजला आहे, या महादेवाची ॥
॥ या अवधुताची भरून कृपा । मज वरत आहे ।
या सन्मुख या रायानं । मजला केले आहे ॥
॥ आपल्या हातची गुल्लेर या रायानं । मजला दिली आहे ।
जिथ लावला नेम तिथं । झोंबते आहे ॥४२॥
॥ गुरूकृपेचे फळ होय । अन्ना-सिध्दी रायानं मजला दिली आहयं
या अन्न सिध्दीचं । सदोनित मजला भोजन आहयं ॥
॥ अंबार कोठे माझ्या घरी । भरले आहे ।
या कोठयात हे वान । अनमोल आहे ।
या वानाचे गुण । अंतापार आहे ॥

॥ या ठिकाणी अमृताच । झाड आहे ।
या झाडाला ही फळे । आली आहे ॥
या फळाची ज्याला रूचा । लागली आहे ।
अक्षय अंबर चिरंजीव तो । झाला आहे ॥४५॥
॥ या अवधुताचे बळकट धरले । हेच पाय ।
वेद सिध्दांत सर्व यामुखी । सत्य बोलत आहयं ॥
॥ हा देवराया मालक माझा होय । ठाई-ठाई देवमाझा उभा आहे ॥
॥ या सावाची सत्ता आता । मजवर आहे ।
या सावाची राशद माझ्या । घरी आहे ॥
॥ या मालावर या ध्वजा । उभ्या आहे ।
या ध्वजाची भरून छाया । मजवर आहे ॥४९॥
॥ हा ज्योतीबा मालक मजला । साहयं आहे ।
याहीच्या ज्योतीचा उजेड या । मालावर आहे ॥
॥ महा तेजस्वी मेघश्याम देव । उभा आहे ।
रसाळ गुण यान मजला । दिला आहे ॥
॥ मन पवन देव माझा । चांगला आहे ।
ईश्वरी रूप या माझ्या । देवाचं आहे ॥
॥ आत्माराम देव माझा । भारी आहे ।
अवघ ज्योतीष्य यान मजला । दिलं आहे ॥५३॥
॥ सदाराम देव अवघ्याहुन । श्रेष्ठ आहे ।
पुरी रत्ती यान मजला । देल्ली आहे ॥
॥ रत्ती बळे अवघ देवांगण । संग आहे ।
या रत्तीच हा उजीड । सदोनित आहे ॥
॥ हे रत्ती मोठी बळाबर आहे ।
या रत्तीच्या राशी गगणाला । टेकल्या आहे ॥
॥ या रत्तीचा पुरवा मजला । सदोनित आहे ।
अंबार कोठे माझ्या घरी । भरले आहे ॥५७॥
॥ या कोठयात हे वाण । अनमोल आहे ।
ज्याला रूचा लागन तो हे । वाण घेत आहे ॥
॥ मनीरामान याहीचं ध्यान । धरलं आहे ।
सुरत रामानं अवघी राशद । जमा केली आहे ॥
॥ हिरालाल अनमोल आहे । हिरालालचा उजेड अंतापार आहे ॥
॥ या मकाणी आईचं आसन । उंच आहे ।
हिरे-रत्न मोती आईच्या आसनाला । लाल जडीत आहे ॥६१॥
॥ हेच आई या आसनावर । बसली आहे ।
शिराळ मुकुट आईचा गगणाला । टेकला आहे ॥
॥ हिच आई अवघ्याहुन । भारी आहे ।
या आईचा गोषा मोठा । भारी आहे ॥
॥ या आईच्या गर्भि फौजा । उठल्या आहे ।
पृथ्वी गमन या फौजा । करते आहे ॥
॥ हिच आई अवघ्याहुन । श्रेष्ठ आहयं ।
अवघा वेल विस्तार या । तिरनयनाचा होय ॥६५॥
॥ अग्नीपासुन दोन्ही नयन । यमापासुन आहे केस ।
विष्णु पासुन नाडी हस्ती । आणीक मौंस ।
विरंची पासुन आहे हा । घोर श्वास ॥

॥ कुबेरा पासुन दोन्ही कर्ण । वरूणा पासुन नासिक ।
शक्ती पासुन दोन्ही हस्त । वायु पासुन दोन्ही चरण ॥
॥ चरण असता झाली धरणी । शिराळ मुकुट लागला गगणी ॥
॥ या आईन तिरभवन वस्ती । केली आहे ।
अवघ देवांगण संग घेवुन । इथं नांदते आहे ॥६९॥
॥ अवघ्या देवांगणावर या आईची । सत्ता आहे ।
अवघ देवांगण आईच्या सेवेशी । लागलं आहे ॥
॥ अवघ्या देवांगणावर या आईचा । हुकुम आहे ।
अवघ देवांगण या आईच्या । अर्जवत आहे ॥
॥ या आईची सत्ता । मजवर आहे ।
या आईन ओटयात मजला । घेतलं आहे ॥
॥ या आईचं नित्य पारायण । करतो आहे ।
या आईन हद्यी धरले । आपले बाळ गोपाळ ॥७३॥
॥ या आईची नित्य विनवणी । करतो हेही ।
या आईनं आपले बाळ । चिरंजीव केले हेही ॥
॥ हे आई आदी देवी होय । या आईचं नित्य पुंजन करतो हेही ॥
॥ हेच आई हे माझी । चंडीका देवी ।
व्दैत दुर्जनाले तवरूत जाळते । हेच आई ॥
॥ हे होय व्दौपदा आई । श्रीकृष्णाची होय बाई ।
आता लागाव ईच्या पाई । सांभाळ केला त्वां मायबाई ॥७७॥
॥ या आईला श्री कृष्णदेव, साहयं आहे । हेच माझी माता होय ॥
॥ हेच आई मुख्य कैलासन होये । कोरी भुम्मका इथं आहे ॥
॥ पंचभुती, महादेव इथं । उभा आहे ।
पुर्वि पासुन या मकाणी । नाम धुनी आहे ॥
॥ ब्रम्हा विष्णु इथं हो । आले आहे ।
या आई बुवाच्या सेवेशी । लागले आहे ॥८१॥
॥ पाताळाचा बळी हा इथं । आला आहे ।
अवघी राशद घेवुन इथं । नांदते आहे ॥
॥ स्वर्गाचा इंद्र चंद्र-सुर्य याहीला । जडीत आहे ।
अवघ देवांगण संग घेवुन । इथं नांदते आहे ॥
॥ बृहस्पती आत्माराम देव । साहयं आहे ।
या धृरूवची पदवी मोठी । भारी आहे ॥
॥ अक्षयी अंमर चिरंजीव । धृरू आहे ।
या धृरूनं आपला गाव । उध्दारला आहे ॥८४॥
॥ अवघ देवांगण मजला आहे । साहयं होवुन ।
या देहीला रूप चढवले । या देवानं ॥८५॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥
॥ सद्गुरू श्री कृष्ण महाराज की जय ॥
॥ गुरूदेव श्री विष्णुस्वामी पुनाजी की जय ॥

॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ चतुर्पता अथर्वन् वेद उभा राहीन पोटी । निजरूप भुम्मा जागी करन सारी सृष्टी ॥

# चतुर्पता
# ॥ अथर्वन् वेद ॥

## ॥ खंड ०८ : भाग ०१ ॥
## ॥ कृष्णपुरी दांड ॥
## ॥ चतुर्पती कृष्णपुरी च्या ओव्या ॥



**शब्दार्थ, चरणार्थ निरसन स्पष्टीकरन सह**






www.chaturpata-atharvan-ved.com

॥ खंड ०८ ॥

॥ कृष्णपुरी दांड ॥

॥ कृष्णपुरी दांड उत्पत्तीचे ज्ञान ॥

## ।। कृष्णपुरी दांडचे प्रारंभिक ज्ञान ।।

कृष्णाजी पुलगाव जील्हा वर्धा हे चतुर्पतीचे परमं भक्त होते. यां भक्ताने अंदाजे १९३० साली तप मांडले. जगाला याहीच्या तपाचे कारण कळेना. कृष्णदेवाला काहीतरी करनं होतं, म्हणुनच निमित्याकारण कृष्णदेवानं पुलगावच्या कृष्णाचा हात धरला होता. हाताशी हात लावला. आणी मिळवलं याहीनं गोत ! कृष्ण अवधुत धनी हद्‌यी उभे राहीले. याहीचीच हद्‌यी वाणी याहीनं सांगतली ! तो नेमधारी योगी तपी बसले. १९३५ साली याहीच्या तपाला पाच वर्षे झाले. पाच वर्षानंतर यांनी आनंदाची हुकमत मानली. आणी तेथुन चिरोडीच्या रानावनात निघुन गेले. याहीच्या संग हद्‌यी ज्योत अनामत उभी होती. या अनामत ज्योतीनं याहीच्या तपाला कोणतेही आता भय नाही. अशी अवस्था प्राप्त झाली होती. १९४२ साल पुर्ण झाल्यावर चिरोडीच्या रानावनात तपाला सात वर्षे पुर्ण झाले. पुर्ण ज्योतीची मदत याहीच्या तपाला झाली. याहीच्या तपाची सात-पाच वर्षाची गणीता करत १२.वर्षे पुर्ण झाले. चिरोडीच्या जंगलातील को-या भुम्मेचे भारी महात्म व्दारे याहीच्या देह भुम्मेला कृष्ण ज्योंती चा प्रकाश लाभला. तेजांकृत प्रकाशाच्या कृष्णांने भावीकाला निरंजनी भेटी दिल्या. पुर्विचे भाग्य दैवानं निरंजनी या भेटी झाल्या. पुलगावचा कृष्णाजी प्रेम भक्ती ध्यान करून सिध्द झाला.

ऐसे कृष्णाजी पुलगाव हे बारा वर्षे ध्यानी लागले. या बारा वर्षात देवावर प्रेम-भक्तीची मोहनी टाकली. मालकाची मेहर झाली. या निरंजन मालकाने तत्कालीन सच्च्या भावीक भक्तजनांला निरंजनी भेटी दिल्या. सच्च्या भक्तांना कृष्णप्रकाशाचे दर्शन लाभले. ऐसे भेटी आंगचे १८ खेत्री सिध्द खेत्री कृष्णाजी पुलगाव च्या संगतीनं उभे राहीलेत. ते असे.. १. कृष्णाजी पुलगाव, जी वर्धा २. श्री भोजन्या पुलगावं ३. श्री हनुमंता पाल सोनेगाव खड्‌डा ४. श्री रामप्रसाद पालं सोनेगाव खड्‌डा, पुलगाव ५. श्री दशरथ तिजारे भातकुली पुलगाव ६. श्री विठोबा पाचघरे रहाटगाव, अमरावती ७. श्री जंगल्या, अमरावती ८. श्री करूमनामा, अमरावती ९. श्री बेले/बेल्या मोर्शि, अमरावती १०. श्री श्रावण महाराज पहुर यवतमाळ ११. पांडुरंग होले मांगला-नेर, यवतमाळ १२. गुणवंता खवल्या मांगला, यवतमाळ १३. श्री येशिनाथ डोंगरे १४. श्री नारायण पणोरा १५. श्री चणकाजी दर्यापुर १६. श्री व-हेकर रहाटगाव १७. ................ १८................. ऐसे अठरा खेत्री च्या आंगी ज्योत प्रकाश लाभुन, या अठरा खेत्री ला ओवी रंचना करण्याचे देणं प्राप्त झालेत.

या सत् सज्जन खेत्रीची कृष्णाजीला संगत घडली. सत् च्या अधिक्याने या सर्वाच्या संगतीनं देव उभे राहीलेत. ऐकोणीशे बेचाळीशी चा रंग उठला. सच्च्या भावीकाच्या आंगचे तेजोगुणी अंश अवतार उजळले. चतुर्पता अथर्वन् वेद भावीकाच्या हद्‌यी उभा राहीला. चतुर्पता अथर्वन वेदाचे निरंजन ग्यान सच्च्या भावीकाच्या हद्‌यी प्रकटले. चतुर्पता अथर्वन् वेदाची ग्यानगंगेला उकळी फुटली. ज्ञानगंगा झर झर वाहु लागली. १९४२ ते १९५४ असे बारा वर्षे या ग्यानगंगेला उकळी येवुन ती कृष्णपुरी दांडाने झरझर वाहत राहली. तेराव्या वर्षी लोकसत्ता स्थापण्याचा शकुन आला. आणी तेराव्या वर्षानंतर लोकसत्ता स्थापण्यासाठी चळवळ उभी राहली. लोकसत्ता स्थापण्याच्या चळवळी करीता आवी रंचना व मांडणा होवु लागल्यात. चळवळीची मांडणा व चळवळीच्या ओव्या याचे ज्ञान कृष्णपुरी चळवळ भाग ०२ च्या प्रारंभिक ग्यानातुन घ्यावे.

येथे संग्रहित केलेल्या कृष्णपुरी दांड व कृष्णपुरी चळवळीच्या जवळपास ८० प्रतिशत ओव्या हया तत्कालीन कृष्णपुरीचे अठरा खेत्री पैकी एक खेत्री संत श्री दशरथ तिजारे, भातकुली, पुलगाव, वर्धा यांचे चिरंजीव असलेले कृष्णपुरी चळवळीचे लढवये भजनगडी श्री मनोहर दशरथ तिजारे ह.मु. यवतमाळ, यांच्या कडे असलेल्या कृष्णपुरीच्या खैत्री च्या हस्ते त्यांच्या हस्तलिखीतात लिहुन ठेवुन संग्रहीत केलेल्या ओव्या चा संग्रह होता. त्या संग्रहीत कृष्णपुरीचे ओव्या शब्दार्थ, ग्यान ईत्यादी सह आम्हास प्राप्त झालेल्या आहेत. नाही-नाही म्हणता त्यांनी आम्हास त्यांच्या जवळच्या जवळपास सर्वच ओव्या दिलेल्या आहेत. त्याबध्दल आम्ही त्यांचे ऋणी आहोत.

**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ०८/भाग-०१ ॥
॥ ओवी नं. ०१ ॥
॥ कृष्णपुरी रहाटगाव दांडची ओवी ॥

# ॥ प्रथम एका ज्योतीचा खेळ ॥

॥ प्रथम एका ज्योतीचा खेळ । नव्हत जल हे स्थळ ।
मेरू शिखर नव्हता चल....।
या तिरभवनाची कशी केली जोड ॥
॥ निर्गुणांचा संगम झाला । निर्वाणानं खेळ केला ।
सगुण-निर्गुण उभा राहीला । तेव्हाच नाव, आदीपुरूष पावला॥
॥ धुम्मधुम्मकार-ज्योत ऐक्यली । ओहंम-सोहंम धुनी उठली ।
तेथे आकाशवाणी झाली....। आदीमाया शक्ती उद्‌भवली ॥
॥ दोन्ही हात जोडुनिया । रूत मागे आदीमाया ।
भोग दयाहो स्वामीराया..।
तिला आवाज दिला, सृष्टी उद्‌भवया ॥ ०४ ॥

॥ बिज आवाजी गर्भिन झाली । बम्हा-विष्णु रूद्र व्याली ।
रंचना तिरभवनाची झाली...।
या निर्वाणाची, ज्योत खेळु लागली ॥
॥ या तिघांची कामगिरी । घडामोड चारही खाणी ।
शिव-शक्तीचा खेळ आहे भारी...।
ही बम्हज्योत, दिसते न्यारी न्यारी ॥
॥ भाव धरा प्रयत्न करा । प्रेम भक्ती रस भरा ।
प्रभु घटोघटी भरला...।
परमेश्वर, भरून उरला न्यारा ॥
॥ देव स्वर्गि देव पाताळी । आणीक आहे भुमंडळी ।
दृष्टी करून पाहे वाकडी ।
देव भरून उरला, बहुयवगाचा गडी ॥ ०८ ॥

॥ देव अवघ्याच्या अंतरी । आणीक एकविस स्वर्गावरी ।
खेळ खेळे सुत्रधारी...। देव भरून उरला, वायुवाच्या परी ॥
॥ देव जनी देव मनी । अनंत बम्हांडाचा धनी ।
खेळ खेळे निरंजनी । देव भरून उरला, अनामत धनी ॥
॥ सर्व घटी भरला देव । चुकले वर्म नाही ठाव ।
उरल्या ज्योती धरा भाव..।
या देहीत नांदन अवधुत राव ॥
॥ अवधुत अवघ्याहुन थोर । अवघ्या देवांच माहेर ।
उभा चौखुम्माच्या वर ।
या रायाची महीमा अंतापार ॥ १२ ॥

भजने :-
॥ अंतापार महीमा तुही । आनंदान नादंव, या बाळाची देही ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग-०१ ॥
॥ ओवी नं. ०२ ॥
॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ देह धरून शुध्द बोलनं ॥

॥ देह धरून शुध्द बोलनं । या भैसानं केले ।
अनामत शक्तीच वर्णन रूप । दाखवलें ॥
॥ जळी-स्थळी काष्ठी-पाषाणी । याहीचा खेळं ।
अनामत शक्ती पाहु या । दोघांचे मुळं ॥
॥ कुठच नव्हतं काही ज्योतं । अनामत एक ।
होता धुम्म धुम्म कार । नाही होती रमणुक ॥
॥ त्या ज्योतीनं माया धरली । रमणुक आली ।
त्याच दिवशी गण देवता । माया स्थापली ॥ ०४ ॥

॥ मुळमाये पासुन शक्ती झाली । पहा ईची रीतं ।
तिला आवाजी तीन खुम्म । चौथा, भैस उभा त्यात ॥
॥ आंगी अग्न परोपरी मदन । रूत मागे त्याला ।
ब्रम्हा विष्णु शंकर एका । क्षणात जाळला ॥
॥ विकाळ रूप त्या भैसाच । तो गायप झाला ।
तिन ताळ चौदा भवन । याला भंग आला ॥
॥ चैत्यन्येशी उपाय नाही राहीला । तिने धावा मांडला ।
निर्गुण निर्विकार तिच्या । सुमरणी आला ॥ ०८॥

॥ निर्विकारानं उपदेश केला । ऐक चैत्यन्यी ।
दयावे तिरनयन जागी । करन आदीमुनी ॥
॥ आदीपुरूषाचा अवतार आला । तो आदीमुनी ।
तिनखुम्म केले जागी पुन्हा । गुप्त झाले धनी ॥
॥ तिन यवगाचा राज्य कारभार । दिला तिघांच्या हाती ।
आदीभैसा वाचुन सुने । आहे राजपती ॥
॥ या तिघांचा चैतनेचा । विसर पडला ।
स्वतः होवुन राजे याहीनं । हुकुम गाजवला ॥ १२ ॥
॥ माया देवता इची सत्ता । तिनही ताळात ।
तिर भवनामध्ये याहीचा कोणी । धरेना हात ॥
॥ इंद्र-चंद्र ब्रम्हा-विष्णु । शिवशंकर आह्रेत ।
या मायेची मोहन माळा । याहीच्या गळयात ॥
॥ या तिघांवर पडली गडेहो । मायेची मोहनी ।
या तिघांच सुमरण करता । चुकेना चौ-यांशी ॥
॥ या तिघांची नष्ट होईन । राजपती ।
चैतन्याचा शिक्का येईन । आदी भैसाच्या हाती ॥ १६ ॥
॥ तिरकुटाच्या तिन गादया । सुन्या पडतीन ।
महीमा धुम्म धुम्मकार भैस । उभा राहीनं ॥ १७ ॥

भजने :- ॥ महीमा आहे गा तुही । आता चालव तिरलोकी गाही ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग-०१ ॥
॥ ओवी नं. ०३ ॥
॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ तेव्हा जीव नव्हता पंचभुता ॥

॥ तेव्हा जीव, नव्हता पंचभुता । तेव्हा तो निराकार होता ।
इच्छा धरली मनात । उद्‌भवली आदीमाया....
उभा आदीपुरूष राया ॥
॥ तेव्हा कुठच नव्हत काही । आदीपुरूषानं धरली देही ।
पंचभुती उरला तोही । धरला रंग....
सगुण-निर्गुण उभे आंग ॥
॥ सगुण निर्गुण निराकारी । देव उभे चरांचरी ।
अवघ आणलं आकारी । या कृष्णपुरी...
या मुळ यवगा वरी ॥
॥ कृष्णपुरीचा आकार । तिन ताळ इच्या वर ।
चंद्र-सुर्य उजेड फार । तिर तिरभवनी...
या मेरूच्या मंडयानी ॥ ०४ ॥

॥ खाली शिपी वर व-हाड । या मध्ये देवाचे गरूड ।
त्यामध्ये वस्तु ही अवघड । कोडंशिला...
माव आदीपुरूषानं केली ॥
॥ शिपी व-हाडी बसला जोड । मध्ये देवाचे गरूड ।
त्यामध्ये ज्ञानगंगा वाहे । झरझर...
इथं हरी नामाचा पाझरं ॥
॥ काहीतरी समजा उमजा । शिपी व-हाडाचा तो राजा ।
इथं उतरले गरूड ध्वजा । यवगेश्वर...
या जम्बु व्दिपावर ॥ ०७ ॥



॥ खंड ०८/भाग-०१ ॥
॥ ओवी नं. ०४ ॥
॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ जुनी वाणी देवानं केली ॥

॥ जुनी वाणी देवानं केली । नवी काय चोरांपासुन झाली ? ॥०१॥
॥ सकळ वाचा वदे देव । का वाढवला अहंभाव ? ॥ ०२ ॥
॥ जे जे वाणी स्तुती केली । ते-तै देवाशी पावली ॥ ०३ ॥
॥ कृष्णपुरी केली मात । बोली बोलला कृष्ण अवधुत ॥ ०४ ॥
॥ ऐसा धरी दृढ भाव । कृष्णपुरी मागे ठावं ॥ ०५ ॥

**भजने :-**

॥ ऐसा न्याहाळुन पाहे । अन्जानाचा तो दयाळु आहे ॥
॥ ऐसा न्याहाळुन पाहे । लेकरांचा तो दयाळु आहे ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग-०१ ॥
॥ ओवी नं. ०७ ॥
॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ महा महा तिर्थ भुम्मेवरी ॥

॥ महा महा तिर्थ भुम्मेवरी । काय पाहु बहु न्याचारी ।
जवळ सापडली कृष्णपुरी । बहु आहे बरी..
हेच माझी पंढरपुरी ॥
॥ हिंडता हिंडता झालो बेजार । जवळ सापडले सावंगपुर ।
कृपा झाली मजवर । श्री कृष्णाची..
या अवधुताच्या पायाची ॥
॥ पहा जळ आहे मुळ । मजला देण झालं अवघड ।
पाहुन झोपडी काढतीन पळ । जरा नाही धिरं...
कार होईन यवगावर ॥
॥ कितीक येतीन कितीक जातीन । असे असंख्यात होतीनं ।
याहीला किल्ली नाही गवसली । हरी नामाची..
हे खुण घे चातुराची ॥ ०४ ॥

॥ खर असता खोट म्हणतीनं । दुध सोडुन भांग पितीन ।
विषय लंपट होतीन । मोठे-मोठे..
देव सोडुन पुंजतीन गोटे ॥
॥ लंपट मायेत होतीन । अलट-पलट होवुन येतीन ।
आर्बुस-निर्बुस झाल्या वाचुन । कळणार नाही..
मग म्हणन देव हाही ॥
॥ माया चांडाळीन मोठी कपटी । लागली मोठयां-मोठयांच्या पाठी ।
घातली मच्छिंदराला मिठी । कदा ना सोडे..
गोरखनाथ बंधन तोडे ॥
॥ या मायेला जपुन चाला । राम राया गलपटला ।
प्याला भैसाशी पाजला । मोठी कपटी..
इनं मथवला जगजेठी ॥ ०८ ॥

॥ पाहता पाहता धोका दिला । हत्ती हौदात बुडाला ।
वाघ बकरीनं धरला । कैक पळाले..
यवगावर देव आले ॥ ०९ ॥

भजने :-
॥ यवगावर देव आले । भेटी दिल्या भावीकाले ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग०१ ॥

॥ ओवी नं. ०६ ॥

॥ रहाटगाव दांडातील ओवी ॥

## ॥ मारा हाक..। धनी जवळ आहे देख ॥

॥ मारा हाक..। धनी जवळ आहे देख ॥ घृ ॥
॥ तिर तिरभवनाच्या ठाई । धन्या वाचुन वस्तु नाही ।
नखी-शिखी भरला हद्‌यी । तो मालक..॥ धनी..
॥ कश्याला हिंडता दुर देशी ? । जवळ आहे ऋषिकेशी ।
करा अंतरी चौकशी ॥ मारा हाक..
॥ जलावर आला शेवाळ । त्यान गायप केले जल ।
शेवाळ बाजुला सार । अंदर आहे.. उज्वल स्वरूप ॥
॥ बिजा पासुन वृक्ष झाला । याला डहाक्या आणी पाला ।
बिज आहे शेंडयाला । मध्ये गायप..॥ धनी जवळ..॥०४॥
॥ तिरभवनाचा सुत्रधारी । खेळ खेळतो यवगावरी ।
याहीची करा चाकरी । तो तारक..॥ धनी जवळ आहे देख..
॥ करा सत्याची चौकशी । चुकवन चौ-यांशीची फेरी ।
मानवा जागी हो लवकरी । भोगा सुखाचा..॥ धनी जवळ..
॥ शुन्यापासुन झालं नवं । दहावं शुन्य याशी नाव ।
याचा करा हो विचार । मिटन रूखरूक..॥ धनी ..॥ ०७ ॥

भजने :- ॥ आधी शुन्य अंती शुन्य । मध्ये नवं भासे ।
तैश्या परी, जग सारे । काही, सत्य नसे ॥

-: शब्दार्थ :-

नउ = सहानर अधीक त्रिगुण । दहाव शुन्य = निगुर्ण निराकार आत्मा



॥ ओवी नं. ०७ ॥

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ जिथ वाणी तिथ धनी ॥

॥ जिथ वाणी तिथ धनी । उभा आहयं ।
पुर्विस्ताचा दोरा प्राण्या । आत्मदृष्टीने पाहयं ॥ घृ ॥
॥ सत्य वाणी हद्‌यी धनी । सदोनित उभा राहये ।
संचिताचा लेखा प्राण्या । आत्मदृष्टीनं पाहये ॥
॥ गंगे सारखे ज्याचे मन । तिथं झरा वाहे ।
जो कोणी पेईन त्याला । ते अमृत आहे ॥
॥ या गंगेचा उगम राया । कोण्या ठायी आहे ।
आत्म दृष्टीनं पाहयं प्राण्या । उलटी गंगा वाहे ॥ ०४ ॥
॥ या गंगेचं पाणी प्राण्या । शुध्द निर्मळ ।
आत्मज्ञानी करतीन आंघोळ । भेतीन यमकाळ ॥
॥ हेच स्वर्ग हेच मिर्त । हेच तिन ताळ ।
चौताळाचा मालक याहीच्या । हाती सर्व खेळ ॥
॥ हेच राउळ हेच देउळ । हेच तिर भवनं ।
या देहीमध्ये स्थापला आहे । पक्का चौथा खुम ॥
॥ चौथ्या खुम्मी उभा धनी । आहे आणीक नाही ।
आत्म दृष्टीन पाहयं प्राण्या । आदी रूप धनी ॥ ०८ ॥

भजने :- ॥ आदी रूप धनी । तारण करन मानवाच्या खाणी ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग०१ ॥

॥ ओवी नं. ०८ ॥

॥ कृष्णपुरी पहुर दांडातील ओवी ॥

## ॥ अनामीक भक्त कृष्णराज देव ॥

॥ अनामीक भक्त कृष्णराज देव । यवगा साठी आला ।
पुर्ण अवतारी कृष्ण देवाच । प्रेम संपादन करा ॥ घृ ॥
॥ दहा इंद्रियांचा फिरवा रथ । राउळा भोवती ।
भक्तीची नंगी शमशेर हाती । ढाल घ्या भावाची/कृष्णाची ॥
॥ प्राण-हंकार धनुष्य-बाण । दोरी ओढा विवेकाची ।
पुर्ण संपदा होवुन, चैत्यन्य ज्योतीत । पहा कृष्ण मुर्ति ॥
॥ यवगी चुकाल प्राणा मुकाल । होईल प्रलय ।
त्रिवेणी हवनी देहं जाळा । तुम्हा देव साहयं ॥ ०४ ॥
॥ कर्ता रणी मोक्ष दानी । पवित्र होते काया ।
अकाल मौत नरक प्राप्ती । व्यर्थ का जातो वाया ? ॥
॥ जन्म-मरणाचा, फासा न चुकवी । तो जगी व्यर्थ ।
राहा नित्य सोहंम् स्वरूपी । पहा ज्योत अनामत ॥
॥ तपी राज कष्टी फळ । कृष्ण देवाची वाणी ।
अळदि राहते रव-रव नरकी । किडे होवुनी ॥
॥ सत्य करणी करूनी नराची । झाली जागरण ।
तिर लोक्यात वाढवुनी महिमा । सावंग्यात देव कृष्ण ॥०८॥
॥ आकाश वाणी बोले धनी । नका राहु भ्रमात ।
.... ..... ..... ..... । झाली संपन्न..॥

टिपः- ही दुक मिळाली नाही. म्हणुन..
अनामीका घरी निशंःकलंकी ज्योत । उभी राहली ताळात ॥ किंवा
चैतन्य ज्योत सोयंम् कृष्ण । उभा, सावंग्यात ॥ ही दुक वापरावी.

भजने :-
॥ अनामीका घरी आला । भाव/भक्ती पाहुन देव राया उतरला ॥
॥ ऐसा अनामीकाचा भाव । याहीनं हद्यी साठवला देव ॥
॥ ज्याचा भाव त्याची भक्ती । विठोबा देव राया याहीच्या संगती ॥
॥ भाव धरा भक्ती करा । भावीका साठी देव भावीक झाला ॥



॥ ओवी नं. ०९ ॥

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ झालो हमाल..। लादला देवाचा माल ॥

॥ झालो हमाल..। लादला देवाचा माल ॥ घृ ॥
॥ वाहतो हरीनामाचे ओझे । चतुर्पती अथर्वन् वेद ।
यात काही नाही माझे ॥ झालो हमाल..। लादला..
॥ हे होय कृष्णाचे दुकान । घ्याहो कोणी वाणांनं हा वाणं ।
नका राहु अभिमानानं ॥ झालो हमाल..। लादला..
॥ श्रीकृष्णाची दुकानदारी । फैलवली भुम्मेवरी ।
मजला ठेवलं चाकरी ॥ झालो हमाल..। लादला..
॥ वाहतो श्रीकृष्णाची ओझी । नित्य करतो हमाली ।
तुमच्या कृपेची सावली ॥ झालो हमाल..। लादला..

भजने :- ॥ हा होय देवाचा माल । घेईन त्याचं बहु बरं ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग०१ ॥
॥ ओवी नं. १० ॥
॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

# ॥ पृथ्वीवर पवित्र भुम्मा ॥

॥ पृथ्वी वर पवित्र भुम्मा । तिर्थस्थान एक ।
को-या भुम्मेवर नांदतो । प्रभु नायक ॥
॥ गंगा यमुना भागीरथी । सरस्वती आली ।
को-या भुम्मेवर अनामत । ज्योत वळली ॥
॥ अनामत कृष्ण देव अवद्युत । माझा कैवारी ।
यवगा परी अवतार घेवुन । भक्ताला तारी ॥
॥ दृष्टांचा संहार करून देव । भक्तांच्या घरी ।
तुमच्या कृपेने यवग लौटले । या भुम्मेवरी ॥ ०४ ॥

॥ जसाच यवग तसाच खेळ । येवुन-होवुन गेले ।
नाव मुद्दा नाही राहीला । गंगेत मिळाले ॥
॥ गंगेचा मुसळा भारी । अखंड आहे ।
कहीक आले कहीक गेले । कोणा नाकळे ॥
॥ कोणी घडेना कोणी मोडेना । याहीची रंचना ।
अवधुत अनामत याहीची । पक्की साधना ॥
॥ चरांचर निराधारी । पहा तो अवधुत ।
सहा दर्शन जोग मोडन । याहीच्या हातं ॥ ०८ ॥

॥ समया पालटुन यवग खेळे । तो आदीपुरूष ।
अठरा खेत्री द्युतपती । ते आले सकस ॥
॥ कोणी गर्जती कोणी सुमरती । भैसाचं नाम ।
सत् यवगाचा पाया रंचला । पहा सोयंम् ॥
॥ ओहंम्-सोहंम् धुनी उठली । या कृष्णपुरी ।
अडुसष्ट तिर्थाहुन तिर्थ हे । आहे भारी ॥
॥ तिर्थ स्थानी पवित्र वाणी । गर्जे आदीमुनी ।
याहीच्या मुखची याहीनं दिली । ही अमृत वाणी ॥ १२ ॥

॥ आदीपुरूषाच्या मुखची होय ही । अमृत संजीवनी ।
याहीच्या नामी राहा गडेहो । भाव धरूनी ॥ १३ ॥

भजने :-
॥ कोरी भुम्मा कोरा देह । कोरा कागद ।
को-या भुम्मेतुन निघाला हो । सिदाईचा वेद ॥
॥ कोरी भुम्मा कोरा देह । कोरा कागद ।
को-या भुम्मेतुन निघाला । चतुर्पता अथर्वन् वेद ॥
॥ कोरी भुम्मा कोरा देह । कोरा कागद ।
जोकोणी नाश करन त्याच्या । कुडीला आहे दोष ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग-०१ ॥

॥ ओवी नं. ११ ॥

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ सद्‌गुरू देवा राहु दिवस निघाला नवा ॥

॥ सद्‌गुरू देवा...। राहु दिवस निघाला खरा ॥ घृ ॥

॥ अन्याय अपराध केले फार । आणीक केले खोटे व्यवहार ।
नाही पाहीले प्रभुचे घर ॥ सद्‌गुरू देवा...

॥ बोला बोली झाला वाद । हद्‌यी आला अथर्वन् वेद ।
धनी खेळती लभेद भेद ॥ सद्‌गुरू देवा...

॥ सत् संगतीचा उपदेश । माझ्या देहीला झाला भास ।
चित्त जडले हरी भजनात ॥ सद्‌गुरू देवा ...

॥ संगत घडली सज्जनांची । भ्रांती उडवा या बाळाची ।
माझी मिटवा हो चौ-यांशी ॥ ०४ ॥ सद्‌गुरू देवा...

॥ सर्व नांदव एका ठायी । तेव्हा चालन तुमची गाही ।
ऐवढी अरज ऐका माझी ॥ सद्‌गुरू देवा..

॥ धरा आदीपुरूषाचे पाय । सर्व एका दृष्टीनं पाहयं ।
तेव्हा जगाचा उध्दार आहयं ॥ सद्‌गुरू देवा..

॥ सत् संगतीचा परमान । सत्य उगवला सुर्य दिन ।
दिले वचन राखा ईमान ॥ ०७ ॥ सद्‌गुरू देवा..

भजने :- ॥ कृष्ण संगतीचा लाभ । काहीतरी पुर्व जन्मीचा भाग ॥
॥ कृष्ण संगतीचा लेश । गोपाळ आले मुज-यास ॥



॥ ओवी नं. १२ ॥

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ याहो अनमोला देवा कोण्या ठायी रमला ॥

॥ याहो अनमोला...। देवा कोण्या ठायी गुंतला ॥ घृ ॥

॥ यवग गेले यवग आले । आदीपुरूषा सुमरतो तुले ।
उभा राहयं आपल्या वचनाले ॥ याहो अनमोला...

॥ सर्व जनी सांगुन गेले । तुमच्या सांगीचे दिवस आले ।
मनी भावीक आनंदले ॥ याहो अनमोला...

॥ आनंद भावीकाच्या मनी । चित्तमन जडले देवाच्या नामी ।
कार करा चौथ्या खुम्मी ॥ याहो अनमोला...

॥ काहो बसले भ्रमात । भरले यवग करा गणित ।
अवघं भाकलं देवाच्या हात ॥ ०४ ॥ याहो अनमोला...

॥ हे होय भाकल्याचे गुण ।‌ पुर्विपासुन केले जतनं ।
कुठं धेनुचं ठिकाण ॥ याहो अनमोला...

॥ कोटी राहु, धेनु पोटी । शरण आलो नामा साठी ।
जागी करा अवघी सृष्टी ॥ ०६ ॥ याहो अनमोला...

भजन :- ॥ थिर नाही कोणाच्या मना । जागी करा हो सारी सेना ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/०१ ॥

॥ ओवी नं. १३ ॥

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

# ॥ याहो महाराजा, जागी कराना चौघडे ॥

**वरभजने :-**

॥ हाती चित्त रंगाची काठी । या खोलाट नदिच्या तटी ।
तुरा खोविला मोतीयाचा । योगी उभाआहे सावंग्याचा ॥
॥ कपाळी चंद्र कोर । चंद्र-सुर्य लल्लाटी ।
बरा विठ्ठनं धरला अवतार । भक्तां साठी ॥
॥ पायी पद्‌म मुखी रत्न । हद्‌यी अमृत ।
पृथ्वी वर अवतार आला । धनी अवधुत ॥
॥ याहीचा सुर्यमुखी वाडा । याहीचा सुर्यमुखी वाडा ।
कितीक वर्णु याहीच्या सौंदर्याच्या शोभा ॥
॥ आदीपुरूष महाराज घेवुन । आला अवघ ।
भक्ती ग्यान वैराग्य सद्‌गुण । हे वाजवले चौघं ॥
॥ या चौघाचा चौघडा वाजवितो । श्री कृष्ण हरी ।
सावंग पुरी येवुन याहीनं । चौघडे/मोहर वाजवली ॥

॥ याहो महाराजा...। जागी कराना चौघडे ॥ धृ ॥
॥ चाक फिरे चौ-यांशी वेढे । कच्या मातीचे बनवले घडे ।
अंदर पाणी सदा बुडबुडे ॥ याहो महाराजा...
॥ आयुष्य गणीता दिवस थोडे । मागे प्रपंचाचे कोडे ।
जन्मोजन्मी लावले अवघडे ॥ याहो महाराजा...
॥ कोण्या जन्मी पुण्य ना घडे । नाही पाहीले सुख-सोहळे ।
सुखासाठी जीव तळमळे ॥ याहो महाराजा...
॥ चंचल मन हिंडे चहुकडे । चैत्यन्य माया ताल तोडे ।
नका ठेवु नामाच्या वेगळे ॥ ०४ ॥ याहो महाराजा...
॥ कृष्ण वाजवतो चौघडे । रोग विघ्न पार पळे ।
बंधन चौ-यांशीचे तोडे ॥ याहो महाराजा...
॥ लिहुन देतो वतन वाडे । कल यवगी करा मोकळे ।
पवना आधारी उडवा घोडे ॥ ०६ ॥ याहो महाराजा...

**भजने :-**

॥ सुवर्णाचा घोडा । जिन का काटयांचा केला ।
मन-पवनाचं चाबुक मारून । घोडा उडवला ॥
॥ मन-पवनांन घोडा उडाला । धरा-धरा म्हणती ।
जोकोणी घोडा धरन त्याची । चुकन चौ-यांशी ॥

या दोन भजनांचे निरसन खंड०९/०९:-मनाचे भजनपाठा सार मध्ये दिलेले आहेत.

॥ ग्यान-भक्ती वैराग्य सद्‌गुण । साधलं ज्यानं ।
तो लाखा मध्ये पाहीला एक पहेलवान ॥

**-: शब्दार्थ :-**

**जागी कराना चौ-घडे** :- हे आदीपुरूष महाराजा ! ज्ञान, भक्ती, वैराग्य, सद्‌गुण या चौघाला संग घेवुन येवुन, या चौघांने हे स्थुल सुक्ष्म कारण महाकारण हे चारदेह भरून भरा. हे ग्यान भक्ती वैराग्य सद्‌गुण हे चौघे चौदेहीत वाजवुन चौघडे/चौदेही जागी करा. देहे प्रकाशमान करा. । **घडे** :- चौ-देहे । **सुर्वणाचा घोडा** :- आत्मा । **जीन काटयाचा केला** :- विषय-विकारांचे काटे असलेला हा देहरूपी जीन या सुर्वणाच्या घोडयावर ठेवला. अधिक ग्यानाकरीता खंड०९/०९:- मनाचे भजनपाठाचे सार निरसन मधुन घ्यावे. । **पवन** :- श्वास, वायु

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग-०१ ॥

॥ ओवी नं. १४ ॥

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ यवगेश्वरा..। भुम्मेवर कार करा ॥

वरभजन :- ॥ याहो सावंग्याच्या राजा । कार करा आपुल्या हाता ॥

॥ यवगेश्वरा.. । भुम्मेवर कार करा ॥ घृ ॥

॥ तिरलोक्याचा सुत्रधारी । मोघंम का बसले हरी ।
कार करा भुम्मेवरी ॥ यवगेश्वरा..

॥ मोघंम यवग गेले तिन्ही । घडामोड काम तुया अध्यानी ।
मोक्ष पदाला न्याहो प्राणी ॥ यवगेश्वरा..

॥ मोक्ष पदाची वासना । चुकवा चौ-यांशी जाचना ।
लवकर याहो मनमोहना ॥ यवगेश्वरा..

॥ बहुत यवग प्रार्थना करी । माझी कारूणा येउ दया हरी ।
गुणरूप दयाहो देहीवरी ॥ यवगेश्वरा...॥ ०४ ॥

॥ अनमोल वस्तु आहे थोर । उभा आहे चौखुम्माच्या वर ।
मिटवा चौ-यांशी बिगार ॥ यवगेश्वरा..

॥ ऐका चतुर्पतीची सुद । उडवन चौ-यांशीची गुंज ।
धनी येईन लभेद भेद ॥ यवगेश्वरा...॥ ०७ ॥

भजने :-

॥ हे होय लभेदाची वाणी । ऐसा बोले श्री कृष्ण धनी ॥

॥ धनी येईन लभेद भेद । धन्याच्या संगतीन सुखः नांदन येथं ॥

॥ लभेदजी । अरज सुनो जम्मावकी । उम्मेद हे बहु मान की ॥



॥ ओवी नं. १५ ॥

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ सारंगधरा..। कधी धरशीन अवतार ॥

॥ सारंगधरा..। कधी धरशीन अवतार भुम्मेवर ॥ घृ ॥

॥ हीन-दीन दशा तुया भक्ताची । अंत का पाहतो ऋषिकेशी ।
करा मोहीम यवगाची ॥ सारंगधरा..

॥ सारंगधरा याहो श्रीरंगा । जगाचे व्दैत न्याहो भंगा ।
कंचन करा धरणी । जगजीवना..॥ कधी धरशीन अवतार..

॥ सुनी आहे धरणी तुमच्या बिना । भ्रांती पडली ऋषि-मुनींना ।
उभा अवतार सांगे खुणा ॥ सारंगधरा....

॥ अनंत यवगाचा अवतार आला । भ्रांती मुळे नाही ओळखला ।
मजला पुर्ण आधार या भक्तीला ॥ ०४ ॥ सारंगधरा....

॥ लब्जा लब्जा बोले विष्णुला । पडझड जागीचा दिवस आला ।
कारूणा येईन तारण अवघ्याला ॥ सारंगधरा...

॥ खेळता यवग झाले चारही । मुदत यवगाची पुर्ण झाली ।
अहिना संग करून गेला बोली ॥ सारंगधरा....

॥ जोवरी चंद्र-सुर्य आकाशी । तोवरी अविनाश धरणीशी ।
सोहंम् नांदव सावंग्याशी ॥ ०७ ॥ सारंगधरा....

भजने :-

॥ सोहंम् नांद माझे राया । आम्ही लागु हो लागु तुम्हा पाया ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/०१ ॥
॥ ओवी नं. १६ ॥
॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ श्रीकृष्णा कर सवारी ॥

॥ श्री कृष्णा..। कर सवारी गरूडावरी । आम्ही अंतरलो बहु दुरी ॥ घृ ॥
॥ आम्ही अन्जान आहो फार । अन्यायी अपराधी लेकरं ।
प्रतिपदेचं महात्म थोर ॥ श्री कृष्णा..। कर सवारी...
॥ अन्याय झाले आम्हावर । कशी त्वां नाही ठेवली नजर ।
तुमच्या वाचुन कोण? उतरवन पैलपार..॥ आम्ही अंतरलो..॥
॥ म्हणतीन आम्हा देवांचे लेकरं । सदा करते पैश्याचा जोर ।
नाही दिले तर मारतीन ठोकर ॥ श्री कृष्णा..। कर सवारी..
॥ किती करतीन अत्याचार । कशी तुला निद्रा लागली फार ।
न्याय करन पडन बराबर ॥ ०४ ॥ श्री कृष्णा..। कर सवारी..
॥ नको अन्न पाण्याचे आहार । इथं वाहे अमृताची धार ।
रूप पाहु दे झुरझुर ॥ आम्ही अंतरलो बहु दुर..
॥ भेटी साठी हिंडलो गरगर । त्वां का लावला उशीर ? ।
तुया चरणाची आवड फार ॥ आम्ही अंतरलो बहु दुर..
॥ गेला आवाज कानावर । डगमगलं आसन सारं ।
देव आले हो.. । केली सवारी गरूडावर ॥
॥ कृष्णाजीनं केला उध्दार । भक्त गर्जती महाभार ।
ध्वजा लावली हो..। दोन्ही झेंडे बराबर ॥ ०८ ॥
भजने :- ॥ झेडे दोहीकडे देनं । मध्ये उभे देव नारायण ॥
॥ या झेंडयाच्या सावलीनं । नर-नारी/देह-जीव हे उध्दारले जातीन/दोन ॥



॥ ओवी नं. १७ ॥
॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ कृष्ण राया..। मनमोहन धनी आला ॥

॥ कृष्ण राया..। मनमोहन धनी आला ॥ घृ ॥
॥ कितीक वर्णु तुमचे गुण । मजला अगाध झाले देणं ।
शांत झाले देहभानं ॥ कृष्ण राया....
॥ तुमची महीमा वर्णु किती ? । तुमच्या नामा नाही गणती ।
उभा राहयं तिरलोकी ॥ कृष्ण राया...
॥ उभा यवगी सत्यधारी । आम्हा आशा लावली भारी ।
उभा राहयं बोलावरी ॥ कृष्ण राया...
॥ बोला बोली लावली माया । धर तिरलोक्यावर छाया ।
अंबर करा अवघी काया ॥०४॥ कृष्ण राया....
॥ अंबर पद या रायाचं । भगव निशाण गर्जे त्याचं ।
घेईन तिरलोक्याची पुस ॥ कृष्ण राया....
॥ पुस परवेश यवगावर । यवगाचा धनी आहे थोर ।
दुर्जन बहु होतीन बेजार ॥ कृष्ण राया....
भजने :-
॥ हरी हरी कृष्णा जगजीवना । मनमोहना मनरंचना । सगुण निर्गुणा ।
॥ सगुण-निर्गुण अवतार यवगासाठी । यवगा यवगीच्या सांगे गोष्टी ॥
॥ यवगा यवगीचा आत्माराम । याहीची किर्त महीमा जगात वाढवनं ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग०१ ॥

॥ ओवी नं. १८ ॥

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

# ॥ विठोबा आले...। धनी तारण अवघ्याले ॥

॥ विठोबा आले..। धनी तारण बा अवघ्याले ॥ धृ ॥

॥ कृष्णाजीनं सांगी केली । लेकरा साठी माउली आली ।
ज्योत निरशुन्याची वळली ॥ विठोबा आले....

॥ निरशुन्याची होय ही ज्योत । आली कृष्णाजीच्या हद्‌यात ।
अवतार उभे सावंग्यात ॥ विठोबा आले....

॥ निरशुन्याहुन अवतार आला । मिर्त लोकी कार केला ।
वाणी सांगतली जगाला ॥ विठोबा आले....

॥ वाणी सांगतली यवगाची । सोहंम् प्रकाशल्या ज्योती ।
देहे तारली मानवाची ॥ ०४ ॥ विठोबा आले...

॥ मोघमांत वेळ गेला । धनी आजवर दिसेना डोळा ।
उजाला हरीनामाचा झाला ॥ विठोबा आले....

॥ वजाबाकी हिशोब झाला । यवग भरले कार केला ।
सोयंम् भेटी साठी आला ॥ विठोबा आले...

॥ विठोबा कृपावंत झाला । देहे जीवाचा संभाळ केला ।
पाझर सत्रावीचा आला ॥ ०७ ॥ विठोबा आले...

भजने :- ॥ नाम घ्याहो विठोबाचे । सार्थक होईन देहजीवाचे ॥



॥ ओवी नं. १९ ॥

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

# ॥ उभा जगजेठी जगजेठी ॥

॥ उभा जगजेठी जगजेठी । वाळवंटीच्या काठी । उभा राहीला जगजेठी ।।घृ।।

॥ पायी पैजंन वाजे रुमझुम । सावळया रुपाचा घनश्याम ।
केली कलयवगी मोहीम ॥ उभा जगजेठी जगजेठी...

॥ भाव धरा दोहीत्य सोडा । ज्ञान दृष्टी डोळा उघडा ।
पहा तो भक्तीचा जिव्हाळा ॥ उभा जगजेठी जगजेठी...

॥ उघडले अमृताचे कुंड । ब्रम्हरस प्याल कोण्या तोडं ।
मन झालं बारबंड ॥ उभा जगजेठी जगजेठी....

॥ आधी मन मुंडले नाही । देव पाहण्याची करता घाई ।
कसा भेटेल तो लवलाई ॥ ०४ ॥ उभा जगजेठी जगजेठी..

॥ ज्याला रस्ता नाही ठाव । तो कसे पाहील देवाचे गाव ।
कसा ओळखान अवधुत राव ॥ उभा जगजेठी जगजेठी..

॥ डोळे असुन आंधळे झाले । तोडं असुन उगे बसले ।
अवतार घेवुन नटले ॥ उभा जगजेठी जगजेठी...

॥ आले गणराज उभे गणपती । बहु यवगाची करतो विनंती ।
सदा राहावं आमच्या संगती ।।०७।। उभा जगजेठी जगजेठी..

भजने :- ॥ वाळवंटी मुळरंभेच्या काठी । झेंडा उभारला ।
नगर वसवले कृष्णपुरी । मुळरंभेच्या तिरी ॥

॥ वाळवंटी मुळरंभेच्या काठी । झेंडा उभारला ।
नगर वसवले कृष्णपुरी । शिपी व-हाडाच्या किनारी ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग०१ ॥

॥ ओवी नं. २० ॥

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ कलयवगी भक्तजन महापुरूष आला ॥

॥ कलयवगी भक्तजन हो । महापुरूष आला ॥
सावंग पुरी कृष्ण हरी । नाव पावला ॥ घृ ॥
॥ कोण्या देही शकुन गर्जला । नाही पाहीली मात ।
कोण्या ठायी कोण वस्तु । कोण होती गोष्ट ॥
॥ गाव नाही नाव नाही । अविनाशी आला ।
चतुर्पतीचा डंका वाजला । आकाश वाणी गर्जला ॥
॥ चतुर्पतीचा डंका वाजला । तिर भुवनी मात ।
या अहिनाला पर लावता । बहु होईन घात ॥०४॥
॥ आदी पुरूष आदीरूप । ज्योत निरंजन ।
मुळ यवगाचं रंग रूप । धरलं शक्तीनं ॥
॥ जात नव्हती न्यात नव्हती । अजाताची खाण ।
ब्रम्हा विष्णु मागुन झाले । पहा हो तिरनयन ॥
॥ चहु वर्णाच केल गायन । द्युताची मात ।
भक्ता साठी हरी उतरला । पहा सावंग्यात ॥
॥ सावंग गाव देहीत पाहावं । पुर्विचं वचन ।
भक्ता साठी कष्टी झाला । पहा ओळखुन ॥ ०८ ॥
॥ तिर भवनाचा मालक असुन । कोण नाही ओळखला ।
सर्व ठायी नांदे देव । ऐसा कृष्णाजी वदला ॥
॥ झाला भ्रम डुबला धर्म । हे जातीन लया ।
चौथ्या खुम्मी केलं बोलनं । तो कृष्ण राया ॥ १० ॥

भजने :- ॥ चौथ्या खुम्मी उभा धनी । तो तारण जिवा जनी ।
हे सर्व याहीच्या अध्यानी ॥



॥ ओवी नं. २१ ॥

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ मुळ यवगाचा कृष्ण ॥

॥ मुळ यवगाचा कृष्ण माझा । मिर्त लोकी आला ।
कल यवगा मध्ये अंधेकार । सांगुन गेला ॥
॥ कलयवगा मध्ये कठीन दुःख । आहे मानवाला ।
राहा या देवाच्या नामी । तो तारण अवघ्याला ॥
॥ या कल यवगामध्ये निर्गुण । अवतार धरी ।
सत्व गुणांची अवतार देही । कुठे गेली पाही ॥
॥ जिकडे तिकडे तिर गुणांन । केली बादशाही ।
कल यवगाचा मान देवा । कोणा कळला नाही ॥ ०४ ॥
॥ कल यवगाचा मान । ख-यांला, ओळखेना जन ।
सोडुन सत्य देवता । खोटयांना, पुंजते हो प्रेमानं ॥
॥ गोटे पुंजुन व्यर्थ गेला । कोण शिकवलं ज्ञानं ।
कोणा पासुन कोण झालं । पहावं शोधुनं ॥ ०६ ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/०१ ॥

॥ ओवी नं. २२ ॥

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

# ॥ यवग भरले हिशोब झाला ॥

॥ यवग भरले हिशोब झाला । आदीमुनी अवतार आला ।
श्यामकर्ण वारू उतरला । पृथ्वीवर..
जुन पुंजन मोडन सारं ॥
॥ तिन यवग तिरगुण गादी । हाती काही आलं नाही ।
सुखः आदीमुनीच्या पायी । धराव भाव..
घ्याहो महाराजाचे नावं ॥
॥ नवा यौग नवा कार । या भैसाचं राज्य खरं ।
पहा डोळ्याच्या समोर । आदीमुनी...
नाश झाला हो तिरभवनी ॥
॥ कार करा हो आदीमुनी । राखा बिर्दाची बाणी ।
बट्टा लागन चक्रपाणी । धावुन येणं..
लाव यवगावर निशाण ॥ ०४ ॥

॥ अभास असता होईन भास । प्रेम हद्‌यी भरन उल्हास ।
विविध रूपाचा तो भैस । देईन आरोळी..
जागी करन चौताळी ॥
॥ झाला भ्रमिष्ट करेना काम । बाहेर निघेना आत्माराम ।
त्याला मायेची पडली फाम । माकड झाला..
म्हणे कुठे पाहु देवाला ॥
॥ का रे हिंडतो रानवन । ओळखा देहीतला जगजीवनं ।
मन बुध्दीचं परमाण । धरा हाती.. उभे आहे रघुपती ॥
॥ उभे रघुपती राया । जीवन दशा उडवन माया ।
अंबर होईन तुझी काया । का भ्रमला..
चित्त दयाहो या बोला ॥०८॥
॥ धरा धरा सत्य भाव । भजा हा कृष्णपुरी देव ।
प्याला अमृताचा प्यावं । आकाशवाणी..
सुखः होईन सर्वजनी ॥

**भजने :-**

॥ परमय सुखः सुखः दयाहो स्वामीराजा । सुखः दयाहो महाराजा ।
आम्ही तुम्हाला विनवितो चत्रभुजा / दयासागरा ॥
॥ विनवा विनवा देवाले । सुखः मागा आपल्या देहीले ॥

**-: शब्दार्थ :-**

परमाण = प्रमाण, साक्ष, पुरावा, गाही । बट्टा = कलंक, डाग, धब्बा.



श्यामकर्ण वारू = अर्जुनाच्या घोडयाचं नाव. । फाम = भ्रमाचा फासा.



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग०१ ॥

॥ ओवी नं. २३ ॥

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ का बसले हो ? सुस्त डोळे लावुन ॥

॥ का बसले हो..। सुस्त डोळे लावुन । हा खेळ केला देवानं ॥घृ॥
॥ बेचाळीसीचे भाग्य वचन । मेहर केली मालकानं ।
मजला सांगतली..। अंतरची खुण ॥ हा खेळ केला देवान..
॥ भाग वचन झालं दर्शन । सत् यवगाचं कारण ।
खरं मानेना..। लटकं नेमतीन जन ॥ हा खेळ केला देवान..
॥ झालं श्री प्रभुचं देणं । परवेशी उगवला हा दिन ।
घरा आले हो..। माझे मनमोहनं ॥ हा खेळ केला देवान..
॥ हीन दीन दशा पाहुन । आले विठोबा-रूक्मिणं ।
गुज गोष्टी हो..। सांगतल्या प्रेमानं ॥०४॥ हा खेळ..
॥ बाळ अडाणी अज्ञान । अवघ्या जाती-न्यातीहुन हीनं ।
इथं कैसे हो..। रमले तुमचे मन ॥ हा खेळ केला देवान..
॥ भोळा भाव भोळेपण । कळेना भक्तीचे लक्षण ।
टाळी वाजवली हो..। नामाची प्रेमानं ॥ हा खेळ केला देवान
॥ अठरा जाती-न्यातीचे गुणं । पाहता नाही रमले मनं ।
हेच माझे हो..। प्रेमाचं ठिकाण ॥०७॥ हा खेळ केला देवान..

भजने :-
॥ भक्ती प्रेमाची प्रेमाची । अधीक/अधीर नाही कामाची ॥
॥ भक्ती प्रेमाची प्रेमाची । आमच्या आहे कामाची ॥



॥ ओवी नं. २४ ॥

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ पाहता पाहता देवपण आले आता ॥

॥ पाहता पाहता देवपण आले आता ॥ घृ ॥
॥ अवघ्या जीवाहुन लहान प्राणी । माझेहुन मोठा नाही कोणी ।
कोणी नाही टाकला रावण मर्दुनी ॥ पाहता पाहता...
॥ कृष्णराज आमचा गडी । भजन सांगे हरघडी ।
तोडली प्रपंचाची बेडी ॥ पाहता पाहता...
॥ कृष्णराज आमचा नेता । उपदेश सांगे जन लोका ।
मोडल्या चौ-यांशीच्या खेपा ॥ पाहता पाहता..
॥ कृष्णाची सांगी खरी । नवल सांगे परोपरी ।
काही बसले नेमधारी ॥ पाहता पाहता..

॥ कृष्णराज आमचा गुरू । आमची दैना नका करू ।
तुम्ही केली ही पृथ्वा तारू ॥
॥ कृष्णराज आमचा पिता । स्थुल देहीवर आले आता ।
अवघ साहयं झाले याहीच्या हाता ॥ पाहता पाहता..
॥ कृष्णराज देव झाले । पहीली पार निघुन गेले ।
तिन्ही ताळ प्रकट झाले ॥ पाहता पाहता..

भजने :- ॥ या देवानं लहानपण धरले । कोणास ओळखु नाही आले ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/०१ ॥

॥ ओवी नं. २५ ॥

सोनेगांव दांडातील रामप्रसाद-हनुमानप्रसाद पाल बंधु यांच्या पाठातील..

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ गडबड मत करना ॥

॥ गडबड मत करना मत करना । भाव भजनसे लढना ॥ घृ ॥
॥ मगरूरीमे मत रहना । मुश्कील होंगी सुधारना ।
तुम गरीबीसे रहना ॥
॥ दोहीत पाखंड सब झोड देना । ग्यान-ध्यान की तलवार लेना ।
आगे आगे कदम बढाना ॥
॥ छे जनोंसे बाते मत करना । छत्तीस पर तु शस्त्र चलाना ।
पंचेचाळीस चौक्या मिटाना ॥
॥ आशा मनशा पापी कल्पना । बत्ती लगाकर सब जला देना ।
देखो भगवत का ठिकाणा ॥ ०४ ॥
॥ माया ममता बाजु हटाना । पहली पार निकल जाना ।
सांगड हरी नामकी धरना ॥
॥ तिरगुण तो करे धिंगाणा । शुध्दसत्व पर ध्यान देना ।
दया शांती प्रसन्न करना ॥
॥ स्थुल सुक्ष्म को आगे बढाना । कारण महाकारण मे जाना ।
अतीकारण की धुनी लगाना ॥
॥ जागृतीमे भजन करना । स्वप्नी सुषप्ती कभी नही भुलना ।
देखो तुरीयाका करीना ॥ ०८ ॥
॥ कृष्णपुरी की बात नही भुलना । दुर्जन को कभी नही डरना ।
आगे भगवतसे मिलना ॥ ०९ ॥

भजने :- ॥ भगवत भजन करो भाई । उसमे किसनजी है रे ॥
॥ भगवत भजन कर भोला । घट घटमे पडेगा उजाला ॥
॥ भगवत भजन कर भैया । अंबर होंगी तेरी काया ॥



॥ ओवी नं. २६ ॥

सोनेगांव दांडातील रामप्रसाद-हनुमानप्रसाद पाल बंधु यांच्या पाठातील..

॥ कृष्णपुरीची ओवी ॥

## ॥ मेरा धनी फिरसे आया ॥

॥ मेरा धनी फिरसे आया । फिरसे डंका बजाया ॥ घृ ॥
॥ किसनजी सावंगपुरमे आया । उसने क्या वाणी बतलाया ।
तुम्हारे समज मे नही आया ॥ फिरसे डंका बजाया..
॥ प्रजापती धनी आया । उसने ब्रम्हरस लाया ।
कोई पिना नही पाया ॥ फिरसे डंका बजाया..
॥ जिसने ब्रम्हरस पिया । लाखोमे एक अंबर हो गया ।
बाकि रही सब कच्ची दुनिया ॥ फिरसे डंका बजाया..
॥ भक्ती करने किसनजी आया । दवंडी देके पुकार किया ।
नाम चतुर्पती बढाया ॥ ०४ ॥ फिरसे डंका बजाया..

भजने :- ॥ दवंडी देल्ली कृष्णानं । सत्य शकुन हे सिदाई वचन ॥
॥ हरीला भजा । लावुन ध्वजा ...। जीवलग राजा, आला आत्माराजा ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग ०१ ॥

॥ ओवी नं. २७ ॥

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ आदीमुनी देव झाले ॥

॥ आदीमुनी देव झाले । चौरंगी बोल केले ।
तेव्हा त्याहीनं सांगीतले । येईन भावळी..। मुर्त देवाची सावळी ॥
॥ साल बेचाळीसीच्या साली । देव अवतरले पृथ्वीवरी ।
अजुन कोणाला ठावनाही । का भ्रमात.. करा यवगाचं गणीत ॥
॥ भ्रमामध्ये भुलले जन । झाले भ्रमिष्ट देवादिक ।
भोगतीन चौ-यांशीचे दुःख । येतो कनवळा. भक्तीचा जिव्हाळा ॥
॥ सुखः घेवुन आले धनी । सावंग्याचे आदीमुनी ।
डोळा उघडुन पाहाना कोणी । अवधुत राया..।
आला सत्य यवगाचा समया ॥ ०४ ॥
॥ मित्र असता शत्रु झाले । तेही आचारा भंगले ।
आदीमुनीचे शकुन चांगले । घेईना कोणी..जन हिंडते रानोवनी ।
॥ शत्रु असता मित्र होईन । असा एक समया येईन ।
भावळीला भावीकजन । येतीन एकाठायी..खेळ उठन अंतराळी ॥
॥ भावळीला भावीक जन । करन भैसाची मांडन ।
चढन सत्‌धर्माचं निशाण । त्या दिवशी.. उभाराहीन् ऋषिकेशी ॥
॥ का हिंडता रानोवन । आधी शुध्द करा मन ।
मग होईन देवदर्शन । ठायी ठायी..। देव भरन सर्व ठायी ॥०८॥
॥ भावळीचे महात्म थोर । भजती प्रतीपदा अवस ।
शिपी किनारी गर्दि फार । पाहजा पुढं.. आदीभैसाचा खेळं ॥०९॥



॥ ओवी नं. २८ ॥

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ कोणीतरी सांगा हो..। कोण नविनच आला ॥

॥ कोणीतरी सांगा हो ..। कोण नविनच आला इकडे ॥ घृ ॥
॥ कोण उजळली सोहंम् ज्योत । ईचा उजेड चतताळात ।
झाली एक नविनच हकिकत ॥ कोणीतरी सांगा हो...
॥ जन म्हणतीन नवल झालं । कोण्या देवानं कौतुक केलं ।
सोहंम् बीज प्रकाशलं ॥ कोणीतरी सांगा हो....
॥ एका एकी डंका वाजला । खडखड खडका झाला ।
रमणा महाराजाचा आला ॥ कोणीतरी सांगा हो...
॥ रमण्या मध्ये राजा कोण ? । चला पाहु अवघे जन ।
चत्रभुज नारायण ॥ ०४ ॥ कोणीतरी सांगा हो....
॥ आदीपुरूष आदीगण । याहीचं रम्य ठिकाण ।
याहीनं ध्वजा लावल्या दोन ॥ कोणीतरी सांगा हो....
॥ आदीपुरूष आदीमुनी । महापुरूष अवधुत धनी ।
याहीच्या मुखची अमृत वाणी ॥ कोणीतरी सांगा हो ....
॥ अनंत ग्यानी अनंत ध्यानी । असा आहे अवधुत धनी ।
सर्व भक्त याहीच्या अध्यानी ॥०७॥ कोणीतरी सांगा हो ..

भजने :-

॥ अवधुत वेष धरून सृष्टि । देह जीव तारण्यासाठी/उध्दारण्यासाठी ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/०१ ॥

॥ ओवी नं. २९ ॥

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ गंगा आली मुळरंभा ॥

॥ अहो जरा थांबा । गंगा आली मुळरंभा ॥ घृ ॥
॥ पहा मुळरंभेचं मुळ । ओळखा चतुर्पतीचं स्थळं ।
फाटक्याचे करन धड ॥
॥ मुळ रंभेची उकळी । निर्मळ करन पृथ्वी ।
कलंक तिळभर राहणार नाही ॥
॥ मुळ रंभेचा मुसळा । सांभाळती संत मेळा ।
नित्य करतीन आंघोळा ॥
॥ या गंगेत माणिक-मोती । हिरे-रत्न पाहु मी किती ? ।
इथं संत महात्म्यांची उत्पत्ती ॥ ०४ ॥
॥ संत महात्मे अवतार । दुनुन खेळ करन कर्तार ।
पाहजा डोळ्याच्या समोर ॥
॥ गंगा वळली मिर्तलोकी । वाहते आदीभैसाच्या मुखी ।
संत महात्मे आले पारखी ॥
॥ सावंग पुरीच्या मैदानी । वाहते मुळरंभेच पाणी ।
हे होय आदीभैसाची मंजुळ वाणी ॥ ०७ ॥
भजने:-॥ गाउ दे मंजुळ रसाळ वाणी । माझा माथा तुमच्या चरणावरी ॥



॥ ओवी नं. ३० ॥

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ सांगे आदीमुनी..। व्हा सावध ४२शीला ॥

॥ सांगे आदीमनी..। व्हा सावध बेचाळीसीला ॥ घृ ॥
॥ ओहंम्-सोहंम् टाळी वाजली । पक्की मांड बसवली ।
मेहर अवधुताची झाली ॥ व्हा सावध बेचाळीसीला..
॥ तप मांडले सावंगपुरी । त्या तपाचे नेम भारी ।
ओळखा आनंदमुर्ति खरी ॥ सांगे आदीमनी..।
॥ तपाला वर्षे झाले पाच । बोलनं झालं आनंदाचं ।
जगाला कळेना कारण । या तपाचं..॥ व्हा सावध...
॥ मानली आनंदाची हुकुमत । निघुन गेले रानावनात ।
संग ज्योत अनामत । त्या समयाला..॥ ०४ ॥ व्हा सावध..
॥ झाली आनंदाची हुकुमत । निघुन गेले वनात ।
त्या चिरोडी गावात । त्या समयाला..॥ व्हा सावध..
॥ चिरोडीचे महात्म भारी । ज्योत उतरली भुम्मेवरी ।
ठाव नाही जगापरी । कलकोट झाला..॥ व्हा सावध..
॥ तपाला वर्षे झाले सात । पुर्ण ज्योतीची मदत ।
साता-पाचाची गणीत । झाले वर्षे बारा..॥ व्हा सावध..
॥ भक्तासाठी उभा जगजेठी । भाग्य दैवानं झाल्या भेटी ।
कृष्णाची मोहीम मोठी । देव झाला..॥ ०८ ॥ व्हा सावध..
॥ भक्ती करून सिध्द झाला । देव त्यानं केला आपला ।
तो लपुन बसला । ओळखु नाही, आला कोणाला ॥ ०९ ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग ०१ ॥
॥ ओवी नं. ३१ ॥
॥ कृष्णपुरीची ओवी ॥

# ॥ नेमधारी योगी आला ॥

॥ नेमधारी योगी आला । तोही लपुन का बसला ।
अचंबा वाटे हो जगाला । निघ बाहेर..
तुमच्या नामाला मोहरं ॥
॥ सत्य बोलनं तुमचं । गायन करतो आदीपुरूषाचं ।
तुम्हाला भय नाही कोणाचं । निघ बाहेर..
हाती नामाची तलवार ॥
॥ बारा वर्षे लागले ध्यानी । सावंग-तरोडीच्या ठिकाणी ।
घातली देवावर मोहनी । प्रेम भक्तीची..
मेहर झाली मालकाची ॥
॥ बारा वर्षे तप केले । तेरावं साल बेचाळीशीचे आले ।
तिथ एक नवलं झालं । देव आले..
भेटी दिल्या भावीकाले ॥ ०४ ॥

॥ सिध्दी साधली बारा वर्षात । आदीपुरूषाच्या दरबारात ।
सागर भरले पोटात । अमृताचे..। आदीभैस नामाचे ॥
॥ रूप धरले । देह धरून अवतरले ।
चला जावु भावळीले । त्या जळगावी..। साल बेचाळीचे हेही ॥
॥ पहा त्या भावळी महिन्यात । बेचाळीस दिवस लावली ज्योत ।
योगी होता जळगावात । त्या मांडीले..
ज्योती चढल्या भावीकाले ॥
॥ उठला बेचाळीसीचा रंग । आदीमुनी महामुनी संग ।
श्री अवधुत आले माग । तो जगजेठी..
नित जेवे एका ताटी ॥ ०८ ॥

॥ शिपी व-हाडाच्या किनारी । उभे राहले नेमधारी ।
नवल सांगे परोपरी । झाला अचंबा..। गंगा वाहे मुळरंभा ॥
॥ जावु पाहु कृष्णपुरी । कृष्ण रायाची नगरी ।
शिपी व-हाडाच्या किनारी । बसवली पेठं..
नामाचा जलजलाट ॥
॥ दया क्षमा शांती चित्ती । तेथे अवधुताची वस्ती ।
पाहता पाहता आले इथी । तिरलोक जुम्मा..
त्याची कलयवगी महीमा ॥ ११ ॥

**भजने :-**

॥ महीमा आहे गा तुही । आता चालव तिरलोकी गाही ॥
॥ हे होय कृष्णाची गाही । महाराजा येवुन भरा हो हद्यी ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/०१ ॥
॥ ओवी नं. ३२ ॥
॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

# ॥ योगी धाकटयाहुन धाकटा ॥

॥ योगी धाकटयाहुन धाकटा । अवतरला मायेच्या पोटा ।
मोडन चौ-यांशीच्या वाटा । कार केला..
यान बेचाळीसीला, झेंडा उभारला ॥
॥ योगी लहानाहुन लहान । हाती घेवुन धनुष्य बाण ।
मारला लंकेचा रावण । तो भुजबळी...
यान दिली गडेहो, तिरभवनी आरोळी ॥
॥ मारला लंकेचा रावण । सत्य जोडली कमाण ।
कुंभकर्ण मारला यान । तुटलं नातं..
या सद्बुध्दिच्या ठायी, उभे अवधुत ॥
॥ आशा मनशा दुर्गुण । वासना कल्पनेच ठिकाण ।
हेही उडवलं योग्यानं । या नामानं..
यान साधली सिदाई, उगवला दिन ॥ ०४ ॥

॥ योगी निघाला जलदिन । हाती घेवुन अगन्या बाण ।
सहा छत्तीस जाळले त्यानं । या बाणानं..
पंचेचाळीस कवाड, गेला उडुन ॥
॥ उभा योगी समाधान । पचते तिर्थ केले त्यानं ।
हद्यी साठवला निर्वाण । तो आदीगण..
दृष्टी वाकडी करून पाहे निर्वाण ॥
॥ उभा योगी गुणीजन । जप-तप केलं त्यानं ।
तिरगुणांचे पडदे खोलले त्यान । याला गगणाहुन...
थोर गवसली खुणं ॥
॥ उभा यवगी लीनतापण । प्रेम-भक्ती साधली त्यानं ।
उडवले दहाचं ठिकाण । मन आहे हाती..
याहीच्या सुमरणी उभे गणपती ॥ ०८ ॥
॥ उभा यवगी धरली देही । ग्याना-ध्यानाची केली रई ।
विर्जन बहुसागराच्या ठायी । घातलं त्यानं..
असे कितीक वर्णु, याहीच्या चतुराईचे गुणं ॥
॥ हरीनामाचा दोर करून । आधार भक्तीचा घेवुनं ।
सागर मंथन केलं त्यानं । या मायेचं..
झुरझुरा पाहीले रूप, आदीपुरूषाचं ॥
॥ आंगी शुध्दसत्व गुण । हाती भैसाचं निशाणं ।
उपदेश केला त्याहीनं । सर्व जनी..
या शिपी व-हाडात, वाटली वाणी ॥ ११ ॥

**भजने :-**

॥ वाणी जगात सांगतली । चतुर्पती नामाची मोहर वाजली ॥
॥ वाणी जगात सांगतली । चतुर्पती नामाची ज्योत उजळली ॥
॥ जोडा या ज्योतीला हात । उभे आहे हो कृष्ण अवधुत ॥
॥ उभा कृष्ण अवधुत । याहीचा चरणी माझा दंडवत ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग ०१ ॥

॥ ओवी नं. ३३ ॥

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ झाली जागृत आदीमुनी माउली ॥

॥ झाली जागृत आदीमुनी माउली । सालं बेचाळीशीच्या साली ॥ घृ ॥

॥ भुम्मेवर भावाक जन । इथं उतरले कोण कोण ?
खेळ मांडला चौघांन ॥ सालं बेचाळीशीच्या साली ..

॥ चौथ्या आंगचा संगजोड । सहजच उभा केला खेळ ।
जागी केले दोन केवळ ॥ सालं बेचाळीशीच्या साली ..

॥ आदीमुनी महामुनी जागी झाले । याहीनं जागी केला दयावंत ।
पुर्वेकडे पुरवला हेत ॥ सालं बेचाळीशीच्या साली

॥ जागी झाला दयावंत । अनामत देव अवधुत ।
उत्तरेकडे उतरली ज्योत ॥ ०४ ॥ सालं बेचाळीशीच्या साली..

॥ या चौघांचा एकच थाट । भुम्मेवर उठला गजघाट ।
पश्चिमेला पेटवलं निट ॥ सालं बेचाळीशीच्या साली ..

॥ भाव धरूनीया बळकट । चौघांनी पुंजले ताट ।
दक्षिणेकडे दाखवलं बोट ॥ सालं बेचाळीशीच्या साली ..

॥ चार दिशांचे चार भाग । चौकोणी बरसे मेद्य ।
हा होय सागराचा ओद्य ॥ सालं बेचाळीशीच्या साली ..

॥ ऐका चौघांच्या रिती । गाय भकसली चतुर्पती ।
पाचवा लभेद आला चित्ती ॥ ०८ ॥ सालं बेचाळीशीच्या...

॥ स्थुल सुक्ष्म कारण । याहीनं साधले महाकारण ।
ओळखली अतीकारणाची खुणं ॥ सालं बेचाळीशीच्या साली..

॥ चौघे मुळावर गेले । चारही यवग साधत आले ।
कलयवगी उध्दारले ॥ १० ॥ सालं बेचाळीशीच्या साली..



॥ ओवी नं. ३४ ॥

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ पाहता पाहता वेळ निघुन जाईन आता ॥

॥ पाहता पाहता..। वेळ निघुन जाईन आता ॥घृ॥

॥ आजवर होतो चौ-यांशीत । भोगत भोगत आलो इथ ।
मन रमलं हरी भजनात ॥

॥ मागे चौ-यांशीची जाचनी । चौ-यांशी चुकवीणार नाही कोणी ।
इच्या आड येणार नाही कोणी ॥

॥ किल्ली हरीनामाची धरा । ज्ञान दृष्टीचे व्दार खोला ।
जावे सातव्या मुक्कामाला ॥

॥ सातव्या मुक्कामाला जावे । जेजे लागन तेते घ्यावे ।
तिथ देहेजिवांचे बरवे आहे ॥ ०४ ॥

॥ संधी कलयवगाच्या ठायी । आदीपुरूष भरन देही ।
सत्ता कोणाची ठेवणार नाही ॥

॥ चुकवण चौ-यांशी येरझार । सत् यवगी होईन कार ।
चुकवन चौ-यांशी..। यवग काबिज करन सारं ॥ ०६ ॥

भजने :-

॥ यवग काबीज करन सार । भैसराज येईन यवगावर ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/०१ ॥
॥ ओवी नं. ३५ ॥
॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ आदीमुनी आम्हा पाजा अमृत वाणी ॥

॥ आदीमुनी....। आम्हा पाजा अमृत वाणी ॥ घृ ॥
॥ अनंत बम्हांडाचा धनी । आला निरशुन्याहुनी ।
याहीचा खेळ आहे अस्मानी ॥ आदीमुनी......
॥ माया चैत्यन्या पासुनी । बम्हा विष्णु शंकर तिन्ही ।
याहीचा खेळ आहे तिरभवनी ॥ आदीमुनी......
॥ रज तम सत्व त्रिगुण । हेच होय बम्हा विष्णु शंकर तिन्ही ।
हेच होय खुम्म तिन्ही । भैस आला चौथ्या खुम्मी ॥
॥ उभा तो मानव खुम्मी । सांगी सांगे आकाशवाणी ।
शुध्दसत्व गुणी । भैस उभा चौथ्या खाणी ॥ ०४ ॥

॥ आथरर्वन् वेदाची मांडणी । सांगी सांगतली आकाशवाणी ।
सावंग्याचे कृष्ण धनी । याहीची आठवन आम्हा मनी ॥ ०५॥

भजने :-
॥ देवा धाव बा लवलाही । तुम्हा वाचुन आमचा कोण नाही ॥
॥ आम्हा दुजा कोण नाही । आम्ही जडलो बा तुम्हा पायी ॥
॥ आदीमुनी । तुया वाचुन नाही कोणी । लवकर याहो..॥



॥ ओवी नं. ३६ ॥
॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ भक्त गर्जती..। शकुन चाले आत्मचित्ती ॥

॥ भक्त गर्जती..। शकुन चाले आत्मचित्ती ॥ घृ ॥
॥ आदीमुनी शकुन सांगती । महामुनी कार करती ।
रूपावंती गुणावंती ॥ शकुन चाले आत्मचित्ती..
॥ हया होय मुळयवगा च्या ज्योती । खेळत खेळत आल्या येथी ।
गंगा वळ्ली भागीरथी ॥
॥ भरल्या आदीपुरूषान ज्योती । पाहत पाहता आल्या इथी ।
याहीच्या सुमरणी द्युतपती ॥
॥ हया होय आदीपुरूषा च्या साथी । महामुनी कार करती ।
अवधुत-अवधुत बोलती ॥ ०४ ॥

॥ हया होय मुळयवगा च्या साथी । एकविस स्वर्ग उडुन जाती ।
बसले देवाच्या संगती ॥ ०५ ॥
भजन :- ॥ होत पुर्विचं संचीत । म्हणुन घडली देवा तुमची संगत ॥

गजर :-
॥ तुम्ही या भजनी बसा । उभा आहे सखा, होणार नाही धोका...।
या चतुर्पती नामाला येवुन भजा ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/०१ ॥

॥ ओवी नं. ३७ ॥

॥ कृष्णपुरीची ओवी ॥

## ॥ आदीमुनी बोले..। महामुनी भजा हो भैसाले ॥

॥ पुर्व जन्माच संचित । प्राल्बदानं बरी केली मात ।
जन्म दिला तुझ्या वंशात । आदीमुनी बोले, महामुनी भजाहो भैसाले ॥घृ॥
॥ पडझड होईन विपरीत । अवघे पडले भ्रमात ।
ब्रम्हा विष्णु शिव भ्रमिष्ट ॥
॥ आदीमुनी सांगे खुणा । ऋषिमुनीला पडला भ्रम ।
कोणी ना घेई देवाचे नाम ॥
॥ इं.स. शके पन्नाशीला । पाया यवगाचा रंचु केला ।
सुरूवात होईन सत् यवगाला ॥ ०४ ॥
॥ दिवस यवगाचा त्याही राहुचा । जमाव होईन शाहुनंदाचा ।
धुम्मधुम्मकार होईन ज्योतीचा ॥
॥ साल शंभर पडेना पाणी । बहु जीवांची होईन हानी ।
विचार करतीन देव तिन्ही ॥
॥ हत्तीच्या सोंडी एवढी धार । पडत राहीन शंभर साल ।
मोडन महाविष्णुच घर । क्षिरसागर..। आदीमुनी बोले..
॥ शिवधाम वैकुंठ कैलास । तेही विरघळतीन पाण्यात ।
जलात उरली हंकार ज्योत ॥ ०८ ॥
॥ ज्योतीला ज्योत मिळवा । सुवर्णाची होईन पृथ्वा ।
आदी मुनीचा शकुन नवा ॥ ०९ ॥
भजने :- ॥ जलसागर आटन पाणी । अनामत उभा राहीन धनी ।
देव तारण जीवाजनी । हे सर्व याहीच्या अध्यानी ॥



॥ ओवी नं. ३८ ॥

॥ कृष्णपुरीची ओवी ॥

## ॥ आनंद झाला । हा ब्रम्ह उल्हासला ॥

॥ आतातरी बम्हपुरी उजळा । ज्योत भडके धडाधडा ।
शिरसिंधुने पहाड फोडा । आनंद झाला, हा ब्रम्ह उल्हासला ॥घृ॥
॥ जीव पाण्याचा बुडबुडा । ज्ञान दृष्टीचा उघडा डोळा ।
तो आत्मा निवडुन काढा ॥
॥ चतुराईच्या चातुरा । मानव जन्म नाही वेळोवेळा ।
सदोनित कर सोहळा ॥
॥ अवघ्या जीवाचा जिव्हाळा । भावीक पाहे वेळोवेळा ।
तिथ धन्य देवाची कळा ॥ ०४ ॥
॥ सर्वांचा राजा कृष्ण सावळा । देहे सोडुन आहे वेगळा ।
सांगे आत्मज्ञानाचा उलगडा ॥
॥ कळेना आता कळविता । संत पुरूष महा देवता ।
याहीच्या आंगी सर्व सत्ता ॥
॥ सत्य ज्योत नामाचा धडा । नवखंड बम्हांड फोडा ।
शाहुनंदाचा प्रकाश पाडा ॥
॥ कृष्णापाशी जा रे गडया । आसारानं सार निवडा ।
धन्य देवाची लीला ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/०१ ॥

॥ ओवी नं. ३९ ॥

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ एक नवल होईन भारी ॥

॥ या भुम्मेवरी..। एक नवल होईन भारी ॥ घृ ॥
॥ नवल सांगतो हकिकत । धेंड उठतीन पृथ्वीत ।
पाहता पाहता थकतीन लोक ॥ या भुम्मेवरी..
॥ राजे भांडतीन राज्यापरी । एक राजा होईन खेत्री ।
हा अवधुत सांगे किल्ली ॥ या भुम्मेवरी....
॥ नाही म्हणु नका जन । देवराज होईन प्रिथवा ।
हा अवधुत सांगे खुणा ॥ या भुम्मेवरी....
॥ यवगाच्या सुत्रांन । आपरूप आले हो धावुन ।
शिक्का भैसाचा चालनं ॥ ०४ ॥ या भुम्मेवरी...

॥ चमचमा हो चमके ज्योत । जगात होईन कौतुक ।
देव येईन भेट देईन ॥ या भुम्मेवरी...
॥ देव येईन गरूडावरी । रूमझुमन पृथ्वा सारी ।
जन बोलतीन हरी हरी ॥ ०६ ॥ या भुम्मेवरी....

भजने :-

॥ नवल सांगतो । पुढे पाहयं.. अमृत गंगा वाहे ॥ नवल सांगतो
॥ नवल सांगतो । पुढे पाहयं.. ग्यान गंगा वाहे ॥ नवल सांगतो
॥ नवल सांगतो । पुढे पाहयं.. कृष्णा अक्षर पाहे ॥ नवल सांगतो



॥ ओवी नं. ४० ॥

॥ कृष्णपुरी ची अरज-ओवी ॥

## ॥ कृष्णपुरी महिमा भारी ॥

॥ कृष्णपुरी महीमा भारी । कनवाळु आला । दयाळु आला ।
दयाळु आला । भाव भक्तीचा जिव्हाळा ॥ घृ ॥
॥ रूपी सावळा अंगी कळा । रंग धरून आला, देहे धरून आला ।
देहे धरून आला । नवल, सांगे हो जगाला ॥
॥ नवल गाही धरली देही । आदी पुरूषानं ।
मिर्त लोकी उभा नामी । तारण जीवन ॥
॥ तारा साठी अवतार येथी । पाहवं डोळ्यानं ।
या रायाच्या ओळखा खुणा । स्थुल देहीनं ॥
॥ ओळखा खुणा अवतार पुन्हा । धरला देवानं ।
या देहीचं मरण चुकतीन । याहीच्या हातानं ॥ ०५ ॥

भजनं :-

॥ कृष्णपुरी महीमा भारी । तारू आला देवराया श्रीहरी ॥
॥ कृष्णपुरी महीमा भारी । दया केली याहीनं या बाळावरी ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/०१ ॥
॥ ओवी नं. ४१ ॥
॥ कृष्णपुरी चा पाळणा ॥

# ॥ देव जन्मले..। कृष्णपुरी आनंद झाला भारी ॥

॥ देव जन्मले । कृष्णपुरी... । आनंद झाला भारी ।
इथ नांदतो । श्री हरी.. । को-या भुम्मेवरी ॥घृ॥
॥ जीव नव्हता हो । पंचभुता..। तेव्हा तो अकाशमात होता ।
भक्त जनांची । बहु चिंता..। अवतरले आता ॥
॥ थापली विटाळी । हे विट..। रक्त मासांची कोट ।
बाहेर येतांना । बहु आट..। येवुन दिली भेटं ॥
॥ माया जन्मांची । कपटी..। संभाळल पोटी ।
बहु उदरात । आटाघाटी..। माय झाली कष्टी ॥०४॥

॥ सावळ्या रूपांचा । मुकुंद..। जन बोलती गोविंद ।
सोहंम् उजाला । हा कंद..। याचा तिरलोकी सुगंध ॥
॥ आला सावळा । बालक..। मुखी नाम तारक ।
करती नरनारी । कौतुक..। आले तिरलोक ॥
॥ आला सावळा । नंदन..। मस्तकी तिरनयन ।
जागी करते हो । तिरभवन..। ओळखा याहीची खुण ॥
॥ पायी पद्मं । बेंबी हिरा..। तोच यवगी खरा ।
आले कृष्णपुरी । दरबारा..। भक्तांच्या माहेरा ॥०८॥

॥ जागृत पाळणा । अष्टमी..। झाले चवथ्या खुम्मी ।
कार केला हो । हरीनामी..। कैक बसले नेमी ॥०९॥

भजने :-
॥ हाती पाळण्याची दोरी । राखन आहे देवराया श्रीहरी ॥
॥ पाळणा अनंत यवगाचा । झोका दयाहो महाराजा आयुष्याचा ॥
॥ पाळणा विणुवनी मजबुत । यामध्ये नांदते जीवनकळा ज्योत ॥



॥ ओवी नं. ४२ ॥

# ॥ परदेशी माझा जीव ॥

॥ परदेशी माझा जीव । कोणता देव नाही ठाव ।
भुम्मा नगर माझ गाव । सदा येण, नाही देवाचं दर्शन ॥
॥ भुम्मेवर येणं, भुम्मेवरून जाणं । करा या जीवाचं रमण ।
करा या जीवाचं रमण । फुकट येरझार, मिटव ८४शी बिगार
॥ अश्या देह-जीवाच्या रिती । ऐसे यवग झाले किती ? ।
भ्रांती मिटव या बाळाची । सदा नांदव पाया पाशी ॥
॥ भ्रांतीमुळे हिंडलो बारबंड । स्वर्ग पाताळ नवखंड ।
पायी घातले मुळखंड । धुंद झालो, अवधुत नामी आलो ॥

भजन :- ॥ धुद झालो तुया नामी । आता चालव तिरलोकी गाही ॥
॥ धुंद झालो तुया नामी । आता कोणाचं भेव नाही ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग ०१ ॥
॥ ओवी नं. ४३ ॥
॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ कृष्णपुरी जड भारी ॥

॥ कृष्णपुरी जड भारी । बहु आहे खोल ।
सत्य वचनांचा बोल ॥ घृ ॥
॥ कृष्णपुरी सांगी खरी । तलवारीची धार ।
यवगी नीघाले बाहेर ॥
॥ आदीपुरूषाचा डंका । त्याचा होतो गजघाट ।
देव झाले प्रकट ॥
॥ पुर्विचा लेश होता । म्हणुन आले आता ।
भेटला मोक्षाचा दाता ॥
॥ होती पुर्विची दोरी । आता आले संसारी ।
आदीपुरूषा च्या दरबारी ॥ ०४ ॥

॥ अन्जानांकडुन काही कारणं । आहे करून घेण ।
म्हणुन दाखवले तुवा पाय ॥
॥ तुमच सांगन माझ म्हणनं । चित्त दयाहो बोला ।
सांगु सांगु शिण आला ॥
॥ जगात येण सांगुन जाणं । हेच माझ काम ।
बिरदी उभा घनश्याम ॥
॥ बेचाळीशीला वचन तुमचं । संभाळ देवराया ।
मिठी घातलीसे पाया ॥ ०८ ॥

॥ धरूनी हात सांगे मात । लटक मानु नये ।
खेळ देवाचा होय ॥
॥ शत्रु तिघे लागले मागे । डगमगली नाव ।
देवा अवधुता धाव ॥
॥ सप्तसागरी कृष्णपुरी तरून जाय ।
आधार देवाचा आहयं ॥
॥ अन्जान फार तुझं लेकरू । संभाळ देवराया ।
लज्जा राखा विठु राया ॥१२॥

॥ आदीपुरूषाचा हुकुम । चवमुलखी गाजनं ।
संत दर्शन घेतीन ॥ १३ ॥

भजने :-
॥ नित दयाहो/लाभो संताचे दर्शन । हेच आहे देवा माझ मागणं ॥

गजर :-
॥ कृष्णा तुझी संगत । मला घडो बा सदोनित ।
तुमची कळसुत्र कळा । कोणा ना कळत ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग ॥

॥ ओवी नं. ४४ ॥

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ म्हणे रूक्मिणा । विठुरायाची कामिणा ॥

॥ म्हणे रूक्मिणा... । विठुरायाची कामिणा ॥ घृ ॥

॥ सांगी केली सावंगपुरी । येवु केलं भुम्मेवरी ।
अवतार घ्यावे कोण्या घरी ॥ म्हणे रूक्मिणा....

॥ खोटं बोलनं खोटं चालनं । खरं विसरून गेले जन ।
शुध्द करावं ईमानं ॥ म्हणे रूक्मिणा....

॥ व्दैत भार झाला पृथ्वीशी । लागल्या असत्याच्या राशी ।
जागा नाही उरली राहण्याशी ॥ म्हणे रूक्मिणा....

॥ भैया भंग झाली पृथ्वी । सत्य राई इतके नाही ।
आता राहावे कोण्या ठायी ? ॥ ०४ ॥ म्हणे रूक्मिणा...

॥ तिर तिरभवनी नाश झाला । अवघा सत्य धर्म बुडाला ।
कोणी मानेना कोणाला ॥ म्हणे रूक्मिणा....

॥ न्याहरून पाहावे जगदिशा । कुठेतरी असन सत्य वाचा ।
त्याच भक्ताची पुरवा आशा ॥ म्हणे रूक्मिणा....

॥ हा होय बेचाळीशीचा धुरा । भक्त न्याहाळुन पाहावे जरा ।
मुक्काम करा तयाच्या घरा ॥ म्हणे रूक्मिणा....

॥ आला बेचाळीशीचा धुरा । आपले बोल खरे करा ।
शिपी किनारी लागला झरा ॥ ०८ ॥ म्हणे रूक्मिणा....

॥ ऐकोणीशे बेचाळीशीला । प्रेम भक्तीचे लागले झरे ।
सत्या घरी देव उभे राहीले ॥

॥ विठोबा-रूक्मिणी उभे आंग । खेळ खेळे लेकरांच्या संग ।
कृष्णपुरी चढवला रंग ॥

॥ कृष्ण पुरीची महीमा । येईन अवघ्याच्या कामा ।
अवघे नांदन सुखः धामा ॥ ११ ॥

भजने :- ॥ संत सुखाचे सागर । बाप रूक्मिणीच्या वर ॥

॥ सुखा साठी म्या भजलासे हरी । सुखः दयाहो महाराजा देहीवरी हो ॥

॥ आम्ही सुखाचे देवा गा तुमच्या रूपाचे ।
ग्यान भजतो मायबाप विठ्ठलाचे ॥



॥ ओवी नं. ४७ ॥

सोनेगांव दांडातील रामप्रसाद-हनुमानप्रसाद पाल बंधु यांच्या पाठातील..

॥ कृष्णपुरीची ओवी ॥

## ॥ सुन सुन रे..। सावंगपुरमे जानेवाले भाई ॥

॥ सावंगपुरमे जानेवाले भाई । सुन सुन रे ..॥ घृ ॥

॥ सावंगपुरमे जानेवाले भाई । बुरे रस्तेसे चलना नही ।
मौत का कुऑं खोदा है । वहीही गिर जायेगां ..
बोल भगवत पर देयेंगा ॥

॥ सावंगपुरमे जानेवाले भाई । सोहंम् रस्तेसे चलना कोई ।
किसनजी चुपके बैठा वही । है भगवत मेरा.।
कचरोमे गुम गया हिरा ॥

॥ सावंगपुरमे जानेवाले भाई । कभी हिंसा करना नही ।
सब घटमे भरा भगवंत वोही । दुजा ना माने..
सब उनके कारखाने ॥
॥ सावंगपुरमे जानेवाले भाई । कभी नशा करना नही ।
इसमे तेरी है गमायी । हरी भक्तोंकी..
सोहंम् ढोल बजानेकी ॥ ०४ ॥
॥ सावंगपुरमे जानेवाले भाई । कभी मुर्दे पुंजना नही ।
भजले अवधुत बादशाही । कभी ना भुले..
किस्मत की चाबी खोले ॥
॥ यह कहना मानो भाई । तुम्हारी हो जायेगी भलाई ।
जन्म मरण की फिकर नही । जमानत हमारी...
बत्ती लगाव तन नगरी ॥
॥ तन नगरीमे मन है बंदर । बत्ती लगाव उसके अंदर ।
यहा का भाग जायेगां बंदर । तखत पर धनी..
बैठेंगा आदीमुनी ॥ ०७ ॥
भजने :- ॥ आदीमुनी । तुया वाचुन नाही कोणी । लवकर याहो..॥
॥ आदीमुनी । माझा माथा तुया चरणी । लवकर याहो..॥



॥ ओवी नं. ४६ ॥
॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ आम्ही धरले अवधुताचे ध्यान ॥

॥ आम्ही धरले अवधुताचे ध्यान । काहो उदास तुम्ही जन ॥ घृ ॥
॥ उदास होण्यास काय कारण? आम्ही नाही छिनले कोणाचे धन ।
आम्हाला देव झाला प्रसन्न ॥
॥ नामी जडले तन-मन । देहे जीव केला अर्पण ।
झालं या भैसरायाचं देणं ॥
॥ राज रोशन करतो आता भजन । या आदीपुरूषाचं सुमरन ।
आमच काय करन कोण ? ॥
॥ मानव जन्मी घातलं त्यानं । कसं सोडु हरी भजन ।
उगीच आड का पडता येवुन ॥ ०४ ॥
॥ तुम्ही नका करू हरीभजन । घ्या तुम्ही पक्के डोळे लावुन ।
उगाच का बसले बहीरे होवुन ॥
॥ कसा पाहान आदीगण । कसे तुम्ही सोडले मोठेपण ।
लक्ष चौ-यांशी भोगनं केलं ॥
॥ हे होय भैसाचं निशाण । ओळखा सत्कृतीची खुण ।
जहांगीरी दिली त्यानं ॥
॥ माझ मीच करतो काम । हद्‌यी भजतो सदाराम ।
पाहीले इथं सुखःधाम ॥ ०८ ॥
॥ कोणीतरी पहा सुखःधाम । अवघे सोडा खोटे काम ।
जन्म मरणाची पडन फाम ॥ ०९ ॥
भजने :- ॥ या चौ-यांशीची पर । झाली अजवर ।
शुन्य उडवन । नाही राहणार जराभर ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/०१ ॥

॥ ओवी नं. ४७ ॥

सोनेगांव दांडातील रामप्रसाद-हनुमानप्रसाद पाल बंधु यांच्या पाठातील..

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ सुनले भैया..। तेरी अंबर कर ले काया ॥

॥ दुनिया है पागल खाना । सब हो गया धिंगाणा ।
तु क्युं बनता दिवाना ॥ सुनले भैया..
॥ दुनिया है रे भाई उलटी । उसकी बात सब है झुटी ।
भगवत चरण मे डाल मिठी ॥
॥ श्री प्रभुकी सब है माया । गर्दि होनेसे घबरा गया ।
उसने सब मुलुख भगवा किया ॥
॥ परम् धर्म सबसे बडा । कोई ना पकडे उसका घोडा ।
मुलुख सब हो गया भगोडा ॥ ०४ ॥

॥ अवधुत धनी सबसे बडा । सब मर्दोके इमान मे खडा ।
उसका भजन कर ले थोडा ॥
॥ भजले भाई अवधुत शाही । जन्म मरण की बात नही ।
भगवत साथ कर भलाई ॥
॥ भगवत ज्योती नजर ना आती । उसकी अगाध है वाणी ।
वही सब जन्मका साथी ॥ ०७ ॥



॥ ओवी नं. ४८ ॥

सोनेगांव दांडातील रामप्रसाद-हनुमानप्रसाद पाल बंधु यांच्या पाठातील..

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ भले फकीरी सत्ताधारी ॥

॥ भले फकीरी सत्ताधारी । नवखंड मे फेरी ।
दसवे खंड मे अलख्ख जगाया । झोली हो गयी खाली ॥
॥ अलट पलट त्रिकुट शिखरपर । हठ मठ के वाशी ।
ओहंम्-सोहंम् धुनी हमारी । बम्हपुरी के रहीवाशी ॥
॥ मनमे आसन मनमे कडासन । मनमे मुजरा मनमे हरी ।
नवखंड मे रमते रमते । दसवे खंड मे फेरी ॥
॥ काम कोध की खाक लगाई । तनु को लगायी राख ।
कृष्णनाथजी का प्याला पियो । दिलसे अपने साथ ॥ ०४ ॥

भजने :-
॥ हम तो भिकारी भिकारी । सदा नाम ललकारी ॥

गजर :-
॥ आम्ही व-हाडी व-हाडी । सदा नामाचे भिकारी ।
आलो तुया व्दारी । भेट दयाना श्रीहरी ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग ०१ ॥
॥ ओवी नं. ४९ ॥
॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ मांड सत्याची बसली ॥

॥ मांड सत्याची बसली । वाणी कृष्णाजीनं काढली ।
धडक छातीशी व्दैतास बसली । भावीक लोकास म्हणे..
भजन म्हणु नका ॥
॥ पाचवीला करार केला । विचार पडला भावीक लोका ।
साहय व्हावे समर्था । कोणीना बोले..महामुनी धावत आले ॥
॥ महामुनी त्याहीशी बोले । व्दैत भक्त आडवे आले ।
देव कसा राहीन साहयाले ? खोटया रिती..
कार झाला महामुनी हाती
॥ हे होय लबाडाचे मुळं । म्हणते भावीकाला उभा राहयं ।
ऐसा वाईट दिवा लावे । पेटेना ज्योत..झडपडा मारे अंधारात
॥ ऐसा अंधार दोहीता घरी । भजन करतो घडोघडी ।
जन म्हणतीन हरी हरी । ऐसे करतीन फसवेगीरी ॥
॥ फसवेगीरी करतीन । हत्या बंम्हाडाच्या घेतीन ।
धर्म-कर्माच्या वाटा मोडतीन । दुर्जना घरी...
पाखंडी भजन करी ॥ ०६ ॥



॥ ओवी नं. ५० ॥
यशवंतराव बुवा याचे चरीत्र कथन व स्तुतीगाण करणारी..
॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ सत्य उगवला..। नेमधारी योगी आला ॥

॥ सत्य उगवला.. नेमधारी योगी आला ॥ धृ ॥
॥ यवगी आले सोहंम् रूप । एकोन्नीशे नउ सालात ।
नोव्हेंबर महीन्यात ॥ सत्य उगवला.. नेमधारी योगी आला ॥
॥ यवगी आले नेमधारी । सगुण रूप ब्रम्हचारी ।
कल यवगी दिली आरोळी ॥
॥ कलयवगी दिली आरोळी । थरथरा भेतीन तीन ताळी ।
इंद्र आसन सोडन पुढे ॥
॥ असे या योग्याचे नेम । बारा वर्षाचं बोलनं ।
साधा सिदाई संधी पाहुन ॥ ०४ ॥
॥ अश्या या योग्याच्या पोटी । आहे सत्कृताची पेटी ।
सांगे सत्यवगा च्या गोष्टी ॥
॥ बारा वर्षे झाले भक्तीला । निजरूप योगी जागी झाला ।
इं.स. ......शे पासुन नेम दिला ॥
॥ ऐस योग्याचं पुर्ण बारा वर्षाचे बोलनं ।
याहीच्या चरणी लीन होवुन राहाना । योगी आला पुर्विचा जुना ॥
॥ लीन व्हावे कोणाच्या नामी । मुखी अमृताची वाणी ।
माझा मुजरा याहीच्या चरणी ॥ ०८ ॥ ...जंगल्याच्या पाठातील.
भजने :- ॥ मुजरा माझा यशवंता । देवाच्या चरणावर माझा माथा ॥
॥ मुजरा माझा आनंदा । हेच माझी देव पुजा ॥
गजर :- ॥ महापुरूषा यशवंता गोविंदा आनंदा ।
वेळोवेळा लागु दे छंदा, तुमच्या सेवेचा ॥

॥ खंड ०८/भाग०१ ॥
॥ ओवी नं. ७१ ॥
॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ आणा वल्ही देह जगन । लावा किल्ली ॥

॥ आणा वल्ही देह जगन । लावा किल्ली...॥घृ॥
॥ आजवर होतो चौ-यांशीत । चौ-यांशी भोगत आलो इथं ।
सुखः सांगतलं हरी भजनात ॥ आणा वल्ही...
॥ संधी कलयवगाच्या ठाई । धरली मानवाची देही ।
जेथे सांगतलं तेथे जावी ॥
॥ एका पर्वताच्या ठाई । नाना त-हेचे वृक्ष येई ।
जे सांगतलं तेच घेई ॥
॥ एका पर्वताच्या वर । तेथे वाघ अनिवार ।
याच्या साठी बना हो विर ॥ ०४ ॥
॥ वल्ही पुर्विच वचन । दुईताचे मोडणं ठाणं ।
अनिवारावर लावा निशाण ॥
॥ बहु रोग हरवायास । दिव्य औषधीचा कस ।
ज्ञान जाळ लावुनीया काठा कर ।
ब्रम्हरसाचा दिव्य प्याला । पाजा त्याला..। मुखी अमृताचा प्याला ॥
भजने :- ॥ रसाई । अमृताचा प्याला । जो पिउन मग्गांम झाला ।
तो वाणी सांगे जगाला । नवल सांगे जगाला ॥



॥ ओवी नं. ७२ ॥
॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ कृष्णपुरीची तलवार ॥

॥ कृष्णपुरीची तलवार । हिचा कोणी ना धरे हात ॥घृ॥
॥ आदीमुनी महामुनी अवतार । यवगासाठी निघाले बाहेर ।
हाती नामाची तलवार ॥
॥ उभा कळवीता कर्तार । दुर्जनाचा केला संहार ।
याहीच्या मोक्षाला मोहरं ॥
॥ सिंहा सारखे चमकती विर । मानवात उभे नर ।
हाती हरीनामाचं शस्त्र ॥
॥ पाहुन कृष्णपुरीचा कार । वैरी कापती थरथर ।
कठीन पडला विचार ॥ ०४ ॥
॥ पाहुन कृष्णपुरीचा कार । जप-तप केले फार ।
यवग टळेना जराभर ॥
॥ पाहुन कृष्णपुरीचा कार । जंतर मंतर केले फार ।
यवग टळेना जरा भर ॥
॥ कृष्णपुरीची तलवार । आपलं यवग करन सर ।
वैरी लपतीन घरोघर ॥०७॥
भजने :- ॥ कृष्णपुरीची तलवार । बम्हा विष्णु कापे थराथर ॥
॥ बम्हा कापे थराथर । इतरांचा इथं काय गुजार ॥
॥ विष्णु चरणावर लोळे । इतरांचा गुजारा काय ॥
॥ बम्हा चरणावर लोळे । शंकर शरणागत जाये ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/०१ ॥

॥ ओवी नं. ७३ ॥

॥ कृष्णपुरी दांडाची ओवी ॥

## ॥ तु मानव असुन नरा ॥

॥ तु मानव असुन नरा । किती वेळ घेशीन फेरा ॥ घृ ॥
॥ मानव म्हणवुन घेशीन । भक्तीचे वर्म नाही जाणशीन ।
खोटयाशी रत् होशीन । व्यर्थ तुझा तोरा ॥ किती वेळ ..
॥ भक्तीचे वर्म नाही ध्यानी । देह वेचतो पाप कारणी ।
साबुत म्हणे देवाची करणी । हाच तुझा तोरा ॥ किती वेळ..
॥ तुझी बुध्दि भ्रमिष्ट । तुझी इच्छा कनिष्ठ ।
तुझे जीवन होईन निकृष्ठ । ध्यान दे जरा ॥ किती वेळ..
॥ ध्यानी आणा मानव धर्म । प्राक्षाळुन हो असत्य धर्म ।
अंगी बांध सत्य धर्म । तेव्हा देव येईन घरा ॥०४॥ किती..
॥ सत्य धर्माची ओळखन । कणाकणात अवधुत नाम ।
मुखी नाम उच्चारण । भजो ओंम् अवधुत प्यारा ॥
॥ ओंम् आहे भक्तीचं ठिकाण । हे आहे प्रभुच विहार स्थान ।
मन लावुन करा ध्यान । चुकतीन येरझारा ॥
॥ ओंम् नव्हे यंत्र । ते आहे भक्तीचे तंत्र ।
अवघ साठवलं त्यात । म्हणुन देतो । या नामाची साक्ष॥०७॥
भजने :- ॥ ओहंम् सोहंम् बिज मंत्रा । भक्तीचा दोरा ।
याच्याविना होणार नाही भक्ती । प्रार्थना करा ॥



॥ ओवी नं. ७४ ॥

॥ दर्यापुर दांडातील चणकाजीच्या पाठातील १६ ओव्या पैकी एक ओवी ॥

## ॥ सांगतो हरी भक्तीची कथा ॥

॥ सांगतो हरी भक्तीची कथा । भक्ती विजयी कर समर्था ।
तुमच्या नामी तरले आता । महामहा विर । संत महीमा यवगावर ॥
॥ शरण आले साधु-संत । कितीतरी पाहशीन तु अंत ।
आड आले दुःखाचे पर्वत । दुर करा । धाव भक्तीच्या माहेरा ॥
॥ दुर्जन करतीन छेडखानी । भक्त पाहतीन केवीलवाणी ।
उभा आहे अवधुत धनी । नामी राहाना । निंदेल त्याला निंदु दयाना ।
॥ दुर्जनाची झाली दाटी । भक्त पळती वाटोवाटी ।
निचंत का बसले जगजेठी । सावंग नाथा । देव कैवारी भावीकाचा ।
॥ दुर्जनाने केला जोर । साधु संत गांजले फार ।
न्याय होईन यवगावर । पाहजा पुढं..। आला अस्मानाचा खेळ ॥
॥ जेजे होईन तेते पाहा । या कलीला जपुन राहा ।
यवगी लपले महामहा ऋषि । आदीमुनी..। नाश झाला तिरभवनी
॥ निधानी वैकुंठी कैलासाहुन । ऋषि-मुनी यवगी येईन ।
न्याय पृथ्वीवर होईन । या देवाचा..। शेक सरन दुर्जनाचा ॥०७॥
॥ ज्याचा न्याय त्याच्या परी । नित करतीन येरझारी ।
चुकणार नाही यमपुरी । सांगतो खरं । होतीन यमाचे चाकर ॥
॥ काय सांगु या देवाचे सुखः । आड नाही येणार दुःखाचे पर्वत ।
अवघे भजतीन धनी अवधुत । सत्याची चढन ज्योत ॥ ०९ ॥
भजने :- ॥ सत्य आणनं जगा । उभा राहीन कृष्ण सावळा ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग०१ ॥

॥ ओवी नं. ७७ ॥

॥ दर्यापुर दांडातील चणकाजीच्या पाठातील १६ ओव्या पैकी एक ओवी ॥

## ॥ मानव होय तु सदा सोहंम् राहयं ॥

॥ श्री कृष्णाचा ढोल वाजे ढमढम ।
याहीनं थापला एक मानव धर्म ॥
॥ कसले धर्म हे कठीण कर्म ।
मानव जातीचे जाणावे वर्म ॥
॥ कसल्या जाती हया कसल्या न्याती ।
कठीन आहे हे मानवाच्या निती ॥
॥ श्रेष्ठ आहे या मानवाच्या खाणी ।
कोण्या पंथाचे बसवले नाही आम्ही ॥
॥ आम्ही अन्जान । का करता जबरदस्ती ?
भगोडयाशी आम्ही नाही करणार दोस्ती ॥
॥ आम्ही सोहंम् । तुम्ही का करता जबराई ?
कोण्या देवाचे आम्ही गुलाम होणार नाही ॥
॥ कैचें देव हा कैचा भगवान ? ।
आमच तरी बा काय केलं कोण ? ॥
॥ कैचे जोग हा कैचा धर्म पंथ ? ।
अवघे मोडन । एक राहीन मानव जात ॥०८॥
॥ बहु यवगाचा आत्माराम एक ।
सर्व घटी भरला प्रभु नायक ॥०९॥

भजने :-
॥ यवगा यवगीचा आत्माराम । याहीची किर्त महीमा जगात वाढवनं ॥



॥ ओवी नं. ७६ ॥

॥ दर्यापुर दांडातील चणकाजीच्या पाठातील १६ ओव्या पैकी एक ओवी ॥

## ॥ कृष्णपुरी सांगतो पाहयं ॥

॥ औट हाताची कृष्णपुरी । तेही आहे घटोघटी ।
अनंत रूपाची कृष्णपुरी । उभी आहे चरांचरी ॥
॥ कुठं नाशली कुठ भंगली । कुठे सोहंम प्रकाशली ।
कुठे नेणीव कुठे जाणीव । जैशी भुमिका तैसा भावं ॥
॥ कोणी चातुर कोणी शहाना । कोणी झाला योगी राणा ।
कोणी दानव कोणी मानव । कैक झाले याहीचे देव ॥
॥ कोणी सत्य कोणी असत्य । जैसे गुण तैसे भासे ।
कुठं पाप कुठं पुण्य । जैसा रस्ता तैसे जाणे ॥
॥ जागा जाग्यांची महिमा । सर्व घटी भरला घनश्याम ।
अश्या कृष्णपुरी कहीक । यवगा यवगीचा कृष्ण एक ॥०७॥

भजने :-
॥ यवगा यवगीचा आत्माराम । याहीची किर्त महीमा जगात वाढवनं ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग०१ ॥

॥ ओवी नं. ५७ ॥

॥ दर्यापुर दांडातील चणकाजी च्या पाठातील १६ ओव्यापैकी एक ओवी ॥

## ॥ दया घनश्यामा..। भुम्मेवर याहो रामा ॥

॥ दया घनश्यामा । भुम्मेवर याहो रामा ।
तुमच्या वाचुन सुनी । पडली हो भुमी ॥ घृ ॥०१॥
॥ भैस राजा । उभे राहा हो निश्कलंकी ।
तुमच्या वाचुन अंधेकार । पडला तिरलोकी ॥
॥ झाला अंधःकार । कसा लोपला हिरा ।
माया व्यापली हो । तिरकुटाचा पसारा ॥
॥ आदीपुरूष हरी । व्हा सावध यवगावरी ।
केली नष्ट याहीन । उत्तम कारागीरी ॥
॥ धन्य कारागीर । आदीपुरूष अवतार ।
का मौन धरलं । तसनस झाली फार ॥
॥ का मौन धरलं ? डोळा उघडुन पाहयं ।
तुमच्या वाचुन आमचा । कोण कैवारी आहयं ॥
॥ आदीपुरूष हरी । करा तुम्ही तयारी ।
बहु यवग राज्य करा । या भुम्मेवरी ॥
भजने :- ॥ भुम्मा लहान कशी म्हणावं । इच्यावर अवतरले हो देव ॥



॥ ओवी नं. ५८ ॥

॥ दर्यापुर दांडातील चणकाजी च्या पाठातील १६ ओव्यापैकी एक ओवी ॥

## ॥ धुम्म धुम्मकार तिरभवनी ॥

॥ धुम्म धुम्मकार तिरभवनी । माया मेघनी ।
तिन ताळ दिसेना धनी । उभी चैत्यन्यी ॥ घृ ॥०१॥
॥ चैत्यन्या झोके मोहनी । करे धुळधाणी ।
ऋषि-मुनी योगी केले । अध्यानी ॥
॥ मोठयां-मोठयांशी जोडलं नातं । धरले हात ।
बम्हा विष्णु शंकर । भुलले त्यात ॥
॥ चैत्यन्या मायेचा झपाटा । भ्रम मोठा ।
तिरभवनांच्या लोकांच्या । चुकल्या वाटा ॥ ०४ ॥
॥ या मायेचा । हात धरेना कोणी ।
चंद्र-सुर्य । लोपले गगणी ॥
॥ रात्र अंधारी । ही झाली काळीकीट ।
हे सुचत नाही । अवधुताची वाट ॥
॥ श्री कृष्णा निघ बाहेर । मशाल धर ।
हरी पाहु दे । कृष्णपुरी नगर ॥
॥ मशाल वाल्या तु धाव । मशाल धाव ।
हे दुरी आहे । कृष्णपुरी गावं ॥ ०८ ॥
॥ श्री कृष्णाची । या देवाची पुण्याई ।
एक राहु उगवला । या पृथ्वीच्या ठाई ॥ ०९ ॥
भजने :-
॥ राहु येईन राहु येईन । करोडो वर्ष आयुष्य/सुखः या देहीला होईन ॥
॥ राहु दिवस येईन खरा । या यमाजीचा नाही राहणार होरा ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/०१ ॥

॥ ओवी नं. ५९ ॥

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ पांडवाचं राज्य बुडाले ॥

॥ पांडवाचं राज्य बुडाले । उभी केली पर ।
पर मोडुन देवराया । जागी करन सारं ॥घृ॥०१॥
॥ अलट पलट माघा-या फिर । गोता खाशी ।
येईन मावचा लोंढा पुरा । वाहुन जाशीन ॥
॥ कलयवगाचे कठीन दिवस । देह नाही सोसणार ।
हरीनामाला विसरू नका । बहु होईन प्रतीपाळ ॥
॥ कलयवगात होईन मारोडा । जाईन कल यवग ।
भैस नामी राहा गडेहो । बहु होईन सुखः ॥०४॥
॥ भैसाच्या नामी सुखः नाही मावणार तिरभवनी ।
नाम होईन घरोघरी । ऐसे होतीन प्राणी ॥
॥ तिरगुणांचा सोडा भ्रम । भजा चतुर्पती ।
तिन यवग भरून गेले । काही नाही आलं हाती ॥
॥ चतुर्पता आहे मोठी । अवघ्याहुन थोर ।
तिरगुणांच उडवन शुन्य जागी करन सारं ॥
॥ तिरगुण याहीचे आहे । संधीचे काम ।
पृथ्वीवर होणार नवलं । ठेवलं सांगुन ॥०८॥
॥ तिरगुणांच शुन्य याहीनं । नाशवला देहं ।
आता तुमचं काय करता । आमचा आहे देव ॥
॥ पाताळी शेष करन चाकरी । शुन्याचा दरबार ।
कृष्णाजीचं आहे भाकलं । जरा नाही चुकणार ॥ १० ॥



॥ ओवी नं. ६० ॥

॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ सत्य जाणा । कशी भुलवन पडली जना ॥

॥ सत्य जाणा... । कशी भुलवन पडली जना ॥ घृ ॥
॥ महा महा योगी झाले । तेही तपाचारी बैसले ।
तरीपण देव नाही कळले ॥
॥ ऋषि मुनीचा दणाणा । उरल्या देहा भंगा जाणा ।
असा या कलयवगाचा माना ॥
॥ ऋषि-मुनी गीरी कपाटी । जप तप लावुन बसले धुनी ।
तरीपण भेट देईना धनी ॥
॥ ऋषि मुनी गीरी कपाटी । तिरलोक ग्यानी भुलले किती ? ।
कार या चतुर्पतीच्या हाती ॥ ०४ ॥
॥ भक्ती करून सिध्द जाणा । आंगी आले देवपण ।
तरीपण देव नाही पाहीला कोण ? ॥
॥ उठतीन कापुर आरती । आरत्या घेवुन येतीन हाती ।
चंद्री लागन मिर्तलोकी ॥
॥ नाम भजा नित्यरूप । करन भक्ती त्याला देईन भेट ।
धुंद लागन कलयवगात ॥ ०७ ॥

भजने :- ॥ कशी भुलवन पडली जना ।
या महाराजाचा खेळ कोणा समजेना ॥

॥ खंड ०८/भाग०१ ॥
॥ ओवी नं. ६१ ॥
॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

# ॥ भुलुन गेलो..। परी कृष्ण सुमरनी आलो ॥

॥ भुलुन गेलो..। परी कृष्ण सुमरनी आलो ॥ घृ ॥
॥ आधी भजा अवधुत बादशाही । जीव होता त्याच ठायी ।
दिली वस्तु आणली नाही ॥ भुलुन गेलो..
॥ वस्तु आणाया गेलो माघारी । पोच चालेना निराधारी ।
रस्ता कठीन जाउ कोण्यापरी ? ॥ भुलुन गेलो..
॥ करू गेलो पाहु गेलो । तीन ताळ धुंडुन आलो ।
आर्बुस-निर्बुस झालो ॥ भुलुन गेलो..
॥ भुलुन गेलो तिरगुणांपरी । मजला संदेह पडला भारी ।
केली सावंग्याची वारी ॥ कृष्ण सुमरनी आलो ॥ ०४ ॥
॥ सावंगपुरी उभे श्रीहरी । याहीचा परीमळ सुटला फार ।
लोट मारली चरणावरं ॥ कृष्ण सुमरणी आलो..
॥ अन्जानाचा धरून हात । उपदेश केला हरीभजनात ।
मजला वस्तु गवसली त्यात ॥
॥ कृष्ण संगतीचा लाभ । काहीतरी पुर्वजन्मीचा भाग ।
मजला त्याहीनं केला बोध ॥
॥ कृष्णराज अहिन अजात । याहीची महीमा चौताळात ।
याहीला गणाचारी वर्णितो ॥ ०८ ॥
॥ अहिन खरा अहिन न्यारा । अहिना घरी धरला अवतार ।
याहीचा पुरा मजला आधार ॥ ०९ ॥

भजने:- ॥ या भुलवनीच्या पाई । माझ मजला समजत नाई ॥
॥ कशी भुलवन पडली जना । काही समजेना ।
या महाराजाचा खेळ कोणा उमजेना ॥

**शब्दार्थ** :- आर्बुस-निर्बुस होणे = दमछाक होणे, बारबंड फिरून दमुन-दमुन जाणे संदेह = संशय, शंका । परीमय = सुवास. सुगंध, दरवळ । वस्तु गवसली = वस्तु मिळणे, वस्तु भेटणे, वस्तु प्राप्त होणे. । बोध = अनुभवजन्य ग्यानाचा उपदेश.



॥ खंड ०८/भाग०१ ॥
॥ ओवी नं. ६२ ॥
॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

# ॥ ऐकुन घ्याहो जनलोका ॥

॥ किती सांगु दुर्जनाच्या चुका । ऐकुन घ्याहो जनलोका ।
सांगतो लटकं मानु नका ॥
॥ झाल्या भावीकाच्या हाका । चिंता पडली त्या मालका ।
जागी झाला कृष्ण सखा ॥
॥ जागी व्हा रे भावीक लोका । अवतरला माझा सखा ।
अशी नाही येणार घटका ॥
॥ भजा प्रभु देव नायका । याहीनं बसवली व्दारका ।
उठला सिदाईचा भडका ॥ ०४ ॥
॥ भजा प्रभु देव नायका । घ्याहो अमृताचा घुटका ।
कृष्णपुरी कोरी भुम्मका ॥

॥ चला पाहु कोरी भुम्मका । आदीमुनी महामुनी सखा ।
याहीच्या मुखचे शकुन ऐका ॥ ०६ ॥
भजने :- ॥ सुटला शकुनाचा वारा । ऐसा बोले झेंडयाचा फरारा ॥



॥ खंड ०८/भाग०१ ॥
॥ ओवी नं. ६३ ॥
॥ कृष्णपुरी ची ओवी ॥

## ॥ कोणीतरी असन सखा ॥

॥ इथ कोणी तरी असन सखा । हरीला विसरू नका ॥
हरीला विसरू नका । हरी होय, आत्म जीवाचा सखा ॥
॥ माय बाप, भाउ बंध । उदंड आहे गोत ।
उदंड आहे गोत । शेवटी, कोणाची नाही संगत ॥
॥ धन संपदा दोन दिवसाची । छाया दुपारची ।
छाया दुपारची । धरल्या, क्षणभर नाही राहायची ॥
॥ दया धर्म तुम्ही करा काही । जोड करा पुण्याची ।
जोड करा पुण्याची । शिदोरी अनंत जन्माची ॥ ०४ ॥
॥ सत्य संस्कृती मानव निती । भक्ती ही प्रेमाची ।
भक्ती ही प्रेमाची । अखंड संगत अवधुताची ॥ ०५ ॥
भजने :- ॥ भक्ती प्रेमाची प्रेमाची । अधीर/अधिक नाही कामाची ॥



॥ खंड ०८/भाग०१ ॥
॥ ओवी नं. ६४ ॥
॥ कृष्णपुरीची ओवी ॥

## ॥ यानं नाश केला ॥

॥ यानं नाश केला..। देव नाही ओळखला ॥ घृ ॥
॥ आदीपुरूषाचं नाम । घेईना कोणी पडली भुलवन ।
दगडा पुढे लावतीन होम ॥ देव नाही ओळखला..
॥ चतुर्पतीची नाही सुद । साधुसंत धरती वाद ।
तिरगुणां मध्ये झाले बोध ॥ देव नाही ओळखला..
॥ भोळे भाळे पाहुन लोक । त्याच लोकांशी मारते हाक ।
उलटा-पालटा दाखवतीन भेष ॥
॥ तिरगुणांत लुंडमुंड झाले । भजत नाही आदीपुरूषाले ।
सोंग दाखवतीन जगाले ॥ ०४ ॥
॥ अशी या तिरगुणांची वाणी । यात नाही देव धनी ।
याहीला राहा हो बचावुनी ॥
॥ असं हे तिरगुणांच पाठांतर । हे होय कडबा कुटार ।
याहीचा नलागो पदर ॥
॥ लागो सत्पुरूषाचा पदर । हे होय मोक्षाचं घर ।
याहीची दैना करन फार ॥ ०७ ॥
भजने :-
॥ बम्हा विष्णु तिरनयन । अवघा नाश केला याहीनं ॥
॥ नाश केला बेईमाना । बम्हांडाची लागो कल्पना ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग०१ ॥

॥ ओवी नं. ६७ ॥

॥ कृष्णपुरी ओवी ॥

# ॥ मता मताचा गलबला ॥

॥ मता मताचा गलबला । कोणी ना माने कोणाला ।।घृ।।

॥ कली मातला कल्लोळ झाला । तो फजीत करन जनलोकांला ।
विसरून जातीन हरी भक्तीला ॥ कोणी ना माने..

॥ हरी भक्तीचा रमणा पलटला । नाशीवंतांचा दरोडा पडला ।
दही-दुधाचा हांडा फोडला ॥

॥ भंग सुटला कलयवगाला । धाक पडन बम्हादिकाला ।
निशं:कलंकी गुप्त झाला ॥

॥ कलयवगी मौसम चांगला । जग हा कलावंत झाला ।
कैक जाती चंद्र लोकाला ।।०४।।

॥ विचित्र राज्य विचित्र कला । अगण्या बाण तयार केला ।
आंगी मोठेपणा आला ॥

॥ चढ सुटन या जगाला । किजबीज किजबीज नवखंडाला ।
बादशाहा गादीवरून उठला ॥

॥ अवघे पाहतीन राजनितीला । अवघा मुलुख गजबजला ।
उभे राहतीन महायुध्दाला ॥

॥ योगी नेमधारी बसला । नित्य भजनी राउळाला ।
करे गर्जना अश्या समयाला ।।०८।।

॥ यौग बदलुन योगी आला । कधी ना विसरे नेमधर्माला ।
त्याहीचा खेळ मालुम त्याहीला ॥ ०९ ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग०१ ॥

॥ कृष्णपुरी आरती नं. ६६॥

॥ कृष्णपुरीची आरती ॥

# ॥ ये देव वो देव, या श्री घनश्यामा ॥

॥ ये देव, वो देव । या श्री घनश्यामा । हरी श्री घनश्यामा ।
आरती ओवाळु । तारा हो आम्हा ॥ घृ ॥
॥ शुध्द भाव कापुर , उजळली ज्योत । उजळली ज्योत ।
मन हा मोगरा । वाहतो नित ॥
॥ तुझेच फुलपुष्प, तुलाच वाहतो । तुलाच वाहतो ।
निमित्या कारण । दर्शना येतो ॥
॥ निमित्या कारण । तुम्ही धरला हात । धरला हात ।
तुमचीच तुम्ही वाणी । सांगाव हद्‌यात, सांगाव जगात ॥
॥ अवताराची महिमा । वर्णितो खरी । वर्णितो खरी ।
यादवांचा उध्दार, मानवांचा उध्दार । या पृथ्वीवरी ॥
॥ कृष्णपुरी नगरी, सावंगपुरी नगरी । होय व्दारका ।
इथं देव नांदतो । श्रीकृष्ण सखा ॥
॥ कृष्णपुरी नगरी, सावंगपुरी नगरी । कंचन झाली ।
तुया नामाची, चतुर्पती नामाची । ज्योत उजळली ॥
॥ तुमच्या नामाचा, आनंद फार । आनंद फार ।
अबिर गुलाल पुष्प । अवतारा वर ॥

भजने : आरती मनभाव केली । सोयंम् ज्योत हे ओवाळली ॥

॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ चतुर्पता अथर्वन् वेद उभा राहीन पोटी । निजरूप भुम्मा जागी करन सारी सृष्टी ॥

# चतुर्पता
# ॥ अथर्वन् वेद ॥



## ॥ खंड ०८ : भाग ०२ ॥
## ॥ कृष्णपुरी चळवळ दांड ॥
## ॥ कृष्णपुरी चळवळ च्या ओव्या ॥



## शब्दार्थ, चरणार्थ निरसन स्पष्टीकरन सह



॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ ॥
चतुर्पता
॥ अथर्वन् वेद ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

www.chaturpata-atharvan-ved.com

॥ खंड ०८ ॥

॥ भाग ०२ ॥

॥ कृष्णपुरी चळवळ दांड ॥

॥ कृष्णपुरी चळवळ दांड उत्पत्तीचे ज्ञान ॥

# ॥ कृष्णपुरी चळवळ दांडाचे प्रारंभिक ज्ञान ॥

॥ कृष्णपुरीच्या चळवळीच्या ओव्या ॥



## ॥ कृष्णपुरीच्या चळवळीचा भाग ॥

॥ कृष्णपुरीचा उत्तरार्ध ॥

कृष्णपुरीच्या कार मधला हा एक चळवळीचा भाग आहे . या भागाव्दारे कृष्णपुरीचे मान्यवर कृष्णा-पुलगाव, हनुमंता व रामप्रसाद पाल-सोनेगाव, विठोबा पाचघरे-रहाटगाव, धनसींग, दशरथ तिजारे-भातकुली, जंगल्या, करूममाना-बडनेरा, बेले-मोर्शि, श्रावणमहाराज-पहुर, पांडुरंग, गुणवंता, व येशीनाथ-मांगला, नारायण-पणोरा.....ईत्यादी कृष्णपुरीचे अठरा खैत्री होते. या अठरा खैत्री सह कृष्णपुरीच्या भक्तगणांने अठरा ठिकाणी चळवळ उभारली होती. चतुर्पती पंथातील मायालंपट भक्त-लोकांचे दुगुर्ण, जीवहत्या, क्रियाभ्रष्टता, षटविकार, मुजोरी, मोठेपणा.. ईत्यादी कलंकी दुर्गुण झाटुन टाकुन, या पंथात निर्मळता, निशंःकलंकता, सरळसाधी सिदाई, लिनता, लोकसत्ता...ईत्यादी सत्गुण आणण्यासाठी ही चळवळ उभारली होती.

या पंथातील काही काही भक्त लोकांना कपटी मायाने कपटाने आपला तिरगुणी प्याला मधुपानाप्रमाणे पाजुन, त्या मानवांत दुगुर्णांचा शिरकाव केला होता. याच मुळे पंथातील काही काही मानवात अहंता, सत्तापिपासु वृत्ती, लता म्हणजेच काही वाईट सवयी होत्या. जसे दारू पिणे, मासभक्षण करने, त्याकरीता पशुहत्या करने, लुटने,..ईत्यादी होते. तसेच निंदा पाखंड क्रियाभ्रष्टता, आचारभंगता, भष्टाचार...ईत्यादी दुर्गुणांचा शिरकाव कपटी मायेने काही जनांत बहु प्रमाणात केला होता. यांचा त्रास सद्गुणींना होत होता.

म्हणुनच पंथातील ज्या ज्या मानवांच्या आंगी दुर्गुणांचा शिरकाव होवुन मायेचा फासा ने वेढले होते, त्या त्या मानवांतील दुर्गुण झाटण्यासाठी या कृष्णपुरीच्या तत्कालीन १८ खेत्रीसह इतर सर्व सद्गुणी भक्त लोकांनी प्रयत्न केलेत. या प्रयत्नात त्यांनी शस्त्रांप्रमाणे धारधार अश्या चळवळीच्या ओव्यांचे निर्माण केलेत. या झोंबणा-या शस्त्ररूपी ओव्यांव्दारे ते दुर्गुणीचे कलंक, विषयरूपी फळे ते छाटु लागलेत. त्या त्या कलंकी मानवातील दुर्गुणी कलंक धिराईनं छाटुन, त्यांना निशंःकलंकी बनवण्यांचा प्रयत्न ई.सन.१९५४ ते १९५५ ते लोकसत्ता येईपर्यत करू लागलेत होते.

कृष्णपुरीच्यां चळवळीत भाग घेतलेल्या भक्त लोकांच्या या अथक निरंतर प्रयत्नांला अखेर आदीपुरूष कृष्णाने स्वतंःच्या सत्तेचा मोहर शिक्का मारून त्यांच्या पदरी यश दिले. यशवंताने दिलेल्या यशामुळेच या पंथात बरीचशी समाधानकारक निर्मळता, निशंःकलंकता, लोकसत्ता दया क्षमा शांती ईत्यादी सद्गुण नांदु लागलेत. त्याच्याच प्रयत्नांचे फळ आम्ही चोखत आहेत. धन्य ते चळवळीत भाग घेणारे भक्त लोक !

या चळवळीच्या ओव्या म्हणजे झोंबणारे धारदार शस्त्रें आहे. शस्त्राला जरा जपुनच वागावे लागते. उठसुठ केव्हाही कोठेही काढावे लागत नाही. जेव्हा अत्यंत आवश्यकताच असेल, तेव्हाच शस्त्रे बाहेर काढावे लागते. तोपर्यत आपली शस्त्रे म्यानात अथवा शस्त्रागारात जपुन ठेवावे लागतात. सध्याच काळ हा शस्त्रांना शस्त्रागारात ठेवण्याचा आहे. कारण की : सध्याच्या काळात पंथात ब-याच प्रमाणात समाधानकारक निर्मळता, लोकसत्ता नांदत असल्यामुळे या चळवळीच्या ओवीरूपी शस्त्रे काढण्याची आवश्यकता नाही.

परंतु काळ बदलत असतो. कालचक्र सतत फिरत राहते. म्हणुनच ज्या कोणत्या काळी भविष्यात या पंथात दारू-लता, मासभक्षण, सत्तापिपासु-वृत्ती, हुकुमशाही, विषयभोग, मुजोरी.. ईत्यादी कलंकीत दुगुर्णांचा शिरकाव व अतिरेक होतांना दिसेल, त्या त्या वेळी या झोंबणा-या ओव्या पुनःश्च शस्त्रांप्रमाणे बाहेर निघुन, त्या त्या वेळेचे दुर्गुणां विरूध्द वापरल्या जावु शकते.

म्हणुनच हे चळवळीचे ओवीरूपी शस्त्रे शस्त्रांगारात ठेवुन, त्या शस्त्रागाराची जपवणुक जतन करावी लागते. वज करावी लागते. या चळवळीच्या ओव्याचा भाग इथं फक्त एक इतिहास म्हणुन लिहुन ठेवला आहे. जो इतिहास विसरतो तो इतिहासात झालेल्या चुकां पुन्हा पुन्हा करतो. म्हणुनच त्याच त्याच चुका पुनःपुनश्च होवु नये. या कारणास्तव ईतिहासाचं जतन, पठन करत राहावे लागते. ई.सन १९५४ ते १९५५ ते लोकसत्ता येईपर्यतचा भाग कृष्णपुरीच्या चळवळीचा ईतिहास आहे. यवगपालट रणसंग्राम रक्तपात ईत्यादी पुर्ण अवतार लक्षणाची ही एक खुण आहे. म्हणुनच या चळवळीच्या ओव्या तुमच्या ज्ञानासाठी, ज्ञानवर्धनासाठी, अभ्यासासाठी पठन करण्यासाठी, ईतिहास जतन करण्यासाठी इथं दिल्या आहे. सध्यातरी गायना करता नव्हे !

या शस्त्रागाराच्या किल्या तुम्हा हाती आहे. मनात येईल तेव्हा हे शस्त्रागार उघडुन त्यातील शस्त्रांचा वापर उठसुठ करू नये. अविचाराणे हे शस्त्रे वापरून शांतीमध्ये भंग आणु नका. शस्त्रे वापरण्याची वेळ आली आहे का ? यावर दहा वेळा विचार करून विचारपुर्वक व शांततेने निर्णय घेवुन, हे शस्त्र हाती ठेवुन वेळ पडल्यास वापरावे. एवढीच विनंती.



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥






॥ खंड ०८/भाग ०२ ॥

**॥ कृष्णपुरी उत्तरार्ध ॥**

॥ ओवी नं. ०१ ॥

॥ कृष्णपुरी चळवळ ची ओवी ॥

## ॥ बदलले गाव । कुठ राहान अवधुतराव ॥

॥ बदलले गाव..। कुठं राहानं अवधुत राव ॥घृ॥
॥ पृथ्वीत झालासे कलकोट । कोणी ना पाहे कोणाची वाट ।
मार्ग धरून पळतीन निट ॥ बदलले गाव...
॥ धर्म पंथ पडतीन गट । अवघेच म्हणतीन आमचं मोठं ।
सारे होवुन बसतीन भ्रमिष्ट ॥
॥ धर्म पंथ अवघ मोडा । जगाचे बंधन तोडा ।
एकच मानव धर्म धरा ॥
॥ जिकडे तिकडे होती क्रांती । हरी वाचुन मिळेना शांती ।
याहीचा न्याय करा एकांती ॥ ०४ ॥

॥ फार नवल वाटते आम्हाला । असा कसा गलबला झाला ।
हरी नामाचा खोळंबा झाला ॥
॥ जिकडे तिकडे दारूचा वर्षाव । ठाउक नाही देवाचं नाव ।
कोण्या ठायी उभे राहावं ॥
॥ इकडे नाही तिकडे नाही । कोण्या ठायी लावु नाव माही ।
सत्य सांग विठामाई ॥ ०७ ॥



**॥ कृष्णपुरी उत्तरार्ध ॥**

॥ ओवी नं. ०२ ॥

॥ कृष्णपुरी चळवळ ची ओवी ॥

## ॥ बोलता खोटे..। खोटयाशी देव नाही भेटे ॥

॥ बोलता खोटे..। खोटयाशी देव नाही भेटे ॥ घृ ॥
॥ मुळ स्वभाव तुमचे खोटे । हरीनामाची किमंत ना वाटे ।
तुमच्या तोडांशी आले काटे ॥ बोलता खोटे...
॥ तुमच्या समजाचे मार्ग उलटे । आनंद न वाटता कहर वाटे ।
आंगी मोठेपणांचे ताटे ॥ बोलता खोटे...
॥ आम्ही तुम्हाला नेमतो माठे । जैसे बरडावरचे गोटे ।
जली पाषाणी कोरडे ॥ बोलता खोटे..
॥ समोर येता शरण वाटे । हिशोब देता वाचा खुंटे ।
बसतीन अवधुताचे रट्टे ॥०४॥ बोलता खोटे...

॥ बोली बोलता वटवटे । पक्ष्यां मांजी वटवटे ।
बसतीन आदीभैसाचे सोटे ॥०५॥ बोलता खोटे...

भजने :-
॥ देव देव म्हणतीन जन । देव नाही पाहीला कोणं ॥
॥ देव देव म्हणतीन जन । देव पाहीला काहो कोण ?
खरं सांगा ईमानानं ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग ०२ ॥

**॥ कृष्णपुरी उत्तरार्ध ॥**

॥ ओवी नं. ०३ ॥

॥ कृष्णपुरी चळवळ ची ओवी ॥

## ॥ झाला हीन.. वाफ गमावली शहाण्यानं ॥

॥ झाला हीन..। वाफ गमावली शहान्यानं ।।घृ।।
॥ यवगावर आले भावीक जन । लहाना-मोठयांशी सांगे ज्ञान ।
नाही पाहला चौथा खुम्म ॥ झाला हीन...
॥ आम्हा सांगे समजावुन । लहानपण नाही धरलं कोण ।
अंगी त्याच्या अभिमानं ॥ झाला हीनं..
॥ भडभडा अग्नी पेटला । हांडा दुधाचा उतु आला ।
पारख नाही केली शहाण्या ॥
॥ दुधाचे हांडे भरले तीन । चवथा नाही पाहीला डोळ्यानं ।
नाही घेतले देवाचे नावं ।।०४।।

॥ आली दुधावरत साय । पुढे पाहा मौज कैशी आहयं ।
करून का करता अन्याय ।।०५।।

भजने :-

॥ रात्रं दिवस करे भजन । कृष्णाजी बुवाच्या संगतीनं ।
जन म्हणतीन आला देव । लागतीन पाया..।
नेम करता गेला वाया ॥
॥ रात्रे-दिवस करे भजन । पहुर गावी येणं-जाणं ।
जन म्हणतीन आला देव । होय कोण..
नाम घेताच ............ जाण ॥



**॥ कृष्णपुरी उत्तरार्ध ॥**

॥ ओवी नं. ०४ ॥

॥ कृष्णपुरी चळवळ ची ओवी ॥

## ॥ अभिमानाचा होईन अपमानं ॥

॥ अभिमानाचा होईन अपमान । अभिमान करू नको रे नरा ।।घृ।।
॥ अनामतानं दिले हे नाव । रस्ता सरळ आहे चालनं ।
रस्ता सरळ आहे चालनं ॥ अभिमान करू नको रे नरा..
॥ तुम्ही कोंबडे-बकरे खाता । म्हणे अवधुताचे भजन करता ।
स्वतःलाच देव समजता ॥
॥ तुम्ही दारू-गांज्या पिता । खोटे बोलुन चुका करता ।
मग देवा-देवा करता ॥
॥ देवा सारखा हा जीव । या जीवाला सांभाळुन वागवं ।
अभिमानाची होईन खोड । मग म्हणानं । आहे अवधुतराव ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग ०२ ॥

**॥ कृष्णपुरी उत्तरार्थ ॥**

॥ ओवी ०५ ॥

॥ कृष्णपुरी चळवळ ची ओवी ॥

## ॥ या मायेला हो..। म्हणतो चांडाळीन आता ॥

॥ या मायेला हो..। म्हणतो चांडाळीन आता ॥ धृ ॥
॥ तुला नेमता माया देवता । देवघरी माजवली सत्ता ।
भक्तजन भुलले सोसा ॥
॥ भुल पाडली सर्वत्रा । सावंग पुरीच्या पंडीता ।
तोबा तोबा करते आता ॥
॥ याहीनं वाढवली अहंता । आंगी तिळभर नाही नम्रता ।
कशी पडली देवाशी चिंता ॥
॥ प्रतिपाळ तुमचे हाता । थोर उपकार तुझे आता ।
कशा टाकला मोहनी फासा ॥०४॥
॥ पैदा केला शुरविर खासा । दारूत फसला माकड जैसा ।
याहीला अनामीक म्हणु कैसा ? ॥
॥ याहीला लागल्या दारूच्या लता । खावुन बसले मालमत्ता ।
यवग कारभार चालवन कसा ? ॥
॥ याहीला गवसला भलताच रस्ता । चाकर होवुन बसतीन आता ।
इथं होईन लोकसत्ता ॥०७॥

भजने :-- ॥ द्युत गर्जना । इथं होईन लोकसत्ता ॥ द्युत गर्जना..



॥ ओवी नं. ०६ ॥

## ॥ हे नाही बर..। तुम्ही चला हो पहली पार ॥

॥ हे नाही बर..। तुम्ही चला हो पहली पार ॥ धृ ॥
॥ तुम्ही म्हणता भक्त होय विठोबाचे । खरे सेरूप ओळखा त्याचे ।
जीव का घेता दुस-यांचे ॥ हे नाही बर..
॥ भक्त गेले अभक्त आले । तेही कियाभ्रष्ट झाले ।
उलटया मार्गानं चालले ॥ हे नाही बर..
॥ अशी कशी संत मालीका । याहीला तीन-तीन चार-चार बायका
याहीच्या मागं लागु नका ॥ हे नाही बर..
॥ तुम्ही म्हणता ओळखला देव । भुतापाशी धरता भाव ।
तुमचे देव आणन तुम्हाला खेव ॥०४॥ हे नाही बर...
॥ मेले मुर्दे पुंजता तुम्ही । कधी नाही पाहीले ते हरीच्या नामी ।
हे नाही येणार तुमच्या कामी ॥ तुम्ही चला पहली पार..
॥ मेले मुर्दे होईना जागी । हे नव्हे ऋषि-मुनी योगी ।
कशी भुलवन पडली जगी ॥
॥ एका दिवसाचं लेकरू । त्याचे तुम्ही का बनता चाकर ।
भरला माकडांचा बाजार ॥
॥ तो योगी जागा करा । त्या योग्याशी भाव धरा ।
मोडन तो माकडांचा बाजार ॥०८॥
॥ होईन त्या गणराजाची मेहर । विर उठतीन भुम्मेवर ।
अवघ भाकलं खरं ॥०९॥

**शब्दार्थ** :- खेव आणने = त्रासुन त्रासुन टाकणे. । मुर्दे = मेलेले मानव, मातीत पुरलेला.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग ०२ ॥

॥ ओवी नं. ०७ ॥

॥ कृष्णपुरी चळवळ काळात गायलेली वंशावळी ॥

## ॥ वंशावळी ची ओवी ॥

॥ पेठी-०१ ॥

॥ सांगतो गाही वंशावळी । या महाराजाची ।
हिरे माणीक मोती । खाण रत्नाची ॥ घृ ॥०१॥
॥ कृष्ण देव सांगतो भाव । मानेना कोणी ।
याहीच्या संगतीन तरला । जळगाव चा महामुनी ॥

भजन :-
॥ पेंठी झालीसे एक । पक्की ठोकली देवानं मेखं ॥

॥ पेठी-०२ ॥

॥ कृष्णदेव गेले संतु-चिंतु आले । हरी-गोविंदा पुना ।
त्याहीच्या संगतीनं । तरला हो ईशना ॥
॥ उभा देव पुना, करे गर्जना । त्याहीला देणं ।
संगती संगतीन तरला । कारल्या चा देवमन ॥

भजन :-
॥ पेंठया झाल्यासे दोन । चांगले ओळखा ही रत्नाची खाणं ॥

॥ पेठी-०३ ॥

॥ पुनाजी गेले, राव-साव आले । मोठया मानानं ।
त्याहीच्या संगतीन पलट केली । बाळाजी पाटलानं ॥
॥ आंगी देवपण, त्याहीला देणं । झाले अवघड ।
संगतीन तरला हो । विठोबा-गोपाळ ॥
॥ विठोबाचा शकुन । अग्नीचं सत्य बोलं ।
शिंदखेड-पहुर तिथुन । झालं हरसुलं ॥

भजन :-
॥ पेंठया झाल्यासे तीन । वरकढ झालं हे दस-याचं सोनं ॥

॥ पेठी-०४ ॥

॥ राव-साव गेले, तिनदेव आले । सावंग पुरी ।
जागो जागी लावले झेंडे । भुम्मेवरी ॥
॥ मेघश्याम परशुराम । सुखदेव ।
मद्युपान घेती । नित मौसांसव ॥

भजन :-
॥ पेंठया झाल्यासे चार । कमी झाला त्याहीचा भक्तीचा जोरं ॥

॥ पेठी-०५ ॥

॥ परशुरामाचे चिरंजीव । हिरे चार ।
नित करती हरी नामाचा व्यापार ॥
॥ श्रीराम-आत्माराम । आनंदा आहे धाम ।
यशवंत माझा । करतो मोहीम ॥
॥ सुख देवाचे चिरंजीव । बुवा नाम देव ।
माधव ! कुठ महाराजाच भजन ? नाही ठावं ॥

भजन :- ॥ पेंठया झाल्यासे पाच । सेरूप ओळखा त्या आनंदाचं ॥

॥ पेठी-०६ ॥

॥ मोतीराम साधु प्रितम । अवचित राव ।
उसाच्या संगतीन । ऐरंड वासुदेव ॥
॥ सारंगधर बहु आहे धिर । बाबा अवधुत ।
मोग-याच्या संगती । लाकुड अनामत ॥
भजनः- ॥ पेंठया झाल्यासे सहा । निघुन गेली त्याहीच्या भक्तीची हवा ॥

॥ पेठी-०७ ॥

॥ आले विश्वास नामी उल्हास । उभा पंडीत ।
किसन्या प्रभु साहेब । श्रीधर जगन्नाथ ॥
॥ पेठया सात असं होत होत । आलं आजवरी ।
दारू-मासांचा वर्षाव झाला । सावंग पुरी ॥
भजनः- ॥ पेंठया झाल्यासे सात । आता मोडन दारू-मौसांची साथ ॥

॥ पेठी-०८ ॥

॥ भक्तांची आठवी पेठी । चवथी जोडी । चढवतीन झेंडे ।
आता दिसणार नाही । सावंगपुरी दारूडे ॥
॥ भक्त ईमानी मुखी वाणी । गर्जतीन ।
सावंग पुरी पुढे भक्त । महाभार होतीन ॥

**भजने :-**

॥ तुया पायी घातली मिठी । आता चालव देवा सच्या भक्तांची पिढी ॥
॥ येईन देवाचे दैवत । उभा राहीन देव त्याहीच्या रंगात ॥
॥ रूसलो आम्ही समजाव तुम्ही । लेकरांची आळ ।
लेकरांची आळ । देवा या बिर्दावर उभा राहयं ॥
॥ वचनी उभा राहयं । डोळे उघडुन पाहयं ॥

**-: शब्दार्थ :-**

**पेठी** :- पिढी, । **कंकर** :- दगड-धोंडे, बारीक खडे । **मौसासव** :- मासं/मटन, मद्यपान, तिरगुणी मधुपान ईत्यादी वाईट लता च्या संग चारही वाणीतुन निघालेले चतुर्पतीचे हरीनाम मुखातुन घेणे । **ऐरंड** :- ऐरंडीचे झाड ।



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०८/भाग ०२ ॥

## ॥ कृष्णपुरी उत्तरार्थ ॥

॥ ओवी नं. ०८ ॥

॥ कृष्णपुरी चळवळ ची ओवी ॥

## ॥ कलयवगात संत ओळखा ॥

॥ चव यवगावर संत झाला । अहिन अवतार ॥
चतुर्पतीचा डंका वाजला । सत्याचा कार ॥
॥ जगी आला सांगुन गेला । तो योगी राया ।
कलयवगा मध्ये साधु-संत । करतीन धिंगाना ॥
॥ कैक संत आम्ही पाहीले । बगळ्यांची खाण ।
खोटे ध्यान लावुन, पकडली मासोळी । टाकली पोटात ॥
॥ पैश्या साठी संत महंत । लबाडांची खाण ।
याहीचे दुर्गुण मोठे मोठे । कसे जाईन उडुन ॥०४॥
॥ लहाना पासुन मोठे संत । झाले अनिवार ।
देवादिकांची विक्री कराले । लावला बाजार ॥
॥ ज्ञान-ध्यान विद्या विकुन । अवघा बोंबाटा केला ।
मल विक्षेप आवरेना पोटी । नाशवंत झाला ॥
॥ कलयवगा मध्ये संत पहा । कशी लबांडाची खाण ।
याहीच्या आंगी दुर्गुण सारे । तुम्ही राहाव जपुन ॥
॥ दुरून केले येणे आम्ही । याहीचे वैराग्य पाहुन ।
हंस न दिसता, बगळा निपजला । पस्तावले मनं ॥०८॥
॥ कोण्या देवानं पैदा केली । ही व्दैत-भुताची खाण ।
जागो जागी यात्रा भरवुन । याहीनं भुलवले जन ॥
॥ वाजवा टाळ शोधुन पाहयं । भक्तीची रीत ।
लबाडी मुळे याहीची कशी हो । चुकन चौ-यांशी ॥
॥ सावंग पुरी संत जन्मला । कृष्ण परवेशी ।
चव यवगाचे सुत्र घेवुन । आले हाती ॥११॥

भजने :- ॥ चव यवगाचा सुत्रधारी । कृष्ण राया ।
यान तारू केली पृथ्वी । अवघे जीवाजना ॥



॥ ओवी नं. ०९ ॥

॥ कृष्णपुरी चळवळ ची ओवी ॥

## ॥ भाव नाही भक्ती नाही ॥

॥ भाव नाही भक्ती नाही । सदा काळी निंदा ।
सदान् कदा कुरकुर करी । रिकामा धंदा ॥
॥ भाव नाही भक्ती नाही । अंतरी कपट ।
हरी भजनाची नाही गोडी । चाले तिरपट ॥
॥ मनात खोटे दिसता मोठे । आहे बगळ्याची जात ।
दिसली मासोळी पकडुन घेतली । टाकली पोटात ॥
॥ पोटात ब्रॅन्डी आणीक अंडी । खाता डुकराचे मास ।
अभिमानाचा भरला ताण । भजन करतो म्हणे भैसाचं ॥०४॥
॥ जुगार खेळता गांज्या पीता । करता बंडाळी ।
अवधुताचा नव्हे तो भजनी । होय पुर्विचा चांडाळी ॥

॥ भजन करता जन्म गेला म्हणे । वर्षे झाले साठ ।
अमृताचा रस नाही भेटला । फुकट गेले कष्ट ॥
॥ हरी नामाची करा हो शेती । होय पुर्विच नात ।
पण याहीच्या पोटी कुजात जन्मली । शेती पाडली पडीत ॥
॥ कुणी नाही गुरू कोणाचा । कुणी नाही चेला ।
नाही कळले भजन अंतरी । नाश संगतीन केला ॥ ०८ ॥
॥ आंगी भरले दुर्गुण सारे । जन्म जन्मांतरी ।
टाळ वाजवुन पिठ पाडले । देव राहीला दुरी ॥
॥ आदीपुरूषाच भजन होय । ऐका हो तुम्ही ।
देहे-जीवांचा तरण उपाय । एकटयानं घेतली हमी ॥ १० ॥

भजने :--॥ मानवा भुलु नको रे संसारा । कर हरीनाम सोयरा ॥ मानवा
॥ मानवा कसा भुलला । कसा भुलला । देव तुमच्या जवळुन गेला ॥

-: शब्दार्थ :-

ब्रॅन्डी = इंग्रजी दारूचा एक प्रकार. । कुजात = वाईट जात । पिठ = बारीक पावडर, ज्वारीचे पिठ । अंडी :- कोंबडी पक्ष्याची अंडे । तिरपट :- तिरप्या मार्गाने, वाम मार्गाने, वाईट मार्गाने जाणारे ।



॥ ओवी नं. १० ॥

॥ कृष्णपुरी चळवळ ची ओवी ॥

## ॥ तिरगुणांचा भ्रम सोडा ॥

॥ तिरगुणांचा भ्रम सोडा । भजा चतुर्पती ।
तिन यवग गेले शुन्यात । काहीनाही लागलं हाती ॥
॥ तिरगुणांच्या मागे लागता । तीन यवग गेले ।
सहाही शास्त्र ग्रंथ वाचता । योगी-मुनी थकले ॥
॥ थकले पंडीत थकले ज्ञानी । थकले पाखंडी ।
आडरानात हिंडत बसले । निंदा बसली तोंडी ॥
॥ निंदकाची झाली दाटी । घरा दारात ।
असुराचे भरले वाडे । जागा नाही देवळात ॥ ०४ ॥
॥ तीन गुण सहा विकार । छत्तीस पाखंड ।
व्दैत पाखंडी भरून उरले । नव खंड ॥
॥ गुलाब-शेवंती जाई-मोगरा । सुगंध घ्या पोटी ।
पण काही चिलाटी बेसरमाची । मोठी झाली दाटी ॥
॥ रक्त पिउनी मस्त बनले । कागांची जात ।
नजर करून तिरपी पाहती । हेडा याहीच्या तोंडात ॥
॥ जादु-टोणा वैद-वाणी । खेळता जुगारी ।
अन्य जीवांचे पैसे घेवुन । केली प्राणहानी ॥ ०८ ॥
॥ कामधेनु गाय घरी । नाही पिले दुध , नाही मागीतले दुध ।
पण ईच्याच पोटी गोचीड बनुन । तोडी लावले रक्त ॥०९॥

भजने :- ॥ देव प्रेमाचा बांधला । आंगी हरी राबवला ॥
॥ ऐसे कैक आहे प्रमाण । भक्ताला दिले या देवांन देणं ॥
॥ भाव धरा व्दैत सोडा । भाव धरा दोहीत सोडा ।
या देव रायाशी नाते जोडा ॥

शब्दार्थ :- हेडा = हल्या, हेला । गोचीड = अंगाला चिकटुन रक्त पिणारा किटक.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग ०२ ॥

**॥ कृष्णपुरी उत्तरार्ध ॥**

॥ ओवी नं. ११ ॥

॥ कृष्णपुरी चळवळ ची ओवी ॥

## ॥ कोण्या देवाचं भजन करता ? ॥

॥ कोण्या देवाच भजन करता । तुम्ही जन लोका ।
कुठं लटकला देव तुमचा । सांगा ना आता ॥घृ॥०१॥
॥ हात नाही पाय नाही । आहे लुंडमुंड ।
रूप नाही रंग नाही । कसं पाहान तोंड ॥
॥ येईन येईन म्हणता बसले । चित्तमन लावुन ।
कोण्या रस्त्यानं येणार आहे । दया तुम्ही सांगुन ॥
॥ आले जीव झाले देव । तुम्हास मालुम ।
सर्व घटी भरला राया । कशी पडली फाम ॥०४॥
॥ चमत्काराला नमस्कार । करतो लवुन ।
गुरू आमचा आदीमुनी । शिकवितो ग्यान ॥

॥ दारूडयांला शरण गेले । दारूडी झाले, पाखंडी झाले ।
दिवा पालवुन अंधार केला । हीन होवुन बसले ॥
॥ होती नव्हती सारी गमावली । दारूच्या पाई ।
आचार-विचार जरा पहान तर । तोही सुदा नाही ॥
॥ ख-या देवाची पडली भ्रांत । पाषाण पुंजतां ।
गोटया सारखे जड तुम्ही । गुंग झाले आता ॥०८॥
॥ ख-या देवाची पडली भ्रांत । मुडदयावर चित्त ।
पुंजता-पुजंता मुडदे झाले । पडले भ्रमात ॥
॥ जेजे गेले कधी ना बोले । वेडा तुमचा भाव ।
सोहंम् रूपाचा उभा धनी । भजा अवधुत राव ॥
॥ भोळी भाबडी वेडी गडेहो । तुमची भावना ।
जागो जागी बडवे म्हणती । दक्षणा दयाना ॥
॥ कसा तुमचा देव गडेहो । कसा तुमचा भाव ।
तुमचा तुम्हाला विसर पडला । हे नाही ठावं ॥१२॥
॥ जीव-हत्या किया-भष्टता । भंगले आचारा ।
नाही तत्वांची सुद-बुध । चौ-यांशी फेरा ॥
॥ दुस-यांचे जीव घेता । शक्ती वाढवता ।
तोंडी हेडा ईतबार थोडा । भाव दाखवता ॥
॥ घडलं पाप कैस साफ । ते होईन आता ।
कळुन करता अन्याय । त्याचा, देव नाही दाता ॥
॥ भक्ती करा देही झीजवा । नका आणु तोटा ।
केली कमाई वाहुन जाईन । पाण्याच्या लोटा ॥१६॥
॥ भजन पुजन कर्त्या देवाशीं । देता भुलथापा ।
डोळे मिटुन हाका मारता । स्वर्गिच्या बापा ॥
॥ भजन पुंजन करा देवाचं । धरा सत्य भाव ।
याच देहीत प्रकट होतो । आत्माराम देव ॥

**भजन** :- ॥ यवगा यवगीचा आत्माराम । त्याची किर्त महीमा जगात वाढवण

**शब्दार्थ** :- फाम= फासा । ईतबार = विश्वास, ईमान

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग ०२ ॥

॥ ओवी नं. १२ ॥

॥ कृष्णपुरी चळवळ च्या ओव्या ॥

# ॥ जिकडे पाहता तिकडे दिसेना कृष्ण माउली ॥

॥ जिकडे पाहता तिकडे दिसेना । कृष्ण माउली ।
याहीच्या मुखची अमृत वाणी । झाकल्या गेली ॥
॥ अमृताचे झरे व्दैतानं । कैसे बुडवीले ।
याहीच्या घरा मध्ये सांड । दारूचे लागले ॥
॥ दारू पिता खाली पडता । खाता ठोकर ।
दारू उतरल्यावर म्हणता । आम्ही चतुर ॥
॥ दारूचे घुटके वरतुन तोंडात हेडा ।
दारूच्या नशेत काय बोलता । सांभाळा वाचा ॥०४॥

॥ हात या धरून मजला । बसवलं मांडी ।
चतुर्पतीचा लेश नाही । ताल तोडे बॅंडी ॥
॥ बॅंडी चा ताल तोडे । कणगी तु-यात ।
तमास गीर बसले गडेहो । या हरीनामात ॥
॥ तुम्हा पाहीजे अंडी-रंडी । आणीक बॅन्डी ।
तुमचा अधिकार नाही । या अवधुताच्या मांडी ॥
॥ तुम्हीच म्हणता आमच खरं । घ्या तुम्ही ऐकुन ।
अवगुणां मध्ये कसला देव । पहा पुराण ॥०८॥

॥ मुळ यवगाचे गुण प्याल्याचे । सांगे तुम्हास ।
प्याला लबाडीनं पाजला म्हणुन । झाला तिरभवनी नाश ॥
॥ चैत्यनीनं प्याला पाजला । भैस उलाटला ।
सत्ता दिली दोहीतांना । मागे राहीला ॥
॥ या प्याल्याने वेद पाडले । याहीच्या मुखचे ।
तुमचा काय होईन केव्हा ? चाकर तिरभवनाचे ॥
॥ हात जोडुनी तुम्हा विनविते । माना वचन ।
दारू दया सोडुन । आंगी, आणा लिनतापण ॥१२॥

॥ हात जोडुनी तुम्हा विनविते । आणा सत् यवग ।
आणा सत् यवग । चढवा भैसाचं निशाण ॥१३॥

भजने :-
॥ सत् यवगाची गाही । दयाहो महाराजा या देही ॥

-: शब्दार्थ :-

**खाल्या पडता** = खाली पडता. । **कणगी-तुरा** = कणगी-तुरा या नावाचे वाद्ये. **हेडा** = हेला, माजावर आलेल्या म्हशीचा कामापुरता नवरा. । **सांड** = सडा, सांडलेल्यांचा दांड. । **तमास गीर** :- तमाशा दाखवणारे आणी तमाशा पाहणारे तमास गीर लोक ।

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग ०२ ॥

**॥ कृष्णपुरी उत्तरार्थ ॥**

॥ ओवी नं. १३ ॥

॥ कृष्णपुरी चळवळीच्या ओव्या ॥

## ॥ झालो दादा मी आंधळा ॥

॥ झालो दादा मी आंधळा हो..। देव दिसेना डोळा ॥ धृ ॥
॥ कोणी कडुन येवु । कोणी कडे जावु ।
दोन्ही डोळयांनी अपंग बहु । कसे मी हरी रूप पाहु ॥ झालो
॥ चौ-खाणीत केलं येणं-जाणं । आजुबाजुला मायबाप दोन ।
कशी पडली भुलवन । देव दिसेना डोळा ॥ झालो दादा...
॥ कोण्याएका दिवशी आवाज आला । सावंगपुरचा रस्ता धरला ।
वसुदेवाशी प्रश्न केला । देव दाखवाना या डोळा ॥
॥ तेली-डांगरी करून गोळा । कणगी-तु-याचा झोकला पोवाडा ।
दारूनं केला खेळ-खंडोबा । देव दिसेना डोळा ॥०४॥
॥ दारू पाई झाला नासोडा । कधी मिळेना ब्रम्ह सावळा ।
आतातरी दारू सोडानां । देव दिसेना डोळा ॥
॥ दारूचं महात्मं वाढवले भारी । पेल्याबिन न राहे कोणी ।
बुडवली दुनिया सारी । देव दिसेना डोळा ॥
॥ दारू पिउन लोळतीन जन । सावंग पुरात हे कारकुन ।
सांगा देव पाहीला का कोणी ? देव दिसेना डोळा ॥
॥ सावंग पुरचे कृष्ण मुरारी । पुन्हा-पुन्हा देव नवा कार करी ।
तारण पृथ्वी सारी । देव दिसेना डोळा ॥०८॥



॥ ओवी नं. १४ ॥

## ॥ सावंगपुरकी साळुबाई ॥

॥ सावंगपुरकी साळु बाई । बिरद छोडके भाग गई ।
बाहर निकली ताराई । बहु नही किया धिंगाना । सावंग पुरमे पागल खाना
॥ सावंगपुरम बैढी ईनाई । अभितक कितने हेले कटवाई ।
अत्याचार हो गया बाई । सावंगपुरी..., अन्याय किया भारी ॥
॥ मट्टीकी मुर्ति भोलीभाली । कभी ना कुछ खाणे वाली ।
जगहपर चुपचाप बैढी भोली । कभीना बोले, भक्तजनके पेट फुले
॥ कोण बेवकुफ तेरा पुजारी । कितनी फैलायी बेकारी ।
आयी किसनजीकी सवारी । लपटे बिस्तरा.,तेरा काल भरगया पुरा
॥ सावंगपुरमे बैढी ईनाई । अभितक कितने बकरे खाई ।
मुर्गोका गणीत नही । अंधेर नगरी.., बोले आवो सावंगपुरी ॥
॥ पत्थरके देव पुंजनेवाले । तुम्हारी ऑख कभि ना खुले ।
भगवत कभि ना मिले । ख्याल रखना, तेरा चौ-यांशी ठिकाणा ॥
॥ सावंगपुरमे बैढया दैवता । बेवकुफ लोक कहती माता ।
भगवत का नही पत्ता । देखो भैया.., सब डुब गयी दुनिया ॥
॥ ताराई-ईनाई भाग जाना । सब बदल गया जमाना ।
अभि तुम्हारा ठाणा-ठिकाणा । उठ जायेगा, धनी बिरदपर आयेंगा ।

**भजने** :- ॥ धनी येईन यवगाचा । हिशोब घेईन हो तुमचा ॥

**शब्दार्थ** :- ताराई =.तारा+आई =.तारणारी आई. । ईनाई=ईना+आई =.शंकराची साळी, जीला दारू-मासांचा भक्ष्य पाहीजे/आवडते ती देवीमाता.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग ०२ ॥

**॥ कृष्णपुरी उत्तरार्ध ॥**

॥ ओवी नं. १५ ॥

॥ कृष्णपुरी चळवळ ची ओवी ॥

## ॥ सुटले सावंग्याचे दलाल ॥

॥ सुटले सावंग्यात दलाल । कोंबडे-बकरे करती हलाल ।
मागते दारूचे बॉटल । देवु नका.. त्यांच्या तोडांवर थुंका ॥
॥ सुटले सावंग्यात बडवे । हाती घेवुन पानाचे विडे ।
याहीचं लक्ष्य भलतीकडे । येवु देवु नका, त्यांच्या तोंडावर थुंका
॥ सुटले सावंग्यात गुंडे । हाती घेवुन दगड-धोंडे ।
भावीकाशी मारते दंडे । भिउ नका, त्यांच्या तोंडावर थुंका ॥
॥ सुटले सावंग्यात मवाली । सफेद कपडे खिसे खाली ।
भावीकांची दैना केली । भोळे राहु नका, त्यांच्या तोंडावर थुंका

॥ पृथ्वीत पडला डाका । त्रास देती भावीक लोका ।
भक्त जनांशी करते धोका । डोळे लावु नका, याहीला मारा लाथा
॥ नकटा बाजार भरवीला । त्यामध्ये विराळा नाक वाला ।
त्याला होय म्हणती चेला । होवु नका, त्याच तोंड पाहु नका ॥
॥ बगल-बच्चे भावीक लोका । उपदेश करते एकामेका ।
म्हणते कृष्णपुरी जाउ नका । ऐकु नका.. ॥
॥ किती सांगु या दुर्जनांच्या चुका । ऐकुन घ्याहो जनलोका ।
खर सांगतो आता । लटकं मानु नका..॥०८॥

॥ झाल्या भावीकाच्या हाका । चिंता पडली त्या मालका ।
जागी झाला कृष्ण सखा । पुढे होणार नाही धोका ॥
॥ जागी व्हारे भावीक लोका । अवतरला माझा सखा ।
अशी नाही येणार घटका । जागी झाला कृष्ण सखा ॥
॥ भजा हा प्रभुदेव नायका । याहीनं बसवली व्दारका ।
उठला सिदाईचा भडका । जागी झाला कृष्ण सखा ॥
॥ भजा प्रभुदेव नायका । घ्याहो अमृताचा घुटका ।
कृष्णपुरी कोरी भुम्मका । उभा आहे इथं माझा सखा ॥१२॥

॥ चला पाहु कोरी भुम्मका । आदीमुनी-महामुनी सखा ।
याहीच्या मुखचे शकुन ऐका ॥

भजने :-
॥ अशी आहे या व्दैतांची रित । भोळेपणान जावु नका तिथं ॥
॥ अशी आहे या व्दैतांची रित । भंग सांगीतला तिथं ॥

-: शब्दार्थ :-

**दैना** = हीन-दीन अवस्था. । **डाका** = दरोडा. । **लटकं** :- खोटे, असत्य
**घटका** :- वेळ, समय । **घुटका** :- पाण्याचा घसात उतरलेला एक घोट

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग ०२ ॥

॥ ओवी नं. १६ ॥

॥ कृष्णपुरी चळवळ च्या ओव्या ॥

## ॥ तुम गया सो हम गया ॥

॥ तुम गया तो हम गया । हम गया तो तुम गया ॥घृ॥
॥ सावंगपुरमे गर्दि किया । ब्म्हरस नही पिया, तेरी कौण भलाई रे ॥
॥ मच्छीका गठ्ठा शिरपर ले गया । बडा पुजारी उसको खिलाया
छोटा पुजारी उसने पढाया ॥
॥ सावंगपुरमे भर गया मेला । सब है शराब पिने वाला ।
पिया भक्तन का झुटा प्याला ॥
॥ शराब पिके पागल हो गया । सारी रात ढोल बजाया ।
कबरस्थान खडा नही किया ॥०४॥
॥ सारी रात ढोल बजाया । बजाते-बजाते थक गया ।
शराब पिके निकल गया ॥
॥ यहा क्या लाया, तो कुछ नही लाया । जैसा गया वैसा आया
खुदा का दर्शन नही पाया ॥
॥ सावंगपुरके इश्वर बंदे । फुट गयी ऑखे, हो गये अंधे ।
तुम खुद ही हो गये गंदे । मुहं काले, ईन्सानी कभी ना मिले ॥

शब्दार्थ :- मच्छीका गठ्ठा = मासोळींचे गाठोडे । झुटा=उष्टा । कबरस्थान = स्मशानघाट । खुदा =खुद होकर खडे रहनेवाला, आपरूप उभा राहणारा परमात्मा भैस



॥ ओवी १७ ॥

## ॥ ये वो ये वो विठामाई ॥

वरभजने :-।। येवो येवो विठामाई । वेळोवेळीची आई ।
हाती काम मुखी नाम । घेतो लवलाही ।।
।। दसरा मांडवस यात्रा भरते, सावंग्याच्या ठाई । कहिक बसले देव ध्यानी, पुर्विची पुण्याई

॥ दसरा मांडवस यात्रा भरते । सावंग्याच्या ठाई ।
कहिक दारू पिउन लोळती । सांगती भलाई ॥
॥ कसलं भजन कसलं पुंजन । दारूडयांची घाई ।
कहिक म्हणती येल-बेल । सुचेना ओवी ॥
॥ मानव निती सांगतो आम्ही । मानेना कोणी ।
तेली-डांगरी आम्हा मारती । अपराध नसुन काही ॥
॥ तिर्थयात्रा अनुष्ठानं । देवाची मनाई ।
सर्वच आहे इथ गडेहो । महाराजाची गाही ॥०४॥
॥ सावंगपुरी देव आहे म्हणता । विठ्ठल-रूक्माई ।
अजुन कोणी नाही पाहीला । वर्षे झाले लई ॥
॥ करू गेलो पाहु गेलो । तिथे काही नाही ।
जाता जाता आम्ही शिणलो । दारूडयांच्या पाई ॥
॥ सावंग-जळगाव सर्वच पहा । या देही ।
मन मंदिरी इथं नांदतो । अवधुत बादशाही ॥

भजने :- ।। देहेतील जीव नाही ओळखला कोण । तिर्थ करता वाया गेला ।।
।। देहेतीन जीव नाही ओळखला ज्या प्राण्यांनं । केले तिर्थ गेले वाया, झाला हीन ।।

शब्दार्थः- येल-बेल= आडवं-तिकडं, वेडे-वाकोडे, हेकोडे-तेकोडे, इकडचं-तिकडें. लई = खुप, पुष्कळ, भरपुर ।

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०८/भाग ०२ ॥

**॥ कृष्णपुरी उत्तरार्ध ॥**

॥ ओवी नं. १८ ॥

॥ कृष्णपुरी चळवळ ची ओवी ॥

# ॥ ईकडुन गेला तिकडुन गेला ॥

॥ ईकुन गेला तिकुन गेला । झाला भ्रमिष्ट ।
चैत्यन्येची भुलवन । याला नाही , गवसे वाट ॥
॥ सोडलं सावंग, लपला कृष्णपुरी आड ।
संगती महाराजाच्या । नाही ओळखला खेळ ॥
॥ महाराजाच्या संगती पुंजन खावुन । सत् ढळला ।
व्दैताची खाण शेवटी बेईमान झाला ॥
॥ बारा वर्षे मुरू घातली । गारगोटी पाण्यात ।
नाही झाली थंडी । शेवटी, आग पोटात ॥०४॥

॥ हंस आणी बगळा दोघांच । सेरूप एक आहे ।
हंस वेचतो मोती । बगळा मासोळ्या पाहे ॥
॥ देवा पुढचा नैवेध खावुन । बेईमान झाला ।
कृष्णपुरीच्या पाया पडुन । व्दैतपुरीत घुसला ॥
॥ व्दैतपुरी मध्ये तो पुर्विच बदनाम झाला ।
व्दैतपुरीचे गुंडे मारती । हे ठावुक मजला ॥
॥ व्दैतपुरीची महाभवानी । त्याला प्रसन्न ।
होती नव्हती त्याची माणुसकी । गमावली ईनं ॥०८॥

॥ कृष्णपुरीचा दलाल गडेहो । व्दैतपुरीमध्ये घुसला ।
जमा-पुंजी काही नाही नेलं । अवघेच विसरला ॥
॥ या जगाचे रक्कम अनामत । घेवुन गेला ।
व्दैतपुरीचं राउळ होईन । हे लावन त्याला ॥
॥ समाजाशी धोका दिला । धोकेबाज झाला ।
खरं नेमा लटकं नेमा । मालुम अवघ्याला ॥
॥ ईकडुन गेला तिकडुन गेला । शत्रु तमाचा ।
हाती पुडी लंपट गडी । प्रेम शक्तीचा ॥१२॥

भजने :-
॥ थकन थकन माया चैत्यन्य । या तिरलोक्याचे गुणं
तिरभवनाच्या लोकांचे थकतीन गुणं ॥

-: शब्दार्थ :-

गवसने = सापडने मिळवणे मिळणे. । तमाचा = त्रिगुणांपैकी तम तामसी गुण.



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०८/भाग ०२ ॥

**॥ कृष्णपुरी उत्तरार्ध ॥**

॥ ओवी नं. १९ ॥

॥ कृष्णपुरी चळवळ ची ओवी ॥

## ॥ भजन सोडुन भगोडा झाला ॥

॥ भजन सोडुन भगोडा झाला । कोल्हा दरीत घुसला ॥
॥ भगोडा झाला पळुन गेला । तो काय तारण आम्हाला ॥
॥ जो भगोडा झाला तोही । आमच्या नात्यात कोणी नाही ॥
॥ ज्याच्या हाती आहे टाळ । त्याचाच अधिकार आहे ॥०४॥
॥ ज्याच्या हाती आहे टाळ । तो देव भक्त देवभाउ होय ॥

भजने :-

॥ देवा भावाची संगत । त्याची मला लागो लाथ ॥
॥ देवा भावाचा शेजार । आल्या जन्माचा होईन उध्दार ॥
॥ नामी उध्दार सांगतला । तारा साठी देवानं अवतार धरला ॥



**॥ कृष्णपुरी उत्तरार्ध ॥**

॥ ओवी नं. २० ॥

॥ कृष्णपुरीच्या चळवळीच्या ओव्या ॥

## ॥ उदासले मन ॥

॥ उदासले मन । सोडलं सावंग ।
पुन्हा धरला रंग । अवतारांनं ॥
॥ सावंग जळगाव । जागोजागी पेणं ।
आता केलं येणं । कृष्णपुरी ॥
॥ कृष्णपुरी नगरात । काय झाली माव ।
उभा आहे देव । अवधुत राव ॥
॥ कृष्णपुरी नगरात । काय झाली मात ।
पुर्विचं हे नातं । होतं त्याचं ॥०४॥

॥ कृष्णपुरी नगरी । कोरी ही भुम्मका ।
कृष्णाची व्दारका । या भुम्मेवरी ॥
॥ कृष्णपुरी नगरी । आमची तिर्थ काशि ।
लक्ष्य पाया पाशी । सदोनित ॥०६॥

भजने :-

॥ लक्ष्य तुया पायाचे ध्यानं । हेच मागतो महाराजा मागणं ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०८/भाग ०२ ॥

**॥ कृष्णपुरी उत्तरार्ध ॥**

॥ ओवी नं. २१ ॥

॥ कृष्णपुरी चळवळ च्या ओव्या ॥

## ॥ पहा या सावंग्याचे सुखः ॥

॥ पहा या सावंग्याचे सुखः । सांगुन गेला धनी एक ।
याच्या उलट झालं दुःख । असं का झालं, यवग धर्माचं बुडालं ॥
॥ आम्ही सावंग्याशी येत का नाही । तुम्ही मानवात नाही ।
तुमची दारू करते घाई । पुढपुढं.., कितीक ऐकावी बडबड ॥
॥ सावंग्याशी या म्हणता । दारू पिउन मागं धावता ।
शुर झाले म्हणता आता । आपुल्या इथी.., कुत्रे वाघावर धावती ॥
॥ काही नसुनीया अपराध । दारू साठी करता सावध ।
कोण्या देवाची औलाद । जम्मा झाली..,बादशाही भंगा गेली ॥०४॥
॥ तुम्ही म्हणता देव पाहाना । सारा भुतांचा कारखाना ।
निघुन गेला सावळा राणा । तिथ काय ? दृष्टी संवारून पाहयं ॥
॥ निघुन गेला ऋषिकेशी । बिमारी आली सावंग्याशी ।
आम्ही पाजतो दवाई त्याशी । पेत नाही.., म्हणे कडु आहे लई ॥
॥ कडु प्याल तेव्हांच होईल बरं । नाहीतर डुबले समजा घर ।
खाली करा रोगांचे भर । झाले कमजोर.., कसं गमावले शस्त्र ॥
॥ बांधा कंबर निघा बाहेर । हाती नामाची तलवार ।
आदीमुनी-महामुनी बराबर । करा लढाई..सत्यवगाच्या समयी ॥०८॥
॥ तुम्ही होवुन बसले कमजोर । आम्ही वाढवलां विस्तार ।
पुढे कोणीनाही करणार जोहर । सांगतो खरं, मगहोईन तुमची हार
॥ किलुडी करता वाया गेले । बहु यवग गुन्हेगार झाले ।
श्रीकृष्णाचे शकुन चांगले । चुकणार नाही, दिवस आला आपल्या ठायी ॥
भजने :- ॥ सत् यवगाचे परमाण । महाराजा जागी करून दाखवनं ॥



॥ ओवी नं. २२ ॥

## ॥ कलजुग बदल गया ॥

॥ कलजुग बदल गया । समया आगे.. कदम डाल भैया ॥घृ॥
॥ पुर्व क्या फौजा पश्चिम मे गया । चारो तरफ लढाया हो रहयां ।
सेनापती घबरा गया ॥
॥ रणमे हो रहयां लढाया । उसमे बिगुल बज रहयां ।
सेनापती भाग गया ॥
॥ बाहर निकलो सेनापती राया । सैनिक देखते तुम्हारी राहं ।
कैसा महामुनी हो गया ? ॥
॥ बिचमे हमारा जहाज अड गया । मै तो बहुत अडचण मे आया ।
चारो तरफ है दरिया ॥०४॥
॥ चारो तरफ अंगार लगाया । मै तो जलकर खाक हुऑ ।
मेरी किस्मत सो गया ॥
॥ अभि सब बदल गयी दुनिया । उसको कोण संभाले भैया ।
मेरा दिमाग आउट हो गया ॥
॥ तुमने मुझसे वादा किया । टाईम आनेसे भुल गया ।
अभि हमारा घात हो रहा ॥
॥ तुम तो मोहब्बत मे फसं गया । अंबर कर लेना काया ।
जग मे हो जावो महामुनी राया ॥०८॥

॥ खंड ०८/भाग ०२ ॥

**॥ कृष्णपुरी उत्तरार्ध ॥**

॥ ओवी नं. २३ ॥

॥ कृष्णपुरीच्या चळवळीच्या ओव्या ॥

## ॥ मंदिरी गेला ॥

॥ मंदिरी गेला..। मी सांगत होती त्याला ॥धृ॥
॥ मंदिरात करते भजन । बुंडवलं झोपेचे साधन ।
वाट पाहता झाली माझी घाणं । दुःख मनाला..॥ मी सांगत..
॥ मंदिरात आया-बाया । श्यामसुंदर माझा गणराया ।
किती सांगु पडते पाया । धुंद झाला.. ॥ मी सांगत..
॥ झडपा घालते घारीच्या वाणी । कसा उचलु माझा महामुनी ।
कोणीतरी करून दयाना मोहनी । सांगे जगाला..॥
॥ यांच्या माग गोगांटा आहे । याच कसतरी करू काय ? ।
प्रसन्न होजो भवानी माय । नवस केला.॥०४॥ मी सांगत..
॥ कृष्णपुरीचा मुकुट फोडला । महाराजाचा ध्वज तोडला ।
ईच्छेचा आगुर मांडला । फितुर केला..॥ मी सांगत..
॥ ताकातुन काढले लोणी । आता म्हणे झाली माझी वाणी ।
केली त्या महामुनीची हानी । आनंद झाला..॥ मी सांगत..
॥ काय सांगु महामुनीची मात । याचा झाला गर्भि घात ।
चांडाळणीनं पालवली ज्योत । अंधार केला..॥ मी सांगत..
॥ आमचा बुडाला महामुनी । झाला मायेच्या अध्यानी ।
घेत नाही अमृत वाणी । हिशोब चुकला..॥०८॥ मी सांगत..
॥ आमचा महामुनी झडपला । घेवुनीया पहुर गावी चला ।
करूणा येईन त्या योग्याला । अश्या समयाला.. ॥ मी..
॥ शक्ती आहे बलवंत । महा-महा लंपट झाले त्यात ।
उपदेश केला मारा लाथ । अश्या शक्तीला..॥१०॥ मी सांगत.

भजनेः- ॥ थकन थकन माया चैत्यन्यं । तिरभवनाच्या लोकांचे थकतीन गुणं ॥
॥ थकन थकन माया चैत्यन्यं । हे होणार आहे, जरा नाही चुकणार ॥



॥ ओवी नं. २४ ॥

## ॥ कोई बिचारा मान करे ॥

॥ कोई बिचारा मान करे । कोई बिचारा फत्तर मारे ।
सब भगवत के है प्यारे । आनंद भरे आनंद भरे ॥
॥ कोई कहता है भैया-भैया । किसने मुहं पर गाली दिया ।
मान अपमान दुर किया । फल पाया बा फल पाया ॥
॥ कोई कहत है योगी आया । किसने बेदम मार दिया ।
सब भगवत तेरी माया । तेरी छाया बा छाया ॥
॥ कोई बातो की फिकीर नही किया । बहुत मुसीबत सहन किया
आगे आगे कदम बढाया । मंदिर आया बा आया ॥०४॥
॥ बकने वाले को बकने दिया । उसने अपना काम किया ।
पहली पार निकल गया । सुखः पाया बा पाया ॥
॥ उलटा-सिधा जगत् पसारा । योगी हमारा हो गया न्यारा ।
शिरबंद को तारा । धनी मेरा बा मेरा ॥

भजने :-॥ भगवत भजन कर ले भैया । अंबर हो जायेगी तेरी काया ॥
॥ भगवत भजन करले भैया । पडे तन घटमे उजाले, उसमे किसनजी है रे

॥ खंड ०८/भाग ०२ ॥

**॥ कृष्णपुरी उत्तरार्ध ॥**

॥ कृष्णपुरी उत्तरार्ध ॥

॥ ओवी नं. २७ ॥

॥ कृष्णपुरी चळवळ च्या ओव्या ॥

## ॥ पंच्चावनीचा आला दसरा दिन ॥

॥ ई.सन एकोन्नीशे पंच्चावन । आला दस-याचा दिन ॥घृ॥
॥ सन एकोन्नीशे पंच्चावन । आला दस-याचा दिन ।
आमचं उल्हासलं मन । गेलो सावंग्या कारण ॥
॥ धन्य तो पुण्यवान दिन । नाही वाहु दिलं देवाला सोनं ।
नाही करू दिले देवदर्शन । माग लागलं भुतांगण ॥
॥ वासुदेवाचा पैजांरा । तेली-डांगरी फिरे गरगरा ।
योगी आणला दरबारा । याहीनं झोकला हो कणगी-तुरा ॥
॥ तेली-डांगरी करे तडतड । करे बडबड, भक्तांसमोर ।
मोडा कृष्णपुरीचा खेळ । आम्हाला वाटते मळमळ ॥०४॥

॥ तेली-डांगरी हरामखोर । भक्तांसंग करे विचार ।
कृष्णपुरी गर्दि फार । याहीला दिसत नाही बरं ॥
॥ तेली-डांगरी सांगे मंतर । खिश्यात रूपये घातले शंभर ।
तुम्ही आम्ही देवांचे लेकरं । याला मासं चारा, आमच्या
समोर । याला दारू पाजा, आमच्या समोर ॥
॥ कृष्णपुरीचा नवा कार । दारू-मांसाचा करे इन्कार ।
असुन जातीचा महार । आम्हा सदा म्हणतो दुर ॥
॥ ऐकुन दुर्जनाची मात । भावीकाचा धरला हात ।
दारू संग खावे मांस । तेव्हाच म्हणु आमची जात ॥०८॥

॥ धिक्कार असो तुझ्या जातीला । तुझे सुखःसोहळे नको मजला
पुन्हा नाही येणार सावंग्याला । भक्तांसंग बोल केला ।
भावीकानं बोल केला ॥
॥ कृष्णपुरी झेंडा लावला । अवधुत-अवधुत नाम गर्जला ।
याहीच्या सुमरनी रघुपती आला । मेळ गोपाळांचा झाला ॥१०॥
भजने :- ॥ नेवु बसवले । गोपाळ... कृष्णा अक्षर पाहयं ॥ नेवु बसवले.
॥ नेवु बसवले । अन्जान.. कृष्णा शिकवन ऐस ग्यानं ॥ नेवु ..



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ ओवी नं. २६ ॥

**॥ कृष्णपुरी उत्तरार्ध ॥**

॥ कृष्णपुरी चळवळ च्या ओव्या ॥

## ॥ पंच्चावनीचा झगडा ॥

॥ सांगतो पंच्चावनीची कथा । बाजार मुर्खाचा भरला होता ।
करनं होतं त्या भगवंता । फुटला घडा, खोट लपणार नाही जरा ।
॥ उघडा पडला तुमचा ईतिहास । तुमचा तुम्हीच केला नाश ।
निघुन गेला तुमच्यापासुन भैस । आमचं काय गेलं..
तुम्ही तुमचचं अनहीत केलं ॥
॥ तुम्ही तुमचेचं फुंकले घर । पाप नाही होणार आम्हावर ।
पंच्चांवनीचा झगडा फार । रंगला आता..
इथं होईन लोकसत्ता ॥
॥ अंगार लावली तुम्ही घराले । आता विझणारी नाही ते कोणाले
दुःख होईन तुमच्या रयतीले । रडन ढळढळा..,
येतो पापांचा करवळा ॥०४॥

॥ निघुन गेला तुमचा ऋषिकेशी । अवगुण भरले दिसले त्याशी ।
आता भोगा चौ-यांशी । चुकणार नाही..
अशी महापुरूषाची गाही ॥
॥ महापुरूषाचं वचन । चुकणार नाही पहा येथुन ।
हिशोब देता होईन घाणं । तुमची आता..
देव सांगते ऐसी कथा ॥०६॥

भजने :-
॥ हिशोब देता होईन घाणं । तेव्हा होईन त्यांना मालुम ॥

-: शब्दार्थ :-

पंच्चावनी = ई.सनं १९५७ सालं. । अनहीत = अत्यंत वाईट, खराब, जे आपल्या हिताचे चांगले आहे ते खराब वाईट केलेत. । मंतर :- मंत्र । झगडा = भांडन, तंटा, मारामारी, मारोडा, रणसंग्राम. । कणगी-तुराः- वाद्यांचे नाव । लोकसत्ता = सच्च्या भक्तलोकांव्दारे भक्तांकरीता चालवणारी सत् सत्ता, लोकशाही. । रयत = प्रजा. । घाणं :- फजीती । फुंकले :- अग्नी जसा फुंकुन फुंकुन पेटवला जातो, तसे फुंकत फुंकत स्वतःचेच घर पेटविले ।



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०८/भाग ०२ ॥
॥ ओवी नं. २७ ॥
॥ कृष्णपुरी चळवळ दांडची आरती ॥

## ॥ ओवाळु श्रीरामरायाचा हनुमान द्युत ॥

॥ ओवाळु श्रीरामरायाचा, हनुमान द्युत । हनुमान द्युत ।
या यवगाचे कारण । आहे याहीचे हात ॥घृ॥ ०१ ॥
॥ पृथ्वी वरती रावण मातला । पहा तो भुजबळी ।
आले हनुमान विर । संग घेवुन लवलाही ॥
॥ व्दारका होती, लंका झाली । कृष्णाची नगरी ।
कुंभकर्ण रावण, याहीन स्थापली गादी ॥
॥ कसले देव, कसले मानव । कसले शहाणपण ।
सार्थक होणार नाही । भुतांचा भाव धरून ॥०४॥

॥ माग राक्षस, पुढ साधुच । रूप धरलं त्याहीनं ।
अनामीकाचा मेळा गांजला । केला हैराण ॥
॥ चौदा चौकडया राज्य भाकलं । होत त्या नगरी ।
झाला भ्रष्ट कार । याहीची ढळली किल्ली ॥
॥ रिध्दी-सिध्दी लक्ष्मी त्याहीची । मागं परतली ।
दृष्ट कल्पना खोटी वासना । गादीवर बसली ॥
॥ व्दैतपुरीमध्ये अहीरावण । महीरावण मातला ।
त्याहीच्या असत्यावर याहीन । शेला पांघरला ॥०८॥

॥ या भक्तीच्या साठी देव तो । कैवारी झाला ।
अहीरावण-महीरावण । एका क्षणात मर्दला ॥
॥ पुढे हनुमान विर, अवतार मागे । श्री राम ।
फुंकली लंका । नाही कुणाला मालुम ॥
॥ धडधड धडधडा, लंका जळन । या कलयवगी ।
नका करू अंदेशा । आपला देव जागी झाला ॥
॥ थोर याहीचे उपकार । हनुमान रामाचा दुत ।
कृष्णपुरी नगरीत याहीनं । उजळली ज्योत ॥१२॥

भजने :-
॥ हनुमंता ! अंजनीच्या सुता । आरती ओवाळु..॥
॥ हनुमंता ! जागी करून दाव समर्था । आरती ओवाळु.. ॥
॥ हनुमंता । देह तार समर्था । आरती ओवाळु..॥
॥ हनुमंता ! तुमच्या चरणी माथा । आरती ओवाळु ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥






॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ चतुर्पता अथर्वन् वेद उभा राहीन पोटी । निजरूप भुम्मा जागी करन सारी सृष्टी ॥

# चतुर्पता
# ॥ अथर्वन् वेद ॥






## शब्दार्थ, चरणार्थ निरसन स्पष्टीकरन सह






www.chaturpata-atharvan-ved.com

॥ खंड ०९ ॥

॥ भजन दांड ॥

॥ भजन दांड चे ज्ञान ॥

# ॥ भजन दांडाचे प्रारंभिक ज्ञान ॥

चतुर्पती कृष्ण अवधुत पंथा मध्ये भजने म्हणण्याचे दोन पध्दती आहे.

०१. ओवी, अर्जा, आरत्या नंतर म्हणण्यात येणारे भजने :-

ओवी, अर्जा, आरत्या संपुर्ण म्हटल्यानंतर म्हणजेच ओवी अर्ज आरत्या चे नामरूपी भोजन परमात्म्याला वाढल्या नंतर, ओवीचा सार अथवा शेवटच्या चरणांचे अक्षरे, याला धरून जे भजने जसे लागु होतात, तसे म्हटल्या जातात. काही काही ओवी च्या मध्येही भजने म्हटल्या जातात. उदाहरणार्थ ढाकुल नामी ची ओवी ईत्यादी. हे भजने ओवी संग आवाजी आलेले आहेत.

०२. भजन पाठे :-

हे भजन पाठे जसा जसा शकुनाचा वारा सुटेल, त्या वा-याच्या झुळकेनुसार हे भजन पाठे म्हटल्या जातात. हे भजन पाठे चतुर्पतीचा रमण्यात, झेंडे चढवतांना किंवा भजनात सुध्दा म्हटल्या जावु शकतात. हे भजन पाठे म्हणण्यास कुठलेही बंधन नाही. म्हणुन येथे दिलेल्या कमवारीनुसारच हे भजने या भजनपाठे म्हटल्या जाईन याची शाश्वती नाही. त्यामुळे या भजनपाठे चा कम व दुका प्रतेक वेळी वेगवेगळ्या राहु शकते. भजनी जवळ जसा जसा शकुन येईन, त्याप्रमाणे हे भजने अथवा भजन पाठे भजनी व्दारे म्हटल्या जातात.

ओव्या ज्याप्रमाणे पिढयानं पिढया आवाजी आलेल्या आहेत, त्याचप्रमाणे हे ओवीवरील भजने व भजन पाठे पिढयांन पिढया आवाजी चालत आम्हापर्यत आलेल्या आहेत. हे आवाजी चालत आलेले भजने व भजन पाठे यांचा संग्रह या ९व्या खंडात दिलेले आहेत.

भजनात येणारा शकुन हा भजन पाठयाचे निर्मिती करत असल्यामुळे, भजनीने म्हटलेला भजन पाठा त्यांला जर तुम्ही जसाचा तसा पुन्हा म्हणण्यास सांगीतला, तर तो भजन पाठा तो भजनी म्हणुन दाखवु शकत नाही. लिहुन देवु शकत नाही. म्हणुन येथे या भजन खंडात दिलेले ई.स.२००० ते २०१६ पर्यत चे प्रतेक वर्ष चे झेंडयाचे भजन पाठे व ईतर भजन मांडीत म्हटल्या गेलेले काही भजन पाठे ईत्यादी त्या त्या भजनांत सामील होवुन, भजनी संग भजने म्हणत मोबाईलवर रेकार्डिंग करून, ते ऐकुन लिहुन ठेवुन त्यांचा संग्रह केलेला आहे. तो संग्रह सुध्दा या खंडात कुठे कुठे दिलेले आहेत.

चतुर्पती चा भजनाचा दांड हा प्रचंड मोठा आहे. याला अंत नाही. म्हणुन जेवढे जमेल तेवढे भजने व भजन पाठे चा संग्रह आमच्याकडुन झाला तेवढाच येथे देत आहे. राहीलेले भजने व भजन पाठे भजनी जनांकडुन घेत राहावे. ही विनंती.



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०९ ॥
॥ भजन पाठा नं. ०१ ॥
॥ गण चे भजन पाठे ॥

# ॥ गणांवरील म्हणण्यात येणारे भजनपाठे चा संग्रह ॥

॥ गण भजनं पाठा नं. ०१/०१ ॥

॥ बाई-बुवा होते जलसागरी । अर्ज गणरायानं केली ।
विर्जन घातलं पाण्यातं देवानं । धरणी बनवली ॥
॥ जलावरी केला कारं । अवधुत निरंजन खरा ।
भजन या देवाचं करा ॥
॥ आदीपुरूष आदीगण । याहीनं उभ केलं, माया-निर्गुण ॥
॥ आदीपुरूष आदीगण । याहीनं उभ केलं, यवगाचं मंडयानं ॥
॥ आदीपुरूष आदीगण । याहीनं उभ केलं मेरू मंडयानं ॥
॥ आदीपुरूष आदीगण । थयथयकार खेळ, मांडला मंडयांनात ॥
॥ थयथयकार अगुचर गण । थयथयकारं ..।
माया विस्तारली याहीनं । उभ, केलं तिरभवनं ॥
॥ थयथयकार अगुचर गण । थयथयकारं ..।
माया विस्तारली याहीनं । उभ, केलं तिरगुणं ॥
॥ कृष्णाजी राया जोडली माया । माया तोड..
हरी बा कृष्णा, तुया पायाची । फार आवडं ॥
॥ कृष्णाजी राया मोडा माया । लावा नामी । ठेवा भजनी.....
हरी बा कृष्णा, तुया वाचुन । नाही कोणी ॥
॥ हरी बा कृष्णा, जगजीवना, मनमोहना । मनरंजना सगुण-निर्गुणा.
तुम्हा वाचुन नाही कोणी । तिर तिरभवना ॥
॥ तुला विनवितो, सारंगधरा, कृपावन भरा । दयासागरा, रंग धरा..
याहो महाराजा । कार करा ॥

॥ गण भजन पाठा नं. ०१/०२ ॥

॥ प्रथम भजु गणराजा । सावंगपुरी त्वां उभारल्या ध्वजा ॥
॥ प्रथम भजु गणराजा । परमय पदा त्वां उभारल्या ध्वजा ॥
॥ भजनी उभे आदीगणं । चतुर्पती गिण्यान या बाळाला देणं ॥
॥ चतुर्पती गिण्यानं दया हरी । माझा माथा तुमच्या चरणावरी ॥
॥ माथा तुमच्या चरणावरी । सकंष्टी धाव धाव चक्रपाणी ॥
॥ संकष्टी धाव चक्रपाणी । पावन व्हावे महाराजा श्रीहरी ॥
॥ पावन झाले देव । तुमच्या कृपेनं आता नाही भेवं ॥
॥ अवघे भेव मिटवजो । महाराजा देवा तु संभाळ करजो ॥

॥ गण भजन पाठा ०१/०२.१ ॥

॥ गण हा सागरचा आला । साहयं भक्तीले, भक्तीले झाला ॥
॥ साहयं करा महाराजा । तुम्हा विनवितो चत्रभुजा ॥
॥ साहयं करा साहयवंता । तुम्हा विनवितो महाराजा भगवंता ॥
॥ साहयं करा भगवंता । तुमच्या चरणावर ठेवला माथा ॥
॥ साहयं करा भगवंता । पदरी धरा महाराजा अवधुता ॥
॥ पदरी धरलं, नका जावु दुर । आहो दुरं ।
लोट मारतो देवाच्या चरणा वरं ॥
॥ दंडवत परिक्रमा घालतो । या देवाच्या नामी ।
आम्हा तारा इथं । विठोबा धनी ॥
॥ दंडवत परिक्रमा घालतो । या देवाच्या नामी ।
आम्हा तारा इथं । श्री कृष्ण धनी ॥

॥ गण भजन पाठा नं. ०१/०३ ॥

॥ आदीगण भरला पोटी । सांगता, सत् कृत्याच्या गोष्टी ॥
॥ आदीगण भरला आंगी । धन्याचं बोलनं आहे चौरंगी ॥
॥ आदीगण भरला देही । धन्याचं बोलनं झालं चौताळी ॥
॥ सत् कृत्य या नामी । या हरी भजनी लागलो देवाच्या नामी ॥

॥ गण भजन पाठा नं. ०१/०४ ॥

॥ गणराज महाराज । व्हावे प्रसन्न ।
आम्ही करतो सुमरण रात्रं-दिनं ॥
॥ गणराज महाराज । प्रसन्न व्हावे ।
मन मोग-याचे फुलं । वाहतो तुम्हाले ॥
॥ गणराज महाराजं । तुमची वाणी ।
करावं कारणं । तारा मानव खुम्मी ॥
॥ गणराज महाराज । मोक्ष देणं ।
तुम्ही विनवीतो आम्ही । रात्रं-दिनं ॥
॥ गणराज महाराजं । व्हावे साहयं ।
अरज आता । लेकरांची/अन्जानाची/गोपाळाची आहयं ॥
॥ गणराज महाराजं । देव आले ।
मिर्त लोकी याहीनं । झेंडे उभारले ॥

॥ गण भजन पाठा नं. ०१/०५ ॥

॥ उभा गणराजा गणपती । अवघा कार आहे या देवाच्या हाती ॥
॥ तुम्हा पासुन अवघे जन । कार करा, महाराजा येवुन ॥
॥ भजनी उभा राहय गणराजा । नाम तुझं.....।
चतुर्पती बिरद कर गा उभं ॥
॥ भजनी उभा राहय गणराजा । नाम तुझं.....।
चतुर्पती गिण्यान दयाहो मज ॥
॥ बसली भजनाची मांड । दयाहो महाराजा आम्हा गिण्यांनाचा सांड ॥
॥ चतुर्पती ग्यान दया देवा । अंतरी लावा ग्यानाचा दिवा ॥

॥ गण भजन पाठा नं. ०१/०६ ॥

॥ आदीगणाच सुमरन । आथर्वन वेदाचं होय बोलनं ॥
॥ आथर्वन वेदाची गाही । जागी करन महाराजा पृथ्वी ॥
॥ पृथ्वी तुमच्या अध्यानं । याहो महाराजा करा यवगाचं काम ॥
॥ यवग धरून उभा राहयं । याहो महाराजा तुम्ही करा हो संभाळ ॥
॥ संभाळ संभाळ वचनं । तोड महाराजा देहीचं बंधनं ॥
॥ बंधन तोड गा देवा । तुमच्या चरणाचा धरला धावा ॥
॥ धावा द्रौपदिनं केला । निजला देव जागी झाला ॥
॥ जागी करा या देवाले हो । करा यादवाले ।
पुर्विच भाकलं अहिना घरी देव आले ॥
॥ अहिना घरी आले देव । पुर्विचं नातं ।
पुर्विचं नातं अकाशमात । उभी राहली ज्योतं ॥
॥ ज्योत भली हो ज्योत भली । उभी आहे ताळातं ।
ज्योतीचा अवतार कृष्णदेव । उभा सावंग्यातं ॥

॥ गण भजन पाठा नं. ०१/०७ ॥

॥ गणराजा गणपती । कळसुत्र आहे, या देवाच्या हाती ॥
॥ कळसुत्राचा मालक । कळसुत्र दोरी देवा, तुमच्या हातातं ॥
॥ आता विनवीतो देवा । तुमच्या चरणाचा, धरला धावा ॥
॥ कृष्णा याहो जगजीवना । तुम्हा विनवीतो, महाराजा मनमोहना ॥
॥ तुम्हा विनवीतो मनमोहना । येवु दयाहो, बाळाची कारूणा ॥
॥ कारूणेच्या सागरा । कारूणा कर ।
आम्ही अन्जांन लेकरं । पदरी धरं ॥
॥ तुमच नावं सागर । म्हणुन आम्ही धरला देवा, तुमचा पदर ॥
॥ पदरी धरां । नका जावु दुरं ।
लोट मारतो, देवाच्या चरणावर ॥
॥ चरणी आलो विठुराया । महाराजा करा, आम्हावर दया ॥
॥ दया केली प्रभुनं । अनामत धनी, उभे आम्ही लेकरं अन्जान ॥
॥ अन्जानाचा होय दाता । वेळोवेळा भेट, दयाहो समर्था ॥
॥ अन्जान तुझं लेकरू । उभा देव, या देहीला तारू ॥

॥ अन्न-अग्न आकाश-धरणी । पाणी-पवनं ।
या देहीला तारू उभा । हा निरंजन ॥
॥ तारू उभा देहीचा ।
सेरूपी शिक्का बसन, या आदीरूपाचा/आदीपुरूषाचा ॥
॥ मोहरं-शिक्का बसन सेरूप । याहीचा उजाला, पडन चौताळातं ॥
॥ चंदन शिक्का तुच मोहरं । अवघी किल्ली देवा, तुमच्या हातातं ॥

॥ गण भजन पाठा नं. ०१/०८ ॥

॥ भजनी महाराज बोले । जैसा प्रभुराज डोले ।
देल्ली भेट, बहुलाभ झाला आम्हाले ॥
॥ भजन करता मिळल भोजन ।
ऐसं सांगुन ठेवलं । या कृष्ण देवानं ॥
॥ भजन करता मिळन भोजन । हरीचं/देवाचं नित्य..।
नाम घेता चुकतीन, चौ-यांशी बंधनं ॥
॥ भजन करता मिळन भोजन । द्युताचं नित्य..।
नाम घेता चुकतीन, चौ-यांशी बंधनं ॥
॥ भजन करता मिळन भोजन । विठुचं नित्य..।
नाम घेता देव झाले प्रसन्न ॥

॥ गण आराधना भजन पाठा नं. ०१/०९ ॥

॥ ये गणा ये गणा । आम्ही करतो प्रार्थना ॥ ये गणा ये गणा..
॥ ये गणा ये गणा । आम्ही विनवितो रात्रं-दिन ॥ ये गणा ये
॥ ये गणा ये गणा । आमची येवु दया कारूणा ॥ ये गणा ये
॥ ये गणा ये गणा । तुमचा बालक आहे तान्हा ॥ ये गणा ये
॥ ये गणा ये गणा । आम्हा पाजा अमृताचा पान्हा ॥ ये गणा ये
॥ आदीगणाला विनवीतो । चतुर्पती गिण्यान, या देवाला मागतो ॥
॥ चतुर्पती गिण्यान दया हरी । माझा माथा तुमच्या, चरणावरी ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०९ ॥

## ॥ भजनपाठा नं. ०२ ॥

दसरा-२००९ साली सावंगा येथे झेडे चढवतांना म्हणण्यात आलेले...

॥ झेंडयांचे भजन पाठे २००९ ॥

# ॥ झेंडें चढवतांना म्हणण्यात येणारे भजनपाठे ॥

टिप :- जागेच्या कमतरते अभावी येथे फक्त अभ्यासासाठी ई.स. २००९ व २०१० या दोन वर्षाचे झेंडयांचे भजन पाठे दिले आहे. बाकी २०११ ते २०१६ या वर्षाचे झेंडयाचे भजन पाठे च्या सम-समान टुका हया एकत्रित करून पुढील झेंडयाच्या भजन पाठा ०४ मध्ये दिलेले आहेत.

॥ भजन पाठा नं. ०२/०१ ॥

॥ पहिल्या थडीवर नेवुन दाखवा । बाळा ला पायं ।
हाती सुदर्शन घेवुन कृष्ण । देव उभा आहयं ॥
॥ तुया नामाची सांगड । तुया नामाची सांगड ।
उतरून दयाहो देवा.. । पहीली पार/पैलपार ।
॥ हरी नामाच्या सांगडी । राम नामाच्या सांगडी ।
विठ्ठल राया बहु, यवगाचा गडी ।
कृष्ण राया बहु, यवगाचा गडी ॥
॥ हरीहरी कृष्णा तु बहु । यवगाचा गडी ।
आमचा माथा तुमच्या चरणां वरी ॥
॥ तुमचे चरण माझी डोही । तुमचे चरण आमची डोही ।
हो हाच करार.. । हो हाच करार..।
भक्त जनांवर करावं दया । बहु यवग तारं ॥
॥ मागं झाल्या पुढं होतीन । जन्मों जन्मीच्या चुका ।
जन्मो जन्मीच्या चुकां संभाळ । करा विठ्ठल सख्या ।
जन्मो जन्मीच्या चुकां माफ । करा कृष्ण सख्या ॥

॥ भजन पाठा नं. ०२/०२ ॥

॥ तुमचे नावं सागर । तुमचे नावं सागर ।
म्हणुन म्या धरला देवा.. । तुमचा पदरं ॥
॥ कानी आवाज ऐकला । कानी आवाज ऐकला ।
म्हणुन म्या रस्ता.. । या सावंग्याचा धरला ॥
॥ भैस राज महाराज उभे । राहा येवुन ।
तुमचे चरण लागता धरनी । होईन कंचनं ॥
॥ भैस राज महाराज उभे । राहां येवुनं ।
आकाशा वर तुमची सत्ता । चालव इथं येवुन ॥

॥ भजन पाठा नं. ०२/०३ ॥

॥ तुम्ही परीस आम्ही लोहा । तुम्ही परीस आम्ही लोहा ।
संगत घडली हो । किसनजी देवा ॥
॥ सावंग्यात परीस नांदे । या देवळात परीस आहयं ।
अंबर करा.. । महाराजा येवुनं ॥
॥ अंबर पदाची वासना । अंम्बर पदाची वासना ।
पुरवा पुरवा..। महाराजा श्री कृष्णा ॥
॥ अंम्बर पदाची वाट अजुनं । नाही मालुमं..।
भल्या भलत्याला नाही गवसलं । अंम्बर ठिकाणं ॥

॥ भजन पाठा नं. ०२/०४ ॥

॥ उपणुन घ्याहो । वार सुटलं मावेचं..
ज्याच्या नशिबी असनं । भजन करनं देवांच ॥
॥ भजन करा देवाचं । नका , बसु निचंत. ।
हीवेळ गेल्या वर पुढंमग । पस्तावलं मनं ॥

॥ भक्ती करून निःसंग होजो । ऐक जन आता, ऐक प्राण्यां आता
या भक्तीला भंगु-नको-देवु वाया, जाशील अघोगता ॥
॥ भक्ती प्रेमाची प्रेमाची । अधिर नाही कामाची ॥ भक्ती प्रे.मा..ची..

॥ भजन पाठा नं. ०२/०५ ॥

॥ नाम रसाई....। अमृताचा प्यालां । जो पिवुन मग्गंम झाला ।
तो वाणी सांगे, जगां..ला । नवल सांगे जगाला ॥

॥ भजन पाठा नं. ०२/०६ ॥

॥ हरी भजनी.. । प्रेम सुखाची वाणी । आत्मा सावध हो.. सावध हो ॥
॥ आत्मा सावध होय तु आता...। या परमय पदा..। उभारंल्या ध्वजा ॥
॥ आत्मा सावध होय तु आता । या परमय पदा, चालन तुमची सत्ता ॥
॥ आत्मा चालं, भजनी राहयं.. । बहु यवगं, सुखंः पाहयं ।
बहु यवगं, सुखंः पाहयं । बहु यवगं, सुखंः पाहय ॥
॥ हरींच्या चरणा, वरत थोरं..। हरी उभे, कृष्ण अवतार ।
धनी उभे कृष्ण अवतार । धनी उभे कृष्ण अवतार ॥
॥ धनी उभे, कृष्ण अवतार.. । धनी , कृपेचे सागर ।
धनी कृपेचे सागर । धनी कृपेचे सागर ॥
॥ धनी कृपेचे सागर.. । केली दया, बाळावर ।
केली दया बाळा वर । केली दया बाळा वर ॥
॥ केली दया बाळावर..। माझा माथा चरणा वर ।
आमचा माथा चरणा वर । आमचा माथा चरणां वर ॥

॥ भजन पाठा नं. ०२/०७ ॥

॥ अवधुताच्या चरणी वाहे । अमृताची गंगा ।
असचं सत्य जाणा । रोग, विघ्नं जाती भंगा ॥
॥ अवधुताच्या चरणी वाहे । अमृताची धारं ।
असचं सत्य जाणा । रोग, विघ्नं जाती दुर ।
असचं सत्य जाणा । रोग, विघ्नं जाती पार ॥

॥ भजन पाठा नं. ०२/०८ ॥

॥ झेंडा उभारला ॥ यवगाचा.. । चतुर्पती नामाचा । झेंडा उभारला ।
॥ यवगाचा.. । अवधुत या नामाचा । झेंडा उभारला ॥
॥ यवगाचा.. । सिदाई या देवाचा । झेंडा उभारला ॥
॥ यवगाचा.. । सत्य याहीची वाचा । झेंडा उभारला ॥
॥ झेंडे सागाचे होय । साग नोव्हे..., देव भगवान होय ॥
॥ झेंडे सागाचे होय । साग नोव्हे..., कृष्ण अवधुत होय ॥
॥ झेडे दोही कडे दोनं । झेंडे दोही कडे दोनं ।
मध्ये उभे.. देव नारायणं । मध्ये उभे.. देव नारायण ॥
॥ या झेंडयाच्या सावलीनं । या झेंडयाच्या सावलीनं ।
नर नारी..। हे उध्दारले दोनं । नर नारी.. हे उध्दारले दोनं ॥

॥ भजन पाठा नं. ०२/०९ ॥

॥ सुटला शकुनाचा वारा । सुटला शकुनाचा वारा ।
ऐसा बोले.., झेंडयाचा फरारा ॥
॥ आजचा दिवस आनंदाचा । आजचा दिन आनंदाचा ।
झेंडा उभारला.., कृष्ण अवधुताचा ।
झेंडा उभारला, कृष्ण देवाचा ॥
॥ आजचा दिवस आनंदाचा । आजचा दिन आनंदाचा ।
झेंडा उभारला.., देवा-भक्तांचा । झेंडा उभारला,चतुर्पती नामाचा
॥ धन्य धन्य आजचा दिन । धन्य धन्य आजचा दिनं ।
मजला झाले.,या झेंडयांचे दर्शन ।
मजला झाले, या देवाचे दर्शनं

॥ झाले देवाचे दर्शनं । झाले देवाचे दर्शनं ।
मजला झाला, हा देव प्रसन्नं । आम्हा झाला हो, देव प्रसन्नं
॥ झाला देव प्रसन्न । झाला देव प्रसन्न ।
विनवा विनवा.. । दोन्ही हातं जोडुनं ॥
॥ कृपा आनंदाची झाली । कृपा आनंदाची झाली ।
हा देव कृपावंत झाला..। हा देव कृपावंत झाला ।
पदरी धरलं महाराजानं । आपल्या बाळालां ॥

॥ भजन पाठा नं. ०२/१० ॥

॥ आनंदाची ही होय ज्योत । आनंदात राहयं ।
लेकंराची बाणी पुरवा । राया येवुनं ॥
॥ आले या ठायी हो । घ्या याहीची गाही ।
भक्त जनं उध्दराया कृष्णदेव । आले या ठायी ॥
॥ आले या ठायी हो । झाले प्रकटं ।
भक्ती जनांची राजा कृष्णदेव । करावं मजबुतं ।
भक्ती जनांची राजा कृष्णदेव । करावं बळकटं ॥
॥ आले या ठायी हो । झाले प्रसन्न ।
भक्ती जनांची राजा कृष्णदेव । करावं संपुर्ण ।
॥ देहीवर तुमची आशा देही । करा हो धिटं ।
व्दैत जनांचा येवुन राया । करावं निपांत ॥

॥ भजन पाठा नं. ०२/११ ॥

॥ लक्ष्य तुया पायाचे ध्यान । लक्ष्य तुया पायाचे ध्यानं ।
हेच मागतो.. । महाराजा मागणं ॥
॥ लक्ष्य तुया पायाची माती । लक्ष्य तुया पायाची माती ।
हेच होय माझी । गंगा भागीरथी ॥
॥ या देवळात गंगा वाहे । या देवळात ज्योत नांदे ।
पुर्व-पश्चिम हो ज्योत । दहा ही बाजुने ॥
॥ या देवळातं देव नांदे । या देवळात देव नांदे ।
पुर्व-पश्चिम हो कृष्णा । दहाही बाजुनें ॥
॥ कृष्णा आहे चातुर । कृष्णा आहे चातुरं ।
आता आहे या । तिरलोकी अधारं ॥
॥ तिरलोक्याचा होय दाता । तिरलोक्याचा होय दाता ।
संभाळ करा..। महाराजा अवधुता ॥
॥ संभाळ संभाळ वचनं । संभाळ संभाळ वचनं ।
वचनी गोयले..। देवराया किसनं ॥
॥ वचनं दिले मानवाले । वचन दिले मानवाले ।
मानवांची हो देवा..। कारूणा तुले ॥
॥ कारूणा आहे गा तुले । कारूणा आहे गा तुले ।
देव राया आहो..। देवं आहे ॥

॥ भजन पाठा नं. ०२/१२ ॥

॥ निरशुन्याहुन विहीर खोदली । सावध होवुन, सावध पाहयी ।
सावंगपुरी पाय लावला । सावध ज्योत रायाची ।
सावंगपुरी पाय लावला । पावन ज्योत भक्तांची ॥
॥ निरशुन्यांहुन आले अवधुत । मिर्त लोकात ।
सावंगपुरी दुकान लावलं । नामाची पेठं ॥
॥ तुझ्या नामी हो, तुझ्या नामी । तुझ्या नामी हो, तुझ्या नामी ।
उडया घातंल्या आम्ही । तुझ्या नामी हो तुझ्या नामी ॥
॥ कृष्णा याहो लवकरं । कृष्णा याहो लवकरं ।
वाट पाहतो आम्ही । अन्जांन लेकरं ॥
॥ आजचा दिन दिवस ठरला । आजचा दिन दिवस ठरलां ।
तुला हाका मारता । आमचा कंठ सुकला ॥

॥ भजन पाठा नं. ०२/१३ ॥

॥ देव रंगाचा रंगारी । देव रंगाचा रंगारी ।
अवघे रंग..। देव रायाच्या घरी ॥
॥ आम्ही आहो मुढं मुढं । आम्ही आहो मुढं मुढं ।
रस्ता दाखव देवा..। होय गा पुढं ॥
॥ रस्ता आहे बिकटं । रस्ता आहे बिकटं ।
म्हणुन म्या धरली देवा..। सावंग्याची वाट ॥



## ॥ भजनपाठा नं. ०३ ॥

दसरा-२०१० साली सावंगा येथे झेडे चढवतांना म्हणण्यात आलेले...

॥ झेंडयांचे भजन पाठे २०१० ॥

# ॥ झेंडें चढवतांना म्हणण्यात येणारे भजनपाठे ॥

॥ भजन पाठा नं. ०३/०१ ॥

॥ पहिल्या थडीवर नेवुन दाखवा । बाळा ला पायं ।
हाती सुदर्शन घेवुन कृष्ण । देव उभा आहयं ॥

॥ आनंदाची ज्योत गडे हो । आनंदात राहयं ।
लेकंराची, बाणी पुरवा । राया येवुनं ॥
॥ कृपा आनंदाची झाली । कृपा आनंदाची झाली ।
हा देव कृपावंत झाला..। हा देव कृपावंत झाला ।
पदरी धरलं महाराजानं । आपल्या बाळालां ॥

॥ आले या ठायी हो । घ्या याहीची गाही
भक्त जनं उध्दराया कृष्णदेव । आले या ठायी ॥
॥ आले या ठायी हो । झाले परसन्न । झाले प्रसन्नं ।
भक्ती जनांची राजा कृष्णदेव । करावं संपुर्ण ॥
॥ याहीच्यावर तुमची आशा तुम्ही । धरा हो धिरं ।
व्दैत जनांचा येवुन राया । उगार संहार ॥

॥ भजन पाठा नं. ०३/०२ ॥

॥ होता पुर्विचा दोरा । म्हणुन कृष्ण देव, आले घरा ॥
॥ होता पुर्विचे संचित । म्हणुन घडली देवा, तुमची संगत ॥
॥ तुम्ही परवेश आम्ही लोव्हा । तुम्ही परवेश आम्ही लोव्हा ।
संगत घडली याहो.. । किसनजी देवा ॥
॥ सावंग्यात परवेश नांदे । या देवळात परवेश नांदे ।
कंचन करा.. । महाराजा देहीले ॥

॥ भजन पाठा नं. ०३/०३ ॥

॥ अनंत यवगा वर । तारले महामहा विर ।
हरी भजनी देवा । तार महाराजा ॥
॥ अनंत यवगा वर । तारले भक्त जना ।
हरी भजनी दयाहो । भेटी महाराजा/ मायबापा ॥
॥ अनंत यवगा चा । महाराजा कृष्ण अवतारा ।
तुमच्या विन देव । नाही दुसरा ॥

॥ भजन पाठा नं. ०३/०४ ॥

॥ नामी आधार सांगतला । नामी आधार सांगतला ।
भक्ता साठी देवान । अवतार धरला ॥
॥ देवा तुम्ही अंतर रंगवा । देवा तुम्ही अंतर रंगवा ।
यवगा यवगी मजला । संग वागवा ॥

॥ अवधुताच्या चरणी वाहे । अमृताची गंगा ।
असचं सत्य जाणा । रोग, विघ्नं जाती भंगा ॥
॥ सांगी सांगतली सांगुन । सांगी सांगतली ठेवुन ।
तुमच्या विन मजला । कोण सांगन ॥
॥ सांगी झाली अंतराळी । सांगी झाली अंतराळी ।
महाराजा, पुर्ण । करून दया सही ॥

॥ भजन पाठा नं. ०३/०५ ॥

॥ किसनजी राया जगजेठी । किसनजी राया जगजेठी ।
वस्त्र पुरवले त्वा । द्रौपदि साठी ॥
॥ किसनजी राया जगजेठी । किसनजी राया जगजेठी ।
महार झाला तु । दामाजी साठी ॥
॥ किसनजी राया जगजेठी । किसनजी राया जगजेठी ।
धावत आला तु । प्रल्हादा साठी ॥
॥ उतर देवा प्रल्हादा सारखा । उतर देवा प्रल्हादा सारखा ।
तसाच धावत येबा । कृष्ण अवधुता ॥

॥ भजन पाठा नं. ०३/०६ ॥

॥ लक्ष्य तुया पायाचे ध्यान । लक्ष्य तुया पायाचे ध्यानं ।
हेच मागतो.. । महाराजा मागणं ॥
॥ लक्ष्य तुया पायाची माती । लक्ष्य तुया पायाची माती ।
हेच होय माझी । गंगा भागीरथी ॥
॥ या देवळात गंगा वाहे । या देवळात देव नांदे ।
केव्हा येशीन देवा । दहा ही बाजुने ॥
॥ या देवळातं देव नांदे । या देवळात देव नांदे ।
पुर्व-पश्चिम हो कृष्णा । दहाही बाजुनें ॥
॥ कृष्णाची आहे चातुरी । कृष्णाची आहे चातुरीं ।
आता आहे या । तिरलोकी गाही ॥

॥ भजन पाठा नं. ०३/०७ ॥

॥ तिरलोक्याचा होय दाता । तिरलोक्याचा होय दाता ।
संभाळ करा..। महाराजा अवधुता ॥
॥ संभाळ संभाळ वचनं । संभाळ संभाळ वचनं ।
वचनी गोयले..। देवराया किसनं ॥
॥ वचनं दिले मानवाले । वचन दिले मानवाले ।
मानवांची हो देवा..। कारूणा तुले ॥
॥ कारूणा आहे गा तुले । कारूणा आहे गा तुले ।
देव राया आहो..। देवं आहे ॥

॥ भजन पाठा नं. ०३/०८ ॥

॥ देवा तु गाय, मी वासरू । देवा तु गाय, मी वासरू ।
संभाळ करा । महाराजा लेकरू ॥
॥ नामी सांगीतला ..
आपल्या नामी देवा तुयी वाट पाहतो ॥
॥ तारक..., नाम तारक । तारक, नाम तारक ।
देव अन्जानाचा तारक । नाम तारक ॥
॥ मागं तारलं, पुढं तारशील । मागं तारलं, पुढं तारशीन ।
देवा तुया भरोसा आहे । देवा तुया, भरोसा आहे ।
भरोसा आहे म्हणुन म्या । धरले तुमचे पायं ॥

॥ भजन पाठा नं. ०३/०९ ॥

॥ श्रीकृष्णा । जगजीवना । माझया मनाच्या मोहना । लवकर याहो
॥ श्रीकृष्णा । जगजीवना । ही अरज अन्जानाची । लवकर याहो ॥
॥ झेंडा उभारला ॥ यवगाचा.. । चतुर्पती नामाचा । झेंडा उभारला

॥ यवगाचा.. । अवधुत या नामाचा । झेंडा उभारला ॥
॥ यवगाचा.. । सिदाई या देवाचा । झेंडा उभारला ॥
॥ यवगाचा.. । सत्य याहीची वाचा । झेंडा उभारला ॥

॥ झेंडे सागाचे होय । साग नोव्हे..., देव भगवान होय ॥
॥ झेंडे सागाचे होय । साग नोव्हे..., कृष्ण अवधुत होय ॥
॥ झेडे दोही कडे दोनं । झेंडे दोही कडे दोनं ।
मध्ये उभे.. देव नारायणं । मध्ये उभे.. देव नारायण ॥
॥ या झेंडयाच्या सावलीनं । या झेंडयाच्या सावलीनं ।
नर नारी..। हे उध्दारले दोनं । नर नारी.. हे उध्दारले दोनं ॥

॥ भजन पाठा नं. ०३/१० ॥

॥ सुटला शकुनाचा वारा । सुटला शकुनाचा वारा ।
ऐसा बोले.., झेंडयाचा फरारा ॥
॥ आजचा दिवस आनंदाचा । आजचा दिन आनंदाचा ।
झेंडा उभारला.., कृष्ण अवधुताचा ।
झेंडा उभारला.., कृष्ण देवाचा ॥
॥ आजचा दिवस आनंदाचा । आजचा दिन आनंदाचा ।
झेंडा उभारला.., देवा-भक्तांचा ।
झेंडा उभारला..,चतुर्पती नामाचा ॥

॥ भजन पाठा नं. ०३/११ ॥

॥ धन्य धन्य आजचा दिन । धन्य धन्य आजचा दिनं ।
मजला झाले.,या झेंडयांचे दर्शन । मजला झाले, या देवाचे दर्शनं
॥ झाले देवाचे दर्शनं । झाले देवाचे दर्शनं ।
मजला झाला, हा देव प्रसन्नं । आम्हा झाला हा, देव प्रसन्नं ॥
॥ झाला देव प्रसन्न । विनवा विनवा.., दोन्ही हातं जोडुनं ॥

॥ भजन पाठा नं. ०३/१२ ॥

॥ अशी तुया नामाची महीमा । अशी तुया नामाची महीमा ।
अग्नी मध्ये तारल्या त्वा । मुंग्याच्या सेना ॥
॥ अशी तुया नामाची गाही । अशी तुया नामाची गाही ।
नामी तरला । सधन कसायी ॥
॥ अशी तुया नामाची गाही । अशी तुया नामाची गाही ।
नामी तरला । वाल्या कोळी ॥
॥ अशी तुया नामाची गाही । अशी तुया नामाची गाही ।
अहील्या उध्दारल्या । वनाच्या ठायी ॥
॥ अशी तुया नामाची भिस्त । अशी तुया नामाची भिस्त ।
या देवानं निर्जिव, चालवली भिंत ॥
॥ नामी तरन , तरन भरोसा । नामी तरन , तरन भरोसा ।
आता आहे देव अन्जानाचा सखा ॥
॥ मागं झाल्या पुढं होतीन । जन्मों जन्मीच्या चुका ।
जन्मो जन्मीच्या चुकां संभाळ । करा विठ्ठल सख्या ।
जन्मो जन्मीच्या चुकां माफ । करा कृष्ण सख्या ॥

॥ भजन पाठा नं. ०३/१३ ॥

॥ विठ्ठला मायबापा । कारूणा, येवु दया माझी ।
कारूणा, येवु दया माझी । कारूणा, येवु दया माझी ॥
॥ कारूणा, येवु दया माझी । प्रार्थना करतो तुझी ।
प्रार्थना करतो तुझी । प्रार्थना करतो तुझी ॥
॥ प्रार्थना करतो तुझी । तुम्ही सदा ठेवजा नामी ।
तुम्ही सदा ठेवजा नामी । दया करा प्रभु मजवरी ॥
॥ दया करा दयावंता । दया करा दयावंता ।
तुम्हा विनवितो । महाराजा भगवंतां/कृष्ण अवधुता ॥

॥ मजला अंतर ठेवु नको । मजला अंतर ठेवु नको ।
कृष्ण देवा सागर भरला । देवा तुम्हा पाशी ॥

॥ भजन पाठा नं. ०३/१४ ॥

॥ निरशुन्याहुन विहीर खोदली । सावध होवुन, सावध पाहयी ।
सावंगपुरी पाय लावला । सावध ज्योत रायाची ।
सावंगपुरी पाय लावला । पावन ज्योत भक्तांची ॥
॥ निरशुन्यांहुन आले अवधुत । मिर्त लोकात ।
सावंगपुरी दुकान लावलं । नामाची पेठं ॥

॥ भजन पाठा नं. ०३/१५ ॥

॥ उपणुन घ्याहो । वार सुटलं मावेचं..
ज्याच्या नशिबी असनं । भजन करनं देवांच ॥
॥ भजन करा देवाचं । नका , बसु निचंत. ।
हीवेळ गेल्या वर पुढंमग । पस्तावलं मनं ॥

॥ भक्ती करून निःसंग होजो । ऐक जन आता, ऐक प्राण्यां आता
या भक्तीला भंगु-नको-देवु वाया, जाशील अघोगता ॥
॥ भक्ती प्रेमाची प्रमाची । अधिक नाही कामाची ॥ भक्ती प्रे.मा..ची...
चुकवन हो चौ-यांशी । भक्ती प्रेमाची प्रेमाची ॥

॥ भजन पाठा नं. ०३/१६ ॥

॥ या आनंदाच्या भरा । या आनंदाच्या भरा ।
हरी भजन हो भजन किर्तन करा ।
यान काय होतं रे नरा । यान काय होतो रे नरा ।
जळतीन पापाचे पर्वत । पडतीन पुण्याच्या भरा ॥
॥ अमृताची गोडी देवा । तुमच्या भजनात ।
तार देवा, ठेवा देवा । सुखी जिवनात ॥
॥ नाम रसाई....। अमृताचा प्यालां । जो पिवुन मग्गंम झाला ।
तो वाणी सांगे, जगां..ला । नवल सांगे जगाला ॥
॥ नामी रहावं । देवाच्या.., देव पुरवन तुमची आशा ॥
नामी रहावं..। देवाच्या, देव चुकवण तुमची चौ-यांशी ॥ नामी रहावं

॥ भजन पाठा नं. ०३/१७ ॥

॥ कशी भुलवण पडली जना । कशी भुलवण पडली जना ।
या महाराजाचा.. । खेळ कोणा कळेना ॥
॥ सांगे अंतरच्या खुणा । सांग अंतरच्या खुणा ।
घेवुन येईन देव.. । पुर्विचा ठेवा ।
घेवुन याहो देवा..। पुर्विचा ठेवा ॥
॥ यान केली कामगीरी । यान केली कामगीरी ।
हा चुकवण बाप्पा.. । चौ-यांशीची फेरी ॥
॥ अंतरी घोष नामाचा । चाकर आहे देव सच्च्या भक्तांचा ॥
॥ नामी आधार सांगतला । नामी अधार सांगतला ।
म्हणुन म्या रस्ता.. । या सावंग्याचा धरला ॥

॥ भजन पाठा नं. ०३/१८ ॥

॥ तुमचे नावं सागर । तुमचे नावं सागर ।
म्हणुन म्या धरला देवा.. । तुमचा पदरं ॥
॥ कानी आवाज ऐकला । कानी आवाज ऐकला ।
म्हणुन म्या रस्ता.. । या सावंग्याचा धरला ॥
॥ भैस राज महाराज उभे । राहा येवुन ।
तुमचे चरण लागता धरनी । होईन कंचनं ॥
॥ भैस राज महाराज उभे । राहां येवुनं ।
आकाशा वर तुमची सत्ता । चालव इथं येवुन ॥

॥ भजन पाठा नं. ०३/१९ ॥

॥ अंबर पदाची वासना । अंम्बर पदाची वासना ।
पुरवा पुरवा..। महाराजा श्री कृष्णा ॥
॥ अंम्बर पदाची वाट अजुनं । नाही मालुमं..।
भल्या भलत्याला नाही गवसलं । अंम्बर ठिकाणं ॥

॥ भजन पाठा नं. ०३/२० ॥

॥ हरी भजनी.. । प्रेम सुखाची वाणी । आत्मा सावध हो.. सावध हो ॥
॥ आत्मा सावध होय तु आता...। या परमय पदा..। उभारंल्या ध्वजा ॥
॥ आत्मा सावध होय तु आता..। या परमय पदा, चालन तुमची सत्ता ॥

॥ भजन पाठा नं. ०३/२१ ॥

॥ आत्मा चालं/ताल, भजनी राहयं.. । बहु यवगं, सुखंः पाहयं ।
बहु यवगं, सुखंः पाहयं । बहु यवगं, सुखंः पाहय ॥
॥ हरींचे सुखः आहे थोरं..। हरी उभे, कृष्ण अवतार ।
धनी उभे कृष्ण अवतार । धनी उभे कृष्ण अवतार ॥
॥ धनी उभे, कृष्ण अवतार.. । धनी , कृपेचे सागर ।
धनी कृपेचे सागर । धनी कृपेचे सागर ॥
॥ धनी कृपेचे सागर.. । केली दया, बाळावर ।
केली दया बाळा वर । केली दया बाळा वर ॥
॥ केली दया बाळावर..। माझा माथा चरणा वर ।
आमचा माथा चरणा वर । आमचा माथा चरणां वर ॥

॥ भजन पाठा नं. ०३/२२ ॥

॥ अवधुताच्या चरणी वाहे । अमृताची धारं ।
असचं सत्य जाणा । रोग, विघ्नं जाती दुर ।
असचं सत्य जाणा । रोग, विघ्नं जाती पार ॥

॥ भजन पाठा नं. ०३/२३ ॥

॥ तुझ्या नामी हो, तुझ्या नामी । तुझ्या नामी हो, तुझ्या नामी ।
उडया घातंल्या आम्ही । तुझ्या नामी हो तुझ्या नामी ॥
॥ कृष्णा याहो लवकरं । कृष्णा याहो लवकरं ।
वाट पाहतो आम्ही । अन्जांन लेकरं ॥
॥ आजचा दिन दिवस ठरला । आजचा दिन दिवस ठरलां ।
तुला हाका मारता । आमचा कंठ सुकला ॥

॥ भजन पाठा नं. ०३/२४ ॥

॥ देव रंगाचा रंगारी । देव रंगाचा रंगारी ।
अवघे रंग..। देव रायाच्या घरी ॥
॥ आम्ही आहो मुढं मुढं । आम्ही आहो मुढं मुढं ।
रस्ता दाखव देवा..। होय गा पुढं ॥
॥ रस्ता आहे बिकटं । रस्ता आहे बिकटं ।
म्हणुन म्या धरली देवा..। सावंग्याची वाट ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

टिप :- ई.सं २००९ ते २०१६ या वर्षाचे झेंडयाचे भजन पाठे चा संग्रहच्या सम-समान टुका हया एकत्रित करून पुढील झेंडयाच्या भजन पाठा ०४ मध्ये दिलेले आहेत.



॥ खंड ०९ ॥

॥ भजनपाठा नं. ०४ ॥

दसरा-२००९,१०,११,१२,१३,१४,१५,१६ साली सावंगा येथे झेडे चढवतांना म्हणण्यात आलेले झेंडयाच्या भजनांचा संग्रह मधील सर्व सम-समान भजने टुका व पाठे चा असलेले..

॥ झेंडयांचे भजन पाठे चा संपुर्ण संग्रह २००९ - २०१६ ॥

## ॥ झेंडें चढवतांना म्हणण्यात येणारे भजनं संग्रह ॥

**महत्वाचे :-** झेंडे चढवतांना जो शकुनाचा वारा सुटतो, त्या शकुनाच्या वा-याच्या झुळकेनुसार हे झेंडयासमोरचे भजन पाठे भजनी व्दारे म्हटल्या जातात. म्हणुन खालील



दिलेल्या कमवारीनुसारच हे भजने या भजनपाठे म्हटल्या जाईन याची शाश्वती नाही. उदाहरणार्थ दिलेले २००९ व २०१० चे भजन पाठे पारखुन पाहावे. त्यामुळे या भजनपाठे चा कम व टुका प्रतेक वेळी वेगवेगळया राहु शकते. फक्त एकाच भजन पाठयाचा कम चुकत नाही तो म्हणजे 'झेंडा उभारला यवगाचा-०४/२४' हा भजन पाठा ! हा झेंडयाचा भजन पाठा झेंडे चढवणारा जेव्हा झेंडयाच्या शेंडयावर चढुन/पोहचुन झेडे चढवण्यास/खोळ घालण्यास आरंभ करतो, तेव्हा भजनी हा झेंडयाचा भजन पाठा म्हणणे चालु करतात. म्हणुनच हा झेंडयाचा भजन पाठा चे नाव व त्यानंतरचा पाठा संपुर्ण शेंदरी जाड अक्षरात भजन पाठयां च्या मध्ये दिलेला आहे.

॥ सांगडीचा भजन पाठा नं. ०४/०१ ॥

॥ तुम्ही व्हावे सांगड । आम्ही आहो, सांगडीचे गडी ।
शरण आलो महाराजा । उतरून, दयाहो पैलथडी ॥
॥ पहिल्या थडीवर नेवुन दाखवा । बाळा ला पायं ।
हाती सुदर्शन घेवुन कृष्ण । देव उभा आहयं ।
हाती सुदर्शन घेवुन श्रीराम । देव उभा आहयं ॥
॥ तुया नामाची सांगड । उतरून दयाहो देवा । पहीली पार ।
उतरून दयाहो देवा.. । पैल पार ॥
॥ हरी नामाच्या सांगडी । राम नामाच्या सांगडी ।
विठ्ठल राया बहु यवगाचा गडी ॥
॥ हरी नामाच्या सांगडी । राम नामाच्या सांगडी ।
कृष्ण राया बहु यवगाचा गडी ॥
॥ हरी हरी कृष्णा । तु बहु यवगाचा गडी ।
आमचा माथा तुमच्या । चरणां वरी ॥

॥ अमृताचा भजन पाठा नं. ०४/०२ ॥

॥ अवधुता च्या, चरणी वाहे । अमृता ची गंगा ।
असचं सत्य जाणा । रोग, विघ्नं जाती भंगा ॥
॥ अवधुता च्या, चरणी वाहे । अमृता ची धारं ।
असचं सत्य जाणा । रोग, विघ्नं जाती दुर ॥
॥ अवधुता च्या, चरणी वाहे । अमृता ची धारं ।
असचं सत्य जाणा । रोग, विघ्नं जाती पार ॥

॥ आनंदाचे भजन पाठा नं. ०४/०३ ॥

॥ अवघा आनंद देजो बा । मोक्ष पदा तु नेजो बा ॥
मोक्ष पदा तु नेजो बा । साळु माय उभी राहयजो बा ॥
॥ साळु माय उभी राहयजो बा । मुखी सदा तु राहयंजो बा ।
मुखी सदा तु राहयंजो बा । परमय पदा तु नेजो गा ॥
॥ परमय तुमच्या पायाचा । हेच मागतो महाराजा ॥
॥ आनंद दे माझे देही । दुसरे मागणं नाही ॥

॥ आनंदाचा भजन पाठा नं. ०४/०४ ॥

॥ आनंदाची ज्योत गडे हो । खेळे आनंदात ।
खेळे आनंदात । ज्योत हरी भजनात ॥
॥ आनंदाची ज्योत गडे हो । आनंदात राहयं ।
लेकंराची, बाणी पुरवे/पुरवा । राया येवुनं ॥
॥ आनंदाची ज्योत गडे हो । आनंदात आली ।
आनंदात आली । कृपा बाळावर केली ॥
॥ कृपा आनंदाची झाली । हा देव कृपावंत झाला ।
पदरी धरलं महाराजानं । आपल्या बाळालां ॥
॥ पदरी धरलं नको जावु दुर । लोट मारतो देवाच्या चरणावर ॥

॥ भजन पाठा नं. ०४/०५ ॥

॥ आले या ठायी हो । घ्या याहीची गाही
भक्त जनं उध्दराया कृष्णदेव । आले या ठायी ॥
॥ आले या ठायी हो । माझे जगजीवन । झाले प्रसन्नं ।
भक्त जनांची आशा कृष्णदेव । करावं संपुर्ण ॥
॥ देव पुरवन तुमची आशा । तुम्ही धरा हो धिरं ।
व्दैत जनांचा येवुन राया । करे संहार ॥
॥ देव पुरवन तुमची आशा । तुम्ही धरा हो धिरं ।
व्दैत पाखंड सोड प्राण्या । उघड कवाड ॥
॥ मोडन जंतराचा भार । उभा आहे कृष्ण पुर्ण अवतार ॥
॥ ज्याला भासन त्याला थोरं । उभा आहे देव पुर्ण अवतार ॥

॥ पुर्विचे भजन पाठा नं. ०४/०६ ॥

॥ होता पुर्विचा दोरा । म्हणुन कृष्ण देव, आले घरा ।
॥ होता पुर्विचा दोरा । म्हणुन आलो, देव रायाच्या घरा ॥
॥ होत पुर्विचं संचीत । म्हणुन घडली देवा, तुमची संगत ॥
॥ तुम्ही परेश/परिस आम्ही लोव्हा । तुम्ही परेश आम्ही लोव्हा ।
संगत घडली याहो.. । किसनजी देवा ॥
॥ लोहा घासे परेशाले/परिसाले । लोहा घासे परेशाले/परिसाले ।
कंचन करा महाराजा देहीले । राखन करा महाराजा देहीचे ॥
॥ सावंग्यात परेश नांदे । या देवळात परेश नांदे ।
कंचन/अंबर करा.. । महाराजा देहीले ॥

॥ गाई चा भजन पाठा नं. ०४/०७ ॥

॥ गायी वाणी हुंबरतो । वासरा वाणी तुयी वाट पाहयतो ॥
॥ देवा तु गाय मी वासरु । नको देवा बाळाला विसरु ॥
॥ देवा तु गाय मी वासरु । नको देवा पान्हा चोरु ॥
॥ देवा तु गाय, मी वासरु । संभाळ करा, महाराजा हे लेकरु ॥

॥ हाका मारण्याचा भजन पाठा ०४/०८ ॥

॥ देव वाणी/बाणी संभाळतो । आपल्या नामी देवा तुयी, वाट पाहतो ॥
॥ कृष्णा याहो लवकरं । वाट पाहतो आम्ही । अन्जांन लेकरं ॥
॥ हाका मारतो मोठयानं । नको-होवु आंधळा, पाहय डोळा उघडुन.
॥ हाका मारतो मोठयानं । नको होवु बहीरा, कर यवगाचे काम ॥
॥ हाका मारतो मोठयानं । सदा विनवितो, राहयं आमच्या संगतीन ॥
॥ आजचा दिन दिवस ठरला । तुला हाका मारता आमचा कंठ सुकला
॥ कोण्या कोण्या परी । हाका मारू तुला ।
प्रल्हादा साठी तु खांबात अवतरला ॥
॥ कोण्या कोण्या परी । हाका मारू तुला ।
व्द्रौपदी साठी तु धावुन आला ॥
॥ कोण्या कोण्या परी हाका मारू तुला ।
दामाजी साठी तु महार झाला ॥
॥ कोण्या कोण्या परी । हाका मारू तुला ।
तारण करा महाराजा । या देहीला ॥

॥ हाका मारतो । यवग्याले/योग्याले । विश्वाच्या चालकाले । हाका..
॥ यवग्याले..। गादीच्या मालकाले । हाका मारतो ॥
॥ यवग्याले । तु तार बा आम्हाले । हाका मारतो ॥
॥ हाका मारतो, यवगेश्वरा । कलयवगाचा मोहरा, लवकर याहो ॥
॥ आदीमुनी । आम्हा पाजा अमृत वाणी । लवकर याहो ॥
॥ क्षिरसागरचा वसणारा । लवकर याहो गरूडावर बसणा-या ॥
॥ करा या गरूडावर स्वारी । देवराया आहे अन्जानाचा कैवारी ॥

॥ श्रीकृष्णा जगजीवना चा भजन पाठा नं. ०४/०९ ॥

॥ श्री कृष्णा । जगजीवना । भेट दयाहो भक्तजना ॥ लवकर याहो.
॥ श्रीकृष्णा । जगजीवना । माझेया मनाच्या मोहना ॥ लवकर याहो
॥ श्रीकृष्णा । जगजीवना । ही अरज अन्जानाची ॥ लवकर याहो..
॥ श्रीकृष्णा । तु जगजेठी । दयाहो अन्जानाला भेटी । लवकर याहो
॥ विनवितो सारंगधरा, कृपावन भरा, दया सागरा, रंगधरवरा, रंग धरा..
तुमच्या विन चवताळी देव नाही दुसरा ॥

॥ कृष्ण/किसनजी राया जगजेठी चा भजन पाठा नं. ०४/१० ॥

॥ नामी आधार सांगतला । नामी आधार सांगतला ।
भक्तासाठी/यवगासाठी/तारासाठी देवान । अवतार धरला ॥
॥ कृष्ण राया जगजेठी । किसनजी राया जगजेठी ।
वस्त्र पुरवले । त्वां व्द्रौपदी साठी ॥
॥ कृष्ण/किसनजी राया जगजेठी । महार झाला, तु दामाजी साठी ॥
॥ कृष्ण राया जगजेठी । किसनजी राया जगजेठी ।
धावुन अवतार धरला । प्रल्हादा साठी ॥
॥ चुकवं फे-या प्रल्हादाच्या सारखा । उतर देवा पल्हादा च्या सारखा
तसाच धावत येबा कृष्ण अवधुता
॥ कृष्ण राया जगजेठी । भाग्य दैवानं झाल्या भेटी ॥
॥ भक्तासाठी तो जगजेठी । आला धावुनी ।
आला धावुनी सत्य भक्ताच्या वचनी ॥
॥ भक्तासाठी तो जगजेठी । आला धावतं ।
सावंगनगरी देव भक्ताच्या गुंतला वचनात ॥

॥ नामाचा महीमा गाही चा भजन पाठा नं. ०४/११ ॥

॥ नाम घेता वाया गेला । ऐसा कोणी नाही ऐका ॥
॥ नाम घेतले वाल्मिकानं । त्याच्या टोणप्याला फुटले पानं ॥
॥ अशी तुया नामाची महीमा । अशी तुया नामाची महीमा ।
अग्नी मध्ये, तारल्या । मुंग्याच्या सेना ॥
॥ अशी तुया नामाची गाही । अशी तुया नामाची गाही ।
नामी तारला । सधन कसायी ॥
॥ अशी तुया नामाची गाही । अशी तुया नामाची गाही ।
नामी तारला । वाल्या कोळी ॥
॥ अशी तुया नामाची गाही । अशी तुया नामाची गाही ।
नामी तारला । सावत्या माळी ॥
॥ अशी तुया नामाची गाही । अशी तुया नामाची गाही ।
अहील्या उध्दारल्या । वनाच्या ठायी ॥
॥ अशी तुया नामाची भिस्त । अशी तुया नामाची किर्त ।
या देवानं निर्जिव, चालवली भिंत ॥
॥ अशी तुया नामाची किर्त । भक्तासाठी त्वा चालवली भिंत ॥

॥ निर्गुण अवतार भजन पाटा नं. ०४/१२ ॥

॥ निर्गुण अवतार बहुता गुण । हरीनं भक्तीचं वाढवंल निशाण ।
हरी कृपेचे सागर । शकुनी कळतीन लक्षण ॥
॥ निर्गुण अवतार बहुता गुणी । ईथं नांदतो श्रीहरी ।
दया करा बाळावरी ॥

॥ निराकार निर्गुण भजन पाठा नं. ०४/१३ ॥

॥ निराकार निर्गुण निरंजन । ज्योत मला दाखव ।
अनंत ब्रम्हांडाच्या वरत । सेरूप ओळखावं ॥
॥ अनंत ब्रम्हांडाच्या वरत । सेरूप कृष्णाचे ।
सेरूप कृष्णाचे पुढे सुखः । अनंत यवगाचे ॥

॥ अनंत यवगाचा भजन पाठा नं. ०४/१४ ॥

॥ अनंत यवगा वर । तारले महामहा विर ।
हरी भजनी देवा तार । महाराजा/मायबापा ॥
॥ अनंत यवगा साठी । उभे राहयले/आहे जगजेठी ।
हरीभजनी/कलयवगी दयाहो भेटी । महाराजा/मायबापा ॥
॥ अनंत यवग तारा । महाराजा कृष्ण अवतारा ।
तुमच्या विन मजला, देव नाही दुसरा ॥
॥ अनंत यवग झाले । महाराज होवुन गेले ।
या सुक्ष्म देहीवर देव आणनं मानवाले ॥

॥ अंम्बर पदाचा भजन पाठा नं. ०४/१५ ॥

॥ अंबर पदाची वासना । अंम्बर पदाची वासना ।
पुरवा पुरवा..। महाराजा श्री कृष्णा ॥
॥ अंम्बर पदाची वाट अजुनं । नाही मालुमं..।
भल्या भलत्याला नाही गवसलं । अंम्बर ठिकाणं ॥
॥ उपणुन घ्याहो । वार सुटलं मावेच/सांगीचं..
ज्याच्या नशिबी असनं तो । भजन करनं देवांच ॥

॥ भक्ती-भावचे भजन पाठा नं. ०४/१६ ॥

॥ थोर महात्मे होवुन गेले । चरित्र पहा त्याहीचे जरा ।
त्याहीच्या समान व्हावे गडेहो । तेव्हाच होईन बोध खरा ॥
॥ भजन/भक्ती करा देवाचीं । नका, बसु निचंत. ।
हीवेळ गेल्या वर पुढंमग । परस्तावलं मनं ॥
॥ भक्ती करून निःसंग होजो । ऐक जन/प्राण्यां आता ।
या भक्तीला भंगु-नको-देवु वाया, जाशील अघोगता ॥
॥ भक्ती प्रेमाची प्रेमाची । अधिर नाही कामाची ॥ भक्ती प्रेमाची..
॥ भक्ती प्रेमाची प्रेमाची । देव चुकवन चौ-यांशी । भक्ती प्रेमाची.
॥ प्रेम भक्तीची मोहनी घातली । धावुन आली कृष्ण/विठोबा माउली ॥
॥ भक्ती केली रायानं । घरामध्ये घातलं चैतन्यं ।
अशीच भक्ती करा देहे-जीव तरतील नामानं ॥

॥ अनामिका घरी आला । भाव/भक्ती पाहुन देव सावध उतरला ॥
॥ असा या अनामिकाचा भाव । भाव/भक्ती पाहुन उतरला देव ॥
॥ भाव धरा भक्ती करा । भावीकासाठी हो देव भावीक झाला ॥
॥ ज्याचा भाव त्याची भक्ती । देव उभा आहे भावाच्या/भक्तांच्या संगती
॥ ज्याचा भाव त्याची भक्ती । विठोबाराया देव त्याहीच्या संगती ॥
॥ ज्याचा भाव त्याची भक्ती । देव आहे त्याचा बहुयवगाचा संगती ॥
॥ ज्याचा भाव त्याचा देव । उभा आहे हो अवधुत राव ॥
॥ देव भावाचा भुकेला । देव नाही कोणाच्या बापाचा ॥
॥ देव भावाचा भुकेला । चाकर आहे तो भावीक भक्तांचा ॥
॥ हद्यी घोक नामाचा । सद्गुरू चाकर आहे प्रेमी भक्ताचा/दासाचा ॥

॥ देव रंगाचा रंगारी चा भजन पाठा नं. ०४/१७ ॥

॥ देव रंगाचा रंगारी । अवघे रंग..। देव रायाच्या घरी ॥
॥ देवामाझे अंतर/अंतरंग रंगवा । यवगा यवगी मजला संग वागवा ॥
॥ देवा माझे अंतःकरण रंगवा । हद्यी धरून मजला संग वागवा ॥

॥ निरशुन्याचा भजन पाठा नं. ०४/१८ ॥

॥ क्षिरसागरी धुम्धुम्कार । तिथुन गर्जला तो परमेश्वर ॥
॥ निरशुन्यामध्ये तो अवधुत/भगवंत । निराकार होता ।
तुमच्या बिन, कोणी नाही बापा । मोक्षाचा दाता ॥
॥ निरशुन्याहुन विहीर खोदली । सावध होवुन, सावध पाहयी ।
सावंगपुरी पाय लावला । सावध ज्योत या रायाची ।
सावंगपुरी पाय लावला । पावन ज्योत या भक्तांची ॥
॥ निरशुन्याहुन विहीर खोदली । कोण होय वनमाळी ।
सावंग नगरी बाग लावला । सत्वाच्या केळी ॥
॥ निरशुन्याहुन आले भगवंत । मिर्त लोकात ।
सावंगपुरी अवतार धरला । अहिनाच्या ईथं ॥
॥ निरशुन्यांहुन आले अवधुत । मिर्त लोकात ।
सावंगपुरी दुकान लावलं । हरी नामाची पेठं ॥

॥ तुया नामी भजन पाठा नं. ०४/१९ ॥

॥ तुझ्या नामी हो, तुझ्या नामी । उडया घातंल्या आम्ही ॥ तुझ्या.
॥ तुया नामा हो तुया नामा । यवग भरले मेघश्यामा ॥ तुया..
॥ तुया नामा हो तुया नामा । यवगी आले मेघश्यामा ॥ तुया..

॥ तुया नामा हो तुया नामा । तुही तारशीन आम्हा ।
तुही तारशीन आम्हा । लवकर याहो मेघश्यामा/घनश्यामा ।
लवकर याहो घनश्यामा । कलयवगी आहे तुमची महीमा ॥

॥ लक्ष्य तुया पायाचे भजन पाठा नं. ०४/२० ॥

॥ लक्ष्य तुया पायाचं ध्यान । हेच मागतो.. । महाराजा मागणं ॥
॥ लक्ष्य तुया पायाचं ध्यानं । चुकव बापा हे चौ-यांशी यवनं ॥
॥ लक्ष्य तुया पायाची माती । हेच होय माझी । गंगा भागीरथी ॥
॥ लक्ष्य तुया पायाची धुळ । यामध्ये झाली या बाळाची आंघोळ ॥
॥ ज्ञान गंगा भरली । यामध्ये आंघोळ या बाळाची झाली ॥
॥ ज्ञान गंगेची उकळी । निर्मळ झाली या बाळाची देही ॥
॥ या देवळातं गंगा वाहे । या देवळात ज्योत नांदे ।
केव्हा येशीन हो कृष्णा । दहाही बाजुनें ॥
॥ कृष्णाची आहे चातुरी/ठाकुरीं । आता आहे याहीची तिरलोकी गाही ॥

॥ तिरलोक्याचा होय दाता भजन पाठा नं. ०४/२१ ॥

॥ तिरलोक्याचा होय दाता । संभाळ करा..। महाराजा अवधुता ॥
॥ संभाळ संभाळ वचनं । वचनी गोयले..। देवराया किसनं ॥
॥ वचनं दिले मानवाले । मानवांची हो देवा..। कारूणा तुले ॥
॥ कारूणा येवु दे माझी । प्रार्थना करतो अवधुत राया तुझी ॥

॥ विठ्ठला मायबापा भजन पाठा नं. ०४/२२ ॥

॥ विठ्ठला मायबापा । कारूणा, येवु दया माझी ।
कारूणा, येवु दे माझी । प्रार्थना करतो तुझी ॥
॥ प्रार्थना करतो तुझी । तुम्ही सदा, ठेवजा नामी ।
सदा ठेवजा नामी । एवढी दया, येवु दे माझी ॥
॥ दया करा या बाळावरी । माथा तुमच्या चरणा वरी ॥
॥ दया करा दयावंता । दया करा दयावंता ।
तुम्हा विनवितो । महाराजा भगवंतां/कृष्ण अवधुता ।
पदरी धरा.., महाराजा भगवंता/अवधुता ।
॥ दया करा दयावंता । येवुन तारा, महाराजा अवधुता ।
तुम्हा विनवितो महाराजा अवधुता/भगवंता ।
तुमच्या चरणावर आमचा माथा ॥
॥ दयावंत उभा राहयं । वाणी बिरदाची बिर्दाची संभाळ ॥
॥ दयावंत ऋषिकेशी । आम्हाला नांदव आपल्या पायापाशी ॥
॥ पायी धरला धावा । तुमच्या परता अधार नाही देवा ॥

॥ येवु दे कारूणा जन्मोजन्मीच्या चुका चे भजन पाठा नं. ०४/२३ ॥

॥ येवु दे कारूणा । येवु दे कारूणा । देवा गा माझी ।
माझे या अपराधाची । येवु दे कारूणा ॥
॥ कारूणा येवु दे आता । तुमच्या चरणावर ठेवला माथा ॥
॥ मागं झाल्या पुढं होतीन । जन्मों जन्मीच्या चुका ।
जन्मो जन्मीच्या चुकां संभाळ । करा कृष्ण सख्या ॥
॥ मागं झाल्या पुढं होतीन । जन्मों जन्मीच्या चुका ।
जन्मो जन्मीच्या चुकां माफ । करा विठ्ठल सख्या ॥
॥ मागं झाल्या पुढं होतीन । जन्मों जन्मीच्या चुका ।
तुमच्या वाचुन कोण तारण । विठ्ठल माझेया सख्या ॥



## ॥ झेंडा उभारला झेडयाचा भजन पाठा नं. ०४/२४ ॥

हा झेंडयाचा भजन पाठा झेंडे चढवणारा जेव्हा झेंडयाच्या शेंडयावर चढुन/पोहचुन झेडे चढवण्यास आरंभ करतो, तेव्हा भजनी हा झेंडयाचा भजन पाठा म्हणणे चालु करतात.



गजरः- ॥ झेंडा उभारला, कौलाचा..। गजर हरी नामाचा ॥ झेंडा..
॥ झेंडा उभारला । यवगाचा..। चतुर्पती नामाचा । झेंडा.. ॥
॥ यवगाचा..। अवधुत या नामाचा । झेंडा उभारला.. ॥
॥ यवगाचा..। तुमच्या नामाचा । झेंडा उभारला ॥
॥ यवगाचा..। उंची या मोलाचा । झेंडा उभारला..॥
॥ यवगाचा..। सत्य/सिदाई या देवाचा । झेंडा उभारला.. ॥
॥ यवगाचा..। सत्य या यवगाचा । झेंडा उभारला.. ॥०६॥



॥ झेडे दोही कडे दोनं । मध्ये उभे..। देव नारायणं ॥
॥ झेंडे सागाचे होय । साग नोव्हे, देव भगवान होय ॥
॥ झेंडे सागाचे होय । साग नोव्हे, कृष्ण अवधुत होय ॥
॥ या झेंडयाच्या सावलीनं । रोग विघ्ने हे जातीन जळूनं ॥
॥ या झेंडयाच्या सावलीनं । नर नारी..। हे उध्दारले दोनं ॥
॥ या झेंडयाच्या सावलीनं । देहे-जीव..। हे तरले दोनं ॥
॥ दोन्ही झेंडे लाल लाल । दुरून दिसते सावंग माहेर ॥
॥ झेंडे फरारती दोन्ही । मालक उभे देव चतुर धनी ॥

॥ सुटला शकुनाचा वारा - भजन पाठा नं. ०४/२५ ॥

॥ सुटला शकुनाचा वारा । ऐसा बोले.., झेंडयाचा फरारा ॥
॥ आजचा दिवस आनंदाचा ।
झेंडा उभारला, कृष्ण अवधुताचा/देवाचा ॥
॥ आजचा दिवस आनंदाचा । झेंडा उभारला, देवा-भक्तांचा
॥ आजचा दिवस आनंदाचा ।
झेंडा उभारला चतुर्पती नामाचा ॥
॥ आजचा दिन आनंदाचा । झेंडा उभारला सत्य यवगाचा ।



॥ धन्य आजचा दिन भजन पाठा नं. ०४/२६ ॥

॥ धन्य धन्य आजचा दिन ।
मजला झाले, झेंडयांचे/देवाचे दर्शन ॥
॥ झाले देवाचे दर्शनं । मजला/आम्हा झाला। देव प्रसन्नं ।
॥ झाला देव प्रसन्न । विनवा विनवा दोन्ही हातं/कर जोडुनं

॥ कृपा सागर चा भजन पाठा नं. ०४/२७ ॥

॥ माझे अंतर मिटवा । यवगा यवगा मजला संग वागवा
॥ मजला अंतर ठेवु नको । मजला अंतर ठेवु नको ।
कृष्णदेवा सागर भरला । देवा, तुम्हा पाशी हो ॥
॥ तुमचे नावं सागर । म्हणुन म्या धरला देवा । तुमचा पदरं ॥
॥ तुम्ही कृपेचे सागर । कृपा कर.. ।
आम्ही अन्जान लेकरं । नका ठेवु दुर ।
आम्ही धरला तुमचा पदर । नका ठेवु/करू दुर ।
॥ कृपा करजो । घे पदराशी..। देहे तार या बाळाची ॥
॥ कृपा करजो । घे पदराशी..। तार या गोपाळाशी/अन्जानाशी ॥
॥ बाळ ओटयात घेतला । अमृत पान्हा माय पाजे बाळाला ॥

॥ अमृत पान्हा पाजला । हात मुखाहुन बाळाच्या फिरवला ॥
॥ हात मुखाहुन फिरवला । दया केली महाराजा भगवंता ॥

॥ तारक नाम तारक चा भजन पाठा नं. ०४/२८ ॥

॥ तारक.., नाम तारक । कर भक्तीचं सार्थकं । नाम तारकं..
॥ तारक.., नाम तारक । कर देहीचं सार्थकं ॥ नाम तारकं..
॥ तारक.., नाम तारक । कर बाळाचं/ लेकरांचं सार्थकं ॥ नाम..
॥ तारक.., नाम तारक । देव अन्जानाचा तारक ॥ नाम तारक ॥

॥ तार देवा तार चा भजन पाठा नं. ०४/२९ ॥

॥ तार देवा तार..। तुया नामाचा आधार ॥
॥ तार देवा तार..। तुया सांगीचा आधार ॥
॥ तार देवा तार..। तुया पायाचा आधार ॥
॥ तार देवा तार..। चिंडी-मुंगी सुध्दा तार ॥
॥ चिडी मुंगी सुध्दा तार । तेव्हा म्हणन कृष्ण अवतार ॥
॥ देहे तार मायबापा । वेळोवेळा तुया चरणी माथा ॥

॥ भरोसा चा भजन पाठा नं. ०४/३० ॥

॥ नामी तरन, तरल भरोसा । नामी तरन, तरन भरोसा ।
उभा आहे, हा देव अन्जानाचा सखा ।
उभा आहे हा हरी । आत्म जीवाचा सखा ॥
॥ तारण तारण ऐसा भरवसा । ऐसा आहे या हरीनामाचा ठसा ॥
॥ ऐसा आहे हरीनामाचा ठसा । या हरीनामाला विसरू नका ॥
॥ या हरीनामाला विसरू नका । ऐसा बोले माझा कृष्ण सखा ॥
॥ नामी तरन भरोसा आहयं । मजबुत धरा या देवरायाचे पायं ॥
॥ मागं तारलं पुढं तारशीन । भरोसा आहयं ।
भरोसा आहे म्हणुन म्या । धरले तुमचे पायं ॥

॥ पाय धरले चा भजन पाठा नं. ०४/३१ ॥

॥ पाय म्या धरले मजबुत । नाही सोडत हो जगजेठं ॥
॥ पाय म्या धरले बळकट । तुमच्या चरणी देह करा मजबुत ॥
॥ तुमचे चरण माझी डोही । हो हाच करार..।
भक्त जनावर करावं दया बहु यवगं तारं ॥
॥ पदरी धरलं, नका जावु दुर । पदरी धरलं, नका जावु दुर ।
लोट मारतो देवा, तुमच्या चरणा वरं ॥

॥ मागण लय नाही भजन पाठा नं. ०४/३२ ॥

॥ धरले चरण उभा जवळ । हेच मागतो महाराजा मागणं ॥
॥ मागणं लय नाही लय नाही । लक्ष्य तुमच्या पायी ॥ मागणं..
॥ मागणं लय नाही लय नाही । सदा राहयजो या देह घरी ॥
॥ मागणं लय नाही लय नाही । देहेतुन जावुच नको कयी ॥
॥ मागणं लय नाही लयं नाही । अंबर करा नरदेही ॥
॥ मागणं लय नाही लय नाही । सुखी नांदव ही नरदेही ॥
॥ मागणं लय नाही लय नाही । या ईच्छा पुर्ण कर या देही ॥
॥ मागणं लयनाही लयनाही । मागण लयनाही लयनाही
माझ मजला देणं दयाहो महीमा तुयी ॥

॥ सुखः चे भजन पाठा नं. ०४/३३ ॥

॥ अमृताची गोडी हो देवा । तुमच्या भजनात, तुमच्या नामातं ।
तारा हो देवा । ठेवा हो देवा । सुखी जिवनातं ॥
॥ सुखा साठी भजलासे हरी । सुखः दयाहो महाराजा देहीवरी ॥
॥ परमय सुखाची वाणी । सुखः दयाहो महाराजा येवुनी ॥
॥ परमय सुखाची वाणी । भेट दयाहो महाराजा येवुनी ॥

॥ आत्मा सावध हो भजन पाठा नं. ०४/३४ ॥

॥ हरी भजनी.. । प्रेम सुखाची वाणी ।
आत्मा सावध हो.. सावध हो ॥
॥ आत्मा सावध होय तु आता । परमय पदा उभारंल्या ध्वजा ॥
॥ आत्मा सावध होय आता । हरी परमय पदा, चालन तुमची सत्ता ।
॥ आत्मा चालं/ताल, भजनी राहयं.. । बहु यवगं, सुखंः पाहयं ।
॥ हरींचे सुखः आहे थोरं..। हरी उभे, कृष्ण अवतार ।
धनी उभे कृष्ण अवतार । कृष्ण उभे पुर्ण अवतार ॥
॥ धनी उभे, कृष्ण अवतार..। धनी कृपेचे सागर ॥
॥ धनी कृपेचे सागर.. । केली दया बाळा वर ॥
॥ केली दया बाळावर..। माझा माथा चरणा वर ।
आमचा माथा चरणा वर । आमचा माथा चरणां वर ॥
॥ चरणी माथा ठेवला । भारी संभाळ या विठ्ठुनं केला ॥

॥ नाम घ्याहो भजन पाठा नं. ०४/३५ ॥

॥ नाम घ्याहो विठोबाचे । सार्थक आहे हो अनंत यवगाचे ॥
॥ नाम घ्याहो विठोबाचे । सार्थक होईन या देह जीवाचे ॥
॥ नामी रहावं । देवाच्या..। विठ्ठ पुरवन तुमची आशा ॥ नामी रहावं
देवाच्या..। देव चुकवण तुमची चौ-यांशी ॥ नामी रहावं..
विठुच्या..। विठ्ठ पुरवन तुमची आशा ॥ नामी राहव..
॥ नाम रसाई....। अमृताचा प्यालां । जो पिवुन मग्गंम झाला ।
तो वाणी सांगे, जगां ला । नवल सांगे जगाला ॥

॥ रस्ता दाखव देवा चा भजन पाठा ०४/३६ ॥

॥ कानी आवाज ऐकला । म्हणुन म्या रस्ता, सावंग्याचा धरला ॥
॥ आम्ही आहो मुढं मुढं । आम्ही आहो मुढं मुढं ।
रस्ता दाखव देवा..। होय गा पुढं ॥
॥ रस्ता आहे बिकटं । रस्ता आहे बिकटं ।
म्हणुन म्या धरली देवा..। सावंग्याची वाट ॥
॥ रस्ता आहे कठीण । कठा कठा बापहो हरीच्या नामानं ॥

॥ भैसराज महाराज भजन पाठा नं. ०४/३७ ॥

॥ भैस राज महाराज उभे । राहा येवुन ।
तुमचे चरण लागता धरनी । होईन कंचनं ॥
॥ भैस राज महाराज उभे । राहां येवुनं ।
आकाशावर/चौताळावर तुमची सत्ता । चालव इथं येवुन ॥
॥ खेळ खेळते सारंगपाणी । हा उभा राहीला यवगी माझा धनी ॥
॥ खेळ खेळते सारंगधर । हा उभा राहीला नर भुम्मेवर ॥
॥ नरा रे कर नर-नारायण गडी । तेव्हाच सार्थक होईन मानव कुडी ॥

॥ गजर ॥

॥ या आनंदाच्या भरा । या आनंदाच्या भरा ।
हरी भजन हो भजन किर्तन करा ।
यान काय होतं रे नरा । यान काय होतो रे नरा ।
पापाचे जळतीन पर्वत । पुण्याच्या पडतीन भरा ॥

॥ सांगी सांगतली चा भजन पाठा नं. ३८ ॥

॥ नामी अधार सांगतला । यवगासाठी देवानं अवतार घेतला ॥
॥ नामी अधार सांगतला । तारा साठी देवानं अवतार घेतला ॥
॥ कशी भुलवण पडली देवा । कशी भुलवण पडली जना ।
या महाराजाचा.. । खेळ कोणा समजेना/कळेना ॥
॥ सांगी सांगतली सांगुन । सांगी ठेवली सांगुन ।
तुमच्या विन हो मजला/आम्हा । कोण सांगण ? ॥
॥ सांगी झाली हो अंतराळी । सांगी झाली हो अंतराळी ।
याहो महाराजा । पुर्ण करून दया सही ॥
॥ सांगे अंतरच्या खुणा । सांग अंतरच्या खुणा ।
घेवुन येईन देव.. । पुर्विचा ठेवा ॥

॥ पुर्विचा ठेवा चा भजन पाठा नं. ३९ ॥

॥ पुर्विचा ठेवा, हरी भजु देवा । ही वेळ लागली पुण्याची ।
मानव जन्म हि-या समान । करा भक्ती या देवाची ॥
॥ पुर्विचा ठेवा, हरी भजु देवा । ही वेळ लागली पुण्याची ।
देव दरबारी बिजली चमकली । ज्योत हरीच्या नामाची ॥

॥ कामगीरी भजन पाठा नं. ४० ॥

॥ यान केली हो कामगीरी । यान केली हो कामगीरी ।
हा देव चुकवण बाप्पा.. । चौ-यांशी फेरी ॥
॥ यान आत्मा घोष देल्ला । यानं आत्म घोष देल्ला ।
हा देव येवुन बाप्पा, साहयं झाला ॥
हा राया उभा राहुन, साहय झाला ॥
॥ साहयं झाले तुम्हा हातं । तुमच्या चरणी आमचा दंडवत ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ झेंडा चढवल्या नंतर चा रमणा, परिक्रमा कार्यक्रम चा साचा ॥

- झेंडयाचे भजन पाठे म्हणणे होईपर्यत चौघडयाचा वेळ होवुन, या चौघडयाच्या संधीकाळात सभामंडपात चौघडा म्हणणे झाल्यानंतर, झेंडयासमोर 'आरती ओवाळीतो, महाराजा आदीपुरूष'-१०/२/०१ ही एक आरती म्हटली जाते. त्यानंतर
- राउळाला प्रर्दक्षिणा घालत असतांना 'किसनजी पदर पसरतो तुम्हा खंड१०/०१/०९' हे अर्ज भजने म्हटल्या जातात. त्यानंतर
- भजने म्हणत राउळातुन रमणा बाहेर निघतो.
- रमणा फिरून राउळात आल्यावर कलयवगी भैस आले-१०/२/०२ किंवा ज्या आरतिचा शकुन येईन, ती आरती म्हटल्या जाते. त्यानंतर शक्तिची 'कोट कोट-१०/२/०३, आरती व आरती चेंडीकेची-१०/२/०५ ही आरती. त्यानंतर तारखेची कापुर ज्योती-१०/०२/०४ आरती किंवा टाळ वाजे-१०/०२/०७ ..ईत्यादी आरत्या राउळाच्या चौकोणटयावर चार याप्रमाणे म्हटल्या जातात.



## ॥ दसरा झेंडा नंतरचा रमणा चे आरत्या व भजने ॥

### ईश्वर-पुनाच्या राउळा समोर पहीली आरती :-

### ॥ कृष्णा तु जगजीवना आरती ॥०१॥ खंड १०/०२/१२

॥ कृष्ण रूपा । भेट माय बापा । आरति ओवाळीतो ।
॥ आदीपुरूषा ही अरज ऐक आता । आरती ओवाळीतो ॥

॥ ईश्वर पुना पवन झाला । आपल्या बाळाच्या साहयाले आला ॥
॥ ईश्वर पुना पोवन झाला । नांदव नांदव या देहे जीवाला ॥
॥ ईश्वर पुना परवेशी । आम्हाला नांदव आपल्या पाया पाशी ॥

### ॥ आरती आकाशवाणी... ॥०२॥ खंड १०/०२/१४

॥ तव चरणी । ओवाळु कर्तार धनी । आरती ओवाळु ॥
॥ तव चरणी । ओवाळु अवतार धनी । आरती ओवाळु ॥
॥ तव चरणी । ओवाळु विठोबा/कृष्ण/अवधुत धनी । आरती ओवाळु ॥

॥ आकाश वाणी गरजला । बिरदा साठी देव धावुन आला ॥
॥ आकाश वाणी गरजला । येवुन बिरदावर धनीदेव उभा राहीला ॥
॥ आकाश वाणी गरजला । आपल्या बिरदा वर उभा राहीला ॥

### ॥ ये देव ओ देव, स्वामी अवधुता आरती.. ॥०३॥ खंड १०/०२/२०

॥ नाम घेतो जगजेठी । तारा जगवा महीमा मोठी ।
तारा जगवा महीमा मोठी । मायबापा दयाहो भेटी ॥
॥ मायबापा दयाहो भेटी । तुमची महीमा आहे मोठी ।
तुमची महीमा आहे मोठी । आम्ही जडलो तुम्हा देठी ॥
॥ आम्ही जडलो तुम्हा देठी । दयाहो भक्तजना भेटी ।
दयाहो भक्तजना भेटी । तुमची महीमा आहे मोठी ॥
॥ धुनी नामाची उठली । गर्जना या तिरभवनी झाली ॥

### ॥ गुपीत प्रकट...आरती ॥०४॥ खंड १०/०२/१८

॥ गुपीत प्रकट झाले राया । आरती ओवाळु देवा अवधुताच्या पाया
आरती ओवाळु देवा विठ्ठलाच्या/अनामताच्या पाया ॥

॥ मेघ डंबर सुर्यपानं । भक्ती लावलं हे भगवं निशाण ॥
॥ मेघ डंबर सुर्यपान । तक्ती लावलं भगवं निशाण ॥
॥ मेघ डंबर सुर्यपान । अवधा गिरी देवाचं निशाण/ठिकाणं ॥
॥ मेघ डंबर सुर्यपान । याहीच्या संग आहे भगव/डंकां निशाण ॥
॥ अवतार आले सावंग्यावरी । निर्मळ आहे देवाची नगरी ॥
॥ साळुमाय आली सावंग्यावरी । डंका वाजवते या भुम्मेवरी ॥
॥ साव आला सावंग्यावरी । डंका वाजवला या भुम्मेवरी ॥
॥ कृष्णा उभा सावंग्यावरी । डंका वाजवते या भुम्मेवरी ॥
॥ राम नामाच्या सांगडी । कृष्ण राया बहु यवगाचा गडी ॥
॥ तुया नामाची सांगड । उतरून दयाहो देवा पहीली पार ॥
॥ पहील्या थडीवर नेवुन दाखवा । बाळाला पाय ।
हाती सुदर्शन घेवुन श्रीराम । देव उभा आहयं ॥
॥ खेतरी ढाल पटाईत । बाहेर निघा दया बाळाला/भक्ताला/भक्तीला भेट
॥ खेत्री/हाती ढाल पटाईत । खेत्री आला बाळाचा/अन्जानाचा/लेकरांचा धावुन
॥ खेत्री शुरविर भगवान । बाळासाठी/अन्जानासाठी आला धावुन ॥
॥ खेत्री बाहेर निघाला । रमणा/मोहरा यवगाचा यवगाचा धरला ॥

॥ हदयी/दंडवत परिक्रमा घालतो । देवाच्या नामी ।
हरी परार्थितो/प्रार्थितो । तार विठोबा/कृष्ण/अवधुत धनी ॥
॥ उभा गोपाळाचा मेळ । यामध्ये, महाराज खेळे । कृष्णराज खेळे ॥

॥ रमण्याचा राउळात प्रवेश झाल्यानंतर झेंडयासमोर/राउळासमोर ज्या आरतीचा शकुन येईन ती आरति म्हटल्या जाते. ॥०५॥

- रमणा फिरून राउळात आल्यावर कलयवगी भैस आले-१०/२/०२ किंवा ज्या आरतिचा शकुन येईन ती आरती म्हटल्या जाते. त्यानंतर शक्तिची कोट कोट-१०/२/०३, आरती व आरती चेंडीकेची-१०/२/०५ आरती त्यानंतर तारखेची कापुर ज्योती-१०/०२/०४ ची आरती किंवा टाळ वाजे-१०/०२/०७ ..ईत्यादी आरत्या राउळाच्या चौकोणटयावर चार याप्रमाणे म्हटल्या जातात.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



जळगाव मध्ये झेडे चढण्याचे वेळेस म्हणण्यात येणारे...

## ॥ झेंडयाचे भजन पाठे ..जळगाव दांड ॥

॥ जैसा जैसा शकुन येईन, तैसे तैसे भजने जळगाव येथेही झेंडे चढवण्याच्या कार्यक्रमाच्या वेळी झेंडयासमोर म्हटल्या जातात. ॥

॥ गण भजने ॥

॥ गणराज महाराज देव आले । मिर्तलोकी त्यानं झेंडे उभारले ॥
॥ ...ईत्यादी गणावरचे भजने म्हटल्या जातात. ॥

॥ झेंडा भजने ॥

॥ सावंग्या नगरात कोण एक उतरला राजा ।
झेंडा हे निशाण, त्याहीच्या जरीच्या पताका ॥
॥ देवगाव नगरात कोण एक उतरला राजा ।
झेंडा हे निशान त्याहीच्या असमाणी ध्वजा ॥
॥ ...ईत्यादी झेंडयाचे भजने पाठे म्हटल्या जातात. ॥

॥ झेंडयाची ओवी/भजने ॥

॥ झेंडा उभारला । कौलाचा..। गजर हरिनामाचा ॥ झेंडा उभारला
॥ झेंडा उभारला । देवानं..। मिर्तलोकी येवुन । झेंडा उभारला
॥ झेंडा उभारला । या वखंतं/वक्त...। अवधुता चे हात ॥ झेंडा उभारला
या वखंतं/वक्त...। अलामता चे हात ॥ झेंडा उभारला
या वखंतं/वक्त...। नितरूपा च्या हात ॥ झेंडा उभारला
या वखंतं/वक्त...। निरंजना च्या हात ॥ झेंडा उभारला
या वखंतं/वक्त...। लभेदा च्या हात ॥ झेंडा उभारला
या वखंतं/वक्त...। भैसराया च्या हात ॥ झेंडा उभारला
या वखंतं/वक्त...। आदीरूपा च्या हात ॥ झेंडा उभारला
या वखंतं/वक्त...। आदीपुरूषा च्या हात ॥ झेंडा उभारला
या वखंतं/वक्त...। महामुनी च्या हात ॥ झेंडा उभारला
या वखंतं/वक्त...। आदीमुनी च्या हात ॥ झेंडा उभारला
या वखंतं/वक्त...। विठ्ठला च्या हात ॥ झेंडा उभारला
॥ दोन्ही झेंडे बराबर । दुरून दिसते देवगाव नगर ॥
॥ दोन्ही झेंडे दोन्हीकडे । मध्ये देव नारायण डोले ॥
॥ झेंडा सागाचा होय । साग नोव्हे, देव भगवान होय ॥
॥ झेंडा सागाचा होय । प्रथम झेंडा देही जीवाचा होय ॥
॥ सुटला शकुनाचा वारा । ऐसा बोले झेंडयाचा फरारा ॥
॥ ...... ईत्यादी झेंडयाचे भजने पाठे म्हटल्या जातात. ॥

॥ अनामत महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०९ ॥
॥ भजन पाठा ०५ ॥
ओवी महात्म :- ॥ सावंगनगरी कृष्णाजीच्या राउळात म्हणण्यात येणारा चौघडा ॥

# ॥ सावंग्याचा चौघडा ॥

॥ चौघडयाच्या अगोदर म्हणनीनुसार म्हणण्यात येणारा भजनपाठे ॥०१॥
॥ गळ्यात मोहन माळ । कानी, कुडलच लेला ।
कुंडलच लेला किसनजी, भजना मध्ये आला ॥
॥ गळ्यात मोहन माळ । कानी, कुंडलच शोभे ।
कुंडलच शोभे, कृष्णदेव । भजना मध्ये उभे ॥
॥ पितांबराचा काठ । शेला, गगनी झळकला ।
गरूडावर बसुन देव माझा । कनवाळु/कैवारी आला ॥
॥ नाचता खेळता देवाचा । ढळला पितांबर ।
साधु संत गर्जती नित, नामाचा गजर ॥
॥ नामदेव किर्तन करी पुढे काय । नाचे पांडुरंग ।
साधु संत रहयंती नित । नामात दंग ॥

॥ चौघडयाचे वेळेचे विनवनी भजने ॥०२॥
॥ झाली चौघडयाची वेळ । अवघे गोपाळ देवा, गोळा कर ।
चौघडयाची वेळ झाली । गोपाळा संग देव, कृष्ण मुरारी ॥

॥ येई ये येई ये । सावंग्याच्या राजा ये ।
सावंग्याच्या राजा ये । अन्जानाला पदरी घे ॥
॥ अन्जानाला पदरी घे । अडाण्याला ग्यान दे ।
आम्ही अडाणी अडाणी । आम्हाला लावा आपल्या नामी ॥
॥ आम्हाला लावा आपल्या नामी । पाय दाखव येवुनी ।
अधार तुमच्या पायाचा । संभाव निभाव बाळाचा ॥
॥ तुये तुले मालुम । आम्ही आहो लेकरं अन्जान ।
आमच्या हाती काही नाही । आम्ही लागलो देवाच्या पायी ॥
॥ अवघ तुमच्या हुकमात । हुकमा बिना पत्ता नाही हालत ।
हुकमा बिना हालतनाही पत्ता । चवताळी आहे तुमची सत्ता ।

॥ कापुराचे भजने ॥०३॥
॥ उदा कापुराचा वास । उठन चवताळी ।
अवधुत गर्जना । होते नामा वरी.. ॥
॥ उदा कापुराचा वास, उठन चवताळी । धुव्वा असमानी... ।
गर्जना द्युताची, होते नामा वरी ॥

॥ चौघडा ॥०४॥
॥ अनामत धनी बिरदपर खडे । नामके, वाजे चौघडे ।
ओहंम्-सोहंम् बिरदपर खडे । नामके वाजे चौघडे ॥
॥ निराकार बिरदपर खडे । नामके वाजे चौघडे ।
निराधार बिरदपर खडे । नामके वाजे चौघडे ॥
॥ निरंजन धनी बिरदपर खडे । नामके वाजे चौघडे ।
आदी गण बिरदपर खडे । नामके वाजे चौघडे ॥
॥ आदी पुरूष बिरदपर खडे । नामके वाजे चौघडे ।
महा पुरूष बिरदपर खडे । नामके वाजे चौघडे ॥

॥ आदी रूप बिरदपर खडे । नामके वाजे चौघडे ।
आप रूप बिरदपर खडे । नामके वाजे चौघडे ॥
॥ आदी भैस बिरदपर खडे । नामके वाजे चौघडे ।
भैस राज बिरदपर खडे । नामके वाजे चौघडे ।
॥ अवतार धनी बिरदपर खडे । नामके वाजे चौघडे ।
कर्तार धनी बिरदपर खडे । नामके वाजे चौघडे ॥
॥ श्री प्रभु बिरदपर खडे । नामके वाजे चौघडे ।
राहु धनी बिरदपर खडे । नामके वाजे चौघडे ॥

॥ कृष्ण धनी बिरदपर खडे । नामके वाजे चौघडे ।
अवधुत धनी बिरदपर खडे । नामके वाजे चौघडे ॥
॥ विठ्ठल धनी बिरदपर खडे । नामके वाजे चौघडे ।
दिगांबर धनी बिरदपर खडे । नामके वाजे चौघडे ॥
॥ चत्रभुज बिरदपर खडे । नामके वाजे चौघडे ।
सारंगपाणी बिरदपर खडे । नामके वाजे चौघडे ॥
॥ संतु-चिंतु बिरदपर खडे । नामके वाजे चौघडे ।
गोविंदा-हरी बिरदपर खडे । नामके वाजे चौघडे ॥

॥ नौबत ॥०७॥

॥ ईश्वर-पुना बिरदपर खडे । नामके,
नित वाजे चौघडे हो । नौबत वाजे चौघडे ।
राव-साव बिरदपर खडे । नामके,
नित वाजे चौघडे हो । नौबत वाजे चौघडे ॥
॥ मेघश्याम बिरदपर खडे । नामके,
नित वाजे चौघडे हो । नौबत वाजे चौघडे ।
परशुराम बिरदपर खडे । नामके,
नित वाजे चौघडे हो । नौबत वाजे चौघडे ॥
॥ सुखःप्रताप बिरदपर खडे । नामके,
नित वाजे चौघडे हो । नौबत वाजे चौघडे ।
श्रीराम बिरदपर खडे । नामके,
नित वाजे चौघडे हो । नौबत वाजे चौघडे ॥

॥ आत्माराम बिरदावर उभा । आत्माराम.., बिरदावर उभा ।
सदाराम नामाचा । नित वाजे चौघडा ।
सदाराम नामाचा । नौबत वाजे चौघडा ॥
॥ लदबद् ज्योत.., बिरदावर उभा । लदबद् ज्योत.., बिरदावर उभा
चतुर्पती नामाचा । नित वाजे चौघडा ।
चतुर्पती नामाचा । नौबत वाजे चौघडा ॥

॥ सचित्तानंद बिरदावर उभा । सचित्तानंद बिरदावर उभा ।
आकाश-धरणी नामाची नौबत । घडाळ-घंटा, घंटा वाजे चौघडा
आकाश-धरणी नामाची नौबत । घडाळ-घंटा, अखंड वाजे चौघडा ॥
॥ पाणी-पवन बिरदावर उभा । पाणी पवन बिरदावर उभा ।
चंद्र-सुर्य नामाची नौबत । घडाळ-घंटा, घंटा वाजे चौघडा ।
चंद्र-सुर्य नामाची नौबत । घडाळ-घंटा, अखंड वाजे चौघडा ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ चौघडयानंतर चा गजर ॥०६॥

॥ चौघडा वाजे अनुहात् । उभे राउळात । कृष्ण अवतारं.....।
महाराजां.. । तु येवुन देहे तार... ॥
॥ चौघडा वाजे अनुहात् । उभे राउळात । कृष्ण अवतारं......।
प्रभु अवतारां.. । बाळावर दया कर... ॥

॥ चौघडया नंतरचे भजने ॥०७॥

॥ किसनजी राउळात आहे । सामने वाजे, चौघडा घडाळं ।
किसनजी राउळात उभा । सामने वाजे, घडाळ चौघडा ॥
॥ सुर्या सम्मोर वाडा । दरवाज्या वर, नित वाजे चौघडा ।
सुर्या सम्मोर वाडा । रोग-विघ्न, महाराजा निर्वाळा/निवारा ॥
॥ चौघडा वाजे नामाचा । गजर होतो, या हरीच्या नामाचा ।
चौघडा वाजे नामाचा । चुराडा होतो, या रोगा विघ्नाचा ॥
॥ चौघडा वाजे दनादन । गोपाळ आले.. मुज-याला धावुन ।
आले मुज-याला धावुन । महाराजा, देवा तु देहे तारनं ॥
॥ चौघडयाच्या नादानं । रोग-विघ्न.. हे जाते जळुन ।
ऐसा चौघडयाचा नाद । रोगा विघ्ना चा, झाला भंग ॥
॥ सावंग आहे, आहे अगुचर । नित्य नामाचा, होतो बा गजर ।
सावंग सोयंम् शब्दाचं । माहेर होये, या भावीक भक्त जनाचं
॥ पहा या सावग्याचे सुखः । जन्म मरणाचे. देहीचे हर्रतीन दुःख
अनामत यवगी परात्पर । याहीच्या चरणी, माझा नमस्कार
॥ उभे आहे अवधुत । याहीच्या चरणी.. माझा दंडवत ।
उभा आहे भैसराजा । याहीच्या चरणी.. आहे मुजरा माझा ॥

॥ गजर ॥०८॥

॥ अनुहात वाजे चवघडा । वाजे चवघडा ।
हा मिटव बा अवघडा । जन्मो-जन्माचा ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ चौघडयानंतरचे भजन-अर्ज ॥०९॥

॥ राख या अर्जिची लज्जा । बिरद संभाळ तु कृष्ण राजा ।
राख या अर्जिचा मान । गोपाळ उभे, दोन्ही हात जोडुन ॥
॥ दोन्ही हात जोडुन । अर्ज करतो, या महाराजाले ।
चांगल्या आनंदानं । नादंव बापा, या देहे जिवाले ॥
॥ आहो देह जिव । देह-जीव देवा, तुमचा होय ।
आहो तुमच्या परता । तुमच्या परता याला कोणी नाही ॥
॥ तुमच्या आंगचा जीव होय । तुमच्या हात देवा, बनली देही ॥
॥ देहजीव बनवला खासा । यावर वर्षाव नाही चालत कोणाचा ॥

॥ देहे जीव बनवला मजबुत । या देवळात नांदते देवाची ज्योत ।
॥ आहो या ज्योतीचा । उजेड आहे मजला, सदोनित ॥

॥ अर्ज-भजने ॥१०॥

॥ अर्ज करतो पामर । उभा आहो, तुमच्या समोर ।
उभा आहो, तुमच्या समोर । एवढे अन्याय, माफ कर ॥

॥ माझया अपराधाच्या राशी । भेदुन गेल्या, गगनाशी ।
अपराध कोटयान कोटी । देवा तुम्ही, घालाना पोटी ॥

॥ दोन्ही जोडुन, धन्याला कर । उभा आहे, पुर्ण अवतार ।
अवतार उभे, लवलावी । देवाच्या, चरणा वर डोही ॥

॥ उभा आहे, माझा सखा । आता नाही, देही ला धोका ।
उभा आहे, माझा देव । आता नाही, कोणा चं भेव ॥
॥ उभा आहे, माझा हरी । तुम्हा बिन, मजला कोण तारी ।
उभा आहे, माझा राम । राम करे, यवगाचे काम ॥

॥ दोन्ही जोडुन, धन्याला हात । उभा आहे, कृष्ण अवधुत ।
दोन्ही जोडुन हस्तक । देवाच्या चरणी मस्तक ॥

गजर ॥११॥
॥ माझ मस्तक तुया चरणी । संकष्टी धाव चक्रंपाणी ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ चौघडा चा साचा ॥

- चौघडा म्हणण्याच्या अगोदर प्रथम विनविनी चे भजन पाठा/पाठे म्हणनीनुसार म्हटल्या जाते.
- त्यानंतर चौघडयाच्या वेळा व येई ये येई ये चा विनवनी भजन पाठा च्या टुका म्हणनीनुसार म्हटल्या जाते.
- त्यानंतर कापुराचा भजन पाठा चे टुका म्हणनीनुसार म्हटल्या जाते.
- कापुर लावल्यानंतर चौघडा म्हणण्यास सुरूवात केल्या जाते. चौघडा म्हणतांना प्रथम
  ॥...... बिरदपर खडे । नामके, वाजे चौघडे ॥ या टुका म्हटल्या जाते.
- चौघडयानंतर नौबत निघत असल्यामुळे शेवटी नित/अखंड नौबत वाजे चौघडा चे टुका म्हटल्या जातात.
  ॥ ...... बिरदपर खडे । नामके, नित/अखंड वाजे चौघडे हो ।
  ... नौबत वाजे चौघडे ॥
  ॥....बिरदावर उभा । ....याहीच्या नामाची नौबत...॥ या टुका म्हटल्या जातात.
- चौघडा वाढल्या नंतर गजर करून चौघडयानंतरचे भजने, अर्ज-भजने ईत्यादी म्हटल्या जातात.



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०९ ॥

॥ भजनपाठा नं. ०६ ॥

॥ चतुर्पतीच्या सर्व दांडातुन संग्रहीत केलेले..॥

# ॥ चौघडयाचे भजन पाठे चा संग्रह ॥

## ॥ चौथा प्रहार ॥

॥ लागला चौथा प्रहर । कृष्णा निघा निघा बाहेर ॥
॥ कृष्णा निघ निघ बाहेर । उठा उठा हो, झाली पहाटेची वेळ ॥
॥ कृष्णा निघ निघ बाहेर । वाट पाहतो आम्ही अन्जान लेकर ॥
॥ शुरविरा बांध कमर, निघ बाहेर । तुला पाहता धरणी कापे थरथर ॥
॥ खेत्री शुरविर भगवान । गोपाळा साठी ये बापा धावुन ॥
॥ खेत्री बाहेर निघाला । यवगाचा रमणा हाती धरला ॥
॥ खेत्री ढाल पटाईत । या यवगाचे कारण आहे याहीच्या हात ॥

## ॥ कानी कुंडल ॥

॥ चौघडयाच्या अगोदर म्हणण्यात येणारा भजनपाठा ॥

॥ फुल पुष्पाच्या माळा । घालुनी गळा ।
भजनात उभा राहीला कृष्ण सावळा ॥
॥ फुल पुष्पाच्या माळा । घालुनी कंठी ।
भजनात उभा राहीला देव जगजेठी ॥
॥ गळ्यात मोहन माळ । कानी, कुडलच लेला ।
कुंडलच लेला, किसनजी । भजना मध्ये आला ॥
॥ गळ्यात मोहन माळ । कानी, कुंडलच शोभे ।
कुंडलच शोभे, कृष्णदेव । भजना मध्ये उभे ॥
॥ पितांबराचा काठ । शेला, गगनी झळकला ।
गरूडा वर, बसुन देव माझा । कनवाळु/कैवारी आला ॥
॥ नाचता खेळता देवाचा । ढळला पितांबर ।
साधु संत गर्जती । नित, नामाचा गजर ॥
॥ नामदेव किर्तन करी, पुढे काय । नाचे पांडुरंग ।
साधु संत नाचती/राहयंती । नित, नामात दंग ॥
॥ कानी कुंडल । गळा मोती, आला रूक्मिनीचा पती ॥ कानी कुंडल
॥ कानी कुंडल । गळा हार, आला रूक्मिनीचा वर ॥ कानी कुंडल

## ॥ चौघाचा चौघडा ॥

॥ चौघडयाच्या अगोदर म्हणण्यात येणारा भजनपाठा ॥

॥ पायी पद्म, मुखी रत्न । हद्यी रायाच्या अमृत ।
पृथ्वीवर अवतार आला । श्रीकृष्ण अवधुत ॥
॥ कपाळी चंद्र कोर । चंद्र-सुर्य आहे लल्लाटी ।
बरा विठुनं अवतार धरला । भक्ता साठी ॥
॥ आदी पुरूष राया घेवुन । आला अवघं ।
भक्ती ग्यान वैराग्य सद्गुण । हे वाजवले चौघं ॥
॥ या चौघाचा चौघडा वाजवतो । श्री कृष्ण हरी ।
सावंगपुरी येवुन याहीनं मोहंर वाजवली ।
सावंगपुरी येवुन कृष्णदेव चौघडे वाजवी ॥
॥ कृष्ण वाजवतो चौघडे । देहीचे रोग-विघ्ने/दुखःदर्द दुर पळे/उडवे ॥
॥ चंदन शिक्का तुच मोहरं । अवघी किल्ली या देवाच्या जवळ ॥
॥ सावंग्यात एक ऋषि । अवघे तिर्थ याहीच्या पाया पाशी ॥
॥ सावंग्यात ज्ञान गंगा । दोष पातक जातीन भंगा ॥
॥ ज्ञान गंगा भरली । यामध्ये आंघोळ या बाळाची झाली ॥

॥ ज्ञान गंगेची उकळी । निर्मळ झाली या बाळाची देही ॥
॥ याहो सावंग्याच्या राजा । कार करा देवा आपल्या हाता ॥



## ॥ चौघडयाची वेळा ॥

॥ चौघडयाची वेळा भजन पाठा ०१ ॥

॥ झाली चौघडयाची वेळा । कृष्ण महाराजा तुम्ही गाई वळवा/सोडा ॥
॥ गाई गेल्या वरच्या राना । कृष्ण महाराजा गाई वळवुन आणा ॥
॥ गाई गेल्या वरच्या राना । कलावुन आणा महाराजा भगवाना ॥
॥ गाई गेल्या वरच्या रानास । कृष्ण महाराजा तु आपल्या गाई संभाळ
॥ किसनजी याहो लवकर । भुकेले वासरं आवरेना कोणास ॥
॥ धन्य भाग्य या कृष्णाच्या पाई ।
हाती काठी सावळा राखतो/वळतो/कलावतो गाई ॥
॥ आम्ही आहो मुढं मुढं । रस्ता दाखव देवा होय गा पुढं ॥

॥ चौघडयाची वेळा भजन पाठा ०२ ॥

॥ झाली चौघडयाची वेळ । बाळ गोपाळ देवा गोळा कर ॥
॥ झाली चौघडयाची वेळ । अवघे गडी देवा गोळा कर ॥
॥ झाली चौघडयाची वेळा । अवघे गोपाळ देवानं केले गोळा ॥
॥ झाली चौघडयाची वेळा । महाराजा तुम्ही आपल्या गाई वळवा ॥
॥ चौघडयाची वेळा झाली । कृष्ण महाराजा तुम्ही वळवाना गायी ॥
॥ गायी गेल्या वरच्या राना । कलावुन आणा महाराजा भगवाना ॥
॥ गायी गेल्या वरल्या रानास । कृष्ण महाराजा आपल्या गाई संभाळ ॥
॥ आम्ही आहो मुढं मुढं । रस्ता दाखव देवा होय गा पुढं ॥
॥ चौघडयाची वेळा झाली । गोपाळा संग आले कृष्ण मुरारी /माउली ॥



## ॥ येई बा येई बा ॥

॥ येवु दे कारूणा । येवु दे कारूणा, देवा गा माझी । माझे अपराधाची ॥ येवु
॥ येवु दे कारूणा । येवु दे कारूणा, देवा गा माझी । या पामराची ॥ येवु दे..
॥ येई बा येई बा । येई बा येई बा, कृष्णरूपा । माझे मुळ स्वरूपा ॥
॥ येई बा येई बा । येई बा येई बा, कृष्णरूपा । कर मजवर कृपा ॥ येई बा..
॥ येई बा येई बा । येई बा येई बा, कृष्णराया । धर मजवर छाया ॥ येई बा.
॥ येई बा येई बा । येई बा येई बा, तु जगजेठी । तोड बंधनाच्या गाठी ॥
॥ येई बा येई बा । येई बा येई बा, तु जगजेठी । पायी घातली मिठी ॥ येई



## ॥ येई ये येई ये ॥

॥ येई ये येई ये । सांवग्याच्या राया ये । सावंग्याच्या राजा ये ।
सावंग्याच्या राजा ये । अन्जानाला पदरी घे ।
अन्जानाला पदरी घे । अडाण्याला ग्यान दे ॥
॥ आम्ही अडाणी-अडाणी । आम्हाला लावा आपल्या नामी ।
आम्हाला लावा आपल्या नामी । पाय दाखव येवुनी ।
अधार तुमच्या पायाचा । संभाव निभाव करा बाळाचा ॥
॥ तुये तुले मालुम । आम्ही आहो लेकरं अन्जान ।
आमच्या हाती काही नाही । आम्हा लागलो या देवाच्या पायी ॥
॥ अवघ तुमच्या हुकमात । हुकमाबिना पत्ता नाही हालत ।
नाही हालत पत्ता । चवताळी आहे तुमची सत्ता ॥



### ॥ कापुराचे भजने ॥

॥ उजळा कापुर वडी । आली आली हो महाराजाची फेरी ॥
॥ उजळा कापुर वडी । आली आली हो महाराजाची स्वारी ॥
॥ उजळा कापुर वडी । चौघडयाले याहो लहान मोठे गडी ॥
॥ उजळा कापुर वडी । चौघडयाले आले लहान मोठे गडी ॥
॥ उजळा कापुर वडी । चौघडयाले आले कृष्ण मुरारी ॥
॥ उभा आहे यवगी राजा । करा नामाची गर्जना ॥
॥ करा नामाची गर्जना । कापुर ज्योत उजळाना ॥
॥ ऐसा बोले यवगी राणा, मेघ श्यामा । करा नामाची सदोनित गर्जना॥
॥ ऐसा बोले यवगी राणा, मेघ श्यामा । कापुर ज्योत हो ज्योत उजळाना ॥

### ॥ कापुराचा वास चवताळी ॥

॥ उदा कापुराचा वास, उठन चवताळी । अवधुत गर्जना होते नामावरी ॥
॥ उदा कापुराचा वास उठन चौताळी । धुव्वा अस्मानी ।
गर्जना द्युतांची होते ठाई ठाई । तुम्ही या महाराजा करा हो मेहरबानी ॥

## ॥ चौघडा ॥

**चौघडा** :- प्रतेक दांडाच्या म्हणनीनुसार हा चौघडा थोडयाबहुत फरकाने, वेगवेगळया टुका घेवुन वेगवेगळया कमाणे म्हटल्या जातो. त्याचमुळे प्रतेक दांडाच्या चौघडयात एकवाक्यता नाही. म्हणुनच एकवाक्यता आणण्यासाठी सावंग्याच्या राउळातील चौघडा खंड ०९/०५:-सावंग्याचा चौघडा व भजन पाठे घ्यावे. ही विनंती.



### ॥ चौघडयाचा साचा ॥

- चौघडा म्हणण्याच्या अगोदर प्रथम विनविनी चे भजन पाठा/पाठे म्हणनीनुसार म्हटल्या जाते.
- त्या नंतर चौघडयाच्या वेळा व येई ये येई ये चा विनवनी भजन पाठा च्या टुका म्हणनीनुसार म्हटल्या जाते.
- त्यानंतर कापुराचा भजन पाठा चे टुका म्हणनीनुसार म्हटल्या जाते.
- कापुर लावल्यानंतर चौघडा म्हणण्यास सुरूवात केल्या जाते. चौघडा म्हणतांना प्रथम
- ॥ ...... बिरदपर खडे । नामके, वाजे चौघडे ॥ या टुका म्हटल्या जाते.
- चौघडयानंतर नौबत निघत असल्यामुळे शेवटी ॥ ...... बिरदपर खडे । नामके, नित/अखंड वाजे चौघडे हो । नौबत वाजे चौघडे ॥ या टुका म्हटल्या जाते.
- उदाहरणार्थ :- सावंग्याचा चौघडा खंड०९/०५ पाहा.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

गजरे :-

॥ चौघडा वाजे अनुहात् । उभे राउळात । कृष्ण अवतार.....
महाराजा.., तु येवुन देहे तार... ॥
॥ चौघडा वाजे अनुहात् । उभे राउळात । कृष्ण अवतारा......
प्रभु अवतारा.., बाळावर दया करा... ॥
किंवा:- ॥ अनुहात वाजे चौघडा । उभा सावळा । राउळा वर..
प्रभु अवतारा । बाळावर दया कर..॥



॥ चौघडयाच्या नंतर म्हणण्यात येणारे भजने ॥

॥ भजनीच्या म्हणनीनुसार भजनाच्या टुका घेवुन भजनी हे भजने म्हणतात. ॥

॥ किसनजी राउळात आहे । सामने वाजे.. चौघडा घडाळं ।
किसनजी राउळात उभा । सामने वाजे.. घडाळ चौघडा ॥
॥ सुर्या सम्मोर वाडा । दरवाज्या वर.. । नित वाजे चौघडा ।
सुर्या सम्मोर वाडा । रोग-विघ्न.. । महाराजा निर्वाळा ॥
॥ देवाचा चौकोणी वाडा । मध्ये देवाचा वाजे चौघडा ॥
चारही कवाड दरवाजे । सभा मंडपी देवाचा नगारा वाजे ॥
चारही कवाड दरवाजे । सभा मंडपी देवाची मोहंर वाजे ॥
चारही कवाड दरवाजे । मध्ये देवाची नौबत वाजे ॥
॥ मागे राउळ पुढे झेंडे । दरवाज्या वर नित नौबत वाजे ॥
॥ चौघडा वाजे नामाचा । गजर होतो.. या हरीच्या नामाचा ।
चौघडा वाजे नामाचा । चुराडा होतो, या रोगा विघ्नाचा ॥
चौघडा वाजे आनंदाचा । चुराडा होतो, या व्दैता भुताचा ॥
चौघडा वाजे आनंदाचा । चुराडा होतो, या करणी कवटाचा ॥
चौघडा वाजे आनंदाचा । चुराडा होतो, या जंतर मंतरचा ॥
॥ चौघडा वाजे खणाखण । गोपाळ आले.. मुज-याला धावुन ।
आले मुज-याला धावुन । महाराजा देवा तु देहे तारनं ॥
आले मुज-याला धावुन । महाराजा देहीचे उडव विघ्नं ॥
आले मुज-याला धावुन । महाराजा देहीचे दुःख-दर्द उडव ॥
॥ चौघडयाच्या नादानं । रोग-विघ्न.. हे जाते जळुन ।
चौघडयाच्या नादानं । रोग-विघ्न.. हे भंगा जातीन ।
चौघडयाच्या नादानं । करणी-कवटा हे धडधडा जळतीन ।
चौघडयाच्या नादानं । दोष-पातक हे धुतल्या जातीन ।
चौघडयाच्या नादानं । पातकाचें पाणी होईन ।
जहराचं हे अमृत बनतीन । दुःख-दर्द हे मिटल्या जातीन ।
देह-जीव हे तरल्या जातीन । नर नारी हे उध्दारल्या जातीन॥
॥ ऐसा चौघडयाचा नाद । रोगा विघ्ना चा झाला भंग ।
ऐसा चौघडयाचा नाद । करणी-कवटाचा झाला भंग ।
ऐसा चौघडयाचा नाद । जंतर मंतरचा झाला भंग ॥
॥ सावंग आहे अगुचर । नित्य नामाचा, होतो गजर ।
नित्य भजनात होतो गजर ॥
॥ सावंग सोयंम् शब्दाचं । माहेर होये या भावीक भक्तजनाचं ॥
सावंग सोयंम् शब्दाचं । माहेर होये सत् भावीक भक्तजनाचं ॥
॥ पहा या सावग्याचे सुखः । जन्म-मरणाचे, देहीचे हर्रतीन दुःख ।
अनामत यवगी परात्पर । याहीच्या चरणी, माझा नमस्कार ॥
॥ उभे आहे अवधुत । याहीच्या चरणी, माझा दंडवत ।
उभा आहे भैसराजा । याहीच्या चरणी आहे, मुजरा माझा ॥
॥ मुजरा मुजरा निर्वाणी । आमचा मुजरा घ्याहो अवधुत धनी ॥
॥ मुजरा मुजरा निर्वाणी । आमचा मुजरा घ्याहो श्रीकृष्ण धनी ॥
॥ चौघडा वाजवला कोणं । श्री कृष्णाजीच्या अवघ्या गोपाळानं/सवंगडयानं ।
॥ चौघडा वाजवला कोणं । हेंगडुजीच्या अवघ्या गोपाळानं/सवंगडयानं ॥
॥ चौघडा वाजवला कोणं । देवमनजीच्या अवघ्या गोपाळानं/सवंगडयानं ॥

-: गजर :-

॥ अनुहात वाजे चवघडा । वाजे चवघडा... ।
हा मिटव बा अवघडा । जन्मो-जन्माचा ॥
किंवा गजर ०२:- ॥ सुर्य उगवला, प्रकाश पडला । आनंद झाला, भारी....।
हरी नामाचा वाजे चौघडा । देव दरबारी ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०९ ॥
॥ भजनपाठा नं. ०७ ॥
॥ अमृताचे भजने ॥

# ॥ अमृताचे भजन पाठे चा संग्रह ॥

॥ लुटा लुटा हो, अमृत वाणी । उत्तम नरदेही ।
उत्तम नरदेही भरोसा घडीचा नाही ॥
॥ पाण्या चा बुडबुडा । तो एक, क्षणाचा गोळा ।
देहे गा तारण । तो एक अवधुत/अनामत जाणा ॥
॥ अमृत/बम्हरस/प्रेमरस घ्याहो घ्या । तुम्ही नाम देवाचं घ्याहो घ्या ।
नाम देवाचं घ्याहो घ्या । देवासारखे मानव अवघे व्हा हो व्हा ॥
॥ घ्या घ्या अमृताचा घुटका । पुन्हा येणार नाही अशी घटका ॥
॥ घ्या घ्या म्हणतो, बाप हो । घेत नाही कोणी ।
घेत नाही कोणी । मोक्ष पदाची वाणी ।
घेत नाही कोणी । प्रेम/आत्म सुखाची वाणी ।
घेत नाही कोणी । अमृता ची वाणी ॥
॥ घ्या घ्या म्हणतो, बाप हो । अमृता ची वाणी ।
अमृता ची वाणी, हे होय । कृष्णा ची वाणी ॥
॥ अमृताची कुपा याहीनं हाती धरून ।
नवखंड पृथ्वा जागी केली । दोघा मिळुन ॥
॥ हरकी मुरखी पारखी तारकी । अवघे जमा झाले ।
त्यामध्ये बोलनं या दोघांचे झाले ॥
॥ स्वर्गि अमृत, पाताळी अमृत । मिर्त लोकी नाम ।
तुमच्या नामा विना अवघं । दिसते हीनं ॥
॥ स्वर्गि अमृत, पाताळी अमृत । नाम नाही धन्या ।
नाम नाही धन्या । दोन्ही पेठा पडल्या सुन्या ॥

॥ अमृत/बम्हरस तुही घ्याहो प्या । गोड नाम देवाचं घ्या ।
या देवा सारखे, मानव अवघे व्हा ॥
॥ घ्या घ्या अमृताचा घुटका । पुन्हापुन्हा नाही येणार अशी घटका ॥
॥ अमृत घेनं अमृत पेनं । अमृत पेंन अमृत घेनं ।
कल यवगी, मानव होतीन । देवा समानं ॥
॥ अमृताची, गोडी देवा । तुमच्या भजनात ।
तार देवा, ठेव देवा । सुखी जिवनात ॥
॥ अमृताची गोडी हो गोडी । माझेया कुडीला आयुष्य देई ॥
॥ बम्ह/प्रेम रसाची गोडी हो गोडी । तुम्ही नाम घ्या या घडी हो घडी ।
॥ ब्रम्ह रसाची गोड वाणी । माझेया कुडीला आयुष्य देई हो देई ॥
॥ नाम रसाई । अमृताचा प्याला । जो पिवुन मग्गम झाला ।
तो वाणी सांगे जगाला । नवल सांगे जगाला ॥
॥ नवल सांगतो । पुढ पाहयं, अमृत गंगा वाहे ॥ नवल सांगतो
॥ घुता चरणी अमृत गंगा । रोग विघ्न जातीन भंगा ॥
॥ आला सत्रावीचा पाझर । अमृत गंगा वाहे झरझर ॥
॥ अवधुताच्या मुखी/चरणी वाहे । अमृताची गंगा ।
असचं सत्य जाणा । रोग, विघ्नं जाती भंगा ॥
॥ अवधुताच्या चरणी वाहे । अमृताची धारं ।
असचं सत्य जाणा । रोग, विघ्नं जाती पार/दुर ।

॥ ज्याच्या मुखी चतुर्पती आगार । त्याच्या मुखी आहे अमृताचा सागर ।
॥ अमृताचा, सागर भरला । देवा तुया पाशी ।
म्हणुन शरण, आलो मी देवा । अमृता साठी ॥

॥ अमृताची गंगा भरली । देवा तुया चरणी ।
रोग-विघ्ने जातीन हो दुर पळुनी ॥
॥ आहो अमृत संजीवनी । हे आहे या देवाच्या पाशी ॥
॥ पाण्याच, अमृत केलं । या, कृष्णाजीनं ।
रोग विघ्न, उडवाया । नाही, लागणार खिन ॥
॥ अमृत करा देहीत भरा । यवगा यवगी देह तारण करा ॥
॥ अमृत करा देहीत भरा । देह वज्र अंबर करा ॥
॥ ज्ञान शक्ती, हदयी शांती । धनी अवधुताच्या ।
अनंत कोटी वर्षती । धारा अमृताच्या ॥
॥ अमृताच्या धारा माझया । मुखात सोडा ।
या धारा मध्ये नाम तुम्ही । चतुर्पती सोडा ॥

॥ अमृताची/मधुची ही गोडी । प्रेमी घाले उडी ।
ऐसी घडी । पुन्हा न येई ॥
॥ अमृताची/मधाची गोडी । माशी घाले उडी ।
मोडलेसे घडी । पुन्हा न येई ॥

॥ गुढी उभी आहे । घडी पाहवं डोळ्यानं ।
ही वेळ गेल्यावर । पस्तावल मन ।
ही वेळ गेल्यावर । मग काय करान ।

डहाकी :- ॥ मोहयाची ही माशी । लदबदली रसाशी ।
रस आला अंगी । द्युत राया ॥
॥ देवाच्या नामाची दोरी । देवाच्या गलपाला दोरी बांधली ॥
॥ बाळ ओटयात घेतला । अमृत पान्हा माय पाजे बाळाला ॥
॥ अमृत पान्हा पाजला । बाळाच्या मुखाहुन हात फिरवला ॥
॥ माय माझी उभी चांगोणा । पाजे हो अमृता चा पान्हा ॥
॥ पाजे अमृता चा पान्हा । चत्र भुज नारायणा ॥
॥ देवा तु गाय मी वासरु । आता नको देवा पान्हा चोरु ॥
॥ धन्या चरणी अमृत गंगा । दोष-पातक/रोग-विघ्ने जाती भंगा ॥

गजर :-
॥ कामधेनु गाय जागृत, या अहीना इथ । चतुरा घरी आली ...।
पाजे अमृताचा पान्हा । धन्य माउली ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०९ ॥

॥ भजनपाठा नं. ०८ ॥

# ॥ अनंत यवगाचे भजन पाठे चा संग्रह ॥

॥ भजन पाठा नं. ०८/०१ ॥

॥ अनंत यवगा पासुन । दीन अपराधी आहो फार ।
दीन अपराधी आहो फार । दया करा हो बाळावर ॥
॥ अनंत यवग कठले । अवतार घेवुन नटले ।
त्याहीला ईश्वर नाही भेटले । महाराजा ॥
॥ अनंत यवग कठले । अवतार अजुन नाही भेटले ।
असे बहु यवग लौटले । महाराजा/मायबापा ॥
॥ अनंत यवगा वर । तुवा उभा केला कार ।
मला बहुत यवग तार । महाराजा/मायबापा ॥
॥ अनंत यवगा साठी । देव विठोबा उभा येथी ।
हरी भजनी दयाहो भेटी । महाराजा/मायबापा ।
बहुत यवग दयाहो भेटी । महाराजा/मायबापा ॥
॥ अनंत यवगा वर । तारले महामहा विर ।
हरी भजनी केला कार । महाराजा/मायबापा ।
हरी भजनी येवुन तार । महाराजा/मायबापा ।
हरी भजनी करा संभाळ । महाराजा/मायबापा ॥
॥ अनंत यवग तारा । महाराजा कृष्ण अवतारा ।
तुमच्या विन देव । नाही दुसरा ॥
॥ अनंत नाव या देवाले । कोण्या नावान हाका मारू तुले ॥
॥ अनंत यवग लौटले देवा तुया कृपेनं ।
काही नाही होत मागणं माझेच्यानं ॥

॥ यवगाचा भजन पाठा नं. ०८/०२ -जळगाव दांडातील ओवी चरणे ॥

॥ यवग धरून उभा राहयं । याहो महाराजा । तुम्ही करा हो संभाळ
॥ यवग भरले हो भरले । या अवताराचे दिवस जवळ आले ॥
॥ यवग भरले हो भरले । देह तारावयाचे दिवस जवळ आले ॥
॥ यवग आले यवग गेले । या यवगाचे चिन्ह कैसे बदलले ? ॥
॥ यवग आले यवग गेले । या वृक्षाचे फळ कैसे बदलले ॥
॥ यवग आले यवग गेले । या धर्माचे रस्ते बुडाले हो ॥
॥ यवग आले यवग गेले । या अधर्माचे धंदे सुरू झाले हो ॥
॥ यवग आले यवग गेले । खबर आहे या महाराजाले ॥
॥ यवग आले यवग गेले । खबर ठाव या श्री कृष्णाले हो ॥

॥ यवगाची केली मांडणा । मांडवशीले ।
खबर ठाव या श्री कृष्णाले ॥
॥ सत् यवगाच परमाण । महाराजा, जागी करून दाखवनं ॥
॥ राजा येईन यवगाचा । हिशोब घेईन लहान्या मोठयाचा ॥
॥ यवग काबीज करन सारं । भैसाचं राज होईन देहीवर/यवगावर ॥
॥ यवगाची झाली कथा । माय माउली उभी आता ॥
॥ यवगा यवगीचा आत्माराम । याहीची किर्त महीमा जगात वाढवनं ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०९ ॥

॥ भजन पाठा नं ०९ ॥

# ॥ मन-भाव भक्ती सत्य-बोलीचे भजनपाठे चा संग्रह ॥

## ॥ मन ॥

॥ मन भजन पाठा ०९/०१ ॥

॥ मोक्ष पदाच ठिकाण गडेहो । कैसे मागता ?
मन ठिकाणी नाही बसवलं । कशी चालन सत्ता ॥
॥ मन ठिकाणी बसवलं नाई । देव पाहण्याची, का करता घाई ?
॥ आधी मन मुंडले नाही । देव पाहण्याची का करता घाई ॥
॥ आधी मन मुंडा हो मन मुंडा । मन मुंडा हो मन मुंडा ।
मनाचा संभाळ करा ॥ आधी मन मुंडा हो..
॥ आधी मन मुंडा हो मन मुंडा । मन मुंडा हो मन मुंडा
मग प्रपंच संभाळ करा ॥ आधी मन मुंडा हो..
मग प्रपंच व्यवहार करा ॥ आधी मन मुंडा हो..
॥ आधी मन मुंडा हो मन मुडा । मग देव राया पहा ॥ आधी..

॥ मन भजन पाठा ०९/०२ ॥

॥ आधी मन धरा हाती । शुध्द भाव धरा मनी ।
मग भजा हो भजा चतुर्पती ॥
॥ आधी मन धरा हाती । शुध्द भाव धरा मनी ।
आंगी येईन चतुर्पती ॥ आधी मन धरा हाती..

॥ मन भजन पाठा ०९/०३ ॥

॥ ऐक तु, माझे मना हो माझे मना.. ।
नको करू चंचलपणा ॥ ऐक तु, माझे मना हो..
॥ ऐक तु, माझे मना हो माझे मना ।
राहय हरी च्या भजना ॥ ऐक तु,माझे मना हो..

॥ मन भजन पाठा ०९/०४ ॥

॥ ज्याचे अंतःकरण शुध्द । त्याला करने न लागे बोध ॥
॥ सदा मनी दया शांती । तिथं मायेची कैशी गुंती ? ॥
॥ सदा मन बम्हचारी । त्याला विठ्ल धनी आवडी ॥
॥ सदा मन बम्हचारी । विठ्ठल राया देव त्याहीच्या संगती ॥
॥ ज्याचं मन समाधान । त्याला झालं देवरायाचं देणं ॥
॥ जैशी मनाची आवडी । त्याला असो सर्व गोडी ॥

॥ चित्त मन भाव भजन पाठा ०९/०५ ॥

॥ चित्त मनाची करा जोडी । देवा पायी अवघे लावा गोडी ॥
॥ चित्त मन लावुन एका ठायी । सत्य भावानं भजा बापाची गाही ॥
॥ सत्य भाव ज्याची भक्ती । विठ्ठलराया देव त्याहीच्या संगती ॥
॥ ज्याचा भाव त्याची भक्ती । देव आहे भावाच्या संगाती ॥
॥ ज्याचा भाव त्याची भक्ती । विठोबा राया देव त्याहीच्या संगती ॥
॥ देव भावाचा भुकेला । देव नाही कोणाच्या बापाचा ॥
॥ देव भावाचा भुकेला । चाकर आहे तो भावीक भक्ताचा ॥
॥ अंतरी घंटा नामाचा । चाकर आहे तो हुजुर भक्ताचा ॥
॥ हद्यी घोक नामाचा । सद्गुरू चाकर आहे प्रेमी भक्ताचा/दासाचा ॥

॥ भाव भजन पाठा ०९/०६ ॥

॥ अनामीका घरी आला । भाव पाहुन देवराया उतरला ॥
॥ भाव अनामीकानं केला । देव वचनात अखंड गोयला ॥
॥ भाव भक्तीनं आखला । देव वचनात अखंड गोयला ॥
॥ भाव धरा बळकट । देव तारण हो तिरलोक्यात ॥

॥ भाव धरा भक्ती करा । भावीका साठी हो देव भावीक झाला ॥
॥ भाव धरा भक्ती करा । त्याच्या घरी देवराया घाले येरझारा ॥
॥ ज्याचा भाव त्याचा देव । उभा आहे अवधुत राव ॥
॥ सत्य भक्ताचा भाव । त्याचा घरी सदा नांदे देव ॥

॥ शुध्द सत्य भाव भजन पाठा ०९/०७ ॥

॥ श्री प्रभु आले घरा । आतातरी शुध्द भाव धरा ॥
॥ शुध्द भाव धरा मनी । मग भजा हो चतुर्पती ॥
॥ शुध्द/सत्य भाव धरा मनी । पावन होईन विठोबा/अवधुत धनी ॥
॥ शुध्द भाव धरा अंतरी । पावन/तारण होईन/करन देवराया श्रीहरी ॥
॥ शुध्द भाव धरा अंतरी । तारण करनं देवराया श्रीहरी ॥
॥ अंतरी धरा शुध्द भाव । पावन होईन अवधुत राव ॥
॥ ऐसा भाव धरा मनी । तुम्हा जवळ आहे धनी ॥
॥ ऐसा भाव धरा मनी । पावन होईन विठोबा धनी ॥
॥ ज्याचा भाव त्याची भक्ती । देव आहे भावाच्या संगती ॥
॥ ज्याच्या अंतरी शिक्का । धाक पडलं बम्हादिका/इंद्रदिका/विष्णुदिका ॥
॥ ज्याच्या अंतरी शिक्का । धाक पडनं शिवादिका/यमदिका ॥
॥ भक्ती एकानं केली । लहान्यामोठयाच्या कामी आली ॥

॥ मन भाव भजन पाठा ०९/०८ ॥

॥ हरी भजनी सावध होय मना । जवळ आहे धनी ।
चौ-याशीचे परोपरी दुःख । मिटवुन घे लवकरी ॥
॥ मना होय तु सावधान । मना होय तु सावधान ।
प्रेमं, भावानं । भजन देवाचं करं ॥
॥ तना मनानं, भक्ती-भावानं, अनुभवानं । भजन देवाचं करा ।
चंदनाच्या परी देहे झिजवा हो जरा ॥
॥ प्रेम आनंदा च्या भरा । या महाराजाची/चतुर्पतीचे भक्ती भजन करा ।
यान काय होतो रे नरा । यान काय होतो रे नरा ।
पापाचे जळतीन पर्वत । पुण्याच्या पडतीन भरा ॥
॥ दयाःक्षमा शांती कारूणा । प्रेम-भाव धरा हद्‌यी/पोटी ।
त्याशी साधन काही नाही लागे । देव देईन भेटी ॥
साधन नलगे काही । देव येईन घरी ॥

॥ आदीपुरूषाच्या पुंजनी लाव मन । तो चुकवन चौ-याशी येणं-जाणं ॥
॥ आदीपुरूषाच्या भजनी नाही ज्याचं मन ।
त्याची चुकणार नाही चौ-यांशी येणं-जाणं ॥
॥ आदीपुरूषाच्या पुंजनी ज्याचे मनं । त्याचं अगाध पुण्य, तारण निर्वाणं
॥ आदीपुरूषाच्या पुंजनी ज्याच मनं । त्याला भेटन मोक्षपदाचे ठिकाणं ॥

॥ शुध्द मन भाव हे कापुर चे भजन पाठा ०९/०९ ॥

॥ शुध्द मन भाव हे कापुर । उजळली ज्योत ।
मन हा मोगरा । देवा, वाहतो नित ॥
॥ मन भावाचे फुल पुष्प । गुंफुनी माळा ।
आम्ही वाहतो कृष्ण देवाच्या चरणा ॥
॥ तुझेच फुल पुष्प हे देवा । तुला वाहतो ।
निमित्या कारण आम्ही । दर्शना येतो ॥
॥ निमित्या कारण तुम्ही देवा । धरला हात ।
तुमचीच वाणी तुम्ही । सांगतली जगात/हद्‌यात ॥
॥ वाणी जगात सांगतली । चतुर्पती नामाची ज्योत उजळली ॥
॥ चतुर्पती नामाची ज्योत उजळली । ओहंम्-सोहंम् टाळी वाजली ॥

**॥ चतुर्पती नामाची ज्योत उजळली । ओहंम्-सोहंम् धुनी उठली ॥**

॥ मन भाव भजन पाठा ०९/१० ॥

**॥ पुर्विचा ठेवा । हरी भजु देवा । ही वेळ लागली पुण्याची ।**
**देव दरबारी बिजली चमकली । ज्योत हरी नामाची ।**
**मानव जन्म हि-या समान । करा भक्ती या देवाची ॥**
**॥ असमानी ध्वजा । मन लावुन भजा । तारू आला देहीचा ॥**
**॥ असमानी ध्वजा, मन लावुन भज । सार्थक होईन आल्या जन्माचं ॥**

॥ मन भाव भजन पाठे चा सार भजन पाठा ०९/११ ॥

**॥ सुवर्णाचा घोडा । जीन काय काटयाचा केला ।**
**मन-पवनाचं चाबुक मारून । घोडा उडवला ॥**
**॥ मन पवनानं घोडा उडवला । धरा धरा म्हणती ।**
**जो कोणी घोडा धरन । त्याची चुकन चौ-यांशी ॥**

**-: शब्दार्थ :-**

**सुवर्णाचा घोडा** :- देहीच्या आत्मारामाला दिलेले संबोधनात्मक नाव ।
**जीन** :- घोडयावर बसण्यासाठी जे चामडयाचे जीन टाकल्या जाते ते जीन. मन व इंद्रियांचे विषय-वासना-विकार..ईत्यादी काटे असलेल्या देहीच्या चामडयाचे जीन या सुवर्णाचा घोडा म्हणजेच आत्म्यावर टाकलेले आहे. । **चाबुक** :- घोडे पळवण्याकरीता उडवण्याकरीता घोडयाला मारण्यासाठी तयार करण्यात येणारी चामडी-वाताचे एकात एक विनुन गुंफलेली दोरी म्हणजे चाबुक. । **पवन** :- श्वास वायु

**मन-पवनाचा चाबुक मारून घोडा उडवला :-**

या देहीचा सुर्वणाचा घोडा उडवण्याकरीता निराकार मन व पवन हे ऐकमेकात गुंफुन तयार केलेले चाबुक मारून या चाबुकाव्दारे देहीचा घोडा उडवुन, उडवत उडवत त्याला चौ-यांशी यवनीत पळत पळत पळवल्या अथवा फिरविल्या जाते. असा मन-पवनाच्या चाबुक मारून घोडा उडवल्या नंतर ही वेळ गेल्यावर पुढे मग पस्तावा येवुन जन त्याला धरा धरा म्हणुन ओरडतात रडतात.

**जो कोणी घोडा धरन । त्याची चुकन चौ-यांशी :-**

उच्चत्तर अशी बुध्दि ठेवुन या उच्चत्तर सत् बुध्दिला या देहरूपी रथाचे सारथी बनवावे. या सारथी व्दारे मनाचा लगाम करून, या मनरूपी लगामाने पंचइंद्रिये यांचे विषय विसना विकार.. रूपी घोडयांना घट्ट बांधुन हे घोडे काबुत आणावे. मग हे काबुत आलेले इंद्रियांचे घोडे देहरूपी रथाला सुवर्णाच्या घोडयासह जुतवावे. तेव्हा कुठे या सुवर्णाच्या घोडयासंग असलेले पंचइंद्रियाच्या सत् संस्काराचे सुक्ष्म संस्कार या सुवर्णाच्या घोडयावर पडुन तो पवन/श्वास व्दारे उडणार नाही. अश्या रितीने जो कोणी हा घोडा धरून देहरूपी रथ हाकवन त्याची चुकन बा चौ-यांशी यवनीची फेरी.

अश्या रितीने जो सारथी प्रथम आपल्या सुवर्णाच्या घोडयावर सत् च्या अधिक्याने शुध्द सत्व चे सुक्ष्म संस्कार धिराईने निरंतर टाकतो. तेव्हामग या शुध्दसत्च्या सुक्ष्मसंस्काराव्दारे तो सुर्वणाचा घोडा आपल्या संगच्या इंदियंरूपी घोडयाला संग घेतो. आणी आपल्या मनरूपी लगाम हाती धरलेले बुध्दिरूपी सारथ्याला परमात्मा मार्गानेच सुरळीत पणे घेवुन जाण्यास साहय होत होत, अंती परमात्मा प्राप्ती करून देतो.

॥ मानवा कसा भुलला ! भजन पाठा ०९/१२ ॥

**॥ मानवा सुद धर बुध आपल्या पोटी ।**
**देव येईन घरा । अवघ्या सांगन गोष्टी । ब-या सांगीतल्या गोष्टी ॥**
**॥ मानवा कसा भुलला रे कसा भुलला ? ।**
**देव तुया जवळुन गेला ॥ मानवा कसा भुलला ?..**
**॥ मानवा कसा भुलला रे कसा भुलला ।**
**घे देवाचा आसरा ॥ मानवा कसा भुलला ?..**
**कर हरी नाम सोयरा ॥ मानवा कसा भुलला ?..**

॥ मानवा ! भुलु नको रे संसारा । कर देवाचा आसरा ॥ मानवा..
॥ मानवा ! भुलु नको रे संसारा । कर हरीनाम सोयरा ॥ मानवा..
॥ मानवा । भुलु नको रे संसारा । नित घालन तो देव येरझारा ॥
॥ मानवा भुलु नको रे संसारा । देव चुकवन चौ-याशीचा फेरा ॥
॥ मानवा भुलु नको रे संसारा । देव चुकवन यमाच्या येरझारा ॥
॥ नर जन्मा तु आला नरा । नर हा शोधुन पाहयं ।
भवसागरातुन तरण्यासाठी । हरी भजन उपाय ॥
॥ हरीच भजन कर रे गडया । नाहीतर भ्रमी घालशीन उडया ॥
॥ चतुर्पतीचे भजन जे करणार । तेच सेरूपी जागी राहुन तरणार ॥

॥ भाव भक्ती ॥

॥ भक्तीभाव भजन पाठा ०९/१३ ॥

॥ भक्ती करून निःसग होजो । ऐक तु प्राण्या आता ।
या भक्तीला भंग नको आणु । वाया जाशीन अधोगता ॥
॥ ओहंम्-सोहंम् दोन्ही ताजवे । काटा नेकीका ।
जो ठेवन बराबर । तो, व्यापारी मोठा ॥
॥ भक्ती करा देहजीव झिजवा । नका आणु तोटा ।
केली कमाई वाया जाईन । पाण्याच्या लोटा ॥
॥ भक्ती करा देवाची । नका राहु निचंत ।
ही वेळ गेल्यावर पुढमग । परस्तावलं मनं ॥
॥ कर भक्ती देवाची । सदा देव आठवा ।
ही वेळ गेल्यावर । कोणा सांगशील परस्तावा ॥
॥ उभी गुढी आहे । घडी पाहवं डोळ्यानं ।
ही वेळ गेल्यावर मग परस्तावन मन ॥

॥ भक्ती भजन पाठा ०९/१४ ॥

॥ कल्पतरूच्या झाडाखाली । बसला हीन कर्म ।
नाही माझे/त्याच्या नशिबी । त्याला काय करन भगवान ॥
॥ सागरात उडी घातली । नाही गवसला मोती ।
कर्म केलं हीन देवा । हाती आला शिंपी ॥
॥ भल्या भल्याला पडली गिलटी/गिरकी । मुळ मायेचा पसारा ।
या गंगेमध्ये नाव चालली । थाप पाहयजो हुशारा ॥
॥ वा वा रे जीवाचा भाव । वा वा रे जीवाचा भाव ।
मन सागर अथांग भरला । धिरे चालवजो नावं ॥
॥ उपणुन घ्याहो । वार सुटलं मावेच । वार सुटलं सांगीच ।
ज्याच्या नशिबी असन तो भजन/भक्ती करनं अवधुताचं ॥

॥ कृष्ण भक्ती भाव भजन पाठा ०९/१५ ॥

॥ पंचेचाळीस वर्षे भक्ती । या यवग्यानं केली ।
आला चौथ्या खुम्मी व-हाडी । ध्वजा लावली ॥
॥ पंचेचाळीस विडयानं हो । कैफी झाला फार ।
शिदाईचा भम्कार उठला । याहीच्या मुखचा कार ॥
॥ या मकानी अवतारानं । धरला रंग ।
चत्रभुज उभे राहीले । याहीचे आंग ॥
॥ कल यवगी भक्त जन । देवा समान ।
ऋषिकेशी आले हो याहीला शरण ॥
॥ नर देहीचा याहीनं । अवतार केला ।
ऋषिकेशी या स्वरांला । येवुन मिळाला ॥
॥ भक्ती केली रायानं । घरामध्ये घातलं चैतन्य ।
अशीच भक्ती करा । देहजीव तरतीनं या नामानं ॥

॥ कृष्ण ज्ञान भक्तीभाव भजन पाठा ०९/१६ ॥

॥ आदी पुरूष राया घेवुन । आले अवघं ।
ज्ञान भक्ती वैराग्य सद्‌गुण । हे वाजवले चौघ ॥
॥ चौघा चा चौघडा वाजवे । श्री कृष्ण हरी ।
सावंग पुरी येवुन याहीनं । मोहरं वाजवली ॥
॥ अंतरी ज्ञान भक्ती वैराग्य । सद्‌गुण, साधलं ज्यांनं ।
तो लाखा मध्ये एक । आहे पहेलवान ॥
॥ आत्मज्ञान भक्ती साधले गडे हो । तो साधु खरा ।
अवघे महाराज वाया गेले । चौ-यांशीच्या फेरा ॥

॥ कृष्ण ज्ञान भक्तीभाव भजन पाठा ०९/१७ ॥

॥ भावीकानं भक्ती केली । प्रेम लावुन ।
याहीच्या घरी देव विठोबा । राहये आनंदान ॥
॥ भावीकाचे प्रेम भक्ती पाहुन । भरलेसे मन ।
याहीच्या हद्‌यी बसुन विठोबा । करे गायन ॥
॥ भावीकाचा देव विठोबा । होय बा कैवारी ।
सर्वच आधी सांगुन गेला । सत्याच्या घरी ॥

॥ कृष्ण भक्तीभाव भजन पाठा ०९/१८ ॥

॥ नाम कंठी रूप देही । उजाला झाला ।
अमृताचा अंबर शिक्का । उभा राहीला ॥
॥ भाव भक्तीनं आवळला । देव वचनात अखंड गोयला ॥
॥ देव प्रेम भावानं बांधला । आंगी हरी राबवला ॥
॥ भक्त जीवाचा जीवनं । त्याला दिले हद्‌यी आलिंगण ॥
॥ देवा भक्ताची जोडी । अंतर नाही पलघडी ॥

॥ कृष्ण ज्ञान भक्ती भजन पाठा ०९/१९ ॥

॥ सावंग नगरी ज्योत भारी । ठेवलं सांगुन ।
हरी नामाच्या ध्वजा लावल्या । ज्ञान-भक्ती कारणं ॥
॥ ज्ञान भक्ती हद्‌यी शांती । धनी अवधुताच्या ।
अनंत कोटी वर्षती धारा । पहा अमृताच्या ॥
॥ शकुनी अवतार बहुता गुण । ज्ञान भक्तीचं वाठवा निशाण ।
ज्ञान भक्तीचं वाठवा निशाण । शकुनी कळतीनं लक्षणं ॥
॥ ज्ञान या भक्तीचीं निशाणी । मनाशी लावजा ।
सत्य नाम सुमरता । रोग-विघ्ने जातीन भंगा ॥
॥ नव निधीचे मंथन । ज्ञान भक्ती होय मोक्षाचे साधनं ॥

॥ कृष्ण भक्तीभाव भजन पाठा ०९/२० ॥

॥ अवघे आहे एकाचे । येथे काम नाही अनेकांचे ॥
॥ भक्ती एकाने/कृष्णाने केली । लहान्या मोठयाच्या कामा आली ॥
॥ भक्ती नव्हे लावणीची । पुर्ण कमाई या देह जीवाची ॥
॥ भक्ती प्रेमाची प्रेमाची । अधिर नाही कामाची ॥ भक्ती..
॥ भक्ती करा प्रेमानं/स्वाभिमानानं । नका राहु गडे हो अभिमानानं ॥
॥ सदोनित करा सुमरनं । धरा हो ध्यानं ।
दुःखं हर्ती बा हर्ले हरी नामानं ॥

॥ निरशुन्याचा भजन पाठा ०९/२१ ॥

॥ निरशुन्याहुन कृष्ण अवधुत । रंग धरून आला ।
सत्य भावीका च्या देही । समया प्रकाशल्या ॥

॥ निरशुन्याहुन सावंग नगरी । उतरला जगजेठी ।
धुम्मधुम्मकार शकुन गर्जना । भक्त तारण्यासाठी ॥
॥ निरशुन्याहुन आले भगवंत । मिर्त लोकात ।
सावंग्यात पुर्ण अवतार धरला । अहीनाच्या ईथं ॥
॥ निरशुन्याहुन आले अवधुत । मिर्त लोकात ।
सावंग नगरी दुकान लावलं । नामाची पेठं ॥
॥ हरी हरी कृष्णा । तु जगाचा जिवनं ।
भक्तीला लावले त्वां बा अवघे जन ॥
॥ हरी हरी कृष्णा । तु जगाचा जिवनं ।
तुया भक्तीशी लागले राया । अवघे जन ॥

॥ हेंगडुजी भक्तीभाव भजन पाठा ०९/२२ ॥

॥ अनामत वस्तु याहीचे । पाय नाही धरणीला ।
अकाशमात अवधुत हंकार । साहयाशी आला ॥
॥ आदीपुरूष आदीमुनी । साहयांशी आला ।
महामुनीला वचनी गोयलं । देवु केलं त्याला ॥
॥ आदीपुरूष भैस सांगे । यवगाच्या गोष्टी ।
हरी नामी कार केला । महामुनी हाती ॥

॥ पुना भक्तीभाव भजन पाठा ०९/२३ ॥

॥ सर्वत्राच्या आधी भक्ती । पुनाजीनं केली ।
हरी नामाचे झेंडे लावले । ध्वज उभारली ॥
॥ हयाचं कंकनी हे अवतार उभे । रूप पाहीले डोळयानं ।
या देहीची मजबुती केली । ईश्वर पुनानं ॥
॥ कृपा मालकाची झाली । मालक कृपावंत झाले ।
पदरी धरलं महाराजानं । आपल्या बाळाले ॥

॥ देवमन भक्तीभाव भजन पाठा ०९/२४ ॥

॥ निरशुन्याहुन आली ज्योत । पहाड पर्वत ओलांडत ।
झरझरा उतरली ज्योत । पहा खोडंगात/कारल्यात ॥
॥ पिशाळ ज्योतीचा हंकार आला । देवगाव नगरात ।
देवगाव नगरात अकाशमात । उभी राहली ज्योत ॥
॥ बाळ बुध घरदार नाही सोडलं कोणं ।
हरी भजनी रमुन राहीला । एक पिसाराम/देवमन ॥
॥ पिसे भयानं । हे देवाचे द्युत । वाणी सांगे जगाला ।
नवल सांगे जगाला ॥
॥ तुया नामाचं लागलं पिसं । आता करू मी कैसं ? ॥
॥ पिसे झालो भैस नामी । आमचं काय करन कोणी ? ॥
॥ पिसे झालो द्युता पायी । आम्हाला कोणाची लज्जा नाही ॥

॥ भक्ती भजन पाठा ०९/२५ ॥

डहाकी :- ॥ देह या जीवाची राया । प्रित दोघांची ।
साहयं करून साचा केला । या भक्ती साठी ॥
॥ अवधुत आले भक्तीला तारू । मुखानं, आवाज केला/करा सुरू ॥
॥ आले या ठाई हो । घ्या याहीची गाही ।
भक्तजन उध्दराया कृष्णदेव आले या ठायी ॥
॥ आले या ठाई हो । माझे जगजीवन ।
भक्त जनांची आशा तुम्ही । करा हो संपुर्ण ॥

## ॥ सत्य ॥

॥ सत्य भजन पाठा ०९/२६ ॥

॥ सत्य बोला सत्य चाला । अंबर होण्याचा दिवस आला ॥
॥ सत्य शकुनाच्या ठाई । मालक उभे देवराया लवलावी ॥
॥ सत् अंगी बावन कळा । तिथे नांदे कृष्णदेव सावळा ॥
॥ गाही होय सत्याची । सत्याठाई उभे धनीदेव/महाराज येवुनी ॥
॥ सत्या घरी आला भगवान । याहीनं मुखी दिले चतुर्पती नाम ॥
॥ सत्य जाणाना तुम्ही । मालक उभा श्री कृष्ण धनी ॥
॥ सत्य जाणाना तुम्ही । मालक उभा यवगा चा धनी ॥
॥ सत्य जाणाना तुम्ही । मालक उभा या पृथ्वीचा धनी ॥
॥ सत्य भावाचा मालक । सागर भरला आहे याहीच्या पोटात ॥
॥ सत्य भावाचा मालक । अमृत भरले आहे देवा तुमच्या पोटात ॥
॥ सत्य आणनं जगा । श्रीकृष्ण आहे या बिर्दावर उभा ॥
॥ सत्य आणनं जगा । पुर्ण अवतार आहे या बिर्दावर उभा ॥
॥ सत्य आणन जगी । सिदाई सेना आहे बिर्दावर उभी ॥
॥ सत्य जाणा हो जाणा । जागी करन देव सारी सेना ॥
॥ सत्य जाणा हो जाणा । आला यवगाचा रमणा ।पुढे पाहा हो पाहा ॥
॥ कलयवगी उगवला कोंब । सत्य देव उभे भावीका संग ॥
॥ चतुर्पती देवाची ऐका, सत्य वाणी । नव राज्य होईन कंचन धरणी ॥
॥ सत्य वचन सत्य बोली । आहे देवा/भैसा दरबारी ।
हेच घर हेच मोक्ष । होय पहीली पायरी ॥
॥ हे होय सत्याची ज्योत । जळुन जाईन पापाचे पर्वत ॥
॥ सत्य शकुन देवाचा । भरोसा नाही वरकढ लोकांचा ॥
॥ पक्का आधार मेठीचा । भरोसा आहे कृष्ण देवाचा ॥

## ॥ बोली ॥

॥ बोली भजन पाठा ०९/२७ ॥

॥ हे होय लभेदाची वाणी । ऐसा बोले श्री कृष्ण धनी ॥
॥ हे होय लभेदाची किर्त । ऐसा बोले हा चौरंगी द्युत ॥
॥ आकाश वाणीचं बोलनं । चवथ्या खुम्मी तो राज करनं ॥
॥ आकाश वाणीचं बोलनं । जागी करन महाराजा तिरभवनं ॥
॥ बोलनं केलं यवगावर । हे भाकलं जरा नाही चुकणार ॥
॥ ऐसा बोल बोलीला । सत्य आहे या देवाची वाचा ॥
॥ तुया सांगीच बोलनं । चौथ्या खुम्मी देव जागी करनं ॥
॥ बोली बोलुनच गेला । काहो यवगाले उशीर लावला ॥
॥ बोलला बोल करा सही । दयाहो महाराजा तुया रूपासुखाची गाही
॥ बोलीची बेबोली करू नको । पदरी धरलं महाराजा सोडु नको ।
॥ पदरी धरलं नका जावु दुर । लोट मारतो देवाच्या चरणांवर ॥

गजर :-

॥ तु सुखकर्ता तु दुःखहर्ता । सावंग्याच्या नाथा ।
देवा अनामता देवा अवधुता । तुमच्या चरणी माथा ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०९ ॥

॥ भजनपाठा नं. १० ॥

॥ विडयांचे भजने ॥

# ॥ विडयाचे भजन पाठे चा संग्रह ॥

॥ विडयाचा भजन पाठा १०/०१ ॥

॥ विडा शकुनाचा होय । या विडयानं देव करतो संभाळ ॥
॥ कानी आवाज ऐकला । म्हणुन म्या रस्ता सावंग्याचा धरला ॥
॥ ऐसा बोल बोलीला । सत्य आहे या देवाची वाचा ॥
॥ ऐसा भाव धरा मनी । पावन होईल देव अवधुत धनी ॥
॥ ज्याचा भाव त्याची भक्ती । विठ्ठल देव आहे त्याहीच्या संगती ॥
॥ भाव त्या अनामीकानं केला । देव वचनात अखंड गोयला ॥
॥ अस्तुरी पुरूषाचा एक भाव । त्याच्या घरी सदा नांदते देव ॥
॥ भाव धरा भक्ती करा । त्याच्या घरी देव घाले येरझारा ॥
॥ तुमचे नाव सागर । म्हणुन धरला म्या तुमचा पदरं ॥
॥ पदरी धरल्या उभा जवळ । लोट मारली देवाच्या चरणावर ॥

॥ विडयाचा भजन पाठा १०/०२ ॥

॥ विडा भावाचा होयं । या विडयानं देव करतो संभाळ ॥
॥ विडा घ्याहो भाव धरूनं । तेव्हाच होईन देव रायाचं देणं ॥
॥ भाव धरा भक्ती करा । भावीका साठी हो देव भावीक झाला ॥
॥ भाव या अनामीकानं केला । देव वचनात अखंड गोयला ॥
॥ ज्याचा भाव त्याची भक्ती । विठ्ठल राया देव त्याहीच्या संगती ॥
॥ ज्याचा भाव त्याचा देव । उभा आहे माझा अवधुत राव ॥
॥ उभा आहे माझा देव । आता नाही कोणाचं भेव ॥
॥ उभा आहे माझा सखा । आता नाही या देहीला धोका ॥

॥ विडयाचा भजन पाठा १०/०३ ॥

॥ विडा होय शकुनाचा । तारू उभा आहे या देहीचा ॥
॥ विडा होय भावाचा । पक्का आधार या अवधुत रायाचा ॥
॥ विडा होय भावाचा/शकुनाचा । सत्य शकुन या सिदाई देवाचां ॥
॥ विडा होय या देवाचा । हा नाश करन या रोगा विघ्नाचा ॥
॥ पंढरपुर पुजेचं महेमान । सावंग्यात वाटते हा देव साखरपान ॥
॥ विडया मध्ये आहे साखरपान ।
यानं देहीचे रोग विघ्न हे जातीन जळुन/उडुन ॥
॥ विडया मध्ये आहे साखरपान । देहीचे रोग विघ्न पळतीन रानोवन ॥
॥ विडा होय या देवाचा । अंबर करन देह पिंड खासा ॥
॥ विडा चतुर्पती चा होय । म्हणुन म्या धरले या देवाचे पाय ॥
॥ विडा चतुर्पती देवाचा होय । या विडयानं हादेव करतो संभाळ ॥
॥ विडा घ्याहो भाव धरून । तेव्हाच होईन या देवाचं देणं ॥
॥ ऐसे कैक आहे परमाण/प्रमाण । भक्तीला दिले या देवानं देणं ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०९ ॥

॥ भजन पाठा नं. ११ ॥

# ॥ विठ्ठला, आदीपुरूष बोले भजन पाठे चा संग्रह ॥

॥ कुडी साठी भजन पाठा ११/०१ ॥

॥ कुडी साठी मी विनवितो तुला ।
माझी कुड मला दयाहो विठ्ठला ॥
॥ संभाळ संभाळ वचनं । वचनी गोयला देवराया किसनं ॥
॥ वचन दिले मानवाला । मानवाची देवा कारूणा आहे तुला ॥
॥ वचन दिले बाळाले । या बाळाची कारूणा येवु दे तुले ॥
॥ कारूणा येवु दे तुले । उभा राहय देवा आपल्या वचनाले ॥
॥ कारूणेच्या सागरा । कारूणा कर ।
अन्जान लेकरं । पदरी धरं ॥
॥ पदरी धरलं । नका जावु दुर । लोट मारली देवाच्या चरणावर ॥
॥ पदर पसरवितो देवा तुया व्दारात ।
अन्जानाचा तु येवुन पुरवं हेतं ॥
॥ अन्जानाचा होय तु दाता । संभाळ करा महाराजा अवधुता ॥
॥ अन्जानाचा होय तु दाता । नित पावन व्हाहो श्रीहरी आता ॥

॥ विठ्ठला मायबापा भजन पाठा ११/०२ ॥

॥ विठ्ठला मायबापा । कारूणा येवु दे माझी ।
कारूणा येवु दे माझी । प्रार्थना करतो तुझी ॥
॥ सावळा माय बापा । कारूणा येवु दे माझी ।
कारूणा येवु दे माझी । प्रार्थना करतो तुझी ॥
॥ आदीपुरूषा माय बापा । कारूणा येवु दे माझी ।
कारूणा येवु दे माझी । प्रार्थना करतो तुझी ॥
॥ निराकारा माय बापा । कारूणा येवु दे आता ।
कारूणा येवु दे आता । तुया चरणी ठेवतो माथा ॥
॥ तुया चरणी ठेवीतो माथा । दया करा दयावंता ॥
दया करा दयावंता । पदरी धरा महाराजा भगवंता ॥
॥ दया करा दयावंता । येवुन तारा, महाराजा अवधुता ।
देहे तारा अवधुता । धरले चरण चरणी ठेवला माथा ॥
॥ दया करा दयावंता । तुम्हा विनवितो महाराजा भगवंता/अवधुता ।
दयावंता उभा राहयं । आपल्या बाळाचा करा संभाळ ॥

॥ पिसे बाळ भजन पाठा ११/०३ ॥

॥ तुया नामाचं लागलं पिसं । आता आम्ही कराव कैसं ॥
॥ तुया नामी झाले पिसे बाळ । याहीचा कोण करन संभाळ ॥
॥ पिसे झालो तुया नामी/पाई । आमचे आता कोणी नाही/नाई ॥
॥ आम्ही पिसे झालो भाई । या द्युताच्या पाई ।
आम्हाला कोणाची लज्जा नाई ॥
॥ पिसे भयानं भैसाचे द्युत । वाणी सांगे जगात ॥
॥ पिसे भयानं भैसाचे द्युत । नवलं दावे जगात ॥
॥ विठ्ठला माय-बापा । वेडी माझी भक्ती ।
वेडी माझी भक्ती । आमचा कोणी नाही संगती ॥
॥ आम्ही वेडे अग्यान बाळ । आमचा कोण करन संभाळ ॥
॥ विठ्ठला मायबापा । ही हाक ऐक माझी ।
ही हाक ऐक माझी । वेडया या पामराची/अन्जान बाळाची ॥

॥ येवु दे कारूणा भजन पाठा ११/०४ ॥

॥ येवु दे कारूणा । येवु दे कारूणा ।
देवा गा माझी । माझे या अपराधाची ।। येवु दे कारूणा..
॥ येवु दे कारूणा । येवु दे कारूणा ।
विठ्ठल राया । कर मजवर दया ॥ येवु दे कारूणा..
॥ येवु दे कारूणा । येवु दे कारूणा ।
श्री कृष्णराया । धर मजवर छाया ॥ येवु दे कारूणा..
॥ येवु दे कारूणा । येवु दे कारूणा ।
माय रूक्मिणा । पाज अमृताचा पान्हा ॥ येवु दे कारूणा..

॥ विठोबा नको विसरू भजन पाठा ११/०५ ॥

॥ विठोबा नको विसरू । देवा नको विसरू ।
तु बाप मी लेकरू । विठोबा नको विसरू बा नको विसरू ।
तु माय मी वासरू । विठोबा नको विसरू बा नको विसरू
तु गाय मी वासरू । विठोबा नको विसरू बा नको विसरू
सुखा चे पाखरू । विठोबा नको विसरू बा नको विसरू ॥

॥ येग येग विठाई भजन पाठा ११/०६ ॥

॥ हाती काम मुखी नाम । तु ये बा अवतारा ।
तु ये बा अवतारा । रूक्मिणीच्या भ्रतारा ॥ ये बा अवतारा..
॥ हरी नामी वाजवु टाळी । तु येग विठा माई ।
येग येगं विठामाई । माझे पंढरीची आई ॥
॥ येग माझी पंढरीची आई । तुयी महीमा आहे/होईन भारी ।
पाचही पांडव देतीन गाही । तुया सारखा देव नाही ॥

॥ का ना येशी ? भजन पाठा ११/०७ ॥

॥ का ना येशी ? तुला काय पडले कोडे/ओझे ।
प्राण गेल्यावर काय पाहु तुझे ॥
॥ जन्म देता तुला शिण नाही आला ।
भेटी साठी त्वा कंटाळा धरला ॥
॥ जन्म देता । मनी उल्हासला । शिन नाही आला ।
भेटी साठी त्वा उशिर लावला ॥
॥ तुया अन् माहया । जन्मो-जन्माच्या गाठी ।
कैश्यानं होतीन आता तुटा ताटी ॥

॥ बोला-बोली भजन पाठा ११/०८ ॥

॥ बोला बोली छंद लागला विठुचा ।
भ्रमा-भ्रमी अंत कळेना तुमचा ॥
जरा अंत नकळे या देवाचा ॥
॥ बोलला बोल करा सही । दयाहो महाराजा तुया रूपासुखाची गाही
॥ बोलीची बेबोली करू नको ।
पदरी धरलं महाराजा सोडु नको ॥
॥ पदरी धरलं तु नको जावु दुरं ।
लोट मारतो देवाच्या चरणा वरं ॥

॥ असचं करनं होत भजन पाठा ११/०९ ॥

॥ असंच करनं होत देवा । का धरलं हाती ?
का धरलं हाती । अवघं काम करावं येथी ।
का धरलं हाती । सांगा/करा यवगाच्या गोष्टी ॥
॥ असचं करनं होत देवा । का धरली आडी ? ।

का धरली आडी । आमचं कोणी नाही ॥
॥ असंच करनं होत देवा । का धरली अट ? ।
का धरली अटं ? मिटवा हे संकट / आम्हा तारा ईथं ॥
॥ असंच करनं होतं देवा ! का बसला उगा ।
का बसला उगा । मिटवा हा चौ-याशीचा फेरा ॥
॥ असंच करनं होत देवा । का बा रूसला ।
का देवा रूसला ? हाका मारता कंठ सुकला ॥

॥ मुखानं पाहु भजन पाठा ११/१० ॥

॥ मुखानं गाउ डोळ्यानं पाहु । विठ्ठल बापं हो ।
बहु दिवसाची अरज आहे । तु दाखव आपले पाय हो ॥
॥ मुखानं गाउ डोळा पाहु । रूक्मिना माय हो ।
बहुं दिवसाची अरज आहे । तु दाखव आपले पाय हो ॥

॥ तुच माझी माय भजन पाठा ११/११ ॥

॥ तुच माझी माय विठोबा । तुच माझा बाप हो ॥
बहु दिवसाची अरज आहे । दाखव आपले रूप हो ॥
॥ तुच माझा बाप विठोबा । तु माझी माय हो ।
बहु दिवसाची अरज आहे । दाखव आपले पाय हो ॥
॥ तुच माझी माय विठोबा । तुच माझा बाप ।
बहु दिवसाची अरज आहे । आता धरावं हातं हो ॥
॥ तुच माझी माय विठोबा । तुच माझा बाप ।
बहु दिवसाची अरज आहे । आता पुरवा हेतं हो ॥

॥ बालो-बाल गुन्हेगार भजन पाठा ११/१२ ॥

॥ बालो-बालं गुन्हेगार । देवा अन्याय कर माफ ।
अन्याय कर माफ । तुच माझा पुर्विचा बाप ॥
॥ तु असतांनी बाप । काहो घडले हे पाप ।
आहो घडले हे पाप । देवा तुम्ही ऐवढे करा माफ ॥
॥ अन्याय अपराध कोटयानं कोटी ।
महाराजा तुम्ही घालाना पोटी ॥
॥ माझे अन्याय घाला पोटी । उभे राहा जगजेठी ॥
॥ अन्याय अपराधी देवा मी । दगल बाज फार ।
नाही घडली सेवा तुझी । पडलं अंतर ॥

॥ नाही केली सेवा भजन पाठा ११/१३ ॥

॥ नाही केली देवा तुयी सेवा । तुज अंतरलो देवा मी आता ॥
॥ देवा माझे अंतर मिटवा । यवगा यवगी संग मज वागवा ॥
॥ कोणा पाशी सांगु देवा । दुःखाचा डोंगर ।
तुम्ही हो माझे माय-बाप । मी तुमचा चोर ॥

॥ या भावीका साठी तुम्ही । याहो जग जेठी ।
याहो जगजेठी । माझे अन्याय घाला पोटी ॥
॥ लवकर याहो गरूडध्वजा । किती अंत पाहशी माझा ।
मजला मानु नको दुजा । पडलो पाया विनविती विठुराया ॥
॥ क्षिरसागरचा वसणारा । लवकर याहो गरूडावर बसणा-या ॥
॥ करा या गरूडावर स्वारी । माझा माथा तुमच्या चरणावरी ॥

॥ हरीहरी कृष्णा भजन पाठा ११/१४ ॥

॥ हरीहरी कृष्णा, जगजीवना मनमोहना मनरंजना सगुण-निर्गुणा ।
तुम्हा वाचुन नाही कोणी तिरभवना ॥
॥ तुम्हा विनवितो सारंगधरा । कृपावन भरा, दयासागरा रंग धरा..
याहो महाराजा । तुम्ही येवुन राज करा ॥
॥ वरपंखी लावली माया । भौवंर जाळ त्वां घातले गळा ।
भौवंर जाळ तोडुन देवा । चरण दाखवा ॥
॥ हरीहरी कृष्ण राया । जोडली माया । माया तोडं
हरी बा कृष्णा । तुया पायाची फार आवडं ॥
॥ श्रीकृष्ण राया । माया तोडा । लावा या नामी ।
हरी बा कृष्णा । तुया वाचुन नाही कोणी ॥

॥ हरीहरी कृष्णा भजन पाठा ११/१५/०१ ॥

॥ हरी हरी कृष्णा । तु जगाचा जीवन ।
तुया भक्तीले लागले । अवघे जन ।
ही पाण्याची नरदेही तार येवुन ॥
॥ हरीहरी कृष्णा । तु जगाचा कर्ता ।
तुया भक्तीले लावले हो । सर्व आता ॥
॥ हरी हरी कृष्णा । तुझी वाट कुठवर पाहु ।
या पाषानाचे दैवत कुठवरं पुंजु ॥
॥ हरीहरी कृष्णा । तुझी वाट कुठवर पाहु ।
या पाषानाला देवपुजा कुठवर देवु ॥
॥ हरीहरी कृष्णा । तु का बसला उगा ।
यवगाचा रमणा आला । खेळ कर उभा ॥
॥ हरी हरी कृष्णा । तु का बसला निचंत ।
यवगाचा रमणा आला । दाव सेरुप ॥

॥ कृष्णदेवा भजन पाठा ११/१५/०२ ॥

॥ कृष्ण देवा । सेरुप दावा जगा । लवकर याहो.. ॥
॥ कृष्ण देवा । तारा जीवन ज्योता । लवकर याहो..॥
॥ कृष्ण देवा । चैन पडेना जीवा । लवकर याहो..॥
॥ कृष्ण देवा । माझे मनाच्या मोहना । लवकर याहो...॥
॥ कृष्णा याहो जगजिवना । तुम्हा विनवितो महाराजा मनमोहना ॥

॥ रंगाचा भजन पाठा ११/१६ ॥

॥ हाका मारु कोणा ? मनाच्या मोहना ।
तुया बिना । रंग माझा सुना ॥
॥ देवा तु रंगाचा रंगारी । अवघे रंग देवा तुया घरी ॥
॥ देवा तु रंगाचा रंगारी । वस्त्रे रंगविले त्वा नानापरी ॥
॥ रंग चढवा श्रीहरी । तुम्हा वाचुन माझा कोणी नाही ॥
॥ रंग चढवा श्रीहरी । तुम्हा वाचुन कोण माझा कैवारी ॥

॥ सारंग धरा । धरा हो देहीचा रंग ।
चत्रभुजा तुम्ही खेळा आम्हा संग ॥
॥ धरधर धर तु । देहीचा रंग ।
याहो महाराजा । तुम्ही रहावं आम्हा संग ॥
डहाकी :- ॥ संगतीचे गडी । पंगतीनं राहु ।
साथचा सवंगडा । संगतीनं खेळु ॥

॥ रंगाचा भजन पाठा ११/१७ ॥

॥ अकाशमात कृष्ण अवधुत । रंग धरून आला ।
सत्या ठाई भावीक भक्ताच्या । ज्योती प्रकाशल्या ॥
॥ उभा राहुन याहीनं धरला रंग ।
ओळखावं नरदेही । देव उभे आंग ॥
॥ देव रंगी रंगला । सर्व घटी तो भरून उरला ॥
॥ आले देवाचे दैवतं । देवा उभा त्याहीच्या रंगात ॥
॥ हाताशी लावला हात । मिळवलं गोत ।
धनी आले हो आले समर्थ/कृपावंत/दयावंत ॥

॥ बिर्दाचा भजन पाठा ११/१८ ॥

॥ आकाशवाणी गरजला । बिर्दासाठी देव धावुन आला ॥
॥ आकाश वाणी गरजला । आपल्या बिर्दावर देव उभा राहीला ॥
॥ देवा धावल्याशी पाव । आपल्या बिर्दाचं चालवजो नावं ॥
॥ रखो बिरदकी बाणी । करो रोग-विघ्नोका पाणी ॥
॥ नित उभा राहयं बिर्दाले । तारण करा अन्जान बाळाले ॥
॥ बिर्द बाणी तुही होय । संभाळ करनं देवा तुया हाती आहे ॥
॥ बिर्द बाणी संभाळ धनी । हे सर्व आहे तुया अध्यानी ॥
॥ सत्य आणनं जगा । या बिर्दावर देव उभा माझा ॥

॥ रूक्मिणीचा भजन पाठा ११/१९ ॥

॥ रूक्मिणी आल्या सत्वधिरा । खेळ कर उभा ।
याहो महाराजा । रूप दावा अवघ्या जगा ॥
॥ सेरूपी उभी राहयं चांगोणा मायं ।
या देह जीवाला करावं साहयं ॥
॥ आम्ही व-हाडी व-हाडी । रूक्मिणीच्या माहेरचे गडी ।
विनवितो घडोघडी । आम्हा/आता दयाहो भेटी ।
॥ आम्ही व-हाडी व-हाडी । आहो तुमचे पुर्विचे गडी ।
आम्हा दयाहो भेटी । उभे राहुन जगजेठी ॥

॥ नाम घेतो जगजेठी भजन पाठा ११/२० ॥

॥ नाम घेतो जगजेठी । तोरे जगमे महीमा मोठी ।
तोरे जगवा महीमा मोठी । आम्ही जडलो तुया देठी ।
आम्ही जडलो तुया देठी । भक्तजना दयाहो भेटी ।
भक्त जना दयाहो भेटी । तुही महीमा आहे/होईन मोठी ॥

॥ मोतीयाच्या माळा भजन पाठा ११/२१ ॥

॥ मोतीयाच्या माळा । घालुनी गळा ।
याहो महाराजा तुम्ही शकुन सांगाया ॥
॥ ज्योतीनं ज्योत चढनं । दिवस अधिक ।
उभा राहयं कृष्णा । जगा दाव कौतुक ॥

॥ फुल पुष्पाच्या माळा भजन पाठा ११/२२ ॥

॥ चंदन पाट मोहन माळा । श्री कृष्णा साठी ।
या यवगाचे कारण आहे । देवा तुमच्या हाती ॥
॥ फुल पुष्पाच्या माळा । घालुनी गळा ।
हरी भजनी उभा राहीला । विठ्ठल सावळा ॥
॥ फुल पुष्पाच्या माळा । घालुनी गळा ।
हरी भजनी उभा राहीला । कृष्ण सावळा ॥

॥ फुल पुष्पाच्या माळा । घालुनी गळा ।
हरी भजनी उभा राहीला । हिर जिव्हाळा ॥
॥ जीवाची जिवनकळा । सेरूपी उभा राहीला हिरं जिव्हाळा ॥
॥ जिवाची जिवनकळा । सेरूपी उभा श्री कृष्ण सावळा ॥

॥ निरंजन निराकार । निश्कलंकी उभे अवतार ।
उभे अवतार याहीच्या हाती यवगाचा कार ॥
॥ निराकार निरंजन । उभे अवतार ।
बनलो याहीचे हात । आम्हाला तार भुम्मेवर ॥

॥ मोतीयाचा टोप भजन पाठा ११/२३ ॥

॥ श्री मोतीयाचा टोप कानी कुंडलचं लेला ।
कुंडलच लेला किसनजी भजनात आला ॥
॥ श्री मोतीयाचा टोप कानी कुंडलचं शोभे ।
कुंडलच शोभे कृष्णदेव । भजनात आले/उभे ॥
॥ श्री मोतीयाचा टोप कानी कुंडलच डोले ।
कुंडलच डोले किसनजी । भजनात बोले ॥
॥ पितांबराचा काठ । शेला गगनी झळकला ।
गरूडावर बसुन देवमाझा । कनवाळु/कैवारी आला ॥
॥ नाचता खेळता देवाचा ढळला पितांबर ।
साधु संत गर्जती नित नामाचा गजर ॥

॥ गलपाचा भजन पाठा ११/२४ ॥

॥ देवाच्या गलपाले जर । देव उभे यवगा वर ॥
॥ देवाच्या गलपाले चांदी । देव उभे यवगाच्या आंधी ॥
॥ देवाच्या गलपाले मोती । देव उभे रूक्माबाईचे पती ॥
॥ देवाच्या गलपाले गोफ । देवाचा चमके मखमली टोप ॥
॥ हरी नामाची गोडी । देवाच्या गलपाले बांधली दोरी ॥

॥ सावळा उभा भजन पाठा ११/२५ ॥

॥ सावळा उभा । उभे जग जीवनं । येवुन देहेत नांदन ॥ सावळा उभा..
॥ सावळा उभा । उभे अनामतं । निश्कलंकी उभी ज्योत ॥ सावळा उभा..
॥ सावळा उभा । उभे जगजेठी । भाग्य दैवानं झाल्या भेटी ॥ सावळा..
॥ सावळा उभा । उभे अवधुतं । याहीच्या चरणी दंडवत ॥ सावळा उभा..
॥ सावळ्या नंदनं । तुया चरणी लोटांगण ॥ सावळ्या नंदन..
॥ सावळ्या नंदन । देवा संग वागवनं ॥ सावळ्या नंदन...
॥ सावळ्या नंदन । देवा समज हद्यी देणं ॥ सावळ्या नंदन...
॥ सावळ्या नंदन । हा चौ-यांशी चुकवनं ॥ सावळ्या नंदन...
॥ सावळ्या नंदन । देवा ईच्छा पुर्ण करनं ॥ सावळ्या नंदन...

॥ किसनजी आले यवगाले भजन पाठा ११/२६ ॥

॥ किसनजी आले यवगाले । फुलाचे हार देवाच्या गळाले ॥
॥ किसनजी आले यवगाले । फुलाची गादी देवाले बसाले ॥
॥ किसनजी आले यवगाले । फुलांचे ओटे देवाले बसाले ॥
॥ वैजावंती घातली माळ । देहीचा तारू/राजा/मालक तो होय ॥
॥ वैजावंती घातली माळ । देह जीवाचा करा हो संभाळ ॥

॥ पानफुलाचा भजन पाठा ११/२७ ॥

॥ कुठवरं वाहु पानफुलं । कुठवर वाहु कापुरं ।
कुठवरं वाहु काय ? अवघचं पडते अपुरं ॥
॥ पान फुलं जन्मले । देवा तुया घरी ।
ते माझे नाही । वाहु तरी कोण्या परी ॥
॥ पान फुलं जन्मले । देवा च्या ईथं ।
ते माझे नाही । वाहु तरी कुठं ॥
॥ मन भावाचे फुल पुष्प । आहे या हद्‌यी ।
ते माझे हो । वाहतो तुया चरणी ॥
॥ मन भावाचे फुल पुष्प । ते तुजला अर्पण केलं ॥
॥ शुध्द मनभाव हे कापुर । उजळली ज्योत ।
मन हा मोगरा । देवा वाहतो नित ॥
॥ मन भावाचे फुल पुष्प तुला वाहतो ।
निमित्या कारण देवा दर्शना येतो ॥
॥ निमित्या कारण तुम्ही । धरलासे हातं ।
आता पुरवा पुरवा देवा । माझे हेतं ॥

॥ उभा कृष्ण अवधुत । याहीच्या चरणी माझा दंडवत ॥
॥ दंडवत परिक्रमा घालतो । या देवाच्या नामी ।
हरी प्रार्थथो/परार्थितो तार विठोबा धनी ॥
॥ दंडवत परिक्रमा घालतो । या देवाच्या नामी ।
आम्हाला तारा इथं । विठोबा धनी ॥

॥ वाजवा टाळी भजन पाठा ११/२८ ॥

॥ दोन्ही हातानं वाजवा टाळी । विठ्ठल विनवा हो विनवा ।
हा रक्त-मासाचा देहपिंड । मजबुत बनवा हो बनवा ॥
॥ टाळी वाजवा, टाळी वाजवा । हरीनामाची ।
सद्‌भाव महीमा याहीची ॥
॥ टाळी वाजवा, टाळी वाजवा । हरी नामाची ।
नित करा हो प्रार्थना । महाराजाची/अवधुताची/विठ्ठलाची ॥

॥ नाम घ्याहो विठोबाचे । सार्थक होईन या देहे-जीवाचे ।
नामी राहावं विठुच्या । विठु पुरवन तुमची आशा ।
विठु पुरवन तुमची आशा । तुम्ही धरा हो धीर भक्त जना ॥
॥ देव पुरवन तुमची आशा । तुम्ही धरा हो धिर ।
व्दैत जनाचा येवुन राया । करन संहार ।
व्दैत पाखंड सोड प्राण्या । उघड कवाड ॥

## ॥ आदीपुरूष बोले भजन पाठे ॥

॥ आदीपुरूष बोले भजन पाठा ११/२९ ॥

॥ आदी पुरूष, बोले अहीनाशी । आलो तुया घरी ।
जे जे बोलान, ते ते होईन । पृथ्वी वरी ॥
जे जे मागानं, ते ते देईन । श्री हरी ॥
॥ आदी पुरूष, बोले अहिनास । सांगतो हकीकत ।
तुमचं आमचं, होत । पुर्विच नातं ॥
॥ आदी पुरूष, बोले अहिनास । सांगतो खरं ।
इथे नांदे कृष्ण अवतार । वंश परांपर ॥
॥ आदी पुरूष, बोले अहिनाशी । दिलं वचन ।
नित नांदन, तुया घरी । आनंदानं ॥
॥ आदी पुरूष, बोले अहिनास । म्हणतीन काटे ।
या काटया पासुन अवघे । मोठे मोठे ॥
॥ आदी पुरूषाच, गिण्यान । झालं अहिनास ।
कल यवग, लागता देणं । झालं कहीकास ॥
अहीन :- आत्मा

॥ जागी करा देवाले भजन पाठा ११/३० ॥

॥ जागी करा या देवाले हो । करा मानवाले ।
पुर्विचं भाकलं अहीना घरी देव आले ॥
॥ अहिना घरी आले देव । पुर्विचं नात ।
पुर्विचं नात अकाशमात । उभी राहली ज्योत ॥
॥ ज्योत भली हो ज्योत भली । उभी आहे ताळात ।
ज्योतीचा अवतार कृष्णदेव । उभे सावंग्यात ॥
बहुत यवग ज्योत भली । नांदव देहीत ॥
॥ आले या ठाई हो घ्या याहीची गाही ।
भक्तजन उध्दराया कृष्णदेव आले या ठाई ॥

॥ निर्वाण ज्योत भजन पाठा ११/३१ ॥

॥ निर्वाणाची ज्योत उभी । राहली सोयंम् ।
या ज्योतीनं मदत केली संपुर्ण ॥
॥ आला ज्योत नगरचा राजा । संग घेवुन सिध्दांच्या फौजा ॥
॥ जलस्थळावर ज्योत राया । उभा हंकार ।
या ज्योतीनं तारण करा । बहु यवगा वर ॥
॥ कलयवगी मोहीम या देवरायाची । भैसरायाची ।
त्याला अगध नाही अन्न या पाण्याची ॥
॥ भेटी आंगचे सिध्द उभे । करा माझे संगतीले ।
सदा विनवितो नित साहय । करावं आम्हाले ॥

॥ माझा जन्म भजन पाठा ११/३२ ॥

॥ माझा जन्म कोण्या निमित्य । पहा शोधुन ।
माझ मजला देणं देवा । केव्हा भेटनं ॥
॥ माझ मजला सुखः दयाहो । धाव पाव आता ।
माझी अरज आहे देवा । तुमच्या वर सत्ता ॥
॥ सत्ता तुमची सत्ता माझी । राहु दे आता ।
सदा विनवितो देवा भक्तात । ठेवावं समानता ॥

॥ शिष्टाई भजन पाठा ११/३३ ॥

॥ आला यवगाच्या सुत्रानं भैस । करे शिष्टाई
निजरूप भुम्मा जागी करन चौताई ॥

॥ पृथ्वीवर तो अवतार उभा । धरून सृष्टी ।
निजरूपा भुम्मा जागी सारी । जागी करन सृष्टी ॥
॥ अनामत आदीपुरूष जाण । धरणी देईन त्याला होईन प्रसन्न ।
धरणी देईन त्याला देणं भेटन ॥
॥ आदीपुरूष अनामत जाण । धरली देही त्याला देणं संप्पन्न ॥

॥ चौताळावरचा ज्योत उजाला चा भजन पाठा ११/३४ ॥
॥ कोटी सुर्यप्रभा सम होईन/दिसन उजाला ।
तुम्ही लागा/डिकावं हो । लागा/डिकावं या नामाला ॥
॥ चंद्र ज्योती सम होईन/दिसन उजाला ।
तुम्ही लागा/डिकावं हो । लागा/डिकावं या नामाला ॥
॥ भैसा खुम्मी अगाध वाणी । ज्योत प्रकाशन देही ।
एकच होईन आरोळी । जागी करन चौताळी ॥
॥ तिरभवनी होईन आरोळी । याचं मानु नका भेव ।
चतुर्पती चा कार आपल्या मनीच ओळखावं ॥

॥ चतुर्पती देव, धरन देही । निजरूप भुम्मा जागी करन चौताळी ॥
॥ चतुर्पती देवाची, ऐकावं वाणी । नवराज्य होईन कंचन धरणी ॥
॥ कजबा वस्ती करनं अवधुत । होईन अचंबा प्रकाशल ज्योत ॥
॥ कजबा वस्ती करन, आदीपुरूष । होईन अचंबा, प्रकाशन ज्योत ॥
॥ ज्योतीनं ज्योत प्रकाश । उजेड हो देहीत ।
उजळले रूप, हे सुर्याच्या तेजात । जैसे रूप हे सुर्याचे तेज ।

॥ जीवनकळा ज्योत भजन पाठा ११/३५ ॥
॥ सत्रावी जीवाची जिवनकळा । सेरूपी उभा कृष्ण सावळा ॥
॥ सावळा उभा । उभे अनामत । निशंःकलंकी उभी ज्योत ॥ सावळा..
॥ पंचभुती उरला तोही, धरला रंग । सगुण-निर्गुण उभा झाला आंग ॥
॥ खेळ खेळे । बहुरंग । खेळे अवताराच्या संग । बावशी उठली ॥

॥ चतुर्पती देव भजन पाठा ११/३६ ॥
॥ हा चतुर्पती देव देईन । रूपा सुखाची गाही ।
जागी करन हा महाराजा । सारी सृष्टी ॥
॥ चतुर्पती देव, तारण देही । नामी राहीन त्याची चुकवन चौ-यांशी
॥ या चतुर्पती देवाची, सत्य वाणी । सत्यवगी उभा राहीन धनी ॥
॥ सत यवगाचं परमाण/प्रमाणं । कृष्ण महाराजा जागी करून दावनं ॥

॥ अथर्वन् वेदाचा भजन पाठा ११/३७ ॥
॥ अथर्वन् वेदाची मांडणी । सांगी सांगतली आकाशवाणी ॥
॥ आकाश वाणीचा आला । सांगी सांगन तो अवघ्या जगाला/जनाला
॥ अथर्वन् वेदाची गाही । महाराजा येवुन भरन हद्यी ॥
॥ अथर्वन् वेदाची गाही । महाराजा येवुन नांदन सत् देही ॥
॥ अर्थवन् वेदाची गाही । जागी करन महाराजा सृष्टी ॥
॥ जागी करू केलं याहीनं । साडेतिन दिवसाच्या रात्री ।
नाही ठेवणार या देहीवर । तिळभर माती ॥
॥ निर्भय गावतो निशंःकलंकी वाणी । बिद पाहुन येईन आता धनी

॥ चौरूपावर शिक्का भजन पाठा ११/३८ ॥
॥ चौ रूपावर शिक्का राहीन । या आदी पुरूषाचा ।
ब्रम्हा विष्णु शंकर याहीची । उडुन जाईन सत्ता ॥
॥ चौ रूपावर शिक्का आहे । या आदी पुरूषाचा ।

शिक्का असुन, नाही काहो म्हणता ? । कसे तुम्ही पंडीता ?
॥ चौथ्या खुम्मावर उभी आहे । अवधुत बादशाही ।
हात कोणाचा पुरत नाही । तारू केली नरदेही ॥
॥ मायेत आहे अवघे जन । मालक घ्याहो तुम्ही ओळखुन ॥
॥ भजा भजा हो चतुर्पती । शकुन येईन आत्मचित्ती ॥

॥ पुर्विचं संचित दोरा भजन पाठा ११/३९ ॥

॥ कृष्ण संगतीचा लाभ । काहीतरी पुर्व जन्मीचा भाग ॥
॥ होती पुर्विची संगत । भौर चंदन हे आले हद्यात ॥
॥ होता पुर्विचा दोरा । भौर चंदन/आदीपुरूषदेव हे आले घरा ॥
॥ भौर चंदन आले घरा । सुटला याहीच्या शकुनाचा वारा ॥
॥ सुटला शकुनाचा वारा । ऐसा बोले झेंडयाचा फरारा ॥
॥ आकाश वाणीचा दोरा हाती । चढुन गेला झेंडयावरती ॥
॥ चढुन गेला झेंडयावरती । राखन आहे देवराया श्रीपती ॥
॥ आदीमुनी महामुनी हाती । पाडल्या फरा-याला गाठी ॥
॥ पाडल्या फरा-याला गाठी । अकाशमात उभे राहीले जगजेठी ॥
॥ आकाश वाणी गर्जला । आपल्या बिर्दावर उभा राहीला ॥

॥ पुर्विचं दोरा भजन पाठा ११/४० ॥

॥ होता पुर्विचा दोरा । म्हणुन आले देवराया घरा ॥
॥ होता पुर्विचा दोरा । म्हणुन आलो देवरायाच्या घरा ॥
॥ होतं पुर्विचं संचित । म्हणुन भेटी झाल्या अकस्मात ॥
॥ होतं पुर्विच संचित । म्हणुन घडली परवेशाची संगत ॥
॥ हाताशी लावला हात । जमा झालं हे देवरायाचं गोत ॥
॥ हाताशी लावला हात, मिळवलं गोत ।
धनी आले हो आले कृष्ण अवधुत ॥
॥ होता पुर्विचा लेश । परेशाची घडली संगत ॥
॥ तुम्ही परेश आम्ही लोहा । संगत घडली याहो किसनजी देवा ॥
॥ लोहा घासे परेशाले । कंचन करा महाराजा देहीले ॥

॥ निराकार निग्गुण रूप भजन पाठा ११/४१ ॥

॥ निराकार निर्गुण निरंजन रूप मज दावं ।
अनंत ब्रम्हाडाच्या वरत सेरूप ओळखावं ॥
॥ अनंत ब्रम्हांडाच्या वरत । सेरूप कृष्णाचे/अवधुताचे ।
सेरूप कृष्णाचें/अवधुताचें । पुढे सुख अनंत यवगाचे ॥
॥ जन्मो जन्मीच्या धारा आहे । भक्तां ची तळमळ ।
पुर्विस्ताचं संचित होत म्हणुन । पावन झाले भगवान ॥
॥ अहीन खरा अहीन न्यारा । अहीना घरी अवतार आला ।
अहीना घरी अवतार उभा । याहीचा आधार मजला पुरा ॥
॥ यवगा यवगीचा हा आत्माराम ।
याहीची किर्त महिमा जगात वाढवनं ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०९ ॥

॥ भजन पाठा नं. १२ ॥

# ॥ देव-देव म्हणता भजने पाठे चा संग्रह ॥

॥ देवदेव म्हणता जळगाव दांडाचा भजन पाठा १२/०१ ॥

॥ महा महा ऋषि बसले । विचार करून ।
आत्म ज्ञान शोधल्या शिवाय । नाही तत्व ग्यानं ॥
॥ महा महा अवतार बसले । घुंम घालुन ।
कोणचं नाही देव पाहीला । सांगता कोण्या तोंड ? ॥
॥ देव-देव म्हणता देव बा । आहे कोण्या ठाई ? ।
शंका नाही जन्माला देव म्या । पाहीला नाही ॥
॥ देव-देव म्हणता देव आहे । भुताचा बाजार ।
ज्याचं नाव देव ते आहे । अग्नीचं घरं ॥
॥ देव-देव म्हणता देव बा । आहे बहुता परी ।
ज्याचं नाव देव तो आहे । अवघ्याच्या अंतरी/शेजारी ।
ज्याचं नाव देव तो आहे । चौथ्या खुम्मी ॥

॥ देहीतील शिव भजन पाठा १२/०२ ॥

॥ देहीतील शिव नाही पाहीला । तिर्थयात्रा करता वाया गेला ॥
॥ देहीतील शिव नाही ओळखला । ज्या प्राण्यानं ।
केले तिर्थ गेले वाया । झाला हीन ॥
॥ देहीतील शिव नाही पाहीला । हिंडे रानोवनी/तिर्थस्थानी ।
पाहता पाहता आयुष्य गेलं । देव सापडला नाही ।
पाहता पाहता आयुष्य गेले । बहु जीवांची केली हानी ॥
॥ गळ्यात त्रिकुटाची माळ । तिर्थ यात्रेला जावुन करता काय ?
तिरकुटावर होम लावला । त्या योग्याकडे/नराकडे पाहयं ॥
॥ अंतरी ग्यानभक्ती वैराग्य सद्‌गुण । साधलं ज्यानं ।
तो लाखामध्ये जाणा एकच पहेलवान ॥
॥ आत्मग्यान वैराग्य सद्‌गुण साधले । तो साधु खरा ।
वरकढ साधु वाया गेले । चौ-यांशीच्या फेरा ॥
॥ भल्या भल्याला बसली गिरकी । अविद्येचा पसारा ।
याच मध्ये नाव चालली । थाप पाहयजो हुशारा ॥
॥ देव देव म्हणतीन जन । देव पाहीला काहो कोणं ? ॥
॥ देव पाहीला काहो कोण ? खरं सांगा तुम्ही ईमानानं ॥

॥ ऐक्यांशी कोटी सावंगा दांडाचा भजन पाठा १२/०३ ॥

॥ ऐक्यांशी कोटी सव्वा लक्ष्य दहावर । दहा देवता ।
त्याच्या मध्ये कोणी नाही बापा । मोक्षाचा दाता ॥
॥ या देवापाशी नाही । मोक्षाचं गाठोडं ।
काय सोडवुन दाखवनं । तुमच्या पुढं ॥
॥ मोक्ष पदासाठी नाना त-हेच्या साधना ।
दुर कर कथा कवी पिंडी । जन्म मरण चुकवेना ॥
॥ मोक्षा विना तत्वता ? कैच्या गिता भागवता ?
सहा शास्त्रे ग्रंथ लिखित । भागवत गिता ।
घरात विस्तु असुन, बाहेर का तपाला जाता ? ॥
॥ अंबर पदाची जागा तुम्ही घ्याहो ओळखुन ।
भल्या भल्याला नाही लागलं । मोक्षाच ठिकाणं ॥
॥ निरशुन्यामध्ये तो भगवंत । निराकार होता ।
तुमच्या विना कोणी नाही बापा । मोक्षाचा दाता ॥
॥ मोक्ष पदाची वासना । पुरवा पुरवा महाराजा भगवाना ॥

॥ या देही तप करा भजन पाठा १२/०४ ॥

॥ या देही हे तप करा । वर भेटन या अस्तुरीला/देहीला ॥
॥ नरदेही स्वयं पाक/शुध्द करा । आदी पुरूष येतीन या घरा ॥
॥ नर देही अंदंर-बाहर । सुंदर सफा करा ।
आदी पुरूष देव येतीन । शंक देह घरा ॥
॥ या देहीचा पती । उभा राहीन तो भ्रतार ।
देवराया भ्रतार । जेवतीन देह गादीवर ॥
॥ भ्ररताराची सेवा करता । जगाला भय वाटे ।
जो कोणी सेवा करन । त्याला आदीपुरूष भेटे ॥
॥ या भ्रताराची सेवा । कर देही तु ।
आदी पुरूषाच्या हातुन लागन । तुया कपाळी कुंकु ॥
॥ या अवताराची संगत घडन ज्याला ।
तो नर नांदे या देव दरबारा ॥
॥ नरा रे कर नर-नारायण गडी ।
तेव्हाच सार्थक होईन मानव कुडी ॥
डहाकी :- *॥ चंदनाच्या परी । झिजवा हा देह । नामी राहावं, सदोनित ॥*

॥ भजन पाठा १२/०५ ॥

॥ देहीचा कारागीर तयार केलं काम ।
हा कारागीर कोण होय ? याच नाव दयाहो सांगुन ॥
॥ उभा आहे भैसराजा । याहीच्या चरणी आहे मुजरा माझा ॥
॥ अनामत आदीपुरूष जाण । धरणी देईन त्याला भेटन दर्शन ॥
॥ अनामत आदीपुरूष जाण । धरणी देईन त्याला देणं भेटन ॥
॥ अनामत आदीपुरूष । धरन देही त्याला भेटन तिरभवनं/तिरलोक ॥
॥ अनामत आदीपुरूषा जाण । अनामत आदीपुरूष जाण ।
ज्याची धरली, देही त्याला । झालं देणं संप्पन्न/संपुर्ण ॥
॥ देहे या देवळाचे । उघडा कवाड । पुढे राज्य होईन शकुनाचे ॥
॥ ना दिया ना पाती । यह आत्मज्योत नजर नही आती ॥

गजर :- ॥ का बसले अंधारात । घे किल्ली जा झटपट ।
ताला खोलुन पहा देवळात.... ।
कशी झगमग जळते । निर्वाणाची ज्योत ॥

॥ तेरे घरमे भजन पाठा १२/०६ ॥

॥ तेरे घरमे भरा भंडार । यार क्यो घुमता बाहर-बाहर ? ।
खोल दरवाजा कवाड । है कोई कुंजीवाला लाल ॥
॥ याहीला किल्ली नाही गवसली । या हरी नामाची ।
ही खुण घे । कृष्ण महाराजाची ॥
॥ यवगा यवगीचा आत्माराम । याहीची किर्त महिमा जगात वाढवनं ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०९ ॥

॥ भजन पाठा नं. १३ ॥

# ॥ शुर विर खेत्री भजनं पाठे चा संग्रह ॥

॥ शुर विर खेत्री भजन पाठा १३/०१ ॥

॥ शुर विरा बांध कंबर । निघ बाहेर..
तुला पाहता, तिरभवन कापे थरथर ॥
॥ शुर विरा बांध कंबर । निघ बाहेर..
त्वा पाय टाकता, तिरभवन कापे थरथर ॥
॥ शुर विरा बांध कंबर । निघ बाहेर..
तु पाउल टाकुन । यवगाची मोहीम कर ॥
॥ खेत्री ढाल पटाईत । या यवगाचे कारण याहीच्या हात ॥
॥ खेत्री ढाल पटाईत । याहो महाराजा दया बाळाला भेट ॥
॥ खेत्री शुर विर भगवान । गोपाळा/लेकरां साठी ये बाप्पा धावुन ।
॥ खेत्री शुर विर भगवान । गोपाळाला/अन्जानांला ने बाप्पा तारून ।
॥ खेत्री शुरविर भगवान । खेत्री आला बाळाचा धावुन ॥
॥ खेत्री बाहेर निघाला । रमणा यवगाचा हाती धरला ॥
॥ खेत्री बाहेर निघाला । भारी संभाळ या देवानं केला ॥

॥ भाल्याचा भजन पाठा १३/०२ ॥

॥ भाला शुरा विरांचा । संहार करते हा देव रोगा विघ्नाचा ॥
॥ भाला शुरा विरांचा । संहार करते हा देव व्दैत दुर्जनाचा ॥
॥ भाल्या वरत भाले रंचले । खेत्रीयाची शाळा ।
खेत्रीयांची शाळा, त्यामध्ये खेळे कृष्ण राया ॥
॥ सुटला अगन्या बाण । देहीचे रोग-विघ्न हे जातीन जळुन/उडुन.

॥ द्युतांचा भजन पाठा १३/०३ ॥

॥ दरबार द्युतांचा/सावाचा होय । ख-या खोटयाचा ईथ न्याय आहे.
॥ ईंद्रानं केला परं । कृष्णा वरं ।
यान गोवर्धन धरले/तारले । नखा वरं ॥
॥ गोवर्धन नखी धरला । यानं ईद्रांचा पण हो, खाल्या केला ॥
॥ हिरण्यकश्य नखीं फाडला । आपला बाळ देवानं ओटयात घेतला ॥
॥ रामानं सिता कशी मुकलीसे वनाशी ।
तशीच गत, नको करू कृष्णा । आपल्या भक्त जनाची ॥
॥ सिता जाणकी उचल पालखी । माय रूक्माई ।
सावंगपुर नगर माझं । माहेर होय बाई ॥
॥ तारा बाईचा स्वर्गि घंटा वाजे । ३३ कोटी देव थरथरा कापे ॥
॥ तारा बाईचा विर हनुमान । आला यवगाचा खेळ ।
आला यवगाचा खेळ । कृष्णा, निघ बाहेर । दावा सेरूप ॥
॥ महाविर मारोती झाला । विघ्नं निवारी ।
श्री कृष्ण नामाची टाळी । भक्ताला तारी/तारती ॥
॥ हनुमान हरीश्चंद्र आहे । या गण नामी ।
या गण नामी, विघ्ने उडवाच्या कामी ॥
॥ मोडन जंतराचे भार । उभा आहे पुर्ण अवतार ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०९ ॥

॥ भजन पाठा नं. १४ ॥

# ॥ तिनदेव भजनं पाठे संग्रह ॥

॥ अंतरी ओळखा भजन पाठा १४/०१ ॥

॥ अंतरी ओळखा आपला पिता । अनुसया आमची माता ॥
॥ ब्रम्हा विष्णु शंकर बाळ । अवतार निरंजनाचे होय ॥
॥ श्रीकृष्णाने दाखवले पाय । अवतार निरंजन होयं ॥
॥ निरंजनाचे धरावे पायं । सागी या आदीपुरूषाची होय ॥

॥ तिन देव तिन यवग भजन पाठा १४/०२ ॥

॥ ब्रम्हा विष्णु शंकर याहीनं । केली भक्ती ।
ते भक्त होय गडे हो । काही नाही त्याहीच्या हाती ॥
॥ तिन यवगाचा दिला जुम्मा । यवगा कारण ।
तिन यवगाचे राज्य तिघाला । देवु केलं देणं ॥
॥ राजपदवी सुदी नाही केली । पहा या तिघांन ।
तिन यवगाची तसनस झाले । कळले याहीचे गुणं ॥
॥ ब्रम्हा विष्णु शंकर झाले । मायाचैत्यन्या च्या उदरी ।
केला यवगाचा नाश । काय याहीच्या पदरी ? ॥
॥ ब्रम्हा विष्णु तिरनयन । यवगा यवगी नाश केला याहीनं ॥
॥ नाश केला बेईमाना । ब्रम्हांडाची लागो तुम्हा कल्पना/माया ॥
॥ केला मायेचा पसारा । उत्तम नरदेही ।
जीवाला अपदेशी घातला । आमचं कोणी नाही ॥
॥ तिन भावांचे तिन काम । पुढे कैसे होईन काम शुन्य निरसुन ॥
॥ ब्रम्हा विष्णु शंकराचे राज्य पलटन । काहीनाही केले त्याहीनं ।
चौथ्या खुम्मी उभा राहीन धनी । अग्नीचं घर ॥
॥ शुन्य उडवन तिरगुणांच । राज येईन भैसाचं । धनीदेव नांदन ईथं ।
॥ तिरगुणांच शुन्य उडवन, चवथा खुम्म ।
सत्य यवगी कृष्ण राजा । देवराज्य करनं ॥
॥ यवग काबीज करन सारं । भैसराज येईन या यवगावर ॥
॥ राजा येईन यवगाचा । हिशोब घेईन लहान्या मोठयाचा ॥
॥ येतीन देवाचे द्युत । उभा राहीन देव त्याहीच्या रंगात ॥
॥ यवगा-यवगीचा आत्माराम । याहीची किर्तमहीमा जगात वाढवनं/सांगन ॥
॥ उभा आहे माझा राम । राम करे यवगाचे काम ॥
॥ सत्य आणनं जगा । कृष्णदेव आहे या बिर्दावर उभा ॥

॥ चौरूप भजन पाठा १४/०३ ॥

॥ चौ रूपावर शिक्का राहीन । या आदी पुरूषाचा ।
ब्रम्हा विष्णु शंकर याहीची/तिरगुणांची । उडुन जाईन सत्ता ॥
॥ चौ रूपावर शिक्का आहे । या आदी पुरूषाचा ।
शिक्का असुन, नाही काहो म्हणता ? । करसे तुम्ही पंडीता ?
॥ चौथ्या खुम्मावर उभी आहे । अवधुत बादशाही ।
हात कोणाचा पुरत नाही । तारू केली नरदेही ॥
॥ हा होय चवथा खुम्म । धनी उभे आहे निर्वाण ॥
॥ चवथा खुम्म जागृत । आकाश वाणी भैसाच्या मुखात ॥
॥ आकाशवाणीचं बोलनं । चवथ्या खुम्मी देवराया राज करनं ॥
॥ सत यवगाचं प्रमाण/परमान । महाराजा जागी करून दावन ॥
॥ निरंजन निराकार उभा अवतार । याहीच्या हाती यवगाचा कार ॥
॥ उभा राहीन अवतारधनी । तो तारण जीवाजनी । हे सर्व त्याहीच्या अध्यानी ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०९ ॥

॥ भजनपाठा नं. १७ ॥

॥ सावंगा शब्द असलेले भजने व पाठे ॥

## ॥ सावंग भजने व पाठे चा संग्रह ॥

॥ सावंग आहे अगुचर । नित्य नामाचा होतो बा गजर ॥
॥ सावंग सोयंम् शब्दाचं । माहेर होय या भावीक भक्त जनांच ॥
॥ पहा या सावंग्याचे सुखः । जन्म-मरणाचे देहीचे हरतीन दुःख ॥
॥ अनामत वस्तु याहीचे । पाय नाही धरणीला ।
अकाश मात अवधुत हंकार । सावंग्याशी आला ॥
॥ निरशुन्याहुन आले अवधुत । मिर्त लोकात ।
सावंग पुरी अवतार धरला । अहीनाच्या ईथ ।
सावंगपुरी दुकान लावले । नामाची पेठ ॥
॥ निरशुन्यावर विहीर खोदली । सावध होवुन सावध पाहयी ।
सावंगपुरी पाय लावला । सावध ज्योत या रायाची ॥
॥ निरशुन्यावर विहीर खोदली । कोण होता वनमाळी ।
सावंग नगरी बाग लावला । लावुन सत्वाच्या केळी ॥
॥ सावंग्या नगरात आहे । अवतारांची भेट ।
आहे अवतारांची भेट । सावंग्यात झालीसे मात ॥
॥ सावंग्यात झालीसे मात । उभा आहे कृष्ण/विठ्ठल नाथ ॥
॥ सावंग्यात झालीसे मात । आता आहे पुर्ण अवताराची भेट ॥
॥ सावंग्यात झालीसे मात । येथं आहे हरीनामाचा उल्हास ॥
॥ सावंग्यात झालीसे मात । ज्योतीचा प्रकाश आहे सदोनित ॥
॥ सावंग्यात झालीसे मात । येथं उभी आहे जिवनकळा ज्योत ॥
॥ ज्योत भली हो ज्योत भली । उभा आहे ताळात ।
ज्योतीचा अवतार कृष्ण देव । उभे सावंग्यात ॥
॥ पुर्ण अवतार उभा सावंगपुरी । निर्भय आहे या देवाची नगरी ॥
॥ साव आला सावंग्यावरी । डंका वाजे या भुम्मेवरी ॥
॥ साळुमाय आली सावंग्यावरी । डंका वाजवते या भुम्मेवरी ॥
॥ सिता जाणकी उचल पालखी । माय रूक्माई ।
सावंगपुर नगर माझे माहेर होय बाई ॥
॥ सावंगपुरी देव नांदे । अन्जानाला देव गिण्यानं सांगे ॥
॥ सावंगपुरी नाम खडका । सिध्दाच्या मुखी आहे अग्नीचा भडका ॥
॥ सावंगपुरी नाम खडका । ऋषिकेशी आले । याहीची वाणी ऐका ॥
॥ सावंग्यात एक ऋषि । अवघे तिर्थ याहीच्या पाया पाशी ॥
॥ सावंग्यात एक ऋषि । सदोनित मजला घडते काशी ॥
॥ सावंग्यात ज्ञान गंगा । दोष पातक हे जातीन भंगा ॥
॥ विठोबा सावंग्यात आहे । त्याहीचे नाव या चौताळी आहे ॥
॥ विठोबा सावंग्याचा राजा । याहीला नमस्कार माझा ॥
॥ विठोबा उभे सावंग्यात । याहीला माझा दडंवत ॥
॥ पंढरपुर पुजेचं महेमान । सावंग्यामध्ये वाटतो हा साखर पान ॥
॥ पुढरपुर पुजेचं महेमान । सावंगपुरी हा देतो गा देणं ॥
॥ सावंग व-हाडात आहे । मध्ये देवाचं गरूड आहे ॥
॥ सावंग होय व्दारका । इथ नांदतो श्री कृष्ण सखा ॥
॥ अनामीकाच अमोघ घर । नाही पाहीलं कोणं ।
सावंगपुरी कृष्णाजी वदला । चतुर्पती नाम ॥
॥ सर्वत्राच्या आधी भक्ती । पुनानं केली ।
सावंग्या मध्ये हरी नामाची । ध्वज लावली ॥
॥ सावंग नगरी कंचन झाली । चतुर्पती नामाची ज्योत उजळली ॥
॥ कोरी भुम्मा जाणा । ईच्यावर अवतरले हो देवराया ॥

॥ आला सावंग्याचा राजा । तो धनीदेव/मायबाप/कैवारी होय माझा ॥
॥ आला सावंग्याचा राजा । तो भजन सांगे सदा ॥
॥ आला सावंग्याचा राजा । याशी सदोनित मुजरा आहे माझा ॥

॥ कोरी भुम्मा कोरा देह । कोरा कागद ।
या को-या भुम्मेतुन निघाला । सिदाईचा वेद ॥
॥ कोरी भुम्मा कोरा देह । कोरा कागद ।
जो कोणी नाश करन । त्याच्या कुडीला दोष ॥
॥ मेरूचं मंडयान सावंग अगुचर वस्ती ।
अवतरले महाराज, वाणी सागंतली यवगाची/जगाशी ॥
॥ अलक्ष्य ज्ञान परंपार । परा वाचेचं होय हे ठिकाणं ॥
॥ परा वाचेच्या ठिकाणी । नांदते माझी तुरीया/तुर्या राणी ॥
॥ परा पश्चंती मध्यमा तिन । चौथी वैखरी, पाचवी अनुर्वाचा जाण ॥
॥ स्थुल सुक्ष्म कारण देही तिन ।
चौथी महाकारण, पाचवी केवल्य/केवळ जाण ॥
॥ केवळ उभे सावंगपुरी । आमचा माथा याहीच्या चरणावरी ॥
॥ वैजावंती घातली माळ । हा देहीचा तारू/राजा/मालक होय ॥
॥ हाती पाळण्याची दोरी । राखन आहे हा देवराया श्रीहरी ॥
गजर :- ॥ हाती पाळण्याची दोरी । झोका गेला लांब दुरी ।
झर झरा उतरले हरी । सांवग पुरी ॥
॥ सावंग्या नगरात, कोण एक उतरला राजा ।
झेंडा हे निशाण । त्याहीच्या जरीच्या पताका ॥
॥ सावंग/देवगाव नगरी । लभेद उतरला राजा ।
झेंडा हे निशाण । त्याहीच्या अस्मानी ध्वजा ॥
॥ झेंडे दोहीकडे दोन । मध्ये उभे देव नारायण ॥
॥ अस्मानी ध्वजा मन लावुन भजा । तारू उभे देहीचे ।
दिवस आला यवगाचा । सार्थक होईन आल्या जन्माचे ॥
॥ कानी आवाज ऐकला । म्हणुन म्या रस्ता सावंग्याचा धरला ॥
॥ याहो सावंग्याच्या राजा । उभा राहयजो या गोपाळाच्या काजा ॥
॥ कृष्ण सावंग्याचा राजा । याहो महाराजा गोपाळाच्या काजा ॥
गजरे :-
॥ ऐक मानवा सांगतो तुला । नको विसरू हरी नामास ।
जाय रे सावंगपुर । एक वेळ पाहय रे सावंगपुर ॥
॥ चला जावु सावंगपुरी । या भक्ताच्या माहेरी । द्युतांच्या नगरी ।
इथ नांदतो हरी । हेच होय पुण्याची पायरी ॥
॥ सावंग्याचं राउळ सुर्यमुखी । आंगणी झेंडे डोलती ।
सभामंडपी शकुन गर्जती..। याहीनं दवंडी देल्ली, नाम चतुर्पती ॥
॥ आंगणी वृंदावन । लावलं साळु मायेनं..।
ईथ रमलं देवाचं मन । जागा/भाव पाहुन ॥
॥ धन्य धन्य कृष्णाजी देवा । हे वाणी काढली तुवा ।
तुया पायाचा धरला धावा..।
माझी अरज आहे एवढी । पावन व्हाहो देवा ॥
॥ धन्य धन्य कृष्णाजी देवा । घडोघडी घडो तुयी सेवा । मागण हेही..
या सोहंम् ज्योतीच्या ठायी । पुन्हा धर नरदेही ॥
॥ कृष्णा तुझी संगत । मला घडो बा सदोनित ।
तुमची कळसुत्र कळा । कोणा नाही कळतं ॥
॥ तु सुखकर्ता तु दुःखहर्ता । सावंग्याच्या नाथा ।
देवा अनामता, देवा अवधुता । तुमच्या चरणी माथा ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०९ ॥

॥ भजन पाठा नं. १६ ॥

॥ भजन पाठे ॥

# ॥ द्युतांचा डंका, दवंडी, जागी राहा भजन संग्रह ॥

॥ भजन पाठा १६/०१ ॥

॥ दवंडी देतो दवंडी देतो ।
हरी उठा उठा हो, आला तुमचा दिवस ॥
॥ दवंडी देतो दवंडी देतो ।
तुम्ही उठा उठा हो, आला संधीचा समय ॥
॥ दवंडी देतो दवंडी देतो ।
तुम्ही उठा उठा हो, आला यवगाचा समय ॥
॥ आला यवगाचा समया । खेळ कर उभा ।
श्री कृष्ण महाराजा । रूप दावा अवघ्या जगा ॥

॥ दवंडी भजन पाठा १६/०२ ॥

॥ दंवंडी देल्ली कृष्णानं । दवंडी देल्ली श्री प्रभुनं ।
अजुन कोणाला नाही मालुम ॥
॥ दवंडी देल्ली कृष्णानं । दवंडी देल्ली श्री प्रभुनं ।
सत्य शकुन हे सिदाई वचनं ॥

॥ दवंडी भजन पाठा १६/०३ ॥

॥ डबडब डबडब डबोल वाजे । शंकाचा नाद ।
मिर्त लोकी दवंडी देल्ली । याहीनं आपल्या आंग ॥
॥ दवंडी कृष्णाची होय । या दवंडी वाल्याचे धरावं पाय ॥
॥ दवंडी विठुची होय । दवंडी वाल्याचे धरावं पाय ॥

॥ डंका भजन पाठा १६/०४ ॥

॥ डंका वाजे हो वाजे । आले पंढरपुरचे राजे ॥ डंका वाजे..
॥ डंका वाजे हो वाजे । आले सावंग्याचे राजे ॥ डंका वाजे..
॥ डंका वाजे हो वाजे । आले चिरोडीचे राजे ॥ डंका वाजे..
॥ डंका वाजे हो वाजे । आले कारल्याचे राजे ॥ डंका वाजे..
॥ देवराया उभे राउळात । डंका वाजे हो तिरभवनात ॥
॥ सोयंम् उभी ज्योत । डंका वाजे तिरलोक्यात ॥

॥ द्युताची वाणी भजन पाठा १६/०५ ॥

॥ द्युताची वाणी ऐका हो मनी । सांगतो जगी ।
मनी नका धरू अंधेसा । येईन धनी ॥
॥ द्युतांचा डंका । तिरलोकी सागंजा ।
पुढं नवल होईन हेही तुम्ही पाहयंजां ॥
॥ कल यवगी मोहीम द्युत रायांची । भैस रायाची
त्याहीला अगाध नाही अन्न या पाण्याची ॥
॥ सांगी सांगतली । दवंडी देल्ली खरी ।
बिर्द वाणी सांभाळ धनी । असु दे लाज या बिर्दाची ॥
॥ देवा धाव पाव । आपल्या बिर्दाची बाणी राख ।
बिर्द वाणी संभाळ धनी । तु कर विघ्नाचं पाणी ।
आम्हाला तारा तुम्ही । हे सर्व तुया अध्यानी ॥

॥ भजन पाठा १६/०६ ॥

॥ जागी राहा हो राहा । यवगाचा समय आला ।
यवगाचा समय आला । पुढं पाहा हो पाहा ॥
यवगाचा रमणा आला । पुढं पाहा हो पाहा ॥
यवगाचा खेळ आला । पुढं पाहा हो पाहा ॥
यवगाचा रंग आला । पुढं पाहा हो पाहा ॥
॥ जागी राहुन पाहा गडे हो । धन्याचा करीना ।
पाहा धन्याच्या करीना । तो तारन तिरभवना ॥

॥ जागी करा भजन पाठा १६/०७ ॥

॥ जागी करा यादवाले हो करा मानवाले ।
पुर्विचं भाकलं अहीना घरी देव आले ॥
॥ अहीना घरी देव आले । पुर्विच नातं ।
पुर्विचं नात आकाशमात उभी राहली ज्योत ॥
॥ उभी राहली ज्योत गडे हो । पहा सावंग्यात ।
पहा सावंग्यात । धनी उभे कृष्णनाथ ॥
॥ ज्योत भली हो ज्योत भली । उभी आहे ताळात ।
बहुत यवग ज्योत भली । नादंन देहीत ॥
॥ ज्योतीनं ज्योत प्रकाश । उजेड होईन देहीत ।
उजळन रूप हे सुर्याचे दिप ॥
॥ जल स्थळावर ज्योत राया । उभा हंकार ।
या ज्योतीनं तरल्या जावु । बहु यवगा वर ॥
॥ आला ज्योत नगरचा राजा । संग आहे सिध्दांच्या फौजा ॥
॥ या भ्रताराची सेवा कर । देही तु ।
आदी पुरूषाच्या हातुन लागनं । तुया कपाळी कुंकु ॥

॥ जागी करा भजन पाठा १६/०८ ॥

॥ थिर नाही कोणाच्या मना । आला यवगाचा रमणा ॥
॥ थिर नाही कोणाच्या मना । जागी करून दाव बापा ॥
॥ थिर नाही कोणाच्या मना । जागी करा हो सारी सेना ॥
॥ थिर नाही कोणाच्या मना । बाहेर काढा हो सारी सेना ॥
॥ निजरूप भुम्मा आहे सारी । जागी करा महाराजा देही ॥
॥ धरधर धर तु देहीचा रंग । याहो महाराजा राहावं आम्हा संग ॥
॥ देह जागी करून दाव बाप्पा । तुमच्या चरणावर माझा माथा ॥
॥ अवघा कार तुम्हा हाती । जागी करा देवा अवघी सृष्टी ॥
॥ जागी करू केलं । साडे तिन दिवसाच्या रात्री ।
तिळभर ठेवणार नाही । देहीवर माती ॥
॥ सत् यवगाचं परमान/प्रमाणं । महाराजा जागी करून दावनं ॥
॥ हे होय कृष्णाची गाही । आदीपुरूष देव धरन देही ॥
॥ हा चतुर्पती देव धरन देही ।
निजरूप भुम्मा जागी करन चौताळी ॥
॥ अथर्वन् वेदाची गाही । जागी करन महाराजा सारी सृष्टी ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०९ ॥
॥ भजन पाठा नं १७ ॥
॥ जळगाव भजनचरणे व पाठे ॥

# ॥ जळगाव दांडचे भजन चरणे व पाठे ॥

॥ अर्ज भजन पाठा १७/०१ ॥

॥ सांवग्या नगरात । कोण एक उतरला राजा । सावंग्या...
झेंडा हे निशाण । याहीच्या जरीच्या पताका ॥ झेंडा हे...
॥ देवगाव नगरात । कोण एक उतरला राजा । देवगाव...
झेंडा हे निशाण । याहीच्या अस्मानी ध्वजा ॥ झेंडा हे निशाण
॥ अस्मानी ध्वजा । मन लावुन भजा । दिवस आला यवगाचा ॥
॥ अस्मानी ध्वजा । मन लावुन भजा । धनी आला यवगाचा ॥
॥ पिवळा पताका । जलतारी । आली महाराजाची स्वारी ॥ पिवळा
॥ जलतारी । आली महाराजाची स्वारी ॥ भगव्या पताका
॥ जलतारी । आली महाराजाची स्वारी ॥
॥ जलतारी । आली महाराजाची स्वारी । अस्मानी पताका ॥
॥ अस्मानी ध्वजा । मन लावुन भजा । दिवस आला यवगाचा ॥
॥ अस्मानी ध्वजा । मन लावुन भजा । तारू आला देहीचा ॥
॥ आले या ठायी हो देवा । घ्या याहीची गाही ।
झाली भक्त जनावर दया । किसनजी आले या ठाई ॥

॥ भजन पाठा १७/०२ ॥

॥ अनामीकाला देल्ल पुजार पण । तिन यवग गादीवर घेईन भरून ।
॥ भरते उरते याची कोण जाणे कळा ।
हा सर्वच खेळ आहे नित रूपाचा सारा ॥
॥ अडीच रोज मागतो राजा । कानड ध्वजा ।
अनामत भजा । निश्कलंकीच्या लागन ध्वजा ॥
॥ महाविर मारोती झाला । तो विघ्ने निवारी ।
कृष्ण नामाची टाळी । भक्ताला तारती ॥
॥ पाळणा बनवला खासा । राखन आहे हा देवराया कृष्णराजा ॥
॥ अगासाची दोरी । लांबविला पाळणा ।
या देवाच्या हाती । कळसुत्र जाणा ॥
॥ ओहंम्-सोहंम् माझे राया । येवुन तारा हो बाळ गोपाळा ॥
॥ सोहंम् नांद माझे राया । येवुन तारा हो बाळ गोपाळा ॥

॥ कबिर भजने पाठा १७/०३ ॥

॥ कबिर परमाना सुन लेना । हरीका भजन कर लेना ॥
॥ कबिर परमाना सुन लेना । साहेब नाम तुम लेना ॥
॥ साहब बैठे झुरकेमे । सबका मुजरा ले ।
जैसी जिनकी चाकरी । वैसा देना दे ॥
॥ साहबजी/नबिबजी । अरज सुनो कोई जम्माव की ।
उम्मेद हे बहु मान की ॥
॥ अवधु सो गुरू मेरा । वही है जगमे न्यारा न्यारा ॥
॥ सब दुनियासे न्यारा । वो है मेरा तारणवाला ॥
॥ अलख रूप मे खडा । वो है मेरा पालन वाला ॥
॥ चतुर्पती मे खडा । वो है मेरा प्रभुजी, तिरभवन मे पालनवाला ॥
॥ कबिर कहे घरघर फिरू । कोई नही माने तो मै क्या करू ? ॥

॥ भजन देवाचं करा भजन पाठा १७/०४ ॥

॥ तुम्ही या गडे हो, बसा गडे हो । घडी भर यानां ।
घडीभर या ना आम्हाला भजन करु लागा ॥
॥ जलावरी केला कार । अवधुत निरंजन खरा ।
तुम्ही भजन या देवाचें करा ॥
॥ काहीतरी करा हो करा । तुम्ही भजन देवाचं करा ।
आदीपुरुष येतीन घरा । तुम्ही भजन देवाचं करा ॥
॥ निश्कलंकी अवतार खरा हो खरा...।
तुम्ही भजन या देवाचे करा ॥

॥ भजनावाचुन सुनं राहु नका चा पाठा १७/०५ ॥

॥ भजना वाचुन सुन । राहु नका कोणी ।
कैलाशी भजन । शंकर करी ॥
॥ भजना वाचुन सुन । राहु नका कोणी ।
पाताळी भजन । शेष करी ॥
॥ भजना वाचुन सुन । राहु नका कोणी ।
स्वर्गि भजन । इद्र करी ॥
॥ भजना वाचुन सुन । राहु नका कोणी ।
मिर्तलोकी भजन । अवतार करी ॥
॥ भजना वाचुन सुन । राहु नका कोणी ।
लहान्या मोठयांचा । एकच धनी ॥

॥ भजने पाठा १७/०६ ॥

॥ कृष्ण व्दारकेचा राजा । देव भजन करे सदा ॥
॥ शंकर करे सुमरन । दुःख हरले बा हरले तुया नामानं ॥
॥ हरीचा नामाचा नसावा आळस ।
कैलाशी महेश करतो याहीचं सुमरन ॥
॥ तुम्ही या गडे हो, बसा गडे हो । घडीभर जागा ।
घडीभर जागा, आम्हाला भजन करु लागा ॥
॥ लुटा लुटा हो, अमृत वाणी । उत्तम नरदेही ।
उत्तम नरदेही भरोसा घडीचा नाही ॥
॥ पाण्या चा बुड बुडा । तोही एक क्षणाचा गोळा ।
देह गा तारण । तो एक अवधुत/अवतार जाणा ॥

॥ घ्या घ्या बाप हो भजने पाठा १७/०७ ॥

॥ घ्या घ्या बाप हो । घेत नाही कोणी ।
घेत नाही कोणी । परमय सुखाची वाणी ॥
॥ घ्या घ्या बाप हो । घेत नाही कोणी ।
घेत नाही कोणी । परमय पदाची वाणी ॥
॥ घ्या घ्या बाप हो । घेत नाही कोणी ।
घेत नाही कोणी । मोक्ष पदाची वाणी ॥
॥ घ्या घ्या बाप हो । घेत नाही कोणी ।
घेत नाही कोणी । अमृताची वाणी ॥
॥ घ्या घ्या बाप हो । अमृताची वाणी ।
अमृताची वाणी हे होय कृष्णाची वाणी ॥

॥ ब्रम्हरस प्रेमरस चे भजने पाठा १७/०८ ॥

॥ बम्हरस तुम्ही प्या हो प्या । मुखी नाम देवाचं घ्या हो घ्या ॥
॥ बम्हरसाची/प्रेमरसाची गोडी हो गोडी । तुम्ही नाम घ्या याघडी ॥
॥ बम्हरसाची गोडी हो गोडी । माझे या कुडीला आयुष्य दया ॥

॥ नाम रसाई । अमृताचा प्याला । जो पिवुन मग्गमं झाला ।
तो वाणी सांगे जगाला ॥

॥ नामाचा भजने पाठा १७/०९ ॥

॥ नाम घेता वाया गेला । ऐसा कोण महाराजा एकला ॥
॥ अशी तुया नामाची गाही । नामी तरला वाल्या कोळी ॥
॥ अशी तुया नामाची गाही । अग्नीमध्ये तारल्या मुंग्याच्या सेना ॥
॥ नाम हे जहराची पुडी । सोडुन दाखव देवा । दृष्टी समोरी ॥
॥ नाम हे जहरच आहे । प्याला पेईन त्याला अमृत आहे ॥
॥ स्वर्गि अमृत पाताळी अमृत । नाम नाही धन्या ।
नाम नाही धन्या दोन्ही पेठा पडल्या सुन्या ॥

॥ भजने पाठा १७/१० ॥

॥ शंकर निघुन गेले कैलाशा । पुजा कोणाची आता करता ? ॥
॥ याहीनं धोंडयाला लावला शेंदुर । पुजा करते बायका पोरं ॥
॥ भुल पडली ख-या देवा । करे दगडाची सेवा ॥
॥ भक्ती एकानं केली । लहान्या-मोठयांच्या कामा आली ॥
॥ भक्ती नव्हे लावणीची । पुर्ण कमाई या देह-जीवाची ॥

॥ भजने पाठा १७/११ ॥

॥ या कलयवगा वर सत्यवग येणारं ।
जे नाही नाही म्हणतीन । तयाचं नाही बरं ॥
॥ ऐसे होणार नाही म्हणता । उसनं झालं ।
उभा राहुन तो फेडनं सारं । त्याहीला चौ-यांशी नाही चुकणार ॥

॥ ज्योतीचे भजने पाठा १७/१२ ॥

॥ ज्योतीचा अवतार देवाचा । शकुन चांगला ।
नामीच राहाव गडे हो । आता एक भाव धरा ॥
॥ या निर्वाणाची ज्योत । उभी सोहंम् ।
या ज्योतीनं मदत । केली पुर्ण ॥
॥ ज्योतीनं ज्योत प्रकाश । उजेड या देहीत ।
उघडले रूप हे सुर्याचे दिप ॥
॥ ज्योतीनं ज्योत वाढंन । दिवस अधिक ।
उभा राहयं कृष्णा । जगा दाव कौतुक ॥

॥ भजने पाठा १७/१३ ॥

॥ या अवताराची संगत घडन ज्याला । तो नर नांदे दरबारा ॥
॥ या अवताराची संगत नाही ज्याला । त्याच्या घराला लागनं वारा ॥
॥ नरा रे कर हा नारायण गडी ।
तेव्हाच सार्थक होईन मानव कुळी/कुडी ॥

॥ कजवा वस्ती भजने पाठा १७/१४ ॥

॥ कजबा वस्ती देव करनं आदीपुरूष ।
होईन अचंबा, जगात होईन कौतुक ॥
होईन अचंबा प्रकाशन ज्योत ॥
॥ ज्योतीनं ज्योत प्रकाश । भरनं देहीत ।
उजळनं रूप सुर्याच्या तेजात । जैसे रूप हे सुर्याचे तेज ॥
॥ उभा राहयं कजब्याच्या मालका । कजबा वस्ती करून दाव समर्था
॥ उभा राहय कजब्याच्या मालका । कजबा वस्ती कर बापा ।
देहजीव नांदवजो आता ॥

॥ कजबा वस्ती कर बापा । देह जीव अंबर कर आता ॥

॥ भजने पाठा १७/१५ ॥

॥ किती सांगु रे बापा । हे जग मानत नाही ।
पंथ-पंथ पडतील गट । माझ-माझ म्हणतीन मोठ ।
मानत नाही.. । या आदी पुरूषाची गाही ॥
॥ अवधुत आहे जबर । तो तिरलोकी घेईन खबर ।
आदीरूप महाराज या भैसाचं राज्य इथं होणार ॥

॥ गुरू वरील भजने पाठा १७/१६ ॥

॥ गुरू गुरू म्हणता । गुरूची महीमा थोर ।
धनी आल्यावर काढन गुरूची खोड ॥
॥ नाही मज गुरू ग्यान । काय पुसता तुम्ही अयनाले ।
आकाशवाणीचा येईन शकुन । तो सांगन अवघ्याले ॥
॥ गुरू नेमावे धरतरी । शिष्य नेमावे कुदळी ।
दोन्ही हाताने खोदु लागले । अमृताची उकळी ॥
॥ गुरू चेला सिध्द साधक । येईना मनी ।
एकच जाणु अनामत धनी ॥
॥ चंदन शिक्का तुच मोहरं । अवघी किल्ली या देवाच्या जवळ ॥

॥ भजने पाठा १७/१७ ॥

॥ साहय करा अहीन राजे । धनी उभे देव माझे ॥
॥ गाहीचे वर्णन वर्णिले । आदीरूप रायाचे शकुन चांगले ॥

॥ भजने पाठा १७/१८ ॥

॥ रोमावळीला गणिता नाही । देव रूपी उध्दारला ।
धन्य देवाची लिला । अवघ्या घटो-घटी भरून उरला ॥
॥ कलयवगी होईन आरोही । मानु नका भेव ।
चतुर्पतीचा कार आपल्या मनी समजावं ॥
॥ समजावं आपल्या मनी । ऐका चतुर्पती नाम ।
काय पाहता देहीच निराळं निघालं नाम ॥
॥ समजावं आपल्या मनी । ऐका चतुर्पती गाही ।
चतुर्पती ग्वाही । भरवसा घडीचा नाही ॥

॥ भजने पाठा १७/१९ ॥

॥ नामी तरन तरल भरोसा । उभा आहे आता कृष्ण सखा ॥
॥ भेटीचा हा लाभ, वृक्षाला फळ । दिसते केवळ, राजहंस ॥
॥ अवघ्या जीवाहुन जीव अनामीक । अनामत खासा ।
यवगा साठी आला राजा । तो होय माझा पिता ॥
॥ आदी पुरूष निश्कलंकी । आहे नितरूप ।
सहा नामी राहीन । तो धनी लभेद एक ॥
॥ सहा नामी राहीन । तो करन गादीचा मान ।
त्याच मजला हो । होईन दर्शन ॥
॥ कळसुत्राचा मालक । धनी देव उभा आहे चौ ताळात ॥

॥ भजने पाठा १७/२० ॥

॥ स्वर्गि जोडुनिया हात । तिरलोकी पुजा देवानं केली साहेत ॥
॥ हात मी स्वर्गाला जोडतो । मिर्त लोकी धनी अनामत पुंजतो ॥
॥ पुजन करतो धरणीले । हात मी जोडीतो आकाशाले ॥

॥ भजने पाठा १७/२१ ॥

॥ सत्य सगुनाच्या ठायी । देव उभे लवलाही ।
सत्य जाणा हो तुम्ही । मालक उभा आहे यवगाचा धनी ॥
॥ कल यवगी मोहीम देवरायाची । भैस रायाची ।
त्याला अगद नाही । अन्ना या पाण्याची ॥
॥ पवन पाणी हुकमात । तुया बिना पत्ता नाही हालतं ॥

॥ तिन देव जागी केले चा भजने पाठा १७/२२ ॥

॥ बम्ह राखीचा साचा । जागी केला ।
बम्हांड रूपाचा बम्ह देव । उभा झाला ॥
॥ विष्णु राखीचा साचा । जागी केला ।
विसव रूपाचा विषणु देव । उभा झाला ॥
॥ शंकर राखीचा साचा । जागी केला ।
संगिन रूपाचा महा देव । उभा झाला ॥
॥ तिन खुम्म जागी केले याहीनं । आणीक चौथा दिला तिरनयन ॥

॥ चतुर्पता अथर्वन् वेदन् गाय । माझेया पोटी ।
चौथ्या खुम्मी उभा धनी । सांगे युगाच्या गोष्टी ॥

॥ गाय भजने पाठा १७/२३ ॥

॥ हुंबरीतो गाईच्या वाणी । गायन करा ।
तुया विना तिताळी । नाही दुसरा ॥
॥ तु गाय मी वासरू । सावळ्या नको पान्हा चोरू ॥
॥ तु हरीण मी पाडस । सावळ्या नको सोडु आस ॥

॥ भजने पाठा १७/२४ ॥

॥ आम्ही पिसे झालो भाई । या धुताच्यां पायी ।
आम्हाला आता कोणाची लज्जा नाही ॥
॥ हीला खांदी घेवुन मिरवता । उभ्याच गल्लीनं ।
भरल्या वस्ती मध्ये ईची । सोय नाही केली कोणं ॥
॥ कोरी देह कोरी भुम्मा । कोरा कागद ।
कोणं केला नाश । त्याला बहु घडनं पाप ॥
॥ न कळत्याचा कैवारी । कळुन करन त्याचा प्रत्यक्ष्य वैरी ॥
॥ कुडी साठी मी विनवितो तुला । विनवितो तुला ।
माझी कुडं मला दयावे बा विठ्ठला हो ॥
॥ मागणं लय नाही लय नाही । ईच्छा पुर्ण कर माही देही ॥
॥ मागणं लय नाही लय नाही । सदा लक्ष्य तुया पायी ॥
॥ मागणं लय नाही लय नाही ।
या सोहंम् ज्योतीच्या ठाई पुन्हा धर नरदेही ॥

॥ भजने पाठा १७/२५ ॥

॥ माझा भाव असो नसो । तरी मी तुझा होय म्हणतो ॥
॥ तुया नामाची गोडी । हरी भजनी घातली उडी ॥
॥ तुया नामाचं लागलं पिसं । आता देवा करू कैस ? ॥
॥ सदा मन समाधान । त्याला देवांच दर्शन ॥
॥ सदा मनी दया शांती । तिथ माया कैसी गुंतवी ॥
॥ सदा मनी दया शांती । तिथ कैशी माया गुंती ॥
॥ सदा मन बम्हचारी । त्याला विठ्ठल देव आवडी ॥
॥ जैशी मनाची आवडी । त्याला असो सर्व गोडी ॥

॥ भजने पाठा १७/२६ ॥

॥ उभा देवाच्या सम्मोर । झाले अन्याय देवा माफ कर ॥
॥ अन्याय झाले कोटयान कोटी ।
आदीरूप राया तुम्ही घालाना पोटी ॥
॥ माझे या अपराधाच्या राशी । भेदुन गेल्या महाराजा गगणाशी ॥
॥ माझे या अपराधाच्या राशी । माझे अन्याय देवा घालाना पोटी ।
॥ दोन्ही हात जाडुन । अर्ज करतो या महाराजाले ॥
॥ चांगल्या आनंदानं । नादव बापा या देह जीवाले ॥
॥ देह जीव तुमचा होये । तुमच्या बिन मजला कोण आहे ॥
॥ देह जीव बनावला खासा । ईच्यावर वर्षाव नाही चालत कोणाचा
॥ देह जीव बनवला मजबुत । या देवळात नांदते देवाची ज्योत ॥

॥ भजने पाठा १७/२७ ॥

॥ अर्ज करतो तातडी । नामी जडल्याची देवा लज्जा राखा माझी ॥
॥ देवा अरज करतो तुम्हा । माझी अरज येवु दया मना ॥
॥ माझी अरज येवु दया मना । माझे मनाच्या मोहना ॥
॥ माझे मनाच्या मोहना । बालक आहो तुमचा तान्हा ॥
॥ माय माझी रूक्मिणा । पाजे अमृताचा पान्हा ॥
॥ भेट दयाहो नारायणा । विनंविती रांत्रदिना ॥
॥ माझी अरज येवु दे मना । विनविती रांत्रदिना ॥

॥ भजने पाठा १७/२८ ॥

॥ नामी राहा हो राहा । आला यवगाचा खेळ । पुढं पाहा हो पाहा ॥
नामी राहा हो राहा । आला यवगाचा समया । पुढं पाहा हो पाहा
॥ नामी राहा हो राहा । आला यवगाचा दिवस । पुढं पाहा हो पाहा
॥ नामी राहा हो राहा । आला यवगाचा रमणा । पुढं पाहा हो पाहा

॥ भजने पाठा १७/२९ ॥

॥ नामी राहुन पाहा गडेहो । धन्या चा करिना ।
मालुम नाही कोण तुम्हा ? । तारण तिरभवना ॥
॥ धन्याचा करीना, आम्हा काय मालुम ?
चवथ्या खुम्मी राज्य करू केलं ।
चवथ्या खुम्मी बादशाहीं करू केलं ॥
चवथ्या खुम्मी गादीं करू केलं ॥
चवथ्या खुम्मी देणं करू केलं ॥
॥ धन्याचा करीना, आम्हा काय मालुम ?
देवराज पृथ्वी करू केलं ॥

॥ भजने पाठा १७/३० ॥

॥ द्रौपदीवर वक्तं, कौरवानं केला । वस्त्र पुरविता, देव झाला ॥
॥ द्रौपदी साठी देव झाले साथी । पाडल्या वस्त्राच्या राशी ॥
॥ द्रौपदी साठी देव झाले रंगारी । कपडे रंगविले नानापरी ॥
॥ देव रंगाचा रंगारी । अवघे रंग या देवरायाच्या घरी ॥
॥ माझे अंतःकरन रंगवा । यवगा यवगी संग वागवा ॥
॥ तार देवा तार तुया । नामा चा आधार ॥
॥ तार देवा तार तुया । सांगीचा आधार ॥

॥ भजने पाठा १७/३१ ॥

॥ मोहरे येवुन यवगी गोष्टी । सांगत आहयं ।
भावीक प्राणी असन लक्ष्य । देवा च लाव/ध्यान ॥
॥ शरण राहता चुकतीन मरण । चौ-यांशी यवनं ।
सोळा न सोळा, बत्तीशीला । चुकतीन मरण ॥
॥ सोळा न सोळा बत्तीशी । पुरली हद ।
ही उभी राहली । जीवनकळीची सुद ॥
॥ सोळा न सोळा बत्तीशी । पुरला मुद्दा ।
याग होम कराल तरी । हे युग टळणार नाही कदा ॥
॥ तेरव्या सिध्दिला मान । चौदावी लागता उभकरन यवगाचं काम
॥ तेरवी सिध्दि अवरस/औरस । धनी उभा देवराया समर्थ ॥
॥ तेरव्या सिध्दि पाया । लवकर याहो आदीपुरूष/कृष्ण राया ॥
॥ चंद्र बत्तीशी चा मुद्या । साधवा, तेरवी सिध्दि ।
भैसा मोहीम कर उभी ॥
॥ कल यवगी मोहीम । देव रायाची । भैस रायाची ।
त्याला अगद नाही, अन्न या पाण्याची ॥
॥ पाणी पवन तुया हुकमात । तुमच्या बिना पत्ता नाही हालत ॥

॥ भजने पाठा १७/३२ ॥

॥ महा महा ऋषि बसले । विचार करून ।
यवगा चा गलपटा नाही । कोणाले मालुम ॥
॥ महा महा ऋषि बसले । घुमं घालुन ।
आत्म ज्ञान शोधल्या शिवाय । नाही तत्व ज्ञानं ॥
॥ अकारात भागवत कथलं । कवि कर्त्यानं ।
सहा शास्त्र जरा चालेना । हरी च्या वाचुनं ॥
॥ रामा सारखे अवतार बसले । घोंमं घालुन ।
कोणचं नाही देव पाहला । सांगता कोणा तोंड ॥
॥ देव-देव म्हणता, देव बा । आहे कोण्या ठाई ।
शंका नाही जन्माला देव म्या । पाहीला नाही ॥
॥ देव-देव म्हणता देव आहे । भुता चा बाजार ।
ज्याचे नाव, देव ते आहे । अग्नीचं घर ॥
॥ देव-देव म्हणता देव बा । आहे बहुता परी ।
ज्याचे नाव देव तो बा । नांदे अंतरी/या घरी/आहे शेजारी/ ॥

॥ भजने पाठा १७/३३ ॥

॥ उभा आहे भैस राजा । याहीच्या चरणी आहे मुजरा माझा ॥
॥ अनामत आधेपुरूष । धरन देही त्याला भेटन तिरभवन/तिरलोक ।
॥ अनामत आदीपुरूष जाण । धरनी देईन त्याला देणें भेटनं ॥
॥ शकुन शकुन भेटन । त्याला होणार नाही बाहेरचं लागनं ॥

॥ भजने पाठा १७/३४ ॥

॥ निरशुन्याच्या धन्या । सावंग्याच्या मालका ।
हा अखंड देहजीव नांदवजो सारखा ॥
॥ आदीपुरूष भरून उरला । अखंड ज्योत ।
अखंड ज्योत खेळे बा मेरूच्या मैदानात ॥
॥ आहे लुंडमुंड । नाही पाय, नाही हात ।
यान खेळ मांडला मेरूच्या मैदानात ॥
॥ तिरभवनी केली बादशाही । चौथा खुम्म पडला सुना ।
चौखुम्मी चालवन बादशाही । त्याची सांगतो महीमा ॥

॥ यवगा यवगीचा आत्माराम ।
त्याची महीमा वाणी जगात वाढवनं ॥

॥ भजने पाठा १७/३५ ॥

॥ देवाच्या नामाची महीमा । अग्नीमध्ये तारल्या मुंग्याच्या सेना ॥
॥ देवाच्या नामाची गाही । नामी तरला एक सधन कसाई ॥
॥ अशी तुया नामाची गाही । नामी तरला एक सावत्या माळी ॥
॥ अशी तुया नामाची गाही । नामी तरला एक वाल्या कोळी ॥

॥ भजने पाठा १७/३६ ॥

॥ जन्मो जन्मीच्या धारा आहे । भक्ताची तळमळ ।
भक्ताची तळमळ । अवतारा संग येणं ॥
॥ सत्य जाणा हो जाणा । आला यवगाचा यवगाचा राणा ॥
॥ सत्य बोला सत्य चाला । सत्या ठाई हो ठाई देव आला ॥
॥ सत्य बोला सत्य चाला । सत्य नामाचा होईन उजाला ॥
॥ केलासाहुन आले भगंवत । मिर्त लोकात ।
देवगाव नगरी दुकाण लावलं । हरी नामाची पेठं ॥

॥ भजने पाठा १७/३७ ॥

॥ हिरे हिरे झाले बहु । ऐसा लाल मी लाल कुठे पाहु ॥
॥ हिरा मोलाशी आला । वर घनाचा टपोरा दिला ॥
॥ लाल हि-याची गणीत । तुम्ही सांगा हो सांगा हो पंडीत ॥
॥ खाली ईंगुळ वर जाळ । त्यामध्ये धांडा हिरवा कंजाळ ॥
॥ खाली ऐरण वर घन । आपला हिरा घ्या तुम्ही ओळखुन ॥
॥ हिरा गाग-यात लोळे । याची पारखं कोणी ना करे ॥
॥ हिरा गाग-यात लोळे । उचलुन घ्याहो महाराजा पदरात ॥
॥ तुया घरी हि-याची खाण । या हि-याची पारख नाही केली कोणं ॥
॥ असा एक दिवस येईन । अवघे हिरे/मोती, एका हाते/हारे ओवीनं ॥

॥ भजने पाठा १७/३८ ॥

॥ तुये तुले मालुम । आम्ही आहो लेकंर अन्जान ॥
॥ अन्जानाचा होय तु दाता । संभाळ करा महाराजा अवधुता ॥
॥ पवन पाणी हुकमात । हुकमा बिना पत्ता नाही हालत ॥
॥ नाही हालत पत्ता । चवताळी आहे तुमची सत्ता ॥

॥ भजने पाठा १७/३९ ॥

॥ झाली चौघडयाची वेळा । अवघे गडी देवा गोळा करा ॥
॥ चौघडयाची वेळ झाली । गोपाळा संग आले कृष्ण मुरारी/माउली ॥
॥ चौघडयाची वेळ झाली । कृष्ण महाराजा तुम्ही वळवाना गायी ॥
॥ गायी गेल्या वरल्या राना । वळवुन आणा महाराजा भगवाना ॥
॥ गाई गेल्या वरच्या रानास । कृष्ण महाराजा तु गायी संभाळ ॥
॥ आम्ही आहो मुठं मुढं । रस्ता दाखव देवा होय गा पुढं ॥

॥ भजने पाठा १७/४० ॥

॥ उभा आहे भैसराजा । याहीच्या चरणी आहे मुजरा माझा ॥
॥ मुजरा मुजरा निर्वाणी । मुजरा घ्याहो अवधुत धनी ॥

॥ खंड ०९ ॥

॥ भजन पाठा नं. १८ ॥

## ॥ कारला दांडातील चरणे व भजने चा संग्रह ॥

*संदर्भ :- श्री समर्थ कृष्णाजी महाराज आणी श्री समर्थ देवमन महाराज जिवन चरित्र अवधुत देवस्थान कारला, संकलन व संपादन : श्री. रघुनाथ पाहुणे रा. सालोड-हि. वर्धा यांची प्रथम आवृत्ती : माघ शुध्द पंचमी गुरूवार दि. ०२ फरवरी २००६, मधील काही काही भजने व चरणे येथे दिलेले आहेत.*

॥ प्रथम यवगी सत्यधारी गिण्यान साहेबाचं ।
अवलेहाई ऋषि गुप्त झाले सत् यवगात ॥
॥ काशीचे वल्लेट/वल्लभ मुनी । आले कारल्याशी ।
आले कारल्याशी । बसले धुनी लावुनी ॥
॥ काशीहुन गमन । कार याशी सांगा । यवगी उभा देव माझा ॥
॥ काहीतरी पुर्वजन्माचा भाग । कृष्ण संगतीचा झाला लाभ ॥
॥ वजाबाकी झाली बेरीज, अक्षरी/अक्षयी आला दिवस । होणार आता होईल द्युत, दृष्टीच्या देखत । याच देही आहे आता, अवताराची भेट ॥
॥ यादवाच्या घरी, धरीला अवतार । मिळविले गोपाळ, भुम्मेवरी ॥
॥ आचार विचार । करून मनाशी । आता झाल्या भेटी । भक्तराया ॥
॥ बाळ बुध घरदार नाही सोडलं कोणं ।
हरी भजनात रमुन राहीला । एक पिसाराम ॥
॥ बाळपणा पासुन देव मानाया । लावलं अवघ्याशी ।
चित्त मन भाव ठिकाणी लावुन । ओळखा या देवाशी ॥
॥ राणी या वैरागी याहीनं मांडला जोग ।
पावन ही नरदेही । ताकीद लागला मागं ॥
॥ पिसे भयानं । देवाचे द्युत । वाणी सांगे जगाला ॥
॥ पिसे झालो तुया पाई । आम्हाला कोणाची लज्जा/भेव नाई ॥
॥ पिसे झालो भैस नामी । आमचं काय करता तुम्ही ।
आमच काय कराल तुम्ही । भैस होय सबदेहीचा धनी ॥
॥ द्युत सांगे । नवलं खरं । पुढे गत यवगाची यवगाची होणारं ॥
॥ भाव धरा धरा हो बळकट । देव तारण तिरलोक्यात ॥
॥ कवाड उघडुन पाहयं । दारी उभा कोण आहे ।
दारी उभा कोण आहे । यवगाचा राजा/मालक होये ॥
॥ मुंगी पैठन ची होय ज्योत की । सावंग्यात उभा झाला गायकी ॥
॥ मोडन जंतराचे भार । उभा राहीन श्रीकृष्ण अवतार ।
उभा राहीन श्रीकृष्ण अवतार । हे भाकल जरा नाही चुकणार ॥
॥ कलयवगी भक्तजन, देवा सम्मान । महामहा ऋषी आले याहीला शरण ।
ऋषीकेशी आले याहीच्या आंग/संग ॥
॥ धन्य भाग्य थोर, कृष्णा पायी । हाती काठी सावळा राखतो गायी ॥
॥ बुडाल्या वंशाचा । वाढवजो वेल । सच्चा करा बोल, महाराजा ॥
॥ नामी जडल्या उपर नसावं । या देहीला मरण ।
तुमचे नाम घेता चुकवा चौ-यांशी यवनं ॥
॥ निरशुन्याहुन आली ज्योत । पहाड पर्वत ओलांडत ।
झरा झरा उतरली ज्योत । पहा खोडंगात/कारल्यात ॥
॥ वाईकाची धुनी उठली अस्मानी । गर्जना झाली तिरभवनी ॥
॥ दवंडी देतो । दवंडी देतो । तुम्ही उठा उठा हो आला तुमचा दिवस
॥ दिवस आला हो आला । साहयं या भक्तीले झाला ॥
॥ जागी करून दाव बापा । तुमच्या चरणावर माझा माथा ॥
॥ कारला नगरं । ऐसं कुठ नाही । तारली नरदेही । महाराजानं ॥
॥ पानाची हे पत्ती, धरलीसे हाती । आता लाभ आहे, देवा घरी ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०९ ॥

**॥ भजनपाठा नं. १९ ॥**

॥ दया कारूणाचे भजनपाठे ॥

# ॥ येवु दे दया, कारूणा चे भजनं पाठे चा संग्रह ॥

॥ येवु दे दया भजन पाठा १९/०१ ॥

॥ येवु दे दया । दया द्युत राया ।
शरण आलो तुया पाया ॥ येवु दे दया, दया द्युत राया ॥ घृ ॥
॥ जादु-टोणा, बहु केला राया । जंतर मंतर बहु केले राया ।
एवढं करून गेलो वाया ॥ येवु दे दया, दया द्युत राया..
॥ करणी-कवटाळा, बहु केला राया । सिध्दक-साधक बहु केले राया ।
जप-तप करून गेलं वाया ॥ येवु दे दया, दया द्युत राया..
॥ पाप-पुण्य । बहु केले राया ।
सगळं करून गेलं वाया ॥ येवु दे दया, दया द्युत राया..
॥ धर्म-कर्म । बहु केले राया ।
तुमच्या वाचुन नाही माया ॥०४॥ येवु दे दया, दया द्युत राया..
॥ खोटं-नाटं । बहु केलं राया ।
हे सारा जावु दे लया ॥ येवु दे दया, दया द्युत राया..
॥ निंदा-स्तुती । बहु केली राया ।
हे चरणी वाहली तुया ॥०६॥ येवु दे दया, दया द्युत राया..
॥ दयेच्या सागरा दया करा । दया साठी झोंबिलो झोंबिलो तुया पदरा ॥

॥ येवु दे कारूणा भजन पाठा १९/०२ ॥

॥ येवु दे कारूणा, येवु दे कारूणा । देवा गा माझी, माझे अपराधाची ॥
॥ येवु दे कारूणा, येवु दे कारूणा । अवधुत राया, तुझी अनमोल माया
॥ येवु दे कारूणा, येवु दे कारूणा । कृष्ण राया, धर मजवर छाया ॥
॥ येवु दे कारूणा, येवु दे कारूणा । विठ्ठल राया, कर मजवर दया ॥
॥ येवु दे कारूणा, येवु दे कारूणा । मायरूक्मिणा, पाज अमृताचा पान्हा
॥ येवु दे कारूणा, येवु दे कारूणा । आदीमुनी, आम्हा पाजा अमृतवाणी
॥ कारूणेचा सागरा, कारूणा कर । आम्ही अन्जान लेकरं । पदरी धर ॥
॥ पदरी धरल्या नको जावु दुरं । लोट मारतो देवाच्या चरणावर ॥

॥ लिनतेच्या सागरा, लिनता धर । आम्ही अडाणी लेकर, विचार कर ॥
॥ लिनतेच्या सागरा, जिवनस्थळी भरला । आकाश वाणी तारण या लेकराला ॥

॥ भजन पाठा १९/०३ ॥

॥ परमय सुखः । सुखः दयाहो स्वामिराजा । सुखः दयाहो महाराजा ।
आम्ही तुम्हाला विनवितो । चत्रभुजा/दयासागरा ॥
॥ परमय सुखाची वाणी । याहो महाराजा भेट दयाहो येवुनी ॥
॥ कृष्ण/परमय सुखाचा राजा । उभा राहयंजो या गोपाळाच्या काजा ॥
॥ आम्ही सुखाचे हरी तुया गा रूपाचे ।
गिण्यान भजतो मायबाप कृष्णाचे ॥
॥ सुखा साठी म्या भजलासे हरी । खेळ मांडला त्वा या भुम्मेवरी ॥
॥ सुखा साठी म्या भजलासे हरी । सुखः दयाहो महाराजा देहीवरी ॥
॥ सुखा साठी विनवितो तुला । सुखः दयाहो महाराजा अन्जानाला ॥
॥ कुडीसुखा साठी हरी विनवितो तुला ।
माझी कुडी मज दयावं बा विठ्ठला हो ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०९ ॥

॥ भजन पाठा नं. २० ॥

# ॥ गाईचे भजनं पाठे चा संग्रह ॥

॥ गाय पुजन च्या रमणाचे भजन पाठा २०/०१ ॥

॥ विठ्ठला/सावळ्या/आदीपुरूष मायबापा । कारूणा येवु दे माझी ।
कारूणा येवु दे माझी । प्रार्थना करतो तुझी ॥
॥ किसनजी याहो लवकर । गाई-गोधन गेले वरच्या रानास ॥
॥ किसनजी याहो लवकर । भुकेले वासरं आवरेना कोणास ॥
॥ गाई गेल्या वरच्या राना । कृष्ण महाराजा तुम्ही गाई वळवा/सोडा ॥
॥ गाई गेल्या वरच्या राना । कृष्ण महाराजा गाई वळवुन आणा ।
॥ गाई गेल्या वरच्या राना । कलावुन आणा महाराजा भगवाना ॥
॥ गाई गेल्या वरच्या रानास । कृष्ण महाराजा तु आपल्या गाई संभाळ
॥ धन्य भाग्य या कृष्णाच्या पाई ।
हाती काठी सावळा राखतो/वळतो/कलावतो गाई ॥
॥ गाईच्या रस्त्यानं, भजनाची मांड । चाललासे दांड, गिण्यानाचा/अमृताचा ॥
डहाक्याः- ॥ हेकोडे-तेकोडे, गाईचे सगर । नाही चौक्या मेट, चौ-यांशीच्या ॥
॥ हेकोडे-तेकोडे, गाईचे सगर । उभे/देव दिगांबर, महाराजा ॥
॥ गाईच्या सगरी, तरणो उपाय । मिटवावे भय, या बाळाचे ॥

॥ गाय पुजन चे भजन पाठा २०/०२ ॥

॥ हे होय गाय गाय । गाय चौवेदाची/सर्वत्राची माय ।
ईला तु पाहयं । चातुरा, भला भेद तु पाहयं ॥
॥ हे होय गाय गाय । गाय मिर्तलोकी/स्वर्गावरती/तिरभवनी राहयं ।
ईला तु पाहयं । चातुरा, भला भेद तु पाहयं ॥
॥ धरणी शालु पांघरली । ईची पुजा या अहिनानं/सावानं केली ॥
॥ धरतरी होय सुवर्णाची । ईच्यावर सत्ता आहे देव रायाची ॥
॥ झाला धरतरीचा मान । आता करतो देव रायाचं पुंजन ॥
॥ पुजा देवाची झाली । मेहर कृपा या बाळवर/गोपाळावर झाली ॥
॥ शुध्द मनभाव हे कापुर, उजळली ज्योत । मन हा मोगरा वाहतो नित

॥ गाय पुजन च्या रमणाचे भजन पाठा २०/०३ ॥

॥ ईद्रानं केला पणं, कृष्णावरं । यानं गोवर्धन तारलं, नखावरं ॥
॥ गोवर्धन नखी धरला । यानं इंद्राचा पणं खाल्या केला ॥
॥ उभा गोपाळाचा मेळ । यामध्ये महाराज खेळे । प्रभुराज खेळ खेळे ॥
॥ गोविंद गोपाळा । धन्य तुयी लीला । हद्या वेगळा राहु नको ॥
॥ गोविंद गोपाळा । धन्य तुयी लीला ।
नामा वेगळा ठेवु नको । पायाच्या वेगळा ठेवु नको ॥

॥ गाय पुजन च्या रमणाचे भजन पाठा २०/०४ ॥

॥ रामानं सिता कशी मुकलीसे/मुखलीसे वनाशी ।
तशीच गती, नको-करू कृष्णा । आपल्या बाळाची ।
तशीच गती, नको-करू कृष्णा । धर मज पोटाशी ॥
॥ सिता जाणकी उचल पालखी । माय रूक्माई ।
सावंग पुर नगर कोरं । माहेर होय बाई ॥
॥ नव्यानवं राम झाले । हा उरला राम तारण या बाळाले ॥

॥ गाय पुजन च्या रमणाचे भजन पाठा २०/०५ ॥

॥ गाई वाणी हुंबरतो । वासरा वाणी देवा तुयी वाट पाहतो ॥
॥ देवा तु गाय मी वासरू । नको देवा तु या बाळास विसरू ॥
॥ देवा तु गाय मी वासरू । संभाळ करा महाराजा हे लेकरू ॥
॥ देवा तु गाय मी वासरू । सावळा नको आता पान्हा चोरू ॥
॥ अन्जान तुये हे लेकरू । उभा देव या देहीला तारू ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०९ ॥
॥ भजन पाठा नं. २० ॥

# ॥ कृष्ण भजने व पाठे चा संग्रहं ॥

॥ कृष्ण भजन पाठा २०/०१ ॥

॥ बिरद वाणी गरजला । चला जावुं म्हणे गोवर्धन पुंजायला ॥
॥ बिरद वाणी गरजला । जावु म्हणुन त्यानं गोवर्धन पुंजला ॥
॥ बिर्द वाणीवर उभा राहीला । जावु म्हणुन त्यानं गोवर्धन पुंजला
॥ ईद्रानं केला परं/पणं । कृष्णा वरं ।
यानं गोवर्धन तारलं । नखा वरं ॥
॥ गोवर्धन नखी धरला । यानं इंद्राचा पणं खाल्या केला ॥
॥ बिर्दासाठी देव धावुन आला । आपल्या बाळगोपाळाचा संभाळ केला ॥
॥ देवा धावल्याशी पाव । आपल्या बिर्दाचा करजो संभाळ ॥
॥ संभाळ संभाळ वचन । वचनी गोयला देवराया किसन ॥

॥ व्द्रौपदीच्या संकष्टाशी । जसा तु धावला ।
कृष्णा तसाच धावत, ये बापा विठ्ठला ॥
॥ अर्जुनाशी त्वा दावले रूप । आमची चुकव देवा चौ-यांशीची खेप ॥
॥ अर्जुनाशी त्वा दावले रूप । आमचे मिटव देवा चौ-यांशीचे दुःख ॥
॥ भक्ता साठी तो जगजेठी । आला धावुन ।
आला धावुन भाव भक्तांचा पाहुन ॥
॥ भक्ता साठी तो जगजेठी । धावत आला ।
धावत आला सत्य भक्ताच्या वचनाला ॥
॥ भक्ता साठी तो जगजेठी । बसुन मळ्यावरं ।
बसुन मळावर पाखरे उडवे सारंगधरं ॥

॥ खेळ खेळतो सारंगधर । मानवात उभा हा नर भुम्मेवर ॥
॥ खेळ खेळतो सारंगपाणी । या लेकरा साठी ये बापा धावुनी ॥
॥ आकाश वाणी गर्जला । या बिर्दासाठी देव धावुन आला ॥
॥ राखली बिर्दाची बाणी । गोपाळा संग उभे देव कृष्ण धनी ॥
॥ रखो बिरदकी बाणी । करो रोग विघ्नोका पाणी ॥

॥ राम भजन पाठा २१/०२ ॥

॥ रामानं सिता कशी मुकलीसे/मुखलीसे वनाशी ।
तशीच गती, नको-करू कृष्णा । आपल्या बाळाची ।
तशीच गती, नको-करू कृष्णा । धर मज पोटाशी ॥
॥ सिता जाणकी उचल पालखी । माय रूक्माई ।
सावंगपुर नगर कोरं । माहेर होय बाई ॥
॥ महा विर मारोती झाला । विघ्न निवारी ।
कृष्ण नामाची टाळी हो राया । भक्ताला तारती ॥
॥ तारा बाईचा विर हनुमान । आला यवगाचा खेळ ।
आला यवगाचा खेळ । कृष्णा, निघ बाहेर ॥
॥ नव्यानवं राम झाले । हा उरला राम तारण या बाळाले ॥
॥ जप लावला तुया पाई । आनंदानं नांदवा बाळाची देही ॥

॥ भजन पाठा २०/०३ ॥

॥ नामी तरले तरन भरोसा । ऐसा बोले माझा सखा ॥
॥ ऐसा बोले माझा सखा । या नामाला विसरू नका ॥
॥ या नामाला विसरू नका । विसरन त्याला बसन धोका ॥

॥ जे होईन बेईमान । त्याची पुस घेईन ॥
॥ जे होणार नाही बेईमान । त्याला नामी सांभाळन ॥

॥ भजन पाठा २१/०४ ॥

॥ ऐसा न्याहारून पाहये । अन्जानाचा तो दयाळु आहये ॥
॥ ऐसा न्याहारून पाहयं । लेकराचा तो कनवाळु आहयं ॥
॥ नेवु बसवले, गोपाळ । कृष्णा अक्षर पाहयं ॥ नेवु बसवले..
॥ नेव बसवले, अन्जान । कृष्णा शिकवत असे ग्यान ॥ नेवु..

॥ भजा भजन पाठा २१/०५ ॥

॥ भजा प्रभुदेव श्रीकृष्णा । याहीनं बसवली येथे व्दारका ॥
॥ भजा प्रभुदेव नायका । येथे उठला आहे सिदाईचा भडका ॥
॥ भगवत भजन करो भैया । तेरी अंबर बनेगी काया ॥
॥ भगवत भजन करो भाई । उसमे किसनजी रहते है ॥
॥ भगवत भजन करो भोला । पडे तन घट मे उजाला ॥
॥ तुम्ही डिकाव या नामाला । कोटी सुर्यप्रभा सम होईन उजाला ॥
॥ तुम्ही डिकावं या नामाला । कोटी चंद्रप्रभा सम होईन उजाला ॥
॥ राहु/रवी दिवस येईन खरा । यमाजीचा नाही राहणार होरा ॥
॥ राहु दिवस येईन । करोडो वर्षे आयुष्य, सुखः कुडीवर होईन ॥
॥ हे होय कृष्णाची गाही । महाराजा येवुन भरन हो हद्‌यी ॥
॥ पाताळाचे पालक, स्वर्गिचे दैवत ।
येतीन भेटी साठी मिर्तलोकी/हद्‌यी ॥
॥ येतीन देवाचे दैवत । उभा राहीन देव त्या रंगात ॥
॥ स्वर्गिचे दैवत, पुजले मिर्तलाकी/धरणी ।
आता घातलीसे मिठी राया चरणी ॥
॥ घेवुनी खजीना, आत्मा ठेवा सुखी । येतीन भेटीसाठी मिर्तलोकी ॥
॥ ग्यान शक्ती, अनंत तृप्ती । हद्‌यी संजीवनी धनी अवधुताच्या ।
परमय पदी भक्त ताराया । वर्षाव अमृताचा ॥
॥ तेरे घरमे हे भंडार । यार तु क्यो फिरता बाहर बाहर ? ॥
॥ खोल दरवाजे कवाड । देख यहा कोई कुंजीवाला लाल ॥
॥ सृष्टीवर अवतार उभा हा । करन शिष्टाई ।
हे निजरूप भुम्मा । जागी करन चौताई ॥

॥ नाम भजन पाठा २१/०६ ॥

॥ नाम घ्याहो लवलावी । आदीपुरूष महाराज भरनं हद्‌यी ॥
॥ नामी राहयं करन संभाळ । भजनी राहयं करन संभाळ ।
आला सावंग्याचा दयाळ ॥ नामी राहयं करन संभाळ..॥
॥ नामी राहयं बा भजनी राहयं । आहो राहयं ।
चुकन चौ-यांशी अशी सांगी आहे हो ॥
॥ नामी न राहये बा भजनी न राहयें । आहो राहयं ।
त्याला चौ-यांशी बा चौ-याशी भोगनं आहे हो ॥
॥ नामी राहयं भजनी राहयें । नामी राहयं भजनी राहयें ।
चुकन चौ-यांशी अशी धन्याची सांगी आहये ॥
॥ सांगी खरी नाम खडका । सिदाच्या मुखी आहे अग्निचा भडका ॥
॥ सांगी खरी नाम खडका । ऋषिकेशी आले हरीनाम ऐका ॥

॥ लहानपण भजन पाठा २१/०७ ॥

॥ जिथ आहे लहानपण । तिथ आहे देवाचं दर्शन/देणं ॥
॥ लहानपण देगा देवा । मुखी लागो साखरेचा रवा ॥
॥ इंद्राचे ऐरावत रत्न थोर । त्याला आहे अंकुशाचा मार ॥

॥ जिथ आहे मोठेपण । त्याला यातना कठिन ॥
॥ लहानपण धरले । म्हणुन देवा त्वां यवगं लोटले ॥
॥ शरण राहता मरण नाही । ऐशी आहे कृष्णाची गाही ॥

॥ पक्वान्न भोजन भजन पाठा २१/०८ ॥

॥ भोजनं वाढती आदीमुनी । तिळभर याहीला अहंता नाही ॥
॥ भजन करता मिळनं भोजन । ऐस सांगुन ठेवलं कृष्णानं ॥
॥ भजन करता मिळनं भोजन । हंकारवाणी महाराजाचं कराव सुमरनं ॥
॥ भजन करता मिळन भोजन । देवाचं नित ।
नाम घेता चुकवन चौ-याशी यवनं ॥
॥ भजन करता मिळन भोजन । विठुचं नित ।
नाम घेता मजला देव झाले प्रसन्न ॥
॥ भजन करता मिळलं भोजन । देवाचं नित । नाम घ्याहो नित्यरूप ॥

॥ भजन करा देवाचं । नका बसु निचंत ।
ही वेळ गेल्यावर मग पस्तावलं मन ॥
॥ पक्वान्न भोजन तयार केलं । काय करनं अन्न ।
बिना जेवल्या वाचुन कैसं । होईन समाधान ॥
॥ जेवणार वाला जेवुन गेला । घ्या तुम्ही ओळखुन ।
पाची पानाचा विडा जेवला । मन समाधान ॥
॥ बेचाळीस विडयानं । कैफी झाला फार ।
शिदाईचा भम्कार उठला । याहीच्या मुखचा कार ॥

॥ ऐसा योगी समाधान । न जेवता तृप्त झाले याहीचे मन ॥
॥ भजन पुंजन ध्यान तुझं । भजन/सुमरन करतो गा बाळ तुझं ॥

॥ भजन पाठा २१/०९ ॥

॥ राघो स्वर्गि उडाला । अमृतफळ चोचेत घेवुन देव भुम्मेवर आला ॥
॥ पिंजरा काटयाचा केला । त्यामध्ये राघो बसवला ॥
॥ पिंजरा आकाशी डोले । त्यामध्ये राघो बोली बोले ॥

॥ भजन पाठा २१/१० ॥

॥ चतुराई केली चातुरा । कृष्ण अवतारा ।
धरलं सत्य त्वा । अवघ/यवगं, आणलं घरा ॥
॥ चतुराई ची चतुर्पती । होती नव्हती नाही दिली कोणाच्याही हाती ॥
॥ चतुर्पती देव । तारन देही ।
हे कितीक सांगीतलं कोणी ऐकत नाही ॥
॥ चतुर्पती देवाला । तुम्ही भजा ।
हा यवगानं यवगा संग वागवनं सदा ॥
॥ चतुर्पतीचं घर नाही । पाहीलं कोणं ?
ऐसे कैक झाले बेईमान । भुलले जन ॥
॥ लदबद ज्योतीचा प्रकाश । ओळखा याहीचे घर हो राया अनामताच घर

॥ भजन पाठा २१/११ ॥

॥ हाताशी लावला हात, मिळवलं गोत ।
धनी आले हो आले अवधुत/अनामत/समर्थ/दयाद्युत ॥
॥ हात या धरून त्वां दाखवलं जग ।
तु पुर्विचा मायबाप अवधुत । पुर्विचा आदीरूप ॥
॥ हात या धरून त्वा दाखवली वाट ।
दाखवली वाट उभे कृष्ण नाथ ॥

॥ लष्टान भजन पाठा २१/१२ ॥

॥ भजनात जर लष्टाण खेळत असेल, तर हमखास म्हणण्यात येणारे भजनां चे चरणें... ॥

॥ आदी भैस अभेष माया । मिटवनं व्दैत भुतांचा ।
सावंग नगरी अखंड जयघोष । होईन नामाचां ॥
॥ हाल-हाल करून भुताचा । वंश मिटवनं ।
प्रथम उभा राहुन भैस । मारणं सैतानं ॥
॥ त्वा मचवले ढोंग । आमच्या रायानं ओळखला रंग ॥
॥ सोग करून ढोंग फैलावती । रूप दाखवते जगापरी ॥
॥ सांगा भैसाच्या रूपा परी । आहे तरी कोण ? ।
ईंद्रा सारखे देव येवुन । याहीला करते नमनं ॥
॥ कोण देव कोण दानव । ठाउक या भैसाले ।
व्दैता सारखे वागता गडेहो । नावं घेता देवाचें ॥
॥ व्दैत भाव विपरीत मती । नाश हो तत्वालां ।
सत्य बोला सत्य चाला । धनी, तारण अवघ्याला ॥
॥ सत्य वचन सत्य बोली । देव दरबारी, भैसा दरबारी ।
हेच घर हेच मोक्ष । पहिली पायरी ॥
॥ दरबार देवाचां होय । निळावंतीचा येथे न्याय आहे ॥
॥ दरबार देवाचा होय । ख-या खोटयाचा येथे न्याय आहे ॥
॥ दरबार द्युतांचा होय । वर पंजा आदीपुरूषाचा/कृष्णाचा आहे ॥

॥ लष्टानाचे भजन पाठा २१/१३ ॥

॥ कोण ठिकाण ? कोण मकाण ? कोण तुमचं गावं ?
कोण्या ठायी राहता तुम्ही ? काय तुमचं नावं ? ॥
॥ मुका मौना आला । वाचा नाही याच्या बोलाला ॥
॥ देव दरबारी मुका बसला । का आहे इथं ?।
मुखीं नाम घेतां अवद्युत । घेईन पदरातं ॥
॥ अवधुत नाम, आहे गा दादा । गोड साखंर ।
साखर असुन गुळ भक्षिता । केवढा हा अंधःकारं ॥

॥ लष्टानाचे भजन पाठा २१/१४ ॥

॥ दादा होय का बाई होय ? । आपलं नाव सांगत का नायं ॥
॥ नको करू नामाची चोरी । बांधल्या जाशीन देव दरबारी ॥
॥ भिक्या-भिक्या म्हणुन हाका मारशी । भिक्या बांधला कृष्णानं खांबाशी
॥ भिक्या बांधला खांबाशी । त्याची काढली कृष्णानं दाढी-मिशी ॥
॥ मुजोरी केली भिक्यानं । त्याची फजीती केली या कृष्णानं ॥
॥ नाचु नाचु झाला जेरजेर । तो मुजोर ।
शिक्षा लाभली माहया बंधुशी । पसरते पदर ॥
॥ देवादिकाशी कळ्लं । आता कैस होईन ? ।
या कृष्णान उडवला मान । दोहीताचा ॥
॥ आमचा हा देव लाल लाल । व्दैत-भुताचं काढतो साल ॥
॥ हे होय या देवाचे लालं । आपल्या मुखानं चांगला बोलं ॥

॥ लष्टान भजन पाठा २१/१५ ॥

॥ खेता भुताचं राहनं/ठाणं जंगलानं । याच्या कपाळी शेंदराची कोर ।
याच्या कपाळी शेंदराची कोर । इथं कायले आला हा मुजोर ॥
॥ इंद्रानं केला पणं; कृष्णावर । यानं गोवर्धन धरला, नखा वरं ॥
॥ गोवर्धन नखीं धरला । या कृष्णानं या इंद्राचा पण खाल्या केला ॥
॥ मुजोरी केली इंद्रानं । त्याची फजीती केली या कृष्णानं ॥

॥ देवादिकाशी कळलं । आता कैस होईन ? ।
यान उडवला मान । देवताचा ॥
॥ सांगा भैसाहुन जगात मोठं । आहे तरी कोण ?
इंद्रा सारखे देव करते । आदी भैसाला नमनं ॥
॥ आमचा देव लाल लाल । देव-दानवाचे तो काढतो सालं ॥
॥ हे होय या देवाचे लालं । आपल्या मुखानं चांगला बोल ॥

॥ विनवणी चा भजन पाठा २१/१६ ॥

॥ कोण्या कोण्या परी, हाका मारू तुला ।
तारण करा महाराजा नरदेहीला ॥
॥ कोण्या कोण्या परी । हाका, मारू तुला ।
प्रल्हादासाठी तु खांबात उतरला ॥
॥ खांब कराडला । दणाना भैसाचा/तिताळी उठला ।
आपल्या बाळासाठी धावुन । देवानं, अवतार धरला ॥
॥ देव व्दारी उभा झाला । हिरण्यकश्यं नखी फाडला ।
हे देव येवुन आपल्या बाळास साहयं झाला ॥
॥ देव उभा राहीला । आपला बाळ ओटयात घेतला ॥
॥ दणाना उठला भैसाचा । चुराडा झाला व्दैत-दानवाचा/व्दैता-भुताचा ॥
॥ मुजोरी केली व्दैतानं । त्याची फजीती केली या देवरायानं ॥
॥ देव-दानवाशी कळलं । आता कैस होईन ? ।
यान उडवला मान । देव-दानवाचा ॥
॥ आमचा देव लाल लाल । देव-दानवाचे तो काढतो सालं ॥

॥ ओवी ॥

॥ सादर सुंदर, पायाचा आधार । मी तुमचा चाकर, आहे मुजोर ॥
॥ मुजोरी केली, लज्जा हे दावली । मांग हे भोगली, बंदे छाया ॥
॥ तिरलोकी हवाला, हुजुरचा तो बेटा । त्यावर दिला फाटा, यवगायवगी
भजनं :- ॥ यवग धरून उभा राहयं । याहो महाराजा तुम्ही करा हो संभाळ ॥

॥ लष्टानाचे भजन पाठा २१/१७ ॥

॥ उतर देवा प्रल्हादा सारखा । उतर देवा प्रल्हादा सारखा ।
तसाच धावत ये बा । कृष्ण अवधुता ॥
॥ भक्ता साठी झाला कष्टी । आला धावुनी ।
आला धावुनी धनीदेव सत्य भक्ताच्या वचनी ॥
॥ धनीदेव आले धावुन । या बाळाचा आकांत पाहुन ॥
॥ आले या ठाई हो माझे जगजीवनं ।
भक्त देवाची आशा कृष्णदेव । करे संपुर्ण ॥
॥ देव पुरवन तुमची आशा । तुम्ही धरा हो धिर ।
व्दैत जनांचा येवुन राया । करे संहार ॥
॥ मोडन जंतराचा भार । उभा आहे कृष्णदेव पुर्ण अवतार ॥

॥ भजन पाठा २१/१८ ॥

॥ किसनजी रखे/रखो बिरदकी बाणी । करे/करो रोग विघ्नोका पाणी ॥
॥ रामा पारधी यमदुत । पत्ता काढुन तो घुसतो घरात ॥
॥ नाव राशी घेतला शोध । या रायानं याहीला सांगीतला बोध ॥
॥ बोध सांगीतला अर्जुनाले । यात नाही तुये मायबाप मराले ॥
॥ अर्जुनाशी दावले रूप । या बाळाचे मिटव देवा चौ-यांशीचे दुःख ॥
॥ पांडव कुंता देवीचे । मालक होय या जम्बु व्दीपाचे ॥
॥ संग शक्तीचे नाव । आत्मा उभा या कुडीचा राम ॥
॥ उभा आहे माझा राम । राम करे यवगाचे काम ॥

॥ आत्मा चाल/ताल भजनी राहयं । बहु यवगं सुखः पाहय ॥
॥ धन्याचे सुखः आहे थोर । धनी उभे कृष्ण अवतार ॥
॥ धनी उभे पुर्ण अवतार । दया केली या बाळावर ॥

॥ भजन पाठा २१/१९ ॥

॥ रूप दहा अवतारी । उभा, झाला श्रीरंग ।
नागीनी-पद्मिनी रूप पाहुन । झाल्या दंग ॥
॥ हात घातला हेकडा । भुजंग पाडला उलटा ।
येशन टोचले नाका । शेषाचा केला घोडा ॥
॥ शेषावर स्वार झाला । कृष्ण बाळ ।
नाचु नाचु कालीया केला । जेर जेर ॥
॥ पाण्याचं अमृत केलं । या कृष्ण देवानं ।
रोग विघ्ने उडवाया । नाही लागला खिनं ॥

॥ भजन पाठा २१/२० ॥

॥ श्री कृष्णा श्री हरी । कर दया बाळावरी । आले संकट निवारी ॥
॥ श्री कृष्णा श्री हरी । तार अन्जानाची देही ॥
॥ श्री कृष्णा जगजीवना । भेट दयाहो भक्ती जना ॥
॥ कृष्णा याहो लवकर । वाट पाहते देवा तुझे लेकरं ॥
॥ गरूडावर केली स्वारी । धावुन आले श्री कृष्ण हरी /बाळाचे कैवारी ॥
॥ हे होय शकुनाची वाणी । धावुन आले कृष्ण धनी/श्रीहरी ॥
॥ निरंजन निराकार, उभा अवतार । बनलो याहीचे हात, तार भुम्मेवर ॥
॥ उभा आहे माझा सखा । आता नाही देहीला धोका ॥
॥ उभा आहे माझा देव । आता नाही या देहीला कोणाचे भेवं ॥
॥ उभा आहे आमचा कैवारी । आले संकट देव खिणात निवारी हो ॥
॥ अन्जानाचा कैवारी । आले विघ्न महाराजा निर्वाळी ॥
॥ आले विघ्न निर्वाळजो । महाराजा तु देहे तारजो ॥
॥ देहे तारा मायबापा । वेळो वेळा तुमच्या चरणावर माथा ॥
॥ देहे तार अवधुता । धरले चरण, चरणी ठेवला माथा ॥
॥ चरणी माथा ठेवला । बाळ गोपाळाचा संभाळ केला । वेल वाढवला ॥
॥ उभा आहे चक्रधारी । रोग विघ्न अवघे निवारी ॥
॥ सुर्दशनाच्या गणती । वेढा देहीच्या भोवती । याहीचे हत्यारं..
हत्यारं बोलती अवधुत/विठ्ठल नाम ॥

॥ भजन पाठा २१/२१ ॥

॥ भाव धरा व्दैत सोडा । या देवाशी नाते जोडा ॥
॥ देवाच्या नामाची गोडी । देवाच्या गलपाला दोरी बांधली ॥
॥ आकाशवाणीचा दोरा हाती । राखन आहे देवराया श्रीहरी ॥
॥ देवाच्या नामाची तलवार । ईचा कोणी ना धरे हात ॥
॥ नाम होय तलवार । ईचा कोणी ना धरे धार ॥
॥ नाम होय भाल्याची अणी । इथं चालत नाही कोणाची बाणी ॥
॥ भाला शुरा विराचा । संहार करते देव व्दैत दुर्जनाचा ॥
॥ भाल्या वरत भाले रंचले । हे होय खेत्रीयाची शाळा ।
हे होय खेत्रीयाची शाळा । येथे खेळे कृष्ण राया ॥
॥ सुटला अगण्या बाण । व्दैत-भुत हे जातीन जळुन ॥
॥ सुटला अगन्या बाण । रोग विघ्ने हे जातीन जळुन ॥
॥ व्दैत सोडा हो सोडा । अवधुत येईन घरा । कैकाच्या मोडन खोडा ॥
॥ नामी राहता देव उडवन विघ्नं । ऐसं आहे हे चतुर्पती नाम ॥

॥ भजन पाठा २१/२२ ॥

॥ अवधुता तुला सुमरीतो । या हरी धाव ।
आम्ही आलो तुया दर्शना । किती दुर तुये गाव ॥
॥ अवधुता तुला सुमरीतो । या हरी धाव ।
या गोपाळाला चरण आपले दाव ॥
या अन्जानाला चरण आपले दाव ॥
॥ अवधुता तुला सुमरीतो । या हरी धाव ।
तुया वाचुन आमुची पाण्यात डुबते नांव ॥
॥ अवधुता तुला सुमरीतो । या हरी धाव ।
तुया वाचुन आमचा कोण करन संभाळ ? ॥
॥ हाका मारू कोणा ? मनाच्या मोहना ।
तुमच्या बिना माझा रंग सुना ॥
॥ किती अंत पाहशील देवा ? का नाही येत ?
कुठ गुंतला रे बापा भक्ताच्या वचनात ॥
॥ किती अंत पाहशी देवा ! कुठे गुंतला ?
तुला हाका मारता । कंठ माझा सुकला ॥
॥ तुमचा देवा धरला धावा । आपल्या अंतरी ।
हरघडी करतो प्रार्थना । माझे संकट निवारी ॥
॥ का गा रूसला जगजेठी ? तुया नामाशी ?
या अन्जानाच्या संकष्टी । धाव ऋषिकेशी ॥
॥ संकट निवारजो देवा । आम्ही धरला तुमच्या पायाच्या धावा ॥
॥ धावा धरला पायी । आनंदानं नादंव बाळाची नरदेही ॥
॥ धावा धरला पायी । येवुन तारा महाराजा ही नरदेही ॥

॥ भजन पाठा २१/२३ ॥

॥ एवढं केल कैश्यासाठी । देवा याहो रातोराती, या गोपाळा साठी ॥
॥ देवा तुम्ही रातोराती याना । तुमचा बालक आहे तान्हा ।
तुमचा बालक आहे तान्हा । पाजा अमृताचा पान्हा ॥
॥ देवा तुम्ही रातोराती आले । साहयं भावीकाले/अन्जानाले झाले ॥
॥ देवा तुम्ही रातोराती आले । देणं भावीकाले/अन्जानाले दिले ॥
॥ देवा तुम्ही रातोराती आले । ऐसें भावीक/अन्जान कितीतरी तरले ॥
॥ देवा तुम्ही रातोराती यानां । भेटं भावीकाले/अन्जानाले देनां ॥
॥ हे होय भावीकाची/अन्जानाची आस । भजन करा हो सावकाश ॥
॥ भजन करा देह झिजवा । करू नका थट्टा ।
केली कमाई वाया जाईन । पाण्याच्या लोटा ॥
॥ ऐका महाराजाची वाणी । भाव धरून ऐका कानी ।
करा या संधीचा मान । उभा कर्तार धनी ॥

॥ भजन पाठा २१/२४ ॥

॥ भैसराज महाराज । उभे राहा यवगाले ।
आता दयाहो भेट । बहु, लाभ होईन आम्हाले ॥
॥ काहो कठोर केलं मनं । विनवितो रात्रंदिनं हो ॥
॥ भावीका साठी, तुम्ही याहो जगजेठी । आहो जगजेठी ।
माझे अन्याय घालाना पोटी हो ॥
॥ लवकर याहो गरूड ध्वजा । किती अंत पाहशील माझा ॥
॥ मजला मानु नको दुजा । पडलो पाया विनवितो विठुराया ॥
॥ निशं:कलंकी अवतारा । तुम्हा विनवितो, आम्हा हृदयी धरा ॥
॥ निश्कलंकी अवतारा । लवकर याहो जगाच्या/भक्ताच्या माहेरा ॥
॥ निश्कलंकी अवतारा । लवकर याहो गरूडावर बसणारा ॥
॥ लवकर याहो अवतारा । तुला पाहता तिरभवन कापे थरथरा ॥

॥ निश्कलंकी आल्यावर । याहीची कमान हो कमान यवगावर ॥
॥ निश्कलंकी अवताराची । पाहयंतो वाटं ।
कुठे गुंतला रे बापा । भक्ताच्या वचनात ॥
॥ निश्कलंकी अवताराची पाहयतो मी वाट ।
तुम्ही या महाराजा । सोयंम् दयाहो भेट ॥
॥ निश्कलंकी अवताराची पाहयतो वाट ।
तुम्ही या महाराजा । कुठवर पुंजु हे पाषाणाचे दैवतं ॥
॥ सोयंम् भेट माझे राया । आम्ही लागु हो लागु तुम्हा पाया ॥
॥ सोयंम् भेट माझे हरी । आम्ही जडलो देवा, आपल्या पायी/चरणी ॥

॥ भजन पाठा २१/२५ ॥

॥ भैसा खुम्मी अगाध वाणी । उठली गर्जना ।
एक होईन आरोळी । जागी करन सारी सेना ॥
॥ भैसा खुम्मी अगाध वाणी । ज्योत प्रकाशनं देही ।
एक होईन आरोळी । जागी करन चौताळी ॥
॥ चौथ्या खुम्मी उभा धनी । तो तारण अवघ्या जिवाजनी ॥
॥ चौथ्या खुम्मी उभा धनी । हे सर्व याहीच्या अध्यानी ॥
॥ चौयवगाचा सुत्रधारी कृष्णा । याहीन तारू केली जीवाजना पृथ्वा ॥

॥ भजन पाठा २१/२६ ॥

॥ टाळ वाजे घोळ वाजे । नौबत वाजे झनाना ।
श्री कृष्णाचा अवतार आला । राम कोणी म्हणाना ।
श्री कृष्णाचा अवतार आला । कृष्ण अवधुत कोणी म्हणाना ॥
॥ झन्झन् झनाना । एकच होईन दणाना ।
श्री कृष्णाचं भजन करा । हा राम कोणी भजाना ॥
॥ चौथ्या खुम्मी धनी जागृत । आकाश वाणी याहीच्या मुखात ॥
॥ आदीपुरूष अवधुत अनामत ज्योत । धुम्मधुम्मकार जगात ।
धुम्मधुम्मकार या जगात । याहीच होईन कौतुक ॥

॥ भजन पाठा २१/२७ ॥

॥ तुया सारखा आमचा देव । असता पाठी राखा ।
आम्हा जरा भर धोका । नाही कोणाचा हो ॥
॥ तुया सारखा आमचा उभा । आहे देव । आहो देव ।
आम्हा जराभर नाही कोणाचं भेवं हो ॥
॥ तुया सारखा आमचा उभा । आहे हरी । आहो हरी ।
आम्हा दुःख आता कैश्या परी हो ॥
॥ तुया सारखा आमचा उभा । आहे विठु ।
पुन्हा पुन्हा तुला आम्ही । नित भेटु हो ॥

॥ भजन पाठा २१/२८ ॥

॥ बहुत यवग लौटले देवा । तुया सांगीनं/कृपेनं ।
काही नाही झाल/होत मागणं । माहयाच्यानं ॥
॥ मागणं मागतो गा देवा । बिना मागल्यानं देणं देजो गा देवा ॥
॥ माझा जन्माचं निमित्यं देवा । पहावं शोधुन ।
माझं मजला देणं देवा । केव्हा भेटनं ॥
॥ माझं मजला सुःख दयाहो । धाव पाव आता ।
माझी अरज/मागणं आहे देवा । तुमच्यावर सत्ता ॥
॥ सत्ता माझी सत्ता तुमची । राहु दे आता ।
सदा विनवितो देवा भक्तात । ठेवावं समानता ॥
॥ लहान्याचे मोठो झालो देवा । तुया कृपेनं ।
एवढं मागणं मागतो देवा । नको देवु अभिमान ॥

॥ अगाध वाणी अगाध धनी । अगाध महीमा तुही ।
तुया वाचुन ईच्छा/मागनं पुर्ण । कोण करन माही ॥
॥ इच्छा पुर्ण कर या देही । देहीतुन जावुच नको कयी ।
देहीतुन जावुच नको कयी । असो तुया सुखारूपाची गाही ॥
॥ मागणं लय नाही लय नाही । ईच्छा पुर्ण कर माही देही ॥

॥ भजन पाठा २१/२९ ॥
॥ जन्म देता देवा शिन नाही आला । भेटीसाठी कंटाळा का धरला हो ॥
॥ जन्म देता, मनी बा उल्हासला । भेटी साठी त्वा उशिर लावला हो ॥
॥ भेटी साठी देवा हिंडलो वनवन । झालो बेजार, यवगं झाले तिन ॥
॥ भेटी साठी देवा नेत्र शिणले । कैसे आहे हे माहया जन्माचे घेरे हो ॥
॥ जन्म दिला तुम्ही यवगायवगी । चकरा मारतो देवा मी घडोघडी/सावंगपुरी
॥ तुया-माहया जन्मो-जन्माच्या गाठी । आता कैश्यान होती तुटातुटी ॥
॥ का ना येशी ? तुला काय पडलं ओझं । भेटत नाही तु आम्हा घडीभर ॥
॥ का ना येशी ? तुला काय पडलं कोडं । प्राणगेल्यावर मग काय पाहु पुढं ॥
॥ चरण चारीया अवतारा । लवकर याहो भक्ताच्या/भक्तीच्या माहेरा ॥

॥ भजन पाठा २१/३० ॥
॥ जन्मो-जन्मीच्या धारा आहे भक्ताची तळमळ ।
भक्तांची तळमळ तु अवतारा संग येणं ॥
॥ जन्मो जन्मी आम्ही करीत । आलो भक्ती । आहो भक्ती..
म्हणुन झाली येथं तुयी प्राप्ती हो ॥
॥ जन्मो जन्मी आम्ही करीत आलो सेवा । आहो सेवा
म्हणुनिया तुया धरलासे धावा हो ॥
॥ जन्मो जन्मी आम्ही करीत आलो सेवा । मुखी रहाव देवा रांत्रं-दिनी ॥
॥ जन्मो जन्मी आम्ही धरीले पाय ।
उभी आहे माझी माय । जीवन कळा हो ॥
॥ जन्मो जन्मी आम्ही हाताशी लावला हात ।
म्हणुन हे मिळाले या देवरायाचं गोत हो ॥
॥ जन्मो जन्मी हाताशी लावला हात ।
उभे झाले देवराया कृष्ण अवधुत हो ॥

॥ भजन पाठा २१/३१ ॥
॥ मिर्तलोकी उभा राहयं । देवा दाखव तु आपले पाय ॥
॥ देवा दाखव तु आपले पाय । या बाळाचा करावं संभाळ ॥
॥ पाय म्या धरले मजबुत । नाही सोडतं हो जगजेठं ॥
॥ नाही सोडतं जगजेठ । आता उभा होय इथं ॥
॥ पाय म्या धरले बळकट । आता नाही सोडतं जगजेठं ॥
॥ पाय धरले बळकट । तुमच्या चरणी देह करा मजबुत ॥
॥ पाय म्या धरले मजबुत । सत्ता नाही कोणाची चालत ॥
॥ पाय म्या धरले लवलावी । ऐका ऐका या देवाची गाही ॥
॥ पायी घातलीसे मिठी । येवुन तारा महाराजा जगजेठी ॥
॥ पायी घातलीसे मिठी । तारा जगवा महीमा आहे गा मोठी ॥
॥ महीमा आहे गा मोठी । तारण करा महाराजा जगजेठी ॥
॥ महीमा आहे गा तुही । येवुन तारा बाळाची नरदेही ॥
॥ महीमा आहे गा तुही । आता चालव तिरलोकी गाही ॥
॥ तिरलोक्याचा होय दाता । संभाळ करा महाराजा अवधुता ॥
॥ संभाळ संभाळ वचन । वचनी गोयले देवराया किसन ॥
॥ वचन दिले मानवाले । मानवाची देवा करूणा तुले ॥
॥ उभा राहयं आपल्या वचनाले । संभाळ करा आपल्या बिर्द वाणीले ॥

॥ बिर्द वाणी तुही होय । संभाळ करनं देवा तुया हाती आहे. ॥

॥ भजन पाठा २१/३२ ॥

॥ अवधुत आमुचा होय पुर्विचा सखा । चुकवन चौ-यांशीचा खेपा हो ॥
॥ चौ-यांशीचे दुःख आहे बहु परी । म्हणुन उभे झाले अवधुत भुम्मेवरी ॥
॥ यादवाचे घर, वंश कृष्णाचा । कलयवगी उगवला कोंब या देवाचा ॥
॥ यादवाचा घर, हरीचं माहेर । ईथे नांदतो सारंगधर वंश परांपर ॥
॥ व-हाडच घर, रुक्मिणीचं माहेर ।
ईथे हरी घालतो येरझार । वंश परांपर ॥
॥ आम्ही व-हाडी व-हाडी । रुक्मिणीच्या माहेरचे गडी ।
तुम्ही याहो आमच्या घरी । विनवितो जगजेठी ॥
॥ कलयवगी भक्तजन, देवा सम्मान । ऋषीकेशी आले याहीला शरण ।
ऋषीकेशी आले याहीच्या आंग/संग ॥
॥ अवधुत आले भक्ती/भुम्मा कारण ।
घरोघरी होईनं नाम सुमरनं । होईनं नाम सुमरनं ॥
॥ अवधुत आले भक्तीला तारु ।
मुखाने आवाज केला सुरु । आवाज करा सुरु ॥
॥ मुळ यवगाचा भक्त होय । शेंडा-बुड याहीला मालुम आहे ॥
॥ मुळयवगाचा भक्त गडे हो । शेंडयावर आला ।
मिर्तलोकी हरीनामाचा कोंब/कंद उगवला ॥
॥ आनंदाचा आनंद । आनंदात आला ।
मिर्त लोकी हरी नामाचा । उजाला झाला ॥
॥ कलयवगी भक्तजन, देवा सम्मान ।
महा महा ऋषीकेशी आले याहीला शरण ॥
॥ देव उभे राउळात । आहे अमृताचे झाड ।
याचा आकाशी गेला आहे शेंडा । पाताळी आहे जडं ॥
या सागरात आहे हिरे लाल कंकर ॥
॥ देव उभे राउळात । आहे अमृताची धुनी ।
या भुम्मेवर आहे सुगंध चंदनाची उटी ॥

॥ भजन पाठा २१/३३ ॥

॥ नरदेह जन्म हि-या समान । संगती तरला ।
सत् संगतीचा संग केला । देह कामा आला ॥
॥ नरदेह जन्म हि-या समान । संगती बुडाला ।
कुसंगतीचा संग केला । देहे वाया गेला ॥
॥ संगत करावं कोणाची । संगत करा हो सत् सज्जनाची ।
॥ संगत करा सत्सज्जनाची । पाखंडयाची संगत नाही कामाची ॥
॥ देवा भावाची संगत । त्याची मला लागो लाथ ॥
॥ देवा भावाचा शेजार । आल्या जन्माचा होईन उध्दार ॥

॥ भजन पाठा २१/३४ ॥

॥ कृष्ण संगतीचा लाभ । काहीतरी पुर्व जन्मीचा भाग ॥
॥ कृष्ण संगतीचा लेश । गोपाळ आले मुज-यास ॥
॥ गोपाळ आले मुज-यास । महाराज उभे राउळात ॥
॥ महाराज उभे राउळात । डंका वाजे तिरभवनात ॥
॥ डंका वाजे । तिरभवनात, याहीची सोयंम उभी ज्योत ॥
॥ याहीची सोयंम् उभी ज्योत । साहयं झाले अंन्जानास/गोपाळास ॥
॥ या निर्वाणाची ज्योत उभी सोयंम् । या ज्योतीनं मदत केली पुर्ण ॥
॥ कृष्णानं धरला अवतार । झाला महार, उभा फळीवर ।
तुम्ही तिकुन आम्ही ईकुन । होवु दया यवगाचा कार ॥

॥ भजन पाठा २१/३५ ॥

॥ अवघं करशी माझं माझं । इथं काय आहे तुझं ॥
॥ इथं आमचं काही नाही । आम्ही जडलो हो तुया पायी ॥
॥ अवघे घातले पाण्यात । एक माझा कृष्ण नाथ ॥
॥ अवघे घातले भरी । एक माझा कृष्ण हरी ॥
॥ अवघे देशोधडी गेले । या विठ्ठलाने आम्हा सांभाळले ॥
॥ अवघे आहे नाशीवंत । येथं उभा आहे माझा कृपावंत ॥
॥ कितीक आले कितीक गेले । कोणी काही नाही केले ॥
॥ पक्का धरूनी भाव । उभा आहो या देवा सम्मोर ॥
॥ उभा देवा सम्मोर । अन्याय अपराध देवा माफ कर ॥
॥ अपराध देवा कर गा माफ । तुच होय माझा पुर्विचा बाप ॥
॥ तु असतांना बाप । का हे घडले पाप ? ॥
॥ आहो घडले हे पाप । देवा तु एवढे कर गा माफ ॥
॥ अपराध माझे कोटयानं कोटी । देवा तुम्ही घालाना पोटी ॥
॥ माझेया अपराधाच्या राशी । भेदुन गेल्या महाराजा गगणाशी ॥

॥ भजन पाठा २१/३६ ॥

॥ देवा तुम्ही सागरचे राहणार । तुमची सागरी महिमा ।
समजावुन सांगा हो मजला माहेरच्या खुणा ॥
॥ देवा तुम्ही कृपेचे सागर । कृपा कर ।
आम्ही जडलो शरपंजरी । नका करू दुर ॥
॥ तुम्ही कृपेचे सागर । कृपा कर ।
आम्ही धरला तुमचा पदर । नका करू दुर ॥
॥ तुम्ही दयेचे सागर । दया कर ।
तारण करा महाराजा । नका करू दुर ॥
॥ सागरात पोहतो आम्ही । तुमचं काय नेलं ?
या कृष्णाजीनं देणं हो । आम्हासही/आम्हालाही देल्लं ॥

॥ भजन पाठा २१/३७ ॥

॥ तारण तारण ऐसा भरवसा । ऐसा आहे हरीनामाचा ठसा ॥
ऐसा हरीनामाचा ठसा । हरी नामाला विसरू नका ॥
॥ विसरन त्याला बसन धोका । ऐसा बोले माझा सखा ॥
॥ हरीला विसरू नका । हरी होय आत्मजीवाचा सखा ॥

॥ भजन पाठा २१/३७ ॥

॥ पक्का आधार मेढी/मेळी चा । भरवसा नाही मजला गणगोताचा ॥
॥ पक्का आधार मेढी/मेळी चा । भरवसा नाही मजला वरकट जनांचा ॥
॥ पक्का आधार मेढी/मेळी चा । भरवसा आहे मजला कृष्ण देवाचा ॥
गजर :-
॥ सारंग धरा, मुर्त तुझी । जगात दिसत नाही...
अनमोल जन्म दिला । तुझे उपकार फिटत नाही ।
अनमोल देणं दिले । तुझे उपकार फिटत नाही ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०९ ॥

॥ भजन पाठा नं. २२ ॥

# ॥ उर्वरीत भजन चरणे व पाठे चा संग्रह ॥

॥ भजन पाठा २२/०१ ॥

॥ हरीहरी कृष्णा, तु जगाचा जीवन । भक्तीला लावले त्वां सर्व जन ॥
॥ हरीहरी कृष्णा, तुही संगत घडली बरी ।
या कलयवगा मध्ये भक्त तार श्रीहरी ॥
॥ हरीहरी कृष्णा, तुझी वाट कोठवर पाहु ।
या पाषानाला दैवत पुजा किती देवु ॥
॥ हरीहरी कृष्णा, तुझी कोठवर पाहु वाट ।
कुठवरं पुंजु या पाषानाचे दैवत ॥
॥ निशंःकलंकी अवताराची । पाहतो वाटं ।
तुम्ही या महाराजा । सोयंम् दयाहो भेटं ॥
॥ सोयंम् भेट माझे राया । आम्ही जडलो देवा तुम्हा पाया ॥

॥ भजन पाठा २२/०२ ॥

॥ हाती चित्त रंगाची काठी । या खोलाट नदीच्या तटी ।
तुरा खोवीला मोतीयाचा । योगी उभा सावंग्याचा ॥
॥ कपाळी चंद्र कोर । चंद्र सुर्य लल्लाटी ।
बरा विठुन अवतार धरला । भक्ता साठी ॥
॥ पायी पद्‌म मुखी रत्न । हद्‌यी अमृत ।
पृथ्वीवर अवतार उभा । धनी अवधुत ॥
॥ जलाधारी धुमधुम्मकारी । ज्योत चमकली ।
अहीना घरी उभी राहुन । अवधुत नाम गर्जली ॥
॥ हा आदीपुरूष घेवुन । आला अवघं ।
भक्ती ग्यान वैराग्य सद्‌गुण । हे वाजवले चौघ ॥
॥ या चौघाचा चौघडा । वाजवतो कृष्ण हरी ।
सावंगपुरी येवुन याहीनं । मोहंर वाजवली ॥

॥ भजन पाठा २२/०३ ॥

॥ भक्ती ग्यान वैराग्य सद्‌गुण । साधलं ज्यानं ।
तो लाखा मध्ये जाणा । एक पहेलवानं ॥
॥ ज्ञान भक्तीची निशाणी । मनाशी लावजा ।
सत्य नाम सुमरता । रोग विघ्न जातीन भंगा ॥
॥ ज्ञान शक्ती हद्‌यी शांती । कृष्ण अवधुताच्या ।
अनंत कोटी वर्षती धारा । अमृताच्या ॥
॥ ज्ञान भक्ती वैराग्य प्राप्ती । अखंड समाधी ।
हरी भक्तीच्या लीन राहुन । साधली नव निधी ॥
॥ नव निधीचे मंथन । ज्ञान भक्ती होय मोक्षाचे साधन ॥

॥ भजन पाठा २२/०४ ॥

॥ सोहंम्-ओहंम्, क्षर अक्षर । तन रूपात जाना ।
पुरूष-प्रकृती दोन्ही बाजु । ओम्‌कार रूप जाणा ॥
॥ ओहंम्-सोहंम् दोन्ही ताजवे । काटा नेकीका ।
जो ठेवन बराबर । तो व्यापारी मोठा ॥
॥ नामा सारखा नाही नफा । का करता तोटा ।
केली कमाई वाया जाईन । पाण्याच्या लोटा ॥
॥ भक्ती करा देहजीव झिजवा । नका आणु तोटा ।
केली कमाई वाया जाईन । पाण्याच्या लोटा ॥

॥ भल्या भल्याला पडली गिरकी । मुळमायेचा पसारा ।
हया गंगेमध्ये नाव चालली । थाप पाहयजो हुशारा ॥
॥ भक्ती करून निसंगः होजो । तु प्राण्या आता ।
या भक्तीला भंग नको आणु । वाया जाशीन अधोगता ॥
॥ नामा दामा भक्त सुदामा । तुकाराम संसारी ।
संसार करून पार झाले । देव आणला घरी ॥
॥ नाम घ्याहो फुकट । याला नाही लागत धन दौलत/संप्पत ॥

॥ भजन पाठा २२/०५ ॥

॥ नित ध्यास सोहंम् ध्यान । निती नेमाने घ्याहो अवधुत नाम ॥
॥ अवधुत अनामत । करा महाराजाचं सुमरनं । बहु आहे सुखः ॥
॥ अवधुत अनामत । पडझड जागी करावं । आला दिवसं ॥
गजर :-
॥ ओहंम् सोहंम्, कृष्ण अवधुत । ओहंम्-सोहंम्, कृष्ण अवधुत ।
कृष्ण अवधुत, कृष्ण अवधुत । कृष्ण अवधुत, कृष्ण अवधुत ॥

॥ भजन पाठे २२/०६ ॥

॥ कृष्ण राया रूप सावळा । याहो प्रार्थनेला ।
कल यवगाच्या ठाई कंद । नामाचा उगवला ॥
॥ अनामता कृष्ण अवधुता । तु गरूड ध्वजा ।
बहुत यवग झाले किती अंत पाहतो माझा ॥
॥ किती अंत पाहतो माझा । नाही गणीत ।
लवकर धाव गा देवा । भक्त पाहतो वाट ॥
॥ या लवलावी धरून देही । या भक्ता साठी ।
कितीक दिवस अंत पाहशीन । राया जगजेठी ॥
॥ किती वाट पाहु गा देवा । कुठ गुंतला ।
त्वां येण्यासाठी उशीर का लावला हो ॥

॥ ऐका हो मात कृष्णनाथ । या वेडया पामराची ।
हीन-दीन दशा झाली हो । तुया भक्तांची ॥
॥ कुठं गुंतला रे बापा । भक्ताच्या वचनात ।
लवकर धाव गा देवा । भक्त पाहते वाटं हो ॥
॥ बहुत यवग वाट पाहतो । कुठ गुंतला राया ।
कोणा पाशी सांगु देवा । दुःखाचा कनवाळ ॥
॥ दुःखाचे डोंगर आहे । नेत्री, अश्रुच्या धारा ।
माझी हिन-दीन दशा पाहुन । येई येई बा अवतारा ॥
॥ येई येई गा अवतारा । या देह घरात ।
करतो सुमरन रांत्र-दिन । शुध्द मनभाव वचनात ॥
॥ करतो विनवनी चक्रंर्पाणी । तु यवगेश्वर ।
तुया वाचुन कोण करन । या देहीचा कार ॥
॥ कधी येशीन अवतार धनीदेव । माझे देह घरात ।
करतो चिंतन रांत्रंन् दिन । शुध्द वचनात ॥
॥ कृष्णाजी जगजीवना । मजशी बोलानां ।
या अन्जानाची कारूणा । येवु दया मना ॥
॥ राखा बाणी चक्रपाणी । याहो परवेशी ।
नष्ट करा अंधार । ज्योत, लावा सत्याची ॥
॥ आलो भिकारी तुया व्दारी । दयाहो भेटी ।
बहु यवगाचे अन्याय । माझे, घालाना पोटी ॥

॥ आलो परवेशी तुया ईथं । दुजा का भाव ? ।
झाला का अहंकार । कैसा, लपला देव ॥
॥ अहंकारी मन माझं । झालं, हीन दीन ।
या प्रार्थनेला धावुन याहो । कृष्ण भगवानं ॥
॥ पंच तत्वांचा विणा । हरी विना कोणी वाजवेना ॥
॥ पंच तत्वांचा कारखाना । हरी विना कोणी चालवेना ॥

॥ भजन पाठा २२/०७ ॥

॥ शुध्द मन भाव हे कापुर । उजळली ज्योत ।
मनभाव हा मोगरा देवा । तुम्हा वाहतो नित ॥
॥ शुध्द मनभाव फुल पुष्पाच्या । करून माळा ।
नित गुंफिनी घालतो देवा । तुमच्या गळा ॥
॥ मन भावाचे फुल पुष्प । आम्ही वाहतो देवा, तुमच्या चरणावरं ॥
॥ तुझेच फुल पुष्प तुला वाहतो । निमित्याकारण देवा दर्शना येतो ॥
॥ निमित्या कारण देवा तुम्ही । धरला हात ।
तुमचीच वाणी तुम्ही सांगाव हद्‍यात/जगात ॥
॥ वाणी जगात सांगतली । चतुर्पती नामाची ज्योत उजळली ॥
॥ ओहंम्-सोहंम् टाळी वाजली । चतुर्पती नामाची ज्योत प्रकाशली/उजळली ॥
॥ सावंग नगरी कंचन झाली । चतुर्पती नामाची ज्योत उजळली ॥
॥ आहो या ज्योतीचा । उजेड आहे मजला सदोतित हो ॥
॥ जोडा या ज्योतीले हात । उभे आहे कृष्ण अवधुत ॥
॥ उभा कृष्ण अवधुत । याहीच्या चरणी मुजरे सदोनित ॥
॥ उभा कृष्ण अवधुत । याहीच्या चरणी माझा दंडवत ॥
॥ दंडवत परिक्रमा घालतो । देवाच्या नामी ।
हरी प्रार्थितो । तारा विठोबा/श्रीकृष्ण धनी ॥

॥ भजन पाठा २२/०८ ॥

॥ धरतरी हे माता । आकाश हा पिता । तार बा अनंता, यवगायवगी ॥
॥ योगी उभा कृष्ण राजा । सत्य भावानं करा हो पुजा ॥
॥ हात मी स्वर्गाला जोडीतो । मिर्तलोकी कृष्ण अवधुत पुंजतो ॥
॥ धरतरी शालु पांघरली । ईची पुजां या अहीनानं/सावानं केली ॥
॥ धरतरी होय सुर्वणाची । ईच्यावर सत्ता आहे या देवरायाची ॥
॥ पुंजन करतो धरणीचे । हात जोडीतो जोडीतो कृष्ण/सावाले/अवधुताले ॥
॥ पुंजन करतो धरणीचे । हात जोडीतो जोडीतो आकाशाले/स्वर्गाले ॥
॥ स्वर्गि जोडुनिया हात । तिरलोकी पुजा देवानं केली साहीत ॥
॥ हात मी स्वर्गाला जोडीतो । मिर्त लोकी कृष्ण अवधुत भजतो ॥
॥ झाला धरतरीचा मान । आता करा देवरायाचं/पित्याचं पुंजन ॥
॥ उटी योग्याची/देवाची/धन्याची केली ।
ज्ञान गंगेने योग्याची/देवाची/धन्याची आंघोळ केली ॥
॥ गंगा जल आहे निर्मळ । यान केली धन्याची आंघोळ ॥
॥ धन्याच्या सव्यां आंगी । चंदना ची उटी ।
केशर कस्तुरी । टिळा लावला लल्लाटी ॥
॥ मोतीयाचा टोप । कानी कुंडलच लेले/शोभे/डोले ।
कुंडलच लेले/शोभे/डोले । कृष्णदेव भजनात आले/उभे/बोले ॥

॥ भजन पाठा २२/०९ ॥

॥ रूसलो आम्ही, समजावं तुम्ही । लेकराची आळ ।
लेकरांची आळ । देवा तु बिर्दावर उभा राहयं ॥

॥ भजन पाठा २२/१० ॥

॥ कृष्णाजी देवा करतो मी तुझा धावा । आहो धावा ।
संकटी सापडलो देवा । मज सोडवा हो ॥
तुया नामी आता साहयं व्हावे देवा हो ॥
॥ नित साहयं करा देवा आपल्या हात ।
धरले चरण, नाही सोडत जगजेठं हो ॥
॥ साचा सचला देवा तुम्हा हात । धरले चरण जवळ उभा राहा नित ॥
॥ धरले चरण उभा जवळ । हेच मागतो महाराजा मागणं ॥
॥ यानं केली विघ्नाची लाही । भाव जडवा देवराया/श्रीप्रभुच्या पायी ॥

॥ कर चतुर्पतीचा अभ्यास भजन पाठा २२/११ ॥

॥ अनामीकाचे/अहीनाचे अमोल घर । नाही कोणा मालुम ।
सावंग्यात उभा राहुन कृष्ण । वदला चतुर्पती नाम ॥
॥ सभामंडपी पाठशाळा । भजनी उभा आहे कृष्ण सावळा ॥
॥ सभामंडपी पाठशाळा । इथं उतरला हरी भक्तीचा जिव्हाळा ॥
॥ नेवु घातले गोपाळ । कृष्ण महाराजा अक्षरं पाहयं ॥
॥ नेवु घातले अन्जान/बालक । देव शिकवते हो शिकवते ग्यानं ॥
॥ चतुर्पतीच्या गडया । कर चतुर्पती अभ्यास ।
पुढे आहे परिक्षा, तुम्ही गडेहो । कसे व्हाल यात पास ॥
॥ चतुर्पतीच्या गडया । कर चतुर्पती अभ्यास ।
ऐक्यांशी कोटी सव्वा लक्ष दहावर । कळु येईन आदीपुरूष ॥
॥ ऐक्यांशी कोटी सव्वा लक्ष दहावर । दहा देवता ।
त्याच्या मध्ये कोणी नाही बापा । मोक्षाचा दाता ॥
॥ मोक्षविना तत्वता । कैची गीता भागवता ।
सहा शास्त्रं ग्रंथ लिखीत । भागवत गिता ।
घरात विस्तु/अग्न असुन । बाहेर का तपाला जाता ॥
॥ निरशुन्यामध्ये तो भगवंत निराकार होता ।
याहीच्या बिना कोणी नाही बापा । मोक्षाचा दाता ॥
॥ तिरगुणाच्या पलिकडे । ठाउक नव्हतं नाव-गावं ।
त्वां पढवले हे गोपाळ । अवधुत राव ॥

॥ भजन पाठा २२/१२ ॥

॥ देह जीवानं संग केला । नाही झाले लग्न ।
तिन ताळामध्ये ज्योत । राहये संगतीन ॥
॥ भ्रताराची सेवा कर । देही तु ।
आदीपुरूषाच्या हातुन लागनं । तुया कपाळी कुंकु ॥
॥ भ्रताराची सेवा करता । जगाला भेव वाटे ।
जोकोणी सेवा करन त्याला । आदीपुरूष भेटे ॥
॥ कजबा वस्ती करन आदीपुरूष । होईन अचंबा, प्रकाशनं ज्योत ॥
॥ भरून भरला आणीक उरला । अंत नाही कळला ।
त्याची कळसुत्र कळा । कळेला कोणाला ॥

॥ भजन पाठा २२/१३ ॥

॥ निरंजनी हा देव । डोळे उघडुन पाहयं ।
मायेच्या/पंचेचाळीस चौक्या आड । हा देव नांदत/उभा आहयं ॥
॥ दुनियेचे घर झालेसे कुठुन । पहा या भेलुंडा पासुन ॥
॥ भेलुंडाचे घर सुरूंगाच्या वर । अलाद हे वस्तु येथे आहे ॥
॥ मुळ घरी जावुन पाहयं । परमं तिर्थ तिथे आहयें ।
भाग्यवंता च्या पुण्यानं । तो उभा राहयें ॥
॥ चार वाणी चार खाणी दंडवत । घरी राहीला महाराजा नित/अखंड ॥
॥ ज्योत आहे निराकार । या ज्योतीन तरल्या जाउ बहु यवगावर ॥
॥ हे होय सत्याची ज्योत । जळुन जाईन पापाचे पर्वत ॥

॥ भजन पाठा २२/१४ ॥

॥ आकाश धरणी पवन पाणी । अन्न अग्नं ।
या देहीला तारू आहे । हे सहा जन ॥
॥ आकाश धरणी पवन पाणी । अन्न अग्नं ।
या देहीत तारू आला । तो निरंजन ॥
॥ तारू आला देहीचा । शिक्का बसन आदीपुरूषाचा/आदीरूपाचा ॥
॥ मोहरं शिक्का बसन सेरूप । याहीचा उजेड पडनं चवताळात ॥
॥ चंदन शिक्का तुच मोहरं । अवघी किल्ली या देवाच्या हातात ॥

॥ भजन पाठा २२/१५ ॥

॥ हरकी मुरकी पारखी तारकी । अवघे जमा झाले ।
हरकी मुरकी निघुन गेले । दोघे राहीले ॥
॥ हरकी मुरकी पारखी तारकी । अवघे जमा झाले ॥
त्या मध्ये बोलनं हो राया । या दोघाचे झाले ॥
॥ अमृताचा कुपा याहीनं हाती घेवुन ।
नवखंड पृथ्वा जागी केली । दोघा मिळुन ॥

॥ भजन पाठा २२/१६ ॥

॥ आला ज्योत नगरचा राजा । संग घेवुन सिध्दांच्या फौजा ॥
॥ बाळ ओटयात घेवुन । ठेवला झाकुन ।
यवगाच्या सुत्रानं हा बाळ । बाहेर निघनं ॥
॥ ओटयात धरला बाळ । या लेकराचा ईनं केला संभाळ ॥
॥ बोध केला अर्जुनाले/बाळाले ।
पुर्विच हालवुन ठेवले आहे । सर्व कळसुत्रे ॥
॥ निमित्या कारण धरला हात । आता होय तु निमित्य मात्र ॥
॥ होय तु निमित्य मात्र । वाणी सांगतो आता मिर्तलोकात/हद्यात ॥
॥ निमित्या कारण हात धरला । अमृत पान्हा देवानं पोटी पाजला ॥
॥ भाल्या वरत भाले रंचले । खेत्रीयाची शाळा ।
खेत्रीयांची शाळा । यामध्ये बोले कृष्णराया ॥
॥ सतरा या वर्षाची साळु । बाहेर निघनं ।
अठरा या वर्षाचा । नंद अवतार येईनं ।
या दोघाचं बोलनं सृष्टीवर होईनं ॥
॥ चवथा खुम्म जागृत । आकाश वाणी भैसाच्या/धन्याच्या मुखात ॥
॥ आकाश वाणीचं बोलनं । शकुन सांगन देव भक्तजनास ॥
॥ आकाश वाणीचं बोलनं । चौथ्या खुम्मी धनीदेव उभा राहीनं ॥
॥ आकाश वाणीचं बोलनं । चौथ्या खुम्मी देव राज करनं ॥
॥ अथर्वन् वेदाचं बोलनं । आकाश वाणी सांगी तो सांगनं ॥
॥ अथर्वन् वेदाचं बोलनं । जागी करन महाराजा तिरभवनं ॥
॥ अथर्वन् वेदाची गाही । जागी करन महाराजा देही/पृथ्वी/सृष्टी ॥

॥ भजन पाठा २२/१७ ॥

॥ कोरी भुम्मा कोरा देह । कोरा कागद ।
को-या भुम्मेतुन निघाला । सिदाईचा वेद/अथर्वन् वेद ॥
॥ कोरी भुम्मा कोरा देह । कोरा कागद ।
जोकोणी नाश करन त्याचा । होय कुडीचा दोष ॥
॥ आदीगणाच्या कृपा मुखी । अग्नं आहे ।
जोकोणी निंदा करन त्याच्या । कुडीचा दोष होय ॥
॥ लिनता ठेव धरून । नित हाती अगण्या बाण घेवुन ॥
॥ हाती घेवुन या नामाची तलवार । करा हो तुम्ही व्दैतांचा संहार ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०९ ॥

॥ भजन पाठा नं. २३ ॥

॥ ओवी भजना नंतर म्हणण्यात येणारे गजर ॥

# ॥ गजरे ॥

-: गजर २३/०१ :-

॥ सत्चित्तानंद च्या सुता । अनुसयेच्या पुता...।
यशोदेच्या लाडल्या, कृष्ण महाराजा अवधुता ॥

-: गजर २३/०२ :-

॥ उभा आहे कृष्ण देव । ओहंम्-सोहंम् त्याचं नाव । कोरी भुम्मा त्याचं गाव ।
त्यानं जुम्मा घेतला । तारू केला देहजीव ॥

-: गजर २३/०३ :-

॥ ओहंम् सोहंम् कृष्ण अवधुत । ओहंम् सोहंम् कृष्ण अवधुत
कृष्ण अवधुत कृष्ण अवधुत । बोला हो मुखानं.. ।
ओहंम् सोहंम कृष्ण अवधुत.. ॥

-: गजरे २३/०४ :-

॥ ओहंम्-सोहंम् बिज मंतंर । लावली धुनी.....।
कृष्णा तुया वाचुन कर्तार । जगात नाही कोणी ॥२३/०४/०१॥
॥ कल यवगी उठली धुनी । चतुर्पती नाम हे तारक... ।
तुम्ही उठा गडे हो । करा देहीचं सार्थक ॥२३/०४/०२॥

-: गजर २३/०५ :-

॥ पुर्वि जन्म घेतला मथुरेत । खेळ केला गोकुळात...।
पुर्ण अवतार तुवा घेतला, आता या सावंग्यात ॥

-: गजर २३/०६ :-

॥ उगवले चांदणं । देवानं लांबबला दोरा हो दोरा....
देवकीच्या पोटी कृष्णदेव । जन्मला हिरा ॥

-: गजर २३/०७ :-

॥ जन्म घेतला देवकी पोटी । हा अवतार आला सावंग्यामध्यी ।
कृष्णाजी तुयी किर्त झळकते । सा-या जगामध्यी ॥

-: गजरे २३/०८ :-

॥ निरशुन्याहुन सावंग नगरी । उतरला जगजेठी ।
धुम्मधुम्मकार शकुन गर्जला । भक्त तारण्यासाठी ॥ २३/०८/०१ ॥
॥ निरशुन्याहुन आली ज्योत । पहाड पर्वत ओलांडत ।
झरझरा उतरली ज्योत । पहा सावंग्यात/खोडगावातं ॥ २३/०८/०२॥
॥ निरशुन्याच्या धन्या । सांवंग्याच्या नाथा/मालका ।
हा अखंड देह-जीव नांदवजो सारखा ॥ २३/०८/०३ ॥
॥ तु सुखकर्ता, तु दुःखहर्ता । सावंग्याच्या नाथा ।
देवा अनामता, देवा अवधुता । तुमच्या चरणी माथा ॥ २३/०८/०४॥
॥ निराकार निरंजना ! अनामत अवधुता ! आमची अरज आहे आता....
देहे-जीव नांदव सुखी देवा ! तुमच्या चरणी माथा ॥ २३/०८/०५ ॥

-: गजरे २३/०९ :-

॥ अमरावती नगरी जयजयकार । कृष्ण, थडीच्या कोंडाशीला !
कोडाशीला आनंद झाला एकाच आरोळीला ॥ २३/०९/०१ ॥
॥ कृष्णाजीचे घरं ! अमरावती नगरं ..!
गुप्त झाली ज्योत, सापडला मोती सावंगपुरं ॥ २३/०९/०२ ॥

॥ चिरोडीच्या शिखरावर, कृष्ण हरी अवतरले
भक्त झाले हैराण, भैसनाम मुखी आले. ॥ २३/०९/०३ ॥
॥ उजळा कापुर ज्योत । कृष्णा नदिच्या थडीवर । नागार्जुन सागर...
कोंडाशीला जावुन पाहयं । उभा आहे हरूष अंबर ॥ २३/०९/०४ ॥
॥ कृष्णाजीचे कर्मस्थान । अमरावती नगर ।
तेथुन गुप्त झाली ज्योत । सापडला मोती सावंगपुर ॥२३/०९/०५॥

-: गजरे २३/१० :-

॥ चिरडोच्या शिखरावरी । देवराया अवतरले कृष्णाजी ।
भक्त झाले हैराण । चतुर्पती नाम दिले मुखी ॥ २३/१०/०१ ॥
॥ चिरोडीच्या शिखरावरी । रत्न गवसले श्रीकृष्ण हरी ।
आनंदी आनंद । झाला बाळ कृष्ण पाहुनी ॥ २३/१०/०२ ॥
॥ मुंगी पैठनचा होय तो जोत की । सावग्यात झाला गायकी ।
ठाईठाई अवतार खेळला । याहीची महीमा वर्णु किती ?॥२३/१०/०३॥
॥ अवतार घेतले ठाई ठाई । खेळ केला गोकुळ वसवत ।
प्रकट झाली अखंड ज्योत । पहा आता सावंग्यात ॥ २३/१०/०४ ॥
॥ पायी पदम् मुखी रत्न । बेंबी याहीच्या हिरा हिरा ।
नाचत खेळत पुर्ण अवतार । सावंग्याशी आला ॥ २३/१०/०५ ॥
॥ रोमावळीला गणीता नाही । देव रूपी उध्दारला..
धन्य देवाची लिला धनीदेव । घटोघटी भरून उरला ॥ २३/१०/०६॥
॥ कुणी गोविंद म्हणा । कुणी गोपाळ म्हणा ।
अशी वेळ येणार नाही पुन्हा ॥ २३/१०/०१ ॥ ॥ २३/१०/०७ ॥
॥ कृष्णसखा उभा राउळात । मोहन जैसा उभा बंन्शी धामात॥२३/१०/०८॥
॥ कामधेनु गाय जागृत । अहीनाच्या इथं । भावीका/चातुरा घरी आली ।
पाजे अमृताचा पान्हा । धन्य माउली ॥ २३/१०/०९ ॥
॥ राव-साव आले घरा । शकुन कृष्णाजीचा खरा..।
चंद्र-सुर्याच्या पलीकडे आहे । अनमोल माझा हिरा ॥ २३/१०/१० ॥
॥ आम्ही व-हाडी व-हाडी । हरी नामाचे भिकारी ।
आलो तुया दरबारी । भेट दयाना श्रीहरी ॥ २३/१०/११ ॥
॥ आलो तुया दरबारी । हरी नामाचा भिकारी ।
अन्जान बाळाला साहय करी । लेकराचा संभाळ करी ॥ २३/१०/१२॥
॥ भक्त उभे दीन दयाळ । तुझी पाहयते वाटं ।
तुया भेटी साठी । जीव हा झाला कासाविस ॥ २३/१०/१३ ॥

-: गजर २३/११ :-

॥ धन्य भाग्य कृष्णा पायी । हाती काठी कृष्णा राखे गायी ।
मुखी आहे याहीची अमृत संजीवनी ॥

-: गजरे २३/१२ :-

॥ ऐक मानवा सांगतो तुला । नको विसरू हरी भजनाला...।
जाय रे एकवेळा सावंगपुर । नगर पाहयं रे एकवेळा॥ २३/१२/०१ ॥
॥ सावंग्याशी जाता का कोणी । माझी विनवणी कृष्णाच्या कानी । जावुन सांगजा..।
दोन्ही हातानं मुजरा माझा । झेंडयाले ठेवजा ॥ २३/१२/०२ ॥
॥ सावंग माझ माहेर । आम्ही लेकरं या अवधुताचे ।
आम्हा भय नाही बा भय नाही कोणाचे ॥ २३/१२/०३ ॥
॥ गुढी पाडवा दस-याला । यात्रा भरते सावंग्याला ।
राउळात दोन्ही झेंडे । दर्शन घेवु चला ॥ २३/१२/०४ ॥
॥ देवाचं राउळ सुर्यमुखी । दोन्ही झेडे डोलती ।
सभामंडपी शकुन गर्जती । याहीनं दवंडी देल्ली नामचतुर्पती ॥२३/१२/०५॥

-: गजर २३/१३:-

॥ सांज-सकाळी कृष्णाजीला । मनभावाचे फुलपुष्प, वाहतो लवुन ।
उजळा कापुर ज्योत । विनवितो सदो नित ॥

-: गजरे २३/१४ :-

॥ तिर्थयात्रेला कशाला जावु ? कोरडी अक्षदा फुल कुठं वाहु ?
तुया चरणी मंजुळ रसाळ वाणी । नाम संजीवनी ॥ २३/१४/०१ ॥
॥ मन मोग-याचे फुल घ्या हो । पान फुलं.. ।
तुजला अर्पन केलं ॥ फुलं घ्या हो..॥ २३/१४/०२ ॥

-: गजर २३/१५ :-

॥ मुजरा कृष्णाले कृष्णाले । मुजरा कृष्णाले भैसाले..।
अंबर करा देहीले ॥ मुजरा कृष्णाले भैसाले.

-: गजर २३/१६ :-

॥ अल्याड याहो, पल्याड न्याहो । अवधुता आदीगणा...।
या अन्जानाची कारूणा । येवु दया मना मोहना ॥

-: गजर २३/१७ :-

॥ कृष्णाजी देवा ! करतो मी धावा ! तुझा पंजा शिरावर राहावा...।
तुमच्या कृपेने या देहीचा उध्दार व्हावा ॥

-: गजर २३/१८ :-

॥ भैसराज महाराजा । त्वा बरीच केली माव...।
सदोनित तुम्हा विनवितो । संकष्टी तु धाव ॥

-: गजर २३/१८ :-

॥ जरा थांबा, घाबरू नका ! उभा आहे सखा ! तो मिटवन धोका...
या चतुर्पती नामाला विसरू नका ॥
॥ तुम्ही या भजनी बसा । उभा आहे सखा, होणार नाही धोका...।
या चतुर्पती नामाला येवुन भजा ॥

-: गजरे २३/१९ :-

॥ याहो याहो या । सर्व मिळुनी या ।
या मानवतेच्या महा मंदिरी । आपण जावु/गाउ या ॥ २३/१९/०१ ॥
॥ याहो याहो या । सर्व मिळुनी या ।
अवधुत नाम देवाचे । गोड गाउ या ॥ २३/१९/०२ ॥
॥ विठ्ठल मेरा पिता । रूक्मिणी मेरी मॉं । करके विठोबा मेरा नाम आजा ।
तेरे जैसा कोई दाता । रकम आये चारो धामा ॥ २३/१९/०३ ॥
॥ तुम्ही या, भजनी बसा ! उभा आहे सखा ! होणार नाही धोका...
या चतुर्पती नामाला येवुन भजा ॥ २३/१९/०४ ॥
॥ या ! तरा हो येथी । उभा आहे जगजेठी ।
कृष्ण महाराजा.. उघडा कवाड घ्या हाती किल्ली ॥ २३/१९/०५ ॥

॥ दरवाज्यावर भक्तराज उभा । सावंग्याचा राजा ।
देवा अवधुता । एकवेळ दर्शन दे दर्शन दे राया ॥ २३/१९/०६ ॥
॥ याहो याहो या । लवकर तुम्ही या । दर्शन तुम्ही दया ।
कृष्ण दयाळ दीन-दुबळ्याची हाक कानी घ्या ना ॥ २३/१९/०७ ॥
॥ सोन्या चांदीन भरली नावं । भक्त असलं त्याचा भाव ।
दीन-दयाळ दर्शन घ्या । सावंग माझ गाव ॥ २३/१९/०८ ॥
॥ भाव भक्ती ज्याच्या घरी । बांध जन्माची शिदोरी । जो करे याची चाकरी ।
देव भक्ताचा भक्ताचा होय गडी ॥ २३/१९/०९ ॥

-: गजरे २३/२० :-

॥ का बसले हो अंधारात ! घे किल्ली जा झटपट !
ताला खोलुन पाहय राउळात....
कशी जगमग जळते ज्योत । या निर्वाणाची इथं ॥ २३/२०/०१ ॥
॥ ज्योत चमकली, कळु नाही आली ! कशी वनवन हिंडते गाय...
या वासरा साठी, कशी हंबरते गाय ॥ २३/२०/०२ ॥

-: गजरे २३/२१ :-

॥ हरी भजनी लाजु नको मना । प्रपंच पाहुणा दोन दिवसाचा ।
हरी भजन पुण्यवंताच्या घरी । बांधली शिदोरी आत्म ज्ञानाची ॥०१
॥ देवाच्या नामाची वाजवली टाळी । हरी तुया नामाची वाजवली टाळी ।
कुणीतरी चला देह गावी । पाहु विठ्ठल रूक्माई ॥ २३/२१/०२ ॥
॥ तुम्हा दिसते आम्हा दिसते । दिसते सर्व जना ।
चंद्र-सुर्याला दिसत नाही । काय त्याहीचा गुन्हा ? ॥ २३/२१/०३ ॥

-: गजर २३/२२ :-

॥ काशी हुन गमन । कारल्याशी आला ।
यवगी उभा आहे देव राया माझा ॥

-: गजर २३/२३ :-

॥ देव अवघ्याला देणं देतो । ज्याला गवसलं तो घेतो...
ज्याला नाही गवसलं । तो दोष देतो ॥

-: गजर २३/२४ :-

॥ माझ मस्तक तुमच्या चरणी । संकष्टी धाव चक्रपाणी
संकष्टी धाव चक्रपाणी । संकष्टी, धाव चक्रपाणी ॥

-: गजर २३/२४ :-

॥ चंद्र-सुर्य आकाशी, प्रकाश या धरणी वरी । तिन ताळाची करे चाकरी
अवधुता कितिक वर्णु गुण । भगवंता कितिक वर्णु गुण ॥

-: गजरे २३/२५ :-

॥ देव भजनात आला । आनंदी आनंद झाला ।
भक्त जनाची हाक ऐकुन । देव धावुन आला ।
किंवा :- गरूडावर बसुन देव माझा । धावुन आला ॥२३/२५/०१॥
॥ सुर्य उगवला, प्रकाश पडला । आनंद झाला, भारी...।
हरी नामाचा वाजे चौघडा । देव दरबारी ॥ २३/२५/०२ ॥

-: गजर २३/२६ :-

॥ सावंग्याच्या कृष्णाजीन । एक खांदला ईरा ।
त्या ई-याले अमृत धारा...
जो असनं भाग्याचा पुरा । त्याच्या मुखात पडतीन धारा ॥

**शब्दार्थ :-** ईरा :- नदिचे शुध्द पाणी पिण्याकरीता नदिच्या वाळुच्या पात्रात हाताने छोटा खड्डा केल्या जातो. अत्यंत कमी वेळातच या खड्डयाला नदिचा पाझर फुटुन नदीच्या शुध्द पाण्याच्या धारा ने तो खड्डा नदिच्या शुध्द व पवित्र पाण्याने भरला जातो. या नदीचा शुध्द पाझर फुटलेल्या या छोटया खड्डयाला ईरा असे म्हणतात. तसेच नदी काठी शुध्द पाण्यासाठी खोदलेल्या विहीरीलासुध्दा विरा अथवा ईरा म्हणतात.

-: गजर २३/२७ :-

॥ सावंग्याचा महार खरा । ओहंम्-सोहंम् खोदला ईरा ।
त्या वि-याले अमृत नामाचा झरा ।
त्या हि-याच्या भोवती का घालता येरझारा ॥

-: गजरे २३/२८ :-

॥ कृष्णाजीचा बोल आहे अनमोल । लागली खाण हि-या रत्नाची, माणीक मोत्याची...
याची पारख कराना । तेव्हा चुकन चौ-यांशी ॥ २३/२८/०१ ॥
॥ धन्य धन्य कृष्णाजी धनी । त्वा दिली ही अमृत वाणी ।
तुया सारखा योगी बापा । जगात कोणी नाही ॥ २३/२८/०२ ॥
॥ या तिरगुणाच्या पलीकडे ठावुक नव्हतं नाव गावं ।
त्वा पढवले गोपाळ । अवधुत राव ॥ २३/२८/०३ ॥
॥ धन्य धन्य कृष्णाजी धनी । राउळी उभे राहुनी । झेंडे स्थापले दोन्ही ।
तुया देहेचे पाणी तिरभवनी । कशी प्रकट केली वाणी ॥ २३/२८/०४ ॥
॥ अल्याड याहो पल्याड न्याहो । कृष्ण अवधुता, आदीगणा..
या अन्जानाची कारूणा येवु दया मना ॥ २३/२८/०५ ॥
॥ हातात डमरू गळ्यात माळ । कपाळी शोभे चंद्र कला ।
शंकरा, पार्वतीच्या नरा । ये माझे माहेरा ॥ २३/२८/०६ ॥
॥ कृष्ण आमचा कैवारी । अवधुत आमचा कैवारी ।
सावंग्या नगरात होईन आमची नित वारी ॥ २३/२८/०७ ॥

॥ एवढी अरज या कर्ता-याच्या/विठ्ठलाच्या/अवधुताच्या/भैसाच्या पायी ।
हाती काठी सावळा वळतो गायी ॥ २३/२८/०८ ॥
॥ एवढी अरज या आदीपुरूषाच्या/कृष्णाच्या/अनामतच्या/अनमोलाच्या पायी ।
हाती काठी सावळा वळतो गायी ॥ २३/२८/०९ ॥
॥ धन्य धन्य कृष्ण देवा । हे वाणी काढली तुवा ।
तुया पायाचा धरला धावा..
आम्ही अरज केली । पावन होय बा आता ॥ २३/२८/१० ॥
॥ धन्य धन्य कृष्णाजी देवा । घडो तुझी सेवा । मागणं हेही...
या सोहंम् ज्योतीच्या ठाई । पुन्हा धर देही ॥ २३/२८/११ ॥
॥ निराकार निरंजना । अवधुत अनामता । एवढी अरज आहे आता ।
देह जीव नांदव सुखी । तुमच्या चरणावर माथा ॥ २३/२८/१२ ॥
॥ मुजरा भैसाले । कृष्णाले । अंबर करा देहीले ॥ मुजरा..॥ २३/२८/१३ ॥

॥ कृष्ण अवधुत । ईश्वर-पुना । हद्यी बसले..
मला हे आदीपुरूष दिसले ॥

-: गजर २३/२९ :-

॥ घ्याहो घ्याहो घ्या । उभे नका राहु ।
अवधुताचा प्रसाद घ्याहो । तसे नका जावु ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड ०९ ॥

॥ भजनपाठा नं. २४ ॥

॥ अर्ज भजने ॥

# ॥ अर्ज चे भजने व पाठे चा संग्रह ॥

॥ अर्ज अगोदरचा भजन पाठा नं. २४/०१ ॥

॥ आता करा एक मन । हद्य भरा, देवाच्या नामानं ।
सत्य लावा, देवरायाचं ध्यानं ।
मजबुत धरा, देवरायाचं ध्यानं । तेव्हाच होईन, देव रायाचं देणं ॥
॥ चित्त मनाची करा जोडी । देवा पायी अवघे, लावा गोडी ॥
॥ चित्त-मन बसवुन एका ठायी ।
सत्य भावानं भजा, या बापाची गाही ॥
॥ सत्य भावाचा मालक । सागर भरला, या देवाच्या पोटात ॥
॥ सत्य भाव त्याची भक्ती । विठ्ठल राया देव, त्याहीच्या संगती ॥

॥ देवाच्या नामाची गोडी । देवाच्या गलपाला, दोरी बांधली ॥
॥ देवाच्या गलपाला बांधली दोरी । अर्ज या बाळानं मांडली ॥

॥ अर्ज भजने नं. २४/०२ ॥

॥ अवधुत अनामत । पडझड जागी कराले, आला दिवस ॥
॥ अवधुत अनामत । ही निजरूप भुम्मा, जागी करन अवधुत ॥
॥ अवधुत अनामत । या महाराजाची अखंड जळते ज्योत ॥
॥ अवधुत अनामत । करा महाराजाचं सुमरन, बहु आहे सुखः ॥

॥ अर्ज भजने नं. २४/०३ ॥

॥ सदोनित करा सुमरन । दुःख हर्ले बा हर्तीन हरी नामानं ।
विनवितो रात्रं-दिन ॥
॥ सदोनित करा सुमरन । माझी अरज ऐकानं ।
तुया चरणी देवा लोटांगण ॥

॥ माझी अरज । हरी ऐकावं अरजं ।
आपरूप देवा नांदवजो बिरदं ॥
॥ आपल्या बिरदी । महाराजा उभा राहयं ।
बाणी बिर्दाची । महाराजा तु संभाळ ॥

॥ अर्ज भजने नं. २४/०४ ॥

॥ राख या अर्जिची लज्जा । बिरद संभाळ श्रीकृष्णाजी राजा ॥
॥ राख या अर्जिचां मान । गोपाळ उभे, दोन्ही हात जोडुन ॥०१॥
॥ दोन्ही हात जोडुन । अर्ज करते, या महाराजाले ॥
॥ चांगल्या आनंदानं । नांदव बाप्पा, या देहे जीवाले ॥
॥ आहो देहे जीव । देहे जीव देवा, तुमचा होय ॥
॥ आहो तुमच्या परता । तुमच्या परता याला, कोणी नाही ॥
॥ तुमच्या आंगचा जीव होय । तुमच्या हात देवा, बनली देही ॥
॥ देहे-जीव बनवला खासा । यावर वर्षाव, नाही चालत कोणाचा ॥
॥ देहे जीव बनवला मजबुत । या देवळात नांदते, देवाची ज्योत ॥
॥ आहो या ज्योतीचा । उजेड आहे मजला, सदो नित ॥

॥ अर्ज भजने नं. २४/०५ ॥

॥ अर्ज करतो पामर । उभा आहो तुमच्या सम्मोर ॥
॥ उभा आहो तुमच्या सम्मोर । घडले अन्याय माफ कर ॥

॥ अर्ज भजने नं. २४/०६/०१ ॥

॥ घडले अन्याय करा माफ । तुच होय पुर्विचा बाप ।
*॥ तुच होय पुर्विचा बाप । आहो मी दगलबाज फार ।*
*॥ तुच होय पुर्विचा बाप । आहो मी बालोबाल गुन्हेगार ।*
*॥ ऐसे कोणते तुये चोरले । काहो कुडी-पाप भोगाया लावले ॥*
*॥ ऐसे कोणते पाप घडले । काहो रोग जंतु कुडीला लावले ॥*
*॥ ऐसे कोणते पाप घडले । काहो रोग जंतु कुडीत घातले ॥*
*॥ ऐसे कोणते पाप घडले । काहो रोग जंतु कुडीत वाढवले ॥*
॥ तु असतांना बाप । काहो घडले हे पाप ॥
॥ आहो घडले हे पाप । देवा तुम्ही अवघे करा माफ ॥
॥ अवघे अन्याय घालाना पोटी । तुम्ही विनवितो हो जगजेठी ॥

॥ अर्ज भजने नं. २४/०६/०२ ॥

॥ अरज माझी अरज देवा । तुम्हा पायी आहयं ।
सदा विनवितो माझेया मुखी । उभा राहयं ॥
॥ अरज माझी अरज देवा । तुम्हा पायी आहयं ।
तुच होय पुर्विचा बाप देवा । बिरदावर उभा राहयं ॥
॥ तुच होय आमचा पुर्विचा बाप । आहो आम्ही तुमचे अन्जानं लेकरं ॥
॥ ऐसे कोणते पाप घडले । काहो आम्हा पडीत टाकले ॥
पड मोडा देवराया । जागी करा देवा सा-या देहा ॥
पड मोडा देवराया । बाहेर काढा देवा सारी सेना ॥
॥ भेटी आंगचे सिध्द उभे । ठेवा/करा/राहा, आमच्या संगतिले ।
सदा विनवितो नित साहयं ठेवावं/करावं आम्हाले ॥

॥ अर्ज भजने नं. २४/०७ ॥

॥ अन्याय कोटयानं कोटी । देवा तुम्ही, अवघे घालाना पोटी ॥
॥ माझ्या अपराधाच्या राशी । भेदुन गेल्या, हो गगणाशी ॥

॥ अर्ज भजने नं. २४/०८ ॥

॥ अर्ज करतो मनमोहना । बाप विठोबा, माय माझी रुक्मीना ॥
॥ अर्ज करतो मायबापा । वेळो वेळा तुमच्या चरणा वर माथा ॥
॥ अर्ज करतो पुन्हा पुन्हा । येवु दयाहो, बाळाची कारुणा ॥
॥ अर्ज होय या बाळाची । नामी जडल्याची लज्जा राख माझी ॥

॥ राख या अर्जीची लज्जा । बिरद संभाळ तु कृष्ण राजा ॥
॥ बिर्द वाणी तुयी होय । संभाळ करनं देवा तुम्हा हाती आहयं ॥
॥ उभा राहयं आपल्या बिर्दाले ।
तारण करा महाराजा या बाळाले/लेकराले/गापाळाले ॥
॥ उभा राहयं या बिर्दाले । संभाळ करा हो देवा आपल्या वाणीचे ॥
॥ संभाळ आपल्या बिर्दाले । बट्टा नाही देवा तुमच्या वाणीले/नामाले ॥
॥ ईच्छा पुर्ण करा माही । उभे राहा महाराजा येवुनी ॥

॥ अर्ज भजने नं. २४/०९ ॥

॥ अर्ज देवाले केला । देव माझा हो धावुन आला ॥
॥ देवा धावल्याशी पाव । चालव आपल्या बिर्दाचे नावं ॥
॥ बिर्द बाणी तुही होय । असन लज्जा, बाणी राखा बिर्दाची ॥
॥ राखली बिर्दाची वाणी । धावुन आले श्री कृष्ण धनी ॥

॥ किसनजी आले यवगाले । फुलाची गादी धन्याले बसाले ॥
॥ मन भाव फुल पुष । देवा आम्ही तुजला अर्पण केलं ॥
॥ फुल-पुष्पाच्या माळा, घालुनी गळा । हरी भजनी उभा कृष्ण सावळा ॥
॥ शुध्द मनभाव हे कापुर । उजळली ज्योत ।
मन मोग-याच्या कळा । तुला वाहतो नित ॥
॥ ऐसा बोले यवगी राणा । करा नामाची गर्जना ।
करा नामाची गर्जना । कापुर ज्योत उजळाना ॥

॥ अर्ज भजने नं. २४/१० ॥

॥ उभा ज्योत नगरचा राजा । संग आहे सिध्दाच्या फौजा ॥
॥ थिर नाही कोणाच्या मना । बाहेर काढा हो सारी सेना ॥
॥ थिर नाही कोणाच्या मना । जागी करा हो सारी सेना ॥
॥ थिर नाही कोणाच्या मना । येईन ज्योतीचा रमंना ॥
॥ थिर नाही कोणाच्या मना । जागी करून तु दावंना ॥
॥ अवघा कार तुम्हा हाती । जागी करा देवा अवघी पृथ्वी ॥
॥ पृथ्वी तुमच्या अध्यानं । याहो महाराजा, करा यवगाचे काम ॥
॥ जागी करून दाव बापा । तुमच्या चरणावर माझा माथा ॥

॥ अर्ज भजने नं. २४/११ ॥

॥ सावंगपुरी नाम खडका । ऋषिकेशी आले हरिनाम ऐका ॥
॥ सावंगपुरी नाम खडका । सिध्दांच्या मुखी आहे अग्नीचा भडका
॥ सावंगपुरी देव नांदे । अन्जानाला देव गिण्यान सांगे ॥
॥ उभा आहे माझा देव । याहीच्या कृपेने नाही कोणाचे भेव ॥
॥ उभा आहे माझा देव । देह जीवाच याहीनं मिटवलं भेव ॥
॥ सारंगधर धरला रंग । चत्रभुज उभे आपल्या आंग ॥
॥ हरी बा कृष्णा । जगजीवना, मनमोहना । मनरंजना सगुण-निर्गुणा..
तुम्हा वाचुन नाही कोणी । या तिरभवना ॥
॥ तुम्हा विनविती की सारंगधरा, कृपावन भरा । दया सागरा, रंग धरा..
याहो महाराजा, कार तुम्ही करा / राज्य तुम्ही करा ॥
॥ विनविती सारंगधरा, कृपा गुण भरा, दयासागरा, रंगधरवरा, रंग धरला
चौताळी देव माझा भरून उरला / तुम्हाविन रंग आमचा सुना ।
तुयाविन आम्हा देव नाही दुसरा ॥
॥ सारंगधरा त्वा धरला रंग । चत्रभुज उभे आहे आपल्या आंग ॥
॥ सारंगधरा धरला रंग । चत्रभुज उभे गोपाळ संग ॥
॥ देव रंगी रंगला । सर्व घटी देव भरून उरला ॥
॥ नाही घडली सेवा तुयी । अंतर पडले हो मजकुणी/मजपासूनी ॥
॥ माझे अंतर मिटवा । यवगा यवगी मजला संग वागवा ॥ अंतर :- दुरी
॥ माझे अंतर रंगवा । यवगा यवगी मजला संग वागवा ॥
अंतर रंगवा :- अंतःरंगातील गुणांची कमतरता दुर करून, अंर्तभागातील मन-चित्त सत्भाव-भक्ती तेज गुण रूप, माया-ममता करणारी सवं शक्ती बळ....ईत्यादी देवुन देहीचे अंतरंग रंगवा. । संग :- तुमच्या सोबत सोबत तुमच्या संगतीनं,
॥ देव रंगाचा रंगारी । अवघे रंग या देवरायाच्या घरी ॥

॥ अर्ज भजने नं. २४/१२ ॥

॥ अर्ज करतो मनात । पावन व्हाहो महाराजा खिणात ॥
॥ अर्ज करतो लवुन । भेट दयाहो महाराजा येवुनं ॥
॥ अर्ज करतो तातडी । उघड महाराजा हे घुंगी/गुंगी झापडी ॥
॥ अर्ज करतो तातडी । कृष्ण/आदीरूप राया उभे राहा या घडी ॥
॥ अर्ज करतो लवलावी । देवाच्या चरणावर माझी डोही ॥

॥ अर्ज भजने नं. २४/१३ ॥

॥ अर्ज करतो मनमोहना । येवु दया बाळाची कारूणा ॥
॥ अर्ज करतो समर्था । तुमच्या चरणावर माझा माथा ॥
॥ अर्ज करतो समर्था । धरले चरण, चरणी ठेवला माथा ॥

॥ दोन्ही जोडुन धन्याला कर । उभा आहे पुर्ण अवतार ॥
॥ अवतार उभे लवलाही । देवाच्या चरणा वर डोही ॥
॥ उभा आहे माझा सखा । आता नाही, या देहीला धोका ॥
॥ उभा आहे माझा देव । आता नाही, कोणाचं भेव ॥
॥ उभा आहे माझा हरी । तुम्हा बिन मजला कोण तारी ॥
॥ उभा आहे माझा राम । राम करे, यवगाचे काम ॥

॥ अर्ज भजने नं. २४/१४ ॥

॥ अर्ज गावतो महाराजा । उभा राहयजो, या गोपाळाच्या काजा ॥
॥ उभा राहयजो, गोपाळाच्या काजा । बाळ गोपाळाची, राखावं लज्जा ॥
॥ अरज करतो महाराजा । प्रतिप्रदा त्वां उभारल्या ध्वजा ॥
॥ माझी अरज तुया पाया । अन्जानाची माळ आहे तुया गळा ॥
॥ माझी अरज तुया पाया । अन्जानाची महाराजा येवु दयाहो दया ॥
॥ माझी अरज तुया पाया । लेकरावर महाराजा तुझी नित असो कृपा ॥
॥ माझी अरज तुया पाया । ही अरज ऐक माझे मनाच्या मोहना ॥
॥ पदर पसरतो तुम्हा । माझी अरज येवु दयाहो मना ॥
॥ उभी राहयं चांगोणा माता । जन्मोजन्मीचे दुःख मिटवजो आता ॥

॥ अर्ज भजने नं. २४/१५ ॥

॥ आहे गरज करतो अरज । अवधुताच्या पायी ।
सुखःशांतीचे आसन सोडुन । धावत येई ॥
॥ आहे गरज करतो अरज । अवधुताच्या पाया ।
सुखःशांतीचे आसन सोडुन । याहो कृष्णराया ॥
॥ अरज माझी अरज देवा । तुम्हा पायी ।
अल्लम दुनिया नांदव बा सुखी ॥
॥ करा या अर्जिचा मान । गोपाळ उभे दोन्ही हात/कर जोडुन ॥
॥ करा या अर्जिचा मान । कृष्णराया लवकर येणं, देवा देहा तारनं ॥
॥ करा या अर्जिचा मान । अवधुतराया लवकर येणं, देही करा अंबरं ॥
॥ लोट मारतो चरणावरी । परमय सुखः घेवुन तुम्ही याहो हरी ॥
॥ सुखा साठी । भजलासे हरी । आहो हरी ।
सुखः दयाहो, महाराजा देहीवरी हो ॥
॥ आम्ही सुखाचे, हरी तुमच्या गा रूपाचे । आहो रूपाचे
गिण्यान भजतो, माय बाप । वैराग्याचे हो ॥
॥ सुखा साठी हरी विनवितो तुला । आहो तुला
पदरी धरा महाराजा गोपाळाला हो ॥
॥ सुखा साठी हरी विनवितो तुला । आहो तुला
परमय सुखः मला दयाहो विठ्ठला हो ॥
॥ परमय सुखः। सुखः दयाहो स्वामीराजा, सुखः दयाहो महाराजा ।
आम्ही तुम्हाला विनवितो । चत्रभुजा ॥
॥ परमय सुखः। सुखः दयाहो स्वामीराजा, सुखः दयाहो महाराजा ।
आम्ही तुम्हाला विनवितो । दया सागरा ॥
॥ परमय सुखाची वाणी । याहो महाराजा, भैट दयाहो येवुनी ॥
॥ कृष्ण सुखाचा राजा । उभा राहजो, या गोपाळाच्या काजा ॥
॥ हरीहरी कृष्णा । तु परमय सुखाचा गडी, तुयी संगत घडली बरी
आमचा माथा तुया चरणावरी ॥

॥ तुमच नाव सागर । म्हणुन धरला देवा तुमचा पदर ॥
॥ पदरी धरलं नका जावु दुर । लोट मारली देवाच्या चरणावर ॥

॥ अर्ज भजने नं. २४/१६ ॥

॥ अर्ज करतो पामर । या अर्जिला देवा व्हाहो सादर ॥
॥ अर्ज करतो पामर । कृष्ण महाराजा देही करा अंबर ॥

॥ अर्ज भजने नं. २४/१७ ॥

॥ अरज देहे जगवाची/बहु दिवसाची । इच्छा पुरवा बाळा च्या मनाची ॥
॥ अरज देहे ताराची । लज्जा राखा देवा नामी जडल्याची ॥
॥ अरज तुमच्या पायाची । लज्जा राखावं देवा आपल्या बिर्दाची ॥
॥ बिरद बाणी राखा मायबापा । वेळोवेळा तुमच्या चरणावर माथा ॥
॥ अर्ज करतो पुन्हा पुन्हा । येवु दयाहो, बाळाची कारूणा ॥
॥ अर्ज करतो महाराजाले । आनंदानं नादंव बापा या देहजीवाले ॥
॥ अर्ज पुना पायी । आनंदानं नांदवा बाळाची देही ॥

॥ अर्ज भजने नं. २४/१८ ॥

॥ अर्ज करतो मनमोहना । बाप विठोबा, माय माझी रूक्मिणा ॥
॥ अर्ज करतो मायबापा । वेळोवेळा तुमच्या चरणा वर माथा ॥
॥ बिरद राखा मायबापा । वेळोवेळा तुमच्या चरणावर माथा ॥
॥ अर्ज करतो मायबापले । प्रार्थना करतो धन्याच्या पायाले ॥
॥ उभी राहयं चांगोणा मायं । आपल्या बाळाचा करावं संभाळ ॥
॥ उभी राहयं चांगोणा माता । जन्मोजन्मीचे दुःख, मिटवजो आता ॥

॥ अर्ज भजने नं. २४/१९ ॥

॥ हनुमंता..। अंजनीच्या सुता । एवढी अरज ऐक आता ॥
॥ हनुमंता..। राम रायाच्या द्युता । अरज करतो ॥
॥ हनुमंता..। जागी हो समर्था । अरज करतो ॥
॥ हनुमंता..। विघ्ने उडवा आता । अरज करतो ॥
॥ हनुमंता..। धाव पाव आता । अरज करतो ॥
॥ हनुमंता..। बिर्दाची ध्वजा संभाळ आता । अरज करतो ॥

॥ अर्ज भजने नं. २४/२० ॥

॥ हनुमंत हरि चंद्र उभे । आदी गण नामी ।
आदी गण नामी उभे । विघ्न उडवाच्या कामी ॥
॥ हनुमंत हरी चंद्र । नित अरज करी ।
या दिवसामध्ये देह तार बहुपरी ॥
॥ रामा रामा रामा रामा । यवग कठले मेघश्यामा ॥
॥ रामा रामा रामा रामा । कधी भेटशिन आम्हा राया ॥
॥ तारा बाईचा विर हनुमान । नित अरज करी ।
आला यवगाचा रमणा । कृष्णा/रामा निघा बाहेरी ॥
॥ खेत्री बाहेर निघाला । यवगाचा रमणा हाती घेतला ॥
॥ नव्व्यानव राम झाले । उरला राम धनीदेव ताराले आला ॥
॥ उभा आहे माझा राम । राम करे यवगाचे काम ॥
॥ राम राम राम राम । जयगुरू बोले हनुमान ॥
॥ मुखाने राम राम बोला । हरीनामी देही थिराईच्या ठेवा ॥
पायी हळु हळु चला । सदा मुखी रामराम बोला ।
मुखानं राम राम बोला । सदोनित विनविती तुला ॥
॥ अर्ज होय लेकराची । तारा जगवा देवा महीमा तुही ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ०९ ॥
॥ भजनपाठा नं. २५ ॥
॥ आरती भजने ॥

# ॥ आरती चे भजने व पाठे ॥

॥ आरती भजने पाठे २५/०१ ॥

॥ उजळा कापुराच्या ज्योती । तुम्हा ओवाळु विठ्ठला गणपती ॥
॥ उजळा कापुराच्या ज्योती । तुम्हा ओवाळु महाराजा श्रीपती/गणपती ।
॥ उजळा कापुराच्या ज्योती । तुम्हा ओवाळु गणराया गणपती ॥
॥ उजळा कापुराच्या ज्योती । तुम्हा ओवाळु कृष्णराया गणपती ॥
॥ कापुर ज्योत उजाळु । देव राया तुम्हाला ओवाळु ॥
॥ कापुर ज्योत उजाळु । याहो आदीपुरूषा/महाराजा तुम्हाला ओवाळु ॥
॥ हात जोडा ज्योतीले । आरती ओवाळु या आदीपुरूषाले/कृष्णाले ॥
॥ हात जोडा ज्योतीले । आरती ओवाळु आदी शक्तीले ॥
॥ लदबद उभी ज्योत । उजाला पडला हो चव ताळात ॥

॥ आरती भजने पाठे २५/०२ ॥

॥ आरती केली मनभाव । ओवाळला हा श्रीकृष्ण देव ॥
॥ अवघे देव ओवाळले । या देवानं आमचे संभाळ केले ॥
॥ आरती या भावीकानं केली । सोयंम् ज्योत हे ओवाळली ॥
॥ आरती या देवाची केली । सोहंम् ज्योत हे ओवाळली ॥
॥ जोडा या ज्योतीले हात । उभे आहे देव कृष्ण अवधुत ॥
॥ उभा कृष्ण अवधुत । याहीच्या चरणी मुजरे सदोनित ।
॥ उभा कृष्ण अवधुत । याहीच्या चरणी आमचे दंडवत ॥
॥ उभा आहे कृष्णराजा/भैसराजा । याहीच्या चरणी मुजरा आहे माझा ।
॥ उभा आहे अवतार । याहीच्या चरणी माझा नमस्कार ॥

॥ आरती भजने पाठे २५/०३ ॥

॥ आरती भजनाची गाही । देतो आम्ही मुजरा लवलावी ॥
॥ आरती भजनाची शोभा । मुज-याले आहे मुजरा माझा ॥
॥ आरती भजनाची शोभा । पायरीले आहे मुजरा माझा ॥
॥ आरती भजनाची शोभा । राउळ झेंडयाले मुजरा माझा ॥
॥ आरती भजनाची शोभा । देवाच्या गादीले आहे मुजरा माझा ॥
॥ आरती भजनाची शोभा । लदबद ज्योतीले मुजरा माझा ॥
॥ आरती ओवाळी अनामत खासा । वेल वाढवा हो सत्जनाचा/मानवांचा ॥

॥ आरती भजने पाठे २५/०४ ॥

॥ आरती भजनं । नितनाम.., तुया चरणी ओवाळनं ॥ आरती भजन
नितनाम..। विठ्ठल/श्रीकृष्ण/अवधुत/अनामतधनी ओवाळीनं । आरती
नितनाम..। तुमच्या चरणी लोटांगण । आरती भजन ॥

॥ आरती भजने पाठे २५/०५ ॥

॥ टाळी वाजवा टाळी वाजवा, कृष्णनामाची ।
सद्भाव भक्ती याहीची ॥
॥ टाळी वाजवा टाळी वाजवा, विठ्ठल नामाची ।
सद्भाव महीमा याहीची ॥
॥ टाळी वाजवा टाळी वाजवा, हरीनामाची ।
नित करा हो प्रार्थना महाराजाची ॥
॥ दोन्ही हातानं वाजवा टाळी । विठ्ठल विनवा हो विनवा ।
हा रक्त-मासाचा देहपिंड । मजबुत बनवा हो बनवा ॥

॥ आरती भजने पाठे २७/०६ ॥
॥ आरती ओवाळीतो देवा । तुमच्या पायाचा धरला धावा ॥
॥ आरती ओवाळीतो देवा । सोयंम् रूप या बाळाला दावा ॥
॥ आरती ओवाळीतो देवा । प्रकट रूप या बाळाले/भक्तीले दावा ॥

॥ आरती भजने पाठे २७/०७ ॥
॥ कृष्णा तु जगाचा जीवन । तुम्हा ओवाळु दोन्ही हात/कर जोडुन ॥
॥ उभा राहयं भक्तीचा जीवन । आरती ओवाळु दोन्ही हात जोडुन ॥
॥ हरी हरी भक्तीला जीवन । आरती ओवाळु दोन्ही कर जोडुन ॥
॥ हरी हरी भक्तीला जीवनं । तुया चरणी हो देवा आहे लोटांगण ॥
॥ दोन्ही कर तिसरा माथा । आरती ओवाळु महाराजा अवधुता ॥
॥ यश दयाहो यशवंता । आरती ओवाळु महाराजा भगवंता/अवधुता ॥

॥ आरती भजने पाठे २७/०८ ॥
॥ आरती ओवाळीतो । अनामता.., महाराज/कृष्णराज सुमरता ॥
अनामता..। अवधुत सुमरता । आरती ओवाळु ॥
अनामता..। विठोबा समर्था । आरती ओवाळु ॥
अनामता..। विठ्ठल भैस समर्था । आरती ओवाळु ॥
अनामता । कृष्ण राज समर्था । आरती ओवाळु ॥
अनामता..। महाराज समर्था । आरती ओवाळु ॥
अनामता..। सावंग्याच्या नाथा । आरती ओवाळु ॥
अनामता.., तुमच्या चरणी माथा ॥ आरती ओवाळीतो ॥
अनामता.., एवढी अरज ऐक आता । आरती ओवाळु ॥
अनामता.., देहे तार समर्था । आरती ओवाळीतो ॥
अनामता.., देहीच्या मालका । आरती ओवाळीतो ॥
अनामता.., कार उभा करा पंडिता । आरती ओवाळु ॥
अनामता.., धरतरी माझी माता । आरती ओवाळीतो ॥
अनामता.., आकाश माझा पिता । आरती ओवाळीतो ॥
अनामता.., चंद्र सुर्य ज्योता । आरती ओवाळीतो ॥
अनामता.., सावंग्याच्या नाथा । आरती ओवाळीतो ॥
अनामता.., गादीच्या मालका । आरती ओवाळीतो ॥

॥ आरती भजने पाठे २७/०९ ॥
॥ आरती ओवाळीतो । अवधुता.., सावंग्याच्या नाथा ॥ आरती..
अवधुता.., बिरद संभाळ आता । आरती ओवाळीतो ॥
अवधुता.., देहे तार समर्था । आरती ओवाळीतो ॥
अवधुता.., तुमच्या चरणी माथा । आरती ओवाळीतो ॥
॥ मुर्ति आनंदाची होय । कृष्ण देव संगतीनं उभा आहे ॥
॥ हे होय आनंदाची मुर्ति । कृष्णदेव उभा आहे संगती ॥
॥ आनंदरूपा..। भेट माय बापा । आरती ओवाळु ॥
॥ कृष्णरूपा..। माझी अरज ऐक आता । आरती ओवाळु ॥
॥ कृष्णरूपा..। भेट दयाहो आता । आरती ओवाळु ॥
॥ आदीपुरूषा..। तुमच्या चरणी माथा । आरती ओवाळु ॥

॥ आरती भजने पाठे २७/१० ॥
॥ आदीरूपा । धनी देहेच्या मालका । आरती ओवाळु ॥
॥ आदीरूपा..। भेट माय बापा । आरती ओवाळु ॥
॥ ब्रम्हरूपा..। कार उभा करा समर्था । आरती ओवाळु ॥
॥ ब्रम्हरूपा..। एवढी अरज ऐक आता । आरती ओवाळु ॥
॥ आरती ओवाळु । धनीदेव लभेदाच्या पाया ॥

॥ आरती भजने पाठे २७/११ ॥

॥ आरती ओवाळीतो । आदीमाया.., माळ घातली गळा ॥ आरती..
आदीमाया.., ओवाळु भैसराया/कृष्णराया । आरती ओवाळीतो ॥
आदीमाया.., येवुन तार बाळ गोपाळा । आरती ओवाळीतो ॥
आदीमाया.., आम्ही जडलो तुम्हा पाया । आरती ओवाळीतो ॥
आदीमाया.., कर लेकरावर दया । आरती ओवाळीतो ॥
आदीमाया.., धर अन्जानावर छाया । आरती ओवाळीतो ॥
आदीमाया.., कर भक्तांवर माया । आरती ओवाळीतो ॥

॥ आरती भजने पाठे २७/१२ ॥

॥ आरती ओवाळु । आदीशक्ती.., बालक धरा/धरला हाती ॥ आरती
आदीशक्ती.., ओवाळु अवधुत पती/धनी । आरती ओवाळु ॥
आदीशक्ती.., अवघा कार तुम्हा हाती । आरती ओवाळु ॥

॥ आरती भजने पाठे २७/१३ ॥

॥ हात जोडीतो ज्योतीले । आरती ओवाळीतो या आदीपुरूषाले ॥
॥ हात जोडीते ज्योतीले । आरती ओवाळु या आदीशक्तीले ॥
॥ उजळ्ली मनभाव ज्योत । उजेड आहे हो मजला सदोनित ॥
॥ उजळ्ली दिप माळ । ईचा उजेड आता आहे अंतापार ॥

॥ आरती भजने पाठे २७/१४ ॥

॥ गाय ओवाळु । तव चरणी.. ओवाळु कृष्ण धनी ॥ गाय ओवाळु
॥ गाय ओवाळु । तव चरणी.. ओवाळु अवधुत धनी ॥ गाय ओवाळु
॥ गाय ओवाळु । तव चरणी.. ओवाळु विठ्ठल धनी ॥ गाय ओवाळु
॥ गाय ओवाळु । तव चरणी.. ओवाळु दिगांबर धनी ॥ गाय ओवाळु
॥ गाय ओवाळु । तव चरणी. ओवाळु आदीरूप धनी ॥ गाय ओवाळु
॥ गाय ओवाळु । तव चरणी..
ओवाळु संतु-चितु/राव-साव/ईश्वर-पुना/पंचद्युता धनी । आरती ओवाळु ॥

॥ आरती भजने पाठे २७/१५ ॥

॥ गुपित प्रकट झाले राया ।
आरती ओवाळु देवा अवधुताच्या/विठ्ठलाचे/श्रीकृष्णाचे पाया ॥
॥ गुपित प्रकट झाले हरी । आमचा माथा तुमच्या चरणा वरी ॥

॥ आरती भजने पाठे २७/१६ ॥

॥ यश दयाहो यशवंता । आरती ओवाळु महाराजा भगवंता ॥
॥ यश दयाहो यशवंता ॥ आरती ओवाळु महाराजा अवधुता ॥

॥ आरती भजने पाठे २७/१७ ॥

॥ हनुमंता..। अंजनीच्या सुता । आरती ओवाळुं ॥
॥ हनुमंता..। राम रायाच्या द्युता । आरती ओवाळु ॥
॥ हनुमंता..। जागी हो समर्था । आरती ओवाळु ॥
॥ हनुमंता..। विघ्ने उडवा आता । आरती ओवाळु ॥
॥ हनुमंता..। धाव पाव आता । आरती ओवाळु ॥
॥ हनुमंता..। तुमच्या चरणी माथा । आरती ओवाळु ॥
॥ हनुमंता..। बिर्दावर उभा राहय आता । आरती ओवाळु ॥
॥ हनुमंता..। बिर्दाची ध्वजा संभाळ आता । आरती ओवाळु ॥

॥ आरती भजने पाठे २७/१८ ॥

॥ करा या आरतीचा मान । योगी अवतारा लवकर येणं ॥
॥ करा या आरतीचा मान । कृष्णाजी राया लवकर येणं ॥
॥ करा या आरतीचा मान । अवधुत राया लवकर येणं ॥
॥ करा या आरतीचा मान । आदीमुनी राया लवकर येणं ॥
॥ याहीच्या चरणावर माथा । आरती ओवाळु राया अवधुता ॥
॥ याहीच्या चरणी मस्तक । आरती ओवाळु उभे अवधुत ॥

॥ आरती भजने पाठे २७/१९ ॥

॥ कलयवगी आरती देवाची, कलयवगी आरती ।
रोग-विघ्ने/दाही-दोष भंगा जाती ॥ कलयवगी आरती..
॥ आरती ओवाळु पंचद्युता । तुमच्या चरणावर आमचा माथा ॥
॥ श्री कृष्णा अवधुता । अनामत राया तुमच्या चरणावर माथा ॥
॥ तुमच्या चरणी माथा ।
आरती ओवाळु कृष्ण महाराजा धनी अवधुता ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥




॥ खंड ०९ स्तंभित ॥



॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ चतुर्पता अथर्वन् वेद उभा राहीन पोटी । निजरूप भुम्मा जागी करन सारी सृष्टी ॥

# चतुर्पता
# ॥ अथर्वन् वेद ॥

## ॥ खंड १० : भाग ०१ ॥
## ॥ अरज ॥
## ॥ चतुर्पती च्या अर्जा ॥



**शब्दार्थ, चरणार्थ निरसन स्पष्टीकरन सह**






www.chaturpata-atharvan-ved.com

॥ खंड १०/अर्ज भाग ०१ ॥

॥ अरज नं. ०१ ॥

॥ मुळावरची अरज ॥

## ॥ अवधुताची संगत घडली ॥

॥ अवधुताची संगत घडली । धनी आला माझा ।
तुम्हा नामी जडलो प्रतिपाळ करा माझा ॥
॥ आपण होवुन आले घरा । मज/आम्हा धरलं हाती ।
दवंडीच्या परमाणं वाणी । सांगतली यवगाची/जगाशी ॥
॥ व्दापर यवुग गेल्या वरं । कल यवग आहे ।
कल यवगाच्या गोष्टी सांगता । सत् यवग पाहावे ॥
॥ मोहरं यवुग, योगी गोष्टी । सांगत आहे ।
भावीक प्राणी असनं लक्ष्य । चरणा वर लावे ॥०४॥
॥ आधी भाकलं, मो-हं होणार । यवगा च्या गोष्टी ।
तिर पतीचा भ्रम सोडा । भजा चतुर्पती ॥ ..जळगाव दांड
॥ चतुरपतीची/चतुराईची, पदवी देवाची । वाणी ऐका हो ।
सतृ कृत्याच्या गोष्टी चांगल्या । विचारानं पहा हो ॥
॥ आदी गणाच्या कृपा मुखी । अगन्च आहे ।
जोकोणी निंदा करन त्याच्या । कुडीला दोष आहयें ॥
॥ सिदाई च्या मुखी रे बापा । अगनच आहे ।
जोकोणी नामी राहीनं त्याचा । करन संभाळ ॥ ..जळगाव दांड
॥ चत्रभुज महाराज धनी देव । भजनातं आहयं ।
नामीच राहा गडे हो देव । करतो/करनं संभाळ ॥०७॥
भजने :-
॥ अवधुत अनामत । करा महाराजाचं सुमरन । बहु आहे सुखः ॥



॥ अरज नं. ०२ ॥

॥ जुनी अरज ॥

## ॥ अवधुत माझा..। सावंग्याचा राजा ॥

॥ अवधुत माझा..। देव सावंग्याचा राजा । आहो राजा ।
भजनी आला..। मनमोहनं मुरली वाला ॥
॥ भजनी आला..। तुम्ही नका करू गलबला । आहो गलबला ।
बसली जागा..। आम्हाला भजन करू लागा ॥
॥ वाजवा टाळी..। एकच उठवा नामधुनी । नाम धुनी ।
लावली ज्योत..। देव उभे भजनातं ॥
॥ ज्योतीनं ज्योत उजेड । भरन देहीतं ।
उजळन रूप । या सुर्या च्या तेजात ॥ ०४॥
किंवाः- जैसे रूप, हे सुर्याचे तेज ॥ जळगाव दांडातील टुक
भजने :-- ॥ निर्वाणा ची ज्योत । उभी राहली सोयंम् ।
या ज्योतीनं । मदत केली पुर्ण ॥
॥ आहो या ज्योतीचा । उजेड आहे मजला सदोनित ॥

-: शब्दार्थ :-

अरज = विणवनी अर्ज, विनंतीपुर्वक विणवणी अर्ज सादर करने, ।
परमाणं = ..प्रमाणे, ...च्या प्रमाणे । मोहरं येवुन = समोर येवुन, पुढं येवुन.
गलबला = गोगांटा । धुळी = नामाचा धुर, नामाची धुनी,

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ अर्ज भाग ०१ ॥
॥ अरज नं. ०३ ॥
॥ जुनी मुळ अरज ॥

# ॥ देहे जगवाची अरज ॥

॥ बहुत यवग, अरज करतो । देहे जगवाची ।
आता माझी, लज्जा राखा । नामी जडल्याची ॥
॥ नामी जडल्या, उपर नसावं । देहीला मरणं ।
तुमचे नाम, घेता चुकवा । चौ-यांशी यवनं ॥
॥ यवगा साठी, अवतार धरला । कृष्ण देवानं ।
चरंचारीया, यवगावर देव । करते तारणं ॥
॥ बाग लावुन, तयार केलं । आपल्या हातानं ।
अमृत टाकुन, सजिव केलं । उभं केलं काम ॥०४॥

भजनेः- ॥ स्वर्गि अमृत पाताळी अमृत मिर्त । मिर्त लोकी नाम ।
तुमच्या नामा विन अवघं । दिसतो हिनं ॥
॥ अमृताचा, सागर भरला । देवा तुम्हा पोटी ।
म्हणुन शरण, आलो मी देवा । अमृता साठी ॥

॥ जीवा या, शिवाची राया । प्रित दोघांची ।
साहयं करून, साचा सचवीला । या भक्ती साठी ॥
॥ करून भक्ती, नाम कंठी । सदोनित राहो ।
सदा विनवीतो, माझ्या मुखी । उभा राहों ॥
॥ हिरा हिरा तो, लाल हिरा । भक्ती परवेशी ।
तुमच्या नामाची, किर्त महीमा । जगात वाढवशी ॥
॥ तुमच्याच आंगचा, जीव हा राया । तुमचाच सवंगडी ।
तुमच्या संगतीनं, तरला राहो । बहु यवगा वरी ॥

भजने :-
॥ अरज देहे जगवाची । इच्छा पुरवा देवा बाळाच्या मनाची ॥
॥ अरज देहे ताराची । लज्जा राखा देवा नामी जडल्याची ॥
॥ अर्ज करतो मनात । पावन व्हावे महाराजा जनात ॥
॥ अर्ज करतो महाराजाले । आनंदानं नादंव बापा या देहजीवाले ॥
॥ अर्ज करतो पामरं । देहे जीव देवा करा अंबर ॥
॥ करा या अर्जिचा मान । कृष्णराया लवकर येणं, देवा देहा तारनं ॥
॥ करा या अर्जिचा मान । अवधुतराया लवकर येणं, देही करा अंबरं ॥
॥ उभी रहयं चांगोणा माता । जन्मोजन्मीचे दुःख मिटवजो आता ॥

गजर :-
॥ निराकार निरंजना । अनामत अवधुता । एवढी अरज आहे आता...
देह-जीव नांदव, सुखी तुमच्या । चरणी आमचा माथा ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ अर्ज भाग ०१ ॥
॥ अरज नं. ०४ ॥
॥ मुळावरची अरज ॥

## ॥ कृष्ण राया धराव छाया ॥

॥ कृष्ण राया, धराव छाया । बाळा च्या वर । भक्तां च्या वर ।
देहे तारून उभे राहीले । पुर्ण अवतार ॥ घृ ॥०१॥
किंवा :- बहुत यवग देहे तारा । या भुम्मेवर ॥ घृ ॥
॥ नित्य सुमरना, तुही प्रार्थना । चित्त/मन लावुन करतो
कर मजवर, दया । तुमच्या, सुमरणी राहो ॥
॥ करतो विनंती, उभे श्रीपती । धर मजवर छाया ।
सदा विनवितो, मुखीं उभा । राहयं राम राया ॥
॥ विठ्ठल दयाळा, माझा संभाळ । आहे तुम्हा हाती ।
धरले तुमचे, पाय । नाही, सोडत जगजेठी ॥
॥ रूपी सावळा, अंगी कळा । हा भारी आहे ।
धनी/धन्य कारागीर, याहीची माव । कोणा ना कळे ॥
॥ अंगी कार, भक्तीला आधार । श्री, कृष्णाचा आहयं ।
हाच करन, प्रतिपाळ । सा-या, जगाला साहयं ॥०६॥

॥ तुमचा धावा, करतो देवा । आपल्या अंतरी ।
कर मजवर, दया । माझं, संकट निर्वाळी ॥
॥ तुम्ही तारलं, कृपा केली । माझे जग जीवना ।
चत्रभुज-रुक्मिणा, तुम्ही व्हा । माझे मन मोहना ॥
॥ उभे/तुम्ही श्रीहरी, मजला तारी । तु ब्रम्ह चारी ।
निशं:कलंकी, अवतार ज्योत । ओळखा हो भारी/न्यारी ॥
॥ आकाशमात, अवधुत हंकार । सावंग्याशी आला, साहयाशी आला ।
तुमचे नाम, सुमरन करता । शिणभाग हर्ला ॥
॥ अनंत माव, तुमची कळेना । ब्रम्हादिकाला हो, इंद्रदिकाला ।
कळ सुत्रावर, कळा धरूनदेव/धनीदेव । तारण अनेकाला/अवघ्याला..

भजने :- ।। हरी हरी बाबा, कृष्ण भजले । निर्गुण, नामी तरले ।
तु तार बा आम्हाले ।।
।। निर्गुण अवतार बहुता गुण । भक्तीचं वाढंवलं निशाण ।
शकुनी कळतीनं लक्षणं ।।
।। हरीहरी कृष्णा ! तु जगाच्या जीवना । तु जगाच्या जिवना
भक्तीला लावले त्वां बा अवघे जना ।।
।। हरीहरी कृष्णा ! तु जगाचं जीवन । तु जगाचं जिवन
ही पाण्याची नर देही । तार येवुन ।।
।। हरीहरी कृष्णा ! तुला बहु यवग विनवी । तुला बहुयवग विनवी
हा देहे-जीव नांदव एका ठायी ।।
।। हरीहरी कृष्णा ! तुझी संगत घडली बरी । तुही संगत घडली बरी
या कलयवगामध्ये भक्त । तारा श्रीहरी ।
माझा हो माथा तुमच्या चरणा वरी ।।

-: चरणांचा कम लक्षात ठेवण्यासाठी टिप :-

हे [1]कृष्ण राया । तुमच्या [2]नित्य सुमरना राहुन [3]करतो विनंती, [4]विठ्ठला दयाळा [5]रूप सावळ्या की : तुम्ही आता [6]अंगी कार करून या जगास साहय करत राहा.

[7]तुमचा धावा करतो कारण की : प्रथम [8]तुम्हीच तारले, [9]श्रीहरी । तुम्हीच [10]अकाशमात मध्ये उभा राहुन [11]अनंत माव करून आम्हास साहय करत आहेस.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ अर्ज भाग ०१ ॥
## ॥ अरज नं. ०५ ॥
॥ म्हणनी नं. ०१:- सखा-भावाने म्हटलेली जुनी अरज ॥
## ॥ सारंगधर आम्हावर । बहु दया कर ॥

॥ सारंगधर आम्हावर । बहु दया कर ।
तुया नामी जडलो । देवा , बहु यवग तार ॥ घृ ॥
॥ तुच देही, तुम्ही बाहेरी । तु तीन ताळी ।
तुमच्या बिना पृथ्वीवर । दुसरा कोणी नाही ॥
॥ तुच रोग तुच विघ्नं । तुम्ही आहा देव ।
तुमच्या बिना चवताळी । हा नाही खेळ ॥
॥ तुच पाणी तुच पवन । तु जीवन स्थळी/कळी ।
यवगा परी अवतार धरला । तारली देही ॥०४॥
॥ तुच अन्न तुच अग्न । तुया आंगची शक्ती ।
तुम्ही धरला रंग दयाळा । कळेना कोणाशी ॥
॥ सर्व्या घटी तु भरला । जग व्यापक झाला ।
कळसुत्र कळा धरून । उभा राहीला ॥०६॥
॥ यवगा परी पर राया । केलीसे सारी ।
निशं:कलंकी अवतार ज्योत । ओळखावं भारी/न्यारी ॥०७॥



॥ अरज नं. ०५/०१ ॥
॥ म्हणनी नं. ०२:- पिता-भावाने म्हटलेली जुनी अरज ॥
## ॥ सारंगधर आम्हावर । बहु दया कर ॥

॥ सारंगधर, आम्हावर । बहु दया कर ।
तुम्हा नामी, जडलो । आम्हा, बहु यवग तार ॥घृ॥
॥ सर्व्या घटी, तु भरला । जगव्यापक झाला ।
तुमची कळसुत्र कळा । कळेना कोणाला ॥
॥ तुम्ही या देहीत, तुम्ही बाहेर । तुम्ही तीन ताळी ।
तुमच्या बिना, चव ताळी । दुसरा कोणी नाही ॥
॥ तुम्हीच आई, तुम्हीच बुवा । तुम्हा आंगी शक्ती ।
मालक माझा, उभा राहीला हा । पृथ्वीचा पती ॥०४॥
॥ तुम्हीच रोग, तुम्हीच विघ्नं । तुम्ही उभे देव ।
तिन ताळी, आहे देवा । तुमचाच खेळ ॥
॥ तुम्हीच पाणी, तुम्हीच पवन । तुम्ही जीवन स्थळी/कळी ।
यवगा वरती, उभा राहीला । धरली/तारली देही ॥
॥ तुम्हाच अन्न, तुम्हीच अग्न । तुया आंगी शक्ती ।
तुम्ही धरला, रंग हो राया । कळेना कोणाशी ॥
॥ यवगा परी, पर राया । केलीसे सारी ।
निशं:कलंकी, अवतार ज्योत । ओळखावं भारी/न्यारी ॥०७॥

**भजने :-**

॥ सारंगधरा त्वा धरला रंग । चत्रभुज उभे आहे आपल्या आंग
॥ सारंगधरा धरला रंग । चत्रभुज उभे गोपाळ संग ॥
॥ देव रंगी रंगला । सर्व घटी देव भरून उरला ॥
॥ नाही घडली सेवा तुयी । अंतर पडले हो मजकुणी/मजपासूनी ॥
॥ माझे अंतर मिटवा । यवगा यवगी मजला संग वागवा ॥ अंतर :- दुरी
॥ माझे अंतर रंगवा । यवगा यवगी मजला संग वागवा ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ अर्ज भाग ०१ ॥
॥ अरज नं. ०६ ॥

# ॥ कृष्ण सावळा हरी जिव्हाळा ॥

॥ मुळावरची ओवी अरज ॥

ओवी महात्म :- चतुर्पतीच्या गुप्त ओव्यांपैकी 150 चरणांची ही ओवी अकाशमात मधील चतुर्पतीच्या आध्यात्मीक विश्वाकडुन काही जाणत्यांना उदा. ईश्वर पुनाजी, विठोबा धनसींग, कोणजाणे.. ईत्यादी ना प्राप्त झाली होती. या 150 चरणांपैकी 75 चरणेच श्रावण महाराज पहुर हे प्राप्त करून घेण्यास समर्थ झाले. परंतु सर्वसामान्य मानव हे 75 चरणे सुध्दा त्यांच्या जवळुन घेण्यास सक्षम न ठरल्यामुळे काही काही चरणेंच काही काही मानवांच्या हाती लागलीत. व बाकी चरणे पुनश्चः गुप्त झालेत. जे काही चरणे सर्वसामान्य मानवांच्या हाती लागलीत, ते चरणे आपल्या स्वभावानुसार गुप्त/गायप होवु नये. म्हणुन त्या चरणांला चतुर्पतीच्या ज्ञानीजनांनी सरळ सरळ अरज चा दर्जा देवुन, हे हाती लागलेले चरणे अरज म्हणुन गाउ लागलेत. अश्या रितीने ही अरज-ओवी ज्याच्या जवळ जितके चरणे राहीलेत, तितके चरणे अरज म्हणुन गाउ लागल्याने, ते सर्वसामान्य मानवांच्या हातात थोडेबहुत राहीलेत. हे 150 चरणे पैकी 9 ते 18.... चरणे पर्यंत हाती राहलेत. म्हणुनच म्हणनीनुसार या अर्ज-ओवीचे चरणे प्रतेक दांडात कमी-जास्त आहेत. काही भागात हे चरणे अजुनही ओवी म्हणुन गायन करतात, तर काही भागात या चरणांला अरजीचा दर्जा देवुन अरज म्हणुन गातात. विनवतात. तुमच्या मांडीत या ओवीच्या चरणांला जो दर्जा दिला असेल, त्याप्रमाणे गायन करावे. परंतु इतर ठिकाणच्या भागात या ओवीला कोणता दर्जा दिला आहे हे जाणुनच गायन करावे. एवढीच विनंती.

॥ मुळावरच्या ओवी चे काही चरणे ॥

॥ कृष्ण सावळा, हरी जिव्हाळा । नित करतो भजन ।
हंकार वाणी, महाराजाचं । नित, करावं सुमरनं ॥घृ॥ ०१ ॥
॥ जल सागरी, शकुन वाणी । आकार तेथुनं ।
निर्गुणांच, मडयान ताळ । स्थापले तिनं ॥
॥ जल सागरी, शकुन वाणी । याहीच्या पासुनं ।
याहीच्या पासुन, ईश्वरी रूपं । धरले देवानं ॥
॥ देही देवता, माया चैत्यन्या । उभ्या नउ जनी ।
उभ्या नउ जनी त्याही । रायाच्या सुमरनी ॥०४॥

॥ ब्रम्हा विष्णु, शंकर झाले । माया पासुन ।
त्याहीला रायाचं देणं । तेही करते/करतीनं सुमरन ॥
॥ तिरकुट खाणं, दोहीता/व्दैता समान । शंकराचं देणं ।
त्याहीला झाले, बेईमान । तेही करते/करतीनं सुमरन ॥
॥ शेष शयनी, क्षीर सागरी । लक्ष्मी-नारायणं ।
लक्ष्मी नारायण याहीनं । धरलं जप ध्यानं ॥
॥ शेष सैन्यी क्षिरसागरी ऋषिकेशी । करते/करतीनं सुमरनं ।
त्याहीला रायाचं देणं । याहीनं धरलं जपध्यानं ॥०८॥
॥ शेष सैन्यी, क्षीर सागरी, सहस्त्र मुखं । करते/करतीनं सुमरनं ।
विष्णु व्दारपाल दोघे फिरत । करते/करतीनं सुमरनं ॥
॥ शेष सुमरनी, ऐका गाही । सहस्त्र मुखं, करते/करतीनं सुमरनं ।
करते/करतीनं सुमरन, जळी-स्थळी । अवघे जनं ॥
॥ जळी-स्थळी, ऋषिकेशी । करते/करतीनं सुमरनं ।
करते/करतीनं सुमरन, जपी-तपी । अवघे जनं ॥११॥
॥ राम धनी, बहु आहे गुणी । तो आहे मनी ।
तो आहे, मनी । तोही रायाच्या, सुमरनी/अलक्ष ध्यानी ॥१२॥
॥ अष्ट गण, अष्ट भैरव । करते जयजय कार, करते येथे कार ।
करते/करतीनं थयथयकार याहीला । नामाचा आधारं ॥

॥ तिन खाणी, माया ध्यानी । भक्ती च्या कामी ।
भक्तीच्या कामी त्याही । रायाच्या सुमरनी ॥
॥ चौथी खाण, महाराज गुणं । अस्सल हा वाणं ।
अस्सल हा वाणं । करे रायाचं जाहीरणं/जाहरण ॥१५॥

भजने :- ॥ हरी हरी ! बाबा कृष्ण भजले । निर्गुण, नामी तरले ।
तु तार बा आम्हाले ॥
॥ हरी हरी कृष्णा । तुझी संगत घडली बरी ।
या कलयवगा मध्ये, भक्त तार । श्री हरी / बहुपरी ॥

**शब्दार्थ** :- **जलसागर** :- जलाचर, जलस्थळ याचे अधीक ग्यान आदीपुरूष आदीगण खंड०१/०१/०१ च्या चौदा जुग जलाचर या टुकीच्या निरसनातुन घेणे । **शेष** :- ज्याने डोक्यावर पृथ्वा घेतली आहे तो नारायणाच्या संगचा शेषनाग, या शेषाच्या शयनावर महाविष्णु पहुडलेला असतो. शेषावतार बलराम, अथवा भरून भरला आणीक उरलेला, शिल्लक, बाकी असलेला । **शयनी** :- शेषाची बिछायत टाकुन पहुडलेला । **देहीदेवता नउ जनी** :- *०१. ब्रम्हा ०२. विष्णु ०३. शंकर, ०४. चौथा आदीमुनी अवतार, ०५. माया-चैतन्या देवता, ०६. परमहंसदेवता, ०७. आकाशऋषि ०८. शक्तीदेवता ०९. हंसऋषि जीवदेवता* अश्या या देहीत वसलेल्या मुख्य नउ देवताशक्तीयॉं. अधिक ग्यान मुळस्तभिचा पाया खंड०३/०१ या ओवीचे निरसनातुन घ्यावे । **अस्सल** :- १००प्रतिशत खरा, खणखणीत



॥ अरज नं. ०७ ॥

॥ जुनी अरज ॥

## ॥ सावंगपुरी देव श्रीहरी ॥

॥ सावंग पुरी, देव श्रीहरी । हरी, आकाश मात । उभा राहीला ।
सदा विनवितो, सिदाई वाचा । दयाहो आम्हाला ॥घृ॥०१॥
॥ सिदाई वाचा, दे अवधुता । करतो सुमरन ।
करतो सुमरन । पुढं, यवगाचे कारणं ॥
॥ कल यवगात, झाली मात, कृष्ण नाथ । वचनी गोयला । धनी..
कर्तार धनीदेव महाराज । उभा राहीला ॥
॥ उभा धनी, चक पाणी । या भुम्मे वरी ।
या भुम्मेवरी । देव, भक्तांचा कैवारी ॥०४॥
॥ उभे श्रीहरी, आम्हा/मजला तारी । तो ब्रम्हचारी ।
तो ब्रम्हचारी । माझं, संकट निवारी ॥०६॥
॥ अकाश मात, उभी ज्योत, अवतार सावंग्यात । साहयांशी आला.
मानवाचा वेल, विस्तार वाढु लागला ॥

भजने :-
॥ सावंगपुरी नाम खडका । सिध्दाच्या मुखी आहे अग्नीचा भडका ॥
॥ सावंगपुरी नाम खडका । ऋषिकेशी आले । याहीची वाणी ऐका ॥
॥ अवतार उभे सावंगपुरी । हेच होय या देवाची नगरी ॥
॥ अवतार उभे सावंगपुरी । डंका वाजवते या भुम्मेवरी ॥

**शब्दार्थ** :- **सिदाई वाचा** :- या पृथ्वीवरी 'जेजे बोलान तेते होईन' अशी वाचा, सच्चा भक्ताच्या बोलावर धनी उभा राहुन, तो धनी सच्चा भक्ताचा बोल खरा करेल, सच्चा भक्त बोलल्याप्रमाणे कार्य करन । **मात** :- यवगाची घटना घडने. घटनेवर घटना घडणे.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ अर्ज भाग ०१ ॥
॥ अरज नं. ०८ ॥
॥ मुळ जुनी अरज ॥

## ॥ हरी भजो नित भजो ॥

॥ परमय सुखः तु, पाहयं रे प्राण्या । हरी भजो नित भजो ॥ घृ ॥
॥ हात जोडुनी करतो प्रार्थना । नित रहाव भजनी/सुमरनी ।
बहु दिवसाची भेट आता । देतो विठोबा धनी हो प्राण्या ॥
हरी भजो नित भजो । परमय सुखः तु पाहयं..॥घृ॥
॥ धनी अवतार करावं कार । दया भक्तीच्या वर ।
अनंत माव याहीची कळेना । उभा राहीला दिवस हो प्राण्या ॥
॥ अकाशमात उभीआहे ज्योत । केली/होईन भुम्मेवर मात ।
साहयं कराया आले अवधुत । आपल्या बाळाचं हो प्राण्या ॥
॥ अवधुत राया करावं दया । तुझ्या कृपेची छाया ।
बहुत यवग तार हरी । भक्ती चा कनवाळु ॥०४॥ हो प्राण्या
भजने :- ॥ परमय सुखः । सुखः दयाहो स्वामीराजा/महाराजा ।
आम्ही तुम्हाला विनवितो । चत्रभुजा ॥
॥ परमय सुखः । सुखः दयाहो स्वामीराजा, सुखः दयाहो महाराजा ।
आम्ही तुम्हाला विनवितो । दया सागरा ॥



॥ अरज नं. ०९ ॥
॥ मुळ जुनी अरज-सावगा पाठा ॥

## ॥ किसनजी पदर पसरतो तुम्हा ॥

॥ किसनजी पदर पसरतो तुम्हा । माझी अरज येवु दया मना ।
माझी अरज येवु दया मना । माझी अरज येवु दया मना ॥
॥ माझी अरज येवु दया मना । विनवितो रांत्र-दिना ।
विनवितो रांत्रं-दिना । लवकर याहो जगजीवना ॥
॥ लवकर याहो जगजीवना । माझ्या मनाच्या मोहना ।
माझ्या मनाच्या मोहना । भेट दयाहो भक्तजना ॥
॥ भेट दयाहो भक्तजना । माय उभी माझी चांगुणा ।
माय उभी माझी चांगुणा । तुमचा बालक आहे तान्हा ॥०४॥
॥ तुमचा बालक आहे तान्हा । पाजा अमृताचा पान्हा ।
पाजा अमृताचा पान्हा । चत्रभुज नारायणा ॥
॥ चत्रभुज नारायणा । सांग अंतरच्या खुणा । येवु दया कारुणा ।
येवु दयाहो माझी कारुणा । माझा माथा तुझ्या चरणा ॥
भजने :- ॥ अर्ज करतो मनमोहना । बाप विठोबा, माय माझी रुक्मिणा ॥
॥ अर्ज करतो मायबापा । वेळोवेळा तुमच्या चरणा वर माथा ॥

**म्हणनी नं ०२ ची अर्ज :-** ।। किसनजी पदर पसरतो तुम्हा । माझी अरज येवु दया मना । तुम्हा विनवीतो रात्रं–दिना । भेट दयाहो भक्तजना । लवकर याहो जगजीवना । माझ्या मनाच्या मोहना । फोड या पाषाणाला पान्हा । नाव तुमचे नारायणा । येवु दया माझी कारुणा । माय माझी रुक्मिणा । तुझा बालक आहे तान्हा । पाज अमृताचा पान्हा । सांग अंतरीच्या खुणा । तुला विनवितो रात्रं–दिना ।।

**शब्दार्थ :-** परमय :- दरवळ, नित येणारा सुगंध । परमय सुख :- नामाव्दारे नित येणा-या दरवळीचे सुखः, उठता बसता देहधर्म करता अंतरी नित नामधुनी उठत राहुन सुखाची दरवळ नित घेणे. **उदाहरणार्थ** :- *या परमय सुखाचा गडी संत तुकाराम होवुन गेले. ते मलमुत्र त्याग ईत्यादी देहधर्म उरकत असतांनासुध्दा त्यांच्या अंतरी नित प्रज्वलीत असलेली नामधुनी मुखात उठुन ते नाम घेत हरीनामाव्दारे परमय सुख हे देहधर्म करतांना सुध्दा प्राप्त करत होते.*

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ अर्ज भाग ०१ ॥
॥ अरज नं. १० ॥
॥ जुनी अरज ॥

## ॥ कलयवगी देव विठोबा । सांगतो गाही ॥

॥ कल यवगी देव विठोबा । सांगतो गाही ।
देहे या जीवाची अरज । ऐका हो माही ॥
॥ देहे जीवाची अरज करतो । तुमच्या व्दारातं ।
होता पुर्विचा लेश माझा । तुम्ही धरला हातं ॥
॥ बहु दिवसाची अरज आहे । हात जोडुन ।
संकट समयी धावुन आला । माझा, भाव पाहुन ॥
॥ वेडया या पामराची अर्ज । माझी ऐका हो ।
उभा राहयं माय-बापा । चालवं, बिर्दाचं नावं ॥०४॥
॥ कल यवगाच्या ठाई अरज । या दासानं केली ।
रूपावंती माय माझ्या । सुमरनी आली ॥
॥ धावुन आली कष्टी झाली । चांगुणा माता ।
जन्मो जन्मीचे दुःख ईनं । मिटवले आता ॥ ०६ ॥
भजने :-॥ उभी राहयं चांगोणा मायं । आपल्या बाळाचा करावं संभाळ ॥
॥ उभी राहयं चांगोणा माता । जन्मोजन्मीचे दुःख, मिटवजो आता ॥



॥ खंड १०:- अर्ज भाग ०१ ॥
॥ अरज ओवी नं. ११/०१ ॥
॥ सावंगा दांडची प्रचलीत ओवी, कारला दांड ची अरज ॥

## ॥ हात जोडुन करतो प्रार्थना...कैवल्यनाथा ॥

॥ हात जोडुनी करतो प्रार्थना । देवा अवधुता ।
धाव पाव लवलाही भेट दया । कैवल्य नाथा/दाता ॥घृ॥
॥ तिन यवग गेले सुन्यात । नाही झाले दर्शनं ।
कृष्ण राज महाराज उभे । राहा हो येवुनं ॥
॥ अल्लाद वस्तु थोर देवाचा । पाय नाही धरणीला ।
कृष्ण राज महाराज येवुन । भेट दयाहो आम्हाला ॥
॥ भक्तांन ओळखावं आपला । शकुन अवतार ।
चतुर्पतीचा कार आपल्या । मनीचं ओळखाव/समजावं ॥०४॥
॥ समजा आपल्या मनीच ओळखा । चतुर्पती ग्यानं/नाम ।
काय पाहता ? देहीत निराळं, निघालं नामं ॥
॥ भैसा खुम्मी अगाध वाणी । ज्योत प्रकाशन या देही ।
एकच होईन आरोही । जागी, करन चौताळी ॥
॥ तिर भवनी होईन आरोही । मानु नोव्हे भेवं ।
चतुर्पतीचा कार दावन । डोळया समोर ॥
॥ खरा कार यवगाचा विडा । मांडला सभेत ।
तेरवी भरल्यावर पुढे । बहु होईन हित ॥०८॥
॥ खरं करनं देवाला । देव, उभा राहीन ।
उभा राहीन तो धिर काय । धरावं जन ॥०९॥
भजने :- ॥ धिर नाही कोणाच्या मना । जागी करून तु दावंना ॥
॥ धिर नाही कोणाच्या मना । जागी करा हो सारी सेना ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ ओवी/अरज नं. ११/०२ ॥

॥ सावंगा-जळगाव दांडची मुळावरची विनवनी ची अरजओवी ॥

## ॥ हात जोड्नी करतो विनंती, कैवल्यदासा ॥

**ओवी महात्मः-** ही अनुभवसंपन्न मुळावरची विनवणी अरज काढण्याकरीता, अर्ज सफल होण्याकरीता...ईत्यादी बहुकारणासाठी जाणत्यांकडुन हमखास म्हणण्यात येत असल्यामुळे, या ओवीचा दुरोपयोग होण्याचा संभव राहु शकतो. त्याचमुळे जाणत्यांनी ही ओवी होती नव्हती कोणाच्याही हाती पुर्ण न देता, या ओवीच्या काही काही टुका घेवुन त्या टुकांव्दारे अर्ज करून त्या टुका प्रचलीत करू लागलेत. त्या टुकांची अरज-१०/०१/११/०१ काल्या दांडात म्हटल्या जाते.

जळगाव वरचरणेः- ॥ कर जोड्नी करतो प्रार्थना । धनी अनामता ।
बदनामी च्या जवळे नको । राहु गुणीवंता ॥
॥ जीव पाण्याचा बुडबुडा । संसार शेनाचा सडा ।
देह गा तारण, तोही एक । अवतार खरा ॥
॥ जीव पाण्याचा बुडबुडा । तोही एक क्षणाचा गोळा ।
देह गा तारण, तोही एक । अनामत/अवधुत जाणा ॥
॥ जन्मो जन्मीच्या धारा आहे । भक्तां ची तळमळ ।
भक्तां ची तळमळ अवतारा । संग येणं ॥

-: सावंगा-जळगाव दांडचे मुळावरची ओवी चरणे :-

॥ हात जोड्नी करतो विनंती । देवा अवधुता ।
धाव पाव, लवलावी भेट दे । कैवल्य दासा/दाता ॥
॥ तिन यवगं भ्रांत पडली । नाही दिसले डोळयानं ।
भैस राज महाराजा उभे । राहो येवुन ॥ राहोः-राहु आत्मे, रहावे
॥ तिन यवगं गेले शुन्यात । नाही झाले दर्शनं ।
कृष्ण राज महाराजा दाखव । आपले चरणं/पायं ॥
॥ अल्लाद आहे याहीचे पाय । नाही लागत/लागले धरणीला ।
बहुत यवगं पाहयतों वाट । कधी यालं भेटीला ॥
डहाकी :- ॥ भेटी आंगचे सिध्द उभे । करा आम्हा/माहया संगतीला ।
सदा विनविते नित साहयं । करावं आम्हाला/मजला ॥०५॥
॥ सत्य शकुन दवंडी देतो । धन्या ची वाणी ।
चतुर्पतीचा कार ओळखा/समजा । आपल्या मनी ॥ ०६ ॥
॥ ओळखा हो भक्तानं आपला । शकुन अवतार ।
काय पाहता ? देहींचं निराळं । निघालं नामं ॥
॥ समजा आपल्या मनी । ऐका, चतुर्पती नाम ।
चतुर पतीचा कार दाखवनं । दृष्टी समोरं ॥
॥ चौथ्या खुम्मी चतुर्पती । ज्योत प्रकाशनं देही ।
एकच होईन आरोही । जागी, करन चौताळी ॥
॥ एकच देईन गाही याचं । मानु नका भेव ।
चतुर्पतीचा कार दावनं । डोळया समोर ॥ १० ॥
॥ खरा कार, यवगाचा विडा । मांडला सभेतं ।
तेरवी सिध्दी भरल्या वर । होईन गणीतं ॥ ११ ॥
॥ कार करा, यवगाचा विडा । मांडला सभेत ।
चौदवी भरल्या वर पुढं । पाहयं बहु हित । बहु होईन हित ।
॥ खरा कार, यवगाचा देव । उभा राहीनं ।
देव उभा राहीन । धिर, धरा हो जनं ॥ १३ ॥

**भजने :- ॥ धिर नाही कोणाच्या मना । बाहेर काढा हो काढा सारी सैना ॥**

आरोही :- कलयवगी पडीत चतुर्पती गाय उभी होवुन तिच्या प्रकाशनाव्दारे तिनयवगाची तिरगुणांची गादी उकलल्या गेली असल्यामुळे तिर गुणीचां एकच ओरड करत केलेला गलवला.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ अर्ज भाग ०१ ॥
॥ अरज नं. १२ ॥
॥ जुनी अरज ॥

## ॥ हात जोडुन करतो प्रार्थना...मिटवावं चिंता ॥

॥ हात जोडुनी करतो प्रार्थना । देवा अवधुता ।
तुया नामी, जडलो माझी । मिटवावं चिंता ॥ घृ ॥
॥ बहु दिवसाची, अर्ज करतो । देवा अनंता ।
तुया परता, जगात माझ । कोण आहे आता ? ॥
॥ भक्ता साठी, झाला कष्टी । कृष्ण अवधुत ।
धावुन आला, पाहुन या । बाळाचा आकांत ॥
॥ धाव पाव, चालव नाव । आपल्या बिर्दाचं ।
मुखी माझेया नाम राहये । आदी भैसाचं ॥
॥ आदी भैसाचा, सत्य शकुन । सांगतो गाही ।
आपल्या बाळावर सदा राहो । तुमची प्रिती ॥

॥ तुच कर्ता, तु करविता । तु बुध्दिचा दाता ।
तुया कृपेने/बळानं तुझेच गुणं । गावले आता ॥
भजने :-
॥ धिर नाही कोणाच्या मना । जागी करून तु दावंना ॥
॥ धिर नाही कोणाच्या मना । जागी करा हो सारी सेना ॥



॥ अर्ज भाग ०१ ॥
॥ अरज नं. १३ ॥
॥ कृष्णपुरीची अरज ॥

## ॥ बहु दिवसाची अर्ज करतो । देवा अवधुता ॥

॥ बहु दिवसाची अर्ज करतो । देवा अवधुता ।
तुया नामी, जडलो माझी । मिटवावं चिंता ॥ घृ ॥
॥ संकट समयी, अर्ज तुही । करतो समर्था । करतो नेणंता ।
तुमच्या नामी जडलो जगात । कोण माझ आता ? ॥

॥ भक्ता साठी, झाला कष्टी । कृष्ण अवधुत ।
धावुन आला, पाहुन या । बाळाचा आकांत ॥
॥ तुच गाही तुच देही । तु आमचा नेता ।
कृष्णपुरी बिरद केलं । त्वां आपल्या हाता ॥
॥ धाव पाव, चालव नाव । तु याही बिर्दाचं ।
हद्‌यी/मुखी राहो नाम माझेया । आदी भैसाचं ॥
॥ आदी भैसाचा, सत्य शकुन । सांगतो गाही ।
आपल्या बळानं बोलत नाही । ही कृपा तुही ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ अर्ज भाग ०१ ॥
॥ अरज नं. १४ ॥
अर्ज महात्मः- पोळयाच्या व गायगोधन पुंजनाच्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी
॥ जुनी अरज ॥

# ॥ गायी या गो-हाची अरज ॥

**वरभजने** :- ॥ एवढी अरज..। या कर्ता-याच्या पायी । आहो पायी ।
हाती काठी..। सावळा राखे गायी ॥
॥ ऐसा आहे..। म्हणे शंकराचा वर ।
धनी कारागीर..। नाक टोचले तिर ॥

॥ गायी-गो-हाची..। ही अरज ऐक माझी ।
खांदा दुखतें.., । सांगु कोणा पाशी ॥
॥ माझी कुडं..। दिली कुणब्याच्या हाती ।
मारु मारुं..। केली जीवाची माती ॥
॥ मारून ठोकुन..। मला लावलंसे तासी ।
कदर नाहीं..। आली या कुणब्याशी ॥
॥ कुणब्या सारखा..। दाता नाही कोणी ।
मेल्या बिगरं..। सोडुन देणार नाही हो ॥ ०४ ॥
॥ कुणापाशी सांगु..। देवा दुःखाचा डोंगर ।
मारु मारुं..। हाड केले चुरं ॥
॥ माझ्याच्यानं होईन..। तोवर मी चालनं ।
खांदया वरचं..। ज्यु देईन टाकुनं ॥
॥ मारतो हाका..। तुझा धनी आहे कोण ।
येईन धनीं..। तो तारण हे जिवन ॥
॥ गाईच्या पोटी..। जन्म घेतला खरा ।
एवढी पृथ्वा । त्वा वाहु केली नरा ॥ ०८ ॥

**भजने** :- ॥ पृथ्वी तुमच्या अध्यानं । याहो महाराजा । तारा, हे जिवन ॥
॥ पृथ्वी तुमच्या अध्यानं । याहो महाराजा, करा यवगाचे काम ॥



॥ अर्ज भाग ०१ ॥
॥ अरज नं. १५ ॥
अरज महात्मः-ः संकटसमयाच्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी..
॥ जुनी अरज ॥

# ॥ संकट समयां । प्रार्थना करतो तुही ॥

॥ संकट समया । प्रार्थना करतो तुही ।
आम्हा कोणी नाही । तुम्हा बिना ॥
॥ संकट समया । धाव कृष्ण राया ।
मिठी घातली पाया । या बाळानं ॥
॥ तुया पाया बिना । दुजा नाही ठाव ।
घेतो तुमचे नाव । महाराजा/मायबापा ॥
॥ तुया पाया साठी । झालो अपदेशी ।
केव्हा भेट देशीनं । महाराजा/मायबापा ॥
॥ तुया भेटी साठी । हिंडलो रानवन ।
यवग झाले तिनं । महाराजा/मायबापा ॥
॥ अन्जान बाळाचा । अंत का पाहशी ? । कारूणा न येई कैशी ।
महाराजा/मायबापा । कारूणा येउ दया माझी, मायबापा/महाराजा ॥

**भजने** :- ॥ अर्ज करतो तातडी । उभा राहय महाराजा येवुनी ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ अर्ज भाग ०१ ॥
॥ अरज नं. १६ ॥
॥ मुळावरचे अरज भजने ॥
महात्म :- चौघडया नंतर हमखास म्हणण्यात येणारी मुळावरचे अर्ज/भजने..

## ॥ चौघडानंतरची भजनांची अर्ज ॥

॥ राख या, अर्जिची लज्जा । अर्जकरतो/बिरदसंभाळ, देवा कृष्ण राजा ॥
॥ राख या, अर्जि चा मानं । गोपाळ उभे, दोन्ही हात जोडुनं ॥

॥ दोन्ही हात जोडुन । अर्ज करतो, या महाराजाले ॥
॥ चांगल्या आनंदानं । नांदव बापा, या देह-जीवाले ॥

॥ आहो देहे जीव । देह-जीव देवा, तुमचा होय ॥
॥ आहो तुमच्या परता । तुमच्या परता याला, कोणी नाही ॥

॥ तुमच्या आंगचा जीव होय । तुमच्या हात देवा, बनली देही ॥
॥ देह-जीव बनवला खासा । यावर वर्षाव नाही चालत कोणाचा ॥

॥ देह जीव बनवला मजबुत । या देवळात नांदते, देवाची ज्योत ॥
॥ आहो या ज्योतीचा । उजेड आहे मजला, सदोनित ॥

भजने :-
॥ अर्ज करतो पामर । उभा आहो तुमच्या सम्मोर ॥
॥ उभा आहो तुमच्या सम्मोर । एवढे अन्याय माफ कर ॥
॥ अन्याय कोटयानं कोटी । देवा तुम्ही घालाना पोटी ॥
॥ माझेया अपराधाच्या राशी । भेदुन गेल्या गगणाशी ॥

॥ दोन्ही जोडुनी कर । उभे आहे पुर्ण अवतार ॥
॥ अवतार उभे लवलावी । देवाच्या चरणावर डोही ॥
॥ उभा आहे माझा सखा । आता नाही देहीला धोका ॥
॥ उभा आहे म्प्रझा देव । आता नाही कोणाचे भेव ॥
॥ उभा आहे माझा हरी । हरी/तुया बिना मजला कोण तारी ॥
॥ उभा आहे माझा राम । राम करे यवगाचे काम ॥

॥ दोन्ही जोडुन धन्याला हात । उभा आहे कृष्ण अवधुत ॥
॥ दोन्ही जोडुन हस्तक । देवाच्या चरणी मस्तक ॥

गजर :-
॥ माझ मस्तक तुया चरणी । संकष्टी धाव चक्रपाणी ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ अर्ज भाग ०१ ॥
॥ अरज नं. १७ ॥
॥ कृष्णपुरीची अरज ॥

## ॥ कृष्णपुरी महीमा भारी ॥

॥ कृष्ण पुरी महीमा भारी । कनवाळु आला, दयाळु आला ।
दयाळु आला, भाव भक्तीचा जिव्हाळा ॥ घृ ॥
॥ रूपी सावळा अंगी काळा । रंग धरून आला, देह धरून आला ।
देह धरून आला । नवल तो सांगे जगाला ॥
॥ नवल गाही धरली देही । आदी पुरूषानं ।
मिर्त लोकी उभा नामी । तारण जीवन ॥
॥ तारा साठी, अवतार येथी । धरला देवानं, पाहवं डोळ्यानं ।
या रायाच्या ओळखा खुणा । या स्थुल देहीत ॥
॥ ओळखा खुणा अवतार पुन्हा । धरला देवानं ।
या देहीचे मरण चुकतीन । याहीच्या हातानं ॥ ०५ ॥



॥ अर्ज भाग ०१ ॥
॥ अरज नं. १८ ॥
॥ कृष्णपुरीची अरज ॥

## ॥ नरदेहीवर सत्ता धन्याची ॥

॥ नरदेही वर सत्ता धन्याची । यवग भरले ।
अवतार घेवुन सारंगधर । सत्य बोलले ॥
॥ कारूणेचा सागर भरला । उभा ठाई ठाई ।
गोपाळाच्या पाठी बाप्पा । आधार तुया दयावा ॥
॥ हंकार वाणी देवा हरी । विनविते तुम्हा ।
तारो नामी ठेव बाप्पा । अशीच वासना ॥
॥ पुर्विचा लेश काही टळेना कोणाला ।
उभी साळुमाय पाजे अमृताचा पान्हा ॥
॥ फाटक्याचे धड तुम्ही करा अवधुता ।
भाकल्याचे गुण ऐसे बोलले पंडीता ॥ ०५ ॥

भजने :-
॥ अर्ज करतो पामर । या अर्जिला व्हावे सादर ॥
॥ अर्ज करतो लवुन । भेट दयाहो महाराजा येवुन ॥
॥ अर्ज करतो येथुन । पावन व्हावे महाराजा तेथुन ॥
॥ अर्ज ऐक लेकराची । नामी जडल्याची लज्जा राखा हो आमची ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ अर्ज भाग ०१ ॥
॥ अरज नं. १९ ॥
॥ अरज ॥

## ॥ बहुत यवग अरज करतो । रावा सावाले ॥

॥ बहुत यवग अरज करतो । रावा सावाले ।
तुमच्या नामी जडलो पदरी । धरा हो बाळाले ॥
॥ तुमच्या नामी, जडलो मजला । नांदवजो देव ।
ठाई ठाई, भरून उरला । इश्वर पुना देव ॥
॥ याच ठिकाणी याच मकानी । रूप, पाहयलं डोळ्यानं ।
या देहीची, मजबुती केली । या, इश्वर पुनानं ॥
॥ बाग लावुन, तयार केलं । आपल्या हातानं ।
निर्जिव होतो, सजीव केलं । उभ केलं कामं ॥
॥ देहे या धरून सुरत वंत उभे आहे ।
गोपाळाच्या मेळा मध्ये । धनीदेव, नित उभा होयं ॥

**भजने** :- ॥ अर्ज रावा सावाले । पदरी धरा, या अन्जान बाळाले ॥
॥ अर्ज करतो तातडी । उघड महाराजा डोळ्याच्या झापडी ॥



॥ अरज नं. १९/२ ॥
॥ देह जगवाची अरज-१०/०१/०३ ची पलट अरज ॥

## ॥ बहुत यवग अर्जि केली । या रावा सावाले ॥

॥ बहुत यवग अर्जि केली । या रावा सावाले ।
याहीच्या चरणी जडलो । मजबुत, करजा देहीले ॥
॥ याहीच्या चरणी जडलो । मजला, नांदवते देव ।
ठाई ठाई, उभा । इश्वर, पुना देव ॥
॥ या मकानी अवतार कृष्ण । रूप, दिसलें डोळ्यानं ।
या देहीची, मजबुती केली । या, इश्वर पुनानं ॥
॥ बाग लावुन, तयार केलं । आपल्या हातानं ।
अमृताचे माठ भरले । पुना देवानं ॥
॥ तुम्हा पायी अमृत । सुरत, वंत उभे आहे ।
मालक माझा देवराया । विठु उभा होयें ॥
॥ याहीची भक्ती नाम कंठी । सदोनित आहे ।
याहीला विनवितो, हेचं देव । हद्यी आहे ॥
॥ हिरा हिरा तो लाल हिरा । भक्ती परवेशी ।
पुर्वि पासुन सांगुन ठेवलं । याहीच्या अवतारी ॥
॥ रावा या सावाची जोडी । आहे बराबरी ।
याहीला विनवितो हेच देव । नांदते माझेया घरी ॥
॥ देवा आंगी जीव राया । तुझा सवंगडी ।
तुमच्या संगतीन आनंदानं । नांदतो, या घरी ॥
॥ बहुत यवग अर्जि केली । या रावा सावाची ।
याहीच्या चरणी जडलो । मजबुती, झाली या देहीची ॥



॥ खंड १० ॥
॥ अर्ज भाग ०१ स्तंभित ॥



॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ चतुर्पता अथर्वन् वेद उभा राहीन पोटी । निजरूप भुम्मा जागी करन सारी सृष्टी ॥

# चतुर्पता
# ॥ अथर्वन् वेद ॥

## ॥ खंड १० : भाग ०२ ॥
## ॥ आरतियाँ ॥
## ॥ चतुर्पती च्या आरत्यां ॥



## शब्दार्थ, चरणार्थ निरसन स्पष्टीकरन सह



॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ ॥
चतुर्पता
॥ अथर्वन् वेद ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

www.chaturpata-atharvan-ved.com

॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. ०१ ॥
दसरा झेंडयासमोर म्हणण्यात येणारी..
॥ मुळावरची आरती ०१ ॥

## ॥ महाराजा आदीपुरूषा आरती ॥

॥ आरती ओवाळीतो । महाराजा आदीपुरूषा ।
कल या यवगात । खेळ करून दाव आम्हास ॥घृ॥ ०१ ॥
॥ प्रथम ऐकला । ऐकला रूपी राया नर ।
नर धरली कुड देहीस । तेज गुण आदीपुरूष ॥
॥ घनन घन कार । कोठे होता धुम्म धुम्मकार ।
कशी केली रंचणुक । हरीहर अनामत कारागीर ॥
॥ कशी केली रंचणुक । देहीला रत्न जडीत ।
संगीन बहु हरीचे रूप । आम्हास दिलेसे सांगुन ॥ ०४ ॥
॥ ताळा वरती ताळ । हरीनं/याहीनं रंचलेसे खास ।
मेहर हो महाराजा । आम्हा जगी बनवलं परवेश ॥
॥ शकुण जाहीरण । हरीनं/याहीनं धरला अवतार ।
कुठच नव्हतं रूप । हरीनं/याहीनं केलासे प्रकाश/परकाश ॥
॥ देही या जीवाचा । अंत कळेना दोघाचा ।
मेहर हो महाराजा । रमणा दाव यवगाचा ॥
॥ चतुराई चतुर्पती । लावा आथर्वन् वेदाची सुद ।
जागी या करून । कलयवगात दाखवनं ॥ ०८ ॥
भजने :- ॥ आदीपुरूषा । ज्योतीच्या मालका । आरती ओवाळीतो ॥
॥ आदीपुरूषा । भेट मायबापा । आरती ओवाळीतो ॥
॥ आदीपुरूषा । तुमच्या चरणी माथा । आरती ओवाळीतो ॥
**शब्दार्थ** :- नर धरली:- एकला रूपी आधी पुरूष राया नर याहीनं, आकाश-धरणी अन्न-अग्न पवन-पाणी हे सहा नर धरून सहानर साचा सचवला आणी त्यात स्वतःचे तेज गुण हे त्याच्याच अंशअवतार आत्माराम व्दारे भरले. । मेहर:- कृपा करा.



॥ खंड १० :- भाग ०२ ॥
॥ आरती नं. ०२/०१ ॥
दसरा सावंगा झेंडयासमोर म्हणण्यात येणारी..
॥ मुळावरची आरती ०२ ॥

## ॥ कलयवगी भैस आले झाले राजपती ॥

॥ कल यवगी भैस आले । झाले राजपती ।
निशं:कलंकी अवतार धनी । ओवाळु आरती ॥घृ॥ ०१ ॥
॥ प्रतिपदा परमय भारी । निशं:कलंकी मांडणं ।
बेचाळीसी ला राज हे । भैसाचं होईनं ॥
॥ कल यवगी उपदेश पंथ । झाला भरजोर ।
योगी उभा राहीला/राहीन आपल्या बिरदाच्या वर ॥
॥ अनंत यवग झाले अजुन । तिघांचा खेळ ।
तिन ताळात नाही ठेवणार । कोणाची उर ॥ ०४ ॥
भजने :- ॥ कलयवगी आरती । कलयवगी आरती ।
दाही दोष/पाप-दोष भंगा जाती ॥
॥ कलयवगी आरती । कलयवगी आरती । रोग विघ्नं भंगा जाती ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० :- भाग ०२ ॥
॥ आरती नं. ०२/०२ ॥
जळगाव दांडात म्हणण्यात येणारी..
॥ मुळावरची आरती ॥

# ॥ कलयवगी भैस आले झाले राजपती ॥

॥ कल यवगी भैस आले । झाली राजपती ।
निशं:कलंकी अवतार । धनी, ओवाळु आरती ॥घृ॥ ०१ ॥

॥ प्रतिपदा उपदेश भारी । निशं:कलंकी मांडणं ।
बेचाळीसी ला राज हे । भैसाचं होईनं ॥
॥ कल यवगी उपदेश पंथ । होईन भरजोर । झाला भरजोर ।
नवखंड पृथ्वीवरचे लोक । होतीन सुलभुल ॥
॥ चारही भवन, चौदा चौक्या । स्वर्ग मिर्त पाताळ ।
तिनही तिरभवन, पंचेचाळीस ताळ ॥
॥ इतक्या ताळचे ठाणे मोडुन । लभेद भेटन ।
पावन होईन देहा । ईतक्या जागी तो खेळन ॥
॥ इतक्या ताळचे लोक येतीन । याहीच्या जवळ ।
इतक्या ताळी राज आदी । भैसाचं होईन ॥

॥ भैस राजा धनी तोच । निश:कलंकी अवतार ।
तिन यवग तिन राजे । करन तिन खेळ ॥
॥ तिन यवगाची राजपदी । केली तिरकुटानं ।
निश:कलंकी अवतार भरून घेईन उसनं ॥
॥ एका पासुन अनेक झाले । तिघांचा खेळ ।
मालक/योगी उभा राहीन/राहीला । आपल्या बिर्दाच्या वर ॥
॥ अनंत यवग झाले गडेहो । तिघांचा खेळ ।
तिन ताळामध्ये नाही कोणाची । ठेवली/ठेवणार उर ॥

॥ अनंत यवग झाले गडेहो । तिघांचा खेळ ।
नवखंडा मध्ये, नाही कोणाची । ठेवली/ठेवणार उर ॥
॥ अनंत यवग झाले गडेहो । तिघांचा खेळ ।
चौदा भुवनात, नाही कोणाची । ठेवली/ठेवणार उर ॥
॥ अनंत यवग झाले गडेहो । तिघांचा खेळ ।
पंचेचाळीस ताळात, नाही कोणाची । ठेवली/ठेवणार उर ॥
भजने :-
॥ कलयवगी आरती । कलयवगी आरती ।
दाही दोष/पाप-दोष भंगा जाती ॥
॥ कलयवगी आरती । कलयवगी आरती । रोग विघ्नं भंगा जाती ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ॥
॥ आरती नं. ०३ ॥
दसरा झेंडे चढल्यानंतर म्हणण्यात येणारी..
॥ मुळावरची आरती नं. ०३ ॥

## ॥ कोट कोट रक्तमासांची ॥



॥ कोट कोट, रक्त-मासांची । कृथा/सत् यवगी होती ।
करून आरती, तुम्हा ओवाळु । आदी माया शक्ती ॥
॥ घृ ॥ ०१ ॥

॥ इच्या आंगची, खोळ झाली । माया चैत्यन्यं ।
सत् यवगी, उभी राहली । होती आपणं/राया संगतीन ॥

॥ एक शेजुन, तिन केल्या । एकीच्या तीनं ।
चतुर्पता, गाय उभी । होती आपणं ॥

॥ गाय होती, संम्माप झाली । देही/देल्ली भैसा उदरातं ।
जली मच्छींदर, होवुन मासोळी । आहे जागरूतं ॥०४॥

॥ ठाई ठाई, अवतार खेळला । संग होती शक्ती ।
तिरकुटां मध्ये, माया चैत्यन्य । करे राजपती ॥

॥ ठाई ठाई, देवाच्या संगं । उभी होती शक्ती ।
निशंःकलंकी, अवतार धनी । आप, आली कशी शक्ती ॥

॥ सातही आसरा, जोगण्या-भोवाण्या । या रिध्दी सिध्दी ।
स्वर्गिच्या प-या, गोपीगणां । जमा झाल्या/होतीन येथी ॥

॥ एक/चैतन्य शेजुन, तीन केल्या । कुवा-यां तीनं ।
तिन यवग, देहे, जीवाचे । नाही झाले लग्नं ॥०८॥

॥ निशंःकलंकी, शक्ती करन । भैसा अध्यानं ।
पन्नाशीला, स्वयंवर होईन । पाहजा डोळयानं/पुढं ॥०९॥

भजने :-
॥ आदीमाया । आम्ही जडलो तुमच्या पाया । आरती ओवाळु ॥
॥ आदीशक्ती । बालक धरजो हाती । आरती ओवाळु ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ॥
॥ आरती नं. ०४ ॥
दसरा झेंडे चढल्यानंतर म्हणण्यात येणारी..
॥ मुळावरची तारकेची आरती नं.०४ ॥

## ॥ कापुर ज्योतीची आरती ॥

॥ कापुर ज्योती, ओवाळु मेघश्यामा । आहो रामा ।
उभे धनी, भक्ताच्या आले कामा ॥ घृ. नं.०१ ॥
*॥ लवकर याहो, देवाच्या ईसवं/विश्वं रामा । ईश व रामा ।*
*उभा धनी, भक्तांच्या आले कामा हो ॥ घृ. नं.०२ ॥*

॥ याहो देवा, तुम्ही याहो सारंगधरा । सारंगधरा ।
आम्ही झोंबीलो/जडलो । देवा तुया पदरा हो ।
तुया चरणी, तरले भक्त कबिरा । आहो कबिरा ।
तुवा चुकविल्या । जन्माच्या येरझारा हो ।
माय बापा, तु ये माझ्या माहेरा । आहो माहेरा ।
तुमच्या बिनं । आम्हा कोण बा दुसरा हो ॥०१॥

॥ सुदाम देवाशी, त्वां/तुवा ओळख दाखवली । दाखवली ।
संगती गुण । हरी भेट उत्तम झाली हो ।
पल्हादाशी, तुवा मदत देवा/कैशी केली । कैशी केली ।
पाताळ भुवनी । त्वां मांड बसवली हो ।
लाख्या मंदिरी, त्वां पांडव तारले । आहो तारले ।
द्रौपदीला । त्वां वस्त्रं पुरवले हो ॥०२॥ कापुर ज्योत..

॥ गो-या कुंभाराची, भक्ती अल्ही लोट । अली लोटं
हरीच्या नामी । तोडले मनगटं हो ।
हरीचे नाम, हद्‌यी बळकट । आहो बळकट ।
टाळ वाजवता । फुटले नखं-बोटं हो ।
घडो-घडी, पाहतो तुझी वाट । आहो वाटं ।
याहो देवा । सोयंम दयाहो भेटं हो ॥०३॥ कापुर ज्योत

॥ दामाजी साठी, देव विठ्ठल झाले महारं । आहो महारं ।
पोत घेवुन । देव गेले डोहीवर हो ।
जावुन उभे, राहीले सव्वा प्रहर । सव्वा प्रहरं ।
बादशाहा पुसे । तु कोणाचा महारं हो ।
मंगळवेढयाचा, होय मी/विठु पांडेवार । पांडेवार ।
चोख्यामेळां । याहीनं केला एकोणचारं हो ।
रसिद दयाहो, मला जावु दया लवकर । आहो लवकर ।
माझा धनी । मला पुसनं समाचार हो ।
आहो मी, ईमानी चाकर । आहो चाकरं ।
माझा धनी । घरी उभा निराधार हो ॥०४॥ कापुर ज्योत..

भजने :-
॥ उजळा कापुराच्या ज्योती । तुम्हा ओवाळु विठ्ठला गणपती ॥
॥ कापुर ज्योत उजाळु । याहो महाराजा, तुम्हाला ओवाळु ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. ०५ ॥
दसरा झेंडे चढल्यानंतर म्हणण्यात येणारी..
॥ मुळावरची आरती नं. ०५ ॥

# ॥ चेंडीकेची आरती ॥



॥ आरती चेंडीकेची । आदीमाया आदीशक्ती ।
दैत्य हे वधुन । दैत्य वध तुम्हा हाती ॥
॥ धृ ॥०१॥
जन्मली बम्हा पोटी । बम्हदेव लागलासे पाठी
स्वर्ग हे पाताळं । धुंडुनी आली मिर्तलोकी ॥

॥ आली या मिर्तलोकी । या अहिनाच्या इथी ।
अहिनं हा बोलला । तुम्ही राहा आदीमाया शक्ती ॥

॥ म्हैसासुर मातला । लागला बम्हाच्या पाठी ।
बम्ह हा पळाला । लागला विष्णुच्या पाठी ।
विष्णु हो पळाला । लागला शंकराच्या पाठी ॥०४॥ आरती..

॥ बम्हा विष्णु शंकर । शोध करे मातेचा ।
स्वर्ग हे पाताळं । धुंडुनी आले मिर्त लोका ॥ आरती..

॥ आले या मिर्त लोकी । सुमरन करत मातेची ।
कर हे जोडुनं । विनवीते आदीशक्ती ॥ आरती चेंडीकेची..

॥ शंकर बोलला । हे आदीमाया आदीशक्ती ।
घेवुन खडंग । तुम्ही वधा म्हैसासुर ॥ आरती चेंडीकेची..

॥ घेवुन खडंग । माता उभयता निघाली ।
वधीला म्हैसासुरं । सुखी केलं देवांगण ॥०८॥ आरती..

॥ वधीला म्हैसासुर । सुखी केलं देवांगणं ।
कल यवगी हा मानं । ऐनास/ऐसं दिलसे वचनं ॥०९॥ आरती

भजने :-
॥ आदीमाया । आम्ही जडलो तुमच्या पाया । आरती ओवाळीतो ॥
॥ आदीशक्ती । बालक धरजो हाती । आरती ओवाळीते ॥
॥ मायबाई तुमची गाही । त्वां मारला दैत्य ।
राहील्या दैत्याचा मायबाई । कराव निपांत ॥
शब्दार्थ :- मातला :- अंहकाराने माजला । धुडुनी :- शोधत शोधत ।

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. ०६ ॥
॥ मुळावरची आरती ॥

## ॥ तरण उपाय करून मजला ॥

॥ तरण उपाय, करून मजला । तार समर्था ।
करून आरती, तुम्हा ओवाळु । देवा आदीरूपा ॥ घृ ॥
॥ निर्गुण गादी, भक्तं जना । फुल पुष्प वर गा,
धन्यावर फुल-पुष्प वर गा ।
तिन यवगाचं, राज्य भाकलं । होतं त्या तिघां ।
ब्रम्हा विष्णु, शंकर तिघं । भैस चौथा गा ।
देही देवता/चंद्र-सुर्य, माया-चैत्यन्यं । याही तीन ज्योता ।
चैत्यन्याचा, खेळ भरून । झाला सर्वत्रां, झाला सर्वतरां ।
तिन यवगाचं, राज्य गेलं । याचं त्रिकुटां । ..जळगावदांड च्या टुका
त्रिकुटांचा, बंध तोडुन । आणण समर्था । याहो समर्था ॥
करून आरती, तुम्हा ओवाळु । देवा आदीरूपा ॥०१॥

॥ पांडवाचे, राज्य बुडालं । उभी राहली परं/पड/कळ ।
परं/पड/कळ मोडुन, देवराया । जागी/उभ करन सारं ।
आदी पुरूष, होईन राजा । भरन दरबारं ।
तिर कुटांच, ठाणं मोडनं । होतीन चाकरं ।
शेष पाताळी, इंद्र स्वर्गि । येईन शरणागता ।
करून आरती, तुम्हा ओवाळु । देवा आदीरूपा ॥०२॥
पड :- दरी । परं :- मायाचे पंख
॥ आदी पुरूष, आदी रूप । तो मागं होता ।
आदी शक्ती, निशं:कलंकी । याहीनं दयाहो भेटां ।
आदी शक्ती, आणीक अनामत । भैस अवधुता ।
तिन यवगाचे, तिन शिक्के, याहीचे भरले गा/तुलाच पुरले गा
चैतन्यं चा, चवथा शिक्का । उभा तिरनयनं ।
बोध अवसरी, राज्य कलीचं । घेईन भरूनं ।
बोध अवसरी, निशं:कलंकी । उभ्या राहतीन ज्योता ।
करून आरती, तुम्हा ओवाळु । देवा आदीरूपा ॥०३॥

॥ निर्गुण/निर्वाण गुरू, मालुम आहे । आहे सर्वत्रा ।
सहा दर्शन, जोग मोडनं । याहीच्या हाता ।
सहा दर्शन, जोग मांडणं । मांडण/मागणं निर्वाळा ।
पंथाच्या, पाळणुका पाळनं । येईल अवघ्याला ।
सत् यवगी, अनामतानं/अनामीकानं । उपदेश केला ।
तिन यवग, तोच राया । जागी राहीला ।
पंथाच्या, पाळणुका पाळतीन । त्याहीला देईन भेटा,
त्याहीला दयाहो भेटा ।
करून आरती तुम्हा ओवाळु । देवा आदीरूपा ॥०४॥
भजने :- ॥ आदीरूपा । ज्योतीच्या मालका । आरती ओवाळीतो ॥
॥ आदीरूपा । धनी देहेच्या मालका । भेट मायबापा ॥ आरती ओवाळीतो
॥ आदीरूपा । तुमच्या चरणी माथा । आरती ओवाळीतो ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. ०७ ॥
॥ मुळावरची आरती ॥

## ॥ टाळ वाजे रघुनंदन नाम गर्जे ॥

॥ टाळ वाजे । रघुनंदन नाम गर्जे हो ।
टाळ वाजे । अवधुत नाम गर्जे हो ॥ टाळ वाजे.. ॥ धृ ॥

॥ माळ्याच्या/तयाच्या मध्ये । जाई-मोग-यांचे झाडं हो ।
याहीच्या संगती । एक तरायाचे झाडं हो ।
याहीच्या पोटी । एक निपजलं केवळं हो ॥०१॥ टाळ वाजे..

॥ माळ्याच्या मध्ये । यान पेरला जोंधळा हो ।
हातो हाती । यानं घातलासे मळा हो ।
यावर सोकारी । देव राज कृष्ण सावळा हो ।
कोण्या देशीचा । तो आला एक कावळां हो ।
हाणुन दिला । तो उडुन गेला कावळा हो ।
राज हंसं । हे फाश्यात पडले हो ।
याहीचे फासे । देव तोडन महाराजा हो ॥ ०२॥ टाळ वाजे..

॥ माळ्याच्या मध्ये । एक माळी गोरा गोमटा हो ।
एका विहीरी । लावल्या पाचं मोटा हो ।
याचं पाणी । हे जाते/धावे दहाही दांडा हो ।
एवढं ओलुनं/आणुन । लावनं/लावले एका पंथा हो ॥०३॥ टाळ..

॥ बैसु नये । कोणी उण्याच्या संगती हो ।
नित बसावे । या साधुच्या संगती हो ।
याहीच्या संगती । पाप-दोष/रोग-विघ्ने भंगा जाती हो ।
विठोबा बोले । मोक्ष्याची होईन/होते प्राप्ती हो ॥०४॥ टाळ..

॥ टाळी टाळी । हा सर्वच विघ्ने जाळी हो ।
रोग-विघ्नाची । यानं जाळुन केली होळी हो ।
धडधड धडधड । रोग-विघ्ने जळते सारे हो ॥
॥ टाळी टाळी । टाळीचे रूप कैसे हो ।
अंम्बर खासे । यानं बनवले साचे हो ॥०५॥ टाळ वाजे...

भजने :-
॥ टाळी वाजवा, टाळी वाजवा । हरीनामाची ।
सद्भाव महीमा/परमय याहीचा ॥
॥ टाळी वाजवा, टाळी वाजवा । हरी नामाची
नित करा हो प्रार्थना । अवधुताची ॥
॥ टाळी वाजवा, टाळी वाजवा । हरी नामाची
नित करा हो प्रार्थना । महाराजाची ॥

गजर :-
॥ दोन्ही हातानं वाजवा टाळी । विठ्ठल विनवा हो विनवा ।
रक्त-मासाचा देहपिंड मजबुत, बनवा हो बनवा ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. ०८ ॥
॥ मुळावरची आरती ॥

# ॥ विठोबाची आरती ॥



॥ आरती विठोबाची । हे होय नाम सुमरनाची ।
लव मज लागली । देवा तुमच्या पायाची ॥
॥ घृ ॥०१॥

॥ उभे देव देहीवर । आता आले सांगीवर ।
गोपाळ जग जीवन । अवघं याहो घेवुनं ।
हरकीजल चित्त मन । ध्वजा दावल्या/देखिल्या डोळ्यानं
नवखंडी झेंडा तुझा । विठोबा देव होय माझा ॥

॥ देही त्वां धरली इथं । उभा राहीलासे नित/निट ।
पहा या सावंग्यात । आहे अवताराची भेट ।
देणं मज देल्लं/झालं । गिण्यान मुक्से/मुखाचं चोखट ॥

॥ कैश्याला हिंडता । देव उभे आहे आता ।
जवळ सापडलं । माझ सावंग माहेर ।
लोट मी, घालतो देवा । सावळ्या तुमच्या चरणां वर ।
चुकवुनी चुकवा हो । उभे राहुन येरझारं ॥०४॥

॥ येरझार चुकवली । देहे वज्रं अंम्बर केली/धरली ।
कृष्णा हे तुमची सांगी । आमच्या मनाला भावली/भासली ।
नवखंडी वसुंधरा । देहें जागरूत करा ॥

॥ जागी या करून । अवघ दाखवा हो डोळा ।
बाप हा विठोबा । कृष्णराज उभा सावळा ।
याहीच्या भेटीनं/सांगीनं । उध्दार झाला कोटीकुळा॥०६॥

भजने :-
॥ हरी हरी भक्तीला जीवनं । आरती ओवाळु दोन्ही हात/कर जोडुनं ॥
॥ आरती ओवाळतो देवा । प्रकट रूप या भक्तीला/बाळाला दावा ॥
॥ आरती ओवाळीतो देवा । तुमच्या पायाचा धरला धावा ॥
॥ आरती भजन । नित नाम । अवधुत ओवाळीनं । आरती भजनं ॥
॥ नित नाम । विठ्ठल ओवाळीनं । आरती भजनं ॥
॥ नित नाम । श्रीकृष्ण ओवाळीनं । आरती भजनं ॥
॥ नित नाम । तुया चरणी लोटांगण । आरती भजनं ॥

**शब्दार्थ** :- लव :- गोडी, आवड, ओढं । हरकिजल :- हर्षभरीत झालं । भावली :- मन भाव मोहुन जाणे. । देल्लं :- दिले



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. ०९ ॥
॥ मुळावरची आरती ॥

## ॥ आले देव अनामता ॥

॥ आले हो अनामता । कृष्ण यवगी उभे आता ।
भक्त हे मिळाले । देहीला तार समर्था ॥घृ॥०१॥

॥ चुकलो आहो पामरं । ऐसे यवग कठले/झाले फार ।
चौ-यांशी जन्मांची । देवा चुकवा येरझारं ।
हाती या धरून । स्वयंम् दाखवा कार ।
भक्त या रायाचं । आयुष्य करा बराबरं ॥
॥ देहे या परमान । उभं करं यवुगं मंडयान ।
सेरूपी उभा राहयं । कारण दाखवा डोळ्यानं ॥ .
॥ बहुत दिवसा पासुनं । झाल्या तुमच्या-आमच्या भेटी ।
मुळ या यवगाच्या । तुम्ही सांगतल्या गोष्टी ।
तरण उपाय । आहे महाराजाच्या हाती । ..जळगाव
भाव हा धरूनं । कपट जरा नाही पोटी । कपट ठेवु नका पोटी
सत्वर पावलें । देव राया जगजेठी ॥ ०४ ॥

॥ अनामीका घरी । रायानं धरला अवतार ।
भक्त या राजाचं । हाउस/आउक रूपी करा खरं/बरं ।
आयुष्य चढवां हो । देहे करा वज्र अंम्बर ॥
॥ जगाच्या माहेरा । राया आम्हावर कृपा करा ।
पावशिल अंतरा । आम्हा बहुत यवग तारा ॥ ०६ ॥
किंवा :- पावशिन अंतरा । सत् लक्ष्य कृपा करा ।। जळगाव
॥ नेणंती परमाण । देही समजावं पुरतं ग्यान । देहे सत्कृत जाणं ।
साच्या हा सचवला । सत्य शकुन दया चांगला ॥

**भजने** :- ॥ अनामता । कृष्णराज समर्था । आरती ओवाळीतो ॥
॥ अनामता । धनी देहेच्या मालका । आरती ओवाळीतो ॥
॥ अनामता । देहे तार समर्था । आरती ओवाळीतो ॥
॥ अनामता । तारण कर गा आता । आरती ओवाळीतो ॥
॥ अनामता । अकाश माझा पिता । धरतरी माझी माता ॥ आरती..
॥ अनामता । चंद्र सुर्य ज्योता । तारा या जीवन ज्योता ॥ आरती..
॥ अनामता । तुया चरणी आमचा माथा । आरती ओवाळीतो ॥
॥ आरती केली मनभाव । ओवाळीला हा श्रीकृष्ण देव ॥
॥ श्रीकृष्ण देव माझे । या देवानं आमचे संभाळ केले ॥
॥ आरती या देवाची केली । सोयंम् ज्योत हे ओवाळ्ली ॥
॥ जोडा या ज्योतीले हात । उभे आहे देव कृष्ण अवधुत ॥
॥ उभे आहे कृष्ण अवधुत । याहीच्या चरणी मुजरे सदोनित ॥
॥ उभा आहे भैस राजा । याहीच्या चरणी आहे मुजरा माझा ॥

-: शब्दार्थ :-

**सत्वरं** :- विलंब/वेळ न लावता ताबोडतोब । **स्वयंम्** :- स्वतःहुन येवुन, खुद होकर, आपरूप । **परमाण** :- प्रमाणं । **हाउस** :- हौस । **आउक** :- सांगी करणारे यवग । **देही समजावं पुरतं ग्यान** :- या देहीला संपुर्ण चतुर्पती ग्यान समजावुन दयावे.

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. १० ॥
॥ जुनी मुळ आरती ॥

## ॥ आले देव अवधुता ॥

॥ आले देव अवधुता । याहीच्या चरणी माझा माथा ।
उभे देव भैसराज । याहीला ओवाळीतो आता ॥घृ॥०१॥
॥ अवधुत किर्ति थोरं । याहीनं बनवलं शरीरं ।
सिध्द हे साधक । हेच होय मोक्षाच घरं ॥
॥ तारशीन देवा तु तार । तुमच्या पासुन हा विस्तार ।
उतरवजो पैलपार । तुया नामाचा आधारं ॥
॥ कंचन ताट करी । ज्योत आकाशाची वाणी ।
अनामत उभे धनी । बरी केली मेहरबानी ॥
कंचन ताट :- सोन्यासारखा आरा असलेला, अस्सल ग्यानाचा प्रकाश देणारा देह
॥ प्रभु देव नायक । हा होय अवघ्यांचा धनी ।
याहीच्या हातांनं । ताळ स्थापले तिन्ही ।
रंचना रंचली । ज्योत आकाश वाणी ॥ ०४॥
॥ प्रभु देव नायक । अवघ्या देवा आधी देवं ।
याहीनं सांगीतला । कृष्णा हाती प्रतिपाळ ।
जागी करा वसुंधरा । चौथे थापले ताळ ॥
॥ दगदग मिटवली । हा होय अनामत धनी ।
याहीच्या हातानं । बहु बरं आमचं आहे ॥०७॥



॥ आरती नं. ११ ॥
॥ पलट दांडांची आरती ॥

## ॥ आले देव अवधुता-पलट आरती ॥

॥ आले देव अवधुता । याहीच्या चरणी माझा माथा ।
उभे देव भैसराज । तुजला ओवाळीतो आता ॥घृ॥०१॥
॥ अवधुत उभे थोरं । याहीनं बनवलं शरीरं ।
सिध्द हे साधक । मुख्य ओळखांव हे घरं ॥
॥ पिता देव उभा तारु । याहीच्या पासुन विस्तारु ।
हद्यी या धरलं । बाळ अंन्जान लेकरु ॥
॥ कंचना देखली । ज्योत ओळखा हो चांगली ।
अनामत उभे धनी । या देवानं धरली बाणी ॥०४॥
॥ प्रभु देव नायक । हा होय अवघ्यांचा धनी ।
आपुल्या हातांनं । ताळ स्थापले तिन्ही ।
रंचना रंचली । ज्योत आकाशाची वाणी ॥ ०४॥
॥ प्रभु देव नायक । अवघ्या देवा आधी देवं ।
कृष्णाची सांगी होय । देव पुना उभा आहे ।
चवथा वेद पाहयं । बाळ कृष्णाचे होय ॥
॥ दग दग मिटवली । हे होय अनामत धनी ।
याहीच्या हातानं । बहु बरं आमचं आहे ॥०७॥
भजन :- ॥ हरीच्या चरणांवर माथा । आरती ओवाळु देवराया अवधुता ॥
॥ हरीच्या चरणी मस्तक । आरती ओवाळु देव उभे अवधुत ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ॥
॥ आरती नं. १२ ॥
॥ मुळावरची आरती ॥

## ॥ कृष्णा तु जगजीवना ॥

॥ कृष्णा तु, जगजीवना । भक्ती लावलेसे आम्हा ।
आरती ओवाळीतो । भेट दयाहो भक्तजनां ॥घृ॥०१॥
॥ अनामीका घरी । देव ठावुक नव्हते कोणा ।
तुम्ही हो येवुनं । रूप दाखवलं आम्हा/जना ॥
॥ तुम्ही हो, राया आम्ही । पुर्वि होतो एका ठायी ।
तुम्ही उभे, देवं । आम्हा ठेवलं/केलं चिरंजीव ॥
॥ उत्तम-मध्यम । याहीच्या कैश्या केल्या न्याती ।
रूप हे अवरूप/अरूप । याहीच्या वाढवल्या किर्ति ॥

॥ जीव हा, उभा शिव । आहे महाराजाच्या हाती ।
अकाश मात ज्योत । ओवाळला श्रीपती ॥
॥ कल या, यवगातं । ज्योत ठावुक नव्हती कोणा ।
तुम्ही हो येवुनं । वाणी सांगतली आम्हा/जना ॥
॥ पायी या, पद्मं । मुखी रायाच्या रत्नं ।
कपाळी याहीच्या शिक्का । देवा तारण कर गा आता ॥
भजने :-
॥ किसनजी जगाचा जिवन । भक्तीला लावले त्वां अवघे जन ॥
॥ किसनजी जगाचा जिवन । तुजला ओवाळु दोन्ही कर जोडुन ॥



॥ आरती नं. १३ ॥
॥ जुनी आरती ॥

## ॥ आरती कृष्ण राजा ॥

॥ आरती, कृष्ण राजा । आता ओळखा याहीच्या तेजा ।
अगाध पुण्यं आहे । हा अवघ्या तिर्थाचा राजा ।
देहे या धरूनं । देव उभा आहे माझा ॥घृ॥०१॥
॥ तुमच्या आरतीची । राया किर्त मोठी ।
तरण उपाय । आहे महाराजाच्या हाती ॥
॥ जन्मीलो, याहीच्या कुशी । माता-पित्याच्या वंशी ।
अवघे तिर्थ आहे । या देवाच्या पायापाशी ॥
॥ किर्त याहीची भारी । याहीचं नाव अगोचरी ।
ओळखा हा सागरं । देव उभा आहे हरी ॥०४॥

॥ याहीच्या मुखचा, अथर्वन् वेद । याहीनं दाखवली सुद ।
उभा देव, आहे विठु । याहीनं सागंतली खुणं ॥
॥ रूक्मिणी/अनुसया माय पार्वती । पदरी धरले बाळ गोपाळ ।
दिसतीनं केवळं । आता उभे माझे देव ॥०६॥
भजने :- ॥ कृष्ण रूपा । भेट मायबापा । आरती ओवाळीतो ॥
॥ आधे रूपा । तुया चरणी माझा माथा । आरती ओवाळीतो ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ भाग ०२ ॥
॥ आरती नं. १४ ॥
॥ मुळावरची आरती ॥

## ॥ आरती आकाशवाणी ॥

॥ आरती आकाश वाणी । गाय ओवाळु तव चरणी ॥ घृ ॥
॥ तव या चरणी । उभे आहेत नर । तव :- तुया, तुमच्या
चतुर पतीचं । राया सांगते ग्यानं ।
चतुराई चतुर्पती । आहे रायाला मालुमं ॥
॥ पिंडी या ब्रंम्हाडी । राया भरुन चारही खुम्मी ।
ब्रम्हा हे विष्णु । राया पहां तिरनयनं ।
भैसाचं कारण । याहीचं आहे वडीलपण ॥
॥ स्वर्गि हे पाताळ । मिर्त लोक होयं ठिकाणं ॥
गाईची या खुणा । ओळखा हो गुणीजना ॥
॥ गाईच्या या वाणी । उभे दिगांबर धनी ।
अठरा हे ग्यानी । देव आहे पुराणी ॥०४॥
॥ सत् कृता ची पेटी । राया बांधुन पोटी ।
आता देव सांगे गोष्टी । देव राया सत् कृतीच्या ॥
॥ चतुराई चतुर्पती । ऐका अथर्वन् वेदाची गाही ।
जागी करुन दावी । कलयवगी नवल पाही ॥०६॥
भजने :-
॥ तव चरणी । ओवाळु विठोबा/कृष्ण धनी/दिगांबर धनी । गाय ओवाळु



॥ आरती नं. १५ ॥
॥ जुनी आरती ॥

## ॥ शकुनाची आरती ॥

॥ आरती शकुनाला । सोंहंम् स्वामी सद्गुरुला ।
वेष घेवुन मानवाचा । आम्हा तारायाशी आला ॥

॥ स्वर्गवाशी रवि किरणं । मिर्त लोकी उतरला ।
आदीपुरुष रुप धरुन । अहीना घरी अवतरला ॥
॥ चित्ताचा चालक । यवगी याचा सुत्रधार ।
जगी नांदे हा जनार्दन । जिकडे तिकडे वाटला गुणं ॥
॥ भय-रोग हर्रायास । दिव्य औषधी कस ।
लावुनी ध्यान अग्न । काढा काढला ब्रम्हरस ।
दिव्य मा्त्रा पाजायाला । याहीच्या हाती अमृत प्याला ॥
॥ दिव्य-औषधी पुरातन । मात्रा मुळयवगा पासुन ।
सोयंम् रुपी अमृतपान । घ्यावे पथ्ये सांभाळुन ॥

॥ नामी तरले ब्रम्हादिक । ऋषि मुनी संत जन ।
तरला हो ज्ञानेश्वर । श्री संत तुका राम ।
तरली मुक्ताई । नाथ निवृत्ती सोपान ।
घेवुनीया दिव्य मात्रा । स्वतः गुणं अजमावीला ॥

॥ जनसेवा करावयास । हा जगी झाला पांडेवार ।
प्रपंचाचे बिगार ओझं । याहीनं वाहले शिरावर ।
राहुनिया गुप्त रूप । केला अठरा यवगाचा करार ॥
॥ हुकमत या मालकाची । राहुनिया गुप्तरूपी ।
अहिना घरी अवतार घेवुनी । आला सत्यवग स्थापायाशी ॥
॥ भेटुनिया कृष्णाजीला/अवधुताला । केली वचनांची हार ।
वेष घेवुन मानव वंशी । उभा निष्कलंकी अवतार ।
सत्याचा प्रकाश । केला दीनांचा उध्दार ॥

॥ शकुनाचे उपकार । झाले दहाही अवतार ।
दिसेना कदा काळ । श्री समर्थ गुरूनाथ ।
राहुनिया गुप्त निरंतर । ओळखु कोणाला नाही येत ॥
॥ बहु दिवसा पासुन । राया पडले अंतर ।
लवकर याहो देवा । आता न लावावा उशिर ।
शुभ्र घोडा पाहण्याची । मजला आशा लागली फार ।
सत् या यवगाची । भुम्मा ध्वजा उभारली ।
ईच्छा पुर्ण कर चातुरा । मिळवा सत्य स्वरूपाला ॥
भजने :-
॥ आरती ओवाळीतो देवा ।
प्रकट/सोयंम् रूप या भक्तीला/बाळाला दावा ॥



॥ आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. १६ ॥
॥ जळगाव दांडातील आरती ॥

## ॥ आरती पाचा पानाची ॥

॥ पाचा या पानाची । केली हो आरती ।
या सुवर्णाच्या ताटी । आरती रूख्माबाईच्या हाती ।
तुम्ही चला रूख्माबाई । देवा हरीला ओवाळाशी ॥
॥ ओवाळा ओवाळा । माझे या सद्‌गुरू माउली ।
उजळल्या ज्योती । पाचही तत्व निरंजनी ॥
॥ निरंजना ची वस्तु । हरीनं आकार मांडला ।
खिडक्या लावुन । ज्योत अंगी मुर्त ठसवली ।
बोध राजा म्हणे । उभी माझी सद्‌गुरू माउली ॥
॥ घालीनं लोटांगण । वंदीन तुये चरणां ।
डोळ्यानं पाहीनं रूप तुझे । अंबर कर काया ।
सद्‌गुरू हो लभेद । पंढरी चा राया ॥
भजने :-
॥ आरती भजनाची शोभा । मुज-याले आहे मुजरा माझा ॥
॥ आरती भजनाची शोभा । पायरीले आहे मुजरा माझा ॥
॥ आरती भजनाची शोभा । राउळ-झेंडयाले आहे मुजरा माझा ॥
॥ आरती भजनाची शोभा । देवाच्या गादीले आहे मुजरा माझा ॥
॥ आरती भजनाची शोभा । लदबद ज्योतीले आहे मुजरा माझा ॥
॥ मुजरा मुजरा निर्वानी । मुजरा आहे हो माझा । अवधुत/कृष्ण धनी ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. १७ ॥
॥ आरती म्हणनी ०१ ॥

## ॥ आले हो ब्रम्हरूप ॥

॥ आले हो ब्रम्हरूप । याहीचा उजेड चवताळात ।
आरती ओवाळीतो । आहे लभेदाची भेटं ॥ घृ ॥०१॥
॥ ओळखा हा ब्रम्हरूप । लदबद लभेद ज्योत ।
भाकलं या कृष्णांच । यवग होईन भैसाचं ॥
॥ योगी परात्परं । आले परंब्रम्ह अवतार ।
उभा देव यवगावर । करन देहीचा उध्दार ॥
॥ अवधुताची कळेना मात । शिणले ब्रम्हदिक ।
आले हो रूपात । तारण करन सर्वत्रास ॥०४॥
॥ द्युतांचा परीमय । ध्यानी जाणा ब्रम्हरूप ।
उभा हो राहुन । जागी करन नरदेहं ॥
॥ द्युताची ही वाणी । भाव धरून ऐका कानी ।
उभा देव धनी । तारू केलं जीवाजनी ॥
॥ चवथ्या या खुम्मावरी । अवधुताची बादशाही ।
हात कोणाचा पुरत नाही । तारू केली अवघी पृथ्वी ॥०७॥

भजने :-
॥ आरती ओवाळीतो देवा । तुमच्या चरणावर ठेवला माथा ॥



॥ आरती नं. १७/२ ॥
॥ आरती म्हणनी ०२ ॥

## ॥ आले देव ब्रम्हरूप ॥

॥ आले देव ब्रम्ह रूप । याहीचा उजेड चौ ताळात ।
आरती ओवाळीतो । आहे लभेदाची भेट ॥ घृ ॥
॥ लभेद अवतार धनी । याहीच्या ध्वजा असमानी ।
भाकलं कृष्णाचं । यवग आहे या भैसाचं ॥
॥ लभेदा ची वाणी । भाव धरून ऐका कानी ।
उभा देव आहे धनी । धनीदेव करन मेहरबानी ॥
॥ प्रथम देव उभा परमेश्वर । आले परब्रम्हं अवतार ।
उभा देव निरंजन । करन देहीचा उध्दार ॥
॥ लभेदाची मात न कळे । शिणले हो ब्रम्हादिक ।
आले देव रूपात । जागी करन सर्व जनास ॥
॥ द्युतांचा परिमय । हेच जाणा ब्रम्ह गुंज ।
उभा देव यवगा वर । जागी करन पाहयंजा पुढं ॥
॥ चौ खुम्माच्या वर । उभी अवधुत बादशाही ।
हात कोणाचा पुरत नाही । याहीनं तारू केली पृथ्वी ॥

भजने :-
॥ ब्रम्ह रूपा । कार उभा करा समर्था । आरती ओवाळु ॥
॥ ब्रम्ह रूपा । माझी अरज ऐक आता । आरती ओवाळु ॥
॥ ब्रम्हरूपा । भेट माय बापा । आरती ओवाळु ॥
॥ ब्रम्हरूपा । तुमच्या चरणी माथा । आरती ओवाळु ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. १८ ॥
॥ सावंगा मुळावरची आरती ॥

## ॥ गुपित प्रकट ॥

॥ गुपीत प्रगट । आता झालेसे राया ।
आरती ओवाळीतो । देवा अवधुताच्या पाया ॥घृ॥०१॥
॥ स्वर्गि चा लभेद । मिर्त लोकी करन कार ।
लभेद अवतार धनी । याहीच्या ध्वजा अस्मानी ॥
॥ तारू हे नामं तारूं । देवा हाती हा संसार ।
उतरवशील पहीली पार । तुमच्या नामाचा आधार ॥
॥ चवदा या चौक्या भारी । आणुन पाडल्या अंधारी ।
देहीच्या दिप माळा । देवा लावजो मशाली ।
मशाली उभ्या ध्वजा । मोहरं होणार लभेद राजा ॥०४॥

॥ समज समज कृती । अवघी किल्ली देवाच्या हाती ।
किल्ल्याचे दरवाजे । वाजे वाजतीनं मोहंर ।
वाजतीन मिर्त लोका । नांदवन त्याहीला नाही धोका ॥
भजने :-
॥ गुपीत प्रकट झाले राया । आम्ही लागु हो लागु तुम्हा पाया ॥



॥ आरती नं. १९ ॥
॥ जळगाव दांडातील मुळावरची आरती ॥

## ॥ गुपित प्रकट ॥

॥ गुपीत प्रगट । आता झालेसे राया ।
करून आरती । ओवाळु अवधुताच्या पाया ॥घृ॥०१॥
॥ स्वर्गिचा लभेद । मिर्त लोकी करन राज ।
लभेद नरदेही । अवतार उभा राहीन महाराज ॥
॥ लभेद अवतार धनी । याहीच्या ध्वजा अस्मानी ।
तिरलोक करून गोळा । उभा राहीन चवथ्या खुम्मी ॥
॥ तार बा तु देहे तारं । तुमच्या पासुन हा विस्तार ।
उतरजो पैल पार । तुमच्या नामाचा आधार ॥०४॥

॥ अवसर आरती । त्याहीच्या पासुन नव ज्योती ।
चौदा चौक्या पार । देहा उपर अवसर । देवा ओपार अवसर
करूनी आंघोळा । ऋषि लभेद भेटन खरा ।
तारण जीव-ज्योता । समजावुन अवघ्या खुणा ।
समजावुन अवघ्या घुता । सोहंम दयाहो भेटा ॥
॥ समज हो समज कृता । अवघी किल्ली देवाच्या हाता ।
किल्ल्याचे कवाड । वाजे वाजतीन मोहंर ।
वाजतीन मिर्तलोका । नांदवन तयाला नाही धोका ॥
॥ देहीच्या दिप माळा । लावुन पाडली अंधारी ।
नांदवजो याहीचे पळ/फळ । देवा लावजो मशाली ।
मशाली दिसें ध्वजा । मोहंरे होणार लभेद राजा ॥०७॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

## चौदा या चौक्या भारी । आणुन पाडली अंधारी ।



देवा ! या देहीत तुच चौदा चौक्या आणुन सुध्दा, या चौदा चौक्यात का अंधारी पाडली आहे ? या भारी चौदा चौक्याचा प्रकाश या देहीला का लाभत नाही आहे ?

## देहीच्या दिपमाळा । देवा लावजो मशाली :-

कृष्णदेवा ! देहीतील चौदा चौक्याच्या चकरस्थानी देवांच्या गुणांच्या दिपमाळा लावुन सुध्दा या दिपांचा उजेड या देहीला का नाही ? कृष्णदेवा ! तुम्ही आम्हावर शक्तीपात करून तुमच्या चैत्यन्य ची मशालीने या देहीच्या दिपमाळा च्या ज्योता मशाली प्रमाणे उजळा. आणी या चौदा चौक्यावरच्या गुणशक्ती जागृत करून, या देहीला संपुर्ण प्रकाशमान करा. कृष्णदेवा ! अवघी किल्ल्या तुमच्या हातात आहेत. तुच या देहीचे कवाड उघडुन या देहीच्या चौदा चौक्याठाई तुमच्या मशाली पेटवुन तुमच्या सत्तेच्या ध्वजा लावा. कृष्णधन्या ! तुमच्या शक्तीपात व्दारे तु लावलेल्या मशालीनेच लभेद धन्याची ध्वज दिसुन गुपित प्रकट झाले हो आता । तुमच्या चरणावर आमचा माथा ।



॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. २० ॥
उटी च्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी..
॥ जुनी मुळ आरती ॥

## ॥ ये देव स्वामी अवधुता ॥

॥ ये देव, ओ देव, स्वामी अवधुता । कृष्ण अवधुता ।
म्हणुनी बाळाशी, म्हणुनी दासाची । भेट दे आता ॥घृ॥ ०१ ॥
॥ कैलासा येवुन, आता सागे ग्यान । आता सांग खबरं ।
सावंग नगर । सावंग नगर, होय तुमचं ठाणं ॥
॥ सावंग नगर, फुला पुष्पांचे हार । फुल पुसमाचे हार ।
तुमचे नामाचा, देवाच्या नामाचा । होतो गजर ॥
॥ याहीची आरती, मनभाव केली । सत् भाव केली ।
तुमच्या नामाची, देवाच्या नामाची । ज्योत उजळली ॥०४।
॥ कल यवगी भक्त । देवा सम्मान । राया समान ।
महा ऋषि आले । याहीला शरण ॥
॥ कल यवगी गाही, सांगतो तुही । सांगतो तुही ।
देही या बिरद । तुमच्या पायी ॥
॥ कल यवगी महीमा । हरी तुमची गाही । हंकार सांगे
देवाच्या नामानं । तुमच्या प्रतापी । तरले अवघे ॥०७॥



॥ आरती नं. २१ ॥
उटी च्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी..
॥ जळगाव पाठातील आरती ॥

## ॥ जयदेव जय भगवंता स्वामी अवधुता ॥

॥ जयदेव जयदेव, जय भगवंता । स्वामी अवधुता ।
म्हणुन दासाची, म्हणुन बाळाची । भेट घे आता ॥घृ॥०१॥
॥ कैलाशी राहुन, नित सांगे ग्यान ।
देवगाव नगर, हे तुझ ठाणं ॥
॥ देवगाव नगर, फुलांचे हार । पुष्पांचे हार ।
देवाच्या नामाचा । नित होतो गजर ॥
॥ फुला या पुष्पांच्या, करूनी माळा । घालुनी गळा ।
येवु दयाहो दया । अवघ्या गोपाळा ॥०४॥
॥ अवघ्या आंगी ल्याले । चंदनाच्या उटी ।
भक्त या राजाच्या । नित व्हावे भेटी ॥
॥ तिरलोकी गाही । सांगतो तुयी ।
हेही गा बिरद, येई गा बिर्द । तुया पायी ॥
॥ तिरलोकी गाही । हंकार सांगे । हंकार सांगे ।
देवाच्या नामानं । तरल्या जाये ॥
॥ कलयवगी भक्त । देवा सम्मान ।
महा ऋषिमुनी येतीन । नामाला शरणं ॥०८॥
॥ कापुर आरती । मनोभावे केली । सत्भाव केली ।
देवाच्या नामाची, हरीच्या नामाची । ज्योत ओवाळली ॥०९॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. २२ ॥
उटी च्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी..
॥ मुळावरची आरती ॥

## ॥ ये देव स्वामी वेल्हाळा ॥

॥ ये देव ओ देव । या श्री वेल्हाळा । कृष्ण वेल्हाळा ।
माझ मजला दयाहो, मोक्ष मजला दयाहो । सुगंध निळा ॥घृ॥
॥ मोक्षाचा कार, नामी अधार । नामी आधार ।
रंचलासे कार । या पृथ्वी वरं ॥
॥ सर्व्या आंगी लेले, चंदनाच्या उटी । चंदनाच्या उटी ।
केशर कस्तुरी, टिळा लल्लाटी ।
॥ पायी या पद्मं, टिळा लल्लाटी । मुखी लल्लाटी ।
देवा या भक्ताच्या । आता झाल्यां भेटी ॥०४॥
॥ फुला या पुष्पांच्या, गुंफुनी माळा । घालुनी गळा ।
आनंद हा झाला । अवघ्या गोपाळा ॥०८॥
॥ पायाचा प्रताप, नामी उल्हास । भजनी उल्हास ।
पावन हे व्हावे । भक्त राजास ॥०४॥
॥ देहे/देव सागर भरला । कृष्णाच्या पोटी । देवाच्या पोटी ।
नव राज्य करा । दावा या दृष्टी ॥
॥ नव राज्य करा । स्वामी वेल्हाळा । कृष्ण वेल्हाळा ।
अवघ्या गोपाळावर । असु दयाहो दया ॥०८॥
॥ आचार विचार, धरूनी मनाशी । धरूनी मनाशी ।
धावुन हे आले । राया जगजेठी ॥
॥ आले हे राया । धरलीसे छाया । धरली हे माया ।
असु दयाहो दया । अवधुत राया ॥
॥ आले तिरनयनं । सांगे शकुन ।
अनंत यवगाचे । चुकवा हो मरण ॥
॥ कापुर आरती, मनभाव केली । सत्भाव केली ।
तुमच्या नामाची, हरीच्या नामाची । ज्योत उजळली ॥१२॥
भजन :- ॥ आनंद रूपा । भेट मायबापा । आरती ओवाळु ॥



॥ आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. २३ ॥
उटी च्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी आरती

## ॥ ओवाळु आरती योगीमुनी राव ॥

॥ ओवाळु आरती, योगीमुनी राव । योगीमुनी राव ।
महापुरूषांची माव कळेना । उभा आहे देव ॥घृ॥०१॥
॥ निर्गुण गादी भक्तजन हो । महापुरूष आला ।
आकाशवाणी नवल, आकाशवाणी गिण्यानं । तो सांगे जगाला ।
॥ आदीमुनी महामुनी । महापुरूष गर्जला ।
तिन ज्योता तिन ताळी । अवधुत खेळला ॥

॥ निराकार निर्मळ । निर्गुण पुरी थाटला ।
आदीपुरूष महाराज । याहीनं पाया रंचला ॥०४॥
॥ आदीपुरूष अवधुत अनामत निर्गुण । निराधारी ।
निशं:कलंकी अवतार ज्योत । उतरली भारी ॥
॥ आदीपुरूषाची झाली मांडना । मिर्त लोकात ।
धर्म पंथ गट, जोग मोडनं । आपल्या हाता ॥
॥ नवा खंडा वरत, आदीपुरूषा चा दरबार ।
जेजे बोलानं तेते होईन । जागी करन सारं ॥
॥ महाव्दाराचे पुंजन भारी । अवधुत प्रार्थना ।
आदीपुरूष महाराज । यादेवाची गर्जना ॥०८॥
॥ प्रतिपदा अवसर, भक्त गर्जती । महा भार ।
अबीर गुलाल पुष्प । कापुर ज्योती भंम्कार ॥
भजने :- ॥ लदबद कापुर ज्योती । तुम्हा ओवाळु महाराजा श्रीपती ॥
॥ लदबद कापुर ज्योती । तुम्हा ओवाळु महाराजा चतुर्पती ॥



॥ आरती नं. २४ ॥

उटी च्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी..

॥ जुनी आरती ॥

## ॥ मन भक्ती सद्भाव देव ॥

॥ मन भक्ती सद्भाव देव । सत्भाव देव ।
करून आरती, ओवाळु देव । ये देव वो देव ॥घृ॥०१॥
॥ निश्चय करून, भक्ती करा । भक्ती करा ।
आता आदीपुरूष । येईन घरा ॥
॥ यवगाचा खेळ, या योग्याला ठावं । कृष्णाला ठाव ।
तोची जाणे कळा । तो भक्त राज ॥
॥ समया पालटुन, यवग खेळे । यवगी खेळे ।
तोची यवगी राजा । तिरकुट पसारे ॥०४॥

॥ प्रस्थ तिर्थ करून, नाही पसारा केला । नाही पसारा केला ।
सत्यवगी आदीपुरूष । उभा राहुन लोपला/लपला ॥
॥ तो यवगी, उभा राहीला । पाय पुढे केले ।
योगी जोगी म्हणे, कळेना कोणाले । कळेना अहिनाले ॥
॥ सांगी सांगता । काही उमजा । मनी समजा ।
निंदा करू नका । जाणे भैस राजा ॥
॥ सात खंड वसले । नवखंड पृथ्वा । नवखंड पृथ्वा ।
चंद्र-सुर्य दोन । आकाश भुवना ॥०८॥

॥ ब्रम्हा विष्णु । शंकर चैत्यन्या । राया निर्गुण ।
आदीपुरूष महाराज । अवतार सात जन ॥०९॥
भजने :-
॥ हात जोडा ज्योतीले । आरती ओवाळु या आदीपुरूषाले ॥
॥ हात जोडा ज्योतीले । आरती ओवाळु या आदी शक्तीले ॥
॥ आरती ओवाळीतो देवा । सोयंम्रूप/प्रकटरूप या बाळाले दावा ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १०/आरती भाग ०२ ॥

॥ आरती नं. २५ ॥

उटी च्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी..

॥ मुळावरची आरती ॥

## ॥ आरती अरज, हा देव आहे बरा ॥

॥ आरती अरज, हादेव आहे बरा । हा देव आहे बरा ।
आता देहे तारा । यवगा यवगा ॥घृ॥ ०१ ॥
॥ हिंडता-फिरता, यवग झाले फार । यवग झाले चार ।
भंग नाही आता । नर देहीस ॥
॥ घेवुनी हे नाम । आलो तुम्हा कडे । आहो तुम्हा कडे ।
ओलांडले यवग । राया सारे ॥
॥ घेवुनी हे नाम, हे आहे लल्लाटी । असावे लव्हाळी ।
आता झाल्या भेटी । आता होतीन भेटी । कल यवगी ॥०४॥
॥ देहे या धरुनी, केली रंचणुक । केली रंचणुक ।
नाम आठवितो, आठवा हो नाम । सदोनित ॥
॥ देहे या प्राण्याची, वाढवला वेलं । वाढवा हो कथा ।
आयुष्य चढवा हो । समरथा ॥
॥ रायाचं रुदर । शंकराचे घर । शंकराचे घर ।
तिरलोकी विस्तार । याहीचा आहे ॥
॥ आचार विचार, धरुनी मती । धरुनी मनाशी ।
पावन हे व्हावे । भक्त राजाशी ॥ ०८ ॥
॥ येवुनी भैस, उठवण जना । उठवन जगा ।
वाणी ऐका हो । गुणी जना ॥
॥ कलयवगी राज्य, आहे या भैसाच । आहे या भैसाला ।
परसन्न व्हावे । यादवाला ॥
॥ आरती ओवाळु, अनामत खासा । अनामत खासा ।
वेल वाढवा हो, मानवाचा । यादवाचा ॥ ११ ॥



॥ आरती नं. २६ ॥

## ॥ आदीरुप आले घरा ॥

॥ आदीरुप आले घरा । धनीदेव, आपरुप आले घरा ।
आरती ओवाळु हा देव । चतुर आहे खरा ॥घृ॥०१॥
॥ आदी रुप रुपाशी आले । निराकार निर्गुण ।
गोपाळाच्या मेळ्या मध्ये । उभे राहले येवुनं ॥
॥ सोयंम् रुपी महाराज आले । रुप दावलं डोळा ।
होत पुर्विच भाग्य माझं । आता आले फळा ॥
॥ होत पुर्विचं फळा आले, रोग-ताप जळाले । तुया, नामाचा प्रताप ।
हद्या मध्ये ज्योत उजाला । झाला आपो-आप ॥०४॥
॥ पाहुन ज्योत, मन उन्मत झालं । अल्लखं निरंजन ।
निराक्षरी नाव प्रभुच । घ्याहो ओळखुन ॥
॥ देही होतो विदेही होतो । येतो पुन्हा पुन्हा ।
अथर्वन् वेद चवथ्या खुम्मी । करतो गर्जना ॥ ०६ ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥

॥ आरती भाग ०२ ॥

॥ आरती नं. २७ ॥

उटी च्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी..

॥ जुनी आरती ॥

## ॥ कापुर आरती सद्भाव मनी ॥

॥ कापुर आरती सत्यभाव मनी । सत्भाव मनी ।
ओवाळु हा देव । आदीमुनी ॥ धृ॥०१॥
॥ आदीमुनी देव, आंगी करे काज । आंगी करे काजं ।
करू केलं याहीनं । देव राज ॥
॥ मुळयवगाचा देव, उभा योगीराव । उभा यवगी राव ।
याहीनं लावली हो । नवी ध्वज ॥
॥ उभारली ध्वज, थापलं यवग । स्थापलं यवग ।
अवतारांन पुन्हा । धरला रंग ॥०४॥

॥ कल या यवगात, सत्यवग आले । सत् यवग आलं ।
याहीचं बोलनं हो । सही झालं ॥
॥ आकाशाची वाणी, सांगे जीवाजनी । सांगे भक्तांजनी ।
झालासे आनंद । सर्व्या ठायी ॥
॥ प्रतिपदा दिवस, उगवला परवेशी । उगवला परवेशी ।
झालासे आनंद । भावीकाशी ॥
॥ प्रतिपदा अवसर, पुंजन आहे भारी । आहे भारी ।
मुज-याला आले । नर-नारी ॥०८॥

॥ पुंजनाच्या वेळी, नगा-यावर टाळी । नगा-यावर टाळी ।
साहंकारी उभा । लवलावी ॥
॥ केशर कस्तुरी, चंदन उटी । चंदन उटी ।
देवा या भक्तांच्या । झाल्या भेटी ॥
॥ गुंफुनी या माळा । फुल पुष्पाच्या । फुल पुष्पांच्या ।
गळा घालु आता । अवताराच्या ॥
॥ उदा-कापुराचे भंम्कार उठती । भंम्कार उठती ।
आदीमुनी देव । ओवाळती ॥१२॥

॥ स्वर्गिचे दैवत, पुंजले या धरणी । पुंजले या धरणी ।
घातलीसे मिठी । राया चरणी ॥१३॥

भजने :-

॥ लदबद कापुर ज्योती । तुम्हा ओवाळु महाराजा श्रीपती ॥
॥ लदबद कापुर ज्योती । तुम्हा ओवाळु महाराजा आदीमुनी ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. २८ ॥
उटी च्या वेळी हमखास म्हणण्यात येणारी..
॥ मुळावरची आरती ॥

# ॥ पंचम गोत्र परमेश्वरा ॥

॥ पंचम गोत्रं परमेश्वरा । ओवाळु श्री अवधुता ।।घृ।।



॥ पंचम गोत्र परमेश्वरा । ओवाळु श्री अवधुता
यवगा साठी धावुन आले । कार हा रंचला ।
नवखंड पृथ्वीच्या वर । झेंडा उभा केला ।
इशवं बळानं वायव द्युत । वाणी, सांगे देव जगाला ॥
किंवा ईशवं बळानं वायव द्युत । अवतार हा आला ।।
किंवा आपल्या बळानं धनी देव । अवतार हा धरला । ..जळगाव दांड ची टुक
किंवा पिसे भयान वायव द्युत । वाणी सांगे जगाला । ..जळगाव/कारला टुक
पंचम गोत्र परमेश्वरा । ओवाळु अवधुता ॥ 01।।

॥ जीव ज्यात बहु अन्जान । आले देव उध्दराया/ताराया
लक्ष्य चौ-यांशी आहो जन्म । आले देव फेडाया ।
बहु दिवसाचे आहो दुःखी । आले दुःख मिटवाया ॥ ०२ ॥

।। यवगा परी आहो यवग । यवग झाले चार । ..जळगाव चरणटुक
॥ यवगा साठी उभा यवगी । पहा देव डोळ्यानं
अगाध आहे परमेश्वर । प्रभु देव नायक ।
तिर लोक्याची आहो दोरी । आता धरली हात ॥ ०३ ।

॥ सतरा या दिवसाची उभी । उभी जिवन कळा ।
किंवा :– ।। सतरावी यवगाची हो राया । उभी जीवन कळा । ..जळगाव टुक
अनामीकाच्या घरी अवतार । उभे देव राया ।
होतो पुर्विचे सवं गडी । आलो/आहो एका ठाया ॥ ०४ ।

॥ वजाबाकी झाली बेरीज । अक्षयी/अक्षरी उभा दिवस/द्युत
मो-हरें होणार सांगे द्युत । दृष्टी च्या देखत ।
या देहीच्या देखतं । आहे, अवतारा ची भेट ॥ ०५ ।

॥ भाव धरुनी आरती केली । ओवाळु पंचद्युता ।
बहु दिवसाची अरज आहे । याहीच्या चरणी माथा ।
आता पुरवले मनोरथं । उभं, केलं आपले हात ॥ ०६ ॥
किंवा :- आता पुरवा मनोरथं । उभ/जागी करा आपले हात,
गेलं आलं खबर घ्यावी । पुरवा आपले हात ॥ ०६ ॥

भजने :-
॥ पंचम गोत्र परमेश्वरा । तुम्हा ओवाळु महाराजा अवतारा/सारंगधरा ॥
॥ आरती ओवाळीतो देवा । प्रकट रूप या बाळाले दावा ॥
॥ आरती ओवाळु पंचधुता । देवाच्या चरणा वर माझा माथा ॥
॥ श्री कृष्णा अवधुता । अनामत राया तुमच्या, चरणावर माथा ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. २९ ॥
उटी च्या वेळी म्हणण्यात येणारी..
॥ आनंदराव बुवा यांच्या पाठयातील आरती ॥

## ॥ जयदेव शंकर नाथा ॥

॥ जयदेव जयदेव जय शंकरनाथा । हरी शंकर नाथा ।
आरती ओवाळु । तारा हो आता ॥घृ॥ जयदेव जयदेव..
॥ शंकर कृष्ण एक/येथे । चौ-यांशी मोडन ।
चौ-यांशी मोडन । भैरव नाथ ॥
॥ कैलासा वरुनी । आले शंकर धनी ।
दोहीत दानवाच्या । मोडन खाणी ॥
॥ इश्वर धनी । आले धावुनी ।
शकुन वाणीची । चालवली धुनी । चाललं धुनी ॥०४॥

॥ यवगाचा पाटील । होय शंकरनाथ ।
मिर्त लोका मध्ये । करन थाट ॥
॥ भजोमत-विरसत । विरसाव ज्योती । प्रितम ज्योती ।
हे एक ओवाळु, । पंच आरती ।
कृष्ण या नाथाला, । आणाव इथी ॥
॥ देहीचा पाटील । तो होय शंकर नाथ ।
कार करन तो । यवग्याच्या हात ॥
॥ शंकर खास । बहु आहे भास ।
शिदाई शकुन । दयाहो आम्हास । आला हो दिवस ॥०८॥

॥ शंकर कृष्ण । बहु आहे बळी ।
जागी या करन । तिनही ताळी ॥
॥ बोथ कलीचा । आलासे धुरा । झालासे धुरा ।
कृष्ण राज आप । आले से घरा
भजा श्री कृष्णाला । आणाव घरा ॥
॥ पोराच्या गळा । घातली माळ ।
शंकरानं तयार केले । बाळ गोपाळ ॥
॥ शंकर शंखरा । आम्हा अंम्बर करा, देहे अंम्बर करा ।
शंकर धनी होय । यौगाचा खरा ॥१२॥

॥ चतुर्पती आहे । आत्म शुध्दी ।
भजा हो कृष्णाला । चालन सिध्दी ॥ १३ ॥

भजने :-
॥ नाम घ्याहो प्रेम लावुनी । होईन हो शंकाची आरोळी ॥
॥ हरी हरी भक्तीला जीवन । आरती ओवाळु दोन्ही कर जोडुन ॥
॥ हरी हरी भक्तीला जीवन । आरती ओवाळु दोन्ही हात जोडुन ॥
॥ हरी हरी भक्तीला जीवन । तुया चरणी हो देवा आहे लोटांगण ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. ३० ॥
उटी च्या वेळी म्हणण्यात येणारी...
॥ नविन पाठातील आरती ॥

## ॥ आरती शंकराची ॥

॥ जयदेव जयदेव जय तु देवा । हरी तु देवा ।
आरती ओवाळु । तु सुखः दाता ॥ घृ ॥ ०१ ॥
॥ सर्व्या आंगी लेले । चिताचे भस्म ।
जावुनी बसले । काशी तिर्थास ॥
॥ महादेवी गेले । तुझे गा भक्त ।
गौरी पुत्र उभा । रस्त्यात येवुन ॥
॥ पायी या पद्म । घेतो तुमचे नाम ।
भक्ताला घेवुन । दासाला घेवुन । पदरी घ्यानं ॥०४॥
॥ सातपुडा आहे । तुमचा पर्वत ।
पर्वता वरून वाहे । रसाई अमृत ॥
॥ ओहंम्-सोहंम् । बीज मंत्रर ।
या रायान दिला, या शंकरानं दिला । सर्वतरास ॥
॥ जोकोणी भक्त, नामी राहनं । भजनी राहंन ।
त्यालाच प्रभुच, त्याला या देवाचं । होईन दर्शन ॥०७॥

भजने :-
॥ नाम घ्याहो लवलाही । होईन शंकाची आरोळी ।
॥ होईन शंकाची आरोळी । भक्त होईन तेव्हा जागी ॥
॥ जागी होईन भक्त । जागी होईन भक्त ।
तिस-या डोळयाला । नका देवु तकलीफ ॥

गजर :- ॥ हातात डमरू, गळ्यात माळ । कपाळी शोभे चंद्रटिळा ।
शंकरा । पार्वतीच्या वरा । ये माझ्या माहेरा ॥



॥ आरती नं. ३१ ॥

## ॥ सावळानंदन ओवाळु निर्वाण ॥

॥ सावळा नंदन । आता ओवाळु निर्वाण ।
चवथ्या खुम्मावरी । देवरायाचं निशाण ॥ घृ ॥०१॥
॥ प्रथम यवग महाभारी । देहे धरली भुम्मेवरी ।
उभा या राहुन । गुप्त झाला माझा हरी ॥
॥ उभे ते चरांचर । धनी आहे निराकार ।
स्वर्ग हे पाताळ । याहीन स्थापलं भुम्मा नगर ॥
॥ उभे देव निर्वाण । सत्य भाव धरा ध्यानं ।
अनंत यवगाचं । रायान सागंतल ग्यानं ॥०४॥
॥ निर्वाणाची ज्योत । उभा आहे चवताळात ।
स्वर्ग पाताळ । जागी होईन/करन मिर्तलोक ॥
॥ जागी होवुन भैसा हाती । मोडन चौ-यांशीच्या वाटी ।
उभा हा राहुनी । येरझार चुकवन कोटयानं कोटी ॥
॥ उभा या राहुन । चुकवण चौ-यांशी फेरा ।
मानवा सोय धरा । गडया रे जाउ सावंगपुरा ॥ ०७ ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. ३२ ॥
॥ मुळावरची आरती ॥

## ॥ श्री अनामता । धनी देहेच्या मालका ॥

॥ आरती ओवाळीतो । श्री अनामता । धनी देहीच्या मालका ।
भक्त तारले । श्री अनंता । बिरद सांभाळ आता ।
होय यवगावर । सावध आता । उशीर लावु नका ॥घृ॥०१॥
॥ अनंत यवगाचा । होय मालक । धनी कैलाश नायक ।
भक्ती अधार । नाम तारक । हे होय निरशुन्याची ज्योत ।
कापुर उजळाना । हातानं । कार/करूणा करा अवधुता ॥
॥ प्रथम यवगी । भक्त हे अपार/फार । त्वां तारले सारंगधर ।
तुमच्या नामी । मजला अधार । धन्य भाग्य थोर ।
तुमचे चरण । दावा मजला । कारूणा करा अवधुता ॥
॥ चार वेद शिणले । गावतांना । तुझी किर्ति निर्वाणा ।
ऐस कैक । थकले गाउन । धन्य तुमवे नाम ।
महीमा वर्णवेना । मज आता । डिगांबर धनी नाथा ।
वाणी वर्णवेना । मज आता । धनी देहेच्या मालका ॥०४॥
॥ तेरव्या सिध्दिचं । होय बोलनं । कधी याल देहे धरून ।
डोळे कधी निवतीन । तुज पाहुन..। दुजा आधार नाहीमज जाण ।
देहे धरून तुम्ही । या आता । बिरद हे संभाळा ॥
॥ कधी याल देवा । देहे धरून । तुम्ही सांगा हो निर्वाणा ।
आरती ओवाळतो । ज्योतीला । कलयवग भासलं मजला ।
ऐसे कधी करशीन । धाव आता । तुमच्या चरणी माथा ॥
॥ देहे धरून तु । का ना येशी । तुझा आधार कैसा मजशी ।
अधार रूपाचा । चरांचर । यवग सर करा ।
यवगाला आधार । नाही आता । कार उभा करा पंडीता ।
यवगा यवगी । चाल नाही । ये आता अवधुता ॥
॥ गोपाळ भुलविले । हे फार । नाही ठेवली नजर ।
याशी कोणी नाही । अधार हो । सावध व्हा यवगावर ।
एवढी अरज । ऐका अवधुता । देहे धरा पंडीता ॥०८॥
॥ घडामोड झालीसे । हे फार । देही करा अंम्बर ।
तेव्हा मन । होईन हे स्थिर । तुम्ही विश्वाचे अंबर
तुम्ही विश्वास । का करता उशीर । यवग जागी कर ।
तुमचे चरण । दावा आता । कारूणा करा मायबापा ॥
॥ भक्त भावीक । हे तुमचे । तिथेच मन तुमचे ।
का ना येशीन । देवा धावुन । कुठ गुंतले मन ।
एवढी अरज । ऐक अवधुता । अवतार घ्याहो आता ॥
॥ तुम्ही याहो । ऋषिकेशी । ठेवा अंम्बर पदाशी ।
गोपाळ लावा हो । कासाशी । आस तुया नामाची ।
तुमची वाणी । बोले निरशुनं । कापुर उजळा आता
कापुर उजळा । आपल्या हातानं..। कार करा अवधुता ॥११॥

भजने :- ॥ अनामता । धनी देहीच्या मालका । आरती ओवाळीतो ॥
॥ अनामता । तुमच्या चरणी माथा । आरती ओवाळीतो ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. ३३ ॥
॥ आरती ॥

## ॥ आरती ओवाळु बहु प्रेमानं ॥

॥ आरती ओवाळीतो । बहु प्रेमान..। धनी अवतार निरंजन ।
सर्व्या घटी भरला । जीवन..। हा खेळ केला देवानं ॥घृ॥०१॥
॥ देव सर्व्या ठायी । रूप धरून..। उभा राहीला सगुण ।
बरी माव केली हो । निगुर्णानं..। हा जुम्मा घेतला त्यानं ॥
॥ देव अनंत । मावेचा..। आहे भावीकाचा ।
सर्वा खेळ । आदीरूपाचा..। अंत कळेना त्याचा ॥
॥ आरती उजळा हो । भावाची..। सोहंम् उजळा ज्योती ।
मेहर होईन । आदीपुरूषाची..। सगुण या निगुर्णाची ॥०४॥

॥ निजरूप झालीसे । हे सेना..। जागी करा सगुणा ।
हा खेळ तुमचा । निर्वाणा..। भेट दयाहो भक्तजना ॥
॥ आता धावुन । या सगुणा.. । भेट दयाहो निगुर्णा ।
तुमच्या ध्वजा लावल्या । अस्मानात..। उभे तुम्ही राहाना ॥
॥ किती चित्तलं । या कर्त्यानं..। खेळ केला सगुणांन ।
अवघ भाकल । कृष्णांन..। उभा हा देह धरून ॥



॥ खंड १० :- आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. ३४ ॥
॥ आरती ॥

## ॥ आरती भावीकाची ॥

॥ आरति भावीकाची । महामुनी नेणंत्याची ।
सेरूपी मिळाले । अर्ज करून तिरलोक्याची ॥घृ॥ ०१ ॥
॥ मुळ यवगाची कथा । कथन केली समर्था ।
वचनी गोयला कृष्ण । तिर लोक्याचा दाता ॥
॥ वाणी ऐका मुळपुरूषाची । प्रेम भाव भक्ती याहीची ।
याहीन वळवली । कामधेनु चौरंगाची ॥
॥ कलयवगी आकाशवाणी । घेवुन आले माझे धनी ।
पुर्विचा संगजोड । वडीलपण त्या आदीमुनी ॥०४॥

॥ पुर्विचा संगजोड । तिरलोकी येतीन दोन केवळ ।
उगवला तिरनयन । खेळ आलासे जवळ ॥
॥ बहु यवगाचा सवंगडी । शिक्का महामुनी जवळी ।
तिरनयनाचा खेळ आला । याहीची भरली चौकडी ॥
॥ गरजला महामुनी । देवराज होईन धरणी ।
पाहजा डोळयानं । नित्य रहा हरी भजनी ॥०७॥

भजने :-
॥ आरती भावीकानं केली । सोहंम् ज्योत हे ओवाळली ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ॥
॥ आरती नं. ३५ ॥
॥ जुनी आरती ॥

## ॥ आरती आनंदाची ॥

॥ आरती आनंदाची । हे होय आदीभैस नामाची ।
सांगी हे सागंतली । पुढे देव तारण अवघ्याशी ॥घृ॥ ०१ ॥
॥ आनंद भैस आला । अवतार अहीना घरी धरला ।
चौदाविच्या ठायी । तारू केलं सर्वत्राला ॥
॥ शक्ती हे चैत्यन्या । ब्रम्हा विष्णु तिरनयन ।
तिनयवगाची राजपदी । निष्कलंकी पुस घेईन ॥
॥ आदीपुरूष आदीशक्ती । मिर्त लोकी उभे राया ।
उभा हा राहुनीया । जागी करन सर्व नरदेहा ॥०४॥

॥ आपल्या बळान । धनीदेव अवतरले येथं ।
मो-हं होणार सांगे द्युत । सांगी सांगे सर्वत्रास ।
नामीच राहा गडे हो । पुढे देव तारण अवघ्यास ॥

भजने :-
॥ आनंद रूपा । तुमच्या चरणावर माथा । आरती ओवाळीतो



॥ खंड १० :- आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. ३६ ॥
॥ आरती ॥

## ॥ ये देव अवधुता मोक्षाचा दाता ॥

॥ ये देव अवधुता । तु होय मोक्षाचा दाता ।
आरती ओवाळीतो । याहो सावळया नाथा ॥घृ॥ ०१ ॥
॥ संसार महासिंधू । ऐसा वेढा का घातला ।
कोटी जन्म घेता । मजला शिण बहु आला ॥
॥ प्रपंच व्यवहार । हे कथा आहे अम्बंर ।
भोगली चौ-यांशी । आम्हाला तार भुम्मेवर ॥
॥ बुध्दी हिन मती हिन । मजला कळत नाही ।
धुंडुन फिरून । आलो या नामाच्या ठायी ॥०४॥

॥ अवधुत हे वाणी । ब्रम्ह अवघड खुण ।
मोक्षाचं ठिकाण । बहु दुर्लभ जाण ॥
॥ अवधुता अनामता । माझी मिटवावं चिंता ।
हात या धरून । न्यावे आपले पंथा ॥०६॥

भजने :-
॥ अवधुता । अकाश माझा पिता । आरती ओवाळीतो ॥
॥ अवधुता । धरतरी माझी माता । आरती ओवाळीतो ॥
॥ अवधुता । चंद्र सुर्य ज्योता । आरती ओवाळीतो ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ॥
॥ आरती नं. ३७ ॥
॥ कृष्णपुरी ची आरती ॥

## ॥ आरती आनंद मुर्ति ॥

॥ आरती आनंदमुर्ति । दया शांती आहे पोटी ।
धर्माची होय मुर्ति । कृष्णराज आहे संगती ॥ घृ ॥०१॥
॥ लाख्या या महालात । पाचही पांडव अवतरले ।
मुखी नामाचा वर्षाव । तारू होते/आले कृष्णदेव ॥
॥ लाखो या लाखी महाल । आहे पांडवाच्या हाती ।
कृष्णाची मदत । आहे पाचही पांडवाशी ॥
॥ कृष्णाचा शकुन । बारा वर्ष तप करा ।
गुप्त या रूपानं । आपले तप पुर्ण करा ॥०४॥

॥ रूप हे धरून । देव किल्यात लपले ।
अधिकारी हे खरे । ओळखु नाही आले कोणाले ॥
॥ बारा वर्षे पुर्ण झाले । एका ठाई हो मिळाले ।
रूप हे कृष्णाचें । जैशे परवेशी उगवले ॥
॥ भिम या अर्जुन । नकुल आणीक सहदेव ।
संग होती द्रौपदा । ओवाळीतो धर्मराया ॥०७॥

भजने :-
॥ आनंद मुर्ति । माझा माथा तुया चरणी । आरती ओवाळीतो ।



॥ खंड १० :- आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. ३८ ॥
॥ कृष्णपुरी दांडाची आरती ॥

## ॥ आरती महाराजा जगदिशा ॥

॥ आरती ओवाळीतो । महाराजा जगदिशा ।
सर्वत्राच्या आधी । तुमच नाव आदीपुरूषा ॥घृ॥ ०१ ॥
॥ अवतार आदीमुनी । देहे धरून आले धनी ।
उतरले दैवत । कृष्णपुरीच्या मैदानी ॥
॥ कृष्णपुरी ठाण । इथ मिळाले संतजन ।
करीती आंघोळ । गंगा आली स्वर्गाहुन ॥
॥ गंगा हे यमुना । लखीलुट आली भागीरथा ।
मुळरंभा मुळाची । प्रसन्न झाली सरस्वती ॥०४॥
॥ पंचगंगा सागरी । या यादवाच्या घरी ।
महातिर्थ हे भारी । उध्दारती नवनारी ॥
॥ यादवाचा वाडा । अनामीक पुसे वेळोवेळा ।
नवखंड पृथ्वीवर । नित वाजतो चौघडा ॥
॥ जागी करन जागरूत । गिळली अनामत ज्योत ।
बेचाळीशीच्या साली । अखंड गोयली वचनात ॥०७॥
भजने :- ॥ आनंद रूपा । भेट मायबापा । आरती ओवाळीतो ॥
॥ जगदिशा । नको करू बेआशा । आरती ओवाळीतो ॥
॥ जगदिशा । मुजरा आहे माझा । आरती ओवाळीतो ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. ३९ ॥
॥ कृष्णपुरीची आरती ॥

## ॥ ओवाळु हा देव कृष्णपुरीचा ॥

॥ ओवाळु हा देव । कृष्णपुरीचा अवधुतराव ।
तिरलोक करन गोळा । चौताळी याहीचं नाव ॥घृ॥ ०१ ॥
॥ भुम्मा गोयक करन गोळा । चवही खुम्माचा जिव्हाळा,
अवघ्या जीवाचा जीव्हाळा ।
पहा हो डोळयान । उभा ब्रम्हरूप सावळा ॥
॥ श्याम हे सुंदर । रूप देवाचे चांगले ।
सदा खबर सांगे । घडी घटका आम्हाले ॥
॥ सांगते परंब्रम्ह । मानव नितीचा धर्म ।
अठरा जाती-न्याती । आता मोडन मेघश्याम ॥०४॥

॥ निधामी धर्म । कियाकर्म अवघे नेम ।
जोगी या वैरागी । जोग मोडन चवथा खुम्म ॥
॥ अजात आहे धनी । अजात करन मानव खाणी ।
अभेद याहीची वाणी । गर्जतीन ऋषिमुनी ॥०६॥



॥ आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. ४० ॥
॥ कृष्णपुरीची आरती ॥

## ॥ आले देव योगेश्वरा ॥

॥ आले देव योगेश्वरा । महाराजा दिगांबरा ।
तुम्हाला ओवाळीतो । पुरवा आकाशवाणीचा दोरा ॥घृ॥ ०१ ॥
॥ आकाश वाणीचे । तार लावा माझ्या ठायी ।
अनंत यवगाची । सदा खबर सांगा नवी ॥
॥ सदा खबर । हद्‌यी सांगे सारंगधर ।
भावीकाच्या घरी । देवानं धरला अवतार ॥
॥ उल्हासलं हे मन । भक्ता मागं येण केलं ।
भावीकाच्या साठी । उभे राहीले निर्वाण ॥०४॥

॥ भावीकाच्या घरा । पुन्हा धरला अवतार ।
पवित्र हे ठाणं । कृष्णपुरी भुम्मेवर ॥
॥ रहीवाशी व-हाडाचे । कृष्णपुरी आले कसे ।
भाव भक्ती साठी । विठोबा देव झाले पिसे ॥

भजने :-
॥ योगेश्वरा । भुम्मेवर कार करा । आरती ओवाळीतो ॥
॥ योगेश्वरा । तुम्हा मुजरा/नमस्कार आहे माझा । आरती ओवाळीतो ॥

॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ॥
॥ आरती नं. ४१ ॥
॥ कृष्णपुरीची आरती ॥

## ॥ ओवाळु ईश्वर-पुना देव ॥

॥ ओवाळु इश्वर पुना । देव ओळखा आपले मना ।
भक्तीच्या जीवना । भावीकाले सांगे खुणा ॥घृ॥ ०१ ॥
॥ भावीकाच्या ठायी । चरांचर वेळा महीमा तुही ।
येईन विठोबा रुक्माई । कृष्ण उभा राउळी ॥
॥ कलयवगाच्या देवा । तु तार आपले गडी ।
न्याहो पहील्या थडी । भरन या यवगाची चौकडी ॥
॥ चवखंडी भरुन । कार केला अन्जानानं ।
तुमच्या भेटी साठी । आमचे उल्हासले मन ॥ ०४ ॥

॥ उल्हासन पंढरी । येईन सावग नगरी ।
या भावीकाच्या घरी । पताका आहे कृष्णपुरी ॥
॥ पताका कृष्णपुरी । मोहीम बहु यवगाची ।
तुमच्या नामाची सदा । आम्ही देतो ललकारी ॥ ०६॥



॥ आरती भाग ॥
॥ आरती नं. ४२ ॥

## ॥ ओवाळु आदीशक्ती ॥

॥ ओवाळु आदीशक्ती । माय माझी रुपावंती ।
पंच या तत्वाची । करुन मनभाव आरती ॥घृ॥ ०१ ॥
॥ भरली पंचभुती । जीवा-शिवाच्या संगती ।
तिरभवनी सत्ता तिची । माय उभी उरल्या ज्योती ॥
॥ मुळ ज्योती पासुन । मुळ माया उद्‌भवली ।
सगुण-निर्गुणी । माय भरुन व्यापली ॥
॥ मुळ माया चैत्यन्या । हीचे पोटी देवांगण ।
तिरभवनी रंचन । या मायेच्या पासुन ॥०४॥

॥ चैत्यन्या पासुन । ब्रम्हा विष्णु तिरनयन ।
एक शेजुन केल्या तिन । मायेचे कितीक वर्णु गुण ॥
॥ उभी हो चरांचर । हिचा तिरभवनी विस्तार ।
सत्ता परंपार । मायची, बहु यवग राहणार ॥

भजने :-
॥ आदीशक्ती । बालक धरजो हाती । आरती ओवाळतो ॥
॥ आदीशक्ती । तारा या जीवन ज्योती । आरती ओवाळीतो ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. ४३ ॥

## ॥ आरती आदीमाया ॥

॥ आरती आदीमाया । आम्ही जडलो तुम्हा पाया ।
आरती ओवाळीतो । येवुन तार बाळ गोपाळा ॥घृ॥ ०१ ॥
॥ मिर्त या लोकात । मायचं नाव मायासुर ।
अग्नीच होय घर । अन्जानावर कृपा कर ॥
॥ चुकलो मी पामर । ऐसे यवग कठले फार ।
तुमच्या नामाचा । मज पडला विसर ॥
॥ तुमच्या नामान । थरथर कापे तिरभवन ।
तुमच्या आज्ञेत । उभे देवांगण ॥०४॥
॥ माया हे आदीशक्ती । आपले बाळ धरावे हाती ।
नवखंड पृथ्वीवर । आहे तुमची वस्ती ॥
॥ उभी माय आदीमाया । बाप माझा धर्मराया ।
दोघा या मिळुन । उभी केली आत्मकाया ॥
॥ द्रौपदा माय आई । श्रीकृष्णाची होय बाई ।
जडलो तुम्हा पाई । संभाळ करा मायबाई ॥०७॥
भजनं :-
॥ मायबाई ! तुमची गाही, त्वां मारले दैत्य ।
उरल्या दैत्यांचा येवुन मायबाई । करावं निर्पात ॥



॥ आरती नं. ४४ ॥
॥ नव्या पाठाची आरती ॥

## ॥ आरती गणरायाची ॥

॥ जयदेव जयदेव जय श्री गणराया । स्वामी गणराया ।
अवघ्या देवा आधी । तु देव माझा ॥ घृ ॥०१॥
॥ उंदरावर बसुनी । दुडदुडत येती ।
लाडु मोदक हाती । घेवुनीया खाती ॥
॥ भक्तांच्या संकटी । धावुन येशी ।
हा दास विनवीतो । तुया चरणाशी ॥
॥ भाद्रपद मासी होशीन भोळा । होतो भोळा ।
नारळ पुष्पांच्या । घालुनी माळा ॥०४॥
॥ कपाळी कस्तुरी लावुनी टीळा ।
तेणे तु दिसशी । सुंदर सावळा ॥
॥ पार्वतीच्या सुता । तु ये गणनाथा । ये गणनाथा ।
नेत्र शिणले । तुझी वाट पाहता ॥
॥ किती अंत पाहशी, निर वाहती । निर वाहती ।
मज बुध्दी दयावी । राया गणपती ॥
॥ प्रदोषाच्या दिवशी, चंद्र शापीला । चंद्र शापीला ।
समय देवाचा सोम देवाचा । मोठा आकांत झाला ॥०८॥
भजने :- ॥ गणराया । आम्ही लागु तुम्हा पाया । आरती ओवाळतो ॥
॥ उजळा कापुर ज्योती । तुम्हा ओवाळु महाराजा गणपती ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. ४७ ॥
॥ जुन्या काळची आरती ॥

# ॥ आरती पुर्विची ॥

॥ आरती पुर्विची । आकाश पाताळ याहीच्या हाती ।
घनघनकार तिरभवनी । केली ज्योत जागृती ।
चंद्र-सुर्याच्या लावल्या ज्योती । ओवाळला श्रीपती ॥ घृ ॥
॥ कुठंच नव्हतं काही । अमृत सागर देवाच्या पोटी ।
तेव्हा धनी विचार करी । केला दिवस-रात्रं आपल्या हाती ॥
आकाशी लावल्या ज्योती । आरती पुर्विची ॥
॥ पुर्विचे संग गडी । वाट पाहते भेटी साठी ।
येवुन सांगे गोष्टी । उभी केली शिरष्टी ।
अनामत उभे येथी । भक्त आले भेटीसाठी ॥
॥ मानवाचा नव्हता वाणं । याहीनं बनवलं तिरनयनं ।
मायेचे पुतळे केले तिन । हात पाय केले याहीनं ।
नाक कान डोळे दोनं । मुखी वाचा फोडली याहीनं ॥ ०४ ॥
॥ बनवलं तिन ताळ । अवघी किल्ली धन्याजवळ ।
बनवलं अन्न अगन् । उभा देव पृथ्वीवर ।
बनवलं पाणी पवन । लावलं मेघाशी गर्जन ।
मेघ हुकमात । ठेवले हो याहीनं ॥ आरती पुर्विची..
॥ बनवलं चव ताळ । ठेवली अवघ्यावर नजरं ।
अंतर नाही जराभर । हे होय अवधुताचं घरं ।
माथा ठेवला चरणावरं । देहं करा हो अंम्बरं ॥ आरती..
॥ कोण्या बिजांचा, नव्हता थारा । ऋषि घालती येरझारा ।
जावुन देवाच्या दरबारा । या देवाचे चरणं धरा ।
नाना परीचे बिजं । देवा तुम्ही पैदा करा ।
आनंद होईन सारा । अवघ्या भुम्मेवर खरा ॥ आरती..
॥ याहीच्या आंगाला नव्हतं विभुत । याहीचं नाव अवधुत ।
याहीच्या तपाला नव्हतं गणित । महामहा ऋषी शरणागत ॥०८॥
॥ यवगावरी तपस्वी नव्हतं कोणी । गेली वस्तु देईन आणुनी ।
अनमोल वस्तु उभी येवुनी । पाहये तिरभवनं शोधुनी ।
भुम्मेवर काढली वाणी । भक्त झाला कृष्ण धनी ॥
॥ याहीचं ताब्यांच देवुळ । याहीचा धाक चवताळात ।
उभे राहले येवुनी सभेत । अवघी सभा कापे थरथर ॥
॥ कृष्णाचे डोळे हिंडे/गेले दोन्ही । दोघे माय-लेक हिंडुनी ।
हिंडले चहु कोणी । यासी त्वां, नाही केली निर्वाणी ।
देव गोयला वचनी । जावुन गायीच्या गोठाणी ।
आणुन शेणं-पाणी । भुम्मा घेतली/घेजो सारवुणी ॥
॥ विडा दिला पानातुनी । लावली कापुराची धुनी ।
विडा घेतला हाती दोन्ही । अवघे दुःखं घेतले ओढवुनी ।
अवघ्या दुःखाचे झालं पाणी । साहयं झाला कृष्णधनी ।
हात फिरवला नेत्रांवरी । नेत्रं पाहये उघडुनी ॥ १२ ॥
॥ दृष्टा-दृष्टी अवधुत । याहीची कला नाही दुनियातं ।
देव झाले पचंद्युत । जम्मा झालं अवघ गोतं ॥ आरती..
॥ देवाचं बत्तिसा खरं । याहीचा न्याय बराबरं ।
तिनशे साठ सांध्या जोडं । लक्ष्य जीवाची घडामोडं ।
अवघी किल्ली धन्याजवळं । धन्यानं उघडले कवाडं ॥ १४ ॥
भजने :- ॥ आरती पुर्विची केली । सोहंम् ज्योत हे ओवाळली ॥

॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ०२ ॥
॥ आरती नं. ४६ ॥
॥ कृष्णपुरी चळवळ काळची आरती ॥

## ॥ हनुमंताची आरती ॥

॥ ओवाळु श्री रामा । रायाचा हनुमंत द्युत ।
यवगाचे कारण । आहे याहीच्या हात ॥ घृ ॥०१॥
॥ पृथ्वी वरत, रावण । मातला तो भुजबळी ।
आले हनुमान विर । संग, घेवुन लवलाही ॥
॥ लंका उभी केली । कंचना ची नगरी ।
कुंभकर्ण रावण । याहीन स्थापली गादी ॥
॥ चौदा चौकडया राज्य । भाकलं होतं त्या नगरी ।
झाला भ्रष्ट कार । त्याहीची, ढळन किल्ली ॥
॥ रिध्दि सिध्दी लक्ष्मी । त्याहीची मागं परतली ।
दृष्ट कल्पना खोटी । वासना गादीवर बसली ॥

॥ अही-रावण महि-रावण । व्दैत पुरीत, मातला ।
त्याहीच्या असत्यावर । त्याहीनं शेला पांघरला ॥
॥ भक्ताच्या साठी । देव कैवारी झाला ।
अहिरावण महीरावण । एका क्षणात मारला ॥
॥ पुढे हनुमान विर । अवतार मागे श्री राम ।
फुंकली लंका । नाही कोणाला मालुम ॥
॥ धडधड लंका जळनं । जळन कल यवगी ।
नका करू अंदेशा । देव झाला जागी ॥
॥ थोर याहीचे उपकार । हनुमान रामाचा धुत ।
कृष्णपुरी नगरीत । उजळली ज्योत ॥ १२ ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड १० ॥
॥ आरती भाग ०२ ॥
प्रसाद ग्रहन करण्याच्या अगोदर म्हणण्यात येणारे..

# ॥ आरती प्रसाद पद ॥

- प्रसाद वाटतांना म्हणण्यात येणारा गजर :-

॥ घ्याहो घ्याहो घ्या । उभे नका राहु ।
अवधुताचा प्रसाद घ्याहो । तसे नका जावु ॥

- प्रसाद वाटुन झाल्यानंतर प्रसाद ग्रहन करण्याच्या अगोदर म्हणण्यात येणारे....

-: आरती प्रसाद पदे :-

॥ ऐसे सांगतले या भजनात । ऐसा वागण्याचा करावा हेतं ॥
॥ थुंकु नये राउळात कोणी । सदा वदावी पवित्र वाणी ॥
॥ नको दुराचारी, नको मद्यपाणी ।
नसावे खुल्या शिरानं, नसो धुम्रपाणी ॥
॥ नको चोर लुच्चा, नको जार-कर्मि ।
नसावे जुगारी, नसो क्रुर-कर्मि ॥

॥ धरा भाव पोटी, वदा भैस वाणी ।
करी विनंती, हात जोडुनी दोन्ही ॥
॥ सत् सज्जनाला, आहे विनंति ।
वर्षाव येथे, सद् भाव बुध्दि/भक्ती ॥
॥ अवघेच आहो मग देव बंधु । ऐकाच मेवाचे हे नर बिंदु ॥
॥ भक्त जनांचा, मिळवुनी मेळ । खेळु हो येथे, बहु संख्य खेळ ॥

॥ प्रसन्न होईन, अवधुत खासा ।
परमय पदा बसवी, यशवंत दाता ॥
॥ आत्म शुध्दिचा कार, आहे तुम्हा हाती ।
म्हणुन गावली, अवधुता तुझी किर्ति ॥
॥ शुध्द आचरणाने, वागुनिया येथं ।
अवघेच चुकवु चौ-यांशीची खेप ॥

॥ कर्तव्याची आज्ञा मानुनी । निर्मळ शिल करुनी ॥
॥ आपले निर्मळ शिल करुन । अवघेच उतरु पहीली पार ॥
॥ परम पुज्य कृष्ण अवतार । हरीला सुमरु वारंवार ॥
॥ तया आठविता महापुण्य राशी ।
नमस्कार माझा अवधुत आबाशी ॥

**भजने** :- ॥ ज्याला भासन त्याला थोर । उभा आहे देव पुर्ण अवतार ॥
॥ उभा आहे पुर्ण अवतार । याहीच्या चरणी माझा नमस्कार ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥



॥ आरती खंड १० ॥
॥ स्तंभित ॥



॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ ॥



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ चतुर्पता अथर्वन् वेद उभा राहीन पोटी । निजरूप भुम्मा जागी करन सारी सृष्टी ॥

# चतुर्पता
# ॥ अथर्वन् वेद ॥

## ॥ खंड ११ ॥
## ॥ चतुर्पता अथर्वन् वेद चे ॥
## ॥ परिशिष्टे व ऋणनिर्देश ॥



**शब्दार्थ, चरणार्थ निरसन स्पष्टीकरन सह**



॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथ ॥
चतुर्पता
॥ अथर्वन् वेद ॥
॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

www.chaturpata-atharvan-ved.com

॥ खंड ११ ॥
॥ परिशिष्ट ०१ ॥
॥ श्री कृष्णा व्दारे झालेली यवगी मांडणा चे ग्यानपिंड ॥

# ॥ पंचतत्वं गायन कला ॥

## ॥ पचंतत्वांचे कामप्रमाणे गायनाची मांडणी ॥

निराकार निराधार निश्कलंकी निरंजन चैतन्य ज्योतीर्मय आदीपुरूष भैष धनी कृष्णाजीच्या देहभुम्मेवर उभा राहला. त्या तत्कालीन समयी एकाच वेळी १८ खेत्री द्युतगणं, भक्त योगी जाणते.. ईत्यादी च्या देहज्योती मध्ये ही भैसाच्या परिपुर्णतम् पुर्ण अवताराची ज्योत खेळली. पुढेही खेळत राहली. आजही खेळत आहे.

खंड-०१-०२-०३ या ओवी च्या सांगीत सांगतलेला भैसाच्या पोटी पुढेच यवगा कारण चौथ्या भैसाने राखुन ठेवलेला चौथा चतुर्पता अथर्वन् वेद हा कृष्णाजीच्या आंगी भैस उभा झाल्याने त्यांच्या मुखातुन बाहेर पडु लागला. भैसा पोटचा चतुर्पता अथर्वन् वेद चे तिरगुणांचे पलीकडचे बोधपुर्ण चतुर्पती ग्यान, निरंजन ग्यान, देह-जीवाचे ग्यान, भाकल्या शकुनाचे ग्यान सह ` ग्यान-भक्ती, विनवणी, अस्तुकी, उपदेश, चतुर्पतीची शिदाई ची शिकवण.. ईत्यादी कृष्णाजी च्या मुखातुन सांगी च्या रूपाने बाहेर पडु लागले. कृष्णाच्या चौदेहीच्या चारही वाणीतुन निघालेल्या मौसवाणी व्दारे बाहेर पडलेले चतुर्पता अथर्वन् वेदाचे अनमोल हिरे मोती लाल प्रमाणे असलेले शब्द समुह तत्कालीन पुनाजी, हेंगडुजी, देवमनजी...ईत्यादी १८ खेत्री द्युतगण सह जाणते भक्त योगी....ईत्यादी सर्वजन आपआपल्या पदरात झेलु लागलेत.

कृष्णाच्या कृष्णप्रकाशाव्दारे प्रचोदयात् झालेल्या धियो व्दारे पुनाजी, हेंगडुजी, देवमनजी ईत्यादी सर्व जाणते गण आपआपल्या पदरी आलेल्या कृष्णाच्या सांगीच्यां शब्द समुहाचे ओवी व भजने मध्ये रूपांतर करू लागलेत. सर्व कार्य सिध्द करणा-या मंत्रवत ओवी रंचना सह पंचतत्वाच्या कामाप्रमाणे गायन करण्याकरीता, कृष्णाच्या सांगीवर आधारीत असलेले भजने ओवी ची मत्रंवत मांडणी पुनाजी, हेंगडुजी, देवमनजी.. ईत्यादी चतुर्पती च्या जाणत्यां योगी महाराज कडुन होवु लागली.

हे सर्व जाणतेगण सृष्टि निर्मिती च्या वेळी ज्या धुम्म्धुम्म्कार अनाहत् नाद लहरी उत्पन्न झाल्या होत्या, त्याच धुम्म्धुम्मंकार नाद लहरी भजनात उत्पन्न करण्याकरीता, भजन ओवी ची मंत्रवत रंचना करून, तिचे गायन पंचतत्वांच्या कामाप्रमाणे करू लागलेत. पंचतत्वांच्या कामाप्रमाणे गायन करणा-या भजन व ओवी च्या विविध चाली..ईत्यादी ची मंत्रवत रंचना, चतुर्पती च्या पुनाजी, हेंगडुजी, देवमनजी.. ईत्यादी जाणत्यांव्दारे झाली. अश्यारितीने चतुर्पती च्या जाणत्या व्दारे *‘पंचतत्वे गायन कला‘* ची निर्मिती झाली. भजन मांडणी पक्की झाली.

जाणत्यांकडुन मंत्रवत ओवी व गायन रंचना ची पक्की मांडणी झाल्यानंतर, या सर्व जाणत्यांनी गावोगावी जावुन *‘चतुर्पती कृष्ण अवधुती भजन मांड‘* च्या स्थापना करू लागलेत. जाणते भक्तजन यांनी आपआपल्या भागात चतुर्पती कृष्ण अवधुत भजन मांडी च्या स्थापना केल्यात. याव्दारे ज्या ग्यानाचे मी-मी म्हणणारे महान ज्ञानी लक्षयच साधु शकत नाही; असे अलक्षय ग्यान असलेल्या चतुर्पता अथर्वन् वेदांचे गायन सुरू झाले.

आदीपुरूष कृष्णाचे मुखच्या चतुर्पता अथर्वन् वेदाचे गायन गावोगावी चालु होवुन, याव्दारे चतुर्पती चे भजन पुंजन ग्यान ध्यान सुमरन व अस्तुकी होवु लागली. चतुर्पता निरंजन ग्यान, देह-जीवाचे ग्यान, भाकलं ग्यान, अस्तुकी विनवणी चे ग्यान-भक्ती भाव युक्त ध्यान व उपदेश...ईत्यादी चा संगम असलेल्या चतुर्पता अथर्वन् वेदं च्या मंत्रवत पंचतत्व गायन कला च्या चालीवर आधारीत ओव्यांचे मंत्रवत रंचलेले भजने व ओवी चे गायन सुरू झालेत.

सच्चे भक्तगणां कडुन अवधुती भजन मांडीव्दारे मंत्रवत भजन ओवीचे मंत्रवत पंचतत्व गायनकलाव्दारे गायन सुरू झाल्याने, त्या भजन मांडीमध्ये सुध्दा सृष्टी निर्मितीच्या वेळी उत्पन्न झालेल्या सर्व कार्य सिध्द करणा-या धुम्म्धुम्म्कार अनाहत् नाद लहरी उत्पन्न होवु लागल्यात.

भजन मांडीत पंचतत्व गायन कला वर आधारीत ओवी व भजने व्दारे भाव-भक्तीचा सांड पडुन अनाहत् लहरी उत्पन्न झाल्याने, तेथे सुध्दा आदीपुरूषाची निर्गुण निराकार निरंजन ज्योत उभी होवुन, त्या त्या गावच्या भजन मांडीत खेळु लागलीत. निश्कलंकी निरंजन ज्योतीमुळे गावोगावच्या रोग्यांचे रोग-विघ्ने दुर होवु लागलेत. भक्तांचे कामे सिध्द होवु लागलेत. अश्याप्रकारे त्या भजन मांडीत जाणत्यांच्या पंचतत्वाच्या कामाप्रमाणे असलेले, पंचतत्व गायन कलाच्या मांडणी मुळे भौरं चक्र फिरू लागले ! सुदर्शना चा वेढा भक्तांच्या देही भोवती पडुन, ते सुदर्शन भक्तांचे रक्षण करत, भक्तांच्या मुखचे चतुर्पता कृष्ण अवधुत नाम चे, हत्यार मध्ये रूंपातर करू लागलेत. जे जाणल्या जात नाही ते घडु लागलेत. पुढे पाहु.

म्हणुनच आता या पंचतत्व गायन कला च्या मांडणीचे ग्यान घेवु या !

॥ पंचतत्वे गायन कला ॥

## ॥ पंचतत्व गायन कला ची मांडणी चे ग्यान ॥

### -: प्रास्तविक ग्यान :-

सृष्टी निर्मिती अगोदर जेव्हा कुठच नव्हतं काही तेव्हा तो आदीरूप धनी एकला चरांचर व्याप्त होता. आणी त्याचे आत्मगडी, पंचमहाभुते ईत्यादी त्या जलाचरात त्याचा संग होते.

जेव्हा त्या धन्याने *मो-हं सृष्टी रंचावी* अशी ईच्छा त्या जलाचरात फेकली, तेव्हा त्या जलाचरांतील सुक्ष्म तत्वांच्या हलचली व्दारे कोणत्याही आघाता शिवाय म्हणजेच बिनआघाताने उत्पन्न होणारा अनाहत् नाद उत्पन्न होवुन, त्या अनाहत् नाद लहरी व्दारे कोठे कोठे धुम्मधुम्मकार उत्पन्न झाला. सृष्टी निर्मितीच्या खेळाचा आरंभ या अनाहत् नाद लहरी व्दारे झाला. या लहरींव्दारे सर्व तत्वांना चालना मिळुन, परमात्म्याने फेकलेली ती ईच्छाच शक्तीरूपात उभी झाली. तिच्यापासुन पुढे सृष्टी निर्मितीस साहयं झाले. सृष्टी निर्माण झाली. अधीक ग्यानासाठी खंड-०१.०१:-आदीपुरूष आदीगण चे निरसन वाचा !

सृष्टी निर्मितीच्या आदी असलेल्या त्याच अनाहत् नाद लहरी चतुर्पती कृष्ण अवधुती भजनात उत्पन्न करून, त्या अनाहत् तरंग लहरीव्दारे सुक्ष्म शक्तीला चालना देवुन, सर्व कार्य सिध्द करण्यासाठी पंचतत्वगायन कला ची मांडणी कृष्णकृपेने चतुर्पतीच्या जाणत्यांकडुन झालेली आहे.

सृष्टी निर्मितीच्या आधीच्या त्याच अनाहत् नादब्रम्ह च्या तरंग लहरी, या पंचतत्व गायनाव्दारे भजनात उत्पन्न होतात. धुम्मधुम्मकार नादब्रम्हाच्या अनाहत् नाद तरंग लहरीच्या स्पंदन शास्त्रावर संपुर्ण मंत्रशास्त्राचे मुळ/पाया आधारलेले/रंचलेले आहे. हे अनाहत् नादब्रम्हाचे मुळ चतुर्पती कृष्ण अवधुत भजनात पंचतत्व गायन मांडणी मुळे प्रकट होते. संपुर्ण मंत्रशास्त्राचे मुळच चतुर्पती भजनात प्रकट होत असल्यामुळे, या पंचतत्व गायन चालीमुळे मंत्रवत रंचना व मांडणी केलेले भजने व ओवीचे चरणे यांना मंत्राप्रमाणे शक्ती येवुन, मंत्राप्रमाणे कार्य करायला लागतात. चरणे सुक्ष्म शक्तिला चालना देत राहते.

भाव-भक्तीयुक्त एकाग्र चित्ताने पाचही तत्वांचे कामाप्रमाणे केलेल्या उच्चारन क्रियेव्दारे, उच्चारलेल्या शब्दांचे स्वर यांच्या स्पंदनाची एकामागुन एक साखळी/शृंखला तयार होते. या एकामागुन एक तयार होणा-या शृखंला ह्या सुक्ष्म शक्तिला चालना देत, अनाहत् तरंग लहरी मध्ये रूपांतरीत होतात. एकाग्र चित्ताने भाव-भक्तीने अनाहत् लहरी मध्ये उच्चारलेले भजन ओवी च्या चरणांतील शब्दसाचा सिध्द होत राहते. तसेच या अनाहत् लहरी मुळे सुक्ष्मशक्तीला चालना मिळते. या चालनेव्दारे आकाशमात मध्ये असलेले, निराकार सुक्ष्म आध्यात्मीक जगत सह चतुर्पतीची सिदाई सेना ईत्यादी सुक्ष्मजगतातील उच्चस्तरीय प्रगाध ज्ञानी भक्त योगी जाणते पुण्यात्मे यांच्या पर्यत, या चतुर्पती भजनात उत्पन्न झालेल्या लहरी पोहचतात.

भाव-भक्तीयुक्त एकाग्र चित्ताने केलेल्या चतुर्पती कृष्ण अवधुत भजनाच्या मांडी मधील भजन गडी/योगी कडुन आलेल्या, या लहरीचे ग्रहन व पृथ्थकरन वर होते. या पृथ्थकरणाच्या आधारावर आकाशमात मधील चतुर्पतीचे सुक्ष्मजगत योग्य त्या शक्ती संजीवनी चा वर्षाव त्या भजन मांडीवर करतात. चैत्यन्य शक्तीचा पुरवा करत राहतात..

सर्वव्याप्त परमात्म्याचे मन सर्वव्याप्त आहे. त्या सर्वव्याप्त मनाशी जुळण्याकरीता, आपल्या मनाशी एकाग्रता आणुन एकाग्र चित्ताने ध्यान लावुन सत्भाव-भक्ती चा सांड वाहल्याने, आपले मन परमात्म्याच्या मनाशी जुळल्या जाते. एकाग्र चित्ताने ध्यान लावुन सत्भाव-भक्तीयुक्त भजन, पुंजंन, ध्यान, सुमरन केल्याने, भजनगडयांचा सुषुम्ना नाडीतील ब्रम्हीनीचा तार जागृत होतो. सुषम्ना तार जागृती मुळे परमात्म्याचे सर्वव्याप्त मन व भजन गडयांचे मन यांच्यात एकमेकाशी सबंध जुळल्या जातो. दोघांच्या मध्ये एक तार/पुल तयार होतो. या तारेव्दारे/पुलावरून वाटचाल करत, भजन गडी वाटेल तेव्हा परमात्म्याच्या सर्वव्यापी मनाशी एकरूप होवु शकतो. त्याकरीता एकाग्र चित्ताने ध्यान लावुन, सत्भाव-भक्तीयुक्त भजनाचे बोल उच्चारताच किंवा *'कृष्ण महाराज धनी अवधुत'* असा बिद मंत्रं मनात आणताच, आपला मेंदु हा आपले चित्त एकाग्र करून ध्यान लावुन, हद्‌य सत्भाव-भक्ती ने भरून जावुन ही दोन मने जुळण्याची किया आपोआप करेल. असे शिक्षण मेदुला देण्याकरीता भजन हा एक उपाय आहे.

एकाग्र चित्ताने कृष्ण परमात्म्यावर ध्यान लावुन, हद्‌यी सत्भाव-भक्ती चा झरा वाहवत उच्चारलेल्या *'कृष्ण महाराज धनी अवधुत'* या बिर्द मंत्राव्दारे अथवा भजनांच्या बोलाव्दारे, जर एकदा का तुमचे मन परमात्म्याच्या सर्वव्याप्त मनाशी जुळले, तर परमात्मा चा संजीवनी शक्ती चा वर्षाव प्राप्त करण्यास वेळ लागत नाही. परमात्म्याचे साहय सह जे पाहीजे ते मिळवण्यास वेळ लागत नाही. म्हणुनच आत्मा शरीर मन एकसंध ठेवुन जेवठया सामुहीक एकाग्रतेने, सामुहीक एकतानतेने भाव भक्तीपुर्वक एकाग्र चित्ताने एकरूप भजन होईल,

तेवठयाच जास्त संजीवनी शक्तीचा वर्षाव, अनंत धारांनी त्या भजनी मांडीवर होते. परमात्मा च्या संजीवनी वर्षावा व्दारे, भजनमांडीला जे पाहीजे ते साहय व देणं तत्परतेने होते. तो वर्षाव मांडीत बसलेल्या भावीक भक्त भजनी व रोगी..ईत्यादी यांना सुध्दा प्राप्त होतो. या वर्षावा मुळेच रोग-विघ्ने, दाही-दोष हळुहळु धुतल्या जावुन, शरीर चैतन्यमय आरोग्य संपन्न व शुध्द होवुन आयुष्य प्राप्त होते. ते असे :

अन्नाचा कार आणी चैतन्य शक्ती यांचा पुरवा यावर आयुष्य ठरलेले असते. अन्नाचा कार जाणुन, जर भजनी भावीक भक्त जन चतुर्पती भजनाव्दारे उभ्या होणा-या नामज्योतीच्या सतत संपर्कात राहुन, या चतुर्पती अवधुती भजनाव्दारे मिळणा-या चैतन्यशक्ती व ईतर संजीवनी शक्तीचा पुरवा घेत राहीला, तर त्याचे नक्कीच तारण होत राहते. शरीराला चतुर्पती भजनात मिळणा-या चैतन्य शक्ती संजीवनी च्या सतत संपर्कात ठेवल्याने, शरीरातील सर्व क्रियांचे समतोल व सुसंवादित्व सह उर्जा समतोल.. ईत्यादी संजीवनी च्या पुरवा व्दारे राखल्या जाते. ही चैतन्य संजीवनी शक्ती ही सर्वभौम, गतिशील, स्वयंभु आपरूप स्वसरंक्षक असल्यामुळे, ही चैतन्य शक्ती भौतीक रोग कारणांचा सहज पराभव करते. रोगप्रतिकारक शक्ती या संजीवनीच्या पुरवा व्दारे मिळत जाते.

चैतन्याचा पुरवा देहीत कमी झाल्यावर देहीची रोगप्रतिकारक शक्ती कमी होवुन, या देहीवर रोग जंतुंचे आक्रमण सुरू होते. हे आक्रमण थोपवण्यासाठी जिथे चैतन्य शक्तीचा पुरवा आहे, तिथे जावे लागते. पुरवाच्या ठिकाणी च्या संपर्कात राहावे लागते. चैतन्य शक्तीच्या पुरवाच्या संपर्कात रोग्याला सतत राहावे लागते.

चतुर्पती भजनात मिळणा-या चैतन्य पुरवा च्या सतत संपर्कात राहल्याने, चैतन्य संजीवनी शक्तीचा पुरवा-पुरवठा शरीरातील रोगग्रस्त भाग अथवा शरीरातील जो भाग किंवा कोश असंतुलीत, क्षिण कमजोर असेल, त्या भागाच्या आतमध्ये हा पुरवा शिरून, कायेच्या आतून चैतन्य संजीवनी चा हा पुरवा त्याला चालना देवुन, तो कोष अथवा भाग याला भरून उरून तो भाग सशक्त बनवते. चैतन्यशक्तिने भरभरून असलेला सशक्त कोष अथवा भाग रोगास दुर पळविते.

संजीवनी वर्षावातील लहरी चतुर्पती भजन मांडीतील भजनी, भावीक भक्त जन व रोगी ईत्यादी मार्फत आपरूप ग्रहन होते. व त्याचे योग्य त्या शक्तीत रूपांतर होवुन, ती संजीवनी शक्ती योग्य त्या कायेच्या ठिकाणी भजनी भावीक भक्तासह रोग्यास प्राप्त होवुन, आवश्यक ते शारीरीक व मानसीक बदल घडवु लागते. या बदलामुळे रोग्याचे रोग निवारण होत राहते, तर निरोगी चैतन्यमय आरोग्यसंपन्न होवुन आयुष्यमान प्राप्त करत राहते.

या सर्व घटना निसर्ग नियमाला अनुसरून घडु लागतात. तो चमत्कार नसतो. कृष्णा सह कृष्णकालीन चतुर्पती जाणत्यांनी मांडणी करून ठेवलेली ती एक शिस्तबध्द कार्यपध्दती आहे. या कार्यपध्दतीत चमत्कारीक घटना घटण्यास कारणीभुत भजनी भावीक भक्तांचा भक्ती भाव असतो. आपआपल्या भाव भक्ती नुसार चतुर्पती च्या या कार्यप्रणाली मधुन चैतन्य संजीवनीचा पुरवा, त्या त्या भावीक भक्तास व रोग्यास प्राप्त होत राहते. अधिकाअधीक भाव भक्ती नेम व अधिकाधिक प्रयत्नांव्दारे चतुर्पती च्या अधिका अधिक सुक्ष्म जगतात प्रवेश करून, अधिकाधिक फायदा करून घेणेही लवकर शक्य होते.

या संजीवनी वर्षावाच्या प्रभावाखाली तसेच पंचतत्वे प्रमाणे कामा च्या गायना व्दारे निर्मित अनाहत् लहरी मुळे, पाण्याच्या नरदेहीतील प्रतेक कोशीकाच्या पाण्यावर या अनाहत् नाद लहरीचा प्रभाव पडुन, त्या पेशी कोशीका उत्तेजीत हर्षभरीत होवुन नवसंजीवनी प्राप्त करतात. निसर्ग नियमांचे पालन, संतुलीत सात्विक आहार, सत् संस्कार, सत् आचार विचार, सत्धिक्य यांच्या व्दारे योग्य मनोधारणा व संजीवनीचा पुरवा होतो. या पुरवा ंच्या मुळे नव्या निर्माण होणा-या पेशी कोशीका आरोग्यसंपन्न होतात.

या सर्व आधात्मीक गोष्टी व आधात्मीक वातावरण निर्मिती चतुर्पती अवधुत भजनात निर्मित होण्याकरीता, चतुर्पतीच्या जाणत्यांनी या कृष्ण अवधुत भजनात आधीच वेगवेगळ्या मांडणा करून ठेवलेल्या आहे. याच मांडण्यांमुळे अत्यंत अवघड व दुर्घट जुनाट रोग सह संकष्टे, आरीष्टे व विघ्ने या भजनाच्या वातावरणात दुर होतात. शरीरातील पाणी मल निर्मळ होवुन, व्याधी निवारण होत राहते. शरीर हर्षभरीत प्रेम आनंदाच्या भरात तरतरीत चैतन्याने युक्त राहुन आरोग्य संपन्न राहते.

आकाश मात मधील चतुर्पतीचे आध्यात्मीक विश्व आणी मिर्त लोकांतील चतुर्पतीचे विश्व यांच्यात संधान साधुन, एकमेकात सबंध ठेवण्यासाठी चतुर्पतीच्या जाणत्यांनी आधीच ही शिस्तबध्द कार्यप्रणाली सह, चतुर्पती च्या यवगाच्या मांडणी ईत्यादी चतुर्पती च्या भजन ओवी व चाली मध्ये टाकलेली आहे. या भजनाच्या जुन्या चाली पंचतत्वांच्या कामाप्रमाणे उच्चारलेल्या स्वरांच्या कार्यावर आधारीत आहे. या जुन्या चाली व्दारेच आकाशमात मधील चतुर्पतीच्या सुक्ष्म विश्वासोबत लवकर संपर्क संधान व संबध साधल्या जाते.

चतुर्पती भैसाच्या यवगाच्या मांडणीव्दारे भजन साधक योगी चा जीवात्मा हा परमात्मा शी संधान साधुन, त्याचा संग करत सर्व भौतीक व आध्यात्मीक दैवी सुक्ष्म शक्तीयॉं, सुक्ष्म प्रकृति व तिचे सुक्ष्म नियम याचे पुर्व ज्ञान मिळवत राहतो. चतुर्पती भजनात तो जिवात्मा भौतिक बंधनातुन मुक्त होवुन उच्चत्तर अश्या चतुर्पती हरी नामाच्या गोडीने धन्याच्या संगतीने चिन्मय, सचित्तांनंद, प्रेम हर्ष आनंदाच्या भरात शांतीपुर्वक शाश्वत जिवन जगतो. असो.

या पंचतत्व गायन मांडणी मध्ये पाचही तत्वांचे कामाप्रमाणे नरदेही च्या तिरभवन व्दारे गायन करवुन घेतल्या जाते. भजनीच्या नरदेहीसोबतच त्या भजनात हजर असलेल्या अन्य भावीक भक्त व रोगी यांना पाचही तत्वांचे देणं देण्याकरीता, आणीक बहु कारणासाठी या पंचतत्व गायन चालीची मांडणी चतुर्पतीच्या जाणत्यांकडुन झालेली आहे.

पृथ्वी, आप, तेज, वायु आणीक आकाश बिंदु या तत्वांच्या कामाप्रमाणे गायनातुन भजन भावीक भक्तास सत्तास्फुर्ति मिळत राहण्याची सोय, त्या सोबतच त्या भावीक भक्तांत कोणत्याही प्रकारची विकृति उत्पन्न होवु न देण्याची सोय, त्यांना स्वतः व्दारे स्वतः जाणण्याची सोय..ईत्यादी बहु कारणांसाठी उपाय योजना पंचतत्व गायन मांडणीत करून ठेवलेल्या आहेत. त्यापैकी जेवठया काही शक्य होईल तेवठयाचे ग्यान कृष्णकृपेने सविस्तर जाणुन घेवु या !



पुढील पानावर...

## ॥ पंचतत्व गायन कला ची मांडणी चे ग्यान ॥

### -: प्रारंभिक ग्यान :-

सृष्टी निर्मितीच्या वेळी प्रथम आकाश तत्वें व्यक्त झालेत. त्या आकाशतत्वांतुन दुसरे वायु तत्वे, वायुतत्वांतुन तिसरे तेजतत्वे व तेजतत्वांतुन चौथे आपतत्वे आणी आपतत्वांतुन पाचवे पृथ्वीतत्वे व्यक्त झालेत. आकाश वायु तेज आप व पृथ्वी यांच्या विविध संयोगाने विविध अणुरेणु तयार झालेत. विविध अणुरेणुंच्या संयोगाने विविध पदार्थ व्यक्त झालेत. विविध पदार्थाच्या संयोगाने विविध देह जीव उत्पन्न झालेत. विविध सृष्टीयॉं व्यक्त झाल्यात. या विविध सृष्टीयॉं मध्ये निराकारी स्वरूपात काही राहीलेत. आणी काही अव्यक्तातुन व्यक्त आकारी स्वरूपात आलेत.

या व्यक्त स्वरूपातुन पुनश्च अव्यक्ता कडे म्हणजेच त्या निराकार परमात्मा कडे जाण्यासाठी, याच्या उलटया मार्गाने वर वर चढत जावे लागते. या उलटया मार्गाची प्रथम पायरी व्यक्त पृथ्वीतत्वांची चढावी लागते, दुसरी पायरी आपतत्वांची, तिसरी पायरी तेजतत्वांची, चौथी पायरी वायुतत्वांची, पाचवी पायरी आकाशतत्वांची चढुन, या पाचही पायरी च्या वर जीथे तत्वविरहीत अवस्था आहे त्या निराकार बिंदु अवस्थेत जावुन, त्या बिंदुपल्याड निरंजनास सर्व समर्पित करावे लागते.

असे हे उलटे कार्य महा महा योग्यांनाही सहजा सहजी जमत नाही, ते कार्य कृष्णाजीच्या कृपेने चतुर्पती च्या जाणत्यांनी, या पंचतत्व गायन मांडणी व तिच्या चालीव्दारे, चतुर्पती कृष्ण अवधुती भजन योग्यांसाठी सोपे करून ठेवले आहे.

चतुर्पती भजन साधक योगी व भावीक भक्त या गायन मांडणी व्दारे, त्याच्या नकळत सहजतेने या उलटया मार्गाने वर वर चढत जातो. प्रथम पृथ्वी व आप तद्नंतर तेज व वायु आणी मग आकाश व बिंदु या मार्गाने, तो या चतुर्पती गायनाव्दारे वर वर जात, बिंदुपल्याड असलेल्या परम अव्यक्त तत्वांकडे म्हणजेच निराकार निगुर्ण तत्वांकडे तो समोर सरकुन, उत्पत्ती पुर्विच्या तत्वरहीत अवस्थेत जावुन, तो परमात्माला आपला भक्ती भाव समर्पित करतो. परमात्माचा संग मिळवितो. त्याला विविध प्रकारचे देणं प्राप्त होते. ते असे :

- वायुतत्वांच्या कामाप्रमाणे गायन केल्याने भजनी गायकाची वाणी मधुर व गोड बनुन त्याला मधुर वाणीचे देणं प्राप्त होते.
- आकाश तत्वांच्या कामाप्रमाणे गायन केल्याने भजनी गायकाचे शरीर हलके-फुलके तरतरीत स्फुर्तियुक्त व उल्हासीत राहते. या आकाश तत्वांची अनुभुती त्याच्यांत येते. अंर्तबाहयं प्रेम व वासल्याने तो व्यापुन राहतो.
- बिंदु पल्याड सर्व काही लिन करण्याच्या या गायनामुळे भजन साधक सर्व अर्तज्ञानी, दयाळु, सर्वांच्या अर्तस्थानी परमात्माचा अंश अवतार आहे हे जाणुन त्या अंशाला जवळचे अर्पण करणारा दाता बनतो. सारा संसार त्याला परमात्माच्या या एकाच अंशाने भरून भरलेला आणीक उरलेला दिसतो. मायेचे अधिपत्य त्याला दिसते. म्हणुन तो आत्मरूपी नादात मस्त राहून परमार्थ करून संसार चालवत या संसाराच्या वरच राहीतो. धन मानसन्मान दोहीत च्या पलीकडे जावुन सत्भावाने सत् आचार विचाराने राहतो.. ईत्यादी तत्वे च्या देणं कसे कसे त्याला भेटु शकते याचे ग्यान पाचही तत्व दयाहो मजला खंड.०२/ओवी.४४ मधुन घ्यावे.

- हे देणं होण्याकरीता पाचही तत्वांचे कामाप्रमाणे गायन ची मांडणी कशी केली आहे ? याचे आता ज्ञान घेवु या !

॥ पंचतत्वे गायन कला ॥

## ॥ पंचतत्वांच्या कामावर आधारलेली पंचतत्वे गायन कला ची मांडणी ॥

**-: भजन ओवी चरणांची मांडणी :-**

**भजन व ओवी चरणांची रंचना व गायन मांडणी :-**

पंचतत्वे यांच्या कामावर आधारीत गायन करण्याच्या मांडणी मध्ये, प्रथम प्रतेक ओवीचे चरणांचे टुके पाच किंवा सात शब्दगटात विभागणी करून कृष्णाच्या सांगीवर आधारीत ओव्यांची रंचना जाणत्यांनी केलेली आहे. ऐसे भजने व ओवी ची रंचना करून, त्या ओव्या पंचतत्वे गायन कला प्रमाणे गायन करण्याची कला जाणत्यानी सर्वप्रथम साधलेली आहे. सर्व साधारणपणे या पंचतत्वे गायन रंचनेवर आधारीत गायन साधण्याकरीता, चतुर्पतीच्या जाणत्यांनी ओवी अथवा भजन मध्ये ओव्यांच्या चरणे यांना चार प्रकार च्या मांडणीत विभागुन ओवी व भजनांची चरण रंचना केलेल्या आहेत. ते असे :

**॥ चरण मांडणी प्रकार ०१ ॥**

**॥ पाच शब्दगटांच्या चरणांची मांडणी ॥**

**॥ एक एक, तिन । एक एक, तिन ॥**

**प्रकार ०१ :- पाच शब्दगटांच्या चरणांची गायन मांडणी :-**

| चरण मांडणी प्रकार ०१ :- | ॥ पाच । पाच ॥ |
|---|---|
| ॥ चरणाची पहीली टुक । | ॥ एक, एक । तिन । असे ५ शब्दगट |
| चरणाची दुसरी टुक ॥ | एक, एक । तिन ॥ असे ५ शब्दगट |

भजन ओवीच्या चरण टुकांना ॥ एक, एक । आणी तिन ॥ अश्या एकुन पाच शब्दगटात विभागुन करून काही ओव्यां च्या चरणांची गायन करण्याची मांडणी चतुर्पतीच्यां जाणत्यांनी केलेली आहे. ती अशी :

॥ एक शब्दगट, एक शब्दगट । तिन शब्द गट । असे ५ शब्दगट
एक शब्दगट, एक शब्दगट । तिन शब्द गट ॥ असे ५ शब्दगट

उदाहरणार्थ :-

॥ पाचही तत्वांचे काम । गायन करतो तिरभवन
पाचही तत्वे देहीला देणं । होईन या नरदेही कारणं ॥ ०२-४४
॥ हरी भजनी प्रेम सुखाची वाणी । आत्मा सावध हो सावध हो ॥
॥ पदरी धरलं नका जावु दुर । लोट मारतो देवाच्या चरणावर ॥
॥ पाय म्या धरले बळकट । नाही सोडत जगजेठं ॥

या चरणाचे गायन करतांना वरील प्रकारे पाच शब्दगटांची मांडणी करून गायन करावे लागते ते असे :



पुढील पानावर...

-: मांडणी ०१ चे उदाहरणे :-

शब्दगट:- ॥ १ २ ३ ४.. ५..। १ २ ३ ४....५.. ।
चरणटुका ॥ पाचही तत् वाचे का...मं..। गायन करतो, तिर भ...वनं..।
पाचही तत्व देहीला दे....णं..। होईन,या नर देही का..रंन..॥

॥ १ २ ३ ४ .. ५ । १ २ ३ ४ .. ५ ॥
॥ हरी भजनी । प्रेम सुखाची वाणी । आत्मा सावध हो. । सावध हो ॥
॥ पदरी थरलं । नका जावु दुर । लोट मारतो देवाच्या चरणा...वरं ॥
॥ पाय म्या थरले बळ... ...कट । नाही सोडत हो । जग जेठं ॥
॥ १ २ ३ ४ .. ५ । १ २ ३ ४ .. ५ ॥

ही पाच ची मांडणी उडान चालीच्या चरण टुकां तसेच भजनांच्या टुकां मध्ये जास्तीत जास्त वापरली जाते. पाच च्या चरण मांडणी प्रकारात ओवी अथवा भजनांच्या चरणांच्या टुकांना ॥ पाच । पाच ॥ च्या शब्दगटात विभागुन, भजने व ओवी याच्या चरणांची रंचना रंचुन, काही ओव्या व भजने चतुर्पतीच्या जाणत्यांनी रंचलेल्या आहेत.

जर चरण टुकात पाच शब्दगटांपेक्षा कमी शब्दगट असेल, तर त्या कमी शब्दगटांची पाच भागात विभागणी/फोड करावी. अथवा हो, बा, गा, आहो, दादा, राया,.. ईत्यादी सहायक पदे टाकुन, पाच शब्दगट करून गायन करावे. आणी जर पाचपेक्षा एखादा जास्त शब्दगट असेल, तर दोन शब्दगट चा एक गट करून पाच शब्दगट करून गायन करावे.

या पाच शब्दगटापैकी पहील्या शब्दगटाचा उच्चार पृथ्वीतत्वांच्या कामाप्रमाणे तर दुस-या शब्दगटांचा उच्चार आपतत्वांच्या कामाप्रमाणे, तिस-या शब्दगटांचा उच्चार तेजतत्वांच्या कामाप्रमाणे, चौथ्या शब्दगटांचा उच्चार वायुतत्वांच्या कामाप्रमाणे आणी पाचव्या शब्दगटांचे दोन भागात फोड/विभागणी करून, त्या पाचव्याचा पहीला भागाचा उच्चार हा आकाशतत्वांच्या कामाप्रमाणे, तर दुसरा बिंदुचा भाग निरंजनात विलीन करण्याचा विलीनतेच्या उच्चारा व्दारे निरंजनात बिंदु विलीन करत, या पाचही शब्दगटाचें गायन केले जाते. हे तत्वांच्या कामाचे उच्चार कोणकोणत्या प्रकारे होवु शकते ते पुढे पाहु..

॥ चरण मांडणी प्रकार ०२ ॥
॥ सात शब्दगटांच्या चरणांची मांडणी ॥
॥ दोन दोन, तिन । दोन दोन, तिन ॥

प्रकार ०२ :- सात शब्दगटांच्या चरणांची मांडणी :-

| चरण मांडणी प्रकार ०२ :- | ॥ सात । सात ॥ |
|---|---|
| ॥ चरणाची पहीली टुक । | ॥ दोन, दोन । तिन ॥ असे ७ शब्दगट |
| चरणाची दुसरी टुक ॥ | दोन, दोन । तिन ॥ असे ७ शब्दगट |

भजन ओवीच्या चरण टुकांना ॥ **दोन, दोन । आणी तिन** ॥ अश्या एकुन सात शब्दगटात विभागुन करून, काही ओव्यां च्या चरणांची गायन करण्याची रंचना चतुर्पतीच्यां जाणत्यांनी केलेली आहे. ती अशी :

॥ दोन शब्दगट, दोन शब्दगट । तिन शब्द गट । असे ७ शब्दगट
दोन शब्दगट, दोन शब्दगट । तिन शब्द गट ॥ असे ७ शब्दगट

उदाहरणार्थ :-

॥ साहंकारी निराधारी । तो बसला आहे ।
मुळ स्तंभाचा शकुन दादा । निरंजनी पाहयें ॥
॥ भक्ती करून, निःसंग होजो । तु प्राण्या आता ।
या भक्तीला भंग नको आणु । वाया, जाशीन अधोगता ॥

या चरणाचे गायन करतांना खालील प्रकारे सात शब्दगटांची मांडणी करून, गायन करावे लागते ते असे :

**दोन-दोन तिन असे सप्तगट :- मांडणी ०२ चे उदाहरणे**

| शब्दगट | ०१ | ०२ | ०३ | ०४ | ०५ | ०६ | ०७ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| चरणं टुका | साहं | कारी, | निरां.. | धारी । | तु | बसला | आहयं.. |
| | मुळ | यवगाचा, | शकुन | दादा । | निरं.. | जनी | पाहयं.. |
| | | | | | | | |
| | भक्ती | करून, | निःसंग | होजो । | ऐक तु | प्राण्यां | आतां.. |
| | या | भक्तीला, | भंग-नको-देवु | वाया । | जाशीन | अधो.. | गतां.. |
| शब्दगट | ०१ | ०२ | ०३ | ०४ | ०५ | ०६ | ०७ |

जर सातपेक्षा कमी असेल, तर हो, बा, गा, आहो, दादा, राया,.. ईत्यादी सहायक पदे टाकुन, सात शब्दगट करावे. आणी जर सात पेक्षा जास्त असेल, तर दोन शब्दगट चा एक गट (उदा.०२. भंग-नको-देवु) करून सात शब्दगट करावे. अश्या रितीने सात शब्दगटापेक्षा कमी अथवा जास्त शब्दगट असेल, तर ते शब्दगट सात भागात विभागुन बरोबर करून गायन करावे.

या सात शब्दगटात पहीला शब्दगट व दुसरा शब्दगट याची एक जोडी करून, या जोडीतील पहील्या शब्दगटा चा उच्चार पृथ्वीतत्वांच्या कामाप्रमाणे, तर दुस-या शब्दगटाचा उच्चार आपतत्वांच्या कामाप्रमाणे, पहील्या जोडीत करतात.

तर तिसरा व चौथा शब्दगट याची जोडी करून तिस-या शब्दगटाचा उच्चार तेजतत्वांच्या कामाप्रमाणे, तर चौथ्या शब्दगटांचा उच्चार वायुतत्वांच्या कामाप्रमाणे करतात.

आणी सरतेशेवटी पाचव्या, सहाव्या व सातव्या शब्दगटांची जोडीतील पाचव्या शब्दगटांचा उच्चार हा पुनः पृथ्वी अथवा अग्नीतत्वाच्या कामाप्रमाणे करून, सहाव्या शब्दगटाचा उच्चार वायुतत्वा च्या कामाप्रमाणे व सातव्या शब्दगटाचा उच्चार आकाशतत्वाच्या कामाप्रमाणे करून, या सातव्या शब्दगटातील बिंदु चा भाग हा निरंजनात विलीन करणा-या उच्चार व्दारे गायन करतात. अश्या रितीने या सातही शब्दगटांचे उच्चार पंचतत्वांच्या कामाप्रमाणे उच्चारले जातात.

या सप्तशब्दगटांच्या मांडणीत कृष्णकालीन चतुर्पती च्या जाणत्यांनी मोठया मोठया ओव्या रंचलेल्या आहेत. थोडीबहुत पारख करून या सप्तशब्दगटांच्या ओव्या सहजच ओळखता येतात. ही सप्तशब्दगटांची मांडणी व तिचा पंचतत्व गायन कला प्रमाणे उच्चार निघणा-या चाली, कृष्णकालीन चतुर्पतीच्या जाणत्यांनी रंचुन ठेवलेल्या आहेत. ही मांडणी आणी तिचे चालीचे उच्चार शास्त्र हे सुक्ष्मशरीरातील सप्तचक्र डोळयासमोर ठेवुन केलेल्या आहेत.

कायाज्ञान खंडातुन ज्ञान घेवुन सुक्ष्मदृष्टीने पाहील्यास, आपणास असे निदर्शनास येईल की : सुक्ष्मशरीरातील सप्तचक्रे हे दोन-दोन च्या जोडया आणी शेवटी तिन चक्र याप्रमाणे सुक्ष्मशरीरात स्थिरावलेले आहेत. या सप्तचक्रांपैकी

मेरुदंडाच्या मुळावर स्थित असलेले मुलाधार चक्र आणी तेथुन तिरप्या कंदाव्दारे जवळच असलेले नाभिलगतचे रविचक्र असे हे दोन चक्र जवळजवळ दोन च्या जोडीने आहेत. रविचक्रावरुन वर गेल्यावर हद्‌यावरचे अनाहत् चक्र आणी कंठंस्थानावरील विशुध्द चक्र असे हे दोन चक्र जवळजवळ दोन च्या जोडीने आहेत. आणी विशुध्द चक्राच्या वर गेल्यानंतर त्रिकुटीवरचे ब्रम्हाचे सत्यलोक चे श्रीहाट चक्रावरील विष्णुचे वैकुंठ आणी गोल्हाट चक्री कैलास हे तिन चक्रे जवळजवळ आहेत. आणी या तिन च्या वर बिंदुस्थान च्या अगोचर चक्री निरंजन उभा आहे. खंड०३/ओवी-०१ वरुन अधिक व सचित्र ज्ञान घ्यावे

सुक्ष्मदेहीवरच्या या सात चक्रांच्या मांडणीला अनुरुप अशीच मांडणी दोन । दोन । तिन असे एकुन सप्तशब्द गट करुन, ओवींच्या चरणांची मांडणी चतुर्पती च्या कृष्णकालीन जाणत्यांनी रंचलेली आहेत. म्हणुनच या सप्तशब्दगटांच्या मांडणीत दोन दोन च्या जोडीने उच्चार करुन, शेवटी तिन शब्दगटांचा उच्चार करत, बिंदु पर्यत उच्चार नेत निरंजनी विलीन केल्या जातो.

अश्या रितीने या मांडणीव्दारे विशिष्ट ध्वनी लहरी उत्पन्न करत, अनाहत् नाद लहरीचे गुंफन केल्या जाते. या गुंफनाव्दारे जाणत्यांनी भजनी भावीक भक्त गडयांना पंचतत्वं चे देणं सोबतच, त्यांच्या सुक्ष्मदेहीतील सप्त चक्र जागृत करण्याचे कार्य आपरुप होवु लागते. कृष्णकालीन चतुर्पतीच्या जाणत्यांनी रंचलेल्या चाली आत्मसाद करुन, नित भजन केल्याने भजन भावीक भक्तांच्या नकळत त्यांच्या सुक्ष्मशरीरातील सप्तचक्रे यांना आपोआप चैतन्य उर्जा मिळत राहते. ही क्रिया खालीलप्रमाणे एकतानतेने भजन करणा-या भजनीगडयांच्या नकळत त्यांनी काहीही प्रयत्न न करता सहजतेने घडत जाते. ते याप्रकारे :

या मांडणीत पंचतत्वाच्या कामाप्रमाणे उच्चार करुन, प्रथम मुलाधारी असलेल्या शक्तीचा पुरवा घेवुन, चरणांची उच्चार क्रिया सुरु होते. तो सुरु झालेला उच्चार बेंबीस्थानच्या सुर्यचक्राला धक्का देवुन, त्यातील सुर्यतेज उर्जा घेवुन क्षणभर तिथे स्तंभित करुन, तो उच्चार सुर्यस्थानावरुन तेज व वायुतत्वाचा वेग घेवुन अनाहत् चक्री येतो. तिथे त्या उच्चारात अनाहत चक्रांची भावउर्जा शक्तीयॉं अंर्तभुत करुन घेवुन, तेथुन तो उच्चार विशुध्द चक्री नादशक्तियॉंचे कंपन लहरी उत्पन्न करतात. आणी संपुर्ण शक्तिपुर्वक तो उच्चार मुखावाटे बाहेर पडतो. आणी त्यासोबतच त्या उच्चाराच्या कंपन लहरी या वर सरकत अग्नचक्र सहस्त्रागार व बिंदुचक्रापर्यत जाते.

उच्चाराव्दारे प्राप्त झालेल्या चैतन्य उर्जेव्दारे, हळुहळु चक्रे जागृत होत जाते. सप्तचक्रांना या शब्दगटाच्या चालीच्या उच्चाराव्दारे धक्के व चैतन्याचा पुरवा होवुन, प्रतेक चक्रांची ज्योतीला चैतन्यरुपी तेल मिळत जाते. चैतन्यरुपी तेलामुळे, त्या त्या चक्रावरील ज्योत उंचावुन त्या सातही ज्योती एकमेकात मिसळत, देहरुपी पृथ्विवर एकच ज्योत उभी राहुन, नवलाख तारा चमकवण्याची योजना या सप्तशब्दगटांच्या रंचनेव्दारे रंचलेली आहे. या मांडणीव्दारे भजन भावीक भक्तगणांचा जीवभाव सतत उंचावत जात, त्यांच्या मनाला हर्ष आनंद मिळत राहतो. चक्रउर्जेत समतोल राखल्या जातो. उर्जा समतोलामुळे, सर्व शरीरातील जीवकोषीकात ती समानतेने प्रवाहीत होत राहते. सर्वत्र समानतेने शरीरात उर्जा संचरीत राहिल्याने, शरीराचे आभामंडळ हे तेजोमय राहुन, त्यात कुठेही उर्जा कमतरतेचे छिद्रे नसतात. अश्या या प्रबळ आभामंडळामुळे रोग-विघ्ने, संकष्टे-आरीष्टे ईत्यादी त्याच्यावर चाल करु शकत नाही. त्यांच्या देहीचा ताबा घेवु शकत नाही. ईत्यादी बहु कारणासाठी या सप्तगटांची मांडणी रंचलेली आहे. असो. पुढे पाहु या !

॥ चरण मांडणी प्रकार ०३ ॥
॥ संयुक्त चरणांची मांडणी ०१ ॥
॥ पाच पाच । दोन दोन, तिन ॥

प्रकार ०३ :- पाच-सात ची संयुक्त मांडणी ०१ :-

| | |
|---|---|
| चरण मांडणी प्रकार ०३ :- | ॥ पाच । सात ॥ |
| ॥ चरणाची पहीली टुक । | ॥ एक, एक । तिन ॥ असे ५ शब्दगट |
| चरणाची दुसरी टुक ॥ | दोन, दोन । तिन ॥ असे ७ शब्दगट |

या संयुक्त मांडणी मध्ये मांडणी प्रकार-०१ व मांडणी प्रकार-०२ चे संयुक्त रूप आहे. चरणाचे वरील टुक ही मांडणी प्रकार ०१ प्रमाणे तर खालील टुक ही मांडणी प्रकार ०२ प्रमाणे रंचुन काही ओवींचे चरणे अश्या प्रकारच्या गायन मांडणीत रंचलेले आहेत.

या मांडणी मध्ये भजने व ओवी यांचा चरणाच्या वरीच्या टुकाला ॥ पाच पाच ॥ शब्दगटात तर खालच्या टुकाला ॥ दोन दोन । तिन ॥ अश्या सात शब्दगटात विभागुन काही ओव्यां च्या चरणांची गायन करण्याची रंचना चतुर्पतीच्यां जाणत्यांनी केलेली आहे. ती अशी :

॥ एक शब्दगट, एक शब्दगट । तिन शब्द गट । असे ५ शब्दगट
दोन शब्दगट, दोन शब्दगट । तिन शब्द गट ॥ असे ७ शब्दगट

उदाहरणार्थ :-
॥ पार्थ म्हणे श्रीअनंता । सेरुप दाव मज आता ।
हरी म्हणे माझ विशाल रूप । भेशिन पाहता पाहता ॥
॥ अवधुत आहे जबंर । कोणा नाही खबरं ।
महाराजाच्या हंकारानं । भक्त जनांच बहु बरं ॥

या संयुक्तिक चरणाचे गायन करतांना वरील प्रकारे चरण टुकांचे गायन मांडणी १ व मांडणी ०२ प्रमाणे मांडणी करून, गायन करावे लागते ते असे :

-: उदाहरणे :-

चरण उदाहरण ०१ :-
॥ १ २ ३ ४ ५ । १ २ ३ ४ ५
मांडणी ०१ टुक ॥ पार्थ म्हणे, श्री अनं..ता । सेरुप दाव, मज आं तां
मांडणी ०२ टुक हरीम्हणे माझं । विशाल रूप । भेशील पाहता पाहता
॥ १ २ । ३ ४ । ५ ६ ७ ॥
चरण उदाहरण ०२ :-
॥ १ २ ३ ४ ५ । १ २ ३ ४ ५
मांडणी ०१ टुक ॥ अव धुत, आहे ज...बर । कोणा नाही, ख ब...रं ।
मांडणी ०२ टुक महा राजाच्यां । हंका रानं । भक्तजना चं बहु-बरं ॥
॥ १ २ । ३ ४ । ५ ६ ७ ॥

वरील प्रमाणे या मांडणातीत चरणांच्या शब्दाची फोड करून दोन दोन तिन असे शब्दगट तयार करून पंचतत्वांच्या कामाप्रमाणे गायन करावे लागते.

॥ चरण मांडणी प्रकार ०४ ॥
॥ संयुक्त चरणांची मांडणी ०२ ॥
॥ दोन दोन, तिन । पाच पाच ॥

प्रकार ०४ :- सात-पाच ची संयुक्त मांडणी ०२ :-

| चरण मांडणी प्रकार ०४ :- | ॥ सात । पाच ॥ |
|---|---|
| ॥ चरणाची पहीली टुक । | ॥ दोन, दोन । तिन ॥ असे ७ शब्दगट |
| चरणाची दुसरी टुक ॥ | एक, एक । तिन ॥ असे ५ शब्दगट |

या संयुक्त मांडणी मध्ये मांडणी प्रकार-०१ व मांडणी प्रकार-०२ चे संयुक्त रूप आहे. चरणाचे वरील टुक ही मांडणी प्रकार ०२ प्रमाणे आहे. तर खालील टुक ही मांडणी प्रकार ०१ प्रमाणे रंचुन काही ओवींचे चरणे अश्या प्रकारच्या गायन मांडणीत रंचलेले आहेत.

या मांडणी मध्ये भजने व ओवी यांचा चरणाच्या वरीच्या टुकाला ॥ दोन दोन । तिन ॥ अश्या सात शब्दगटात तर खालच्या टुकाला ॥ पाच पाच ॥ अश्या शब्दगटात विभागुन काही ओव्यां च्या चरणांची गायन करण्याची रंचना चतुर्पतीच्यां जाणत्यांनी केलेली आहे. ती अशी :

॥ दोन शब्दगट, दोन शब्दगट । तिन शब्द गट । असे ७ शब्दगट
एक शब्दगट, एक शब्दगट । तिन शब्द गट ॥ असे ५ शब्दगट

उदाहरणार्थ :-
॥ भरून पावले, रूप दावले । विठ्ठल कुलशाही ।
विठ्ठल कुलशाही । देवाचा आवाज नरदेही ॥
॥ हरी हरी कृष्णा । तु बहु यवगाचा गडी
आमचा माथा तुमच्या चरणावरी ॥

या संयुक्तिक चरणाचे गायन करतांना वरील प्रकारे चरण टुकांचे गायन मांडणी २ व मांडणी ०१ प्रमाणे मांडणी करून, गायन करावे लागते ते असे :

-: मांडणी ०४ चे उदाहरणे :-

चरण ०१ उदाहरण :-

| | |
|---|---|
| | ॥ १ २ । ३ ४ । ५ ६ ७ ॥ |
| मांडणी-०२ ची टुक | ॥ भरून पावले । रूप दावले । विठ्ठल कुल शाही । |
| मांडणी-०१ ची टुक | विठ्ठल कुलशाही । देवाचा आवाज नरदेही ॥ |
| | ॥ १ २ । ३ ४ ५ ॥ |

चरण ०२ उदाहरण :-

| | |
|---|---|
| | ॥ १ २ । ३ ४ । ५ ६ ७ ॥ |
| मांडणी-०२ ची टुक | ॥ हरी हरी । कृष्णा बहु । यवगा चा गडी । |
| मांडणी-०१ ची टुक | आमचा माथा तुमच्या चरणां वरी ॥ |
| | ॥ १ २ ३ ४ ५ ॥ |

वरील प्रमाणे या मांडणीत चरणाच्या पहील्या टुकाचे सात शब्दगटात विभागणी करून गायन करावे लागते, तर त्याच चरणाच्या दुस-या टुकाचे पाच शब्दगटात विभागणी करून गायन करावे लागते.

या चारही मांडणीतील त्या भजन ओवींचे चरणांच्या टुकांचे पाच अथवा सात शब्दगटांचे गायन हे पंचतत्वांच्या कामावर आधारीत करण्यासाठी, पंचतत्वांच्या कामावर आधारीत जुन्या चालींची निर्मिती चतुर्पतीच्या जाणत्यांनी करून ठेवलेली आहे. हे तत्वांच्या कामाचे उच्चार कोणकोणत्या प्रकारे होवु शकते ते आता पाहु या !

॥ पंचतत्वे गायन कला ॥

## ॥ पंचतत्वांच्या कामाप्रमाणे चरणांच्या शब्दगटांचे उच्चार ॥

### -: प्रारंभिक ग्यान :-

ज्या तत्वांत जे काम करने शक्य असेल, त्या कामाप्रमाणे त्या तत्वाचा उच्चारन करून गायन केले जाते. कोणकोणत्या तत्वांत, तत्वगुण व कामांनुसार कोण कोणत्या प्रकारचे उच्चार करने शक्य आहे. याचे तत्वनुरूप आता ज्ञान घेवु या !

पंचतत्वे यांच्या कामावर आधारीत गायन करण्यासाठी, ओवी या भजने यांचे चरण पारखुन, ते चरण वरील चार प्रकार च्या मांडणी पैकी कोणत्या मांडणीत रंचलेले आहे ? हे ध्यानात घ्यावे लागते. तद्नंतर त्या मांडणीनुसार चरणांच्या शब्दगटांची फोड करावी लागते. ती अशी :

- जर पाच ची मांडणी असेल, तर प्रथम शब्दगट हा पृथ्वीतत्वांच्या कामाच्या उच्चाराप्रमाणे, तर दुसरा शब्दगट हा आप/जलतत्वांच्या कामाच्या उच्चाराप्रमाणे, आणी तिसरा शब्दगट हा अग्नीतत्वांच्या कामाच्या उच्चाराप्रमाणे, चौथा शब्दगट हा वायुतत्वांच्या कामाच्या उच्चाराप्रमाणे आणी पाचवा शब्दगट चे दोन फोडी करून, प्रथम फोड ही आकाशतत्वांच्या कामाप्रमाणे उच्चारून, तर दुसरी बिंदु ची फोड ही निरंजनात विलीन करत, संपुर्ण चरण टुक ही निरंजनाला वाहीली जाते. खालील तक्त्यात उदाहरणार्थ विभागणी दिलेली आहे.

उदाहरणार्थ :-

**प्रकार ०१ :- पंचतत्वांच्या कामाप्रमाणे पाच शब्दगटांचा विभागणी**

| पाच शब्दगट | १ | २ | ३ | ४ | ५ |
|---|---|---|---|---|---|
| | पृथ्वी तत्वाचा शब्दगट | आप/जल तत्वाचा शब्दगट | तेज/अग्न तत्वांचा शब्दगट | वायु तत्वांचा शब्दगट | आकाश-बिंदु तत्वांचा शब्दगट |
| पंच तत्वांचा कामाप्रमाणे चरण टुकांची फोड करून उच्चारन | ॥ पाचही.. गायन.. पाचही.. होईन.. | तत्.. करतो.. तत्वं.. या.. | वाचे.. तिर.. देहीला.. नर.. | कां.. भं.. दे.. देही.. | मं.. । वं..नं.. । णं.. । का..रंणं..॥ |
| | ॥ हरी.. आत्मा.. | भजनी.. ! सावध.. | प्रेम.. हो.. ! | सुखाची.. सावध.. | वा..णीं.. । हों.. ॥ |
| | ॥ पदरी.. लोट.. | धरलं.. ! मारतो.. | नका.. देवाच्या.. | जावु.. चरणा.. | दु..रं.. । व..रं.. ॥ |
| | ॥ पाय.. नाही.. | म्यां.. सोडत.. | धरले.. हो.. | बळ.. जगं.. | कं..टं.. । जे..ठं.. ॥ |
| | ॥ कृष्ण.. | महाराज.. | धनी.. | अवं.. | धुं..तं.. ॥ |
| | पृथ्वी | आप | तेज | वायु | आकाश-बिंदुं |
| | १ | २ | ३ | ४ | ५ |

* जर सात ची मांडणी असेल, तर प्रथम शब्दगट हा पृथ्वीतत्वांच्या कामाच्या उच्चाराप्रमाणे, तर दुसरा शब्दगट हा आप/जलतत्वांच्या कामाच्या उच्चाराप्रमाणे, आणी तिसरा शब्दगट हा अग्नीतत्वांच्या कामाच्या उच्चाराप्रमाणे, व चौथा शब्दगट हा वायुतत्वांच्या कामाच्या उच्चाराप्रमाणे करावा. आणी पाचवा शब्दगट हा तेज किंवा पृथ्वी तत्वांच्या कामाप्रमाणे, व सहावा शब्दगट हा वायुतत्वांच्या कामाप्रमाणे करून, सातव्या शब्दगटाचे दोन फोडी करून, प्रथम फोड ही आकाशतत्वांच्या कामाप्रमाणे उच्चारून, दुसरी बिंदु ची फोड ही निरंजनात विलीन करत, संपुर्ण चरण टुक ही निरंजनाला वाहीली जाते. खालील तक्तात उदाहरणार्थ विभागणी दिलेली आहे.

उदाहरणार्थ :-

**प्रकार ०२ :- पंचतत्वांच्या कामाप्रमाणे सात शब्दगटांची विभागणी**

| सप्त शब्दगट | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | पृथ्वीतव चा शब्दगट | आप/जल तत्वाचा शब्दगट | तेज तत्वाचा शब्दगट | वायु तत्वांचा शब्दगट | तेज किंवा पृथ्वी | वायु तत्वाचा शब्दगट | आकाश -बिंदु तत्वांचा |
| | ॥ साहं.. मुळ.. | कारी.., यवगाचा.. | निरां.. शकुन.. | धारीं..। दादा.. । | तो.. निरं.. | बसला.. जनी.. | आं..हयं..। पा..हयं..॥ |
| पंच तत्वांचा कामा प्रमाणे चरण टुकांची फोड करून उच्चारन | ॥ भक्ती.. या.. | करून.., भक्तीला.. | निःसंग.. भंग नको देवु | होजो.. । वाया.. | तुं.. जाशीन.. | प्राण्यां.. अधो.. | आं..तां..। गं..तां..॥ |
| | ॥ नामी.. तुमचे.. | जडल्या.. नाम.. | उपर.. घेता.. | नसावं.. चुकवा | या.. चौ.. | देहीला -यांशी.. | मरं..णं.. । यवं..नं..॥ |
| | ॥ अगाध तुया.. | वाणी.. वाचुन.. | अगाध.. ईच्छा.. | धनी.. पुर्ण.. | अगाध.. कोण.. | महीमा.. करनं.. | तु..हीं.. । मां..हीं..॥ |
| | ॥ आपण. दवंडी.. | होवुन.. च्या.. | आले.. परमानं.. | घरां.. वाणी.. | आम्हा.. सांग.. | धरलं.. तली.. | हां..तीं.. जगा..शीं. |
| | आदीरूप आरती.. | आले.. ओवाळु.. | घरा.. हा.. | धनीदेव.. देव.. | आपरूप.. चतुरं.. | आले.. आहे.. | घं..रां..। खं..रां..॥ |
| | पृथ्वी | आप | तेज | वायु | पृथ्वी/तेज | वायु | आकाश.. |
| | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |



पुढील पानावर...

॥ पंचतत्वे गायन कला ॥

## ॥ पंचतत्वांच्या कामाप्रमाणे चरणांच्या शब्दगटांचे उच्चार ॥

-: तत्वांच्या कामानुसार उच्चारण ग्यान :-

कोणकोणत्या तत्वांत, तत्वगुण व कामांनुसार कोण कोणत्या प्रकारचे उच्चार करने शक्य आहे. याचे तत्वनुरूप आता ज्ञान घेवु या !

॥ पंचतत्वे गायन कला ॥

पृथ्वी तत्वांच्या कामाप्रमाणे..

### ॥ पृथ्वीतत्व-शब्दगटांचे चार प्रकारे करता येणारे उच्चारण ॥

पृथ्वीतत्वांच्या गुण हा 'गतीमानता धारण करने', 'गंध व भारयुक्त जडत्व घेवुन असने' हे आहेत. जडत्वांचा आधार घेवुन, अथवा भार देवुन, गतीमानता धारण करण्याचे कामे पृथ्वीतत्वांत होतात.

या पृथ्वीतत्वांच्या कामाप्रमारे पृथ्वीतत्वांच्या पहील्या शब्दगटाचा उच्चार चार प्रकारे करने शक्य आहे. ते असे..

॥ प्रकार ०१ ॥

पृथ्वीतत्वांच्या पहील्या शब्दगटावर जोर देवुन गायनात..

### ॥ गतीमानता धारण करणारे उच्चार. ॥

पृथ्वीतत्वं च्या गुण व कामानुरूप पृथ्वीतत्व शब्दगटांचा बेंबीपासुन जोर लावुन, भार देवुन, झटक्याने वर उचलत गतीमानता धारण करणारे उच्चारण करणे शक्य आहे.

उदाहरणार्थ ऑलंपिक सारख्या तत्सम खेळात धावण्याच्या शर्यतीत धावपटु जसा जिथुन शर्यत सुरूवात होते तीथे ठोकलेली खुणेची खुंटी याला मागच्या पाय लावुन उभा राहतो. आणी ईशारा झाल्यावर त्या खुंटीला मागच्या पायाने जोर देवुन गतिमानता धारण करतो.

अश्याच प्रकारे या गायनात खुंटी प्रमाणे असलेल्या पृथ्वीतत्वांचा पहीला शब्दगटा वर जोर देवुन केलेल्या उच्चार व्दारे प्रथम गायनात गतिमानता धारण केल्या जाते. अश्या प्रकारे भार देवुन गतिमानता धारण करणारा उच्चार हा पृथ्वीतत्वाचे काम घेवुन केलेला एक उच्चार होवु शकतो.

॥ प्रकार ०२ ॥

पृथ्वीतत्वांच्या पहील्या शब्दगटाला जडत्व देवुन गायनात..

### ॥ जडत्व झटक्याने वर उचलणारा उच्चार ॥

पृथ्वीतत्वाच्या पहिल्या शब्दगटाला जडत्व देवुन शरिराची ताकद लावुन तो जडत्व दिलेला शब्दगटाचे झटक्याने वर उचलत उच्चारण केल्या जावु शकते. हा पृथ्वीतत्वांच्या काम घेवुन केलेला एक उच्चार होवु शकतो.

उदाहरणार्थ भारत्तोलन खेळातील पहेलवान जड भारयुक्त वजन उचलतांना जसा संपुर्ण शक्तीनीशी पहीला एक झटका देवुन एका झटक्यात किंवा दोन झटक्यात वजन उचलतो, तश्याच प्रकारे पृथ्वीतत्वांच्या पहिल्या शब्दगटांना उचलल्या जावुन पृथ्वीतत्वांचे एक उच्चारण करणे शक्य होते.

॥ प्रकार ०३ ॥
पृथ्वीतत्वांच्या पहील्या शब्दगटाला जडत्व देवुन गायनात..
॥ जडत्वाव्दारे दाबुन-ठोकुन केलेला उच्चार. ॥

पृथ्वीतत्वांच्या पहील्या शब्दगटाला जडत्व देवुन गायनात ते पाल ठोकतांना प्रथम जसे लोखंडाच्या घना च्या भाराने म्हणजेच त्या घनाच्या/हातोडीच्या जडत्व गुणांव्दार धरणीत खुंटी दाबुन:ठोकुन गाडल्या जाते, तश्याच प्रकारे दाबुन-ठोकुन केलेला उच्चार हा पृथ्वीतत्वां च्या कामाप्रमाणे केलेला एक उच्चार होवु शकतो.

कुणी बलवान तर घन न घेताच, आपल्या हस्त शक्तीच्या ताकतीने धरणीत हळुहळु परंतु जोर लावुन खुंटी रोवतात. हीच कृती शब्दउच्चार केल्यास तोही एक पृथ्वीतत्वांच्या कामाप्रमाणे उच्चार होवु शकतो.

॥ प्रकार ०४ ॥
पृथ्वीतत्वांच्या पहील्या शब्दगटाला जडत्व देवुन गायनात...
॥ पृथ्वितत्वांचे कामे शोधुन केलेला उच्चार. ॥

तुम्ही पृथ्वीतत्वांत होणारे कामे शोधुन त्या कामाप्रमाणे उच्चार जर केला तर तो पृथ्वीतत्वांच्या कामाप्रमाणे उच्चार होवु शकतो.

अश्या रितीने पहील्या पृथ्वीतत्व शब्दगटांचा उच्चार चतुर्पती भजनी आपआपल्या आवडीनुरूप, वरील चार पैकी एक काम निवडुन त्या कामाप्रमाणे पृथ्वीतत्वाच्या पहील्या शब्दगटांचा उच्चार बेंबीपासुन जोर लावुन, भार देवुन, झटक्याने वर उचलत करतात. आता पाहु या दुस-या शब्दगटांचा जलतत्वांच्या कामानुरूप होणारे उच्चार..

॥ पंचतत्वे गायन कला ॥
जल/आप तत्वांच्या कामाप्रमाणे..
॥ जलतत्व-शब्दगटांचे चार प्रकारे करता येणारे उच्चारण ॥

जल/आपतत्वांचे गुण 'तरलता', 'विरलता', 'मधुरता', रस ईत्यादी आहेत. जलतत्वांच्या स्वभावगुण हा संस्कारात रस घेवुन अथवा ठेवुन त्या संस्कारात रममान होण्याची सवय पाडणे हा आहे. जलतत्वांच्या या स्वभावगुणांचा फायदा घेण्यासाठी जलतत्वांच्या कामानुरूप जलतत्वांचे कोणकोणते उच्चार करने शक्य आहे. याचे ग्यान आता घेवु या !

सागरातील जलांच्या लाटा उसळी मारतात. तर नदी मधील जलाच्या लाटा हे निरंतर वाहत राहते. आणी जलाचरातील म्हणजेच तलावातील जल अथवा विहिरीतील जलाच्या लाटा हया थोप मारतात. विहिरीच्या जलात पोहणा-यांनी उडी घातल्यानंतर जेव्हा तो जलाच्या आत खोलवर जातो, तेव्हा तो तैराक जलाच्या खोलीनुरूप एक थाप मारून अथवा एकापेक्षा जास्त थाप मारून वर येतो. किंवा काही दमदार तैराक थाप न मारताही आपरूप नुसत्या अंगझडतीने जलाच्या वर येतो. श्वास घेतो. जलावर मधुरतेने हळुवार थाप मारत तरंगतो. थाप मारत समोर पोहत जातो. उसळी घेतो. मधुरतेने हळुवार थाप मारत जलावर तरंगत राहतो. जलावर होणा-या या कामानुसार जलतत्वांच्या शब्दगटांचे कोणकोणते उच्चारण होणे शक्य आहे. ते आता पाहु या :

॥ प्रकार ०१ ॥
जल/आप तत्वांच्या कामाप्रमाणे..
॥ जलतत्वांच्या दुस-या शब्दगटां चा मधुरतेने थाप मारल्याप्रमाणे उच्चार ॥

आपतत्वांच्या एक गुण 'मधुरता' आहे. या मधुरतेचा आधार घेवुन जलतत्वांच्या शब्दगटांचा गोड मधुर असा एक उच्चार करने शक्य आहे.

ज्याप्रकारे तैराक हा जलावर विशिष्ट लयीत मधुरतेने हळुवारपणे थाप मारत तरंगतो, त्याचप्रमाणे जलतत्वांच्या दुस-या शब्दगटांचा उच्चार हा विशिष्ट लयीत मधुरतेने हळुवार थाप मारून केल्या जावु शकतो. एक अथवा दोन थापा मारून या जलतत्वांच्या शब्दगटांचा एक तरल उच्चार केल्या जावु शकतो.

॥ प्रकार ०२ ॥
जल/आप तत्वांच्या कामाप्रमाणे..
॥ जलतत्वांच्या दुस-या शब्दगटां चा तरंगत विरलतेकडे जाणारा उच्चार ॥

आपतत्वांचे गुण 'विरलता', 'तरंगता' हे सुध्दा आहेत. या तरंगता विरलतेचा आधार घेवुन जलतत्वांच्या शब्दगटांचा तरंगत विरलतेकडे जाणारा उच्चार करने शक्य आहे.

उदाहरणार्थ :- 'गगण कवटाळु....' या शब्दगटातील दुसरा शब्दगट चा उच्चारात उच्चारणात हळुहळु विरलतेकडे नेत करतात.

॥ प्रकार ०३ ॥
जल/आप तत्वांच्या कामाप्रमाणे..
॥ जलतत्वांच्या दुस-या शब्दगटांला दाबुन उसळी घेत केल्या जाणारा उच्चार ॥

जलाला एका ठिकाणाहुन दाबले तर ते दुस-या ठिकाणाहुन जलांच्या लाटा उसळी घेवुन बाहेर येतात. ज्याप्रमाणे ताकतीने दाबले असता जलांच्या लाटा उसळी मारतात.

॥ प्रकार ०४ ॥
जल/आप तत्वांच्या कामाप्रमाणे..
॥ जलतत्वांत करता येणारे कामे शोधुन केलेला उच्चार. ॥

तुम्ही जलतत्वांत होणारे कामे शोधुन त्या कामाप्रमाणे उच्चार जर केला तर तो जलतत्वांच्या कामाप्रमाणे उच्चार होवु शकतो.

अश्या रितीने दुस-या जलतत्व शब्दगटांचा उच्चार चतुर्पती भजनी आपआपल्या आवडीनुरूप, वरील चार पैकी एक काम निवडुन त्या कामाप्रमाणे जलतत्वाच्या दुस-या शब्दगटांचा उच्चार जलावरील थापेप्रमाणे जोर देवुन दाबुन करतात. किंवा उसळी घेत करतात. अथवा तरंगत विरलतेकडे नेणारा उच्चार करतात.

पृथ्वीतत्वाचा ' जोर लावुन जड भार युक्त उच्चार' आणी जलतत्वांचा ' जोर लावुन दाबुन थाप मारल्याप्रमाणे उच्चार' किंवा 'तरंगत विरलतेकडे जाणारा उच्चार' आणी आकाशतत्वाचा ' विलीनतेकडे बिंदुपल्याड जाणारा

उच्चार' यातील भेद वारंवार जाग जागृत ठेवुन भजन श्रवण केल्याने लक्ष्यात यायला लागतो.

पृथ्वीतत्व शब्दगट आणी जलतत्वांचे शब्दगट यांचा उच्चार सहसा जोडीने करून तरंगत विरलतेकडे जावुन तिस-या अग्नीतत्वांच्या पायरीवर उभे होतात. आता पाहु या तिस-या शब्दगटांचा अग्नी/तेजतत्वांच्या कामानुरूप होणारे उच्चार..

**॥ पंचतत्वे गायन कला ॥**

तेज तत्वांच्या कामाप्रमाणे..

**॥ अग्नीतत्व-शब्दगटांचे करता येणारे उच्चारण ॥**

अग्नीप्रमाणे दाहकता, तेज धगधगीतपणा, प्रकाशीतपणा.. ईत्यादी तेज/अग्नी तत्वांचे गुण आहेत. पृथ्वीतत्वांच्या गतिमानतेला तेज या तेजस तत्वांव्दारे मिळते. दिव्य ज्ञानाच्या तेज प्रकाशाव्दारे निघालेली ज्ञानउर्जा या तेजस तत्वांव्दारे प्रक्षेपित अथवा ग्रहन केल्या जावु शकते. या अग्नीतत्वांच्या स्वरचिन्हाचा आकार त्रिकोणी असुन टोकदार आहे. त्रिकोणाला जसे अणुकुचिदार टोक असते, तसेच टोक हे अग्नीज्योतीला सुध्दा असते. उर्जेचे टोकदार स्पंदने निर्माण करत अग्नीज्योत धगधगत राहते. तेज देत राहते.

असे हे तेजपुर्ण अग्नीतत्व शब्दाव्दारे साहय होण्याकरीता अग्नीतत्वांच्या गुण कामाप्रमाणे या अग्नीतत्वांच्या शब्दगटांचा उच्चार हा ' तेज टोकदार, करारी किंवा धगधगते स्पंदन युक्त करतात.

उदाहरणार्थ :- माता आपल्या बाळाला शिस्त लावण्याकरीता, शिकवण्याकरीता जेव्हा रागावते, तेव्हा त्या क्षणाला तिच्या मुखातुन निघालेले शब्द हे अग्नीप्रमाणे तेजस्वी, धगधगीत टोकदार असते. त्यात क्रोधाचा लवलेशही नसतो. परंतु तिचे ते तेजस शब्द योग्य ते काम करतात. योग्य तो प्रभाव पाडते.

जेव्हा शब्दांचा उच्चारात तेज धगधगीतपणा व करारी असते, तेव्हा तो उच्चार तेजगुणांचा शब्द बनतो. आणी तेजस तत्वांचे काम करतो. म्हणुनच चरणांचा तिसरा तेजगुणांचा शब्दगट चा उच्चार हा खालीलप्रमाणे करता येवु शकतो.

०१ तेज टोकदार केल्या जातो किंवा
०२ भडका उडाल्याप्रमाणे केल्या जातो. किंवा
०३ धगधगीत स्पंदनयुक्त केल्या जातो. किंवा
०४ अग्नतत्वे यांचे कामे शोधुन त्या कामाप्रमाणे केल्या जातो.

हे तेजतत्व वारंवार भजन गायन केल्याने आपरूप सहस साध्य होते. वारंवार भजनांव्दारे हे तेजस तत्व साध्य झाल्यानंतर अवधुत भजन साधक योगी मध्ये तेजतत्वांच्या सिध्दियाँ सोबतच ओंजस तत्वांचे अवतरण होते. हे ओजंस तत्व अवतरण झाल्यानंतर त्या भजन योग्यास दिव्य वाङ्‌मयीन शक्ती, चतुर्पती चे गुढ निरंजन ज्ञान, गायन वाणी, विद्‌वता व मेधाबुध्दी ईत्यादी आपरूप काहीही प्रयत्न न करता किंवा अल्पप्रयत्नाने सहजच प्राप्त होते. हेच या तेजस तत्वांव्दारे मिळालेल्या ओजंस तत्वांची गाही अथवा लक्षण आहे. म्हणुनच सच्चे भक्त भजन साधक योगी हे उत्तम विचारवंत, /सुक्ष्म विचार करणारे तसेच उत्तम लिखाण करणारे, /घृताबुध्दिचे म्हणजेच बुध्दित

कधीही न विसरणारे कायमचे कोरलेले ज्ञान ओवी भजने ईत्यादी युक्त असतात. मेधाबुध्दियुक्त विद्‌वान असतात. त्यांची वाणी आपतत्वांच्या गुणांव्दारे मधुर व गोड असते. किंवा तेजस तत्वांच्या गुणाव्दारे तेजस्वी असते.
त्यांची वृत्ती सुसंस्कृत, कुणाच्याही आत्म्याला न दुखवता सुख देणारी व लीनतापणाची असते. म्हणुनच आध्यात्मीक ज्ञानाच्या क्षेत्रात असे म्हटल्या गेले आहे की : 'सच्चे भक्त भावीक साधक योगी हे उत्तम रितीचे विचारवंत /लेखक/प्रवक्ता/गायक व सत्पुरूष असतात. परंतु उत्तम प्रसिध्दीत असलेले विचारवंत/लेखक/गायक/प्रवक्ते हे सच्चे भावीक भक्त योगी सत्पुरूष राहीलच याची काही शाश्वती नसते.' आध्यात्मीक क्षेत्रातील सच्चे स्वस्वरूपी ओळखीचे पारखी हे लिखाणावरून पारख करून ते लिखाण करणारा कसा आहे ? त्यांच्या जवळ काय देणं आहे ? याची पारख करून लिखाणकर्त्याला ओळखु शकतात. इतरांचे बोलने व्यर्थ आहे !. असो. आता वायुतत्वांच्या शब्दगटा कडे वळु या !

॥ पंचतत्वे गायन कला ॥

वायु तत्वांच्या कामाप्रमाणे..

**॥ वायुतत्व-शब्दगटांचे करता येणारे उच्चारण ॥**

मुळ आकाशतत्वाच्या स्पंदनात्मक अवस्थेला वात म्हणजे वायु म्हणतात. आकाशाच्या पोटी वायुतत्वांची निर्मिती होत असते. अव्यक्त निराकार निरंजन मध्ये जाण्याची परमगती वायुतत्वांपासुन प्राप्त होते. वायुतत्व हे स्पंदनात्मक उडाण घेणारे तत्व आहे. या वायुतत्वात गगण विहार करून गगणाला कवटाळी घालता येवु शकते.

तेज/अग्नीतत्वांच्या टोकावर येवुन तेथुन गरूडाप्रमाणे झेप किंवा उडाण किंवा भरारी घेवुन गगणविहार ईत्यादी करण्याची कामे या वायुतत्वात केल्या जावु शकते. म्हणुनच गायनामध्ये अग्नीतत्व शब्दगटांच्या टोकदार टोकाला स्पर्श करून आकाशतत्वांत जाण्याच्या अगोदर वायुतत्वात गगण विहार करावा लागतो.

कृष्ण अवधुती भजनाच्या पंचतत्व गायन कलामध्ये चौथा शब्दगट हा वायुतत्वाचा असतो. या चौथ्या वायुतत्वाच्या शब्दगटाचा उच्चार हा वायुतत्वांत करता येणा-या कामाप्रमाणे या शब्दगटाचा उच्चार खालील प्रकारे होवु शकतो.

०१ एकदम वर झेप घेतल्याप्रमाणे-झेपेप्रमाणे उच्चार करने. किंवा
०२ उड्डाण घेतल्याप्रमाणे शब्द उडवुन उच्चार करने. किंवा
०३ भरारी मारल्याप्रमाणे शब्दाला भरारी देत उच्चार करने. किंवा
०४ गगणात विहार केल्याप्रमाणे शब्दाचा उच्चार करने.
०५ वायुतत्वांत करता येणारे कामे शोधुन त्या कामाप्रमाणे उच्चार करने.

वरिल प्रमाणे वायुतत्व शब्दगटांचा उच्चार वायुतत्वाचे कंपन उत्पन्न करतो.

पुढील पानावर..

॥ पंचतत्वे गायन कला ॥

आकाश तत्वांच्या कामाप्रमाणे..

॥ आकाशतत्व-शब्दगटांचे करता येणारे उच्चारण ॥

आकाशतत्वाचा गुण ‘नाद‘ आहे. वायुतत्वाची स्पंदन विरहीत अवस्था म्हणजे आकाशतत्व होय. आकाश तत्व सर्वांना भरून सर्वव्याप्त होवुन उरते. तसेच सर्वांना विलीनतेकडे नेवुन सर्वाना विलीन करून घेते. म्हणुनच सर्वव्याप्तता, सर्वअंर्तभुतता, अनंता कडे घेवुन जाणे, विलीन करने, भरण-पोषण करने .. ईत्यादी आकाशतत्वांचे कामे आहे.

अव्यक्त परमात्म्याच्या अव्यक्त पराप्रकृती मधुन प्रथम स्पंदन विरहित अवस्थेत प्रथम आकाशतत्व निर्मिले. या आकाशात स्पंदने आल्याने या आकाशतत्वाच्या पोटी वायुतत्व व्यक्त झाले. वायुतत्वां पासुन तेज/अग्नतत्वे व्यक्त झाले. आणी अग्नतत्व पासुन आप तत्व व्यक्त झाले. आपतत्वापासुन पृथ्वीतत्व व्यक्त झाले. अश्या प्रकारे तत्वे व्यक्त होण्याचा क्रम हा परमात्मापासुन परा अव्यक्त बिंदु आणी तेथुन ‘आकाश - वायु - अग्न - आप - पृथ्वी‘ असा वरून खाली आहे. म्हणुनच कृष्ण अवधुती भजन साधक योगी हा परमात्माकडे जाण्याकरीता कृष्ण अवधुती भजनाच्या पंचतत्व गायन कलाव्दारे ‘पृथ्वी - आप - अग्न - वायु - आकाश - बिंदु‘ असा खालुन वर मार्गाने वर वर चढत अव्यक्त परमात्मा स्वरूपी अव्यक्त बिंदु कडे जात त्यात विलीन होतो.

सर्व सृष्टीच्या निर्मिती अगोदर उत्पत्ती पुर्वि सर्व निराकार अव्यक्त असते. त्या उत्पत्ती नंतर येणारी मधली अवस्था ही व्यक्त असते. आणी या मधल्या व्यक्त अवस्थेनंतर सरतेशेवटी ते पुन्हा अव्यक्त निराकार अवस्थेत जात असते. निराकारात विलीन होत असते. हाचा सृष्टीचा क्रम आहे. भ.गीता. ०२-२८. परंतु शक्तीसंचय, शक्ती अविभक्तीत्व, चिरंजीवीत्व चा नियम नेहमी कायम राहतो. कालगतीला अनुसरून वस्तु अथवा जीव व्यक्त आकारी व अव्यक्त निराकारी होत असते. याच नियमाला अनुसरून येथे पाचव्या आकाशतत्वांच्या शब्दगटांचा उच्चार खालीलप्रमाणे केला जातो.

पाचव्या आकाशतत्वांच्या शब्दगटांचे प्रथम दोन उपभाग पाडल्या जातात. त्यापैकी पहीला उपभाग हा आकाशतत्वांच्या गुणांनी युक्त हळुहळु विलीनतेकडे जाणारा उच्चाराने उच्चारतात. तर दुसरा अंतिम अनुस्वार बिंदु अक्षर गटाचा भाग हा तत्वविरहीत बिंदुतत्वाच्या पल्याड परा पर्यत नेवुन निरंजन परमात्म्यात विलिन अर्पण होणारा उच्चार करतात.

आकाशतत्वाचे विलीनतेचे कामाप्रमाणे पहील्या उपभागाचा उच्चार हा विलीनतेकडे जाणारा उच्चारून तो उच्चार हळुहळु विलिनतेकडे जाणारा ठेवुन सरतेशेवटी बिंदु व्दारे तो उच्चार दुस-या उपभागाच्या तत्वविरहीत बिंदु अवस्थेच्या पल्याड परा पर्यत नेवुन तो उच्चार निरंजनी विलीन/अर्पण करतात.

आकाशतत्वांच्या गायनाने भजन साधकात स्फुर्ति, उल्हास, व तरतरीतपणा येत राहतो. बिंदुपल्याड असलेल्या निरंजनात सर्व काही अर्पण किंवा विलीन करण्याच्या कामामुळे भजन साधक सर्वान्तंरग्यानी, दयाळु, दाता, सर्वात परमात्माचा एकच अंश सर्वत्र भरून भरला आणीक उरला आहे असे मानणारा होतो. परमात्म्याच्या त्या एका अंशाला सर्वस्व अर्पण करणारा दाता होतो. आकाशतत्व साध्य झाल्याने त्याला सारा संसार हा परमात्मा च्या अख्त्यारी असुन, हा सारा संसार परमात्म्याने मायेच्या अधिपत्या खाली दिलेला

आहे. याचे ज्ञान होवुन त्याला तिरगुणी मायेच्या पलीकडचे विश्व त्याला दिसायला लागते. म्हणुन तो आत्मरूपी नादात मस्त राहुन आपला नियत प्रपंच करत परमार्थ साधतो. परमार्थ करून संसार चालवत संसाराच्या वरच राहतो. धन, मानसन्मान व्दैत व तिरगुणांच्या पलीकडे जावुन सत्‌भावाने राहतो. आकाशतत्वांच्या अनुभुतीव्दारे तो सर्वानां वात्सल्याने व्यापुन राहत आकाशाप्रमाणे सर्वव्यापी होत राहतो.

अश्या रितीने पाचही तत्वांचे काम अथवा गुण घेवुन त्या त्या तत्वांच्या कामाप्रमाणे उच्चार उच्चारून या पाचही तत्वांच्या वर जिथे तत्वविरहीत बिंदु अवस्था आहे, त्या बिंदु अवस्थेत उच्चार नेत त्या उच्चाराची उर्जा तरंगे हे बिंदुपल्याड उभ्या असलेल्या निरंजनास अर्पण करने. निरंजनात विलीन करने ईत्यादी कृति या पंचतत्वगायन कला मध्ये चतुर्पतीच्या जाणत्यांनी समावीष्ट केलेल्या आहेत. अधिक ग्यानासाठी खंड ०२ ओवी ४४ 'देह निर्गुणा ! पाचही तत्व दयाहो मजला' या ओवीचे निरसन वाचा. असो.

अश्या रितीने पाचही तत्वांचे काम प्रमाणे उच्चार या देहीच्या तिरभवनाव्दारे करून त्या पाचही तत्वांच्या कामाव्दारे उत्पन्न झालेल्या अनाहत् नाद लहरी ची उर्जा निरंजनाकडे नेत ती उर्जा निरंजनात विलीन करत म्हणजेत देह निगुर्णात नेवुन निगुर्ण निरंजनाला उर्जा अर्पण करत चरणाच्या पुढील टुका उच्चारण करत पुनःपुनश्च या क्रियेची शृंखला विणत राहतात. अनुहात् लहरी उत्पन्न करत मंत्रशास्त्राचे मुळ प्रकट करत राहतात.

कोणतेही लिखाण हे मनुष्यास मार्गदर्शक ज्ञान देते. त्या त्या ज्ञानमार्गावरील खुण मुद्रा दाखवतात. परंतु लिखाणाव्दारे दर्शवलेल्या ज्ञानमार्गाच्या खुण मुद्रा घेवुन स्वतःला स्वतःव्दारे एकटेच जावे लागत असते. स्वतःव्दारे स्वतःला प्रकाशीत करावे लागते. या स्वतःव्दारे स्वतः चालण्याच्या मार्गावर जिथे कुठे अडथळा येत असेल, तिथे पुनश्चः लिखाणाच्या मार्गदर्शक ज्ञानात सुक्ष्मदृष्टीने डोकावुन पाहत सुक्ष्म ज्ञान शोधुन त्या ज्ञानाव्दारे तो अडथळा दुर करत पुढे पुढे चालावे लागते. चालता चालता अनुभव घ्यावे लागते. आध्यात्मीक विश्व हे अनुभवाचे शास्त्र आहे. ईथे प्रतेकाचे वेगवेगळे अनुभव राहु शकते. म्हणुनच तुमचा अनुभव हा तुमचाच अनुभव असतो. नुसते वाचुन हे अनुभव येत नसते. तर त्यासाठी प्रयत्न करावा लागतो. आयुष्य झिजवावे लागते. आपण स्वतःला कोणता अनुभव येतो ? हे जाणण्याकरीता येथे प्रथम चालने सुरू करावे लागते. चालता चालता अनुभव घेण्याकरीता प्रयत्न करावा लागतो. एक एक अनुभव घेत अनुभवाचे गाठोडे पाठिवर ठेवुन त्यात एक एक अनुभवाची भर टाकत पुढे पुढे जावे लागते. हे अनुभव घेण्याकरीता मार्गदर्शक तत्वांने सांगीतलेल्या कृति प्रमाणे कृति करत त्या कृतिचे स्वतः चे अनुभव घ्यावे लागते. म्हणुनच सरळ सरळ कृति कर्म करावी लागतात. सिध्दतेकरीता अथक प्रयत्न करावा लागतो.

म्हणुनच आतापर्यंत जे तुम्ही पंचतत्वगायन कला चे तत्वज्ञान वाचले त्यापैकी जेवढे काही पहिल्या वाचनात समजले तेवढेच आपले देणं समजुन या तत्वज्ञानाच्या भानगडीत न पडता सरळ सरळ कृति करण्याच्या मार्गात चाला. हे तत्वज्ञान देण्याचे फक्त एकच उद्‌देश आहे की : 'चतुर्पती चा गडी कोणत्याही परिस्थितीत ज्ञानाच्या बाबतात मागे पडु नये.' या कारणास्तव येथे अत्यंत क्लिष्ट अश्या चतुर्पती पंचतत्व गायन कला चे तत्वज्ञान थोडक्यात देण्याचा प्रयत्न केला आहे. या पैकी जे सहजच समजेल ते घ्यावे. बाकीचे सोडुन देत सरळ सरळ कृति मार्गात बसावे. हा कृतिमार्ग चतुर्पती च्या जाणत्यांनी येथे अवधुती भजनाच्या चालीमध्ये दिलेला आहे

## -: कृतिमार्ग :-

हेंगडुजी, पुनाजी, देवमनजी..ईत्यादी कृष्णकालीन चतुर्पतीच्या जाणत्यांनी या पंचतत्व गायन कलाचे ज्ञान दृष्टीसमोर ठेवुन, कृष्ण अवधुती भजनांच्या ओवी आणी त्यांच्या चाली रंचल्या आहे. एकदा का या भजनाच्या जुन्या चाली तुम्ही आत्मसाद केल्यात, तर पंचतत्वगायन कलाचे तत्वज्ञान चे ज्ञान नसतांना ही तुम्ही पंचतत्वगायन कला प्रमाणे गायन करु लागतात. कृष्णकालीन चतुर्पती च्या जाणत्यांनी या चाली अश्या रितीने रंचल्या आहेत की : या चाली आत्मसाद केल्यानंतर, या चालीव्दारे चरणे म्हणत असतांना, भजनीगडयांच्या नकळत त्यांच्याकडुन आपोआप पंचतत्वगायन कला प्रमाणे गायन घडु लागते. पंचतत्वांच्या देण सह संजीवनीचा वर्षाव प्राप्त होवु लागते. सुक्ष्म सृष्टीशी संधान साधल्या जावु लागते... ईत्यादी बहु काही गुढं गोष्टी घडत राहतात. तशी मांडणीच या भजनांच्या चालीमध्ये जाणत्यांनी करुन ठेवलेली आहेत.

म्हणुनच तत्वज्ञानाच्या भानगडीत न पडता सरळ सरळ कृति करण्याकरीता, जिथे कृठे कृष्ण अवधुती भजन सुरु असेल, तिथे जावुन कृष्णकालीन जुन्या चाली आत्मसाद करण्याचा प्रयत्न करावा. या प्रयत्नात प्रथम कृष्ण अवधुती भजन मांडीत बसुन, जुन्या चाली श्रवण करा. नंतर जसे भजनगडी म्हणत आहे, त्याप्रमाणे मागाहुन म्हणण्याचा प्रयत्न करावा. सर्व काही तत्वज्ञान विसरुन, ज्या कृष्णकालीन जुन्या चालीत भजन गडी म्हणत आहे, ते जसेच्या तसे मागाहुन म्हणण्याची कृति करा. प्रथम मागाहुन म्हणण्याची सवय लावा. नंतर पुढे म्हणण्याचा प्रयत्न करावा. त्याकरीता जिथे कुठे कृष्ण अवधुती भजन कानावर येत असेल, तिथे मानसन्मानाची पर्वा न करता, लिनता अंगी बाळगुन, त्या भजन मांडीमध्ये सरळ जावुन बसा. भजन गडयांच्या म्हणणीप्रमाणे त्यांच्या मागाहुन भजने म्हणण्यास हळुहळु सुरुवात करत, भजन मांडी मध्ये सामील व्हावे. अश्याच प्रकारे प्रेम व ज्ञान भक्ती भावपुर्ण एकतानतेने एकरुपतेने कृष्णकालीन जुन्या चालीत भजन करण्याचा निरंतर प्रयत्न करत राहावा.

भजनाव्दारे मिळणा-या देणं ची तसेच फळाची आसक्ति न बाळगता, स्वतःचे कर्तव्य म्हणुन भजने करत राहा. भजनांव्दारे प्रेम भक्तीभाव अर्पण करत राहावे. ऐवढेच केल्याने कृष्णासह कृष्णाचे हस्तक, सवंगडी.. ईत्यादी सुक्ष्मविश्वाचे जाणतेगण उभे होवुन, कसे तुमचे पाठराखन करत आहे?, कसे तुम्हास तुमच्या नकळत शिकवत आहे?, याचा अनुभव स्वतःव्दारे स्वतःच घ्यावे. तुमच्या नकळत कृष्णाव्दारे तुमची शिकवणी सुरु होते. पाटी पुस्तक पेन कागद ईत्यादी न घेताच, तुम्ही कृष्णाव्दारे शिकत शिकत जात, त्या शिकलेल्या ज्ञानाचा अनुभव घेत घेत, तुमचे अनुभवाचे गाठोडे भरत जाते. तुमचे अनुभवाचे गाठोडे कसे भरत गेले ?, तुम्ही कसे शिकलेत ?, कसे ज्ञानवंत गुणवंत झाले ? कसे परिपक्व झालेत ? ईत्यादी उत्तरे मागे वळुन शोधल्यास, हे कसे घडले ? काय देणं मिळाले ? हे तुमचे तुम्हीच जाणाल. सरतेशेवटी हे कृष्ण अवधुताचे भजन होय. भैसाच्या यवगातील मांडणीपैकी एक मांडणी असलेल्या पंचतत्वगायन कला च्या या मांडणी व्दारे, ईथे कोणीही खाली हात राहत नाही. असो.

॥ अथर्वन् वेदाची मांडणी । सांगी सांगतली आकाशवाणी ॥
॥ आकाशवाणीचा द्युत येईन/आला ।
तो सांगीवर सांगी सांगन अवध्या जनास/जगाला ॥
॥ ऐसा बोले चौरंगी द्युत । हे होय लभेदाची किर्त ॥
॥ यवगा यवगी चा आत्माराम । याहीची किर्त महीमा जगात वाढवनं ॥

**॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥**

॥ खंड ११ ॥
॥ भाग नं. ०१ ॥
॥ परिशिष्ट ०२ ॥
॥ श्री कृष्णा व्दारे झालेली यवगी मांडणा चे ग्यानपिंड ॥

# ॥ चतुर्पता अथर्वन् वेद सैना व सिदाई ॥

## ॥ प्रारंभिक ग्यान ॥

आत्मा हा परमात्म्याच्या आंगचा तेजोगुणी अंश आहे. जेव्हा आदीपुरूष परमात्मा होते चरांचर, तेव्हा हे आत्म गडी होते त्यांच्या बराबर ! परमात्म्याने 'मो-ह सृष्टी रंचावी' ऐसे जेव्हा ईच्छिले मनी, तेव्हा या परमात्म्याच्या ईच्छापुर्ति साठी या आत्मगडयांनी प्रकृति योनी मध्ये सृष्टी रंचनेच्या कार्यास्तव उडया घातल्या. अधिक ग्यानाकरिता खंड०१/०१/आदीपुरूष आदीगणाचे निरसन वाचा.

जेव्हा धन्याचे आंगचे आत्मगडी हे धन्याच्या ईच्छेखातर प्रकृतियोनीमध्ये उडया घेवुन प्रकृतित प्रवेशी झालेत, तेव्हा ते प्रकृति मायेच्या तिन गुणांनी बध्द झालेत. मायेचे ३ गुण, ६ मनोविकार आणी ३६ पाखंडी ईच्छा वासना कल्पना.. अश्या मायेच्या एकुन ४५ चौक्याच्या आत अडकला. मायेच्या ४५ चौक्यावरच्या फाश्यात पडुन तो आत्मा मन बुध्दि अंह यासह देहीच्या सप्तकोषाने बांधल्या गेला. निष्कलंकी परमात्म्याच्या आंगचा निष्कलंकी आत्मा हा मायेचे तिनगुण विकारा सह मन बुध्दि अंह आणी सप्तकोषाव्दारे वेस्टल्या जावुन त्यावर चौदेहीचे येरझार कोट पडुन तो जिवात्मा झाला. अश्या रितीने निष्कलंकी आत्मावर मायेच्या प्रतापाव्दारे कलंकीत वेस्टने येवुन तो देहधारी जिवात्मा बनला. तिरगुणी मायेच्या अधिपत्या खाली आला. येथे तो आपला मालक भुलला, मायेत पडला आणी चौ-यांशी च्या फेरीत अडकुन हा जीवन पोवन राजा नांदु लागला. आत्मा/शिव हा देहीनं/शक्तिनं लोपला. स्वतं या देहीचा/शक्तिचा धनी असता या शक्ति/मायेव्दारे चोर ठरला. हा देह राजा यवगा साठी आला.

आत्मा हा परमात्म्याचा तेजोगुणी अंश आहे. परमात्म्यात जे काही गुण शक्ती दिसतात, ते सर्व गुण शक्ती या आत्म्यात अंशरूपात ठासुन भरलेले आहेत. म्हणुनच परमात्म्याला जाणण्याकरीता, प्रथम स्वतःच्या अंर्तगतात झाकुन, देहशुध्दि करत आत्म्यावरचे मायेचे वेस्टने दुर करत त्याला जागृत करावे लागते. या आत्मजागृतिकरीता प्रथम आत्मज्ञानी व्हावे लागते. या आत्म्याला जाणावे लागते. कारण हा आत्माच आपल्या मुळघरच्या परमात्म्याकडे जाण्याचा एकच मार्ग होय. परमात्म्याकडे जाण्याची पायरी होय. ही पायरी जागृत करण्याकरीता, आत्म्याचा स्वभाव प्रथम तुम्हास जाणावा लागतो. प्रथम त्याला थोडयाबहुत आत्म ज्ञानाने जाणण्याचा प्रयत्न करू या !

ज्याप्रमाणे हंस हा पाणी मिश्रीत दुधातले फक्त दुधच पितो आणी पाणी तसेच सोडुन देतो. कंकरातुन फक्त मोतीच वेचतो, त्याच प्रमाणे हा आत्मा हा फक्त आसारातुन सार निवडत, त्या सारातुन शुध्द सत्व चे सार ग्रहण करतो. सत्य प्राशन करतो. सत्य, शुध्द सत्व घेत शुध्द सत्वगुणी सत्यवान राहतो. मायेच्या बध्द जीवनामुळे, तो मनासह दश इंद्रियाच्या विषय वासनाशी कठीन संघर्ष करत, त्यांच्या सर्व कलंकापासुन दुर राहत निष्कलंकी राहतो. चैतन्यपुर्ण ज्ञानमय निष्कलंकी सुर्याला म्हणजेच या आत्म्याला निष्कलंकता प्रिय आहे.
चिरंजीव अंबर आत्मा हा परमात्यांचा अंश असल्याकारणाने, परमात्म्याप्रमाणे हा आत्मासुध्दा चैतन्यप्रकाश युक्त आहे. आणी त्याला परम सुखाची, परंम आनंदाची सत् चित्त व आनंद ची गोडी असते. याच गोडी मुळे त्याला जर

उच्चत्तर हरीनामाची गोडी चा थोडाबहुत काही अनुभव आला, तर त्याची विषयाबध्दलची गोडी सुटते. आणी अनुभव संप्पनतेमुळे तो स्वः चैत्यन्यात स्थिर होत परमय सुखाने राहतो.

ज्याचा भाग त्याला दयावा लागतो, तेव्हा कुठे काहीतरी कणवा येईन हो धन्याला ! ज्याचे खादय त्याला दयावे लागते, तेव्हाकुठे काहीतरी कणवा येईन हो धन्याला ! म्हणुनच आत्मज्ञान घेवुन आत्म्याचे खादय जाणुन म्हणजेच आत्म्यांचा अन्नाचा कार जाणुन, ते खादय/अन्न त्याला देण्यासाठी प्रयत्नरत् व्हावे. आपल्या आत्म्याचे शुध्द सत्व व परमय सुखः सत् चित् आनंदाच्या उच्चत्तर गोडी चे जे खादय/अन्न आहे, ते खादय त्याला दयावे लागते. तेव्हा कुठे काहीतरी कणवा येईन त्या देहीच्या धन्याला ! तो ईच्छा पुर्ण करन या नरदेही । देहीतुन जाणारच नाही कधी । राहीन त्याच्या गुणरूप व परमय सुखः ची गाही ! हे सुख नाही मावणार या देहीच्या तिरभवनी । देवा या जीवाचे आत्मज्ञान शोधल्या शिवाय हे होणं शक्य नाही ।

इथले जगत मायेने आच्छीदलेले असल्यामुळे, येथे आत्मा व परमात्मा यांचे हे ज्ञान फार गुप्त आणी रहस्यमय आहे. परंतु हे अध्यात्मज्ञान आणी विशिष्ट आत्मज्ञान सह गुढं ग्यान जर स्वयं परमात्मा तुमच्या हद्‌यात अर्तभुत होवुन त्याने सांगीतले, तरच समजु शकते. अन्यथा नाही. तो परमात्मा सर्वांच्या हद्‌यी अंतरंगात निपचित पहुडलेला आहे. म्हणुन त्या परमात्याला हद्‌यात जागी करून उभे करण्यासाठी, नित त्याचे भजन पुंजन ध्यान सुमरण व सच्ची भक्ती सदोनित करावी. म्हणुनच भजन चरण गर्जुन सांगी करत आहे की :

॥ जागी करा या देवाले हो । करा मानवाले ।
पुर्विचं भाकलं अहिना घरी देव आले ॥.

याच अविनाशी दिव्य अहीन आत्म्याला कुठे कुठे ब्रम्ह असे म्हणतात. आणी त्याच्या नित्य स्वभावाला अध्यात्म असे म्हटल्या गेले आहे. या आत्म्याच्या करीताचा अधात्म आहे. हे चांगल्या रितीने आध्यात्मीक जाणते जाणतात.

निष्कलंकी आत्मा जेव्हा प्रकृति मायेच्या तिन गुण विकारांनी बध्द असल्यामुळे, त्याला स्वतःच्या अस्तित्वाबद्‌दल विस्मरणेकडे जाण्याच्या कल राहतो. त्यामुळे त्याला स्वस्वरूपाचे ज्ञान होत नाही. हा आत्मा जेव्हा प्रकृति मायेच्या योनीत येतो, तेव्हा तो सप्तकोषाने वेस्टीला जातो. या सप्त कोषापैकी फक्त स्थुल देहीचा अन्नमय कोष साध्या डोळयानं दिसतो. परंतु सुक्ष्म देहीचे प्राणमय कोष, वासनामय कोष व मनोमय कोष तसेच कारण देहेचा ज्ञानमय कोष आणी महाकारण देहेचे विज्ञानमय व आनंदमय कोष हे त्यांच्या गुणतत्वांव्दारे ज्ञानदृष्टीने पाहता येते. सप्तकोषाचे अधिक ग्यानाकरीता खंड०३/०६:-पंचभुताचा पसारा या ओवीचे निरसन वाचावे. येथे या सप्तकोषांचे थोडक्यात ग्यान अवलोकन करू या !

०१. **अन्नमय कोष** : हा साध्या डोळयानं दिसणारा तुमचा स्थुलदेह होय. ज्याला स्थुल शरीर असे म्हणतात. जीवनकाळात या सप्तकोषापैकी स्थुल देहीचा अन्नमय कोष हा जीव-जंतु, रोग-विघ्ने, व स्थुलदेहीच्या षटविकार सह ईतर विकारांनी वेस्टीला असल्यामुळे, तो कलंकीत होवुन, या विकारी कोषांनी तो स्थुलदेही वेस्टीला जातो. या स्थुल देहीला मर्यादित आयुष्य असुन ते मिर्त असते. मृत्य पावणारे असते.

**०२. प्राणमय कोष** :- आत्मा जेव्हा देहीत अवतरला, तेव्हा त्याच्या चैतन्यप्रकाशात पडलेल्या त्याच्या छाया व्दारे प्राण निर्माण होवुन, सर्व देहीवर विराजमान झाला. स्थुल देहीवर प्राणमय कोष या आत्म्यापासुन उत्पन्न होवुन, हा प्राणमय कोष सर्व कोषात प्राण संचारत ठेवतो. हा सर्वत्र संचार असलेल्या कोषालाच प्राणमय देह असे सुध्दा म्हणतात.

**०३-०४:- मनोमय व वासनामय कोष** :- आत्मा जेव्हा प्रकृतियोनीमध्ये प्रवेशी झाला, तेव्हा मन बुध्दि अंह व मायेचे तिरगुण याने बध्द झाला. आत्म्यावर मनाने वेस्टने घालुन मनोमय कोष उत्पन्न केला. देहीच्या मनाचे या मनोमय कोषावर अधिराज्य असते. मनाव्दारे मनाचे सुक्ष्म संस्कार या मनोमय कोषात साठवले जातात. तर मनातील प्रबल वासना हया मनावर वेस्टने घालुन आपला वासनामय कोष निर्मिती करते. हा वासनामय कोष या मनोमय कोषावर चढुन मनाच्या प्रबल वासना चे संस्कार साठवत असते. अश्या रितीने अमर्याद आयुष्याच्या सुक्ष्मदेहीचा मनोमय व वासनामय कोष हा मनाचे षटविकार, मनाच्या विषय भोगेच्छा तृप्ती च्या वासना या व्दारे वेस्टीला जातो. स्थुल देही आत्म्याने सोडल्यानंतर या मनोमय कोषात साठवलेल्या सुक्ष्म संस्काराव्दारे हा मनोमय कोष आत्म्याला खेचत राहत असतो. तर वासनामय कोष हा आपल्या वासना तृप्त करण्यासाठी आत्म्याला खेचत गरगरा फिरवत ठेवते. वासने पोटी आत्म्याला चौ-यांशीच्या यवनीमध्ये पुनःजन्म घ्यावयास वासनामय कोष भाग पाडत राहते.

**०५-०६:- ज्ञानमय कोष व विज्ञानमय कोष** :- आत्मा जेव्हा प्रवेशी होवुन मती ने बध्द झाला तेव्हा मुळ बुध्दिचे वेस्टन त्यावर येते. वरवर बुध्दिचे हे वेस्टन म्हणजे ज्ञानमय कोष होय. तर सत् संस्कारक्षम अनुभवजन्य विशेष ज्ञानयुक्त मतीचे वेस्टन हे विज्ञानमय कोष होय. या कोषांमध्ये बुध्दि ही देहीव्दारे आलेले विषेश आध्यात्मीक ज्ञान, सत्यसार व सत्य ज्ञानानुभव सह विशेष ग्यान म्हणजेच विज्ञान हे सुक्ष्म स्वरूपात कोरून, त्या बुध्दिमती चा सुक्ष्म संस्काराचा साठा करत राहते. या कोषात विशेष ग्यान विज्ञान सह अनुभवाचा साठा असतो. अश्या रितीने कारण महाकारणी च्या ज्ञानमय व विज्ञानमय कोषात आध्यात्मीक ज्ञान, संस्कार कोरले जावुन त्या ज्ञानाच्या संस्काराने तो संस्कारक्षम होत असतो. स्थुल देही सोडल्यानंतर आत्मा हा या विषेश ज्ञान विज्ञान व अनुभवाचे साहयं घेवुन, परोपरीच्या पाय-या वरवर चढत जातो.

**०७:- आनंदमय कोष** :- आत्मा हा सुखाचा गडी आहे. परमात्म्या संबधीच्या सत्य ज्ञानाच्या संगतीने तो आपल्या परमात्म्याशी तार जुळवुन परमय सुखाची प्राप्ती करण्याची अभिलाषा त्यांला नेहमीच राहत असते. त्याला परमय सुखाच्या गोडी ने आनंद होत राहतो. या आत्म्यावर परमय सुखानंदाचा कोष आपरूप जडला जातो. परमय सुख व सत्संस्कारा व्दारे त्याचा आनंदमय कोष आनंद प्राप्त करत राहतो. परमय सुखाच्या आनंदाने आनंदाची ज्योत जेव्हा नांदु लागते, तेव्हा त्याचा हा आनंदमय कोष बलबान होवुन तो देहीत आनंदाने राहतो.

आत्म्याच्या आनंदमय कोषात या देहीच्या आनंदमय क्षणात जेव्हा जेव्हा त्याला परमानंद, चित्तानंद, व परमय सुख प्राप्त होते, तेव्हा तेव्हाचे ते परमय सुखाचे क्षण चे अनुभवाचे सुक्ष्म संस्कार या आनंदमय कोषावर कोरल्या जावुन, त्या क्षणांचा तेथे साठा होत असते. परमात्माच्या सच्च्या भाव भक्तीचे व्दारे आलेले परमय सुखानंद हा तर आनंदमय कोषात लवकरच कोरल्या

जातो. परमय सुखाचा साठा वाढत वाढत जात हा आत्मा नित्य सत्चित्तानंद अवस्थेत सुख शांतीने राहु लागतो.

ऐश्या रितीने जीवनकाळात आत्मा हा सप्तकोषाने वेस्टुन प्रकृतीच्या तिन गुणांने बध्द होवुन जीवात्मा बनुन देहीत वसना करत राहत असतो.

जेव्हा हा निश्कलंकी आत्मा देहीला सोडुन बाहेर निघतो, तेव्हा तो सुक्ष्म पंचेद्रियासह मन मती संस्कार व देहीची उर्जा सह सप्तकोषाने वेस्टिलेला जिवात्मा असतो. हा जीवात्मा देहसोडल्यानंतर सुध्दा देहीची उर्जा नष्ट न होता ती आत्माच्या कृष शक्तीव्दारे आकर्षित होवुन, ती निराकार गोल गोळयात रूपांतरीत होवुन, त्याच्या भोवताल येवुन तो पवनरूपी गोल गोळा होत असतो. या जीवात्म्याच्या पवनरूपी गोळयात सप्तकोषांवरील विषयविकारांच्या कचरा व्दारे, तो आत्मा कलंकीत होत राहत असतो.

आत्म्याच्या चैतन्य व कृष शक्तीव्दारे तयार झालेल्या, या पवनरूपी जिवात्म्याचे एक एक कोष सोडत, या आत्म्यास वरवरची पायरी चढत पुनश्च आपल्या मुळ स्वरूपात म्हणजेच सप्तकोषाच्या कलंकाने विरहीत होवुन, परमात्म्याचा तेजोगुणी अंश असलेल्या केवळ शुध्द स्वरूपात येवुन, आपल्या मुळघरी प्रवेश घ्यावा लागतो.

आत्म्याला आपल्या मुळघरी परत येण्याच्या परोपरीच्या पाय-या चढुन, उत्तरोत्तर उन्नत्ती करण्यासाठी त्याला विज्ञानमय कोष व आनंदमय कोषाचे साहय होते. तर मनोमय, वासनामय कोष यांचा अडथळा होत राहत असतो. मनोमय कोष व वासनामय कोषात असलेल्या तिव्र विषय वासना तृप्तीच्या ईच्छा त्याला गुरफाटत गुंतवुन ठेवण्याचा प्रयत्न करत राहत. त्या जीवात्म्यास अवनती कडे नेण्यास कारणीभुत होवु शकते.

जीवनकाळात देहीत असतांना आत्म्याला मुळस्वरूपी आणुन मुळघरी नेण्याच्या प्रयत्नात देहीचे साहय घ्यावे लागते. याकरीता स्वतःला आत्मस्वरूपी मानुन मन बुध्दि ईंद्रिये अंह यापेक्षा श्रेष्ठ जाणुन, उच्चत्तर अशी बुध्दि व्दारे तिच्या खालच्या स्तरावर असलेल्या मनाचे सयंमन करून, मनाला प्रथम ताब्यात घ्यावे लागते. मन-संयमन करून ताब्यात आलेल्या मनाव्दारे, ईंद्रियाला ताब्यात आणुन सरळसाध्या सिदाईच्या सत् मार्गाने जीवनकाळात चालत राहावे लागते. ईद्रिये मन मती भंगवतास अर्पण करून भगवंताच्या सेवेत राहावे लागते. नित सच्या भगवत् भक्ती भावाने युक्त होवुन, समानतेने श्रध्दा, वासनारहीत प्रेम, वात्सल्य, दया, क्षमा शांती मनी ठेवुन, आध्यात्मीकतेचे प्राबल्य जिवनकाळात वाढवावे लागते. ऐसे सत् मार्गाने, शंक आचार विचाराने सत्कृत्ये करत, अहं न आणता सरळसाध्या सिदाईच्या मार्गाने देह धरणी अंर्तबाहयं शुध्द करत करत, आध्यात्मीक निरंजन ग्यान घेत घेत, जीवन जगत राहावे लागते. अश्याप्रकारे जर आध्यात्मीक प्राबल्य ठेवुन जर देही जगत असेल किंवा जगली असेल, तर त्या देहीच्या मनोमय कोषात हरीभक्ती प्रेमभाव सह सत् संस्कार चा शिक्का येवुन, त्या मनोमय कोषात दया क्षमा शांती कारूणा, साहयभाव, वात्सल्य चे संस्कार ओतप्रोत भरून राहते.

हाच आध्यात्मीक संस्काराचा साठा वाढवत नेत राहल्याने, ती देही आध्यात्मीक विश्वाच्या साहयंव्दारे थोडीबहुत समोर जावुन, आसारातुन सार घेण्याची क्षमता तिच्यात येवुन, तिच्यात आध्यात्मीक विश्वाचे सत्य ज्ञान अंतर्भुत होवु लागते. त्या सत्य ज्ञानानुरूप वागणुक करून, तो मग चतुर्पती निरंजन ग्यान प्राप्त करतो. चतुर्पतीचे अनुभव घेतो. अनुभवाचे संस्कार युक्त

विषेश ग्यान मग त्या देहीच्या ज्ञान विज्ञानमय कोषात कोरल्या जाते. त्या जीवात्म्याच्या ज्ञान व विज्ञानमय कोषात विशेष असे आध्यात्मीक ज्ञान विज्ञान चे साठा कोरल्या जावुन, तेथे त्याची साढवणुक होत राहते. ज्ञान विज्ञान कोष बलवान व वरचढ होत राहतो. आध्यात्मीक विश्वाचे विषेश ज्ञान विज्ञान सह सच्ची भक्ती भाव सत्कृत्ये करत, हरीनामाची ज्योत मध्ये नित राहत, हरीच्या प्रेमभक्ती रसात नित डुबुन राहत, भक्ती-भाव मार्गात अच्च्युत शिखरावर जावुन जेव्हा जेव्हा त्याला परमय सुखानंद, परमानंद प्राप्त होतो, तेव्हा तेव्हाच्या परमय क्षणाचा परमय आनंद हा आनंदमय कोषात कोरल्या जावुन तेथे तो साठवल्या जातो. याव्दारे त्या जीवात्म्याच्या आनंदमय कोषात परमानंद, परमय सुखानंद चा साठा वरचढ होत राहतो. या साठयामुळेच आत्म्याला सुखःशांती लाभत जाते.

अश्या रितीने कर्मफलाविषयी आशा न ठेवता, आपले नियत कर्तव्य समजुन, सत्कृत्य करत सरळ साध्या सिदाईच्या मार्गाने चालणा-या सत् देहीचे जीवात्म्याचे, सर्वच कोष हे बलवान राहुन ते विकारांना दुर करून निर्विकार कडे नेणारे राहतात. तो आध्यात्मीक विश्वाच्या पहील्या पायरीवर आरूढ झालेला असतो. तेथुन तो आध्यात्मीक विश्वाच्या परोपरीच्या एक एक पायरी चढत सरतेशेवटी अंतीम पायरीवर जेथे परमात्मा उभा असतो, तेथे येवुन परमात्मा चरणी लीन होतो.

..परंतु प्रकृति मायेपासुन उत्पन्न झालेल्या विकार व गुणांचा नुसताच उपभोगच झाला. आणी या उपभोगाच्या लालचेपायी देही जर आपल्या जीवनकाळात काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर अंहं सत्ता लालचा मानसन्मानाची नित ईच्छा, तम वासना ईत्यादी विकारांचे प्राबल्य ठेवुन अधर्माने जीवन जगत असेल किंवा जगली असेल, तर त्या देहीच्या जीवात्म्याच्या मनोमय कोषात विषयवासना, भोगलालचा, व्दैतभाव, संस्कार शुन्यता, तम, अधर्मता..ईत्यादी वाईट गुणांचे सुक्ष्म संस्कार कोरल्या जात राहते. ऐसे विषया डोह मध्ये डुंबुन भोगलालचा, षटविकार, अघोरी ईच्छा, वासना कल्पना..ईत्यादी चे प्राबल्य जेव्हा वाढतो, तेव्हा तो मनाच्या वासनामय कोषात कोरून साठवल्या जातो. मनाचा हा वासनामय कोष आपल्या वासना तृप्तीकरीता धडपडत राहत मन अशांत बनवत राहतो.

अश्या प्रकारे जीवनकाळ जगुन कलंकीत सुक्ष्मशरीराचे कोषात अतृप्त विषय वासना विकार चा साठा घेवुन, जीवात्म्या जेव्हा देही बाहेर निघतो, तेव्हा तो सुक्ष्म ईद्रिये मन मती संस्कारसह या कलंकीत कोषाने वेस्टीलेला राहतो. त्याच्यावर वाईट संस्कारांच्या साठयात कलंकीत विषय वासना विकार अतृप्त ईच्छा कामना कल्पना ईत्यादीचे वर्चस्व राहत असते. या कलंकीत कोषाच्या वर्चस्वाखाली येवुन, मग तो जीवात्मा मनोमय वासनामय कोषातील अतृप्त ईच्छा, विषय वासना अनुरूप वागत, मनोमय वासनामय कोषातील अतृप्त ईच्छा वासनांच्या तृप्ती करीता अशांततेने भटकत राहतो.

ऐसे ज्या जीवात्म्याच्या मनोमय वासनामय कोषात अतृप्त ईच्छा वासना विकार ठासुन भरलेले आहेत. आणी ज्ञान विज्ञानमय कोषात ज्ञान विज्ञान चा अभाव आहे. आणी आनंदमय कोषात फक्त भोगलालचेच्या सुखाचेच संस्कार आहे. असे ते कलंकीत कोषाने वेस्टलेले जीवात्मे आपल्या कलंकीत वृत्तीनुसार, अतृप्त ईच्छा वासना तृप्तीकरीता अशांत होवुन भरकटत राहतात. ते अशांत लवकरच क्रोधिष्ट होत राहतात. या क्रोधिष्टांचा त्रास या मिर्तलोकच्या विश्वाला होण्याचा संभव असतो. ऐसे ते जीवात्मे अविद्येने भारले

जावुन, असत्य ज्ञानाच्या संस्कारनुरूप वागु लागतात. आणी कुठेकुठे कधीकधी रोग-विघ्ने, संकष्टे-आरीष्टे पैदा करत राहतात.

अश्या रितीने देहीबाहेर गेलेल्या ज्या जीवात्म्यावर देहीच्या जीवनकाळात सत्संस्कार कोरल्या गेले नाही, जे कोरल्या गेले ते सर्वच विषय वासना भोगलालचा विकारांचे कलंक ठासुन कोरल्या गेले, तो जीवात्मा विषय विकार भोगलालचा वासनांच्या निरनिराळ्या प्रकारांनी आच्छादित कोषाचा असतो. या विषय वासना विकारांने मोहीत होवुन, त्यांच्या वर्चस्वा खाली आल्यामुळे त्या मोहीत जीवात्म्या संग आलेले जे काही थोडेबहुत शुध्द ज्ञान असते, तेही संपुर्णपणे विषयविकार वासनांच्या काळोखात लोपलेले असते. आध्यात्मीक विश्वाचे शुध्द ज्ञान विज्ञान नाही. अकाशमात मध्ये उभ्या असलेल्या आपल्या चतुर्पती निरंजन धन्याचे ग्यान नाही. आपला धनी कोण ? हे माहीत नाही ! आपला मार्ग त्याला ठाव नाही ! तेथे कोणी त्याचा वाली नसल्यामुळे, ते मायेच्या भ्रातीत येवुन गोधळलेले राहतात. अशांततेने वणवण भटकत राहतात. क्रोधिष्ट होत राहतात. त्यांची शांती करेल कोण ? अश्यांची मेल्या माग चौ-यांशी चुकन काय ? मेल्या मागे ही तो चौ-याशी भोगतच राहतो.

म्हणुनच असे म्हटल्या गेले आहे की : सुक्ष्म देहाच्या कोषात असलेल्या संस्काराचा साठा च्या वर्चस्वानुरूप, त्या जीवात्म्याची उन्नत्ती अथवा अवनती ठरल्या जात असते. जीवात्म्याच्या कोषात जर उन्नती कडे नेणा-या संस्कार व ज्ञान विज्ञान चा साठा चे वर्चस्व भरभरून असेल, तर तो उन्नत्तिच्या मार्गाने अकाशमात मधील चतुर्पती धन्याच्या आध्यात्मीक विश्वाच्या साहयानें जातो. परंतु त्या जीवात्म्याच्या कोषात जर अवनती कडे नेणारे ईच्छा विषय वासना भोग लालसा असत्यभाव व्दैतभाव चे संस्कार व ज्ञान विज्ञान असेल, तर तो त्रिविध मलाच्या तापाने ग्रस्त होवुन अशांत होत असल्यामुळे, त्याला त्याच्या स्वस्वरूपाचे ज्ञान होत नाही. त्यामुळे तो अवनती च्या मार्गाने चौ-यांशीच्या फे-यात फेकल्या जातो.

॥ चतुर्पता अथर्वन् वेद ज्ञानपिंड ॥

## ॥ चतुर्पता अथर्वन् वेद सैना ॥

निर्गुण आत्मा हा कश्याही कोषाने वेस्टीलेला असेना ! तो सरतेशेवटी हा चतुर्पती धन्याचा तेजोगुणी अंश अवतार असतो. परमात्म्याचा तो निर्गुण निराकार तेजोगुणी अंश असल्याकारणाने, तो दयावंत कृपाळु चतुर्पती परमात्मा धनी त्याच्यावर दया कृपा करून, त्याच्या त्या राजहंसावर आलेले कलंकीत कोषाचे वेस्टनांचे जाळे काढण्याकरीता, तसेच विषय वासनां कल्पना च्या गुलामगीरीचे बंधने तोडण्याकरीता, तसेच त्यांच्या मुळ मालकाकडे परत येण्यास वेळोवेळी संधी देण्याकरीता.. ईत्यादी बहु कारणास्तव आकाशमात तसेच मिर्तलोक च्या विश्वात, त्या चतुर्पती धन्याने आपल्या संगच्या सिदाईच्या उच्चस्तरीय आत्म गडयांना संग घेवुन, त्यांच्या निर्गुण आत्म गादीवर चतुर्पती अथर्वन् वेदाचे ग्यान कोरून, त्यांना चतुर्पता अथर्वन् वेदाचे सैन्य बनवुन, त्या निराळ्या चतुर्पती धन्यानें आपली एक निराळीच व्यवस्था करून ठेवलेली आहे. ती अशी :

ज्या देहीने आत्मज्ञानी होवुन या निरंजन ज्योत स्वरूपी उभ्या असलेल्या कृष्ण अवधुताला हात जोडुन सच्च्या भक्ती-भावाने भजलेत, त्यांना चौथ्या च्या चतुर्थ म्हणजेच तुर्या अवस्थेत प्राप्त होणारे चतुर्पता अथर्वन् वेदाचे ग्यान झालेत. निराकार निर्गुण अश्या आत्म गादीवर ठेवलेले, चतुर्पती निरंजन ग्यान चा प्रकाश व्दारे त्या देहीच्या आत्म ज्योती प्रकाशु लागल्यात. अश्या सर्वांना

त्या चौथ्या भैसराजाने आपल्या यवगाच्या मांडणीत, चतुर्पता अथर्वन् वेद च्या सैन्यात प्रवेशी केलेले आहे.

॥ चतुर्पता अथर्वन् वेद सैन्य । दिले गादीवर बसुनं ।
झुटे देव सिदे गेले । राज सैन्याला शरण ॥ ०६/०२

चतुर्पता अर्थवन् वेदाचे सैन्य या भैसराजाने सच्च्या भक्तजनांच्या निर्गुण गादीवर बसवुन दिले आहे. म्हणजेच त्या चौथ्या भैसाने अथर्वन् वेदाचे सैन्य, या सगुण देहीच्या आत उभा असलेला चतुर्पती परमात्माचा तेजोगुणी अंशअवतार निर्गुण आत्मा यालाच गादी बनवुन, या गादीवर तो चौथा चतुर्पता अथर्वन् वेद बसवुन दिला आहे. आणी या निर्गुण गादीवर बसवलेल्या या चतुर्पता अथर्वन् वेदावर, तो शुध्द सत्व चौथा आदीपुरूष भैस उभा असुन, त्यानेच या तिरगुणांच्या पल्याड चे ग्यान सच्च्या भक्तजनांस मिर्तलोकी व आकाशमात मध्ये देण्याची व्यवस्था करून ठेवली आहे.

या व्यवस्थेमध्ये चौथ्या भैसाच्या अथर्वन् वेद सैना मध्ये एकापेक्षा एक वरचढ असलेले उच्चस्तरीय चतुर्पता अथर्वन् वेद चे निरंजन ग्यान त्यांच्या निर्गुण गादीवर कोरून असलेले, उच्चश्रेणीचे भक्त योगी संत महात्मे पुण्यात्मे हे आत्मगडी ईत्यादीची आत्मसैना सह, परमात्म्याच्या विविध सत् ज्ञानपिंड शक्तीयॉं, गोपीयॉं, योगण्या, जोगण्या, भोवण्या, आसरा प-या रिध्दि-सिध्दियॉं ईत्यादी ईश्वरी शक्तीगण, द्युतगण, सखेगण, निरंजन चतुर्पती ग्यानी भक्तगण...ईत्यादी परमात्म्याचे सर्वगण हे संचारत असतात. हे परमात्म्यांचे सर्वगण परमात्म्याच्या अध्यक्षतेखाली परमात्म्याचे आज्ञेने परमात्म्याच्याच तेजोगुणी अंश अवतार यावर आलेले, कलंकीत कोषांचे वेस्टंने तोडण्याकरीता साहयं करत राहतात. त्यांना मायेच्या बंधनाच्या गुलामगीरीतुन मुक्त करून, अशांत अवस्थेतुन शांत अवस्थेकडे नेत, परमात्म्याकडे मार्गक्रमण करण्यास आपरूप साहय करत राहतात. त्यांना मुक्तता प्राप्त करून घेण्याकरीता योग्य त्या कर्मानुरूप त्यांना योग्य ते कर्मफल परमात्म्याकडुन मिळवुन देण्यास साहय होत राहतात. मग तो जीवात्मा स्थुल देहीच्या आत असो या बाहेर !

चतुर्पती परमात्म्यांच्या सैना ला विशेष ग्यान असते की : नित्य आनंदमय परमात्म्याप्रमाणे, त्याच्या प्रतेक अंशअवतार आत्म्यास सुखानंदाची गोडी असते. त्या गोडीप्राप्ती करीता त्याचा देह भरकटुन विषय वासना भोगलालचेत पडुन, त्यांच्यावर कलंकीत वेस्टने चढवत राहतो. त्यामुळेच त्यांच्या या वेस्टनांमध्ये विषय वासना सुखाने कलंकीत झालेली गोडीच भरून असते. त्याचमुळे तो जीवात्मा ईद्रियेभोगापासुन जरी दुर गेला, तरी त्याच्यी इंद्रिये विषय वासना बध्दलची गोडी सुटत नाही. परंतु त्याला जर उच्चत्तर अशी चतुर्पती हरीनाम रसाची गोडी चाखावयास दिली, या उच्चत्तर नाम गोडीच्या अनुभव त्यास आला, तर त्याला ईतर गोडी तुच्छ वाटायला लागुन हळुहळु त्याची विषय वासना भोगलालचा विषयवासना बध्दलची गोडीही सुटत जाते. आणी त्यामुळे तो चैतन्य प्राप्त करून स्थिर होत जातो. शांत होत जातो. ऐसे शांत पावलेले जीवात्मे जर हे परमात्मा च्या हरीनाम ज्योतीच्या संगतीन राहीले, तर ते जीवात्मे सुध्दा परमात्म्याच्या कार्याला सहयोग सहकार्य देत सुखानंदाची प्राप्ती करून सुखानंदाने राहतात. आणी तो गोळा धिराईने निश्कलंकी कडे वाटचाल करू लागतो. त्यांची निश्कलंकी कडे वाटचाल सुरू झाल्यानंतर, ते त्याला आपल्या मुळस्वरूपाचे मुळघरचे अहीनाघरचे निरंजन ग्यान चा पुरवा देत देत, एक एक पायरी चढण्यास ईहलोकात या परलोकात साहयं करत राहतात.

असेच साहयं करण्याकरीता चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाचे प्रवर्तक पुर्ण अवतार श्री कृष्ण नाथ यांनी, सर्वप्रथम सुरूवात ईहलोकी सह परलोकी

चतुर्पती अथर्वन् वेदाचे सैन्य तयार करून ठेवलेली आहे. चतुर्पता अथर्वन् वेद सैना तयार करत आहे. करत राहणार आहे. ही चतुर्पता अथर्वन् वेदाचे ग्यान निर्गुण गादीवर बसवण्याकरीता, त्यांनी चतुर्पती कृष्ण अवधुत पंथात व्यवस्था करून ठेवलेली आहे. या व्यवस्थेचा आरंभ त्यांनी स्वतःपासुन करून, ते चतुर्पती कृष्ण अवधुत भजन मांडी व्दारे अजुनही करत आहे. पुढेही निरंतर करत राहणार आहे. या व्यवस्थेचे ग्यान थोडक्यात घेवु या !

कृष्णामृतं मधून आपणास ग्यान आलेले आहे की : कृष्णाच्या बाळ लीला काळातच कृष्णाने मायबाप ला माध्यम बनवुन विविध प्रकारच्या अनेक मांत्रिकगण, सिध्दगण..ईत्यादी ला भेटी दिल्यात. या भेटीत त्यां बाळ कृष्णाने एकही शब्द न बोलता गुलामगिरीच्या बंधनात असलेल्या कलंकीत जीवात्म्याची पाहणी केली. आणी त्यांच्या निर्गुण गादीवर चतुर्पता हरीनामाचे रोपन आपल्या तेजोबळाव्दारे करून दिले. त्यांना खतपाणी घातले. चतुर्पता ज्ञानाचे भोजन दिले. ज्ञानांमृत पाजले. ऐसे कृष्णाने सर्वप्रथम पाहणी केलेल्या त्या सर्व जीवात्म्यांच्या उच्चत्तर अश्या हरीनामाची गोडी लावली. या उच्चत्तर गोडी व्दारे त्यां कलकींत जीवात्म्यावरचे विषय वासना विकारांचे कोष तुटुन पडु लागले. कलंक निघाल्यामुळे त्यांना स्वस्वरूपाचे ग्यान होवु लागले. ते चतुर्पता अथर्वन् वेद च्या निरंजन ग्यानाव्दारे प्रकाशु लागलेत. त्यांच्या ज्ञान विज्ञान कोषात चतुर्पती नाम रसाच्या गोडीव्दारे चतुर्पती अथर्वन वेदाचे ज्ञानपिंडे कोरल्या जावुन तेथे त्यांचा संचय होवु लागला. या ज्ञान विज्ञान संचयाने त्यास आपले मुळघर मुळचा धनी पर्यत जाण्याचा चतुर्पता मार्ग जाणु लागलेत. आणी असे जाणते झालेले ते सर्व कलंका कडुन निश्कलंकी कडे जाणारे जीवात्मे आपल्या मुळघरच्या मुळ चतुर्पती धन्याच्या चरणी लीन होण्याकरीता मार्गक्रमण करू लागलेत. ऐसे त्या कृष्णाने ०९ लाख जीवात्म्याची पाहणी करून त्यांना चतुर्पती धनीदेवाच्या चरणी लावले. असे ओवीचे चरण गर्जुन सांगी करत आहे की :

॥ सैना नाही गणीता । किती मी सांगु सिध्दाशी ।
कृष्णाच्या पायाची आज्ञा । आधार भक्तीशी ॥ ०७/३३

सच्च्या भक्तीच्या आधाराने कृष्णाच्या पायाची आज्ञा घेवुन हा चरण सांगी सांगत आहे की : देहीच्या ०९ लाख चैतन्य ता-यात चतुर्पती नाम भिनवुन असलेल्या कृष्ण बाळाने, पिंडी ते ब्रम्हांडी या न्यायाने अंदाजे ०९ लाख तेजोगुणी अंशअवतार ची पाहणी करून, त्यांच्या निर्गुण गादीवर चतुर्पता अथर्वन् वेदाचे ग्यान पिंडे बसवुन देवुन, त्यांना निश्कलंकी बनवुन चतुर्पता अथर्वन् वेद च्या सैना मध्ये सामील करून घेत, त्या सर्वांना चतुर्पती धन्याच्या चरणी सेवेस लावले आहे. त्यानंतर सुध्दा त्यानी केलेल्या अनेक लिलांव्दारे इहलोकच्या तसेच परलोकच्या अनेक निश्कलंकी आत्म्यांच्या निर्गुण गादीवर चतुर्पता अथर्वन् वेद चे ग्यान पिंडे बसवुन देवुन अगणीत निर्गुण आत्मे यांना चतुर्पता अथर्वन् वेद च्या सैना मध्ये सामील केलेले आहेत. या सैनाची नाही हो गणीता ! कारण की : भैसाच्या यवगी मांडणी ची रंचनेत कृष्णाने आपल्या जाणत्या गणांला प्रेरणा देवुन, त्यांच्या मार्फत चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाच्या भजन मांडी गावोगावी स्थापुन, या भजन मांडी व्दारे चतुर्पता अथर्वन् वेद च्या सैना मध्ये भरती करून घेण्याचे कार्य निरंतर अखंडपणे सुरू ठेवण्याची पक्की व्यवस्था/रंचना आधीच करून ठेवलेली आहे. ती अशी :

कृष्ण काळापासुन आजपर्यत अंदाजे ४०० वर्षे या चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाच्या भजन मांडीव्दारे चतुर्पता अथर्वन् वेदाचे ओवीरूपी ग्यान पिंडे यांचे गायन सुरू आहे. अजुनही विदर्भ परीसरातील अमरावती, यवतमाळ, वर्धा, नागपुर, चंद्रपुर ईत्यादी जिल्हयाच्या खेडयापाडयात गावोगावी शहरी या

चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाच्या भजन मांडी चतुर्पता अथर्वन् वेदाचे गायन करत कार्यरत आहेत. या भजन मांडीची अंदाजे सरासरी गणीता करतो म्हटले तर कमीतकमी सरासरी काढुन प्रतेक जिल्हयात १०० चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाच्या मांडी कार्यरत आहे. असे फक्त विर्दभातील दहा जिल्हयापैकी सरासरीने ०५ जिल्हे जरी घेतले तरी सरासरी १०० भजन मांडी x ०५ जिल्हे असे एकुन ५०० चतुर्पता कृष्ण अवधुती भजन मांडी होतात.

या ५०० भजन मांडीने सरासरी प्रतेक वर्षि ०२ कलंकीत जीवात्म्याला सव्वा महीने चतुर्पता अथर्वन् वेद च्या गायनाव्दारे चतुर्पता नामज्योतीच्या सानीध्यात ठेवुन, आकाशमात मधील चतुर्पती अथर्वन् वेद सैना च्या साहयांने व त्यांच्या शकुनाव्दारे केलेल्या ओवी गायनाव्दारे चतुर्पता अथर्वन् वेदाचे ग्यान पिंडे चे रोपन, या वासना विकारी कलंकीत-जीवात्मा/लष्टान वर करून त्यांना शुध्दतेकडे नेत, उच्चत्तर अश्या चतुर्पती हरी नामाची गोडी लावलेली आहे. आणी त्यांच्याकडुन *“जिथे कुठे राहान तिथे कुणाचाही घात न करता, कुणालाही त्रास न देता, शांततेने चतुर्पता धनी देवाच्या हरीनामी राहील“*.... ईत्यादी वचने घेवुन, आकाशमात मध्ये त्यांना निश्कलंकी कडे जाणा-या मार्गात सोडुन दिलेले आहेत. कलंकी कडुन निश्कलंकी कडे जाणारे चतुर्पता हरीनामी असलेल्या या जीवात्म्यांला करोडोचे आयुष्य असल्यामुळे, ते अजुनही चतुर्पती हरीनामी राहुन आकाशमात मध्ये द्युतगणांची चतुर्पता अथर्वन् वेदाचे सैन्य बनुन, चतुर्पता हरीनामाचे रसपान प्राशन करत विचरण करत राहत आहेत.

यांची सरासरी अंदाजे गणीता जर करतो म्हटले तर १०० भजन मांडी प्रतीजील्हा x ०५ जिल्हे x ४०० वर्षे असे सरासरीतुन कमीतकमी सरासरी काढत एकुन ४००००० चार लाख जीवात्मे च्या निगुर्ण गादीवर चतुर्पता भजन मांडीव्दारे चतुर्पता अथर्वन् वेदाचे ज्ञानपिंडे रोपन करून, त्यांनी चतुर्पती हरीनामा ची उच्चत्तर गोडी लावुन, आकाशमात मध्ये सोडलेले आहेत. हे कलंकी कडुन निश्कलंकी कडे गेलेले हे सर्व ०४ लाख पेक्षा जास्त जीवात्मे आकाशमात मध्ये चतुर्पता अथर्वन् वेद चे सैन्य बनुन विचरण करत आहेत. त्यासोबतच कृष्णकाळी कृष्णाने ०९ लाख पेक्षा जास्त, आणी कृष्णा संगच्या जाणतेगणांने ०४ लाख पेक्षा जास्त असे ०४लाख + ०९लाख + ०४लाख असे एकुन १७लाख पेक्षा जास्त संख्या असलेली चतुर्पता अथर्वन् वेदाची राज सैना आकाशमात मध्ये, या चारशे वर्षाच्या कालावधीत उभी झालेली आहे. आणी पुढेही निरंतर यांची संख्या चतुर्पता कृष्ण अवधुत पंथाच्या मांडी व्दारे, पंथाच्या गुढं व्यवस्थेव्दारे चतुर्पतीचे जाणते द्युतगण वाढवतच नेणार आहे. वाढतच राहणार आहे. या भैस राज सैनाची गणीता नाही राहणार ! किती सांगु सिध्दाशी ?

ही अगणीत चतुर्पता अथर्वन् वेदांची सैना कृष्णाने मांडणी केलल्या शिस्तबध्द कार्यप्रणालीनुरूप शिष्टाई करत, ही भैस राज सैना अनेक संच्च्या जनांस साहयं करत आहेत. सच्च्यांच्या खांदयावरचे तिरगुणांचे पदर काढुन टाकत, त्यांचा तिरगुण बंध तोडत त्यांच्या देहीवरचे तिरगुणांचे ठाणे रिकामे करत, त्यामध्ये तिरगुणांच्या पलीकडचे चतुर्पता ग्यान-भक्ती चे ज्योता भरत आहेत. चतुर्पती हरीनामाच्या ज्योतीमध्ये ठेवुन त्यांना तिरगुणांच्या पलीकडे जाण्यास साहयं करत आहे. चतुर्पतीचे निरंजन व गुढं असे ग्यान पिंडे त्या सच्च्यांना देत आहेत. चतुर्पतीचे सत् अनुभव देत आहेत. देही प्रकाशीत करण्यास साहयं करत आहेत. सच्च्यांचे सुरक्षा रक्षक बनुन, त्यांचे रक्षण करत आहेत. मोठे मोठे संकष्टे-आरीष्टे, रोग-विघ्ने यातुन संच्च्यांचा बचाव करत आहेत. सच्च्यांचे जीवनमार्गातील रोग-विघ्ने, संकष्टे-आरीष्टे, घात-पात, दुःख-दर्द

ची तिव्रता चे तेज कमी करत अथवा बहु दुर ढकलत त्यां त्या सच्च्यांचा जीवनमार्ग सुकर व सुलभ बनवण्यास साह्य होत आहेत....आणीक बहुत काही कारणास्तव चतुर्पती चे शिस्तबध्द कार्य सह, कृष्णाने दिलेली शिष्टाई करत चतुर्पती च्या सिदाई च्या मार्गाने पुढे येणा-या भैसराज च्या सत् यवगाचे मांडणी चे कार्य ही सैना द्युतगणांच्या संगतीन करत आहेत. ऐश्या या भैसाच्या सत्यवगाच्या मांडणीची खबर नाही कोणाशी !

॥ यवगी मांडणा । भैसाची.. । खबर नाही कोणाशी ॥
भैसाच्या यवगी मांडणा...चे ऐसे शकुन दिले आहेत की :
॥ त्रिकुटांचे बंध तोड्न तिरगुणांचे ठाणे मोडण ।
तिनदेव सह शेष पाताळी, इंद्र स्वर्गिचा, चतुर्पतीच्या शरणागत येतीन
यम येवुन बसतीन, मानवाच्या चतुर्पती सभेत ।
यम ईवान दुत, करतीन हवालदारी ईथं ।
नित कोर धान्य पिकन येथं ॥

## ॥ चतुर्पती कृष्ण अवधुत भजन मांडीव्दारे भजन करण्याचा साचा ॥

- सर्वप्रथम निरंजन ज्योत प्रज्वलीत केल्या जाते.
- प्रज्वलीत निरंजन ज्योतीसमोर विडे मांडल्या जातात. हे विडे मांडण्याकरीता नागवेलीचे म्हणजेच खाण्याचे पान सरळ ठेवल्या जाते. आणी त्या पानांवर किंचित चुना लावुन त्यामध्ये थोडी साखर व सुपारी आणी अंगारा/गल्ला टाकल्या जातो. अश्या रितीने हा विडा पृथ्वीतत्वाचे पान, तेज तत्वाचा चुना, जलतत्वांची साखर, वायुतत्वांची सुपारी आणी आकाशतत्वांचा अंगारा असे पाचतत्वे मिळुन हा भावाचा विडा निरंजन ज्योती समोर मांडल्या जातो.
- तद्नंतर उद्बत्ती लावुन प्रथम ढोलक-भांडे यांना अक्षद लावुन भजनीगणांना अक्षद लावल्या जाते. त्यानंतर भजन म्हणणे सुरु करतांना कापुर लावतात.
- कापुर लावल्यावर सर्वप्रथम सुमरन-०१/०१/०० म्हटल्या जाते.
- सुमरन नंतर अष्टगणांपैकी कोणताही एक गण म्हटल्या जातो.
- गण म्हटल्यानंतर गणावर सहसा विनवनी ची ओवी म्हटल्या जाते.
- गणावरची ओवी नंतर आपआपल्या पाठातील भजन ओव्या भजनीगण म्हणतात.
- भजन वाढण्याच्या अगोदर अर्ज-१०/०१/-- म्हटल्या जाते.
- अर्ज म्हटल्यानंतर कापुर प्रज्वलीत करुन आरती-१०/०२/-- म्हटली जाते. कापुर कमी असेल तर आरतीच्या वाढत्या चरणावर कापुर लावल्या जाते.
- आरती झाल्यानंतर साखर-पोहे चा प्रसाद वाटल्या जाते. काहीकाही मांडीत आरतीवरचे प्रसादपद म्हणुन प्रसाद ग्रहन केल्या जातो. भजन वाढल्यानंतर निरंजन ज्योतीसमोरील विडे ईच्छुक भावीकांना खाण्यास दिले जातात.



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ११ ॥
॥ परिशिष्ट ०३ ॥
॥ चतुर्पती कृष्ण अवधुत पंथाचे पाळणुका, नेम उद्देश ॥ व
॥ आध्यात्मीक सुक्ष्मनियमांचे ग्यान पिंड ॥

# ॥ चतुर्पती नेम व उद्देश ॥

- **भजनात बोडखे बसु नये. तसेच राउळात बोडखे जावुन दर्शन घेवु नये.**

आध्यात्मीक विश्वाचे कारण असे आहे की : बुध्दि ला सुर्याची उपमा दिलेली आहे. देहीअंतर्गत सुर्य आपल्या बारा कला सिध्दि ची वृध्दि करत त्यांना प्रकाशीत करत राहतो. सुर्याच्या बारा कलासिध्दी चे ग्यान *द्युताचे मोती-०२/०६* या ओवीच्या निरसनातुन घ्यावे. तसेच कायाज्ञान खंडातुन आपणास ज्ञान आलेले आहे की : दसवी खिडकी असलेले सहस्त्रागार वरील टाळु स्थान हे देहीअंतर्गत सुर्याच्या प्रकाशाने ज्ञानवृध्दी, मेधा शक्ती व सिध्दियॉं....ईत्यादी अंग चे संचालन करत, त्याची वृध्दि करत राहते.

भजनात असतांना अथवा राउळात जातांना, कृष्ण निरंजन ज्योतीच्या सभोताल असलेले सत् प्रभावयुक्त वातावरण भक्ता अंतर्गत प्रवेशी होते. त्या सत् प्रभावाच्या वातावरणात रमलेल्या सत् भक्तांच्या सत् मनभाव भक्ती युक्त लावलेल्या नाम ज्योतीच्या प्रकाशाने, हा देहीअंतर्गत सुर्य अधिकाअधीक प्रखर होत असतो. ऐसा देहीअंर्तगत प्रखर झालेला सुर्य प्रकाश, हा बुध्दि ला प्रखर करून ज्ञानवृध्दि करत, तिचे मेधा बुध्दित परिवर्तन करण्यास साहय होत असतो. तसेच आरा वृध्दि करून अंग संचलन करत, शरीर निरोगी ठेवण्यास हा प्रखर सुर्यप्रकाश साहय होत असतो. ऐसा भजन व दर्शन कालावधीत प्रखर झालेल्या सुर्याचा प्रकाश, हा दहाव्या खिडकीतुन बाहेर जावुन तिचा -हास होवु नये. त्या प्रकाशाचा पुरेपुर लाभ व्हावा. म्हणुन टाळु हा बोडखा नसावा. डोक्याच्या शिखास्थानावर टोपी, अथवा पगडी, शेला रूमाल पदर, ओढणी.. ईत्यादी कापडी वस्तु ठेवुन, टाळु झाकुनच भक्तांनी भजनात अथवा राउळात जावे. कृष्ण अवधुती भजनात भक्तांच्या बौध्दिक विकास, ज्ञानवृध्दी, मेधामती शक्ती विकास, आरा विकासाव्दारे निरोगीत्व..ईत्यादी बहु कारणा करीता, हा नेम चतुर्पती च्या कृष्णकालीन जाणत्यांनी घालुन दिलेले आहे.

- **दर बुधवारी भजन करने.**

आध्यात्मीक कारणे असे आहेत की :

नरदेही ही पाण्याची आहे. या नरदेहीत ७० प्रतिशत पाणी असते. हे पाणी देहीच्या प्रतेक कोशीकात विराजमान असते. देहीच्या प्रतेक कोशीकातुन हे पाणी काढण्यास आजचे विज्ञान यशस्वी झाले, तर पुर्ण वाढं झालेल्या ७० किलो वजनाच्या सुदृढ देहीतुन हे पाणी ५० लिटर पर्यत निघु शकते. म्हणुनच याला पाण्याची नरदेही असे आध्यात्मीक विश्वात म्हटलेले आहे. चतुर्पती कृष्ण अवधुत भजनाच्या पंचतत्व गायन कला व्दारे निर्मित, अनाहत् धुम्मधुम्मकार नाद लहरी चा प्रभाव, या देहीच्या पाण्यावर पडुन या अनाहत् नाद लहरी अंतर्गत प्रवेशी होवुन, प्रतेक कोशीकामध्ये जलतरंगे उठवत राहतात. त्यामुळे त्या कोषीका उत्तेजीत होवुन, देहीचा शिण भाग हरवुन, देहीला हर्षआनंद स्फुर्ति तरतरी उल्हास.. ईत्यादीचे तत्वांचे देणं देत, देहीला तणावमुक्त करत राहतात.

जास्त काळ टिकणारा तणाव हा शरीरातील रोगप्रतिकारक शक्ती व श्वेतरक्तकण ची कार्य शक्ती, हद्याची कार्य शक्ती ईत्यादी देहीच्या विविध शक्तियॉं वर विपरीत परिणाम टाकत, देहीच्या शक्तीयॉं बाधीत करत राहते.

या जास्त काळ टिकणा-या तणाव व्दारे निर्मित रसायन, एनोरपाईनफ्रिन हार्मोण हे देहीअंतर्गत पुरक रसायन, रक्षण करणारे रसायण..ईत्यादी बायोकेमिकल वर प्रभाव टाकुन, ते देहीचे पुरक-रक्षक रसायन बनवणे कमी करत राहते. त्यामुळे मस्तिकाच्या पेशीला पुरत अन्न मिळत नाही. अन्नाच्या कमतरतेमुळे मस्तक बम्हांडाच्या पेशी चे तेज बल कमी होत राहते. मस्तक ब्रम्हांडाच्या पेशी तेजोमय बलशाही राहत नाही. कमजोर आरा असलेल्या पेशीं चा प्रभाव संपुर्ण कायेवर पडुन काया कमजोर होते. कायेचा आरा तेजोमय बलशाही राहत नाही. देहीच्या या कमजोर झालेल्या आरा च्या अंतर्गत, मग बाहेरील रोग शक्तियॉं घुसुन देहीत प्रवेश घेतात. देहीच्या अंतर्गत प्रवेश घेतलेल्या बाहेरील शक्तीयॉं मग या देहीला आपले घर बनवण्याचा प्रयत्न करत, देहीला रोगग्रस्त, दोषमय बनवुन कमजोर करत राहतात.

देहीचा आरा हा चतुर्पती भजनाव्दारे उठलेल्या अनाहत् लहरी व्दारे वाढवुन, ऐश्या या बाहेरील बाधक शत्रु शक्तीयॉं ला कमजोर करून, त्यांचा वार या देहीवर येवु न देण्याकरीता, चतुर्पती च्या कृष्णकालीन जाणत्यांनी दर कृष्णाच्या बुधवारी भजन ठेवण्याची मांडणी केलेली आहे.

- **दर अमावश्या, पोर्णिमा, सण..ईत्यादी विशिष्ट तिथीवर भजन करने.**

आध्यात्मीक कारण असे आहे की : पोर्णिमा, अमावश्या दिवशी चद्र सुर्य व पृथ्वी एका रेषेत असतात. तर अष्टमी व ईतर काही संण ईत्यादी विशिष्ट दिवशी विशिष्ट कोण करून असतात. चंद्र सुर्य व पृथ्वी च्या एकरेखीय दिवशी गुरूत्वाकर्षन शक्ती व ईतर वैश्विक शक्तीयॉं यांच्या व्दारे, चंद्र सुर्य व पृथ्वी मधील परस्पर आकर्षन अन्य दिवसाच्या तुलनेने अधिक असते. चंद्र-सुर्य व पृथ्वी च्या गुरूत्वाकर्षन शक्ती व ईतर शक्तीयॉं यांच्यामध्ये संघर्षन होत राहते. या विशिष्ट दिवशी वैश्विक शक्तियॉंचा वर्षाव अधिक होत असतो. या वर्षाव व संघर्षना च्या प्रभावामुळे पृथ्वीवरच्या समुद्राच्या जलात ज्याप्रमाणे समयानुरूप भरती ओहटी ची प्रकीया होत राहते, त्याचप्रमाणे मनुष्य देही ही सुध्दा पाण्याची असल्यामुळे त्यांच्यावर सुध्दा या वैश्विक शक्तीयॉं चा वर्षाव व संघर्षनाचा प्रभाव पडुन, देहीच्या आतमध्ये सुध्दा समयानुरूप भरती आहोटी प्रमाणे प्रक्रिया होत राहते.

पुनवा च्या वैश्विक शक्तीयॉं च्या प्रभावाने देहीला उत्तेजना स्फुर्ति देणा-या तत्वांचा वर्षाव होत राहतो. देहीची उत्तेजना, रक्तसंचार, रक्तचाप व ईतर शक्तियॉं हया सामान्य दिवसाप्रमाणे न राहता, थोडाबहुत प्रखर होत राहत असतो. तर अवसा-अमावश्येच्या वैश्विक शक्तीयॉं च्या प्रभावाने मनप्रधान चंद्र लोपल्या जात असल्यामुळे, मनाचा लवकर लय होतो. त्यामुळे लवकरच मन लीन होते. शांती येते. एकाग्रता साधुन ध्यान लागते. चंद्रप्रकाश तत्वांचा लवलेशही नसलेला, संपुर्ण निश्कलंकी सुर्य प्रकाशाने प्रज्वलीत झालेल्या निश्कलंकी तत्व प्रकाश च्या निश्कलंकी शक्तियॉं प्राप्त होत राहते. आणीक बहु काही देणं प्रकृति माये कडुन प्राप्त होत राहत असते.

अश्या रितीने या विशिष्ट दिवशी प्रकृती मायेकडुन जे देण प्राप्त होत असते, ते सर्व देणं भगवंता चरणी अर्पित करण्यांकरीता, भजन पुंजन ध्यान सुमरन व्दारे लीन होवुन, त्या देणं चा लाभ प्राप्त होण्यासाठी, आणीक बहु कारणासाठी अमावश्या, पोर्णिमा, दर बुधवार व ईतर विशिष्ट सणं च्या विशिष्ट तिथी वर भजन मांडीत बसुन, भजन म्हणण्याची मांडणी कृष्णकालीन चतुर्पती च्या जाणत्या योग्यांनी केलेली आहे. ती अशी :

- **अमावश्येला जागृती सांगतली आहे. तर बिज तारीख हे नाम घेण्याचा पहीला दिवस मानुन नाम घेण्याची सुरूवात करण्यास सांगतली आहे.**

पंथाचे कारण असे आहे की : या चतुर्पती कृष्ण अवधुत पंथात कृष्णाला सुर्य ची उपमा दिली आहे. तर हेंगडुजीला चंद्र ची उपमा दिलेली आहे. या कृष्ण अवधुत पंथाचे चंद्र-सुर्य हे दोघे होय. या चंद्र-सुर्याचा प्रकाश या पंथाच्या भुम्मेवर नित पडत राहतो. येथे कृष्णाचे सुर्य वंशाचे तर हेंगडुजीचे चंद्र वंशाचे असे चंद्र-सुर्य वंशाचे अवघे लोक, हे भजन पुंजन ध्यान सुमरणी लागलेले आहेत.

ब्रम्हांडात ज्या दिवशी सुर्य प्रकाशात चंद्रपकाशाचा लवलेश राहत नाही. सुर्य प्रकाश हा चंद्रप्रकाशाने बाधीत नसतो. सुर्य हा चंद्र प्रकाशाने कलंकीत न राहता तो सपुर्ण पणे निश्कलंकी असतो, त्या दिवसाला अमावश्या असे म्हणतात. तर पिंडी मध्ये बुध्दि चा प्रकाश हा जेव्हा मनाने बाधीत नसतो. बुध्दि चा प्रकाश हा मनाने कलंकीत न राहता, तो बुध्दिचा प्रकाश सपुर्ण पणे निश्कलंकी असतो, तेव्हाच्या त्या दिवसाला अमावश्या असे म्हणतात.

सुर्याच्या या निश्कलंकी दिवशी निश्कलंकी धन्याचे भजन पुजंन ध्यान सुमरन रात्रभर जागृत राहुन चंद्र सुर्य वंशीचे लोक करतात. या निश्कलंकी दिवसानंतर येणारा पहीला दिवस प्रतिपदा ला, निश्कलंकीचे मनभावाने पुजन करून दर्शन घेतात. आणी बिज तारखेपासुन त्या बिजाकारी निश्कलंकी धन्याचे बिज नाम घेण्याची सुरूवात करून, पुढील निश्कलंकी दिवस येईपर्यत नाम सुमरणी राहतात. कारण की : याच निश्कलंकी दिवशी भैसराज धनी येणार । तो सत् यवगाची ध्वजा फडकवणार । भैसाचं राज येणार.. अशी सांगी केलेली आहे.

म्हणुनच या पंथात अमावश्येला संपुर्ण रात्रभर जागृति भजन करून, उरल्या अमावश्येला म्हणजेच, ज्या वेळेला अमावश्या संपते आणी प्रतिपदा लागते, तेव्हाच्या संधीकाळात सुर्य वंशीय धन्याची उटी करतात. तर चंद्र वंशीय हे या संधि ला अवसर म्हणजेच संधी मानुन, अवसर पुंजन करून चंद्राच्या बिज तारीख हे नाम घेण्याचा पहीला दिवस मानुन, बिजाकारी ची बिज नाम ज्योत प्रज्वलीत करून नाम घेण्याची सुरूवात करतात. ऐसे हे चंद्र-सुर्य वंशाचे अवघे लोक निश्कलंकी दिवस ते पुढील निश्कलंकी दिवस येईपर्यत अखंड नाम सुमरनी राहतात.

- **आपले नियत कर्तव्य कर्मे करत, भजने व ओव्या सुमरन करत नित नाम ज्योतीत राहत भजन पुंजन ध्यान ग्यान-भक्ती करत राहने.**

ज्ञान-भक्ती व चौरगी वाणीच्या ओवी मांडणीचे उद्देश ग्यान असे आहेत की :- भावना हद्यातुन उठत असते. हद्य हे भावनेचे केंद्र आहे. मनोभाव चा हद्याशी संबध असतो. म्हणुनच विचार व भावना सकारात्मक भावपुर्ण असल्यास हद्य प्रणाली उत्तमरित्या काम करते. तसेच मस्तकातील मेंदुचा डावा अर्धगोलाचे कार्य प्रणाली हे तर्कशुध्द विचार करने, पृथ्थकरण करने, योग्ययोग्यता तपासने, सारासार विचार करने, आसारातुन सार काढणे.. ईत्यादी कार्य करत असते. तर मेंदुच्या उजव्या अर्धगोल हा भावना, अंर्तस्फुर्ति, प्रेम, भक्ती, भाव, ध्यास, ध्यान, धारणा ..ईत्यादी अध्यात्म चे कार्य करत असते.

भावीक भक्तयोगी मध्ये भावना उंचबळुन येत भक्ती भाव हा वर्चस्व श्रेष्ठ होत असल्यामुळे त्याचे हद्यप्रणाली व मस्तकी मेदुंचा फक्त उजवा अर्धगोल हे दोन प्रणाली सुदृढ होत मजबुत राहतात. तर ध्यान योग्यात ध्यान

चे वर्चस्व श्रेष्ठ होत असल्यामुळे त्यांची मस्तीक प्रणाली ही सुदृढ होत श्रेष्ठ होत असते. म्हणुनच असे म्हटल्या गेले आहे की :

भक्ती योग्याची हृद्यकेंद्र प्रणाली ही बलवान व मजबुत राहुन त्यांचे मस्तककेंद्र प्रणाली ही कमजोर राहत असते. तर ध्यान योग्याची मस्तककेंद्र प्रणाली ही बलवान व मजबुत राहुन त्यांचे हृद्यकेंद्र प्रणाली ही कमजोर राहत असते. हृद्यकेंद्र व मस्तिक केंद्र हया दोन्ही केद्रापैकी फक्त एक प्रणाली भक्ती योगी किंवा ध्यान योगी मध्ये बलवान असते. तर दुसरी प्रणाली कमजोर असते.

हृद्यकेद्र व मस्तककेद्र या दोन्ही केद्र प्रणाली भक्ती अथवा ध्यान योग्यांमध्ये बलवान नसते. म्हणुनच हे दोन्ही केद्र प्रणाली बलवान व शक्तीशाली बनवण्याकरीता, कृष्णाजी ने ज्ञान-भक्ती सांगतलेली आहे. आणी त्यांच्या सांगीनुरूप चतुर्पती कृष्ण अवधुत पंथांच्या कृष्णकालीन जाणत्यांनी ओवी मध्ये ज्ञान-भक्ती चे चरणे असलेल्या ओव्या रंचना करून, ज्ञान-भक्ती ची मांडणी एकाएका ओवीत केलेली आहे. म्हणुनच कृष्ण अवधुती भजन ओवी मध्ये कुठेकुठे भक्तीभाव निर्माण करणारे व त्यासोबतच कुठेकुठे ज्ञान देणारे चरणे ओवीत टाकलेले आहेत. फक्त भक्तीभाव निर्माण करणारे चरणे कोणत्याही कृष्णकालीन जाणत्यांनी एकाच ओवीत टाकलेले नाही. किंवा फक्त ज्ञान सांगणारे चरणे कोणत्याही कृष्णकालीन जाणत्यांनी एकाच ओवीत टाकलेले नाही. बहुतेक मुळावरच्या ओवीत ज्ञान देणा-या चरणांसोबतच भक्ती भाव निर्माण करणारे चरणे टाकुन, ज्ञान-भक्ती उत्पन्न करणा-या ओव्यांची मांडना कृष्णकालीन जाणत्यांनी रंचलेली आहेत. याव्दारे जाणत्यांनी भजनी गडयांना त्यांच्या नकळत भक्तीयोग सह सहज ध्यानयोग दिलेला आहे. आदीपुरूष चतुर्पती चे भजन पुंजन ध्यान सुमरन गायन करत त्याला भक्तीभावव्दारे कसे ओवाळाचे ? कसे विनवावे ? ग्यानाने कसे शोधुन शोधुन पकडावयाचे ?..ईत्यादी बहु कारणांकरीता ग्यान-भक्ती दिलेली आहे. कृष्णा च्या सांगीव्दारे चतुर्पतीच्या जाणत्यांनी, ही ज्ञान-भक्ती भक्तजनांना देण्याचे बहुकारणापैकी एक कारण असे आहे की :

कृष्णकालीन चतुर्पती च्या जाणत्यांनी ओवी व्दारे फक्त प्रेम भक्ती भाव.. ईत्यादी ची अंतर्स्फुर्ति दिली असती, तर भक्तयोग्यांी हृद्य केंद्र प्रणाली व मेदुंचा फक्त उजवा भाग बलवान व सशक्त राहीला असता. परंतु मेंदुचा डावा अर्धगोल त्यामानाने अशक्त राहु शकतो. म्हणुनच त्यांनी मेदुंचे दोन्ही भागाचे संतुलन राखण्यासाठी, त्यांनी ओवीत चतुर्पती ज्ञान सह भक्ती भाव दिलेला आहे. त्याव्दारे ओवीच्या चरणांनुसार अर्थ लावुन त्यांचे पृथ्थकरन करने, चार चार अर्थाचे शब्द व क्लिष्ट शब्दां चा चौरंगी अर्थापैकी, त्या त्या चरणात काणकोणते अर्थ लागु पडते ? याचा तर्कशुध्द विचार करने, ओवीच्या चरणांचा उतार, घटनाकम, व ओवी चरणांतील पुढील चरण उघण्याकरीता टाकलेली किल्ली ध्यानात आणणे, तसेच ओवीत पुसते-सांगते चरण जोडया म्हणजेच प्रथम चरणात प्रश्न चा उद्भव करून, नंतरच्या चरणात त्याचे उत्तर सांगने. किंवा नुसते सांगते चरणे किंवा आसार सांगुन सार सांगणारे चरणे, विनवणीचे चरणे, इत्यादी चरणांच्या टुकाची पारख करणारी पारखी दृष्टी चा विकास करने, सुक्ष्म मन मती भाव विकास..ईत्यादी अनेक गुढं गोष्टी ओवीच्या रंचनेत सम्मावुन, त्यांची मांडणी केलेली आहे.

अश्या प्रकारच्या ओव्याच्या मांडणी व्दारे भजनी च्या मेदुला सतत कार्यरत् ठेवुन, भजनी भक्तांच्या मेदुचा डावा भागही कार्यरत् होवुन, तो सशक्त व बलवान होतो. या कृष्णकालीन ओव्यांच्या मांडणी व्दारे भजन

भक्तांची हद्‌य केंद्र प्रणाली सह मेदुचे डावा-उजवा असे दोन्ही भाग नामी राहील्याने, सशक्त व बलवान होत राहील. याची काळजी घेतलेली आहे. हद्‌यकेंद्र प्रणाली तसेच मस्तीकाच्या उजवी व डावी असे दोन्ही केंद्र प्रणाली अश्या तिनही केंद्र प्रणाली भजनी भक्तात संतुलीत, समतोल व सशक्त बलवान मजबुत ठेवणे..ईत्यादी बहु कारणांकरीता कृष्णाजीच्या सांगीवर आधारीत ज्ञान व भक्ती भाव यांचा संगम असलेल्या, ज्ञान-भक्ती देणा-या ओव्या कृष्णकालीन जाणत्यांनी बहु कारणा करीता रंचलेल्या आहेत.

या बहु कारणांपैकी एक कारण असेही आहे की : भजन ओवी सुमरन गायनाव्दारे भजन भक्तांना भक्तीयोग, ध्यानयोग यासह निर्गुण निराळे सहज ध्यान त्यांच्या नकळत त्यांना प्राप्त होते. ते अश्याप्रकारे :

भजनी भक्तांचे मन ईतर कुठेही न भटकता स्मृतितील चरणे स्मरण करण्याच्या कामी एकाग्रतेने लागते. वारंवार अश्याच प्रकारच्या स्मृतितील ओवी च्या चरणांच्या स्मरणाव्दारे, त्याला मन एकाग्र करण्याची सवय आपोआप लागत जाते. त्यांच्या एकाग्र मनाने त्यांच्या स्मृतितील चरणे बाहेर काढुन दिल्यानंतर, तो जेव्हा ते चरणे भजनात पंचतत्व चालीव्दारे गावतो, तेव्हा त्याच्या पंचतत्व गायन कला व्दारे, तिथे अनाहत् नाद उत्पन्न होवुन त्याच्या अंतर्गत प्रवेशी होतो. आणी त्याचे मन हे त्या अनाहत् नादब्रम्हात लीन होत जाते. जसे जसे भजन कालावधी वाढत जाते, तसे तसे ही मनाची लिनता हळुहळु वाढत जावुन, तो ध्यानावस्थेपर्यत जावुन, तो जागी राहुन त्याच्या नकळत ध्यानावस्थेत भजने गायन करु लागतो. तो देहभान विसरून भजनात तल्लीन होवुन, तासोन्‌तास बसुन भजन गायन करत राहतो. हेच सहज ध्यान योग होय.

ध्यान म्हणजे काय ? **'योगश्चःचित्तवृत्तीःनिरोधः'** मनाच्या चित्त वृत्ति चा निरोध करने म्हणजे ध्यान योग होय. भजनी त्या गायन अवस्थेत त्यांच्या मनाचा चित्त वृत्तिचा निरोध त्याच्या नकळत काहीही प्रयत्न न करता करत असल्यामुळे, त्या भजनी कडुन सहजतेने आपोआप ध्यानयोग साधल्या जातो. देह भान विसरून त्या भजन योग्याने आपल्या मनाला एकाग्र करून, नादब्रम्हात लीन करून आपला मनोभाव धन्याचरणी अर्पण केला असल्याकारणाने, हे त्याचे मानसिक ध्यान होवुन, तो निर्गुण उपासक आपरुप होत तो निगुर्ण निराळे ध्यानावस्थेत जातो.

आणी तो भजन योगी भाव भक्तीव्दारे शरीरातील चैतन्य भगवंतावर केंद्रित करतो. आपले चित्तातील मन भाव वृत्तीयॉं यांना भगवंताला अर्पण करतो. चित्तातील सर्व वृत्तियॉं चा निरोध सहजच त्याच्या नकळत होत राहतो. अश्या रितीने तो **'योगश्चःसर्वचित्तवृत्तीःनिरोधमः'** करत भगवंताच्या नामज्योतीवर केंद्रित होतो. ऐसा तो ज्ञान-भक्तीने ध्यान योगी व भक्ती योगी होवुन खरा सच्चा योगी होतो. त्या सच्च्याला चतुर्पतीचे योगग्यान येवुन, त्या योगग्यानव्दारे तो योगसृष्टीत प्रवेश करतो.

ऐसा सच्चा योगी होण्याकरीता तो कृष्ण अवधुती भजनी कृष्णकृपेने सत् संस्कार टाकत, सत्‌संस्काराच्या अधिक्याने तिरगुणांच्या पलीकडे जावुन, विलक्षण आत्मसयंम व चतुर्पती ज्ञानाव्दारे झालेली शंक आचार विचार व निर्मळ उच्च संस्कारीत बुध्दि चे गुण प्राप्त झालेल्या उच्चत्तर अश्या बुध्दिव्दारे, तिच्या खालच्या स्तरावर असलेल्या मनाचे संयमन करतो. मनातील विचार.. ईत्यादी ला आवरून मन त्याच्या चंचल व अस्थीर स्वभावामुळे, जिथे कुठे भटकत असेल, तिथुन खिचुन आणुन त्या मनावर संयम करून भजनात येतो.

आणी मग भजनात ते मन भगवंतावर एकाग्र करून, भगवंता चरणी मनाला लिन करत भगवंताच्या ठायी स्थिर होतो.

अश्या रितीने तो भजन योगी क्षुब्ध व उत्तेजीत मनाच्या सर्व शक्तीयॉं, हया शरीर व बुध्दि कर्मा व्दारे बाहेर पडु न देता, त्यां शक्तियॉंना एकवटुन त्यात भक्ती भाव संचरीत ठेवुन, एकाच कृष्ण परमात्म्यावर केन्द्रीत करतात. या केंन्द्रीत अवस्थेत जो शब्दउच्चार, पंचतत्व गायनाव्दारे निघालेले उच्चार, हे मंत्राचे रूप घेवुन, ते उच्चारलेली शब्दरंचना चे सिदाई चे वाक्ये सिध्द होतात.

कृष्ण परमात्मा ठाई मनो भाव अर्पण करत, चित्तात स्थिरता आणत, कृष्ण अवधुत भजन व त्यांचे मानसिक पुंजन करून, त्या कृष्णाच ठाई बुध्दि नियुक्त करून सच्ची भक्ती करत राहणे. यालाच भक्ती योग म्हणतात.

अश्या रितीने भक्तीयोग, ध्यानयोग, सहज असे निराळे निर्गुण ध्यान योगाने युक्त झालेला कृष्ण अवधुती भजनी हा जिथे कुठे असतो, तिथे तो एकटा नसतो. त्याच्या संग नित नामज्योत तेवत असते. आणी या नामज्योतीत खेळणारा भैस चा संचार त्याच्या सर्व बाजुने राहत असतो. सच्चा कृष्ण अवधुती भजनी कोणतेही काम करत असतांना, त्याच्या मुक्षी नाम व अंतर्गत सदैव नामज्योत जागृत असते. त्याच्या कामातुन त्याला जेव्हा केव्हा वेळ मिळेल, तेव्हा त्या विसावाच्या वेळी मुखी नाम येवुन, त्याच्या मन अंतर्गत कृष्ण अवधुत ओव्याचे स्मरण चिंतंन मनन व गायन करत राहतो. या व्दारे त्याला त्या समयाला सुख आनंद ची प्राप्ती आपरूप होत त्याचा शिणभाग हर्रल्या जात असतो. त्याच्या या महान कार्याव्दारे त्या जिवात्म्यास इंद्रिये, मन, बुध्दि यापासुन निवृत्त होवुन प्रेमभक्ती भाव युक्त हरीनामाची उच्चत्तर गोडी लागुन, तो नित परमात्म्याच्या सानीध्यात राहण्या करीता, जेव्हा केव्हा वेळ मिळेल, तेव्हा तो जीवात्मा नित प्रयत्न करत राहतो. परमात्म्याशी सानीध्य साधत राहतो. तो अव्यक्त अवस्थेत भगवंत भक्ती युक्त नामज्योतीचा प्रकाश यांचे सानीध्यात राहण्याची ईच्छा व भावना त्यांच्या अंतर्मनात सदैव जागृत ठेवतो.

अश्या रितीने तो कृष्ण अवधुत भजन योगी आपल्या जिवात्म्यास नित परमात्म्याच्या सानीध्यात ठेवुन, त्या जिवात्म्यास स्वतःच्या स्वस्वरूपाचा विसर न पाडता, त्याला विस्मृतीत जावु न देता, त्याला हरीनामी जागृत ठेवुन, परमात्म्या शी एकरूप होण्यास प्रयत्नरत् असतो. ऐसा तो जीवात्मा कृष्णाच्या शिकवणीतुन पाटी पुस्तक न घेता शिक्षण घेत, ज्ञान-भक्ती चे देणं प्राप्त करतो. सत् चित्त करून चिन्मय हर्ष प्रेम आनंदाच्या भरात सत्तचिद्‌नंद परमात्मा कृपेने शाश्वत जीवन जगत राहतो.

ज्या क्षणी जीवात्म्याचा भाव हा परमात्म्याशी एकरूप होतो, तेव्हा तिथे मायेचे काहीही चालत नाही. तो क्षण ईंद्रिये तृप्तीकारक मायेच्या भ्रांतीचा शेवटचा क्षण होयं. मायेच्या या शेवटच्या क्षणी तो जीवत्मा अंतीम सत्याच्या धारा खाली आलेला असतो. त्याच्या अंतीम सत्याचा शोध परिपुर्ण होतो.



॥ कृष्ण महाराज धनी अवधुत ॥

॥ खंड ११ ॥

॥ परिशिष्ट ०४ ॥

भजनी-गणांनी अनुभवलेल्या...

# ।। प्राकृतिक औषधियाँ ।।

सामाजीक, शारीरीक आणी मानसिक रित्या पुर्णपणे सदृढ असण्याची उत्तम स्थिती म्हणजे संपुर्ण निरोगत्व होय. हे संपुर्ण निरोगत्व प्राप्त करण्यासाठी :

- सामाजीक आरोग्य प्राप्ती करीता धर्म चे साहय घ्यावे लागते.
- शारीरिक आरोग्यासाठी आध्यात्मात योगशास्त्र चे ग्यान आहे. तर
- शांतता तणावमुक्ती ईत्यादी मानशिक व जैविक कार्यामध्ये अडथळा आणणारी स्थिती उत्पन्न करणारे मानसिक रोग, अस्वस्थ करणारे शरीरातील अवेळी अचानक झालेले बदल करणारे रोग विघ्ने संकष्टे यांना दुर करून शारीरीक व मानसिक आरोग्य प्राप्त करण्याकरीता आध्यात्म सह त्याला साथ देणारे आयुर्वेद यांचे ग्यान, ऋषि मुनी आचार्य जुने लोक यांच्या अनुभवाव्दारे आलेले प्राकृतिक औषधियॉंचे पिढयान पिढयापासुन आलेले ग्यान चे साहय घ्यावे लागते. .

म्हणुनच येथे चतुर्पती कृष्ण अवधुती भजनी गडयांनी अनुभव घेवुन ते अनुभव संप्पन्न प्राकृतिक औषधियॉ चे ग्यान चतुर्पती भजनी गडयांच्या पुढील पिढीकरीता जतन करून ठेवत आहेत.

**त्रिफळा** :- १. हड २. बहेडा/बिहाडा ३. आवळा हे तिन फळे समभाग घेणे.

**त्रिकुटा** :- १. पिंपळ २. काळी मिर्च ३ सुंठ हे तिन समभाग कुट करणे.

**कोष्ठबध्द दुर करण्यासाठी रेचक** :-
त्रिफळा २ ते ३ मासे रात्री झोपतांना दुध अथवा पाण्यासोबत घेणे.

**कफ अथवा वातनाशक** :-
त्रिकुटा ३ ते ६ मासे रात्री झोपतांना दुध अथवा पाण्यासोबत घेणे.

**भजन,प्राणयम ध्यानादी कियां व्दारे उत्पन्न होणा-या खसखसी / खोकलासाठी** :-
विलायची दाने, जिरा, बदामची गीरी, मनुका खडीसाखर आवश्यकतेनुसार वाटुन त्याचे चाटन घेणे.

**खोकला** :-
१. चार ते पाच लवंग तव्यावर भाजुन घेणे व त्यात सुंठ, काळे मिरे टाकुन, त्यांची बारीक पावडर करून शुध्द गुळात मिसळावे व त्यात आवश्यकतेनुसार थोडे सहद टाकुन त्याच्या गोळया बनवाव्यात. या गोळया आवश्यकतेनुसार चोखाव्या. किंवा
२. दाळींबाचे दाणे खाणे व त्याचे छीलके जाळुन त्याची राख पाण्यासोबत घेणे. किंवा
३. उंबराच्या दुधाचे २-थेंब खाण्याच्या पानात म्हणजेच नागवेलीच्या पानात टाकुन ते पान सुर्योदयापुर्वि खाणे.

